


# भारतीय संस्कृतिकोश

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृतिमंडळ, यांच्या साहाय्याने प्रकाशित

## प्रथम खंड

अं ते औक्षण
आणि परिशिष्ट

संपादक

पं. महादेवशास्त्री जोशी,

सहसंपादक

तर्कतीर्थ सौ. पद्मजा होडारकर, एम्. ए.
श्री व. ग. सहस्रबुद्धे, बी. एस्सी.

भारतीय संस्कृतिकोश मंडळ

४१० शनिवार पेठ, पुणे ४११०३०

प्रकाशक :
पं. महादेवशास्त्री जोशी, कार्यवाह,
भारतीय संस्कृतिकोश मंडळ,
४१० शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०

मुखपृष्ठ :
श्री. सुधाकर खाजगीवाले

अंतर्गत सजावट :
श्री. दत्ता महाबळेश्वरकर
श्री. सुधाकर खाजगीवाले
श्री. गंगाधर ताटके

ठसे :
श्री. ब. शं. दाते,
कलाभुवन, पुणे ४११ ०३०

द्वितीयावृत्ती :
शके १९०३
इ. स. १९८२

मुद्रक :
नगिन बी. शहा
संगम प्रेस प्रा. लि.,
१७ कोथरुड, पुणे ४११ ०२९



या खंडाच्या मुद्रणासाठी वापरलेला कागद महाराष्ट्र राज्य शिक्षणखात्यातर्फे उपलब्ध झालेला व सवलतीच्या दरात मिळालेला आहे.








मूल्य दिडशे रुपये 150/-

# दुसऱ्या आवृत्तीच्या निमित्ताने

भारतीय संस्कृतिकोशाच्या प्रथमखंडाची सुधारित आवृत्ती ग्रंथप्रेमी वाचकांच्या हाती देताना आम्हाला होणारा आनंद असामान्य आहे. कारण एखाद्या मोठ्या ज्ञानकोशाला दुसऱ्या आवृत्तीचे भाग्य लाभणे, हे विशेष होय. महाराष्ट्रातल्या शिक्षण संस्था, ग्रंथालये, काही शासकीय संस्था आणि वृत्तपत्रे यांनी या कोशाला ग्राहक म्हणून उदार आश्रय दिला. त्याचप्रमाणे व्यक्तिशः शेकडो जिज्ञासूंनी आणि ग्रंथप्रेमी मंडळीनीही कोश विकत घेऊन आमच्या कार्याला हातभार लावला. विशेष म्हणजे प्रस्तुत कोश ज्या ज्या ठिकाणी गेला, तिथे तिथे तो कपाटाची शोभा न होता उपयोगात आणला गेला आणि आजही तसा तो वापरला जात आहे. कित्येक साक्षेपी शिक्षक, प्राध्यापक आणि वृत्तपत्रांचे संपादक यांनी प्रस्तुत कोश आपल्याला वेळोवेळी कसा उपयोगी पडत आहे, याविषयी आम्हाला लेखी व तोंडी कळविले आहे. जाणकार विद्वानांनीही याची भलावण केली आहे. अशा प्रकारे प्रस्तुत कोशाला जी लोकप्रियता व विद्वन्मान्यता लाभली त्याबद्दल आम्हाला आनंद होत आहे. हा आनंद जे उद्दिष्ट प्रारंभीच आम्ही मनाशी धरले होते त्याच्या सफलतेचा आहे.

एकोणिसशे एकोणऐंशी साली दहावा खंड प्रकाशित होऊन हा महान प्रकल्प पुरा झाला त्यावेळी महाराष्ट्रातल्या वृत्तपत्रांनी अग्रलेख व स्फुट लेख लिहून प्रस्तुत कार्याचा जो मनमोकळा गौरव केला त्याबद्दल आणि ज्या ज्ञातअज्ञात अशा व्यक्तींनी पत्रे लिहून आमची प्रशंसा केली, त्यांचे आम्ही अत्यंत ऋणी आहो. प्रस्तुत कोशाच्या पुनर्मुद्रणाला आम्ही प्रवृत्त झालो, ते याच बहुमुखी गौरवामुळे होय.

गेली दोन वर्षे कोशाचा पहिला व दुसरा हे दोन खंड दुर्मिळ झाले होते. त्यापैकी प्रथमखंड सुधारित स्वरूपात आज वाचकांना उपलब्ध होत आहे. या खंडाच्या मुद्रणासाठी आम्हाला दोन वर्षांचा कालावधी लागला. मुख्य अडचण आर्थिक होती. पुरेसे द्रव्यबळ उपलब्ध व्हायला आम्हाला एवढा काळ लागला. इथे एक गोष्ट विशेषत्वाने उल्लेखिली पाहिजे, ती ही की प्रस्तुत खंडाला लागणारा कागद महाराष्ट्र शासनाने आम्हाला सवलतीच्या दरात उपलब्ध करून दिला. त्याबद्दल महाराष्ट्र शासनाचे व कागदसमितीचे आम्ही अत्यंत ऋणी आहो.

दुसरी मदत महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृतिमंडळाची. या मंडळाने प्रस्तुत खंडासाठी आम्हाला एकरकमी पंचवीस हजार रुपये दिले. त्याबद्दल साहित्य संस्कृतिमंडळाचे आम्ही अत्यंत ऋणी आहो. पुढच्या खंडासाठी आम्हाला साहित्य संस्कृतिमंडळाकडून अशीच मदत लाभेल, असा आम्हाला भरंवसा आहे,

पहिला खंड प्रसिद्ध झाल्यानंतर आम्ही आता दुसऱ्या खंडाची सुधारित आवृत्ती सिद्ध करायला लागलो आहो आणि मुद्रणारंभ करीत आहो. दुसरा खंड प्रकाशित झाल्यानंतर आमच्या नव्या ग्राहकांना दहा खंडांचा संपूर्ण संच उपलब्ध होऊ शकेल.

प्रस्तुत खंड हा सुधारित आहे, हे वर सांगितलेच आहे. या खंडातल्या अनेक विषयांत आम्ही नवी भर घातली आहे. काही विषय नव्या माहितीच्या आधारे संपूर्णपणे नव्याने लिहिले आहेत. ज्या विषयासंबंधी नावापलिकडे किंवा चार–दोन वाक्यांपलिकडे माहिती उपलब्ध होऊ शकली नाही आणि काही

विषयांचा अन्यत्र अन्य नावाने समावेश झाला आहे, असे विषय या आवृत्तीत वगळले आहेत. गेल्या वीस वर्षांत संशोधन होऊन जे अनेक विषय उजेडात आले त्यांची माहिती मूळ विषयात भर घालून किंवा त्या त्या नव्या नावांखाली त्यांना स्वतंत्र स्थान देऊन आम्ही प्रस्तुत खंडाला अद्ययावत्पणा आणण्याचा प्रयत्न केला आहे. काही जाणकारांनी पहिल्या खंडातील विषयासंबंधी ज्या सूचना केल्या किंवा ज्या त्रुटी दाखवल्या त्यांचीही आम्ही दखल घेतली आहे. खंड छापून पुरा होण्याच्यावेळी जे नवे विषय नव्याने दृष्टीसमोर आले आणि ज्यांचा समावेश आम्हाला वर्णक्रमाने करता आला नाही, असे काही विषय परिशिष्टात दिले आहेत. या लेखांपैकी, अक्कलकोटच्या पूज्य श्रीगजाननमहाराजांनी जे एक नव्या पद्धतीचे अग्निहोत्र प्रचलित केले आहे, आणि शेकडो जण त्याचा आत्मकल्याणार्थ अवलंब करीत आहेत, त्या अग्निहोत्राविषयी श्री. स. के. कुलकर्णी यांनी आम्हाला जो लेख लिहून दिला, त्याविषयी आम्ही आभारी आहो.

श्री. सानेगुरुजींच्या आंतरभारतीविषयी पुण्यातील 'साधना' साप्ताहिकाचे माजी संपादक श्री. यदुनाथ थत्ते यांनी जी माहिती दिली, तिची नोंद आम्ही त्या नावाखाली केली आहे.

समग्र कोशातील हजारो विषयांची सूची निरनिराळ्या १२५ विभागांत आम्ही दहाव्या खंडाच्या अखेरीस खंड आणि पृष्ठ यांच्या उल्लेखासह दिली आहे. प्रस्तुत प्रथमखंडात काही विषय गाळले आहेत व काही नवीन समाविष्ट केले आहेत. त्यामुळे वाचकांना सदर सूचीप्रमाणे विषय मिळणार नाहीत. ही अडचण तर खरीच; पण त्याला निरुपाय आहे.

गेल्या दीड–दोन वर्षांत मंडळाची फार मोठी बौद्धिक हानी झाली आहे. अजूनही ती आम्हाला वेळोवेळी जाणवते. महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांचे निधन ही पहिली मोठी हानी. ते चतुरस्र विद्वान होते. तसेच घटनापंडितही होते. मंडळाची घटना बनविण्यात त्यांनी आम्हाला मोलाचे मार्गदर्शन केले. मंडळाच्या स्थापनेपासून ते मंडळाचे उपाध्यक्ष होते. वेळोवेळी ते आम्हाला अनेक प्रकारे मदत करीत.

त्यानंतर प्रा. न. र. फाटक यांचे निधन झाले. ते मंडळाच्या कार्यकारिणीचे सदस्य होते. मी जेव्हा जेव्हा मुंबईला जाई, तेव्हा तेव्हा आमच्या कार्याविषयी चर्चा करीत असे. त्या चर्चेचा मला फार उपयोग होई. मंडळाच्या संदर्भग्रंथालयासाठी त्यांनी आम्हाला स्वतःच्या संग्रहातील काही ग्रंथही दिले होते.

त्यानंतर गेल्या जानेवारीत तर्कतीर्थ पद्मजा होडारकर यांचे अकाली निधन झाले. कोशाचा आराखडा सिद्ध करण्यापासून मला त्यांची मदत झाली होती. कोशाच्या सहसंपादक म्हणून त्यांनी कोश-प्रकल्प पूर्ण होईपर्यंत काम केले. नात्याच्या दृष्टीने सांगायचे तर ती माझी मुलगी. कमी बोलणे आणि मन लावून काम करणे, हे तिचे वैशिष्टय. कोशरचनेवर तिने एवढे प्रभुत्व संपादन केले होते की, तिचा सल्ला मलाही योग्य आणि मोलाचा वाटे. तिच्या मृत्यूने कोशमंडळाची आणि व्यक्तिशः माझी अपार हानी झाली आहे.

वरील तीन्ही मान्यवर व्यक्तींच्या निधनामुळे मंडळाचे तीन सदस्य कमी झाले होते. त्यांच्या जागी कोशमंडळावर येण्यासाठी माननीय श्री. वसंतराव पटवर्धन, बँक ऑफ महाराष्ट्रचे चेअरमन, प्रा. सौ. लीला अर्जुनवाडकर आणि श्री. शंकर मंगेश होडारकर यांना विनंती केली आणि ती त्यांनी मान्य केली, याविषयी आम्ही त्या सर्वांचे आभारी आहो.

कोशाच्या सुधारित दुसऱ्या आवृत्तीच्या मुद्रणकालात मंडळाला ज्या उदार दात्यांनी देणग्या दिल्या त्यांची नावे अशी–

| | | |
|---|---|---|
| श्री. म. गो. भट, ट्रस्टी, भट फॅमिली रिसर्च फौंडेशन, मुंबई............ | रु. | १०,००० |
| श्री. अरविंद मफतलाल, मुंबई............................................ | रु. | ५००० |
| श्री. एम्. एस्. तळावलीकर अँड सन्स, पणजी ......................... | रु. | १,००१ |
| श्री. श्री. रा. वैद्य, पणजी ................................................ | रु. | ५५० |
| श्री. हेमंत ठोंबरे, पद्मजा अॅडव्हर्टायझर्स, पुणे.......................... | रु. | १०,००० |

संगम मुद्रणालयाने पूर्वीप्रमाणेच कोशाच्या पहिल्या खंडाच्या या दुसऱ्या आवृत्तीचे मुद्रणही आस्थेने केल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

यानंतर संस्कृति–कोशाच्या दुसऱ्या खंडाच्या सुधारित दुसऱ्या आवृत्तीचे मुद्रणही आम्ही लवकरच सुरू करणार आहो.

महादेवशास्त्री जोशी
संपादक व कार्यवाह

## मंडळातील सहकारी

| | |
|---|---|
| श्री. रा. शं. नगरकर, बी. ए. | उपसंपादक |
| श्री. मो. मा. वाळिंबे | उपसंपादक |
| श्री. अ. चिं. जोगळेकर, बी. ए. | प्रमुख लेखनिक |
| श्री. मा. य. मिराशी | लेखनिक |
| श्री. अ. गो. साठे | लेखनिक |

## मंडळाशी संबंधित अन्य सहकारी

| | |
|---|---|
| श्री. वि. वि. भिडे, एम्. ए., पीएच्. डी. | समीक्षक |
| श्री. सु. ह. जोशी, एम्. ए. | संकलक |

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना

भारतीय संस्कृतिकोशाचा हा प्रथम खंड वाचकांच्या हातीं देतांना आमच्या मंडळाला व व्यक्तिशः मलाहि परम आनंद होत आहे. गेली सात वर्षे ज्या कार्याचा एकमेव ध्यास घेऊन मी आमच्या मंडळाच्या सन्माननीय सभासदांच्या मार्गदर्शनाखाली या महान् कार्याची रचना चालविली होती, त्याचे हे दृश्य फल या प्रथम खंडाच्या रूपाने आज वाचकांच्या समोर येत आहे.

१९४७ सालीं भारत पारतंत्र्यांतून मुक्त झाला आणि भारतांत स्वातंत्र्याचें एक नवें सुवर्णयुग अवतरलें. भारत स्वतंत्र झाला, स्वतःचा भाग्यविधाता बनला, ही गोष्ट चिरवांच्छित अशीच झाली. पण कोणत्याहि देशाचा सर्वांगीण उत्कर्ष केवळ राजकीय स्वातंत्र्याने होऊं शकत नाही. त्यासाठी त्याला आर्थिक आणि आत्मिक स्वातंत्र्याचीहि गरज असते. किंबहुना राजकीय स्वातंत्र्य हें, या पुढील स्वातंत्र्याचें एक साधनच ठरतें. त्या दृष्टीने भारताच्या आर्थिक आणि औद्योगिक स्वातंत्र्याचे भगीरथ प्रयत्न आज देशभर चालू आहेत. त्याचबरोबर भारताच्या संस्कृतीचाहि विकास व्हावा म्हणूनहि भारत सरकार प्रयत्नशील आहे. साहित्य अकादमी, नाटच अकादमी, ललितकला अकादमी अशा विविध साहित्य—कलासंस्था भारत सरकारने त्यासाठी निर्माण केल्या आहेत. भारतीय आकाशवाणीवरहि संस्कृतिविषयक कार्यक्रमांना प्राधान्य दिलें जात असून त्या द्वारें भारतांतील भिन्न भिन्न राज्यांतील भिन्नभाषी लोकांच्या संस्कृतीचा परस्परांना परिचय व्हावा आणि तो वाढावा म्हणून प्रयत्न होत आहेत. इतकेंच नव्हे; तर भारत सरकारने देशांतील सांस्कृतिक व्यवहारांना चालना, प्रोत्साहन व मार्गदर्शन करण्यासाठी 'वैज्ञानिक संशोधन व सांस्कृतिक व्यवहार' या नांवाचें एक स्वतंत्र मंत्रालयच निर्माण केलें आहे.

या सर्व सांस्कृतिक प्रयत्नांना एका निराळच्या रीतीने हातभार लावावा, या उद्देशाने १९५७ सालीं आमच्या भारतीय संस्कृतिकोश मंडळाची स्थापना झाली.

**मंडळाचे संस्थापक सभासद**

(१) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, संपादक धर्मकोश, वाई.
(२) महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार, बी. ए. ; कुलगुरु ; पुणें विद्यापीठ, पुणें.
(३) डॉ. रा. ना. दांडेकर, एम्. ए. पीएच्. डी. पुणें.
(४) श्री. अ. ह. लिमयें, एम्. ए. पुणें.
(५) श्री. शं. वा. किर्लोस्कर, कारखानदार, किर्लोस्करवाडी.
(६) श्री. दा. वा. पोतदार, बी. ई., पुणें.
(७) प्रा. न. र. फाटक, बी. ए., मुंबई.
(८) श्रीमती दुर्गा भागवत, एम. ए., मुंबई.
(९) श्री. वि. पु. भागवत, संपादक 'मौज', मुंबई.
(१०) प्रा. गोवर्धन पारीख, एम्. ए., रेक्टर, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
(११) श्री. काशीनाथ दामोदर नायक, व्यापारी व संशोधक, गोवा.

(१२) श्री. चिं. ग. कर्वे, बी. ए., संपादक, सुलभ विश्वकोश, पुणें.
(१३) श्री. बा. ग. जगताप, बी. ए. बी. टी., शिक्षणशास्त्रज्ञ, पुणें.
(१४) श्री. सि. ग. फडके, बी. ए., एल्एल्. एम्. पुणें.
(१५) श्री. चिं. श्री. नातू, एम्. ए., पुणें.
(१६) श्री. जयंतराव टिळक, बी. एस्सी., संपादक 'केसरी' पुणें
(१७) डॉ. ग. वि. देसाई, डी. डी. एस्., पुणें.
(१८) पं. महादेवशास्त्री जोशी, ग्रंथकार, पुणें.
(१९) तर्कतीर्थ सौ. पद्मजा होडारकर, एम्. ए., पुणें.

**मंडळाचा उद्देश–**

संस्कृत, पाली, हिंदी, मराठी, गुजराती, बंगाली, कन्नड, तेलुगु, तमिळ, इ. देशी भाषांतील आणि इंग्रजी इ. परदेशी भाषांतील भारतीय संस्कृति–विषयक ग्रंथ संपत्तीचे आलोडन करून त्या आधारे महाराष्ट्र ज्ञानकोशाच्या धर्तीवर 'भारतीय संस्कृतिकोश' या नांवाने भारतीय संस्कृतीचा व्यापक आणि तपशीलवार ज्ञानकोश मराठी व हिंदी या दोन्ही भाषांत तयार करून तो प्रकाशित करणें, हा या मंडळाचा उद्देश आहे.

स्वतंत्र भारताला अशा एका बृहत्कोशाची अत्यंत गरज होती. आजमितीस भारतीय जनतेत संस्कृतिविषयक जिज्ञासा नव्याने उदय पावली आहे. सुशिक्षित, सुसंस्कृत माणसे आपल्या परंपरा आणि आपला प्राचीन इतिहास, यांचा शोध घेण्याच्या प्रयत्नांत दिसतात. समाजाच्या या जिज्ञासेची अंशतः तरी पूर्ति करणे व अधिक ज्ञानाच्या कामी तिला मार्गदर्शन करणे, हें अत्यावश्यक होते. महाराष्ट्रांत आणि भारताच्या अनेक भाषांत अनेक ज्ञानकोश आहेत व नव्यानेहि निर्माण होत आहेत. पण त्यांचा व्याप अखिल विश्वात्मक असल्यामुळे भारतीय संस्कृतीच्या ज्ञानाविषयींच्या आकांक्षा ते बृहत् विश्वकोश साकल्याने पुऱ्या करू शकत नाहीत, असे आढळून आले व म्हणूनच भारतीय संस्कृतिकोश मंडळाने केवळ सांस्कृतिक विषयांना वाहिलेला असा एक तपशीलवार व व्यापक कोश निर्माण करण्याचें हे महत्कार्य अंगीकृत केलें.

**संस्कृतीची व्याख्या–**

संस्कृति म्हणजे काय, हा इथे मुख्य प्रश्न आहे. कृ – करणे या धातूपासून बनलेल्या 'कृति' या शब्दाला 'प्र' 'वि' आणि 'सम्' असे उपसर्ग लागून प्रकृति, विकृति आणि संस्कृति असे शब्द अनुक्रमे बनतात. प्रकृति म्हणजे निसर्ग. विकृति म्हणजे त्यांत होणारा विकार किंवा बिघाड. आणि संस्कृति म्हणजे प्रकृतींत विकार किंवा बिघाड होऊं नये, या उद्देशाने तिच्यावर करायचे विविध सम्यक् संस्कार होत. प्रकृति, विकृति आणि संस्कृति हे तीन्ही शब्द डोळ्यांपुढे ठेवले असतां संस्कृतीचा जो अर्थ अल्पांशाने प्रतीत होतो, त्याचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे करतां येईल–

मानव हा सभोवतीच्या निसर्गांत किंवा निसर्गांतल्या पदार्थांत आपल्या जीवनाला अनुकूल आणि उपयुक्त असे बदल करून किंवा प्रसंगी त्यांच्यावर इष्ट तें संस्कार करून आपली जीवितयात्रा चालवीत असतो. मानवाला बाह्य विश्वावर आणि स्वतःच्या मन–बुद्धींवर विजय मिळवूनच आपलें जीवित सफल करतां येतें. तो बाह्य विश्वांतील पदार्थ आपल्या जीवनाला उपयुक्त व शोभादायक करून घेण्यासाठी त्यांत बदल घडवून आणतो; त्याचबरोबर स्वतःचे देह, मन, बुद्धि, आत्मा, यांच्यावरहि संस्कार करून स्वतःमध्येहि बदल घडवून आणतो. या दोन्ही क्रिया कळत न कळत एकसमयावच्छेदाने चालू असतात. यावरून संस्कृतीचें आणखी एक लक्षण श्रीमती इरावती कर्वे यांच्या शब्दांत सांगतां येईल, तें असें– 'मनुष्य-

समाजाची डोळ्यांना दिसणारी भौतिक वस्तुरूप निर्मिति व डोळ्यांना न दिसणारी; पण विचारांना आकलन होणारी मनोमय सृष्टि म्हणजे संस्कृति.'

ही संस्कृति परंपरेने मानवाला प्राप्त होत असते. संस्कृतीची निर्मिति, तिचा संचय व एका पिढींतून दुसऱ्या पिढींत, दुसरींतून तिसरींत अशी तिची संक्रांति होत जाणें म्हणजे संस्कृतीची परंपरा होय. संस्कृति ही एका व्यक्तीची नसून ती समाजाची असते. व्यक्तीचें जीवन मर्यादित व अत्यल्प असतें; तर समाजाचे जीवन प्रदीर्घ व मोठ्या प्रदेशावर विस्तारलेलें असतें. जुनी माणसे मरतात आणि त्यांच्या जागीं नवीं जन्माला येतात. हीं नवीं माणसें जुन्या माणसांच्या सामाजिक परंपरा घेऊनच आपल्या जीवनक्रमाला लागतात. त्यामुळेच सामाजिक परंपरा या युगायुगांचें जिणें घेऊन दीर्घायु बनतात. संस्कृति ही व्यक्तीच्या आयुष्याची दिशा निश्चित करते; तर व्यक्ति युगधर्माला अर्थात् देशकालाला अनुसरून संस्कृतीचा प्रवाह बदलीत असते. हवा, पाणी, सूर्यप्रकाश या गोष्टी जितक्या सहजतेने मानवाच्या जीवनांत सोबत करतात, तितक्याच सहजपणें संस्कृतिहि मानवाचें अंतर्बाह्य जीवन व्यापून राहते.

आपण जिला संस्कृति म्हणतों, तिचीं स्थूल मानाने आधिभौतिक, आधिदैविक आणि आध्यात्मिक अशीं तीन अंगें कल्पितां येतात–

बाह्य विश्वावर संस्कार करून त्याला मानवाच्या उन्नतीसाठीं उपकारक बनविणें, हा संस्कृतीचा आधिभौतिक विभाग होय. शेती, पशुपालन, स्थापत्य, धातुकाम, यंत्रनिर्मिति, नगररचना, औषधिसंशोधन, अर्थोत्पादन आणि वितरण, या सर्व गोष्टी आधिभौतिक या विभागांत येतात.

भाग्य अनुकूल व्हावें, प्रयत्न सफल व्हावे, तसेंच बाधा आणि संकटें निरस्त व्हावीं, या उद्देशाने देवतांची पूजा आणि प्रार्थना करणे, जपतपादि आचरणे, मंत्रतंत्र आणि टोणे टोटके करणें आणि या सर्व क्रियांच्या द्वारे विश्वांतर्गत अदृश्य अशा दैवी शक्तींचे साहाय्य प्राप्त करून घेणें, या गोष्टी संस्कृतीच्या आधिदैविक विभागांत येतात.

स्वतःच्या मन–बुद्धींवर संस्कार करून त्यांना आत्मदर्शनाची योग्यता प्राप्त करून देणें, हा संस्कृतीचा आध्यात्मिक विभाग होय. धर्म, तत्वज्ञान, नीतिनियम, विद्या–कला, साहित्य, सद्गुण, शिष्टाचार, संस्कार, इत्यादि सर्व गोष्टींचा अंतर्भाव संस्कृतीच्या आध्यात्मिक विभागांत होत असतो.

**भारतीय संस्कृतीचें वैशिष्टय–**

धर्म, संस्कृति आणि जीवन या तिन्ही क्षेत्रांचा विस्तार आणि व्यापकता समान आहे. या तिन्हींचा आशय एकच; आणि तो म्हणजे सर्व अंगांनी अंतर्बाह्य विकसित झालेलें मानव्य ! व्यक्तित्व आणि मानव्य या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. भारतीय संस्कृति या दोन्ही अंगांचा परिपोष करण्यासाठी प्रयत्नशील आहे. लौकिक अभ्युदयाची साधना करतां करतांच निःश्रेयसाची सिद्धि प्राप्त करणे आणि आधिभौतिकाचा योग्य तो मान राखून आध्यात्मिक मूल्यांची प्रतिष्ठापना करणें, हें भारतीय संस्कृतीचे उद्दिष्ट आहे. म्हणून भारतीय संस्कृति कर्माला प्राधान्य देते. त्या कर्मांत जिव्हाळा निर्माण व्हावा, म्हणून भक्तीचा आधार घेते आणि कर्मांत उत्साहाचा झरा सतत वाहता राहावा म्हणून कलेलाहि मान्यता देते. भारतीय संस्कृतींत चारित्र्याला विशेष रूपानें महत्त्व दिलें गेलें आहे. त्यासाठी ती संत–महंत, ऋषि–मुनी, तत्त्वज्ञानी, स्वार्थत्यागी आणि चारित्र्यवान् व्यक्तींचा सन्मान करते आणि योग्य प्रसंगी त्यांचे स्मरणहि करायला सांगते. भारतीय संस्कृति केवळ ऐहिक उत्कर्षावर संतुष्ट नाही. तिचे अंतिम साध्य आहे धर्मविजय किंवा अध्यात्मविजय !

**भारत–महामानवतेचा सागर—**

भारत देश महामानवतेचा सागर आहे. अनेक मानववंश आणि अनंत जाती यांचे प्रवाह एकत्र मिळून हा महामानवसागर निर्माण झाला आहे. भारताची संस्कृति या विभिन्न जातींनी संमीलित रूपाने निर्माण केलेली आहे. संघर्ष, समन्वय, सामंजस्य आणि एकात्मता या क्रमाने भारतीय संस्कृतीचे हे महावस्त्र विणले गेले आहे. या आसेतुहिमाचल खंडप्राय देशांत वास्तव्य करणाऱ्या जातीजमातींनी देश–काल–परिस्थितीला धरून आपापल्या सांस्कृतिक आविष्कारांच्या विविध पद्धती निर्माण केल्या आहेत. धर्म, पंथ, आचार, विचार, श्रद्धा–संकेत, पूजास्थाने, देवता, यात्रा, उत्सव, व्रते, पर्वे, साहित्य, नृत्य, नाट्य, शिल्प, चित्र, त्याचप्रमाणे सामाजिक आणि कौटुंबिक चालीरीती, अशा असंख्य प्रकारांनी या विविधतेने विस्तृत रूप धारण केले आहे. आणि असे असूनहि या विविधतेच्या आवरणांत एकत्वाची अनुभूति सदैव जागृत राहिली आहे. 'एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति' हा वैदिक विचार इथे दृढ आहे. याच्याहि पुढे जाऊन असे म्हटले पाहिजे, की नानात्वांत एकत्वाचे दर्शन घेणे हा भारतीय संस्कृतीचा विशेष धर्म आहे. नाम–रूपांच्या या विस्तारलेल्या सागरांत नाम–रूपातीत अंतिम आणि शाश्वत तत्त्वाचा शोध करणे, हे भारतीय संस्कृतीचें अंतर्गत सूत्र आहे. तो तिचा इतिहासप्रसिद्ध महिमा आहे.

म्हणूनच नवनिर्माणासाठी बद्धपरिकर झालेल्या स्वतंत्र भारताने या देशांत भिन्न प्रदेश, भिन्न भाषा, भिन्न पंथ आणि भिन्न धर्म, यांच्या आश्रयाने विकसित झालेल्या आपल्या संस्कृतीचे सम्यक दर्शन घेणे आवश्यक ठरते.

हाच विचार भारताचे महामंत्री पं. जवाहरलाल नेहरू यांनी श्री. रामधारीसिंह दिनकर यांच्या ग्रंथाला लिहिलेल्या प्रस्तावनेत मांडला आहे—

"यह संभव है कि, संसार में जो बडी बडी ताकते काम कर रही है, उन्हें हम पूरी तरह न समझ सकें। लेकिन इतना तो हमें समझना चाहिये, कि भारत क्या है और कैसे इस राष्ट्र ने अपने सामाजिक व्यक्तित्व का विकास किया है। उस के व्यक्तित्व के विभिन्न पहलू कौनसे हैं और उसकी सुदृढ एकता कहाँ छिपी हुई है...यदि हम इस बुनियादी बात को नहीं समझ पाते, तो फिर हम भारत को समझने में असमर्थ रहेंगे और यदि भारत को नहीं समझ सके तो हमारे भाव, विचार और काम सब के सब अधूरे रह जायेंगे और हम देश की कोई ऐसी सेवा नहीं कर सकेंगे जो प्रभावपूर्ण और ठोस हो।"

भारतीय संस्कृतिकोश मंडळ याच भावनेने प्रेरित होऊन या बृहत् कोशाच्या निर्मितीसाठी बद्धपरिकर झाले आहे. या कोशाच्या द्वारे भारताच्या विविध सांस्कृतिक परंपरांचें, प्रवाहांचें आणि आविष्कारांचें साररूप पण सर्वांगीण दर्शन वाचकांना आणि जिज्ञासूंना घडावे, हेच या कार्याचे प्रमुख उद्दिष्ट आहे.

संस्कृतीच्या उपरिनिर्दिष्ट व्याख्या व तिची व्याप्ति यांना अनुसरून प्रस्तुत कोशांत पुढील विषयांची तपशीलवार माहिती यावयाची आहे—

- यज्ञसंस्था व तिची अंगोपांगे,
- वैदिक, स्मार्त, पौराणिक व अन्यधर्मीय लोक यांचे गृह्य आणि सामाजिक संस्कार.
- ग्रह, नक्षत्र, तिथि, वार यांच्या योगाने होणारी सर्व प्रकारची पर्वे.
- प्रांतीय व अखिल भारतीय सण व उत्सव.
- पुण्य तीर्थे, क्षेत्रें व सरोवरें.
- गंगादि पुण्य नद्यांचें माहात्म्य व त्यांचा परिचय..
- अखिल भारतांतलीं सुप्रसिद्ध देवस्थानें.

- सर्व प्रकारचीं दानें व महादानें.
- सर्व प्रकारचीं मांगलिक, क्षेत्रीय व पार्वणादि श्राद्धें.
- स्मार्त, पौराण इ. सर्व प्रकारचीं प्रायश्चित्तें.
- अग्नि, जल इ, विविध प्रकारचीं दिव्यें.
- देव–देवतांच्या पूजा आणि बलिदानें.
- शुभाशुभ योग, शकुन आणि मुहूर्त.
- पौराणिक आणि लौकिक व्रतें व उद्यापनें.
- वापीकूपतडागादि इष्टापूर्त कर्मे.
- अरिष्टनिवारणार्थ सर्व प्रकारचीं शांतिकर्मे.
- वर्णाश्रमादि कर्तव्यें आणि अधिकार.
- भारतांतील सर्व जातीजमाती, त्यांचीं वैशिष्टये, कार्यें, आणि त्यांचें समाजांतलें स्थान.
- भारतांतील सर्व आदिवासी जमाती, त्यांची राहणी, क्षेत्र, देव–धर्म, भाषा, आणि इतर वैशिष्टयें
- जातिसंस्था, तिचा उगम, विकास आणि परिणाम.
- पूर्वास्पृश्य जाती, त्यांचीं कार्ये, सामाजिक स्थिति आणि अस्पृश्यतेचा इतिहास.
- मंत्रतंत्रादि प्रकार, प्रयोग आणि सिद्धि.
- अखिल भारतीय निसर्गोपासनेचे विविध प्रकार.
- अवतार, संत व राष्ट्रपुरुष यांचे जन्मोत्सव व पुण्यतिथी.
- सर्व पंथोपपंथ, त्यांचे आचार, दैवतें आणि त्यांच्या उपासना,
- भारतांतील इतर धर्म, त्यांचा इतिहास, वैशिष्टये, संघर्ष आणि समन्वय.
- आस्तिक–नास्तिक सर्व दर्शनें.
- पंथोपपंथांचें तत्त्वज्ञान.
- सर्व दार्शनिक मतवाद.
- तंत्र, नीति, राज्य, साहित्य, नाटय, इ. शास्त्रें, त्यांचा उगम व विकास.
- विविध विद्या व कला.
- सदाचार आणि सद्व्यवहार.
- निसर्ग आणि पशु–पक्षी यांच्याशीं मानवाचे सांस्कृतिक संबंध.
- वेद, उपवेद, वेदांगें, सूत्रें, उपनिषदें यांचा परिचय.
- स्मृति, पुराणें, उपपुराणें आणि महाकाव्यें.
- वेदकालापासून तों वर्तमान काळापर्यंत भारतांत झालेले वैदिक, पौराणिक व ऐतिहासिक राजवंश.
- प्रादेशिक भाषा, त्यांचा विकास, साहित्य व लोकसाहित्य.
- विविध उद्देशांनी निर्माण झालेलें संस्कृत, प्राकृत, पालि, अर्धमागधी, प्रांतिक भाषा इ.चें कथासाहित्य.
- बौद्ध, जैन, लिंगायत, शैव, शाक्त, वैष्णव, इ. चें धार्मिक व सांप्रदायिक वाङ्मय.
- नागरनाटय व लोकनाटय आणि त्यांच्या प्रांतोप्रांतींच्या परंपरा.
- शास्त्रीय नृत्यें व लोक नृत्यें.
- ब्राह्मणी, बौद्ध व जैन मूर्तिकला.
- चित्रकला व तिच्या प्रादेशिक शैली..

- लोककला, खेळणीं, पात्रें व उपकरणें.
- प्रांतोप्रांतींची वेषभूषा व अलंकार.
- विविध स्थापत्यशैली.
- विविध भारतीय खेळ.
- प्रांतोप्रांतींचे रांगोळी, कणे, भित्तिचित्रें, गोंदणें, इ. कलाप्रकार.
- संगीत—शास्त्रीय व जानपद.
- रागरागिण्या, स्वर, ताल, लय इत्यादि.
- शास्त्रीय संगीताचीं, ग्रामीण व आदिवासींचीं वाद्यें.
- वैदिक, पौराणिक, तांत्रिक, ग्रामीण व क्षुद्र देव—दैवतें.
- यक्ष, राक्षस, पिशाच, इ. अतिमानवी योनि.
- वैदिक, पौराणिक ऋषि—मुनी.
- महाकवि व आचार्य.
- पुण्यश्लोक राजे, महाराजे.
- संत, भक्त व संप्रदायसंस्थापक.
- राष्ट्रीय महापुरुष.

याशिवाय या कोशाचीं आणखी कांही वैशिष्टयें पुढीलप्रमाणे आहेत—

- या कोशांत उत्तरेइतकेंच दक्षिणेलाहि महत्त्व दिलेलें आहे.
- नागर संस्कृतीइतकेंच लोकसंस्कृतीलाहि प्राधान्य दिलेलें आहे.
- प्रत्येक प्रादेशिक भाषेंतील संत, भक्त, कवि आणि लोककवि यांच्या साहित्याचे नमुने त्या त्या भाषेंत पण देवनागरी लिपींत दिले आहेत. आंतरभारती व भाषिक सामंजस्य या दृष्टीने टाकलेलें हें एक प्रगतिशील पाऊल आहे.

**संपादनविभागांत काम करणारीं मंडळीं—**

श्री. व. ग. सहस्रबुद्धे, बी. एस्. सी.

सौ. सुलोचना लिमये, एम्. ए.

श्री. विद्याधरशास्त्री भिडे, एम्. ए.

श्री. रामचंद्र वामन दातार, बी. ए.

श्री. सुहास हरि जोशी, बी. ए.

श्री. श्रीधर शंकर फडके बी. ए. वेदान्तपारंगत

याशिवाय श्री. स. शं. देसाई, प्रा. रा. का. बर्वे, कै. ल. के. भावे, श्री. डॉ. शां. भा. देव, डॉ. सी. ग. देसाई, श्री. बा. मो. कानिटकर या मंडळींनी कोशाच्या संपादनाला लेखनरूपाने बहुमोल साहाय्य केलें आहे. तसेंच लेखनिक व इतर तांत्रिक गोष्टीतले साहाय्यक म्हणून श्री. रमेश अमृत परचुरे, वसंत चिंतामण फाटक, मोरेश्वर माधव वाळिंबे, हे विद्यार्थी मंडळात काम करीत आहेत.

**विद्वन्मंडळांचें साहाय्य आणि सहकार्य—**

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, म. म. द. वा. पोतदार, पं. दत्तात्रेयशास्त्री कवीश्वर, न्यायविद्वान्, श्री. पां. ज. चिन्मुळगुंद I. C. S, श्री. सेतुमाधवराव पगडी M. A. डॉ. रा. ना. दांडेकर M. A. ph. D., श्रीमती दुर्गा भागवत M. A., प्रा. न. र. फाटक B. A., श्री. रा. चिं. ढेरे, या मान्यवर विद्वानांनी कोशरचना जास्तींत जास्त निर्दोष व्हावी, या उद्देशाने संपादकांना बहुमोल बौद्धिक साहाय्य केलें आहे.

मराठी व हिंदी या दोन्ही भाषांत कोशनिर्मिति करणें आणि त्या कोशाचे मुद्रण करणें हा लक्षावधि रुपयांचा प्रकल्प आहे. हें काम तडीस जायचे, तर त्या कामीं सरकार व समाज यांची अर्थशक्ति मंडळाच्या मागे उभी असणें आवश्यक होतें व आहे. 'सर्वारम्भास्तण्डुलाः प्रस्थमूलाः' हें सुभाषित प्रसिद्धच आहे. त्या दृष्टीने भारत सरकार व महाराष्ट्र राज्य सरकार यांच्याकडून आम्हांला आजवर थोडीबहुत आर्थिक मदत मिळाली आहे. पण त्याशिवाय समाजांतून अन्य मदतीचे हात पुढे आले नसते, तर हें काम आमच्या संकल्पाप्रमाणे एवढ्या मुदतींत प्रथम खंडाच्या प्रकाशनापर्यंत येऊन पोंचलेंच नसते. त्या दृष्टीनें आम्हाला द्रव्यसाहाय्य करून ज्यांनी हें कार्य अविच्छिन्न चालू ठेवण्यास मदत केली, त्या उदारधी दात्यांचीं नांवें अशीं—

श्रीमान् अरविंद नवीनचंद्र मफतलाल, मुंबई.
श्रीमान् दयानंद बांदोडकर, पणजी—गोवा.
दि बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेट, पुणें.
श्रीमान् सरदार डी. के. जाधव, ग्वाल्हेर.
श्री. ठक्कर जादवजी कारा चॅरिटी ट्रस्ट, मुंबई.
श्री. मेघजी तुलसीदास बदाई भाटिया धर्मशाळा ट्रस्ट, मुंबई.
श्री. काशीनाथ दामोदर नायक, मडगांव—गोवा.
श्री. अखिल भारतीय आर्य (हिंदु) धर्मसेवा संघ, दिल्ली.

याशिवाय कोशाचे आगाऊ ग्राहक म्हणून बऱ्याच मंडळींनी आमच्याकडे मंडळाने ठरविलेली कोशाची सवलतीची किंमत भरली असून त्यांच्या या सहकार्यानेंहि कोशनिर्मितीच्या कामाला बहुमोल मदत झाली आहे.

मंडळ वरील उदारधी दात्यांचें आणि आगाऊ ग्राहकांचें ऋणी आहे.

भारतीय संस्कृतिकोश मंडळाचा कार्यवाह आणि संपादक अशी दुहेरी भूमिका माझ्याकडे आलेली आहे. त्यामुळे अंतर्गत आणि बहिर्गत अशीं उभयविध कामे मला करावीं लागतात. या कामीं मंडळाचे कोशाध्यक्ष श्री. अ. ह. लिमये व मंडळाचे एक सभासद श्री. चिं. श्री. नातू यांनी मित्रभावानें मला वेळोवेळीं सहकार्य दिले व अनेकदा माझ्या कामाचा भार आपल्या शिरावर घेतला. त्यांच्या या दैनंदिन आणि आस्थेवाईक सहकार्याबद्दल मी त्यांचा सदैव ऋणी आहे. त्याचप्रमाणे मंडळाला वेळोवेळीं आवश्यक तो कायद्याचा सल्ला श्री. सि. ग. फडके B. A. LL. M. वकील देत असून हिशेब तपासण्याचें काम श्री. जी. डी. आपटे अँड को ऑडिटर्स, पुणें हे करीत आहेत, त्याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों.

कोणत्याहि कोशनिर्मितीच्या कार्यात संदर्भग्रंथ ही अत्यंत मौलिक किंवा प्राणभूत अशी गरज असते. संदर्भ ग्रंथांवांचून कोशनिर्मितीचें पान हालूं शकत नाही आणि सगळे संदर्भग्रंथ स्वतःच्या ग्रंथालयांत जमा करणे, ही गोष्ट कोणत्याहि संस्थेला सुतराम् शक्य नाही. अशा वेळीं अन्य ग्रंथालयांची मदत फार मोलाची ठरते. त्या दृष्टीने आम्हाला आवश्यक ते संदर्भग्रंथ उपलब्ध करून देण्याच्या कामीं कलकत्ता येथील नॅशनल लायब्ररी, दिल्ली येथील सेंट्रल सेक्रेटॅरिएट लायब्ररी, मुंबई येथील एशियाटिक सोसायटीची लायब्ररी,

पुणे येथील भांडारकर रिसर्च इन्स्टिटयूट, फर्ग्युसन कॉलेज व केसरी–मराठा संस्था यांचीं ग्रंथालयें, तसेंच श्रीमंत सरदार आबासाहेब मुजुमदार या सर्वांनी आम्हांला आस्थेवाईक साहाय्य केलें आहे. त्यांचे मी मनःपूर्वक आभार मानतों व यापुढेहि या सर्वांचे आम्हाला असेच सहकार्य मिळेल, अशी आशा करतों.

संगम प्रेस, पुणें याचे चालक श्री. पटवर्धन बंधु यांनी कोशाच्या छपाईची धुरा आपल्या खांद्यावर वाहिली आणि आमच्या अडीअडचणी विचारांत घेऊन व हें कार्य आपलेंच आहे अशा आस्थेवाईक जाणिवेने कोशाच्या छपाईचें काम उत्कृष्टपणे केलें, याबद्दल त्यांना आमचे हार्दिक धन्यवाद आहेत.

श्री. दत्ता महाबळेश्वरकर, श्री. सुधाकर खासगीवाले व श्री. गंगाधर ताटके आमच्या कोशमंडळाचे चित्रकार कलावंत आहेत. कोशाची अंतर्बाह्य सजावट त्यांनीच केली आहे. तसेंच श्री. बाळुकाका दाते, कलाभुवन पुणें, यांनी चित्रांचे ठसे उत्तम प्रकारे बनवून दिले. आपल्या व्यवसायांत त्यांनी आमच्या कामाला प्राथम्य दिलें, याबद्दल मी या सर्वांचे हार्दिक आभार मानतों.

प्रस्तुत प्रथम खंडाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ, मुंबई, या मंडळाने ५००० रुपये आरंभी दिले असून खंड प्रकाशित होताच आणखी ५००० रुपये देण्याचें आश्वासन दिले आहे.

तसेच केंद्र सरकारच्या वैज्ञानिक संशोधन व सांस्कृतिक व्यवहार खात्याने प्रस्तुत खंडाच्या प्रकाशनासाठी ११००० रुपयांचें अनुदान दिलें आहे.

भारतीय संस्कृतिकोश मंडळ वरील अनुदानाबद्दल महाराष्ट्र राज्य सरकार व केंद्रीय सरकार यांच्याविषयीं अत्यंत कृतज्ञ आहे.

प्रस्तुत कोशाच्या प्रथम खंडाच्या प्रकाशनासाठी पुणे विद्यापीठाने एक हजार रुपयांचें अनुदान दिले आहे. या अनुदानाबद्दल भारतीय संस्कृतिकोश मंडळ, पुणे विद्यापीठाचे मनःपूर्वक आभार मानीत आहे.

कोशाच्या या प्रथम खंडाचें प्रकाशन अत्यंत विषम परिस्थितींत होत आहे. चीनने भारतावर आक्रमण करून भारताच्या स्वातंत्र्याला आणि अभेद्यत्वाला जबरदस्त धक्का दिला आहे. भारत सरकार आणि भारतीय जनता हें आक्रमण परतवून लावण्यासाठी व भारतीय स्वातंत्र्य अबाधित राखण्यासाठी साऱ्या शक्तीनिशी बद्धपरिकर झाली आहे. भारतावरचें हें परचक्र लवकरच निरस्त होवो आणि भारतीय जनतेला शांतीचें आणि सुखसमृद्धीचें नवें युग प्राप्त होवो, अशी आकांक्षा या प्रसंगी मी व्यक्त करतों.

त्याबरोबरच कशाहि अनुकूल वा प्रतिकूल परिस्थितींत आम्ही हाती घेतलेलें हें कोशनिर्मितीचें काम आम्ही थांबवणार नाहीं वा त्यांत कसलीहि शिथिलता येऊं देणार नाही, असें मंडळाच्या वतीने मी आमच्या बहुसंख्य चाहत्यांना, ग्राहकांना आणि दात्यांना या प्रसंगीं निर्धाराचें अभिवचन देतों.

सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः ।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद्दुःखमाप्नुयात् ॥

सर्वांचा नम्र
महादेवशास्त्री जोशी
–संपादक व कार्यवाह

# संदर्भ ग्रंथ संक्षेप

अ. अ. – अभिधान अनुशीलन, विद्याभूषण, विभू, १९५८

अॅ. अॅ. रा. – Annals and Antiquities of Rajasthan, J. Tod.

अ. उ. सा. – अवधी और उसका साहित्य, त्रिलोकीनारायण दीक्षित, १९५४

अ. जा. प्रा. इ. – अग्रवाल जाति का प्राचीन इतिहास, सत्यकेतु विद्यालंकार, १९३८

अॅ. भां. ओ. रि. इ. – Annals of the Bhandarker Oriental Research Institute

अ. भा. सं. – अरब और भारत के संबंध, सय्यद सुलैमान. नदवी, १९३०

अ. म. भा. – अथर्ववेदाचे मराठी भाषांतर, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, १९७२

अ. म. ज्ञा. – अभिनव मराठी ज्ञानकोश, संपादक–ग. रं. भिडे, १९६३

अ. सा. – अपभ्रंश साहित्य, हरिवंश कोच्छड, १९५६

अ. सु. अ. – अथर्ववेदाचा सुबोध अनुवाद, श्री. दा. सातवळेकर

अ. स्क. म. म्यू. – Amarawati Sculptures in the madras Govt. museum

अ. हि. नॉ. इं. – Early History of North India, Sudhakar Chattopadhyaya, 1958

आं. सा. इ. – आंध्रका सामाजिक इतिहास, सुरवरम प्रताप रेड्डी, अनुवाद–आर. वेंकटराव, १९५९

आ. अ. आ. लि. – Aspects of Early Assamese Literature, Editor-B. kakti, 1953

आ. आ. दे. – आर्योंका आदिदेश, संपूर्णानंद, १९५७

आ. इ. – आयुर्वेद का इतिहास, कविराज सूरमचंद्र, १९५२

आ. ए. सां. प. – आगरा–एक सांस्कृतिक परिचय, अग्रवाल, विनोद पुस्तक मंदिर, आगरा, १९५८

आ. फ. सि. – Agra and Fatehpur Sikri, Pub. Division, Govt. of India, New Delhi, 1958

आ. भ. त. प्र. – आळवार भक्तोंका तमिळ प्रबन्धम् और हिन्दी कृष्णकाव्य, मलिक मोहंमद, १९६४

आ. म. वा. इ. – आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास, अ. ना. देशपांडे, १९५४

ऑ. मु. इ. – observations on The Mussalmans of India, mrs Ali Meer Hassan, 1917

आ. वि. सू. स्मा. ग्रं. – आचार्य श्री. विजयवल्लभ सूरी स्मारक–ग्रंथ श्रीमहावीर विद्यालय प्रकाशन, १९५६

आ. सं. – आर्य संस्कृति, बलदेव उपाध्याय, १९५३

आ. सं. मू. – आर्य संस्कृति के मूलाधार, बलदेव उपाध्याय

आ. सा. इ. – आसामी साहित्याचा इतिहास, विरिंचिकुमार बारुआ, १९७७

इं. अँ. – Indian Antiquary. Vol. 9,

इं. इं – Immortal India, J H. Dave, I, 1960

इं. इ. – Indian Inheritance, K. M. Munshi, 1956-57

इं. नॉ. फ्रां. ना. सें. – Indias north-East Frontier in the Nineteenth Century, Verrier Elvin

इं. फो. लो. – Indian Folklore

इं. बु. इ. – The Indian Buddhist Iconography, Benoytosh Bhattacharya, 1958

इं. मु. क. – Indo Muslim Culture, V. Raghavendra Rao

इं. म्यु. इं – Indian Musical Instruments–Times of India Annual, 1955

इं. वे. क. सू. – India of Vedic kalpasutras, Ram Gopal, 1959

इं. सा. – Indian Sadhus, G. S. Ghurye, 1953

इं. स्क. – Indian Sculpture, C. Shivaramamurti, 1

इं. स्ट. पा. प्रे. – Indian Studies, Past and Present, Calcutta

इ. सं. – इतिहास संग्रह, पारसनीस

उ. अ. – उपनिषदांचा अभ्यास, के. वि. वेलसरे, १९६५

उ. उ. सा. – उर्दू और उसका साहित्य, अमन गोपीनाथ

उ. का. प. – उर्दू काव्याचा परिचय, सेतुमाधवराव पगडी, १९६१

उ. प्र. बौ. वि. – उत्तर प्रदेश में बौद्ध धर्म का विकास, नलिनाक्ष दत्त, कृष्ण-

दत्त वाजपेयी, १९५६
उ. भा. मं. – उत्तर भारतातील मंदिरे, कृष्ण देव, १९६९
उ. भा. सं. प. – उत्तरी भारत की संत परंपरा, परशुराम चतुर्वेदी, १९५२
उ. यो. द– उमेश योगदर्शन, उमेश चंद्रजी, अनु.– प्रभाकर रानडे, १९५९
उ. र. – उपनिषद्रहस्य, रा. द. रानडे, अनुवाद– कृ. वें. गजेंद्रगडकर, १९५९
उ. सं. सं. इ. – उत्तर भारतीय संगीत का संक्षिप्त इतिहास, भातखंडे, १९५४
ऋ. आ. – ऋग्वेदिक आर्य, राहुल सांकृत्यायन, १९५७
ऋ. द. – ऋग्वेद दर्शन, रा. गो. कोलंगडे, १९५४
ऋ. ब्र. स. – ऋग्वेदीय ब्रह्मकर्मसमुच्चय
ऋ. म. भा. – ऋग्वेदाचे मराठी भाषांतर, सि. वि. चित्राव, १९६९.
ए. इं. सा. हि. क.– Ancient India and South Indian History and Culture, S. Krishnaswamy Aiyangar.
ए. क. – Ancient Karnatak, Bhaskar A. Saletore, 1936
ए. द. – एकनाथ दर्शन, संपा.-ब. गि. घाटे
एन्सा. मुंडा– Encyclopaedia Mundarica, Haufman, 1950
एन्सा. रि. – An Encyclopaedia of Religion, Virgilius ferm.
एन्सा. रि. ए. – Encyclopaedia of Religion and Ethics, James Hastings, 1955
ए. से. ए. इ. – Ethnic Settlements in Ancient India, Shashi Bhushan Choudhuri, 1955
ओ. इ. इं. – Original Inhabitants of India, G. Oppert
क. द. – Karnataka Darshana, R. S. Hukkerikar, 1955
क. ब्र. – Cult of Brahma, Tarapada Bhattacharya,
क. म. – Customs of Mankind, Lilian Eichler
क. हि. वा. पु. – Cultural History from the Vayu Puran, D. K. Patil, 1946.
क. हे. इं. – Cultural Heritage of India, S. K. Chatterjee 1958
का. आ. – कामरूप आसाम, राजा मंगळवेढेकर, १९७३
का. ए. सां. अ. – कादंबरी: एक सांस्कृतिक अध्ययन, वासुदेवशरण अग्रवाल, १९५८
का. द्रा. स. इं. – Castes and Tribes of Southern India, Thurston
का. सा. सा. – काशी की सारस्वत साधना, गोपीनाथ कविराज, १९६५
की. पॉ. – The Keys of Power, J. Abbot, 1832
कृ. क. त. – कृत्यकल्पतरु
के. व्ही. आर. ऐ. को. व्हॉ. – K. V. R. Aiyangar Comemoration Volume.
कै. सा. द. – कैरली साहित्य दर्शन, रत्नमयीदेवी दीक्षित
कौ. अ. – कौटिलीय अर्थशास्त्र
क्रि. स्ट. ले. उ. – Critical Studies of the Later Upanishadas, S. G. Desai
क्ला. डि. हिं. मा. – Classical Dictionary of Hindu Mythology ete. John Dawson, 1957
खं. वै. – खंडहरोंका वैभव, मुनिकांत सागर
खो. प.–खोजकी पगडंडियां, मुनि कांतिसागर, १९५३
गं. अ. य. कि. – The Gandharvas The Apsarasas, The Yakshas and The Kinnaras, N. G. Tavakar, 1971
गॉ. नॉ. बु. – The Gods of Northern Budhism
गा. म. वि.–गायत्री महाविज्ञान, पं. श्रीराम शर्मा, १९५९
गा. स.–हाल सातवाहनाची गाथा सप्तशती, स. आ. जोगळेकर, १९५६
गी. ए. अ.–गीता : एक अध्ययन, चिं. त्र्यं. केंचे, १९६०
गी. र.–गीता रहस्य, लो. टिळक, १९५६
गुज. सा. इ.–गुजराती साहित्य का इतिहास, जयंतकृष्ण हरीकृष्ण दवे, १९६३
गो. च. प.–श्रीगुरू गोरक्षनाथ चरित्र आणि परंपरा, रा. चिं. ढेरे, १९५९
गो. त्यां. सं.–गोसावी व त्यांचा संप्रदाय, पृथ्वीगीर हरिगीर, १९२६
गो. सि. सं.–गोरक्ष सिद्धान्तसंग्रह, जनार्दनशास्त्री पाण्डेय, १९७३
ग्रे. वी. इं. – Great Women of India, Swami Madhavananda 1953
ग्लो. उ. प्र. – Glories of Uttar Pradesh, Nandalal Chatterji, 1957
च. व. चिं.–चतुर्वर्गचिंतामणि
चा. इ. त.–चार्वाक, इतिहास आणि तत्वज्ञान, सदाशिव आठवले, १९५८
चिं. न. च.–चिन्तन के नये चरण, देवदत्त शास्त्री, १९६०
चि. छा.–चिनारच्या छायेत, श्रीपाद जोशी, १९६२
ज. आं. हि. रि. सो.–जर्नल ऑफ दि आंध्र हिस्टॉरिकल रिसर्च सोसायटी,
ज. ज. र. स.–जय जय रघुवीर समर्थ, अमरेंद्र, १९६०
ज. जी. सं.–जनजातीय जीवन और संस्कृति
ज. द.–जयपूरदर्शन, म. म. द. वा. पोतदार, १९४८
ज. वि. ध.–जगातील विद्यमान धर्म

रा. ब. आठवले, १९३५

जॉ. ए. मि. इं. – Studies in the Geography of Ancient and Medieval India, D. C. Sircar 1962

जा. का. भा. सं.–जातककालीन भारतीय संस्कृति, पं. मोहनलाल महतो 'वियोगी', १९५८

जु. वा. न. सं. – जुने वाङ्मय नवे संशोधन, आवळीकर, १९६४

जै. इ. – The Jain Iconography, B. C. Bhattacharya

जै. व्र. वि. सं. – जैन व्रतविधान संग्रह, बारेलाल जैन राजवैद्य, १९५२

जै. सा. इ. – जैन साहित्य और इतिहास, नाथूराम प्रेमी, १९५६

जै. ज्ञा. को. – जैन ज्ञानकोश, १९७२

ज्यो. कौ. – ज्योतिष कौस्तुभ, पं. रघुनाथ शास्त्री पटवर्धन, १९६४

टे. ली. आं. प्र. – Temples and Legends of Andhra Pradesh, N. Ramesan, 1962.

टें. सा. इं. – Temples of South India, K. R. Shrinivasan, 1971

ट्रा. आ. मि. इं. – Tribal Art of Middle India, Verrier Elwin

ट्रा. इं. – Tribes of India, A. V. Thakkar, 1950

ट्रा. ए. इं. – Tribes in Ancient India, Editor, Bimal Churn Law, 1943

ट्रा. का. सें. प्रॉ. इं. – Tribes and Castes of the Central Provinces of India, R. V. Russel, R. B. Hiralal

ट्रा. के. – Tribes of Keral, A. A. De Luiz, 1962

ट्रा. वी. इं. – The Tribal women of India, S. S. Shashi, 1978.

डि. इ. – Dictionary of Islam T. P. Hughes, 1935

डि. सा. इं. म्यु. म्यु. – A Dictionary of South Indian Music and Musicians, P. Sambmoothy

डे. हिं. इं. – The Development of Hindu Iconography, Jitendra nath Banarjee, 1959

तं. क. शा. – तंतकवी तथा शाहीर, य. न. केळकर, १९५२

त. सा. सं. – तमिळ साहित्य और संस्कृति, अवधनंदन, १९५८

तां. बौ. सा. सा. – तांत्रिक बौध्द साधना और साहित्य, नागेंद्रनाथ उपाध्याय, १९३९

तु. म. गु. प. – तुकाराम महाराजांची गुरुपरंपरा, वा. सी. बेंद्रे, १९६०

ते. सा. इ. – तेलुगु साहित्य का इतिहास, बालशौरि रेड्डि, १९६४

द. आ. स्मा. ग्रं. – दत्तोपंत आपटे स्मारक ग्रंथ, चित्रशाळा, १९४७

द. चिं. – दर्शन और चिंतन, पं. सुखलालजी १९५७

द. द. – दक्षिण दर्शन, जानेवारी १९६१

द. दि. – दर्शन दिग्दर्शन, राहुल सांकृत्यायन, १९४७

द. सं. इ. – दत्त संप्रदायाचा इतिहास, रा. चिं. ढेरे, १९५८

दे को. – देवी कोश–आदिशक्तीचे विश्वस्वरूप, प्र. कृ. प्रभुदेसाई

दो. को.– दोहा–कोश, पं. राहुल सांकृत्यायन, १९५७

द्र. गॉ. मॉ. हिं. – Dravidian Gods in Modern Hinduism, W. T. Elmore

ध. म. बु द.– धर्मचक्रवर्ती भगवान बुद्धदर्शन, रा. गो. कोलंगडे, १९५९

ध. वि. स्व. – धर्म विवाद–स्वरूप, के. ल. दफ्तरी, १९३४

ध. शा. वि. – धर्मशास्त्र विचार, पां. वा. काणे, १९३५

ध. सू.–Dharma Sutras, A Study in their Origin and development, S. C. Banerjee, 1962

ना. प्र. प. – नागरी प्रचारिणी पत्रिका

ना. भा. ध. – नाथांचा भागवत धर्म, श्री. रं. कुलकर्णी, १९५८

ना. सं. – नाथ संप्रदाय, हजारी प्रसाद द्विवेदी, १९५०

ना. सं. उ. वि. – नाथ संप्रदाय, उदय व विकास, प्र. न. जोशी, १९७०

नै. प. – नैषध परिशीलन, चण्डिकाप्रसाद शुक्ल, १९६०

न्यू. इं. अँ. – New Indian Antiquary.

पं. ज्यो. शा. – पंचांगातील ज्योतिषशास्त्र, त्र्यं. गो. ढवळे, १९५८

प. का. भा. – पतंजलिकालीन भारत, प्रभुदयाळ अग्निहोत्री, १९६२

प. ध. शा. को. – पवित्र धर्मशास्त्र विषयक कोश, दि. शं. सावरकर, १९४२

प. भा. द. – पश्चिम भारताचे, दर्शन, गो. प्र. सोहनी, १९६९

पॉ. क. क. – Popular Culture in Karnatak, Masti Venkatesh Iyengar, 1937

पा. का. भा. – पाणिनीकालीन भारतवर्ष, वासुदेवशरण अग्रवाल, १९५५

पा. यो. द.–भारतीय मानस शास्त्र अथवा सार्थ आणि सविवरण पातंजल योगदर्शन, कृ. के. कोल्हटकर, १९५९

पा. वा. ते. भि. र.–पाली वाङ्मयातील तेरा भिक्षुणी रत्ने, ना. के. भागवत, १९५३

पा. सा. इ.–पाली साहित्य का इतिहास, भरतसिंह उपाध्याय, १९५१

पी. के. गो. को. – P. K. Gode Comemoration Volume, Ed. Hariyappa, Patkar, 1968

पु. इं. – Puran Index, V. R. Ramchandra Dikshitar 1955
पु. चिं.–पुरुषार्थ चिंतामणि
पु. त. नि.–पुरातत्त्व निबंधावली, राहुल सांकृत्यायन, १९३७
पु. त. मी. – पुराणतत्त्वमीमांसा, त्रिपाठी, श्रीकृष्णमणी, १९६१
पु. त. वि.–पुरातत्त्व विद्या, शां. भा. देव, १९७६
पु. वि.–पुराण विमर्श, पं. बलदेव उपाध्याय, १९६५
पू. म. भा.– पूर्व मध्यकालीन भारत, वासुदेव उपाध्याय, १९५३
पू. मा. प्र.–पूजा मार्ग प्रदीप, अनंत वासुदेव मराठे, १९६२
पे. का. म.–पेशवे कालीन महाराष्ट्र, वा. कृ. भावे
पे. पु.–पेरिय पुराण
पो. वी. हिं. सि. –. Position of Women in Hindu Civilization, A. S. Altekar, 1958
प्र. वि.–प्रतिमा विज्ञान, द्विजेंद्रनाथ शुक्ल, १९५६
प्रा. च. को.–प्राचीन चरित्र कोश, सि. वि. चित्राव, १९३२
प्रा. भा. क.–प्राचीन भारतीय कला, म. श्री. माटे, १९७४
प्रा. भा. क. वि.–प्राचीन भारत के कलात्मक विनोद, हजारी प्रसाद द्विवेदी, १९५२
प्रा. भा. ना. शा.–प्राचीन भारतीय नाणक शास्त्र, म. के. ढवळीकर
प्रा. भा. प्र.–प्राचीन भारत के प्रसाधन अत्रिदेव विद्यालंकार
प्रा. भा. म.–प्राचीन भारतीय मनोरंजन, मन्मथराय, १९५७
प्रा. भा. लो. ध.–प्राचीन भारतीय लोकधर्म, वासुदेवशरण अग्रवाल, १९६४
प्रा. भा. वि.–प्राचीन भारतीय विद्यापीठे, ना. गो. तवकर, १९५०
प्रा. भा. वि. वि.–प्राचीन भारतीय विचार और विभूतियाँ, राधाकुमुद मुकर्जी, १९५८
प्रा. भा. वे.–प्राचीन भारतीय वेशभूषा, मोतीचंद्र, १९५१
प्रा. भा. शा. प.–प्राचीन भारतीय शासनपद्धति, अ. स. अळतेकर, १९५९
प्रा. भा. शि. प.–प्राचीन भारतीय शिक्षण पद्धती, अ स. अळतेकर
प्रा. भा. सां.–प्राचीन भारतकी सांग्रामिकता, रामदीन पांडेय, १९५७
प्रा. म.–प्राचीन महाराष्ट्र, श्रीधर व्यं. केतकर
प्रा. म. जै. सा.–प्राचीन मराठी जैन साहित्य, सुभाषचंद्र अक्कोळे, १९६८
प्रा. म. सं.–प्राचीन मराठी संतकवी, ज. र. आजगांवकर, १९५७
प्रा. मौ. बि.–प्राङ्मौर्य बिहार, देवसहाय त्रिवेद, १९५४
प्रा. सा. इ.–प्राकृत साहित्य का इतिहास, जगदीशचंद्र जैन, १९६१
प्रा. स्थ. को.–प्राचीन भारतीय स्थल कोश, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, १९६९
प्रि. तं. – Principles of Tantra, Arthur Avalon, 1960
प्रि. क. इं. – Primitive Culture of India, T. C. Hudson
प्रो. हि. अ. – Proto Historic Ahar, Sankalia, Deo, Ansari, 1969
फे. फे. आ. – Fairs and Festival of Assam, Hem Barua and J. D. Baveja, 1956
फो. आ. बें – Folk Art of Bengal, Ajit Mookerjee, 1946
फो. डा. म. – Folk Dance of Maharashtra, A. G. Agarkar, 1950
फो. लो. त. – Folk Lore of Tamilnadu, L. Chettiar, 1973
फो. लो. नॉ. इं. – Folk Lore in Northern India
बॉं. बे. क्रा. – Bombay Beggars and Criers
बि. पे. ला. – Bihar Peasant Life, G. A. Grierson, 1926
बु. इं. – Buddhist India, T. W. Rhys–Davids, 1959
बौ. द मी.–बौद्धदर्शन मीमांसा, पं. बलदेव उपाध्याय, १९५४
बौ. ध. द.–बौद्ध धर्म दर्शन, आचार्य नरेंद्र देव, १९५६
बौ. ध. बि.–बौद्ध धर्म और बिहार, हवलदार त्रिपाठी, १९६०
ब्र. लो. सा. अ.–ब्रज लोकसाहित्य का अध्ययन, सत्येंद्र, १९४९
ब्र. सि. मा.–ब्रह्म सिद्धान्त माला, बाबा गर्दे
ब्रा. भि. वि.–ब्राह्मणांतील भिन्न शाखीय विवाह, पं. महादेवशास्त्री दिवेकर, १९४५
भ. गी. सा. द.–भगवद्गीता : साक्षात्कारदर्शन, ग. वि. तुळपुळे, १९५९
भ. वि.– भक्ति का विकास, मुंशीराम शर्मा, १९५८
भां. प्रा. सं. मं. – भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिर, पुणे ४
भा. आ. – भारतके आदिवासी, जनक अरविंद, १९५७
भा. इ. रू. – भारतीय इतिहास की रूपरेखा, जयचंद्र विद्यालंकार, १९३३
भा. ज्यो. शा. – भारतीय ज्योतिष शास्त्र, शं. बा. दीक्षित, १९३१
भा. द. – भारतीय दर्शन, (१) बलदेव उपाध्याय, १९५७, (२) उमेश मिश्र, १९५७
भा. द. इ. – भारतीय दर्शनशास्त्र का इतिहास, देवराज, रामानंद तिवारी, १९५०
भा. द सं. – भारतीय दर्शन संग्रह, पं. द.

वा. जोग, १९५८
भा. ना. सा. – भारतीय नाट्य साहित्य, संपादक नरेंद्र
भा. प्र. वि. – भारतीय प्रतीक विद्या, जनार्दन मिश्र, १९५९
भा. प्रा. जै. ती. – भारतके प्राचीन जैन-तीर्थ, जगदीशचंद्र जैन, १९५२
भा. बृ. इ. – भारतवर्षका बृहद् इतिहास, भगवद्दत्त
भा. ब्रा. जा. प्र. – भारतीय ब्राह्मण जाति–प्रदीपिका, इंद्रदेव नारायण सिंह, १९५८
भा. मा. शा. – भारतीय मानसशास्त्र अथवा पातंजल योग दर्शन, कृ. के. कोल्हटकर, १९५९
भा. व. इ. – भारतीय वनस्पतींचा इतिहास, चिं. ग. काशीकर, १९७४
भा. वा. इ.– भारतीय वाद्यांचा इतिहास, ग. ह. तारळेकर, १९७३
भा. सं. – भागवत संप्रदाय, बलदेव उपाध्याय, १९५४
भा. सं. म. – भारतके संत-महात्मा, रामलाल, १९५७
भा. सा. – भारत सावित्री, वासुदेव शरण अग्रवाल, १९५७
भा. सा. शा. – भारतीय साहित्यशास्त्र, ग. त्र्यं. देशपांडे, १९५८
मं. म. – मंत्रमहोदधि
म. क. – मनोरम कश्मीर, मनोहर कृष्ण दर, १९५८
म. क. च. – महाराष्ट्रीय कविचरित्र ज. र. आजगावकर
म. च. को. – मध्ययुगीन चरित्रकोश, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, १९३७
म. जि. – महाराष्ट्राचे जिल्हे, महाराष्ट्र शासन
म. जी. – महाराष्ट्र जीवन–संपादक गंगाधर बाळकृष्ण सरदार, १९६०
म. त. म. – मराठी तत्त्वज्ञान महाकोश, संपा. – दे. द. वाडेकर, १९७४.
म. नि. वा. – मराठी निबंधाची वाटचाल, शं. गो. तुळपुळे, १९६८
म. प. – महाराष्ट्र परिचय, कर्वे, जोगळेकर, जोशी, १९५४
म. प्र. पु. रू. – मध्यप्रदेशके पुरातत्त्वकी रूपरेखा, मो. गं. दीक्षित, १९५४
म. भा. उ. वि. – मराठी भाषा उद्‌गम व विकास, कृ. पां. कुलकर्णी, १९५७
म. भा. उ. सं. – महाभारताचा उपसंहार, चिं. वि. वैद्य, १९२१
म. भा. व्या.– महाभारतावरील व्याख्याने, वाळशास्त्री हरदास, १९६१
म. म. वा. – महानुभावीय मराठी वाङमय, य. खु. देशपांडे, १९६०
म. यु. का. र. – महाभारत युद्धाची कालगणनात्मक रहस्ये, ग. वा. कवीश्वर, १९७१
म. यु. भा. – मध्ययुगीन भारत, चिं. वि. वैद्य, १९२३
म. लो. मा. – महाराष्ट्र लोकसाहित्य-माला, महाराष्ट्र लोकसाहित्य समिती
म. वा. इ. – मराठी वाङमयाचा इतिहास, ल. रा. पांगारकर
म. वा. को.– मराठी वाङमयकोश, गं. दे. खानोलकर, १९७७
म. वि. को. – मराठी विश्वकोश
म. व्यु. को. – मराठी व्युत्पत्तिकोश, कृ. पां. कुलकर्णी, १९४६
म. श. को – महाराष्ट्र शब्दकोश, संपा.– दाते, कर्वे
म. शि. वै. – मराठवाड्याचे शिल्प-वैभव, म. श्री. माटे
म. सा. – महाराष्ट्र सारस्वत, वि. ल. भावे, (१९५१) १९६३
म. सा. प. – महाराष्ट्र साहित्य पत्रिका
म. सा. पु. – महाराष्ट्राची सामाजिक पुनर्घटना, रा. शं. वाळिंबे, १९६२
म. हिं. क. – मध्यकालीन हिंदी कवयित्रियाँ, सावित्री सिन्हा, १९५३
म. ज्ञा. को. – महाराष्ट्रीय ज्ञानकोश, श्रीधर व्यंकटेश केतकर
मा. लो. वि. अ. – मालवी लोकगीत : एक विवेचनात्मक अध्ययन, चिन्तामणि उपाध्याय, १९६४
मा. सां. अ. – मानसोल्लास: एक सांस्कृतिक अध्ययन, शिवशेखर मिश्र, १९६६
मि. मि. इं. –Medieval Mysticism in India, Kshitimohan Sen
मि. रि. – Myth and Reality, D. D. Kosambi
मी. द.–मीमांसा दर्शन, मंडनमिश्र शास्त्री, १९५५
मुं. इ. जा.–मुंबई इलाख्यातील जाती, गो. मं. कालेलकर, १९२८
मु. इं. – Observations on the Mussulmauns of India, Mrs. Meer Hassan Ali, 1917
मु. का. भा.–मुगलकालीन भारत, आशीर्वादीलाल श्रीवास्तव, १९५९
मु. पू. म.–मुसलमानपूर्व महाराष्ट्र, वा. कृ. भावे, १९४६
मु. रि.–मुसलमानी रियासत, गो. स. सरदेसाई
मू. वि.–मूर्तिविज्ञान, ग. ह. खरे.
मों. जि. गॅ. – Gazetteer of India, Monghir District, 1960
म्यु. इं. – Music of India, Herbert A. Popley, 1921
यो. वा. सं. वा.–योगवासिष्ठ आणि संत वाङमय, य. वि. परांजपे, १९५४
यो. सो. पू–योगसोपान पूर्वचतुष्क, ह. ता. घमंडे, १९५१
र. भा.– रमणीय भारत, राम बिवलकर
रा. अ. ग्रं. – राजर्षि अभिनंदन ग्रंथ, संपादक–स्नातक, व्यास, १९६०
रा. क. रामकथा, कामिल बुल्के, १९६२
रा. जा- राजस्थान की जातियाँ, बजरंगलाल लोहिया, १९५४
रा. भ. शा.– रामभक्तिशाखा, रामनिरंजन पांडेय, १९६०

रा. भा. सा.–राजस्थानी भाषा और साहित्य, मोतीलाल मेनारिया, १९५२

रा. रा. का.–रास और रासान्वयी काव्य, दशरथ ओझा, दशरथ शर्मा, १९५९

रा. ले. सं.–राजवाडे लेख संग्रह, लक्ष्मणशास्त्री जोशी, १९५८

रा. स. रा.–राजगुरु समर्थ रामदास, शं. दा. पेंडसे, १९७४

रा. सं. सि. सा.–राधावल्लभ संप्रदाय-सिद्धांत और साहित्य, विजयेंद्र स्नातक, १९५८

रा. सा. म. उ.–रामभक्ति साहित्य में मधुर उपासना, श्रीभुवनेश्वरनाथ मिश्र, १९५७

रि. इं. – The Religions of India A. P. Karmarkar, 1950

रि. फि. अ. – Religion and Philosophy of the Atharvaveda, N. J. Shende, 1952

रे. क. इ. – Races and Culture of India, D. N. Majumdar, 1958

ल. वि. सो.–लग्नविधि आणि सोहळे, ना. के. अलोनी, १९०४

लो. ध. ना.–लोकधर्मी नाट्यपरंपरा, श्याम परमार, १९५९

लो. सा. अं.–लोकसाहित्याचे अंतःप्रवाह, प्रभाकर मांडे, १९७५

लो सा. भू–लोकसाहित्य की भूमिका, कृष्णदेव उपाध्याय, १९५७

लो. सा. रू. – लोकसाहित्याची रूपरेखा दुर्गा भागवत, १९५६

लौ. अ. – लौकिक अणि अलौकिक, रा. चिं. ढेरे, १९७६

लौ. दं. – लौकिक दंतकथा, गो. मं. कालेलकर, १९३४

व. श्रा. – वसुनंदी श्रावकाचार, आचार्य वसुनंदी

वा. गु. यु. – वाकाटक – गुप्त युग, मजुमदार, अल्तेकर, १९६८

वा. नृ. का. – वाकाटक नृपती व त्यांचा काल, वा. वि. मिराशी, १९५७

वि. उ. वि. – विज्ञान, उदय व विकास, प्र. न. जोशी, १९६०

वि. ए. इं. – Viharas in Ancient India, D. K. Barua, 1969

वि. द. ले. सं. १ – विद्वद्रत्न डॉ. दप्तरी–लेखसंग्रह, खंड पहिला, १९६९

वि. ध. द. – विश्वधर्म दर्शन, सांवलिया बिहारीलाल वर्मा, १९५३

वि. मुं. रा. प. – विशाल मुंबई राज्य परिचय, प्रसाद प्रकाशन, १९६०

वि. सं. मं. वा. – विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक

वि. स्मृ. ग्रं. – विक्रम स्मृति ग्रंथ, १९४५

वे. इं. – Vedic Index of Names and Subjects, Macdonell and Keith, 1954

वे. ए. – Vedic Age, History and Culture of Indian People, Vol. 1, Bharatiya Vidya Bhavan

वे. शा. दी. – वेदशास्त्र दीपिका,

वै. दे. अ. द. – वैदिक देवतांचे अभिनव दर्शन, रा. ना. दांडेकर, १९५१

वै. ध. – वैष्णव धर्म, परशुराम चतुर्वेदी

वै. नि. – वैदिक निबंध, ना. गो. चापेकर १९२९

वै. वा. इ. – वैदिक वाङमय का इतिहास पं. भगवद्दत्त, १९५६

वै. मा. – वैदिक माइथॉलॉजी, एम्. ए. मॅकडोनेल

वै. वा. इ. – वैदिक वाङमय का इतिहास, पं. भगवद्दत्त, १९५६

वै. वि. भा. प. – वैज्ञानिक विकास की भारतीय परंपरा, सत्यप्रकाश, १९५४

वै. शां. अ. म – वैदिक शांकर अद्वैत मतवाद, द. वा. जोग, १९५४

वै. सं. वि. – वैदिक संस्कृतीचा विकास, लक्ष्मणशास्त्री जोशी १९५१

वै. सा. – वैदिक साहित्य, पं. रामगोविंद त्रिवेदी, १९६०

वै. सा. सं. – वैदिक साहित्य और संस्कृति, बलदेव उपाध्याय, १९५८

व्या. ज्ञा. को. – व्यायाम ज्ञानकोश, सरदार मुजुमदार, बडोदे

व्र. चं. – व्रतचंद्रिका, गौरीशंकर उपाध्याय, १९५२

व्र. ति. नि. – व्रततिथि निर्णय, नेमिचंद शास्त्री, १९५६

व्र. प. – व्रतपरिचय, हनुमान शर्मा, १९५७

व्हि. गॉ. सा. इं. – The Village Gods of South India, Henry Whitehead, 1921

शं. हि. टा. – Shankardeo and His Times, Maheshwar Neog, 1965

श. क. – शब्दकल्पद्रुमः राजा राधाकांत देव.

शि. इ. – शिखांचा इतिहास, न. वि. गाडगीळ, १९६३

शृं. हा – शृंगार हाट, मोतीचंद्र, अग्रवाल, १९५९

श्री. द. क. – श्री दत्तोपासना कल्पद्रुम, पांडुरंगशास्त्री गोस्वामी, १९७७

श्री. द. ज्ञा. को. – श्रीदत्तात्रेय ज्ञानकोश प्र. न. जोशी, १९७४

श्रु. बो. – श्रुतिबोध, रा. वि. पटवर्धन, १९४२

श्रौ. ध. स्व. चि. – श्रौत धर्माची स्वरूप-चिकित्सा, चिं. ग. काशीकर, १९७७

ष. द. भे. – षट्चक्र दर्शन व भेदन, श्री. म. वैद्य, १९६७

सं. कौ. – संस्कार कौस्तुभ, वेंकटाचार्य गजेन्द्रगडकर, १९१४

सं. चा. अ. – संस्कृति के चार अध्याय, रामधारीसिंह दिनकर, १९५६

सं. प्र. – संस्कृतीची प्रतीके, पं महादेवशास्त्री जोशी, १९७६
सं. मि. – संशोधकाचा मित्र, ग. ह. खरे, १९३१
सं. मु. – संशोधन मुक्तावली, वा. वि. मिराशी.
सं. वि. – संस्कृति आणि विज्ञान, द. के. केळकर
सं. शा – संगीतशास्त्र, के. वासुदेवशास्त्री, १९५८
सं. शा. क. इ. – संगीत शास्त्रकार व कलावंत यांचा इतिहास, लक्ष्मण दत्तात्रय जोशी, १९३५
सं. सा. इ. – संस्कृत साहित्य का इतिहास, (१) ए. बी. कीथ, १९६० (२) बलदेव उपाध्याय, १९५६ (३) वाचस्पति–गैरोला, १९६०
सं. सा. लो. सा – संत साहित्य आणि लोक साहित्य, रा. चिं. ढेरे, १९७८
सं. सा. सो. इ. – संस्कृत साहित्याचा सोपपत्तिक इतिहास, वि. वा. करंबेळकर, १९५४
स. काँ. सा. इं. क. – Some Contributions of South India to Inalian Culture, K. Ayangar, 1942
स. द. सं. – सर्व दर्शन संग्रह, म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर, १९२४
स. पॉं. – The Serpent Power Arthur Avalon, 1958
स. भा. प्र. व. – सचित्र भारत प्रवास वर्णन, बाळासाहेब घोरपडे, १९१२
स. म. खे. पु. – सचित्र मराठी खेळांचे पुस्तक, अ. बा. देवधर, १९०५
सा. इं. – Sadhus of India, B D. Tripathi, 1978
सा. इं. इ. गॉं. गॉं. – South Indian Images of Gods and Goddesses
सा. इं. फे. – South Inalian Festivities, P. V. Jagadisa Ayyar, 1921
सा. शा. इ. – संस्कृत साहित्य शास्त्राचा इतिहास, पां. वा. काणे, १९३१
सिं. क. – Sindhi Culture, U. T. Thakur, 1959
सि. सा. – सिद्ध साहित्य, धर्मवीर भारती, १९५५
सी. ऋ. – The Seeres of the Rigveda, V. G. Rahurkar, 1964
सु. वि. को. – सुलभ विश्वकोश, य. रा. दाते, चिं. ग. कर्वे
से. इं. – Census of India
से. सें. – A Seminar on Saints T. M. P. Mahadevan, 1960
सो. इं. ट्रें. – Sources of Indian Tradition, Wm. Theodore de Bary, 1958
सो. चें. म. – Social Changes in Malabar, M. S. A. Rao, 1957
स्कू. से. जै. लि. – Schools and Sects in Jain Literature, Amulyachandra Sen, 1931
स्ट. इं. क. हि. – Studies in Indian Cultural History, P. K. Gode
स्ट. उ. प – Studies in the Upapuranas, vol. 1, R. C. Hazra, 1958
स्ट. ओ. फो. – Studies of Orissan Folklore, Kunjaviharidas, 1953
स्वा. के. अ. ग्रं. – श्रीस्वामी केवलानंद अभिनंदन ग्रंथ, १९५२
ह. कु. प्रा. लो. – हमारे कुछ प्राचीन लोकोत्सव, मन्मथ राय, १९५३
ह. च. सां. अ. – हर्षचरित–एक सांस्कृतिक अध्ययन, वासुदेवशरण अग्रवाल, १९५३
ह. प्र. लो. सा. – हरियाणा प्रदेश का लोक साहित्य, शंकरलाल यादव, १९६०
हिं. क. भ तु. अ. – हिंदी और कन्नड में भक्ति आंदोलन का तुलनात्मक अध्ययन, हिरण्मय, १९५९
हिं. ध. त. – हिंदू धर्म आणि तत्वज्ञान, स. अं. डांगे, १९७३
हिं. मॅं. क. से. – Hindu Manners, Customs ane Cerimonials, H, K, Beauchamp, 1959
हिं. रा. तं. – हिंदु राज्य तंत्र, काशी प्रसाद जायस्वाल, १९५२
हिं. वि. को. – हिन्दी विश्व–कोश, संपा.- फूलदेवसहाय वर्मा
हिं. सं. – हिंदू संस्कार, राजबली पांडेय, १९५७
हिं. स. सं. वि. – हिंदुसमाज संघटना आणि विघटना, पु. ग. सहस्रबुद्धे, १९६७
हिं. सा. – हिंदी साहित्य, धीरेंद्र वर्मा, व्रजेश्वर वर्मा, १९६२
हिं. सा. को. – हिंदी साहित्य कोश, संपादक–धीरेंद्र वर्मा, १९५९
हिं. सा. बि. – हिंदी साहित्य और बिहार संपादक–शिवपूजन सहाय, १९६०
हिं. सा. बृ. इ. – हिंदी साहित्य का बृहत् इतिहास, संपा.–राजबली पांडेय.
हिं. हॉं. से. – Hindu Holidays Cerimonials, B. A. Gupte, 1916
हिं. इं. ई. आ. – History of Indian and Eastern Architecure, Vols. I and II. James Ferguss-on, 1967
हिं. इं. फि. – A History of Indani Philosophy, Surendranath Dasgupta
हिं. इं. लॉ. – History of Indian Logic, S. C. Vidhyabhusan

हि. ओ. – History of Orissa, Harekrishna Mahtab, 1959
हि. ओ. ले. – The History af Orissa and its Lessons, N. K. Basu
हि. क. इं पी. – History and Culture of the Indian People, Bharatiya Vidya Bhavan
हि. जॉ. ए. इं. – Historical Geography of Ancient India, B. C. Law, 1954
हि. जै. मो. – History of Jain Monachism, S B. Deo, 1956
हि. द. ना. स. – History of Dasanami Naga Sanyasis, Sir Panchayatti Akhar Mahanirvani
हि. ध. – History of Dharma Shastra, P. V. Kane.
हि. सं. पो. – History of Sanskrit Poetics, P. V. Kane

# संदर्भ ग्रंथ सूची


अध्यात्म दर्शन– के. वि. बेलसरे, १९६२
अष्टछाप परिचय – धीरेन्द्र वर्मा, १९४७
अष्ट विनायक – सदानंद चेंदवणकर, १९६४
अहिच्छत्रा – कृष्णदत्त वाजपेयी, १९५६
आंध्र प्रदेश – (१) प्रकाशन विभाग, सूचना व प्रसारण मंत्रालय भारत सरकार १९६८
(२) भारत दर्शन–अरिगपूडि १९७३
आंध्र भारती – श्री. बालशौरी रेड्डी, १९५९
आमची नक्षत्रे – र. वि. वैद्य, १९६३
आमची संस्कृती – इरावती कर्वे, १९६०
आर्य संस्कृती – बलदेव उपाध्याय, १९५३
आज्ञापत्र – (१) संपादक– रा. चिं. ढेरे, प्र. पं. जोशी, १९६०
(२) संपादक–व. गो. गर्गे, द्वा. वा. घाटे, १९४५
उज्जयिनी – इतिहास तथा पुरातत्व, स. का. दीक्षित, १९६८
उडीसा – भारत दर्शन माला– २६, तारिणीचरणदास चिदानंद, १९७३
उपनिषत्सार – शंकरराव देव १९५०
उपनिषद्रहस्य – रा. द. रानडे, १९५९
उर्दू ड्रामा –Rajendranath Shaida, March of India, April-May 1958, Voc. X. No. 4-5
एर्ना. गॅझे. – Gazetteer of India, Keral, Dist. Ernakulam, Menon, 1965
ॐकार रहस्य – शांताराम आठवले, १९७०
ओरिसा – Orissa, S. C. Dash, Pub. Division Govt. of India 1970
औरंगा. गॅझे. – Gazetteer of India Aurangabad District, B. G. Kunte, 1977
कंकावटी – झवेरचंद मेघाणी १९५८
कर्नाटक – पं. महादेवशास्त्री जोशी,
कामकल्प – Kama Kalpa or The Hindu Ritual of Love, P. Thomas, 1959
कामसूत्र – Kama–Sutra, The Hindu Art of Love, B. N. Basu, 1959
काव्यप्रकाश – मंगरूळकर व अर्जुनवाडकर, १९६२
कुमाऊं – राहुल सांकृत्यायन, १९५९
केरळ – पं. महादेवशास्त्री जोशी, १९६०
कोल्हा. गॅझे. – Gazetteer of India, Kolhapur District, 1960
गंगाजळी – रा. चिं. ढेरे, १९७२
गया गॅझे. – Gazetteer of India, Gaya District, P. C. Roy Choudhury, 1957
चक्रवर्ति अशोक – अभिराग, १९५७
चित्पावन – ना. गो. चापेकर, १९३८
जडवाद – जडवाद अर्थात अनीश्वरवाद, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, १९४१
जैन धर्म – कैलाशचंद्र शास्त्री, १९५५
ठाणे गॅझे. – Gazetteer of India, Thana District
ज्योतिर्विलास – शं. बा. दीक्षित, १९४८
तर्पण – ना. गो. चापेकर, १९४८
त्रिवेंद्रम गॅझे. – Gazetteer of India. Trivendrum Dist.
दर्शन और चिंतन – पं. सुखलालजी, १९५७
दि अॅबोरिजिनल्स – The Aboriginal Races of India, S. S. Sarkar, 1954
दि परधान्स – The Perdhans of the upper Nermada Valley, S. Hivale, 1946
दि सिखस् – Archer, 1946
देवीकोश – आदिशक्तीचे विश्वस्वरूप, प्र. कृ. प्रभुदेसाई, १९६८

**नंदादीप** – संपा. सरोजिनी बाबर, १९७२
**नक्षत्रलोक** – पं. महादेवशास्त्री जोशी, १९५७
**नागेश संप्रदाय** – यू. म. पठाण, १९६३
**नाथ संप्रदाय** – हजारीप्रसाद द्विवेदी, १९५०
**परंपरा** – परंपरा लोकगीत, संपा. नारायणसिंह भाटी
**पशुपुराण** –Pashu Puran, Hattiangdi, 1967
**पारशांचा इतिहास** – म. वि. काथवटे, १९२१
**पुराणतत्त्वमीमांसा** – श्रीकृष्णमणि त्रिपाठी, १९६१
**पुरातत्त्व विद्या** – शां. भा. देव, १९७६
**पूजातत्त्व** – गोपीनाथ कविराज, १९५८
**बदलापूर** – ना. गो. चापेकर
**बीड गॅझे.** – Gazetteer of India Beed Dist. Maharashtra state
**भगवान बुद्धासाठी** – शं. द. देव, १९४७
**भगवान श्रीकृष्ण** – पं. बाळशास्त्री हरदास, १९५२
**भूदानगंगा** – विनोबा भावे, १९५८
**मणिकांचन** – सेतुमाधवराव पगडी, १९६१
**मतिप्रकाश** – पां. कृ. सावळापूरकर, १९७४
**मदुरा गॅझे.** – Gazetteer of India, Madurai District, B. S. Baliga, 1960
**मध्यप्रदेश** – एक परिचय, सूचना तथा प्रकाशन, भोपाळ, १९६३
**मराठी आरती** – म. वि. गोखले. १९६७
**महाराष्ट्रातील पुरातत्व** – श्री. ह. धी. सांकलिया, म. श्री. माटे, १९७६
**माझे समकालीन** – न. वि. गाडगीळ
**मानसोल्लास** – एक सांस्कृतिक अध्ययन, शिवशेखर मिश्र, १९६६
**मुलांचे इकबाल** – श्रीपाद जोशी, १९६०
**योगदीपिका** – बी. के. एस्. आयंगार १९७५
**रज:कण** – ना. गो. चापेकर, १९४३
**राजस्थान** –(१) पं. महादेवशास्त्री जोशी, (2) Ra'jasthan, Dharm Pal, National Book Trust (3) Rajasthan, Publications Division, Govt. of India
**लज्जागौरी** – श्री. रा. चिं. ढेरे, १९७८
**लक्ष्मीतंत्र** – पं. व्ही. कृष्णमाचार्य १९५९
**लीळाचरित्र** (१) शं. गो. तुळपुळे, १९६६ (२) वि. भि. कोलते १९७८
**लोकयात्रा** – श्रीपाद जोशी, १९६०
**वरद नागेश** – संपा.–यू. म. पठाण, १९७०
**विश्वधर्मदर्शन** – सांवलिया बिहारीलाल वर्मा, १९५३
**वेदविद्या** – वासुदेवशरण अग्रवाल, १९५९
**व्रतचंद्रिका** – गौरीशंकर उपाध्याय, १९५२
**व्रतपरिचय** – हनुमान शर्मा, १९५७
**व्रतराज** – विश्वनाथ शर्मा, १९५३
**शंकरदेव** – Shankardeo and His Times, Maheshwar Niyog 1965
**शंकराचार्य** – शंकराचार्य व त्यांचा संप्रदाय, म. रा. बोडस, १९२३
**शिवलिंगोपासना** – स. कृ. फडके, १९५४
**शृंगारनायिका** – स. आ. जोगळेकर, १९५५
**शैवमत** – यदुवंशी, १९५५
**श्रीगुरुदत्तयोग** – श्री. शं. खानवेलकर, १९५७
**श्रीरामकोश** – संपादक अ. ल. गाडगीळ, १९७३
**श्री विद्यार्णव तंत्र** – Iconography of Shri Vidyarnava Tantra S. Shri Kanth Shastri
**श्रीशंकराचार्य** – पं. बलदेव उपाध्याय, १९५०
**संगीत शास्त्र** – के. वासुदेव शास्त्री, १९५८
**सह्याद्रि** – स. आ. जोगळेकर, १९५२
**सातारा गॅझे.** – Gazetteer of India Maharashtra Dist. Satara, S. M Payadi, 1963
**सारण गॅझे.** – Gazetteer of India Saran Dist
**सिंधी कल्चर** – Sindhi culture, U. T. ThaKur, 1959
**स्त्रीजीवन** – साने गुरुजी, १९६२
**स्मृतिगंध** – ना. गो. दीक्षित १९७२
**हडप्पा** – सिंधु सभ्यता का आदिकेंद्र, केदारनाथ शास्त्री, १९५९
**हिंदुत्व** – रामदास गौड, १९३९
**हिमालयदर्शन** – शं. स. दाते, १९५१
**ज्ञानोबा माऊली** – रा. चिं. ढेरे, १९६०

• • •

# भारतीय संस्कृतिकोश

## खंड पहिला

**अं** अ च्या डोक्यावर टिंब दिल्याने हे अक्षर बनते. मात्र ही पद्धत फारशी प्राचीन नाही. गिरनारच्या शिलालेखात अ च्या पुढे टिंब देऊन ते बनविले आहे. इ. स. च्या चौथ्या शतकात अ च्या डोक्यावर टिंबाऐवजी लहान रेघ दिलेली आढळते. अं हे मंत्रशास्त्रात पहिले बीज मानले आहे. [ म. ज्ञा. को. ]

**अंकगणित** एक शास्त्र. संस्कृतीची वाढ केवळ भौतिक साधनांनी होऊ शकत नाही. त्यासाठी मानसिक साधनांचीही आवश्यकता असते. भाषा व गणित ही दोन मानवी व्यवहाराची मानसिक साधने होत. विचार आणि संशोधन यांच्या दृष्टीने गणिताचे महत्त्व भाषेपेक्षाही अधिक आहे. गणिताच्या साह्यानेच मनुष्य विश्वाचे आकलन करण्यास अधिक समर्थ झाला आहे.

प्राचीन काळी गणितशास्त्र हा वेदांगज्योतिषाचा एक भाग मानला जात असे. यज्ञातील विविध आकृतींचे क्षेत्रफळ काढण्यासाठीही या शास्त्राचा उपयोग करीत. त्याचप्रमाणे परमेश्वरप्राप्तीचे साधन असलेली मनाची एकाग्रता या शास्त्राच्या अभ्यासाने साध्य होते, अशीही समजूत होती. गणितशास्त्राच्या अनेक शाखा आहेत. त्यापैकी अंकगणित ही सर्वांत सोपी व उपयुक्त शाखा आहे. अंकगणिताला भास्कराचार्यांनी पाटीगणित असे नाव दिले आहे. त्याला व्यक्तगणित असेही म्हणतात.

संख्या मोजणे व संख्या लिहिणे या बाबतीत प्राचीन अन्य राष्ट्रांच्या तुलनेने वैदिक लोक बरेच पुढे गेले होते. काल व अक्षर यांच्या गणनेसाठी त्यांनी दशांकपद्धती शोधून काढली. गोपथब्राह्मणात अंक शब्द संख्यावाचक आहे (१.१.२७). गणितात शून्याची कल्पना हा प्राचीन भारतीयांचा मोठाच शोध होय. शून्यकल्पनेने गणितशास्त्रात नवे युग निर्माण झाले. वैदिक वाङ्मयात शून्य शब्दाचा अर्थ रिते किंवा पोकळ असा दिलेला आहे (श. ब्रा. २.३.१-९; तै. ब्रा. २.१.२.१२).

वस्तूंची गणना प्रथम हातापायांच्या बोटांच्या मदतीने सुरू झाली. त्यासाठी उभ्या रेघांचाही उपयोग केला जात असे. त्यानंतर संख्यावाचक शब्द निर्माण झाले. पाच, दहा, शंभर, इ. संख्यांसाठी नुसत्या रेघा मारण्याची पद्धत इजिप्त, असीरिया रोम, इ. देशांत चालू होती. संख्या व्यक्त करण्याची दुसरी पद्धत म्हणजे लिपीतील अक्षरे त्यांच्या अनुक्रमाप्रमाणे वापरणे. संख्यावाचक प्रथमाक्षर या संख्येचे चिन्ह म्हणून वापरण्याची पद्धतीही अस्तित्वात होती. रोमन C, M ही अक्षरे अद्यापही अशा प्रकारे वापरली जातात.

अंक याचा मूळ अर्थ चिन्ह किंवा खूण असाच आहे. 'उत्सङ्गचिह्नयोरङ्कः' (अमर). १ ते ९ अंक व ० (शून्य) ही चिन्हे कशी उगम पावली, त्याचा इतिहास देताना महाराष्ट्रीय ज्ञानकोशात म्हटले आहे, की संख्यांच्या नावाची आद्याक्षरे हीच पूर्वी संख्याचिन्हे होती आणि त्या आद्याक्षरांची अपभ्रष्ट रूपे म्हणजेच सांप्रतचे आकडे होत –

| मूळ शब्द | शब्दचिन्ह | अपभ्रष्ट रूप |
|---|---|---|
| एक | ए | १ |
| द्वौ | द | २ |
| त्रि | त्र | ३ |
| पञ्चन् | प | ५ |
| नव | न | ९ |
| शून्य | श | ० |

नाणेघाट येथे सापडलेल्या एका शिलालेखावरून असे दिसते, की हे अंक हिंदू लोकांत सनपूर्व ३०० पासून प्रचलित होते हेच अंक इ. स. ६०० च्या सुमारास अरबांनी युरोपात नेले.

एकापासून परार्धपर्यंत संख्यांची गणना करणे हे वैदिक आर्यांना माहीत होते, यात शंका नाही. शुक्ल यजुर्वेदात (१७.२) एक (१), दश (१०), शत (१००), सहस्र (१०००), नियुत (१००,०००), अर्बुद (१०,०००,०००), परार्ध (१,०००,०००,०००,०००) येथपर्यंत संख्यांचा उल्लेख आहे. मैत्रायणी व काठक या संहिता, पंचविंश ब्राह्मण, सांख्यायन श्रौतसूत्र, इ. ग्रंथांतही अशा प्रकारची संख्यांची नावे आहेत. जन्म, नामकरण, विवाह, मृत्यू, इ. प्रसंगी किंवा मंत्र–तंत्रात्मक विधीत १ पासून १०० पर्यंत अनेक संख्यांची नावे वेदात

वापरलेली आहेत. ललितविस्तर (सनपूर्व १०० वर्षे) या बौद्ध ग्रंथात शतगुणोत्तर पद्धतीने एक तल्लक्षण = $१०^{५३}$ पर्यंत संख्यांची गणना दिलेली आहे.

आपल्या अंकपद्धतीत आकड्यांना त्यांच्या विशिष्ट स्थानामुळे भिन्न किंमत प्राप्त होते. एखाद्या संख्येतील ज्या स्थानी मूळ किंमतीचा कोणताही आकडा ठेवता येत नाही; पण जे स्थान भरणे आवश्यक असते, ते भरण्यासाठी शून्याचा उपयोग होतो. शून्याला स्वतंत्रपणे काही किंमत नसते; पण दुसऱ्या मोठमोठ्या संख्या सुलभ रीतीने मांडण्यासाठी त्याचा फार उपयोग होतो.

दशमानपद्धतीने संख्या लिहिणे, हा भारतीय अंकगणितातला एक अत्यंत महत्त्वाचा शोध आहे. सनपूर्व दोन हजार वर्षांच्या सुमारास हा शोध लागला असावा. परंतु त्या पद्धतीने संख्या लिहिल्याचे उदाहरण मात्र इ. स. ६ व्या शतकाअखेरचे आहे. त्यापूर्वीचा तसा दाखला जगात कुठेही उपलब्ध नाही. दशांश अपूर्णांकही भारतीय गणितज्ञांस त्याच काळात माहीत होते, असे दिसते.

ब्रह्मगुप्ताने आपल्या ब्राह्म-स्फुट-सिद्धांत या ग्रंथात अंकगणितातील वीस प्रक्रिया दिल्या आहेत—बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार, वर्ग, वर्गमूळ, घन, घनमूळ, अपूर्णांक, त्रैराशिक, पंचराशिक, सप्तराशिक, नवराशिक, एकादशराशिक, भाण्ड–प्रतिभाण्ड (अदलाबदल व विनिमय), इत्यादी.

बेरीज (संकलित) व वजाबाकी (व्युत्कलित) करण्याच्या क्रम व उत्क्रम अशा दोन पद्धती होत्या. जिच्यात एकम्‌कडून प्रारंभ केला जातो तो क्रम व त्याच्या उलट तो उत्क्रम होय. सध्याची अंकगणिताची पद्धत क्रमपद्धतीशी जुळती आहे. गुणाकार करण्याच्या अनेक पद्धती ब्रह्मगुप्त, श्रीधर, महावीर, भास्कर, श्रीपती, इ. गणिती पंडितांनी दिलेल्या आहेत. त्यापैकी गोमूत्रिका पद्धती सध्याच्या पद्धतीशी जुळती आहे. भागाकार करण्याची सध्याची रीत फार पूर्वीपासून चालत आलेली आहे. त्याचप्रमाणे वर्गमूळादी काढण्याच्या पद्धतीही वरील ग्रंथकारांच्या ग्रंथांत आढळतात. व्यवहारी अपूर्णांक व पदावली सोडवण्याची रीत भारतीयांना प्राचीन काळापासून ज्ञात आहे. याचप्रमाणे त्रैराशिकादी प्रकारही सुमारे दोन हजार वर्षांपूर्वीपासून भारतात प्रचलित आहेत.

कर्जाऊ रक्कम देऊन तिच्यावर व्याज आकारण्याची प्रथाही पुरातन आहे. पाणिनी, कौटिल्य व गौतम हे तिचा उल्लेख करतात. आर्यभटीय व गणितसारसंग्रह या ग्रंथांत व्याजाचा हिशेब करण्याच्या अनेक रीती सांगून, त्यावरील उदाहरणेही दिलेली आहेत.

श्रीधर, द्वितीय आर्यभट, महावीर, यांनी कोणत्याही संख्येस शून्याने गुणिले अथवा भागिले तर गुणाकार वा भागाकार शून्य येतो, असे लिहिले आहे. पण त्यात एक चूक आहे ती ही, की शून्याने एखाद्या संख्येस भागिले असता भागाकार शून्य न येता अनंत येतो.

बखशाली हस्तीलिपी, त्रिशतिका, गणितसारसंग्रह, गणिततिलक, लीलावती, गणितकौमुदी, पाटीसूत्र, इ. ग्रंथांमध्ये पाटीगणिताविषयी बरीच माहिती मिळते. भास्कराचार्यांनी पाटीगणिताचे आठ विभाग केले आहेत – (१) परिभाषा अथवा कोष्टके (विविध परिमाणे). (२) परिकर्माष्टक (आठ प्रकारची बेरीज, वजावाकी, गुणाकार, इ. कर्मे). (३) व्यस्तविधी, इष्टकर्म, विषयकर्म, त्रैराशिक, इ. संकीर्ण विषय. (४) मिश्रक व्यवहार (व्याज, हौद, नळचा, क्रयविक्रय, वर्णज्ञान (सोन्याचा कस), छंदश्चिती, शिल्प, इ.). (५) श्रेढीव्यवहार. (६) क्षेत्रव्यवहार (क्षेत्रफळ, घनफळ, चिती, राशी, छाया, इ.). (७) कुट्टक–अतिशय व्यापक स्वरूपाचा दृढभाजक. व (८) गणितपाश–यावच्छक्य भेदसंख्या सांगणे (परम्युटेशन व काँबिनेशन). अंकगणितात हल्ली ज्या ज्या प्रकरणांचा समावेश होतो, ती ती बहुतेक सर्व यांत आली आहेत.

सांप्रत जी अधिक, उणे, गुणिले, वगैरेंची चिन्हे प्रचारात आहेत, ती भारतात पूर्वी ज्ञात नव्हती. संख्या निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या क्रमाने मांडणे, या पलिकडे काही योजना नव्हती. काही वर्णात्मक चिन्हे विशिष्ट ग्रंथकारांनी व्यक्तिशः योजलेली आढळतात; परंतु त्यांचा सार्वत्रिक प्रचार झाला नव्हता. इ. स. च्या पहिल्या शतकातल्या एका संस्कृत ग्रंथात युती म्हणजे बेरीज या शब्दातील आद्याक्षर यु हे (+) चिन्हाऐवजी योजले आहे, तर सांप्रतचे (–) चिन्ह वजाबाकीसाठी वापरले आहे. फल म्हणजे उत्तर, यातील आद्याक्षर फ हे समत्वचिन्ह म्हणून योजले असून, सांप्रत त्यासाठी (=) हे चिन्ह वापरले जाते. सध्या प्रचारात असलेली चिन्हे मूळ युरोपात उगम पावली आहेत.

प्राचीन गणितज्ञांना अंकांच्या अनेक श्रेणी माहीत होत्या. श्रेणींचे युग्म व अयुग्म (सम व विषम), असे विभाजन केलेलेही आढळते. त्रिलोकसाराच्या लोकसामान्याधिकार या प्रकरणात निरनिराळ्या चौदा श्रेणी दिलेल्या आहेत.

अशा प्रकारे अठरापर्यंत आकड्यांच्या प्रचंड संख्यांची गणना, दशमानपद्धती, एक ते नऊ आकडे, शून्याचा उपयोग, इ. महत्त्वाचे शोध लावून प्राचीन भारतीयांनी जी गणितशास्त्राची परंपरा सुरू केली, ती ख्रिस्ती शतकाच्या १२ व्या शतकापर्यंत अबाधित चालली. ख्रिस्तोत्तर काळात आर्यभट,

ब्रह्मगुप्त, श्रीधर, पद्मनाभ व भास्कराचार्य हे महान ज्योतिषी व गणिती होऊन गेले. त्यांनी ज्योतिषशास्त्राला साहाय्यक विषय म्हणून गणिशास्त्राचा अभ्यास केला व त्यात अनेक शोध लावले. त्यानंतरच्या ६–७ शे वर्षांच्या अंधकारयुगात इतर शास्त्रांप्रमाणेच या विषयातही काही प्रगती झाली नाही. १९ व्या शतकाच्या अखेरीस मात्र एक महान गणिती भारतात जन्मला. त्याचे नाव रामानुजन. त्यांची अलौकिक बुद्धिमत्ता व गणितातले त्यांचे विलक्षण शोध पाहून पाश्चात्त्य गणिती आश्चर्यस्तंभित झाले. लंडनच्या रॉयल सोसायटीने त्यांना F. R. S. ही सर्वश्रेष्ठ पदवी देऊन त्यांचा गौरव केला. २० व्या शतकात अनेक भारतीय गणितज्ञांनी त्या शास्त्रात संशोधनपूर्वक बरीच भर घातली आहे व प्राचीन भारतीय गणितपरंपरेचे पुनरुज्जीवन केले आहे. पाहा—अंकविद्या.
[ एन्सा. रि. ए.; म. ज्ञा. को.; वै. वि. भा. प.; वि. उ. वि. ]

**अंकम्मा** द. भारतातील ग्रामदेवता. मारी देवतांतही हिची गणना होते. गावाबाहेर हिच्या नावाने एक ओबडधोबड दगडी मूर्ती बसविलेली असते. मातीच्या गाडग्यात कवड्या घालून त्या रूपाने घरातही हिची स्थापना करतात. पटकीची साथ येते तेव्हा हिला कोंबड्या-बकऱ्याचे बळी देतात. हिची जत्रा पाच दिवस चालते. त्या जत्रेत हिला रेडा बळी देतात. पुजारी कुंभार असतो. रेणुकेने एका प्रसंगी भयानक रूप घेतले, तीच ही अंकम्मा होय. हिच्या अनेक दंतकथा असून, त्यांत ब्राह्मणी धर्माचा उपहास आढळतो. हिलाच अंकरम्मा किंवा अंगरम्मा असेही म्हणतात. [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

**अंकलम्मा** द. भारतातील ग्रामदेवता. हिला विशेषेकरून स्त्रिया भजतात. हिच्या जत्रेच्या वेळी हिची नवी मृण्मय मूर्ती करून बसविल्यावर ग्रामीण स्त्रिया तिच्या भोवती फेर धरून रात्रभर नाचतात. हिची मूर्ती बसलेली व चतुर्भुज असते. एका हाती पाश आणि दुसऱ्या हाती ब्रह्मकपाल असते. भुताने झपाटलेली माणसे हिच्या कृपेने बरी होतात, अशी समजूत आहे. हिला पशुबलीच्या ऐवजी भाताचा नैवेद्य चालतो. [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

**अंकविद्या** आजमितीस गणितशास्त्रात असाधारण प्रगती झाली आहे. या शास्त्राचा पाया म्हणजे दशमानात्मक संख्यालेखनपद्धती हा होय. ही पद्धती नऊ अंक व शून्याचे चिन्ह यांवर बसविलेली आहे. ही एकद्रम अस्तित्वात आली नसून, प्राथमिक अंकांत व संख्यालेखनपद्धतीत सुधारणा होत गेल्या, तसतशी कालांतराने आजच्या परिणतावस्थेस पोचली आहे. मानवी व्यवहार जसजसे वाढू लागले, तसतशी मानवाला हिशेब करण्याची गरज निर्माण झाली. त्यासाठी अंक व सोयिस्कर संख्यालेखनपद्धती तयार करण्याची गरज निर्माण झाली. हिशेबाच्या निरनिराळ्या पद्धती व तदनुषंगिक अंकपाठ, माणसाला मुळात आपल्या हाताकडे पाहून सुचले असावे, अशी सार्वत्रिक कल्पना आहे. आजही हिशेब करण्याच्या कामी हातांच्या बोटांचा उपयोग सर्वत्र केला जातो. तसा तो करीत असतानाच प्राचीन काळी कोणीतरी त्रिमान्, चतुर्मान, पंचमान, दशमान, इ. गणनापद्धती बसविल्या असाव्या. राजवाडे म्हणतात, की संस्कृतात तीन वचने व त्यांचे प्रत्यय दिसतात, ते ज्या कोणत्या तरी काळी आपल्या पूर्वजांना केवळ तीनच आकडे मोजता येत होते, अशा अवस्थेची स्मारके आहेत. माणसाच्या बोटांना प्रत्येकी तीन पेरे आहेत, यावरून तिनाच्या गटांनी हिशेब करण्याची त्रिमानपद्धती सुचली असावी. अंगठा सोडून चार बोटांवर हिशेब करणाऱ्यांनी चतुर्मानपद्धती बसविली. चार बोटे व प्रत्येकाची तीन पेरे या सर्वांचा उपयोग करून द्वादशमान पद्धती उदयास आली. एका हाताच्या सर्व बोटांचा उपयोग करणाऱ्यांना पंचमानपद्धती व दोन्ही हातांच्या बोटांचा एकदम उपयोग करणाऱ्यांना दशमानपद्धती सुचली असावी. अशा प्रकारे हिशेब करण्याच्या कामी हातांच्या बोटांचा उपयोग करण्याची पद्धती सर्व देशांत पुरातन कालापासून चालत आलेली आहे.

अंक म्हणजे संख्यादर्शक दृश्य चिन्हे, अशी जर त्या शब्दाची व्याख्या केली, तर हातांची बोटे हेच वस्तुतः प्राचीन काळातले अंक होते, असे म्हटले पाहिजे. संख्या व गणित यांच्यासाठी दृश्य चिन्हांचा उपयोग करणे, ही गोष्ट लेखनकलेहूनच नव्हे; तर दशमानात्मक संख्यावाचक परिभाषेहूनही अधिक प्राचीन आहे. तात्पुरत्या हिशेबासाठी हातांची बोटे अंकांचे कार्य करीत; पण संख्यांची कायमची नोंद करून ठेवण्याची गरज जेव्हा उत्पन्न झाली, तेव्हा त्याचबरोबर अंकासाठी कोणत्यातरी लिखित चिन्हाचीही आवश्यकता भासू लागली. अशा स्थितीत एक ही संख्या दर्शविण्याकरिता एक उभी रेघ ओढावी, असे त्या काळच्या लोकांना सकृद्दर्शनी सुचले असावे. इजिप्तमधील चित्रलिपीत एक ते नऊ अंक तितक्या उभ्या रेषांनी दाखवीत असत. दहा, शंभर व हजार या संख्यासाठी निराळी चिन्हे असत. लक्षाकरिता बेडकाचे व दशलक्षाकरिता आश्चर्याने बाहू पसरलेल्या माणसाचे चित्र काढीत.

सध्या उपलब्ध असलेले भारतातले सर्वांत प्राचीन अंक हे अशोकाच्या नाणेघाटातल्या शिलालेखात दिसणारे अंक होत.

हा लेख सनपूर्व सुमारे तिसऱ्या शतकातला आहे. अशोकाच्या लेखात दोनशेकरिता तीन वेगवेगळी चिन्हे सापडतात. त्यावरून अंकाकरिता लिखित चिन्हे वापरण्याची पद्धती भारतात अशोका-च्याही पूर्वी कित्येक शतके प्रचलित असली पाहिजे. प्राचीन भारतीय अंकपाठात एक ते तीन या संख्यांकरिता तितक्या आडव्या रेषा काढीत. चार ते नऊ यांच्यासाठी सहा चिन्हे, दहा ते नव्वद दशकांकरिता नऊ चिन्हे आणि शंभर व हजार यांकरिता एकेक चिन्ह अशी चिन्हे अथवा अंक होते.

इजिप्शियन लोकांचे अंक व प्राचीन भारतीय अंक यांची तुलना पुढीलप्रमाणे करता येते –

(१) दोन्ही अंकपाठांत पहिले तीन अंक रेषांनी दर्शविलेले असतात.

(२) दोन्हीकडच्या संख्यावाचक चिन्हांची संख्या सारखी असून, ज्या संख्येकरिता इजिप्शियन अंकपाठात निराळे चिन्ह असते, त्याच संख्येकरिता भारतीय अंकपाठातही बहुधा निराळी आकृती दृष्टीस पडते.

(३) दोनशे, तीनशे, इ. शंभराच्या पटी दाखवणाऱ्या शतकाच्या अंकांकरिता व दोन हजार, तीन हजार, इ. हजाराच्या पटी दाखवणाऱ्या सहस्राच्या अंकांकरिता दोन्ही ठिकाणीं निराळी चिन्हे न योजिता शंभर किंवा हजार यांच्या अंकास पटीची निदर्शक चिन्हेच जोडून काम साधलेले आहे.

पण या तीन गोष्टी सोडून दिल्या, तर इजिप्शियन व भारतीय अंकपाठांत कुठेही सादृश्य नाही. चार या अंकाकरिता इजिप्शियन लोकांनी मूळची रेषायुक्त आकृतीच कायम ठेवली आहे, तर भारतात त्या संख्येकरिता निराळी आकृती निर्मिलेली आहे. भारतात दोनशे व तीनशे यांच्याकरिता शंभराच्या अंकास व दोन हजार आणि तीन हजार यांच्याकरिता सहस्राच्या अंकास उजव्या बाजूस अनुक्रमे एक व दोन आडव्या रेषा काढण्याचा प्रघात होता. पण चारशे ते नऊशे हे शतकाचे आकडे व चार हजार ते नऊ हजार हे सहस्राचे आकडे शंभराच्या व हजाराच्या अंकास अनुक्रमे चार ते नऊ हे अंक जोडूनच सिद्ध करीत.

प्राचीन इजिप्शियन व भारतीय अशा दोन्ही अंकपाठांत जे थोडेबहुत साम्य आढळते, त्यावरून या उभय देशांतल्या अंकांत काहीतरी परस्पर संबंध असला पाहिजे, हे सूचित होते. प्राचीन काळी भारतात तयार झालेल्या चैनीच्या वस्तू इजिप्तच्या बाजारात विक्रीस जात असत; त्यावरून या परस्पर संबंधाला पुरावाही मिळू शकतो. भारतातील लोकांनी आपले अंक निरनिराळ्या देशांतल्या अंकांपासून किंवा अक्षरांपासून बनविले, असे मत बर्नेल व बेली या पाश्चात्य पंडितांनी मांडले आहे. पण बुल्हेरला हे मत मान्य नाही.

भारतात कोणत्याही प्रकारची अक्षरांकपद्धती अस्तित्वात येण्याच्या पूर्वी कित्येक शतके सर्वसाधारण संख्यावाचक शब्दांशिवाय दुसऱ्या कित्येक सांकेतिक शब्दांचा संख्या दर्शविण्याकरिता उपयोग केला जाई. शतपथ ब्राह्मण (१३.३.२.१) व तैत्तिरीय ब्राह्मण (१.५.११.१) यात चार या संख्येकरिता कृत हा शब्द वापरला आहे. चौवीस संख्येकरिता गायत्री, अठ्ठेचाळीस संख्येकरिता जगती, असे सांकेतिक शब्द श्रौतसूत्रांत आढळतात. वेदांगज्योतिषांत १, ४, ८, १२ व २७ यांकरिता अनुक्रमे रूप, अय, गुण, युग व भसमूह हे शब्द वापरलेले आहेत. पिंगलाच्या छंदःसूत्रांतही निरनिराळ्या वृत्तांत किती अक्षरांच्या नंतर यती येतो, ते सांगण्यासाठी सांकेतिक शब्द योजिलेले आहेत. सातव्या शतकानंतरच्या कित्येक ज्योतिषग्रंथांत असे सांकेतिक शब्दांक सर्वत्र आढळतात. प्राचीन शिलालेखांतले व दानपत्रांतले शक, तसेच संस्कृत कवींच्या ग्रंथांतील रचनेचे शक, यांतही सांकेतिक शब्दांक वापरलेले दिसतात.

संस्कृतात ज्योतिष व गणित या शास्त्रांवरचे ग्रंथ छंदोबद्ध असल्यामुळे त्या ग्रंथांतल्या मोठमोठ्या संख्या श्लोकात ग्रथित करण्यासाठी ही शब्दांकाची पद्धती बरीच विकास पावली. या सर्व ग्रंथकार आचार्यांनी अंकांना स्थानीय किंमत देऊन शून्य व नऊ अंक अशा दहा चिन्हांवर बसविलेली संख्यालेखनपद्धतीच वापरली. त्यांच्या संख्यांमध्ये एकम्‌चा आकडा प्रथम देऊन नंतर दहम्, शतम्, इ. आकडे यथानुक्रम सांकेतिक शब्दांनी दिलेले असतात. उदा० आकाश–पंच–वसु–पक्षः ही संख्या घ्या. तिच्यामधील आकाश, पंच, वसु व पक्ष हे शब्द अनुक्रमे शून्य, पाच, आठ व दोन या अंकांचे सूचक असून, ती संख्या आकड्यांनी २८५० अशी होते.

हे शब्दांक म्हणजे व्यवहारातल्या निरनिराळ्या वस्तूंची किंवा कल्पनांची नावे असून, ते त्या त्या वस्तूंनी किंवा कल्पनांनी सूचित होणाऱ्या संख्यांकरिता योजिलेले असतात. एकच सख्या निरनिराळ्या वस्तूंच्या किंवा कल्पनांच्या नावांनी सूचित होणे शक्य असते व त्या प्रत्येक नावाला कित्येक प्रतिशब्दही असणे शक्य असते. त्यामुळे एकाच संख्येकरिता अनेक शब्द वापरलेले आढळून येतात. पुढील उदाहरणे पाहा–

० करिता–शून्य, ख, गगन, आकाश, नभ, पूर्ण, रंध्र, इ.
१ करिता–आदी, शशी, इंदू, विधू, अब्ज, भू, क्षिती, इ.
२ करिता–यम, अश्विन्, नासत्य, लोचन, कर, कुच, इ.
३ करिता–राम, गुण, लोक, अग्नी, इ.
४ करिता–वेद, श्रुती, समुद्र, केंद्र, वर्ण, युग, कृत, अय, इ.
५ करिता–बाण, भूत, पर्व, प्राण, पांडव, अर्थ, विषय, इंद्रिय, इ.

६ करिता–रस, ऋतू, रिपू, दर्शन, इ.
७ करिता–नग, ऋषी, वार, स्वर, धातू, छंद, इ.
८ करिता–वसू, अही, गज, सिद्धी, भूती, मंगल, इ.
९ करिता–अंक, नंद, निधी, ग्रह, द्वार, गो, पवन, इ.
१० करिता–दिशा, अंगुली, अवतार, इ.
११ करिता–रुद्र, भर्ग, इ.
१२ करिता–रवी, मास, राशी, व्यय, इ.
१३ करिता–विश्वेदेव, काम, अतिजगती, अघोष, इ.
१४ करिता–मनू, विद्या, इंद्र, लोक, इ.
१५ करिता–तिथी, घस्र, पक्ष, इ.
१६ करिता–नृप, अष्टी, कला, इ.
१७ करिता–अत्यष्टी
१८ करिता–धृती
१९ करिता–अतिधृती
२० करिता–नख व कृती.
२१ करिता–उत्कृती, प्रकृती व स्वर्ग.
२२ करिता–कृती व जाती.
२३ करिता–विकृती.
२४ करिता–गायत्री, जिन, अर्हत्, सिद्ध, इ.
२५ करिता–तत्त्व.
२७ करिता–नक्षत्र, उडू, भ, इ.
३२ करिता–दंत, रद, इ.
३३ करिता–देव, त्रिदश, इ.
४० करिता–नरक.
४८ करिता–जगती.
४९ करिता–तान.

'अङ्कानां वामतो गतिः' या नियमानुसार या सांकेतिक शब्दांकांची उजवीकडून डावीकडे रचना करायची असते. उदा० गुण–वसु–गज–भूमिते शकाब्दे, ही संख्या वरील पद्धतीने मांडली असता शके १८८३ असा बोध होतो.

जुन्या हस्तलिखितांत अंकांकरिता अक्षरांचाही उपयोग केलेला दिसतो. अंकांना अक्षरांची रूपे देण्याची कल्पना आर्यभट, इ. ग्रंथकारांच्या अक्षरांकांवरूनच काही अंशी सुचली असावी. आर्यभट (प्रथम) याने आपल्या आर्यभटीय ग्रंथांत अक्षरांकांचा प्रथम उपयोग केला. त्याच्या पद्धतीत क वर्गापासून प वर्गापर्यंतची पंचवीस अक्षरे पहिल्या पंचवीस अंकांकरिता नियुक्त केली असून, त्यांपुढील य ते ह या आठ वर्णांचा अनुक्रमे ३०, ४०, ५०, ६०, ७०, ८०, ९० व १०० हे अंक दाखविण्याकरिता उपयोग केला आहे. स्वरांमध्ये ऱ्हस्व दीर्घ हा भेद मानलेला नसून, अ ला एक व इ, उ, ऋ, लृ, ए, ऐ, ओ व औ यांना अनुक्रमे शंभर व शंभराचा दुसरा, तिसरा, चौथा, पाचवा, सहावा, सातवा व आठवा घात असे अर्थ दिलेले आहेत. व्यंजनाला जोडलेला स्वर व्यंजनाच्या संख्येची आपल्या संख्येइतकी पट दर्शवीत असून, संयुक्त व्यंजनातील स्वर त्याच्या अवयवीभूत प्रत्येक व्यंजनाबरोबर घ्यायचा असतो. उदा० महायुगात किती भूभ्रमणे होतात, हे आर्यभटाने ङिशिबुण्लृख्षृ या अक्षरांकसंख्येने सांगितले असून, ती संख्या १५,८२,२३,-७५,२०० इतकी होते.

दुसऱ्या आर्यभटाने आपल्या आर्यसिद्धांतात नऊ अंक व शून्य या दहा चिन्हांकरिता वर्णमालेच्या पहिल्या दोन वर्गांतील (क, च) दहा अक्षरे यथानुक्रम घेतली असून, पुढच्या दोन वर्गातील (ट, त) दहा अक्षरे पुन्हा त्याच अंकांकरिता यथानुक्रम योजिली आहेत. राहिलेल्या व्यंजनांपैकी प वर्गाची अक्षरे पहिल्या पाच अंकांसाठी व यरलवादी आठ अक्षरे पहिल्या आठ अंकांसाठी योजलेली आहेत. या पद्धतीला कटपयादी क्रम म्हणतात. यांत स्वरांना कोणताच अर्थ नाही. यातील संख्यालेखनपद्धती 'अङ्कानां वामतो गतिः' या सर्वसाधारण नियमाच्या उलट आहे. या पद्धतीप्रमाणे एकमृचे अक्षर सर्वांत शेवटी, दहमृचे अक्षर त्याच्या पूर्वी, शतमृचे अक्षर दहमृच्याही आधी असा क्रम पाळलेला आहे. उदाहरणार्थ क, ण, घ, ज्ञ, झु, झि, ला, या अक्षरसंख्येचा अर्थ १५९९९९३ असा होतो (आर्यसिद्धांत २.९).

वर सांगितलेल्या दोन अक्षरांकपद्धतींपैकी पहिल्या आर्यभटाची पद्धती त्याच्या ग्रंथाबाहेर अन्यत्र दृष्टीस पडत नाही. पण दुसऱ्या आर्यभटाचा कटपयादिक्रम कित्येक शिलालेखांतून दिसून येतो. षड्गुरुशिष्य याने सर्वानुक्रमणीवर लिहिलेल्या वेदार्थदीपिका या टीकेत हा क्रम वापरलेला आहे. उत्तरकालीन लेखकांनी या कटपयादी क्रमात बदल करून ते 'अङ्कानां वामतो गतिः' या नियमाप्रमाणे आपल्या संख्या लिहू लागले.

याशिवाय केरळ व आंध्र या प्रदेशांत अक्षरांकांची आणखी एक पद्धती दिसून येते. तीत क पासून ळ पावेतो ३४ वर्ण अनुक्रमे पहिल्या ३४ अंकांकरिता योजले असून, पुढच्या ३४ अंकांकरिता का, खा, इ. आकारयुक्त व्यंजने, त्यापुढील ३४ अंकांकरिता कि, खि, इ. इकारयुक्त व्यंजने अशा रीतीने बाराखडीतील सर्व अक्षरांचा उपयोग करून ४०८ पावेतोचे अंक अक्षरांनी दाखविलेले असतात. ब्रह्मदेशातील काही जुन्या हस्तलिखित ग्रंथांत १ ते १२ करिता क ची बाराखडी, १३ ते २४ करिता ख ची, २५ ते ३६ करिता ग ची अशा प्रकारे सर्व व्यंजनांच्या बाराखड्यांचा, अंक दर्शविण्यासाठी उपयोग केलेला आहे. लंकेतल्या हस्तलिखितांतही पृष्ठांक दर्शविण्याच्या कामी याच

अनुक्रमाने बाराखडयांतील अक्षरे योजिली आहेत.

अंकांकरिता अक्षरांचा उपयोग पहिल्या आर्यभटापूर्वी कोणीही केलेला दिसत नसला, तरी अक्षरांकपद्धतीचा जनक तोच होता, असे मात्र निश्चितपणे सांगता येत नाही. कारण पाणिनीच्या १.३.११ या सूत्रावरील कात्यायनाचे वार्तिक व कैयटाने दिलेले त्याचे उदाहरण यांचे अवलोकन केल्यावर असे कळते, की स्वरित चिन्हांमध्ये १, २, ३, इ. संख्या दर्शविण्याकरिता शिवसूत्रांतील वर्णक्रमानुसार अक्षरे वापरली आहेत.

आज सर्वत्र प्रचारात असलेली केवळ संख्यालेखन पद्धतीच नव्हे; तर नऊ प्राथमिक अंक व शून्य यांची चिन्हेही मुळात हिंदीच आहेत. अरबांनी आपले अंक हिंदी अंकांपासून तयार केले, असे अल् बिरूनीनेच म्हटले आहे. अरब लोकांत दोन प्रकारचे हिंदी अंक प्रचलित होते. पश्चिमेकडे ज्यांचा प्रसार होता, त्यांस घोबर (धूळ) अंक असे म्हणत. पूर्वेकडील व पश्चिमेकडील अरबी अंकांत विशेष फरक आढळून येत नाही. हे जरी खरे असले, तरी नवीन पद्धतीचे संख्यालेखन सुरू होण्यापूर्वी युरोपात स्थानरेषापटावर जे अंक वापरण्यात येत होते, त्यांचे पूर्वेकडील अरब अंकांपेक्षा स्पेन व आफ्रिका या देशांत प्रचारात असलेल्या घोबर अंकांशी अधिक साम्य होते.

अंकांमध्येही शुभाशुभ कल्पना व्यक्त झालेली आहे. अनेक जातीजमातींच्या लोककथांत ३, ४, ५, १२, ४०, १००, या संख्या शुभ व पवित्र मानलेल्या आढळतात. सुधारलेल्या समाजातही अंकांविषयी शुभाशुभ कल्पना प्रचलित आहेतच. पाश्चात्त्य देशांत तेरा ही संख्या अशुभ मानतात. भारतीय जातकशास्त्रात आठ हा अंक व कुंडलीतले अष्टम स्थान मृत्युसूचक मानलेले आहे. तीन हा अंकही असाच अशुभ मानलेला आहे. 'न गच्छेत् ब्राह्मणत्रयम्' म्हणजे तीन ब्राह्मणांनी (किंवा माणसांनी) एकदम एखाद्या कार्यासाठी जाऊ नये; गेल्यास कार्यनाश होतो, अशी समजूत आहे. तीन व त्याची कोणतीही पट या संख्यांना गूढविद्येत विशेष महत्त्व आहे. वैदिक वाङ्मयात तीन व त्याने भाग जाणाऱ्या संख्या यांचा उल्लेख अनेक वेळा आला आहे. वेदात विश्वाची विभागणी पृथिवी, द्यौः व अंतरिक्ष अशा तीन लोकांत केलेली आढळते. सात या आकडयालाही असेच महत्त्व आहे. पृथ्वीची द्वीपे सात, अग्नीच्या जिव्हा सात, सूर्याच्या रथाचे अश्व सात, मरुत् तीन × सात, ऋषी सात, वायू सात × सात, इत्यादी. अकरा ही संख्या रुद्रांची, बारा आदित्यांची, एकवीस गणपतीची, सहा स्कंदाची, सात मातृकांची, तीन गौरीची, अशा विशिष्ट संख्या विशिष्ट देवतांच्यासाठी निश्चित केलेल्या आहेत. पितरांची कुळे नऊ व दहा या संख्यांशी निगडित आहेत. बौद्ध धर्मात सात या अंकाला विशेष मान प्राप्त झाला आहे. कारण बुद्धाची सात रत्ने, सात पवित्र स्थाने मानलेली आहेत. काही प्राचीन ग्रंथांत सात, दहा, सत्तर या संख्यांनी पूर्णत्व सूचित केले आहे. पाहा—अंकगणित. [म. ज्ञा. को.—विज्ञानेतिहास; प्रा. भा. लि. मा.; एन्सा. रि. ए.]

**अंकाई-टंकाई** नासिक जिल्ह्यात सह्याद्रीच्या रांगेत हे स्थान आहे. या ठिकाणी दोन डोंगरांवर दोन भक्कम किल्ले असून, डोंगरांच्या उतारावर तीन ब्राह्मणी व सात जैन लेणी आहेत. पहिल्या ब्राह्मणी लेण्यांत शिवलिंग असून, अन्य काही आकृती कोरलेल्या आहेत. हे लेणे इ. स. च्या १०–११ व्या शतकातले असावे.

जैन लेणी लहान असली तरी त्यांत बरेच शिल्पकाम आहे. त्यांतील क्र. १ व २ ही लेणी दुमजली आहेत. तिसऱ्या लेण्यात इंद्र व अंबा यांच्या मूर्ती आढळतात. त्यांच्या बाजूला तीर्थंकरांच्या व काही नग्नमूर्ती दिसतात. चौथ्या लेण्यात एक शिलालेख असून, तो इ. स. च्या ११ व्या किंवा १२ व्या शतकातील आहे.

ही सर्वच लेणी लहान असली तरी शिल्पकलेच्या दृष्टीने प्रेक्षणीय आहेत. पाहा—महाराष्ट्र. [म. ज्ञा. को.; म. प.]

**अंका मिरी** आसामात सुंद्री नदीच्या विस्तीर्ण खोऱ्यात राहणारी एक जमात. हे शेतकरी आहेत. यांची जमीन महामूर पिकते. हे कापडही विणतात. यांच्या बायका निळे परकर व त्यांवर कुडती वापरतात. यांचे स्थान पर्बतिया मिरींच्या वायव्येस आहे. यांच्या स्त्रिया तोंडावर गोंदून घेतात म्हणून आसामी लोक त्यांना अंका (अंक = गोंदणे) म्हणतात. हे लोक तेनाय असे आपल्या जमातीचे नाव सांगतात. यांच्या चालीरीती पदम अबोरांप्रमाणे आहेत. ते दिसतातही अबोरांसारखेच. हे शांतताप्रिय आहेत; पण लुटारूंपासून स्वतःचे संरक्षण करण्यासाठी त्यांना शस्त्रसज्ज राहावे लागते. हे गनिमी काव्याने न लढता आगाऊ जाहीर करून शत्रूवर छापा घालतात. ते पुरुष शत्रूंना झोडपतील, ठार करतील; पण त्यांच्या बायकामुलांना मात्र हात लावणार नाहीत. पाहा—पर्बतिया मिरी; पदम अबोर.

**अंकिया** एक आसामी नाटयप्रकार. बंगालमधले कीर्तनिया नाटय इ. स. च्या १६–१७ व्या शतकात आसाममध्ये अंकिया या रूपात प्रचलित झाले. त्यात पद्याच्या जागी गद्याला महत्त्व मिळाले. करमणूक हेच केवळ त्याचे उद्दिष्ट न राहता, त्याच्या द्वारे वैष्णव धर्माचा प्रचारही केला गेला. अंकिया म्हणजे एकांकी नाटक होय. शंकरदेव, माधवदेव व गोपाळदेव हे

आसाममधले लोकप्रिय अंकियाकार होत. पाहा–आसामी रंगभूमी; कीर्तनिया. [ लो. ध. ना. ]

**अंकुरारोपण** धान्याचे अंकुर वाढविणे. लिंगायत व रेड्डी लोकांत लग्नप्रसंगी हा विधी करतात. लग्नाच्या आदल्या दिवशी पुरोहित साळी, गहू, हरभरे, ज्वारी व काळे वाटाणे अशी पाच धान्ये घेऊन ती एकत्र मिसळतो व वारुळाची माती घालून भरलेल्या मातीच्या भांड्यात ती पेरतो. पेरताना तो सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष व ईशान या शिवरूपांचे मंत्र म्हणतो; त्याचबरोबर भूमातेचीही प्रार्थना करतो. नंतर १५ दिवस वधू-वरांच्या पक्षातील मंडळी पाणी घालून ते अंकुर वाढवतात. १६ व्या दिवशी वरांकडील माणसे ते उगवलेले शेत घेऊन वधूच्या घरी जातात. वरमाता त्यांतले काही अंकुर वधूच्या केसांत माळते व उरलेले सुवासिनींना वाटते. हे विधान वंशवृद्धीसाठी असते. [ की. पॉ. ]

**अंकुश** लाकडी दांड्याला वसविलेले आकडीसारखे हत्यार. हत्तीला ताब्यात ठेवण्यासाठी हे त्याच्या गंडस्थळाला टोचतात. गणपती हा अंकुशधारी आहे. 'अङ्कुशधारिणम्' असे त्याचे वर्णन आहे. कित्येक देवतांच्या हाती अंकुश असतो. अंकुशाच्या डोक्यावर वज्र असते, तेव्हा त्याला वज्रांकुश म्हणतात. पाहा– वज्र.

**अंग** एक प्राचीन देश. अथर्ववेदातील एका सूक्तात (५.२२. १४) ज्वराने मूजवत, बाल्हिक, गंधार, अंग, मगध, इ. देशांत निघून जावे, अशी प्रार्थना केलेली आहे. यावरून त्या काळात हा देश आर्यावर्ताच्या बाहेर असावा, असे वाटते. बौधायन धर्मसूत्रातही, यात्रेखेरीज अन्य हेतूने कोणी या देशात गेल्यास त्याने प्रायश्चित्त घ्यावे, असे सुचविले आहे (१.१.१९–२०).

या देशाला अंग हे नाव कसे मिळाले, याविषयी विविध कथा प्रचलित आहेत. ज्या प्रदेशात शिवाने आपला तृतीय नेत्र उघडून कामदेवाचे (मदनाचे) दहन केले व त्याला अनंग केले, त्या प्रदेशाला अंगदेश हे नाव मिळाले (वा. रा. बाल. २३). बलीची पत्नी सुदेष्णा हिच्या ठिकाणी दीर्घतमा ऋषीने नियोगाने अंग, वंग, कलिंग, इ. पाच पुत्र उत्पन्न केले. त्या प्रत्येकाने आपापल्या नावाने स्वतंत्र राज्य स्थापले, अशी कथा महाभारतात आहे (आदि. ९८.३२). अनेक पुराणांतही ही कथा आहे. भारतीय युद्धापूर्वी दुर्योधनाने कर्णाला अंगदेशाचे राज्य दिले, अशीही कथा महाभारतात आहे (सभा ४४.९०; आदि. १३५). या प्रदेशात निवास करणाऱ्या अंग नामक लोकसमूहावरून याला हे नाव मिळाले असावे, असेही एक मत आहे.

दशरथाचा मित्र रोमपाद हा या देशावर राज्य करीत असताना एकदा त्याच्या राज्यात अवर्षण झाले व दुष्काळ पडला. ते अवर्षण ऋष्यशृंग या ऋषिकुमाराने दूर केले, म्हणून रोमपादाने शांता नामक आपली कन्या त्याला दिली, अशी कथा रामायणात आहे (वा. रा. बाल. ९.१०). रोमपादाचा पणतू चंप या राजाने अंग देशाची राजधानी निर्माण केली व तिला चंपा हे नाव दिले.

पाणिनीच्या अष्टाध्यायीत (४.२.१३८) अंग आणि वंग यांचा उल्लेख एकत्र केला असून, गोपथ ब्राह्मणात त्याचा मगधाशी संबंध दाखविला आहे (२.९). शक्तिसंगम तंत्रात याचा विस्तार पुढील श्लोकात वर्णिला आहे–

**वैद्यनाथं समारभ्य भुवनेशान्तगं शिवे ।**
**तावदङ्गाभिधो देशो यात्रायां न हि दुष्यति ।।**

अर्थ– वैद्यनाथापासून भुवनेश्वरापर्यंत अंगदेश समजावा. हा यात्रेसाठी दूषित (वर्ज्य) नाही.

हा देश वैभवसंपन्न होता (वा. रा. बाल. २३.१४). त्यात रुप्याच्या खाणी होत्या व रेशीम उत्पन्न केले जात होते (वा. रा. किष्किंधा. ४०.२२). हा देश धन-धान्याने समृद्ध होता (अयोध्या. १०.३९).

या देशातले लोक बायकामुलांची विक्री करीत आणि रोगग्रस्त माणसांना टाकून देत, अशी माहिती गोविंदसुत्तात दिलेली आहे. अंग देशात एक स्वतंत्र लिपी प्रचलित होती, असे ललितविस्तरात सांगितले आहे.

सनपूर्व ६ व्या शतकाच्या प्रारंभी उत्तर भारतात मगध, कोसल आणि वत्स ही तीन मोठी राज्ये असून, सोळा महाजनपदे होती. त्या महाजनपदांत अंग, कलिंग, कुरू, पांचाल, शूरसेन, काशी, मिथिला, इ. जनपदांचा समावेश होता. महाभारतात अंग देशाचे जे वर्णन आहे, त्यावरून बिहारमधील भागलपूर व मोंघीर हे जिल्हे त्यात अंतर्भूत होते, असे दिसते. हा देश मगधाच्या पूर्वेला होता. चंपा नदी ही त्या दोन देशांतील सीमा होती. गंगा नदी ही अंग देशाची उत्तर सीमा होती. चंपा नगरी ही या देशाची राजधानी पूर्वी मालिनी या नावाने प्रसिद्ध असून, ती गंगा व चंपा यांच्या संगमावर, मिथिलेपासून साठ योजने दूर होती. कनिंगहॅमच्या मते भागलपूरजवळ चंपानगर व चंपापूर ही दोन गावे आहेत, त्या जागी चंपा नगरी पूर्वी वसलेली असावी. ती नगरी अत्यंत संपन्न असून, भारतातील सहा प्रमुख नगरींमध्ये तिची गणना होत असे. तिथे व्यापाराचे मोठे केंद्र असून, तिथले व्यापारी आपल्या नौकांतून मलाया, सुमात्रा वगैरे देशांशी व्यापार करीत होते. या देशातल्या

लोकांनी हिंद चीनमध्ये वसाहती स्थापल्या होत्या. चंपा नगरीजवळच गग्गरा नामक प्रख्यात पुष्करिणी होती.

अंग व मगध या देशांमध्ये सतत वैर व संघर्ष चालू होते. काही काळ मगधाचा काही भाग अंग देशात समाविष्ट झालेला होता. राजगृह हे स्थान अंग देशात होते. अंग देशाचा राजा ब्रह्मदत्त याने मगधाधिपती भट्टिय याचा पराभव केला होता. पण भट्टियाचा पुत्र बिंबिसार याने ब्रह्मदत्ताचा पराभव करून त्याला ठार मारले आणि चंपानगरी जिंकून घेतली. तिथे तो मगधाचा राजप्रतिनिधी म्हणून राहिला. भट्टियाच्या मृत्यूनंतर बिंबिसार मगधाचा राजा झाला. अंगदेश हा त्याच्या राज्याचा एक प्रांत असून, त्याने अजातशत्रूची तिथला राज्यपाल म्हणून नेमणूक केली होती.

अंग देश हे जैन धर्माचे मोठे केन्द्र होते. बारावा तीर्थंकर वासुपूज्य याचा जन्म व निर्वाण इथेच झाले. महावीराने आपले तीन चातुर्मास्य इथेच केले. बुद्धाच्या काळी अंगदेशात कित्येक महाशाला वा स्नातकसंस्था होत्या व बिंबिसार राजाने त्यांच्या खर्चासाठी जमिनी तोडून दिल्या होत्या. बुद्ध अनेकवार चंपानगरीत आला होता व त्याने इथल्या गग्गरा पोखरिणी नावाच्या सरोवराकाठी विश्राम केला होता. इथेच त्याने विशाखा नावाच्या शिष्येला आपल्या धर्माची दीक्षा दिली. बुद्धाच्या उपदेशाने इथल्या पुष्कळ ब्राह्मणांनी बौद्ध धर्म स्वीकारला. बुद्धाने नवा धर्म अस्तित्वात आणल्यानंतर पहिल्या दहा वर्षांच्या काळातच चंपा आणि तिच्या आसपासची नगरे यांमध्ये त्या धर्माची केंद्रे निर्माण झाली. त्या प्रत्येक केंद्रात एकेक भिक्षुसंघ राहून धर्मप्रसाराचे काम करीत असे.

इ. स. च्या ८ ते १२ व्या शतकांत या देशावर पाल वंशाची सत्ता होती. पुढे अकबराने तो आपल्या साम्राज्यात समाविष्ट केला. इ. स. १७६५ साली शहा अलम बादशहाने बंगाल, बिहार, ओडिसा या प्रांतांची सनद ईस्ट इंडिया कंपनीला करून दिली, तेव्हा हा देशही त्याबरोबरच ब्रिटिशांच्या ताब्यात गेला. पाहा— चंपा. [ हिं. जॉ. ए. इं.; प्रा. मौ. बि.; अ. म. भा.; प्रा. च. को. (हिंदी); रामकोश १; प. का. भा.; भा. बृ. इ.; हि. क. इं. पी. १ व २; म. ज्ञा. को. ]

(२) उल्मुक व पुष्करिणी यांचा पुत्र. हा कृतयुगाच्या अंती प्रजापती होता. वेन हा याचा पुत्र होय.

(३) नैयायिकांच्या मते प्रयोजक किंवा उपकारक. मीमांसकांनी याची व्याख्या केली आहे, ती अशी—' फलवत्सन्निधौ अफलं तदङ्गम् '= स्वर्गादी फल देणाऱ्या मुख्य यागांच्या अनुषंगाने फल न सांगितलेले जे याग केले जातात, ते अंग होत.

(४) जातकशास्त्रात लग्नाला अंग म्हणतात.

**अंग-उपांग** श्वेतांबर जैनांच्या आगमांचा एक भाग. अंगांची संख्या बारा आहे.

(१) **आचारांगसूत्र**—याचे दोन भाग असून, त्यांना श्रुतस्कंध असे म्हणतात. या ग्रंथात जैन साधूंच्या आचारांचे वर्णन आहे. हा ग्रंथ गद्यपद्यमिश्रित आहे.

(२) **सूत्रकृतांग**—यात जैन साधूंची जीवनचर्या वर्णिलेली असून, त्याबरोबर जैनेतर मतांचे खंडनही आहे. याचेही दोन भाग असून, ग्रंथ विविध छंदांत निबद्ध आहे.

(३) **स्थानांग**—यात बौद्धांच्या अंगुत्तरनिकायाप्रमाणे एक ते दहा अशा चढत्या संख्या घेऊन धार्मिक विषयांचे विवेचन केलेले आहे.

(४) **समवायांग**—यात तिसऱ्या अंगात आलेल्या विषयांचेच अधिक वर्णन आहे.

(५) **भगवतीसूत्र**—महावीराच्या महनीय व्यक्तिमत्त्वाचे अनेक पैलू दाखवणारा हा ग्रंथ आहे. महावीराचे शिष्य, त्याच्या समकालीन व्यक्ती आणि त्यांचे प्रभावी व्यक्तिमत्त्व यांचे विवरण देणारा हा ग्रंथ ऐतिहासिक दृष्टीनेही श्रेष्ठ आहे.

(६) **नायाधम्मकहाओ** (सं. ज्ञातृधर्मकथा)—यात जैन धर्मातील आचार आणि तत्त्वज्ञान यांचे विशद रूपाने वर्णन करणाऱ्या कथांचा संग्रह आहे. वाङ्मयीन दृष्टीनेही या कथा मनोज्ञ आहेत. बौद्ध धर्मात जातककथांना जे महत्त्वपूर्ण स्थान आहे, तेच जैन धर्मात या कथांना आहे.

(७) **उपासगदसाओ** (सं. उपासकदशांग)—या ग्रंथात उपासकांच्या कर्तव्यांचे विस्तृत वर्णन आहे.

(८) **अन्तकृद्दशा**—याचा अर्थ ज्यांनी संसाराचा अंत केला, अशा साधूंच्या संबंधी दहा अध्याय. यांवरून वाटते की, या ग्रंथाचे दहा परिच्छेद असावे. पण आज त्यांपैकी आठच उपलब्ध आहेत.

(९) **अनुत्तरौपपातिकदशा**—याचा अर्थ सर्वांत उच्च अशा स्वर्गाची प्राप्ती करून घेणाऱ्या यतींच्या संबंधी दहा अध्याय. पण सांप्रत यांतले तीनच उपलब्ध आहेत. यांत श्रीकृष्णाचे चरित्र जैनांच्या दृष्टीने वर्णिलेले आहे. इथे श्रीकृष्ण जैन धर्मी मानलेला आहे.

(१०) **प्रश्नव्याकरण**—यात जैन धर्माचे उपदेश प्रश्नोत्तररूपाने सांगितले आहेत.

(११) **विपाकसूत्र**—विपाक म्हणजे सर्व प्रकारची कर्मे परिपक्व होणे. यांत शुभाशुभ कर्मांचे फल सांगितले आहे.

(१२) **दृष्टिवाद**—हे अंग आजमितीस लुप्त आहे. फक्त त्याचे उल्लेख काही ग्रंथांत मिळतात.

**उपांग**—जैनांच्या प्रत्येक अंगाच्या बरोबरीने एकेक उपांग त्याला जोडलेले असते. यांची संख्याही बाराच आहे. या उपांगांची

नावे पुढीलप्रमाणे – (१) औपपातिक, (२) राजप्रश्न, (३) जीवाधिगम, (४) प्रज्ञापना, (५) जंबुद्वीपप्रज्ञप्ती, (६) चंद्रप्रज्ञप्ती, (७) सूर्यप्रज्ञप्ती, (८) निरयावली (पाठभेदकल्पिका), (९) कल्पावतंस, (१०) पुष्पिका, (११) पुष्पचूलिका व (१२) वृष्णिदशा (पाठभेद-वंह्दिशा). [आर्य संस्कृति.]

**अंग औरव** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील १३८ क्रमांकाचे सूक्त याच्या नावावर आहे. इंद्रस्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. कवी सांगतो, इंद्राने कपटी पिप्रूची वळकट नगरे फोडली, राक्षसांना ठार केले, महिने कुठून धरावे ते सांगितले, आकाशाला सूर्यरथचक्रे धारण करायला भाग पाडले. त्याची एक ऋचा (१०.१३८.२) अशी–

**अवासृजः प्रस्वः श्वञ्चयो गिरी–**
**नुदाज उस्रा अपिबो मधु प्रियम् ।**
**अवर्धयो वानिनो अस्य दंसरा–**
**शुशोच सूर्य ऋतजातया गिरा ।।**

अर्थ – हे उदकनिर्मात्या, पर्वतजलदात्या, वृक्षवर्धक इंद्रा, तुझ्या सृष्टिनियमनकौशल्यामुळे सूर्य तेजस्वी झाला.

अधार्मिक दासांना आर्य हे योग्य प्रतिस्पर्धी भेटले, असे हा सूक्तद्रष्टा सांगतो. [ऋ. म. भा.]

**अंगठी** सोने, रुपे, इ. धातूंचे बोटात घालण्याजोगे वळे किंवा कडे. अंगठी वाटोळी असते; पण कित्येकदा चौकोनी, अष्टकोनी, असाही तिचा आकार असतो. कित्येकदा अंगठीवर कोंदण बनवून त्यात एखादा खडा बसवतात. अंगठी घालून आपली बोटे अलंकृत करणे, ही आवड पुरातनकालापासून सर्वत्र दिसून येते. ज्या काळी लेखनकला फार थोड्या लोकांना अवगत होती, त्या काळी आत्मविशिष्ट चिन्हे अंगठ्यांवर खोदून, महत्त्वाच्या कागदपत्रांवर त्यांचा शिक्का उठवीत. असे शिक्के त्या लेखांचा खरेपणा सिद्ध करण्यास उपयोगी पडत. ऋग्वेदकालापासून भारतात अंगठीचा उपयोग होत असलेला दिसतो. ऋग्वेदात मरुतांचे वर्णन करताना ते खादियुक्त असतात, असे म्हटले आहे (ऋ. २.३४.२). 'खादि' म्हणजे अंगठी असा अर्थ सायणाचार्यांनी दिला आहे. मरुताना 'हिरण्यखादयः' (सोन्याच्या अंगठ्या घालणारे) असे शांखायन श्रौतसूत्रातही म्हटले आहे. धार्मिक विधीच्या वेळी दर्भाचे पवित्रक (अंगठीच्या आकाराची दर्भग्रंथी) बोटात घालण्याची पद्धती सूत्रांत आढळत नसली, तरी ती स्मृतिकालात सुरू झालेली दिसते. या पवित्रकाची ग्रंथी इंग्रजी आठ या आकड्यासारखी असते. कित्येकदा दर्भांच्या ऐवजी सोन्याचेच पवित्रक करून ते बोटात घालतात. ते असले, की मग दर्भाचे घालावे लागत नाही. (पवित्रक पाहा)

खुणेची अंगठी हा एक कथासाहित्यातला महत्त्वाचा कल्पनाबंध आहे. अंगठीवर स्वतःचे नाव खोदून प्रसंगी तिचा खुणेसाठी उपयोग करणे, ही चाल रामायणाइतकी तरी प्राचीन आहे. हनुमान सीताशुद्धीसाठी निघाले असता, सीतेची भेट झाल्यास तिला खूण पटावी म्हणन रामाने आपल्या नावाची अंगठी त्याच्या स्वाधीन केली होती (वा. रा. किष्किंधा. ४४.१२). कालिदासाचे अभिज्ञानशाकुंतलम् हे नाटक अशा खुणेच्या अंगठीवरच आधारलेले आहे. राजकीय व्यवहारातही अंगठ्या म्हणजे मुद्रा यांना प्राचीन काळापासून महत्त्व आहे. राजमुद्रा ही राजाच्या अधिकारचिन्हातली एक वस्तू होती व ती प्रत्येक राजशासनावर उठवावी लागे. त्याशिवाय राजाज्ञेला प्रामाण्य नसे. त्यामुळे अशा अंगठीला फार जपावे लागे. या अंगठ्यांचा परवान्यासाठीही उपयोग करीत.








अंगठ्यांचे विविध प्रकार

पायांतील जोडवी, अंगठी, इ. अलंकार उत्खननात मिळालेले आहेत. इ. स. २ ऱ्या शतकापर्यंत जोडवे व अंगठी यांत विशेष फरक दिसून येत नव्हता. तोपर्यंत हे दोन्ही अलंकार केवळ गोल कड्याप्रमाणे बनवीत. ती सोने, चांदी किंवा तांबे या धातूंची असत. पण त्यानंतरच्या काळात अंगठी एका बाजूला चपटी बनवली जाऊ लागली. त्या चपट्या बाजूवर अंगठी वापरणाऱ्या व्यक्तीचे नाव कोरता येऊ लागले.

केवळ हस्तभूषण म्हणूनच अंगठी घालण्याची चाल पडलेली नाही. तिच्यामागे संरक्षणाचीही कल्पना आहे. जादूटोण्यात वर्तुळाला फार महत्त्व असते. एखाद्या माणसाला भुतांखेतांपासून सुरक्षित ठेवण्यासाठी त्याच्याभोवती पाणी, वाटोळे खडे, काटे, तांदूळ, विस्तव, इ. वस्तूंनी वर्तुळ करून ते मंत्राने भारतात. कित्येक वेळा स्वतःच्या सुरक्षिततेसाठी मांत्रिकच अशा वर्तुळात बसून आपले प्रयोग करीत असतो. अशा वर्तुळाचेच छोटे प्रतीक म्हणजे अंगठी. मंतरलेली अंगठी बोटात घातल्याने पिशाच्चादिकांची बाधा होत नाही, अशी सार्वत्रिक समजूत आहे. नवग्रहांची बाधा होऊ नये म्हणूनही विशिष्ट रत्नांच्या अंगठ्या वापरतात.

विवाहाच्या वाङ्‌निश्चयाच्या वेळी वराने वधूच्या बोटात अंगठी घालण्याची चाल पाश्चात्त्य देशांत सर्वत्र आहे. विवाहाची




उत्खननात प्राप्त झालेल्या निरनिराळ्या कालखंडांतील अंगठ्या— क्र. १ ते ५ – सिंधुसंस्कृती मिळालेली वळी (सनपूर्व २५००). क्र. ६ ते ९ – हस्तिनापूर येथील उत्खननात मिळालेल्या अंगठ्या (सनपूर्व ३ रे-४ थे शतक). क्र. १० – मध्य प्रदेशातील एरण येथे मिळालेली अंगठी (सनपूर्व ३ रे शतक). क्र. ११ ते १३ – तक्षशिला येथील उत्खननात मिळालेल्या अंगठ्या (सनपूर्व १ ले – २ रे शतक).

शपथ म्हणून अंगठीचा उपयोग करण्याची पद्धत प्रथम इजिप्त मधल्या लोकांनी सुरू केली, असे एच्लर म्हणतो. प्राचीन इजिप्शियन साहित्यात अशा अंगठ्यांचे पुष्कळ उल्लेख आहेत. अंगठी वाटोळी असते आणि वर्तुळाला शेवट नसतो; म्हणून विवाहबद्ध होणाऱ्या वधू-वरांचे प्रेम चिरकाल टिकावे या हेतूने ही वाङ्‌निश्चयाची अंगठी देण्याची चाल पडली असावी. स्त्री-पुरुषांचे जीवन एकटेपणी अपूर्ण असते व ते विवाहमीलनाने परिपूर्ण होते, हीही कल्पना याच्या मुळाशी असणे शक्य आहे. प्राचीन काळी पळवून आणलेल्या स्त्रियांच्या हातांत वाटोळ्या बेड्या किंवा कडी घालीत. त्याचेच स्मारक प्रतीक म्हणून वराने वधूला अंगठी घालण्याची पद्धत सुरू झाली असावी, असाही काही संशोधकांचा तर्क आहे. वाङ्‌निश्चयाची ही अंगठी प्रथम साधी व लोखंडाची असे. पण इ. स. दुसऱ्या शतकापासून ती सोन्याची झाली व पुढे तिचा विवाहाच्या धार्मिक विधीतही समावेश झाला.

मोहोरेची अंगठी घालण्याची चालही बरीच जुनी आहे. बायकांत हिचा बराच प्रचार आहे. महाराष्ट्रात सुनमुख या वैवाहिक सोहळ्यात मोहोरेच्या अंगठीची गरज असते. श्रीमंत लोक मोहोरेच्या अंगठ्या वापरतात, त्याप्रमाणे गोरगरीब चांदीच्या अंगठ्यांवर चवली, पावली बसवून ती हौस भागवतात. जयपुरी अंगठ्या फार प्रसिद्ध आहेत. उत्तर भारतात मिन्याच्या सुंदर अंगठ्या बनवतात, सुवासिक अंगठ्या, देवदर्शनी अंगठ्या, इष्ट कामना पुरवणाऱ्या अंगठ्या, असे अनेक प्रकार बाजारात विक्रीस असतात.

वरगृही नववधूचे नामकरण करताना व बालकाच्या नामकरण संस्कारात सुवर्णशलाकेऐवजी अंगठीनेच नाव लिहिण्याची पद्धती आहे. कोकणात लग्नाच्या दुसऱ्या दिवशी वधू-वरांचा अंगठीचा खेळ होतो. परातीतल्या हळदीच्या पाण्यात अंगठी टाकून ती वधू-वरांना शोधायला लावतात. वधूला ती मिळाली तर तिचा जय होतो व वराला मिळाल्यास वधू ती त्याच्याकडून मागून घेते व आपल्या बोटात घालते. [ एन्सा. रि. ए.; म. ज्ञा. को.; वा. रा. पु. अ. ]

## अंगण

घराच्या पुढची व मागची मोकळी जागा. हा शब्द अंग् या धातूपासून तयार झाला असून, त्याचा अर्थ फिरण्याची, हालचाल करण्याची जागा असा आहे. प्राचीन संस्कृत वाङ्‌मयात मैदान, क्रीडास्थान, इ. अर्थाने हा शब्द वापरलेला आढळतो (वा. रा. उत्तर. २७.३४–३५). मार्कंडेयपुराण (८५.४८), भागवतपुराण (१०.५.६). इ. ग्रंथांतून आजच्या प्रचलित अर्थानेही अंगण शब्द आला आहे. प्राचीन काळी राजवाडे, मोठाले वाडे, इ. वास्तू अनेक चौकांच्या असत. या चौकांनाही अंगण असेच संबोधण्यात आले आहे. वा. रामायण (अयोध्या. १६.४७), हर्षचरित, इ. ग्रंथांमध्ये अशी अंगणे उल्लेखित आहेत.

प्राचीन काळापासून घरापुढच्या अंगणाशी अनेक सांस्कृतिक बाबी निगडित आहेत. भारतभर निरनिराळ्या सणांच्या, उत्सवांच्या, व्रतवैकल्यांच्या निमित्ताने अंगणात सडा-संमार्जन करून त्यावर रांगोळ्या घालण्याची पद्धत आहे. यशोदेला पुत्र झाला असता गोकुळातल्या आनंदोत्सवात याही बाबीची नोंद झालेली आहे (भाग १०.५.६). बहिरा जातवेदाने या प्रसंगाचे वर्णन करताना म्हटले आहे –

मग गौळीं काय केलें । समग्र वाडे झाडिले ॥
आणि संमार्जन केलें । गृहद्वारी ॥
सडे घातले अंगणीं । चौक घालिती सुवासिनी ॥

विचित्र ध्वजा तोरणी । माळा पुष्पाचिया ।।
(भैरवी टीका. ५.३५.३६)

कृष्णाच्या बाललीलांचे वर्णन करीत असताना अंगणातल्या अष्टदळाचा उल्लेख संत नामदेवाने केला आहे (सकल सतगाथा, नामदेव अ. क्र. ६४). पहाटेच उठून, सडासंमार्जन करून घरापुढे रांगोळ्या घालणाऱ्या स्त्रियांची अनेक चित्रे लीळाचरित्रात आढळतात (उत्तर. भाग १ लीळा. १५४). या स्त्रिया घराप्रमाणेच मंदिराच्या प्रांगणातही रांगोळ्या घालीत असत (लीळाच. उत्तर. भाग १. लीळा १०६).

अंगणात रंगमाळा रेखणे हा व्रतवैकल्यातला एक भाग आहे. चैत्रांगण ही रांगोळी एका लौकिक व्रताचाच भाग आहे. आजही अनेक स्त्रिया चातुर्मासात अंगणात विविध रांगोळ्या काढण्याचे व्रत करताना दिसतात.

अंगणात तुलसीवृंदावने बांधून, त्यात तुलसीची रोपे लावण्याची पद्धत आहे. या तुलसीवृंदावनाचे माहात्म्य वर्णन करताना नामदेवाने एका अभंगात म्हटले आहे–

तुळसीवृंदावन ज्याचे घरीं ।
त्यासी प्रसन्न श्रीहरी ।

लोकसाहित्यातील अंगणाचे वर्णन हे छोट्या देऊळवाड्याची आठवण करून देणारे आहे. त्याचे स्वरूप स्पष्ट करताना एका अनामिक स्त्रीने म्हटले आहे–

माझ्या अंगणात पिवळ्या लाल ग कर्दळी
बाळाची वर्दळी चारी दिशा ।।
माझ्या अंगणात लाविल्या तुळशी ।
नाही होणार आळशी तान्हेबाळ ।।
माझ्या अंगणात तुळशीचा वाफा ।
गोविंद घाली खेपा मंजुळींना ।।
माझ्या अंगणात शोभती दुर्वा फुले ।
खेळाया येती मुले बाळासंगे ।।

अंगणाला घराच्या अंतरंगाचे प्रतीक मानतात. अंगणावरून घराची कळा ओळखणे यासारखे वाक्प्रचार वरील अर्थाचेच द्योतक आहेत. पाहा–प्रांगण. [ लीळाचरित्र; स्त्रीजीवन. ]

**अंगददेव** (इ. स. १५०४–१५५२) शीखांचा दुसरा गुरू. याचा जन्म इ. स. १५०४ मध्ये झाला. त्याचे वडील खत्री जातीचे व व्यापारी होते. त्याचे मूळ नाव लेहना होते. शीख संप्रदायात प्रवेश करण्यापूर्वी तो दुर्गेचा उपासक होता. नानकांचा शिष्य झाल्यानंतर त्याला हळहळू शीख पंथात उच्च स्थान मिळाले व गुरू नानकांनी आपल्या पश्चात त्याची गुरुपदी नेमणक केली. गुरू अंगद याने ज्या गोष्टी केल्या, त्यांत गुरुमुखी लिपी प्रचारित करणे ही पहिली गोष्ट होय. ही लिपी त्याने महाजन लिपीतून निर्माण केली व ती लोकप्रिय केली. गुरुमुखी



गुरू अंगददेव

हे नाव दिल्यामुळे तिला धार्मिक महत्त्व आले व शीखांनी तिचा पवित्र लिपी म्हणून स्वीकार केला. गुरुमुखीच्या स्वीकारामुळे शीख हे हिंदूंहून वेगळे आहेत, हे दर्शविणारी एक बाब निर्माण झाली. तिच्यामुळे शीखांचे संघटन होण्यास फार मदत झाली.

अंगदाने गुरू नानक यांचे चरित्र बाला या नानक–शिष्याकडून लिहून घेतले. गुरू नानकांची स्तोत्रे त्याने प्रार्थनेत समाविष्ट केली. अशा काही गोष्टींमुळे शीखांचे हिंदूंहून वेगळे अस्तित्व सिद्ध झाले. शीखांमध्ये मूर्तिपूजा मागासली व नामजपाचा महिमा वाढला.

या सर्वांच्या जोडीला गुरू अंगदाने लंगरची व्यवस्था केली.

लंगर म्हणजे गुरुद्वारातले सदावर्त होय. ही व्यवस्था सतत चालण्यासाठी प्रत्येक शीखाने आपल्या मिळकतीतला काही भाग दान म्हणून दिला पाहिजे, असा त्याने आदेश काढला.

त्यापुढे जाऊन अंगदाने उदासी या नावाने आपले वेगळेपण दाखवणाऱ्या, नानकाच्या काही शिष्यांना शीखसंप्रदायाच्या बाहेर घालविले. शीखांच्या आचारशुचितेसाठी त्याने अनेक गोष्टी केल्या व त्याचबरोबर गुरूचे माहात्म्यही वाढविले. बायकांना आपला बुरखा दूर करायला लावला. सती जाण्याच्या प्रथेविरुद्धही मोठी मोहीम काढली. शीखांच्या पवित्र आदि-ग्रंथाचा प्रारंभही अंगदानेच केला. अशा प्रकारे १३ वर्षे गुरु-गादी चालवून व अमरदास या पुत्राची गुरुपदी स्थापना करून मग अंगदाने आपला देह ठेवला. [शि. इ.]

**अंगपूजा** व्रतोत्सवादी प्रसंगी केल्या जाणाऱ्या षोडशोपचार पूजेतील एक अवांतर पूजा. या पूजेत देवतेच्या प्रत्येक अंगाचा नामनिर्देश करून मूर्तीवर अक्षता टाकतात. उदा० 'सुमुखाय नमः पादौ पूजयामि' इत्यादी. या पूजेने मूर्तीच्या सर्व अवयवांत सामर्थ्य येते, अशी धारणा आहे.

**अंगबाह्य** दिगंबर जैनांचे धर्मग्रंथ. अंग नामक त्यांच्या मुख्य धर्मग्रंथात यांचा समावेश नसल्यामुळे यांना अंग-बाह्य किंवा प्रकीर्णके असे नाव मिळाले आहे. यात पुढील ग्रंथांचा समावेश होतो–

(१) सामयिक, (२) चतुर्विंशतिस्तव, (३) वंदन, (४) प्रतिक्रमण, (५) दशवैकालिक, (६) उत्तराध्ययन व (७) कल्पव्यवहार. [हि. जै. मो.]

**अंगरक्षक** आजच्याप्रमाणेच प्राचीन काळीही राजाचे शरीर-रक्षक अधिकारी नेमलेले असत. कौटिल्याने त्यांना आत्मरक्षितक (अर्थ. २.३१) व पाणिनीने राजप्रत्येनस् म्हटले आहे (अष्टा. ६.२. ६०). कित्येकदा स्त्रियाही अंगरक्षणाचे काम करीत. त्यासाठी सुदृढ अशा यवनी स्त्रियांची निवड केली जात असे. राजाच्या शरीररक्षणाचे कार्य मोठे जबाबदारीचे मानीत. कौटिल्याने त्यासाठी विशेष विधान सांगितले आहे. बहुधा ही जबाबदारी राज कुमारांवर सोपविली जात असे. [पा. का. भा.]

**अंगराग** घामाची दुर्गंधी नष्ट करून शरीर सुंदर बनवणे यासाठी ज्या सुगंधी द्रव्यांचा देहाला लेप करतात, त्यांना अंगराग असे नाव आहे. यांतली मुख्य द्रव्ये आंबे-हळद, केशर, चंदन आणि कापूर ही असतात. हळद ही त्वचा साफ करते; म्हणून तिचा उपयोग मुखलेपासाठी होतो. संस्कृत काव्यग्रंथांत हळदीचा उल्लेख क्वचित सापडतो. चंदन, केशर आणि कापूर यांचे उल्लेख मात्र विपुल आहेत. चंदन-कापूर थंड व केशर उष्ण मानलेले आहे. या व्यतिरिक्त श्वेत अगरु व गोरोचन यांचाही अंगरागाच्या कामी उपयोग होत असे. वसंतऋतूत शरीरावर चंदनाचा व अगरूचा लेप द्यावा आणि हिवाळ्यात केवळ अगरूचा लेप करावा, असे चरक सांगतो (सूत्र. ६.२५). अरगजा ही वस्तूही अंगरागातच येते. केशर, चंदन, कापूर, इ. वस्तू मिसळून ती बनवितात.

वैदिक साहित्य, महाभारत, अग्निपुराण, अर्थशास्त्र, कामसूत्र, नाट्यशास्त्र, इ. अनेक ग्रंथांत अंगरागाचे प्रयोगात्मक वर्णन आढळते. उद्वर्तन, विलेपन, धूपन, चूर्ण, पराग, तैल, दीपवर्ती, धूपवर्ती, गंधोदक, मुखवास, इ. अंगरागाचे विविध प्रकार होतात. गंधसार या ग्रंथात अंगराग निर्माण करण्याचे मुख्यत्वे खालील सहा प्रकारचे विधी सांगितले आहेत–

(१) भावनक्रिया–चूर्णित पदार्थांना तरल द्रव्यांनी अनुविद्ध करणे.

(२) पाचनक्रिया–विविध पदार्थांचे काढे करून ते एकत्र मिसळणे.

(३) बोधक्रिया–गुणवर्धक पदार्थांचा संयोग करून त्यांना उत्तेजित करणे.

(४) वेधक्रिया–आरोग्यवर्धक व त्वचेला उपकारक अशा पदार्थांचा संयोग करणे.

(५) धूपनक्रिया– सुगंधी द्रव्यांच्या धुराने अंग सुवासित करणे.

(६) वासनक्रिया – सुगंधी तेले व द्रव्ये यांचा संयोग करणे.

अनसूयेने सीतेला शाश्वत व दिव्य अंगराग दिला होता, असे रामायणात वर्णन आहे. त्या वेळी अनसूया म्हणते–

> अङ्गरागं च वैदेहि महार्हमनुलेपनम् ।
> मया दत्तमिदं सीते तव गात्राणि शोभयेत् ।।
>
> (वा. रा. अयोध्या. २.११८.१८–१९)

अर्थ – हे सीते, मी दिलेला हा महामोलाचा अंगराग तुझ्या अवयवांना शोभवील.

भारतात पुरातन काळी वनस्पतींपासून प्रसाधनद्रव्यांची व अंगरागांची निर्मिती होत असे. पाहा–प्रसाधन. [प्रा. भा. प्र.]

**अंगलम्मा** द. भारतातील ग्रामदेवता. हिची पूजा विशेषतः कोइंबतूर जिल्ह्यात केली जाते. ही सर्वसंहारक आहे. शूद्रातिशूद्रच हिला भजतात. बलिदानाच्या वेळी हिच्या-पुढे अंतरपाट धरण्याची चाल आहे. रानडुकराच्या रक्तात

भात कालवून त्याचा हिला नैवेद्य दाखवितात. [ व्हि. गां. सा. इ. ]

**अंगविज्जा** (सं. अंगविद्या) जैन साहित्यात अंगविज्जा नावाचा एक प्राचीन ग्रंथ आहे. हा ग्रंथ कुषाण व गुप्त या दोन युगांच्या संधिकालातला असावा. ही प्राचीन-काळची एक लोकप्रसिद्ध अशी विद्या होती. शारीरिक लक्षणां-वरून अथवा अन्य काही निमित्ते आणि चिन्हे यांवरून एखाद्याचे शुभाशुभ फल वर्तविणे, हा या विद्येचा विषय होता. ही विद्या फार प्राचीन असली पाहिजे. कारण पाणिनीही तिचा उल्लेख करतो (अष्टा. ४.३.१७). दीघनिकायात ही विद्या बौद्ध भिक्षूला वर्ज्य सांगितलेली आहे. जैनांनी आपल्या आगमसाहित्याच्या प्रकीर्ण ग्रंथात हिचा समावेश केलेला असून, दृष्टिवाद नावाच्या बाराव्या अंगात महावीराने या निमित्तज्ञान सांगणाऱ्या विषयाचा उपदेश केला असल्याचे सांगितले आहे.

अंग, स्वर, लक्षण, व्यंजन, स्वप्न, शिंक, भूमी व अंतरिक्ष हे निमित्तकथनाचे आठ प्रकारचे आधार अंगविद्येत मानलेले आहेत. या आठ महानिमित्तांवरून भूत-भविष्य जाणण्याचा प्रयत्न केला जात असे. या ग्रंथात तत्कालीन जीवनाच्या अनेक क्षेत्रांशी संबद्ध अशा शब्दसूची उपलब्ध होतात. या दृष्टीने या ग्रंथाला ऐतिहासिक महत्त्वही प्राप्त झालेले आहे. ग्रंथाचे एकूण ६० अध्याय असून, त्यांत पुढील विषयांचे विवेचन आहे–

जिन भगवानाची स्तुती, शिष्य आणि त्यांचे नियम, प्रश्न-कर्त्याच्या मुद्रेवरून आणि त्याच्या तत्कालीन परिस्थितीवरून फलाचा विचार, जीवन-मरणासंबंधी, वृष्टी आणि धनधान्या-संबंधी; तसेच जयापजयासंबंधी फल सांगणे, पूजाविशुद्धी, डोहाळे, कन्याविवाह याविषयी विचार, प्रवास आणि पुनरागमन यासंबंधी विचार व देश, काल, उत्पात, भूमिगत धन, देवता-प्रसाद, नक्षत्रप्रसाद, नक्षत्रविजय, पूर्वजन्माचे ज्ञान, इ. विषयां-संबंधी चर्चा.

अशा प्रकारे हा अंगविज्जा ग्रंथ सांस्कृतिक दृष्टचा अत्यंत महत्त्वाचा आहे. यामधली शब्दावली अनेक स्थळी अस्पष्ट आणि संदिग्ध आहे. त्या शब्दांच्या अर्थज्ञानासाठी निरनिराळे प्राकृत कोशही साहाय्य देऊ शकत नाहीत. या ग्रंथावर प्राचीन, अर्वाचीन एकही टीका उपलब्ध नाही. त्यामुळे या ग्रंथातल्या शब्दसंपत्तीवरचे गूढतेचे आवरण कायमच राहिले आहे. [ डॉ. वासुदेशरण अग्रवाल – ना. प्र. प. अंक ६१, १९५६ ]

**अंगाई गीते** लहान मुलांना झोपविण्याच्या हेतूने म्हटली जाणारी लहान लहान गाणी. लोकसाहित्यातील बालगीतांचा हा एक प्रकार आहे. ही गीते केवळ भारतापुरती मर्यादित नाहीत, तर ती जगात सर्वत्र प्रचलित आहेत. आई मुलाला मांडीवर घेऊन, अशी गाणी गाऊन त्याला झोपवते म्हणून या गीतांना अंगाई गीते म्हणतात (अंक + आई = अंगाई). ही गाणी पाळणा गीते या नावानेही परिचित आहेत.

बाळाची झोप हा या गीतांचा प्रधान हेतू असल्यामुळे त्यांची रचना लहान, साधी, लयबद्ध व नादमधुर असावी लागते. यात शब्दांची किंवा वर्णांची पुनरावृत्ती असते. अंगाई गीतांमध्ये सलग अर्थ असतोच असे नाही. अर्थाला या गीतांमध्ये महत्त्व नाही. ही गीते मुलांसाठी दुसऱ्यांनी म्हणायची असतात. त्यामुळे या गाण्यांशी केवळ श्रोते म्हणूनच मुलांचा संबंध असतो. झोपेबरोबरच बाळाचे मनोरंजन हाही एक हेतू त्यात आहेच. झोप व विनोदन हे हेतू ज्या गीतांमधून साधले जातात, ती गीते उत्तम असा साधा निकष या गीतांबाबत आहे.

अंगाई गीतांची प्राचीनता ही मातृत्वाइतकीच प्राचीन असावी. मूल रडू लागल्यावर त्याला उगी उगी करताना आईच्या तोंडून जो पहिला गीतबद्ध हुंकार उत्पन्न झाला तेच पहिले अंगाई गीत, असे म्हणायला हरकत नाही. मार्कंडेयपुराणात या गीतांचा आढळ होतो. ऋतुध्वजाची पत्नी मदालसा हिने रडू लागलेल्या विक्रांताला (मार्क. पु. २५.११-१८) म्हटलेली गाणी आणि अलर्काच्या नामकरणानंतर त्याला खेळवण्याच्या मिषाने म्हटलेली उपदेशात्मक गाणी ही अंगाई गीते समजायला हवी. त्यातला काही भाग पुढीलप्रमाणे आहे –

सदा मुरारिं हृदि चिंतयेथा–
स्तद्ध्यानतोऽन्तः षडरीञ्जयेथाः ।
मायां प्रबोधेन निवारयेथा
ह्यनित्यतामेव विचिन्तयेथाः ॥
अर्थागमाय क्षितिपाञ्जयेथा
यशोऽर्जनायार्थमपि व्ययेथाः ।
परापवादश्रवणाद् बिभीथा
विपत्समुद्राज्जनमुद्धरेथाः ॥
यज्ञैरनेकैर्विबुधानजस्र–
मर्थैर्द्विजान् प्रीणय संश्रितांश्च ।
स्त्रियश्च कामैरतुलैश्चिराय
युद्धैश्चारींस्तोषयितासि वीर ॥
बालो मनो नन्दय बान्धवानां
गुरोस्तथाज्ञाकरणैः कुमारः ।
स्त्रीणां युवा सत्कुलभूषणानां
वृद्धो वने वत्स वनेचराणाम् ॥

(मार्क. पु. २५.३७-४०)

अर्थ–सदैव परमेश्वराचे हृदयात चिंतन कर. कामादी षड्रिपूंन

ताब्यात ठेव. ज्ञानाने माया दूर कर. विश्वाची अनित्यता लक्षात घे. अर्थ प्राप्त करून घेण्यासाठी राजांवर विजय मिळव आणि त्या अर्थाचा यशासाठी उपयोग कर. परापवादापासून दूर राहा. लोकांना संकटसागरातून मुक्त कर. यज्ञ करून देवतांना आणि नेहमी दाने देऊन ब्राह्मणांना व आश्रितांना प्रसन्न ठेव. स्त्रियांना विविध भोग देऊन व शत्रूंबरोबर युद्धे करून त्यांना संतुष्ट राख. बाल्यकालात भावंडांना आनंदित कर. कौमार्यावस्थेत आज्ञा पालन करून गुरूला (माता-पिता, इ.) प्रसन्न कर. यौवनावस्थेत चांगल्या कुळातल्या स्त्रियांना आणि वृद्धापकाळी वनचरांना सुखी कर.

मार्कंडेय पुराणाचा काळ इ. स. चे ४–५ वे शतक असा मानला जातो. इ. स. च्या ८ व्या शतकात तमिळनाडूमध्ये पेरियाळवार नावाचा एक मोठा विष्णुभक्त होऊन गेला. त्याने बालकृष्णाच्या मधुर लीलांचे वर्णन अनेक पदांतून केले आहे. कृष्णाला पाळण्यात घालून झोपविण्यासाठी यशोदेने त्याच्याच बाललीलांचे स्मरण करीत अंगाई गायली आहे. चंद्राला बोलविताना ती म्हणते –

**चक्करक्कैयन तडंकण्णल मलर बिळित्तु**
**ओक्कलै मेलिरुन्दु उन्नैये चुट्टि काट्टुम काण**
**तक्कतरिदियेल चंदिरा छलम चेय्यादे**
**मक्कट् पेराद मलडनल्लैयेल वा कण्डाय ।**

भावार्थ – माझा हा लाल, माझ्या कडेवर बसून आपल्या पाणीदार डोळ्यांनी तुला (चंद्राला) बोलावतो आहे. जर तुला त्याला सुखी करायचे आहे, तर तू त्याला दुःख देऊ नको. तो चक्रधारी परमेश्वर आहे. हे चंद्रा ! तुला जर असा मुलगा असता तर या वागण्याने किती दुःख होते, हे तुला समजले असते. हे अभागी निपुत्रिका ! लवकर उगव.

जैनाचार्य शीलांकसूरी याचे सुयजहवृत्ती (इ. स. चे ९ वे शतक) आणि पुष्पदंताचे (इ. स. चे १० वे शतक) अपभ्रंश भाषेतले महापुराण यांत (४.४) अंगाई गीतांचा उल्लेख आढळतो. तसेच महानुभावांच्या लीळाचरित्रात (पूर्वार्ध ४२), ज्ञानेश्वरीत (१२.६) व त्यांच्या गाथ्यातील मदालसाचरित्रातही यांचा सदर्भ आहे. चांगदेव, नामदेव, एकनाथ, रामदास, तुकाराम, इ. बहुतेक सर्व मराठी संतांनी पाळणागीते गायली आहेत. सूरदासाची सूरसागरातील (पद ६५९-६६१, ६६५, ६६८), व तुलसीदासाची गीतावलीतील (बालकांड पद १८-२४) पाळणागीते उत्तर भारतात सर्वतोमुखी आहेत. कर्नाटकातील ख्यातनाम संत पुरंदरदास यानेही कृष्णकथा गायनाच्या निमित्ताने अंगाईंची रचना केली आहे. त्याच्या एका पदातील काही भाग पुढीलप्रमाणे आहे –

**जो जो श्रीकृष्ण परमानंद**
**नंद गोपिय कंद बालमुकुंद ।।**
**पालुगडलोळु पवडिसिदवने वं ।**
**दालदेलेय मेले मलगिद शिशुवे ।**
**श्री ललितांगियर चित्तदोल्लभने ।**
**बाल निन्नन्मु पाडि तूगुवेनय्या ।।**

भावार्थ – क्षीरसागरात वटपत्रावर पहुडलेल्या आणि गोपींचा वल्लभ असलेल्या तुला मी (पाळण्यात ठेवून) हालविते.

अंगाई गीते प्राचीन मराठीत आणि भारतातील अन्य भाषांमध्ये निरनिराळ्या नावांनी परिचित आहेत. गुरुचरित्रकारांनी एका ओवीत त्यांना पर्यंद गीते असे म्हटले आहे.

पुष्पदंताच्या अपभ्रंश भाषेतल्या महापुराणात परियंदइ असा उल्लेख असून (४.४.१३) त्याचा मूलार्थ हालवणे असा आहे (परि+आंदोल). त्यावरूनच प्राचीन मराठीत पर्यंद हा शब्द आला असावा. लीळाचरित्र (पूर्वार्ध ४२), ज्ञानेश्वरी (१२.५), ज्ञानेश्वरांचा अभंगगाथा (८४५), नरेंद्राचे रुक्मिणी स्वयंवर (९), इ. ग्रंथांत हा शब्द आढळतो. पाळणा (सं. पालन) गीतातून पालकपालख हे शब्द हटकून येतात (परि+अंक>पर्यंक>पल्लंक>पालक>पालख).

संत तुकारामाने एका अभंगात "अनुहत बाळका हल्लरू गाती" असे सांगून अंगाई गीतांना हल्लर गीते असे म्हटले आहे. ज्ञानेश्वरांनी "अनाहताचा हल्लरू गासी" या चरणात (ज्ञाने. १२.७) व पुष्पदंतानेही महापुराणात "होहल्लरु जो जो" (४.४.१५) असे म्हणून हल्लर हा शब्द अंगाई गीत या अर्थी वापरला आहे. मराठी भाषेच्या तंजावरी कोशातही हल्लर शब्द या अर्थीच आढळतो. हल्लरू हा शब्द कानडी असून त्याचा अर्थ (हल+वरु) संथ लयीचा आवाज असा आहे. मध्यप्रदेशाच्या माळवा, निमाड या भागातील अंगाई गीते हालरा गीते म्हणूनच ओळखली जातात. साऱ्या गुजरात प्रदेशात ही गीते हालरडाँ गीते म्हणून परिचित आहेत. हिमालयाच्या कुशीत वसलेल्या कुमाऊं भागात त्यांना हिळोरी म्हणतात.

हिंदी प्रदेशातल्या बहुतेक सर्व भागांतल्या अंगाई गीतांना लोरी हे सामान्य नाव आहे. लोरी हा शब्द लोल या संस्कृत शब्दावरून बनला असावा आणि त्याचा अर्थ हलणे, डोलणे असा आहे. बुंदेलखंडातल्या अंगाई गीतांना लालन गीते म्हणतात, तर नेपाळमध्ये लू गीते म्हणतात.

भारतभरच्या अंगाई गीतांची भाषा भिन्न असली तरी, त्यांतला भाव सर्वत्र सारखाच आढळतो. बाळाच्या झोपेची आळवणी हा त्यांतला एक प्रमुख विषय आहे. एक अनामिक स्त्री आपल्या बाळकृष्णाला उद्देशून म्हणते–

बाळा जो जो रे, सिरिकिस्ना
देवकीनंदना, बाळा जो जो रे
माय रे गाणं गाई
रात्री झोका देई, बाळा जो जो रे
झोप जगन्नाथा,
चांद तुह्या रे माथा, बाळा जो जो रे

उत्तर प्रदेशातील हिंदी भाषिक एक माता हाच भाव पुढील शब्दांत प्रकट करते—

आ री निंदरिया तूं प्यारी निंदरिया
ललना की अँखियों पे छारी निंदरिया।
गगन मंडल से चंदा बुलावे
तारों से खेले तेरी निंदरिया।

भावार्थ—ये, हे आवडत्या निद्रे तू ये! माझ्या मुलाच्या डोळ्यावर ये. आकाशातून चंद्र तुला बोलावतो आहे. तू ताऱ्यांबरोबर खेळत आहेस.

काही केल्या मूल रडता थांबत नाही असे दिसल्यावर भारतीय माता त्याला प्रसंगी भीती घालतात. निरनिराळ्या प्रांतांत भीतीसाठी निरनिराळ्या गोष्टींचा आश्रय केलेला असतो. बागुलबुवा हे मराठी भाषेतील हे एक लोकप्रिय नाव आहे.

एकनाथमहाराजांनी बागुलबुवाशिवाय बऱ्याच अन्य गोष्टींचा पुकारा एका अंगाई गीतात केला आहे. ते गीत असे—

खर खर मुंडा आवरे फकीरा।
पालखी निजविला मोतीया हिरा ॥ १ ॥
उळुउळु गाई निजरे बाळा।
मोठा जटाधारी गोसावी आला ॥ धृ ॥
येरे येरे कोल्ह्या जाय रे लांडग्या।
नको भेडसाऊ लेकुरा वांडुग्या ॥ २ ॥
आळविला कान्हा पाजूनी प्रेमपान्हा।
एका जनार्दनी लाविला स्तना ॥ ३ ॥

मराठी लोकसाहित्यात तर बागुल या नावानेच अनेक पदांची रचना झालेली आहे.

मीठमोहऱ्या उतरून टाकणे हा बाळाच्या संरक्षणाचा एक उपाय होय. तसाच दुसरा उपाय म्हणून या गीतातून देवादिकांची नावे उच्चारली जातात.

पण पुढच्या काळात संरक्षणाचा हा मूळ हेतू विस्मृत होऊन त्याची जागा आदर्शाने घेतली आहे. राम, कृष्ण, दत्त, इ. देवांचे पाळणे या आदर्शाच्या कल्पनेतून गायले जातात. अंगाई गीतांचा हा मूळ उद्देश आणि पाळण्यातील अध्यात्माचे निरूपण पाहता अंगाई गीतांचा विकास कसा झाला हे स्पष्ट दिसून येते.

बाळाचे वर्णन हा या गीतांची एक आवडता विषय आहे. त्यात त्याचे रूपवर्णन, त्याचा खेळ, त्याचे न्हाणे, त्याचे बाळसे, त्याचे अलंकार, इ. विषय येतात. हा बाळ गोरा, कुरळ्या केसांचा, विरळ दातांचा, मोठमोठ्या डोळ्यांचा, इवल्याशा हनुवटीचा असतो. तो सदैव मुठी वळत असतो.

चंद्र व मामा हे या गीतांत आवर्जून उपस्थित असतात. शिवाय भारतातील बहुतेक सर्व भाषांमधून चंद्राशी मामाचे नाते जोडलेले असते. एक मूल चंद्राला पकडण्यासाठी त्याच्याकडे झेपावत असताना त्याची तेलुगू आई म्हणते—

चंद मामा रावे जाबिल्ली रावे
कण्डे-कि रावे कोटि पूलू तेवे
बंडि मीदा रावे बंति पूलू तेवे

भावार्थ—हे चंदामामा ये. गाडीवर बसून ये. फूल घेऊन ये. पिवळे पिवळे फूल देऊन जा.

लोकगीतातील मानवी मामाचे घराणे खानदानी असते. तो मोठा प्रभावशाली व तालेवार असतो. बाळासाठी त्यानेच पाळणा पाठवायचा, असा संकेतही अनेक ठिकाणी आहे.

मुलांच्या झोपण्याचे एक साधन म्हणून या गीतांतून पाळण्यांचेही वर्णन येणे हे अगदी स्वाभाविक आहे. हे पाळणे कलाकुसरीचे आणि ऐश्वर्याचे प्रदर्शन करणारे असतात. हा पाळणा सोन्याचा, चंदनाच्या लाकडाचा किंवा हस्तिदंताचा असतो. त्याला निरनिराळी रत्ने जडविलेली असतात. त्याची दोरी रेशमाची असते. सूरदासाच्या काव्यातला पाळणा विश्वकर्म्याने केलेला असून त्याला कामदेवाने रत्ने जडविली आहेत. थोड्याफार फरकाने हेच वर्णन लोकसाहित्यासह सर्वत्र आढळते. या सर्व संकेतांची पूर्ती करणारा एक पाळणा पुढीलप्रमाणे आहे—

जो जो रे जो जो श्री रामचंद्रा।
दशरथपुत्रा लागो निद्रा ॥ धृ ॥
केवळ कांचनी पाळणा आणिला।
बा तुजसाठी रेशमी विणिला ॥ १ ॥
खूर रुप्याचे सुंदर चहू बाजूंना।
हंतरिलासे आंत मऊ बिछाना ॥ २ ॥
भरजरी चांदवा रेशमी शेला।
चिमण्या मोत्यांची झालर त्याला ॥ ३ ॥
हंस कोकिळ ते इंद्रनिळाचे।
बसविले शुक मोर पांचू पोवळ्याचे ॥ ४ ॥
हालवी कौसल्या दशरथ बाळा।
वंदिते त्या मी विश्वपाळा ॥ ५ ॥

अंगाई गीतांच्या जागतिक वाङ्मयात लू, लू, लल्ल, लूल्लय, निन्न, नन्न, बो, बो, दो, दो यासारखे ध्वन्यनुकारी शब्दसमूह येतात. उलुलू हा यासारखाच एक ध्वनी आहे. मराठीत हा उच्चार

आपण बोबडचा स्वरूपात उच्चारून मुलाला झोपविण्याचा प्रयत्न करतो. हेमचंद्राने देशीनाम-मालेत उल्लुरुह या शब्दाचा अर्थ हळू काढलेला आवाज असा दिला आहे. उलुलू या शब्द-समूहाने प्रारंभ होणारी अनेक गीते, बंगाली, मराठी, इ. भाषांमध्ये आढळतात. एकनाथांचे एक अंगाई गीत अशा स्वरूपाचे आहे. अंगाई गीते हा लोकगीतसृष्टीचा एक अलंकार आहे. त्यातून निरनिराळ्या मार्गाने मुख्यतः वात्सल्य प्रतीत होते.

## अंगात येणे

एखादे माणूस अवचित घुमू लागले, हातवारे करू लागले, असंबद्ध किंवा गूढ असे काही-तरी बोलू लागले, शाप किंवा वर या स्वरूपात काही उद्‌गार काढू लागले, की त्याच्या अंगात आले, असे म्हणतात. अंगात येणे म्हणजे एखाद्या देवतेचा किंवा भुताखेताचा शरीरात संचार होणे, असे समजतात. भूत अंगात आल्यास त्याला झडपणी किंवा झपाटणे म्हणतात. भगत, देवऋषी किंवा ग्रामदेवतेचा पुरोहित यांच्या अंगात त्या त्या देवतेचा संचार होतो व त्यांच्या मुखाने ती देवता ग्रामस्थांचे चांगले अथवा वाईट बोलून दाखवते, तसेच त्यांना विशिष्ट कार्याचा किंवा बलिदानाचा आदेशही देते, अशी समजूत आहे. हा संचार काही कालापुरताच टिकून राहतो. यात ती व्यक्ती माध्यम या स्वरूपात काम करते. हे दैवताशी होणारे एकरूपत्व वैयक्तिक व सामाजिक असे उभयविध असते. वैयक्तिक एकरूपता प्राप्त झाल्यावर ते माणूस अनैसर्गिक हालचाली करू लागते. त्याचे खाणे, पिणे, वागणे, वघणे, बोलणे, या गोष्टींतही विचित्रपणा येऊ लागतो. पुष्कळदा यांतूनच मंत्रतंत्र, जादूटोणा वगैरे प्रकारही निर्माण होतात. सामाजिक एकरूपतेत जाती-जमातीचा पुढारी हाच मुख्य असतो व सर्व लोकांच्या वतीने तो देवाशी आपले संबंध प्रस्थापित करतो. जमातीचे कल्याण व्हावे म्हणून तोच देवाला गाऱ्हाणे घालतो. त्यामुळे त्या जमातीपुरते त्या पुढाऱ्याला महत्त्व प्राप्त होते. देवऋषी किंवा भगत हा जेव्हा दुसऱ्याची भूतबाधा दूर करण्यासाठी प्रवृत्त होतो, तेव्हा देवाला अंगात आणून तो त्या भुताखेताशी सामना देऊ लागतो. पुष्कळ ठिकाणी ग्रामदेवता पुजाऱ्याच्या अंगात येऊन आपली जत्रा करण्याचा आदेश व बऱ्याभल्याचा कौल देते. स्त्री किंवा पुरुष यांपैकी कोणाच्याही अंगात संचार होऊ शकतो. देवता अंगात आली, की तिचा संचार पूर्ण व्हावा म्हणून त्या व्यक्तीपुढे धूप जाळतात व वाद्यांचाही गजर करतात. पुष्कळदा भूतयोनीत गेलेला एखादा आत्मा कुटुंबातल्या व्यक्तीच्या अंगात येऊन त्याच्या मुखाने आपली आशा-आकांक्षा बोलतो व 'इच्छित गोष्ट मिळाल्यावर मी भूतयोनीतून मुक्त होईन' असे सांगतो.

बहुधा अंगात येणारी दैवते ही क्षुद्र दैवतेच असतात. मात्र नव-रात्रात अष्टमीच्या दिवशी महालक्ष्मीच्या पुढे घागरी फुंकताना एखादी बाई घुमू लागली, की तिच्या अंगात महालक्ष्मी आली असे म्हणतात. मग तिथे जमलेली बायकामाणसे तिला हळदकुंकू लावून व तिला महालक्ष्मीपुढे बसवून आपापले प्रश्न विचारतात. गावात अतिवृष्टी, अनावृष्टी किंवा गुरांच्या अथवा माणसांच्या रोगाची साथ आली, की त्याही वेळी ग्रामदेवता पुजाऱ्याच्या अथवा भगताच्या अंगात येऊन भूत-भविष्य सांगते. मग ग्रामस्थ मंडळी तिच्या आज्ञेप्रमाणे वागतात. अंगात येणे हा प्रकार सर्व जगात प्राचीन कालापासून आजतागायत निर-निराळ्या स्वरूपात चालू आहे.

## अंगामी नाग

नागभूमीमधील एक नाग जमात. कोहिमात आणि आसपासच्या प्रदेशात यांची वस्ती आहे. अंगामी नाग उंच, गोरे आणि शरीराने धडधाकट असतात. पाठीवर मणभर ओझे लादून हे लोक उंच डोंगर चढतात व उतरतात आणि काही वेळा तर दिवसाला तीस-चाळीस मैल मार्ग चालून जातात. कित्येक तास असा चढ-उतार करताना त्यांना दम लागत नाही. उलट गाणी गात, मजेत त्यांचा प्रवास चाललेला असतो. त्यांचे खांदे, छाती, जांघा व पोटऱ्या यांचे स्नायू उभार व बळकट झालेले असतात. त्यांचे केस काळे असतात; पण डोळे मात्र बहुधा घारे असतात. ज्या अंगामी नागांचा शहरांशी संपर्क आलेला नाही किंवा ज्यांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारलेला नाही, असे अंगामी पुरुष केवळ एक लंगोटी लावतात, वेताचा कमरपट्टा घालतात आणि बाहू व पोटऱ्या यांवर वेताचा पट्टा गुंडाळतात. ते गळ्यात तांब्याची कडी व कवडयांच्या माळा घालतात. छाती, बाहू व पाय यांवर ते गोंदून घेतात. हे गोंदण त्यांच्या सामाजिक पदाचेही द्योतक असते. पूर्वी जो पुरुष युद्धात शत्रूचे शिर कापून आणीत असे, त्याच्या छातीवर विशेष प्रकारचे गोंदण गोंदले जात असे. हे शिर तो आपले गौरवचिन्ह म्हणून घरासमोर टांगून ठेवीत असे.

अंगामी नागांच्या मुली कानांत, गळ्यांत व हातांत अलंकार घालतात. त्या अंगभर स्वतः विणलेल्या शाली पांघरतात. अविवाहित मुली डोक्यावरील सर्व केस कापून टाकतात. लग्न ठरले म्हणजे त्यांना केस वाढवायला परवानगी मिळते. नियमितपणे केस कापल्याने पुढे त्यांचे केस दाट बनतात व रोगापासून मुक्त राहतात. ख्रिस्ती मुली मात्र असे केस कापत नाहीत.

हे लोक भात, मासे, मांस, भाज्या, इ. पदार्थ खातात. त्यांना डुकराचे आणि गाईचे मांस फार आवडते. काही खेडयांतले लोक कुत्र्याचे मांसही खातात. तांदुळाचे मद्यही या लोकांना प्रिय आहे

अंगामी नाग झूम पद्धतीने शेती करतात. सर्व झूम जमिनी गावाच्या मालकीच्या असतात. आणि कोणत्याही भागात शेती करायला त्यांना परवानगी असते. शेतीची अवजारे आणि घरातील सामानसुमान यांच्यावर त्यांची वैयक्तिक मालकी असते आणि वारसाहक्काने ती संपत्ती कनिष्ठ पुत्राला मिळते.



अंगामी नाग स्त्री

अंगामी नाग सुगीच्या वेळी सण साजरे करतात. फेब्रुवारी महिन्यात साजरा होणारा सेकेन्य-पूजा हा त्यांचा सर्वांत मोठा उत्सव आहे. त्या दिवशी घरातील प्रत्येक पुरुष एकेक कोंबडा मारतो. नरडे दाबूनच तो मारायचा असतो. मरता मरता जर कोंबड्याने आपली टांग डावीकडे टाकली तर तो शुभ शकुन समजतात आणि पुढच्या वर्षी पीक चांगले येणार असे मानतात. या दिवशी लोक ठेवणीतले कपडे घालतात. शेतात नृत्य करताना लोक डोक्याला कापडी टोपी घालतात. या वेळी ते अंगावर नक्षीदार शाल पांघरतात. तिच्या विणकामासाठी त्यांना कित्येक महिने लागलेले असतात.

हे लोक हातांत भाले घेऊन नृत्य करतात. त्यांच्या नृत्याला गीतांची साथ असते. ही गीते मधुर असतात आणि हळू आवाजात गायिली जातात. मुली गाण्यात विशेष तरबेज असतात.

अंगामी मुली साध्या मागांवर आपल्याला लागणारे कपडे व शाली विणतात. स्थानिक वनस्पतींपासून रंग तयार करून त्या सूत रंगवतात. निरनिराळ्या तऱ्हेच्या टोपल्या, चटया वगैरे विणण्याचे कामही त्या करतात. पूर्वी अंगामी नाग मुलगी ज्या तरुणाने लढाईत अनेक माणसांची मुंडकी तोडली आहेत, अशा तरुणाला वर म्हणून पसंत करीत असे; पण सांप्रत त्यांच्यातील शिरे कापून आणण्याची प्रथा बंद पडली आहे.

या लोकांत मुली व मुले यांच्यासाठी वेगवेगळी शय्यागृहे असतात. संध्याकाळी कामधाम व जेवण आटोपल्यावर मुले-मुली आपापल्या शय्यागृहांत झोपण्यासाठी जातात. तिथे रात्री त्यांचे गायन व नृत्य चालते.

अंगामी नाग आपल्याला इतर नाग जमातींपेक्षा श्रेष्ठ समजतात. तसेच, अंगामींपैकी एक वर्ग आपल्यात पूर्ण शुद्ध रक्त असल्याचा दावा करतो. आणि आपल्याला महान अंग असे म्हणवतो. रक्ताची ही शुद्धता टिकविण्यासाठी आपल्या मुला-मुलींचा विवाह हा वर्ग महान अंग गोत्रातच करतो.

ज्या गावात केवळ अंगामी नागांची वस्ती आहे, त्या गावाची व्यवस्था प्रजातंत्रात्मक असते. प्रत्येक व्यक्ती सामाजिक व्यवहारात पूर्ण स्वतंत्र असते. मात्र धार्मिक बाबींसाठी प्रत्येक गावात एक मुखिया किंवा मुख्य पुरोहित असतो. तो गावाच्या संस्थापकाच्या वंशातील असतो. त्याला टेवो असे म्हणतात. धार्मिक बाबतीत त्याला काही अधिकार असले तरी एरवी तो सामान्य माणसासारखा शेती करून जगतो. कोणी प्रतिष्ठित व्यक्ती त्याला भेटायला गेली असता तो हवेत उंच उडी मारून आणि स्वागतपर आरोळी ठोकून त्या व्यक्तीचे स्वागत करतो.

उकपेनुओफॉई नामक एकच देव आहे, अशी या लोकांची श्रद्धा आहे आणि ते त्याचीच पूजा करतात.

हे लोक मृताला कपड्यात लपेटून पुरतात. त्यानंतर सर्व लोक मांसभोजन करतात व तांदळाची दारू पितात. पाहा – नाग जमाती, नागभूमी. [ नागालँड – श्री. जयंत वाचस्पति, १९७४; ट्रा. वी. इं.; ज. जी. सं.; हिमालयाच्या कुशीत ]

**अंगारकी चतुर्थी** तिथिव्रत. संकष्टी चतुर्थी मंगळवारी येते तेव्हा तिला अंगारकी (मंगळ) चतुर्थी म्हणतात. या व्रतात दिवसभर उपवास व रात्रौ भोजन करायचे असते. व्रतावधी चार किंवा आठ चतुर्थ्या किंवा जन्मभर. व्रतविधी : सूर्यास्तानंतर अंगुष्ठमात्र मंगळाच्या प्रतिमेची पूजा, मंत्र अग्निर्मूर्धा० (ऋ. ८.४४.१६). नंतर अर्घ्यदान व नक्तभोजन. या व्रताची कथा अशी–

अवंती नगरीत भारद्वाज नावाचा ऋषी होता. एके दिवशी तो क्षिप्रानदीवर स्नानास गेला असता तिथे अप्सरांची जलक्रीडा पाहून त्याचे वीर्य स्खलित झाले. त्यातून एक रक्तवर्ण पुत्र उत्पन्न झाला. पृथ्वीने त्याचे पालन केले. सात वर्षांनंतर त्याने पृथ्वीला विचारले, की 'माझा वर्ण असा लाल का?' त्यावर

पृथ्वीने त्याचे जन्मवृत्त त्याला सांगितले. मग तो भारद्वाजाकडे आला. भारद्वाजाने त्याचे उपनयन करून त्याला वेदशास्त्रे पढविली व गणेशाचा मंत्र दिला. मग नर्मदेच्या काठी बसून त्या पुत्राने त्याचे अनुष्ठान केले. माघ कृष्ण चतुर्थीच्या दिवशी गणपती त्याला प्रसन्न झाला. 'तुला देवांसह अमृतपान करायला मिळेल. मंगळ या नावाने तू प्रसिद्ध होशील, आणि तुझ्या नावाची चतुर्थी लोकांना कल्याणप्रद होईल,' असा गणपतीने त्याला वर दिला. त्या दिवसापासून अंगारक चतुर्थीला महत्त्व आले. पुढे त्या मंगळाने गणेशाची मूर्ती करून तिचे मंदिर बांधले. मंगलमर्ती या नावाने तो गणेश प्रसिद्ध झाला. ते स्थानही तीर्थक्षेत्र बनले. [ व्रतराज ]

## अंगारकी चतुर्दशी

मंगळवारी येणारी चतुर्दशी. शंभर सूर्यग्रहणांत केलेल्या दानादी कृत्यांपेक्षा ही अधिक फल देते. [ हि. ध. ]

## अंगारा

अंगार=निखारा, यांपासून हा शब्द बनला आहे. यज्ञातल्या, चुलीतल्या अथवा एखाद्या पवित्र स्थळातल्या राखेला किंवा भस्माला अंगारा म्हणतात. भूतबाधा किंवा दृष्टिबाधा झाली असल्यास ती दूर करण्यासाठी अंगारा अभिमंत्रित करून तो त्या व्यक्तीच्या कपाळी लावतात. ही चाल पुराणग्रंथांतही आढळते. अरुंधतीने अग्निहोत्र्याच्या कुंडातील भस्म मृत्युंजय मंत्राने अभिमंत्रित करून ते एका मृत-ब्राह्मणाच्या कपाळी लावले आणि तो जिवंत झाला, अशी कथा पद्मपुराणात (१०६) दिली आहे. गुरुचरित्रात अंगारा, किंवा भस्म याच्या सामर्थ्याच्या अनेक कथा आहेत. रामरक्षा, शिवकवच, इ. स्तोत्रे सायंकाळी पठण करून त्यांनी अभिमंत्रित केलेला अंगारा बाळंतिणीला आणि लहान मुलांना लावण्याची प्रथा महाराष्ट्रात आढळते. बैरागी, गोसावी हे भिक्षा मागायला येतात, तेव्हा तेही आपल्या देवाचा अंगारा लोकांच्या कपाळी लावतात. शिवाच्या देवस्थानात देवापुढे अंगारा ठेवलेला असतो. दर्शनार्थी लोक तो कपाळी लावून बाहेर पडतात. बाळंतिणीच्या पाचव्या व सहाव्या दिवशी हिंग व दूध कालवून ते जाळतात व त्याचाच अंगारा म्हणून उपयोग करतात.

अंगारा हे शुक्ल वा कृष्ण यातूचे उत्तम माध्यम आहे. विशिष्ट हेतूसाठी अंगारा हातात घेऊन मंत्र म्हणतात, त्या वेळी त्या मंत्रांची शक्ती अंगाऱ्यात उतरते अशी समजूत आहे. मग मंत्रसामर्थ्याने भारलेली ती विभूती इच्छित कार्यासाठी वापरली जाते. अंगारा-धुपारा हा शब्दप्रयोग याचाच बोधक आहे. पाहा—भस्म, राख. [ म. ज्ञा. को. ९. ]

## अंगिरस कुल

या कुलातल्या ३३ ऋषींची नावे पुराणात आली आहेत. ती अशी— (१) अंगिरा (२) त्रित (३) भारद्वाज बाष्कली (४) ऋतवाक् (५) गर्ग (६) शिनी (७) संस्कृती (८) गुरुवीत (९) मांधाता (१०) अंबरीष (११) युवनाश्व (१२) पुरुकुत्स (१३) त्रसदस्यू (१४) सदस्युमान (१५) आहार्य (१६) अजमीढ (१७) ऋषभ (१८) कपी (१९) पृषदश्व (२०) विरूप (२१) कण्व (२२) मुद्गल (२३) उतथ्य (२४) शरद्वान (२५) वाजश्रवा (२६) अयास्य (२७) सुवित्ती (२८) वामदेव (२९) असिज (३०) बृहदुक्थ (३१) दीर्घतमा (३२) कक्षीवान.

तेहतिसावे नाव लुप्त झाले आहे. वरील बत्तीस नावांचीही शुद्ध रूपे निश्चित करता येत नाहीत. या अंगिरस कुलात पुढे अनेक पक्ष झाले आहेत. उदा० कण्व, मुद्गल, कपी, इत्यादी. या कुलाचा मूळ पुरुष अंगिरा ही फार पुरातन व्यक्ती होती. याचा अथर्ववेदाशी घनिष्ठ संबंध आहे. स्वतंत्रपणे व भृगूच्या बरोबर याची अनेक सूक्ते अथर्ववेदात आहेत. या कुलातल्या मंत्रद्रष्टचा ऋषींत मांधाता, अंबरीष, युवनाश्व, इ. पुरुष क्षत्रिय होते (वायू पु. ५९.१०२). [ वै. वा. इ. ]

## अंगुत्तर निकाय

बौद्धांच्या निकाय ग्रंथांपैकी हा चौथा निकाय असून यात ९५५७ सुत्ते आहेत. हा सुत्तपिटकाचा एक भाग आहे. हा ग्रंथ बुद्धाच्या निर्याणानंतर उत्तर भारतात रचला गेला. यांतली सुत्ते काही एका ओळीइतकी लहान, तर काही तीन चार पाने भरतील इतकी प्रदीर्घ आहेत. यांत बौद्ध धर्माची तत्त्वे विषयवारीने दिली असून त्या धर्मातल्या नीतिनियमांचे मानसशास्त्रीय विवरण केलेले आहे. बौद्धधर्मी व्यक्तीच्या उन्नतीसाठी आवश्यक अशा गुणांचे यांत सविस्तर वर्णन असून एक, दोन, तीन, अशा क्रमाने अकरापर्यंत गुणांची मांडणी यात आढळते. प्रत्येक विषय विशिष्ट संख्येने युक्त करून यांत नमूद केलेला आहे. ही पद्धत ख्रिस्ती धर्मग्रंथातही पुढे अवलंबिली गेली आहे. उदा० सात प्राणघातक पापे, दहा ईश्वरी आज्ञा, बारा प्रेषित, इत्यादी. लेखी पोथ्याही फार नव्हत्या व पाठांतरच करणे जरूर होते, अशा काळात अशा सुत्तांची आवश्यकता होती. बुद्धघोषाने या सर्वांचा संग्रह मनोरथपूरणी या आपल्या ग्रंथात केला आहे. पाहा—सुत्तपिटक; बुद्धघोष.

## अंगुलिताडितिका

एक प्राचीन क्रीडा. खेळणाऱ्या गड्यांतून एकाचे डोळे बंद करून उरलेले गडी आपल्या बोटाने त्याच्या मस्तकाला स्पर्श करीत. स्पर्श कर

णाऱ्या गड्याचे नाव, डोळे बांधलेल्या गड्याने बिनचूक सांगितले, तर त्याच्यावरचे राज्य जाऊन ज्याचे नाव ओळखले गेले, त्या गड्यावर राज्य येई. [प्रा. भा. म.]

**अंगुली** 'अङ्गति इति अङ्गुलि :' = क्रियेसाठी गमन करते, ती (विग्रह कोश). एक मान. अंगुली = ८ यव (अर्थ. २.२०). सांप्रतच्या पाऊण इंचाबरोबर. यज्ञोपवीत ९६ अंगुलीचे असते. स्थंडिल यजमानाच्या एका अंगुलीइतके उंच व अठरा अंगुली चौरस असते. लग्नातले बोहले वधूच्या ६ अंगुलींहून अधिक व १२ अंगुलींहून कमी असे विषम अंगुलींचे असते.

**अंजन** काजळाला अंजन म्हणतात. काजळ डोळ्यात घालण्याची पद्धत भारतात प्राचीन कालापासून आहे. सुश्रुतसंहितेत काजळ तयार करण्याची पद्धती दिली आहे. सामान्यत: तुपाच्या दिव्यावर एखादे पसरट भांडे पालथे ठेवून त्यात काजळ धरतात व ते घोटून तयार करतात. नेत्ररोग होऊ नयेत, म्हणून मुलांच्या डोळ्यात काजळ घालतात. रमणींच्या सोळा शृंगारात काजळाचा समावेश आहे. 'काजळ-कुंकू' हे सुवासिनींचे सौभाग्य मानलेले आहे. रसिक-श्रेष्ठींनी रमणींच्या नेत्रातल्या काजळाला खूपच गौरविले आहे. त्याविषयी एक सुभाषित असे –



डोळचात अंजन घालणारी स्त्रीमूर्ती – खजुराहो

अधरे नववीटिकानुरागो
नयने कज्जलमुज्ज्वलं दुकूलम् ।
इदमाभरणं नितम्बिनीना –
मितरद्भुवणमङ्गदूषणाय ॥

अर्थ– अधरावर तांबूलाची रक्तिमा, डोळचात काजळ व झुळझुळीत तलम वस्त्र, हेच खरे रमणींचे अलंकारमंडन होय. इतर भूषणे ही त्यांच्या अंगावरची दूषणेच ठरतील.

जिचा पती परगावी गेलेला आहे (प्रोषितभर्तृका) तिने व विधवेने काजळ घालू नये, असा संकेत आहे. कालिदासाने विरहिणी यक्षस्त्री अंजनविरहित असल्याचे लिहिले आहे (उ. मेघ ३५). लग्नाच्या वेळी वधू-वरांच्या डोळचांत काजळ घालण्याची प्रथा पुरातन आहे. लग्नाच्या चौथ्या दिवशी वधू-वर परस्परांच्या डोळचांत अंजन घालीत व त्या वेळी आपले डोळे मधासारखे तेजस्वी होवोत, अशी मंत्रयुक्त प्रार्थना करीत. त्याचप्रमाणे मधुप नावाच्या मण्यांचे चूर्ण करून तेही डोळचात घालीत व परस्परांना आलिंगन देत. प्राचीन वेदिका-स्तंभावर कित्येक स्त्रीमूर्ती शलाकेने डोळचात अंजन घालीत असलेल्या दाखविल्या आहेत.

मोहेंजोदडो, नासिक, नेवासे, इ. अनेक ठिकाणी झालेल्या उत्खननांत हस्तिदंताच्या अंजनशलाका मिळाल्या आहेत. नासिक व नेवासे इथे सापडलेल्या हस्तिदंती शलाकांवर अत्यंत नाजुक नक्षीकाम केलेले आहे. हस्तिदंताप्रमाणे लोक तांब्याच्याही शलाका वापरीत. पाहा–काजळ, सुरमा. [हडप्पा; महाराष्ट्रातील पुरातत्त्व; वै. नि.; प्रा. भा. प्र.]

**अंजनगिरी** (१) हा पर्वत महावनात असल्याचे जातकात म्हटले आहे (५.१३३). रामायण (किष्किंधा. ३७.५) व मार्कंडेयपुराण (५८.११) यांतही याचा उल्लेख आला आहे. स्कंदपुराणात हा सुवर्णाचा असल्याचा उल्लेख आहे. या सर्व उल्लेखांच्या आधारे पंजाबमधील सुलेमान पर्वतांच्या रांगेला प्राचीन काळी अंजनगिरी म्हणत असावे, असे वाटते. या पर्वतात अनेक खिंडी असून, त्यांतून भारतातून बलुचिस्तानात जाण्याचे प्रमुख मार्ग आहेत. [हि. जॉ. ए. इं.; क. हि. वा. पु.]

(२) एक पर्वत. सितोदाच्या पश्चिमेस हा आहे. उरगांचे वसतिस्थान. हा रानटी हत्तींबद्दल प्रसिद्ध आहे (वायुपु. ३६. २८; ३९.५९; ६९.२३८).

**अंजना** हनुमंताची माता. वाल्मीकिरामायणात हिचे चरित्र पुढीलप्रमाणे आले आहे–पुंजिकस्थला नावाची एक श्रेष्ठ व सुंदर अप्सरा होती. ऋषीच्या शापामुळे ती वानर योनीत जन्माला आली. तरीही तिच्या अंगी स्वेच्छेप्रमाणे रूप धारण करण्याचे सामर्थ्य होते. कुंजर नावाच्या वानराची ती मुलगी असून पुढे तीच केसरी वानराची अंजना नावाची पत्नी झाली. अंजना एकदा एका सुंदर स्त्रीच्या रुपात पर्वतावर हिंडत

असता वायूने तिला पाहिले, तो तिच्यावर मोहित झाला आणि तिला त्याने आलिंगन दिले. मग तो तिला म्हणाला. 'मी तुला आलिंगन देऊन तुझ्या ठिकाणी माझे तेज ठेवले आहे. तुला वीर्यवान, बुद्धिवान असा मुलगा होईल.' नंतर तिने हनुमंताला जन्म दिला (वा. रा. किष्किंधा. ६६-६७).

शिवपुराणात हिला गौतम ऋषीची कन्या मानले आहे (शिवशत २०). मातंग ऋषीच्या सांगण्यावरून हिने केसरीसह आकाशगंगा या तीर्थस्थानी एक हजार वर्षे वायूची आराधना केली. वायू प्रसन्न झाला असता हिने पुत्र व्हावा असा वर मागितला. मग त्याच्याच अंशाने हिला मारुती हा पुत्र प्राप्त झाला. [श्रीरामकोश; प्रा. च. को.]

**अंजनेरी** (सं. अंजनागिरी) नासिक–त्र्यंबकेश्वर मार्गावरील एक पर्वत. ही एक टेकडयांची रांग असून, तिच्या पायथ्याला अंजनेरी हे गाव आहे. याच्या माथ्यावर एक मंदिर आहे. गावात काही मंदिरांचे भग्नावशेष दिसतात. ही मंदिरे आभीर राजे व देवगिरीचे यादव (इ. स. ११५०–१३०८) यांच्या वेळची आहेत. प्रत्येक मंदिराच्या दरवाज्याच्या वरच्या पट्टीवर तीर्थंकराची एक मूर्ती आहे. बऱ्याच मूर्ती खाली पडून भग्न झालेल्या आहेत. एका जैन देवालयात इ. स. ११४० चा संस्कृत शिलालेख आहे. त्यात सेउण यादवाच्या एका वाणी प्रधानाने काही दुकानांचे उत्पन्न देवळाला दिल्याचा उल्लेख आहे.

या पर्वताला तीन शिखरे असल्यामुळे याला त्रिकूट असेही म्हणतात. एका शिखरावर किल्ला व अंजनादेवीचे मंदिर आहे. एका शिखरावर एका विशाल गुंफेत पार्श्वनाथाची मूर्ती आहे. गुंफेच्या वर एक मैल दूर एक सरोवर आहे. एका शिखरावर सीतादेवीची मूर्ती आहे.

आभीरांचे मांडलिक त्रिकूटक इथे इ. स. च्या ४ थ्या शतकात राज्य करीत होते. यादवकाळात अंजनेरी ही एक समृद्ध नगरी होती. [सु. वि. को.; जै. ज्ञा. को.; म. वि. को.]

**अंजली** (१) 'अज्यते अनेन इति' = जेणेकरून सेचन केले जाते ती (विग्रहकोश). अंजली ही एक मुद्रा आहे. दोन्ही हात कोपरांपासून उभे, हातांचे तळवे मणिबंधात जुळवलेले; पण फुगीर आणि पोकळ. बोटांची अग्रे किंचित अंतर्वक्र. ही एक नृत्यमुद्रा आहे. देवाला नमस्कार करतानाही अंजलिसंपुट करतात. हिला सर्वराजेंद्रमुद्रा असे म्हणतात.

(२) एक परिमाण. चरकाच्या मते १६ कर्ष म्हणजे एक अंजली. कौटिल्याच्या मताप्रमाणे अंजली अथवा कुडव १२$\frac{1}{2}$ तोळ्यांच्या बरोबर असतो. [इं. बु. इ.; पा. का. भा.]

**अंडकटाह** भूरादी सात लोकांना मिळून अंडकटाह म्हणतात. हे सात लोक छत्राकार असून, त्या प्रत्येकाला त्याचे सूक्ष्म आवरण आहे. या अंडकटाहाच्या सभोवती घनोदधी नामक समुद्र आहे व त्याने भूमंडल धारण केलेले आहे, असे वायुपुराणात सांगितले आहे.

**अंतःकरणचतुष्टय** अंतःकरण म्हणजे अंतरिंद्रिय. इंद्रियांचे प्रकार दोन–बाह्य व आंतर. चक्षु, श्रोत्र इ. इंद्रिये ही बाह्य इंद्रिये होत. ती आपणांस बाह्य विषयांचे ज्ञान करून देतात. परंतु आंतर विषयांचे ज्ञान होण्यासाठी कोण्यातरी इंद्रियाची गरज असते. म्हणून अंतःकरण हे एक निराळे इंद्रिय मानले आहे. त्याच्या द्वारे सुख, दुःख, इ. आंतर विषयांचे ज्ञान होते. अंतःकरण हे ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये यांच्यावर नियंत्रण ठेवते. या अंतःकरणाचे पुढील चार घटक व चार विषय आहेत–

मनो बुद्धिरहंकारश्चित्तं करणमन्तरम्।
संशयो निश्चयो गर्वः स्मरणं विषया इमे ॥

अर्थ – मन, बुद्धी, अहंकार व चित्त (मिळून) अंतःकरण होय. संशय, निश्चय, गर्व व स्मरण हे त्याचे (अनुक्रमे) विषय होत.

वेदान्त्यांच्या मते अंतःकरण हे आरशासारखे आहे. ब्रह्माचे प्रतिबिंब त्यात पडते व त्या प्रतिबिंबाला जीव ही संज्ञा प्राप्त होते. [न्यायकोश]

**अंतःपुर** राजप्रासादातल्या राणीवशाच्या विभागाला अंतःपुर अशी संज्ञा आहे. शुद्धान्त व अवरोध अशी त्याची आणखीही नावे आहेत. शुद्धान्त शब्दावरून सूचित होते, की राजप्रासादाच्या ज्या भागात स्त्रियांचे वास्तव्य असे, तो भाग पवित्र मानला जाई. त्या भागात अनोळखी व अपरिचित लोकांना प्रवेश मिळत नसे. अवरोध असे नाव पडण्याचे कारण तो भाग सुरक्षित व रक्षकांनी वेढलेला असे. या रक्षकांना प्रतीहार व कंचुकी अशी नावे होती. अंतःपुराचा अधिकारी बहुतांशी वृद्धच असे. मोगल व चिनी सम्राटांच्या अंतःपुराचे रक्षक व सेवक म्हणून खोजे अर्थात क्लीव लोक ठेवले जात. गुप्त साम्राज्याच्या काळातही ही प्रथा होती.

राजे, महाराजे व श्रीमंत लोक यांची अंतःपुरे समृद्ध व कलापूर्ण असत. राजांच्या अंतःपुरात नाट्यशालाही असत. रामायणात अंतःपुरातल्या वधूजननाट्यसंघाची चर्चा आढळते. मालविकाग्निमित्रात ज्या नृत्याभिनयस्पर्धेचा उल्लेख आहे, ती अंतःपुरातल्या रंगमंचकावरच झाली होती. नृत्य, गान, वाद्य, चित्र, इ. कला अंतःपुराच्या आश्रयाने वाढत होत्या. कित्येकदा राजकीय कारस्थानेही अंतःपुरातच शिजत. अंतःपुरे

सदैव प्रसन्न असत, असे नाही. राजस्त्रियांमधले कलह व हेवेदावेही तिथे धुमसत राहत.

श्रीमंत नागरिकांच्या घराचे दोन प्रकोष्ठ असत. बाहेरचा प्रकोष्ठ पुरुषांसाठी व आतला प्रकोष्ठ अंतःपुरातल्या स्त्रियांसाठी. वराहमिहिराने आपल्या बृहत्संहितेत अशा प्रकारचे घर बांधण्याचा विस्तृत तपशील दिला आहे. अशी मोठी घरे राजमार्गाच्या दोन्ही अंगी बांधली जात. अंतःपुरातल्या वधू अशा घरांच्या वरच्या मजल्यावर राहत, असे दिसते. बाहेर होणारे विशेष उत्सव आणि समारंभ अंतःपुरातल्या वधू वरच्या मजल्यावरच्या गवाक्षातून पाहत, असे वर्णन काव्य-नाटकांतून आढळते. वरच्या मजल्यांना रस्त्याच्या बाजूने गवाक्ष ठेवणे आवश्यक समजले जात असे. मालतीमाधव



अंतःपुरातील नृत्यविनोद–अजंटा

नाटकातली मालती आपला प्रियकर माधव राजमार्गाने जात-येत असता त्याला अशा गवाक्षातूनच पाहत होती. ही गवाक्षे खालच्या मजल्यापेक्षा थोड्या अधिक उंचीवर ठेवीत. याचे कारण असे असू शकेल, की अंतःपुरातल्या स्त्रियांना बाहेरच्या लोकांना पाहता यावे; पण रस्त्यावरच्या लोकांना मात्र अंतःपुरातल्या स्त्रियांचे दर्शन घडू नये. जे राजमहाल नदीच्या तीरावर असत, त्यांना जाळीदार गवाक्षे बसवीत. त्यातून अंतःपुरवधू नदीची शोभा पाहू शकत. सुनंदेने इंदुमतीला अशा जाळीदार गवाक्षातून रेवा नदीच्या चटुल तरंगांची शोभा पाहण्यास सांगितले होते. (रघु. ६.४३).

अंतःपुराच्या अंतर्भागांची बनावट कशा प्रकारची असे, ते संस्कृत काव्य–नाटकांमधून कल्पिता येते. तिथे एक मोठी चौसोपी असे. मृच्छकटिकातला विदूषक या अंतर्गत चौसोपीच्या दारात बसून पक्वान्ने खात असे. वराहमिहिर अंतःपुराला एक आंगण असावे व त्याला चारही बाजूंनी चार ओसऱ्या किंवा सज्जे असावे, असे सांगतो. या ओसऱ्यांचे खांब सुरुवातीला लाकडी असत. नंतरच्या काळात ते दगडांचे किंवा विटांचे उभारू लागले. या खांबांवर शालभंजिका नामक मूर्ती कोरीत. या मूर्ती सौभाग्यसूचक मानीत. कालिदासानेही अशा स्त्री-मूर्तींचा उल्लेख केला आहे (रघु. १६.१७).

वाल्मीकिरामायणात (१.५) अयोध्येच्या वर्णन-प्रसंगात वधूनाटकसंघ, उद्यान, कूटागार व विमान, यांचे उल्लेख आले आहेत. रामभट्ट या टीकाकाराने वधूनाटकसंघ म्हणजे अंतः-पुराच्या स्त्रियांसाठी नाटकशाला, उद्यान म्हणजे क्रीडेसाठी निर्मिलेली पुष्पवाटिका, कूटागार म्हणजे स्त्रियांचे क्रीडागृह आणि विमानगृह म्हणजे सात मजली महाल, असे त्या शब्दांचे अर्थ दिले आहेत. त्यावरून रामायणकाळातील प्रासादांतर्गत अंतःपुराचे भव्य स्वरूप कळून येते.

अंतःपुराच्या शयनकक्षात एका पलंगावर मऊ शय्या अंथरलेली असे. बाणभट्ट सांगतो, की कादंबरीचा पलंग फार मोठा नव्हता. त्यावर एक चादर पसरलेली असून, तिच्यावर धवल उपधान (शुभ्र उशी) होती. कादंबरी डावी भुजलता किंचित वक्र अशी त्या उशीवर ठेवून अर्धशयित अवस्थेत परिचारिकांना भिन्न भिन्न कार्यांचा आदेश देत होती. जवळच्या वेदिकेवर तांबूलपात्र व सुगंधी उपलेपन होते. तिथल्या भिंतींवर नाना प्रकारची चित्रे काढलेली होती. ती पाहून चंद्रापीडाला असा भ्रम झाला की, सारे जग जणू कादंबरीच्या दर्शनासाठी इथे चित्ररूपाने उपस्थित झाले आहे. तिच्या महालाच्या छता-वरही विद्याधरांची अधोमुख व मनोहर चित्रे रंगविलेली होती.

अंतःपुरातल्या स्त्रियांच्या मनोविनोदाची जी अनेक साधने असत, त्यांत चित्रकर्माला प्राधान्य होते. अंतःपुरातल्या कुमारी विवाहित स्त्रियांपेक्षा कलाप्रवीण असत. त्या वीणा व बासरी वाजवीत, द्यूत खेळत, चित्रे काढीत व सुभाषिते पाठ करीत. विवाहित स्त्रिया डोक्यावर अवगुंठन किंवा घुंघट घेत, असेही उल्लेख मिळतात. फक्त चार प्रसंगी लोक त्यांना पाहू शकत व ते दर्शन दोषावह मानले जात नसे. भासाच्या प्रतिमा नाटकात (प्रतिमा १.२९) राम म्हणतो –

**स्वैरं हि पश्यन्तु कलत्रमेतद्**

बाष्पाकुलाक्षैर्वदनैर्भवन्तः ।
निर्दोषदृश्या हि भवन्ति नार्यो
यज्ञे विवाहे व्यसने वने च ॥

अर्थ – (लोकहो,) तुम्ही अश्रूपूर्ण नेत्रांनी माझ्या या कलत्राला (सीतेला) स्वच्छंदपणे पाहा. कारण, यज्ञ, विवाह, संकट आणि वनगमन या चार प्रसंगी (राज) स्त्रियांचे दर्शन निर्दोष असते.

अंतःपुराला लागूनच वृक्षवाटिका असे. तिच्या मध्यभागी दीर्घिका म्हणजे लांबट तलाव असे. त्या वाटिकेत फल-पुष्पांचे वृक्ष आणि लताकुंज असत. फुलझाडे क्रमाने एका जातीची एका भागात अशा प्रकारे लावीत. अंतःपुरात जवळच्या परिसरात लहान लहान फुलझाडे, त्यापुढे ताटवे, त्याच्या बाहेर लतामंडप आणि त्याच्याही पलिकडे मोठे वृक्ष लावले जात. या वाटिकेच्या एका भागात अंतःपुरस्वामिनी भाजीपालाही लावीत असे. वात्स्यायनाच्या कामसूत्रात मुळा, कंद, पालक, वांगी, कोहळा, सुरण, इ. अंतःपुरवाटिकेत होणाऱ्या शाकभाज्यांचा उल्लेख आहे. तिथल्या दीर्घिकेत जलपक्षी क्रीडा करीत. अशा प्रकारचे हंस, कारंडव, चक्रवाक, इ. पक्षी दीर्घिकेत असणे व त्यांचा कलरव सदैव कानावर पडत राहणे मंगलकारक मानले जाई. जिथे जलचर पक्षी विश्राम करतात, तिथे देवतांचा वास असतो (बृहत्संहिता ५६. ४.७). [ प्रा. भा. कं. वि. ]

**अंतराळ वर्ग** द. भारतातल्या, विशेषतः केरळातल्या अनेक जातींचा समूह. ब्रह्म-क्षत्रांपेक्षा कनिष्ठ; पण शूद्रांपेक्षा वरिष्ठ अशा (अंतराळी असणाऱ्या) लोकांना हे नाव आहे. या वर्गाचे नामपिदी, अंबलवासी व शामंधर असे पोटभेद आहेत. नामपिदी हे मूळचे ब्राह्मण; पण त्यांच्या कोण्या पूर्वजाने राजप्रतिनिधीचा खून केला म्हणून त्यांची गणना अंतराळ वर्गात होऊ लागली. नम्पूतिरी ब्राह्मण यांच्याकडे पौरोहित्य करतात. हे मरुमक्कतायम् हा वारसाकायदा मानतात. अंबलवासीचे व शामंधरांचे सहा पोटभेद आहेत. हे लोक आपणांस क्षत्रिय-बीजाचे म्हणवतात; पण यांचे रीतिरिवाज नायरांप्रमाणेच आहेत. हे यज्ञोपवीत वापरीत नाहीत. यांचे संस्कार अमंत्रक असतात. अंबलवासी व शामंधर यांच्यांत रोटीबेटी व्यवहार होत नाही. पाहा – अंबलवासी, नायर. [ म. ज्ञा. को. ९ ]

**अंतरिक्ष** 'अन्तर्मध्ये ऋक्षाणि नक्षत्राणि यस्य तत्'– ज्याच्या मध्यभागी नक्षत्रे असतात ते (हलायुध). पृथ्वी व स्वर्ग यांच्यामधील अवकाश (वायुपु. २३.१०७). देव, मुनी, यक्ष, गंधर्व हे या प्रदेशात संचार करतात. ययातीला इंद्राने स्वर्गभ्रष्ट केले असता तो भूमीवर न पडता अंतरिक्षात सावरला, अशी कथा मत्स्यपुराणात आहे (३५.४). [ पु. इं. ]

**अंतर्मातृकान्यास** अ पासून अः पर्यंतचे स्वर आणि क पासून क्ष पर्यंतची व्यंजने यांना मातृका म्हणतात. या मातृकांची आपल्या शरीरामध्ये असलेल्या सहा चक्रांवर प्रतिष्ठापना करणे यालाच अंतर्मातृकान्यास म्हटले आहे.

या न्यासाची देवता अंतर्मातृकासरस्वती आहे. 'ॐ अं नमः' या मंत्राने अनुस्वारयुक्त प्रत्येक मातृकेचे स्थापन करायचे असते. न्यास झाल्यावर भारती किंवा अंबिका हिचे ध्यान करतात. निरनिराळ्या पूजाप्रकारांमध्ये प्रारंभी हा न्यास करायचा असतो. [ ऋ. ब्र. स. ]

**अंतर्यामी** 'सकलजीवनियामकः' = सकल जीवांचे आतून नियंत्रण करणारा. याला साक्षी असेही म्हणतात. साक्षीला सर्व पदार्थांचे ज्ञान होते; परंतु त्याचा साक्षीवर काहीही परिणाम होत नाही. अंतःकरण ही साक्षीची उपाधी होय. वेदांत्यांचा साक्षी हा सांख्यांच्या पुरुषाप्रमाणे निर्लेप आहे. [ न्यायकोश ]

**अंतर्वेदी** गंगा–यमुनांच्या मधील हरिद्वार ते प्रयागपर्यंत पसरलेला प्रदेश (दोआब) म्हणजे अंतर्वेदी होय (स्कंदपु. १. १. १७). वृत्राला मारल्यामुळे इंद्राच्या मागे लागलेली ब्रह्महत्या इथे नष्ट झाली, अशी कथा आहे.

वैदिक काली या प्रदेशात निरंतर यज्ञ होत. त्या काळी उशीनर, पंचाल व वत्स हे देश अंतर्वेदीत गणले जात. याच्या पूर्वेस काशी व कोसल आणि नैर्ऋत्येस कुरु, शूरसेन, चेदी हे देश होते. गुप्तकालात अंतर्वेदी हा गुप्तसाम्राज्याचा एक 'विषय' (जिल्हा) होता. समुद्रगुप्ताने इथे अश्वमेध केला होता.

अंतर्वेदीचा उल्लेख कथासरित्सागरात वसुदत्त या ब्राह्मणाच्या कथेत आला आहे. तो अंतर्वेदीत राहणारा असून, विद्याभ्यासासाठी वलभीस (गुजरात) जाऊ इच्छीत होता. [ प्रा. म. ]

**अंत्यक्रिया** या क्रियेलाच संस्कृतात और्ध्वदेहिक म्हणतात. प्रेत घरातून बाहेर काढण्यापासून या क्रियेचा प्रारंभ होतो. प्रेतवाहनासाठी शिबिका असावी, असे म्हटले आहे. शिबिका म्हणजे पालखी होय. पण प्रेत आडवे ठेवण्याइतकी ती लांब नसते; त्यावरून बसलेल्या स्थितीत प्रेत नेण्याची चाल पुरातन काळी असण्याचा संभव आहे. सध्या प्रेत तिरडीवरून नेतात. ते उताणे निजवतात. वाहक चार असतात. प्रेतापुढे अग्नी नेण्याची वहिवाट बहुतेक जातींत आढळते. जे लोक प्रेते पुरतात,

ते सुद्धा अग्नी घेऊन जातात. जो क्रिया करणारा असतो, तो अग्नीचे मडके हातात धरतो. हा अग्नी गोवरीचा असतो. काही ग्रंथांत दाहगर्तेचा उल्लेख आहे. दाहगर्ता म्हणजे दहनासाठी खड्डा. सध्या असा खड्डा कोणी खणीत नाहीत. ज्या अर्थी प्रेत पुरणारे लोकसुद्धा अग्नी घेऊन जातात, त्या अर्थी जुन्या काळी या प्रथेचे अनुकरण इतर समाजांकडून होत असावे, असे वाटते. प्रेतावरोवर जाणाऱ्यांनी मुक्तकेश व उपवीत (माळेसारखे जानवे) करून जावे, असे म्हटले आहे.

दुसरी सर्वसामान्य चाल म्हणजे प्रेतावरोवर शिजवलेला भात घरातून नेणे. हा भात प्रेताच्या ओठांवर ठेवून आलेली सर्व माणसे त्याच्यावर उदक सोडतात. हे पिंडदान आणि तिलांजली यांच्यासारखे आहे. याच भाताला पुढे उत्थापन पिंड असे नाव मिळाले. गरुडपुराणात अंत्यक्रियेच्या वेळी सहा पिंड द्यावे, असे सांगितले आहे, (१) मृत्युभूमीवर (२) दारात (३) चव्हाट्यावर (४) विसाव्याच्या जागी (५) चितेवर व (६) चितेवर प्रेताच्या शेजारी. यांना उत्क्रांतिपिंड म्हणतात.

अग्निहोत्र्याशिवाय बाकी सर्वांची प्रेते पालथी ठवून जाळण्याची प्रथा पूर्वी होती. अलिकडे ती लुप्त आहे. अग्निहोत्र्याची उपकरणे त्याच्या बरोबर जाळायची असतात, म्हणून त्याला चितेवर उताणे ठेवावे, असे सांगितले आहे. स्त्रियांचे मात्र उताण्या स्थितीतच दहन करावे, असे शास्त्रवचन आहे.

प्रेतदहनात स्त्री व पुरुष यांत आणखी एक भेद सांगतात, तो असा–पुरुषाला डोक्याकडून व स्त्रीला पायाकडून अग्नी द्यावा. हा नियम ब्राह्मणांत अद्यापि पाळला जातो. शूद्रकमलाकर, डोक्याच्या बाजूने प्रथम अग्नी द्यावा असे सांगतो. पण रूढी मात्र पायांकडून अग्नी देण्याची आहे. कदाचित हीच चाल मूळची असावी. अग्नी देताना ब्राह्मणेतर जातींत प्रेताकडे पाठ करतात. याला शास्त्राचा आधार नाही. मृताविषयीच्या मायेतून ही चाल निर्माण झाली असावी. दहनविधीत मडके फोडण्याची चाल सर्वत्र आहे. घट फोडणे हे प्राण गेल्याचे निदर्शक आहे. या घटातले पाणी चितेभोवती तीन प्रदक्षिणा करून धारेने ओततात. अग्नी बाहेर पसरू नये किंवा चिता विझवून टाकावी, या हेतूने हे जलसिंचन होत असावे. गुजरातेत प्रेत पुरते जळून गेल्यावर चिता पाण्याने विझवूनच मंडळी स्मशानातून परततात. गुजरातेत कित्येक ठिकाणी प्रेतावरोवर कुऱ्हाड नेण्याची वहिवाट आहे. ही कुऱ्हाड तिरडीवर प्रेताच्या डोक्याजवळ ठेवतात. प्रेत स्मशानात जिवंत झालेच, तर त्याला कुऱ्हाडीने मारता यावे हा त्याचा मागचा उद्देश सांगतात. कारण जिवंत झालेले प्रेत माणूस न राहता पिशाच होते, अशी समजूत आहे.

मडके फोडण्याची क्रिया ज्या दगडाने करतात, तोच दगड अश्मा म्हणून पुढे दहा दिवस वापरतात. प्रेताचा जीव अंत्यक्रिया पुरी होऊन स्वर्गमार्गाला लागेपर्यंत त्या दगडात वास करून राहतो, अशी समजूत आहे. तिलांजली त्याच्यावरच देतात. मडके फोडण्याची क्रिया ही वैदिक नाही. उदक सोडण्यासाठी काहीतरी आधार लागतो; कारण जमिनीवर किंवा दर्भावरही उदक सोड नये, असे हारीत सांगतो –

> पात्राद्वा जलमादाय स्वयं पात्रान्तरे क्षिपेत् ।
> जलपूर्णेऽथवा गर्ते न स्थले न तु बर्हिषि ॥

अर्थ – अर्घ्य देताना एका पात्रातून पाणी घेऊन ते स्वतः दुसऱ्या पात्रात अथवा जलपूर्ण खळग्यात सोडावे. मात्र ते जमिनीवर किंवा दर्भावर सोडू नये.

ब्राह्मणेतर जातींत प्रेताला स्नान घालण्यापूर्वी तेल, तूप व हळद लावतात. मुसलमानसुद्धा याला अपवाद नाहीत. हा विधी कात्यायनस्मृतीत सांगितला आहे.

पूर्वीच्या स्मृतीत हा विधी आढळत नाही. मूल उपजताच त्याला न्हाऊ घालतात, त्याचप्रमाणे मनुष्य मेल्यावर त्याला स्नान घालणे युक्त होय, या समजुतीतून ही रूढी निर्माण झाली व कात्यायनाने तिला शास्त्राचे स्वरूप दिले, असे वाटते. काही जातींत प्रेताला सोवळ्याचे वस्त्र नेसवतात. काही ठिकाणी प्रेताची श्मश्रूही करवितात. थोर वयाच्या ब्रह्मचाऱ्याला वस्त्राऐवजी लंगोटी नेसवतात. काही जातींत सुपात वरी, नागली, भात, इ. धान्ये घेऊन ती प्रेतापुढे पेरीत जातात. मेलेल्या माणसाने पिशाच होऊन परत येऊ नये यासाठी ही धान्याची पेरणी असावी. कारण धान्याला पिशाच भिते अशी समजूत आहे.

प्रेताचे मुख आच्छादित करून व मस्तक पूर्वेकडे करून त्याला स्मशानात न्यावे, असे धर्मसिंधूत सांगितले आहे; पण रूढी मात्र प्रेताचे तोंड उघडे ठेवून नेण्याची आहे. पुरुषाचे व सवाष्णीचे तोंड झाकीत नाहीत. विधवेचे मात्र झाकतात. निपुत्रिकालाही झाकल्या तोंडानेच नेतात. उघडया तोंडाने स्मशानात जाता येणे हे पुरुषार्थाचे लक्षण समजले जाते.

प्रेतविषयक कित्येक क्रिया जिवंतपणी केल्या जाणाऱ्या क्रियांच्या उलट असतात. उदा० लग्नात वधू-वरांना तेलहळद लावतात. ती पायांकडून डोक्याकडे अशी चढती लावतात. प्रेताला हेच पदार्थ वरून खाली असे लावतात. तेल लावल्यावर गरम पाण्यानेच स्नान केले पाहिजे असा जिवंतपणीचा नियम असतो. मेल्यावर तेल लावून थंड पाण्याची आंघोळ घालतात. जिवंतपणी दक्षिणेकडे पाय करून निजत नाहीत. प्रेताचे पाय मात्र दक्षिणेकडे करतात. दक्षिणेकडे ज्योत करून समई ठेवीत नाहीत. पण माणूस मेल्यावर त्याच्या जागी जी समई अथवा पणती ठेवतात, तिची ज्योत दक्षिणेकडेच असते.

हिंदूंव्यतिरिक्त सर्व जग प्रेते पुरणारे आहे. प्रेत पुरण्याची चाल ही दहनाच्या पूर्वीची असावी; आणि ते पशुपक्ष्यांकडून खावविण्याची चाल त्याच्याही पूर्वीची असावी. ऋग्वेदातील पुढील मंत्र प्रेत पुरण्याच्या चालीचे निदर्शक आहेत–

उच्छ्वञ्चस्व पृथिवि मा नि बाधया :
सूपायनास्मै भव सूपवञ्चना ।
माता पुत्रं यथा सिचाम्येनं भूम ऊर्णुहि ।।
उत् ते स्तभ्नामि पृथिवीं त्वत्परीमं लोगं निदधन्मो
अहं रिषम् ।
एतां स्थूणां पितरो धारयन्तु तेऽत्रा यमःसादना
ते मिनोतु ।।

(ऋ. १०. १८. ११, १३)

अर्थ – हे धरित्री, वरच्यावर सावरून राहा. या (मृता) ला इजा करू नको. याचे लाड पुरव. त्याची समजूत कर आणि कोमल मनाची आई जशी लेकराला पदराखाली झाकून घेते त्याप्रमाणे हे भूमी, त्याच्यावर तू आपले पांघरूण घाल (हे मृता) ही तुझ्यावरील माती ठोकून घट्ट बसविली. आता तुझ्यावर हा मातीचा ओटा करतो. तुला कोणतीही इजा होणार नाही. हे मृत्तिकाच्छादित मृतशरीरा, तुला आच्छादिणाऱ्या मृत्तिकेला पितर धारण करोत. यम तुझ्याप्रीत्यर्थ निवासस्थान निर्माण करो.

वेदमंत्रांच्या काळानंतर यज्ञसंस्थेचा विस्तार झाला. यज्ञ हेच सर्व ऐहिक व पारलौकिक उद्दिष्टांचे साधन बनले. त्यातूनच मृताचा संस्कार हाही अग्नीच्या साहाय्याने करण्याची कल्पना निर्माण झाली. पुढे वैदिक आर्य प्रेताला अग्निसंस्कार करू लागले. प्रेताला अग्निसंस्कार देऊन ते दग्ध करणे ही वैदिक आर्यांची रीत मग अन्य जातींतही रूढ झाली. या देशातले बौद्ध व लिंगायत हे प्रेते पुरणारे आहेत. ज्या जातींवर लिंगायतांचा प्रभाव आहे, त्याही प्रेते पुरतातच. संन्याशाचे प्रेत पुरतात ते बौद्धांचे अनुकरण असावे. संन्याश्याला अग्नी नसतो, म्हणूनही त्याच्या दहनाचा विधी सांगितला नसेल. संन्याश्याचे प्राणोत्क्रमण समाधिस्थितीत झाले पाहिजे, या समजुतीतून त्याला बसल्या अवस्थेत पुरण्याची चाल पडली असेल. देवीच्या रोगात मेलेल्या माणसाला जाळीत नाहीत; तर पुरतात. कुष्ठरोग्यालाही पुरावे किंवा जलसमाधी द्यावी, असे शास्त्रवचन आहे.

मरणोत्तर जी क्रिया करतात तिच्यात प्रायश्चित्ते, तिलांजली, पिंड, श्राद्धे आणि दाने इतक्यांचा अंतर्भाव होतो. और्ध्वदेहिक करणारा प्रथम सहा प्रायश्चित्तांचे उदक सोडतो. यांपैकी तीन प्रेताच्या शुद्धीकरिता व तीन कर्त्याला अधिकारप्राप्ती व्हावी म्हणून असतात. प्रायश्चित्ते सोडल्यावर कर्ता क्षौर करतो. केसांत पाप किंवा मळ असतो म्हणून ते काढून टाकायचे असतात –

यानि कानि च पापानि ब्रह्महत्यासमानि च ।
केशानाश्रित्य तिष्ठन्ति तस्मात् केशान् वपाम्यहम् ।।

अर्थ – जी काही ब्रह्महत्येसारखी पापे असतात, ती केसांचा आश्रय करून राहतात, म्हणून मी केशवपन करतो.

पण एवढ्यावरून अंत्यक्रियेसाठी कर्त्याने क्षौर करणे अपरिहार्य आहे, असे ठरत नाही. एकंदरीत क्षौर कृताकृतच मानणे चांगले.

मृत देहाचे चितेत पूर्ण दहन झाल्यावर स्मशानात गेलेले आप्तेष्ट परत फिरतात. परत येताना मागे वळून पाहत नाहीत. बाहेरचे लोक पुनश्च मृताच्या घरात येतात, मरणाच्या जागी काही क्षण उभे राहतात व मगच आपापल्या घरी जातात. प्रेताबरोबर गेलेल्या सर्व लोकांनी स्नान व आचमन करून जल, अग्नी, गोमय, इ. पवित्र वस्तूंना स्पर्श करून मगच घरात जावे, असे शास्त्रवचन आहे.

प्रेतदहनानंतर पहिल्या दिवसापासून दहा दिवस तिलांजली व पिंड देण्याची पद्धती आहे. पहिल्या दिवसाची तिलांजली प्रेताला दाहामुळे उत्पन्न झालेल्या तृषेच्या शमनासाठी असते. पुढे दहा दिवसांच्या क्रियेत हाच संकल्प म्हटला जातो. नऊ दिवसांच्या पिंडांनी प्रेतात्म्याच्या शरीराचा एकेक अवयव बनावा, नवव्या दिवशीच्या पिंडाने शरीर पूर्ण तयार व्हावे आणि दहाव्या दिवसाच्या पिंडाने त्याची तहान-भूक शमावी, अशी त्या दहा पिंडांची कल्पना आहे. ही कल्पना गरुड-पुराणावरून उचललेली दिसते. दश पिंडांनी आत्म्याला नवे शरीर मिळते व त्या शरीराने तो स्वर्गसुख भोगण्यास पात्र होतो, अशी त्यामागची धारणा आहे. सूत्रग्रंथांत या कर्माचा उल्लेख नाही. यावरून ही कल्पना वैदिक नसून पौराणिक आहे, हे उघड होते.

अंत्यकर्मात सपिंडीकरणापर्यंत एकूण अकरा प्रकारची श्राद्धे करावी लागतात – (१) नव अथवा विषम श्राद्ध. हे विषम दिवशी करायचे असते. (२) नग्नप्रच्छादन श्राद्ध. हे पहिल्याच दिवशी करतात. सर्वत्र प्रयोगकार हे श्राद्ध सांगत नाहीत. प्राण्याला शरीर झाकण्याकरिता वस्त्र मिळावे म्हणून हे श्राद्ध आहे, असे त्याच्या नावावरून कोणालाही वाटेल; पण यात नुसते वस्त्रच देत नाहीत; तर आमान्न, तेल, तूप, सोने, रुपे, पादत्राण छत्री, इ. सर्व प्रवासोपयोगी वस्तू देतात. हे श्राद्ध अमंत्रकच असते. (३) पाथेय श्राद्ध. हेही वरच्याच उद्देशाने करतात. मुख्य क्रियेचा उद्देश प्रेतत्वनिवृत्ती हा असतो. काही प्रयोगकार याचा विधी सांगत नाहीत. हेही अमंत्रकच असते. (४) अस्थिसंचयन श्राद्ध. आशौचात विषम दिवशी अस्थिसंचयन करावे, असे सांगितले आहे. अस्थी गोळा करताना श्राद्ध करावे लागते.

अस्थिसंचयन समंत्रकच असते; पण श्राद्ध मात्र अमंत्रकच असते. अस्थी तीर्थात टाकण्याच्या वेळीही श्राद्ध करतात. (५) रुद्रगण श्राद्ध. (६) वसुगण श्राद्ध. ही दोन एकोद्दिष्ट पण अमंत्रकच श्राद्धे आहेत. ही सपिंडीच्या पूर्वी करतात. अकरा रुद्र व आठ वसू यांना उद्देशून ही श्राद्धे असतात. वसू, रुद्र व आदित्य या मृतांच्या देवता आहेत. (७) पाथेय श्राद्ध. हे पूर्वीसारखे आणि त्याच उद्देशाने केलेले दुसरे श्राद्ध होय. (८) उदकुंभ श्राद्ध. यात मृताला उद्देशून उदकाने भरलेला कुंभ व आमान्न देतात. (९) महैकोद्दिष्ट श्राद्ध. हे अमंत्रक श्राद्ध प्रेताला उत्तम लोक मिळावा म्हणून अकराव्या दिवशी करायचे असते. (१०) सपिंडी श्राद्ध. हे श्राद्ध बाराव्या दिवशी करतात. प्रेतत्व निवृत्त होऊन मृताचा पितरांत समावेश व्हावा व त्याला पितृलोक प्राप्त व्हावा, म्हणून हे श्राद्ध करतात. हे समंत्रक असते. यात प्रेतपिंडाचे दर्भाने तीन भाग करतात आणि प्रेताचा बाप, आजा आणि पणजा यांच्या पिंडांत ते समाविष्ट करतात. सपिंडीकरण श्राद्ध एका वर्षानंतर करायचे असते. पण बाराव्या दिवशीच सपिंडी करण्याची वहिवाट पडली आणि पुढे शास्त्रकारांनी तिला मान्यता दिली. (११) सोळा मासिक श्राद्धे. दर महिन्याला एक अशी बारा आणि ऊनमासिक इत्यादी चार, मिळून यांची संख्या सोळा होते. ही श्राद्धे पुरी होईपर्यंत कुलात मंगल कार्य करू नये, असा प्रतिबंध आहे. म्हणून ही मासिके अकराव्या दिवशीच करून घेतात. याला मासिकनिवृत्ती असे नाव आहे.

ब्राह्मणादी सर्व जातींत अलिकडे नवव्या दिवसापूर्वी कोणी क्रिया सुरू करीत नाहीत. चितेची राख गोळा करणे आणि अस्थिसंचय हे बहुधा तिसऱ्या दिवशी होते. एकंदरीत क्रियेचा मुख्य उद्देश प्रेताला अन्नोदक देणे हा दिसतो. याशिवाय मृतात्म्याला जरुरीचे व आवडते पदार्थ देण्याची पद्धत सर्वत्र आढळते. मृत्यूनंतरही आत्म्याला उपभोगक्षम असे शरीर असते, अशी सर्वत्र समजूत आहे. सर्व वस्तूंचा उपभोग मृतात्म्याला प्रत्यक्ष रीतीने घेता येतो. म्हणून प्रेताला तशा वस्तू अर्पण करणे किंवा प्रेताबरोबर त्या पुरणे ही समजूत सर्व जगात प्राचीन कालापासून आहे. स्त्रीने सती जाण्याच्या चालीचा उगम या कल्पनेतूनच झाला असावा. यानंतरची कल्पना म्हणजे इथे उपभोग्य वस्तू दुसऱ्याला दिल्या असता त्या परलोकी मृताला मिळतात, ही होय. गरुडपुराणात म्हटले आहे, की –

श्राद्धे दत्तं अन्नं द्विजशरीरे प्रविश्य पितरो भुञ्जते ।

अर्थ – श्राद्धात ब्राह्मणाला अन्न दिले असता पितर त्या ब्राह्मणाच्या शरीरात प्रवेश करून त्याचा उपभोग घेतात.

दाने केली असता मृत जीवाला यमदूत पीडा देत नाहीत, असेही गरुडपुराणात म्हटले आहे–

यमदूता महारौद्राः करालाः कृष्णपिङ्गलाः ।
न पीडयन्ति दाक्षिण्याद्वस्त्राभरणदानतः ।।

अर्थ –काळे, पिंगट, महाभयंकर आणि दंताळ असे यमदूत वस्त्रे आभरणे यांची दाने दिल्याने (मृतात्म्याला) पीडा देत नाहीत.

अंत्यक्रियेत अकराव्या दिवशी दशदाने देण्याची चाल आहे– (१) गाय (२) भूमी (३) तिल (४) सुवर्ण (५) आज्य (६) वस्त्र (७) धान्य (८) गूळ (९) रौप्य व (१०) मीठ ही दशदाने होत. देवांना मीठ वर्ज्य आहे; पण पितरांना ते प्रिय असल्याने दहा दानांत त्याचा अंतर्भाव झाला आहे. ही दाने अभ्युदयार्थ असल्यामुळे मेल्यावर तशीच जन्माच्या वेळीही द्यायची असतात. या सर्व कृत्यांत वृषोत्सर्गाचे महत्त्व फार आहे. (वृषोत्सर्ग पाहा)

दहाव्या दिवशी पिंडाला कावळा शिवला पाहिजे अशी सर्वांची समजूत असते. पितर कावळ्याच्या वंशात येऊन पिंड भक्षण करतात ही समजूत याच्या मुळाशी आहे. अर्थात ही आदिम अवस्थेतली कल्पना आहे. त्यापुढची सुधारलेली कल्पना म्हणजे कावळ्याला यमदूत मानणे ही होय.

प्रेत जळताना त्याच्या भोवती तीन फेऱ्या घालून क्रिया करणाऱ्याने तीन बोंबा मारणे हीही चाल बहुतेक सर्व ठिकाणी आहे. स्वर्ग, पृथ्वी व पाताळ या तीन्ही लोकांत मनुष्य मेल्याची वार्ता बोंब मारून कळवावी हा त्यातला मतितार्थ दिसतो.

निरनिराळ्या जातीजमातींमध्ये अंत्यविधीचे जे विविध प्रकार आढळतात, ते पुढीलप्रमाणे –

**संन्यासी** – संन्याशाचा मृत देह स्नान घालून अलंकृत करून पुरण्याच्या स्थळी नेतात व त्याची पूजा करतात. पुरण्यापूर्वी शंखाने वा शस्त्राने त्याचे मस्तक फोडतात. देह पुरतात. संन्याशाचा देह तीर्थात टाकण्याचीही चाल आहे. त्याला जलसमाधी म्हणतात. दहा दिवस समाधिस्थानपूजा, पायसबलिदान, दीपदान व शंखोदकतर्पण करतात. अकराव्याला पार्वणश्राद्ध, बाराव्याला नारायणबली व नंतर समाराधना करतात. त्यानंतर संन्याशाची समाधी बांधतात. संन्याशाला पिंडदान नसते.

**लिंगायत** – लिंगायतांमध्ये (वीरशैव) मृतांना पुरण्याची चाल आहे. त्यांच्या गळ्यात नित्य असलेले शिवलिंग सर्व अपवित्राचा नाश करते, अग्नीने जाळण्यासारखे अपवित्र काही उरत नाही; म्हणून अग्निसंस्कार नाही, असे सांगितले जाते. जमिनीत बसलेल्या स्थितीतच प्रेत पुरतात. खड्ड्यात बरेच मीठ घालतात. तिरडीवरून प्रेत नेण्याची चाल नाही. मनुष्य मृत झाला म्हणजे घरीच त्याच्या मृत्युशय्येभोवती सर्व आप्तेष्ट वर्तुळाकार बसून भोजन करतात. मग बैलगाडीतून प्रेतयात्रा निघते. बरो-

बरच दोन पोती मीठ वाहून नेतात. लिंगायतांत सुतक पाळीत नाहीत.

**इतर भारतीय जातीजमाती** – बऱ्याच आदिवासी जमातींमध्ये मृत्यूला कारण होणारा रोग, पशू किंवा अपघात हा एखाद्या भूतपिशाचादिकांच्या कडून होतो, असे मानतात. प्राण ही एक सूक्ष्म व्यक्ती असते व चांगल्या माणसाचा प्राण मुखनेत्रादिकांतून, तर वाईट माणसाचा प्राण गुदमूत्रद्वारांतून बाहेर पडतो, असे मानतात. काही जातींत एका देहात अनेक आत्मे असतात, असे मानून मृत्युस्थळी, पुरण्याच्या स्थळी व इतरत्र त्यांना पिंड दिला जातो. बहुतेक जमातींत केवळ मृतापुरतेच विधी करतात. पश्चिम भारतातील प्रेतदहन करणाऱ्या जमातींमध्ये जीव दगडामध्ये जातो, अशा समजुतीने दहनभूमीवरून 'जीव-खडा' उचलून आणतात व त्याला उदक देतात. काही जमातींत मरणोत्तर जीव झाडामध्ये जातो, असे मानतात. नागा व माडिया गोंड हे झाडामध्ये मृत देह गाडतात, तर खासी लोक झाडाच्या ढोलीत प्रेत ठेवतात, सर्व जमातींत आपल्या कुलातले मृतात्मे उपकारी व इतर कुलातले अनिष्ट समजतात. उपकारी मृतात्म्यांना गृहरक्षणार्थ परत येण्याचे आवाहन करतात. घरात अगर पुरलेल्या जागी दिवा लावण्याची चाल बहुतेकात जमातींत आहे. कुठे कुठे मृतात्म्यांना पितरांच्यामध्ये पोचवण्याचे विधी आहेत. मणिपूरव्यतिरिक्त इतर ठिकाणच्या नागांमध्ये ज्या भूतपिशाचाने मृत्यू आणला असेल त्याला शाप देऊन भाल्याने धमकावण्याची चाल आहे. मृतात्म्यांना अन्नोदक देतात. त्यांची शस्त्रे त्यांच्याबरोबरच पुरतात. गारोंमध्ये कुत्रा मारून पुरण्याची व गोंडांमध्ये थडग्यावर मातीची अश्वप्रतिमा ठेवण्याची चाल आहे. छोटा नागपूरमधील कोळी व तत्सम, आसामातील नागा व खासी, हे मृताला पुरलेल्या जागेवर वर्तुळाकार दगड ठेवतात. पहाडिया व नागा त्याज्य स्थितीत मेलेल्यांना पशुपक्ष्यांसाठी अरण्यात टाकतात. बंगालमधील कामी लोकांत प्रेते जलप्रवाहामध्ये टाकण्याची चाल आहे. प्रेताला स्पर्श करणाऱ्यांना वेगवेगळे शुद्धीचे विधी सर्व जाती-जमातींत आहेत. नातलगाचे मुंडण करण्याची व ते केस मृताबरोबरच पुरण्याची चाल पुष्कळ जमातींत आहे. दक्षिणेत मुंबईकडील भागात कानफाटे किंवा गोरखपंथी लोक मृताला बसलेल्या स्थितीत पुरतात. काशीतील कानफाटे मृतांना घरामध्येच पुरतात. मुंबई ते दक्षिण हैदराबादपर्यंतच्या प्रदेशातील तेलंगी लोक कोणाही आप्तेष्टाने मृत्यूसाठी रडायचे नाही असा नियम पाळतात. काही जातींत प्रेताला अग्निसंस्कार करण्यापूर्वी दोन गाडगी भरून शिंदीची दारू आणून सर्व आप्तेष्टांना देण्याची चाल आहे. अग्नी देण्यापूर्वी प्रेताभोवती नाचण्याचीही चाल कित्येक ठिकाणी आहे.

**शीख** – शीख पंथात काही खास अंत्यविधी नमूद केलेले नाहीत; परंतु अंत्यसमयी म्हणायच्या काही धार्मिक प्रार्थना निवडलेल्या आहेत. मृतासंबंधी विलाप करणे व ऊर बडवून आक्रोश करणे मात्र निषिद्ध मानले आहे. मृताशेजारी बसून धार्मिक प्रार्थना म्हणतात. प्रेत दहनास नेण्यापूर्वी प्रेताला स्नान घालून धर्मविहित वेष चढवितात. ते प्रेताचे दहन करतात. मृताचा मुलगा अथवा जवळचा आप्त चिता पेटवितो. नंतर चितेतील रक्षा नदीत टाकतात. शक्य असेल, तर ही रक्षा कर्तारपूरजवळ बिआस नदीत टाकतात. मृताची स्मारके बांधणे निषिद्ध मानतात. त्यांच्यांत श्राद्ध करण्याची प्रथा नाही. मृताच्या वयोमानानुसार चार ते दहा दिवसांपर्यंत आशौच पाळतात. आशौचाच्या काळात घरातील लोक जमिनीवरच बसतात व झोपतात. सुतकाच्या शेवटच्या दिवशी आप्तेष्ट मृताच्या घरी जमून ग्रंथसाहिबातील ठराविक उताऱ्यांचे पठण करतात. कुटुंबप्रमुख मृत झाल्यास त्याच्या ज्येष्ठ मुलास त्या दिवशी सर्वांसमक्ष फेटा बांधतात व नवा कुटुंबप्रमुख म्हणून त्याला मान्यता देतात.

**जैन** – जैनांत प्रेते जाळतात. प्रेताला स्नान व कपडे घालून स्मशानात नेतात. पूर्ण दहन होईपर्यंत सर्व लोक तिथे थांबतात. तिसऱ्या दिवशी प्रेताची रक्षा नदीत टाकतात व जिनालयात जाऊन जिनपूजा करतात. नंतर उपाश्रयात जैन श्रमण त्यांना देहाच्या नश्वरतेबद्दल प्रवचन देतो. जैन दहा दिवस आशौच पाळतात. क्रियाकर्मांतर नसते; पण मृत्यूपूर्वी व नंतरही आप्तेष्ट दानधर्म करतात. या चालींमध्ये प्रदेशपरत्वे काही भिन्नताही आढळते.

**बौद्ध** – बौद्धांत भिक्षू व पूज्य पुरुष यांचे दहन केले जाते. थायलंड व कंबोडिया या देशांतले बौद्ध प्रेताला कित्येक दिवस पडवीमध्ये किंवा खोलीत ठेवतात. राजघराण्यातील प्रेते दोन, तीन वा अधिक महिने तिथे एका पेटीत ठेवतात. प्रेताजवळ धर्मपाठ करतात व नंतर त्याचे दहन करतात. कंबोडियात, त्याज्य मानलेले मृत कैदी, तसेच आत्महत्या, अपघात व खून होऊन मेलेले लोक यांना पुरतात. जपानी बौद्धांतही प्रेतदहन आहे. तिबेटात वरिष्ठ लामांची प्रेते ध्यानस्थ बुद्धाप्रमाणे बसवून ती जाळतात; इतरांची पुरतात. चिनी बौद्ध भिक्षु-भिक्षुणींना जाळतात व इतर मृतांना पुरतात. महान भिक्षूंच्या अस्थी, केश, पात्रे, वस्त्रे इत्यादींवर स्तूप उभारण्याची चाल आहे. एका काळी प्रेते जंगलात फेकली जात असावी, असे निकायासारख्या ग्रंथांवरून कळते. मरणोन्मुख माणसापुढे धार्मिक ग्रंथांचे पठण करतात. जपानमधील बौद्धांत पुरोहितासमक्ष प्रेताचे मुंडन करतात. एका पिशवीत पुढील परलोक प्रवासाला उपयुक्त अशा वस्तू ठेवतात. त्या वस्तूंसह प्रेतदहन करतात. पंथभेदानुसार मर्तिक-प्रथेमध्ये

काही फरक असतात. दहनानंतर अस्थी गोळा करून आणतात व त्या पुरतात.

पारशी–पारशी समाजात प्रथम मृत देह घरात स्वच्छ केलेल्या खोलीत ठेवतात. त्याला स्नान घालून पांढरे कपडे घालतात. त्याच्या भोवती नातलग विशिष्ट मंत्र म्हणत पवित्र दोर मृताला बांधतात. मृताच्या कानापाशी एक मंत्र म्हणतात. 'दख्म' म्हणजे एक उंच बुरूज. तिथपर्यंत शुभ्रवस्त्राच्छादित प्रेत-वाहक दिवसा प्रेत नेतात. उत्तर दिशेला भुते असतात म्हणून प्रेताचे मुख त्या दिशेला करीत नाहीत. बुरुजातील वर्तुळाकार स्थानावर मृताचा नग्न देह टाकतात. तो गिधाडांनी खाल्ल्यावर मग अस्थी एका विहिरीत टाकतात. पुरोहित त्या त्या वेळी विशिष्ट धार्मिक मंत्र म्हणतो.

ज्यू–या लोकांत प्रेत पुरण्याची प्रथा आहे. त्यांच्या धर्मात पुनर्जन्मकल्पना नाही. मृत व्यक्ती आपल्या पितरांकडे जाते, असे ते मानतात. अनेक देवदूतांपैकी सॅम्युएल हा मृत्यूचा देवदूत आहे. मोठ्या संपन्न कुटुंबांत घरालगतच प्रेते पुरण्याचे अंगण असते. सर्वसामान्यांसाठी सार्वजनिक दफनस्थळे असतात. प्रेता-च्छादनासाठी आवरण व विशिष्ट प्रकारचे कपडे असतात. काही थोरांची वा धर्मप्रमुखांची थडगी पूज्य व आदरणीय मानतात. सात दिवस सुतक पाळतात. दफनाच्या दिवशी नातलग उपवास करतात. दुसरे दिवशी इष्टमित्रांसह चांगले भोजन करतात. मृताचा पुत्र ज्यू धर्मग्रंथातील कादिश मंत्राचा जप ओळीने अकरा महिने व नंतर श्राद्धाच्या दिवशी करतो. त्यायोगे मृताला सद्गती मिळते, अशी समजूत आहे.

ख्रिस्ती–ख्रिस्ती लोकांत प्रेतांना पुरण्याची चाल सार्वत्रिक आहे. त्यांच्यांत पुनर्जन्माची कल्पना नाही. पुरण्याची जागा नैस-र्गिक गुहा किंवा खडकाळ टेकडीत खोदलेली कबर या स्वरूपात शहराच्या बाहेर असते. त्यात पुष्कळ प्रेतांची सोय असते. अगदी पूर्वी ख्रिस्ती संतांचा झालेला अनन्वित छळ व त्यांनी पत्करलेले हौतात्म्य, यांमुळे अशा संतांच्या कबरी लोकांची उपासनाकेंद्रे बनली. रोमच्या आसपास अशा जागा आढळतात. जमिनीत खोदून बंदिस्त केलेल्या कबरी, हुतात्म्यांची प्रेते सुरक्षित राहावी व श्रद्धाळू लोकांना निर्धोकपणे त्यांचे दर्शन घेता यावे म्हणून निर्माण झाल्या. नंतर पाश्चिमात्य चर्चने प्रेते पुरण्याची सोय चर्चच्या आवारातच करण्यास सुरुवात केली. रोमन काळातील अंत्ययात्रेमध्ये किंवा मृताच्या स्मरणार्थ झालेल्या मेजवान्यांमध्ये अंत्यसंस्काराची गीते (डर्ज) म्हणण्याची प्रथा होती. एलिझाबेथ-काळात इंग्रजीत अनेक दर्जेदार अंत्यसंस्कारगीते लिहिली गेली. त्यांत मृत्यूची अनिवार्यता, जीवनाची क्षणभंगुरता, दुःख, विलाप हे प्रमुख विषय आणि शोकानुकूल गेयता असते.

इ. स. च्या चौथ्या शतकापासून कबरी खोदणारे, मृत्युलेख खोदणारे, दगडकाम करणारे असे तज्ज्ञ लोक निर्माण झाले. ख्रिस्ती धर्माला राजमान्यता मिळाल्यावर राजाश्रय, पैसा यांच्या साहाय्याने संतांच्या वा प्रेषितांच्या कबरी भव्य, सुंदर उपासना केंद्रे बनली व वास्तु-शिल्पकलेचे उत्कृष्ट नमुने तयार झाले. अलिकडे मृताच्या वा त्यांच्या कुटुंबियांच्या इच्छेनुसार प्रेताला अग्नीही दिला जातो.

मुसलमान–हे लोक प्रेताचे दफन करतात. मरणोन्मुख मनुष्याभोवती कलिमांचा पाठ करतात. मृत्यूनंतर कुराणामधील छत्तिसाचा सुरा, सुरे या सिन, हा म्हणतात. आसन्नमरण माण-साचा देह मक्केच्या दिशेकडे तोंड करून ठेवतात. मृताचे कपडे बदलतात. त्याचे तोंड मिटवून डोळ्यावरून पट्टी बांधतात व पायही एकत्र बांधतात. भारतात शवाला पांढऱ्या कापडाने झाक-तात. इतरत्र हिरव्या कापडाने झाकतात. भारतात स्त्रिया शव-यात्रेत जात नाहीत. ही यात्रा जात असता वाटेत येणारे मुसल-मान उभे राहून प्रार्थनामंत्र म्हणतात. प्रेताला खांदा देणे कर्तव्य मानतात. मशिदीत जमिनीवर तिरडी, पूर्वांग मक्केकडे करून ठेवतात. तेथे इमाम प्रार्थना म्हणतो. भोवती असलेल्या आप्ते-ष्टांना, 'याच्या संबंधाने तुमची साक्ष सांगा' असे त्याने म्हणताच 'तो धर्मनिष्ठ होता' असे सर्व म्हणतात. नंतर प्रेत दफनासाठी नेतात. प्रेत उजव्या बाजूस कलते, मक्केकडे तोंड करून ठेवतात व कबर बंद करतात. नंतर तिथे एक फकीर बसून, देवाकडून मृताला केल्या जाणाऱ्या पाच प्रश्नांना बरोबर उत्तरे जावी म्हणून ती तो उच्चारतो, 'माझा ईश्वर अल्ला, माझा प्रेषित मुहंमद, माझा धर्म इस्लाम, धर्मग्रंथ कुराण व काबा हा किब्ला (प्रार्थना मंदिर) होय' अशा अर्थाची ती उत्तरे असतात. नंतर प्रेत आणणारे लोक 'फतीहा' म्हणून परततात. नंतर मृताच्या खोलीत फकीर कुराणातील विशिष्ट अध्याय म्हणतात व मोठी जपमाळ घेऊन कलिमाचा जप करतात. पाहा–अंत्येष्टी.
[ बदलापूर; क. हे. इं.; म. वि. को. ]

## अंत्यज

अंत्य या शब्दाचा भौगोलिक अर्थ सीमेच्या पलिकडे राहणारा असा आहे. त्याला धरून समाजातल्या सर्वांत नीच वर्णांना अर्थात ग्राम्यबाह्य जातींना अंत्यज म्हटले आहे. अंगिरसाच्या मताप्रमाणे पुढील जाती अंत्यज होत–

चण्डालः श्वपचः क्षत्ता सूतो वैदेहिकस्तथा ।
मागधायोगवौ चैव सप्तैतेऽन्त्यावसायिनः ।।

अर्थ–चंडाल, श्वपच (कुत्र्याचे मांस खाणारे), क्षत्ता (सारथी), सूत, वैदेहिक, मागध व आयोगव हे सात अंत्यज होत.

अत्रीच्या मते परीट, चांभार, नट, बुरुड, कैवर्त (कोळी), मेद

व भिल्ल हे सात अंत्यज आहेत (अत्रिस्मृ. २४९). हे अस्पृश्य असले तरी जत्रा, लग्नसोहळा, यज्ञ व सार्वजनिक समारंभ या प्रसंगी यांची अस्पृश्यता मानू नये, असेही तो सांगतो. मनूने एका ठिकाणी शूद्राला अंत्यज म्हटले आहे. व्यासस्मृतीत गोमांस भक्षण करणाऱ्यांनाही अंत्यज म्हटले आहे.

मिताक्षरेत अंत्यज व अंत्यावसायी असा भेद केला असून, अंत्यावसायी हे अंत्यजांतलेही अंत्यज मानलेले आहेत. अंत्यजांच्या अत्रिकृत यादीतले परीट, बुरुड, कोळी व नट हे मेघातिथी व कुल्लूक यांच्या वेळेपासून स्पृश्य मानले गेले आहेत.

ज्यांना अंत्यज मानले जात होते, अशा जाती प्राचीन काळी आर्यधर्माच्या कक्षेत नव्हत्या. त्यांची संस्कृतीही भिन्न होती. विशेषतः वन्य व पर्वतवासी जाती यांचा तो समाज होता. आर्यांनी उत्तर भारतात आपला जम बसवल्यावर ब्राह्मणधर्म विशेष प्रभावी झाला. ब्राह्मणांच्या पावित्र्याचे रक्षण झाले पाहिजे व त्यासाठी काही जातीजमातींचा त्यांच्याशी अजिबात संसर्ग होता कामा नये, ही भावना त्यामुळे बळावली. त्यासाठी म्लेच्छ म्हणजे पाश्चात्य जमाती (यवनादी) व भारतातल्या मूळच्या दस्यू, शूद्र, चांडाल, इ. अनार्य जमाती यांना जातिबाह्य ठरवण्यात आले. शूद्रांतलेही ते अतिशूद्र ठरले. पाहा – अस्पृश्यता. [ हि. ध.; एन्सा. रि. ए. ]

**अंत्यावसायी** चांडाल, श्वपच, क्षत्ता, सूत, वैदेहिक, मागध व आयोगव या सात जातींना अंत्यावसायी म्हटले आहे. मिताक्षरेत (याज्ञ. ३.२६० वरील) यांना अंत्यजांचाच एक भाग मानले आहे. मनू आणि वसिष्ठ हे यांना अनुक्रमे चांडाल पुरुष व निषाद स्त्री आणि शूद्र पुरुष व वैश्य स्त्री यांची संतती मानतात (मनु १०. ३९; वसिष्ठ ध. सू. १८. ३).

यांच्या समोर वेदाध्ययन करू नये, असे भरद्वाज आपल्या श्रौतसूत्रात सांगतो (११.२२.१२). यांना सांप्रत डोंब म्हणतात, असे जातिविवेक नामक ग्रंथात म्हटले आहे. पाहा–चांडाल, अंत्यज. [ हि. ध. ]

**अंत्येष्टी** ज्याने तीन अग्नी ठेवून अग्निहोत्र धारण केले आहे, असा यजमान मृत झाल्यास त्याचा अंत्यसंस्कार कसा करावा, या विचारातून अंत्येष्टी हा संस्कार तयार केला गेला. अंत्य म्हणजे शेवटचा आणि इष्टी म्हणजे यज्ञ. या यज्ञामध्ये हविर्द्रव्य म्हणजे स्वतः मृत यजमानच असतो. यजमानाच्या मुलाने अथवा बांधवांनी त्याची आहुती देण्याचा विधी म्हणजेच अंत्येष्टी होय. याला पितृमेध असेही नाव आहे.

मृत झालेल्या मनुष्यास पाण्यात अथवा अरण्यात टाकून द्यावे असाही एक प्रकार यासंबंधाने सांगितला आहे. परंतु पुरणे, पाण्यात टाकणे आणि जाळणे या तीन प्रकारांमध्ये मृताचे दहन करणे हेच अधिक श्रेयस्कर समजले गेले आहे. यासंबंधी हिरण्यकेशिपितृमेधसूत्राच्या टीकेत असलेला एक श्लोक असा–

खननं दहनं त्याग इति या त्रिविधोच्यते ।
शरीरसंस्क्रिया ह्यस्य परलोकजयावहा ।।

अर्थ – पुरणे, जाळणे किंवा टाकून देणे या तीन प्रकारांत दहन करणे हा प्रकार मृताला परलोकी जय मिळवून देणारा आहे.

मृत झालेल्यांचे संस्कार करण्यास जर कोणीही अधिकारी नसेल तर मृताला पाण्यात टाकणेच योग्य असे सांगितले आहे. ज्यांचे संस्कार झालेले नाहीत, अशा लहान मुलांना पुरतात. संन्यासी मृत झाला तर त्यालाही अग्निसंस्कार न करता पुरावयाचे असते. मृताला अग्नीमध्ये दहन करणे हाच सर्वसामान्य रूढ प्रकार होय. मृत झालेल्या मनुष्याचे पूर्वी काही संस्कार झालेले असल्यास त्याचे विधिपूर्वक दहन करतात; पण त्याचे संस्कार झालेले नसल्यास मृताला अमंत्रक अग्नी देतात. याला भडाग्नी देणे असे म्हणतात. मंत्रपूर्वक अग्नी देण्याचा विधी भिन्न भिन्न शाखांमध्ये निरनिराळा सांगितला आहे. तैत्तिरीय आरण्यकाच्या सहाव्या अध्यायामध्ये अंत्येष्टीसाठी लागणारे सर्व मंत्र एकत्रित केलेले दिसतात. ब्राह्मणग्रंथांमध्ये पितृमेधाचा असा विधी सांगितलेला नाही. परंतु प्रायश्चित्ताच्या अनुषंगाने यजमान मृत झाल्यास काय करावे याचे दिग्दर्शन ब्राह्मणग्रंथांमध्ये आढळते. पितृमेधाचा विधी सर्व सूत्रकारांनी सांगितला आहे. काही शाखांच्या श्रौतसूत्रांमध्ये हा विधी आहे; तर काही शाखांच्या सूत्रकारांनी पितृमेधाचा समावेश गृह्यसूत्रांमध्ये केला आहे. अंत्येष्टी हे कर्म श्रौत आणि गृह्य असे उभयविध आहे. मृत मनुष्य अग्निहोत्री असेल, तर त्याचे दहनकर्म हे पुष्कळ विस्तृत आहे. परंतु अग्निहोत्र नसलेला यजमान मृत झाल्यास कोणता विधी करावा हेही सर्व सूत्रकारांनी सांगितलेले आहे. सर्वसामान्य दहनविधीची माहिती अशी–

पितृमेधाचा विधी सांगण्यास सुरुवात करताना वैखानस गृह्यसूत्रामध्ये (५.१) आसन्नमरण यजमानाने काय करावे हे सांगितले आहे–मागच्या तीन वर्षांत येऊन गेलेल्या अरिष्टांचा विचार करून आपल्या आयुर्मर्यादेची परीक्षा करावी. तदनुसार आपल्या आप्तांना बोलावून संपत्तीची वाटणी करावी. मृत्युदिनाच्या दिवशी स्वच्छ जागी वाळू पसरावी व तिच्यावर दर्भ आंथरून त्यावर बसावे अथवा दक्षिणेकडे डोके करून निजावे. प्रयाणकाळ जवळ आला असता शुक्ल–कृष्ण अशा दोन्ही गती ध्यानात घ्याव्या. विषयांपासून इंद्रियांना निवृत्त करून ब्रह्माच्या ठिकाणी मन स्थिर करावे. 'सोऽहम्' या तत्त्वाचे चिंतन करावे.

आसन्नमरण यजमानास त्याच्या अग्नीसह नदीच्या काठावर न्यावे, असे काही सूत्रकारांनी सांगितले आहे. यजमानाची मरणावस्था जवळ आली म्हणजे 'ब्रह्मविदाप्नोति' (तैत्ति. उप. २) आणि 'भृगुर्वै वारुणि :' (तैत्ति. उप. ३) हे दोन अध्याय म्हणावे व यजमान मृत झाला हे नक्की झाल्यावर पुढचे कर्म करण्यास सुरुवात करावी, असे सांगितले आहे.

यजमान सकाळचा होम झाल्यानंतर मृत झाल्यास ठीकच; परंतु रात्री मृत झाल्यास लगेच प्रातर्होम करून मग अंत्येष्टीचा विधी करायचा असतो. तसेच पौर्णिमेनंतर आणि अमावास्येच्या अगोदर मृत झाल्यास लगेच दर्शेष्टी करतात अथवा त्या इष्टीबद्दल पूर्णाहुती घालतात. मृत यजमानास गार्हपत्याजवळ ठेवून गार्हपत्यादी तीनही अग्नींवर आहुती देतात. अग्निशाळेच्या दक्षिणेस बंदिस्त जागी यजमानाचे वपन करतात. मग स्नान घालून एका खाटेवर कृष्णाजिन पसरून त्यावर त्याला आडवा ठेवतात. दक्षिणाग्नीवर चरू शिजवतात. तीन बोकड मृताबरोबर नेण्यासाठी आणून ठेवावे असे काही सूत्रकारांनी सांगितले आहे. मग स्मशानाकडे जाण्याची तयारी करतात. एक वृद्ध गाय बरोबर नेतात. तीन्ही अग्नी भांड्यातून स्मशानात न्यावे अथवा अग्निसमारोप करून स्मशानात पुन्हा मंथन करावे, असे विकल्प सांगितले आहेत. यजमानाला वाहनातून न्यावे, असेही सांगितले आहे. यजमानाबरोबर अग्नी आणि सर्व यज्ञीय पात्रे नेतात. प्रेताबरोबर वृद्धांनी जायचे असते. स्त्रियांनीही बरोबर जावे, असे सांगितले आहे. यजमानपत्नीनेही प्रेताबरोबर जायचे असते. त्या वेळी स्त्रियांनी केस मोकळे सोडायचे असतात. स्त्रियांनी प्रेताबरोबर जाण्याची प्रथा आजमितीस सर्वत्र आढळून येत नसली, तरी वेदकालात यजमानपत्नीने जाण्याची पद्धती होती ही गोष्ट स्पष्ट आहे. स्मशानाच्या मार्गात एक चतुर्थांश अंतर चालून गेल्यावर एका मातीच्या ढेकळावर भाताचा पिंड देतात. तीक्ष्ण शस्त्राने त्या वेळी एक बोकड मारावा, असे काही सूत्रकाराने सांगितले आहे. याप्रमाणे आणखी तीन वेळा वाटेत थांबून स्मशानात जातात. पळसाच्या किंवा शमीच्या फांदीने दहनाची जाग स्वच्छ करतात. त्या ठिकाणी पात्रे ठेवून त्यांचे प्रोक्षण करतात. या वेळी यजमानाचे पोट फाडून आंतडे व पुरीष बाहेर काढावे आणि त्या ठिकाणी तूप ओतून ते दर्भांनी पुन्हा शिवून टाकावे, असेही एक मत आहे. परंतु असे करणे योग्य नव्हे, असे सर्व सूत्रकारांनी सांगितले आहे. बरोबर आणलेली म्हातारी गाय मारून तिची अंगे बाहेर काढतात.

स्मशानाच्या आग्नेयी दिशेकडे चिता रचतात. यजमानपत्नीला या वेळी पतीच्या शेजारी झोपण्यास सांगतात. पत्नीने शेजारी बसावे असाही एक पक्ष आहे. त्या वेळी पुढील मंत्र म्हणतात –

इयं नारी पतिलोकं वृणाना निपद्यत उपत्वा मर्त्य प्रेतम् ।
विश्वं पुराणमनुपालयन्ती तस्यै प्रजां द्रविणं चेह धेहि ।
(तै. आ. ६.११)

अर्थ– हे मनुष्या ! पतिलोकास येण्याची इच्छा करणारी आणि सनातन स्त्रीधर्माचे पालन करणारी ही पतिव्रता तुझ्या जवळ आली आहे. तू तिला पूर्वीची संतती व धन घेण्याची अनुज्ञा दे.

नंतर जवळच्या नातलगांपैकी कोणीतरी त्या यजमानपत्नीला चितेकडून दूर करतात. प्रेताला चितेवर ठेवून त्यावर सुवर्णाचे तुकडे टाकतात. यज्ञीय पात्रे यजमानाच्या वेगवेगळ्या अवयवांवर ठेवतात. याला पात्रांचे चयन म्हणतात. गाईची काढलेली विविध अंगे यजमानाच्या निरनिराळ्या अवयवांवर ठेवतात. गाय मारू नये असाही एक पक्ष आहे. मग चितेस अग्नी देतात. आहवनीय पुढच्या बाजूस, गार्हपत्य पाठीमागे व दक्षिणाग्नी दक्षिणेकडे ठेवतात. यम देवतेसाठी सूक्ते म्हणून चितेचे उपस्थान करतात. दहन जिथे केले असेल, त्याच्या पाठीमागे तीन रेघा काढून त्यात पाणी ओततात. त्या पाण्याने सर्वजण मार्जन करतात. पत्नीने, मुलाने अथवा अन्य कोणीही उदकुंभ भरून घेऊन उलट्या तीन प्रदक्षिणा घालीत पाण्याची धार पाडावी असे वैखानस गृह्यसूत्रात (५.५) सांगितले आहे. दहनकर्म झाल्यावर वपन करून मागे न पाहता घरी परततात. यजमानाच्या जवळच्या नातलगांनी वपन करावे, असे बौधायन पितृमेधसूत्रात (१.१२) सांगितले आहे.

याप्रमाणे दहनाचा विधी करायचा असतो. दहनाच्या विधीसंबंधी अनेक मतभेद असावे, असे दिसते. बौधायन पितृमेधसूत्रामध्ये ठिकठिकाणी 'यच्चाऽन्न स्त्रिय आहुस्तत्कुर्वन्ति' (=स्त्रिया जे जे सांगतील ते ते करावे) असे वाक्य येते (१.१०). यजमान पितृलोकात जात असताना त्याच्याबरोबर आवश्यक ती सामग्री असावी, असे सांगितले आहे. म्हणूनच गाय व बोकड मारून त्याच्या बरोबर द्यायचे असतात.

दहन ज्या दिवशी केले असेल त्याच्या तिसऱ्या, पाचव्या अथवा दहाव्या दिवशी अस्थी गोळा करतात. म्हाताऱ्या पुरुषांनी अथवा बायकांनी अस्थी गोळा कराव्या, असे सांगितले आहे. पाय, मांडी, कटिप्रदेश, मस्तक, इ. ठिकाणच्या अस्थी गोळा करून एका कुंभात भरतात. अस्थी गोळा करताना मंत्र म्हणावे लागतात. स्मशानामध्येच एक खड्डा करून तो अस्थिकुंभ त्यामध्ये ठेवतात. राख भरून दूर टाकून देतात. अस्थींचे पुनः दहन करावे, असाही एक पक्ष आहे. त्यासाठी प्रेताचे ज्या अग्नीने दहन केले असेल तो अग्नी शिल्लक असल्यास घेतात अथवा मंथन करून अग्नी सिद्ध करतात. अस्थी तुपामध्ये भिजवून

त्यांचा या अग्नीवर होम करतात. अस्थी पुरण्याचा आणखी एक निराळा प्रकार आढळतो, तो असा—स्मशानात जाऊन ज्या ठिकाणी दहन केले असेल ती जागा नांगरतात. नांगराच्या रेघा पडतील त्यांवर तिळ, धाना (लाह्या), दूध वगैरे पदार्थ घालतात. नंतर कुंभातील अस्थी काढून त्या पुरुषाकृतीप्रमाणे नांगराच्या रेघांवर मांडतात. अस्थींच्या वर निरनिराळ्या प्रकारच्या विटा मांडतात. या विटांची संख्या अग्निचयनातील विधीप्रमाणे एक हजार अथवा त्याहून अधिक असते. चयन झाल्यावर उपस्थान करायचे असते. या चयनास लोष्ठचित्ती अथवा स्मशानचयन असे म्हणतात.

याप्रमाणे अंत्येष्टीचा विधी सांगितला आहे. यजमान प्रवासात असता मृत झाला, तर प्रायश्चित्तविधी करून नंतर पितृमेघ करतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

## अंदमान

बंगालच्या उपसागरात लहानमोठ्या बेटांनी बनलेला जो प्रदेश आहे, त्याला अंदमान असे म्हणतात. अंदमानात लहानमोठी मिळून २०४ बेटे आहेत. अंदमानाचा मुख्य भूभाग पाच द्वीपांनी बनला आहे. या द्वीपसमूहास महाअंदमान असे म्हणतात. तिथल्या पर्वतश्रेणीतल्या सर्वोच्च डोंगराची उंची २४०० फूट आहे. मुख्य बेटांच्या दक्षिणेस छोटे अंदमान आहे.



अंदमानातील घरे

हवामान—अंदमानाची हवा नेहमीच उष्ण असते. उन्हाळ्यात दमटपणाही असतो. डिसेंबर ते फेब्रुवारी हे थंडीचे दिवस असतात. या दिवसांतही उन्हाळ्यापेक्षा फारशी थंड हवा नसते. जानेवारी महिन्यात तिथे लहानशी वादळे होतात. कधी कधी या वादळांचे तडाखे फार जोरदार असतात. ती निकोबार बेटांच्या जवळपास असतात. ती बहुतेक आग्नेयीला उठून उत्तरेला सरकतात. आणि पुनः वक्रमार्गाने आग्नेयीला सरकून अंदमानात येतात.

मार्च ते मे या काळात उन्हाळा असतो. मार्चमध्ये अत्यल्प पाऊस असतो. एप्रिलमध्ये तो किंचित वाढतो व मेमध्ये जोरदार पडतो. मोठ्या वादळांचा धक्का आक्टोबर—नोव्हेंबरमध्ये विशेष असतो. या दिवसात रोज वादळ होते. यांतली जवळजवळ निम्मी वादळे उत्पाती असतात.

हा द्वीपसमूह हुगळी नदीच्या मुखापासून सुमारे ९५० कि. मी. अंतरावर आहे. याचे क्षेत्रफळ ६३४० चौ. कि. मी. असून, लोकसंख्या ८९,००० आहे.

अंदमानाच्या द्वीपसमूहात हिंदू, मुसलमान, शीख, ख्रिस्ती व बौद्ध अशा सर्व धर्मांचे लोक राहतात. त्यामुळे इथे सर्व धर्मियांची मंदिरे आणि प्रार्थनागृहे आढळतात. हे विविध धर्मी लोक इथे गुण्यागोविंदाने नांदतात. हिंदू व मुसलमान यांच्यामध्ये रोटी-बेटी संबंधही होतात. इथले मुसलमान मशिदीत जातात तसेच हिंदूंच्या मंदिरातही जाऊन तीर्थप्रसाद घेतात. तिथे जातीयता व प्रांतियता यांची नाव निशाणी नाही, असे श्री. योगराज थानी हे सांगतात.

इतिहासवेत्ते तर्क करतात, की मलायानिवासी ज्याला हंडुमान म्हणतात, त्या रामभक्त हनुमंतांवरून अंदमान हे नाव पडले असावे. आख्यायिका अशी आहे, की रामाने लंकेत जाण्यासाठी इथेच सेतू बांधण्याचा प्रयत्न केला होता; पण काही कारणाने तो बेत रद्द करून त्याने रामेश्वराजवळ ते काम पुरे केले.

पुराणकालीन उल्लेखांप्रमाणेच सनपूर्व काळात अरब यात्रिकांच्या प्रवासवृत्तातही अंदमानाचा उल्लेख मिळतो. चिनी प्रवासी इत्सिंग व मार्कोपोलो (इ. स. १२८६) यांच्या प्रवास वर्णनातही अंदमानाचा उल्लेख आला आहे.

लंका, ब्रह्मदेश व तिथून पुढील दूर पूर्वेकडे अन्य देश यांच्या जलमार्गात ही बेटे येतात. कित्येक शतकांपूर्वीपासून दर्यावर्दी खलाशांना ही बेटे माहीत होती. मध्ययुगात गुलामांच्या व्यापाराचेही हे केन्द्र बनले होते. सागरावर लूटमार करणारे चांचे लोकही वेळोवेळी यांचा आश्रय घेत. हस्तिदंत, मसाले, ढाक्याची मलमल, हिरेमाणके, इ. बहुमोल वस्तूंचा व्यापार या भागातून चाले. चांचे लोक अशा व्यापारी जहाजांवर हल्ला करीत व तो माल लुटीत. विशेषकरून ई. इं. कंपनीच्या जहाजांवर त्यांचा डोळा असे. शेवटी शेवटी तर, बंगालच्या

उपसागरातली ही चांचेगिरी इतकी भयंकर वाढली की ई. इं. कंपनीच्या वडचा अधिकाऱ्यांना त्या प्रकरणी लक्ष घालणे भाग पडले. मग लॉर्ड कॉर्नवॉलिस याने या चाच्यांचे पारिपत्य करण्यासाठी कॅ. ब्लेअर याच्या नेतृत्वाखाली इ. स. १७८९ साली एक आरमारी तुकडी अंदमानाकडे रवाना केली. कॅ. ब्लेअर ज्या बंदरात उतरला त्या बंदराला पुढे त्याचे स्मारक म्हणून पोर्ट ब्लेअर असे नाव देण्यात आले. आजही पोर्ट ब्लेअर हीच अंदमान द्वीपसमूहाची राजधानी आहे. या बंदराचा कलकत्ता व मद्रास या बंदरांशी सागरी संबंध आहे.

१८५७ सालच्या स्वातंत्र्ययुद्धात भाग घेतलेल्या ज्या देशभक्तांना ब्रिटिशांनी जन्मठेपेची शिक्षा दिली, त्यांना पोर्ट ब्लेअर इथल्या तुरुंगात आणून ठेवण्यात आले. तेव्हापासून पुढे ६० वर्षेपर्यंत हा सेल्युअर तुरुंग काळे पाणी या नावाने ओळखला जात असे. नुसत्या त्याच्या नावानेच भारतीय लोकांच्या अंतःकरणाचा थरकाप होत असे. तिथल्या राजबंद्यांना मिळणारी वागणूक अमानुष व अंगावर शहारे आणणारी होती. त्या पाशवी छळाने त्रस्त झालेले बंदी प्रसंगी प्रतिकारासाठी आपल्या



अंदमानातील मूळ रहिवासी

प्राणांवरही उदार होत. इ. स. १८७२ साली हिंदुस्थानचा ग. ज. लॉर्ड मेयो हा त्या कारागृहाची पाहणी करण्यास गेला असताना अशाच एका जिवावर उदार झालेल्या कैद्याने त्याचा खून केला. पण त्या घटनेने ब्रिटिश सरकारचे डोळे उघडले व त्या तुरुंगाची काही अंशी सुधारणा करण्यात आली. त्यामुळे तिथल्या कैद्यांचे जीवन अल्पांशाने तरी सुसह्य झाले.

पुढे श्री. सावरकर बंधू, भाई परमानंद, महावीरसिंह, संन्याल बंधू अशा शेकडो भारतीय क्रांतिकारक देशभक्तांना ब्रिटिश सरकारने अंदमानातल्या याच कारागृहात काळ्या पाण्यावर धाडले. दुसऱ्या महायुद्धात १९४२ साली अंदमान बेटे जपान्यांनी काबीज केली होती. पण युद्धात अखेरीस जपानला शरणागती पत्करावी लागली. तेव्हा त्यांना ही बेटेही सोडणे भाग पडले.

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यावर हा द्वीपसमूह भारतीय संघराज्याचे चतुर्थ श्रेणीचे राज्य बनले. भारत सरकारने इथे कित्येक निर्वासितांचे पुनर्वसन केले आहे. तिथला सेल्युअर जेल आता रुग्णालयात परिवर्तित झाला आहे. तियली जनसंख्या अंदाजे ४० हजार आहे. भारतातून जन्मठेपेवर आलेल्या सर्व जातीजमातींच्या कैद्यांचे वंशज अंदमानात वसाहत करून राहिले आहेत.

अंदमानातल्या तद्देशीय मूळ लोकांना जारवा व ओंगी म्हणतात. जारवा मोठ्या अंदमानात असून, ओंगी छोट्या अंदमानात आहेत. हे लोक नेग्रिटो वंशाचे आहेत. यांना कामधंदा किंवा शेती करणे आवडत नाही. ते भटके जीवन जगतात. नारळ, मध आणि मासे, हा या लोकांचा नित्याचा आहार होय. जारवा लोक तिरंदाजीत निष्णात आहेत. बाणांशिवाय त्यांना दुसरे हत्यार माहीत नाही. वन्य पशूंसारखे त्यांचे जीवन आहे. त्यांना माणसाळविण्याचे आजवरचे सर्व प्रयत्न वाया गेले आहेत. आपल्याशिवाय अन्य जातीच्या माणसांची त्यांना विलक्षण भीती वाटते. सुधारलेल्या जगाशी सहकार करायला ते बिलकुल तयार नसतात. म्हणूनच ते निबिड अरण्यात राहतात. ते अद्यापि ख्रिस्ती मिशनऱ्यांच्याही तावडीत सापडले नाहीत. पण रोगराई व सुधारलेल्या समाजापासून अलगपणा यांमुळे त्यांची संख्या मात्र झपाट्याने कमी कमी होत आहे.

इथले आदिवासी हसतमुख, उत्साही व क्रीडाप्रेमी आहेत. मात्र एकदा रागावले, की कोणतेही भयंकर कृत्य करायला ते मागेपुढे पाहत नाहीत. त्यामुळे त्यांच्यावर विश्वास ठेवणे जड जाते. त्यांच्यांत अनेक जाती-पोटजाती आहेत व त्यांची भाषा व राहणीही वेगळी आहे. त्यांचा भुतांखेतांवर विलक्षण विश्वास असतो. मनुष्य मेल्यावर तो भूतयोनीत जातो, असे ते समजतात.

अंदमानी पुरुषाचे शरीर पीळदार, सुडौल व सुंदर असते. त्याचे केस काळे, चमकदार व कुरळे असतात. स्त्रिया मात्र पुरुषांइतक्या सुंदर नसतात.

गेल्या काही वर्षांत अंदमान बेटातील लोकांची स्थिती काही

अशी सुधारली आहे. ते थोडी वस्त्रे वापरू लागले आहेत. निरनिराळ्या प्रकारचे दागिने घालण्याची हौस त्यांना आहे. घरे व



अंदमानी लोकांचे भालायुद्ध

नावा बांधण्याच्या कामी चांगले लाकूड उपलब्ध आहे. त्या कामात यांची निपुणता दिसून येते. वेतापासून सुंदर टोपल्या बनविण्यात हे लोक कुशल आहेत. हे नारळाच्या पानांपासून चटया बनवतात. मातीची सुंदर भांडीही यांना बनवता येतात. केवडा, नारळ, केळी, बांबू इत्यादींच्या पानांचे व फुलांचे हार वगैरे विविध प्रकार हे लोक तयार करतात.

नौकाशर्यती, डुकराशी लढत, लाठीमार, कोंबडयांच्या झुंजी, भालायुद्ध हे यांचे आवडते खेळ आहेत.

आता इथे अनेक उद्योग सुरू झाले आहेत.

अंदमानातल्या जंगलात पूर्वी हिंस्र श्वापदे जवळजवळ नव्हतीच. मुख्य भूखंडावर जंगली जनावरांची निपज व वाढ होण्यापूर्वीच अंदमान बेटे भूखंडापासून अलग झाली असावी. पण चालू शतकात तिथे हरणे व वाघ नेऊन सोडलेले आहेत. अंदमान बेटे निसर्गसौंदर्याने समृद्ध आहेत. या बेटांवर घनदाट ंगले आहेत व नारळीच्या मोठाल्या बागाही आहेत. लाकूड व तांदूळ हे इथले मुख्य उत्पन्न आहे. इथल्या समुद्रात मासेही अनेक प्रकारचे मिळतात. मालाची वाहतूक बहुतेक जलमार्गाने होते. यापुढे भारतीय संघराज्यात या रमणीय द्वीपसमूहाचा भविष्यकाल उज्ज्वल बनेल, अशी खात्री वाटते. [ भारत के द्वीप—श्री. योगराज थानी, १९७५; हिं. वि. को.; अंदमान ते आनंदमान—श्री. माधव राजवाडे, १९६७; म. वि. को. ]

## अंदमानी भाषासमूह

या भाषा बोलणारे अंदमानातले मूळ रहिवासी हे नेग्रिटो वंशातले असून त्यांचे मलेशियन द्वीपकल्पातील समाङ् या जातीशी मानववंशदृष्ट्या साम्य दिसते. हे लोक आता झपाट्याने कमी होत आहेत. संस्कृती आणि भाषा यांच्या दृष्टीने या लोकांचे तीन भाग होतात. उत्तर, मध्य (दक्षिण अंदमान) आणि दक्षिण. यांतला दक्षिणेकडचा भाग अत्यंत जुनाट आणि इतरांपासून तुटलेला आहे.

या भाषासमूहाची वैशिष्ट्ये अशी —

स्वर: अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, एऽ, अं, ओ, ओऽ,

व्यंजने: क — ग — ङ.
च — ज — ञ
तथद — न
प — ब — म.
यरलवह.

रूपपद्धती — शब्दांना कोणताही विकार होत नाही. त्यांचे वाक्यातले कार्य, उपसर्ग व प्रत्यय यांच्या साहाय्याने सिद्ध होते. काही प्रत्ययांनी क्रिया आणि तिचा संदर्भ स्पष्ट होतो.

पुढील प्रत्यय विशेष वापरात आहेत: —

कर्ता किंवा क्रिया दाखविणारा ङ, वर्तमान — भविष्य दर्शक - के, व भूतकालदर्शक — रे, भविष्यदर्शक — बो. इतर प्रत्यय मराठीतल्या शब्दयोगी अव्ययाप्रमाणे वापरले जातात;

वाक्यपद्धती — वाक्ये साधारणपणे छोटी व स्वतंत्र असतात. पण क्वचित जोडशब्द वापरून जोडलीही जातात. उदा. बेंदरे हा जोडशब्द दोन वाक्यांच्या मध्ये येतो. त्याचा अर्थ — 'कारण, म्हणून' असा होतो.

या भाषेत स्वतंत्र संख्यावाचक शब्द नाहीत. ऊब — 'एक' याचा मूळ अर्थ 'खरा' असा आहे, तर दोन या अर्थाच्या ईक्पोडर या शब्दाचा 'पुष्कळ' असाही अर्थ होतो. बऱ्याचशा संख्या हावभावाच्या साहाय्याने व्यक्त केल्या जातात. या भाषांपैकी एकीतला उतारा असा — ओऽन मेऽत बारैज लेन् ऊथिन — ओऽल ओको — ली — के आमर् आर्दूरू एऽरल् — आर्लूआ लेन् जाज — के. कातो चाङ तोऽङ अन दरङ लेन एकार नैकन् ओऽगरल ईक्पोडर प्लि — के तार् — ओऽलो ओ — लेन् ता. ओऽरोक् — ङ बेऽदिग् थी तोऽलत् — ङ ल् — एब् तोऽलोबोइचो लत् बीज — के.

अर्थ — जेव्हा आमच्या गावात कोणीतरी मरतो तेव्हा आम्ही सगळे ओसाड जागी जातो. तिथे पानांनी विणलेल्या किंवा पानांनी झाकलेल्या झोपडीत रिवाजाप्रमाणे दोन एक महिने राहतो. नंतर अस्थी गोळा करून तोलोबोइचोला शोकनृत्य करण्यासाठी परततो. [ श्री. ना. गो. कालेलकर — म. वि. को. ]

## अंध

विदर्भातली एक शेतकरी जात. ही जात मूळ आंध्र लोकांची एक पोटजात असावी असे वाटते. यांचे वरताती व खालताती असे दोन भेद आहेत. पहिल्या वर्गात औरस संततीचा समावेश होतो. दुसरी अवैध संततीची प्रजा असावी. यांच्यांत गोत्रे व आडनावेही आहेत.

**विवाहप्रथा** – या लोकांत मामाच्या मुलीशी लग्न होते. सगोत्र विवाह निषिद्ध आहे. लग्नविधी कुणव्यांप्रमाणेच असतो. माघापासून वैशाखापर्यंत लग्ने होतात. मुलीला लग्नापूर्वी उच्च जातीच्या पुरुषाकडून गर्भ राहिल्यास प्रथम तिला दंड करतात व मग पुनर्विवाहाप्रमाणे तिचे लग्न करतात. क्वचित महार–मांगाबरोबर व्यभिचार केलेल्या स्त्रियांना पावन करून जातीत घेतल्याचीही उदाहरणे आहेत.

अंध लोकांत मद्यमांसाचा निषेध नाही. जातीची पंचायत असते. तिच्या मुख्यास मोहवारिया म्हणतात. त्याला दोन मदतनीस असतात. जातीतले कज्जे, खटले पंचायतीत निवडले जातात. अपराध्याला दंड करतात. हे लोक नामांकित पारधी आहेत. हे पशूंची शिकार करतात; पण पक्षी मारीत नाहीत. हे या प्रदेशातले आदिवासी असावे. पण आता ते हिंदू संस्कृतीत पूर्णपणे मिसळले आहेत. हे लोक मृताला दक्षिणेकडे डोके करून पुरतात. [म. ज्ञा. को.]

## अंधक

यादव वंशाची एक शाखा. क्रोष्टू शाखेतील भीम सात्वत नामक राजाला अंधक व वृष्णी नामक दोन पुत्र होते. त्यांतील अंधकाच्या कुळातील आहुकाला देवक व उग्रसेन हे पुत्र झाले. उग्रसेन हा मथुरेचा राजा असून, कंस हा हा त्याचा पुत्र होता. देवकाची कन्या देवकी ही वृष्णी कुळातील वसुदेवाची पत्नी व श्रीकृष्णाची माता होय.

उग्रसेन मथुरेचा राजा असला तरी, त्याचे राज्य हे अंधककुळाचे गणराज्य होते. कौटिल्याच्या अर्थशास्त्रात अशा गणराज्याला राजशब्दोपजीवी असे म्हटले आहे. म्हणजे कुळाचा प्रमुख राजा ही पदवी घेत असला तरी, राज्यावर कुळाची किंवा गणाची सत्ता चाले. अंधकांच्या गणराज्याजवळच वृष्णींचे गणराज्य होते. अक्रूर हा वृष्णींचा नेता उग्रसेनाचा जावई होता.

उग्रसेनाचा पुत्र कंस हा दुष्ट होता. त्याने पित्याला बंदीत टाकून स्वतः राज्य बळकावले.

कंस हा मगधसम्राट जरासंधाचा जावई होता. जरासंधाच्या आधारामुळे तो उन्मत्त झाला व त्याने एकतंत्री राजसत्ता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न चालविला. त्याच्या क्रूरपणाला प्रजा कंटाळली होती. श्रीकृष्णाने कंसाचा वध केल्यामुळे प्रजेला आनंद झाला. उग्रसेनाने श्रीकृष्णाला राजपद घेण्याची विनंती केली. पण श्रीकृष्णाने ते स्वीकारले नाही व उग्रसेनालाच अभिषेक करवला.

महाभारत व कौटिलीय अर्थशास्त्र यांत अंधक-वृष्णी संघराज्याचा उल्लेख आहे. पाणिनीच्या मते अंधक-वृष्णी संघात राजन्यांची शासनव्यवस्था प्रचलित होती. मात्र अन्य संघांप्रमाणेच कुळांची सत्ता होती. कुळांच्या अधिपतीला राजा म्हणत व त्यांच्या पुत्रांना राजन्य म्हणत.

अंधक-वृष्णी संघात अन्य अनेक कुलांचा समावेश केला गेला होता. त्याचा राज्य-विस्तारही मोठा होता. श्रीकृष्ण हा त्या संघाचा नेता होता. पाहा–यादव राजवंश. [पा. का. भा.; भगवान श्रीकृष्ण; पु. वि.]

## अंधकनिकाय

अशोकाच्या कालात महादेव नावाच्या एका भिक्षूने आंध्र प्रदेशात चैत्यवादी संप्रदायाची स्थापना करून बौद्ध धर्माचा प्रचार सुरू केला. हा संप्रदाय महाचैत्य संप्रदायाचीच एक शाखा म्हणून जन्माला आला. आंध्रातल्या धान्यकटक नगराच्या पूर्व–पश्चिमेस दोन डोंगर आहेत. दोन्ही डोंगरांत भिक्षुसंघ राहात असत. त्या आधारावर हा संप्रदाय पूर्वशैलीय आणि अपरशैलीय या दोन शाखांत विभाजित झाला. काही कालाने त्यात राजगिरक आणि सिद्धार्थक असे आणखी दोन भेद पडले. हे चारही भेद मिळून अन्धकनिकाय बनतो. त्यातूनच पुढे वैपुल्यवादी निघाले. त्यांनी जे सिद्धान्त पुढे आणले त्यात बुद्धाने अवतार घेतला नाही, तो या जगात राहिला नाही आणि त्याने उपदेश केला नाही, हा एक क्रांतिकारक सिद्धान्त होता. अन्धकनिकाय हाच या वैपुल्यवाद्यांना आधारभूत होता. त्यातूनच पुढे महायान पंथ उगम पावला. पाहा–महायान [सि. सा.]

## अंधकासुरमर्दनमूर्ती

अंधकासुर नावाचा हिरण्याक्षाचा एक पुत्र होता. त्याने एकदा पार्वतीची अभिलाषा धरल्यामुळे शिव त्याचे पारिपत्य करण्यास गेला.



अंधकासुरमर्दनमूर्ती, वेरूळ (गुंफा क्र. २९)

दोघांचे युद्ध झाले. त्यात असुराच्या प्रत्येक रक्तबिंदूपासून

अनेक राक्षस निर्माण होऊ लागले. त्यामुळे शिवाला अंधकासुराचा पराभव करणे कठिण झाले. मग शिवाने चामुंडीसह सप्तमातृकांना उत्पन्न करून त्यांना असुरांचे रक्त वरच्या वर पिण्यास सांगितले. मातृकांनी तसे करताच अंधकासुराचा निरुपाय होऊन तो शिवाला शरण गेला. मग शिवाने त्याचे भृंगीश असे नाव ठेवून त्याला गणांचे आधिपत्य दिले. या घटनेवर निर्माण केलेली शिवशिल्पे अनेक ठिकाणी आहेत. त्यांतले सर्वोत्कृष्ट शिल्प घारापुरी व वेरूळ येथे असून, त्यांत शिवाच्या हातातल्या भाल्याच्या फाळावर अंधकासुर खोदलेला आहे. **पाहा** – भृंगीश, मातृका. [ मू. वि. ]

**अंधकूप** खोल अंधारी विहीर. एका नरकाचे नाव. शास्त्राविरुद्ध मार्गानें जीविका चालवणारे, दुसऱ्याला इजा करणारे व परदुःखात सुख मानणारे लोक या नरकात यातना भोगतात. (भाग. पु. ५. २६. १७).

**अंधतामिस्र** एका नरकाचे नाव. एखाद्याच्या पत्नीचे व मालमत्तेचे हरण करणारे व धर्माविरुद्ध वागून कुटुंबपोषण करणारे या नरकात जातात (भाग. पु. ५. २६. ९; ३. ३०. ३३). या नरकातील यातनांनी जीवाची मती व दृष्टी नष्ट होते. [ पु. इं. ]

**अंबट्टन** दक्षिण त्रिवांकुरमधल्या नापितांच्या जातीला हे नाव आहे. ब्राह्मण पुरुष व वैश्य स्त्री यांच्या संबंधापासून ही जात निर्माण झाली, असे सांगतात. ब्राह्मण यांच्या घरी पौरोहित्य करतात. सालेम जिल्ह्यातील कोंगा वेल्लाळांत अंबट्टन हे लग्नाचे उपाध्येपण करतात. याविषयी दंतकथा अशी — पांड्यांच्या कारकीर्दीत एका विवाहप्रसंगी ब्राह्मण व अंबट्टन या दोघांसही लग्नाच्या पौरोहित्यास बोलावणे गेले होते. पण वाटेत ब्राह्मणाचा मृत्यू झाला. हा अपशकुन समजून राजपुरुषांनी असे ठरविले, की यापुढे अंबट्टनालाच पौरोहित्यासाठी बोलवायचे.

यांना नासिवन (अपवित्र), नासुवन (नाकातून जन्मलेला) अथवा नाविदन असे म्हणतात. लग्नप्रसंगी त्यांना पंडित म्हणतात. स्त्रियांचे क्षौर करण्याचे काम यांच्यांतील बायका करीत असतात. अंबट्टनांना क्षौरकर्माखेरीज वैधकीही अवगत असते. यांच्या बायका सुइणीची कामे करतात. हे मनुस्मृतीतील अंबष्ठांशी आपला संबंध जोडून आपल्या जातीचे श्रेष्ठत्व सांगतात; पण तरीही उच्चवर्णी लोक यांचा विटाळ मानतात.

अंबट्टनांचे तीन पोटभेद आहेत– (१) मलयाळम भाषा बोलणारे व मरुमक्कतायम पाळणारे (२) मलयाळम भाषा बोलणारे; पण मरुमक्कतायम न पाळणारे व (३) तमिळ भाषा बोलणारे.

**विवाहप्रथा** – यांचा लग्नसमारंभ पाच दिवस चालतो. यांना विधवाविवाह मान्य नाही. विधवांना लग्नसमारंभातही मज्जाव असतो. मुलगी ऋतुस्नात झाली, की तिला ११ दिवस अस्पृश्य मानतात. बाराव्या दिवशी स्नान करून ती घरात सर्वांना शिवते.

यांच्यांत शैव-वैष्णव असा भेदही आहे. दोघांत लग्नसंबंध होतात. वैष्णव मद्य-मांस सेवीत नाहीत. हे लोक कोमटचांच्या पंगतीला बसत नाहीत. बायका सुवर्णमण्यांचे अलंकार घालतात व मोठ्या प्रमाणात गोंदून घेतात. मूर्ती, मादेन व यक्षी या अंबट्टनांच्या देवता होत. याशिवाय हे अन्य हिंदू देवतांनाही भजतात. हे मृतांना जाळतात व ब्राह्मणाकरवी और्ध्वदेहिक संस्कारही करतात. [ का. ट्रा. स. इं.; म. ज्ञा. को. ]

**अंबरनाथ** ठाणे जिल्ह्यात कल्याण–कर्जत मार्गावर, कल्याणपासून ४ मैल अंतरावर हे गाव आहे. या गावाच्या पूर्वेला सुमारे दीड मैलांवर एक शिवमंदिर आहे. हे मंदिर शिलाहार राजांनी इ. स. च्या ११ व्या शतकात बांधलेले असून, त्याच्या शिखराचा बराच भाग पडून गेला आहे. मंदिराची लांबी ८९ फूट व रुंदी ७४ फूट असून, त्याच्या भोवती १५० फूट लांब व १०५ फूट रुंद असा प्राकार होता. मंदिर पश्चिमाभिमुख आहे. गर्भगृह, अंतराळ व सभामंडप असे त्याचे तीन भाग आहेत. गाभारा बराच खोल असून, त्यात खडकाचा एक उंचवटा आहे. त्यालाच स्वयंभू शिवलिंग म्हणतात. मंडपाला तीन द्वारे असून, दर्शनी भागात भद्र आहे. गाभारा व मंडप आतून चौकोनी असले तरी, भिंतीची रचना अशी केली आहे की, दोन्ही वास्तू बाहेरून नक्षत्राकृती भासतात. मंदिराच्या शिखरापर्यंत अशीच तारकाकार रचना केलेली आहे.

मंदिराच्या चौथऱ्यावर अनेक थर असून, त्यांतील एकेका थरात हत्ती, घोडे, इ. पशू व मानव यांच्या आकृती कोरलेल्या आहेत. वरच्या पृष्ठभागावर देवता, गंधर्व, अप्सरा, यक्ष, व्याल यांच्या आकृती दिसतात. भिंतीत मोठ्या देवळ्या करून त्यात शैव देवतांच्या मूर्ती बसविल्या आहेत. त्या मूर्तींच्या वर एकाच घाटाचे खोदकाम असलेले पट्ट व त्यावर पागोळ्या आहेत. पागोळ्यांवर चैत्य-तोरणाकृती कोनाड्यात शिवमूर्ती आहेत. गाभारा व मंडप यांना जोडणाऱ्या अंतराळावर गजपृष्ठाकार म्हणजे दोन्ही उतरत्या बाजू गोलसर असलेले छप्पर आहे. या छपराची चांदईची एक बाजू चैत्यतोरणाकृती असून,

तीत नटराजमूर्ती आहे. या भागाला शुक-नासिका असे नाव आहे. गाभाऱ्याचे व अंतराळाचे छप्पर जोडलेले आहे; पण मंडपाचे छप्पर वेगळे आहे. त्याची रचनाही पायऱ्यांची असून, प्रत्येक पायरीवर घुमटांच्या छोट्या प्रतिकृतींची ओळ दिसते. भद्रावरही असेच छप्पर आहे. श्री. म. श्री. माटे यांनी या मंदिराचे वर्णन केले आहे. ते असे—भिंतीची अनेकशः मोडणी केलेली असल्याने व विविध आकारांच्या थरांची योजना



शिवमंदिर, अंबरनाथ

जागोजाग केली असल्याने या वास्तूवर छाया-प्रकाशाचा नयनरम्य खेळ पाहावयास सापडतो. उत्तर भारतीय व नागर शैलीला अनुसरून सर्वच भागांचे प्रमाण अशा रीतीने बसविले आहे की, या वास्तूची झेपावत जाणारी उंची सहज प्रतीत व्हावी.

अत्यंत आकर्षक अशा या बहिरंगाच्या दर्शनानंतर मंदिराच्या अंतरंगात थोडीशी निराशाच होते. दोन-चार ठिकाणच्या कोनाड्यातील देवतामूर्ती सोडल्या, तर भिंतीवर कसलेही नक्षीकाम नाही. याची भरपाई काही प्रमाणात स्तंभ, हस्ततुला, छत व द्वारशाखा करतात.

गाभाऱ्याच्या दरवाज्यावर आणि गणेशपट्टीच्या वरच्या भागात देवतांच्या व पशूंच्या आकृती कोरलेल्या आहेत. मंडपात स्तंभांच्या रांगा असून त्यांवर मूर्ती कोरलेल्या आहेत. प्रत्येक मूर्तीवर तोरण व कोरीव काम आहे. मंडपाच्या मध्यभागी चार स्तंभांवर आधारलेले घुमटाकृती छत आहे. त्याच्या मधोमध झुंबर असून तिथपर्यंत घुमटाची रचना एकापेक्षा एक लहान अशा वर्तुळांनी केलेली आहे. त्याच्या भोवती मंडपाच्या उरलेल्या भागात सपाट छत आहे. छतावर कीर्तिमुखे, कमळे व लतापल्लव असे कोरीव काम आहे.

मंदिराच्या भिंतीवर एकूण सत्तर मूर्ती कोरलेल्या असून, त्यांतल्या बऱ्याच मूर्ती शिव-पार्वतींची विविध रूपे दर्शवितात. काही मूर्ती विष्णूच्या व त्याच्या अवतारांच्या आहेत. उत्तरेकडील कोनाड्यात ब्रह्मदेवाची मूर्ती आहे. इथे त्रिभंगी नृत्यमुद्रेत महिषासुरमर्दिनीची मूर्ती व अष्टभुज कामदेवाचीही मूर्ती आहे.

हे मंदिर त्या काली प्रचलित असलेल्या अनेक भिन्न शिल्पपद्धतीच्या मिश्रणाने निर्माण केलेले आहे. श्री. म. श्री. माटे यांच्या मते अंबरनाथच्या या मंदिराची वास्तू डौलदार व प्रेक्षणीय असली तरी, त्यातील मूर्तिशिल्प मात्र तितकेसे सुरेख नाही. परंपरेला अनुसरून पीठावर अश्वथर, नरथर, कीर्तिमुखे अशासारख्या रूपकांची, तसेच जंघेवर देवदेवता यक्षी, इ. मूर्तींची योजना केलेली असली तरी, त्या शिल्पकामात जिवंतपणा दिसून येत नाही. पाहा—शिलाहार राजवंश. [श्री. ज. ह. दवे–भारती, १३ एप्रिल १९५८; श्री. नाईक न्यू. इं. अँ. भाग ९ वा, जुलै १९४७; महाराष्ट्रातील पुरातत्त्व, संपा. श्री. सांकलिया, श्री. माटे १९७६; वि. मुं. रा. प.; म. जि. – ठाणे]

## अंबलक्कारण

ग्रामरक्षकाचा व शेतीचा धंदा करणारी तमिळनाडमधील एक जात. हे लोक मुख्यत्वे तिरुचिरापल्ली व पुदुकोट्टाई या भागात वास्तव्य करतात. मुट्टिरियन जातीशी यांचा जवळचा संबंध आहे. आपण शिवाच्या घर्मबिंदूपासून जन्मलो, असे हे सांगतात. कण्णप्प या नायन्मार संताला हे आपला मूळ पूर्वज मानतात.

**विवाहप्रथा** – मुलगी वयात आल्याशिवाय लग्न करीत नाहीत. घटस्फोट घेता येतो; पण त्याला बरेच निबंध असतात. विधवाविवाहाला हरकत नसते. काही लोक केवळ आपल्या पोटजातीतच लग्नसंबंध करतात. पौरोहित्यासाठी ब्राह्मण बोलावतात.

मृताच्या दहनाच्या वेळी व श्राद्ध करताना हे जानवे घालतात. यांना मद्यमांस चालते. प्रत्येक नाडूत त्यांची पंचायत असते. जातींचे निवाडे पंचायतीत होतात. पंचायतप्रमुखाला कारियक्करण म्हणतात. हा हक्क वंशपरंपरेने चालतो. [का. ट्रा. स. इं.]

## अंबलवासी

तमिळनाड व केरळ यांतली एक अंतराळ जात. हिला केरळात क्षत्रियांच्या खालोखाल मानतात. केरळात यांना देवालयातील कामे करण्याचा अधिकार मिळालेला आहे. झाडलोट, दिवाबत्ती, पूजेची सामग्री, चौघडा वाजविणे, इ. देवस्थानातील सर्व कामे हे करतात. यांच्यांत बारा पोटभेद आहेत. याशिवाय जानवे घालणारे व न घालणारे असाही भेद आहे. पहिल्यात आदिकल चाक्यार, नावियार, नंबिस्सन, पुप्पळी, इ. जाती येतात; तर दुसऱ्यात नम्बियार, वायिरन, मारार, इ. जाती येतात. आदिकल हे मुलांचे उपनयन करतात व गायत्रीमंत्रही म्हणतात. आपण मूळचे ब्राह्मण; पण भद्रकालीच्या

मंदिरात पूजा केल्यामुळे आमचा मान कमी करण्यात आला असे हे सांगतात. यांचे चाक्यार व नम्बियार असे आणखी पोटभेद आहेत. नम्पूतिरी ब्राह्मणांनी व्यभिचारः दोषाबद्दल जातीबाहेर टाकलेल्या स्त्रीची जी मुले उपनीत असतात, त्यांना चाक्यार जातीत घालतात व मुंज न झालेल्यांना नम्बियार या जातीत घालतात. अंबलवासींत मरुमक्कतायम हा वारसा कायदा चालतो: घटस्फोटाची चाल आहे. अशा स्त्रीला नम्पूतिरी ब्राह्मणाशी दुसरे लग्न करण्यास हरकत नसते. सर्वसाधारण धर्मकृत्यासाठी हे आपल्यातूनच पुरोहित निवडतात. महत्त्वाचे विधी ब्राह्मणाकडून करवितात. मात्र ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या हातचे पाणी घेत नाहीत. आशौच दहा दिवस पाळतात. पाहा—चाक्यार. [का. ट्रा. स. इं.; सो. चें. म.]

## अंबष्ठ लोक व देश

अंबष्ठ हे एक प्राचीन जनपद असून, ते राजाधीन होते. तिथल्या जानपदांना आंबष्ठ्य म्हणत. ऐतरेय ब्राह्मणात उल्लेखिलेला आंबष्ठ्य राजा यांच्यापैकीच असावा, असे गोल्डस्टुकर म्हणतो (ऐ. ब्रा. ७. २१. ३). त्यांची गणना औदीच्यात केलेली आहे. यांचा देश चिनावच्या खालच्या अंगाला होता. ग्रीक लेखकांनी संबस्तई आणि अवस्तनोइ असे ज्यांना म्हटले ते लोक अंबष्ठ होत. अंबष्ठांचा देश पश्चिमेला असून, दिग्विजययात्रेत नकुलाने त्यांचा पराभव केला, असे महाभारतात म्हटले आहे (म. भा. सभा. ४८.१४). अंबष्ठ हे युद्धोपजीवी होते. भारतीय युद्धात हे कौरवांच्या बाजूने लढले होते.

पुराणांत त्यांना अनव क्षत्रिय असे म्हटले असून, त्यांची उत्पत्ती उशीनरपुत्र सुव्रत याच्यापासून झाली, असे सांगितले आहे. शिवी आणि यौधेय यांच्याशीही त्यांचा संबंध दिसतो. यावरून प्राचीन काळी यांना शुद्ध क्षत्रिय मानीत असावे, असे वाटते. पण मनू (१०. ८), याज्ञवल्क्य (१. ९१), बौधायन (ध. सू. १. ९. ३), यांनी अंबष्ठांना संकरजाती मानले आहे. ब्राह्मण पुरुष व वैश्य स्त्री यांच्या विवाहजन्य संततीला ते अंबष्ठ म्हणतात. गौतमाच्या मते (ध. सू. ४.१४) क्षत्रिय पुरुष व वैश्य स्त्री यांची संतती म्हणजे अंबष्ठ.

हे वैद्यकीय व्यवसाय करतात, असे मनू सांगतो (१०. १५). श्री. मुजुमदारांच्या मते ते ब्रह्मक्षत्रिय म्हणजे जन्माने ब्राह्मण व कर्माने क्षत्रिय होत.

पुढील काळात हे जसे नर्मदेच्या उगमाजवळ येऊन वसले, तसेच ते पूर्वेस बिहार आणि बंगाल या प्रदेशांतही पोचले. आजही ते बंगालमध्ये त्याच नावाने ओळखले जातात आणि वैद्यकी करतात. [पा. का. भा.; हि. ध.; ट्रा. ए. इं.]

## अंबा

आदिशक्ती पार्वतीच्या मातृस्वरूपाला अंबा किंवा अंबा भवानी म्हणतात. हीच महाकाली, महालक्ष्मी व महासरस्वती या रूपांनी त्रिविध व त्रिगुणात्मक बनते. इतकेच नव्हे; तर हिची अनंत रूपे व अनंत नामे आहेत. कोल्हापूरच्या महालक्ष्मीला व तुळजापूरच्या देवीला अंबाबाई म्हणतात.

देवगिरी दुर्गावर अंबा देवीचे मंदिर होते; पण ते मुसलमानी आक्रमणात भग्न झाले. सांप्रत तिथे भारतमाता मंदिर बांधण्यात आले आहे. गिरनार पर्वतावर अंबा देवीचे मंदिर आहे. विदर्भातील कौंडिण्यपूर येथे अंबा देवीचे स्वयंभू स्थान आहे. पाहा—गिरनार, देवगिरी, अमरावती, कोल्हापूर, तुळजापूर, देवता, शक्ती.

## अंबाजी

गुजरातमधले एक देवीचे स्थान. या गावाचे नाव आरासुर असे असून, ते बनासकाठा जिल्ह्यातील दांता या तालुक्यात आहे. अबूरोड स्टेशनपासून हे क्षेत्र तेरा मैलांवर येते. या ठिकाणी अंबाजीचे मंदिर आहे. मंदिर जुने, ठेंगणे व लहान आहे; पण पुढे मोठा मंडप आहे. मंडपात चांदीचे व पितळेचे सिंह उभे आहेत. अंबाजीची मूर्ती नाही.



अंबाजी

पण गर्भगृहातील कोनाडचात वस्त्रालंकार व मुखवटा अशा तऱ्हेने रचतात, की पाहाणाऱ्याला माताजीने वाघावर स्वारी

केली आहे, असे वाटते. इथे कुंकवाची उधळण असते.

मंदिराच्या समोरच्या भागात एक मोठा चौक आहे. त्याला चाचरनो चोक असे म्हणतात. त्या ठिकाणी होमहवन करतात. अंबाजीच्या यात्रेत कोणत्याही कारणासाठी तेल वापरीत नाहीत. केसांनासुद्धा तेल न लावता तूपच लावतात. इथे यात्रेच्या वेळी कोणीही पुरुष कोणत्याही स्त्रीची थट्टा–मस्करी करू शकत नाही. इतकेच नव्हे; तर यात्रेकरू पुरुषाने क्षेत्रात असेपर्यंत स्वतःच्या पत्नीशीसुद्धा समागम करता कामा नये, असा नियम आहे. तसे केल्यास माताजीचा कोप होतो, अशी समजूत आहे. प्रत्येक पौर्णिमेला इथे यात्रा भरते. त्या वेळी भवाई नावाचे नृत्य होते.

अंबाजीजवळ कुंभारिया नावाच्या खेडेगावात मंत्री विमलशाह याने बांधलेली काही जैन मंदिरे आहेत. त्यांबद्दल पुढील दंतकथा सांगतात–अंबाजीने विमलशाहाला पुष्कळ द्रव्य दिले व त्यातून त्याने ३६० मंदिरे बांधली. नंतर देवीने त्याला विचारले की, तू ही मंदिरे कोणाच्या प्रभावामुळे बांधलीस? तेव्हा त्याने उत्तर दिले, की गुरूच्या प्रभावामुळे. त्यामुळे अंबाजीला राग आला व तिने ३५५ मंदिरे जाळून टाकली व फक्त पाचच शिल्लक ठेवली. [ वि. मुं. रा. प. ]

**अंबायज्ञ** अंबेच्या उद्देशाने श्रीविष्णूने हा यज्ञ केला. त्यासाठी सत्तावीस ऋत्विज वरले. त्यांनी देवीच्या बीजांनी युक्त अशा मंत्रांचा जप आणि हवन केले. त्या वेळी देवीने आकाशवाणीच्या द्वारे युगायुगांत धर्मरक्षण करण्याचे वरदान दिले. त्या दिवसापासून हा यज्ञ रूढ झाला. [ देवी भागवत ३ ]

**अंबिका** (१) एक प्राचीन देवता. शुक्ल यजुर्वेदात (वाज. सं. ३.५७) हिचा उल्लेख रुद्राची भगिनी म्हणून केलेला आहे. आर्यपूर्व सिंधु-संस्कृतीमधील शिवसदृश पुरुष देवता व वैदिक रुद्र यांचे तादात्म्य झाल्यानंतर सिंधु-संस्कृतीतली स्त्री देवता व रुद्रभगिनी अंबिका यांचेही तादात्म्य होऊन अंबिका ही रुद्रपत्नी मानली गेली (भाग. पु. ३.१२.१३). अंबिकाचा अर्थ मातृदेवी असा आहे. मातृदेवी म्हणजे पृथ्वी. ती सर्वश्रेष्ठ देवी असल्यामुळे तिचा संबंध शिवमहादेवाशी जोडला गेला.

पूर्वजन्मी ही दक्षकन्या सती होती. नंतर तिने हिमाचलाची पत्नी मेना हिच्या उदरी जन्म घेतला व ती शिवपत्नी झाली, अशी कथा आहे. याज्ञवल्क्याने हिला विनायकाची माता मानले आहे.

तलाव खोदण्यापूर्वी हिची पूजा करतात (मत्स्य पु. ५८). पाहा – उमा, पार्वती. [ प्रा. भा. लो. ध.; शैवमत ]

(२) जैन दैवतसमूहातली यक्षिणी. (दिगंबरमते कूष्मांडी) ही नेमिनाथाची सेविका आहे. हिचे वर्णन पुढीलप्रमाणे –

सोनेरी वर्णाची. सिंहारूढ. आम्रगुच्छ, पाश, पुत्र व अंकुश धारण करणारी. हिचे पौराणिक दुर्गेशी साधर्म्य आहे. हिच्या मूर्ती जैन क्षेत्रांतून आढळतात. [ जै. इ. ]

**अंबुवाची** सूर्य मृग नक्षत्रात गेल्यानंतरचे पहिले तीन दिवस हा पृथ्वीच्या रजोदर्शनाचा काल मानून त्या मुदतीत जमीन नांगरणे, बी पेरणे, इ. कृषिविषयक क्रिया वर्ज्य समजतात (दे. भा. ९.१). बंगालमध्ये हा काल आषाढ वद्य दशमीपासून त्रयोदशीपर्यंत धरतात. सूर्य आर्द्रा नक्षत्राच्या प्रथम चरणात असतो, तो काळ, असाही अंबुवाचीचा पर्याय आहे. चौथ्या दिवशी दगडांना स्नान घालून पुष्पमाळा वाहतात व भूमाता शुद्ध झाली, असे समजतात. आसामात आषाढ महिन्याच्या शुक्ल पक्षात कामाख्या देवीचा अंबुवाची उत्सव होत असतो, त्या वेळी तीन दिवस देवळाचे दरवाजे बंद असतात. कामाख्या ही ऋतुमती आहे, अशा कल्पनेने कोणालाही तिचे दर्शन घेऊ देत नाहीत. चौथ्या दिवशी देवीला स्नान घालून तिथे जमलेल्या भक्तांच्या दर्शनासाठी दरवाजे उघडतात. या उत्सवात देवीच्या भक्तांना देवीच्या रजोदर्शनाचे प्रतीक म्हणून लाल कापडाचे तुकडे वाटतात.

या उत्सवाचा प्राचीन कृषिकर्माशी संबंध दिसतो. मानवी स्त्रीच्या रजोदर्शनकाळात तिला गर्भधारणा होत नाही. तिच्या ठिकाणी टाकलेले वीर्यरूप बीज वाया जाते, किंबहुना त्या गोष्टीचा तिला त्रास होतो, या अनुभवावरून प्राचीन मानवाने धरित्रीच्या रजोदर्शनाची कल्पना केली व तिलाही तीन दिवस अस्पृश्य व अयोग्य मानले. मृगाच्या पहिल्या पावसाने माती वाहून येऊन नदीनाल्यांचे पाणी लाल होते, या दृश्यावरून पृथ्वीच्या रजस्रावाची कल्पना प्राचीन मानवाला सुचली असावी व त्याने ते तीन दिवस कृषिकर्माला अयोग्य मानले असावे. कामाख्या हे पृथ्वीमातेचेच स्वरूप असल्यामुळे तिच्या या अंबुवाचीच्या काळात विशिष्ट विधि-निषेध निर्माण केले गेले आहेत.

याचे स्पष्टीकरण करताना डॉ. रा. चिं. ढेरे लज्जागौरी या ग्रंथात लिहितात, ते असे–रजोदर्शन, पुष्पितावस्था, फलशोभन, ऋतु, इत्यादी. स्त्रीच्या सुफलनप्रक्रियेतील संज्ञा या पृथ्वीच्या सुफलनप्रक्रियेतील संज्ञा आहेत. या उलट स्त्रीचे देहधर्म पृथ्वीच्या सर्जनशीलतेशी निगडित करण्याची वृत्तीही जगातील सर्व मानवसमूहात आदिम काळापासून आढळते. ज्याप्रमाणे स्त्री ऋतुस्नात झाल्यावाचून, रजस्वलावस्था अनुभवल्यावाचून सुफलनक्षम होऊ शकत नाही, त्याचप्रमाणे नवसृष्टीचा गर्भ

वाहण्यापूर्वी स्त्रीप्रमाणेच पृथ्वीही रजस्वला होत असते, अशी धारणा अगदी आजपर्यंत टिकून असलेली दिसते.

अन्नाचा गर्भ वाहण्याची क्षमता पृथ्वीला अंबुवाचीनंतरच प्राप्त होत असल्यामुळे अंबुवाचीचे महत्त्व कृषिजीवनात विशेषत्वाने आढळते. केवळ कृषिविषयक लोकधारणांतच नव्हे, तर कृषिशास्त्रीय ग्रंथांतही अंबुवाचीविषयक संकेतांना स्थान लाभलेले आढळते.

**द्यौः पुमान् धरणी नारी बीजमम्भो दिवश्च्युतम् ।**
**द्यु-धात्री-बीज-संयोगाद् धान्यादीनां तु सम्भवः ।।**
**अन्नं हि जगदाधारं सर्वमन्ने प्रतिष्ठितम्।**
**मूलमापो हि अन्नस्य तस्मादापो हि जीवनम् ।।**

अर्थ – द्यौ हा पुरुष आहे, धरणी नारी आहे. आणि द्यौपासून क्षरलेले पर्जन्यजल हे बीज आहे. द्यौ, धरणी आणि बीज यांच्या संयोगातूनच धान्यादी वनस्पतींचा संभव होतो. अन्न हेच जगाचा आधार आहे. अन्नामुळेच हे सर्व जीवविश्व टिकून आहे. आणि जल हेच अन्नाचे मूळ असल्यामुळे जलाला ' जीवन ' ही संज्ञा लाभली आहे.

कृषिशास्त्रीय ग्रंथांचा उपक्रम सामान्यतः याच शब्दांत केला जातो. ' वृष्टिमूला कृषिः सर्वा वृष्टिमूलं च जीवनम् ' ही जाणीव भारतीय कृषिशास्त्रीय ग्रंथांत सतत राखली गेली आहे. आणि त्याचमुळे वृष्टिविषयक ज्ञान आणि विधिविधान यांना त्यांत अनन्यसाधारण महत्त्व लाभले आहे. म्हणूनच वर्षेच्या प्रारंभकाळात अंतरी ओलावलेल्या धरणीचे रूप रजस्वलावस्थेच्या धारणेने स्वीकारले जाणे स्वाभाविक आहे. मृगाच्या धारांत चिंब झालेली धरणी आर्द्रेच्या प्रारंभकाळात अंतरी पुरेशी आर्द्र होते आणि त्यानंतरच ती नवसर्जनाचा गर्भ वाहू शकते. धरणीची ही गर्भधारणआर्द्रताच अंबुवाची या संज्ञेने अभिव्यक्त झालेली आहे. पाहा–कामाख्या; लज्जागौरी [फे. फे. आ.]

**अंशुक** प्राचीन काळचे एक वस्त्र. बृहत्कल्पसूत्रभाष्याच्या टीकेत याला कोमल व चमकदार रेशमी कापड असे म्हटले आहे. यात जरतारी कामही करीत. बाणाने हर्षचरितात याला अत्यंत तलम व स्वच्छ वस्त्र असे म्हटले आहे. फुले आणि पक्षी यांच्या आकृतींनी अंशुक सुशोभित केले जाते, असेही तो म्हणतो. त्याच्या तलम या विशेषणावरून काही संशोधक ती मलमल असावी असे म्हणतात. पण मलमल सुती असते. अंशुक हे रेशमी वस्त्र असल्याचे पुरावे मिळतात. जैनांच्या अनुयोगद्वारसूत्रात कीटज (रेशमी) वस्त्राचे जे पाच प्रकार मानले आहेत, त्यांत अंशुकाचे नाव आहे.

अंशुकाचे प्रकार दोन-एक भारतीय व दुसरे चीनमधून येणारे. या दुसऱ्याला चीनांशुक असे नाव होते. बृहत्कल्पसूत्रभाष्यात याची व्याख्या दिली आहे. ती अशी–' चीनो नाम जनपदः तस्य यः श्लक्ष्णतरः पटः तस्माज्जातम् ' (=चीनमधल्या तलम रेशमी कापडापासून बनवलेले वस्त्र). कालिदासाने याचा शाकुंतलात उल्लेख केला आहे. [ प्रा. भा. वे. ]

**अ** याचे पुढील अर्थ सांगितलेले आहेत – (१) आदिवर्ण ' अक्षराणामकारोऽस्मि '=अक्षरातला अकार मी आहे (गीता १०.३३). वाङ्मयाचे आदिबीज. (२) प्रणवाची पहिली मात्रा. (३) नञर्थक—नेति नेति–सूचक. (४) शिव, ब्रह्मा, वायू व वैश्वानर.

**अः शिखायां सिद्धमन्त्रे प्रग्राहेऽर्के रथावंषि ।**
**चक्रे कुक्कुटमूर्ध्नीन्दुबिम्बे ब्रह्मेशविष्णुषु ।।**
(नानार्थमंजिरी)

अर्थ – ज्वाला, मंत्र, पर्जन्य, सूर्य, रथाचा घोडा, चक्र, कोंबड्याचे डोके, चंद्रबिंब, ब्रह्मा, शिव, विष्णू हे अचे अर्थ होत.

अ हे सगळ्या भारतीय भाषांच्या वर्णमालेतले पहिले अक्षर असून, पाणिनीने त्याचे स्थान कंठ मानलेले आहे. वेगवेगळ्या उच्चारानुसार याचे सानुनासिक व निरनुनासिक असे १८ भेद होतात. अ च्या रचनेबाबत वर्णोद्धारात पुढील उल्लेख आहे – एक उभी रेषा असून तिला दोन आडव्या रेषा फुटतात.

३ शती ई०पू० मौर्य | १श०प० शक | १-२श०प० आंध्र | २-३श०प० कुषण
२-३श०प० जग्गयपेट | ४श०प० आदि गुप्त | ६श०प० उत्तर गुप्त | ७-९ श० मध्ययुग

अच्या रूपाचा विकासक्रम

एक वाकून वर जाते व दुसरी वाकून खाली येते. सनपूर्वी ४ थ्या शतकातल्या ब्राह्मी लिपीपासून आजच्या देवनागरी लिपीपर्यंत वेगवेगळ्या शतकांत अ ची मागील रूपे दृग्गोचर होतात.

तंत्रशास्त्रानुसार अ मध्ये ब्रह्मा, विष्णू, शिव व त्यांच्या शक्ती वर्तमान आहेत. अ+उ+म् मिळून ओंकार बनतो. त्याचे प्रथम बीज अ हे आहे. चित्ताच्या एकाग्रतेसाठी प्रथम त्याचाच जप केला जातो. [श. क.; हिं. वि. को.]

**अकबर** (इ. स. १५४२–१६०५) मोगल बादशहा हुमायून याचा पुत्र. याचे संपूर्ण नाव जलालुद्दीन मुहंमद अकबर

असे होते. इ. स. १५४० मध्ये शेरशहा सूर याने हुमायूनचा पराभव करून आग्र्यापर्यंत त्याचा पाठलाग केल्यामुळे हुमायून लाहोरला पळाला व तिथून तो सिंधमध्ये गेला. त्या धामधुमीत त्याने हमिदाबानू नामक तरुणीशी लग्न केले. हुमायूनचा भाऊ हिंदाल याचा शियापंथी गुरू मीर अली अकबर जामी याची ती कन्या होती. त्यानंतर हुमायून सिंधमधील अमरकोट येथील राजपूत राजाच्या आश्रयाला गेला. तिथे ऑक्टोबर १५४२ मध्ये हमिदाबानूला मुलगा झाला. तोच अकबर होय.

त्यानंतर इ. स. १५४३ मध्ये हुमायून इराणच्या शाहाकडे निघाला. वाटेत त्याचा भाऊ अस्करी याने त्याच्यावर हल्ला केला. पण हुमायून कसावसा निसटून कंदाहारकडे पळाला. मात्र छोटा अकबर अस्करीच्या हाती सापडला. त्याने अकबराला काबूल येथे दुसरा भाऊ कामरान याच्याजवळ ठेवले. तिथे त्याच्या बेगमेने अकबराचे चांगले पालनपोषण केले.

इराणच्या शाहाच्या मदतीने हुमायूनने कंदाहार व काबूल जिंकून घेतले. तिथे इ. स. १५४५ साली त्याची व अकबराची भेट झाली. तिथेच अकबराचे बालपण गेले.

सर्व बालपण धामधुमीत गेल्यामुळे अकबराचे शिक्षण नीटपणे झाले नाही. लेखन-वाचनात त्याचे मन रमत नसे. मात्र त्याची स्मरणशक्ती तीव्र व बुद्धी कुशाग्र होती. त्यामुळे त्याने अवांतर ज्ञान पुष्कळच मिळवले होते. घोड्यावर बसणे, तलवार चालविणे, निशाण मारणे या गोष्टींत तो तरबेज होता.

हुमायूनचा भाऊ हिंदाल गझनीचा सुभेदार होता. इ. स. १५५१ मध्ये तो मरण पावला, तेव्हा हुमायूनने अकबराला गझनीचा सुभेदार नेमले व हिंदालची कन्या रझिया सुलताना हिच्याशी त्याचा विवाह करून दिला. इ. स. १५५४ पर्यंत अकबर गझनीला राहिला. इ. स. १५५५ मध्ये हुमायून भारतावर स्वारी करण्यास निघाला, तेव्हा त्याने मुनीमखान याला अकबराचा संरक्षक नेमले. हुमायूनने दिल्ली जिंकून घेतल्यावर अकबराला युवराज घोषित केले व त्याला लाहोरचा सुभेदार नेमले. तिथे बैरामखान याला अकबराचा संरक्षक नेमले. हुमायून अफगाणिस्तानात असताना बैरामखानाने हुमायूनला बरीच मदत केली होती. दिल्लीवर स्वारी करून मोगलांची सत्ता पुन्हा प्रस्थापित करण्याच्या कामीही बैरामखानाने मोठी कामगिरी केली.

इ. स. १५५६ मध्ये हुमायून मरण पावला, तेव्हा अकबर लाहोर येथे होता. बैरामखानाने अकबराला कलानौर (पंजाब) येथे बादशाही तख्तावर बसवले व तो स्वतः बादशहाचा प्रतिनिधी म्हणून राज्यकारभार करू लागला. त्या वेळी अकबराची सत्ता फक्त पंजाबच्या काही भागावर होती. दिल्ली व आग्रा येथे तारडी बेग व इस्कंदर खान हे मोगलांचे सुभेदार होते. सूर घराण्यातील आदिलशहा, इब्राहीमशाहा व सिकंदर शाहा हे दिल्ली घेण्यासाठी टपलेले होते. आदिलशाहाचा मुख्यमंत्री व सरसेनापती हीमू फार महत्त्वाकांक्षी होता. त्याने प्रचंड सैन्यानिशी आग्रा व दिल्ली या नगरांवर स्वारी करून ती जिंकली व दिल्ली येथे तो स्वतः सिंहासनावर बसला. ही वार्ता कळताच बैरामखान व अकबर यांनी दिल्लीवर स्वारी केली. पानिपत येथे त्यांची व हीमूची घनघोर लढाई झाली. मोगलांचे सैन्यबळ कमी होते. प्रथम त्यांचा पराभव झाला. पण हीमूला बाण लागून तो घायाळ झाल्यामुळे, त्याचे सैन्य घाबरले व अकबराचा जय झाला. त्याने हीमूला ठार मारले.

त्यानंतर बैरामखान व अकबर यांनी शिकंदर सूरचा बंदोबस्त करण्यासाठी पंजाबकडे सैन्य पाठवले. ते दोघेही तिकडे गेले. शिकंदर सूर शिवालिक पर्वतातील माणकोट नामक भक्कम किल्ल्यात जाऊन राहिला. पण सहा महिन्यानंतर त्याने किल्ला मोगलांना दिला व तो बिहारकडे पळून गेला. तिथून दिल्लीला परत येताना अकबराने अजमेर घेतले (एप्रिल १५५८).

इ. स. १५५८ मध्ये मोगलांच्या सरदारांनी ग्वाल्हेरचा किल्ला सर केला व जौनपूरही जिंकून घेतले.

इ. स. १५५६–५९ या चार वर्षांत बैरामखानाने अकबराच्या राज्याचा कारभार उत्तम प्रकारे केला. तो अत्यंत कर्तबगार व कार्यक्षम होता, पण त्याची अरेरावी अकबराला सहन झाली नाही. अकबर नामधारी बादशहा होता. बैरामखान त्याला न विचारताच सर्व कारभार चालवीत असे. त्याची हुकुमशाही व कडक शिस्त यांमुळे अकबर संतापला. मग त्याने काही सरदारांच्या मदतीने बैरामखानाला पदभ्रष्ट करून राज्यसूत्रे स्वतःच्या हाती घेतली व त्याला मक्केला जाण्याची परवानगी दिली. बैरामखानाने प्रथम त्याचा आदेश मानला व तो मक्केला जाण्यास निघाला. पण वाटेत तो बिथरला व त्याने बंड केले. मग अकबराने त्याच्यावर सैन्य पाठवले. सेनापती अरगाखान याने त्याचा पराभव केला व त्याला बादशहासमोर आणले. अकबराने त्याला काल्पी-चंदेरीची जहागीर देऊ केली. पण ती न घेता बैरामखान मक्केच्या यात्रेसाठी राजस्थानातून गुजरातमध्ये गेला. पाटण येथे मुबारकखान नावाच्या अफगाण सरदाराने इ. स. १५६१ च्या जानेवारी महिन्यात त्याचा खून केला.

अकबराने बैरामखानाची विधवा सलिमा बेगम, मुलगा अब्दूर रहीम व परिवारातील अन्य माणसे यांना सन्मानाने दिल्लीला नेले. सलिमा ही अकबराची आते बहीण होती; तिच्याशी त्याने लग्न केले.

बैरामखानाच्या हुकुमशाहीतून मुक्त होताच अकबराने जनानखान्यातील अरेरावी बंद करण्याचा निश्चय केला. त्याची

जुनी दाई महामा अनगा हिचे तिथे वर्चस्व होते. तिचा मुलगा आधमखान फार शिरजोर झाला होता. मुनीमखान, शिहाबुद्दीन अहमदखान, वगैरे लोकही त्याच्या बाजूचे होते. अकबराने मुनीमखानाच्या जागी शमसुद्दीन अरगाखान याला मुख्यमंत्री नेमल्यामुळे चिडून आधमखानाने अरगाखानाला ठार मारले व तो अकबराकडे खुलासा करण्यासाठी गेला. पण अकबराने त्याला ठार मारले.

अशा प्रकारे अकबराने दुसऱ्यांचे वर्चस्व झुगारून देऊन स्वतःचे व्यक्तिमत्त्व दाखवून दिले व प्रभुत्व प्रस्थापित केले. त्याने मुनीमखानाला पुन्हा मुख्यमंत्री नेमले.

इ. स. १५६२ च्या जानेवारी महिन्यात अकबराने अजमेरला जाऊन ख्वाजा मुइनुद्दीन चिस्तीच्या कबरीचे दर्शन घेतले. त्याच वेळी जयपूरचा राजा बिहारीमल याने अकबराला आपली कन्या दिली. ती मरियम उज्जमानी या नावाने प्रसिद्ध आहे. फत्तेपूर शिक्रीच्या शेख सलीम चिस्तीच्या आशीर्वादाने तिला जो पुत्र झाला त्याचे नाव सलीम ठेवले.

अकबर बादशहा अजमेरला गेला होता, तेव्हा त्याने, 'पुत्र झाल्यास ख्वाजा मुइनुद्दीन चिस्तीच्या दरग्याचे दर्शन घेण्यासाठी पायी यात्रा करीन' असा नवस केला होता. सलीम (जहांगीर) याचा जन्म झाल्यावर अकबराने तो नवस पुरा केला.

इ. स. १५६० पासून १५६७ पर्यंतच्या सात आठ वर्षांपर्यंतचा अकबराचा काळ मुख्यत्वे बंडे मोडण्यातच खर्च झाला. तेवढ्या कालात त्याने आपले राज्य बरेच सुस्थिरही केले. १५६४ पर्यंत अकबराचे सैन्य माळवा जिंकून राजस्थानात मेरटापर्यंत पोचले होते. राजस्थान अकबराच्या विरुद्ध धुमसू लागला होता. पण राजपूत राजांना जिंकून केवळ आपले साम्राज्य वाढविणे, एवढाच अकबराचा उद्देश नव्हता; तर त्या राजांशी मैत्री करून त्यांना आपल्या साम्राज्याचे हितचिंतक बनवावे, अशीही त्याची आकांक्षा होती. म्हणून त्याने राजपूत राजांना अभिवचन दिले की, 'तुम्ही जर माझे प्रभुत्व मान्य करून मला सैनिकी सहकार्य द्याल, आपसांतल्या लढाया थांबवाल आणि माझ्या आज्ञेनेच राज्यगादीवर बसाल, तर मी तुमच्या धर्मात, कारभारात आणि सामाजिक जीवनात हस्तक्षेप करणार नाही.'

त्याप्रमाणे जयपूर, जोधपूर, बीकानेर व जैसलमीर येथील राजपूत राजांनी अकबराच्या शर्ती मानल्या. त्यांनी अकबराशी मैत्री तर केलीच; शिवाय त्याला आपल्या घराण्यातल्या मुली देऊन त्याच्याशी वैवाहिक संबंधही प्रस्थापित केले. पण मेवाडचा राजा प्रतापसिंह अकबराविरुद्ध दंड थोपटून उभा राहिला. त्याचा बंदोबस्त करण्यासाठी अकबराने मानसिंहाला सैन्यासह तिकडे पाठवले. हळदीघाटात मानसिंह व राणा प्रताप यांचे घनघोर युद्ध झाले आणि त्या युद्धात प्रतापसिंहाचा पाडाव झाला. त्यामुळे इ. स. १५७६ मध्ये मेवाडही अकबराच्या साम्राज्यात समाविष्ट झाले. त्याआधी त्याने गुजरात, बंगाल व बिहार हे प्रांतही आपल्या सत्तेखाली आणले होते. अशा रीतीने १५–२० वर्षांच्या कारकिर्दीत अकबराने काबूलपासून आसामपर्यंत व पश्चिमेस गुजरातपर्यंत आपली सत्ता भारतात प्रस्थापित केली.

अकबराच्या राज्यविस्ताराचा कालक्रम –

इ. स. १५५६–राज्यप्राप्ती व पानीपत येथे हीमूचा पराभव.

इ. स. १५५७–शिकंदर सूरचा पराभव, ग्वाल्हेरचा किल्ला जिंकला, जौनपूर व अजमेर घेतले.

इ. स. १५६०–बैरामखानाला पदच्युत करून स्वतः राज्यकारभार करू लागला.

इ. स. १५६१–माळवा जिंकून घेतला आणि चुनारगड घेतला.

इ. स. १५६२–जयपूरचा राजपूत राजा भारमल याने अकबराची सत्ता मानली व आपली कन्या त्याला दिली. मेरटचा किल्ला घेतला.

इ. स. १५६४–गढमंडलची गोंड राणी दुर्गावती हिचा पराभव करून तिचे राज्य जिंकले.

इ. स. १५६७–चितोडवर स्वारी.

इ. स. १५६८–चितोडगड सर केला.

इ. स. १५६९–रणथंभोरचा किल्ला जिंकून घेतला. कांजिरही घेतले.

इ. स. १५७०–मारवाडमधील जोधपूर, बीकानेर व जैसलमीर या प्रदेशांच्या राजपूत राजांनी आपणहून अकबराचे स्वामित्व मान्य केले. बीकानेरच्या व जैसलमीरच्या राजांनी स्वकन्या देऊन अकबराशी स्नेहसंबंध जोडला. अशा प्रकारे मेवाड व त्याची अंकित राज्ये डुंगरपुर, बाँसवाडा व प्रतापगड वगळून संपूर्ण राजस्थानावर मोगलांची सत्ता प्रस्थापित झाली.

इ. स. १५७२–७३–गुजरातविजय.

इ. स. १५७४–७६–बिहार व बंगाल हे प्रदेश साम्राज्यात समाविष्ट केले.

इ. स. १५७६–हळदीघाटाची लढाई. मेवाडचा बराच भाग जिंकून घेतला.

इ. स. १५८१–८५–काबूलमध्ये अकबराचा सावत्र भाऊ मिर्झा हकीम याने बंड केले, ते मोडून अकबराने काबूल काबीज केले.

इ. स. १५८५–काश्मीर घेतले.

इ. स. १५८७–वायव्य सीमेवरील युसूफझाई टोळ्यांचा पराभव केला.

इ. स. १५९०–९१–सिंध प्रांत घेतला.
इ. स. १५९२–ओडिसा प्रांत जिंकला.
इ. स. १५९५–बलुचिस्तानवर प्रभुत्व व कंदाहार घेतले.
इ. स. १६००–अहमदनगरचे राज्य घेतले.
इ. स. १६०१–खानदेश घेतला.

अशा प्रकारे अकबराने ४५ वर्षांच्या कालावधीत एक विशाल साम्राज्य स्थापले. काबूलपासून बंगालपर्यंत व काश्मीरपासून गोदावरीपर्यंत त्याची सत्ता प्रस्थापित झाली. जिंकलेल्या प्रदेशांवर आपले सुभेदार नेमून तिथे चांगली शासन व्यवस्था सुरू करणे व शांतता प्रस्थापित करणे हे त्याचे धोरण होते.

एक उत्तम शासनकर्ता म्हणून अकबर बादशाहा प्रसिद्ध आहे. प्रजेचे हित हेच त्याचे ध्येय होते. त्याने सर्व साम्राज्याचे १५ विभाग पाडून सर्वत्र समान राज्यव्यवस्था सुरू केली. शेतीस उत्तेजन देणे, वसुलाची व्यवस्था चांगली ठेवणे आणि काटकसरीने खर्च करणे, हे त्याच्या राज्यव्यवस्थेतील विशेष गुण होते, असे अबुल फज़ल याने म्हटले आहे.

लोकांची आर्थिक, सामाजिक व धार्मिक उन्नती व्हावी म्हणून अकबराने अनेक कायदे केले. त्यांची अंमलबजावणी नीट व्हावी म्हणून अधिकारीही नेमले. तो जितका कठोर तितकाच दयाळूही होता. राज्यकारभारात तो फार दक्ष असून दिवसातील १५-१६ तास त्या कामी खर्च करीत असे.

समाजसुधारणेच्या दृष्टीने त्याने व्यभिचार व मद्यपानाचा अतिरेक हे गुन्हे ठरवून त्यासाठी कडक शिक्षा ठेवली. त्या काळी लढाईत पकडलेल्या सैनिकांना गुलाम करण्याची चाल होती, ती त्याने बंद केली. तो वृत्तीने धार्मिक असूनही त्याच्याजवळ कट्टरपणा नव्हता. त्याचे धार्मिक विचार उदार असून अंतःकरण विशाल होते. सर्व धर्मांच्या अनुयायांना समानतेने वागविण्याचे धोरण त्याने अवलंबिले होते. इ. स. १५६३ पर्यंत हिंदू यात्रेकरूंकडून तीर्थस्थानांच्या ठिकाणी यात्राकर वसूल केला जात असे; तो त्याने रद्द केला. त्याचप्रमाणे १५८१ मध्ये त्याने जिजिया करही रद्द केला.

अकबराला सर्व धर्मांतल्या श्रेष्ठ तत्त्वांविषयी आदर वाटत असे आणि त्यांचे ज्ञान मिळावे या हेतूने तो प्रत्येक धर्माच्या धर्मपंडितांना बोलावून त्यांच्याशी धर्मचर्चा करी. तो हिंदू व इस्लाम या दोहोंचाही प्रेमी होता; पण दोन्ही धर्मांतल्या कट्टरपणाची त्याला घृणा होती. धर्मांतर करणाऱ्या लोकांकडे तो तुच्छ नजरेने पाही. कारण त्याला वाटे, की जे लोक भीती किंवा लोभ या कारणांनी धर्म बदलतात, ते खरेखुरे धार्मिकच नव्हेत.




धर्म हा अकबराच्या बाबतीत राजनीतीचे साधन नव्हता

तर ती त्याच्या आत्म्याची अनुभवविषयक जिज्ञासा होती. अबुल फज्ल व बदायूनी यांच्या ग्रंथांवरून कळते, की अकबर सूफी साधूंप्रमाणे कधी कधी समाधी लावून बसत असे. त्या समाधीत तो अंतिम सत्याच्या पुष्कळसा जवळ जात होता, असेही त्यांनी लिहिलेले आहे.

मुसलमान असल्यामुळे त्याला असेही वाटे, की आपण इस्लामच्या तत्त्वांप्रमाणे चालावे. पण त्याच्या काळापर्यंत इस्लाम धर्मात अनेक पंथोपपंथ निर्माण झाले होते. त्यांत कोण खरा आणि कोण खोटा हे इस्लामी धर्मपंडितांच्या वादविवादांतून समजून घ्यावे, म्हणून तो प्रयत्न करी. त्याने फत्तेहपूर सिकरी येथे त्यासाठी एक इबादतखाना (प्रार्थनागृह) बनविला होता. तिथे तो अनेक प्रसंगी धार्मिक वादविवाद घडवून आणी. त्या वादसभेचा अध्यक्ष तो स्वतः राही. कित्येक वेळा अन्यधर्मीय, विशेषतः हिंदू पंडितांनाही इस्लामी पंडितांशी पूर्वोत्तर पक्ष करायला लावी व त्या वादाचा अंतिम निर्णय आपण देई. अशा प्रकारे स्वतःचे श्रेष्ठत्व इतरांना स्वीकारायला लावून अकबर देशाचा धार्मिक नेताही बनू लागला. इ. स. १५७९ मध्ये अकबर साम्राज्याचा प्रमुख इमाम या अधिकाराने मशिदीत खुतबा पढला. त्या वेळी राज्यातल्या प्रमुख उलेमांच्या सह्यांनिशी अशी घोषणा केली गेली, की 'इमाम–ए–आदिल (प्रमुख इमाम) अर्थात् अकबर सर्व धर्मपंडितांत श्रेष्ठ आहे व वादग्रस्त मामल्यांत त्याचा निर्णय सर्वांनी मान्य केला पाहिजे. जो न मानील तो दंडनीय ठरेल.'

त्याच्या या घोषणेने कट्टर मुसलमान भडकून उठले व त्यांनी अकबराचा भाऊ महम्मद हकीम याला मिळून बिहार व बंगाल या प्रदेशांत बंड उभारले. पण अकबर ते मोडून काढण्याच्या कामी समर्थ ठरला आणि त्यामुळे धर्माच्या बाबतीत अंतिम निर्णय देण्याचे पूर्ण स्वातंत्र्य त्याला मिळाले.

सर्व धर्मांचा समन्वय करून एक व्यापक धर्म निर्माण करण्याची त्याला तळमळ लागली होती. त्यातूनच त्याचा दीने इलाही हा नवा धर्मपंथ निर्माण झाला. दीने–इ–लाही याचा अर्थ ईश्वरी धर्म असा होतो. त्याला तौहीदे इलाही (एकेश्वरी धर्म) असेही म्हणतात.

(१) ईश्वरावर दृढ श्रद्धा असणे (२) अकबर हा ईश्वराचा बारावा इमाम आहे, या कल्पनेवर विश्वास ठेवणे (३) हत्या व मांसभोजन यांचा त्याग (४) स्त्रीसहवासात संयम व शुचिता आणि (५) वेळोवेळी भोजन व दान देणे ही या पंथाची मुख्य तत्त्वे होती. अबुल फज्ल हा त्या धर्माचा मुख्य आचार्य होता खरा; पण अकबर स्वतःच लोकांना त्या पंथाची दीक्षा देत असे. दीक्षित मनुष्य अकबराचे एक चित्र स्वतःच्या पगडीत ठेवी. त्यावर 'अल्ला हु अकबर' हे शब्द लिहिलेले असत. या पंथातली दोन माणसे भेटली, की अल्ला हु अकबर व जल्ले जलाल हु, या घोषणांनी परस्परांना अभिवादन करीत.

इ. स. १५९३ मध्ये त्याने धार्मिक स्वातंत्र्याबाबत कित्येक फर्माने काढली. त्यांत पुढील आज्ञा महत्त्वाच्या होत्या– (१) जबरदस्तीने बाटविला गेलेला हिंदू जर पुनश्च स्वधर्मात जाऊ इच्छीत असेल तर त्याला कोणीही अडवू नये. (२) कोणत्याही माणसाला धाकदपटशाने धर्मांतर करायला लावू नये. (३) प्रत्येक व्यक्तीला आपले धर्ममंदिर बनविण्याची पूर्ण स्वतंत्रता आहे. (४) विधवेला सक्तीने सती जायला लावू नये. लहानपणापासून हिंदूंशी घनिष्ठ संबंध आल्यामुळे त्याच्या आचारविचारांचे त्याला चांगलेच ज्ञान झाले होते. हिंदुधर्मातील पुनर्जन्म, कर्मवाद, इ. अनेक सिद्धान्त त्याला मान्य होते. रक्षाबंधन, दसरा, दिवाळी, वसंतपंचमी, इ. हिंदूंचे सण व उत्सव तो मोठ्या समारंभाने करी. हिंदूंप्रमाणे तो कपाळी टिळा लावी व डोक्याला साफाही बांधी.

अकबराने आपल्या जीवनात धार्मिक समन्वयाला मोठे स्थान दिले होते. जे चांगले वाटले, ते तत्त्व त्याने आपल्या आचरणात आणले होते. त्याने पारशी धर्मातील अग्नीची उपासनाही सुरू केली होती. नवरोजसारखे काही पारशी सणही तो साजरे करी. तो सूर्याचीही उपासना करी. जैन धर्माचाही त्याच्यावर प्रभाव



अकबर बादशहा

पडला होता. पण या सर्वांत त्याच्यावर विशेष प्रभाव होता तो हिंदुधर्माचा.

दीने इलाहीच्या स्थापनेनंतर अकबराने दरबारातले मुसल-

मानी सण बंद केले, मशिदी बंद केल्या व गोमांसभक्षणासही बंदी केली. परंतु धर्मसंस्थापकाला आवश्यक असणारी कट्टरता त्याच्या अंगी नव्हती. धर्मप्रसारासाठी आवश्यक तो दीर्घोद्योगही त्याच्या हातून झाला नाही. त्यामुळे त्याचा दीने इलाही पंथ प्रसार पावला नाही. त्याला सुमारे एक हजारच अनुयायी मिळाले. बिरबलाशिवाय कोणीही प्रतिष्ठित हिंदू त्यात सामील झाला नाही. साम्राज्याच्या स्थिरतेसाठी मुस्लीम धर्म अयोग्य म्हणून अकबराने त्याचा त्याग केला; पण ते स्थान त्याच्या नवीन धर्माला मिळू शकले नाही. त्याची सहिष्णू वृत्ती व अनाग्रही बुद्धी यामुळेच त्या नवीन धर्माची पाळेमुळे त्याच्या साम्राज्यात खोलवर गेली नाहीत. अकबराबरोबरच त्याचा तो धर्म लयाला गेला. अकबराचे जीवन व कार्य या विषयी प्रा. नरहर कुरुंदकर यांनी प्रकट केलेले विचार असे –

अकबराच्या जीवनाच्या जसजसे आपण शेवटाकडे येतो तसतसे एक विसंवादी चित्र आपल्याला दिसू लागते. त्याने एक बलवान आणि प्रचंड साम्राज्य निर्माण केले. विविध युद्धांचा जेता, राज्यकारभारधुरंधर आणि वैभवशाली साम्राज्याचा निर्माता या दृष्टीने तो सफल आयुष्य जगलेला आहे. अपार भोग, अपार व्यसने आणि अपार वैभव असे त्याच्या जीवनाचे एक दर्शन आहे.

पण दुसऱ्या बाजूने पाहिले तर हे जीवन विफल आहे. जी नवीन समाजरचना तो निर्माण करू इच्छित होता, तिला समाजात कोणताही पाठिंबा तो मिळवू शकला नाही. निरनिराळ्या सुधारणांविषयी फर्मानांमागून फर्माने तो काढीत होता. या सुधारणा देशभर व्यापक प्रमाणावर अमलात आणणे त्याला जमले नाही.

एखादी लाट उसळावी आणि पूर्णपणे विरून जावी, तसा अकबराचा सर्व प्रयत्न वाया गेलेला आहे. भारतीय समाजमनाला काही आकार देण्यात अकबराला अल्पसुद्धा यश आले नाही.

अकबराकडे उदारमतवादी आणि सहिष्णू राजा म्हणून पाहणे अपुरे आहे. त्याच्या जीवनाकडे एका कर्तबगार राजाने केलेला आणि; संपूर्णपणे अयशस्वी झालेला समाजपरिवर्तनाचा प्रयोग म्हणूनच पाहिले पाहिजे. अकबर मनाने आपल्या काळाच्या फार पुढे गेलेला माणूस होता. आणि हे त्याच्या अपयशाचे एक प्रमुख कारण आहे.

अकबर हा निरनिराळ्या धर्मांच्या पंडितांशी चर्चा करीत होता. या चर्चेमुळे काही बदल होत असेल, तर तो अकबराच्या भूमिकेत होत होता. शैव, वैष्णव, जैनांनी अकबराचे कौतुक केले. हे कौतुक परधर्मसहिष्णुतेबद्दल आहे. पण त्यांनी अकबराची भूमिका कधीच मान्य केली नाही. अकबराचे शत्रू असोत, मित्र असोत ते सगळे कर्मठ धार्मिकच होते. २५–३० जणांचा एक गट सोडल्यास वैचारिक दृष्टीने अकबराशी सहमत कुणीच नव्हते. अकबराच्या विचाराला पाठिंबा देणारे विविधधर्मीय पुरोगामी विचारवंतांचे लोक – आंदोलन नव्हतेच. राजवाड्यात जमून ५–२५ जण काय विचार करीत आहेत, याची जनतेला खबर नव्हती आणि जनतेत आपला विचार हजारो, लाखोंच्या संख्येने अनुयायी तयार करून रुजवला पाहिजे याची या मंडळींना जाणीव नव्हती. लोकमानसात कोणताच पाठिंबा नसणारा हा विचार जसा जन्मला तसा विरघळला. याहून अधिक काही घडणे शक्य नव्हते.

दुसरी गोष्ट अशी की लोकांनी त्याला आपला वैचारिक व नैतिक नेता मानावे असे अकबराचे जीवन नव्हते. तो सतत लढत होता. नवनव्या प्रदेशावर तो शस्त्रबळाने ताबा मिळवत होता. या जनतेने त्याचे राज्य बोलाविलेले नव्हते. त्याचे राज्य चांगलेही असेल. तुलनेने सुखाचे आणि सहिष्णुतेचे असेल, पण हे जनतेचे राज्य नव्हते. भारताच्या बहुतेक भागात अकबर हा जनतेच्या श्रद्धेचा भाग असलेली राज्ये उद्ध्वस्त करणारा आक्रमक होता. असा आक्रमक शांतता व सुव्यवस्था देऊ शकतो. पण लोकांना नवीन राष्ट्रीय चेतना देऊ शकत नाही. राष्ट्रनिर्माता होणे हे अकबराला भारतात शक्य नव्हते.

अकबराच्या कारकिर्दीत साहित्य, संगीत व कला यांचा खूप उत्कर्ष झाला. त्याने अनेक पंडितांना व कलावंतांना आपल्या दरबारात आश्रय दिला होता. अबुल फज़ल, फैझी, बदायूनी, बिरबल, तोडरमल, मानसिंग, तानसेन, ही त्याच्या नवरत्नांपैकी काही रत्ने सुविख्यात आहेत. त्यांच्यामुळे त्याच्या कारकिर्दीत विद्वत्ता व कलाकौशल्य या गुणांची चांगलीच जोपासना झाली. त्याने फारसी व संस्कृत साहित्याच्या निर्मितीलाही खूपच उत्तेजन दिले. अथर्ववेद, भगवद्‌गीता, रामायण, महाभारत, हरिवंश, लीलावती, पंचतंत्र, नल-दमयन्ती आख्यान, योगवासिष्ठ, राजतरंगिणी, इ. संस्कृत ग्रंथांचे त्याने विद्वानांकडून फारसी भाषेत भाषांतर करवून घेतले. त्याच्या काळात लिहिलेले अनेक फारसी इतिहासही उपलब्ध आहेत. अकबराची राजवट म्हणजे हिंदी काव्यरचनेचे सुवर्णयुगच मानले जाते. तुलसीदास, सूरदास, रहीम, रसखान, बिरबल, हे श्रेष्ठ कवी त्याच्याच काळात होऊन गेले. चित्रकला, शिल्पकला, इ. कलांचाही त्या काळात बराच उत्कर्ष झाला. अकबराला संगीताची फार आवड होती. तो उत्तम संगीतज्ञही होता. तानसेनसारख्या अलौकिक गायकाला राजाश्रय देऊन त्याने आपले नाव संगीताच्या क्षेत्रात अमर केले. हिन्दू व मुसलमानी संगीताचे मिश्रण करून एक निराळेच हिन्दुस्थानी संगीत निर्माण करायला अकबरानेच प्रेरणा दिली.

अकबराची बुद्धी शोधक होती. त्याला यांत्रिक प्रयोगांचीही

आवड होती. तो उद्योगप्रिय होता. त्याचा बांधा मध्यम आकाराचा; पण सुडौल होता. त्याचा रंग गव्हाळी असून डोळे काळे होते. त्याची वाणी स्पष्ट व भारदस्त होती. तो शूर होता, तसाच कुशल सेनानीही होता.

अकबराची शेवटची चारपाच वर्षे फार दुःखात गेली. त्याचा मोठा मुलगा सलीम बापाविरुद्ध उठला. अकबराचा जिवलग मित्र व कारभारी अबुल फज़ल याचा त्याने खून करविला. त्याचे दुसरे दोन मुलगे मुराद व दानियल दारूच्या व्यसनामुळे मरण पावले. आणि इ. स. १६०४ मध्ये त्याची आई हमीदा बानू मरण पावली. या सर्व घटना अकबराला अखेरच्या काळात अत्यंत असह्य ठरल्या आणि अशा अवस्थेत १५ ऑक्टोबर १६०५ रोजी त्याला मृत्यू आला. जगात जे अनेक थोर सम्राट होऊन गेले, त्यांत अकबराची गणना होते. [ मु. का. भा.; हिं. वि. को.; म. ज्ञा. को.; 'सोबत' दिवाळी-अंक, १९७६ ]

**अकरमासे** अकरमासे म्हणजे पूर्ण बारा मासे नव्हेत असे, म्हणजेच ज्यांच्यांत काही न्यूनत्व आहे असे लोक. पूर्वी श्रीमंत मराठे लग्नप्रसंगी आपल्या जावयाला एखादी सुंदर स्त्री आंदण म्हणून देत. अशा स्त्रियांच्या संततीला पुढे अकरमासे म्हणू लागले. ही जात ठाणे व पश्चिम खानदेश या जिल्ह्यांत आढळते. यांना कडू, शितळे, लेकावळे अशीही नावे आहेत. यांच्यांतही अस्सल व कमअस्सल असे दोन वर्ग आहेत. मराठा स्त्रीला ब्राह्मण व मराठा पुरुषापासून झालेली संतती ती अस्सल. व खालच्या दर्ज्याच्या पुरुषापासून झालेली ती कमअस्सल. सध्या यांचे व्यवसाय दुकानदारी, शेती, सुतारकी, लोहारकी, वगैरे आहेत. हे मराठी बोलतात. यांची राहाणी स्वच्छ आणि डामडौली असते. पेहेराव मराठी धर्तीचा असतो. हे मद्यमांस सेवन करतात. यांच्यांत स्मार्त व भागवत हे दोन्ही पंथ आहेत. हे ब्राह्मण उपाध्यायांकडून धर्मकृत्य करतात. जातिसभा असते ती तंट्यांचा निवाडा करते. यांना विधवाविवाह संमत आहे. हे मृतांना जाळतात किंवा पुरतात. [ म. ज्ञा. को. ]

**अकरावा** मनुष्य मरण पावल्यापासून अकराव्या दिवशी मृतासाठी दाने व वृषोत्सर्गादी विधी करतात, त्या दिवसाला हे नाव आहे. पाहा – अंत्यक्रिया.

**अकरे** देवापुढे लावण्यासाठी ११ वाती किंवा पिठाचे ११ दिवे करतात, त्यांना हे नाव आहे. अकरे हे चढत्या म्हणजे एक, दोन, तीन, चार व उतरत्या म्हणजे अकरा, दहा, नऊ, आठ अशा क्रमाने देवापुढे लावण्याची पद्धत आहे.

**अकलंकदेव** ( इ. स.चे ७ वे शतक ) दिगंबरपंथीय जैन आचार्य. याला कवी अशी पदवी होती. हा मोठा विद्वान व महातार्किक होता. याने बौद्ध पंडितांशी वादविवाद करून बौद्ध धर्माच्या प्रभावापासून दक्षिण भारतातील जैन दर्शनाचे संरक्षण केले. याने जैन तर्कशास्त्रात मोलाची भर घातली आहे. गृध्रपिच्छविरचित तत्त्वार्थसूत्रांवर तत्त्वार्थवार्तिक हा ग्रंथ लिहून याने जैन सिद्धांतावरील विविध आक्षेपांचे निराकरण केले. समंतभद्रकृत आप्तमीमांसा या ग्रंथावर याचे अष्टशती नावाचे स्वल्पाक्षर; पण अर्थगंभीर असे भाष्य आहे. त्यात जैनांच्या स्याद्वादाचे प्रभावी समर्थन आढळते. प्रमाणसंग्रह, न्यायविनिश्चय, सिद्धिविनिश्चय व लघीयस्त्रय हे चार प्रकरणग्रंथ लिहून याने जैन प्रमाणशास्त्राची व्यवस्थित पुनर्रचना केली.

तत्त्वज्ञानाच्या सर्वंकष अभ्यासाला प्रोत्साहन देणे हे अकलंकदेवाचे दुसरे महत्कार्य. सिद्धिविनिश्चय या ग्रंथात त्याने निरनिराळ्या सोळा विषयांचा जो ऊहापोह केला आहे, त्यावरून हे स्पष्ट होते. आपल्या वेळी उपलब्ध व प्रचलित असलेल्या सर्व तत्त्वज्ञानप्रवाहांचा अभ्यास करून त्यांवर ज्ञानकोशाच्या स्वरूपाचे व्यापक ग्रंथ लिहिण्याची जी प्रथा पुढे वाचस्पतिमिश्र, उदयन, शांतरक्षित, इ. प्रायः सर्व दर्शनकारांनी चालू केली, तिचा प्रारंभ अकलंकदेवाच्या ग्रंथांपासून झाला आहे, असे म्हणता येते. याचा धर्मकीर्तीबरोबर निर्देश केला जातो. याने कांची येथील हिमशीतल राजाच्या दरबारात बौद्धांचा पराभव केला आणि त्यामुळे दक्षिणेतून बौद्धांची हकालपट्टी झाली, असे रामस्वामी अय्यंगार लिहितात.

अकलंक हा तार्किक असला, तरी त्याचे अंतःकरण भक्ताचे होते, हे त्याच्या अकलंकस्तोत्रावरून कळून येते. तो म्हणतो–

त्रैलोक्यं सकलं त्रिकालविषयं सालोकमालोकितं
साक्षाद्येन यथा स्वयं करतले रेखात्रयं साङ्गुलि ।
रागद्वेषभयामयान्तकजरालोलत्वलोभादयो
नालं यत्पदलङ्घनाय स महादेवो मया वन्द्यते ।।

अर्थ – ज्याने त्रिकालविषय असे सकल त्रैलोक्य हाताची बोटे आणि त्यांवरील रेषा यांच्याप्रमाणे साक्षात अवलोकन केले आहे व राग, द्वेष, भय, रोग, मृत्यू, जरा, चंचलता, लोभ, इत्यादी विकार ज्याच्या पदाचे उल्लंघन करायला असमर्थ आहेत, अशा त्या महादेवाला (महावीर ?) मी वंदन करतो. [ श्री. विद्याधर जोहरापूरकर – नवभारत, जाने. १९५६; म. च. को. ]

**अका** भारताच्या ईशान्य प्रदेशातील डोंगरांत राहणारी एक पहाडी जमात. भोरोली नदीच्या काठी यांची वस्ती आहे. लोक त्यांना अका म्हणत असले, तरी ते स्वतःला 'न्हुसो'

म्हणवितात. यांच्या दोन टोळ्या आहेत– (१) हजारीखावा अर्थात हजार चुलींवरचे खाणारे व (२) कापाचोर अर्थात कापसाच्या झाडांत दडून बसणारे (चोर). अका हे मुळापासून बंडखोर वृत्तीचे आहेत. यांची लोकसंख्या अत्यल्प आहे. इतिहासकाळात हे आसामात उतरून दंगल करीत व लोकांना लुबाडीत. त्यांचा बंदोबस्त करणे अशक्य ठरल्यावरून आसाममधील राजांनी त्यांना 'पोजा'चा अधिकार दिला होता. पोजा याचा अर्थ धाकदपटशा असा होतो. त्या हक्कानुसार आसामी राजे त्यांना आपल्या खंडणीतला काही वाटा देत. इ. स. १८२५ च्या सरकारी दप्तरखान्यातील माहितीवरून असे कळते, की हजारीखावा हे आपापल्या नेमून घेतलेल्या प्रदेशांत घरोघरी जाऊन स्वतःच खंडणी वसूल करीत.

आसामात ब्रिटिश सत्ता स्थापन झाल्यावर ब्रिटिशांना अका जमातीने लोकांकडून खंडणी वसूल करणे, ही गोष्ट पसंत पडली नाही. त्यासाठी ब्रिटिश सरकार आपल्या तिजोरीतून त्यांना खंडणी देऊ लागले.

कापाचोरांचा तंगी नावाचा एक पुढारी होता. त्याने आपल्या भोवतालच्या प्रदेशात दहशतीचे राज्य सुरू केले. आसामचे सरकार त्याच्या पाठीमागे लागले. पुढे ब्रिटिशांनी आसाम घेतल्यावर तेही त्याचा पिच्छा पुरवू लागले. पुढे हळूहळू कापाचोर व



अका कुटुंब

हजारीखावा यांच्यांत अंतर्गत भांडणे सुरू करून भेदनीतीच्या बळावर ब्रिटिशांनी तंगीला पकडले. त्याला गौहाटीच्या तुरुंगात ठेवण्यात आले होते; पण तिथूनही तो निसटला. पुढे इ. स. १८४१ पर्यंत त्याने खून, लूटमार व पळवापळवी यांचे जणू सत्रच चालू केले. त्याला आणि त्याच्या टोळीला पकडण्यासाठी ब्रिटिश सरकारला खूपच खटाटोप करावा लागला.

अका हे सहा हजार फूट उंच डोंगरांत राहतात. आपण त्या प्रदेशात कुठून आलो, याबद्दल ते पुढील आख्यायिका सांगतात – आमचे पूर्वज खालच्या सपाटीवर विशनाथाच्या उत्तरेस गिलधरी नदीच्या काठी राहत होते. कृष्ण व बलराम यांनी त्यांना तिथून हुसकावून लावले व ते या डोंगराळ भागात आले.

तर्क असा आहे, की आहोम टोळीवाले आसामात घुसले, त्यांच्या पूर्वीच हे लोक आसामचे रहिवासी झालेले असावे व आहोमांनी पिटाळून लावल्यामुळे, ते नेफाच्या डोंगराळ भागात येऊन स्थायिक झाले असावे. यांची संख्या अत्यल्प असून यांच्या दोन वेगवेगळ्या वसाहती आहेत. मोठ्या वसाहतीत कापाचोर व लहान वसाहतीत हजारीखावा राहतात. यांचीच एक तिसरी टोळी आहे. तिला अंकामिरी म्हणतात. अंका लोक मिजी लोकांना आपले मित्र मानतात. मिजी हे बहुसंख्य आहेत. अका लोक संकटप्रसंगी मिजींची मदत घेतात. मिजी हे सखल प्रदेशात क्वचितच येतात. अकांच्या दहा कुळ्या आहेत.

अका लोक तीरकमठा, भाला, तलवार व बंदूक ही हत्यारे कौशल्याने चालवितात. ते ती स्वतःच बनवितात. गनिमी युद्धात ते प्रवीण असतात. त्यांचा पोजाचा हक्क आजमितीपर्यंत त्यांनी चालू ठेवला आहे. दरवर्षी माघ-फाल्गुनात ते सपाटीला उतरून तिथल्या लोकांपासून पोजा वसूल करतात.

हरिदेव हा त्यांचा मुख्य देव आहे. याशिवाय फुक्सू हा जंगलाचा व पाण्याचा देव, फिरान व सिमन हे युद्धाचे देव व सातू हा गृह आणि शेती यांचा देव होय. त्यांची अन्यही काही दैवते आहेत. ते आपल्या देवांसाठी मंदिरे अथवा झोपड्या बनवितात. त्यांच्या देवप्रतिमा चांदीच्या किंवा सोन्याच्याही असतात. या प्रतिमा त्यांना त्यांचे शेजारी भोटिया यांच्याकडून मिळाल्या असाव्या, असे वाटते. ते देवांच्या पुजाऱ्याला देवरी म्हणतात. देवरीची निवड दैवी दृष्टांतानुसार होते. देवपूजा आणि बलिकर्म देवरी करतो. अका लोक देवांना गायी, बकऱ्या, कोंबडी आणि कबुतरे यांचे बळी देतात. त्यांचा शकुनावर फार विश्वास आहे.

घर बांधताना ते प्रथम त्या जागी बलिदान करतात व फुक्सूची पूजा करतात. घरे बळकट बांधतात. छप्पर एक प्रकारच्या रुंद पानांचे करतात. कुटुंबातली सर्व माणसे व कुटुंबातले दास, सर्व मिळून एकाच घरात राहतात. घरात तांब्या-पितळेची भांडी वापरतात; मातीची वापरीत नाहीत. धान्याची कोठारे व गुरांचे गोठे घरापासून लांब ठेवतात. त्यांना औषध माहीत नाही. ते रोग्याला उपचार म्हणून देवरीकडून गंडे, दोरे बांधून घेतात. ते लुटारू असले, तरी चांगले शेतकरीही आहेत. अन्नोत्पादनाच्या बाबतीत ते स्वावलंबी आहेत. ते भात व भाजीपाला पिकवितात; गायी बाळगतात व त्यांचे मांस खातात; पण दुधाला मात्र स्पर्श

करीत नाहीत. डुकरे, कोंबडी व कबुतरेही पाळतात. त्यांना अफूचे जबरदस्त व्यसन असते. बायकाही त्यातून सुटलेल्या नाहीत. ते मोड नावाची कडक दारू स्वतःच बनवून पितात. त्यांचा पोषाख आसाममधल्या इतर टोळीवाल्यांसारखाच असतो. त्यांचे शिरस्त्राण वेताचे बनविलेले व तीन इंच उंच असते. त्याला दोन पिसे लावतात. अकांचे शरीर धडधाकट व पिळदार असते.

अकांमध्ये बहुपत्नीकत्वाची चाल आहे. अका आणि मिजी यांच्यांत बेटीव्यवहार होतो. विवाहाच्या दिवशी देवांच्या कृपेसाठी बलिदान करतात. जमलेल्या मंडळींना त्याच पशूंची मेजवानी मिळते. विवाहाचा सोहळा पाच दिवस चालतो. वधूवरांना कापडाच्या छताखाली उभी करून देवरी त्यांच्याभोवती एक कापडाचा तुकडा हलवितो व ती दोघे पति-पत्नी झाल्याचे जाहीर करतो.

हे लोक स्त्री प्रसूत होत असता पशुबली देतात. मुलां-मुलींत भेद करीत नाहीत.

हे लोक प्रेते पुरतात. प्रेताच्या शेजारी त्याची हत्यारे ठेवतात. उरलेल्या जागेवर वस्त्र पसरवून त्याच्या भोवती बांबूचे कुंपण घालतात. पाहा – मिजी. [ इं. नॉ. फ्रॉं. ना. सें. ]

**अकाली** एक धार्मिक पंथ. अकाल म्हणजे कालरहित किंवा ज्याच्यावर कालाची सत्ता चालत नाही तो; म्हणजेच परमेश्वर होय. आणि त्याची उपासना करणारा तो अकाली होय. काही लोक त्याचा अर्थ कालालाही न डरणारा असा करतात. शीख धर्मात या शब्दाला विशेष महत्त्व आहे. गुरु नानकदेव यांनी कालातीत परमेश्वराची उपासना अकाल या नावाने प्रचलित केली. ' जातिगत, धर्मगत व देशगत भावांतून मुक्त होऊन विश्वातल्या समस्त धर्मांच्या लोकांवर प्रेम करावे. त्यांच्याशी विरोध न धरता मैत्रीभावाने वागावे. कारण सर्व मानवजात त्या अकाल पुरुषाचीच संतती आहे.' असा गुरू नानक यांचा उपदेश आहे. ' सत् श्री अकाल ' ही या पंथाची घोषणा आहे.

याच परंपरेत पुढे शिखांचा सहावा गुरू हरगोविंद याने अमृतसरच्या सुवर्णमंदिरासमोर अकालतख्त स्थापन केले. त्याला अकालबुंग असे नाव आहे. बुंग म्हणजे ज्यावर घुमट आहे, असे एक महाभवन.

या अकालबुंगात अकाली लोकांच्या गुप्त मंत्रणा व चर्चा होऊ लागल्या. त्यांत जे निर्णय होत त्यांना गुरुमतां अर्थात गुरूचा आदेश असे नाव दिले गेले. धार्मिक समारंभाच्या स्वरूपात अकाली लोकांची तिथे अनेक संमेलने भरत. पण त्यांचा मुख्य उद्देश मोगलांच्या अत्याचारांपासून जनतेचे रक्षण कसे करावे, हाच असे. याच कारणामुळे अकाली चळवळीला राजनैतिक वळण लागले. जो नामवाणीचा प्रेमी, त्यागी आणि विरक्त असेल, तोच अकालबुंगाचा सभासद होऊ शके. अकाली लोक शूर, निर्भय आणि स्वतंत्र असत. बाल, वृद्ध, दुबळे आणि अबला यांचे प्राणपणाने संरक्षण करणे, हा ते आपला धर्म समजत.

इ. स. १६९९ साली गुरू गोविंदसिंह याने खालसा पंथ स्थापला. अकाली लोकच त्या पंथाचे अनुयायी होते. औरंगजेबाच्या अत्याचारांना सामना देण्यासाठी अकाली लोक सेनादलाच्या स्वरूपात संघटित झाले. निळे वस्त्र आणि पाच ककार (कच्छ, कडा, कृपाण, केश व कंघा) धारण करण्याची गुरूने त्यांना आज्ञा केली. तेव्हापासून पाच ककार हे अकाली पुरुषांना अनिवार्य ठरले आहेत. त्यांच्या लष्करी बाण्यामुळे त्यांना निहंग अशीही संज्ञा मिळाली. निहंग हा फारसी शब्द असून, त्याचा अर्थ निर्भय असा आहे. शिखांच्या इतिहासात अकालींनी महत्त्वाची कामगिरी बजाविली आहे. निहंग ब्रह्मचर्याने व साधुवृत्तीने राहत. ते दलितांचे आणि दुर्बलांचे संरक्षण करीत, तसाच शीख धर्माचा प्रचारही करीत. हे भ्रमणशील असत. अफगाणांच्या आक्रमणांना तोंड देणे व अत्याचारी टोळ्यांपासून हिंदू स्त्रियांचे रक्षण करणे हे त्यांचे नित्याचे कार्य होते.

महाराजा रणजितसिंह (इ. स. १७८० ते १८३९) याच्या काळात अकाली सेनादल उत्कर्षाच्या शिखरावर होते. या अकाली सैन्याच्या बळावरच मुलतान, काश्मीर, अटक, नौशेरा, जमशेद व अफगाणिस्तान इथवर रणजितसिंहाने आपला राज्यविस्तार केला. फुलासिंग हा त्या वेळी अकालींचा पुढारी होता. हा त्या पंथाच्या सर्व गुणदोषांचे प्रतीक होता. इ. स. १८०९ मध्ये अमृतसर येथे मेटकाफच्या तुकडीवर हा आपल्या दलासह तुटून पडला आणि त्यामुळेच प्रसिद्धीस आला. इ. स. १८१८ मध्ये वेढ्यात सापडलेला मुलतानचा किल्ला याने जबरदस्त पराक्रम करून सर करण्याच्या बेतात आणला होता. रणजितसिंहाने हा त्याचा पराक्रम पाहून त्याला सिंधच्या खोऱ्यात मुख्य अधिकारी नेमले. पुढे १८२३ मधील तेरीच्या लढाईत त्याने आपल्या दलासह युसफझईवर चढाई केली. युसफझईचा पराभव झाला खरा; पण फुलासिंगाला त्या युद्धात मरण आले. त्याचे स्मारक नौशेरा येथे असून हिंदू व मुस्लीम दोन्ही जाती त्याला मान देतात.

अकाली लोकांबद्दल फुलासिंगाच्या पूर्वीपासूनच त्यांच्या शत्रूंना व मित्रांनाही दरारा वाटत असे. शीख सरदारांनाही त्यांची भीती वाटे. पुष्कळदा अकाली लोक त्यांच्याकडून बल-प्रयोगाने खंडणी वसूल करीत. इ. स. १८२३ नंतर रणजितसिंहाने हळूहळू त्यांचे महत्त्व नष्ट केले. इंग्रजांनाही अकालींचा धाक वाटत होता.

ते अनेक मार्गांनी त्यांना दाबण्याचा प्रयत्न करीत होते.

शीख गुरूंनी आपल्या धर्माच्या प्रसारासाठी अनेक गुरुद्वारे स्थापले व त्यांच्या योगक्षेमासाठी रणजितसिंहाने मोठमोठ्या जहागिऱ्या लावून दिल्या होत्या. इंग्रजी राज्यात या जहागिऱ्यांचे अधिकार ज्यांच्या हातांत होते, त्यांच्यापैकी पुष्कळसे महंत पुढे दुराचरणी बनले. त्यांच्यामुळे शीख धर्माला कलंक लागण्याची वेळ आली. गुरुद्वारे ही अनीतीची आगरे बनली. अशा महंतांच्या हातांतून गुरुद्वाऱ्यांचा उद्धार करण्यासाठी १९२० साली अकाली तरुणांनी आपले नवे सेनादल संघटित केले. त्यांनी अनेक ठिकाणच्या मठांतून दुराचरणी महंतांना हुसकावून देऊन ते मठ आपल्या ताब्यात घेतले. या कार्यात अनेक अकाली वीरांना आत्मबलिदानही करावे लागले. ब्रिटिश सरकारने सुरुवातीस महंतांना बरीच मदत केली; पण शेवटी अकाली दलाचाच विजय झाला. इ. स. १९२५ पर्यंत सगळे गुरुद्वारे शिरोमणी गुरुद्वारा कमिटीच्या सत्तेखाली आले. या कामी अकाली लोकांना म. गांधींनी पुष्कळ मदत केली व भारतीय काँग्रेसनेही अकाली आंदोलनाचा पुरस्कार केला.

इ. स. १९२५ साली ब्रिटिश सरकारने गुरुद्वारा कायदा निर्माण केला. तदनुसार १९२६ साली गुरुद्वाराप्रबंधक समितीचे पहिले निर्वाचन झाले. या समितीचे प्रमुख कार्य गुरुद्वाऱ्यांची देखरेख, धर्मप्रचार, विद्याप्रसार, इ. आहे. शिरोमणी गुरुद्वाराप्रबंधक समितीहून वेगळे असे एक केंद्रीय शिरोमणी अकाली दल अमृतसर येथे स्थापन झाले आहे. त्याचे जत्थे प्रत्येक जिल्ह्यात गुरुद्वाऱ्यांची व्यवस्था आणि जनसेवा इत्यादी कामे करतात. पाहा— शीख धर्म; हरगोविंद; नानक [ हिं. वि. को. ]

**अकुटी बोंगा** याचा वाच्यार्थ वाकडे किंवा कमानीसारखे भूत असा होतो. हा मुंडांचा एक देव आहे. याने पछाडले, की माणसाला धनुर्वात होतो, असे समजतात. याच्या बलिदानाचा विधी पुढीलप्रमाणे—

कर्ता आपल्या घराशेजारी सूर्याचा पहिला किरण पडेल अशा जागी कुंपण घालून थोडीशी जागा बंदिस्त करतो. मग तो आतली जागा शेणाने सारवितो व तिथे एक चटई पसरतो. मग तो अकुटी बोंगाची पूजा करतो. त्यासाठी कर्त्याला खाण्यापिण्याबाबत काही निबंध पाळावे लागतात. या बोंगाचे बळी मासिक व वार्षिक असे दोन प्रकारचे असतात. लाल रंगाचा बोकड, लाल कोंबडा, तांदुळांची दारू, गव्हाच्या पिठात साखर मिसळून बनविलेली मिठाई, हे बळीचे प्राणी व पदार्थ असतात. दोन्ही प्रकारचे बळी सोमवारी किंवा रविवारी देतात. या विधीचे आणखीही बरेच तंत्र आहे. [ एन्सा. मुंडा. ]

**अक्क देवतलू** आंध्र प्रदेशातील कोळी लोकांच्या देवता. या पूर्वी एका घरच्या बहिणी होत्या. त्यांनी एके दिवशी भांडण करून एकमेकींस ठार मारले. म्हणून त्या भूतयोनीत गेल्या. पुढे त्या घरात बाखा उत्पन्न झाला. त्या वेळी एका भगताच्या अंगात येऊन त्यांनी सांगितले, की 'आमची पूजा कराल तरच वचावाल.' त्या दिवसापासून तिथले कोळी त्यांना भजू लागले. समुद्रात मच्छीमारीला जाण्यापूर्वी ते त्यांना बलिदान करतात. यांच्या ओबडधोबड मृण्मय मूर्ती टेकडीवर समुद्राकडे तोंड करून वसविलेल्या असतात. त्यांना कोणी स्पर्श करायचा नसतो. [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

**अक्क महादेवी** (इ. स. ११६० चा सुमार) एक वीरशैव भक्त. कर्नाटक राज्याच्या शिमोग्ग (शिमोगा) या जिल्ह्यात हिचा जन्म झाला. हिच्या बापाचे नाव विमल व आईचे सुमती होते. ही अत्यंत रूपमती होती. तिला पाहून त्या प्रदेशाचा जैन राजा कौशिक मोहित झाला व त्याने तिला मागणी घातली. पण हे लग्न व्हावे असे तिच्या मनात नव्हते. कारण, समजायला लागल्यापासून तिने पर शिवाला आपला पती मानले होते. तिची धारणा होती, की आपले लग्न चेन्न मल्लिकार्जुनाशी केव्हाच लागले आहे. ती म्हणते—

'आई, माझा प्रियकर अरूप असूनही रूपवान आहे. तो मृत्युरहित आहे. तो अवकाश, व्यवधान व चिन्ह यांनीही रहित आहे. तो अभय, अकुल, असीम आहे. तोच माझा पती. इतर मरणधर्मी पती खड्ड्यात जाऊ देत.' (वचनशास्त्रसार)

पण आईवडिलांनी गळ घातली म्हणून व राजाज्ञा मानली नाही, तर आपल्या आईबापांवर संकट ओढवेल म्हणून ती त्या लग्नाला तयार झाली. मात्र तिने राजाला अट घातली, की 'माझ्या पूजोपासनेत तू व्यत्यय आणता कामा नये; तसे झाल्यास मी तुझ्यापासून वेगळी होईन.'

राजाने ती अट मानली; पण पाळली मात्र नाही. अखेर त्याची भोगासक्ती तिला असह्य झाली व तिने त्याचा त्याग केला. ती चेन्नबसवाच्या शोधासाठी बाहेर पडली. लोकांनी तिला परावृत्त करण्याचा खूप प्रयत्न केला; पण तिने कोणाचेही मानले नाही. स्त्री ही अबला असली तरी तीही सबला होऊ शकते, हे तिने आपल्या चरित्राने सिद्ध केले. अध्यात्मसाधनेच्या क्षेत्रात तिची कीरवाणी असामान्य ठरली आहे. ती म्हणते—

'ज्याने डोंगरात घर बांधले, त्याने जंगली जनावरांना घाबरता कामा नये. समुद्रावर घर करणाऱ्याने लाटांना डरता कामा नये. बाजारात बिऱ्हाड मांडील, त्याने कोलाहलाला घाबरता कामा नये. हे चेन्न मल्लिकार्जुन ! त्याचप्रमाणे मी या संसारात

जन्म घेतला आहे; तेव्हा मलाही निंदास्तुतीच्या आघातांना न भिता शांतीनेच सर्व साहिले पाहिजे.' (वचनधर्मसार)

अक्क महादेवी संसारत्याग करून कल्याणक्षेत्री गेली. तिथे तिने मधुर भक्ती व उज्ज्वल चारित्र्य या गुणांनी अनेक शिवशरणांना सन्मार्ग दाखविला. आपले वीर वैराग्य व निर्भय शिवशरणता यांच्या बळावर वीरशैव भक्तांच्या मालिकेत तिने महत्त्वाचे स्थान मिळविले आहे. तिची वचने संख्येने अल्प असली तरी ती तत्त्वार्थाला भिडणारी आहेत. योगांगत्रिविधी या नावाचा हिचा एक छोटासा ग्रंथ असून त्यात अध्यात्माचे निरूपण आहे. जीवनाच्या अखेरीस आपले अंतिम उद्दिष्ट साधण्यासाठी ती कल्याणहून श्रीशैलपर्वतावर गेली व तिथेच शिवैक्य पावली.

अक्क महादेवीचे जीवन हा अमर प्रेमाचा दिव्य संदेश आहे. कन्नड काव्यवनातली ती कोकिला आहे. तिच्या वचनांत सर्वत्र अध्यात्माचाच स्वर लागलेला आहे. तिला पर शिवाशी सामरस्य प्राप्त झाले आहे. समरस होऊनही ती शरणार्थिनी राहिली आहे. ती म्हणते–

**नानु निनगोलिदे, एनीनु नगोलिदे**
**नीनेन्ननगलदिप्पे नानिन्ननगलदिप्पे नय्या**
**निन ननगे बेरेंडु ठावुंटे**

अर्थ – मी तुझ्यावर मुग्ध आहे आणि तू माझ्यावर ! मी तुझ्याशी अवियुक्त आहे आणि तू माझ्याशी ! तुझ्याशिवाय मला दुसरा कोणता आधार आहे ! [हिं. क. भ. तु. अ.]

## अक्कलकोट

महाराष्ट्रातील एक प्रख्यात पुण्यक्षेत्र. याचे मूळ नाव प्रज्ञापुरी होते. हे दत्तक्षेत्र गाणगापूरच्या बरोबरीने मानले जाते. हे सोलापूर जिल्हयात, सोलापूरपासून ३५ कि. मी. अंतरावर पुणे-रायचूर लोहमार्गावर आहे. अक्कलकोटचे स्वामी या नावाने प्रसिद्ध असलेल्या दत्तावताराच्या विविध लीलांमुळे दत्तभक्तांना या स्थानाचे विशेष महत्त्व वाटते. अक्कलकोटास स्वामींचे वास्तव्य सुमारे दोन तपे होते.

अक्कलकोटात स्वामींच्या वास्तव्याच्या आणि प्रभावाच्या खुणा जागोजाग दृष्टीस पडतात.

प्रत्यक्ष अक्कलकोटात स्वामींचे पाच मठ आहेत.

(१) **पेठेतील समाधिमठ**–हा मठ श्री स्वामींच्या अवतारकालातच त्यांच्या समाधिगुहेसहित बांधण्यात आला. संस्थानचे व्यवस्थापक श्री. विंचूरकर यांच्या पैशातून श्री. चोळप्पा यांनी तो बांधविला. स्वामींच्या उपस्थितीत श्री गणपती, देवी, शिवलिंग यांची इथे स्थापना झाली. याच मठात श्री स्वामींची समाधी असून, मठव्यवस्था चोळप्पांच्या वंशजांकडे आहे. हे स्थान जागृत असल्याचा अनेकांचा अनुभव आहे.

(२) **वडाखालील मठ**–श्री स्वामींचे हे कायमचे वसण्याचे आवडते स्थान होय. हा मठ १९२०–२१ मध्ये पंच कमिटीने बांधविला.

(३) **श्री बाळप्पामहाराज मठ**–स्वामींनी श्री बाळप्पामहाराजांना आपल्या पादुका देऊन मठ बांधण्याची आज्ञा केली. या मठात श्री स्वामींच्या दंड, छाटी, कंठमणी, माळ, इ. पवित्र वस्तु ठेवलेल्या आहेत. तूर्त श्रीगजाननमहाराज मठाची परंपरा समर्थपणे सांभाळीत आहेत. गजानन महाराजांचे अध्यात्मप्रचाराचे कार्य जागतिक स्वरूपाचे आहे. त्यांच्या पंचसाधन मार्गाचा (अग्निउपासनेचा) प्रसार आणि आचार जगातील बहुसंख्य देशांत सुरू झालेला आहे.

(४) **जोशीबुवांचा मठ**–संस्थानचे कारभारी चिंतोपंत टोळ हे स्वामिचरणांवर नित्यनियमाने सहस्रतुलसीदल वाहत असत; पण स्वामी अक्कलकोटात नसल्यास नेमात खंड पडे. म्हणून स्वामींनी एका पाटावर आपली पावले उमटविली व त्या दिवसापासून श्री. टोळ त्यावरच तुलसीपत्रे वाहू लागले.

(५) **राजे रायरायन यांचा मठ**–राजे रायरायन हे हैद्रावादकडील एक मोठे जहागीरदार होते. स्वामींच्या कृपेने त्यांचा राजयक्ष्मा बरा झाला. पुढे त्यांनी मोठा खर्च करून गावाबाहेर एक सुंदर मठ बांधला व त्यात स्वामींच्या पादुकांची स्थापना केली.

या दत्तक्षेत्रात सेवेकरिता अनेक भक्त येत असतात. प्रतिवर्षी दत्तजयंती आणि स्वामींची पुण्यतिथी (चैत्र शु. त्रयोदशी) या दिवशी मोठ्या थाटाचा उत्सव होतो.

गावाच्या बाजारभागात एकमुखी दत्ताचे एक स्थान आहे. गावात विनायकाचेही एक मंदिर आहे.

राजर्षी शाहूमहाराजांचे एक सरदार फत्तेसिंह भोसले यांनी अक्कलकोट संस्थानाची स्थापना इ. स. १८४९ मध्ये केली. [श्री द. ज्ञा. को.; अक्कलकोट निवासी श्रीस्वामीसमर्थ चरित्रदर्शन–श्री. वि. के. फडके, तरुण भारत, अक्कलकोट तालुका पुरवणी.]

## अक्कलकोटचे स्वामी

(समाधी इ. स. १८७८) एक दत्तावतारी सत्पुरुष. दत्तसंप्रदायाच्या अर्वाचीन इतिहासात यांना महत्त्वाचे स्थान आहे. हे इ. स. १८५७ मध्ये अक्कलकोट येथे आले व अखेरपर्यंत तिथेच राहिले. यांच्या पूर्वजीवनाविषयी काहीच माहिती मिळत नाही. त्यांनीही आपले पूर्वजीवन अखेरपर्यंत गुप्तच राखले. त्यामुळे लोक त्यांना अक्कलकोटचे स्वामी याच नावाने ओळखू लागले. एकदा कोणीतरी त्यांना प्रश्न विचारला, की 'आपण कुठून आला ?' त्यावर त्यांनी उत्तर दिले, 'आम्ही कर्दळीबनातून निघालो आणि बंगालदेश, गंगा–गोदा–तटाक, वगैरे स्थळे हिंडत

हिंडत, विविध पुण्यक्षेत्रांच्या तीर्थयात्रा करून शेवटी इथे आलो.'

कर्दळीवनातून निघालो, या त्यांच्या सांगण्यावरून त्यांच्या भक्तांनी मनाशी निश्चित केले, की इ. स. १४५८ मध्ये कर्दळीबनात (श्रीशैल) निजानंदासाठी गेलेले नरसिंह सरस्वतीच या स्वामींच्या रूपाने पुनश्च अवतरले आहेत.

उन्मुक्त लीला आणि अद्भुत चमत्कार यांनी त्यांचे चरित्र भरलेले आहे. शेकडो भाविक जन त्यांच्या दर्शनार्थ येत. राजेरजवाडेही त्यांत असत. ते कोणाच्या प्रश्नाला कधीच धड उत्तर देत नसत. संदर्भाने ज्याची त्याला खूण पटावी असे त्यांचे मोजके



अक्कलकोटचे स्वामी

बोलणे असे. त्यांच्यामुळे महाराष्ट्रात व कर्नाटकात दत्तोपासनेचा प्रसार मोठ्या प्रमाणात झाला. या दोन्ही प्रदेशांत त्यांचे अनेक मठ आहेत. त्यांची शिष्यपरंपरा मोठी आहे. आळंदीचे नृसिंहसरस्वती, बीडकरमहाराज, देव मामलेदार, बाळप्पामहाराज, शंकरमहाराज, विष्णुबुवा ब्रह्मचारी हे त्यांचे शिष्य होत.

**शिव हर शंकर नमामि शंकर शिवशंकर शंभो**
**हे गिरिजापति भवानिशंकर शिवशंकर शंभो ।।**
**संतमहंतां होती भेटी हरुषे नाचूं वाळवंटीं ।**

असे स्वामींचे भजन असे. सुषुप्ती अवस्थेत ते विराट् शिवाचे ध्यान करीत असे सांगतात. त्यांनी महाराष्ट्रात गुरुसंप्रदाय वाढविला. वीस वर्षे प्रगट राहून चैत्र व. १३ शके १८०० या दिवशी ते निजानंदी निमग्न झाले. अक्कलकोट येथे त्यांची समाधी असून, लोक तिच्या दर्शनासाठी जात असतात. [द. सं. इ.]

## अक्काबाई

समर्थ श्रीरामदासस्वामींची एक प्रमुख शिष्या; कऱ्हाडच्या रुद्राजीपंत देशपांडे यांची कन्या. ही बालविधवा होती. वडिलांच्या अनुमतीनेच तिने रामदासांचा उपदेश घेतला होता. समर्थांच्या नंतर ४० वर्षांनी कार्तिक शुद्ध प्रतिपदेला, सज्जनगडावरच अक्काबाईचा देहान्त झाला. तिची समाधी राममंदिरापुढील भागात उत्तर दिशेला आहे. तिथे आता समर्थ सेवा मंडळाने सभागृह व इतर वास्तू बांधल्या असून, ते स्थान अत्यंत रमणीय झालेले आहे. समर्थ सेवा मंडळाने या समाधि-मंदिराचा जीर्णोद्धारही केलेला आहे.

अक्काबाई आणि वेण्णाबाई या दोन्ही शिष्यांची थोरवी तत्कालीन लोकगीतांतून गायलेली आहे. त्यांपैकी एक असे—

**आक्काबाई वेणूबाई । समर्थांच्या लागती पाईं ।।**
**देवरूपी केल्या ठाईं । दूरवर त्यांची केवढी कीर्ती ।।**

सज्जनगडावरील समर्थांची समाधी व देऊळ अक्काबाईने बांधले. समर्थांच्या पश्चात हिनेच समर्थ-संस्थानाचा कारभार कुशलतेने चालविला. [अ. म. ज्ञा.; ज. ज. र. स.]

## अक्रियावाद

बुद्ध-महावीरांच्या कालातील एक दार्शनिक मतवाद. त्यांच्याही पूर्वी या मताचा खूप प्रचार झाला होता. महावीराने पाखंडी लोकांचे जे चार वर्ग केले आहेत, त्यांत अक्रियावादी मोडतात.

जीव, अजीव, आसन, बंध, संवर, निर्जरा, पुण्य, अपुण्य व मोक्ष, ही नऊ तत्त्वे मानणारे ते अक्रियावादी होत. अक्रियावादात कर्म, क्रिया व प्रयत्न हे अमान्य केलेले आहेत. त्यांच्या मते प्रत्येक गोष्टीचे अस्तित्व क्षणिक असते आणि कोणतीही स्थिती उत्पन्न झाल्याक्षणीच नष्ट होते. त्यामुळे तिची कसलीही क्रिया असू शकत नाही. अस्तित्व हेच क्रियेचे कारण व तिचे फळ असते. तेच नाही म्हणजे क्रिया संभवतच नाही. या वादात नित्य व अनित्य असा भेदच नाही. कारण त्यांनी जीवाचे अस्तित्वच अमान्य केलेले आहे.

स्वतः, परतः, काल, ईश्वर, आत्मा, नियती, स्वभाव आणि यदृच्छा या विचारभेदांमुळे अक्रियावादांत ८४ उपपंथ निर्माण झाले आहेत.

याच अक्रियावादाचे निराळ्या प्रकारे आठ उपवर्ग होतात—

(१) एकवाद – परमात्मा हाच जगताचे मूळ कारण होय असा विश्वास.

(२) अनेकवाद – परमतत्त्व एक खरे; पण ते नाना रूपांनी व्यक्त होते.

(३) मितवाद – आत्म्याला विशिष्ट आकार असतो.

(४) निर्मितवाद – ईश्वराने विश्व निर्माण केले, ही श्रद्धा.

(५) सातवाद – सुखासीन जीवन जगूनही मोक्ष मिळतो.

(६) समुच्छेदवाद – सर्व वस्तू सतत नाश पावत असतात.

(७) नित्यवाद – सर्व वस्तू अनंत आहेत.

**(८) न सन्ति परलोकवाद** – आत्मा, परलोक, पुनर्जन्म, इ. कल्पनांवर अविश्वास.

जीवाने केलेल्या कर्मांचा परिणाम त्याला भविष्यकाळी भोगावा लागतो, हे अक्रियावाद्यांना मान्य नाही. त्याचप्रमाणे कशालाही अस्तित्व नसून भविष्यकाळासंबंधी केलेली भाकिते असत्य असतात, असे त्यांचे मत आहे. बुद्धाच्या काळी पूरण कस्सप (पूर्ण कश्यप) हा आचार्य या मताचा प्रख्यात समर्थक होता. जैन व बौद्ध या दोन्ही संप्रदायांनी वरील अक्रियावादाचे खंडन केले आहे. [ स्कू. से. जै. लि. ]

**अक्रोध** क्रोधाचा अभाव, क्रोधाचे दमन व यतिधर्मांपैकी एक धर्म. हा दैवी संपत्तीतला एण गुण आहे (गीता १६.२). कौशिक नावाच्या ब्राह्मणाला एक पतिव्रता स्त्री सांगते–

**क्रोधः शत्रुः शरीरस्थो मनुष्याणां द्विजोत्तम ।**
**यः क्रोधमोहौ त्यजति तं देवा ब्राह्मणं विदुः ॥**

(म. भा. वन. २०६)

अर्थ – हे ब्राह्मणश्रेष्ठा, क्रोध हा मनुष्यांच्या शरीरांत वास्तव्य करणारा शत्रू आहे. जो क्रोध व मोह यांचा त्याग करतो, त्याला देव ब्राह्मण म्हणतात.

संत व स्थितप्रज्ञ पुरुषांच्या अंतरांत अक्रोधवृत्ती सदैव वसते.

**अखंड द्वादशी** एक तिथिव्रत. आश्विन शु. द्वादशी. याचा विधी असा – एकादशीस उपवास. द्वादशीस विष्णुपूजा. व्रतावधी एक वर्ष. फल – धर्मकृत्यांतले न्यून पूर्ण होते (हेमाद्रिव्रतखंड). मार्ग० शु. द्वादशीला उपवास व पूजा. फल – यज्ञांतील वैकल्य दूर होते (वायू पु. १७.११–२५; गणेश पु. १.११८).

**अखंडानंद** (१) (इ. स. चे १४ वे शतक) काशीतील एक वेदान्तवेत्ता संन्यासी. हा अखंडानुभूतीचा शिष्य होता. प्रकाशानंद यतीच्या पंचपादिकाविवरण या ग्रंथावर याची तत्त्वदीपन नामक टीका आहे. [ का. सा. सा. ]

(२) (इ. स. १८६४–१९३७) एक संत व थोर समाजसेवक. हे रामकृष्ण परमहंसांचे शिष्य होते. यांचे मूळ नाव गंगाधर घटक. बंगालमधील एका ब्राह्मण कुटुंबात यांचा जन्म झाला. रामकृष्ण परमहंसांकडून त्यांना स्वरूपानुसंधान व नित्यानित्यविवेक यांची शिकवण मिळाली. रामकृष्णांच्या निर्णयानंतर त्यांनी हिमालयात तीन वर्षे तपश्चर्या केली. नंतर त्यांनी तिबेटात व उत्तर भारतात प्रवास केला. त्या वेळी त्यांना सर्वत्र घोर दारिद्रय दिसले. दारिद्रयाचे मूळ अज्ञानात आहे, हे जाणून त्यांनी बहुजनसमाजात शिक्षणप्रसार करायचे ठरवले. त्याप्रमाणे खेत्री येथे त्यांनी कामाला प्रारंभ केला. तिथे त्यांनी वैदिक पाठशाळा सुरू केली. तसेच, त्यांनी अनेक ठिकाणी हस्तव्यवसाय शिकवणाऱ्या व धंदेशिक्षणाच्या शाळा काढण्यातही पुढाकार घेतला. त्यांनी सामाजिक कार्यंही पुष्कळ केले. उदयपूर येथील भिल्ल समाजाला त्यांनी अन्नदान केले. पटकीची साथ, दुष्काळ, बिहारचा धरणीकंप या वेळी त्यांनी आपद्ग्रस्तांना खूप मदत केली. दीनदुबळयांच्या सेवेतच ईश्वरपूजन आणि धर्माचरण आहे, असे ते मानीत.

शेवटी ते सारगाच्छीच्या आश्रमात राहिले. तिथे त्यांनी एक अनाथालय काढले. पुढे ते रामकृष्ण संघाचे अध्यक्ष झाले. त्यांनी विपुल लेखन केले आहे. रा. स्व. संघाचे दुसरे सरसंघचालक श्री. गोळवलकर गुरुजी हे त्यांचे शिष्य होते. त्यांना संन्यासदीक्षा अखंडानंदांनीच दिली. बेलूर मठात ७ फेब्रुवारी १९३७ रोजी त्यांनी देह ठेवला. [ श्रीरामकृष्णांचे लीलासहचर – श्री. वा. पु. दामले, १९६३ ]

**अखर** दसनामी संप्रदायाची एक शाखा. इ. स. १७५० च्या सुमारास अखरांपैकी राजेंद्र गिरी याला बरेच महत्त्व प्राप्त झाले होते. तेव्हापासून अखर या लढाऊ गोसाव्यांची माहिती मिळते. यापूर्वीचा त्यांचा इतिहास मात्र उपलब्ध नाही.

निर्वाणी आखाड्यातील एका परंपरागत भाटाकडे अखरांच्या संबंधीची एक पोथी सापडली आहे. परंतु दंतकथांच्या रूपाने जी माहिती मिळते, तीच या पोथीत संग्रहीत केलेली आहे.

अखरांमध्ये अवाहन, अटल, निर्वाणी, आनंद, निरंजनी, जून, अबहन असे पोटभेद आहेत. अटल अखर हे यांपैकी सर्वांत जुने असून मोगलांच्या कारकीर्दीत हिंदुधर्माच्या रक्षणासाठी यांच्यातील पुष्कळ वीरांनी मोगलांविरुद्ध लढा दिला होता. हे जोधपूर राज्यात राहत होते. काबूल व बलुचिस्तान या प्रदेशांतील मुसलमानांनी जेव्हा जोधपूरवर स्वारी केली, तेव्हा अटल संन्याशांनी त्यांचा पराभव केला व मारवाडवर पुन्हा कधीही हल्ला करणार नाही, अशी कुराणावर हात ठेवून त्यांना शपथ घ्यायला लावली. या कामगिरीबद्दल जोधपूरच्या राजाने त्यांना नागोर तालुका इनाम दिला.

इ. स १९ व्या शतकाच्या आरंभी मिशनरी लोकांनी ख्रिश्चन धर्माचा प्रसार आरंभिला. तेव्हा विद्वान अखरांनी वेद-शास्त्रांच्या अध्यापनासाठी मठ उभारले. या मठांतील अध्यापकांना मंडलेश्वर असे म्हणत असत. यांपैकी काही मंडलेश्वरांनी नंतर अखरांच्या अखत्यारीबाहेर आपले स्वतंत्र मठही स्थापले.

इ. स. १९११ साली हरद्वार येथे निर्वाणी अखरांनी महानिर्वा

वेदविद्यालय स्थापन केले. पुढे १९१६ साली ते बंद करून अलाहाबाद शहरी उघडण्यात आले.

कुंभपर्व, मकरसंक्रांती, मेषसंक्रांती अशा पर्वकाळी हरद्वार व प्रयाग येथे गंगास्नानाचा पहिला मान अखरांचा आहे. या वेळी गंगेच्या वाळवंटात निर्वाणी अखर आपला तंबू ठोकून दोन उंच ध्वज उभारतात व त्याखाली चंडीपाठ सुरू करतात. ध्वज उभारलेले असतात, तोवर ते लोकांना अन्नदान करतात; तसेच पर्वदिनी एक घोडा, सव्वा पाच मण खिचडी व पाचशे पंचवीस रुपये इतके दानही देतात. प्रत्येक पर्वाच्या वेळी निर्वाणी अखरांना हजारो रुपये खर्च येतो. त्यानंतर हे काशीला जातात. [ हि. द. ना. सं. ]

## अखो

(इ. स. १५९१–१६५६) एक गुजराती भक्तकवी. हा जातीचा सोनार असून, जेतलपूर हे याचे जन्मस्थान होते. हा लहानपणापासून कृष्णाचा भक्त होता. लहानपणीच याने वल्लभ संप्रदायाचे आचार्य गोस्वामी गोकुळनाथ यांच्याकडून वैष्णवपंथाची दीक्षा घेतली होती, असे म्हणतात.

मोठेपणी याला अनेक कटू अनुभव आले. त्याच्या एका धर्मभगिनीने त्याला एक सोन्याचा दागिना घडवायला दिला असता अखोने त्यात पदरचे सोने घालून तो दागिना मोठा बनवून दिला. पण त्या बाईला मात्र वाटले, की हा जातीचा सोनार असल्यामुळे याने आपले गुंज दोन गुंजा सोने तरी घेतले असेल. म्हणून तिने तो दागिना दुसऱ्या सोनाराकडे परीक्षेसाठी नेला; पण तो वजनात मूळच्यापेक्षा अधिकच भरला. धर्मभगिनीचा हा अविश्वास अखोला कळला व त्याला अतिशय दुःख झाले.

पुढे तो अहमदाबादेच्या टाकसाळीचा मुख्य अधिकारी झाला. पण तिथेही भेसळ केल्याच्या आरोपावरून त्याला पकडण्यात आले. मात्र त्या प्रकरणात तो निरपराध ठरला. तथापि या अनुभवांमुळे त्याचे मन संसाराला विटले. त्याच्या कजाग बायकोनेही त्याच्या उद्वेगात अधिकच भर टाकली. त्यामुळे तो घरदार सोडून तीर्थयात्रेला निघाला. त्या यात्रेत तो गुरूचा शोध करीत होता. तो गुरू त्याला काशीत भेटला. त्याने अखोला ब्रह्मज्ञान शिकविले. तिथे काही काळ गुरुसेवा करून तो परत अहमदाबादेस आला.

वयाच्या पन्नाशीनंतर त्याने काव्य करण्यास प्रारंभ केला. पंचीकरण, गुरुशिष्यसंवाद, अनुभवबिंदू, चित्तविचारसंवाद, कैवल्यगीता आणि अखेगीता, हे त्याचे ग्रंथ आहेत. याशिवाय त्याची प्रकीर्ण काव्येही पुष्कळच आहेत. अखोच्या काव्यातला प्रधानरस म्हणजे ब्रह्मरस. एका पंडिताने प्राकृत उपनिषदे म्हणून त्याच्या ग्रंथांचा गौरव केला आहे.

मिथ्याचार, दंभ, दुराग्रह, इ. सामाजिक दुर्गुणांवर अखोने आपल्या काव्यांतून कठोर प्रहार केले आहेत. गोकुळनाथ या आपल्या दांभिक गुरूचा तो पुढीलप्रमाणे उपहास करतो –

**गुरु कीधा मे गोकुळनाथ घरडा बळदने घाली नाथ**

अर्थ – गोकुळनाथाला मी माझा गुरू केले; पण म्हाताऱ्या बैलाला वेसण घालण्यासारखाच तो प्रकार होता.

**एक मूर्खने एवी टेव पत्थर एटला पूजे देव**

अर्थ – एका मूर्खाला सगळ्याच दगडांना देव मानून पूजा करण्याची सवय होती.

**ज्यां ज्योइए त्यां कूडेकूड सामेसामा बेठां घूड**

अर्थ – जिथे पहावे तिथे लबाडी व अप्रामाणिकपणा. जणू काय घुबडे समोरासमोर बसली आहेत.

**ऊंडो कुवो ने फाटी बोख शिख्व्युं सांभळ्युं संघळूं फोक**

अर्थ – जो शिकविलेले व ऐकलेले लक्षात घेत नाही, तो खोल विहिरीत बुडणाऱ्या फाटक्या पखालीसारखाच आहे.

अखो केवलाद्वैतवादी असला तरी त्याने भक्तीचेही माहात्म्य सांगितले आहे. हिन्दी भाषेत त्याने ब्रह्मलीला नामक ग्रंथही लिहिला आहे. अखेगीता हा त्याचा सर्वोत्तम ग्रंथ मानला जातो. तो प्रतिभासंपन्न कवी होता.

अखो फारसा शिकलेला नव्हता; पण त्याचे व्यवहारज्ञान खोल होते. त्याच्या पूर्वीच्या काव्यवाङ्मयात कृष्णभक्तीचे जे फाजील स्तोम माजले होते, ते त्याने पुष्कळच कमी केले व गुजराती कवितेला नवे वळण लावले. म्हणूनच गुजराती वाङ्मयात त्याला युगप्रवर्तक कवी मानतात. [ वि. मुं. रा. प.; गुज. सा. इ. ]

## अगदतंत्र

आयुर्वेदाच्या आठ अंगांपैकी एक अंग. याला विषतंत्र असेही म्हणतात. केवळ सामान्य माणसांना नव्हे, तर राजे, अधिकारी लोक, यांनाही स्थूल वा सूक्ष्मरूपाने विषप्रयोग करून मारण्यासाठी या तंत्राचा उपयोग केला जाई. म्हणूनच कौटिल्याने सांगितले आहे, की जांगालीविद वैद्य राजाजवळ असलाच पाहिजे. त्याच्याकरवी राजाच्या खाद्यपेयांची परीक्षा केली जात असे. विष मिसळलेल्या अन्नाची सहजतेने परीक्षा करता यावी, म्हणून पशुपक्षी पाळले जात. विषकन्येचा प्रयोगही याच तंत्राचा एक भाग मानला जातो. पाहा – विष. [ सं. सा. इ. भाग २ ]

## अगमुदैयन

तमिळनाडमधील एक जात. मरवन आणि कल्लन, या जातींसारखीच ही जात आहे. अगमुदैयन शब्दाचा अर्थ घरधनी किंवा जमीनदार असा आहे. शेती हाच यांचा [illegible] आहे. [illegible] तेवली, नट्टू, कोट्टारपट्टू, [illegible] इ. अनेक पोटजाती आहेत. मूळ अगमुदैयनांचा ब्राह्मणांशी विशेष संबंध आलेला असून त्याचा

त्यांच्यावर बराच प्रभाव पडलेला आहे. हे धर्मकृत्यांसाठी ब्राह्मण पुरोहिताला बोलावितात. सामान्यत: प्रौढ विवाहाची चाल आहे. लग्न ठरविताना कुंडली पाहतात. लग्नविधी साधा असतो. वराची बहीण वस्त्रालंकार व फुले घेऊन वधूगृही जाते व वधूला त्या वस्तू देऊन तिच्या गळ्यात हळदीने रंगविलेली माळ घालते. त्या वेळी शंख वाजवितात. मग त्याच दिवशी वधूला वराच्या घरी नेण्यात येते. एवढ्याने लग्नविधी पुरा होतो.



अगमुदैयन जोडपे

हे शैवपंथी आहेत. हे अय्यनार, पिडारी, करुप्पण्ण-स्वामी, इ. अनेक क्षुद्र दैवतांनाही भजतात. स्वत:ला पिळ्ळै ही थोर लोकांना दिली जाणारी पदवी लावून घेतात. हे लोक प्रेते जाळतात किंवा पुरतात आणि अंत्य-संस्कारही करतात. [ म. ज्ञा. को.; मदुरा गॅझे. ]

## अगम्यागमन

अगम्या = समागम करण्यास अयोग्य किंवा निषिद्ध स्त्री. अगम्यागमन= निषिद्ध स्त्रीशी समागम. हे एक पाप आहे. पुढील स्त्रिया अगम्य होत –

**शूद्राणां विप्रपत्नी च विप्राणां शूद्रकामिनी ।**
**गुरुपत्नीं राजपत्नीं सपत्नीमातरं प्रसूम् ।**
**सुतां पुत्रवधूं श्वश्रूं सगर्भां भगिनीं सति ।।**
**सोदरभ्रातृजायां च भगिनीभ्रातृकन्यकाम् ।**
**शिष्यां च शिष्यपत्नीं च भागिनेयस्य कामिनीम् ।।**
**भ्रातृपुत्रप्रियां चैवात्यगम्यामाह पद्मजः ।**
**एतास्वेकामनेकां वा यो व्रजेन्मानवाधमः ।**
**स मातृगामी वेदेषु ब्रह्महत्याशतं लभेत् ।।**

(ब्र. वै. प्रकृ. २७)

**अर्थ** – शूद्रांना ब्राह्मणस्त्री, ब्राह्मणांना शूद्रस्त्री, गुरुपत्नी, राजपत्नी, सावत्र आईची माता, माता, मुलगी, सून, सासू, गर्भ-वती, बहीण, भावजय, भावाची व बहिणीची मुलगी, शिष्या, शिष्यपत्नी, भाच्याची बायको व पुतण्याची बायको, या स्त्रिया अति-अगम्य होत, असे विधात्याने सांगितले आहे: अशा स्त्रियां-पैकी एकीशी वा अनेकींशी जो संभोग करील, तो मातृगमनी ठरेल व त्याला शंभर ब्रह्महत्यांचे पातक लागेल.

असे पातक घडल्यास त्याच्या निष्कृतीसाठी कडक प्रायश्चित्त सांगितले असून, पराशक्तीची पूजा करून तिच्या पंचदशाक्षरी मंत्राचा जप केल्यानेही प्रायश्चित्त होते, असे सांगितले आहे (ब्रह्मांड पु. ४.८).

एकाच कुटुंबातील स्त्रीपुरुषांचा किंवा जवळच्या नात्यातील स्त्रीपुरुषांचा लैंगिक संबंध आदिवासी समाजांत व सुसंस्कृत समाजांत प्राचीन काळापासून निषिद्ध मानला गेला आहे. अशा लैंगिक संबंधाबद्दल सर्वसामान्य लोकांना तिरस्कार वाटतो, त्यांच्या भावना तीव्र असतात. त्यामुळे अशा अपराधासाठी कडक शिक्षा सांगितलेल्या आहेत. काही समाजांत अशा पापासाठी देह-दंड किंवा बहिष्कार ही शिक्षा दिली जात असे.

अशा अनैतिक संबंधातून उत्पन्न झालेल्या संततीला सामा-जिक अवहेलना सहन करावी लागते. तथापि पूर्वीच्या मानाने तिची तीव्रता आता कमी झाली आहे. [ पु. इं.; म. वि. को. ]

## अगरम

मदुराई जिल्ह्यात दिंडिगुलच्या उत्तरेस सहा मैलां-वर हे गाव असून, तिथे मुत्तलम्माचे देवालय आहे. आश्विनात तिथे फार मोठा उत्सव होतो. गाभाऱ्याच्या दोन्ही बाजूंस दोन मोठे राक्षसांचे पुतळे उभे आहेत. त्यांतील उत्तरे-कडील पुतळ्यावर सरडा चुकचुकला, तर ते शुभ लक्षण सम-जून उत्सव केला जातो. सरडा चुकचुकला नाही, तर उत्सव होत नाही. उत्सवात एका चांदीच्या चक्राची मिरवणूक काढतात. उत्सवासाठी मातीची मूर्ती करून तिचे शेवटी नदीपलिकडे विसर्जन करतात. [ मदुरा गॅझे. ]

## अगरिया

मध्य प्रदेशातील आदिवासी लोकांची एक जमात. लोहारकाम हा यांचा मुख्य व्यवसाय असून, यांचा नेहमी अग्नीशी (आगीशी) संबंध येत असल्यामुळे यांना अगरिया हे नाव मिळाले असावे. रेवा भागातील लोखंडाच्या खाणींना अगर म्हणतात. त्यावरून अगरिया हे नाव मिळाले असावे, असेही म्हणता येईल. छत्तिसगढमधील अघरिया नावाचे शेतकरी आणि पंजाब व राजस्थान या प्रदेशांत मीठ बनवणारे आगरी यांच्याहून हे अगरिया लोक वेगळे आहेत. हे लोक लोहारकाम करीत असले तरी हिंदू लोहार व अगरिया यांच्यांत खूप भिन्नता आहे. अगरिया लोक लोहखनिज कोळशाच्या भट्टीत तापवून त्यापासून लोखंड उत्पन्न करतात; लोहार लोक मात्र हे काम क्वचितच करतात. लोहारांचा भाता अगरियांच्या भात्यापेक्षा वेगळ्या प्रकारचा असतो. अगरिया आपला भाता पायांनी चालवितात, पण लोहार तो हातांनी चालवितात. लोहार लोक हिंदू देवतांना भजतात; पण अगरिया लोक लोहासूर, अग्यासूर वगैरे क्षुद्र देवतांना भजतात.

अगरिया लोक ठेंगणे व बळकट बांध्याचे असून, त्यांचा रंग काळा असतो. त्यांचे डोके चौकोनी, नाक रुंद व बोजड, ओठ जाड

व केस राठ असतात. हे दिसायला कुरूप व मतिमंद वाटतात.

मंडला, रेखा, बालाघाट, विलासपूर, मिर्झापूर, द्रुग, रायपूर, सुरगुजा, उदयपूर, जशपूर, पालामौ, या भागात अगरियांची मुख्य वसती आहे. त्या प्रदेशांत त्यांचे निरनिराळे विभाग असून, त्यांच्या चालीरीतींत पुष्कळ वेगळेपणा दिसून येतो. कारण निरनिराळ्या भागातील अगरियांच्या चालीरीती त्यांच्या आसपासच्या जाती-जमातींच्या चालीरीतींप्रमाणे आहेत. तथापि त्या सर्व अगरियांचे रंग, रूप, आकार यांत साम्य आहे; त्यांच्या लोखंडाच्या भट्ट्या व भाते एकाच प्रकारचे असतात. काही संशोधकांच्या मते अगरिया हे कोल, गोंड, कोरवा, इ. जमातींपैकीच असून, त्यांतल्या ज्या काहीजणांनी लोखंड शुद्ध करणे व लोहारकाम सुरू केले त्यांना अगरिया हे नाव मिळाले. पण वेरियर एल्विन यांना हे मत मान्य नाही. त्यांचा बांधा, त्यांची राहणी, त्यांच्या लोककथा, त्यांची दैवते, त्यांच्या कारागिरीचे तंत्र यांतील सारखेपणा पाहून वेरियर एल्विन यांना असे वाटते, की हे निरनिराळ्या भागातले अगरिया इतर जमातींहून भिन्न अशा एकाच जमातीचे लोक आहेत. प्राचीन काळातील असुरांशी संबंधित अशी एक असुर नावाची जमात होती. त्या जमातीच्या लोकांनी बिहारमधील मुंड जमातीवर स्वारी केली तेव्हा मुंडांनी त्यांचा पराभव केल्यामुळे ते असुर मध्य प्रदेशातील मैकल पर्वतापर्यंत पसरले व तिथे त्यांनी वसाहती केल्या. तेच सांप्रत अगरिया या नावाने ओळखले जात असावे, असे त्यांनी सुचविले आहे.

अगरिया लोक एकंदरीत भित्रे व बुजरे असले तरी, ते आळशी वाटत नाहीत. जंगलात जाऊन लाकडे तोडणे, त्यांपासून कोळसा तयार करून तो घरी आणणे, डोंगरातील लोहखनिज खणून काढणे आणि ते भट्टीत भाजून त्यापासून लोखंड काढणे ही अतिशय कष्टाची कामे आहेत. आणि त्या लोखंडाच्या वस्तू बनविणे हे देखील सोपे नाही. दिवसरात्र सतत ते या उद्योगात मग्न असतात. कोळसा व लोखंड या वस्तूंशी सतत काम करूनही या लोकांची राहणी स्वच्छ असते. त्यांच्या घरांत व लोहारखान्यांत टापटीप दिसून येते. या लोकांची कारागिरी चांगली असते आणि त्यांना काम शिकविणेही सोपे असते. सामान्यपणे हे लोक सच्चे व पापभीरू आहेत. पण ते फार अज्ञ व मागसलेले आहेत. त्यांच्या पोटजाती पुढीलप्रमाणे –

**(१) पथरिया** – ही यांची प्रमुख पोटजात होय. तिला मुखीबन्सी असेही नाव आहे. हे मूळचे अगरिया समजायला हरकत नाही. डिंडोरी तहसीलमध्ये यांची वसती आहे. हे लोक आपले भाते मोठा दगड ठेवून घट्ट बसवतात.

यांच्या बायका नाकांत कोणताही दागिना घालीत नाहीत, काचेच्या बांगड्या घालीत नाहीत व भांगात शेंदूर लावीत नाहीत. मासिक पाळीच्या बाबतीत त्या फार कडक नियम पाळतात.

पथरिया लोक सर्व अगरियांमध्ये दिसायला बरे असून, बैगा लोकांप्रमाणेच ते नृत्यासाठी किंवा उत्सवप्रसंगी नीटनेटका वेष करतात. त्यांचा रंग सावळा असून केस राठ नसतात. पुरुष मस्तकाच्या डाव्या बाजूला केसांचा अंबाडा बांधतात किंवा केस मागे सोडतात. हे लोक रंगीत कपडे कधीही वापरीत नाहीत, कारण लाल व पिवळा हे रंग त्यांनी निषिद्ध मानले आहेत.

पथरिया गोंड हे बैगा लोकांच्या गावांत, त्यांच्यासारखीच घरे बांधून राहतात. यांच्या चालीरीती त्यांच्याप्रमाणेच आहेत.

**(२) कल्ला** – यांची वसती छत्तिसगढमधील कल्होटी भागात आहे. तेही पथरियांप्रमाणेच मोठा दगड ठेवून आपले भाते घट्ट बसवितात. कल्ला हे छत्तिसगढ भागात गेलेले पथरियाच असावे. पण या दोन पोटविभागांत रोटी-बेटी व्यवहार बहुधा होत नाही.

हे लोक रंगीत कपडे वापरतात. स्त्रिया नाकात दागिना व हातांत काचेच्या बांगड्या घालतात; भांगात शेंदूर भरतात व कपाळी टिकली लावतात. मासिक पाळीचे नियम त्या नीट पाळीत नाहीत.

कल्ला अगरिया गोमांस खात नाहीत. ते स्वतःला उच्च व सुधारलेले मानतात. त्यांना बैगांच्या हातचे अन्न चालत नाही.

**(३) खुंटिया चोख** – विलासपूर विभागात यांची वसती आहे. हे लोक बांबूच्या दोन लहान खुंट्यांनी आपले भाते पक्के वसवतात. पथरियांच्या भट्टीप्रमाणे यांची भट्टी कलती नसून उघड्या जागेत सरळ उभी असते. यांचे भाते पथरियांच्या भात्यांप्रमाणे गाईच्या चामड्यांनी मढवलेले नसून सांबराच्या किंवा चितळाच्या कातड्याने मढवलेले असतात.

यांच्या स्त्रिया चोळी घालीत नाहीत. त्या काचेच्या बांगड्या व दंडावर चांदीची जड कडी घालतात. अविवाहित मुली कासोटा घालतात, पण विवाहित स्त्रिया कासोटा घालीत नाहीत. स्त्रिया नाक टोचीत नाहीत. त्या लाल किंवा पिवळी वस्त्रे वापरीत नाहीत. नेहमी पांढऱ्या साड्याच नेसतात. मासिक पाळीचे नियम पाळतात. स्त्रियांना अन्य जमातीच्या माणसांच्या हातचे अन्न चालत नाही, पण पुरुषांना ते चालते.

यांची घरे प्रशस्त, स्वच्छ व सुशोभित केलेली दिसतात. डिंडोरीतल्या कारागिरांना माहीत नसलेल्या काही लोखंडी वस्तू हे खुंटिया चोख बनवतात.

**(४) महाली असुर** – विलासपूरमधील असुर अगरियांना महाली म्हणण्याचे कारण हे की ते लोखंडाच्या रसातून मैल (घाण) बाजूला काढण्याचे काम करतात. यांच्या चालीरीती व पुराणकथा डिंडोरीच्या पथरियांप्रमाणेच आहेत. आपण सुर-

गुजाहून आलो असे ते मानतात. पथरियाप्रमाणेच हे दगडाने भाते पक्के बसवतात व गाईच्या चामडयाने भाते मढवतात. लोहासुराला हे काळी गाय बळी देतात.

यांच्यांतल्या स्त्रिया काचेच्या बांगडया वापरीत नाहीत. त्या पितळेच्या बांगडया घालतात, लाल साडया नेसतात, केसांत शेंदूर घालतात व नाकात फुलणी नामक दागिना घालतात. कासोटा घालीत नाहीत. त्यांना गोंदवून घेण्याची फार हौस असते. चोळीच्या जागीही त्या गोंदवून घेतात.

(५) **गोंड-धुक** – रायपूरमधील अगरिया भोवतालच्या समाजात मान मिळावा म्हणून स्वतःला लोहार म्हणवतात. ते पथरिया वर्गातलेच आहेत. ते मूळचे आदिवासीच आहेत, पण बरेचसे हिंदू बनले आहेत. त्यांची राहणी व वेषभूषा हिंदूंप्रमाणेच असते. मात्र त्यांच्या कथा, दैवते, श्रद्धा, समजुती आणि विधिनिषेध सर्व काही डिंडोरीच्या अगरियांसारखेच आहेत. त्यांच्यापैकी काहीजणांना अगरिया या नावाची लाज वाटते.

उदयपूर व जशपूर या भागातही अगरियांचे लहान लहान गट आढळतात. त्यांत वरील पोटजातींतले लोकच आहेत. छोटा नागपूरमध्ये असुर जमातीचे जे लोक वसलेले आहेत, त्यांच्यांतही काही अगरिया आहेत. अगरियांच्या निरनिराळ्या पोटजातींत लग्नसंबंध बहुधा होत नाहीत. पण गोंड व बैगा लोकांशी हे लोक लग्नसंबंध करतात. हिंदू लोक व काही जमातींचे लोक अगरियांना हीन मानतात, पण अगरिया मात्र स्वतःला उच्च स्थान मिळावे म्हणून प्रयत्नशील आहेत.

अगरियांच्या या पोटजातींचेही अनेक पोटभेद असून, त्यांची निरनिराळी देवके आहेत. या पोटभेदांना गोती म्हणतात. समान गोतीत लग्नसंबंध होत नाही. अगरिया लोक आपल्या देवकांना खूप मान देतात व त्यांना फार जपतात. कारण त्यांच्याशी त्यांच्या अनेक पुराणकथा निगडित आहेत.

**पुराणकथा** – यांच्यांत अनेक कथा प्रचलित असून, त्यांचा अगरियांच्या जीवनावर खूपच प्रभाव दिसून येतो. हे लोक क्षुद्र दैवतांची पूजा करतात, त्यांच्या रागालोभावर यांचा लोखंडाचा उद्योग अवलंबून असतो. कोळसा, भट्टी, भाता, हातोडा, चिमटा या साधन-सामग्रीविषयी आणि लोखंड वितळवण्याच्या तंत्राविषयीही त्या कथांमध्ये बरेच काही सांगितलेले असून, त्याप्रमाणेच हे सर्व कामे करतात. यांत ते कधीही सुधारणा करू शकत नाहीत. त्या कथांतील विविध प्रसंगांतूनच वायू, अग्नी, पितर यांची पूजा सुरू झाली.

अगरियांच्या उत्पत्तीविषयी स्पष्ट माहिती उपलब्ध नाही. अग्नीपासून किंवा दगडांच्या ठिणग्यांतून ते उत्पन्न झाले, असे म्हणतात. देवाच्या अंगावरील मळातून ते जन्मले अशीही एक कथा आहे. अगरियांचा पहिला राजा लोगुंडी व त्याचे नगर लोहरिपूर यांच्यासंबंधी अनेक कथा आहेत. त्याच्या राज्यात समृद्धी होती. अगरिया लोक लाल लोह खात. त्यांच्या अंगी अलौकिक शक्ती होती. पण ते राज्य सूर्यामुळे नष्ट झाले. प्राचीन काळी सूर्य हा लोहरिपूर भोवती पसरलेला तप्तलाल लोखंडाचा तवा होता. देवाने तो वर उचलून आभाळात नेला व मग तो तिथेच तळपत राहिला. त्या वेळी पृथ्वीवरील झाडे व गवत यांना आग लागली व लोहरिपूर भस्मसात झाले.

दुसरी कथा अशी आहे– लोगुंडी राजाला एक सुंदर कन्या होती. तिच्यापायी सूर्य व राजा यांच्यांत मोठे युद्ध झाले. त्यात सूर्याने राजाचा व राज्याचा नाश केला. त्या वेळी त्याची राणी परगावी गेली होती, ती वाचली. तिने एका गोंडाच्या घरात आश्रय घेतला व तिथे तिला एक मुलगा झाला. तोच ज्वालामुखी होय. त्याने राहूप्रमाणे सूर्याला गिळले व पित्याच्या वधाचा सूड घेतला.

अशा प्रकारे सूर्य व अगरियांचा लोगुंडी राजा यांचे वैर असल्यामुळे हे लोक सूर्याच्या उन्हात लोहारकाम करीत नाहीत व भट्टीवर सूर्याचे किरण पडू देत नाहीत. सूर्यप्रकाशामुळे भट्टी फुटते, लोखंडाचा रस बिघडतो, लोखंड ठिसूळ बनते आणि वेडेवाकडे व निरुपयोगी होते, अशी त्यांची दृढ समजूत आहे.

अगरियांच्या मूळ पुरुषाच्या उत्पत्तीविषयी कथा अशी –

पृथ्वीवर प्रथम नंगा बैगा व नंगा बैगिन हे जोडपे उत्पन्न झाले. त्या वेळी पृथ्वी डळमळत होती. म्हणून नंगा बैगा याने अग्यासुराची प्रार्थना केली. अग्यासुराने मोठया ज्वाला उत्पन्न केल्या व त्यांतून एक पुरुष निर्माण केला. तोच अगरियांचा मूळ पुरुष होय. त्याने शुद्ध लोखंडाचे बारा खांब बनवून ते पृथ्वीच्या चारही कोपऱ्यांवर ठोकून दिले. त्यामुळे पृथ्वी स्थिर झाली. मग परमेश्वराने सर्वत्र बीजे पेरली. तेव्हापासून त्या पुरुषाचे वंशज लोखंडाचे काम करू लागले.

**अग्यासुर** – हा अगरियांचा अग्निदेव होय. दर वर्षी एकदा त्याला लाल कोंबडा बळी दिला जातो. अग्नीला हे लोक फार मान देतात. घरात मृत्यू झाल्यानंतर काही दिवस अग्नी उत्पन्न करीत नाहीत. अग्नीची शपथ घेत नाहीत. कोणी अग्नीवर लघवी केली तर त्याचे मूत्रेंद्रिय सुजते किंवा त्याला फोड येतात, अशी समजूत आहे. अग्नीवरून चालत जाणे हे पाप मानले जाते; त्यामुळे गुप्त रोग होतो. अग्नीला लाथ मारली असता त्या माणसाचे पाय साध्या जमिनीवर देखील भाजू लागतात. जळके लाकूड (अग्नी) वाहत्या पाण्यात फेकले तर दुसरा अग्नी पेटवता येत नाही; फेकणारा माणूस वाहून जातो. आणि मग ते जळके लाकूड परत आणून वापरावे लागते.

प्रत्येक वेळी नवा अग्नी उत्पन्न करण्यालाही महत्त्व दिले जाते. कोळसा करताना अग्नी नवीन पेटवला पाहिजे. कारण जुना अग्नी वापरला तर कोळसा चांगला होत नाही, अशी समजूत आहे. लोखंडाची भट्टी पेटवणे किंवा लोखंडाची वस्तू बनवण्यासाठी विस्तव पेटवणे या सर्व कामांसाठी प्रत्येक वेळी नवा अग्नी उत्पन्न केला तरच शुद्ध लोखंड मिळते व वस्तू चांगल्या बनतात. पेटलेल्या अग्नीतले जळते लाकूड अशा कामी वापरीत नाहीत. मात्र याला होळीचा अपवाद आहे. होळीतले जळते लाकूड घेऊन अग्नी पेटवला तर तो चालतो; कारण तो पवित्र असतो.

लोखंडाचे सामर्थ्य–अगरिया लोक लोखंडाच्या अंगी गूढ सामर्थ्य आहे, असे मानतात व विविध प्रकारे त्याचा उपयोग करून घेतात. साधे लोखंडही ते पवित्र मानतात व त्याला जपतात. कारण सामान्य भुताखेतांना दूर ठेवण्यासाठी त्याचा उपयोग होतो. कुआरी लोहा म्हणजे नवीन भट्टीतून प्रथमच उत्पन्न झालेले लोखंड अशा कामी व औषधासाठी विशेष प्रभावी मानले जाते. कोळसा बनवताना, लोह खनिज खणून काढताना, भट्टी बांधताना व ती पेटवताना प्रत्येक वेळी विशेष नियम पाळले जातात. विटाळाला दूर ठेवले जाते; कारण पावित्र्याला महत्त्व असते. अशा वेळी लोहासुराला व धरतीमातेला पशुपक्षी बळी देतात. त्यानंतर सर्व कृत्ये कुमारीच्या किंवा कुमाराच्या हातानें सुरू करतात. विटाळशीची सावलीही नवीन भट्टीवर पडू देत नाहीत.

जुन्या भट्टीतून देखील कुआरी लोह मिळू शकते. पण त्यासाठी नवरा व बायको दोघांनी रविवारी किंवा बुधवारी रात्री नग्न होऊन, चकमकीने नवीन विस्तव पेटवून भट्टी फुलवावी लागते आणि सूर्योदयापूर्वी काम संपवावे लागते.

कुआरी लोहाचे बरेच खिळे बनवून ठेवतात आणि मग ते निरनिराळ्या प्रसंगी भुताखेतांपासून संरक्षण व्हावे म्हणून वापरतात. हे लोखंड भुताखेतांविरुद्ध प्रभावी शस्त्र आहे, अशी त्यांची श्रद्धा आहे.

मूल जन्माला आले, की त्याच्या जवळ लोखंडाचा विळा किंवा अन्य वस्तू ठेवतात. लग्नसमारंभात वधू-वरांना भूतबाधा होऊ नये म्हणून नवरा मुलगा लोखंडाचा अडकित्ता जवळ बाळगतो. लोखंडी कडी, दिवे, अंगठी या वस्तूंत कुआरी लोह अल्प प्रमाणात घातले तरी ते भूतबाधेला प्रतिबंधक ठरते. नववधू वराच्या घराचा उंबरा ओलांडताना लोखंडाच्या तुकड्यावर पाय ठेवून मग आत जाते.

अगरिया लोक लोखंडी कडी सर्व प्रकारच्या दुष्टशक्तींपासून संरक्षण करण्यासाठी वापरतात.

रोगराईवर उपचार म्हणूनही कुआरी लोह फार उपयोगी पडते. लोखंडाचे कडे घालणे, लोखंडाचा लाल तुकडा कढत पाण्यात बुडवून ते पिणे, इ. अनेक उपाय निरनिराळ्या रोगांवर केले जातात. लोखंडी कोयता तापवून त्याने रोगग्रस्त शरीराला डाग देणे हा उपायही प्रचलित आहे. झंझावात, वीज, गारांचे वादळ या सर्व संकटांचे निवारण करण्यासाठी लोखंडी कुऱ्हाड, कोयता किंवा तुकडा घराबाहेर फेकण्याची चाल आहे.

कुआरी लोह विकू नये असे बंधन आहे; ते पाप आहे व त्यामुळे भट्टीचा नाश होतो, अशी समजूत आहे.

अग्नि-दिव्य करण्यासाठी लोखंडी चिमटा तापवून संशयित व्यक्तीला त्याने स्पर्श करतात. अपराधी असेल त्याच्या देहाला तो चिमटा चिकटतो अशी कल्पना आहे.

दैवते – लोहासुर, कोयलासुर, अग्यासुर, पवनदेव व धुआधरणी ही यांची खास दैवते आहेत. ती त्यांच्या व्यवसायाशीच निगडित आहेत. त्यांचा कोप होऊ नये म्हणून हे फार जपतात व त्यांना गाय किंवा बैल बळी देतात. हे दुल्हा देवालाही भजतात. तो ठाकुरदेवाचा पुत्र होय. ठाकुरदेवाचे वास्तव्य गावाबाहेर व दुल्हादेवाचे गावात असते. रोगराई उत्पन्न करून माणसांना छळणे हे यांचे कार्य समजले जाते.

भगवान नामक देवालाही हे लोक भजतात. पण त्यांच्या मते तो संहारक आहे. कारण त्यानेच लोगुंडी राजाचा नाश केला, अशी कथा आहे. महादेव या देवाला मात्र हे घाबरत नाहीत. कारण तो यांना भट्टी लावण्याची कला शिकवतो.

हे लोक चेटकिणी, मृतात्मे, क्षुद्रदैवते आणि विटाळशी स्त्री यांना फार घाबरतात. त्यांच्यामुळे भट्टीवर फार संकटे येतात, असे यांना वाटते. अग्नीला पाय लावणे व मशाल फेकून देणे या कृतीही हानिकारक व अशुभ मानतात. विटाळशी स्त्रीविषयी यांना विलक्षणच भय वाटते. देव किंवा भुते यांच्यामुळे येणाऱ्या आपत्ती बहुधा काही तरी उपायांनी टाळणे शक्य होते; पण रजस्वला स्त्रीमुळे येणारी आपत्ती अनिवार्य असते, असे हे समजतात. म्हणून तिला खाणीजवळ किंवा भट्टीजवळ जाऊ देत नाहीत, ऐरण व मोठा हातोडा यांना स्पर्श करू देत नाहीत. तिचा संपर्क आला तर भट्टी मोडते किंवा लोखंड बिघडते किंवा माणसे मरतात. मग मांत्रिकाला बोलावून देवाला डुक्कर, दूध, हळद, इ. अर्पण करतात व दक्षिणाही देतात.

चेटकिणीमुळेही अशीच संकटे येतात व लोखंडाची भट्टी नष्ट होते किंवा मुलांना त्रास होतो. मग मांत्रिकाकडून त्यांवर उपाय केले जातात. काही अगरिया पुरुषही चेटुक करतात.

अलिकडे हे लोक लोखंडाचा उद्योग सोडून शेती करू लागले आहेत. पण शेतीचे तंत्र त्यांना नीट साधत नाही व त्यांना ते पसंतही नाही. देवाने सांगितलेला उद्योग सोडून भूमातेला नांग-

राने उखळणे हे पाप आहे, अशी त्यांची भावना आहे. ते केल्या-मुळेच आपल्यावर भुताखेतांचा कोप होतो, असेही त्यांना वाटते.

**विवाहप्रथा** – अगरियांच्या निरनिराळ्या पोटविभागांमध्ये लग्नसंबंध होतात; पण एकाच पोटविभागातील स्त्री-पुरुषांचे लग्न होत नाही. मुलीचे लग्न परगावच्या मुलाशी जुळवण्याची पद्धत आहे. कारण एका लहान गावात एकाच पोटविभागाचे लोक असतात. समान देवक असणाऱ्या गोतीतही लग्नसंबंध करीत नाहीत. काही लोकांना आते–मामे भावंडांचे लग्न झालेले चालते, काही लोकांना चालत नाही. वराच्या बापाने वधूच्या बापाला देज देण्याची चाल यांच्यांतही रूढ आहे. या लोकांत विवाह-निष्ठेला फारसे महत्त्व दिसत नाही. विवाहित स्त्री-पुरुषांच्या अनैतिक संबंधाकडे दुर्लक्ष केले जाते.

यांच्या आसपास जे इतर जातीजमातींचे लोक वसलेले असतात, त्यांच्या लग्न-समारंभाप्रमाणेच यांचा लग्नसमारंभ होतो. त्यात विशेष प्रकारचा विधी नसतो. वधू-वरांना शिंदीच्या पानांची बाशिंगे बांधतात.

हे लोक गोंड व बैगा या जमातींशीही लग्नसंबंध करतात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक तरुण मृत मनुष्याचे प्रेत पुरतात. पण म्हाताऱ्या माणसाचे प्रेत जाळतात. कारण म्हाताऱ्या माणसाचे भूत फार घातक असते व त्याचे प्रेत जाळले, तर भूत फार त्रास देत नाही, अशी यांची समजूत आहे. प्रेताबरोबर मृत मनुष्याची व्यवसायासधने म्हणजे हातोडा, चिमटा वगैरे उपकरणे ठेवली, तर त्याचे भूत कोणाला छळीत नाही अशीही कल्पना आहे. मृत माणसांच्या भुतांचा कोप होऊन भट्टी मोडू नये, किंवा दुसरा कसला त्रास होऊ नये म्हणून हे लोक खूप जपतात. चोख अगरिया पोटविभागातले लोक गवताचे कडे करून मृताच्या पायांत घालतात. त्याचप्रमाणे प्रेतावर तेलहळदीचा शिडकाव करणे, प्रेताजवळ मडके फोडणे, इ. विधीही करतात.

मृत्यूनंतर दहाव्या दिवशी बडा नहावत हा विधी केला जातो. आंघोळ करणे, असा त्याचा अर्थ आहे. त्यानंतर पुरुष रांग करून घरी येतात तेव्हा पुढचा मनुष्य एक दगड उचलून मागच्या माणसाच्या हाती देतो; तो मनुष्य तो दगड आपल्या मागच्या माणसाच्या हाती देतो. शेवटच्या माणसाच्या हाती दगड आला की तो दगडावर थुंकून त्याला मागे फेकून देतो. घरी गेल्यानंतर कोंबडीच्या पिलाचा एक पाय मोडून त्याच्या रक्ताचे थेंब मडक्यातल्या पाण्यात टाकतात. रक्त जसे पाण्यात मिसळते, तसा मृताचा आत्मा देवांत मिसळून जातो, अशी यांची समजूत आहे.

बायका मर्तिकाचे स्नान करताना मासा किंवा बेडूक पकडतात व त्याला पाण्याच्या भांड्यात घालून घरी आणतात. मग ते भांडे अंगणात ठेवून त्याच्या समोर धूप जाळतात. नंतर एक कोंबडीचे पिलू पकडून त्याला मृताच्या नावाने संबोधतात व भात खायला देतात. त्याने भात खाल्ला तर मृतात्मा त्या पिलात आहे, असे मानून त्याला मारून खातात. जर पिलाने भात खाल्ला नाही तर मृताचा आत्मा रुष्ट आहे, असे समजून पिलाला सोडून देतात व भांड्यातील पाणी व प्राणी फेकून देतात.

असुर अगरिया दहाव्या दिवशी स्नानानंतर घरी येऊन जमिनीवर तांदुळाच्या पिठाने काही आकृती काढतात व तिच्यावर पाट ठेवून त्यावर खिचडीचा द्रोण व पाण्याचे भांडे ठेवतात. मग सर्वजण नदीवर जाऊन मृतात्म्याला घरी चलण्याची विनंती करतात. त्याने ती विनंती मानली व तो घरी गेला तर खिचडीवर बोटांच्या खुणा दिसतात व पिठाची आकृती पायांनी विस्कटलेली दिसते. अशा प्रकारे मृतात्म्यांना प्रसन्न करून ते घरांत राहू देतात. दुसऱ्या देहात प्रवेश करून नवीन जीवन सुरू करीपर्यंत ते तिथे सुखाने राहतात, अशी यांची समजूत असते.

मृताचे भूत परत येऊन त्याने छळू नये म्हणून अगरिया लोक प्रेतयात्रा वेडयावाकड्या मार्गाने नेतात व स्मशानाभोवती पाच फेऱ्या घालतात. [ दि अगरिया–वेरियर एल्विन, १९४२ ]

**अगरू** आंध्रातल्या तेलुगू शेतकऱ्यांची किंवा विडयाच्या पानांचा धंदा करणाऱ्यांची एक जात. नेल्लिमेरळ या ठिकाणी यांची दाट वस्ती आहे. यांच्यांत मुले-मुली वयात आल्यावर त्यांची लग्ने करतात. पौरोहित्य उडिया ब्राह्मण करतो. मृतांना जाळतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**अगरोहा** एक प्राचीन स्थान. हरियाणा प्रदेशातील हिस्सार जिल्ह्यात, हिस्सार नगरापासून तेरा मैलांवर हे गाव आहे. त्याच्या आसपास एका प्राचीन नगराच्या भग्नावशेषांचे ढिगारे दूरवर पसरले आहेत. त्या अवशेषांत इमारतींचे पाये, मोठाल्या विटा, मूर्तींचे तुकडे, मणिमाला, नाणी, शिक्के, इ. विविध वस्तू मिळाल्या आहेत. त्यावरून असे अनुमान केले जाते, की त्या जागी प्राचीन काळी एक विशाल व समृद्ध नगर वसलेले असावे. तिथे एक किल्लाही होता. अग्रवाल जातीचा मूळ पुरुष राजा अग्रसेन याने हे नगर वसवले व तिथे किल्लाही बांधला, असे म्हणतात. पण तो किल्ला पतियाळा नरेश अमरसिंह याचा सेनापती दीवाण नन्नूमल याने इ. स. च्या १८ व्या शतकाच्या उत्तरार्धात बांधला, अशीही कथा सांगितली जाते. दीवाण नन्नुमल हा अग्रवाल वैश्य होता. पण ही कथाही खरी नसावी. कारण त्या काळात तिथे गेलेल्या युरोपियन प्रवाशांना अगरोहा नगर उजाड झालेले आढळले.

अगरोहा येथे सापडलेल्या अवशेषांत कुशाण कालातले दोन

शिक्के सापडले आहेत. पंजाबी लोकगीतांत रिसालू–शीलांची गाथा प्रसिद्ध आहे. शीला ही अगरोहाची रहिवासी होती व रिसालू हा सियालकोटचा राजा म्हणजे कुशाण सम्राट विम कडफिसेस होय असे मानले जाते. टॉलेमीच्या भूगोलात अगारा नामक शहराचा उल्लेख असून, रेनेलच्या मते तेच अगरोहा नगर होय. यावरून असे दिसते, की अगरोहा हे नगर दोन हजार वर्षांपूर्वी स्थापन झालेले होते. तिथे आग्रेय गणाची राजधानी होती आणि ग्रीक सम्राट शिकंदर याने ती जिंकली होती. त्यानंतर आग्रेय गणराज्य मौर्य साम्राज्यात समाविष्ट झाले. काही काल अगरोहा कुशाणांच्या सत्तेखाली असावे. त्यानंतर ५–६ शतकांचा इतिहास ज्ञात नाही. इ. स. च्या ८ व्या शतकात दिल्लीच्या तोमर वंशातील राजाने दिल्लीच्या आसपासच्या प्रदेशावर आपली सत्ता स्थापली. त्यामुळे अगरोहा तोमरांच्या राज्यात समाविष्ट झाले. तोमरांच्या मागून तिथे चौहानांची सत्ता प्रस्थापित झाली. पण मुहंमद घोरीने अगरोहावर स्वारी करून त्याचा बराच नाश केला. तथापि ते नगर त्या वेळी पूर्ण नष्ट झाले नव्हते; तिथे बरीच वसती होती व इ. स. च्या १५ व्या शतकात ते एका जिल्ह्याचे मुख्य ठिकाण होते. सुलतान फीरूज शाह तुगलुक याची सत्ता त्या प्रदेशावर होती. फीरूज शाहने अगरोहापासून १३ मैलांवर हिस्सार फीरोजा नावाचे नगर स्थापले तेव्हा तिथल्या बांधकामासाठी अगरोहा नगरातील पडक्या मंदिरांचे व घरांचे दगड वापरण्यात आले, असे मुस्लिम इतिहासकार शम्सा-ए-सिराज अफीफ याने लिहून ठेवले आहे.

महंमद घोरीच्या आक्रमणानंतर अगरोहातील अग्रवाल लोकांनी स्थलांतर केले. आपली प्राचीन जन्मभूमी सोडून ते लोक अन्य प्रदेशांत जाऊन वसले. त्यामुळे अगरोहा नगर हळूहळू उजाड झाले. आता तिथे एक लहानसे खेडेगाव मात्र उरले आहे. [अ. जा. प्रा. इ.]

**अगस** कानडी धोब्यांची एक जात. हे लोक दक्षिण महाराष्ट्र आणि त्यालगतचे कानडी जिल्हे या प्रदेशांत आढळतात. हे द्रविड वंशाचे आहेत. वीरघटेमडिवाळ ईश्वरम याच्यापासून हे आपली उत्पत्ती सांगतात. अगसी = पागोटे, यावरून अगस हे नाव या जातीला मिळाले असावे. हे कपडे धुतात व देवस्थानाच्या उत्सवप्रसंगी किंवा वरिष्ठ जातींच्या मिरवणुकांत मशाली धरण्याचे काम करतात. ग्रामदेवतांना बळी देण्यासाठी आणलेल्या पशूचे डोके उडविण्याचा हक्क यांचा असतो. हे आपल्याहून श्रेष्ठ जातींचेच कपडे धुतात व लग्नमंडपासाठी तसेच प्रेतासाठीही कापड पुरवितात. यांच्यांत अनेक पोटजाती आहेत.

यांच्यापैकी काही शैव तर काही वैष्णव आहेत. हे लक्ष्मी, भूमिदेवरू, शिव, केदारलिंग, यल्लम्म, भवानी, मारुती, या देवांना भजतात. श्रावणात भूमिदेवरूचा उत्सव करतात. भूमिदेवरूचे पुजारीही हेच असतात. भट्टीत कपडे जळू नयेत म्हणून हे भट्टीच्या भांडयाची पूजा करून त्याला बळी देतात. यांचे पौरोहित्य बहुधा जंगम लोक करतात. यांचा गुरू लिंगायत असतो.

यांच्यांत बालविवाहाप्रमाणेच प्रौढविवाहही रूढ आहेत. आतेमामे बहिणीशी लग्न करता येते. एखादी स्त्री जन्मभर अविवाहितही राहू शकते. विधवाविवाह रूढ आहेत; पण वरही विधुर असावा लागतो. गुरीकर नावाचा यांचा एक नायक असतो, तो लग्नात वधू-वरांच्या हातावर पाण्याची धार ओततो. यांच्यांत काडीमोड करायलाही मोकळीक आहे.

या जातीची पंचायत असते. मुख्य पंचाची निवडणूक करतात. पंचायतीला गुन्ह्याबद्दल शिक्षा किंवा दंड करायचा अधिकार असतो. हे लोक वक्कलिग व कुरुब अशा वरिष्ठ जातींतील लोकांना आपल्या जातीत घेतात. यांचा दर्जा शूद्राहून खालचा आणि अस्पृश्यांहून वरचा समजला जातो. हे मृताचे संस्कार लिंगायतांप्रमाणेच करतात. पितरांसाठी हे महालय करतात. [मुं. इ. जा.; म. ज्ञा. को.]

**अगस्त्य** (१) एक वैदिक ऋषी. याची व्याख्या अशी–'अगं (विन्ध्यं) स्त्यायति इति' = विंध्य पर्वताच्या वृद्धीस प्रतिबंध करणारा (विग्रहकोश). अर्थात हे याचे मूळ नाव नसून, नंतरच्या आयुष्यात केलेल्या एका महत्कार्यामुळे त्याला मिळालेली ही गौरवपूर्ण उपाधी आहे. याच नावाने पुढे तो प्रसिद्ध झाला. याची पैतृक नावे मान्य व मांदार्य अशी दोन आहेत (ऋ. ७.३३.१३). हा मित्रावरुणांचा पुत्र असून, वसिष्ठाचा सख्खा भाऊ आहे. एका सत्रात मित्रावरुण गेले असता तिथे आलेल्या उर्वशीवर त्यांची नजर पडली आणि तिच्याविषयी उत्पन्न झालेल्या अभिलाषेने त्यांचे वीर्य-स्खलन झाले. ते वीर्य वसतीवरी नावाच्या कुंभात पडले. त्यातून अगस्त्य व वसिष्ठ जन्म पावले. अगस्त्य कुंभाच्या मध्यातून जन्मला (बृह. देवता ५.१३४). अगस्त्य हा कुंभातून म्हणजे आदिवासींच्या मातृरूप दैवतापासून जन्मला, अशी उपपत्ती डॉ. कोसंबी यांनी लावली आहे. अगस्त्य हा ऋग्वेदातल्या २६ सूक्तांचा द्रष्टा आहे.

पुढे हा खेलराजाचा पुरोहित बनला. खेलाची पत्नी विश्पला पतीसमवेत शत्रूशी लढत असता दुर्दैवाने शत्रूच्या हाती सापडली व त्यांनी तिचा पाय तोडला. अगस्त्याला त्याबद्दल दुःख झाले. त्याने तिच्यासाठी अश्विनौ देवांचे स्तवन केले. त्या स्तोत्राने ते प्रसन्न झाले व त्यांनी विश्पलेला लोखंडाचा पाय जोडून दिला (ऋ. १.११८.८).

एकदा मरुतांसाठी आणलेला पशू इंद्राने पळविला. त्यामुळे मरुत हे वज्र घेऊन इंद्राला मारायला धावले. त्या वेळी अगस्त्याने मध्ये पडून तो संघर्ष टाळला व त्यांचे सख्य घडवून आणले (ऋ. १.१६५,१७०; ऐ. ब्रा. ५.१६). वैदिक आर्यांचा पुढारी इंद्र आणि त्याचे अनुयायी मरुत यांच्यामधला हा संघर्ष असावा, तो दूर करून अगस्त्याने आर्यांचे ऐक्य अबाधित राखण्याचे कार्य केले असावे.

विदर्भ देशाची राजकन्या लोपामुद्रा ही याची भार्या होय. ऋग्वेदाच्या पहिल्या मंडळातले १७९ वे सूक्त हे अगस्त्य-लोपामुद्रा यांच्या संवादाचे आहे. तिथे लोपामुद्रा वृद्ध अगस्त्याला संभोगाविषयी प्रवृत्त करीत असताना दिसते. अगस्त्याने शेवटी तिच्या इच्छेला मान दिला आहे. याच्यापासून लोपामुद्रेला



अगस्त्य मुनी

दृढास्यू नावाचा पुत्र झाला व तोच पुढे इध्मवाह या नावाने प्रसिद्ध झाला. अगस्त्य हा सर्व ऋषींत वृद्ध असल्यामुळे इंद्राने यालाच गायत्र्युपनिषद उपदेशिले व याने ते इषाला शिकवून त्याची परंपरा सुरू केली (जै. उ. ब्रा. ४.१५ १, १६.१).

पुराणवाङ्मयात याला अग्नीचा अवतार मानले आहे (मत्स्य पु. ६१.२०१). अगस्त्य विरक्त होता; पण लोपामुद्रेची ऐश्वर्य भोगण्याची आसक्ती प्रबळ होती. तिची इच्छा पूर्ण करावी म्हणून हा द्रव्य मागण्यासाठी अनेक राजांकडे गेला. पण त्याला अपेक्षित धन कुठेच मिळाले नाही. शेवटी इल्वल दैत्याचा पराभव करून याने त्याची अपार संपदा हस्तगत केली.

अगस्त्याचे मुख्य पराक्रम तीन—विंध्यविजय, समुद्रविजय व इंद्रविजय. हा प्रथम काशीत राहत असे. आर्यावर्तात दाटीवाटी करून राहिलेल्या आर्यजनांना वसाहतीसाठी विंध्याच्या खालचा दक्षिणप्रदेश उपलब्ध करून द्यावा, म्हणून हा त्या मोहिमेवर निघाला. त्या वेळी विंध्यपर्वत मेरुपर्वताशी स्पर्धा करण्यासाठी उंच वाढू लागला होता. अगस्त्यान त्याला नमविले व 'आपण दक्षिणेहून परत येईपर्यंत असाच नमून राहा' म्हणून सांगितले. कालकेय नावाचे दैत्य समुद्रात वास्तव्य करून जगाला पीडा देत होते. त्यांचा नाश करण्यासाठी याने एकाच आचमनात समुद्र आटवून टाकला (म. भा. वन. १०४, १०५). याने द्वादशवार्षिक सत्र करून पशुहिंसा न करताही इंद्राला पर्जन्यवृष्टी करायला भाग पाडले (म. भा. आश्व. ९२). प्रजांच्या हितासाठी याने सर्व मृगांचे देवतोद्देशाने प्रोक्षण केले. त्यामुळे देव-पितृकार्यात मृगमांस अर्पण करण्यास प्रत्यवाय उरला नाही (म. भा. अनु. ११५). नहुष हा इंद्रपदावर बसला असता त्याने इंद्राणीच्या महालात जाण्यासाठी अगस्त्यादी ऋषींना आपली पालखी वाहायला लाविले. नहुष 'लवकर चल' या अर्थी त्याला 'सर्प सर्प' म्हणाला. तेव्हा अगस्त्याला क्रोध येऊन त्याने नहुषाला, 'तू सर्प होऊन धरणीवर पडशील' असा शाप दिला. महाभारताच्या अनुशासन पर्वात हा शाप अगस्त्याच्या जटेत बसलेल्या भृगूने दिला असे म्हटले आहे (१.५७).

तमिळ प्रदेशात अगस्त्याचे नाव आदराने घेतले जाते. ते लोक त्याला शिवाचा शिष्य, पारंगत विद्वान, वेदशास्त्रांचा प्रणेता, त्याचप्रमाणे अलौकिक शक्तीचा महर्षी मानतात. याने दक्षिणेत येऊन आर्य-द्रविड संस्कृतींचा समन्वय साधण्याचे महत्कार्य केले आणि उत्तर-दक्षिण हा भेद मिटवून सारा भारत एकसंध करण्याचा प्रयत्न केला. पांड्य राजांचा कुलगुरू या नात्याने तो तिकडे प्रसिद्ध आहे. याने तमिळ भाषेचे अध्ययन केले व तिचे एक बृहत् व्याकरणही रचले अशी कथा सांगतात. याने आर्यभाषा आणि आर्यकथा यांचा तिकडे प्रचार केला आणि तमिळ साहित्याच्या अभिवृद्धीसाठी संघम्‌ची स्थापना केली. तमिळनाडचा प्राचीन इतिहास अगस्त्याच्या कथांनी ओतप्रोत भरलेला आहे. दक्षिणापथाच्या प्रवासात त्याने अनेक जंगले तोडून वसाहती उभारल्या. त्याला या कामी मदत करणाऱ्या दक्षिणेतील जमातींत वेळीर व अरुवालर या दोन जमाती मुख्य होत्या. तमिळ

साहित्याचा पिता या नात्याने तिकडचे लोक याला भजतात. दक्षिणेत अगस्त्याच्या नावाशी संबद्ध अशी अनेक क्षेत्रे आहेत. त्यांत कर्नाटकातले वातापी (बदामी), कूर्गमधले ब्रह्मगिरी, आंध्रमधले द्राक्षारामम, तंजौर जिल्ह्यातले अगस्त्यमपल्ली, तिरुनेलवेल्ली जिल्ह्यातले पोदियमलै व अगस्त्यवरम ही क्षेत्रे सर्वांत प्रसिद्ध आहेत. प्रायः या सर्व प्रदेशात अगस्त्याची मंदिरे आहेत. या सर्वांत पोदियमलैला विशेष महत्त्व आहे. पंचवटीतून निघाल्यावर या ठिकाणीच त्याने आपला मुख्य आश्रम स्थापित केला आणि इथूनच साऱ्या तमिळ देशात आर्यसंस्कृतीचा प्रचार केला. पण अगस्त्याचे पर्यटन इथेच समाप्त होत नाही. तिकडील लोकांचा असा विश्वास आहे, की त्याने समुद्र पार करून यवद्वीप (जावा), बरहनद्वीप (बोर्निओ), सुमात्रा, सयाम, इ. देशांत संचार करून तिथेही आर्यसंस्कृतीचा पाया घातला.

आकाशात दक्षिणेकडे असलेल्या नौकापुंजातील एका ठळक ताऱ्याला अगस्त्याचेच नाव दिले आहे. तो भाद्रपदात उगवतो व त्याच्या उदयानंतर पावसाळ्यात गढूळ झालेले नद्यांचे पाणी निवळते, असा साक्षात्कार आहे (रघु. ४.२१).

अगस्त्याविषयी महाभारत आणि पुराणे यांत ज्या कथा आढळतात, त्यांचा त्याच्या ऋग्वेदातील सूक्तांत आभासही मिळत नाही. तो उत्तरेहून दक्षिणेस गेला आणि विंध्याचा गुरू झाला, याचाही सुगावा ऋग्वेदात लागत नाही. त्यामुळे दक्षिणेत आर्यसंस्कृतीची पताका फडकविणारा अगस्त्य हा अगस्त्याच्या वंशातला दुसराच कोणीतरी पुरुष असावा, असे श्री. राहुल सांकृत्यायन म्हणतात. मात्र हा जो कोणी अगस्त्य असेल तो साहसी, दूरदर्शी आणि सेवावृत्तीचा असला पाहिजे, यात शंका नाही. संस्कृतिप्रचारासाठी जिवाची तमा न बाळगता शेकडो कोसांच्या दुर्गम प्रवासाला निघालेला हा पहिला प्रवासी आहे, असे निस्संशय म्हणता येते. शकपूर्व ८०० वर्षे हा या पुरुषाचा काल असावा, असे डॉ. भांडारकर इ. पंडितांनी मानलेले आहे. हा आर्यसंस्कृतीचा अग्रदूत आहे. दक्षिणेत यज्ञसंस्थेचे बीजारोपणही यानेच केले आणि त्याच्याच आदेशानुसार दक्षिणेचे अनेक राजे आणि सामंत यज्ञ करू लागले. कावेरी पूं पट्टिणमूच्या चोळ राजाला त्यानेच इंद्राप्रीत्यर्थ प्रतिवार्षिक २८ दिवसांचा उत्सव करायला सांगितले.



अगस्त्यमूर्ती

अगस्त्यगीता, अगस्त्यसंहिता, शिवसंहिता, द्वैधनिर्णयतंत्र, इ. ग्रंथ याच्या नावावर आहेत. अगस्त्याला ऋग्वेद्यांच्या ऋषितर्पणात स्थान नाही; पण हिरण्यकेशी शाखेच्या तर्पणात आहे. यावरून सदर शाखा दक्षिणेकडची असावी व दक्षिणेत प्रमुख स्थान मिळविलेल्या अगस्त्याचा, त्या शाखेच्या तर्पणात अंतर्भाव झाला असावा. सूक्तकार अगस्त्य आणि आश्रमऋषी अगस्त्य हे दोघे भिन्न असावे, असे श्री. चापेकर म्हणतात (तर्पण), ते वरील राहुल सांकृत्यायनांच्या मताशी जुळणारे आहे. अगस्ति-अगस्त्य हे गोत्र आपस्तंब, माध्यंदिन व देशस्थ ऋग्वेदी या ब्राह्मणांत आढळते. पुराणांतील माहितीवरून अगस्त्यवंशाच्या पौलस्त्य, पौलह आणि ऋतू अशा तीन शाखा असल्याचे दिसते. या वंशांतील राजांनी अगस्त्यांची मुले दत्तक घेतली, असे उल्लेख आढळतात. पाहा-लोपामुद्रा, दक्षिणापथ, तमिळ साहित्य. [ प्रा. च· को.; ऋ. आ.; ऋ. द.; त. सा. सं.; वे. इं. ]

(२) एक वैयाकारण. याचा काल सुमारे एक हजार वर्षांमागचा. हा शूद्र जातीत जन्मला होता. हा कवी असून याला प्राचीन अगस्त्याचा अवतार मानतात. याचे अगस्त्यव्याकरण हे तमिळ भाषेचे पहिले व्याकरण मानतात. याशिवायही याचे बरेच ग्रंथ तमिळ भाषेत आहेत.

(३) दक्षिणेतला एक शिल्पशास्त्रज्ञ. आगस्तीय सकलाधिकार या ग्रंथाचा कर्ता. द. भारतातील मूर्तिकलेला याने वळण लावले. मूर्तींच्या प्रमाणांविषयी याने घालून दिलेले नियम आजमितीसही तिकडील कलाकार पाळतात. त्याच्या सकलाधिकार ग्रंथाची ११ प्रकरणे आहेत. त्यांवरून त्याच्या वेळी दक्षिणेस उदयाला आलेली मूर्तिकला कशा प्रकारची होती, ते कळून येते. शिवाच्या १६ प्रतिमांची माहिती त्याने दिली आहे. हा पहिल्या पांड्य राजाचा मंत्री व पुरोहित होता, असे सांगतात. [म. ज्ञा. को.; त. सा. सं.; स. कॉं. सा. इं. क.]

## अगस्त्यपूजा

पंचांगात ज्या स्थितीस अगस्त्योदय लिहिला असेल, त्या दिवशी ही पूजा सांगितली आहे. एका कलशावर घृतपात्र ठेवून त्यात अगस्त्याची सुवर्णमूर्ती ठेवून सात दिवस तिची पूजा करतात. मग त्या प्रतिमेचे दान करून कोणते तरी फळ सोडतात. ब्रह्मप्राप्ती हे याचे फल आहे.

या व्रताची कथा – प्राचीन काळी देवासुरसंग्राम झाला व त्यात असुरांनी जीवरक्षणार्थ समुद्राचा आश्रय केला. इंद्राने अग्नी व वायू यांना समुद्र आटविण्याची आज्ञा दिली. पण तसे केल्याने प्राणिसंहार होईल म्हणून अग्नि-वायूंनी त्या गोष्टीला नकार दिला. त्यावर इंद्राने त्यांना शापिले, की 'तुम्ही मानवयोनीत जन्म घ्याल.' तेव्हा ते मित्रावरुणांच्या रेतापासून कुंभात निर्माण

झाले. वसिष्ठ व अगस्त्य ही त्या दोघांची नावे होत. अगस्त्याने मलयाचलावर तप करून दक्षिणेच्या पर्वतराजीत विमानाने संचार करण्याचा वर देवांकडून मिळविला. तेव्हापासून लोक त्याला पुजू लागले. (मत्स्य पु. ६१)

सूर्य कन्याराशीच्या मध्यावर असता अगस्त्याचे दर्शन व पूजन करावे असे सांगितले आहे (नीलमत पुराण). [हि. ध.]

**अगस्त्यमलै** केरळ राज्यातल्या त्रिवांकुर (त्रावणकोर) जिल्ह्यातल्या पश्चिम घाटातले एक पर्वत-शिखर. याची उंची ६२०० फूट आहे. त्रिवांकुर आणि तिनेवल्ली या जिल्ह्यांच्या सीमेवर हा पर्वत असून, ताम्रपर्णी व नेयार या नद्या याच्यावरून उगम पावतात. अगस्त्य या पर्वतावर अजून राहिलेला असून, तो योगनिद्रेत आहे, असा तिकडील लोकांचा समज आहे. याला अगस्त्यकूटम असेही नाव आहे. [म. ज्ञा. को.]

**अगस्त्यरामायण** यात सोळा हजार श्लोक असून, अगस्त्याने स्वारोचिष मन्वन्तरातल्या दुसऱ्या कृत-युगात याची रचना केली, अशी कथा आहे. याची छाया राम-चरितमानसात दिसते. राजा कुंतल व भानुमती ही पुढील जन्मी दशरथ-कौसल्या झाली, सीतेचा जन्म वार्ष्णेयाच्या भूमिशोधनात झाला, अशा वेगळ्या कथा यात असून, याशिवाय समुद्राची उत्पत्ती, मुद्रिकादानाचे कारण, ऋष्यमूक पर्वताची स्थिती, इ. कथाही वेगळ्या रूपात सांगितल्या आहेत. [हिंदुत्व]

**अगस्त्यसंहिता** अगस्त्याच्या नावावर असलेला ३३ अध्या-यांचा एक ग्रंथ. अगस्त्य-सुतीक्ष्ण यांच्या संवादातून हा ग्रंथ विस्तारला आहे. यात राममंत्राच्या उपासनेचे रहस्य, त्याचे विधी व ब्रह्मविद्या यांचे निरूपण आहे. या ग्रंथात सर्वत्र सीता-राम यांच्या आलिंगित युगलमूर्तीचे ध्यान व वर्णन आहे. रामभक्तिशाखेच्या वैष्णवांना हा ग्रंथ परम आदरणीय वाटतो. [रा. भ. शा.]

**अगस्त्यार्घ्यदान** सूर्य सिंहराशीत गेल्यावर २१ दिवसांनी अगस्त्य (तारा) उदय पावतो व सूर्य वृषभ राशीत गेल्यावर ७ व्या दिवशी त्याचा अस्त होतो, असे गर्गादीमुनींचे वचन आहे. अगस्त्याच्या उदयापासून पुढे सात दिवस त्याला सर्वांनी अर्घ्य द्यायचे असतात. हे व्रत १७ वर्षे कर-तात. याचा विधी पुढीलप्रमाणे –

काशतृण व पुष्पे यांनी अगस्त्याची मूर्ती करावी. अलंकार घालून ती पूर्णकुंभावर ठेवावी. तिची पूजा करून दधियुक्त अक्ष-तांचा बली द्यावा. रात्रौ जागरण करावे. मग प्रातःकाली ती मूर्ती घेऊन जलाशयावर जावे. मग ' अगस्त्यः खनमानः खनित्रैः' या वेदमंत्राने अगस्त्याची प्रार्थना करावी. लोपामुद्रेचा मंत्र पुढीलप्रमाणे –

**राजपुत्रि महाभागे ऋषिपत्नि वरानने ।**
**लोपामुद्रे नमस्तुभ्यमर्घ्यं मे प्रतिगृह्यताम् ।।**

अर्थ–हे राजकन्ये, महाभाग्यवती, ऋषिपत्नी, सुमुखी, लोपा-मुद्रे, तुला नमस्कार असो. (तू) माझे अर्घ्य ग्रहण कर.

मग अगस्त्याच्या प्रतिमेचे विसर्जन करून ती ब्राह्मणाला दान द्यावी. नंतर होम करून अगस्त्याच्या उद्देशाने एक फळ सोडावे. फल – ब्रह्मपदाची प्राप्ती. [ निर्णयसिंधू ]

**अगस्त्याश्रम** भारतात अनेक ठिकाणी अगस्त्य ऋषींचे आश्रम होते आणि अगस्त्य ऋषीच्या नावाशी संबंधित अशी अन्य तीर्थस्थाने होती. रामायण-महाभारतात त्यांचे उल्लेख आढळतात.

१. मलय पर्वत–तिनेवेल्ली जिल्ह्यातील अगस्त्यकूट पर्वता-वर ताम्रपर्णी नदीच्या उगमस्थानी अगस्त्य ऋषीचा आश्रम होता. तमिळ भाषेत पोदियिल म्हणजे दक्षिण पर्वत होय. तमिळ साहित्यात अगस्त्य ऋषीचा निर्देश पोदियिलचा संत या नावाने केलेला आहे. स्थानिक समजुतीनुसार आजही या पर्वता-वर अगस्त्य ऋषीचे वास्तव्य आहे.

२. पंचवटी – वाल्मीकिरामायणामध्ये नाशिक आणि पंच-वटी यांच्या परिसरात असलेल्या अगस्त्य ऋषीच्या आश्रमाचा निर्देश आढळतो.

३. प्रवरा नदीच्या काठी-नगर जिल्ह्यातील अकोला गावा-जवळ अगस्त्य ऋषीचे मंदिर आजही पाहायला मिळते. तिथेच त्याचा आश्रम असावा.

४. रामाच्या सेतूजवळ–पांड्य देशात रामाच्या सेतूजवळ वसलेल्या अन्य एका अगस्त्याश्रमाचा निर्देश महाभारतात आढ-ळतो. योगिनीतंत्र आणि नारदपुराणाचे सेतुमाहात्म्य यांतही या आश्रमाचा निर्देश आहे.

५. दुर्जया नदीच्या काठी–महाभारतातील लोमश ऋषीच्या यात्रावर्णनात या आश्रमाचा निर्देश असून, मणिमती नगराजव-ळील या स्थानी अगस्त्याने वातापी राक्षसाचा वध केला होता.

तसेच दक्षिण भारतातील गोकर्ण, कुंजरकुंज, महाराष्ट्रातील कोल्हापूर, तमिळनाडूमधील वेदारण्यम या स्थानीं अगस्त्य ऋषींचे आश्रम होते असे सांगतात.

६. सरस्वती नदीच्या काठी पुष्कर तीर्थाजवळ.

७. गुजरातमधील प्रभास क्षेत्रामध्ये व हाटकेश्वर क्षेत्रामध्ये

अगस्त्याश्रम असल्याचा उल्लेख आढळतो.

८. गढवाल प्रदेशातील रुद्रप्रयागपासून १८ कि. मी. अंतरावरील अगस्त्यमुनी नामक एका ग्रामात अगस्त्य ऋषीचा आश्रम होता.

९. संकाश्य (संकिस) गावाजवळ.

१०. इटाव्यापासून ६० कि. मी. नैर्ऋत्येस सराई आघात नामक स्थानी अगस्त्य ऋषीचे आश्रम होते, अशी स्थानिक लोकांची श्रद्धा आहे. काशीत आणि प्रयागजवळ अगस्त्याश्रम असल्याचेही उल्लेख आहेत. अगस्त्याश्रमाव्यतिरिक्त अगस्त्य ऋषीच्या नावाशी संबंधित अशा अन्य अनेक तीर्थस्थानांचा निर्देश पौराणिक साहित्यात आढळतो.

दक्षिण समुद्राजवळ अगस्त्यतीर्थ आहे (म. भा. आदि. २.३६). हिमाचलाच्या पायथ्याला अगस्त्यवर नामक स्थान आहे. कालिंजर पर्वताचा एक भागही अगस्त्य पर्वत या नावाने ओळखला जातो. [ हि. ध.; हि. जॉ. ए. इं.; सं. मु. ६; प्रा. स्थ. को. ]

**अगाशिव लेणी** महाराष्ट्रातील कऱ्हाड शहराच्या ईशान्येस एक मैलावर अगाशिव नामक डोंगर असून, त्यात ही लेणी खोदलेली आहेत. या डोंगराची उंची १२०० फूट असून, त्याच्या माथ्यावर शिवालय आहे. या शिवाला अग्रशिव असे नाव होते. कालान्तराने या अग्रशिवाचेच अगाशिव असे रूपांतर झाले. हे शिवालय बुद्धकालानंतरचे असावे, असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. या लेण्यांची संख्या सुमारे चौपन्न असून, ती बुद्धभिक्षूंच्या वर्षावासासाठी खोदलेली होती. या चौपन्न लेण्यांपैकी बावीस लेणी कोयना नदीच्या बाजूला, एकोणीस भैरवदऱ्यात आणि तेरा जखिणवाडीकडील बाजूस आहेत. 'जखिणवाडी' हा 'यक्षिणवाटिका' या शब्दाचा अपभ्रंश आहे.

ही लेणी सनपूर्व २५० ते इ. स. २०० एवढ्या कालखंडात टप्प्याटप्प्याने खोदली गेली असावीत, असे शिल्पज्ञांचे मत आहे. बौद्धांच्या हीनयान पंथाच्या पूर्वकाली या लेण्यांची खोदाई झाली असावी. कारण या पंथात बुद्धप्रतिमेचे पूजन नाही. दागोबा हेच बुद्धप्रतीक समजले जाई. चक्र आणि सिंह ही बौद्ध संघाची द्योतक असत. ही सर्व चिन्हे या लेण्यांत दृष्टोत्पत्तीस येतात. प्राचीन मगध विद्यापीठाची एक शाखा अगाशिव लेण्यांत होती. [ कऱ्हाड; म. जि. – सातारा ]

**अगीर** पंजाबातील एक जात. हे सर्व हिंदू असून, मीठ तयार करण्याचा धंदा करतात. हे आपणांस राजपुतांचे वंशज म्हणवितात. यांचा सामाजिक दर्जा लोहाराहून उच्च आणि जाटांच्या खालचा मानतात. [ म. ज्ञा. को. ]

**अगुरू** एक सुगंधी द्रव्य. हा चंदनाचा एक प्रकार आहे. अगुरूची झाडे हिमालय, आसाम, भूतान व पूर्व बंगाल या प्रदेशांत होतात. कालागुरू किंवा कृष्णागुरु, दाहागुरू, काष्ठागुरू, स्वादागुरू व मांगल्यागुरू असे याचे प्रकार आहेत. अगुरूचा उपयोग अगरबत्ती व उटी बनवण्यासाठी आणि धूपासारखा करतात. न्हाल्यानंतर केसांना धूर देणे ही प्रथा प्राचीन काळापासून चालू आहे. हा धूर केसांतला दुर्गंध, उवा व लिका नष्ट करतो आणि केस निरोगी व सुंदर बनवितो, असे चरकानेही सांगितले आहे (चि. ७.७७). अगुरूंत कालागुरू श्रेष्ठ मानला जातो.

शिरांसि कालागुरुधूपितानि कुर्वन्ति नार्यः सुरतोत्सवाय ॥
(ऋतुसं. ४.५)

अर्थ – पुष्पोत्सवासाठी स्त्रिया आपली मस्तके कालागुरूने धूपवितात.

उत्तम अगुरू जड असतो. तो पाण्यात टाकला तर बुडतो. त्याच्यावर काळे ठिपके असतात. तो लवकर पेट घेत नाही. त्याचा धूर फार होत नाही आणि तो फार झिजत नाही. तो केशदोष दूर करून त्यांना सुगंधी बनवितो. तो वायू, कफ व कर्णरोग यांचा नाश करतो. तो पौष्टिक असून, अतिसार व वमन यावर स्तंभक म्हणून आणि सर्पदंशावरही उपयुक्त आहे. अगुरुकाष्ठाचे तेल तिक्त, कटू, व्रणशोधक व कृमिकुष्ठहारक आहे (सुश्रुत ४५). याच्या सालीचा उपयोग लेखनासाठीही करीत. [ प्रा. भा. प्र.; म. श. १.; कौ. अ. – संपा. श्री. करंदीकर, हिवरगावकर, अ. ३२. ]

**अगोचरी** हठयोगातली एक मुद्रा. हिचे स्थान कानांत आहे. मनाचा संयम करून त्याला नासाग्री स्थिर केल्याने ही मुद्रा सिद्ध होते. ही सिद्ध झाल्याने बाह्य श्रवणाचा प्रतिरोध होऊन अंतस्थ शब्दांचे श्रवण होऊ लागते.

करणमध्ये अगोचरी मुद्रा सबद कुसबद ले उतपनी
सबद कुसबद समो कृतवा मुद्रा तौ भई अगोचरी
(अष्टमुद्रा-गोरखबानी)

अर्थ – कर्णमध्यात अगोचरी मुद्रा आहे. जे शब्द आणि कुशब्द उत्पन्न होतात, त्यांचे ती ग्रहण करते. शब्द आणि कुशब्द सम केल्याने अगोचरी मुद्रा सिद्ध होते. [ गा. म. वि. ]

**अग्निकार्य** ब्रह्मचाऱ्याने सकाळ-संध्याकाळ अग्नीला समिधा देणे याला हे नाव आहे. हे संध्यावंदनानंतर करायचे असते. हे मेधाजनन होईपर्यंत उपनयनाच्या अग्नीवर व नंतर लौकिकाग्नीवर करतात. प्रथम समिदाधानाचा संकल्प करून अग्नीभोवती परिसमूह व पर्युक्षण केल्यावर 'विश्वानि नः'

(ऋ. ५.४.९–११) या ऋचांनी अग्नीचे अर्चन करून ' अग्नये समिधम् ' या मंत्राने अग्नीत समिधा देतात. मग उजवा हात ओला करून आणि अग्नीवर तापवून 'तेजसा मा समनज्मि' या मंत्राने तो मिटलेल्या ओठांवरून खाली आणतात. असे तीनदा करतात. मग उपस्थान, परिसमूह व पर्युक्षण, तसेच विभूतिग्रहण केल्यावर गोत्र–प्रवरांसहित आपल्या नावाचा उच्चार करून अग्नीला व वृद्ध मंडळींना अभिवादन करतात. [ आचारेंदुः ]

**अग्निकुले** अग्नीपासून सुरू झालेल्या घराण्यांना अग्निकुले असे म्हणतात. यांत चौहान, चालुक्य, परमार व पडिहार या चार राजपूत कुलांचा समावेश होतो. या कुलांविषयी श्री. चिंतामणराव वैद्य यांनी आपले मत पुढीलप्रमाणे मांडले आहे—ही चार राजपूत कुळे आपणांस अग्निकुले मानतात; पण ते चुकीचे आहे. इ. स. १००० च्या सुमारास ही कुले आपणास सूर्य व चंद्र वंशाचे समजत. चंदभाटाने पृथ्वीराजरासोत त्या कुलांच्या अग्निकुंडातून उत्पत्तीचे वर्णन लिहून ठेविले व त्यामुळे या कल्पनेला ऐतिहासिक स्वरूप येऊन, ही कुले आपणास अग्निवंशज समजू लागली. पण याचा दुष्परिणाम असा झाला, की पाश्चात्य संशोधक या कुलांतील लोकांना हूण इत्यादी अनार्य जातीचे, पण वसिष्ठाने अग्निसंस्कार करून क्षत्रिय बनविलेले लोक, असे मानू लागले. परमार राजे स्वतःला वसिष्ठोद्भव सूर्यवंशी क्षत्रिय मानतात. तसेच इ. स. १०००–१२०० या कालविभागातील कोरीव लेखांत राजपुतांच्या अग्निवंशाचा उल्लेख कोठेही नाही. गाहडवालांच्या एका कोरीव लेखात सूर्य व सोम या दोनच क्षत्रिय वंशांचा निर्देश आहे.

चंदभाटापूर्वी अग्निकुलाच्या कल्पनेचा अभाव होता, हा श्री. वैद्यांचा निर्णय डॉ. केतकरांस मान्य नाही. ते म्हणतात, की चंदभाटापूर्वीही परमार राजे स्वतःला अग्निकुलोत्पन्न समजत. ही अग्निकुलाची कल्पना बरीच जुनी असली पाहिजे. कारण प्राचीन तमिळ वाङ्मयातही तिचा निर्देश आढळतो. परंबुनाडूच्या पारी नामक राजाच्या मुलींची लग्न करण्यासाठी कपिलर नावाचा त्याचा मित्र त्या दोन राजकन्यांना घेऊन ज्या दोन राजांकडे गेला, त्यांतला एक राजा अग्निकुलोत्पन्न असल्याचे त्याने लिहिले आहे. कपिलरचा काळ इ. स. चे दुसरे शतक हा असावा, असे डॉ. होर्नले याचे मत आहे. यावरून अग्निकुलाची कल्पना इतकी मागे न्यावी लागते. अग्निकुलांचा वास्तव इतिहास उपलब्ध नाही. त्यामुळे त्यांच्या उत्पत्तीविषयी एका पौराणिक कथेवर अवलंबून राहावे लागते. ती कथा पुढीलप्रमाणे —

क्षत्रियांनी ब्राह्मणांचा छळवाद आरंभिल्यामुळे परशुरामाने त्यांच्या विरुद्ध हत्यार उपसले व एकवीस वेळा क्षत्रियांचा निःपात केला. पण त्याचा परिणाम असा झाला, की क्षत्रियांच्या अभावी दैत्य माजले व त्यांनी सर्वत्र अंदाधुंदी सुरू केली. मग अर्बुद (अबू) पर्वतावर निवास करणाऱ्या ऋषींना दैत्यांचा अत्याचार असह्य होऊन त्यांनी श्रीविष्णूचा धावा केला. विष्णूने ऋषींना क्षत्रियांच्या पुनर्निर्मितीचा आदेश दिला. त्यांना मदत करण्यासाठी इंद्र, ब्रह्मा, रुद्र या देवांसह विष्णूही अर्बुद पर्वतावर आला. ऋषींनी क्षत्रियांच्या पुनर्निर्मितीसाठी यज्ञ करायचे ठरविले. सर्व तयारी झाली. इंद्र हा त्या यज्ञाचा पहिला यजमान झाला. त्याने दर्भाची एक मानवी आकृती तयार करून अग्नीत टाकली. ऋषींनी संजीवन मंत्र म्हटला. त्यासरशी ' मार, मार' अशी आरोळी ठोकीत एक पुरुष वर आला. हा पहिला अग्निकुलोत्पन्न क्षत्रिय होय. ऋषींनी त्याचे परमार असे नाव ठेविले.

त्यानंतर ब्रह्मा, रुद्र व विष्णू या तीन्ही देवांनी इंद्राप्रमाणेच केले आणि त्यांपासून चालुक्य, परिहार व चौहान असे तीन पुरुष अग्नीतून निर्माण झाले. हे चार पुरुष चार अग्निकुलांचे मूळ पुरुष होत. त्यांचे व दैत्यांचे युद्ध झाले व त्यात सर्व दैत्य-दानवांचा निःपात झाला. नंतर परमाराला अबू, धार व उज्जैन या प्रदेशांचे स्वामित्व देण्यात आले. चालुक्य पाटणाचा राजा झाला. परिहार हा मरुस्थलीचा (कच्छचे रण) स्वामी बनला. चौहान मकावती प्रदेशाचा राजा झाला. चंदभाटाने म्हटले आहे की छत्तीस राजकुलांत अग्निकुल श्रेष्ठ आहे. कारण त्याचा जन्म अग्नीपासून अतएव अयोनिज असा आहे. पाहा – परमार, चालुक्य, परिहार, चौहान. [ अॅं. अॅं. रा.; म. यु. भा.; म. ज्ञा. को.]

**अग्निचयन** सोमयागात पूर्व दिशेस उत्तरवेदी नावाचा एक ओटा तयार करतात व त्यावर विटांनी रचलेले एक कुंड तयार करतात, त्याला चयन असे नाव आहे. चयनाच्या श्येन, रथचक्र, द्रोण, कंक, सुपर्ण, इ. अनेक आकृती सांगितलेल्या आहेत. एकेका आकृतीत किती इष्टका (विटा) मांडाव्या, त्यांचे आकार व मापे काय असावी, इ. तपशील श्रौतसूत्रांत दिलेला असतो. विशेष म्हणजे चयनांतली प्रत्येक वीट मांडताना मंत्र म्हणायचा असतो. मंत्रांत जो महत्त्वपूर्ण शब्द आला असेल, तो प्रतीक मानून त्याचे नाव इष्टकेला दिले जाते. उदा० वर्चस्या, तेजस्या, रेतस्या, इ. (अष्टाध्यायी ४. ४. १२५). तैत्तिरीय शाखेच्या सूत्रकारांनी श्येनचितीचा व कात्यायनाने सुपर्णचितीचा विधी प्रामुख्याने सांगितला आहे. इतर प्रकारची चयने प्रचारात नाहीत. श्येन किंवा सुपर्ण यांचा उल्लेख गरुडचयन याही शब्दाने केला जातो. पहिल्या सोमयागात चयन करायचे नसते. वाजपेय आणि सारस्वतसत्र यांमध्ये

चयन करू नये, असे सत्याषाढ श्रौतसूत्रांत सांगितले आहे (११.१). चयनाचा विधी असा–

फाल्गुन पौर्णिमेस इष्टी करून चयनयुक्त सोमयागाचा संकल्प केल्यानंतर उखासंभरण हा विधी करतात. त्यासाठी एक घोडा व एक गाढव घेऊन गावाबाहेर जातात. विशिष्ट जागी घोड्याला उभे करून त्याच्या पावलावर आज्याची आहुती देतात. नंतर तिथली माती मंत्र म्हणून कृष्णाजिनात भरतात व गाढवाच्या पाठीवरून ती यज्ञशाळेत वाहून आणतात. मग त्या मातीत कौलांचे तुकडे, भाताचा कोंडा, बारीक वाळू, बकऱ्याचे केस, इ. पदार्थ मिसळतात. माती चांगली मळून तिचे उखा नावाचे कुंडाच्या आकाराचे भांडे तयार करतात. उखेची उंची वीतभर असते. तिच्या गळ्याजवळ मेखला करतात. चारही बाजूंना स्तनासारखे उंचवटे करतात. ती उखा गार्हपत्य अग्नीवर वाळवितात. एका खड्डयात उखा ठेवून भोवती अग्नी घालून ती भाजतात. हे सर्व कर्म समंत्रक असते. नंतर पशुयाग करतात. पाच (किंवा एकच) पशू या यागात घेतात. त्यांची शिरे काढून ठेवतात. याच वेळी एका पुरुषाचे मस्तकही आणून ठेवण्यास सांगितले आहे. किंवा ही पशूंची शिरे आणि पुरुषाचे शिर ही मातीचीच करण्याबद्दलही सांगितले आहे. पशुयागानंतर उखासंभरण करतात. यजमानाचा दीक्षाविधी झाल्यावर उखा आहवनीय अग्नीवर धरतात. तिच्यात दर्भाचे तुकडे घालतात. उखा तापून लाल झाली म्हणजे आतले ते दर्भ पेटतात. हाच उख्याग्नी होय. याला तै. सं. (५. १. ९) मध्ये स्वयंभू म्हटले आहे. मग यजमान त्याचे उपस्थान करतो. एवढे झाल्यावर ती उखा घडवंचीवर ठेवतात. अग्नी उत्पन्न झाल्यापासून त्याला गार्हपत्याच्या आयतनात ठेवीपर्यंत तो भूमीवर ठेवायचा नसतो. म्हणून यजमान आपल्या गळ्यात शिकाळे अडकवून त्यात अग्नीसह ती उखा ठेवतो. गार्हपत्य आयतनासाठी २१ इष्टकांचा चौकोनी ओटा बनवितात. याला गार्हपत्यचिती असे नाव आहे. तिच्यावर मग उख्याग्नीची स्थापना होते. यज्ञशाळेच्या नैर्ऋत्येस दूर अंतरावर तीन इष्टका मांडून ते शिकाळे टाकून देतात.



सुपर्णचयन

ज्या ठिकाणी महाग्नीचे चयन करायचे, ती जागा पुरुषमानाने म्हणजे यजमानाचा हात उंच करून जेवढी उंची भरेल त्या मानाने मोजून घेतात. ती जागा मंत्रपूर्वक नांगरतात. पाणी शिंपडून तिच्या मध्यभागी दर्भस्तंब लावतात. मग त्यावर ज्या आकृतीची चिती करावयाची असेल, तदनुसार इष्टका मांडतात. इष्टकांच्या एका थराला प्रस्तर म्हणतात. एका प्रस्तरात कमीत-कमी दोनशे इष्टका असतात. चयनाच्या पूर्व बाजूला शीर्ष, दोन्ही बाजूंना पक्ष, मागच्या अंगाला पुच्छ व मध्यभागाला आत्मा म्हणतात. साधारणपणे रोज एक एक प्रस्तर मांडतात.

प्रस्तर मांडून झाल्यावर त्यावर माती पसरतात. इष्टका मांडण्याच्या पूर्वी मध्यभागी उखा व दर्भस्तंबाजवळ कमलपत्रावर सोन्याची पुरुषप्रतिमा ठेवतात (तै. सं. ५. २. ७.). रुक्म, तूप आणि दही यांनी भरलेल्या स्रुचाही ठेवतात. पशूंची मस्तके, पुरुषमस्तक, तसेच उखळ व मुसळही तिथे ठेवतात. नंतर निरनिराळे मंत्र म्हणून शीर्ष, पुच्छ, पक्ष आणि आत्मा या ठिकाणी इष्टकांचा प्रस्तर मांडतात. एक प्रस्तर झाला, की पहिली चिती झाली. याप्रमाणे पाच, सात, नऊ इतके प्रस्तर असतात. चयन तयार झाल्यावर पक्ष, पुच्छ आणि शीर्ष यांच्याजवळ उभे राहून उद्‌गाते निरनिराळी सामे गातात. सर्व इष्टका मांडून झाल्यावर शेवटच्या इष्टकेवर शतरुद्रीय होम करतात. शेळीचे दूध रुईच्या पानावरून ओततात व तसे करताना रुद्राध्याय म्हणतात. एका कळकाच्या टोकाला बेडूक बांधून तो कळक चितीवर फिरवून त्या बेडकाला मारतात. नंतर विधिपूर्वक महाग्निचितीवर अग्नीचे प्रणयन होते. वैश्वानर देवतेसाठी इष्टी, गणहोम, वसोर्धारा होम हे विधी होतात. वसोर्धारा होमात उंबराच्या लांब स्रुचीमधून अग्नीवर तुपाची सतत धार धरतात. सात प्रकारच्या धान्यांनी वाजप्रसवीय होम करतात. मग यजमानाला हुतशेष हविर्द्रव्यांनी अभिषेक करतात. नंतर राष्ट्रभृत होम करतात. महाग्नीच्या जवळ एक रथ आणून त्या रथाच्या मुखावरून राष्ट्रभृत होमातल्या शेवटच्या पाच आहुती देतात. तो रथ मग यजमान अध्वर्यूला देतो. मग सोमयागाप्रमाणे अवभृथापर्यंत सर्व अनुष्ठान करतात.

सोमयागाबरोबर अग्निचयन केले असेल, तर त्यानंतर सौत्रामणीयाग करावा लागतो. अग्निचयन केल्यानंतर यजमान सर्वश्रेष्ठ होतो. मग त्याने कोणालाही उत्थापन देऊ नये व व्रतस्थ राहावे, असे सांगितले आहे.

चयनाच्या विधीत इष्टकाकरण म्हणजे विटा तयार करणे, याचा तपशील सूक्ष्म रीतीने सांगितलेला आहे. चितीच्या रचनेत बरेच कौशल्य लागते. संवत्सर सत्रात चयनाचा विधीही वर्षभर चालतो. मंत्रसंग्रह मोठा आणि विधींची जटिलता, यामुळे चयनात ऋत्विजांच्या विद्येची कसोटी लागते. अजूनही क्वचित गरुडचयनाचे प्रयोग होतात. पण अन्य चिती नाममात्र राहिल्या आहेत.

तैत्तिरीय ब्राह्मण (३. १०–१२) आणि तैत्तिरीय आरण्यक (१ व ३) यांत काठकचयने सांगितली आहेत. सावित्र, नाचिकेत, चातुर्होत्र, वैश्वसृज व अरुणकेतू अशी पाच काठकचयने आहेत. अशा प्रकारची काठकचयने अन्य शाखांमधून दिसत नाहीत. यांचा विधीही भिन्न आहे. ही सोमयागाबरोबर करायची असतात. यांत इष्टका वापरीत नसून वाळूचे खडे वापरतात. त्यांनाच इथे इष्टका म्हटले आहे. बोटाच्या पेराएवढे सोन्याचे तुकडे इष्टका म्हणून घ्यावे, असेही सांगितले आहे. या चयनांचा आकार रथचक्राप्रमाणे असतो.

सावित्रचयनात रथचक्राच्या मापाएवढे वर्तुळ काढतात. या वर्तुळात एकात एक अशी आणखी नऊ वर्तुळे काढतात. त्या वर्तुळांच्या रेषांवर वाळूचे खडे मांडतात. या चितीवर अग्नीचे प्रणयन करून पशुबंध विधी करतात. पशूच्या अंगयागापूर्वी मृत्युदेवतेसाठी मांसरसाचा ग्रह भरून घेतात.

नाचिकेत चयनाचे अनुष्ठान सावित्रासारखेच आहे. या नाचिकेताग्नीचा विधी सांगताना तैत्तिरीय ब्राह्मणात (३.११.८) नचिकेता व यम यांचा संवाद आला आहे. यमाने नचिकेताला या चयनाचा विधी सांगितला, म्हणून याला नाचिकेत चयन म्हणतात.

चातुर्होत्र चयनामध्ये ८६ इष्टका सांगितल्या आहेत. त्या मांडताना तैत्तिरीय आरण्यकाच्या तिसऱ्या अध्यायातले मंत्र म्हणतात. बाकीचा विधी सावित्राप्रमाणेच असतो.

वैश्वसृज चयनामध्ये ४२ इष्टका असतात. त्या एका किंवा तीन थरात मांडतात. हा विधी सहस्रसंवत्सरसत्र, रात्रिसत्र, इ. सत्रांमध्ये केलाच पाहिजे, असे सत्याषाढ श्रौतसूत्रांत सांगितले आहे (२३. ३. २८). वरील चारही चयने एकदम करता येतात.

अरुणकेतुचयनाचा बहुतेक विधी सावित्रचयनाप्रमाणेच आहे. विशेष म्हणजे यातल्या इष्टका पाण्याच्या असतात. नदीचे पाणी, कढत पाणी व थंड पाणी अशा प्रकारचे त्रिविध पाणी म्हणजे इष्टका होत. या मांडताना पुष्कळ मंत्र म्हणावे लागतात. उत्तरवेदीच्या जागी रथचक्राएवढा गुढगाभर खोल खड्डा करून त्यात त्या जलरूप इष्टका सहा थरात मांडतात. चयन पुरे झाल्यावर अवशिष्ट जलाने यजमानाला अभिषेक करतात. नंतर चयनावर घडवंची ठेवून तिच्यावर अग्नीचे प्रणयन करतात. चयन झाल्यावर सौत्रामणी याग करावा लागतो. या पाचही चयनांसाठी लागणाऱ्या मंत्रब्राह्मणांचा द्रष्टा कठ हा ऋषी असल्यामुळे यांना काठकचयन असे नाव पडले आहे. अशा प्रकारे अग्निचयन करणाऱ्या यजमानाला अग्निचित म्हणत, असे पाणिनी सांगतो (अष्टा. ३. २. ९१).

यजुर्वेदकाळी अग्निचयनाला सोमयागाच्या बरोबरीने महत्त्व प्राप्त झाले होते. यज्ञधर्माच्या इतिहासात चयनसंस्था हा एक महत्त्वाचा टप्पा आहे. ईश्वराची परमपुरुष किंवा विश्वपुरुष रूपाने उपासना व मूर्तिपूजा अग्निचयनात उगम पावली आहे. मंदिरसंस्थेचा किंवा धार्मिक स्थापत्याचा प्रारंभ इथूनच होतो. शैव–वैष्णव धर्माचा उगमही अग्निचयनात झाला आहे. अग्निचयनात वैश्वानर इष्टी सांगितली असून, या वैश्वानराचे स्वरूप त्रैलोक्यव्यापी असल्याचे शतपथात सांगितले आहे (९.३.१३)

अग्निचयनाशी उपनिषदांचा निकटचा संबंध आहे. अग्निचयनातला हिरण्मय पुरुष म्हणजेच उपनिषदांतला विशुद्ध जीवात्मा अथवा परमात्मा होय. शतपथातील अग्निरहस्य हे दहावे कांड बृहदारण्यकोपनिषदाची प्रथम अवस्था आहे. छांदोग्य उपनिषदातील वैश्वानरविद्या व शांडिल्यविद्या अग्निरहस्यात प्रथम आली आहे. शांडिल्य हा चयनाचा द्रष्टा आहे. शांडिल्यविद्या ही उपनिषदांतल्या आत्मविद्येचे सूत्ररूप सारच होय. कठोपनिषदाचाही चयनसंस्थेशी संबंध आहे. त्याचा द्रष्टा नचिकेता हा चयनातल्या एका विधीचा प्रणेताच आहे. तैत्तिरीय उपनिषदाचा चयनातील पक्षिपुरुषाच्या उपासनेशी साक्षात संबंध आहे. तात्पर्य, विश्वात्मक परमपुरुषाच्या उपासनेचा प्रारंभ अग्निचयनात होत असून, उपनिषदांच्या तात्त्विक मननाचा प्रारंभही तिथेच होतो. उपनिषदांच्या इतिहासाच्या दृष्टीने अग्निचयनाची उपेक्षा करता येणार नाही.

पंजाबातील उत्खननात चयनाची रचना सापडली असून दक्षिणेत तुंगभद्रेच्या काठी उखा हे पात्र सापडले आहे. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे; वै. सं. बि.; हि. ध.]

**अग्निज्वाला** एका नरकाचे नाव. ऋषींच्या आश्रमांना उपद्रव देणारे लोक या नरकात जातात (ब्रह्मांड पु. ४.२.१४९). आश्रमाची कर्तव्ये करण्यापासून च्युत होणारेही या नरकात यातना भोगतात (वायुपु. १०१.१४८). [पु. इं.]

**अग्नितापस** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील १४१ क्रमांकाचे सूक्त याने रचले आहे. विश्वेदेवांची स्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. अग्नितापसाने अग्नी, अर्यमन, विष्णू, सूर्य, इ. देवतांकडून धनाची व साहाय्याची अपेक्षा केली आहे. याची एक ऋचा अशी –

इन्द्रवायू बृहस्पतिं सुहवेह हवामहे ।
यथा नः सर्व इज्जनः
सङ्गत्या सुमना असत् ।। (१०.१४१.४)

अर्थ – इंद्र, वायू आणि बृहस्पती हे भक्तांकडे सत्वर येतात, त्यांनाही आम्ही आदराने पाचारण करतो; कारण त्या योगाने आमच्याशी ज्यांचा संबंध येईल, असे सर्व लोक आमच्याविषयी उत्तम बुद्धी ठेवतील.

अग्नीने समक्ष येऊन आपल्याशी संभाषण करावे, अशी प्रार्थना कवीने केली आहे. [प्रा. च. को.; ऋ. म. भा.]

**अग्नितीर्थे** पुढील सहा ठिकाणी ही अग्नितीर्थे असल्याचे उल्लेख पुराणांत मिळतात—(१) यमुनेच्या दक्षिण तीरावर (२) वाराणसीच्या खालच्या अंगास (३) गोदावरीच्या किनाऱ्यावर (४) सरस्वतीच्या काठावर (५) साभ्रमतीच्या उत्तर तीरावर व (६) कुब्जाम्रकाच्या खालच्या बाजूस. [हि. ध.]

**अग्निदग्ध** पितरांचा एक वर्ग. ज्यांच्या प्रेताला दाहसंस्कार झाला ते अग्निदग्ध व ज्यांची प्रेते पुरली गेली ते अनग्निदग्ध होत. वेदकाळी प्रेते जाळणे व पुरणे अशा दोन्ही प्रथा होत्या. उपनिषत्काली प्रेतदहन हे अधिक प्रशस्त मानू लागले (छां. उ. ८.८.५). अग्निदग्ध व अनग्निदग्ध अशा अनामिक पितरांना सपिंडक श्राद्धांत पुढील मंत्राने भूमीवर जल देतात–

अग्निदग्धाश्च ये जीवा येऽप्यदग्धाः कुले मम ।
भूमौ दत्तेन तोयेन तृप्ता यान्तु परां गतिम् ।।

अर्थ – माझ्या कुलातले जे अग्निदग्ध व अनग्निदग्ध असे (मृत) जीव असतील, ते भूमीवर दिलेल्या (या) जलाने तृप्त होऊन परम गतीला जावोत. [वे. इं.]

**अग्निदान** हिवाळ्यातल्या कडक थंडीच्या दिवसांत गोरगरिबांना शीतनिवारणासाठी अग्नी मिळावा म्हणून एखाद्या तीर्थात, देवळात किंवा मठात सदैव शेकोटी पेटत राहील अशी व्यवस्था करणे, याला अग्निदान म्हणतात. फल– साठ हजार वर्षे स्वर्गवास. [दा. चं.]

**अग्निदिव्य** अग्नीच्या योगाने अपराधाची सत्यासत्यता ठरविण्याची रीत. अपराध्यावरील आरोप शाबीत किंवा नाशाबीत ठरविण्यासाठी प्राचीन काळी अशा माणसाला एखादी असह्य आणि धोकादायक क्रिया करायला लावीत. त्या प्रकाराला दिव्य असे नाव होते. आरोपी जर निरपराध असेल, तर त्याला सत्याच्या पक्षपाती देवता कोणतीही इजा होऊ देणार नाहीत, अशी या दिव्याच्या मागची धारणा होती. दिव्याचे अनेक प्रकार आहेत. त्यांपैकी अग्निपरीक्षा किंवा अग्निदिव्य हा एक प्रकार आहे. आरोपीने उकळत्या तेलाच्या कढईत हात बुडवून आत टाकलेली वस्तू बाहेर काढायची किंवा तप्त लोखंडाचा गोळा हातावर घ्यायचा, हे अग्निदिव्याचे स्वरूप होय. या दिव्यात त्याच्या हाताला जर इजा झाली नाही, तर तो माणूस निरपराधी आहे, असे मानीत.

हा विधी प्राचीन काळापासून सर्व जगात प्रचलित आहे. अग्नीची शोधक शक्ती रानटी लोकांनाही माहीत होती. सुसंस्कृत समाजात अलौकिक सामर्थ्याचे प्रदर्शन व सत्याची प्रतीती पाहणे, हे दोन अग्निदिव्याचे उद्देश असत. तांड्य ब्राह्मणात अग्निदिव्याची एक कथा आली आहे – दोन ब्राह्मणांनी आपले श्रेष्ठत्व

सिद्ध करण्यासाठी अग्निप्रवेश केला. त्यात वत्स हा ब्राह्मण शरीरावरचा एक केसही न जळता अग्नीतून सुखरूप बाहेर पडला व तोच श्रेष्ठ ठरला. अथर्ववेदात (२.१२) व छांदोग्य उपनिषदात (६.१६) अग्निप्रवेशाच्या ऐवजी तापलेले लोखंड धरण्याचा उल्लेख आहे.

सहा महिने रावणाच्या लंकेत राहिल्यामुळे सीतेच्या चारित्र्यावर जो अपवाद आला होता, तो घालविण्यासाठी तिनेही अग्निदिव्य केले होते. वाल्मीकि-रामायणात म्हटले आहे –

रामाने सीतेच्या चारित्र्याविषयी शंका घेतली. त्यामुळे तिला अत्यंत दुःख झाले. ती अग्निदिव्य करायला सिद्ध झाली. लक्ष्मणाने तिच्यासाठी चिता रचली. चितेला अग्नी दिल्यावर सीता देव आणि ब्राह्मण यांना नमस्कार करून निर्धारवचन बोलली –

**यथा मे हृदयं नित्यं नापसर्पति राघवात् ।**
**तथा लोकस्य साक्षी मां सर्वतः पातु पावकः ।।**
**यथा मां शुद्धचारित्र्यां दुष्टां जानाति राघवः ।**
**तथा लोकस्य साक्षी मां सर्वतः पातु पावकः ।।**
(वा. रा. युद्ध. ११६.२५–२६)

**अर्थ**–जर माझे हृदय कधीही राघवापासून दूर गेले नसेल, तर (हा) लोकसाक्षी अग्नी माझे सर्व प्रकारे रक्षण करो. मी शुद्धचरित असून, मला राघव कलंकित समजतो. तर (हा) लोकसाक्षी अग्नी माझे सर्व प्रकारे रक्षण करो.

असे म्हणून सीतेने त्या धडधडत्या चितेत प्रवेश केला. त्यासरशी त्या चितेतून मूर्तिमान अग्नी सीतेला हाती धरून बाहेर आला आणि त्याने सीतेचे पावित्र्य रामाला पटविले.

स्त्रियांच्या सतीत्वाची परीक्षा पाहण्याचा हा प्रकार भारतात तसेच इतर देशांतही प्राचीन काळापासून चालू आहे. त्या काळी लोखंडाचा एक फाळ तापवून लाल करीत व जिच्या चारित्र्याविषयी संशय उत्पन्न झाला असेल, अशा स्त्रीला तो जिभेने चाटायला लावीत. जर तिचे तोंड भाजले, तर ती व्यभिचारिणी व न भाजले तर सती ठरे. हा अग्निदिव्याचा प्रकार पुढे स्मृतिग्रंथांनीही मान्य ठरविला. त्याचा सामान्य विधी पुढील प्रमाणे होता –

पूर्व-पश्चिम अशी गोमयाची नऊ मंडले बनवीत. अग्नी, वरुण, वायू, यम, इंद्र, कुबेर, सोम, सविता व विश्वेदेव या त्या मंडलांच्या अनुक्रमे देवता मानीत. प्रत्येक मंडल १६ अंगुलांच्या अर्धव्यासाचे व दोन मंडलांत १६ अंगुलांचे अंतर असे. प्रत्येक मंडलात कुश पसरीत. मग एक लोहार ५० पलें वजनाचा व ८ अंगुले लांबीचा एक लोखंडाचा तुकडा तापवून लाल करी. मग विशिष्ट मंत्र म्हणून त्या लोहखंडावर देवतांचे आवाहन करीत. नंतर शोध्य माणूस पहिल्या वर्तुळात पूर्वाभिमुख उभा राही. न्यायाधीश त्याच्या हातांवर लाल रंगाच्या खुणा करी. मग त्या हातांवर पिंपळाची सात पाने ठेवून त्यांवर दधियुक्त अक्षता ठेवी. शोध्याचे (आरोपी) दोन्ही हात त्या पानांसह बांधले जात. मग न्यायाधीश त्या दोन्ही हातांवर सांडशीने ते तप्त लोहखंड ठेवी. मग शोध्याला पहिल्या मंडलातून दुसऱ्या मंडलात, दुसऱ्यातून तिसऱ्यात अशा प्रकारे आठ मंडलांपर्यंत सावकाश चालायला लावीत. मग नवव्या मंडलात ते लोहखंड शोध्याला टाकायला लावीत. मग हाताची परीक्षा करीत. जर ते भाजले नसतील किंवा त्यांवर फोड उठले नसतील, तर न्यायाधीश शोध्य व्यक्ती निर्दोष असल्याचे घोषित करी (कात्या. स्मृ. ४४१; याज्ञ. स्मृ. २.१०७)



अग्निदिव्याचा एक प्रकार

प्राचीन अग्निदिव्याची ही परंपरा आजही भारतात काही ठिकाणी, विशेषतः आग्नेय भारतात चालू असलेली दिसते. मात्र हे दिव्य सामाजिक अपराधांसाठी होत नसून, विशिष्ट देवतांचे उपासक आपला व्रतस्थपणा देवतेला पटविण्यासाठी ते करतात.

वर्षातल्या ठराविक दिवशी काही देवतांच्या जत्रा असतात. त्या देवतांचे भक्त अशा जत्रांना आवर्जून जातात. त्या आधी त्यांना काही दिवस व्रतस्थ राहावे लागते आणि जत्रेला गेल्यानंतर आपल्या व्रतपालनाचा पुरावा देण्यासाठी प्रथम अग्निदिव्य करावे लागते. त्या प्रसंगी एका विशिष्ट जागी खूप लाकडे घालून अग्नी पेटवितात. त्याचे निखारे झाले, की मग देवस्थानातला पुजारी त्या देवतेच्या अंगावरचे एक फूल आगीत टाकतो. ते न जळता तसेच राहिले, तर त्या अग्निदिव्याला देवतेची अनुज्ञा आहे, असे समजतात. मग भक्तगण त्या अग्निकुंडातून उघड्या पायांनी चालत जातात.

आंध्रामध्ये धर्मराजाचे एक मंदिर आहे. त्या मंदिरात पांड

व द्रौपदी यांच्या मूर्ती आहेत. जवळच सुमारे सहा हात लांब व तीन हात रुंद असे अग्निकुंड आहे. विशिष्ट दिवशी तिथला पुजारी कुंडातला निखारा फडक्यात बांधून ते फडके द्रौपदीच्या मूर्तीच्या कमरेला बांधतो. पण ते फडके थोडेसुद्धा जळत नाही, असे सांगतात. हे कृत्य झाल्यावर पुजारी मूर्तीवरचा एक पुष्पगुच्छ त्या अग्निकुंडात टाकतो. त्याला झळ बाधली नाही, की मग तोच गुच्छ हाती घेऊन तो त्या अग्निकुंडातून चालत जातो.

उडीसामध्ये चैत्र महिन्यात अशाच प्रकारे अनेक ठिकाणी अग्निदिव्याचे समारंभ होतात. रोगराईची आपत्ती टळावी हा त्यांचा उद्देश असतो. पूर्व लंकेमध्ये तर हा सोहळा मोठ्या समारंभाने साजरा होतो. तिथल्या पांडिरुप्प खेड्यातले लोक हा समारंभ करतात. त्यासाठी घरदार सुशोभित करतात. त्यानंतर गावातल्या सहा धर्मशील लोकांची निवड करतात. त्यांना पाच पांडव व द्रौपदी अशी नावे देतात. द्रौपदी झालेला माणूस स्त्रीवेष घेतो. त्यांनी तो सोहळा संपेपर्यंत मंदिरात एकभुक्त राहून रात्री महाभारताची कथा ऐकायची असते. अग्निदिव्याच्या आधी तीन दिवस त्यांतला अर्जुन एका खास उभारलेल्या खांबाच्या डोक्यावरील पिंजऱ्यात तपश्चर्येला बसतो. त्यानंतर तिथल्या द्रौपदीच्या मंदिरासमोर एक लांबरुंद खड्डा खणून तो लाकडाच्या ओंडक्यांनी भरून काढतात. अग्निदिव्याच्या दिवशी पुजारी त्या नामधारी द्रौपदीची पूजा करतो व अग्नीपासून सर्वांचे संरक्षण होण्याचा वर मागून घेतो. मग तो द्रौपदी झालेला माणूस पानसुपारी आणि केळी पदरात बांधून अग्निकुंडाला तीन प्रदक्षिणा घालतो व त्या वस्तू कुंडात ठेवून कुंडाला अग्नी लावतो. कुंड पुरते पेटून निखारे झाल्यावर त्यांतून स्वतः चालत जातो. त्याच्या मागून मग इतरही लोक जातात.

कर्नाटकात केसरकोड गावातले लोकही असाच अग्निदिव्याचा सोहळा करतात. त्यासाठी अग्निकुंडासमोर विष्णुभूत या देवतेची स्थापना करतात. मुख्य पुरोहित माडाच्या पात्यांनी आपले शरीर मढवितो. मंत्रतंत्रादी विधी झाल्यावर काही लोकांच्या अंगांत देवतांचे वारे संचारते. लगेच ते अग्निकुंडातून चालत जातात. त्यानंतर मुख्य पुरोहित धावत जाऊन त्या निखाऱ्यावर अंग टाकतो. मग इतर लोक त्याला उचलून बाहेर आणतात व अग्नीची प्रार्थना करतात.

गोमंतकात शिरगाव येथे वैशाख महिन्यात तिथल्या देवीची जत्रा होते. त्या वेळी तिचे धोंड नावाचे भक्त अग्निकुंडातून चालत जातात. पाहा – दिव्य. [ हि. ध.; एन्सा. रि. ए. ]

**अग्निधिष्ण्य ऐश्वर** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या नवव्या मंडलातील १०९ क्रमांकाचे सूक्त याने रचले आहे. हा ईश्वराचा पुत्र म्हणून याला ऐश्वर हे नाव मिळाले. या सूक्ताचा मूळकर्ता हा नसून अन्य कोणीतरी असावा, कारण ईश्वर-पुत्राच्या नावाने हे सूक्त सांगितले जाते, असे एक मत आहे. पवमान सोम हा या सूक्ताचा विषय आणि देवता आहे. याची एक ऋचा अशी –

**एवामृताय महे क्षयाय**
**स शुक्रो अर्ष दिव्यः पीयूषः ।** (९.१०९. ३)

अर्थ – भक्तांना अमरत्व आणि निवासस्थान देणाऱ्या हे अमृतोपम, तेजस्वी आणि दिव्य सोमा, तू उत्पन्न हो.

प्रस्तुतच्या सूक्तात सोम तयार करण्याची पद्धत सांगितली आहे आणि हाच या सूक्ताचा विशेष होय. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ.]

**अग्निपंचक** फलज्योतिषातला एक घातक योग. शुद्ध प्रतिपदेपासून चालू तिथीपर्यंत तिथी मोजून त्या संख्येत मुहूर्ताच्या काळी चालू असलेल्या लग्नाची संख्या मिळवितात. मग त्या संख्येस नवांनी भागून बाकी दोन राहिल्यास अग्निपंचक मानतात. यात अग्नीपासून भय असते, म्हणून गृहारंभास तो मुहूर्त वर्ज्य ठरविलेला आहे. [ मु. चिं. ]

**अग्निपावक** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील १४० वे सूक्त याच्या नावावर आहे. अग्निपावक हा या सूक्ताचा खरा कर्ता नसून अन्य कोणीतरी असावा असे सांगितले जाते. अग्निस्तुती हा प्रस्तुतच्या सूक्ताचा विषय आहे. याची एक ऋचा अशी–

**इष्कर्तारमध्वरस्य प्रचेतसंक्षयन्त राधसो महः ।**
**रातिं वामस्य सुभगां महीमिषंदधासि सानसिं रयिम् ।।** (१०. १४०. ५)

अर्थ – हे यज्ञसाधक आणि ज्ञानसंपन्न अग्ने, तू आम्हास उत्कृष्ट अन्न आणि उपभोग्य धन दे.

अग्निपावकाने क्षुद्र मनोवृत्तीच्या लोकांना आटोक्यात ठेवून खरे ऐश्वर्य आपणास बहाल करण्याबद्दल अग्नीची प्रार्थना केली आहे. [प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ.]

**अग्निपावक बार्हस्पत्य** एक सूक्तद्रष्टा. पाहा – प्रयोग भार्गव. [ ऋ. म. भा. ]

**अग्निपुराण** अठरा प्रसिद्ध पुराणांपैकी एक. याच्या नावावरून हे पुराण अग्निमाहात्म्य सांगणारे असावे, असे वाटते; पण अग्नीने वसिष्ठाला सांगितलेले विद्यासार या

अर्थाने त्याला अग्निपुराण म्हटले आहे. ‘ अग्निनोक्तं पुराणं यदाग्नेयं वेदसम्मितम् ’, अग्निपुराण अग्नीने सांगितले असून ते वेदतुल्य आहे, असे त्या नावाचे स्पष्टीकरण दिले आहे (६०). यात अग्निरुवाच, ईश्वर उवाच, पुष्कर उवाच, इ. वक्त्यांची नावे आहेत. त्यावरून हे तीन-चार वक्त्यांनी मिळून सांगितले आहे, असे दिसते. सर्ग-प्रतिसर्गादी पुराणांची पाच लक्षणे यात दिसत असली, तरी इथे त्यांना विशेष महत्त्व नाही. परा व अपरा या विद्यांना धरूनच या पुराणाचा विस्तार आहे. वेद व त्यांची षडंगे, तसेच मीमांसादी दर्शने, इ. सर्व विद्यांचा या पुराणात अपरा विद्या या नावाने निर्देश असून जिच्या योगाने ब्रह्मज्ञान होते, त्या अध्यात्मविद्येलाच परा विद्या म्हणून गौरविले आहे (१.१७). याशिवाय अवतार, चरित्रे, राजवंश, विश्वाची उत्पत्ती, तत्त्वज्ञान, व्यवहार, नीती, असे विविध विषय यात विवेचिले आहेत. अध्यात्माविषयी मात्र अल्पसेच विवेचन असल्यामुळे या पुराणाला तामसकोटीत घातले आहे. यात एखाद्या विशिष्ट पंथाचा पुरस्कार नसला, तरी पुराणकाराचा शैव धर्माकडे कल दिसतो. या पुराणाच्या रचनाकाली भारतात शैव धर्म प्रतिष्ठित झाला होता, हे यावरून कळून येते.

आनंदाश्रमाने प्रसिद्ध केलेल्या अग्निपुराणाच्या प्रतीत ३८३ अध्याय असून श्लोकसंख्या ११,४५७ आहे; पण निरनिराळ्या पुराणांनी या पुराणाची श्लोकसंख्या भिन्न भिन्न दिली आहे. नारदपुराणातल्या सूचीत दिलेला ईशानकल्पवृत्तान्त उपलब्ध प्रतीत आढळत नाही. त्याचप्रमाणे अग्निपुराणातून म्हणून घेतलेले उतारे (उदा० बल्लाळसेनाचा दानसागर) उपलब्ध प्रतीत आढळत नाहीत. यावरून या पुराणाचा काही भाग लुप्त झाला असावा, असे वाटते.

या पुराणाचा काळ कोणता याविषयी मतभेद आहेत. म. म. काणे यांच्या मते तो इ. स. चे दहावे शतक, तर श्री. काळे यांच्या मते तो पाचवे किंवा सहावे शतक हा आहे. इ. स. च्या पाचव्या शतकानंतर व मुसलमानी स्वाऱ्या भारतावर होण्याच्या आधी याचे संकलन झाले असावे, असे डॉ. केतकरांचे मत आहे. अन्य पुराणांत सांगितलेल्या अग्निपुराणाच्या १५–१६ हजार श्लोकसंख्या लक्षात घेऊन हे पुराण पूर्वी आजच्यापेक्षा मोठे असावे व आजचे पुराण त्याची संशोधित अवशिष्टरूप आवृत्ती असावी, असे श्री. काळे म्हणतात.

अग्निपुराणाचा प्रथम श्लोक पुढीलप्रमाणे आहे–

श्रियं सरस्वतीं गौरीं गणेशं स्कन्दमीश्वरम् ।
ब्रह्माणं वह्निमिन्द्रादीन् वासुदेवं नमाम्यहम् ।।

नमनानंतर सर्ग, प्रतिसर्ग, इ. विषय डावलून एकदम अवतारकथेपासून वर्णनाला प्रारंभ झालेला आहे. १ ते १६ हे अध्याय अवतारवर्णनात खर्ची पडले आहेत. मात्र या अवतारमालिकेत कूर्मावताराचा उल्लेख नाही. वाल्मीकि-रामायणातील रामकथा यात संक्षिप्त रूपाने दिलेली आहे. ‘ रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव ’ हे अनन्वयाचे सुप्रसिद्ध उदाहरण अग्निपुराणातूनच घेतले आहे (११. २. २३). कृष्णावताराच्या भागात गोमंतपर्वताचा उल्लेख आहे. हा गोमंतपर्वत म्हणजे आजच्या गोमंतकाला लागून असलेल्या सह्याद्रीच्या श्रेणीतला एखादा डोंगर असावा, असा तर्क आहे.

महाभारताचा साररूप कथाभागही यात दिलेला आहे. अग्निपुराणाच्या रचनेच्या कालात हिंदूंच्या अवतारपरंपरेत बुद्धाला स्थान मिळाले होते, हे उघड दिसते. इथे बुद्धाला विष्णूचा अवतार म्हटले असून, विष्णूने हा अवतार का ग्रहण केला, याविषयी पुढील कथा दिलेली आहे–

प्राचीन काळी सगळे दैत्य वैदिक कर्मे आचरणारे होते. त्यामुळे ते बलवानही होते. एकदा देव-दैत्यांच्या युद्धात देवांचा पराभव झाला. तेव्हा देवांनी विष्णूची प्रार्थना केली व विष्णूने दैत्यांना धर्मभ्रष्ट करून त्यांचा नाश करण्यासाठी बुद्धावतार घेतला.

अवतारवर्णनाचा हा विषय झाल्यावर मग सर्ग-प्रतिसर्गांच्या वर्णनाला प्रारंभ होतो. त्यात अव्यक्त ब्रह्मापासून सकल सृष्टी कशा क्रमाने उत्पन्न झाली, ते सांगून पुढे देवोपासना, मंत्र व तदनुषंगिक गोष्टी सांगितल्या आहेत. अध्याय २९ ते ४५ यांत वास्तुशास्त्राचा विचार आलेला आहे. त्यात देवालय कसे बांधावे, देवतांच्या मूर्ती कशा कराव्या, देवप्रतिष्ठा व जीर्णोद्धार कोणत्या पद्धतीने करावे, इ. विषय सांगितले असून देवप्रतिष्ठा करावयास मध्यदेशातील ब्राह्मणच पात्र असून कच्छ, कावेरी, कोकण, कलिंग, या देशांतले ब्राह्मण अपात्र आहेत, असे म्हटले आहे.

यापुढील अध्यायांत सप्तद्वीपे व सागर यांची नावे व वर्णने आहेत. त्यापुढे राजधर्म वर्णिलेला आहे. राजा कसा असावा यासंबंधी पुढील वचन आहे–

राजा स्यात् जनरञ्जनात् ।

(अग्निपुराण २२०.२४)

अर्थ – जनांच्या रंजनाने राजा हा राजा ठरतो.

राजाने आपल्या प्रजाजनांना कधीही पीडा देऊ नये व प्रजेचे प्रेमही संपादन करावे, याविषयी पुढील वचने आढळतात–

अरक्षिताः प्रजा यस्य नरकं तस्य मन्दिरम् ।

(अग्निपुराण २१३.१

अर्थ – ज्याच्या प्रजा अरक्षित असतात, त्या राजाला नरकात राहावे लागते.

जनानुरागप्रभवा राज्ञो राज्यमहीश्रियः ।

(अग्निपुराण २२३.३

अर्थ – राजाच्या राज्य, पृथ्वी आणि संपत्ती या गोष्टी प्रजेच्या अनुरागातूनच निर्माण होतात.

या पुराणात राजा, राज्य आणि राजकारण या सर्व गोष्टींचे सविस्तर वर्णन आलेले आहे. यातला विशेष भाग म्हणजे गीतासाराचा. एकेका श्लोकात वा श्लोकार्धात त्या त्या अध्यायाचे तात्पर्य येऊन जाते. उदा०

गतासुरगतासुर्वा न शोच्यो देहवानज ।

(अग्निपुराण ३८१.२)

यात गीतेच्या दुसऱ्या अध्यायाचे सार येऊन गेले आहे.

दानाविषयी अग्निपुराण म्हणते –

देशे काले च पात्रे च दानं कोटिगुणं भवेत् ।

(अग्निपुराण २०९.५)

अर्थ – देश, काल आणि पात्र यांचा विचार करून दिलेले दान कोटिगुणित होते.

गायीचे महत्त्व सांगताना पुढील श्लोक आलेला आहे –

गावः प्रतिष्ठा भूतानां गावः स्वस्त्ययनं परम् ।
अन्नमेव परं गावो देवानां हविरुत्तमम् ।।

(अग्निपुराण २९२.१५)

अर्थ – गायी या प्राणिमात्राची प्रतिष्ठा आहे. गायी हे परममंगल आहे. गायी (गोरसपदार्थ) हे परम अन्न व देवांचे उत्तम हविर्द्रव्य आहे.

या पुराणाची प्रशस्ती सांगताना अग्निपुराण हे विष्णूचे महत्तर रूप असे म्हटले आहे.

आग्नेये हि पुराणेऽस्मिन् सर्वा विद्याः प्रदर्शिताः ।

(अग्निपुराण ३८३.२५)

अर्थ – या अग्निपुराणात सर्व विद्यांचे प्रदर्शन झालेले आहे.

या पुराणाला समस्त भारतीय विद्यांचा विश्वकोश म्हटले, तरी त्यात अतिशयोक्ती होणार नाही. राजनीती, धर्मशास्त्र, ज्योतिष, आयुर्वेद, व्रते व तीर्थे यांची वर्णने या पुराणात विस्ताराने केलेली आहेत. छन्दःशास्त्र, अलंकारशास्त्र व व्याकरणशास्त्र यांच्याही विवेचनात कित्येक अध्याय खर्ची पडले आहेत. राजयोगाच्या अष्टांगांचे वर्णन संक्षिप्त व सुंदर आहे. गीतासाराप्रमाणेच शेवटी अद्वैत वेदान्ताचेही सार दिलेले आहे. याशिवाय अनेक प्रकारची कल्पविद्या, मंत्रविद्या, मोहिनीविद्या, वृक्षवैद्यक, अश्ववैद्यक, वनौषधी हे विषयही या पुराणात विस्ताराने सांगितले आहेत. [ वि. ध. द.; पु. नि.; हि. ध.; म. ज्ञा. को. ]

**अग्निप्रवेश** प्राणोत्सर्ग करण्याचा एक प्रकार. महाभारतात देहत्यागाचे जे प्रकार सांगितले आहेत, त्यांत अग्निप्रवेशही सांगितला आहे (शांति. ३५.१७). अत्रीच्या मताप्रमाणे अशक्त, नियमपालनास असमर्थ व असाध्य रोगाने ग्रस्त अशा मनुष्याने स्वतःचा कडेलोट करून, पाण्यात बुडून, प्रायोपवेशन करून वा अग्निप्रवेश करून प्राणत्याग करणे ही गोष्ट धर्म्य आहे. लक्ष्मीधराने तीर्थविवेचनकांडात या अग्निप्रवेशाचा विधीही दिला आहे. हा अग्निप्रवेश समंत्रक असे. त्यापूर्वी वस्त्रावर भैरवमूर्ती रेखाटून तिची रक्तपुष्पाने पूजा करून मग अग्नीत उडी टाकीत. या अग्निप्रवेशाचे आठ प्रकार सांगितलेले आहेत–

(१) पतंगपात – कीट-पतंगाप्रमाणे आगीवर झडप घालणे. (२) हंसपात – अंगांचा संकोच करून आगीत उडी घेणे. (३) मृगपात – हरिण खड्डयावरून उडी मारताना फसून आत पडतो, त्याप्रमाणे करणे. (४) मुसलपात – उखळात मुसळ ज्या पद्धतीने पडते, तद्वत् उडी घेणे. (५) वृषपात – बैलाप्रमाणे हुंकार करीत उडी घेणे. (६) विमानपात – विमान आदळते त्याप्रमाणे पडणे. (७) शाखापात – फांदीवरून खालच्या आगीत उडी घेणे व (८) सिंहपात – सिंहाच्या पवित्र्याने उडी घेणे.

प्राचीन काळी पुरुषांप्रमाणे स्त्रियाही यांपैकी कोणत्यातरी पद्धतीने अग्निप्रवेश करीत होत्या. अर्थात अशा प्रकारच्या गोष्टी अपवादात्मकच घडत. कोणी एखादा जिवाला कंटाळला असल्यास धर्मशास्त्राने त्याच्या देहत्यागाला अशा प्रकारे सवलत ठेवली होती, एवढाच याचा अर्थ आहे. [ शृं. हा. ]

**अग्निमुख** ग्रहमख, व्रतोद्यापन, शांती, संस्कार, इ. कर्मांच्या वेळी स्थंडिलावर अग्निस्थापना करून हवन वगैरे कर्मे केली जातात. या विधीचे जे तंत्र त्याला अग्निमुख असे म्हणतात. कोणतेही साग्निक कर्म म्हटले, की त्याचे तंत्र एकच असते. देवता, हविर्द्रव्य व मंत्र तेवढे त्या त्या कर्माला अनुसरून भिन्न असतात. अग्निमुखाचे सामान्य तंत्र पुढील प्रमाणे –

अग्निस्थापनेच्या जागी स्थंडिल म्हणजे मातीचा चौकोनी ओटा तयार करतात. 'इषुमात्रावरं सर्वतः स्थण्डिलमुपलिप्य (= कमीत कमी बाणाच्या लांबीइतक्या चारही बाजू असतील, असे स्थंडिल करावे), असे आश्व. गृह्यसूत्रात सांगितले आहे. (१.३.१). सत्याषाढ सूत्रांत (१८.१) त्याची चौरस लांबी एक हात किंवा खांद्यापासून बोटापर्यंत भरेल एवढी असावी, असे म्हटले आहे. ते चार बोटे उंच करतात. त्यावर 'ब्रह्मा यमश्च सोमश्च रुद्र ईशश्शक्रतुः' या पंक्तीत सांगितल्याप्रमाणे सहा देवतांसाठी सहा रेषा समिधेने ओढतात. त्यावर लौकिकाग्नीची स्थापना करतात. प्रत्येक कर्मात या अग्नीचे नाव भिन्न असते –

सभ्यनामा तु चौले स्याद् व्रतादेशे समुद्भवः ।
गोदाने सूर्यनामाग्निर्विवाहे योजकः स्मृतः ।।
आवसथ्ये द्विजो ज्ञेयो वैश्वदेवे तु रुक्मकः ।

**देवानां हव्यवाहश्च पितृणां कव्यवाहनः ।।**

अर्थ – चौलाच्या अग्नीला सभ्य, उपनयनाच्या समुद्भव, गोदानाच्या सूर्य, विवाहाच्या योजक, वास्तुशांतीच्या द्विज, वैश्वदेवाच्या रुक्मक, देवांच्या हव्यवाह व पितरांच्या अग्नीला कव्यवाहन अशी नावे आहेत.

अग्निस्थापना व ध्यान झाल्यावर देवतांचे अन्वाधान करतात. यात त्या त्या कर्माच्या देवतेसाठी सांगितलेले हविर्द्रव्य व त्याची आहुतिसंख्या यांचा निर्देश होतो. अग्नीच्या भोवती परिसमूहन (पाणी फिरविणे) करून दर्भाची परिस्तरणे घालतात. हे दर्भ पूर्व-पश्चिमेस उत्तरेकडे अग्रे करून व दक्षिण-उत्तरेस पूर्वेकडे अग्रे करून घालतात. दक्षिणेस ब्रह्मासाठी आसनाचा दर्भ टाकतात. अग्नीच्या उत्तरेस दर्भ पसरून त्यांवर कर्मासाठी लागणारी पात्रे व एकवीस समिधांची जुडी या स्वरूपात इध्मा व बर्ही (दर्भांची जुडी) असे सर्व मिळून पात्रासादन (पात्रांची मांडणी) करतात. मग ब्रह्मा आपल्या आसनावर बसतो. दोन साग्र दर्भांचे प्रादेशमात्र पवित्रक करून ते प्रणीता नावाच्या पात्रावर ठेवून त्यात पाणी घालतात. पवित्रकाने त्या जलाचे उत्पवन करून (वर उडवून) ते पात्र अग्नीच्या उत्तरेस ठेवतात. दुसऱ्या एका पात्रात जल शुद्ध करून त्याने सर्व पात्रांचे प्रोक्षण करतात. दर्वी व स्रुची यांचे संमार्जन करतात. आज्यपात्रात तूप घालून ते अग्नीतून बाहेर काढलेल्या निखाऱ्यावर तापवितात. दर्भ पेटवून तीन वेळा त्याच्या भोवती फिरवितात. मग ते आज्य अग्नीच्या पश्चिमेस बर्हीवर ठेवतात. पूर्व बाजू वगळून स्थंडिलाच्या बाकीच्या तीन बाजूस परिधी घालतात व परिषेक करतात. इध्म्यावर आज्य टाकून त्याचा होम करतात. आधारसंज्ञक दोन आहुती वायव्येकडून आग्नेयीकडे व नैर्ऋत्येकडून ईशान्येकडे अशा क्रमाने देतात. चक्षुषीसंज्ञक दोन आहुती देतात. नंतर व्याहृतिहोम करून त्या त्या कर्माच्या देवतांच्या उद्देशाने प्रधान होम करतात. प्रधान होमानंतर अंगयागसंज्ञक आज्याहुती देतात. जय, अभ्यातान, राष्ट्रभृत या नावाचे होम स्विष्टकृतापूर्वी करावे, असे सत्याषाढ सूत्रांत सांगितले आहे (१९.१.५०). प्रधान होमासाठी जी हविर्द्रव्ये असतील, त्या सर्वांतला थोडा अंश घेऊन स्विष्टकृताची आहुती देतात. इतर आहुतींशी तिचा संसर्ग होऊ द्यायचा नसतो. इध्म्याला बांधलेल्या दर्भाच्या दोरीचा होम करतात. परिस्तरणातले काही दर्भ घेऊन त्यांना आज्य लावून त्यांचा होम करतात. भूमिस्पर्श करून हात धुतात. अग्नीभोवतालच्या तीनही परिधींचा होम करतात. उत्तर परिषेक करून प्रणीतेचा विमोक करतात. ब्रह्मयाला दक्षिणा देतात. शांती किंवा व्रतोद्यापने इ. कर्मांत प्रधान देवतांना व क्षेत्रपालाला बलिदान करतात. मग अग्नीची पूजा व प्रार्थना करून कर्म संपवितात.

विवाह, उपनयन, इ. संस्कारांत यजमान स्वतः अग्निमुख करतो. त्या त्या संस्काराचें विशिष्ट विधी अग्निमुखाच्या तंत्रामध्येच करायचे असतात. ग्रहमख, स्वाहाकार, इ. मोठ्या अनुष्ठानांत यजमानाने वरलेला आचार्य हे कर्म करतो. आहुतींच्या संख्येनुसार अग्निकुंडाचे प्रमाणही कमीअधिक असते. कर्मानंतर आचार्याला दक्षिणा देणे व ब्राह्मणभोजन घालणे या गोष्टी करतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**अग्नियुत स्थौर** एक सूक्तद्रष्टा. याला अग्नियूप असेही म्हणतात. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील ११६ वे सूक्त याने रचले आहे. इंद्रस्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. नमुन्याची एक ऋचा अशी–

**नि तिग्मानि भ्राशयन् भ्राश्यान्यव स्थिरा तनुहि यातुजूनाम्।**
**उग्राय ते सहो बलं ददामि प्रतीत्या शत्रून् विगदेषु वृश्च ।।**

अर्थ – हे लखलखीत आयुधधारी, हविर्दत्त आणि पराक्रमी इंद्रा, आक्रमक शत्रूंची आणि राक्षसांची बळकट शरीरे तू नष्ट कर.

अग्नियुताने इंद्राकडे भाग्य, धन, इ. गोष्टींची मागणी केली आहे. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ. ]

**अग्निवेश** आयुर्वेदाचा आचार्य. भागवतात याला देवदत्ताचा पुत्र व अग्नीचा अवतार म्हटले आहे (९.२.२१–२२). हा अलौकिक प्रतिभावान, होता, असे म्हटले आहे. आत्रेय पुनर्वसू हा याचा गुरू होय. त्याच्या सर्व शिष्यांत हाच कुशाग्रबुद्धीचा होता. चरकसंहितेत त्याच्या विषयी म्हटले आहे–

**बुद्धेर्विशेषस्तत्रासीन्नोपदेशान्तरं मुनेः ।**
**तन्त्रस्य कर्ता प्रथममग्निवेशो यतोऽभवत् ।।** (सू. १.१)

अर्थ – मुनी पुनर्वसू याच्या उपदेशात भेद नव्हता; पण बुद्धीच्या विशेषत्वामुळे सर्व तंत्रकर्त्यांत अग्निवेश हा पहिला ठरला.

याने आयुर्वेदाचे तंत्र रचले ते अग्निवेशतंत्र या नावाने प्रसिद्ध आहे. हे अष्टांगात्मक असूनही कायचिकित्साप्रधान आहे. त्यावरूनच पुढे चरकाने अधिक संशोधन करून चरकसंहिता लिहिली. चरकाने प्रत्येक अध्यायाच्या शेवटी 'इत्यग्निवेशकृते तन्त्रे चरकप्रतिसंस्कृते' अशी या गोष्टीची नोंद करून ठेविली आहे.

तैत्ति. प्रातिशाख्यावरून कळते, की कृष्ण यजुर्वेदाची एक अग्निवेशसंहिताही होती. पण आजमितीस ती उपलब्ध नाही. तिचे एक कल्पसूत्रही होते. [ वै. वि. भा. प.; आ. इ. ]

**अग्निष्टुत** सोमयागाचा एक विकार. या यागात त्रिवृत् नामक स्तोत्रपद्धतीने अग्नीचे स्तवन केले जाते. अनुष्ठानाचा विधी सामान्यपणे अग्निष्टोमासारखा आहे. पाप-

भोजन व अभक्ष्यभक्षण या दोषांच्या निवृत्तीसाठी आणि इष्ट कामनांच्या सिद्धीसाठी हा याग करायचा असतो. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**अग्निष्टोम** हा सोमयागाचा एक प्रकार आहे. याचा उगम ब्रह्मदेवाच्या पहिल्या मुखापासून झाला (ब्रह्मांड पु. २. ८. ५०; वायुपु. ९. ४९). अग्निष्टोम ही सर्व सोमयागांची प्रकृती आहे. हा एकाह यज्ञ आहे. या यागात अग्नीचा स्तोम म्हणजे स्तुती असल्यामुळे किंवा शेवटचे स्तोत्र अग्नीला उद्देशून असल्यामुळे याला हे नाव मिळाले आहे. हा याग वसंत ऋतूत करतात. याची आरंभक अशी दीक्षणीयेष्टी पूर्णिमा, अमावास्या किंवा प्रतिपदा यांपैकी एखाद्या तिथीस करायची असते. या यागाच्या अनुष्ठानाचा क्रम पुढीलप्रमाणे आहे –

**आरंभ** – गार्हपत्याच्या पश्चिमेस बसून यजमानदंपती प्रधान संकल्प करतात. नंतर यजमान सोमप्रवाक नावाच्या एका ऋत्विजाची निमंत्रक म्हणून योजना करतो. मग सोमप्रवाक ब्रह्मा, होता, अध्वर्यू, इ. १६ किंवा १७ ऋत्विजांना यागासाठी बोलावणे करतो. ऋत्विक्मंडळी घरी आल्यावर यजमान मधुपर्क विधीने त्यांची पूजा करतो. मग यजमान राजाकडे देवयजनाची म्हणजे यज्ञभूमीची याचना करतो. नंतर अरणींच्या ठिकाणी अग्नीचे समारोपण करून यजमान ऋत्विजांसह अरणी आणि यज्ञसामग्री घेऊन देवयजनात प्रवेश करतो.

यज्ञभूमीच्या ठिकाणी प्रथम प्राग्वंश नावाचा मंडप उभारला जातो. याच्या आच्छादनाचे वंश (कळक) पूर्वेस अग्रे करून घातलेले असतात. म्हणून या मंडपाला प्राग्वंश किंवा प्राचीनवंश असे म्हणतात. या मंडपाची लांबी पूर्व-पश्चिम १६ प्रक्रम व रुंदी दक्षिणोत्तर १२ प्रक्रम असते. चारही दिशांना चार व ईशान्य कोपऱ्यात एक, अशी याला पाच दारे ठेवतात. मंडप कूड घालून सर्व बाजूंनी बंदिस्त करतात.

**दीक्षणीयेष्टी** – प्राग्वंशात कुंडे व वेदी घालून त्यांत अरणिमंथनातून उत्पन्न केलेल्या अग्नीची स्थापना करतात. नंतर आज्यसंस्कार, कूष्मांडहोम, इ. विधी होतात. त्यानंतर दीक्षणीयेष्टीला प्रारंभ होतो. यागकालात यजमानदंपतीला विशिष्ट नियमांचा अंगीकार करावा लागतो, त्याला दीक्षा म्हणतात. दीक्षेसंबंधीची इष्टी ती दीक्षणीयेष्टी होय. या इष्टीत अग्नाविष्णु या देवतेच्या उद्देशाने पुरोडाशाचे हवन होते. ते अनुष्ठान संपल्यावर यजमान प्राग्वंश मंडपाच्या उत्तरेस एका बंदिस्त जागी क्षौर करून घेतो व हातापायांची नखे काढून घेतो. क्षौर वगळून बाकीचे नखे काढणे वगैरे विधी यजमानपत्नीलाही करावे लागतात. मग यजमान स्नान व आचमन करतो. नंतर अध्वर्यू यजमानदंपतीला नवी रेशमी वस्त्रे देतो. ती परिधान केल्यावर उभयता हविष्यान्नाचे भोजन करतात, अंगास लोणी माखतात,


आसंदी घडवंची


कृष्णाजिन

डोळ्यांत काजळ घालतात, दर्भांकुरांनी आपल्या शरीरावर पवन संस्कार करून घेतात. हिला अप्सुदीक्षा म्हणतात.

नंतर अध्वर्यू यजमानाला व प्रतिप्रस्थाता यजमानपत्नीला मंडपात आणून नियमित जागी बसवितो. मग दीक्षाहुती दिल्या जातात. यजमान कृष्णाजिनावर बसून कमरेला मोळाची तिपेडी दोरी गुंडाळतो; डोक्यास पागोटे गुंडाळून अंग खाजविण्यासाठी एक मृगशृंगाचा तुकडा व हाती औदुंबराचा दंड घेतो. यजमानपत्नी डोक्याला रेशमी जाळी घालते. नंतर यजमान आपल्या मुठी वळतो. मग अध्वर्यू अमक्याचा व अमकीचा पुत्र, नातू व पणतू असा अमुक नावाचा यजमान सोमयाग करीत असल्याचे वृत्त सर्वांना प्रकट करतो. दुपारी दीक्षाविधी झाल्यापासून रात्री नक्षत्रे दिसेपर्यंत यजमानाला मौन पाळावे लागते.


मृगशृंग

**प्रायणीयेष्टी** – दुसऱ्या दिवशी प्रायणीयेष्टी होते. पथ्यास्वस्ती, अग्नी, सोम, सविता व अदिती या पाच प्रायणीयेष्टीच्या प्रधान देवता होत. पहिल्या चारांसाठी आज्याचे व अदितीसाठी चरूचे हवन करतात. हे अनुष्ठान संपल्यावर मग सोमक्रयाचा विधी सुरू होतो.

**सोमक्रय** – हा सोमवल्ली विकत घेण्याचा विधी असतो. सोम कुत्सगोत्री ब्राह्मणाकडून किंवा शूद्राकडून विकत घेतात. नंतर

सोमराजाला (सोमवल्ली) शकटावर (गाड्यात) घालून मंडपाच्या द्वारात आणतात. सुब्रह्मण्य ऋत्विज तो गाडा हाकण्याचे



सोमशकट

काम करतो. सोमराजाला भेट म्हणून एक बोकड पुढे करतात. मग त्याच्या आतिथ्यासाठी आतिथ्येष्टी होते. प्रथम सोमराजाला प्राग्वंश मंडपात आहवनीयाच्या दक्षिणेस उंबराची घडवंची मांडन तिच्यावर अधिष्ठित करतात. नंतर आतिथ्येष्टीचा विधी पुढे चालू होते.

**आतिथ्येष्टी** – विष्णू ही या इष्टीची प्रधान देवता होय. तिच्या उद्देशाने नऊ कपालांवर तयार केलेल्या पुरोडाशाचे हवन करतात. मग सगळे ऋत्विज तानूनप्त्र नावाचा विधी करतात. या विधीत काशाच्या वाटीमध्ये ठेवलेल्या तुपाला स्पर्श करून सगळे ऋत्विज शपथ घेतात, की 'आम्ही एकोप्याने व प्रमादरहित असे यागानुष्ठान करू.' मग यजमानासह सर्व ऋत्विज सोमावर आप्यायन नामक संस्कार करतात. नंतर प्रवर्ग्य अनुष्ठान होते. तीन बोळकी एकावर एक अशी ठेवल्याप्रमाणे एक मृत्तिकापात्र तयार करतात. त्याला महावीर म्हणतात. ते मातीच्या एका ओटयावर ठेवून त्यात तूप ओततात व भोवती अग्नी प्रज्वलित करतात. तूप तापले, की त्यात गायीचे व शेळीचे दूध ओततात. या दुग्धमिश्रित तुपाला घर्म म्हणतात. घर्म उतू गेल्यावर त्याचे हवन करतात. या अनुष्ठानात होता हा ऋत्विज प्रसंगानुरूप विशिष्ट मंत्र म्हणतो व प्रस्तोता सामगायन करतो.



महावीर

**उपसदिष्टी** – वरील अनुष्ठान संपल्यावर ही इष्टी होते. अग्नी, सोम व विष्णू या हिच्या प्रधान देवता होत. त्यांच्या उद्देशाने आज्याहुती देतात. प्रवर्ग्य व उपसद ही दोन्ही कृत्ये सकाळी व दुपारी अशी रोज दोनदा तीन दिवस करायची असतात. मधल्या (दुसऱ्या) दिवशी सोमयागासाठी महावेदी तयार करतात. तिसऱ्या दिवशी प्रवर्ग्योद्वासन या अनुष्ठानाला प्रारंभ होतो.

**प्रवर्ग्योद्वासन** – प्रवर्ग्याची सर्व सामग्री घडवंचीवर ठेवून ऋत्विक्‌मंडळी यजमानदंपतीसह उत्तरवेदीकडे येतात. मधे टप्प्याटप्प्यावर प्रस्तोता सामगायन करतो. सर्व सामग्री उत्तरवेदीवर चक्राकार मांडतात. मग तिच्यावर दही व मध ओततात. आग्नीध्र ऋत्विज खांद्यावर जलकलश घेऊन त्याची धार ओतीत उत्तर वेदीभोवती तीन प्रदक्षिणा करतो. एवढे झाल्यावर हे अनुष्ठान समाप्त होते.

**मंडपनिर्माण** – आहवनीय अग्नी प्रज्वलित करून उत्तरवेदीकडे नेतात. हविर्धान संज्ञक दोन गाडे उत्तरवेदीच्या मागे आणून ठेवतात. नंतर हविर्धानमंडप तयार करतात. महावेदीच्या अर्धभागी उत्तरेस आग्नीध्रीय मंडप, दक्षिणेस मार्जालीय मंडप व पश्चिमेस सदोमंडप असे तीन मंडप तयार करतात. सदोमंडपाच्या मध्यभागी औदुंबरी नावाची एक उंबराची मेढ विधिपूर्वक पुरतात. चात्वालातून माती उकरून तिने सदोमंडपात टीचभर व्यासाचे चौरस अथवा गोल असे सहा ओटे हाताहाताच्या अंतराने घालतात. त्याचप्रमाणे आग्नीध्रीय मंडपात एक व मार्जालीय मंडपात एक असे आणखी दोन ओटे घालतात. यांना धिष्ण्य म्हणतात. नंतर अग्नीचे अन्वाधान होऊन अग्नीषोमीय पशूच्या मुख्य अनुष्ठानास प्रारंभ होतो. पात्रासादन व आज्यग्रहण झाल्यानंतर ब्रह्मा सोमराजाला उचलून घेतो. मग वैसर्जन होम होतो.

**अग्नीषोमप्रणयन** – अग्नी आग्नीध्रीय मंडपात ठेवतात व सोमराजाला हविर्धान मंडपात नेऊन ठेवतात. हेच अग्नीषोमप्रणयन होय. मग अग्नीषोमीय पशू बांधण्यासाठी यूप नामक स्तंभ उभारतात. पशू म्हणजे बोकड होय. नंतर त्याचे उपाकरण (समर्पण) करण्याचा विधी होतो. पशूला मारून त्याचे पोट फाडतात व वपा नावाचा कोठ्याला चिकटून बसलेला कागदासारखा पापुद्रा बाहेर काढून त्याचे हवन करतात. मग सुब्रह्मण्य ऋत्विज इंद्राच्या निमंत्रणासाठी सामगान करतो. अध्वर्यु पाण्याची एक घागर भरून आणून शालामुखीय अग्नीच्या पश्चिमेस ठेवून देतो. या जलाला वसतीवरी अशी संज्ञा आहे. या जलाचा उपयोग दुसऱ्या दिवशी सोम कुटण्यासाठी वगैरे होतो. त्या रात्री यजमान आग्नीध्रीय मंडपात जागत राहून सोमाचे रक्षण करतो. पत्नी प्राग्वंशात जागी राहते. प्रतिप्रस्थाता मित्रावरुणांना पयस्या देण्यासाठी त्या रात्री गाईचे दूध काढतो. ते दूध विरजण्यात येते. दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे सोमयागाच्या मुख्य अनुष्ठानास प्रारंभ होतो. या दिवसाला सुत्याह असे म्हणतात.

प्रातःसवन – अध्वर्यू प्रथम आग्नीध्रीयातील अग्नीवर यज्ञतनू संज्ञक ३३ आज्याहुती देतो. खर नामक ओटयावर


वाजिन


सदस्य


आग्नीध्र (चमस)

सोमरस साठवण्याचे ग्रह (पेले) मांडून ठेवतात. सोम कुटायचे बत्ते जुळवून ठेवतात. होता प्रातरनुवाक संज्ञक मंत्रसमूह पठण करतो. ब्रह्मा मौन पाळतो. मग अध्वर्यूसह चार ऋत्विज अधिषवण चर्मावर सोमवल्ली कुटून तिचा रस काढतात. तो दशापवित्र संज्ञक लोकरी फडक्यातून गाळून घेतात. विविध देवतांच्या उद्देशाने ग्रह भरून घेतात. नंतर अध्वर्यू, प्रस्तोता, इ. ऋत्विज एकमेकांना स्पर्श करून विप्रुढ्होम संज्ञक कर्म करतात. चात्वालाशेजारी प्रस्तोता, प्रतिहर्ता, इ. ऋत्विज बहिष्पवमान संज्ञक सामगान करतात. दुसऱ्या व तिसऱ्या सवनामध्ये अनुक्रमे माध्यंदिन आणि आर्भव पवमान गातात. मग पुरोडाशादी हविर्द्रव्ये सुशोभित करतात. आहवनीय, आग्नीध्रीय व मार्जालीय अग्नींना सोमाहुती देतात. अश्विनौसाठी ग्रह भरून ठेवला जातो. नंतर सवनीय पशूचे अनुष्ठान सुरू होते. पशुहनन करून वपायागापर्यंत सर्व अनुष्ठान झाल्यावर सर्व ऋत्विज आपापल्या स्थानी येऊन बसतात. शमिता (पशु मारणारा) अध्वर्यूच्या आज्ञेने पशूची निरनिराळी अंगे शामित्र शाळेत (पशू मारण्याची जागा) अग्नीवर शिजत ठेवतो. पुरोडाशादी पाच द्रव्यांचे हवन होते. अध्वर्यू व प्रतिप्रस्थाता हे इंद्रवायू, मित्रावरुण व अश्विनौ या जोडदेवतांच्या उद्देशाने द्विदेवत्य संज्ञक सोमपात्रातील सोमाचे यजन करतात. नंतर शुक्रामंथिप्रचार हे कर्म सुरू होते. यात अध्वर्यू शुक्र नामक ग्रह, प्रतिप्रस्थाता मंथी नामक ग्रह व चमसाध्वर्यू नावाचे दुय्यम ऋत्विज सोमरसाने भरलेले चमस घेऊन त्यातील सोमाचे हवन करतात. मग अवशिष्ट सोमरसाचे प्राशन व इडाभक्षण करतात. मग अध्वर्यू अच्छावाक नावाच्या ऋत्विजाच्या हाती पुरोडाश शकल देतो. तो काही मंत्रसंघाचे पठण करतो. नंतर सोमरस चमसाचे अध्वर्यू हवन करतो. मग ऋतुयाग करतात. यात अधिकमासासह तेरा महिने व सर्व ऋतू यांच्या उद्देशाने सोमाचे हवन होते. इंद्राग्नीसाठी सोमग्रह भरून ठेवला जातो. त्या वेळी होता शस्त्र संज्ञक मंत्रसंघ विशिष्ट पद्धतीने म्हणतो. सोमरसाचे हवन होते. असे आणखी काही विधी झाल्यावर अध्वर्यू सवनप्रायश्चित्ताच्या आहुती घालतो. मग मैत्रावरुणाची 'सर्पत' (बाहेर चला) अशी आज्ञा होताच सर्व ऋत्विज सदोमंडपातून बाहेर पडतात व प्रातःसवनाचे अनुष्ठान समाप्त होते.

माध्यंदिनसवन – हे अनुष्ठान वरेचसे प्रातःसवनाप्रमाणेच असते. द्विदेवत्ययाग, ऋतुग्रहयाग वगैरे काही कृत्ये या सवनात नसतात. प्रथम विप्रुढ्होम झाल्यावर ऋत्विज सदोमंडपांत प्रवेश करतात. मग दधिघर्मप्रचार, पुरोडाशयाग, शुक्रामंथिप्रचार ही कर्मे झाल्यावर दाक्षिणात्य होम करतात. अध्वर्यूला यजमान, त्याला पत्नी व तिला कुटुंबांतील माणसे अन्वारंभ (हस्तस्पर्श) करतात. मग सर्वांच्या वरून वस्त्र आच्छादितात. अध्वर्यू दाक्षिण अर्थात दक्षिणांगभूत होम करतो. मग दक्षिणा देण्यास प्रारंभ होतो. अत्रिगोत्रांतल्या ब्राह्मणाला सर्वांत आधी सुवर्ण दक्षिणा दिली जाते. मग सर्व ऋत्विजांना दक्षिणा देतात. सोमयागातली दक्षिणा सात, एकवीस, साठ, शंभर, एकशे बारा, हजार किंवा अगणित अशा गायी किंवा मोठ्या मुलाचा हिस्सा वगळून बाकीची सर्व संपत्ती एवढी असते. याशिवाय अन्य पशू व वेगवेगळी धान्येही दक्षिणा म्हणून देतात. दक्षिणेचा एक चतुर्थांश अध्वर्यू आणि त्याचे मदतनीस यांना मिळतो. बाकीच्यांचे वाटे त्याहून कमी असतात. आग्नीध्राला प्रथम आणि प्रतिहर्त्याला शेवटी दक्षिणा मिळते. प्रतिहर्त्याला दक्षिणा देऊन झाल्यावर दक्षिणेचे द्वार बंद होते. मग कोण्याही याजकाला काहीही दिले जात नाही.

मग वैश्वकर्मण होम, मरुत्वतीययाग, अतिग्राह्यप्रचार, उक्थ्यप्रचार, इ. कृत्ये करून सवनप्रायश्चित्ते घातल्यावर माध्यंदिनसवनाचे अनुष्ठान समाप्त होते.

तृतीयसवन – प्रथम हविर्धान मंडपाची द्वारे बंद करतात. मग आदित्य देवतेसाठी सोमाचे हवन होते. नंतर अध्वर्युप्रमुख चार ऋत्विज प्रातःसवनाप्रमाणेच सोम कुटून त्याचा रस गाळतात. एका कलशात सोमरस भरून ठेवतात, त्याला पूतभृत् म्हणतात. यजमानदंपती त्यात आशिर (घुसळलेले दही) मिसळतात. मग मधली सर्व कृत्ये झाल्यावर पाशुक अनुष्ठान सुरू होते. शमित्याने शिजविलेल्या पशूच्या विविध अंगांचे अध्वर्यू हवन करतो. मग सवनीय पुरोडाशाचा याग, सोमरसाचे यजन, इडाभक्षण, कपालविमोचन, सवनमुखभक्षण, ही कृत्ये होतात. मग यजमानासह सर्व ऋत्विज पितृत्रयीच्या उद्देशाने पिंडदान करतात. मग सोमदेवतेसाठी चरू (भात) शिजवितात व त्याचे हवन करतात. मग त्या चरुस्थालीत तूप ओतून अध्वर्यू त्यात आपल्या मुखाचे अवलोकन करतो. मग आणखी काही कृत्ये झाल्यावर उद्गाताप्रभृती सामगायक अग्निष्टोम नामक सामाचे गायन करतात. सवनीय पशूचे अनुष्ठान संस्राव होमापर्यंत केले जाते. मग उन्नेता हारियोजनयाग करतो. सर्व ऋत्विज

आग्नीध्रीय मंडपात जाऊन दह्यावरची साय भक्षण करतात. सर्व चमसांत पाणी व दूर्वा घालून ठेवतात. आहवनीयाचे उपस्थान करून सर्व ऋत्विज त्यामध्ये सात सात समिधा देतात. मग एकमेकांचा हात धरून उभे राहतात व सख्यविसर्जन अर्थात यज्ञासंबंधाने केलेल्या ऐकमत्याच्या प्रतिज्ञेचे विसर्जन करतात.

नंतर अध्वर्यू पत्नीसंयाज करतो. प्रायश्चित्ताच्या आहुती देऊन ध्रौवाज्याची समाप्ती करतो. मग समिष्टयजू होम, प्रणीताविमोक व उपवेषनिरसन ही कृत्ये केली जातात. औदुंबरी (मेढ) उपटून चात्वालावर टाकतात. सूर्याचे उपस्थान करतात. सवनीय प्रायश्चित्ते घालतात, मग 'सर्पत' अशी आज्ञा झाल्यावर सर्वजण सदोमंडपातून बाहेर पडतात. इतके झाल्यावर तृतीयसवनाचे अनुष्ठान संपते.

अवभृथ – मग अवभृथस्नानासंबंधीचे अनुष्ठान सुरू होते. अन्वाधानापासून हविर्द्रव्याच्या निर्वापापर्यंत अनुष्ठान झाल्यावर वरुणासाठी पुरोडाशाचा निर्वाप करतात. तो तयार झाल्यावर महावेदीच्या जवळ आणतात. मग सोमलिप्त पात्रांसह सर्व यज्ञसामग्री चात्वालाजवळ आणून ठेवतात. प्रस्तोता सामगान करतो. मग यजमानदंपती व सर्व ऋत्विज अवभृथस्नानाला जाण्यासाठी मंडपाबाहेर पडतात. मधल्या टप्प्यावर सामगान होते. सर्वजण नदीच्या किंवा जलाशयाच्या तीरावर जमतात. जलप्रवाह दिसताच विशिष्ट मंत्र म्हटले जातात. पाण्यात दर्भमुष्टी टाकतात. पाण्यातच वरुणाला पुरोडाश अर्पण करतात. स्विष्टकृतापर्यंत अनुष्ठान झाल्यावर सोमवल्लीचा चोथा कातडे पसरलेल्या घडवंचीवर ठेवतात. विषमसंख्येचे मंत्र म्हणून मग तो चोथा स्रुचीत भरून पाण्यावर पालथा करतात. मग सर्वांचे स्नान होते. यजमान आपली मेखला सोडून टाकतो. पत्नी आपले योक्त्र विसर्जित करते. स्नानानंतर यजमानदंपती धूत वस्त्रे नेसतात. उन्नेता ऋत्विज सर्व ऋत्विजांना जलाबाहेर काढतो. नंतर उन्नेत्याला पुढे करून व उंबराच्या समिधा हाती घेऊन सर्वजण मागे जलप्रवाहाकडे न पाहता परत यज्ञभूमीत येतात. आणलेल्या समिधा आहवनीय अग्नीत टाकतात. मग उपस्थान झाल्यावर अवभृथाचे अनुष्ठान समाप्त होते.

नंतर प्रायणीयेष्टीप्रमाणेच उदयनीयेष्टी केली जाते. त्यानंतर मित्रावरुणांच्या उद्देशाने अनुबंध्यायाग प्राचीन काळी होत असे. यात वशा अर्थात वांझ गायीचे हवन करीत. पण हे कृत्य कलिवर्ज्य मानलेले असल्यामुळे अलिकडे तिच्याऐवजी आमिक्षेचा याग करतात. मग देविकासंज्ञक देवतांचे यजन होते. यजमान क्षौर करतो. स्नानानंतर वाजिनयाग होतो. आहवनीयातला अग्नी एका परळात घेऊन त्यावर वेदीतले काही दर्भ जाळतात. त्या धुराचे अनुमंत्रण करतात. नंतर अध्वर्यू सक्तुहोम करतो, मग अरणींच्या ठिकाणी अग्नीचा समारोप करतात. यजमान यज्ञस्थलातून घरी येतो. नंतर यज्ञभूमीच्या उत्तरेस निराळ्या विहारात अग्निमंथन करून अग्निस्थापना करतात. त्यावर अग्नीच्या उद्देशाने उदवसानीया इष्टी करतात. ती न केल्यास पूर्णाहुती संज्ञक आज्याहुती देतात. [ म. ज्ञा. को.; हि. ध. ]

## अग्निष्वात्त

एक पितृगण. यांची संख्या चौसष्ट हजार आहे. यांची व्याख्या पुढीलप्रमाणे – 'यानग्निरेव दहन् स्वदयति ते अग्निष्वात्ताः'=ज्यांना अग्नी जाळून भक्षितो, ते अग्निष्वात्त होत (श ब्रा. २.६.१.७). हे दक्षिण दिशेस सोमपद नावाच्या प्रदेशात वास्तव्य करतात (भाग. पु. ४. १.६३; विष्णुपु. १. १०. १८).

संध्या नामक आपल्या कन्येस पाहून ब्रह्मदेव मोहित झाला असता त्याच्या घामातून यांची उत्पत्ती झाली. स्वधा ही यांची पत्नी होय. काहींच्या मते ते मरीचीचे वंशज असून अन्य काहींच्या मते ऋतू म्हणजेच अग्निष्वात्त होत. यमपुत्र शंखाच्या सूक्तात अग्निष्वात्तांना पुढील आवाहन केले आहे.

अग्निष्वात्ताः पितर एह गच्छत सदः सदः सदत सुप्रणीतयः।
अत्ता हवींषि प्रयतानि बर्हिष्यथा रयिं सर्ववीरं दधातन।।
(ऋ. १०. १५. ११)

अर्थ – हे अग्निष्वात्त पितरांनो, इथे आगमन करा. प्रशंसनीय मार्गाने पण प्रेमळपणाने वागणाऱ्या पितरांनो, आपापल्या आसनांवर अधिष्ठित होऊन, या कुशास्तरणावर ठेवलेले हविर्भाग सेवन करा आणि वीरांनी (पुत्र) परिपूर्ण असे वैभव आम्हांला द्या.

सांप्रत श्राद्धात पितरांना कुशास्तरणावरच पिंडदान करतात. ही प्रथा वेदकालाइतकी प्राचीन असल्याचे वरील मंत्रावरून दिसते.

पीवरी ही यांची मानसकन्या होय. तिचा विवाह व्यासपुत्र शुकाशी झाला ( ब्रह्मांड पु. उ. ३. १०. ७५–८० ). दुसरी मानसकन्या सेना हिमालयाची भार्या झाली (वायुपु. ३०. २७). हे इतर पितृगणांचे अधिपती होत. पाहा – पितर. [ पु. इं. ]

## अग्निसमारोप

संकटकाली अग्नीचे रक्षण करणे अशक्य झाल्यास अथवा पति–पत्नी या उभयतांनाही प्रवासाला जाणे असल्यास अग्नीचा समारोप करतात. 'अयं ते योनिः' या मंत्राने प्रथम होम करतात. नंतर अग्नीवर अरणी अथवा समिधा तापवून त्या वस्तूत अग्नी आला असे समजतात.

याचेच नाव समारोप. प्रवासात ही समिधा बरोबर घेतात व गावाची सीमा किंवा नदी ओलांडताना तिला स्पर्श करतात. परत स्वगृही आल्यावर मंथनाने अग्नी उत्पन्न करून अथवा श्रोत्रियाच्या घरचा आणून त्याची स्थापना करतात व ती समिधा अग्नीत टाकतात. समारोपाचा अवधी बारा दिवसांचा असतो. त्यापुढे काळ लोटल्यास अग्निविच्छेद झाला, असे समजतात. मग गृह्यसूत्रानुसार अग्नीचे पुनःसंधान करावे लागते. [ ध. सि. तृ. प. ]

**आग्निहोत्र** 'यस्मिन् अग्नये होत्रं होमो भवति तदग्निहोत्रम्' = ज्या कर्मात अग्नीला उद्देशून होम केला जातो ते कर्म म्हणजे अग्निहोत्र होय, अशी याची व्याख्या आहे (जै. सू. भाष्य १. ४. ४). अग्निहोत्र घेणे म्हणजे गार्हपत्य, आहवनीय व दक्षिणाग्नी या तीन अग्नींचे आधान करणे. याला अग्न्याधानविधी म्हणतात. ज्याने अग्न्याधान केले असेल, त्याला आहिताग्नी म्हणतात. आहिताग्नीला रोज सकाळ – संध्याकाळ होम करावा लागतो. अग्न्याधानाचा अधिकार त्रैवर्णिकांनाच असला, तरी निषाद व रथकार यांनाही आधान न करता अग्निहोत्र करता येते, असे काही सूत्रकार सांगतात. केवळ गार्हपत्य अग्नी नित्य ठेवावा व प्रत्येक कर्माच्या वेळी दुसरे दोन अग्नी गार्हपत्यातून काढून घेऊन सिद्ध करावे, असा प्रमुख पक्ष आहे. याला उद्धरणपक्ष म्हणतात. तीनही अग्नी नित्य धारण करणे, या विकल्पाला अजस्रपक्ष म्हणतात. सकाळच्या होमासाठी पहाटेच अथवा सूर्य क्षितिजावर येताक्षणीच उद्धरण करतात. सायंकाळी दिन-रात्रीच्या संधिकालात अथवा आकाशात पहिला तारा दिसू लागता किंवा पहिल्या प्रहरी उद्धरण करतात.

प्रथम अग्नी प्रदीप्त करून त्याच्या भोवती परिस्तरणे घालतात. पात्रासादन करतात. अग्निशाळेच्या दक्षिणेस गाय उभी करून तिची धार काढतात. ते दूध अग्नीवर तापवितात. यजमानाच्या अनुज्ञेने अध्वर्यू ते दूध चार स्रुवे भरून अग्निहोत्रहवणीत घेतो. प्रथम अग्नीत समिधा देतो व मग दुधाची आहुती देतो. सकाळच्या होमात सूर्याचा व सायंकाळच्या होमात अग्नीचा निर्देश करायचा असतो. मग गार्हपत्याची प्रार्थना होते. स्रुचीतल्या हवीचा अल्पांश पितरांसाठी दक्षिणेस टाकतात. यजमान उपस्थान करतो. अध्वर्यू अवशिष्ट दुधाचे प्राशन करतो. स्रुचीत पाणी घालून ते सर्प, पिपीलिका (मुंग्या), इ. क्षुद्र प्राण्यांना दिले जाते. दुसऱ्यांदा घातलेले पाणी अध्वर्यू यजमानपत्नीच्या हातात ओततो. स्रुची अग्नीवर तापवून तिची वाफ सप्तर्षींना उद्देशून आकाशात सोडतात. तीन्ही अग्नींच्याभोवती परिषेक करून अग्नीत इंधने घालतात. अग्निहोत्री गृहस्थाने जर बराच काळ होम केला नाही, तर त्याला परत अग्न्याधान करावे लागते. यजमानाने रोज अग्निहोत्र करावे निदान पर्वदिवशी तरी अवश्य करावे, असे सांगितले आहे. अग्निहोत्र असता यजमानाला एकट्याने प्रवासाला जाण्यास आडकाठी नाही. पण यजमानपत्नीला मात्र ग्रामसीमा ओलांडता येत नाही. तिचा आणि अग्नीचा कधीही वियोग होता कामा नये. पत्नीला प्रवासाला न्यायचे असेल, तर अग्नीलाही बरोबर न्यावे लागते. तसे करताना अग्नीचा अरणीत समारोप करून ती बरोबर नेतात व इष्ट स्थळी पोचल्यावर पुनश्च मंथन करून अग्नी निर्माण करतात. आपत्काळी एकदम पंधरा दिवसांचे होम देता येतात. 'मुखं वा एतद्यज्ञानां यदग्निहोत्रम्' = अग्निहोत्र हे यज्ञाचे मुख होय, असे शतपथात म्हटले आहे (१४.३.१.२९). भरताने अग्निहोत्र केल्याचा उल्लेख भागवतात आहे (५.७.५). अग्निहोत्राचे व्रत घेणाऱ्या सपत्नीक गृहस्थाला अग्निहोत्री म्हणतात. पाहा – अग्निहोत्रहोम, अग्न्याधान, आहिताग्नी. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**अग्निहोत्र–प्रातर्दन** एक आध्यात्मिक कल्पना. मनुष्य बोलतो तेव्हा श्वासाचा निरोध होत असतो. याचा अर्थ तो आपल्या प्राणांचे वाचेत हवन करतो. बोलणे थांबले, की श्वास मोकळा होतो. म्हणजे वाणीचे प्राणात हवन होते. ही दोन हवने अनंत व अमर असून इतर कर्ममय हवने नश्वर आहेत. याचा अर्थ आपल्या अंतर्यामी अखंड अग्निहोत्र चाललेले असते असा आहे. हे ज्या विद्वानांना कळले, ते लौकिक अग्निहोत्र पाळीत नाहीत (कौषी. उ. २.५). या आंतर अग्निहोत्राचा शोध प्रतर्दनाने लावला, म्हणून त्याला प्रातर्दन अग्निहोत्र असे नाव पडले. [ उ. र. ]

**अग्निहोत्रहवणी** यज्ञीय पात्रांतील एका स्रुचीचे नाव. ही वेकळीची करावी, असे सांगितले आहे. अग्निहोत्रहोम या स्रुचीने करतात. हिच्यात पवित्रकावरून पाणी



अग्निहोत्रहवणी

ओतून, ते मंत्रांनी सिद्ध करतात. या पाण्याने अन्य पात्रांचे प्रोक्षण करायचे असते. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**अग्निहोत्रहोम** अग्निहोत्र्याने नित्य सकाळी आणि सायंकाळी तीन्ही अग्नींच्या ठिकाणी जो होम

करायचा असतो, त्याला हे नाव आहे. याचा मुख्य हवी म्हणजे गायीचे दूध होय. ते न मिळाल्यास तांदूळ, तूप व दही, ही द्रव्ये चालतात. विशिष्ट कामनेसाठी विशिष्ट द्रव्ये घेतात. पशु-कामना असेल तर दूध, ओजाची कामना असेल तर तांदूळ, इत्यादी (तै. ब्रा. २.१). हवनीय द्रव्याच्या दोन दोन आहुती सकाळी सूर्य व प्रजापती यांना उद्देशून व सायंकाळी अग्नी व प्रजापती यांना उद्देशून देतात. हा एकच मुख्य विधी अग्निहोत्राला नित्य आवश्यक आहे. शिवाय अग्नीजवळ उभे राहून दोन्ही वेळा काही प्रार्थनामंत्रही म्हणावे लागतात. या कर्माला उपस्थान अशी संज्ञा आहे.

हे उपस्थान झाल्यावर गृह, पशू, रात्री आणि दिशा यांचेही उपस्थान यजमान करतो; अंतर्वेदीत बसून आपल्या संततीसाठी आशीर्वाद मागतो. उपस्थान सायंकाळीच करावे की प्रातःकाळीही करावे, यासंबंधी सूत्रकारांत मतभेद आहेत. महिन्याच्या पहिल्या पक्षात अग्नीषोमाचे व दुसऱ्या पक्षात इंद्राग्नीचे उपस्थान अन्य उपस्थानांबरोबर करायचे असते. या होमाचा विधी यजुर्वेदातच सांगितलेला आहे. यजमान क्षत्रिय असेल, तर त्याच्या घरी फक्त पर्वदिवशीच होम होतो. क्षत्रियांच्या घरी ब्राह्मणानेच होम करायचा असतो. पाहा – अग्निहोत्र. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**अग्नी** एक वैदिक देवता. वैदिक आर्यांच्या दृष्टीने ज्याप्रमाणे आकाशातील प्रमुख देवता वरुण व अंतरिक्षातील प्रमुख देवता इंद्र, त्याचप्रमाणे पृथ्वीवरील प्रमुख देवता अग्नी होय. ही देवता मूळ भौतिक स्वरूपातच ओळखली जात असल्यामुळे अग्नीच्या स्वरूपात मनुष्यत्वाचे अंश थोडेच दिसतात. वेदांतले त्याच्या अवयवांचे वर्णन रूपकात्मकच समजायला हवे. अग्नीची विविध रूपे वेदांत वर्णिलेली आहेत. विस्तव हे अग्नीचे पार्थिव रूप होय. मानवाचे कल्याण करण्याची शक्ती ज्या अदृश्य देवतेच्या ठायी आहे, तिलाही अग्नीच म्हटले आहे.

अग्नी या शब्दाची एक व्याख्या अशी – 'अङ्गति ऊर्ध्वं गच्छति इति' (= वर जातो तो अग्नी होय.) याची दुसरी व्याख्या पुढीलप्रमाणे –

जातो यदग्रे भूतानामग्रणीरध्वरे च यत् ।
नाम्ना संनयते वाङ्गं स्तुतोऽग्निरिति सूरिभिः ।।
(बृहद्देवता २.२४)

अर्थ – सर्व भूतांच्या आधी जन्मलेला, यज्ञामध्ये अग्रणी आणि नावाने अंगाचे संनयन करणारा, म्हणून अग्नी अशी त्याची विद्वानांनी स्तुती केली आहे.

अग्नीला अनेक ठिकाणी द्यावापृथिवींचा पुत्र म्हटले आहे (ऋ. १०.४५.८), तर दुसऱ्या एका ठिकाणी 'सहसः सूनुः' म्हणजे बलाचा पुत्र म्हटले आहे (ऋ. ६.४८.५). घर्षणाच्या योगाने अग्नी उत्पन्न करण्यास बरेच बळ लागते, त्यावरून हे नाव पडले असावे. याशिवाय त्याला वनस्पतींचा किंवा वृक्षांचा गर्भ (ऋ. २.१.१४; १.७०.४) असे जे म्हटले आहे, त्याचा संबंध अरण्यात दोन फांद्यांच्या घर्षणाने अग्नी उत्पन्न होतो, त्या गोष्टीशी असावा.

द्यु, अंतरिक्ष व पृथ्वी ही अग्नीची तीन प्रमुख जन्मस्थाने मानलेली आहेत. आकाशात पावसाळी मेघांच्या घर्षणाने विद्युत निर्माण होते. ते अग्नीचेच एक रूप होय. त्याचे द्युलोकातले रूप म्हणजे सूर्य हे सर्वश्रेष्ठ होय, असे म्हटले आहे (ऋ. १०.१.३; ५.३.३.). दगडावर दगड आपटून किंवा अरणींच्या मंथनाने जी ठिणगी उत्पन्न होते ते अग्नीचे तिसरे रूप होय. अग्निदेवाचा जन्म शुष्क काष्ठांतून होतो व तो आपल्या माता-पित्यांना (काष्ठांना) भक्षण करतो, असे म्हटले आहे (ऋ १.६८.२; ५.९.३-४).

त्वामग्ने पुष्करादध्यथर्वा निरमन्थत । मूर्ध्नो विश्वस्य वाघतः ॥
(ऋ. ६.१६.१३)

या मंत्रात, अथर्वाने अग्नीला पुष्करापासून मंथन करून प्रकट केले, असे म्हटले आहे.

ऋग्वेदात अग्नीचे स्वरूपवर्णन पुढीलप्रमाणे केलेले आहे –

चत्वारि शृङ्गा त्रयो अस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्तासो अस्य ।
त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति महो देवो मर्त्यां आविवेश ।।
(ऋ. ४.५८.३)

अर्थ – याला चार शिंगे, तीन पाय, दोन मस्तके, (आणि) सात हात आहेत. ज्या वृषभाला तीन प्रकारांनी बांधून टाकले असून जो मोठ्याने डरकाळ्या फोडतो, त्याच महान ईश्वराने (वृषभाने) मानवांच्या अंतःकरणात वास केला आहे.

वेदात अग्नीला वृषभ म्हटले आहे. कारण तो वृषभाप्रमाणे बलवान आहे. त्याला अश्व, गरूड, हंस व सर्पही म्हटले असून त्या प्राण्यांशी त्याचे साम्यही दाखविले आहे. मात्र असे साम्य दाखविताना त्याचे स्वरूप वर्णन करण्याचा उद्देश नसून, अग्नीच्या क्रिया व धर्म प्रकट करण्याचा उद्देश आहे. वृषभ ही संज्ञा अग्नीला वारंवार लावलेली आहे. अग्नी हा बलवान वृषभ असून, त्याच्या ठिकाणी पुरुषत्वाची विपुलता आहे (ऋ. ४.५.३). अग्नीच्या तेजस्वितेविषयी वेदांत पुष्कळ उल्लेख आहेत.

दुसऱ्या कोणत्याही देवतेपेक्षा अग्नीचा मानवी जीविताशी आणि त्याच्या गृहसंस्थेशी निकट संबंध आहे. गृहपती ही संज्ञा फक्त अग्नीलाच दिलेली आहे. ही कल्पना पुरातन कालापासून चालत आलेली असावी.

यः पञ्च चर्षणीरभि निषसाद दमेदमे। कविर्गृहपतिर्युवा ॥
(ऋ. ७.१५.२)

अर्थ – पंचजनांसन्मुख प्रत्येक घरात अधिष्ठित झालेला हा प्रतिभावान अग्नी गृहपती व तारुण्याची मूर्तीच आहे.

तशीच त्याची दुसरी संज्ञा म्हणजे अतिथी ही होय. प्रत्येक गृहात अग्नी हा पहिला अतिथी असतो (ऋ. ५.८.२).

पुष्कळ ठिकाणी अग्नीला पिता, मित्र, बंधू, इ. नात्यांनी उल्लेखिले आहे. अग्नी हा होमाग्नी म्हणून प्रतिष्ठित होण्यापूर्वी गृहातल्या सामान्य जीवनाचे केंद्र होता, त्या वेळची ही विशेषणे असावी. अग्नी हा कौटुंबिक जीवनाचा आधार झाल्यामुळे इतर देवतांच्यापेक्षा त्याच्याशी वैदिकांचे जिव्हाळ्याचे संबंध दिसतात. तो देवा-मानवांत मध्यस्थाचे काम करतो व मानवांनी अर्पिलेले हविर्द्रव्य देवांकडे पोचते करतो. तो देवांना यज्ञाकडे घेऊन येतो म्हणून त्याला दूत हे विशेषण वारंवार लावलेले आहे (ऋ. ३.१४.२).

घृतपृष्ठ, घृतमुख, घृतकेश या विशेषणात त्याचा आज्याहुतींशी संबंध दिसतो. त्याच्या दाढा तीक्ष्ण व दात सोनेरी आहेत (ऋ. ५.२.३). तो यज्ञकर्मातला ऋत्विज आणि पुरोहित आहे (ऋ. १.१.१). तो सर्वभक्षक तसाच विश्वविद् आहे (ऋ. ६.१५.१३). विश्वातली सर्व संपत्ती त्याच्या ताब्यात आहे. म्हणूनच त्याची प्रार्थना केलेली आहे –

शिवा नः सख्या सन्तु भ्रात्राग्ने देवेषु युष्मे।
सा नो नाभिः सदने सस्मिन्नूधन् ॥
(ऋ. ४.१०.८)

अर्थ – हे अग्ने, तुझ्या दिव्य विभूतीशी जडलेले आमचे मित्रत्व बंधुत्व आम्हांस मंगलप्रद होवो. कारण या धरित्रीच्या वक्षःस्थलावर या यज्ञगृही आता आम्हांला मुख्य आधार तेवढाच आहे.

डॉ. वासुदेवशरण अग्रवाल यांच्या मते ऋग्वेदात अग्नीला सर्वश्रेष्ठ देवता मानले आहे. 'इदं ज्योतिरमृतं मर्त्येषु' = ही अमर ज्योती आहे. मानवाच्या नश्वर देहातील दिव्य तत्त्व म्हणजे अग्नी होय. त्यालाच प्राण हे नाव आहे. वनस्पती, पशू व मनुष्य ही विश्वाची तीन व्यक्त रूपे असून, अग्नी हेच त्यांचे मूलरूप होय. अग्नीची विविध रूपे म्हणजे एक विराट यज्ञ आहे. अग्नी हा त्या यज्ञातील प्रजापती होय. त्या यज्ञाला सर्वहुत यज्ञ म्हटले आहे (ऋ. १०.९०.८-९).

ब्राह्मणग्रंथांत अग्नी व रुद्र हे एकच मानलेले आहेत. 'अग्निर्वै रुद्रः' (श. ब्रा. ५.३.१.१०; तांड्य ब्रा. १२.४.२४). रुद्राप्रमाणेच अग्नीलाही त्र्यंबक हे नाव दिलेले आहे. सूर्य हे अग्नीचेच एक रूप आहे (ऋ. १.७३.८). अग्नी, वायू व सूर्य ही एकाच आत्मतत्त्वाची भिन्न रूपे आहेत (बृहद्देवता १.६१.७१).

अग्नीला अपांनपात् = जलाचा पुत्र म्हटले आहे. अग्नी हा जलाचा गर्भ आहे, अग्नी जलात उत्पन्न होतो, असे उल्लेख ऋग्वेदात आढळतात.

वैदिक अग्नीच्या निरनिराळ्या रूपांविषयी डॉ. रा. ना. दांडेकर यांनी विवेचन केले आहे, ते असे –

वैदिक देवतांमध्ये इंद्र ही सर्वश्रेष्ठ देवता असून, त्यानंतर अग्नीचा क्रमांक लागतो. अग्नी हा दिव्य असण्यापेक्षा पार्थिव असल्याचे उल्लेख ऋग्वेदात अधिक आहेत. तो देवांचा दूत, होता किंवा पुरोहित आहे.

वैदिक अग्निदेव हा आहवनीय, गार्हपत्य व दक्षिण या यज्ञीय अग्नींहून अगदी भिन्न आहे. आहवनीयादी अग्नींना देव ही संज्ञा कुठेही दिलेली नाही आणि यज्ञीय हवी त्या अग्नींना अर्पण केले जात नाहीत; ते अन्य देवतांना या अग्नींच्या द्वारा अर्पण केले जातात.

अग्निदेवतेच्या सुमारे ५६ रूपांचा उल्लेख श्रौतसूत्रांत केला आहे आणि या निरनिराळ्या रूपांतील अग्नीला निरनिराळ्या यज्ञकर्मांच्या निमित्तांनी हवी अर्पण करावे, असे विधी श्रौतसूत्रांत सांगितलेले आहेत. आहवनीयादी तीन मुख्य यज्ञीय अग्नींची कल्पना वैदिक अग्नि–देवतेच्या त्रिविध रूपांच्या संकल्पनेतून उद्भूत झाली असावी.

नेहमी असे सुचविण्यात येते की, दैवतशास्त्रीय वैदिक अग्नी हा अग्नी या नैसर्गिक मूलद्रव्याच्या दैवतीकरणातून उद्भवला आहे आणि हे नैसर्गिक मूलद्रव्य मानवी जीवनाशी इतके संबद्ध आहे की अग्निविषयक ऋग्वेदीय दैवतशास्त्रात, त्या मूलद्रव्यांच्या संकल्पनेपेक्षा अधिक काही समजून घेण्यासारखे नाही. परंतु दैवतशास्त्राचा चिकित्सक अभ्यास केल्यास असे दिसून येते, की या दोन्ही संकल्पना वेगवेगळ्या प्रकारे विकसित झाल्या आहेत. अग्निविषयक वैदिक दैवतशास्त्राचे मूळ नैसर्गिक अग्नी हे नसून, देव आणि मानव यांच्यामधील क्रियाशील व कार्यक्षम मध्यस्थ किंवा दूत या संबंधीची संकल्पना हे आहे.

अग्नीला वैश्वानर हे नाव ऋग्वेदात अनेक ठिकाणी दिलेले आहे. द्यू व भूमी यांतील सर्व अग्निरूपात राहणारा अग्नी तो वैश्वानर असावा, असे डॉ. केतकर म्हणतात. प्राण आणि अपान अथवा उपांशू आणि अंतर्याम यांच्या पारस्परिक घर्षणातून जी उष्णता प्रकट होते, तोच पुरुष आहे व तोच वैश्वानर आहे, असे मैत्रायणी उपनिषदात म्हटले आहे (२.६). भूर्भुवः स्वः किंवा अग्नी, वायू, आदित्य या तीन्ही तत्त्वांच्या समन्वयातून जी प्राणशक्ती स्पंदित होते, तिला वैश्वानर म्हणतात. प्राण्यांच्या शरीरात जो तापधर्मा अग्नी आहे, तेच प्राण्यांचे जीवन होय.

मन, प्राण आणि वाक् या तीन तत्त्वांच्या मीलनातूनच जीवनाची अभिव्यक्ती होत असते. वेदोत्तर कालात वैश्वानर म्हणजे प्राण्यांच्या शरीरातला अन्नपचन करणारा जठराग्नी असा त्याचा अर्थ झाला आहे.

**अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः।**
**प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ।।**
(गीता १५.१४)

**अर्थ** – (भगवान म्हणतात,) मी जाठर अग्नी = वैश्वानर होऊन प्राण्यांच्या देहाचा आश्रय केलेला आहे. (मी) प्राणापानांनी युक्त होऊन चतुर्विध अन्न पचवीत असतो.

या वैश्वानर अग्नीसंबंधी डॉ. दांडेकर यांनी केलेले विवेचन असे–

वैदिक दैवतशास्त्राच्या विकासक्रमाच्या एका अवस्थेत अग्नी आणि सूर्य यांचे सारूप्य प्रस्थापित करण्यात आले. आणि जेथे जेथे सूर्य हे अग्नीचेच एक रूप आहे, असे सांगितले गेले तेथे तेथे वैदिक ऋषींना वैश्वानर अग्नीच अभिप्रेत होता. ऋग्वेदाच्या ६ व्या मंडलातील ७ ते ९ या सूक्तांत आणि १० व्या मंडलातील ८८ व्या सूक्तातील १०–१३ या ऋचा यांत अग्नी वैश्वानर ही शब्दसंहती सूर्य या शब्दाची समानार्थक म्हणूनच वापरलेली दिसते. सूर्य व अग्नी यांच्या तादात्म्याची ही कल्पना वैदिक यज्ञसंस्थेतही चालू राहिली. वैश्वानर अग्नी एखाद्या विशिष्ट वैश्विक विभागाशी संबद्ध आहे, अशी वैदिक ऋषिकवींची धारणा नव्हती. त्याचा अधिकार तीन्ही लोकांत मानला जातो, असेच त्यांनी म्हटले आहे—

**तव त्रिधातु पृथिवी उत द्यौर्वैश्वानर व्रतमग्ने सचन्त ।**
(ऋ. ७.५.४)

**अर्थ** – पृथिवी आणि आकाश दोन्हीही, हे वैश्वानर अग्ने, तुझ्या तीन प्रकारच्या आज्ञा दक्षतेने पाळताना दिसतात.

वैदिक दैवतशास्त्रात अपांनपात् नावाची एक देवता आहे. ऋग्वेदातील वर्णनावरून या देवतेची तीन वैशिष्ट्ये प्रतीत होतात — (१) जलात निवास (२) शीघ्रगामित्व व (३) अग्निमयत्व. या वरून अपांनपात् ही विद्युद्देवता असली पाहिजे असे गृहीत धरले जाते. ऋग्वेदात काही ठिकाणी अग्नीचा प्रत्यक्षपणे अपांनपात् असा उल्लेख केलेला आहे. अग्नीला अपांगर्भ म्हटले आहे (ऋ. ३.१.१२). यावरून असे सूचित होते, की अग्नी व अपांनपात् हे एकरूपच आहेत. म्हणजे अपांनपात् हे अग्नीचे वैद्युत रूप होय. पण डॉ. दांडेकरांच्या मते ते बरोबर नाही. त्यांच्या मते अपांनपात् व अग्नी या दोन भिन्न देवता आहेत. वैदिक संस्कृतीच्या विकासातील अग्नीच्या स्थानाविषयी डॉ. दांडेकरांनी प्रकट केलेले विचार असे—

प्राचीन भारतीय इतिहासाच्या एका कालखंडांत यज्ञ हे वैदिक संस्कृतीचे प्रधान प्रतीक मानले गेले होते. आणि अग्नी हे त्या यज्ञाचे सारभूत प्रतीक समजले गेले होते. वैदिक संस्कृतीच्या विस्ताराचे जे एक भव्य नाटच भारताच्या रंगभूमीवर घडून आले, त्यातील प्रमुख भूमिका अग्नीची होती. पूर्व भारताच्या वैदिकीकरणाचे अग्रदूत गोतम रहूगण व विदेघ माथव यांच्या विषयी शतपथ ब्राह्मणात (१.४.१.१०) दिलेल्या कथेवरून हेच स्पष्ट होते. अग्नी देव आणि मानव यांना जोडणारा दुवा, आर्य आणि आर्येतर यांना जोडणारा दुवा ठरला.

ऋग्वेदात अग्नीला होता असे एक विशेषण आहे (ऋ. १.१.१). याचे स्पष्टीकरण डॉ. वासुदेवशरण अग्रवाल यांनी पुढीलप्रमाणे केले आहे – होता म्हणजे देव किंवा शक्ती हिंचे आवाहन करणारा. बाहेरून भूततत्त्वे आणून त्यांचे अग्नीत हवन करणारी आणि त्या हवनाच्या द्वारे त्यांना आत्मरूपात परिवर्तित करणारी जी एक शक्ती आहे, तेच अग्नीचे होतृस्वरूप होय. प्रत्येक गर्भित कोशात जे स्पंदन चालते ते या हौत्रकर्माच्या पूर्तीसाठीच असते. ते बाहेरून पंचतत्त्वांना केंद्रात खेचून आणते आणि त्यांचे संवर्धन करते. यात दोन प्रक्रिया दिसतात. एक अन्न-अन्नाद आणि दुसरी संवर्धन. केंद्रात बसलेला अग्नी हा अन्नाद ( = अन्न खाणारा) असून, तो बाहेरून अन्नाची अपेक्षा करतो. अन्नाद अग्नीच्या या भुकेलाच अशनाया म्हणतात. जर अग्नीला अन्न मिळाले नाही, तर जीवनयज्ञाची समाप्ती होईल व कोशसंवर्धनाचे कार्य थांबेल. बीजापासून पुनश्च बीजापर्यंत जाणे हेच प्रकृतीचे चक्र असून, अग्नीचे हौत्रकर्म तेच आहे.

निदानविद्येला धरून ऋग्वेदात तीन अग्नींना तीन भ्राते म्हटले आहे (ऋ. १.१६४.१). पृथ्वीतल्या अग्नीला पवमान, अंतरिक्षातल्या अग्नीला पावक आणि द्युलोकातल्या अग्नीला शुची म्हणतात. या तीन अग्नींना अनुक्रमे ब्रह्माग्नी, देवाग्नी आणि भूताग्नी असे म्हटले आहे. यांतला फक्त भूताग्नी तेवढाच दृष्टीला दिसू शकतो. शरीरात क्षार–आम्लयुक्त असा जो रसात्मक भौतिक अग्नी आहे, तो प्रत्यक्ष पाहता येतो. पण त्याच्या आधारावर राहणारे प्राण आणि मन हे दृष्टिगम्य होत नाहीत. म्हणूनच पार्थिव अग्नीला घन, अंतरिक्षाग्नीला तरल आणि द्युलोकस्थ अग्नीला विरल म्हटले आहे. भौतिक देह घन आहे. त्यात सर्वव्यापी असलेली प्राणक्रिया तरल आहे आणि मनाची क्रिया विरल आहे. विरल अग्नी सर्वांत सूक्ष्म असून सर्वांहून अधिक व्यापक आहे. मनाची स्थिती अशीच असते. ते निकट आणि दूर सर्वत्र व्याप्त असते.

अग्नीच्या उत्पत्तीबद्दल उपनिषदात म्हटले आहे, की मूळ सत्पासून प्रथम अग्नी उत्पन्न झाला व त्यापासून पुढे जल व पृथ्वी

ही निर्माण झाली (छांदो. ६.८). अग्नीने या विश्वात शिरून अनेक रूपे धारण केली (कठ. २.५).

पौराणिक कल्पनेप्रमाणे अग्नी हा ब्रह्मदेवाच्या क्रोधापासून उत्पन्न झालेला त्याचा पुत्र आहे. अग्नायी, स्वाहा आणि स्वधा अशा याच्या तीन भार्या आहेत. तो आग्नेयी दिशेचा लोकपाल आहे. एकदा सप्तर्षींचे हविर्द्रव्य त्यांना पोचते करून परत जात असता त्यांच्या भार्या याच्या दृष्टीस पडल्या. अग्नी त्यांच्यावर मोहित होऊन त्यांची प्राप्ती व्हावी यासाठी सप्तर्षींच्या गार्हपत्यात चिरकाल लपून राहिला. पण तरी त्याला ऋषींच्या भार्या प्राप्त होईनात. तेव्हा वैतागून तो देहत्याग करायला निघाला. स्वाहेला ही वार्ता कळली. तिने आपला पती जगावा म्हणून सहा ऋषिपत्न्यांची रूपे घेतली व एकेका रूपात त्याला भोग दिला. सातव्या अरुंधतीचे रूप मात्र स्वाहेला घेता आले नाही (म. भा. वन. २२४).

अग्नीने आजगव धनुष्य पृथूला दिले. कृष्णाने केलेल्या पारिजातहरणाच्या वेळी हा कृष्णाविरुद्ध इंद्राच्या सैन्यात दाखल झाला होता.

श्वेतकीच्या यज्ञात सतत हविर्द्रव्य भक्षिल्यामुळे अग्नीला जाडच उत्पन्न झाले. तेव्हा पाचक म्हणून खांडववन भक्षिण्यास ब्रह्मदेवाने त्याला सांगितले. अग्नी खांडववन जाळायला निघाला; पण इंद्राने पर्जन्यवृष्टी करून त्याचा तो बेत हाणून पाडला. असे एकदा नव्हे; अनेकदा झाले. अखेर अग्नीने कृष्णार्जुनांकडे संरक्षण मागितले. त्यांनी आश्वासन दिल्यावर त्याने अर्जुनाला रथ, अक्षय्य भाते व गांडीव नावाचे धनुष्य; आणि कृष्णाला सुदर्शन चक्र व कौमोदकी गदा ही आयुधे देऊन शस्त्रसज्ज केले. मग त्यांच्या संरक्षणाखाली अग्नीला सुखाने खांडववन जाळायला मिळाले (म. भा. आदि. २२२, २२३).

भृगुपत्नीच्या संबंधात अग्नीने दमन राक्षसाला चहाडी केली म्हणून भृगूने याला शाप दिला, की 'तू सर्वभक्षक होशील!' (पद्म पु. पा. खं. १४). भृगूच्या शापामुळे अग्नी पुढे पाण्यात गुप्त झाला. त्यामुळे यज्ञयाग बंद पडले. देव अग्नीच्या शोधार्थ निघाले, तेव्हा जलातल्या मत्स्यांनी त्याचा ठावठिकाणा सांगितला. मग देवांनी स्तुती करून त्याला जलातून बाहेर आणले (म. भा. आदि. ७). अग्नीचे स्कंद, पावक, पवमान, शुची, सुदर्शन व स्वारोचिष हे पुत्र होत. अग्नीचे गोत्र शांडिल्य व वाहन मेष मानलेले आहे.

**अग्निमूर्ती** – मूर्तिकलेत अग्नी वयोवृद्ध दाखवितात. त्याच्या भोवती तेजोवलय असते. तो बसलेला असल्यास त्याला कमलाचे किंवा अर्धचंद्राचे आसन असते. हेमाद्रीने त्याचे मूर्तिध्यान पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

रक्तं जटाधरं वह्निं कारयेद्धूम्रवाससम् ।
ज्वालामालाकुलं सौम्यं त्रिनेत्रं श्मश्रुधारिणम् ।।
चतुर्बाहुं चतुर्दंष्ट्रं देवेशं वायुसारथिम् ।
चतुर्भिश्च शुकैर्युक्ते धूमचिह्नरथे स्थितम् ।।
वामोत्सङ्गगता स्वाहा शक्रस्येव शची भवेत् ।

अर्थ – रक्तवर्ण, जटाधारी, धूम्रवस्त्र नेसलेली, ज्वालांच्या मालांनी वेष्टित, सौम्य, त्रिनेत्र, श्मश्रुधारी, चार हातांची, चार दाढांची, चार पोपट जोडलेल्या धूमध्वज रथात बसलेली, वायू सारथी असलेली आणि इंद्राच्या शचीप्रमाणे ज्याच्या वामांकावर स्वाहा ही भार्या बसली आहे, अशी अग्नीमूर्ती करावी.

वैदिक वाङ्मयात याचे वर्णन वऱ्याच प्रकाराने आले असले तरी चार शिंगे, तीन पाय, दोन डोकी, सात जिव्हा व हात हे त्याचे वर्णन सर्वांत लोकप्रिय झालेले आहे. आणि अशा स्वरूपाच्या अनेक मूर्तीही सापडतात. विष्णुधर्मोत्तर पुराणात अग्निमूर्तीचे तपशीलवार वर्णन आले आहे. त्याचा सारांश असा –

अग्नी चतुर्भुज, त्रिनेत्र, चार दाढांचा आणि दाढी असलेला आहे. त्याच्या रथाला चार पोपट जोडलेले असून, वायू त्याचा



अग्नीची मूर्ती

सारथी आहे. त्याच्या डाव्या मांडीवर स्वाहा बसलेली आहे. ज्योत, त्रिशूळ व अक्षमाला या वस्तू त्याच्या हातांत आहेत.

आगम साहित्यानुसार तो चतुर्भुज असतो. एक हात वरद मुद्रेत व दुसरा हात अभय मुद्रेत असतो. अन्य दोन हातांपैकी एका हाती त्याची शक्ती व दुसऱ्या हाती स्रुक् असते.

मेंढा किंवा एडका हे त्याचे लांछन वा वाहन आहे.

कधी कधी तो उग्रमुखाचा, मोठ्या पोटाचा आणि द्विभुजही दाखवितात. त्याच्या एका हातात कमंडलू व दुसऱ्या हातात अक्षमाला असते. त्याच्या सर्वांगातून ज्वाला उफाळत असतात. त्रावणकोरमधल्या कांडियुर गावी एक अग्निमूर्ती आहे. तिला सात हात व तीन पाय आहेत. मेंढ्याची दोन डोकी हे या मूर्तीचे वैशिष्ट्य आहे. त्रिवंद्रम्‌मधल्या अग्निमूर्तीशी हिचे सादृश्य आहे, असे म्हणतात.

वेदाप्रमाणेच अवेस्त्यातही अग्निविषयक कथा अनेक आहेत. अग्नी हे अहुर मज्दाचेच रूप असून, तेच पुढे झरथुष्ट्राच्या रूपाने आविर्भूत झाले. अग्नीच्या संरक्षकांनाच झरथुष्ट्री धर्मात धर्मगुरू समजतात. हे अग्नीला विझू देत नाहीत. अग्नीत प्रेत जाळणे, अथवा शेण वगैरे अपवित्र वस्तू टाकणे हे झरथुष्ट्री (पारशी) धर्मात निषिद्ध मानले आहे.

मानववंशाच्या प्रगतीचा पहिला महत्त्वाचा टप्पा म्हणजे अग्नी निर्माण करण्याचा शोध हा होय. हा शोध फार प्राचीन काळी म्हणजे चार लक्ष वर्षांपूर्वीच्या हिमांतर युगात लागला असावा, असे म्हणतात. अग्नीविषयी जगातल्या अनेक मानववंशांमध्ये दंतकथात्मक वाङ्मय भरपूर आहे. बहुतेक सर्व आदिवासी जमातींमध्ये अग्नीच्या उत्पत्तिकथांचा आढळ होतो. त्यांपैकी दोन कथा पुढीलप्रमाणे –

(१) माकडाने आभाळात जाऊन रंगदेवापासून अग्नी आणला. तो घेऊन ते झाडावर बसले. त्याने ढोल, तुताऱ्या वाजवून लोकांना जाहीर केले की 'जे तुमच्याजवळ नाही, ते माझ्याजवळ आहे.' लोक तिथे जमले. त्यांनी पाहिले, की माकडाच्या हाती चमकणारी अशी एक नवीच वस्तू आहे. ती माकडाने खाली टाकावी व आपल्याला मिळावी, म्हणून ते माकडाला दगड मारू लागले. माकड झाडाच्या शेंड्यात जाऊन बसले. मग माणसांनी मुंग्यांचे एक वारुळ आणून ते झाडाच्या बुंध्यात ठेवले. मुंग्या झाडावर चढल्या आणि माकडाला चावू लागल्या. त्यांना झाडून टाकण्याच्या धांदलीत माकडाच्या हातून अग्नी खाली पडला व तो माणसांना मिळाला (मोकलुम आदिवासी, वायव्य सीमाप्रांत).

(२) प्राचीन काळी आदिमानव आपले अन्न कच्चेच खात असे. कारण त्याच्याजवळ अग्नी नव्हता. एके दिवशी एक माणूस जंगल तोडीत असता त्याने एका पक्ष्यावर दगड मारला. तो एका खडकावर आदळला आणि त्यातून एक ठिणगी उडली. माणसाने आणखी एक दगड मारला आणि त्यातून दुसरी ठिणगी उडाली व ती जवळच्या झुडपात पडली. त्यामुळे त्या झुडपांना आग लागली. अशा प्रकारे माणसाला अग्नी प्राप्त झाला (वांचू आदिवासी, वायव्य सीमाप्रांत).

घर्षणातून अग्नीच्या उत्पत्तीचा साक्षात्कार ही कल्पना जगातल्या अग्निकथांत सर्वत्र आढळते. माणसानेही पुढे तीच पद्धती अवलंबिली. दोन काठ्या किंवा दोन दगड यांचे घर्षण करून तो अग्नी निर्माण करू लागला.

अग्नी हाती येताच मानवाच्या जीवनात क्रांतिकारक बदल झाला. अग्नीच्या ज्ञानानेच मानवाला माणूस बनविले. मग शेती, पाकनिर्मिती, उष्णता, प्रकाश, प्रेतदहन, धार्मिक विधी, यांच्यासाठी माणूस अग्नीचा उपयोग करू लागला.

प्राचीन मानवाला त्याच्या शिकारीतही अग्नीचा उपयोग होऊ लागला. थंडी व हिंस्र जनावरे यांपासूनही त्याने अग्नीच्या मदतीने स्वतःचे रक्षण केले. प्राचीन मानव झोपडीत एकदा पेटविलेला विस्तव विझू देत नसे. कारण अग्नी विझला तर पुनश्च तो उत्पन्न करणे हे कष्टाचे काम असे. पुष्कळदा मानवसमूह स्थलांतर करण्याच्या वेळी अग्नी बरोबर घेऊन जात, म्हणून एका विशिष्ट कालखंडाला अग्नियुग मानलेले आहे. या युगाचे आद्यंत नक्की सांगणे कठीण आहे.

**अग्नीविषयक लोकसंकेत** – अग्नीला शिवाचे वीर्य समजतात. मानववीर्याला तेज म्हणण्याची प्रथा यातूनच पडली आहे. अग्नीवर तोंडाने फुंकर घालीत नाहीत. घालायचाच झाला तर तळहातावरून घालतात. उष्टे–खरकटे पाणी टाकून अग्नी विझवीत नाहीत. अग्नीत थुंकत नाहीत. त्याच्यात नखे, केस वगैरे अपवित्र पदार्थ टाकीत नाहीत. त्याला पदस्पर्श करीत नाहीत. पिकाण्याच्या सुब्रत्तेशी अग्नीचा संबंध मानतात. सूर्यास्तानंतर अग्नी घरातून बाहेर देत नाहीत. दोन माणसांच्या मधून अग्नी नेला तर त्या दोघांचे भांडण होते, असे समजतात. रजस्वला स्त्री अग्नीला शिवत नाही. घरातले माणूस मेल्यावर अग्नी विझवून टाकण्याची चाल काही ठिकाणी आहे.

अग्नीविषयी मानवाच्या मनात दोन प्रकारच्या भावना प्रथमपासून उद्‌भवल्या आहेत. अग्नीमुळे जे लाभ होतात त्याबद्दल कृतज्ञता व त्याच्या विनाशक शक्तीची भीती. त्यामुळे सर्व धार्मिक विधीत व संस्कारांत त्याला महत्त्वाचे स्थान प्राप्त झालेले आहे.

अग्नीची शोधकशक्ती सर्व जगात मान्यता पावली आहे. त्यामुळे त्याला पवित्र मानण्यात येते. अग्नीत दुरित निवारण्याची शक्ती आहे, असे मानून त्याला अन्न, पेयद्रव्य अर्पण करण्याची प्रथा सुरू झाली असावी. धार्मिक संस्कारात व होम-हवनासाठी अग्नीचा उपयोग सर्वत्र आढळतो.

अग्नीच्या शोधकशक्तीमुळे जे वाईट असेल ते जाळून टाकावे

या भावनेतून प्रेते जाळण्याची प्रथा उगम पावली असावी.

अग्नीमुळे मनुष्याला दिव्यत्व प्राप्त होते आणि अग्नीला अर्पण केलेले द्रव्य अधिक पवित्र होऊन देवांना पोचते अशा समजुतीमुळे यज्ञसंस्था उदय पावली असावी. मात्र हिंदू व पारशी या धर्मांत अग्नीला देवत्व मिळाले तसे इतर धर्मांत मिळालेले दिसत नाही. असंस्कृत समाजातही अग्नीला देव मानण्याची कल्पना फारशी नाही. एक अद्‌भुत शक्ती एवढीच त्यांची कल्पना होती. [ वै. मा.; ऋ. द.; म. ज्ञा. को. ६; की. पॉ.; स्पा. वे. फा.; वैदिक अग्नी; द्वि. अ. ग्रं.; मू. वि.; डे. हिं. इ.; सा. इं. इ. गॉ. गॉ. ]

**अग्नौकरण** श्राद्धाचा अंगभूत होम. श्राद्धात ब्राह्मणाच्या हातावर किंवा अग्नीत चरूचा हविर्भाग देण्याचे जे कृत्य, त्याला हे नाव आहे. [ सं. कौ. ]

**अग्न्याधान** अग्निहोत्र घेतेवेळी हा विधी करतात. याला अग्न्याधेय असेही म्हणतात. शमीच्या वृक्षावर वाढलेल्या अश्वत्थाच्या लाकडाच्या अरणी करून त्यांच्या घर्षणातून प्रथम अग्नी उत्पन्न करतात. हा अग्नी तीन किंवा पाच ठिकाणी स्थापणे हे अग्न्याधानातले प्रधान कर्म होय. या प्रसंगी अध्वर्यू, ब्रह्मा, होता, उद्‌गाता व आग्नीध्र, असे पाच ऋत्विज नियोजित करतात. तीन अग्नी म्हणजे गार्हपत्य, दक्षिणाग्नी व आहवनीय हे होत. या तीन अग्नींत सभ्य व आवसथ्य या दोन अग्नींची भर पडली, की ते पाच अग्नी होतात. पाहा – अग्निहोत्र, पुनराधान.

**अग्न्याधेय** सात हविर्यज्ञांपैकी पहिला याग. हा याग दोन दिवस चालतो. पहिल्या दिवसाला उपवसथ असे नाव असून, त्या दिवशी प्राथमिक गोष्टी करतात व दुसऱ्या दिवशी मुख्य विधी करतात. कृत्तिका, रोहिणी, मृगशीर्ष, पूर्वाफाल्गुनी, विशाखा,- उत्तराभाद्रपदा, यांपैकी एका नक्षत्रावर किंवा वसंत ऋतू, उन्हाळा, पावसाळा, हिवाळा, यांतल्या पर्वदिवशी अनुक्रमे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व उपकृष्ट यांनी अग्न्याधेय करावे, असे सांगितले आहे.

विशिष्ट देशी, विशिष्ट पुरुषाने मंत्र म्हणून गार्हपत्यादी अग्नीच्या उत्पत्तीसाठी आयतनात निखारे ठेवणे, याला अग्न्याधेय असे नाव आहे. अरणी आणण्यापासून पूर्णाहुतीपर्यंतच्या सर्व क्रियांचा अग्न्याधानात समावेश होतो. हे केल्यावर यजमान आहिताग्नी होतो. सर्व यागांपूर्वी अग्न्याधान विहित आहे.

शमीवृक्षांतर्गत वाढलेल्या अश्वत्थ वृक्षाच्या अरणी अध्वर्यू आणतो. त्याचप्रमाणे वाळू, खारट माती, उंदराच्या बिळाची माती, इत्यादी सात प्रकारची माती; तसेच अश्वत्थ, उदुंबर, शमी, इ. सात प्रकारच्या समिधा गोळा करतो.



यजमान एखादी उंच जागा देवयजन म्हणून निवडून तिथे मंडप घालतो. मंडपाच्या मध्यभागी एका टोकाला गार्हपत्य अग्नीचे आयतन, तसेच गार्हपत्याच्या पूर्वेला व आग्नेयीला अनुक्रमे आहवनीय व दक्षिण या अग्नींची आयतने असतात. आहवनीयाच्या समोरच्या गृहात सभ्य व आवसथ्य या अग्नींची आयतने असतात.

यजमान व यजमानपत्नी रेशमी वस्त्रे नेसून अग्नीची प्रतिष्ठापना करतात. यजमान संकल्प करून ऋत्विजांचे वरण करतो व त्यांची मधुपर्कपूजा करतो. दुपारी किंवा संध्याकाळी अध्वर्यू औपासन अग्नीतून थोडा अग्नी घेऊन किंवा मंथनाने ब्राह्मौदनिक नामक अग्नी प्रज्वलित करतो. एक स्थंडिल तयार करून त्याच्यावर पूर्व-पश्चिम व दक्षिणोत्तर तीन तीन रेघा मारून त्यांवर औपासनाग्नीतून आणलेले निखारे ठेवतो. रात्री अध्वर्यू ब्राह्मौदनिक अग्नीच्या पश्चिमेला चार पात्रांत तांदूळ भरून ब्रह्मौदन शिजवितो. त्यातील थोडा भाग ब्राह्मौदनिक अग्नीला अर्पण करतो. यजमान चार पात्रांत तो शिजविलेला भात ठेवून त्याच्यावर भरपूर तूप ओततो आणि तो भात ब्राह्मणांना देतो. उरलेल्या ओदनात चित्रीय अश्वत्थाच्या तीन समिधा बुडवून त्या अग्नीला अर्पण करतात. मग यजमान अध्वर्यूला व ब्रह्मौदन भक्षण करणाऱ्या ब्राह्मणांना प्रत्येकी तीन कालवडी देतो. अग्न्याधेयापूर्वी बारा, तीन, दोन किंवा एक दिवस चित्रीय अश्वत्थाच्या समिधा यजमानाने अग्नीला द्यायच्या असतात.

अग्न्याधेयाच्या आदल्या रात्री काळे ठिपके असलेला बकरा गार्हपत्याग्नि-आयतनाच्या उत्तरेला बांधतात. यजमान त्या रात्री मौन पाळतो व ब्राह्मौदनिक अग्नीत लाकडाच्या ढलप्या टाकीत राहतो. पहाटे अध्वर्यू दोन अरणी अग्नीवर तापवितो. नंतर ब्राह्मौदनिक अग्नी विझवितात. अध्वर्यू अरणी यजमानाकडे देतो. अध्वर्यू अग्नींच्या आयतनांची रचना करून त्यांवर जलप्रोक्षण करतो. मग आयतनांवर वाळू पसरून तिच्यावर गारगोटी, लाकडी वस्तू, इ. संभार ठेवतो. अध्वर्यू ब्राह्मौदनिक अग्नीची राख बाजूला करून तिथे दोन अरणी ठेवतो व सकाळी अग्नी उत्पन्न करतो. त्या वेळी एक तांबडा किंवा पांढरा घोडा तिथे ठेवतात व शक्तिसांकृती हे साम गातात.

अग्नी उत्पन्न होताक्षणीच अध्वर्यू ‘ उपावरोह जातवेदः ’ या मंत्राने त्याचे अभिमंत्रण करतो. यजमान चतुर्होतृ मंत्र म्हणतो. अध्वर्यू ढलप्या टाकून अग्नी प्रज्वलित करतो. रथंतर व यज्ञायज्ञीय ही सामे गायिली जातात. या वेळी तो संभारावर गार्हपत्य अग्नी ठेवतो व मंत्र म्हणतो. यजमान ‘ घर्मशिरस् ’ मंत्र म्हणतो.

अध्वर्यू परिस्तरण करतो.

सकाळी अर्धे सूर्यबिंब वर यायच्या आत आहवनीयाग्नीची स्थापना करतात. अध्वर्यू गार्हपत्य अग्नीवर काष्ठे पेटवितो आणि एका पात्रात वाळू भरून त्यावर ती ठेवतो. यजमान घोडयाच्या उजव्या कानात अग्नितनू मंत्र म्हणतो. मग अध्वर्यू तो अग्नी आहवनीयाच्या आयतनात स्थापन करतो. अग्नी स्थापन करताना गोत्र व वर्ण यांप्रमाणे विधी वेगवेगळा असतो. आग्नीध्र लौकिकाग्नी घेतो किंवा मंथन करून अग्नी उत्पन्न करतो आणि दक्षिणाग्नी स्थापन करतो. या वेळी यज्ञायज्ञीय हे साम गातात.

आहवनीय अग्नी गार्हपत्य अग्नीतून एका पात्रात घेतात. या वेळी वामदेव्य साम गातात व घोडयाच्या मागून पूर्वेकडे जातात. ब्रह्मा विहाराच्या दक्षिणेला, रथ किंवा रथचक्र याचे तीन फेरे फिरवितो. अध्वर्यू घोडयाला संभारावरून चालायला लावतो व उजवा खूर असा ठेवायला लावतो, की प्रतिष्ठापना केल्यावर अग्नीचे निखारे त्या पावलावर पडावे.

सर्व अग्नींची प्रतिष्ठापना झाल्यावर मग पूर्णाहुती होते. यजमान ऋत्विजांना गाय, बैल, नवीन रथ, बकरा, पूर्णपात्र, घोडा, इ. वस्तू दक्षिणा म्हणून देतो. पाहा – अग्न्याधान. [ हि. ध. ]

**अग्न्युत्सव** पुरी येथील जगन्नाथाच्या मंदिरात नित्य सर्वप्रथम अग्निपूजा आणि हवन होते. जगन्नाथाचा नैवेद्य इथल्या यज्ञाग्नीवरच शिजतो. अग्निपूजेची ही प्रथा उत्क-



अग्न्युत्सवमूर्ती

लाचा राजा महाभावगुप्त ययाती याने सुरू केली. तो अग्निपूजक होता. त्याच्या प्रेरणेने उत्कलात अनेक यज्ञ झाले आणि ती प्रथा पुढे दोनशे वर्षेपर्यंत चालू राहिली.

यज्ञनगर नावाचे एक स्थानही उत्कलात प्रतिष्ठित झाले. अग्निपूजा हे मोक्षाचे एकमेव साधन आहे, असा ययातीने प्रचार केला आणि त्याप्रमाणे आचरणही केले. ययाती आणि पादपद्माचार्य यांच्या प्रेरणेने, अनेक प्रचारक स्वतः अग्निधारणा करून समग्र उत्कलात अग्नीच्या उपासनेचा प्रचार करीत राहिले. हे लोक वडू या नावाने प्रसिद्ध आहेत. ययातीच्या काळात दर वर्षी माघ पूर्णिमेस अग्न्युत्सव नावाचा एक उत्सव उत्कलात साजरा होत होता. आजही तो चालू आहे. हे लोक जगन्नाथाला यज्ञावतार समजतात. पाहा – जगन्नाथ. [ कल्याण–भक्तिअंक ]

**अग्यारी** पारशी लोकांच्या अग्निमंदिराचे हे नाव आहे. आतश्-ए-दादगाह, आतश-ए-आदराँन व आतश-ए-बेहराम असे अग्यारीचे तीन दर्जे आहेत. आतश-ए-दादगाह-मधील अग्नीजवळ पूजेसाठी दस्तुर ( पुरोहित ) किंवा गृहस्थी जाऊ शकतो; परंतु आतश्-ए-आदराँन आणि आतश्-ए-बेहराम-मधील अग्नीजवळ सेवानियुक्त दस्तुराव्यतिरिक्त अन्य कोणासही जाण्याचा अधिकार नाही. अग्यारीतील अग्नीचे दर्शन अन्य धर्मियांस घेता येत नाही.

सोनार, लोहार, कुंभार इत्यादिकांच्या भट्टयांतील अग्नी एकत्र करून त्यावर धार्मिक विधी झाल्यावर पेल्यासारख्या मूल्यवान धातुपात्रात आतश-ए-आदराँन व आतश-ए-बेहराममधील सिद्धाग्नी स्थापन केला जातो. आतश-ए-बेहराम सर्वश्रेष्ठ आहे. तिथला अग्नी विझला तर ते अरिष्टसूचक चिन्ह मानले जाते. [ म. वि. को. ]

**अग्रजन्मा** ब्राह्मणाची एक विशिष्ट संज्ञा. वर्णांमध्ये तो प्रथम झाला म्हणून किंवा अग्र = प्रधान अंग अर्थात मुख, त्याच्यापासून झाला म्हणून ब्राह्मणाला अग्रजन्मा म्हणतात. 'ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्' अशी श्रुती आहे.

अग्निर्देवतानां ब्राह्मणो मनुष्याणाम्, तस्माद् ब्राह्मणो
मुखेन वीर्यं करोति, मुखतो हि सृष्टः । (तांडय ब्राह्मण)

अर्थ – अग्नी देवतांचे (व) ब्राह्मण मनुष्यांचे मुख आहे म्हणून तो मुखापासूनच वीर्य करतो. (तो) मुखापासूनच उत्पन्न झाला आहे.

याशिवाय ज्येष्ठ भ्राता व ब्रह्मदेव यांनाही अग्रजन्मा म्हणतात (नानार्थमंजिरी). पाहा – ब्राह्मण.

**अग्रदानी** आसामातील ब्राह्मणांची एक पोटजात. हे लोक प्रेतदहनाच्या वेळी मंत्र म्हणतात व श्राद्धाची दानदक्षिणा घेतात. अग्रदानी या शब्दाचा अर्थ प्रेताच्या उद्देशाने

दिले जाणारे दान घेणारा असा आहे.

**अग्रदास** (इ. स. च्या १६ व्या शतकाचा उत्तरार्ध) एक रामभक्त हिंदी कवी. हा राजस्थानचा रहिवासी असून बालविरागी व सदाचारी होता. लहानपणीच त्याने कृष्णदास पयहारीचे शिष्यत्व पत्करले आणि त्याच्या सान्निध्यात राहून अध्यात्मसाधना केली. नंतर त्याने आपला गुरुबंधू कील्हदास याच्या आज्ञेवरून राजस्थानातील जयपूरजवळच्या रैवास गावी आपली गादी स्थापली आणि रामभक्तीच्या रसिकोपासनेचा प्रचार केला. त्याचा शिष्यपरिवारही फार मोठा होता. त्याच्या प्रमुख शिष्यांत नाभादास, प्रयागदास, भगवानदास, देवमुरारी व धर्मदास यांची गणना होते.

अग्रदासाला रामभक्तीच्या रसिक संप्रदायाचा प्रणेता मानतात. याचा अर्थ त्याच्या पूर्वी ही भक्तिशाखा नव्हती असे नाही. तर तिचे स्वरूप व्यक्तिगत होते. तिच्यातील अनेक तत्त्वे विखुरलेली होती. या सर्व गोष्टींना एका सूत्रात गुंफण्याचे मोठे काम अग्रदासाने केले. उत्तरकालीन रामभक्तांनी त्याच्या या महान कार्याचा आवर्जून उल्लेख केला आहे.

अग्रदासाने जानकीची एक सखी या नात्याने रामभक्ती केली. तो आपल्या भक्तमंडळीत अग्रअली या नावाने प्रसिद्ध होता. अली हा शब्द सखी, सहचरी, कला, मंजरी, लता यांचा पर्यायी शब्द आहे. त्यामुळे अग्रअली ही मुद्रा भावसूचक ठरते, तर अग्रदास ही शरणसूचक ठरते. अग्रदासाने ज्ञानभक्तीचा मार्ग सोडून माधुर्योपासना स्वीकारली. त्याचा परिणाम म्हणून तो सदैव रासक्रीडेत मग्न असे. रासासाठी त्याने अनेक नाटकमंडळचांचीही स्थापना केली. त्याला बागेची फार आवड होती, कारण त्याच्या मते उद्यान हे राम-सीतेचे विहारस्थल होय. त्यामुळे बागेची देखभाल तो जातीने करीत असे. नाभादासाने त्याच्या या गुणाचा उल्लेख करताना म्हटले आहे–

**प्रसिध बाग सों प्रीति । सुहय कृत करत निरंतर ।**
**रसना निर्मळ नाम । मन हुँ बरसत धाराधर ।।**

(छप्पय्य ३६)

अर्थ – बागेवरचे याचे प्रेम प्रसिद्ध असून, बागेत काम करीत असताना याची जीभ रामनामाचा वर्षाव करीत असे.

बहुतेक सर्व राममंदिरांतून लहानमोठ्या वाटिका लावण्याची पद्धत इथूनच पुढे सुरू झाली. आंबेरचा राजा मानसिंह हा अग्रदासाचा भक्त होता. त्याची आणि अग्रदासाची भेट कुंजातच झाल्याचा उल्लेख प्रियादासाने केला आहे.

ध्यानमंजिरी, कुंडलिया, शृंगाररससागर, अष्टयाम, इ. त्याचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. पैकी अष्टयाम हा ग्रंथ संस्कृत भाषेतील असून, इतर तीन ग्रंथ हिंदी भाषेतील आहेत. त्याचा शृंगाररससागर हा ग्रंथ अप्रकाशित असून, अन्य सर्व ग्रंथ प्रकाशित झालेले आहेत. अष्टयामामध्ये रामाच्या अष्टयामीयोपासनेचे विस्तृत वर्णन आढळते. कुंडलियात नीती व उपदेश हे विषय आहेत. ध्यानमंजिरीत रामध्यान सांगितले आहे. श्रीरामाचे सौंदर्य वर्णन करताना अग्रदास म्हणतो–

**कुंडल ललित कपोल जुगल । अस परम सुदेसा ।**
**तिनको निरखि प्रकास । लजत राकेस दिनेसा ।**
**मेचक कुटिल विसाल । सरोरुह नैन सुहाए ।**
**मुख पंकज के निकह । मनो अलि-छौना आए ।**

अर्थ – (श्रीरामाने) कानांत कुंडले धारण केलेली आहेत. त्यामुळे दोन्ही गाल मनोहर दिसत आहेत. त्यांना पाहून चंद्र-सूर्यही लाजतात. रामाचे काळेभोर, खटचाळ, विशाल, असे कमलनयन मोठे सुंदर दिसत आहेत. ते जणू मुखकमलावर बसलेले दोन लहान भुंगेच आहेत.

रामचंद्राच्या आदर्शांचे पालन करणारा हा एक निष्ठावंत भक्त व शीलाचार्य होता. [ रा. र. सं.; हिं. सा. को.; हिं. सा. इ.; हिं. सा.; रा. भ. शा.; रा. सं.; भा. सं. ]

**अग्रपूजा** सर्वश्रेष्ठ व्यक्तीचा सन्मान प्रथम करण्याची प्रथा. यज्ञयागप्रसंगी अनेक विद्वान ब्राह्मण आणि अन्य मंडळी एकत्र येत असत. यज्ञामध्ये काम करणाऱ्या ऋत्विजांना दक्षिणा देण्यापूर्वी, जो सर्वश्रेष्ठ ज्ञाता असेल त्याला दक्षिणा द्यावयास सांगितली आहे. अत्रिकुळामधील ऋषीला सर्वांच्या अगोदर दक्षिणा द्यावी, असे शतपथ ब्राह्मणात सांगितलेले आहे. अत्रिगोत्रातील ऋषी हे सर्वज्ञानी होते, म्हणूनच त्यांना हा मान मिळाला असावा. यज्ञसमारंभप्रसंगी अग्रपूजेसंबंधी वादही होत असत. पांडवांच्या यज्ञामध्ये श्रीकृष्णाची अग्रपूजा केली म्हणून शिशुपाल क्रुद्ध झाला आणि त्याने श्रीकृष्णाची निंदा केली, अशी कथा महाभारतात आहे. [ अ. म. ज्ञा. ]

**अग्रमंदर** बिहारमधील चंपापुरी (आधुनिक भागलपूर) गावाजवळचे जैन तीर्थस्थान. जैनांचा तीर्थंकर वासुपूज्य याचे हे मोक्षस्थान होय. चंपापुरीच्या रजतमौलिका नदीच्या तीरी हे स्थान वसले असल्याचा निर्देश गुणभद्राच्या उत्तर पुराणात आहे.

भागलपूरच्या दक्षिणेस ४८ कि. मी. अंतरावर असणारे आधुनिक मंदरगिरी नामक पर्वतीय स्थान ते हेच असावे, असे म्हणतात. दिगंबर जैनांचे हे एक प्रमुख तीर्थस्थान मानण्यात येते. [ प्रा. स्थ. को. ]

**अग्रवाल** वैश्य वर्णाच्या अंतर्गत एक जात. लोकभाषेत या शब्दाचा उच्चार अगरवाल असाही करतात. आग्नेय पंजाब, उत्तर राजस्थान व पश्चिमेकडचा उत्तर प्रदेश या भागांत या जातीची बरीच लोकसंख्या आहे. पण व्यापार-धंद्याच्या निमित्त हे लोक भारतात सर्वत्र पसरलेले आहेत.

अग्रवाल लोकांचे मूळ स्थान अगरोहा हे होते. आणि अग्रसेन हा या लोकांचा मूळ पुरुष होता, अशी परंपरागत समजूत आहे. अगरोहा ही अग्रसेनाची राजधानी होती. पंजाबच्या हिसार जिल्ह्यातल्या फतेहाबाद या शहरावरून सिरसा (शैरीषक) कडे जाणाऱ्या मार्गावर अगरोहा हे ठिकाण लागते. एके काळी हे नगर फार समृद्ध होते. अग्रसेनानेच याची स्थापना केली होती.

श्री. सत्यकेतू विद्यालंकार यांनी अग्रवाल जातीची उत्पत्ती आग्रेय गणापासून मानली आहे. महाभारताच्या वनपर्वात (२२५.२०) व पाणिनीच्या अष्टाध्यायीत (४.१.९९) आग्रेय गणाचा उल्लेख आलेला आहे. प्राचीन गणराज्ये प्राय: एक जाती किंवा वंश यांची बनलेली होती. त्या गणांचेच स्थान पुढे जातींनी घेतले. या आग्रेय गणाचा किंवा अग्रवाल जातीचा संस्थापक अग्रसेन राजा होता.

अग्रवैश्यवंशानुकीर्तनम् किंवा महालक्ष्मीव्रतकथा व उरुचरितम् या ग्रंथांत अग्रसेनासंबंधी कथा दिलेली आहे. क्रुकनेही त्याच्या संबंधीच्या दंतकथा उद्धृत केल्या आहेत. या कथांत थोडाफार फरक आहे. सर्वसाधारणपणे या कथांचा सारांश असा –

वल्लभ नावाचा एक राजा होता. त्याला अग्रसेन नामक पुत्र होता. अग्रसेन मोठा धनाढ्य व बलवान होता. त्यामुळे इंद्राला त्याचा मत्सर वाटू लागला. त्याने मग अग्रसेनाच्या राज्यात पाऊस पाडणे बंद केले. त्यामुळे अग्रसेनाच्या राज्यात दुष्काळ पडला. मग त्याने तप करून महालक्ष्मीला प्रसन्न करून घेतले व तिला इंद्र आपल्याला वश होईल, असे करायला सांगितले. महालक्ष्मीने 'तथास्तु' म्हटले व त्याला कोलपूर येथे जाण्याचा आदेश दिला. तिथे नागांचा राजा महीरथ याच्या कन्येचे स्वयंवर होते. नागकन्येने अग्रसेनालाच वरले व त्या दोघांचा थाटामाटाने विवाह झाला. राजा महीरथाने अग्रसेनाला खूप द्रव्य व सैन्य दिले. त्यामुळे त्याची शक्ती खूप वाढली. हे वर्तमान नारदाकडून इंद्राला कळल्यावर त्याने अग्रसेनाशी समेट केला.

तरी अग्रसेन पूर्णतया संतुष्ट झाला नाही. त्याने यमुनातटावर जाऊन पत्नीसह तपश्चर्येला प्रारंभ केला. कालांतराने महालक्ष्मी त्याच्यावर प्रसन्न झाली आणि त्याला म्हणाली, 'तू तप बंद कर आणि पुन्हा संसार कर. तुला खूप वैभव आणि सर्व सुखे मिळतील. तुझ्या वंशातील लोक नेहमी सुखी आणि संतुष्ट राहतील. आजपासून तुझे कुल तुझ्या नावाने प्रसिद्ध होईल आणि तुझी प्रजा अग्रवंशीया म्हणून ओळखली जाईल. तुझी प्रजा माझी पूजा-अर्चा करील आणि त्यामुळे नेहमी वैभवसंपन्न राहील.'

त्यानंतर राजाने एका नव्या वैभवशाली नगराची स्थापना केली. आणि त्यात आपल्या जातीच्या पुष्कळ लोकांना वसविले. नगराच्या मध्यभागी त्याने महालक्ष्मीचे एक विशाल मंदिर बांधले.

मग अग्रसेनाने सतरा यज्ञ केले. अठराव्या यज्ञाच्या वेळी घोड्याच्या मांसातून शब्द बाहेर पडले, की 'हे राजा, मद्य आणि मांस यांच्या योगाने वैकुंठ जिंकण्याचा प्रयत्न करू नको. मद्य आणि मांस यांचे सेवन जो करीत नाही, त्याला कधीच पाप लागत नाही'. हे ऐकून राजाला मद्यमांसाची घृणा आली आणि त्याने यज्ञ बंद केला. त्यामुळे अठरावा यज्ञ अपूर्ण राहिला आणि अग्रसेनाने साडेसतरा यज्ञ केले, असे लोक म्हणू लागले.

क्रुकने दिलेल्या कथेत अग्रसेनाला अठरा राण्या होत्या, असे सांगितले आहे. प्रत्येक राणीबरोबर त्याने एकेक यज्ञ केला. या अठरा यज्ञांतील अठरा आचार्यांवरून अग्रवालांची अठरा गोत्रे उत्पन्न झाली. अठरावा यज्ञ अपूर्ण राहिल्याने अग्रवालांत साडे-सतरा गोत्रे आहेत; असे म्हणण्याची चाल पडली.

अग्रवाल लोकांत अग्रसेनाला महत्त्वाचे स्थान आहे. अनेक घरांत त्याच्या प्रतिमेची किंवा चित्राची पूजा करतात. ते त्याला देवासमानच मानतात. त्यामुळे अग्रसेन ही एक ऐतिहासिक व्यक्ती होती, या गोष्टीला गौणत्व दिले गेले आहे, असे श्री. सत्यकेतू विद्यालंकार सांगतात. प्राचीन भारतात अनेक शूर व महत्त्वाकांक्षी राजकुमार आपले वेगळे राज्य स्थापून नव्या वंशाची स्थापना करीत असत. महाभारतात अशा व्यक्तींना 'पृथक् वंशकर्तार:' असे म्हटले आहे. राजा अग्रसेनही असाच एक पृथक् वंशकर्ता होता. प्राचीन भारतातील वैशालक वंशाच्या एका राजशाखेत त्याचा जन्म झाला. आपल्या पराक्रमाने त्याने एक नवे राज्य स्थापन केले व एका नव्या राजवंशाला प्रारंभ केला. त्याच्या नावावरून त्याच्या राज्याला आग्रेय असे नाव मिळाले. आजही त्या राज्यातील लोकांना अग्रवाल असे म्हणतात, असे विद्यालंकारांचे प्रतिपादन आहे.

महाभारतीय युद्धानंतर कलियुग सुरू झाले, त्याच्या आधी सुमारे शंभर वर्षे हा अग्रसेनाचा काळ होय.

राजा अग्रसेनाचा विवाह कोलपूर किंवा अहिनगरच्या नाग राजाच्या कन्येशी झाला होता. तसाच त्याच्या पुत्रांचाही विवाह नागकुलातील कन्यांशी झाला होता, अशी दंतकथा आहे. आजही अग्रवाल लोकांत नाग व साप यांना बरेच महत्त्व आहे. हे लोक नागाला किंवा सापाला कधी मारत नाहीत. अनेक ठिकाणी अग्रवाल लोक घराच्या दरवाज्याच्या दोन्ही बाजूंना सापा

प्रतिमा बनवून ठेवतात व त्यांची पूजा करतात. आस्तिक मुनीची पूजाही या लोकांत प्रचलित आहे. नागराजाचा अवतार मानलेल्या गूगा पीराचे हे लोक उपासक आहेत. याशिवाय, नागपंचमीलाही हे लोक नागांची पूजा करतात.

आग्रेय हे प्राचीन भारतातील अनेक गणराज्यांपैकी एक गण-राज्य होते. मॅसिडोनचा राजा सिकंदर याने पहिल्या प्रथम या गणराज्यावर हल्ला केला. या युद्धात अनेक अग्रवाल पुरुष मारले गेले आणि त्यांच्या स्त्रिया शरीर अग्निसात करून सती गेल्या. अगरोहाच्या प्राचीन अवशेषात अजूनही हे स्थान दाखवतात. तिथे सती गेलेल्या स्त्रियांच्या अनेक समाध्या आहेत.

इ. स. च्या बाराव्या शतकाच्या शेवटी घोरी सुलतानांनी हल्ला करून अगरोहा नगर नष्ट केले. तेव्हा अग्रवाल लोक स्थलांतर करून सर्व उत्तर भारतात पसरले. त्यांच्यापैकी बरे-चसे लोक जवळच्या राजस्थानात शिरले आणि त्यांनी मार-वाडात वस्ती केली. दिल्ली, पंजाब आणि उत्तर प्रदेश या भागातही त्यांची बरीच वस्ती आहे.

अग्रवाल लोकांत अनेक भेद आहेत. हे भेद मुख्यत: देश, धर्म व रक्तशुद्धी यांवर आधारलेले आहेत. देशभेदानुसार महत्त्वाचा भेद म्हणजे मारवाडी व वैश्य अग्रवाल किंवा देशवाली अग्रवाल हा होय. अगरोहा नष्ट झाल्यावर काही अग्रवाल मारवाडात जाऊन राहिले. दिल्लीहून पश्चिम किनाऱ्यावरील बंदराकडे जाणारा व्यापारी मार्ग मारवाडातून जात होता. जाणारे येणारे व्यापारी व इतर लोक इथे विश्रांतीसाठी थांबत असत. त्यामुळे अग्रवालांना व्यापारी क्षेत्रात उन्नती करून घ्यायची चांगली संधी मिळाली. आजही हे लोक कुशल व्यापारी म्हणून भारतात प्रसिद्ध आहेत. देशवाली किंवा वैश्य अग्रवालांचेही पुरबिये व पछाइये असे भेद आहेत. उत्तर प्रदेशाचा पूर्वभाग व बिहार यात काही शतकापासून राहणारे आपल्याला पुरबिये म्हणवतात व जे दोन-दीडशे वर्षांपूर्वी तिथे जाऊन राहिले, ते पछाइये होत. याशिवाय, देशवाली लोकात महमिये, जांग्ले, हरियालिये, वांगडी, सहरालिये, लोहिये, इ. काही भेद आहेत.

धर्मभेदानुसार अग्रवालांचे जैन, वैष्णव व शैव असे भेद आहेत. पण या तीन्ही भेदांत खानपान, विवाह, इ. बाबतीत काही फरक नाही. त्यांच्यांत परस्पर विवाहसंबंधही होतात. अनेक अग्रवाल आर्यसमाज, राधास्वामी, इ. पंथाचे अनुयायी आहेत, तर पंजाबात काहींनी शीख पंथाचा स्वीकार केला आहे.

अग्रवालांचे बीसा व दस्सा हे भेद रक्तशुद्धीवर आधारलेले आहेत. सामान्यत: असे समजले जाते, की जे अग्रवाल शुद्ध रक्ताचे आहेत, ते बीसा होत. दस्सा हे त्याहून कमी शुद्ध रक्ताचे व पंजे हे त्याहूनही कमी शुद्ध रक्ताचे मानले जातात. बीसा व दस्सा अग्रवालांत परस्पर विवाहसंबंध होत नाही. दस्सा अग्र-वालांत पुन्हा कदीमी व हालके किंवा जगीद असे उपभेद आहेत. जगीदांना स्थानपरत्वे गाटे, गुडाकुर, गिंदौडिया, दिलवालिये अशी नावे पडली आहेत.

अग्रवालांच्या एका उपजातीला राजाशाही किंवा राजवंशी असे नाव आहे. इतर अग्रवालांशी हे लोक प्राय: विवाहसंबंध करीत नाहीत. राजा रतनचंद नामक एका प्रतापी पुरुष होता. त्याने हा भेद स्थापन केला. राजाशाही लोकांवर मुसलमानांचा बराच प्रभाव आहे. ते मुख्यत्वे उर्दू व फारसी शिकतात. त्यांचा पोषाखही बराचसा मुसलमानांच्या पोषाखासारखाच असतो. त्यांची वस्ती मुख्यत्वे मुजफ्फरनगर व त्याच्या आसपासचा प्रदेश यात आहे.

**उद्योगधंदे** – शेती, पशुपालन व व्यापार हे या लोकांचे प्रमुख व्यवसाय आहेत. व्यापारात हे लोक फारच पुढारलेले आहेत. ते खूप पैसा मिळवतात व दानधर्मातही खूप खर्च करतात.

अग्रवैश्यवंशानुकीर्तनम् या ग्रंथात अग्रवालांची गर्ग, गोइल, गावाल, वात्सिल, कासिल, सिंहल, मंगल, भंदल, तिंगल, ऐरण, धैरण, ढिंगल, तित्तल, मित्तल, तायल, गोभिल व गवन अशी अठरा गोत्रे दिलेली आहेत. सांप्रत अग्रवालांत प्रचलित असलेल्या गोत्रांशी ही नावे बरीच मिळतीजुळती आहेत.

**विवाहप्रथा** – हे लग्नसंबंध समान गोत्रात तर करीत नाहीत; पण पित्याच्या व मामाच्या गोत्रातही करीत नाहीत. अग्रवालां-पैकी कदीम अग्रवालांची विवाहप्रथा पुढे दिली आहे –

पूर्वी मुलगी आठ वर्षांची झाली, की तिचा विवाह करीत. मुलीसाठी वर शोधण्याचे काम न्हावी व पुरोहित असे दोघे मिळून करीत. सांप्रत मुलीचा विवाह साधारणपणे अठराव्या वर्षी करतात. मुलीचा बाप मुलगा पसंत करतो. मुलाची व मुलीची पत्रिका जुळली, तर मुलाचे आईबाप व इतर नातेवाईक मुलगी पाहण्यासाठी तिच्या घरी जातात. त्या वेळी मुलीची ओटी भरून तिला साडीचोळी व गळ्यातला हार देतात. तसेच चांदीच्या रुपयांनी तिचा भांग भरतात आणि तिच्यावरून वीस रुपये ओवाळून न्हाविणीला देतात.

यानंतर वधूपिता व वरपिता एकमेकांना भेटतात. वधूपिता एक परात, पाच शेर लाडू व काही रुपये वरपित्याला देतो आणि वरमातेला व आलेल्या इतर नातेवाइकांनाही काही रुपये देतो. याला मिलनी असे नाव आहे.

त्यानंतर वधूपिता एका ठरवलेल्या दिवशी वरपित्याकडे एक पत्र व दोन रुपये घेऊन न्हाव्याला पाठवतो, याला सगाई असे नाव आहे. लग्नापूर्वी सव्वा महिना अगोदर वधूपिता वरगृही न्हाव्यामार्फत एक पिवळी चिठ्ठी पाठवतो. तिच्यावर हळदीने

स्वस्तिक काढलेले असते आणि तिच्यात लग्नाचा मुहूर्त लिहिलेला असतो. ही चिठ्ठी गेल्यावर वधूच्या घरी लग्नाची तयारी सुरू होते. हल्ली बहुधा सगाई आणि पिवळी चिठ्ठी एकाच दिवशी पाठवतात.

नंतर सात सुवासिनींनी गहू पाखडणे, न्हाविणीने उटणे तयार करून वधूच्या अंगाला लावणे, घराच्या दरवाज्याच्या बाहेरच्या दोन्ही बाजूंना सरसूचे तेल टाकणे, मुलीच्या आईबापांनी मुलीच्या मामाकडे जाऊन त्याला लग्नाचे निमंत्रण देणे, इ. विधी होतात. या प्रत्येक विधीच्या वेळी स्त्रिया गीते गातात.

विवाहाच्या पूर्वी पाच दिवस वधूला हळद व उटणे लावून न्हायला घालणे, एका खोलीत भिंतीवर थापा काढणे, त्याची पूजा करणे, वधूला आरती ओवाळणे, इ. विधीही होतात. विवाहाच्या पूर्वी तीन दिवस, दोन दिवस व विवाहाच्या दिवशी सकाळी वधूला तेल लावण्याचा कार्यक्रम होतो. नंतर रात्री जागरण करून स्त्रिया गीते गातात व हातापायांना मेंदी लावतात. विवाहाच्या आदल्या दिवशी तेल लावल्यावर स्त्रिया पापडाचे पीठ भिजवून पापड लाटतात. मग कुंभाराने आणलेल्या चाकाची पूजा करतात. आणि वधूची आई हळदीच्या पाण्यात हात बुडवून तो पंजा कुंभाराच्या पाठीवर उमटवते. अशाच प्रकारचे विधी वराच्या घरीही होतात.

विवाहाच्या आदल्या दिवशी किंवा त्याच दिवशी सकाळी वर घोड्यावर बसून वाजतगाजत वधूगृही जायला निघतो. त्या वेळी पुढील गीत गातात–

**हंस घोडी लील बछेडी बांधौ वडे के पेड सूं ।**
**जाय चढै मेरौ अतिलडौ विंघसैं करैं हो दाई सैं बीनती ।**
**दाई अंचर गह रही तुम होत लाल मैंने**
**नार कटायौ मेरौ हो नेग दिवाइये ।।**
**जाय चढै मेरौ अतिलडौ विंघसैं करैं हो दाई सैं बीनती ।**

प्रथम मंदिरात जाऊन वर देवपूजा करतो व मग सर्वजण विहिरीवर जातात. तिथे वरमाता विहिरीची पूजा करते आणि विहिरीत पाय सोडून बसते. ती मग मुलाला म्हणते, की 'तू आता चालला आहेस, तर मी विहिरीत उडी टाकून मरते.' तेव्हा मुलगा तिचा हात धरून तिला सांगतो, 'की तुझी सेवा करण्यासाठी मी तुला सून आणायला चाललो आहे. तेव्हा तू काही मरू नको.' मग ती खूष होऊन पाय विहिरीच्या बाहेर काढते. नंतर स्त्रिया घरी परततात आणि वराच्या बरोबर फक्त पुरुष व मुलगे वधूगृही जातात. वराकडील लोक म्हणजे वरात लांबून आली असेल, तर वधूपिता आपल्या गावाच्या चार स्टेशने आधी सर्व लोकांची गाडीत खाण्यापिण्याची व्यवस्था करतो. सर्व वराती जानोशात उतरतात. तिथे वधूपिता वरासाठी पोषाख, अंगठी, घड्याळ, इ. वस्तूंशिवाय दोन कळसे, दोन तांब्ये, परात, काही रुपये घेऊन जातो आणि वराला देतो. नंतर सर्वजण वाजतगाजत मिरवीत वधूगृही जातात. तिथे घराच्या दरवाज्यात वधू वराच्या गळ्यात फुलांचा हार घालते आणि मग वरही तिच्या गळ्यात हार घालतो. त्यानंतर वधूच्या घराच्या अंगणात छोटा मांडव घालतात. घरातील सुवासिनी व वधू हिरव्या बांगड्या भरतात. वरातीबरोबर आलेले ब्राह्मण, पुरोहित, पंडित आणि इतर ब्राह्मण यांना मंडपात भोजन वाढतात आणि मगच इतर लोकांना जेवायला वाढतात.

नंतर मंडपात वधूचे चुलता-चुलती तिला काही भांडी व दागिने देतात. ही भांडी मुलाच्या मामाला मिळतात आणि दागिने मात्र मुलीकडेच राहतात. त्यानंतर इतर स्त्रिया वधूला छल्ला, अंगठी, रुपये असा अहेर करतात. वरपिताही वधूला लाल दुपट्टा, चुंदडी, चादर, चप्पल, इ. सामान न्हाव्यामार्फत पाठवतो. मग वधूच्या मामाकडून आलेल्या कापडाचा वधूसाठी घागरा व जाकिट असा पोषाख शिवतात. मग तिच्या पायांच्या बोटांत बिछुए नामक अलंकार घालतात. हे सौभाग्य चिन्ह असून प्रत्येक सौभाग्यवतीने ते घातलेच पाहिजेत, असा नियम आहे.

घराच्या दारात रांगोळी घालून सतरंजी पसरतात. तिथे वर उभा राहतो. वधूचा मामा तिला घेऊन तिथे येतो आणि वधूला वराभोवती चार फेऱ्या मारायला सांगतो. त्या वेळी पंडित मंत्र म्हणतात. त्यानंतर मंडपात पुरोहित देवता व गणेश यांचे पूजन करतो आणि मग वधूपिता कन्यादान करतो. त्या वेळी तो पाच रुपये तरी दक्षिणा देतो. कन्यादानानंतर हवन होते आणि सप्तपदी होते. सप्तपदीनंतर वधू वराच्या डाव्या हाताला बसते आणि तेव्हाच ती विवाहित झाली असे समजतात. मग काशाच्या दोन भांड्यांत तूप गरम करून घालतात आणि वधू-वर त्यांत आपले मुख पाहतात. याला छायादान असे म्हणतात. ती काशाची भांडी नंतर भड्डुरी ब्राह्मणाला दान देतात. सप्तपदी झाल्यावर विवाह विधी पूर्ण होतात. मग वधूपिता व वरपिता ब्राह्मणांना दान देतात. वराने बांधलेले बाशिंग वधूची आई एक वर्षभर जपून ठेवते. कारण वर्षाच्या आत ते खराब झाले तर ते अशुभ मानतात. विवाहानंतर वधूच्या व वराच्या घरी काही लौकिक सोहळे होतात. [ क. अ. वि. प्र.; अ. जा. प्रा. इ.]

**अग्रवाल, डॉ. वासुदेवशरण** (इ. स. १९०४–१९६६) प्राचीन भारतीय विद्यांचे एक मर्मज्ञ अभ्यासक व लोकसंस्कृतीचे भाष्यकार. यांचा जन्म उत्तर प्रदेशातील खेडा नावाच्या एका खेड्यात, साहजी नावाने ओळखल्या जाणाऱ्या प्रतिष्ठित वैश्य कुळात झाला. यांचे

वयाच्या सहाव्या वर्षी त्यांची आई वारली. वडील गोपीनाथजी नोकरीनिमित्त बाहेरगावी असत. त्यामुळे वासुदेवशरणांचे पालन-पोषण त्यांचे आजोबा लाला झब्बामल यांनी केले. आजोबांच्या सान्निध्यात राहिल्यामुळे त्यांच्या लोकाभिमुख वृत्तीचा आणि अनेक सुसंस्कारांचा वारसा वासुदेवशरणांना प्राप्त झाला.

वासुदेवशरणांचे वडील लखनौला व्यवसाय करीत असल्यामुळे त्यांचे उच्च शिक्षण लखनौलाच झाले. इ. स. १९२९ मध्ये वासुदेवशरण लखनौ विद्यापीठातून एम्. ए. झाले.

वासुदेवशरणांचे वडील राष्ट्रीय कार्यकर्ते होते, तसेच विद्येचे चाहतेही होते. त्यांनी पं. जगन्नाथ नामक एका संस्कृत विद्वानाच्या खास अध्यापनाखाली वासुदेवशरणांचे संस्कृत अध्ययन करवून घेतले. डॉ. अग्रवाल म्हणतात – 'माझ्या जीवनात जो काही अमृताचा अंश आहे, त्याचे श्रेय संस्कृत अध्ययनाकडेच जाते. संस्कृतच्या अक्षरद्वारातूनच मला प्राचीन भारतीय संस्कृतीच्या दर्शनाचे परमभाग्य प्राप्त झाले. संस्कृताने माझ्या जीवनात जे अमृतसिंचन केले आहे, त्याविषयी कृतज्ञता व्यक्त करायला माझ्याजवळ शब्द नाहीत.'

एम्. ए. झाल्यावर दोन वर्षांनी ते मथुरेच्या पुरातत्त्व संग्रहालयाचे अध्यक्ष झाले. तिथे त्यांनी मूर्तिविज्ञान आणि अन्य भारतीय ललितकलांचे प्रगाढ चिंतन-मनन केले. याच काळात त्यांनी व्रजभूमीच्या सांस्कृतिक इतिहासाचे संशोधन केले व पारंपरिक उल्लेखांना पुरातत्त्वाची पुष्टी देऊन मथुरेतील श्रीकृष्ण-जन्मस्थानाची निश्चिती केली. त्यानंतर लखनौ येथे ७ वर्षे (१९४०–४६) आणि दिल्ली येथे ६ वर्षे, तिथल्या पुरातत्त्व संग्रहालयांची अध्यक्षपदे त्यांनी भूषविली. इ. स. १९५२ च्या शेवटी ते काशीच्या हिंदू विद्यापीठात कलाविभागाचे अध्यक्ष झाले.

डॉ. वासुदेवशरणांनी ज्ञानक्षेत्रात प्रथम पदन्यास केला, तो पाणिनीच्या अष्टाध्यायीवरील गंभीर अध्ययनाच्या रूपाने. हा ग्रंथ त्यांना भारताच्या जनपदीय जीवनाचा दर्पण वाटला. त्यांचे गुरु श्री. राधाकुमुद मुखर्जी यांनी त्यांना पाणिनीच्या अष्टाध्यायीवर पीएच्. डी. साठी प्रबंध लिहिण्यास प्रेरित केले. इ. स. १९४१ साली 'इंडिया अॅज नोन् टु पाणिनी' हा त्यांचा प्रबंध सिद्ध झाला. या प्रबंधामुळे त्यांना पीएच्. डी. व डी. लिट्. या दोन सर्वोच्च बहुमानाच्या पदव्या प्राप्त झाल्या.

पाणिनीच्या अध्ययनानंतर त्यांनी मेघदूत, हर्षचरित व कादंबरी या ग्रंथांची सांस्कृतिक अध्ययने ग्रंथरूपाने प्रसिद्ध केली. याच प्रकारे मार्कंडेय, वामन आणि मत्स्य या पुराणांचा सांस्कृतिक अभ्यास विद्वानांपुढे मांडला. याशिवाय, देवीमाहात्म्याचे इंग्रजी संपादन, उरुज्योती, कल्पवृक्ष, वेदविद्या, कला और संस्कृती, उपनिषद्-नवनीत, भारतसावित्री, भारत की मौलिक एकता, पृथ्वीपुत्र, गीतानवनीत, प्राचीन भारत के लोकधर्म, इ. ग्रंथ त्यांनी लिहिले. मधुकर, जनपद, वरदा, पुराणम्, मरुभारती, लोकवार्ता, इ. अनेक नियतकालिकांच्या संपादनात व निर्मितीत त्यांचा सिंहाचा वाटा होता.

वासुदेवशरण अग्रवाल यांच्या सर्वगामी विद्वत्तेविषयी आणि त्यांच्या सर्वस्पर्शी सहानुभूतीविषयी डॉ. रा. चिं. ढेरे लिहितात–

डॉ. वासुदेवशरण अग्रवाल हे सूक्ष्म शास्त्रीय दृष्टीचे संशोधक होते; परंतु त्यांचे संशोधन तर्काच्या सीमा संभाळूनही अभिजात रसिकतेने रंगलेले आहे. ते चिंतन-मननात अखंड मग्न राहणारे ज्ञानसाधक होते; परंतु वर्तमान जनजीवनाचे त्यांना सतत भान होते. ग्रंथ हेच त्यांचे चिरसहकारी होते; परंतु त्यांनी रुक्षतेला जवळ फिरकूही न देता आपल्या स्नेहामृतात अनेकांना भिजवून टाकले होते. ते भारतीय विद्यांचे सम्राट् होते; परंतु एवढा ज्ञानाधिकार प्राप्त होऊनही त्यांनी आपले विनयाचे वैभव उणे पडू दिले नाही. त्यांचे मन संस्कृतीच्या पुरातन अंगाचा एकसारखा शोध घेत होते; परंतु नूतन हे पुरातनाचे अपत्य आहे, हे सत्य कधी त्यांनी डोळ्याआड होऊ दिले नाही. सत्याचा शोध आणि स्वीकार करण्याच्या बाबतीत ते अत्यंत निर्भय होते; परंतु सत्य हे नग्न स्वरूपातही शिव आणि सुंदर असते, याचा त्यांना कधीही विसर पडला नाही. [ विविधा ]

**अग्रहार** ब्राह्मणांना दान दिलेले गाव. या शब्दाची व्याख्या मानसार ग्रंथात पुढीलप्रमाणे दिलेली आहे –

अग्रं ब्राह्मणभोजनं तदर्थं ह्रियन्ते राजधनात्
पृथक् क्रियन्ते ते अग्रहाराः क्षेत्रादयः ।

अर्थ – अग्र म्हणजे ब्राह्मणभोजन. त्यासाठी राजधनातून वेगळे केलेले ते क्षेत्रादिक अग्रहार होत.

प्राचीन काळी राजे लोक विद्वान ब्राह्मणांच्या योगक्षेमासाठी विशिष्ट भूभागाचे दान करीत व तिथे त्या ब्राह्मणांची वसाहत उभारून देत. त्या भागाचा महसूलही त्या अग्रहारातल्या लोकांच्या उपजीविकेसाठी लावून दिला जाई. अशा गावांना अग्रहार म्हणत. तिथे राहून विद्वान ब्राह्मण विनाशुल्क अध्यापनाचे काम करीत. अशा अग्रहारांत अनेक ठिकाणांहून विद्यार्थी अध्ययनासाठी येत.

एका काळी भारतात सर्वत्र अग्रहार ही संस्था चालत होती. बिल्हणाने काश्मिरातल्या अग्रहारांचे तपशीलवार वर्णन केले आहे. प्रवरपुराते नद्यांच्या संगमावरच्या उत्कृष्ट जमिनी राजांनी ब्राह्मणांना अग्रहार म्हणून दिल्या होत्या. वितस्ता नदीकाठचा अग्रहार शुभ्र होता. तिथली घरे लाकडी होती. अनंतराजाने डोंगरावरही अग्रहार स्थापले होते. त्यांना भट्टाग्रहार असे म्हणत. लोकांच्या दृष्टीला हे भट्टाग्रहार म्हणजे शिथिल होत जाणाऱ्या

धर्माला मजबुती आणण्यासाठी उभारलेल्या तटांसारखे वाटत.

गोमंतकात कदंबराजांनी बरेच अग्रहार स्थापल्याची माहिती मिळते. गोमंतकातल्या काणकोण विभागाला अष्टागर (अष्टाग्रहार) असे दुसरे नाव आहे, ते वरील शब्दावरूनच आले आहे. इ. स. च्या १० व्या शतकात धारवाड जिल्ह्यातल्या कडियुर गावी राष्ट्रकूटांनी दोनशे ब्राह्मणांची सोय होईल, असा अग्रहार स्थापला होता. म्हैसूरमधील आरसीकेरी व बनवासीमधील बेळगावे या ठिकाणीही अग्रहार होते.

अग्रहारांची रचना सामान्यतः पुढीलप्रमाणे असे —

मध्यभागी देवालय, होमशाळा, पाठशाळा, भोजनशाळा व रुग्णालय या संस्था आणि सभोवती ब्राह्मणांची घरे. अग्रहारांतील वस्ती दृढ झाल्यावर मग तिथे वाणी, उदमी, कारुनारू यांची वस्ती होई, दुकाने थाटली जात. मग त्या वसाहतीला टुमदार नगराचे स्वरूप येई. तिथली व्यवस्था महाजनांकडे असे. ते ब्राह्मणांतूनच निवडले जात. सर्व महाजनांवर एक अध्यक्ष असे. अग्रहारांना मिळालेल्या देणग्या व्याजी लावून त्या व्याजाचा विनियोग विविध कार्यांकडे केला जाई. बेळगावे येथील अग्रहार या दृष्टीने नमुनेदार होता. तिथले वातावरण प्रसन्न व पवित्र असे. विविध उत्सवांच्या निमित्ताने तिथे विद्वानांची शास्त्रचर्चा चाले. धर्म, संस्कृती आणि कला यांचा तिथे संगम झालेला होता.

अग्रहारांत संपत्ती सांचली आहे असा सुगावा लागल्यावर आजूबाजूचे लुटारू लोक त्यांच्यावर हल्लेही करीत. अशा प्रसंगी महाजनांना त्या लुटारूंचा प्राणपणाने प्रतिकार करावा लागे. त्यांत कित्येक अग्रहारी लोक प्राणांसही मुकत.

वरंगळच्या काकतीय राजांपैकी गणपतिदेव व त्याची मुलगी रुद्रांबा यांनी स्थापलेल्या अग्रहारांपैकी एका अग्रहाराचे वर्णन मलकापूर येथील शिलालेखात (इ. स. १२६०) पुढीलप्रमाणे आहे —

मंदर नावाचा गाव सर्व हक्कांसहित विश्वेश्वर शंभूला गणपतिदेवाकडून देण्यात आला. त्याची मुलगी रुद्रदेवी. त्याच्या अनुज्ञेने वेलंगपूडी नावाचा दुसरा गाव त्या बरोबर मिळवून आठ प्रकारच्या हक्कांसहित व इतर उत्पन्नांसहित, कृष्णेत असलेल्या बेटासहित दान दिला. विश्वेश्वरदेवाचा शाश्वत मठ, सर्वांना उपयोगी पडणारा अग्रहाराच्या बरोबर छत्र स्थापन करून विश्वेश्वर देशिकाने त्या दोन्ही गावांना मिळवून श्रीविश्वेश्वरगोडकी हे नाव दिले. अनेक गोत्रियांना व एक दुसऱ्या बरोबर क्रयविक्रय करणारे, साठ द्राविड ब्राह्मणांना, प्रत्येकी एक पेनुबाका मानेडूच्या हिशेबाने उपजीविकेकरिता व्यवस्था केली. वेलंगपूडी मंदर गावी एकशेवीस खंडीची जमीन देण्यात आली. राहिलेली जमीन तीन भागांत वाटून एक भाग शिवाच्या नावाने, दुसरा भाग विद्यार्थ्यांना व शुद्ध शैव मठाला प्रसूती व आरोग्यशालांना छत्रांना मिळवून विश्वेश्वर देशिकाला दिला. हे शैव सिद्धांत पूर्णपणे जाणणारे या गावांत विद्यार्थ्यांच्या सोयीकरिता ऋग्-यजु-सामवेद म्हणणारे, तीन पदवाक्यप्रमाण साहित्यागम व्याख्यान करणाऱ्याच्या बरोबर एक वैद्य व एक कायस्थ यांची व्यवस्था करण्यात आली. या दहा जणांना प्रत्येकी दोन खंडीची जमीन देण्यात आली. [ ए. ए. इं.; मु. पू. म.; व. का. रा. ]

**अघमर्षण** (१) एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदातील अघमर्षण हे एकच सूक्त (१०.१९०) याचे आहे. त्या सूक्तात याने सृष्टिनिर्मितीची प्रक्रिया सांगितली आहे. या सूक्ताला पदपाठ नाही. त्यावरून हे मागाहून घातलेले असण्याचा संभव आहे. हा ऋषी केवळ अथर्ववेद्यांच्या तर्पणात येतो, यावरून हे सूक्त मूळचे अथर्ववेदातले असू शकेल, अशी शंका श्री. ना. गो. चापेकर यांनी व्यक्त केली आहे.

हे एक पापक्षालनसूक्त आहे. 'अघं मर्षति इति' = पापाचा पराभव करणारे (विग्रहकोश). संध्येतला एक विधी या सूक्ताने करायचा असतो. त्या वेळी म्हणायच्या ऋचा अशा —

ऋतं च सत्यं चाभीद्धात्तपसोऽध्यजायत ।
ततो रात्र्यजायत ततः समुद्रो अर्णवः ।।
समुद्रादर्णवादधि संवत्सरो अजायत ।
अहोरात्राणि विदधद्विश्वस्य मिषतो वशी ।।
सूर्याचन्द्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत् ।
दिवं च पृथिवीं चान्तरिक्षमथो स्वः ।।
(ऋ. १०.१९०.१-३)

अर्थ — (सृष्टिनिर्मात्याच्या) जाज्वल्य तपःसामर्थ्याने प्रथम न्याययुक्त धर्म आणि सत्य उत्पन्न झाले. नंतर (अंधकाररूप) रात्र उत्पन्न झाली आणि त्यानंतर उदककल्लोळांनी उचंबळणारा समुद्र निर्माण झाला (१). उचंबळणाऱ्या समुद्राच्या (उत्पत्ती) नंतर कालनिदर्शक वर्षमान उत्पन्न झाले आणि नंतर डोळ्यांची उघडझाप करणारे सर्व प्राणिमात्र सृष्टीच्या अधिपतीने घडवून अहोरात्र (वर्षाचे विभाग) प्रचारात आणले (२). तथापि पूर्वी ठरविलेल्या योजनेप्रमाणे सृष्टिकर्त्याने रवी, चंद्र उत्पन्न केले होते. (पण त्यांच्या अगोदर) द्युलोक केला आणि नंतर (क्रमाने) पृथ्वी, अंतरिक्ष आणि स्वर्गलोक अशी रचना केली (३).

संध्येत उजव्या हाताच्या खळग्यात पाणी घेऊन ते वरील सूक्ताने अभिमंत्रित करतात व त्या पाण्यात उजव्या नाकपुडीतून श्वास सोडून ते डाव्या बाजूस भूमीवर टाकतात. या कृतीने शरीरातील पापपुरुष श्वासावाटे बाहेर पडून त्याचा नाश होतो.

**यथाश्वमेधः ऋतुराट् सर्वपापापनोदनः ।**
**तथाघमर्षणं सूक्तं सर्वपापप्रणाशनम् ।।**

अर्थ – जसा यज्ञांचा राजा अश्वमेध सर्व पापे दूर करतो, त्याप्रमाणे अघमर्षणसूक्त सर्व पापांचा नाश करणारे आहे.

स्नानाच्या वेळीही हे सूक्त म्हणतात. [ प्रा. च. को.; म. ज्ञा. को.; आह्निकसार; तर्पण]

(२) एक तीर्थ. हे विंध्य पर्वताच्या पायथ्याशी आहे. इथे दक्षाने तप केले व हंसगुह्य नामक स्तोत्राने विष्णूची स्तुती केली (भाग. पु. ६.४). [ पु. इं. ]

**अघमर्षणव्रत** सकल पातकांचे प्रायश्चित म्हणून हे व्रत करतात. यात रोज तीन वेळा पाण्यात बुडी मारून अघमर्षणसूक्त (ऋ. १०.१९०.) म्हणायचे असते. हे तीन दिवसांचे व्रत आहे (बौ. ध. सू. ४.२. १९–२०). तीन दिवस उपवास करणे, दिवसा उभे राहणे, रात्री बसून राहणे व व्रताच्या शेवटी गाय दान देणे, असा याचा विधी सांगितला आहे (विष्णुधर्मोत्तरपु. ४६. १–९). [ हि. ध. ]

**अघरिया** बंगालमधील एक छोटी शेतकरी जमात. हे लोक मूळ आग्र्याहून आले म्हणून यांना अघरिया म्हणू लागले. ते असे सांगतात, की आपण मुळात क्षत्रिय होतो; राजकीय छळामुळे आग्र्याहून पळून बंगाल प्रांती आलो. इकडे आल्यावर आम्ही जानव्याला फाटा दिला व नांगर हाती धरला, म्हणून लोक आम्हाला हीन समजू लागले. विदर्भ, रायगड, सारंगगड, बिलासपूर, छोटा नागपूर, बालाघाट, रेवा, उदेपूर, या भागांत यांची वस्ती आहे. हे आग्र्याजवळच्या राजपुतांचे वंशज आहेत, असे मानतात. हे लोक उंच व वर्णाने निमगोरे असतात. त्यांचे अवयव प्रमाणबद्ध असतात. दिसण्यात ते राजपुतांसारखे आहेत. त्यांच्या स्त्रिया पुरुषांबरोबर शेतीच्या कामाला जात नाहीत. त्या घरी बसून सूत कातताात. त्यांची वेषभूषा नीटनेटकी असते. त्या चांदीचे दागिने घालतात.

मुलींची लग्ने त्या वयात आल्यावर करतात; पण साखरपुडा लहानपणी होतो. तो होऊनही मुलींना पूर्ण स्वातंत्र्य असते. अघरिया मुलींचे डोळे सतेज, दात शुभ्र, केस काळेभोर व पापण्या लांब असतात. त्या फक्त हात आणि पाय यांवरच गोंदून घेतात. यांची लग्ने ब्राह्मण उपाध्यायाकरवी होतात; पण तो ब्राह्मण पंजाबकडील असला पाहिजे. उत्कल ब्राह्मण त्यांना चालत नाही. यांच्यांत विधवाविवाहाचा निषेध नाही.

हे लोक मृतांना पुरतात.

बंगालमधील इतर लोकांची समजत आहे, की अघरियांच्या बायका चेटकिणी असतात. विशेषकरून गंगापूर जिल्ह्यात हा प्रवाद फार आहे. या स्त्रियांनी चेटूक क्रिया सोडून द्यावी, म्हणून त्यांच्यावर सक्ती केली जाते. प्रसंगी त्यांना मारहाणही करतात. म्हाताऱ्या बायका तरुण स्त्रियांना ही विद्या शिकवितात. [ इं. स्ट. पा. प्रे. व्हॉ. ३, एप्रिल १९६० ]

**अघोर** (१) महेश्वराचे ३२ व्या कल्पातले रूप. याचा वर्ण काळा होता (वायुपु. २३. २९. ७६).

(२) एक शिवावतार. हा चौदा हातांचा, आयुधे धारण करणारा व नृत्यासाठी सिद्ध असणारा, असा आहे. याची कथा अशी – ब्रह्मदेवाच्या वराने मरुत्त नामक दैत्य माजला. त्याला मारण्यासाठी शिवाने पार्वतीला आज्ञा केली. पार्वती त्या कामी असमर्थ ठरली. मग शिवाने स्वत: अघोर रूप घेऊन त्याचा संहार केला. ही घटना तिरुवेन्कडू या गावी घडली. तमिळनाडूमधल्या या गावी भद्रकालीचे मंदिर असून, तिच्या समोर अघोरमूर्तीची स्थापना केलेली आहे.

अघोरमूर्ती चतुर्मुख, अष्टभुज, मुंडमालाधारी व मरुत्त दैत्याचे मस्तक तुडविणारी, अशी करतात. अघोराचा निवास श्मशानात असून, त्याच्या भोवती भूत-प्रेतांचा मेळावा असतो, असे मानतात. [ सा. इं. इ. गॉ. गॉ. ]

**अघोर चतुर्दशी** भाद्रपद कृष्ण चतुर्दशीचे नाव. या दिवशी उपवास करून शिवपूजा करतात.

**भाद्रे मास्यसिते पक्षे अघोराख्या चतुर्दशी ।**
**तस्यामाराधितः स्थाणुर्नयेच्छिवपुरं ध्रुवम् ।।**

अर्थ – भाद्रपद कृष्ण चतुर्दशीला अघोरा असे नाव आहे. त्या दिवशी शंकराची पूजा केली असता तो भक्ताला शिवलोकी नेतो. [ श. क. ]

**अघोरनाथ** शिवाचे एक रूप. जो घोर म्हणजे भयानक नव्हे तो अघोर अर्थात सौम्य. अघोर पंथाचे लोक या नावाने शिवाची पूजा करतात. [ अ. अ. ]

**अघोर पंथ** एक संप्रदाय. याला औगर, औघड, अशीही नावे आहेत. यजुर्वेदाच्या रुद्राध्यायात 'या ते रुद्र शिवा तनूरघोरा पापकाशिनी' असा एक मंत्र आहे. यात शिवाच्या अघोर तनूचा उल्लेख आहे. अघोरीश्वर या नावाने शिवाची उपासना कर्नाटकात व इतरत्रही केली जाते. त्यावरून या पंथाचा संबंध शैव संप्रदायाशी, विशेषत: पाशुपत व कालामुख संप्रदायांशी जोडला जातो. गोरखनाथाचा शिष्य ब्रह्मगिरी

याने या पंथाची स्थापना केली, असे सांगतात.

या पंथाचा दीक्षाविधी असा – दीक्षा द्यायच्या वेळी गुरू शंख वाजवतो. त्याच वेळी भाड्याने आणलेला बँडही मोठमोठ्याने गीत वाजवीत असतो. गुरू एका मानवी कवटीत भरलेल्या पाण्यात काहीतरी द्रव्य मिसळतो आणि ते पाणी दीक्षार्थीच्या गोटा केलेल्या मस्तकावर ओततो. नंतर दीक्षार्थीला थोडी दारू प्यायला देतात आणि खालच्या जातीच्या लोकांकडून भिक्षा मागून आणलेले अन्न खायला देतात. मग त्याला भगवी वस्त्रे धारण करायला सांगतात. मग गुरू त्याच्या कानात गूढ मंत्र सांगतो. हा मंत्र गुप्त ठेवायचा असतो.

काही वेळा मानवाचे मांस खाणे, हा दीक्षेतील एक आवश्यक विधी असतो. त्यानंतर दीक्षार्थीच्या गळ्यात पशूंच्या हाडांची माळ घालतात. काही वेळा मद्याने भरलेल्या पाच भांड्यांत बकऱ्याचे मांस व फुले मिसळतात आणि ती भांडी वेदीवर ठेवतात. मग दीक्षार्थीला डोळे बांधून गुरूच्या पुढे नेतात. गुरू दिवा लावतो आणि दीक्षार्थीचे डोळे सोडून त्याला दिव्याच्या ज्योतीकडे पाहायला सांगतो. नंतर गुरू त्याच्या कानात हळू आवाजात मंत्र उच्चारतो. बारा वर्षांनंतर दीक्षित पुरुषाला पंथात पूर्ण प्रवेश मिळतो.

या पंथाच्या लोकांचे वर्णन युआन च्वांग या चिनी प्रवाशाने केले आहे. ते असे – हे लोक अंगाला राख फासून गळ्यात कवट्यांच्या माळा घालतात व नग्न हिंडतात. काही लोक पाने किंवा झाडांच्या साली नेसतात. कोणी वाघाचे कातडेही गुंडाळतात. चामुंडा ही यांची देवता आहे. हे तिला नरबली देतात व प्रेताचे मांस खातात. आनंदगिरीनेही शांकर दिग्विजयात यांचे असेच वर्णन केले आहे. हे अन्ननिषेध पाळीत नाहीत. घोड्याचे मांस वर्ज्य करून इतर सर्व प्रकारचे मांस खातात. हे लोक आपली विष्ठा अन्नात मिसळून खातात व तिचे पाणी फडक्यातून गाळून पितात. या प्रकाराला ते अतिलिया म्हणतात. या प्रकाराने अद्भुत सामर्थ्य प्राप्त होते, ते असे मानतात.

थेवेनो, वार्ड, टॉड, या पाश्चात्य ग्रंथकारांनी अघोरी लोकांविषयी बरीच माहिती लिहून ठेवली आहे –

अघोरी लोक गोरक्षनाथाला आपला मूळ पुरुष मानतात. यांच्यांत मंत्रतंत्र व जादूटोणा हेही प्रकार बरेच आहेत. हे मंत्रतंत्रांनी माणसांना मारतात व त्यांना पुनश्च जिवंत करतात, अशाही आख्यायिका प्रचलित आहेत. त्यामुळे सामान्य लोकांना यांचे भय वाटत असते. अबूचा पहाड ही आपल्या पंथाची आद्यभूमी असे ते मानतात. सांप्रत या पंथाचे लोक अल्प असले, तरी ते सर्व भारतभर आढळतात. मुसलमानही या पंथाचे अनुयायी आहेत. बिहारमध्ये यांची संख्या अधिक असून, त्या खालोखाल राजस्थान व मारवाड या भागात आहे. अलिकडे हे वस्त्रे वापरू लागले आहेत. पण त्यांचा वेष सर्वत्र समान नसतो. अघोरी स्त्रिया टोळ्या करून हिंडतात. कमरेला घागरा, मस्तकी जटा, गळ्यात स्फटिकांच्या माळा व हातात त्रिशूळ असा त्यांचा वेषपरिवेष असतो.

भारतात ब्रिटिशांचा अंमल सुरू झाल्यावर अघोरी लोकांना त्यांच्या क्रूर कृत्यांबद्दल शिक्षा होऊ लागल्या. त्यामुळे या पंथात बाह्य सुधारणा पुष्कळ झाली. त्यांनी मनुष्यवध व नग्नसंचार बंद केला. पूर्वी माणसांच्या हाडांच्या माळा घालीत, त्याऐवजी ते आता रुद्राक्षमाळा, सापांच्या हाडांच्या माळा किंवा रानडुकराच्या सुळ्यांच्या माळा वापरू लागले आहेत.

या पंथाशी संबंधित असे पुष्कळ साहित्य सगळीकडे विखुरलेले आहे. पण अद्यापि त्याचे अध्ययन व अनुशीलन झालेले नाही. त्यांचे तत्त्वज्ञान निर्गुण अद्वैतवादाशी मिळतेजुळते आहे. त्यांची साधना हठयोग पद्धतीला धरून असते. ते ध्यानयोगाला विशेष महत्त्व देतात. गुरूला परमहंस समजून त्याची पूजा करतात. साधुसंतांच्या समाधीचीही पूजा करतात. शीत-उष्ण, क्षुधा–तृषा, इ. द्वंद्वांविषयी बेफिकीर राहून यांच्यामधले काही लोक लययोगाची साधना करतात. अशा स्थितीत त्यांचे शिष्य या साधकांची लहान बालकांप्रमाणे काळजी वाहतात. निर्वाणी व गृहस्थ असे दोन प्रकारचे लोक या पंथात आहेत.

किनाराम हा या पंथाचा सर्वप्रसिद्ध आचार्य होय. हा अठराव्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला. हा काशीजवळ राहत होता. याने लिहिलेल्या ग्रंथांत विवेकसार हा ग्रंथ मुख्य असून, तोच या पंथाचा प्रमाणग्रंथ आहे. किनारामाच्या मते सत्य पुरुष किंवा निरंजन हा सर्वत्र व्यापक रूपाने स्थिर असून, त्याचे अस्तित्व सहजरूप आहे. या ग्रंथात सृष्टिरहस्य, कायापरिचय, पिंड-ब्रह्मांड, अनाहतनाद, योगसाधना, निरालंबस्थिती, आत्मविचार, सहजसमाधी, इ. अनेक विषयांचे विवेचन आहे. किनारामाने प्रस्तुत पंथाच्या प्रचारासाठी रामगढ, देवल, हरिहरपुर व क्रमिकुंड अशा चार ठिकाणी आपले मठ स्थापले. हा इ. स. १७६९ मध्ये मृत्यु पावला. किनारामावरूनच या पंथाला किनारामी पंथ, असेही म्हणतात. याच्या व्यतिरिक्त भिनकराम, भीखनराम, टेकनराम, सदानंदबाबा, बालखंडीबाबा, इ. काही सुप्रसिद्ध संत या पंथात होऊन गेले.

सरभंगी नावाचा एक दुसरा पंथ या पंथातूनच निघाला आहे. याचा प्रचार विशेषकरून बिहारमधील चंपारण्य जिल्ह्यात आहे. हे लोक वीतराग व द्वंद्वसहिष्णू असले, तरी किळसवाण्या प्रकारांपासून अलिप्त आहेत. पाहा – किनाराम अघोरी, सरभंग संप्रदाय. [ एन्सा रि. ए.; हिं. सा. को.; म. ज्ञा. को., सा. इं.

**अघोर शिवाचार्य** ( इ. स. चे १२ वे शतक) श्रीकंठमताचा अनुयायी. याने मृगेंद्रसंहितेवर व्याख्या लिहिली आहे. शैवमतात याचा हा ग्रंथ प्रमाण मानतात. श्रीकंठाने इ. स. च्या पाचव्या शतकात ज्या शैवमताला नवजीवन दिले, त्याचाच परिपोष बाराव्या शतकात याने केला. [हिंदुत्व]

**अघोरेश** शिवाचे एक रूप. याच्या जपाने सर्व दुःखे नाहीशी होतात. यव, क्षीर, आज्य व शुभ्र तांदूळ, यांच्या हवनाने हा संतुष्ट होऊन वैभव देतो व व्याधीचा नाश करतो, असे सांगितले आहे. [ लिंग पु. ४९ ]

**अचलगढ** एक तीर्थक्षेत्र. दिलवाड्यापासून पाच मैलांवर अचलगढ पहाड आहे. पहाडाच्या पायथ्याशी एक तलाव व अचलेश्वर महादेवाचे प्राचीन मंदिर आहे. त्यातील लिंगाच्या खाली तेजपालाचा एक मोठा शिलालेख आहे. तलावाच्या काठी एक श्वेतमंदिर आहे. जवळच अचलगढ गावात एक मोठे जैन मंदिर आहे. त्यात चौदा पितळी प्रतिमा असून, त्यांचे वजन १४४४ मण आहे. या मंदिराखाली भुयारात एक मंदिर असून, त्यात २४ देवावास आहेत. याशिवाय, इथे शांतिनाथ, कुंथुनाथ, पार्श्वनाथ, नेमिनाथ व आदिनाथ यांचीही मंदिरे आहेत. [ जै. ज्ञा. को. ]

**अचलदाने** ही दहा दाने पुढीलप्रमाणे आहेत—धान्यपर्वत, लवणाचल (मिठाची रास), गुडाचल (गुळाची ढेप), हेमपर्वत (सोन्याची रास), तिलशैल, कार्पासपर्वत, घृतशैल, रत्नपर्वत, रजतशैल (रुप्याची रास) व शर्कराचल. ही दाने पर्वकाळी किंवा मंगलकार्यप्रसंगी द्यायची असतात. चतुरस्र मंडप उभारून त्याच्या मध्यभागी दर्भावर दानद्रव्याचा ढीग रचतात व त्याचे दान देतात. फल— समृद्धी, राजैश्वर्य व उत्तम लोक यांची प्राप्ती. [ दा. चं. ]

**अचलासप्तमी** मार्गशीर्ष शु. सप्तमी. (व्रतराजान्वये माघ शु. सप्तमी). हे सूर्यव्रत आहे. हे व्रत करणारे षष्ठीस एकभुक्त राहतात. सप्तमीच्या सुप्रभाती जलचरांनी पाण्यात खळबळ सुरू करण्यापूर्वी एखाद्या जलाशयावर स्नानाला जातात. जाताना सोन्यारुप्याच्या अथवा तांब्याच्या पात्रात तेलवातीचा दिवा पेटवून ठेवून ते पात्र डोक्यावर घेतात. मग जलाशयाच्या काठी उभे राहून हाताने त्याचे पाणी हालवितात.

**नमस्ते रुद्ररूपाय रसानां पतये नमः ।**
**वरुणाय नमस्तेऽस्तु हरिवास नमोऽस्तु ते ।।**

अर्थ — भयानक रूप असलेल्या, तसेच रसांचा अधिपती आणि श्रीहरीचा निवास असलेल्या वरुणा, तुला नमस्कार असो.

हा मंत्र म्हणून तो दिवा पाण्यात सोडतात. मग स्नान व स्नानांग तर्पण करतात. या व्रताच्या मुख्य देवता शिव-पार्वती व सूर्य या होत. चंदनाच्या अष्टदलात मध्यभागी शिव-पार्वतींची स्थापना करून अष्टदलाच्या आठ पाकळ्यांवर पूर्वादिक्रमाने रवी, भानू, इ. सूर्यरूपांची सुपाऱ्यांवर स्थापन करतात. नंतर पूजा करून देवतांचे विसर्जन करतात. मग घरी येतात. नंतर एका मृण्मय अथवा ताम्रपात्रात गूळ व तूप मिसळलेले तिळाचे पीठ घालून त्यात सुवर्णाचे कर्णभूषण ठेवतात व त्यावर तांबडे वस्त्र आच्छादितात व त्या पात्राची पूजा करतात. मग त्यावरचे आच्छादन ब्राह्मणांकरवी दूर करून त्याचे दान करतात. नंतर दिवसभर सूर्यचिंतन, सायंकाळी अन्नदान व मग भोजन करतात. याची कथा अशी —

पूर्वी सगर राजाची इंदुमती नावाची एक वेश्या होती. एकदा ती स्वस्थ बसली असता तिच्या मनात विचार आला, की ' आपल्या हातून आजवर कोणतेही पुण्य घडलेले नाही. आपण शिव-विष्णूंची पूजाही कधी केली नाही. छे ! केवळ विषयासक्त राहून आपला उद्धार होणार नाही. ' मग तिने वसिष्ठ ऋषीकडे जाऊन आपली ही मनोव्यथा त्याला निवेदिली. वसिष्ठाने तिला अचलासप्तमीचे व्रत सांगितले. हे व्रत केल्यामुळे ती जीवनाच्या अंती इंद्रलोकाला गेली.

हे व्रत इष्टप्राप्तीसाठी सर्वांनी करावे, असे श्रीकृष्णाने धर्मराजास सांगितले आहे. [ व्रतराज ]

**अचलेश्वर** अमृतसर—पठाणकोट रेल्वेमार्गावर बटाला स्टेशनपासून दीड कोसावर अचलेश्वर शिवाचे मंदिर आहे. हे मंदिर एका सरोवराच्या मध्यभागी आहे. मंदिरात कार्तिकेयाची आणि पार्वतीचीही मूर्ती आहे. इथे वसू आणि सिद्धगण यांनी यज्ञ केला होता. गुरू नानकानेही काही काल इथे साधना केली होती.

कार्तिक शु. दशमीला इथे जत्रा भरते. [ कल्याण—तीर्थांक ]

**अचळागौर** महाराष्ट्रीय ब्राह्मणसमाजातील सुवासिनी पूजेची एक प्रथा. जिचे आईवडील व सासूसासरे हयात आहेत आणि जिच्या एकाही अपत्याचा मृत्यू झालेला नाही, अशा सुवासिनीला महाराष्ट्रात अचळागौर या नावाने ओळखले जाते. नवरात्रात हिला बोलावून भोजन घालण्याची चाल काही घराण्यात आहे. अशा वेळी तिला सगळे दधिपात्र देतात व त्यात दक्षिणेचे द्रव्य घालतात.

**अचिंतिपा** चौऱ्यायंशी सिद्धांपैकी एक. हा मुळात मोळीविक्या होता. एकदा हा रानात गेला असता याने तिथे पडलेल्या एका नागाला दोरी समजून त्यानेच आपली मोळी बांधली, असे सांगतात. हा कानिफनाथाचा शिष्य होय. [ ना. सं. ]

**अचिंत्य भेदाभेदवाद** बंगालमध्ये महाप्रभू श्रीचैतन्य देव यांनी स्थापन केलेल्या वैष्णव भक्तिसंप्रदायाला आधारभूत असलेल्या वेदान्तमताचे वर्णनात्मक नाव अचिंत्य भेदाभेदवाद असे आहे. वेदान्त्यांच्या मते ब्रह्म हे अचिंत्य म्हणजे कल्पनेच्या पलिकडचे आहे. श्रीचैतन्यांचे शिष्य जीव गोस्वामी यांनीच मुख्यतः या मताची मांडणी केली व गुरूच्या मधुराभक्ति–संप्रदा याला तात्त्विक बैठक दिली. पाहा– चैतन्य संप्रदाय.

**अच्छावाक** एक ऋत्विज. होत्याच्या गटात याचे तिसरे स्थान आहे. याची वाणी स्पष्ट असावी, असा संकेत आहे. म्हणूनच याला अच्छावाक ही संज्ञा मिळाली आहे. हा ऋग्वेदी व सामर्थ्यवान असावा, असे ऐतरेय ब्राह्मणात सांगितले आहे (२.३६). सोमयागात याज्या आणि शस्त्र म्हणणे हे याचे काम असते. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**अच्छोदा** बर्हिषद पितरांची मानसकन्या. तिने चुकून अमावसू या पितृगणातल्या पुरुषालाच वरले, त्यामुळे ती योगभ्रष्ट झाली. पुढे तिला तिचे पितर त्रसरेणूंच्या स्वरूपात दिसले व तिने त्यांची प्रार्थना केली. ते म्हणाले. 'तू २८ व्या द्वापारात पृथ्वीवर मत्स्यकन्या होशील व तुझा शंतनूशी विवाह होईल. तू दोन पुत्रांची माता होशील. नंतर तुला पितृलोकात स्थान मिळेल.' हीच अच्छोदा एका कोळ्याची कन्या म्हणून जन्माला आली. सत्यवती व मत्स्यगंधा ही तिला नावे मिळाली. पुढे शंतनूशी तिचा विवाह होऊन तिला चित्रांगद व विचित्रवीर्य असे दोन पुत्र झाले. (ब्रह्मांडपु. ३. १०; वायुपु. ७३; मत्स्य पु. १४) [ प्रा. च. को.; पु. इं. १ ]

**अच्युतव्रत** एक काम्य व्रत. याचा विधी असा – पौष कृ. प्रतिपदेस अच्युतपूजा. 'ॐ नमो वासुदेवाय' या मंत्राने तिल व घृत यांचे हवन व तीस दंपतींना भोजन. फल– आरोग्य व संपत्ती यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**अच्युतानंतगोविंद** संकटे व आधिव्याधी यांचे निराकरण व निरामय आरोग्याची प्राप्ती, यांच्यासाठी विष्णूच्या अच्युत, अनंत आणि गोविंद या तीन नामांचा जप करावा, असे सांगितले आहे. हा जप ब्राह्मणद्वारा केला तरी चालतो. 'ॐ अच्युताय नमः अनन्ताय नमः गोविंदाय नमः' असा या नाममंत्राचा जप करायचा असतो. कश्यप, अत्री व भरद्वाज हे या मंत्राचे ऋषी आहेत.

अच्युतानन्तगोविन्दनामोच्चारणभेषजात् ।
नश्यन्ति सकला रोगाः सत्यं सत्यं वदाम्यहम् ॥

या अनुष्टुभ मंत्राचा जप केला तरी चालतो. जपसंख्या सहस्र, दशसहस्र, लक्ष किंवा यथाशक्ति [ ऋ. ब्र. स. ]

**अच्युतानंद दास** (इ. स. चे १६ वे शतक) एक ओडिया वैष्णव कवी. ओडिसातील कटक जिल्ह्यात तिलकाना येथे याचा जन्म झाला. आपण शूद्रकुलात जन्मल्याचे कवी सांगतो. ओडिसातील वैष्णव कविसंप्रदायात पंचसखा नावाने ओळखल्या जाणाऱ्या कविपंचकातील अच्युतानन्द हा वयाने सर्वांत लहान कवी होय. आपण कोळी व गोप जातींचे गुरू असल्याचे त्याने म्हटले आहे. ओडिसातील या जाती, अच्युतानंदाने रचिलेल्या कैवर्तगीता आणि गोपालांक उगाल या ग्रंथांना आपले पवित्र धर्मग्रंथ म्हणून फार मान देतात.

अनाकारसंहिता या ग्रंथात आपण ३६ संहिता, ७८ गीते व १०० मालिका लिहिल्या असल्याचे अच्युतानंदाने म्हटले आहे. त्याच्या नावावर २७ वंशचरित्रे, १२ उपवंश आणि काही कोइली, चौतिसा, टीका, विलास, निर्णय, उगाल, गुज्जरी, भंजन, इ. एक लक्ष संख्येची ग्रंथरचना असल्याचे सांगितले जाते. ही सर्व रचना आज उपलब्ध नाही. बारा संहिता, सहा गीते व एक मालिका एवढीच त्याची रचना उपलब्ध आहे. हरिवंश हा त्याचा सर्वोत्कृष्ट ग्रंथ होय. त्याची लोकप्रियता ओडिसात जगन्नाथदासाच्या भागवत ग्रंथाखालोखाल आहे. मूळ संस्कृत साचा सोडला, तर हरिवंश ही त्याची जवळजवळ स्वतंत्र रचना म्हणता येईल. त्यात कृष्णचरित्र वर्णिले असून, ओडिसातील गोपजातीच्या सामाजिक जाणिवा प्रतिबिंबित झालेल्या आहेत.

अच्युतानंद हा एक गूढवादी व आध्यात्मिक कवी होता. त्याच्या अनेक भक्तिगीतांवरून प्रेम आणि भक्ती या भावना उत्कटतेने व्यक्त होतात. भावकवी म्हणून त्याची योग्यता मोठी आहे. माणसात देव पाहाणारा आणि माणसातील देवत्वाचा पुरस्कार करणारा तो एक महान द्रष्टा होता. [ म. वि. को. ]

**अच्छरीनृत्य** उत्तर प्रदेशातील एक धार्मिक लोकनृत्य. अच्छरी हा अप्सरा शब्दाचा अपभ्रंश आहे. हे नृत्य स्त्रियांचे असून, सौम्य व आकर्षक आहे. नृत्य करणाऱ्या स्त्रिया

घागरा नेसून रंगीत पोषाख करतात व संथ गतीने नाचतात. या नृत्यात राधाकृष्णविषयक गीते म्हणतात. अप्सरा किंवा आसरा यासारख्या अनिष्ट शक्तींच्या परिहारार्थ हे नृत्य केले जाते. [ संमेलनपत्रिका–लोकसंस्कृती विशेषांक; भा. लो. नृ. ]

**अड्डुताळी** तमिळनाड व केरळमधील सुवासिनी स्त्रियांचा गळ्यात घालायचा एक अलंकार. पाहा–ताळी.

**अज** (१) न जायते इति अजः = ज्याला जन्म नाही असा. परमेश्वराचे नाव.

**न हि जातो न जायेऽहं न जनिष्ये कदाचन ।**
**क्षेत्रज्ञः सर्वभूतानां तस्मादहमजः स्मृतः ।।**

अर्थ –(विष्णू म्हणतो) मी उत्पन्न झालो नाही, होत नाही व होणार नाही. सर्व भूतांचा मी क्षेत्रज्ञ आहे. म्हणून मला अज म्हटले आहे.

(२) तुषित देवगणातला एक.

(३) ब्रह्मदेवाचे एक नाव.

(४) एक यज्ञीय पशू. यालाच बकरा, बोकड, अशीही अन्य नावे आहेत. हा प्राणी सामान्यतः गरीब समजला जातो. त्यामुळेच त्याची यज्ञात बलियोग्य पशू म्हणून निवड केली जात असावी. याविषयी एक सुभाषित प्रसिद्ध आहे, ते असे –

**अश्वं नैव गजं नैव व्याघ्रं नैव च नैव च ।**
**अजापुत्रं बलिं दद्यात् देवो दुर्बलघातकः ।।**

अर्थ – घोडा नाही, हत्ती नाही, वाघ तर नाहीच नाही. अजापुत्र (म्हणजे बकरा) बळी द्यावा, (कारण) देव दुर्बलांचा घातकर्ता आहे.

याची शिंगे पोकळ असून, याला दाढी असते. याच्या गळ्याला दोन लहान स्तन असतात. अजागळ स्तन म्हणजे निरुपयोगी असा वाक्प्रचार यावरूनच आला आहे. कारण या स्तनातून मर्यातच दूध निघत नाही. पाहा – बकरा; बलिदान.

**अज एकपाद** एक वैदिक देवता. हिचा अहिर्बुध्न्याशी निकटचा संबंध आहे (ऋ. २. ३१. ६). याच्या बरोबर अज एकपाद याचा पाच ठिकाणी उल्लेख येतो. निघंटूमध्ये याला स्वर्गीय देवता म्हटले आहे (५. ६). याने दोन्ही लोक (द्यावापृथिवी) स्थिर केले, असे अथर्ववेदात म्हटले आहे (१३. १. ६). हा पूर्वेला उदय पावत असल्याचे वर्णन तै. ब्रा. मध्ये येते (३. १. २. ८). यावरून हे सूर्याचेच एक नाव असावे, असे वाटते. दुर्गाचार्यांचेही तेच मत आहे. महाभारतामध्ये अज एकपाद याला एकादश रुद्रांपैकी एक म्हटले आहे. हा अग्नीचे एक रूप आहे, अशीही समजूत आहे. याला पेयनिषेक देतात



अज एकपाद

(पार. गृ. सू. २. १५. २). पाहा – अहिर्बुध्न्य, एकादश रुद्र. [ म. ज्ञा. को. वेदविद्या; प्रा. च. को. ]

**अजंटा** बौद्ध लेण्यांसाठी प्रसिद्ध असलेले एक स्थान. सातमाळा पर्वतराजीची एक शाखा खानदेश व मराठवाडा यांच्या सीमेलगत पसरलेली आहे, तिला इंध्याद्री म्हणतात. त्या डोंगरावरून तापी नदीच्या खोऱ्यात उतरण्याचा जो मार्ग आहे, त्या मार्गावर, घाटमाथ्याजवळ अजंटा हे लहानसे गाव वसलेले आहे. त्यावरून त्या डोंगराला अजंटा डोंगर म्हणतात. त्या डोंगराच्या एका अर्धचंद्राकृती दरडीत, अजंटा गावापासून सुमारे ४ मैल अंतरावर, अनेक गुंफा खोदलेल्या आहेत. औरंगाबाद जिल्ह्यात औरंगाबादच्या उत्तरेला ६२ मैलांवर हे स्थान आहे. तिथून ४ मैल दूर, घाटाच्या पायथ्याशी फरदापूर नावाचे खेडेगाव आहे.

अजंटाची ही लेणी डोंगरांच्या एका रांगेत असून, तिच्या समोर डोंगरांची दुसरी रांग आहे. डोंगरांच्या त्या दोन रांगा जिथे मिळाल्या आहेत, तिथे एका कड्यावरून घाटमाथ्यावरचे पाणी खाली दरीत कोसळते आणि लेण्यांच्या समोरून वाहत

जाते. या प्रवाहालाच पुढे वाघरा नदी म्हणतात.

ज्या पहाडात लेणी खोदलेली आहेत, त्याची उंची काही ठिकाणी अडीचशे फुटांपर्यंत गेली आहे. त्या उभ्या पहाडात तीस गुंफांची एक मालिकाच पसरलेली दिसते. त्यांतील चार चैत्य-गृहे असून, बाकीचे विहार आहेत. कालमानाच्या दृष्टीने या लेण्यांचे स्थूल असे दोन विभाग होतात–पहिल्या विभागात हीनयान पंथाच्या म्हणजे सनपूर्व १५० ते इ. स. १०० या कालखंडातील क्र. ८, ९, १०, १२, १३ व १५ अ या सहा गुंफांचा समावेश होतो. बाकीच्या गुंफा इ. स. ४०० नंतरच्या महायान पंथाच्या आहेत.



अजंटा डोंगर

सुमारे एक हजार वर्षे या ठिकाणी बौद्धांचे एक महत्त्वाचे केंद्र होते. प्रसिद्ध चिनी प्रवासी युआन च्वांग हा दक्षिणेत बादामीला गेला असता त्याने या गुंफांचे जे वर्णन ऐकले ते लिहून ठेवले आहे. ते असे – महाराष्ट्र देशाच्या पूर्व भागात एक मोठी पर्वतश्रेणी आहे. तिथे एका दरडीत भव्य मंडप व दालने कोरलेली आहेत. त्यात एक मोठा संघाराम आहे. अचेलो या प. भारताच्या रहिवाशाने तो खोदविला असे सांगतात. त्यातील मंदिर शंभर फुटांहूनही अधिक उंच आहे. त्या मंदिरात सत्तर फूट उंचीची एक भव्य बुद्धमूर्ती आहे. या मूर्तीवर पाषाणाची सात छत्रे एकावर एक अशी आहेत. एकाही छत्राला कशाचा आधार नाही. भिंतीवर बोधिसत्त्व अवतारातील विविध प्रसंग रेखाटलेले आहेत. मठाच्या द्वाराजवळ दोन्ही बाजूंना दगडी हत्ती आहेत.

एकोणतीस क्रमांकाच्या गुंफेतील एका शिलालेखात (इ. स. ५ वे शतक) अचल याने एक गुंफा खोदल्याचा उल्लेख आहे. इ. स. ७ व्या शतकापर्यंत या लेण्यातले चित्रकाम चालू होते. त्यानंतर बौद्ध धर्माचा ऱ्हास होऊन या स्थळाचे महत्त्व कमी झाले. भिक्षूंची वसाहत नष्ट होऊन त्या गुंफा निर्मनुष्य झाल्यानंतर तिथे रान माजले आणि त्यात जंगली जनावरांनी वसती केली. त्यामुळे मध्ययुगात हे स्थान अज्ञातच राहिले. ते नेहमीच्या वाहतुकीच्या मार्गावरून सहज दिसत नाही. त्याचा शोध लावण्याचे श्रेय परकीय राज्यकर्त्यांनाच द्यावे लागते. इ. स. १८१९ मध्ये मद्रास विभागातील काही गोरे लष्करी अधिकारी अजंटाच्या रानात हिंडत असताना, त्यांनी ही लेणी पाहिली. आणि इ. स. १८२४ मध्ये जनरल सर जेम्स अलेक्झँडर याने तिथे जाऊन त्या सर्व गुंफांची नीट पाहणी केली.

या गुंफा तेथील शिल्पकामापेक्षा चित्रकामासाठी विशेष प्रसिद्ध आहेत. सर्व चैत्यांत क्र. १० व २६ हे चैत्य उत्कृष्ट आहेत. १० क्रमांकाचा चैत्य बौद्ध लोक अत्यंत पवित्र मानतात. तो सर्वांत प्राचीन व उत्कृष्ट रंगविलेला आहे. त्यातील कमानी, खांब, भिंती, छत यांवर गिलावा करून बुद्धादिकांची सहस्रावधी चित्रे रंगवलेली आहेत. गिलावा वारुळातील मातीचा केलेला असल्यामुळे शेकडो वर्षे टिकला. सव्विसाव्या लेण्याचे कोरीव काम अप्रतिम आहे. त्याच्या बाहेरील अंगाला एक मोठी बुद्धमूर्ती खोदलेली असून, गाभाऱ्यात अनेक बुद्धमूर्ती आहेत. त्यातील स्तूप व छत फारच सुंदर आहेत.

इथली सर्व लेणी जशी समकालीन नाहीत, तशी त्यातील रंगीत चित्रेही समकालीन नाहीत. ९ व्या व १० व्या गुंफेतील चित्रे इ. स. १ ते ३ या शतकांतली आणि १, २, १६, १७ या गुंफातील चित्रे ६ व्या शतकातली व बाकीची ७ व्या शतकातली आहेत. या सगळ्या गुंफांची निर्मिती अगदी योजनापूर्वक झाली असावी, असे वाटते. पण वस्तुस्थिती तशी नाही. पूर्वी प्रत्येक गुंफा किंवा गुंफांचा गट स्वयंपूर्ण होता. प्रत्येक गुंफेतून किंवा मोठ्या गटातून खाली झऱ्यापर्यंत जाण्यासाठी पायऱ्या होत्या. आता त्यांची पडझड झाली आहे.

या लेण्यांविषयी एक दंतकथा आहे, ती अशी –

आचार नावाचा एक अर्हत होता. त्याची माता मरण पावली. तिने याच देशात पुनर्जन्म घेतला आहे, असे त्याला अंतर्ज्ञानाने समजले. तो तिचा शोध घेत हिंडू लागला. एकदा एक बालिका त्याला भिक्षा वाढायला आली असता हीच आपली आई असे त्याने ओळखले. अर्हताला पाहून तिलाही पान्हा फुटला. कोवळ्या वयात हा प्रकार झालेला पाहून लोकांना ते आश्चर्य व दुश्चिन्ह वाटले. मग अर्हताने तिच्या पूर्वजन्माचा वृत्तांत सांगून लोकांचे समाधान केले. तिच्यासह तो अजंटयास आला. तिथे त्याने डोंगरात संघाराम खोदविले आणि त्यांच्या भिंतीवर बुद्धचरितातील अनेक चित्रे रंगवून घेतली.

ही लेणी सनपूर्व पहिल्या शतकापासून सातव्या शतका-

पर्यंतच्या काळात खोदण्यात आली. यांतली सर्वांत प्राचीन लेणी पैठणच्या सातवाहनांच्या वेळची असून, ती हीनयान पंथाची आहेत. या पहिल्या विभागात चैत्य असून, दुसऱ्या विभागातील महायान पंथाच्या लेण्यांत बुद्धाच्या मूर्ती आहेत. दोन्ही विभागांत रंगीत चित्रे आहेत. मानवाच्या विध्वंसक वृत्तीचा, तसेच कडक आणि विषम हवेचा परिणाम पुष्कळशा चित्रांवर होऊन त्यांतली बरीचशी नष्टप्राय झाली आहेत. केवळ तेरा लेण्यांतलीच चित्रे काय ती शिल्लक आहेत. त्यांतल्या त्यांत एक, दोन, नऊ, दहा, बारा, सोळा, सतरा व एकोणीस या क्रमांकाच्या लेण्यांतील चित्रे सुरेख आहेत. दुसरे व बारावे ही लेणी विहाराची आहेत. ६५ फूट लांबी-रुंदीची सपाट छत असलेली व १२ ते १४ फूट उंचीची ती प्रशस्त दालने आहेत. भव्य स्तंभांनी ती तोलून धरलेली आहेत. त्यात मागच्या भिंतीच्या आतल्या अंगाला एका वेदीवर भव्य बुद्धमूर्ती दिसते. पुढच्या भिंतींत द्वारे व गवाक्षे आहेत. बाजूने जाणाऱ्या ओवऱ्यांचे स्तंभ आणि आतली प्रशस्त दालने यांवर सुंदर पण विचित्र आकृतिबंध कोरलेले आहेत.

अजंटयातली चित्रे काढण्यासाठी लागणारी पार्श्वभूमी माती, शेण व दगडाची वस्त्रगाळ पूड, हे पदार्थ एकत्र करून व त्याचा भिंतीवर लेप देऊन बनविण्यात आली आहे. छतासाठी भाताच्या तुसाचाही उपयोग केलेला आहे. अजंटयाच्या चित्रकारीत वापरलेले रंग काजळी, फिकट लाल, फिकट पिवळा आणि गर्द निळा, एवढेच असून ते अगदी साधे आहेत. चित्रविषयांची बाह्य रेखा गुलाबी, तपकिरी किंवा काळ्या रंगात आढळते. इथल्या चित्रकलेचे हे एक वैशिष्टच आहे. विशिष्ट जातीची माणसे विशिष्ट रंगानेच चित्रित करायची, असा इथला संकेत दिसतो. सर्वसाधारण माणसाचा रंग काळसर तपकिरी आहे. सामान्यतः भारतीयांचा वर्ण हाच असतो. या वर्णातच एखाद्या व्यक्तीत सोनेरी किंवा गुलाबी छटा आढळते. ती आरोग्याची किंवा आनंदी वृत्तीची द्योतक असावी. विटकरी तांबूस आकृती शेतकरी, कामकरी वगैरे श्रमिकांच्या आहेत. हिरवट आकृती वन्यांच्या आहेत.

अजंटयाच्या चित्रांचे तीन विभाग आहेत – (१) अलंकारिक चित्रे (२) मानवी आकृतींचे यथातथ्य रेखांकन असलेली चित्रे व (३) कथानकपर चित्रे. पहिल्या विभागात पशू, पक्षी, कल्पित प्राणी व यक्षगंधर्वादी अतिमानवी योनी, यांचा समावेश आहे. दुसऱ्या विभागात लोकपाल, बुद्ध व बोधिसत्त्व यांचा मुख्यत्वे समावेश होतो. बुद्ध हा लोंबत्या कानांमुळे इतर भिक्षूंहून वेगळा दिसतो. बोधिसत्त्वांच्या अंगावर राजभूषणे आढळतात. काही चित्रे समूहरूप आहेत. त्यांपैकी एक कुबेराच्या पंचिक नावाच्या सेनापतीचे आहे. चित्रात तो बसलेला असून जवळ त्याची पत्नी हारीती मुलाला पाजीत बसली आहे. बुद्धचित्रे विविध आसनबंधांची आहेत. त्यांतल्या मुद्रा भिन्न भिन्न आविर्भाव दाखवतात. बुद्धाचे समग्र जीवनच या ठिकाणी चित्रित झाले आहे. तिसऱ्या विभागात जातककथांचा समावेश होतो. सिबिजातकात बोधिसत्त्वाने एका कबूतराला वाचविण्यासाठी आपले मांस ससाण्याला कसे देऊ केले, ते दाखविले आहे.



स्नानशृंगार–अजंटा

महाजनकजातकातल्या कथेतलेही काही देखावे आहेत. सिंहली राजकन्येची बोधिसत्त्वाला भुरळ घालण्यासाठी चाललेली धडपड, समुद्रपर्यटनात बोधिसत्त्वाची नौका बुडाली असता मणिमेखल यक्षाने त्याला केलेली मदत, वगैरे देखावे त्यात आहेत. रुरुजातकात बोधिसत्त्व हरिण झालेला दिसतो. छदनाजातकात तो हत्तींचा राजा होतो. वेस्संतरजातकात बोधिसत्त्वाला देशत्याग करावा लागतो. तो आपली मुलेही ब्राह्मणाला दान देतो, ब्राह्मण त्या मुलांचा छळ करतो व मग इंद्राच्या कृपेने वेस्संतराला मुलांसह राज्यप्राप्ती होते, असा तो देखावा आहे.

**गुंफा क्रमांक एक** – शिल्प व चित्र या दोन्ही दृष्टींनी हे लेणे विशेष प्रेक्षणीय आहे. याचा दर्शनी भाग सुरेख आणि प्रमाणबद्ध आहे. त्यात तुळईच्या वर बुद्धाच्या जीवनातील प्रसंग, हत्तींच्या झुंजी, इ. विविध प्रकारचे कलापूर्ण शिल्पकाम दिसते. निरनिराळ्या प्रकारचे स्तंभ देखणे असून, त्यांवरही बुद्ध, गंधर्वयुग्मे इ. आकृती कोरलेल्या दिसतात. काही स्तंभांवर पूर्ण कलश आढळतो. त्याचे भद्र मात्र पडलेले आहे.

सोप्याच्या दोन्ही टोकांना दोन खोल्या असून, मागील मंडपात जाण्यासाठी तीन दरवाजे आहेत. मुख्य दरवाज्याच्या चौकटीवर गुप्तकालीन पद्धतीचे सुंदर नक्षीकाम केलेले आढळते. मंडपाच्या चारी बाजूंना सोपे असून, त्यांचे स्तंभ नक्षीदार आहेत. मंडपाच्या मागील अंगी मोठा गाभारा असून, त्यातील सिंहासनावर बुद्धाची भव्य मूर्ती आहे; तिच्या दोन्ही बाजूंना

बोधिसत्त्व आणि वरच्या बाजूला गंधर्वयुग्मे आहेत; समोर धर्मचक्र आहे. या मूर्तीच्या मुखावरील भाव विलक्षण आहे. मूर्तीच्या उजव्या बाजूने प्रकाश टाकला की मुद्रा प्रसन्न दिसते. समोरून प्रकाश पाडला तर ती ध्यानमग्न वाटते आणि डाव्या बाजूने टाकला तर खिन्न भासते.

ही गुंफा आतील चित्रांसाठीच प्रसिद्ध आहे. पूर्वी सर्वत्र चित्रे रंगविलेली होती. पण त्यांतली पुष्कळ चित्रे नष्ट झाली आहेत. मात्र जी शिल्लक आहेत, ती उत्कृष्ट वाटतात.

**गुंफा क्रमांक दोन** – या गुंफेची रचना पहिल्या गुंफेसारखीच आहे. समोर सोपा, मागे मंडप व त्याच्या मागे गर्भगृह असून, त्यात बुद्धमूर्ती आहे. स्तंभांचा आकार, घाट व त्यांवरील नक्षी यात बदल दिसतो. मंडपाच्या तीन्ही बाजूंना खोल्या आहेत. या गुंफेतही सर्वत्र सुंदर चित्रे रंगवलेली होती. छतावरची चित्रे अजून चांगली आहेत; पण भिंतीवरची चित्रे खराब झाली आहेत. अंतराळाच्या छतावरील चित्रे अप्रतिम वाटतात.

**गुंफा क्रमांक तीन** – ही गुंफा अपूर्ण अवस्थेत आहे. तिचा फक्त सोपाच खोदून झालेला दिसतो.

**गुंफा क्रमांक चार** – ही गुंफा सर्वांत मोठी आहे. सोप्याची लांबी ८७ फूट, रुंदी १२ फूट व उंची १६ फूट आहे. त्यात आठ अष्टकोनी स्तंभ असून, दोन्ही बाजूंना दोन दालने आहेत. मागच्या मंडपात जाण्यासाठी तीन दारे असून, त्यांच्यामध्ये दोन खिडक्या आहेत. मधल्या दाराच्या चौकटीवर द्वारपालिका, शालभंजिकायुग्मे, इ. आकृती असून, गणेश पट्टीवर बुद्धमूर्ती, चैत्य, शार्दूल वगैरे कोरलेले आहेत. दाराच्या उजव्या बाजूला अवलोकितेश्वराची प्रतिमा व डाव्या बाजूला बुद्धमूर्ती आहे. अंतराळाच्या दोन्ही भिंतींवर भव्य बुद्धप्रतिमा कोरलेल्या आहेत. गाभाऱ्यात बुद्धाची बैठी मूर्ती आहे. या गुंफेतही रंगचित्रांचे अवशेष दिसतात. हे लेणे इ. स. ६ व्या शतकाच्या पूर्वार्धातील असावे.

**गुंफा क्र. ५** – ही गुंफा अपूर्ण आहे. तिचा फक्त सोपाच खोदलेला आढळतो.

**गुंफा क्र. ६** – ही गुंफा इतर गुंफांपेक्षा वेगळी आहे. तिच्यात दोन मजले आहेत. सोप्यातून मागील मंडपात जायला एकच दार आहे. मात्र त्या भिंतीत चार खिडक्या आहेत. आधीच्या गुंफांमध्ये मंडपाच्या मध्यभागी एक चौक मोकळा ठेवलेला आढळतो, तसा या गुंफेत नाही. मंडपात चार खांबांच्या चार रांगा असून, त्यांच्या माथ्यावर तुळया कोरलेल्या दिसतात. मागे गाभारा आहे, त्याचे प्रवेशद्वार नेहमीप्रमाणे चौकोनी नसून, त्यावर अर्धवर्तुळाकृती तोरण आहे. दोन्ही बाजूंना असलेल्या मकरमुखातून हे तोरण वर येते. अंतराळात, दोन्ही अंगांना 'श्रावस्तीचे विश्वरूप' आणि 'माराचे मोहजाल' ही चित्रे रंगवलेली दिसतात. गर्भगृहात बुद्धाची पाषाणमूर्ती असून, बुद्धाची चित्रेही रंगवलेली आहेत. दुसऱ्या मजल्यावर मुख्य सोप्याच्या दोन्ही बाजूंना, गाभाऱ्यात व त्यातील देवळयांत अनेक बुद्धमूर्ती आढळतात.

**गुंफा क्र. ७** – या विहाराची रचना जरा वेगळी आहे. त्यात सोप्याच्या मागे मंडप नसून, अंतराळ व गाभारा खोदलेला आहे. सोप्याच्या दोन्ही बाजूंना ओसऱ्या असून, त्यातून आत दोन दालने खोदलेली आहेत. सोप्याची लांबी ६३ फूट, रुंदी १३.५ फूट व उंची १३.५ फूट आहे. अंतराळाच्या दोन्ही बाजूंच्या भिंतीत श्रावस्तीच्या विश्वरूपाचे शिल्प कोरलेले आहे. गाभाऱ्यात सिंहासनावर बुद्धाची मूर्ती असून भिंतीवर आणि सिंहासनाच्या पुढच्या भागावरही बुद्धमूर्ती कोरलेल्या दिसतात. या विहारातही चित्रे रंगवलेली होती, पण ती आता नष्ट झाली आहेत.

**गुंफा क्र. ८** – या लेण्याचे काही भग्न अवशेष तेवढे पाहायला मिळतात. यात खूप मोठा संघाराम असावा. पण डोंगराचे कडे कोसळून त्याचा बराच भाग ढासळून गेला आहे.

**गुंफा क्र. ९** – या लेण्यात हीनयान पंथाचे, सनपूर्व १ ल्या शतकात खोदलेले चैत्यगृह आहे. त्याच्या दर्शनी भागात विशाल चैत्य तोरण दिसते. ते अगदी साधे आहे. तळमजल्यावर एक दार व दोन खिडक्या दिसतात. त्यांच्या माथ्यावर चैत्य-गवाक्षांची ओळ आहे. गवाक्षाच्या दोन्ही बाजूंना लहान गवाक्षे, वीथिका व कठडे आहेत. त्यांवर कोठेही बुद्धमूर्ती नाही. मात्र दोन्ही बाजूंना ज्या ताशीव भिंती उभ्या आहेत, त्यांवर महायानकाळात बुद्धप्रतिमा खोदण्यात आल्या. त्यांत आजानुबाहू अशा उभ्या मूर्ती अधिक आहेत.

चैत्यगृहात मध्यमंडप, गोल स्तूप व नासिका अशी रचना आढळते. इथले स्तंभ अष्टकोनी, पण अगदी सरळसोट आहेत. कोठेही नक्षीकाम कोरलेले नाही. या गुंफेत चित्रांचे काही अवशेष दिसतात.

**गुंफा क्र. १०** – हे प्राचीन चैत्यगृह सनपूर्व दुसऱ्या शतकातले असावे. गुंफा क्र. नऊमधील चैत्यगृहासारखीच याची रचना आहे, आकार मात्र खूप मोठा आहे. हे ४१ फूट रुंद, ९५.५ फूट खोल आणि ३६ फूट उंच आहे. भाजे, कार्ले, बेडसे व कोंडाणे येथील चैत्यगृहांप्रमाणेच या लेण्यात स्तभांच्या रांगा, भव्य स्तूप व मागील भित अर्धवर्तुळाकार आहे. गुंफेत बरीच पडझड झाली आहे. तथापि भितींवर पुष्कळ रंगीत चित्रे अजून चांगली आहेत. त्यातील काही हीनयान पंथाची व काही महायान पंथाची आहेत. षड्दन्त जातकाच्या कथेतील हत्तींच्या आकृती अत्यं

सफाईदारपणे रंगवलेल्या आहेत. या गुंफेतले शिल्पकाम अगदी साधे आहे.

**गुंफा क्र. ११** – या गुंफेत सोपा, मंडप, खोल्या व गर्भगृह अशी, अन्य विहारांसारखीच रचना आहे. त्यांतील स्तंभ वगैरे शिल्पकाम साधेच आहे. याची बरीच पडझड झालेली दिसते. यात सर्वत्र चित्रे रंगविलेली होती; त्यात बुद्धाची व बोधिसत्त्वांची चित्रे बरीच होती. पण आता सोप्यातील चित्रे तेवढी चांगली दिसतात.

**गुंफा क्र. १२ ते १५** – ही सगळी विहारलेणी असून, त्यांत मंडपाभोवती भिक्षूंच्या खोल्या आहेत. खोल्यांमध्ये दगडी बाके आहेत. सगळ्यांची रचना सारखीच आहे. शिल्पकाम साधे असून काही भाग पडलेला दिसतो. क्रमांक बारा व तेरा या गुंफांचे पुढचे सोपे ढासळलेले आहेत, पण मंडप शिल्लक आहेत. खोल्यांच्या दारांवर चैत्य तोरणे कोरलेली आहेत. तिथे यज्ञकुंडासारख्या पायऱ्या-पायऱ्यांच्या आकृतीही आढळतात. १४ क्रमांकाच्या लेण्यातील शालभंजिका सुरेख आहेत. १५ क्रमांकाच्या गुंफेतील गर्भगृहात सिंहासनावर बुद्धाची मूर्ती आहे व गणेश पट्टीवरील चैत्य-स्तूप-शिखराचे शिल्प प्रेक्षणीय आहे.

**गुंफा क्र. १६** – इथली १६, १७ व १९ या क्रमांकांची लेणी स्थापत्य व चित्रकला या दोन्ही दृष्टींनी भारतातल्या कुठल्याही लेण्यांपेक्षा उत्कृष्ट आहेत, असे बर्जेसने म्हटले आहे. यातले १६ वे लेणे वाकाटक नृपती हरिषेण याच्या वराहदेव नावाच्या सचिवाने आपल्या मातापित्यांच्या पुण्योपचयासाठी खोदविले आहे. हे लेणे अनेक बाबतीत अत्युत्कृष्ट गणले जाते. याची ओसरी किंवा पडवी ६५ फूट लांब व सुमारे ११ फूट रुंद असून तिला मध्ये अष्टकोनी स्तंभ आहेत. दोन्ही बाजूंना दोन खोल्या आहेत. या ओसरीतून आतल्या मंडपात जायला तीन दरवाजे आहेत. मोठ्या दरवाजाच्या चौकटीच्या बाजूच्या लहान स्तंभावर दोन्ही अंगी मकरवाहना गंगेची मूर्ती खोदलेली आहे. आतल्या मंडपाची पुढील वीथिका ७४ फूट लांब आहे. मंडपाची लांबी ६६ फूट, रुंदी ६५ फूट व उंची १५ फूट असून, त्यात २० अष्टकोनी स्तंभ आहेत. त्याच्या दोन्ही बाजूंना ६–६ खोल्या आहेत. त्याच्या पाठीमागे चैत्यमंदिर असून, त्यात जायला तीन दरवाजे आहेत. मध्यभागी बुद्धाची भव्य मूर्ती सिंहासनावर अधिष्ठित असून, ती धर्मचक्रप्रवर्तनमुद्रेत आहे. बुद्धाच्या मुखाभोवती तेजोवलय असून, त्याच्या दोन्ही अंगी वज्रपाणी व पद्मपाणी चवऱ्या घेऊन उभे आहेत.

मंडपाच्या दोन्ही बाजूंना प्रत्येकी सहा, मागच्या भिंतीत दोन व ओसरीच्या उभय अंगी दोन, अशा एकंदर सोळा लहान खोल्या भिक्षूंकरिता खोदलेल्या आहेत.



या १६ व्या लेण्यात मुख्यत्वे बुद्धाच्या शेवटच्या जन्मातले प्रसंग चित्रित झाले आहेत. मंडपात प्रवेश करून उजव्या बाजूच्या भिंतीवरची चित्रे ओळीने पाहत गेल्यास ती बुद्धाच्या चरित्रातल्या घटनांना अनुलक्षून क्रमाने काढली आहेत, असे दिसते. मायादेवीचे स्वप्न, बुद्धजन्माचा देखावा, असित ऋषींचे भविष्यकथन, बाल गौतम पाटीवर धुळाक्षरे काढीत असल्याचे दृश्य, त्याचे धनुर्विद्येचे शिक्षण, सुजातेने त्याला केलेले पायसदान, बुद्धांची राजगृहातील भिक्षा, बुद्धाचा धर्मोपदेश, अजातशत्रू बुद्धाच्या दर्शनाला आल्याचे दृश्य; त्यापुढे दुसऱ्या व तिसऱ्या खोल्यांवरच्या भिंतींवर नंदाचा धर्मप्रवेश, बुद्ध राजवाड्यात आला असता त्याची पत्नी व पुत्र त्याला सामोरे आल्याचे दृश्य, नंदाला दिव्य लोकात नेऊन बुद्धाने तिथल्या अप्सरा दाखविल्या ते दृश्य, अशी ही प्रसंगमालिका आहे.

या कथेतल्या शेवटच्या प्रसंगाचे चित्र चांगल्या स्थितीत असून, कलासमीक्षकांनी त्याची मुक्तकंठाने स्तुती केली आहे. नंदाने बुद्धाचा धर्म स्वीकारून भिक्षुजीवन जगण्याचा निश्चय केल्यावर त्याचा राजमुकुट त्याची पत्नी सुंदरी हिच्याकडे एका सेवकाने आणून दिला व तो पाहून सुंदरी शोकावेगाने मरणोन्मुख झाली, हा त्या चित्राचा विषय आहे. सुंदरी एका सखल आसनावर लोडाला टेकून बसली आहे. मरणोन्मुख अवस्थेमुळे तिची मान गळून पडली आहे. तिचे डोळे शक्तिपातामुळे अर्धवट मिटले आहेत. ती खाली पडू नये म्हणून एक दासी तिला सावरून धरीत आहे व दुसरी शोकविव्हल दृष्टीने तिच्याकडे पाहत आहे. तसे करताना ती एका हाताने सुंदरीची नाडी पाहत आहे व दुसरा हात तिने आपल्या धडधडत्या हृदयावर ठेवला आहे. पंखा धारण करणारी आणखी एक दासी विकलांग अवस्थेत उभी आहे. जवळच काही सेवक असून, ते सुंदरीच्या अखेरच्या अवस्थेबद्दल दुःख करीत आहेत. उजव्या बाजूला बाहेरच्या अंगणात उभ्या असलेल्या दोन दासी या प्रकाराबद्दल आपसांत चर्चा करीत आहेत. मंडपावरचा मोरही शोकाकुल झाला असून, तो आपली मान लांब करून जणू त्या दासींचे बोलणे ऐकत आहे.

अनेक पाश्चात्य कलाविदांनी या चित्राची मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे. शोक, कारुण्य आणि सुस्पष्ट प्रसंगचित्रण या बाबतीत या चित्राला मागे टाकणारी कलाकृती कलेच्या इतिहासात आढळणार नाही, असे ग्रीफिथ म्हणतो. फ्लॉरेन्सचे चित्रकार यापेक्षा चांगल्या आकृती कदाचित काढू शकले असते आणि व्हेनिसच्या कलाकारांना कदाचित त्यांत यापेक्षा जास्त चांगले रंग भरता आले असते; पण त्यांपैकी कोणालाही या चित्रातल्या भावना यापेक्षा जास्त उत्तम रीतीने व्यक्त करता आल्या नसत्या.

या चित्रात वाकाटककालीन चित्रकलेने उच्चांक गाठला, असे म्हणता येते



अजंट्याच्या लेण्यातील एक चित्र

१६ क्रमांकाच्या लेण्यापुढून खाली उतरले असता नागराजाचे लहानसे लेणे लागते. त्यात एका नागाने केलेल्या वेटोळ्यावर नागराज बसला असून, त्याच्या मस्तकावर रत्नजडित मुकुट आहे. त्यावर बैठकीच्या नागाची फणा आहे. अजंट्याची लेणी नाग कारागीरांनी खोदली असल्याने त्यांमध्ये नागराजांच्या प्रतिमा अनेक ठिकाणी कोरल्या गेल्या आहेत, असे श्री. मिराशी म्हणतात.

गुंफा क्र. १७ – हे लेणे विहारपद्धतीचे असून, ऋषीक देशाच्या राजाने भिक्षुसंघाकरिता खोदविले होते. ते क्रांतिवृत्ताचे लेण म्हणून प्रसिद्ध आहे, कारण याच्या ओसरीच्या डावीकडील भिंतीवर एका भव्य चक्राचे चित्र आहे. याविषयी म. म. वा. वि. मिराशी पुढील माहिती सांगतात–

हे चित्र क्रांतिवृत्ताचे आहे, अशा समजुतीने काही पाश्चात्य विद्वानांनी या लेण्याला क्रांतिवृत्ताचे लेणे असे नाव दिले होते. पण हे चित्र क्रांतिवृत्ताचे नसून संसाराचे आहे. संसाराला पुष्कळदा चक्राची उपमा देतात. या भव्य चक्राचे आठ भाग करण्याचा उद्देश होता, असे दिसते; पण त्याचे पाचच भाग चक्राच्या तुंब्यापासून परिधीपर्यंत जाणाऱ्या अंतरांनी विभागले आहेत. बाकीचे तीन भाग खिडकीमध्ये आल्यामुळे रंगविले गेले नसावे. या चक्रामध्ये खेडेगावातल्या, तसेच नगरातल्या व राजप्रासादांतल्या जीवनाचे विविध पैलू रंगविले आहेत. उदाहरणार्थ, शेतकऱ्यांची घरे, त्यांचे साधे जीवन, त्यांची जनावरे, नगरातील नाचरंग, प्रेमी युगुलांचे विविध विलास, अरण्यातील प्रशांत स्थली आत्मानात्मविचारात गुंतलेले ऋषिगण, इ. चित्रे तिथे आहेत. हे सबंध चक्र कोण्या भयंकर आकाराच्या प्राण्याच्या (दैवाच्या) हाताने फिरविले जात आहे, असेही दाखविले आहे.

या विहाराच्या सोप्यात सहा साधे स्तंभ असून, मागच्या मंडपात जायला तीन दारे आहेत. मधल्या दारावर बुद्धाची अनेक चित्रे रंगवलेली आढळतात. मंडपाची रुंदी ६४ फूट, खोली ६२ फूट व उंची १३ फूट असून, त्यात वीस अष्टकोनी स्तंभ आहेत. त्याच्या मागे लहानसे अंतराळ आणि प्रशस्त गाभारा आहे. गाभाऱ्यात बुद्धाची भव्य मूर्ती असून, त्याच्या समोर व दोन्ही बाजूंना अन्य मूर्ती उभ्या आहेत. गाभाऱ्याच्या दारावर विविध प्रकारचे नक्षीकाम कोरलेले असून, बुद्धाच्या व सेविकांच्या आकृतीही दिसतात.

या विहारात एकूण १६ खोल्या आहेत. सोप्याच्या एका टोकाजवळ एक शिलालेख आहे. त्यात अश्मक देशाच्या काही राजांची नावे आढळतात. या लेण्यातील चित्रे अजंट्याच्या लेण्यातील सर्व चित्रांत चांगल्या अवस्थेत दिसतात आणि त्यात निरनिराळ्या जातकांतील विविध कथांचे चित्रण केलेले आढळते. गंगा व यमुना यांच्या मूर्ती आणि विविध प्रकारची नक्षी यांनी सुशोभित अशी द्वारशाखा गुप्तकालीन शिल्पकलेचे चांगले उदाहरण आहे. अंतराळातील स्तंभांवर सुरेख नक्षी कोरलेली आढळते.

या गुंफेतील एक चित्र विशेष उल्लेखनीय आहे. ते आहे शृंगारमग्न स्त्रीचे. आरशात पाहून वेषभूषा करणाऱ्या यौवनेचे. तिच्या मुखावरचे भाव, हातांची बोटे, गळ्यातले मोत्यांचे हार, हे सर्व अत्यंत सफाईने रंगवलेले आहेत. रंगवलेले मोती खऱ्या मोत्यांप्रमाणे चमकत असल्याचा आभास निर्माण व्हावा अशी रंगाची किमया केलेली आहे ! अजंट्याच्या लेण्यातील चित्रांसंबंधी प्रा. म. श्री. माटे लिहितात–

आपल्या आजच्या कसोटीला सगळी चित्रे उतरत नाहीत. काही स्त्री-पुरुष तर मरगळलेले, सत्त्वहीन वाटतात. सफाईदार रेखा, सुदीर्घ नेत्र, डौलदार आकृती यांचा पुष्कळदा इतका अतिरेक झाला आहे, की त्यातून निर्जीव, निस्सत्त्व स्त्री-पुरुष तयार झाले आहेत. तसे पाहिले तर अजंट्याच्या सगळ्याच कलेत लालित्याचा थोडासा अतिरेकच आहे आणि त्यामुळे जीवितातील जोम, टणकपणा यांचा प्रत्यय इथे येत नाही.

गुंफा क्र. १८ – हे लेणे अगदीच अपूर्ण आहे. त्यात केवळ एक द्वारमंडप दिसतो; अन्य शिल्पकाम काहीही नाही.

गुंफा क्र. १९ – हे एक सुंदर चैत्यगृह आहे. ते फार मोठे नाही. त्याची लांबी ४६ फूट, रुंदी २४ फूट व उंची २४। फूट

आहे. त्याची रचना अत्यंत प्रमाणवद्ध असून, हे बौद्ध शिल्पाचे उत्कृष्ट उदाहरण मानले जाते. हे लेणे महायान काळातील, इ. स. च्या ५ व्या ६ व्या शतकातील असले तरी, त्याचे संपूर्ण विधान प्राचीन परंपरेला अनुसरून आहे. पूर्वीची काष्ठ-शिल्पाची प्रतिकृती यातही शिल्लक आहेच. मात्र स्तूपाची रचना वेगळी आहे आणि चैत्यात बुद्धमूर्ती विराजमान झाली आहे. या चैत्यगृहासमोर मोकळे प्रांगण आहे.

१९ वे लेणे गंधकुटी या नावाने उल्लेखिलेले असून, ते वैशिष्ट्यपूर्ण आहे. ते अंतर्बाह्य कोरीव कामाने भरलेले आहे.



गुंफा क्र. १९ मधील चैत्य, अजंटा

त्याच्या समोर द्वारमंडप असून, त्याच्या वाटोळ्या स्तंभांना उभ्या गलथ्यांनी व आडव्या कमलबंधाच्या पट्टयांनी भूषविले आहे. त्याच्या शिरोभागी आमलक आहे. या गंधकुटीतील चैत्यात दोन खांबांवरच्या कमानीत बुद्धाची उभी मूर्ती कोरलेली आहे. त्याने पायापर्यंत लोंबणारा अंगरखा घातला असून त्याची मुद्रा शांत आहे. चैत्याच्या घुमटावर हर्मिका व तिच्यावर तीन छत्रे आहेत.

या चैत्यगृहाच्या द्वारमंडपावर भव्य गवाक्ष आहे; त्याचे तोरण गोलाकार आहे. गवाक्ष व खालचा मजला यांना सांधणाऱ्या प्रस्तरांवर शिल्पपट्ट कोरलेले आहेत. दर्शनी भागात सर्वत्र सुंदर शिल्प कोरलेले दिसते. भद्राचे स्तंभ विशेषच प्रेक्षणीय आहेत. दरवाज्याच्या दोन्ही बाजूंना, तोरणाच्या बाजूंना आणि गृहमुखाशी काटकोनात, पुढे असलेल्या बाजूच्या भिंतींवर, बुद्धमूर्ती व यक्षमूर्ती कोरलेल्या आहेत. डाव्या हाताकडील भिंतीवर कोरलेले नागदंपतीचे शिल्प तर विशेष प्रेक्षणीय आहे.

चैत्यमंदिरात स्तूपाजवळ भव्य बुद्धमूर्ती असून, तिच्यावर मकर-तोरण दिसते. या मंदिराचे स्तंभ पहिल्या लेण्यातील स्तंभांसारखेच आहेत. त्यांच्या दोन रांगांमुळे मंडप व नासिका असे दोन विभाग झाले आहेत. मंडपाच्या भिंतींवर रंगीत चित्रे आहेत.

**गुंफा क्र. २०–२५**– या सहा गुंफांत लहानमोठे विहार आहेत. काही लेण्यांत चैत्यही आहेत. यांचे एकंदर दृश्य रूप विशेष वर्णनीय नसले, तरी प्रत्येक गुंफेत काही शिल्पकाम प्रेक्षणीय आहे. वीस क्रमांकाच्या गुंफेसमोर जी वीथिका आहे, तिचे छत पाहण्यासारखे आहे. आत सात मानुषी बुद्ध कोरलेले आहेत. बावीस क्रमांकाच्या गुंफेत ते चितारलेले आहेत. तेवीस व चोवीस क्रमांकांच्या गुंफांतील शिल्पकाम सुंदर आहे. कोरीव काम विपुल असले तरी उच्च कोटीचे वाटते. तेवीस व पंचवीस क्रमांकांची लेणी अपूर्णच आहेत.

**गुंफा क्र. २६**– हे लेणे एक चैत्यगृह आहे. हे इ. स. च्या ६ व्या–७ व्या शतकात खोदलेले असून, त्यात बौद्ध शिल्पकलेची अंतिम अवस्था पाहायला मिळते. सर्व शिल्पकाम ठाशीव स्वरूपाचे आहे. पण त्यात मूर्ती, आकृती, नक्षी सर्वांचा अतिरेक झालेला दिसतो.

या चैत्यगृहातील मंडप मागे अर्धवर्तुळाकार असून, मध्यमंडप व दोन्ही बाजूंना नासिका असे विभाग आहेत. मंडपाची लांबी ६८ फूट, रुंदी ३६। फूट व उंची ३१। फूट आहे. त्यातील स्तंभ खूप उंच असून, त्यावर विपुल नक्षीकाम आहे. माथ्यावर कोनाड्यात बुद्ध-प्रतिमा कोरलेल्या आहेत. इथला घुमटाकार स्तूप लहान असून, त्याचा चौथरा मात्र खूप मोठा आहे. त्यावर लहानलहान देवळ्यांतही बुद्धमूर्ती दिसतात. त्याच्या दर्शनी भागावर तोरणाने वेष्टित अशी बुद्धमूर्ती आहे. मंडपाच्या डाव्या बाजूच्या भिंतीत बुद्धाच्या महापरिनिर्वाणाचा प्रसंग कोरलेला आहे. गौतम बुद्धाच्या मूर्तीची लांबी तेवीस फूट आहे. तरीही त्याचे अवयव, वस्त्रे, मुद्रेवरील भाव हे सर्व सुरेख, हुबेहूब दिसतात. बुद्धाची मुद्रा शांत आहे, पण त्याच्या मंचकाजवळ असलेल्या सर्व शोकग्रस्त व्यक्तींच्या मुखावर दुःखाची छाया पसरलेली स्पष्ट दिसते. वर गंधर्व-अप्सरांचे थवेही कोरलेले दिसतात.

हे चैत्यगृह १९ व्या गुंफेतील चैत्यगृहासारखेच आहे. मात्र यात बुद्धाच्या असंख्य मूर्ती जागोजागी दिसतात आणि इतर मूर्तीही पुष्कळ आहेत. याचा पुढचा सोपा बराच ढासळला आहे. त्याच्या समोर मोठे प्रांगण असून त्याच्या एका बाजूला भिंतीत अवलोकितेश्वर व बुद्ध यांच्या मूर्ती आहेत. दर्शनी गवाक्षाच्या बाजूला सर्वत्र बुद्धमूर्ती कोरलेल्या आहेत. मोठ्या कमानीच्या दोन्ही बाजूंना कुबेराच्या मूर्ती आहेत.

**गुंफा क्र. २७**– या लेण्याचा पुढचा सोपा पडला आहे. मागे लहान मंडप आहे. त्यात स्तंभ नाहीत. त्याच्या मागे अंतराळ व गाभारा असून, गाभाऱ्याच्या मागील भिंतीत बुद्धाची मूर्ती आहे. अंतराळात काही मूर्ती कोरलेल्या दिसतात. मंडप, अंतराळ

व खोल्या यांतील बराच भाग ढासळलेला आहे. दुसरा मजला खोदण्याची योजना असावी; पण ती अपूर्ण राहिलेली दिसते.

गुंफा क्र. २८–२९– या दोन्ही गुंफा अपूर्ण असून, दुर्गमही आहेत. त्यात खोदकाम थोडेच झालेले आहे.

गुंफा क्र. ३०– हे लेणे बरेच प्राचीन (सनपूर्व दुसऱ्या शतकातले) आहे. पण हे बारा क्रमांकाच्या लेण्यापेक्षा फारसे वेगळे नाही.

अजंटयाच्या चित्रकारांना शरीरशास्त्राचे व चित्रकलेच्या पारंपरिक संकेतांचे सूक्ष्म ज्ञान होते. त्यांची निरीक्षणशक्ती तीक्ष्ण होती. त्यामुळे त्यांनी रंगविलेले देखावे निसर्गाशी व जीवनाशी प्रामाणिक आहेत. हे चित्रकार दूरच्या आकृती उंचावर काढतात. या चित्रांतील वेगवेगळया माणसांचे आकार लहान-मोठे दिसतात. याचे कारण असे, की चित्रातील नायक किंवा नायिका आणि विशेषत: ते देव, गंधर्व, अप्सरा या कोटीतील असतील, तर आकाराने मोठे काढण्याची पद्धत होती. केवळ आकारातच फरक करून चित्रातील प्रमुख पात्रांकडे लक्ष वेधण्यात येई. याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे बुद्ध, यशोधरा व राहुल या चित्राचे. यात यशोधरा आणि राहुल यांच्या समोरच उभा असलेला बुद्ध त्यांच्या जवळजवळ दुप्पट आकाराचा आहे.

इथल्या काही चित्रांत पुष्कळ व्यक्ती चितारलेल्या आहेत. पण त्यांचे वैशिष्टय असे, की चित्रात मात्र गर्दी झालेली दिसत नाही. तसेच, इथे रंगवलेल्या हजारो व्यक्तींच्या आसनात, वर्णात किंवा आकृतींत साम्य आढळत नाही.

इथल्या लेण्यांतील चित्रपटातील स्त्रियांच्या प्रतिमा अत्यंत मोहक आहेत. अप्सरेपासून नागकन्येपर्यंत आणि राजकन्येपासून चामरधारिणीपर्यंत सर्व दर्जांच्या स्त्रियांच्या प्रतिमा इथे रंगविलेल्या आहेत. यौवनाने मुसमुसलेल्या, सौंदर्याने रसरसलेल्या; पुष्पालंकारांनी सजलेल्या; गौर, श्यामल, ताम्र व कृष्णवर्णी; पुष्टस्तनी, सूक्ष्मकटी, पृथुलनितंबिनी; कोणी स्वत:च्या सौंदर्याचे आरशात निरीक्षण करीत स्तब्ध उभी आहे, तर कोणी नितंबांचे स्पंदन करीत गजगतीने पदन्यास करीत आहे. कुठे एखादी अप्सरा आकाशातून तरंगत चाललेली आहे, तर कुठे एखादी नागकन्या एकांतात बसून मानवलोकांचे निरीक्षण करीत आहे. कोणी पाठमोरी झुलत्या केसांच्या बटा सावरीत आहे, तर कोणी सामोरी अपांगावलोकन करीत आहे. कुणी झोपाळयावर बसून झोके घेत आहे, तर कुणी वातायनातून बाहेरचे दृश्य पाहत आहे. स्त्रियांच्या वेषभूषेत आणि केशरचनेत खूपच विविधता आढळते. इथल्या चित्रांतील काही स्त्रियांनी धारण केलेली वस्त्रे तलम व तोकडी आहेत. पण ती कामुकतेची प्रेरणा करीत नाहीत, हे त्यांचे वैशिष्टय होय.

इथल्या चित्रांपैकी सर्वोत्तम कलाकृती म्हणजे पद्मपाणी बोधिसत्त्वाची होय. त्याची उभे राहण्याची ढब, त्याच्या अंगावरचे



प्रेमी युगुल, अजंटा

मोजके व सुरेख अलंकार, त्याचा नक्षीदार मुकुट आणि प्रसन्न मुद्रा हे सर्व उत्तम साधले आहे.

पहिल्या गुंफेतील बैलांची झुंज प्रेक्षणीय आहे. शिंगे एकमेकांच्या कपाळात रोवून आणि शेपटया वर करून एकमेकांवर धावणाऱ्या बैलांचे हे जोरकस चित्रण आहे.

याच गुंफेत चार हरणांचे एक वैशिष्टयपूर्ण शिल्प आहे. एका चौकटीत दोन उभी व दोन बसलेली अशी चार हरणे कोरलेली आहेत. पण या सगळयांना मिळून एकच तोंड आहे. ते इतक्या सफाईने बसविले आहे, की प्रत्येक हरीण अलग अलग पाहिले, तरी ते डोके त्याच हरणाचे आहे, असे वाटते.

अजंटयाच्या चित्रांतील पुरुषांच्या अंगी मात्र पौरुषाचा पूर्ण अभाव दिसतो. सिंहासनाधिष्ठित राजा असो किंवा मृगयेला निघालेला शिकारी असो, कोणाच्याही मुखावर पराक्रमाचा लवलेश दिसत नाही. परदेशी दिसणाऱ्या पुरुषांनाच तेवढया दाढीमिशा आढळतात. फारच थोडया एतद्देशीयांच्या ओठावर मिशा दिसतात. तसेच इथल्या चित्रात युद्धप्रसंग कुठेही चितारलेला नाही. हत्यारांचा उपयोग शिकारीच्या वेळी किंवा मिरवणुकीच्या अग्रभागी अलंकारांसारखा केलेला दिसतो. इथल्या चित्रांतले सगळेच पुरुष शांत, सस्मित, सहनशील व निरुपद्रवी दिसतात.

अजंटयाच्या चित्रांवरून तत्कालीन समाजस्थितीवर बराच

प्रकाश पडतो. तत्कालीन श्रीमंतांच्या घरांचे दिवाणखाने बहुधा चौकोनी व क्वचित गोलही असत. आतले सामान साधेच असे. बसायला चौरंगासारखे कातीव पायाचे मंच, टेकण्याकरिता त्यांना गोल आकाराची पाठ व पाय ठेवण्यासाठी पादपीठ असे. स्वयंपाकघरात शिंकी लोंबविण्याची पद्धत असे. भोजनासाठी वसायला चौरंग व ताट ठेवायला वाटोळी ठेंगणीशी तिवई असे. इथल्या चित्रांवरून तत्कालीन समाजातल्या भिन्नभिन्न वंशाच्या लोकांचीही कल्पना करता येते. चित्रसमूहात काही लोक काळे, खुजे व चपटचा नाकाचे दिसतात. ते या प्रदेशातले आदिवासी असावे. इथे नागवंशी लोकही दिसतात. त्या काळात कुशाण, पल्हव, ग्रीक वगैरे परदेशी लोकही महाराष्ट्रात येऊन स्थायिक झाले होते; त्यांचीही चित्रे आहेत. १७ व्या लेण्यात बुद्धाच्या श्रोतृवर्गात दाढीमिशांचे, अंगांत पूर्ण बाह्यांचे कोट घातलेले व डोक्यावर उंच निमुळता टोप असलेले पुरुष दिसतात. हे या परदेशी वर्गाचे प्रतिनिधी असावे. चित्रात काही चिनी चेहरेही दिसतात. तत्कालीन स्त्रीपुरुष अर्धोरुक म्हणजे अर्ध्या मांडचा उघडचा दिसतील, असे वस्त्र नेसत व त्या वस्त्राला भिन्न रंगांचे पट्टे असत. बायका विकच्छ पद्धतीने नेसत. काही पुरुष मांडचोळणा घालीत. शिकारी पुरुष तुमान घालून वर गुडघ्यापर्यंत पोचणारा कोट चढवीत. पुरुष सामान्यतः उत्तरीय वस्त्र जानव्याप्रमाणे वापरीत. काही लोक एकाच वस्त्राचा कमरेखाली नेसण्यासाठी व वर उत्तरीयासाठीही उपयोग करीत. काही स्त्रिया आपल्या स्तनांवर रुंद पट्टी बांधीत. अशा पट्टचांना पयोधरपट म्हणत. त्यांची गाठ पाठीवर येत असे. चोळीचा प्रकार सार्वत्रिक होता, असे दिसत नाही. अधिकारी व सामान्य जन आपले केस पाठीवर किंवा छातीवर मोकळे सोडीत. काही लोक केसांवर वस्त्राची पट्टी बांधीत. ब्राह्मणांच्या डोक्यावर शेंडीची गाठ असे.



गुंफा क्र. १९ चे मुखदर्शन, अजंटा

अजंटाच्या लेण्यात स्त्रियांच्या केशरचनेचे व शिरोभूषणाचे इतके विविध व सुंदर प्रकार दिसतात, की प्रेक्षक आश्चर्यचकित होतो. अलंकारांचीही विविधता व विपुलता दिसते. ललाटिका, चटुलातिलक, मधे मोठा इंद्रनील मणी बसवलेला मोत्यांचा एकसर, गळसरी, सोनपुतळचांचे हार, वाटोळी कर्णकुंडले, मोत्यांचे लोंबते पदर असलेली केयूरे, रत्नजडित मणिमेखला, इ. अलंकार इथे दिसतात. नाकात नथ घालण्याचा प्रघात त्या काळी नव्हता.

पुरुष पादत्राण घालीत व त्याचा पट्टा घोटचाजवळ पायाभोवती बांधीत. तलवार कमरेला बांधीत व खंजीर कमरपट्टचात खोवीत. घोडचावरचे जीन, लगाम वगैरे सामान दिसते; पण रिकीब मात्र दिसत नाही. धनुष्य, बाण, भाले व ढाली दिसतात. ढाली बहुधा वाकडचा, चौकोनी, आयत आकाराच्या व क्वचित वाटोळचाही असत. छत्र्या बहुधा चौरस किंवा आयताकार दिसतात. राजछत्र मात्र वाटोळे असे.

अजंटाच्या चित्रकलेने मोहून जाणार नाही, असा प्रेक्षक विरळा! इथल्या चित्रकलेतल्या तांत्रिक पूर्णतेचा परिणाम मनावर अधिक होतो, की त्या चित्रांतल्या भावनात्मक प्रगाढतेचा अधिक होतो, हे सांगणे कठीण आहे, असे डॉ. आनन्दकुमारस्वामी म्हणतात. या चित्रकलेला स्त्रीपुरुषांच्या आंतरिक भावनेची पूर्ण जाणीव आहे व पशुपक्ष्यांनाही अंतःकरण असते, हीही जाणीव आहे. त्यामुळे या कलेला अमरत्व प्राप्त झाले आहे. [ सह्याद्रि; वा. नृ. का.; औरंगाबाद गॅझे.; म. शि. वै. ]

## अजपाजप

विशिष्ट प्रकारचा जप. यात नामोच्चारण नसते. माला वगैरे बाह्य साधनांचाही उपयोग करायचा नसतो. हा जप एक, दोन, तीन किंवा चार अक्षरांचा असतो. श्वासनिरोधासह हा जप अवाक् पद्धतीने करतात. हा जप म्हणजे योगसाधनेतली एक प्राथमिक महत्त्वाची गोष्ट आहे. शून्यात मनाला केंद्रित करण्याचे ते एक साधन आहे. सिद्ध आणि नाथपंथी यांच्या साहित्यात या जपाची चर्चा आहे. दिवस आणि रात्र मिळून माणसाचे जे २१६०० श्वासोच्छ्वास होतात, त्यांनाच नाथपंथी योगी अजपाजप म्हणतात.

इकबीस सहस्र षट्सा आद् पवन पुरषि जप मालो ।
इला प्यंगुला सुषमन नारी अहनिसि बहै प्रनाली ।।
(गोरखबानी)

कबिराने नाथपद्धतीला धरूनच श्वास–निःश्वासांना अनुक्रमे ओहम् व सोहम् म्हटले असून, त्यांच्या आतबाहेर जाण्या-येण्याने होणाऱ्या जपाला अजपाजप म्हटले आहे.

श्री. कोल्हटकर यांनी आपल्या भारतीय मानसशास्त्र किंवा पातंजलयोगदर्शन या ग्रंथात अजपाजपाचे विधान पुढीलप्रमाणे दिले आहे –

हा विधी अत्यंत प्राचीन काळापासून चालत आला आहे, अशी सांप्रदायिकांची भावना आहे. भारतवर्षात अतिप्राचीन काळी जेव्हा हंस हा एकच वर्ण होता, त्या वेळी या अजपाजप-द्वाराच विराटाची उपासना ऋषि-मुनी करीत असत, अशीही समजूत आहे.

श्वसन करणाऱ्या प्राणिमात्राच्या ठिकाणी हा अजपाजप जन्माच्या क्षणापासून मरणाच्या क्षणापर्यंत अखंडपणे पण न कळत चाललेला असतो. या विधीला अनुसरून त्याचा संकल्प-पूर्वक उच्चार केला व असा क्रम नित्यनियमाने प्रत्यही ठेवला म्हणजे हा जप जाणिवेच्या कक्षेत येऊन त्यावर सहजपणाने अनुसंधान राहू लागते. दीर्घ काळ असा क्रम चालविल्यास मनाशी या जपाचे इतके तादात्म्य होते, की रिकाम्या असलेल्या कोणत्याही क्षणी या जपावर मन तत्काळ एकाग्र होते व समाधिपादातील २८ व्या सूत्रात सांगितलेला अभ्यास सहज-पणाने घडू लागतो. या अभ्यासाने चित्तात प्रसुप्तावस्थेत असलेले अनंत जन्मातील पापसंस्कार धुवून जातात. चित्त स्वच्छ, शांत आणि प्रसन्न होते व आधि-व्याधी दूर होतात.

हा जप करीत असताना प्रणवाचा जप अनायासाने होतो. यासंबंधीचे अधिक विवेचन पातंजलयोगसूत्रांतल्या समाधिपादा-तील २७, २८ व २९ या सूत्रांच्या विवरणात पाहायला मिळेल. [ सि. सा.; पा. यो. द. ]

## अजपालिपा

(इ. स. चे ९ वे शतक) चौऱ्यायंशी सिद्धांपैकी एक. याचे दुसरे नाव जवरिपा असे होते. हा कण्हपाचा प्रशिष्य असून, मगधनिवासी मानला जातो. तूप विक्रीचा व्यवसाय करणाऱ्या जातीत याचा जन्म झाला, अशी समजूत आहे. डॉ. हजारीप्रसाद द्विवेदींच्या मते चामरीनाथ अथवा चामरिपा आणि अजपालिपा या एकच व्यक्ती आहेत. [ पु. त. नि.; ना. सं.; हिं. सा. बि. ]

## अजमीळ्ह सौहोत्र

एक सूक्तद्रष्टा. हा पुरुमीळ्ह या नावाने ओळखला जातो. पाहा – पुरुमीळ्ह सौहोत्र. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा. ]

## अजमेर

राजस्थानातील एक नगर. हे जयपूरपासून ८२ मैल अंतरावर आहे. ते तारागड डोंगराच्या पायथ्या-जवळ वसलेले असून, त्याच्या भोवती अनेक डोंगर उभे आहेत. या नगराचे मूळ नाव अजय मेरू (=अजिंक्य पर्वत) असे होते. चौहान वंशातील अजयपाल राजाने याची स्थापना इ. स. च्या ७ व्या शतकात केली, असे म्हणतात. त्याच वंशातील अजयराज हा राजा इ. स. च्या १२ व्या शतकात राज्य करीत होता, तेव्हा त्याने या नगराची खूप वाढ केली आणि तारागडावर एक किल्लाही बांधला. त्यामुळे हे नगर निर्माण करण्याचे बरेच श्रेय त्याला दिले जाते.

इ. स. ११९३ साली मुहंमद घोरीने पृथ्वीराजाचा पराभव करून अजमेर जिंकले. त्यानंतर इ. स. १४०० पर्यंत हे नगर दिल्लीच्या पठाण सुलतानांच्या सत्तेखाली होते. त्यानंतर ते मेवाडच्या राणा कुंभा याने जिंकून घेतले. इ. स. १४०० ते १५३१ या कालावधीत तिथे माळव्याच्या सुलतानाची सत्ता होती. मग मारवाडचा राजा मालदेव राठोड याने ते जिंकून घेतले. पुढे इ. स. १५५६ मध्ये मोगल बादशहा अकबर याने तिथे मोगल वंशाची सत्ता स्थापली. राजस्थान व गुजरात या प्रदेशांवर स्वाऱ्या करण्यासाठी हे ठिकाण मोक्याचे असल्यामुळे अकबर बादशहाने तिथे आपले मुख्य लष्करी ठाणे स्थापले होते.



ख्वाजा मोइनुद्दीन चिस्तीचा दरगा, अजमेर

जहांगीर बादशहानेही अनेक वर्षे तिथे राहून मेवाडचा राणा अमरसिंग याच्याशी युद्ध केले. इ. स. १६१६ साली इंग्लंडचा राजा जेम्स पहिला याचा वकील सर थॉमस रो याने इथे जहांगीर बादशहाला आपले अधिकारपत्र सादर केले.

अजयराजाचा पुत्र अर्णोराज याने इथला आनासागर तलाव बांधला. त्या तलावाच्या बांधावर शहाजहान बादशहाने सुंदर क्रीडागृहे बांधली; त्यांतली चार क्रीडागृहे अजून चांगल्या स्थितीत राहिलेली आहेत.

मुसलमान लोक या शहराला दुसरी मक्का मानतात. त्याचे कारण, इथे ख्वाजा मोइनुद्दीन चिस्तीचा प्रख्यात दरगा आहे. मोइनुद्दीन चिस्ती हा भारतातला इस्लामचा पहिला प्रचारक मानला जातो. इ. स. ११९० च्या सुमारास तो अजमेरला येऊन राहिला. तो इ. स. १२३६ साली तिथेच मरण पावला. मांडवगडाचा सुलतान महमूद खिलजी याने इ. स. १४६४ साली तिथे त्याची कबर बांधली. मात्र मोगल बादशहा अकबराच्या वेळी त्या दरग्याची ख्याती वाढली. कारण अकबराने पुत्रासाठी नवस केला होता आणि तो पुरा करण्यासाठी इ. स. १५७० पासून १५८२ पर्यंत दर वर्षी तो अजमेरला जाऊन मोइनुद्दीन चिश्तीच्या दरग्याचे दर्शन घेत असे व तिथे नमाज पढत असे. दर वर्षी रज्जब महिन्यात तिथे मोठा उरूस होतो. त्या वेळी साऱ्या जगातून लाखो मुसलमान यात्रेकरू तिथे येतात. या दरग्यात कबरीशिवाय दोन मशिदी, एक सभागृह व एक बुलंद दरवाजा आहे. बुलंद दरवाजा ७५ फूट उंच आहे. लाल दगडाची मशीद अकबराने बांधली आहे. दुसरी संगमरवरी जामा मशीद शहाजहान बादशाहाने बांधली.

दरग्याच्या मुख्य प्रवेशद्वाराजवळ दोन प्रचंड हंडे आहेत. एका हंडचात २६०० किलोग्राम तांदुळांचा भात व दुसऱ्या हंडचात १०४५ किलो तांदुळाचा भात शिजवता येतो. वार्षिक उरुसाच्या वेळी तिथे जमणाऱ्या भक्तांसाठी तांदुळांचे गोड पक्वान्न बनवण्यासाठी ते हंडे वापरतात.

तारागडाच्या पायथ्याजवळच दरग्याच्या मागे, अढाई दिन का झोपडा नावाची सुंदर मशीद आहे. पूर्वी तिथे एक संस्कृत महाविद्यालय व एक मंदिर होते. वीसलदेव विग्रहराज याने ते मंदिर इ. स. ११५३ मध्ये बांधले होते. इ. स. ११९२ साली मुहंमद घोरीने ते सर्व शिल्पकाम पाडून त्याचीच मशीद बनवली. ती अडीच दिवसांत बांधली गेली म्हणून तिला अढाई दिन का झोपडा हे नाव मिळाले असे म्हणतात. पण इ. स. च्या १८ व्या शतकात तिथे पंजाबशाहाचा उरूस अडीच दिवस होत असे. त्या वेळी जमणाऱ्या फकिरांनी या मशिदीला हे नाव दिले असणे संभवनीय वाटते.

या मशिदीत २०० फूट लांब व १७५ फूट रुंद अशा प्रशस्त प्रांगणाभोवती पडव्या आहेत. एका बाजूला प्रार्थनास्थान असून, त्यात सुंदर नक्षीदार स्तंभांच्या पाच रांगा व त्यांवर सुंदर छत आहे. छपरावर दहा घुमट असून, त्यांना आधार देणारे १२४ खांब आहेत. दर्शनी भागात सात भव्य कमानी असून, त्यांत कोरीव जाळी बसवलेली आहे. हे शिल्पकाम अत्यंत कलापूर्ण व सुरेख आहे. शमसुद्दीन इल्तमिश याने इ. स. १२११–३६ या काळात या वास्तूची वाढ केली.

तिथे दोन मिनार बांधलेले आहेत, तेही खूप सुरेख आहेत.

इ. स. १८७५–७६ मध्ये या मशिदीजवळ केलेल्या उत्खननात गुळगुळीत पाषाणावर कोरलेले सहा शिलालेख मिळाले आहेत. त्यांवर देवनागरी लिपीत दोन संस्कृत नाटकांतील काही ओळी आहेत.



अढाई दिन का झोपडा, अजमेर

या नगरात ऋषभदेवाचे भव्य मंदिर आहे. त्यात सर्वत्र सोन्याचा मुलामा दिलेला आहे. जैन वाङ्मयातील अनेक प्रसंग या मंदिरात चितारलेले दिसतात.

आनासागर तलावाच्या बांधाखाली जहांगीर बादशाहाने बांधलेली दौलतबाग प्रेक्षणीय आहे.

अजमेरपासून ७ मैलांवर पुष्करतीर्थ आहे. [राजस्थान; इं. इं. ३; प. भा. द.]

**अजयगढ** उत्तर प्रदेशातला एक पर्वत. प्राचीन नाव अजगढ. दशरथाचा पिता अज याने इथे एक किल्ला बनवला होता, म्हणून हे नाव पडले असे सांगतात. मकरसंक्रांतीला इथे जत्रा भरते. या पर्वताची प्रदक्षिणा केल्याने रोग दूर होतात, अशी समजूत आहे. [ कल्याण-तीर्थांक ]

**अजवीथी** आकाशस्थ शिशुमाराच्या पाठीवरून दक्षिणेकडे जाणारा मार्ग. मूळ, पूर्वाषाढा व उत्तराषाढा ही तीन नक्षत्रे मिळून हा मार्ग बनला आहे. याच्या दक्षिणेला पितृयाणमार्ग आहे (भाग. पु. ५. २३. ५; ब्रह्मांड पु. २. २१; मत्स्य पु. १२४).

**अजा** एक रहस्यमय देवता. हिला सोळा हातपाय, चार नखे व एक शिंग आहे. ही आपल्या केसांचे तीन अंबाडे बांधते. ही अष्टविद्यांची देवता असून, हिला माया असेही म्हटले आहे. [ पु. इं. ]

**अजा एकादशी** श्रावण कृ. एकादशीचे नाव. हिचे व्रत पापनाशक आहे. या व्रताची कथा पुराणांत आहे, ती अशी–

पूर्वी हरिश्चंद्र नावाचा एक राजा होऊन गेला. विपरीत दैवगतीमुळे तो राज्यभ्रष्ट झाला. त्याने विश्वामित्राची दक्षिणा पुरी करण्यासाठी प्रथम पत्नी व पुत्र यांना विकले व शेवटी एका डोंबाघरी स्वतःलाही विकले. धन्याच्या आज्ञेने तो स्मशानातली प्रेतवस्त्रे गोळा करीत असता, त्याला गौतमऋषी भेटला. त्याने सांगितलेले अजा एकादशीचे व्रत केल्यामुळे हरिश्चंद्राची आणि पत्नी-पुत्रांची भेट झाली व त्याला राज्यही परत मिळाले (पद्म. पु. उ. खं. ५६).

**अजातशत्रू** (सनपूर्व ५ वे शतक) शिशुनाग राजवंशातला एक प्रतापी सम्राट. हा बिंबिसाराचा पुत्र होता. पुराणातील माहितीप्रमाणे अजातशत्रू हा शिशुनाग वंशातला सहावा राजा होता. पण बौद्ध साहित्यातील महावंश या ग्रंथानुसार बिंबिसार हा पहिला व अजातशत्रू हा दुसरा राजा होय. ही वंशावळ इतिहासज्ञांनी स्वीकारली आहे. बिंबिसार व अजातशत्रू हे दोघेही गौतम बुद्धाचे समकालीन होते. बिंबिसार बुद्धाचा भक्त होता. बुद्धाचा दूरचा भाऊ देवदत्त हा दुष्ट व कपटी होता. त्याने अजातशत्रूला बिंबिसाराचा वध करण्यास प्रेरणा दिली, असे बौद्ध दंतकथांवरून समजते. आणि पित्याचा वध करून अजातशत्रूने राज्यपद मिळवले. पण जैन दंतकथेनुसार बिंबिसाराने अजातशत्रूला युवराज ठरवले असूनही अजातशत्रूने वृद्ध पित्याला बंदिवासात ठेवले व तो सिंहासनावर बसला. मग बिंबिसाराने विषप्राशन करून आत्मघात केला.

अजातशत्रू महापराक्रमी होता. त्याने मगधाचे साम्राज्य खूप वाढवले. प्रथम त्याला कोसलाधिपती प्रसेनजित याच्याशी युद्ध करावे लागले. प्रसेनजिताची बहीण बिंबिसार राजाची पट्टराणी व अजातशत्रूची सावत्र आई होती. अजातशत्रूने बिंबिसाराचा वध केल्यामुळे, ती दुःखाने मरण पावली. त्यामुळे प्रसेनजित संतापला व त्याने बिंबिसाराला विवाहप्रसंगी बक्षीस दिलेले काशी नामक गाव परत घेतले. मग मगध व कोसल यांचे युद्ध सुरू झाले. प्रसेनजिताने मगधावर स्वारी केली. प्रारंभी अजातशत्रूने त्याला यशस्वी प्रतिकार केला. पण नंतर तो कोसलसेनेच्या कचाट्यात सापडला आणि सर्व सेनेसह शरण गेला. तथापि प्रसेनजित याने त्याला सोडून दिले, काशी गावही परत दिले आणि आपली कन्या वजिराही त्याला दिली.

त्यानंतर अजातशत्रूने पूर्व भारतातील ३६ गणराज्यांच्या महासंघाचा पराजय करून आपले साम्राज्य वाढवले, असे जैन ग्रंथांत सांगितले आहे. त्या गणराज्यांत लिच्छवींचे राज्य अत्यंत प्रबळ असल्यामुळे ते जिंकायला त्याला सोळा वर्षे लागली. काशी व कोसल या राज्यांचे साहाय्य लिच्छवींनाच मिळाले होते. लिच्छवी लोकांत एकी व संघटना होती, तोपर्यंत त्यांना जिंकणे दुरापास्त असल्यामुळे अजातशत्रूने आपला एक मंत्री वस्सकार याला पाठवून त्यांच्यांत दुहीचे बीज पेरले. त्याच्या कपटनीतीमुळे दोन–तीन वर्षांत लिच्छवी लोकांत अनेक वर्गभेद निर्माण होऊन, त्यांचे संघटनासामर्थ्य कमी झाले.

मगधाची राजधानी राजगृह गंगेपासून दूर असून, लिच्छवींचे गणराज्य गंगेच्या पलिकडे होते. शत्रूवर हल्ला करणे सोपे व्हावे म्हणून अजातशत्रूने गंगेच्या काठावर पाटलिपुत्र येथे एक गडकोट बांधला. त्यानंतर त्याने वैशालीवर स्वारी करून लिच्छवींचा पराभव केला. हे सर्व महायुद्ध सनपूर्व ४८४ ते ४६८ या १६ वर्षांत झाले, असे म्हणतात. काशी व कोसल या राज्यांचाही अजातशत्रूने पराभव केला. अवंतीचा राजा चंडप्रद्योत याने राजगृहावर स्वारी करण्याचा घाट घातला होता, पण अजातशत्रूच्या प्रचंड सेनाबलामुळे तो दबकून गप्प राहिला. अशा प्रकारे अजातशत्रूने मगधाचे प्रबल साम्राज्य प्रस्थापित केले.

जैन ग्रंथांनुसार बिंबिसार व अजातशत्रू दोघेही जैन व महावीराचे भक्त होते. अजातशत्रू वैशाली व चंपा या नगरींत जाऊन महावीराचे दर्शन घेत असे.

अजातशत्रू हा प्रथम बुद्धाचा शत्रू होता. देवदत्ताच्या चिथावणीमुळे त्याने बुद्धावरही मारेकरी घातले होते, अशी बौद्ध दंतकथा आहे. पण बिंबिसाराचा वध केल्यानंतर त्याला आपल्या पापकर्माचा पश्चात्ताप झाला व तो बुद्धाला शरण गेला. अजातशत्रूच्या राजवटीतच गौतम बुद्धाचे महापरिनिर्वाण झाले. तेव्हा तो कुशीनारा येथे गेला व त्याने बुद्धाचा मुख्य शिष्य महाकस्सप याच्याकडून बुद्धाच्या देहाचे प्रमुख अवशेष मिळविले. त्याने मग राजधानीत अनेक धातुचैत्य (स्तूप) बांधून त्यां

बुद्धाचे अवशेष सुरक्षित ठेवले. त्याने बौद्धांचे १८ महाविहारही दुरुस्त करून बौद्ध भिक्षूंची उत्तम सोय केली. अजातशत्रूने पहिली बौद्ध संगीती राजगृह येथे भरवली. त्या परिषदेला ५०० बौद्ध भिक्षू उपस्थित होते. त्यांची उत्कृष्ट व्यवस्था राजाने ठेवली आणि परिषदेसाठी एक भव्य सभागृह बांधून दिले. राजगृहाजवळच्या वेभार पर्वतातील सप्तपर्णी गुहेत ही परिषद झाली.

कूणिक या अन्य नावानेही अजातशत्रूचा निर्देश जैन ग्रंथांत केलेला आढळतो. त्याची राणी पद्मावती हिचा पुत्र उदयभद्र हा अजातशत्रूच्या मागून मगधाचा राजा झाला. जैन ग्रंथांनुसार तो पितृभक्त होता. पण बौद्ध परंपरेप्रमाणे त्याने पित्याचा वध करून राज्य मिळवले. पाहा– पाटलिपुत्र; शिशुनाग राजवंश. [हि. क. इं. पी. २]

**अजातिवाद** अद्वैत वेदान्त दर्शनातील एक संज्ञा. अजातिवाद व विवर्तवाद या दोहोंत पुष्कळ अंशी साधर्म्य आहे. अद्वय, अज, असे ब्रह्म तेवढेच केवळ सत्य असून जग नावाची वस्तू उत्पन्नच होत नाही, असे अजातिवादाचे प्रतिपादन आहे. विवर्तवादातही अधिष्ठानस्वरूप ब्रह्म तेवढेच सत्य असते व नामरूपात्मक जग हा अध्यास असून तो मिथ्या असतो म्हणजे ब्रह्मभिन्नत्वाने सत्य नसतो. गौडपादाचार्यांनी मांडूक्यकारिकेत हा अजातिवाद प्रतिपादिला आहे. याच्याही पूर्वी उपनिषदांतही या सिद्धान्ताचा ध्वनी ऐकू येतो. माध्यमिक बौद्धांच्या दर्शनात या सिद्धान्ताचे विस्ताराने प्रतिपादन केलेले आहे.

उत्पन्न वस्तूचा उत्पत्तीपूर्वी जर अभाव असेल, तर त्या अभावात्मक वस्तूची सत्ता कोणत्याही प्रकारे संभवत नाही. कारण अभावातून काहीही उत्पन्न होत नाही. जर उत्पत्तीच्या पूर्वी वस्तू विद्यमान असेल, तर उत्पत्तीचे काही प्रयोजनच नाही. जी वस्तू अजात आहे, ती अनंत काल अजातच राहणार. तिच्या स्वभावात परिवर्तन होणार नाही. अजात वस्तू अमृत असते. म्हणून ती जात होऊन मृत होऊ शकणार नाही.

याच कारणांनी माध्यमिक बौद्ध कार्यकारणभावालाही असिद्ध ठरवितात. जर कार्य व कारण एक असतील, तर कार्याच्या उत्पत्तीबरोबरच कारणाचीही उत्पत्ती झाली पाहिजे. पण तसे होत नाही. म्हणून सांख्यांचा नित्यकारणभाव असिद्ध ठरतो. असत् कारणापासून असत्कार्य उत्पन्न होऊ शकत नाही. तसेच सत्कारणापासून सत्कार्यही निर्माण होत नाही. सत्पासून असत्‌ची व असत्पासून सत्‌ची उत्पत्ती होत नाही. म्हणूनच कार्य आपोआप उत्पन्न होत नाही; तसेच कोणत्याही कारणाच्या द्वारेही उत्पन्न होत नाही. [भा. द. सं.; मांडूक्यकारिका; मूल माध्यमिक कारिका; हिं. वि. को.]

**अजाद** एक प्राचीन जनपद. पाणिनीच्या अष्टाध्यायीत याचा उल्लेख मिळतो (४. १. १७१). हा प्रदेश बकऱ्यांसाठी प्रसिद्ध असावा, असे नावावरून वाटते. इटावाच्या आसपासचा प्रदेश आजही बकऱ्यांसाठी प्रसिद्ध आहे. हाच कदाचित पूर्वीचा अजाद असेल. [पा. का. भा.]

**अजादान** एक दान. अजा = शेळी. चैत्रमासी कोणत्याही शुभ दिवसापासून तीन दिवस नक्त भोजन करतात. दुधाने भिजवलेल्या तांदळांच्या पिठाची भाकरी हे भोज्य अन्न समजतात. भोजनापूर्वी चंदनाने पार्वतीची दशभुज प्रतिमा रेखतात. ज्वालामुखी या नावाने तिची पूजा करतात व तिसऱ्या दिवशी पाच दुधाळ शेळ्या ब्राह्मणाला दान देतात. दानाचे फल-मोक्ष. [व्रतराज]

**अजानवृक्ष** आळंदी येथील ज्ञानेश्वरांच्या समाधीजवळचा एक वृक्ष. श्री सिद्धेश्वरमंदिराच्या पुढे गेल्यावर कासवमंडपाच्या उजव्या बाजूस हा वृक्ष लागतो. या वृक्षाची एक डहाळी ज्ञानेश्वरांनी लावली व त्या डहाळीचा हा वृक्ष झाला, असे म्हणतात. ज्ञानेश्वरांनी या वृक्षाच्या छायेत समाधी घेतली. ज्ञानेश्वरांनी समाधी घेतल्यानंतर निवृत्तिनाथांनी रक्षणार्थ जो कोरडा दंड समाधिस्थानासमोर रोवला, तोच क्षणात पालवून त्याचा वृक्ष बनला, अशीही आख्यायिका या वृक्षामागे आहे.

पुढे तीनशे वर्षांनी संत एकनाथांना एक स्वप्नदृष्टान्त झाला. त्या दृष्टान्तानुसार एकनाथ आळंदीस गेले आणि त्यांनी या वृक्षाच्या मुळांचा समाधीला होणारा त्रास दूर केला. इथे ज्ञानेश्वरीची मूळ प्रत संत एकनाथमहाराजांना ज्ञानेश्वरांनी दिली असे सांगतात. तिच्या आधारे लोकांच्या लेखनात अपपाठांनी भरलेल्या ज्ञानेश्वरीची त्यांनी शुद्ध प्रत तयार केली आणि त्याद्वारे ज्ञानेश्वरांचा संदेश महाराष्ट्रात सर्वत्र घुमवला.

आजही शेकडो साधक या वृक्षाच्या छायेत बसून ज्ञानेश्वरीचे पारायण करीत असतात. [ज्ञानोबा माऊली; अ. म. ज्ञा.]

**अजित** (१) जैन दैवतसमूहातला यक्ष. सुविधिनाथाचा सेवक. समृद्धिनाथचरित्रात याचे वर्णन केले आहे, ते असे–

तत्तीर्थजन्मात्वजितः श्वेताङ्गः कूर्मवाहनः ।
बिभ्राणो दक्षिणौ बाहू मातुलिङ्गाक्षसूत्रिणौ ।
वामौ तु नकुलकुन्तधारिणौ धारयन् भुजौ ।।

अर्थ – सुविधिनाथाच्या तीर्थातून जन्मलेला, शुभ्र वर्णाचा, कासवावर बसलेला, चतुर्भुज व उजव्या दोन हातांत मातुलिंग व अक्षमाला धारण करणारा आणि डाव्या दोन हातांत मुंगुस

व भाला धारण करणारा असा हा अजित आहे. ( दिगंबरमते फल, माला, शक्ती व वरदमुद्रा धारण करणारा.) [ जै. इ. ]

(२) चाक्षुष मन्वंतरातला विष्णूचा अवतार. याच्याच अवतारकालात क्षीरसमुद्राचे अमृतासाठीं मंथन झाले ( भाग. पु. २.२.५ ). याने देवांना असुरांशी मैत्री करून समुद्रमंथनात त्यांचे सहकार्य घेण्याचा सल्ला दिला (भाग. पु. ८. ६).

(३) स्वारोचिष मन्वंतरात तुषितेच्या उदरी जन्मलेला विष्णू (ब्रह्मांड पु. ३. ३).

(४) एक देवगण. या गणात पुढील नावांचे देव आहेत — असम, उग्रदृष्टी, सुनय, शुचिश्रवस्, केवल, विश्वरूप, सुदक्ष; मधुप, तुरीय व इंद्रयुक् (ब्रह्मांड पु. २. ९. ४६).

**अजित केशकंबल** (सनपूर्व ५२३) हा बुद्धाच्या काळातला एक विख्यात संप्रदायप्रवर्तक होता. केशकंबल या त्याच्या उपाधीवरून तो माणसांच्या केसांची घोंगडी वनवून ती पांघरीत होता, असे दिसते. घोंगडी ही त्याच्या साध्या राहणीची साक्ष आहे. बुद्धाचा उदय झाला त्या वेळी हा एक सुप्रसिद्ध आचार्य म्हणून गाजत होता. दीघनिकाय ग्रंथावरून हा भटक्या होता, असे कळते. मतप्रचारासाठी आणि संघटनेसाठी तो भटकत असावा. लोकायतमताची सुव्यवस्थित मांडणी करून, यानेच त्याचा संघटित पंथ निर्माण केला, असे काही विद्वानांचे मत आहे. पाली सूत्रांत याच्या बरोबरीने इतर पाच नास्तिकांचा उल्लेख येतो. पण या सर्वांत हाच तेवढा सूक्ष्म आणि तर्कशुद्ध विचार करणारा वाटतो. याचा आणि बुद्धाचा राजगृह येथील वर्षावासात वाद झाला होता (बुद्धचर्या). याच्या मतांचे उल्लेख सनपूर्व सहाव्या शतकापासून इसवी सनाच्या आठव्या शतकापर्यंतच्या साहित्यात अनेक ठिकाणीं आढळतात. याची सर्व माहिती बौद्ध आणि जैन ग्रंथांतूनच मिळते. जैन सूत्रांत याची मते विकृत स्वरूपात मांडलेली आहेत.

अजित हा पूर्ण भौतिकवादी होता. तो पृथ्वी, आप, तेज व वायू ही चारच भूते मानतो व आकाश मानीत नाही. आत्मा, पुनर्जन्म, पापपुण्य आणि कर्मविपाक या गोष्टी तो ओळखीत नाही. यज्ञ, दान, हवन, हे सर्व तो झूट मानतो. त्याला इहपरलोक आणि देवदेवता मंजूर नाहीत. मानवप्राणी मरतो तेव्हा त्याच्या शरीरातला पृथ्वीचा अंश पृथ्वीत, जलाचा जलात, अग्नीचा अग्नीत आणि वायूचा वायूत मिळून जातो व मूर्ख असो वा पंडित असो; त्याचे काहीही शिल्लक उरत नाही, असे तो मानतो.

अजिताने औपनिषदिक तत्त्वज्ञानाचा अभ्यास केल्याचे दिसून येते. कोणी श्रमण वा ब्राह्मण ब्रह्मज्ञानी होऊ शकतो, या गोष्टीवर त्याचा विश्वास नाही. चार्वाकाचे जीवनतत्त्वज्ञान अजिताच्या मतात अंतर्भूत आहे. जवळजवळ सगळा चार्वाकवाद अजितानेच सांगितला, असे म्हटले तरी चालेल. बुद्धाच्या पूर्वीच अजिताने ब्राह्मणधर्माविरुद्ध बंड पुकारले. त्याची चळवळ बुद्ध आणि महावीर या दोघांच्याहीपेक्षा अधिक पायाशुद्ध होती. बुद्धाने मध्यममार्ग काढून कळत नकळत तत्त्वज्ञानाशी तडजोड केली आहे. अशी तडजोड अजिताने केली नाही. पण बुद्धाच्या असामान्य व्यक्तिमत्त्वापुढे तो फिका पडला आणि त्याचे नावही लोपले. ब्राह्मणी वाङ्मयात त्याचा मागमूसही लागत नाही व बौद्ध वाङ्मयात तर त्याची सर्वत्र निंदाच आढळते.

अजिताचा संप्रदाय अग्निहोत्र, वेद, त्रिदंड, इ. गोष्टींच्या विरोधी होता.

**अग्निहोत्रं त्रयो वेदास्त्रिदण्डं भस्मगुण्ठनम् ।**
**बुद्धिपौरुषहीनानां जीविका धातृनिर्मिता ।।** (सर्व द. सं.)

अर्थ — अग्निहोत्र, वेदत्रयी, त्रिदंड, भस्मचर्चन (हे) ब्रह्मदेवाने बुद्धी व पौरुष यांनी हीन असलेल्या लोकांना उपजीविकेचे साधन निर्माण करून दिलेले आहे.

वत्सदेशाचा तत्कालीन राजा उदयन हा अजिताच्या संप्रदायात होता (ललितविस्तर अ. १). अजिताचा दार्शनिक सिद्धान्त हाच पुढे लोकायतदर्शनाचा व कौटिल्याच्या अर्थशास्त्राचा पाया ठरला, असे धर्मानंद कोसंबी सांगतात. [ बौ. ध. वि.; चा. इ. त. ]

**अजितनाथ** जैनांचा दुसरा तीर्थंकर. अजित शब्दाची व्याख्या — ‘पुरीषादिभिर्न जित इति अजितः’ (= अन्नादिकांच्या मलांनी दूषित न होणारा) (हेमचंद्र). याला दुसरा अर्हंत् मानतात. पापांना अजिंक्य म्हणून त्याला अजित म्हटले आहे (उ. पु. पर्व ४८). याला सप्तपर्ण म्हणायचे कारण, याचा जन्म सप्तपर्ण (सातवण) वृक्षाच्या खाली झाला हे होय. याचा ज्ञानवृक्षही तोच असून, लांछन गज आहे. याच्या आईला गरोदरपणी हत्तीचे स्वप्न पडले होते. याच्या यक्षयक्षिणी महायक्ष व अजितबला या होत. याचा जन्म माघमासी रोहिणी नक्षत्रावर झाला असून, याचे मोक्षस्थान पारसनाथ पर्वत हे होय.


अजितनाथ

अजितनाथाच्या मूर्ती देवगड, झाशी, सारनाथ, या ठिकाणीं आढळतात. हा खड्गासनावर उभा

असून, याच्या आसनाखाली हत्ती कोरलेला असतो. यक्ष-यक्षिणी आसनाच्या दोन्ही कोपऱ्यात उभे असतात. यक्षाच्या हातीं भाला, अंकुश व गदा आणि यक्षिणीच्या हातीं पाश व अंकुश ही आयुधे असतात. अवसर्पिणी कालातील पाचव्या दुःखरूप फेऱ्यात याचा जन्म झाला, असे जैन मानतात. [ जै. इ. ]

**अजितनाथपुराण** एक जैन पुराण. अजितनाथ हा जैनांचा दुसरा तीर्थंकर असून, या पुराणात त्याचा जन्म, जन्माभिषेक, राज्याभिषेक, निष्क्रमण, केवलज्ञान-लाभ, इ. प्रसंग ४७ पर्वांत वर्णिले आहेत. [ हिंदुत्व. ]

**अजितपुराण** रन्नकविलिखित कन्नड ग्रंथ. याचा लेखनकाल इ. स. ९९४ हा आहे. या ग्रंथाचा नायक जैनांचा दुसरा तीर्थंकर अजितनाथ हा आहे. त्याचे वैराग्य आणि भक्ती यांचे पराकाष्ठेचे वर्णन यात केलेले आहे. या पुराणात अजितनाथाचा जन्म, जन्माभिषेक, वैराग्य, परि-निष्क्रमण, इ. विषयांचे हृदयग्राही वर्णन कवीने केले आहे.

या पुराणात बारा अध्याय व तीन हजार श्लोक असून, हा ग्रंथ चंपू शैलीत रचलेला आहे. या ग्रंथामुळे रन्नाला वैश्यवंश-ध्वज असे म्हणू लागले. रन्नाने जैन धर्माबरोबरच अन्य धर्मांचेही अध्ययन केले होते, याचे दाखले या पुराणात अनेक ठिकाणीं आढळतात. पाहा – रन्न. [ भारतवाणी, सप्टेंबर १९५९ ]

**अजितबला** अजितनाथ या जैन तीर्थंकराची यक्षिणी. हिचे वर्णन असे –

**लोहासनाधिरूढां चतुर्भुजां वरदपाशाधिष्ठित-**
**दक्षिणकरां बीजपूराङ्कुशयुक्तवामकराम्**

(निर्वाणकलिका)

अर्थ – लोहासनावर बसलेली. (श्वेतांबरमते वृषभवाहना) चतुर्भुज. वरदमुद्रा व पाश उजव्या हाती. मातुलिंग व अंकुश डाव्या हाती. (दिगंबरमते अभयमुद्रा, शंख व चक्र धारण करणारी). देवगढ येथे हिची मूर्ती आढळते. [ जै. इ. ]

**अजिन** अजिन = चर्म. (अजिनं चर्म कृत्तिः स्त्री – अमर). बकऱ्याचे किंवा हरिणाचे कातडे. प्राचीन काली अजिन म्हणून बकऱ्याचे चामडे वापरण्याचा प्रघात होता. मागाहून मृगचर्माची चाल पडली. ऋग्वेदात अजिनपरिधानाचा उल्लेख अनेक ठिकाणीं आहे. शतपथ ब्राह्मणात अजिनवासी (मृगचर्म नेसणाऱ्या) मुनींचा उल्लेख आहे (३. ९. १. १२). यज्ञप्रसंगी दीक्षा घेण्याच्या वेळी यजमानाने आपल्या अंगावर कृष्णाजिन पांघरावे, असे सांगितले आहे (ऐ. ब्रा. १. १. ३). सामान्य इष्टीपासून मोठमोठ्या यागांपर्यंत यज्ञसंस्थेत मृगा-जिनाचा उपयोग असतो. बृहस्पतिसव यज्ञात यजमानाला मृगाजिनावर बसवून अभिषेक करतात. उपनयनात बटूलाही मृगाजिन देतात. मृगाजिन हे एक पवित्र आसनही मानलेले आहे. याच्या जोडीने व्याघ्राजिनालाही तेवढेच पावित्र्य आहे. राजसूय यज्ञात एका प्रसंगी यजमानाला व्याघ्राजिनावर बसवून अभिषेक करतात (जै. ब्रा. १. ७. ८). शिव हा व्याघ्रचर्म धारण करणारा आहे. तो गजचर्मही पांघरतो.

**अजिरवती** वर्तमान राप्ती नदीचे प्राचीन नाव. हिला अचिरवती असेही म्हणतात. पाणिनीने हिचा उल्लेख केला आहे (अष्टा. ६. ३. ११९). ही नदी हिमालयात उगम पावून औंध प्रांतात गोरखपूर जिल्ह्यात शरयूला मिळते. कोसलाची शेवटची राजधानी असलेले श्रावस्ती नगर हिच्या काठी वसले होते. कोसलचा राजा पसेनदी (प्रसेनजित) याच्या गच्चीवरून ही नदी दिसत असे. नगरातली मुले हिच्या काठी कुस्त्या खेळत. पसेनदीचा पुत्र विडूडभ याने हिच्या तीरावर शाक्यांशी युद्ध करून त्यांचा पराभव केला. या नदीला अनर्था-वह असे महापूर येत. अशाच एका पुरात विडूडभ राजा आपल्या सैन्यासह वाहून गेला. हिच्या काठी अनाथपिंडक नावाच्या सावकाराने आपली संपत्ती पुरून ठेवली होती. एका महापुरात त्या संपत्तीपैकी बरेच द्रव्य वाहून गेले. [ हि. जॉ. ए. इं. ]

**अझाबुल कब्र** इस्लामी कल्पनेप्रमाणे थडग्यात मिळणारी शिक्षा. माणसाचे शव थडग्यात ठेवल्यावर तिथे दोन कृष्णवर्णी देवदूत येऊन त्याला पैगंबराविषयी प्रश्न विचारतात. तो सच्चा मुसलमान असला, तर 'परमेश्वर एक आहे व मुहम्मद त्याचा प्रेषित आहे' असे उत्तर देतो. मग त्याचे थडगे विस्तारते, त्यात प्रकाश पडतो व मृत मनुष्य त्यात शांतपणे निजू शकतो. अन्यधर्मी मृत माणसे विरुद्ध उत्तर देतात; त्यामुळे त्यांचे थडगे संकोच पावून ती चिरडली जातात. देवाची कृपा होईपर्यंत त्यांना तिथे कठोर शिक्षा भोगाव्या लागतात. [ डि. इ. ]

**अटक** एक नदी. या नावाचे गावही आहे. पण हा शब्द सिंधू नदीच्या उत्तर भागाला उद्देशूनच वापरतात. अटक हे नाव त्या नदीच्या दुस्तरतेला अनुलक्षून अकबराने दिले आहे. पुढे ते लोकांच्या समजुतीत भारताची सरहद्द बनले. अटकेच्या पलिकडे हिंदूंनी जाऊ नये; ती सीमा ओलांडून पुढे गेल्यास प्रायश्चित्त घ्यावे लागेल, असा धर्मशास्त्रीय अर्थही त्या शब्दाला

पुढे प्राप्त झाला. ज्याप्रमाणे अटक ही हिंदूंची धर्मशास्त्रीय मर्यादा मानली गेली, त्याचप्रमाणे हिंदू राज्यकर्त्यांच्या राजकीय विचारांची आणि कर्तृत्वाची सरहद्दही तीच ठरली, असे म्हटले तरी चालेल. इ. स. १७६० मध्ये बाळाजी बाजीराव याने गंगाधर यशवंत यास पत्र लिहिले, की 'तुम्ही सर्वांनी एकचित्ते-करून मेहनत करून, अवदालीचे पारिपत्य करून अटक पार करावा' (राजवाडे खं. १.१५६.२४५). खैबर घाटापलिकडे जाऊन शत्रूला अडविण्याची किंवा त्याचे पारिपत्य करण्याची कल्पना मराठी राज्यकर्त्यांना शिवली नसावी, असे दिसते. अटक ही भारताची उत्तर सीमा होय अशी आपलीच समजूत होती, असे नसून परकीयांचीही तशीच समजूत प्राचीन काळापासून होती. हप्तहिंदवः हा भारताविषयीचा अवेस्त्याच्या काळातला उल्लेख आहे. सिंधू नदीच्या पलिकडे हिंदुस्थान, ही इराणी आणि ग्रीक लोकांचीही समजूत होती. [ म. ज्ञा. को. ]

**अट्टालक** (१) उपरिगृह किंवा प्राकारमंडपाच्या वरची शाला असा याचा अर्थ आहे (हलायुधकोश). अलिकडच्या भाषेत अट्टालकाला मीनार असे म्हणता येईल. लांबी व रुंदी यांच्या अनुपातात ज्याची उंची कितीतरी पटींनी अधिक असते, अशा स्थापत्यरचनेला अट्टालक म्हणतात. प्राचीन काळी नगर किंवा गड-कोट यांच्या सुरक्षिततेसाठी अट्टालकांची



अट्टालक

उभारणी करीत. पहारेकरी अट्टालकात उभे राहून दूरच्या शत्रूच्या हालचालीही पाहू शकत. अट्टालकांची उभारणी वास्तु-कलेच्या भव्यतेचे प्रदर्शन करण्यासाठी करीत. बहुतेक अट्टालक मंदिरे किंवा राजप्रासाद यांच्या मुख्य प्रवेशद्वारावरच बनवीत. पुढे अशा अट्टालकांना गोपुर असे म्हणू लागले. गुप्तकालीन मंदिरांची अत्युच्च शिखरे म्हणजे एक प्रकारचे अट्टालकच होत. देवगढ येथील दशावतारमंदिराचे शिखर ४० फूट उंच आहे. बहुतेक अट्टालकांची शिखरे निमुळती होत जातात; पण काही अट्टालकांचा अग्रभाग चपटा व लांबही असतो. राजपुतांच्या व मोगलांच्या काळी भारतात उंच उंच मीनार बनविण्याची पद्धत होती. ताजमहालच्या चार कोपऱ्यांवर चार उंच मीनार बनविलेले दिसतात व ते त्या वास्तूची शोभा वाढवितात. चितोडचा विजयस्तंभही याच प्रकारचा आहे. हिंदुमंदिरांच्या अट्टालकावर किंवा गोपुरावर मूर्तिकारी दिसून येते. मदुरा व कांची येथील गोपुरे त्यांवरच्या मूर्तिकलेसाठी सुप्रसिद्ध आहेत. विजयस्तंभावरही मूर्तिकारी आढळते. पाहा – गोपुर. [ हिं. वि. को. ]

(२) भूतपिशाचांच्या गमनागमनाचे स्थान. [ पु. इं. ]

**अट्टे वक्कल** कर्नाटकातली एक डोंगरी जमात. अंकोला आणि येल्लापूर या भागात यांची वस्ती आहे. यांची लोकसंख्या अल्प आहे. अट्टे हा कन्नड शब्द असून, त्याचा अर्थ बांबूची पाटी असा आहे. हे लोक बांबू व वेत यांच्या पाट्या वगैरे वस्तू बनवतात, त्यावरून त्यांना हे नाव पडले आहे. यांची भाषा कन्नड-कोकणी अशी मिश्र आहे. हे लोक झोपड्यांतून राहतात. त्यांचा मुखिया असतो, त्याच्या घराला देवडी असते आणि दारात एक वृक्ष लावलेला असतो.

काही अट्टे वक्कल गुरे चारण्याचे काम करतात. त्यांना स्वतःची अशी शेती करणे माहीत नाही. लग्नासाठी जबर व्याजाने एखाद्या सावकाराचे कर्ज घेतात आणि ते फिटेपर्यंत कर्ज घेणारा पुरुष त्या सावकाराच्या घरी राहून काम करतो.

मुखिया सर्वांना आचार-विचार समजावून देण्यासाठी जमातीच्या सभा भरवतो, जातिधर्माला सोडून वागणाऱ्याला आर्थिक दंड देतो व क्वचित प्रसंगी बहिष्कृतही करतो.

**देव-धर्म** – तिरुपती वेंकटरमण ही यांची कुलदेवता आहे. हे तुळशीच्या झाडाखाली त्याची मूर्ती बसवून तिरुपतीच्या यात्रेसाठी जातात. यात्रेकरूला दास म्हणतात आणि त्याचा आदर करतात. प्रतिवर्षी एखाद्या घरी हरिदिन या नावाने वेंकटरमणाचा उत्सव करतात. त्यांच्या चुलीजवळ एका कट्ट्यावर नारळ ठेवलेला असतो. त्या नारळात ते आपल्या पितरांचा निवास आहे असे समजतात.

एक दिवस जननाशौच पाळतात. धोब्याकडून शुद्धी करवितात. १४ व्या दिवशी मुलाचे नाव ठेवतात.

**विवाहप्रथा** – बालविवाह प्रचलित आहे. मुलाचा बाप फुले घेऊन मुलीच्या बापाकडे जातो व मुलीला मागणी घालतो. मुलीचे देज ठरवल्यावर वधूपित्याला विडा देतो. लग्नासाठी नवरदेव वधूगृही जात असताना एका हाती रंगीत रुमाल आणि दुसऱ्या हातात कट्यार घेतो. अंगात बंडी, डोक्याला रुमाल आणि पायात खडावा असा त्याचा वेष असतो.

**मर्तिकप्रथा** – एखाद्या घरी मृत्यू झाला, की सगळे लोक तिथे रडायला जातात. एखादा मनुष्य अपघाती मेल्यास दुसऱ्या गावच्या ग्रामदेवाला कोंबडे देतात. एक दिवस सुतक पाळतात. [ श्री. शंकर कृष्णतीर्थ – राष्ट्रभारती, जुलै १९५६ ]

## अट्ठकथा

( सं. अर्थकथा. ) अट्ठकथा म्हणजे पाली भाषेतील बौद्ध ग्रंथांवर लिहिलेले भाष्य. यात मूळ पाठाची व्याख्या नीट कळावी म्हणून प्रथम तत्संबंधी एक कथा सांगितलेली असते व मग मूळ शब्दांचा अर्थ सांगितला जातो. त्रिपिटकाच्या प्रत्येक ग्रंथावर अशा अट्ठकथा उपलब्ध आहेत. बौद्ध अनुश्रुतीप्रमाणे स्थविर महेंद्र व त्याचे सांगाती भिक्षू, लंकेत जाताना पाली त्रिपिटकांबरोबर अट्ठकथाही घेऊन गेले. या कथा प्रथम मुखपरंपरेने चालत होत्या. लंकेत त्यांचे पाली रूप लुप्त होऊन त्यांना सिंहली रूप प्राप्त झाले.

बुद्धघोषाने पुढील प्रमुख अट्ठकथांचा निर्देश केला आहे – ( १ ) महा अट्ठकथा ( २ ) महा पच्चरी ( ३ ) कुरुंदी ( ४ ) अंधट्ठकथा ( ५ ) संख्येपअट्ठकथा ( ६ ) आगमट्ठकथा व ( ७ ) आचरियानं समानट्ठकथा.

भारतात बौद्ध धर्म ऱ्हासोन्मुख झाल्यावर वरील अट्ठकथा लंकेतून इकडे आणण्याची आवश्यकता निर्माण झाली आणि म्हणूनच आचार्य रेवंताने आपला पट्टशिष्य बुद्धघोष याला त्या उद्देशाने लंकेत पाठविले. बुद्धघोषाने सिंहली स्थविरांच्या साहाय्याने या सिंहली अट्ठकथांचे पालीत रूपांतर केले. बुद्धघोषकृत सुमंगलविलासिनी, पपंचसूदनी, सारत्थपकासिनी व मनोरथपूरणी या अट्ठकथा सिंहली महा अट्ठकथेवर आधारलेल्या आहेत.

पाली साहित्यात अट्ठकथांचा समावेश इ. स. च्या चौथ्या पाचव्या शतकापासून झालेला दिसतो. बुद्धानंतर सुमारे १००० वर्षांनी या अट्ठकथा लिहिल्या गेल्या होत्या; पण त्यांची परंपरा तुटली होती. या अट्ठकथा बौद्धांच्या सिंहली परंपरेवर आधारित नसत्या, तर त्यांना इतक्या दीर्घ कालखंडानंतर बौद्ध साहित्यात प्रामाण्य लाभले नसते. आजमितीस त्रिपिटकाच्या खालोखाल अट्ठकथा प्रमाणभूत मानल्या जातात. बुद्धदत्त, बुद्धघोष व धम्मपाल, हे पालीसाहित्यातले मोठे अट्ठकथाकार होत. हे चौथ्या पाचव्या शतकातच होऊन गेले. [पा. सा. इ.]

## अट्ठ गुरुधम्मा

(सं. अष्ट गुरुधर्म.) बौद्ध भिक्षूंच्या बाबतींत जसे चार पाराजिक धम्म वर्ज्य सांगितले आहेत, त्याचप्रमाणे भिक्षुणींना अट्ठ गुरुधम्मा म्हणजे आठ प्रकारचे निषेध सांगितले आहेत. मैथुनादी व्यभिचारांना मुख्य धरून हे निषेध कल्पिलेले आहेत. असे गुन्हे करणाऱ्या भिक्षुणींना भिक्षुसंघातून घालवून देत असत.

## अठरा

एक संख्या. भारतीय वाङ्मयात या संख्येला एक वैशिष्ट्यच लाभले आहे. भारतीय युद्ध १८ दिवस लढले गेले. त्यात १८ अक्षौहिणी सैन्याने भाग घेतला. महाभारताची पर्वे १८ आहेत. व्यासांनी प्रथम जे भारत रचले, त्याला जय अशी संज्ञा आहे. 'नारायणं नमस्कृत्य...ततो जयमुदीरयेत्' हा त्याचा पहिला श्लोक असून, जय शब्दाची संख्याशास्त्रातून निघणारी संख्याही १८ च आहे (ज = ८, य = १). गीतेचे अध्यायही १८ च आहेत.

रामाबरोबर लंकेवर चालून गेलेले वानरसैन्य १८ पद्मेच होते. मोरोपंतांनी आपल्या भारतरचनेच्या प्रारंभी प्रत्येक आर्येचे आद्याक्षर विशिष्ट योजून 'श्रीपांडवसहायो भगवानरविन्दाक्षो जयति' असा १८ अक्षरांचा जयमंत्र साधला आहे.

मोरोपंतांच्या भारताची आर्यासंख्या एकंदर १७१३६ येते. त्यांतील आकड्यांची बेरीज १८ च भरते.

पुराणे १८, उपपुराणे १८ व विद्या १८, अशा प्रकारे आणखीही काही १८ संख्येची उदाहरणे आढळतात

## अठरा कारखाने

कारखाना म्हणजे मोठे खाते. शिवाजी महाराजांनी अठरा शाळा स्थापल्या, त्या अशा – गजशाला, मल्लशाला, धान्यसंग्रह, भेरिदुंदुभी, यंत्रशाला, वैद्यशाला, पानीयशाला, उष्ट्रशाला, शिबिरशाला, खटकशाला, रत्नशाला, पाकशाला, शस्त्रशाला, तांबूलशाला, रथशाला, लेखनशाला, नाटकशाला (वस्तुशाला), जिनसखाना.

पेशवे सरकारचे अठरा कारखाने होते, ते असे–तोफखाना, पालखाना, उष्टरखाना, शिलेखाना, फरासखाना, कोठी लकडखाना, इमारत, बागा, कुरणे, वहीतकोठा, रथखाना, पुणे पेटा, थट्टी, पोते व जामदारखाना, जिन्नसशाळा व वैद्यशाळा, पुस्तकशाळा व खासगी. [ सु. वि. को. ]

## अठरा पगड जाती

तांबट, पाथरवट, लोहार, सुतार, सोनार, कासार, कुंभार, गुरव, धनगर, गवळी, वाणी, जैन, कोष्टी, साळी, चितारी, माळी, तेली व रंगारी अशी त्यांची नावे आहेत. [ सु. वि. को. ]

**अठ्ठावीस योग** मुहूर्तज्योतिषात आनंदादी २८ योग सांगितले आहेत, त्यांचे श्लोक पुढीलप्रमाणे –

आनन्दाख्यः कालदण्डश्च धूम्रो
धाता सौम्यो ध्वांक्षकेतू क्रमेण ।
श्रीवत्साख्यो वज्रकं मुद्गरश्च
छत्रं मित्रं मानसं पद्मलुंबौ ॥१॥
उत्पातमृत्यू किल काणसिद्धी
शुभोऽमृताख्यो मुसलो गदश्च ।
मातंगरक्षश्चरसुस्थिराख्याः
प्रवर्धमानाः फलदः स्वनाम्ना ॥२॥

अर्थ – (१) आनंद (२) कालदंड (३) धूम्र (४) धाता (५) सौम्य (६) ध्वांक्ष (७) केतू (८) श्रीवत्स (९) वज्रक (१०) मुद्गर (११) छत्र (१२) मित्र (१३) मानस (१४) पद्म (१५) लुंब (१६) उत्पात (१७) मृत्यू (१८) काण (१९) सिद्धी (२०) शुभ (२१) अमृत (२२) मुसल (२३) गद (२४) मातंग (२५) राक्षस (२६) चर (२७) स्थिर व (२८) वर्धमान. हे योग आपापल्या नावाप्रमाणे शुभाशुभ फल देतात.

हे योग काढताना अभिजितासह २८ नक्षत्रे धरतात. कोणत्या तिथीस कोणता योग आहे, हे जाणण्यासाठी इष्ट रविवार असेल तर अश्विनी, सोमवार असेल तर मृगशीर्ष, मंगळवार असेल तर आश्लेषा, बुधवार असेल तर हस्त, गुरुवार असेल तर अनुराधा, शुक्रवार असेल तर उत्तराषाढा व शनिवार असेल तर शततारका, या नक्षत्रांपासून क्रमाने इष्ट तिथीपर्यंतची नक्षत्रे मोजावी. जी संख्या येईल, त्या संख्येने दर्शविलेला योग त्या दिवशी आहे, असे समजावे. [ मुहूर्तचिंतामणि]

**अडकित्ता** सुपारी फोडण्याचे एक हत्यार. हा शब्द अडकोत्तू या कानडी शब्दापासून मराठीत आला, असे म्हणतात. अडकी = सुपारी, ओत्तू = कापणे, फोडणे, तासणे. शिवकालात अडकित्ता शब्द रूढ होता. रघुनाथपंडिताच्या



अडकित्ता

राज्यव्यवहार कोशात हा शब्द आढळतो (भोग्यवर्ग ६६). याहीपेक्षा याचा प्राचीन उल्लेख भीमकवीच्या बसवपुराण या कन्नड ग्रंथात अडकोत्तू व अडकेगत्ती असा आला आहे (इ. स. १३६९). यावरून अडकित्ता शब्द सहाशे-सातशे वर्षांइतकाच जुना असावा, असे गोडे यांचे मत आहे.

पतंजलीच्या महाभाष्यात 'शङ्कुलया खंडः शङ्कुलाखंडः' असे शब्द येतात. वासुदेवशरण अग्रवालांच्या मते या शब्दांचा अर्थ अडकित्ता असा आहे. पण पतंजलीच्या काळात सुपारी होती किंवा नाही, यासंबंधी श्री. गोडे यांनी शंका व्यक्त केली आहे. गुजरातमध्ये लहान अडकित्त्याला सूडी आणि मोठ्या अडकित्त्याला सूडो म्हणतात. बंगाली, हिंदी, असमिया या भाषांत याला अनुक्रमे यांती, सरौता व चरोता हे शब्द रूढ आहेत. लीळाचरित्र या महानुभावीय मराठी ग्रंथात अडकित्त्याला पोफळ-फोडणा हा शुद्ध मराठी शब्द वापरला आहे.

अडकित्ते हे पितळ, लोखंड, चांदी या धातूंचे बनवितात. मात्र लोखंड सोडून अन्य धातूंच्या अडकित्त्यांना पोलादी पाते





अडकित्त्याचे विविध प्रकार

लावले जाते. चांदीचे अडकित्ते बनविण्याची पद्धतही प्राचीन असावी. पुण्याच्या राजा केळकर संग्रहालयात चांदीचे अडकित्ते आहेत. लीळाचरित्रात अडकित्ते सावकाराकडे गहाण टाकल्याचे उल्लेख आहेत. यावरून यादवकालापासून मौल्यवान धातूंचे अडकित्ते तयार होत असतत, असे दिसते (लीळा-चरित्र. भाग १ पूर्वार्ध ३८, ८७).

कसबी कारागिरांनी आपली कला दाखविण्यासाठी अड-

कित्याचा भरपूर उपयोग केला आहे. हे अडकित्ते घोडा, कुत्रा, मोर, गेंडा, पोपट, इ. पशु-पक्ष्यांच्या आकाराचे बनविले आहेत. मिथुन स्वरूपातला आणि भगवान शेषशायी स्वरूपाचा असे विविध अडकित्ते राजा केळकर संग्रहालयात आहेत.

तांबूल साहित्यातील हा एक महत्त्वाचा भाग असून, खानदानी घराण्याचे ते एक गौरवचिन्ह आहे. [ लीळाचरित्र, संपा. श्री. शं. गो. तुळपुळे; मा. सां. अ.; नवभारत, जुलै १९६० ]

**ॲडॅम** ख्रिस्ती धर्माने मानलेला पहिला मानव. हाच मानववंशाचा जनक होय. बायबलमधील ॲडॅमह या शब्दाचा अर्थ पृथ्वीतत्त्व असा आहे. त्यातून देहधारी प्राणी उत्पन्न झाला, असा याचा आशय आहे. ॲडॅम हा शब्द जातिवाचक म्हणजे मनुष्यजातीचा बोधक आहे. परंतु फार प्राचीन काळापासून त्याचा उपयोग विशेषनामासारखा करतात.

ईश्वराने एकूण सहा दिवसांत विश्वोत्पत्ती केली, असे बायबलात सांगितले आहे. प्रथम देवाने आकाश व पृथ्वी निर्माण केली. सुरुवातीला सर्वत्र अंधार पसरलेला होता व देवाचा आत्मा जलावर तरंगत होता. नंतर देवाने प्रकाश उत्पन्न केला. दुसऱ्या दिवशी आकाश व जल पृथक् केले. तिसऱ्या दिवशी कोरडी जमीन व तिच्यावर गवत, झाडेझुडपे; चौथ्या दिवशी ग्रहतारे; पाचव्या दिवशी जीवजंतू व पक्षी व सहाव्या दिवशी अनेक जातीचे वनपशू व ग्रामपशू निर्माण केले. या सर्व सृष्ट वस्तूंवर स्वामित्व गाजविण्यासाठी त्याने स्त्री व पुरुष असे एक मिथुन निर्माण केले. त्याने भूमीतील मातीचा मनुष्य बनविला व त्याच्या नाकपुड्यांत प्राणवायू फुंकला.

या पुरुषाच्या शरीराची एक फासळी काढून व त्यात मांस भरून ईश्वराने ईव्ह नावाची त्याची सहचारिणी निर्माण केली. या पुरुषाच्या करमणुकीसाठी देवाने एडन नावाची एक सुंदर बाग तयार केली. या बागेत एक ज्ञानवृक्ष होता. या वृक्षाचे फळ न खाण्याबद्दल त्याने या दांपत्याला बजावले. पण एक दिवस देवाचा वैरी सॅटन सर्परूप घेऊन तिथे आला व त्याने ईव्हचे मन वळवून दोघांना ज्ञानवृक्षाचे फळ खायला लावले. त्याबरोबर ज्ञान होऊन त्यांना नग्न स्थितीत राहण्याची लाज वाटू लागली. तेव्हा त्यांनी अंजिराची पाने शिवून स्वतःकरिता वस्त्रे बनविली. ज्ञानवृक्षाचे फळ खाण्याच्या अपराधाबद्दल शाप देऊन देवाने त्यांना बागेतून हाकलून दिले. तेव्हापासून मनुष्य मर्त्य व पतित झाला, असे ख्रिस्ती लोक मानतात.

ॲडॅम व ईव्ह यांना एबेल, केन व सेथ असे तीन पुत्र झाले. एबेलला केनने ठार मारले. केन व सेथ यांच्यापासून मानववंश विस्तारला. यहुदी धर्मानुसार ॲडॅमच्या अधःपाताची कथा मानवाची अपूर्णता दर्शविते. [ म. ज्ञा. को.; एन्सा. रि. ]

**अडाणा** भारतीय संगीतातील एक राग. या रागात षड्ज, शुद्ध ऋषभ, कोमल गंधार, शुद्ध मध्यम, पंचम, कोमल धैवत व कोमल निषाद हे स्वर लागतात. अवरोहात धैवत वर्ज्य असतो. या रागाची जाती संपूर्ण षाडव आहे. वादी तार षड्ज व संवादी पंचम आहे. हा राग रात्रीच्या तिसऱ्या प्रहरी गातात. हा कानड्याचाच एक प्रकार आहे. दोन्ही रागांमध्ये स्वर एकच लागतात, परंतु कानड्याप्रमाणे या रागाची प्रकृती संथ नाही. [ अ. म. ज्ञा.]

**अडियन** केरळ आणि कर्नाटक प्रदेशात राहत असलेली एक जमात. उच्च जातींना विटाळ होऊ नये, म्हणून त्यांनी सहा पावले दूर राहावे, असा प्राचीन काळात नियम होता. त्यावरून अडियन हे नाव प्रचलित झाले असावे, असा तर्क आहे. शिवद्विज ब्राह्मण व अस्पृश्य मुलगी यांच्या संकरातून अडियनांची उत्पत्ती झाली, असेही काही लोक म्हणतात. एका ब्राह्मणाने महादेवास अर्पण केलेला नैवेद्य भक्षण करण्याचा अनाचार केला, त्यामुळे त्याच्या वंशजांना निकृष्ट दर्जा प्राप्त झाला, तेच हे अडियन होत, असाही समज आहे. भद्रकालीच्या देवळात अडियनांचे पूर्वज पुजारी होते, असा त्यांचा दावा आहे.

अडियन गव्हाळी व कृष्णपिंगल रंगाचे असून, त्यांचे केस कुरळे असतात. ते शेतमजुरी करतात. प्रत्येक खेड्यात त्या लोकांचा एक प्रमुख असतो. त्याला पेरुमन व त्याच्या पत्नीस पेरुमती म्हणतात. हे पद वंशपरंपरागत चालते.

**विवाहप्रथा** – विवाह ठरवण्यात वराकडील लोक पुढाकार घेतात. वधूमूल्य रु. ५ ते १०० पर्यंत असते.

**देवधर्म** – केरळमधील अडियन ओणम व विशू हे सण साजरे करतात. माता दैवम (डोंगरदेवता) ही त्यांची सर्वमान्य देवता आहे. धार्मिक समारंभात पुरुष नृत्य व गायन करतात. स्त्रिया नृत्यात भाग घेत नाहीत. नृत्य व गायन देवांना आवडते व त्यामुळे पूर्वजांचे आत्मे संतुष्ट होतात, असा त्यांचा समज आहे.

**मर्तिकप्रथा** – अडियन मयताला पुरतात व सुतक पंधरा दिवस पाळतात. [ म. वि. को.]

**अड्यार** हे ठिकाण मद्रासपासून सात मैलांवर आहे. हे थिऑसॉफिकल सोसायटीचे एक जागतिक महत्त्वाचे पीठ आहे. इथे अड्यार नदी बंगालच्या उपसागराला मिळते. इथे ३०० एकर जागेत एक रमणीय उद्यान केलेले असून, त्यात एक प्रचंड विस्ताराचा वटवृक्ष आहे. त्या वृक्षातळी सभा-संमे-

लनेही भरतात. इथे वरील सोसायटीच्या अनेक इमारती असून, एक मोठे ग्रंथालयही आहे. त्यात संस्कृत व पाली भाषेतील, ताडपत्रावर लिहिलेल्या १०,००० पोथ्या आहेत. [ सु. वि. को.]

**अणिमा** अष्ट सिद्धींपैकी एक. ही प्राप्त झाली, की माणसाला अणूएवढे लहान होता येते. [ स. पां. ]

**अणुवाद** प्राचीन काळी अणुवाद हा दार्शनिक विवेचनाचा एक विषय होता. प्रत्येक प्राकृत पदार्थ हा अणूंचा बनलेला असतो, असा अणुवादाचा सिद्धान्त आहे.

'अन्त्यावयवत्वम् अणुत्वम्' (= ज्या पदार्थाचे पुढे आणखी अवयव पाडता येत नाहीत, त्याला अणू म्हणावे), अशी अणूची व्याख्या आहे. अणू किती सूक्ष्म आहे, याची कल्पना येण्यासाठी पुढील उदाहरण देतात –

**जालसूर्यमरीचिस्थं सूक्ष्मं यद् दृश्यते रजः।**
**तस्य षष्ठतमो भागः परमाणुः स उच्यते ॥**

अर्थ – खिडकीतून येणाऱ्या सूर्यकिरणात जो सूक्ष्म रजःकण दिसतो, त्याच्या सहाव्या भागाला परमाणू असे नाव आहे.

अणू निरवयव आणि म्हणूनच नित्य आहे. अणूलाही आणखी अवयव आहेत, असे मानले तर अनवस्था प्रसंग ओढवेल, असे वैशेषिक दर्शनात म्हटले आहे.

वैशेषिक दर्शनाचे आचार्य कणाद महर्षी यांनी अणूसंबंधी विशेष विचार केला आहे. त्यांना अणूचा इतका ध्यास लागला होता, की 'पीलवः पीलवः' असे म्हणतच त्यांनी देह ठेवला, अशी त्यांची आख्यायिका सांगतात.

वैशेषिकांच्या अणुवादाची रूपरेषा पुढीलप्रमाणे आहे –

सृष्टीच्या प्रारंभी सर्व पदार्थांचे चार प्रकारचे अणू किंवा परमाणू असतात. परमेश्वराच्या इच्छेने त्यांच्यांत हालचाल उत्पन्न होते व दोन अणू एकत्र येऊन एक द्वचणुक तयार होते. तीन द्वचणुकांच्या संयोगाने एक त्र्यणुक उत्पन्न होते. व चार त्र्यणुकांच्या संयोगाने एक चतुरणुक बनते आणि अशा रीतीने स्थूल पृथिवी, स्थूल जल, स्थूल तेज व स्थूल वायू ही द्रव्ये अस्तित्वात येतात. विशेष हे या निरनिराळ्या द्रव्यांच्या अणूंचे व्यावर्तक आहेत.

ईश्वराला जेव्हा सृष्टीचा प्रलय व्हावा, अशी इच्छा उत्पन्न होते, तेव्हा द्वचणुकाचे दोन परमाणू एकमेकांपासून विभक्त होतात व द्वचणुकाचा नाश होतो. द्वचणुकनाशामुळे क्रमाने त्र्यणुकनाश व चतुरणुकनाश होतो. अशा रीतीने असमवायी कारणनाशाने व समवायीकारणनाशाने द्रव्यनाश होतो. सृष्टीचा अवांतर प्रलय होतो, तेव्हा सर्व कार्यद्रव्यांचा ध्वंस होतो व महाप्रलय होतो, तेव्हा सर्व भावकार्यांचा ध्वंस होतो.

वैशेषिकांनी उत्पत्तीचा जो क्रम मानला, तोच क्रम त्यांनी विनाशाचाही मानला आहे. या प्रक्रियेवर शंकराचार्यांनी वेदान्तसूत्रांवरील (२. ३. १४) आपल्या भाष्यात आक्षेप घेतला आहे, तो असा –

**विपर्ययेण तु प्रलयक्रमोऽत उत्पत्तिक्रमाद् भवितुमर्हति। तथाहि लोके दृश्यते येन क्रमेण सोपानमारूढस्ततो विपरीतेन क्रमेणावरोहति।**

अर्थ – उत्पत्तिक्रमाच्या नेमका विरुद्ध असा प्रलयक्रम असायला पाहिजे. ज्या क्रमाने माणूस जिना चढून जातो, त्याच्या विरुद्ध क्रमाने उतरतो, असाच जगात अनुभव येतो.

घट जेव्हा फुटतो, तेव्हा त्याची दोन कपाले होतात. नंतर त्या कपालांचे आणखी बारीक बारीक तुकडे होऊन शेवटी द्वचणुकाचा नाश होतो, असे सर्वत्र दिसते. वैशेषिकांच्या मताप्रमाणे घटनाश होतो म्हणजे सुरवातीलाच घटाच्या द्वचणुकाचा नाश होतो. पण असे मानले तर मग बाकीचा घट कुठे राहील? त्याच क्षणी सर्व घट पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणे कोसळून पडेल. परंतु असे काही प्रत्ययाला येत नाही. तेव्हा वैशेषिकांचे हे मत बरोबर नाही. प्राचीन काळी अणू हा दार्शनिक विवेचनाचा विषय होता; तर आधुनिक कालात तो वैज्ञानिक संशोधनाचे केंद्र बनला आहे. [ हिं. वि. को.; भा. द. इ.]

**अणुव्रते** अणुव्रत म्हणजे लघुव्रत. जैन लोक पुढील पाच अणुव्रते मानतात – (१) अहिंसा (२) अचौर्य (३) सत्य (४) स्वस्त्रीसंतोष व (५) परिग्रहप्रमाण. दोन इंद्रियांच्या प्राण्यापासून तो पंचेंद्रियांच्या प्राण्यापर्यंत कोणत्याही जीवाची हत्या न करणे याचे नाव अहिंसा. चोरी न करणे, विसरलेले, पडलेले, एखाद्याने ठेवलेले व आपले नसलेले धन न घेणे, याचे नाव अचौर्य. सदासर्वदा खरे बोलणे हे सत्य. जिचे पाणिग्रहण केले असेल, तिच्याशिवाय अन्य स्त्रीची अपेक्षा न बाळगता स्वतःच्या स्त्रीच्या ठिकाणी संतुष्ट असणे, हे स्वस्त्रीसंतोष. धनधान्य, घरदार, वस्त्रपात्र, इ. भोग्य वस्तू गरजेपुरत्याच ठेवून अधिकाचा त्याग करणे हे परिग्रहप्रमाण.

महाव्रते व अणुव्रते यांच्यांत अंतर एवढेच, की महाव्रते श्रमण साधूंसाठी व अणुव्रते गृहस्थ श्रावकांसाठी असतात. महाव्रतांत सर्वत्यागाची अपेक्षा असते; तर अणुव्रतात अहिंसा-सत्यादि गोष्टींचे स्थूल स्वरूपात पालन केले जाते. अन्यथा दोन्हींसारखीच आहेत. [ जैनधर्म; तत्त्वार्थसूत्र; रत्नकरंडश्रावकाचार ]

**अतल** सप्त पाताळांपैकी चौथे. तिथली भूमी पीत वर्णाची आहे. या लोकात मयपुत्र बलाचे राज्य असून का

नेमी, नमुची, शंकुकर्ण, इ. दैत्य, नाग व राक्षसही तिथे राहतात. अतल ही विराट पुरुषाची मांडी होय (भागपु. २. ५. ४०; विष्णुपु. २.५. २. ३; वायुपु. ५०. ११. १३.).

**अतलद्दी** तेलुगू स्त्रियांचे गौरीव्रत. कुमारीने इच्छित वर मिळावा म्हणून हे करायचे असते. वद्य पक्षातील तृतीयेला सूर्योदयापूर्वी भोजन, दुपारी गौरीची पूजा व दहा स्त्रियांना मिठाई देणे, असा याचा विधी आहे.

**अतिकृच्छ्र** एक प्रायश्चित. बारा दिवस ग्रासमात्र अन्न सेवन करणे व नंतर तीन दिवस उपवास करणे असे याचे स्वरूप आहे. अशक्त व्यक्तीने हातात मावेल तेवढे (पाणिपूर) अन्न ग्रहण करावे, असेही सांगितले आहे (मनु. ११. २१३; याज्ञ. ३. ३१९). या प्रायश्चित्ताने महापातके सोडून इतर सर्व पापांचे क्षालन होते (गौत. २६. २२). पाहा – कृच्छ्र.

**अतिक्रुद्ध** हा एक आगमोक्त मंत्र आहे. याची अठ्ठावीस किंवा एकतीस अक्षरे असतात.

अष्टाविंशत्यक्षरो य एकत्रिंशदथापि वा ।
अतिक्रुद्धः स विज्ञेयो निन्दितः सर्वकर्मसु ।।

अर्थ – अठ्ठावीस किंवा एकतीस अक्षरे असलेल्या मंत्राला अतिक्रुद्ध असे नाव असून, सर्व कर्मांत तो निंदित आहे.

यावरून तंत्रमार्गाव्यतिरिक्त अन्य जपविधानात याला मान्यता नव्हती, असे दिसते.

**अतिग्राह्यपात्र** अग्निष्टोमात अग्नी, इंद्र व सूर्य यांच्यासाठी वेगवेगळे ग्रह सांगितले आहेत. त्यांना अतिग्राह्य ग्रह असे म्हणतात. या ग्रहांची स्थापना करण्यासाठी अशोकाच्या लाकडाचे पात्र बनवतात. हे पात्र वायव्यपात्राच्या आकाराचे असते. वाजपेय यज्ञामध्ये पाच अतिग्राह्य ग्रह असतात. वेगवेगळ्या सोमयागांमध्ये यांची संख्या वेगवेगळी असते.

**अतिचार** 'अतिक्रम्य चरणं गमनम्' (= अतिक्रमण करून जाणे). भौमादी पाच ग्रहांचे राशिभोगाचा नियत-काल समाप्त होण्याच्या पूर्वी दुसऱ्या राशीत जाणे, याला अतिचार म्हणतात. ग्रह पूर्वराशीत गेल्यास तो वक्रातिचार होतो. हे दोन्ही अतिचार गुरूने केल्यास अवर्षणादी संकटे येतात. [ स्मृतिज्योतिष ]

**अतिच्छंद** एक वृत्त. प्राचीन साहित्यशास्त्रातील पद्धतीप्रमाणे हे सहावे वृत्त असून, सहा या संख्येचे निदर्शक आहे. पुढे याच वृत्ताला शक्वरी म्हणू लागले. पाहा – शक्वरी.



**अतिथी** 'अतिथिर्ना गृहागते' = घरी आलेल्या माणसाला अतिथी म्हणावे (अमर). 'अतति सततं गच्छति इति' = सदा प्रवासी. 'अध्वनीनोऽतिथिर्ज्ञेयः' = पांथस्थाला अतिथी म्हणावे. 'नास्ति तिथिर्यस्य सः' = ज्याच्या येण्याला काळ वेळ किंवा निश्चित दिवस नाही, त्याला अतिथी म्हणावे, अशी आणखी एक अतिथीची व्याख्या सांगतात. अतिथी म्हणजे पाहुणा. अतिथीला देव मानून त्याचे आतिथ्य करण्याची प्रथा वेदकाळापासून होती. पराशर म्हणतो –

प्रियो वा यदि वा द्वेष्यो मूर्खः पण्डित एव वा ।
वैश्वदेवे तु सम्प्राप्तः सोऽतिथिः स्वर्गसङ्क्रमः ।।
(पारा. स्मृ. १.४०)

अर्थ – मित्र असो वा शत्रू; मूर्ख असो वा पंडित; वैश्वदेवाच्या काळी दारी आलेला अतिथी (यजमानाला) स्वर्ग देणारा होतो.

वैश्वदेव झाल्यानंतर अतिथीची प्रतीक्षा कशी करावी, या संबंधात पुढील श्लोक आहे –

ततो गोदोहमात्रं तु कालं तिष्ठेद् गृहाङ्गणे ।
अतिथिग्रहणार्थाय तदूर्ध्वं वा यदृच्छया ।।

अर्थ – वैश्वदेवानंतर गोदोहन कालाइतकी (गोदोहन काल= मुहूर्ताचा आठवा भाग) अतिथीची वाट पाहावी, किंवा यदृच्छेने त्याहूनही अधिक काळ मार्गप्रतीक्षा करावी.

वैश्वदेवाच्या काळी चांडाल जरी अतिथी म्हणून आला, तरी त्यालाही भोजन घालावे, असे आपस्तंब आणि वृद्धहारीत यांनी सांगितले आहे. महाभारतात (अनु. ७. ६) म्हटले आहे, की –

चक्षुर्दद्यान्मनो दद्याद् वाचं दद्याच्च सूनृताम् ।
अनुव्रजेदुपासीत स यज्ञः पञ्चदक्षिणः ।।

अर्थ – (यजमानाने) नेत्र, मन व गोड वाणी ही अतिथीला द्यावी, त्याच्या व्यवस्थेकडे स्वतः लक्ष द्यावे आणि तो निघाला असता त्याला थोडे पोचवायला जावे. मनुष्ययज्ञाची ही पंचविध दक्षिणा होय.

ज्याच्या घरातून अतिथी विमुख जातो, त्या यजमानाला अतिथीचे पाप मिळते व यजमानाचे पुण्य त्या अतिथीला मिळते, असेही सांगितले आहे.

यजमानाने आपल्या ऐपतीप्रमाणे भोजन, केवळ पाणी किंवा आंथरुण दिले, तरी ते आतिथ्य होते. यजमान घरी नसल्यास त्याच्या पत्नीने अतिथीचा सत्कार करावा. मनू तर स्पष्ट सांगतो, की 'भोजन देण्याची ऐपत नसेल, तर तृणासन बसायला द्यावे, तेही नसेल तर साध्या जमिनीवर बसा म्हणावे

आणि तेवढेही शक्य नसले तर गोड शब्दांनी त्याचे कुशल विचारावे. सज्जनांच्या घरी निदान एवढे तरी झालेच पाहिजे' (मनु. ३.१०१).

या अतिथिसत्काराच्या मागे मानवतेची भावना स्पष्ट आहे. स्मृति–सूत्रकारांनी आणखीही काही कारणे सांगितली आहेत. अतिथिपूजेने शांती आणि स्वर्ग यांचा लाभ होतो. योगी आणि सिद्धपुरुष ब्राह्मणरूपाने पृथ्वीवर फिरत असतात; हे जाणून गृहस्थाने त्यांचे आतिथ्य केल्यास त्याचे कल्याण होते. ब्रह्मचारी व यती यांना भोजन घातल्याशिवाय जर गृहस्थाने भोजन केले, तर त्याला चांद्रायण प्रायश्चित्त घ्यावे लागते. वृद्धहारीत तर म्हणतो, की –

यतिर्यस्य गृहे भुङ्क्ते तस्य भुङ्क्ते हरिः स्वयम् ।

अर्थ – ज्याच्या घरी यती भोजन करतो, त्याच्या घरी साक्षात श्रीहरी भोजन करतो.

जर यती गृहस्थाच्या घरी एक रात्र राहिला, तर यजमानाचे सर्व पाप धुवून जाते. अतिथीच्या आधी जो यजमान भोजन करतो, तो अन्न, वैभव, प्रजा, पशू व पुण्य हे सर्व घालवून बसतो.

मात्र अतिथीचे स्वागत करताना पात्रापात्रविचारणा ठेवावी आणि तारतम्याने निरनिराळ्या वर्णांचे आतिथ्य करावे, असेही अनेक स्मृतिकारांनी सांगितले आहे. वेदकाळी अतिथीसाठी गाय किंवा कालवड मारण्याची प्रथा होती, असे शतपथ ब्राह्मणावरून कळते (७.३.२.१).

पुराणांतरी गाजलेला अतिथी म्हणजे दुर्वास मुनी हा होय. यजमानाला संकटात पाडून त्याचे सत्त्वहरण करण्याचा प्रयत्न करणे अशी त्याची वृत्ती आहे. पांडव वनवासात असता रात्रौ त्यांच्या आश्रमात शिष्यासह जाऊन जेवण मागणे, अंबरीषाच्या घरी जाऊन त्याची साधनद्वादशी मोडण्याची वेळ आणणे, अशा गोष्टी त्याने केल्या आहेत. दुसरा अतिथी विष्णू. त्याने वामनरूप घेऊन बळीकडे त्रिपाद भूमी मागितली व त्याला राज्यभ्रष्ट केले. तिसरा अतिथी शिव. याने श्रियाळराजाकडे जाऊन त्याचा पुत्र चिलया याच्या मांसाचे भोजन मागितले. ब्रह्मा–विष्णू–महेश हे यतिवेषाने अत्रीच्या आश्रमात आले व त्यांनी अनसूयेला विवस्त्र होऊन भोजन वाढण्यास सांगितले. पण या सर्व प्रकारात शेवटी त्या त्या गृहस्थांचाच विजय झालेला दाखविला आहे. या सर्व कथा गृहस्थाच्या असीम आतिथ्यधर्माचाच गौरव आहेत.

अतिथिधर्म हा गृहस्थाचा मुख्य धर्म मानलेला आहे. प्राचीन काळी रस्ते आणि वाहने यांच्या विशेष सोयी नव्हत्या. लोक तीर्थयात्रा किंवा अन्य कारणे यांच्यासाठी पायी प्रवास करीत. दुपारच्या वेळी क्षुधेच्या तृप्तीसाठी व रात्रीच्या मुक्कामासाठी त्यांना वाटेत कोणाच्या तरी घरी जावेच लागे. अशा पांथस्थांना अन्न व निवारा मिळून त्यांचा प्रवास सुखकर व्हावा, यासाठी आलेल्या अतिथीचे आतिथ्य करण्याची जबाबदारी धर्मशास्त्राने गृहस्थाश्रमावर टाकलेली आहे. पुराणांतही अतिथिधर्माचा जागोजाग गौरव केलेला आहे. अतिथी, मग तो कोणत्याही जातीचा असो; त्याला विष्णूप्रमाणे पूज्य समजून गृहस्थाने कुशलप्रश्नपूर्वक त्याचे आतिथ्य करावे, असे पुराणकारांचे मत आहे. याविषयी पद्मपुराणात कथा दिली आहे, ती अशी –

ज्ञानभद्र नावाचा एक गृहस्थ सौराष्ट्रात राहत होता. एकदा दुष्काळात त्याला व त्याच्या पत्नीला एकवीस दिवस उपवास पडला. त्यानंतर एका डोंगरावर हिंडत असता त्याला एक कोहळा मिळाला. घरी आणल्यावर त्याच्या पत्नीने त्याचे दोघांसाठी दोन भाग केले. एवढ्यात त्याच्या दारी एक गोप आला. तोही क्षुधार्त होता. ज्ञानभद्राने त्याला आपला भाग देऊन टाकला. तेवढ्याने त्याची भूक थांबली नाही, म्हणून पत्नीनेही त्याला आपला भाग दिला. अतिथी तो कोहळा खाऊन संतुष्टपणे निघून गेला. त्या अतिथिसत्कारामुळे त्या दंपतीला तर मोक्ष मिळालाच; शिवाय सौराष्ट्रात पाऊस पडून दुष्काळही संपला (प. पु. क्रि. खं. २५). पाहा – गृहस्थाश्रम. [ वे. इं.; हि. ध. ]

**अतिपातक** नवविध पापांपैकी सर्वांत मोठे पातक. हे तीन प्रकारचे आहे. पुरुषाने माता, कन्या व सून यांच्याशी गमन केल्यास व स्त्रीने पुत्र, पिता व सासरा यांच्याशी गमन केल्यास ते अतिपातक होते. अशा पातकाला अग्निप्रवेश हेच प्रायश्चित्त होय, असे विष्णुधर्मोत्तर पुराणात सांगितले आहे (३४.१.२). [ हि. ध. ]

**अतिबला** हे एका औषधीचे नाव आहे. देवमूर्तीला पहिले स्नान घालताना या औषधीचा उपयोग करतात (मत्स्य पुं. २६७. १४). [ पु. इं. ]

**अतिमानवी योनी** यक्ष, गंधर्व, किन्नर, गुह्यक, राक्षस, विद्याधर, पिशाच, सिद्ध, सर्प, नाग, या अतिमानवी योनी होत. महाभारत, रामायण, पुराणे, जातके यांत या योनींचे उल्लेख मिळतात. या योनीचे स्थूल वर्गीकरण असे –

गंधर्व, यक्ष, किन्नर हे प्रथम श्रेणीतले व स्वर्गसंबंधी मानले जातात. यात गंधर्वांबरोबरच अप्सराही येतात. नाग व राक्षस हे पातालसंबंधी व देवविरोधक गणले जातात. यांची श्रेणी दुसरी. गुह्यक, विद्याधर, सिद्ध यांची श्रेणी तिसरी व पिशाचांची चौथी. या सर्व अतिमानवी योनींची वैशिष्ट्ये अशी –

(१) मायिक सिद्धी (२) आकाशसंचार (३) अदृश्य होणे आणि रूप पालटणे (४) ललितकलांत प्रावीण्य (५) मानव स्त्री-पुरुषांशी संभोग करू शकणे (६) त्यांची मानवापासून झालेली अपत्ये मानवी होतात (७) रात्रिसंचाराची आवड व (८) मानवाच्या दैवाचे साहाय्यक किंवा विघातक.

यांना देवयोनी असेही म्हणतात. या शब्दाचा विग्रह असा – 'देवा योनिरुत्पत्तिस्थानम् एषाम् इति' (= देव हे ज्यांचे उत्पत्तिस्थान आहे ते – म्हणजेच देवांश). अमरकोशात यांची नावे पुढीलप्रमाणे दिली आहेत –

विद्याधराप्सरोयक्षरक्षोगन्धर्वकिन्नराः ।
पिशाचो गुह्यकः सिद्धो भूतोऽमी देवयोनयः ।।

सर्व प्राचीन संस्कृतीत राक्षस किंवा अतिमानुष अशा प्रकारच्या व्यक्ती मानलेल्या आहेत. हे अतिमानव माणसांशी प्रसंगानुरूप चांगले किंवा वाईट वर्तन करतात. ख्रिस्ती धर्मात त्यांना दुष्टच मानलेले आहे. ते सैतानाचे दूत असून देवांचे व ख्रिस्ताचे वैरी समजले जातात. [ लो. सा. रू. ]

## अतिरात्र

सप्त सोमसंस्थांपैकी एक सोमयाग. हा याग एका दिवसात न संपता एक दिवस व एक रात्र उलटून गेल्यावर संपतो, म्हणून याला अतिरात्र असे नाव मिळाले आहे. मुलांची किंवा पशूंची इच्छा असणारा यजमान हा याग करतो. या यागात एकोणतीस स्तोत्रे आणि तितकीच शस्त्रे असतात. स्तोत्रे आणि शस्त्रे यांचे चार पर्याय रात्री म्हणतात. जो ज्या वेळी शस्त्र म्हणणारा असेल त्या वेळी त्याचा चमस मुख्य समजून चमसप्रचार केला जातो. हे सर्व हवन रात्री होते. या सर्व चमसगणांची देवता इंद्र ही आहे. तीन्ही रात्रीपर्याय झाले म्हणजे आश्विन द्विकपाल पुरोडाश तयार केला जातो. त्यानंतर अध्वर्यू संधिस्तोत्राचे उपाकरण करतो. या स्तोत्राचा त्रिवृत्सोम आहे. सामगायकांनी स्तोत्र म्हटल्यावर होता आश्विन शस्त्र म्हणायला प्रारंभ करतो. सूर्योदयाबरोबर शस्त्राचे शंसन संपवितात. त्यापूर्वी शस्त्र संपले तर इष्ट त्या ऋचांची भर घालतात. मुख्य सुत्येच्या दिवशी सरस्वती देवीसाठी पशुयाग करतात.

ऋग्वेदात या यागाचा उल्लेख आढळतो (७.१०३.७). देवांनी हा याग करून द्युलोक जिंकला असे तांड्य ब्राह्मणात म्हटले आहे (९.२.९). अतिरात्र विधात्याच्या मुखापासून उत्पन्न झाला असे काही पुराणांत म्हटले आहे (भागपु. ३.१२.४०; वायुपु. ९.५१). कश्यपाने हा यज्ञ केल्याचे विवेचन आढळते (ब्रह्मांड. ३.५.४.; मत्स्यपु. ४४.६५). धर्मकृत्यात मध दान दिला तर अतिरात्र यागाचे पुण्य मिळते, अशी याची थोरवी आहे (वायुपु. ७९.११.; ब्रह्मांडपु. ३.१५.११). [ हि. ध.; पु. इं.; श्रौ. ध. स्व. चि. ]

## अतिवृद्ध

अनेक आगमोक्त मंत्रांपैकी हा एक प्रसिद्ध असून तो निषिद्ध मानला आहे –

चतुःशतं समारभ्य यावद्वर्णसहस्रकम् ।
अतिवृद्धः स मन्त्रस्तु सर्वशास्त्रेषु वर्जितः ।।

अर्थ – चारशे वर्णांपासून हजारापर्यंत वर्णसंख्या असलेल्या या मंत्राला अतिवृद्ध हे नाव असून, सर्व शास्त्रांत तो वर्जित आहे. [ सं. इं. डि. ]

## अतीत

कच्छमधील एक जात. आसामातही यांची थोडी वस्ती आहे. यांच्या अनेक पोटजाती आहेत. हे पोटजातीचे नाव आपल्या नावापुढे लावतात. हे शैव असून, यांच्यामध्ये ब्रह्मचारी व गृहस्थ असे दोन वर्ग आहेत. पहिल्यास मठधारी, व दुसऱ्यास घरबारी म्हणतात. हे मद्य-मांस सेवन करतात. भिक्षा किंवा अन्य कोणतेतरी धंदे करून निर्वाह चालवितात. यांना पुनर्विवाह संमत आहे. हे लोक मरणोत्तर समाधी बांधून तिच्यावर शिवलिंग बसवितात. [ सु. वि. को. ]

## अतीतपंथ

संसाराचा त्याग करून संन्यासवृत्तीने परमार्थाचे आचरण करणाऱ्या वैराग्यांचा हा पंथ आहे. शैव आणि वैष्णव या दोन्ही पंथांत अतीत आढळतात. वैष्णव अतीत विहारमध्ये दिसतात. अवधूत आणि अतीत यांच्यामध्ये साधर्म्य आहे. पण अवधूत शब्द प्राचीन असून, अतीत शब्द अर्वाचीन आणि प्रादेशिक आहे. स्थूल अर्थाने दसनामी गोसाव्यांना अतीत या नावाने ओळखतात. दसनामींपैकी अर्ध्या वर्गाला दंडी म्हणतात. कारण ते दंडा किंवा सोटा वापरतात. अतीत दंड वापरीत नाहीत. त्यांचे खाणेपिणे, कपडे, स्वयंपाक करण्याची पद्धत आणि दीक्षाविधी या सर्व गोष्टी दंडीहून वेगळ्या आहेत. बहुसंख्य अतीत संन्यासी असले, तरी त्यांतले काही गृहस्थाश्रम संभाळून व्यापार उदीमही करतात. संन्यस्त अतीत मठात किंवा आश्रमात राहतात. त्यांची वस्त्रे गेरूने रंगविलेली असतात. ते महादेव, भैरव व हनुमान यांची उपासना करतात. तत्त्वज्ञानात अद्वैताचा पुरस्कार करतात. शैव अतीत अर्धनग्न राहून जटा, दाढी वाढवितात. ते मौन पाळतात व भिक्षेवर जगतात. [ एन्सा. रि. ए. ]

## अतींद्रिय

इंद्रियातीत ज्ञान किंवा अनुभूती. इंद्रियगम्य अनुभवाहून ही अनुभूती घन व संश्लिष्ट असते. म्हणूनच साहित्यशास्त्रात तिला अलौकिक तत्त्व म्हटले आहे. अभिनवगुप्ताच्या ध्वन्यालोकलोचन या ग्रंथावरच्या टीकेत मम्मट हिचे वर्णन पुढीलप्रमाणे करतो – अलौकिक चमत्कारी, अलौकिक आनंदमय व लोकोत्तर अशा आत्मसंवेदनालाच गम्य,

अशी अलौकिक सिद्धी म्हणजे अतींद्रिय अनुभूती होय. ही रसमय असते म्हणूनच रसाला ब्रह्मास्वादसहोदर (ब्रह्मानंदाचा सख्खा भाऊ) म्हटले आहे. पण आधुनिक मनोविज्ञान हे काव्य-रसाचा आनंद संपूर्णपणे इंद्रियातीत असतो, असे मानीत नाही. ज्या रहस्यवादी लेखकांनी अतींद्रिय अनुभूतीची चर्चा केली आहे, त्यांनाही तिच्या विशदीकरणासाठी इंद्रियगोचर अशीच उपमाने योजावी लागली आहेत. अतएव अतींद्रिय हा शब्द साहित्य-क्षेत्रांत केवळ कल्पनामात्र समजावा लागतो. [ हिं. सा. को. ]

**अत्तर** घ्राणेंद्रियाला आल्हाद देणारी अत्तरे, सुवासिक तेले व पदार्थ यांचा उपयोग मनुष्यजातीत फार पूर्वीपासून प्रचलित आहे. फुलांचा मधुर वास, कस्तूरीमृग, जवादी मांजर, वगैरे प्राण्यांपासून निघणारी सुगंधी द्रव्ये व वनस्पतिज निर्यास, यांपासून निरनिराळी अत्तरे व तेले तयार होतात. पूर्वी सुधारलेल्या सर्व देशांत व भारतात यांचा खप होत असल्यामुळे अत्तरे तयार करण्याची कला पूर्णत्वास पोचली होती. यांचा उपयोग विलासी लोकच करीत, असे नसून, धार्मिक संस्कार व शुभ कृत्ये यांतही ती वापरली जात. देवपूजा, साधुसंतांचा सत्कार, अभ्यंगस्नान, यांकरिताही यांचा उपयोग फार पूर्वीपासून प्रचलित आहे. इजिप्त देशात प्रेतसंस्काराच्या वेळी यांचा उपयोग करीत. जंगली जातींतही अत्तरे व सुगंधी द्रव्ये वापरतात व गृहशुद्धीकरिता चंदन, ऊद व अबीर जाळतात. सुगंधी द्रव्ये वर सांगितलेल्या पदार्थांखेरीज रासायनिक मिश्रणानेही तयार होतात. त्यांना रासायनिक सुगंध म्हणतात. दिल्ली, अमृतसर व लाहोर येथून या अत्तरांचा व्यापार चालतो. कनोज येथेही अत्तराचे कारखाने आहेत. [ सु. वि. को. ]

**अत्तारी** एक मुसलमान जात. यांना गांधी अथवा लुक्केकरी असेही म्हणतात. हे लोक सुवासिक द्रव्ये, दंतमंजन व कुंकू विकतात. नागपूर, वर्धा जिल्हा व संपूर्ण विदर्भामध्ये यांची वस्ती आहे. मुसलमान असूनही इतर मुसलमानांपेक्षा हे काहीसे वेगळे आहेत. यांची स्वतःची स्वतंत्र संघटना आहे.

**विवाहप्रथा** – मुलगी वयात येण्यापूर्वीच तिचा विवाह करतात. वर वधूला देज देतो आणि वधू वराला अंगठी देते. विवाहाच्या वेळी वधूपक्षाचे लोक तिला भांडी व वाड-बिस्तरा भेट देतात. विवाहानंतर वधू-वरांना एका पलंगावर बसवले जाते. आणि दोघांनाही एकमेकांचे मुखावलोकन करण्यास सांगतात. वधूच्या घरी चार दिवस राहून वरात वराच्या घरी जाते. वर आणि वधू अल्पवयीन असूनही दोघांना एका खोलीत बंद केले जाते. यांच्या विवाहसमारंभात मंडप घालणे, वधू-वरांना तेल हळद लावणे, कंकण बांधणे, इ. हिंदूंच्या प्रथांचेही पालन केले जाते.

विवाहापूर्वी कन्येचे आचरण अनैतिक असेल, परंतु ती गर्भवती नसेल तर तिचा विवाह विधिपूर्वक केला जातो. ती गरोदर असेल तर मात्र प्रसूत झाल्यानंतर विधवाविवाह पद्धतीने तिचे लग्न लावले जाते. ती मुलाला स्वतःजवळ ठेवू शकते. परंतु तिच्या पतीच्या संपत्तीवर मात्र या मुलाचा काहीही अधिकार नसतो. पतीच्या मृत्यूनंतर चाळीस दिवसांच्या आत विधवा आपल्या धाकट्या दिराशी विवाह करू शकते. चुलत बहीण-भावंडांच्यांतही लग्न होऊ शकते. विवाहाच्या वेळी काजीला द्रव्य व वस्त्र देतात.

हे संतांची उपासना करतात व कुत्र्याला अत्यंत अपवित्र मानतात. यांच्यांत सुतक पाळण्याची प्रथा नाही. हे प्रेताबद्दल आशौच भावना बाळगीत नाहीत. भूतपिशाच्चांना घालवून देण्यासाठी हे उदबत्ती जाळतात. [ ट्रा. का. सें प्रॉ. इं. ]

**अत् तहियात्** इस्लाम धर्मातला एक मंत्र. रोजच्या नमाजातले दोन भाग म्हणून झाले, की हा मंत्र म्हणतात. त्या वेळी डावा पाय दुमडून त्यावर बसतात व गुडघ्यांवर हात ठवतात. मंत्राचा अर्थ असा –

मी माझ्या जिभेने, देहाने तसेच दानाने, देवाची आराधना करीत आहे. त्याच्या कृपेने व आशीर्वादाने हे देवदूता, तुला, आम्हांला आणि सर्व ईश्वरभक्तांना शांती लाभो. [ डि. इ. ]

**अत्तिमब्बे** ( इ. स. चे १० वे शतक ) एक दानशूर आणि सच्चरित्र अशी कर्नाटकातील स्त्री. पुंगनूर गावी तिचा जन्म झाला. तिचा बाप सेनापती असून विद्येचा भोक्ता होता. अत्तिमब्बेचे लग्न नागदेव नावाच्या सेनापतीशी झाले; पण तो थोड्याच कालात निवर्तला. नंतर तिने आपले सर्व जीवन जैन धर्माच्या प्रसारार्थ वाहिले. या काळात तिने १५०० जैन मंदिरे बांधली असे सांगतात. शांतिनाथपुराणाच्या एक हजार प्रती लिहवून तिने त्या लोकांना वाटल्या. या तिच्या औदार्यामुळे तिला दानचिंतामणी ही पदवी मिळाली. पुढे तर लोक तिला देवताच मानू लागले. [ क. द. ]

**अत्तुर** मदुराई जिल्ह्यात दिंडिगुलच्या नैर्ऋत्य दिशेला दहा मैलांवर हे गाव असून, तिथे वंडिकलियम्मन देवीचे मंदिर आहे. त्या मंदिरात मुत्तलम्माचीही मूर्ती आहे. प्रत्येक देवीचा उत्सव एका वर्षाआड केला जातो.

वंडिकलियम्मनूचा उत्सव अधिक महत्त्वाचा असून, है

पंगुनी (फाल्गुन) महिन्यात होतो. पूर्वी उत्सवात अनेक रेडे बळी दिले जात. उत्सवाच्या वेळी देवीच्या मातीच्या मूर्तीची मिरवणूक काढतात आणि एका बागेत तिचे विसर्जन करतात. मुत्तलम्माचा उत्सवही अशाच प्रकारे होतो. [ मदुरा गॅझे.]

**अत्यग्निष्टोम** सप्त सोमसंस्थांपैकी एक सोमयाग. याचा विधी अग्निष्टोमाप्रमाणेच असतो. अग्निष्टोमाची बारा स्तोत्रे आणि शस्त्रे म्हणून झाल्यावर उक्थ ग्रहांचा याग न करता तेरावे षोडशीस्तोत्र व षोडशीशस्त्र म्हटल्यावर सोमाची आहुती दिली की, अत्यग्निष्टोम याग होतो.

यात इंद्रासाठी एक पशूही दिला जातो. पाहा – अग्निष्टोम. [ हि. ध.; श्रौ. ध. स्व. चि. ]

**अत्री ऋषी** एक सूक्तद्रष्टा. याला अत्री भौम असेही म्हणतात. ऋग्वेदाचे पाचवे मंडळ हे अत्रिमंडळ म्हणून ओळखले जाते. या मंडळातील सदतीस ते त्रेचाळीस, शहात्तर, सत्याहत्तर व त्र्याऐंशी ते शहांऐंशी अशी तेरा सूक्ते याने रचली आहेत. अन्य सूक्तांची रचना याच्या वंशजांनी केली आहे. बृहद्देवतेत याची जन्मकथा दिली आहे, ती अशी –

प्रजापतीने साध्य देवांसह त्रिसंवत्सर नावाचे एक सत्र सुरू केले होते. त्या वेळी वाग्देवी शरीर धारण करून तिथे प्रकट झाली. तिला पाहून प्रजापती व वरुण यांचे मन विचलित झाले आणि त्या दोघांचे वीर्य पतन पावले. वायूने ते वीर्य अग्नीत टाकले. त्या अग्निज्वालेपासून भृगू आणि निखाऱ्यापासून अंगिरा ऋषी जन्मला. ही दोन सुंदर मुले पाहून वाग्देवी प्रजापतीला म्हणाली, ‘या दोघांसारखा तिसरा एक मुलगा तुम्ही मला द्यावा.’ प्रजापतीने ‘बरे आहे’, असे म्हणून प्रतिसूर्यच जणू असा एक पुत्र निर्माण केला, तोच हा अत्री होय.

दुसरी एक कथा अशी – हा स्वायंभुव मन्वंतरात ब्रह्मदेवाच्या नेत्रापासून जन्मला. हा ब्रह्मदेवाच्या अष्ट-मानसपुत्रांपैकी एक आहे. कर्दम प्रजापतीची कन्या अनसूया ही त्याची पत्नी होय.

अत्री मोठा गणिती होता. सूर्यग्रहणाचे ज्योतिषशास्त्रीय स्पष्टीकरण याला ज्ञात होते, असे ऋग्वेदातल्या सूर्यग्रहणसूक्तावरून दिसते (ऋ. ५.४०). सूर्यग्रहणामुळे पृथ्वीवर उत्पन्न झालेल्या परिस्थितीचे वर्णन अत्रीने केले आहे, (५.४०.५) ते असे –

यत् त्वा सूर्य स्वर्भानुस्तमसाविध्यदासुरः ।
अक्षेत्रविद् यथा मुग्धो भुवनान्यदीधयुः ॥

अर्थ – हे सूर्या, अंधकाररूपी स्वर्भानू (राहू) असुराने तुला ग्रासताच मनुष्यमात्र वेड्यासारखे झाले. आपण कुठे आहोत, हेच त्यांना समजेना. नंतर अत्रीने स्वर्भानू दैत्याचा नाश करून सूर्याला मोकळे केले.

प्रस्तुत सूक्ताच्या शेवटी असे म्हटले आहे –

यं वै सूर्यं स्वर्भानुस्तमसाविध्यदासुरः ।
अत्रयस्तमन्वविन्दन् नह्यन्ये अशक्नुवन् ॥ (५.४०.९)

अर्थ–अंधकारमार्गे सूर्याला ग्रस्त करणाऱ्या स्वर्भानूला अत्रींनी शोधून काढले. अन्य कोणीही हा पराक्रम करू शकले नाही.

स्वर्भानूने वेढलेल्या सूर्याला अत्री ऋषीने तुरीय यंत्राच्या साहाय्याने पाहिले. यावरून या विशिष्ट यंत्राची वैदिक काळी रचना झाली होती, असे दिसते.

अत्रीची पर्जन्यविज्ञानातही खूप गती होती. अतिवृष्टी व अनावृष्टी कशी टाळावी, आपणास हवा तेव्हा पाऊस कसा पाडावा, इ. संबंधीचे अनेक तोडगे त्याने दिले आहेत. त्याचे पर्जन्यसूक्त अत्यंत ओजस्वी आहे (ऋ. ५.८३). त्यातली एक ऋचा (५.८३.४) अशी –

प्र वाता वान्ति पतयन्ति विद्युत उदोषधीर्जिहते पिन्वते स्वः ।
इरा विश्वस्मै भुवनाय जायते यत् पर्जन्यः पृथिवीं रेतसावति ॥

अर्थ – पर्जन्यदेव पर्जन्यरूपाने पृथ्वीवर अवतीर्ण होताच वायू वाहू लागतात, विजा चमकू लागतात, ओषधी वाढू लागतात, आकाश पाझरू लागते आणि पृथ्वी मनुष्योपयोगी नूतन रूप धारण करते.

अत्रिकुळातले ऋषी लोकशाही राज्याचे भोक्ते होते. त्यामुळे राजसत्तेची वक्रदृष्टी होऊन अत्री भौमाला, प्रचलित राज्यसत्तेविरुद्धचा बंडखोर म्हणून बंदिवास घडला असावा, असे ऋग्वेदातल्या अनेक अवतरणांवरून वाटते (ऋ. १.११२.७; ११८.७). या सर्व प्रसंगीं अश्विनीकुमारांनी त्याला संकटमुक्त केले आहे. हा अत्रीच्या लोकप्रियतेचा (पांचजन्य) एक निकष आहे. अश्विनीकुमारांनी तरुण अत्रीचा ताप शांत केला (ऋ. १.११८.७) आणि एका बलवर्धक अन्नाने त्याला पुष्ट केले (ऋ. १. ११६.८). अग्नीनेही अत्रीला बऱ्याच वेळा साह्य केले आहे (ऋ. १.४५; १०.१५०).

अत्री ऋषी यज्ञकर्मात निष्णात होता. संध्याकाळी यज्ञ करणे हे निषिद्ध होय, असे स्पष्ट मत त्याने दिले आहे (ऋ. ५.७७.२). सूर्यग्रहणामुळे यज्ञकर्मात उत्पन्न झालेले विघ्न अत्रीने नष्ट केले आणि म्हणून देव त्याच्यावर प्रसन्न झाले. देवांनी त्याला वर मागण्यास सांगितले. त्यावर अत्री ऋषी म्हणाला, ‘माझ्या गोत्रातील लोकांना सर्वांच्या आधी व सन्मानपूर्वक दक्षिणा मिळावी.’ देवांनी त्याची मागणी मान्य केली. गोपथ ब्राह्मणात हा कथाभाग विस्ताराने सांगितलेला आहे (पूर्वभाग २.१७). सोमराजाच्या घरी राजसूय यज्ञ झाला

असता, होत्याचे काम अत्रीनेच केले होते. निमिराजाने एका यज्ञाच्या प्रसंगी ऋत्विज म्हणून याला बोलावले होते (वा. रा. ७.५५.९).

स्वार्थी व कंजूष लोकांचा अत्रीला मनापासून तिटकारा होता. एका ठिकाणी हा म्हणतो —

**विसर्माणं कृणुहि वित्तमेषां ये भुञ्जते अपृणन्तो न उक्थैः।**
**अपव्रतान् प्रसवे वावृधानान् ब्रह्मद्विषः सूर्याद् यावयस्व ॥**
(ऋ. ५.४२.९)

अर्थ – जे (लोक) स्तोत्रे म्हणण्याचा धंदा करून पोट भरतात (व चैनही करतात) पण (एक कवडीचाही) दानधर्म करून देवांस संतुष्ट करीत नाहीत, त्यांचे धन तू क्षणभरही टिकू देऊ नकोस. तसेच सन्मार्गापासून भ्रष्ट झालेले, भरपूर पोरेबाळे असल्यामुळे माजलेले, धर्माचा (ज्ञानाचा) द्वेष करणारे असे जे दुष्ट असतील त्यांना सूर्यप्रकाशातून अंधारात ढकलून (गाडून) टाक.

अत्रीने धर्मशास्त्रात एक मोठी परंपरा निर्माण केली आहे. अत्रिसंहिता, अत्रिस्मृती हे दोन ग्रंथ त्याच्या नावावर आढळतात. मनूही त्याचे मत गौरवाने स्वीकारतो (३.१६). अत्रिसंहितेत चारशे श्लोक असून, ते नऊ अध्यायात विभागले आहेत. त्यांत अनेक प्रायश्चित्ते, जप, योग, कर्मविपाक, इ. विषयांचा विचार केला आहे.

अत्री हा सप्तर्षींपैकी एक आहे. एकोणिसाव्या द्वापार युगातला हा व्यास आहे. दाशरथी राम वनवासात असताना याच्या आश्रमात आला होता. त्या वेळी अनसूया व अत्री या दंपतीने त्याचे उत्तम स्वागत केले होते. यानेच राम-लक्ष्मणांना पुढचा मार्ग दाखविला (वा. रा. अरण्य. ११७). राम अरण्यवास संपवून अयोध्येला परतल्यावर त्याचे अभिनंदन करण्यासाठी आलेल्या महर्षींमध्ये अत्री होता (वा. रा. उत्तर. १.३). याला सोम व अर्यमा नावाचे दोन मुलगे असल्याचा उल्लेख महाभारतात आढळतो (शांति. २०१). अन्यत्र महाभारतातच याला बरीच मुले असून, ती सर्व वेदवेत्ती, सिद्ध व शांतचित्तमहर्षी होती, असे म्हटले आहे (म. भा. आदि. ६६.६).

याला अनसूयेपासून दत्त, दुर्वास व सोम नावाचे तीन मुलगे झाले. विविध पुराणांनी याच्या पुत्रांच्या नावांसंबंधी भिन्न भिन्न मते व्यक्त केली आहेत.

अत्रीने ज्या ठिकाणी तपश्चर्या व पुरश्चरणे केली, ती स्थाने पुढीलप्रमाणे सांगितली जातात – (१) जम्मू काश्मीरचा परिसर, (२) हिमालयात गंगोत्रीच्या मार्गावर, (३) ऋक्ष पर्वत, (४) चित्रकूट पर्वत, (५) माहूर गड व (६) रैवतक पर्वत. पाहा – अत्री स्मृती, अनसूया. [ ऋ. म. भा.; प्रा. च. को.; सीं. ऋ.; ऋ. द.; श्रीरामकोश खंड १, भाग १.; श्री. द. कु.]

**अत्री कुल** यात पुढील मंत्रद्रष्टे ऋषी आहेत— (१) अत्री (२) अर्चनानस् (३) श्यावाश्व (४) गविष्ठिर (५) आविहोत्र व (६) पूर्वातिथी. यांतल्या पाचव्या नावाबद्दल पाठभेद आहेत. ते नाव अंधिगू असणे शक्य आहे. अंधिगू गविष्ठराचा पुत्र असून, ऋ. ९.१०१ या सूक्ताचा द्रष्टा आहे. [ वैं. वा. इ. ]

**अत्री सांख्य** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे त्रेचाळीसावे सूक्त याच्या नावावर आहे. अश्विनौ देवांची स्तुती हा या सूक्ताचा विषय होय. त्याची एक ऋचा अशी –

**युवं भुज्युं समुद्र आ रजसः पार ईङ्खि तम्।**
**यातमच्छा पतत्रिभिर्नासत्या सातये कृतम् ॥**
(ऋ १०. १४३. ५)

अर्थ – सागरनिमज्जित भुज्यूसाठी पंखयुक्त नौका सिद्ध करणाऱ्या, हे अश्विनौ देवांनो, तुम्ही भुज्यूचे प्राण वाचविले.

या सूक्तात अश्विनौ देवांनी अत्रींना असुरांच्या बंदिवासातून मुक्त केल्याचा उल्लेख आहे. भुज्यू तौग्र्य नामक राजपुत्राचे जहाज समुद्रात बुडू लागले असता अश्विनौ देवांनी तीन दिवस व तीन रात्रींमध्ये त्याची मुक्तता केल्याची कथाही सांगितली आहे. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ. ]

**अत्री स्मृती** अत्री ऋषीने रचलेला स्मृतिग्रंथ. या ग्रंथात नऊ अध्याय असून, त्यांत वेदांबद्दल आदर, चार वर्णांची कर्मे, त्यांची वृत्ती; चांद्रायण, प्राजापत्य, निराहार, पराक, कृच्छ्र, इ. व्रते व प्रायश्चित्ते; योग्यायोग्यदान, स्त्री आणि शूद्र यांना पतित करणारी कर्मे, स्पर्शास्पर्श दोष, उच्छिष्टादी अन्नदोष, दशविध ब्राह्मण, श्राद्ध, इ. विषय आलेले आहेत. पातिव्रत्य हेच सुवासिनी स्त्रियांचे महाव्रत होय; मातेपेक्षा श्रेष्ठ गुरू नाही, दानासारखा मित्र नाही; अपंग, आंधळे, पांगळे व अनाथ यांना भिक्षा घालावी; धट्टयाकट्टयांना भिक्षा घालू नये; विद्यादान हे सर्वश्रेष्ठ दान होय; लघुशंका, शौच, दंतधावन, स्नान, भोजन, जप व होम करतेवेळी मौन धारण करावे, इ. आपली काही मते अत्री ऋषीने मांडली आहेत. मनूने या स्मृतीचा गौरवाने उल्लेख केला आहे (३.१६). [अ. म. ज्ञा. को. ]

**अथर्वण-ब्राह्मण** अग्नीची उपासना करणाऱ्या प्राचीन पुरोहितांना अथर्वन् म्हणत. हा शब्द प्र

भारतीय काळाचा असून, अवेस्त्यांतील अथ्रवन् या शब्दाशी संबद्ध दिसतो. ब्राह्मण वर्गाचा उदय होऊन भारतात त्याच्याकडे पौरोहित्य येण्यापूर्वी अथर्वणांकडे भारतीयांचे पौराहित्य असावे. अथर्ववेद हा या वर्गाचा वेद असून, पुढे त्याच्या शाखा, उपशाखा झाल्या आहेत. तूर्त भारतात हा वर्ग अगदीच अल्प आहे. महाराष्ट्रात अथर्वण शाखेचे काही लोक सातारा जिल्ह्यात आढळतात. उत्तर भारतातही तुरळक आहेत. हे शौनक शाखेचे असून, यांच्यांत पाच गोत्रे आहेत. महाराष्ट्रात या शाखेचे शरीरसंबंध देशस्थ, कऱ्हाडे यांच्याशी होतात. आपला वेद सर्वांत आधीचा आहे व त्याचे अधिदैवत भार्गवराम आहे, असे हे मानतात. यांच्यांतले पुष्कळसे लोक शाखालोपामुळे आता ऋग्वेदी झाले आहेत. हे श्राद्धांत पितृत्रयीचा उच्चार उलटया क्रमाने म्हणजे पणजा, आजा, बाप असा करतात. पाहा— अथर्ववेद. [ ब्रा. भि. वि.; सु. वि. को. ]

**अथर्ववेद** चारही वेदांच्या संहितांमध्ये अथर्ववेदाचे स्थान शेवटचे आहे. अंगिरोवंशीय अथर्वा ऋषीने हा प्रथम पाहिला आणि आविष्कृत केला, म्हणून याचे नाव अथर्ववेद असे पडले. याचा निर्देश अथर्वांगिरसवेद अशा जोडनावानेही केलेला आहे. या जोडनावामुळे या वेदाची संयुक्तता तशीच विषयभिन्नताही सूचित होते. याविषयी गोपथ ब्राह्मणात एक आख्यायिका आहे, ती अशी —

सृष्टी निर्माण करण्याच्या उद्देशाने ब्रह्मदेव तपश्चर्या करीत असताना, त्याच्या रोमरंध्रांतून स्वेदधारा भूमीवर वाहिल्या. त्या स्वेदजलात ब्रह्मदेवाने आपले प्रतिबिंब पाहिले आणि लगेच त्याचे वीर्यस्खलन झाले. मग ते रेतमिश्रित जल द्विधा होऊन त्याचा एक भाग शांत, पेय, स्वादू, असा झाला; तर दुसरा क्षार, अपेय, अस्वादू बनला. या दोन भागांतून अनुक्रमे भृगू व अंगिरा हे ऋषी निर्माण झाले. या दोहोंनाही दहा दहा पुत्र होऊन ते अथर्वांगिरस नावाचे वीस ऋषी झाले. या प्रत्येक ऋषीने शौनक संहितेच्या एकेका कांडाची रचना केली. अथर्व ऋषींच्या मंत्रांचा आथर्वणवेद बनला व अंगिरा ऋषींच्या मंत्रांचा आंगिरसवेद झाला.

या आख्यायिकेचे तात्पर्य असे दिसते, की आथर्वण व आंगिरस हे प्रथम दोन स्वतंत्र वेद होते व पुढे त्यांचे एकीकरण होऊन त्या संयुक्त स्वरूपाला अथर्ववेद असे नाव पडले.

अथर्ववेदाला भृग्वंगिरस असे आणखीही एक नाव आहे. भृगुऋषी हे अंगिरसांचे शिष्य होते व स्वतःला आंगिरस म्हणवीत होते, हे त्याचे कारण होय. अथर्ववेदाचे अध्ययन करणारे ऋषी भृगू गोत्रात बरेच असावे. 'अथर्वाणः भृगूत्तमाः' असा एक उल्लेख मिळतो. त्यावरून भृगुकुलाचा अथर्ववेदाशी निकटचा संबंध कळून येतो. 'अङ्गिरोभ्यः स्वाहा' असा तैत्तिरीय संहितेत केवळ अंगिरसांचाच उल्लेख येतो, त्यावरून याला आंगिरस वेद असेही म्हणत असल्याचे कळते. या शब्दाची व्युत्पत्ती बृहदारण्यकोपनिषदात पुढीलप्रमाणे दिली आहे —

अङ्गेषु गात्रेषु यो रसः सप्तधातुमयस्तमधिकृत्य
या चिकित्सा साङ्गिरसानां चिकित्सा ।
(बृहदा. १. ३. ८)

अर्थ—शरीरामध्ये असलेला जो सप्तधातुमय रस, त्याविषयींची चिकित्सा ज्यात आहे, तो आंगिरसवेद होय.

याला ब्रह्मवेद असे आणखी एक नाव आहे.

चत्वारो वा इमे वेदा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदो ब्रह्मवेदः
(गो. ब्रा. २. १६)

अथर्वा हे एका वैदिक आचार्याचे नाव आहे. त्याच्या वंशातला ऋषिसमूहही त्याच नावाने ओळखला जातो. अथर्व शब्दाचा आणखी एक अर्थ अग्नी व सोम यांचा पूजक असा आहे. अतिप्राचीन काळी अग्निहोत्री पुरोहित अथर्वा या नावाने ओळखला जात असे. अवेस्त्यातला अथ्रवन् हा शब्दही अग्निपूजक याच अर्थाचा आहे. हे अग्निपूजक ऋषी यातुविद्येतही प्रवीण होते. अशा ऋषींची मंत्ररचना अवथर्वदात आहे.

प्रारंभी यज्ञकर्मात वेदत्रयीलाच स्थान होते. होता, अध्वर्यू व उद्गाता हे तीन ऋत्विज अनुक्रमे ऋक्–यजु:–साम मंत्रांनी आपापले कर्म पार पाडीत. ब्रह्मा हा चौथा ऋत्विज असून, त्याला निराळा वेद नव्हता, हे ऐतरेय ब्राह्मणावरून (५.३३) उघड होते. पुढे मात्र 'अथर्वाङ्गिरोभिर्ब्रह्मत्वम्' असा नियम ठरविण्यात आला व ब्रह्म्याचे काम अथर्ववेदी ब्राह्मणाला देण्यात आले (गो. ब्रा. २. २४). अथर्ववेदात यज्ञोपयुक्त असा फारच थोडा भाग आहे. म्हणूनच वेदत्रयीहून त्याला कमी पवित्र मानले गेले. धर्मसूत्रे आणि स्मृतिग्रंथ यांनी त्याचा उल्लेख अनादरानेच केला आहे. अथर्ववेद बहुतांशी अभिचारात्मकच आहे. श्रौतामध्ये स्थान मिळाल्यावाचून त्या अभिचारात्मक मंत्रांचे वेदत्व मान्य होणे शक्य नव्हते, म्हणून मग सारे विखुरलेले मंत्र एकत्र करून ब्रह्मवेद या नावाने त्यांना प्रतिष्ठा प्राप्त करून देण्यात आली. अथर्ववेदातील मंत्रांचा गृह्यकर्माशी विशेष संबंध असल्यामुळे ब्रह्मा हा ऋत्विज अथर्ववेदी असावा असे ठरविण्यात आले. यावरून किंवा पुढे वेदान्तात विकास पावलेल्या ब्रह्मविद्येचा उगम अथर्ववेदात झाला आहे, म्हणूनही त्याला ब्रह्मवेद म्हणू लागले असावे.

अथर्ववेद हा पुरोहितांचा वेद समजला जातो. त्यात शांतिक, पौष्टिक, घोर, अभिचार, इ. अनेक प्रकारच्या कर्मांचा समावेश

होत असल्यामुळे त्या वेदाचे अध्ययन केलेल्या ब्राह्मणालाच पुरोहित नेमावे, असे सांगितले आहे. राजाच्या शांतिक आणि पौष्टिक कर्मांचे संपादन पुरोहिताने अथर्ववेदाच्या आधारेच करायचे असे. अशा राजपुरोहिताचा राजकारणात आणि युद्धातही मोठाच अधिकार असे. तो खऱ्या अर्थाने 'पुरोहित' (=पुढे राहणारा) असे. 'ज्या राज्यात अथर्ववेत्ता वास्तव्य करतो, त्या राष्ट्राचे सर्व उपद्रव शांत होऊन त्याला समृद्धी प्राप्त होते', असे याच्या परिशिष्टात म्हटले आहे.

अथर्ववेदाला क्षत्रवेद म्हणायचीही रूढी आहे. युद्धात शत्रूचा पराभव व्हावा म्हणून अथर्ववेदात अनेक कर्मे सांगितली आहेत. राजकर्माणि या नावाचा बराच मोठा सूक्तसंग्रह अथर्ववेदात आहे. ही सर्व कर्मे करण्याचे काम राजपुरोहिताकडे असे. काही विधी खुद्द राजानेच करायचे असत.

महाभाष्य, चरणव्यूह इत्यादींच्या मते 'नवधा आथर्वणो वेदः' = या वेदाच्या नऊ शाखा आहेत. त्यांची नावे अशी –

(१) पैप्पल (२) दान्त (३) प्रदान्त (४) स्नात (५) सौत्र (६) ब्रह्मदावन (७) शौनक (८) देवदर्शनी व (९) चारणविद्या. अन्य मते ही नावे पुढीलप्रमाणे –

(१) पैप्पलाद (२) तौदायन (३) मौदायन (४) शौनक (५) जाजल (६) जलद (७) ब्रह्मवेद (८) देवदर्शन व (९) चारणवैद्य.

वर उल्लेखिलेल्या शाखांपैकी शौनक आणि पैप्पलाद या दोनच शाखा सध्या उपलब्ध आहेत. या दोन्ही शाखांचे मुद्रण रोथ आणि व्हिटने या दोघा पाश्चात्त्य पंडितांनी केले आहे. व्हिटनेने तर संपूर्ण अथर्ववेदाचे इंग्रजी भाषांतर केले आहे. डॉ. रघुवीर यांनी पैप्पलाद शाखेची संशोधित आवृत्ती व पं. सातवळेकरांनी शौनक संहिता प्रसिद्ध केली आहे.

पैप्पलाद– ही शाखा पिप्पलाद मुनीच्या नावावर आहे. हा ऋषी थोर अध्यात्मवेत्ता होता. याने सुकेश, भारद्वाज, इ. सहा मुनींचे जे शंकासमाधान केले, ते प्रश्नोपनिषदाच्या रूपाने प्रसिद्ध आहे. याच्या शाखेची संहिता २० कांडांची आहे.

शौनक – अथर्ववेदाची ही संहिता २० कांडे, ३४ प्रपाठक, १११ अनुवाक, ७७३ वर्ग, ७६० सूक्ते, ६,००० मंत्र व ७३८२६ शब्द अशा प्रकारे विभागली गेली आहे. सूक्तसंख्येच्या बाबतीत मतभेद आहेत.

अथर्ववेदाची भाषा सामान्यतः ऋग्वेदाच्या भाषेसारखी असली तरी, काही ठिकाणी ती ऋग्वेदकालानंतरची वाटते. यात लोकभाषेतल्या शब्दांचा वापर अधिक दिसतो, असे सांगून तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी पुढे लिहितात –

अथर्ववेदाचा काळ काटेकोरपणे सांगणे अवघड आहे. तथापि तो ऋग्वेदकालानंतरचा आहे. ह्याची प्रमाणे अथर्ववेदात आलेल्या विविध विषयांच्या वर्णनांवरून मिळतात. आर्य गंगेच्या प्रदेशात स्थायिक झालेले दिसतात. भारताच्या पूर्व आणि आग्नेय दिशेकडे ते बरेच सरकलेले दिसतात. यमुना आणि वरणावती या नद्यांचे उल्लेख येतात. बंगालमधील दलदलीच्या प्रदेशात वावरणारा वाघ अथर्ववेदात प्रथमच दिसतो. आर्य आणि दस्यू यांच्यामधील भेदभाव तीव्रतर झाल्याचे आढळते. ब्राह्मणांचे महत्त्व वाढल्याचा प्रत्यय येतो. चातुर्वर्ण्य स्थिरावलेले दिसते. ऋग्वेदातील अग्नी, इंद्र, इत्यादी देवता येथेही दिसतात, परंतु राक्षसांचा नाश करणे एवढेच त्यांचे मुख्य कार्य झालेले दिसते. अथर्ववेदातील तत्त्वज्ञानपरिभाषाही बरीच विकसित झालेली अशी आहे. अथर्ववेदातील काही भाग मात्र ऋग्वेदाइतकाच जुना आहे.

अथर्ववेदाच्या मंत्रांचे संकलन विशिष्ट उद्देश डोळ्यांपुढे ठेवून केलेले असल्यामुळे, त्याची रचना कृत्रिम व विस्कळीत आहे. ऋग्वेदाप्रमाणे मंडलरचना, देवतांचा क्रम, ऋषींचा निर्देश, या गोष्टींची सुबद्धता अथर्ववेदात आढळत नाही. १ ते ५ कांडांतल्या सूक्तांत अनुक्रमे ४ ते ८ मंत्र आहेत. ६ व्या कांडातली बरीच सूक्ते एक किंवा दोनच मंत्रांची आहेत. ८ ते १२ या कांडांतली सूक्ते मोठी असून, त्यांत विषयवैचित्र्य आढळते. १३ ते १८ या कांडांत विषयांची एकरूपता दिसते. १५ व १६ ही दोन कांडे गद्यमय आहेत. शेवटची दोन कांडे खिल कांडे या नावाने ओळखली जात असून, ती मूळ संहितेला मागाहून जोडली गेली, असे मानतात. शेवटच्या कांडाची मंत्रसंख्या सुमारे १ हजार असून, हे मंत्र सोमयागासाठी घेतलेले आहेत. एकूण अथर्ववेदाचा एकपंचमांश भाग ऋग्वेदातून घेतलेला आहे. वर्तमान ऋग्वेदात नसलेली, पण त्याच्या कोणत्या तरी शाखेतून ग्रहण केलेली कुन्ताप नामक सूक्ते अथर्ववेदाच्या शेवटच्या कांडात असून, त्याची संख्या १० आहे. कौषीतकी ब्राह्मणावरून (३०.५) कळते, की या सूक्तांचा उपयोग यज्ञविधानात आवश्यक म्हणून होत होता. या सूक्तांत परीक्षित राजा आणि त्याचे राष्ट्र यांचे विशद वर्णन आहे. त्यामुळे या सूक्तांना ऐतिहासिक मूल्य प्राप्त झाले आहे. अथर्ववेदाची भाषा सोपी असून, तिला नियमबद्धता कमी आहे.

पैप्पलाद शाखेचे कोणतेच उपग्रंथ सापडत नाहीत.

शौनक शाखेचे मात्र उपग्रंथ उपलब्ध आहेत. गोपथ ब्राह्मण हे अथर्ववेदाचे एकमेव ब्राह्मण होय. प्रश्न, मुंडक, मांडूक्य ही तीन उपनिषदे अथर्ववेदाची आहेत. वैतान व पैठीनसी श्रौतसूत्रे सुमन्तुधर्मसूत्र व कौशिक गृह्यसूत्र अशी सूत्रे आहेत. याचे एक प्रातिशाख्यही आहे. नक्षत्रशांती, अंगिरस, यांसारखी कल्पे परिशिष्टात आहेत.

प्राचीन मानवसमाजाच्या नाना प्रकारच्या क्रिया, अनुष्ठाने, संकेत, श्रद्धा, टोणेटोटके, या सर्वांचे विशद वर्णन अन्य वेदांपेक्षा अथर्ववेदातच विशेषत्वाने पाहायला मिळते. समाजशास्त्राच्या अभ्यासकाला अथर्ववेद हा एक बहुमोल आणि समृद्ध असा साहित्यनिधी आहे. वैद्यक शास्त्रातली प्रगती, राष्ट्रविषयक विचार व व्यवहार, स्त्री-पुरुषसंबंध, देवघेव, लोकभ्रम, संकेत, अध्यात्म, इ. अनेक विषयांचे ज्ञान अथर्ववेदाच्या अध्ययनाने मिळते.

प्रतिपाद्य विषयांच्या दृष्टीने अथर्ववेदाचे पृथक्करण केल्यास त्यात १४४ सूक्ते आयुर्वेदासंबंधी, २१५ सूक्ते राजधर्मासंबंधी, ७५ सूक्ते समाजव्यवस्थेसंबंधी, ८३ सूक्ते अध्यात्मासंबंधी व २१३ सूक्ते विभिन्न विषयांसंबंधी आहेत.

आयुर्वेदविषयक सूक्तांत मानवशरीराच्या समस्त अवयवांचे वर्णन असून, ज्वर, गंडमाळा, कुष्ठ, राजयक्ष्मा, इ. रोगांची नामोल्लेखपूर्वक चिकित्सा आहे. भूत-प्रेत-राक्षस यांच्या बाधेमुळे नाना प्रकारे रोग संभवतात, अशी अथर्ववेदातली कल्पना आहे. तदनुसार त्या त्या रोगांचे निर्मूलन करणारे मंत्रही त्यात दिलेले आहेत. मानवाची या जगात दीर्घकाल जगण्याची आकांक्षा आणि मृत्यू टाळण्याचा त्याचा प्रयत्न या दोन कल्पना अथर्ववेदात प्रामुख्याने आढळतात. दीर्घायुष्याची कामना करणारी कितीतरी सूक्ते अथर्ववेदात आहेत. कौटुंबिक उत्सव आणि गृह्यसंस्कार यांच्या प्रसंगी ही सूक्ते म्हटली जात. पुढील सूक्त त्यातलेच आहे–

पश्येम शरदः शतम् । जीवेम शरदः शतम् ।
बुध्येम शरदः शतम् । रोहेम शरदः शतम् ।
पूषेम शरदः शतम् । भवेम शरदः शतम् ।
भूयेम शरदः शतम् । भूयसीः शरदः शतात् ।
(अथर्व. १९.६७)

अर्थ – आम्ही शंभर वर्षे पाहू, शंभर वर्षे जगू, ज्ञान प्राप्त करू, वाढू, पुष्ट होऊ, अस्तित्व राखू व शंभर वर्षांहूनही अधिक वर्षे (हे सर्व मिळवू).

दीर्घायुष्यासाठी हातात रक्षासूत्र किंवा मणी बांधण्याचे विधानही अथर्ववेदात सांगितले आहे (१९. २७, २८). केवळ वैद्यक दृष्ट्याही रोगचिकित्सेचे ज्ञान अथर्ववेदात बरेच प्रगत झालेले दिसते. विशिष्ट विकारांसाठी पृश्निपर्णी, आघाडा, पिंपळी, इ. वनस्पतींचे प्रयोग तिथे सांगितले आहेत.

राजधर्माचे अनेक अंगांनी केलेले विवरण हे अथर्ववेदाचे वैशिष्ट्यच होय. तिथे विशुद्ध लोकतंत्रात्मक राज्यव्यवस्थेचा निर्देश केलेला आहे. त्या काळी प्रजेकडून राजा निवडला जात असे. या गोष्टीचा उल्लेख 'त्वां विशो वृणतां राज्याय' (= तुला प्रजा राजा म्हणून वरोत) या मंत्रात (३. ४. २) मिळतो. अथर्ववेदात राजाची निवड, त्याचे अधिकार, त्याचे सामर्थ्य व कर्तव्य, यांविषयी स्पष्ट उल्लेख आहेत. चौथ्या कांडातले ८ वे सूक्त राज्याभिषेकासंबंधी आहे. त्यात राजाच्या अंगावर पवित्र जलाचे सिंचन करणे व त्याने वाघाच्या किंवा बैलाच्या कातड्यावर बसणे, या दोन महत्त्वाच्या क्रिया सांगितल्या आहेत. त्या प्रसंगी राजा आपल्या प्रजेला अभिवचन देतो, की –

अहं राष्ट्रस्याभीवर्गे निजो भूयासमुत्तमः ।
(अथर्व. ३. ५. २)

अर्थ – मी राष्ट्रातल्या जनांमध्ये त्यांचा म्हणून राहीन व प्रजेच्या विश्वासाला पात्र ठरेन.

राजा हा ईश्वरी अंश आहे, ही कल्पना अथर्ववेदात आढळत नाही; प्रजेच्या सामर्थ्याने आणि प्रेमाने तो श्रेष्ठ व समर्थ होतो असाच सूर त्यात आहे. सभा व समिती या त्या काळातल्या दोन राजकीय संस्था होत्या. त्यांच्या अनुमतीने राजा आपला कारभार चालवीत असे. त्या दोहोत सभा ही विद्वज्जनांची असल्यामुळे वरिष्ठ होती व न्यायदानाचे कामही तिच्याकडेच होते. समिती तिच्या धोरणाप्रमाणे सर्व राजकीय कार्ये पार पाडीत होती (१५. ९. २-३). राजा म्हणे, की 'सभा च मां समितिश्चावताम्' (=सभा आणि समिती माझे रक्षण करोत). राजा अशीही आकांक्षा धरी, की सभा-समितींच्या सदस्यांनी माझ्याबरोबर एका स्वरात बोलावे व आपण त्यांच्या ज्ञानाचा व शक्तीचा समुचित उपयोग करून घ्यावा (७.१३).

अथर्ववेदातली समाजव्यवस्थाही वर्णाश्रम-धर्मावरच आधारलेली आहे. समाजशास्त्राच्या सिद्धांतानुसार सामाजिक जीवनाचा मूल घटक म्हणजे कुटुंबसंस्था होय. या वेदाच्या तिसऱ्या कांडात कौटुंबिक जीवनाचे एक आदर्श चित्र रेखाटले आहे. त्या सूक्ताला सांमनस्य सूक्त असे नाव आहे. त्यातले काही मंत्र पुढीलप्रमाणे आहेत –

अनुव्रतः पितुः पुत्रो मात्रा भवतु सम्मनाः ।
जाया पत्ये मधुमतीं वाचं वदतु शन्तिवाम् ॥
मा भ्राता भ्रातरं द्विक्षन् मा स्वसारमुत स्वसा ।
सम्यञ्चः सव्रता भूत्वा वाचं वदत भद्रया ।
(अथर्व. ३. ३०. २-३)

अर्थ – पुत्र पित्याचा अनुगामी आणि मातेच्या मनाला अनुकूल होवो. पत्नी आपल्या पतीशी शांतिप्रद असे मधुर भाषण करो. भाऊ-भाऊ आणि बहिणी-बहिणी ही एकमेकांचा द्वेष न करोत. (तुम्ही सगळे) मनाने एक आणि समव्रत होऊन मंगल वाणीने भाषण करा.

घरे बांधणे, शेती करणे, अन्नधान्याचे उत्पादन वाढविणे,

इ. अनेक गोष्टींचे वर्णन अथर्ववेदात केलेले आहे. पतिपत्नींच्या प्रेमासंबंधीही अथर्ववेदात सुंदर सूक्ते आहेत. निरोगी सुदृढ शरीराप्रमाणेच स्त्रीपुरुषांच्या प्रेमभावनेचीही मानवी जीवनाला अत्यंत आवश्यकता आहे, असे अथर्ववेदात म्हटले आहे.

या वेदाचा चौथा प्रतिपाद्य विषय अध्यात्म हा आहे. 'अस्य वामस्य' हे ऋग्वेदातले अध्यात्मविद्येविषयीचे सूक्त अथर्ववेदातही आले आहे. अथर्ववेदात बहुदैवतवादाचे निराकरण करून एकेश्वरवादाची स्थापना केली आहे. (९. १०. २८). अथर्ववेदात कोणत्याही तत्त्वप्रणालीचे संपूर्ण दर्शन होत नसले, तरी तिथे ब्रह्म, आत्मा, जीव, मृत्यू, स्वर्ग, इ. कल्पना विखुरलेल्या स्वरूपात आढळतात. उपनिषदांतल्या ब्रह्मविषयक व आत्मविषयक कल्पनांचा उगम अथर्ववेदातच सापडतो. ऋषींचे तप, मंत्र आणि यज्ञकर्म, यांतून ब्रह्माची उत्पत्ती झाली, असा विचार तिथे आहे. आत्म्याला अमर आणि सर्वव्यापक असे म्हटले आहे. सृष्टिविज्ञानात जीव, ईश्वर आणि प्रकृती हे तीन नित्य पदार्थ अथर्ववेदात मानलेले आहेत. या तीनही पदार्थांचे स्वरूप आणि त्यांचा संबंध अलंकारिक भाषेत सांगितला आहे. (प्रकृतिरूप) वृक्षावर जीव आणि ईश्वर असे दोन पक्षी बसले आहेत, असे ते रूपक आहे. (३. ९. २०). जीवाने त्या ईश्वराचा साक्षात्कार करून घेतल्यानंतर त्याला परमानंदस्वरूप मोक्षाची प्राप्ती होते.

प्रजापती हा सर्व प्राणिमात्राचा प्रभू असून, तो सर्व प्रजांना जन्म देतो (७. १९. १). प्रजोत्पादन हे त्याचे मुख्य कार्य होय (५. २५. ५; ६. ११. २). त्याने उत्पन्न केलेल्या प्रजेचे पालनपोषण विराज् हा करतो. विराज् म्हणजे विश्व किंवा पृथ्वी होय. उपनिषदांत (श्वेता. १. ३) ज्याप्रमाणे काल हे मूलतत्त्व मानलेले आहे, त्याप्रमाणेच अथर्ववेदातही मानलेले आहे. मात्र तिथे ब्रह्म व काल ही दोन्ही तत्त्वे अभिन्न मानली आहेत.

कालो ह ब्रह्म भूत्वा बिभर्ति परमेष्ठिनम् ।
(अथर्व. १९. ५३. ९)

अर्थ – काल हाच ब्रह्म होऊन परमेष्ठीला (प्रजापती) धारण करतो.

अथर्ववेदातले अध्यात्मविषयक विचार पाहिले म्हणजे अथर्ववेद हा वेदकालीन यज्ञधर्म आणि उपनिषदांतील ब्रह्मविद्या यांच्या मधला सेतू आहे, हे कळून येते.

अथर्ववेदाशी संबंधित अशा उपनिषदांची संख्या भिन्न भिन्न पंडितांच्या मते भिन्न आहे. पण ज्यांच्या प्रारंभी 'भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः' हा शांतिपाठ आहे व शेवटी 'इत्यथर्ववेदे... उपनिषद् समाप्ता' हे वाक्य आहे, अशी ६८ उपनिषदे अथर्ववेदाशी निश्चतपणे संबंधित आहेत. इतर तीनही वेदांच्या मानाने अथर्ववेदाशी संबंध असलेल्या उपनिषदांची संख्या अधिक आहे. त्यावरून अथर्वणपरंपरा त्या काळी किती मान्यता पावली होती, ते समजून येते.

अथर्ववेदात धर्माव्यतिरिक्त इतर अनेक गोष्टींसंबंधी सूक्ते अधिक असल्यामुळे वैदिक धर्माचे अभिमानी त्याला प्रारंभी वेद मानीत नव्हते. पण पुढे यज्ञधर्म प्रस्थापित झाल्यावर ब्राह्मणसाहित्यात अथर्ववेदाला मान मिळू लागला. ब्राह्मणकालात अथर्ववेदी ब्राह्मण राजपुरोहित झाले होते. त्यांनी आपल्या वेदांतील सूक्तांचा व्यावहारिक उपयोग करून दाखविल्यामुळे त्या वेदाला मान्यता मिळाली असावी. पुढच्या कालात यज्ञधर्माविषयी अश्रद्धा हळूहळू वाढू लागली. तिला आळा घालण्यासाठी अथर्वण ऋषींनी नवीन संघटना उभी केली, भक्तीला महत्त्व दिले, अवतारवाद स्वीकारला. कृष्ण, रुद्र, शिव, इ. अनेक देवतांची उपासना करून ब्रह्मप्राप्ती होणे शक्य आहे, या नवीन विचारप्रणालीचा पुरस्कार करण्यासाठी अथर्वण उपनिषदे रचण्यात आली. त्यांच्या या प्रयत्नामुळे सनातन धर्माचा ऱ्हास थांबला. या अथर्वण उपनिषदांचे पाच वर्ग दिसतात ते असे –

(१) शुद्ध वेदान्तप्रतिपादक (२) योगमार्गाचा पुरस्कार करणारी (३) संन्यासधर्माचे प्रतिपादन करणारी (४) शैवमतप्रतिपादक व (५) वैष्णवमतप्रतिपादक.

त्रिमूर्तिकल्पना अथर्वण उपनिषदांतच उत्क्रांत झाली आहे. पंचायत पूजेचा उगमही तिथेच सापडतो. अशा प्रकारे शैववैष्णव उपासनांचा या उपनिषदांत समन्वय होऊन, त्यातून पुढे स्मार्त धर्माचा उदय झाला. मुंडकोपनिषद हे दशोपनिषदांतले उपनिषद असून, त्यात अथर्वणकुलातील अंगिरसाचा महिमा गुरू म्हणून वर्णिलेला आहे. तो ब्रह्मविद्या शिकवितो. द्वैत, अद्वैत, अमरत्व यांच्याविषयी पाठ देतो. आत्मोपनिषदात तर त्याने शुद्ध अद्वैतवाद प्रतिपादिला आहे. भगवद्गीतेतील बऱ्याच कल्पना अंगिरस ऋषीच्या विचारप्रणालींतून घेतलेल्या आहेत, असे विद्वानांचे मत आहे.

ऋग्वेदापेक्षा अथर्ववेदातले वातावरण अगदी वेगळे आहे. जादूटोणा हा अथर्ववेदातला एक प्रमुख विषय आहे. यातला यातुविद्या असे म्हणतात. ऋग्वेदातल्या बहुतेक देवता अथर्ववेदातही आल्या आहेत. पण तिथे त्यांचे स्वरूप बरेच पालटले आहे. निरनिराळ्या वर्गांतील लोकांनी निर्माण केलेल्या देवतांना अथर्ववेदातच मान्यता मिळाली. ऋग्वेदापासून अथर्ववेदापर्यंत पाहिल्यास अथर्ववेदात देवांची जागा भुते, खेते, रोग, मृत्यू यांनी व्यापलेली दिसते. भुते, खेते आणि राक्षस यांचा नाश करणे हे महत्त्वाचे काम अथर्ववेदातल्या देवतांना करावे लागते. ऋग्वेदातल्या स्वधिती आणि अन्य देवतांना आहुती पोचविण्याचे का

करणारा अग्नी अथर्ववेदात शत्रूवर विजय मिळविण्यासाठी केलेल्या अभिचार कर्माचा साहाय्यक बनला आहे. इथे यज्ञाला प्रतियज्ञ करून एखादा शत्रू यजमानाच्या फलप्राप्तीत बिघाड आणू शकतो. आणि अशा यज्ञाची हविर्द्रव्ये भाताचा कोंडा, पळसाची पाने, इ. हलक्या वस्तू असतात. म्हणून आपल्या यज्ञ-कर्माचा नाश होऊ नये, यासाठी संभाव्य शत्रूला आधीच मारून टाकण्याचे मंत्रतंत्र अथर्ववेदात दिले आहेत. हे मंत्रतंत्रात्मक विधी करताना वेळूचा एक तुकडा उभा चिरला जातो. ते शत्रूला चिरण्याचे प्रतीक आहे. अथर्ववेदात दुष्ट आत्मे व त्यांची अद्‌भुत शक्ती यांचाच विचार अधिक केलेला आहे. जादूटोणा करणारी माणसे आपल्या अंगीची शक्ती शत्रूवर घालतात, तिला कृत्या असे नाव आहे. या कृत्येचे विरोधी मंत्रही अथर्ववेदात आढळ-तात. दुस्वप्नांचे भय त्या काळी लोकांना फार वाटे; ती मृत्युसूचक समजली जात. अशी स्वप्ने पडू नयेत म्हणून अथर्ववेदाचे १६ वे कांड म्हणण्याची प्रथा होती. पिशाच, राक्षस आणि गंधर्व-अप्सरा, यांचा त्रास चुकविण्यासाठी अथर्ववेदातल्या दुसऱ्या कांडातल्या दुसऱ्या सूक्ताचा उपयोग करीत. शिवाय अजशृंगी वनस्पतीची धुरीही देत. निरनिराळ्या कारणांसाठी निरनिराळ्या प्रकारचे ताईत हाताला बांधीत. त्यासाठी औषधि–वनस्पतींचा उपयोग करीत. मंत्रसिद्ध अंगठ्याही वापरीत.

कृषी आणि पशू यांच्या समृद्धीसाठी अथर्ववेदात अनेक मंत्र दिलेले आहेत. शेतीची नांगरट करताना शुनासीर देवतेची प्रार्थना करीत. धान्य पेरताना ६ व्या कांडातले १४२ वे सूक्त म्हणत. पिकांची नीट वाढ होण्यासाठी व त्यांना भरपूर हवा, पाऊस मिळण्यासाठी मरुत् व पर्जन्य या देवतांची प्रार्थना करीत. गोधन वाढावे, यासाठी विशेष प्रकारचे विधी करीत. दुसऱ्या कांडातले २६वे सूक्त त्या कामी उपयोजीत. मार्गशीर्ष पौर्णिमेस आग्रहायण विधीच्या वेळी म्हटले जाणारे भूमिसूक्त (१२.१) अत्यंत महत्त्वपूर्ण असून, त्यांतला प्रत्येक मंत्र भूमीच्या भक्तीने ओत-प्रोत भरलेला आहे. त्यांतले काही मंत्र पुढीलप्रमाणे आहेत –

यस्यां पूर्वे पूर्वजना विचक्रिरे यस्यां देवा असुरानभ्यवर्तयन् ।
गवामश्वानां वयसश्च विष्ठा भगं वर्चः पृथिवी नो दधातु ।।५।।
यो नो द्वेषत् पृथिवि यः पृतन्याद् योऽभिदासान्मनसा यो वधेन।
तं नो भूमे रन्धय पूर्वकृत्वरि ।।१४।।
यस्यां वृक्षा वानस्पत्या ध्रुवास्तिष्ठन्ति विश्वहा ।
पृथिवीं विश्वधायसं धृतामच्छा वदामसि ।।२७।।
मा नः पश्चान्मा पुरस्तान्नुदिष्ठा मोत्तरादधरादुत ।
स्वस्ति भूमे नो भव मा विदन्
परिपन्थिनो वरीयो यावया वधम् ।।३२।।
निधिं बिभ्रती बहुधा गुहा वसु मणिं हिरण्यं पृथिवी ददातु मे ।
वसूनि नो वसुदा रासमाना देवी दधातु सुमनस्यमाना ।।४४।।
मल्वं बिभ्रती गुरुभृद् भद्रपापस्य निधनं तितिक्षुः ।
वराहेण पृथिवी संविदाना सूकराय वि जिहीते मृगाय ।।४८।।
उपस्थास्ते अनमीवा अयक्ष्मा अस्मभ्यं सन्तु पृथिवी प्रसूताः ।
दीर्घं न आयुः प्रतिबुध्यमाना वयं तुभ्यं बलिहृतः स्याम ।।६२।।

अर्थ––जिथे आमच्या पूर्वजांनी अद्‌भुत कार्ये केली, जिथे देवांनी असुरांना मारले आणि जी गाई, घोडे आणि पक्षी यांची माता आहे, ती भूमी आम्हांला तेज व ऐश्वर्य देवो (५). जे आमचा द्वेष करतात, जे सैन्यासह आमच्यावर चढाई करतात, जे मनातून आमचे वाईट इच्छितात आणि जे आम्हाला मारण्या-साठी उद्युक्त असतात, त्यांना हे शत्रुमर्दिनी, तू नष्ट कर (१४). जिथे चारी बाजूंना वृक्ष–वनस्पती उभ्या आहेत, त्या विश्वधारक पृथ्वीचे आम्ही गुणगान करीत आहो (२७). मागून-पुढून आणि वरून-खालून कोणीही आमच्यावर प्रहार करू नयेत. हे भूमी, तू मंगल कर. हिंसक, चोर आणि लुटारू यांना आमचा पत्ता न लागो. हे भूमी, अशा लोकांना तू पिटाळून लाव (३२). ही विविध वैभवशालिनी पृथ्वी मला मणी आणि सुवर्ण देवो. प्रसन्नवदना, वरदात्री आणि धनरत्नदायिनी अशी ही पृथ्वी आम्हाला अमित वैभव देवो (४४). लहानथोर पदार्थांना धारण करणारी व पापी आणि पुण्यवंत यांचा भार वाहणारी ही पृथ्वी आहे. हिला वराहरूपी ईश्वराने शोधून प्राप्त केले (४८). हे भूमी, तुझे प्रदेश रोग, क्षय आणि भय यांनी रहित होवोत. आम्ही दीर्घायू होऊ, सदा सावध राहू आणि तळहातावर शिर घेऊन तुझ्यासाठी सर्वस्वाचा त्याग करण्यासाठी तयार राहू (६२).

अथर्ववेदाची रचना ऋग्वेदानंतर झालेली असावी, हे त्यातील भाषा व छंद या अंतर्गत प्रमाणांवरून दिसून येते. अथर्ववेदात ज्या समाजाचे प्रतिबिंब दिसते, तो समाजही ऋग्वेदकालाहून अर्वाचीन आहे. अथर्ववेदातले आर्य हे सप्तसिंधूच्या प्रदेशातून बाहेर पडून पूर्व आणि दक्षिण या दोन दिशांना बरेच पुढे गेलेले दिसतात. ऋग्वेदात चातुर्वर्ण्याचा केवळ उल्लेख आहे, तर अथर्ववेदात चातुर्वर्ण्य प्रतिष्ठित झालेले दिसते.

अथर्ववेदाचे मूर्तिशास्त्रातले ध्यान हेमाद्रीने पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

अथर्वणाभिधो वेदो धवलो मर्कटाननः ।
अक्षसूत्रं च खट्वाङ्गं बिभ्राणोऽयं जनप्रियः ।।

अर्थ – अथर्ववेद हा शुभ्र वर्णाचा, माकडाच्या तोंडासारखे तोंड असणारा, यज्ञोपवीत आणि खट्वांग धारण करणारा व लोकांना प्रिय असणारा असा आहे.

[ रि. फि. अ.; वै. सा. सं.; वै. सा. रं. फो. लो.; म. ज्ञा. को.; हि. ध.; वै. नि. ]

**अथर्ववेदपरिशिष्ट** या ग्रंथात नित्य, वैयक्तिक व निरनिराळी पर्वे यांच्या वेळी करायची धार्मिक विधिविधाने सांगितली आहेत. यात आलेले काही विषय असे– नक्षत्रकल्प, राष्ट्रसंवर्ग, राजप्रथमाभिषेक, पुरोहितकर्म, आरात्रिक, तिलधेनुविधी, भूमिदान, तुलापुरुषविधी, हिरण्यगर्भविधी, हस्तिरथदानविधी, गोसहस्रविधी, वृषोत्सर्ग, इंद्रमहोत्सव, ब्रह्मयाग, स्कंदयाग अथवा धूर्तकल्प, अरणिलक्षण, यंत्रपात्रलक्षण, वेदिलक्षण, कुंडलक्षण, स्रुवलक्षण, हस्तलक्षण, ज्वालालक्षण, लघुलक्षहोम, कोटिहोम, गणमाला, घृतकंबल, अनुलोमकल्प, आसुरीकल्प, समुच्चयप्रायश्चित्ते, ब्रह्मकूर्चविधी, तडागादिविधी, पाशुपतव्रत, संध्योपासनविधी, स्नानविधी, तर्पणविधी, श्राद्धविधी, अग्निहोत्रहोमविधी, उत्तमपटल, चरणव्यूह, चंद्रप्रतिपदिक, ग्रहयुद्ध, राहुचार, कूर्मविभाग, दिग्दाहलक्षण, विद्युल्लक्षण, उत्पातलक्षण, सद्योवृष्टिलक्षण, गोशांती, अद्‌भुतशांती, स्वप्नाध्याय, अथर्वहृदय, भार्गवीये, इत्यादी.

इ. स. १९०९ मध्ये हा ग्रंथ रोमन लिपीत छापला होता. जॉर्ज मेलविल बोलिंग व जुलियस फॉन नेजलीन या दोन पाश्चात्य विद्वानांनी मोठ्या परिश्रमाने त्याचे संपादन केले होते. त्या ग्रंथावरून श्री. रामकुमार राय यांनी त्याचे देवनागरीत रूपांतर केले व त्याला हिंदी टीपा जोडल्या.

**अथर्ववेदशाखा** 'नवधाऽथर्वणो वेद:' (=अथर्ववेदाच्या शाखा ९ आहेत) (पातं. म. भा. पस्पशाह्निक). चरणव्यूहानुसार त्यांची नावे अशी– (१) पैप्पलाद (२) स्तौद (३) मौद (४) शौनकीय (५) जाजल (६) जलद (७) ब्रह्मवद (८) देवदर्श व (९) चारणवैद्य. यांतल्या सहा नावांच्या शुद्धतेबद्दल संदेह नाही. स्तौद, जलद व ब्रह्मवद या तीन नावांबद्दल संशोधनाची आवश्यकता आहे. ब्रह्मवद हे कदाचित् ब्रह्मपलश किंवा ब्रह्मवलही असू शकतील.

कृष्ण-द्वैपायनाचा चौथा शिष्य सुमंत याने अथर्वसंहितेच्या दोन शाखा बनवून कबंध नामक शिष्याला पढविल्या. बृहदारण्यकात (३.७) आरुणि-याज्ञवल्क्य संवादात कबंध आथर्वणाचे नाव येते. तो सुमंतूचाच शिष्य असावा. कबंधाने आपण मिळविलेल्या दोन शाखा पथ्य व देवदर्श या शिष्यांना पढविल्या. त्यांच्या नंतर या दोन शाखा ९ प्रकारे विभक्त होऊन विस्तारल्या. त्यांची नावे अशी –

**पैप्पलाद** – स्कंदपुराणाच्या नागरखंडानुसार पिप्पलाद हा याज्ञवल्क्याचा संबंधी व महाविद्वान होता. याची संहिता २० कांडांची व ब्राह्मण ८ अध्यायांचे आहे. ही संहिता सांप्रत उपलब्ध आहे. 'शं नो देवीरभिष्टये' हा अथर्ववेदाचा प्रथम मंत्र या शाखेचा आहे, असे छांदोग्य मंत्रभाष्यात गुणविष्णू सांगतो.

**स्तौद** – सायणाचा पाठ तौद असा आहे. बुद्धाच्या काळी कोसल देशात तौदेय्य अथवा तोदेय्य ब्राह्मण होते, ते या शाखेचे असावे (मज्झिम नि. २.५.१०).

**मौद** – पातं. महाभाष्याच्या काळात ही शाखा बरीच प्रसिद्ध असावी. अथर्व परिशिष्टात (२.४) जलद व मौद या शाखांच्या पुरोहितांकडून कृत्य करून घेणाऱ्या राजाचे राष्ट्र नाश पावते, असे म्हटले आहे. सांप्रत ही शाखा नाममात्र शिल्लक आहे.

**शौनकीय** – शौनक नावाचे अनेक ऋषी झाले आहेत. यातला आथर्वण शौनक कोणत्या गोत्राचा व देशाचा होता, ते अज्ञात आहे. शौनकीय संहितेत १८ च कांडे आहेत. कौशिक व वैतान ही सूत्रे शौनकीय शाखेशी संबंध दाखवितात. पंचपटलिकानुसार शौनकीय संहितेत एकूण ४६२७ मंत्र आहेत.

**जाजल** – विशेष माहिती उपलब्ध नाही.

**जलद** – जलदायन असाही पाठभेद आहे (अथर्वपरिशिष्ट अरणिलक्षण २).

**ब्रह्मवद** – याचे गोत्रनाम भार्गव असावे. कारण या शाखेचे वर्णन अथर्ववाङ्मयात भार्गव नामाच्या अंतर्गत मिळते.

**देवदर्श** – यांचा उल्लेख जाजलांच्या वर्णनात येतो. पाणिनीय गणपाठात देवदर्शन असे नाव आढळते.

**चारणवैद्य** – कौशिक सूत्राच्या (६.३७) व्याख्येत केशव लिहितो, की 'त्वमग्ने व्रतपा असि' व 'कामस्तदग्रे' ही सूक्ते चारणवैद्यांच्या तंत्रांत म्हटली जातात. वायू व ब्रह्म या पुराणांत या शाखेच्या संहितेची मंत्रसंख्या ६०२६ एवढी दिली आहे. या पुराणांच्या कालात ही संहिता विशेष प्रसिद्ध असावी. चरणव्यूहात सगळ्या अथर्ववेदाच्या शाखांची मिळून मंत्रसंख्या 'द्वादशैव सहस्राणि' (=बारा हजार) एवढी दिली आहे. [वै. वा. इ.]

**अथर्ववेदाचे उपग्रंथ** अथर्ववेदाच्या ९ शाखांपैकी शौनक शाखेचे मात्र उपग्रंथ सध्या उपलब्ध आहेत. गोपथ ब्राह्मण हे अथर्ववेदाचे एकमेव ब्राह्मण आहे. प्रश्नोपनिषद्, मुंडकोपनिषद् व मांडूक्योपनिषद् ही तीन उपनिषदे अथर्ववेदाची आहेत. वैतान श्रौतसूत्र, सुमंतुधर्मसूत्र, कौशिक गृह्यसूत्र, अशी तीन सूत्रे आहेत. याचे एक प्रातिशाख्यही उपलब्ध आहे.

अथर्वपरिशिष्टामध्ये नक्षत्रकल्प, शांतिकल्प, अंगिरसकल्प यांसारखी अनेक कल्पे आहेत. लक्षणग्रंथ आणि प्रायश्चित्ते यांचाही समावेश अथर्ववेद परिशिष्टामध्येच केलेला आहे. आयुर्वेद, सर्पवेद, पिशाचवेद, असुरवेद, इतिहासवेद आणि पुराणवेद हे अथर्ववेदाचे उपवेद समजले जातात.

**अथर्वा** एक प्राचीन उपाध्याय. ' थर्वतिश्चरतिकर्मा तत्प्रतिषेधः ' (= चित्तवृत्तिनिरोधरूप समाधीने संपन्न अशी व्यक्ती म्हणजे अथर्वा, असा भावार्थ) अशी त्याची व्याख्या निरुक्तात दिली आहे (११.२,१७). हा अग्निमंथनाच्या पद्धतीचा संशोधक असून (ऋ. ६.१६.१३), याने उत्पन्न केलेला अग्नी विवस्वानाचा दूत झाला, असे म्हटले आहे (ऋ. १०.२१.५). याच्या नावावरूनच अग्नीला अथर्वन असे एक नाव मिळाले आहे. ऋग्वेदात अनेक ठिकाणीं याचा उल्लेख येतो. याचा व इंद्राचा स्नेह होता. यज्ञ करून याने स्वतःला स्थैर्य मिळविले होते. वरुणाने याला एक कामधेनू दिली होती (अथर्व. ५.११; ७.१०४). हा ब्रह्मदेवाचा ज्येष्ठ पुत्र व स्वायंभुव मन्वंतरातला ऋषी आहे. शांती व चित्ती अशा याच्या दोन भार्या असून, याला धृतव्रत, प्रदध्यच् व अथर्वशिरस् असे तीन पुत्र होते. त्यांना आथर्वण असे म्हणतात. हा अंगिरस कुलातला पहिला असून, याचा अथर्ववेदाशी घनिष्ठ संबंध आहे. नहुष राजा इंद्रपदावर बसताच याने त्याचा वेदमंत्रांनी सत्कार केला. त्या वेळी नहुषाने त्याला वर दिला, की ' तुझ्या वेदाचे नाव अथर्वांगिरस् होईल व तुला यज्ञभाग मिळेल. ' [प्रा. च. को.]

**अथर्वांगिरस्** (१) अथर्वा व अंगिरा यांच्या अनुवर्ती पुरुषांना हे नाव आहे. यातले कित्येक पुरुष मंत्रद्रष्टे होते. यज्ञानुष्ठानात अथर्ववेदाचे विधिवत पालन होते, की नाही, यावर यांची देखरेख असे.

(२) ब्राह्मणग्रंथांत संपूर्ण अथर्ववेदासाठीही हे नाव येते (तै. ब्रा. ३. १२. ८. २; श. ब्रा. ११.५. ६. ७). काही पंडितांच्या मते अथर्व म्हणजे त्या वेदांतील पवित्र भाग (भेषजानि) व अंगिरस म्हणजे जादूटोण्याचा भाग (अभिचार) होय. पुराणात भिषज् आथर्वण व घोर आंगिरस या नावाचे दोन पुरुष आढळतात, त्यावरून वरील मताला पुष्टी मिळते. पाहा—अथर्वा, अथर्ववेद. [ वे. इं.; हिं. वि. को.]

**अथिपट्ट** तमिळनाडूमधला एक नायन्मार. हा नेगापट्टम येथील कोळी असून, जाळ्यात पकडलेल्या माशांपैकी मोठा मासा शिवाला देण्याचा याचा नेम होता. तेवढ्या भक्तीमुळे त्याला शिवकृपा लाभली. [पे. पु.]

**अदत्त** देऊनही जे दान ठरत नाही व ज्याचे पुण्यरूपी फल मिळत नाही, ते अदत्त होय. याचे विविध प्रकार पुढील श्लोकात दिले आहेत —

अदत्तं तु भयक्रोधशोकावेगरुजान्वितैः ।
तथोत्कोचपरीहासव्यत्यासच्छलयोगतः ।।
बालमूढास्वतन्त्रार्तमत्तोन्मत्तापवर्जितम् ।
कर्ता ममेदं कर्मेति प्रतिलाभेच्छया च यत् ।।
अपात्रे पात्रमित्युक्ते कार्यं वा धर्मसंहिते ।
यद्दत्तं स्यादविज्ञानाददत्तमिति तत् स्मृतम् ।।

अर्थ — भीतीने, रागाने, शोकाने व रुग्ण अवस्थेत दिलेले, त्याचप्रमाणे कार्याला प्रतिबंध करणाऱ्या अधिकाऱ्यांना लाच म्हणून दिलेले, ' हा माझे काम करील, ' या अपेक्षेने दिलेले, अपात्राला पात्र म्हणून दिलेले, काही न येणाऱ्याला चारी वेद जाणतो, असे समजून दिलेले आणि अज्ञानाने दिलेले, द्रव्यादी दान हे अदत्त अर्थात देऊन न दिल्यासारखेच होय. [ श. क. ]

**अदारिद्र्य षष्ठी** एक तिथिव्रत. षष्ठीच्या दिवशी उपवास अथवा एकभुक्त राहणे व सूर्यपूजा करणे, असा याचा विधी आहे. व्रतावधी एक वर्ष. भोजनात तेल व मीठ वर्ज्य. पायसाचे भोजन. फल — दारिद्र्यनाश. [ हिं. ध. ]

**अदिकल** केरळातील अंबलवासी जातिसमूहांपैकी एक वर्ग. हे मुळात ब्राह्मण होते; पण शंकराचार्यांनी घेतलेल्या सत्त्वपरीक्षेत हे टिकले नाहीत, म्हणून यांना हीन जाती स्वीकारावी लागली, असे सांगतात. ज्यांना मद्याचा नैवेद्य हवा असतो, अशा भद्रकाली, इ. देवतांच्या मंदिरांत हे पुजाऱ्याचे काम करतात. हे उपनयन करून जानवे घालतात, दहा वेळा गायत्री जप करतात. यांचे पौरोहित्य याच जातीचे लोक करतात. लग्न व वारसा या संबंधात मरुमक्कतायम् हा कायदा पाळतात. यांच्या बायका नम्पूतिरी बायकांसारखे दागिने घालीत असल्या, तरी त्यांना ताडपत्री छत्री वापरण्याचा व कुणबीण बरोबर नेण्याचा अधिकार नाही. हे आशौच दहा दिवस पाळतात. मंत्र, तंत्र व जादूटोणा, इ. अभिचारकर्म हा यांचा धंदा आहे. पाहा — अंबलवासी. [ का. ट्रा. स. इं. ]

**अदितिकुंड** कुरुक्षेत्रात, थानेसरापासून ५ मैलांवर असलेल्या अमीन नामक गावाच्या पूर्वेस दोन सरोवरे आहेत. त्यांपैकी एका सरोवराचे नाव अदितिकुंड असून, दुसऱ्या सरोवराचे नाव सूर्यकुंड आहे. अदितिकुंड हे बहुशः कोरडेच असते. सूर्यकुंडाला मात्र बाराही महिने भरपूर पाणी असते. या ठिकाणी पूर्वी कश्यप आणि अदिती यांचा आश्रम होता. इथेच अदितीच्या पोटी वामनावतार झाला, अशी समजूत लोकांत प्रचलित आहे. या ठिकाणी एक शिवमंदिर असून, दोन प्राचीन, लाल दगडाच्या मूर्ती आहेत. [ कल्याण — तीर्थांक ]

**अदिती** एक वैदिक देवता. अ + दिति = जिला मर्यादा नाही अशी. यास्काने हिला देवांची बलवती माता मानलेले आहे. ही विश्वाचीही माता आहे. ही आकाशाला आधार देते आणि पृथ्वीचे धारण करते. पण ऋग्वेदात हिचे स्वरूप मात्र निश्चित नाही. ही अखिल विश्वाला व्यापणाऱ्या दिव्य शक्तीची प्रतिमा असावी, असे वाटते. हिला एकदा दक्षाची कन्या म्हटले आहे, तर लगेच दक्ष हा तिचा पुत्र असेही म्हटले आहे. (ऋ. १०.७२.४). हिच्या आठ पुत्रांची नावे अशी – मित्र, वरुण, धाता, अर्यमा, अंश, भग, विवस्वान् व आदित्य.

हिला फक्त सातच पुत्रांची अपेक्षा होती. म्हणून आठव्या खेपेस तिने आपला गर्भ फोडला. तोच पुढे मार्तंड या नावाने प्रसिद्ध झाला. सात पुत्रांना घेऊन ती देवांकडे गेली आणि आठव्याला तिने आकाशात फेकून दिले (ऋ. १०.७२.८). हे आठ पुत्र म्हणजेच अष्ट वसू होत.

तैत्तिरीय संहितेत हिला विष्णुपत्नी म्हटले आहे (७.५.१४). ऋग्वेदात अदितिविषयक एकही संपूर्ण सूक्त नाही. प्रसंगवशात तिचा ऐंशी वेळा उल्लेख मात्र आला आहे. हिला देवी असे म्हटले असून, प्रातःकाल, मध्याह्न व सायंकाल असे त्रिकाल तिचे आवाहन करावे, असे सांगितले आहे.

वैदिक ऋषींना अभिप्रेत असणारे अदितीचे पृथ्वीरूप स्पष्ट करताना डॉ. रा. चिं. ढेरे लिहितात –

देवमाता अदिती आणि पृथ्वी यांना वैदिक ऋषींनी कधी भिन्नरूप, कधी समरूप तर कधी एकरूप मानले आहे भूमी ही जनयित्री आहे, धात्री आहे, पृथ्वी आहे, मही आहे. अदिती हीही पृथ्वीप्रमाणे 'मही माता' आहे (ऋ. १.७२.९; ९.७४.५). ती 'अष्टयोनि' आहे, अष्टपुत्रा आहे. तिने सात दिव्य पुत्रांना– आदित्यांना – जन्म दिला. आणि आठवे गर्भांड फोडले. परंतु आदित्यांनी सृष्टिसातत्यात भाग घेण्याचे नाकारल्यामुळे तिला ते मृत गर्भांड (मार्तंड) पुन्हा सचेत करून पोसावे लागले. जनन आणि मरण यांचे हे चक्र निरंतर भिरभिरते राखण्यासाठी तिने त्या मृत गर्भांडाचे पुन्हा अभिसरण केले.

**प्रजायै मृत्यवे वत् पुनर्मार्ताण्डमभिमरत् ॥**

(ऋ. १०.७२.९)

**अर्थ** – हे मार्तंडा, प्रजनन आणि मरण यांसाठी मी पुनः तुझे अभिभरण केले.

वैदिक ऋषींनी वर्णिलेले आदितीच्या दिव्य चरित्रातले हे पर्व तिची पृथ्वीरूपता गाजवणारे आहे, यात संशय नाही. सृष्टिसातत्यासाठी 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' आवश्यक आहे; म्हणूनच प्रजनन आणि मरण यांसाठी मृत गर्भांडाला पुनः अभिभृत करणारी अदिती ही, जनन-मरणांने युक्त असे सृष्टिसातत्य ऋतुचक्राच्या साहाय्याने राखणाऱ्या पृथ्वीशी एकरूप ठरते.

अदितीचे हे पृथ्वीशी एकरूपत्व एकदा स्पष्ट झाले, की स्वाभाविकच पृथ्वीचे आणखी एक रूप असणाऱ्या रेणुकेचे स्मरण होते. आणि मग साहजिकच अदिती-पृथ्वी यांच्याप्रमाणेच अदिती-रेणुका यांच्या एकरूपत्वाचाही अनुबंध प्रतीत होऊ लागतो.

जनन-मरण-पुनर्जनन या आऱ्यांनी युक्त असे गतिमान जीवनचक्र प्रवर्तित करण्यासाठी अदितीने आपल्या गर्भाशयात मृतांडाचे पुनश्च अभिभरण केले. ही अदितीच्या चरित्रातील अवस्था तिच्या पृथ्वीरूपतेची द्योतक आहे. जीवनचक्र प्रवर्तित करणारी अदिती ही पृथ्वी आहे आणि केवळ सर्जनेंद्रियाच्या रूपात पूजिली जाणारी रेणुका नाम व रूप या उभय दृष्टींनी पृथ्वीच आहे. तेव्हा अदिती आणि रेणुका एकच असल्याची श्रद्धा रेणुकेच्या उपासनेत दृढावलेली आढळली, तर आश्चर्य वाटण्याचे कारण नाही.

स्कंदपुराणाच्या सह्याद्रिखंडात समाविष्ट असलेले माहूरच्या रेणुकेचे जे माहात्म्य रचले गेले आहे, त्यात रेणुका ही अदितीचा अवतार असल्याची श्रद्धा अभिव्यक्त झालेली आहे.

अदिती ही मित्रावरुणांची व त्याचबरोबर अर्यम्याचीही माता असल्यामुळे तिला राजमाता, वीरपुत्रा अशी नावे मिळाली आहेत. अथर्ववेदात (६.४) हिचे भाऊ व पुत्र या दोहोंचाही निर्देश आहे. वाजसनेयी संहितेत (२१.५) हिला स्तोत्याची महान माता, ऋताची अधिष्ठात्री, पराक्रमी, रक्षणकर्त्री व मार्गदर्शक म्हणून गौरविले आहे. अशा प्रकारचे व आदित्यांबरोबर येणारे तिचे उल्लेख पाहिले असता, मातृत्व हा अदितीचा विशेष गुण आहे असे दिसते. पस्त्या या तिच्या विशेषणानेही बहुधा हेच सूचित केलेले असावे. विपत्ती, अपराध किंवा पाप यांपासून मुक्त होण्यासाठी ऋग्वेदात अदितीचे अनेकवार आवाहन केले आहे.

अदिती, आप व पृथ्वी यांच्यापासून देव उत्पन्न झाले (ऋ. १०.६३.२). एका ठिकाणी अदितीला विश्वसृष्टीची मूर्ती म्हटले आहे. अदिती ही आदित्यांची माता असल्यामुळे तिच्याकडे प्रकाशाची याचना केलेली आहे व तिच्या अक्षय्य प्रकाशाची स्तुतीही केलेली आहे (ऋ. ७.८२). उषेला अदितीचे मुख असे म्हटले आहे. ऋग्वेदात व वाजसनेयी संहितेत तिला गौः असे संबोधिले आहे. संस्कारविधीत जी गाय लागते, तिला सामान्यतः अदिती असे म्हणत.

मैनाक पर्वताच्या मध्यावर असलेल्या विनशन नामक तीर्था वर अदितीने चरू शिजविला होता (म. भा. वन. १३५). हे युगांत पुत्रप्राप्त्यर्थ सतत एका पायावर उभे राहून तिने अशी तपश्चर्या केली व नंतर तिला विष्णू हा पुत्र झाला (म. भा. अनु. ८३). विष्णूच्या आधी हिला अकरा पुत्र होते. [ वै. को.; वै. मा.; प्रा. च. को.; लज्जागौरी ]

**अदितीष्टी** दर्शेष्टी झाल्यावर अदितीसाठी तुपात शिजविलेल्या चरूचा याग करावा, असे काही श्रौतसूत्रांत सांगितले आहे. एकदा या यागाचा उपक्रम केला, की प्रत्येक दर्शेष्टीबरोबर ही इष्टी केली पाहिजे, असा नियम आहे. पशुकाम यजमानाने ही इष्टी करावी, असे मानव श्रौतसूत्रात सांगितले आहे (१. ३. २९). कामना पुरी होईपर्यंतच ही इष्टी करावी, असेही एक मत आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**अदिन बोंगाकू** मुंडा, वेड्डा, इ. आदिवासींचा ग्रामदेव. याची उपासना हे पितरोपासनेचे प्रतीक आहे. या देवाचा सिम बोंगा या देवाशी संबंध आहे. या देवाची वर्षातून एकदा सामुदायिक समाराधना होते. अदिन बोंगाकू व सिम बोंगा यांच्या समागमे सर्व पितर असतात, अशी त्यांची समजूत आहे. ते लोक आपल्या मृत व्यक्तींच्या आवडी लक्षात घेऊन, त्या त्या वस्तू अदिनच्या छपरावर ठेवतात. [ एन्सा. मुंडा ]

**अदियान** द. भारतातली एक जात. या शब्दाचा मूळ अर्थ गुलाम असा आहे. हे जमीनदारांच्या शेतीचे संरक्षक होते. प्रत्येक अदियानला आपल्या जमीनदारास काहीतरी वार्षिक खंडणी द्यावी लागत असे व त्याच्या घरी वेठबिगार करावी लागत असे. [ का. ट्रा. स. इं. ]

**अदुःख नवमी** भाद्र. शु. ९ मीचे नाव. विशेषत: स्त्रियांकरिता या दिवशी तिथिव्रत असते. व्रताचा अवधी नऊ वर्षांचा असतो. व्रतदेवता गौरी असते. उपवास, पूजा व जागरण या तीन्ही गोष्टींना या व्रतात महत्त्व आहे. स्त्रिया प्रातःकाली नदीवर स्नान करून मौन धरून घरी येतात व कलशावर पूर्णपात्रात गौरीची स्थापना करतात. मग पुढील मंत्राने ध्यान करतात —

दिव्यपात्रधरां देवीं विभूतिं च त्रिलोचनाम् ।
दुग्धान्नदाननिरतां गौरीं त्वां चिन्तयाम्यहम् ।

अर्थ — दिव्यपात्र धारण करणाऱ्या, ऐश्वर्यसंपन्न, त्रिलोचन, दूध आणि अन्न याचे दान करण्यात तत्पर, अशा हे गौरी, मी तुझे चिंतन करते.

नंतर पूजा, वायनदान व उपोषण. ते शक्य नसल्यास हविष्यान्नभोजन, रात्रौ नृत्य, गीत, कथाश्रवणादी कार्यांत जागरण. दशमीस देवीची उत्तरपूजा, विसर्जन, दंपतीभोजन व व्रतसंपूर्ती. नऊ वर्षे पूर्ण झाल्यावर उद्यापन. सुवर्णाच्या गौरीप्रतिमेची पूजा व दान. तिल, घृत, पायस यांचे हवन. नऊ दंपतींस वायन व भोजन, या व्रताची कथा अशी —

शापदग्ध अशा दोन अप्सरा कोंबडी आणि माकडीण यां रूपांनी जन्मल्या. दोघीही रानांत हिंडत होत्या आणि दोघींनाही पूर्वजन्माची स्मृती होती. एक दिवस अदुःख नवमी आली असता 'आपण गौरीचे व्रत करू या' असे कुक्कुटी मर्कटीस म्हणाली. कुक्कुटीने उपवास केला; पण मर्कटीला त्याचे विस्मरण होऊन तिने मोराची अंडी दिसली ती खाल्ली. आपण संपूर्ण उपवास केला, असे तिने खोटेच कुक्कुटीस सांगितले. पण कुक्कटीने तिचा खोटेपणा ओळखला व तिची निर्भर्त्सना केली. शेवटी दोघींनीही शंकराला शरण जाण्याचे ठरविले. त्यांनी शिवाची प्रार्थना करून देहत्याग केला. पुढे कुक्कुटी एका सच्छील ब्राह्मणाच्या घरी जन्माला आली. तिला नवराही चांगला मिळाला व पाच पुत्रही झाले. मर्कटी एका राजाची राणी झाली. पण तिला मात्र मूलच होईना. ती आपल्या मैत्रिणीचा मत्सर करू लागली. शेवटी तिच्या मनातला द्वेष इतका वाढला, की तिने आपल्या मैत्रिणीच्या पाचही पुत्रांना ठार मारून त्यांच्या शिरांचे वाण मैत्रिणीस धाडले. कर्मधर्मसंयोगाने त्या दिवशी अदुःख नवमी होती. कुक्कुटीला व्रत होते. त्या व्रताच्या पुण्याने तिचे पाचही पुत्र जिवंत होऊन परत आले. ही गोष्ट समजताच मर्कटीला अपार दुःख झाले व ती पश्चात्ताप करीत कुक्कुटीकडे आली. कुक्कुटीने तिला अदुःख नवमीचे व्रत सांगितले. राजाची राणी झालेल्या मर्कटीने ते यथासांग केले. मग तिलाही एक पुत्र झाला. पुढे त्या दोघींचे सख्य आमरण राहिले. [ व्रतराज ]

**अदृष्ट** एक दार्शनिक संज्ञा. अदृष्टाची व्याख्या अशी — 'न दृष्टम् । अतीन्द्रियो गुणः । शुभाशुभकर्मजन्यसंस्कारः' ( = न दिसणारे, इंद्रियांना अगम्य असा गुण. शुभ व अशुभ कर्मापासून उत्पन्न होणारा संस्कार.) कोणतेही कर्म केल्यावर त्याचे फल मिळेपर्यंत जो क्रिया व फल याचा संबंध राहतो, त्याला अदृष्ट असे म्हणतात. 'ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत' (=स्वर्गाची इच्छा करणाऱ्याने ज्योतिष्टोमयाग करावा), असे यागविधायक वाक्य आहे. तदनुसार याग केल्यावर स्वर्ग मिळेपर्यंत याग व स्वर्ग यांचा जो संबंध राहतो, तेच अदृष्ट होय.

नैयायिक अदृष्ट हा आत्मगुण मानतात. त्यांच्या मते धर्माधर्म हे अदृष्ट होत. अदृष्ट हे अन्यथानुपपत्ती या प्रमाणाने मानावे लागते. अदृष्ट मानल्याशिवाय स्वर्ग व याग यांचा कार्यकारणभाव उत्पन्न होत नाही.

**अद्भुत** अतर्क्य, विस्मयकारक अशी घटना. दैवी चमत्कारांचा समावेश अद्भुतातच केला जातो. मानवाला काही चमत्कार बुद्धी व हातचलाखी यांच्या मदतीने करता

येतात. त्यांची गणना मात्र अद्‌भुतात करता येत नाही.

अद्‌भुत घटना ही दुःखदायक किंवा विनाशकारी घटनांची पूर्वसूचना होय, अशी समजूत आहे. अशा प्रकारच्या अद्‌भुतांची शांती केली असता, भावी अरिष्ट टळते, अशीही समजूत आहे. कौशिक गृह्यसूत्रात (कंडिका ९२–१४१) अतिवृष्टी, दुर्भिक्ष, सूर्यग्रहण, भूकंप, देवतामूर्तीचे रडणे किंवा हसणे, तिला घाम येणे, ती सरकणे, गायींनी दुधाऐवजी रक्त देणे, पावसातून तूप, मांस, सोने, इ. पदार्थांची वृष्टी होणे या घटनांचा समावेश अद्‌भुतात केला आहे. तिथे निरनिराळ्या अद्‌भुतांचे निरनिराळे शांतिविधीही दिले आहेत.

**अद्‌भुतकथा** यांना परीकथा, चमत्कार कथा अशी अन्य नावे आहेत. पाहा – लोकसाहित्य (खंड ८ वा).

**अद्‌भुत ब्राह्मण** सामवेदाचे एक ब्राह्मण. यात शुभाशुभ शंकुन, अद्‌भुत गोष्टी व भविष्ये यांचे वर्णन आहे. [ क्ला. डि. हिं. मा. ]

**अद्‌भुत रस** काव्यातला एक रस. ' विस्मयोद्‌भुतमाश्चय चित्रम् ' ( अमर ). विस्मय हा रसाचा स्थायी भाव होय. रसतरंगिणीमध्ये या रसाचे लक्षण दिले आहे ते असे –

**विस्मयस्य सम्यक् समृद्धिः अद्‌भुतः सर्वेन्द्रियाणां ताटस्थ्यं वा ।**

अर्थ – विस्मयाची चांगल्या प्रकारे समृद्धी अथवा सगळ्या इंद्रियांना तटस्थता किंवा स्तंभ प्राप्त होणे, याला अद्‌भुत रस म्हणतात.

जेव्हा एखाद्या कविकृतीत विस्मय हा स्थायीभाव पूर्णपणे प्रकट होऊन, सगळी इंद्रिये त्या विस्मयाने अभिभावित होऊन काही काल निश्चेष्ट बनतात, तेव्हा अद्‌भुतरसाची निष्पत्ती होते. याची उत्पत्ती वीररसातून होत असल्याचे भरत सांगतो. त्याच्या मते याचा वर्ण पीत व देवता ब्रह्मा आहे. विश्वनाथाच्या मते याची देवता गंधर्व आहे.

सरस्वतीकंठाभरण या ग्रंथात विस्मयाची व्याख्या पुढीलप्रमाणे दिलेली आहे –

**विस्मयश्चित्तविस्तारः पदार्थातिशयादिभिः ।**

अर्थ – एखाद्या अलौकिक पदार्थाच्या ज्ञानाने उत्पन्न होणारा चित्ताचा विस्तार म्हणजे विस्मय होय.

विश्वनाथाने विस्मयाला चमत्काराचा पर्याय मानले असून, तोच या रसाचा प्राण असल्याचे त्याने साहित्यदर्पण या ग्रंथात सांगितले आहे. त्याने या रसाच्या बाबतीत नारायणपंडिताचे पुढील मत उद्धृत केले आहे –

**रसे सारश्चमत्कारः सर्वत्राप्यनुभूयते ।**
**तच्चमत्कारसारत्वे सर्वत्राप्यद्‌भुतो रसः ।**
**तस्माद‌द्‌भुतमेवाह कृती नारायणो रसम् ।**

(सा. द. ३.३)

अर्थ – सर्व रसांत चमत्कार हा साररूपाने असतो व त्याच्या त्या साररूप अस्तित्वाने सर्वत्र अद्‌भुतरसच प्रतीत होतो आणि म्हणून नारायणपंडित अद्‌भुत हा एकच रस मानीत आहे.

मानसशास्त्रज्ञही विस्मयाला एक प्रधान भाव मानतात व जिज्ञासेतून त्याची प्रवृत्ती दाखवितात.

आदिमानवाला सभोवतीच्या अफाट पांचभौतिक निसर्गाच्या दर्शनाने सर्वप्रथम भय आणि विस्मय या दोन भावांचीच प्रतीती झाली असावी. कला किंवा काव्य यांच्या आकर्षणात विस्मयाची भावना प्रबल असते. त्यामुळेच अद्‌भुत रसाचे महत्त्व स्वयंसिद्ध आहे. जगन्नाथाच्या मते अद्‌भुतरस शृंगार व वीर या रसांना अविरोधी असतो, म्हणजेच त्या दोन रसांबरोबर अद्‌भुताची अवस्थिती होऊ शकते.

अद्‌भुत रसाचे एक उदाहरण पुढे दिले आहे–

**साक्षिया नेत्र हो । हा पहा कीं पहा ।**
**श्रीनिशेचा महाराष्ट्र-संसार हा ।**
**केवढा थोर हा, आणि भव्याकृति ।**
**ईश्वराची किती ही अगम्या कृति ।**

(चंद्रशेखर – तारातरं

रसभाव – विस्मय हा स्थायीभाव. अलौकिक वस्तू किं अलौकिकतेने युक्त असे वाक्य, शील किंवा कर्म हा आलंबन विभाव. त्यांच्या गुणधर्मांचे वर्णन हा उद्दीपनविभाव. थक्क मनाचा गोंधळ होणे, स्वर गद्‌गद होणे, डोळे ताठ होणे, हे अ भाव आणि हर्ष, भ्रांती, वितर्क हे या रसाचे व्यभिचारी भा होत. [ हिं. सा. को. ]

**अद्‌भुतशांती** घरातल्या खांबाला पालवी फुटली, काव घरात शिरला, गाय स्वतःचेच दूध प्या अग्नी नसताना धूर उत्पन्न झाला, कोणाला सर्पदंश झाला. कि अशासारख्याच आणखी काही अद्‌भुत गोष्टी घडल्या, तर अशुभ समजतात. अशा वेळी ही शांती करावी, असे बौधा गृह्यसूत्रात सांगितले आहे (३.६).

इंद्र ही या कृत्याची मुख्य देवता होय. तिला चरूच्या आ व इंद्राग्नींसाठी आज्याहुती देतात.

पूर्णाहुती झाल्यावर अवशिष्ट चरू शमीच्या पानावर ठेवतात. चरुस्थालीत पाणी घालून ते, ज्या जागी अशुभ असेल, त्या जागी ओततात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**अद्रिज – अद्रैस्ती** एक प्राचीन मानवगण. अद्रिज लोकांचा देश रावीच्या पूर्वेस पसरलेला होता. पिंप्रामा हा त्यांचा किल्ला होता. महाभारतात अद्रिजांचा उल्लेख आला आहे (द्रोण. १५९.५). हे लोक व ग्रीकांनी उल्लेखिलेले अद्रैस्ती हे लोक एकच असावे. यांना शिकंदराच्या सैन्यापुढे हार खावी लागली होती. [ हि. जॉ. ए. इं. ]

**अद्वय** द्वित्वभावरहित. महायान बौद्धांच्या दर्शनात भाव आणि अभाव यांच्या दृष्टीच्या पलिकडच्या ज्ञानाला अद्वय म्हटले आहे. यात अभेदाचे अवस्थान नसते. अद्वैत हे भेदरहित सत्तेचा बोध करते. अद्वैतात ज्ञानाच्या सत्तेला प्राधान्य असते, तर अद्वयात चतुष्कोटिविनिर्मुक्त ज्ञानाचेच प्राधान्य मानले जाते. या चतुष्कोटी अशा –

(१) अस्ति (आहे), (२) नास्ति (नाही), (३) अस्ति नास्ति (आहे नाही) व (४) नास्ति नास्ति (नाही नाही).

**अद्वयतारकोपनिषद** १०८ उपनिषदांपैकी ५३ वे उपनिषद्. शुक्ल यजुर्वेदात याचा समावेश असून, ब्रह्मप्राप्ती हा याचा प्रतिपाद्य विषय आहे. या उपनिषदात राजयोगाची तत्त्वे विशद केली असून शमदमादी षड्गुणयुक्त योगी, हा याचा अधिकारी मानलेला आहे. यातील प्रतिपादन पुढीलप्रमाणे –

जेव्हा योगी, मी चिद्रूप आहे, असे कल्पून भ्रूमध्यात अंतर्दृष्टीने सच्चिदानंद तेजोरूप ब्रह्माचे अवलोकन करतो, तेव्हा तो तारकरूप होतो. म्हणजे त्याची जन्ममरणाच्या फेऱ्यातून सुटका होते. ब्रह्मप्राप्तीसाठी तीन लक्ष्ये सांगितली आहेत, ती पुढीलप्रमाणे –

**अंतर्लक्ष्यलक्षण** – देहात सुषुम्ना नावाची ब्रह्मनाडी असते. तिचा आकार सूर्यासारखा व तेज चंद्रासारखे असते. ही नाडी मूलाधारापासून निघून ब्रह्मरंध्रात जाते. तिच्यामध्ये अतिशय बारीक पण कोटी विजांप्रमाणे लखलखीत अशी कुंडलिनी असते. तिचे मानसिक दर्शन झाल्याबरोबर पुरुषाच्या सर्व पापांचा नाश होतो व तो मुक्त होतो. ललाटभागी त्याला जर निरंतर कुंडलिनी दिसली, तर तो सिद्ध होतो. मग त्याच्या कर्णरंध्रात फूत्कारध्वनी उत्पन्न होतो. तर्जनीच्या अग्रांनी दाबल्याने आवाज बंद होतो. मन या स्थितीवर स्थिर झाले की, नेत्रांच्या मध्यभागी त्याला अंतर्दृष्टीने निळा तेजस्वी प्रदेश दिसतो व निरतिशय सुख लाभते.

**बहिर्लक्ष्यलक्षण** – जेव्हा पुरुष नासिकाग्राच्या पुढे क्रमाने चार, सहा, आठ, दहा व बारा अंगुळांवर निळ्या रंगाचे व लाल रंगाने मिश्रित परंतु वास्तविक नारिंगी रंगाचे असलेले आकाश पाहतो तेव्हा तो योगी होतो. आकाशाकडे पाहिले असता त्याला जेव्हा तेजस्वी किरण दिसतात, तेव्हा तो योगी होतो. मस्तकावर बारा अंगुळांच्या अंतरावर असे किरण दिसल्यास, तो अमर होतो.

**मध्यलक्ष्यलक्षण** – प्रातःकाळी त्याला सूर्याप्रमाणे मोठे बिंब दिसते. ते अग्नीप्रमाणे तेजस्वी व चित्रविचित्र रंगांचे असते. नंतर तो पुरुष तदाकार होतो व तेच दृश्य सतत पाहिल्याने त्याला आकाश गुणरहित दिसू लागते. त्यानंतर तेच आकाश त्याला कोटिसूर्यप्रकाशाने झळाळल्याप्रमाणे दिसते. तारकयोग्याला एकूण पाच प्रकारचे आकाश दिसते. हे सर्व ज्याला दिसते, त्याची फलापासून मुक्तता होते.

या उपनिषदात तारकयोगसिद्धी, तारकयोगाचे स्वरूप, शांभवी मुद्रा व आचार्यलक्षण हे विषय आले आहेत.

**अद्वयवज्र** (इ. स. चे ११ वे शतक) सिद्धसाहित्याचा एक प्रमुख टीकाकार व पंजिकाकार. सिद्धवाङ्मयातील रहस्यांची उकल करून दाखविण्यात अद्वयवज्र हा सिद्धहस्त आहे. सरहपादाच्या दोहाकोशगीती या सुप्रसिद्ध ग्रंथावरील अद्वयवज्राची संस्कृत पंजिका उपलब्ध आहे. अद्वयवज्र हा अत्यंत विद्वान होता. याशिवाय, सिद्धांच्या सहवासाचा लाभ मिळाल्यामुळे त्याला सिद्धचर्याही चांगली अवगत होती. दीपंकर श्रीज्ञान याचा तो विद्यागुरू होता. अद्वयवज्राचे जीवनचरित्र थोडक्यात पुढीलप्रमाणे –

हा नानूक व सावित्री या ब्राह्मण दंपतीचा मुलगा. जन्मनाम दामोदर. याने सामवेद व व्याकरणादी शास्त्रे यांचे अध्ययन केले. नंतर तो बौद्ध दर्शनांतही पारंगत झाला. त्यानंतर ज्ञानश्री मित्राचे प्रकरणग्रंथ व मंत्रशास्त्र यांचे शिक्षण घेतल्यावर तो विक्रमशिला नगरात जाऊन भिक्षू बनला. त्या वेळी त्याला मैत्रीगुप्त असे नवे नाव मिळाले. नंतर त्याने सिद्धी मिळविण्यासाठी पंचक्रम तारापद्धतीला अनुसरून चतुर्मुद्रांसहित एक कोटी जप केला. पुढे त्याला दक्षिण भारतात जाण्याबद्दल स्वप्नदृष्टान्त झाला. त्याला अनुसरून तो आंध्रातल्या धान्यकोट येथे गेला. तिथे उपवासव्रत घेऊन तारादेवीची उपासना करीत असता पुनश्च त्याला मनभंग व चित्रविश्राम या पर्वतांकडे जाण्याचा दृष्टान्त मिळाला. तिथेही तो गेला. त्याने तिथे निकराची साधना सुरू केली. अंती तो आपले मस्तकही तोडून घेण्यास सिद्ध झाला. मग त्याला ८४ सिद्धांतल्या शबरपाने साक्षात दर्शन दिले, आपला शिष्य म्हणून त्याला अभिषेक केला व पंचचक्र आणि चतुर्मुद्रा यांचा उपदेशही केला. त्याने त्याचे अद्वयवज्र असे नवे नाव ठेवले. अद्वयवज्राला सिद्ध बनण्याची तीव्र इच्छा होती; पण एवढे होऊनही ती मात्र सफल झाली नाही.

पुढे तो राजगृहात ( मगध ) जाऊन एकांतवासात राहिला. याला अवधूतीपा व मैत्रीपा अशी अन्य नावेही होती. याने अनेक ग्रंथांवर टीका लिहिल्या असून, त्यांपैकी अबोधबोधक, गुरुमैत्रीगीतिका, चतुर्मुद्रोपदेश, चित्तमात्रदृष्टी, दोहानिधि-तत्त्वोपदेश, चतुर्वज्रगीतिका, हे टीकाग्रंथ तिबेटातील संग्रहात आहेत. [ पु. त. नि.; पं. राहुल सांकृत्यायन, अजन्ता मासिक, सप्टेंबर १९५५; दो. को. ]

**अद्वयवज्रसंग्रह** वज्रयानपंथाचा एक ग्रंथ. हा सदर पंथाच्या विविध तत्त्वप्रणालींवर लिहिलेल्या रचनांचा संग्रह आहे. या ग्रंथात अन्य पूर्ववर्ती ग्रंथांपेक्षा पारमितासाधनेवर, विशेषतः प्रज्ञापारमितेवर भर दिलेला आहे. प्रज्ञापारमिता नसेल, तर इतर पाच पारमिता त्या पदावर अधिष्ठित होऊ शकत नाहीत. पंचपारमितांच्या बरोबरीने प्रज्ञापारमितेचे सतत सेवन केले तरच साधक सुखी आणि शांत होतो, असे या ग्रंथाचे प्रतिपादन आहे. [ तां. बौ. सा. सा. ]

**अद्वैत** शिवाचा एक अवतार. एकदा कुबेराने कैलासावर शिवमंत्राचा जप केला. तेव्हा शंकर त्याला 'वर माग' म्हणाला. कुबेराने त्याला आपला पुत्र होण्याविषयी प्रार्थिले. शिवाने जन्मांतरी त्याचा पुत्र होण्याचे मान्य केले. त्याप्रमाणे कुबेराला अद्वैत नामक पुत्र झाला, तोच हा अवतार होय. [श. क.]

**अद्वैतदर्शन** षड्दर्शनांपैकी एक प्रमुख दर्शन. याला वेदान्त, उत्तरमीमांसा व शांकरदर्शन अशीही अन्य नावे आहेत. हे दर्शन सकल अध्यात्मशास्त्रांचा मुकुटमणी आहे. शंकराचार्यांपूर्वीच्या दार्शनिक प्रवृत्ती व तार्किक विचार यांचा चरमोत्कर्ष या दर्शनात झाला आहे. श्रुतींचा चरम सिद्धान्त या अर्थी वेदान्त शब्दाचा प्रयोग उपनिषदांत झाला. उपनिषदांनाच वेदान्त अशी संज्ञा मिळाली. वेदान्ताची व्याख्या अशी –

**वेदशिरोभागो ब्रह्मप्रतिपादक उपनिषद्रूपो ग्रन्थविशेषः ।। अत्र उपनिषदर्थनिर्णायकत्वेन ब्रह्मसूत्राणामपि वेदान्तत्वमुपचर्यंते इति विज्ञेयम् । (न्यायकोश)**

अर्थ – वेदांचा शेवटचा भाग व ब्रह्मप्रतिपादक असा उपनिषद्रूपी ग्रन्थविशेष म्हणजे वेदान्त होय. ब्रह्मसूत्रे ही उपनिषदांच्या अर्थांची निर्णायक असल्यामुळे त्यांनाही वेदान्त ही संज्ञा लागू होते, असे जाणावे.

वेदान्तात सांगितलेल्या सर्व सिद्धान्तांचा मूलाधार म्हणजे उपनिषदे होत. ती वेदांतील रहस्यमय सिद्धान्तांची प्रतिपादक झाल्यामुळे त्यांनाच वेदान्त म्हणू लागले. पण उपनिषदांच्या सिद्धान्तांत एकवाक्यता नाही; इतकेच नव्हे, तर बऱ्याच ठिकाणी विरोधही आहे, असे जेव्हा दिसून आले, तेव्हा त्या विरोधाचा परिहार करून एकवाक्यता प्रस्थापित करण्याची आकांक्षा निर्माण झाली आणि तिच्या पूर्तीसाठी बादरायणमुनीने ब्रह्मसूत्रांची रचना केली. हा ५५० सूत्रांचा लहानसा ग्रंथ समस्त वेदान्तसिद्धान्तांचा आकरग्रंथ बनला आहे. ब्रह्मसूत्रांवर एकूण २४ आचार्यांनी भाष्ये किंवा व्याख्या लिहून आपापल्या भिन्नभिन्न दार्शनिक मतांची प्रस्थापना केली आहे.

या आचार्यपरंपरेत शंकराचार्य हे अलौकिक पुरुष होऊन गेले. त्यांची प्रगाढ विद्वत्ता, दिव्यदर्शी प्रतिभा व असाधारण तर्कपटुता, यांच्यापुढे कोणालाही नतमस्तकच व्हावे लागेल. प्रस्थानत्रयीचे आद्य भाष्यकार हेच होत. त्यांचे परमगुरू गौडपादाचार्य, हे अद्वैत तत्त्वज्ञानाचे पहिले आचार्य मानले गेले आहेत. त्यांचा मांडूक्यकारिका हा ग्रंथ म्हणजे अद्वैताचा पायाच समजला जातो.

अद्वैताची व्याख्या पुढीलप्रमाणे –

**न विद्यते द्वैतं द्विधा भावो यत्र तत् ।**

(सिद्धान्तबिंदु १०)

अर्थ – ज्याच्या ठिकाणी द्विधा भाव नाही ते अद्वैत होय.

नामरूपात्मक जग हे प्रातिभासिक असून ब्रह्मज्ञानाने त्याचा बोध होतो आणि अद्वैत (= द्विधाभावरहित) ब्रह्म तेवढेच शाश्वत अतएव सत्य असते. हेच उपनिषदे, ब्रह्मसूत्रे व गीता यांचे सार आहे, असे शंकराचार्य सांगतात. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः' हे त्यांच्या सिद्धान्ताचे सार होय. हाच अद्वैत शब्द घेऊन रामानुजांनी विशिष्टाद्वैत व मध्वाचार्यांनी शुद्धाद्वैत असा त्यात स्वमते फरक केला व त्या त्या नावाने आपले तत्त्वज्ञान उभारले.

परमार्थसत्तारूप ब्रह्माची एकता व नानात्वाने प्रतीत होणाऱ्या जगाची मायिकता, हा वेदान्त शास्त्राचा मूलमंत्र आहे. हा मंत्र यथार्थत्वाने अवगत होण्यासाठी अन्य काही सिद्धान्तांचा परिचय होणे आवश्यक आहे. आत्मज्ञानाची स्वयंसिद्धी हा वेदान्तातला एक मौलिक सिद्धान्त आहे. तो समजल्यावरच अन्य तत्त्वांचे अनुशीलन करता येईल.

**आत्मसत्ता** – जगत् हे अनुभूतीवर आधारलेले आहे. जगातील सर्व व्यवहार अनुभवालाच धरून चालतात. या अनुभूतींच्या विविध स्तरांत आत्म्याची सत्ता स्वयंसिद्ध आहे. ज्ञाता या रूपाने आत्म्याची उपलब्धी असल्यावाचून कोणत्याही विषयाचे ज्ञान संभवनीय नाही. प्रत्येक अनुभवाच्या प्रक्रियेत अनुभव घेणाऱ्याला स्वतःच्या सत्तेचा अनुभव अवश्यमेव होत असतो. प्रमाणादी सकल व्यवहारांचा आश्रय आत्माच आहे. कोणत्याही व्यवहाराच्या पूर्वीच आत्म्याची सिद्धी असते. त्याचे निराकरण

होऊ शकत नाही. कारण निराकरण आगंतुक वस्तूचें होते; स्वभावाचे नव्हे. उष्णता हा अग्नीचा स्वभाव आहे. अग्नी त्याचे निराकरण करू शकत नाही. शंकराचार्यांनी या सिद्धान्ताचे प्रतिपादन संक्षेपरूपाने केले आहे, ते असे –

सर्वांचा आत्म्याच्या अस्तित्वाविषयी संपूर्ण विश्वास असतो. असा कोणीही माणूस आढळणार नाही, की जो 'मी नाही' असे म्हणून आपले अस्तित्व नाकारील. म्हणून आत्म्याची सिद्धी स्वयमेव मानावी लागते (ब्र. सू. १. १. १ शां. भा.).

आत्मसत्ता ही स्वयंसिद्ध आहे, हे सांगण्यासाठी याज्ञवल्क्य म्हणतो –

**विज्ञातारम् अरे केन विजानीयात्**

(बृहदा. उप. २. ४. १४)

अर्थ – जो स्वतः ज्ञाता आहे त्याला दुसऱ्या कोणत्या साधनाने जाणावे ?

सूर्याच्या प्रकाशाने जग प्रकाशित होते; पण सूर्याला कोण प्रकाशित करील ? तद्वत् प्रमाणांच्या सिद्धीला प्रमाणभूत होणारा आत्मा कोणत्या प्रमाणांनी सिद्ध केला जाईल ? अर्थात् आत्मा हा स्वयंसिद्धच आहे.

प्रत्येक विषयानुभूतीत दोन अंश असतात – (१) अनुभव घेणारा आत्मा व (२) अनुभवाला विषयभूत होणारा ज्ञेय पदार्थ. व्यवहारी किंवा स्थूल दृष्टीला जीव आणि जगत् अशा दोन भिन्न व स्वतंत्र सत्ता दिसतात; पण सूक्ष्म दृष्टीने पाहिल्यास आत्मा हीच एकमेव सत्ता सिद्ध होते. या विशाल विश्वात आत्म्याहून भिन्न अशी एकही वस्तू नाही. नामरूपात्मक विकारांच्या आत सर्वत्र एकच आत्मस्वरूप चैतन्यरूपाने प्रकाशत आहे. प्रत्येक अनुभूतीत विषयी किंवा विषय आणि कर्ता किंवा कर्म या रूपात एकाच अखंड आत्म्याची उपलब्धी होत असते. शंकराचार्यांनी या सृष्टीला देश-काल यांच्या विचित्रतेने चित्रीकृत, असे म्हटले आहे. देश-काल हे मायाकल्पित असल्यामुळे तज्जन्य भेद हे केवळ काल्पनिक ठरतात. या जगात एकच अखंड सत्ता विद्यमान आहे आणि ती म्हणजे आत्मसत्ता ही होय. तिला जो जाणतो, तोच खरा तत्त्वज्ञानी.

**ब्रह्मस्वरूप** – या निर्विकल्प, निरुपाधिक व निर्विकार अशा आत्मसत्तेचेच नाव ब्रह्म असे आहे. ब्रह्म हेच परमार्थतः सत्य आहे. तसेच ते ज्ञानस्वरूप असून अनंतही आहे. 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' (तै. उ. २. १. १) ही श्रुती याविषयी प्रमाण आहे. उपनिषदांनी सगुण-निर्गुण अशा दोन्ही ब्रह्मांचे प्रतिपादन केले आहे; पण शंकराचार्यांच्या मते निर्गुण ब्रह्म हेच उपनिषदांचे प्रतिपाद्य आहे. त्यांनी ब्रह्माच्या स्वरूप-निर्णयासाठी ब्रह्माची दोन प्रकारची लक्षणे केली आहेत – (१) स्वरूपलक्षण व (२) तटस्थलक्षण. 'स्वरूपं सत् व्यावर्तकं स्वरूपलक्षणम्'= पदार्थाच्या सत्य, तात्त्विक स्वरूपाचा परिचय देणारे व इतर पदार्थांहून त्याला वेगळे करणारे ते स्वरूपलक्षण होय. 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' हे ब्रह्माचे स्वरूपलक्षण समजावे. इथे ब्रह्म हे विशेष्य असून सत्य, ज्ञान व अनंत ही तीन पदे त्याची विशेषणे आहेत. यातले सत्यम् हे विशेषण ब्रह्माला नामरूपात्मक विकारापासून निवृत्त करते. ज्ञानम् हे विशेषण जडत्वाची व्यावृत्ती करण्यासाठी आहे. इथे ज्ञान शब्दाचा अर्थ ज्ञप्ती किंवा जाणीव असा घेतला पाहिजे. अनन्तम् हे विशेषण मर्यादित पदार्थांच्या निवृत्तीसाठी आहे. वरील लक्षणांतील सत्य शब्द अबाधित सत्त्व या अर्थी, ज्ञान शब्द स्वप्रकाशचैतन्य या अर्थी व अनंत शब्द व्यापक या अर्थी आहे. ही तीन विशेषणे विशेष्याला म्हणजेच ब्रह्माला आपला अर्थ समर्पित करून विरुद्ध अर्थाचे निराकरण करतात. 'विज्ञानमानन्दं ब्रह्म' (बृहदा. ३. ९. २८) हेही ब्रह्माचे दुसरे स्वरूपलक्षण होय. या उभय लक्षणांवरून ब्रह्म हे सत् (सत्ता), चित् (ज्ञान) व आनंद म्हणजेच सच्चिदानंद आहे, असे सिद्ध होते.

ब्रह्माची अद्वैतता सिद्ध करण्यासाठी शंकराचार्य व त्यांचे अनुयायी चातुर्यपूर्ण युक्तिवाद करतात. ब्रह्म केवळ श्रुतीच्या आधारावरच प्रतिष्ठित नाही; तर त्याचे अस्तित्व युक्तिवादानेही सिद्ध करता येते.

कार्यकारणसंबंधांचा विचार केल्याअंती असे दिसते, की काय हे उत्पन्न होण्यापूर्वी कारणात विद्यमान असते. कार्य ही कारणाहून भिन्न अशी वस्तू नाही. मातीची बनविलेली गाडगी, मडकी, इ. पदार्थ हे सगळे मातीच आहेत. सोन्याचे बनविलेले अंगठी, कंकण, इ. अलंकार वस्तुतः सोनेच आहेत. याचा अर्थ असा, की कारणामध्ये कार्य हे अव्यक्त रूपाने पहिल्यापासूनच विद्यमान असते. कुंभार, सोनार या निमित्तकारणांच्या द्वारे तेच अव्यक्त रूप व्यक्त केले जाते. आकार नावाची पदार्थाहून भिन्न अशी एखादी वस्तू नाही. ती द्रव्याची केवळ एक अवस्था असते. द्रव्याला धरूनच आकाराची सत्ता असते. म्हणून आकारजन्य भेद स्वीकारून एखाद्या उपादानकारणाला त्याहून भिन्न मानणे उचित नव्हे. एखादा आकार किंवा गुण याला मूलद्रव्याहून पृथक् मानणे हे युक्तिसंगत नाही. आकाराला किंवा गुणाला द्रव्याहून भिन्न अशी सत्ता नाही. कुंभाराने आपल्या कल्पनेने घडे, गाडगी बनविली, त्यांना भिन्न भिन्न नावे दिली, तरी त्यांची नामरूपे मिथ्या आहेत. त्यांतले वास्तव द्रव्य माती हेच एकमेव खरे आहे. हाच आशय, पुढील श्रुतीत सांगितला आहे–

**वाचारम्भणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् ।**

(छान्दोग्य उप. ६. १. ४)

अर्थ–विकार, विकार असे जे म्हणतात, ते केवळ वाचारंभण म्हणजे नुसते नाव आहे. विकार हा खोटा असून केवळ मृत्तिकाच सत्य आहे.

**विवर्तवाद**–कारणाच्या या असत्य व काल्पनिक परिवर्तनाला विवर्त म्हणतात. 'अतत्त्वतोऽन्यथाभावो विवर्तः' (अप्पय्य दीक्षित) म्हणजे तत्त्वाच्या ठिकाणी खोटा व भ्रामक असा जो बदल दिसतो, त्याला म्हणजेच तत्त्वाच्या ठिकाणी अतत्त्वाच्या भावाला, विवर्त अशी संज्ञा आहे. हा विवर्त किंवा परिवर्तन वास्तव नसून मनाने आरोपित असते. या मानसिक आरोपालाच शंकराचार्य अध्यास असे म्हणतात. अधि या पदाने अधिष्ठानाचा बोध होतो. ज्यावर एखाद्या पदार्थाचा आरोप होतो, ते अधिष्ठान होय. यातला आरोपित पदार्थ मिथ्या असून अधिष्ठान तेवढे सत्य असते, हा अद्वैतदर्शनाचा ठाम सिद्धान्त आहे. जोवर अधिष्ठानाचे ज्ञान झालेले नसते, तोवर आरोपित पदार्थ भासत असतो. ते ज्ञान झाले, की तो भासमान पदार्थ मिथ्या आहे, असा निश्चय होतो. यासाठी या दर्शनात नेहमी दिली जाणारी उदाहरणे म्हणजे रज्जु-सर्प व शुक्ति-रजत ही होत. अर्धवट अंधारात दोरी पडलेली दिसते व तिच्यावर सर्पाचा भ्रम होतो. त्याचप्रमाणे वाळवंटातली शिंप दुपारच्या उन्हात चमकते व तिच्यावर रुप्याचा भास होऊ लागतो. पण दिव्याच्या प्रकाशात दोरी पाहिल्यावर, तसेच ती शिंप हातात घेतल्यावर वरील दोन्ही भ्रम निरस्त होतात. (अध्यास पाहा)

वरील दोन्ही उदाहरणांत रज्जू व शुक्ती या अधिष्ठानांची सत्ता मान्य केलेली आहे. या उदाहरणांवरूनच शंकराचार्यांना जगन्मिथ्यात्व सिद्ध करायचे आहे. ब्रह्म या अधिष्ठानावर जगत् हे भ्रमाने भासते व सत्यज्ञान झाल्यावर त्या भ्रमाचा निरास होऊन 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' हा सिद्धान्त दृढ होऊ शकतो, असे आचार्य सांगतात.

आचार्य जगाचे मिथ्यात्व सांगतात, तेव्हा ते जगाचे अस्तित्व अजिबात नाकारतात, असे नव्हे; तर पारमार्थिक अवस्थेत आत्मज्ञानी पुरुषाला जग भासत नाही, असे त्यांचे म्हणणे आहे. नामरूपे क्षणोक्षणी पालटणारी व नश्वर असल्यामुळे वेदान्त्यांनी त्यांना मिथ्या मानले आहे. आत्मज्ञान होईपर्यंत व्यवहारदशेत अद्वैतीसुद्धा जगाला सत्यच मानतात. आत्मसाक्षात्कार होईतो सर्व लौकिक व वैदिक व्यवहार उपपन्न होतात, असे आचार्यांनी अनेक ठिकाणी सांगितले आहे.

अशा युक्तीने विचार केल्यावर जगातले समस्त आकार मिथ्या ठरतात. मग प्रश्न असा येतो, की सर्वत्र आणि सार्वकाल असणारी सत्य वस्तू कोणती ? घडा हा नश्वर आणि मृत्तिका ही सत्य असे आपण म्हटले; पण मृत्तिकासुद्धा सर्वत्र समानरूपाने असणारी मूळ वस्तू नाही. जी सर्व पदार्थांचे अधिष्ठान होऊ शकते आणि जी सर्व पदार्थांत अनुस्यूत असते, तीच मूलवस्तू होय. अशा वस्तूचा शोध करू जाता सत्ता नावाची एक वस्तू आपणाला मिळते. सत्ता म्हणजे विशिष्ट सत्ता नव्हे; तर शुद्ध सत्ता. ही जगताचे उपादानकारण असते व ती नाना रूपांत प्रकट होऊनही स्वतः निराकार व निरवयव असते. ही सत्ता म्हणजेच ब्रह्म होय. ते एक आहे आणि अद्वितीय आहे.

**माया व अविद्या**– एकमेवाद्वितीय, निर्विशेष व अनिर्वचनीय अशा या ब्रह्मापासून नामरूपात्मक सविशेष व सलक्षण अशा जगताची उत्पत्ती का व कशी झाली ? याचे उत्तर शंकराचार्यांनी मायावादाच्या आधारे दिले आहे. मायेच्या ठिकाणी दोन शक्ती आहेत. एक आवरणशक्ती व दुसरी विक्षेपशक्ती होय –

शक्तिद्वयं हि मायाया विक्षेपावृत्तिरूपकम् ।
विक्षेपशक्तिर्लिङ्गादि ब्रह्माण्डान्तं जगत् सृजेत् ॥
अन्तर्दृग्दृश्ययोर्भेदं बहिश्च ब्रह्मसर्गयोः ।
आवृणोत्यपरा शक्तिः सा संसारस्य कारणम् ॥

(दृग्दृश्यविवेक)

या श्लोकांचा विस्तृत अर्थ असा – आवरणशक्ती ही ब्रह्माचे शुद्ध स्वरूप झाकून टाकते व विक्षेपशक्ती त्या ब्रह्माच्या ठिकाणी आकाशादी भौतिक जग उत्पन्न करते. जसा एखादा छोटा ढग पाहणाऱ्या माणसाच्या दृष्टीपुढे येऊन अनेक योजने विस्तृत असलेल्या सूर्यमंडळाला झाकून टाकतो, तद्वत् परिच्छिन्न अज्ञानाने अनुभवकर्त्याच्या बुद्धीला झाकून टाकल्यामुळे अपरिच्छिन्न आत्मा आच्छादित होतो. या शक्तीलाच आवरण म्हणतात. त्याचप्रमाणे रज्जूचे अज्ञान रज्जूच्या ठिकाणी आपल्या शक्तीने जसे सर्प निर्माण करते, तद्वतच माया ही अज्ञानाच्छादित आत्म्याच्या ठिकाणी आपल्या शक्तीच्या बळावर आकाशादी जगताचा प्रपंच निर्माण करते. या शक्तीलाच विक्षेप असे म्हणतात. मूलस्वरूपावर पडदा टाकणे म्हणजे आवरण व त्या आच्छादित स्वरूपावर दुसऱ्या वस्तूचा आरोप करणे म्हणजे विक्षेप होय.

शंकराचार्यांनी माया व अविद्या हे दोन्ही शब्द समानार्थक मानले आहेत. पुढचे वेदान्ती त्या दोन शब्दांत सूक्ष्म फरक दाखवितात. माया म्हणजे परमेश्वराची बीजशक्ती. ही अविद्यात्मक असल्यामुळे हिला अव्यक्त असेही म्हणतात. ही परमेश्वराच्या ठिकाणी आश्रित असते. जगातल्या पदार्थांची हे दोन – सत् आणि असत्. सत् म्हणजे अबाधित आणि असत् म्हणजे बाधित. माया ही सत् व असत् या दोहोंहून विलक्षण आहे. म्हणूनच ती अनिर्वचनीय आहे. जो पदार्थ सत् किंवा असत् या रूपांनी वर्णिता येत नाही, त्याला दार्शनिक परिभाषेत अनिर्वचनीय म्हणतात. मायेला सत् म्हणावे, तर ब्रह्मज्ञान झाल्यावर

ती बाधित होते. बरे तिला असत् मानावे, तर तिची प्रतीती होते. असत् पदार्थाची प्रतीती कधीही होणार नाही. मायेच्या ठिकाणी हे दोन विरुद्ध धर्म राहत असल्यामुळे शंकराचार्यांनी तिला अनिर्वचनीय म्हटले आहे.

शंकराचार्यांप्रमाणेच रामानुजांनाही माया मान्य आहे; पण दोघांच्या मायाविषयक कल्पनेत भिन्नता आहे. रामानुज ही सारी सृष्टी वास्तव व सत्य मानतात. त्यांच्या मते माया ही ईश्वराची सृष्टिकार्य करण्याची शक्ती आहे. तिच्यामुळे ब्रह्मात अवस्थित असलेल्या शरीर या अचित् तत्त्वात विकार उत्पन्न होतो; पण शंकराचार्यांच्या मते ब्रह्मात कोणताही विकार अथवा परिवर्तन घडत नाही. शंकराचार्यही मायेला ईश्वराची शक्ती मानतात; पण ते ईश्वराचे नित्य स्वरूप नव्हे, असे त्यांचे म्हणणे आहे.

**ईश्वरविचार** – हेच निर्विशेष ब्रह्म मायेच्या योगाने आवृत झाल्यावर सविशेष होते व सगुण भाव धारण करते. यालाच ईश्वर म्हणतात. विश्वाच्या सृष्टि-स्थिति-लयांना तोच कारण असतो. सर्वज्ञ, सर्वेश्वर, सर्वकाम, सर्वनियंता, सर्वांतर्यामी, जगत्कारण, इ. विशेषणे अद्वैतदर्शनात ईश्वराला दिलेली आहेत. समस्त प्रपंचाचा साक्षी असल्यामुळे तो सर्वज्ञ आहे. सर्व जीवांना त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार फल देत असल्यामुळे तो सर्वेश्वर आहे. त्याच्या सर्व इच्छा पूर्ण झालेल्या असल्यामुळे तो सर्वकाम आहे. सर्व जीवांना त्यांच्या त्यांच्या कर्मात प्रेरणा देत असल्यामुळे तो सर्वनियंता आहे. सर्व जीवांच्या हृदयात राहून त्यांना नियंत्रित करतो, म्हणून तो सर्वांतर्यामी आहे. चराचर विश्वाला विवर्तरूपात अधिष्ठान होत असल्यामुळे तो जगत्कारण आहे.

एवंगुणविशिष्ट हा ईश्वर, सृष्टी का म्हणून निर्माण करतो, हाही एक विचारणीय प्रश्न आहे. जर या कामी त्याचे आत्मप्रयोजन काही असेल, तर त्याचे सर्वकाम हे विशेषण बाधित होते. तो हे कार्य निरुद्देश करतो म्हटले, तर त्याच्या सर्वज्ञतेला धक्का पोचतो. याचे उत्तर अद्वैतदर्शनात लीला असे दिलेले आहे. सृष्टिकार्य ही ईश्वराची लीला आहे. तो पूर्णकाम ईश्वराचा विलास आहे (ब्र. सू. २. १. ३२–३३ शां. भा.).

न्यायशास्त्र ईश्वराला जगताचे निमित्तकारण मानते, तर वेदान्तशास्त्र निमित्तकारणाबरोबरच त्याला जगताचे उपादान कारणही मानते. कुंभार घटाचा असतो, तसा तो जगताचे निमित्तकारणही आहे व माती जशी घटाचे उपादानकारण असते, तसा तो जगताचे उपादानकारणही आहे. ईश्वर म्हणजे मायोपाधिक ब्रह्म होय. त्याच्या चेतनकर्माला अनुसरून ते जगताचे निमित्तकारण आहे व मायोपाधीच्या दृष्टीने तेच जगताचे उपादानकारणही आहे. ब्रह्म वस्तुतः निर्गुण खरे; पण मायेच्या संबंधाने तेच सगुणत्वाने प्रतीत होते; उपासकाच्या दृष्टीने तेच सगुण अर्थात ईश्वराचे रूप धारण करते, अशी कल्पना आहे.

जीवाचेही तसेच आहे. जीव आणि ब्रह्म यांत कोणत्याही प्रकारे भेद नाही. 'जीवो ब्रह्मैव नापरः।' ईश्वर मायावच्छिन्न चैतन्य आहे, तर जीव अंतःकरणावच्छिन्न चैतन्य आहे. दोन्ही चैतन्यरूपच आहेत. उपाधीच्या योगाने सीमित झाल्याकारणाने त्यांना पृथक् नाव व पृथक् सत्ता ही प्राप्त झाली. मायेनेच त्या दोघांना ब्रह्माहून पृथक् पदार्थ बनविले. विद्यारण्यांच्या शब्दांत (पंचदशी ६.२३६) सांगायचे तर –

**मायाख्यायाः कामधेनोर्वत्सौ जीवेश्वरावुभौ।**
**यथेच्छं पिबतां द्वैतं तत्त्वमद्वैतमेव हि ॥**

अर्थ – जीव आणि ईश्वर हे मायारूपी कामधेनूचे दोन वत्स आहेत. ते आपल्या इच्छेनुसार द्वैताचे प्राशन खुशाल करोत; पण त्याचे तत्त्व मात्र अद्वैतच आहे.

आचार्यांच्या मते शरीर व इंद्रियसमूह यांचा अध्यक्ष व कर्मफलाचा भोक्ता असा आत्मा म्हणजे जीव होय (ब्र. सू. २. ३. १७ शां. भा. ). जीवाच्या जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ती अशा तीन अवस्था आहेत. शब्दादी विषयांचे ज्ञान इंद्रियांच्या द्वारे ज्या अवस्थेत होते, ती जाग्रत् अवस्था होय. जाग्रत् अवस्थेतील अनुभवाने उत्पन्न झालेल्या संस्कारापासून जीवाला स्मरणरूप मनोमय विषयानुभव येतो. या अवस्थेस स्वप्न म्हणतात. जाग्रत् व स्वप्न अवस्थांमध्ये भोग देणारी कर्मे क्षीण होतात. त्यामुळे स्थूल–सूक्ष्म देहावरील त्याचा अभिमान नष्ट होतो, बुद्धी कारणशरीररूप अज्ञानात लीन होते व मग संस्कारजन्य स्मरणरूप ज्ञानही होत नाही, अशा अवस्थेस सुषुप्ती म्हणतात.

या अवस्थात्रयाप्रमाणेच जीवाचे पाच कोश मानलेले आहेत. अन्नमय, मनोमय, प्राणमय, विज्ञानमय व आनंदमय अशी त्यांची नावे आहेत. त्याचप्रमाणे जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ती या अव-

| शरीर | अभिमानी | कोश | अवस्था |
|---|---|---|---|
| स्थूल | समष्टि–वैश्वानर<br>व्यष्टि–विश्व | अन्नमय | जाग्रत् |
| सूक्ष्म | समष्टि–सूत्रात्मा<br>व्यष्टि–तैजस | मनोमय<br>प्राणमय<br>विज्ञानमय | स्वप्न |
| कारण | समष्टि–ईश्वर<br>व्यष्टि–प्राज्ञ | आनंदमय | सुषुप्ती |

स्थांचा अभिमान बाळगणारे अनुक्रमे विश्व, तैजस आणि प्राज्ञ असे जीवात्म्याचे भेद आहेत. हे भेद व्यष्टीच्या अभिमानी जीवाचे

असून समष्टि–अभिमानी ईश्वराच्या याच तीन भेदांना अनुक्रमे विराट् किंवा वैश्वानर, सूत्रात्मा किंवा हिरण्यगर्भ व ईश्वर अशा संज्ञा आहेत.

जीव आणि ईश्वर या दोन तत्त्वांचे निरूपण वेदान्तशास्त्रात अनेक प्रकारे केलेले आहे. जीव आणि ईश्वर यांचे सामान्यरूप चैतन्य हे आहे. चैतन्य हे बिंब होय. याची प्रतिबिंबे भिन्न उपाधीत पडून भिन्न नामे ग्रहण करतात. माया किंवा अविद्या हिच्या ठिकाणी पडलेल्या प्रतिबिंबाला ईश्वरचैतन्य आणि अंतःकरणात पडलेल्या प्रतिबिंबाला जीवचैतन्य म्हणतात. पूर्ण घटात आणि जलाशयात पडणाऱ्या सूर्याच्या प्रतिबिंबात जे अंतर, तेच अंतर जीव आणि विश्व या दोहोंत समजावे.

**जगद्विचार** – एखाद्या जादूगाराप्रमाणे ईश्वर आपल्या मायाशक्तीच्या द्वारे ही विचित्र सृष्टी निर्माण करतो. इथेच हा प्रश्न उपस्थित होतो, की जगत् सत्य की असत्य ? शंकराचार्यांनी सत्याची व्याख्या पुढीलप्रमाणे दिली आहे –

**यद्रूपेण यन्निश्चितं तद्रूपं न व्यभिचरति तत्सत्यम् ।**

अर्थ – ज्या रूपाने जो पदार्थ निश्चित होतो, त्या पदार्थाचे ते रूप जर सतत व्यभिचरित न होता, समभावाने विद्यमान राहील, तर त्याला सत्य म्हणावे.

नित्यपरिवर्तनशील किंवा परिणामस्वभाव असलेले हे जग या दृष्टीने सत्य नाही. मग जगत् नितान्त असत्य आहे असे म्हणायचे काय ? याचे उत्तर देताना वेदान्ती सांगतात –

नामरूपाने युक्त व क्षणोक्षणी पालटणारे असल्यामुळे हे नामरूपात्मक जग मिथ्या आहे. 'नेह नानाऽस्ति किञ्चन,' 'इदं सर्वं यदयमात्मा', इ. श्रुतिवचने जगताचे मिथ्यात्व व ब्रह्माचे सत्यत्व प्रस्थापित करतात. आत्मज्ञान होईपर्यंत व्यवहारदशेत जग हे द्वैत्यांना जेवढे सत्य वाटते, तेवढेच अद्वैती वेदान्त्यांनाही वाटते. जगताची पारमार्थिक स्थिती मान्य नसूनही त्याची व्यावहारिक सत्ता आचार्य मान्य करतात.

वेदान्तमतात सत्ता तीन प्रकारची मानलेली आहे – (१) प्रातिभासिक, (२) व्यावहारिक व (३) पारमार्थिक. जी सत्ता प्रतीतिकाळात सत्यरूपाने प्रतिभासते; पण नंतर बाधित होते, तिला प्रातिभासिक सत्ता म्हणतात. उदाहरणार्थ – रज्जु-सर्प, शुक्ति-रजत इत्यादी. व्यावहारिक सत्ता विश्वातल्या समस्त व्यवहारगोचर पदार्थांत राहते. विश्वातल्या पदार्थांना कोणतेतरी नाम आहे व कोणतेतरी रूप आहे. या नाम-रूपात्मक वस्तूंची सत्ता व्यवहारासाठी नितान्त आवश्यक आहे. व्यवहारकालातच सत्य असल्यामुळे जगातल्या विकारात्मक पदार्थांची सत्ता व्यावहारिक ठरते. पारमार्थिक सत्ता ही खरीखुरी सत्ता आहे. ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीने जगाकडे पाहिले असता, ते असत्य प्रतीत होते. जग इंद्रियांना अवश्य सत्य आहे; पण वास्तवरूपाने ते सत्य नाही.

वेदान्तात मिथ्या याचा अर्थ असत् नव्हे; तर अनिर्वचनीय असा आहे. याच अनिर्वचनीयवादाची पारिभाषिक संज्ञा विवर्त अशी आहे. परिणाम आणि विवर्त यांच्यामधला भेद वेदान्तसारांत पुढीलप्रमाणे सांगितला आहे–

**सतत्त्वतोऽन्यथा प्रथा विकार इत्युदीरितः ।**
**अतत्त्वतोऽन्यथा प्रथा विवर्त इत्युदीरितः ।।**

अर्थ – तात्त्विक परिवर्तनाला विकार व अतात्त्विक परिवर्तनाला विवर्त असे म्हणतात.

दही हा दुधाचा विकार आहे; पण सर्प हा रज्जूचा विवर्त आहे. कारण दूध व दही यांची सत्ता एका प्रकारची असून रज्जू व सर्प यांची सत्ता भिन्न प्रकारची आहे. सर्पाची सत्ता काल्पनिक आहे, तर रज्जूची सत्ता वास्तविक आहे (ब्र. सू. २. १. ७ शां. भा.).

**जीवविचार** – आत्मा जर स्वभावतःच नित्यमुक्त आहे, तर तो संसारात बद्ध झालेला का दिसतो ? आनंदरूप आत्मा सांसारिक दुःखांनी तळमळताना का दिसतो ? याचे एकमात्र उत्तर म्हणजे अध्यास. जीवाने स्वतःला स्थूल-कृश, अंध-बधिर, सत्कृत-तिरस्कृत, अशा प्रकारे मानणे म्हणजेच इंद्रियादिकांच्या धर्मांचा आरोप स्वतःवर करणे व त्यामुळे सुखी व दुःखी होणे. हे सारे अविद्याविजृंभित अध्यासाचेच फल आहे. कर्तृत्व आणि भोक्तृत्व यांचा प्रवर्तक असलेला हा अध्यास स्वाभाविक आहे, अनादी आहे, तसाच अनंतही आहे (शां. भा. उपोद्घात). जगातल्या समस्त प्रमाण-प्रमेयांच्या व्यवहाराचा मूलाधार हाच आहे. याचेच दुसरे नाव अध्यारोप असे आहे. याच अध्यारोपाचा निरास करण्यासाठी आत्मविद्येचे प्रतिपादन करणे, हे वेदान्तशास्त्राचे प्रधान उद्दिष्ट आहे.

जीव हा आत्मस्वरूपाच्या अज्ञानामुळेच या संसारात अनंत क्लेश भोगतो. अविद्येमुळे तो आपला शुद्ध-बुद्ध-मुक्त असा स्वभाव विसरून गेला आहे. त्याला या अज्ञानातून बाहेर काढून ज्ञानाच्या भूमिकेवर आरूढ करणे, यालाच मोक्ष असे म्हणतात. एका बाजूने आनंदरूप ब्रह्माची प्राप्ती आणि दुसऱ्या बाजूने सकल शोकांची निवृत्ती हे मोक्षाचे स्वरूप आहे. याच मोक्षाच्या प्राप्तीसाठी वेन्दाताने साधनमार्गही सांगितला आहे, तो असा –

दार्शनिकांनी आपापल्या दृष्टिकोनातून केवल कर्म, कर्मज्ञान-समुच्चय व केवल ज्ञान, तसेच भिन्नभिन्न साधनमार्ग सांगितले आहेत. शंकराचार्यांना पहिल्या दोन गोष्टी मान्य नसून शेवटची म्हणजे केवल ज्ञान हीच तेवढी मान्य आहे. ज्ञानमार्ग किंवा ज्ञाननिष्ठा याविषयी त्यांचा आग्रह आहे. कर्माच्या द्वारे कैवल्य-

प्राप्ती कधीच होणार नाही, म्हणून कर्म व्यर्थ आहे, असे ते सांगतात (नैष्कर्म्यसिद्धी १. ५३). पण त्याचबरोबर नित्यकर्माचे अनुष्ठान करावे, असेही त्यांचे सांगणे आहे. ते कर्म साक्षात् मोक्षप्रद होऊ शकत नसले, तरी निष्कामपणे आचरिलेल्या त्या कर्मामुळे चित्तशुद्धी होते व ती झाल्यावर जीव आत्मस्वरूप जाणू शकतो. पद्मपादाचार्यांनी आपल्या विज्ञानदीपिकेत वेदान्तसंमत आचार्यपद्धतीचे जे विवेचन केले आहे, त्यात ते म्हणतात, 'कर्म हे प्रबल आहे. त्यामुळे वासना उत्पन्न होते व वासनेतूनच संसाराचा उदय होतो. म्हणून संसाराचा उच्छेद करायचा असेल, तर कर्मांचे निर्हरण करणे नितान्त आवश्यक आहे.'

**ज्ञानाने मोक्ष–** ज्ञानप्राप्तीची प्रक्रिया शंकराचार्यांनी आपल्या विवेकचूडामणी व उपदेशसाहस्री या ग्रंथांत मोठ्या रोचक भाषेत सांगितली आहे. ज्ञानप्राप्तीसाठी साधकाने साधनचतुष्टयसंपन्न झाले पाहिजे, असे ते म्हणतात. ब्रह्म हेच केवल सत्य असून तदितर समस्त संसार अनित्य व असत्य आहे, अशा विवेकाचा उदय, ऐहिक व पारलौकिक अशा समस्त फलभोगांविषयी वैराग्य, मनाची एकाग्रता, इंद्रियनिग्रह, उपरती, तितिक्षा, समाधान, गुरू व वेदान्तवाक्ये यांच्यावर दृढ श्रद्धा, मुमुक्षुत्व, इ. गुणांचा उदय झाल्यावर मनुष्य वेदान्तश्रवणाचा अधिकारी बनतो. मग त्याने ब्रह्मवेत्त्या गुरूला शरण जाऊन आत्मविषयक प्रश्न करावे. मग गुरूने त्याला 'तत्त्वमसि' इ. महावाक्यांचा उपदेश करावा. त्या उपदेशाच्या द्वारे त्या शिष्याला जीवब्रह्मांच्या ऐक्याचे ज्ञान उत्पन्न होईल व त्याचे सारे शोक–मोह नष्ट होऊन त्याला आनंदाचा अनुभव घडेल.

अद्वैतज्ञानाच्या साधकाला श्रवण, मनन व निदिध्यास या तीन गोष्टींची नितान्त आवश्यकता आहे. या गोष्टी साध्य केल्यावर मगच त्याचे परोक्षज्ञान अपरोक्षज्ञानाच्या रूपात परिणत होईल. मग तो साधक 'अहं ब्रह्मास्मि' (मीच ब्रह्म आहे) अशा अनुभवाच्या भूमिकेवर आरूढ होईल. असा हा वेदान्ताचा साधनमार्ग आहे.

ज्याला मोक्ष मिळाला आहे, असा पुरुष संसारबंधनात पडत नाही. त्याला शोक–मोह बाधत नाहीत. प्रारब्ध कर्माचा क्षय होईपर्यंत तो देह धारण करतो; पण त्याची देहावरील आसक्ती गळून गेलेली असते, अशा पुरुषाला जीवन्मुक्त म्हणतात. मी कर्ता, भोक्ता नव्हे, अशी जिवंतपणीच प्रतीती येणे, अशा अवस्थेला जीवन्मुक्ती म्हणतात.

गीतेत 'प्रजहाति यदा कामान्' (२. ५५) इ. श्लोकांत जी स्थितप्रज्ञाची लक्षणे सांगितली आहेत, ती जीवन्मुक्ताचीच लक्षणे होत. वेदान्ती लोक या मुक्तीचे स्वरूप समजाविण्यासाठी पुढील उदाहरण देतात–

एखाद्या माणसाच्या गळ्यात सोन्याचा हार आहे, पण तो ती गोष्ट विसरून व हार हरवला आहे, असे समजून त्याची अन्यत्र शोधाशोध करतो. मग कोणीतरी दुसरा मनुष्य त्याला सांगतो, की 'अरे, हार तर तुझ्या गळ्यातच आहे' त्यावर तो माणूस हार सापडला, अशा भावनेने हर्षित होतो. वस्तुतः त्याचा हार कुठेच गेला नव्हता. तो हरवला नव्हता आणि त्यामुळेच तो मिळालाही नव्हता. मुक्तीचीही स्थिती अशीच आहे. जीव स्वभावतःच मुक्त आहे. मुक्तीची उत्पत्तीही होत नाही आणि प्राप्तीही होत नाही. पण जीव ही गोष्ट विसरून मुक्ती कुठेतरी बाहेर शोधू लागतो. दैववशात् गुरु भेटला व त्याने उपदेश केला म्हणजे त्याचे एतद्विषयक अज्ञान दूर होते. मग विवेक उत्पन्न होतो आणि त्यामुळे तो जीव स्वाभाविक मुक्तीलाच प्राप्त करून घेऊन प्रसन्न होतो. वेदान्तमतात मोक्षदशा ही नितान्त आनंदमय आहे. या दशेत जीव-ब्रह्मविषयक भेद-भावना आणि तज्जन्य दुःखे यांची केवळ निवृत्तीच होत नाही; तर साधकाला अलौकिक आनंदाची अनुभूती घडते आणि मग त्या अनुभूतीने तो कृतकृत्य होतो.

अद्वैत वेदान्ताचे हे संक्षिप्त सार आहे. याच्या अनुशीलनाने शंकराचार्यांच्या अलौकिक विद्वत्तेचा, तसाच असाधारण तार्किकतेचाही परिचय होऊ शकेल. शंकराचार्यांनी आपल्या सिद्धान्तांच्या प्रतिपादनासाठी जागोजाग श्रुतींचा आश्रय घेतला आहे व आपल्या मताच्या दृढीकरणासाठी अन्य मतांचे खंडनही केले आहे. आचार्यांच्या तर्कपद्धतीचे एक वैशिष्ट्य हे, की त्यांचा तर्क वेदशास्त्रानुकूल असतो. त्यांनी प्रतिपादिलेला अद्वैताचा साधनमार्गही मनोरम आहे. ते कर्माचा तिरस्कार करीत नाहीत, तर चित्तशुद्धीसाठी निष्काम कर्म आचरलेच पाहिजे, असे सांगतात. याच कारणामुळे सर्वसामान्य जनतेलाही ते आदरणीय झाले आहेत. बौद्धांना परास्त करून वैदिक धर्माचे पुनरुत्थान घडवून आणण्यात शंकराचार्यांना फार मोठे श्रेय आहे. आचार्य श्रीविद्येचे उपासक व सिद्धपुरुष होते. त्यांना शंकराचा अवतार म्हटले जाते. वैष्णवाचार्यांनी शंकराचार्यांचा मायावाद भक्तीशी नितान्त विरोधी आहे, असे मानून त्याचे मोठ्या हिरीरीने खंडन करण्याचा प्रयत्न केला आहे; पण एवढे होऊनही या विश्वाचे कोडे उलगडण्याच्या कामी अद्वैत वेदान्त जेवढा सफल झाला आहे, तेवढे दुसरे कोणतेही मत झाले नाही. आणि म्हणूनच अद्वैतदर्शनाचा जगात एवढा गौरव आहे.

अद्वैत वेदान्ताचे मूलस्रोत आपणास उपनिषदांत आढळतात. त्याहूनही प्राचीन असलेल्या वैदिक संहितांतही अद्वैत-विचार अनेक ठिकाणीं दृष्टीस पडतो. उपनिषद्कारांनी आपल्या सिद्धान्तांचे उगमस्थान म्हणून वेदसंहितांचाच स्वीकार केला आहे.

वेदान्त हा व्यावहारिक धर्म आहे. वेदान्ताने माणसांना निष्क्रियतेची शिकवण दिली, असा आरोप काही लोक वेदान्तावर करतात; पण तो सर्वथा भ्रांत आहे. वेदान्त विश्वातल्या प्रत्येक जीवाच्या ठिकाणी परब्रह्माची सत्ता मानतो. तो विषयसुख तुच्छ करून जीवांना शाश्वत आनंदाकडे जाण्यासाठी प्रोत्साहन देतो. विषयसुख हे नाशिवंत असून, अध्यात्मसुख हेच चिरस्थायी आणि खरे सुख आहे, हे वेदान्तात आग्रहपूर्वक प्रतिपादिले आहे; नराचा नारायण बनण्याचा बहुमोल आदर्श आपल्यासमोर उभा केला आहे. क्षुद्र स्वार्थाच्या भावनेने त्रस्त आणि ग्रस्त झालेल्या मानवसमाजाला वेदान्त हा अमृतमय कल्याणोपदेश आहे. इतकेच नव्हे; तर 'वसुधैव कुटुंबकम्' ही वृत्ती बाणवून घेण्यासाठीही वेदान्त हेच सर्वश्रेष्ठ साधन आहे. [ भा. द.; भा. द. सं. ]

**अद्वैतानंद बोधेंद्र** (इ. स. ११५० चा सुमार) द. भारतात कावेरीच्या तीरावर पंचनद नावाच्या गावात यांचा जन्म झाला. यांचे पूर्वाश्रमीचे नाव सीतानाथ व गोत्र कौंडिण्य होते. यांनी वयाच्या १७ व्या वर्षी कांचीच्या कामकोटिपीठाच्या आचार्यांकडून संन्यास घेतला. आचार्यांनी त्यांचे अद्वैतानंद नाव ठेवून पुढे त्यांना आपल्या पीठावर बसविले. अद्वैतमताचे अध्ययन पूर्ण झाल्यावर यांनी भारतयात्रा केली व अन्य संप्रदायांतल्या विद्वानांशी वाद करून त्यांच्यावर विजय मिळविला. यांनी शांतिविवरण व गुरुप्रदीप असे दोन ग्रंथ लिहिले आहेत. यांनी मुख्यत्वे वाचस्पतिमिश्रांना अनुसरले आहे. [हिंदुत्व]

**अद्वैतोपनिषद** एक गौण उपनिषद. यात स्थावर–जंगमामध्ये एकच अद्वैतब्रह्म प्रकाशित आहे, अद्वैताच्या ठिकाणी भेद नाही व अद्वैताच्या ज्ञानाने पुरुष अमूढ होतो, असे सांगितले आहे.

**अधमा नायिका** गुण आणि प्रकृती यांना अनुसरून केलेला एक नायिकाभेद. भानुदत्त म्हणतो –

**हितकारिण्यपि प्रियतमेऽहितकारिण्यधमा ।**

अर्थ – प्रियकर हित करणारा असताही ( त्याचे ) अहित करणारी (प्रतिकूल वागणारी) ती अधमा नायिका म्हणावी.

गाथासप्तशतीतील याचे एक उदाहरण असे –

**चित्ताणि अदईअसमागमम्मि कअमण्णुआई भरिऊण ।**
**सुण्णं कलहाअन्ती सहीहि रुण्णा ण ओहसिआ ।।**

अर्थ –नवऱ्याची भेट झाली न झाली तोच पूर्वी घडलेल्या रागाच्या गोष्टी आठवून त्याच्याशी कलहाला प्रवृत्त होणाऱ्या स्त्रीच्या अवस्थेबद्दल तिच्या मैत्रिणींना खेद होतो. तथापि सहानुभूतीमुळे त्या तिचा उपहास करीत नाहीत, एवढेच ! [ हिं. सा. को. ]

**अधर्म** (१) ब्रह्मदेवाच्या पृष्ठभागापासून उत्पन्न झालेला धर्मविरोधी पुरुष. याची भार्या मृषा. तिच्यापासून दंभ आणि माया या मिथुनाची उत्पत्ती झाली (भाग पु. ३. १२). त्या मिथुनापासून लोभ आणि विकृती, क्रोध व हिंसा, कली व दुरुक्ती, मृत्यू व भीती, निरय व यातना अशी मिथुनसंतती झाली (भाग पु. ४.८). हा काल्पनिक पुरुष असून, मानवी जीवनातला अधर्म, त्यातून निघणारे दुर्गुण आणि त्यांचे परिणाम, यांच्यावर बसविलेले हे रूपक आहे. [ प्रा. च. को. ]

(२) धर्माचा विरोधी. पाहा – धर्म.

**अधर्मसंतती** प्रत्येक देशात अनीतीच्या आचरणामुळे झालेली संतती असतेच. आणि ही संतती अनेक प्रकारचे सामाजिक प्रश्न उभे करते. वेश्यागमन आणि शरीरविक्रय यांमुळेच केवळ अनीतीचे आचरण होते असे नाही; तर अन्यत्रही ते बरेच होते. निदान अधर्मसंततीची संख्या वाढविण्यास वेश्यागमनाहून अन्य कारणे असू शकतात. अधर्मसंततीची कारणे अनेक आहेत. दासी, देवळांतल्या भाविणी आणि विधवा स्त्रिया यांच्या अनीतीच्या आचरणाने अधर्मसंतती उत्पन्न झाली आहे. कुमारी मुलींपासून झालेल्या मुलांची संख्या मात्र फारशी नाही.

अधर्मसंततीचे भिन्न भिन्न प्रमाण, समान आचारविधींनी नियंत्रित झालेल्या समाजाचा नैतिक दर्जा काहीसा दिग्दर्शित करते, तरी अधर्मसंततीच्या प्रमाणावरून राष्ट्रातील नीतिमत्ता ठरविता येणार नाही. एखाद्या देशात अधर्मसंततीचे प्रमाण अतिशय मोठे असले, तर त्याचे कारण तेथील नीतिमत्ता बिघडली आहे हेच केवळ नसून तेथील आचारविधी किंवा आर्थिक स्थिती या गोष्टी तरुणपणी विवाहाला पोषक नसतील किंवा मुलांच्या आईबापांनी मागाहून लग्न केल्यास मुले औरस बनणे तेथील कायद्याप्रमाणे शक्य होत असल्यामुळे अधर्मसंतती हा मोठा महत्त्वाचा प्रश्नच नसेल. ज्या लोकांत अधर्मसंततीचे प्रमाण बरेच कमी असेल, पण गर्भपात व गर्भधारणेला मुद्दाम प्रतिबंध करणे यांसारख्या पद्धती प्रसृत झाल्या असतील, त्या लोकांतले केवळ अधर्मसंततीचे प्रमाण पाहून त्यांची नीतिमत्ता उच्च तऱ्हेची ठरविणे भ्रामक आहे. बहुतेक ख्रिस्ती देशांतल्यापेक्षा मुसलमानी देशांत अधर्मसंतती निःसंशय कमी आहे. पण तेवढ्यावरून मनोनिग्रहाच्या बाबतीत मुसलमान श्रेष्ठ आहेत, असे म्हणता येणार नाही. तथापि समान संस्कृती व आचारधर्म असलेल्या भिन्न समाजांत अधर्मसंततीच्या प्रमाणात जी भिन्नता येते, ती नीतिकल्पना व नैतिक भावना काही अंशी स्पष्ट करण्यास खास उपयोगी पडते.

हिंदू समाज हा जातिबद्ध असल्यामुळे अधर्मसंततीस कोणत्याही जातीत स्थान मिळत नाही. अशी प्रजा निराळी राहते व तिला निराळी जात बनवावी लागते. अशी परिस्थिती असल्यामुळे काही लहान लहान अनिश्चितपद जाती अधर्मसंततीमुळे उत्पन्न झाल्या असणे शक्य आहे. त्या कोणत्या, हे आज सांगणे शक्य नाही. धर्मशास्त्रग्रंथांत ज्या अनेक जातींचा संकरजाती म्हणून उल्लेख आहे. त्यात मागध, सैरंध्र, चांडाल, यांसारख्या जातींचा उल्लेख आहे. आपल्याकडे पूर्वी गोवर्धन ब्राह्मणास गोलक म्हणून 'अमृते जारजः कुंडो मृते भर्तरि गोलकः' या मनुस्मृतीमधील वाक्यान्वये त्यांना इतर ब्राह्मण पंक्तिबाह्य धरीत; पण गोवर्धन ब्राह्मण ही प्रादेशिक जात असावी व त्याची जोशीपणाची वृत्ती निदान रामदेवराव जाधवाच्या काळाइतकी जुनी असावी, असे दिसते. ब्राह्मण पुरुष व ब्राह्मण स्त्री यांची अधर्मसंतती ब्राह्मणांतच गफलतीने मिसळून गेल्याची उदाहरणेही आहेत. एकत्र राहणाऱ्या पण विवाहबद्ध नसलेल्या सजातीय स्त्रीपुरुषांपासून झालेली संतती धडपड करून व अडचणीत सापडलेली वधूवरे पाहून आपल्या आईबापांच्याच जातीत प्रवेश करते. जेव्हा वरच्या जातीतील विधवा स्त्रिया पुरुषाबरोवर राहत नसतील व त्यांना मुले झाली असतील, तेव्हा त्या आपल्या मुलांची कशी तरी वाट लावतात, त्या मुलांस मारून टाकतात, किंवा पंढरपूरसारख्या ठिकाणी ठेवून देतात किंवा ख्रिस्ती मिशनऱ्यांस किंवा गोसाव्यास ती मुले देऊन टाकतात. उच्च वर्गातील विधवा किंवा कुमारी आपल्या अधर्मसंततीला उघडपणे वाळगून आहेत, असे एकही उदाहरण पाहण्यात नाही.

जेव्हा पुरुष व स्त्री भिन्नजातीय असून, अधर्मव्यवहाराने एकत्र राहत असतील, तेव्हा त्यांना जी मुले होतात, ती रक्षिली जातात. अशी मंडळी विदुर जात फुगवितात. पण त्यांनाही हल्ली बराच प्रतिबंध झाला आहे. ब्राह्मण पुरुष आणि ब्राह्मणेतर स्त्री अशांपासून जी संतती आहे, तिने इतरांपासून वियुक्तता स्थापन केली आहे, म्हणजे आपली स्वतंत्र जात बनविली आहे. ते स्वतःला पाराशर ब्राह्मण म्हणवून घेत आहेत. मराठ्यांमध्ये प्रथम अधर्मसंततीला दूर ठेवण्यात येते व त्यांचा समावेश कुलीनात होत नाही; पण कालांतराने तसली कुटुंबे सुशिक्षित व संपन्न झाली, म्हणजे त्यांच्याशी चांगल्या कुळातील लोकही लग्नव्यवहार करू लागतात. म्हणजे मराठे जातीतच अधर्मसंततीला थोडेबहुत औदार्य दाखविले जाते, असे म्हणता येईल. मुंबईतील काही अकरमासे सामान्य मराठ्यांपेक्षा शैक्षणिक व सांपत्तिकदृष्ट्या अधिक चांगल्या स्थितीत आहेत. ते मराठ्यात मिसळून जाण्यास फारसे तयार नाहीत. अशांपैकी पुष्कळ मंडळी आपणास ब्राह्मो म्हणवितात. त्यांच्या लग्नांची व्यवस्था त्यांच्यातच होते. ब्राह्मणादी चांगल्या जातींतही अशांची लग्ने झाल्याची उदाहरणे आहेत. त्यांना कायद्याच्या अडचणी नाहीत. एका बाबतीत तर त्यांची स्थिती कायद्याने इष्ट अशीच आहे. एखाद्या हिंदू स्त्रीने युरोपियनाबरोबर लग्न केले, तर त्या स्त्रीच्या संततीला हिंदू समजण्यात येणार नाही; पण तिचा युरोपियनाबरोबर अधर्मसंबंध असला, तर मात्र तिच्या संततीला हिंदू समजण्यात येते. मुंबईतील अकरमाशात असा वर्ग आहे. तसेच मलयाळी लोकांपैकी तिय्या जातीतही असा वर्ग आहे. [ म. ज्ञा. को. ]

**अधःशिरस्** एका नरकाचे नाव. याला अधोमुखही म्हणतात. जे निषिद्ध लोकांकडून पापदाने घेतात व जे लोक फलज्योतिषावर उपजीविका करतात, ते या नरकात पडतात. (ब्रह्मांड पु. ४.२.१४८; विष्णू पु. २.३.४).

**अधिकमास** याला मलमास, पुरुषोत्तम मास आणि महाराष्ट्रात धोंडामास, असेही म्हणतात. चांद्र वर्ष व सौर वर्ष यांचा मेळ घालण्यासाठी सरासरी बत्तीस किंवा तेहतीस चांद्रमासांनंतर चांद्र वर्षात जो एक अधिक महिना धरावा लागतो, त्याला अधिकमास म्हणतात. सामान्यतः प्रत्येक चांद्र मासात एक सौर संक्राती होत असते. ज्या मासात अशी एकही सौर संक्राती घडत नाही, म्हणजेच जो चांद्रमास संपूर्णपणे दोन संक्रांतींच्या दरम्यान येतो, तो अधिकमास समजायचा. उदा० सूर्याची मेषसंक्रांती चैत्र अमावास्येला घडली व त्याची वृषभ संक्रांती वैशाखात न होता ती त्यापुढील महिन्याच्या प्रतिपदेस घडली, तर हा संक्रांतीविहीन मास अधिक वैशाख ठरेल व त्यापुढचा महिना हा निज वैशाख होईल.

चैत्र, ज्येष्ठ व श्रावण हे १२ वर्षांनी, आषाढ १८ वर्षांनी, भाद्रपद २४ वर्षांनी, आश्विन १४१ वर्षांनी व कार्तिक ७०० वर्षांनी अधिकमास होतो. भाद्रपदापर्यंतच्याच मासांना अधिक मास म्हणतात. आश्विन व कार्तिक अधिक झाले, तरी त्यास तसे म्हणत नाहीत. ज्या वर्षी आश्विन अधिक होतो, त्या वर्षी पौष क्षयमास होतो. अशा वेळी दोन प्रहरांपर्यंत मार्गशीर्ष व दोन प्रहरानंतर पौष मानून दोन्ही मासांची धर्मकृत्ये एकाच महिन्यात करतात. या जोड मासाला संसर्प असे म्हणतात. कार्तिकापुढील चार महिने अधिकमास होत नाहीत व आश्विनाच्या पूर्वी क्षयमास होत नाही.

चांद्र व सौर अशा दोन्ही मासांचा प्रचार भारतात वैदिक कालापासून आहे. 'द्वादशमासाः संवत्सरः' म्हणजे बारा मासांचे एक वर्ष ही कालगणनादेखील वैदिक कालाइतकीच प्राचीन आहे. पण सौर वर्षाचे दिवस सुमारे ३६५ असता चांद्रमासाचे दिवस

मात्र ३५४ च भरतात. त्यामुळे १२ चांद्र मास म्हणजे एक वर्ष असे मानले, तर हळूहळू प्रत्येक मास मागे मागे पडू लागेल व वसंत ऋतूतला चैत्र मास ३३ वर्षांत सगळ्या ऋतूत भ्रमण करील. दुसरा परिणाम असा होईल, की ३३ सौर वर्षांत चांद्र वर्षांची संख्या एका वर्षाने वाढेल. असे होऊ द्यायचे नसेल तर बत्तीस किंवा तेहतीस चांद्र महिन्यानंतर एक चांद्र मास अधिक धरणे भाग आहे. भारतीय ज्योतिर्विदांनी हा उपाय अवलंबून चांद्र व सौर या दोन्ही वर्षांचा मेळ घातला.

संहिता व ब्राह्मणे यांत यज्ञ व संवत्सर हे पर्यायवाचक शब्द असल्याचे दाखविणारी अनेक वचने आहेत. लो. टिळकांच्या मते यज्ञ ही संवत्सराचीच एक प्रतिमा होती. त्याप्रमाणे यज्ञ बारा चांद्र मासांत पूर्णही होत असे. परंतु नवीन यज्ञाची सुरुवात संवत्सरारंभी व्हायची असल्यामुळे यज्ञदेवता प्रजापती हा उरलेले बारा दिवस (चांद्र वर्षापेक्षा सौर वर्ष सुमारे ११–१२ दिवसांनी मोठे असते.) नव्या वर्षाच्या यज्ञाची तयारी करण्यात घालवितो, असे अथर्ववेदात (४.११.११) म्हटले आहे. सर्व वर्षभर श्रम केल्यामुळे ऋभू (म्ह. ऋतू) हे या अवधीत आपली गती मंद करून सूर्याचा पाहुणचार घेतात, असे जे ऋग्वेदात वचन आहे, ते देखील या अधिक दिवसांनाच अनुलक्षून आहे. 'वेदाय उपजायते' (ऋ. १. २५. ८) या मंत्रांशाचा अर्थही संदर्भावरून अधिक मास असाच घेतला पाहिजे.

वाजसनेयी संहितेत अधिकमासासाठी अंहसस्पती व मलिम्लुच अशी दोन नावे आली आहेत (७. ३०; २२. ३०). यांतील मलिम्लुच शब्दावरूनच मलमास हा शब्द आला आहे. तेराव्या मासाला ऐ. ब्रा. मध्येही निंद्य म्हटले आहे. (३. १.). वेदाच्या ज्या भागात अधिक मासाचा उल्लेख आहे, तो सनपूर्व १५०० वर्षांच्या सुमारास तयार झाला असावा, असे काही युरोपीय पंडितांचे म्हणणे आहे. पण शं. बा. दीक्षित यांच्या मते अधिकमास धरण्याची पद्धत सनपूर्व सुमारे पाच हजार वर्षांपासून भारतात प्रचलित असावी.

बृहन्नारदीय व पद्म या पुराणांत पुरुषोत्तममासमाहात्म्य व मलमासमाहात्म्य या प्रकरणांत अधिक मासाचे महत्त्व वर्णिले आहे. त्यात अधिक मासात करायची व्रते, दाने, उद्यापने यांचा विधी सांगितला असून, फलश्रुतीही निवेदिली आहे.

**अधिकमासकृत्ये** – या मासाची देवता पुरुषोत्तम म्हणजे विष्णू ही मानली असून, त्याच्या कृपेसाठी पुढील कृत्य करण्यास सांगितले आहे –

पूजा, पापक्षालनासाठी मलमासव्रत, प्रत्येक दिवशी अनरसे, इ. पक्वान्ने तेहतीस या संख्येने कांस्यपात्रात भरून पात्रासह त्यांचे दान, पादत्राणे व छत्री यांचे दान, सुवर्णदक्षिणा, इत्यादी.

महाराष्ट्रात अधिकमासातले अनरशांचे वाण बहुधा जावयाला देतात. कन्या व जामात यांना लक्ष्मीनारायणस्वरूपी मानले आहे, त्यातून ही पद्धत आली असावी.

जी कर्मे अन्य वेळी करणे शक्य असेल, ती अधिकमासात वर्ज्य सांगितली आहेत. उदा० अग्न्याधान, देवप्रतिष्ठा, राज्याभिषेक, विवाहोपनयनादी संस्कार, गृहारंभ, गृहप्रवेश, देशांतर-यात्रा, इ.

अधिकमासात मृत झालेल्यांचे श्राद्ध व महालय, शुद्ध मासात त्या तिथीस करतात. अधिकमासात जन्मलेल्या बालकाचा जन्ममास त्या नावाचा शुद्ध मास असेल तो धरतात. पाहा- अधिमासव्रत. [पं. ज्यो. शा.; पुरुषार्थ चिंतामणी; म. ज्ञा. को.]

## अधिकरणसमथा धम्मा

बौद्ध धर्मशास्त्रातले सात नियम. संघात विवाद निर्माण झाल्यास त्याच्या शांतीचे उपाय म्हणून पुढील सात नियम सांगितले आहेत – (१) संमुखविनय–दोन्ही पक्षांनी एकत्र येऊन धर्मविवादाचे ज्ञानाने परीक्षण करणे. (२) स्मृतिविनय-भिक्षूला अपराधाची स्मृती करून देणे. (३) अमूढविनय-मतिभ्रमाने केलेल्या अपराधाची जाणीव (४) प्रतिज्ञातकरण-वृद्ध भिक्षूजवळ जाऊन अपराधनिवेदन करणे. (५) यद्‌भूयसिक–आवासातल्या सर्व भिक्षूंना एकत्र करून विवादपरीक्षण (६) तत्पापीयसिका –अपराधाविषयी विस्मरण झाल्याचा बहाणा केल्यास दुसऱ्या भिक्षूने त्याला समजावणीच्या मार्गाने कबूल करायला लावणे व (७) तिणवत्थारक-अपराधी माणसाने स्वतःला तृणाने झाकणे. [पा. सा. इ.]

## अधिकारनंदी

शिववाहन. नंदीचे एक वेगळे स्वरूप. या स्वरूपात तो वाहन नसून सेवक असतो. त्याचे रूप पूर्ण किंवा अर्धे मानवी असते.

काही पंडितांच्या मते नंदी हे शिवाचेच वृषभरूप आहे. शिव-वाहनाची कल्पना सनपूर्व पहिल्या किंवा दुसऱ्या शतकात उगम पावली असावी आणि गुप्तकालापूर्वी नंदीला मानवरूप मिळाले असावे. कालिदासाने कुमारसंभवात त्याचे वर्णन शिवाचा द्वारपाल असे केले आहे –

**लतागृहद्वारगतोऽथ नन्दी वामप्रकोष्ठार्पितहेमवेत्रः।**
**मुखार्पितैकाङ्गुलिसंज्ञयैव मा चापलायेति गणान् व्यनैषीत्॥**
(कुमारसं. ३. ४१)

अर्थ – शिवाच्या तपोवनात प्रवेश झाल्यावर साहजिकपणेच शिवगणांच्या चित्तांत विकृती उत्पन्न झाली. मग लतागृहाच्या दारात (पहारा करीत) उभा असलेला व ज्याने आपल्या डाव्या हातात सुवर्णाची वेतकाठी घेतली आहे असा नंदी, नाका-

वर बोट ठेवून 'चंचल बनू नका' असा इशारा शिवगणांना देता झाला.

रामायणात त्याचे वानररूप वर्णिले आहे (वा. रा. १६. १४). सर्व शैव पुराणांतून नंदी मानवरूपातच आढळतो. मूर्तिकलेत त्याच्या मूर्ती शिवासारख्याच घडवितात. फक्त त्याचे पुढचे दोन हात जोडलेले असतात. द. भारतातल्या अनेक शिवालयांच्या प्रवेशद्वारवर अशा शिवसदृश नंदीमूर्ती आढळतात. पण असे असले तरी नंदीचे वृषभरूप मात्र केव्हाही विसरले गेले नाही. पाहा—नंदी, नंदीशमूर्ती. [ डे. हिं. इ. ]

**अधिदैवत** वेदान्तदर्शनातील पारिभाषिक शब्द. इंद्रियांच्या देवता. जसे— हातांची देवता इंद्र, पायांची विष्णू, डोळ्यांची सूर्य, इत्यादी. त्या त्या देवता त्या त्या इंद्रियांचा व्यापार चालवितात. उपनिषदांत उपासनेसाठी ब्रह्मस्वरूपाची जी प्रतीके सांगितली आहेत, त्यांत आकाश हे अधिदैवत प्रतीक मानले आहे ( छान्दोग्य. ३. १८. १ ).

गीतेत श्रीकृष्ण अर्जुनाला 'पुरुषश्चाधिदैवतम्' = पुरुष म्हणजे अधिदैवत होय, असे सांगतो (८.४). पुरुष या शब्दाने सूर्यातला पुरुष, पाण्याची देवता किंवा वरुणपुरुष, इ. सचेतन सूक्ष्मदेहधारी देवता विवक्षित असून, हिरण्यगर्भाचाही त्यात समावेश होतो. पाहा— हिरण्यगर्भ. [ गी. र. पृ. ७०८ ]

**अधिमासव्रत** अधिकमासात करायचे मासव्रत. याचा विधी पुढीलप्रमाणे — विष्णुस्वरूप सूर्याची पूजा. उपवास किंवा नक्तभोजन. तेहतीस गुडघृतमिश्र अपूपांचे ( अनरसे ) दान. दानाचा मंत्र असा —

**विष्णुरूपी सहस्रांशु : सर्वपापप्रणाशनः।**
**अपूपान्नदानेन मम पापं व्यपोहतु ॥**

अर्थ— विष्णुरूपी सर्वपापनाशक सूर्य ( मी केलेल्या ) अपूपदानाने माझे पाप नष्ट करो.

मग प्रार्थना, ब्राह्मणभोजन व पुरुषोत्तममाहात्म्याचे श्रवण. व्रताचे फल — पापनाश व सुखसमृद्धीची प्राप्ती.

या व्रताची कथा अशी —

नहुषराजाला इंद्रपद मिळाल्यावर तो उन्मत्त झाला व त्याने शचीची कामना धरली. तिच्या महालात जाण्यासाठी त्याने अगस्त्यादी ऋषींना आपली पालखी वाहायला लावले. पालखीत बसल्यावर तो अगस्त्याला 'सर्प,' ( लवकर चल ) म्हणाला, तेव्हा अगस्त्याने 'तूच सर्प हो' असा शाप दिला. नहुष सर्पयोनीत पडला. शेवटी व्यासांच्या आदेशानुसार त्याने हे व्रत केले व तो सर्पयोनीतून मुक्त झाला. पाहा — अधिकमास.

**अधिवासन** 'अधिवासयति स्थापयति देवता अनेन इति' (= ज्याच्या योगाने देवतेची स्थापना करतात, असा एक विधी), अशी याची व्याख्या आहे. तेल, हळद, इ. द्रव्यांनी स्थापनीय मूर्तीचे शुद्धीकरण व संस्करण करणे, याला अधिवासन म्हणतात. प्रतिष्ठेच्या पूर्वदिवशी सायंकाळी ही करतात. संस्कारद्रव्ये पुढीलप्रमाणे एकंदर २२ आहेत — मृत्तिका, गंध, शिला, धान्य, दूर्वा, पुष्प, फल, दधी, घृत, स्वस्तिक, सिंदूर, शंख, काजळ, रोचना, पांढऱ्या मोहऱ्या, सुवर्ण, रुपे, तांबे, चामर, दर्पण, दीप व प्रशस्त पात्र. [ श. क. ]

**अधिषवण** सोमरस काढण्यासाठी ज्या दोन फलकांवर सोमलता ठेवून ती दगडांनी कुटतात, त्या फलकांना अधिषवण असे नाव आहे (अथर्व. ५. २०. १०; श. ब्रा. ३. ९. ४. १). [ वे. इं. ]

**अधिष्ठान** (१) आश्रय, वस्तूची राहण्याची जागा. 'आत्मनो भोगायतनं शरीरम्' = आत्म्याचे भोग भोगण्याचे ठिकाण, स्थान म्हणजे शरीर होय (वात्स्या. १. १. ९). म्हणून शरीरालाही अधिष्ठान म्हटले आहे. प्रत्येक पदार्थांला अधिष्ठान व उपाधी अशी दोन अंगे दिसतात. उदा० सोने व सोन्याचा दागिना. यात सोने हे अधिष्ठान व दागिना ही उपाधी आहे. उपाधी (आकार) बदलली, की त्याला निराळे नाव पडते. यावरून जगातली भिन्न भिन्न नावे उपाधीलाच लागतात; अधिष्ठानाला नाहीत, असा सिद्धान्त आहे.

भक्तिमार्गात हृदय हे भगवंताचे अधिष्ठान मानलेले आहे —

**ईश्वर : सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।**
**भ्रामयन् सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया ।।**
(गीता १८. ६१).

अर्थ — हे अर्जुना, ईश्वर सर्व भूतांच्या हृदयात राहून यंत्रावर चालविल्याप्रमाणे सर्व भूतांना (आपल्या) मायेने चालवीत असतो. [ ब्र. सि. मा. ]

(२) स्थापत्यशास्त्रात इमारतीच्या चौथऱ्याला किंवा जमिनीबरोबरच्या सर्वांत खालच्या घटकाला हे नाव आहे. (कामिकागम ३०. ५).

**अधिसामकृष्ण** एक पौराणिक राजा. मत्स्यपुराणानुसार शतानीकाचा पुत्र. वायू, विष्णू व मत्स्य या पुराणांत या राजाच्या पुढे भविष्यकालीन राजवंश सांगण्यास प्रारंभ झाला आहे. हा राज्य करीत असता वायुपुराण लिहिले गेले. हस्तिनापूर महापुरात वाहून गेल्यामुळे याने आपली राज

धानी कौशांबीला नेली (वायुपु. २. ३७. २५४). विष्णू व मत्स्य या पुराणांत अधिसोमकृष्ण व भागवतात अधिसीमकृष्ण असे त्याच्या नावाचे पाठभेद आहेत. [ प्रा. च. को. ]

**अधीवास** उपरणे. वेदकाळी पुरुष आपल्या कपड्यांवरून हे वस्त्र परिधान करीत (ऋ. १. १४०. ९). स्त्रियाही अशा वस्त्राचा उपयोग करीत. [ वे. इं. ]

**अधोमुखजननशांती** मूल अधोमुख जन्माला आले तर त्या अशुभाचा परिहार करण्यासाठी ही शांती सांगितलेली आहे. प्रथम गोमुखप्रसवशांती, रुद्र या देवतेची स्थापना व पूजा; मग अग्निस्थापनापूर्वक अग्निमुख; मुख्य देवतेसाठी कलशस्थापना करून रुद्राध्याय व रुद्रसूक्त यांचे पठन; समिधा, चरू, आज्य व तिल यांचा प्रधानहोम; मग बलिदान, पूर्णाहुती व शेवटी बालकासह यजमानाला अभिषेक करतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**अधोमुख नक्षत्रगण** सत्तावीस नक्षत्रांत पुढील नक्षत्रे अधोमुख आहेत – आश्लेषा, कृत्तिका, भरणी, मघा, विशाखा, पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वा भाद्रपदा व शततारका. ही नऊ नक्षत्रे अधोमुख असल्यामुळे अशुभ असून, ती विद्या, अर्घ्य व भूमी खणणे या कार्यासाठी शुभ होतात, असे सांगितले आहे. [ ज्योतिःसारसंग्रह ]

**अधोमुख वृक्षासन** हठयोगातील एक आसन. हे करण्याची पद्धती अशी – ताडासनात उभे राहून पुढे वाकावे, भिंतीपासून एक फूट अंतरावर तळहात जमिनीवर टेकावे. तळहातांमधील अंतर खांद्यांमधील अंतराइतके असावे. हात पूर्णपणे ताणलेले असावे. नंतर पाय मागे नेऊन गुडघे वाकवून श्वास सोडावा व पाय उचलून वर न्यावे. भिंतीच्या आधाराने तोल सांभाळावा. नेहमीप्रमाने श्वसन करीत या स्थितीत एक मिनिट राहावे.

भिंतीच्या आधाराने हातावर तोल सांभाळण्यास शिकल्यावर पाय भिंतीपासून दूर ठेवावे व नंतर हेच आसन खोलीच्या मध्यभागी करण्याचा प्रयत्न करावा. पाय पूर्णपणे ताणून धरावे. बोटे वर रोखलेली असू द्यावी व डोके अधिकाधिक वर उचलून धरावे.

या आसनामुळे शरीराची समतोल वाढ होते; खांदे, दंड व मनगटे मजबूत बनतात आणि छाती पूर्णपणे विस्तारली जाते, असे सांगितले आहे. [ योगदीपिका ]

**अधोमुख श्वानासन** हठयोगातील एक आसन. हे करण्याची पद्धती अशी – डोके आणि पुढले पाय खाली व मागचे पाय वर अशा स्थितीतील कुत्र्यासारखे हे आसन दिसते, म्हणून त्याला हे नाव पडले आहे.

या आसनात तोंड जमिनीकडे वळवून, पाय लांब करून, जमिनीवर पालथे निजतात. पावलांमध्ये एक फूट अंतर ठेवतात. तळहात छातीच्या बाजूला टेकवून बोटे सरळ व डोक्याकडे रोखलेली ठेवतात. श्वास सोडून धड जमिनीवरून उचलतात. हात ताठ करतात. डोके आतल्या बाजूस पावलांच्या दिशेने वळवतात आणि टाळू जमिनीवर टेकवतात. कोपरे सरळ ... देतात व पाठ ताणून धरतात. पाय ताठ ठेवून ते गुडघ्याशी न वाकवता टाचा खाली ओढतात आणि पायांचे चवडे आणि टाचा जमिनीवर पूर्णपणे टेकवतात.

या आसनात हृदयावर विशेष ताण न पडता रक्तप्रवाह व्यवस्थित वाहू लागतो. मेंदूमधील पेशींना त्यामुळे नवचैतन्य लाभते. तीव्र रक्तदाबाचा विकार असलेल्यांनी हे आसन करण्यास हरकत नाही. [ योगदीपिका. ]

**अधोवस्त्र** प्राचीन काळचे कमरेभोवती कसून बांधले जाणारे छोटे वस्त्र. त्याचा एक पदर नाभीच्या खाली ... वरच्या टोकाची गाठ बांधीत व खालचे टोक सुटे ठेवीत ... दुसऱ्या पदराचा मागच्या बाजूने कांचा खोचल्यावरही काही भाग ... वर राही. शरीर वाकविल्यावर वस्त्र वर ओढले गेल्याने उजव्या ... मांडीचा काही भाग उघडा दिसे. अधोवस्त्र वापरण्याची ... पद्धत गुप्तकालीन मूर्तीत दिसून येते. [ह. च–सां. अ.]

**अध्यग्नी** स्त्रीधनाच्या सहा प्रकारांपैकी एक. हे सहा प्रकार मनूने पुढीलप्रमाणे सांगितले आहेत –

अध्यग्न्यध्यावाहनिकं दत्तं च प्रीतिकर्मणि ।
भ्रातृमातृपितृप्राप्तं षड्‌विधं स्त्रीधनं स्मृतम् ।।
(मनु ९. १९४)

अर्थ – अध्यग्नी, अध्यावाहनिक, सणासुदीस पतीकडून प्रेमाने भेट म्हणून मिळालेले, भाऊ, माता व पिता यांनी दिलेले, ... स्त्रीधनाचे सहा प्रकार आहेत.

विवाहाच्या वेळी, अग्नीसमक्ष स्त्रियांना जे (द्रव्य) दिले जाते, त्याला अध्यग्नी स्त्रीधन, असे म्हणतात.

**अध्यवसाय** 'इदमेवेति विषयपरिच्छेदो निश्चयः' ('हेच' अशा प्रकारे विषयाचे ज्ञान होणे, याला निश्चय म्हणतात). निश्चय म्हणजेच अध्यवसाय होय. 'निश्चय ...

व्यवसायः स्यात्' (अमर), कोणतीही गोष्ट तडीस नेण्यासाठी या अध्यवसायाची अत्यंत जरुरी असते. सांख्यांच्या मते 'अध्यवसायो बुद्धिः' = अध्यवसाय म्हणजेच बुद्धी होय (सां. का.). ही बुद्धीच पुरुषाला भोग-मोक्ष देते. [ हि. इं. फि. ]

**अध्यक्ष** 'अध्यक्षणोति समन्तात् व्याप्नोति इति' ( = सर्व बाजूंनी पाहणारा, व्यापणारा अतएव आयव्ययादी कृत्यांचा निरीक्षक अधिकारी म्हणजे अध्यक्ष होय.) (हलायुध). 'अध्यक्षाधिकृतौ समौ' असे म्हणून अमरकोशात अध्यक्ष व अधिकारी हे समान मानले आहेत. वेदोत्तर व पाणिनीच्या कालात एखाद्या खात्यावरच्या वरिष्ठ अधिकाऱ्याला अध्यक्ष म्हणत. कौटिल्याच्या मते एकेका विभागाचा उच्चतम प्रशासक म्हणजे अध्यक्ष होय. त्याच्या अर्थशास्त्रात पंचवीस अध्यक्षांची नावे आली आहेत. त्यांत अश्वाध्यक्ष व गवाध्यक्षही आहेत. पाहा – अर्थशास्त्र. [ पा. का. भा. ]

**अध्यात्मरामायण** रामचरित्र कथन करणारा सुप्रसिद्ध ग्रंथ. याला अध्यात्मरामचरित किंवा आध्यात्मिक रामसंहिता, असेही म्हटले आहे. हा उमामहेश्वरांच्या संवादातून विस्तारलेला ग्रंथ आहे. उमेची प्रार्थना अशी – 'भक्तियोग हे जरी परमेश्वरप्राप्तीचे श्रेष्ठ साधन असले, तरी परमेश्वराचे स्वरूप अनेकांनी अनेक प्रकारे वर्णिल्यामुळे त्याविषयी निश्चय होत नाही. तरी तुम्ही मला परमेश्वराचे खरे स्वरूप सांगावे.' त्यावर शिवाने तिला समग्र अध्यात्मरामायण सांगितले.

अध्यात्मरामायणाचा मूलाधार वाल्मीकीचे रामायण हाच आहे. मात्र काही ठिकाणी कर्त्याने मूळ रामायणात बदल केला आहे. उदा० दशरथाने केलेल्या पुत्रकामेष्टीत अग्नीने दिलेला पुरोडाश कौसल्या व कैकयी यांना मिळाला असता, त्यांनी आपल्यातला अर्धा अर्धा वाटा सुमित्रेला दिला, अशी कथा अध्यात्मरामायणात सांगितली असून, वाल्मीकिरामायणात तो अग्निदत्त पायस दशरथानेच सर्व राण्यांना वाटून दिला आणि त्यांतही सुमित्रेला दोनदा दिला असे म्हटले आहे.

या ग्रंथाची ७ कांडे व ६५ सर्ग आहेत. याचा रचनाकाल इ. स. १५ वे शतक हा मानलेला आहे. कोण्या शिवोपासक रामशर्म्याने हा ग्रंथ रचला, असे भविष्यपुराणात म्हटले आहे. हा रामशर्मा म्हणजे रामानंदस्वामीच होय, असेही काही लोक म्हणतात. पण संशोधक ते मान्य करीत नाहीत. या ग्रंथावर अद्वैतमताचा प्रभाव तर आहेच; शिवाय योगमार्ग व तंत्रमार्ग यांचाही प्रभाव आहे. मुख्यतः वेदान्त व भक्ती यांची सांगड घालण्याकरिता गीतेच्या व श्रीमद्भागवताच्या आधारावर हा ग्रंथ लिहिलेला आहे, असे श्री. नरहर गणेश जोशी म्हणतात. हा ग्रंथ रामभक्तांसाठी अत्यंत महत्त्वपूर्ण आहे, असे त्यात म्हटले आहे. यात रामाला विष्णूचा अवतार मानले असून, त्याचबरोबर तो निर्गुण परब्रह्म आहे, असेही म्हटले आहे. इथे सीता ही योगमाया असून, रावण हा रामाचा विरोधभक्त आहे. रामाचे अवतारकार्य वाचकांच्या डोळ्यांपुढे सतत राहावे, अशा तऱ्हेने अध्यात्मरामायणाची रचना आहे. बालकांडातील रामहृदयस्तोत्रापासून उत्तर कांडात कौसल्येला रामाने तत्त्वज्ञान उपदेशिले आहे, तिथवर रामाची निरनिराळ्या लोकांनी केलेली स्तोत्रे या ग्रंथात जागोजाग आढळतात. भागवतातल्या कृष्णकथेचे अनुकरण करून या ग्रंथात रामाच्याही बाललीलांचे वर्णन केले आहे. कृष्णाने अर्जुनाला गीता उपदेशिली, त्याच धर्तीवर अध्यात्मरामायणात रामाने लक्ष्मणाला उपदेश केला असून, तो रामगीता या नावाने प्रसिद्ध आहे. या रामगीतेचा पहिला श्लोक असा –

**आदौ स्ववर्णाश्रमवर्णिताः क्रियाः कृत्वा समासादितशुद्धमानसः ।**
**समाप्य तत्पूर्वमुपात्तसाधनः समाश्रयेत् सद्गुरुमात्मलब्धये ॥**

(उत्तरकांड ५.७)

अर्थ – प्रथमतः मनुष्याने स्वतःच्या वर्णाश्रमानुसार (नित्यनैमित्तिक) कर्मे आचरावी. त्यायोगे अंतःकरणशुद्धी होईल. पुढे तिच्यामुळे शमदमादी साधने प्राप्त झाली असता कर्माचरणातच केवळ गुरफटून न राहता त्याने आत्मज्ञानासाठी सद्गुरूचा आश्रय करावा.

त्यापुढे राम म्हणतो – जगामध्ये दिसणारे नानात्व अनित्य असून नाम-रूपांच्या पलिकडचे परब्रह्मतत्त्व हेच काय ते एकमेव सत्य होय. मनुष्याच्या संसारबंधाला एकमेव कारण म्हणजे अज्ञान आणि त्याच्या नाशाचा एकच उपाय म्हणजे आत्मज्ञान होय. श्रद्धायुक्त होऊन आणि मन निर्मळ करून गुरुकृपेने 'तत्त्वमसि' इ. वाक्यांनी जीवात्मा व परमात्मा यांचे एकरूपत्व जाणावे आणि मेरुप्रमाणे निश्चल, सुखरूप होऊन राहावे.

या ग्रंथाविषयी श्री. पां. कृ. सावळापूरकर यांनी व्यक्त केलेले विचार असे –

अध्यात्मरामायण हा अद्वैत वेदान्त आणि भक्तिमार्ग यांचे प्रवर्तन करणारा एक सुप्रसिद्ध ग्रंथ असून, त्याची छाप तदुत्तरकालात निर्माण झालेल्या अनेक रामकथांवर पडली आहे. विशेषतः तुलसीदासांचे रामचरितमानस आणि एकनाथांचे भावार्थरामायण यांतील अनेक कल्पना अध्यात्मरामायणातील आहेत. अध्यात्मरामायणातील रामकथा ही प्रमुखतः वाल्मीकिरामायणाच्या आधारानेच रचली असली तरी, तिच्यावर वाल्मीकिरामायणापेक्षा भागवताचाच परिणाम अधिक झाला आहे.

अध्यात्मरामायणाची मूळ भूमिकाच, राम हा परमेश्वरावतार असून, पूर्वनियोजनाप्रमाणे त्याने व अन्य मंडळींनी या मृत्युलोकातील अवतारकृत्याचे केवळ नाटक वठविले आहे, अशी आहे. या नाटकात केवळ रामादी अवतारच पूर्वनियोजित नाहीत, तर रावणही हेतुपुरस्सर रामाकडून वध करून घेण्यासाठीच अवतीर्ण झाला आहे, अशी योजना आहे. त्यामुळे या सर्व पात्रांची सुखदुःखे ही नैसर्गिक राहिली नाहीत. भागवतातील कृष्णकथेचे केवळ अनुकरण करण्याच्या छंदामुळे अध्यात्मरामायणकर्त्याने ही भूमिका घेतली आहे. वेदान्तासाठी ती कदाचित आवश्यक असली तरी, कथानकाची रोचकता त्यामुळे नाहीशी झाली आहे.

हा प्राचीन ग्रंथ रामाने शंकरास व शंकराने पार्वतीस सांगितला. पुढे होणाऱ्या पात्राने अगोदरच उत्पन्न होऊन पुढील भविष्य कथन केले, हा सर्व अद्‌भुत प्रकार देवविषयक ग्रंथात शोभतो व भाविकांना त्यात काही विलक्षण वाटत नाही. [ सार्थ श्रीमत्-अध्यात्म-रामायणम् – श्री. भा. शं. देवस्थळी, १९५५ (प्रस्तावना – श्री. न. ग. जोशी) ; मतिप्रकाश ]

**अध्यात्मरामायणकीर्तनलू** सुब्रह्मण्यम् या कवीने तेलुगू भाषेत रचलेला ग्रंथ. यात शंभर 'कीर्तनां'मध्ये संपूर्ण रामायणकथा वर्णित आहे. ही कीर्तने १२ किंवा १४ चरणांची आहेत. कर्नाटक-सारंग, मंगलकैशिकी, ललितपंचमी, इ. अप्रसिद्ध राग या काव्यात पाहायला मिळतात. इ. स.च्या १९व्या शतकाच्या प्रारंभी हा कवी होऊन गेला. याची ही कीर्तने आंध्रात लोकप्रिय आहेत. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**अध्यात्मशास्त्र** आत्मा या विषयाचे शास्त्र. अध्यात्म या शब्दात अधि आणि आत्म हे दोन शब्द आहेत. अधि या उपसर्गाचा अर्थ तमधिकृत्य = त्याविषयी असा आहे. अध्यात्म म्हणजे आत्म्याविषयी ज्ञान होय. शं. वा. दांडेकर यांनी अध्यात्मशास्त्राची व्याख्या 'अंतिम सत्य शोधून काढण्याच्या दृष्टीने केलेले अनुभवाचे मंथन' अशी केली आहे. आपल्या अनुभवात येणारे जेवढे म्हणून पदार्थ आहेत, त्यांतील नित्य काय व अनित्य काय हे शोधून काढण्याच्या दृष्टीने जे शास्त्र त्यांकडे बघते ते अध्यात्मशास्त्र होय.

अध्यात्मशास्त्र म्हणजे आत्मज्ञानाचे शास्त्र आणि अध्यात्मदर्शन म्हणजे आत्म्याविषयी दर्शन होय. या दृश्य विश्वाला आधारभूत असलेल्या आत्मस्वरूपाचा तर्काने निश्चय करणे आणि नंतर त्याचा साक्षात अनुभव घेणे याला अध्यात्मदर्शन हे नावआहे.

अध्यात्मशास्त्राला पराविद्या असेही म्हणतात. हे तत्त्वज्ञान वेदांमध्ये उगम पावले आणि उपनिषदांमध्ये पूर्णतेला पोचले. उपनिषदे हे अध्यात्मज्ञानाचे भांडारच आहे. तसेच भगवद्‌गीतेत अध्यात्म शास्त्राचे मर्म सुंदर रीतीने सांगितले आहे.

या अशाश्वत जगतात अमृतत्व कुठे आहे याचा शोध करता करता वैदिक ऋषींना 'एकं सत्'चा साक्षात्कार झाला. मूळ सत् एकच व सर्वव्यापी असून ते आत्मरूपाने मनुष्याच्या अंतःकरणात वसते. त्या आत्म्याचा साक्षात् अनुभव घेणे हे मानवी जीवनाचे अंतिम ध्येय वैदिक ऋषींनी ठरविले. प्राचीन व अर्वाचीन ब्रह्मज्ञानी पुरुषांनी अध्यात्मशास्त्राची परंपरा आजपर्यंत टिकवून धरली आहे. ही परंपरा अखंडपणे टिकण्याचे कारण थोर संतांची त्यावरील अढळ निष्ठा हे होय.

सर्व विश्वाला व्यापणारे अव्यक्त अविनाशी तत्त्व कोणते, त्याचा विचार करणे आणि त्या अव्यक्तातून उगम पावणाऱ्या व त्यातच पुन्हा विलीन होणाऱ्या चराचर विश्वाचे ज्ञान करून घेणे, याला वेदान्तामध्ये अध्यात्मशास्त्र म्हणतात. ईश्वर (परब्रह्म) स्वरूपाची ओळख करून घेणे हे अध्यात्मशास्त्राचे परमोच्च ध्येय होय.

अध्यात्मशास्त्राचा योग्य अधिकारी कोण, ते योगवासिष्ठातील पुढील श्लोकात सांगितले आहे. –

अहं बद्धो विमुक्तः स्यामिति यस्यास्ति निश्चयः।
नात्यन्तमज्ञो नो तज्ज्ञः सोऽस्मिञ्छास्त्रेऽधिकारवान्॥
(१.२.२)

अर्थ – मी बद्ध असून, मुक्त कसा होईन, अशी चिंता ज्याला लागली आहे, तसेच जो अगदी अज्ञ नाही व तज्ज्ञही नाही, असा मनुष्य या शास्त्राचा अधिकारी असतो.

जे जीव साधनचतुष्टयपूर्ण असतात, म्हणजे ज्यांच्या अंगी विवेक, वैराग्य, शमादिषट्क व मुमुक्षत्व ही चार तत्त्वे बाणलेली आहेत, तेच या शास्त्राचे अधिकारी होत; कारण ज्यांचा मोह नष्ट झाला आहे, जे तत्त्वज्ञ आहेत, ज्यांचे चित्त शुद्ध झालेले आहे, अशा प्रबुद्ध लोकांचीच या शास्त्रात गती होत असते. हे जग ब्रह्मरूप आहे, हा उपदेश अज्ञानी मनुष्याला करणे व्यर्थ आहे. यज्ञ, दान, तप यांच्या योगाने बुद्धी सुसंस्कृत झालेली नसेल तर आत्मज्ञान होणार नाही. पाहा – अद्वैतदर्शन, आत्मा, उपनिषदे, द्वैतदर्शन, ज्ञान. [ अध्यात्मदर्शन; यो. वा. सं. वा. ]

**अध्यापक** 'उपेत्य अधीयते अस्मात् इति' (= ज्याच्याजवळ जाऊन अध्ययन केले जाते तो अध्यापक होय). विशिष्ट ग्रंथांच्या अध्यापनामुळे अध्यापकांचे अनेक प्रकार मानलेले आहेत. चरणांतर्गत विषयांचे नियमपूर्वक अध्यापन करणाऱ्याला आख्याता म्हणत (अष्टा. १. ४. २९). स्वाध्याय-विषयक ग्रंथांचे अध्यापन करणाऱ्याला प्रवचनीय म्हणत

'प्रवचनीयो गुरुः स्वाध्यायस्य' (अष्टा. ३. ४. ६८). वैदिक ग्रंथांचे प्रवचन करणाऱ्याला प्रवक्ता म्हणत (अष्टा. २. १. ६). वेदांगांचे शिक्षण देणाऱ्याला अनूचान म्हणत. 'अङ्गाध्यायी अनूचानः' (बौधा. गृ. सू. १. ४). उपनयन करणाऱ्या गुरूला अधीष्ट म्हणत. जेवढ्या कालासाठी शिष्य अध्यापनाबद्दल प्रार्थना करी, तेवढ्या कालावरून त्याला मासाध्यापक, वर्षाध्यापक, इ. नावे मिळत. अष्टाध्यायीत दारुणाध्यापक, घोराध्यापक, इ. आणखी काही अध्यापकांचे प्रकार सांगितले आहेत. विद्यार्थ्यांना कठोर शिस्तीत वागवून अध्यापन करणाऱ्यांना ही नावे होती. अनुभवी, सरळ व आदर्श अध्यापकांना काष्ठाध्यापक, परमाध्यापक, स्वाध्यापक असे म्हणत. घोकंपट्टी करून घेणाऱ्या अध्यापकाला भृशाध्यापक म्हणत. [पा. का. भा.]

**अध्यारोप** 'असर्पभूतरज्जौ सर्पारोपवत् अजगद्रूपे ब्रह्मणि जगद्रूपारोपवत् वस्तुनि अवस्त्वारोपोऽध्यारोपः' (=सर्प नसलेल्या रज्जूवर सर्पाचा, त्याचप्रमाणे जगद्रूप नसलेल्या ब्रह्मावर जगाचा आरोप होतो, तद्वत् अवस्तूवर वस्तूचा आरोप करणे याला अध्यारोप म्हणतात). ब्रह्म सत्य, जग मिथ्या व जीवब्रह्मैक्य, या तीन गोष्टींची सिद्धी वेदान्तशास्त्र करते. पण अज्ञ जनांच्या समजुतीप्रमाणे जग सत्य आहे, असे गृहीत धरून व सृष्टीचे उपक्रमोपसंहार सांगून नंतर 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' (=ब्रह्म हे एकमेव व अद्वितीय आहे), हा सिद्धान्त सिद्ध करावा लागतो. म्हणून वेदान्ताच्या प्रकरणग्रंथांच्या प्रारंभी 'अध्यारोपापवादाभ्यां निष्प्रपञ्चं प्रपञ्च्यते' (=अध्यारोप व अपवाद या दोहोंच्या साहाय्याने निष्प्रपंच ब्रह्माचा प्रपंच केला जातो), असे म्हटलेले असते. [ब्र. सि. मा.]

**अध्यावाहनिक** स्त्रीधनाच्या सहा प्रकारांपैकी एक. पित्याच्या घरातून पतिगृही जाताना स्त्रीला जे धन मिळते, त्याला अध्यावाहनिक स्त्रीधन, असे म्हणतात.

**अध्यास** अद्वैतदर्शनातला एक पारिभाषिक शब्द. अयथार्थज्ञान अर्थात मिथ्याज्ञान किंवा 'अतस्मिंस्तद्बुद्धिः' म्हणजे ते नसलेल्या ठिकाणी ते आहे, अशी बुद्धी होणे याला अध्यास म्हणतात. शुक्तीच्या ठिकाणी रुप्याचा किंवा रज्जूच्या ठिकाणी सर्पाचा भ्रम होणे, ही याची उदाहरणे आहेत.

यातले 'अधि' हे पद महत्त्वाचे आहे. त्याचा अर्थ अधिष्ठान असा आहे. आचार्यांनी अधिष्ठानाची सत्ता स्वीकारून बौद्धांचा शून्यवाद टाळला आहे. अध्यासात दोन पक्ष असतात. ज्याच्यावर आरोप होतो तो एक पक्ष व ज्याचा आरोप होतो तो दुसरा पक्ष. उदा० रज्जू हा एक पक्ष व सर्प हा दुसरा पक्ष. या दोहोंमुळे अध्यास होतो. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' हा अद्वैतवेदान्ताचा परम सिद्धान्त आहे व तो सिद्ध करण्यासाठी शंकराचार्यांनी अध्यासाचा अवलंब केला आहे. मिथ्या जगाचा सत्य ब्रह्म या अधिष्ठानावर भ्रमाने आरोप होतो हे सिद्ध करून त्यांना ब्रह्माची सत्यता व जगन्मिथ्यत्व पटवायचे आहे.

तार्किकांच्या मते अध्यास हा प्रमाणाने सिद्ध होणारा नाही. पण आचार्यांच्या मते लोकव्यवहार तसा होत असल्यामुळे अध्यास संभवनीय आहे. परमार्थतः दोन धर्मींचे तादात्म्य नसणे व धर्मांचे मिश्रण न होणे याला विवेक म्हणतात. या विवेकाच्या अभावामुळे अध्यास होतो. आत्मा व देहादी हे दोन पृथक् पदार्थ आहेत. तसेच त्यांचे अनुक्रमे चैतन्य व जाड्य हे धर्मही भिन्न आहेत. तेव्हा वस्तुतः धर्मी-धर्मींचा व धर्मी व धर्म यांचा अध्यास संभवू नये. पण अविवेकामुळे तो संभवतो. परस्पर भेदज्ञान न झाल्यामुळे देहावरच आत्म्याचा आरोप होतो व जन्ममरणादी देहाचे धर्म आत्म्यावर आरोपित होतात. म्हणजेच आत्मा व देह यांची भिन्नता न कळल्यामुळे 'मी अमुक आहे व हे अमके तमके पदार्थ माझे आहेत,' असे वाटू लागते. सत्यानृताचे मिथुनीकरण होऊन (खऱ्या खोट्यांच्या मिश्रणाने) हा अध्यास निर्माण होतो. कारण सत्याच्या ज्ञानावाचून मिथ्याज्ञानाचा संभव नाही. सत्य म्हणजे चिदात्मा व अनृत म्हणजे देह, इंद्रिये इत्यादी. या दोन धर्मींचे मिथुनीकरण झाले, की 'मी मनुष्य आहे व पुत्रभार्यासंपत्ती ही माझी आहेत', असा संसर्गरूप अध्यास होतो. अध्यासावस्थेत सत्य व मिथ्या यांचा परस्परविवेक होऊ शकत नाही.

अध्यासाचे स्वरूपलक्षण शंकराचार्यांनी सांगितले आहे ते असे —

**स्मृतिरूपः परत्र पूर्वदृष्टावभासः।**

अर्थ — एखाद्या पदार्थात तत्सदृश अशा दुसऱ्या एखाद्या पूर्वदृष्ट पदार्थाचा स्मृतिरूप अवभास होणे.

शिंप पाहिल्यावर पूर्वदृष्ट स्मृतिरूप रुप्याचा व रज्जू पाहिल्यावर तसाच सर्पाचा त्यावर आरोप होत असतो. हाच अध्यास होय. रज्जू पाहिल्यावर प्रथम सर्पाचे स्मरण व त्यानंतर सर्पाचे ज्ञान अशी ती प्रक्रिया आहे. ही सर्पज्ञानाची स्मृती सर्पाहून भिन्न वस्तू आहे. अधिष्ठानाचे ज्ञान, म्हणजेच शिंप. ही शिंप आहे व रज्जू ही रज्जू आहे, असे ज्ञान झाले, की त्यावरचा रुपे व सर्प याचा अध्यास दूर होतो.

अध्यास हा सत् व असत् यांहून विलक्षण अतएव अनिर्वचनीय आहे. रज्जूवर भासलेला सर्प हा सत् नव्हे. कारण तो सत् असता, तर त्याचा बाध झाला नसता. सद्वस्तूचा कधीही बाध

होऊ शकत नाही. तो असत् म्हणावा, तर असत्पदार्थाचे कधीही ज्ञान होत नसल्यामुळे सर्पाचे ज्ञानच होऊ नये. पण ते होते. म्हणून अध्यासाचे निरूपण अनिर्वचनीय या शब्दाने करावे लागते.

निरुपाधिक व सोपाधिक असे अध्यासाचे दोन भेद आहेत. दोष किंवा कर्म यांनी क्षुब्ध झालेल्या अज्ञानापासून उत्पन्न होणारा व तत्त्वज्ञानाचा विरोधी असा जो भ्रम व त्यामुळे निरुपाधिक चिद्रूप आत्म्याच्या ठिकाणी अहंकाराचा अध्यास होणे, याला निरुपाधिक म्हणतात. तत्त्वज्ञानाने तो बाधित होतो. अविद्येमुळे मायोपाधिक ब्रह्माच्या ठिकाणी जीव व ईश्वर या रूपाने भेदाचा आभास होणे, याला सोपाधिक म्हणतात. उपाधीच्या निवृत्तीने त्याचा निरास होतो.

अध्यासाचे ज्ञानाध्यास व अर्थाध्यास असे आणखीही दोन भेद आहेत. ज्ञानाध्यासात एका वस्तूचा दुसऱ्या वस्तूवर आरोप होतो. सर्प व सर्पज्ञान ही भिन्न आहेत. सर्पाचा अध्यास म्हणजे अर्थाध्यास व सर्पज्ञानाचा अध्यास म्हणजे ज्ञानाध्यास होय. चैतन्यस्वरूप ब्रह्मावाचून जेवढे म्हणून व्यावहारिक व प्रातिभासिक पदार्थ आहे, त्या सर्वांचा ब्रह्माच्या ठिकाणी आरोप करणे, याला अर्थाध्यास म्हणतात. आत्मसाक्षात्कार होण्यापूर्वी ज्यांचा बाध होत नाही, ते पदार्थ व्यावहारिक व आत्मज्ञानापूर्वी ज्यांचा बाध होतो, ते पदार्थ प्रातिभासिक होत. [ वै. शां. अ. म. ]

**अध्रिगुप्रैष** पशुयागांतील पशुहननाच्या अधिष्ठात्री देवतेला अध्रिगू असे नांव आहे. 'अध्रिगुर्वै देवानां शमिता' (= अध्रिगू हा देवांचा शमिता अर्थात शामित्र कर्म करणारा होय), असे ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे (२. ७). तैत्तिरीय ब्राह्मणात (३. ६. ६) अध्रिगुप्रैषाचे काही मंत्र दिले आहेत. त्यांचा प्रारंभ 'दैव्याः शमितार उत मनुष्या आरभध्वम्' असा आहे. या मंत्रांत दिव्य आणि मानुष शमित्यांना पशूला यज्ञभूमीवर आणण्यासाठी आवाहन केलेले आहे. वध्य पशूचे आप्तेष्ट पशुहत्येला अनुज्ञा देतील व हननानंतर पशूचे अवयव त्या त्या अवयवांच्या देवतांत विलीन होतील, असा विश्वास तिथे प्रकट केलेला आहे.

या मंत्रांचा काही भाग ऐकू न जाईल इतका हळू म्हणायचा असतो, तर काही भाग तीन वेळा म्हणायचा असतो [ हि. ध. ]

**अध्वरकल्पेष्टी** 'यस्य भ्रातृव्यः सोमेन यजते' (=ज्याचा चुलतभाऊ (शत्रू) सोमयाग करीत आहे), त्याने ही इष्टी करावी, असे मैत्रायणी संहितेत म्हटले आहे (२. १. ७). त्यावरून सोमयागाचे फल त्याला मिळू नये, या उद्देशाने ही इष्टी असते. शत्रूच्या यज्ञात मुख्य दिवसाचे अनुष्ठान असते, त्या दिवशी तीन्ही काळात (त्रिकाळ) ही इष्टी करायची असते. अग्नीविष्णू, सरस्वती व बृहस्पती, या या इष्टीच्या देवता होत. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**अध्वर्यू** यज्ञातला एक प्रमुख ऋत्विज्. 'अध्वरं याति इति' (= अध्वरात (यागात) जातो तो – अमरकोश.) अध्वर म्हणजे यज्ञ. ध्वरा = हिंसा ज्यात नाही तो. यज्ञामध्ये पशुयाग असला, तरी यज्ञांतील हिंसा ही हिंसा नव्हेच, असे शास्त्रकारांनी सांगितले आहे ('तस्माद्यज्ञे वधोऽवधः' मनु. ५. ३९). अशा अध्वरामध्ये प्रमुखत्व स्वीकारतो, तो अध्वर्यू होय. यज्ञामध्ये विविध कामे मंत्र म्हणून अध्वर्यूला करावी लागतात. त्या वेळी कोणते मंत्र म्हणायचे ते ब्राह्मणग्रंथांमध्ये सांगितलेले असतात. हे मंत्र यजुर्वेदात सांगितले आहेत म्हणून यजुर्वेदास अध्वर्युवेद असेही म्हटले आहे. अध्वर्यू हा साधारणपणे कोणतेही कार्य आरंभिण्यापूर्वी यजमान व ब्रह्मा यांची अनुज्ञा घेतो व अन्य ऋत्विजांना आज्ञा देतो. सामान्यतः अनेकांच्याकडून ती ती कामे करवून घेण्याची जबाबदारी अध्वर्यूवर असते. या आज्ञापनास प्रैष असे म्हणतात. उदाहरणार्थ –

**सोमाय राज्ञे क्रीताय प्रोह्यमाणायानुब्रूहि, ब्रह्मन् वाचं यच्छ, सुब्रह्मण्य सुब्रह्मण्यामाह्वय, प्रतिप्रस्थातः सवनीयान् निर्वप।**

(सत्या. श्रौ. सू. ८. १)

अर्थ – (हे होत्या,) विकत घेतलेल्या सोमराजाला नेले जात आहे त्यासंबंधी मंत्र म्हण. हे ब्रह्म्या, वाङ्नियम कर. सुब्रह्मण्या, सुब्रह्मण्यानामक सामगान कर. हे प्रतिप्रस्थात्या, सवनीय पुरोडाशांचा निर्वाप कर.

यात होता, ब्रह्मा, सुब्रह्मण्य आणि प्रतिप्रस्थाता या चौघांना अध्वर्यूने वेगवेगळे प्रैष दिलेले आहेत. अध्वर्यू हा शब्द कोणतेही काम पुढाकार घेऊन करणारा या अर्थी रूढ झाला आहे, तो याचमुळे. अध्वर्यूच्या गटामध्ये प्रतिप्रस्थाता, नेष्टा व उन्नेता असे तीन ऋत्विज असतात. कोणत्याही श्रौतयागामध्ये अध्वर्यू असावाच लागतो. आहुती देण्याचे प्रमुख काम अध्वर्यूच करतो. अध्वर्यूचे काम खरोखरीच अवघड आहे. त्याला अनेक प्रकारची कामे विधियुक्त पार पाडायची असतात. तसेच ती करीत असताना प्रत्येक कृतीस मंत्र म्हणावे लागतात. हे मंत्र बरेचसे याजुष असतात. हे छंदोरहित असून लहान-मोठेही असतात. कोणत्याही कामात चूक झाल्यास प्रायश्चित्त करावे लागते. अध्वर्यू हा चपळ असावा लागतो. त्याचे पाठांतर अस्खलित असले पाहिजे. त्याचे पुढील कर्माचे चांगलेच अवधान पाहिजे. 'आचतुर्थात् कर्मणोऽभिसमीक्षेत । इदं करिष्यामीदं करिष्यामीति' =एक कर्म करीत असताना पुढे चौथ्या कर्मापर्यंत त्याचे लक्ष गेले पाहिजे (आ

श्रौ. सू. १. २. ११). अध्वर्यूंच्या या चपळतेवरून तैत्तिरीय आरण्यकात अध्वर्यूला चक्षू म्हटले आहे (१०. ६४). म्हणजे अध्वर्यूची हालचाल डोळ्यांइतकी जलद होणे आवश्यक असते. सोमयागात बहुतेक वेळा अध्वर्यूलाच सोमाचा याग करावा लागतो. त्याला सोमपानही अनेक वेळा करावे लागते. इतर ऋत्विजांच्या कामाची माहितीही अध्वर्यूला असावी लागते. यज्ञीय कर्मकांडाचा विस्तार झाला, तसतसे अध्वर्यूमध्येही भेद पडलेले दिसतात. प्राच्याध्वर्यू हा देशभेद आहे.

शाखाभेदाने कर्मकांडातही भेद पडले व त्या त्या शाखेप्रमाणे आध्वर्यव करणाऱ्या ऋत्विजाला कठाध्वर्यू, कलापाध्वर्यू अशी नावे पडली आहेत. पाहा – अग्निष्टोम. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे; पा. का. भा. ]

**अध्वा** मार्ग, पंथ. पण तंत्रशास्त्रात जगत् किंवा सृष्टी असा त्याचा अर्थ आहे. तंत्रमते अध्वा शुद्ध व अशुद्ध असा दोन प्रकारचा असतो. शुद्ध अध्वा म्हणजे महामाया हे ज्याचें उपादान कारण आहे, असे सात्त्विक जगत् होय. शिवाची परिग्रहशक्ती अचेतन व परिणामशालिनी मानली जाते. तिलाच विंदू म्हणतात. शुद्ध बिंदूचे नाव महामाया असून, तो सत्त्वमय जगताच्या उत्पत्तीत उपादानकारण बनतो. अशुद्ध विंदू म्हणजे माया. ती प्राकृत जगताचे उपादानकारण होते. महामायेच्या क्षोभातून शुद्ध अध्वा व मायेच्या क्षोभातून अशुद्ध किंवा मायाध्वा उत्पन्न होतो. [ भा. द. – पं. बलदेव उपाध्याय ]

**अनंगत्रयोदशी** एक व्रत. (१) मार्ग० शु. १३ शी पासून एक वर्षभर प्रत्येक १३ शीस अनंताची (कामदेवाची) निरनिराळ्या नावांनी, फुलांनी आणि नैवेद्यांनी पूजा करायची असते.

दुसरा पर्याय असा – चैत्र किंवा भाद्र० शु. १३ शी पासून प्रतिमासी वस्त्रावर कामदेवाची प्रतिमा काढून तिची पूजा करतात (पु. चिं. २२३). [ हि. ध. ]

**अनंगदानव्रत** वेश्यांसाठी काम्यव्रत. रविवारी पुनर्वसू, पुष्य किंवा हस्त नक्षत्र आले असता, त्या दिवशी वेश्येने विष्णू व काम यांची पूजा करावी, विद्वान ब्राह्मणाला विष्णूरूप मानून त्या रात्री रतिसुख द्यावे व विष्णुप्रतिमा आणि शय्यादी साहित्य दान द्यावे, असा याचा विधी आहे. याप्रमाणे तेरा महिने व्रत करायचे असते. याची कथा अशी–

नारदाच्या शापाने कृष्णाच्या सोळा हजार स्त्रिया पुढील जन्मी वेश्या झाल्या. पुढे त्यांना दाल्भ्य ऋषीने हे व्रत करायला सांगून त्यांचा उद्धार केला (मत्स्यपु. ७०). [ हि. ध.; पु. इं. ]

**अनंगपा** चौऱ्यायंशी सिद्धांपैकी एक. हा जातीने शूद्र असून, गौड देशाचा रहिवासी होता. हा डोंबिपापासून तिसऱ्या पिढीत येतो. [ पु. त. नि. ]

**अनंगरंग** कल्याणमल्लाचा कामशास्त्रावरील एक ग्रंथ. कल्याणमल्ल हा इ. स. च्या १५ व्या शतकात होऊन गेला. लोदी घराण्यातील लाडखान नामक एका सरदाराचा त्याला आश्रय होता. आपल्या धन्यासाठीच कल्याणमल्लाने हा ग्रंथ लिहिला. रतिरहस्य व कामसूत्र या ग्रंथांचा आधार घेऊन त्याने हा ग्रंथ लिहिलेला आहे.

या क्षणभंगुर विश्वात एकच गोष्ट सत्य आहे व ती म्हणजे कामिनीसमागमाचा आनंद होय. हा आनंद ब्रह्मास्वादसहोदर आहे, असे कल्याणमल्लाचे मत आहे. [ कामकल्प ]

**अनंगवज्र** हा पद्मवज्राचा शिष्य असून, ८४ सिद्धांपैकी एक आहे. पूर्व भारतातील गोपाल नावाच्या राजाचा हा मुलगा असे मानले जाते. याच्या अनेक ग्रंथांचे तिबेटी अनुवाद तंजूरमध्ये सापडतात. हा वज्रयानी पंथाचा एक आचार्य होता. प्रज्ञोपायविनिश्चयसिद्धी हा याचा संस्कृत ग्रंथ त्या पंथात महत्त्वाचा मानला जातो. [ आर्यसंस्कृती ]

**अनंगव्रत** (अनंग = शंकर) काम्य व्रत. स्त्री व पुरुष दोघांनाही हे करता येते. व्रतारंभ मार्ग० शु. १३ शीस करतात. व्रताची देवता शंकर असून, प्रत्येक महिन्यात भिन्न भिन्न नावांनी त्याची पूजा केली जाते. पूजा, उपोषण व जागरण या तीन्ही गोष्टींना या व्रतात सारखेच महत्त्व आहे. व्रतावधी एक वर्ष. उद्यापनाच्या वेळी अर्धनारीनटेश्वराची सुवर्णप्रतिमा करून तिला सर्व राजोपचार समर्पण करतात. व्रताचे फल–संपत्ती व आयुरारोग्य यांची प्राप्ती. [ व्रतराज ]

**अनघाव्रत** एक तिथिव्रत. मार्ग० वद्य अष्टमीस गोमयाने पवित्र केलेल्या वेदीवर अनघ व अनघा या नावांनी दोन शहाळी स्थापन करून त्याची पूजा करावी व पुढे एक वर्ष पर्यंत प्रत्येक वद्य अष्टमीस हे व्रत चालवून मग त्याची सांगता करावी, असे हेमाद्री सांगतो. फल – पापनाश. [ हि. ध. ]

**अनघाष्टमी** मार्ग० वद्य अष्टमी या दिवशी वासुदेव व लक्ष्मी यांच्या दर्भमूर्ती बनवून त्यांची पूजा करतात.

पूजेचा मंत्र 'अतो देवा...'(ऋ. १.२२.१६) हा आहे. [ हि. ध. ]

**अनंत** (१) विष्णूची तापसी कला. सात्वत तंत्राचे अनुयायी याला संकर्षण म्हणतात. तो आपल्या सहस्र फणांपैकी एका फणेवर पृथ्वी धारण करतो. याच्या कपाळातून रुद्र अकरा रूपांनी प्रकट झाला. अनंताच्या कृपाप्रसादासाठी नागराजे त्याची प्रार्थना करतात. नारद, तुंबरू त्याची कीर्ती गातात ( भाग. पु. ३. २६. २५; ४. ९. १४; विष्णुपु. २. ५. १३–२७). देवकीचा सातवा पुत्र बलराम व अनंत हे एकच होत. जलप्रलयाच्या वेळी अनंत हा विश्वाला आपल्याकडे खेचून घेतो (भाग. पु. १०. ६८. ४६). याला शेष असेही म्हणतात. श्रीकृष्णाने 'अनन्तश्चास्मि नागानाम्' म्हणून त्याला आपली विभूती मानले आहे (गीता १०. २९). [ पु. इं. ]

(२) कात्यायन श्रौतसूत्राचा टीकाकार. प्रज्ञापरिशिष्टभाष्य या ग्रंथाचा कर्ता. [ म. ज्ञा. को. ]

(३) ( इ. स. चे १४ वे शतक ) जातकपद्धती या ग्रंथाचा कर्ता. गोत्र गार्ग्य. विदर्भाचा रहिवासी. [ भा. ज्यो. शा. ]

(४) (इ. स. चे १६ वे शतक) अनंतसुधारस नावाच्या पंचांगगणिताचा कर्ता. हा ग्रंथ सूर्यसिद्धान्ताला अनुसरणारा आहे.

(५) (इ. स. चे १७ व १८ वे शतक) एक मराठी कवी. हा मूळचा सातारा जिल्ह्यातील मेथवड या गावाचा रहिवासी होता. पुढे याला श्रीरामदासस्वामींनी निलंगावादेस मठ स्थापून दिला होता. हा तिथेच राहत असे. हा विठ्ठलमग्न होता. याची हजार पंधराशे कविता सध्या प्रसिद्ध आहे व आणखीही काही उपलब्ध झाली आहे. याने सुलोचनागहिंवर, सुलोचना आख्यान व रामदासस्तुती या नावाची काव्ये लिहिली आहेत. [ म. सा. ]

(६) अनंत चतुर्दशीस पूजा करून हाताला बांधतात, तो १४ गाठींचा दोरा.

(७) भारतीय तत्त्वज्ञानातील एक संकल्पना. ही प्रथम उपनिषदांत आली आहे. तैत्तिरीय उपनिषदात ब्रह्माचे स्वरूप 'सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म' (= ब्रह्म हे सत्य, ज्ञान व अनंत होय) असे म्हटले आहे. छान्दोग्य उपनिषदात अनंत पदाचा पर्यायशब्द भूमा हा सांगितला आहे, असे श्री. शंकराचार्य म्हणतात.

श्री. शंकराचार्यांनी, जी वस्तू कशापासूनही वेगळी नाही, ती अनंत होय, अशी अनंताची व्याख्या केली आहे. वेगळेपण म्हणजेच अंत; तो जेथे नाही ते अनंत होय.

अनंत शब्दाने व्यक्त होणारी देशतः अनंतता वैशेषिक-दर्शनात विभू या पदाने व्यक्त केलेली आहे. आकाश, काल, दिक् व आत्मा ही विभू द्रव्ये आहेत.

सांख्यविषयक अनंतता भारतीय तत्त्वज्ञानात अगण्य वा असंख्य शब्दांनी व्यक्त झाली आहे. परंतु अनंत नामक संख्या भारतीयांच्या साहित्यात निर्दिष्ट केलेली आढळत नाही.

जैनतत्त्वज्ञानाप्रमाणे कर्मबंधातून मुक्त झालेल्या जीवाच्या ठिकाणी अनंतचतुष्टय म्हणजे अनंत ज्ञान, अनंत दर्शन, अनंत सुख व अनंत वीर्य असे चार गुण व्यक्त होतात. [ म. वि. को. ]

**अनंत कंदली** ( इ. स. चे १५ वे १६ शतक ) आसाम प्रदेशातला एक थोर वैष्णव संत व पंडित. त्याचे मूळ नाव हरिचरण असून, कंदली ही त्याची पदवी आहे. हा कामरूप जिल्ह्यातल्या हाजी गावचा ब्राह्मण व शंकरदेवाचा शिष्य होता. हा राजा नरनारायणाच्या दरबारात होता. शंकरदेवानेच त्याला आपला अपुरा राहिलेला भागवताच्या दशमस्कंधाचा अनुवाद पुरा करण्याची आज्ञा केली. याशिवाय त्याने भागवताच्या चौथ्या, पाचव्या, सहाव्या व नवव्या स्कंधाचा आसामी भाषेत पद्यानुवाद केला आहे.

महीरावणवध, हरिहरयुद्ध, वृत्रासुरवध, भरत-सावित्री, जीवस्तुती व कुमारहरण हे त्याचे अन्य काव्यग्रंथ आहेत. कुमारहरणात कवीने उषा – अनिरुद्ध यांची प्रणयकथा रोचक शैलीत सांगितली आहे. हे त्याचे काव्य फार लोकप्रिय आहे. [ आ. सा. इ.; आ. अ. आ. लि.; शं. हि. टा. ]

**अनंतगुंफा** ओडिसातल्या भुवनेश्वराजवळ खंडगिरी नावाची जैनांची लेणी आहेत. ही इ. स. च्या पहिल्या शतकात खोदलेली आहेत. त्यांतल्या एका गुंफेचे नाव अनंतगुंफा असे आहे. त्या गुंफेत एक चक्र व चार घोड्यांच्या रथात बसलेल्या सूर्याची मूर्ती कोरलेली आहे. हा सूर्यरथ अंधकाररूपी राक्षसाच्या अंगावरून जात आहे. अशा प्रकारच्या सूर्यमूर्ती बोधगया, भाजे या ठिकाणींही आढळतात. [ डे. हिं. इ. ]

**अनंतचतुर्दशी** (१) भाद्र० शु. चतुर्दशीस हे व्रत करतात. हे काम्य व्रत असून याचा अवधी चौदा वर्षांचा आहे. गतवैभव परत मिळावे, या हेतूने मुख्यतः हे व्रत सांगितले आहे. हे व्रत सार्वत्रिक नाही. कोणी उपदेशिल्यास किंवा अनंताचा दोरा सहजपणे सापडल्यास हे व्रत घेतात व मग ते त्या कुळात चालू राहते. अनंत अर्थात विष्णू ही याची मुख्य देवता असून शेष व यमुना या गौण देवता आहेत. पूजेचा विधी पुढीलप्रमाणे –

सकाळी नदीवर स्नान करून सुशोभित अशी मांडवी तयार करतात. तिच्या खाली सर्वतोभद्र मंडल काढून त्यावर तांब्याचे किंवा रुप्याचे पूर्णपात्र ठेवून त्यात अष्टदळ काढतात. त्यावर

सात फणांचा दर्भांकुरांनी बनविलेला शेष नाग ठेवून त्यांच्यापुढे चौदा गाठींचा रेशमी दोरा ठेवतात. कुंभाला वस्त्रयुग्माचे वेष्टन करतात. कुंभातल्या जलाला यमुना म्हणतात. प्रथम यमुना व शेष यांचे पूजन झाल्यावर मग त्याच पूर्णपात्रात अग्न्युत्तारण करून बसविलेल्या अनंतमूर्तीचे पुढील मंत्राने ध्यान करतात –

**नवाम्रपल्लवाभासं पिङ्गभ्रूश्मश्रुलोचनम् ।**
**पीताम्बरधरं पद्मशङ्खचक्रगदाधरम् ॥**
**अलङ्कृतपयोराशिं विश्वरूपं विचिन्तये ।**

अर्थ–नूतन आम्रपल्लवाप्रमाणे ज्याची कांती आहे, ज्याच्या भुवया, मिशा व डोळे पिंगट आहेत, जो पितांबर नेसलेला व शंख-चक्र-गदा धारण करणारा आहे व ज्याने सागराला भूषविले आहे, अशा विश्वरूपाचे (विष्णूचे) मी ध्यान करतो.

नंतर षोडशोपचारे पूजा करतात. या पूजेत अंगपूजा, आवरणपूजा, अष्टोत्तरशतनामपूजा अशा आणखी अंगभूत पूजा असतात. पुष्पांजली झाल्यावर अर्घ्य देतात. मग दोरकाची प्रार्थना करून तो चौदा गाठींचा दोरा हातात किंवा गळ्यात बांधतात आणि जुन्या दोऱ्याचे विसर्जन करतात. वड्या-घारग्यांचे वायन देऊन व्रतदेवतांचे विसर्जन करतात. सांगतेसाठी दंपतीभोजन घालतात.

चौदा वर्षे पूर्ण झाल्यावर व्रताचे उद्यापन करतात. त्याचा विधी असा–

त्रयोदशीस एकभुक्त, चतुर्दशीस तीळ, आवळे यांचा कल्क अंगाला लावून यथाविधि स्नान, अनंताची पूजा. रात्रौ अश्वत्थ-समिधा, तिल, व्रीही, यव, घृत या द्रव्यांनी व्रतदेवतांसाठी हवन, कथाश्रवण. पूर्णिमेस प्रातःकाळी पुन्हा पूजा. नंतर आचार्यपूजन, प्रतिमादान, गोप्रदान, दक्षिणादान, आशीर्वादग्रहण, ब्राह्मण व आंधळे-पांगळे यांस अन्नदान व नंतर विष्णुस्मरण करून पारण्याचे भोजन. या व्रताची कथा अशी –

कौरव–पांडवांचे द्यूत झाले. त्यात युधिष्ठिर सर्वस्वी हरला. पांडवांना बारा वर्षे वनवास आणि एक वर्ष अज्ञातवास पत्करावा लागला. एके दिवशी श्रीकृष्णाने वनात जाऊन पांडवांची भेट घेतली व आपत्तीतून मुक्त होण्यासाठी युधिष्ठिराला अनंत-चतुर्दशीचे व्रत सांगितले. युधिष्ठिराने त्याविषयी प्रश्न केला असता श्रीकृष्णाने त्याला एक कथा सांगितली ती अशी –

कृतयुगात सुमंतू नावाचा एक आचारसंपन्न ब्राह्मण होता. त्याला शीला नावाची एक मुलगी झाली. तिच्या जन्मानंतर तिची आई मृत्यू पावली आणि सुमंतूने दुसरा विवाह केला. त्याला ती पत्नी कर्कशा मिळाली. पुढे शीलाचे लग्न कौंडिण्य मुनीशी झाले. शीलाची वरात जातेवेळी सुमंतूने पत्नीला म्हटले, की ' जावईबुवांना काहीतरी आंदण देऊ या. ' पण कर्कशेने त्या गोष्टीला संमती दिली नाही. उलट जावयाचा आणि लेकीचा अपमानच केला. दुःखी होऊन शीला आपल्या पतीबरोबर निघाली. वाटेत एका नदीच्या काठी काही स्त्रिया एकत्र जमून व्रत करीत असलेल्या तिला दिसल्या. ते व्रत अनंताचे होते. शीलेने ते त्याच ठिकाणी आचरिले आणि हातात अनंताचा दोरा बांधून ती पतीसह घरी आली. त्या व्रताच्या पुण्याने तिचा संसार समृद्ध झाला. कौंडिण्याला त्या वैभवाची धुंदी चढली. एके दिवशी एकांतात असता त्याने शीलेच्या हातातला तो दोरा तोडून अग्नीत टाकला. त्यामुळे अनंताचा कोप झाला. लक्ष्मी आली तशी निघून गेली. शीलेने त्याला त्याची चूक समजावून दिली. मग तो अनंताला प्रसन्न करून घेण्यासाठी वनात निघाला. भेटेल त्या प्राण्याला ' अनंत कुठे भेटेल ' म्हणून विचारू लागला. कोणी त्याला सांगेना. शेवटी तो आत्महत्येस प्रवृत्त झाला. मग अनंताने ब्राह्मणाच्या रूपाने त्याला दर्शन दिले. नंतर घरी येऊन त्याने अनंत-व्रत केले. त्या योगे त्याचे गतवैभव त्याला फिरून प्राप्त झाले.

या व्रतांत सर्पपूजेचे अवशेष दिसतात. प्राचीन नागपूजक लोक वैष्णवधर्मात प्रविष्ट झाल्यावर, ही नागपूजा व्रतरूपाने वैष्णव-धर्मात आली असावी.

(२) जैन व्रत. व्रतकाल भाद्र० शु. ११ शी ते पूर्णिमा. पहिले तीन दिवस एकाशन, चतुर्दशीस उपवास आणि पूजा व पूर्णिमेस पुन्हा एकाशन. या प्रकारे १४ वर्षे व्रत करतात. हे व्रत अयोध्ये-जवळच्या पद्मखंड गावी सोमशर्मा नामक ब्राह्मणाने आपल्या पत्नीसह केले व मृत्यूनंतर स्वर्गादी सुखे भोगून त्याने मोक्ष मिळविला. [ जै. व्र. वि. सं. ]

## अनंततनय

एक मराठी कवी. समग्र महाभारत न रचता त्यातील मधलेच एखादे पर्व मराठीत सांगणारे अनेक कवी आढळतात; त्यांपैकी अनंततनय हा एक होय. त्याने दोन-चार पर्वे लिहिलेली असावी, असे दिसते. परंतु त्यांतले एकच उपलब्ध आहे आणि ते म्हणजे उद्योगपर्व. हे रचण्याचे कारण त्याने पुढीलप्रमाणे दिले आहे –

**पूर्वी मुक्तेश्वरें । अनेक कवींच्या ईश्वरें ।**
**आरंभिलें भारत सारें । भाषाधारें रचावया ॥**
**परी तें न गेलें समाप्ती । ऐसें तर्कुनी सर्व मती ।**
**चतुर्थानंतरें पंचमीं प्रीती । ' उद्योगी ' मत संचरली ॥**

अनंततनयाचे नाव त्र्यंबक असावे, असे उद्योगपर्वातील अनेक उल्लेखांवरून दिसते –

**ही त्र्यंबकें आपुली वाणी । वाक्यपुष्पांची गुंफिली श्रेणी ।**
**अर्पिली असे श्रीकृष्णचरणीं । अर्थ सुगंधें घमघमीत ॥**

या व्यतिरिक्त या कवीचे वसतिस्थान, काल, इत्यादींबद्दल

माहिती उपलब्ध नाही. याच्या उद्योगपर्वाची ओवीसंख्या सुमारे सहा हजार आहे. याने आपला ग्रंथ व्यासकृतीवरून फार काळजीपूर्वक लिहिला असून, प्रत्येक अध्यायाच्या शेवटी त्यात मूळ भारताच्या किती व कोणत्या अध्यायातील कथाभागांचा समावेश केला आहे, हेही सांगितले आहे. प्रत्येक अध्यायाच्या शेवटी उपसंहारादाखल याने एक एक श्लोक घातला असून, त्या श्लोकात त्या त्या अध्यायातला कथाभाग सारांशरूपाने सांगितलेला आहे. [ म. सा. ]

**अनंततृतीया** एक व्रत. भाद्रपद, वैशाख किंवा मार्गशीर्ष या मासांच्या शु. चतुर्थीपासून एक वर्षपर्यंत करायचे व्रत. व्रताची देवता गौरी असून, प्रत्येक मासी वेगवेगळ्या फुलांनी तिची पूजा करतात. [ हि. ध. ]

**अनंतदेव** (१) (इ. स. चे १७ वे शतक) पैठणच्या एकनाथ महाराजांनंतरचा चौथा पुरुष. याच्या वडिलांचे नाव आपदेव. या आपदेवाने मीमांसान्यायप्रकाश नावाचा ग्रंथ लिहिला आहे. याच्या घराण्यात मीमांसाशास्त्राचे अध्ययन परंपरेने चालू होते. अलमोडा व नैनिताल या प्रदेशावर राज्य करणारा बाजबहाद्दुर (इ. स. १७ वे शतक) हा चंद्रवंशी राजा अनंतदेवाचा आश्रयदाता होता. त्याच्याच प्रेरणेने अनंतदेवाने स्मृतिकौस्तुभ नावाचा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ विस्तृत असून लोकप्रियही आहे. भारतातील सर्वश्रेष्ठ न्यायालयाने हा ग्रंथ प्रमाणभूत मानला आहे.

या ग्रंथातील विषयांची संक्षिप्त यादी पुढीलप्रमाणे – गर्भाधानादी संस्कार, त्यांचे योग्य काल, नागबली व नारायणबली, कृच्छ्रादी प्रायश्चित्ते, दत्तकपुत्राचा विचार, ब्रह्मचारीधर्म, इत्यादी. दत्तकाविषयी याची मते अशी–पुतण्या हा दत्तक घेण्यास सर्वांहून अधिक लायक होय. तो नसेल तर सगोत्र सपिंड, असगोत्र सपिंड, सगोत्र असपिंड व मग स्वतःच्या जातीचा, अशा क्रमाने मुलगा दत्तक घ्यावा. कन्येचा व बहिणीचा पुत्र दत्तक घेऊ नये. दत्तक हा आईबापांचा एकुलता किंवा ज्येष्ठ पुत्र असता कामा नये. उपनयनसंस्कार जनक पित्याच्या घरी झाल्यास, तो दोन्ही गोत्रांचा मानावा. त्याच्या विवाहाच्या वेळी दोन्ही कुलांचे गोत्र विचारात घ्यावे. दत्तक घेतल्यानंतर औरस पुत्र झाल्यास, त्या दोन्ही मुलांना बापाच्या मालमत्तेचा समान वाटा मिळावा. धार्मिक विधी करून मुलगीही दत्तक घेता येते.

याशिवाय संस्कारकौस्तुभ, राजधर्मकौस्तुभ, अग्निहोत्रप्रयोग, इ. बरेच ग्रंथ याने लिहिले आहेत. कृष्णभक्तिचंद्रिका या नावाचे एक नाटकही याने लिहिले आहे. [ हि. ध. ]

(२) (इ. स. चे १३ वे शतक) भास्कराचार्यांच्या वंशातला एक ज्योतिषी. याने ब्रह्मगुप्त सिद्धान्ताचा २० वा अध्याय व बृहज्जातक यांवर टीका लिहिली आहे. [ भा. ज्यो. शा. ]

**अनंतनाग** आदिनाग किंवा आदिशेष याचेच हे नाव आहे. विष्णुधर्मोत्तरपुराणात याचे मूर्तिवर्णन पुढीलप्रमाणे आढळते – चतुर्भुज, अनेक फणा, मधल्या फणेवर पृथ्वी देवतेची मूर्ती, उजव्या दोन हातांत कमळ व मुसळ, डाव्या दोन हातीं फाळ व शंख.

तिथेच सुरासागर व तालवृक्ष यांचा उल्लेख असल्यामुळे मूर्तिकलेच्या दृष्टीने याचे संकर्षण किंवा बलराम याच्याशी साम्य दिसते. बलराम हा शेषाचाच अवतार मानतात. प्राचीन शिल्पकृतीत नागराज बहुधा अर्धसर्प व अर्धमानव या स्वरूपात दिसतो. पण तोच जेव्हा विष्णूचे आसन अथवा शयन असतो, तेव्हा तो संपूर्णपणे सर्परूपात दाखवितात. पाहा– शेष, बलराम. [ डे. हि. इ. ]

**अनंतनागक्षेत्र** काश्मिरातील एक प्रसिद्ध तीर्थक्षेत्र. हे कोकरनागहून जवळच, मार्तंड पठाराच्या पश्चिम अंगाला पायथ्याशी आहे. याला इस्लामाबाद हे नाव देण्याचा प्रयत्न मुस्लिम राज्यकर्त्यांनी केला; परंतु तो सफळ झाला नाही. अनंतनाग येथील झरा विशेष प्रसिद्ध आहे. या झऱ्याचे काश्मिरीत रूढ असलेले नाव आहे नागबल. अनंत यासाठी नाग आणि झरा यासाठी बल, असा हा शब्द बनलेला आहे. येथील झरा दोन सुबक कुंडांतून बाहेर पडतो. या दोन कुंडांच्या मध्यभागी अनंताचे म्हणजे विष्णूचे मंदिर आहे. अनंतचतुर्दशीच्या दिवशी इथे मोठी यात्रा भरते. इथे गंधकयुक्त पाण्याचे एक कुंड आहे.

लाकडावरील नक्षीकाम, कापडावरील कशिदा, पापये माशे (कागदाच्या लगद्यापासून तयार केलेल्या कलापूर्ण वस्तू) आदींसाठी हे नगर प्रसिद्ध आहे. [ हि. ध.; चि. छा. ]

**अनंतनाथ** जैनांचा चौदावा तीर्थंकर. याचे जन्मस्थान अयोध्या. मातापित्यांची नावे जयश्यामा व सिंहसेन. जन्मनक्षत्र रेवती. लांच्छन अस्वल (श्वेतांबरमते ससाणा). ज्ञानवृक्ष पिंपळ. मोक्षस्थान पारसनाथपर्वत. यक्ष–यक्षिणी पाताळ व अनंतमती (श्वेतांबरमते अंकुशा). हा गर्भात असता त्याच्या मातेला शेवटचे टोक नसलेली (=अनंत). अशी मोत्यांची माळ दिसली; म्हणून याचे नाव अनंत ठेवले गेले. [ जै. इ. ]

**अनंतपंथ** श्रीविष्णूची अनंत या नावाने उपासना करणारा एक वैष्णव पंथ. उत्तर भारतात बरेली

सीतापूर या दोन ठिकाणीं या पंथाची केंद्रे आहेत. [ मि. मि. इं. ]

**अनंत पद्मनाभ गोस्वामी** ( इ. स. चे १९ वे शतक ) तंजाऊरमधील कालक्षेपम् या गीतप्रकाराचा सुप्रसिद्ध गायक. हा काही काल सर्फोजीच्या पदरी होता. याला कोकिळकंठ अशी पदवी होती. [डि.सा.इं.म्यु.म्यु.]

**अनंत फंदी** (इ. स. १७४४–१८१९) एक मराठी शाहीर. हा नगर जिल्ह्यातील संगमनेरचा रहिवासी होता. हा वाजसनेयी ब्राह्मण असून, याचे गोत्र कौंडिण्य व आडनाव घोलप होते. याच्या पत्नीचे नाव म्हाळसाबाई असून, मुलाचे श्रीपती असे होते. मलिक फंदी या नावाच्या एका फकिराशी याचा स्नेह जमला; त्यामुळे लोक यालाही फंदी म्हणू लागले. भवानीबावा नामक एका पुरुषाच्या कृपेने याला तरुणपणीच कवित्वस्फूर्ती झाली, अशी आख्यायिका सांगतात. पुढे याने तमाशाचा फड उभारला व तो तमासगीर बनला. याची रचना व म्हणण्याची धाटणी फारच रसाळ होती. श्रोते तल्लीन होऊन त्याचे कवित्व ऐकत. एकदा याला वाटेत भिल्लांनी लुटले. त्या वेळी याने त्यांच्या नायकावर लावणी रचून म्हटली. ती ऐकून सर्वजण खूष झाले व त्यांनी त्याची लूट परत करून वर त्याला विदागीही दिली.



अनंत फंदी

याची कविता लावणी, कटाव, फटका, श्लोक, आर्या व ओवी अशा अनेक जातींची आहे. या सर्व काव्यप्रकारांत त्याचे फटके अधिक लोकप्रिय आहेत.

वर्म काढुनी शरमायाला । उणें कुणाला बोलुं नको ।
कर्जबाजारी होउनि बहु तूं । बोज आपला दवडुं नको ।
स्नेहासाठी पदरमोड कर । जामिन कोणा राहुं नको ।

या फटक्यांतील मार्मिक व्यवहारी उपदेश सर्वांना पटेल असा आहे. होनाजी बाळासारख्या तत्कालीन शाहिराने ' फंदी अनंत कवनांचा सागर ' अशा शब्दांत त्याला गौरविले आहे.

एकदा अहिल्याबाई होळकर हिची व याची गाठ पडली असता ती फंदीला म्हणाली, की ' तमाशाचा धंदा करणे हे ब्राह्मणास उचित नव्हे. '

ते ऐकून याने तमाशा सोडून दिला व कीर्तन करणे सुरू केले. दुसऱ्या बाजीरावाची याच्यावर बहाल मर्जी होती. त्याने फंदीकडून माधवरावाच्या मृत्यूवर श्रीमाधवनिधनग्रंथ नामक ओवीबद्ध काव्य लिहवून घेतले. प्रसादयुक्त पण ओजस्वी वाणी व समयसूचकता या गुणांमुळे याची समकालीन शाहिरांवरही विलक्षण छाप होती. [ तं. क. शा.; म. सा.; म. च. को. ]

**अनंतफलसप्तमी** एक व्रत. भाद्र. शु. सप्तमीला प्रारंभ करून एक वर्ष प्रत्येक शु. सप्तमीस सूर्यपूजा करणे असा याचा विधी आहे. या व्रताने अनंत फल मिळते. [हि.ध.]

**अनंतभट्ट** भारतचंपू या ग्रंथाचा कर्ता. या कवीचा काल अनिश्चित आहे. पाहा – चंपू वाङ्मय.

**अनंतमती** एक जैन यक्षिणी. अनंतनाथाची सेविका (श्वेतांबरमते अंकुशा). हिचे वर्णन पुढीलप्रमाणे –

सुवर्ण कांतीची. चतुर्भुज. धनुष्य, बाण, फल व वरदमुद्रा धारण करणारी. हंसवाहना. (श्वेतांबरमते कमलवाहना) हंस या हिच्या वाहनावरून हिचे सरस्वतीशी साधर्म्य दिसते. हिला विद्यादेवीही मानले आहे. [ जै. इ. ]

**अनंतव्रत** (१) काम्य व्रत. मार्गशीर्ष मासात मृगशीर्ष नक्षत्र येईल त्या दिवशी विष्णुपूजा; पुढे पौषात पुष्यनक्षत्रावर, माघात मघा नक्षत्रावर, अशा क्रमाने त्या त्या मासात त्या त्या मासनक्षत्रावर पूजा करणे, असा याचा विधी आहे. व्रतावधी एक वर्ष. हे व्रत पुत्रप्रद आहे. [ हि. ध. ]

(२) प्रत्येक शु. द्वितीयेस एक वर्षपर्यंत विष्णुस्वरूपात अनंतपूजा (विष्णु ध. ३.१५०). [ हि. ध. ]

**अनंतशयन** विष्णूचे एक अवस्थास्वरूप. शेष नागाची शय्या करून विष्णू त्यावर पहुडतो. शेषाची फणा त्याच्या मस्तकावर छत्राप्रमाणे पसरून राहते. पायागती लक्ष्मी सेवा करीत बसलेली असते. द. भारतातल्या बहुतेक सर्व विष्णुमंदिरांत अशाच प्रकारच्या मूर्ती आहेत, त्यांना रंगनाथ किंवा रंगस्वामी म्हणतात. जगच्चालक नारायणाचेच हे एक रूप होय. त्रिवांकुर येथे अनंतशयनमूर्ती चौदा हात लांबीची आहे. इ. स. च्या ६ व्या शतकात खोदलेल्या देवगढ येथील शिल्पांतही अशा प्रकारची एक मूर्ती मिळाली आहे. [ ड़े. हिं. इ. ]

**अनंतसुत विठ्ठल** (इ. स. १७७६ ते १८६३). एक मराठी कवी आणि दत्तभक्त. याचे मूळ नाव

विठ्ठल अनंत पिंपळगावकर असे होते. मातृपितृभक्त असल्यामुळे याने आपल्या आईवडिलांना कावडीत बसवून त्यांच्या यात्रा करविल्या, म्हणून याचे नाव कावडीबोवा असे पडले. गालव-क्षेत्रात स्वत: श्रीदत्तात्रेयाने त्याला दर्शन देऊन कीर्तन आणि ग्रंथलेखन यांची आज्ञा केली, असे सांगतात.

पुढे तो बडोद्याला गेला. तिथे त्याला मोठा शिष्यसमुदाय मिळाला. तिथे त्याने श्रीराम व विठ्ठल-रखुमाई यांची मंदिरे बांधली. आषाढ शु. अष्टमी ही याची पुण्यतिथी होय. त्या दिवशी बडोद्याला मोठा उत्सव होतो.

अनंतसुताने रचलेला महत्त्वपूर्ण ग्रंथ श्रीदत्तप्रबोध हा होय. त्याचे ६१ अध्याय असून, त्यात श्रीदत्तात्रेयाने आपल्या मातेला केलेला अध्यात्मपर उपदेश आहे. ग्रंथाची भाषा प्रसन्न व हृदय-स्पर्शी आहे. हा प्रासादिक ग्रंथ श्रीदत्तात्रेयांनीच वदविलेला असून, त्यांची ती वाङ्मयी मूर्ती आहे, अशी सांप्रदायिक दत्तभक्तांची श्रद्धा आहे. या ग्रंथाच्या वाचनाने मनोकामना पूर्ण होतात, असा दत्तभक्तांना विश्वास वाटतो.

या ग्रंथाव्यतिरिक्त याने स्फुट अभंग, करुणा-शतक, सांप्रदा-यिक सद्गुरुनमस्कारश्लोक, इ. लेखन केले आहे.

याचा संप्रदाय निंबराज संप्रदाय या नावाने अस्तित्वात आहे. या पंथातले लोक पीतवस्त्र परिधान करून उघड्या अंगाने कीर्तन करतात.

**उभें रहावें कीर्तनीं उघडें । पागुटें नसावें आंगडें ।**
**कांस घालोनि वाडेंकोडें । गावे पवाडे श्रीहरीचे ॥**
**ती आज्ञा शिरीं वाहोन । संप्रदायी करिती कीर्तन ।**
**सप्त पिढी वरदान । निंबराजा पावन जाहलेसे ॥**

याप्रमाणे कीर्तन करण्याच्या पद्धतीसंबंधी त्याने आपल्या ग्रंथात लिहिले आहे. [ म. ज्ञा. को.; श्री द. ज्ञा. को. ]

## अनंताकुली पंथ

ओडिसामधला एक धर्मपंथ. या पंथाचे लोक जातपात मानीत नाहीत; कोणत्याही जातीतल्या मुलीशी लग्न करतात व कोणाकडेही जेवतात.

## अनंताचार्य

(इ. स. चे १८ वे शतक) कण्वशाखी ब्राह्मण पंडित. हा काशीचा रहिवासी होता. याने कण्व-संहितेवर भावार्थदीपिका नावाची टीका, भाषिकसूत्रभाष्य, यजु:-प्रातिशाख्यभाष्य, श. प. ब्राह्मणभाष्य, कण्वकंठाभरण, इ. ग्रंथ लिहिले आहेत. [ वै. सा. ]

## अनंतार्य

(इ. स. चे १६ वे शतक) हा दक्षिणेत मेलकोटे येथे राहत होता. याने ज्ञानयाथार्थ्यवाद, प्रतिज्ञावादार्थ, ब्रह्मलक्षणनिरूपण, इ. अनेक ग्रंथ लिहिले आहेत. त्याच्या ग्रंथां-वरून त्याचे प्रगाढ पांडित्य कळून येते. [ हिंदुत्व ]

## अनंतासन

हठयोगातील एक आसन. अनंत हे विष्णूचे एक नाव आहे. त्याचप्रमाणे विष्णूची शय्या बनलेल्या शेषनागाचेही नाव अनंत असे आहे. केरळातील तिरुअनंतपुरम येथे अनंतपद्मनाभाचे मंदिर आहे. तिथे हे आसन दिसते. या आसनाची पद्धत अशी –

सरळ उताणे झोपतात. आणि श्वास सोडून डाव्या कुशीवर वळतात. डोके उचलतात. डावा हात डोक्याच्या वर नेतात आणि शरीराच्या रेषेत लांबवतात. डावा कोपर वाकवून डावा तळहात कानाच्या वरच्या बाजूला ठेवून त्यावर डोके टेकतात. मग उजवा गुडघा वाकवतात. उजव्या हाताचा अंगठा व पहिली दोन बोटे यांनी उजव्या पायाचा अंगठा पकडतात. श्वास सोडून उजवा हात आणि पाय एकदम वर उचलतात. या स्थितीत पंधरा-वीस सेकंद राहून श्वास सोडतात. मग उजवा गुडघा वाकवतात. आणि डाव्या तळहातावरून डोके जमिनीवर आणतात. मग उताणे निजतात. मग उजव्या कुशीवर वळून असेच आसन करतात.

या आसनामुळे ओटीपोट सुधारते. गुडघ्यामागच्या शिरा विकसित होतात व पाठदुखी थांबते. [ योगदीपिका ]

## अनध्याय

प्राचीन काळी निरनिराळ्या कारणांनी वेदाध्ययन विशिष्ट कालात बंद राहत असे, त्याला अनध्याय असे म्हणत. प्रतिपदा, अष्टमी, चतुर्दशी, पूर्णिमा आणि अमा-वास्या, या अनध्यायाच्या तिथी होत. बौधायन धर्मसूत्र सांगते-

**हन्त्यष्टमी ह्युपाध्यायं हन्ति शिष्यं चतुर्दशी ।**
**हन्ति पञ्चदशी विद्यां तस्मात् पर्वणि वर्जयेत् ॥**

अर्थ – अष्टमीस अध्ययन केल्यास ते गुरूला घातक, चतुर्दशीस केल्यास शिष्याला घातक आणि पूर्णिमेस किंवा अमा-वास्येस केल्यास विद्येला घातक होते, म्हणून पर्वदिवशी ते वर्ज्य करावे.

याशिवाय प्रतिपदा हा मोठा अनध्याय होता. प्रतिपदेला पाठनाशिनी म्हणजे पठिताचा नाश करणारी, असे म्हटले आहे. अपरार्कांच्या मते महानवमी (आश्विन शु. नवमी), भाद्रपद वद्यातले भरणी नक्षत्र, अक्षय्यतृतीया, रथसप्तमी, युगादी मन्वादी तिथी, दक्षिणोत्तरायणांचे आरंभदिन, विषुवदिन आणि सोपपद तिथी या दिवशीही अध्ययन बंद ठेवावे.

अनध्यायाचे प्रकार चार आहेत – (१) नित्य (२) नैमित्तिक (३) तात्कालिक व (४) आकालिक.

नित्य अनध्याय – वर दिलेले अनध्याय हे नित्य होत.

नैमित्तिक अनध्याय – शिष्य, ऋत्विज्, गुरुबंधू व स्वशाखेचा श्रोत्रिय, यांपैकी कोणी मृत झाला असता; तसेच ऋतुसंधी, उत्सवातले भोजन, श्राद्धीय द्रव्याचा प्रतिग्रह, ग्रहणदिन, इ. प्रसंगी होणारा अनध्याय.

तात्कालिक अनध्याय – कुत्रा, कोल्हा, घुबड, इ. पशूंचा शब्द ऐकू येत असता; आशौचातला माणूस, शव, अंत्यज, पतित हे सन्निध असता; जलात असता; पशू, वृक्ष व पर्वत यांवर आरोहण केले असता; श्रोत्रिय विद्वान घरी किंवा आश्रमात आला असता; धुके असता; मध्यरात्री व संध्यासमयी होणारा अनध्याय. निमित्त दूर झाले की हा अनध्याय संपतो.

आकालिक अनध्याय – अकाली मेघगर्जना, वृष्टी, एकदम वीज पडणे, विवाद, कलह, युद्ध या गोष्टी चालू असता; अजीर्ण, वमन, रक्तस्राव झाला असता; रात्रौ वीज चमकली असता होणारा अनध्याय. याची मुदत आकालिक निमित्त झाले असेल, त्या वेळेपासून दुसऱ्या दिवशी त्या वेळेपर्यंत असते.

अशा प्रकारे अनध्यायाच्या दिवसांची संख्या हळूहळू बरीच वाढत गेली. त्यामुळे अध्ययनात वारंवार खंड पडू लागला. हे लक्षात घेऊन मग विकल्प सांगितला गेला की, अनध्याय प्राप्त झाला असताही मनातल्या मनात वेदांची उजळणी करायला, किंवा ब्रह्मयज्ञात वेद म्हणायला हरकत नाही.

प्राचीन काळी महिन्यातल्या दोन प्रतिपदा हे मुख्य अनध्याय असत. त्या दिवशी विद्यार्थ्यांना संपूर्ण सुट्टी असे; पण अष्टमी, चतुर्दशी, पूर्णिमा, अमावास्या, या तिथींस वेदांगाचे अध्ययन करण्यास प्रत्यवाय नसे. किंबहुना त्या अध्ययनाची उपेक्षा न व्हावी, म्हणूनच हे अनध्याय निर्माण केले असावे. वेदमंत्रांत दिव्य सामर्थ्य असते, अशी वैदिकांची श्रद्धा आहे. अपवित्र स्थितीत, अपवित्र देश-कालात आणि मनाच्या खिन्न अथवा भयभीत अवस्थेत, त्यांचे पठण झाल्यास त्या मंत्रांतले सामर्थ्य नष्ट होईल, या भीतीने वरील नैमित्तिक, आकालिक, इ. अनध्याय सांगितले असावे. [ध. सिं.; नि. सिं.; हि. ध.]

**अनन्य अली** (इ. स. चे १८ वे शतक) वृंदावनात वास्तव्य करणारा एक भक्तकवी. याला गोविंदलाल गोस्वामींकडून राधावल्लभ संप्रदायाची दीक्षा मिळाली होती. पूर्वनाम भगवानदास. याने ७९ ग्रंथ रचले, असे सांगतात. अनन्य अलीकी बानी या नावाने ते ग्रंथ प्रसिद्ध आहेत. हा संपूर्ण संग्रह सुमारे ६००० पदांचा आहे. जुगल प्रेमलीला व जुगल माधुरी हे याच्या वर्णनांचे मुख्य विषय होत. याच्या ग्रंथांची नावे स्वप्नविलास, प्रेमसरोवरक्रीडा, शरदृऋतुविलास, जलविहारलीला, इ. आहेत. [रा. सं. सि. सा.]

**अनय** तमिळनाडमधला एक नायन्मार. हा गुराखी होता. एके दिवशी रानात गेला असता याला एका वृक्षात शिवरूप दिसू लागले. याने बासरी वाजवून त्याला प्रसन्न केले. तेव्हा शिवाने याला साक्षात दर्शन दिले. [पे. पु.]

**अनरकव्रत** एक ऋतुव्रत. हेमंत व शिशिर या ऋतूंत हे करतात. मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेपासून याचा प्रारंभ होतो. यात केशवपूजा व 'ॐ नमः केशवाय' या मंत्राचा १०८ वेळा जप करतात. [हि. ध.]

**अनर्थदंडव्रत** एक जैनव्रत. शास्त्रमर्यादा पाळणे, दुसऱ्यास पाप करण्यास सल्ला न देणे, हिंसक हत्यारे दुसऱ्यास न देणे, वाईट व निंद्य गोष्टींचे चिंतन न करणे, इ. गोष्टींचा या व्रतात समावेश होतो. [जैन धर्म]

**अनलहक्** सूफी संप्रदायातला पारिभाषिक शब्द. 'मीच खुदा (परमात्मा) आहे,' असा त्याचा अर्थ आहे. या शब्दाच्या द्वारे सूफी पंथी आत्म्याला परमात्म्याच्या स्थितीत विलीन करतात. खुदापर्यंत पोचण्याच्या या अवस्थेप्रत जाण्याच्या सूफींनी चार पायऱ्या मानल्या आहेत. या पायऱ्या क्रमशः चढून जाणे आवश्यक असते. पहिली शरीयत. या पायरीवर नमाज्, रोज़ा व अन्य काही गोष्टी यांवर अंमल करावा लागतो. दुसरी पायरी तरीकत. या पायरीवर साधकाला एका पीराची (गुरू) आवश्यकता उत्पन्न होते. पीर भेटल्यावर साधकाचे ज्ञान वाढते. मग तो मारिफत या तिसऱ्या पायरीवर आरूढ होतो. त्यापुढची पायरी हकीकत ही होय. इथे त्याला अंतिम सत्याची प्राप्ती होते व तो स्वतःला खुदामध्ये विलीन करतो. मग त्याचा द्वैतभाव मिटतो. मी व तू म्हणजेच आत्मा व परमात्मा यांत अंतर राहत नाही. मग तो अनलहक् अर्थात् 'मी खुदा आहे' असे पुकारीत उठतो.

अनलहक् अशी पहिली घोषणा मन्सूर बिन हल्लाज याने केली व आपले खुदाशी अभिन्नत्व जाहीर केले. हा इराणचा सुप्रसिद्ध सूफी साधू होता. पण त्याचा हा उद्घोष इस्लामी धर्मगुरूंना धर्मविरोधी वाटला. मुल्ला लोक त्याला खुदाईचा दावेदार समजले व त्यांनी मन्सूरला सुळावर चढविले. खुदा व मानव हे दोघे कधीही एक होणे किंवा असणे शक्य नाही, असा इस्लामचा सिद्धान्त आहे. [हिं. सा. को.; हिं. वि. को.]

**अनवलोभन** एक संस्कार. हा गर्भिणीचा संस्कार असून, गर्भस्राव होऊ नये, म्हणून तो करायचा असतो

दुसऱ्या किंवा तिसऱ्या महिन्यात पुंसवनानंतर हा संस्कार करतात. 'न अवलुप्यते गर्भोऽनेन इति' (=जो केल्याने गर्भ गळून पडत नाही, तो अनवलोभन संस्कार होय), अशी याची व्याख्या आहे (बैजवाप गृह्यसूत्र). वास्तविक हा अनवलोपन असा शब्द असून त्याचेच अनवलोभन असे स्वरूप झाले आहे.

या संस्कारात गर्भवतीला पूर्वाभिमुख मखरात बसवून पती तिच्या मागे उभा राहतो व काही मंत्र म्हणून तिच्या उजव्या नाकपुडीत दूर्वांचा रस अंगठ्याने पिळतो. मग अवदान विधीने प्रजापतीला चरूची आहुती देतो. मग तिच्या हृदयाला स्पर्श करून गर्भाच्या संरक्षणासाठी देवतांची प्रार्थना करतो. [सं. कौ.]

**अनसूया** एक सती. कर्दम-देवहूतींची कन्या व अत्री ऋषीची भार्या. हिने तपश्चर्या करून शिवाला प्रसन्न केले होते. एकदा दहा वर्षे अनावृष्टी झाली असता लोक दुष्काळाने हैराण झाले. अशा वेळी आपल्या पर्वतावरच्या आश्रमात हिने तपःसामर्थ्याने गंगा आणली व अन्नधान्य पिकवून दुष्काळ निवारिला. मांडव्य ऋषीला सुळावर चढविलेल्या अवस्थेत एका स्त्रीचा धक्का लागला व त्यामुळे झालेल्या वेदना असह्य होऊन त्याने त्या स्त्रीला 'सूर्योदयापूर्वी तू विधवा होशील', असा शाप दिला. ती स्त्री अनसूयेची सखी होती. त्यामुळे आपल्या मैत्रिणीच्या सौभाग्यासाठी हिने सूर्योदय होऊच द्यायचा नाही, असे ठरविले. तेव्हा सर्वत्र हाहाकार माजला. मग सर्व देव आणि ऋषी तिला शरण आले. अशा प्रकारे हिने आपल्या तपोबलावर सखीचा शाप दूर करून मगच सूर्योदय घडविला. हिच्या सतीत्वाबद्दल असूया वाटून उमा, लक्ष्मी, सावित्री यांनी आपल्या पतींना तिचे पातिव्रत्य नष्ट करण्यासाठी पाठविले. ब्रह्मा-विष्णु-महेशांनी आश्रमात येऊन तिला नग्न अवस्थेत भिक्षा वाढायला सांगितले. प्रसंग कठिण होता. त्यातून आपल्या पातिव्रत्याच्या बळावर निभावून जायचे असे ठरवून तिने पतीचे चरणतीर्थ तीन्ही देवांवर प्रोक्षिले, त्यासरशी तीन्ही देव लहान बाळे झाली. मग तिने विवस्त्र होऊन त्यांना स्तनपान दिले. त्या तीन्ही देवांच्या अंशांनी पुढे तिला दत्त, दुर्वास व चंद्र असे तीन पुत्र झाले. वनवासात राम-सीता हिच्या आश्रमात आली असता हिने सीतेला अंगराग व वस्त्रभूषणे देऊन सती-धर्माचा उपदेश केला तो असा –



अनसूया

> **नगरस्थो वनस्थो वा शुभो वा यदि वाऽशुभः।**
> **यासां स्त्रीणां प्रियो भर्ता तासां लोका महोदयाः॥**
> (वा. रा. २. ११७. २१)

अर्थ – नगरात राहणारा वा वनवासी, अनुकूल वा प्रतिकूल कसाही असो; आपला पती ज्या स्त्रियांनी प्रिय मानला, त्यांना प्रकाशित असे परलोक प्राप्त होतात. [म. ज्ञा. को.]

**अनसूयातीर्थ** गुजरातेतील एक प्रमुख दत्तक्षेत्र. हे क्षेत्र बडोदे जिल्ह्यात शिनोर गावापासून ८ कि. मी. अंतरावर आहे. या ठिकाणी अनसूयेचे मंदिर आहे. समोरच दत्तमंदिर आहे. हे स्थान अत्यंत पवित्र, निसर्गसुंदर व रमणीय आहे. अनसूयामंदिराजवळची माती निष्ठापूर्वक लाविली असता, असाध्य रोगही बरे होतात, अशी लोकांची श्रद्धा आहे. गंगासप्तमीला अनसूयाक्षेत्री मोठी जत्रा भरते. [श्री. द. ज्ञा. को.]

**अनस्तमी व्रत** एक जैनव्रत. व्रतावधी जीवनाच्या अखेरीपर्यंत. याचा विधी असा – दोन घटिका दिवस झाल्यानंतर व दोन घटिका शेष राहीपर्यंतच्या काळात भोजननिवृत्ती व मंत्रजप. या व्रताची कथा अशी –

सुप्रतिष्ठ नगरात सागरसेन मुनीजवळ एक मांसलोलुप कोल्हा होता. मुनीने त्याच्याकडून हे व्रत करवून घेतले. त्यामुळे दुसऱ्या जन्मात तो प्रीतिंकर नावाचा श्रेष्ठीपुत्र म्हणून जन्माला आला. त्याने पुढे विरक्त होऊन जिनदीक्षा घेतली. [जै. व्र. वि. सं.]

**अनागतवंश** पाली भाषेतले १४२ पद्यखंडांचे एक काव्य. हे काव्य कस्सप नावाच्या कवीने लिहिले. कस्सपाच्या कालाचा पत्ता लागत नाही. मेत्तेय (मैत्रेय) या भावी बुद्धाचे त्यात वर्णन आहे. त्याच्या एका हस्तलिखित प्रतीत अनागतबुद्धस्स वण्णना, असे लिहिलेले आहे. भावी काळात होणाऱ्या मेत्तेय बुद्धाविषयी बौद्धांचा विश्वास वाढत गेल्याने या ग्रंथाला बरेच महत्त्व आले. निकाय किंवा पिटक ग्रंथांत मेत्तेयाचा उल्लेखही नाही. अपवाद काय तो दीघनिकायाचा. त्यात ... २२ व्या संवादात बुद्धाच्या तोंडी असे भविष्य घातले आहे, '... मेत्तेयाला हजारो अनुयायी मिळतील.'

या ग्रंथात नवीन असे काही नाही. पूर्वीच्या बुद्धकथांवरच ह्याची उभारणी झाली आहे. फक्त नावे तेवढी निराळी आहेत.

मैत्रेयाच्या अवताराचा काळ हे सुवर्णयुग ठरेल व त्या वेळचे राजे व प्रजाजन सत्य व सद्गुण यांच्या आचरणात एकमेकांशी स्पर्धा करतील, असे त्यात वर्णिले आहे. ख्रिस्ती धर्मातला मेसाया व हा मैत्रेया या दोघांत संशोधकांना बरेच साम्य आढळले आहे. मैत्रेय हे व्यक्तिनाम नसून, ते त्याचे गोत्रनाम आहे. [सु. वि. को.]

**अनागामी** बौद्ध दर्शनातला एक पारिभाषिक शब्द. ही अर्हत्-पदाच्या खालची भूमी आहे. जेव्हा सत्कार्यदृष्टी, विचिकित्सा, शीलव्रतपराभास, कामच्छंद व व्यापाद, ही पाच बंधने गळून पडतात, तेव्हा बौद्ध साधक हा अनागामी होतो. मृत्यूनंतर तो वरच्या भूमीत प्रवेश करतो. तिथेच उत्तरोत्तर उन्नत होत होत, अविद्येचा नाश झाल्यावर तो अर्हत्पदाला पोचतो. मग त्याला पुनर्जन्म मिळत नाही. म्हणूनच त्याला अनागामी (न+आगामी = पुन्हा जन्माला न येणारा) म्हटले आहे. [ हिं. वि. को. ]

**अनात्मवाद** आत्मवादाचा विरोधी सिद्धान्त. ज्यात आत्म्याचा निषेध केलेला आहे, असा वाद म्हणजे अनात्मवाद होय. आत्मवाद ब्राह्मणपरंपरेतला असून, ते श्रौतदर्शन आहे, तर अनात्मवाद श्रमणपरंपरेतला असून, ते बौद्धदर्शन आहे. पाली भाषेत याला अनात्तवाद असे म्हटले आहे. नैरात्मवाद किंवा पुद्गलप्रतिषेधवाद, अशीही त्याची पर्यायनामे आहेत.

बुद्ध हा अनात्मवादी होता. अनात्मवाद हा बुद्धदर्शनाचा पाया आहे. काही लोक असे मानतात, की अनात्मवादात आत्म्याचे संपूर्णतया निराकरण केलेले आहे आणि हा वाद म्हणजे आत्म्याचा अनस्तित्ववाद किंवा भौतिकवाद आहे; पण हा विचार चुकीचा आहे. बौद्ध दर्शनात अनात्मवाद वरील अर्थाने स्वीकारलेला नाही. बुद्धाने त्याला शाश्वतवाद व उच्छेदवाद या दोन एकांतिक वादांच्या मधला रस्ता 'मध्यमा प्रतिपद्' असे म्हटले आहे. शाश्वतवादाचा सिद्धान्त म्हणजे आत्मा हा नित्य, कूटस्थ, चिरंतन व एकरूप आहे असे मानणे. उच्छेदवाद म्हणजे आत्मा नाहीच असे म्हणणे. बुद्धाने आपल्या अनात्मवादाला या दोहोंपासून पृथक करून अभौतिक नैरात्मवाद या स्वरूपात त्याची देशना दिली आहे. बुद्ध आत्म्याचे वर्णन निषेधात्मक पद्धतीने करतो. रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान हे पाच स्कंध असून ते म्हणजे आत्मा नव्हे, असे तो म्हणतो. जीव, आत्मा, सत्ता हे शब्द बौद्ध दर्शनात समानार्थक आहेत. बुद्धाच्या मते या शब्दांच्या द्वारे अभिहित होणारा पदार्थ म्हणजे एखादी स्वतंत्र सत्ता नसून ते अनेक धर्मांचे एक सामान्य नामकरण आहे. बुद्धाने व्यावहारिक रूपाने आत्म्याचा निषेध केलेला नाही; तर तो पारमार्थिक रूपाने केला आहे. लोकव्यवहारात पंच स्कंधांचा समुदाय या रूपात आत्म्याची सत्ता आहे; पण त्याव्यतिरिक्त एखादा आत्मा नावाचा स्वतंत्र पदार्थ नाही, असे त्याचे मत आहे. तो आत्मवादाचे खंडन मोठ्या अभिनिवेशाने करतो, ते असे –

आत्मवादी पुरुष आत्म्याचे स्वरूप समजून न घेता त्याच्या कल्याणासाठी नाना प्रकारची यज्ञयागादी सत्कृत्ये करीत असतो. कल्पना करा, की एखादा पुरुष देशातल्या सर्वांत सुंदर स्त्रीवर प्रेम करीत आहे. मात्र त्याने त्या स्त्रीला कधीच पाहिलेले नाही. तिचे रंग, रूप, आकार, गुण, यांपैकी काहीही त्याला ठाऊक नाही. तिचे नाव आणि गोत्रही त्याला माहीत नाही. पण असे असूनही त्याचे प्रेम मात्र तिच्यावर जडले आहे, असा पुरुष लोकांमध्ये जसा हास्यास्पद ठरेल, तद्वतच आत्म्याचे गुणधर्म न समजता त्याच्या पारलौकिक सुखासाठी यज्ञयागादी कृत्ये करणे हे उपहासास्पद व गर्हणीय ठरेल (दीघनिकाय).

उपनिषदांचे सांगणे आहे, की 'आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति' म्हणजे आत्म्याच्या कामनेसाठी सर्व काही प्रिय होते (बृहदा. उप.). याचा अर्थ जगात सर्वप्रिय वस्तू म्हणजे आत्मा होय. याच आत्म्याच्या सुखासाठी मनुष्य विषयांची कामना करतो. पण ही कामना किंवा काम हाच बुद्धाला मान्य नाही. हा काम निर्माणच होऊ नये, म्हणून त्याने एका नव्या मार्गाची दीक्षा दिली. त्याची विचारधारा एका नव्या मार्गाने प्रवाहित झाली. तो म्हणतो –

आत्म्याचे अस्तित्व मानणे, हेच सर्व अनर्थांचे मूळ आहे. आत्मा मानल्याने अहंकाराचा उदय होतो. आत्म्याला सुख व्हावे म्हणून जीव नाना प्रकारांनी शरीराला सुख देऊ पाहतो व त्या सुखप्राप्तीचे अनेक उपाय धुंडू लागतो. यासाठी आत्म्याचा निषेध करणे हाच कामविजयाचा सुगम मार्ग आहे. बुद्धाच्या या उपदेशाचा प्रतिध्वनी पुढच्या काळात अनेक बौद्ध आचार्यांच्या ग्रंथात उमटला आहे. या आचार्यांनी अनात्मवादाच्या व्याख्या अनेक ढंगांनी केल्या आहेत.

आत्मविषयात बुद्धाने संघातवाद व संतानवाद हे दोन सिद्धान्त स्वीकारले आहेत, असे थेरवादी नागसेनाने सांगितले आहे. आत्मा हा रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान या पाचांचा संघातमात्र आहे. ज्या व्यक्तीला आपण एखाद्या नावाने हाक मारतो, ती व्यक्ती केवळ पंच स्कंधांचा समुच्चय असते. आत्मा कोणी एक, कूटस्थ व नित्य नसून, तो नित्य परिवर्तनशील असा स्कंध आहे.

पण बुद्धाच्या मते आत्मा हा स्कंधांहून भिन्नही नाही व अभिन्नही नाही. म्हणून संघातवाद ही बुद्धाची शिक्षा-दीक्षा होती, हे निश्चित रूपाने सांगता येत नाही. संतानवाद हा

आत्मा संतानरूप असल्याचे सांगतो. भौतिक व मानसिक, बाह्य व आभ्यंतर, इंद्रिय व इंद्रियग्राह्य, अशा पदार्थांचे आत्मा हा संतान आहे. विशेषत: सर्वास्तिवादी बौद्धांचे हे मत आहे. त्यांनी बुद्धाचा अनात्मवाद हा संतानवादाच्या स्वरूपात स्वीकारला आहे. आत्मा अवस्तू नाही, तर ती नित्य वस्तू आहे. मात्र ती स्थिर किंवा कूटस्थ नसून नित्य परिवर्तनशील आहे. आत्म्याचे घटक क्षणिक व विपरिणामधर्मी आहेत. जलप्रवाह किंवा दीपशिखा ही अग्नीच्या किंवा जलाच्या क्षणांचे संतान असतात, तद्वत आत्मा केवळ स्कंधांचे संतान आहे.

वात्सीपुत्रीय बौद्धांनी आत्म्याला पुद्गल किंवा द्रव्य यांचा पर्याय मानले आहे. पण वसुबंधु आपल्या अभिधर्मकोशात या मताचे खंडन करताना सांगतो, की पुद्गलवाद शेवटी शाश्वतवादाकडेच झुकतो, हा त्यातला दोष आहे.

विज्ञानवादी व योगाचारी यांच्या मते आत्मा केवल विज्ञान आहे. सौत्रांतिकांनी आत्मविज्ञानाला सत् व ध्रुव मानले; पण नित्य मानले नाही. वेदान्तातला आत्मा नित्य आहे. ध्रुव आणि नित्य या शब्दांचा साधारण अर्थ एकच आहे. या दृष्टीने वसुबंधू वेदान्ताच्या जवळ आला आहे. वसुबंधूने ज्याला विज्ञप्तिमात्र मानले, तो तर वेदान्तातल्या नित्य आत्म्याहून अंशमात्रही भिन्न नाही.

या अनात्मवादाचे काही सिद्धान्त पुढीलप्रमाणे आहेत – (१) पंच स्कंधांना आत्मा समजणे योग्य नव्हे. कारण ते बाधांनी ग्रस्त व रोगाधीन आहेत. (२) पंच स्कंध अनित्य आहेत अतएव दु:ख आहेत. म्हणून ते आत्मा होऊ शकत नाहीत. (३) जर ते आत्मा नव्हेत, तर त्यांच्यापासून निर्वेद प्राप्त करून घेतला पाहिजे; तरच निर्वाणाचा लाभ होईल. (४) जोवर आत्मग्रह आहे, तोवर आत्मीयाचा बोध आहे, बंधन आहे व आसक्तीही आहे. आत्म्याला नित्य व सत् मानले, तर खरी अनासक्ती व विरक्ती प्राप्त होणार नाही आणि खऱ्या अनासक्तीवाचून निर्वाण दुर्लभ आहे. या आणि अशाच आणखी काही कारणांनी बुद्धाने अनात्मवादाची देशना दिली आहे.

या देशनेच्या मागे तत्कालीन सामाजिक परिस्थितीचाही विचार होता. वैदिक आत्मवादात कित्येक दोष शिरले होते. आत्म्याच्या पारलौकिक कल्याणासाठी यज्ञयाग आणि तन्निमित्त पशुहिंसा सर्वत्र चालत होती. आत्मा हा सर्वत्र एकरूप व सम मानणारे वेदान्ती व्यवहारात मात्र तसे वागत नव्हते. जीव हे उच्च–नीच आहेत व त्यांच्यामध्ये जातिकृत अनेक भेद आहेत, अशा धारणेने त्यांचा व्यवहार चालत होता. आचार-विचारांतली ही विसंगती बुद्धाच्या ध्यानी आली व तिच्या निराकरणासाठी त्याने अनात्मवादाची घोषणा केली. या अनात्मवादाच्या सिद्धान्ताने यज्ञादी पुण्यकर्मांची व्यर्थता सिद्ध केली व अनासक्ती व समचर्या यांना आधारशिला मिळवून दिली.

चौऱ्यायंशी सिद्ध हे बौद्धमतावलंबीच होते व त्यांनीही अनात्मवादाचाच प्रचार केला. त्यांचे अनुवर्ती नाथपंथीही अर्धबौद्ध व अर्धयोगी होते. त्यांच्या साहित्यात अनात्मवाद हा आध्यात्मिक जीवनाची प्रेरणा व अध्यात्मातली चरम अनुभूती या उभय रूपांत दिसून येतो. त्यानंतरचे निर्गुणी संत व सूफी संत यांच्यावरही अनात्मवादाचा प्रभाव आहे. अनात्मवाद हा वस्तुत: मौनवाद आहे. या प्रकरणी बुद्धाला पुढील प्रश्न विचारले गेले होते – (१) जीव शरीराहून भिन्न आहे की अभिन्न? (२) तथागत (बुद्ध) मृत्यूनंतर राहतो किंवा नाही? (३) का राहतही आहे आणि न राहतही आहे? (४) का नाही राहत आहे का नाही न राहत आहे? बुद्धाने या सर्व प्रश्नांचे उत्तर मौनानेच दिले. बुद्धाच्या या मौनाचा खरा अर्थ काय, याविषयी आजवर अनेक बौद्ध व बौद्धेतर पंडितांनी तर्कांचे रान उठवून अनेक मते मांडली आहेत. [ बौ. द. मी.; हिं. सा. को.]

**अनादेशदेवता** एखाद्या स्मार्त कृत्यात जिथे विशिष्ट देवता घ्याव्या असे सांगितलेले नसते, तिथे अग्नी, वायू, सूर्य व प्रजापती या देवता घेतात, त्यांना अनादेशदेवता म्हणतात. [ सं. कौ. ]

**अनानत पारुच्छेपी** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या नवव्या मंडलातील एकशे अकरावे सूक्त याच्या नावावर आहे. पवमान सोमस्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. याची एक ऋचा अशी–

अग्मन्नुक्थानि पौंस्येन्द्रं जैत्राय हर्षयन् ।
वज्रश्च यद्भवथो अनपच्युता समत्स्वपच्युता ॥
(ऋ. ९.१११.३)

अर्थ – हे सूर्यकिरणसंमीलित, दिव्यरथाधिष्ठित, इंद्रगामी, स्तोत्रस्तुत, पूर्वदिशानुगामी आणि ज्ञानवान सोमा, इंद्राच्या वज्राच्या साह्याने सदैव अजेय राहून तू इंद्रगौरव वृद्धिंगत करतोस.

पणींनी अपहरण केलेले द्रव्य इंद्राने सोमप्राशनाने परत मिळविले असे अनानताने म्हटले आहे. [ ऋ. म. भा.; प्रा. च. को.]

**अनावळा ब्राह्मण** गुजराती खेडावाळ ब्राह्मणांचा एक वर्ग. सुरतेच्या पूर्वेस ४० मैलांवर असलेल्या अनावळ या गावावरून यांना हे नाव पडले. गुजरातेतल्या व्यारा महालात ऊन पाण्याचे काही झरे आहेत. स्कंदपुराणातल्या

एका कथेत प्रस्तुत ब्राह्मणांचा या उन्हाळचांशी संबंध जोडून दिलेला आहे, तो असा—

रामचंद्र लंकेहून अयोध्येला जात असता वाटेत अगस्त्याश्रमात उतरला आणि तिथे त्याने रावणवधाचे प्रायश्चित्त केले. त्या विधीसाठी रामाने हिमालयातून ब्राह्मण आणविले व त्यांच्या सुखार्थ इथे ऊन पाण्याचे झरे निर्मिले. हे ब्राह्मण बारा गोत्रांचे होते. त्यांनी रामाकडून दक्षिणा घेतली नाही, यास्तव रामाने त्यांचा वेदाध्ययनाचा व प्रतिग्रहाचा अधिकारच नष्ट करून टाकला. 'यापुढे तुम्ही वैश्य वृत्तीने जगाल' असा शापही रामाने त्यांना दिला. अशा प्रकारे ब्राह्मण्यापासून भ्रष्ट झाले म्हणून या अनावळ ब्राह्मणांना लोक भठेला (भ्रष्ट) असे म्हणू लागले.

दुसऱ्या एका कथेत रामाने अनावळ येथील एका भिल्लाला ब्राह्मण करून घेतले व पुढे त्याचा वंश अनावळ ब्राह्मण म्हणून प्रसिद्ध झाला, असे म्हटले आहे.

हे लोक शेतकरी पेशाचे असल्यामुळे त्यांच्या ब्रह्मकर्माचा लोप झालेला आहे. हे आपली धर्मकृत्ये औदीच्य ब्राह्मणांकडून करवितात. यांच्यांत वशी आणि नायक असे दोन पोटभेद आहेत. दक्षिण गुजरातचे पहिले वसाहतकार ते वशी व तिथून दुसरीकडे जाऊन राहिले ते नायक होत. अनावळांतल्या श्रेष्ठ वर्गाला देसाई व कनिष्ठ वर्गाला भठेला म्हणतात. देसाई भठेल्यांशी सोयरीक करीत नाहीत. [ मुं. इ. जा.; म. ज्ञा. को. ]

**अनासक्तियोग** महात्मा गांधींनी गीतेचे गुजराती भाषांतर केलेले असून, त्याला अनासक्तियोग असे नाव दिलेले आहे. या ग्रंथाची अनेक भाषांत भाषांतरे झालेली आहेत. त्याचे इंग्रजी रूपांतर त्यांचे पट्टशिष्य श्री. महादेवभाई देसाई यांनी केलेले असून, त्याला विस्तृत व विचारपूर्ण प्रस्तावनाही जोडलेली आहे. म. गांधींच्या मते अनासक्ती शब्दाचा अर्थ असंग, निवृत्ती किंवा त्याग असा आहे. असंग हे त्या स्थितीचे अभावात्मक स्वरूप आहे, तर निवृत्ती हे भावात्मक स्वरूप आहे. त्यागाचा अर्थ ते कर्मफलत्याग असा करतात. हे सर्व मिळून अनासक्तियोग सिद्ध होतो. गांधीजी म्हणतात, की 'अनासक्ती या सूर्याभोवती भक्ती, ज्ञान व कर्म हे उपग्रह फिरत आहेत' (अना. यो. पृ. १२५). याचा अर्थ असा आहे, की भक्ती, ज्ञान व कर्म ही सर्वस्वी अनासक्तीच्या सिद्धान्तावर अवलंबून आहेत व अनासक्तीची त्यांच्यावर सत्ता आहे. गांधीजींनी अनासक्ती व सत्य-अहिंसा यांचा अतूट संबंध जोडून दिलेला आहे. अहिंसेचे तत्त्व प्रस्थापित करण्यासाठी गीता सांगितली नाही, हे ते कबूल करतात; पण पुढे म्हणतात, की 'अहिंसेच्या तत्त्वाला गीतेच्या फार फार पूर्वीच मान्यता मिळालेली होती... ४० वर्षे अविश्रांत परिश्रम करून माझी अशी खात्री झाली, की सर्व प्रकारे व सर्व स्वरूपात अहिंसा पूर्णत: आचरणात आणल्यावाचून पूर्णकर्मफलत्याग अशक्य आहे.' अनासक्ती हे एक नाणे असून, अहिंसा व सत्य या त्याच्या दोन बाजू आहेत.

अनासक्ती या कल्पनेचे पृथक्करण केल्यास तिच्यात तीन विचार अंतर्भूत दिसतात. निष्काम कर्म, सर्व कर्मे ईश्वरार्पण करणे व शरणागती म्हणजेच देह व आत्मा ईश्वरचरणी अर्पण करणे. गांधीजी म्हणतात, की हे सर्व केले, तरच मनुष्याचा देह हा देवाचे देऊळ होऊ शकेल. हा झाला अनासक्तीचा सिद्धान्त.

गांधीजींचे दुसरे मत असे आहे, की महाभारत हा इतिहास नसून एक रूपक आहे. ते म्हणतात, 'आधुनिक अर्थाने महाभारत हा इतिहासग्रंथ आहे, हे मी मानीत नाही. याची सयुक्तिक प्रमाणे आदिपर्वातच सापडतात. (महाभारतातील स्त्री-पुरुष) पात्रांची अमानुष आणि अतिमानुष उत्पत्ती वर्णून भगवान व्यासाने राजा-प्रजेच्या इतिहासाला साफ पुसून टाकले आहे. त्यात वर्णिलेली पात्रे मुळात ऐतिहासिक खुशाल असोत; पण महाभारतात त्यांचा उपयोग व्यासांनी केवळ धर्माचे दर्शन घडविण्यासाठीच केला आहे. याच महाग्रंथात गीता ही शिरोमणी म्हणून विराजमान आहे. या गीतेच्या रूपाने मानवाच्या अंत:-करणात सदैव सुरू असणाऱ्या नैतिक झगड्याचे चित्रण झालेले आहे. गीतेसारख्या लोकोत्तर ग्रंथाची निर्मिती, कौटुंबिक भांडणे योग्य की अयोग्य हे ठरवून त्याबाबत निर्णय देण्यासाठी झाली असेल, हे संभवत नाही. गीतेतील कृष्ण शुद्ध संपूर्ण ज्ञानाची मूर्ती आहे. पण तो काल्पनिक आहे, असे म्हणण्याने कृष्ण या नावाच्या अस्तित्वाचा मी निषेध करीत नाही. मात्र संपूर्ण कृष्ण काल्पनिक आहे. संपूर्ण अवताराचे त्याच्यावर मागाहून केलेले आरोपण आहे, असे मला वाटते. प्रत्येक देहधारी प्राणी हा अवतारच आहे. पण मानवतेची काहीतरी लोकोत्तर सेवा केल्यावाचून कोणालाही पूर्णावतार हे विशेषण देता येणार नाही. मानवाच्या हितासाठी केलेली अलौकिक सेवा हाच अवतारपदाचा निकष आहे.

परमेश्वरस्वरूप झाल्याविना मानवाला सुखाचा लाभ व शांतीची प्राप्ती होत नाही. ईश्वरस्वरूप होण्याचा प्रयत्न हाच खरा पुरुषार्थ आणि हेच आत्मदर्शन! आत्मसाक्षात्कार हा गीतेचा विषय आहे; पण या विषयाचे प्रतिपादन करण्यासाठी काही गीतेची रचना झालेली नाही. मुमुक्षूंना मोक्ष म्हणजेच आत्मदर्शन प्राप्त करून देणारा एक अद्वितीय उपाय सांगावा, असा गीतेचा उद्देश आहे. आणि हा अद्वितीय उपाय म्हणजे कर्मफलत्याग होय.

पण कर्मफलत्याग ही साधी गोष्ट नाही. ती केवळ बुद्धीची कसरतही नाही. अंत:करण घुसळून निघाले तरच ती संभवते.

त्यागाचे हे सामर्थ्य अंगी बाणण्यासाठी ज्ञानाची आवश्यकता आहे. ज्ञानाची परिणती शुष्क पांडित्यात होऊ नये, म्हणून गीताकाराने ज्ञानाची भक्तीशी सांगड घालून दिली आहे व भक्तीला अग्रस्थान दिले आहे. गीतेतील ही भक्ती म्हणजे भाव-विवशता नव्हे; किंवा भाबडेपणाही नव्हे. गीतेतली भक्ताची लक्षणे पुढीलप्रमाणे आहेत –

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च।**
**निर्ममो निरहङ्कारः समदुःखसुखः क्षमी॥** (गीता १२.१३)

यावरून आपल्याला कळते, की ज्ञान मिळविणे व भक्त होणे, हेच आत्मदर्शन होय. पण तरीही अशा ज्ञानाला किंवा भक्तीला कर्मफलत्यागाच्या कसोटीस उतरावे लागते. गीता सांगते, की 'फलासक्ती सोडा आणि कर्म करा. निष्काम होऊन कर्म करा.' पण फलत्याग म्हणजे कर्माच्या परिणामाविषयी बेदरकारी असा मात्र त्याचा अर्थ नाही. परिणाम, साधनविचार व त्यांचे ज्ञान या गोष्टी अत्यावश्यक होत. हे सर्व झाल्यावर फलासक्ती न ठेवता जो साधनेत म्हणजेच कर्मात तल्लीन होऊन जातो, तो फलत्यागी होय. फलासक्ती धरणारा, केवळ फलाचेच चिंतन करणारा मनुष्य पुष्कळ वेळा कर्तव्यापासून च्युत होतो व न करण्याच्या गोष्टीही करू लागतो. त्याचा नीति-अनीतीचा विवेक सुटतो आणि तो सूक्तासूक्त मार्गाचा अवलंब करतो. असे हे फलासक्तीतून निघणारे कटू परिणाम विचारात घेऊन, गीताकाराने अनासक्तीचा सिद्धान्त बनविला व तो जगापुढे आकर्षक भाषेत मांडला. [गांधी विचारदर्शन; भ. गी. सा. द.]

**अनाहतचक्र** अनाहत=न ताडित. योगविद्येतले एक चक्र. हे रक्त वर्णाचे असून, हृदयाच्या ठिकाणी असते.

अनाहतचक्र

या ठिकाणी आहत प्रेरणेवाचून म्हणजे कसल्याही आघातावाचून शब्दप्रत्यय येतो, नाद ऐकू येतो, म्हणून याला हे नाव मिळाले.

**शब्दब्रह्ममयः शब्दोऽनाहतस्तत्र दृश्यते।**
**अनाहताख्यं पद्मं तन्मुनिभिः परिकीर्तितम्॥**

अर्थ – त्या अनाहत चक्रात शब्दब्रह्मरूप शब्द अनाहत स्वरूपात प्रत्ययाला येतो म्हणून मुनींनी त्याला अनाहत पद्म (चक्र) म्हटले आहे.

हे बारा पाकळ्यांचे कमळ असून, त्या पाकळ्यांवर कं पासून ठं पर्यंत बारा वर्ण असतात. त्याचा वर्ण बंधूक पुष्पाप्रमाणे तेजस्वी आहे. हे कल्पतरूसारखे असून, इच्छितापेक्षा अधिक देते. हे वायूतत्त्वाचे स्थान असून, यं हे त्याचे बीज आहे. काळवीट हे त्याचे वाहन व काकिनी ही त्याची शक्ती होय. काकिनी शक्ती त्रिकोण रूपी असून, त्या त्रिकोणात बाण-लिंग आहे. [श्रीगुरुदत्तयोग; स. पाँ.]

**अनाहतनाद** न+आहत (ताडित)=अनाहत. एक यौगिक प्रक्रिया. नादाचे दोन भेद आहेत. एक आहत व दुसरा अनाहत. नाद हा आकाशाचा गुण आहे. हृदय हे चेतनाचे स्थान आहे. त्यातच दहराकाश नावाची एक लहानशी जागा शुद्ध आकाशाने व्याप्त आहे. त्या शुद्ध आकाशात आघातावाचून एक नाद सतत उठत असतो. पण माणसाचे मन व इंद्रिये बाह्य विषयांकडे झुकलेली असल्यामुळे त्याला हा नाद ऐकू येत नाही. हा नाद योगिजनांनाच साध्य आहे.

हा नाद व त्याच्या श्रवणाची प्रक्रिया पुढीलप्रमाणे सांगितलेली आहे – नाद हा अव्यक्त परमतत्त्वाच्या व्यक्तीकरणाचा सूचक असा आदी शब्द आहे. तो प्रथम परावाणीत सूक्ष्म रूपाने राहत असतो व पुढे अपरावाणीत येऊन अनुभवगम्य होतो. तो ॐकाररूप असून, ब्रह्माण्डाचे मूलतत्त्व आहे. तो अनाहत रूपाने पिण्ड-ब्रह्माण्डात व्याप्त असतो, पण अज्ञानी जीवाला त्याचे श्रवण होत नाही. कारण त्याचा सुषुम्नामार्ग अवरुद्ध असतो. हठयोगाच्या साधनेने तो मार्ग मोकळा होऊन जेव्हा कुंडलिनी शक्ती जागृत होते व प्राणवायू सुषुम्ना नाडीत प्रवेश करतो, तेव्हा त्याचे श्रवण होऊ लागते. सुषुम्नेच्या मार्गात षट्चक्रे अवस्थित असतात. प्राणायामाच्या द्वारे या चक्रांचा भेद होऊन प्राणवायू जेव्हा ऊर्ध्व गतीने अनाहतचक्रातल्या ब्रह्मग्रंथीत पोचतो, तेव्हा या अनाहत नादाचा प्रारंभ होतो. या अवस्थेत त्याला नानाविध भूषणध्वनी ऐकू येऊ लागतात. पुढे प्राण-अपान व नादबिंदू यांचे मीलन होते, तेव्हा प्राणवायू विशुद्ध चक्रातल्या विष्णुग्रंथीत प्रविष्ट होतो. तिथे त्याला ब्रह्मानंदाची भेरी ऐकू येऊ लागते. या नादावस्थेला घटावस्था म्हणतात. तिथून पुढे प्राणवायू आज्ञाचक्रातल्या रुद्रग्रंथीत प्रविष्ट होतो, तेव्हा त्याला मर्दल

ध्वनीचा अनुभव घडतो. इथेच त्याला अष्टसिद्धींची प्राप्ती होते. या नादावस्थेला परिचयावस्था म्हणतात. तोच प्राणवायू तिथून वर ब्रह्मरंध्रात प्रविष्ट झाला, की त्याला बासरी किंवा वीणा यांच्या ध्वनीचा अनुभव घडतो. नादाच्या या चौथ्या अवस्थेला लयावस्था म्हणतात. या अवस्थेत सार्‍या वृत्ती निरुद्ध होतात व आत्मा निजस्वरूपी स्थित होतो.

हाच नाद उपाधियुक्त होतो, तेव्हा तो सप्तस्वरांत विभाजित होतो. निरुपाधिक अवस्थेत तो प्रणवरूप असतो. हठयोगी एकांत स्थळी शवासन करून व हाताच्या दोन्ही आंगठ्यांनी दोन्ही कान बंद करून या नादाची साधना करतात. याला अनहद, अनुहत, अशीही नावे आहेत. [हठयोगदीपिका; गो. सि. सं.; हिं. वि. को.]

**अनाहित** मझ्द संप्रदायातली एक प्रमुख देवता. अवेस्त्यात हिचे वर्णन अनेक ठिकाणीं आले आहे. हिला बलिष्ठ व पवित्र देवता असे म्हटले आहे. ही पर्जन्य व वसंतऋतू यांची अधिष्ठात्री असून ही नक्षत्रमंडलात वास करते. तिथून जगातल्या सर्व नद्या उगम पावतात. या नद्यांच्या दैवी जलापासून पृथ्वीवर वनस्पती व प्राणी निर्माण झाले. अनाहित ही पुरुषबीज, स्त्रीचा गर्भाशय व स्तनांतले दूध शुद्ध करते. प्रसूतिसमयी स्त्रिया तिची प्रार्थना करतात. ही युद्धाचीही देवता आहे. वारा, पाऊस, ढग आणि गारा या चार घोडचांच्या रथात बसून ती रणांगणात जाते व वीरांना विजय मिळवून देते. हिच्या प्रीत्यर्थ ज्यांनी बलिदान केले, त्या सर्व वीरांची नामावली अवेस्त्यात एका ठिकाणी दिली आहे. त्यात झरथुष्ट्राचेही नाव आहे. ही कुमारिका असून सुंदर, उंच व बलवती आहे. हिच्या अंगात सोनेरी झगा, कानांत कुंडले, गळ्यात कंठा व मस्तकी मुकुट आहे.

ही देवता अनत या सेमेटिक देवीसारखी आहे. प्राचीन काळी अनाहितेची उपासना इराणी साम्राज्यात प्रतिष्ठा पावली होती. हिला बैल आवडतो, असे समजतात. [ एन्सा. रि. ए.; म. ज्ञा. को.]

**अनित्य** अ + नित्य = नित्य नसलेले. जगातील सर्व पदार्थांचे नित्य व अनित्य असे दोन भाग करता येतात. मात्र नित्यानित्यासंबंधी दार्शनिकांच्या कल्पना भिन्न असल्यामुळे त्यांचे नित्यानित्य पदार्थही भिन्न होतात. 'ध्वंसप्रतियोगित्वम्' हे नैयायिकांनी अनित्याचे लक्षण केले आहे. (तर्कदी.). ज्या वस्तूचा ध्वंस होतो, ती वस्तू अनित्य होय, असा त्याचा अर्थ आहे. म्हणून नैयायिक परमाण तेवढे नित्य मानून, इतर सर्व दृश्य पदार्थ अनित्य मानतात. अद्वैत वेदान्त्यांच्या मते ब्रह्म तेवढे नित्य असून, इतर सर्व अनित्य आहे. जे नित्य तेच सत्य व जे अनित्य ते मिथ्या, असे ते मानतात. [ हि. इं. फि., ]

**अनियतधम्मा** (सं. अनिश्चित धर्म) बौद्ध धर्मशास्त्रातले अपराध. ज्या अपराधांचे स्वरूप अनिश्चित असून, साक्षीने सिद्ध झाल्यावरही ज्या अपराधांना विशेष श्रेणीत घालावे लागते, त्यांना अनियतधम्मा म्हणतात. यांचे स्वरूप दोन प्रकारचे आहे – (१) एखाद्या भिक्षूने एकांत स्थळी बसून स्त्रीशी संभाषण करणे व (२) खुल्या जागेत स्त्रीशी संभाषण करीत असता काही अनुचित शब्द वापरणे. एखाद्या स्त्रीने अशा कृत्यांबद्दल त्या भिक्षूला दोषी ठरविल्यास त्याला पाराजिक इ. प्रायश्चित्ते करावी लागतात. [ पा. सा. इ. ]

**अनिरुद्ध** सात्वत धर्मातल्या व्यूहकल्पनेतला हा चौथा व्यूह असून, त्याला अहंकाररूप मानले आहे. व्यूहोपासनेत याची मूर्ती पुढीलप्रमाणे करावी, असे हेमाद्री सांगतो –

पद्मपत्रासारखा वर्ण, रक्त वस्त्र, खड्ग–चर्म ही आयुधे; त्याच्या डाव्या अंगी पताकायुक्त असे देवांचे ध्वज असावे.

अनिरुद्धाला शब्दयोनी = शब्दाचे उगमस्थान, असेही म्हटले आहे. (भाग. पु. ३. १. ३४) [ पु. इं. ]

**अनिरुद्ध कायस्थ** प्राचीन आसामी साहित्यात या नावाचे दोन संतकवी होऊन गेले.

(१) इ. स. च्या १६ व्या शतकात होऊन गेलेला कोचवंशीय राजा रघुनारायण (इ. स. १५८०–१५९२) याचा हा मंत्री होता. आपल्या काव्यग्रंथांच्या शेवटी आपण रामचंद्राचा पुत्र व दामोदराचा नातू असल्याचे याने नमूद केले आहे. याने भागवतपुराणाच्या दुसर्‍या व पाचव्या स्कंधांचे आसामी भाषेत भाषांतर केले आहे.

(२) हा वैष्णव संप्रदायातील मायामरा शाखेचा प्रवर्तक असून, त्याचा काल इ. स. १५५३ ते १६२३ असा आहे. ही वैष्णवशाखा आसामच्या इतिहासात दोन कारणांमुळे विशेष प्रसिद्ध आहे. अठराव्या शतकाच्या अंताला या शाखेने आहोम राजसत्तेविरुद्ध सशस्त्र उठाव करून काही काळ सत्ताही बळकावली आणि आसामच्या कानाकोपर्‍यात तसेच डोंगराळ प्रदेशातही या शाखेच्या अनुयायांनी वैष्णवसंप्रदायाचा प्रसार केला. या अनिरुद्धाने सुमारे दोनशे भक्तिगीते रचली असून, ती आजही त्याने स्थापिलेल्या वैष्णव मठांतून गायिली जातात. याव्यतिरिक्त त्याने भागवतपुराणाच्या चौथ्या व पाचव्या स्कंधांचे आसामी भाषेत भाषांतरही केले आहे. [ म. वि. को. ]

**अनिरुद्धभट्ट** (इ. स. चे १२ वे शतक) बंगालमधील धर्मशास्त्राचा प्रमुख ग्रंथकार. हा बंगाली ब्राणह्य

असून, गंगा नदीच्या तीरावरील विहारपाटक गावचा रहिवासी होता. त्याला धर्माधिकरणिक (न्यायाधीश) असेही म्हटले आहे. बल्लाळसेनाच्या दानसागर या ग्रंथावरून कळते, की तो बल्लाळसेन राजाचा गुरू होता व दानसागराच्या रचनेला त्याची मदत झाली होती. हारलता, पितृदयिता, चातुर्मास्यपद्धती व भागवततत्त्वमंजरी, असे याचे ग्रंथ आहेत.

हारलतेत जननमरणाशौच, सपिंड मृताचा अग्निसंस्कार, उत्तरक्रिया, तिचे अधिकारी, तर्पण, इ. विषय आले आहेत.

पितृदयिता हा ग्रंथ सामवेदी लोकांसाठी आहे. आह्निक, श्राद्ध, दान व इतर धार्मिक कृत्ये हे विषय या ग्रंथात विवेचिले आहेत. भागवततत्त्वमंजरी हा ग्रंथ वैष्णव तत्त्वज्ञानाचे विवेचन करणारा आहे. अनिरुद्धभट्ट हा कुमारिलभट्टाचा अनुयायी होता. याला बंगालमध्ये फार मोठी कीर्ती लाभली. [ हि. ध. ]

## अनिर्वचनीय

ज्याचे निर्वचन करणे अशक्य असा पदार्थ. जगातल्या सर्व पदार्थांचे निर्वचन (वर्णन) करता येते; पण ब्रह्म हा एक असा पदार्थ आहे, की त्याचे वर्णन करता येत नाही. उपनिषदांत ब्रह्मवर्णन आढळते; पण ते केवळ काही अंगांनीच केलेले असते. त्याचे संपूर्ण निर्वचन शक्य नाही, असे अद्वैतवेदान्ती मानतात. रामानुजांच्या मते ब्रह्म हे सगुण अर्थात वासुदेवस्वरूप आहे. त्यामुळे अनंत कल्याणगुणांनी त्याचे निर्वचन होणे शक्य आहे. पण अद्वैतवेदान्त्यांचे ब्रह्म हे निर्गुण, निर्विकार असल्यामुळे ते अनिर्वचनीय आहे. अनिर्वचनीयाचे लक्षण सर्वदर्शनसंग्रहात पुढीलप्रमाणे दिले आहे –

**प्रत्येकं सदसत्त्वाभ्यां विचारपदवीं न यत्।**
**गाहते तदनिर्वाच्यमाहुर्वेदान्तवादिनः॥**

अर्थ – सत् किंवा असत् या दोन्ही शब्दांनी जे विचारभूमीत प्रविष्ट होत नाही, त्याला वेदान्ती अनिर्वाच्य म्हणतात.

सांख्य व पातंजल योगदर्शनकार यांचेही मत अद्वैतवेदान्त्यांसारखेच आहे. [ हि. इं. फि. १ ]

## अनिल वातायन

एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे अडुसष्ट क्रमांकाचे सूक्त याच्या नावावर आहे. वायुस्तुती हा या सूक्ताचा विषय असून, वायू हीच सूक्ताची देवता आहे. याची एक ऋचा अशी–

**अंतरिक्षे पथिभिरीयमानो**
**न नि विशते कतमच्चनाहः।**
**अपां सखा प्रथमजा ऋतावा**
**क्व स्विज्जातः कुत आ बभूव॥**
(ऋ. १०.१६८.३)

अर्थ – अंतरिक्षात फिरणारा, अविरत कार्यकारी, जलमित्र, आणि सत्यपालक वायू कुठे उत्पन्न झाला ? तो कोठून आला ?

वायू अदृश्य आहे, तो इच्छासंचारी आहे, यासारखे वायूचे प्रसिद्ध गुणधर्म अनिलाने प्रस्तुत सूक्तात सांगितले आहेत. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा. ]

## अनीश्वरवाद

ईश्वराची सत्ता न मानणारा एक दार्शनिक सिद्धान्त. जगताचे सर्जन, संचालन व नियंत्रण करणाऱ्या कोण्या एका ईश्वराची सत्ता, अनीश्वरवादी मानीत नाहीत. त्यांच्या मते हे जग स्वयंसंचालित व स्वयंशासित आहे. ईश्वरवादी ईश्वराच्या अस्तित्वाविषयी जी प्रमाणे देतात, त्या सर्वांची आलोचना करून अनोश्वरवादी ती असिद्ध ठरवितात. ईश्वरवाद्यांचे मत असे, की मनुष्याच्या मनात ईश्वरप्रत्यय स्वयंसिद्ध व अनिवार्य असतो, हे ईश्वराच्या अस्तित्वाचे द्योतक होय. यावर अनीश्वरवादी म्हणतात, की ईश्वरभावना सर्व मनुष्यांत अनिवार्यरूपाने आढळत नाही. आणि आढळली तरी केवळ मानसिक भावनेने, मनाच्या कक्षेच्या बाहेर असलेल्या वस्तूंचे अस्तित्व सिद्ध होऊ शकत नाही.

विश्वातल्या सर्व वस्तूंचे काहीतरी कारण असतेच. कारणाशिवाय कार्याची उत्पत्ती नाही, हा सिद्धान्त आहे. त्यावरून ईश्वरवादी म्हणतात, की घटपटादी वस्तूंप्रमाणे हे सर्व जगही एक कार्यच आहे आणि म्हणूनच त्याचे उपादान व निमित्त कारण असलेच पाहिजे. हे कारण म्हणजेच ईश्वर होय. यावर अनीश्वरवाद्यांचे म्हणणे असे, की घटपटादी वस्तू कुठे आणि केव्हा उत्पन्न झाल्या, ते आपणास कळू शकते; पण या जगाचा आरंभ केव्हा झाला, ते समजायला मात्र आपल्याजवळ एखादे प्रमाण नाही. जगताचा प्रवाह अनादी आहे आणि म्हणून त्याचा निर्माता आणि त्याचे उपादान कारण याचा शोध घेण्याची आवश्यकता नाही. जगाचा स्रष्टा म्हणून कोणी ईश्वर मानलाच तर अनेक प्रश्न पुढे उभे राहतात. उदा० जगाची सृष्टी करण्यात ईश्वराचा उद्देश काय ? केवळ मानसिक किंवा आध्यात्मिक सत्ता भौतिक सृष्टी कशी निर्माण करू शकेल ? ती त्या भौतिक सृष्टीचे उपादान कारण कशी होऊ शकेल ? जर या सृष्टीचे उपादान कारण म्हणून एखादा भौतिक पदार्थ मानला, तर तो जगाचे नियंत्रण कसे करू शकेल ? ईश्वर स्वतः भौतिक शरीर अथवा भौतिक उपकरणे यांच्या साहाय्याने सृष्टिनिर्माणाचे कार्य करतो की त्याच्यावाचूनच करतो ? भौतिक शरीरादिकांच्या साहाय्याने करतो म्हणावे, तर सृष्टी अस्तित्वात नसताना ते शरीर व उपकरणे आली कुठून ? याशिवाय ही सृष्टी दुःखमय असून, जीवनाचा अंत मरणात, सुखाचा अंत दुःखात, संयोगाचा वि-

गात व उन्नतीचा अवनतीत होतो. अशी सृष्टी निर्माण करण्यात ईश्वराला लाभ काय ? ईश्वराचे भक्त त्याला सर्वशक्तिमान, सर्वज्ञ व कल्याणकारी मानतात; मग अनंत दुःखे, संघर्ष, हिंसा, कठोरता, छल-कपट, इ. दोषांनी युक्त असा हा विश्वप्रपंच निर्माण करणारा परमेश्वर सर्वज्ञ, सर्वशक्तिमान व कल्याणकारी कसा होऊ शकेल ?

यावर ईश्वरवादी असा युक्तिवाद करतात, की या विश्वप्रपंचात सर्व वस्तूंच्या अंतर्गत एक प्रकारची नियमबद्धता व प्रयोजनाची सार्थकता आढळते. यावरून या विश्वाचे संचालन करणारा कोणीतरी बुद्धिमान असा ईश्वर असला पाहिजे, हे सिद्ध होते. या युक्तिवादाचे अनीश्वरवादी असे खंडन करतात, की या जगात अशा कितीतरी घटना घडतात, की त्यांचा उद्देश किंवा प्रयोजन कल्याणकारी आहे, असे दिसून येत नाही. अतिवृष्टी, अनावृष्टी, महापूर, दुष्काळ, वणवा, अकालमृत्यू, व्याधी, वार्धक्य, इ. गोष्टींत ईश्वराचा कल्याणकारी उद्देश असतो, असे कसे म्हणता येईल ? या सृष्टीत जितके नियम दिसतात, तितकाच अनियमितपणाही दिसतो; जेवढे ऐक्य तेवढाच विरोधही आढळतो. पण यावर ईश्वरवादी आणखी एक युक्तिवाद करतात, की सर्व प्राणिमात्रांच्या व्यवहारावर नियंत्रण ठेवून त्यांच्यावर सत्ता गाजवणारा, तसेच त्यांच्या पापाला दंड व पुण्याला शुभ फल देणारा कोणीतरी ईश्वर असणे, ही गोष्ट अत्यंत आवश्यक आहे. याला उत्तर म्हणून अनीश्वरवादी सांगतात, की जगात प्राकृतिक नियमांव्यतिरिक्त दुसरा कोणताही नियम नाही. पापपुण्य हा भेद मनुष्यकृत आहे आणि म्हणूनच तो मिथ्या आहे. इथे सारा व्यवहार क्रिया आणि प्रतिक्रिया या स्वरूपात चालतो. त्यासाठी कोण्या नियामकाची किंवा शासकाची गरजच नाही. जर पाप-पुण्यासाठी निग्रहानुग्रहसमर्थ असा ईश्वर असता, तर जगात सदैव पुण्यात्मे व साधुसंत यांचे रक्षण झाले असते व त्याचबरोबर दुष्टात्म्यांचे निर्दालनही झाले असते. पण जगात तसे घडताना दिसत नाही. प्रबळानी दुर्बळांना चिरडून टाकावे आणि हिंसकांनी मानवांची निर्घृण हत्या करावी, हाच अनुभव मानवी व्यवहारात सदैव येत असतो. अशा प्रकारे ईश्वरवाद्यांच्या युक्तीचे व प्रमाणांचे खंडन करून अनीश्वरवादी त्याहीपुढे जाऊन सांगतात, की अशा प्रकारचे हिंसा, रक्तपात, उत्पात, अपघात यानी भरलेले हे जग निर्माण करणारा कोणी मानायचा असेल, तर तो बुद्धिमान व कल्याणकारी ईश्वर न मानता मूर्ख व दुष्ट असा सैतानच मानावा लागेल.

भारतात जैन, बौद्ध, चार्वाक, सांख्य व मीमांसक हे अनीश्वरवादी आहेत. बुद्ध ईश्वराची सत्ता मानीत नव्हता. आपल्या उपदेशात त्याने अनीश्वरवादी भावना स्पष्ट शब्दांत व्यक्त केली आहे. अदृष्ट आणि अज्ञात अशा ईश्वरावर भरंवसा ठेवून आपल्या अनुयायांनी अकर्मण्य बनू नये, असे त्याला वाटत होते. पथिकसुत्तांत त्याने ईश्वराच्या कर्तृत्वाचा उपहास केला आहे. दुसऱ्या एका ठिकाणी त्याने ईश्वराला अन्य देवतांप्रमाणेच एक सामान्य देवता मानले आहे व त्याला अज्ञानीही ठरविले आहे. त्याच्या दृष्टीने ईश्वर हा बुद्धीच्या कसोटीवर शिल्लक उरतच नाही.

अनीश्वरवादी दर्शनात ईश्वराच्या नास्तित्वाबद्दल दिल्या गेलेल्या युक्तींचे, गुणरत्न या आचार्यांने संकलन केले आहे. कुमारिलभट्टाचे श्लोकवार्तिक व रामानुजांचे श्रीभाष्य या ग्रंथांतही अनीश्वरवादी विचारांचा संग्रह झालेला आहे.

**विज्ञान व ईश्वर** – याविषयी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी केलेले विवेचन असे–

अलीकडे पाश्चात्य देशांत ईश्वर, जीवशक्ती, चैतन्य वस्तू यांचे अस्तित्व सिद्ध करण्यास अनुकूल अशी प्रवृत्ती काही संशोधकांच्या ठिकाणी उत्पन्न होऊ लागली आहे. हिंदुस्थानातील धर्मभोळे शिक्षित लोक याचा अर्थ असा करतात की, आधुनिक विज्ञानाचा जडवादी पाया गडगडू लागला असून, आता विज्ञानवादी अध्यात्मवादाकडे दीन दृष्टीने धाव घेऊ लागले आहेत; विज्ञाने वैचारिक संकटात सापडली असून, त्यांना ईश्वरवाद, आत्मवाद, इ. धार्मिक तत्त्वांचा आश्रय केल्याशिवाय गत्यंतरच राहिले नाही. या समजुतीत गैरसमजाचाच भाग मोठा आहे; कारण आधुनिक विज्ञानांपैकी कोणत्याही विज्ञानाने ईश-सत्ता कोणत्याही पक्क्या प्रमाणाने सिद्ध केलेली नाही. विज्ञानात वस्तु-कल्पनेच्या किंवा वस्तुविचाराच्या तारतम्याने तीन श्रेणी सांगितलेल्या आहेत. (१) अनुभवाने सिद्ध केलेल्या वस्तूंच्या कल्पना, (२) अनुमाने व (३) संभाव्य कल्पना. यांपैकी कोणत्याही श्रेणीत ईश्वरकल्पना बसत नाही.

आधुनिक विज्ञान-पंडित ईश्वरकल्पनेचे सत्यत्व सिद्ध करू पाहत आहेत. पण त्यांनी सांगितलेली ईशसत्तेची प्रमाणे तर्कशास्त्राच्या कसोटीस उतरणारी नाहीत.

ईश्वरकल्पनेवर विज्ञानदृष्ट्या मूलभूत आक्षेप असा आहे की, ज्ञान, इच्छा व भावना यांनी संपन्न असा आत्मा म्हणजेच ईश्वर होय; परंतु आत्मा देहाहून निराळा आहे, हेच अगोदर सिद्ध होऊ शकत नाही. ज्ञान, इच्छा व भावना यांचा उदयास्त विषयसंसर्गावर अवलंबून असतो. विषयसंसर्गावर अवलंबून नसलेल्या ज्ञान, इच्छा व भावना यांचे ईश्वराच्या ठिकाणी अस्तित्व आहे, अशी कल्पनाच अर्थहीन आहे. आणि विषयांच्या आधीन असलेल्या ज्ञानाने, इच्छेने व भावनेने युक्त असलेला ईश्वर मनुष्याच्या आत्म्यासारखाच विषयाने बद्ध आहे, असे सिद्ध होते. ज्या तऱ्हेचा ईश्वर ईश्वरवाद्यांना सिद्ध करावयाचा आहे, तो असा

विषयबंधनांत सापडलेला ईश्वर नाही; तो मुक्त आहे. बंधमुक्त अशा ईश्वराची कल्पनाच अर्थहीन, विसंगत व बाधित आहे.

म्हणूनच कणाद, कपिल, बुद्ध व चार्वाक हे सत्त्वशील, शुद्ध चारित्र्याचे आदर्श बनलेले तत्त्वज्ञ व मनुष्यजातीचे मार्गदर्शक ईश्वराच्या वाटेस गेले नाहीत व त्या वाटेस जाऊ नका, असा संदेश देऊन गेले. मनुष्याच्या शुद्ध चारित्र्यास व वर्तनास ईश्वराच्या कल्पनेची आवश्यकता नाही, हे त्यांच्या पवित्र चारित्र्याने व उदात्त विचारसरणीने आपोआप सिद्ध झाले आहे. पाहा– ईश्वर. [ हिं. वि. को. १; जडवाद. ]

**अनुक्रमणी** अनुक्रमणी म्हणजे वेदांचे सूचीग्रंथ होत. हे वेदांग साहित्यात मोडतात. यांची रचना वेदांच्या नंतर झालेली असून, वेदरक्षण आणि वेदार्थमीमांसा हा त्यांचा उद्देश आहे. अनुक्रमणीवरून कोणत्याही मंत्राचे ऋषी, देवता आणि छंद हे कळून येतात. ऋक्संहितेच्या अनेक अनुक्रमणी आहेत. त्यात शौनकाची अनुवाकानुक्रमणी आणि कात्यायनाची सर्वानुक्रमणी हे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. या दोहोंवरही विस्तृत टीका उपलब्ध आहेत. सर्वानुक्रमणीवर षड्गुरुशिष्य (इ. स. चे १२ वे शतक) याचे भाष्य अत्यंत उपयुक्त असे आहे. यात मूळ ग्रंथातल्या विषयांचे संक्षिप्त व सुरेख वर्णन आहे. शौनकाच्या अनुक्रमणीला बृहद्देवता असे नाव आहे. यात ऋग्वेदातील देवतांचे क्रमशः वर्णन असून, प्राचीन आख्यानांचेही विवरण आहे. माधवभट्टानेही एक सर्वानुक्रमणी लिहिली असून, तिचे दोन खंड उपलब्ध आहेत. यजुर्वेदाची अनुक्रमणी शुक्लयजुःसर्वानुक्रम या सूत्रात दिलेली आहे. तिच्यावर श्रीदेवाचे भाष्य आहे. सामवेदाशी संबद्ध असलेल्या अनुक्रमणी बऱ्याच असून, त्यांत त्या वेदाचे ऋषी, छंद व सामविधान यांचे विवरण आहे. अथर्ववेदाच्या बृहत्सर्वानुक्रमणीत प्रत्येक ऋषी-दैवत-छंदांचे पूर्ण विवरण मिळते. पाहा–बृहद्देवता. [ हिंदुत्व; सं. सा. इ. ]

**अनुगीता** महाभारताच्या आश्वमेधिक पर्वात अनुगीता हे एक उपपर्वच असून, त्याचे अध्याय १६ ते ९२ आहेत. अनुगीता म्हणजे गीतेचा एक वेगळा आविष्कार होय. या उपपर्वाचा उपक्रम असा–

भारतीय युद्धानंतर, आता श्रीकृष्ण द्वारकेला जाणार या कल्पनेने अर्जुनाला अत्यंत विषण्णता आली. तो भगवंताला म्हणाला –

" माधवा, युद्धाच्या पूर्वी रणांगणावर तुझ्या विराट स्वरूपाचा साक्षात्कार झाला. माझ्यावरील स्नेहामुळे दिव्यज्ञानाचा उपदेश करून, तू माझ्या मोहाचा निरास केलास. पण तू केलेल्या त्या दिव्य उपदेशाचे या वेळी मला विस्मरण झाले असून, ते दिव्यज्ञान पुन्हा एकदा श्रवण करावे, अशी मला इच्छा झाली आहे."

त्यावर भगवान म्हणाला –

" पार्था, प्राचीन काळी एक महान सिद्ध पुरुष होऊन गेला. तो शांतचित्त, जितेंद्रिय, ब्रह्मतेजाने तळपणारा आणि अन्तर्धान विद्येचा ज्ञाता होता. काश्यप ऋषीने त्या सिद्ध महापुरुषाला मनोमन आपले गुरू मानले. त्या सिद्धमहर्षींनी परासिद्धीसंबंधी आपले अमोल विचार काश्यपाला सांगितले. हेच त्याचे महान विचार मी तुला निवेदन करतो –

" उत्तम मनुष्य नाना प्रकारच्या शुभकर्मांचे निष्ठेने अनुष्ठान करतो. त्या पुण्यकर्मांच्या योगाने कर्त्या पुरुषाला इहलोकी उत्तम फलाची आणि उत्तम गतीची प्राप्ती होते. द्वंद्वाविना जीवनाला अस्तित्व नाही. दुःख नको असेल तर सुखाचा त्याग करण्याची सिद्धता असली पाहिजे. सुखदुःखातीत अवस्था प्राप्त करून घेतल्यावाचून आत्मसुखाची चव चाखता येत नाही. मोक्ष या लोकीच संपादन करायचा असतो. ब्रह्मपदाची प्राप्ती भूलोकावरच कामक्रोधादी षड्रिपूंना जिकल्यानंतर होत असते. जीवाची कर्मप्रवृत्तीच त्याच्या जीवनाचे मूळ असते. अन्न उपकारक आहे; तसेच ते अपायकारकही आहे. शरीर म्हणजे पंचमहाभूतांचा संघात आहे. शरीरान्तर्गत असलेला प्राण निघून जाताच या पंचमहाभूतांच्या संघातामध्ये विकृती निर्माण होऊन ते नाश पावते. या लोकात जीवाकडून घडलेल्या शुभ अथवा अशुभ कर्मांचे फल भोगल्याविना त्यांचा नाश होत नाही, कर्मफलाच्या उपभोगाची आशा सोडल्यावाचून अथवा निष्काम भावनेने कर्म करण्याविना या कर्मपरंपरेतून जीवाची सुटका होत नाही. कर्तव्यपरायणता, वेदाध्ययन, इंद्रियनिग्रह, प्राणिमात्रावर दया करणे, चित्ताचा संयम, कोणाच्या अकल्याणाची मनानेसुद्धा इच्छा न करणे, दुसऱ्याच्या धनाचा अपहार करण्याची वासना न धरणे, मातापित्यांची सेवा करणे, शुभकामना आणि शुभकर्म करणे या गुणांचा श्रेष्ठ पुरुषांच्या आचरणात अंतर्भाव झालेला असतो. धर्मानुसार आचरण करणारा या संसारसागरातून अनायासाने तरून जातो. वासनेचा त्याग केल्यावाचून विश्वाची माया विरत नाही.

**अनुग्रह** 'अभीष्टसम्पादनेच्छारूपः प्रसादः'=मनोवांछित वस्तूच्या संपादनाविषयी (भगवंताचा) इच्छारूप प्रसाद म्हणजे अनुग्रह होय (न्यायकोश). भगवंताची कृपा म्हणजेही अनुग्रहच. सर्व संप्रदायांनी भगवंताच्या अनुग्रहरूप कृपेला विशेष महत्त्व दिले आहे. गीतेत श्रीकृष्णाने अर्जुनाला अनुग्रहाचे महत्त्व सांगितले आहे (गीता १८.५६) –

मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ।

अर्थ – (भगवत्परायण कर्मयोगी) माझ्याच कृपेने (अनुग्रहाने) शाश्वत पदाची प्राप्ती करून घेतो.

पुष्टिमार्गात पुष्टीलाच अनुग्रह म्हटले आहे (भाग. पु. २. १०). परमात्मा हा निग्रहानुग्रहसमर्थ असून, अनन्य भक्तीने त्याचा अनुग्रह संपादन केल्यास भक्ताचे शाश्वत कल्याण होते, अशी सर्व भक्तिसंप्रदायांची मूलभूत धारणा आहे. पाहा– पुष्टिमार्ग, भक्ती. [ हिं. सां. को. ]

**अनुग्रहशिवमूर्ती** शिवाने कित्येक भक्तांवर अनुग्रह केला असून, त्या भक्तांत अर्जुन, रावण व विष्णू हे प्रमुख आहेत. अर्जुनानुग्रहाची मूर्ती श्रीशैल येथील शिल्पांत आहे. तिथे अर्जुन शिवाने दिलेला बाण ग्रहण करीत आहे. घारापुरी व वेरुळ येथे रावणानुग्रहाची शिल्पे आढळतात. त्यांत शिव–पार्वती उच्चासनावर बसली असून, त्यांच्या बैठकीखाली रावण आपल्या वीस भुजांनी कैलासपर्वत हालवीत असल्याचे दाखविले आहे. शिव विष्णूवर अनुग्रह करीत आहे अशा शिल्पांत चतुर्भुज शिवाच्या बैठकीजवळ विष्णू असून, तो उजव्या हाताने शिवाला कमळ वाहत आहे व दुसऱ्या हाताने सहस्रकमळांत एक कमळ उणे पडले म्हणून आपले नेत्रकमळ उपटून काढीत आहे, असे दाखविले आहे. [ मू. वि. ]

**अनुत्तर** बौद्ध तत्त्वज्ञानात शून्यता, प्रज्ञा आणि उपाय यांच्या एकात्मज्ञानाला अनुत्तर ज्ञान, असे म्हणतात. अनुत्तर उपलब्धीची परंपरा सिद्धांनी योगाचारातून ग्रहण केली. अनुत्तर शब्दाचा अर्थ सर्वश्रेष्ठ, ज्याच्या पलिकडे काही नाही, असा आहे. बौद्ध संप्रदायांत योग आणि अनुत्तर या दोन उच्च पातळीवरच्या सूक्ष्म साधना होत्या. जे निःस्वभाव झाले आहेत किंवा ज्यांनी सहजस्वभाव किंवा वज्रस्वभाव पूर्णपणे आत्मसात केला आहे, अशा साधकांनाच अनुत्तर साधनेचा अधिकार होता. या साधनेविषयी आस्था धारण करणारे सिद्ध अन्य पद्धतींचा तिरस्कार करीत नसत. अनुत्तर साधक लोक मंत्र, तंत्र, इ. आडंबराचे महत्त्व मानीत नव्हते. पाहा – सहजयान, वज्रयान, योगाचार. [ हिं. सा. को. ]

**अनुत्तरपूजा** बोधिचित्ताच्या उदयासाठी अनुत्तर नामक पूजाविधान सांगितले आहे. या पूजची सात अंगे अशी – वंदन, पूजन, पापदेशना, पुण्यानुमोदन, बुद्धाध्येषणा, बुद्धयाचना व बोधिपरिणामना. ही पूजा मानसिकही होऊ शकते. साधक प्रथम जगताच्या कल्याणासाठी त्रिरत्नांना शरण जातो; नंतर विविध उपचारांनी बुद्ध व बोधिसत्व यांचे वंदन व पूजन करतो; मग जाणिवेत अथवा नेणिवेत केलेल्या पापांचे बुद्धापुढे प्रकटीकरण करतो. यालाच पापदेशना म्हणतात. ही पश्चात्तापपूर्वक केल्यास जुनी पापे नष्ट होतात व बुद्धाच्या कृपेने नवी पापे घडत नाहीत. नंतर साधक सर्व प्राण्यांच्या हातून शुभ कर्मे घडावी व त्यांना सर्व दुःखांपासून मुक्ती मिळावी म्हणून पुण्यानुमोदन करतो, म्हणजेच विश्वातल्या संपूर्ण सत्त्वांची सेवा करण्याचा निश्चय करतो, अंतरांत शुभ भावनेला आश्रय देतो. मग अंजलिसंपुट जोडून सर्व दिशांमध्ये स्थित असलेल्या बुद्धाची तो प्रार्थना करतो, की त्याने जीवांना त्यांच्या दुःखनिवृत्तीसाठी धर्मोपदेश करावा; समस्त जीवांसाठी त्याने चिंतामणी अथवा कल्पवृक्ष बनावे. त्यालाच बुद्धाध्येषणा म्हणतात. त्यानंतर पुढची प्रार्थना ही, की कृतकृत्य बोधिसत्त्वांनी मानवांच्या कल्याणसाधनांत सदैव मग्न असावे. याचे नाव बुद्धयाचना होय. नंतर या साधकाची शेवटची प्रार्थना अशी असते, की या अनुत्तरपूजेचे जे फलस्वरूप सुकृत मला प्राप्त झाले आहे, त्याच्या द्वारे मी प्राणिमात्रांच्या दुःखप्रशमनाचे कारण बनावे. या भावनेचे नाव बोधिपरिणामना होय.

या पूजेच्या योगाने बोधिचित्ताचा उदय अवश्य होतो. पाहा – त्रिरत्न, बोधिसत्व. [ बौ. द. मी. ]

**अनुपदसूत्र** चौथ्या सामसूत्राचे नाव. याचे दहा प्रपाठक आहेत. याचा संग्रह कोणी केला, त्याचा पत्ता लागत नाही. पंचविंश ब्राह्मणातल्या पुष्कळशा दुर्बोध वाक्यांची व्याख्या यात केलेली असून, षड्विंश ब्राह्मणाचीही चर्चा केलेली आहे. या ग्रंथात पुष्कळशी ऐतिहासिक सामग्री उपलब्ध होते व बऱ्याच प्राचीन ग्रंथांची नावेही मिळतात. यात उक्थ, स्तोत्र व गान यासंबंधीची माहिती आहे व अनेक वेदशाखा व उपनिषदे यांच्या सिद्धान्तांचा संग्रह केलेला आहे. [ हिंदुत्व ]

**अनुपमा** वस्तुपाल आणि तेजपाल हे गुजरातचा राजा वीरधवल (धोल्का, इ. स. चे १३वे शतक) याचे सेनापती होते. हे धर्माने जैन असून, यांनी अबू व गिरनार या पर्वतावरील जैनमंदिरे बांधली. त्या दोन भावांपैकी धाकटा तेजपाल याची अनुपमा ही पत्नी होय. ती चंद्रावतीचा व्यापारी धरणिग याची कन्या होती. हे दोघे बंधू नेहमी तिच्या सल्ल्याने वागत. तिच्याच सांगण्यावरून वर उल्लेखिलेली जैनमंदिरे बांधली गेली. तिला साहित्य व तत्त्वज्ञान यांची आवड होती. तिला षड्दर्शनमाता असे नाव मिळाले होते. पुरातनप्रबंधसंग्रहात कंकणकाव्य आहे, ते तिनेच रचले आहे, असे म्हणतात. शत्रुंजय तीर्थासमीप तिच्या नावाचे अनुपमा हे सरोवर आहे. [प्रे. वी. इं.]

**अनुपलब्धी** एक प्रमाण. प्रत्यक्षादी प्रमाणे भाव पदार्थांच्या उपलब्धीला साधक होतात; पण अभावाच्या उपलब्धीलाही प्रमाणाची आवश्यकता असतेच. आपली इंद्रिये भावात्मक वस्तूंचे ज्ञान करून देतात; पण ती अभाव दाखवू शकत नाहीत. म्हणूनच अनुपलब्धीची स्वतंत्र सत्ता मानावी लागते. उदा० जर विशिष्ट ठिकाणी घट उपस्थित असता, तर तो अवश्य दिसला असता. ज्या अर्थी तो दिसत नाही, त्या अर्थी त्याचा अभाव आहे. याचाच अर्थ वस्तूची अनुपलब्धी (अदर्शन) ही त्या वस्तूचा अभाव सूचित करते.

अनुपलब्धी प्रत्यक्ष प्रमाणाहून भिन्न आहे. कारण आपण डोळ्यांनी घट पाहू शकतो; पण घटाभाव पाहू शकत नाही. ती अनुमानाहूनही भिन्न आहे, कारण अनुमानासाठी ज्या उचित व्याप्तीची सत्ता असायला हवी, ती इथे नाही. आप्त वाक्य नसल्यामुळे अनुपलब्धी ही शब्दप्रमाण नव्हे आणि सादृश्य ज्ञानाच्या अभावी उपमानही नव्हे. फलतः हे एक स्वतंत्र प्रमाण आहे. भाट्ट मीमांसक व वेन्दाती अनुपलब्धी हे प्रमाण मानतात. प्रभाकरमतानुयायी मीमांसक व नैयायिक मात्र हे मानीत नाहीत. नैयायिकांचे मत असे, की अभावज्ञान विशेषणविशेष्यभाव्य सन्निकर्षाने होते; त्यासाठी अनुपलब्धी हे निराळे प्रमाण मानण्याची आवश्यकता नाही. यावर वेन्दात्यांचे म्हणणे असे, की पदार्थांच्या ज्ञानाला रूपाची आवश्यकता असते. पण अभावाला रूप नसल्याने त्याच्या ज्ञानासाठी अनुपलब्धी हे निराळे प्रमाण मानलेच पाहिजे. [भा. द.]

**अनुपातक** गोवध, परदारागमन, व्रात्यता (योग्य वेळी उपनयन न करणे), व्रतलोप (ब्रह्मचर्यव्रत मोडणे), संन्यास घेतल्यावर परत गृहस्थाश्रमात जाणे, अस्पृश्य व अमंगळ वस्तूंचा स्पर्श होणे, कनिष्ठ किंवा पतित यांच्याकडून दान स्वीकारणे, धर्मभ्रष्टता, इ. पातकांना अनुपातके म्हणतात (विष्णू ध. सू. ३६). मनू. ११.५५–५८; याज्ञ. ३.२२८-३३. यांना महापातकांप्रमाणेच मानतात व त्यांपासून शुद्ध होण्यासाठी अश्वमेध किंवा तीर्थयात्रा ही प्रायचित्ते सांगतात. याज्ञवल्क्याने गोवधासाठी पुढील प्रायचित्ते सांगितली आहेत– एक मास इंद्रियदमन, पंचगव्यप्राशन, गोष्ठशयन, गोपालन, गोदान, कृच्छ्र व अतिकृच्छ्र. परदारागमनासाठी गाढवाचे कातडे पांघरून सात घरी भिक्षा मागण्यास सांगितले आहे (आप. ध. सू. १.१०.२८.१९). व्रतलोपासाठी मृत्युदेवतेला गाढवाचा बळी देणे (आप. ध. सू. १.९.२६.८–९), संन्यासानंतर पुनश्च गृहस्थाश्रमात येणाऱ्याला सहा महिने कृच्छ्र करणे व अशुद्ध स्पर्शासाठी सचैल स्नान करणे (गौतम ध. सू. १४. २८)आणि धर्मभ्रष्ट झाल्यास कृच्छ्र प्रायश्चित्त करणे, या मार्गाने शुद्ध व्हावे लागते. पाहा–महापातके.

**अनुप्पन्** तमिळनाडमधली कानडी शेतकऱ्यांची जात. यांचे मूलस्थान म्हैसूर अथवा दक्षिण कर्नाटक असावे. यांच्यांत काही शैव आणि काही वैष्णव आहेत. वैष्णवांच्या घरी ब्राह्मण पौरोहित्य करतात; पण शैवांच्या घरी करीत नाहीत. यांचे सहा पोटभेद आहेत. प्रत्येक पोटभेदाचा एकेक प्रमुख असतो. यांची पंचायत असते.

हे लोक लग्नात वधू व वर यांची हाताची लहान बोटे सात वेळा एकत्र बांधतात. हाच यांचा विवाहविधी असतो. यांना विधवाविवाह मान्य आहे. पण व्यभिचार शाबीत होऊन एखाद्या स्त्रीला घटस्फोट मिळाला असल्यास, तो नवरा जिवंत असेतो तिला दुसरे लग्न करता येत नाही. आतेबहिणीवर मामेभावाचा हक्क असतो. एखाद्या स्त्रीचा पती तिच्याहून लहान अतएव पतिधर्म पाळण्यास असमर्थ असल्यास जवळच्या नातेवाईकाकडून तिला प्रजोत्पादन करून घेता येते. मात्र त्या प्रजेचे पितृत्व तिच्या नवऱ्याकडे जाते.

हे अनेक देवतांना भजतात आणि त्यांतल्या बहुसंख्य देवता या सती गेलेल्या स्त्रिया असतात. [का. ट्रा. स. इं.]

**अनुप्पनदी** मदुरेच्या आग्नेयी दिशेस दोन मैलांवर हे गाव असून, तिथे प्रेते पुरण्याची प्रागैतिहासिक जागा सापडली आहे. तिथे मातीची अनेक थडगी असून, त्यांत माणसांची हाडे व काही लहान भांडीही मिळाली आहेत. त्यांतली काही भांडी चकचकीत आहेत. [ मदुरा गॅझे. ]

**अनुप्रवचनीय** एक होम. वेदांच्या काही भागांचे अध्ययन झाल्यावर हा केला जात असे. सांप्रत तो उपनयनविधीमध्येच करतात. पाहा – उपनयन.

**अनुबंधचतुष्टय** संस्कृत भाषेत वेदान्त-ग्रंथांच्या प्रारंभी ग्रंथाच्या भूमिकेच्या रूपात अनुबंधचतुष्टय सांगण्याचा प्रघात आहे. ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय, त्याच्या प्रतिपादनाचे प्रयोजन, ग्रंथाचा अधिकारी म्हणजे कोणासाठी ग्रंथ लिहिला ते व त्या अधिकाऱ्याशी त्या विषयाचा संबंध, या चार गोष्टी मिळून अनुबंधचतुष्टय होते. केव्हा केव्हा ग्रंथाच्या मंगलाचरणातच अनुबंधांचा निर्देश केलेला असतो. अलिकडे ग्रंथांना ज्या विस्तृत भूमिका किंवा उपोद्घात लिहिले जातात, त्यांचे अनुबंधचतुष्टय हे पूर्वरूप समजायला हरकत नाही. [ ब्र. सि. मा. ]

**अनुब्राह्मण** ब्राह्मणसदृश ग्रंथांना अनुब्राह्मण असे म्हटले आहे. अशा प्रकारचे काही ग्रंथ प्राचीन काळी होते. भट्टभास्कराने तैत्तिरीय ब्राह्मणाच्या विशिष्ट अंशाला अनुब्राह्मण म्हटले आहे ( तै. सं. भाष्य १.८.१ ). शांखायन श्रौतसूत्राचे १४ व १५ हे अध्याय ब्रह्मदत्त नावाच्या टीकाकाराने अनुब्राह्मण म्हणूनच मानले आहेत. आश्वलायन व वैतान श्रौतसूत्रांतही अनुब्राह्मणांचा उल्लेख येतो. या अनुब्राह्मणांचे अध्ययन करणाऱ्यांना अनुब्राह्मणी असे म्हणत, असे पाणिनीने सांगितले आहे (अष्टा. ४.२.६२). [ पा. का. भा. ]

**अनुभव** हा शब्द अनु + भव् या दोन शब्दांपासून बनला आहे. अनु म्हणजे तत्सदृश व भव् म्हणजे होणे किंवा बनणे. याचाच अर्थ ज्या वस्तूचा अनुभव घ्यायचा तिच्याशी वृत्ती तद्रूप होणे असा आहे. याची व्याख्या अशी–' स्मृतिभिन्नं ज्ञानम् ' =स्मृतीहून भिन्न असे ज्ञान म्हणजे अनुभव होय ( तै. सं. ). 'हा घट आहे ' असे चाक्षुष प्रत्यक्ष म्हणजे अनुभव होय. त्याचे यथार्थ व अयथार्थ असे दोन भेद आहेत. प्रत्यक्ष, अनुमिती, उपमिती व शब्द असे यथार्थ अनुभवाचे चार प्रकार आहेत. संशय, विपर्यय व तर्क हे अयथार्थ अनुभवाचे तीन प्रकार होत. वैशेषिकमते प्रमा व अप्रमा असे अनुभवाचे दोन प्रकार आहेत. बुद्धिवृत्ती विषयानुरूप बनणे म्हणजे अनुभव, असे पातंजलयोगशास्त्राचे मत आहे. पाटाचे पाणी शेतात गेले म्हणजे ते जसे शेताचा तुकडा चौकोनी, त्रिकोणी असेल त्याप्रमाणे चौकोनी, त्रिकोणी बनते; तद्वत् इंद्रियांच्या पन्हळीतून अंतःकरण बाहेर जाणे व त्या त्या विषयाच्या आकाराने परिणत होणे, विषयानुरूप बनणे म्हणजे अनुभव होय.

इंद्रियवादी लोक अनुभवाची कक्षा इंद्रियांपुरती मर्यादित करतात; तर अध्यात्मवादी अनुभवाचे क्षेत्र इंद्रियांच्या पलिकडे असल्याचे सांगतात. इंद्रियग्राह्य अनुभव घेण्यास इंद्रिये सदैव तयार असतात. पण त्यांच्या शक्ती मर्यादित असल्यामुळे त्यांनी घेतलेल्या अनुभवावर बुद्धीचा संस्कार करून ज्ञानाची रचना करावी लागते. आत्मा अत्यंत सूक्ष्म असल्याने तो इंद्रियातीत आहे. जड व स्थूल वस्तूंच्या ज्ञानासाठी जी बुद्धी, जी साधने व ज्या पद्धती आपण वापरतो, त्या सर्व इंद्रियातीताच्या म्हणजेच सूक्ष्माच्या क्षेत्रात लटक्या पडतात. तिथे उपयोगी पडते ती एक प्रतिभा. प्रतिभेमध्ये तद्रूपतेने ज्ञान होते. व्यवहारात इंद्रियांचा जसा विषयांशी साक्षात् संबंध येतो. तद्वत् प्रतिभेमध्ये आत्म्याशी साक्षात् संबंध येतो. म्हणून आत्म्याच्या अनुभवाला साक्षात्कार असेही म्हणतात. ' प्रत्यक्षात्मकं ज्ञानम् ' = साक्षात्कारः (न्या. म.). व्यावहारिक ज्ञान इंद्रियप्रत्यक्ष असते, तर आत्मज्ञान इंद्रियातीत प्रत्यक्ष असते. आत्मानुभवाचे शब्दाने वर्णन करणे म्हणजे ते आत्म्याचे अप्रत्यक्ष ज्ञान होय. त्याला परोक्षानुभूती म्हणतात. तिच्यामुळे आत्म्याचा प्रत्यक्ष अनुभव घेण्याकडे प्रवृत्ती होते. आत्म्याशी एकरूप होऊन होणारे ज्ञान हे साक्षात् अनुभवरूप असल्यामुळे त्याला अपरोक्षानुभूती असे म्हणतात. [ न्यायकोश; श्री. के. वि. बेलसरे–प्रसाद, ऑक्टोबर १९५९ ]

**अनुभूती स्वरूपाचार्य** (इ. स. चे १२ वे शतक) एक व्याकरणकार आणि अद्वैतवेदान्ती. सारस्वतप्रक्रिया, आख्यानप्रक्रिया आणि धातुपाठ हे त्याचे व्याकरणग्रंथ होत. याच्या संबंधी एक आख्यायिका सांगतात, ती अशी–

एका विद्वत्सभेत अनुभूती स्वरूपाचार्याने अपाणिनीय अशा पुंक्षु पदाचा प्रयोग केला. काही पंडितांनी याबद्दल त्याच्यावर टीका केली असता त्याने दुसऱ्या दिवशी त्या शब्दाची सिद्धी करून दाखविण्याचे वचन दिले. मग त्याने देवी भगवतीची आराधना केली. देवीच्या कृपेने त्याला स्फूर्ती झाली आणि त्याने काही सूत्रे रचली. सरस्वतीने ही सूत्रे दिली म्हणून त्यांना ' सारस्वत सूत्रे ' असे नाव मिळाले.

काही टीकाकारांच्या मते त्याने यत्रतत्र विखुरलेल्या या सूत्रांना सुव्यवस्थित स्वरूप दिले; तर काहींच्या मते ही सूत्रे अनुभूती स्वरूपाचार्याचा शिष्य नरेंद्राचार्य याने रचलेली आहेत.

व्याकरणसंप्रदायांतील सर्वांत सुलभ म्हणून हे सारस्वत व्याकरण प्रसिद्ध आहे. यातील सूत्रसंख्या, पाणिनिकृत अष्टाध्यायीतील सूत्रांच्या एक पंचमांशापेक्षाही कमी आहे. केवळ सातशे सूत्रांत संस्कृत भाषेचे सारे व्याकरण निबद्ध करणे, ही आश्चर्याचीच गोष्ट आहे. म्हणूनच हे व्याकरण अतिशय लोकप्रिय असून गुजरातमध्ये आणि पाणिनीय व्याकरणाचे अध्ययनस्थान असलेल्या काशीतही त्याचा प्रचार आहे. काशीच्या पूर्वेकडे अनेक केंद्रांत, पाणिनीय व्याकरणाचे अध्यापन करण्यापूर्वी सारस्वत चंद्रिका शिकविली जाते व त्याचा विद्यार्थ्यांना चांगला लाभ होतो.

आपल्या सारस्वत सूत्रांवर अनुभूती स्वरूपाचार्याने स्वोपज्ञ नामक वृत्तीही लिहिली.

अनुभूती स्वरूपाचार्य अद्वैत वेदान्ताचा अधिकारी आचार्य होता. गौडपादरचित मांडूक्यकारिकेच्या शांकरभाष्यावर त्याने टीका लिहिलेली आहे. आनंदबोधप्रणीत प्रमाणरत्नमालेवरही त्याने टीका लिहिलेली आहे. अनुभूती स्वरूपाचार्यांचा प्रकटार्थविवरण हा ग्रंथ म्हणजे ब्रह्मसूत्रांवरील व्याख्यान होय. हा पांडित्यपूर्ण ग्रंथ त्याच्या असामान्य शास्त्रीय विद्वत्तेचा प्रमापक आहे. [ म. च. को.; सं. सा. इ. ]

**अनुमंडनपट्टी** उयमपलयम्च्या नैऋत्य दिशेस पेरियरच्या रस्त्यावर दोन मैल अंतरावर हे गाव असून, तिथून जवळच एका झाडीत एक ३–४ फूट उंच शिळा उभी आहे व तिच्यावर दोन पुरुषांच्या आकृती कोरलेल्या आहेत. त्या शिळेला अन्नमर्कळ किंवा भावांची शिळा म्हणतात.

दोघे भाऊ होते. त्यांना आपल्या बहिणीच्या शीलाचा संशय आला. त्यांनी तिला एकीकडे गाठून ठार मारले व स्वतःचेही प्राण वेचले, अशी त्या शिळेची आख्यायिका सांगतात. भावांच्या या शिळेसमोर बहिणीचीही शिळा आहे. ग्रामवासी या दगडांची पूजा करतात. [ मदुरा गॅझे. ]

**अनुमरण** पतीच्या मागून अग्निप्रवेश करून मरणे, म्हणजेच सती जाणे, असा त्याचा अर्थ आहे–

**देशान्तरमृते पत्यौ साध्वी तत्पादुकाद्वयम् ।**
**निधायोरसि संशुद्धा प्रविशेज्जातवेदसम् ।।**

अर्थ – पती देशांतरी मृत झाला असता (त्याचे प्रेत न मिळाल्यास) शुचिर्भूत साध्वीने त्याच्या पादुका हृदयाशी धरून अग्निप्रवेश करावा.

ही प्रथा क्षत्रिय, वैश्य व इतर स्त्रियांनाच विहित आहे, ब्राह्मण स्त्रियांना नाही, असे सांगितले आहे. पाहा – सतीप्रथा.

**अनुमान** भारतीय दर्शने व तर्कशास्त्र यातील एक पारिभाषिक शब्द. भारतीय दर्शनांत ज्ञानप्राप्तीच्या साधनांना प्रमाण असे म्हणतात. त्यांपैकी अनुमान हे एक प्रमाण आहे. चार्वाकदर्शन सोडल्यास बहुतेक सर्व दर्शनांत अनुमान हे प्रमाण मानले आहे. 'अनुमितिकरणम् अनुमानम्' म्हणजे अनुमान हे अनुमितीचे असाधारण कारण आहे.

ज्या पदार्थाचे ज्ञान प्रत्यक्ष प्रमाणाने होत नाही; पण त्या पदार्थाशी साहचर्यनियमाने संलग्न असणाऱ्या दुसऱ्या एका पदार्थाच्या प्रत्यक्षाने होते, त्याला अनुमिती व त्या प्रक्रियेला अनुमान असे म्हणतात. उदा० एखाद्या पर्वतावर धूम (धूर) दिसला, की त्या पर्वतावर वह्नी (अग्नी) आहे, असे ज्ञान आपल्याला होते. कारण पूर्वी महानसादी (स्वयंपाकघर) अनेक ठिकाणी वह्नी व धूम यांचे साहचर्य आपण पाहिलेले असते. त्यामुळे पर्वतावर धूम पाहिला, की जिथे जिथे धूर असतो, तिथे तिथे वह्नी असतो, याचे स्मरण होते. आणि ज्या अर्थी या पर्वतावर धूम दिसतो, त्या अर्थी तिथे वह्नी असला पाहिजे, असे ज्ञान होते.

या अनुमानप्रक्रियेतील पारिभाषिक शब्द पुढीलप्रमाणे आहेत– ज्या पदार्थाचे आपल्याला प्रत्यक्ष ज्ञान होते व ज्याच्या ज्ञानाच्या आधारावर अप्रत्यक्ष पदार्थाच्या अस्तित्वाचे ज्ञान होते, त्याला हेतू किंवा लिंग असे म्हणतात. उदा० धूम हा पदार्थ. ज्या पदार्थाच्या अस्तित्वाचे ज्ञान होते, त्याला साध्य असे म्हणतात. उदा० वह्नी. हेतू व साध्य यांच्या साहचर्यनियमाला व्याप्ती असे नाव आहे. ज्या ठिकाणी हेतूचे (धूमाचे) प्रत्यक्ष होते, त्याला पक्ष असे म्हणतात. उदा० पर्वत. ज्या ठिकाणी हेतू धूम व साध्य वह्नी यांचे साहचर्य आपण पूर्वी पाहिलेले असते, त्याला सपक्ष म्हणतात. उदा० महानस (स्वयंपाकघर). जिथे साध्याचा म्हणजे वह्नीचा अभाव असतो, तिथे धूम या हेतूचाही अभाव असतो, त्याला विपक्ष असे म्हणतात. उदा० जलह्रद (पाण्याचा डोह). पक्षावर म्हणजे पर्वतावर हेतू असणे, याला पक्षधर्मता व त्याचे प्रत्यक्ष ज्ञान होणे, याला पक्षधर्मताज्ञान असे म्हणतात. एकाच वेळी पक्षधर्मताज्ञान व व्याप्तिस्मरण ही दोन्ही होतात, तेव्हा त्याला परामर्श असे म्हणतात. 'साध्यव्याप्यहेतुमान् पक्षः' असे परामर्शाचे स्वरूप असते. व्याप्तिविशिष्ट पक्षधर्मतेला लिंगपरामर्श किंवा अनुमान असे म्हणतात.

अनुमानाचे दोन प्रकार आहेत – स्वार्थानुमान व परार्थानुमान. स्वार्थानुमान ही स्वतःची मानसिक प्रक्रिया आहे. महानसादी ठिकाणी धूम व वह्नी यांचे साहचर्य अनेकवार पाहून मनात धूम व वह्नी यांच्या व्याप्तीचा निश्चय होतो व एखाद्या वेळी पर्वतावर धूम दिसला, की मग पर्वतावर वह्नी आहे, अशी अनुमिती होते. हे स्वार्थानुमान होय.

परंतु जेव्हा दुसऱ्या एखाद्या व्यक्तीला पक्षावर साध्य आहे याचा निश्चय करून द्यायचा असतो, तेव्हा आपल्या मानसिक प्रक्रियेला आपण पाच अंगांत प्रकट करतो. या पाच अंगांना पंच अवयव असे नाव आहे.

**पञ्चावयवेन वाक्येन स्वनिश्चितार्थप्रतिपादनं**
**परार्थानुमानम् ।**

अर्थ – पंचावयवी वाक्याने आपल्याला निश्चित माहीत असलेल्या अर्थाचे प्रतिपादन करणे, म्हणजे परार्थानुमान होय.

हे पाच अवयव पुढीलप्रमाणे आहेत –

**प्रतिज्ञा** – 'साध्यवत्त्वेन पक्षवत्त्वं प्रतिज्ञा' = पक्षावर साध्य आहे, असे सांगणे म्हणजे प्रतिज्ञा होय. उदा० 'पर्वतो वह्निमान्'.

**हेतू** – 'लिङ्गस्य पक्षधर्मत्त्ववचनं हेतुः' = लिंग पक्षावर आहे, असे सांगणे म्हणजे हेतू होय. उदा० 'धूमवत्त्वात्'.

**उदाहरण** – 'सव्याप्तिकं दृष्टान्तवचनमुदाहरणम्' = व्याप्तिसहित दृष्टान्त देणे, म्हणजे उदाहरण होय. उदा० 'यो यो धूमवान् स स वह्निमान् यथा महानसम्'.

**उपनय** – 'परामर्शवचनमुपनयः' = परामर्शाचा बोध करून देणे, म्हणजे उपनय होय. उदाहरणार्थ –

'तथा (वह्निव्याप्यधूमवान्)च अयम् (पर्वतः)'.

निगमन – 'लिङ्गसम्बन्ध – प्रयुक्त – निश्चित–साध्यवत्त्व-वचनं निगमनम्' = लिंगसंबंधयुक्त निश्चित साध्याचे प्रतिपादन म्हणजे निगमन होय. उदा० 'तस्मात् (धूमवत्त्वात्) तथा (वह्निमान्)'.

दार्शनिक व इतर प्रकारच्या वादविवादांतही परार्थानुमान उपयोगी पडते.

गौतमाने अनुमानाचे स्वार्थ व परार्थ असे भेद न सांगता पूर्ववत्, शेषवत् व सामान्यतो दृष्ट असे तीन प्रकार कल्पिले आहेत. 'यत्र कारणेन कार्यमनुमीयते तत् पूर्ववत्' (न्यायसूत्र) =ज्या ठिकाणी कारणावरून कार्याचे अनुमान केले जाते, ते पूर्ववत् अनुमान होय. उदा० आकाशात मेघ जमले, की वृष्टी होणार असे केले जाणारे अनुमान.

'यत्र कार्येण कारणमनुमीयते तच्छेषवत्' (न्यायसूत्र) = जिथे कार्यावरून कारणाचे अनुमान केले जाते, ते शेषवत् अनुमान होय. उदा० नदीला पूर आलेला दिसला, की ती ज्या प्रदेशातून वाहते, त्या प्रदेशात कुठेही पाऊस पडला असला पाहिजे, असे अनुमान होणे.

या दोन्ही प्रकारांत न मोडणारी अनुमाने ही सामान्यतो दृष्ट या सदराखाली येतात. उदा० एखाद्या माणसाला सकाळी आपण त्याच्या घरी पाहिला आणि संध्याकाळी जर तोच माणूस आपल्याला बाजारात दिसला, तर तो मधल्या काळात घरून बाजारात गेला असला पाहिजे, असे अनुमान होते. त्याचप्रमाणे सूर्य सकाळी पूर्वेला तर संध्याकाळी पश्चिमेला दिसतो, यावरून दिवसभरात सूर्याने पूर्वेकडून पश्चिमेकडे प्रयाण केले, असे त्याची गती न पाहूनही अनुमान करता येते.

**अनुयाज** बर्ही, नराशंस व स्विष्टकृत् अग्नी या देवतांना उद्देशून दिल्या जाणाऱ्या आहुती. प्रधान आहुतीनंतर या देतात. यांतील पहिला प्रैष 'देवान् यज' असा असून दुसरे दोन 'यज' एवढेच असतात. [ हि. ध. ]

**अनुयोग** जैन आगमांच्या व्याख्येला अनुयोग म्हणतात. प्राचीन काळी आगमांतल्या प्रत्येक शब्दाची व्याख्या 'नया'च्या आधारे केली जात असे; पण पुढे मंदबुद्धी पुरुषांच्या ज्ञानासाठी आर्यरक्षित या आचार्याने अनुयोगाची चतुर्विध विभागणी केली ती अशी –

(१) **प्रथमानुयोग** – यात पद्मपुराण, त्रिषष्टिलक्षण, महापुराण, हरिवंश पुराण व उत्तर पुराण या कथात्मक ग्रंथांचा समावेश होतो. याला धर्मकथानुयोग असेही म्हणतात.

(२) **करणानुयोग** – यात पृथ्वी, ग्रह, विश्व वगैरे सृष्टीच्या उत्पत्तीची माहिती देणाऱ्या सूर्यप्रज्ञप्ती, चंद्रप्रज्ञप्ती व जयधवला या ग्रंथांचा समावेश होतो. याला गणितानुयोग असेही म्हणतात.

(३) **द्रव्यानुयोग** – कुंदकुंदाचार्य, उमास्वाती व समंतभद्र इत्यादी ग्रंथकारांनी लिहिलेल्या तत्त्वज्ञानात्मक ग्रंथांचा या विभागात समावेश होतो.

(४) **चरणानुयोग** – या विभागात जैन श्रमणांच्या दैनंदिन आचरणाचे नियम येतात. मूलाचार, त्रिवर्णाचार, रत्नकरंड श्रावकाचार, या ग्रंथांचा समावेश होतो.

या अनुयोगांच्या आधारावर त्या त्या विषयांचे प्राधान्य लक्षात घेऊन शास्त्राचेही विभाजन केले गेले. आचारांग इ. सूत्रे चरणानुयोगात, उवासगदसा, इ. प्रथमानुयोगात, जंबुदीवपण्णत्ती इ. करणानुयोगात व पन्नवणा इ. द्रव्यानुयोगात समाविष्ट करण्यात आली. अनुयोगाच्या प्रक्रियेचे विवेचन करणारा प्राचीन ग्रंथ अनुयोगद्वार हा आहे. [ हिं. जै. मो.; हिं. वि. को. ]

**अनुराधपूर** श्रीलंकेतले एक प्राचीन नगर. कोलंबोच्या नंतर लंकेतले हेच सर्वांत मोठे नगर असून, हे बौद्धांचे



अनुराधपूर येथील मुख्य स्तूप

प्रसिद्ध तीर्थ आहे. हे सुमारे १३०० वर्षे लंकेची राजधानी असून, कदम्बा नदीच्या तीरावर बसले आहे. अनुराध नावाच्या एका राजाने हे सनपूर्व सहाव्या शतकात वसविले. पुढे १०० वर्षांनी

पंडुकाभय नावाच्या राजाने आपली राजधानी तिथे आणली. त्यानंतर इ. स. आठव्या शतकातल्या अग्ग बोधी राजाच्या कारकीर्दीपर्यंत म्हणजे सुमारे १३०० वर्षे ही लंकेची राजधानी होती. सिंहली शेतकरी याला अनुराजपूर असेही म्हणतात. या शहराजवळ दोन मैल परिघाचा एक सुंदर तलाव पंडुकाभय राजानेच बांधून ठेवलेला आहे. याच्या दक्षिण तीरापासून एक मैलाच्या अंतरावर बोधिवृक्ष आहे. हा वृक्ष सुमारे २२०० वर्षांइतका जुना आहे. गयेच्या मूळ बोधिवृक्षाची एक फांदी सम्राट अशोकाने लंकेच्या तिस्स राजाला अर्पण केली, तिचाच हा वृक्ष बनलेला आहे, असे म्हणतात. तिस्स राजा व त्याचे सरदार यांनी बौद्ध धर्म स्वीकारून अनुराधपुरात बौद्धपद्धतीच्या सुंदर वास्तू उभ्या केल्या. त्यांनी अनेक आराम व विहारही बांधले. त्यांतली थूपाराम ही स्तूपाच्या आकाराची एक इमारत ७० फूट उंचीची होती. सांप्रत या सर्व इमारती नष्ट झालेल्या आहेत.

तिस्स राजाच्या मृत्यूनंतर ही राजधानी तमिळ लोकांनी जिंकली, पण त्यानंतर १०० वर्षांनी दुत्थगामिनी अभय या राजाने ती पुनश्च जिंकून घेतली. लंकेत या राजाच्या कित्येक आख्यायिका प्रचलित आहेत. या राजाने लाखो रुपये खर्च करून सोनेरी वाळूचा अभयगिरी नावाचा एक दागोबा बांधला. त्याची उंची १८९ फूट आहे. पाली भाषेत त्याला महाथूप असे म्हणतात. बौद्ध त्या वास्तूला पूज्य मानतात. अनुराधपूर अशा अनेक इमारतींनी शोभिवंत झाले होते.

या नगराचा उल्लेख फा-हि-यानने आपल्या ग्रंथात केलेला आहे. तो या नगरात बौद्धग्रंथांचा अभ्यास व त्यांच्या नकला करण्याकरिता दोन वर्षे राहिला होता. अनुराधपूर हे नालंदा विद्यापीठाप्रमाणे लंकेतले एक महान विद्यापीठ बनले होते. बौद्ध तत्त्वज्ञानावरचे अनेक ग्रंथ व अट्ठकथा इथे निर्माण झाल्या. सुप्रसिद्ध बौद्ध पंडित बुद्धघोष हा इथलाच विद्यार्थी होता.

इ. स. ४५० मध्ये धातुसेन नावाचा राजा तिथे राज्य करीत होता. त्याच्या नंतर तिथल्या राजघराण्यात यादवी युद्धे सुरू झाली. अशा युद्धांच्या वेळी एखादा पक्ष तमिळ लोकांना आपल्या मदतीस बोलावीत असे. त्या लुटारू सैन्याने अनुराधपूर अनेक वेळा लुटले. अखेर इ. स. च्या ८ व्या शतकात इथून राजधानी हालवून दक्षिणेस पुलस्तिपूर येथे नेण्यात आली. इ. स. १३०० नंतर अनुराधपुराची बहुतेक वस्ती उठली व आसपास जंगल माजले. आजमितीस हे नगर पुनः वसले आहे आणि व्यापार व व्यवसाय यांचे केंद्र बनले आहे. पाहा – श्रीलंका. [ म. ज्ञा. को. ]

**अनुराधा** अश्विन्यादी २७ नक्षत्रांपैकी १७ वे नक्षत्र. तुळेच्या पूर्वेस विंचवाच्या आकृतीसारखी एक आकृती आषाढात रात्रीच्या पहिल्या प्रहरी दक्षिणेच्या अंगाने दिसते, तिला वृश्चिक म्हणतात. या वृश्चिकाच्या मस्तकात तीन तारकांचा पुंज आहे, त्याचे नाव अनुराधा. हे नक्षत्र वृश्चिक राशीत येते. या नक्षत्राची देवता मित्र आहे (तै. सं. ४.४.१०). याला नक्षत्रिय प्रजापतीची प्रतिष्ठा म्हटले आहे (तै. ब्रा. १.५.२.२). हे नक्षत्र सर्वसिद्धीकर, तिर्यङ्गमुख, मृदू, मैत्र व मंदलोचन आहे.

या नक्षत्रावर जन्मलेली व्यक्ती कांतिमान, कीर्तिमान, कलाप्रवीण व शत्रुंजय असते (कोष्ठीप्रदीप). पाहा – नक्षत्रिय प्रजापती; नक्षत्रे. [ नक्षत्र लोक; श. क.; आमची नक्षत्रे ]

**अनुलोम–प्रतिलोम** श्रेष्ठ वर्णाचा पुरुष कनिष्ठ वर्णाच्या स्त्रीशी विवाह करतो, तेव्हा त्या विवाहाला अनुलोम विवाह आणि त्यांच्या संततीला अनुलोम प्रजा असे म्हणतात. आणि श्रेष्ठ वर्णाची स्त्री जेव्हा कनिष्ठ वर्णाच्या पुरुषाशी विवाह करते, तेव्हा त्या विवाहाला प्रतिलोम व त्यांच्या संततीला प्रतिलोम प्रजा म्हणतात.

अनुलोम व प्रतिलोम विवाहाची उदाहरणे भारतात मध्ययुगापर्यंत अनेक आढळतात. कालिदासाच्या 'मालविकाग्निमित्रम्' मध्ये वर्णिलेल्या विवाहात अग्निमित्र ब्राह्मण व मालविका क्षत्रकन्या होती. वाकाटक रुद्रसेन (द्वितीय) याने प्रभावती हिच्याशी विवाह केला होता, ती वर्णाने वैश्य होती. ही अनुलोमाची उदाहरणे होत. प्रतिलोमाच्या उदाहरणात कदंबकुलसंस्थापक मयूरशर्मा हा ब्राह्मण असून त्याने आपल्या मुली गुप्त व अन्य राजांच्या घरी दिल्या होत्या. ययाती व देवयानी यांच्या उदाहरणात ययाती क्षत्रिय व देवयानी ब्राह्मणकन्या होती. पुढे पुढे अशा विवाहांना धर्मशास्त्रकारांनी पायबंद घातला.

अनुलोम आणि प्रतिलोम संततीच्या बाबतीत प्रश्न प्रामुख्याने येतो तो असा, की विवाहजन्य संबंधामुळे निर्माण झालेल्या प्रजेला हे नाव द्यायचे, की विवाहबाह्य संबंधांमुळे निर्माण झालेल्या प्रजेला ?

मूर्धावसिक्त, अंबष्ठ, निषाद, माहिष्य, उग्र आणि करण या सहा अनुलोम जाती याज्ञवल्क्याने सांगितलेल्या आहेत. मनू म्हणतो की या जातींना उपनयनादी संस्कारांचा अधिकार असून, प्रतिलोम जातींना मात्र तो नाही (१०.४१); कारण ते शूद्रवत् आहेत. ब्राह्मण आणि क्षत्रिय यांना जरी तो अधिकार असला, तरी ब्राह्मण स्त्री आणि क्षत्रिय पुरुष यांच्या संततीला तो नाही. पराशरमाधवीयात प्रतिलोम हे वर्णबाह्य व पतित आहेत, असे देवलाचे मत दिलेले आहे. उशना आणि वैखानस यांनी निरनिराळ्या प्रतिलोम जातींना निरनिराळी नावे दिली आहेत. उदा० ब्राह्मण स्त्री आणि क्षत्रिय पुरुष यांच्या विवाहापासून

झालेल्या संततीला सूत असे नाव असून, विवाहबाह्य संततीला रथकार असे आहे. अपवाद सांगायचा, तर देवयानी ब्राह्मण-कन्या व ययाती क्षत्रिय असूनही, त्यांच्या पुत्रांना सूत न म्हणता क्षत्रिय मानले गेले.

विवाहसंबंधात अनुलोम व प्रतिलोम या शब्दांचा व्यवहार वैदिक साहित्यात आढळत नाही. मन्वादी स्मृतिकार मात्र याचा ऊहापोह करतात. यावरून अनुमान होते, की वेदोत्तर कालात वर्णव्यवस्था दृढ झाल्यावर मग अशा विवाहाचा विचार करणे भाग पडले असावे. स्मृतिग्रंथात वरील दोन्ही प्रकार दिसत असले, तरी धर्मशास्त्रकारांना अनुलोम विवाह तेवढेच मान्य होते. मात्र अनुलोमविवाहजन्य प्रजेचा सामाजिक दर्जा काय असावा, याबद्दल स्मृतिकारांत मतभेद आहेत. सर्वसाधारणपणे तीन मते प्रमुख आहेत–

(१) नारद व कौटिल्य यांच्या मते एका वर्णाच्या पुरुषाने त्या वर्णालगतच्या वर्णातील स्त्रीशी विवाह केला, तर ती संतती पित्याच्या वर्णाची होते.

(२) दुसरे मत असे, की अनुलोम विवाहजन्य प्रजा ही पित्यापेक्षा कनिष्ठ आणि मातेपेक्षा श्रेष्ठ दर्जाची असते.

(३) तिसरे आणि बहुमान्य मत असे, की अनुलोम विवाह-जन्य प्रजा मातृवर्णी असते. प्रतिलोम प्रजा मातापित्यांपेक्षा कनिष्ठ दर्जाची समजतात.

आपस्तंब धर्मसूत्रात चांडाल, पौल्कस व वैन या अनुलोम जातींचा उल्लेख आहे. मनूने प्रथमच या जातींच्या धंद्यांची माहिती दिलेली आहे.

सुरुवातीला सहा अनुलोम आणि सहा प्रतिलोम जाती होत्या. परंतु पुढे अनुलोम आणि प्रतिलोम यांचा परस्पर व इतर वर्णांशी संबंध आल्यामुळे त्यातून असंख्य जाती–उपजाती निर्माण झाल्या. पाहा – वर्णसंकर. [ हि. ध. ]

**अनुशय** बौद्ध तत्त्वज्ञानात पुढील सहा अनुशय मानलेले आहेत – (१) राग (तृष्णा), (२) प्रतिघ (द्वेष), (३) मान, (४) अविद्या (विद्याविरोधी तत्त्व), (५) दृष्टि-विशेष (उदा० सत्कार्यदृष्टी, मिथ्यादृष्टी, इ.) व (६) विचि-कित्सा (संशय). राग या अनुशयाचे दोन पोट प्रकार असून, त्यांची नावे कामराग व भवराग अशी आहेत. त्यामुळे काही ठिकाणीं अनुशय सात असल्याचेही म्हटले आहे. हे अनुशय संसा-राचे मूल कारण होत. अन्य दर्शनात वासना, कर्म, अपूर्व, अदृष्ट, संस्कार, इ. नावांनी ज्या तत्त्वांचा बोध होतो, त्यालाच बौद्धांनी अनुशय म्हटले आहे. बौद्ध दर्शनात या अनुशयांच्या निरासाचा उपाय प्रामुख्याने सांगितला आहे. [ बौ. ध. द. ]

**अनुशयाना** नायिकाभेद. अनुशय=खेद, दुःख. प्रियकराचे मीलनस्थान किंवा भेटीचा संकेत चुकल्याने दुःख पावणारी परकीया स्त्री ही अनुशयाना होय. सर्वप्रथम भानु-दत्ताने या नायिकेची कल्पना केली आहे. [हिं. सा. को.]

**अनुष्टुभ्** गायत्र्यादी सात प्रमुख वैदिक छंदांतला तिसरा छंद. याला ब्रह्माचे चौथे मुख म्हटले आहे (पु. इं.). आठ अक्षरांचा एक असे चार चरण यात असतात. ‘द्वात्रिंशदक्षरानुष्टुप्’= बत्तीस अक्षरांचा अनुष्टुभ् होतो, असे सांगितले आहे (कौ. ब्रा. २६.१). याचे वैदिक उदाहरण –

**आ तिष्ठ वृत्रहन् रथं युक्ता ते ब्रह्मणा हरी ।**
**अर्वाचीनं सु ते मनो ग्रावा कृणोतु वग्नुना ॥**
(ऋ. १.८४.३)

ब्राह्मणग्रंथांतून वाणीलाच अनुष्टुभ् म्हटले असून (तै. ब्रा. ३.३.१०.३) परम छंद म्हणून त्याला गौरविले आहे (श. ब्रा. १३.३.३.१). ‘अनुष्टुभिम छन्दसां योनिः’=अनुष्टुभ् हे (सर्व) छंदांचे जन्मस्थान आहे (तां. ब्रा. ११.५.१७). हा प्रजापतीचा छंद आहे (ऐ. ब्रा. ३.१३). सर्व सोमसवनात याचा प्रथम उपयोग करतात. याविषयी कथा अशी –

प्रजापतीने यज्ञाच्या शेवटी अनुष्टुभाला अच्छावाकीय ऋचे-कडे सोडून दिले. ते न आवडून तो प्रजापतीला म्हणाला, ‘मी तुझा मूळ छंद असून तू मला आपल्यापासून दूर केलेस; यावरून तू सर्व देवांत अत्यंत पापी आहेस.’ प्रजापतीला ती गोष्ट लागली. त्याने स्वतःवरचा दोषारोप घालविण्यासाठी सोमयाग करून अनुष्टुभाला प्रथम स्थान दिले.

वेदोत्तर काळात या छंदाला फार महत्त्व आले. रामायण-महाभारतादी पुराणेतिहास ग्रंथ बहुंशी याच छंदात आहेत. वेदेतर वाङ्मयात वाल्मीकीला हा छंद प्रथम स्फुरला.

**मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः ।**
**यत्क्रौञ्चमिथुनादेकमवधीः काममोहितम् ॥**

अर्थ–हे निषादा, तू चिरकाल जगू नकोस; कारण तू क्रौंच मिथुनापैकी काममोहित अशा नराला ठार केलेस.

वाल्मीकीची ही शापवाणी प्रथमच अनुष्टुभ् छंदात अवतरली. त्यानंतर त्याच छंदात रामायण रचण्याचा आदेश त्याला ब्रह्म-देवाकडून मिळाला (वा. रा. १.२).

याचे वेदेतर साहित्यातले लक्षण पुढील प्रमाणे–

**श्लोके षष्ठं गुरु ज्ञेयं सर्वत्र लघुपञ्चमम् ।**
**द्विचतुष्पादयोर्ह्रस्वं सप्तमं दीर्घमन्ययोः ॥**

अर्थ–श्लोकात (चरणात) सहावे अक्षर गुरू व पाचवे लघू जाणावे. तसेच दुसऱ्या व चवथ्या चरणातले सातवे अक्षर ऱ्हस्व

व पहिल्या व तिसऱ्या चरणातले दीर्घ असावे. [ हिं. सा. को.; म. ज्ञा. को.-प्रस्तावनाखंड]

**अनुसूचित जाती व जमाती** इ. स. १९६१च्या जनगणनेप्रमाणे भारतातील जमातींची लोकसंख्या २, ९८, ४६, ३०० म्हणजे भारताच्या एकूण लोकसंख्येच्या ६.८ टक्के आहे. या जमातींपैकी जवळ जवळ निम्म्या जमाती मध्यप्रदेश (६६, ७८, ४१०), ओडिसा (४२, २३, ७५७) आणि बिहार (४२, ०४, ७७०) या प्रदेशांत मिळून आहेत. या व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाने आणखी दोन वर्गांना मागसलेले म्हणून मान्यता दिलेली आहे. यांत (१) विमुक्त जाती व भटक्या जमाती आणि (२) नवदीक्षित बौद्ध व आर्थिक दृष्ट्या मागसलेले यांचा समावेश होतो.

अनुसूचित जाती ही संज्ञा प्रथम सायमन कमिशनने वापरली व तीच पुढे १९३५ च्या कायद्यात अंतर्भूत करण्यात आली. सामान्यतः अस्पृश्य मानल्या गेलेल्या जातींचा समावेश अनुसूचित जातींत होतो. इ. स. १९३५ च्या कायद्याच्या परिशिष्टात अशा अनुसूचित जातींची पहिली अधिकृत यादी प्रकाशित करण्यात आली आहे.

अनुसूचित जातींची संख्या १९६१ च्या जनगणनेप्रमाणे अदमासे १,००० असून, त्यांची लोकसंख्या ६, ४५, ११,३१३ आहे; म्हणजेच भारताच्या एकूण लोकसंख्येच्या १४.६४ टक्के आहे. महाराष्ट्रातील अनुसूचित जातींची संख्या ७७ असून, त्यांची एकूण लोकसंख्या ६०, ७२, ५३६ आहे. त्यांपैकी चांभार, महार, मांग व तत्सम जातींची एकूण लोकसंख्या १६ लाखांच्या वर आहे. ही महाराष्ट्रातील एकूण लोकसंख्येच्या १८ टक्के आहे.

अनुसूचित जातींच्या उन्नतीसाठी शासनाबरोबरच विशेषत: महाराष्ट्रात महात्मा फुले, विठ्ठल रामजी शिंदे, स्वातंत्र्यवीर सावरकर, बडोद्याचे महाराज श्रीमान सयाजीराव गायकवाड, कोल्हापूरचे छत्रपती शाहू महाराज, डॉ. बाबासाहेब आंबेडकर इत्यादींनी मोठ्या प्रमाणात परिश्रम घेतले.

भारतीय संविधान निर्माण होताना अनुसूचित जातींकरिता संरक्षण व अस्पृश्यतानिर्मूलन या गोष्टी प्रामुख्याने लक्षात घेण्यात आल्या. त्यानुसार संविधानात्मक अनेक तरतुदी करण्यात आल्या आहेत.

स्वातंत्र्योत्तर काळात अनुसूचित जातींच्या प्रगतीसाठी कल्याणकारी योजना आखण्यात आल्या. त्याव्यतिरिक्त १९५५ साली संसदेने अस्पृश्यता (गुन्हा) अधिनियम संमत करून, तो सर्व भारतभर लागू केला. शासनाने आखलेल्या कल्याणकारी योजनांनुसार अनुसूचित जातींच्या आर्थिक व शैक्षणिक अडचणींचा विचार करून, त्या दूर करण्याचे प्रयत्न करण्यात येत आहेत. [ म. वि. को. ]

**अनुस्तरणी** प्रेताचे दहन करण्यापूर्वी एक गाय वा शेळी मारून तिचे अवयव प्रेताच्या अवयवांवर ठेवण्याची प्रथा प्राचीन काळी केव्हा तरी होती. त्या गायीला वा शेळीला अनुस्तरणी अशी संज्ञा होती. (कात्या. श्रौ. सू. २५. ७.३४–३७; श. ब्रा. १२.५.२.१५).

**अनु** (१) पंच जनांपैकी एक आर्य मानवगण व द्रुह्यूंचे जोडीदार. हे लोक परुष्णीच्या (रावी) तीरावर राहत होते. दाशराज्ञ युद्धात अनू हे सुदासाच्या शत्रुपक्षात होते (ऋ. ७. १८. १४). अनूंना पंचजनांत महत्त्व होते.

इंद्राचा रथ एका अनूने तयार केला होता व तो इंद्राचा उपासक होता. (ऋ. ८. ४. १).

(२) ययातीला शर्मिष्ठेच्या ठायी झालेल्या पुत्रांत अनू हा थोरला होता. ययातीचे वार्धक्य यानेही न स्वीकारल्यामुळे ययातीने याचा राज्याधिकार नष्ट केला. पुढे हा उत्तरेस म्लेच्छांचा राजा बनला (म. भा. आदि. ६३; मत्स्य पु. ३४).

**अनूढा** नायिकाभेद. अनूढा = अविवाहित. भोजाने सर्वप्रथम हा भेद कल्पिला. 'अनब्याहि केहु पुरुषसों अनुरागिनी जो होय.' = अविवाहित अवस्थेत एखाद्या पुरुषावर प्रेम करणारी स्त्री म्हणजे अनूढा होय, (रसराज ६२) असे हिचे लक्षण मतिरामाने दिले आहे. [ हिं. सा. को. ]

**अनूप** एक जनपद. या जनपदाच्या स्थानासंबंधी अनेक मते आहेत. अनूप लोकांचा प्रदेश सुराष्ट्र व आनर्त यांच्या नजीक असावा, असे हरिवंशावरून कळते. नासिक येथील गौतमी बलश्री हिच्या शिलालेखात अनूपाचा उल्लेख विदर्भ व अवंती यांच्या समवेत केलेला असून, हा प्रदेश म्हणजे नर्मदाकाठच्या माहिष्मती नगरीभोवतालचा प्रदेश होय, असे सुचविले आहे. वायुपुराणात नर्मदानूप असा एक उल्लेख आहे. यावरून कार्तवीर्य अर्जुनाचे ज्या प्रदेशावर राज्य होते, त्याच्या जवळपास हे अनूप लोक राहत असावे, असे दिसते. कार्तवीर्याप्रमाणेच तालराजाचा संबंधही अनूप देशाशी असल्याचे समजते.

समुद्रालगतच्या पण दलदल असलेल्या भूमीला अनूप असे म्हणत. बंगालच्या अतिदक्षिण व अतिपश्चिम प्रदेशांस अनूप अशी संज्ञा आहे. कार्तवीर्य व ताल या राजांना महाभारतात अनूपाचे राजे म्हटले आहे. अनूप देशात राहणाऱ्या लोकांनाही

अनूप अशी संज्ञा होती. क्वचित अनीप असेही म्हणत. [ ट्रा. ए. इं.; क. हि. वा. पु.]

**अनूपसिंह** (इ. स. १६७४–१७०९) हा विकानेरचा (राजस्थान) राजा होता. लहानपणीच याला राजगादी मिळाली. हा मोठा विद्याप्रेमी व संगीतज्ञ होता. निरनिराळ्या ग्रंथांच्या प्रती करून घेऊन त्यांचा आपल्या ग्रंथालयात संग्रह करण्याचा त्याला विलक्षण नाद होता. त्या कामासाठी त्याने आपल्या पदरी अनेक लेखनिक बाळगले होते. विकानेरच्या अनूप संस्कृत लायब्ररीत त्याने जमा केलेले अनेक संस्कृत ग्रंथ आहेत. शहाजहानच्या कालापर्यंत मोगलदरबारात गायक–वादकांचा मोठा आदर होता; पण औरंगजेब हा संगीतद्वेष्टा निपजला व त्यामुळे तिथून निघालेले कित्येक संगीताचार्य बिकानेरमध्ये अनूपसिंहाच्या आश्रयाला आले. त्यांतल्याच भावभट्ट नावाच्या एका विद्वानाने त्याच्या पदरी राहून संगीत अनूपांकुश, अनूपसंगीत-विलास, इ. ग्रंथांची रचना केली.

अनूपसिंहाचे जीवन अनेक युद्धे लढण्यात व्यतीत झाले. या लढायांमुळे त्याचा बहुतेक काल विकानेरच्या बाहेरच जात असे. पण या धामधुमीतही त्याने ग्रंथसंग्रहाचे काम आवर्जून केले. नष्ट होण्याच्या मार्गाला लागलेले कित्येक ग्रंथ केवळ त्याच्या ग्रंथसाक्षेपामुळे वाचले. हा राजा कवींचाही पोशिंदा होता. त्याने लोकप्रियताही मिळविली होती. चारण कवींनी राजस्थानी भाषेत त्याच्यावर कबित्त, दोहा, वेली, इ. अनेक प्रकारची प्रशस्तिकाव्ये रचली आहेत. [ श्री. अगरचन्द नाहटा – संयुक्त राजस्थान, जून १९५८ ]

**अनूबंध्या** सोमयागात उदयनीया इष्टी झाल्यावर हा विधी होतो. यात मित्रावरुणांना उद्देशून वंध्या गाय अर्पण करतात. पूर्वी या गायीचे हनन होत असे. पण पुढे हे कलिवर्ज्य म्हणून बंद करण्यात आले. गायीऐवजी बैल किंवा पयस्या अर्पण केली तरी चालते, असे कात्यायन सांगतो. पाहा– अग्निष्टोम. [ हि. ध. ]

**अनेकदेवतावाद** एक आध्यात्मिक मतप्रणाली. या वैविध्यपूर्ण विश्वाचे व जीवनाचे नियंत्रण करणाऱ्या चैतन्यमय अशा अनेक शक्ती किंवा व्यक्ती आहेत. त्याच महासामर्थ्यशाली देवता होत. त्यांच्या कृपेने मानवाचे हित होते व अवकृपेने अहित होते. भक्तीने किंवा पूजेने त्यांची कृपा संपादन करता येते. तसेच त्यांची उपेक्षा केल्याने किंवा त्यांचे नियम मोडल्याने अवकृपा होते, अशी श्रद्धा म्हणजे अनेकदेवतावाद होय.

धर्मविचाराच्या विकासात एकदेवतावाद हा अनेकदेवतावादाच्या वरची पायरी आहे, असे समजतात. परंतु अँड्र लँग या मानवशास्त्रज्ञाचे असे मत आहे, की मुळात माणसाला विश्वाचे शासन चालविणाऱ्या एकाच अधिपतीची कल्पना सुचली आणि विश्वाचे शासन म्हणजे सुव्यवस्था राखण्याकरता एकाच शास्त्याची कल्पना अधिक सुसंगत ठरते. सुरवातीला एकेका देवतेची पूजा करणारा एकेक प्राथमिक समाज पृथक्पणे अस्तित्वात आला. हे एकदेवतावादी समाज जेव्हा निरनिराळ्या कारणांमुळे एकत्रित आले, तेव्हा त्यांच्या देवताही एकत्र गोळा झाल्या व ते अनेक समाज मिळून झालेल्या एका समाजात अनेकदेवतावाद मान्यता पावला. पण लँगचे हे मत विवाद्य आहे.

प्राचीन चिनी, इजिप्शियन, बाबिलोनियन, ग्रीक, रोमन, हिंदू, इ. लोकांचे धर्म हे अनेकदेवतावादी धर्म होते. विश्वातील सूर्य, आकाश, वायू, पृथ्वी, समुद्र, पर्जन्य, इ. विशाल दृश्ये पाहून व त्यांचा मानवी जीवनावरील प्रभाव पाहून त्यांच्यात मानवाने चैतन्यमय व नियंत्रक अशा शक्तीची किंवा व्यक्तींची कल्पना केली, असे दिसते. कल्पना या भावनात्मक प्रतिक्रियेतून निर्माण होतात. मानवाच्या राजकीय व सामाजिक जीवनातील संस्कारांचा प्रभाव त्या भावनात्मक प्रतिक्रियेवर पडतो. गणराज्यातील माणसे देवतांची कार्ये व स्थाने गणराज्यातील स्थानास्थानांप्रमाणे कल्पितात, तर राजसत्तेतील माणसे एक देवता राजाच्या स्थानी मानून बाकीच्या देवता साहाय्यक किंवा दुय्यम स्थानावरील कल्पितात. देवतांचे आहार-विहार हे माणसाच्या स्वतःच्या आहार-विहारांप्रमाणेच कल्पिलेले असतात.

हिंदू धर्म हा अनेकदेवतावादी आहे. परंतु द्वैतमतानुसार विष्णू किंवा शिव ही प्रमुख देवता असून, बाकीच्या इंद्र, वरुण, गणेश, इ. देवता साहाय्यक व मुख्य देवतेच्या आधीन आहेत, असे मानलेले आहे. अद्वैतमतानुसार एक परमात्मा हीच मुख्य देवता असून, अन्य शिव, विष्णू, ब्रह्मा, इंद्र, वरुण, इ. सर्व देवता परमात्म्याच्याच भिन्न भिन्न विभूती किंवा आविर्भाव आहेत, असे कल्पिलेले आहे. [म. वि. को.]

**अनेकान्तवाद** जैन धर्मातील एक प्रमुख तात्त्विक विचार. कोणत्याही पदार्थाकडे एकान्त पक्षाने न पाहणे याला जैन अनेकान्तनय म्हणतात. जगात कोणतीही वस्तू नव्याने उत्पन्न होत नाही, तर सर्व पदार्थ आपापल्या अवस्थेचे स्थित्यंतर करतात, म्हणजे एक स्वरूप सोडून दुसरे धारण करतात. प्रत्येक पदार्थास उत्पाद, व्यय व ध्रौव्य अशा तीन अवस्था असतात. पदार्थाच्या एका अवस्थेचे रूपांतर होऊन त्याला दुसरी अवस्था प्राप्त होणे, याला उत्पाद म्हणतात. रूपांतर-

समयी पहिल्या अवस्थेचा नाश होणे याला व्यय म्हणतात व तत्त्वरूपाने पदार्थाच्या अस्तित्वाचे परिणमन असणे, याला ध्रौव्य म्हणतात. पदार्थ ध्रौव्यापेक्षेने नित्य आहे व पर्यायापेक्षेने अनित्य आहे. पदार्थात एकाच वेळी नित्यानित्य स्वभाव असणे, याला नित्यानित्यात्मक म्हणतात. पदार्थात एकाच काळी अनेक धर्म असतात. त्यांचे स्वरूप वर्णन करण्यास अशक्य असणे, याला अवक्तव्य धर्म म्हणतात. या दृष्टीने वस्तूंत उत्पाद, व्यय व ध्रौव्य यांच्या अपेक्षेनेही सात भिन्न भिन्न धर्म आहेत. या सातांना मिळून जैनमतात सप्तभंगी नय असे म्हटले आहे. या सप्तभंगी नयानुसार पदार्थात पुढील सात धर्म आढळतात – (१) नित्य (२) अनित्य (३) अवक्तव्य (४) नित्यानित्य (५) नित्यअवक्तव्य (६) अनित्य–अवक्तव्य व (७) नित्यानित्य अवक्तव्य.

या सात प्रकारांनी पदार्थस्वरूप जाणण्याचे सप्तभंगीनयाचे सात प्रकार आहेत –

(१) **स्यादस्ति** – स्वद्रव्य, क्षेत्र, काल, भाव, या चारांच्या अपेक्षेने पदार्थाचे अस्तित्व मानणे.

(२) **स्यान्नास्ति** – सातांपैकी पुढील चारांच्या अपेक्षेने पदार्थाचे अस्तित्व नाही म्हणणे.

(३) **स्यादस्तिनास्ति** – तोच पदार्थ वेगवेगळ्या काळात आहे व नाही म्हणणे.

(४) **स्यात् अवक्तव्य** – त्या पदार्थाची स्थिती सांगता येणे अशक्य असणे.

(५) **स्यादस्ति अवक्तव्य** – काही अपेक्षेने पदार्थाचे अस्तित्व सांगणे अशक्य झाल्यास तिथे कथंचित् अस्तित्व सांगता येण्यासारखे नाही, असे म्हणणे.

(६) **स्यान्नास्ति अवक्तव्य** – पदार्थाचे नास्तित्व कथंचित् सांगता येणे शक्य असणे.

(७) **स्यादस्ति नास्ति अवक्तव्य** – पदार्थाचे अस्तित्व व नास्तित्व सांगणे शक्य व अशक्य असणे.

अशाप्रमाणे स्याद्वादाचे हे अतिसंक्षिप्त स्वरूप आहे. विशिष्ट पदार्थ असा किंवा तसाच आहे, असे समजून चालणे हा एकान्त पक्ष या वादाला मान्य नसून, विशिष्ट पदार्थ निरनिराळ्या अपेक्षेने असा किंवा तसा, असेल किंवा नसेल, असे सांगून एकान्त पक्ष टाळणे, हाच अनेकान्ताचा मुख्य हेतू आहे. एकाच स्त्रीला कोणी आई, कोणी कन्या, कोणी पत्नी, कोणी सासू, तर कोणी सून म्हणतो व निरनिराळ्या लोकांच्या अपेक्षेने सर्वांचे ते ते म्हणणे खरेही असते.

पं. सुखलालजींनी याविषयी पुढील विचार मांडले आहेत – या विश्वाचा विचार करणाऱ्या परस्पर भिन्न दोन मुख्य दृष्टी आहेत. एक आहे सामान्यगामिनी व दुसरी आहे विशेषगामिनी. पहिल्या दृष्टीने प्रारंभी विश्वात समानता दिसते व पुढे ती दृष्टी हळूहळू अभेदाकडे झुकते. शेवटी तिचा निश्चय होतो, की जे जे काही प्रतीतीचा विषय आहे, ते ते वास्तवात एकच आहे. दुसऱ्या दृष्टीला विश्वात सर्वत्र असमानताच दिसते व ती या असमानतेचे मूळ शोधता शोधता शेवटी अशा भूमिकेवर जाते, की विश्वात एकता कुठे नाहीच. फलत: तिचा निश्चय होतो, की विश्व म्हणजे केवळ भेदांचा पुंज आहे.

वरील दोन्ही दृष्टी मुळातच भिन्न आहेत. कारण पहिलीचा आधार आहे समन्वय; तर दुसरीचा आधार आहे विश्लेषण. या दोन विचारसरणींमुळे अनेक विरोधी वाद उभे होतात. या दोन मूलभूत विचारधारांतून निर्माण होणाऱ्या किंवा त्या त्या दोहोंशी येनकेनप्रकारेण संबंध राखणाऱ्याही अनेक विचारधारा प्रवाहित झाल्या आहेत. कोणी अभेद तर स्वीकारतात; पण त्याची व्याप्ती स्वरूप किंवा द्रव्य इथवर न वाढविता देशकालापुरतीच मर्यादित करतात. या विचारधारेत अनेक द्रव्ये मानणारेही लोक आहेत; पण त्यातून त्या द्रव्याची कालिक नित्यता तशीच दैशिक व्यापकता याविषयी वाद निर्माण झाले. उदाहरणार्थ सांख्यांचा प्रकृतिपुरुषवाद. दुसऱ्या विचारधारेने भेदाचे क्षेत्र इतके वाढविले, की तिच्यातून परमाणुवाद, विभुद्रव्यवाद, इ. कल्पना निघाल्या.

अद्वैतवादी दृष्टीने सारे भेद असह्य मानून अभेदमूलक अनेक वादांना जन्म दिला. सत्कार्यवाद हा त्यांतलाच एक आहे. तसेच एका बाजूने सारे विश्व अखंड व एकतत्त्वरूप मानणारा एक पक्ष व दुसऱ्या बाजूने विश्व हे निरंश, अंशपुंज मानणारा दुसरा पक्ष. या दोघांना आपले अभीष्ट तत्त्व सिद्ध करायचे असेल, तर अनिर्वचनीयतेचाच स्वीकार करावा लागेल. कारण त्या तत्त्वाचे शब्दाच्या द्वारे निर्वचन होते, असे मानल्यास त्यामुळे अखंड सत्तत्त्वाची सिद्धी होऊ शकणार नाही. तसेच निरंश भेदतत्वाचीही सिद्धी होऊ शकणार नाही. निर्वचन करणे म्हणजे जणू अखंडता किंवा निरंशता यांचा लोप करणे आहे. या मतांतून पुढे अनिर्वचनीयवाद निर्माण झाला.

त्या वादाला टक्कर देण्यासाठी लक्षणवादी तार्किक पुढे आले व त्यांनी वस्तुमात्राचे लक्षण बनविणे केवळ शक्यच नव्हे, तर ते वास्तविकही आहे, असा दावा केला व निर्वचनीयवाद पुढे आणला.

हे सगळे एकान्तवाद होत. त्यांची पारस्परिक वादलीला पाहून अनेकान्तदृष्टीचे आचार्य अंतर्मुख होऊन विचार करू लागले, की 'या सर्व वादांत काही तथ्यांश आहे का? असल्यास तो किती प्रमाणात आहे किंवा नाही ? का हे संपूर्ण

आहे ?' याचा विचार करता त्यांना एक युक्ती सापडली. त्यामुळे सर्व विरोध मावळून त्यांना पूर्ण सत्याचे दर्शन झाले. ही युक्ती म्हणजेच अनेकान्तदृष्टी होय. अनेकान्ताच्या प्रकाशात त्यांना दिसून आले, की प्रतीती अभेदगामिनी असो वा भेदगामिनी असो, दोन्ही वास्तविक आहेत. भेद व अभेद यांच्या प्रतीती परस्परविरुद्ध यामुळे दिसतात, की त्या प्रत्येकीला ते ते लोक पूर्ण प्रमाण मानतात. सामान्य व विशेष या दोन्ही प्रतीती या स्वविषयांत यथार्थ असूनही पूर्ण प्रमाण ठरू शकत नाहीत. वस्तूचे पूर्ण स्वरूप असे असले पाहिजे, की विरुद्ध दिसणाऱ्या प्रतीतींनीही आपल्या स्थानी राहून त्या वस्तूला अविरोधी भावाने प्रकाशित करावे व सर्वांनी मिळून वस्तूचे पूर्ण स्वरूप प्रकाशित केल्यामुळे सर्व प्रतीती प्रमाणभूत मानल्या जाव्या. या समन्वयगर्भित विचाराच्या बळावर त्यांनी सांगितले, की सत् द्वैत व सत् अद्वैत या दोहोंत कसलाही विरोध नाही. कारण वस्तूचे पूर्ण स्वरूप भेदाभेदात्मक किंवा सामान्य-विशेषात्मकच असते. उदा० स्थान, समय, रंग, रस, परिमाण, इ. विचार केल्यावाचून आपण केवळ विशाल जलराशीचाच विचार करतो, तेव्हा आपल्याला एकच एक समुद्र प्रतीत होतो. पण त्याच जलराशीच्या विचारात जेव्हा स्थान, समय, इ. विचार दाखल होतात, तेव्हा आपल्याला एका अखंड समुद्राच्या जागी अनेक छोटे मोठे समुद्र दिसू लागतात. हा भेद वाढता वाढता शेवटी जलकणसुद्धा शिल्लक राहत नाही व अंती सर्व शून्यवत् भासू लागते. जलराशीत अशा प्रकारे अखंड समुद्राची बुद्धी व त्याच्या अंतिम अंशाची बुद्धी या दोन्ही वास्तविक आहेत. पहिली बुद्धी यासाठी वास्तविक, की ती भेदांना अलग अलग रूपाने स्पर्श न करता त्या सर्वांना एकसमयावच्छेदाने (सामान्य) रूपात पाहते. स्थान, समय, इत्यादिकृत भेद – जे एक दुसऱ्यापासून व्यावृत्त आहेत – त्यांना अलग अलग रूपाने विषय करणारी बुद्धीही वास्तविक आहे. कारण ते भेद तसे आहेतच.

साऱ्या विश्वाला एकमात्र सत् रूपाने पाहत असता किंवा समस्त भेदांच्या अंतर्गत एकमात्र अनुगमक सत्तेचा विचार करीत असता आपण म्हणू शकतो, की सर्व काही एक, एकमेव सद्रूपच आहे. कारण सर्वग्राही सत्तेचा विचार करतेवेळी परस्परव्यावृत्त असे भेद भासत नाहीत, यालाच सत् अद्वैत म्हणतात. पण जेव्हा आपण विश्वाला गुणधर्मकृत भेदांत विभाजित करतो, तेव्हा विश्वाचे एक सत् रूप जाऊन त्या ठिकाणी अनेक सत् रूप प्रतीत होऊ लागतात. हेच सत् द्वैत होय. या दोन्ही सत् अद्वैत व द्वैत बुद्धी आपापल्या विषयांत यथार्थ असल्या, तरी त्या दोन्ही जेव्हा सापेक्ष रूपाने येतात, तेव्हाच त्यांना पूर्ण प्रामाण्य लाभते हाच या दोन परस्परविरुद्ध समजल्या जाणाऱ्या वादांचा अनेकान्त दृष्टीने केलेला समन्वय होय.

अनेकान्त दृष्टी अनिर्वचनीयत्व व निर्वचनीयत्व या दोन्ही वादांचा झगडा मिटवते. ती सांगते, की वस्तूचे तेच रूप प्रतिपाद्य होऊ शकते, की जे संकेताचा विषय बनेल. सूक्ष्मतम बुद्धीच्या द्वारे केला जाणारा संकेतही वस्तूच्या स्थूल अंशालाच विषय करू शकतो. वस्तूचे असे असंख्य भाव आहेत, की ज्यांचे संकेताच्या द्वारे शब्दाने प्रतिपादन करणे शक्य नाही. या अर्थाने अखंड सत् स्थूल भावाने निर्वचनीय होऊ शकत असले, तरी सूक्ष्म भावाने ते अनिर्वचनीयच आहे. एकाच वस्तूची भावरूपता व अभावरूपता या दोन्हीही परस्परविरुद्ध नाहीत. दूध हे दूध रूपानेही प्रतीत होते व अदधि किंवा दधिभिन्न रूपानेही प्रतीत होते. अशा अवस्थेत वस्तूचे भाव-अभाव असे उभयरूप सिद्ध होऊन एकाच वस्तूतली भावत्व व अभावत्व ही विरोधप्रतीती नाहीशी होते.

कार्य-कारणात कार्याला केवल सत् व केवल असत् मानणारे विरोधी वाद आहेतच. त्याही विरोधाचा परिहार अनेकांत दृष्टी सरळ रीतीने करू शकते. ती म्हणते, की कार्य हे उत्पादनात सत्‌ही आहे व असत्‌ही आहे. कंकण बनण्याच्या पूर्वी सुवर्णात ते बनण्याची शक्ती आहे म्हणून उत्पत्तीच्या पूर्वीही शक्तिरूपाने कार्य सत् म्हणता येते. शक्तिरूपाने सत् असूनही उत्पादक सामग्रीच्या अभावी ते कार्य उत्पन्न न होऊ शकल्यामुळे ते उपलब्ध होत नाही. म्हणून ते असत्‌ही आहे.

बौद्धांचा केवळ परमाणुपुंजवाद व नैयायिकांचा अपूर्वावयवी वाद हे दोन्ही आपसात टकरा देतात; पण अनेकांत दृष्टीने स्कंध या तत्त्वाचा स्वीकार करून वरील दोन्ही वादांचा समन्वय केला आहे. कारण स्कंध हा केवळ परमाणुपुंज नाही, तसाच तो अनुभवबाधित अवयवांनी भिन्न असा अपूर्व अवयवीरूपही नाही. अशा प्रकारे अनेकान्त दृष्टीने अनेक वादांचा समन्वय मध्यस्थ भावाने केला आहे. असे करीत असताना अनेकान्तवादाच्या बरोबरच नयवाद व भंगवाद आपोआप फलित होतात; कारण पदार्थांचे वेगळे वेगळे पैलू, त्यांच्या विषयमर्यादेचा विभाग व त्यांचा एकाच विषयात यथोचित विन्यास या गोष्टी करून अनेकान्तवाद सिद्ध झाला आहे.

वैदिक परंपरेतल्या न्याय, वेदान्त, इ. दर्शनांत, तसेच बौद्ध दर्शनात कोणत्यातरी एका वस्तूचे विविध दृष्टींनी निरूपण करण्याची पद्धती, तसेच अनेक पक्षांच्या समन्वयाची दृष्टीही दिसून येते. पण तरीही प्रत्येक वस्तू व तिचा प्रत्येक पैलू यांच्यावर संभाव्य समग्र दृष्टींनी विचार करण्याचा आत्यंतिक आग्रह, तसेच समग्र दृष्टिबिंदूंच्या समन्वयातच विचाराची परिपूर्णता

मानण्याचा आग्रह, जैनपरंपरेशिवाय अन्यत्र दिसत नाही. त्याच आग्रहातून जैन तार्किकांनी अनेकान्त, नय व सप्तभंगीवाद यांचे स्वतंत्र व व्यवस्थित शास्त्र निर्माण केले. जैन दर्शन सर्व दृष्टींचा समन्वयही करते व सर्व दृष्टींना आपापल्या विषयांत तुल्यबळ व यथार्थही मानते. [ जैन धर्म; दर्शन और चिंतन ]

**अनेकार्थसमुच्चय** संस्कृत साहित्यातील एका शब्दाचे अनेक अर्थ देणारा कोश. या कोशाच्या कर्त्याचे नाव शाश्वत असे आहे, म्हणून त्याला शाश्वतकोश असेही म्हणतात. प्रस्तुत कोशकर्त्यांविषयी काही माहिती उपलब्ध नाही. ग्रंथाच्या शेवटी दिलेल्या 'कृतिरियं भट्टपुत्रशाश्वतस्य' या विधानावरून शाश्वत हा भट्टपुत्र होता, एवढे कळते.

अनेकार्थसमुच्चयाच्या सहाव्या विभागात शाश्वताने या कोशाच्या रचनेसंबंधीची थोडी माहिती दिली आहे. त्यावरून शाश्वताने आपला कोश पूर्वकालीन कोशकारांच्या कोशाचे अवलोकन करून आणि महाबळ, वराह या विद्वानांशी विचारविनिमय करून लिहिला, तसेच विद्याविलासाच्या दरबारातील खुड्लादी विद्वानांनी त्याचे परीक्षण केले, असे दिसते.

वराह हा इ. स. च्या सहाव्या शतकात प्रसिद्ध असलेला वराह मिहीरच होय, असे विद्वानांचे मत आहे. तसेच अमरसिंहाने लिहिलेल्या अमरकोशाशी अनेकार्थसमुच्चयाचे पुष्कळच साम्य आहे. त्यावरून शाश्वताने आपला ग्रंथ सहाव्या शतकाच्या सुमारास लिहिला असावा, असे दिसते.

यात एकूण ८०७ श्लोक आहेत व त्याचे सहा विभाग केले आहेत. पहिल्या विभागात १५३ श्लोक असून, प्रत्येक श्लोकात एक शब्द घेऊन त्याचे विविध अर्थ दिले आहेत. दुसऱ्या विभागात ४०० श्लोक असून, श्लोकाच्या प्रथमार्धात व उत्तरार्धात प्रत्येकी एक शब्द घेऊन त्याचे अर्थ दिले आहेत. तिसऱ्या विभागात १४१ श्लोक असून, त्यातील प्रत्येक पादात एक शब्द घेऊन त्याचे अर्थ दिले आहेत. चवथ्या विभागाला पुरवणी विभाग असे म्हणता येईल. कारण त्यात ४६ श्लोक असून, त्यांची रचना तिसऱ्या विभागाप्रमाणे आहे. पूर्वीच्या विभागात येऊन गेलेल्या शब्दांचे पुरवणी अर्थ दिले आहेत. पाचव्या विभागात २४ श्लोक असून, त्यात अव्ययांच्या अर्थाचा विचार केला आहे. सहाव्या विभागात शाश्वताने आपल्या ग्रंथाच्या रचनेविषयीची त्रुटित माहिती दिलेली आहे. यात ४३ श्लोक आहेत.

अनेकार्थसमुच्चय हा जरी छोटा कोश असला तरी, उत्तरकालीन मेदिनी, प्रांब, हेमचंद्र, धरणीदास यांसारख्या नामवंत कोशकारांवर त्याची छाप दिसून येते. तसेच क्षीरस्वामी, वररुची, मल्लिनाथ, इ. टीकाकारांनी आपापल्या ग्रंथांत या कोशातील अनेक वचने उद्धृत केली आहेत. [ अ. म. ज्ञा. ]

**अनैयूर** तिरुमंगल तालुक्यातील सुमारे हजार वस्तीचे खेडे. या नावाचा अर्थ हत्तीचे खेडे असा होतो. याची आख्यायिका अशी—इंद्राच्या ऐरावताचा वर्ण दुर्वासाच्या शापामुळे काळा झाला होता. या खेड्यात असलेल्या देवालयाजवळील भुईकमल तलावात त्या हत्तीने आंघोळ केली, तेव्हा त्याचा वर्ण पुन्हा पांढरा होऊन त्याला पूर्वपद प्राप्त झाले. तो पुढे त्याच खेड्यात राहिला व तिथेच मृत झाला. इ. स. १८७७ साली केलेल्या उत्खननात येथे हस्तिदंताचे काही अवशेष सापडले आहेत. त्यावरून पूर्वी केव्हातरी येथे हत्ती पुरलेला असावा, असे दिसते. इथले देऊळ ऐरावतेश्वराला अर्पण केलेले आहे. ते उग्रपांड्य नावाच्या राजाने बांधल्याचे सांगतात. [ मदुरा गॅझे. ]

**अनोदना सप्तमी** एक व्रत. चैत्र शुद्ध षष्ठी व सप्तमी या दोन्ही दिवशी केवळ पाणी पिऊन उपवास करावा आणि सप्तमीस सूर्यपूजा करावी, असे सांगितले आहे. फल—दीर्घायुरारोग्याची प्राप्ती. [ हि. ध. ]

**अनोमा** बौद्ध साहित्यात निर्देशिलेली एक पवित्र नदी. प्राचीन साहित्यात हिची हो-नन्-चिअँग, अनोम, अनोमिय, अनुवनिय, अनुमनिय अशी नामान्तरे आढळतात. अनोमचा शब्दश: अर्थ देदीप्यमान किंवा छोटी नदी असा आहे. उत्तर प्रदेशातील बस्ती जिल्ह्यात उगम पावून गोरखपूर जिल्ह्यातील सोहगौर गावाजवळ ही रावी नदीस मिळते. आधुनिक औमी हीच अनोमा असावी, असे कनिंगहॅम मानतो. राज्यत्याग केल्यावर गौतमबुद्ध प्रथम इथे आला व त्याने राजवस्त्रे उतरून काषायवस्त्रे धारण केली, असा उल्लेख बौद्ध साहित्यात आहे. कपिलवस्तूपासून अनोमा सहा योजने आहे, असाही उल्लेख आढळतो. या वर्णनावरून आधुनिक औमी हीच अनोमा ठरते. [ म. वि. को. ]

**अन्न** 'अद्यते अस्मै इति'=ज्याला खाल्ले जाते ते अन्न होय. (विग्रहकोश). ते अन्न व त्याच्या जोडीचे दुसरे काही पदार्थ यांची व्याख्या व्रतराजात पुढील प्रमाणे सांगितली आहे—

सस्यं क्षेत्रगतं प्राहु: सतुषं धान्यमुच्यते ।
आमं वितुषमित्युक्तं स्विन्नमन्नमुदाहृतम् ॥

अर्थ—शेतातल्या पिकाला सस्य, कोंड्यासहित दाण्याला धान्य, कोंडा काढून निराळे केलेल्या धान्याला आम व पाणी घालून अग्नीवर शिजविले म्हणजे त्याला अन्न म्हणतात.

वैदिक आर्यांची अन्नविषयक भावना भव्य होती. ऋग्वे-

दाच्या पहिल्या मंडलात अन्नस्तुती नावाचे एक सूक्त आहे. त्यात अगस्त्य ऋषी म्हणतो, 'हे सोमा, श्रेष्ठ देवांचे मन तुझ्यावर बसले आहे. दूध वा धान्य यांचे जे पदार्थ आम्ही खातो, त्यांचेही हे रसा, तूच पोषक सार हो. तू हृदयातील जीवनरस आणि तूच (बुद्धीला) उज्ज्वलता देणारा हो' (ऋ. १.१८७). अन्न हे सुख देणारे, द्वेषरहित, सुखोत्पादक व अद्वितीय मित्र असते, असेही वरील सूक्तात म्हटले आहे. अन्नाविषयी वेदांत वारंवार प्रार्थना केलेली दिसते. 'अन्नं वै वाजः'=अन्न म्हणजेच पोषक द्रव्य होय (तां. ब्रा. १३.९.१३.). 'अन्नं वा आयतनम्' = अन्न हेच स्थान आहे. (श. ब्रा. ७.५.१.२०). 'अन्नं प्राणः' = अन्न म्हणजेच प्राण होय (तै. ब्रा. ३.२.३.४). अन्न हे विराट (शोभा व महत्त्व देणारे) आहे. म्हणून ज्याच्या जवळ अन्न भरपूर आहे, तोच लोकांमध्ये पुष्कळ महत्त्व पावतो (ऐ. ब्रा. १.५).

स्वतःच्या प्रकृतीला मानवेल इतकेच अन्न माणसाचे रक्षण करते. त्याहून अधिक सेवन केल्यास ते घात करते व गरजेपेक्षा कमी घेतल्यास कृश करते (श. ब्रा. ७.५.१.१४). अन्न म्हणजेच श्री (शोभा) आहे.

**अन्नं प्राणमन्नमपानमाहुः । अन्नं मृत्युं तमु जीवातुमाहुः ।**
**अन्नं ब्रह्माणो जरसं वदन्ति । अन्नमाहुः प्रजननं प्रजानाम् ॥**
(तै. ब्रा. २.८.८.३)

**अर्थ** – अन्न हे प्राण आणि अपान आहे. ते मृत्यू व जीवनरसायन आहे. ते तारुण्य देणारे आहे, असे ब्राह्मण म्हणतात. ते प्रजांची उत्पत्ती करणारे आहे.

प्राचीन मानव गुहांत राहून मांस व कंदमुळे यांवर निर्वाह करीत असे. विविध साधनांच्या द्वारे शेती करून धान्य निर्माण करणे व ते उदरनिर्वाहाचे साधन बनविणे, हा मानवी संस्कृतीच्या विकासातला एक महत्त्वाचा टप्पा आहे. वेदकाळात सातू या धान्यावर विशेष भर होता. यजुर्वेदात ही धान्यांची यादी वाढली आहे. आज प्रचारात असलेली सर्व धान्ये त्या यादीत आढळतात. शिवाय दही, मध, तूप, हे पदार्थही अन्न व परम अन्न म्हणून सांगितले आहेत (श. ब्रा. ९.२.१.१२). अग्नीच्या साहाय्याने धान्ये शिजवून भोजन करणे, ही पद्धतही अत्यंत प्राचीन आहे. धान्याच्या लाह्या बनविण्याची पद्धतही मानवांना प्राचीन काळापासून अवगत होती. कौटिल्याच्या अर्थशास्त्रात धान्यांचा उपयोग करण्याच्या अनेक पद्धती दिल्या आहेत. त्यांची नावे अशी – (१) कुट्टककर्म– कुटणे (२) पिष्टकर्म–पीठ करणे (३) सक्तुकर्म–भाजणे व (४) तैलपीडन–तेल काढणे.

**अन्नाचे प्रकार** – अन्न चतुर्विध मानलेले आहे– (१) भक्ष्य–चावून खाण्याचे (२) पेय–पिण्याचे (३) लेह्य–चाटून खाण्याचे व (४) चोष्य–चोखून खाण्याचे.

**अन्नरस** – हे सहा प्रकारचे मानलेले आहेत– (१) मधूर (२) आम्ल–आंबट (३) क्षार–खारट (४) कडू (५) तुरट व (६) तिक्त–तिखट.

माणसाला अन्नाची किंमत फार प्राचीन काळापासून कळलेली आहे. ते निर्माण करणे, त्याचे रक्षण करणे आणि ते पुढे मिळण्याची नक्की तरतूद करणे, या अन्नधान्यविषयक क्रियाकलापातून सर्व जगभर अनेक धार्मिक उत्सव व सण निर्माण झाले आहेत. अशा सणासमारंभातून अन्नाचे माहात्म्य गायिले जाई. अन्नाचे रक्षण व्हावे व त्याची नासधूस होऊ नये म्हणून फार खबरदारी घेतली जाई. त्यासाठी काही नियमही करण्यात आले होते. अन्नाचा दुरुपयोग करू नये याविषयी सर्व भाषांत म्हणी व वाक्प्रचार आहेत.

पोषण या दृष्टीनेच नव्हे, तर सामाजिक दृष्टीनेही अन्नसंशोधन व अन्नसमृद्धी या गोष्टी मानवी क्रियेच्या बुडाशी वास्तव्य करतात. अन्नाचा पुरवठा म्हणजे श्रमाची प्राथमिक अवस्था व त्याचा संचय म्हणजे संपत्तीची प्राथमिक अवस्था होय. अन्नसंचय हीच प्राथमिक संपत्ती होती. धर्म आणि नीती यांच्याशी अप्रत्यक्षपणे अन्नाचा संबंध आहे. नैतिक कायद्याचा आरंभही विशिष्ट अन्नाच्या निषेधापासूनच होतो. रानटी व सुधारलेल्या समाजातला मुख्य फरक अन्नमूलक आहे. रानटी समाज नैसर्गिक अन्नावर अवलंबून राहतो; तर सुधारलेला समाज अन्न निर्माण करतो आणि हंगाम नसेल त्या वेळी उपासमार होऊ नये, म्हणून त्याचा संग्रहही करतो.

अन्नोत्पादनाच्या प्रकारापेक्षा पाकसिद्धीचे प्रकार अधिक आढळतात. सर्व पाकशास्त्र भाजणे व शिजविणे या दोन गोष्टींत सामावलेले आहे. पदार्थाला अग्नी देणे म्हणजे भाजणे व पाण्यात अन्नाला अग्नीची उष्णता देऊन ते मऊ करणे, म्हणजे शिजवणे होय. तापून लाल झालेले दगड पाण्याच्या भांड्यात टाकून ते पाणी अन्न शिजविण्याजोगे गरम करणे, हा प्राचीन प्रकार आहे. विस्तवावर अन्न शिजविण्याची पद्धती ही त्यानंतरची होय. विशिष्ट प्रकारचे अन्ननिषेध हे सर्वांना अन्न उपलब्ध व्हावे व अन्नपदार्थांची वृद्धी व्हावी, म्हणूनच मूलतः सांगितले गेले. त्यांना धार्मिक व नैतिक महत्त्व पुढील काळात प्राप्त झाले.
[ वै. वि. भा. पं.; एन्सा. रि. ए.; म. ज्ञा. को. ]

## अन्नकूट

विविध प्रकारची पक्वान्ने आणि खाद्य पदार्थ तयार करून ते कृष्ण-मूर्तीच्यापुढे मांडणे व कृष्णाला त्यांचा नैवेद्य दाखविणे याला अन्नकूट म्हणतात. कार्तिक शु.

प्रतिपदा या दिवशी अन्नकूट करण्याची प्रथा प्रचलित आहे.

कार्तिकस्य सिते पक्षे अन्नकूटं समाचरेत् ।
गोवर्धनोत्सवं चैव श्रीविष्णुः प्रीयतामिति ।।

(सनत्कुमारसंहिता)

अर्थ – कार्तिकाच्या शुक्ल पक्षात अन्नकूट आणि गोवर्धनोत्सव श्रीविष्णूच्या प्रीतीसाठी आचरावा.

अन्नकूट म्हणजे वास्तवात गोवर्धनाचीच पूजा होय. प्राचीन काळी हा उत्सव इंद्राप्रीत्यर्थ होत असे; पण वैष्णव संप्रदाय बलवान झाल्यावर इंद्रपूजेचे रूपांतर गोवर्धनपूजेत केले गेले. गोवर्धन पर्वत हा मथुरेजवळ असून, त्यालाच अन्नकूट असे नाव आहे. याची कथा अशी –

एकदा श्रीकृष्ण गवळ्यांसह गोवर्धन पर्वतावर गायी चारीत असता, एके दिवशी गवळ्यांनी तिथे लतामंडप उभारायला सुरवात केली. कृष्णाने त्याचे कारण विचारता ते गवळी म्हणाले. 'दरवर्षी आम्ही इंद्राप्रीत्यर्थ इंद्रमख नावाचा उत्सव करतो. त्यामुळे अतिवृष्टी आणि अनावृष्टी यांचे भय न उरता देशात सुखसंपदा नांदते.'

त्यावर कृष्ण म्हणाला, 'इंद्राचा आपला काही संबंध नाही. गोवर्धन हाच आपला आणि आपल्या गुरावासरांचा पोशिंदा आहे. आपण उत्सव करायचा, तर तो या पर्वताचा करावा.'

लोकांना ते मान्य झाले. गोकुळातल्या लोकांनी त्या वर्षी गोवर्धनाचा उत्सव केला. हे वर्तमान नारदाकडून इंद्राला समजले. इंद्र क्रुद्ध झाला. त्याने गोकुळावर मुसळधार वृष्टी सुरू केली. त्या वेळी कृष्णाने आपल्या करांगुलीवर गोवर्धन उचलून धरून त्याच्या खाली सगळे गोकुळ सुरक्षित राखले. इंद्राचा गर्व हरण होऊन तो कृष्णाला शरण आला.

तेव्हापासून गोवर्धनपूजा सुरू झाली. व्रजमंडलात अन्नकूटाचा उत्सव साजरा होतो. त्या दिवशी मिठाईच्या पदार्थांची रास देवापुढे उभारतात. राजस्थानातील नाथद्वारा आणि काशीतले अन्नपूर्णामंदिर या ठिकाणीं त्या दिवशी भाताचे डोंगर रचतात. उदयपूरमध्ये या दिवशी मिरवणूक निघते. हत्तींची साठमारी व दारूकामही होते. [ हि. ध.; व्रतचंद्रिका ]

## अन्नच्छत्र

अन्नदान करण्याचे स्थान. सर्व दानांत अन्नदानाचे पुण्य फार मोठे असते. तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणीं देवाची सेवा करण्यासाठी राहिलेल्यांना व यात्रेकरूंना अन्नदान केल्यास अधिक पुण्य मिळते. राजे, सरदार व अन्य धनिक या कल्पनेमुळे अशी अन्नच्छत्रे तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणीं स्थापन करीत. तिथे कोणालाही विनामूल्य भोजन मिळत असे. अशी अन्नच्छत्रे अद्यापही काही ठिकाणीं चालू आहेत. पाहा – अन्नदान [ अ. म. ज्ञा. ]

## अन्नद मन्त्र

या मंत्राचा ऋषी ब्रह्मा, छंद निचृद्, देवता गायत्री, वसुधा आणि श्री, बीज ग्लौम् व शक्ती श्रीम् आहे. मंत्र असा –

**अन्नं मह्यन्नं मे देह्यन्नाधिपतये ममान्नं प्रदापय स्वाहा।**

मंत्राचा प्रयोग करताना तो ॐ ग्लौं श्रीम् या बीजांनी संपुटित (मंत्रारंभी ॐ ग्लौं श्रीम् या क्रमाने व मंत्रान्ती उलट क्रमाने बीजे लावणे) करतात. मंत्राची साधना करताना मंत्रदेवता वसुधा व श्री यांचे ध्यान करायचे असते. सुरुवातीस पीठशक्तींची स्थापना, अष्टशक्तींची पूजा, इ. विधी करून मग मूलमंत्राचा एक लक्ष जप रोज ठराविक संख्येने पुरा करतात. जप पुरा झाल्यावर घृतयुक्त अन्नाचे हवन (दशसहस्र संख्येने) करतात. असे हे पुरश्चरण केल्याने मंत्र सिद्ध होतो व यजमानाला विपुल अन्न (धान्य) मिळते. [ मंत्रमहोदधि ]

## अन्नदान

अखिल जीवसृष्टीला जीवधारणेसाठी अन्नाची अत्यंत आवश्यकता असते. 'स वा एष पुरुषोऽन्नरसमयः' (तो हा पुरुष अन्नरसमय आहे) असे तै. उपनिषदात म्हटले असून, 'अन्नं ब्रह्म' (अन्न हेच ब्रह्म) अशीही घोषणा केलेली आहे.(२.१). ब्रह्माचे जे लक्षण तेच अन्नाचेही सांगितले आहे. अन्नापासूनच सर्व भूते उत्पन्न होतात, अन्नावरच जगतात आणि अखेर अन्नाप्रत जाऊन त्यातच लय पावतात (तै. उ. ३). अन्नाला प्राण व आयू असेही म्हटले आहे. शरीर व प्राण यांचा जो योग, त्यालाच आयू म्हणतात. आणि या दोहोंचीही धारणा अन्नानेच होत असते. म्हणूनच सर्व दानांत अन्नदान श्रेष्ठ मानले आहे. आपल्या परिवाराला कमी करूनही क्षुधिताला प्रथम जेवू घालावे. अन्नदान करते वेळी अतिथीचे नाव, गाव, कुलशील, काहीही पाहू नये व जो क्षुधित तो सत्पात्र समजावा, असेही सांगितले आहे. अन्नदानाची प्रशंसा करणारे काही श्लोक हलायुधकोशात पुढील प्रमाणे दिले आहेत –

अन्नदस्य मनुष्यस्य बलमोजो यशांसि च
कीर्तिश्च वर्धते शश्वत्त्रिषु लोकेषु पाण्डव ।। १ ।।
अन्नदानात्परं दानं न भूतं न भविष्यति ।
पुण्यं यशस्यमायुष्यं बलपुष्टिविवर्धनम् ।। २ ।।

अर्थ – अन्नदान करणाऱ्या मनुष्याच्या बल, ओज, यश, कीर्ती या गोष्टी तीन्ही लोकांत वाढतात (१) अन्नदानाहून श्रेष्ठ दान झाले नाही व होणार नाही. (ते) पुण्य, यश, आयुष्य, बल व पुष्टी वाढविणारे आहे. (२)

अन्नदानाने पुण्य मिळते असेही सांगितलेले आहे.

महाभारतात अन्नदानाचे जे माहात्म्य सांगितले आहे, त्याचा सारांश असा –" अन्न हे मनुष्याचे प्राण आहेत, म्हणून अन्नदान

करणाऱ्याला प्राणदाता म्हणतात. हे दान करणाऱ्याला पशू, पुत्र, धन, भोग व बल या गोष्टी प्राप्त होतात आणि तो देवतांकडून सन्मानित होतो. अन्नाचा आहार जर माणसाला मिळाला नाही, तर त्याच्या शरीरातील पंचतत्त्वे विलग होतात आणि बलवानही क्षीण होत जातो. अन्नदान हे दान असे आहे, की त्यामुळे दाता व भोक्ता हे दोघेही संतुष्ट होतात. म्हणून मानवाने सतत अन्नदान केले पाहिजे. "

अन्नाची याचना करणाऱ्या ब्राह्मणाला त्याची शाखा, गोत्र, वेदाध्ययन, इ. कोणत्याही गोष्टी विचारू नयेत, ब्राह्मणांपासून शूद्रांपर्यंत सर्वांना अन्नदान करावे, असेही महाभारतात सांगितले आहे. अन्नदानामुळे राजा रन्तिदेवाला स्वर्गलोक मिळाल्याची कथा महाभारतात आहे. पुनर्वसू नक्षत्रावर अन्नदान करावे असेही सांगितले आहे. [ ऋ. द. ]

**अन्नदेव** गोंड जातीची कृषिदेवता. मकर संक्रांतीला या देवाचा उत्सव केला जातो. या दिवशी गोंड लोक शेतात सामुदायिक भोजन व नाचगाणी करतात.

**अन्नपूर्णा** अन्नपूर्णा म्हणजे अन्नधान्य पुरवणारी देवता. हा पार्वतीचा अवतार आहे. काशीत हिचे मंदिर असून त्या क्षेत्रातली समस्त जनता जेवल्याशिवाय ती अन्नग्रहण करीत नाही, अशी तिची आख्यायिका आहे. चांद्रसेनीय कायस्थांत गृहिणी आपला पती प्रवासाहून घरी येण्याच्या वेळी हिची पूजा करते, हिच्या मस्तकावर पिवळ्या अक्षता वाहते व प्रार्थना करते, की 'घरी येणाऱ्या थोर पाहुण्याचे (पतीचे) रक्षण कर.'



अन्नपूर्णा

श्रीविद्यार्णवतंत्रात हिची मूर्ती पुढीलप्रमाणे करावी, असे सांगितले आहे—

सुवर्णवर्णा, शशिकला धारण करणारी, त्रिनेत्र, भू-श्रीपूजित, डाव्या हाती पानपात्र, उजव्या हाती पळी व दृष्टी नृत्य करणाऱ्या शिवाकडे लागलेली. हिचा मंत्र असा—

**ॐ श्रीं ह्रीं क्लीं नमो भगवति अन्नपूर्णे**
**ममाभिलषितमन्नं देहि देहि स्वाहा ।**

या मंत्राचा ऋषी द्रुहिण, छंद कृती व देवता अन्नपूर्णेश्वरी आहे. या मंत्राचे सव्वालक्ष पुरश्चरण सांगितले आहे. हिची कथा पुढील प्रमाणे—

शिव भिक्षाटन करून आपल्या कुटुंबाचे पोषण करीत असे. एक दिवस त्याला पुरेशी भिक्षा मिळाली नाही व त्याचा परिवार उपाशी राहिला. त्या वेळी नारदाने तिथे येऊन कलागत लाविली, की पार्वतीच्या अशुभ पायगुणामुळे हे दैन्य आले आहे. लगेच पार्वतीकडे जाऊन नारद म्हणाला, की 'शिव हा दुर्भागी असल्यामुळे तुझी अशी उपासमार होत आहे.' ते ऐकून पार्वतीने शिवाचा त्याग करण्याचे ठरविले. त्यावर नारद तिला म्हणाला, 'तू आज शिवाच्या आधी भिक्षेला जा.' पार्वतीने तसे केले. तिला खूप भिक्षा मिळाली. मागाहून शिव भिक्षेला गेला. त्याला रिकाम्या झोळीने परत यावे लागले. पण पार्वतीने आपल्या भिक्षेतून त्याला पोटभर भोजन वाढले. त्यामुळे शिव प्रसन्न होऊन तिला म्हणाला, 'तू अन्नपूर्णा आहेस.' [ अ. अ. ]

**अन्नप्राशन** एक शिशुसंस्कार. मुलाला प्रथम अन्न भरविण्याचा हा संस्कार आहे. मूल जन्मल्यानंतर सहाव्या महिन्यात हा संस्कार करावा, असे अनेक स्मृतिकारांचे मत आहे. मुलाला पुष्टी, तेज, चपळपणा व कांती प्राप्त व्हावी यासाठी पित्याने बकऱ्याचे व कवडयाचे मांस, मासे किंवा भात शिजवून त्यात दही, दूध, तूप मिसळून ते अन्न महाव्याहृतीच्या उच्चारासह मुलाला भरवावे, असे शांखायन-स्मृतीत सांगितले आहे. काही स्मृतिकार होम, ब्राह्मणभोजन व आशीर्वाद हे विधी अधिक सांगतात. मुलाला भरविताना 'अन्नपतेऽन्नस्य...' हा मंत्र म्हणावा असे आश्व. गृह्यसूत्रात सांगितले आहे. अलिकडे सामान्यतः सहाव्या महिन्यात शुभ दिवशी मुलाला आईच्या मांडीवर बसवून सोन्याचांदीच्या पात्रातून त्याला खीर भरवितात. महाराष्ट्रात याला उष्टावण असे म्हणतात. उष्टावणासाठी चांदीचे भांडे आणि चमचा मुलाच्या मामाने द्यायचा असा संकेत आहे. मुलाला भरवून झाल्यावर त्याच्यापुढे वस्त्र, शस्त्र, पुस्तक, लेखणी व कारागिरीच्या वस्तू मांडून ठेवतात. ज्या वस्तूला मुलगा स्पर्श करील, त्या वस्तूच्या अनुरोधाने तो आपली उपजीविका चालवील, असे समजतात.

**अन्नंभट्ट** (इ. स. १५ वे शतक) एक न्यायपंडित. या तेलंगी ब्राह्मणाचा जन्म तेलंगणातील गरिकपाद या गावी झाला. कोंडवीडु येथील संस्कृत पाठशाळेत याने बारा वर्षे अध्ययन

करून न्यायशास्त्रावर प्रभुत्व मिळविले. पुढे याने 'बालानां सुखबोधाय' म्हणजे नवीन विद्यार्थ्यांना न्यायशास्त्रातले पदार्थ आणि सिद्धान्त सुलभपणे कळावे म्हणून तर्कसंग्रह या ग्रंथाची रचना केली. हा ग्रंथ न्यायशास्त्रात प्रमाणभूत ठरला आहे. न्यायाचे विद्यार्थी प्रथम हाच ग्रंथ वाचतात. पुढे याने स्वतःची पाठशाळा स्थापून तिथे आपल्या पद्धतीने न्यायाचे अध्यापन सुरू केले. याचे विद्यार्थी न्यायशास्त्रात फार नावाजले. याने वयाच्या ५५ व्या वर्षी मल्लिकार्जुनाची यात्रा केली. त्याआधी आणि त्या नंतर हा कुठल्याही प्रवासाला गेला नाही.

याने कोणाही राजाकडे किंवा धनिकाकडे कधी तोंड वेंगाडले नाही. त्याच्यापाशी जे होते, तेवढ्यावरच संतोष मानून त्याने अध्यापनात आपले आयुष्य वेचले. [ म. ज्ञा. को. ]

**अन्नमय कोश** पंचकोशातील एक. पंचमहाभूतांपासून बनलेले हे शरीर मृत्यूनंतर आपल्या मूल घटकात विलीन होते. या स्थूल शरीराला वेदान्तात अन्नमय कोश, असे म्हटले आहे. याचे पोषण अन्नामुळे होते व जागृतावस्थेत जीव या कोशात वास्तव्य करतो. [ स. पॉं. ]

**अन्नमाचार्य** (इ. स. १४२३–१५०२) तेलुगू भाषेचा एक महान कवी. याचा जन्म आंध्र प्रदेशातल्या कडपा जिल्ह्यातील ताल्लपाक या गावी झाला. याचे प्राथमिक शिक्षण घरीच झाले. वयाच्या सोळाव्या वर्षी हा तिरुपती क्षेत्रात वास्तव्याला गेला. तिथे त्याने वेंकटेशाची उपासना सुरू केली. तो देवाच्या स्तुतिपर अशी पदे नित्य रची व गाई. याने एकूण ३२,६०० पदे रचली, अशी आख्यायिका आहे. पण सांप्रत तेवढी उपलब्ध नाहीत. जी आहेत, ती सर्व वेंकटेश्वर देवस्थानातल्या एका खोलीत सुरक्षित ठेवलेली आहेत. त्या खोलीला ताल्लपाक वारि कोट्टू असे म्हणतात. त्या खोलीच्या भिंतीवर अन्नमय्याची मूर्तीही कोरलेली आहे. या कवीचे श्रीसर्वेश्वरशतक हे काव्य प्रसिद्ध आहे. त्यातल्या प्रत्येक पदाच्या चौथ्याचरणात वेंकटेश्वरा असे संबोधन असते. त्याला संकीर्तनाचार्य ही उपाधी होती. तो जसा कवी, तसाच उत्तम संगीतज्ञही होता. त्याने आपली कीर्तने साठ राग-रागिण्यांत रचली आहेत. त्यागराजाने ज्या प्रकारच्या कीर्तनसाहित्याला पराकोटीला पोचविले, त्याचा श्रीगणेशा अन्नमय्याने केला होता. अन्नमय्याच्या पुत्रपौत्रांनीसुद्धा वेंकटेशाच्या आराधनेतच आपले आयुष्य वेचले. अन्नमय्याच्या कित्येक रचना ताम्रपत्रांवरही खोदलेल्या आढळल्या आहेत. याची सर्व कीर्तने अलिकडेच वेंकटेश्वर देवस्थान समितीने अकरा भागांत प्रकाशित केली आहेत. [ आंध्र भारती; ते. सा. इ. ]

**अन्नम्म** द. भारतातली ग्रामदेवता. ही सात बहिणींतली प्रमुख आहे. हिच्या वार्षिक जत्रत भक्तगण जळत्या निखाऱ्यांवरून चालत जातात. [ व्हि. गॉं. सा. इं. ]

**अन्नसमर्पणविधी** कोणत्याही निमित्ताने ब्राह्मणभोजन घालतेवेळी पाने वाढून झाल्यावर जो विधी करतात, त्याचे हे नाव आहे. याला उदक सोडणे, असेही म्हणतात. प्रथम गायत्री मंत्राने पाने प्रोक्षण करतात; मग 'प्रजापते न त्वदेतानि...' ( ऋ. १०.१२१.१० ) हा मंत्र म्हणून मग पुढील श्लोक म्हणतात –

एको विष्णुर्महद्भूतं पृथक् भूतान्यनेकशः।
त्रींल्लोकान् व्याप्य भूतात्मा भुङ्क्ते विश्वभुगव्ययः॥

अर्थ – श्रीविष्णू हे एक महाभूत आहे. वेगवेगळी भूते अनेक आहेत. विश्व भोगणारा अव्यय असा भूतात्मा तीन्ही लोकांना व्यापून भोजन करीत असतो.

हा श्लोक म्हणून यजमान उदक सोडतो. या ब्राह्मणभोजनाने त्या त्या कर्माची देवता संतुष्ट होवो, असे यजमान म्हणतो. मग ब्राह्मण भोजनास प्रारंभ करतात. [ ऋ. ब्र. स. ]

**अन्यसंभोगदुःखिता** नायिकाभेद. पतीने वा प्रियकराने अन्य स्त्रीशी संभोग केल्यामुळे म्हणजेच आपल्या प्रेमाशी प्रतारणा केल्यामुळे जिला दुःख झाले आहे, अशी स्त्री. भानुदत्ताने सर्वप्रथम अशा नायिकेची कल्पना मांडली. हिंदी भक्तिकाव्यात मर्यादित व रीतिकाव्यात व्यापक रूपाने हिचे चित्रण झाले आहे. [ हिं. सा. को. ]

**अन्वष्टका** एक श्राद्धप्रकार. अष्टकांच्या मागून केले जाते म्हणून या कर्माला अन्वष्टका म्हणतात. ही व्याख्या रुद्रस्कंदाने आपल्या खादिर गृह्यसूत्राच्या टीकेत (३.[illegible]) सांगितली आहे. भाद्रपद कृष्ण पक्षातील मघा नक्षत्रावर अन्वष्टका श्राद्ध करतात. याचा विधी पिंडपितृयज्ञाप्रमाणेच असतो. या वेळी स्त्रीपितरांना पिंडदानाबरोबरच दारू अर्पण करावी असे सांगितले आहे (पार. गृ. सू. ३.३). या सुरादानाविषयी डॉ. काणे यांनी पुढील तर्क केला आहे –

प्राचीन काळी ब्राह्मण समाजातल्या चालीरीतीप्रमाणे पुरुषांनी मद्यपान बंद केले असले, तरी बायका चोरून मद्यपान करीत असाव्या किंवा गृह्यसूत्रांच्या कालापूर्वी आंतरजातीय विवाह होत असल्यामुळे ब्राह्मण हे क्षत्रियांच्या आणि वैश्यांच्या मुली करीत असावे आणि त्यांना मद्यपानाची सवय असावी. पाहा – अष्टका. [ हि. ध. ]

**अन्वाधान** (अनु + आधान) श्रौत-स्मार्तकर्मात अग्नीची स्थापना केल्यानंतर आचार्य हातात समिधा घेऊन 'अस्मिन्नन्वहितेऽग्नौ...' अशी सुरुवात करून कर्माच्या देवतांचा व हविर्द्रव्यांचा निर्देश करतो व मग त्या समिधेचा होम करतो. याला अन्वाधान म्हणतात. [ सं. कौ. ]

**अन्वारंभ** श्रौत – स्मार्त कर्म करतेवेळी पत्नीने पतीच्या हातास हात लावणे अथवा यजमानाने आचार्याच्या हातास दर्भ लावणे. [ सं. कौ. ]

**अन्वारंभणीया इष्टी** दर्शपूर्णमास इष्टी प्रथमच करायची असेल, तर ही इष्टी करतात. सरस्वतीला दोन आहुती देऊन ही इष्टी सुरू करतात. हिच्यात अग्नाविष्णूंना एकादशकपाल पुरोडाश, सरस्वतीला चरू व सरस्वान् आणि भगिन् अग्नी यांना अनुक्रमे एकादशकपाल व अष्टाकपाल पुरोडाश देतात. ही इष्टी एकदाच करतात. पाहा– पुरोडाश, दर्शपूर्णमास. [ हि. ध. ]

**अन्वारोहण** पतीचे प्रेत चितेवर ठेवताच सतीने त्याच चितेवर स्वतःला जाळून घेण्यासाठी आरोहण करणे, याला अन्वारोहण म्हणतात. याचा विधी पुढीलप्रमाणे– प्रथम संकल्प. नंतर सुवासिनींना सौभाग्यवायने देणे. अग्नीजवळ जाऊन पंचरत्ने व नील अंजन पदरास बांधणे. तोंडात मोती धरणे. नंतर पुढील मंत्राने अग्नीची प्रार्थना–

स्वाहासंश्लेषनिर्विण्ण सर्वगोत्र हुताशन ।
सत्त्वमार्गप्रदानेन नय मां भर्तृरन्तिकम् ।।

अर्थ – हे स्वाहेच्या आलिंगनाने सुख पावलेल्या सर्वगोत्र अग्ने, मला सत्त्व (प्रकाशमय) मार्ग दाखवून पतीच्या जवळ घेऊन जा.

नंतर अग्नी, विष्णू, काल, पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, ब्रह्मा व रुद्र यांना उद्देशून आज्याच्या आहुती देणे. अग्नीला प्रदक्षिणा. पाषाण व उपला यांची पूजा. पुनश्च हाती पुष्पांजली घेऊन अग्नीची प्रार्थना. आणि मग हळूहळू अग्निप्रवेश.

या अन्वारोहणाने (सती जाण्याने) पतीच्या सर्व पापांचा नाश होऊन, त्याला स्वर्ग मिळतो व पुढील जन्मी त्या स्त्रीसह अनंत सुखे प्राप्त होतात. पाहा – सतीप्रथा. [ निर्णयसिंधु ]

**अन्वाहार्य श्राद्ध** एक मासिक श्राद्ध. पिंडपितृयज्ञातले कित्येक विधी गाळून हे श्राद्ध करतात. भाष्यकार भट्ट नारायण सांगतो, की अन्वाहार्य श्राद्ध अमावास्येस, मासिक पिंडपितृयज्ञ झाल्यावर करावे. यात ब्राह्मणभोजन, पिंडदान व पितरांना वस्त्र समर्पण करायचे असते. [ इं.वे.क.सू. ]



**अन्वाहार्य स्थाली** शतपथ ब्राह्मणात (११. १.३.७) सांगितले आहे, की दर्शपूर्णमासाची दक्षिणा अन्वाहार्य चरू ही आहे.

हा अन्वाहार्य चरू ज्या थाळीमध्ये शिजवला जातो त्या थाळीला अन्वाहार्यस्थाली म्हणतात. हा चरू म्हणजेच हे तांदूळ दक्षिणाग्नीवर शिजवले जातात. म्हणन या अग्नीला अन्वाहार्यपचन असे म्हणतात.

**अपंग** एका तारेचे केवळ तालवाद्य. याची बनावट अशी– एक वाटोळा डबा घेऊन त्याच्या तोंडावर चामडे मढवितात. डब्यावर दीड हात लांबीची बांबूची काठी बसवितात. तिच्या डोक्यावर खुंटी बसवितात. तारेचे एक टोक चामड्यावर व दुसरे खुंटीला बांधून मग ती खुंटी आवळतात. या तारेवर हाताने तालाचे बोल वाजवितात. त्यामुळे तालाची गती स्पष्ट समजते व तार कमी अधिक खेचल्याने त्याच्या नादाला कमीअधिक तीव्रता येते. [परंपरा]

**अपदान** पाली भाषेतील एक ग्रंथ. बुद्धकालीन बौद्ध संप्रदायातील ५५० पुरुष सदस्यांची व ४० स्त्री सदस्यांची चरित्रे यात आहेत. हा ग्रंथ छापलेला नाही. परंतु यातील ४० चरित्रांतील पुष्कळ उतारे थेरी गाथेच्या टीकेत घेतलेले आहेत. यांपैकी एका उताऱ्यात सनपूर्व तिसऱ्या शतकातील कथावत्थ नामक ग्रंथाचा उल्लेख आढळतो. यावरून या ग्रंथाचे अर्वाचीनत्व सिद्ध होते. आणखीही काही गोष्टी या ग्रंथाच्या अर्वाचीनत्वाच्या द्योतक आहेत. दीघनिकायात ऐतिहासिक बुद्धाच्या आधीच्या बुद्धांची संख्या सहा सांगितली आहे. बुद्धवंशासारख्या यापुढील ग्रंथात ती चौवीस झाली आहे आणि अपदानात तर ती पस्तीस असल्याचे सांगितले आहे. सुमंगलविलासिनी या ग्रंथावरून असे दिसते, की दीघनिकायाचे पाठक अपदान ग्रंथाचा अंतर्भाव अभिधम्म पिटकामध्ये करीत, तर मज्झिम निकायाचे पाठक तो सुत्तन्त पिटकामध्ये करीत. संप्रदायातील याच्या स्थानाविषयीचा मतभेद हा या ग्रंथाच्या अर्वाचीनपणाचाच पुरावा होय.

अपदान म्हणजे शुद्धाचरण किंवा शूरकर्म. प्रत्येक अपदानात प्रथम त्यातील नायकाच्या किंवा नायिकेच्या पूर्वजन्माचा इतिहास दिलेला असून, नंतर त्याच्या चालू जन्मातील हकिगत दिलेली असते. त्यावरून अपदान हे जातकांप्रमाणे वर्तमान व भूतकाळ या दोन्ही काळांचे पुराण आहे, असे म्हणायला हरकत नाही. फरक इतकाच, की जातकात बुद्धाच्या पूर्वजन्माची कथा

दिलेली असते; तर अपदानात बहुधा अर्हताची कथा असते.

विसुद्ध-जन-विलासिनी नामक अपदानावरची एक टीका उपलब्ध आहे. या टीकेचा कर्ता बुद्धघोष आहे, असे गंधवंशातील दोन उताऱ्यांवरून दिसते.

इ. स. च्या पहिल्या शतकात जेव्हा बौद्ध पंडित संस्कृत भाषेत ग्रंथरचना करू लागले, तेव्हा अपदानाचे अवदान असे संस्कृत रूपांतर झाले. अनेक अपदानांची संस्कृत, तिबेटी व चिनी भाषेत रूपांतरे झाली आहेत. अवदानशतक व दिव्यावदान हे त्यांतील प्रमुख ग्रंथ होत. या अवदानात अपदानातील कथा जशाच्या तशा घेतलेल्या नसून त्यांतील काहींवर संस्कार केलेले आहेत; तर काही नव्यानेही लिहिलेल्या आहेत. [ म. ज्ञा. को. ]

**अपभ्रंश भाषा** अपभ्रंश शब्दाचा उल्लेख पतंजलीच्याही पूर्वी (सनपूर्व १५०) झालेला दिसतो. पतंजलीनेही आपल्या महाभाष्यात त्याचा उल्लेख केला आहे. तो म्हणतो, की 'एकाच शब्दाचे अनेक अपभ्रंश होतात. उदा० गौः या शब्दाचे गावी, गोणी, गोता इत्यादी' (१. १. १.). यावरून कळते, की पतंजलीच्या मते शिष्टसंमत संस्कृत भाषेपासून विकृत किंवा भ्रष्ट झालेले शब्द हे अपभ्रंश होत. भरताच्या नाट्यशास्त्रात प्राकृताचे तीन प्रकार सांगितले आहेत— (१) ज्यात संस्कृतासारख्या शब्दांचा प्रयोग होतो, (२) संस्कृतापासून विकृत झालेल्या शब्दांचा प्रयोग होतो व (३) देशी भाषेच्या शब्दांचा प्रयोग होतो. हेच निराळ्या शब्दांत सांगायचे तर तत्सम, विभ्रष्ट किंवा तद्भव व देशी शब्दांच्या उपयोगाने होणाऱ्या भाषेला प्राकृत म्हणावे. पतंजलीने जिचा अपभ्रंश भाषा असा उल्लेख केला आहे, तिलाच भरताने प्राकृत किंवा विभ्रष्ट म्हटले आहे.

वाक्यपदीयम् या ग्रंथाचा कर्ता भर्तृहरी याने व्याडी नामक आचार्याच्या मताचा उल्लेख करताना अपभ्रंश शब्दाचा अर्थ पुढील प्रमाणे सांगितला आहे –

**शब्दसंस्कारहीनो यो गौरिति प्रयुयुक्षिते ।**
**तमपभ्रंशमिच्छन्ति विशिष्टार्थनिवेशिनम् ।।**

अर्थ – गौः या शब्दाचा प्रयोग करायचा असता असमर्थतेमुळे किंवा प्रमादामुळे शब्दसंस्कारहीन असा विशिष्टार्थ दर्शविणारा गावी इ. शब्द उच्चारला जातो, त्याला अपभ्रंश म्हणतात.

उत्तरकालीन लेखकांनी अपभ्रंश भाषेला उकारबहुला ( जिच्यात उकार पुष्कळ आहेत अशी ) म्हटले आहे. भरताच्या वर दिलेल्या निर्देशावरून स्पष्ट होते, की त्याच्या काळी अपभ्रंश नावाची भाषा विकसित झाली नव्हती.

या व्यतिरिक्त शबर, आभीर, इ. काही विभाषाही होत्या. भाषा व विभाषा यांतला भेद स्पष्ट करताना अभिनवगुप्त म्हणतो–

**भाषा संस्कृतापभ्रंशः भाषापभ्रंशस्तु विभाषा ।**

अर्थ – संस्कृताचा अपभ्रंश म्हणजे भाषा व अपभ्रंशापासून विकृत झालेली बोली म्हणजे विभाषा होय.

चंडाने प्राकृतलक्षणम् या ग्रंथात अपभ्रंश भाषेला विभाषा म्हटले आहे. अपभ्रंशाच्या बाबतीत प्राचीन आलंकारिकांत दोन परस्पर विरोधी मते होती. रुद्रट अपभ्रंशाला प्राकृत म्हणतो, तर भामह व दंडी तिला प्राकृताहून भिन्न अशी काव्यभाषा मानतात. याकोबी या भिन्न मतांचा समन्वय असा करतो, की शब्दसमूहाच्या दृष्टीने अपभ्रंश ही प्राकृताला जवळची आहे. व व्याकरणाच्या दृष्टीने ती प्राकृताहून भिन्न आहे. दंडीने समस्त वाङ्मय चार भाषाविभागांत विभक्त केले आहे, त्यांत अपभ्रंश हाही एक प्रकार आहे–

**तदेतद्वाङ्मयं भूयः संस्कृतं प्राकृतं तथा ।**
**अपभ्रंशश्च मिश्रं चेत्याहुरार्याश्चतुर्विधम् ।।**

(काव्यादर्श १.३२)

मार्कंडेयाच्या मतानुसार अपभ्रंश भाषेची नागर, उपनागर व व्राचड अशी तीन रूपे होतात, तर नेमिनाथाच्या मते ती नागर, उपनागर व ग्राम्य अशी तीन प्रकारची होतात.

इ. स. १० व्या शतकाच्या सुमारास झालेल्या पुष्पदंताने आपल्या महापुराणात संस्कृत व प्राकृत यांच्याबरोबर अपभ्रंश भाषेचाही स्पष्ट उल्लेख केला आहे (५.१८.६). त्या काळात संस्कृताबरोबरच अपभ्रंश भाषेचेही राजकुमारींना शिक्षण दिले जात असे. राजशेखरही पुष्पदंताच्याच काळातला होय. त्याने अपभ्रंशाचा अनेक ठिकाणी निर्देश केला आहे. वल्लभीचा राजा धरसेन याच्या शिलालेखावरून कळते, की सहाव्या शतकात अपभ्रंश भाषेतही साहित्यरचना होऊ लागली होती. वरील भिन्न भिन्न निर्देशांवरून पुढील गोष्टी सिद्ध होतात –

(१) प्रारंभी प्रतिमानापासून च्युत, स्खलित, भ्रष्ट अथवा विकृत शब्दांनाच अपभ्रंश ही संज्ञा होती. अपभ्रंश हा शब्द सामान्यतः तिरस्कारनिदर्शकच होता; पण पुढे सबंध भाषेला हे नाव मिळाले. (२) भरताच्या वेळी अपभ्रंश भाषा बीजरूपाने वर्तमान होती व शबर, आभीर, इ. पश्चिमोत्तर भारतातले वनवासी लोक ती बोलत होते. (३) सहाव्या शतकात अपभ्रंश हा शब्द, व्याकरण व अलंकार यांवरील ग्रंथांत प्रयुक्त होऊ लागला होता व त्याला साहित्यशास्त्राकडून स्वीकृतीही मिळाली होती. (४) नवव्या शतकात ही सर्वसाधारण लोकांची भाषा आहे असे मानले जाऊ लागले. प्रथम ही भाषा गुर्जरप्रदेश, हिमवत्प्रदेश, सौवीर व सिंधुदेश, इथवरच मर्यादित होती; पण पुढे ती माळवा, राजस्थान, पंजाब, इथपासून तो सर्व उत्तर प्रदेश व्यापू

मगधापर्यंत पसरली. (५) अकराव्या शतकात अपभ्रंश ही एकच भाषा स्थानभेदाने अनेक प्रकारची बनली. तिचा व्यापक रूपाने काव्यव्याकरणादी ग्रंथांत प्रयोग होऊ लागला. सिद्धांनी मगधात प्रचलित असलेल्या अपभ्रंश भाषेत आपले ग्रंथ रचले, त्यावरून या गोष्टीला पुष्टी मिळते.

या भाषेविषयी श्री. ब्लॉक यांनी पुढील विवेचन केले आहे– शेवटी प्राकृताच्या जागी दुसरी एक भाषा येऊ लागली ती म्हणजे प्राकृताचा पेहेराव चढविलेली आधुनिक अपभ्रंश भाषा होय. जैनांनी धार्मिक लेखनासाठी प्राकृत राखून ठेवली; पण इतरत्र मात्र त्यांनी अपभ्रंश भाषेला पसंत केले. या वेषांतराचा एक हेतू म्हणजे त्यांतून देशीला काढून टाकणे हा होता.

अपभ्रंश हे नाव प्रदेशवाचक नाही. प्राकृत आणि संस्कृत या नावांप्रमाणेच तेही गुणवाचक असून, या दोन भाषिक अवस्थांशी ते विरोध दर्शविते. पतंजली हे नाव मध्ययुगीन आर्यभाषांच्या काही रूपांना लावतो. ही रूपे त्याच्या काळच्या संस्कृतात प्रचलित होती; पण त्याच्या दृष्टीने ती चुकीची होती. मध्ययुगीन आर्य भाषांवर संस्कार घडवून त्यांना नियमबद्ध करण्यात आले, तेव्हा ज्यांना साहित्यात स्थान नव्हते, अशा उत्क्रांत रूपांना अपभ्रंश ही संज्ञा लावण्यात येऊ लागली. पण एक काळ असा आला की, अपभ्रंशाची काही रूपे प्राकृतात शिरली. एवढेच नव्हे; तर ही भाषा प्राकृताच्या बरोबरीने लेखनासाठी मान्य ठरविण्यात आली. सहाव्या शतकातल्या साहित्यशास्त्रावरच्या एका ग्रंथात त्याचे अशा प्रकारचे वर्गीकरण करण्यात आलेले आहे. आणि याच काळात होऊन गेलेला वल्लभीचा अधिपती गुहसेन हा, त्याच्या नातवाच्याच भाषेत सांगायचे झाले तर, संस्कृत, प्राकृत आणि अपभ्रंश या तीन भाषांत निष्णात लेखक होता. यानंतरच्या काळात प्राकृताबरोबर या भाषेचे नियम देऊन व्याकरणकर्त्यांनी त्या दोघींना बरोबरीचा दर्जा दिला.

वास्तविक या भाषेतले सर्वांत जुने लेख फार तर इ. स. १०००च्या आसपासचे आहेत. आणि ते राजस्थान आणि गुजरातमधल्या जैनांचे आहेत. लिखित साहित्याला आवश्यक अशा प्राकृतीकरणामागे त्याच्यावर पडलेला खऱ्याखुऱ्या बोल-भाषांचा प्रभाव दिसून येतो. यानंतर स्वतःच्या जन्मभूमीबाहेर पडून अपभ्रंश सर्व हिंदुस्थानभर पसरली. आता ती केवळ जैन लोकांचीच राहिली नाही. व्रजभाषेतल्या भाटांच्या वीरगीतांतही तिची रूपे दिसून येतात. नंतर अगदी थोड्या कालावधीत बुद्धधर्मीय स्तोत्रांत दिसून येणारे तिचे एक पूर्वेकडील रूप उपलब्ध होते. मिथिलेतल्या विद्यापतीच्या वैष्णव स्तोत्रांवर तिचा परिणाम झालेला असून प्राकृतपिंगल या छंदोरचनेवरील ग्रंथाला तिने काही उदाहरणे पुरविली आहेत. टीकाकार त्याला अवहट्टभासा असे म्हणतात. मूळरूप आणि त्याला फुटलेले प्रादेशिक फाटे यांची आठवण हे नाव करून देते.

ज्या प्रदेशांतल्या भाषा एकमेकींपेक्षा फारशा भिन्न नव्हत्या, त्या प्रदेशांत आणि ज्या भागांत राजपूत भाटाप्रमाणे 'अमके' भाषा येणे हे आपल्या व्यवसायाला गौरवास्पद आहे, असे कवींना वाटत होते, त्या सर्व ठिकाणी पूर्वी होऊन गेलेल्या साहित्यिक भाषांप्रमाणे अपभ्रंश भाषेचा विस्तार सहज, कोणताही अडथळा न येता झाला. हे कारणच लोकभाषेतल्या उदात्त व सुसंबद्ध रूपाच्या साहित्याची त्या भाषेकडून अपेक्षा ठेवणाऱ्या अभ्यासकांना गोंधळात टाकणाऱ्या त्यातल्या मिश्रणाचा खुलासा करू शकते. अपभ्रंशात प्राकृताचे अनिश्चित प्रमाणात मिश्रण आहे. हे प्रमाण कित्येकदा फार मोठे असते. यासाठीच त्यात बोलभाषेच्या एका अवस्थेचे काही अंश सापडतात; पण ती अवस्था कोणत्याही भाषेचा पूर्ण प्रतिनिधी नव्हे.

अपभ्रंश कवी आपल्या या भाषेला भासा, देशी भासा किंवा गामेल्ल भासा असे म्हणत असले, तरी मध्यकालीन भारतीय आर्य भाषांच्या उत्तरकालीन अवस्थेला अपभ्रंश भाषा, असे नाव रूढ झाले. अकराव्या शतकात या भाषेचे परिवर्तन विस्तृत स्वरूपात झाले. व्यंजनसमीकरणाची प्रक्रिया यापूर्वीच त्या भाषेमध्ये सुरू झाली होती. ती या काळात पराकाष्ठेला पोचली. त्यातूनच उत्पन्न झालेली द्वित्व व्यंजनांच्या ठिकाणी एक व्यंजनाची प्रवृत्तीही या काळात सुरू झाली. त्याचा परिणाम म्हणून पुढे व्यंजनाचा पूर्वस्वर दीर्घ होऊ लागला. उदा०–सप्त>सत्त>सात; कर्म>कम्म>काम, इत्यादी. ऱ्हस्वाच्या जागी दीर्घ स्वर व दीर्घाच्या जागी ऱ्हस्व स्वर असे प्रयोग करण्याची प्रवृत्ती वाढली. वैदिक भाषा व त्यानंतरची संस्कृत भाषा, यांत काही विशिष्ट अवस्थांतच दन्त्य व्यंजनांच्या जागी (त, थ, द, ध, न) मूर्धन्य व्यंजनांचा (ट, ठ, ड, ढ, ण) प्रयोग होत होता. पण अपभ्रंश भाषेत ही गोष्ट प्रचुरतेने दिसू लागली. उदा०–पत्>पड; दुल्>डोल, त्रुट्>टुट्ट, इत्यादी.

या भाषेत षष्ठी विभक्तीच्या स्य या प्रत्ययाच्या जागी स्स व सप्तमीच्या स्मिन् या प्रत्ययाच्या जागी स्सि असे प्रयोग होतात. उदा० पुत्रस्य>पुत्तस्स>पुत्तह; तस्मिन्>तस्सि>तही इत्यादी. सुबन्त व तिङन्त पदांत प्रत्ययांश असलेल्या अनुनासिक वर्णाच्या जागी अनुस्वाराचा प्रयोग होतो. उदा० देवेन>देवेण>देवें; धरामि>धरऊं इत्यादी. प्रथमेच्या एकवचनात ओच्या जागी उकार व सप्तमीच्या एकवचनात एच्या जागी इकार येतो. उदा० देवो>देवु; देवे>देवि इत्यादी. प्रथमा व द्वितीया या विभक्तींची रूपे समान होतात. पंचमी, षष्ठी व सप्तमी यांच्या रूपांतही बऱ्याच अंशी समानता आहे. उदा०

पंचमी बहुवचन गिरिहुं; ष. ब. गिरिहं–गिरिहुं; स. ब. गिरिहुं इत्यादी. पण विभक्तिरूपांच्या या समानत्वामुळे अर्थज्ञानात काठिण्य व संकर निर्माण झाला व त्याचा परिणाम म्हणून अनेक परसर्गांचा प्रयोग सुरू झाला. उदा० मणमहि > मनमे; मइतणी > मेरा इत्यादी. धातुरूपांतही भिन्न भिन्न काल सूचित करणाऱ्या अनेक लकारांचा लोप झाला. वर्तमान, सामान्य भविष्य व आज्ञार्थ, यांचीच रूपे प्रामुख्याने प्रयुक्त होऊ लागली.

मध्यकालीन भारतीय आर्यभाषांच्या काळात संस्कृता-व्यतिरिक्त द्राविड व ऑस्ट्रिक भाषांतूनही शब्दांचे निस्संकोच ग्रहण होऊ लागले. या संस्कृतेतर भाषांच्या प्रभावामुळे अपभ्रंश भाषेत अनुकरणात्मक वरेचसे शब्द आले.

प्रारंभी अपभ्रंश भाषेला 'आभीरोक्तिः', 'आभीरादिगिरः' म्हणजे आभीरांची भाषा असे म्हटले जाई. याचा अर्थ असा नव्हे, की ही आभीरांची खास भाषा होती किंवा आभीर लोक जिथून कुठून आले तिथून ते ही भाषा आपल्यावरोबर घेऊन आले. वस्तुस्थिती अशी आहे, की आभीर जिथे जिथे गेले, तिथे तिथे त्यांनी तद्देशीय प्राकृत स्वीकारले व त्यात स्वतःच्या स्वभावाला अनुसरून उच्चारणादिकांच्या बाबतीत परिवर्तन केले. या परिवर्तित आणि विकसित भाषेलाच पुढे अपभ्रंश असे नाव दिले गेले.

संस्कृत व प्राकृत व्याकरणाप्रमाणेच हेमचंद्र, त्रिविक्रम (इ. स. १४०० चा सुमार), लक्ष्मीधर (इ. स. १५ व्या शतकाचा उत्तरार्ध), मार्कंडेय (इ. स. १७०० चा सुमार), – इ. वैयाकरणांनी अपभ्रंश भाषेची व्याकरणे लिहिली. व्याकरणाच्या नियमांनी बद्ध झाल्यामुळे अपभ्रंश भाषेच्या वृद्धीला पायबंद बसला.

अपभ्रंश साहित्य विशेषतः जैन–बौद्धांनी वाढविले. म्हणूनच त्या भाषेत धार्मिक साहित्याची विपुलता आहे. अपभ्रंशकालात बौद्ध–जैन धर्मांच्या बरोबरच इस्लामचाही प्रचार सुरू झाला. त्यासाठी इस्लामी धर्मप्रचारकांनीही अपभ्रंश भाषेत ग्रंथरचना केली. पण असे असले, तरी अपभ्रंश साहित्याची रचना व त्याची सुरक्षा या उभयविध कार्यांत जैनांचे परिश्रम फार मोठे आहेत. जैन आचार्य हे संस्कृत पंडितही होते हे खरे; पण जैनांमध्ये व्यापारी वर्ग बराच मोठा होता व तो संस्कृत भाषेला अनभिज्ञ होता. या वर्गाच्या धार्मिक भावनेला परिपुष्ट करण्यासाठी जैन आचार्यांना त्यांच्या भाषेचा अवलंब करावा लागला. त्यासाठीच त्यांनी अपभ्रंश भाषेत अनेक धार्मिक व दार्शनिक ग्रंथ लिहिले. त्याशिवाय काव्य, नाटक, ज्योतिष, आयुर्वेद, व्याकरण, अलंकार, गणित, राजनीती, इ. विषयांवरही त्यांनी विपुल ग्रंथसंपदा निर्माण केली आहे. जैनांनी रामायण, महाभारत व पुराण यांवरही ग्रंथ लिहिले आहेत; पण त्यांत आपल्या धर्माला पोषक होतील अशा प्रकारे मूळ कथेत आणि व्यक्तींच्या चरित्रचित्रणातही फेरबदल केले आहेत.

भाषाशास्त्रज्ञ इ. स. ५०० ते १००० एवढा कालखंड अपभ्रंश भाषेच्या नावावर घालतात. पण त्या भाषेतले साहित्य सुमारे आठव्या शतकापासूनच मिळू लागते. नवव्या शतकापासून तो तेराव्या शतकापर्यंतचा कालखंड हे अपभ्रंश भाषेच्या समृद्धीचे युग आहे. याच कालखंडात पुष्पदंत, धवल, धनपाल, नयनंदी, कनकामर, धाहिल, इ. कितीतरी प्रतिभाशाली कवी आणि महाकवी आपल्याला भेटतात. या सर्वांत पुष्पदंत हा अपभ्रंश भाषेचा कविसार्वभौम आहे. जैनांची महापुराणे, चरित्रग्रंथ, स्तोत्रे, बौद्ध सिद्धांचे दोहे आणि पदे, विद्यापतीची कीर्तिलता, अब्दुर् रहमानचे संदेशरासक, इ. कितीतरी काव्यग्रंथ अपभ्रंश साहित्याची भूषणे ठरलेली आहेत. जैन भांडारांनी अपभ्रंश साहित्याची जिवापाड जपणूक केली आहे. गुजरात, सौराष्ट्र आणि राजस्थान, या प्रदेशांत जैनांची समृद्ध ग्रंथालये आहेत. या ग्रंथालयांतून प्राप्त झालेले कित्येक अपभ्रंश ग्रंथ आजमितीस प्रकाशात आले आहेत व पुढेही येण्याची शक्यता आहे. मध्ययुगीन कालात एखाद्या ग्रंथाची हस्तलिखित प्रत तयार करवून घेऊन एखाद्या जैनभांडारात श्रावकांच्या उपयोगासाठी ती ठेवून देणे, हे जैनांच्या दृष्टीने मोठे धर्मकार्य होते. जैनभांडारे हस्तलिखित ग्रंथांनी संपन्न झाली ती याच धार्मिक भावनेमुळे. तत्कालीन कित्येक श्रीमंत व राजेमहाराजे कवींना आणि आचार्यांना आश्रय देऊन त्यांच्याकडून संस्कृत न जाणणाऱ्या श्रावकांसाठी अपभ्रंश भाषेत ग्रंथ रचून घेत. सामान्य जनतेच्या अंतःकरणात प्रवेश करणे हे जैन कवींचे ध्येय होते. सामान्य जनतेला प्रभावित करायचे असेल, तर कथेहून अन्य श्रेष्ठ साधन नाही हे जाणून पुराणचरितादी सर्व ग्रंथ जैनांनी कथा आणि अवांतर कथा यांनी भरून टाकले आहेत. श्रीचंद्राचा कथाकोश म्हणजे अनेक धार्मिक आणि उपदेशप्रद कथांचे भांडार आहे.

अपभ्रंश साहित्यात कित्येक रासग्रंथही उपलब्ध आहेत. पृथ्वीराजरासो व संदेशरासक हे दोन ग्रंथ सोडल्यास बाकीचे सारे धार्मिक विषयांवर आधारलेले आहेत. जिनदत्तसूरिकृत उपदेशरसायन या रासग्रंथात धार्मिक कृत्यांचा उल्लेख असून गृहस्थांना केलेला सदुपदेशही आहे. ६३ महापुरुषांची चरित्रे व अन्य कित्येक धार्मिक पुरुषांची जीवनचरित्रेही उपलब्ध आहेत. तीर्थंकरांची व गुरूंची स्तोत्रेही बरीच आहेत. अभयदेवसूरीचे जयतिहुयण स्तोत्र, त्याचप्रमाणे ऋषभ–जिन–स्तोत्र, धर्मसूरिस्तुती, इ. स्तोत्रे प्रसिद्ध आहेत. याव्यतिरिक्त चूनरी, चर्चरी, पुलक, इत्यादी नावांचे काही ग्रंथ मिळाले आहेत. विनयचंद्राने आपल्या चूनरीत धार्मिक

भावना व सदाचार यांनी रंगविलेली चूनरी पांघरावी असा उपदेश केला आहे. जिनदत्तसूरीच्या चर्चरीत त्याने आपल्या गुरूचे गुणगान केले आहे. त्यानेच रचलेल्या पुलकात श्रावक गृहस्थांना धर्मोपदेश आहे.

बौद्ध सिद्धांनीही अपभ्रंश भाषेत काही स्फुट पदे व दोहे लिहिले असून त्यांत वज्रयान व सहजयान यांच्या सिद्धान्तांचे प्रतिपादन आहे. सिद्धांची अपभ्रंश-रचना दोन प्रकारची आढळते. एका प्रकारात त्यांच्या सिद्धान्तांचे प्रतिपादन व दुसऱ्या प्रकारात ब्राह्मणांच्या कर्मकांडाचे व रूढिप्रियतेचे तीव्र खंडन. काश्मीरी शैव मतानुयायांनीही स्वमतप्रतिपादक काही पदे अपभ्रंश भाषेत लिहिलेली काश्मीरमध्ये आढळली आहेत. त्यावरून अपभ्रंश भाषेच्या क्षेत्रविस्ताराची कल्पना येते. अपभ्रंश-काव्यात शृंगार, वीर व शांत या तीन रसांचेच प्रामुख्याने दर्शन होते. सौंदर्यवर्णनांत शृंगार व युद्धवर्णनांत वीररस आढळतो. जिथे संसाराची असारता वर्णिलेली असते, तिथे शांतरस दिसतो. मुख्यत्वे अपभ्रंश साहित्याचा स्थायी भाव शांतरसाचाच आहे. अपभ्रंश भाषेची प्रबंधकाव्ये संस्कृत महाकाव्यांच्या धर्तीवर रचलेली आढळतात. संस्कृत काव्ये सर्गबद्ध असतात, तर अपभ्रंश भाषेची मोठी काव्ये संधिबद्ध असतात. काही कडवके मिळून एक संधी होतो. कडवकाची समाप्ती घत्ता या छंदाने होते. कडवकाचा मूलभाग पज्झटिका, पादाकुलक, वदनक, पारायण, इ. छंदांत असतो. काव्यकृतीच्या प्रारंभी मंगलाचरण, सज्जन-दुर्जन-स्मरण, आत्मविनय, इ. विषय असतात. अपभ्रंश काव्यात भाषेच्या दोन शैली आढळतात. एक शैली प्राचीन संस्कृताच्या परिपाटीला धरून विकसित झाली आहे, तर दुसरी शैली अधिक मुक्त व स्वच्छंद आहे. तिच्यात भाषेचे बोलचालीतले सर्वसाधारण स्वरूप आढळते. दुसरी एक प्रवृत्ती दिसते, ती ध्वन्यात्मक शब्दांच्या प्रयोगाची. अर्थ अधिक स्पष्ट होण्यासाठी त्या त्या भावाला अनुकूल असे ध्वन्यात्मक शब्द विशेषतः प्रारंभीच्या अपभ्रंश साहित्यात आढळतात. अपभ्रंश कवींनी मात्रिक छंदांचा मोठ्या प्रमाणात उपयोग केला असून, छप्पय, कुंडलिक, चंद्रायन, रासाकुल, इ. नवे छंदही निर्मिले आहेत. त्यांनी गाथा छंदाचाही उपयोग केला आहे.

अधिकांश अपभ्रंश साहित्याची रचना गुजरात, राजस्थान, मध्यप्रदेश, विदर्भ, मिथिला व मगध या प्रदेशांत झाली आहे अपभ्रंश साहित्याचे प्रादेशिक वर्गीकरण पुढीलप्रमाणे आहे.

(१) पश्चिमी प्रदेशाचे अपभ्रंश साहित्य – यात स्वयंभू, योगींदु, धनपाल, हेमचंद्र, अब्दुर् रहमान, इ. लेखकांच्या कृतींचा अंतर्भाव होतो.

(२) महाराष्ट्राचे अपभ्रंश साहित्य – यात पुष्पदत व कनकामर यांच्या कृतींचा अंतर्भाव होतो.

(३) पूर्वेकडील प्रदेशांचे अपभ्रंश साहित्य – यात बौद्ध सिद्ध व विद्यापती यांच्या रचनांचा समावेश होतो.

(४) उत्तरेकडील प्रदेशांचे अपभ्रंश साहित्य – यात नाथ-संप्रदायातल्या कवींच्या पदांचा समावेश होतो.

अपभ्रंश साहित्याचे दुसरे वर्गीकरण जैन व जैनेतर साहित्य अशा स्वरूपात करता येते. जैनांच्या अपभ्रंश साहित्याचे विवेचन वर आलेच आहे. जैनेतर साहित्यात ब्राह्मण, बौद्ध व मुसलमान यांनी रचलेल्या साहित्याचा समावेश होतो. [ डॉ. ना. गो. कालेलकर; अ. सा.; हिं. सा. को. ]

## अपरा एकादशी

वैशाख वद्य एकादशीचे नाव. या एकादशीला उपवासादी व्रत केले असता पुत्रप्राप्ती होते, असे सांगितले आहे (पद्म पु. उ. खं. अ. ५).

## अपराजिता

(१) एक देवता. हिला दुर्गा असे एक नाव आहे. हे नाव तिच्या रौद्ररूपाचे द्योतक आहे. या रूपात तिने अनेक असुरांचा संहार केला. देवीपुराणात तिच्या स्वरूपाचे वर्णन आढळते. तंत्रसाहित्यात तिच्या पूजेचे स्वतंत्र विधान आहे.

विजयादशमीला सीमोल्लंघनास निघण्यापूर्वी हिची व जया, विजया या देवतांची पूजा करावी, असे निर्णयामृतात सांगितले आहे. अष्टदल कमलावर हिच्या मृण्मय मूर्तीची स्थापना व पूजा करतात. मग हळदीने रंगविलेल्या वस्त्रात दूर्वा व मोहऱ्या घालून त्यांची पुरचुंडी करून ती उजव्या दंडावर बांधतात. त्या वेळी पुढील मंत्र म्हणतात–

जयदे वरदे देवि दशम्यामपराजिते ।
धारयामि भुजे दक्षे जयलाभाभिवृद्धये ॥

ही पूजा मुख्यत्वे राजांसाठी सांगितली आहे.

स्कंदपुराणात (काशीखंड ७२) व मत्स्यपुराणात (अ. १७८) हिचा अनुक्रमे योगिनी व मातृका म्हणून उल्लेख येतो. पाहा–दसरा, दुर्गा [ देवीकोश; श. क. ]

(२) जैन दैवतसमूहातली एक यक्षिणी. हिचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे – कमलावर आरूढ, चतुर्भुज, मातुलिंग, खड्ग व खेटक धारण करणारी आणि हरितवर्णाची. दिगंबरमते सिंहारूढ, मातुलिंग, खड्ग, खेटक वरदमुद्रा धारण करणारी. [ जै. इ. ]

(३) बौद्ध देवता. पीतवर्ण, द्विभुज. मूर्तिकलेत ही गणेशाला पायदळी तुडविताना दिसते. ही माराचा उच्छेद करणारी आहे. ब्रह्मादी देव हिच्या मस्तकावर छत्र धरतात. [ इं. बु. इ. ]

**अपराजिता सप्तमी** भाद्रपद शु. सप्तमीला अपराजिता सप्तमी असे नाव आहे. चतुर्थीला एकभुक्त राहून पंचमीला नक्तभोजन, षष्ठीला उपवास व सप्तमीला सूर्यपूजा करून मग पारणे, असे याचे विधान आहे. आश्विनादी, मार्गशीर्षादी, फाल्गुनादी व ज्येष्ठादी असे या व्रताचे चार प्रकार असून त्यांच्या देवता अनुक्रमे भर्ग, अंशुमान्, अर्यमा व सविता या आहेत. या व्रतात वरील देवतांची पूजा व प्रार्थना करायची असते. हे व्रत आचरणारा युद्धात शत्रूला पराजित करतो व त्रिवर्गावर जय मिळवून सूर्यलोकाला जातो, असे सांगितले आहे. व्रतावधी एक वर्ष. [ हि. ध.; कृ. क. त. ]

**अपराध** अकार्यादी दोषांना अपराध असे म्हणतात. हे बत्तीस प्रकारचे आहेत. त्यांची नावे वराहपुराणात दिलेली आहेत, ती अशी –

यानैर्वा पादुकैर्वापि गमनं भगवद्गृहे ।
देवोत्सवाद्यसेवा च अप्रणामस्तदग्रतः ।।
उच्छिष्टे वाथवा शौचे भगवद्दर्शनादिकम् ।
एकहस्तप्रमाणं च तत्पुरस्तात् प्रदक्षिणम् ।
पादप्रसारणं चाग्रे तथा पर्यङ्कबन्धनम् ।
शयनं भक्षणं वापि मिथ्याभाषणमेव च ।
उच्चैर्भाषा मिथो जल्पो रोदनानि च निग्रहः ।
निग्रहानुग्रहे चैव नृषु च क्रूरभाषणम् ।।
कम्बलावरणं चैव परनिन्दा परस्तुतिः ।
अश्लीलभाषणं चैव अधोवायुविमोक्षणम् ।।
शक्तौ गौणोपचारश्च अनिवेदितभक्षणम् ।
तत्तत्कालोद्भवानां च फलादीनामनर्पणम् ।।
विनियुक्तावशिष्टस्य प्रदानं व्यञ्जनादिके ।
पृष्ठीकृत्यासनं चैव परेषामभिवादनम् ।
गुरौ मौनं निजस्तोत्रं देवतानिन्दनं तथा ।
अपराधास्तथा विष्णोर्द्वात्रिंशत् परिकीर्तिताः ।
द्वात्रिंशदपराधा ये कीर्त्यन्ते वसुधे मया ।
वैष्णवेन सदा ते तु वर्जनीयाः प्रयत्नतः ।।

अर्थ– वाहनांत बसून किंवा पादुका घालून देवालयात जाणे, देवाची उत्सवादी सेवा न करणे, देवाला नमस्कार न करणे, उष्टयाने किंवा आशौचात देवाचे दर्शन घेणे, एकाच हाताने नमस्कार करणे, देवापुढे नुसते हात ओवाळणे, देवापुढे पाय पसरून बसणे, त्याचप्रमाणे पर्यंकबंध घालून बसणे, झोपणे, खाणे, खोटे बोलणे, मोठ्याने व आपसांत बोलणे, रडणे, भांडणे, दुसऱ्यावर निग्रह व अनुग्रह करणे, लोकांशी कठोर बोलणे, कांबळ पांघरणे, परनिंदा, परस्तुती, अश्लील भाषण, अधोमार्गाने वायू सोडणे, सामर्थ्य असता गौण उपचार समर्पिणे, नैवेद्य न दाखविता खाणे, त्या त्या कालात उत्पन्न होणारी फळे अर्पण न करणे, तोंडी लावणे वगैरे जेवढी अर्पिण्याचे ठरविले असेल, त्यातला अल्पांशच अर्पण करणे, देवापुढे पाठ करून बसणे, देवासमोर दुसऱ्याला नमस्कार करणे, गुरुसमोर मौन पाळणे व आत्मस्तुती करणे, हे बत्तीस अपराध आहेत. ते वैष्णवाने प्रयत्नपूर्वक टाळावे.

अहन्यहनि यो मर्त्यो गीताध्यायं तु संपठेत् ।
द्वात्रिंशदपराधैस्तु अहन्यहनि मुच्यते ।।

अर्थ – जो माणूस रोज गीताध्याय पठण करतो, त्याची रोजच्या रोज बत्तीस अपराधांतून मुक्तता होते. [ श. क. ]

**अपराधशतव्रत** काम्य व्रत. मार्ग० शु. द्वादशी, कोणतीही शुक्ल किंवा कृष्ण अष्टमी. किंवा अमावास्या या दिवसापासून व्रताला प्रारंभ करतात. व्रतावधी एक वर्ष. विष्णुपूजा करणे हा या व्रताचा मुख्य भाग होय. शंभर अपराधांची नावे भविष्यपुराणाच्या उत्तर पर्वात अध्याय १४६ मध्ये सांगितली आहेत. या व्रताने त्यांचे क्षालन होते. [ हि. ध. ]

**अपरान्त** अपर म्हणजे पश्चिम आणि त्याचा अन्त म्हणजे अखेरचा प्रदेश किंवा कडेचा प्रदेश होय. सह्याद्रीच्या पश्चिमेकडील प्रदेशाला प्राचीन काळी अपरान्त असे नाव होते. भडोचपासून गोमंतकापर्यंतच्या सागरी तीरावरील भूपट्टीला अपरान्त म्हणत असावे. डॉ. भांडारकरांच्या मते अपरान्त म्हणजे आजचा उत्तर कोकणाचा प्रदेश होय. शूर्पारक किंवा आजचा सोपारा ही त्या प्रदेशाची राजधानी होती. महाभारताच्या भीष्मपर्वात अपरान्ताचा उल्लेख आलेला आहे (अ.९). अपरान्तात फार पाऊस पडतो, असे कौटिल्य सांगतो. कालिदासाच्या दिग्विजयवर्णनावरून अपरान्त देश केरळच्या उत्तरेस असल्याचे स्पष्टपणे कळते (रघु. ४.५३). वायुपुराणात अपरीत व मत्स्यपुराणात पुरंधर असे म्हटले आहे; पण ही दोन्ही नावे चुकीची आहेत. आभीर लोक या प्रदेशात राहत असत, असे विष्णुपुराणात सांगितले आहे. अपरान्ताचा जुन्यात जुना ऐतिहासिक उल्लेख अशोकाच्या शिलासनात आढळतो. मोग्गलिपुत्त तिस्स याने सनपूर्व २४७ च्या सुमारास अपरान्तात बौद्ध धर्माचा प्रसार करण्यासाठी आपले शिष्य पाठविले होते, असे लंकेतील महावंसो या ग्रंथात म्हटले आहे. अपरान्तात ३७ हजार लोकांना बौद्धधर्माची दीक्षा देण्यात आली, असे सामन्तपासादिकेत म्हटले आहे. बौद्ध काळात अपरान्ताच्या चतुःसीमा ठाणे, कुलाबा आणि त्याच्या आसपासच्या प्रदेशापरत्याच मर्यादित होत्या. पण

पुढे वसाहती विस्तृत झाल्या आणि दळणवळण वाढले तसतशा अपरान्ताच्या मर्यादाही वाढलेल्या दिसतात. पौराणिक अपरान्तात कच्छ, सौराष्ट्र, अबू, महीखोरे, भडोच व नासिक एवढ्या प्रदेशाचा समावेश होत होता, असे श्री. राय चौधरी सांगतात.

अपरान्ताचे प्राकृत नाव कोकण असे आहे. युआन च्वांगच्या वर्णनावरून वनवासी, बेळगाव व धारवाड, या घाटावरच्या प्रदेशालाही कोकणच मानीत असावे, असे दिसते. पाहा – कोकण. [ क. हि. वा. पु.; म. सा. प. वर्ष ९; सह्याद्रि ]

**अपरार्क** (इ. स. चे १२ वे शतक) हा शिलाहार वंशातला विद्वान राजा होता. याने याज्ञवल्क्य स्मृतीवर एक मोठा टीकात्मक निबंध लिहिला असून, त्याला विद्वन्मान्यता आहे. पाहा – शिलाहार राजवंश. [ आ. सं. मू. ]

**अपराह्ण** 'पञ्चधा विभक्तेऽह्नि चतुर्थो भागः' = दिवसाचे पाच भाग केले, तर त्यांतला चौथा भाग म्हणजे अपराह्ण होय. 'द्विधा विभक्तेऽह्न्युत्तरो भागः' = दिवसाचे दोन भाग केले असता दुसरा भाग असेही म्हटले आहे. (मिताक्षरा २.९७). सामान्यतः सूर्योदयापासून १८ घटी काल गेल्यावर अपराह्ण मानतात. 'श्राद्धस्य पूर्वाह्णादपराह्णो विशिष्यते' (=श्राद्धासाठी पूर्वाह्णापेक्षा अपराह्ण विशेष विहित आहे), असे मनू म्हणतो (३.२७८). जप, तप, दानादिदेवकार्ये पूर्वाह्णात करावी व पितृकार्ये अपराह्णात करावी, असा शिष्टाचार आहे.

**अपरिग्रह** परि+ग्रह =संपत्ती किंवा विषयभोग जवळ बाळगणे, त्यांचा संग्रह करणे व त्यांवर स्वतःचे स्वामित्व प्रस्थापित करणे. याच्या उलट अपरिग्रह. संपत्तीचा व भोग्य वस्तूंचा संचय व संग्रह न करणे म्हणजे अपरिग्रह होय. परिग्रहामुळे आसक्ती, चिंता व दुःख वाढते. परिग्रहवृत्ती बळावली, की समाजात एखाद्या ठिकाणी संपत्तीचा ढीग तर दुसऱ्या अनेक ठिकाणी दैन्य-दारिद्र्य अशी विषम परिस्थिती निर्माण होते. परिग्रह म्हणजेच संपतीचा संचय हा वैयक्तिक मोक्ष व सर्व समाजाचा उत्कर्ष या दोहोंनाही बाधक ठरतो. म्हणून श्री. विनोबा हे सर्वोदयासाठी अपरिग्रहसमाज निर्माण करू पाहत आहेत. ते म्हणतात –

"बाबा (विनोबा) जो असंग्रही समाज करू इच्छितो, त्यात कमीत कमी दोन वर्षे पुरणारा धान्याचा साठा राहील... भुकेलेल्याला प्रत्येक घरी जाऊन मागण्याचा हक्क राहील... त्याला जेवू घालण्यापुरते धान्य प्रत्येक घरी असावे...मी संग्रह वाढवू इच्छितो; पण तो प्रत्येक घरात वाटून देऊ इच्छितो. अपरिग्रहसमाजात संपत्ती चांगली वाढेल. याचे कारण अपरिग्रह म्हणजे अत्यंत संग्रह; परंतु विभागलेला. तिसरी गोष्ट ही, की कोणत्याही व्यर्थ वस्तूंचा संग्रह होणार नाही. चांगल्या वस्तूंतसुद्धा क्रम पाहावा लागेल...हा क्रम खालीलप्रमाणे असेल–

(१) जेवण उत्तम मिळाले पाहिजे. (२) प्रत्येकाला कपडा मिळाला पाहिजे. (३) चांगले घर मिळाले पाहिजे. (४) शेतीची अवजारे मिळाली पाहिजेत. (५) ज्ञानाची साधने मिळाली पाहिजेत. (६) मनोरंजनाची साधने-संगीत वगैरे उपलब्ध झाले पाहिजे.

असंग्रह याचा अर्थ क्रमाप्रमाणे संग्रह...अपरिग्रही समाजात पैसा कमीत कमी राहील...अपरिग्रही समाजाची पाच लक्षणे आहेत –(१) या समाजात लक्ष्मी पुष्कळ वाढेल म्हणजे तिची (धान्य, फळे, दुभते, भाजी, इ.) समृद्धी होईल. (२) लक्ष्मी घराघरांत वाटली जाईल म्हणजे तिचे समान वाटप होईल. (३) निरर्थक वस्तूंचा संग्रह होणार नाही. (४) क्रमाप्रमाणे संग्रह होईल. (५) पैसा कमीत कमी राहील."

**अपर्णा** पार्वतीचे एक नाव. शिव पती मिळावा म्हणून तपश्चर्या करीत असता हिने सर्व आहार सोडला व शेवटी वृक्षाचे पानही खाण्याचे सोडून दिले, म्हणून तिला अपर्णा असे नाव मिळाले. हाच आशय कालिदासाने कुमारसंभवात पुढील श्लोकाने सांगितला आहे–

स्वयं विशीर्णद्रुमपर्णवृत्तिता
परा हि काष्ठा तपसस्तया पुनः ।
तदप्यपाकीर्णमतः प्रियंवदां
वदन्त्यपर्णेति च तां पुराविदः ।।

(कुमार. ५.२८)

अर्थ – वृक्षांवरून गळणाऱ्या पर्णांनी जीवनधारण करणे ही तपाची पराकाष्ठा (मानली जाते). पण पार्वतीने ती पर्णेही खायचे सोडून दिले, म्हणून पुरातत्त्ववेत्ते तिला अपर्णा म्हणतात.

**अपवर्ग** याचे लक्षण–'आत्यन्तिकी दुःखनिवृत्तिरपवर्गः '= आत्यंतिक दुःखनिवृत्ती म्हणजे एकदा निवृत्त झालेले दुःख पुनश्च कधीही न येणे, याला अपवर्ग म्हणतात (सर्व द. सं. पृ. २४६). सामान्य अर्थ निःश्रेयस् किंवा मोक्ष. मानवाचे अंतिम साध्य काय, याविषयी विचार करून दार्शनिकांनी अपवर्गाची कल्पना मांडली. सांख्यमते प्रकृतिपुरुषविवेक हे साधन व दुःखनिवृत्ती हाच मोक्ष होय (सां. का. ६८). प्रमाण, प्रमेय, इ. षोडश पदार्थांच्या ज्ञानाने निःश्रेयस् मिळते, असे नैयायिक

सांगतात (गौ. सू. १. १. १.). अपवर्ग म्हणजे एकवीस दुःखांचा नाश, असे नैयायिकांचे मत आहे (त. भा. प्र. ४१). म्हणजे त्यांच्या मते तो अभावरूप ठरतो. पण इतर दर्शनकारांना ही कल्पना मान्य नाही. मीमांसक स्वर्गादी लोकांत मिळणाऱ्या निरतिशय सुखालाच मोक्ष मानतात (न्या. को. पृ. ४१३). अद्वैतवेदान्त्यांच्या मते अपवर्ग हा आनंदरूप असून, महावाक्यार्थ-बोधानंतर तो प्राप्त होतो. व्याकरणात फलप्राप्तीला अपवर्ग मानले आहे. यात लौकिक फलेही समाविष्ट होतात. पाहा—मोक्ष.

**अपशकुन** शकुन म्हणजे भविष्यसूचक चिन्ह किंवा वस्तू होय. शकुनांत शुभाशुभ असे दोन्ही भाग असतात. अशुभ शकुनांना अपशकुन म्हणतात. मंगल कार्याचा उपक्रम करताना, महत्कार्याला प्रारंभ करताना आणि प्रवासास निघताना काही चिन्हे, वस्तू व प्राणी यांचे दर्शन व काही शब्दांचे श्रवण अशुभ मानलेले आहे –

वंध्या स्त्री, चर्म, भूस, हाडे, सर्प, मीठ, निखारे, लाकडे, नपुंसक, विष्ठा, तेल, उन्मत्त मनुष्य, चरबी, ओशट पदार्थ, शत्रू, जटा वाढविलेला माणूस, संन्यासी, तृण, रुग्ण, नस, तैलाभ्यक्त, व केस सोडलेला माणूस, जातिभ्रष्ट, अवयवहीन, क्षुधित, रक्त, स्त्रियांचे आर्तव, सरडा, गृहदाह, मांजरांचे भांडण, शिंक, गूळ, ताक, चिखल, विधवा, कुबडा, कुटुंबात कलह, वस्त्रात पाय अडखळणे, हातातली वस्तू पडणे, रेड्यांची झुंज, कृष्ण धान्ये, कापूस, वमन, उजव्या अंगाला गाढव ओरडणे, अकस्मात एखाद्याला क्रोध येणे, गर्भवती, मुंडित मनुष्य, ओलेता माणूस, दुष्ट भाषणाचे श्रवण, अंध, बधिर, रजस्वला, इत्यादी गोष्टी प्रयाणादी शुभ कार्यारंभी अशुभ शकुन समजावे.

अपशकुन झाल्यास ११ ते १६ प्राणापर्यंत (प्राण=१० दीर्घ अक्षरे उच्चारण्यास लागणारा वेळ) थांबून किंवा प्राणायाम करून पुन्हा कार्याला लागावे.

> वाराणस्यां दक्षिणे भागे कुक्कुट्टो नाम वै द्विजः ।
> तस्य स्मरणमात्रेण भवेद् दुःशकुनः शुभः ।।

या मंत्राचा जप करावा; किंवा देवाचे नाव घ्यावे व कामाला लागावे, असा शास्त्रार्थ आहे. . [ मुहूर्तचिंतामणी; अ. म. ज्ञा.]

**अपसंद** बिहारच्या गया जिल्ह्यातील एक गाव. या गावात अनेक मूर्ती असून त्यांतली वराहमूर्ती ही सर्वोत्कृष्ट आहे, असे कनिंगहॅमने लिहिले आहे. गुप्त वंशातील शेवटचे राजे या ठिकाणी येऊन राहिले होते. त्यांपैकी आदित्यसेन हा एक होता. त्याच्या पत्नीने इथे एक मोठा तलाव खोदला आहे. इथे एक शिलालेख उपलब्ध झाला आहे. त्यावरून आदित्यसेनाने इथे एक विष्णुमंदिर बांधले व त्याची माता श्रीमती हिने एक धार्मिक विद्यापीठही स्थापन केले, असे कळते. [ गया गॅझे.]

**अपसव्य** शरीराच्या दक्षिण अंगाला अपसव्य म्हणतात. 'अपसव्यं तु दक्षिणम्' (अमर.) सव्य व अपसव्य या दोन संज्ञा यज्ञोपवीताच्या अवस्थेसाठी वापरतात. यज्ञोपवीत उजव्या खांद्यावरून डाव्या खांद्याखाली येणे, याला अपसव्य किंवा प्राचीनावीत म्हणतात. याच्या उलट म्हणजे डाव्या खांद्यावरून उजव्या खांद्याखाली येते, तेव्हा त्याला सव्य म्हणतात. नेहमी जानवे याच अवस्थेत असते. श्राद्धात यज्ञोपवीताचे अपसव्य करून पितरांची पूजा व तर्पण करायचे असते. 'प्राचीनावीतं पितृणाम्' = पितरांचे कर्म प्राचीनावीत करून करावे (तै. सं. २.५.११). पाहा—तर्पण.[ हि. ध. ]

**अपःस्पर्श** आचमनाचा एक प्रकार. यात पाण्यात बोटे बुडवून ती डोळे, कान व ओठ यांना लावायची असतात. देवपूजा, इ. कर्मे करीत असताना अधोवायूचे निस्सरण, असत्य भाषण कानी पडणे, मांजर किंवा उंदीर यांचा स्पर्श, क्रोध येणे, अशा गोष्टी घडल्या असता अपःस्पर्श करावा, असे सांगितले आहे. [ आचारेंदुः ]

**अपांक्तेय** भोजनात पंक्तीस बसण्यास अयोग्य तो अपांक्तेय होय. मानसिक व्यंग, रोग, निंद्य व्यवसाय, अनैतिक आचरण, पाप, रूढिभंग, इ. दोषांनी ब्राह्मणही ब्राह्मणांच्या पंक्तीस बसण्यास अयोग्य होतो (मनु. ३.१६७).

**अपातानी** अरुणाचल प्रदेशातील एक पहाडी जमात. पाच हजार फूट उंचीवरच्या वीस चौरस मैलांच्या क्षेत्रफळात अपातानी लोकांची वस्ती आहे. इ. स. १९६१ च्या जनगणनेनुसार सात खेड्यांत त्यांची २५२० घरे होती आणि त्यांत १०,७४५ लोक राहत होते.

अपातानी लोक मध्यम उंचीचे व दिसायला साधारण आहेत. पुरुष मस्तकावर केसांचा बुचडा बांधतात व त्यात एक पिन खोचतात. त्यांच्या स्त्रिया मस्तकावर मध्यभागी दोन अंबाडे बांधतात व त्यांत पितळी पिना अडकवतात. पुरुष अधरोष्ठापासून खाली हनुवटीपर्यंत उभ्या रेषा गोंदवून घेतात; तर स्त्रिया कपाळाच्या वरच्या भागापासून नाकाच्या शेंड्यापर्यंत आणि खालच्या ओठापासून हनुवटीपर्यंत उभ्या निळ्या रेषा गोंदवतात. त्या आपल्या दोन्ही नाकपुड्यांत दोन-तीन इंच व्यासाचे गोल लाकडी ठोकळे घालतात. त्यामुळे त्यांच्या कुरूपतेत भरच पडते.

हे लोक सुस्वभावी, सद्‌वर्तनी, भित्रे व उद्योगी आहेत.

वेषभूषा – पुरुष गडद निळ्या पार्श्वभूमीवर पिवळ्या-तांबड्या रंगाचे पट्टे असलेल्या कापडाचा चौरस तुकडा गळ्या-भोवती गुंडाळतात. त्यांच्या कमरेभोवती वेताची कडी असतात. आणि मागच्या बाजूला लाल रंगाने रंगवलेल्या वेताच्या कामट्यांची एक लांब शेपटी लोंबत असते. ती फार मजेशीर दिसते. त्यांच्या स्त्रिया निळ्या किंवा काळ्या रंगाचा परकर आणि वर पांढऱ्या सुती कापडाचे जाकिट असा पोषाख करतात.



अपातानी स्त्री

घरे – यांची गावे बहुधा बांबूच्या वनांच्या मध्यभागी वसलेली असतात. घरे बांबूची असून, वर गवताचे छप्पर असते.

उद्योगधंदे – शेती हा या लोकांचा प्रमुख व्यवसाय आहे. तांदूळ हे इथले मुख्य पीक असून, त्याच्या जोडीला बाजरी व मका ही धान्येही ते पिकवतात. शेतीसाठी अवजारे न वापरता सर्व कामे ते हातांनीच करतात. मोठमोठ्या पोकळ लाकडी ओंडक्यांतून पाणी वाहावत नेऊन ते शेतीला पाणी पुरवतात व भरपूर उत्पन्न घेतात. शेतीच्या जोडीला ते गुरे, मिथुन व कोंबड्या पाळतात.

विवाहप्रथा – विवाहाच्या बाबतीत मुलामुलींना पूर्ण स्वातंत्र्य असते. विवाहाच्या पूर्वीही मुली आपल्या जोडीदाराच्या घरी राहू शकतात. या लोकांत देज देण्याची पद्धत आहे. विवाहाच्या वेळी कोणतेही धार्मिक विधी करीत नाहीत. मुलाचे लग्न झाल्यावर आईबाप त्याला वेगळे बिऱ्हाड मांडून देतात. सर्वांत धाकटा मुलगा मात्र विवाहानंतरही आईबापांच्या घरी राहतो. श्रीमंत लोक बहुधा अनेक बायका करतात.

या लोकांत माइट व मुरा असे दोन उच्च व नीच वर्ग आहेत. काही खेड्यांत मुरा वर्गाच्या लोकांचे उद्योग ठरवून दिलेले आहेत. मातीची भांडी तयार करणे, लोहाराचे काम करणे, असे ते उद्योग आहेत. या वर्गातील लोक गुलाम म्हणून काम करतात. गुलाम मुक्त झाला की त्याला राहायला घर व कसण्यासाठी जमीन देतात.

देवधर्म – किल्लो व किरू या दोन प्रमुख देवता असून ती दोघे पति-पत्नी आहेत. चांदुन देवाने पृथ्वी व त्याची पत्नी दिदुन हिने आकाश निर्माण केले. हिलो ही त्यांची रोगप्रतिबंधक देवता आहे. दर तीन वर्षांनी निरनिराळ्या गावांत आळीपाळीने हे देवदेवतांना पशू बळी देतात.

सण-उत्सव – मोरोम हा त्यांचा पेरणीचा उत्सव आहे. म्लोको हा उत्सव बागेत साजरा करतात. या वेळी देवतांना डुक्कर, कोंबडे किंवा कुत्रा बळी देतात.

या लोकांत पंचायत असते. तिचे सभासद गावाचा कारभार पाहतात.

शत्रूला मारल्यानंतर त्याचे हात जाळतात व त्याची जीभ आणि डोळे पुरतात. त्यामुळे मेलेल्या माणसाला आपला शत्रू दिसत नाही व त्याच्यावर त्याला सूड उगवता येत नाही, अशी त्यांची समजूत आहे.

हे लोक आपला बराचसा खरेदीचा व्यवहार वस्तूंच्या अदला-बदलीने करतात.

यांची स्वतःची अशी एक स्वतंत्र बोली आहे.

नैसर्गिक कारणामुळे मृत्यू आलेला माणूस पृथ्वीच्या खाली असलेल्या लोकात जातो. अनैसर्गिक रीत्या मृत्यू आलेला माणूस अवकाशात असलेल्या लोकात जातो, अशी त्यांची समजूत आहे.

भारत स्वतंत्र झाल्यानंतर या लोकांची आर्थिक परिस्थिती बरीच सुधारली आहे. खेड्यांतून दुकाने व चहागृहे उघडली आहेत. अनेक लोकांना सरकारी नोकऱ्या मिळाल्या आहेत. यांच्या मुलांच्या शिक्षणासाठी शाळा उघडण्यात आल्या आहेत.

[ इं. नॉ. फ्रां. ना. सें.; म. वि. को. ]

**अपान** एक वायू. 'अपानयति मलादिनिःसारणेन जीवयति इति' = मलादिकांच्या निःसारणाने जीवन चालवितो तो अपान होय (हलायुध). पंचप्राणांपैकी दुसरा. याची गती अधोगामी असते व हा गुदद्वाराच्या ठिकाणी राहतो, असे वेदान्त-सारात म्हटले आहे. अथर्ववेदात याचा वारंवार उल्लेख येतो (२.२८.३; ५.३०.१२). ऐतरेय उपनिषदात याचा नाभीशी संबंध दाखविला आहे. याचे कार्य पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

अधो नयत्यपानं तु आहारं च नृणामधः ।
मूत्रशुक्रवहो वायुरपान इति कथ्यते ।।

अर्थ – माणसांचा अधोवात व आहार खाली नेणारा व मूत्र व शुक्र यांना वाहून नेणारा जो वायू; याला अपान म्हटले जाते.

योगसिद्धीसाठी प्राण व अपान हे सम करावे लागतात (गीता ५. २७). पाहा – प्राण, प्राणायाम.

**अपांनपात्** एक वैदिक देवता. अग्नीचे विद्युद्रूप. ऋग्वेदातल्या एका संपूर्ण सूक्तात याचे स्तवन आहे ( ऋ. २. ३५ ). अंतरिक्षातले जल हे याचे जन्मस्थान असून याला जलांचा गर्भ म्हटले आहे. तो उदकात बलिष्ठ होऊन विराजतो व इंधनावाचून प्रकाशतो (ऋ. २. ३५. ४, ७).

अपांनपात् हे मेघांत लपलेल्या विद्युद्रूपी अग्नीचे प्रतीक मानलेले असावे. या देवतेचा उगम भारताबाहेर व पर्शुभारतीय काळात झाला असावा; कारण अवेस्त्यात हा एक जलात राहणारा असुर असून, तो स्त्रियांच्या मेळाव्यात राहतो व तेजदार घोड्यावर स्वार होतो, असे म्हटले आहे. ओल्डेनबर्गच्या मते ही मुळात एक साधी जलदेवता असावी. पण पुढे अगदी विसदृश असा जलोत्पन्न अग्नी व अपांनपात् यांना एक मानू लागले असावे. [ वै. सा. सं.; म. ज्ञा. को. – वेदविद्या ]

**अपाप संक्रांतिव्रत** एक काम्य व्रत. कोणत्याही संक्रांतीपासून याचा प्रारंभ करतात. व्रतावधी एक वर्ष. सूर्य-पूजा व शुभ्र तिळांचे दान हा या व्रताचा विधी होय. फल–पापनाश. [ हि. ध. ]

**अपामार्ग** एक वनस्पती. ( आघाडा ) याची पाने पत्रपूजेत वापरतात. ऋषिपंचमीच्या व्रतात व्रती स्त्रीने याच्या काड्यांनी दात घासून व पाने मस्तकावर ठेवून स्नान करायचे असते. हा गौरीचा प्रतिनिधी आहे. देवीला याची पत्री आवडते. ग्रहयज्ञात बुधासाठी याच्या समिधा वापरतात. वैदिक वाङ्मयात अभिचारासाठी याचा उपयोग सांगितला आहे. प्राचीन काळी मृताच्या अस्थी जमिनीत पुरल्यानंतर स्नान करण्यापूर्वी या वनस्पतीच्या साहाय्याने शुद्धी करीत. [ हि. ध. ]

**अपामार्जन** एक स्तोत्र. हे विष्णुधर्मोत्तरपुराणात दाल्भ्य व पुलस्त्य यांच्या संवादप्रसंगाने निर्माण झाले आहे. सर्व प्रकारची दुःखे कोणत्या उपायाने दूर होतील, असे दाल्भ्याने विचारल्यावरून पुलस्त्याने हे स्तोत्र सांगितले. याचे १९१ श्लोक असून, त्यांत विष्णूची स्तुती आहे. याला 'स्तोत्रराज म्हटले असून, याच्या पठणाने ब्रह्महत्येचे पातकही दूर होते, असे सांगितले आहे. याच स्तोत्रात एक ज्वरमंत्र आहे. ज्वरपीडा नष्ट होण्यासाठी त्या मंत्राचा १०,००० जप व होम करावा, असा विधी तिथेच दिला आहे. [ ऋ. व्र. स. ]

**अपूप** एक खाद्यपदार्थ. 'न पूयते, विशीर्यंति इति' = जो कुजत नाही तो (हलायुध). घारगा. गहू किंवा तांदूळ यांच्या पिठात तूप मिसळून ( व गूळ घालून ) तळलेला वडा. हे आपल्या देशातले प्राचीन पक्वान्न आहे. ऋग्वेदातही याचा उल्लेख येतो ( ऋ. १० ४५. ९ ). महाउम्मगजातकानुसार प्राचीन काळी तांदुळाची तीन प्रकारची पक्वान्ने बनवीत – यागू, पूप व भत्त. यागू म्हणजे गोड लापशी, पूप म्हणजे वडा व भत्त म्हणजे ( गोड वा तिखट ) भात. अनरसा अपूपच आहे. पुढे वैष्णव धर्माच्या वृद्धिकाळात अपूप हा विष्णूचा नैवेद्य ठरला. अधिक मासात पुरुषोत्तमासाठी अपूपांचेच दान सांगितले आहे. तिखटमिठाचा वडा हा ग्रामदेवता व कुलदेवता यांचा नैवेद्य असतो. मंगलकार्यांतला वडा हा कढईतून टोचून बाहेर काढतात. पितृकार्यांतला वडा न टोचता बाहेर काढतात. वडा हा वाटोळा असतो. म्हणून ते सूर्यप्रतीक ठरले आहे. सूर्य व विष्णू यांचा अभेद असल्यामुळे वैष्णवांच्या पूजाविधीत वड्याला मान्यता मिळाली. [ पा. का. भा.; वे. इं. ]

**अपूर्व** मीमांसेतली एक संज्ञा. 'यागादिजन्यः स्वर्गादिजनकः कश्चन गुणविशेषः' = यागादी कर्मांनी उत्पन्न होणारा व स्वर्गादी फलाचा जनक असलेला एक विशिष्ट गुण म्हणजे अपूर्व होय (न्यायकोश). हे मीमांसकांचे मत आहे. याला वेदान्ती प्रारब्ध कर्म, नैयायिक धर्माधर्म, वैशेषिक अदृष्ट व पौराणिक पुण्य-पाप म्हणतात.

मीमांसादर्शनात अपूर्वाला फार महत्त्व आहे. अपूर्व मानल्याशिवाय त्यांची स्वर्गकल्पना उपपन्नच होऊ शकत नाही. यज्ञाने स्वर्ग मिळतो; पण यज्ञ हा तीन क्षणच राहणारा (त्रिक्षणावस्थायी) असल्यामुळे यज्ञ व स्वर्ग म्हणजेच कारण व कार्य यांचे सामानधिकरण्यच येत नाही. म्हणून त्यासाठी त्यांना अपूर्व कल्पावे लागले. ते यज्ञ व स्वर्ग यांमधला दुवा आहे. यज्ञ केल्यावर त्यापासून अपूर्व निर्माण होते व ते स्वर्गफलाच्या प्राप्तीपर्यंत टिकते. व्यवहारांत प्रत्येक गोष्टीला पाच कारणे सांगितली, त्यांत अपूर्व = अदृष्ट हे एक कारण आहे. सर्वच गोष्टी पुरुषप्रयत्नाने साध्य होत नाहीत. काही गोष्टी अदृष्टाधीन असतात. त्यावरून दोन विचारमार्ग निघाले. एक दैववादी व दुसरा प्रयत्नवादी. पण प्रत्येक कार्यात अपूर्वाचाही थोडाफार भाग असतो, हे आता पुष्कळ विचारवंतांस मान्य झाले आहे. [ हि. इं. फि. १ ]

**अपूर्वविधी** मंत्र व ब्राह्मण मिळून वेद होतो. ब्राह्मणवाक्ये म्हणजे विधिवाक्ये होत. त्यांमध्ये अनेक प्रकारचे विधी म्हणजे आदेश असतात. अपूर्वविधी हा त्यांतलाच एक

प्रकार आहे. याची लक्षणे पुढीलप्रमाणे सांगितली आहेत–

(१) 'अप्राप्तप्रापको विधिः = प्राप्त म्हणजे ज्ञात आणि अप्राप्त म्हणजे अज्ञात होय. अज्ञात वस्तूचे ज्ञान जो करून देतो, तो अपूर्वविधी समजावा.

(२) 'यो विधिः अत्यन्ताप्राप्तमर्थं बोधयति सः' = जो विधी अत्यंत अप्राप्त (अज्ञात) अशा विषयाचे बोधन करतो तो (न्यायकोश). उदा० 'अग्निहोत्रं जुहुयात् स्वर्गकामः' = ज्याला स्वर्गाची कामना असेल, त्याने अग्निहोत्र करावे, असे वैदिक वचन आहे. या विधीत सांगितलेले अग्निहोत्र प्रत्यक्षादी इतर कोणत्याही प्रमाणाने ज्ञात होत नाही, म्हणून या विधीला अपूर्वविधी म्हणायचे. याचे चार प्रकार आहेत –

(१) **कर्मविधी** – 'अग्निहोत्रं जुहोति' या वाक्यातले अग्निहोत्राचे विधान.

(२) **गुणविधी** – 'द्रव्यदेवतादिविधायकविधिः' = द्रव्य, देवता, इत्यादींचे विधान करणारा. उदा० 'दध्ना जुहोति' यात दही या हवनीय द्रव्याचे विधान आहे.

(३) **विनियोगविधी** – उदा० 'ऐन्द्रचा गार्हपत्यमुपतिष्ठते'. इथे इंद्रदेवताक ऋचेचा गार्हपत्याच्या स्तुतीसाठी विनियोग सांगितला आहे.

(४) **प्रयोगविधी** – अमुक गोष्ट आधी करून मग दुसरी करावी, असे ज्या विधीने सांगितले जाते तो विधी. उदा० 'अधीत्य स्नायात्' = अध्ययनानंतर स्नान करावे. [ हि. इं. फि. १ ]

## अपूर्वव्रत

एक जैन व्रत. भाद्रपद शु. प्रतिपदेपासून तृतीयेपर्यंत हे व्रत करतात. पहिले दोन दिवस एकाशन व तिसऱ्या दिवशी उपवास करतात. व्रतकालात त्रिलोकाची रचना करून अकृत्रिम चैत्यालयाची स्थापना व पूजा करतात. त्रिकाल 'ॐ ह्रीं त्रिलोकसंबंधिअकृत्रिमजिनालयेभ्यो नमः' या मंत्राचा जप करतात. पाच वर्षे व्रत केल्यावर उद्यापन करतात.

या व्रताला त्रैलोक्यतिलकव्रत असेही दुसरे नाव आहे. [ जै. ज्ञा. को.; व्र. ति. नि. ]

## अपोशान

जे अन्न आपण खातो, त्याला उपस्तरण (बैठक) व अपिधान (आच्छादन) या दोन गोष्टी आवश्यक असतात. त्या करण्यासाठी उजव्या हाताच्या तळव्यावर (आचमनाला घेतात तसे) पाणी घेऊन ते 'ॐ अमृतोपस्तरणमसि' या मंत्राने भोजनापूर्वी प्राशन करणे व 'ॐ अमृतापिधानमसि' या मंत्राने त्याचप्रमाणे भोजनोत्तर प्राशन करणे, याला अपोशान कर्म म्हणतात. धोतर व उपरणे या दोन वस्त्रांनी मनुष्य जसा अनग्न होतो, तद्वत् अपोशानाने (आपोष्णी) अन्न अनग्न होते. हे अपोशान शिजविलेले अन्न भक्षण करतेवेळीच करावे, असे सांगितले आहे. [ आचारेंदुः ]

## अपोहवाद

बौद्ध दर्शनात सामान्याचे खंडन करून नामजात्यादी असंयुक्त अर्थालाच शब्दार्थ मानले आहे. भाषा ही सामान्य किंवा जाती यांच्या आधारावाचून राहू शकत नाही, असा न्याय-मीमांसा-दर्शनांचा सिद्धान्त आहे. प्रत्येक व्यक्तीसाठी भिन्न भिन्न शब्द प्रयुक्त करायचा झाला, तर भाषेला अनवस्था प्राप्त होईल. भाषेतच नव्हे; तर ज्ञानाच्या क्षेत्रातही सामान्याला महत्त्व आहे. कारण एक ज्ञान जर दुसऱ्या ज्ञानाहून पृथक् मानावे लागले, तर एकाच वस्तूच्या अनेक ज्ञानांत काही परस्परसंबंध राहणार नाही. म्हणूनच न्याय-मीमांसेत अनेक व्यक्तींत राहणाऱ्या एका सामान्याची (जाती) नित्य सत्ता मानलेली आहे. हीच सत्ता भाषेच्या व्यवहारालाही कारण आहे.

पण बौद्धांच्या मते सर्व पदार्थ क्षणिक असल्यामुळे ते सामान्याची सत्ता मानीत नाहीत. त्यांचा दावा असा, की जर सामान्य एक असेल, तर ते अनेक व्यक्तींच्या ठिकाणी कसे राहील ? जर सामान्य नित्य असेल, तर नष्ट पदार्थांत राहणाऱ्या सामान्याचे काय होते ? अतएव सामान्यनामक नित्य सत्ता पदार्थामध्ये राहते, हे खरे नाही. पदार्थ क्षणिक असल्यामुळे तो कोणत्या अन्य वस्तूशी संबंधित न होता, तो स्वतःच स्वतःमध्ये एक विशिष्ट सत्ता असतो. त्याला स्वलक्षण असे म्हणतात. अनेक स्वलक्षण पदार्थांत अज्ञानामुळे एकत्वाची मिथ्या प्रतीती होते. अर्थात् लोकव्यवहाराला ती आवश्यकच असते. म्हणून सामान्यलक्षण पदार्थाला व्यावहारिक सत्ता असली, तरी पारमार्थिक दृष्टचा तो असत् आहे. शब्दांचा अर्थ परमार्थतः सामान्य संबंधाने रहित होऊनच भासित होतो. यालाच अन्यापोह किंवा अपोह (अप + ऊह) म्हणतात. अपोहवादाच्या विकासाचे तीन स्तर मानलेले आहेत. दिङ्नागाच्या मते शब्दाचा अर्थ अन्याभाव मात्र असतो. शांतरक्षित म्हणतो, की शब्द हा भावात्मक अर्थाचा बोध करवितो व त्याचा अन्याशी भेद ऊहाच्या द्वारे कळतो. रत्नकीर्तीचे मत असे, की शब्दार्थ हा अन्याच्या भेदाने युक्त असतो. ही तीनही मते शब्दार्थाला अन्याच्या भेदाने युक्त मानणारी आहेत. हेच अपोहवादाचे वैशिष्टच आहे.

## अपौरुषेयवाद

वेद हे पौरुषेय (पुरुषनिर्मित) की अपौरुषेय असा प्राचीन काळापासून वाद आहे. वेदांचा आविष्कार कसा झाला, याबाबत मीमांसक व नैयायिक या दोघांची मते भिन्न भिन्न आहेत. जैमिनीय मीमांसक, कुमारिलादी मीमांसक, आधुनिक मीमांसक व सांख्यवादी, यांच्या मते वेद हे

नित्य, अपौरुषेय व स्वतःप्रमाण आहेत. मीमांसक हे वेदांना स्वयंभू मानतात. वेदांच्या निर्मितीचा प्रयत्न कोणाही व्यक्तीचा किंवा ईश्वराचा नाही, असे त्यांचे म्हणणे आहे. नैयायिक मात्र वेद हे ईश्वरप्रोक्त आहेत, असे समजतात. मनुष्य हा भ्रम, प्रमाद, दुराग्रहादी दोषांनी युक्त असल्यामुळे त्याने वेदासारखा निर्दोष ग्रंथ रचणे शक्य नाही; म्हणून वेद अपौरुषेय, इतकेच मीमांसक म्हणतात; तर त्याच्या पुढे जाऊन नैयायिक असे प्रतिपादन करतात, की भ्रमप्रमादशील मानवाने वेद निर्माण केले नाहीत, अशी श्रद्धा ठेवून ते ईश्वराने सांगितले किंवा प्रकट केले, असे मानणेच योग्य होईल. ईश्वराने सृष्टी निर्माण केली, तसेच त्याने वेदही निर्माण केले, असे म्हटल्यास हरकत कोणती, असा नैयायिकांचा सवाल आहे.

श्रुतीच्या मताप्रमाणे ऋग्वेदादी वेद हे 'त्या महाभूताचे निःश्वास आहेत.' श्वासप्रश्वास हे स्वतः आविर्भूत होतात. त्याच्यासाठी मानवाच्या प्रयत्नाची वा बुद्धीची अपेक्षा नसते. म्हणून त्या महाभूताचे निःश्वासरूप असलेले वेद अदृष्टवशात्, अबुद्धिपूर्वक, स्वयं आविर्भूत होतात. मीमांसामतात शब्द नित्य मानलेला आहे. शब्द हा अश्रुत होतो, पण तो लुप्त होत नाही. शब्द आविर्भूत झाला, की तो क्रमशः विकीर्ण होऊन लघू व अश्रुत होतो; परंतु केव्हाही लुप्त होत नाही. शब्द उच्चारला जातो म्हणजेच आकाशात अंतर्हित असलेला शब्द तालू व जिह्वा यांच्या संयोगाने फक्त आविर्भूत होतो; उत्पन्न होत नाही (मी. सू. १. १. १४ शा. भा.). वेद ही नित्य शब्दांची संहती असल्यामुळे ते नित्य आहेत व कोणत्याही प्रकारे उत्पाद्य नाहीत. काही वैदिक संहितांचा संबंध तित्तिरी, कठ, इ. व्यक्तिनामांशी येतो; परंतु या व्यक्तींनी त्या त्या संहितांचे प्रवचन केले, असा त्याचा अर्थ आहे; त्यांनी त्या ग्रंथांची रचना केली, असा नव्हे (मी. सू. १. १. ३० शा. भा.). वेदांमध्ये जागोजाग आढळणारे बर्बर, प्रावाहणि, यांसारखे शब्द हे व्यक्तीचे वाचक नसून, नित्य पदार्थांचे निर्देशक आहेत. अशा प्रकारे स्वतः आविर्भूत वेद हे कोणाही पुरुषाने रचलेले नसल्यामुळे अपौरुषेय ठरतात. या सर्व विचाराला अपौरुषेयवाद असे नाव आहे. [श्रु. बो.; हिं. वि. को.]

**अप्पय्य दीक्षित** (इ. स. १५२०–१५९२–महालिंगशास्त्री यांच्या मते) एक दाक्षिणात्य महापंडित. द्रविड ब्राह्मण. पित्याचे नाव नारायण दीक्षित. अप्पय्य दीक्षित यांना त्यांच्या वडिलांकडूनच विद्या मिळाली. बाराव्या वर्षीच त्यांनी अध्ययन पूर्ण केले. पुढे अलंकार, व्याकरणशास्त्र व दर्शने यांतही पारंगतता मिळविली. यांचे वडील व आजोबा अद्वैती होते. त्यांचे संस्कार ग्रहण करून यांनीही अद्वैतमताचा प्रसार केला. इतकेच नव्हे, तर ते शंकराचार्यांच्या अद्वैतपरंपरेतले सर्वश्रेष्ठ आचार्य बनले.

अप्पय्य हे अद्वैती असूनही परम शिवभक्त होते. सिद्धान्तकौमुदीकार भट्टोजी दीक्षित हा यांचा शिष्य होता. पण तो परम वैष्णव असूनही त्यांचा गुरुशिष्यसंबंध जिव्हाळ्याचा राहिला. अप्पय्य शैव असूनही अनाग्रही होते. ते म्हणत –

मुरारौ च पुरारौ च न भेदः पारमार्थिकः।
तथाऽपि मामको भक्तिश्चन्द्रचूडे प्रधावति।।

अर्थ – विष्णू व शिव या दोघांत परमार्थतः भेद नाही, पण माझी भक्ती मात्र चंद्रशेखर शिवाकडेच धाव घेते.

शैवसिद्धान्ताच्या स्थापनेसाठी त्यांनी शिवार्कमणिदीपिका, शिवतत्त्वविवेक, शिवकर्णामृत, इ. पांडित्यपूर्ण ग्रंथ लिहिले. शांकरसिद्धान्तात वाचस्पतिमिश्राचे, रामानुजमतात सुदर्शनाचे व माध्वमतात जयतीर्थाचे जे स्थान व महत्त्व, तेच श्रीकंठसंप्रदायात शिवार्कमणिदीपिका रचणाऱ्या अप्पय्य दीक्षितांचे.

एकदा नर्मदातीरनिवासी नृसिंहाश्रम हे त्यांच्याकडे आले. त्यांनी अप्पय्य दीक्षितांना जाणीव दिली, की पितृ-पितामहांच्या अद्वैतपरंपरेची जाणीव ठेवा. त्याला अनुसरून त्यांनी न्यायरक्षामणी, सिद्धान्तलेश, इ. ग्रंथ लिहिले. सिद्धान्तलेश या ग्रंथांत त्यांनी अद्वैतवादी आचार्यांच्या एकजीववाद, नानाजीववाद, बिंबप्रतिबिंबवाद, अवच्छेदवाद, साक्षित्व, इ. विषयांतल्या मतभेदांचे दिग्दर्शन करून त्या विषयांवर स्वतःचे विचार मांडले आहेत. त्यांचा हा ग्रंथ शांकर संप्रदायाचा एक महान कोशच आहे.

त्यांची विद्वत्ता, वादपटुत्व व सदाचरण या गुणांवर लुब्ध होऊन चंद्रगिरी येथील राजा व्यंकटपती रायलू याने त्यांच्या कुटुंबाच्या व त्यांच्याकडे शिकायला येणाऱ्या विद्यार्थ्यांच्या योगक्षेमासाठी म्हणून त्यांना एक अग्रहार दिला होता. तिथे राहून त्यांनी कित्येक विद्यार्थी पढविले. दक्षिणेतल्या अनेक राजदरबारांत यांना बिदागी व मानसन्मान मिळाला होता.

यांनी दार्शनिक विषयांवर १०४ ग्रंथ लिहिले, अशी जनश्रुती आहे; पण ते सगळे उपलब्ध नाहीत. अलंकारशास्त्रावरचा कुवलयानंद हा त्यांचा ग्रंथ पंडितमान्य आहे. चंद्रालोक नावाच्या ग्रंथावरची ती एक विस्तृत व्याख्या आहे. हा ग्रंथ त्यांनी राजा व्यंकटपती याच्या प्रेरणेवरून लिहिला. वृत्तिवार्तिक व चित्रमीमांसा हेही त्यांचे साहित्यविषयक ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

हे वैदिकधर्माचे निष्ठावंत अनुयायी होते. कावेरीच्या तीरावर यांनी अनेक यज्ञ केले. पुढे त्रिस्थळीयात्रा करून काही काळ काशीक्षेत्री वास्तव्य केले. याच वास्तव्यात त्यांची व पंडितराज जगन्नाथ यांची गाठ पडली. जगन्नाथ पंडिताने यांच्या चित्रमीमांसेचे खंडन केले आहे. आख्यायिका अशी, की जगन्नाथ

अप्पय्य हे काशीक्षेत्रात एकमेकांचे प्रतिस्पर्धी बनले होते. त्रिस्थळीहून गावी परत आल्यावर त्यांनी संस्कृतात काही पद्दे रचली. त्यांतून 'ब्रह्मैवाहम्' हाच अद्वैतघोष प्रकट झाला आहे.

आयुष्याच्या अखेरीस काशीक्षेत्री देह ठेवावा, या उद्देशाने तिकडे जाण्याची ते तयारी करू लागले; पण सगळ्या ग्राम- स्थांनी त्यांना आपला देश न सोडण्याची गळ घातली. म्हणून ते चिदंबरम् या ठिकाणी राहायला गेले. त्यांच्याजवळ स्फटिकाची पाच शिवलिंगे होती. त्यांतली दोन त्यांनी ब्राह्मणांस दान दिली. एक मुलाला व एक पुतण्याला दिले व पाचव्याची चिदंबरम् येथे स्वहस्ते स्थापना केली.

दार्शनिक दृष्टीने अप्पय्य हे निर्गुणब्रह्मवादी होते; पण त्या ब्रह्माच्या उपलब्धीसाठी साधन म्हणून त्यांनी सगुणोपासनेचा स्वीकार केला. त्यांना सर्वतंत्रस्वतंत्र म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही. प्रगाढ पांडित्य व असामान्य प्रतिभा, या लोकोत्तर गुणांनी हा महापंडित संस्कृत साहित्याच्या आकाशातला एक देदीप्यमान तारा ठरला आहे. [ हिंदुत्व ; म. ज्ञा. को.; म. च. को.]

**अप्पर** तमिळनाडमधल्या नायन्मार शैव संतांतला एक प्रमुख संत. याचा काल निश्चित नाही. कोणी त्याला तिसऱ्या- चौथ्या शतकातला मानतात; तर कोणी सातव्या शतकातला समजतात. हा दक्षिण अर्काटमधल्या तिरुवायूर या गावी वेल्लाळ या अब्राह्मण कृषक जातीत जन्मला.


अप्पर

याचे मूळचे नाव मरुलनीकियर असे होते. याला तिलकवडियार नावाची मोठी वहीण होती. तिचे एका सुभेदाराबरोबर लग्न ठरले होते; पण तो सुभेदार लग्नाआधीच एका युद्धात मरण पावल्यामुळे ती विरक्त बनली. अशात तिचे आई- वडीलही निवर्तले. त्या आघाताने तिची जीवनावरची आस्थाच संपली आणि ती अग्निप्रवेशाला उद्युक्त झाली. पण मरुलनीकियरने तिला प्राणत्याग न करण्याची गळ घातल्यामुळे तिला त्या निश्चया- पासून परावृत्त व्हावे लागले. पुढे ती शिवाराधनेत आपला काळ कंठीत राहिली.

हळूहळू मरुलनीकियर मोठा झाला. अध्ययन करून तो महा- पंडित आणि मोठा वादविवादपटू बनला. पुढे त्याला अध्यात्माची गोडी लागली. त्या काळी दक्षिणेत जैन धर्माची चलती होती. अशा स्थितीत कोणीतरी जैन साधू त्याला भेटला आणि त्याच्या प्रभावात सापडून मरुलनीकियरने जैन धर्माची दीक्षा घेतली. आख्यायिका अशी, की त्याने पाटलीपुत्रात जाऊन जैन धर्म स्वीकारला व तो तिथेच जैनांचा आचार्य बनला. अनेक अन्यधर्मी पंडितांना त्याने वादांत पराभूत केले. हे त्याचे सामर्थ्य जाणून अनेक जैन श्रमणांनी त्याला आपला गुरू केले.

आपला भाऊ जैन बनल्याचे ऐकून तिलकवडियारला दुःख झाले. ती आपला गाव सोडून तिरुअधिकै या शिवक्षेत्रात जाऊन राहिली. आपल्या मोठेपणाच्या धुंदीत मरुलनीकियरला तिचे स्मरणही राहिले नाही. पुढे एके दिवशी त्याला पोटशूळ उठला आणि त्यात तो मरणोन्मुख अवस्थेला पोचला. त्या वेळी मात्र त्याला बहिणीचे स्मरण झाले व त्याने तिला बोलावणे धाडले; पण तिचा प्रतिनिरोप आला, की 'मी जैनांच्या मठ-मंदिरांत पाऊलही ठेवणार नाही.' त्यामुळे शेवटी त्यालाच उठून बहिणीकडे यावे लागले. बहिणीचे पाय धरल्यावर तिने भावाला शिवाची विभूती दिली व तिच्या सेवनाने त्याचा पोटशूळ गेला. या रोकड्या प्रचीतीने त्याची शिवावर श्रद्धा जडली व त्याने जैन धर्म सोडून शैव धर्म अंगीकारला.

या घटनेने जैन साधू त्याच्यावर क्षोभले आणि त्यांनी महेंद्र- वर्मा या पल्लव राजाकडे त्याच्याविषयी नाना प्रकारच्या चुगल्या केल्या; पण मरुलनीकियर आपल्या भक्तिसाधनेत मस्त होता. राजाने त्याला पकडून आणण्यासाठी शिपाई पाठविले, तर तो त्यांना एका पद्यातच बोलला—

> नाम आर्क्कुम् कुडि अल्लोम् नामार्क्कुम् कुडि अल्लोम्
> नमनै अञ्जोम् नरकातिल् इडर्प्पडोम्
> नडलै इल्लोम् एमाप्पोम्
> पिणि अरियोम् पणिवोम् अल्लोम्
> इन्बे एन्नाळुम् तुन्बम् इल्लै
> तमार्क्कुम् कुडि अल्लात् तन्मेयान
> शंकरन् नरचङ्गवेण् कुल्लै और काविल्
> कोमार्के नाम एन्रूप मीळा आलयफ्
> कोयम् मळर्च् चेवडियिणैये कुरुहि नोवे

अर्थ – आमच्यावर कोण्याही राजाची सत्ता नाही. आम्हांला जुलमी राजाचेच काय, पण नरकाचेही भय वाटत नाही. आमचा कधी थरकाप होत नाही. आम्हांला दुःख ठाऊक नाही. आम्ही सदा सुखी. आपदा-विपदा आमच्यासमोर उभ्या राहू शकत नाहीत. आमच्या जीवनाला दुःखाची छाया नाही; कारण आम्ही राजाधिराज शंकराचे दास आहो. त्याच्यावर आमची पूर्ण निष्ठा आहे आणि आम्ही स्वतःला त्याच्या चरणावर वाहिले आहे.

तो पल्लव राजा जैन होता. जैन धर्माचा त्याग केल्याबद्दल

मरुलनीकियरचा त्याने अनन्वित छळ केला; पण मरुलनीकियरने आपली शिवनिष्ठा सोडली नाही. शेवटी राजाच त्याला शरण गेला आणि त्यानेही जैनधर्म टाकून शिवदीक्षा घेतली. त्यानंतर मरुलनीकियरने चिदंबरम, शियाली, वेदारण्यम, इ. अनेक शैव-क्षेत्रांच्या यात्रा केल्या. त्या संचारात त्याची आणि संबंधरची गाठ पडली. संबंधरने त्याची योग्यता ओळखून त्याला अप्पर (पिता) अशी पदवी दिली. पुढे याच नावाने तो प्रसिद्ध झाला.

अप्परसंबंधी बऱ्याच आख्यायिका दक्षिणेत प्रचलित आहेत. देवालयाच्या आवारातले गवत काढण्यासाठी हा सदैव आपल्या खांद्यावर खोरे वागवीत असे, असे सांगतात. तमिळनाडमधल्या त्याच्या मूर्तीत हे खोरे दाखविलेले असते.

अप्परच्या ठिकाणी अद्भुत कार्यशक्ती होती. त्याने अत्यंत कष्ट सोसून दक्षिणेत शैव धर्म वाढविला. शिवाचे गुणानुवाद करणारी याची सुमारे दोनशे पदे तेवारम्‌मध्ये संग्रहीत आहेत. तिरुनावुक्करशू असे याचे आणखी एक नाव होते. त्याचा अर्थ पवित्र वाणीचा राजा किंवा वाक्शक्तिप्रवर असा आहे. खरोखर त्याच्या वाणीत अपूर्व सामर्थ्य होते. त्याच्या कवितेत अनेक ठिकाणीं शिवनृत्याचे वर्णन आढळते. हा गूढवादी कवी होता. त्याने आपल्या शेतकीपेशाचेही काव्यमय चित्रण केले आहे. त्याने जणू शैव धर्माचे रहस्यच आपल्या कवितेच्या द्वारे लोकांच्या श्रवणसंपुटात ओतले. पाहा–तेवारम; नायन्मार. [ त. सा. सं. ]

**अप्पुडी अडिगळ** त्रेसष्ट शैव संतांपैकी एक. हा परम गुरुभक्त होता. याने आपली सर्व धनसंपदा गुरूला समर्पिली होती. एकदा गुरू त्याच्या घरी भोजनास आला असता, याने आपल्या मुलाला केळीची पाने आणायला धाडले, त्या कामी त्याला सर्पदंश होऊन मृत्यू आला. पण गुरूने त्याला पुनश्च जिवंत करून याच्यावरचे अरिष्ट दूर केले. [ पे. पु. ]

**अप्रकाश्य** पुढील नऊ गोष्टी गुप्त ठेवाव्या, असा शिष्ट लोकांनी संकेत घालून दिला आहे –

जन्मर्क्षं मैथुनं मन्त्रो गृहच्छिद्रं च वञ्चनम् ।
आयुर्धनापमानं स्त्री न प्रकाश्यानि सर्वथा ।।

अर्थ–जन्मनक्षत्र, मैथुन, मंत्र, गृहच्छिद्र, फसवणूक, वय, धन, अपमान व स्त्री या गोष्टी कधीही प्रगट करू नयेत.

**अप्रतिचक्रा** एक जैन विद्यादेवी. दिगंबर जैन हिला जंबुनदा असेही म्हणतात. ही मयूरवाहना व माला धारण करणारी आहे. श्वेतांबरांच्या मते ती गरुडवाहना, चतुर्भुज व हातीं चक्रे धारण करणारी आहे. [ जै. इ.; दे. को. ३ ]

**अप्रतिरथ ऐंद्र** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे तीन क्रमांकाचे सूक्त याने रचले आहे. प्राधान्याने इंद्रस्तुती हा या सूक्ताचा विषय होय. याची एक ऋचा अशी–

उद्धर्षय मघवन्नायुधान्युत सत्वनां मामकानां मनांसि ।
उद्वृत्रहन् वाजिनां वाजिनान्युद्रथानां जयतां यन्तु घोषाः ॥
(ऋ. १०.१०३.१०)

अर्थ– भक्तांची आयुधे आणि मने युद्धोत्सुक बनविणाऱ्या हे वृत्रहंत्या इंद्रा, आमचे अश्व आणि रथ वेगसंपन्न आणि जयघोषकारी बनोत.

या सूक्ताला धर्मशास्त्रीय महत्त्वही आहे. युद्धासाठी सिद्ध असलेल्या राजाला उत्साह प्राप्त व्हावा म्हणून या सूक्ताचे पठण करतात (आश्व. गृ. ३.१२.१३). याशिवाय दुष्टग्रहपरिहारासाठी शांतिसूक्त म्हणूनही याचा पाठ करण्याची पद्धत आहे.

या सूक्तात अप्वा नावाच्या पापाभिमानी देवतेचा उल्लेख आढळतो (१०.१०३.१२).

वैदिक आर्यांच्या युयुत्सू वृत्तीचे प्रतिबिंब या सूक्तात उत्तम रीतीने पडलेले आहे. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा. ]

**अप्रतिष्ठ** पृथ्वीच्या खालील चौथा नरक. या नरकातल्या प्राण्याला स्थिती नसते. त्याला सदैव भ्रमण करीत राहावे लागते (ब्रह्मांड पु. ४.२.१५०, १८४).

**अप्सरा** अतिमानवी योनीतली स्त्री. सर्व अप्सरा अत्यंत सुंदर असतात; त्या नृत्यप्रिय व स्वरासक्त असतात; स्वर्गातल्या इंद्रसभेत नृत्यगायन करून देवांचे मनोरंजन करतात आणि त्यांना शृंगारसुख देतात, अशी कल्पना सर्वत्र प्रचलित आहे. पुण्यवान लोकांनाही अप्सरांचा उपभोग घेता येतो, अशी समजूत आहे.

अप्+सरस् = जलात क्रीडा करणाऱ्या स्त्रिया, अशी या शब्दाची व्युत्पत्ती सायणाचार्यांनी दिली आहे. वेदांत अप्सरांचा उल्लेख अगदी त्रोटक आहे. ऋग्वेदात (७.३३.१२) वसिष्ठांचा जन्म अप्सरेपासून झाला, असे सांगितले आहे. अप्सरा ही गंधर्वांची पत्नी होय, असेही म्हटले आहे. मात्र ऋग्वेदात उर्वशी या एकाच अप्सरेचा निर्देश आढळतो. पुरुरवा–उर्वशी यांच्या कथेची बीजे ऋग्वेदात सापडतात.

अथर्ववेदात अप्सरांविषयी अधिक माहिती मिळते. त्या जलात निवास करतात; त्या गंधर्वांच्या पत्नी आहेत; मेघ, विद्युत व तारे यांच्याशी त्यांचा संबंध असतो; न्यग्रोध, अश्वत्थ, प्लक्ष व औदुंबर या वृक्षांवर अप्सरा व गंधर्व यांचा निवास

असतो. अप्सरा द्यूतप्रिय आहेत; त्यांच्या कृपेमुळेच द्यूतात भाग्य उजळते; त्यांच्या अंगी मानवाला वेड लावण्याचे सामर्थ्य आहे व त्यांच्यावर मंत्रप्रयोग करता येतात.

शतपथ ब्राह्मणात मेनकेचा व शकुंतलेचा उल्लेख आढळतो. उपनिषदे, ब्राह्मणे व गृह्यसूत्रे या ग्रंथांत अप्सरांविषयी जे उल्लेख आले आहेत, त्यावरून असे दिसते, की त्या काळी अप्सरा व गंधर्व यांना पुष्कळ मानाचे स्थान मिळाले होते. विवाह-विधीत अप्सरांची उप-स्थिती शुभकारक मानली जात होती. अप्सरांच्या कृपेने संततीची प्राप्ती होते, अशी श्रद्धा होती. अप्सरांना सूक्ष्म बुद्धी लाभलेली होती आणि त्यांची शरीरे सुगंधी असत, म्हणून स्नातक त्यांची प्रार्थना करीत. वैदिक वाङ्मयात अप्स-रांना नृत्यांगना व भोगदासी मानलेले नसून, समाजात त्यांचा सन्मान केला जात असल्याचे म्हटले आहे. यज्ञयाग करणारे ऋषी आपले कार्य अप्सरांना पसंत पडावे म्हणून प्रयत्नशील असत. काही अप्सरा विदुषी होत्या. ऋग्वेदाच्या १० व्या मंडलात उर्वशीचा उल्लेख ब्रह्मवादिनी असा केलेला आहे.



अप्सरा

घृताची, मेनका, रम्भा, ऊर्वशी, तिलोत्तमा, सुकेशी व मञ्जुघोषा ही प्रसिद्ध अप्सरांची नावे आहेत. वायुपुराणात अप्सरांची संख्या चौतीस सांगितली आहे (६.४). महाभारतात अप्सरांचा उल्लेख बऱ्याच ठिकाणीं आढळतो. कश्यपापासून प्राधेला रंभादी अप्सरा झाल्या, असे संभव पर्वात सांगितले आहे. या सूर्याच्या समोर नृत्य करतात व द्वादशादित्यांबरोबर आळी-पाळीने चालतात (भाग पु. १२.११.४७). समुद्रमंथनातून यांची उत्पत्ती झाली, असे भागवतात सांगितले आहे (८.८.७). अप्सरा मेरुपर्वतावर राहत असून, कामदेव हा त्यांचा अधिपती आहे (ब्रह्मांड पु. २. १५. ४९).

एखाद्या पुरुषाचे तप उग्र झाले आणि त्याच्यापासून आपल्या इंद्रपदाला धोका आहे असे वाटले तर इंद्र त्या पुरुषाचा तपोभंग करण्यासाठी अप्सरांना पाठवीत असे. अप्सरांचे चौदा गण असून, त्यांत दैविक व लौकिक असे दोन भेद आहेत. त्यांपैकी काही अप्सरा ब्रह्मा व मनू यांच्या मानसकन्या असून, कित्येक देवांच्या व ऋषींच्या स्त्रिया व माता आहेत.

अप्सरा पृथ्वीवर येऊन मानवावरही प्रेम करतात. पुरुरवा–उर्वशी यांची प्रेमकथा प्रसिद्ध आहे. काही अप्सरा जलांच्या स्वामिनी असतात. त्या तलावात पक्षिरूपाने विहार करतात (श. ब्रा. ११. ५. १. ४). अरण्यांतले जलाशय, नद्या, समुद्र ही आणखी त्यांची निवासस्थाने होत. जलाव्यतिरिक्त वृक्षांशीही त्यांचा संबंध आहे. त्या वड व पिंपळ यांवर झोपाळे बांधून झोके घेतात व कर्करी नावाचे मधुर वाद्य वाजवितात (अथर्व. ४. ३७.४). महाराष्ट्रात ज्यांचा आसऱ्या म्हणून उल्लेख येतो, त्या अप्सराच होत. यांना नवसाचे पाळणे वाहण्याची पद्धत आहे पुराणांत अप्सरांच्या व त्यांच्या शृंगारविलासांच्या अनेक कथा आढळतात. पाहा– क्षुद्र देवता. [ म. ज्ञा. को.–वेदविद्या; सु. वि. को.; पु. इं.; गं. अ. य. कि.]

**अफगाण टोळ्या** अनेक सजातीय गटांच्या या टोळ्या बन-लेल्या असतात. पण त्यांच्या सामाजिक चौकटीत परकी गटांचा अंतर्भाव करण्याची तरतूद असते. अफगाण लोक भटके असल्यामुळे पुष्कळदा त्यांच्या टोळ्यांत फुटीर-पणा निर्माण होतो. काही लोक सामायिक जमीन व पाणी यांचा त्याग करून मूळ टोळीपासून दूर जातात. हा फुटीरपणा कधी तात्पुरता, तर कधी कायमचा असतो. भारतात आढळणारे अफगाण हे बहुसंख्य घिलझाई आहेत. अस्सल अफगाणांशी त्यांचा वांशिक दृष्ट्या कोणताही संबंध नाही. हे लोक उंचेपुरे व शरीराने दणकट असतात. हिंदूंशी ते वाकड्या वृत्तीने वागतात. ते फक्त शिखांची तेवढी कदर करतात. कारण ते त्यांचे एका-काळी राष्ट्रीय शत्रू होते. [ रे. क. इं.]

**अॅबट** (इ. स. १८५३–१९३२) मराठी संतवाङ्मयाचा अभ्यासक असलेला एक अमेरिकन मिशनरी. याचे संपूर्ण नाव जस्टिन एड्‌वर्ड्स अॅबट असे होते. त्याचा जन्म अमे-रिकेतील न्यू हॅंपशायर परगण्यातील पोर्टस्मथ या गावी एका श्रीमंत कुळात झाला. वयाच्या चौथ्या वर्षी तो आपल्या आई-बापांबरोबर महाराष्ट्रातील राहुरी येथे आला आणि अमेरिकन मराठी मिशनच्या द्वारे त्याने चाळीस वर्षे ख्रिस्ती धर्माच्या सेवेत घालवली. त्यांपैकी पंचवीस वर्षे त्याने ज्ञानोदय या ख्रिस्ती धर्म-प्रसारक इंग्रजी-मराठी साप्ताहिकाच्या इंग्रजी विभागाचे संपादन केले. त्यानंतर तो अमेरिकेत परत गेला आणि मराठी संत-वाङ्मयाचा अभ्यास करू लागला. इ. स. १९२० मध्ये तो पुन्हा सपत्नीक हिंदुस्थानात आला आणि त्याने महाराष्ट्रातील संतांच्या

पवित्र स्थळांना भेट दिली. त्याच सुमारास भारत इतिहास संशोधक मंडळातील मराठी संतांची हस्तलिखिते त्याने पाहिली. त्यानंतर त्याने युरोपातील अनेक विद्यापीठांच्या आणि इतर संग्रहांतून मराठी संतवाङ्मयाचा तपास केला. डच भाषेतील डच ईस्ट इंडिया कंपनीच्या पत्रव्यवहारसंग्रहात शिवाजीमहाराजांविषयी त्याला बरीच माहिती आढळली व तसे त्याने भारत इतिहास संशोधक मंडळाला कळवले. त्याचा शिवाजीमहाराजांच्या नाण्यांविषयीचा एक निबंध एशियाटिक सोसायटीने प्रसिद्ध केला होता. मराठी संतांचे वाङ्मय इंग्रजी भाषेत प्रसिद्ध करण्यासाठी त्याने पोएट सेण्टस् ऑफ महाराष्ट्र या नावाची ग्रंथमाला सुरू केली. तिच्यात भानुदास, एकनाथ, भिक्षुगीत, दासो दिगंबर, बहिणाबाई, स्तोत्रमाला, तुकाराम, रामदास, भक्तविजय – खंड एक व दोन, भक्तलीलामृत व ज्ञानेश्वर एवढी पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. त्याच्या लेखनात भक्तीप्रमाणेच विद्वत्ता व चिकित्सक बुद्धीही दिसून येते.

महाराष्ट्रावर त्याचे फार प्रेम होते. त्याने भारत इतिहास संशोधक, मंडळ, गोखले हॉल ग्रंथालय, सेवासदन, इ. संस्थांना देणग्या दिल्या. मरणोत्तर आपल्यावर अग्निसंस्कार करावा, असे त्याने लिहून ठेवले होते. [ अ. च. को.; गंगाजळी ]

**अबदल लोक** ही जमात पंजाबातील कांगडा, होशियारपूर या जिल्ह्यांत, तसेच बिलासपूर, चंबा, मंडी, या ठिकाणी आढळते. गाणी गाऊन भिक्षा मागणे, हा यांचा धंदा आहे. राजपुतांच्या लग्नांत व अंत्यविधीच्या प्रसंगी हे गाणी गाण्याचे काम करतात. याच नावाचे मुसलमान फकीरही आहेत. पण त्यांचा व यांचा काही संबंध नाही. [सु. वि. को.]

**अबदागिरी** कमळासारखे कापडी मोठे वर्तुळ, त्याला झालर, वर चांदीचा कळस आणि खाली लांब रंगीत दांडा, अशी अबदागिरी असते. हे पौर्वात्य देशातले वैभवाचे व राजसत्तेचे प्रतीक आहे. इजिप्तमधील चित्रांतही अबदागिरी दिसतात. भारतात देवांच्या मूर्तींवर, राजेरजवाडे यांच्या मस्तकांवर आणि लग्नकार्याच्या मिरवणुकीत अबदागिरी धरतात. पेशवाईत पराक्रम गाजविणाऱ्या पुरुषाला अबदागिरी वापरण्याचा अधिकार मिळे व त्यासाठी सरकारातून एका माणसाचा पगार व अबदागिरीचे सामानही दिले जाई. [ सु. वि. को. ]

**अबदाली** एक मुसलमान जात. यांची वस्ती गुजरातमध्ये आहे. हे भिक्षेकरी आहेत. जादूगार जेव्हा जादूचे प्रयोग करतो, तेव्हा हे गाणी म्हणतात. मुसलमानांच्या घरांतून यांना वार्षिक संभावना म्हणून काही द्रव्य मिळते. [ मुं. इ. जा. ]

**अबदुल हक्क** (इ. स. १५५१–१६४२) एक उर्दू ग्रंथकार. सादुल्ला तुर्क नावाचा तैमूरलंगाचा एक अनुयायी दिल्लीला राहिला होता, त्याचा हा वंशज होय. इ. स. १५९६ साली याने तारीख–इ–हक्क किंवा तारीख–इ–अबदुल-हक्की हा ग्रंथ लिहिला. धर्म व इतिहास या विषयांवर याने शंभरांवर ग्रंथ लिहिले आहेत. उतारवयातही याची प्रतिभा जागृत होती. उत्तर प्रदेशात याची गणना साधुपुरुषांत होते. दिल्लीला याची कबर आहे. [ सु. वि. को. ]

**अबुल फज़ल** (इ. स. १५५१–१६०२) नागोर येथील शेख मुबारकचा पुत्र व अकबराच्या दरबारातला इतिहासलेखक आणि विद्वान. याचे शिक्षण बापाच्या देखरेखीखाली झाले. शेख मुबारक हा धर्माच्या बाबतीत उदारमतवादी होता. त्यामुळे त्याला कट्टर मुल्ला व उलेमा यांच्याकडून खूप छळ सोसावा लागला. अबुल फज़लही त्या छळातून सुटला नाही. वयाच्या १५ व्या वर्षीच फज़लने आपले परंपरागत अध्ययन पूर्ण केले. त्याचा वडील भाऊ फैजी. तोही गाढा विद्वान होता. त्याने फज़लला अकबराकडे आणले.

उलेमांचा धार्मिक कडवेपणा व शिरजोरी कमी व्हावी, या हेतूने अकबराने एक नवा मनसुबा रचला होता. दर गुरुवारी सर्व धर्मांच्या पंडितांना एकत्र बोलावून तो धार्मिक विषयांवर त्यांच्यांत वादविवाद घडवून आणी. त्या पंडितसभेत फज़लने अनेकदा आपली बौद्धिक चमक दाखविली व त्यामुळे तो अकबराला प्रिय झाला. त्या पंडितसभेचे संचालन तोच करी व अकबर शेवटी स्वतःचा निर्णय देई. या वादविवादात अखेर उलेमांचा पाडाव झाला व कुराणाला अनुसरून इस्लामी धर्मात परिवर्तन करण्याचा अकबराचा हेतू व अधिकार उलेमांना मान्य करावा लागला. पुढे अबुल फज़लशी विचारविनिमय करून अकबराने दीने इलाही नावाचा नवा धर्मपंथ स्थापन केला. अकबराने अबुल फज़लला आपला मंत्री म्हणून नेमून घेतले होते. अकबराचा राजनैतिक पत्रव्यवहार तोच करीत असे. इ. स. १५९९ साली दक्षिण भारताचा शासक म्हणून त्याची नियुक्ती झाली होती. या सर्व गोष्टी कट्टर मुसलमानांस आवडल्या नाहीत. ते फज़लला सतत पाण्यात पाहू लागले. शहाजादा सेलीम हाही फज़लच्या वाइटावर टपून होता. त्याने अकबराकडे फज़लबद्दल खूप चुगल्या केल्या, पण अकबराने त्याचे काही मानले नाही. त्यामुळे सेलीमने अकबराशी विद्रोह मांडला. त्याने ओरछाचा राजा वीरसिंह बुंदेला याला फूस दिली व फज़ल दक्षिणेतून माघाऱ्याला परत

मेत असता वाटेत त्याची हत्या करविली. फजलच्या निर्घृण हत्येमुळे अकबराला फार दुःख झाले.

अबुल फजलने पुष्कळ ग्रंथ लिहिले असून, त्या सर्वांत अकबरनामा हा त्याचा प्रमुख ग्रंथ होय. याचे तीन विभाग असून, त्यांत अकबराच्या राज्यकारभाराचा विस्तृत इतिहास आहे. ऐने अकबरी या त्याच्या दुसऱ्या ग्रंथात तत्कालीन भारताच्या सामाजिक व धार्मिक जीवनाविषयी बरीच माहिती मिळते. या ग्रंथाचे भाषांतर गैरट व ब्लाकमन या पाश्चात्त्य विद्वानांनी केले असून, फजलच्या विद्वत्तेची प्रशंसाही केली आहे. याशिवाय त्याने कुराणावर टीका लिहिली आहे. तो शांतिप्रिय होता व त्याची धार्मिक मते उदार होती. अकबराला त्याच्या साम्राज्य शासनात अबुल फजलची फार मदत झाली. मुस्लीम समाजावरचे उलेमांचे वर्चस्व नष्ट करण्याच्या कामी त्याने अकबराला मनोभावे साह्य केले. [ सु. वि. को; हिं. वि. को. ]

**अबुल फैज़-फैज़ी** (इ. स. १५४७–१५९६) अकबराच्या दरबारातला राजकवी. हा नागोरच्या शेख मुबारकचा मुलगा व अबुल फजलचा वडील भाऊ होय. याच्या बापावर अकबराच्या दरबारातल्या उलेमांनी नसती बालंटे आणल्यामुळे तो आपल्या मुलांना आग्र्यास ठेवून परागंदा झाला होता.

अबुल फैजी लहानपणापासूनच काव्य करू लागला. थोड्याच काळात त्याची ही कवित्वकीर्ती अकबराच्या कानी आली आणि त्याची काव्येही त्याला वाचायला मिळाली. त्यामुळे अकबर संतोष पावला व त्याने फैज़ीला आपल्या दरबारात बोलावून आणून त्याचा सन्मान केला. प्रथम त्याने शहाजादा मुराद याला शिकविण्याचे काम फैजीकडे दिले व पुढे आग्र्याचा सदर म्हणून त्याची नेमणूक केली. कविराज अशा अर्थाचा मलिक-उश-शुअरा असा त्याला किताबही दिला. फैज़ी हा कवी होता, तसाच इतिहास, तत्त्वज्ञान, वैद्यक व गणित या विषयांतला पंडितही होता. बादशहाच्या आज्ञेवरून त्याने नल-दमयंती आख्यानावर फारसीत महाकाव्य रचले आहे.

नल-दमयंतीची कथा त्याला फारच आवडली होती. तो आपल्या महाकाव्यात म्हणतो –

सद शुक्र के ई निगार खाना
बजिरफ्त निगारे जाविदाना

अर्थ – धन्य आहे ! जगाच्या चित्रशाळेला या अमर चित्राचा – नल-दमयंती काव्याचा – लाभ झाला.

या महाकाव्यात त्याने मूळ कथानकात थोडा फरक केला आहे. त्याने नलाला निषधाचा नव्हे, तर उज्जयिनीचा राजा बनविले आहे. जाळे पसरून दमयंतीने हंसांना पकडले, असे तो सांगतो. कलीने नलशरीरात प्रवेश केल्याची गोष्ट फैजीने वगळली आहे. प्रस्तुत महाकाव्यात भारतीय वातावरण सुरेखपणे उतरले आहे. तो म्हणतो –

ई रिश्ता बसरहे हिन्द बस्तन्द
ब ई सब्जा बखाके हिन्द किश्तन्द

अर्थ – ही प्रेमाची गाठ केवळ हिंदुस्थानातच बांधली जाते व हे पीक हिंदुस्थानातच उगवते.

दमयंतीच्या सौंदर्याचे वर्णन करताना तो म्हणतो, की बाग इतकी सुंदर दिसते, त्याचे कारण तिने दमयंतीच्या सौंदर्याचा काही भाग चोरला आहे. तिथे कूजन करणाऱ्या पक्ष्यांना तो वेदपठण करणाऱ्या ब्राह्मणांची उपमा देतो. शेवटी दमयंतीला नलाची ओळख पटल्यानंतर ती जेव्हा परस्परांना आलिंगन देतात, तेव्हा तो त्यांना एकमेकांची चुंबने घेणाऱ्या दोन कळ्यांची व एकमेकांना विलगलेल्या एकाच झाडाच्या दोन फांद्यांची उपमा देतो.

आपण एक भारतीय कथा सांगत आहो, याचा फैज़ीला वाटत असलेला अभिमान त्याच्या काव्यात जागजागी दिसतो. तो म्हणतो –

अर्जी सन्दल ना बसूदाह बर सग
पेशानीये सुबहरा बहब रंग

अर्थ – नल-दमयन्ती आख्यानाच्या चंदनाचे गंध उगाळून मी प्रभातकालाच्या कपाळावर टिळा लावीत आहे.

फारसी साहित्यात फैज़ीचे हे महाकाव्य अपूर्व गणले गेले आहे.

अकबराने नेमलेल्या ग्रंथसंपादक मंडळाचा फैज़ी हा अध्यक्ष होता. महाभारताच्या फारसी अनुवादाचे काम याच्याकडूनच झाले आहे. हिंदू वाङ्मयाचा व दर्शनांचा काळजीपूर्वक अभ्यास करणारा पहिला मुसलमान हाच होय. भास्कराचार्यांच्या बीजगणित व लीलावती या ग्रंथांचीही त्याने फारसीत भाषांतरे केली. त्याने कुराणावरही विस्तृत टीका लिहिली आहे. बदायूनी व बख्तावरखाँ यांच्या मते फैज़ीने १०१ ग्रंथ लिहिले. त्याची सगळी कविता पन्नास हजार भरेल असे म्हणतात; पण त्याचे कित्येक ग्रंथ उपलब्धच होत नाहीत.

अकबराने आपल्या दरबारचा वकील म्हणून एकदा त्याची दक्षिणेत बुऱ्हानपूर येथे नेमणूक केली होती. दक्षिणेतील निरनिराळ्या राज्यांना भेटी देऊन तिकडच्या राजकारणाची इत्थंभूत माहिती त्याने अकबराला दिली. तो आगरा येथे मृत्यू पावला. त्याच्या मृत्यूचे अकबराला फार दुःख झाले. फैज़ीजवळ फार मोठा ग्रंथसंग्रह होता. त्यात दर्शन, संगीत, ज्योतिष, गणित, वैद्यक, इतिहास, धर्म, इ. अनेक विषयांवरचे लिखित ग्रंथ होते. [ मु. रि.; हिं. वि. को.; मणिकांचन ]

**अबू पर्वत** राजस्थानातील सिरोही जिल्ह्यात, गुजरातच्या सीमेजवळ असलेला एक पर्वत. अहमदाबाद-दिल्ली लोहमार्गावरील अबूरोड या स्थानकापासून ४–५ मैलांवर या पर्वताचा पायथा लागतो. तिथे हृषिकेशाचे मंदिर आहे. त्या स्थानाला द्वारकेचे द्वार म्हणतात; कारण श्रीकृष्ण मथुरेहून द्वारकेला जाताना या जागी थांबला होता, अशी आख्यायिका आहे. या स्थानाच्या आसपास प्राचीन चंद्रावती नगरीचे भग्नावशेष विखुरलेले आहेत. तिथपासून १०–१२ मैलांचा घाटमार्ग चढून गेल्यानंतर एक विस्तीर्ण पठार लागते. त्याची लांबी १४ मैल व रुंदी २ ते ४ मैल आहे. त्या पठारावर अबू नावाचे गाव आहे. हे गाव अबूरोड स्थानकाच्या वायव्येस १७–१८ मैलांवर, डोंगरकुशीत वसलेले आहे. या पठाराची उंची समुद्रसपाटीपासून ४००० फूट आहे. हा पर्वत अरवली पर्वताचा एक भाग मानला जातो. पण अरवली व अबू या पर्वतांच्या मध्ये १५ मैल रुंदीचा सपाट प्रदेश आहे.

या पर्वताचे पुराणातले नाव अर्बुदाचल असे आहे. महाभारताच्या वनपर्वात याला हिमालयाचा पुत्र मानले आहे. स्कंद पुराणातील प्रभास खंडात या स्थानासंबंधी एक कथा सांगितलेली आहे, ती अशी–

प्राचीन काळी या पर्वताच्या जागी सपाट भूमी होती व तीत एक खूप खोल विवर होते. तिथून जवळच वसिष्ठ ऋषींचा आश्रम होता. त्यांची कामधेनू नंदिनी एकदा त्या खड्डयात पडली. तेव्हा वसिष्ठ ऋषींनी सरस्वती नदीची प्रार्थना केली. मग तिने आपले पाणी त्या खड्डयात सोडले. त्यामुळे खड्डा भरत गेला व नंदिनी वर आली. त्यानंतर तो धोकादायक खड्डा कायमचा बुजवून टाकावा अशी विनंती वसिष्ठांनी महादेवाला केली. महादेवाने हिमालयाला तशी आज्ञा केली. हिमालयाने आपला पुत्र नंदिवर्धन याला ते काम करण्याचा आदेश दिला. पण तो होता पांगळा. अर्बुद नावाचा नागराज त्याचा मित्र होता. त्याच्यावर आरूढ होऊन नंदिवर्धन तिथे गेला आणि त्या दोघांनी तो खड्डा बुजवला. त्यानंतर नंदिवर्धन तिथेच स्थायिक झाला. या कामी अर्बुदाने मोठे सहकार्य केल्यामुळे वसिष्ठ ऋषी प्रसन्न झाले व त्यांनी त्याला अर्बुदाचल हे नाव दिले.

गौतम ऋषींचा आश्रमही या पर्वतावर होता, असे म्हणतात.

अबू गावाजवळ नखी तलाव आहे. तो देवांनी आपल्या नखांनी खोदला, अशी दंतकथा सांगितली जाते. त्याच्या एका काठावर एक खडक असा उभा आहे, की भला मोठा बेडूकच पाण्यात उडी घेत आहे, असे वाटते. दुसऱ्या बाजूला स्वामी रामानंदांनी स्थापन केलेले रघुनाथाचे मंदिर आहे.

तिथून जवळच एका पहाडात अर्बुदा देवीचे गुहामंदिर आहे. ही देवी या पर्वताची स्थलदेवता मानली जाते. तिचे दर्शन घेण्यासाठी चारशे पायऱ्या चढून जावे लागते. आणि मंदिराचे प्रवेशद्वार इतके लहान आहे, की अगदी वाकूनच आत जाता येते.

ज्यांच्या वास्तव्यामुळे अबू पर्वताला माहात्म्य प्राप्त झाले, त्या वसिष्ठांचा आश्रम एका डोंगराच्या घळीत आहे. तिथे पोचायला ७०० पायऱ्या उतरून जावे लागते. प्रथम एक तळे दिसते. गोमुखातून निर्मळ जलधारा त्यात सतत पडत असते. एका दगडी तटाच्या आत वसिष्ठांचे मंदिर असून, त्यात वसिष्ठांची ध्यानस्थ मूर्ती आहे. बाजूला राम-लक्ष्मण आहेत. तिथे अरुंधती व नंदिनी यांच्याही मूर्ती आहेत. तिथेच एक अग्निकुंड दिसते. वसिष्ठादी ऋषींनी त्या कुंडात यज्ञ करून राजपुतांची चार अग्निकुले निर्माण केली, अशी आख्यायिका आहे.

अबूपासून १–२ मैलांवर देवळवाडा नामक गाव आहे. तेच दिलवाडा या नावाने प्रसिद्ध झाले आहे. कारण तिथे पाच जैनमंदिरे आहेत. त्या मंदिरांमुळेच हे जैनांचे तीर्थक्षेत्र मानले जाते व तिथे बारा मास यात्रा असते. पाच मंदिरांपैकी दोन मंदिरे विशेष प्रख्यात आहेत. एकाचे नाव आहे विमलवसही व दुसऱ्याचे लूणवसही. गुजरातचा चौलुक्य राजा भीमदेव याचा



विमलवसहीमंदिराचे छत–अबू

मंत्री विमलशाह याने पहिले मंदिर इ. स. १०३१ साली बांधले म्हणून त्याला विमलवसही हे नाव मिळाले. ते इ. स. १०८०

मध्ये पुरे झाले. त्यासाठी सुमारे १८-१९ कोटी रुपये खर्च झाले, असे म्हणतात.

हे मंदिर पहिला तीर्थंकर ऋषभदेव याचे आहे. ऋषभदेवाची मूर्ती सुंदर व हिरेमाणकांनी सजवलेली आहे. मंदिर संपूर्ण संगमरवरी पाषाणाचे आहे. बाहेरून हे मंदिर साधे दिसत असले तरी त्याच्या आतील स्तंभ, तोरणे व छत यांवरील अलौकिक नक्षीकाम पाहून मन चकित होते.

मंदिराचे आवार १२८ फूट लांब व ७५ फूट रुंद असून, त्यात मध्यभागी गर्भगृह, गूढमंडप, नवचौकी, रंगमंडप, इ. भाग आहेत. सर्व मंदिरात एकूण एकशे एकवीस सुरेख स्तंभ आहेत. सभामंडपाच्या मध्यभागी अष्टकोनी स्तंभाच्या माथ्यावर भव्य घुमट आहे, त्याचे कोरीव काम अप्रतिम वाटते. भिंती व छत यांवर तीर्थंकरांच्या जीवनातील प्रसंग कोरलेले असून, काही जागी पौराणिक कथाप्रसंगही कोरलेले दिसतात. या मंदिरातील तोरणे विशेष सुंदर असून, स्तंभावरही सुरेख मूर्ती व नाजूक नक्षी कोरलेली आहे.

मुख्य मंदिराच्या भोवती ५२ लहान मंदिरे असून, त्यांत अन्य तीर्थंकरांच्या सुंदर प्रतिमा आढळतात. प्रांगणाच्या नैर्ऋत्येकडील कोपऱ्यात अंबिकेचे लहान मंदिर दिसते. ते तिथे पूर्वीच होते, असे म्हणतात. विमलशाहाला देवीने स्वप्नदृष्टांत दिल्यावरून विसावा तीर्थंकर मुनिसुव्रत याची भूमिगत मूर्ती सापडली, तिची स्थापना अंबिकामंदिराच्या शेजारच्या मंदिरात करण्यात आली. ती मूर्ती काळसर पाषाणाची आहे.

या मंदिराच्या प्रांगणात प्रवेश करताच प्रथम हत्तिशाळा दिसते. तीत दहा संगमरवरी हत्ती उभे असून, दारातच विमलशाहाचा अश्वारूढ पुतळा दिसतो.

लूणवसही हे दुसरे जैन मंदिर. गुजरातचा राजा वीरधवल याचे मंत्री वस्तुपाल व तेजपाल नामक बंधू होते, त्यांनी इ. स. १२३० साली बांधले. तेजपालाचा पुत्र लूणसिंह हा लहानपणीच मरण पावला. त्याच्या स्मरणार्थ हे मंदिर बांधण्यात आले आहे. हे मंदिरही संपूर्ण संगमरवरी आहे. गाभाऱ्यात बाविसावा तीर्थंकर नेमिनाथ याची काळ्या पाषाणाची रत्नजडित मूर्ती आहे. या मंदिराची रचना विमलवसही मंदिरासारखीच आहे. पण त्यातले स्तंभ अधिक भव्य असून, काही स्तंभ चितोडगडावरील कीर्तिस्तंभासारखे दिसतात. इथले कोरीव काम अत्यंत सुंदर आहे. या मंदिरात प्रगल्भ व प्रसन्न शैलीच्या स्थापत्यकलेचा विलास जागोजाग आढळतो. सभामंडपाच्या छतावर विपुल नक्षीकाम कोरलेले असून, मध्यभागी असलेला लोलक तर फारच कलापूर्ण आहे.

या मंदिराच्या प्राकारातील हत्तिशाळेतही दहा संगमरवरी हत्ती असून, त्यांच्या मागे, भिंतीजवळ वस्तुपाल, तेजपाल, त्यांच्या स्त्रिया व अन्य नातेवाईक यांच्या पूर्णाकृती प्रतिमा आहेत.



दिलवाडा मंदिरातील स्तंभ, अबू

मध्यवर्ती नेमिनाथमंदिराच्या भोवती अन्य तीर्थंकरांची लहान मंदिरे असून, प्रत्येकापुढे अप्रतिम कोरीव काम केलेले चौखांबी मंडप आहेत. प्रवेशद्वाराजवळ दोन कोनाडे असून, त्यांत शांतिनाथाच्या सुबक मूर्ती आहेत. हे कोनाडे वस्तुपाल व तेजपाल यांच्या स्त्रियांसाठी निर्माण केले गेले. त्यांना लहान सुबक स्तंभांवर मंडपी बसवलेल्या आहेत, त्यांना देराणी-जेठाणी के आलिया म्हणतात.

या मंदिरात एक शिलालेख आहे, त्यात मंदिराचा निर्माता म्हणून केवळ तेजपालाचाच उल्लेख आढळतो.

मध्ययुगीन स्थापत्यकलेच्या क्षेत्रात राजस्थानी व सोळंकी शैलींचा उत्कृष्ट विलास या दोन मंदिरांत पाहायला मिळतो. त्यांतील कोरीव नक्षीकाम व शिल्पकाम देशी आणि परदेशी कलाभिज्ञांच्या मते भारतात अद्वितीय आहे.

दिलवाडा येथील तिसरे मंदिर चौमुखिजीचे आहे. चौथे मंदिर शांतिनाथाचे व पाचवे वच्छाशहाचे. ही तीन्ही मंदिरे अगदी साधी आहेत. लूणवसही मंदिराच्या दक्षिणेला एक कीर्तिस्तंभ आहे. वस्तुपाल व तेजपाल हे बंधू जैन असले तरी त्यांनी गातेश्वर-मंदिर, ब्रह्मशाला, दानशाला, धर्मशाळा, वापी, तलाव, इ. अनेक इष्टापूर्त कर्मे केली. आणि त्यांनी एक विश्वस्त संस्था

स्थापून मंदिरांच्या व्यवस्थेसाठी बरेच द्रव्य त्या संस्थेला दिले.

दिलवाड्यापासून ३–४ मैलांवर अचलेश्वराचे मंदिर आहे. त्यात शिवलिंगाच्या जागी एका खळग्यात एक बाण आहे. तो बाण महादेवाच्या पायाच्या अंगठ्याचे प्रतीक आहे. नंदिवर्धन व अर्बुदनाग यांनी हा पर्वत उभा केला, पण तो स्थिर होईना. त्याला स्थिर करण्यासाठी महादेवाने आपल्या पायाचा अंगठा पहाडावर जोराने दाबला. पर्वत हालायचा थांबला पण अंगठा तिथे तुटून पडला. म्हणून त्याला अचलेश्वर महादेव हे नाव मिळाले. तिथे इ. स. ८१३ मध्ये मंदिर बांधले गेले. या मंदिरात पितळेचा भव्य नंदी आहे.

या मंदिराच्या जवळच एक मोठे कुंड आहे. त्याला मंदाकिनी कुंड म्हणतात आणि त्याचे पाणी गंगाजलाइतके पवित्र मानले जाते. त्या कुंडाच्या काठावर आदिपाल नामक परमार राजाची धनुर्धारी मूर्ती उभी आहे. तत्कालीन राजांची वेषभूषा कशी होती ते या मूर्तीवरून ध्यानात येते.

अचलेश्वरापासून काही अंतरावर अचलगड आहे. हा गड परमार राजांनी इ. स. ९०० च्या सुमारास बांधला असावा. मेवाडचा राणा कुंभा याने इ. स. १४३३ साली हा गड पुन्हा बांधला. त्यात जैनांची चार मंदिरे आहेत. तिथून दोन मैलांवर ओरिया नावाचे गाव आहे. तिथे कोटेश्वर महादेवाचे मंदिर आहे. तिथूनच अबूपर्वताच्या सर्वोच्च गुरुशिखरावर चढण्याचा मार्ग सुरू होतो. हे शिखर समुद्रसपाटीपासून ५६५३ फूट उंच आहे. हे दत्ताचे निवासस्थान मानले जाते. तिथे एका देवळीत दत्तात्रेय गुरूची पदचिन्हे उमटलेला पाषाण आहे.



आदिपाल परमार

या पर्वतावर एक विष्णुमंदिर व एक सूर्यमंदिरही आहे. सूर्यमंदिरात अश्वारूढ सूर्याची मूर्ती आहे. तिथे इ. स. ११४[illegible] मधले शिलालेखही आहेत.

जैनमंदिराच्या निर्मितीपूर्वी या पर्वतावर शाक्त पंथाचे एक केंद्र होते. अघोरी साधूंचा एक मोठा आखाडाही तिथे होता. [ श्री. ज. हृ. दवे–भारती, फेब्रुवारी १९५१; कल्याण – तीर्थांक; प. भा. द.; र. भा.; उ. भा. मं. ]

## अबोर

अरुणाचल (भारताचा ईशान्य प्रदेश) मधील एक जमात. अबोर हा शब्द असमिया भाषेतील असून, त्याचा अर्थ रानटी किंवा स्वतंत्र असा होतो. अबोर नामक एक पर्वतश्रेणी आसामच्या उत्तर सरहद्दीवर आहे. त्या च्यावर काही अबोर राहतात. पण दिहांग नदीच्या दोन्ही काठांवर यांची मुख्य वस्ती आहे. उजव्या काठावर पाशी व मेयांग अबोर आणि डाव्या काठावर पड्डो, सिन्वो कि[illegible] सिळूक, मेड्वो [illegible] गोलीबार अबोर रहा तात. अबोर टोळी वाले सखल प्रदेशातील मिरी टोळी वाल्यांना आपले दास समजत व मिरीही त्यांचा तो अधिकार मान्य करीत. परंतु आसाममध्ये ब्रिटिशांची सत्ता स्थापन झाल्यावर काही मिरी लोक अबोरांची सत्ता झुगारून ब्रिटिशांच्या आश्रयाला गेले. त्यामुळे अबोर व ब्रिटिश यांच्यामध्ये बेबनाव निर्माण झाला. या बेबनावात आणखीही एका गोष्टीची भर पडली.



अबोर धोबी

दिहांग नदीत सोन्याची वाळू मिळत असे. ती गाळून तिथे धोबी लोक सोन्याचा धंदा करीत. हे धोबीही अबोरांच्या सत्तेखाली होते. ब्रिटिशांनी त्या वाळूवर आपला हक्क प्रस्था[illegible]पित करताच ते साहजिकच ब्रिटिशांच्या अमलाखाली आले. त्यांनीही मग अबोरांचा संबंध तोडला. अबोरांना हे सहन [illegible] नाही. त्यांनी या अपमानाचा सूड घेण्यासाठी एका [illegible] धोब्यांच्या वस्तीवर हल्ला करून कित्येक धोब्यांना पळवून [illegible] ब्रिटिशांच्या सत्तेला ते एक उद्दाम आव्हानच होते. [illegible]

ब्रिटिश व अबोर यांच्यात वैर सुरू झाले. उभयपक्षी वारंवार चकमकी झडू लागल्या. इ. स. १९ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत ही धामधूम चालू राहिली.

**अबोरशाखा**—अबोर जमातीच्या दोन शाखा आहेत. दिहांग नदीच्या डाव्या तीरावर दिबांगपर्यंत पसरून राहणाऱ्या जमातीला बोर अबोर किंवा मोठे अबोर म्हणतात. पदम अबोर ही दुसरी शाखा होय. बोर अबोर हे पदम अबोरांपेक्षा अधिक जंगली व अधिक लढाऊ आहेत. इतरांची गुरे, ढोरे व वस्तू पळविणे, ही गोष्ट म्हणजे त्यांच्या हातचा मळ आहे. लांब भाले, लांब तलवारी व धनुष्य-बाण, ही त्यांची आयुधे असतात. ते सदैव हत्यारबंद राहतात. शत्रूच्या हल्ल्याची इशारत मिळताच ते एकजुटीने त्याला तोंड देतात.

अबोरांचे मूलस्थान आसाम व तिबेट यांच्या मध्ये आहे. ते बारा हजार फूट उंचीवर असून दाम्लोह पदम असे त्याचे नाव आहे. तिथून ते खाली उतरले. तिथे त्यांच्या शेतीला जागा कमी पडू लागली म्हणून ते दिहांग नदीच्या तीरावर येऊन वसले. इथूनच त्यांनी इतरत्र हातपाय पसरले.

हल्ली दिहांग नदी हीच त्यांची नैसर्गिक सरहद्द आहे. जो नवा प्रदेश त्यांनी व्यापला, त्यातील मूळ टोळीवाल्यांची त्यांनी कत्तल केली. मिशमी हे त्यापैकीच होत.

एखाद्या खडकाला लागून ते आपली घरे बांधतात. त्यामुळे खडक ही त्यांच्या घराची एक भिंत बनते. एका बाजूने खडक व दुसऱ्या बाजूने जमिनीत पुरलेल्या मेढी यांच्या आधारावर ते आपल्या घरात बांबूची माची बसवितात. माचीच्या खाली गुरे बांधतात आणि वर आपण राहतात. मियुन या नावाचे एक जनावर ते पाळतात.


अबोर सरदार

अबोर लोक तातॅर वंशाचे असून त्यांची शरीरे घिप्पाड व पिळदार असतात. दिसायला ते उग्र व कुरूप असतात. नेफा टेकड्यांतील बहुतेक टोळीवाल्यांप्रमाणे अबोरांना दाढी नसते. मिशा मात्र तुरळकच असतात. स्त्रिया पुरुषांप्रमाणे आपले केस कापतात. त्यांच्या केसांची रचना घेऱ्याच्या आकाराची असते. स्त्री-पुरुष दोघेही कानांना मोठी भोके पाडतात व त्यांत लाकडाचे तुकडे घालतात. स्त्रिया गळ्यात विविध काचमण्यांच्या माळा व पितळेच्या सऱ्या घालतात. त्यांच्या हातांतही पितळेच्याच बांगड्या मनगटापासून तो कोपरापर्यंत भरलेल्या असतात. त्या पायांत वेताचे वाळे घट्ट आवळून बांधतात. पुरुष उद्दाल वृक्षाच्या सालीचे वल्कल कमरेभोवती गुंडाळतात व अंगात तिबेटन लोकरीचा किंवा कातड्याचा कोट घालतात. त्यांची शिरस्त्राणे तीन प्रकारची असतात. एक वेताचे व दुसरी दोन सांबराच्या कातड्याची. त्यांना अस्वलाच्या कातड्याची किनार असते. ही शिरस्त्राणे घातली, की ते भयंकर दिसतात. यांच्या कपाळावर क्रॉस गोंदलेला असतो. या क्रॉसमुळे आयुष्यभर संरक्षण व मृत्यूनंतर स्वर्ग मिळतो, अशी त्यांची समजूत आहे. बायका कमरेभोवती एक फडके गुंडाळतात व दुसऱ्या एका फडक्याने वक्षःस्थळ झाकतात. त्यांची भाषा कर्कश असते.

अबोर हे मुख्यत्वे शेतीचा व्यवसाय करतात. सपाट प्रदेशावर ते भात, कापूस, तंबाखू, ऊस, मिरची, ही पिके काढतात. शेतकामात स्त्रिया पुरुषांना मदत करतात. शेतीशिवाय ते गुरेढोरेही बाळगतात.

**देवधर्म**—हे वनदेवतांना भजतात. मुले हरवली तर ती वनदेवतांनी नेली, असे समजतात. रोगराई देवतांच्या कोपामुळे होते, असे ते मानतात. त्यामुळे रोग्याला औषधपाणी देण्याऐवजी ते देवतेला बळी देतात. हा बळी वृद्ध किंवा अशक्त माणसाकडून देतात. प्रत्येक रोगाची एकेक देवता असते. पोम्सा, उरोम, किलूदेले, निपांग, ही त्यांची नावे होत. या सर्व देवता रिगम पर्वतावर राहतात. याशिवाय ते एक सर्वश्रेष्ठ देवही मानतात. परलोकात जम नावाचा मर्त्यांचा न्यायाधीश असतो व तो पापपुण्याचा निवाडा करतो, अशी समजूत आहे. यमाप्रमाणेच याचाही स्वभावधर्म असतो. अपोम व त्याचा भाऊ पोम्स हे रबराच्या झाडीत राहणारे देव होत. देवदार नामक शकुन सांगणारे लोक त्यांचे पौरोहित्य करतात.

**विवाहप्रथा**—लग्ने वडील माणसे जुळवीत असली तरी तरुण-तरुणींना त्या बाबतीत मोकळीक असते. एखाद्या तरुणाचे एखाद्या मुलीवर प्रेम बसते, तेव्हा तो आपली पत्नी होण्याबद्दल तिची संमती विचारतो. ती मिळाल्यास मग त्या तरुणाची वडीलधारी माणसे मुलीच्या आई-बापांकडे पुढील बोलणी करण्यासाठी जातात. जातांना ते आपल्याबरोबर थोडी दारू व चार खारी नेतात. मुलीच्या आईबापांनी संमती न दिल्यास त्यांना आणखी काही खारी देण्याचे आमिष दाखवून त्यांची

संमती मिळवितात. सर्वसाधारणपणे खारींची संख्या तीस ते चाळीस असते. काही वेळा ही संख्या दोनशे ते तीनशे पर्यंत जाते. खार हे अबोरांचे अत्यंत आवडते भक्ष्य आहे. ते खारी मारून त्या वाळवून ठेवतात. खारींची मागणी मान्य झाल्यावर त्या तरुणाचा त्या मुलीवर हक्क शाबीत होतो. मुलगी लग्न झाल्यावरही माहेरीच राहते. तिचा नवराच रात्री तिथे झोपायला येतो. दोघेही दिवसा आपापल्या बापाच्या शेतावर राबतात. त्यांना मूल होऊन ते सात वर्षांचे होईपर्यंत त्यांचा जीवनक्रम अशा प्रकारे चालतो. तोपर्यंत जावई सासऱ्याची खारींची मागणी थोडी थोडी करून पुरी करतो. त्यानंतर मग ती दोघे आपले स्वतंत्र घर थाटतात व स्वतंत्र शेती करतात. यांच्यांत क्वचित् बहुभर्तृकत्व व बहुपत्नीकत्वही आढळते.



अबोर युवती

यांच्यांत व्यभिचार फार करून होत नाही. पण झालाच, तर त्या व्यभिचाराची सर्व जबाबदारी पुरुषावर टाकली जाते. ज्या स्त्रीशी त्याचा अनैतिक संबंध असेल, तिच्या नवऱ्याला सहा ते आठ मिथुन जनावरे द्यावी लागतात. शिवाय, त्याला शारीरिक शिक्षाही होते. व्यभिचारात स्त्री अपराधी असल्याचे सिद्ध झाल्यास, तिला कडक शिक्षा करतात.

चोराला देहदंडाची शिक्षा देतात. शिवाय, चोरलेल्या मालमत्तेच्या किमतीच्या प्रमाणात त्याला दंडही भरावा लागतो. चोराने गुन्हा नाकबूल केल्यास त्याला दिव्य करावे लागते.



थडग्यावर कवटचा

अबोर टोळीवाले मागसलेले असले तरी ते पाहुण्यांचे व आल्यागेल्याचे आतिथ्य तत्परतेने करतात. आपल्या इष्टमित्रांना बोलावून मेजवान्या देण्याची त्यांची चाल आहे. मेजवानीस हुनर असणारा प्रत्येक माणूस आपल्या घरी इतरांना निमंत्रण देतो व अशा प्रकारे त्यांच्या वस्तीत सदैव मेजवान्या होत राहतात. मेजवानीसाठी कापलेल्या जनावरांच्या कवटचा ते आपल्या घरांत टांगून ठेवतात. ज्याच्या घरात अधिक कवटचा, तो अधिक श्रीमंत समजला जातो. तो मेल्यावर त्याच्या खड्ड्यावर त्या कवटचांचा ढीग रचतात.

अबोर स्त्रिया त्यांनी सोडून दिलेल्या शेतातल्या केळीवरची केळी कधीच तोडीत नाहीत. कारण त्या केळीवर नीइपांग नावाचे एक भूत राहते व ते स्त्रियांना पछाडते, तसेच मासिक रजोदर्शन, प्रसूती. इ. प्रसंगी त्यांना ते खूप त्रास देते, अशी समजूत आहे. स्त्रियांनाच नव्हे तर पुरुषांनाही ते बाधा करते. त्याला भाताचा किंवा कोंबडचांचा बळी द्यावा लागतो. पाहा – पदम अबोर.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना पुरतात. गावाच्या एखाद्या प्रवेशमार्गाजवळ स्मशान असते. मृताच्या थडग्यावर एक लहानशी झोपडी बांधतात. मृताशौच एक वर्षभर पाळतात आणि त्या अवधीत रोज थडग्यावरच्या झोपडीत विस्तव पेटवतात आणि ताजे अन्न ठेवतात. [ सु. वि. को.; इं. नॉ. फ्रां. ना. सें. ]

## अब्दपूर्ती

एक शिशुसंस्कार. याला वर्षवर्धन असेही म्हणतात. मूल एक वर्षाचे झाले म्हणजे त्याच्या जन्मनक्षत्रावर हा संस्कार करायचा असतो (गोभिल गृ. सू.). यात त्या नक्षत्राची देवता, ते नक्षत्र, व धाता यांना आज्याहुती देतात. पाहा – वर्धापन. [ हि. ध. ]

## अब्दुर् रहमान

एक अपभ्रंश कवी. संदेशरासक या काव्याचा कर्ता. याचे मूळ नाव अद्दहमाण असे होते. त्याचे परिवर्तित रूप अब्दुर् रहमान झाले असावे. हा पश्चिम भारतात राहत होता. आपण म्लेच्छ देशाचे रहिवासी, असे तो म्हणतो. हा म्लेच्छ देश मुलतान असावा; कारण त्याच्या काव्यात मुलतानचे वर्णन तपशीलवार आढळते. हा मीर हुसनचा पुत्र असून, धंद्याने कोष्टी होता.

भारतीय संस्कृती, तसेच संस्कृत, प्राकृत आणि अपभ्रंश या भाषा आत्मसात करून काव्यरचना करणारा हा पहिला मुसलमान कवी होय. तो इस्लामचा अनुयायी असूनही त्याची संस्कृती आणि विचारधारा हिंदुत्वाला धरूनच वाहिली आहे. त्याचे संदेशरासक हे मेघदूताचे अनुकारी काव्य अपभ्रंश साहित्यातले एक रत्न समजतात.

याच्या कालाबद्दल मात्र मतभेद आहेत. डॉ. कत्रे त्याचा काल इ. स. ११ ते १४ या शतकांमध्ये मानतात; डॉ. द्विवेदी यांच्या मते तो इ. स. ११ व्या शतकात होऊन गेला. [ अ. ज्ञा. ]

**अब्लिंगमंत्र** ऋग्वेदाच्या एका सूक्तातले (१०.९) पहिले तीन मंत्र अब्लिंग या नावाने प्रसिद्ध आहेत –

आपो हि ष्ठा मयोभुवस्ता न ऊर्जे दधातन ।
महे रणाय चक्षसे ।। १ ।।
यो वः शिवतमो रसस्तस्य भाजयतेह नः ।
उशतीरिव मातरः ।। २ ।।
तस्मा अरंगमाम वो यस्य क्षयाय जिन्वथ ।
आपो जनयथा च नः ।। ३ ।।

अर्थ – हे आपोदेवींनो, तुम्ही कल्याणमय आहा; तर आम्ही परम रमणीय वस्तू पाहावी, म्हणून आम्हांला ओजस्वितेच्या ठिकाणी घेऊन चला (१). तुमचा जो अत्यंत मंगलकारक रस आहे, त्याचा प्रेमळ मातेने आपल्या बालकाला दुग्धाचा आस्वाद करवावा, त्याप्रमाणे आम्हांला उपभोग करवा. (२)

ज्या तुमच्या निवासस्थानावर तुमचे प्रेम आहे, त्याच्या जवळ आम्ही त्वरित पोचावे, म्हणून हे आपोदेवींनो, आम्हांला तिथेच उत्पन्न करा. (३)

संध्येतील मार्जनात आणि मंगलाभिषेकातही या मंत्रांचा विनियोग होतो. [ हि. ध. ]

**अभंग** अभंग हे एका खास मराठी लौकिक छंदाचे नाव आहे. बहुतेक प्राचीन मराठी कविता ओवी आणि अभंग या दोन लौकिक छंदांत आविष्कृत झालेली आहे. ओवी आणि अभंग हे दोन्ही मराठी छंद एकरूपच आहेत. ओवी हे या दोन्ही छंद-प्रकारांचे मूळ रूप असून अभंग हे ओवीचेच मालात्मक रूप आहे. महानुभावीय वाङ्मयात अभंग हा शब्द समाप्तिमुद्रा या अर्थाने वापरला गेला आहे (स्मृतिस्थळ स्मृ. ११३; लीळाचरित्र उत्तरार्ध लीळा ४२४). परंतु त्याचा अभंग छंदाशी काही संबंध दिसत नाही. ओवीच्या मालिकेला अभंग म्हणतात, हे खरे असले, तरी अभंग या नावाची खास परंपराही आढळते. तेराव्या शतकातील कानडी कवी चौंडरस हा विठ्ठलाला अभंग–विठ्ठल असे म्हणतो. एकनाथादी मराठी संतांनीही अभंग-विठ्ठल या शब्दांनी विठ्ठलाचे वर्णन केले आहे–

अभंग विठ्ठल परि । मना सांडी विषय खोडी
सिंधु तो अभंग विठ्ठल

यावरून असे अनुमान निघते, की विठ्ठलविषयक ओवी-प्रबंधास अभंग हे नाव रूढ झाले असावे. विठ्ठलाच्या अभंग या विशेषणाचे रहस्य असे आहे, की तो वृंदावनातील देहुडच्या कृष्णा-प्रमाणे त्रिभंग उभा नसून समचरणांवर अभंग अवस्थानात उभा आहे. अभंगाचे लक्षण सांगताना नामदेवाने म्हटले आहे–

समचरणीं अभंग । नव्हे तान–छंदो भंग ।

समचरणी अभंग हे शब्द सूचक आहेत. ते समचरणांवर उभ्या असलेल्या अभंग विठ्ठलाशी अभंग छंदाचे नाते जोडणारे आहेत. याचा अर्थ असा, की विठ्ठल–भक्ति–परंपरेत महनीयता पावलेल्या या लौकिक छंदाचे नावही विठ्ठलाच्या रूपविशेषांशी संबद्ध आहे.

जात्यावरील ओव्या, दळणकांडण करताना म्हणायच्या ओव्या आणि वारकऱ्यांचे अभंग यांतील संबंध अभेदाचा आहे. आद्य महानुभावीय कवींची अभंग–रचना ओवीच्या सदरातच गणली जात असे. संत नामदेवाने अभंग–कलेविषयी म्हटले आहे, ते असे–

अभंगाची कळा नाही मी नेणत ।
त्वरा केली प्रीत केशीराजें ।।
अक्षरांची संख्या बोलिले उदंड ।
मेरु सुप्रचंड शर आदीं ।।
सहा साडेतीन चरण जाणावे ।
अक्षरें मोजावीं चौक चारी ।।
पहिल्यापासोनी तिसऱ्यापर्यंत ।
अठरा गणित मोज आलें ।।
चौक चारी आधीं बोलिलों मातृका ।
बाविसाची संख्या शेवटील ।।
दीड चरणाचे दीर्घ ते अक्षर ।
मुमुक्ष विचार बोध केला ।।
नामा म्हणे मज स्वप्न दिलें हरी ।
प्रीतीनें खेचरी आज्ञा केली ।।

यावरून अभंग ही बावीस अक्षरसंख्या असलेली दीर्घ–प्रचुर रचना आहे, असे नामदेवाचे मत होतेसे दिसते. बाव्वीस अक्षरांचे साडेतीन भाग. या भागालाच नामदेव चरण म्हणत आहे. तीन भागांची अठरा अक्षरे व पुढच्याची चार अक्षरे मिळून बाव्वीस अक्षरे एका चौकात असतात. असे बाव्वीस अक्षरी (साडेतीन) चरण सहा झाले, म्हणजे अभंग होतो. हा झाला मोठा अभंग. लहान अभंगाविषयी नामदेव म्हणतो–

मुख्य मातृकांची संख्या । सोळा अक्षरे नेटक्या ।।
समचरणी अभंग । नव्हे ताल–छंदो–भंग ।।
चौक पुलिता (?) विसर्ग । गण यति लघु दीर्घ ।।
जाणे एखादा निराळा । नामा म्हणे तो विरळा ।।

सोळा अक्षरे असलेल्या दोन (सम–) चरणांवर उभा असलेला हा अभंग कधीही ताल-छंदोभंग पावत नाही. उलट इतर रचनांतील गण, यती, लघू, दीर्घ, विसर्ग, वगैरे गोष्टी भान-गडीच्या आहेत व त्या जाणणारा कोणी वेगळाच असतो.

अभंग छंदाचे रचनेच्या दृष्टीने तीन मुख्य प्रकार आढळतात. त्यांपैकी दोन प्रकार स्वतंत्र असून, तिसरा प्रकार दुसऱ्यातच

थोडा फरक होऊन झालेला दिसतो. याशिवाय दुसरा व तिसरा यांच्या मिश्रणाने झालेला आणखी एक प्रकारही आढळतात येतो.

प्रकार पहिला–तीन सहाअक्षरी चरण आणि चौथा चरण लहान चारअक्षरी, अशा रचनेचा मोठा अभंग, यालाच छंदोरचनाकारांनी देवद्वार हे नाव दिले आहे. महदंबा, देमाइसा या महानुभावीय कवयित्रींच्या ओव्या प्राय: याच प्रकारच्या अभंगात आहेत. तुकारामाचे व इतर संतकवींचे बहुसंख्य अभंग या मोठ्या रचनेचेच आहेत.

स्त्रियांच्या कित्येक ओव्याही याच प्रकारच्या आहेत–

फुलांची ग वेणी । पाठीवरी लोळे ।
मावांत बहीण खळे । उषाबाई ।।

प्रकार दुसरा–यातील चरण अष्टाक्षरी असतात. याची दोन तऱ्हांनी मोडणी होऊ शकते. एक, सर्व अक्षरे सुरवातीपासून घेऊन दोन आवर्तने घ्यायची. या मोडणीप्रमाणे हा प्रकार पादाकुलक छंद होईल. दुसरी मोडणी, आघतालपूर्व दोन अक्षरे ठेवून पुढे ताल चालू करायचा. या मोडणीच्या अभंगालाच छंदोरचनेत देवीवर अशी संज्ञा दिलेली आहे. हा लहान अभंग होय.

प्रकार तिसरा–क्वचित् षडक्षरी व अष्टाक्षरी अशा प्रकारचे संयोजन असते. असे अभंग खूप आढळतात.

अभंगांतील चरण आणि अक्षरे यांच्या विविधतेमुळे अभंगांचे थोडयाफार फरकाने अनेक भेद पडतात. इतिहासाचार्य राजवाडे यांनी पिंगलोक्त परिभाषा वापरून प्रतिष्ठा अभंग, सुप्रतिष्ठा अभंग, उष्णिग अभंग, अनुष्टुभ अभंग, बृहती अभंग, पंक्ती अभंग, त्रिष्टुभ अभंग, जगती अभंग अशी अभंग–प्रकारांची नावे सांगितली आहेत. अभंग या संज्ञेचे स्पष्टीकरण करताना राजवाडे म्हणतात ' ज्या छंदात भंग नाहीत, तो अभंग. भंग म्हणजे कर्णमधुर गण. अर्थात अभंग म्हणजे गणविहीन वृत्तात्मक समचरण किंवा विषमचरण छंद. ' छंदोरचनाकारांच्या मते अभंग हा लगत्वभेदातीत (लघु-गुरु, इ. भेदांच्या पलिकडचा) अक्षरसंख्याक पद्यप्रकार आहे. या लगत्वभेदातीत अक्षरसंख्याक पद्यप्रकाराला काहीतरी पारिभाषिक नाव पाहिजे, म्हणून वैदिक पद्यप्रकाराला असणारे छंद हे नाव दिले आहे, असे त्यांचे एतद्विषयक स्पष्टीकरण आहे.

प्रा. भवानीशंकर पंडिताच्या मते अभंग हा मात्रिक आहे. श्री. वि. ज. सहस्रबुद्धे यांनी प्रा. पटवर्धन आणि प्रा. पंडित या दोघांच्या मतांचे खंडन करण्याचा प्रयत्न केला आहे. अभंगातील प्रत्येक अक्षराच्या दोन मात्रा धरायच्या, हे प्रा. पटवर्धनांचे मत त्यांना अभंग–गायनाच्या स्वरूपाशी विसंगत वाटते. प्रा. पंडितांच्या मताविषयी प्रतिक्रिया व्यक्त करताना ते म्हणतात, ' वादाकरिता अभंगास मात्रिक म्हणावयासही हरकत नाही. पण मात्रावृत्ताच्या दृष्टीने अभंगाची रचना शिथिल असल्याचे मान्य करावे लागेल व शिथिलता शेकडा नव्वद अभंगांत आहे, असेही कबूल करण्याची आपत्ती प्राप्त होईल ! त्यापेक्षा अभंगाची गणना अक्षर छंदात केलेली आहे, तीच योग्य नव्हे काय ?'

डॉ. ना. ग. जोशी यांनी मराठी छंदोरचनेचा लयदृष्ट्या पुनर्विचार मांडताना, अनेक अभंग–प्रकारांचे विश्लेषण करून असे मत व्यक्त केले आहे, की ' छांदस रचनेतील अक्षरोच्चार द्विमात्रक कालमानाचा असतो, हे माधवराव पटवर्धनांचे मतच ग्राह्य ठरते. '

अभंग छंदामध्ये प्राचीन मराठीत विपुल रचना झालेली आहे. ज्ञानेश्वरांपासून तुकारामापर्यंत अनेक मराठी संतकवींनी आपल्या आत्मानुभूतीच्या अभिव्यक्तीसाठी अभंगाचेच माध्यम वापरले. मराठी संतांनी परमार्थविचार ओवीतून मांडला; तर त्यांनी परमार्थानुभव अभंगांतून व्यक्त केला. अभंग–वाङमय म्हणजे मराठी संतांच्या पारमार्थिक आत्मचरित्रांचा सागरच आहे. अभंगांत ज्ञानेश्वरांच्या अनुभूतीचा ' मोगरा ' दरवळत आहे, नामदेवांच्या वत्सलभावाची दूधगंगा फेसाळत आहे, नाथांच्या समचित्ताची शांती विलसत आहे, समर्थांचे सामर्थ्य निनादत आहे आणि तुकोबांच्या परमार्थप्रवासाच्या दीप्तिमान् पाऊलखुणा तेजाळत आहेत. अभंग हा मराठी शारदेचा अभंग ठेवा आहे. पाहा–ओवी. [ श्री. रा. चिं. ढेरे ]

**अभयगिरी** सुप्रसिद्ध बौद्ध मठ. हा लंकेत अनुराधपूर या नगरात आहे. वट्टगामिनी या तिथल्या राजाने वुद्धस्तूपाजवळ हा मठ बांधला. त्यापूर्वी सुमारे २०० वर्षे महाविहार नावाचा एक मठ इथे होता. या दोन मठांतल्या भिक्षूंत वैमनस्य उत्पन्न झाल्यामुळे तिथल्या महासेन राजाने (इ. स. ३००) तो महाविहार पाडून टाकला. पण कालांतराने त्याची पुनश्च उभारणी झाली व दोन्ही मठांचा नावलौकिक कायम राहिला. पाहा–अनुराधपूर. [ सु. वि. को. ]

**अभयदान** हे दान सर्व दानांत श्रेष्ठ मानलेले आहे. जो आर्त जनांना अभय देतो, तो महादानी समजावा. सर्व भूतांना अभय देणे याहून श्रेष्ठ दान नाही. [ जा. का. भा. सं. ]

**अभयदेवसूरी** (१) (मृत्यू इ. स. १०८३) बृहत खरतर गच्छाचा संस्थापक. याला नवांगवृत्तिकार असे म्हणतात. हा धार येथे जन्मला. याच्या पित्याचे नाव धन व आईचे धनदेवी. वयाच्या १६ व्या वर्षी याने आचार्य पदवी मिळविली. जिनेश्वरसूरीने याला सूरी बनविले. स्थानांगावरील टीका,

भगवतीसूत्रटीका, समवायांगटीका, इ. अनेक ग्रंथ याने लिहिले. हा गुजरातेत कपडवणज गावी मरण पावला. [ म. ज्ञा. को. ]

(२) (इ. स. १०००) जैनधर्मी श्वेतांबर राजगच्छ शाखेचा आचार्य व प्रद्युम्नसूरीचा शिष्य. याने वादमहार्णव नावाचा ग्रंथ लिहिला आहे. [ म. च. को. ]

(३) प्रश्नवाहन कुलात जन्मलेला व जयसिंहसूरीचा शिष्य. याने सौराष्ट्राच्या खेंगार राजाला जिनदीक्षा दिली व कित्येक ब्राह्मणांना जैन बनविले. याने मदेरा शहरी महावीराचे मंदिर बांधले. [ म. च. को. ]

(४) (इ. स. चे १२ वे शतक) याला दुसरा अभयसूरी म्हणतात. याच्याच नेतृत्वाने रुद्रपल्लीय गच्छ महत्त्वाला चढला. याने जयंतविजय नावाचे मगधदेशाच्या जयंत या राजाची प्रशंसा करणारे महाकाव्य लिहिले आहे. काशीच्या राजाकडून याला वादीसिंह अशी पदवी मिळाली होती. [सं. सा. इ.; म. च. को.]

**अभय-नृसिंह-मंत्र** याचा अर्थ अभय देणारा नृसिंहाचा मंत्र असा आहे. तो मंत्र पुढीलप्रमाणे –

ॐ नमो भगवते नरसिंहाय नमस्तेजस्तेजसे
आविराविर्भव वज्रनख वज्रदंष्ट्र कर्माशयान्रंधय रंधय
तमो ग्रस ग्रस स्वाहा अभयमात्मनि भूयिष्ठा ॐ क्ष्रौम्.

हा बासष्ट अक्षरी मंत्र अभयप्राप्तीसाठी जपावा, असे सांगितले आहे. याचे विधान नारसिंह मंत्राप्रमाणेच आहे. [ मंत्रमहोदधि ]

**अभयहस्त** यालाच वरदहस्त असेही म्हणतात. हे एक सर्वमान्य शुभ चिह्न आहे. हाताचा पंजा कुंकवात बुडवून त्याचा छाप उठविला, की तो अभयहस्त होतो. असा छाप घरावर, देवळावर, वस्त्रावर, बैलाच्या पाठीवर, इ. अनेक ठिकाणी उठवितात. त्यायोगे अशुभाचा परिहार होऊन मंगल होते, अशी समजूत आहे.

**अभयांबा** एक देवी. तमिळनाडूमधील चिदंबरम्पासून सुमारे ४० कि. मी. अंतरावरच्या मायावरम् गावी अभयांबा देवीचे मंदिर आहे. या देवीची उत्पत्तिकथा अशी–

दक्षयज्ञामध्ये रुद्रगणांनी यज्ञाचा विध्वंस आरंभिण्यापूर्वी, एक मोर सतीला शरण गेला आणि त्याने तिच्याजवळ प्राणरक्षणाची याचना केली. त्या यज्ञात सतीने योगाग्नीने देहत्याग केला. त्या अंतसमयी तिला त्या मयूराचे स्मरण झाले. त्यामुळे तिचा पुनर्जन्म मयूरस्वरूपात झाला. त्या स्वरूपातच तिने शंकराची आराधना केली आणि तिला शंकराचे दर्शन घडले. पुढे मयूरशरीराचा त्याग करून ती शंकरासह कैलासपर्वतावर गेली. सतीने मयूराला अभय दिले होते म्हणून देवीचे नाव अभयांबा पडले. पुढे तिची मूर्ती स्थापण्यात आली. [ देवीकोश १ ]

**अभाव** याचा अर्थ नसणे, अस्तित्वात नसणे असा आहे. नैयायिकांनी अभाव हा एक पदार्थ मानलेला असून, त्याचे पुढील चार प्रकार सांगितले आहेत – प्रागभाव, प्रध्वंसाभाव, अत्यन्ताभाव व अन्योन्याभाव. वेदान्त्यांच्या मते अभाव हा अधिकरणापेक्षा निराळा पदार्थ नाही; भावाहून निराळे होणे म्हणजेही अभाव होय.

अभावाच्या कल्पनेत (१) भेद किंवा भिन्नता आणि (२) नसणेपणा. या दोन वेगळ्या कल्पनांची गुंतागुंत झालेली आहे. भारतीय ( आणि पाश्चात्त्य ) तर्कशास्त्रांत या गुंतागुंतीतूनच अभावासंबंधीच्या सिद्धान्तांना आकार आलेला आहे. हत्ती आणि घोडा एकमेकांपासून भिन्न आहेत. हत्तीत घोड्याचा आणि घोड्यात हत्तीचा अभाव आहे, असेही आपण म्हणू. पण अमुक प्राणी हत्ती नाही, याचा अर्थ तो घोडा आहे असा होत नाही. पहिली म्हणजे भेदाची कल्पना अन्योन्याभाव या नावाने भारतीय तत्त्वज्ञानात प्रसिद्ध आहे. ही कल्पना मूळची बौद्धांची असावी व या कल्पनेशीच त्यांचा वस्तूच्या अर्थासंबंधीचा अपोह-सिद्धान्त निगडित असावा. पण बौद्धांच्या विवेचनात भेद आणि नसणेपणा यांचा वेगळेपणा स्पष्टपणे सांगितलेला नाही. अभावाची कल्पना व्यक्त करण्याकरिता ज्या कल्पनेचा अभाव असेल, त्या कल्पनेचाही संसर्ग नको ही गोष्ट स्पष्ट करण्याकरिता संसर्गाभावाची कल्पना पुढे आली. न्याय-तार्किकांनी व जैनांनी ती पुढे मांडली. पण ही असंसर्गाची कल्पनासुद्धा कालिक किंवा कालातीत अथवा केवल तार्किक अशी असू शकते. त्यातून प्रागभाव, प्रध्वंसाभाव आणि अत्यन्ताभाव या कल्पनांचा उदय होतो.

एखादी वस्तू अस्तित्वात येण्यापूर्वी तिचा अभावच असतो. हा झाला प्रागभाव. तसेच एखादी वस्तू नष्ट झाल्यावरही तिचा अभावच असतो. हा झाला प्रध्वंसाभाव. पण आकाशकुसुम नावाची गोष्ट कधीच नसते. आकाश आणि कुसुम यांच्या धर्मामध्येच परस्परविरोध आहे. तेव्हा कुसुमाचा धर्म आकाशाच्या ठिकाणी कधीच राहू शकत नाही. कधीच न राहण्याचा हा जो नसणेपणा आहे, त्याला अत्यन्ताभाव असे म्हणतात. यांपैकी प्राक्-अभाव व प्रध्वंसाभाव या कल्पना राहित्याच्या कल्पनेशी विसंगत नसल्या तरी, राहित्यापेक्षा त्या वेगळ्या आहेत, हे ध्यानात घेणे आवश्यक आहे. [ म. त. म. ]

**अभिजित** (१) अश्विन्यादी नक्षत्रांपैकी २८ वे नक्षत्र. उत्तराषाढानक्षत्राचा चतुर्थ चरण व श्रवणाचा

पंधरावा भाग मिळून होणाऱ्या १९ दंडांइतक्या कालास अभिजित असे नाव आहे. याची गणना नक्षत्रांत होत असली, तरी याचा क्रांतिवृत्ताशी काहीही संबंध नाही. हे क्रांतिवृत्ताच्या बरेच उत्तरेस आहे. मैत्रायणी संहिता (२.१३.२०), तं. ब्राह्मण (१.५.१) व अथर्वसंहिता (१९.७) यांमध्ये त्याचा उल्लेख असून तो एकवचनी आहे. त्यावरून वैदिक काळात अभिजिताचा तारा एकच मानीत असावे, असे दिसते. उत्तरकालीन मुहूर्तादी ग्रंथांत मात्र या नक्षत्राच्या तारकांची संख्या तीन दिलेली आहे. पाश्चात्य ज्योतिषात ज्याला लायरा नामक पुंज म्हणतात, त्यात हे नक्षत्र आहे. या नक्षत्राची देवता ब्रह्मा असून मध्याह्नपूर्व एक घटका व मध्याह्नोत्तर एक घटका, एवढ्या कालाला ज्योतिषग्रंथांत अभिजिन्मुहूर्त असे म्हणतात. श्रावण द्वादशीस याच मुहूर्तावर वामनावतार झाला. याच नक्षत्रावर शिवाने त्रिपुरभेद केला (भाग. पु. ८. १८. ५; ७. १०. ६७). दानास उत्तम काल (मत्स्य पु. २२.२). पुण्याहवाचनाच्या वेळी या नक्षत्राच्या मंत्राचा उच्चार होतो. [ हि. ध.; सु. वि. को.; ज्यो. कौ. ]

(२) एक याग. याची कृती सोमयागाप्रमाणेच असते. नकळत ब्रह्महत्या घडली असता प्रायश्चित्त म्हणून हा याग करावा, असे मनू सांगतो (११. ७४). [ हि. ध. ]

**अभितपा सौर्य** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील सदतिसावे सूक्त याने रचले आहे. सूर्य ही या सूक्ताची देवता असून त्याची स्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. याची एक ऋचा (१०.३७.७) अशी–

विश्वाहा त्वा सुमनसः सुचक्षसः
प्रजावन्तो अनमीवा अनागसः ।
उद्यन्तं त्वा मित्रमहो दिवेदिवे
ज्योग्जीवाः प्रति पश्येम सूर्य ।

अर्थ – हे मित्रसन्मानकारी सूर्या, तुझ्या नित्य दर्शनाने सुविचार, व्यवस्थितपणा, संतती, आरोग्य आणि पापमुक्ती आदी गुण आम्हांस लाभोत.

याशिवाय अभितपाने सूर्याला आपला पाखंडीपणा, रोगराई, अन्नदुर्भिक्ष्य, दुःस्वप्ने, इ. अरिष्टे दूर करण्याचीही विनंती केली आहे. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा. ]

**अभिधम्म** ( सं. अभिधर्म. ) त्रिपिटकातील एक पिटक. आभीक्ष्ण्य = एकाच धर्माचे नाना प्रभेद दाखविणे, अभिभव = अन्य मतांचे खंडन करणे व अभिगती = बौद्ध सिद्धान्तांची यथायोग्य आध्यात्मिक व्याख्या करणे, या तीन कारणांमुळे याला अभिधम्म असे नाव दिले गेले आहे. यात बौद्ध धर्मांच्या तत्त्वांचे विशिष्ट पद्धतीने प्रतिपादन केलेले आहे. यात पुग्गलपञ्ञत्ती, धातुकथा, धम्मसंगणी, विभंग, पठ्ठानपगरण, कथावत्थू व यमक, असे सात ग्रंथ येतात. पाली टेक्स्ट सोसायटीने हे सारे ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. यांत बौद्ध धर्मातील विशिष्ट शब्दांच्या व्याख्या व निश्चित अर्थ देऊन नंतर त्यांचे तात्त्विक व व्यावहारिक विवेचन विस्तारपूर्वक केले आहे. मानसशास्त्रदृष्ट्या विवेचिलेले रुक्ष नीतितत्त्वज्ञान यात भरलेले आहे. शेवटी बौद्धेतर सर्व मते कशी पाखंडी व मूर्खपणाची आहेत, त्याबद्दल चर्चा केलेली आहे. या पिटकाचा काल दुसऱ्या दोन पिटकांपेक्षा अलिकडचा म्हणजे सनपूर्व सुमारे ४०० व २५० यांच्या दरम्यानचा असावा. सात ग्रंथांपैकी धम्मसंगणी सर्वांत जुना व कथावत्थू सर्वांत अलिकडचा आहे, असे काही पंडित म्हणतात. सर्वास्तिवादीपंथात या सातही ग्रंथांना संस्कृतरूप दिले गेले होते; पण भारतात महायान पंथाचा उत्कर्ष झाल्यावर हे ग्रंथ तर लुप्त झालेच; शिवाय अभिधम्म हा शब्दही मागे पडला. या ग्रंथांची चिनी भाषांतरे तेवढी उपलब्ध आहेत. अभिधम्माच्या अभ्यासकांना अभिधम्मिक असे नाव होते व बौद्ध भिक्षूंत त्यांचा दर्जा मोठा होता, असे मिहिंतल येथील शिलालेखावरून कळते. [ बौ. द. मी.; म. ज्ञा. को. ]

**अभिधम्मत्थ** बौद्धांच्या मानस व नीती या शास्त्रांवरील लघू, पण अत्यंत महत्त्वाचा, असा हा संग्रहग्रंथ आहे. इ. स. १२ व्या शतकात अनुरुद्ध या पंडिताने हा ग्रंथ केला. अभिधम्मअध्ययनाची केंद्रे असणाऱ्या लंका व ब्रह्मदेश या ठिकाणी हा ग्रंथ आधारभूत मानला जात असून यावर अनेक टीका व भाष्ये आहेत. याची एकंदर ९ प्रकरणे असून शेवटचे फार लोकप्रिय आहे. [ म. ज्ञा. को. ]

**अभिधर्मकोश** (इ. स. ५ वे शतक) वसुबंधु या विख्यात बौद्ध पंडिताने लिहिलेला एक संस्कृत ग्रंथ. या ग्रंथातले तत्त्वज्ञान सर्वास्तिवादाला अनुसरून आहे. हा सर्व ग्रंथ कारिका-बद्ध असून कारिकांची संख्या ६०२ आहे. या कारिकांवर वृत्तीही आहे. धातू, इंद्रिये, लोक, अनुशय, आर्यपुद्गल, ज्ञान, समाधी व पुद्गल, असे आठ विषय यात चर्चिले आहेत. नीती, मानस व अध्यात्म या तीन्ही विषयांचे यात प्रतिपादन आहे. वसुबंधू हा सर्वास्तिवादी होता. पण त्याचा हा ग्रंथ इतका व्यवस्थित, सुस्पष्ट, सुसंबद्ध व निश्चितार्थक झाला, की सर्व बौद्धपंथांत त्याला मान्यता व प्रामाण्य मिळाले. या कोशाची मूळ संस्कृत आवृत्ती नष्ट झाली असून त्याचे चिनी व जपानी अनुवाद तेवढे उपलब्ध आहेत. अभिधर्मकोशावर भारत, तिबेट, चीन

जपान, या देशांतील बौद्ध विद्वानांनी इतक्या टीका व इतके भाष्यग्रंथ लिहिले आहेत, की त्या सर्वांचे मिळून एक ग्रंथालयच होईल. या ग्रंथावर ज्या अनेक टीका व व्याख्या झाल्या, त्यांत अभिधर्मकोशव्याख्या या ग्रंथाला सर्वोच्च स्थान आहे. यशोमित्र नावाच्या बौद्ध पंडिताने ही व्याख्या लिहिली असून सदर ग्रंथ नेपाळात जपून ठेवलेला आहे. पाहा–वसुबंधू. [ म. ज्ञा. को. ]

**अभिधा** अर्थबोध करविणारी एक शक्ती. 'स मुख्योऽर्थस्तत्र मुख्यो व्यापारोऽस्याभिधोच्यते' = साक्षात् संकेतित अर्थ म्हणजे मुख्य अर्थ, त्याचा बोध करून देणाऱ्या व्यापाराला अभिधा असे म्हणतात (का. प्र. २.८). ही एक शब्दशक्ती आहे. हिच्या द्वारे तीन प्रकारच्या शब्दांचा अर्थबोध होत असतो.

रूढ शब्द – या शब्दांचा अर्थबोध समुदायशक्तीच्या द्वारे होतो व त्या शब्दांची व्युत्पत्ती होत नाही. उदा० घोडा, बैल, गड, वड, इत्यादी.

यौगिक शब्द – या शब्दांचा अर्थबोध अवयवांच्या (प्रकृती व प्रत्यय) शक्तीच्या द्वारे होतो. उदा० दिनकर, सुधांशू, इत्यादी.

योगरूढ शब्द – यांचा अर्थबोध समुदाय व अवयव यांच्या शक्तीच्या सहयोगाने होतो. हे शब्द यौगिक असूनही रूढ असतात. उदा० वारिज, जलज, या शब्दांचा यौगिक अर्थ जलांत उत्पन्न होणारी वस्तू असा आहे; मात्र योगरूढ अर्थ कमळ असाच होतो.

**अभिधानचिंतामणी** अनेक संस्कृत शब्दांचा संग्रह असलेला एक कोश. या कोशात रूढ शब्द व यौगिक शब्द यांचा संग्रह केलेला आहे, या कोशाला नाममाला असेही म्हटले जाते. जैन धर्मासंबंधी बहुतेक सर्व शब्द या कोशामध्ये आलेले आहेत.

या कोशाचा कर्ता हेमचंद्र हा जैन होता. याचे सहा विभाग असून त्यांना अनुक्रमे देवाधिदेवकांड, देवकांड, मर्त्यकांड, भूमिकांड किंवा तिर्यक्‌कांड, नारककांड आणि सामान्यकांड अशा संज्ञा आहेत.

पहिल्या विभागात ८५ श्लोक असून, त्यात जैनधर्मातील देव व जैनधर्मातील काही पारिभाषिक शब्द आले आहेत. दुसऱ्या विभागात २५० श्लोक असून, ब्राह्मण व बौद्ध धर्मातील देवतांची नावे व त्या त्या धर्मातील पारिभाषिक शब्द दिलेले आहेत. तिसऱ्या विभागात ५९८ श्लोक आहेत व त्यात मनुष्य-प्राणी व तत्संबंधी शब्दांची माहिती आहे. चौथ्या विभागात ४२३ श्लोक असून, त्यात पशु-पक्षी व तत्संबंधी असलेले शब्द आलेले आहेत. पाचव्या विभागात केवळ सात श्लोक आहेत. यात प्राण्यांचे विवरण आहे. आणि शेवटच्या, सहाव्या विभागात १७८ श्लोक असून, त्यात भाववाचक नावांचा, विशेषणांचा व अव्ययांचा निर्देश केलेला आहे.

या कोशावर एकंदर आठ टीका उपलब्ध आहेत.

कोशाच्या आरंभी हेमचंद्राने वासुकी, व्याडी, धनपाल आणि वाचस्पती या कोशकारांचा उल्लेख करून, प्रस्तुत कोश लिहिताना वरील कोशकारांचे ऋण मान्य केले आहे. त्याचप्रमाणे त्याच्या स्वोपज्ञ टीकेत अमर, कात्य, दुर्ग, धन्वंतरी, भागुरी, भोज, शाश्वत, हलायुध, मालाकार व यादव यांचेही कोश याने जागोजागी उद्‌धृत केले आहेत. उत्तरकालीन कोशांवर अभिधान चिंतामणीची बरीच छाप पडलेली दिसून येते. [अ. म. ज्ञा. ]

**अभिधानरत्नमाला** संस्कृत भाषेतील एक प्रसिद्ध शब्दकोश. या कोशाचा कर्ता हलायुध असल्यामुळे त्यास हलायुध कोश असेही म्हणतात. संस्कृत साहित्यातील टीकाकार अमरकोशाप्रमाणे याही कोशाचा वारंवार उल्लेख करतात. अभिधानरत्नमालेची एकूण पाच कांडे असून, त्यांना अनुक्रमे स्वर्गकांड, भूमिकांड, पातालकांड, सामान्यकांड व अनेकार्थकांड अशा संज्ञा आहेत. पहिल्या चार कांडांत समानार्थी शब्द एकत्रित आणले आहेत; तर शेवटच्या कांडांत शब्दांचे भिन्न अर्थ एकत्रित केलेले आहेत. पहिल्या कांडात १५५ श्लोक असून, त्यात अंतरिक्ष आणि तत्संबंधी शब्दांचा विचार केला आहे. दुसऱ्या कांडात ४६७ श्लोक असून त्यांत पृथिवी आणि तत्संबंधी शब्दांविषयी माहिती आहे. तिसऱ्यात ६३ श्लोक असून, त्यांत पाताल आणि तत्संबंधी शब्द दिले आहेत. चौथ्यात १०१ श्लोक असून, त्यांत भाववाचक नामांचा व विशेषणांचा विचार केला आहे. या विभागात अव्ययांचाही समावेश आहे. पाचव्या विभागात १०१ श्लोक आहेत. अभिधान रत्नमालेवर एकंदर चार टीका उपलब्ध आहेत.

हलायुधाने आपला कोश पूर्वकालीन कोशांचे अवलोकन करून लिहिला, असा उल्लेख त्याने स्वतः या ग्रंथाच्या प्रारंभी केला आहे व त्यात अमरदत्त, वररुची, भागुरी आणि वोपालित यांचे ऋण मान्य केले आहे.

उत्तरकालीन कोशकारांवर व टीकाकारांवर हलायुध कोशाची बरीच छाप दिसून येते.

हलायुधाची अभिधानरत्नमाला आणि हेमचंद्राचा अभिधान-चिंतामणी यांमध्ये बरेच साम्य आढळते. दोन्हींत काही श्लोक तंतोतंत सारखे आहेत.

हलायुध नामक चार लेखक होऊन गेले. त्यांपैकी राजा कृष्ण (१ ला) राष्ट्रकूट याच्या दरबारी असलेल्या हलायुधाने हा कोश लिहिला, असे विद्वानांचे मत आहे. [ अ. म. ज्ञा. ]

**अभिनंदन नाथ** जैनांचा चौथा तीर्थंकर. 'अभिनन्द्यते देवेन्द्रादिभिरित्यभिनन्दनः' = देवेंद्रादिकांकडून ज्याचे अभिनंदन केले जाते असा (अभिधान चिंतामणि). याचा जन्म साकेतात झाला. याचा पिता संवर नावाचा राजा आणि माता सिद्धार्था होय. जन्मनक्षत्र पुनर्वसू. यक्ष-यक्षिणी ईश्वर व काली. ज्ञानवृक्ष प्रियाल (खिरणी). लांच्छन माकड. मोक्षस्थान पारसनाथ पर्वत. याच्या मूर्ती क्वचितच आढळतात. याचा परिवार पाहता या तीर्थंकराची कल्पना शैवसंप्रदायावरून केलेली दिसते. [ जै. इ. ]

**अभिनय** 'अभिनयति हृद्गतभावान् प्रकाशयति इति' = अंतरातील राग-द्वेषादी भाव प्रकाशित करणे म्हणजे अभिनय होय, अशी याची व्याख्या आहे. वाणी, शारीरिक चेष्टा, मुखमुद्रा व वेषभूषा यांच्या द्वारे मानसिक भाव व्यक्त करणे, तसेच प्रेक्षकाला रसाची अनुभूती घडविणे हे मुख्यत्वे अभिनयाचे उद्दिष्ट आहे. या शब्दाचा यौगिक अर्थ जवळ नेणे, म्हणजेच प्रेक्षकाला कवीच्या भावार्थाप्रत पोचवणे असा आहे. भरताचे नाट्यशास्त्र व नंदिकेश्वराचा अभिनयदर्पण यांत अभिनयाचे विस्ताराने वर्णन आहे.

नाट्यशास्त्रानुसार अभिनयाचे चार प्रकार होतात –

**भवेदभिनयोऽवस्थानुकारः स चतुर्विधः ।**
**आङ्गिको वाचिकश्चैवमाहार्यः सात्त्विकस्तथा ।।**

**अर्थ** – अभिनय म्हणजे अवस्थेचे अनुकरण. तो चार प्रकारचा असतो – आंगिक, वाचिक, आहार्य व सात्त्विक.

**आंगिक अभिनय** – शरीर, मुख आणि विविध चेष्टा यांनी एखादा भाव किंवा अर्थ प्रकट करणे, म्हणजे आंगिक अभिनय होय. मस्तक, हात, कंबर, वक्ष, पार्श्व आणि चरण, यांच्या द्वारे आंगिक अभिनय केला जातो. डोळे, भुवया, अधर, गाल व हनुवटी यांच्या द्वारे केला जाणारा अभिनय हा आंगिक अभिनयातला उपांग अभिनय होय. संपूर्ण शरीराच्या विशेष चेष्टा, अर्थात् लंगडा, कुबडा, वृद्ध यांच्या चेष्टांचे अनुकरण याला चेष्टाकृत अभिनय म्हणतात. हे सर्व प्रकारचे अभिनय रस, भाव, आणि संचारी भाव यांच्या अनुसार केले जातात. मुखज चेष्टांचा अभिनय सहा प्रकारचा होतो. मुखरागयुक्त शारीरिक अभिनय अल्पांशाने जरी झाला, तरी तो समग्र अभिनयाची शोभा वाढवितो, असे भरताने म्हटले आहे. हा मुखराग चार प्रकारचा असतो – स्वाभाविक, प्रसन्न, रक्त व श्याम.

मस्तक हालवून करायच्या अभिनयाचे नऊ प्रकार होतात –

(१) **सम** – डोके खाली वाकलेले किंवा उचललेले किंवा हालत नसलेले. उपयोग : नृत्यारंभ, प्रार्थना, अधिकारयुक्त भाषण, समाधान, राग, बेपर्वाई किंवा क्रियाशून्यता.

(२) **उद्वाहित** – डोके वर उचलून स्थिर ठेवणे. उपयोग : पताका, चंद्र, आकाश, पर्वत, हवेत उडणारे पदार्थ, कोणतीही उंच वस्तू.

(३) **अधोमुख** – डोके खाली वाकलेले असणे. उपयोग : विनय, दुःख, नमन, एखादी गोष्ट हिडिस मानणे, मूर्च्छा, जमिनीवर पडलेला पदार्थ, स्नान.

(४) **आलोलित** – डोके वर्तुळात फिरविणे. उपयोग : निद्रावस्था, पर्याकुलावस्था, उन्माद, मूर्च्छना, घेरी येणे, कांकू करणे, हसणे, इत्यादी.

(५) **धूत** – उजवीकडून डावीकडे व डावीकडून उजवीकडे डोके वळविणे. उपयोग : नकार, पुन्हापुन्हा पाहणे, सहानुभूती, आश्चर्य, निराशा, बेपर्वाई, थंडी, आग, भीती, मद्य पिण्याच्या वेळचा पहिला क्षण, युद्धाची तयारी, अव्हेर, आतुरता, आपल्या अवयवाकडे नजर टाकणे, दोन्ही बाजूंना हाक मारणे.

(६) **कंपित** – खाली वर डोके हालवणे. उपयोग : क्रोध, 'थांब' म्हणणे, पृच्छा, हाक, भीती घालणे, इत्यादी.

(७) **परावृत** – डोके एका बाजूला करणे. उपयोग : 'हे कर' असे सांगणे, तिटकारा, नम्रता, कापणे, अंग चोरणे, अनादर करणे, इत्यादी.

(८) **उत्क्षिप्त** – डोके एका बाजूला वर करणे. उपयोग : 'हे घे' म्हणणे, खून करणे, प्रतिपाळ करणे, मान्यता देणे.

(९) **परिवाहित** – एका बाजूकडून दुसऱ्या बाजूकडे पंख्याप्रमाणे डोके हालविणे. उपयोग : प्रेमी बनणे, प्रियेकरिता झुरणे, सुख, आनंद, विचार.

दृष्टीच्या अभिनयाचे आठ प्रकार सांगितले आहेत ते असे –

(१) **सम** – देवांच्या स्त्रियांप्रमाणे डोळे न हालविता बघणे, उपयोग : नृत्यारंभ, तागडी, इतर काही गोष्टींविषयी विचार, आश्चर्य, देवमूर्ती.

(२) **आलोकित** – तीक्ष्ण कटाक्षांनी जलद डोळे फिरविणे. उपयोग : कुंभाराचे फिरते चाक, एकूण एक वस्तू दाखविणे, इच्छा.

(३) **साची**- डोके न हालविता डोळ्याच्या कोपऱ्यातून पाहणे. उपयोग : इंगित, मिशीला पीळ घालणे, आत्मविश्वास, बाणाचा नेम धरणे, खूण करणे, इत्यादी.

(४) **प्रलोकित**–एका बाजूकडून दुसऱ्या बाजूकडे डोळे फिरविणे. उपयोग : दोन्ही बाजूंच्या वस्तू पाहणे, खूण करणे, हालचाल, अस्वस्थ मन.

(५) **निमीलित**–डोळे अर्धवट झाकलेले, अर्धवट उघडलेले असे ठेवणे. उपयोग : ऋषीसारखा आविर्भाव, दुसऱ्याच्या मर्या-

माणे वागणे, जप, ध्यान, नमस्कार, वेड, सूक्ष्म दृष्टी इत्यादी.

(६) उल्लिखित–सूक्ष्म रीतीने वर व बाजूला कटाक्ष टाकणे. उपयोग : ध्वजाचा अग्र, गोपूर, देवमंडप, पूर्वजन्म, उंची, चंद्रिका.

(७) अनुवृत्त– झट्‌दिशी खाली–वर बघणे. उपयोग : रागीट मुद्रा, स्नेहयुक्त आमंत्रण.

(८) अवलोकित–खाली बघणे. उपयोग : छायेकडे बघणे, विचार, शय्या, अभ्यास, आपल्या अंगाकडे बघणे.

भुवयांच्या अभिनयाचे सहा प्रकार सांगितले आहेत. ते असे–

(१) सहज–नेहमीच्या चेहऱ्यातील भुवई ही नैसर्गिक स्थिती दर्शविते.

(२) पतित– स्थिर असलेल्या भुवया चढविणे. उपयोग : अरुची, आश्चर्य, मत्सर.

(३) उत्क्षिप्त– एक किंवा दोन्ही भुवया वर उचलणे. उपयोग : स्त्रीचा राग, खरे बोलणे, शृंगारभाव, लीला.

(४) चतुर– भुवया मिळवून थोडया हालविणे. उपयोग : एकमेकांचे चेहरे मिळविणे, हृत्सौख्य, आवेग.

(५) रेचित– सुंदर व मधुर रीतीने एक भुवई आकुंचित करणे. उपयोग : एखादे गुह्य ऐकणे, एखाद्या स्थळाकडे बघणे, इत्यादी.

(६) कुंचित– एक किंवा दोन्ही भुवया कमानदार करणे. उपयोग : प्रियकर हजर नसताना त्याची आठवण करून दिल्यामुळे झालेला आनंद (मोट्टाइत), खोटा राग (कुट्टमित), विलास, किलकिंचित.

मान हालवून करायच्या अभिनयाचे चार प्रकार सांगितले आहेत ते असे–

(१) सुंदरी– मान क्षितिजाशी समांतर अशी इकडे तिकडे फिरविणे (तिर्यक् प्रचलित). उपयोग : प्रणयप्रारंभ, परीक्षा घेणे, 'शाबास' असे म्हणणे, आठवण, थट्टेचे भाषण, सहानुभूतीचे सुख.

(२) तिरश्चीन–सापाच्या चालीप्रमाणे दोन्ही बाजूंना मान वर करणे. उपयोग : तरवार पाजळणे, सर्पाकार गती.

(३) परिवर्तित– अर्धचंद्राप्रमाणे उजव्या व डाव्या बाजूला मान वळविणे. उपयोग : शृंगारनर्तन, कपोलचुंबनप्रसंगी.

(४) प्रकंपित– कपोताप्रमाणे पाठीमागे व पुढे मान फिरविणे. उपयोग : 'तू आणि मी' असे सांगणे, गणना, झोके.

हस्ताभिनयाचे एकूण बारा प्रकार सांगितले आहेत –

(१) प्रसारण– बोटे ताठ करून. (२) कुंचित– बोटे वाकवून. (३) रेचित–बोटे पसरून. (४) पुंखित–हात पुढे, बोटे ताठ, वाकलेली किंवा पसरलेली. (५) अपवेष्टित– हात खाली केलेला. (६) प्रेरित– हात मागे झुकलेला, बोटे सरळ, वाकलेली अथवा पसरलेली. (७) उद्वेष्टित–तळहात वर धरलेला. (८) व्यावृत्त–हात बाजूने पुढे रोखलेला. (९) परिवृत्त–हात बाजूकडून पुढे केलेला. (१०) संकेत–शब्दाशिवाय कल्पना देणे. (११) चिह्न–ज्या गोष्टी पुढे आहेत व ज्या अदृश्य आहेत, त्यांच्या खुणा निरनिराळ्या चिह्नांनी दाखविणे. (१२) पदार्थटीक–शब्दांचे अर्थ समजावून देणे.

या व्यतिरिक्त वक्षाचे पाच, पार्श्वांचे पाच, उदराचे तीन; कटीचे पाच, ऊरूचे पाच, जांघेचे पाच व पायांचे पाच प्रकारचे अभिनय भरताने सांगितले आहेत. सोळा भूमिचारी व सोळा आकाशचारी यांचे वर्णन करून भौममंडलाचे दहा व आकाशमंडलाचे दहा अभिनय सांगत असताना भरताने गतीच्या अभिनयाचे विस्ताराने वर्णन केले आहे. गतीप्रमाणेच आसन म्हणजे बसण्याचे विविध प्रकारही त्याने सांगितले आहेत. आंगिक अभिनयाचे भरताने जितके तपशीलवार व सांगोपांग निरूपण केले आहे, तितके अन्य कोणत्याही नाट्याचार्याने केलेले नाही.

**वाचिक अभिनय**–रंगभूमीवर अभिनय करणारी व्यक्ती मुखाने जे काही सांगते, त्या सगळ्याला वाचिक अभिनय म्हणतात. या अभिनयात रसयुक्त वाक्यांचा प्रयोग करून त्यांचे शृंगार, करुण, रौद्र, इ. रसांना अनुकूल असे योग्य त्या आरोहावरोहासह उच्चारण करायचे असते. भरताने वाचिक अभिनयाची लेसष्ट लक्षणे सांगितली असून त्याच्या गुणदोषांचेही विवेचन केले आहे. वाचिक अभिनयाचे सर्वांत मोठे वैशिष्ट्य हे, की अभिनेता पडद्याआडून बोलला तरी केवळ त्याच्या शब्दोच्चारावरून प्रेक्षकाला त्याची मुखमुद्रा व मनोवस्था यांची कल्पना करता यावी.

**आहार्य अभिनय**–अभिनेत्याने आपापल्या भूमिकेला अनुरूप अशी वेषभूषा करणे, याला आहार्य म्हणतात. वस्तुतः आहार्य हे अभिनयाचे अंग नसून तो नेपथ्यकर्माचा भाग आहे.

**सात्त्विक अभिनय**–अष्टसात्त्विक भावांचे प्रदर्शन. यात स्तंभ; स्वेद, रोमांच, इ: अष्टसात्त्विक भाव येतात.

भारतीय अभिनयकलेचा इतिहास फार प्राचीन आहे. संस्कृत भाषेत भासाची नाटके ही सर्वांत जुनी आहेत. त्यावरून कळते, की आपल्या देशात अभिनयाचा प्रारंभ दोन, सव्वादोन हजार वर्षांपूर्वी झाला आहे. भरतमुनी हा भासाच्या आसपासच्याच कालातला असावा, असे डॉ. केतकरांचे मत आहे. त्याने ज्या अर्थी अभिनयकलेचे तपशीलवार विवेचन केले आहे, त्या अर्थी त्याच्याही पूर्वी भारतात अभिनयकलेचा अनेक अंगांनी विकास झाला होता, हे सिद्ध होते.

अभिनयात अनुकरण, नक्कल, इ. गोष्टी आढळतात. त्यांचे मूळ मानवजातीच्या आदिम अवस्थेपासून दिसून येते. अनु-

करणाची प्रवृत्ती बालकांत तर असतेच, पण थोड्याफार प्रमाणात ती पशूंतही आढळते. या अनुकरणप्रवृत्तीच्या मागे दोन कारणे संभवतात. एक म्हणजे त्यांत अभिनेत्याला वास्तवाच्या अनुभूतीसारखा आनंद प्राप्त होतो; व दुसरे म्हणजे एका व्यक्तीला दुसऱ्या अनेक व्यक्तींपुढे आपल्या अनुभूतींची अभिव्यक्ती करण्याचा अवसर मिळतो. या दुसऱ्या उद्देशातून हावभाव व मुद्रा यांचा विकास झाला आहे.

आजमितीस भारतातल्याच नव्हे, तर जागतिक अभिनयकलेलाही एक शास्त्रीय व परिष्कृत असे स्वरूप प्राप्त झाले आहे. पण आजचे अभिनयशास्त्र व प्राचीन अविकसित नाटयनृत्य यांची तुलना करता, अभिनयाचे आधारभूत सिद्धांत दोन्हीकडे सारखेच दिसतात. मध्ययुगीन काळात अभिनयकलेला हीनत्व आले होते. नट किंवा अभिनय करणारे यांची सामाजिक प्रतिष्ठा कमी झाली होती. पण आजमितीस सर्वच ललित कलांच्या बरोबरीने अभिनयालाही प्रतिष्ठा प्राप्त होत आहे. नाटय व अभिनय यांच्या मागचे सांस्कृतिक संबंध लक्षात घेऊन आजमितीस त्या कलेच्या वृद्धीला सर्वत्र प्रोत्साहन मिळत आहे. आणि ते योग्यच आहे. [ म. ज्ञा. को.; हिं. सा. ]

**अभिनव कालिदास** संस्कृत वाङमयात अभिनव कालिदास या नावाने प्रसिद्धीस आलेल्या एकंदर सात व्यक्ती आहेत, त्या अशा–(१) मूळ नाव वेंकटेश. (?) याने अभिनव भारतचम्पू हा ग्रंथ लिहिला. याच्यासंबंधी अधिक माहिती उपलब्ध नाही. (२) मूळ नाव कृष्णमूर्ती. पित्याचे नाव सर्वशाली. याने इ. स. च्या १७ व्या शतकाच्या प्रारंभी यक्षोल्लास नामक ग्रंथ लिहिला. मदनाभ्युदयबाण हाही ग्रंथ कृष्णमूर्तीने लिहिल्याचे सांगतात. (३) मूळ नाव उपलब्ध नाही. कांची येथे राहणारा, काश्यपगोत्री ब्राह्मण. शृंगारकोशभाण किंवा शृंगारशेखरभाण नामक ग्रंथ याने लिहिला. श्रीकंठाचा कंदर्पदर्पणभाण हा ग्रंथ व कालिदासाचे मालविकाग्निमित्र हे नाटक या दोहोंवर त्याने लिहिलेल्या टीका उपलब्ध आहेत. (४) मूळ नाव नारायणस्वामी. श्रीरंगपट्टण येथे प्रथम रंगभूमीवर आलेल्या चंद्रकला (?) भाण या ग्रंथाचा कर्ता. याने लिहिलेली तत्त्वचिंतामणिदीधिती नामक व्याख्याही उपलब्ध आहे. (५) मूळ नाव माधवाचार्य. नवकालिदास याही नावाने प्रसिद्ध आहे. याने संक्षेपशङ्करविजय हा ग्रंथ लिहिला आहे. (६) मूळ नाव नरसिंह कवी. नवकालिदास किंवा नवीन कालिदास याही टोपणनावाने हा प्रसिद्ध आहे. नञ्जराजयशोभूषण या आपल्या ग्रंथात हा स्वतःबद्दल थोडी माहिती देतो, ती अशी – सनगर ब्राह्मणाच्या कुलात हा जन्मला. पित्याचे नाव शिवराम. शिवराम स्वतः शास्त्रपारंगत असल्याने त्यानेच आपल्या पुत्राला शास्त्रे शिकविली. त्याने आपल्या धर्मगुरूचे नाव योगानंदयतींद्र असे सांगितले आहे. नञ्जराजयशोभूषण या अलंकारावरील ग्रंथात नञ्जराजाची थोरवी याने वर्णन केलेली आहे. चंद्रकलापरिणय नावाचे नाटकही याने लिहिले असल्याचे सांगतात. (७) मूळ नाव उमामहेश्वर. आंध्र प्रांतातील वल्लाळ घराण्यात याचा जन्म झाला. मोक्षगुंडम् घराण्यातील वेंकटरायाचा हा पुत्र व अक्कयसूरी याचा शिष्य होता. कविकुञ्जराच्या राजशेखरचरित्रात याचा विद्यानगरचा राजा राजशेखर याच्या राजसभेतील कवी म्हणून उल्लेख आढळतो.

अद्वैतकामधेनू, तत्त्वचन्द्रिका किंवा निर्गुणब्रह्ममीमांसातत्त्वचंद्रिका, पाणिनीयवादनक्षत्रमाला, विरोधवरूथिनी, वेदान्तसिद्धान्तसार, इ. ग्रंथ उमामहेश्वराने लिहिले असल्याचा उल्लेख सापडतो. [ अ. म. ज्ञा. ]

**अभिनवगुप्त** (इ. स. ९५० चा सुमार) एक महान आचार्य. तंत्रशास्त्र व साहित्यशास्त्र यांचा प्रकांड पंडित. हा काश्मिरी शैव ब्राह्मण होता. अभिनवगुप्ताचे घराणे मूळचे कनोज येथील होते. याचा एक पूर्वज अत्रिगुप्त हा फार विद्वान होता आणि शैव शास्त्रांत त्याने विशेष प्रावीण्य मिळवले होते. काश्मीरचा राजा ललितादित्य ( इ. स. सुमारे ७२५–७६१ ) याच्या कानावर त्याची कीर्ती गेली होती. कनोजचा राजा यशोवर्मा याला जिंकल्यानंतर ललितादित्याने अत्रिगुप्ताला आपल्याबरोबर काश्मीरमध्ये नेले. तिथे गेल्यावर वितस्तेच्या (झेलम) काठी शीतांशुमौलीच्या मंदिरासमोर राजाने त्याला मोठे घर बांधून दिले आणि उदरनिर्वाहासाठी मोठी जहागीर दिली.

अभिनवगुप्ताच्या पित्याचे नाव नरसिंहगुप्त किंवा चुखुलक असे होते. नरसिंहगुप्तही फार विद्वान होता. त्याला अनेक शास्त्रांत गती होती. तो मोठा शिवभक्त होता. अभिनवगुप्ताच्या मातेचे नाव विमलकला असे होते. ती फार धार्मिक होती. अभिनवगुप्ताला योगिनीभू असे म्हटलेले आहे. ज्याचे माता व पिता मीलनाच्या वेळी आपल्याला शक्ती व शिव यांच्याशी एकरूप मानतात, अशा पुत्राला शैव आगमांत योगिनीभू असे नाव दिलेले आहे. आणि योगिनीभू पुरुषालाच शैव आगमांचे सम्यक ज्ञान होते, असे मानलेले आहे. द. भारतात अभिनवगुप्ताला शेषाचा अवतार समजतात.

अभिनवगुप्त अत्यंत बुद्धिमान होता. त्याची ज्ञानतृष्णा विलक्षण होती. अनेक गुरूंच्या जवळ तो अनेक विद्या शिकला. जालंधर येथे जाऊन आचार्य शंभुनाथ याच्या जवळ त्याने कौलिक मताचे प्रगाढ अध्ययन केले. कौल साधनेमुळेच त्याला शांती

लाभली, सिद्धी मिळाल्या आणि आत्मसाक्षात्कार झाला. आपल्या पित्याकडून व्याकरण, भूतिराजाकडून ब्रह्मविद्या, वामनाथाकडून द्वैत तंत्रे, भूतिराजतनयाकडून द्वैताद्वैत शैव दर्शन, लक्ष्मणगुप्ताकडून क्रमपद्धती आणि त्रिक दर्शने, इंदुराजाकडून ध्वनिशास्त्र, भट्टतोताकडून नाट्यशास्त्र अशा विविध गुरूंकडून विविध विद्या त्याने संपादल्या. त्यानंतर थोड्याच कालात तो सिद्धान्त, वाम, भैरव, यामल, कुल, त्रिक, एकवीर, इ. सर्व शैव पंथांचा आध्यात्मिक गुरू मानला जाऊ लागला. या सर्व पंथांच्या तत्त्वज्ञानाचे तो अधिकारवाणीने विवेचन करी. त्यामुळे शैव लोक त्याला श्रीकंठाचा अवतार मानू लागले. ज्या वेळी त्याने ईश्वरप्रत्यभिज्ञाविवृतिविमर्शिनी लिहायला सुरवात केली, त्या वेळी तो जीवन्मुक्त अवस्थेला पोचलेला होता, असे सांगतात.

अभिनवगुप्ताच्या अंताबद्दल काश्मीरमधील पंडितांच्या व काही मुसलमानांच्या घराण्यांतही एक परंपरागत समजूत प्रचलित आहे, ती अशी – अभिनवगुप्ताला आपले जीवितकार्य संपले आहे असे जेव्हा वाटले, तेव्हा त्याने आपल्या बाराशे शिष्यांसह भैरवगुंफेत प्रवेश केला. त्यानंतर तो कधीही लोकांना दिसला नाही. श्रीनगर-गुलमर्ग या रस्त्याच्या मध्यभागी, मगम या गावापासून सुमारे पाच मैल अंतरावर अद्यापही ही गुंफा दाखवतात.

ग्रंथ, टीका व स्तोत्रे धरून याने केलेली रचना पन्नासच्या वर जाते. याच्या उपलब्ध ग्रंथांची नावे अशी – बोधपंचदशिका, मालिनीविजयवार्तिक, परात्रिंशिका, विवृती, तंत्रालोक, तंत्रसार, तंत्रवटधानिका, ध्वन्यालोकलोचन, अभिनवभारती, भगवद्गीतार्थसंग्रह, परमार्थसार, ईश्वरप्रत्यभिज्ञाविवृतिविमर्शिनी, ईश्वरप्रत्यभिज्ञाविमर्शिनी, पर्यंतपंचाशिका, घटकर्परकुलकविवृती, क्रमस्तोत्र, परमार्थद्वादशिका, परमार्थचर्चा, महोपदेशविंशतिका, अनुत्तराष्टीका, अनुभवनिवेदन, रहस्यपंचदशिका, तंत्रोच्चय, पुरूरवोविचार, क्रमकेली, शिवदृष्ट्यालोचन, पूर्वपंचिका, पदार्थप्रवेशनिर्णयटीका, प्रकीर्णकविवरण, काव्यकौतुकविवरण, कथामुखतिलक, लघ्वीप्रक्रिया, भदवादविदारण, देवीस्तोत्रविवरण, तत्त्वाध्वप्रकाशिका, शिवशक्त्यविनाभावस्तोत्र, बिंबप्रतिबिंबवाद, परमार्थसंग्रह, अनुत्तरशतक, प्रकरणस्तोत्र, नाट्यालोचन व अनुत्तरतत्वविमर्शिनीवृत्ती. याशिवाय त्याने आणखी काही ग्रंथ रचले आहेत, असे दर्शविणारे पुरावे उपलब्ध आहेत. त्याच्या काही महत्त्वाच्या ग्रंथांची थोडक्यात माहिती अशी –

**तंत्रालोक** – हा तंत्रशास्त्रावरचा विश्वकोशच आहे, असे म्हटले पाहिजे. यात सदतीस परिच्छेद असून, त्यांत तंत्रशास्त्राचे सिद्धान्त, तंत्राच्या प्रक्रिया, तंत्रविषयक नाना मते, बंध-मोक्ष, मोक्षाचे स्वरूप, परमार्थसाधक शैवाचारांच्या विविध प्रक्रिया, इ. विषयांचे सुंदर व साधार विवेचन आहे. तंत्रशास्त्रावरील हा अत्यंत प्रमाणभूत ग्रंथ असून, अभिनवगुप्ताने आपल्या स्वतःच्या अनुभवावरून त्यातील विषयांचे प्रतिपादन केले आहे.

**ध्वन्यालोकलोचन** – आनंदवर्धनाच्या ध्वन्यालोकावरील ही प्रौढ व्याख्या आहे. अभिनवगुप्ताच्या रससिद्धान्तांबद्दल साहित्यशास्त्र त्याचे ऋणी आहे. त्याचे रसविषयक विवेचन वैज्ञानिक व युक्तिसंगत आहे.

**अभिनवभारती** – भरतमुनीच्या नाट्यशास्त्रावरचे पांडित्यपूर्ण व प्रमेयबहुल व्याख्यान या ग्रंथात आहे. हा ग्रंथ नसता, तर नाट्यशास्त्रातील तत्त्वांचा पत्ता आजही लागला नसता.

**परमार्थसार** – त्रिकदर्शनाच्या अतिगूढ अशा महत्त्वाच्या सिद्धान्तांचे वर्णन या ग्रंथात आहे.

**ईश्वरप्रत्यभिज्ञाविमर्शिनी** – आपल्या प्रत्यभिज्ञासूत्रांवर उत्पलाचार्यांनी स्वतःच जी विवृती लिहिली, तिच्यावर अभिनवगुप्ताने ही प्रौढ व पांडित्यपूर्ण व्याख्या लिहिली आहे.

**पर्यन्तपंचाशिका** – शंभुनाथाने प्रवर्तित केलेल्या कुलदर्शनाचे यात विवेचन आहे.

पांडित्यात अभिनवगुप्ताचा असा मोठा अधिकार असल्यामुळेच नारदाच्या संगीतमकरंदात त्याला महामहेश्वराचार्य अशा उपाधीने गौरविले आहे. व्याकरणाच्या इतिहासात पतंजलीचे व वेदान्ताच्या इतिहासात वाचस्पती मिश्राचे जे महत्त्वपूर्ण स्थान आहे, तेच अलंकारशास्त्रात अभिनवगुप्ताचे आहे. त्याने अलंकारशास्त्राला दर्शनाच्या पदवीवर आरूढ केले. त्याच्या रससिद्धान्ताचा आणि ध्वनिसिद्धान्ताचा मम्मट, हेमचंद्र, विश्वनाथ, शारदातनय, जगन्नाथ, इ. आलंकारिकांनी आपापल्या ग्रंथांत उल्लेख केला आहे, त्यांना मान्यता दिली आहे आणि त्याबद्दलचे उतारेच्या उतारे उद्धृत केले आहेत. त्यामुळे रस व ध्वनी या सिद्धान्तांचा प्रवर्तक म्हणून त्याची जास्त प्रसिद्धी झाली आहे. वास्तविक क्रम, कुल आणि प्रत्यभिज्ञा या अद्वैत शैव दर्शनांचा अधिकारी विद्वान म्हणूनही त्याची योग्यता फार मोठी आहे. तो केवळ शुष्क तार्किक नव्हता; तर विश्वाचे रहस्य शोधणारा मर्मज्ञ साधकही होता. [ हिं. वि. को.; म. ज्ञा. को.; सं. सा. इ.; अभिनवगुप्त – के. सी पांडे ]

## अभिलषितार्थचिंतामणी

एक प्राचीन ज्ञानकोश. हा छंदोबद्ध आहे. याला मानसोल्लास असेही म्हणतात. सोमेश्वर (तृतीय) हा याचा कर्ता होय. याविषयी कोशाच्या अनुक्रमणिकेत पुढील श्लोक आहे–

चालुक्यवंशतिलकः श्रीसोमेश्वरभूपतिः ।
कुरुते मानसोल्लासं शास्त्रं विश्वोपकारकम् ।।

अर्थ – चालुक्यवंशाचा भूषणभूत असा सोमेश्वर राजा विश्वाला

उपकारक शास्त्र मानसोल्लास या नावाने निर्माण करीत आहे.

विक्रमादित्याचा पुत्र सोमेश्वर हा कल्याण येथे इ. स. ११२६ साली गादीवर बसला. राज्यावर आल्यानंतर त्याने या कोशाची रचना केली. हा राजा प्रकांड पंडित होता, याविषयी कोणाचा मतभेद नाही; परंतु त्याने एकट्याने हा ग्रंथ रचला असेल, याविषयी विद्वान लोक संदेह व्यक्त करतात. त्याने अनेक विद्वानांच्या सहकार्याने ही कोशरचना पूर्ण केली असेल, असे त्यांचे म्हणणे आहे. परंतु डॉ. शिवशेखर मिश्र यांनी मात्र अनेक प्रमाणांच्या आधारे, ही एकट्या सोमेश्वराचीच कृती आहे, असे सिद्ध केले आहे.

प्रस्तुत कोशात वस्त्रभोग, पुत्रोपभोग, अन्नभोग, आलेख्य कर्म, नृपगेह, आस्थाभोग, राष्ट्रपालन, इ. अनेक प्रकरणे आहेत. इ. स. च्या बाराव्या शतकापर्यंत भारतात विद्या व कला या संबंधात जी ग्रंथसंपदा निर्माण झाली होती, तिचे आलोडन करून त्यांतील सारसर्वस्व सोमेश्वराने आपल्या ग्रंथात आणले आहे.

अभिलषितार्थ चिंतामणी हा भारतीय संस्कृतीचा एक अनुपम व श्रेष्ठ असा ग्रंथ आहे. विशुद्ध हिंदू संस्कृतीचा परिचय करून देणारा हा शेवटचा ग्रंथ म्हटला पाहिजे. चालुक्य वंशातले राजे हे मुसलमानी संपर्कापासून पूर्णपणे अलिप्त होते. या देशात मुसलमानी संस्कृतीचा प्रसार होण्यापूर्वीच या चालुक्य वंशाची इतिश्री झाली होती. इ. स. बाराशेच्या जवळपास चालुक्य वंशाचा शेवटचा सम्राट सोमेश्वर चौथा हा राज्य करीत असता, यादवांनी त्याच्या राज्याचा उत्तर विभाग आणि होयसळांनी दक्षिण विभाग काबीज करून चालुक्यवंशाची सत्ता नष्ट केली.

अभिलषितार्थ चिंतामणीचा व्याप फार मोठा व सर्वोपयोगी असा आहे. सामान्यपणे लेखकाची दृष्टी राजजीवन आणि राजनीती यांवरच केंद्रित झालेली असली, तरी ज्ञान-विज्ञानाची अनेक क्षेत्रे धांडोळून, त्यांचेही सार प्रस्तुत ग्रंथात त्याने दिले आहे. या दृष्टीने त्याने ज्योतिष, अश्वशास्त्र, गजशास्त्र, पाकशास्त्र, वास्तुशास्त्र, चित्रलेखन, पशुचिकित्सा व संगीतादी ललित कला यांचे विस्तृत व महत्त्वपूर्ण विवेचन केले आहे. राजनैतिक सिद्धान्तांच्या अभिव्यक्तीसाठी त्याने स्मृती, पुराणे, नीतिशास्त्र व अर्थशास्त्र यांचा आश्रय घेतला असला तरी, त्यातही त्या विषयातले सिद्धांत मांडताना त्याने आपली स्वतंत्र बुद्धिमत्ता प्रकट केली आहे.

प्रस्तुत ग्रंथाच्या पुत्रोपभोग प्रकरणात सोमेश्वराने बालकाच्या संस्कारांचे वर्णन केले आहे. ते करताना त्याने वैदिक विधान प्रमाण मानले असले, तरी गीत, वाद्य, नृत्य यांच्याबरोबरच तत्कालीन कौटुंबिक व सामाजिक चालीरीतींचेही निदर्शन केले आहे. सोमेश्वर वेदांना जेवढे प्रामाण्य देतो, तेवढेच लौकिक विधींनाही देतो, हे त्याचे वैशिष्ट्य होय. तत्कालीन क्रीडाविनोदही त्याने आपल्या ग्रंथात वगळले नाहीत. एतावता जगातला पहिला ज्ञानकोश म्हणूनच प्रस्तुत ग्रंथाचा गौरव करावा लागेल. [ मानसोल्लास; मु. पू. म. २ ]

**अभिवादन** स्वनामोच्चारणपूर्वक नमस्कार. 'आभिमुख्येन वाद्यते आशीः कार्यते अनेन'=समोर उभे राहून गुरूकडून आशीर्वाद ज्यामध्ये मिळविला जातो, ते कृत्य म्हणजे अभिवादन होय (हलायुध). अभिवादन तीन प्रकारचे असते- नित्य, नैमित्तिक व काम्य. प्रहररात्री शिष्याने गुरूजवळ जो राहून करायचे ते नित्य, गावाहून परत आल्यावर करायचे ते नैमित्तिक व दीर्घायुष्य आणि स्वर्गप्राप्ती यांच्यासाठी करायचे ते काम्य. ऋत्विज्, श्वशुर, चुलता व मामा यांना उत्थापन देऊन 'अभिवादये अमुकशर्माऽहं भो', असे म्हणून अभिवादन करायचे असते. प्रत्यभिवादन कसे करावे ते ठाऊक नसेल त्यांनी अभिवादन करताना वरील उच्चारणातला 'भो' शब्द गाळायचा असतो. ब्राह्मण, पुरुष, क्षत्रिय, वैश्य किंवा स्त्री यांना अभिवादन करतेवेळी स्वतःचे नाव गाळून 'मी नमस्कार करतो' एवढे म्हणायचे. ब्राह्मणाने उजवा हात कानाच्या, क्षत्रियाने छातीच्या व वैश्याने कमरेच्या रेषेपर्यंत आणून अभिवादन करायचे. शूद्राने आपला हात खाली पायापर्यंत लांब न्यावा. विद्वानांना दोन्ही हातांनी व इतरांना एकाच हाताने अभिवादन करावे, सवर्णांनी सवर्णांनाच अभिवादन करावे व इतरांना नुसते 'स्वस्ति' म्हणावे, असे सांगितले आहे. अभिवादनाविषयी मनू म्हणतो-

अभिवादनशीलस्य नित्यं वृद्धोपसेविनः ।
चत्वारि संप्रवर्धन्ते आयुर्विद्यायशोबलम् ॥
(२.१२१)

अर्थ – अभिवादन हे ज्यांचे शील आहे व जो नित्य वृद्धांची परिचर्या करतो, अशा (पुरुषा)ची आयुष्य, विद्या, यश आणि बल ही चार वृद्धी पावतात. पाहा – प्रणाम. [ हि. ध. ]

**अभिवादनीय नाम** मुलाने आईबापांना वंदन करताना 'मी अमुक नावाचा अभिवादन करीत आहे,' असे म्हणून उच्चारायचे आत्मनाम हे अभिवादनीय होय. हे नाव पित्याने ठेवायचे असते व ते इतरांपासून गुप्त राखायचे असते. पाहा – नामकरण.

**अभिषेक** अभि + षिच् = सर्वांगी सर्व बाजूंनी शिंपडणे, या धातूपासून हा शब्द बनला आहे. शुक्ल-कृष्ण यजुर्वेद, ब्राह्मणे, श्रौतसूत्रे, इ. ग्रंथांत हा शब्द आढळतो; ऋग्वेद व सामवेद यांत आढळत नाही. वेदकाळी राजाच्या राज्या...

रोहणप्रसंगी त्याच्या मस्तकावर समंत्रक पाणी शिंपडून त्याला शुद्ध करीत व त्या विधीला अभिषेक म्हणत. 'शीर्षतो वा अभिषिच्यमानोऽभिषिच्यते' (=ज्याचा अभिषेक करायचा त्याच्या मस्तकापासून अभिषेक सुरू करावा) असे शतपथ ब्राह्मणात सांगितलेले आहे (९. ३. २. ३). अभिषेकाचे वर्णन तै. ब्रा. (१. ७. ५), श. ब्रा. (५. ३. ३). ऐ. ब्रा. (८. ५), इ. ब्राह्मण ग्रंथांत दिलेले आहे. त्या वेळी म्हणायचे मंत्र निरनिराळ्या संहितांमध्ये आढळतात.

प्राचीन काळी फक्त राजांनाच अभिषेक होत असे. इतर लोक त्या विधीला पात्र नसत. इतर देशांत प्रत्यक्ष रक्ताने अभिषेक करीत व त्यामुळे शरीरात उत्साह निर्माण होतो, असे मानीत. भारतात मात्र असा रक्ताभिषेक कधीही नव्हता. हा विधी सार्वभौम सत्ता मिळविण्यासाठी करायचा असे. सम्राट व महाराजे यांच्या राज्याभिषेकांचे वर्णन महाभारतात आले आहे. भारतीय युद्धानंतर राज्यारोहणप्रसंगी युधिष्ठिराला अभिषेक झाल्याचे वर्णन महाभारतात पाहायला मिळते (शांति. ४०. २´). वनवासातून परत आल्यावर रामचंद्राला केलेल्या राज्याभिषेकाचे वर्णन कालिदासाने पुढील श्लोकात केले आहे–

सरित्समुद्रान् सरसीश्च गत्वा
रक्षःकपीन्द्रैरुपपादितानि ।
तस्यापतन् मूर्ध्नि जलानि जिष्णो-
विन्ध्यस्य मेघप्रभवा इवापः ॥

(रघु. १४.८)

अर्थ – राक्षस व वानर यांच्या नायकांनी निरनिराळ्या नद्या, समुद्र, सरोवरे, इ. ठिकाणीं जाऊन त्यांची आणलेली जले विंध्याच्या मस्तकावर मेघातून पाणी पडावे त्याप्रमाणे त्या जयशील रामाच्या मस्तकावर पडली.

सम्राट अशोक याने कलिंगविजयानंतर चार वर्षांनी आपला राज्याभिषेक करून घेतला होता. बृहत्कथेत नरवाहनदत्ताचा अभिषेक वर्णिला आहे. भावी कालात ज्याला राज्य मिळायचे, अशा युवराजालाही अभिषेक होत असे व त्याला यौवराज्याभिषेक असे म्हणत. ज्या प्रसंगी रामचंद्राला वनवास पत्करण्याची वेळ आली तो प्रसंग त्याच्या यौवराज्याभिषेकाचाच होता (वा. रा. २. ३–८).

पुढील काळात अमात्य, सामान्य राजे व राजपुरोहित यांनाही अभिषेक होत असल्याचे 'मूर्धाभिषिक्ता अमात्या राजानः' या हर्षचरितातल्या उल्लेखावरून कळते.

ऐतरेय ब्राह्मणातही सामान्य राजांना अभिषेक होत असल्याचे सांगितले आहे (८.१४).

अथर्ववेदाच्या कौशिकसूत्रात सामान्य राजांच्या अभिषेकाहून श्रेष्ठ राजांचा अभिषेक निराळा कल्पिला आहे (१७. ११–१३).

पुष्याभिषेक नावाच्या आणखी एका अभिषेकाचे सविस्तर वर्णन अथर्वपरिशिष्ट, बृहत्संहिता व कालिकापुराण या ग्रंथांत आढळते. या विधीचे वैशिष्टच म्हणजे चंद्र-पुष्य यांच्या योगावर हा अभिषेक करायचा असतो. याच योगावर पूर्वी इंद्राने असुरांना जिंकले होते. बौद्ध कल्पनेप्रमाणे बोधिसत्त्वाचा यौवराज्याभिषेक व अभिनिष्क्रमण या दोन्ही घटना याच योगावर घडल्या.

महाभारत (शांति. ४०), रामायण, अग्निपुराण व मानसार या ग्रंथांत अभिषेकासंबंधी माहिती आली आहे. वरील ग्रंथांत या विधीतल्या तंत्राची व पौरोहित्याची कल्पना विकसित झालेली दिसत नसली, तरी या ग्रंथांच्या रचनाकाली वैदिक अभिषेकांच्या विधींत बराच फरक पडला होता, असे दिसून येते. वेदोत्तर अभिषेकविधीची उभारणी मुख्यत्वे उत्तरकालीन कल्पनांवर आधारलेली दिसते. या संस्कारातील सर्वसाधारण गोष्टी खालीलप्रमाणे असत –

अभिषेकाच्या आदल्या दिवशी राजा विधिपूर्वक स्नान करी. अभिषेकाच्या पूर्वी किंवा त्या वेळी तो आपले अनेक मंत्री निवडी. राणी, हत्ती, श्वेताश्व, पांढरा बैल, शुभ्र छत्र व चामर, इ. राजरत्नांची निवड होई. व्याघ्रचर्माच्छादित सुवर्णसिंहासन किंवा भद्रासन तयार केले जाई. सप्तसमुद्रांचे जल, मध, दूध, दही, इ. वस्तूंनी भरलेले सुवर्णकलश सिंहासनाजवळ आणून ठेवीत. अभिषेकविधीची इतर सामग्री पुढीलप्रमाणे असे –

वड, उदुंबर, अश्वत्थ व प्लक्ष या लाकडांची पात्रे; प्रियंगू व यव या धान्याच्या ओंब्या; उदुंबराचा मंचक, चमस व फांदी.

नंतर राजा आपल्या राणीसह सिंहासनावर बसे. सामंत, मांडलिक, इ. राजे त्याची मोठ्याने द्वाही फिरवीत. नंतर पुरोहित, ज्या मंत्रांत वरुणाचा सम्राज् या नावाने उल्लेख आला आहे, असे मंत्र म्हणून उदुंबराच्या शाखेने जल, दूध, दही, मध, इ. द्रव्यांनी त्याला अभिषेक करी. एकटा पुरोहितच नव्हे; तर इतर ब्राह्मण, मंत्री, आप्त व प्रजाजनही त्याला अभिषेक करीत. नंतर राजा इंद्राचे स्तवन करी. पुरोहित व उपाध्याय यांना दक्षिणा देई. नंतर पुरोहित राजाला प्राशन करण्यासाठी सुरेने भरलेले पात्र देई व सुरा ही सोमरूप आहे, असे सांगे. मग शांतिमंत्रांचा पाठ होई. अग्निपुराण व मानसार यांत सांगितल्याप्रमाणे राजा राजधानीच्या नगराभोवती एक प्रदक्षिणा करी व नंतर अभिषेकाचा विधी समाप्त होई. त्या प्रसंगी राज्यात सर्वत्र आनंदोत्सव केला जाई व कैद्यांनाही मुक्त करण्यात येई.

ऐतरेय ब्राह्मणात अशा अभिषिक्त झालेल्या प्राचीन राजांची व त्यांना अभिषेक करणाऱ्या ऋत्विजांची नावे पुढीलप्रमाणे दिली आहेत (८.४.७)–

| राजा | ऋत्विज |
|---|---|
| (१) जनमेजय पारिक्षित | —तुर कावषेय |
| (२) शार्यात मानव | —च्यवन भार्गव |
| (३) शतानीक सात्राजित | —सोमशुष्म वाजरत्नायन |
| (४) आंबाष्ठ्य | —पर्वत व नारद |
| (५) युधांश्रौष्टि औग्रसैन्य | —पर्वत व नारद |
| (६) विश्वकर्मा भौवन | —कश्यप |
| (७) सुदास पैजवन | —वसिष्ठ |
| (८) मरुत्त आविक्षित | —संवर्त आंगिरस |
| (९) अंग | —उदमय आत्रेय |
| (१०) भरत दौष्यन्ती | —दीर्घतमा मामतेय |

महाराष्ट्रात छत्रपती शिवाजीमहाराजांनी असाच स्वतःवर राज्याभिषेक करून घेतला होता. त्याचे पौरोहित्य काशीचा सुप्रसिद्ध विद्वान गागाभट्ट याने केले होते. या समारंभाची विस्तृत वर्णने बखरीत आली आहेत.

**पुनरभिषेक**—हा संस्कार ज्याच्यावर करायचा तो राजा पूर्वीच अभिषिक्त असतो. या पुनरभिषेकाने त्याचे बलवर्धन करायचे असते. यामुळे, ज्या अनेक शक्ती राजामधून गेलेल्या असतात, त्या त्याला पुनश्च प्राप्त होतात. याचा विधी पुढीलप्रमाणे—

व्याघ्रचर्माने आच्छादित उदुंबराचा मंचक, उदुंबराचाच एक चमस व फांदी, दही, मध, तूप, ऊन पडले असताना पडलेल्या पावसाचे उदक, तृणांकुर, सुरा आणि दूर्वा अशी सामग्री आणावी. स्फ्य नावाच्या आयुधाने वेदी आखून वरील मंचक अर्धा वेदीत व अर्धा वेदीबाहेर ठेवावा. राजाने वीरासन घालून वेदीमागे बसावे व दोन्ही हातांनी तो मंचक धरून त्यावर आरूढ होण्याकरिता देवांना पाचारण करावे. त्या वेळी ‘देवस्य त्वा सवितुः प्रसवे...’ इ. मंत्रांनी सवित्याला आवाहन करावे. मग राजाने त्या मंचकावर आरोहण करावे. ऋत्विजाने त्याला अभिषेक करावा व त्याच्या हाती सुरापात्र द्यावे. राजाने त्यातील सुरा पिऊन अवशिष्ट भाग आपल्या मित्राला द्यावा. मग मंचकाखाली उतरून व पूर्वाभिमुख बसून ‘नमो ब्रह्मणे...’ हा मंत्र तीनदा म्हणावा. मग विजयाची इच्छा प्रदर्शित करून ऋत्विजाला दक्षिणा द्यावी व अग्नीत समिधा टाकावी. मग घरी गेल्यावर गृह्याग्नीच्या मागे बसावे. ऋत्विजाने आज्यपात्रातून अग्नीला आहुती द्यावी व राजाच्या कल्याणासाठी काही मंत्र म्हणावे.

**ख्रिस्ती अभिषेक**—पाश्चात्य देशांत पहिले रोमन साम्राज्य लयाला गेल्यावर पुढे आलेले ख्रिस्ती राजे पोपकडून राज्याभिषेक करवून घेऊ लागले.

इंग्लिश राजे वेस्ट मिन्स्टर ॲबेमध्ये व स्कॉटिश राजे स्कोन येथे राज्याभिषेक करवून घेत. आजमितीस इंग्लंडचा राजा राज्यारूढ झाल्यानंतर एका वर्षाने हा अभिषेकविधी करून घेतो.

ख्रिस्ती धर्मात तेलाने अभिषेक होतो. त्यामुळे देवाच्या सेवेसाठी आवश्यक ते पावित्र्य मिळते, अशी समजूत आहे. हिब्रू शब्द मसीह व ग्रीक शब्द ख्रिस्त यांचा अर्थ अभिषिक्त असा होतो. येशूचा हा अभिषेक पवित्र आत्म्याच्या सामर्थ्याने झाला. ख्रिस्तशिष्यांचा अभिषेक ईश्वराकडून झाला, असे समजतात. चर्चच्या मुख्य याजकालाही अभिषेक होत असतो.

**देवाभिषेक**—एखाद्या मूर्तीची प्रतिष्ठा करण्याच्या वेळी तिला अभिषेक करण्याचा विधी आहे. देवाच्या षोडशोपचार पूजेत पंचामृतस्नानानंतर महाभिषेक करतात.

अभिषेक करीत असताना शिवासाठी रुद्राध्याय, विष्णूसाठी पुरुषसूक्त किंवा पवमान पंचसूक्त, गणपतीसाठी गणपति-अथर्वशीर्ष, देवीसाठी श्रीसूक्त व सूर्यासाठी सौर सूक्ते म्हणतात. हा अभिषेक झाल्यानंतर पुनरभिषेकातले ‘देवस्य त्वा सवितुः प्रसवे...’ इ. मंत्र म्हणण्याची पद्धत आहे. पुण्याहवाचनात व शांतिकर्मांनंतर यजमानदंपतीला व लग्नात वधू-वरांना अभिषेक केला जातो, त्याला अमृताभिषेक असे म्हणतात. हा अभिषेक दूर्वा व पंचपल्लव यांनी केला जातो. काही संस्कारांच्या वेळी जलाशयावर जे स्नान करतात, त्यालाही अभिषेक म्हणतात.

**बौद्ध अभिषेक**—बौद्धांच्या दसभूमीत शेवटच्या भूमीस अभिषेकभूमी असे म्हणतात. वज्रयानमताप्रमाणे अभिषेकाचे सात प्रकार आहेत—उदकाभिषेक, मुकुटाभिषेक, पट्टाभिषेक, वज्रघंटाभिषेक, वज्रव्रताभिषेक, नामाभिषेक व अनुज्ञाभिषेक. यातले पहिले दोन देहशुद्धीसाठी, तिसरा-चौथा वाचाशुद्धीसाठी, पाचवा व सहावा चित्तशुद्धीसाठी व सातवा ज्ञानशुद्धीसाठी आहे.

जैनांच्या एका आचार्याला अभिषेक अशी उपाधी असते. त्याला जैनसूत्रे योग्य पद्धतीने कशी वाचावी व त्यांचा नेमका अर्थ काय, हे माहीत असावे लागते. पाहा—राजसूय, अभिषेचनीय. [ हि. ध.; म. ज्ञा. को.; बौ. ध. द.; प. ध. शा. को.]

## अभिषेकमंत्र

देवाच्या षोडशोपचार पूजेत अभिषेक नावाचा एक विधी असतो. यात देवाला समंत्रक स्नान घालायचे असते. त्यासाठी पुढील मंत्रांचा विनियोग करावा, असे आचारेंदु या ग्रंथात सांगितले आहे—

**स्वर्णघर्मानुवाकेन महापुरुषविद्यया ।**
**पौरुषेण च सूक्तेन सामनीराजनादिभिः ।।**

अर्थ—स्वर्णघर्मानुवाक, महापुरुषविद्या, पुरुषसूक्त व सामनीराजन, इ. मंत्रांनी (देवाला सुगंधित उदकाने स्नान घालावे).

एखाद्या मंगलकार्यात जेव्हा यजमानदंपतीला अमृताभिषेक करायचा असेल, त्या वेळी ‘हिरण्यवर्णाः शुचयः...’, ‘[illegible]

मिह देवाः...', इ. मंत्रांचा विनियोग करण्याची प्रथा आहे.

**अभिषेचनीय** राजसूय यज्ञातील हा एक सोमयाग आहे. हा पाच दिवस चालतो, चैत्र प्रतिपदेस यज्ञभूमीच्या दक्षिण भागात दीक्षाविधी होतो. यामध्ये होता भृगुगोत्रातला असावा लागतो. सोम आणल्यानंतर सविता, अग्नी गृहपती, सोम, बृहस्पती, इंद्र, रुद्र, मित्र व वरुण या देवतांना चरूच्या आहुती देतात. नंतर ब्रह्मा रत्नींना सांगतो, की 'यजमान हा तुमचा राजा आहे.' याशिवाय तो निरनिराळ्या देशांतल्या लोकांचाही उल्लेख करतो. मग उपाध्याय सतरा प्रकारचे जल उदुंबराच्या सतरा पात्रांत आणून ते मोठ्या पात्रात ओततो. त्या पात्राच्या पूर्वेस व्याघ्राजिन आंथरतो. त्याच्या पश्चिम टोकाला शिशाचा तुकडा ठेवलेला असतो. मग पार्थ नामक सहा याग होतात. मग दर्भयुक्त सुवर्णाने जल शुद्ध करून ते चार पात्रांत ओततात. यजमान रेशमी वस्त्र नेसतो. अध्वर्यू त्याला सज्ज धनुष्य व तीन बाण देतो. यजमान शिशाचा तुकडा पायाने लोटून व्याघ्राजिनावरच्या सुवर्णावर पाय ठेवून उभा राहतो. नंतर काही पावले चालून पूर्वाभिमुख होतो. मग अध्वर्यू वगैरे ऋत्विज त्याला अभिषेक करतात. यजमान अंगावरचे जल मृगशृंगाने घासतो. होता त्याला शुनःशेपाचे आख्यान सांगतो. होता व अध्वर्यू यांना शंभर किंवा हजार गायींची दक्षिणा देण्यात येते. मग राजा व्याघ्राजिनावर विष्णुक्रम नावाची तीन पावले टाकतो. पाहा– राजसूय, अभिषेक. [ हि. ध. ]

**अभिष्टुत्** एक प्रायश्चित्त-स्वरूप सोमयाग. याला अग्निष्टुत् असेही म्हणतात. अजाणता ब्रह्महत्या घडली असता या यागाच्या अनुष्ठानाने त्या पातकातून मुक्तता होते (मनु. ११. ७४; वसिष्ठ. २२.७).

**अभिसारिका** अष्टनायिकांपैकी सुप्रसिद्ध नायिका. हिची व्याख्या पुढीलप्रमाणे –

**कान्तार्थिनी तु या याति सङ्केतं साऽभिसारिका ।**

अर्थ – संकेत ठरवून प्रियकराकडे जाणारी ती अभिसारिका. भरताने हिची व्याख्या तिच्या मनोवृत्तीसह दिली आहे –

**उद्दामसन्मथमहाज्वरवेपमाना**
**रोमाञ्चकण्टकितगात्रलतां वहन्ती ।**
**निःशङ्किनी व्रजति या प्रियसङ्गमाय**
**सा नायिका निगदिता त्वभिसारिकेति ॥**

अर्थ – उच्छृंखल मदनाच्या महाज्वराने कापणारी, जिची काया रोमांचांनी कंटकयुक्त झाली आहे अशी व निःशंकपणे प्रियकराच्या भेटीस निघणारी, ती अभिसारिका म्हटली गेली आहे.

रसमंजरीत तिचा आणखी एक विशेष सांगितला आहे –

**स्वयमभिसरति प्रियमभिसारयति वा या, सा अभिसारिका ।**

अर्थ – स्वतः प्रियकराच्या भेटीस जाते किंवा प्रियकराला भेटीस आणविते, ती अभिसारिका.

अभिसार म्हणजे प्रेमिकांनी एकमेकांस चोरून भेटायला जाणे. अभिसारिकेचे स्वीया, सामान्या, मुग्धा, प्रौढा, उत्तमा, मध्यमा, इ. पोटभेद सांगितले आहेत. अभिसारिकेचा प्रियकर परपुरुषच असायला हवा, असा नियम नाही. स्वतःच्या पतीला भेटण्यासाठी घरच्या माणसांचा डोळा चुकवून संकेतस्थळी जाणारी स्त्रीही अभिसारिकाच ठरते. म्हणून या पोटभेदांत स्वीयेला स्थान मिळाले आहे. परकीया अभिसारिकेला याहून निराळे भय असते. आपला व्यभिचार उघडकीस आला, तर आपली अप्रतिष्ठा होईल, कदाचित् आपणास संसारालाही मुकावे लागेल, या भीतीने तिचे काळीज धडधडत असते. शुक्लपक्षाच्या रात्री चांदणे असते; म्हणून ती शुभ्र वस्त्र नेसते. कृष्णपक्षात काळे वा निळे वस्त्र नेसते. उद्देश हा, की भोवतालच्या वातावरणाशी एकरूप व्हावे व कोणाच्या नजरेत येऊ नये. हिचे भेद असे – अभिसार करताना जिला केवळ साहसाचेच साहाय्य असते, ती उत्तमा, जी दूतीच्या सोबतीने जाते, ती मध्यमा व जी कालावर विसंबून राहते, ती अधमा होय.

अष्टनायिकांत अभिसारिका हीच रसिकांना विशेष प्रिय आहे. अमरुशतकातला हिच्या वर्णनाचा श्लोक असा–

**उरसि निहितस्तारो हारः कृता जघने घने**
**कलकलवती कांची पादौ रणन्मणिनूपुरौ ।**
**प्रियमभिसरस्येवं मुग्धे त्वमाहतडिण्डिमा**
**यदि किमधिकत्रासोत्कम्पं दिशःसमुदीक्षसे ॥**

अर्थ–तुझ्या हृदयावर मुक्तामाला झळकत आहे. पुष्ट जघनावर मेखला किणकिणत आहे. पायात मणि-नूपुरे झणत्कार करीत आहेत. हे मुग्धे, अशा प्रकारे तू जणू वाद्ये वाजवीत अभिसाराला निघाली आहेस. मग आता (कोणी पाहील का या) भयाने आजूबाजूला कशाला पाहतेस ? [ शृंगारनायिका ]

**अभिज्ञा** दिव्य शक्ती. ही पाच प्रकारांनी आविर्भूत होते – विविध चमत्कार, दिव्य श्रवण, दिव्य दर्शन, परचित्तविज्ञान व पूर्वजन्मस्मरण. बुद्धाच्या मते योगी समाधिबलाने या शक्ती मिळवू शकतो. मात्र त्याने तेच ध्येय मानू नये.

**अभीष्टतृतीया** मार्ग० शुद्ध तृतीया. हे तिथिव्रत आहे. या दिवशी गौरीची पूजा करून अभीष्ट सिद्धी-

साठी तिची प्रार्थना करतात. (स्कं. का. ८३.१-८). [ हि. ध. ]

**अभीष्टचिंतन** एखाद्या व्यक्तीच्या किंवा संस्थेच्या उत्कर्षाची इच्छा व्यक्त करणे, म्हणजे अभीष्टचिंतन होय. ही सामाजिक प्रथा सर्व समाजांत सर्व काळी दिसून येते. आपला आनंद स्वतःपुरता न ठेवता इतरांपुढे व्यक्त करणे आणि आपल्या आनंदात इतरांनाही सहभागी करून घेणे, ही एक सामाजिक प्रवृत्ती आहे. वाढदिवस, वर्षारंभ, इ. विशेष प्रसंगीं संबंधित व्यक्तीचे अभीष्टचिंतन करण्याची ही प्रथा सर्वत्र आढळते. वडीलधाऱ्यांनी लहानांचे अभीष्टचिंतन करणे म्हणजेच आशीर्वाद देणे होय.

परस्परांच्या जीवनात आनंद, आपुलकी व स्नेहभाव वृद्धिंगत होणे, या दृष्टीने या सामाजिक आचाराचे महत्त्व प्राचीन काळापासून आजपर्यंत यत्किंचितही कमी झालेले नाही. ओवाळणे, दृष्ट काढणे, पुष्पहार किंवा गुच्छ अर्पण करणे. हे अभीष्टचिंतनाचे विविध प्रकार लोकप्रिय आहेत. [ म. वि. को. ]

**अभीष्टसप्तमी** कोणत्याही मासाची शु. सप्तमी. या दिवशी हे व्रत करतात. या व्रतात सागर, द्वीप, पाताल व पृथ्वी यांची पूजा करतात. [ हि. ध. ]

**अभेदानंद** ( इ. स. १८६६–१९३९ ) भारतीय संस्कृतीचे प्रचारक व रामकृष्ण परमहंसांचे शिष्य. यांनी संस्कृत व इंग्रजी या भाषांचा चांगला अभ्यास केला होता. शंकराचार्यांप्रमाणे तत्त्वज्ञानी होण्याचा त्यांनी निश्चय केला व त्यासाठी आपल्या आवडीचा चित्रकलेचा अभ्यासही सोडून दिला. पुढे रामकृष्ण परमहंसाच्या देखरेखीखाली त्यांनी शिवसंहितेचा अभ्यास केला. इ. स. १८८६ नंतर त्यांनी संन्यास घेतला व अभेदानंद हे नाव धारण केले. त्यानंतर चौदा हजार फूट उंचीवर असलेल्या थंड गुहेत त्यांनी साधना केली. त्या साधनेत सत्यासंबंधी विचार केला. मग त्यांनी पायी तीर्थयात्रा केल्या. इ. स. १८९६ मध्ये विवेकानंदांच्या निमंत्रणावरून ते लंडनला गेले. तिथे त्यांनी हिंदू धर्मावर व्याख्याने दिली आणि वेदान्त व राजयोग यांचे वर्ग चालवले. इ. स. १८९७ मध्ये त्यांनी न्यूयॉर्कमधील वेदान्त सोसायटीचे नेतृत्व स्वीकारले आणि सतत वीस वर्षे तिथे वेदान्त, पातंजल योग, भगवद्गीता इत्यादींचे वर्ग चालवले. नंतर पूर्वेकडील मलाया, चीन, जपान या देशांत धर्मप्रसाराचे काम करीत ते फिरले. तिबेटातही ते गेले होते. तिथून परतल्यावर १९२३ मध्ये त्यांनी कलकत्त्याला रामकृष्ण वेदान्तसोसायटी स्थापन केली. तसेच दार्जिलिंग येथे त्यांनी एक मठही स्थापला. वेदान्त आणि भारतीय तत्त्वज्ञान यांवर त्यांनी अनेक ग्रंथ लिहिले आहेत. १९३७ मध्ये रामकृष्ण परमहंसांचा शतसांवत्सरिक उत्सव साजरा झाला, त्याचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले होते. [ अ. म. ज्ञा. ]

**अभौतिकवाद** बुद्ध अनात्मवादी आणि अनीश्वरवादी असूनही भौतिकवादी नव्हता. जेव्हा जेव्हा भौतिकवाद्यांशी त्याची गाठ पडली, तेव्हा तेव्हा त्याने त्यांचे जोरदार खंडन केले. भौतिकवादाचे अवलंबन केल्याने ब्रह्मचर्य आणि समाधी यांना प्रतिबंध होतो, असे त्याचे मत होते. एका प्रसंगी त्याने सांगितले, की 'तोच जीव आहे, तोच शरीर आहे, दोन्ही एक आहेत, असे मानल्यावर ब्रह्मचर्यवास होऊ शकत नाही. जीव दुसरा आहे, शरीर दुसरे आहे, असे मत झाल्यानेही ब्रह्मचर्यवास होणार नाही.' ( अंगुत्तर नि. ३ ). याचे तात्पर्य हे, की भौतिकवादी आणि आत्मवादी यांच्या दृष्टीने साधुजीवन हे युक्तिसंगत ठरत नाही. परलोकात शुभ फल प्राप्त व्हावे अशी आकांक्षा असली, तरच मनुष्य साधुजीवनाकडे वळेल. पण भौतिकवादी तर परलोकच मानीत नाहीत. म्हणून बुद्ध अनात्मवादी असूनही, भौतिकवादाचा विरोधी होता. आस्तिकवाद मान्य करून त्याने आचारशिक्षा दिलेली आहे. आस्तिकवाद ही त्याच्या आचारशिक्षेची दार्शनिक आधारशिला आहे. [ बौ. द. मी. ]

**अभ्यंकर वासुदेवशास्त्री** (इ. स. १८६२ ते १९४३) महाराष्ट्रातील प्रख्यात संस्कृत वैयाकरणी व अनेक शास्त्रांचे निष्णात पंडित. इ. स. १९२१ मध्ये इंग्रज सरकारने यांना महामहोपाध्याय ही पदवी दिली. साताऱ्याचे रामशास्त्री गोडबोले यांच्याकडे वासुदेवशास्त्र्यांचे अध्ययन झाले. पुढे त्यांची नेमणूक पुण्याच्या फर्ग्युसन महाविद्यालयात व संस्कृत पाठशाळेवर आली. त्यांनी व्याकरण, वेदान्त, मीमांसा, साहित्य, न्याय, तर्क, ज्योतिष, धर्म, इ. विषयांत प्रावीण्य मिळविले होते. त्यांची लेखनशैली मार्मिक, मूलग्राही आणि सुबोध आहे. त्यांची ग्रंथसंपदा अशी–

संस्कृत टीकाग्रंथ– (१) सर्वदर्शनसंग्रहटीका, (२) मीमांसान्यायप्रकाशटीका, (३) सिद्धान्तबिन्दुटीका, (४) श्रीभाष्यचतुःसूत्री टीका, (५) कुण्डार्कटीका, (६) यतींद्रमतदीपिकाटीका, (७) गीताध्यायटीका.

स्वतंत्र संस्कृतग्रंथ – (१) अद्वैतामोद, (२) कायमोद, (३) धर्मतत्त्वनिर्णय, (४) धर्मतत्त्वनिर्णयपरिशिष्टम्, (५) सूत्रान्तरपरिग्रहविचार.

मराठी भाषान्तरे–(१) ब्रह्मसूत्रशाङ्करभाष्य, (२) पातंजल

महाभाष्य, आणि (३) न्यायकोशाचे संपादन. [ अ. म. ज्ञा. ]

**अभ्यंग** अंगाला तेल, उटणी व अत्तर लावून उष्णोदकाने स्नान करणे, याला अभ्यंगस्नान म्हणतात. याला मांगलिकस्नान असेही नाव आहे. ही चाल प्राचीन काळापासून भारतात आणि इतरही देशांत आहे. माणूस ऐहिक सुखोपभोगासाठी तेले व सुगंधी द्रव्ये वापरू लागल्यावर अभ्यंगस्नानाचा विधी रूढ झाला. शरीराचे स्नायू बलवान् व्हावे व बल, पुष्टी आणि कांती वाढावी, या उद्देशाने अभ्यंगस्नान करण्याची पद्धत निर्माण झाली. आरोग्यवृद्धी हा त्याचा पहिला उद्देश होता. पुढे या प्रकाराला धार्मिक स्वरूप आले. या कामी तीळ किंवा खोबरे यांचे तेल व तूप वापरतात. त्यात चंदन, गुलाब, मोगरा, वगैरे फुलांची अत्तरे मिसळतात. तेलात हळदही टाकतात. लग्नाच्या आधी वधू-वरांना हळद लावतात, तोही अभ्यंगाचाच प्रकार आहे. मंगलकार्याच्या प्रारंभी यजमानदंपतीने अभ्यंगस्नान करावे, असा विधी आहे. महापूजेत देवालाही अभ्यंगस्नान घालतात. बळी देण्याच्या पूर्वी पशूच्या अंगाला अभ्यंग करण्याची प्रथा सर्व मागसलेल्या जातींत आहे. मृताच्या शरीरालाही तेल, तूप, हळद, लावून स्नान घालतात. विशिष्ट प्रसंगी वेदी, देवळे, धार्मिक उपकरणे, शस्त्रे, यंत्रे, वाहने यांनाही तेल लावण्याची प्रथा आहे. राज्याभिषेक, राजसूय, अश्वमेध, इ. प्रसंगीं अभ्यंगस्नानाला विशेष प्राधान्य असून, त्याला १८ द्रव्यांची आवश्यकता असते. ज्यू लोकांत राजे आणि धर्माधिकारी यांना अधिकारासंबंधी अभिषेक करण्याच्या प्रसंगी तेल लावीत. ख्रिस्ताचे मसीह असे जे नाव आहे, त्याचा अर्थ तैलाभिषिक्त असाच आहे. रोमन कॅथॉलिकांच्या मंदिरांतून विशेष प्रसंगी अभ्यंगविधी होत असतो. हिंदूंतही वर्षप्रतिपदा, दिवाळी, इ. सणावारी अभ्यंगस्नान करण्याची चाल आहे.

आजारीपणात, आशौचकालात, स्त्रियांच्या मासिक रजोदर्शनात, उपवासाच्या दिवशी, विद्यार्थिदशेत अभ्यंग करू नये, असे सांगितले आहे. संन्यासी व बैरागी यांनाही अभ्यंग निषिद्ध आहे.

**अभ्यातान होम** एक काम्य होम. तै. सं. ३. ४. ५ मधील मंत्रांना अभ्यातान अशी संज्ञा आहे. देवांनी यज्ञात या अभ्यातान मंत्रांनी होम केल्यामुळे त्यांचे कर्म समृद्ध झाले. म्हणून एखादे कर्म समृद्ध व्हावे, अशी इच्छा करणाऱ्याने हा होम करावा, असे सांगितले आहे. बौ. श्रौ. सूत्रांत या होमाचे स्वतंत्र विधान आहे (१४. १६). हा होम जयहोमाप्रमाणेच इतर कर्मांच्या अनुषंगाने करायचा असतो. हा श्रौत व स्मार्त अशा दोन्ही प्रकारच्या कर्मांत करतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**अभ्यावर्ती चायमान** वैदिक काळातला वीर योद्धा. हा पार्थव म्हणजे पृथूंचा सम्राट होता (ऋ. ६. २७.८). वृचीवंतांचा राजा वरशिख व अभ्यावर्ती या दोघांचे वितुष्ट येऊन युद्ध जुंपले. त्यात अभ्यावर्तीचा पाडाव झाला. या पराजयाने अभ्यावर्ती मनात जळू लागला. त्याने भरद्वाजाची भेट घेतली. भरद्वाज हा इंद्राचा कृपापात्र होता. त्याने आपला पुत्र पायू याच्या करवी धनुष्य, बाण, कवच, इ. शस्त्रे अभिमंत्रित केली व ती अभ्यावर्तीस दिली. मग त्याने इंद्राप्रीत्यर्थ यज्ञ केला. इंद्र सोमग्रहणासाठी तिथे आल्यावर भरद्वाजाने अभ्यावर्तीचा पक्ष घेण्याबद्दल इंद्राला गळ घातली. त्यावर अभ्यावर्तीला इंद्राचे साहाय्य मिळाले. त्याने मग वरशिखावर चढाई करून त्याला ठार केले. हे निर्वाणीचे युद्ध हरियूपीया व यव्यावती या दोन नद्यांच्या काठी झाले (बृ. दे. ५. १२४–१४८; ऋ. ६. २७. ५). हरियूपीया म्हणजेच सांप्रत हडप्पा नावाने ओळखले जाणारे स्थान होय. अभ्यावर्तीला पार्थव असे म्हटले आहे. पाश्चात्त्य विद्वानांच्या मते याचा भारताच्या वायव्येस राहणाऱ्या पारसीकांशी संबंध होता. वरील सूक्तातच दैववात असे एक नाव येते, ते अभ्यावर्तीचेच दुसरे नाव असावे. [ ऋ. द.; वै. सा. सं.; वे. इं.]

**अभ्यास** या शब्दाच्या निरनिराळ्या व्याख्या दिलेल्या आहेत— (१) 'पुनःपुनः संशीलनम्' = ध्येयवस्तूच्या ठिकाणी मनाच्या स्थिरीकरणासाठी प्रयत्न करणे. (सर्व द. सं. पृ. १२४). (२) 'पौनःपुन्यम्' = समाधिविशेष साधण्यासाठी पुनःपुनः प्रयत्न करणे. (गौ. सू. ४.२.२६) (३) 'संस्कारबाहुल्यम्' = वस्तूवर सतत संस्कार करीत राहणे. (गौ. सू. वृ. ३.२.४२)

एखादा विषय चित्तात दृढ होण्यासाठी त्याचे पुनःपुनः प्रतिपादन करणे, तोच पुनःपुनः सांगणे, याला अभ्यास म्हणतात. आरुणीने श्वेतकेतूला 'तत्त्वमसि' हे वाक्य नऊ वेळा सांगितल्यावर मग ते त्याला पटले, असे छांदोग्य उपनिषदात सांगितले आहे. योगशास्त्रात चित्तस्थिरीकरणाचा उपाय म्हणून अभ्यासाला महत्त्व दिलेले आहे. एखाद्या विषयाचे तात्पर्य काय, याचा निर्णय करण्यासाठीदेखील मीमांसादर्शनात अभ्यासाचा प्रमाण म्हणून उपयोग मानलेला आहे. [ हि. इं. फि. १; सं. सा. इ. ]

**अभ्युदय** मानवी जीवनात सुख व समृद्धी यांचा लाभ होणे म्हणजे अभ्युदय साधणे होय. वैदिक धर्मामध्ये अभ्युदयाला फार मोठे महत्त्व दिलेले आहे. मानवी जीवनाचे अंतिम ध्येय निःश्रेयस किंवा मोक्ष मिळविणे हे असले तरी, ऐहिक

सुखाकडे दुर्लक्ष करणे, असा त्याचा अर्थ नाही. काही अतिरेकी धर्माचारांमुळे कर्मकांडाचा वीट येऊन सर्व दुःख आहे; सर्व क्षणिक आहे, ही वृत्ती वाढू लागली. जैन व बौद्ध यांचे संप्रदाय वाढू लागल्यावर वैयक्तिक व राष्ट्रीय अभ्युदयाकडे समाजाचे दुर्लक्ष झाले. अभ्युदयाला अवश्य असलेली वीरवृत्ती आणि पौरुष यांच्याकडे समाजाची पाठ फिरली व शक – हूण– मोगलादी रानटी टोळ्यांच्या आक्रमणापुढे हिंदू समाज हतबल झाला. सर्व समाजाची वृत्तीच पालटली व अहिंसा, मोक्ष, संन्यास; इ. तत्त्वांच्या प्राबल्यामुळे अभ्युदयाबद्दल अगतिकता निर्माण झाली. पुढच्या काळात राजपूत आणि मराठे यांनी काही काल वीरवृत्ती जागृत ठेवली खरी; पण नंतरच्या ब्रिटिश अमदानीत पुन्हा या वृत्तीकडे दुर्लक्ष झाले. अभ्युदयाबद्दलची हिंदू समाजाची ही उदासीनवृत्ती बदलल्याविना वैयक्तिक, सामाजिक व राष्ट्रीय अभ्युदय साधणे कठीण होईल. [ अ. म. ज्ञा. ]

**अभ्युक्षण** प्रोक्षण, अभ्युक्षण व अवोक्षण हे तीन्ही शब्द एखाद्या वस्तूवर पाणी शिंपडणे या अर्थाचे आहेत. याविषयी पुढील श्लोक प्रसिद्ध आहे –

**उत्तानेनैव हस्तेन प्रोक्षणं परिकीर्तितम् ।**
**न्यञ्चताभ्युक्षणं प्रोक्तं तिरश्चावोक्षणं स्मृतम् ।।**

अर्थ – उताण्या हाताने प्रोक्षण, वाकलेल्या (पालथ्या) हाताने अभ्युक्षण व तिरक्या हाताने अवोक्षण केले जाते.

पाने वाढल्यानंतर तुलसीपत्राने त्यावर जे जलसेचन करतात; त्याला प्रोक्षण म्हणतात. श्राद्धविधीत फुले, दर्भ, इ. वस्तूंवर जलसेचन करतात, त्याला अभ्युक्षण म्हणतात. अग्निमुखात स्थंडिल तयार केल्यावर त्यावर जलसेचन करतात, त्याला अवोक्षण म्हणतात. [ आचारेन्दुः; पू. मा. प्र.]

**अभ्री** वैदिक काळातले कुदळीसारखे हत्यार. अथर्ववेदात त्याचा अनेकदा उल्लेख येतो (४.७.५,६; १०.४.१४). त्याचा दांडा वांबू, उदुंबर किंवा विकंकत या वृक्षाचा करीत. त्याचे अग्र वेगवेगळ्या धातूचे असे. कधी कधी त्याची दोन्ही टोके धारदार असत (श. ब्रा. ६. ३. १. ३०.). [ वे. इं. ]

**अमनस्कयोग** नाथपंथाचा एक महत्त्वाचा ग्रंथ. परंपरेनुसार हा ग्रंथ गोरक्षनाथाने रचला, असे मानले जाते. पण गोपीनाथ कविराजांनी त्याबद्दल शंका व्यक्त केली आहे. या ग्रंथाच्या पूर्वार्धात ९८ श्लोक व उत्तरार्धात ११३ श्लोक आहेत. भगवान शिव आणि वामदेव यांच्या प्रश्नोत्तरांतून या ग्रंथाची निर्मिती झाली आहे. यात तारकयोगाचे रहस्य, योगी गुरूची लक्षणे, योगसाधनेसाठी स्थान, योगासनांचे प्रकार, क्रियायोग, विभूतिलक्षण, इ. विषयांची विस्तृत चर्चा केलेली आहे.

यात वर्णिलेल्या तारकयोग व अमनस्कयोग यांतील फरक, लय व त्याचे प्रकार, सिद्धी, सिद्धीच्या मागे लागल्याने होणारा सर्वनाश, लययोग्याला होणारा परमानंद, शांभवी मुद्रेचे रहस्य, इ. विषयांचा उपयोग नाथपंथीय साधकांना होण्यासारखा आहे.

योगाचे पूर्वयोग किंवा तारकयोग आणि उत्तरयोग किंवा अमनस्कयोग असे दोन भेद आहेत. पूर्वयोगात मनाचे अस्तित्व मानलेले आहे. तर अमनस्कयोगात मनाचा संबंधच येत नाही. या ग्रंथाच्या उत्तरार्धात अमनस्कयोगाची महती वर्णन केली आहे. या योगामुळे शांभवी मुद्रा प्राप्त होते. ही मुद्रा म्हणजे आदिशक्ती उमाच होय. ही साधल्याने योग्याला एकवीस पिढ्यांपर्यंत मुक्ती मिळते. या अमनस्कयोगामुळे अमरत्व येते. सर्व प्रकारचे संकल्प संपलेले, सर्व प्रकारची क्रियाशीलता शून्यवत बनलेली, अशा अवस्थेत अद्भुत असा लयानंद प्राप्त होतो. मनाचा लय कसा होतो, त्याचेही वर्णन यात केलेले आहे. केवळ आत्मयोगानेच वायू नष्ट होतो. वायू नष्ट झाला, की मन नष्ट होते. आणि मन नष्ट झाले, की मोक्षाची प्राप्ती होते. सर्व प्रकारच्या भावांपासून मन मुक्त झाले, की आत्मनिष्ठा निर्माण होते. मन उन्मनी अवस्थेला पोचल्यावर अद्वैतभावाची निर्मिती होते. अमनस्कता निर्माण झाली, की चारही बाजूंनी सर्व विषयांच्या बाबतीत मन उदासीन बनते. निरंतर अभ्यासाच्या योगाने योग्याला सहजावस्था प्राप्त होते आणि तो स्वतःच परमानंदस्वरूप बनून जातो. या योग्याचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे (२. ११०) –

**निर्मनःसहजस्थिते पुरुषे न दिवारात्रिशब्दोऽस्ति ।**
**जागरणशयनवर्जितचिन्मात्रानन्दस्थानान् ।।**

अर्थ – अमनस्करूप सहजतत्त्वात वास करणाऱ्या योगी पुरुषाला दिवस आणि रात्र असे शब्दच लागू पडत नाहीत. कारण जागृती, सुषुप्ती या अवस्थांपलिकडील चिन्मात्रानंद अवस्थेमध्ये तो सदैव निवास करीत असतो. म्हणून या अमनस्कयोगाचेच सतत आचरण करायला हवे.

या अमनस्कयोगाची साधना करण्यासाठी प्रस्तुत ग्रंथात गुरूची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. [ ना. सं. उ. वि. ]

**अमरकंटक** (१) मध्य प्रदेशातील विलासपूर जिल्ह्यातला पर्वत. इथून नर्मदा नदी उगम पावते. याचे दुसरे नाव मेकल असून, त्यामुळेच नर्मदेला मेकलकन्यका असे नाव पडले आहे. विंध्य आणि सातपुडा या पर्वतश्रेणींच्या मध्यभागी मेकल पर्वत उभा आहे.

कालिदासाने मेकलाला आम्रकूट म्हटले आहे (मेघ. १७).

कटनी-विलासपूर लोहमार्गावरील पेंडरा स्थानकापासून सात मैलांवर हे ठिकाण आहे. इथे गिरिशिखरावरील एका कुंडातून



नर्मदेचा उगम, अमरकंटक

नर्मदेची लहानशी धार बाहेर येते व पुढे दोन मैल वाहून सत्तर फुटांवरून खाली पडते. या स्थानाला कपिलधारा म्हणतात. नर्मदेच्या उगमाजवळ कुंडाभोवती अमरनाथ, नर्मदा, इ. शैव-वैष्णव मंदिरे आहेत. इथे कर्णमंदिर नावाचे एक भग्न मंदिर असून वास्तुकलेच्या दृष्टीने ते अभ्यसनीय आहे.

प्राचीन काळी अमरकंटकाच्या परिसरात गोंडांचे राज्य होते व रतनपुर नावाची त्यांची राजधानी होती. पुढे हैहयवंशी राजांनी त्यांना जिंकले. इथे जलेश्वर नावाचे स्थान आहे. त्या ठिकाणी केलेले श्राद्ध विशेष फलप्रद होते, असे वायुपुराणात म्हटले आहे (७७.१०–११). शिवाने बाणासुराची तीन पुरे जाळली, त्यांतले दुसरे पुर या पर्वतावर होते (मत्स्य पु. १८८. ७९). सूर्यचंद्रांच्या ग्रहणपर्वात या स्थळाची यात्रा केल्याने अश्वमेधाहून दसपट पुण्य मिळते (पद्मपु. आदि. १५.७४–८०). अशा अनेक गोष्टींमुळे या क्षेत्राचे माहात्म्य वाढले आहे. जगन्नाथपुरीच्या यात्रेला जाताना किंवा तिथून परत येताना अमरकंटकाची यात्रा करण्याचा प्रघात आहे. मत्स्यपुराणात (१८६.३४–३५) या क्षेत्राची प्रशंसा पुढीलप्रमाणे केलेली आहे –

एवं भोगो भवेत्तस्य यो मृतोऽमरकण्टके ।
अग्नौ विषजले वापि तथा चैव ह्यनाशके ॥
अनिवर्तिं गतिर्यस्य पवनस्याम्बरे यथा ।
पतनं कुरुते यस्तु अमरेशे नराधिप ॥

अर्थ – जो कोणी अग्नी, विष, जल किंवा उपवास या साधनांनी या ठिकाणी देह ठेवतो, त्याला (स्वर्गात) विविध भोग मिळतात व जो याशि खरावरून देहपात करतो, त्याला मोक्ष मिळतो. पाहा – नर्मदा, मेकल. [ श्री. ज. ह. दवे – भारती, ८ डिसेंबर १९५७; कल्याण तीर्थांक; हि. ध.; स. भा. प्र. व; व्रतराज ].

(२) माल्यवत पर्वतावरील एक प्रसिद्ध शिखर. इथे विशल्यकरणी नदी उगम पावते. हे क्षेत्र कलिंग देशाच्या सीमेवर आहे. इथे पितरांचे श्राद्ध करण्याबद्दल सांगितले आहे. ही अंगिरा ऋषीची तपोभूमी होती. (ब्रह्मांड पु. ३. १३.४-१६). [ पु. इं. ].

**अमरकोश** उपलब्ध कोशग्रंथांत सर्वांत प्राचीन व अपूर्व असा शब्दकोश. हा मुख्यत: अनुष्टुभ् छंदात रचलेला आहे. अमरसिंह हा याचा कर्ता होय. या कोशावर अनेक पंडितांनी टीका लिहिल्या आहेत. संस्कृत भाषेच्या अभ्यासकांना या कोशाचे किती महत्त्व वाटत होते ते यावरून कळते. मध्ययुगीन शिक्षणक्रमात अमरकोश लहानपणीच मुलांकडून पाठ करून घेत. क्षीरस्वामीची (११ वे शतक) अमरकोशोद्घाटन ही टीका सर्व उपलब्ध टीकांत जुनी, प्रामाणिक व पांडित्यपूर्ण आहे. अमरकोशाची कांडे तीन असून त्यात दहा हजार शब्द आहेत. पहिल्या कांडात स्वर्वर्ग, व्योमादिवर्ग, कालवर्ग, धीवर्ग, शब्दादिवर्ग, नाट्यवर्ग, पातालभोगिवर्ग, नरकवर्ग व वारिवर्ग; दुसऱ्या कांडात भूमी, पुर, शैल, वनौषधी, इ. वर्ग व तिसऱ्या कांडात विशेष्यनिघ्न, संकीर्ण, नानार्थ, इ. वर्ग आहेत. अमरकोशाला त्रिकांड व नामलिंगानुशासन अशीही नावे आहेत. शब्दावरोबरच त्याचे लिंगही कळावे, अशी सोय या कोशग्रंथात केलेली आहे. पाहा– अमरसिंह. [ म. ज्ञा. को.; सं. सा. इ. २ ].

**अमरचंद्रसूरी** ( इ. स. १३ वे शतक ) एक जैन कवी. गुजरातेतील अनहिलपट्टनाच्या ( पाटण ) बीसलदेवाचा हा सभापंडित होता. याने बालभारत नावाचे ४४ सर्गांचे एक काव्य लिहिले असून, त्यात संक्षेपाने महाभारतकथा वर्णिली आहे. याशिवाय याचे छंदोरचनावली व कलाकलाप हे आणखी दोन ग्रंथ आहेत. [ सं. सा. इ.; म. च. को. ]

**अमरदास** (इ. स. १४७९–१५७४) शिखांचा तिसरा गुरू. याचे वडील तेजभान हे व्यापारी होते. अमरदास हा आयुष्याच्या पूर्वार्धात वैष्णवपंथी होता. त्याने कित्येक वर्षे तीर्थयात्रा केल्या, अनेक संतांची सेवा केली, पण त्याला समाधान लाभले नाही. पुढे त्याच्या पुतण्याचे गुरू अंगददेवाची कन्या अमरो हिच्याशी लग्न झाले. तिच्या मुखातून गुरू नानकाची भक्तिपर पदे ऐकून तो प्रभावित झाला व त्याने अंगददेवाची भेट घेतली. या गुरूची सेवा केल्यामुळे त्याला समाधान प्राप्त झाले व त्याने शीख पंथात प्रवेश केला. अंगददेवाने याला आपला वारस नेमले आणि इ. स. १५५२ साली अंगददेवाच्या मृत्यूनंतर,

वयाच्या ७० व्या वर्षी अमरदासाला गुरुपद मिळाले. अंगददेवाचा पुत्र आणि नानकाचा पुत्र यांनी त्याला विरोध केला. तथापि



गुरू अमरदासजी

त्यांचे मत शीख लोकांनी मानले नाही; त्यांनी अमरदास यालाच आपला गुरू मानले. हिंदू लोकांनी मोगल बादशाहा अकबर याच्याकडे अमरदासाविरुद्ध तक्रारी केल्या. पण अकबराने त्या मानल्या नाहीत. ' सर्वांबद्दल प्रेम असावे आणि जातीजातींत व धर्माधर्मांत भेद नसावा ' असा उपदेश अमरदास करीत असल्यामुळे अकबराच्या मनात त्याच्याविषयी आदरभाव उत्पन्न झाला. गोविंदलाल या गावी जाऊन अकबराने अमरदासाची भेट घेतली व लंगरात जेवणही केले. लंगरात यात्रेकरू, प्रवासी, भिकारी आणि शीख लोक या सर्वांना चांगले अन्न मिळत असे. त्याच्या वास्तव्यामुळे गोविंदलाल हे शीख पंथाचे तीर्थक्षेत्र बनले.

अमरदासाने शीख पंथाची बावीस केंद्रे स्थापन केली; त्यामुळे पंथाचा प्रचार वेगाने होऊ लागला.

अमरदासाने सामाजिक क्षेत्रातही बरेच कार्य केले. वैशाख, माघ व कार्तिक मासांतील शुद्ध प्रतिपदा हे तीन नवे सण त्याने सुरू केले. सण कसे साजरे करायचे, त्याची पद्धत त्याने घालून दिली. बारसे व बारावे या संस्कारांतही त्याने बदल केला. अशा प्रसंगी पंडितांना बोलावू नये, पुराणे वाचू नयेत, असा आदेश त्याने दिला. जन्मप्रसंगी गाण्यासाठी त्याने स्वतः नवे गीत रचले. लग्नकार्यात गुरुवाणीतील शब्द वाचावे, असा आदेश त्याने दिला. स्त्रीने सती जाण्याच्या प्रथेला त्याने विरोध केला. पडदा-पद्धतीलाही त्याचा विरोध होता. नमस्कार करण्याची रीतही त्याने बदलली. या सर्व फेरफारांमुळे शीख पंथ हिंदू समाजापासून वेगळा वाटू लागला. गुरू अमरदासाच्या कार्यामुळे पंथाची प्रतिष्ठा वाढली गुरू अमरदास वयाच्या ९५ व्या वर्षी मृत्यू पावला. त्याचा जावई रामदास याने शेवटच्या दिवसांत त्याची चांगली सेवा केली. त्यामुळे त्याने रामदासाला गुरुपद दिले. [ उ. भा. सं. प.; शि. इ.; म. ज्ञा. को. ]

**अमरनाथ** (१) काश्मीरमधले एक विख्यात शिवक्षेत्र. श्रीनगरच्या ईशान्येस ८६ मैलांवर हे क्षेत्र आहे. ही एक निसर्गनिर्मित गुहा आहे. या गुहेतले शिवलिंग बर्फाचे बनलेले आहे. हे शिवलिंग शुक्ल प्रतिपदेपासून हळूहळू वाढीस लागते आणि पौर्णिमेस पूर्ण होते; तसेच वद्य प्रतिपदेपासून त्याची घट सुरू होते आणि अमावास्येला ते पूर्णपणे अदृश्य होते, असे सांगतात. पण या आख्यायिकेत तथ्य नाही. हे लिंग थंडीच्या दिवसांत आपोआप बनते आणि थंडी संपल्यावर हळूहळू क्षीण होत असले तरी पूर्णपणे कधीच नष्ट होत नाही. मात्र आश्चर्याची गोष्ट ही, की लिंग व त्याची पिंडी ही दोन्ही घट्ट बर्फाची बनतात आणि गुहेच्या बाहेरचे सर्वत्र पसरलेले बर्फ मात्र कच्चे आणि भुसभुशीत असते. गुहेच्या वरच्या अंगाला डोंगरावर रामकुंड असून त्यातून ठिबकणाऱ्या थेंबांनी हे शिवलिंग बनते, असे सांगतात.



हिमलिंग – अमरनाथ

या गुहेत लिंगाशिवाय आणखी दोन विग्रह बर्फाचेच बनतात. त्यांना पार्वती व गणपती समजतात. अमरनाथ हे एक शक्तिपीठ असून तिथे सतीचा कंठ गळून पडला असल्याचे सांगतात.

गुहेच्या खालच्या अंगाला अमरगंगेचा प्रवाह आहे. हिला पंजनखी म्हणतात. यात्रिक लोक या प्रवाहात स्नान करून मग अमरनाथाच्या दर्शनाला जातात. श्रावण पौर्णिमेस इथे मोठी यात्रा भरते. हेच दिवस या यात्रेला जाण्यास सोयीचे असतात. पुढे या भागात असह्य थंडी सुरू होते. श्रावण शु. पंचमीस श्रीनगरहून एक मोठा मेळा अमरनाथकडे जायला निघतो. त्याच्या अग्रभागी काश्मीरच्या शारदापीठाचे शंकराचार्य असतात. 'हर हर महादेव' अशी गर्जना करीत साधू, नागा महंत, बैरागी, गृहस्थ, असे सर्व लोक अमरनाथाचा पहाड चढू लागतात. ज्यांना पायी यात्रा करणे शक्य नसेल, त्यांच्यासाठी श्रीनगरला घोडी मिळू शकतात.

या गुहेत काही कबूतरे आहेत. त्यांना शिव-पार्वतीची रूपे समजतात. त्याविषयी कथा अशी – शिव एकदा पार्वतीला सृष्टीचे रहस्य समजावून सांगत होता. ती गोष्ट कबूतरांच्या



अमरनाथ – गुंफा

एका जोडीने ऐकली व ती जोडी त्यामुळे अमर झाली.

इथे जवळच आणखी एक गुंफा आहे. तिच्यात भस्मासारखी माती मिळते. यात्रेकरू शिवाचा प्रसाद म्हणून ती माती आणतात. [ कल्याण–तीर्थांक; म. क.; भारती, ११ ऑगस्ट १९५७. ]

(२) गोरक्षनाथाचा शिष्य आणि गहिनीनाथाचा गुरुबंधू. याचे अनुयायी महाराष्ट्रात आढळतात. याचे जीवनवृत्त अजून अंधारातच आहे. निवृत्तिनाथांनी आपला परिवार सांगताना 'गुरु गयनी अमर' असा याचा उल्लेख केला आहे. गुरु-अमरनाथ-संवाद नावाचा याचा मराठी ग्रंथ अंशतः उपलब्ध आहे. यात याला त्याच्या गुरूने दिलेले ज्ञान समाविष्ट केले आहे. हा ग्रंथ पद्याला जवळ असणाऱ्या गद्यात लिहिला आहे. यातील दृष्टांत आणि प्रमेये ज्ञानेश्वरीतल्या दृष्टांतप्रमेयांशी तंतोतंत जुळतात. त्यावरून वाटते, की अमरनाथ व ज्ञानेश्वर या दोघांची परंपरा एकच असावी. या ग्रंथात अजातवाद व मायावाद यांचे प्रतिपादन आहे. [ गो. च. प.; म. सा. ]

## अमरनीती

तमिळनाडमधला एक नायन्मार. हा शिवभक्त गृहस्थ असून, याचा मोठा व्यापार होता. एके दिवशी शिवाने याची साधुवेषात सत्त्वपरीक्षा घ्यायचे ठरविले. त्याने आपली लंगोटी अमरनीतीकडे ठेव म्हणून ठेवली; पण दुर्दैवाने ती त्याच्याकडून हरवली. तिच्यासाठी साधू हटून बसला. शेवटी तिच्या मोबदल्यांत आपली सर्व संपत्ती आणि बायका-मुलेसुद्धा साधूला देण्यास हा तयार झाला. ते पाहून शिवाने त्याला निजरूपात दर्शन दिले व कृतार्थ केले. [ पे. पु. ]

## अमरसिंह

अमरकोशाचा कर्ता. हा विक्रमाच्या नवरत्नांपैकी तिसरा होता. याच्या कालाबद्दल मतभेद आहेत. विल्सन याचा काल सनपूर्व पहिले शतक मानतो; तर अन्य संशोधक त्याला इ. स. च्या ३ ऱ्या किंवा ५ व्या शतकातला मानतात. हा जैन किंवा बौद्ध असावा, असेही म्हणतात. युआन च्वांग याच्या उल्लेखावरून चंद्रगुप्त विक्रमादित्य हा याचा आश्रय-दाता असावा, असे वाटते. [ म. च. को.; सं. सा. इ. २ ]

## अमरावती

(१) स्वर्गातील इंद्राची राजधानी. ही मेरू पर्वताजवळ असून, भव्यता व सौंदर्य यांविषयी प्रसिद्ध आहे. या अमरावतीत सुधर्मा नावाची देवसभा असून, नंदनवन नावाचे उद्यान आहे. अमृताची साठवणही याच ठिकाणी आहे. ही नगरी काही काल बली दैत्याने जिंकून घेतली होती. इथे गंधर्व व अप्सरा वास्तव्य करतात आणि देवेंद्राची व पुण्यवंत राजर्षींची सेवा करतात. इथले वातावरण नृत्य-गायनाने धुंद असते. इथे पुण्यवंतांना सर्व प्रकारचे सुखोपभोग यथेष्ट मिळतात (म. भा. वन. ४३). पाहा – इंद्र, स्वर्ग.

(२) आंध्र प्रदेशात कृष्णा नदीच्या तीरावर असलेले एक बौद्ध तीर्थक्षेत्र. हे क्षेत्र गुंटूर जिल्ह्यात, सत्तनपल्ली तालुक्यात असून, तिथून जवळच धरणीकोट किंवा धान्यकटक नावाचे नगर प्राचीन काळी वसलेले होते. अमरावती हे गाव आता तिथल्या बौद्ध स्तूपामुळे जगप्रसिद्ध झाले आहे.

इ. स. च्या १९ व्या शतकाच्या प्रारंभी तिथल्या जहागीर-दाराच्या नोकरांनी तिथली टेकडी खोदली आणि त्यांना हा स्तूप तिथे सापडला. मग इ. स. १८८० साली इथे उत्खनन करून, हा स्तूप चारी अंगांनी मोकळा करण्यात आला. त्यापूर्वी स्थानिक लोकांनी आणि सरकारी बांधकाम खात्याच्या अधि-

काऱ्यांनी तिथून अगणित विटा व पाषाणखंड उचलून नेले होते.

भारत सरकारच्या पुरातत्त्व-विभागाने कृष्णा व गुंटूर जिल्ह्यांत अनेक ठिकाणीं उत्खनन केले तेव्हा तिथे काही प्राचीन बौद्ध स्तूप सापडले. कृष्णा नदीच्या तीरावर अमरावती, जगय्यपेट, घंटसाला, गुम्मिडिडुर्रू, भट्टिप्रोलू, इ. ठिकाणी असे स्तूप मातीच्या ढिगाऱ्यात आढळले, त्या सर्वांत अमरावतीचा स्तूप अलौकिक मानला जातो.

अमरावतीचा स्तूप संगमरवरी पाषाणखंडांनी रचलेला असून, त्याच्या भोवती १४ फूट उंचीचा कठडा आहे. स्तूपाच्या खालच्या भागाचा व्यास १६२.५ फूट असून, कठड्याचा व्यास १९२ फूट आहे. दोन्हीच्या मध्ये १३ फूट रुंदीचा प्रदक्षिणामार्ग आहे. या मार्गाच्या दुसऱ्या बाजूला दुसरा कठडा आहे, अशी कल्पना होती; पण तो कठडा नसून, स्तूपाचाच पृष्ठभाग आहे, असे आता ध्यानात आले आहे. हा स्तूप सनपूर्व तिसऱ्या शतकात निर्माण झाला होता; त्यानंतर तो मोठा करून त्याच्या भोवती दगडी आवरण घालण्यात आले आणि भव्य कठडा बांधण्यात आला. स्तूपाचा हा जीर्णोद्धार सातवाहन वंशाच्या राजवटीत इ. स. च्या दुसऱ्या शतकात झाला. त्यानंतर इ. स. च्या तिसऱ्या शतकात स्तूपाच्या आवरणाच्या दगडांवर कित्येक शिल्पे कोरण्यात आली. त्यांत ४८ चित्रे दागोबाची असून, बुद्धाच्या जीवनातील अनेक प्रसंगही कोरलेले आहेत. यातील कोरीव काम अप्रतिम आहे.

या स्तूपाभोवतालच्या कठड्याचे शिल्पकाम मात्र सर्वोत्कृष्ट मानले जाते. त्यातील मानवी प्रतिमा, पशूंच्या आकृती आणि



श्रीवत्सांकित स्तूप, अमरावती

नक्षी अद्वितीय आहे. अमरावतीच्या शिल्पकामातील कमलाकृती आणि मालाधारिणी भरहूत, बोधगया, मथुरा, इ. ठिकाणच्या शिल्पांपेक्षा पुष्कळ नाजुक व रेखीव आहेत. मालाधारिणींच्या कमनीय आकृती त्यानंतरच्या पल्लव शिल्पकामात आढळतात, तशाच जावामधील शिल्पांतही दिसून येतात. अमरावतीची शिल्पकला सातवाहन शिल्पकामाची सर्वोत्तम अवस्था दर्शविते.

या स्तूपाचे भग्नावशेष अन्यत्र नेल्यामुळे त्या जागी स्तूप दिसत नाही. मात्र त्याचा खालचा भाग आणि भोवतालचा कठडा पाहायला मिळतो.

अमरावतीचा हा आकृतियुक्त कठडा म्हणजे शिल्पविद्येतले एक महदाश्चर्यंच होय. आजच्या भग्न, त्रुटित अवस्थेतही तो धर्म व कला यांच्या इतिहासाला मोठीच साधनसामग्री पुरवितो.

इथल्या पाषाणशिल्पांचा काल गांधारशैली व सांचीशैली यांच्या मधला आहे, असे कलादृष्टीने म्हणता येते. प्रारंभी बुद्धाच्या मूर्ती बनवीत नसत. फक्त काही चिह्नांनी बुद्धाचे अस्तित्व दर्शवीत. पण गांधारकलेने बुद्धाला त्याच्या चरित्रातील प्रसंगानुसार चित्रांकित केले. अमरावतीच्या शिल्पात सांचीप्रमाणे बुद्धाची प्रतीकेही आहेत व गांधारशैलीप्रमाणे बुद्धाच्या मूर्तीही आहेत. अमरावतीच्या काही सुंदर मूर्ती आजमितीस मद्रास येथील वस्तुसंग्रहालयात ठेवलेल्या आहेत.

बौद्ध युगात कृष्णानदीच्या तीरावर जी कलाक्षेत्रे निर्माण झाली, ती निर्मिणाऱ्या सर्व कलाकारांनी अमरावतीचेच अनुकरण केले आहे. बौद्ध कलासंप्रदायात अमरावतीचा कलासंप्रदाय सर्वोत्कृष्ट समजला जातो. या ठिकाणी ब्राह्मी लिपीतले पुष्कळ शिलालेखही सापडले आहेत. [ हि. जॉ. ए. इं.; म. ज्ञा. को.; हि. इं. ई. आ.; टें. सा. इं.; इं. स्क. ]

(३) विदर्भातले एक नगर. अंबेच्या मंदिरामुळे प्राचीन काळापासून या शहराला महत्त्व प्राप्त झाले आहे. अमरावतीच्या पूर्वेस चौदा कोसांवर कौंडिण्यपूर नावाचे एक खेडे आहे. तिथे अंबादेवीचे स्वयंभू स्थान आहे. त्याच्या आसपासच्या वस्तीला अंबिकापूर म्हणत. त्या भागात उंबराची झाडे विपुल असल्यामुळे पुढे त्याला उंबरमती हे नाव मिळाले. त्याचेच पुढे उमरावती किंवा अमरावती असे रूपांतर झाले असावे. मध्यंतरी या नगराचा महिमा लुप्तप्राय झाला होता. पुढे इ. स. च्या १८व्या शतकात नागपूरचे श्रीमंत रघूजी भोसले यांच्या राजवटीत या नगराला



एकवीरा देवी

पुनश्च ऊर्जितावस्था प्राप्त झाली. जुने अमरावती शहरही समृद्ध व व्यापारी ठाणे असावे. कारण त्या नगराच्या रक्षणार्थ सभोवती सुमारे २६ फूट उंचीचा भक्कम तट बांधलेला आहे. अंबेचे देवालय या तटाच्या बाहेर असून, बरेच प्रशस्त आहे. मंदिराच्या दक्षिणेस एक नाला वाहतो. त्याच्या पैलतीरावर एकवीरा देवीचे मंदिर आहे.

अंबा ही विदर्भराजांची उपास्यदेवता होती. या देवीच्या दर्शनासाठी विदर्भराजाची कन्या रुक्मिणी आली असता, इथूनच श्रीकृष्णाने तिचे हरण केले, असे पुरणांत सांगितले आहे. [अंबानगरी अमरावती – श्री. शकुंतला दिवाणजी, १९६० ]

**अमरुक** (इ. स. ७०० चा सुमार) एक संस्कृत कवी. याचे अमरुकशतक नावाचे शतश्लोकी प्रणयकाव्य प्रसिद्ध आहे. शंकराचार्यांनी ज्या मृत राजाच्या देहात प्रवेश केला, त्या राजाचे नाव अमरुक होते, असे शांकरदिग्विजयात म्हटले आहे. अमरुकच्या देहात प्रवेश केल्यानंतर वात्स्यायनाच्या सूत्रांच्या आधारे शंकराचार्यांनी कामशास्त्रातील विविध अवस्था व प्रसंग याविषयी हे शंभर श्लोक लिहिले, अशी आख्यायिका आहे. वामन व आनंदवर्धन यांनी अमरुकचे श्लोक उद्धृत केले आहेत.

अमरुशतक (अमरुकशतक) ही संस्कृत प्रणयकाव्यातली सर्वश्रेष्ठ स्फुट रचना आहे. दीर्घ व नादमधुर वृत्तरचना हा त्या काव्याचा विशेष आहे. सर्व साहित्यशास्त्रज्ञ शृंगारचर्चेसाठी अमरुकाला उपजीव्य मानतात. अमरुकाच्या मते प्रणय ही सर्वंकष देवता आहे. कल्पना व्यक्त करण्याच्या दृष्टीने त्याचा प्रत्येक श्लोक सुटसुटीत व संपूर्ण आहे. त्याने वर्णन केलेले एका मुग्धेचे पुढील शब्दचित्र पाहा –

मुग्धे मुग्धतयैव नेतुमखिलः कालः किमारभ्यते
मानं धत्स्व धृतिं बधान ऋजुतां दूरे कुरु प्रेयसि ।
सख्यैवं प्रतिबोधिता प्रतिवचस्तामाह भीतानना
नीचैः शंस हृदि स्थितो हि ननु मे प्राणेश्वरः श्रोष्यति ।।

अर्थ – ‘हे मुग्धे, तू आपला सगळा वेळ मुग्धपणातच (भोळेपणात) का घालवतेस ? अग प्रेमिके, जरा रुसवा धर, धैर्य बांध व आर्जव दूर ठेव.’ अशा प्रकारे सखीने उपदेशिलेली प्रेयसी मुद्रेवर भय दाखवीत सखीला प्रतिवचन बोलली. ‘अग, हळू सांग ! हृदयात बसलेला माझा प्राणेश्वर ऐकेल ना !’

अमरुककवीच्या प्रेमवर्णनाचा विशेष लक्षात घेण्याजोगा आहे. पुरुष प्रेमाशी प्रतारणा करील, तो स्वार्थी व चंचलही बनेल; पण स्त्रीचे प्रेम मात्र पवित्र, अविचल व निःस्वार्थ असते, असे तो मानतो. तत्कालीन संस्कृत वाङ्मयात स्त्रियांच्या प्रेमाला चंचल, स्वार्थी व अविश्वसनीय मानण्याची पद्धत रूढ असताना, अमरुकानेच मात्र वेगळा दृष्टिकोन मांडावा, हे त्याला भूषणावह आहे. अमरुकानंतर त्याचे अनुकरण करणारी कितीतरी शृंगारशतके निर्माण झाली; पण तरीही त्याच्या काव्यातली हृदयंगमता कमी झालेली नाही. अमरुकाबरोबर भर्तृहरीची तुलना केली जाते. तोही एका शृंगारशतकाचा कर्ता आहे. प्रणयाची विचारमग्नता व खेदजनक नैराश्य या गुणांत भर्तृहरी वरचढ असला तरी, भावनेचा हळुवारपणा, तिच्यातली तळमळ व विकास यांच्या चित्रणात अमरुकच अद्वितीय आहे. [ सं. सा. सो. इ. ]

**अमलानंद** (इ. स. चे १३ वे शतक) याचे जन्मस्थान निश्चित नाही. हा देवगिरीच्या यादवांच्या राज्यात राहत होता. हा अद्वैतमताचा समर्थक असून, वेदान्तकल्पतरू, शास्त्रदर्पण व पंचपादिकादर्पण, असे याचे तीन ग्रंथ आहेत. त्यावरून याची प्रगाढ विद्वता कळून येते. [ हिंदुत्व ]

**अमहीयू आंगिरस** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या ९ व्या मंडलातील एकसष्टावे सूक्त, याच्या नावावर आहे. पवमान सोमस्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. याच्या दोन ऋचा (९. ६१. १–२) अशा–

अया वीती परिस्रव यस्त इन्दो मदेष्वा ।
अवाहन् नवतीर्नव ।।
पुरः सद्य इत्थाधिये दिवोदासाय शम्बरम् ।
अध त्यं तुर्वशं यदुम् ।।

अर्थ–इंद्राला नव्याण्णव नगरभेदाचे सामर्थ्य देणाऱ्या हे सोमा, आपला तेजस्वी रस तू प्रवाहित कर.

दिवोदाससाह्यकारी, शत्रुजेत्या सोमाने शंबर, तुर्वश आणि यदू राजांची नगरे उद्ध्वस्त केली.

प्रस्तुत सूक्तात सोमनिर्मितीची पद्धतही सांगितली आहे. [ ऋ. म. भा.; प्रा. च. को. ]

**अमात्य** राज्याच्या सात अंगांपैकी दुसरे अंग म्हणजे अमात्य होय. राज्यकारभारातला मंत्री किंवा सचिव या अर्थी हा शब्द आप. धर्मसूत्रात प्रथम आढळतो (२. १०. २५. १०). मनुस्मृती (७.५५) व कौ. अर्थशास्त्र (१.७) यांत अमात्याची आवश्यकता पुढील प्रमाणे सांगितली आहे– एकटा राजा सर्व राज्यकारभार पाहू शकत नाही, म्हणून त्याने अमात्य योजावा. या अमात्याच्या अंगी पुढील गुण असावे–

तो आपल्या देशात जन्मलेला, उच्चकुलोत्पन्न, प्रभावशाली, कलाभिज्ञ, दूरदर्शी, चतुर, दक्ष, हजरजबाबी, सदाचरणी, निरोगी, सशक्त व निष्ठावंत असावा. त्याची स्मरणशक्ती तीव्र, वागणे

सौजन्यपूर्ण व वृत्ती प्रेमळ असावी. महाभारतात विशेष गुण सांगितला आहे तो म्हणजे अमात्याला पौर-जानपदांचा विश्वास संपादन करता आला पाहिजे हा होय (म. भा. शांति. ८३. ४६).

अमात्यपद वंशपरंपरेने चालत नसे. मुलगा बापाइतकाच कर्तबगार व वरील गुणांनी युक्त असेल, तरच त्याला अमात्य नेमावे, असे बहुतेकांचे मत आहे (मनु. ७.५४; याज्ञ. १. ३१२; म. भा. सभा. ५. ४३). ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांतूनच अमात्य निवडावे, असे शुक्रनीतिसार (२. ४२६–२७) व नीतिवाक्यामृत (१०८) यांत सांगितले आहे.

**अमात्यकर्तव्ये** – राजाने अमात्यमंडळाशी विचारविनिमय करावा. आपत्काली मंत्र्यांनी बहुमताने दिलेल्या निर्णयानुसार वागावे. राजा वाममार्गाने जाऊ लागला, तर अमात्यांनी त्याला जागृत करावे व बेजबाबदारपणा करीत असेल तर त्याचा तोल सांभाळावा. राजानेही अमात्य हे आपले गुरूच आहेत असे मानावे, असा कौटिल्याचा उपदेश आहे (अर्थ. १. १५). शांतता, सुरक्षा, आय-व्यय, सेना, कोश, देश, आत्मरक्षण, इ. विषयांसंबंधी अमात्यांचा सल्ला घेऊनच राजाने कारभार करावा, असे मनू म्हणतो (७. ५६, ५९). शुक्रनीतिसारात अमात्यमंडळाची नावे व कार्ये पुढीलप्रमाणे सांगितली आहेत–

कार्याकार्यप्रविज्ञाता स्मृतः प्रतिनिधिस्तु सः ।
सर्वदर्शी प्रधानस्तु सेनावित्सचिवस्तथा ॥
मन्त्री तु नीतिकुशलः पण्डितो धर्मतत्त्ववित् ।
लोकशास्त्रनयज्ञस्तु प्राड्विवाकः स्मृतः सदा ॥
देशकालप्रतिज्ञाता ह्यमात्य इति कथ्यते ।
आयव्ययप्रतिज्ञाता सुमन्त्रः स च कीर्तितः ॥

अर्थ – कार्याकार्य जाणणारा तो प्रतिनिधी. सर्व गोष्टींचे यथायोग्य आकलन करणारा तो प्रधान. सैन्यव्यवहार जाणणारा तो सचिव. नीतिकुशल तो मंत्री. धर्मतत्त्व जाणणारा तो पंडित. लोकव्यवहार व कायदेकानू जाणणारा तो प्राड्विवाक. देश-काल ओळखून कार्याचे धोरण आखणारा तो अमात्य व नफा-तोटा जाणणारा अर्थशास्त्रज्ञ तो सुमंत्र होय.

वरील मंत्रिमंडळ हे आठ जणांचे आहे. अमात्यांची संख्या किती असावी, याविषयी मतभेद आहेत. कोणी ही संख्या तीन ते चार पर्यंतच मर्यादित ठेवतात, तर कोणी ती आठ ते दहा पर्यंत वाढवितात. रामायणात दशरथाच्या मंत्र्यांची संख्या आठ दिलेली आहे. (वा. रा. १. ७. २–३). इतिहासकाळात छत्रपती शिवाजीने अष्टप्रधानांची प्रथा सुरू केली होती. ही कल्पना त्याने रामायणावरून किंवा शुक्रनीतिसारावरून घेतली असावी.

महाभारत, अर्थशास्त्र व नीतिवाक्यामृत या ग्रंथांवरून अमात्यमंडळ तीन प्रकारचे असावे, असे वाटते–(१) तीन किंवा चार मंत्र्यांचे, महत्त्वाचे निर्णय घेणारे एक अंतरंग मंत्रिमंडळ, (२) सात किंवा आठ मंत्र्यांची एक मन्त्रिपरिषद व (३) राज्यांतल्या वेगवेगळ्या विभागांतील उच्च अधिकाऱ्यांसह बनणारी मंत्रिमहासभा.

इतिहासकाळात शिशुनाग वंशापासून शुंगकालापर्यंत कर्तबगार आणि श्रेष्ठ अशा अमात्यांची अनेक नावे आढळतात. अजातशत्रूचा वर्षकार, विडूडभाचा दीर्घचारायण, उदयनाचा यौगंधरायण, चंद्रगुप्त मौर्याचा चाणक्य, अशोकाचा राधगुप्त, पालकाचा पिशुन, ब्रह्मदत्ताचा बाभ्रव्य हे प्रधानामात्य सुप्रसिद्ध आहेत. यांना आर्यब्राह्मण असेही म्हणत. राजाप्रमाणेच यांचे व्यक्तिमत्त्वही प्रभावशाली होते. कुशाणकालात मंत्रिपरिषदेचे स्पष्ट चित्र आढळत नाही; पण गुप्तसम्राटांच्या काळात मंत्रिपरिषदेचा अध्यक्ष म्हणून प्रधान मंत्र्याला पुनश्च पुराणकालीन गौरव प्राप्त झाला. [ हि. ध.; हिं. रा. तं.; का. ए. सां. ब.]

## अमानत

(१८२१–१८६५ इ. स.) लखनौचा एक सुप्रसिद्ध कवी. उर्दू प्रेमकाव्यात वासोख्त नावाचा एक पद्यप्रकार आहे. वासोख्त याचा अर्थ तळतळाट असा होतो. यात दुसऱ्याच्या नादी लागलेल्या प्रेयसीविषयी प्रियकराच्या असह्य वेदना व तळतळाट व्यक्त झालेले असतात. जिचे मन विचलित झाले आहे, अशा प्रेयसीचे वर्णन अमानतने पुढीलप्रमाणे केले आहे–

रूठकर मैं जो कभी पाससे हट जाता था।
हाथ फैलाके गलेसे वो लिपट जाता था॥

अर्थ – मी जर कधी एखाद्या वेळी रुसून तिच्यापासून दूर झालो, तर ती हात लांब करून माझ्या गळ्याला मिठी मारायची. पण हाय !

आयिनेसे वो दो चार आठ पहर रहने लगी।
शौक खुदबीनीका मंजुरे नजर रहने लगी॥

अर्थ – ती आता तासन् तास आरशासमोर उभी राहून स्वतःचे कौतुक करू लागली.

पलकें झपकाके हजार आफतें ढायीं उसने।
लाख छुरियां दिले आशिक पे लगायीं उसने॥

अर्थ – ती आता खिडकीत बसून येणाऱ्या-जाणाऱ्याकडे पाहू लागली. मधुर गीते गुणगुणू लागली. आपल्या पापण्यांच्या उघडझापांनी ती लोकांची हृदये घायाळ करू लागली.

अमानतने लिहिलेले हे प्रणयकाव्य आपल्या माधुरीमुळे गेली सव्वाशे वर्षे रसिकांच्या जिभेवर नाचत आहे. [ उ. का. प.]

## अमालद

एक प्राचीन मानवगण. मालद किंवा मानद असेही नाव आढळते. यांचे जनपदराज्य होते. हे लोक

भारताच्या पूर्व भागात राहणारे होते व भीमाने आपल्या दिग्विजयाच्या मोहिमेत यांचा पराभव केला होता, असे महाभारतावरून कळते. बंगालमधील मल्हद या नावाने सांप्रत ज्ञात असलेल्या प्रदेशात हे लोक राहत असावे. वायुपुराणातही पूर्वेकडील जनपद असाच यांचा उल्लेख आहे. [ क. हि. वा. पु. ]

**अमावसु** पितरांपैकी एक. हा रूपाने अत्यंत सुंदर आणि इंद्रियनिग्रही होता. पितरांची मानसकन्या अच्छोदा ही याच्यावर भाळली, तरीही हा ब्रह्मचर्यापासून ढळला नाही. ही वार्ता पितरांस कळल्यानंतर त्यांनी याची स्तुती केली व महिन्याची शेवटची तिथी याच्या नावे सर्व पितरांना प्रिय होईल, असा त्याला वर दिला. तेव्हापासून त्या तिथीला अमावास्या असे म्हणू लागले (मत्स्य पु. १४). पाहा–अमावास्या.

**अमावास्या** एक तिथी. चंद्र व सूर्य ज्या तिथीला एका राशीत येतात, त्या तिथीला अमावास्या म्हणतात (अमा = सह, वस् = राहणे). 'सूर्याचन्द्रमसोर्यः परः सन्निकर्षः सामावास्या' (= सूर्य-चंद्रांच्या परम सान्निध्याला अमावास्या म्हणावे) असे गोभिल सांगतो. ज्या तिथीला चंद्र दिसत नाही, ती अमावास्या, अशी व्याख्या मिताक्षरेत सांगितली आहे.

अमावास्येचा उल्लेख ऋग्वेदात आढळत नाही. पण सूर्यग्रहण अमावास्येलाच होते आणि अनेक ज्योतिर्विदांच्या मते या ग्रहणाचा उल्लेख ऋग्वेदात आहे (ऋ. ५.४०). प्रस्तुत सूक्तात सूर्याला ग्रासणाऱ्या स्वर्भानूला अत्री ऋषींनी शोधून काढले, असे म्हटले आहे. यावरून अत्रीने सूर्यग्रहणाचे ज्योतिषशास्त्रदृष्ट्या स्पष्टीकरण केले, असे वाटते. त्याला अमावास्या ज्ञात असली पाहिजे. ऋग्वेदात सिनीवाली नामक देवतेचा निर्देश आढळतो. अपत्यप्राप्तीसाठी तिची पूजा केली जात असे. चतुर्दशीयुक्त अमावास्येलाच सिनीवाली म्हणतात.

अथर्ववेदात अमावास्येसंबंधी एक सूक्त आढळते, त्याचा भावार्थ असा –

हे सुभग आणि लोकप्रिय अमावास्या देवते, माहात्म्यसंपन्न देवांनी हविर्भाग स्वीकारलेला आमचा यज्ञ पूर्ण करून तू आम्हांस धन आणि पुत्र प्रदान कर.

(अमावास्या म्हणते) समस्त देव माझ्याप्रत येऊन माझ्या ठायी निवास करतात. साध्यादी देव, तसेच इंद्रप्रमुख देवगण माझ्यासह राहत असल्यानेच मला 'अमावास्या' नाव मिळाले.

अन्न, बल आणि धनदात्या अमावास्येला आम्ही हवी अर्पण करतो. अमावास्येची रात्र आम्हास धनदायी होवो.

जग, प्राणी आणि वस्तुमात्रादी चराचर सृष्टीची निर्मिती करणाऱ्या हे अमावास्ये, आमच्या यज्ञाच्या समस्त कामना पूर्ण करून तू आम्हांस समृद्ध बनव (अथर्व. ७.७९).

अथर्ववेदात अन्यत्रही अमावास्येचा उल्लेख असून, तिथे तिला सिनीवाली असे म्हटले आहे (६.११.३).

अमावास्येचे दोन प्रकार आहेत. एक सिनीवाली व दुसरी कुहू. चतुर्दशीयुक्त अमावास्या ती सिनीवाली आणि प्रतिपदायुक्त ती कुहू होय. "या पूर्वा अमावास्या सा सिनीवाली। या उत्तरा सा कुहूः" असे वचन आहे (मैत्रा. सं. ४.३.५). हाच विचार ऐतरेय ब्राह्मण (७.९), षड्विंश् ब्राह्मण (४.६), गोपथ ब्राह्मण (उ. भा. १.१०), इ. ग्रंथांत आहे.

अलिकडे आपण अमावास्या अशुभ मानतो. पण प्राचीन काळी ही समजूत नव्हती, हे अथर्ववेदातल्या वरील सूक्तावरून स्पष्ट होते (७.७९). सर्व देव तिच्या ठायी निवास करतात, हे तिच्या शुभत्वाचे लक्षण आहे. स्वर्गाची इच्छा करणारे लोक दर्शपूर्णमास इष्टी या तिथीला करतात. तसेच पिंडपितृयज्ञ, पार्वणश्राद्धही अमावास्येला करतात. निरनिराळ्या प्रकारची दाने, श्राद्धविधी यांना गजच्छायापर्व प्रशस्त मानले आहे. रावणाचा सुपार्श्व नावाचा बुद्धिमान अमात्य रावणाला म्हणाला. "आज कृष्णपक्षातली चतुर्दशी आहे. यासाठी तू आजच युद्धाच्या तयारीला लाग; आणि सेना बरोबर घेऊन तू उद्या अमावास्येच्या मुहूर्तावर विजयार्थ बाहेर पड." (वा. रा. ९२). यावरून रामायणकाळी अमावास्या शुभ मानली जात होती, हे स्पष्ट आहे. महाभारतात मात्र ही तिथी काही ठिकाणी शुभ मानली आहे, तर काही ठिकाणीं अशुभ मानली आहे. कृष्णाने कर्णाजवळ युद्धघोषणा करताना (म. भा. उद्योग. १४२.१८) म्हटले आहे –

**सप्तमाच्चापि दिवसादमावास्या भविष्यति ।**
**सङ्ग्रामो युज्यतां तस्यां तामाहुः शक्रदेवताम् ॥**

अर्थ – आजपासून सातव्या दिवशी अमावास्या आहे. इंद्र ही तिची देवता असे म्हणतात. त्या दिवशी युद्धाला प्रारंभ होईल.

श्रीकृष्णाला यादवांच्या विनाशाची जी लक्षणे दिसत होती, त्यांतच त्याने त्रयोदशीयुक्त अमावास्या हा एक योग सांगितला आहे (म. भा. मौसल २.१८–१९). भारतीय युद्धाच्या वेळी असाच योग होता, हेही त्याने याच वेळी सांगितले आहे. महाभारतात एके ठिकाणी अमावास्येचा एक भयंकर (रौद्र) मुहूर्त म्हणून निर्देश केलेला आहे (म. भा. वन. २२४.१२). यावरून महाभारताच्या काळात अमावास्या अशुभ मानली जात होती, असे दिसून येते. अमावास्या ही पंचपर्वातले एक पर्व आणि फाल्गुन अमावास्या ही चौदा मन्वादी तिथींमधली एक तिथी असल्यामुळे त्या शुभ मानल्या गेल्या आहेत.

**अमा षोडशभागेन देवि प्रोक्ता महाकला ।**
**संस्थिता परमा माया देहिनां देहधारिणी ॥**

अर्थ – चंद्रमंडलाची सोळावी कला (अर्थात अमावास्या) ही क्षयोदयादी रहित असल्यामुळे ती महाकला म्हटली जाते. ती प्राण्यांचे देह धारण करणारी परम माया आहे.

पंचांगात ही तिथी ३० या आकड्याने दर्शवितात. अमावास्या हे नाव ज्योतिषाच्या प्रगतीचे निदर्शक आहे. त्यापूर्वी अमावास्येला उद्देशून दर्श हा शब्द होता. दर्श म्हणजे अमावास्येनंतरची चंद्रदर्शनाची प्रतिपदा होय.

**विधिविधान** – अमावास्या ही स्वभावतः अशुभ तिथी आहे. म्हणून नित्यकर्माव्यतिरिक्त अन्य कर्मास ती वर्ज्य मानतात. सोमवारी, मंगळवारी व गुरुवारी, तसेच अनुराधा, विशाखा, स्वाती, या नक्षत्रांवर ती आल्यास मात्र पवित्र समजतात. सोमवारी आल्यास हिला सोमवती असे म्हणतात व त्या तिथीस स्त्रिया अश्वत्थाची पूजा करून त्याला १०८ वस्तू समर्पण करतात. तसेच आषाढातली दिव्याची अमावास्या, श्रावणातली पिठोरी अमावास्या आणि आश्विनातली लक्ष्मी-पूजनाची अमावास्या या मंगलदायक मानतात. समुद्राचे स्नान अमावास्येला करतात. तमिळनाडूतील लोक या दिवशी कावेरीत स्नान करतात. भाद्रपद अमावास्येस सर्वपित्री म्हणतात व त्या दिवशी सर्व पितरांच्या उद्देशाने श्राद्ध करतात. मांत्रिक लोक मंत्रसाधनेसाठी ही रात्र पसंत करतात. दृष्टिदोषावर मंत्र, तंत्र, गंडे, दोरे, या दिवशी करतात. वडार वगैरे काही कारुनारू लोक अमावास्येला हत्यारांची पूजा करतात. कापणी, मळणी, पेरणी या दिवशी करीत नाहीत. नवे वस्त्रालंकार धारण करीत नाहीत. धान्य, पैसे वगैरे संपत्तिदर्शक वस्तू दुसऱ्यांना देत नाहीत. अनध्याय पाळतात. साधू, पीर, यांच्या समाधीचे दर्शन घेतात. प्रत्येक अमावास्येस श्राद्ध करण्याची प्रथा दक्षिणेत एका काळी होती. अमावास्येचे मूर्तिध्यान हेमाद्रीने पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

**अमावास्या विधातव्या द्विर्दोर्मरकतप्रभा ।**
**दर्भासनस्थिता चेयं दर्भपिण्डधरा कृशा ॥**

अर्थ – द्विभुज, मरकतमण्याच्या कांतीची, दर्भासनस्थ दर्भमुष्टी धारण करणारी व कृश अशी अमावास्येची मूर्ती करावी.

**अमायां च नदीस्नानं पुनात्यासप्तमं कुलम्**

अर्थ–अमावास्येच्या दिवशी नदीत स्नान केल्याने सात कुळे पुनीत होतात.

लोकधर्माचा अमावास्येवर जबरदस्त पगडा आहे. अमावास्येच्या दिवशी चंद्र सूर्यामध्ये प्रविष्ट झाल्यावर तो जसा कोणाला ओळखू येत नाही, तसा माझा शत्रू मरो आणि पुन्हा कोणाच्या दृष्टीला न पडो, अशा अर्थाची प्रार्थना ऐतरेय ब्राह्मणात आहे (८.२८). यातूनच अमावास्येचा व जादूटोण्याचा संबंध आला असावा. जारण-मारण, वशीकरण, उच्चाटन, विद्वेषण व काही सिद्धी यासाठी आवश्यक असणारे जप-तपादी अनुष्ठान अमावास्येला शिकतात. दर अमावास्येला चेटकिणी नग्नावस्थेत अंगाला व कपाळाला कुंकू माखून स्मशानात किंवा मारुतीच्या देवळात जमतात व तिथे त्या त्यांना येत असलेले सर्व मंत्र म्हणतात, अशी समजूत आहे. याशिवाय जादूचे पुढील विधी या तिथीला करतात—झाडाला चिंध्या गुंडाळून त्यात खिळे ठोकतात. त्यामुळे दृष्टिदोष दूर होतो, असे म्हणतात. मुलगी या तिथीला प्रथमच ऋतुस्नात झाली तर ती दुर्दैवी ठरते, असे संस्कारकौस्तुभात म्हटले आहे. तसेच या तिथीला जी मुले जन्मतात, त्यांच्या आई-बापांना दारिद्र्य येते, असे सांगतात. यातुधानाच्या या प्रभावामुळेच अमावास्येसंबंधी काही संकेतही निर्माण झालेले पाहायला मिळतात. उदा. अमावास्येला झाडाचे पान तोडू नये (म. भा. अनु. १२७). दंतधावन करू नये (म. भा. अनु. १२७.४). रोग्याला ही तिथी वाईट असते. अशा प्रकारच्या दैवी आपत्ती टाळण्यासाठी काही तोडगेही केले जातात. ज्योतिषशास्त्राने ही अनध्याय तिथी मानली आहे.

भारतात काही ठिकाणीं या तिथीला सूर्यपूजा व व्रतवैकल्ये करण्याची प्रथा आहे. [ऋ. म. भा.; अ. म. भा; की. पॉं.; हिं. हॉ. से.; लौ. दं.; म. यु. का. र.; श्री. ह. धी. सांकलिया, रविवार सकाळ, ११ सप्टेंबर १९७७ ]

**अमावास्यापयोव्रत** एक तिथिव्रत. अमावास्येस फक्त दूध पिऊन राहणे व विष्णुपूजा करणे असा याचा विधी आहे. व्रतावधी एक वर्ष. फल – समृद्धी. [ हि. ध.]

**अमावास्याव्रत** तिथिव्रत. (१) शिवार्पणबुद्धीने दान. (२) ब्रह्मदेवाच्या संतोषासाठी तीन ब्राह्मणांची पूजा, असा याचा विधी आहे. फल – दीर्घायुरारोग्य. [ हि. ध.]

**अमितगती** ( इ. स. चे ११ वे शतक ) जैनांच्या दिगंबर संप्रदायातील माथुर संघातला एक सुप्रसिद्ध कवी व ग्रंथकार. परमार वंशांतल्या वाक्पतिराज मुंज या राजाच्या दरबारातला हा सुप्रसिद्ध विद्वान होता. याने अनेक ग्रंथ लिहिले असून, ते सगळे संस्कृतात आहेत. त्यांची नावे अशी –

(१) सुभाषितरत्नसंदोह – यात विषयनिराकरण, इंद्रियनिग्रहोपदेश, स्त्रीगुणदोषविचार, इ. ३२ प्रकरणे असून, ती सुंदर सुभाषितांनी भरलेली आहेत. (२) धर्मपरीक्षा –

पुराणकथांना अविश्वसनीय ठरविले आहे. (३) श्रावकाचार– याचे १० परिच्छेद असून, त्यांत श्रावकांचे आचार संपूर्ण सांगितले आहेत. वरील तीन ग्रंथांमुळे त्याला जैन साहित्यात मानाचे स्थान मिळाले आहे. [ जै. सा. इ. ]

**अमितप्रभ** एक बोधिसत्त्व. याचे ध्यान असे–वर्ण शुभ्र किंवा रक्त. चिन्ह कलश. शुभ्र वर्णाचा असताना तो वैरोचनाचा व लाल वर्णाचा असताना अमिताभाचा पुत्र मानला जातो. याच्या मस्तकी अमृतकलश असतो, तर कधी तो त्याच्या डाव्या हातात असतो. [ इं. बु. इ. ]

**अमिताभ** ध्यानी बुद्धांतला एक प्रमुख. अद्वयवज्रसंग्रह नामक ग्रंथात याचे वर्णन केलेले आहे, ते असे –

पश्चिमे दले रविमण्डलोपरि रक्तह्रींकारसम्पुटो।
रक्तवर्णोऽमिताभः पद्मचिह्नसमाधिमुद्राधरः ।।

अर्थ – (सुखावतीच्या) पश्चिम अंगाला रक्तशोभायुक्त करसंपुट असलेला, रक्तवर्ण, पद्म व समाधिमुद्रा धारण करणारा अमिताभ होय.

याचे शिरोलांच्छन कमळ असून, वाहन मयूरयुग्म आहे. हा सुखावती नामक दिव्य लोकाचा अधिपती असून, सदैव ध्यानावस्थेत राहतो. चालू भद्रकल्पाचा तो अध्यक्ष आहे. पद्मपाणी हा बोधिसत्त्व याच्यापासून उत्पन्न झाला असून, तोच चालू कल्पातला सर्व सृष्टिव्यवहार करतो. या अमिताभाचा एक मंत्र आहे तो असा – 'ॐ आः आरोलिक हुम्।'

अमिताभाविषयी बौद्ध साहित्यातली कथा अशी –

हा प्राचीन काळी धर्माकर नावाचा भिक्षू होता. त्याला बुद्धत्व प्राप्त झाल्यावर दहा कल्प लोटून गेले. त्याचे अंतर्धानही पुढे अनंत काळाने होणार आहे. याने असा निर्धार केला होता, की 'मी बुद्ध झाल्यावर अतिशय शुभ असे एक बुद्धक्षेत्र निर्माण करीन.' त्या प्रमाणे त्याने सुखावती नावाचा दिव्यलोक निर्माण केला. या लोकात सुखाची अनंत सत्ता विद्यमान आहे. तिथे बुद्धत्वाची आकांक्षा धरणारे अनेक बोधिसत्त्व त्याचा उपदेश श्रवण करीत असतात. जपानमध्ये अमिताभ अमिदो या नावाने प्रसिद्ध आहे. पाहा – सुखावतीव्यूह. [ इं. बु. इ. ]

**अमितायू** अमिताभ या ध्यानी बुद्धाचा अवतार. बौद्धांच्या उत्तरकालीन सगुणोपासनेचे एक रूप. मध्ययुगीन काळात भारतात याची उपासना बरीच वाढली होती. श्री. वॅडेल याला अनेक बौद्ध मंदिरांतून त्याचे अवशेष सापडले आणि त्यानेच या मूर्तीकडे लोकांचे लक्ष वेधले.

अमितायू म्हणजे ज्याचे आयुष्य अपरिमित आहे असा. अशा प्रकारच्या दीर्घायू मुनींची उपासना तिबेटी बौद्ध संप्रदायात चालू आहे. तिथल्या प्रत्येक मंदिरात त्याची प्रतिमा आढळते. तो आयुष्य वाढविणारा म्हणून तिथल्या लोकांना पूज्य ठरला आहे. मंत्रतंत्रांतही त्याचा उपयोग करतात. रस्त्याच्या कडेच्या दगडांवरही त्याच्या मूर्ती कोरतात. याची प्रतिमा अमिताभाप्रमाणेच असते; पण त्याला निरलंकृत न दाखविता तेरा अलंकारांनी भूषवितात. त्याच्या हातात अमृतपात्रही असते. सुखावतीव्यूह हा बौद्धांचा स्वर्ग असून, अमितायू हा त्याचा स्वामी आहे. त्याच्या नामस्मरणाने आणि मृत्युसमयी केलेल्या ध्यानाने स्वर्गप्राप्ती होते, असा बौद्धांचा विश्वास आहे. अमितायुर्ध्यानसूत्र या नावाचा एक ग्रंथ असून, त्यात त्याच्या ध्यानाने प्राप्त होणाऱ्या अलौकिक फलांचे वर्णन आहे. [ म. ज्ञा. को. ]

**अमियरस** एक यौगिक धारणा. यालाच अमृत किंवा सोमरस अशीही नावे आहेत. सहस्रदल कमलाच्या मध्यभागी चंद्रबिंदू असतो. त्यातून एक प्रकारचा स्राव गळून तो खाली मूलाधार चक्रापर्यंत येतो व शरीरातल्या अन्नरसात मिश्रित होतो. यालाच अमियरस असे नाव आहे. 'रसगगन गुफासे अजर झरै' (= रसमय आकाशगुंफेतून अजर (अमिय) रस पाझरत राहतो), असे कबीराने त्याचे वर्णन केले आहे. नाथपंथी योगमार्गात कायशोधन व कायरक्षण या गोष्टी महत्त्वाच्या मानलेल्या आहेत. अमियरसाच्या सेवनाने वरील गोष्टी साध्य होतात, असे गोरखनाथाचे मत आहे. पाहा – सहस्रदलचक्र, अमृत. [ हिं. सा. को. ]

**अमिल** सिंधमधली नोकरीपेशाने जगणारी एक जमात. हे लोक लोहाणा अथवा खत्री जमातीपैकी आहेत. अमिल हे नाव पर्शियन अमल या शब्दावरून आले आहे. अमल याचा अर्थ कारभार हाकणे असा होतो. या जमातीचे लोक सर्व सरकारी खात्यांत कारकून व अधिकारी या नात्यांनी होते. त्यांना मानाचे स्थान होते. सुशिक्षित असल्यामुळे या जमातीने एका काळी सिंधमधील सगळी बौद्धिक क्षेत्रे व्यापली होती, असे म्हणायला हरकत नाही. यांच्यांत नऊ गोत्र आहेत. लोहाणा जातीतून हे लोक आले असले, तरी पुढे त्यांचा लोहाणांशी शरीरसंबंध होईनासा झाला. [ सिं. क. ]

**अमी** बिहारमधील सारण जिल्ह्यातील एक क्षेत्र. याला अंबिका-आस्थान असेही नाव आहे. बाव्वन शक्तिपीठांपैकी हे एक असून, इथे अंबिकेचे मंदिर आहे. चैत्र महिन्यात इथे

यात्रा भरते. राजा सुरथ इथे राज्य करीत होता, असे काही पंडितांचे म्हणणे आहे. [ सारण गॅझे. ]

**अमीर खुसरो** (इ. स. १२५३-१३२५) एक श्रेष्ठ फारसी कवी व संगीतकार. याचा जन्म दिल्ली-जवळच्या पटियाली नामक गावी झाला. त्याचा बाप सैफुद्दीन महमूद हा एक तुर्की सरदार होता. खुसरो हा लहानपणी अत्यंत हुशार होता व कविता रचू लागला होता. दिल्लीचा सुलतान कैकुबाद याच्या दरबारात याला आश्रय मिळाला. तेव्हापासून अखेरपर्यंत खुसरो दिल्लीच्या अफगाण सुलतानांच्या पदरी होता. शेख निजामुद्दीन औलिया हा सूफी संत याचा गुरू होता. त्याच्यावर खुसरोची फार भक्ती होती. या देशावरही खुसरोचे खूप प्रेम होते आणि भारतातील ज्ञान व विद्या यांचे श्रेष्ठत्व त्याने आपल्या ग्रंथात वर्णिले आहे.



अमीर खुसरो

खुसरो हा कवी, संगीतज्ञ व गायक होता, तसाच भाषापंडित, विद्वान, मुत्सद्दी व रहस्यवादी ही होता. फारसी संगीत व संस्कृती यांचा त्याने उत्तम अभ्यास केला होता.

भारतीय संगीताच्या प्रचारासाठी याने बरेच प्रयत्न केले. दक्षिण भारतातील शुद्ध सप्तकांपेक्षा वेगळ्या शुद्ध स्वरसप्तकांची योजना करून त्याने हिंदुस्थानी संगीताची पद्धती विकसित केली. त्याने काही वैचित्र्यपूर्ण नवे राग निर्माण केले. रागात म्हणण्याजोगी नवीन पदे रचून याने ख्यालगायकी प्रचलित केली. कवाली पद्धतीची गायकी खुसरोनेच सुरू केली, असे म्हणतात.

एका प्रकारच्या वीणेत सुधारणा करून सतार हे वाद्य बनवण्याचे श्रेय अमीर खुसरोलाच देण्यात येते.

याने निरनिराळ्या विषयांवर ७२ ग्रंथ लिहिले आहेत. तो फारसीचा महाकवी मानला जातो. तथापि त्याने हिन्दवी भाषेतही काव्यरचना केली ती अत्यंत लोकप्रिय झाली. मात्र त्याची हिन्दवी गीते लिखित रूपात उपलब्ध नाहीत. जी लोकांच्या मुखी सुरक्षित राहिलेली आहेत, त्यांची भाषा आधुनिक वाटते. [ हिं. सा. को, २; सं. शा. क. इ.; हिं. वि. को.; उ. सं. सं. इ.]

**अमुक्ताभरणव्रत** एक तिथिव्रत. हे मुख्यत्वे स्त्रियांसाठी आहे. भाद्र० शु. सप्तमीस अमुक्ताभरणसप्तमी म्हणतात. त्या दिवशी शिव-पार्वतींच्या चित्राकृती स्थापून त्यांच्या पार्श्वभागी सोन्यारुप्याच्या तारांचा अथवा सुताचा दोरा वळून ठेवतात. नंतर षोडशोपचार पूजा करतात. पूजेचा मंत्र असा –

मन्दारमालाकुलितालकायै कपालमालाङ्कितशेखराय।
दिव्याम्बरायै च दिगम्बराय नमः शिवायै च नमः शिवाय॥

अर्थ – मंदारमाला वेणीत माळणारी व दिव्य वस्त्र नेसणारी पार्वती आणि जटाजूटाभोवती रुंडमाला वेष्टिणारा व दिगंबर असा शिव यांना नमस्कार असो.

या व्रताचा महानैवेद्य पायस, अपूप व गूळभात हा असतो. पूजेनंतर दोरा हातात बांधतात, त्याचा मंत्र असा –

सप्तसामोपगीतं त्वां चराचरजगद्गुरो ।
सूत्रग्रन्थिस्थितं हस्ते धारयामि स्थिरो भव॥

अर्थ – हे चराचर जगताच्या गुरो (शंकरा), सप्तसामे तुझे स्तवन करतात. (अशा तुला या) सूत्रग्रंथीवर स्थापून मी (माझ्या) हातात धारण करतो. (इथे) तू स्थिर हो!

नंतर मागच्या वर्षीच्या दोऱ्याचे विसर्जन करतात. अकरा घारग्यांवर तूप घालून त्यांचे वाण देतात. उद्यापनाच्या वेळी शिव-पार्वतींच्या सुवर्णप्रतिमेचे दान व दंपतीभोजन करून व्रत-समाप्ती करतात. याची कथा अशी –

पूर्वी अयोध्यानगरीत नहुष नावाचा राजा होऊन गेला. त्याच्या राणीचे नाव चंद्रमुखी. त्याच नगरातल्या विष्णुगुप्त नावाच्या ब्राह्मणाच्या भार्येचे नाव भद्रमुखी असे होते. दोघीही मैत्रिणी होत्या. एकदा त्या दोघी शरयूवर स्नानास गेल्या असता, नगरातील स्त्रिया तिथे जमून शिव-पार्वतीची पूजा करीत असलेल्या त्यांनी पाहिल्या. त्यांच्या हातात कसले तरी दोरे बांधलेले आहेत, हेही त्यांना दिसले. त्यांनी त्याविषयी जिज्ञासा दर्शविताच त्या स्त्रियांनी त्यांना हे अमुक्ताभरणव्रत सांगितले. त्या दोघींनी ते करण्याचा संकल्प केला. काही वर्षांनी दोघींनाही व्रताचा विसर पडला. त्यामुळे मृत्यूनंतर चंद्रमुखी वानरीच्या व भद्रमुखी कोंबडीच्या जन्मास आली. मात्र त्यापुढील जन्म त्यांना माणसाचा मिळाला. भद्रमुखी ब्राह्मणस्त्री झाली व चंद्रमुखी राजाची राणी झाली. भद्रमुखी अष्टपुत्रा झाली. चंद्रमुखीला एक पुत्र झाला खरा; पण जन्मतःच रोगट असल्यामुळे तो लगेच निवर्तला. त्यामुळे चंद्रमुखीला भद्रमुखीचा मत्सर वाटू लागला. तिने भद्रमुखीच्या आठही पुत्रांवर मारेकरी घालून त्यांना ठार केले. पण ती व्रत करीत राहिलेली असल्यामुळे त्या व्रताच्या प्रभावाने ते पुनश्च जिवंत झाले. चंद्रमुखीला त्या गोष्टीचे आश्चर्य वाटून ती भद्रमुखीला शरण गेली. तिने चंद्रमुखीला व्रताचा प्रभाव

सांगितला. मग चंद्रमुखीनेही ते व्रत भक्तिभावाने केले व ती पुत्रपौत्रांसह सुखाने नांदली. [ व्रतराज ]

**अमृत** 'नास्ति मृतं (=मरणं) यस्मात् तत्' (=जे प्याल्याने मरण टळते, ते अमृत होय. हलायुध). याला पीयूष व सुधा अशी आणखी नावे आहेत. अमृत हे एक रसायन आहे. देव-दानवांनी समुद्रमंथन केले तेव्हा त्यांना अमृत प्राप्त झाले, अशी कथा पुराणात आहे.

'मी मर्त्य आहे, तो अमर कसा होईन,' ही चिंता वेद-कालापासून माणसाला लागलेली दिसते – (ऋ. ८.१९.२५)

यदग्नेऽमर्त्यस्त्वं स्यामहं मित्रमहो अमर्त्यः । सहसः सूनवाहुत ॥

अर्थ – हे अग्ने, मी मर्त्य आहे आणि मैत्रीची-प्रेमाची दीप्ती असलेला तू अमर्त्य आहेस; मी आणि तू एक व्हावे (तुझ्या-प्रमाणेच मीही अमर्त्य व्हावे).

काण्व सौभरीने व्यक्त केलेली ही एक प्रातिनिधिक आकांक्षा आहे. वैदिक ऋषींची प्रतिभा अमृताच्या शोधासाठी सर्व विश्वाचा ठाव घेण्यास व स्वर्गाच्या अंतिम मर्यादाही उल्लंघून पार होण्यास निघाली आहे, असे दिसते. वैदिक लोक अन्नसेवनाच्या आधीच्या व नंतरच्या अपोशानाला अमृताचे उपस्तरण (बैठक) व अपिधान (झाकण) समजत. ऋग्वेदात अग्नीला अमर्त्य म्हटले आहे. त्यावरून वेदोत्तर वाङ्मयात सर्व देवांना अमर्त्य म्हणण्याची पद्धत पडली. देवांना अमर असे नाव मिळाले. देव अमर का; तर त्यांच्यापाशी अमृत नावाचा रस आहे आणि तो त्यांना प्राशन करायला मिळतो म्हणून. 'अमृतं सोमः' = सोम हा अमृत आहे व तो (रस) देवाचे पेय आहे, असे मानलेले आहे (श. ब्रा. ९.५.१.८). 'आम्ही सोम प्यालो व अमर झालो' असेही काण्व प्रगाथ म्हणतो (ऋ. ८.४८.३). शतपथात हा शब्द अनेकवार आलेला असून, ते स्वर्गीय पेय असल्याचे म्हटले आहे. वायुपुराणात अमृताचा संबंध सोमाशी न जोडता तो चंद्राशी जोडलेला आहे. पुराणकाळात सोमाचा वल्लीशी असलेला संबंध सुटून तो चंद्राशी जोडला जाऊ लागला, याचे हे उदाहरण आहे. वैदिक वाङ्मयात आदित्य, अग्नी, आप् या देवतांना जसे अमृत म्हटले आहे; तसेच प्राण, हिरण्य, ऋक्, रुच् (दीप्ती), स्वर्ग, इ. अनेक वस्तूंनाही अमृत म्हटले आहे (श. ब्रा. ९.१.२.३२; ९.४.४.५; तै. ब्रा. १.७.६.३; १.३.७.५). अमृतामुळे मृत्यू नष्ट होतो, असे शतपथ ब्राह्मणात म्हटले आहे (१०.२.६.१९). 'मृत्योर्मा अमृतं गमय' (= मृत्यूकडून मला अमृताकडे ने,) ही उपनिषदांतली प्रार्थना आहे.

पण अमृत म्हणजे नक्की कोणता पदार्थ, ते मात्र त्यावरून कळत नाही. कदाचित शतपथाच्या कर्त्यालाही ते अज्ञात असेल. म्हणून शंभर वर्षे किंवा त्याहून अधिक आयुष्य ते पूर्णायुष्य म्हणजेच अमृत, असे त्याचे स्पष्टीकरण दोन-तीन ठिकाणी दिलेले आढळते (श. ब्रा. ९.५.१.१०; १०.२.६.८). चंद्रमंडलातून अमृतरस पाझरतो, ही कल्पना पुराणकालात पुढे आली. चंद्राच्या अमृतमय कला कृष्णपक्षात देव प्राशन करतात व अवशिष्ट दोन कला पितर मागच्या बाजूने येऊन पितात, असे विष्णुपुराणात सांगितले आहे (२.१२).

स्वर्गांत अमृताचा साठा असून, त्याच्या रक्षणासाठी विशिष्ट यंत्रणा असल्याचे महाभारतातल्या सुपर्णाख्यानावरून कळते (आदि. ३२). त्याचप्रमाणे पाताळातल्या नागलोकातही अमृताच्या तोडीचा रस आहे, असे पुराणकारांनी मानले आहे. कौरवांनी भीमसेनाला वेलींनी बांधून नदीत फेकून दिले असता वासुकीने त्याला पाताळात नेऊन तिथला रस प्राशन करायला दिला. त्या रसाने भीमाला दहा हजार हत्तींचे बळ प्राप्त झाले (म. भा. आदि. १२८–१२९). चित्रांगदालाही हाच रस प्राशन करायला मिळाला होता.

मृत व अमृत हे शब्द उपनिषदांत वारंवार येतात. बृहदारण्यकात (४.४.१४) अमृत हा शब्द दुःखाचा प्रतियोगी म्हणून आला आहे. छांदोग्यात (७.२३) भूमालाच सुख म्हटले असून, भूमा म्हणजेच अमृत असा त्याचा अर्थ दिला आहे. अमृत हे बाह्य विश्वात नसून माणसाच्या मनातच आहे. शरीर मर्त्य, पण मन अमृत होय. मनात जेव्हा विषाद, तम व पाप ही शिरतात, तेव्हा मनुष्याचा अमृताच्या धारेशी असलेला संबंध तुटतो. मन प्रसन्न ठेवणे व प्रमादरहित होणे, ही अमृतप्राप्तीची पहिली पायरी आहे. माणसाला आत्मज्ञान होणे म्हणजे ती अमृताचीच प्राप्ती असते. ज्याने आत्म्याला जाणले, तो मृत्यूला तरून गेला व त्याने अमृतत्व मिळविले असे समजावे, हा अध्यात्मशास्त्राचा सिद्धान्त आहे.

आधिदैविक दृष्टीने देवांना अमर्त्य मानले असून, त्यांची कृपा हा अमृतप्राप्तीचा मार्ग होय, असे मानले आहे. आधिभौतिक दृष्ट्या स्वस्थ, आरोग्यसंपन्न व शतायुष जीवन हे अमृत होय. 'एतद्वै मनुष्यस्य अमृतत्वं यत्सर्वमायुरेति' = माणसाने संपूर्ण आयुष्य जगणे हेच मनुष्याचे अमृतत्व होय, असे शतपथात म्हटले आहे (९.५.१.१०).

विश्वातला प्राणस्रोत हेच अमृताचे स्थान होय. जिथे जिथे प्राण आहे, तिथे तिथे अमृत आहे. 'अमृतमु वै प्राणाः' अर्थात प्राणतत्त्व हेच अमृत होय (श. ब्रा. ९.१.२.३२). वैदिक विज्ञानाच्या दृष्टीने अमृत व मृत्यू ही दोन्ही एकाच वेळी मानवशरीरात राहतात. दोघांचे कार्य मात्र भिन्न भिन्न आहे. अनृत, पाप व तम हे मृत्यूचे कार्य; तर सत्य, पुण्य व ज्योती हे अमृ-

ताचे कार्य होय. या दोहोंत संकर होऊ न देणे यात माणसाची बुद्धिमत्ता असते.

अमृत हे कुठेतरी बाह्य विश्वात नसून, मानवशरीरातच सहस्रदलकमलात ते असते व कुंडलिनी जागृत झाल्यानंतरच तिथून कुंडलिनीमुखात त्याचा स्राव होऊ लागतो, असे हठयोग-पद्धतीत मानले आहे. ज्ञानेश्वर त्याला चंद्रामृत म्हणतात (ज्ञाने. ६.२४७). परमात्म्याची १७ वी कला ही अमृतकला असल्याचे ते सांगतात. मध्यकालीन तांत्रिक साधनेत लोक माणसाला अमरत्व देणाऱ्या कोणत्या तरी (अमृत) रसाच्या शोधात होते, असे दिसते. कालांतराने मैथुनाचे सुख हाच अमृतरस असे ते मानू लागले. तांत्रिक अनुष्ठानात मद्याचा प्रवेश अमृताचे प्रतीक म्हणूनच झाला आहे. पुढे 'निर्गुनिया' संतांनी मद्याचा निषेध करून हठयोगातल्या 'अमियरसा'चा स्वीकार केला (हिं. सा. को.). 'अमृत व मृत्यू ही दोन्ही माझीच रूपे होत' असे गीतेत श्रीकृष्णाने अर्जुनाला सांगितले आहे (९.१९). पाहा–सहस्रार चक्र; अमियरस; समुद्रमंथन. [ वेदविद्या ]

**अमृतचंद्र** ( इ. स. चे ९ वे शतक ) जैन पंडितांत कुंदकुंदाचार्यांच्या नंतर याचेच नाव घेतले जाते. याचे पुढील ग्रंथ उपलब्ध आहेत – (१) पुरुषार्थसिद्ध्युपाय–यात निराळ्या ढंगाने श्रावकाचार सांगितले आहेत. (२) तत्त्वार्थसार–हा उमास्वातीच्या तत्त्वार्थसूत्रांचा पद्यानुवाद आहे. (३) समयसारटीका. (४) प्रवचनसारटीका व (५) पंचास्तिकायटीका. तीन ते पाच हे तीन्ही ग्रंथ कुंदकुंदाच्या प्राकृत ग्रंथांच्या संस्कृत टीका आहेत. [ जै. सा. इ.; म. च. को. ]

**अमृत छकना** शीख धर्माच्या दीक्षेतला एक आवश्यक विधी. दीक्षार्थी पुरुष प्रथम सकेश स्नान करून शुद्ध वस्त्र व पाच ककार धारण करून येतो. मग त्याला शीख धर्माचे मुख्य सिद्धान्त उपदेशून 'अरदास' केली जाते. एका लोखंडी कटोऱ्यात खांडयाच्या टोकाने बत्तासे पाण्यात घोळले जातात. त्यावेळी पाच 'प्यारे' किंवा सिंह जपूजी, जापजी, दससवैया, चौपाई व आनंदसाहब या ग्रंथांतील वाणीचे पठण करतात. एवढे झाल्यावर लोखंडी कटोऱ्यात अमृत तयार होते. मग दीक्षार्थी चार नियम व पाच ककार धारण करून धर्माने वागण्याची 'रहत' अर्थात प्रतिज्ञा करतो. मग 'वाह गुरु का खालसा' व 'वाह गुरुकी फतेह' असा उद्घोष करून त्याला ते अमृत प्राशन करवितात. त्याचे केस व डोळे यांवरही त्या अमृताचा पाच वेळा शिडकाव करतात. एवढे झाल्याने तो शीख पंथाचा सदस्य होऊन 'सिंह' ही उपाधी धारण करण्यास अधिकारी होतो. शेवटी प्रसाद वाटला जाऊन हा विधी संपतो. [ अ. अ. ]

**अमृतनादोपनिषद्** १०८ गौण उपनिषदांपैकी २१ वे उपनिषद्. हे पद्यात्मक असून, कृष्णयजुर्वेदात आले आहे. विशुद्ध चित्त असणाऱ्यांना श्रवणमननादिकांच्या योगाने पुरुषार्थाची सिद्धी प्राप्त होते; परंतु ज्यांचे चित्त मलिन असेल, अशांनी मोक्षप्राप्तीसाठी ब्रह्माची उपासना व षडंग योगाचा अभ्यास करावा, असे यात सांगितले आहे. त्या दृष्टीने या उपनिषदात प्रणवोपासना, प्रत्याहारलक्षण, षडंगयोग, प्राणायाम, समाधी व ती सिद्ध करण्याचे उपाय, इ. माहिती आली आहे.

**अमृतबिंदूपनिषद्** १०८ गौण उपनिषदांपैकी २० वे उपनिषद्. कृष्ण यजुर्वेदात हे आले आहे. मन हेच आत्म्याच्या बंधाचे व मोक्षाचेही कारण आहे, हा या उपनिषदाचा प्रतिपाद्य विषय आहे. त्या अनुषंगाने यात मनो-निरोध हाच मोक्षाचा उपाय होय, असे सांगितले आहे.

**अमृतराम** (इ. स. चे १८ वे शतक उत्तरार्ध) राजस्थानातील एक संत. हा पल्लीवाळ ब्राह्मण असून, कृष्णभक्त होता. याने नाहरगडाच्या रस्त्यावर आपल्या घराशेजारी अटल-विहारीचे मंदिर बांधले आहे. याच्या लहानमोठ्या ११ काव्य-कृती उपलब्ध आहेत. अमृतकोश, चौपरिहुलास, वन्सीविहार अशी त्यांची नावे आहेत. चौपरिहुलासात राधाकृष्णांच्या चौसर खेळाचे वर्णन आहे. [ मरुभारती, जुलै १९५७ ]

**अमृतराय** (इ.स. चे १६९८–१७५३). एक मराठी संतकवी. हा देशस्थ आश्वलायन ब्राह्मण होता. याच्या पित्याचे नाव शंकर आणि आईचे नाव उमा. हा मूळचा बुलढाणा जिल्ह्यातील मेहकर तालुक्यातल्या फत्तेखेर्डा गावचा रहिवासी होय. पुढे याने औरंगाबादला येऊन विसा मोरो नामक एका श्रीमंताकडे कारकुनाची नोकरी पत्करली. परंतु रंगेल स्वभावामुळे हा फार काळ त्या नोकरीत रमला नाही. अमृतरायाला रामयोगी व शिवयोगी नावाचे दोन मुलगे व कृष्णाबाई नावाची एक मुलगी होती. त्याची बायको फार कजाग होती, त्यामुळे तो परमार्थाकडे वळला, असे म्हणतात.

मध्वमुनी हा त्याचा गुरू होय. याशिवाय अंबिकासरस्वती व ज्ञानानंद ही नावेही त्याच्या गुरुस्थानी आढळतात. यावरून हा आनंदसांप्रदायी असावा, असे वाटते.

अमृतरायाची शिष्यपरंपरा मोठी आहे. त्यात कोल्हापूर...

सिद्धेश्वरमहाराज, माधवकवी, शंकर इत्यादींचा समावेश आहे.

अमृतराय उत्तम कीर्तनकार होता. 'कीर्तनसुखार्थ झाला अवतारचि अमृतराय जीवाचा', असे प्रशस्तिपत्रक मोरोपंतांनी सन्मणिमालेत त्याला दिले आहे. कीर्तनात तो स्वतःची कविता म्हणत असे. नानासाहेब पेशवे त्याच्या कीर्तनावर खूष होते, असे म्हणतात. शनवारवाड्यात नानांच्या समोर त्याचे कीर्तन झाल्याची एक आख्यायिका आहे. पेशवाईतून त्याला एक वर्षासनही मिळाले होते.

अमृतरायाची स्फुटकविता प्रसिद्ध आहे. त्याची भाषा प्रौढ असून, रचनेत उत्तम चातुर्य व डौल आढळतो. त्याच्या अमृतमधुर काव्यांमुळेच लोक त्याला अमृतराय म्हणू लागले होते. मराठीप्रमाणेच त्याला हिंदीही चांगली अवगत होती. त्याने बरीच हिंदी पदे रचली आहेत. त्याचे एक मराठी पद असे –

संतपदांची जोड। दे रे हरी ।। ध्रु ।।
संतसमागमे आत्मत्वाचा । सुंदर उगवे मोड ।
सुफलित करुनी पूर्ण मनोरथ । पुरविशि जिविचें कोड ।।
अमृत म्हणे रे हरि भक्तांचा । शेवट करिसी गोड ।।

मराठी साहित्यात कटावनिर्मितीला यानेच प्रथम प्रारंभ केला, असे सांगतात. [ म. सा.; अमृतरायकृत कवितासंग्रह – संपादक – श्री. वा. दा. ओक. ]

**अमृतसर** पूर्व पंजाबातले एक मोठे शहर व शिखांचे पवित्र स्थान. हे बियास (व्यास) नदीच्या तीरावर वसले आहे. हे इ. स. १५७७ मध्ये स्थापन झाले. शिखांची चार 'तख्ते' आहेत, त्यांपैकी अमृतसरचे तख्त हे 'श्री अकाल तख्त साहबी' या नावाने ओळखले जाते. या ठिकाणाला प्रथम चाक असे नाव होते. शिखांचा चौथा गुरू रामदास याला वाटले, की शिखांसाठी एक सुंदर मंदिर निर्माण करावे. म्हणून प्रथम त्याने एक तलाव खोदायला प्रारंभ केला. या तलावाचे नाव त्याने अमृतसरोवर ठेवले. या नावामागे एक आख्यायिका आहे, ती अशी –

रामचंद्राने अश्वमेध करायचे ठरवून दिग्विजयार्थ घोडा सोडला. लव–कुश यांनी तो घोडा पकडला. त्याच्या मुक्ततेसाठी राम–लक्ष्मण व भरत–शत्रुघ्न यांनी लव–कुशांशी युद्ध मांडले. पण त्या कुमारांनी चौघांनाही मूर्च्छित पाडले. पुढे त्यांना उठविण्याचा प्रश्न आला, तेव्हा लव–कुशांनी स्वर्गातून अमृत आणून ते त्यांच्यावर शिंपडले व उरलेले तिथेच जमिनीत पुरून टाकले.

ज्या ठिकाणी ते अमृत पुरले होते, त्याच ठिकाणी गुरू रामदास यांनी हा तलाव खोदला आहे, असे म्हणतात. ही भूमी गुरू रामदास याला अकबराने भेट म्हणून दिली होती. तिथे रामदासाने एक पर्णकुटी बांधली आणि वसाहत सुरू केली. तिला प्रथम रामदासपूर असे नाव पडले. नंतर ते एक तीर्थक्षेत्र बनले. तिथल्या तलावातील स्वच्छ पाणी अमृतासारखे आहे, म्हणून रामदासपूरचे नाव अमृतसर ठेवण्यात आले. हे सरोवर ४७५ फूट लांब–रुंद आहे. त्याला सर्व बाजूंनी संगमरवराचे घाट बांधले आहेत. तलावाच्या मध्यभागी शिखांचे पवित्र स्थान असे सुवर्णमंदिर आहे. त्याचा चौथरा ६५ फूट चौरस आहे. हे मंदिर शिखांचा पाचवा गुरू अर्जुनदेव याने निर्माण केले. मंदिरात जाण्यासाठी सरोवराच्या पश्चिम अंगाला दोनशे फूट लांबीचा संगमरवरी पूल आहे. सुवर्णमंदिर हे खरोखरच सोन्याचे मंदिर आहे. याच्या रचनेला जेवढे सोने लागले आहे, तेवढे क्वचितच दुसऱ्या एखाद्या वास्तूला लागले असेल. जगातल्या अद्भुत इमारतींत याची गणना होते. महाराजा रणजितसिंहाने या मंदिराची शोभा वाढविण्यासाठी अपार धन वेचले. या मंदिराची छते व भिंती सोन्याचा मुलामा दिलेल्या पत्र्यांनी लखलखत असतात. याला हरमंदिर असेही दुसरे नाव आहे.



सुवर्णमंदिर, अमृतसर

शीख लोक याला दरबारसाहब म्हणतात व आपल्या पवित्र ग्रंथाला ग्रंथसाहब म्हणतात. मुख्य मंदिराला जोडून सेतूच्या पश्चिम अंगाला एक स्थान आहे, त्याला अकालबुंग म्हणतात. रोज सकाळी या ठिकाणाहून ग्रंथसाहब आणून तो सुवर्णमंदिरातल्या एका छत्रीखाली ठेवतात. दिवसभर तो तिथे असतो. ग्रंथी नावाचा एक अधिकारी त्याच्यावर चवरी वारीत राहतो. देवस्थानाचे गायक त्याच्यापुढे बसून ग्रंथसाहबांतली गीते रागदारीत गातात. त्याच्या समोर एक वस्त्र पसरलेले असते. त्यावर भाविक लोक दक्षिणा ठेवतात. रात्र पडल्यावर ग्रंथसाहब परत अकालबुंगात नेतात. शिखांच्या गुरुद्वारात उघड्या डोक्याने कोणालाही जाता येत नाही. इथे एकूण तेरा गुरुद्वारे आहेत. त्यांतला सुवर्ण-मंदिर हा मुख्य होय.

अमृतसर, संतोषसर, रायसर, विवेकसर व कमलसर

(कौलसर) अशी इथे पाच तीर्थे आहेत. दुर्गा, सत्यनारायण, लक्ष्मीनारायण अशी तीन प्रसिद्ध मंदिरेही इथे आहेत. प्रतिवर्षी कार्तिक मासात इथे मोठी जत्रा भरते.

इ. स. १७६२ साली अफगाण सेनापती अहमदशहा याने तोफा डागून हे पवित्र स्थान उद्ध्वस्त केले, पण शिखांची निष्ठा एवढी जबर, की त्यांनी पुढे अवघ्या चारच वर्षांत ते पुनश्च उभारले व त्याच्या भोवती तटबंदीच्या इमारती बांधल्या. [ कल्याण – तीर्थांक; भारती, एप्रिल १९५९; एन्सा. रि. ए. ]

**अमृतसिद्धियोग** जातकाच्या मुहूर्तस्कंधातला एक शुभ योग. याविषयी श्लोक असा –

**आदित्यहस्ते, गुरुपुष्ययोगे, बुधानुराधा, शनिरोहिणी च ।**
**सोमे च सौम्यं भृगुरेवती च भौमाश्विनी चामृतसिद्धियोगः ।।**

अर्थ – रवि-हस्त, गुरु-पुष्य, बुध-अनुराधा, शनि-रोहिणी, सोम-मृगशीर्ष, शुक्र-रेवती व मंगळ-अश्विनी असा वार-नक्षत्रांचा योग होतो, तेव्हा त्याला अमृतसिद्धियोग म्हणतात.

मात्र पंचमीस रवि-हस्त, सप्तमीस मंगळ-अश्विनी, षष्ठीस सोम-मृगशीर्ष, अष्टमीस बुध-अनुराधा, दशमीस शुक्र-रेवती, नवमीस गुरु-पुष्य व एकादशीस शनि-रोहिणी, असा अमृतसिद्धियोग असतो तो अशुभ समजून शुभकार्यास वर्ज्य समजतात. [ मु. चिं. ]

**अमृतानंद** ही एक योगाची अवस्था आहे. आत्मानंदाला-सुद्धा अमृतानंद म्हणतात. 'तत्वैवं विद्वानमृत इह भवति' (= आत्मज्ञानी पुरुष या लोकी अमृत होतो–नृ. पू. उ. १. १६). आत्म्याचे स्वरूप अमृतत्व हेच मानलेले आहे. 'अहं ब्रह्मास्मि,' 'तत्त्वमसि,' इ. महावाक्यांच्या अर्थज्ञानाने तो आत्म-साक्षात्कार होतो, त्यालाच अमृतानंद म्हणतात.

**अमेश स्पेन्त** झरथुष्ट्री धर्मात सर्वश्रेष्ठ देवदूतांच्या संघाला हे नाव आहे. याचा अर्थ अमेश = अमर व स्पेन्त = उपकारी, अर्थात अमर परोपकारी व्यक्ती असा आहे. अवेस्त्यातल्या प्राचीन गाथाग्रंथांत हा शब्द आढळत नाही; पण उत्तरकालीन अवेस्त्यात व त्या धर्माच्या इतर वाङ्मयात तो बरेच वेळा येतो. अमेश स्पेन्त हे अहुरमझ्दाचे सेवक होत (यस्त-इ. प्रयानो २. ५५. ५९; वोहुमनयश्त ३. ३१). हे संख्येने सहा असून, स्राओश ही देवता त्यांत अंतर्भूत केली तर त्यांची संख्या सात होते. ते सतत अहुरमझ्दाजवळ राहतात व जगाला मार्ग-दर्शन करण्याच्या कार्यात त्याला मदत करतात. अमेश स्पेन्त ही अहुरमझ्दाची स्वतःची सृष्टी आहे. ते अदृश्य, अमर, उत्तम शास्ते व दानशूर असतात. धार्मिक कृत्यात त्यांच्यासाठी यजन केले जाते. यज्ञातली आहुती ग्रहण करण्यासाठी ते प्रकाशमय मार्गाने खाली येतात. त्यांच्यापैकी वोहुमनह हा सुवर्णाच्या सिंहासनावर बसतो. अहुरमझ्दाने त्यांच्यापैकी प्रत्येकाला सृष्टी-तले विशिष्ट कार्य नेमून दिले आहे.

प्रत्येकाचा विशिष्ट महिना विशिष्ट दिवस व विशिष्ट फूल असते. झरथुष्ट्री वाङ्मयात या सहांना सहा सद्गुणांची प्रतीके मानले आहे –

(१) वोहुमनह–सद्विचार. (२) अशवहिश्त–नीतिमत्ता. (३) क्षथ्रवैर्य–इच्छित राज्य. (४) स्पेन्त अर्मैति–पवित्र ऐक्य. (५) हौर्वतात–संरक्षक आरोग्य व (६) अमेरेतात–अमरत्व. यांतील पहिले तिघे पुरुष असून, पुढच्या तीन स्त्रिया आहेत.

सामान्य देवतांपेक्षा श्रेष्ठ व अहुरमझ्दापेक्षा कनिष्ठ असे हे देवदूत आहेत. यांची कोणी बायबलमधल्या श्रेष्ठ देवदूतांशी (आर्चेंजल) तुलना करतात; तर कोणी वैदिक आदित्यांशी त्यांचे साम्य दाखवितात. [ एन्सा. रि. ए. ]

**अमोघदर्शी** एक बोधिसत्त्व. निष्पन्नयोगावलीत याचे वर्णन आहे, ते असे – याचा वर्ण पीत असून, चिह्न कमळ आहे. ते कमळ त्या उजव्या हाताच्या आहे. [ इं. बु. इ. ]

**अमोघसिद्धी** ध्यानी बुद्धांपैकी चौथा. याचे वर्णन अद्वय-वज्रसंग्रहात पुढीलप्रमाणे दिले आहे –

**उत्तरदले श्यामवर्णोऽमोघसिद्धि-**
**विश्ववज्रचिह्नाभयमुद्राधरः ...**

अर्थ – उत्तर दलाच्या ठिकाणी अमोघसिद्धीचे स्थान असून तो अभयमुद्रा व विश्ववज्र धारण करतो ...

गरुडयुग्म हे याचे वाहन असून, हा श्यामवर्ण व उत्तराभिमुख असतो. याच्या मूर्तीवर सात नागफण्यांचे छत्र असते. याच्या मंदिरापुढे लहानसा खड्डा असतो, ते त्या नागांचे निवासस्थान होय. याचा मंत्र – 'ॐ आः प्रज्ञाऽरुक् हुम् ।' तिबेट व चीन या देशांत हा ध्यानी बुद्ध अत्यंत लोकप्रिय आहे. [ इं. बु. इ. ]

**अम्म** द. भारतातील मातृदेवता. प्राचीन तमिळ साहित्यात हिचे बरेच वर्णन आहे. हिला अय्यि (माता), कोट्टवै (विजयी माता) किंवा कोट्टी (संहारकर्त्री) अशीही अन्य नावे आहेत. मरवर जमातीची ती कुलदेवता आहे. त्या जमातीने ताडी, भात, रक्त व बळी देऊन तिची कृपा संपादन केली, असे सांगतात. ती रणरागिणी आहे. रणांगणावर ती अग्रभागी असते. तिच्या गळ्यात आतड्यांच्या माळा असतात. मारलेले शत्रू स्वतःच्या रक्तात पोहत असलेले पाहून ती विकट हास्य करते

तिच्या निशाणावर सिंह असतो. ती काळविटावर बसते. तिच्या हातात पोपट व सभोवती भुताखेतांचा मेळावा असतो.

पत्तुप्पाट्टू या तमिळ गीतसंग्रहात याहून भयानक असे तिचे वर्णन आहे. शिलप्पधिकारम्‌मध्ये तिची कुमारी, गौरी, अशी आणखी काही नावे दिली आहेत. तमिळ महाकाव्यांच्या अखेरीच्या काळात अम्माच्या स्वभावविशेषांसंबंधी अनेक दंतकथा निर्माण झाल्या. उमा, रमा, सावित्री, या तीन देवतांची ती मूलशक्ती मानली गेली. शिवाच्या सहस्रनामांप्रमाणेच तिचीही सहस्रनामे निर्माण झाली. त्यांतली काही नावे तिच्या क्रूर स्वभावाची, तर काही सौम्य स्वभावाची निदर्शक आहेत. शाक्त पंथात तिची नामे, रूपे व उपासना यांना खूप महत्त्व दिलेले आहे. पाहा–मातृदेवता, काली, चंडी, नवदुर्गा. [ रि. इं. ]

**अम्मावारू** द. भारतातील ग्रामदेवता. हिच्या कोपामुळे पटकी उद्‌भवते, अशी समजूत आहे. हिची कथा पुढीलप्रमाणे– ही आदिमाया असून, हिने क्षीरसागरात तीन अंडी घातली. त्यांपैकी दोन फुकट गेली व तिसरे उबवले. त्यातून ब्रह्मा विष्णू-महेश जन्मले. त्याच्या खालच्या अर्धापासून पृथ्वी व वरच्या अर्धापासून आकाश बनले. विष्णू लोण्यावर, ब्रह्मा हळदीवर आणि शिव तिच्या दुधावर वाढला. अम्मावारूने प्रत्येकाच्या कपाळी धार्मिक चिन्हे कोरली. मग चार नगरे निर्मिली. तिने त्या देवांसाठी व चौथे स्वतःसाठी. पुढे हे तीन देव राजे झाले व अम्मावारूला जुमानीनासे झाले, त्यामुळे ती कोपली व तिने तिघांनाही ठार केले; पण पुढे लहर फिरल्यावर त्यांना परत जिवंतही केले. पुन्हा त्यांचा संघर्ष सुरू झाला. त्यात ब्रह्मा-विष्णू हरले; पण शिव मात्र हरला नाही. [ व्हि. गॉ. सा. इं. ]

**अयन** 'सूर्यस्य उत्तर – दक्षिण – दिग्गमनम्' = सूर्याचे उत्तर किंवा दक्षिण दिशेस जाणे म्हणजे अयन होय. वर्षाची अयने दोन असतात. एक दक्षिणायन आणि दुसरे उत्तरायण. रोज एका ठराविक जागी उभे राहून पूर्वक्षितिजावर सूर्य कुठे उगवतो, हे क्षितिजालगतच्या झाडांच्या किंवा टेकड्यांच्या अनुषंगाने पाहत गेल्यास असे आढळते की, जूनच्या २२ तारखेच्या सुमारास उगवता सूर्य क्षितिजावर जास्तीत जास्त उत्तरेला गेला आहे. या सुमारास दिनमान मोठ्यांत मोठे आणि रात्रिमान लहानांत लहान असते. त्यानंतर सूर्य हळूहळू दक्षिणेकडे वळतो. म्हणजे त्याचे दक्षिणायन ( दक्षिणेकडे जाणे ) सुरू होते त्यानंतर सप्टेंबरच्या २३ तारखेला सूर्य कुठे उगवतो हे पाहून ठेवावे. या सुमारास दिनमान आणि रात्रिमान ही समान असतात. या ज्ञानासाठी तारकापटाचा आधार घेतल्यास सोयीचे पडेल. त्या पटावरच्या ज्या बिंदूत सूर्य या दिवशी आलेला दिसेल, त्याला शरत्‌संपात म्हणतात. तिथूनही पुढे सूर्य आणखी दक्षिणेकडे जाऊन थांबलेला दिसतो, तो डिसेंबरच्या २२ तारखेस. या वेळी तो तारकापटात पूर्वाषाढेत आलेला दिसेल. तिथून मग तो माघारा उत्तरेकडे वळतो, म्हणजे त्याचे उत्तरायण सुरू होते. त्यानंतर जूनच्या २१ तारखेपर्यंत तो सतत उत्तरेकडे जात राहतो आणि मग पुन्हा दक्षिणेकडे वळतो. त्या तारखेस तो मृग आणि आर्द्रा या दोन नक्षत्रांच्या दरम्यान आलेला असतो.

मार्च २१ तारखेस अहोरात्राचे मान समान होते. त्यामुळे पुढील काळात पृथ्वीच्या उत्तर गोलार्धात येऊ घातलेल्या उन्हाळ्याची सूचना मिळते. २२ जूनचे दक्षिणायन हे पावसाळ्याचे सूचक असते. २३ सप्टेंबरचा समरात्रिंदिन काल पावसाळा संपून हिवाळा सुरू होणार असे सुचवितो. २१ डिसेंबरचे उत्तरायण वसंतागमाची द्वाही फिरविते.

अशा प्रकारे २१ मार्च आणि २३ सप्टेंबर या दिवसांची जी समरात्रिंदिनाची अवस्था असते, त्या वेळी सूर्य आकाशात अनुक्रमे वसंतसंपात-बिंदूत आणि शरत्‌संपात-बिंदूत असतो. हे दोन बिंदू हळूहळू पश्चिमेकडे चळतात, असा अनुभव आहे. ही चळणूक सामान्यतः १००० वर्षांत सुमारे १३ अंशांची असते. उत्तरायण आणि दक्षिणायन केव्हा सुरू होणार ते पंचांगात दिलेले असते.

धर्मशास्त्रात उत्तरायण पवित्र व पुण्यकारक मानलेले असून, दक्षिणायन हे पितरांचे व यमाचे अतएव अशुभ मानलेले आहे. उत्तरायणात मृत्यू शुभप्रद व दक्षिणायनात अशुभ मानतात. याविषयी गीतेतले पुढील दोन श्लोक प्रसिद्ध आहेत –

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।**
**तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ।।**
**धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।**
**तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ।।**

(गीता ८. २४–२५)

अर्थ – ज्योतिर्मय अग्नी, दिवस, शुक्लपक्ष आणि उत्तरायणाचे सहा महिने, या कालात मृत्यू पावलेले ब्रह्मवेत्ते जन ब्रह्माला प्राप्त होतात. ( त्याचप्रमाणे ) धूर, रात्र, कृष्णपक्ष आणि दक्षिणायनाचे सहा महिने (या कालात मृत्यू पावलेला) योगी चंद्राच्या ज्योतीला प्राप्त होऊन (स्वर्गात आपल्या शुभ कर्मांचे फल भोगून) परत भूलोकावर येतो.

शरपंजरी पडलेला भीष्म देहत्याग करण्यासाठी, उत्तरायणाची वाट पाहत होता, असे महाभारतात म्हटले आहे.

अयने मोजण्याच्या पद्धती दोन आहेत. एक म्हणजे, सूर्य विषुववृत्तावर येऊन उत्तरेकडे किंवा दक्षिणेकडे वळतो, तिथून अयन सुरू झाले असे मानायचे व दुसरी म्हणजे सूर्याची उत्तर-

दक्षिण गती संपून तो माघारा वळतो, तिथपासून अयन समजायचे. महाभारतकाळी ही दुसरी पद्धती प्रचारात होती. त्या काळी उत्तरायण माघ महिन्यात सुरू होत असे, असे कळते. हल्ली मात्र उत्तरायण पौषात आणि दक्षिणायन आषाढात सुरू होते. दक्षिणायनाचा स्वामी यम असल्यामुळे महत्त्वाची शुभ कर्मे त्या अयनात करीत नाहीत.

**विधि-निषेध** – सूर्य उत्तरायणात असता पुढील कृत्ये करावी, असे सांगितले आहे –

**देवतारामवाप्यादि प्रतिष्ठोदङ्मुखे रवौ ।**
**दक्षिणाभिमुखे कुर्वन्न तत्फलमवाप्नुयात् ॥**

**अर्थ** – देवता, उद्याने, वापी, कूप इत्यादींची प्रतिष्ठा उत्तरायणात करावी. दक्षिणायनात केल्यास फल मिळत नाही.

**मातृभैरववाराहनारसिंहत्रिविक्रमाः ।**
**महिषासुरहन्त्री च स्थाप्या वै दक्षिणायने ॥**

**अर्थ** – मातृका, भैरव, वराह, नरसिंह, त्रिविक्रम, देवी, इ. (उग्र) देवतांची स्थापना दक्षिणायनात करावी.

गृहप्रवेश, देवार्चा, विवाह, चौल, उपनयन, इ. शुभ कर्मे दक्षिणायनात वर्ज्य करावी. [ पु. चिं.; पं. ज्यो. शा.; म. भा. उ.]

## अयनव्रत

एक काम्यव्रत. उत्तरायण सुरू झाले असता गोघृतस्नान व विष्णुपूजा असा याचा विधी आहे. फल – विष्णुसायुज्य. [ व्र. प. ]

## अयनांश

निरयनगणनेचे आरंभस्थान जो निःशर रेवती योगतारा (झीटापिशियम), त्याच्यापासून सायनमेषसंपातापर्यंतचे क्रांतिवृत्तावरील अंशादी अंतर म्हणजे अयनांश होत. हे अयनांश सूर्यसिद्धांताप्रमाणे २७ अंशांपेक्षा जास्त कधीही होत नाहीत. निःशर रेवती योगताऱ्यापासून पूर्वेस व पश्चिमेस २७ अंशापर्यंत संपात जातो, असे मानतात; पण अर्वाचीन संशोधनाने संपाताची पूर्ण प्रदक्षिणा होते, असे निश्चित झाले आहे.

**शून्यायनांश** – गणेश दैवज्ञ याच्या मताने शके ४४४ मध्ये संपात रेवती योगताऱ्यावर (झीटापिशियम) होता. त्याची गती त्याने दरसाल ६० विकला धरली आहे. राजमृगांक, करणप्रकाश, करणकुतूहल या ग्रंथांमध्ये शके ४४५ मध्ये संपात रेवतीच्या योगताऱ्यावर होता, असे दिलेले आहे. भास्वतीकरण ग्रंथामध्ये शके ४५० या वर्षी, आर्यसिद्धान्ताच्या मते शक्रे ५२७ या वर्षी व पराशरमते शके ५३२ साली संपात रेवतीवर होता. संपात रेवतीवर असताना अयनांश शून्य होतात.

पाश्चात्य गणितावरून पाहिले असता शके ४९६ साली संपात रेवती योगताऱ्यावर होता असे दिसते. तसेच पाश्चात्य शोधांवरून सपातगती सुमारे ५०.२ विकला आहे. प्राचीन ज्योतिष्यांनी ती ६० विकला धरली आहे. तीमध्ये दरसाल ९.८ विकला एवढा फरक पडतो. या चुकीच्या गतीमुळे शके ४९६ पासून दरसाल मेषसंक्रांतीमध्ये ९.८ विकलांची चूक पडत गेलेली आहे. प्राचीन मताने शके १८४० साली, १८४० उणे ४४४ = १३९६ गतवर्षे झाली. तेव्हा दरसाल ६० विकला म्हणजे १ कला संपातगती धरली, तर त्या साली १३९६ कला म्हणजे २३ अंश १६ कला इतके अयनांश येतात. तेव्हा प्राचीन अयनांश २३.१६ – अर्वाचीन सूक्ष्म अयनांश १८.४४ = ४.७२ इतके अंतर शके १८४० साली असल्यामुळे प्राचीन संक्रांती व निरयन ग्रह ४ अंश ३२ कला एवढ्याने अंतरित होतात. याप्रमाणे आजपर्यंत होत आलेली चूक नाहीशी केली, तरच पुढील पंचांगे शुद्ध निघतील. आज जे टिळकपंचांग प्रसिद्ध होत आहे, त्यात ही चूक दुरुस्त केली आहे.

युरोप खंडात संपातगतीचा म्हणजे जिच्यामुळे अयनांश धरावे लागतात, त्या अयनगतीचा शोध प्रथम हिपार्कस याने सनपूर्व १२५ च्या सुमारास लावला. त्याने आपले वेध व आपल्या पूर्वी १७० वर्षे टोमोकेरीस याने केलेले वेध, यावरून हा शोध लावला. त्याच्या मागाहून सुमारे ३०० वर्षांनी टॉलेमीने संपातास गती आहे, ही गोष्ट निश्चयाने स्थापित केली. तो म्हणतो, की 'हिपार्कसच्या वेळेपासून आजपर्यंत २६७ वर्षांत तारांचे भोग २ अंश ४० कला वाढले आहेत.' यावरून १०० वर्षांस १ अंश म्हणजे ३६ वर्षांस १ विकला संपातगती त्याने ठरविली. टायकोब्राही याने संपाताची वार्षिक गती ५१ विकला ठरविली आणि पुढे लालांडी याने ५०.५ आणि डिलांबर याने ५०.१ विकला ठरविली. प्राचीन संस्कृत ग्रंथात जशा वार्षिक संपातगती निरनिराळ्या दिलेल्या आहेत, त्याचप्रमाणे वरील गतीही भिन्न भिन्न आहेत. अरब लोकांतील अलबटानी नामक ज्योतिष्याने ६६ वर्षांत १ अंश म्हणजे वर्षास सुमारे ५५.५ विकला संपातगती ठरविली आहे, ती सूर्यसिद्धांताशी बरीच जुळते. हल्ली पाश्चात्यांनी संपातगती ५०.२ विकला निश्चित केलेली आहे. प्राचीन भारतीय ग्रंथकारांप्रमाणे अरब ज्योतिषीही संपातास पूर्व-पश्चिम आंदोलगती मानीत होते. [ म. ज्ञा. को. ]

## अयाचितव्रत

'याचनां विना अन्येन दत्तस्य भोजनमयाचितम्'= (कोणाकडेही) न मागता दुसऱ्याने दिलेल्या अन्नाचे भोजन, ते अयाचित होय (पु. चिं.). प्रथम या व्रताचा संकल्प करतात. मग अयाचित वृत्तीने राहून दिवसातून एकदा, दुपारी वा रात्री भोजन करतात. अयाचित असे काही न मिळाल्यास उपवास करावा लागतो. [ हि. ध.; निर्णयसिंधु ]

**अयास्य आंगिरस** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या नवव्या मंडलातील चव्वेचाळीस ते शेचाळीस आणि दहाव्या मंडलातील सदुसष्ट व अडुसष्ट अशी एकूण पाच सूक्ते याने रचली आहेत. हा अंगिरसाला स्वराजेपासून झालेला मुलगा होय. अयास्य हा आभूती त्वाष्ट्राचा शिष्य म्हणून ओळखला जातो. हा हरिश्चंद्राच्या व शार्यात मानवाच्या यज्ञात उद्गाता होता.

नवव्या मंडलातील सूक्तांचा पवमान सोम हा विषय असून उर्वरित सूक्ते ही बृहस्पतिसूक्ते म्हणून प्रसिद्ध आहेत. या सूक्तांमध्ये आंगिरसपुत्र व इंद्रपुरोहित बृहस्पती आंगिरस यांचा पराक्रम वर्णन केला आहे. पणी लोकांनी वलपुरात अडकविलेल्या गायी त्यांनी मुक्त केल्या असे सांगितले आहे. याची एक ऋचा (ऋ. १०.६८.७) अशी—

बृहस्पतिरमत हि त्यदासां नाम स्वरीणां सदने गुहा यत्।
आण्डेव भित्वा शकुनस्य गर्भं मुदुस्रियाः पर्वतस्य त्मनाजत्

अर्थ—बृहस्पतीने धेनुवंदिवासस्थान शोधून काढताच अंडयाचे कवच फोडणाऱ्या पक्ष्याच्या पिलांप्रमाणे पर्वतीय धेनू बाहेर पडल्या.

याने आपल्या सूक्तांमधे शृक्र व मंथी या सोमपात्रांचा उल्लेख केला आहे. धर्मकृत्यातील एक अधिकारी व्यक्ती म्हणून याचा अनेक ठिकाणी उल्लेख येतो. याने स्वतःचा कवी म्हणून निर्देश केला आहे (ऋ. ९. ४४. १–२).

इंद्रप्रीत्यर्थ सामगायन करीत असता याला ध्यानशक्तीचे रहस्य उकलले. धेनू म्हणजे उषा, सूर्य व विद्युत् या वस्तू होत, असे हा सांगतो. ' मौक्तिकालंकारांनी काळ्या घोड्याला सजवावे, त्याप्रमाणे पितरांनी काळ्या आकाशाला तेजस्वी तारांगणांनी मंडित केले आहे आणि अंधाराला रात्रौ व प्रकाशाला दिवसा मोकळीक दिली आहे, ' अशा उपमेने याने पितरांचे कर्तृत्व सांगितले आहे. हा ऋषी निसर्गनिरीक्षक असून याच्या दोनच सूक्तांत कितीतरी निसर्गविषयक सुंदर उपमा येऊन गेल्या आहेत. [ ऋ. म. भा.; प्रा. च. को.; सी. ऋ. ]

**अयोगव** एक संकरजाती. ' वैश्यकन्यायां शूद्रादुत्पन्नसन्तानः' =वैश्य स्त्रीच्या ठिकाणी शूद्रापासून उत्पन्न झालेल्या संततीला अयोगव असे नाव आहे. [ श. क. ]

**अयोध्या** उत्तर प्रदेशातल्या फैजाबाद जिल्ह्यातले एक महाक्षेत्र. सात पुऱ्यांमध्ये अयोध्येची गणना आहे. हे शहर सरयूच्या तीरावर वसले आहे ' मनुना मानवेन्द्रेण सा पुरी निर्मिता स्वयम् '=मानवश्रेष्ठ मनूने ती नगरी स्वतः निर्माण केली, असे वाल्मीकीने म्हटले आहे (वा. रा. १. ५. ६). मनूचा पुत्र इक्ष्वाकू. तो पुढे अयोध्येच्या सिंहासनावर बसला. रामचंद्राच्या सत्ताकालात अयोध्येचा परम उत्कर्ष झाला. वाल्मीकीने त्या काळच्या अयोध्येचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे—

कपाटतोरणवतीं सुविभक्तान्तरापणाम्।
सर्वयन्त्रायुधवतीमुषितां सर्वशिल्पिभिः॥
सूतमागधसम्बाधां श्रीमतीमतुलप्रभाम्।
उच्चाट्टालध्वजवतीं शतघ्नीशतसङ्कुलाम्॥
(वा. रा. १. ५. १०–११)

अर्थ – द्वारे आणि तोरणे यांनी युक्त, आतल्या बाजारपेठांची मांडणी व्यवस्थित आणि विभक्त असलेली, सर्व यंत्रे आणि आयुधे यांनी युक्त, सर्व प्रकारचे कारागीर जिच्यामध्ये राहतात अशी, सूत व मागध यांनी भरलेली, ऐश्वर्यवती, जिची प्रभा अतुलनीय आहे, जिच्यामध्ये उंच हवेल्या आणि ध्वज फडकत आहेत आणि जिच्यामध्ये शेकडो तोफा आहेत, (अशी ती अयोध्या होती).

या अयोध्येचे माहात्म्य तुलसीदास पुढीलप्रमाणे सांगतात—

जद्यपि सब वैकुंठ बखाना
वेदपुराणविदित जगु जाना॥
अवध सरिस प्रिय मोहि न सोऊ
यह प्रसंग जानै कोउ कोऊ॥

अर्थ – वेद-पुराणांनी जरी वैकुंठाचे वर्णन केले असले, तरी अयोध्येसारखे दुसरे कोणतेही क्षेत्र मला प्रिय नाही, ही गोष्ट पुष्कळांना माहीत आहे.

अयोध्या ही कोसल देशाच्या अंतर्गत असून, हिची लांबी बारा योजने आणि रुंदी तीन योजने (१ योजन= ४ कोस) होती, असे वाल्मीकीने सांगितले आहे (वा. रा. १.५. ७) स्कंदपुराणाच्या मते ती सुदर्शन चक्रावर वसली असून, भूतशुद्धितत्त्व या ग्रंथाच्या मते ती रामाच्या धनुष्यावर स्थित आहे.

कथासरित्सागरात अयोध्येचे अनेक उल्लेख मिळतात. उदयनाची माता मृगावती ही अयोध्येच्या कृतवर्म राजाची कन्या असे तिथे सांगितले आहे. शशांकवती—लंवकाच्या मुख्य कथेचे स्थान अयोध्या हेच आहे. वेताळपंचविशीत शूर चोराला पती म्हणून वरणारी रत्नवती नावाची वैश्यकन्या अयोध्येतलीच होती. तिचा हा वृत्तांत वीरकेतूच्या कारकिर्दीत घडला.

त्यानंतर विक्रमादित्याने अयोध्या नगरी वसविली आहे. एका प्रसंगी त्याच्या सैन्याचा तळ सरयूच्या तीरावर पडला. तिथे तप करणाऱ्या योगिजनांकडून त्याला कळले, की इथेच पूर्वी रामाची अयोध्या होती. त्याने मग त्या क्षेत्राचे पुनरुज्जीवन करावे असे ठरवून तिथे मंदिरे, सरोवरे, विहिरी या गोष्टी निर्माण केल्या,

बुद्धकाळातही अयोध्येला बरेच महत्त्व होते. इथे अनेक बौद्ध विहार असल्याचे युआन च्वांग सांगतो. गुप्तकालातही हिला राजधानीचा दर्जा मिळाला होता. अयोध्येवर मुसलमानांची अनेकदा आक्रमणे झाली आहेत. इ. स. ११९३ मध्ये शहाबुद्दीन घोरीने हा प्रांत जिंकून घेतला. तेव्हापासून तो १८५६मध्ये ब्रिटिशांच्या ताब्यात जाईपर्यंत हा प्रांत मुसलमानांकडेच होता.

अयोध्येत अनेक शिव-विष्णुमंदिरे आहेत, तशाच मशिदीही आहेत. सीतारसोई, हनुमानगढी, कनकभवन, इ. दर्शनीय स्थळे आहेत. साधु-वैराग्यांचे मठ आणि आखाडेही आहेत. अयोध्येच्या दोन परिक्रमा आहेत. पहिली, स्वर्गद्वार या स्थानापासून सुरू होते व जनौरा, गुप्तार घाट, ही स्थळे करून परत स्वर्गद्वारात येऊन संपते. दुसरी अंतरवेदीची परिक्रमा रामघाटापासून सुरू होऊन सुग्रीव पर्वत, लक्ष्मण घाट, इ. क्षेत्रांवरून परत रामघाटी येऊन पुरी होते.

गोस्वामी तुलसीदासांनी आपले रामचरितमानस अयोध्येत प्रकाशित केले. अयोध्या हे जैनांचेही पवित्र क्षेत्र आहे. त्यांच्या पहिल्या व चौथ्या तीर्थंकराचे हे जन्मस्थान आहे. या नगराला विनीता, अयोध्या, अयुध्रा, साकेत, इक्ष्वाकुभूमी, रामभूमी, रामपुरी, अशी अन्यही नावे आहेत.

अयोध्येत एक प्राचीन विद्यापीठ होते व ते तिथला जैन राजा ऋषभ याने स्थापले होते, असे त्रिषष्टिशलाकापुरुषचरित. या ग्रंथावरून कळते. अर्हत् ऋषभ याला ७२ विद्या येत होत्या व, त्या त्याने आपल्या प्रजेला शिकविल्या. या शिक्षणाचा प्रारंभ लेखनकलेने झाला व त्याचा शेवट आकाशातल्या ताऱ्यांचे ज्ञान देऊन करण्यात आला, असे त्या ग्रंथात म्हटले आहे. पाहा – कोसल, साकेत. [ हि. ध.; हि. जॉ. ए. इं.; कल्याण–तीर्थांक; स. भा. प्र. व.; श्री. ज. ह. दवे–भारती, ३० डिसेंबर १९५६ ]

**अय्यनार** द. भारतातला, विशेषत: तमिळनाडमधला एक ग्रामदेव. याला अय्यप्प असेही म्हणतात. केरळात याला शास्ता म्हणतात. द्रविड आदिवासी त्याला आपला नियामक समजतात. तमिळनाडमध्ये प्रत्येक गावात याला स्थान आहे. पाणवठ्याजवळ व उंच वृक्षाच्या छायेत याच्या नावाने दगड बसविलेला असतो. काही गावांतून चवाठ्यावर याच्या मूर्ती बसविलेल्या असतात. हा भुताखेतांचा अधिपती आहे. तो मध्यरात्री घोड्यावर स्वार होऊन आपल्या भूतगणांसह संचाराला निघतो. त्याच्या हाती खड्ग असते. त्याच्या वाटेत जो कोणी येतो, तो मृत्युमुखी पडतो. आजारातून बरे होण्यासाठी लोक त्याला नवस करतात व चिकणमातीचे हत्ती, रेडे, कुत्रे व घोडे बनवून त्याला अर्पण करतात. याचे पुजारी कुंभार असतात. अवर्षण पडते, तेव्हा याची अश्वारूढ प्रतिमा तयार करून, तिची मिरवणूक काढतात आणि घरोघरचा भात जमवून त्याला नैवेद्य समर्पितात. रात्रीच्या वेळी लोक याच्या स्थानाकडे फिरकत नाहीत. याचे स्वरूप, अधिकार व कार्य पाहिले असता, खंडोबा व ब्रह्मभूत या देवांशी याचे साधर्म्य दिसते. केरळात हा वनदेव मानला जात असून, त्याचे प्रमुख स्थान सावरीमलै (शबरीमलै) वर आहे. मदुराई जिल्ह्यात दिंडिगल-पासून १८ मैलावर अय्यंपळ्ळैयम नामक गावी असलेले अय्यनारचे मंदिर प्रसिद्ध आहे. पाहा – शास्ता. [ ओ. इ. इं. ]


अय्यनार मूर्ती


अय्यनारचे मंदिर

**अय्यर कोटीश्वर** (इ. स. १८६९–१९३८) एक तमिळ कवी. कुंजर भारती या कवीचा हा नातू होय. रामनाड जिल्ह्यातील नंदनूर गावी याचा जन्म झाला. याचे पिता नागनाथ अय्यर हा शिवगंगै व रामनाड येथे दरबारगायक होता. कोटीश्वर अय्यर हाही संगीतकार व उत्तम गायक होता. मद्रास विद्यापीठाची पदवी मिळविल्यावर याने मद्रास हायकोर्टात नोकरी पत्करली व फावल्या वेळात तमिळ भाषेत कीर्तने रचण्यास सुरुवात केली. नोकरीतून निवृत्त झाल्यावर याने बाहात्तर मेलाराम कीर्तने रचली. दाक्षिणात्य संगीतात कोटीश्वर अय्यरांनी घातलेली ही मोलाची भर होय. तोडी रागावर याचे स्वतंत्र

मूलग्राही विवेचन आहे. त्यावरून याला तोडी कोटीश्वर असे म्हणू लागले. त्याने स्वत:ला कवी कुंजरदास अशी उपाधी घेतली



अय्यर कोटीश्वर

होती. त्यागराजावर याने लिहिलेले काव्य फार प्रसिद्ध आहे. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**अय्यर पगै** तमिळनाडमधला एक नायन्मार. हा धनाढ्य शिवभक्त होता. एके दिवशी शिवाने साधुवेषात येऊन याची पत्नीच मागितली. हा तिचे दान करायला निघाला, तेव्हा आप्तेष्टांनी विरोध केला. त्या सर्वांना ठार करून याने त्या साधूला पत्नीचे दान केले. त्यामुळे शिवाने संतुष्ट होऊन त्याची पत्नी त्याला परत दिली व मेलेल्यांना जिवंत केले, अशी आख्यायिका आहे. [ पे. पु. ]

**अय्यावाळ** (इ. स. चे १८ वे शतक) एक कवी. याचे मूळ नाव श्रीधर वेंकटेश्वर दीक्षित. हा तिरुविसैनल्लूर (तिरुवैयालूर) येथे राहणारा नियोगी तेलुगू ब्राह्मण होता. याने अनेक काव्ये व स्तोत्रे लिहिली आहेत. तमिळनाडमध्ये नामसंकीर्तन या नावाने भजनाचा जो प्रकार चालू आहे, तो यानेच सुरू केला. हा मोठा संगीतज्ञ होता. आजही कार्तिक मासात पौर्णिमेपर्यंत तिरुविसैनल्लूर या गावी त्याच्या स्मृतीसाठी संगीतोत्सव होत असतो. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**अरख** उ. भारतातील एक शेतकरी जात. विदर्भातही यांची वस्ती आहे. ही जात द्रविड वंशातली दिसते. परशुरामाला एकदा जळू चावली व त्यातून निघालेल्या रक्तातून आपली उत्पत्ती झाली, असे हे सांगतात. गोंड व पासी यांच्या संबंधांतून यांची उत्पत्ती झाली असावी, असे रसेल व हिरालाल यांचे मत आहे. चांदा जिल्ह्यातले अरख गोंडांचे अगदी जवळचे भाईबंद दिसतात. हे स्वत:ला हिंदू म्हणवीत असले, तरी त्यांचे धार्मिक व्यवहार वन्य धर्माप्रमाणेच चालतात. देवी व करतल नावाचा देव ही यांची दैवते आहेत. सामान्यत: हे हिंदूंचे सर्व सण पाळतात. यांच्यात गोत्रे आहेत. सगोत्रविवाह करीत नाहीत. कुलाचाराप्रमाणे १२ देवतांची पूजा करतात. समान संख्येची दैवते पूजणारे, परस्परात विवाहसंबंध करीत नाहीत. लग्ने मारुतीच्या देवळापुढे लावतात. मुलीचे देज घेतात. लग्नात पाच दोऱ्यांचे मंगळसूत्र वधूच्या गळयात बांधतात व कपाशीचे झाड लावतात. यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे.

हे मृताचे आशौच एक दिवसच पाळतात. यांना मद्य-मांस चालते. हे चांभाराला शिवत नाहीत. ब्राह्मण यांच्या घरी पौरोहित्य करीत नाहीत. [ म. ज्ञा. को.; ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**अरगजा** अंगाला लावायचे एक उटणे. तवकील पिवळ्या रंगाने रंगवून त्याला चमेली, उदाचे फूल, बेलिया, चंदन या अत्तरांचा वास दिला, की अरगजा तयार होतो. उंची अरगजात केशर, कस्तुरी हे पदार्थ वापरतात. याच्या मसाल्याचे मणी बनवून त्यांच्या माळा करतात. [ सु. वि. को. ]

**अरगू** मुंड आदिवासींतला वाग्दान-विधी. वरपक्षाकडील मंडळी वधूपक्षाकडे आल्यावर वधूला बाहेर आणतात. तिच्या मागे एक माणूस पेटलेली चूड आणि दुसरा माणूस दारूचे मडके व पाण्याचा लोटा घेऊन उभा राहतो. नंतर वधूला वरपित्याच्या किंवा त्याच्या प्रतिनिधीच्या हाती देण्यात येते. तो तिला उराशी कवटाळून आपल्या घरी तिला मायेने संभाळले जाईल, असे अभिवचन देतो. मग जमातीचा पंच 'मुलीला नीट निरखून पारखून घ्या', असे वरपित्याला सांगतो. त्या पेटलेल्या चुडीचा अर्थ हा, की 'जे काय आहे ते उघड आहे, आमच्याकडे लपवाछपवी नाही.' त्यानंतर वधूला जर तो संबंध पसंत असेल, तर ती लोटयातले पाणी द्रोणात भरून ते भावी सासऱ्याला देते. तो विचारतो, 'पाणी कसे आहे?' ती उत्तर देते, 'सोन्यासारखे.'

त्या वेळी जमलेले जे लोक ते पाणी पितात, ते त्या लग्नाचे साक्षीदार होतात.

मग वरपिता दारूच्या मडक्यातून द्रोणभर दारू वधूला प्यायला देतो. तो त्या द्रोणात आठ पैसे टाकतो, ते वधूला मिळतात. मग सर्वांचे जेवण होते. [ एन्सा. मुंडा. ]

**अरणी** यज्ञीय अग्नी मंथन करून निर्माण केला जातो. त्यासाठी अश्वत्थाच्या दोन फळचा घेतात. त्यांना अरणी म्हणतात. अरणीच्या मधोमध एक खाच पाडून तीत मंथा बसवितात. खालच्या अरणीला अधरारणी व वरचीला उत्तरारणी म्हणतात. अरणीला 'अग्नेर्योनिः' = अग्नीचे जन्मस्थान, असे म्हटले आहे. अरणीच्या साहाय्याने अग्निमंथन करण्याचा उल्लेख ऋग्वेदात आहे. विश्वामित्र म्हणतो, की ज्याप्रमाणे गर्भवती स्त्रियांच्या उदरात गर्भ ठेविला जावा त्याप्रमाणे हा सर्वज्ञ (अग्नी) या दोन मंथनफळयांच्या ठिकाणी स्थापित झाला आहे. मनुष्याने जागृत राहून व हवी समर्पून रोज त्याचा गौरव करावा, अशी या अग्नीची थोरवी आहे (ऋ. ३.२९.२).





अरणी

**अरण्य** 'अर्यंते मृगैः इति' = जिथे पशू संचार करतात ते अरण्य होय (हलायुध). अरण्य शब्दाचा अर्थ नेहमीच जंगल असा असतो, असे नाही. अरण्य हे वाडी, परसूं व शेतजमीन यांपासून विभक्त व मनुष्यापासून दूर असते, असे वैदिक वाङमयात सांगितले आहे. अरण्य व ग्राम यांतही भेद केलेला आहे. भिक्षू अथवा संन्यासी अरण्यात राहतात, असे छांदोग्यात म्हटले आहे(८.५.३). ऋग्वेदात अरण्याला लागणाऱ्या वणव्याचे वर्णन आहे (ऋ. १.६५.४; २.१४.२).

पुराणान्तरी नऊ अरण्ये प्रसिद्ध असून त्यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत – (१) दंडकारण्य (२) सैंधवारण्य (३) पुष्करारण्य (४) नैमिषारण्य (५) कुरु-जांगल (६) उत्पलावर्तकारण्य (७) जंबूमार्ग (८) हिमवदरण्य व (९) अर्बुदारण्य.

**अरण्यद्वादशी** एक तिथिव्रत. मार्गशीर्ष शुद्ध एकादशी किंवा कृत्यमयूखाच्या कर्त्याच्या मताप्रमाणे चैत्र किंवा श्रावण शुद्ध एकादशीला सकाळी स्नान करून या व्रताला प्रारंभ करतात.

याचा व्रतावधी एक वर्ष असतो. यात गोविंदपूजा हा प्रमुख विधी करायचा असतो.

द्वादशीस अरण्यात जाऊन पारणा करायची असते. पारणेस १२ ब्राह्मण, यती किंवा दंपती यांस भोजन घालतात. या व्रताला अपरा द्वादशी असे नाव आहे. [ हि. ध. ]

**अरण्यषष्ठी** एक तिथिव्रत आहे. ज्येष्ठ शु. षष्ठीला अरण्यषष्ठी असे नाव आहे. तिला स्कंदषष्ठी असेही म्हणतात. त्या दिवशी सुवासिनी हातात पंखा घेऊन वनात हिंडतात; कंदमुळे, फळे खाऊन उपास करतात; विंध्यवासिनीची व स्कंद यांची पूजा करतात. अपत्यप्राप्तीसाठी हे व्रत आहे. राजस्थानातल्या स्त्रिया हे व्रत करताना अरण्यात जाऊन अपत्यप्राप्तीसाठी विशिष्ट वनस्पती खातात. बंगालमधील स्त्रिया हे व्रत जावयासाठी करतात. [ हि. ध.५; इं. फो. लो. ]

**अरण्यानी** एक वैदिक देवता. सप्तसिंधूतल्या आर्यांच्या पशुधनाचे संवर्धन अरण्यांवर अवलंबून असे. म्हणून त्यांनी अरण्याला देवता मानले आहे. देवमुनी म्हणतो –

आञ्जनगन्धिं सुरभिं बह्वन्नामकृषीवलाम् ।
प्राहं मृगाणां मातरमरण्यानिमशंसिषम् ।।
(ऋ. १०.१४६.६)

अर्थ – रानातील सुगंधी लतांचे उटणे लावणारी ही अरण्यानी स्वतःही सुवासिक आहे. जमीन न नांगरता ही बहुत खाद्य-पदार्थ निर्माण करते. ही मृगादी पशूंची माता आहे. हिची प्रशस्ती मी गायिली आहे.

**अरत्नी** याचा मूळ अर्थ कोपर असा आहे. 'बाहुर्वा अरत्निः' (श. ब्रा. ६.३.१.३३). व्यवहारात हे लांबी मोजण्याचे एक परिमाण आहे. एक हात (कोपरापासून करंगळीच्या टोकापर्यंत) असा त्याचा अर्थ आहे (ऋ. ८.८०.८; अथर्व. १९.५७.६). [ वे. इं. ]

**अरनाथ** जैनांचा अठरावा तीर्थंकर. जन्मस्थान हस्तिनापूर. मातापिता मित्रसेना व सुदर्शन. जन्मनक्षत्र रोहिणी. लांछन नंद्यावर्त किंवा मत्स्य. ज्ञानवृक्ष आम्र. मोक्षस्थान पारसनाथ पर्वत. यक्ष–यक्षिणी यक्षेंद्र व धारणी. हा गर्भात असता याच्या आईने रत्नयुक्त अर (चाकाची आर) स्वप्नात पाहिला म्हणून अरनाथ असे याचे नाव ठेवले. हा चक्रवर्ती झाला. याच्या कुशाणकालीन दोन पाषाणमूर्ती सापडल्या आहेत. [ जै. इ. ]

**अरपचन** एक बोधिसत्त्व. मंजुश्रीचा रूपभेद. साधनमालेत याचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे –

खड्गपुस्तकधारिणं रक्तवस्त्रयुगयुतम्......
विश्वदलकमलस्थबद्धपर्यङ्किनम्......

अर्थ – खड्गपुस्तकधारी, दोन लाल वस्त्रे धारण करणारा... विश्वदलकमलावर पर्यंकासन घालून बसलेला...

याचा वर्ण रक्त–गौर असून पार्श्वभागी केशिनी, उपकेशिनी, चंद्रप्रभ व सूर्यप्रभ असतात. याला सद्योनुभव असे दुसरेही एक नाव आहे. याच्या मूर्ती बऱ्याच आढळतात. [ इं. बु. इ. ]

**अरब व भारत** अरबस्तानात राहणाऱ्या लोकांना अरब म्हणतात. अरब ही जात नसून, ती एक जमात आहे. बहुसंख्य अरब धर्माने मुसलमान आहेत. अरब हे स्थायिक व भटक्ये असे दोन्ही प्रकारचे आढळतात. स्थायिक अरब शेती व पशुपालन करून राहतात. भटक्ये अरब वाळवंटातून उंटाच्या पाठीवर माल लादून त्याची ने-आण करतात. भटक्या अरबांचे उंटांचे काफिले दिवसभर वाळवंटांतून प्रवास करून रात्री एखाद्या ओलाव्याच्या जागी तळ ठोकतात. अरबांचे अन्न मुख्यत्वे मका किंवा गहू यांची रोटी, खजूर व उंटाचे दूध, हे असते. अरब हे बुद्धीने हुशार, आतिथ्यशील, शूर व बऱ्याच अंशी कडवे असतात.

कुराण हा इस्लामी धर्मग्रंथ अरबी भाषेत लिहिलेला आहे. अरबी भाषा ही सेमेटिक भाषाकुलातली दक्षिणेकडील शाखा आहे. उत्तरेची व दक्षिणेची असे तिचे दोन मुख्य भेद आहेत. दक्षिणेकडील भाषेस हिमीअराइट असे नाव होते; पण ती आता नष्टप्राय आहे. उत्तरेची भाषा म्हणजे कुराणाची भाषा होय. ती सर्व अरबस्तानात बोलली व लिहिली जाते. उच्च दर्जाची अरबी भाषा येमेन प्रांतातील उच्च वर्गांमध्ये आढळते. मुहंमदानंतरच्या दोन शतकांपर्यंत या भाषेच्या व्याकरणाची फारशी वाढ झालेली नव्हती. मुसलमानांनी चालविलेल्या युद्धांमुळे व मिळविलेल्या विजयांमुळे या भाषेचा प्रसार पश्चिम आशिया, पूर्व व उत्तर आफ्रिका, तसेच स्पेन व भूमध्य समुद्रातील काही बेटे इथवर झाला. या सर्व प्रदेशात तिचे अवशेष आजही दृष्टीस पडतात. या भाषेतील प्राचीन वाङ्मयाची फारशी उपलब्धी नाही. पण या भाषेत प्राचीन काळापासून काव्यरचना होत असली पाहिजे, असे अनुमानिता येते. मुहंमदापूर्वीही अरब कवींनी त्यांच्यातल्या यादवीयुद्धांवर, वीरांच्या पराक्रमांवर व स्त्रियांच्या सौंदर्यावर काव्यरचना केलेली आढळते. अरबांच्या जत्रा होत, त्या वेळी त्यांच्यांतल्या शायरांच्या काव्यस्पर्धा होत व त्या वेळी कवींचा गौरवही होत असे. त्यांची काव्ये सुवर्णाक्षरांत लिहवून काबाच्या मंदिरात टांगण्यात येत. त्यांना मोदसहवात किंवा मोअल्लाकत अशी संज्ञा आहे. अशा काव्यांपैकी सात काव्ये उपलब्ध आहेत.

अरबी वाङ्मयाच्या उत्कर्षकालास मुहंमदापासून प्रारंभ होतो. अल् मनसूर याने अरबी वाङ्मयाला प्रथमच उत्तेजन दिले. हारून-अल्-रशीद (७८६–८०८ इ. स.) याच्या कारकीर्दीत अरबी भाषा, कला व वाङ्मय यांना वैभव प्राप्त झाले. याने सर्व देशांतून विद्वान लोकांस पाचारण करून त्यांना मोठमोठ्या देणग्या दिल्या व त्यांच्याकडून ग्रीक, सीरियॅक, संस्कृत, इ. भाषांतील ग्रंथांची भाषांतरे करवून त्यांचा प्रसार केला. अल् मामून (८१३–८३३ इ. स.) याने विद्या व कला यांना खूपच उत्तेजन दिले. इतकेच नव्हे; तर बगदाद, अलेक्झांड्रिया, इ. शहरांत त्याने ग्रंथालये स्थापिली. मध्ययुगात अरब लोक गणित, भूगोल, वैद्यक, काव्य, ज्योतिष, रसायन, इ. शास्त्रांत बरेच पुढारलेले होते. त्यांना पाश्चात्य देशांच्या ज्ञान-विज्ञानाचे आद्य गुरू मानतात.

अरबी लिपी ही उजवीकडून डावीकडे लिहिली जाते. त्यांच्या लिपींपैकी जुनी कुफी ही लिपी युफ्रातिस नदीवरील कुफा या शहरावरून नामाभिधान पावली असून, ती सीरियॅकवरून निघाली आहे. इ. स. च्या दहाव्या शतकात नस्तालिक ही नवी लिपी प्रचारात आली व तीच सध्या प्रचलित आहे.

अरब लोकांची अशी समजूत आहे, की हजरत आदम हा स्वर्गातून प्रथम खाली उतरला तो हिंदोस्तानात. तिथून तो अरबस्तानात गेला. म्हणून अरब लोक भारताला आपली पितृभूमी मानतात. ही इतिहासपूर्वकालातली कथा आहे. ऐतिहासिक कालावर नजर टाकली तर असे दिसते, की हजारो वर्षांपूर्वी अरब व्यापारी भारताच्या बंदरात येऊन विविध प्रकारचा माल यूरोपपर्यंत घेऊन जात. इराणच्या बादशहाने इ. स. च्या सहाव्या शतकात सिंधवर आपली सत्ता स्थापली होती. अरबस्तानात इस्लामचा उदय झाल्यानंतर प्रथम त्यांनी इराण जिंकला व नंतर भारताकडेही आपली दृष्टी वळविली. इ. स. च्या सातव्या शतकात ठाणे, भडोच, इ. पश्चिम किनाऱ्यावरील बंदरांना त्यांचा उपसर्ग पोचला. आठव्या शतकात मुहंमद-बिन-कासीमने सिंधवर स्वारी करून मुलतानपर्यंत आपली सत्ता स्थापन केली. गुजरात व मध्यभारत यांवर झालेली त्यांची आक्रमणे चालुक्य, प्रतीहार वगैरे राजांनी निकराचा प्रतिकार करून परतवून लाविली. त्या काळी सिंधमध्ये बौद्ध धर्माचे प्राबल्य होते आणि बौद्ध व ब्राह्मण यांचे वैर होते. त्यामुळे दाहर राजाच्या विरुद्ध असलेले अनेक बौद्ध लोक मुसलमानांना फितूर झाले व दाहरच्या पराजयाचे ते एक महत्त्वाचे कारण ठरले.

इ. स.च्या आठव्या शतकापासून पंधराव्या शतकापर्यंत अनेक अरबी व्यापारी भारतात येऊन गेले. त्यांतील काही जणांनी आपल्या प्रवासाची वर्णने लिहून ठेवली आहेत. त्यात भारताविषयी बरीच माहिती आढळते. विशेषतः अकराव्या शतकात अल्-बिरुनीने भारतात वास्तव्य करून जी माहिती आपल्या तारीख-अल्-हिंद या ग्रंथात लिहिली आहे, ती अभ्यसनीय आहे. सातव्या शतकापासून पंधराव्या शतकापर्यंत भारताचा परदेशाशी

चालणारा व्यापार अरबांच्याच हातांत होता. सिंधमध्ये देवल, गुजरातमध्ये खंबायत व महाराष्ट्रात सोपारा, दक्षिणेत कोलम्मल्ली, मलबार, इ. बंदरे त्या काळात चालू होती. अरबांची तिथे नेहमी ये-जा चालू असे. ते येताना खजूर व घोडे भारतात आणीत व लिंबू, नारळ, आंबा, इ. पदार्थ अरबस्तानात घेऊन जात.

आफ्रिकेला वळसा घालून वास्को-डि-गामा भारतात आला व तो नवा समुद्रमार्ग त्यानेच शोधून काढला, असा समज आहे. पण त्यापूर्वी अनेक शतके अरबांना तो मार्ग माहीत होता. इब्नमाजिद नावाच्या एका अरबी खलाशानेच वास्कोला तो मार्ग दाखविला व त्याला भारताच्या किनाऱ्यावर आणून सोडले, असे एका अरबी ग्रंथात लिहिले आहे.

खुरासान हा अफगाणिस्तानच्या सीमेवरचा इराणातला एक प्रदेश होय. (पूर्व इराण व आधुनिक अफगाणिस्तान याला समुच्चयाने खुरासान म्हणत.) त्या प्रदेशात इस्लामच्या पूर्वी बौद्ध धर्म प्रचलित होता. त्या देशातील बल्ख या शहरात नौबहार नावाचे बौद्ध मंदिर होते. बरमक हे तिथल्या पुजाऱ्याचे नाव होय. खलीफा उस्मानच्या काळात इस्लामी लोकांनी बल्ख जिंकले, तेव्हा बरमक याने इस्लाम धर्म स्वीकारला. पुढे याच्या वंशजांनी अब्बासी घराण्याच्या कारकिर्दीत मुख्यमंत्री म्हणून काम केले व त्या राज्यात भारतीय विद्यांचा प्रसार केला. त्यांनी भारतातून बऱ्याच शास्त्रीपंडितांना बगदादला नेले व त्यांच्या करवी अनेक संस्कृत ग्रंथांचे अरबीत भाषांतर करविले. अनेक इतिहासकारांनी आपल्या ग्रंथांत त्या वेळच्या भारताला गौरविले आहे. अरबांनी, आपण १ ते ९ अंक हिंदू लोकांकडूनच मिळविले, असे स्पष्ट कबूल केले आहे. अरबी भाषेत या अंकांना हिंदसा असे म्हणतात. गणिताप्रमाणेच ज्योतिष, संगीत, रसायन, वैद्यक, तर्कशास्त्र, अलंकारशास्त्र, युद्धविद्या, इ. अनेक विषयांचे ज्ञान अरबांनी भारतीय पंडितांकडूनच मिळविले व ते पुढे युरोपीय लोकांना दिले.

बुद्धिबळे व सोंगट्या हे खेळही अरबांनी भारतीयांकडूनच घेतले. याकूबी नावाच्या अरबी लेखकाने त्याविषयी बरेच लिहिले असून, असे प्रतिपादिले आहे, की 'हे खेळ भारतीय दर्शनाच्या दोन विचारधारांचे सूचक आहेत. सोंगट्या म्हणजे दैववाद व बुद्धिबळे म्हणजे प्रयत्नवाद होय.'

उत्तर भारतात इस्लामचा प्रवेश होण्यापूर्वी दक्षिण भारतात अरब मुसलमानांचा प्रवेश झाला होता; पण तो राजनैतिक नसून, व्यापारी स्वरूपाचा होता. मलबारशी अरबांचे संबंध आठव्या शतकापासूनचे आहेत. अरब व्यापारी तिथे वखारी घालून स्थायिक झाले होते. मापिळ्ळा (मोपला) ही मलबारमधली मुसलमान जमात अरबांपासूनच निर्माण झालेली आहे. कारोमंडल किनाऱ्यावरही अरब लोकांचा व्यापार चालू होता. या अरबांचे तिथल्या हिंदू राजांशी चांगले संबंध होते. इ. स.च्या नवव्या शतकात गुजरातमधील राजांशीही त्यांचे व्यापारी संबंध होते. त्या काळात कच्छ-काठेवाडमध्ये अरब व्यापाऱ्यांची संख्या बरीच होती. भारतात अरबांचे राज्य सिंधपुरतेच मर्यादित राहिले. मुसलमानांनी भारतात राज्ये स्थापन केली; पण ते अरब नसून, तुर्क व इतर वंशाचे होते. [ अ. भा. सं.; सु. वि. को.]

**अरयडिगळ** तमिळनाडमधला एक नायन्मार. हा कवी असून, कांचीच्या पल्लव राजकुलात जन्मला होता. याने राजकाजातून निवृत्त झाल्यावर शैव क्षेत्रांच्या यात्रा केल्या व प्रत्येक क्षेत्रांत एकेक काव्य रचले. [ पे. पु. ]

**अरवन** द. भारतातील एक ग्रामदेव. हा द्रौपदी नामक ग्रामदेवतेच्या अनुषंगाने असतो. हा नागकन्येपासून अर्जुनाला झालेला पुत्र होय, असे मानतात. भारतीय युद्धात विजय मिळविण्यासाठी पांडवांनी याला बलिदान केले, अशी कथा दक्षिणेत प्रचलित आहे. [ सा. इं. इ. गॉ. गॉ. ]

**अरवली** एक पर्वत. संस्कृत नाव पारियात्र. मूळचे देशी नाव आडावला. टॉलेमीने उल्लेखिलेला अपो कोपी माँट पर्वत हाच असावा. याची उंची ४ ते ५ हजार फूट असून, हा अबूपासून दिल्लीपर्यंत पसरलेला आहे. याच्या उत्तरेस सप्तसिंधूंचा प्रदेश व पश्चिमेस थर-पारकरचे रण आहे. सिंधपंजाबच्या मैदानातून भारतावर झालेली आक्रमणे काही कालपर्यंत यानेच थोपवून धरली. या संघर्षांची प्रतीके त्याच्या अंगाखांद्यावर गडांच्या रूपाने आजही विद्यमान आहेत. हा डोंगर राजस्थानाचे दोन भाग बनवितो. पूर्व राजस्थान व मारवाड हे दोन्ही प्रदेश अरवलीने निर्माण केले आहेत. पण त्यांची प्रकृती अगदी भिन्न आहे. पाहा – राजस्थान. [ सह्याद्रि; म. ज्ञा. को.]

**अरविंद घोष** ( इ. स. १८७२–१९५० ) या महापुरुषाचा जन्म पश्चिम बंगालमधील एका कायस्थ घराण्यात झाला. यांच्या वडिलांचे नाव कृष्णधन असे होते. हे एम. डी. असून, सिव्हिल सर्जनच्या हुद्यावर काम करीत होते. अरविंदांचे प्राथमिक शिक्षण दार्जिलिंग येथे झाले. वयाच्या सातव्या वर्षी त्यांना त्यांच्या दोन ज्येष्ठ बंधूंसह शिक्षणासाठी इंग्लंडात पाठविण्यात आले. तिथे मँचेस्टर येथील ड्रेवेट दंपतीच्या देखरेखीखाली ही मुले राहत. अरविंदांनी पाच वर्षांत माध्यमिक शिक्षण पुरे करून केंब्रिज येथील किंग्ज कॉलेजात प्रवेश मिळ

विला. तिथे त्यांनी अनेक भाषांचा अभ्यास करून त्यांवर प्रभुत्व मिळविले. असामान्य बुद्धीचा विद्यार्थी असा त्यांचा तिथे लौकिक झाला. याच वयात आपल्या देशाबद्दल त्यांच्या मनात भक्तिभाव निर्माण झाला.

इ. स. १८९० मध्ये त्यांनी आय. सी. एस.ची परीक्षा दिली. पण घोड्यावर बसण्याच्या परीक्षेच्या वेळी ते गैरहजर राहिल्याने त्यांना अनुत्तीर्ण ठरविण्यात आले. विलायतेतून मायदेशी आल्यावर अरविंदांनी बडोद्याच्या दरबारात नोकरी पत्करली. प्रारंभी ते जमावंदी व दिवाणी खात्यात होते. पण प्रशासकी कामाची आवड नसल्यामुळे त्या नोकरीत त्याचे मन रमेना; म्हणून त्यांना मग बडोदा कॉलेजात इंग्रजीचे प्राध्यापक व पुढे कुलगुरू नेमण्यात आले. तिथे असतानाच त्यांचे धर्म व संस्कृती यांकडे लक्ष वेधले. अंतरात राष्ट्रीय वृत्ती जागृत झाली. इ. स. १९०१ साली राजबहाद्दूर भूपाल बोस यांची कन्या मृणालिनीदेवी हिच्याशी त्यांचा विवाह झाला. बडोद्याला असतानाच त्यांना योगमार्गाची गोडी लागली. ब्रह्मानंद नावाच्या एका योग्याच्या शिष्याकडून ते प्राणायाम शिकले. श्री. विष्णू भास्कर लेले या गृहस्थाकडून त्यांनी समाधीची विद्या मिळविली. लेले यांनीच त्यांना ईश्वरी आदेशावर अवलंबून राहण्यास सांगितले.

पुढे हळूहळू त्यांना राष्ट्राच्या उद्धारासाठी चाललेल्या चळवळीत आपण प्रत्यक्ष सहभागी झाले पाहिजे, असे वाटू लागले. याच काळात वंगभंगाची चळवळ सुरू झाली. त्या चळवळीने उभ्या भारतात उग्र रूप धारण केले. अशा वेळी अरविंदांना केवळ पोटार्थी नोकरी करीत स्वस्थ बसवेना. इ. स. १९०६ साली बडोद्याची नोकरी सोडून ते कलकत्त्यास आले आणि तिथे राष्ट्रीय शिक्षणासाठी नवीनच निघालेल्या नॅशनल कॉलेजचे ते प्राचार्य झाले. पण त्या शिक्षण मंडळाच्या कार्यकारिणीत नेमस्तांचेच मताधिक्य असल्यामुळे अरविंदांचे त्यांच्याशी पटले नाही. त्यामुळे त्यांनी ते प्राचार्यपद सोडले. नंतर ते श्री. बिपिनचन्द्र पाल यांच्या 'वन्दे मातरम्' पत्राच्या संपादकवर्गात दाखल झाले. थोड्याच काळात त्या पत्राची सर्व जबाबदारी अरविंदांना स्वीकारावी लागली. हळूहळू या पत्राची प्रतिष्ठा वाढत गेली आणि अरविंदांची राष्ट्राच्या प्रमुख नेत्यांत गणना होऊ लागली. या पत्रातील काही प्रक्षोभक लेखांबद्दल ब्रिटिश सरकारने त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला भरला. पण त्यांतून ते निर्दोषी सुटले. पुढे सुरतेच्या सुप्रसिद्ध काँग्रेस अधिवेशनाला उपस्थित राहून त्यांनी लोकमान्य टिळकांच्या खांद्याला खांदा लावून नेमस्तांशी लढा दिला. त्यानंतर थोड्याच काळात अरविंद भारतात लोकप्रियतेच्या शिखरावर चढले.

याच वेळी बंगालमधल्या क्रांतिकारकांनी लेफ्टनंट गव्हर्नरची गाडी उलथून टाकण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. मुझफरपूरचे सेशन जज्ज किंग्ज फोर्ड यांची गाडी समजून त्यांनी दुसऱ्याच एका गाडीवर बाँब फेकले. या कृत्यांत अरविंदांचे बंधू बारीन्द्र यांचा हात होता. पण अरविंद हेच या कटाचे सूत्रधार असावे, असा संशय घेऊन सरकारने त्यांना अलिपूरच्या तुरुंगात डांबले. त्याही खटल्यात अरविंद पुनश्च निर्दोषी सुटले.

पण तुरुंगाबाहेर येताच त्यांना आपल्या राष्ट्रीय पक्षाची वाताहत झालेली दिसली. सरकारच्या दडपशाहीमुळे त्यांच्या अनुयायांची पांगापांग झाली होती. 'वन्दे मातरम्' छापखानादेखील जप्त झाला होता. पण तरीही धीर न सोडता 'कर्मयोगी' हे इंग्रजी दैनिक व 'धर्म' हे बंगाली साप्ताहिक सुरू करून ते सरकारशी लढत राहिले. त्यांनी स्वदेशी व बहिष्कार या लोकमान्य टिळकांच्या चळवळीला भरपूर पाठिंबा दिला. पण जितक्या आकस्मिक रीतीने ते राजकारणाच्या क्षेत्रात उतरले, तितक्याच आकस्मिकपणे ते त्यातून निवृत्तही झाले.

त्याच वेळी अरविंदांना हद्दपार करण्याचा किंवा निदान कायमचे स्थानबद्ध करण्याचा सरकारचा विचार असल्याच्या अफवाही पसरल्या. अशा वेळी स्वतःचे राजकारण सफल झाले नाही, जनतेतही म्हणावी तशी जागृती नाही आणि सुबुद्ध म्हणविणाऱ्यांच्या दहशतवादालाही नैतिक अधिष्ठान नाही, हे त्यांना समजून चुकले. आध्यात्मिक अधिष्ठान लाभल्यावाचून आपले कार्य यशस्वी होणार नाही, अशी त्यांची धारणा झाली. त्यामुळे उत्तरपारा येथील आपल्या भाषणात त्यांनी जनतेला अखेरचा संदेश दिला तो असा–

'आमची चळवळ केवळ राजकीय नाही, तर ती धार्मिकही आहे, सनातन धर्माचे पुनरुत्थान या व्यापक अर्थाने ती चालवायला हवी. देशभक्तीचा आमचा ध्येयवाद प्रेम व बंधुभाव यांच्यावर अधारलेला आहे आणि केवळ राष्ट्रीयच नव्हे; तर अखिल मानवजातीचे अंतिम ऐक्य हे त्याचे उद्दिष्ट आहे.'

इ. स. १९१० साली ते कलकत्त्याहून पाँडेचरीस आले आणि तिथेच शेवटपर्यंत राहिले. पाँडेचरी हे ठिकाण त्या वेळी फ्रेंचांच्या ताब्यांत असल्यामुळे ब्रिटिश सरकारचा उपसर्ग न होता त्यांना तिथे निर्वेध अध्यात्मसाधना करता आली. पाँडेचरीस गेल्यानंतर पहिली चार वर्षे त्यांनी योगसाधनेत घालविली. पूर्वी स्वतःला आलेल्या अनुभवात निरनिराळ्या योगमार्गांच्या अभ्यासाची भर घालून त्यांनी योगानुभवाच्या सर्व कल्पना पारखून घेतल्या. इ. स. १९१४ साली तत्त्वज्ञान व धर्म यांना वाहिलेले 'आर्य' नावाचे एक इंग्रजी मासिक त्यांनी सुरू केले. याच वेळी एक फ्रेंच पंडित पॉल रिचर्ड हे आपल्या पत्नीसह भारतात आले. ते गुरूच्या शोधात होते. अरविंदांची कीर्ती ऐकून ते त्यांना जाऊन भेटले व

पुढे तिथेच राहिले. अरविंद व पॉल दंपती या तिघांनी मिळून 'आर्य' मासिक सात वर्षे चालविले. या मासिकात लिहिलेल्या लेखांतूनच दैवी जीवन ( Life Divine ) हा अरविंदांचा जग-प्रसिद्ध ग्रंथ निर्माण झाला. इ. स. १९१४ साली लोकमान्य टिळक मंडालेहून परत आल्यानंतर त्यांनी अरविंदांना राजकारणासाठी परत बोलाविले. पण अरविंदांनी त्यांना उत्तर दिले ते असे—'ईश्वर प्रत्येकाला एकदाच कार्याची संधी देतो, त्या वेळी आपण आपले कर्तव्य पार पाडावे. तो काळ गेला की दुसऱ्यासाठी जागा खाली करावी.'

१९१९ साली मृणालिनीदेवींचा आपल्या माहेरी मृत्यू झाला. हळूहळू अरविंदांची साधना वृद्धिंगत होऊ लागली. त्यांच्या भोवती अनेक साधक गोळा झाले, त्यांतूनच १९२० च्या सुमारास पाँडेचरीची योगाश्रम ही संस्था उभी राहिली. काही कालानंतर पॉल रिचर्ड हे पाँडेचरीहून निघून गेले, तरी त्यांच्या पत्नी श्रीमती मिरा रिचर्ड या मात्र तिथेच राहिल्या. त्यांनी तिथे अध्यात्मात खूपच प्रगती केली. सर्व साधक त्यांना 'माताजी' म्हणून आदराने संबोधू लागले. अरविंदाश्रमात योगाश्रमाची शिस्त त्यांनीच बसविली. अध्यात्मतत्त्वाचा जीवनात प्रवेश घडविणे हे या संस्थेचे उद्दिष्ट आहे. अरविंदांच्या निर्याणानंतर माताजींचे निर्याण होईपर्यंत योगाश्रमाची सर्व सूत्रे त्याच चालवीत.

इ. स. १९२० सालानंतर अरविंद हळूहळू पूर्ण एकांतवासात गेले. आश्रमातील साधकांनाही त्यांचे दर्शन दुर्लभ झाले. २४ नोव्हेंबर १९२६ रोजी त्यांना सिद्धिलाभ झाला. तेव्हापासून, १५ ऑगस्ट हा त्यांचा जन्मदिन, २२ फेब्रुवारी हा माताजींचा जन्मदिन व २४ नोव्हेंबर हा सिद्धिलाभ-दिन या तीनच दिवशी आश्रमातल्या व बाहेरच्या मंडळीस त्यांचे दर्शन मिळे. सिद्धिलाभ झाल्यानंतरही अरविंद आश्रमाबाहेर आले नाहीत. ३ डिसेंबर १९५० रोजी त्यांनी इहलोकींची जीवनयात्रा समाप्त केली.

अरविंदांचे इंग्रजी भाषेवर विलक्षण प्रभुत्व होते. त्यांची कल्पनाशक्ती अफाट होती. आणि विचारसरणी अगदी नवी व स्वतंत्र होती. त्यांनी प्रचंड लेखन केले असून, ते सहज समजेल इतके सोपे नाही. अरविंदांचे प्रमुख ग्रंथ पुढीलप्रमाणे आहेत—

[ 1 ] The Life Divine [ 2 ] Lights on Yoga [ 3 ] The Riddle of This World [ 4 ] Yogic Sadhana [ 5 ] Ahana ( कवितासंग्रह ) [ 6 ] Love and Death (कविता) [ 7 ] The Objects of Love [ 8 ] The Ideal of The Karmayogin [ 9 ] Brain of India [ 10 ] Renaissance in India [ 11 ] Self Determination[12] Superman[13] Ishopanishad [ 14 ] Essays on the Gita [ 15 ] The Mother.

**अरविंदाश्रम** – ही एक आदर्श आणि स्वयंपूर्ण अशी संस्था आहे. कामाच्या सोयीसाठी आश्रमाचे अनेक विभाग केलेले असून, त्या त्या विभागात काम करणारे साधक आपापले काम सेवाभावाने करीत असतात. इथे कोणी कोणावर देखरेख करीत नाही. इथे प्रत्येक कार्यकर्ता स्वत:च स्वत:चा निरीक्षक असतो. त्यामुळे आश्रमाच्या सर्व खात्यांतल्या कामात सुसंवाद असतो. प्रत्येक साधकाला जरूर तिथे आपल्या कामात सुधारणा करण्याचे, नवे प्रयोग करून नवे ज्ञान मिळविण्याचे स्वातंत्र्य इथे दिले गेले आहे.

साधकांना राहण्यासाठी इथे शंभराच्या वर घरे आहेत. ती दाटीवाटीने न बांधता अंतर ठेवून बांधलेली आहेत. प्रत्येक साधकाची खोली साधी पण स्वच्छ असते. गरजेपुरत्या पण मोजक्याच वस्तू तिथे असतात. अधिक-उण्या वस्तूंची आवश्यकता उत्पन्न झाल्यास त्या वस्तू आश्रमाकडून पुरविल्या जातात. साधकांत पुरुषांप्रमाणे स्त्रियाही असतात. त्यांच्या आरोग्याचा विचार विशेषत: योगदृष्टीनेच केला जातो. रोगनिवारण निसर्गोपचारांनीच व्हावे, असा कटाक्ष असतो. निरुपाय तिथे ॲलोपथी, होमिओपथी किंवा आयुर्वेद यांचा आश्रय केला जातो.

आश्रमाचे भोजनगृह विस्तृत असून, तिथे एका वेळी हजार माणसांचा स्वयंपाक व भोजन या गोष्टी होऊ शकतात. जेवण शाकाहारी, सात्त्विक व सकस असते. त्यात भात, भाजी, पाव, केळी, लिंबू व दूध यांचा समावेश असतो.

आश्रमासाठी लागणाऱ्या भाज्या व फळे तिथल्या बागेतून निघतात. या बागेत नाना प्रकारची सुवासिक फुले सदैव फुललेली असतात. पूजा व प्रसाद यांच्यासाठी लागणारी फुले पहाटे तोडली जातात. आश्रमाचे दोन कारखानेही आहेत. तिथला कामगारवर्ग आपापल्या कामात वाकबगार असतो. आश्रमाच्या अंतर्बाह्य दुरुस्तीची सर्व कामे तिथे होतात. फुकट जाणारे कागद, चिंध्या, इ. प्रत्येक वस्तूचा तिथे काहीं ना काही सदुपयोग केला जातो. आश्रमातल्या स्त्री साधिका तिथले विणकामखाते चालवितात. ग्रामोद्योगाचीही एक शाखा तिथे चालते. [ प्रा. मधुसूदन फडके – नवभारत, डिसेंबर १९५८ ]

## अरविंद-दर्शन

महायोगी अरविंद ही एक अलौकिक विभूती होती. ते भूतलावरील एक दिव्य जीव होते. त्यांनी ऋग्वेद, उपनिषदे, गीता आणि अध्यात्मविद्येचे सर्व संप्रदाय स्वतंत्र दृष्टीने तपासून त्यांतला गूढ अर्थ आपल्या अभिनव आणि समृद्ध अशा शैलीने मांडला आहे. दृश्य सृष्टी, अदृश्य आध्यात्मिक विश्व आणि दैवी – मानवी ध्येयवाद

सर्वांचा परामर्श घेणारे अध्यात्मवादी तत्त्वज्ञान त्यांनी नव्या स्वरूपात रचले आहे. अरविंदांचे प्रतिपादन परिचित व अपरिचित अशा आध्यात्मिक कल्पनांच्या विस्ताराने तज्ज्ञ वाचकालाही भांबावून सोडणारे आहे. त्यातले विचारांचे टप्पे नीट ओळखणे कठीण जाते. विज्ञान आणि तत्त्वज्ञान यांच्यांतील पाश्चात्य व पौर्वात्य पारिभाषिक शब्दांची यात भरपूर पेरणी आढळते. त्यांच्या अनुरोधाने त्यांनी मांडलेल्या सिद्धान्तांचा मागोवा घेण्याचा प्रयत्न करताना पुष्कळदा पंचाईत पडते. त्यांच्या विचारसृष्टीतील उत्तरोत्तर थरांचे आकलन करणे बुद्धीला अशक्य होते. त्यांच्या विचारात तार्किक संगती आहे; पण उपपत्ती अल्प आहे. आधुनिक विज्ञानाच्या सिद्धान्तांतून आणि प्रश्नांतून सूचित होणारे अध्यात्मवादी अभिप्राय त्यांनी अधिकारवाणीने सांगितले आहेत. हे विज्ञानाचे सूचितार्थ आध्यात्मिक विशाल संवेदनांना आधार देणारे आहेत.

अरविंदांच्या तत्त्वज्ञानाचे सार दोन शब्दांत सांगावयाचे तर ते 'पूर्ण योग' या शब्दांनी सांगता येईल. मानवी जीवात्म्याची दिव्य परमात्म्यामध्ये परिणती होणे, तसेच प्राकृत जीवनाची दिव्य जीवनात परिणती होणे, हे अरविंदांच्या पूर्ण योगाचे उद्दिष्ट आहे. या पूर्ण योगाला चार साधनांची आवश्यकता आहे. पहिले साधन म्हणजे धर्मशास्त्राचे ज्ञान, दुसरे उत्साह किंवा प्रयत्न, तिसरे गुरूचे प्रत्यक्ष उदाहरण किंवा गुरुप्रभाव व चौथे काल. या विश्वात सर्व वस्तू चक्रनेमिक्रमाने नियमित असून त्याप्रमाणे दिव्य शक्तीच्या संचारालाही अनुकूल काल यावा लागतो. म्हणून त्यांनी कालाला चौथे साधन मानले आहे. पूर्ण योगाच्या साधकाला एका किंवा अनेक शास्त्रांचा उपयोग करता येईल; पण ती शास्त्रे त्याला बंधक होणार नाहीत. साधकाला आपल्या जीवनात शास्त्र नव्हे; तर सत्य आचरून दाखवायचे असते. शास्त्रप्रामाण्य किंवा शब्दब्रह्म यांच्या पलिकडे त्याला जायचे असते. अशा साधनेच्या कामी शास्त्र हे त्याला केवळ मार्गदर्शक एवढ्याच स्वरूपात उरते.

पूर्ण योगाच्या साधनेला अत्यावश्यक कोणती अट असेल; तर ती साधकाने पूर्णपणे स्वतंत्र असणे ही होय. त्याला अनिर्बंध अनुभव घेता आला पाहिजे. प्रत्येक माणसात भौतिक प्रकृतीच्या अतीत होण्याची एक आकांक्षा असते. तदनुसार प्रत्येक माणसाला जेव्हा आपापल्या योगमार्गाने स्वतःचा विकास करून घेता येईल; तेव्हाच त्याला पूर्ण योगाची सिद्धी लाभेल. कारण स्वातंत्र्य हाच खरा नियम, तीच खरी परिपूर्ती व तीच कृतार्थता होय.

मानवातील अहंकाराचे रूपच बदलून टाकणे हे पूर्ण योगाचे उद्दिष्ट आहे. योगाचा प्रारंभ आणि सिद्धी म्हणजे हे अहंकारविसर्जनच होय.

पूर्ण योग साध्य करण्याच्या कामी दोन शक्तींचे सयुक्त साहाय्य लागते. एक म्हणजे स्वतःची उन्नती करून घेण्याविषयीची दुर्दम्य व स्थिर प्रेरणा. ही प्रेरणा नेहमी खालून वर जाण्याची इच्छा करीत असते व वरच्या शक्तीला जणू मदतीसाठी हाक मारीत असते. दुसरी शक्ती म्हणजे परमेश्वराची वरदायिनी कृपा. ही उच्च स्थानावरून पहिल्या शक्तीच्या हाकेला ओ देत असते. या दैवी शक्तीला अरविंदांनी जननी म्हटले आहे. तिने योगमायेचे आवरण घेतले असल्याने तिचा आपणास प्रत्यय येत नाही. परमेष्टी, समष्टी व व्यष्टी अशा तीन अवस्थांत तिचे स्फुरण होते. पहिल्या अवस्थेत सृष्टीचा परम तत्त्वाशी प्रथम संबंध घडतो. दुसरीत सृष्टीची बैठक तयार होते व तिसरीत व्यक्तिमात्रापर्यंत तिचा आविष्कार येऊन पोचतो.

पूर्ण योगाच्या साधनेत क्रमबद्ध पण अविभक्त असे तीन टप्पे असतात. पहिला स्वतःच्या अतीत होण्याचा प्रयत्न करणे. याचाच अर्थ अहंकाराचा निरास करणे. त्यायोगे दिव्य शक्तीशी संबंध प्रस्थापित व्हायला सुरुवात होते. दुसरा टप्पा म्हणजे ज्या दिव्य शक्तींशी आपला संबंध जडला, तिला स्वतःमध्ये आत्मसात करणे आणि तिसरा टप्पा म्हणजे वरील प्रकारे आपल्या मानवतेची जी उच्च परिणती झाली आहे, तिचा जगातील एका दिव्य शक्तीचे प्रेरक केंद्र म्हणून जगासाठी उपयोग करू देणे हा होय. कारण पूर्ण योग म्हणजे केवळ वैयक्तिक मोक्ष नसून त्याच्या पलिकडची ती अवस्था आहे.

अहंकाराचे विसर्जन हे पहिले साधन. या साधनामुळे साधक दिव्यशक्तीशी सायुज्य संपादन करतो. जसजसा हा संबंध वाढत जातो, तसतशी साधकाला जाणीव होऊ लागते, की आपण स्वतः काही करीत नसून ती दिव्य शक्तीच आपल्या द्वारे सर्व काही करीत आहे. मग या परमशक्तीला शरण जाण्याचा ध्यास साधकाला अधिकाधिक लागतो. आणि शेवटी तो आपली साधनाही त्या दिव्य शक्तीच्याच हवाली करतो. म्हणूनच पूर्ण योगाच्या साधकाला अशी प्रतीती येते, की ज्या सिद्धी आपल्याला प्राप्त होत आहेत, त्या स्वतःच्या शक्तीमुळे नव्हेत; तर त्या परमशक्तीमुळे! साधक हा त्या दिव्य शक्तीचे एक उपकरण असतो. पण आपण त्या शक्तीचे साधन आहो; हाही त्याचा अभिमान गळून गेला पाहिजे.

पूर्ण योग म्हणजे आध्यात्मिक विकास होय. आध्यात्मिक जीवनाला उत्क्रांतीची किंवा क्रमविकासाची कल्पना लावून दाखविणे हे अरविंदांच्या तत्त्वज्ञानाचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. ते म्हणतात – आपणांला दिव्य शक्तीचे ज्ञान होते आणि दिव्य शक्तीशी सायुज्यही प्राप्त होते. कारण मुळात अप्रकटपणे आपणच ती दिव्य शक्ती असतो. सर्व उपदेश म्हणजे प्रकटी-

करण म्हणजे अनावरण होय. दिव्य शक्तीशी सायुज्य संपादणे किंवा स्वतः दिव्यशक्तिरूप होणे म्हणजे आपली आवरणे गळून पडणे आणि त्यायोगे आपले मूळ रूप प्रकट होणे हे होय.

शरीरधारी मानवाला जी पूर्णता प्राप्त करून घेणे शक्य आहे, तिची प्राप्ती म्हणजे मानवामधील परमात्म्याच्या नित्य पूर्णत्वाचाच अनुभव होय. ही आध्यात्मिक उत्क्रांती अनंत काळपर्यंत होत राहणार, म्हणून साधकाने उतावीळ न होता कालाविषयी असीम सहिष्णुता बाळगली पाहिजे व आपल्या उत्साहशील प्रयत्नात खंड पडू देता कामा नये. त्याला त्या दिव्य शक्तीच्या साक्षात्काराविषयी आत्मविश्वास असला पाहिजे. या दिव्य शक्तीची चार स्वरूपे असून त्यांची नावे महासरस्वती, महेश्वरी, महाकाली आणि महालक्ष्मी अशी आहेत.

पूर्ण योग ही अशी एक प्रक्रिया आहे, की तिच्या योगाने व्यक्तीला तर पूर्णता येतेच; शिवाय त्याचबरोबर विश्वाचाही विकास होतो. व्यक्तीच्या आध्यात्मिक उत्क्रांतीने जगाचाही लाभ होतो. या व्यक्तीमुळे दिव्यत्वाकडे नेणारे एक केंद्र जगात प्रस्थापित होते. याच्या उलट जगाची आध्यात्मिक उन्नती ही व्यक्तीलाही पोषकच होते.

व्यक्तीचा हा आध्यात्मिक विकास घडवून आणताना ती दिव्य शक्ती अनेक पद्धतींचा अवलंब करते. तिचा व्यापार म्हणजे परमेश्वरी लीलाच आहे. ही लीला अशी काही और आहे की ती प्रमादांचा उपयोग सत्यसंशोधनाकडे, दुःखाचा उपयोग आनंदप्राप्तीकडे आणि अपूर्णतेचा उपयोग पूर्णतेच्या सिद्धीकडे करून घेते; पण आपले अहंकारी मन स्वतःच्या आवडीनिवडी त्या दिव्य शक्तीच्या व्यापारावर लादीत असते. आपल्या अहंकारी मनाची अशी वासना असते, की असे काहीतरी अद्भुत घडावे, की त्यामुळे आपली त्या दिव्य शक्तीवर श्रद्धा बसेल. आपल्या अहंकाराच्या या आंधळेपणामुळे आणि अधीरपणामुळे आपल्या पदरी नाना प्रकारचे अनर्थ मात्र येतात. त्यामुळे दिव्य शक्तीचे साहाय्य बाजूला राहून आपण अनर्थकारक विपरीत शक्तीचे मात्र धनी होतो.

पूर्ण योगाच्या साधकाने हे लक्षात ठेवले पाहिजे, की दिव्य शक्तीचा आविष्कार हे नेहमीच आवरणाखाली दडलेले असे 'गुह्य' आहे. आपण कोणीकडे नेले जात आहो, हे आपल्याला कळत नाही. अहंकाराच्या प्रभावामुळे माणसाला आपल्यातले जे 'गूढ' ते पाहणे सुलभ होत नाही. म्हणूनच बहुतेक साधकांना आपल्या विकासासाठी एखाद्या बाह्य आधाराची, एखाद्या श्रद्धेय वस्तूची आवश्यकता असते.

पूर्ण योगाच्या बाबतीत श्रेष्ठ आप्तवाक्य किंवा शास्त्रप्रामाण्य कोणते असेल, तर तो प्राणिमात्राच्या हृदयात गूढ असलेला सनातन वेद हाच होय. पूर्ण योगाचा श्रेष्ठ सद्गुरू म्हणजे हृदयस्थ अंतर्यामी. तोच आपले तिमिर दूर करतो आणि वाढत्या प्रमाणात स्वतःचे स्वरूप आपणातच प्रकट करतो. या अंतर्यामी जगद्गुरूला पाहणे, जाणणे, त्याच्याशी तद्रूप होणे आणि आपल्या अंतर्बाह्य स्वरूपात त्याला भरून घेऊन आपल्या जीवनाची परिपूर्ती करणे, हेच आपल्या ऐहिक जीवनाचे उद्दिष्ट आणि हेच पूर्ण योगाचे संपूर्ण लक्षण किंवा वैशिष्टच होय.

पूर्ण योगाची पहिली आणि शेवटची अट अहंकाराचे विसर्जन ही आहे. अहंकाराच्या त्यागाने साधकाला अशी एक शांती प्राप्त होते, की तिच्या योगाने त्याचे जीवन आमूलाग्र बदलून जाते. अंतःस्थ दिव्य शक्तीशी प्राप्त झालेल्या एकरूपतेचे आणि अंतर्गत उपशमाचे ही शांती हे बाह्य प्रतीक होय.

या अंतिम अवस्थेत मनुष्याला संपूर्ण दिव्य जीवन लाभते. पुरुषोत्तमाच्या पराप्रकृतीशी साधक एकरूप होतो. त्याला अपूर्व दिव्य जन्म लाभून त्याच्या दिव्य कर्माला प्रारंभ होतो. ज्ञान, भक्ती व कर्म यांचा महासमन्वय घडवून आणणारा हा पूर्ण योग आहे. हे ज्ञान, ही भक्ती व हे कर्म म्हणजे शुद्ध अशा मोक्षस्थितीचा महान आविष्कार असतो. हृदयस्थ परमेश्वराचा विशुद्ध संकेत त्या स्थितीत प्रकट होतो. ही स्थिती म्हणजे निवृत्तिपर संन्यासयोग नव्हे. संन्यासमय मोक्ष ही ज्ञानाची अलिकडची अवस्था आहे; ती पूर्ण स्थिती नव्हे. विश्वव्यापी ज्ञान, भक्ती आणि कर्म हे मोक्ष स्थितीचेच म्हणजे पुरुषोत्तम अवस्थेचेच अविभाज्य अंश आहेत.

मृत्तिकेतून मनापर्यंत मानवी जीवनाचा विकास झाला आहे. आता एका नव्या कक्षेत म्हणजे कलियुगातून सत्ययुगात, मनातून अतिमनात प्रवेश करण्याचा समय जवळ आला आहे. मन व अतिमन यांचा सांधा जिथे जुळतो तिथेच उत्क्रांति-अपक्रांतीच्या सरणीतील ऊर्ध्वगोल व अधोगोल यांची गाठ पडली आहे.

ही उत्क्रांति-अपक्रांतीची कल्पना अरविंदांनी पुढीलप्रमाणे सांगितली आहे — स्वतःच्या अस्तित्वाचा परमानंद लुटण्यासाठी परब्रह्म वेड पांघरून सृष्टीत उतरते. पुनश्च त्याच उद्देशाने ते वेड झुगारून देऊन आत्मज्ञान प्राप्त करून घेते. अज्ञान हे या प्रक्रियेचे पाताळ म्हटले तर अविद्या हा मध्यलोक व परमज्ञान हा वैकुंठ होय. अतिसंज्ञेतून अपसंज्ञेत व पुनश्च अपसंज्ञेतून अतिसंज्ञेत जगताच्या अपक्रांतीचा व उत्क्रांतीचा सर्ग चालू असतो. जगताचे स्वरूप केवळ मृण्मय अथवा केवळ आध्यात्मिक असते, तर उत्क्रांती संभवलीच नसती. चैतन्याचा मृत्तिकेत 'अवतार' होतो म्हणूनच मृत्तिकेचा चैतन्यात 'उद्धार' होऊ शकतो, स्वयंभाव, आत्मज्ञानात्मक शक्ती व भावानंद ही तीन पदे अतिसंज्ञ तत्त्वांच्या ऊर्ध्वगोलातली आहेत. परब्रह्म क्रमाने या तीन पदांतून

अतिमानसात आले व तिथून क्रमाने मन, जीवात्मा, जीवन व मृत्तिका या अधोगोलातील कोटीत उतरले म्हणजे अपक्रांतीचा सर्ग पुरा होतो. उलट पक्षी विरुद्ध क्रमाने हीच अष्टपदी पुरी करून ते पहिल्या जागी परत आले, म्हणजे तीच उत्क्रांती पूर्ण होते.

मन व अतिमन यांच्यामधील पटल दूर झाले, तरच ऊर्ध्व-गोलांतील कोटींचा अधःप्रवेश व अधोगोलांतील कोटींचा उर्ध्व-प्रवेश शक्य होत असतो. मनाचे जगताविषयीचे ज्ञान व्यवहार-बुद्धीने मर्यादित असते. अतिमन हेच परब्रह्माला त्याच्या स्वरूपात जाणू शकते. अतिमनाचे ज्ञान म्हणजे तादात्म्य बुद्धीचे ज्ञान. त्या योगेच व्यष्टीत परमेष्ठीचा साक्षात्कार घडेल. परम ज्ञानाचा प्रकाश खाली उतरेल. त्याच्या दीप्तीने जीवन भरून जाईल. अमृततत्त्वाचा लाभ होईल. मानव हा अतिमानव होईल. अशा मानवाच्या साहचर्याने, वर्तनाने व संदेशाने माणसांच्या जीवनात अंतःप्रेरणेचा मुक्त संचार दिसू लागेल. मग मानवांच्या परस्परव्यवहारात जाणीव, सहानुभूती व सहिष्णुता अधिकाधिक निर्माण होईल. होता होता या परमज्ञानी अतिमानवांचा एक निराळा वंश, एक नवा देवसमाजच पृथ्वीवर नांदू लागेल.

'दि ह्यूमन सायकल' या ग्रंथात अरविंदांनी मानवी इतिहासाचे तत्त्वज्ञान सांगितले आहे. यात मानवजातीची एकता ही माणसाच्या जीवनसाफल्याचे अबाधित तत्त्व आहे, हा सिद्धान्त गृहीत धरून समाजगतिशास्त्राचे सिद्धान्त मांडलेले आहेत. मानवी समाजाची प्रगती होत असता एक मानसिक सोपान-परंपरा तयार होते. तिचे विलग स्वरूपाचे पृथक्करण करणे कठीण असते; पण तिच्यामुळे काही मानसिक अवस्थांचे क्रमिक दिग्दर्शन होते. या अवस्था पाच आहेत —— (१) प्रतीकमय–ही अवस्था दृश्य विश्वाच्या व जीवनाच्या अंतरंगातील सूक्ष्म शक्तींच्या अनुभवाला अभिव्यक्त करणाऱ्या प्रतीकांनी संपन्न असते. (२) सुरेखतेला प्राधान्य देणारी–ही नैतिक व्यवस्थेला अभिव्यक्त करते. (३) रूढीच्या बंधनांना प्रामुख्य देणारी–हिच्यात परंपराप्राप्त शिस्तीचा जोर मोठा असतो. या अवस्थेत आज्ञाधारकता आणि नियमबद्धता अंमलात येते. शब्दप्रामाण्य काटेकोरपणे पाळले जाते. हिच्यामुळे श्रद्धामय शांतता निर्माण होते. मात्र ती बाह्यात्कारी असते. तिच्या पोटी निर्दयत्व व दास्य ही गुप्तपणे नांदत असतात. (४) व्यक्तिवादी–हिच्यात परंपरेच्या विरुद्ध प्रतिक्रिया वरचढ होते. बुद्धिवाद बंड करून उठतो. त्याला यशही मिळते. व (५) आत्मनिष्ठ–बुद्धिवाद व व्यक्तिस्वातंत्र्य यांतून ही अवस्था उदित होते. हिच्यात आत्म-स्वातंत्र्य गाढ अशा विश्वव्यापी अनुभूतीने आणि मानवव्यापी ध्येयवादाने संपन्न बनते. स्वातंत्र्य, समता व बंधुभाव या तत्त्वांच्या रूपाने हिचा आविष्कार बाह्य जगात दिसतो. सर्व सृष्टीच्या विकासाचे हेच अंतिम फलित होय. हेच दिव्य जीवन होय. लोकसत्ता हे त्याचे बाह्य लक्षण आहे.



सामाजिक परिणतीचा आदर्श नियम अरविंद पुढीलप्रमाणे सांगतात –

व्यक्तीला दैवी पूर्णता लाभण्याच्या कामी सर्व तऱ्हेच्या साधनांचा पुरवठा करणे, हे समाजाचे ध्येय असले पाहिजे. स्वातंत्र्य व संवादित्व निर्माण होईल, असा प्रयत्न झाला पाहिजे. स्वातंत्र्याने विशेष गुणांची वाढ होते व संवादित्वाने एकता प्राप्त होते. ही दोन तत्त्वे म्हणजे प्रगती आणि साफल्य यांची मुख्य साधने होत. स्वतःची अनिर्बंध प्रगती करण्याची आणि इतरांच्या तशाच प्रगतीला मदत करण्याची सोय ज्या समाजात असते, तोच समाज सुसंवादी जीवन निर्माण करू शकतो. मानव-जातीची पूर्णता याच पद्धतीने साधता येईल. अध्यात्मशक्तीने संपन्न असलेली अथवा आत्मनिष्ठ अशी समाजसंस्था निर्माण करण्याचा हाच खरा मार्ग आहे. आत्मनिष्ठ समाजव्यवस्था समाजातील साधूंपासून गुन्हेगारांपर्यंतच्या सर्व व्यक्तींना यांत्रिक, ठराविक साच्यांचा आकार देण्याचे क्रौर्य दाखविणार नाही. ती गुन्हेगारांना जाळ्यात गुंतलेले कष्टी आत्मे समजून त्यांना आधार देऊन वाचवण्याचा प्रयत्न करील. या समाजसंस्थेच्या अर्थ-शास्त्राचा हेतू प्रत्येक माणसाला सर्वांत उच्च आनंद कामातून मिळावा, ते काम ज्याच्या त्याच्या स्वभावाला अनुरूप असावे, त्यांतून आत्मविकासाला अवकाश मिळावा आणि सर्वांना संपन्न आणि सुंदर जीवन जगायला मिळावे, अशा प्रकारचा राहील. या समाजव्यवस्थेचे राज्यशास्त्र नागरिकांना समष्टिरूप आत्मे असे समजेल. हे आत्मे स्वतःचा विकास अन्तःप्रेरणेने करीत राहून त्या कामी एकमेकांना मदत करतील. म्हणजेच दिव्य आत्म्याचा शोध घेत राहतील. या समाजव्यवस्थेचे राज्यशास्त्र नागरिकांना प्रचंड राज्ययंत्राचे केवळ संरक्षक असे समजणार नाही. त्यांना राष्ट्रदेवतेच्या वेदीवर देण्याचे केवळ बळी किंवा तिच्या मस्त-कावर रक्ताचा अभिषेक करणारी पात्रे असे मानणार नाही. राष्ट्रे किंवा राज्ये म्हणजे घातक शस्त्रास्त्रे निर्माण करण्याचे कारखाने नव्हेत. कोट्यवधी लोकांच्या जीविताची आणि घरादारांची राखरांगोळी झाली तरी त्याची पर्वा न करता शस्त्रास्त्रांचा अग्निवर्षाव करणाऱ्या राक्षसी मुत्सद्यांचा सवता सुभा म्हणजे काही राज्य नव्हे.

अशा प्रकारच्या आत्मनिष्ठ समाजसंस्था निर्माण होण्याच्या पूर्वी अनेक व्यक्तींनी स्वतंत्रपणे आत्मनिष्ठ जीवनाचे प्रयोग करायला हवे. नव्या व्यवस्थेचे आदर्श व्यक्तींनी प्रथम आपल्या जीवनांत उतरविले पाहिजेत. कारण आत्मस्वातंत्र्याच्या प्रथम अनुभवातूनच अशा आत्मनिष्ठ समाजसंस्था निर्माण व्हायच्या

आहेत. आत्मस्वातंत्र्य हीच त्यांची मूलभूत शक्ती आहे. [ श्री. नारायणराव निकम–नवभारत, जानेवारी १९५२; वै. सं. वि.]

**अरिकामेडू** एक उत्खनित गाव. द. भारतात पाँडिचरीच्या दक्षिणेला सुमारे साडेतीन किलोमीटर अंतरावर हे गाव आहे. या ठिकाणी प्रथम इ. स. १९२७ साली आणि नंतर १९४५ साली असे दोनदा उत्खनन झाले. इथल्या उत्खननांत अनेक रोमन नाणी आणि विविध बनावटीची मृत्पात्रे सापडली आहेत. त्यावरून अरिकामेडू हे इसवी सनाच्या सुरुवातीला मोठे व्यापारी केंद्र होते, असे कळते. ग्रीक व रोमन प्रवाशांचे वृत्तांत आणि प्राचीन तमिळ वाङ्मय यांतून द. भारताच्या रोमन व ग्रीक साम्राज्याशी होत असणाऱ्या व्यापारी देवघेवीची कल्पना करता येते. 'पेरिप्लस ऑफ दि एरिथ्रिअन सी' या ग्रंथात उल्लेखिलेले कारोमांडल किनाऱ्यावरील पोडुके हे व्यापारी केंद्र म्हणजेच सांप्रतचे अरिकामेडू होय, असे सिद्ध होण्याइतका पुरावा आता उजेडात आला आहे.

भारतीय पुरातत्त्व विभागातर्फे आर. ई. एम. व्हीलर यांनी १९४५ साली केलेल्या उत्खननात रोमन बनावटीची विविध मृत्पात्रे, रोमन सम्राटांची काही नाणी, रोमन बनावटीचे काचेचे प्याले आणि मातीचे दिवे सापडले आहेत. यांतील काही मृत्पात्रांवर रोमन कुंभारांच्या मुद्रांचे ठसेही होते. या रोमन मृत्पात्रांचा काळ सनपूर्व पहिले शतक ते इ. स. चे पहिले शतक असा निश्चित झालेला आहे. त्यामुळे या अवशेषांबरोबर सापडलेली भारतीय बनावटीची काळी-तांबडी व पिवळसर रंगाने चितारलेली मृत्पात्रेही समकालीन ठरली. द. भारतात ब्रह्मगिरी व इतर ठिकाणीं ही भारतीय मृत्पात्रे सापडल्याने त्यांच्या साहाय्याने उत्खननात कालनिश्चितीला मोठी मदत झाली आहे. [ म. वि. को. ]

**अरिमेध** एक प्राचीन जमात. पुराणांतून यांचे उल्लेख सापडत नाहीत; पण हे लोक मेवाडचे प्राचीन रहिवासी असावे. यांच्यामध्ये शत्रूला देवीपुढे बळी देण्याची चाल होती; त्यावरून यांना हे नाव मिळाले असावे. यांच्याबद्दल संशोधकांत भिन्न मते आहेत. कनिंगहॅमच्या मते मेढ किंवा मेढी या नावांनी ओळखले जाणारे पंजाबमधले लोक हेच पूर्वीचे अरिमेध असावे. इ. स. च्या सातव्या शतकापर्यंत जाटांच्या बरोबरीने हे मेध लोक सिंधमध्ये राहत असल्याचे पुरावे आढळतात. [ ए. से. ए. इं. ]

**अरिवत्तय** तमिळनाडमधला एक नायन्मार. रोज शिवमंदिरात जाऊन शिवाला महानैवेद्य दाखविणे हा याचा नेम होता. एके दिवशी पावसातून जाताना याच्या थाळीतले अन्न सांडले. महानैवद्याची वेळ चुकली म्हणून याला दुःख झाले व हा आत्मघात करायला निघाला. मग शिवाने प्रकट होऊन त्याला आवरले, अशी कथा आहे. [ पे. पु. ]

**अरिष्टनेमी तार्क्ष्य** एक सूक्तद्रष्टा. याने द्यावा-पृथिवींची प्रशंसा पुढील प्रमाणे केली आहे–

उर्वी न पृथ्वी बहुले गभीरे । मा वामेतौ मा परेतौ रिषाम ।
(ऋ. १०. १७८.२)

अर्थ – हे पृथ्वी आणि आकाश हो, तुम्ही फार विस्तीर्ण, अवाढव्य व अमर्याद आहा. कोणी आला काय किंवा कोणी गेला काय; तुम्हांला त्याची दादही नसते.

**अरिष्टे** अरिष्ट = मृत्युसूचक लक्षण. याची व्याख्या पुढीलप्रमाणे केलेली आहे–

रोगिणो मरणं यस्मादवश्यंभावि लक्ष्यते ।
तल्लक्षणमरिष्टं स्याद्रिष्टमप्यभिधीयते ॥

अर्थ – रोग्याचे मरण अटळ आहे असे ज्यामुळे लक्षित होते त्या लक्षणाला अरिष्ट किंवा रिष्ट असे म्हणतात.

अरुंधती, ध्रुव व चंद्रावरची छाया न दिसणे, सूर्याचे किरण न दिसणे व अग्नींतून किरण निघत आहेत असे दिसणे, मूत्र किंवा विष्ठा यांचे वमन, स्वप्नांत सोन्यारुप्याची वांती, जमिनीवर पाऊल अर्धेच उमटणे, कावळा, कपोत किंवा गिधाड डोक्यावर बसणे, दक्षिण दिशेस मेघ नसता वीज दिसणे, जलात इंद्रधनुष्य दिसणे, आरशात आत्मप्रतिबिंब न दिसणे, स्वप्नात वानर जोडलेल्या रथातून गायन करीत दक्षिण दिशेस जाणे, इ. अनेक मृत्युसूचक अरिष्टे पुराणात सांगितली आहेत.

अरिष्टाला दुर्दैव, संकट, आपत्ती असेही अर्थ आहेत. शेतीवरील संकटे ही 'ईति' संज्ञेने संस्कृत वाङ्मयात प्रसिद्ध आहेत. त्यांत अतिवृष्टी, अनावृष्टी, टोळ, उंदीर, पक्षी व परचक्र यांचा समावेश केला जातो. या सहा संकटांशिवाय स्वसैन्यपीडा असे एक सातवे संकट सांगितले जाते. अरिष्टे ही दैवी आणि मानवनिर्मित असू शकतात.

अरिष्ट–निरसनाचे उपाय – वरील प्रकारची लक्षणे दिसू लागल्यानंतर शहाण्या माणसाने समजावे, की तीन, चार, सहा, नऊ, इ. महिन्यांच्या आत किंवा एका वर्षाच्या आत आपला मृत्यू अटळ आहे. मग त्या मृत्यूला धैर्याने सामोरे जावे. गृहत्याग करून पूर्व किंवा उत्तर दिशेला गमन करावे. निर्जन स्थानी योगासनावर बसून महेश्वराला नमस्कार करावा. निवातीच्या दीपाप्रमाणे स्थिर राहून योगधारणा करावी. ओंकाराचे ध्यान करावे आणि अशा रीतीने नश्वर देहाचा त्याग करून मोक्ष साधावा.

असे वायू पुराणात (१९) सांगितले आहे. पाहा—तापत्रय. [श. क.]

**अरिहंत** जैन धर्मात तीर्थंकरांचा उल्लेख अरिहंत या नावाने करतात. त्याचा मंत्रही 'ॐ णमो अरिहन्ताणम्' असा असतो. [ हिं. जै. मो. ]

**अरुणगिरी** कैलासाजवळचा एक पर्वत. हे शिवाचे वसतिस्थान असून, इथे ओषधि—वनस्पतींची विपुलता आहे. या पर्वताच्या पायथ्याशी शैलोद नामक सरोवर असून, त्यातून शिलादा नदी उगम पावते. तिच्या काठी सुरभी नावाचे एक वन आहे (ब्रह्मांड पु. २. १८–२३; वायू पु. ४७. १७–२२).

**अरुणगिरिनाथर** (इ. स. चे १५ वे शतक) तमिळनाडमधला एक सुप्रसिद्ध कवी. हा संस्कृत व तमिळ या दोन्ही भाषांचा पंडित होता. आळवारांच्या युगानंतर तमिळनाडमध्ये जे भक्तकवी होऊन गेले, त्यांत हा विशेष प्रसिद्ध आहे. कोण्या चेट्टियारच्या रखेलीपासून याचा जन्म झाला, असे सांगतात. हा सुब्रह्मण्याचा परम भक्त असून त्याच्या मंदिरात चौघडा वाजवीत असे. त्याविषयी एक आख्यायिका सांगतात, ती अशी—

एकदा तो सुब्रह्मण्याच्या पूजेस बसला असता तिथला राजा मंदिरात आला. पूजेत मग्न असल्यामुळे याने राजाला उत्थापन दिले नाही. त्यामुळे राजाला क्रोध येऊन त्याने अरुणगिरिनाथरला कैदेत टाकले. राजा म्हणाला, की 'तू जर खरा भक्त असशील, तर सुब्रह्मण्य तुझी मुक्तता करील.' आणि घटना तशीच घडली. सुब्रह्मण्य मोरावर बसून तिथे आला व त्याने त्याची सुटका केली. त्याच्याच कृपेने अरुणगिरिनाथर हा पुढे कवी झाला.

याचा सर्वप्रसिद्ध ग्रंथ तिरुप्पुह्ळ् हा आहे. याचा अर्थ 'पवित्र स्तुती' असा होतो. या ग्रंथांत अरुणगिरिनाथरने सुब्रह्मण्याचे विविध प्रकारे स्तवन केले आहे. हा ग्रंथ त्याच्या अनेक पद्यांचा संग्रह आहे. पळणी, तिरुच्चेंदुर, इ. सुब्रह्मण्याच्या क्षेत्रांत जाऊन त्याने या पद्यांची रचना केली आहे. त्याने एकंदर १६ हजार भक्तिगीते रचली, असे सांगतात; पण त्यांतली दोन हजार पद्येच आज उपलब्ध आहेत. ही गीते विविध तालांत आणि छंदांत निबद्ध आहेत. या गीतांची सुरावट आणि शब्दशक्ती आश्चर्यकारक आहे. याच्या काव्यात संस्कृत शब्दांचे प्रमाण अधिक असले, तरी त्यातला भक्तीचा प्रवाह प्रसन्न आणि सुगम आहे. या गीतांत आध्यात्मिक सुगंध भरून राहिला आहे. या ग्रंथामुळेच त्याला 'चंदपवल्लप्पेरुमन्' ही पदवी मिळाली.

याशिवाय कंदरनुभूती, कंदरअंदादी, भूतवेतालवगुप्पू, अलंकारम्, हे याचे आणखी ग्रंथ आहेत.

तिकडील शिवभक्तांमध्ये तिरुप्पुह्ळ् या ग्रंथाला विशेष स्थान आहे. शिवाच्या आणि सुब्रह्मण्याच्या मंदिरांतून त्याचे पाठ चालतात. मुलांना रागदारीसह ती पदे शिकवितात. कार्तिक मासात पहाटे उठून तिकडील शिवभक्त वाद्यांच्या साथीवर तिरुप्पुह्ळ् गात गावातून हिंडतात व मंदिर-प्रदक्षिणा करतात. या पदांच्या गायनाने त्रिविधताप नष्ट होतात, अशी तिकडील शिवभक्तांची श्रद्धा आहे. [ त. सा. सं.; डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**अरुण वैतहव्य** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एक्याण्णव क्रमांकाचे सूक्त याच्या नावावर आहे. अग्निस्तुती हा प्रस्तुत सूक्ताचा विषय आहे. याची एक ऋचा अशी —

**सुदक्षो दक्षैः क्रतुनासि सुक्रतुरग्ने कविः काव्येनासि विश्ववित् ।**
**वसुर्वसूनां क्षयसि त्वमेक इद् द्यावा च यानि पृथिवी च पुष्यतः ॥**
(ऋ. १०.९१.३)

अर्थ – स्वबलाने बलवान, स्वकर्माने सुकर्मन आणि स्वकाव्याने कवी बनलेल्या हे अग्ने, तू द्यावापृथ्वीधन संवर्धितोस.

या सूक्ताच्या दहाव्या ऋचेत सात यज्ञीय ऋत्विजांचा आणि चौदाव्या ऋचेत वांझ गाय यज्ञामध्ये हवन करण्याच्या चालीचा उल्लेख आढळतो. [ ऋ. म. भा.; प्रा. च. को. ]

**अरुणाचल** हा पर्वत कैलासाच्या पश्चिमेस आहे. हे एक पुण्यक्षेत्र आहे. ब्रह्मा व विष्णू या दोघांत श्रेष्ठ कोण, याविषयी वाद चालला असता, शिव त्या दोघांमध्ये स्तंभरूपाने उभा राहिला. शिवाने, या स्तंभाचे आदि-अंत जो जाणील तो श्रेष्ठ, असे त्यांना सांगितले. ब्रह्मदेव त्या स्तंभाचे अग्र शोधण्यासाठी निघाला; पण त्याला ते सापडले नाही. विष्णूही स्तंभाचे मूळ शोधण्यासाठी जाऊन अयशस्वी ठरला. पण ब्रह्मा 'आपण शोध लावला,' असे खोटे बोलला आणि विष्णूने मात्र सत्य ते सांगितले. त्यावरून शिवाने ब्रह्मदेवाला अपूज्य ठरविले. हा स्तंभ अरुणाचल क्षेत्री प्रकट झाला म्हणून इथे शिवपूजा मुक्तिप्रद मानलेली आहे. पाहा – अरुणगिरी.

**अरुणाचल कविरायर** (इ. स. १७१९ – १७८८) एक तमिळ कवी. तंजाऊर जिल्ह्यातल्या तिलैयादी नामक गावी याचा जन्म झाला. नल्लतंबिया पिल्लै हे याचे वडील आणि वल्लियमै ही माता होय. अंबलवात कविरायर याच्या मार्गदर्शनाखाली याने संस्कृत, तमिळ व तेलुगू या भाषांचा उत्तम अभ्यास केला.

रामनाटकम् हे याचे तमिळ भाषेतले रामायणावरचे महा-

काव्य होय. याची रचन गद्य-पद्यात्मक आहे. अरुणाचलाच्या शिष्यांनी या काव्यावर संगीताचा साज चढविल्यामुळे ते अल्पावधीतच लोकप्रिय झाले. या महाकाव्याचे पहिले गायन श्रीरंगम्‌च्या मंदिरात झाले.

रामनाटकम्‌ची भाषा अत्यंत साधी व सोपी आहे. भावानुकूल शब्दरचना असल्यामुळे, हे काव्य श्रोत्यांची पकड पटकन घेते. काव्यात तत्कालीन म्हणी व वाक्प्रचारही भरपूर आढळतात.

या कवीने आणखी चार ग्रंथ रचले आहेत. त्यांची नावे अशी – (१) शिरगाझी स्थलपुराणम्. (२) शिरगाझी कोवई. (३)हनुमार पिल्लई तमिष. (४)अजोमुखी नायकम्. याशिवाय त्याची काही कीर्तनेही आहेत. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**अरुणाचल प्रदेश** भारतीय संघराज्यातील एक घटक राज्य. हे राज्य केंद्रशासित आहे. भारताच्या ईशान्येल । नेफा नामक जो प्रदेश होता, त्यालाच २२ जानेवारी १९७२ पासून अरुणाचल प्रदेश असे नाव देण्यात आले. पश्चिमेला भूतानच्या बाजूने पत्कोई पर्वतश्रेणी, उत्तरेला तिबेट व चीन, पूर्वेला ब्रह्मदेश आणि दक्षिणेला आसाम व नागालँडचा तुएनसांग जिल्हा अशा याच्या चतुःसीमा आहेत. पूर्वी या प्रदेशाला विशेष असे नाव नव्हते. पण १९५५ पासून त्याला ईशान्य सीमांचल एजन्सी (नेफा) असे म्हणत असत.

अरुणाचल प्रदेशाचे क्षेत्रफळ एकतीस हजार चौरस मैल असून, त्याचा सर्व भाग डोंगराळ आहे. भौगोलिक दृष्टया हा भाग हिमालयाच्या उतरणीवर असून, त्याचा खालचा भाग तराईजवळ आहे. त्यामुळे या भागातील हवा फार उष्ण आहे. तर उत्तरेकडील भागात हिमालयाची बर्फाच्छादित शिखरे असल्यामुळे तिथले हवामान फारच थंड आहे. नद्यांच्या खोऱ्यात काही भाग सपाट आहे. सर्वच अरुणाचल प्रदेशात अनेक नद्या व झरे आहेत. इथे पावसाचे प्रमाण चाळीस ते दोनशे इंचापर्यंत आहे. बर्फाच्छादित प्रदेशाखेरीज इथली सर्व भूमी नेहमी हिरवीगार असते.

या प्रदेशाची लोकसंख्या पाच लाखांवर असून, त्यात सुमारे एकोणतीस मुख्य जमाती व त्यांच्या एकेचाळीस उपजमाती यांचा समावेश आहे. त्यांतील बहुतेकांच्या आपापल्या स्वतंत्र बोली आहेत. बहुसंख्य लोक डोंगर उतारावर वसवलेल्या गावात राहतात. प्रत्येक जमातीचे किंवा टोळीचे स्वतंत्र गाव असते.

अरुणाचल प्रदेशाचे कामेंग, सुबनसिरी, सियांग, लोहित व तिरप असे पाच जिल्हे असून, ही नावे इथल्या मुख्य नद्यांच्या नावावरून दिलेली आहेत.

या प्रदेशातील प्रत्येक जिल्ह्याची थोडक्यात माहिती अशी –

कामेंग जिल्हा – अरुणाचल प्रदेशातील हा अगदी पश्चिमेकडील जिल्हा असून बोमदिला हे त्याचे मुख्य ठिकाण आहे. ते नऊ हजार फूट उंचीवर वसलेले आहे. इथले दुसरे मोठे गाव तावांग हे दहा हजार फूट उंचीवर आहे. इथे तीनशे वर्षांपूर्वी बांधलेला एक विशाल बौद्ध मठ आहे.

कामेंग जिल्ह्यात मोनपा लोकांची वस्ती बरीच आहे. हे लोक स्वभावाने शांत, नम्र व कलात्मक प्रवृत्तीचे आहेत. हे लोक महायानी बौद्ध धर्माच्या निङ्‌मापा (लालटोपी) संप्रदायाचे अनुयायी असून, ते पद्मसंभवाची उपासना करतात. तावांगचा बौद्ध मठ हा त्यांच्या जीवनाचा व संस्कृतीचा केंद्रबिंदु आहे. तिबेटी आणि भूतानी संस्कृतीचा त्यांच्या वेषभूषा, अलंकार, भाषा आणि साहित्य यावर खूपच प्रभाव आहे. पूर्वी या लोकांचा तिबेटशी पुष्कळ व्यापार चालत असे. हे लोक संगीत, नृत्य व नाटक यांचे फार शोकिन आहेत. यांचा आसामच्या तराई प्रदेशाशी घनिष्ठ संबंध असून, अजूनही उदालगिरी येथील मेळ्यात ते मोठ्या संख्येने उपस्थित राहतात.

इथली दुसरी एक छोटी जमात म्हणजे शेरडुकपेन ही होय. रूपा, जीगाव व शेरगाव या गावात यांची वस्ती आहे. हेही बौद्ध आहेत. थंडीच्या दिवसात हे दरवर्षी तराईच्या प्रदेशात येतात व तिथे व्यापार करतात. याशिवाय, खोवा, अका, मिजी व सुलुंग या लहान जमातीही इथे राहतात.

कामेंग जिल्ह्याच्या पूर्व भागात डफला जातीचे लोक राहतात. हे लढाऊ प्रवृतीचे म्हणून प्रसिद्ध आहेत. यांची संख्या एंशी हजारांपेक्षा जास्त आहे. सपाट प्रदेशातील शांततामय जीवन जगणाऱ्या लोकांवर यांनी अनेक वेळा हल्ले केलेले आहेत. हे लोक जन्मजात शिकारी आहेत, कारण दाट जंगल असलेल्या पहाडी प्रदेशांत यांचे वास्तव्य असल्यामुळे जंगली जनावरांशी यांना नेहमीच सामना करावा लागतो. यांची घरे लांबच्या लांब असतात व त्यात त्यांचे नातेवाईक, नोकर व गुलाम राहतात.

मिजी व खोआ या जमाती बौद्धधर्मी नाहीत. मिजी लोक सुमारे पंचवीस गावांत राहतात. खोआ किंवा बुगुन हे लोक फार गरीब असून, अका लोकांच्या शेतात मजुरी करतात. सुलुंग ही इथली मूळ जमात आहे. हे लोक चांगले शिकारी असून, लोखंड व पितळ यांवर नक्षीकाम करण्यात प्रवीण आहेत.

सुबनसिरी जिल्हा – हा कामेंगच्या पूर्वेला असून, झीरो हे त्याचे मुख्य ठिकाण आहे. हे स्थान अपातानी पठारावर वसलेले असून, उत्तर लखीमपूर जिल्ह्याच्या किम्सिसन डोंगरी रस्त्याने जोडलेले आहे. इथल्या पठारावर अपातानी लोकांची वस्ती आहे. हे लोक फार मेहनती असून, वर्षात आपल्या शेतीत दोन

पिके घेतात. कापड विणण्यातही हे कुशल आहेत. यांची घरे लाकडाची असतात. इथे काही डफला लोकही राहतात.

तागिन जमातीचे लोक सुबनसिरी नदीच्या उजव्या किनाऱ्यावर दुर्गम अशा डोंगर-उतारावर राहतात. हे लोक शेती करतात. पण पुरेसे धान्य पिकत नसल्यामुळे त्यांना अर्धपोटी राहावे लागते.

जिल्ह्याच्या दक्षिण व पूर्व भागात पहाडी मिरी लोक राहतात. हे लोक दिसायला डफलांसारखेच असून ते कपाळावर केसांचा अंबाडा बांधतात. हे लोक नम्र व आनंदी असून बाहेरून येणाऱ्या प्रवाशांना मदत करतात.

**सियांग जिल्हा**—हा जिल्हा सुबनसिरीच्या पूर्वेला असून, त्याच्या मध्यभागातून सियांग नदी वाहते. ही नदी नंतर ब्रह्मपुत्रेला मिळते. जिल्ह्याचे मुख्य ठिकाण अलाँग हे असून, ते सियू व सिपू या दोन नद्यांच्या तीरावर वसलेले आहे. पासीघाट हे इथले दुसरे मोठे गाव आहे. या जिल्ह्यात आदी जमातीचे लोक राहतात. पूर्वी यांनाच अबोर असे नाव होते. आदी जमातीच्या अनेक शाखा असून, त्या गेलोंग व मिनपोंग अशा दोन समूहांत विभागलेल्या आहेत. गेलोंग समूहात पासी, पांगी, शिमोंग, बोरी अशिंग व तेंगाम या शाखा आहेत. तर मिनपोंग समूहात रामो, बोकर व पालिबो या उपजमातींचा समावेश आहे. यांची वस्ती सियांग व मामने या नद्यांच्या तीरावर केंद्रित झालेली आहे. या लोकांना नृत्यगायनांची फार आवड आहे. हे लोक कुशल विणकर असून ते बांबू व वेत यांपासून तऱ्हेतऱ्हेच्या उपयोगी वस्तू बनवतात. कापड विणणे हा त्यांचा गृहोद्योग असून, त्यातील रंगसंगती आकर्षक असते. शेती हा त्यांचा मुख्य व्यवसाय आहे. यांच्यांत अविवाहित तरुण-तरुणांसाठी निरनिराळी शय्यागृहे असतात. गेलोंग उपजमातीचे लोक बहुपती व बहुपत्नी अशा दोन्ही प्रथा पाळतात. अनेक भाऊ मिळून एकच पत्नी करतात किंवा त्यांनी अनेक स्त्रिया केल्या तरी सर्व भावांचा त्यांच्यावर समान हक्क असतो. यात त्यांना काही गैर वाटत नाही.

आदी लोकांचा आसामशी व्यापार चालतो. तराई व अलाँग यांच्या आसपास राहणारे लोक असमिया भाषा बोलतात.

याशिवाय, इथे सीमावर्ती प्रदेशात मेंबा व खंबा या बौद्ध जमाती राहतात. यांचे संगीत व धार्मिक नृत्य सिक्कीमच्या संगीत-नृत्याशी मिळते जुळते आहे.

**लोहित जिल्हा**—याचा आकार घोडयाच्या नालासारखा आहे. याला पूर्वी मिश्मी पहाड असे नाव होते. जिल्ह्याचे मुख्य ठिकाण तेझू हे आहे. इथले दुसरे महत्त्वाचे गाव म्हणजे सदिया. या भागात मुख्य वस्ती मिश्मी लोकांची आहे. यांचे दिगारू किंवा तरांव, मिझू किंवा कमन व चूलिकाटा किंवा इदू असे तीन भेद आहेत. सर्व मिश्मींचे चेहरे मंगोलियन घाटाचे आहेत. त्यांच्या केस विंचरण्याच्या पद्धतीवरून त्यांच्यांतील भेद ओळखायचा असतो. हे सर्व लोक दिसायला सुंदर आहेत. यांचे कपडे रंगीबेरंगी असतात.

याशिवाय इथे पदम जमातीचे लोकही राहतात. खांप्टी व सिंगफो नामक दोन बौद्ध जमातींची वस्तीही इथे आहे. पूर्वी हे लोक लढाऊ वृत्तीचे होते. पण बौद्ध धर्माच्या स्वीकारामुळे ते आता शांत प्रवृत्तीचे शेतकरी बनले आहेत. खांप्टी लोकांची स्वतःची लिपी आहे. यांच्या प्रत्येक गावात एक बौद्ध मंदिर असते. हे इतर जमातींच्या मानाने प्रगतिशील असून पवनचक्कीच्या साहाय्याने धान्य दळतात.

**तिरप जिल्हा** — अरुणाचल प्रदेशाचा हा दक्षिणेकडील छोटासा जिल्हा असून, खोनसा हे त्याचे मुख्य ठिकाण आहे. तांगसा जातिसमूहाचे लोक या प्रदेशात राहतात. या जातिसमूहाचे अनेक भेद व शाखा आहेत.

नॉक्टे ही इथली एक आदिम जमात आहे. त्यांचा एक मुखिया असतो व तो अनेक गावांवर आपले नियंत्रण ठेवतो. इथली दुसरी जमात म्हणजे वांचू. यांचा मुख्य एक सरदार असतो व तो अनेक गावांवर आपली सत्ता चालवतो. त्याचे घर खूप मोठे असते. ते लाकडाचे बनवलेले असून, लाकडावर कोरीव काम केलेले असते. वांचू लोक कपडे विणतात, वेत व बांबू यांच्या वस्तू बनवतात व लाकडावर कोरीव काम करतात.

इथे वास्तव्य करून राहणारी आणखी एक जमात म्हणजे तांगसा. तांगसा लोक आपल्या वेणीचा कपाळावर अंबाडा बांधतात. पुरुष लुंगी नेसतात. त्यामुळे ते ब्रह्मी लोकांसारखे दिसतात. पूर्वी हे लोक आसपासच्या गावांवर हल्ले करून लोकांची मुंडकी कापून आणीत असत. पण आता ते शांत वृत्तीचे शेतकरी बनले आहेत. त्यांच्या गावाच्या प्रवेशद्वाराजवळच अविवाहित तरुणांसाठी शय्यागृह असते. इथे तरुण शस्त्रास्त्रे घेऊन राहतात आणि गावावर काही आपत्ती आल्यास ढोल बडवून लोकांना त्याबद्दल सूचना देतात. हे लोक अफीमबाज आहेत. लिडो व मार्गेरिटा या इथल्या बाजारांत भडक रंगाचे कपडे घातलेल्या अनेक तांगसा मुली पाहायला मिळतात.

एकूणच, अरुणाचल प्रदेशातील लोक मंगोलाइड वंशाचे असून त्यांचा रंग फिकट गोरा, नाक चपटे व केस सरळ असतात. त्यांचे डोळे बारीक असतात. बहुतेक लोक मध्यम बांध्याचे असून त्यांची मस्तके लांब असतात. हे लोक डोंगरावर चढ-उतार करण्यात कुशल असून, अगदी कठीण व दुर्गम रस्त्यांवरून पाठीवर ओझे लादून चालू शकतात.

मुख्य जमातींची माहिती कोशात स्वतंत्रपणे दिलेली आहे.

या लोकांचे मुख्य अन्न म्हणजे कडधान्ये, डाळी, भाज्या आणि मांस हे होय. जिथे तांदूळ बराच पिकतो, तिथले लोक आहारात भाताला प्राधान्य देतात. तेल, तूप यांचा स्वयंपाकात ते अगदी क्वचित उपयोग करतात. बौद्ध जमाती सोडल्यास इतर जमाती दूध कधीच पीत नाहीत.

पुष्कळसे लोक झूम पद्धतीने शेती करतात. काही लोक डोंगर-उतारांवर सोपानशेती करतात.

अरुणाचल प्रदेशातील स्त्रिया हातमागावर कापड विणण्यात कुशल आहेत. त्यांचे माग वजनाने हलके व लहान असतात. मागाचे एक टोक कंबरेला व दुसरे समोरच्या एखाद्या खांबाला बांधून त्या विणकाम करतात. स्वतःच्या वस्त्रांपुरेसाच कापूस हे लोक पिकवतात. निरनिराळ्या भडक रंगातील नक्षीने स्त्रिया वस्त्रे सुंदर बनवितात. काळा, पिवळा, गडद निळा, हिरवा, विटकरी, इ. रंग हे लोक वनस्पतींपासून मिळवतात.

गुलामप्रथा हे अरुणाचल प्रदेशातील लोकांचे एक वैशिष्ट्य आहे. पण हे गुलाम आपल्या चांगल्या वागणुकीने धन्याची मर्जी संभाळतात. आणि मग हळूहळू त्याच्या कुटुंबातीलच एक घटक बनून जातात. धन्याने गुलामांना अन्न, वस्त्र आणि निवारा दिला पाहिजे, असे त्याच्यावर बंधन असते. काही ठिकाणी गुलाम आपली मिळकत आपल्याजवळ ठेवू शकतात. मात्र गुलाम आणि इतर लोक यांच्यात रोटीबेटीव्यवहार होऊ शकत नाही.

बहुतेक जमातींत ग्रामपंचायत असते. जमातीतील तंटेबखेडे पंचायत सोडवते. त्याचप्रमाणे सामाजिक जीवनावरही तिचे नियंत्रण असते.

अरुणाचल प्रदेशात काही ऐतिहासिक महत्त्वाची स्थळे आहेत; ती पुढीलप्रमाणे –

**मालिनीथान** – हे ठिकाण सियांग जिल्ह्यात आहे. इथे राहणारे इदू मिश्मी रुक्मिणीला आपल्या जमातीतील मानतात. रुक्मिणी व कृष्ण भीष्मकनगरापासून द्वारकेला परत जात असता शिव जिथे तप करीत होता, तिथे पार्वतीने त्या दोघांचे स्वागत केले. आणि स्वतः गुंफलेल्या पुष्पमाळा त्यांच्या गळ्यात घातल्या. तेव्हा कृष्णाने प्रसन्न होऊन तिला मालिनी असे म्हटले. तेव्हापासून या स्थानाला मालिनीथान किंवा मालिनीस्थान असे नाव पडले. नुकतेच इथे काही ऐतिहासिक अवशेष सापडले आहेत. त्यांत बहुतेक वस्तू दगडाच्या आहेत. दशभुज गणेश व इतर देवता यांच्या सुंदर मूर्ती, नंदीबैल, सिंह, ऋषी व द्वारपाल यांच्या मूर्ती, सुंदर कलात्मक स्तंभांचे तुकडे, इ. वस्तू इथे मिळाल्या आहेत.

**ईटा** – हे गाव सुबनसिरी जिल्ह्यात आहे. इथे एक प्राचीन राजवाडा असून, राजधानीचे काही अवशेषही आहेत. इ. स.च्या ११ व्या शतकातील जितारी राजवंशाचा शेवटचा राजा रामचंद्र याची राजधानी मायापूर म्हणजेच ईटा हे गाव होय, असे इतिहासकार सांगतात.

**परशुरामकुंड** – हे लोहित जिल्ह्यात असून, अनेक शतकांपूर्वीपासून हे तीर्थस्थान मानले गेले आहे. दरवर्षी मकरसंक्रांतीला इथे हजारो यात्रेकरू जमतात. या कुंडात स्नान केल्याने सर्व पापे धुवून जातात, अशी भाविकांची श्रद्धा आहे. परशुरामाने मातृहत्येचे पाप इथेच धुवून टाकले होते, म्हणून या कुंडाला त्याचे नाव मिळाले, असे सांगतात.

**भीष्मकनगर** – हे स्थान लोहित जिल्ह्यातील सदिया नगराच्या उत्तरेला सुमारे तीस मैलांवर आहे. इथे पुरातत्त्व-विभागातर्फे उत्खनन करण्यात आले, त्यात विटांचे वीस हजार चौरसफूट क्षेत्रफळ असणारे ढीग मिळाले आहेत. ही राजवाड्याची इमारत असून, तिच्या चारही बाजूंना दगडी भिंत आहे. छुतिया राजांनी इथे राजवाडा व मंदिर बांधले होते. इथे एक कमल सरोवर सापडले आहे. त्यांच्याशी भीष्मक व रुक्मिणी यांचा संबंध जोडलेला आहे.

**विकासकार्य** – भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर या प्रदेशाकडे व इथे राहणाऱ्या आदिम जातींकडे भारत सरकारने अधिक लक्ष द्यायला सुरुवात केली आहे. आदिम समाजाचे आधुनिक समाजात रूपांतर करणे, हे काम सोपे नाही. पण हळूहळू हे परिवर्तन घडून येत आहे. इ.स.१९६३ पासून इथे आर्थिक व सामाजिक विकासकार्य जोराने चालू आहे. उदा० सुबनगिरी जिल्ह्यातील तागिन जमातीच्या वयस्कर लोकांनी एकत्र जमून स्थानिक पंचायत स्थापण्याचा निश्चय केला आणि क्षेत्रीय विकासकार्य आपल्या हातात घेतले. सामाजिक कल्याण आणि पंचायतीचे न्यायदान, इ. ते स्वतः पाहू लागले. आता हे लोक बालविवाह हा चांगला नाही, असे मानू लागले आहेत. त्याचप्रमाणे मोनपा लोकांनी घरी बनवलेली दारू विकायची नाही, असे ठरवले आहे. डफला लोकांची बहुतेक मुले आता प्राथमिक शाळेत जाऊ लागली आहेत. वेताचे विमान व मोटारी अशा खेळण्यांनी ते खेळू लागले आहेत. हेलिकॉप्टर, विमान, मोटार, बुलडोझर, इ. वाहने त्यांच्या चांगल्या परिचयाची झाली आहेत. काही अपातानी लोक तर ट्रक्टर चालवायलाही शिकले आहेत.

झूम शेतीत श्रम खूप करावे लागतात आणि त्या मानाने धान्य मात्र कमी पिकते. हे लक्षात आल्यावर आता इथल्या लोकांना एकाच जागी शेती करण्याचे शिक्षण देण्यात येत आहे.

इ. स. १९६९ पासून इथे पंचायत राज्य सुरू करण्यात आले आहे आणि त्यात लोकांचे अधिकाधिक सहकार्य घेण्यात येत आहे.

इथल्या लोकांना वैद्यकीय मदत मिळावी म्हणून सरकारने इथे अनेक आरोग्य-केंद्रे उभारली आहेत. प्रत्येक गावात एक विणकामाचे शिक्षण देणारी शाळा उघडण्यात आली आहे. लाकडावर कोरीव काम करणे, लोहकाम, सुतारकाम, वेतापासून वस्तू बनवणे, इ. गोष्टींचे शिक्षणही तिथल्या लोकांना दिले जात आहे. इतर काही घरेलू उद्योगही पाठचवेतन देऊन विद्यार्थ्यांना शिकवले जात आहेत. एकंदरीत, सर्व दृष्टींनी हा प्रदेश प्रगतीच्या मार्गावर वाटचाल करीत आहे. [ अरुणाचल मिजोरम (भारत-दर्शन) – डॉ. कमला सांकृत्यायन, १९७५; हिल इंडिया – विवेकानंद केंद्र पत्रिका, १–२, ऑगस्ट १९७२ ]

**अरुद्रा** एक सण, तमिळनाडूमध्ये मार्गशीर्षाला मार्गली असे म्हणतात. त्या मासात, आर्द्रा नक्षत्र येईल त्या दिवशी नटराजाची पूजा करून सण साजरा करतात. रुद्र ही आर्द्रेची देवता आहे. नक्षत्रांच्या द्वारे विश्वातल्या अदृश्य शक्तींचा प्रवाह मानवापर्यंत येत असतो. त्याचा स्वीकार करायचा तर मानवाचे शरीर शुद्ध असायला हवे व त्याच्या ठिकाणी इच्छाशक्तीही प्रबल असायला हवी. अरुद्रा नक्षत्रावर नटराज शिवाची पूजा केल्याने मानवाला शुद्धता व इच्छाशक्ती ही दोन्ही प्राप्त होतात, अशी त्या लोकांची श्रद्धा आहे.

कली नावाचा एक पदार्थ या दिवशी शिवाला अर्पण करण्याची प्रथा आहे. त्याच्या मागची कथा अशी – सेंदनार नावाचा एक मोळीविक्या होता. तो सर्पण विकून आलेल्या द्रव्यात एका शिवभक्ताला भोजन घाली. एके दिवशी पावसाने लाकडे ओली झाल्यामुळे ती कोणी विकत घेईना. त्या दिवशी त्याला द्रव्याऐवजी फक्त थोडे पीठ मिळाले. त्या पिठाचा त्याने कली हा पदार्थ बनविला. मग तो एखाद्या शिवभक्ताची वाट पाहू लागला. एवढ्यात नटराज वृद्ध ब्राह्मणाच्या रूपाने त्याच्यापुढे आला. मोळीविक्याने त्याला कली दिला. तो घेऊन नटराज मंदिरात आला. दुसऱ्या दिवशी लोकांना तो पदार्थ मंदिरात सांडलेला आढळला. लोकांनी प्रसाद म्हणून त्याचे ग्रहण केले तेव्हापासून ही प्रथा पडली.

चिदंबरम्‌प्रमाणेच पेरूर, कुट्टालम्, तिनेवेल्ली, मदुरा, तिरुवलनागडू या ठिकाणीही हा सण करतात. [ सा. इं. फे. ]

**अरुंधती** वसिष्ठाची भार्या. मेधातिथी मुनीने ज्योतिष्टोम केला, त्या वेळी ही यज्ञकुंडातून उत्पन्न झाली. ही पूर्वजन्मात ब्रह्मदेवाची मानसकन्या संध्या होती. ही चंद्रभागेच्या तीरी वाढली. पुढे ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून मेधातिथीने तिला शिक्षणासाठी सावित्रीकडे ठेवले. बारा वर्षे पूर्ण झाल्यावर एका उद्यानात योगायोगाने हिची आणि वसिष्ठाची गाठ पडली. वसिष्ठ तिच्या रूपावर भाळला. पुढे सावित्रीने त्या दोघांचे लग्न लावून दिले (कालिका पु. २३).

ही वसिष्ठाला केव्हाही विरोध करीत नसे, म्हणून हिचे अरुंधती असे नाव पडले, अशी त्या नावाची व्युत्पत्ती आहे. हिला महापतिव्रता मानलेले आहे. ही वसिष्ठाला सोडून कधीच राहत नाही. सप्तर्षींमध्ये वसिष्ठाच्या शेजारी हिचे स्थान आहे. गगनमंडळात हिची तारका मंदप्रभ आहे. अरुंधती दिसेनाशी झाली, की सहा महिन्यांत माणसाचा मृत्यू ओढवतो, असा लोकसंकेत आहे, कृत्तिका या इतर सहा ऋषींच्या भार्या होत. त्यांची रूपे घेऊन एकदा स्वाहेने अग्नीशी संभोग केला. पण तिला अरुंधतीचे रूप मात्र घेता आले नाही, अशी कथा म. भा. च्या वनपर्वात आहे. विवाह-संस्कारात वधूला अरुंधतीचे दर्शन घडवितात.

एकदा हिला आश्रमात ठेवून सप्तर्षी फळेमुळे आणण्यासाठी हिमालयात गेले. या कालात बारा वर्षांचे अवर्षण पडले. त्यामुळे हिमालयातून सप्तर्षी परत आलेच नाहीत. अशा वेळी शिव ब्राह्मणाच्या वेषाने तिची सत्त्वपरीक्षा घेण्यासाठी आला. हिच्याजवळ त्याला देण्यास काहीच नव्हते; म्हणून हिने त्याला लोखंडी बोरे दिली. ब्राह्मणाने तिला ती शिजत ठेवायला सांगितली. ती शिजत लावून ती त्याच्याशी तत्त्वचर्चा करीत बसली. त्याचे बोलणे चालू असता बारा वर्षे नकळत उलटून गेली. एवढ्यात सप्तर्षी फळेमुळे घेऊन परत आले. त्या वेळी शिवाने निजरूपात प्रकट होऊन अरुंधतीच्या तपाची प्रशंसा केली. त्या दिवसापासून ते स्थान बदरपाचनतीर्थ म्हणून प्रसिद्ध झाले (म. भा. शल्य. ४८).

तिच्या दुर्धर पातिव्रत्यामुळे कृत्तिका पुंजात हिचा समावेश झाला नाही. तमिळ-तेलुगू भाषांत मात्र हिचा 'सात बहिणी 'त अंतर्भाव आहे. दक्षिणेतले माडिगा लोक तिला अरंजोथी म्हणतात व अगस्त्याची पत्नी समजतात. अगस्त्यापासून हिची ताटातूट का झाली, त्याचे स्पष्टीकरण माडिगांच्या कथेत सापडते ते असे –

एकदा एक तरुण परगावाहून रात्री घरी आला व पत्नीला न उठविता तिच्या शेजारी झोपला. तिला परपुरुषाची शंका यऊन तिने त्याला लाथ मारली. तेव्हा त्याने तिला शापले; की 'तू पुढील जन्मी माडिगा होशील.' ते ऐकन त्याच्या सासऱ्याने त्यालाही प्रतिशाप दिला, की 'तू पुढील जन्मी देवदासीचा पुत्र होशील.'

त्याप्रमाणे अरुंधती माडिगा जातीत जन्मली व तो देवदासीपुत्र झाला. काही कालाने तो मूठभर वाळू, लोखंड व चिंचेची पाने घेऊन तिच्याकडे आला. त्याला वाळूचा भात, लोखंडी डाळीचे

वरण आणि चिंचेच्या पानांची पत्रावळ बनविणारी पतिव्रता स्त्री पत्नी म्हणून हवी होती. अरुंधतीने ते अद्भुत कृत्य करून दाखविले. पुढे त्या दोघांचे लग्न झाले. ते तिच्या बापाला आवडले नाही. त्याने जावयाला शाप दिला, की 'तू दक्षिणेचा तारा होशील' आणि मुलीला शापले, की 'तू उत्तरेकडची तारका होशील.' त्यामुळे त्या दोघांची ताटातूट झाली (लो. सा. रू.).

अरुंधतीचे दुसरे नाव ऊर्जा असे होते. चित्रकेतू व इतर सात ऋषी यांची ही माता समजली जाते (भाग. पु. ४.१.४०). शक्ती हा हिचा आणखी एक पुत्र होय. हिने योगाचे फल प्राप्त होण्यासाठी देवीच्या १०८ नावांचे ध्यान केले. [ पु. इं. ]

**अरुंधतीव्रत** एक स्त्रीव्रत. चैत्र शु. तृतीयेस प्रारंभ. याचा विधी असा – त्रिरात्र उपवास करतात. कलशावर पूर्णपात्रात अरुंधतीची सुवर्णमूर्ती मध्यभागी बसवून तिच्या दोही अंगी वसिष्ठ व ध्रुव यांच्या मूर्ती बसवितात. हिच्या ध्यानाचा श्लोक पुढीलप्रमाणे –

ध्यायामि दिव्यरूपां तां वसिष्ठस्य प्रियां शुभाम् ।
पतिव्रतां पुण्यशीलां सौभाग्यैकनिकेतनाम् ।।

अर्थ – वसिष्ठपत्नी, दिव्यरूपा, पुण्यशील पतिव्रता, सौभाग्याचे एकमेव स्थान अशा अरुंधतीचे मी ध्यान करते.

नंतर षोडशोपचार पूजा, अर्घ्यदान व प्रार्थना. वंशपात्रात सौभाग्यवायन ठेवून त्याचे व सुवर्णमूर्तीचे ब्राह्मणास दान. चार दंपतींची पूजा व भोजन. उद्यापनाच्या वेळी तिल व समिधा यांचे १०८ हवन, सुवासिनीपूजा, दंपतीभोजन व शक्त्यनुसार कांस्यपात्र, दीप, आरसा, चामर, घोडा व शय्या यांचे दान. व्रताचे फल – सौभाग्यप्राप्ती.

या व्रतात वसिष्ठाची मूर्ती करायची ती तो अरुंधतीचा पती म्हणून व ध्रुवाची मूर्ती करायची ती अक्षय्यतेचे प्रतीक म्हणून. विवाहाच्या वेळी वधूला ध्रुवदर्शन करायला लावतात, त्यातही अक्षय्य सौभाग्य लाभावे हाच हेतू असतो. [ व्रतराज ]

**अरुव** द. भारतातील एक शेतकरी जात. हे स्वतःला पटणीस (मुसलमान) पुरुष व ओडिया स्त्री यांचे वंशज मानतात. यांना नायको, पाट्रो, पोधानो, इ. किताब आहेत. यांच्यांत अशी समजूत आहे, की आपल्यांतल्या पुरुषांचा अथर्ववेदाशी व स्त्रियांचा यजुर्वेदाशी संबंध आहे. अरुव लोक कोणत्याही इस्लामी समारंभात भाग घेत नाहीत वा नमाज पढत नाहीत. पुष्कळसे लोक हिंदू दैवतांनाच भजतात.

हे लोक मृतांना पुरतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**अरे** एक जात. हा शब्द आर्य या शब्दावरून बनलेला दिसतो. हे लोक मध्यप्रदेश व तिरुवितांकुर या भागांत राहतात. हे महाराष्ट्रातून तेलंगणात व तिकडून चांद्याकडे गेले असावे. हे सर्व ब्राह्मणी धर्मविधी ब्राह्मण पुरोहिताच्या द्वारे करतात; पण ब्राह्मणाकडे अन्न मात्र घेत नाहीत. हे ब्राह्मण, बनिया व कोमटी या लोकांना आपल्या जातीत घेतात. सोयर व सुतक पंधरा दिवस पाळतात. [ म. ज्ञा. को. ]

**अरोड** पंजाबातील एक जात. या जातीत सर्व धर्मांचे लोक आहेत; पण मुसलमान फारच कमी आहेत. हे खत्री लोकांसारखे दिसतात. अरोड या नावाची एक प्राचीन राजधानी होती. हे लोक तिथून पंजाबात गेल्यामुळे त्यांना हे नाव पडले असावे. पंजाबात हे लोक सावकारी करतात. [ सु. वि. को. ]

**अर्कपुटसप्तमी** फाल्गुन शु. सप्तमीला हे काम्य व्रत करतात. सूर्यपूजा, निराहार व अष्टमीस तुळशीपत्राएवढ्या रुईच्या पत्राचे प्राशन, हा या व्रताचा विधी आहे. फल- व्याधिनाश. [ व. प. ]

**अर्कविवाह** अर्क म्हणजे रुईचे झाड. त्याच्याशी एखाद्या पुरुषाने विवाह करणे, याला हे नाव आहे. रुईला सूर्यकन्या मानलेले आहे. एखाद्या पुरुषाच्या दोन बायका मृत झाल्या, तर तिसऱ्या स्त्रीशी लग्न केल्यास दोघांपैकी एखाद्याला अपमृत्यू येऊ नये, यासाठी हा विधी आहे. शनिवारी वा रविवारी हस्त नक्षत्रावर फलपुष्पयुक्त रुईजवळ जाऊन प्रथम पुण्याहवाचनादी कृत्ये करतात. कन्यादाता म्हणून आचार्य निवडतात. रुईच्या झाडावर छायेसहित सूर्याची पूजा करतात. नंतर रुईला शुभ्र वस्त्राने वेढून विवाहेच्छू पुरुष सूर्याची प्रार्थना करतो –

त्रिलोकवासिन् सप्ताश्व छायया सहितो रवे।
तृतीयोद्वाहजं दोषं निवारय सुखं कुरु ।।

अर्थ – त्रैलोक्यात वास करणाऱ्या, सात अश्वांच्या रथात बसणाऱ्या आणि छायेसहित असणाऱ्या हे सूर्या, (मी करणार असलेल्या) तिसऱ्या विवाहापासून उत्पन्न होणारा दोष दूर करून (मला) सुख दे.

नंतर कन्यादाता आचार्य, वराची मधुपर्क पूजा करून कन्यादान करतो. त्यानंतर कंकणे बांधतात. रुईच्या चारही दिशांस चार कलशांवर विष्णूची स्थापना करून त्याची पूजा करतात. नंतर होम व आचार्याला गोप्रदान करून विधी पूर्ण करतात. शेवटी शांतिसूक्त म्हणतात. [ निर्णयसिंधु; म. ज्ञा. को. ]

**अर्कव्रत** एक तिथिव्रत. उभय पक्षांतल्या षष्ठी व सप्तमी या तिथींना हे व्रत करतात. सूर्यपूजा व रात्री भोजन असा याचा विधी आहे. व्रतावधी एक वर्ष. [ हि. ध. ]

**अर्कसप्तमी** एक तिथिव्रत. व्रताचा आरंभ उत्तरायणात रविवारी शुक्लपक्षात सप्तमी येईल, त्या दिवसापासून करतात ( पद्म पु. ५.७५. ८६–१०६ ). या व्रताची देवता सूर्य आहे. व्रतावधी दोन वर्षे. पंचमीस एकभुक्त, षष्ठीस नक्तभोजन, सप्तमीस उपवास व अष्टमीस पारणा, असा याचा विधी आहे. व्रतकाळात रुईच्या पानाच्या द्रोणातून पाणी पितात. [ हि. ध. ]

**अर्काष्टमी** एक तिथिव्रत. व्रतारंभ शु. ८ मीस रविवार असेल त्या दिवसापासून करतात. या व्रतात उमाशंकरपूजेचे विधान आहे. [ हि. ध. ]

**अर्घ्यदान** 'अर्घार्थमुदकम्'= अर्घ म्हणजे पूजा, तिच्यासाठी जल (विग्रह कोश). संध्येतला व व्रतातला एक विधी. हा षोडशोपचार पूजेतला चौथा उपचार आहे. अर्घ्याची व्याख्या याज्ञवल्क्य पुढीलप्रमाणे सांगतो – 'दूर्वासर्षपपुष्पाणां दत्वार्घं पूर्णमञ्जलिम्' = देव, पितर व वंदनीय व्यक्ती यांस दूर्वा, मोहऱ्या व फुले यांसह ओंजळभर उदक देणे. संध्येत ओंजळभर उदक घेऊन सूर्याभिमुख उभे राहतात व व्याहृतिपूर्वक गायत्रीमंत्र म्हणून ती ओंजळ त्रिवार पाण्यात सोडतात. निरनिराळ्या व्रतांत आणि स्नानविधींत त्या त्या देवतांना उद्देशून अर्घ्यदान करायचे असते. व्रताचे अर्घ्य कुशाग्रे, अक्षता, तिल, व्रीही, यव, माष, प्रियंगू व सिद्धार्क या द्रव्यांनी युक्त असावे (पारिजात) किंवा गंध, पुष्प, अक्षता, यव, कुशाग्र, तिल, सर्षप (मोहऱ्या) व दूर्वा यांनी युक्त असावे (व्रतराज). प्राचीन काळी अर्घ्य हा आतिथ्याचा भाग होता. पाहा – संध्या, देवपूजा.

**अर्घ्यपात्र** पूजाविधानातले एक पात्र. हे पानांचे किंवा समुद्रात उत्पन्न होणाऱ्या शंखशिंपल्याचे करावे, असे पृथ्वीचन्द्रोदय या ग्रंथात सांगितले आहे. ते सोने, रुपे किंवा तांबे यांचे करावे, असे हेमाद्री सांगतो. [ निर्णयसिंधु ]

**अर्चत हैरण्यस्तूप** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे एकोणपन्नास क्रमांकाचे सूक्त याच्या नावावर आहे. सवितृदेवाची स्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. याची एक ऋचा अशी (१०.१४९.४) –

**गाव इव ग्रामं यूयुधिरिवाश्वान् वाश्रेव वत्सं सुमनां दुहाना। पतिरिव जायामभि नो न्येतु धर्ता दिवः सविता विश्ववारः ॥**

अर्थ – द्युलोकाचा आधार आणि सर्ववंद्य सवितादेव आमच्याकडे गृहगामी आणि वत्सगामी धेनूसदृश, अश्वगामी योद्धयांसदृश, अथवा पत्नीगामी पतीसदृश द्रुतगतीने येवो.

अर्चत ऋषी आंगिरस कुळातला असून, त्याचे स्वतःचे नाव या सूक्तात आढळते. याने सृष्टीच्या उत्पत्तीविषयीं पुढील प्रक्रिया सांगितली आहे – जगत्प्रेरक सवित्याने ज्या पोकळीत तारकांच्या समुद्राला स्थिर केले, तिथेच तो उचंबळून गेला. या पोकळीतच भूमी उत्पन्न झाली. तिथूनच रजोलोक निघाला आणि त्याच आकाशात नक्षत्रे आणि पृथिवी यांचा विस्तार झाला. त्याच्या मागून अमर विभूतींचा लोक व त्याच्या प्रभावाने यज्ञरूप पवित्र सामर्थ्य उत्पन्न झाले. या जगत्प्रेरक सवित्यापासूनच सुपर्ण प्रथम उत्पन्न झाला. तो सवित्याच्या अनुशीलनाप्रमाणे चालतो ( ऋ. १०. १४९). [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ. ]

**अर्चन** नवविधा भक्तीतील पाचवा प्रकार. गंधपुष्पादी साहित्य घेऊन किंवा ते घेतल्याचे कल्पून श्रद्धापूर्वक भगवंताची पूजा करणे, याला अर्चनभक्ती म्हणतात. प्रतिमा, स्थंडिल, अग्नी, सूर्य, जल, हृदय, गाय व ब्राह्मण ही पूजेची आठ अधिष्ठाने असून, त्यांतले पहिले मुख्य आहे. अधिष्ठानपरत्वे पूजेत फरकही सांगितलेला आहे.

समर्थ रामदासस्वामींनी मूर्तिपूजेव्यतिरिक्त देव, ब्राह्मण, साधुसंत, इत्यादींच्या पूजेचाही समावेश अर्चनभक्तीत केला आहे. पाहा – भक्ती, देवपूजा. [ रा. स. रा. ]

**अर्चनानस आत्रेय** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील ६३ व ६४ ही दोन सूक्ते याच्या नावावर आढळतात. शिवाय आठव्या मंडलातील बेचाळीसावे सूक्त हे याच्या व नाभाक काण्व या उभयतांच्या नावावर आहे. त्रेसष्ट व चौसष्ट या दोन्ही सूक्तांचा विषय मित्रावरुणस्तुती असा आहे. याची एक ऋचा अशी–(५. ६३. २)

**सम्राजावस्य भुवनस्य राजथो मित्रावरुणा विदथे स्वर्दृशा। वृष्टिं वां राधो अमृतत्वमीमहे द्यावापृथिवी वि चरन्ति तन्यवः ॥**

अर्थ – स्वकिरणांनी द्यावापृथ्वीमध्ये संचार करणाऱ्या हे यज्ञसम्राट, आणि जगदीश्वर मित्रावरुणांनो, तुम्ही आम्हांस पर्जन्यसमृद्धी आणि अमरत्वाचे वरदान द्या.

'ईश्वर हा प्रिय आणि सुखमय असून, तो कोणाचाही घात करीत नाही; तेव्हा आपण त्याच्या सेवेला लागावे' असा विचार याने मांडला आहे (ऋ. ५. ६४. ३.). वैदिक ऋषींचे अधूनमधून प्रकट होणारे असे विचार पुढील भक्तिमार्गाचे बीजारोपण कर-

तात. हा ऋषी श्वावाश्वाचा पिता असून मित्रावरुणांनी याला अनेक प्रकारे मदत केली आहे. (ऋ. ५. ६४. ७). [ ऋ. म. भा.; प्रा. च. को. ]

**अर्जुन** तिसरा पांडव. हा कुंतीला दुर्वासाच्या वरामुळे इंद्रापासून झालेला पुत्र होय (म. भा. आदि. १२२. ३५). अर्जुन अलौकिक पराक्रमी, नीतिज्ञ व महामना होता. त्याचा जन्म होताच आकाशवाणीने, त्याच्या सर्व भावी पराक्रमाचे सूचक घडविले होते (म. भा. आदि. १२२. ३६–४८). उत्तरा फल्गुनीसह पूर्वा फल्गुनी नक्षत्रावर त्याचा जन्म झाला, म्हणून त्याला फाल्गुन हे नाव मिळाले (म. भा. विराट. ४४. १६).

पांडवांचा जन्म हिमालयाच्या शतशृंग नावाच्या भागात झाला. त्यांचे उपनयनादी संस्कार पांडूच्या मृत्यूनंतर हस्तिनापुरात झाले (म. भा. आदि. १२७. १४).

महाभारतकारांनी अर्जुन व श्रीकृष्ण हे नर-नारायणाचे अवतार आहेत, असे सांगितले आहे.

एष नारायणः कृष्णः फाल्गुनश्च नरः स्मृतः ।
नारायणो नरश्चैव सत्त्वमेकं द्विधा कृतम् ।।
(म. भा. उद्योग. ४९. २०)

अर्थ – श्रीकृष्ण हा नारायणाचा अवतार असून, अर्जुन हा नराचा अवतार आहे. नर व नारायण यांचे सत्त्व एकच आहे; पण ते दोन स्वरूपांत अवतीर्ण झाले आहे.

व्यासांनी अर्जुनाच्या व्यक्तिमत्त्वाचे सर्व पैलू चित्रसेन गंधर्वाच्या मुखाने स्पष्ट केले आहेत. ते म्हणतात–

यस्तु देवमनुष्येषु प्रख्यातः सहजैर्गुणैः ।
श्रिया शीलेन रूपेण व्रतेन च दमेन च ।
प्रख्यातो बलवीर्येण सम्मतः प्रतिभानवान् ।।
वर्चस्वी तेजसा युक्तः क्षमावान् वीतमत्सरः ।
साङ्गोपनिषदान् वेदांश्चतुराख्यानपञ्चमान् ।।
योऽधीते गुरुशुश्रूषां मेधां चाष्टगुणाश्रयाम् ।
ब्रह्मचर्येण दाक्ष्येण प्रसवैर्वयसापि च ।।
(म. भा. वन. ४५. ७–१२)

अर्थ – जो देव आणि मनुष्य यांच्यामध्ये आपल्या स्वाभाविक गुणांनी प्रसिद्ध आहे; श्री, शील, रूप, व्रत, दम, बल, वीर्य, प्रतिभा इत्यादिकांनी युक्त असणारा, ज्याच्या शरीरावर विद्या, ऐश्वर्य यांचे तेज झळकते, अतिशय शूर, क्षमाशील, मत्सररहित, सांगवेद व उपनिषदे, इतिहास व पुराण-वाङ्मय यांचे गुरूजवळ अध्ययन करून, ज्याने ज्ञान प्राप्त करून घेतले आहे असा, गुरूची सेवा करणारा, बुद्धिमत्तेचे सर्व गुण असलेला, ब्रह्मचर्य, सदैव सावधानता, तत्परता व इतर अनेक गुणांचे आश्रयस्थान असणारा असा हा अर्जुन आहे.

अर्जुन हा एक आदर्श विद्यार्थी होता. द्रोणाचार्यांचे त्याच्यावर पुत्रवत् प्रेम होते. एकदा अर्जुन रात्रीच्या अंधारात लक्ष्यवेधाचा अभ्यास करीत होता. ते पाहून द्रोणाचार्यांना प्रेमाचे भरते आले. ते अर्जुनाला म्हणाले, 'हे अर्जुन ! मी सत्यप्रतिज्ञा करतो की, या जगात तुझ्यासारखा दुसरा कोणीही धनुर्धर होणार नाही. त्यासाठी मी सर्व प्रयत्न करीन' (म. भा. आदि. १३१. २७). विद्यार्थी म्हणून अर्जुनाची अभ्यासातली एकाग्रता वाखाणण्यासारखी होती. त्याची परीक्षा घेण्यासाठी आचार्यांनी एका कारागिराकडून एक कृत्रिम भास (गिधाड) तयार करून तो झाडाच्या टोकावर ठेवला. इतर विद्यार्थ्यांची परीक्षा संपल्यावर त्यांनी अर्जुनाला विचारले, 'अर्जुना ! तुला झाड, भास आणि मी हे सर्व दिसते काय ?' त्यावर अर्जुन उत्तरला, 'मला फक्त पक्ष्याचा गळा दिसतो आहे. वृक्ष किंवा तुम्ही यांपैकी काही दिसत नाही' (म. भा. आदि. १३२. ४–५). कठीण प्रसंगातही अर्जुन न डगमगणारा होता. एकदा त्याने आचार्यांना दुखापत न होऊ देता मगरीला ठार मारले आणि आचार्यांना मुक्त केले.

पार्थाची गुरुभक्ती अलौकिक होती. द्रुपदराजाला पराभूत करून आचार्यांच्या समोर त्याला उभे करण्यात त्याची गुरुभक्तीच प्रतीत होते. अश्वत्थामा मारला गेला या कल्पनेने आचार्य शस्त्रे टाकून, समाधी लावून बसले होते. धृष्टद्युम्न त्यांचा शिरच्छेद करायला धावला. त्या वेळी अर्जुन ओरडून म्हणाला–' हे धृष्टद्युम्ना ! आचार्यांना मारू नकोस, जिवंत पकडून आण' (म. भा. द्रोण. १९२. ६५–६६).

परंतु द्रोणवध झाल्यावर अर्जुनाची गुरुभक्ती उफाळून आली. तो धर्मराजाला म्हणाला. 'तुम्ही अत्यंत क्रौर्याने माझ्या गुरूला ठार केले. तुम्ही धर्मज्ञ असूनही हा भयंकर अधर्म केलात. वालीच्या वधामुळे रामाची अपकीर्ती जशी त्रैलोक्यात चिरकाल राहिली, तशी आचार्यांना मारून तुमचीही अपकीर्ती कायम राहील. मी राज्यलोभाने आचार्यांचा वध होत असताना, त्या घटनेची उपेक्षा केली. तेव्हा खाली डोके वर पाय अशा स्थितीत मी नरकात जाणार आहे, (म. भा. द्रोण. १९६).

अर्जुन चारित्र्यसंपन्न होता. त्याच्या चारित्र्याची ग्वाही देणारे दोन प्रसंग महाभारतात आढळतात. देवांच्याकडून दिव्य अस्त्रांचे ज्ञान मिळविण्यासाठी तो देवलोकात राहिला होता. त्या वेळी इंद्राच्या इच्छेने उर्वशी नावाची अप्सरा त्याच्याकडे आली. तिला पाहाताच अर्जुन लज्जेने संकोचून म्हणाला, "ज्याप्रमाणे कुंती, माद्री व शची या मला माता म्हणून वंद्य आहेत, त्याप्रमाणे तूही पुरुवंशाची जननी असल्यामुळे, माता म्हणून मला वंद्य आहेस. तू मुलाप्रमाणे माझे संरक्षण करायला पाहिजे' (म. भा. वन. ४६.

४५–४७). हा पहिला प्रसंग होय. आणि दुसरा प्रसंग असा –

विराटाच्या दरबारी अर्जुन उत्तरेला नृत्यगायन शिकवीत होता. पांडवांचा अज्ञातवास संपल्यावर, हा अर्जुन आहे, हे समजल्यावर विराटाने आपली कन्या उत्तरा त्याला पत्नी म्हणून देऊ केली. पण अर्जुनाने तिचा पत्नी म्हणून स्वीकार करण्याऐवजी सून म्हणून स्वीकार केला (म. भा. विराट. ७२). यावरून अर्जुनाची शीलसंपन्नता ध्यानी येते.

अर्जुन जसा शीलवान होता तसा तो मनाचाही मोठा होता. भारतीय युद्ध संपल्यावर धृतराष्ट्र निरुपायाने पांडवांच्या आश्रयाला आला. त्याने श्राद्धासाठी पांडवांना धन मागितले; पण भीमाने धन द्यायला विरोध केला. अर्जुनाने उदार अंतःकरणाने धन द्यावे असे सुचविले. अर्जुनाचे हे वागणे म्हणजे सौजन्याचा एक आदर्श आहे, असेच वाटते.

अर्जुन शालीन असला तरी दूरदर्शी होता. युद्धासाठी श्रीकृष्णाकडे मदत मागायला तो गेला असता, श्रीकृष्णाने त्याला म्हटले एका बाजूला युद्ध न करणारा मी आणि दुसऱ्या बाजूला अफाट यादव सैन्य, असे मी दोन विभाग करतो. यातला तुला हवा तो घे. उरलेला दुर्योधन घेईल. त्या वेळी अर्जुनाने केवळ श्रीकृष्णाचा स्वीकार करून आपला चाणाक्षपणा सिद्ध केला. जिकडे कृष्ण तिकडे विजय याची त्याला खात्री होती. मनावरचा विलक्षण संयम हा त्याच्या दूरदृष्टीचाच परिपाक आहे. दुःशासन द्रौपदीचे केस धरून तिला ओढीत आहे हे पाहून भीम धर्मराजाचे हात जाळायला निघाला. त्या वेळी अर्जुन त्याला म्हणाला–'तू पूर्वी असा कधी वागला नाहीस. शत्रूने तुझी धर्मबुद्धी भ्रष्ट केली आहे तेव्हा त्यांची इच्छा सफल होईल, असे तू काही करू नको' (म. भा. सभा. ६८. ७–८).

अर्जुनाचा पराक्रम सर्वज्ञात आहे. त्याला अर्जुन, फाल्गुन, जिष्णू, किरीटी, श्वेतवाहन, बीभत्सू, विजय, कृष्ण, सव्यसाची व धनंजय अशी दहा नावे होती. त्यातील सात नावे त्याला त्याच्या पराक्रमाने मिळालेली आहेत (म. भा. विराट ४४. १३–२२). किरातवेषधारी शिवाचे आणि त्याचे युद्ध हे त्याच्या पराक्रमाचे एक मूर्तिमंत उदाहरण आहे. शिवाने त्याच्या धैर्याचे गुणगान गाताना म्हटले आहे–

भो भो फाल्गुन तुष्टोऽस्मि कर्मणाप्रतिमेन ते ।
शौर्येणानेन धृत्या च क्षत्रियो नास्ति ते समः ।।
समं तेजश्च वीर्यं च ममाद्य तव चानघ ।
प्रीतस्तेऽहं महाबाहो पश्य मां भरतर्षभ ।।

(म. भा. वन. ३९. ६८–६९).

अर्थ – हे अर्जुना ! तुझ्या या अनुपम पराक्रमावर, शौर्यावर आणि धैर्यावर मी प्रसन्न आहे. तुझ्यासारखा दुसरा क्षत्रिय नाही. तुझे तेज आणि शौर्य माझ्यासारखेच आहे. मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे. तू मला पाहा.

कर्ण व अर्जुन यांची तुलना करताना कृपाचार्यांनी अर्जुनाचे अनेक पराक्रम अहंकारी कर्णाला सांगितले आहेत. ते म्हणतात– एकट्या अर्जुनाने उत्तर-कुरू देशावर चढाई करून त्याला जिंकले. त्याने एकट्याने खांडववन अग्नीला दिले. त्याने पाच वर्षे कठोर तप करून ब्रह्मचर्याचे पालन केले. एकट्यानेच सुभद्राहरण करून द्वंद्वयुद्धात श्रीकृष्णाला आव्हान केले. किरातरूपी शंकराशी युद्ध केले. एकट्यानेच जयद्रथाच्या हातून द्रौपदीला मुक्त केले. त्याने एकट्यानेच पाच वर्षे स्वर्गात राहून इंद्राकडून अस्त्रे प्राप्त करून घेतली. अजिंक्य अशा चित्रसेन गंधर्वाला त्याने एकट्यानेच जिंकले. देवांनाही अवध्य असणाऱ्या कालखंज व निवातकवच या दानवांना त्याने एकट्यानेच मारले (म. भा. विराट. ४९).

याशिवाय त्याचे अंगारपर्ण नामक गंधर्वाशी झालेले युद्ध, जयद्रथवध हे त्याच्या पराक्रमाचे उत्तम दाखले आहेत. अर्जुनाच्या पराक्रमाचा प्रभाव भीष्माचार्य, द्रोणाचार्य, कृपाचार्य यांनी मंजूर केलेला आहे. श्रीकृष्णाने म्हटले आहे, स्वबलाने अर्जुनाला जिंकू शकणारा शिवावाचून दुसरा कोणी नाही (म. भा. आदि. २२१. ८).

एकंदरीत अर्जुन म्हणजे अस्त्रज्ञान, युद्धकौशल्य, आत्मविश्वास, सद्गुण यांचा आदर्श होता. कै. म. म. बाळशास्त्री हरिदास म्हणतात, "पांडव हे तर श्रीकृष्णाच्या धर्मसंस्थापनेच्या कार्याचे साधनयंत्र आहेतच ! पण अर्जुन हा त्यातील सर्वांत महत्त्वाचा भाग होय."

हा सव्यसाची धनुर्धर होता. याने आपल्या आयुष्यात अनेक महान पराक्रम केले. याला अग्नीपासून गांडीव धनुष्य, दोन अक्षय्य भाते व कपिध्वज रथ, मयासुराकडून देवदत्त नावाचा महाशंख, इंद्राकडून कवचकुंडले व शिवाकडून पाशुपतास्त्र मिळाले. राजसूय यज्ञाच्या प्रसंगी याने पूर्वेचा दिग्विजय केला. भारतीय युद्धात कर्णाला यानेच मारले.

श्रीकृष्णाशी याची सख्यभक्ती होती. युद्धारंभी हा मोहग्रस्त झाला असता श्रीकृष्णाने याला गीता उपदेशिली. वयाच्या १०६ व्या वर्षी पांडवांच्या महाप्रस्थानात हा हिमालयावर मृत्युमुखी पडला. याला द्रौपदीपासून श्रुतकीर्ती, सुभद्रेपासून अभिमन्यू, चित्रांगदेपासून बभ्रुवाहन व उलूपीपासून इरावान असे पुत्र झाले. पाहा – महाभारत. [ प्रा. च. को.; म. भा. व्या. ]

**अर्जुनदेव** (इ. स. १५६१–१६०६) शिखांचा पाचवा गुरू. हा गुरू रामदास याचा पुत्र. रामदासानंतर इ. स. १५८१ मध्ये हा गुरुपदावर आला. हा प्रतिभावंत कवी, तत्त्वज्ञ, संघटक व मुत्सद्दी होता. सत्प्रवृत्ती व सदाचार यामुळे याला

गुरुपद मिळाले. याने प्रथम शिखांसाठी प्रमाणभूत धर्मग्रंथ निर्माण करण्याचे काम हाती घेतले. तोपर्यंत गुरू नानकांचे चरित्र आणि काव्य एवढीच ग्रंथसाहित्याची व्याप्ती होती. अर्जुनदेवाने अत्यंत परिश्रम करून पूर्वीच्या गुरूंची वचने एकत्र केली आणि स्वतःच्या पदांची भर घालून आदिग्रंथ किंवा ग्रंथसाहिब विस्तृत केला. या ग्रंथामुळे शिखांमध्ये नवा आत्मविश्वास निर्माण झाला. त्यांची धार्मिक भावना या ग्रंथावर केंद्रित झाल्यामुळे त्यांचे संघटन झाले.

अर्जुनदेवाने अमृतसर या नगराची रचना पूर्ण केली आणि तरणतारण, कर्तारपूर, इ. नवीन नगरे वसवली. तसेच अमृतसर येथे त्याने सुवर्णमंदिर बांधून, शीख समाजासाठी एक पवित्र तीर्थक्षेत्र निर्माण केले. हे स्थान त्यांच्या कार्याचे केंद्र बनले.

अर्जुनदेवाने निर्माण केलेला ग्रंथसाहिब हा ग्रंथ कुराणाप्रमाणे शीख समाजाला मार्गदर्शक ठरला आणि धर्मगुरू हा शिखांचा शासक बनला. त्याच्या मठाला राजदरबाराचे स्वरूप प्राप्त झालें.

प्रत्येक शीख व्यक्तीने गुरूला दक्षिणा म्हणून आपल्या प्राप्तीचा दहावा भाग द्यावा, असा दंडक अर्जुनदेवाने घातला. ते द्रव्य जमा करण्यासाठी त्याने आपले प्रतिनिधी नेमले, त्यांना मसंद म्हणत. त्याने व्यापार व उद्योग यांतही शीख समाजाला प्रोत्साहन दिले.

शीख समाजाला आत्मसंरक्षणासाठी समर्थ बनवणे, ही अर्जुनदेवाची सर्वांत श्रेष्ठ कामगिरी होय. त्याने शिखांतले साहस, उत्साह, स्वाभिमान, इ. सद्‌गुण वाढीस लावले. पराक्रमी जाट लोकांना त्याने शीख पंथात प्रवेश दिल्यामुळे,शीख समाजात लढाऊ वृत्ती वाढू लागली. गुरू नानकापासून चालत आलेल्या धर्मसभेला त्याने कायदेमंडळाचे स्वरूप दिले. अर्जुनदेवाने जपमाळेऐवजी तलवार हाती धरली. त्याने आपली धर्मसंस्था वैभवसंपन्न केली; पण तो मात्र स्वतः अत्यंत साधा राहिला.

अर्जुनदेवाच्या या संस्थेला मोगल दरबारीही महत्त्व प्राप्त झाले. त्याच्याजवळचे द्रव्य आणि सैन्य या गोष्टी त्याला कारण होत्या.

त्यानंतर एके दिवशी चंदूलाल नावाचा मोगलांचा दिवाण अर्जुनदेवाकडे आला. अर्जुनदेवाचा पुत्र हरगोविंद याला आपली कन्या देण्याच्या हेतूने तो तिथे गेला होता; पण ‘ माझी मुलगी सून करून घ्या, ’ असे सांगताना तो अशी काही अरेरावीची भाषा बोलला, की अर्जुनदेवाने त्याची सोयरीक नाकारली. त्यामुळे चंदुलालचे पित्त खवळले. लगोलग दिल्लीस जाऊन त्याने अकबराकडे अर्जुनदेवाबद्दल खोटेनाटे सांगितले. तो म्हणाला –

“ अर्जुनदेव मोगलांचे साम्राज्य उच्छेदून शीखराज्य स्थापू इच्छितो. त्याच्या आदिग्रंथात महंमदी धर्माची निंदा आहे. ”

अकबराने ते ऐकले; पण चंदुलालवर त्याचा विश्वास बसला नाही. त्याने तो ग्रंथ अर्जुनदेवाकडून मागून घेतला आणि बारकाईने वाचला; पण त्याला त्यात कुराण किंवा इस्लाम यांची निंदा कुठेच आढळली नाही. अकबराने आदरपूर्वक तो ग्रंथ अर्जुनदेवाकडे परत पाठविला. त्यामुळे चंदुलालला हात चोळीत स्वस्थ बसावे लागले.

अकबरानंतर जहांगीर गादीवर आला. त्याच्या कारकीर्दीत मात्र चंदुलालने आपला सूड उगवून घेतला. जहांगिराचा पुत्र खुस्रव याने बापाविरुद्ध बंड केले. त्यात त्याचा पराजय झाला. तो आश्रयासाठी अर्जुनदेवाकडे गेला व अर्जुनदेवाने क्षात्रधर्म म्हणून त्या शरणागताला आश्रय दिला. चंदुलालला तेवढे कारण पुरेसे वाटले. त्याने अर्जुनदेवावर राजद्रोहाचा आरोप ठेवून जहांगिराकडून त्याला पकडण्याचा हुकूम मिळविला. त्याने



गुरू अर्जुनदेव

अमृतसरला जाऊन अर्जुनदेवाला कैद केले व जहांगिरापुढे आणून उभे केले. जहांगिराने त्याला कारागृहात पाठविले व चंदुलालला त्याच्यावर अधिकारी म्हणून नेमले. चंदुलालने त्याला म्हटले, की ‘ माझी मुलगी सून करून घेत असशील, तर अजूनही मी तुझे प्राण वाचवीन. ’ पण अर्जुनदेवाने त्या गोष्टीला स्पष्ट नकार दिला. चंदूलाल त्यामुळे अधिकच खवळला व त्याने अर्जुनदेवाला हालहाल करून ठार मारले.

अर्जुनदेवाचा अंत झाला आणि तेव्हापासून शीख व मोगल

यांच्यात संघर्षाची ठिणगी पेटली. शिखांच्या दमनासाठी मोगलांनी नाना प्रकारचे अघोरी उपाय योजले. शिखांनी त्या सर्व संकटांना धैर्याने तोंड दिले. शिखांच्या इतिहासाला त्यामुळे निराळे वळण लागले. अर्जुनदेवाच्या काळापर्यंत शिखांचा पंथ हा केवळ धार्मिक पंथ होता. पण तोच पुढे मुसलमानांचा कट्टा द्वेष्टा व रणगाजी असा एक राजकीय पंथ म्हणून संघटित झाला. पाहा – शीखपंथ. [ उ. भा. सं. प.; शि. इ. ]

**अर्जुनायन** प्राचीन लोक व देश. यांना प्रार्जुन असेही म्हणत. प्रयाग येथील एका स्तंभावर समुद्रगुप्ताने जिंकलेल्या जमातींची जी नावे आहेत, त्यांत या लोकांचा उल्लेख आहे. समुद्रगुप्ताच्या राज्याच्या पश्चिम भागात हे लोक स्थायिक झाले होते, असे दिसते. या जमातीच्या दोन्ही नावांत अर्जुन शब्द येतो. यौधेय नावाचा युधिष्ठिराचा एक पुत्र होता. त्याच्याशी यौधेय जमातीचा संबंध जोडता येणे शक्य आहे.

सनपूर्व २०० ते इ. स. ४०० या कालावधीत दिल्ली-आग्रा-जयपूर या प्रदेशांत अर्जुनायनांचे गणराज्य होते. त्यांची नाणी मथुरेजवळ सापडली आहेत. ती दोनतीन प्रकारची आहेत. काही नाण्यांवर ‘अर्जुनायनानां जय:’ हे शब्द आहेत. त्यांच्या अक्षरवाटिकेवरून ही नाणी सनपूर्व दुसऱ्या शतकातली असावीत, असे वाटते. काही नाण्यांवर दर्शनी भागी बैलाचे चित्र असून, मागील भागी स्त्रीची आकृती आहे; ती लक्ष्मी असावी. [ ट्रा. ए. इं.; प्रा. भा. शा. प.; प्रा. भा. ना. शा. ]

**अर्थवाद** ‘अर्थस्य प्रयोजनस्य वादो वादनम्। विध्यर्थप्रशंसापरं वचनम्’ अर्थ = प्रयोजन, त्यासंबंधी बोलणे, म्हणजेच विध्यर्थाचे प्रशंसापर वचन म्हणजे अर्थवाद होय (न्यायकोश). हा पूर्वमीमांसेतला पारिभाषिक शब्द आहे. ‘मंत्र-ब्राह्मणयोर्वेदनामधेयम्’ = वेदामध्ये मंत्र आणि ब्राह्मण असे दोन भाग असतात (आप. श्रौ. सू. २४.१). मंत्रांत देवतांची अथवा कर्माची स्तुती असते व ते मंत्र निरनिराळ्या अनुष्ठानाच्या वेळी म्हणायचे असतात. क्रियमाण कर्मासंबंधीचा अर्थ त्या मंत्रामध्ये आलेला असतो. मंत्रभागामध्ये काही छंदोबद्ध मंत्र असतात. त्यांना ऋक् म्हणतात. आणि गद्यस्वरूप मंत्रांना यजुस् म्हणतात. मंत्रभाग वगळून वेदाचा जो भाग शिल्लक राहतो, त्याला ब्राह्मण असे म्हटले आहे. विधी, निषेध, नामधेय आणि अर्थवाद असे ब्राह्मणाचे चार विभाग शास्त्रकारांनी कल्पिले आहेत. त्यामुळे मंत्र आणि ब्राह्मण मिळून वेदाचे पाच भाग होतात.

विशिष्ट मंत्र म्हणून विशिष्ट कर्म करावे, त्याचप्रमाणे अमुक याग केल्याने अमुक फल मिळते, अशा प्रकारे ज्या वाक्यात कर्माची प्रेरणा असते, किंवा ज्या वाक्यात एखादे विधान केलेले असते, अशा वाक्यांना विधी म्हणतात. ‘अग्निहोत्रं जुहुयात् स्वर्गकाम:’ = स्वर्गाची कामना असेल त्याने अग्निहोत्रहोम करावा, यासारखे अनेक विधी ब्राह्मणग्रंथांमध्ये येतात. एखादी गोष्ट करू नये, असा निषेध ज्या वाक्यामध्ये केलेला असतो, त्याला निषेध म्हणतात. उदा० ‘नोपर्यासीत, न मांसमश्नीयात्’। इ. ब्राह्मणभाग म्हणजे निषेध होय. दर्शपूर्णमास, अग्निहोत्र, ज्योतिष्टोम, इ. शब्दांना नामधेय म्हणतात. अनेक अंगे असलेल्या एका यागाच्या नावास नामधेय म्हटले आहे. विधी, निषेध व नामधेय वगळून उरलेल्या ब्राह्मणभागास अर्थवाद म्हणतात.

निरनिराळ्या ब्राह्मण ग्रंथांमध्ये खूप मोठा भाग अर्थवादाचाच आहे. अर्थवादामध्ये अनेक कथा सांगितलेल्या असतात. एखादा विधी सांगितला, की त्या विधीने सांगितलेले कर्म करावे, अशी प्रेरणा मिळते. परंतु ‘ते कर्म का करायचे? ते कर्म केल्याने काय होते? त्या कर्माचे माहात्म्य काय? तेच कर्म करणे का चांगले?’ इ. अनेक प्रश्न उत्पन्न होतात. या सर्व प्रश्नांची उत्तरे देण्यासाठीच अर्थवादाची आवश्यकता मानलेली आहे. कोणत्याही कर्माची निरनिराळ्या दृष्टीने स्तुती करायची, हे अर्थवादाचे मुख्य प्रयोजन होय. ‘अग्निहोत्रं जुहुयात्’ =अग्निहोत्रहोम करावा एवढे सांगून कोणी अग्निहोत्र घेऊन होम करण्यास प्रवृत्त होणार नाही तर, अग्निहोत्रहोम केल्यामुळे काय होते? त्याचे माहात्म्य काय? पूर्वी त्यासंबंधी काय काय घडले? अग्निहोत्रहोम केल्यामुळे कोणाला कसा स्वर्ग मिळाला? हे सर्व सांगितल्यावरच अग्निहोत्रहोम करण्याची प्रवृत्ती होऊ शकेल.

त्याचप्रमाणे एखादी गोष्ट करू नये, एवढे सांगून ते न करण्याची प्रवृत्ती होणार नाही, तर ती गोष्ट करण्यामुळे काय वाईट होते ते सांगावे लागते. अर्थवादामध्ये ते सांगितलेले असते. अकरणीय गोष्टीची निंदा करून ती गोष्ट सर्वथा त्याज्य मानावी हेच सांगण्याचा त्या ठिकाणी उद्देश असतो. तेव्हा एखाद्या विधीची स्तुती किंवा निषेधाची निंदा ज्या वाक्यामध्ये अथवा भागामध्ये केलेली असते, तो अर्थवाद अशी आणखी एक व्याख्या उपलब्ध होते – ‘स्तुतिनिन्दान्यतरद् वाक्यम् अर्थवाद:’= स्तुती किंवा निंदा यांपैकी एखाद्या गोष्टीसंबंधी जे वाक्य तो अर्थवाद होय. निषेधवाक्यांनी एखाद्या गोष्टीची निंदा केलेली असली, तरी तिचा उद्देश निंदा करणे हा नसून जे विहित ते करावे, असे सांगण्याचा असतो. याला मीमांसाशास्त्रात ‘नहि निन्दान्याय’ म्हणतात. (‘न हि निन्दा निन्द्यं निन्दितुं प्रवर्तते अपि तु विधेयं स्तोतुम्।’ तंत्रवार्तिक. जै. सू. २. ४. २१. वरील भाष्य).

अर्थवादाचे स्तुती, निंदा, परकृती व पुराकल्प असे चार भेद

आहेत. (गो. न्यायदर्शन २. १. ६४). याशिवाय गुणवाद, अनुवाद आणि भूतार्थवाद असेही तीन प्रकार मानलेले आहेत.

> विरोधे गुणवादः स्यादनुवादोऽवधारिते ।
> भूतार्थवादस्तद्धानादर्थवादस्त्रिधा मतः ।।
> (तन्त्रवार्तिक १. २.)

याचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे – प्रत्यक्ष, अनुमान, इ. प्रमाणांशी ज्यांचा विरोध दिसतो, अशा अर्थवादवाक्यांना गुणवाद म्हणतात. अशा वाक्यांचा अर्थ लक्षणेने निराळा घेऊन मगच त्यांची एकवाक्यता करायची असते. 'यजमानो यूपः'=यजमान हा यूप आहे, 'आपो वै दर्भाः'=आपः हे दर्भ आहेत, 'अग्निः पशुः'=अग्नी हा पशू होय, अशी अनेक अर्थवाद – वाक्ये ब्राह्मणग्रंथात येतात. त्यांचा अर्थ लक्षणेनेच घ्यावा लागतो. 'धूम एवाग्नेर्दिवा ददृशे' =अग्नीचा धूरच दिवसा दिसतो, हे वाक्य घ्या. केवळ धूर नव्हे; तर प्रत्यक्ष अग्नीही दिवसा दिसू शकतो. त्यामुळे वरील वाक्याचा अभिधाशक्तीने अर्थ केला तर ते वाक्य विरोधी ठरते. अग्नी आणि सूर्य यांना आहुती देण्याचे विधान ज्या वाक्यात केले आहे, त्या वाक्याची स्तुती करताना अग्नी आणि सूर्य यांचे परस्परावलंबित्व सांगितलेले आहे. दिवसा अग्नी आपले तेज सूर्याला देतो, म्हणून दिवसा केवळ धूरच दिसतो, अशी त्या वाक्यात अग्नीची स्तुती केलेली आहे. अशा प्रकारची अर्थवादवाक्ये गुणवाद या प्रकारात येतात व त्यांचा अर्थ लक्षणेनेच घ्यायचा असतो.

जी गोष्ट प्रत्यक्षादी प्रमाणांनी सिद्ध आहे, तीच पुन्हा सांगायची याला अनुवाद म्हणतात. 'अग्निर्हिमस्य भेषजम्' (तै. सं. ७. ४. १८)=(अग्नी हे थंडीवर औषध आहे,) ही गोष्ट प्रत्यक्ष अनुभवाने सिद्ध आहे. 'वायुर्वै क्षेपिष्ठा देवता' (=वायू ही जलद चालणारी देवता आहे) हे दुसरे वाक्य. वायू जलद वाहतो ही गोष्ट सिद्ध आहे. अर्थात वरील दोन्ही वाक्ये अनुवादरूप समजायची.

जी गोष्ट प्रत्यक्षादी प्रमाणांशी विरोधी नाही, तथापि जी आपणास माहीत नाही, परंतु ती खरी असणे शक्य आहे, अशी गोष्ट सांगणे याला भूतार्थवाद म्हणतात. एखादा विधी सांगितल्यावर ते कर्म करण्याची प्रवृत्ती व्हावी. यासाठी पूर्वीच्या तशा कर्मांच्या व कर्म करणाऱ्यांच्या अनेक कथा ब्राह्मणग्रंथांमधून ठिकठिकाणीं सांगितलेल्या असतात. या सर्व कथा भूतार्थवादाचीच उदाहरणे होत.

यांत देव आणि असुर यांचे युद्ध झाले आणि त्या प्रसंगी काय घडले, ते सांगितलेले असते. अशा बऱ्याच गोष्टी सांगितल्यानंतर 'य एवं विद्वान्...' = जो हे जाणतो त्याने हे करावे, अशा प्रकारची वाक्ये येतात. त्या सर्वांना भूतार्थवाद म्हणायचे.

अर्थवादाचे मीमांसाशास्त्राच्या अन्य ग्रंथांत अडतीस भेद केलेले आहेत (बालमीमांसाप्रकाश : पृ. ४८–५५). शास्त्रीय दृष्ट्या त्यांमध्ये अनेक भेद असले, तरी एखाद्या कर्मास प्रवृत्त करणे, हेच खरे अर्थवादाचे कार्य होय. 'प्ररोचनया तु प्रवर्तते द्वेषान्निवर्तते इति तयोर्विवक्षा' = (एखाद्या कर्माची आवड उत्पन्न केल्याने (कर्ता) प्रवृत्त होतो व त्याची निंदा केल्याने निवृत्त होतो म्हणून त्यांची विवक्षा,) असे शबरस्वामीने भाष्यात म्हटले आहे. अर्थवादवाक्यांची विधिवाक्यांशी एकवाक्यता करून त्यांचे प्रामाण्य जाणून घ्यायचे असते. त्यांचा स्वतंत्रपणे अर्थ करून प्रामाण्य दाखविता येणार नाही. शाबरभाष्यामध्ये अर्थवादाधिकरणात अर्थवादाचे प्रामाण्य सिद्ध केले आहे (१.२.१). मूळ विधानाची स्तुती करणे, हे अर्थवादाचे काम असल्यामुळे त्या अर्थी अर्थवाद अन्यत्रही योजतात. अर्थवादांना स्वातंत्र्याने अर्थ असतो; परंतु स्वतंत्रपणे तो अर्थ लक्षात घेतल्यास अनेक परस्परविरोधी आणि विचित्र अर्थ त्यातून निघू लागतील. म्हणून वेदांत आलेले अर्थवाद कोणत्या विधीच्या अनुरोधाने आले आहेत, हे पाहणे आवश्यक असते.

पूर्वमीमांसा हे दर्शन वेदांना अनादी, नित्य व अपौरुषेय मानते. त्यामुळे सर्व विरोधी वाक्यांचा समन्वय करण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. समस्त वेदवाक्यांचे मुख्य प्रयोजन मनुष्याला यज्ञकर्मासाठी प्रवृत्त करणे हे आहे, असा मीमांसकांचा सिद्धान्त आहे. त्यांच्या दृष्टीने वेदांतले ब्रह्म, ईश्वर, जीव, देवता, लोक, परलोक हे सर्व विषय केवळ अर्थवादरूपच आहेत. पण उत्तरमीमांसेत अनेक आचार्यांनी त्यांचे खंडन केले आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ].

**अर्थशास्त्र** एक दर्शन. 'अर्थ्यते इति अर्थः' (=ज्याची अपेक्षा केली जाते तो अर्थ होय.) जमीन, सुवर्ण, गुरेढोरे, धान्य, उपकरणे, योगक्षेम, इ. सर्वांना मिळून अर्थ अशी संज्ञा आहे. या सर्व गोष्टींचा विचार करणारे शास्त्र ते अर्थशास्त्र होय. यात मानवाच्या अर्थविषयक प्रयत्नांचे विवेचन येते. मनुष्याच्या आर्थिक प्रयत्नांच्या द्वारे विश्वात सुख व शांती निर्माण करणे म्हणजेच पर्यायाने विश्वकल्याण साधणे हा अर्थशास्त्राचा उद्देश आहे. म्हणूनच चतुर्विध पुरुषार्थांत अर्थ हा दुसरा पुरुषार्थ मानलेला आहे.

अर्थशास्त्र ही प्राचीन विद्या आहे. चार वेदांचे चार उपवेद आहेत, त्यांत एक अर्थवेदही असून, तो ऋग्वेदाचा उपवेद आहे. मात्र तो सांप्रत उपलब्ध नाही.

भारतीय अर्थशास्त्राचा उगम ब्रह्मदेवापासून झाला आहे, असे

म. भा. च्या शांतिपर्वांत सांगितले आहे (५९), ती कथा अशी—

एकदा सर्व देव ब्रह्मदेवाकडे गेले व त्यांनी त्याला मानवाच्या कल्याणाचा मार्ग विचारला. तेव्हा ब्रह्मदेवाने एक हजार अध्यायांचे त्रिवर्गशास्त्र (धर्म-अर्थ-काम) निर्माण करून ते उपदेशिले. या पैतामह अर्थशास्त्रात दंड व नीती यांचे अपूर्व विधान होते. ब्रह्माच्या या अर्थशास्त्राचा पुढे विशालाक्ष, स्कंद, इंद्र, पुलोमा, बृहस्पती, काव्य उशना, यांनी विस्तार केला.

याशिवाय नारद, बुध, सुधन्वा (बृहस्पतीचा बंधू), मरुत्त, तसेच स्वायंभुव, प्राचेतस व वैवस्वत हे तीन मनू, वसिष्ठ, भरद्वाज, गौरशीरा, पराशर, व्यास, भीष्म, कौणपदंत, द्रोण, भारद्वाज, उद्धव वातव्याधी, शांबव्य, शालंकायन, विष्णुगुप्त, असे अनेक अर्थशास्त्रज्ञ महाभारतादी ग्रंथांतून उल्लेखित आहेत.

प्राचीन भारतीय आचार्यांनी लोकांच्या व्यावहारिक जीवनाशी ज्या ज्या गोष्टींचा संबंध पोचतो, त्या त्या सर्वांचा उपदेश आणि शिक्षण अर्थशास्त्र या नावाने दिलेले आहे. अर्थशास्त्राची अत्यंत महत्त्वाची शाखा राजकारण ही होय. तिला नीतिशास्त्र असे स्वतंत्र नाव होते. म्हणूनच केव्हा केव्हा अर्थशास्त्र व नीतिशास्त्र ही नावे समानार्थक योजिली जात. प्राचीन भारतात राजसत्ताक पद्धतीशिवाय दुसऱ्याही काही शासनपद्धती अस्तित्वात होत्या; पण त्या अन्य पद्धतींचा विचार न करता भारतीय आचार्यांनी राजाधिष्ठित राजनीती, या दृष्टीनेच शासनशास्त्राचे विवेचन केले आहे.

अर्थशास्त्र हे स्वतंत्र शास्त्र म्हणून जन्माला येण्यापूर्वीही धर्मशास्त्राच्या अनुषंगानेच त्याचा विचार होत असे. आपस्तंब धर्मसूत्रांत अर्थशास्त्राच्या कक्षेतल्या विषयांचे विवेचन आले आहे; पण धर्म व अर्थ या दोन शास्त्रांत एक मूलभूत फरक आहे. धर्मशास्त्र हे श्रुतिस्मृतिप्रतिपादित कर्तव्ये शिकविते, तर अर्थशास्त्र हे नीति-धर्मनिरपेक्ष अशा भौतिक सिद्धीचे मार्ग दाखविते. अर्थशास्त्र हे वस्तुस्थितीला अनुसरणारे शास्त्र आहे.

महाभारताच्या काळात अर्थशास्त्र हे धर्मशास्त्रापासून विभक्त होऊन स्वतंत्रपणे आकार धरू लागले, असे अनुमानिता येते. त्या काळात राज्यकारभार व राजधर्म यांना महत्त्व प्राप्त झाले आणि त्यामुळे राजधर्माचा विचार अर्थशास्त्र या स्वतंत्र नावाने करण्याची गरज उत्पन्न झाली. तेव्हापासूनच राज्यशास्त्राचा विचार धर्मनिरपेक्ष होऊ लागला. त्यामुळे त्याला एक निराळीच दिशा मिळाली. त्याचा परिणाम असा झाला, की भारतीयांच्या ठिकाणी भूमी व लोक यांच्यावर आधिपत्य मिळविण्यासाठी व मिळालेले आधिपत्य टिकविण्यासाठी स्पर्धा सुरू झाली. या सत्तास्पर्धेत उपयोजिले जाणारे उपायही फारसे विशुद्ध राहिले नाहीत. भारतीय राज्यशास्त्राचा विचार करताना हे परिवर्तन लक्षात घ्यावे लागते व त्याचा सुगावा आपल्याला महाभारतातच मिळतो. कौरव-पांडवांच्या संघर्षात भीष्म, द्रोण, कर्ण हे अतिरथी, महारथी कौरवांच्या पक्षात होते. त्यांना युद्धात मारण्यासाठी पांडवांनी श्रीकृष्णाच्या अनुमतीने ज्या मार्गांचा अवलंब केला, त्यांना धर्मयुद्धात स्थान देता येणार नाही. आणि असे असूनही पांडवांना मिळालेला विजय हा तत्कालीन जनतेने धर्मविजय मानला. यावरून त्या काळी जुना राजधर्म व अर्थशास्त्रप्रणीत राजधर्म यांमध्ये दुसराच धर्म अधिक प्रभावी ठरू लागला होता, असे दिसून येते.

प्राचीन धर्मशास्त्र व हे नवे अर्थशास्त्र यांमधील फरक स्थूलमानाने पुढीलप्रमाणे सांगता येतो— धर्मशास्त्रात ध्येयसिद्धीसाठी वापरण्याची साधने शुद्ध असावी यावर भर होता; पण अर्थशास्त्रात या साधनशुचितेला स्थान उरले नाही. येनकेन प्रकारेण राजकीय उद्दिष्ट साध्य करण्यात यश मिळविले म्हणजे अर्थशास्त्राचा हेतू सफल झाला. त्यामुळेच अर्थशास्त्र हे अथर्ववेदाला जवळचे आहे, असे मानण्याची रूढी पडली. प्राचीन भारतातील राजकीय विचारांवर या अर्थशास्त्रीय विचारांचा मोठाच प्रभाव पडलेला आहे. पण कोणत्याही परिस्थितीत अर्थशास्त्राला धर्मशास्त्राचा लगाम असावा, असे प्रतिपादन करण्याचे प्रयत्न मात्र पुनः पुनः केलेले आढळतात. धर्मशास्त्र व अर्थशास्त्र यांच्यामध्ये विरोध निर्माण झाल्यास धर्मशास्त्रच प्रमाण मानावे अशी विचारसरणीही अनेकदा व्यक्त झाली आहे.

**अर्थशास्त्रात्तु बलवद्धर्मशास्त्रमिति स्थितिः ।**

(याज्ञ. २. २१)

अर्थ — अर्थशास्त्राहून धर्मशास्त्र बलवान (मानावे) असा नियम आहे.

**यत्र विप्रतिपत्तिः स्याद्धर्मशास्त्रार्थशास्त्रयोः ।**
**अर्थशास्त्रोक्तमुत्सृज्य धर्मशास्त्रोक्तमाचरेत् ।।**

(नारद १. ३९)

अर्थ — अर्थशास्त्र व धर्मशास्त्र यांत विरोध आल्यास अर्थशास्त्रात सांगितलेले टाकून धर्मशास्त्रात सांगितले असेल, ते आचरावे.

महाभारत व मनुस्मृती यांचा रचनाकाल सामान्यतः एकच मानला जातो. पण महाभारतातील राज्यशास्त्रविषयक विचार मनुस्मृतीतल्या विचारांपेक्षा अधिक उच्च दर्जाचे आहेत. शांतिपर्वातील 'राजधर्म' हे उपपर्व पूर्णपणे राज्यशास्त्रविषयक सिद्धान्त, राजनैतिक डावपेच व दैनंदिन राज्य कारभारातील बारकावे, यांनी भरलेले आहे. तत्पूर्वी निर्माण झालेल्या आणि विवेचिलेल्या राजकीय सिद्धान्तांचा समन्वय करण्याचे कार्य महाभारतकारांनी केले.

याज्ञवल्क्यस्मृती, कामंदकीय नीतिसार व शुक्रनीती हे तीन ग्रंथ राज्यशास्त्राचा विचार करणारे असून त्यांची रचना मनुस्मृती व महाभारत यांच्या नंतरची आहे. मौर्य राजवंशावर मनुस्मृतीचा प्रभाव होता; तर गुप्त घराण्यावर याज्ञवल्क्यस्मृतीचा होता. इ. स. च्या चौथ्या व पाचव्या शतकात भारताच्या सामाजिक व राजकीय क्षेत्रात कोणकोणते बदल झाले, ते याज्ञवल्क्यस्मृतीवरून कळून येते. गुप्त साम्राज्याचा कायदा याज्ञवल्क्यस्मृतीवरच आधारलेला आहे. गुप्तकालात व्यक्ती, जात आणि वर्ग यांचा विचार न करता राज्याचे कायदे सर्वांना सारख्याच पद्धतीने लागू करण्यात आले. तत्पूर्वी ब्राह्मणांना कायद्यात कित्येक सवलती होत्या, त्या या काळात काढून घेण्यात आल्या. शूद्रांच्या बाबतीतले कित्येक अन्याय्य निर्बंधही दूर करण्यात आले. याज्ञवल्क्यापूर्वीच्या स्मृतिकारांनी कायद्याचा धर्मनिरपेक्ष असा विचार केलेला नव्हता. याज्ञवल्क्यस्मृतीत तो प्रथमच केलेला आढळतो, हे त्या स्मृतीचे वैशिष्ट्य होय. फौजदारी कायद्यांपेक्षा दिवाणी कायद्यांचा विचार याज्ञवल्क्याने बारकाईने केला आहे.

कामंदकीय नीतिसारात कौटिल्याचेच सिद्धांत व नियम पुनश्च निराळ्या भाषेत मांडलेले आहेत. या ग्रंथात राज्यशास्त्रविषयक कोणताही नवा विचार आढळत नाही. मात्र या ग्रंथावरून एक गोष्ट दिसते, की कौटिल्यानंतर भारतात राजकारणाचा प्रपंच करणारे तोलामोलाचे असे ग्रंथकार निर्माण झालेच नाहीत.

शुक्रनीती या ग्रंथाचा काळ इ. स. चे आठवे शतक हा होय. कामंदकीय नीतिसाराप्रमाणेच हाही ग्रंथ संकलनात्मकच आहे. पण या ग्रंथांत मंत्रिमंडळाची घडण व व्यवस्था, तसेच परराष्ट्रीय संबंध व सैन्यविषयक धोरण, या विषयांचे विवेचन चांगल्या प्रकारे केलेले आहे.

शुक्रनीतीतले अर्थशास्त्रविषयक विचार पुढीलप्रमाणे आहेत—

नीतिशास्त्र हे जीवनाच्या प्रत्येक गोष्टीत उपयोगी पडणारे आणि त्यामुळे मानवी जीवनाला स्थैर्य प्राप्त करून देणारे शास्त्र आहे. धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थांचा नीतिशास्त्रात समावेश होतो. नीतिशास्त्राच्या अध्ययनाने मानवाला व्यवहारचातुर्य लाभते आणि त्याचे मनोरथ पूर्ण होतात. राजांनी या शास्त्राचे अध्ययन अवश्य केले पाहिजे. प्रजेचे संरक्षण व समाजातल्या दुष्ट प्रवृत्तींना आळा घालणे, ही राजाची दोन प्रधान कर्तव्ये होत. त्यासाठी राजाला चांगल्या राजपुरोहिताची आवश्यकता असते. विद्वान्, निग्रही, निर्लोभी, शस्त्र आणि शास्त्र या दोहोंतही पारंगत, स्पष्टवक्ता आणि धोरणी असा राजपुरोहित असावा. मंत्री विश्वासपात्र असावे. राजाला त्यांनी योग्य तो सल्ला द्यावा आणि अयोग्य वर्तन करण्याच्या वेळी राजाला त्यांचे भयही वाटावे. मुख्य प्रधानाने सर्व मंत्र्यांकडून नेमलेली कामे करून घ्यावी. सरसेनापतीने सैन्यभरती, सैन्याची शिस्त आणि सैन्यसंचालन, इ. गोष्टी योग्य प्रकारे सांभाळाव्या. राजाला विद्वान् आणि नीतिनिपुण असे सल्लागारही असावे. न्यायाधीशांना देशातील चालीरीतींचे व रूढींचे चांगले ज्ञान असावे.

शुक्रनीतीने परदेशातील वकिलाला फार महत्त्व दिले आहे. योग्यायोग्यतेचा विवेक असणारा, स्थलकालमर्यादा लक्षात ठेवून वागणारा, दुसऱ्याचे इंगित अचूक ओळखणारा, चांगले व्यक्तिमत्त्व आणि मोहक वक्तृत्व असणारा व वेळी प्रसंगी निर्भयपणे आपत्तींना तोंड देणारा असा पुरुष राजाने परदेशात वकील म्हणून नेमावा, असे त्या ग्रंथात सांगितले आहे.

**कौटिलीय अर्थशास्त्र** – इ. स. १९०५ साली अर्थशास्त्रावरचा एक प्राचीन ग्रंथ उपलब्ध झाला. त्याचे नाव कौटिलीय अर्थशास्त्र हे होय. हा अर्थशास्त्रावरील युगप्रवर्तक ग्रंथ असून, कौटिल्य हा त्याचा कर्ता आहे. कौटिल्य हा चंद्रगुप्त मौर्याचा महामंत्री होता. या ग्रंथामुळे प्राचीन भारताच्या इतिहास व संस्कृती यांविषयीच्या कल्पनांत महत्त्वाचे फेरबदल घडून आले आहेत.

शिकंदर भारतावर स्वारी करून आला त्या वेळच्या राजकीय परिस्थितीवर या ग्रंथामुळे चांगलाच प्रकाश पडतो व तत्कालीन सामाजिक व राजकीय परिस्थितीमुळे भारतात एका बलाढ्य अशा मध्यवर्ती सत्तेची स्थापना होणे का आवश्यक होते, तेही स्पष्ट होते.

कौटिल्याने अर्थशास्त्राची व्याख्या केली आहे ती अशी –

**तस्याः पृथिव्याः लाभपालनोपायः शास्त्रमर्थशास्त्रम्।**

(कौ. अ. १५.१)

अर्थ – पृथ्वीचा (पृथ्वीवरील सत्तेचा) लाभ करून घेणे व मिळालेल्या पृथ्वीचे पालन करणे, या गोष्टींचा उपाय सांगणारे शास्त्र ते अर्थशास्त्र होय.

**अर्थ एव प्रधानः इति कौटिल्यः। अर्थमूलौ हि धर्मकामाविति।**

(कौ. अ. १.७)

अर्थ – अर्थ हाच प्रधान आहे. धर्म आणि काम हे अर्थमूलक आहेत.

अर्थशास्त्राचा मुख्य प्रतिपाद्य विषय राजनीती हा आहे. मानवमात्राचे सर्व सुख-कल्याण अर्थशास्त्रात समाविष्ट आहे. आपल्या पूर्वीच्या १८ अर्थशास्त्रज्ञ आचार्यांचा आणि संप्रदायांचा कौटिल्याने उल्लेख केला आहे. यावरून असे दिसून येते, की नंदांच्या कालापर्यंत अर्थशास्त्र हे स्वतंत्र विद्या या स्वरूपात मान्यता पावले होते. त्याला धर्मशास्त्राइतकीच योग्यता मिळालेली होती. आन्वीक्षिकी, त्रयी, वार्ता आणि दंडनीती या चार विद्या

विवेचन करताना कौटिल्याने मनू, बृहस्पती आणि उशना यांची मते उद्धृत केली आहेत. प्राचीन आचार्यांच्या अर्थशास्त्रविषयक साऱ्या ग्रंथांचे आलोडन करूनच कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्राची उभारणी केली आहे. कौटिल्याच्या या अर्थशास्त्रात पंधरा अधिकरणे असून, त्यांची विषयसूची पुढीलप्रमाणे आहे –

(१) विनयाधिकार – अमात्योत्पत्ती, मंत्री आणि पुरोहित यांची नियुक्ती, भिन्न उपायांनी मंत्र्यांची परीक्षा, गुप्त विचार, राजकुमारांचे रक्षण आणि कर्तव्य, अन्तःपुराचा प्रबंध, आत्मरक्षण आणि दूतकर्म इत्यादी.

(२) अध्यक्षप्रचार – शासनसंस्थेतील प्रमुख म्हणजेच अध्यक्ष यांची कर्तव्ये, त्यांचे विभाग, दुर्ग म्हणजे गडकोट यांची उभारणी, कर गोळा करणे, रत्नांची परीक्षा, खनिज पदार्थांच्या उद्योगांचे संचालन, वजने आणि मापे, सेनापतीची कार्ये, गुप्त हेरांची योजना इत्यादी.

(३) धर्मस्थीय – कज्जे खटले यांचा निर्णय, विवाहविषयक नियम, दायविभाग, गृहवास्तू, श्रम आणि भांडवल यांचा विनियोग, बेवारशी धनाची व्यवस्था इत्यादी.

(४) कंटकशोधन – कारागिरांचे व व्यापाऱ्यांचे रक्षण, दैवी आपत्तींवर उपाय, गुंड व अत्याचारी लोकांचे निरोधन व त्यांना द्यायच्या शिक्षा इत्यादी.

(५) योगवृत्त – राजांविषयी सेवकांची कर्तव्ये, विश्वासघातकी सेवकांचा प्रतिकार, दंडविधान, कोशसंग्रह इत्यादी.

(६) मंडलयोनी – शत्रुराष्ट्रांना वश करून घेण्याचे उपाय, प्रकृतीचे गुण, उद्योग आणि शांती.

(७) षाड्गुण्य – षड्गुणांचा उद्देश, त्याचप्रमाणे त्यांची स्थाने, वृद्धी आणि क्षय, युद्धविषयक विचार, संधी, विग्रह आणि विक्रम, प्रबल शत्रूशी वागण्याची नीती इत्यादी.

(८) व्यसनाधिकारिक – राज्यावरच्या आपत्तींची मूळ कारणे शोधणे आणि त्यांच्या शांतीचे उपाय इत्यादी.

(९) अभियास्यत् कर्म – युद्धप्रस्थान करण्यापूर्वीची तयारी, बाह्य आणि आभ्यंतर आपत्ती, अर्थानर्थसंशय, त्यांचे विवेचन आणि उपाय इत्यादी.

(१०) सांग्रामिक – सैन्याचे प्रयाण, सैन्याचे तळ, कूटयुद्ध, युद्धभूमी, चतुरंग दळाच्या हालचाली, व्यूह आणि प्रतिव्यूह इत्यादी.

(११) संघवृत्त – संघराज्यात फूट पाडण्याविषयी विचार, त्यांचे नियम इत्यादी.

(१२) अबलीयस् – दुर्बल राजांनी प्रबल राजांच्या आक्रमणाचा प्रतिकार कसा करावा याविषयी विचार, मंत्रयुद्ध, शस्त्र, अग्नी आणि रस यांचा प्रयोग इत्यादी.



(१३) दुर्गलंभोपाय – शत्रूच्या किल्लेकोटांचा ताबा मिळविण्याचे उपाय, जित प्रदेशात शांतीची स्थापना इत्यादी.

(१४) औपनिषदिक – शत्रुघाताचे विविध प्रयोग, त्यांपासून स्वपक्षाचे रक्षण, अद्‌भुताचे उत्पादन, औषधे आणि मंत्र यांचे प्रयोग इत्यादी.

(१५) तंत्रयुक्ती – अर्थशास्त्राचा अर्थ, तसेच बत्तीस युक्तींची नावे आणि त्यांचे अर्थ इत्यादी.

१५ अधिकरणे, १५० अध्याय, १८० उपविभाग व ६००० श्लोक, एवढा या ग्रंथाचा विस्तार आहे. कौटिलीय अर्थशास्त्राचे सार पुढीलप्रमाणे सांगता येईल –

राजा, मंत्री, देश, दुर्ग, कोश, सैन्य व सामंत हे राज्यसंस्थेचे सात घटक आहेत. या सर्वांना प्रकृती असे नाव असून सर्वांच्या समुदायाला प्रकृतिमंडल म्हटले आहे. त्यात राजा हा प्रथम आहे. तो उच्च कुलात जन्मलेला, प्रयत्नवादी, स्वतंत्र, प्रभावी व्यक्तिमत्त्वाचा, वडिलांचा आदर करणारा, त्यांची सल्लामसलत मानणारा, सत्यवादी, सुसंगत वागणुकीचा, महत्त्वाकांक्षी, कृतज्ञ, आज करता येण्याजोग्या गोष्टी उद्यावर न ढकलणारा, मांडलिकांवर जरब ठेवणारा, स्थिर बुद्धीचा आणि शिस्तीचा भोक्ता असा असावा. हे गुणविशेष अंगी असले, तरच त्याला लोकवश्यता लाभते.

मंत्री हे स्वदेशी जन्मलेले, उच्चकुलीन, शास्त्रविद्यापारंगत, प्रजेवर प्रभाव टाकणारे, दूरदृष्टीचे, कलाभिज्ञ, धीट, वाक्पंडित, उत्साही, कर्तृत्ववान् व चिकाटीचे असावे. ज्या देशांत मंत्री मूर्ख असतात, तिथे राजांना स्वेच्छाचार करायला फावते.

देशाच्या सर्व सीमा नैसर्गिक व निश्चित असाव्या. विपत्काली देशातील सर्व लोकांची उपजीविका चालू शकेल इतके धान्य उपजविणारी देशातली भूमी असावी. वेळी प्रसंगी परकीयांना आसरा देण्याची पात्रता त्याच्यामध्ये असावी. देश संरक्षणास सुलभ असावा. त्याचे दर्शन सुखदायक असावे. ज्यांत चांगले लाकूड उपलब्ध होईल, अशी जंगले आणि गुरांचे कळप पोसले जातील अशी कुरणे देशात असावी. देशातली पिके केवळ पावसावर अवलंबून नसावी. कालवे असावे. जलमार्ग व स्थलमार्ग चांगले असावे, खाणी आणि विविध मालाने भरलेल्या बाजारपेठा असाव्या. आपत्काळी करांचे जादा ओझे पेलू शकेल, इतकी देशातल्या प्रजेची सांपत्तिक स्थिती ठीक असावी. उद्योगी शेतकरी, उदार धनी व विश्वासू नोकर असलेला देश चांगला. देशात सुविद्य आणि आदरणीय चरित्राचे लोक असावे. वैश्य व शूद्र यांची वस्ती अधिक असावी. देशाच्या सर्व सीमांवर उत्तम किल्ले असावे. त्यांची डागडुजी चांगली ठेवावी.

कायदेशीर, वारसाहक्काने मिळालेली किंवा राजाने स्वपरा-

क्रमाने मिळवलेली सोने, रूपे, रत्ने इत्यादी संपत्ती राजाच्या भांडारात असावी. बऱ्याच कालपर्यंत अवर्षण पडले किंवा अन्य कोणत्याही प्रकारची दैवी अथवा नैसर्गिक आपत्ती कोसळली, तरी राज्याचे सर्व व्यवहार सुरळीतपणे चालू शकतील, इतकी संपत्ती राजाच्या खजिन्यात नेहमी असावी.

सैनिकांच्या अंगी पुढील गुण असावे – ते राजनिष्ठ आणि आज्ञाधारक असावे. परमुलुखांत गेले तरी त्यांना आपल्या देशाचे प्रेम राहावे. सर्व प्रकारच्या संकटांना तोंड देण्याची व सर्व शस्त्रे उत्तम प्रकारे वापरण्याची त्यांना सवय असावी. ते लाचलुचपतीला वश होणारे व राजाशी दगलबाज होणारे नसावे. सैन्यात शक्यतो क्षत्रियांचीच भरती करावी.

राजाचे सामंत व मांडलिक मैत्रीधर्माने वागणारे असावे. त्यांची निष्ठा अचल असावी. त्यांनी राजाची कोणतीही विनंती अमान्य करू नये. जरूर पडल्यास सर्व सामर्थ्यानिशी त्यांनी मदतीला धावून यावे.

अशा प्रकारचे सप्तांगसंघटित राज्य हे आदर्श राज्य ठरते. संपूर्ण सार्वभौमत्व अशा सुसंघटितपणावरच अवलंबून असते. शहाणा राजा आपल्या बुद्धिबलाने या सातही अंगांतले न्यून पूर्ण करून घेतो. शिवाय हे सर्व घटक गुणसंपन्नही करू शकतो. पण राजाचेच व्यक्तिमत्त्व खुजे असेल किंवा त्याला धोरण आणि कर्तृत्व नसेल, तर त्या राज्याचे घटकच त्याचा पराजय करू शकतात.

अर्थ मिळवणे व मिळविलेल्याचे रक्षण करणे, यासाठी विश्रांती व कार्यतत्परता या दोन्ही गोष्टी आवश्यक आहेत. कार्यतत्परता म्हणजे श्रमाची फळे दुसऱ्यांनी हिरावून नेऊ नयेत, अशी व्यवस्था होय.

ज्या राजाला उत्तम व्यक्तिमत्त्व आहे, ज्याच्या राज्याचे सर्व घटक सुसंघटित आहेत व ज्याला योग्य असे राजकीय धोरण आहे, तोच राजा विजयी ठरतो. कौटिलीय अर्थशास्त्रात अशा प्रकारच्या विजेत्या राजाबद्दलच सर्व विधाने केलेली आहेत. किंबहुना विजेता राजा किंवा राजर्षी हाच त्या शास्त्राचा नायक आहे. कौटिल्याने इंद्र, धर्म आणि यम यांच्याशी राजाची तुलना केली आहे. तो ईश्वराचा प्रतिनिधी आहे आणि म्हणून त्याचा कोणी अपमान करू नये, असेही कौटिल्याने सांगितले आहे. राजा जर उन्मार्गगामी, अधर्मी, अन्यायी आणि व्यभिचारी झाला, तर त्याला पदच्युत करावे, प्रसंगी त्याचा वधही करावा, इथपर्यंत कौटिल्याने विचारांची झेप दाखविली आहे.

कौटिल्याने गणराज्यांचे संपूर्ण विलीनीकरण करून एकतंत्री राज्याची स्थापना केली. त्याला ठाऊक होते, की एकतंत्री राज्यात अनेक दोष उत्पन्न होतात आणि त्यांतला मुख्य दोष म्हणजे राजा हाच त्या पद्धतीत सर्वाधिकारी होतो. म्हणून त्याने राजाला सर्वगुणसंपन्न बनविण्याचा पूर्ण प्रयत्न केला आहे. तो मदान्ध, स्वेच्छाचारी आणि प्रजापीडक न बनावा, यासाठी त्याच्यावर प्रकृतिमंडलाचे पूर्ण नियंत्रणही ठेवले आहे. राजाचा उत्तराधिकारी होईल तोही गुणसंपन्न व्हावा यासाठी त्याने राजकुमारांचे शिक्षण, आचार, व्यवहार, भोजन, शयन, वागणूक, इ. प्रत्येक गोष्टीचे उचित असे विधिविधान घालून दिले आहे. राजाची दिनचर्या आणि रात्रिचर्याही त्याने नेमून दिली आहे.

राजमंडळ व राज्याराज्यांमधील संबंध यांविषयी लिहिताना कौटिल्य म्हणतो – कोणत्याही राज्याच्या सभोवती ज्यांची राज्ये असतात, ते राजे व त्यांची राज्ये हे राजमंडळ होय. केंद्र असलेल्या राजाने या सर्व राजांना आपले शत्रू मानून त्यांच्याशी व्यवहार करायला हवा. आपल्या राज्यापासून अगदी जवळचा राजा हा सर्वांत पहिला शत्रू मानावा. तो जेव्हा आपत्तीत असेल तेव्हा त्याच्यावर हल्ला करून त्याला जिंकावे. शत्रुराज्याच्या पलिकडे असलेला राजा आपला मित्र मानावा. त्याच्याशी मैत्री केल्याने मधल्या शत्रुराज्याला कोंडीत पकडता येते. शत्रूचे मित्र हेही शत्रूच मानावे. आपल्या राज्याला लागून असलेला पण आपल्याशी मित्रत्वाने वागणारा राजा आपला नैसर्गिक मित्र मानावा. संकटकाली ज्याने आपल्याला आश्रय दिला असेल त्याला परिस्थितिजन्य मित्र मानावे. आपण व शत्रू यांच्यामध्ये असलेल्या राजाला मध्यस्थ समजावे. राजमंडळात ज्याचा समावेश होत नाही, जो बलवान् आहे किंवा ज्याला आपल्या शत्रूला मदत करणे सहज शक्य आहे आणि जो आपल्या विशिष्ट वागणुकीमुळे भोवतालच्या सर्व राजांवर वचक ठेवू शकतो, अशा राजाला तटस्थ समजावे.

कौटिल्याच्या एकूण वर्णनावरून बारा राजांचे मिळून राज-मंडळ बनत असावे, असे दिसते. विजिगीषू राजा, त्याचा शत्रू, मध्यस्थ व तटस्थ हे चार, त्यांचे मित्र हे चार व मित्रांचे मित्र हे चार मिळून बारा राजे होतात. विजिगीषू राजाने या राज-मंडळाशी सहा गुणांचा योग्य काळी योग्य प्रकारे अवलंब करून वागावे. हे सहा गुण पुढीलप्रमाणे आहेत – (१) संधी (तह) (२) विग्रह (युद्ध) (३) यान (चढाई) (४) आसन (युद्ध किंवा चढाई न करतां स्वस्थ राहणे) (५) द्वैध (एकाशी तह व दुसऱ्यावर चढाई) आणि (६) आश्रय (बलवान् राजाचा आश्रय घेणे.)

राजमंडळ, राजाचे अंतर्वर्तुळ, आंतरराज्यांमधील संबंध, व त्यांच्याविषयी षड्गुणाश्रयी धोरण, या गोष्टींसंबंधी कौटिल्याने केलेला ऊहापोह लांबलचक वाटेल; पण हे धोरण ठरविताना कौटिल्याला तत्कालीन राजांना आलेले राज्यकारभाराचे अनुभव कौटिल्या

जमेस धरून त्याचा एवढा विस्ताराने प्रपंच केला आहे.

**कौटिल्य व मनू** – या दोघांचे मतभेद पुढीलप्रमाणे आहेत– नियोगपद्धती ब्राह्मण जातीने स्वीकारण्यास कौटिल्याची मान्यता आहे. मनूने नियोगाविषयीची माहिती सांगून नंतर त्याचा निषेध केला आहे. कौटिल्याच्या मते ब्राह्मणाच्या शूद्र स्त्रीपासून झालेल्या पुत्राला पित्याच्या मिळकतीत वाटा मिळावा, तर मनूच्या मते अशा पुत्राला बापाच्या मिळकतीत वारसाहक्क नाही. मनूने विधवाविवाहाला प्रतिबंध केला आहे (५.१६१–१६५), तर कौटिल्याने विधवांना पुनर्विवाहाची परवानगी दिली असून, त्या बाबतीत पुष्कळच सवलती ठेवल्या आहेत (कौ. अ. ३.२–४). मनूचा द्यूताला तीव्र विरोध आहे (९. २२१–२२४), तर कौटिल्य सांगतो, की जुगारीचे अड्डे राजाने आपल्या नियंत्रणाखाली चालू ठेवावे व त्यांचा उपयोग चोर, दरोडेखोर इत्यादी गुन्हेगारांना पकडण्याच्या कामी करावा (३. २०).

**कौटिल्य व याज्ञवल्क्य** – याज्ञवल्क्यस्मृतीत कौटिल्याची बरीच मते उद्धृत केली आहेत. याज्ञवल्क्य कौटिल्यापेक्षा कित्येक बाबतीत प्रगत दिसतो. दाव्याच्या कामांतील निरनिराळे विषय व पुराव्याचे प्रकार यांबाबत कौटिल्याने स्पष्ट नियम दिलेले नाहीत. याज्ञवल्क्याने या सर्व बाबींचा सविस्तर विचार केला आहे. निपुत्रिकाच्या मालमत्तेला त्याची विधवा किंवा माता वारस म्हणून कौटिल्य मानीत नाही; पण याज्ञवल्क्य तसे मानतो. पती हयात असताना मृत झालेल्या स्त्रीच्या स्त्रीधनाचे वारस कौटिल्य अनुक्रमे पुत्र व कन्या असे मानतो, तर याज्ञवल्क्य पुत्रापूर्वी कन्येचा हक्क सांगतो.

**कौटिलीय अर्थशास्त्र व कामसूत्र** – या दोन ग्रंथांत अनेक बाबतींत साम्य आढळते. दोहोंतली कित्येक प्रकरणेही समान आहेत. मतभेदाच्या गोष्टी अशा – कामसूत्रात ग्रहांचे परिणाम व कुंडलीतील लग्न यांची महती दिली आहे; तर कौटिल्याने ग्रहांचे फल पाहण्याचा निषेध केला आहे. मात्र शुभाशुभ नक्षत्रांविषयी तो उल्लेख करतो व वेदांगज्योतिषातील पाच संवत्सरांचे एक युग, एका युगात दोन अधिक मास व अयनाच्या शेवटी दिवस व रात्र यांच्या कालामध्ये सहा मुहूर्तांचे अंतर, या गोष्टी मान्य करतो.

**ज्ञातवाङ्मय** – कौटिल्याला चार वेद, अथर्ववेदातील जारण-मारण, वेदाची षडंगे, इतिहास-पुराणे, धर्मशास्त्र, सांख्य, योग व लोकायत ही दर्शने, इ. साहित्य ज्ञात होते. त्याने धातुशास्त्राचाही उल्लेख केला आहे. त्याच्या काळी सरकारी भाषा संस्कृत होती. कौटिल्य हा स्वतः भाषाप्रभू होता. त्याची भाषा साधी, सुबोध व स्पष्ट आहे. ती व्याकरणासारखी संक्षिप्त नाही, सूत्रासारखी स्वल्पाक्षर नाही व आपस्तंबासारखी आर्ष नाही. विषयांचा व्यवस्थित अनुक्रम व एकसूत्रीपणा इ. गुणांमुळे कौटिल्याचे अर्थशास्त्र ही अत्यंत तेजस्वी बुद्धिमत्तेच्या विद्वानाची कृती आहे अशी खात्री पटते.

**देश व लोक** – कौटिल्याने दिलेली देशांची व लोकांची माहिती बोधप्रद आहे. त्या काळी रेशमी कापड चीनमधून व लोकरीचे नमदे नेपाळमधून येत. कांबोज व सुराष्ट्र या देशांत वृष्णींचे गणराज्य व क्षत्रियांच्या श्रेणी (कार्पोरेशन्स) होत्या व ते लोक शेती, व्यापार व युद्धाचा धंदा करून उपजीविका करीत. लिच्छिविक, वृजिक, मल्लक, मद्रक, कुकुर व कुरुपांचाल हे गण स्वतःला राजा ही उपाधी लावून घेत. कांबोज, सिंधू, आरट्ट व वनायू या देशांत घोडे चांगले निपजत. म्लेच्छ लोक टोळ्या करून राहत व स्वतःची मुले विकीत किंवा तारण म्हणून गहाण ठेवीत. बौद्धांविषयींची स्पष्ट माहिती कौटिल्याने क्वचितच दिलेली आहे. त्यावरून असे वाटते, की त्याच्या काळात बौद्धधर्माचा फारसा प्रसार झाला नव्हता व लोकांत त्याला मान-मान्यताही मिळाली नव्हती.

कौटिल्याने औषधि-वनस्पतींची आश्चर्यकारक माहिती दिलेली आहे. कौटिल्याचे औषधिविज्ञान सुश्रुतापेक्षाही अधिक विस्तृत आहे, असे डॉ. यॉली म्हणतो. तो रसविद्ध (पारा-मिश्रित) सुवर्णाचा व सुवर्णमिश्रित रसायनांचाही उल्लेख करतो.

कौटिल्याच्या कालात किल्ल्यांवर शिव, वैश्रवण, अश्विनी, लक्ष्मी व मदिरा (दुर्गा) यांची देवालये बांधीत व अपराजित, अप्रतिहत, जयंत व वैजयंत या देवतांकरिता स्वतंत्र कोनाडे करीत. महाद्वारानजीक ब्रह्मा, इंद्र, यम व स्कंद या संरक्षक देवता स्थापीत.

**समाजजीवन** – कौटिल्याने अष्टविध विवाहांचा उल्लेख केला आहे. त्याच्या काळी प्रौढविवाह प्रचलित होते. पहिल्या तीन वर्णांत औपशयिक दोष उत्पन्न झाल्यास विवाहविच्छेदाला परवानगी होती. मात्र मुले झाल्यावर तसा विवाहविच्छेद करता येत नसे. विशिष्ट परिस्थितीत स्त्रियांनाही घटस्फोट घेऊन दुसरे लग्न करता येत असे. एका स्त्रीला अनेक पुरुषांकडून पुत्रोत्पत्ती झाल्यास, ते ते पुत्र आपल्या पित्याच्या संपत्तीचे अधिकारी मानले जात. एकपत्नीव्रत आणि पातिव्रत्य हे आदर्श श्रेष्ठ मानले जात. व्यभिचारी स्त्री-पुरुषांना दंड होत असे. नियोगाचीही चाल होती. राजा जर वृद्ध अथवा सदा रोगी असेल, तर तो नियोग-पद्धतीने गोत्रातल्या पुरुषांकडून स्वतःच्या पत्नीच्या ठिकाणी प्रजोत्पत्ती करून घेत असे. आई-बापांनी मुलीच्या लग्नाकडे दुर्लक्ष केल्यास, ती स्वतः वराची निवड करून विवाहबद्ध होत असे. वृत्ती आणि अवध्य असे दोन प्रकारचे स्त्रीधन मानले जात होते. पुनर्विवाह केल्यास पूर्वीच्या स्त्रीधनावर तिचा हक्क राहत नसे.

उच्च कुलांत पडद्याची प्रथा होती. अनाथ, विधवा आणि प्रोषित-भर्तृका अशा बायकांना सरकारकडून सूत कातणे, कशीदा काढणे, शिवणे, विणणे, इ. कामे देऊन वेतन दिले जात असे. राज्यातल्या वेश्यागृहांची नोंदणी होत असे. वेश्यांची संस्थाने (मोहल्ले) स्वतंत्र असत. वेश्येला व्यवसायासाठी सरकारकडून परवानगी घ्यावी लागे. तिच्या इच्छेविरुद्ध तिच्याशी व्यवहार करणाऱ्या पुरुषाला कडक शासन दिले जात असे. कर्ज देणे घेणे, उधारी उसनवारी, यांच्याविषयी नियम होते. गावोगावी पंचायती होत्या. घर, जमीन, इ. लहान सहान प्रकरणांचे निवाडे पंचायतीतच होत असत. सामुदायिक शेतीचीही प्रथा होती.

कौटिलीय अर्थशास्त्रावर आतापर्यंत भट्टस्वामींचे प्रतिपद-पंचिका व माधवयज्वाचे नयचंद्रिका ही दोन भाष्ये प्रकाशित झाली आहेत. पण दोन्ही भाष्ये अपूर्ण आहेत. पहिल्याचा प्रारंभ दुसऱ्या अधिकरणातील ८ व्या अध्यायापासून झाला असून, त्याची अखेर त्याच अधिकरणातील ३६ व्या अध्यायाच्या शेवटी झाली आहे. दुसरे भाष्य ७ व्या अधिकरणातल्या ७ व्या अध्यायापासून सुरू होऊन १२ व्या अधिकरणातील ४ थ्या अध्यायाच्या शेवटी समाप्त होते. या ग्रंथाचे महत्त्व जाणून कित्येक भारतीय व पर-देशी विद्वानांनी याची भाषांतरे केली आहेत व त्यावर विस्तृत प्रबंधही लिहिले आहेत. त्यांत श्री. शामशास्त्री, गणपतिशास्त्री, डॉ. नरेंद्रनाथ लॉ, श्री. प्रमथनाथ बानर्जी, डॉ. जयस्वाल, प्रा. बंद्योपाध्याय, प्रा. विद्यालंकार या भारतीय लेखकांचा आणि श्री. हर्मान याकोबी, श्री. हिलेब्रांट, श्री. कीथ, या पाश्चात्त्य लेखकांचा समावेश आहे.

**चाणक्यनीती व सूत्रे** – डॉ. शामशास्त्री यांनी चाणक्याच्या ५७१ सूत्रांचे एक पुस्तक प्रसिद्ध केले आहे. डॉ. काणे यांच्या मते ही सूत्रे कौटिल्यानंतरची आहेत. चाणक्यनीती नावाचे कित्येक ग्रंथ भारताच्या निरनिराळ्या भागांत आढळतात. तेही सर्व कौटिल्यानंतरचेच आहेत. चाणक्य-राजनीतिशास्त्र या ग्रंथात ६६० श्लोक आहेत. याशिवाय वृद्धचाणक्य, लघुचाणक्य, इ. नावांनी कित्येक ग्रंथ रचले गेले आहेत. [ सो. इं. ट्रॅ.; हि. ध.; कौ. अ.; म. ज्ञा. को. ]

## अर्थापत्ती

मीमांसा दर्शनातले एक प्रमाण. 'अर्थापत्तिरपि दृष्टः श्रुतो वाऽर्थोऽन्यथा नोपपद्यते इत्यर्थकल्पना' = एखाद्या अर्थाची अन्य अर्थाच्या ग्रहणाशिवाय उपपत्ती होत नाही असे पाहून त्याच्या उपपत्तीसाठी ज्या अन्य अर्थाची कल्पना केली जाते, तिला अर्थापत्ती म्हणतात. (जै. सू. १. १. ५ शा. भा.) उदा० देवदत्त दिवसा भोजन करीत नाही; पण लठ्ठ मात्र दिसतो. इथे उपवास करणे आणि लठ्ठ दिसणे या दोन गोष्टींतला परस्परविरोध स्पष्ट आहे. याचा परिहार कसा करायचा? तो करायचा तर 'देवदत्त रात्री अवश्य भोजन करीत असला पाहिजे' अशा अन्य अर्थाची कल्पना करावी लागते. यालाच अर्थापत्ती म्हणतात.

अर्थापत्ती हे एक स्वतंत्र प्रमाण आहे. त्याच्या द्वारे उपलब्ध होणारे ज्ञान प्रत्यक्ष, अनुमान व शब्द या तीन्ही प्रमाणांच्या द्वारे होऊ शकत नाही. वरील देवदत्ताच्या उदाहरणात तो भोजन करीत असल्याचे 'प्रत्यक्ष' कोणी पाहिले नाही. 'अनुमान' करायचे तर व्याप्ती जमत नाही. 'शब्द' प्रमाणाने ठरवायचे, तर त्याच्या रात्रिभोजनाबद्दल कोण्या आप्त पुरुषाने आपणास सांगितले नाही. म्हणूनच अर्थापत्ती हे स्वतंत्र प्रमाण मानले पाहिजे, असे मीमांसक म्हणतात.

दैनिक व्यवहारातही वाक्यांचा अर्थ समजण्यासाठी अर्थापत्तीचे आपणांस पुष्कळ साहाय्य होते. अर्थापत्तीचे दोन भेद आहेत-

(१) दृष्टार्थापत्ती – उदा० वरील देवदत्ताचा दृष्टान्त.

(२) श्रुतार्थापत्ती – म्हणजे एखाद्या अर्थाच्या उपपत्तीसाठी अन्य शब्दाची कल्पना करणे. उदा० 'बंद कर' हे शब्द ऐकतांच 'दार' या पदाची कल्पना केली जाणे. [ भा. द. ]

## अर्धकृच्छ्र

व्रत किंवा प्रायश्चित्त. यात प्रथम चार दिवस एक-भुक्त राहून नंतर दोन दिवस उपवास करायचा असतो (आप. स्मृ. ९. ४३–४४). दुसरा पर्याय तीन दिवस अयाचित एकभुक्त व तीन दिवस उपवास. पाहा – कृच्छ्र.

## अर्धचंद्र

देवमूर्तीसाठी ज्या पीठिका बनवितात त्यांपैकी एक. ही पीठिका केल्याने कर्त्याला पुत्रप्राप्ती होते, असे सांगितले आहे (मत्स्य पु. २६१. १३).

## अर्धनारीश्वर

शिव-पार्वतींच्या संयुक्त रूपाला हे नाव आहे. यात मूर्तीचा अर्धा भाग शिवाचा व अर्धा पार्वतीचा असतो व दोन्हीही भाग बेमालूम सांधलेले असतात. दक्षिण भारतात अशा प्रकारच्या मूर्ती उत्तर भारतापेक्षा अधिक प्रमाणात आढळतात. शिव-शक्ती किंवा स्त्री-पुरुष तत्त्व यांचा संयोग हे सृष्टीचे मूलतत्त्व आहे. या संयोगाची प्रतिमा अर्धनारीश्वराच्या रूपात कल्पिली आहे. अर्धनारीश्वराच्या उत्पत्तीविषयी कथा आहे, ती अशी –

ब्रह्मदेवाने सृष्टिकार्याच्या प्रसंगी मानसपुत्र उत्पन्न करून त्यांना प्रजा निर्माण करण्याची आज्ञा दिली. पण त्यांच्याकडून ते कार्य होईना. त्यामुळे ब्रह्मदेव खिन्न झाला व त्याने उग्र तप केले. त्या तपाच्या प्रभावाने शिव हा अर्धनारीरूप घेऊन

त्याच्या मस्तकातून बाहेर पडला. त्याने ब्रह्मदेवासकट सर्व सृष्टी जाळून टाकली व स्वतःच्या भार्येशी (सती) यौगिक प्रक्रियेने समागम करून पुनश्च ब्रह्मा, विष्णू, यांच्यासह सर्व सृष्टी निर्माण केली (लिंग पु. ४१).

शिवाचे हे अर्धनारीरूप मूर्तिशिल्पांत सर्वमान्य व आकर्षक ठरले आहे. कवी व तत्त्वज्ञ या दोघांनाही त्याने सारखेच लोभविले आहे. कालिदासाने रघुवंशाच्या प्रारंभी (१.१) नाव न घेता याच अर्धनारीश्वराला वंदन केले आहे.

वागर्थाविव संपृक्तौ वागर्थप्रतिपत्तये ।
जगतः पितरौ वन्दे पार्वतीपरमेश्वरौ ।।

अर्थ – शब्द व त्याचा अर्थ यांचे सम्यक् ज्ञान व्हावे एतदर्थ एकमेकांशी निगडित झालेल्या वाणी व अर्थ यांच्याप्रमाणे एकमेकांत मिळून गेलेल्या जगताचे मायबाप अशा पार्वती-परमेश्वरांना (मी) वंदन करतो.

फार प्राचीन काळी योनी व लिंग ही दोन स्वतंत्र प्रतीके होती. पुढे मानवाने त्या दोन प्रतीकांना शिवलिंगात एकत्र जुळवून त्यांची उपासना आरंभिली. त्यानंतर मानवसमाज मूर्ती घडविण्याइतका सुसंस्कृत व कलावंत झाला तेव्हा हेच योनि-लिंग प्रतीक त्याने अर्धनारीश्वराच्या रूपात आकाराला आणले. प्रजावृद्धी व्हायची, तर उभयांचा एकीभाव होणे अपरिहार्य आहे, हाच त्या दोन्ही प्रतीकांतला आशय आहे.

सृष्टीच्या पूर्वी स्त्री-पुरुष-भेद कशा प्रकारे होता, त्याचे उत्तर देण्याचा प्रयत्न या शिल्पाच्या द्वारे केलेला आहे. प्रारंभिक अवस्थेत स्त्री-पुरुष-तत्त्वे ही अविभक्त होती, एकमेकांत एकमेक होती. आजही अत्यंत खालच्या थराच्या जीवांत स्त्रीतत्त्व आणि पुरुषतत्त्व ही दोनही एकाच शरीरात वास्तव्य करतात. ते स्वतःमध्येच नर-नारी असतात आणि स्वतःमधूनच निर्मिती करतात.

विश्वातले समस्त नररूप म्हणजे शिव आणि नारीरूप म्हणजे उमा होय, असे रुद्रहृदयोपनिषदात सांगितले आहे –

रुद्रो नर उमा नारी तस्मै तस्यै नमो नमः ।

हे उभय म्हणजेच जगत्कारण. 'अग्नीषोमात्मकं जगत्' असे श्रुतिवचन आहे. अग्नी हे पुरुषतत्त्व असून, ते स्त्रीच्या रजात आहे. सोम हे स्त्रीतत्त्व असून ते पुरुषाच्या शुक्रात आहे. काम हा त्या दोहोंच्या मधला संयोजक भाव आहे. ही दोन्ही तत्त्वे कामामुळे एकमेकांना आकृष्ट करतात.

तत्त्वज्ञानही हाच आशय सांगते. शिव हा शक्तियुक्त होतो तेव्हाच कार्यक्षम होतो. शिवागमातल्या अद्वैतात शक्तीचा म्हणजे मायेचा त्याग केलेला नसून, ब्रह्मशक्ती म्हणून तिचा संग्रहच केला आहे. शिवशक्तीची नित्य समरसता म्हणजेच अद्वैत असे तिथे मानलेले आहे. माया ही प्रकृती असून, महेश्वर हा तिचा धारणकर्ता आहे. या उभयांच्या संयोगातून सर्व विश्व निर्माण झाले. मनू म्हणतो (१.३२) –

द्विधा कृत्वात्मनो देहमर्धेन पुरुषोऽभवत् ।
अर्धेन नारी तस्यां स विराजमसृजत्प्रभुः ।।

अर्थ – परमेश्वराने स्त्री व पुरुष अशा उभय रूपांत आत्म-देह विभक्त केला आणि मग स्त्रीच्या ठिकाणी विराजाला (चराचर विश्वाला) जन्म दिला.

हे अर्धनारीरूप कसे घडवावे, याविषयी हेमाद्रीने चतुर्वर्ग-चिंतामणीमध्ये तपशीलवार विवरण केले आहे –

शिवाचे उजवे अर्ध नारीचे बनवावे. तिच्या कपाळी कुंकुम-तिलक लावावा. केशसंभार दाखवावा. गळयात हार घालावे. स्तन वाटोळा व घन असावा. वस्त्र नेसवावे. मेखला बांधावी. पायाला अळिता लावावा. दोन हातांत आरसा आणि कमळ देऊन डोळयांत काजळ रेखावे.

डावे नररूप सर्वलक्षणयुक्त करावे. त्याच्या मस्तकी जटाजूट व त्यावर चंद्र असावा. अंगाला भस्मचर्चन व नागयज्ञोपवीत असावे. ऊर्ध्वलिंग व कटीला सर्पमेखला असावी. पाय कमळा-वर असावा. हातात त्रिशूळ व अक्षमाला असावी.

अर्धनारीश्वराच्या मूर्तीचा प्रथम उल्लेख इ. स. च्या ३ ऱ्या शतकात पॅरीफिरीने केला आहे. त्याला अशी मूर्ती उत्तर भारतातल्या एका गुंफेत सापडली. अशीच दुसरी भव्य मूर्ती (१६ फूट ९ इंच उंच) घारापुरी येथे आहे. मथुरा हे कुशाणकालीन शिल्पाचे आगर होय. तियल्या शिलापट्टात अर्धनारीश्वराची मूर्ती उभी आणि द्विभुज आहे. या शिल्पात शिवाच्या जटा व पार्वतीचा पुष्ट स्तन स्पष्ट दिसतो. बदा-मीच्या गुहेतील मूर्ती चतुर्भुज असून, तिच्या खालच्या हातात आडवा दंड व वरच्या दोन हातांत नागवेष्टित परशू व कमल आहे. धारासुरम येथील अर्धनारीश्वराची मूर्ती अष्टभुज व त्रिमुख आहे. ही तीन मुखे शिव, रुद्र व उमा यांची असावी. काही शिल्पांत शिवाचे ऊर्ध्व लिंग असते.

अर्धनारीश्वराचे ध्यान तंत्रसार या ग्रंथात पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

नीलप्रवालरुचिरं विलसत्त्रिनेत्रम् ।
पाशारुणोत्पलकपालकशूलहस्तम् ।
अर्धाम्बिकेशमनिशं प्रविभक्तभूषम् ।
बालेन्दुबद्धमुकुटं प्रणमामि रूपम् ।।

अर्थ – निळया पोवळयाप्रमाणे सुंदर दिसणाऱ्या, त्रिनेत्र-धारी, पाश, रक्तकमल, कपाल व त्रिशूळ हाती धारण करणाऱ्या, स्त्री आणि पुरुष यांची वेषभूषा ज्याच्या रूपात स्पष्ट दिसते

अशा व ज्याच्या मुकुटात चंद्रकोर बांधली आहे अशा अर्धनारीश्वराला मी नमस्कार करतो.

तंत्रसारात याचे पूजाविधान, जप व होमही सांगितला आहे. [ मू. वि.; सं. प्र.; डे. हिं. इ.; श. क. ]

**अर्धमत्स्येंद्रासन** एक योगासन. याची पद्धती अशी – उजवा पाय सरळ ताठ पसरून बसावे. डावा पाय गुडघ्यापासून वळवून उजव्या पायाच्या गुडघ्याच्या डाव्या बाजूस ठेवावा. उजव्या पायाचा चवडा जमिनीस टेकवावा. डाव्या पायाचा चवडा ताठ ठेवण्याचा प्रयत्न करावा. उजव्या हाताच्या काखेत डाव्या पायाचा गुडघा ठेवून उजव्या हाताने डाव्या पायाचा चवडा घट्ट पकडावा. डावा हात पाठीकडे वळवून कमरेवर ठेवावा आणि श्वासोच्छ्वास चालू ठेवावा. शक्य तितकी छाती अधिक फुगवावी. शरीराचा कोणताही भाग सैल ठेवू नये.



अर्धमत्स्येंद्रासन

मस्तकाचा भाग डावीकडे वळवून हनुवटी खांद्यावर ठेवावी. डोळे उघडे ठेवावे. उजव्या पायाचा गुडघा जमिनीपासून उचलू देऊ नये. हळूहळू पोटाचा भाग डाव्या पायाच्या गुडघ्याने दाबून ठेवण्याचा प्रयत्न करावा.

डावा पाय समोर ताठ करून बसावे. नंतर उजवा पाय गुडघ्यापाशी वळवून डाव्या पायाच्या गुडघ्याच्या डाव्या बाजूस ठेवावा. उजव्या पायाचा चवडा जमिनीस टेकवावा. डाव्या पायाचा चवडा ताठ ठेवण्याचा प्रयास करावा. डाव्या हाताच्या काखेत उजव्या पायाचा गुडघा ठेवून डाव्या हाताने उजव्या पायाचा चवडा घट्ट पकडून ठेवावा. डावा हात पाठीमागे वळवून कमरेवर ठेवावा. शक्य तितकी छाती फुगवावी. शरीराचा कोणताही भाग सैल सोडू नये. मस्तकाचा भाग उजवीकडे वळवून हनुवटी खांद्यावर ठेवावी. डाव्या पायाचा गुडघा जमिनीपासून जरासुद्धा हालू देऊ नये. हळूहळू पोटाचा भाग उजव्या पायाच्या गुडघ्याने दाबण्याचा प्रयत्न करावा. वरील दोन्ही प्रकार करून झाल्यावर अर्धमत्स्येंद्रासनाचा अभ्यास पूर्ण होतो. या आसनामुळे पोटातील अवयवांना व्यायाम होतो व पाठीचा कणा सुदृढ बनतो, असे सांगितले आहे. [ उ. यो. द.; योगदीपिका ]

**अर्धमागधी भाषा व साहित्य** एक प्राकृत भाषा. शौरसेनी व मागधी या दोन भाषाप्रदेशांच्या मध्ये अर्धमागधीप्रदेश होता. हल्लीचा अयोध्या प्रांत व त्याचा दक्षिणेकडील प्रदेश यांत ही भाषा प्रचलित होती.

भरताने नाटचशास्त्रात अर्धमागधीला स्वतंत्र भाषा म्हटले आहे (१८.३८). त्यानंतर विश्वनाथाने हिला गुप्तचर, राजपुत्र आणि शेठ यांची भाषा म्हटले आहे ( साहित्यदर्पण ६ ). मुद्राराक्षसातला जीवसिद्धी क्षपणक, त्याचप्रमाणे प्रबोधचंद्रोदय नाटकातली काही पात्रे अर्धमागधी बोलतात. भासाच्या कर्णभार नाटकातही इंद्र अर्धमागधी बोलताना दिसतो.

सांप्रत उपलब्ध असलेल्या ग्रंथांवरून असे दिसते, की अर्धमागधीला दीर्घ परंपरा असून, ती इतर प्राकृत भाषांपेक्षा अधिक संपन्न आहे. जैन पंडित तिला इतर सर्व भाषांची जननी मानतात. महावीराने याच भाषेच्या द्वारे धर्मप्रसाराचे कार्य केले. आपले धर्मनियमही त्याने याच भाषेत सांगितले. त्यामुळे श्वेतांबर जैनांचे धर्मग्रंथ याच भाषेत लिहिलेले आहेत.

अर्धमागधी या नावाचे स्पष्टीकरण दोन प्रकारे करतात – ( १ ) ‘ अर्धं मागध्या इति अर्धमागधी ’ = जिच्यात मागधी भाषेची काही लक्षणे आहेत, सर्व नाहीत ती. किंवा (२) ‘अर्धं मगधस्य व्याप्य स्थिता ’ = जिने मगधाचा ( पश्चिमेकडील) अर्धा भाग व्यापलेला आहे, ती.

अर्धमागधीची ध्वनिपद्धती पुढीलप्रमाणे आहे –

स्वर – ऱ्हस्व – अ, इ, उ, एँ, ओँ.

दीर्घ – आ, ई, ऊ, ए, ओ.

व्यंजने – कंठ्य – क, ख, ग, घ, ङ.

तालव्य – च, छ, ज, झ, ञ.

मूर्धन्य – ट, ठ, ड, ढ, ण.

दंत्य – त, थ, द, ध, न.

ओष्ठ्य – प, फ, ब, भ, म.

अर्धस्वर – य, व.

द्रव – र, ल. ऊष्म–स. महाप्राण – ह.

अनुस्वार – ं

संस्कृत भाषेशी तुलना केल्यास, असे दिसून येईल, की संस्कृत-

प्रमाणे अर्धमागधीत ऋ, ॠ, लृ हे स्वर किंवा ऐ, औ हे संयुक्त स्वर नाहीत. तसेच, तिच्यात ए व ओ हे स्वर ऱ्हस्वही आढळतात आणि ऊष्म वर्णांपैकी केवळ स ह्याच आढळतो.

संस्कृताची व अर्धमागधीची वर्णरचना बऱ्याच अंशी समान असली, तरी ज्या प्रकारे हे वर्ण या दोन भाषांत वापरले जातात त्यात फार मोठा फरक आहे. अर्धमागधीत काही वर्ण काही स्वरूपात आढळतच नाहीत. उदा. स्वरमध्यस्थ क. संस्कृत-अशोक अर्धमागधी – असोग. तसेच, संस्कृतमध्ये असणारी काही संयुक्त व्यंजने अर्धमागधीत आढळत नाहीत. उदा. प्र, त्स, स्त, इत्यादी. संस्कृत – प्रवचन, चिकित्सा, हस्त. अर्धमागधी – पावयण, तिगिच्छा, हत्थ. कित्येकदा एखाद्या वर्णाचे एखाद्या परिस्थितीत अनियमितपणे असणे, हे तो शब्द संस्कृतामधून उसना घेतल्याचे लक्षण आहे.

व्याकरणदृष्ट्या या दोन्ही भाषांतले महत्त्वाचे फरक पुढीलप्रमाणे – (१) अर्धमागधीत द्विवचन नाही. द्विवचनाबद्दल बहुवचन वापरतात. (२) अर्धमागधीत सहा विभक्ती व संबोधन आहे. संस्कृतातील चतुर्थीशी मिळती विभक्ती नष्ट झाली असून, तिच्याऐवजी षष्ठी वापरतात. (३) क्रियापदांच्या रूपांबाबत संस्कृतमध्ये आढळणारी विविधता व क्लिष्टता या भाषेत उरलेली नाही.

अर्धमागधीतील विभक्तिप्रत्ययांची कल्पना पुढील उदाहरणांवरून येईल –

| | एकवचन | बहुवचन |
|---|---|---|
| प्रथमा – | देवो, देवे | देवा |
| द्वितीया – | देवं | देवे, देवा |
| तृतीया – | देवेण, देवेणं | देवेहि, देवेहिं |
| पंचमी – | देवा, देवाओ | देवेहिन्तो |
| षष्ठी – | देवस्स. | देवाण, देवाणं |
| सप्तमी – | देवे, देवंसि, देवम्मि | देवेसु, देवेसुं |
| संबोधन – | देव | देवा |

अर्धमागधीतील क्रियापदांची कल्पना पुढील उदाहरणांवरून येईल –

वर्तमानकाळ 'जाण'

| | एकवचन | बहुवचन |
|---|---|---|
| प्रथम पुरुष – | जाणामि | जाणामो |
| द्वितीय पुरुष – | जाणासि | जाणह |
| तृतीय पुरुष – | जाणइ | जाणन्ति |

भविष्यकाळ 'कर'

| | ए. व. | ब. व. |
|---|---|---|
| प्र. पु. | करिस्सामि, करिस्सं | करिस्सामो |
| द्वि. पु. | करिस्ससि | करिस्सह |
| तृ. पु. | करिस्सइ | करिस्सन्ति |

भूतकाळ 'हस'

| | ए. व. | ब. व. |
|---|---|---|
| प्र. द्वि. तृ. पु. | हसित्था | हसिंसु |

धातूंच्या वर्गाप्रमाणे प्रत्ययांमध्ये काही विशेष फरक होतात.

अर्धमागधीचा बराचसा शब्दसंग्रह संस्कृतोद्भव आहे. बाकीचे शब्द देशी म्हणजे आर्येतर भाषांतून आलेले आहेत.

साहित्य – अर्धमागधी साहित्यात श्वेतांबर जैनांच्या पंचेचाळीस आगमग्रंथांचा समावेश होतो. त्यांपैकी बारा अंगग्रंथांची रचना महावीराच्या गणधरांनी केलेली असून, बाकीचे आगमग्रंथ श्रुतज्ञानी व दशपूर्वी स्थविरांनी रचलेले आहेत. महावीराच्या निर्वाणानंतर ९८० वर्षांनी वलभी येथे देवर्द्धिगणीच्या अध्यक्षतेखाली महावीराचा धर्मोपदेश लेखनिविष्ट करण्यात आला. त्याच्या पूर्वी गुरुशिष्यपरंपरेने तो मुखोद्गत करण्यात येत असे. दिगंबर पंथाचे जैन मात्र या आगमग्रंथांना प्रमाण मानीत नाहीत.

पहिल्या तीर्थंकराच्या वेळेपासून दोन आगमग्रंथ प्रचलित होते, असे श्वेतांबरपंथीय लोक मानतात. (१) चौदा पूर्वग्रंथ व (२) अकरा अंगग्रंथ. यांपैकी चौदा पूर्वग्रंथ नंतर दिट्ठिवाय (दृष्टिवाद) नामक बाराव्या अंगग्रंथात समाविष्ट करण्यात आले. महावीरानंतर चौदा पूर्वग्रंथांचे ज्ञान स्थूलभद्र या आठव्या आचार्यापर्यंत चालत आले. पण पुढच्या वज्रापर्यंतच्या सात आचार्यांना दहा पूर्वग्रंथांचेच ज्ञान होते. त्यानंतरच्या काळात ते कमी कमी होत जाऊन वलभीवाचनेच्या काळी ते पूर्णपणे लुप्त झाले. अशा रीतीने बारावा अंगग्रंथ नष्ट झाला.

वलभीवाचनेच्या वेळी तयार केलेल्या ग्रंथांच्या संहिता नंतरच्या काळात विकृत होत गेल्या व काही नष्टही झाल्या. नंदीसूत्रावरून याची कल्पना येऊ शकते. कारण त्यात अठ्ठ्याहत्तर आगमग्रंथांची माहिती सापडते. सांप्रत फक्त पंचेचाळीस आगमग्रंथच उपलब्ध आहेत. आगमग्रंथांत सर्वप्राचीन असलेल्या अकरा अंगग्रंथांतील अनेक आर्ष प्रयोगांच्या जागी नंतरच्या काळात महाराष्ट्री रूपे आलेली आढळतात. असे असले, तरी नंतरच्या ग्रंथांतून महावीराचे जीवन व तत्त्वज्ञान यांच्या मूळ स्वरूपाला मात्र फारसा धक्का लागलेला नाही, असे आधुनिक पंडितांचे मत आहे.

नंदीसूत्राप्रमाणे बारा अंगप्रविष्ट व सहासष्ट अंगबाह्य ग्रंथ असून, अंगबाह्य ग्रंथांत सहा आवश्यक, एकतीस कालिक व एकोणतीस उत्कालिक असे तीन विभाग आहेत. उपलब्ध पंचेचाळीस आगमग्रंथांत अकरा अंगग्रंथ, बारा उपांगग्रंथ, दहा प्रकीर्णके, सहा छेदसूत्रे, चार मूलसूत्रे आणि दोन वर्गनाव असलेले

ग्रंथ असे विभाग आहेत. हे उपलब्ध आगमग्रंथ भिन्नकर्तृक व भिन्नकालीन असून गद्य, पद्य आणि गद्यपद्यमिश्रित अशा सर्व स्वरूपात आढळतात. यांपैकी काही ग्रंथ संकलित स्वरूपाचे आहेत. काहींत विषयांची पुनरावृत्ती आढळते; तर काहींत संक्षिप्त विधाने आहेत. काही ग्रंथांत सांप्रदायिक गोष्टींचे पद्धतशीर निरूपण आढळते. साधू व साध्वी यांचे आचारधर्म यावर या ग्रंथांचा भर आहे. त्यांत वाङ्मयगुण आढळत नाहीत.

आगमग्रंथांवरील टीका संस्कृत व प्राकृत अशा दोन्ही भाषांत आहेत. प्राकृत टीकांत निज्जुत्ती (निर्युक्ती), भाष्य व चुण्णी (चूर्णी) असे तीन प्रकार आढळतात. पहिले दोन प्रकार पद्यात व तिसरा गद्यात आहे. निर्युक्ती श्रुतकेवली भद्रबाहूने (सनपूर्व ३२२) रचल्या असून, त्यांना सध्याचे स्वरूप द्वितीय भद्रबाहूने (इ. स. चे ६ वे शतक) दिले, असे आधुनिक विद्वान मानतात. त्यात भद्रबाहूने जैनदर्शनाची भूमिका स्थिर केली. जिनभद्राने (इ. स. चे ७ वे शतक) विशेषावश्यक भाष्यात त्या वेळेपर्यंतच्या दार्शनिक चर्चेचे सर्व विषय हाताळले आहेत. संघदासाच्या (इ. स. चे ७ वे शतक) बृहत्कल्पभाष्यात साधूंच्या आहार-विहाराची चर्चा आहे. उपलब्ध भाष्यग्रंथांची संख्या दहा असून, चूर्णीग्रंथ अठरा आहेत. जिनदास महत्तराच्या (इ. स. चे ७–८ वे शतक) चूर्णीत सर्व भाष्यविषय संक्षेपाने आढळतात. हरिभद्र (८ वे शतक) शीलांकसूरी (१० वे शतक), शांत्याचार्य, अभयदेव (११–१२ वे शतक) मलधारी हेमचंद्र व आचार्य मलयगिरी (१२ वे शतक) यांनी आगमग्रंथांवर संस्कृत टीका लिहिल्या. त्यांपैकी सर्वांत प्राचीन टीका हरिभद्राची असून, मलयगिरीची टीका सर्वश्रेष्ठ मानली जाते. आगमग्रंथ सुलभपणे समजण्यासाठी प्राचीन गुजरातीत बालावबोध टीका लिहिल्या गेल्या, त्यांना टबा असे नाव आहे. [ म. ज्ञा. को.; हिं. सा. बृ. इ.; प्रा. सा. इ.; म. वि. को. ]

## अर्धलक्ष्मीहरी

विष्णूचे अर्धनारी रूप. तंत्रसारात याचे ध्यान दिले आहे, ते पुढीलप्रमाणे –

उद्यत्प्रद्योतनशतरुचिं तप्तहेमावदातं
पार्श्वद्वन्द्वे जलधिसुतया विश्वधात्र्या च जुष्टम् ।
नानारत्नोल्लसितविविधाकल्पमापीतवस्त्रं
विष्णुं वन्दे दरकमलकौमोदकीचक्रपाणिम् ॥

अर्थ – उगवत्या शतसूर्यांप्रमाणे तेजस्वी, तप्त सुवर्णाप्रमाणे निर्मळ, विश्वजननी लक्ष्मी ही ज्याचे अर्धांग बनली आहे अशा, विविध रत्नांनी झगमगणारी वेषभूषा केलेल्या, पिवळसर वस्त्र परिधान केलेल्या, विकसित कमल, कौमोदकी गदा व चक्र हाती धारण करणाऱ्या, अशा विष्णूला मी नमस्कार करतो.

तंत्रसारात याचे पूजाविधान दिले आहे. अर्धलक्ष्मीविष्णूची कल्पना ही वैष्णव आगमांनी शैवागमांतल्या अर्धनारीश्वराच्या कल्पनेची उसनवारी केली आहे, असे दिसते. [ श. क. ]

## अर्धश्रावणिक व्रत

व्रतारंभ श्रावण शु. प्रतिपदेपासून. एक मासपर्यंत एकभुक्त किंवा नक्तभोजन व पार्वतीची पूजा, हा या व्रताचा विधी आहे. उद्यापनाच्या दिवशी ब्राह्मण व कुमारिका यांना भोजन घालतात. [ हि. ध. ]

## अर्धाधान

अग्निहोत्र घेण्याच्या वेळी स्मार्ताग्नीतून अर्धा अग्नी घ्यावा किंवा संपूर्ण स्मार्ताग्नीचे रूपांतर श्रौताग्नीत करावे, असे दोन पक्ष आहेत. अर्धा स्मार्ताग्नी तसाच ठेवून अर्ध्या स्मार्ताग्नीचा उपयोग अग्न्याधानात करतात, त्याला अर्धाधान म्हणतात. [ सं. कौ. ]

## अर्धासन

(१) एक यौगिक आसन. याची पद्धती अशी–

एकपादमथैकस्मिन्विन्यस्योरुणिसस्तम ।
आसीनोर्धासनमिदं योगसाधनमुत्तमम् ॥

अर्थ – एका पायाचा चवडा दुसऱ्या मांडीवर ठेवून ताठ बसणे याचे नाव अर्धासन असून, ते योगसाधनाला प्रशस्त आहे.

(२) एक पारिभाषिक संज्ञा. अर्जुनाला इंद्राचे अर्धासन प्राप्त झाले होते. याचा उल्लेख कालिदासही करतो (रघु. ६.७३). राजा किंवा सम्राट ज्या आसनावर बसायचा, त्यावर अन्य कोणत्याही व्यक्तीला बसता येत नसे; पण सम्राट एखाद्या व्यक्तीच्या विद्या-विक्रमादी गुणांवर प्रसन्न होऊन व त्याला आपला मित्र मानून आपल्या अर्ध्या आसनावर बसण्याचा मान देई. गुप्तकालापर्यंत ही प्रथा चालत होती. मुसलमानी दरबारातही अशी प्रथा दिसते. सुलतानाच्या आसनाला 'जामेखाना' म्हणत व त्याच्या कृपेला पात्र अशी व्यक्तीच त्यावर बसू शके. [भा. सा.]

## अर्धोदयपर्व

एक अत्यंत शुभ मानलेला दिवस. याचे लक्षण पुढीलप्रमाणे सांगितलेले आहे –

अमार्कपातश्रवणैर्युक्ता चेत्पौषमाघयोः ।
अर्धोदयः स विज्ञेयः कोटिसूर्यग्रहैः समः ॥

अर्थ – पौष किंवा माघ अमावास्येच्या दिवशी, रविवार, श्रवण नक्षत्र व व्यतीपात इतके योग असतील, तर त्या पर्वाला अर्धोदय म्हणतात. हा योग कोटी सूर्यग्रहणांच्या तोडीचा आहे. यात एखादा योग कमी असल्यास त्याला महोदय असे मानतात. अर्धोदय पर्वाचा योग दिवसा आल्यासच प्रशस्त होय.

रात्री आला तर तो तसा नसतो, असे स्कंद पुराणात सांगितले आहे.

अर्धोदये तु सम्प्राप्ते सर्वं गङ्गासमं जलम् ।
शुद्धात्मानो द्विजाः सर्वे भवेयुर्ब्रह्मसन्निभाः ।
यत्किञ्चित् क्रियते दानं तद्दानं सेतुसन्निभम् ।।

अर्थ – अर्धोदय पर्वाच्या वेळी सर्व उदके गंगोदकासमान होतात, शुद्ध अंतःकरण असलेले सर्व ब्राह्मण ब्रह्मतुल्य होतात व कोणतेही दान सेतुबंध–यात्रेच्या योग्यतेचे होते.

त्या दिवशी कांस्यपात्रात पायस भरून घेतात व त्यावर अष्टदल काढून त्यावर यथाशक्ति सुवर्ण ठेवतात. मग त्याची श्वेत पुष्पांनी पूजा करतात. मग त्या पात्राला वस्त्रालंकारांनी अलंकृत करून ते ब्राह्मणाला दान देतात.

हा योग शके १३५२ च्या पौष मासात म्हणजे इ. स. १४३१ च्या जानेवारी १४ ला आला होता. [ पु. चि.; श. क.; हि. ध. ]

## अर्धोदय व्रत

अर्धोदयपर्व क्वचितच येते. ते एक पुण्यपर्व असल्यामुळे त्याचे व्रत सांगितले आहे. या व्रताच्या देवता ब्रह्मा–विष्णू–महेश या होत. अर्धोदयाच्या आदल्या दिवशी नद्यांच्या संगमावर स्नान करून पुढील मंत्राने संकल्प करतात –

त्रिदैवत्यं व्रतं देवाः करिष्ये भुक्तिमुक्तिदम् ।
भवन्तु सन्निधौ मेऽद्य त्रयो देवास्त्रयोऽग्नयः ।।

अर्थ – देवहो, भुक्ती – मुक्ती देणारे व तीन देवता असलेले हे व्रत मी करीन. (त्यासाठी) तीन देव व तीन अग्नी माझ्या सन्निध राहोत.

तीन देवतांच्या सुवर्णप्रतिमा तिळांच्या तीन राशींवर डावीकडून उजवीकडे अशा अनुक्रमाने स्थापून पर्वाच्या दिवशी मध्यान्ही प्राणप्रतिष्ठापूर्वक त्यांची पूजा करतात. नंतर 'प्रजापते...' (ऋ. १०.१२१.१०), 'इदं विष्णुः...' (ऋ. १.२२.१५) व 'त्र्यंबकं यजामहे...' (ऋ. ७.५९.१२) या मंत्रांनी अनुक्रमे तीन्ही देवांसाठी हवन करतात. मग तिलराशी-सह प्रतिमांचे दान, तसेच सवत्स धेनू, वस्त्र–पात्र, इत्यादींचे दान करतात व दहा ब्राह्मणांस भोजन घालतात. पाहा – अर्धोदय पर्व. [ हि. ध.; व्रतराज ]

## अर्बुद काद्रवेय

एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील चौऱ्याण्णवावे सूक्त याने रचले आहे. सोमस्तुती हा या सूक्ताचा विषय असून ग्रावा ही त्याची देवता आहे. याची एक ऋचा (१०.९४.४) अशी –

बृहद्वदन्ति मदिरेण मन्दिनेन्द्रं क्रोशन्तोऽविदन्नना मधु ।
संरभ्या धीरा स्वसृभिरनर्तिषु राघोषयन्तः पृथिवीमुपब्दिभिः ।।

अर्थ – ऋत्विजांच्या दहा बोटांसमवेत नर्तन करणारे, सोमधारक, इंद्रपाचारक, शब्दकारी आणि सुसंघटित ग्रावे स्वतःच्या गर्जनेने पृथ्वी व्यापतात.

या सूक्तात अर्बुदाने सोमरस कसा काढावा याचा वस्तुपाठ दिला आहे. हा नागर्षी होता. याने यज्ञातील उणीवा कशा दूर कराव्या हे सांगितले आहे (ऐ. ब्रा. ६.१). सर्पसत्रात याची ग्राव्याने स्तुती केली होती (पं. ब्रा. २५.१५.). ग्रावा शब्दाचा अर्थ वरवंटा असा असावा. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा. ]

## अर्बुदादेवी

अबूच्या पहाडावरील एक देवी. हिला अधरदेवी असेही म्हणतात. हिच्या पायथ्याशी एका महंताचा आश्रम आहे. तिथून तीनशे पायऱ्या चढून गेल्यावर एक गुहा लागते. या गुहेत दुर्गादेवी व चौसष्ट योगिनी यांच्या कोरीव मूर्ती आहेत. या गुहेतच दुसरी एक अरुंद तोंडाची पण प्रशस्त अशी गुंफा आहे. त्या गुंफेत अर्बुदादेवीची भव्य मूर्ती आहे. इथे तुपाचे दिवे सतत पाजळत असतात. देवीच्या उजव्या बाजूला जो लहानसा बोगदा आहे, त्यातून देवी खालच्या नखी तलावावर नित्य स्नानाला जाते, अशी भाविकांची समजूत आहे. या गुंफेवरचा घुमट शोभिवंत दिसतो. विजयादशमीला या देवीची मोठी यात्रा भरते. पाहा – अबू पर्वत. [ म. ज्ञा. को. ]

## अर्यमा

एक वैदिक देवता. हा बारा आदित्यांपैकी एक असून, ऋग्वेदात मित्रा-वरुणांबरोबर याचा उल्लेख येतो. हा अनेक देवतांचा मित्र आहे. हा कश्यप-अदितीचा पुत्र असून, मातृका ही याची पत्नी व चर्षणी हे पुत्र होत. अवेस्त्यातही याचा उल्लेख आहे, त्यावरून हा हिंदइराणी काळातला देव आहे, असे वाटते. हा वैशाख मासाचा आदित्य असून, याचे तीनशे किरण आहेत. यमाला शाप होऊन तो शंभर वर्षे विदुराच्या रूपाने शूद्र योनीत गेला असता, तेवढ्या काळात अर्यम्याने मृत्यूचा अधिपती म्हणून त्याचा अधिकार सांभाळला. गीतेत श्रीकृष्णाने पितरांत अर्यमा ही आपली विभूती असल्याचे सांगितले आहे (१०.२९).

गृह व प्रासाद यांच्या निर्माणकाळी देव-गंधर्व-पितरांबरोबर यांचीही पूजा करावी, असे सांगितले आहे (मत्स्य पु. २५० ३०). शिशुमारग्रहाच्या मांडीच्या जागी याचे स्थान असून, याच्या दक्षिणेस पितृयाणमार्ग आहे (ब्रह्मांड पु. २.२३.१०३). हा हिरण्मय-खंडात श्रीहरीच्या कूर्मतनूची पूजा करतो. (भा. पु. ५.१८.२९) पृथूने पृथ्वीचे दोहन केले त्या वेळी पितरांनी याला वत्स करून कव्य दोहून घेतले (भाग. पु. ६.६.३९–४२; १.१३.१५). [ पु. इं.; म. ज्ञा. को. – वेदविद्या; प्रा. च. को. ]

**अर्वाक्तल** पृथ्वीच्या खाली असलेले वालुकायुक्त पाचवे तल. विरोचन दैत्याचे वसतिस्थान. इथे नाग, दानव व राक्षस यांची हजारो पुरे आहेत (ब्रह्मांड पु. २०).

**अर्हत्** 'अर्हः प्रशंसायाम्' यावरून स्तुत्य, पूज्य, मान्य अशी व्यक्ती. संकेतार्थाने जिन, बुद्ध, तीर्थंकर, पारंगत इत्यादी. 'अर्हतीति अर्हत्' (=पूज्य असतो तो अर्हत् होय,) अशीही व्युत्पत्ती आहे. वेदोत्तर काळी ब्राह्मणांशी स्पर्धा करणाऱ्या वर्गाने स्वतःच्या सामाजिक व आध्यात्मिक उच्चतेचा निदर्शक असा अर्हत् हा शब्द स्वतःला लावून घ्यायला सुरवात केली. अर्हत् हेच खरे ब्राह्मण होत, असे त्यांनी ठरविले. या शब्दाला सांप्रदायिक अर्थ येण्यापूर्वी तो शब्द पूज्य, श्रेष्ठ या अर्थाने वापरला जात होता. कालिदासानेही याच सामान्य अर्थाने तो वापरला आहे.

हा शब्द धर्मग्रंथांत दोन अर्थांनी आढळतो. एक बौद्धधर्मी अर्हत् व दुसरा अन्य संप्रदायातला अर्हत्. पंचविंश ब्राह्मणाच्या आधारे व्रात्यसंस्कृतीत अर्हतांचा एक प्राचीन पंथ असल्याचे श्री. करमरकर सांगतात. इतर संप्रदायांत त्याचा अर्थ सांप्रदायिक मताप्रमाणे जे उच्च ध्येय असेल, ते गाठलेला मनुष्य असा आहे. प्रारंभीच्या बौद्धधर्मी लोकांनी ज्या अर्थी या शब्दाचा उपयोग केला आहे, त्या अर्थी बुद्धापूर्वी उत्तर भारतात जे उपासना संप्रदाय होते, ते या शब्दाचा उपयोग करीत असावे, असे स्पष्ट दिसते. पण बौद्धांनी हा शब्द विशेष उचलून धरला.

बुद्ध सारनाथाला पोचल्यावर तिथल्या पाच भिक्षूंपाशी गेला. पण त्यांनी त्याचे स्वागत करायला नाखुषी दर्शविली. ते पाहून बुद्ध त्यांना म्हणाला. 'भिक्षूंनो, डोळे उघडून पाहा. तुमच्या पुढे उभा असलेला तथागत हा एक अर्हत् आहे. मी तुम्हांला विनय शिकवीन व मार्गदर्शन करीन.'

बुद्धाची आणि काश्यपाची भेट झाली तेव्हा बुद्धाने दाखविलेले चमत्कार पाहून काश्यप म्हणाला. 'श्रमणाच्या ठिकाणी अचाट सामर्थ्य आहे, हे मी मान्य करतो; पण तो माझ्यासारखा 'अर्हत्' नाही.' त्यावर बुद्ध म्हणाला. 'काश्यपा, तू अर्हत्ही नाहीस आणि तुला त्या पदापर्यंत पोचण्याचा मार्गही गवसलेला नाही.'

ज्या वेळी बुद्धाला कळून चुकले, की गुरू किंवा धर्मोपदेशक झाल्यावाचून अर्हत् पदवी प्राप्त होत नाही, तेव्हा त्याने खास भिक्षूंचा एक वर्ग बनवून त्याला उपदेश द्यायला प्रारंभ केला. ज्यांनी आस्रवांचा म्हणजे रागद्वेषादी विकारांचा नाश केला आहे, अशा भिक्षूंनाच या वर्गात प्रवेश मिळे. अशा भिक्षूंनाही स्वतःला अर्हत् म्हणवून घेण्याची मोकळीक होती. अशा रीतीने बुद्धाने अर्हत् पदवी शिष्यसामान्य करून टाकली. त्यामुळे केवळ बुद्धालाच श्रेष्ठत्व मिळाले असे नव्हे; तर त्याच्या शिष्यांचाही दर्जा वाढला. त्यामुळे बुद्धाच्या धर्माचेही श्रेष्ठत्व प्रस्थापित झाले. पण याच गोष्टीमुळे बुद्धाला त्याच्या शिष्यांतून श्रेष्ठतम ठरविण्यासाठी एका निराळ्या पदवीची आवश्यकता उत्पन्न झाली. त्यासाठी जो नवा शब्द निर्माण झाला, तो सम्यक्संबुद्ध हा होय. सम्यक्संबुद्ध म्हणजे सर्वज्ञ. ही पदवी मात्र बुद्धाव्यतिरिक्त अन्य कोणालाही लागू झाली नाही.

जैनांनीही या शब्दाला विशेष मान्यता दिलेली आहे. 'ॐ णमो अरिहन्ताणम्' या त्यांच्या सुप्रसिद्ध मंत्रात अर्हतालाच नमन आहे.

बौद्धांचे अर्हत् आणि सम्यक्संबुद्ध हे शब्द जैनांच्या केवली आणि अर्हत् या शब्दांशी समानार्थक आहेत. द्रष्टेपणा, सच्चेपणा, विनय, तप, आत्मक्लेश, सेवा, दातृत्व हे जैनमताप्रमाणे अर्हताचे गुणविशेष होत. हे गुण आत्मसात् करणारा केवलीही अर्हत् होऊ शकतो. त्यांनी केवलीचे दोन प्रकार मानले आहेत – केवली आणि अर्हत्केवली. दोघेही वीतराग आणि सर्वज्ञ असतात. पण धर्मप्रवर्तकाची म्हणजेच गुरू होण्याची योग्यता मात्र अर्हत्केवली, म्हणजे तीर्थंकर यालाच असते.

ज्याने अष्टांगिक मार्ग पूर्णपणे आक्रमिला व जो शेवटच्या स्थितीला प्राप्त झाला, असा थोर पुरुष म्हणजे अर्हत् होय. अर्हतांनी तीन मद म्हणजे इंद्रियवासना, पुनर्जन्म व अज्ञान हे दोष जिंकलेले असतात. प्रत्येक अर्हत् हा सम्यक्–ज्ञानी असतो. त्याला संबोधी प्राप्त झालेली असते. (१) अनुद्विग्नता (२) आत्मशुद्धी (३) उत्साह (४) शांतता (५) आनंद (६) एकाग्रता, व (७) औदार्य, या सप्त गुणांनी तो युक्त होऊन अर्हत् बनला. बौद्धमते अर्हत्पुरुषाला पुनर्जन्म नाही व संसारी पुरुषालाही ते पद प्राप्त करून घेता येते. बुद्धाच्या जीवनकालात अर्हत्पदाला पोचलेल्या वीस जणांची नावे अंगुत्तरनिकायात दिली आहेत. दीघनिकायातल्या सप्तसंवादांतल्या तिसऱ्या संवादात अर्हत्पद हे सर्वोच्चपद असल्याचे सांगितले आहे. अर्हत्पदाचा अर्थ विस्तृत होत चालला तसतसा अर्हत् पुरुषाबद्दल पूज्य भावही वाढत गेला. एखाद्या भिक्षूला जेव्हा आपण अर्हत् बनलो असे वाटे, तेव्हा तो तसे प्रकट करी. पुढेपुढे तर त्या विषयीच्या कल्पना इतक्या वाढल्या, की अर्हत्पदाची प्राप्ती प्राचीन काळातल्या थोर पुरुषांनाच शक्य होती; प्रस्तुत काळात तसा पुरुष होणे शक्य नाही, असाही समज रूढ झाला.

बौद्धधर्माच्या स्थापनेनंतर काही शतकांनी महायान पंथ निघाला. त्या पंथाचे पंडित पाली भाषा सोडून संस्कृत भाषेत ग्रंथ लिहू लागले. अर्हत्पदाची कल्पना हीनयानी संप्रदायाची

असल्यामुळे महायानी पंडितांनी तिला उचलून न धरता बोधिसत्त्व ही नवीच पदवी प्रचारात आणली. बोधिसत्त्व अवस्था हे त्यांनी अंतिम उच्च ध्येय ठरविले. ललितविस्तर व महावस्तू या ग्रंथांत बुद्धाच्या आरंभीच्या शिष्यांनाच फक्त अर्हत् ही उपाधी दिलेली आहे. सद्धर्मपुंडरीक या ग्रंथात अर्हत् शब्द बऱ्याच वेळा आला असला, तरी अर्हत् ही अवस्था बुद्धापेक्षा कमी दर्जाची आहे, असे तिथे स्पष्ट म्हटले आहे. पाहा– बोधिसत्त्व. [ प्रा. जैन–आ. वि. सू. स्मा. ग्रं.; एन्सा. रि. ए.; म. ज्ञा. को.; रि. इं; बौ. द. मी. ]

**अलक** एक अलंकारशास्त्रज्ञ. याने रत्नाकराच्या 'खरविजय' नामक ग्रंथावर टीका लिहिली व मम्मटाचा अपूर्ण राहिलेला काव्यप्रकाश हा ग्रंथ परिकरअलंकारापासून पुढे लिहून पूर्ण केला. [ म. च. को. ]

**अलकनंदा** हिमालयातील गढवाल प्रदेशातल्या केदार पर्वतातून उगम पावलेली एक पवित्र नदी. ही गंधमादन पर्वतापासून निघाली, असे भागवत पुराणात म्हटले आहे (४.२४). गंगेला मुख्य पाणीपुरवठा हिच्यापासून होतो. अनेक पुराणांत हिला गंगेच्या चार प्रवाहधारांपैकी एक मानले आहे (वायुपु. ४१.१८; कूर्मपु. १.४६.३१; विष्णुपु. ११.२.३६).

देवप्रयागच्या वरच्या गंगाप्रवाहाला अलकनंदा म्हणतात. देवप्रयाग येथे ही भागीरथीला मिळते व पुढे त्या संयुक्त प्रवाहाला गंगा असे नाव प्राप्त होते. बदरिकाश्रम हे त्या दोघींचे संगमस्थान होय, असे नारद पुराणात म्हटले आहे (२.६७.७२–७३). या नदीला पाच इतर नद्या मिळून पाच प्रयाग बनतात. त्यांची नावे देवप्रयाग, नंदप्रयाग, कर्णप्रयाग, रुद्रप्रयाग व विष्णुप्रयाग अशी आहेत. पाहा – गंगा. [ म. ज्ञा. को.; हि. जॉ. ए. इं.; हि. ध. ]

**अलका** कुबेराची राजधानी. कैलासावर या नगरीची स्थापना असून कुबेर हा तिचा स्वामी आहे. पुरूकडून तारुण्य घेतल्यानंतर ययातीने या ठिकाणीच विषयसुखाचा उपभोग घेतला (म. भा. आदि. ८५.९). पुरूरवाही उर्वशीसह अलकेतच राहिला होता. कालिदासाने मेघदूतात या नगरीचे काव्यमय वर्णन केले आहे. [ क. हि. वा. पु; सु. वि. को. ]

**अलंकार** (१) अमरकोशात 'अलम्' शब्दाचे भूषण, पर्याप्ती, शक्ती आणि वारण असे चार अर्थ दिले आहेत. अलंकार शब्दातला त्याचा अर्थ भूषण अशा आहे. शरीर सुशोभित करण्यासाठी वापरायच्या वस्तूंना अलंकार म्हणतात.

आपले शरीर शोभिवंत व आकर्षक दिसावे ही इच्छा मानवमात्रात स्वभावतःच आहे. अलंकाराला आभरण असेही म्हणतात. हा शब्द भृ (=भर्) धातूपासून बनला आहे. त्याचा अर्थ शरीरावर ठेवणे, बाळगणे, किंवा वाहणे असा आहे. त्यावरूनच त्याला- अलंकार असाही अर्थ प्राप्त झाला आहे. अथर्ववेदात अनेक ठिकाणी हा शब्द मंत्रसामर्थ्य किंवा मंत्रशक्तीने भारलेली वस्तू अशा अर्थाने येतो (२.४.३). ऋग्वेदातही त्याचा अर्थ आणणे, विशेषतः इच्छित वस्तू किंवा शक्तिदायी वस्तू आणणे, असा आहे.

अलंकार व आभरण यांचे हे लाक्षणिक अर्थ विचारात घेता, अलंकारांचा हेतु केवळ शरीर सजविणे एवढाच नसून, जीविताचे संरक्षण, देवतांची कृपा, पिशाचांचे निराकरण असे अनेक हेतू त्याच्या मुळाशी दिसतात. सौष्ठवयुक्त शरीरात देवाची वसती असते व रोगग्रस्त शरीर पिशाचांचे माहेरघर असते, अशी समजूत आहे. म्हणून आपले शरीर भूषवून त्यात देवतांचे वास्तव्य घडवून आणणे व त्या देवतांच्या द्वारे भुताखेतांना पळवून लावणे, असा अलंकाराचा गर्भितार्थ होतो. दृष्टबाधा व ग्रहबाधा होऊ नये, असाही त्यात उद्देश असतो. याच हेतूमुळे अलंकारांत प्रतीके शिरली आहेत. नाग, कमळ, इ. अलंकार हे प्रतीकात्मकच आहेत. मुलाच्या गळ्यात वाघनखे घालण्याची पद्धत संरक्षणाच्या उद्देशानेच आली आहे. धातूंचा मुख्य उपयोग भुतांखेतांपासून बचाव व देवतांची कृपा यासाठी होतो, असे प्राचीन काळापासून मानले गेले आहे. त्यासाठीच पूर्वी तांब्याचे दागिने घालण्याची प्रथा होती. अजूनही मुलांच्या पायांत तांब्याचे वाळे घालतात. त्याचा मूळ हेतू पौरुषाची जपणूक असा आहे. अलंकारांचा संबंध जादूविद्येशीही थोडाबहुत आहेच. सामान्यतः शरीरावरचे सर्व अलंकार हे ताईतवजाच असतात. सौभाग्यचिन्हांचा सगळा वर्ग अशाच प्रकारचा आहे. विवाहित स्त्रीच्या गळ्यात बांधले जाणारे मंगळसूत्रही भूषणापेक्षा संरक्षण याच भावनेने आलेले आहे. लग्नातली अंगठीही मुळात संरक्षक म्हणूनच वधूच्या बोटात घातली गेली.

बहुतेक सर्व मानवसमाजांत अलंकार वापरण्याची चाल आहे. आदिमानव वाळलेले गवत, वेलीचे देठ, नाना प्रकारच्या बिया, फळे, हाडे, इ. वस्तूंनी आपली काया सुशोभित करी. आजही पोवळी, कवड्या, शंख, काचेचे मणी, विशिष्ट प्रकारच्या लाकडांचे मणी, इ. अलंकार वन्य जमातीत मुक्त हस्ताने वापरलेले दिसतात. गुंजाफळाचे हार भिल्ल स्त्रिया वापरीत, असे उल्लेख संस्कृत वाङ्मयात अनेक ठिकाणी आढळतात. उदा० –

किं जातु गुञ्जाफलभूषणानां सुवर्णकारेण वनेचराणाम् ।।
(विक्रमांकदेवचरित १. २५)

अर्थ – गुंजाफळांचे दागिने घालणाऱ्या वन्यांना (त्यांच्या वस्तीत) सोनाराची काय गरज ?

आपले संरक्षण व्हावे याबरोबरच आपण सुंदर दिसावे या आकांक्षेतूनही विविध अलंकारांची निर्मिती झालेली आहे. सौंदर्याकांक्षा ही स्त्रियांमध्ये विशेष प्रमाणात दिसत असली, तरी पुरुषांनीही अलंकारांचा हव्यास कमी धरलेला नाही. अजंटयाच्या लेण्यात एका राजकुमाराचे चित्र आहे. त्या राजकुमाराच्या अंगावर कपडयांपेक्षा हिऱ्यामोत्यांचे अलंकारच अधिक प्रमाणात दिसून येतात. त्याचप्रमाणे अलंकारांची हौस केवळ श्रीमंत लोकांतच असते असे नाही; तर ती गरीब लोकांत-सुद्धा तितकीच आढळून येते. श्रीमंतांचे अलंकार थोडे; पण ते मौल्यवान, घाटदार व आकर्षक असतात; तर गरिबांचे दागिने विपुल; पण हलक्या धातूचे असतात. पांढरपेशांपेक्षा अन्य जातींतल्या बायका चांदीचे दागिने मोठया प्रमाणात घालतात. गोंड, कातकरी, ठाकूर वगैरे जमाती पितळेचे आणि मण्यांचे भाराभर अलंकार घालताना दिसतात.

प्रत्येक समाजातील अलंकरणांच्या पद्धती वेगवेगळया असतात. त्यांतही स्त्रिया, पुरुष व मुले यांचे अलंकार भिन्न भिन्न प्रकारचे असतात. सौंदर्यदृष्टी बदलते, तसतशी अलंकारांची जडणघडणही बदलते. भारतीयांची अलंकारप्रियता ग्रीक इतिहासकारांनी वर्णिली आहे. भारतातील प्राचीन काळची सोने, मोती व रत्ने यांची समृद्धी लक्षात घेता, भारतीय लोकांच्या दागिन्यांच्या हौसेचे आश्चर्य वाटायचे कारण नाही. ते लोक स्वत:ची शरीरे तर अलंकारांनी भूषवीतच; पण गायी, घोडे आणि हत्ती यांनाही सुवर्णालंकारांनी सजवीत.

अलंकारांचे सामान्यत: चार प्रकार आहेत – (१) अवेध्य–किरीट, कुंडल, इ. (२) बंधनीय – फुले, गजरे इ. (३) क्षेप्य–नूपुर, वलय, इ. व (४) आरोप्य – मोत्ये व मणी यांच्या माळा इत्यादी.

वैदिक कालातले अलंकार कशा प्रकारचे असत, ते समजायला चित्रगत किंवा शिल्पगत असा कोणताही पुरावा उपलब्ध नाही. पण असे असले तरी वैदिक साहित्यात अलंकाराची नावे मात्र थोडी थोडकी नाहीत. ही नावे पुढीलप्रमाणे आढळतात –

**ऋग्वेद** – अंज, अंजी, अरंकृत, अरंकृती, आनूक, ओपश, कर्णशोभन, कुरीर, कृशन, कृशनिन, खादी, निष्क, न्योचनी, पुंडरीक, पुष्कर, प्रभपन, बर्हंन, भूपन, मणी, रत्न, रुक्म, रुक्मिन्, ललामी, वरिमत्, व्यंजन, विभूषन, शतपत्र, शिबल, सुनिष्क, स्तुका, स्रज्, हिरण्ययी, हिरण्यशिप्र, हिरीमत्, इत्यादी.

**तैत्तिरीय संहिता** – पुण्डरिकस्रज्, (सुवर्ण कमलांची माला), पुष्कर, प्रवर्त, प्राकाश, भोग, मणी, रत्न, स्रज् इत्यादी.

**अथर्ववेद** – अंजी, ओपश, कुम्ब (डोक्यावर घालायची जाळी), कुरीर, कृशन, जीवभोजन (अंजन), देवांजन, नलंद, निष्कग्रीव, पुंडरीक, पुष्म, प्रसाधन, मधूलक, रुक्मन्, ललाम, ललामगू, ललाम्य, सीमन्, सुरुक्म, सुस्र, स्रज्, स्वेदांजी, हरिस्रज्, हिरण्यज, हिरण्यस्रक्, हैरण्य इत्यादी.

**संहितेतर वाङ्मय** – प्राकाश, फण, लोहमणी, निमुक्ता, स्थागर, इत्यादी.

ऋग्वेदातले मरुत् हे विशेषेकरून अलंकारप्रिय दिसतात –

चित्रैरञ्जिभिर्वपुषे व्यञ्जते ।
वक्ष:सु रुक्माँ अधि येतिरे शुभे ।।

(ऋ. १.६४.४)

अर्थ – आपल्या शरीरास ते (मरुत्) चित्रविचित्र आभरणांनी भूषवीत असतात. शोभेकरिता त्यांनी आपल्या वक्ष:स्थळावर सुवर्णालंकार धारण केलेले असतात.

वैदिक युगात वक्ष:स्थलावर धारण करण्याचा निष्क नावाचा एक अलंकार होता; पण त्याचा आकार कसा असे ते कळत नाही. तो सुवर्णाचा अलंकार असावा. वैदिक काळात निष्क नावाचे एक सुवर्णनाणे होते. या नाण्यांचे हार करून ते गळयांत घालीत. 'अर्हन् निष्कं यजतं विश्वरूपम्' (ऋ. १. ३३. १०) या मंत्रात निष्कांच्या हाराला विश्वरूप असे विशेषण दिलेले असून विश्वरूप म्हणजे सर्व प्रकारच्या आकृतींची सुवर्णनाणी गुंफून बनविलेला हार रुद्र आपल्या गळयात घालतो, असे म्हटले आहे.

मणी हा आणखी एक वैदिक अलंकार होय. ऋग्वेदात व तदुत्तर ग्रंथांत मणी म्हणजे रत्न असा त्याचा अर्थ दिला आहे. हा मणी दोऱ्यात ओवून गळयात किंवा दंडावर बांधीत. त्याचा उपयोग ताइताप्रमाणे करीत. पूर्व व उत्तर अश्मयुगात सर्वत्र मणी अस्तित्वात होते. सिंधुसंस्कृतीतही त्यांचा आढळ होतो. मण्यांची वलये व कुंडलेही करीत. सोन्यारुप्याचे मणी श्रीमंत वापरीत तर गरीब लोक दगडाचे, मातीचे, शंखांचे व गारेचेही मणी बनवून ते वापरीत. लांब, गोल असे त्यांचे वेगवेगळे आकार असत. मण्यांचा कमरपट्टा करीत. त्याला मणिमेखला म्हणत. मण्यांची वळी किंवा कंकणेही करीत.

मणिना वलयं वलयेन मणि: । मणिना वलयेन विभाति कर:॥

या सुभाषितात मणिवलयाने शोभणाऱ्या हाताचा उल्लेख आहे. चूडामणी नावाचा एक बायकांचा अलंकार होता. तो स्त्रिया आपल्या भांगात लोंबता बसवीत. हा विकसित कमळाच्या आकाराचा असून, त्याला मोत्यांच्या पाकळया जडवीत. मण्यांचे अलंकार स्त्रियांप्रमाणेच पुरुषही वापरीत.

प्राचीन काळी मणी हे विशेषेकरून दृष्टबाधा, आपत्ती व शरीरगत दोष दूर व्हावे म्हणून वापरीत. ही कल्पना आजही अस्तित्वात आहे. मुलांच्या गळयात अजूनही विशिष्ट मणी हा दृष्टमणी म्हणून बांधला जातो.

ऋग्वेदातील आणखी एक दागिना म्हणजे खादी. साखळ्या, कडी, तोडे वा अंगठी अशा अर्थाने हा शब्द येतो. वाजपेय, दशपेय, राजसूय, अश्वमेध या यज्ञांत यजमान व ऋत्विज यांनी विशिष्ट अलंकार वापरायचे असत. वाजपेय यज्ञात सर्व ऋत्विज सोन्याच्या कंठ्या घालीत, तसेच होता वज्रनामक रत्ने जडविलेली व शंभर सोन्याची कमळे गुंफून बनविलेली कंठी धारण करी (आश्व. श्री. सू. ९.९).

वैदिक काळात रुक्म नावाचा आणखी एक सुवर्णालंकार होता. रुक्म म्हणजे वाटोळे सुवर्णपदक होय. सूर्याला 'दिवोरुक्म' = आकाशाचे सुवर्णपदक म्हटले आहे (ऋ. ७.६३.४). अग्निचयनात यजमानाच्या गळ्यात २१ ठिपके उठविलेले रुक्म बांधायचे असे.

रत्नाचाही उल्लेख ऋग्वेदात येतो. अथर्ववेदात मणिरत्नाचा (सर्पमणी) उल्लेख आलेला आहे. सर्व प्रकारचे दुरित नष्ट होण्यासाठी रत्न उपयोगात आणीत. रत्नात सर्व कामना पूर्ण करण्याचे अलौकिक सामर्थ्य असते, अशी पुरातन श्रद्धा आहे. इंद्राने बुद्धाला पूर्वजन्मात 'विरोचन' = अक्षय प्रकाशी असे रत्न दिले होते, अशी जातकात कथा आहे. बौद्ध धर्मात बुद्धालाच रत्न म्हटले आहे. निरनिराळीं रत्ने ही ग्रहांची प्रतीके मानलेली आहेत. उदा० गुरूचा पुष्पराग, शनीचा नीलमणी इत्यादी. ती ती रत्ने त्या त्या ग्रहांची बाधा नष्ट व्हावी म्हणून अलंकारांच्या रूपाने वापरीत.

मोहेंजोदडो व हडाप्पा येथील स्त्री व पुरुष दोघांनाही अलंकारांची हौस दिसते. उत्खननात आढळून आले आहे, की त्या काळच्या स्त्रिया गळ्यात ताईत बांधीत व हारही घालीत. दंडांत बाजूबंद आणि कानांत तुकड्यांसारखी लटकती कर्णभूषणे वापरीत. बांगड्या कोपरापर्यंत भरीत. त्यांच्या कमरेत मेखला, बोटांत अंगठ्या व पायांत तोरड्या असत. त्या काळच्या श्रीमंतांचे दागिने सोने, चांदी आणि मणी यांचे असत. गरिबांचे दागिने तांबे, हाडे व शिंपा यांचे असत.

वेदोत्तर काळातल्या राजस्त्रिया व देवता यांच्या कित्येक अलंकारांची नावे पुढीलप्रमाणे आहेत – शिखापाश, शिखाजाल, खंडपत्र, चूडामणी, मकरिका, मुक्ताजाल, कुंडल, खड्गपत्र, वेणीगुच्छ, दारक, ललाटतिलक, भ्रूर, कर्णवलय, दंतपत्र, कर्णपूर इत्यादी. या अलंकारांच्या आकृत्या कशा असत व कोणता अलंकार कुठे घालीत, याची निश्चित माहिती मिळत नाही. तथापि, भारतातल्या निरनिराळ्या प्रदेशांतल्या लेण्यांतून आढळणाऱ्या मूर्तींवरून काही अलंकारांच्या आकृतींची कल्पना करता येते. बौद्ध काळात मोत्यांचा वापर अधिक प्रमाणात दिसतो. नागमुद्रा हे प्रतीक मोत्यांत गुंफलेले आढळते. कर्णभूषणांत बाण, ध्वज व अंकुश ही प्रतीके व कंठभूषणांत खंजीर, श्रीवत्स व वज्र ही प्रतीके आढळतात.

**मस्तकाभरणे** – अमरसिंहाने आपल्या अमरकोशात अलंकारांच्या यादीला मस्तकाभरणापासूनच सुरवात केली आहे.



झपटा

स्त्रियांच्या शीर्षालंकारांत भांगात घालायचे बालपाश्या व पारितथ्या असे दोन अलंकार त्याने सांगितले आहेत. पारितथ्या हा विजवरा असावा. याला सिंथी असेही म्हणतात. हंसतिलक म्हणजे पिंपळपानाच्या आकाराचा हिरेजडित दागिना. हा विजवऱ्याच्याच जागी घालीत.

झपटा – केसांत गुंतवून भालप्रदेशी आणलेला एक अलंकार.

ललामक – हा बिजवऱ्यासारखाच एक दागिना होता. पण त्याला पेटया नसून सोन्याची पाने असत.

चूडामंडन – कमलपत्रासारखा सुवर्णाचा दागिना. हा केवड्याप्रमाणे डोक्यात घालीत.

चूडिका – कमलासारखे सुवर्णाचे फूल.

ललाटावरचे अलंकार दोन – पत्रपाश्या व ललाटिका. पत्रपाश्या हा अलंकार पानांच्या गुच्छासारखा असे. डेख हे केंद्र समजून निरनिराळ्या दिशांना अग्रे येतील अशा प्रकारे त्यात पानांची रचना केलेली असे. ललाटिका याचा अर्थ हलायुधकोशात 'स्वर्णादिरचितललाटाभरणम्' = सुवर्णादी धातूंचे बनविलेले व ललाटावर लोंबणारे आभरण, असा दिलेला आहे; पण कालिदास आपल्या कुमारसंभवात (५.५५) ललाटावरचा चंदनतिलक या अर्थी तो शब्द वापरतो –

तदाप्रभृत्युन्मदना पितुर्गृहे। ललाटिकाचन्दनधूसरालका ।।

राजे लोक डोक्यावर रत्नखचित मुकुट वापरीत. अर्जुनाच्या किरीटाचे वर्णन महाभारताच्या कर्णपर्वांत आले आहे. मुकुटधारी दशरथाचे वर्णन कालिदास पुढीलप्रमाणे करतो –

चरणयोर्नखरागसमृद्धिभिर्मुकुटरत्नमरीचिभिरस्पृशन् ।।
नृपतयः शतशो मरुतो यथा शतमखं तमखण्डितपौरुषम् ।।
(रघु. ९.१३)

अर्थ – देव ज्याप्रमाणे इंद्राला नमस्कार करतात, त्याप्रमाणे शेकडो राजे चरणांच्या नखांच्या लाल कांतीने युक्त झालेल्या

मुकुटांवरील रत्नांच्या किरणांनी, अखंडित पराक्रम असलेल्या त्या दशरथाला प्रणाम करते झाले.

सरदार वगैरे पुरुष मस्तकी शिरपेच हा अलंकार धारण करीत.

राजस्त्रिया मस्तकी मुकुट न घालता भालप्रदेशी रत्नजडित सुवर्णपट्ट वापरीत. त्यावरूनच पट्टराणी हा शब्द आलेला आहे. चूडामणिरत्नाचा वर उल्लेख झालाच आहे. सीतेच्या चूडामणीचा रामायणात उल्लेख आहे. हा अलंकार मोत्ये व रत्नें ही एकत्र जडवून प्रफुल्ल कमळाच्या आकाराचा बनवीत. अमरावतीच्या शिल्पात चूडामणीचे अनेक सुंदर नमुने कोरलेले दिसतात. चूडामणीच्या जोडीला मकरिका नावाचाही एक अलंकार होता. तो श्रीमंत स्त्रिया आपल्या भांगातून थेट कपाळावर लोंवता सोडीत. याशिवाय, लांब वेणी पाठीवर सोडून तिच्यावर मोत्यांचे किंवा रत्नांचे सर नितंवापर्यंत मोकळे सोडणे अशीही पद्धत होती. याला प्रवेणी असे नाव असे. प्रवेणीच्या अग्रभागी सोन्याच्या वाटीत मोती जडवून त्याचा गोंडा लोंबवीत. प्रवेणीचा उल्लेख कालिदासाने (रघु. १५. ३०) केला आहे –


शिरपेच

**तत्र सौधगतः पश्यन्यमुनां चक्रवाकिनीम् ।**
**हेमभक्तिमतीं भूमेः प्रवेणीमिव पिप्रिये ।**

अर्थ – तिथे राजवाड्यावर जाऊन (शत्रुघ्न) चक्रवाक पक्ष्यांनी युक्त असलेल्या यमुनेला पाहत असता पृथ्वीच्या सुवर्णजडित वेणीप्रमाणे दिसणारा तो देखावा पाहून आनंदित झाला.

याशिवाय चंद्रकोर, गुलाबाचे फूल, नाग, केवडा, विजवरा, मूद, फिरकीचे फूल, चंद्र-सूर्य गोंडेफूल, या नावांचेही अलंकार बायका डोक्यांत व केसांत वापरीत.

**कर्णभूषणे** – अमरसिंहाच्या मते याचे कुंडल व कर्णिका असे दोन प्रकार आहेत. कर्णिकेलाच तालपत्र, ताटक, दंतपत्र, अशी अन्य नावे आहेत. कर्णिका कानाच्या वरच्या भागी व कुंडल खालच्या भागात घालीत.

स्त्री व पुरुष दोघेही कुंडले वापरीत. सापाचे वेटोळे असावे, त्याप्रमाणे कुंडले वलयाकृती असत. हा अलंकार वजनाला थोडा जड असे. त्यामुळे शरीराची थोडीशी हालचाल झाली तरी कुंडले मागे पुढे हालू लागत. कालिदासाने दशरथाच्या कानांतील कुंडलांचे चांचल्य पुढील श्लोकार्धात (रघु. ९. ५१) सांगितले आहे –

**तुरगवल्गनचञ्चलकुण्डलो । विरुरुचे रुरुचेष्टितभूमिषु ।**

अर्थ – घोड्याच्या चालण्याने ज्याच्या कानांतील कुंडले सारखी हालत आहेत, असा तो दशरथ राजा रुरु नामक हरिणे वावरत असलेल्या वनात शोभू लागला.

प्राचीन देवमूर्तींच्या कानांत कुंडले बहुतकरून असतात. त्यांचा आकार गोल असतो व त्यावर कारागिरी असते. कुंडलांत नाना प्रकारची रत्नेंही जडवीत. लंकेतल्या स्त्रियांच्या कर्णकुंडलांत हिरे बसविलेले होते, असे रामायणात वर्णन आहे. दमयंतीच्या स्वयंवरासाठी आलेल्या राजांच्या कानांत मणिकुंडले असल्याचे वर्णन महाभारतात आहे.

कुंडले अनेक नमुन्यांची असत. चंद्रकोरीच्या आकाराच्या कुंडलांना मृष्टकुंडल असे नाव होते. अमरावतीच्या शिल्पांत या नमुन्याची कुंडले विशेष प्रमाणात आढळतात. सर्व कुंडलांत मकरकुंडले ही लोकप्रिय व कौशल्याने बनविलेली असत. त्यांची जडणघडण मकराच्या आकृतीची असे. भागवतात (८. १५. १) बलिराजाचे वर्णन करताना –

**हेमाङ्गदलसद्बाहुः स्फुरन्मकरकुण्डलः ।**

असा त्याच्या मकरकुंडलांचा उल्लेख आला आहे. विष्णुमूर्तींच्या कानातली कुंडले ही मकरकुंडलेच असतात. मुंबईच्या कोळी स्त्रियांच्या कानात माशाच्या आकाराची कुंडले आजही दिसतात. याच प्रकारचे आणखी एक कर्णभूषण म्हणजे कनककमल हे होय. हे वर्तुळाकृती व प्रफुल्ल कमलाप्रमाणे दिसे. कालिदासाने मेघदूतात त्याचा उल्लेख केला आहे (उ. मे. ११). दक्षिण भारतातल्या स्त्रिया आजही अशा प्रकारची कनककमले वापरतात.


मत्स्याकार कुंडल

याशिवाय आणखी काही कर्णभूषणे होती, ती पुढीलप्रमाणे–

मुक्ताकंटक–मोत्यांची साखळी.

द्विराजिक– भीकबाळी. हिच्यात दोन मोती असून, मधला खडा पाचू, माणिक, इ. रत्नांचा असे.

त्रिराजिक – तीन मोत्यांची भीकबाळी.

कर्णपूर – फुलाच्या आकाराची कुंडले.

शृंखल – सोन्याची साखळी.

दक्षिणेतले गवळी असल्या साखळ्या कानांत घालतात.

कर्णेन्दू–कानातला चंद्र. हा कानाच्या मागच्या बाजूस घालीत.

कानबाला – याला चक्रवाडी असेही म्हणतात. ही मोत्यांची असून कानाच्या वरच्या भागी घालतात.



मकर कुंडल

महाराष्ट्रातल्या स्त्रिया जुन्या काळी बाळ्या, बुगड्या, वेलभोकरे, सोन्या-मोत्यांच्या कुड्या, इ. कर्णालंकार वापरीत. सांप्रत फक्त कुड्याच तेवढ्या वापरतात.

प्राचीन काळी हल्लीच्या सारखे दोन्ही कानांत सारखे अलंकार न घालता एकाच कानात एखादा अलंकार घालण्याची पद्धत असावी. बाणाने आपल्या कादंबरीत वर्णिलेल्या चांडालकन्यकेच्या एकाच कानात दंतपत्र होते.

नासिकाभूषणे – कालिदास, बाण, इ. संस्कृत कवींनी आपादमस्तक सर्व शरीरावरील अलंकारांचे वर्णन केले असले, तरी त्यात नाकातल्या कोणत्याही अलंकारांचा उल्लेख नाही. यावरून प्राचीन काळी नाकात अलंकार घालण्याची प्रथा नसावी, असे वाटते. नथ, लवंग, लोलक, चमकी, मोरणी, हे नासिकालंकार मुसलमानांच्या संपर्कातून आले असावे, असा तर्क आहे. अरब स्त्रिया नाकात नथवजा वलय घालतात. उ. भारतात सोन्याच्या तारेचे वलय नाकात घालण्याचा प्रघात अनेक जातींत आढळतो. तो बहुधा मुसलमानी प्रभावाचा परिणाम असावा. इ. स. च्या १०व्या शतकापासून नाकातल्या अलंकारांचे उल्लेख संस्कृत साहित्यात आढळू लागतात. द. भारतात तीन प्रकारचे नासिकालंकार आढळतात. मुक्कुकुट्टी, बुलक व नत्तू. मुक्कुकुट्टी हा तिकडील स्त्रियांचा सौभाग्यालंकार आहे.

पंजाबी स्त्रीच्या नाकातला अलंकार

सर्वप्रथम विल्हण कवी नासिकाभूषणाचा उल्लेख करतो –
नासावंशविनिर्मुक्तमुक्ताफलसनाभिना । (विक्रमांकदेवचरित)

शंकराचार्यांच्या त्रिपुरसुंदरीस्तोत्रात 'हे गिरिजे, मी दिलेल्या या नासिकाभूषणाचा स्वीकार कर' अशी देवीची प्रार्थना आहे.



नथ

शंकराचार्यांचा काल इ. स. चे आठवे शतक हा आहे. त्यावरून पाहता नासिकाभूषणाचा उल्लेख विल्हणाच्याही मागे जातो. पण श्री. गोडे यांच्या मते शंकराचार्यांचे पद्यग्रंथ दुसऱ्या कोण्या तरी शंकराचार्यांचे असून, ते अकराव्या शतकातले आहेत. बहुतेक उल्लेखांत नासिकाभूषण म्हणजे मोती असे म्हटलेले आहे. नासिकाभूषण हे सोन्याच्या तारेत मोती गुंफून बनवीत. आजही प्रचारात असलेली महाराष्ट्रातली नथ मोतीजडितच असते.

कंठभूषणे – कंठी वगैरे अलंकारांना पुराणकालात ग्रैवेयक असे नाव होते. नाभीपर्यंत लोंबणाऱ्या सोन्याच्या माळेला प्रालंबिका असे म्हणत व ती मोत्यांची असल्यास तिला उरःसूत्रिका



आधुनिक पद्धतीचा हार

म्हणत. हल्ली हांसळी ही लहान मुलांच्याच गळ्यात घालतात व ती सोन्याची किंवा चांदीची करतात. पण प्राचीन काळी मोठी माणसेही हांसळी वापरीत. हल्ली स्त्री-पुरुष गळ्यात सोन्याच्या, पोवळ्यांच्या, तुलसीकाष्ठांच्या, रुद्राक्षांच्या किंवा स्फटिकांच्या माळा घालतात. प्राचीन काळी माळा हा मस्तकावर धारण करण्याचा अलंकार असावा, असे दिसते. कारण 'माल्यं मालास्रजौ मूर्ध्नि' असे अमरकोशात म्हटले आहे. पण मेदिनीकोशावरून वाटते, की मस्तकावर धारण करायच्या माला

या पुष्पमालाच असत. वैदिक ग्रंथांत सुवर्णमालांचा उल्लेख सापडतो. यज्ञात उद्गात्याला सुवर्णमालाच द्यावी, असे सांगितले आहे. गोभिलसूत्रांत आलेल्या 'स्नात्वाऽलंकृत्य' या वचनावरून त्या काळी स्वर्णमाला कंठातच धारण करीत, असे दिसते. मोत्यांच्या एकेरी सराला यष्टिलता किंवा यष्टिका म्हणत. कालिदासाने मोत्यांच्या यष्टीचा पुढीलप्रमाणे उल्लेख केला आहे–

**क्वचित्प्रभालेपिभिरिन्द्रनीलैर्मुक्तामयी यष्टिरिवानुविद्धा ।।**

(रघु. १३.५४)

रत्नावली हा अलंकार रत्ने, मोत्ये व सुवर्णमणी एकत्र करून बनवीत. याला मणिसोपान असेही नाव होते. याच्या मध्यभागी मोठा सुवर्णमणी असल्यास त्याला चाटुकार म्हणत.

गळ्यातला सर्वांत महत्त्वाचा अलंकार म्हणजे हार होय. हाराविषयी संस्कृत साहित्यात असंख्य उल्लेख आहेत–

**हारोऽयं हरिणाक्षीणां लुण्ठति स्तनमण्डले ।**

(अमरुशतक १००)

**अर्थ** – हा हार हरिणाक्षींच्या स्तनमंडलावर लोळतो.

**पाण्डयोऽयमंसार्पितलम्बहारः ।** (रघु. ६.६०)

**अर्थ** – या पाण्डय राजाने खांद्यावर लांब हार घातला आहे.

हारातल्या सरांच्या संख्येवरून त्याला निरनिराळी नावे होती, ती अशी –

**देवच्छंद** – शंभर (किंवा १०८) सरांचा मोत्यांचा हार.

**गुच्छ** – बत्तीसपदरी हार.

**गुच्छार्ध** – चौवीसपदरी हार.

**गोस्तन** – चारपदरी मोत्यांची कंठी.

**अर्धहार** – बारापदरी (किंवा सोळापदरी) मोत्यांची कंठी.

**माणवक** – वीसपदरी मोत्यांची कंठी. भागवतात विष्णूला 'मायामाणवकं हरिम्' = श्रीहरी हा मायारूपी माणवक धारण करणारा आहे, असे म्हटले आहे (८.१८.२४).

**एकावली** – एकपदरी टपोऱ्या मोत्यांची माळ. कालिदासाने 'लताविटपे एकावली लग्ना' असा या अलंकाराचा उल्लेख विक्रमोर्वशीयात केला आहे.

**नक्षत्रमाला** – २७ मोत्यांचा एक पदरी हार किंवा भानुजी दीक्षितांच्या अमरकोशावरील टीकेप्रमाणे ७०० किंवा ८०० मोत्ये असलेला हार.

**भ्रामर** – मोठ्या मोत्यांची एकपदरी कंठी.

**नीललवनिका** – पाच, सात, किंवा नऊपदरी मोत्यांची कंठी व तिला जडविलेले पाचूचे लोलक.

**वर्णसर** – वरीलप्रमाणेच. पाचूऐवजी हिऱ्याचे लोलक.

**सारिका** – नऊ किंवा दहा मोत्यांची गळ्याबरोबर बसणारी कंठी.

**वज्रसंकलिका** – वरीलप्रमाणेच; पण मागच्या बाजूस पाचूच्या लोलकाचा गोंडा.



पाचपदरी हार

**वैकक्षक**–यज्ञोपवीता-सारखी खांद्यांवरून लोंबणारी माळ. अमरावतीच्या शिल्पांत हा अलंकार फक्त स्त्रियांच्याच गळ्यात दिसतो; पण त्यानंतरच्या शिल्पांत बालसुब्रह्मण्य, बालकृष्ण, इ. बालदेवतांच्या गळ्यांतही हा अलंकार चढला आहे.

**देवंदक** – याचेच दुसरे नाव शतेश्वरी असे आहे.

**इंदुच्छंद** – याला १००८ पदर असत व तो देवाच्या गळ्यात घालीत.

**विजयच्छंद** – पाचशेपदरी हार.

**रश्मिकलाप** – चौऱ्याण्णवपदरी हार.

**मंदर** – पाचपदरी हार.

**फलकहार** – तीन किंवा पाच पदरी चपट्या आकाराच्या रत्नांचा केलेला हार. भारतीय हारांतला हा प्राचीन नमुना आहे. मौर्य, आंध्र, शुंग यांच्या शिल्पांत हा पाहायला मिळतो. हे फलक हारांत सारख्या अंतरावर बसविलेले असत.



फलक हार

मोत्यांचा आकार व संख्या यांवरून बहुतेक हारांना नावे दिलेली दिसतात. काही हारांची नावे मध्यभागी असलेल्या मोत्यांवरून दिली जात. उदा. शीर्षक, उपशीर्षक, प्रकाण्डक, अवघटक, तरलप्रतिबंध, इत्यादी.

विष्णूच्या किंवा श्रीकृष्णाच्या गळ्यातल्या हाराला वैजयंती म्हटले आहे. या हाराला पाच पदर असतात व ते सृष्टीतील पंचतत्त्वांचे प्रतिनिधी मानले जातात.

याशिवाय चंद्रहार, एकदाणी, सरी, ठुशी, पोत, पेटी, तन्मणी, लप्फा, वज्रटीक, साखळी, राकडी, मोहनमाळ, बोरमाळ, इ. (विशेषतः स्त्रियांचे) गळ्यांत घालायचे कित्येक अलंकार आहेत.

**अंगुलिभूषणे** – अंगुरीय, अंगुलीय, ऊर्मिका ही एकाच अलंकाराची नावे आहेत. हा अलंकार हाताच्या बोटांत घालण्याचा आहे. सांप्रत या अलंकाराला मोहोर म्हणतात. मोहोर म्हणजे

अंगुलिमुद्रा होय. नंदाचा अमात्य राक्षस याची मोहोरेची अंगठी दुसऱ्याच्या हातात गेल्यामुळे त्याचे सगळे बेत फसले, अशी कथा मुद्राराक्षस नाटकात आहे. दुष्यंताने शकुंतलेला दिलेली अंगुलि-मुद्रा तिच्या हातून हरवली व पुढे ती तिच्या दुःखाला कशी कारणीभूत झाली, ती कथा शाकुंतल नाटकात आलेली आहे.

पुरातन काळापासून आपल्या देशात अंगठ्या घालण्याची चाल आहे. श्राद्धाच्या वेळी यजमान दर्भाची पवित्रके घालतो, त्यासुद्धा एक प्रकारच्या अंगठ्याच असे म्हटले पाहिजे. कित्येक धार्मिक लोक आपल्या बोटांत विशिष्ट प्रकारची गाठ असलेले सोन्याचे पवित्रक कायमचे घालून ठेवतात. तर्जनीत (अंगठ्या-जवळील बोट) सोन्याची अंगठी घालावी व अनामिकेत (करंगळीजवळ बोट) रुप्याची अंगठी घालावी, असा धार्मिक संकेत आहे. संस्कृत साहित्यात अंगठीचे अनेक प्रकार पुढील-प्रमाणे वर्णिलेले आहेत –

द्विहीरक – दोन बाजूंस दोन हिरे व मध्ये पाचूचा खडा मिळून बनविलेली अंगठी.

त्रिहीरक – मध्ये मोठा हिरा व दोन बाजूंस दोन लहान हिरे अशी बनविलेली अंगठी.

वज्र – त्रिकोणाकृती कोंदणात बसविलेल्या हिऱ्याची अंगठी.

रविमंडळ – मध्ये इतर रत्ने व त्यांच्याभोवती हिरे अशा प्रकारची अंगठी.

नंद्यावर्त – चौकोनी कोंदणात बसविलेल्या रत्नांची अंगठी.

वज्रवेष्टक – कोंदणाभोवती हिरे असलेली अंगठी.

सूक्तिमुद्रिका – नागफणीच्या आकृतीच्या कोंदणात रत्ने जडविलेली अंगठी. (अंगठी पाहा.)

बाहुभूषणे – दंडांत घालण्याच्या दागिन्यांत अंगद व केयूर हे दोन दागिने प्रमुख आहेत. ही भूषणे स्त्री-पुरुष दोघेही वापरीत. हे अलंकार रत्नजडित सुवर्णाचे असत. यांतल्या काहींचा आकार लतेसारखा व काहींचा मकरासारखा असून वरची बाजू टोकदार असे. म्हणून हे अलंकार घालणारी व्यक्ती त्याचे वरचे टोक आपल्या उत्तरीय वस्त्रात अडकणार नाही, अशी काळजी घेई. काहींच्या दोन्ही तोंडांस सिंहाचे किंवा अन्य कोणत्या तरी पशूचे मस्तकही घडविलेले असते. केयूर हा अलंकार जडावाचा केलेला असतो. तो मुख्यत्वे उजव्या दंडात घट्ट बसवितात.



केयूर

केयूराला लोंबता गोंडा असतो. तो नसला, की त्याला अंगद म्हणतात. पुरुषाने वापरलेल्या अंगदाचा उल्लेख कालिदासाने केला आहे–'संघट्टयन्नङ्गद-मङ्गदेन' (रघु. ६.७३). बाणभट्टाच्या कादंबरीत शूद्रक राजाच्या दंडांत केयूर असल्याचे सांगितले असून, त्यावर सर्पाची उत्प्रेक्षा केलेली आहे. याशिवाय पंचका व कटक अशा दोन बाहुभूषणांचाही उल्लेख मिळतो. पंचकामध्ये पुष्कळ ताईत व पेटया असतात. कटक ही चौकोनी जडावाची सुवर्णपेटी असते. चौरपंचाशिकेत 'आवद्धहेमकटकां रहसि स्मरामि' म्हणजे जिने सुवर्णाचे कटक दंडांत बांधले आहेत, अशा स्त्रीचे (प्रेयसी) मी स्मरण करतो, असा उल्लेख आहे (१५).



बाहुभूषण, खजुराहो

मनगटात धारण करण्याच्या अलंकारांना आवापक, पारि-हार्य व वलय अशी नावे आहेत. वलय म्हणजे सोन्याची सल-कडी किंवा बायकांचे गोठ होत. वलयात फलकवलय नावाचा एक प्रकार असून त्यात चपट्या आकाराची रत्ने जडवलेली असत. असे शिल्प अमरावतीच्या स्तूपात आढळते. वलयाचा कनकवलय म्हणून कालिदासाने दोन ठिकाणी उल्लेख केला आहे. मेघदूतातल्या विरही यक्षाचे कनकवलय गळून पडल्यामुळे मनगट रिकामे झाले होते. दुष्यंताच्या विरहावस्थेमध्ये त्याचे कनकवलय सारखे कोपरापर्यंत जात असे.

वलयाच्या खाली कंकणे घालतात. 'कंकणं करभूषणम्' असे अमरकोशात म्हटले आहे. संस्कृत साहित्यात कंकणांचा वारंवार उल्लेख येतो. लग्नात वधूवर एकमेकांच्या हातात बांधतात, ते कंकण सुताचे असते; म्हणूनच मेदिनीकोशांत कंकण शब्दाचे करभूषण, मंडन व सूत्र असे तीन अर्थ दिलेले आहेत. चूड व अर्धचूड हे कंकणाचेच प्रकार आहेत. चूड म्हणजे सोन्याच्या तारेचे स्थूल कंकण व अर्धचूड म्हणजे तसेच बारीक कंकण होय. चूड



प्राचीन हस्तभूषणे

यालाच मराठीत चुडा म्हणतात. बंगालमध्ये शंखांचे चुडे आजही वापरतात. त्याच प्रदेशात बाहुती नामक एक सलकड्यांचा प्रकार रूढ आहे. काचेच्या, शंखांच्या, सोन्याच्या किंवा पितळेच्या बांगड्या हा भारतात सर्वत्र वापरला जाणारा स्त्रियांचा अलंकार आहे. उत्तर भारतातल्या अनेक जातींत कांशाच्या बांगड्या वापरतात. बांगड्यांचा धंदा करणाऱ्या वर्गाला मराठीत कासार असे म्हणतात. ह्याच शब्द तांबट जातीलाही लावण्यात येतो. त्यावरून अशी कल्पना होते, की पूर्वी तांबट लोक कांशाची भांडी व बांगड्या करीत असावे व त्यामुळे कासार हा शब्द बांगड्या व भांडी बनविणाऱ्या दोन्ही जातींस चिकटला असावा.

**कटिभूषणे** – स्त्री आणि पुरुष यांच्या कमरेत घालायच्या दागिन्यांचे अनेक प्रकार आहेत.

कांची – सोन्याची एक पदरी साखळी. कुमारसंभवातील

**एतावता नन्वनुमेयशोभिकाञ्चीगुणस्थानमनिन्दितायाः ।।**

(१. ३७) या श्लोकार्धांत कालिदासाने उमेच्या कटीला 'कांचीगुणस्थान' (= कांची नामक अलंकार घालायची जागा,) असे म्हटले आहे.

मेखला – सोन्याची आठपदरी साखळी.

**स्मरसि स्मर मेखलागुणैरुत गोत्रस्खलितेषु बन्धनम् ।।**

(कु. सं. ४. ८)

अर्थ – हे मदना, नाव घेताना चूक झाल्यामुळे मी मेखलेच्या पदरांनी तुला बांधले, ही गोष्ट तू स्मरतोस काय ?

या श्लोकात कालिदासाने मेखलेला अनेक पदर असतात, याचीही सूचना दिली आहे.

रस(श)ना – सोळापदरी कमरपट्टा. गीतगोविंदातील

**रसतु रसनापि तव घनजघनमण्डले ।**


मेखला

या जयदेव-वचनात रसना हा ध्वनी उत्पन्न करणारा अलंकार असल्याचे सूचित होते. रसनला बारीक घागऱ्या लावीत असावे. सोन्याच्या तारेत मणी ओवून हा अलंकार बनवीत. जुन्या मूर्तींच्या कमरेलाही असा सूत्रमणियुक्त अलंकार बांधलेला दिसतो. याचा उपयोग वस्त्र संभाळण्याकरिता होत नसून, केवळ शोभेकरिता होत असावा, असे वाटते.

कलाप – पंचवीसपदरी कटिबंधाला हे नाव दिलेले आहे.

कांचीदाम – चार बोटे रुंदीचा गोंडे व घुंगुर असलेला सोन्याचा पट्टा.

पुरुषांच्या कटिभूषणाला शृंखला म्हणत. याशिवाय सारसन असेही एक कटिभूषणाचे नाव आहे. ते स्त्री-पुरुष दोघेही वापरीत असावे.

**चरणालंकार**– याचेही अनेक प्रकार आहेत, ते पुढीलप्रमाणे-

पादचूड – रत्नजडित सुवर्णाचा वाळा.

पादकंटक – चौकोनी तीन शिरांचा सोनेरी वाळा. यातून ध्वनी निघावा म्हणून आत दाणे घातलेले असत.

पादपद्म – तीन किंवा पाच सोनेरी साखळ्यांचा जडावाचा दागिना. बंगालमध्ये चरणपद्म या नावाने आजही तो प्रचारात आहे. हा चांदीचा केलेला असतो.

किंकिणी – यालाच मराठीत पैंजण असे म्हणतात.


नूपुर

नूपुर – हा पायातला प्रसि[द्ध] अलंकार होय. नूपुर म्हणजे चाळ. हे पूर्वी सोन्याचे करीत अलीकडे चांदीचे किंवा पितळेचे करतात. अलिकडे नर्तकी स्त्रिया पायात चाळ बांधतात; पण प्राचीन काळी गरती स्त्रियाही हा अलंकार वापरीत. सीतेच्या पायांतही नूपुर होते, हे रामायणावरून कळते. उद्भट म्हणतो –

**गुणवानपि मौखर्यात् पादे लुठति नूपुरः ।**

अर्थ – गुण (सूत्र) वान् असूनही सतत शब्द करीत राहिल्यामुळे नूपुर पायात लोळतो.

याशिवाय मंजीर नावाचा आणखी एक चरणालंकार होता. तो रवीला गुंडाळलेल्या दोरीसारखा असे व बायका तो आपल्या पायांना बांधीत. अमरावतीच्या शिल्पांत मंजीराचा नमुना आढळतो. मंजीर हा अलंकारही नूपुराप्रमाणेच नाद उत्पन्न करणारा असल्याचे गीतगोविंदावरून कळते. तुलाकोटी या अलंकाराची दोन्ही टोके मोठ्या आकाराची असतात. तोरड्या चांदीच्या असतात. पासुली या पायात घालायच्या अंगठ्या होत.

**सौभाग्यालंकार** – काही अलंकार केवळ सुवासिनींनी वापरायचे असतात. त्यांना सौभाग्यालंकार असे नाव आहे. ... मंगळसूत्र हा अलंकार महाराष्ट्र व कर्नाटक या प्रदेशात प्रचारात आहे. दक्षिणेत अशाच प्रकारचा ताळी नावाचा अलंकार आहे. ताळी किंवा मंगळसूत्र हे दोन्ही अलंकार लग्नात वर आपल्या वधूच्या गळ्यात बांधतो. काळी पोत वाखाच्या दोऱ्यात ...

सोन्याच्या तारेत गुंफून मंगळसूत्र तयार करतात. त्याच्या मधोमध एक मणी असतो. त्याला सौभाग्यमणी म्हणतात. मण्याच्या दोन्ही अंगीं सोन्याच्या दोन बारीक वाटया असतात. त्या चंद्रसूर्याची प्रतीके होत. 'यावच्चन्द्रदिवाकरौ' वधूचे सौभाग्य शाश्वत राहावे, असा त्या मंगळसूत्राचा गर्भितार्थ आहे. गाथासप्तशतीत याला कनकदोरा असे म्हटलेले आहे. कानातला तालपत्र हा अलंकारही सौभाग्याचे प्रतीक मानीत. त्या अलंकारावरून तो वापरणाऱ्या स्त्रीचा पती हयात आहे, असे समजत.

नाकातली नथ व पायांच्या बोटांतली जोडवी, गेंद, विरोल्या, मासोळचा हे अलंकारही सौभाग्यालंकारांतच गणले जातात. लग्नाच्या वेळी वधूच्या हातांत ज्या हिरव्या बांगडया भरतात, त्यांना वज्रचुडा असे नाव आहे. उत्तर भारतात काच व लाख यांच्या बांगडया हा सौभाग्यालंकार समजतात.

**बाळलेणी** – लहान मुलांच्या अंगावर घालण्याच्या दागिन्यांचा एक वर्ग आहे. यांत विदल्या, मनगटया, ताईत, गाठले, वाघनख, हासळी, मोडवाकी, पिळाचे वाळे, चाळ, कडया, हाताच्या बोटांतल्या पाच अंगठया व त्यांना जोडून केलेला विंचू, तसेच डूल, करदोटा, इ. अलंकारांचा अंतर्भाव होतो.

मुसलमानी स्त्रियांचे दागिने बरेचसे हिंदू स्त्रियांच्या अलंकारांच्या धर्तीवरच असतात. त्याची कारणे दोन असावी. एक म्हणजे, बरेचसे मुसलमान मूळ हिंदू असल्यामुळे हिंदूंचे अलंकार त्या समाजात शिरले व दुसरे म्हणजे, परकी अस्सल मुसलमानांनीही हिंदूंच्या बहुविध अलंकारांचे अनुकरण केले. पारशी स्त्रियांचे दागिने विविध प्रकारचे नसतात. पण ते सोने, मोत्ये व रत्ने यांचे असल्यामुळे अधिक मूल्यवान असतात. कान, हात व गळा या तीनच ठिकाणी पारशी स्त्रिया दागिने घालतात. सोन्यापेक्षाही त्यांचा हिरे, मोत्ये यांवर विशेष भर असतो. [ म. ज्ञा. को.]

(२) साहित्यशास्त्रात शब्दांचे अर्थाचे किंवा दोन्हींचे सौंदर्य वाढविणाऱ्या अनुप्रास, उपमा, उत्प्रेक्षा, इ. विशिष्ट शब्दार्थयोजनेला अलंकार असे नाव आहे. अलंकारांचे शब्दालंकार, अर्थालंकार आणि उभयालंकार असे तीन प्रकार आहेत. शब्दालंकार हे विशिष्ट शब्दयोजनेवर आधारलेले असतात. अनुप्रास आणि यमक ही शब्दालंकाराची उदाहरणे होत. अर्थालंकार हे अर्थावर आधारलेले असतात. उपमा, उत्प्रेक्षा, श्लेष, अर्थांतरन्यास ही अर्थालंकाराची उदाहरणे आहेत. ज्या अलंकारांत शब्द आणि अर्थ हे दोन्ही महत्त्वाचे असतात त्यांना उभयालंकार असे म्हणतात. पुनरुक्तवदाभास, श्लिष्ट उपमा, परंपरित रूपक ही उभयालंकाराची उदाहरणे आहेत. अलंकार अनेक असून, त्यांतही काही भेद आहेत. रूपक, भ्रांतिमान, अपन्हुती, व्यतिरेक, व्याजस्तुती, विरोधाभास, अनुमान, यथासंख्य, हे काही प्रमुख अलंकार होत. पाहा – साहित्यशास्त्र. [ काव्यप्रकाश; हि. सं. पो. ]

(३) संगीतात वापरला जाणारा एक शब्द. त्याचा अर्थ स्वरांचा कलात्मक व सुंदर समुच्चय असा आहे. स्थायी, आरोही, अवरोही व संचारी, अशा स्वरांना धरून अलंकार बनत असतो. अलंकारांमुळे संगीताला शोभा येते. वायुपुराणात संगीतातल्या अलंकारांचे उल्लेख येतात. आधुनिक संगीतात अलंकारांविषयी स्वतंत्र वर्णन आढळत नाही. कारण आजमितीस अलंकार हे गमकांत अंतर्भूत झालेले आहेत. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

## अलंकारधारण

अश्विनी, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, रेवती ही नक्षत्रे व रवी, मंगळ, गुरु, शुक्र हे वार असता स्थिरलग्नी मोत्ये, सोने, पोवळे, मणी, हस्तिदंत, इ. अलंकार धारण करावे; म्हणजे ते सुख व भाग्य देणारे होतात आणि दुष्ट वारी, दुष्ट नक्षत्री अलंकार धारण केले असता, ते क्लेशावह होतात, असे सांगितले आहे.

## अलंकारसंप्रदाय

'शब्दार्थभूषणमनुप्रासोपमादिः'= (शब्द व अर्थ यांना भूषणभूत होणारे अनुप्रासादी प्रकार म्हणजे अलंकार होत.) (न्यायकोश). 'काव्यशोभाकरो धर्मः'= काव्याला शोभा देणारा धर्म, अशी दुसरी व्याख्या आहे. संस्कृत साहित्यशास्त्रात रससिद्धान्ताची प्रतिष्ठापना होण्यापूर्वी काही साहित्यशास्त्रज्ञ अलंकारालाच काव्याच्या उत्कृष्टतेचे प्रमुख साधन मानीत असत. अलंकारसंप्रदाय म्हणजे काव्यात अलंकारालाच श्रेष्ठत्व देणारा संप्रदाय होय. या संप्रदायाचा संस्थापक भामह असून, उद्‌भट आणि रुद्रट हे दोघे त्याचे पोषक आहेत. उद्‌भटाने भामहाच्या अलंकारांना व्यवस्थित स्वरूप दिले. दंडीलाही कोणत्या ना कोणत्या स्वरूपात अलंकारांची प्रधानता मान्य होती. या संप्रदायाच्या मते अलंकार हा काव्याचा प्राण आहे. ज्याप्रमाणे अग्नीला उष्णतारहित कल्पिता येत नाही, त्याचप्रमाणे काव्यालाही अलंकाराविना काव्यत्व नाही. रमणीचे मुख सुंदर असले तरी अलंकारावाचून त्याची प्रभा जशी फाकत नाही, त्याचप्रमाणे प्रकृत रूपात वाणीला चारुता प्राप्त होत नाही. भामहाने वक्रोक्ती हा अलंकारांचा पाया मानला आहे.

सैषा सर्वैव वक्रोक्तिरनयाऽर्थो विभाव्यते ।
यत्नोऽस्यां कविना कार्यः कोऽलङ्कारोऽनया विना ।।
(काव्यालंकार २.८५)

अर्थ – वक्रोक्ती हीच सर्व काही आहे. हिने अर्थ विशेषत्वाने प्रकाशित होतो. हिच्यासाठी कवीने प्रयत्न करावा. वक्रोक्तीवाचून अलंकार कुठला ?

भामहाने शब्दालंकारांपेक्षा अर्थालंकारांवर विशेष भर दिला आहे. उद्भट हा भामहाचा टीकाकार. उद्भटाने आपली लक्षणे भामहावरच आधारली; पण त्यांचे स्वरूप अधिक नीटनेटके केले. त्याने अलंकारांना दिलेले शास्त्रीय स्वरूप उत्तरकाली मम्मटालासुद्धा उचलावेसे वाटले. त्यांच्या नंतरचे बहुतेक सर्व आलंकारिक आपली मते मांडताना उद्भटाची दखल घेतल्यावाचून पुढे जाऊ शकत नाहीत. अलंकारांच्या विकासात दंडीलाही मोठे श्रेय आहे. दंडीने ३५ अर्थालंकारांचे विवेचन केले आहे. रुद्रटाचे अलंकारविवेचन सूक्ष्म आणि महत्त्वपूर्ण आहे. शब्दार्थरूपाने अलंकारांचे जे दोन भेद पडले, त्यांची पार्श्वभूमी रुद्रटाने दिली आहे. त्याने एकूण ६८ अलंकारांचे वर्णन केले आहे. या संप्रदायाच्या आचार्यांनी अलंकारांचे वर्गीकरण करताना त्यांच्या मूलतत्त्वांचाही विचार केला आहे. त्यांच्या विभागासाठी काही सिद्धान्तही निश्चित केलेले आहेत. अलंकारांच्या वर्गीकरणाचे वैज्ञानिक स्वरूप सर्वप्रथम रुद्रटाच्या काव्यालंकारात दिसते. याच विषयात रुय्यक व विद्याधर यांचें निरूपणही तर्कशुद्ध, मूलगामी आणि वैज्ञानिक आहे. रुद्रटाने औपम्य, वास्तव, अतिशय व श्लेष यांना अलंकारांचे मूळ मानले आहे. विद्याधराने आपल्या एकावली या ग्रंथात औपम्य, विरोध, तर्क इत्यादींना अलंकारांचे मूलविभेदक मानून तो विषय सुंदर रीतीने प्रतिपादिला आहे. वामनाचे अलंकारविवेचनही वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्याने उपमेचाच प्रामुख्याने प्रपंच केला असून, उपमेच्या मर्यादाही बरोबर ओळखल्या आहेत.

अलंकारांचा विकास हळूहळू होत गेलेला दिसतो. भरताच्या नाट्यशास्त्रात अनुप्रास, उपमा, रूपक व दीपक या चारांचाच निर्देश आहे. यांतला अनुप्रास हा शब्दालंकार असून, बाकीचे तीन अर्थालंकार आहेत. अलंकारांची संख्या वाढत गेली, त्याचबरोबर त्यांच्या स्वरूपातही फरक पडत गेला. त्यांतल्या वक्रोक्ती अलंकाराचे क्रमशः विकसित स्वरूप अभ्यासण्याजोगे आहे.

या संप्रदायातल्या कित्येक आचार्यांनी प्रतीयमान (व्यंग्य) अर्थाचे महत्त्वही स्वीकारले आहे. त्यांनी ध्वनी व प्रतीयमान अर्थ यांना काव्याचे मूलतत्त्व मानले नाही; पण समासोक्ती, अप्रस्तुतप्रशंसा, आक्षेप, यांच्यामध्ये प्रतीयमान अर्थाच्या अनेक प्रकारांचा समाहार केला आहे.

अलंकारमताच्या आचार्यांना रसतत्त्व अज्ञात नव्हते; पण त्यांनी रसाला स्वतंत्र स्थान न देता त्याला एक अलंकारविशेष म्हणूनच स्वीकारले आहे. भामहाने रसवत्, प्रेय, ऊर्जस्वी व समाहित या चार अलंकारांच्या अंतर्गत रस आणि भाव यांचा समग्र विषय समाविष्ट केला आहे. रुद्रटाने अलंकारांबरोबरच रसाचेही विवेचन केले आहे. 'काव्य रसयुक्त असावे, अन्यथा रसिक काव्यापासूनही विन्मुख होतील,' असे तो म्हणतो. रुद्रटाच्या रसविवेचनाने शब्दार्थं व रस हे समोरासमोर आले. त्याने रससंख्या दहा मानली असली, तरी तिला मर्यादा घातली नाही. दंडीही रसवत् अलंकाराशी परिचित आहे. त्याने आठ रस आणि आठ स्थायीभाव यांचा निर्देश केला आहे. त्याचप्रमाणे ध्वन्यर्थालाही समासोक्ती, आक्षेप, इ. अलंकारांत त्याने समाविष्ट केले आहे. भामह, रुद्रट व दंडी यांनी काव्यांत अलंकारांचे जे महत्त्व प्रतिपादिले, ते कोणत्या ना कोणत्या स्वरूपात पुढच्या कालातही मान्यता पावले आहे. पाहा – अलंकार [ सं. सा. इ.; हिं. सा. को.; भा. सा. शा. ]

**अलखगीत** नाथपंथी जोगी भिक्षा मागताना अलख निरंजन (अदृश्य परमेश्वर) म्हणून जी गीते गातात, त्यांना अलखगीते म्हणतात. या गीतांतून गोपीचंद, भरथरी, गोरख व मैनावती यांच्या कथा असतात. ही गीते निर्गुणभावाची द्योतक आहेत. [ हिं. सा. को. ]

**अलखधारी** एक पंथ. भारताच्या वायव्य प्रदेशात, विशेषकरून अंबाला जिल्ह्यात या पंथाचे लोक आहेत. हे जातीने चर्मकार असून, स्वतःला लालबेगचे अनुयायी म्हणवितात. हे लालबेगला शिवाचा अवतार मानतात. यांचा मूर्तिपूजेवर विश्वास नाही. ते कोणत्यातरी अलख (अलक्ष्य) तत्त्वाचे ध्यान करतात. त्यांच्या मते या दृश्य जगाव्यतिरिक्त परलोक नावाचे स्थान नाही. या जगालाच ते महत्त्व देतात आणि इथे अहिंसा, परोपकार, इ. सद्‌गुण अंगी बाणवून सात्त्विक जीवन व्यतीत करावे, असे मानतात. हे सामाजिक भेद मानीत नाहीत. [ उ. भा. सं. प. ]

**अलखनामी** एक धार्मिक पंथ. हा शब्द अलक्ष्य+नाम या संस्कृत सामासिक शब्दापासून बनला आहे. अलखगीर असेही याचे दुसरे नाव आहे. दसनामी गोसाव्यांतल्या पुरी नावाच्या पोटविभागाला अलखनामी किंवा अलखिया असे म्हणतात. त्याचा अर्थ अलखाचा अनुयायी, असा होतो. या पंथाची स्थापना बिकानेरच्या एका चांभार जातीच्या पुरुषाने केली. पुढे त्याच्या अनुयायांनी त्याला लालगीर अशी पदवी दिली.

हे लोक कांबळीचा लांब चोगा वापरतात आणि डोक्यावर उंच निमुळती टोपी घालतात.

भिक्षा हे यांचे निर्वाहसाधन होय. भिक्षेसाठी हे लांब कटोरा वापरतात. 'अलख कहो' किंवा 'अलख हो जागो' असा उद्घोष करून भिक्षा मागतात. लगेच भिक्षा वाढली तर घेतात, नाही तर पुढच्या घरी निघून जातात. शांत आणि निरुपद्रवी

असा हा भिक्षेकऱ्यांचा वर्ग आहे. यांचा संबंध शैव पंथाशी येतो.

लालगीर याचा निश्चित काळ सांगता येत नाही. तसेच या पंथाचे तत्त्वज्ञान केव्हा निश्चित झाले, तेही सांगणे कठिण आहे. अलखनामींना मूर्तिपूजा मान्य नाही. परमेश्वराचे स्वरूप अलक्ष्य अर्थात अगम्य, अगोचर आहे, हा त्यांचा सिद्धान्त आहे. त्यामुळे अलखाच्या केवळ नामस्मरणात त्यांची उपासना साठविलेली असते. याशिवाय दानधर्म करणे, मद्यमांस न खाणे, अहिंसा पाळणे व वैराग्यवृत्तीने वागणे, हे या पंथाचे सामान्य नियम आहेत. हे परलोक मानीत नाहीत. 'शरीराबरोबर सर्व काही नाश पावते व शेवटी शरीरही महाभूतांत विलीन होते; त्यामुळे सुख-दुःख हे मनुष्याला या ठिकाणी याच जन्मात भोगावे लागते,' असे लालगीरचे मत होते. लालगीरची मते बौद्ध धर्माशी बरीच जुळतात. पाहा – दससामी. [ म. ज्ञा. को. ]

## अलख बुलाखी

(इ. स. चे १९ वे शतक, पूर्वार्ध) शांकर मतानुयायी गुजराती संत कवी. याने गुजरातीत पुष्कळ कविता केली असून, याला तिथल्या लोकांत बरीच मान्यता आहे. सद्‌गुरू म्हणून ते त्याच्या पादुकांची पूजा करतात. [ म. ज्ञा. को. ]

## अलगर कोविल

मदुराई जिल्ह्यातले एक विष्णूचे देवस्थान. हे मदुरेच्या ईशान्येस १२ मैलांवर आहे. हे स्थान फार प्राचीन आहे. प्राचीन काळी तिथे एक कडेकोट नगर वसलेले होते. तिरुमल नायकाच्या राजवाडचाचे अवशेषही तिथे दिसतात. देवळाच्या आसपास अनेक मंडप असून त्यांवर सुंदर कोरीव काम आहे.

अलगर ही कल्लर व इतर चोर लुटारू यांची कुलदेवता आहे. या देवाच्या उत्सवात रथ ओढण्याचा मानही कल्लरांचाच असतो. जुन्या काळी हे लोक आपल्या लुटीतला काही भाग या देवाला अर्पण करीत.

आदी महिन्याच्या अमावास्येस इथे मोठी यात्रा भरते. हे देवस्थान जागृत असल्याचे सांगतात. खोटी शपथ घेणारा मनुष्य तिथल्या करुप्पन द्वारामधून गेला, तर तो मरतो, अशीही समजूत आहे. [ म. ज्ञा. को. ]

## अलगूज

बासरीच्या वर्गातले एक वाद्य. हे बांबूचे करतात. बांबूचा सुमारे दीड वीत लांबीचा पोकळ तुकडा घेतात. त्याची एक बाजू पेराची असते व त्यामुळे ती सहजच बंद असते. तिला बारीक छिद्र पाडतात. दुसऱ्या बाजूस तिरकस खाप देऊन पायरी करतात. ती आडवी चिरून त्या छेदात बारीक पायरीच्या आकाराची गावडी बसवितात. म्हणजे ती आयतीच पिपाणी बनते. या पिपाणीपासून चार बोटांवर खापाच्या विरुद्ध अंगास चौकोनी छिद्र करून ते थोडेसे मोकळे राहील, अशा बेताने एक गावडी बसवितात. त्यामुळे पिपाणीतून फुंकलेला वारा या चौकोनी छिद्रावर आदळतो. चौकोनी छिद्रापासून चार बोटांच्या अंतरावर वाटाण्याच्या आकाराची समांतर आठ छिद्रे सळई तापवून तिच्या साह्याने पाडतात. या छिद्रावर बोटे ठेवून वर उचलून इष्ट स्वर काढता येतो. अलगूज म्हणजे लहानशी सनईच होय. सनईप्रमाणे अलगूजही उभे धरून वाजवितात. काही ठिकाणी दोन अलगुजे एकत्र जोडून ती जोडीने वाजवितात. त्याला अलगोजा म्हणतात. जोड-अलगुजात सात छिद्रे असली, तरी त्यातली फक्त चारच (सा रे ग म) उघडी ठेवून बाकीची मेणाने बंद करतात. पाहा – बासरी. [ सु. वि. को.; भा. वा. इ. ]



अलगूज

## अलद्रा

अतिवृष्टी थांबविण्यासाठी करावयाचा एक लौकिक विधी. त्या दिवशी गावात कोणीही स्वयंपाक, धुणेपाणी, इ. गृहकृत्ये करीत नाहीत. आदल्या दिवशी शिजवून ठेवलेले अन्न खातात. मेघराजाशी हा एक प्रकारचा असहकारच असतो. देव जसा उपचारांनी फलप्रद होतो, तसाच तो प्रसंगविशेषी त्याच्याशी असहकार केल्यानेही इष्ट फल देतो, अशी लोकधारणा आहे. [ लो. दं. ]

## अलबेली अली

सखीसंप्रदायातली एक कवयित्री. मात्र काही संशोधक हा पुरुष असावा की काय अशी शंका दर्शवितात. अलबेली अलिग्रंथावली, गुसाईजीका मंगल व विनयकुंडलिया असे हिचे तीन ग्रंथ उपलब्ध झाले आहेत. हिने शुद्ध व्रजभाषेचा उपयोग केला आहे. तिच्या कुंडलियाचा एक नमुना असा –

जागत नैनन में रहौ सोवत सपने माँहि ।
चलत फिरत इक छिन कहूँ अन्तर परिहै नाँहि ।
अंतर परिहै नाँहि निरखि तुव वदन किशोरी ।
प्रेम छके दिन रैन रहे दृग चन्द चकोरी ।।

अर्थ – हे किशोरी! मी जागी असेन तेव्हा तू माझ्या डोळ्यांत वास्तव्य कर. मी झोपी गेल्यावर माझ्या स्वप्नात वावरतानादेखील एका क्षणाचाही मला तुझा वियोग होऊ नये, तुझे रूप पाहण्यात एका क्षणाचाही खंड पडू नये व चंद्र-चकोराप्रमाणे

माझे डोळे रात्रंदिवस प्रेमानंदात मग्न राहावे. [ म. हिं. क. ]

**अलम** इस्लामी ध्वज. मुहंमद पैगंबराच्या काळी काळे व पांढरे अशी दोन्ही रंगांची निशाणे वापरीत. पुढे पंथ भिन्न झाल्यावर शियापंथी हिरवे निशाण वापरू लागले व सुन्नींनी पांढरा रंग कायम ठेवला. कॉन्स्टंटिनोपल या शहरात मुहंमदाचे म्हणून एक निशाण जतन करून ठेवले आहे, ते चौपदरी रेशमी असून, त्याचा एक पदर हिरवा आहे. इस्लामी निशाणाचा मूळ रंग मात्र काळा असावा, असे मानतात. [ डि. इ. ]

**अलवण** तिरुवितांकुर (कोचिन) मधली मीठ तयार करणारी जात. सुमारे चार शतकांपूर्वी पांड्य देशातून सात अलवण कुटुंबे तिरुवितांकुरच्या मिठागरांत काम करण्यासाठी आणली गेली व त्यांची ही जात बनली, अशी आख्यायिका सांगतात. हे लोक तमिळ बोलतात, मांस खातात, पण मद्य वर्ज्य मानतात. शास्ता व भद्रकाली या यांच्या कुलदेवता होत. यांना पूर्वी मंदिरप्रवेश बंद होता. हे पूर्वी मृतांना पुरीत; पण अलिकडे काही लोक मृतांचे दहन करतात. यांच्यांत गोंदून घेण्याची चाल सार्वत्रिक आहे. [ का. ट्रा. स. इं.; म. ज्ञा. को. ]

**अलवणतृतीया** एक तिथिव्रत. हे केवळ स्त्रियांसाठी आहे. वैशाख, भाद्रपद किंवा माघ शु. तृतीया. ही याची तिथी होय. द्वितीयेस उपवास व तृतीयेस गौरीची पूजा व मीठ वर्ज्य करून भोजन, असा याचा विधी आहे. हे व्रत आयुष्यभर केले तरी चालते. [ हि. ध. ]

**अलक्ष्मी** एक क्षुद्र देवता. हिला अशुभाची, दुर्भाग्याची देवता मानतात. पद्मपुराणात हिच्या जन्माचा वृत्तांत सांगितलेला आहे. तो असा –

देवासुरांनी केलेल्या समुद्रमंथनातून कालकूटानंतर, पण लक्ष्मीच्या आधी ही वर आली. म्हणून हिला लक्ष्मीची मोठी बहीण अतएव ज्येष्ठा म्हणतात.

> ततोऽलक्ष्मी समुत्पन्ना कालास्यारक्तलोचना ।
> रूक्षपिंगलकेशा च जरन्ती बिभ्रती तनुम् ॥
>
> (पद्म. ब्रह्म. ९.९)

अर्थ – कालकूटानंतर अलक्ष्मी वर आली. तिचे तोंड काळे; डोळे लाल आणि केस पिंगट होते. तिच्या शरीरावर म्हातारपणाच्या खुणा होत्या.

वर आल्यावर हिने देवांना विचारले की, 'मी काय करू ?' त्यावर देवांनी तिला सांगितले. "तू कोळसे, केस, कोंडा (केर); अस्थी यांत राहा. ज्या घरात कलह असेल तिथे तू राहा. जिथे असत्य व कठोर भाषण चालते, संध्याकाळच्या वेळी अभक्ष्यभक्षण होते, गुरू, देव, अतिथी यांचा समादर होत नाही, वेदमंत्रांचा घोष जिथे नसतो, जिथे परद्रव्यापहरण, परदारागमन, सज्जननिंदा, इ. गोष्टी चालतात, तिथे तू राहा."

सागरमंथनातून लक्ष्मी वर आली. तिचा विष्णूबरोबर विवाह ठरला. पण ज्येष्ठेच्या आधी कनिष्ठेचे लग्न कसे करायचे असा प्रश्न लक्ष्मीने उपस्थित केला. त्यामुळे विष्णूने अलक्ष्मीचे उद्दालक नामक दीर्घतपस्वी ऋषीबरोबर लग्न लावले. पण उद्दालकाचा वैदिक आचार पाहून तिला तो आवडेनासा झाला आणि उद्दालकालाही तिचा अवैदिक स्वभाव आवडला नाही. अखेर उद्दालकाने अलक्ष्मीला पिंपळाखाली वसायला सांगितले आणि तो निघून गेला. उद्दालक परत येत नाही असे लक्षात आल्यावर अलक्ष्मी रडू लागली. तिचा तो आक्रोश ऐकून लक्ष्मी विष्णूसह तिला भेटायला आली. विष्णूने तिचे सांत्वन करून तिला तिथेच राहायला सांगितले. तो म्हणाला, "दर शनिवारी लक्ष्मी तुला भेटायला येईल. त्यामुळे शनिवारी अश्वत्थ पूज्य मानला जाईल आणि जे तुझी पूजा करतील, त्यांच्या ठिकाणी लक्ष्मी निश्चल राहील."

अलक्ष्मीच्या मूर्तीचे वर्णन अंशुमद्भेदागम (काश्यपशिल्पम्), सुप्रभेदागम, पूर्वकारणागम, इ. ग्रंथांमध्ये आढळते, ते असे- द्विभुजा, कृष्णवर्णाची, मोठ्या ओठांची, लांब नाकाची, लोंबणाऱ्या स्तनांची, निळे वा तांबडे वस्त्र ल्यालेली, उजव्या हातात कमळ आणि डाव्या हातात कऱ्हा धारण करणारी व भद्रपीठावर पाय सोडून सुखाने बसलेली. तिने विविध अलंकार धारण केलेले असतात आणि वेणी घातलेली असते. तिच्या रथावर काकचिन्हांकित ध्वज असतो. ती कन्यापुत्रांसहित असते. तिच्या उजव्या बाजूला मागे बैलाचे तोंड असलेला मुलगा असतो.

प्राचीन तमिळ निघंटूत गाढव हे तिचे वाहन आणि केरसुणी हे आयुध सांगितले आहे. निघंटूतच ज्येष्ठेला शीतला म्हटले आहे.

अलक्ष्मीच्या जन्माची आणि तिच्या ज्येष्ठा या नावाची कथा पुराणांनी वाढविली आहे. पण ज्येष्ठेची वा अलक्ष्मीची कल्पना पुराणांपेक्षाही प्राचीन आहे. बौधायन गृह्यसूत्राच्या ज्येष्ठाकल्पात ज्येष्ठेचे वर्णन आहे. तिच्या रथाला सिंह जोडलेले आहेत, वाघ तिच्या मागून येत आहेत. तिचे पोट मोठे व डोळे कमळासारखे आहेत, असे तिथे म्हटले आहे. शिवाय हस्तिमुखा म्हणजे हत्तीसारखे तोंड असलेली असेही म्हटले असून, या देवीची स्थापना करून तिच्यासाठी हवन करावे, असे सांगितले आहे. महाभारतात लक्ष्मीने असुरांचा त्याग आणि अलक्ष्मीने त्यांचा अंगिकार केल्याचे कथानक आहे (वन. ९४.९.१२).

' बौधायन गृह्यसूत्रात ज्येष्ठेची अनेक नावे दिली असून, त्यांत निर्ऋती हे एक तिचे नाव दिले आहे.

विविध नावांनी वावरणारी ज्येष्ठा विनायकांशी नाते सांगणारी आहे. बौधायन गृह्यसूत्रातल्या ज्येष्ठाकल्पात तिला हस्तिमुखा म्हणजे हत्तीसारखे मुख असणारी, मोठ्या पोटाची असे म्हटले आहे. विनायक हेही हस्तिमुख आहेत. विघ्ननायक गणपती मूळचा विनायक असून, तो हस्तिमुख आहे.

काही अभ्यासकांच्या मते अलक्ष्मी व लक्ष्मी ही एकाच देवतेची दोन रूपे आहेत. मंत्रमहोदधीत ज्येष्ठा लक्ष्मी नामक मंत्रात ज्येष्ठेलाच लक्ष्मी म्हटले आहे. लक्ष्मीसहस्रनामात तिची ज्येष्ठा, कालरात्री, कुबेराक्षी, वैनायकी, षष्ठी, इ. नावे येतात.

काश्यपशिल्पानुसार घट हे ज्येष्ठेचे अभिज्ञान आहे. दिवाळीच्या दिवशी घटावर स्वस्तिक काढून त्याला लक्ष्मीचे प्रतीक समजून तो घट दारात ठेवण्याची एक पद्धत आहे. भाद्रपद मासातल्या गौरीच्या सणात ज्येष्ठा-कनिष्ठांचे मुखवटे हे घटाचेच असतात. काही ठिकाणी या घटांनाच लक्ष्मी मानतात. लक्ष्मी व अलक्ष्मी या उभय देवतांच्या हाती कमळ असते. हा या उभय देवतांच्या साम्यातला एक समान धागा आहे.

बंगालमध्ये लक्ष्मीपूजेच्या प्रसंगी अलक्ष्मीची गोमयाची मूर्ती करून तिची पूजा करण्याची पद्धत आहे. गोमंतकात दिवाळीच्या पाडव्याला अशीच एक शेणाची मूर्ती बनवून तिची पूजा करतात, तीही अलक्ष्मीच असावी.

अमावास्येच्या दिवशी अलक्ष्मीचे निःसारण करण्याचे विधिविधान धर्मसिंधू, निर्णयसिंधू इ. मान्य ग्रंथांतून आले आहे. कृत्यचंद्रिकेत ही पूजापद्धती विस्ताराने दिली आहे, त्याचा सारांश असा – गोमयाची लहानशी अलक्ष्मी बनवावी. डाव्या हातात कृष्णपुष्पे घेऊन पुढील ध्यानमंत्र म्हणावा –

अलक्ष्मी कृष्णवर्णां द्विभुजां कृष्णवस्त्रां पराधीनाम्
लौहाभरणभूषितां शर्कराचन्दनर्चाचितां
गृहसम्मार्जनीहस्तां गर्दभारूढां कलहप्रियां ।।

अर्थ – ही अलक्ष्मी, कृष्णवर्णाची, दोन हातांची, काळी वस्त्रे परिधान केलेली, लोखंडाच्या अलंकारांनी नटलेली, चंदन र्चाचलेली, हातात केरसुणी घेतलेली, गाढवावर बसलेली आणि कलहप्रिय आहे.

नंतर हातातली फुले तिला वाहावी आणि प्रार्थना करावी. मग सूप वाजवून तिचे आपल्या सीमेच्या बाहेर विसर्जन करावे. निर्णयसिंधुकार म्हणतात, की मध्यरात्र उलटून गेली असता, निद्रेने लोकांचे अर्धे डोळे मिटले असता नगरातील स्त्रियांनी सूप व डिंडिम वाजवून मोठ्या आनंदाने आपापल्या गृहांगणातून अलक्ष्मी बाहेर घालवावी. अशाच तऱ्हेचा विधी भारतभर आढळतो. शीतलेचे स्वरूपही काही अंशी अलक्ष्मीसारखेच आहे. या वर्णनाशी जुळणाऱ्या काही मध्ययुगीन शिल्पकृती उपलब्ध आहेत.

हिचा फेरा आपल्या घरावर येऊ नये म्हणून काही ठिकाणी आश्विन शु. अष्टमीस महालक्ष्मीच्या पूजेआधी ज्येष्ठा या नावाने हिची पूजा करून घराबाहेर तिचे विसर्जन करतात. ही घरातून निघून जावी म्हणून काही ठिकाणीं मागीलदारी एक वात लावून ती घराच्या कोनाकोपऱ्यात फिरवून पुढील दारी आणून टाकतात. हा प्रकार म्हणजे अलक्ष्मीला बाहेरची वाट दाखविणे होय. बाहेर वात लावून ती घरात आणणे म्हणजे लक्ष्मीला घरात येण्याचा मार्ग दाखविणे, असे समजतात. बंगालमध्ये आश्विनी अमावास्येस शेणाची ' क्षणिका अलक्ष्मी ' बनवून लक्ष्मीप्रमाणेच तिची पूजा करतात व मग तिचे विसर्जन करतात. [ डे. हिं. इ. ]

## अलक्ष्मीनाशक स्नान

पौष पूर्णिमेस पुष्य नक्षत्र असेल त्या दिवशी पुरुषाने पांढऱ्या मोहरीचा कल्क अंगाला लावून स्नान करावे व अलक्ष्मीला घरातून हाकलून द्यावे. नंतर नारायण, इंद्र, चंद्र, बृहस्पती व पुष्य यांच्या मूर्तींना सर्वौषधियुक्त जलाने स्नान घालून त्यांची पूजा व होम करावा, असे याचे विधान आहे. [ पुरुषार्थचिंतामणी ]

## अलाबु सारंगी

अलाबु = भोपळा. त्याच्या आधाराने बनविलेले सारंगी नावाचे तंतुवाद्य. हे उत्तर भारतात प्रचलित आहे. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

## अलिआ

तमिळनाडमधली एक शेतकरी जात. यांच्या नावाची व्युत्पत्ती हल (नांगर) किंवा (धान्य) या शब्दांवरून लावतात. यांचा सामाजिक दर्जा भंडारी व उडिया यांच्या खालचा मानतात. वरील जाती यांच्या हातचे अन्नोदक घेत नाहीत. यांच्यांत गोत्रे आहेत. सगोत्र विवाह होत नाही. बालविवाहाची प्रथा आहे. बालवयात मुलीचे लग्न होऊ शकले नाही, तर तिचे पितळी भांडे किंवा बाण यांच्याशी खोटे लग्न लावतात. हे वैष्णव असून, ग्रामदेवतांनाही भजतात. [ का. ट्रा. स. इं. ]

## अलिपना

सणवार, व्रते आणि धार्मिक व सामाजिक समारंभ या प्रसंगी बंगालमधील स्त्रिया व मुली लाकडी पाट, चौरंग किंवा जमीन यांवर जी चित्रे वा नक्षी काढतात, त्या कलाप्रकाराला अलिपना असे नाव आहे. अलिपना अंगणात किंवा घरातल्या जमिनीवर काढायची असल्यास ती तांदुळांच्या कोरड्या पिठाने काढतात व भिंतीवर काढायची झाल्यास तेच पीठ पाणी घालून पातळ करून त्याच्या रेघांनी काढतात. पांढऱ्या

रंगाव्यतिरिक्त इतर रंगांचा वापर क्वचितच करतात. विशेष प्रसंगी इतर रंग व पदार्थ वापरतात. अलिपना हातानेच काढतात. त्यासाठी कुंचला वापरीत नाहीत.

अलिपना हा निरनिराळ्या व्रतांचा महत्त्वपूर्ण भाग असतो. त्या व्रतांचा व त्यासाठी काढलेल्या अलिपनेचा अभ्यास केल्यास तिकडील लोकांच्या चालीरीती, धार्मिक श्रद्धा, सामाजिक इतिहास व कलात्मक जीवन यांवर प्रकाश पडतो.

कोणत्याही मांगलिक प्रसंगी अलिपना काढण्याची प्रथा आहे. लग्नात नवरदेव वधूगृही मंडपात येण्याच्या पूर्वी मुख्य द्वारापुढे शेणाने जमीन सारवून तिच्यावर विशिष्ट प्रतीकांची अलिपना काढण्याचे काम न्हावीण करते. अलिपनेतली चित्ररचना वास्तवदर्शी नसून प्रतीकात्मक असते, परंपरागत पद्धतीनेच ती आजही काढली जाते. त्यामुळे तिच्यांत वैविध्य व स्वतंत्र प्रज्ञा आढळत नाही. मात्र ज्या कारणासाठी ती काढली जाते, ते कारण किंवा उद्दिष्ट त्या रचनेत पूर्णपणे व्यक्त होते. कलश व देवता यांच्या स्थापनेसाठी त्यांच्या खाली अलिपना रेखाटतात.



अलिपना

विशिष्ट व्रतांच्या विशिष्ट अलिपना असतात. तारान्रताची अलिपना सर्वांत लोकप्रिय आहे. या अलिपनेत वरच्या बाजूला सूर्यबिंब, खाली दोही अंगी शिवलिंगे व पार्वती, सर्वांत खाली चंद्र, सूर्य-चंद्रांच्यामध्ये सोळा तारका व ब्रह्मांड आणि त्यातच भक्ताचे आसन म्हणून खाली पृथ्वी, अशी रचना असते. माघमंडळ व्रताच्या अलिपनेतच फक्त विविध रंग वापरतात. ही रचना संपूर्ण वर्तुळाकार असते व वरखाली सूर्य-चंद्र असतात. काजळरेखा नावाच्या एका लोकगीतात एका मुलीने केलेल्या अलिपनेचे तपशीलवार वर्णन आहे. अलिपना वर्गाकार व गोलाकार अशी दोन प्रकारची असते. हिचा विस्तार साधण्यासाठी वेलपत्ती किंवा रेषा काढतात. अलमोडा व नैनीताल जिल्ह्यातल्या बायका अलिपना काढण्यात विशेष कुशल असतात.



लक्ष्मीपूजनासाठी अलिपना

बंगाली समाजातली सौंदर्यदृष्टी प्राचीन काळापासून तो आजतागायत कसकशी विकसित झाली, ते अलिपना पाहिल्यावर कळून येते. सांप्रत ग्रामीण समाजाची स्थिती फार अवनत झाली आहे. तरीही त्या समाजात ही कला अजूनही जागृत स्थितीत आहे. ग्रामीण स्त्रियांचे अलिपना रेखाटण्याचे कौशल्य व त्यांची कल्पनाशक्ती अजूनही दिसून येते.

अलिपना शब्दाची व्युत्पत्ती अद्यापि स्पष्ट झालेली नाही. संस्कृत ‘आलिंपन’ यापासून हा शब्द उत्पन्न झाला असावा, असे मानतात. पण काही विद्वानांच्या मते तो मूळ आर्येतर शब्द आहे. बंगालमधील वन्य जमातींत गावाभोवती वेशीची भिंत उभारून तिच्यावर जे नक्षीकाम करीत, त्याला ऐलपन असे नाव होते. या रेखांकनामुळे गाव आणि शेत यांचे संरक्षण होते, अशी त्या लोकांची समजूत होती. त्या ऐलपनवरूनच अलिपना शब्द आला असावा.

हा कलाप्रकार किती प्राचीन आहे, ते सांगता येत नाही. ज्या व्रताशी व विधीशी अलिपनेचा संबंध येतो, त्यांपैकी बरीच व्रते व विधी बंगालमध्ये आर्यपूर्वकाळापासून चालत आलेली आहेत असे म्हणतात. बंगालमधील ग्रामीण स्त्रिया ज्या तऱ्हेचे नक्षीदार कमळ काढतात, तसेच ते मोहेंजोदडो येथील कलाकृतींतही दिसते, असे गुरुसदय दत्त सांगतात. आर्यांच्या आगमनापूर्वी या भागात ऑस्ट्रिक वंशाचे जे लोक येऊन वसले, त्यांनी ही कला

सुरू केली असावी, असे काही पंडितांचे मत आहे. ते लोक शेती करणारे होते. बंगालमधील परंपरागत व धार्मिक लोककलांचा शेतीशी बराच संबंध आहे.

बंगालमध्ये होणाऱ्या कित्येक व्रतांत आणि मांगलिक विधींत अलिपना काढतात. लक्ष्मीपूजनाच्या वेळी तर तिचे फारच महत्त्व असते. लक्ष्मी ही सौभाग्य, धनधान्य व सौंदर्य यांची



सूर्यपूजेसाठी अलिपना

देवता असल्यामुळे प्रत्येक गृहिणी तिची पूजा करते. त्या वेळच्या अलिपनेत भाताची रोपटी, कोठारे, घुबड, कुंकवाची डबी, या आकृती नेहमी आढळतात. याशिवाय नांगर, विळा, सूर्य, मापटे, या शेतीशी संबंधित वस्तूंचे दर्शनही त्यांत होते. मासा हे समृद्धीचे प्रतीक मानतात व ते सर्व अलिपनांमध्ये आढळते.

केवळ हौस म्हणूनही पूर्वी अलिपना काढली जाई; पण अलिकडे ती प्रवृत्ती कमी झाली आहे. समाजजीवनातले व्रते व धार्मिक विधी यांचे महत्त्वही लोप पावत असल्यामुळे अलिपनेची आवडही कमी होत चालली आहे. पाहा – रांगोळी, थापे, चौकपूर्णा. [ फो. आ. बें.; संमेलन पत्रिका – कला अंक १९५८ ]

## अलुती-बलुती

ज्या गावकामगारांना गावात काही हक्क प्राप्त झालेले असतात, त्यांना अलुतेदार व बलुतेदार म्हणतात. यांची संख्या बारा असते. लोहार, सुतार, महार, मांग, कुंभार, चांभार, परीट, न्हावी, भट, मुलाणा, गुरव व कोळी हे बारा बलुतेदार होत. तेली, तांबोळी, साळी, माळी, जंगम, कळवंत, डवऱ्या, ठाकर, घडशी, सोनार, तराळ व चौगुला हे बारा अलुतेदार होत. या दोघांनाही गावातल्या शेतकऱ्यांकडून सुगीच्या वेळी धान्य मिळत असते. अलुतेदारापेक्षा बलुतेदाराचा हक्क मोठा असतो. हक्कानुसार बलुतेदारांचे तीन वर्ग आहेत. काही ठिकाणी गावचा पाटील व कुलकर्णी यांचाही बलुतेदारात समावेश केलेला दिसतो. सर्वच गावांत बलुतेदार असतात, असे मात्र नाही. [ सु. वि. को. ]

## अलौकिक ज्ञान

प्रत्यक्ष व अनुमान हे दोन ज्ञानाचे मोठे विभाग आहेत. वर्तमान कालात ज्यांची सत्ता आहे व ज्या ज्ञानेंद्रियांच्या टप्प्यात आहेत, अशा वस्तूंचे ज्ञान प्रत्यक्षाच्या द्वारे होत असते. पण दूरस्थ व सूक्ष्म वस्तूंचे ज्ञान इंद्रियांच्या द्वारे होत नाही. त्यासाठी अनुमानाचा अवलंब करावा लागतो. म्हणून प्रत्यक्ष व अनुमान यांच्या द्वारे प्राप्त होणाऱ्या ज्ञानाला लौकिक ज्ञान असे म्हणतात. हे ज्ञान देशिक व कालिक प्रतिबंधांनी परिच्छिन्न असते. केव्हा केव्हा काही व्यक्तींना देशकालांच्या प्रतिबंधापासून मुक्त असे काही ज्ञान झाल्याचे दिसून येते व त्याची व्याख्या प्रत्यक्ष व अनुमान यांच्या आधारे होऊ शकत नाही. म्हणून अशा प्रकारच्या ज्ञानाला अलौकिक ज्ञान म्हणतात. असे अलौकिक ज्ञान असणारे लोक पुष्कळदा आढळून येतात. सर्व देशांत सर्वसामान्य जनतेचाही अशा अलौकिक ज्ञानावर विश्वास असतो.

भारतीय दर्शनांमध्ये आस्तिक व नास्तिक असे दोन प्रमुख भेद आहेत. चार्वाक, लोकायत, इ. दर्शने नास्तिक असून ती इंद्रियांच्या कक्षेच्या बाहेरचे म्हणजेच अतींद्रिय किंवा अलौकिक ज्ञान मानीत नाहीत. पूर्वमीमांसा दर्शनाचीही अलौकिक ज्ञानाविषयी अनास्था आहे. याव्यतिरिक्त असलेली आस्तिक व नास्तिक दर्शने मात्र अलौकिक ज्ञानावर पूर्ण भरोसा ठेवतात.

न्यायदर्शनात प्रत्यक्ष प्रमाणाचे लौकिक व अलौकिक असे दोन विभाग केलेले आहेत. अलौकिक प्रत्यक्षाचेही तीन विभाग असून, त्यांतले योगज प्रत्यक्ष हे अलौकिक ज्ञानाशी संबंध दर्शविते. वैशेषिक दर्शनाचे भाष्यकार प्रशस्तपाद सांगतात, की समाधी अवस्थेत योग्यांना केवळ मनाच्या द्वारे लौकिक प्रत्यक्षाच्या टप्प्याबाहेर असलेल्या वस्तूंचे प्रत्यक्ष ज्ञान होते व समाधी सिद्ध झाल्यावर त्यांच्या स्थूल इंद्रियांनाही सूक्ष्म, दूरस्थ व व्यवहित अशा पदार्थांच्या ज्ञानाची शक्ती प्राप्त होते. याव्यतिरिक्त अलौकिक ज्ञानाचे आणखी एक रूप प्रशस्तपादांनी मानले आहे. त्याला ते आर्षज्ञान म्हणतात. आर्षज्ञान म्हणजे ऋषींना होणारे ज्ञान होय. हे ज्ञान प्रत्यक्ष, अनुमान, इ. प्रमाणांनी होणाऱ्या ज्ञानाहून भिन्न आहे. या ज्ञानाला त्यांनी प्रतिभा असे म्हटले आहे. प्रतिभा अर्थात अलौकिक ज्ञान केवळ ऋषिमुनींपुरतेच सीमित नसून सामान्य लोकांनाही केव्हा केव्हा ते प्राप्त झालेले दिसते, असेही ते म्हणतात.

सांख्य दर्शनात त्या दर्शनाचा प्रणेता कपिलमुनी याला सिद्ध व सर्वज्ञ म्हटले आहे. योगदर्शन हे तर ज्ञानाचे समर्थन करणारे सर्वश्रेष्ठ दर्शन होय. पतंजली केवळ अलौकिक ज्ञानावरच विश्वास ठेवतो असे नव्हे; तर अलौकिक कार्यशक्तीवरही विश्वास ठेवतो. पातंजल योगसूत्रांच्या तिसऱ्या अध्यायात योग्यांना प्राप्त होणाऱ्या पुढील अलौकिक ज्ञानशक्तींचा त्याने निर्देश केला आहे – अतीत व अनागत यांचे ज्ञान (सू. १६), सर्व प्राण्यांच्या बोलीचे ज्ञान (सू. १७), पूर्वजन्माचे ज्ञान (सू. १८), सूक्ष्म, व्यवहित व विप्रकृष्ट ज्ञान (सू. २६), भुवनज्ञान, शरीराच्या आंतररचनेचे ज्ञान (सू. ३०), सिद्धदर्शन (सू. ३३) दिव्यस्रोत (सू. ४२) इत्यादी.

शंकराचार्यही ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान या मिथ्या भेदांवर आधारलेल्या ज्ञानाहून श्रेष्ठ व पलिकडचे असे एक तात्त्विक ज्ञान मानतात व त्याला अनुभव अशी संज्ञा देतात. त्यांचा हा अनुभव इंद्रियजन्य नसून त्याचे स्वरूप अतींद्रिय अतएव आध्यात्मिक आहे.

बौद्ध व जैन दर्शनांत आस्तिक दर्शनांहूनही अलौकिक ज्ञानाचे अधिक समर्थन केलेले आहे. बौद्धांनी बुद्धाला व जैनांनी तीर्थंकरांना सर्वज्ञ मानले आहे. या दोन्ही दर्शनांत अलौकिक ज्ञानाला प्रत्यक्ष म्हटले आहे. 'यत्किंचिदर्थस्य साक्षात्कारि ज्ञानं तत्प्रत्यक्षमुच्यते' (न्यायबिंदुटीका ३) असे प्रत्यक्षाचे वेगळे लक्षण धर्मोत्तराचार्याने केले आहे. योग्यांना होणाऱ्या ज्ञानाच्या बाबतीत तो म्हणतो, की 'भावनेचा प्रकर्ष झाल्यावर योगी वस्तूंना इतक्या स्पष्ट रूपाने पाहू शकतो, की त्या जणू काचभिंतीच्या मागे ठेवलेल्या आहेत' (न्यायबिंदुटीका १. ११).

जैनदर्शनात असे प्रतिपादिले आहे, की 'जीवमात्र स्वभावतःच सर्वज्ञ आहे. पण कर्माच्या परमाणूंचे आवरण पडल्यामुळे त्याच्या सर्वज्ञतेला बाध येतो व ते आवरण दूर झाल्याने त्याला सर्वज्ञत्व प्राप्त होते.' अशा ज्ञानाला त्यांनी केवलज्ञान म्हटले असून त्याच्या प्राप्तीसाठी साधक जीवाला अवधी व मनःपर्याय या दोन भूमिका उल्लंघून पुढे जावे लागते, असे सांगितले आहे. (प्रमाणनयतत्त्वलोकालंकार पृ. १०२ – १२०).

पाश्चात्य वैज्ञानिकांनीही या विषयावर पुष्कळ संशोधन केले आहे. टेलिपथी किंवा मनःपर्याय हा एक व एक्स्ट्रॉ सेन्सरी पर्सेप्शन किंवा अतींद्रिय प्रत्यक्ष हा दुसरा, असे दोन पारिभाषिक शब्द या अलौकिक ज्ञानाच्या संबंधात त्यांनी उपयोजिले आहेत. टेलिपथी शब्दाचा सर्वप्रथम प्रयोग मायर्स याने केला. टेलिपथी म्हणजे एका व्यक्तीच्या आन्तरिक अनुभूती, प्रेरणा किंवा जटिल अनुभव यांचे ज्ञानेंद्रियांच्या माध्यमाशिवाय दुसऱ्या व्यक्तीच्या मनात प्रविष्ट होणे. यालाच मनःपर्याय असे म्हणता येईल. आधुनिक संशोधनावरून मनःपर्याय ही एक सत्य वस्तू आहे, असे सिद्ध झाले आहे. अनेक प्रयोगांच्या अंती आणखी एक गोष्ट सिद्ध झाली ती ही, की मनःपर्यायाची शक्ती विशिष्ट व्यक्तींतच असते, असे नसून थोड्याबहुत प्रमाणात ती सर्वच माणसांच्या ठिकाणी असते. याविषयीची अनेक उदाहरणे गर्नी, मायर्स, पॉमीर यांनी लिहिलेल्या फेंटाझम्स् ऑफ् दि लिव्हिंग या ग्रंथात पाहायला मिळतात. या सर्व संशोधनातून सारभूत सिद्धान्त निष्पन्न झाला तो असा, की कोणत्याही भौतिक साधनाच्या साहाय्यावाचून एक व्यक्ती कितीही दूर असलेल्या व्यक्तीचे मनोगत जाणू शकते.

एक्स्ट्रॉ सेन्सरी पर्सेप्शन ही शब्दसंहती डॉ. ऱ्हाइन याने उपयोगात आणली. दूरदर्शन व दूरश्रवण या गोष्टी वरील शब्दसंहतीत अंतर्भूत आहेत. विस्तृत संशोधनानंतर डॉ. ऱ्हाइन या निष्कर्षाप्रत पोचला आहे, की अतींद्रिय प्रत्यक्ष हे एक वास्तविक सत्य आहे. डॉ. ऱ्हाइनचे कार्य पुढे नेणाऱ्यांत प्रा. टिरेल याचे नाव प्रमुख आहे. टिरेलनेही अनेक प्रयोगांच्या अंती पुन्हा एकदा ठासून सांगितले, की अतींद्रिय प्रत्यक्ष हे एक निर्विवाद सत्य आहे. [ डॉ. गोवर्धन भट्ट – अजन्ता, नोव्हें. १९५८]

**अल् कौसर** इस्लामी समृद्धिवाचक शब्द. मुहंमदाच्या स्वर्गात एक सरोवर आहे, त्याचे नाव हौझुल कौसर म्हणजे समृद्धीचे सरोवर असे आहे. पैगंबराला ते स्वर्गाच्या प्रवासात दिसले. ते विस्तीर्ण असून, त्याचे पाणी शुभ्र व सुवासिक आहे. ते पिणाऱ्याला पुन्हा तहान लागत नाही. [ डि. इ.]

**अल्-जन्नत** इस्लामी धर्मातला स्वर्ग. फारसी भाषेत त्याला बिहिश्त म्हणतात. कुराणात स्वर्गाची आठ भिन्न नावे आढळतात. मुस्लिम पंडितांच्या मते ती स्वर्गाच्या भिन्न भिन्न विभागांची नावे आहेत – (१) जन्नतुल्-खुल्द (शाश्वतीचे उद्यान), (२) दार्-उस्-सलाम (शांतिस्थान), (३) दार्-उल्-करार, (४) जन्नातुल् अद्न, (विश्रामस्थान) (५) जन्नातुल्-मवा (आश्रयस्थान). (६) जन्नातुल्-नईम (आनंदधाम), (७) इल्लीय्यन व (८) जन्नातुल्-फिर्दौस. मुहंमद पैगंबराने वर्णिलेले सुखोपभोग प्रसिद्ध असून, मुसलमानांच्या मनावर त्यांचा विलक्षण प्रभाव आहे. [ डि. इ.]

**अल् बिरूनी** (इ. स. ९७०–१०३८) एक अरबी पंडित व प्रवासी. याचे मूळ नाव अबू रैहान मुहंमद असे होते. सिंध प्रांतातील बिरून नामक गावी याचा जन्म झाला, म्हणून याला बिरूनी हे नावा मिळाले, असे म्हणतात. तो

मध्य आशियातील अमुदारिया नदीच्या दक्षिण तीरावरील खीवा (ख्वारिज्म) प्रांताचा रहिवासी होता. तो इ. स. १०१८ च्या सुमारास गझनीला गेला व तिथे त्याला राजाश्रय मिळाला. सुलतान महंमुदाबरोबर तो भारतात आला होता. त्याने लिहिलेल्या किताबुल् हिन्द नामक ग्रंथात हिंदूंच्या तत्कालीन चालीरीती, त्यांची शास्त्रे, वेद, पुराणे, धर्म, तत्त्वज्ञान, सण, उत्सव इ. विषयांची बरीच माहिती दिली आहे. त्याने संस्कृत भाषा अवगत करून घेतली होती आणि भारताच्या अनेक प्रांतांत प्रवास केला होता. त्यामुळे त्याला भारतीय संस्कृतीचे पुष्कळ ज्ञान प्राप्त झाले होते. त्याने भारताविषयी विविध प्रकारची अनेक पुस्तके लिहिली आणि त्यामुळे तो भारत आणि अरबस्तान व इराण यांच्यामधील ज्ञानदूत ठरला. हा गणित, ज्योतिष व दर्शने या शास्त्रांचा पंडित होता. याला गूढ विद्याही अवगत होती. त्याला गीतेतले तत्त्वज्ञान विशेष आवडले होते.

किताबुल् हिंद या पुस्तकात याने भारताचे भौगोलिक वर्णन केलेले असून, कानून मसऊदी या पुस्तकात भारतातील कित्येक नगरांची नावे व वर्णने आहेत.

याला नवीन ज्ञान मिळविण्याची फार हौस होती. आणि तो सर्व विद्यांचा चिकित्सक दृष्टीने अभ्यास करीत असे. त्याने त्या वेळी प्रचलित अशा कित्येक भ्रामक समजुतींची चिकित्सा करून लोकांचा भ्रमनिरास केला. भारतात असताना याने पृथ्वीचा परीघ व तिची गती यांचे मापन केले. त्याचे ज्ञान पाहून भारतीय पंडितांनी त्याला विद्यासागर ही पदवी दिली. [ अ. भा. सं.; म. ज्ञा. को.; हिं. वि. को. ]

**अल् मदीना** जिथे मुहंमद पैगंबराची कबर आहे, ते शहर. हे अरबस्तानात आहे. याचे मूळचे नाव यस्रब असे होते. मुहंमदाने मक्का सोडून या शहराचा आसरा घेतला, इथे धर्मप्रचार केला व इथेच देह ठेवला. म्हणून मक्केच्या खालोखाल इस्लामी जगात त्याला महत्त्व आले आहे. हे पठारावर वसले असून याच्या भोवती मजबूत दगडी भिंत आहे. या शहराला पाणीपुरवठा भरपूर असल्यामुळे तिथे अरब लोकांची फार पूर्वीपासून वस्ती होती. [ डि. इ. ]

**अल् महदी** इस्लामी शियापंथाचा बारावा नेता. हा प्रेषित असून, पुनश्च अवतार घेणार असल्याचे शियापंथी मानतात. [ मु. इं. ]

**अल्लकप्प** शाहाबाद जिल्ह्यातील मसरपासून वैशालीस जाणाऱ्या रस्त्यावरचे एक ठिकाण. इथे बुद्धाच्या काळी बली नावाचे गण राहत असून, त्यांचे स्वतंत्र गणराज्य होते. त्यांनी बुद्धाच्या अवशेषांचा काही भाग मिळवून त्यावर एक स्तूप बांधला, असे दीघनिकायात सांगितले आहे.

**अल्लम प्रभू** (इ. स. चे १२ वे शतक) कर्नाटकातील वीरशैव संप्रदायाचा एक मोठा आचार्य. हा बसवाचा समकालीन होता. चामरसाच्या प्रभुलिंगलीले या काव्यात याला शिवाचा अवतार मानले आहे. याचा जन्म कुठे झाला व याचे मातापिता कोण याविषयी निश्चित माहिती नाही. श्रीनिवासमूर्ती यांच्या मते याचा जन्म शिमोगा जिल्ह्यातल्या बळ्ळिगामे या ठिकाणी झाला. दिवाकर यांच्या मते बनवासी हे त्याचे गाव व नागवसाधिपती व सज्जनदेवी हे त्याचे आईवडील होत. याचे पहिले नाव नुसते अल्लम होते; पण पुढे त्याच्या महनीय गुणांवरून त्याला अल्लम प्रभू किंवा प्रभुदेव असे म्हणू लागले. कामलता नावाच्या एका रूपवती कन्येशी याचा विवाह झाला होता; पण ती थोड्याच दिवसात मरण पावली. त्यामुळे अल्लम विरक्त होऊन संसारातून उठला. वनात राहून त्याने दीर्घ तपस्या केली. याच्या वैराग्याची परीक्षा पाहण्यासाठी पार्वतीने आपल्या अंशाने एक राजकन्या उत्पन्न करून त्याच्याकडे पाठविली, अशी आख्यायिका आहे. त्या तपस्येने त्याला आत्मज्ञान प्राप्त झाले. मग तो शिवाद्वैत तत्त्वाचा समर्थ प्रचारक बनला. आपल्या शिष्यमंडळींसह त्याने भारतयात्रा केली व परत आल्यावर कल्याणनगरात (म्हैसूर राज्य) बसवाची भेट घेतली. त्याच्या असाधारण व्यक्तित्वाने बसव व त्याचे शिष्य प्रभावित झाले. बसवाने त्याला आपल्या अनुभवमंटपाचे अध्यक्ष नेमले.

अल्लमाने षट्स्थलज्ञानचारित्र्य, शून्यसंपादने, मंत्रगोप्य, सृष्टिवचन, इ. ग्रंथ रचले. अल्लमाची वचने सुप्रसिद्ध आहेत. त्यावरून त्याची तीव्र बुद्धिमता आणि भव्य विचारशक्ती दिसून येते. त्याची वचने आकाराने छोटी असूनही अध्यात्मज्ञानाची रत्ने आहेत. विश्वव्यापी परमेश्वराचे वर्णन तो असे करतो–'त्याला क्षती नाही, वृद्धी नाही, गती नाही, अंत नाही. तो प्रकाशातले चैतन्य आहे.'

भक्तिसाधनेच्या मार्गात त्याला अश्रद्धा आणि भ्रष्टाचार मान्य नव्हता. अल्लमाच्या मते खरा ज्ञानी तो, की जो स्वतःला ज्ञानी समजत नाही. 'अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम्' या उपनिषद्वचनाचा जणू तो अनुवादच करतो– जो आपण परब्रह्म जाणले असे समजतो त्याला काहीही कळले नाही (वचनधर्मसार पृ. ७७). त्याचा मूर्तिपूजेला विरोध होता. हृदयात परमेश्वर असताना अन्य मूर्ती आणि मंदिरे कशाला ? असा त्याचा सवाल आहे. वीरशैव पंथावर त्याच्या

व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव खोलवर पडलेला आहे. पाहा – वचन-साहित्य. [ पॉं. क. क.; हिं. क. भ. तु. अ. ]

**अल्लर** केरळातील एक वन्य जमात. पालघाट जिल्ह्यात या लोकांची वस्ती आहे. यांची संख्या अत्यल्प म्हणजे पाचशेच्या आसपास असावी. यांचा वर्ण काळा असून, ते मध्यम उंचीचे आहेत. त्यांचे नाक बसके, ओठ जाड, हात लांब आणि केस कुरळे असतात. त्यांच्या स्त्रियांना दागिन्यांची फार आवड असून, त्या गळयात मण्यांच्या माळा, नाकात चमकी, हातात बांगडया आणि बोटात अंगठया घालतात. स्त्रिया व पुरुष दोघेही कमरेभोवती एक फडके गुंडाळतात. गरिबीमुळे याहून जास्त कपडे घालणे त्यांना शक्य होत नाही. क्वचित काही स्त्रिया अंगात पोलके घालतात. हे लोक मल्याळम् भाषा बोलतात. बोलताना तमिळ आणि तुळू या भाषांतील काही शब्दही ते वापरतात.

हे लोक गुहा, खळगे, झाडांच्या ढोली यांत किंवा एखादया पुढे आलेल्या खडकाच्या खाली राहतात. अन्न गोळा करीत फिरावे लागत असल्यामुळे ते एका ठिकाणी फार दिवस राहत



अल्लर दांपत्य

नाहीत. जिथे जास्त दिवस मुक्काम करायचा असेल, तिथे ते झोपडी उभारतात. त्या झोपडीचे छप्पर गवताचे असते आणि त्याच्या चारही बाजू मोकळया असतात. थंडीपासून आणि वन्य प्राण्यांपासून संरक्षण व्हावे, म्हणून ते लोक रात्री शेकोटीभोवती झोपतात. त्यांचा संसार गाडग्यामडक्यांचा असतो. याशिवाय, कुऱ्हाडी, खुरपी, कोयते, जाळी, पिंजरे, इ. आयुधे व वस्तू यांच्याकडे असतात. शिकारीसाठी त्यांनी कुत्रे पाळलेले असतात.

हे लोक जंगलातून मध, मेण, लाकडे, बांबू, इ. गोळा करून विकतात किंवा त्यांच्या अदलाबदलीने आपल्याला आवश्यक असलेल्या वस्तू घेतात. लाकडांपासून कोळसा तयार करण्याची विद्या त्यांना अवगत आहे आणि तो तयार करून ते विकतात.

अन्न गोळा करणे, शिकार करणे, पशू व पक्षी जाळयात पकडणे, हे त्यांचे मुख्य उद्योग आहेत. कंदमुळे, फळे, पशु-पक्ष्यांचे मांस असा त्यांचा आहार असतो.

**विवाहप्रथा** – मुली वयात आल्यावर त्यांची लग्ने करतात. वधूमूल्य साधारणपणे पाच रुपये असते. वधू-वरांनी जमलेल्या लोकांसमक्ष एकमेकांना घास देणे, हा विवाहातील एकमेव विधी असतो. विवाहाचे पावित्र्य वगैरे हे लोक मानीत नाहीत. त्यामुळे जवळच्या नात्यातील स्त्री-पुरुषही लग्नाशिवाय समागमसुख घेऊ शकतात.

हे लोक जननाशौच वगैरे पाळत नाहीत. नवजात मुलाचे नाव केव्हाही ठेवतात. मुलाचा पिता जर ज्ञात असेल तर तो नाव ठेवतो आणि तो नसल्यास मुलाचा मामा त्याचे नामकरण करतो. मुलाचे कान टोचण्याची पद्धत आहे.

हे लोक काही [वनस्पती, वृक्ष, खडक, डोंगर व झरे यांना पवित्र मानतात. मलकोरथी नामक देवीलाही ते भजतात. हळूहळू ते हिंदू धर्मातल्या काही कल्पना उचलू लागले आहेत. भुता-खेतांनी त्रास देऊ नये, म्हणून ते त्यांच्याविरुद्ध जादूटोणा करतात.]

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते पुरतात. जनावरांनी उकरू नये म्हणून खोल खड्डा खणतात. प्रेत ताज्या पानांनी झाकतात. मृताशौच पाळत नाहीत. [ द्रा. के. ]

**अल्लाह** इस्लामी धर्मातला ईश्वर व सृष्टिनिर्माता. अल्लाह हे ईश्वराचे खरे नाव असून इतर सुमारे शंभर नावे आहेत, ती त्याची विशेषणे होत. उदा० अर् रहमान (कृपासागर), अर् रहीम (दयानिधी), अस् समद् (अविनाशी) इत्यादी. इस्लामच्या उदयकालात अरबस्तानमध्ये राहणारे लोक अनेक देव मानणारे व मूर्तिपूजक होते. तेही अनेक देवतांना उद्देशून अल्लाह हाच शब्द वापरीत. पण मुहंमद पैगंबराने परमेश्वर हा एकच असून त्याच्याशिवाय दुसरा कोणी देव नाही (ला इलाह इल्लल्लाह) अशी घोषणा केली व अल्लाह हे त्या एकाचेच नाव आहे, हे पहिले धर्मसूत्र सांगितले. अल्लाह हा अलीलाह या अरेबिक शब्दाचा संक्षेप आहे. ईश्वराला त्याच्या खऱ्या नावाने आळवणाऱ्या माणसाचीच इच्छा पूर्ण होते, असे पैगंबराने म्हटले आहे (मिश्कात १०.९.१.२). ज्यू व सिरियन

ख्रिश्चन, हे देव या अर्थी हा शब्द वापरतात; पण त्यांचा देव मुहंमदी अल्लाहून निराळा आहे. [ डि. इ.; एन्सा. रि. ]

**अल्ला हु अकबर** मुसलमानांचा एक मंत्र व घोषणा. परमेश्वर सर्वांत श्रेष्ठ आहे, असा त्या घोषणेचा अर्थ आहे. नमाज पढण्यापूर्वी प्रत्येक मशिदीतला मुअज्जिन या मंत्राचा मोठ्याने उच्चार करतो. आणि सर्व मुसलमानांना प्रार्थनेसाठी निमंत्रण देतो. याला बांग देणे, असे म्हणतात. नमाज पढल्यानंतर मनातल्या मनात या मंत्राचा ३४ वेळा जप करायचा असतो. प्राचीन काळी लढाईच्या वेळी मुसलमान शिपाई युद्धाची घोषणा म्हणून या मंत्राचा उच्चार करीत. धार्मिक वृत्तीचे मुसलमान सूर्यग्रहण व चंद्रग्रहण सुरू झाले असता या मंत्राचा जप करीत. [ मु. इं. ]

**अल् हजरुल्-अस्वद** मक्केच्या मशिदीत 'काबा'च्या चबुतऱ्यात बसविलेल्या एका काळ्या, वाटोळ्या दगडाचे नाव. लक्षावधी मुस्लीम यात्रेकरूंच्या चुंबनामुळे हा दगड गुळगुळीत झालेला आहे. मुहंमदाच्या सांगण्याप्रमाणे हा स्वर्गातून पडलेला दगड होय. पाप-पुण्याच्या अंतिम निवाड्याच्या वेळी त्याला स्पर्श करणाऱ्या व्यक्तींच्या वतीने तो साक्ष देणार आहे. [ डि. इ. ]

**अवकहडा चक्र** या नावाचे एक चक्र पंचांगात दिलेले असते. वधू-वरांचे घटित पाहण्यासाठी याचा उपयोग करतात. या चक्रात एकूण ८ कोठे असतात. त्यांची क्रमाने माहिती अशी –

(१) बाहेरच्या बाजूने पहिला. यात नक्षत्राच्या चरणांची चू, चे, चो, ला अशी सांकेतिक अक्षरे दिलेली असतात.

(२) यात नाडीची आद्याक्षरे दिलेली असतात. नाडीचे प्रकार तीन - आद्य, मध्य, अंत्य.

(३) यात योनींची नावे दिलेली असतात. अश्विनीपासून २७ नक्षत्रांच्या योनी अनुक्रमे पुढीलप्रमाणे आहेत - अश्व, गज, मेष, सर्प, सर्प, श्वान, बिडाल, मेष, मार्जार, उंदीर, उंदीर, गौ, महिषी, व्याघ्र, महिषी, व्याघ्र, मृग, मृग, श्वान, वानर, नकुल, वानर, सिंह, अश्व, सिंह, गौ, गज.

(४) यात गण दिलेले असतात. गण तीन आहेत - देव, मनुष्य, राक्षस.

(५) यात नक्षत्रांची नावे दिलेली असतात.

(६) यात राशींचे वर्ण दिलेले असतात. वर्ण चार आहेत - ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र,

(७) या कोठ्यात बारा राशींचे स्वामी दिलेले असतात.



अवकहडा चक्र

(८) यात मेषादी बारा राशी दिलेल्या असतात.

**अवकीर्णी** एखाद्या ब्रह्मचाऱ्याकडून स्त्रीसमागमादी कारणांनी ब्रह्मचर्य व्रताचा भंग झाला; तर त्या ब्रह्मचाऱ्याला अवकीर्णी म्हणत. त्याचे प्रायश्चित म्हणून पुढील विधान सांगितले आहे – प्रतिपदेला मध्यरात्री 'सं मा सिञ्चतु' या मंत्राने अग्निपूजा करून अग्नीला समिधा व दोन आज्याहुती देणे. त्याशिवाय निर्ऋती देवतेच्या उद्देशाने गाढव अर्पण करणे (आप. ध. सू. १.९.२६.८-९). मनू म्हणतो, की अशा ब्रह्मचाऱ्याने वर्षभर गाढवाचे कातडे पांघरावे, आपल्या अपराधाचा उच्चार करून सात घरी भिक्षा मागावी व त्रिकाल स्नान करून एकभुक्त राहावे (मनु. ११. १२२-२३). [ हि. ध. ]

**अवच्छेदवाद** हा वाचस्पतिमिश्रांनी मानलेला वाद आहे. या वादात, एकच चैतन्य अज्ञानाचा आश्रय आणि अज्ञानाचा विषय अशा दोन भेदांनी भिन्न होते, असे मानले आहे. अज्ञानाचे विषयीभूत चैतन्य म्हणजे ईश्वर व आश्रयभूत चैतन्य म्हणजे जीव होय. दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर अविद्यावच्छिन्न चैतन्य म्हणजे ईश्वर व अन्तःकरणावच्छिन्न चैतन्य म्हणजे जीव होय. अज्ञान हे नानाविध असल्यामुळे या

मतात जीवही नानाविध असल्याचे मानले जाते. [भा. द.]

**अवटनिरोधन** अठ्ठावीस नरकांपैकी एक. जे लोक बिळात वा कोठारात माणसांना कोंडतात, त्यांना हा नरक भोगावा लागतो. यात विषारी धूर नाकातोंडात जाऊन पापी माणसाचा जीव कोंडतो (भाग. पु. ५.२६. ७ व ३४).

**अवतंसक** बौद्धांचा सूत्रग्रंथ. याची दोन चिनी भाषांतरे उपलब्ध आहेत. इ. स. च्या पाचव्या शतकात बुद्धभद्राने केलेले एक व दुसरे शिक्षानंदाने केलेले. अवतंसक सूत्र प्रथम नागार्जुनाने नागदेशात संशोधिले, असे म्हणतात.

**अवतार** अव+तृ धातूवरून अवतार शब्द बनला आहे. उच्च स्थानावरून नीच स्थानावर उतरणे यालाच अवतार म्हणतात. अवतार कोणाचा, केव्हा आणि कशासाठी होतो, हे श्रीकृष्णाने भगवद्गीतेच्या पुढील दोन श्लोकांत (गीता.४.७–८) सांगितले आहे–

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥**
**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥**

अर्थ– हे अर्जुना, जेव्हा जेव्हा धर्माला ग्लानी येते आणि अधर्माची उठावणी होते, तेव्हा तेव्हा मी स्वतःला उत्पन्न करतो (अवतार घेतो). साधूंचे संरक्षण, दुष्कृत्ये करणाऱ्यांचा विनाश आणि धर्माची संस्थापना, यांच्यासाठी मी प्रत्येक युगात जन्म (अवतार) घेतो.

पुराणे व इतर ग्रंथ यांतून प्रतिपादिलेले अवतारतत्त्व हे मध्ययुगीन व अर्वाचीन हिंदुधर्माचे एक प्रमुख तत्त्व आहे.

वैकुंठधाम सोडून वरील कार्यासाठी भगवंताचे भूलोकी येणे, याला अवतार म्हणतात. परमात्मा जेव्हा एखाद्या प्राण्याचे अथवा माणसाचे शरीर धारण करून काही काल किंवा संपूर्ण जीवनभर त्या शरीरात वास्तव्य करतो, तेव्हा त्या शरीरधारणाला अवतार म्हणतात. उत्पत्ती, स्थिती आणि लय हे सृष्टीचे स्वभावधर्म आहेत. ब्रह्मा, विष्णू व महेश हे या तीन धर्मांचे अनुक्रमे कारक मानलेले आहेत. त्यांत सृष्टीच्या पालनाची जबाबदारी विष्णूवर आहे. म्हणून जेव्हा सृष्टीत उपद्रव सुरू होतात, विनाशाची प्रक्रिया वाढू लागते व मानवसमाजाच्या धर्माची घडी विसकटते, तेव्हा तो विनाश थांबवून ती घडी पुनश्च नीट बसविणे व मानवसमाजाला धर्ममार्गावर आरूढ करणे, यासाठी भगवान् विष्णू युगायुगी अवतार घेतो, अशी भारतीय श्रद्धावंतांची पक्की धारणा आहे. सनातन मताचे सर्व ग्रंथही ही धारणा परिपुष्ट करतात.



विष्णू

जीवाने आपल्या मातापित्यांकडून शरीराचे ग्रहण करावे, हा सृष्टीचा नियम आहे. परमात्माही या नियमाला अनुसरून दया-दाक्षिण्यादी गुणांनी युक्त व तपःपूत अशी मातापितरे आपला अवतार घेण्यासाठी निवडतो. मात्र ईश्वराचा हा जन्म परवशतेने न होता स्वेच्छेने आणि प्रकृतीवर पूर्ण स्वामित्व ठेवून होत असतो. वरील सिद्धान्तानुसार अवतारी पुरुष मनुष्य असूनही परमात्मरूप असतो व परमात्मा असूनही मनुष्य असतो. व्यवहारी लोक प्रपंचसिद्धीसाठी मानवरूपाने त्याला ग्रहण करतात व परमार्थी लोक आध्यात्मिक सिद्धीसाठी परमात्मरूपाने त्याला शरण जातात.

प्राचीन लोकांमध्ये अवतारकल्पना वरील तात्त्विक अर्थाने आढळत नाही. प्राचीन लोक ज्या मानवांची अथवा प्राण्यांची पूजा करीत, त्यांना ते दैवी अथवा प्रत्यक्ष देवताच समजत. पुढे मग अशा प्रकारचे पुण्यवान प्राणी व मानव परमेश्वराचे अवतार म्हणून मानले जाऊ लागले. उदा० अवलोकितेश्वर हा दलाई लामामध्ये अवतरित होतो, असे तिबेटी लोक समजतात. प्राण्यांमध्ये मृत मनुष्याची विशिष्ट व अद्भुत शक्ती वास करते, म्हणून त्यांची पूजा करणे आवश्यक आहे, या प्राचीन मानवांच्या कल्पनेत अवतारकल्पना अंधुक रीतीने प्रत्ययास येते. वृद्ध व वैद्य यांच्या अंगी अमानुष शक्ती असते व ते प्रत्यक्ष देवच होत, अशीही कल्पना प्राचीन जगात आढळते व तिच्यातही अवतारकल्पना बीजरूपाने दिसते.

भारतात परमेश्वराच्या या अवतारग्रहणाची कल्पना पुराणांनी वाढविली व अनेक कथांच्या रूपाने तिचा विकास केला. पण ही कल्पना पुराणांपेक्षाही प्राचीन आहे. तिची बीजे वैदिक वाङ्मयातच आढळतात. सनपूर्व काही शतके अवतारकल्पना लोकांना परिचित होती. पाणिनी व पतंजली यांनी कृष्णाव-

ताराचा उल्लेख केला आहे. त्यांच्या काळात अवतार म्हणून विष्णुपूजा प्रचलित होती.

वैदिक वाङमयात अवतारकल्पना आहे; पण ती अस्पष्ट रूपात आढळते. दशावतारांपैकी काही अवतारांची बीजे वेदातल्या काही कथांतून सापडतात. प्रलयकाली मनूने आपल्या होडीचा दोर एका माशाच्या शिंगाला बांधला व त्या माशाने मनूचे प्रलयजलात संरक्षण केले, अशी कथा शतपथ ब्राह्मणात दिलेली आहे (२.९.१.१). या कथेवरून पुढे मस्त्यावताराची कल्पना सुचली असावी. कूर्मावताराचे मूळ तैत्तिरीय संहितेत व आरण्यकात आढळते. प्रजापतीचा शरीररस कूर्मरूपाने जलात फिरत होता, तोच 'सहस्रशीर्षा पुरुषः' या स्वरूपात प्रजापतीपुढे प्रकट झाला. तेव्हा प्रजापतीने त्याला विश्व निर्माण करण्याबद्दल सांगितले. त्याने मग प्रत्येक दिशेस जल फेकून आदित्यादी सृष्टी निर्माण केली (तै. आ. १.२३.१–९). प्रजापतीने वराहरूप घेऊन समुद्राच्या तळातून पृथ्वीला वर काढले, ही कथा तैत्तिरीय ब्राह्मणात असून ती वराहावताराची सूचक आहे (१.१.३). कूर्म व वराह या दोन रूपांतली कृत्ये मूलतः प्रजापतीची आहेत. पुढे प्रजापतीला मागे टाकून नारायण म्हणजे विष्णू हा पुढे आला. तोच जगाचा कर्ता, धर्ता आहे, अशीही कल्पना केली गेली. म्हणून मग प्रजापतीची वर उल्लेखिलेली कृत्ये विष्णूच्या नावावर चढली. नमुची दैत्याचे मस्तक इंद्राने पहाटेस पाण्याचा फेस फेकून उडविले, या ऋग्वेदातल्या कथेत नरसिंह अवतारांचे बीज शोधता येईल (ऋ. ८. १४.१३.). नरसिंहाचा प्रथम उल्लेख तैत्तिरीय आरण्यकात आला आहे. वामनाने बळीकडे त्रिपादभूमी मागून शेवटी त्रिभुवन व्यापले, या अवतारकृत्याचा संबंध ऋग्वेदातील विष्णूच्या तीन पावलांत विश्व व्यापण्याच्या उल्लेखाशी जोडता येईल –

**इदं विष्णुर्वि चक्रमे त्रेधा नि दधे पदम् ।**

(ऋ. १.२२.१७)

अर्थ– हे (विश्व) तीन पावले ठेवून विष्णूने आक्रांत केले. शतपथात म्हटले आहे, की विष्णू हा प्रथम वामन म्हणजे ठेंगू होता. विष्णू म्हणजेच यज्ञ होय. त्याच्या योगाने देवांनी अर्चा व श्रम करून सर्व पृथ्वी प्राप्त करून घेतली (१.२.५.५). अथर्ववेदात परशुराम या अवताराचे बीज सापडते. सृंजय वैतहव्य राजे भृगूंची व ब्राह्मणी प्रजेची हिंसा केल्यामुळे पराभूत झाले, असा तिथे उल्लेख आहे (५.१९.१-११).

अवतारवादाचा सूत्रपात प्रथम ब्राह्मणसाहित्याच्या रचनाकालात झाला. 'वामनो ह विष्णुरास' (= वामन हा विष्णू होता) असे शतपथात स्पष्ट म्हटले आहे (१.२.५.५). नारायणीय उपनिषदात ही कल्पना याहून अधिक स्पष्ट झाली व पुढे वेगवेगळ्या ग्रंथांत आणि शिलालेखांतही अवतार-कल्पनेचे उल्लेख होऊ लागले. शिलप्पधिकारम्‌मध्ये नृसिंहावताराचा निर्देश आहे. कालिदासाने 'रामाभिधानो हरिरित्युवाच' (= राम नावाचा विष्णू असे बोलला) असे म्हणून रामावताराचा उल्लेख केला आहे (रघु. १३.१). छांदोग्यात (३.१७.६.) देवकीपुत्र कृष्णाचा, त्याचप्रमाणे तै. आरण्यकात (१९.१.६) वासुदेव कृष्णाचा उल्लेख येतो. वैदिक वाङमयात त्याला ब्रह्माचा अवतार असे म्हटले असून, पुढे तो विष्णूचा अवतार मानला गेला. महाभारत, हरिवंश व पुराणे यांत कृष्ण हा विष्णू होता, 'कृष्णस्तु भगवान् स्वयम्,' असे स्पष्ट म्हटले आहे.



परशुराम

महाभारतानंतरच्या वाङमयांत वासुदेव व कृष्ण हे एकच मानलेले आहेत. पण त्या पूर्वीच्या वाङमयांत त्या दोन भिन्न व्यक्ती होत्या. तै. आरण्यकात वासुदेवाचा नारायण व विष्णू यांच्यासह उल्लेख आहे (११.१.६). पाणिनीनेही 'वासुदेवा-र्जुनाभ्यां वुन्' या सूत्रात वासुदेवाचा उल्लेख करून त्याला देवकोटीतले मानले आहे. कृष्णाचे नाव प्रथमतः छांदोग्यात येते (३.१७.६). तिथे त्याला देवकीचा पुत्र व घोर आंगिरसाचा शिष्य म्हटले आहे. त्या ठिकाणी कृष्ण हा मनुष्यच मानलेला आहे. पण पुढे कृष्णाच्या मागे ब्रह्मण्य हे विशेषण लागले व विष्णूशी त्याचे तादात्म्य कल्पिले गेले. ब्राह्मणकाळात प्रजा-



वामनावतार

पती हा विविध रूप घेऊन मानवांची दुःखे निवारीत होता. त्यानंतर नारायणाकडे ते कार्य आले. त्याचे व दैत्यशत्रू विष्णूचे ऐक्य कल्पिले गेले. वेदकालाच्या अखेरीस वासुदेव ही देवता महत्पदास चढली. त्यालाही विष्णूचाच अवतार समजू लागले. महाभारतकाळापूर्वी वासुदेव हा विष्णू व नारायण यांच्या बरोबरीने मानला जात होता. देवकीपुत्र कृष्ण हा ज्ञानी यती मानला जात होता. हे दोघेही भिन्न होते; पण पुढे ते एकरूप होऊन अवतार पदवीला पोचले.

वासुदेव याचा अर्थ वसुदेवोत्पन्न असा सर्वांनी केला आहे. पण बलदेव हा वसुदेवोत्पन्न असूनही त्याला वासुदेव म्हणत नाहीत. वासुदेव या नावावरून त्याचा बाप वसुदेव असला पाहिजे, असे गृहीत धरले गेले आहे. याला एक पुरावा म्हणजे म. भा. पूर्व वाङ्मयात कृष्णाच्या बापाचे नाव आढळत नसून, देवकी हे त्याच्या आईचे नाव तेवढे दिसते. कृष्णाचे चरित्र पाहिल्यास त्याच्यामध्ये दैवी व मानवी अशा उभयविध गुणांचा समन्वय झालेला आहे. त्याच्या चरित्राचे सरळ दोन भाग पडतात. त्याचे बालचरित्र गोकुळ वृंदावनात गोप-गोपींशी निगडित आहे. त्याने बाळपणीच दैत्यसंहाराची अद्भुत कृत्ये केली आहेत. बलदेव हा देखील शेषाचा अवतार मानला जात असे. कदाचित या दोन विभूतींचा मुद्दाम संबंध आणला गेला असावा. कंसवधापर्यंत तो संबंध टिकतो व पुढे त्या दोघांचे जीवनप्रवाह वेगळे होतात. कृष्णचरित्राच्या पुढच्या भागात तो वृष्णींचा राजा व पांडवांचा कैवारी या स्वरूपात दिसतो. या सर्व गोष्टींवरून असे दिसते, की कृष्ण हा मुळात यादव व सात्वत यांचा देव होता. त्यांनीच त्याला वासुदेवाशी एकरूप केले असावे.



कृष्णावतार

याकोबीच्या मते पांचरात्र व भागवत या दोन संप्रदायांनी वासुदेव व कृष्ण या दोघांचे ऐक्य करून त्यांची पूजा सुरू केली.

रामावताराच्या बाबतीत याहून थोडा निराळा प्रकार आहे. रामावतार त्रेतायुगाच्या शेवटी झाला, अशी सर्व हिंदूंची धारणा आहे. प्रथम तो केवळ काव्याचा नायक होता. पण वाल्मीकीच्या रामायणामुळे तो लोकविश्रुत झाला. सत्यवादी, पितृभक्त, बंधुवत्सल, महापराक्रमी आणि सद्गुणांचा पुतळा अशा अनेक गुणविशेषांमुळे राम हा लोकांचा आदरणीय झाला. डॉ. याकोबीचे अनुमान आहे, की दाशरथी राम हा वैदिक इंद्राचेच दुसरे रूप आहे. तो पश्चिम भारतात बलराम आणि पूर्व भारतात दाशरथी राम, अशा दोन भिन्न स्वरूपांत विकसित झाला. गृह्यसूत्रांतली इंद्रपत्नी सीता ही त्याच कारणामुळे पुढे रामपत्नी बनली. बौद्ध जातकांवरून कळते, की बुद्ध हा रामाचा अवतार होता. बौद्ध साहित्यात रामाची बोधिसत्त्व या स्वरूपात कल्पना केलेली आहे. त्यावरून सनपूर्व पहिल्या शतकातच राम हा अवतारी पुरुष मानला गेला असावा, असे दिसते. मूळ रामायणात राम हा एक श्रेष्ठ मानव व आदर्श क्षत्रिय स्वरूपातच दिसतो. पण रामायणात भर पडली त्या काळात मात्र तो अवतार पदवीला पोचला.

अवतार या स्वरूपात रामोपासनेचा अधिक प्रचार इ. स. च्या बाराव्या शतकानंतर झालेला दिसतो. स्वामी रामानंद यांच्या काळात रामोपासना खूप वाढली. त्या उपासनेवर धार्मिक साहित्यही निर्माण झाले. रामभक्तिसाहित्यात अध्यात्म रामायणाला वरचे स्थान आहे. इ. स. च्या चौदाव्या शतकानंतर रामभक्तीचा प्रवाह अधिक वेगवान झाला. त्याला पूर्ण परब्रह्माचे स्थान मिळाले. वाल्मीकीचा राम शरभंगाच्या आश्रमात गेल्यावर त्या ऋषीच्या चरणांना स्पर्श करतो, तर अध्यात्म रामायणात राम शरभंग ऋषीकडून पूजेचा स्वीकार करतो. अगस्त्याच्या बाबतीतही हाच प्रकार आहे (अध्यात्म रा. ३.२.२-१०)



वराह-अवतार

पूर्व-प्रचलित रामकथा मध्ययुगात अशा वेगळ्याच ढंगात परिवर्तित झाली आहे. आणि हे परिवर्तन राम हा अवतार म्हणून जनतेच्या हृदयात ठसल्यानंतर झालेले आहे. रामकथेचा हा कायापालट भक्तिसंप्रदायाने घडवून आणला. अवतारकल्पना ही वैष्णव संप्रदायात महत्त्वाला चढली. बहुतेक वैष्णव हे साक्षात विष्णूपेक्षा त्याच्या रामकृष्ण या अवतारांनाच विशेष भजतात. प्रथमारंभी विष्णूचे अनंत अवतार आहेत, अशी कल्पना होती. पण पुढे ही अवतारसंख्या मर्यादित करण्याकडे प्रवृत्ती होऊ लागली.

**अवतारसंख्या** – महाभारतातल्या नारायणीय उपाख्यानांत (म. भा. शांति.३३९) वराह, नृसिंह, वामन, भार्गवराम, दाशरथीराम, व वासुदेवकृष्ण या सहा अवतारांची चर्चा आहे. त्याच अध्यायात पुढे हंस हा अवतार धरून व बुद्ध अवतार वगळून दहा अवतारांचा उल्लेख येतो. काही ठिकाणी ही संख्या बारा आहे. भागवत पुराणात (६. २. ७) चौवीस अवतारांचा निर्देश केला आहे, त्यांची नावे पुढीलप्रमाणे –

(१) नारायण (विराट पुरुष) (२) ब्रह्मा (३) सनत्कुमार (चार मिळून) (४) नर-नारायण (५) कपिल (६) दत्ता-



नृसिंह

त्रेय (७) सुयज्ञ (८) हयग्रीव (९) ऋषभ (१०) पृथू (११) मत्स्य (१२) कूर्म (१३) हंस (१४) धन्वंतरी (१५) वामन (१६) परशुराम (१७) मोहिनी (१८) नृसिंह (१९) वेदव्यास (२०) व्यास (२१) बलराम (२२) कृष्ण (२३) बद्ध व (२४) कल्की



हे सर्व अवतार लीलावतार या नावाने प्रसिद्ध आहेत. पुढच्या सर्व पुराणांत अवतारांची दहा ही संख्या निश्चित केली आहे. त्यांची नावे पुढीलप्रमाणे–

(१) मत्स्य (२) कूर्म (३) वराह (४) नृसिंह (५) वामन (६) परशुराम (७) राम (८) कृष्ण (९) बुद्ध व (१०) कल्की.

कित्येक पुराणांत बुद्धाला अवतार मानत नाहीत. इ. स. च्या सातव्या शतकाच्या सुमारास बुद्धाला विष्णूचा अवतार म्हणून



बुद्ध

प्रखर मान्यता मिळू लागली होती. पण तरीही कुमारिलभट्टासारख्या मीमांसकांचा त्याला विरोध होताच. इ. स. च्या दहाव्या शतकाच्या सुमारास मात्र बुद्ध हा अवतार सर्वत्र प्रसिद्धी पावला. या गोष्टीला बौद्धांचे वाङ्मयही कारणीभूत झाले आहे. हिंदूंची अवतारकल्पना हीनयान पंथात प्रविष्ट झाली नव्हती; पण महायान पंथाने तिचा मोकळ्या मनाने स्वीकार केला. बोधिसत्त्व या कल्पनेच्या उदयानंतर बोधिसत्त्व हे बुद्धाचे अवतार आहेत, ही पुढची कल्पना रूढ झाली. बुद्ध जरी निर्वाणाला गेला असला, तरी त्याला पुन्हा अवतार घेण्याचे सामर्थ्य आहे व यापुढे तो मैत्रेय बुद्धाच्या रूपाने अवतरणार आहे, असे महायान पंथाने घोषित केले.

**अवतारांचे प्रकार**–अंशावतार व पूर्णावतार असे दोन प्रकारचे अवतार मानलेले आहेत. लहानसहान उपद्रवांच्या शांतीसाठी तेवढ्याच वेळेपुरता परमात्मा अवतार घेतो व ते कार्य संपल्यावर अंतर्धान पावतो, या प्रकाराला अंशावतार म्हणतात. पण नीतिधर्माचा उच्छेद करणाऱ्या आणि भूमीला भारभूत झालेल्या रावण, कंसादी दैत्यांच्या निर्दालनासाठी भगवान जेव्हा आपल्या शक्तिव्यूहासह अवतार घेतो आणि ते कार्य पुरे झाल्यावरही काही काल जगात राहतो, अशा अवताराला पूर्णावतार म्हणतात. या दृष्टीने रामकृष्ण हे पूर्णावतार मानले गेले आहेत. रामाचा बंधू लक्ष्मण हा शेषाचा अवतार व वानर हे स्वर्गातल्या देवांचे अवतार, तसेच बलराम हा शेषाचा अवतार, रुक्मिणी ही लक्ष्मीचा अवतार व गोपगोपी हे देव-देवांगनांचे अवतार, हा राम-कृष्णांचा शक्तिव्यूह होय. बौद्ध मतात अवलोकितेश्वराला बुद्धाचा अंशावतार मानले आहे.



अवलोकितेश्वर

**अंशावतार**–म. भा. च्या आदिपर्वात ५४ ते ६४ या अध्यायांमध्ये अंशावतारांची नामावली दिलेली आहे. देवी भागवताच्या चौथ्या स्कंधातही अंशावतारांची एक नामावली आहे. तिच्यात कोणकोणत्या देवांनी कोणकोणते अंशावतार घेतले ते पुढीलप्रमाणे सांगितले आहे—

| देव | अवतार |
|---|---|
| कश्यप | वसुदेव |
| आदिशेष | बलराम |
| नारायण ऋषी | श्रीकृष्ण |
| यमधर्म | युधिष्ठिर |
| अश्विनीदेव | नकुल-सहदेव |
| धर्म | विदुर |
| शिव | अश्वत्थामा |
| गंधर्वराज | देवक |
| अष्टवसू | भीष्म |
| मरुद्‌गण | कृप-कृतवर्मा |
| अदिती | देवकी |
| नरऋषी | अर्जुन |
| वायू | भीमसेन |
| सूर्य | कर्ण |
| बृहस्पती | द्रोण |
| वरुण | शंतनू |
| मरुत | विराट |
| हंस | धृतराष्ट्र |
| द्वापर | शकुनी |
| पावक | धृष्टद्युम्न |
| कली | दुर्योधन |
| राक्षस | शिखंडी |
| वरुण | द्रुपद |
| विश्वेदेव | पांचालीचे पाच पुत्र |
| धृती | माद्री |
| विप्रचित्ती | जरासंध |
| हयग्रीव | केशी |
| बाष्कल | भगदत्त |
| लंब | प्रलंब |
| सनत्कुमार | प्रद्युम्न |
| लक्ष्मी | द्रौपदी |
| सिद्धी | कुंती |
| मती | गांधारी |
| जय | हिरण्याक्ष |
| विजय | हिरण्यकशिपू |
| हिरण्याक्ष | रावण |
| हिरण्यकशिपू | कुंभकर्ण |
| रावण | शिशुपाल |
| कुंभकर्ण | दंतवक्त्र |
| प्रल्हाद | शल्य |
| कालनेमी | कंस |
| अनुल्हाद | धृष्टकेतू |
| खर | धेनुक |

**नित्यावतार** – भगवंताच्या न्यूनाधिक ईश्वरी गुणांचा आदर्श प्रस्थापित करण्यासाठी होणारे आणि त्या उच्चतम आदर्शांचे व्यक्तित्वानुसार प्रकटन करणारे अवतार हे नित्यावतार समजले जातात.

**गुणावतार** – ब्रह्मा, शिव, मनू, प्रजापती, ऋषी व संत यांना गुणावतार समजतात.

**विभवावतार** – यांची संख्या ३९ मानलेली असून यांत ध्रुव, कपिल, मधुसूदन, पद्मनाभ, इ. व्यक्ती येतात (अहिर्बुध्न्य संहिता ५.५०).

**सत्त्वावतार** – यांत काल, स्वभाव, कार्य, कारण, मन

पंचभूते, अहंकार, त्रिगुण, इंद्रिये, ब्रह्मायुशरीर व स्थावरजंगम जीव, यांची गणना होते (भाग. पु. ६.२.७).

**अर्चावतार** – प्राणप्रतिष्ठा केलेल्या आणि भक्तजनांकडून पूजिल्या जाणाऱ्या भगवंताच्या मूर्ती यांत येतात.

**अंतर्यामी-अवतार** – प्राण्यांच्या हृदयकमलात निवास करणारा आणि त्यांच्या समस्त व्यापारांचे नियमन करणारा परमात्मा (गीता. १८.६१).

**लीलावतार** – सनत्कुमार, सनंदन, सनातन, नारद, वराह, मत्स्य, यज्ञ, नर-नारायण, कपिल, दत्तात्रेय, हयग्रीव, हंस, पृष्णिग, ऋषभ, पृथू, नृसिंह, कूर्म, धन्वंतरी, मोहिनी, वामन, परशुराम, राम, व्यास, बलदेव, कृष्ण, बुद्ध, कल्की हे लीलावतार होत. प्रत्येक कल्पात हे होत असल्यामुळे यांना कल्पावतार असेही म्हणतात.

**मन्वंतरावतार** – यज्ञ, विभू, सत्यसेन, हरी, वैकुंठ, अजित, वामन, सार्वभौम, ऋषभ, विष्वक्सेन, धर्मसेतू, सुदामा, योगेश्वर व बृहद्‌भानू.

**युगावतार** – शुक्ल, रक्त, श्याम व कृष्ण हे कृतयुगादिक्रमाने चार अवतार होत.

**आवेश** – काही महापुरुषांत शक्ती, ज्ञान किंवा भक्ती यांच्या द्वारे भगवंताचा आवेश होतो. शेष हा शक्त्यावेश, सनकसनंदन हे ज्ञानावेश व नारद हा भक्त्यावेश होय.

**अवतारांची मूलतत्त्वे** – अवतार-कल्पनेच्या मुळाशी मुख्य सिद्धान्त आहेत, ते असे–

(१) परमेश्वराचा एका रूपात नित्य-लोकामध्ये नित्यविहार असतो आणि दुसऱ्या रूपात जगत्प्रवृत्ती असते. (हंसविलास, ४७). (२) परमात्मा एक असूनही स्वतःला अनेक रूपांत प्रकट करू शकतो. (३) अवतार नित्यरूप आहे; मायिक नाही. (४) सर्व अवतार सच्चिदानंदविग्रह आहेत. (५) काही अवतार मनुष्यरूपात होतात; तर काहींत मानुष चेष्टा असते. (६) अवताराची मानुष तनूही दिव्य असते व तिच्या ठिकाणी दिव्य शक्ती वास्तव्य करतात. (७) प्रत्येक अवताराची विशिष्ट देहलीला असते आणि विशिष्ट लोकही असतो. (८) परमेश्वर अवताररूपाने पृथ्वीवर आला असताही तो आपल्या दिव्य व पूर्ण रूपात निजधामामध्ये विराजमान राहतो.

अवतारकल्पना प्रथम वैष्णव धर्मात उगम पावली. तिला लोकप्रियता मिळाल्यावर शैव, शाक्त, गाणपत्य, इ. संप्रदायांनी आपापल्या संप्रदायांत तिचा स्वीकार केला. विष्णूप्रमाणेच शिवानेही विविध प्रसंगीं अनेक अवतार घेऊन साधुपरित्राण आणि दुष्टविनाश केल्याचे शैव पुराणांत सांगितले आहे. कालभैरव, शरभ, यज्ञेश्वर, महाकाल, एकादश रुद्र, हनुमान, नर्तकनट, अवधूतेश्वर, वृषेश, इ. शिवाचे अवतार शिवपुराणात सांगितले आहेत. शिवाची प्रथम भार्या दक्षकन्या सती, तीच



कल्की

पुढे हिमाचलाच्या पोटी अवतार घेऊन पार्वती या नावाने शिवाचे अर्धांग बनली. पार्वतीला आदिमाया किंवा आदिशक्ती असे म्हणतात. तिनेही असुरमर्दनासाठी अनेक अवतार घेतले आहेत. मुख्य देवतांच्या काही परिवारदेवताही असतात. त्याही आपल्या स्वामीच्या अनुज्ञेवरून किंवा विशिष्ट कार्यासाठी मानव-अवतार धारण करतात. गणपतीनेही युगायुगांत गणेश, विघ्नेश, मयूरेश, सिद्धिविनायक, इ. अनेक अवतार घेतल्याचे गाणपत्य पुराणांवरून कळते. दत्तात्रेय हा मुळात श्रीविष्णूचा अवतारच आहे. पण या अवताराने ही श्रीपादश्रीवल्लभ नृसिंहसरस्वती, इ. अवतार घेतल्याचे दत्तपरंपरेवरून कळते. दक्षिणेतले बारा आळवार हे श्रीविष्णूच्या आयुधांचे अवतार मानलेले आहेत. महाराष्ट्रातल्या भागवत संप्रदायात ज्ञानेश्वराला विष्णूचा, नामदेवाला उद्धवाचा आणि तुकारामाला नामदेवाचा अवतार मानले आहे. मध्यकालातल्या सर्व संप्रदायांतून अवतारांची चर्चा आढळते. मूळ अवतारकल्पना अशा प्रकारे सर्वत्र विस्तार पावली आणि या कल्पनेला भगवद्‌गीतेतील पुढील श्लोकाची (१०.४१) पुष्टी मिळाली –

यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।
तत्तदेवागच्छ त्वं मम तेजोंऽशसम्भवम् ।।

अर्थ – (हे अर्जुना) जी जी वस्तू वैभव, लक्ष्मी किंवा प्रभाव यांनी युक्त आहे, ती ती माझ्या तेजाच्या अंशापासून झाली आहे, असेच तू समज.

जैन लोक अवतार मानीत नसले, तरी हिंदूंच्या अवतारकल्पनेला थोडीशी कलाटणी देऊन त्यांनी तिचा स्वीकार केला आहे. तीर्थंकर हे मनुष्यरूपाने जन्म घेतात व तपस्येच्या मार्गाने देवत्व मिळवितात. तीर्थंकर याचा अर्थच जीवांना भवसागरातून पार करण्यासाठी तीर्थ म्हणजे पायउतार बनणारा असा आहे. सनातन मतातही जगदुद्धार हेच अवताराचे कार्य मानलेले आहे.

ख्रिस्ती धर्मांत तिसऱ्या शतकापर्यंत अवतारकल्पनेचा विचार झाला नाही. त्यानंतर ख्रिस्ताला देवाचा अवतार म्हणावे किंवा नाही, हा प्रश्न उत्पन्न झाला आणि तो वादग्रस्तही बनला. काही ख्रिस्ती ख्रिस्ताला ईश्वराचा अवतार मानीत, तर काही त्याला केवळ मनुष्य म्हणत. पुढे ख्रिस्त हा ईश्वराचा पुत्र आहे, अशी भाषा प्रचलित झाली. ख्रिस्ती जनतेत अशी श्रद्धा आहे, की ईश्वर हा मनुष्यजातीच्या पापांचे प्रायश्चित करण्यासाठी व मनुष्यांना मुक्तीचा मार्ग दाखविण्यासाठी ख्रिस्ताच्या रूपात अवतरित झाला.

इस्लामी धर्मांत अवतारकल्पना कशी आली त्याचा इतिहासही मनोरंजक आहे. ही कल्पना इस्लामी धर्माच्या शिया पंथात दिसते. महंमदाच्या मनात आपल्या मागून खलिफा म्हणून ज्याची नेमणूक करायची होती, त्या अलीला मदिनेच्या पुढाऱ्यांनी पदच्युत केले व अबूबक्र, उमर आणि उस्मान यांना खलिफा नेमले. पुढे इ. स. ६६० मध्ये अली मारला गेला. त्याचे पुत्र हसन आणि हुसेन हेही करबलाच्या लढाईत मृत्यू पावले. या सर्व गोष्टींचा परिणाम म्हणून इराणमधले अलीचे अनुयायी अलीला व त्याच्या मुलांना देवाचे अवतार मानू लागले.

पारशी धर्मांत अवतारकल्पना नाही. पण तरीही ते लोक राजाला पवित्र व दैवी शक्तीने युक्त मानतात.

**व्यूह आणि अवतार** – महाभारताच्या शांतिपर्वात नारायणीय धर्माचे विवेचन आहे. हा नारायणीय धर्म सर्वप्रथम भगवंताने अर्जुनाला सांगितला आणि नंतर नारदालाही त्याचा उपदेश दिला (म. भा. शांति ३४६.१०-११; ३४८. ६-८). याच नारदाने पुढे नारायणीय धर्माच्या अंतर्गत व्यूहकल्पना मांडली. वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध हे चार मिळून चतुर्व्यूह होतो. यात वासुदेव हा परमात्मा व सकल सृष्टीचा कर्ता होय. संकर्षण हे त्याचे दुसरे रूप. ते प्राणिमात्राचे प्रतिनिधी समजावे. संकर्षणापासून प्रद्युम्नाची उत्पत्ती झाली. प्रद्युम्न म्हणजेच मन. त्याच्यापासून अनिरुद्ध उत्पन्न झाला. तो अहंकाराचा प्रतिनिधी होय. या चारही नारायणाच्या मूर्ती आहेत. या व्यूहवादाचा सिद्धान्त पुढीलप्रमाणे आहे –

भगवान वासुदेव कल्पारंभी स्वतःच्या ठिकाणी केवळ अव्यक्त मूल प्रकृतीलाच उत्पन्न करीत नाही, तर तिच्या बरोबरच संकर्षण नामक विशिष्ट जीव किंवा एक व्यूहही निर्माण करतो. संकर्षण आणि प्रकृती यांच्या संयोगातून मन प्रगट होते. हे मन हाच प्रद्युम्न होय. प्रद्युम्नापासून अनिरुद्धाची म्हणजे अहंकाराची उत्पत्ती होते. त्याच्यापासून पुढे महाभूते व त्यांचे गुण उत्पन्न होतात. त्याच वेळी ब्रह्माचीही उत्पत्ती होते आणि तो तत्त्वांच्या सामग्रीने भूतसृष्टीची रचना करतो.

नारायणीय आख्यानात व्यूहवादाच्या अनुषंगानेच भगवंताच्या अवतारग्रहणाची चर्चा आलेली आहे. तिथे भगवंताच्या केवळ सहाच अवतारांचा उल्लेख आलेला आहे. पण पुढे विष्णूचे महत्त्व जसजसे वाढत गेले, तसतसे त्याच्या स्वरूपात मोठे परिवर्तन होऊन अवतारांची संख्याही वाढली.

वैदिक संहितांच्या युगात मित्र, वरुण, अग्नी, इन्द्र, इ. देवतांना एकाच देवाधिदेवाची भिन्न भिन्न स्वरूपे मानण्याची प्रवृत्ती होती. अवतारवादाच्या युगात त्याच्या उलट राम, कृष्ण, इ. महापुरुषांना विष्णूचे अंश अथवा अवतार मानू लागले. गुप्तकाल हा पुराणांच्या उपबृंहणाचा काल होय. त्या कालात अवतारकल्पनेला सर्वांगी बहर आलेला दिसतो. अवतारवाद हा बीजरूपाने वैदिक कालातच होता आणि ब्राह्मण कालापासून पुढे त्याचा हळूहळू विकासही होत होता; पण नारायणीय धर्माच्या स्थापनेच्या काळी व्यूहवाद बलवत्तर झाला आणि त्याच्यापुढे अवतारकल्पना काही काल मंदप्रभ झाली. पुढे गुप्तकालात अवतारवाद पुनश्च बळावला व त्याने व्यूहवादालाच विस्मृतप्राय करून टाकले. अवतारकल्पनेत व्यूहाच्या चार अंगांतले वासुदेव हे एकच अंग अवशिष्ट राहिले. बाकीचे व्यूह केवळ विष्णूचे गुणावतार किंवा अंशावतार ठरले. व्यूहवाद हा नारायणावर आधारित होता, तर अवतारवाद हा विष्णूचा आधार घेऊन पुढे आला. विष्णू ही वेदकालातील एक दुसऱ्या श्रेणीची देवता होती. पण अवतारकल्पनेने तिने वाढत वाढत सर्वोच्च भगवत्पद अलंकृत केले. पुराणांत विष्णूचे स्थान सर्वोच्च मानले गेले आहे. अशा प्रकारे नारायणीय उपाख्यानात सांगितलेला मूळचा भागवत किंवा एकांतिक धर्म पुढे वैष्णव धर्मांत परिणत झाला. व्यूहवादात नारायणाच्या केवळ सृष्टिकारक गुणांनाच प्राधान्य दिलेले होते; तर अवतारवादात भगवंताच्या षड्गुणैश्वर्याला व त्याच्या अनंत लीलांना महत्त्व प्राप्त झाले. आणि त्याहीपुढे साक्षात विष्णूपेक्षा त्याचे राम-कृष्णादी अवतार हेच विशेषत्वाने भजनीय व पूजनीय ठरले. [ वै. ध.; म. ज्ञा. को.; हि. ध. ]

**अवंती** (१) माळव्यामधील एक प्राचीन नगरी. हिला अवंतिका असेही म्हणत. मोक्षदायक सप्तपुऱ्यांमध्ये हिची गणना आहे. पूर्वी ही नगरी आजच्या उज्जयिनीच्या दक्षिणेस अर्ध्या कोसावर होती. आधुनिक माळवा, निमाड व मध्यप्रदेशातील बराचसा भाग मिळून अवंती हा प्रदेश बनला होता. या देशाचे दोन प्रमुख विभाग होते. उत्तर विभागाची राजधानी उज्जयिनी होती व दक्षिण विभागाची माहिष्मती होती. याच उज्जयिनीत प्रख्यात विक्रमादित्य राजा राज्य

करीत होता. अवंतीच्या वैभवाचे वर्णन अनेक संस्कृत कवींनी केले आहे. कालिदास म्हणतो –

प्राप्यावन्तीमुदयनकथाकोविदग्रामवृद्धान्
पूर्वोद्दिष्टामुपसर पुरीं श्रीविशालां विशालाम्।
स्वल्पीभूते सुचरितफले स्वर्गिणां गां गतानां
शेषैः पुण्यैर्हृतमिव दिवः कान्तिमत् खण्डमेकम्।
(मेघ. पू. ३१)

अर्थ – उदयनाच्या कथा माहीत असलेली वृद्ध माणसे ज्या देशात अजून आहेत, अशा अवंती देशात प्रवेश केल्यावर तू पूर्वोक्त वैभवशाली आणि विशाल उज्जयिनीला जा. (ती नगरी म्हणजे) पुण्यकर्म संपत आल्यामुळे मर्त्यलोकी परत गेलेल्या स्वर्गवासी पुण्यात्म्यांच्या अवशिष्ट पुण्यकर्मांनी खेचून आणलेला जणू स्वर्गलोकाचा झळाळता तुकडाच आहे.

महाभारतकालीन अवंती राष्ट्राचा विस्तार दक्षिणेस नर्मदेच्या किनाऱ्यापर्यंत व पश्चिमेस महानदीपर्यंत झाला होता. या राष्ट्रातल्या लोकांना आवंत्य असे म्हणत. आवंत्यांचा उल्लेख वेदांत नाही; पण वेदोत्तर वाङ्मयात वैपुल्याने आहे. बौद्ध धर्माच्या स्थापनेच्या वेळी भारतात जी चार प्रमुख राज्ये होती, त्यांत अवंतीची गणना होती. नंतर ही राज्ये मौर्य साम्राज्यात समाविष्ट झाली. अवंतीतले क्षत्रिय राजे पराक्रमी होते. भारतीय युद्धात कौरवांच्या सैन्यापैकी एक पंचमांश सैन्य अवंतीच्या राजाचे होते. विंद व अनुविंद हे दोन आवंत्य वीर त्या सर्व युद्धात कौरवांच्या बाजूने चमकले. शेवटी अर्जुनाने त्यांचा वध केला.

अवंतीचे क्षत्रिय हे हैहय राजवंशाचे असून त्यांच्यापैकी कार्तवीर्य अर्जुन हा महापराक्रमी राजा झाला. हैहय व यादव यांचे वैवाहिक संबंध घडले आहेत. यदुराजकन्या राज्याधिदेवी हिचा विवाह अवंतीच्या राजाशी झाला होता. तिला विंद-उपविंद असे दोन पुत्र झाले. भारतीय युद्धातले विंद-अनुविंद ते हेच असावे. अवंतीचा उल्लेख पाणिनीने केला असून (अष्टा. ४.१.१७०) भागवत, स्कंदपुराण व योगिनीतंत्र यांमध्येही तो आहे.

या देशाची जमीन सुपीक होती. कच्छच्या आखातापासून पूर्वेकडे निघालेल्या आर्यांनी हा देश जिंकून तिथे आपली वसाहत केली. इ. स. च्या दुसऱ्या शतकापर्यंत हा देश अवंती या नावाने प्रसिद्ध होता. पुढच्या काळात मालव हे नाव त्याला प्राप्त झाले.

अवंतीचे राज्य जंबुद्वीपामधील सोळा महाजनांपैकी एक होते. या राज्यातले लोक श्रीमंत व समृद्ध होते. अवंती हे बौद्ध धर्माचे मोठे केंद्र होते. या प्रदेशात थेर महाकच्चायन याने त्या धर्माचा प्रसार केला. जैन तीर्थंकर महावीर यानेही या ठिकाणी तपश्चर्या केली होती.

भारताच्या राजकीय इतिहासात अवंतीला महत्त्वाचे स्थान आहे. बुद्धाचे समकालीन असलेल्या प्रद्योतवंशी राजांच्या पराक्रमाची भीती मगध सम्राटांच्याही हृदयात वसत होती. प्रद्योतांचा हल्ला येऊ नये म्हणून मगधाच्या अजातशत्रूने राजगृह या राजधानीला भक्कम तटबंदी केली होती. प्रद्योतराजा वत्सराज उदयनाचा मत्सर करीत असे. त्याने एकदा उदयनाला पकडून तुरुंगात टाकले असता प्रद्योताची कन्या वासवदत्ता हिचे त्याच्यावर प्रेम जडले. तो तिला घेऊन पळून गेला आणि त्याने तिला आपली पट्टराणी केली. ही घटना कालिदासाने 'प्रद्योतस्य प्रियदुहितरं वत्सराजोऽत्र जह्रे' या श्लोकात सांगितली आहे (मेघ. पू. ३४). सम्राट अशोक हा अवंती देशाचा राजप्रतिनिधी म्हणून काही काळ उज्जयिनीस राहिला होता. पाहा – उज्जयिनी. [ हि. जॉ. ए. इं.; प्रा. स्थ. को. ]

(२) एक प्राचीन राज्य. या राज्यात महाकालवन आहे. त्या वनात शिवपार्वती विहार करीत असता अंधक नावाच्या दैत्याने पार्वतीला पळवून नेण्याचा प्रयत्न केला. त्या वेळी शिवाने अंधकाशी युद्ध करून त्याचा पराभव केला (मत्स्य पु. १७८). जरासंधाने यादवांच्या विरुद्ध मोहीम सुरू केली, तेव्हा अवंतीच्या लोकांना आपल्या सैन्यात भरती केले होते. या प्रदेशावर शूद्र व आभीर यांनी राज्य केले. मागध पुरंजयाच्या कालात इथले ब्राह्मण व्रात्य झाले (भाग. पु. १२.१).

**अवंतीपूर** काश्मीरमधले झेलमच्या तीरावरचे एक क्षेत्र. श्रीनगरपासून हे नऊ कोसांवर असून, अनंतनाग क्षेत्राला जाणाऱ्या रस्त्यावर आहे. याचे प्राचीन नाव विश्वैक्यसार असे होते. इ. स. च्या ९ व्या शतकात अवंतिवर्मा या राजाने या नगराची स्थापना केली. या ठिकाणी अनेक मंदिरांचे भग्नाविशेष आहेत. इथले अवंतीश्वराचे मंदिर जमिनीपासून ५७ फूट उंचीवर असून वर चढायला पायऱ्या आहेत. इथली कारागिरी उच्च दर्जाची आहे. जवळच एका दगडी सिंहासनावर एक भव्य कन्यामूर्ती उभी असून तिच्या हाती डमरू आहे व तिच्या दोहीं अंगीं दोन सिंह आहेत.

इथले दुसरे ऐतिहासिक दृष्टचा महत्त्वाचे मंदिर म्हणजे अवंतिवर्म्याने बांधलेले विष्णुमंदिर होय. या विष्णुमूर्तीच्या दोहीं अंगीं दोन द्वारपाल आहेत. मंदिराच्या वरच्या भागी चार कोंबडचा असून त्यांच्यावर चौदा गोल पाषाणांची पंक्ती आहे. मंदिरावर देवतांची चित्रे व हंस, सिंह, कमल ही सांस्कृतिक प्रतीके कोरलेली आहेत. शिकंदराने इथल्या मंदिरांचा विध्वंस केला, असे सांगतात. [ म. क.; योजना, कश्मीर विशेषांक, १९६२ ]

**अवत्सार काश्यप** एक सूक्तद्रष्टा. याला अवत्सार प्राश्रवण असेही म्हणतात. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील चव्वेचाळिसावे आणि नवव्या मंडलातील त्रेपन्न ते साठ क्रमांकाची सूक्ते याने रचली आहेत. चव्वेचाळिसावे सूक्त हे विश्वेदेवसूक्त म्हणून प्रसिद्ध आहे. या सूक्तात जागृतीची प्रशंसा आहे. प्रबोधिनी एकादशीच्या दिवशी किंवा तुळशीच्या लग्नाच्या वेळी हे मंत्र म्हटले जातात. याच्या दोन ऋचा (५.४४.१४-१५) पुढे दिल्या आहेत –

यो जागार तमृचः कामयन्ते यो जागार तमु सामानि यन्ति ।
यो जागार तमयं सोम आह तवाहमस्मि सख्ये न्योकाः ।।
अग्निर्जागार तमृचः कामयन्तेऽग्निर्जागार तमु सामानि यन्ति ।
अग्निर्जागार तमयं सोम आह तवाहमस्मि सख्ये न्योकाः ।।

अर्थ – जागृत भक्तावर ऋचा आणि सामसूक्ते प्रसन्न होतात आणि वशीकृत सोम त्याच्या मैत्रीविषयी अभिमान बाळगतो. जागृत अग्नीवर ऋचा आणि सामसूक्ते प्रसन्न होतात आणि वशीकृत सोम त्याच्या मैत्रीमध्ये अभिमान बाळगतो.

नवव्या मंडलातील याच्या नावावरील सूक्तांमध्ये पवमान सोम हा विषय चर्चिला गेला आहे.

त्यांपैकी एका सूक्तात सोम तीस सरोवरे ओलांडून जात असल्याचा आणि सात नद्यांचा निर्देश आहे (९.५४.२). अभ्यासकांच्या मते भारतातील सप्तसिंधू नद्यांचा हा उल्लेख असावा. शिवाय ध्वस्र, पुरुषन्ती या राजांची दानस्तुती यात आहे (९.५८.३-४).

क्षत्र, मनस, एवावद, यजत सध्री आदी आचार्यांबरोबर अवत्साराचा उल्लेख केलेला आढळतो (ऋ. ५.४४.१०). ऐतरेय ब्राह्मणातही याचे नाव आहे (२.२४). [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ. ]

**अवदान** याच्या व्याख्या पुढीलप्रमाणे आहेत – (१) 'हविष्ट्वप्रयोजकः संस्कारः' = हविर्द्रव्याला हवीपणा प्राप्त करून देणारा संस्कार (जैमि. न्या. अ. १. १०.७). (२) ब्राह्मणे व कल्पसूत्रे यांत अवदान शब्द होमयोग्य पदार्थांच्या गृहीतव्य अंशाचा वाचक म्हणून घेतलेला आहे. उदा० 'तस्मात् यत्किञ्चिदग्नौ जुह्वति तदवदानं नाम' = म्हणून जे किंचित् अग्नीत हवन करतात, त्याला अवदान असे नाव आहे (श. ब्रा. १.७.२.६). (३) दो = कापणे. यावरून मुख्य हवीपासून यागासाठी कापून घेतलेला किंवा निराळा केलेला भाग तो अवदान होय.

श्रौतयज्ञात हविसमर्पणाची विशिष्ट पद्धती आहे. पुरोडाशासारख्या घन हवीच्या मध्यातून एक व पूर्वार्धातून एक अशी दोन अवदाने घेतात. प्रथम जुहूत एक स्रुवाभर आज्याने उपस्तरण, त्यावर अवदाने व त्यावर आज्याने अभिघार असे करून मग ते अग्नीत देतात. याला चतुरवदान म्हणतात. पंचावदानात हवीच्या पश्चिमार्धातून तिसरे अवदान घेतात. जमदग्नी गोत्राच्या यजमानासाठी पंचावदान घ्यावे, असे सांगितले आहे (सत्या. श्रौ. सू. २.२). हवी द्रवपदार्थ असेल, तर त्याचे अवदान स्रुव्याने घेतात व मांसाचे अवदान स्वधितीने घेतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे; भा. वृ. इ. ]

**अवदानसाहित्य** 'अवदानं कर्म वृत्तम्' (=अवदान म्हणजे परिशुद्ध कर्म होय) (अमर). पालीभाषेतल्या अवदान शब्दाची व्युत्पत्ती अज्ञात आहे. धार्मिक, नैतिक अथवा ऐतिहासिक प्रकारचे असाधारण कार्य, असा या शब्दाचा सर्वसामान्य अर्थ आहे. "पराक्रमोऽवदानं स्यात्" (=पराक्रम म्हणजे अवदान होय) असे भागुरिकोशात म्हटले आहे. परोपकार बुद्धीने केलेले कृत्य; मग ते आत्मत्यागाचे असो वा विहार बांधणे, द्रव्यदान, इ. स्वरूपाचे असो, तेही अवदान या अर्थानेच घेतले जाते. कृष्णकृत्यांचे फल काळे व शुभ्र कृत्यांचे फल शुभ्र, हा नीतिसिद्धान्त कथेच्या द्वारे पटवून देणे, हे अवदानसाहित्याचे उद्दिष्ट आहे. बौद्धांच्या महाव्युत्पत्तिकोशात बारा विद्या दिलेल्या असून त्यांत अवदान ही एक विद्या मानलेली आहे. अवदानसाहित्य हे कर्मवादाचा प्रचार करणारे आहे. हे मुख्यत्वे कथासाहित्य आहे. या कथा दंतकथांच्या स्वरूपात असल्या, तरी त्या स्वतः बुद्धाने सांगितलेल्या असल्यामुळे बौद्ध सूत्राप्रमाणेच त्यांचेही प्रामाण्य मानतात. अश्वघोषाचा सूत्रालंकार हा ग्रंथ काही अंशी अवदानस्वरूपाचा आहे. अवदानकथांचा सर्वांत प्राचीन संग्रह अवदानशतक हा आहे.

हा हीनयानपंथाचा ग्रंथ आहे. यात सर्वास्तिवादाच्या आगमातली कित्येक सूत्रे उद्धरण म्हणून घेतलेली आढळतात. यात बुद्धपूजेला प्राधान्य दिले आहे. यात दहा दशके असून प्रत्येक दशकाचा विशिष्ट असा विषय आहे. बुद्ध किंवा प्रत्येक बुद्ध होण्यासाठी काय करावे लागते, ते पहिल्या चार दशकांत सांगितले आहे. पाचव्या दशकात मानवाला प्रेतकोटीत होणाऱ्या यातना व बुद्धाने सांगितलेली त्यांची कारणे या प्रकारच्या कथा आहेत. सहाव्यात स्वर्गात देव होऊन राहिलेल्या मानवांच्या व प्राण्यांच्या कथा आहेत. शेवटच्या चार दशकांत कोणत्या कृत्यांनी मानव अर्हत्कोटीला जातो त्यासंबंधीच्या कथा आहेत.

अवदानशतकातल्या कथांपैकी एक कथा अशी –

एका गरीब मुलीने बुद्धाच्या पायांना चंदनाचे विलेपन केले

व त्यामुळे सर्व शहरभर चंदनाचा सुवास सुटला. या चमत्काराचा त्या मुलीला आनंद वाटला व ती बुद्धाच्या पाया पडून त्याला म्हणाली, की 'मी पुढील जन्मी प्रत्येकबुद्ध व्हावे.' त्यावर बुद्धाने हसून तिला म्हटले, की 'तू एके दिवशी गंधमादन नावाने प्रत्येकबुद्ध होशील.'

प्रत्येक कथेचा उपसंहार पुढील वाक्याने होत असतो –

'गुरूने असे संभाषण केल्यावर परमानंदित अंतःकरणाने भिक्षूंनी त्या गुरूची प्रशंसा केली.'

अवदानशतकाच्या आधारावर पुढे कल्पद्रुमावदानमाला, अशोकावदानमाला, अशा काही अवदानमालांची रचना झाली.

याव्यतिरिक्त दुसरा महत्त्वाचा ग्रंथ दिव्यावदान हा होय. या ग्रंथाचा काही भाग महायानपंथाशी संबद्ध असला, तरी हा मुख्यत्वे हीनयानांचा ग्रंथ आहे. हा ग्रंथ अवदानशतकापेक्षा लहान आहे; पण त्यात काही प्राचीन सूत्रे आहेत. हा संग्रह इ. स. च्या तिसऱ्या शतकात बनला असावा, असे विंटरनिट्झचे मत आहे. यातली सामग्री सर्वास्तिवादाच्या विनय ग्रंथातून घेतलेली आहे. यात सुसंबद्धता फारशी नसली, तरी त्यातले काव्य अभिजात आहे. त्याची भाषा सुबोध असून अशोकापासून तो पुष्यमित्र शुंगापर्यंतच्या राजांचा त्यात उल्लेख आहे. यातली अशोकपुत्र कुणालाची कथा अत्यंत करुण आहे. यात अधूनमधून भिक्षूंच्या चर्येचे नियमही दिलेले आहेत. यावरून हा ग्रंथ मूलतः विनयग्रंथ असावा, या मताला पुष्टी मिळते.

अशोकावदान हा ग्रंथही प्राचीन आहे. कारण इ. स. च्या तिसऱ्या शतकात त्याचे चिनी भाषेत भाषांतर झालेले आहे. सम्राट अशोक हा त्यातील कथाचक्राचा मध्यबिंदू आहे. कल्पद्रुमावदानमाला, रत्नावदानमाला व अशोकावदानमाला ही अवदानांची पद्यात्मक रूपांतरे असून, त्यांपैकी काही अवदानशतकांतून घेतलेली आहेत. हे तीनही ग्रंथ वीरकाव्याच्या धर्तीवर लिहिलेले आहेत. यांची भाषा पुराणांच्या भाषेसारखी आहे; त्यावरून ज्या कालात सांप्रदायिक पुराणे अस्तित्वात आली, त्याच कालात हे ग्रंथ निर्माण झाले असावे. हे तीनही ग्रंथ महायानपंथाचे आहेत.

क्षेमेन्द्राचा अवदानकल्पलता हा ग्रंथ इ. स. च्या ११ व्या शतकात निर्माण झाला. तिबेटात हा ग्रंथ आदरणीय मानला जातो. हा विशाल कथासंग्रह महाकाव्याच्या धर्तीवर आहे. क्षेमेन्द्राचा पुत्र सोमेन्द्र याने जीमूतवाहनावदान नावाची एक कथा त्या ग्रंथात अधिक घातली आहे. त्याशिवाय द्वाविंशतावदान, भद्रकल्पावदान, व्रतावदानमाला, विचित्रकर्णिकावदान, सुमागधावदान, अशी आणखीही लहानमोठी अवदाने बौद्ध साहित्यात निर्माण झाली आहेत.

जातके म्हणजेही अवदानेच होत. बोधिसत्त्व हा जातकांचा नायक आहे. आर्यसूराने जातकमाला लिहिली असून ती बौद्ध संप्रदायात अत्यंत लोकप्रिय ठरली आहे. अश्वघोषाच्या सूत्रालंकाराला आदर्श ठेवून ही जातकमाला रचली गेली आहे. इ. स. च्या ५ व्या शतकात जातकमालेचा चिनी अनुवाद तयार झाला; तेव्हा त्यापूर्वी शंभर वर्षे तरी आर्यसूर हा होऊन गेला असावा. जातकमालेत बुद्धाच्या पूर्वजन्माविषयी दंतकथा आहेत. या कथा त्याला पालिजातकात आयत्या मिळाल्या. जातकमाला गद्य-पद्य अशा संमिश्र स्वरूपात आहे. पाहा – जातककथा; अश्वघोष. [बौ. ध. द.; सं. सा. सो. इ.; म. ज्ञा. को.; भा. वृ. इ.]

## अवध

उत्तर प्रदेशातील एका भागाचे नाव. याची राजधानी अयोध्या होती. अवध हे अयोध्येचे अपभ्रष्ट रूप आहे. प्राचीन काळी या प्रांताला कोशल म्हणत असत. नवाबांच्या राजवटीत अवध प्रदेशाचे महत्त्व फार वाढले. प्रारंभी फैजाबाद ही या प्रांताची राजधानी होती. हे नगर अयोध्येच्या जवळ आहे. कालांतराने लखनौ नगराला राजधानीचे स्थान मिळाले. सध्या उत्तर प्रदेशाची तीच राजधानी आहे. अवध प्रदेशाचे नवाब स्वतंत्र राज्य करीत. ते शियापंथी मुसलमान असल्याने अवध हे शियापंथी मुसलमानांचे प्रमुख केंद्र बनले आहे. इ. स. १९०२ मध्ये आगरा व अवध मिळून एक नवीन प्रांत बनवला गेला व त्याचे नाव 'संयुक्त प्रांत' असे ठेवले गेले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर याच भागाला 'उत्तर प्रदेश' असे नाव मिळाले.

## अवधी – भाषा व साहित्य

अवधीचा अर्थ अवधविषयक असा होतो. पण भाषेच्या क्षेत्रात त्याचा अर्थ अवधप्रदेशात बोलली जाणारी भाषा किंवा बोली असा आहे. हिंदीच्या प्रादेशिक बोलीत अवधीला प्रमुख स्थान आहे. तुलसी व जायसी यांच्या प्रतिभेचा विलास याच भाषेच्या द्वारे प्रकट झाला. अवध हे हिचे मूळ क्षेत्र असले, तरी तिचा प्रसार मात्र हिंदीभाषिक विभागात सर्वत्र आहे. लखनौ, उन्नाव, रायबरेली, सीतापुर, बाराबंकी, सुलतानपुर, प्रतापगढ, फैजाबाद, लखीमपुर, खीरी, इ. जिल्ह्यांत ही भाषा बोलली जाते. बिहारमधले मुसलमान हीच बोली बोलतात. याशिवाय उत्तराखंडाच्या दक्षिणेस म्हणजे गंगा ओलांडून प्रयाग, मिर्जापुर, जौनपुर, इ. जिल्ह्यांच्या कित्येक तहसिलींत ही बोली प्रचलित आहे.

अवधीत पुढील ध्वनी आहेत–

व्यंजने : क, ख, ग, घ...ह

च, छ, ज, झ...य

ट, ठ, ड, ढ...र, ऱ्ह
त, थ, द, ध, न, न्ह, ल, ल्ह, स
प, फ, ब, भ, म, म्ह, व

(न्ह, म्ह, ऱ्ह, ल्ह, ही संयुक्त व्यंजने नसून, स्वतंत्र महाप्राण-युक्त व्यंजने आहेत.)

स्वर : अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ओ.

यांची अनुनासिक रूपेही होतात.

अवधीतले बहुतेक शब्द संस्कृतोद्‌भव आहेत. बोलभाषेत कायस्थ लोक सामान्यपणे फार्सी शब्द अधिक वापरतात; तर ब्राह्मणांच्या भाषेत संस्कृतचे प्रमाण अधिक आहे.

अवधीचे लेखन सामान्यत: कैथी लिपीत होते. व्यापारी लोक मुडिया लिपी वापरतात. ही दोन्ही देवनागरीची रूपे आहेत.

हिच्या उत्पत्तीसंबंधी विद्वानांत मतभेद आहेत. रामचंद्र शुक्ल अपभ्रंश भाषेतून हिचा उगम झाल्याचे सांगतात. ग्रियर्संनचे मत, ती अर्धमागधीपासून जन्मली, असे आहे. बाबूराम सक्सेना यांच्या मते तिचे निकटचे साम्य पालीशी आहे. पूरवी व पश्चिमी अशी अवधीची दोन रूपे आहेत. पूरवीला शुद्ध अवधी म्हणतात. पूरवीचे सुंदर रूप जायसीच्या काव्यात व पश्चिमीचे तुलसीदासाच्या काव्यात आढळते.

अवध प्रदेशाच्या सामाजिक, सांस्कृतिक व राजनैतिक परिस्थितीवर दृष्टिपात केला असता असे दिसते, की या प्रदेशाची वीरपरंपरा व वीरगाथालेखनाचीही परंपरा प्राचीन आहे. आजच्या उपलब्धीप्रमाणे अवधीचे पहिले काव्य (इ. स. ११७४) वीरकाव्यच आहे व ते जगनिक या कवीने लिहिले आहे. या काव्याचे नाव आल्हखंड असे असून, त्याचा संबंध आल्हा-ऊदलांच्या कथेशी आहे. पृथ्वीराजाच्या मृत्यूनंतर अकरा वर्षांनी महोबा या वीरस्थलाचे पतन झाले. त्याबरोबरच परमारांचे कीर्तिवैभव वाढले, विस्तारले. आल्हखंडात याच यशोवितानाचे सविस्तर वर्णन आहे. वीरगाथाकाव्यात आल्हखंडाला जे भाग्य लाभले, ते दुसऱ्या कोणत्याही ग्रंथाला लाभले नाही. तुलसीदासाच्या रामचरितमानसानंतर याच ग्रंथाला अवधप्रदेशात सर्वाधिक लोकप्रियता मिळाली आहे.

चौदाव्या शतकाच्या प्रारंभी देशातल्या परिवर्तनशील राजकीय व ऐतिहासिक परिस्थितीमुळे साहित्याच्या आदर्शातही महान क्रांती झाली. या काळात इस्लामी धर्माने हिंदुत्वाशी कट्टर विरोध धरला होता. इस्लाम जनतेच्या हृदयात असंतोष आणि विद्रोह यांची बीजे पेरीत चालला होता. मात्र हिंदूंची शक्ती क्षीण झालेली असल्यामुळे ते युद्धाच्या मार्गाने आपल्या अपमानाचे उट्टे काढू शकत नव्हते. आत्मसंरक्षणासाठी ईश्वराची प्रार्थना करणे यापलिकडे हिंदूंना काही करता येत नव्हते; त्यामुळे 'निर्बल के बल राम' हा भाव जनतेच्या हृदयात पुनश्च जागृत झाला. जनतेचे कवीही ईश्वराच्या स्तुतिस्तोत्रांतच आपल्या काव्यप्रतिभेचे प्रदर्शन करू लागले. जनतेच्या भावनांचे प्रतिनिधी असलेल्या या कवींनी धार्मिक महत्त्वाची तीर्थक्षेत्रे हेच आपले कार्यक्षेत्र केले व त्या त्या ठिकाणच्या भाषेत काव्यरचना सुरू केली. कालांतराने त्या त्या क्षेत्ररूप केंद्रांतल्या भाषेने साहित्यिक भाषेचे रूपग्रहण केले. चौदाव्या शतकाच्या या कालखंडाला भक्तिकाल असे म्हणतात. उत्तरभारतात भक्तिकालामध्ये ज्या दोन भाषांना प्राधान्य मिळाले, त्यांतली पहिली व्रजभाषा आणि दुसरी अवधी होय.

भक्तिकालातले हे काव्य संतलिखितकाव्य, प्रेमकाव्य, रामकाव्य, व कृष्णकाव्य, या चार धारांनी प्रवाहित झाले. कृष्णकाव्याची रचना व्रजभाषेत विशेषत्वाने झाली. प्रेमकाव्ये व रामकाव्ये ही बहुतांशी अवधीत लिहिली गेली; कारण बहुतेक रामाश्रित कवी अवधप्रदेशाचेच रहिवासी होते. संतकवींत अवधीभाषेच्या द्वारे काव्यनिर्मिती करणाऱ्यांत मलूकदासाचे नाव सर्वप्रथम घ्यावे लागेल. रामअवतारलीला, ज्ञानबोध, सुखसागर, इ. ग्रंथ त्याने लिहिले. त्याच्या भाषेचे प्रसन्न, सुंदर रूप त्याच्या स्फुट साहित्यात दिसून येते. मथुरादास हा मलूकदासाचा शिष्य. हा इ. स. चे सोळावे शतक संपताना झाला. यानेही अवधीत काव्यरचना केली आहे. त्यानंतर अठराव्या शतकाच्या प्रारंभी राजस्थानात संत चरणदास जन्मास आला. ज्ञानस्वरोदय, अष्टांगयोग, संदेहसागर, भक्तिसागर इत्यादी त्याचे २१ ग्रंथ आहेत. त्याच्या बहुतेक ग्रंथांची भाषा अवधी आहे.

प्रेमकाव्यांची भाषा मुख्यत्वे अवधीच झाली आहे. सूफी कवींनी याच भाषेत आपली प्रेमाख्याने रचली आहेत. सूफी आख्यानकाव्यांची परंपरा हिंदू व मुसलमान दोघांनीही आत्मसात केली व पुढे चालविली.

उत्तरभारतात रामानंदाच्या (इ.स.चे १४ वे शतक) प्रतिभेने व महान व्यक्तिमत्त्वाने रामभाव जागृत केला. पुढे रामसाहित्याचा सर्वश्रेष्ठ कवी तुलसीदास हा झाला. त्याच्या काव्यामुळे रामभक्तीचा प्रचार सर्वत्र झाला. त्याच्या रामचरितमानसामुळे रामभक्तीची जी एक अविच्छिन्न धारा प्रवाहित झाली ती आजतागायत या ना त्या स्वरूपाने साहित्यात दृग्गोचर होत राहिली आहे. तुलसीदासाने अवधीत 'मानसा'ची रचना करून त्या भाषेला मधुर, परिष्कृत व सुसंस्कृत बनविले. सूरदासाने व्रजभाषेला जे साहित्यिक वैभव दिले, तेच तुलसीदासाने अवधीला दिले.

सूफी व हिंदू कवींनी अवधीभाषेत अनेक प्रेमाख्याने रचली

आहेत. आजवरच्या संशोधनातून असे प्रेमाख्यानांचे हिंदू लेखक सुमारे ३४ उपलब्ध झाले आहेत. त्यांतल्या केवळ ११ कवींनीच अवधीभाषेत काव्यरचना केली. सत्यवती की कथा (इ. स. १४९६), रसरतन (इ. स. १६१९), नलदमयंती (इ. स. १६२६), पुहुपावती (इ. स. १६७०), उषाचरित्र (इ. स. १७७५), इत्यादी अवधीभाषेतील प्रेमाख्याने सुप्रसिद्ध आहेत.

**अवधी लोकसाहित्य** – अवधी लोकसाहित्य गद्य व पद्य या दोन्ही दृष्टींनी संपन्न आहे. गद्य वाङ्मयात असंख्य कथा-कहाण्यांचा समावेश होता. शेतकऱ्यांच्या जीवनानुभवाचे सार या कथांत साठविलेले असते. या कथांचा एक संग्रह श्री. त्रिपाठी यांनी प्रकाशित केला आहे.

अवधीतील पद्य लोकसाहित्याचेही दोन प्रमुख विभाग आहेत. त्यांपैकी एक भाग मोठमोठ्या महाकाव्यांचा बनलेला असून, दुसऱ्या भागात सरस व रोचक अशी अनेक प्रकारची गीते येतात. महाकाव्यांपैकी चनैनी हे सर्वांत मोठे आहे. या काव्याची नायिका चनैनी असून, नायकाचे नाव लोरिक आहे. ही दोघेही जातीने अहीर असून, काशीच्या जवळपास राहणारी होती.

घिरवा नावाचे दुसरे एक महाकाव्य असून, भडभुंजे लोक सूप वाजवीत ते गातात.

याशिवाय, छोटी छोटी अनेक गीते स्त्रिया व पुरुष भिन्न भिन्न धार्मिक व सामाजिक उत्सवप्रसंगी गातात. अवध प्रदेशात स्त्रियांनी गोवा घेण्याची पद्धत होती. त्या पुरुषांच्या समाजात मिसळत नसत. त्यामुळे स्त्रिया व पुरुष यांच्यासाठी वेगवेगळी गीते प्रचलित झाली. या लहान लहान गीतांतून अवध प्रदेशाच्या सामाजिक व आर्थिक स्थितीचे वर्णन आढळते. [ अवधी और उसका साहित्य; श्री. त्रिवेदी – आजकल, जुलै १९५४ ]

## अवधूत

'सर्वान् प्रकृतिविकारान् अवधुनोतीत्यवधूतः' (= सर्व प्रकृतीच्या विकारांना धुवून टाकतो, नष्ट करतो, तो अवधूत होय), अशी त्याची व्याख्या आहे (सिद्ध-सिद्धान्त पद्धती ६.१). नाथपंथी योग्यांनाही अवधूत म्हणतात. अवधूत म्हणजे जात, गोत वगैरे सर्व मर्यादा फेकून दिलेला पुरुष. हा वंधातीत असतो, महापातकी व पतित हे सोडून सर्व वर्गांकडून अन्नग्रहण करतो व अजगरवृत्तीने वागून सदैव आत्मचिंतनात मग्न राहतो.

ब्रह्मनिर्वाणतंत्रात अवधूताचे मुख्य चार प्रकार सांगितले आहेत – (१) ब्रह्मावधूत – हा कोणत्याही वर्गातील व आश्रमातील ब्रह्मोपासक असतो. (२) शैवावधूत – याने विधिपूर्वक संन्यास घेतलेला असतो. हा कमीत कमी वस्त्रे वापरतो, जटा वाढवितो, अंगाला माती फासतो, मौन पाळतो व धुनी लावून बसतो. (३) वीरावधूत – याचे केस लांब वाढविलेले असून ते अस्ताव्यस्त असतात. याच्या गळ्यात अस्थी किंवा रुद्राक्ष यांची माला व हातात काष्ठदंड, परशु व डमरू ही आयुधे असतात. हा अंगाला भस्म किंवा रक्तचंदन फासतो व कौपीन धारण करतो. (४) कुलावधूत – हा कौल संप्रदायाची दीक्षा घेऊनही गृहस्थाश्रमात राहतो.

वैष्णव संप्रदायातील रामानंदाच्या काही शिष्यांनाही अवधूत असे म्हणतात. रामानंदाने रामानुजांच्या अनुयायांत सुधारणा घडवून आणण्यासाठी नवा संप्रदाय स्थापन केला व या संप्रदायाच्या अनुयायांना जाति-धर्मभेद न मानण्याचा आदेश दिला. अशा जातिधर्मातीत पुरुषाला त्यांनी अवधूत ही संज्ञा योजिली. हे अवधूत जटा वाढवितात, गळ्यात स्फटिकांची माळ घालतात, खांद्यावर घोंगडी टाकतात व हातात भिक्षापात्र घेऊन फिरतात. बंगालमध्ये यांचे निरनिराळे आखाडे असून, त्यांत सर्व जातींचे लोक आहेत. हे जेव्हा भिक्षा मागायला जातात, तेव्हा 'वीर अवधूत' असा पुकारा करतात व एकतारीच्या सुरावर गाणी गातात. हे राम व मारुती यांना भजतात.

अवधूत साधू कानफाटा गोरखनाथाला गुरू मानतात. 'गोरखबानी'तही अनेकदा अवधूतपदाचे विवेचन आले आहे. नाथपंथात अवधूताची स्थिती अत्यंत उच्च मानलेली आहे. तो सर्व प्रकारच्या प्रकृतिविकारांनी रहित आहे, असे गोरक्ष-सिद्धान्तसंग्रहात सांगितले आहे. दत्तसंप्रदायात दत्तात्रेयाला अवधूत या नावाने संबोधितात. नाथसंप्रदायाच्या दैवतसमूहात दत्ताला मानाचे स्थान आहे. अवधूतगीता हा ग्रंथ दत्तात्रेयाने गोरक्षनाथाला उपदेशिला आहे.

पश्चिमोत्तर प्रदेशात काही अवधूतवृत्तीच्या स्त्रिया पुरुष-वेषात राहतात व त्या भस्म व रुद्राक्ष धारण करतात. त्यांना अवधूती असे नाव आहे. गंगागिरी नामक एका अवधूतीच्या परंपरेतील या स्त्रिया आहेत, असे मानले जाते. पाहा – दत्त संप्रदाय. [ गो. च. प.; हिं. ध.; हिं. वि. को. ]

## अवधूतगीता

नाथपंथातील एक प्रमाणभूत ग्रंथ. स्वतः दत्तात्रेयाने ही गीता कार्तिकेयाला उपदेशिली आहे. यात आत्मसंवित्त्युपदेश आहे. संवित्ती म्हणजे पूर्ण ज्ञान. आत्मा आणि परमात्मा, जीव व शिव यांच्या ऐक्याचे पूर्ण ज्ञान, हा अवधूतगीतेचा गाभाच आहे. जीवापासून शिव, आत्म्यापासून परमात्मा हा केव्हाच वेगळा नसतो, हे अनेक दृष्टान्तांनी यात दाखवले आहे.

आत्मा हा सर्वव्यापक आहे. तो निर्गुण, निराकार, देहरहित, जन्मरहित, अविनाशी आहे. घटाचा नाश झाल्यावर घटाकाश

आपोआप आकाशात विलीन होते, त्याप्रमाणे शरीराची उपाधी सुटल्यावर आत्मा परमात्मतत्त्वाशी समरस होतो, असे या गीतेत सांगितले आहे.

ओंकार हा ब्रह्माचा म्हणजे परमात्मतत्त्वाचा वाचक आहे.

या ग्रंथातील आत्मा व परमात्मा यांचे वर्णन भगवद्गीतेतील तशा प्रकारच्या वर्णनाशी मिळते-जुळते आहे. [ ना. सं. उ. वि. ]

**अवधूती मार्ग** ' अवहेलया क्लेशादिपापान् धुनोतीति ' = अनायासाने क्लेशादी पापांना दूर करणारी शक्ती म्हणजे अवधूती होय. सुषुम्ना मार्गाने प्रवाहित होणाऱ्या शक्तीचे तांत्रिक नावही अवधूती आहे (चर्यापद पृ. ११).

**अवधूती मध्यदेशे तु महासुखाधाररूपिणी**

(साधनमाला ४४८.११)

अर्थ – अवधूती ही मध्य म्हणजे वाम व दक्षिण शक्तींच्या मध्यभागी असून, ती महासुखाला आधारभूत असते.

बौद्धसाधनेत हिला पुष्कळ महत्त्व दिलेले आहे. या मार्गानेच बोधिचित्त निर्माणचक्रातून (नाभिस्थित) उठून क्रमशः धर्म-चक्र (हृदयस्थित) व संभोगचक्र (ग्रीवास्थित) यांतून वर जाऊन उष्णीषकमलात पोचते व तिथे महासुखाचा अनुभव घेते. हेवज्र-तंत्रात याची व्याख्या दिली आहे, ती अशी –

**उभयोर्मीलनं यच्च सलिलक्षीरयोरिव ।**
**अद्वयाकारयोगेन प्रज्ञोपायं तदुच्यते ।।**

अर्थ – ज्या ठिकाणी प्रज्ञा व उपाय तसेच शून्यता व करुणा यांचे अद्वयाकारयोगाने दूध–पाण्यासारखे मीलन होते, त्याला प्रज्ञोपाय म्हणतात.

ही महासुखाची अनिर्वचनीय अवस्था आहे.

तांत्रिक संकेतानुसार ललना, चंद्र व प्रज्ञा, हे वामशक्तीचे द्योतक असून, रसना, सूर्य व उपाय, हे दक्षिणशक्तीचे बोधक आहेत. या दोहोंच्या मध्ये असणाऱ्या शक्तीला अवधूती अशी संज्ञा आहे. ही शक्ती पापे धुवून टाकणारी आहे. तांत्रिक साध-नांच्या द्वारे वाम-दक्षिण शक्तींची विशुद्धी झाल्यावर अवधूती मार्गाने उन्मीलन होते. असे उन्मीलन झाल्यावर महासुखाची प्राप्ती होते. अवधूती मार्ग हा रागमार्ग आहे, तसाच प्रवृत्ति-मार्गही आहे. तो वैराग्य किंवा निवृत्ती यांचा मार्ग नाही. म्हणून महासुखाच्या उपलब्धीसाठी शुद्ध विषयरसाच्या सेवनाची आवश्यकता तंत्रमार्गात सांगितली आहे.

सहजिया ग्रंथात विशुद्धी व मलिनता यांना धरून शक्तीची तीन रूपे सांगितली आहेत –(१) अवधूती – हिच्या ठिकाणी द्वैत-भावाचा निवास असतो. (२) चांडाली – हिच्यात द्वैताद्वैतभाव राहतो. व (३) बंगाली किंवा डोंबी – हिच्यात अद्वैत राहते. जाणता तंत्रसाधक वाम आणि दक्षिण या दोन्ही वेड्यावाकड्या मार्गांना सोडून मध्यमार्गाने प्रवास करतो. या मार्गाच्या अव-लंबनाने अंतिम क्षणी रागरूप अग्नी आपोआप शांत होतो. मग त्यापासून जो आनंद उत्पन्न होतो, त्याला विरमानंद म्हणतात. साधनेची हीच सर्वोच्च दशा आहे. या दशेत मन व वायू, तसेच चंद्र व सूर्य यांची गती स्तंभित होऊन साधक अद्वैताच्या आनंदात प्रतिष्ठित होतो. पाहा – सहजयान, मुद्रा. [ हिं. सा. बृ. इ. ]

**अवधूतोपनिषद्** एक संन्यासप्रतिपादक उपनिषद्. याचे ३६ मंत्र आहेत. सांकृती व दत्तात्रेय यांच्या संवादांतून हे निर्माण झाले आहे. यात प्रथम अवधूताचे लक्षण सांगितले असून, पुढे प्रधान व गौण अशी अवधूतचर्या सांगितली आहे. यात परमार्थसिद्धीने धन्य झालेला सांकृती म्हणतो-

**परमानन्दपूर्णोऽहं संसरामि किमिच्छया ।**
**अनुतिष्ठन्तु कर्माणि परलोकयियासवः ।**
**सर्वलोकात्मकः कस्मादनुतिष्ठामि किं कथम् ।।**

अर्थ – मी परमानंदाने परिपूर्ण आहे. मग मी कोणत्या इच्छेने सांसारिक गोष्टी कराव्या ! परलोकाला जाण्याची इच्छा कर-णाऱ्यांनी कर्मांचे अनुष्ठान करावे. मी सर्वलोकात्मक झालो आहे. मी कर्माचरण का आणि कसे करावे !

**अवन** भारतातील कोणत्याही जातीशी आपला कसलाच संबंध नाही, असे समजणारी एक जात. पण हे मूळचे जाट आहेत, असे काही समाजशास्त्रज्ञ समजतात. जाटांत या नावाची एक पोटजातही आहे. हे प्राचीन काळी मिठाच्या पर्वताच्या उत्तरेस असलेल्या पठारावर राहत होते. अवन हा शब्द संस्कृत असून, त्याचा अर्थ रक्षण असा आहे. अवनांनी मुसलमानी स्वाऱ्यांस तोंड देऊन हिंदूंचे रक्षण केले, म्हणून यांना संरक्षक या अर्थी अवन हे नाव पडले असावे, असा एक तर्क आहे. मुसलमानांच्या स्वाऱ्यांनंतर सय्यद कुतुबशहाने यांना इस्लामी धर्म स्वीकारण्यास भाग पाडले असावे. तेव्हापासून अवन हे आपणांस कुतुबशहाचे वंशज म्हणवू लागले, हा दुसरा तर्क होय. पण मूळचे हे जाट अथवा राजपूत असावे, याबद्दल त्यांच्या चालीरीती साक्ष देतात. अवनांत अहीर, भाट, चांद, इत्यादी अनेक पोटजाती आहेत. [ सु. वि. को. ]

**अवनिमूलम्** तमिळनाडमधला एक उत्सव. भाद्रपदाला तमिळ भाषेत अवनी असे नाव आहे. ह्या मासातील मूळ नक्षत्रावर हा उत्सव करतात. या मासाची अधि-ष्ठात्री देवता निर्ऋती आहे. निर्ऋती हा असुर असल्यामुळे

महिन्यात माणसे आसुरी वृत्तीने पछाडली जातात, असे समजून मानवी मनावरचा तो आसुरप्रभाव नष्ट होण्यासाठी हा सण किंवा उत्सव पाळतात.

या उत्सवाला मदुराई येथे विशेष महत्त्व आहे. कारण शिवाने एका मजुराचे रूप घेऊन एका म्हातारीसाठी कष्ट केले आणि मदुरेचा राजा अरिमाधव पांड्य याचे गर्वहरण केले, अशी कथा पुराणांत आहे. आजही मदुराई येथे हा उत्सव थाटाने करतात. त्या दिवशी सुंदरेश्वराला सोन्याची टोपली व सोन्यचे फावडे अर्पण करतात व त्याची नदीपासून मंदिरापर्यंत मिरवणूक काढतात. [ सा. इं. फे; फो. लो. त. ]

**अवनी** तमिळनाडमधल्या कोला जिल्ह्यातील मुलबागल तालुक्यातले एक क्षेत्र. भारतातल्या दहा क्षेत्रांपैकी अवंतिका क्षेत्र ते हेच, असे तिकडील लोक मानतात. रामचंद्र लंकेतून परत येताना इथे उतरला होता, अशी दंतकथा आहे. एका शिलालेखात या स्थानाला दक्षिणेची गया असे म्हटले आहे. इथे स्मार्तपंथाचे आचार्य राहतात. [ मदुरा गॅझे. ]

**अवभृथस्नान** अवभृथ म्हणजे चातुर्मास्यातील वरुणप्रघास-पर्व, कौकिल सौत्रामणी व सर्व प्रकारचे सोम-याग यांच्या शेवटी वरुण देवतेच्या उद्देशाने करायचा याग होय. ही इष्टी यज्ञसमाप्तिदर्शक असते. हिच्यात वरुणाला पुरोडाश अर्पण करायचा असतो. या इष्टीनंतर यजमानदंपती सर्व ऋत्विजांसह नदीवर वा जलाशयावर जाऊन स्नान करतात, त्याला अवभृथस्नान म्हणतात. या वेळी अवशिष्ट सोम व त्याची सर्व पात्रे पाण्यात सोडतात. यजमान आपली मेखला व पत्नी आपले योक्त्र पाण्यात टाकते. यजमान 'देवीरापो . . . ' या मंत्राने जलाचे आवाहन करून पाण्यात उतरतो. यजमानदंपती डोक्यावर पाणी शिंपडून एकमेकांच्या पाठी चोळतात. वरुणास उद्देशून जलातच पुरोडाशादी द्रव्यांच्या आहुती देतात. यजमान दंपती नवे वस्त्र नेसतात. सोम गुंडाळलेल्या वस्त्राचे यजमान पागोटे बांधतो. मग उन्नेत्याच्या पाठीमागून सर्व मंडळी मागे वळून न पाहता यज्ञभूमीकडे जातात. मार्जन केल्यावर 'एधोऽसि......' या मंत्राने औदुंबराच्या समिधा आहवनीयात टाकतात. पाहा – अग्निष्टोम, चातुर्मास्य याग. [ हि. ध.; म. ज्ञा. को. ]

**अवम दिन** एकाच दिवशी दोन तिथी संपतात, त्या दिवसाला हे नाव आहे. यालाच तिथिक्षय असेही म्हणतात. व्रत वा शुभकृत्य यांच्या प्रारंभाला हा दिवस वर्ज्य असतो. [ निर्णयसिंधू; हि. ध. ]

**अवरुद्धा** एखाद्या पुरुषाने आमरण उपभोगासाठी ठेवलेली भोगदासी. धन्याच्या मृत्यूनंतर त्याच्या वारसदारांकडून तिला आपल्या उपजीविकेसाठी काही द्रव्य मागता येते. मात्र तिने दुसरा घरोवा करता कामा नये, त्या दोघांचा संबंध उघड असला पाहिजे व ती कुटुंबातलीच एक अशी मानली गेली पाहिजे. [ हि. ध. ]

**अवलंबनसूत्र** एक बौद्ध सूत्रग्रंथ. अवलंवन या शब्दाने प्रेत-योनीतून मुक्त न झालेल्या व अधोमुख अशा आत्म्यांची स्थिती दर्शविलेली आहे. या सूत्राचा सारांश असा– बुद्ध जेतवनात राहत असता त्याचा शिष्य मोग्गलान हा ऋद्धी संपादन करीत होता. त्याला एके दिवशी अंतर्ज्ञानाने दिसले, की त्याची माता अन्नपाण्याच्या अभावी कृश होऊन प्रेतलोकात खितपत पडली आहे. मग त्याने तिला भात खायला दिला; पण त्याचे कोळसे झाले. तेव्हा त्याने तिच्या मुक्तीवद्दल बुद्धाला उपाय विचारला. त्यावर बुद्धाने सांगितले –

"सातव्या महिन्याच्या पौर्णिमेस दशदिशांचे आचार्य बोलावून पूर्वजांच्या मुक्तीच्या उद्देशाने अन्न, जल व वस्त्र त्यांना अर्पण कर. म्हणजे तुझे पूर्वज उद्धरतील."

त्या अर्पणाच्या वेळी म्हणायचे मंत्रही बुद्धाने मोग्गलानाला सांगितले. मोग्गलानाने त्याप्रमाणे केल्यावर त्याची माता दुःखापासून मुक्त झाली.

हे सूत्र भिक्षू धर्मरक्षित याने इ. स. २६५च्या सुमारास चिनी भाषेत अनुवादिले आहे. या सूत्राविषयी डॉ. केतकर म्हणतात, की ब्राह्मणांच्या भिक्षुकीला प्रथम नावे ठेवून, पुढे श्राद्धे वगैरे भिक्षुकी कर्मे आपल्या ताब्यात घेण्यासाठी बौद्धांचे जे प्रयत्न झाले, त्यांचे फल म्हणजे हे सूत्र होय. [ इं. अॅ. ९; म. ज्ञा. को.]

**अवलोकितेश्वर** एक महान बोधिसत्त्व. अवलोकितेश्वर हा सामासिक शब्द असून, त्याचा अर्थबोध स्पष्ट होत नाही. सामान्यतः त्याचे पुढील अर्थ संभवतात – (१) मनुष्याला जे काही दिसते (अवलोकन होते) त्याचा स्वामी. (२) प्रचलित जगाचा स्वामी. (३) मानवांना दिसणारा ईश्वर व (४) साक्षात्कार झालेला ईश्वर.

तिबेटी व भारतीय विद्वानांच्या मते अवलोकितेश्वर म्हणजे मानवांकडे करुणादृष्टीने पाहणारा ईश्वर होय. तो सर्व बाजूंनी सर्व गोष्टी पाहतो व सर्वांचे रक्षण करतो. म्हणूनच त्याला समंतमुख (सर्व बाजूंनी मुख असलेला) असेही म्हणतात. काहींच्या मते त्याचे मूळ नाव अवलोकितस्वर असे होते. पण पुढे त्याच्या व्यक्तित्वात शैव गुणधर्म समाविष्ट झाल्यान

त्याला अवलोकितेश्वर म्हणू लागले. मात्र या शब्दाची समाधानकारक उपपत्ती लागत नाही, एवढे खरे !

लोकेश्वर व लोकनाथ अशी त्याची आणखी दोन नावे आहेत. त्यांचा अर्थ मात्र विश्वाचा स्वामी हा स्पष्ट दिसतो.

अमिताभ हा स्वर्गीय बुद्ध व पांडरा ही त्याची शक्ती, यांच्यापासून अवलोकितेश्वराचा जन्म झाला, असे मानतात. तो पित्याच्या राज्याचा मुख्यमंत्री (सामंत) आहे. त्याचे सौंदर्य नेत्रयुग्मात साठविलेले असून, दया किंवा करुणा हा त्याचा परम गुण आहे. मधुसागर व रथचक्राएवढी कमळे निर्माण करण्याचे त्याचे सामर्थ्य आहे. कित्येक महायानी ग्रंथांतून त्याला गौतमबुद्धापेक्षाही श्रेष्ठ मानले आहे. तो लंकेत गेला असता, तिथल्या राक्षसी त्याच्यावर मोहित झाल्या; पण त्याने त्या सर्वांना सन्मार्गाला लावले. मगधात एकदा दुष्काळ पडला व अन्नान्नदशेमुळे माणसे नरमांसभक्षक बनली. ते पाहून याने तत्काळ पर्जन्यवृष्टी करून लोकांना दुष्काळातून बाहेर काढले.

बौद्धकल्पनेप्रमाणे चालू कल्प हा भद्रकल्प असून, त्यावर अवलोकितेश्वराचे स्वामित्व आहे. गुणकरंडव्यूह या ग्रंथात याचे पुढीलप्रमाणे वर्णन आहे – तो दयाळू व जनांना नैतिक उपदेश करणारा आहे. 'जोवर जगातले सर्व प्राणी ज्ञान मिळवून निर्वाणाला जात नाहीत, तोवर आपणही निर्वाणाची आकांक्षा धरणार नाही,' अशी त्याची प्रतिज्ञा आहे. हळूहळू मानवजात निर्वाणाच्या दिशेने प्रगती करील व त्यानंतर त्याच क्रमाने अन्य जीवयोनीही ज्ञानाला सन्मुख होऊन निर्वाण साधतील, असा त्याचा विश्वास आहे. तो अव्यक्त रूपाने विश्वात अध्यात्मज्ञानाचा प्रसार करीतच राहिला आहे. महायान पंथात त्याला बौद्ध संघातला श्रेष्ठ अतएव 'संघरत्न' मानतात.

सद्धर्मपुंडरीक या ग्रंथात याचे माहात्म्य पुढीलप्रमाणे वर्णिले आहे – तो इतर बोधिसत्त्वांहून श्रेष्ठ आहे. तो अक्षयमतीबरोबर शाक्य मुनीचे प्रवचन ऐकतो. मंजुश्री सोडल्यास तो शाक्य मुनीच्या तोलाचा आहे. तो परित्राणकर्ता आहे. हजारो बुद्धांची पूजा करण्याऐवजी त्याचे एकट्याचे ध्यान करावे. तो बुद्ध, बोधिसत्त्व, महेश्वर, कुबेर, वज्रपाणी वगैरेंची रूपे धारण करतो. तो अमिताभाच्या स्वर्गात असतो व कधी त्याच्या उजव्या तर कधी डाव्या हातात वसतो. सुखावतीव्यूह हा ग्रंथही त्याच्याच माहात्म्यासाठी लिहिलेला आहे. त्यात त्याला सुखावती (बौद्धांचा स्वर्ग) चा स्वामीच म्हटले आहे.

कारंडव्यूह व शूरंगम या ग्रंथांतले त्याचे वर्णन तंतोतंत शिवासारखे आहे. शिव जसा उग्र व कनवाळू, तसाच अवलोकितेश्वर आहे. त्याचे स्वरूप विराट् आहे. सगळे बुद्ध एकत्र केले तरी ते त्याच्याशी तुल्यबल होणार नाहीत. त्याच्या रोम-रंध्रांत हजारो बुद्ध, बोधिसत्त्व व सगळे जग सामावले आहे. कनिष्ठ दर्जाचे सर्व देव त्याच्या शरीरातून बाहेर पडतात. चंद्र-सूर्य त्याच्या नेत्रांतून निघतात. महादेव त्याच्या मस्तकातून निघतो. त्याच्या हृदयापासून नारायणाचा व स्कंधापासून ब्रह्म-देवाचा जन्म होतो. तो 'लक्षभुजधारी' व 'कोटिकोटी नेत्र-वान' आहे. त्याच्या बोटांतून अमृताच्या नद्या वाहतात व त्या नरकाग्नी शमवून भूत-प्रेतांची क्षुधा-तृषाही शमवितात.

वरील वर्णनावरून बौद्धांवर पुढेपुढे पौराणधर्माचा किती विलक्षण प्रभाव पडला ते कळून येते.

अवलोकितेश्वराचे सर्वांत मोठे कार्य म्हणजे त्याने 'ॐ मणिपद्मे हुम्' हा षडक्षरी मंत्र जगाला उपलब्ध करून दिला हे होय. या मंत्राचे सामर्थ्य अपार आहे. तिबेटी बौद्ध असे मानतात, की इ. स. ४०० च्या सुमारास हा मंत्र त्यांच्या देशात स्वर्गातून पडला. ही मंत्रविद्या अवलोकितेश्वराहून दुसऱ्या कोणालाच अवगत नाही, म्हणून त्यालाच एकट्याला बौद्ध... ही पदवी प्राप्त आहे.

विंटरनिट्झच्या मताप्रमाणे इ. स. च्या ५ व्या शतकापूर्वी भारतात अवलोकितेश्वराची उपासना चालू झाली होती. त्याची प्राचीनतम मूर्ती इ. स. च्या ५ व्या शतकातली आहे. चिनी प्रवासी फाहियान (इ. स. ३९९) याने भारतात याची पूजा होत असलेली पाहिली. तो लंकेतून चीनला जात असता समुद्रावर तुफान झाले व त्याने प्राणरक्षणासाठी अवलोकितेश्वराची प्रार्थना केली. तिबेटात अवलोकितेश्वराला फार मान्यता आहे. तो तांत्रिक पंथाचा मुख्य देव आहे. त्यांच्या मुख्य लामा (दलाई लामा) मध्ये हा अवतीर्ण होतो व अमिताभ पंचेन लामा (महापंडित) मध्ये अवतीर्ण होतो. त्यामुळे या दोन्ही लामांचे वेगवेगळे मठ आहेत. आजमितीस ते एकमेकांचे प्रतिस्पर्धी समजले जातात.



अवलोकितेश्वर, ज्योतिर्मय रूप

याचे भारतीय पर्याय १५ आहेत. चौदा प्रकारच्या मूर्तीं-मध्ये त्याच्या मुकुटात अमिताभाची मूर्ती असते. १५ ...

प्रकाराचे नाव वज्रधर्म. हा पाच ध्यानी बुद्धांपासून झाला, असे समजतात. नेपाळात याचे १०८ प्रकार कल्पिलेले असून, काठमांडूच्या एका विहारात त्याची तितकी चित्रे व तितक्या लाकडी कोरीव मूर्ती पाहायला मिळतात. चीनमध्ये अवलोकितेश्वर स्त्रीरूपात दाखवितात. ही कल्पना भारतीय अर्धनारीश्वरावरून घेतली असावी. याची एक सुंदर मूर्ती लखनौच्या संग्रहालयात आहे. पद्मपाणी हे त्याचे मुख्य लक्षण असल्यामुळे त्याच्या हाती कमल दिलेले असते व दुसरा हात अनुग्रह सूचित करतो. त्याच्या बोटातून गळणारे अमृत, एक प्रेत ओठ पुढे करून प्राशन करीत आहे, असेही दाखविलेले असते. तारा, त्याच्या मंत्राचा पालक हयग्रीव व मैत्रेयाचा मित्र सुधन हे त्याच्या मूर्तिशिल्पात त्याच्या भोवती दाखवितात. जेव्हा तो चतुर्भुज शिवासारखा असतो, तेव्हा त्याच्या दोन हातांची ओंजळ दाखवितात. दुसऱ्या दोन हातांत पद्म व रुद्राक्षमाला असते. त्याच्या अन्य काही शिवसदृश मूर्तींत व्याघ्रांबर, कमंडलू, नागबंध, अस्थिमाला या वस्तूही दिसतात. पाहा – अमिताभ, बोधिसत्त्व. [ एन्सा. रि. ए.; तां. बौ. सा. सा.; इं. बु. इ.; म. ज्ञा. को. ]

**अवसर्पिणी** जैनांचा कालविभाग. जैन धर्मात उत्कृष्ट व निकृष्ट अशा अभिप्रायाने उत्सर्पिणी व अवसर्पिणी असे कालाचे दोन विभाग पाडलेले आहेत. अवसर्पिणीचे सहा भाग होतात – सुसम सुसम, सुसम, सुसम दु:सम, दु:सम सुसम, दु:सम, व दु:सम दु:सम. सांप्रत पाचवा दु:सम हा कालविभाग चालू असून, तो दु:खाचा आहे व त्याची वर्षसंख्या २१ हजार आहे. [ म. ज्ञा. को. ]

**अवसानविधीची पूजा** उत्तर प्रदेशात विवाह समारंभ समाप्त झाल्यावर ही पूजा करतात. औसानबीबी असा त्या नावाचा तिकडे अपभ्रंश झाला आहे. या पूजेसाठी पाच किंवा सात सुवासिनी बोलावतात. प्रथम चौक सारवून त्यावर मातीच्या सात पिशव्या चक्राकार मांडतात. त्यांवर कोऱ्या घडचात पाणी भरून तो कलश बसवितात. सुवासिनी प्रथम अभ्यंगस्नान करून त्या कलशाची पूजा करतात. भाजलेले चणे व गूळ यांचा नैवेद्य करतात. मग तिची पुढील कथा ऐकतात–

दोघे वहीणभावंडे होती. भावाला चिमण्या पाळण्याचा नाद होता. पुढे त्याचे लग्न ठरले; पण तो सारखा कृश होऊ लागला. वहिणीने कारण विचारले. तो म्हणाला, की 'मी लग्नाला गेल्यावर पाठीमागून माझ्या चिमण्यांचे कसे होणार ?' बहिणीने ती जबाबदारी घेतली. लग्नाला न जाता ती घरी राहिली. पण तरीही तिच्याकडून दुर्लक्ष झाल्यामुळे काही चिमण्या अन्नपाण्यावाचून मेल्या. वहिणीला दु:ख झाले. ती औसानबीबीला नवस बोलली, की 'माझ्या चिमण्या जिवंत करशील तर तुझी पूजा करीन.' त्यावर चिमण्या जिवंत झाल्या. त्या दिवसापासून ही पूजा प्रचलित झाली.

**अवस्यू आत्रेय** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील ३१ व ७५ ही दोन सूक्ते याने रचली आहेत. पहिल्या सूक्तात इंद्रपराक्रम व दुसऱ्या सूक्तात आश्विनौ देवांची स्तुती हे विषय आहेत. इंद्राने शुष्णाच्या कपटजालाचा भेद केला, अहिवध केला, तो दस्युनाशक आहे, इ. इंद्रपराक्रमाच्या छटा यात सांगितल्या आहेत. शिवाय तुर्वश व यदू यांच्याप्रीत्यर्थ सुदुधा नदी प्रवासाला योग्य बनविली, असेही म्हटले आहे. याची एक ऋचा अशी –

**आ प्र द्रव हरिवो मा वि वेन: पिशङ्गराते अभि न: सचस्व ।**
**नहि त्वदिन्द्र वस्यो अन्यदस्त्यमेनाँश्चिज्जनिवतश्चकर्थ ।।**

(ऋ.३१.२)

अर्थ – अविवाहितांना नववधू प्रदान करणाऱ्या हे धनवान आणि अश्वसमृद्ध इंद्रा, आमच्यावरील राग विसरून तू धावत ये, आणि आमचा स्वीकार कर. तुझ्याशिवाय आम्हास अन्य कोणताही आधार नाही.

हे समग्र सूक्त आर्यांनी दस्यूंवर मिळविलेल्या विजयाचे यशोगान आहे. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ. ]

**अवहट्ट** संस्कृतची एक अपभ्रष्ट भाषा. हे नाव विद्यापतीच्या कीर्तिलतेत आलेले आहे –

**देशिल वयना सबजना मिठ्ठा तँ तयसन जम्पओ अवहट्टा**

'देशिल वयना' म्हणजे देशी वचन. विद्यापतीने या ठिकाणी देशी वचन आणि अवहट्ट ही दोन्ही एकच मानली आहेत. यावरून अनुमान होते, की अवहट्ट भाषा विद्यापतीच्या काळात (इ. स. चे १४ वे शतक) प्रचलित अशी साहित्यभाषा होती आणि लोकांना ती सुलभपणे समजतही होती. अवहट्ट म्हणजेच अपभ्रंश भाषा का तिच्याहून ही वेगळी, याविषयी विद्वानांत मतभेद आहेत. काही लोक हिला वर्तमान भारतीय भाषांचे पूर्वरूप समजतात, तर काही हिलाच अपभ्रंश मानतात. [ हिं. सा. को. ]

**अवाचित फलदान** संक्रांतीच्या दिवशी फळाचे नाव न उच्चारता एखादे फळ, विशेषत: नारळ गुपचुपपणे एखाद्या ब्राह्मणाच्या घरी जलपूर्ण पात्रात टाकणे व नंतर त्याच ब्राह्मणाला त्याचे दान करणे असा याचा

विधी आहे. या दानाचा मंत्र पुढीलप्रमाणे आहे –

**अनाख्यात जले क्षिप्तं फलमेतदनुत्तमम् ।**
**ससुवर्णं प्रदास्यामि सुपुत्रादिफलप्रदम् ।।**

अर्थ – न सांगता पाण्यात टाकलेले हे श्रेष्ठ फल सुपुत्रादी फळ देणारे म्हणून मी याचे दान देत आहे. [ व्रतराज ]

**अविघ्नचतुर्थीव्रत** एक काम्य व्रत. फाल्गुन शुद्ध चतुर्थीस व्रताचा आरंभ. व्रतावधी चार महिने. गणपतीची पूजा, नक्तभोजन, उद्यापनास तिलयुक्त अन्नाचे हवन व सुवर्णाच्या गजमुखाचे दान, असा याचा विधी आहे. हे व्रत पूर्वी सगराने अश्वमेधाच्या वेळी व रुद्राने त्रिपुरासुराच्या वधप्रसंगी केले होते. फल – सर्व विघ्नांचा नाश व कार्यसिद्धी. याचा दुसरा पर्याय असा – दोन्ही पक्षांतील चतुर्थीला व्रत करणे. व्रतावधी तीन वर्षे. [ हि. ध.; कृ. क. त.; व्र. प. ]

**अविद्या** ‘असत्प्रकाशनशक्तिविद्या’ = असत् पदार्थाच्या प्रकाशनाची शक्ती म्हणजे अविद्या होय (स. द. सं. शांकर.) अविद्येची आवरण व विक्षेप ही दोन कार्ये आहेत. आवरण म्हणजे आत्मस्वरूपावर पडदा टाकणे व विक्षेप म्हणजे त्यावर दुसऱ्या वस्तूचा आरोप करणे. अविद्येलाच अज्ञान असेही म्हणतात. पाहा — अज्ञान, माया.

**अविधवा नवमी** भाद्रपद वद्य नवमीला हे नाव आहे. स्वतःची माता अथवा कुटुंबातील अन्य कोणी स्त्री अहेवपणी (सधवा) मृत झाली असल्यास या दिवशी तिचे श्राद्ध करतात (नि. सिं. २.१५४). यात ब्राह्मणभोजनाप्रमाणे सुवासिनीलाही भोजन घालण्याची रूढी आहे. [ हि. ध. ]

**अवियोग द्वादशी** एक तिथिव्रत. भाद्रपद शुद्ध द्वादशीला शिवगौरी, ब्रह्मा-सावित्री, विष्णु-लक्ष्मी व सूर्य-निक्षुभा यांची पूजा करणे, असा याचा विधी आहे. फल– सौभाग्यप्राप्ती. [ हि. ध. ]

**अवियोग व्रत** एक तिथिव्रत. हे केवळ स्त्रियांसाठी आहे. मार्ग० शुद्ध द्वितीयेपासून या व्रताला प्रारंभ करतात. तृतीयेला तांदुळाच्या पिठाच्या शिव-गौरींच्या प्रतिमा बनवून त्यांची पूजा व पायसभोजन, असा याचा विधी आहे. व्रतावधी एक वर्ष. प्रत्येक महिन्यात या तिथीला वेगवेगळ्या नावांनी व पुष्पांनी शिवगौरीची पूजा करतात. फल – पतिवियोगाचे संकट दूर होते. [ हि. ध. ]

**अविवेक** सत्यासत्य, धर्माधर्म, बरेवाईट, इत्यादी प्रतियोगी पदार्थांमधील भेद न समजणे म्हणजे अविवेक होय. दोन पदार्थांतील भेद समजण्यास त्या पदार्थांचे पृथक् स्वरूप समजावे लागते. यावरून आत्मा व अनात्मा यांचे स्वरूप व त्या दोहोंतील भेद यांचे अज्ञान म्हणजे अविवेक होय. तो अभिमानाला कारणीभूत होतो. पाहा – अज्ञान, अभिमान.

**अवीची** अठ्ठावीस नरकांपैकी एक नरक. याला खाली काही आधार नाही. खोटी साक्ष देणारे, तसेच दान व द्रव्यविनिमय यांच्या बाबतीत खोटेपणा करणारे लोक या नरकात खाली डोके, वर पाय अशा अवस्थेत यातना भोगतात व अंती पर्वत-शिखरावरून त्यांचा कडेलोट केला जातो, असे भागवत पुराणात (५.२६.२८) सांगितले आहे.

**अवेष्टी** एक इष्टी. हिच्यात अग्नी व इतर देवता यांना पुरोडाशाच्या आहुती देतात. राजसूय यागाच्या वेळी राजा ही इष्टी करतो. पण काही आहुतींच्या फरकाने ब्राह्मणही ती करू शकतो. [ हि. ध. ]

**अवेस्ता** प्राचीन इराणचा व पारशी लोकांचा धर्मग्रंथ. इराणातील गबर नावाने ओळखल्या जाणाऱ्या लोकांचाही हा धर्मग्रंथ आहे. इराण देश हे पारश्यांचे मूळ वसतिस्थान होय. झरथुष्ट्र हा त्यांचा प्रेषित तिथेच उदयाला आला. त्याने सनपूर्व ६००च्या सुमारास आपला धार्मिक संदेश तिथल्या लोकांना दिला. त्याने लोकांना जे उपदेश वेळोवेळी दिले, त्यांचा संग्रह म्हणजे अवेस्ता होय.

अवेस्ता याचा मूळ अर्थ पवित्र ग्रंथ असा आहे. अवेस्ता हा शब्द पहलवी भाषेतील अविस्ताक किंवा अपस्ताक या शब्दापासून निघाला आहे आणि वरील दोन शब्द उपस्ता या शब्दापासून निघाले आहेत. त्यावरून अवेस्ता शब्दाचा अर्थ मूलग्रंथ असा होऊ शकेल. दुसरी उपपत्ती अपस्तान (विश्वास) या शब्दावरून लावल्यास, अवेस्ता म्हणजे एकमेव प्रमाणभूत ग्रंथ असाही त्याचा अर्थ होऊ शकतो.

सध्या उपलब्ध असणारा अवेस्ता हा ग्रंथ मूळच्या एका बृहत्काय ग्रंथाचा केवळ एक भागमात्र आहे. इराणी परंपरेप्रमाणे मूळच्या अवेस्त्यामध्ये २१ नस्क व १००० हून अधिक प्रकरणे होती व या ग्रंथाची निर्मिती अकमेनियनाच्या काळात (सनपूर्व ५५८ ते ३००) झाली. हा ग्रंथ मुळात गायींच्या कातड्यावर लिहिलेला होता.

तबरी व मसूरी हे इतिहासकारही वरील परंपरेला पुष्टी

देतात. प्लिनी नामक रोमन पंडित तर म्हणतो, की झरथुष्ट्राने एकूण २० लक्ष ग्रंथ रचला होता. पहलवी भाषेतील दिनकर्त व पर्शियन भाषेतील रिवायत या दोन ग्रंथांत अवेस्त्याच्या या विशालत्वाबद्दल बरीच माहिती दिलेली आहे.

अकमेनियन राजांच्या अंमलात अवेस्त्याचे श्रद्धापूर्वक रक्षण होत होते. झरथुष्ट्राचा आश्रयदाता विस्ताश्प याने या ग्रंथाची एक प्रत पर्सिपोलिस येथील आपल्या दप्तरखान्यात ठेवली होती. विटांवर कोरलेली दुसरी एक प्रत समरकंद येथील अग्यारीच्या खजिन्यात ठेवलेली होती. पण शिकंदराने केलेल्या स्वारीच्या धामधुमीत या दोन्ही प्रती नाश पावल्या. शिकंदराच्या मागून तिथे सेल्यूकसचा व त्यानंतर पर्थियनांचा अंमल सुरू झाला. त्या कालखंडात या ग्रंथाची त्याहून अधिक हानी झाली.

तथापि अशाही परिस्थितीत अवेस्त्याचा काही भाग इराणमधल्या काही झरथुष्ट्री धार्मिक लोकांना मुखोद्गत होता. याशिवाय त्याची काही प्रकरणे इतस्ततः विखुरलेल्या अवस्थेत पडून होती. या सर्व मुखोद्गत व विखरून पडलेल्या ग्रंथाचे संकलन करण्याचा प्रयत्न इ. स. च्या तिसऱ्या शतकात झाला. तीच परंपरा सस्सानियन राजघराण्याच्या संस्थापकाने पुढे चालू ठेवली. त्याने राजगुरू तन्सार याच्या हाती जमविलेले सर्व साहित्य देऊन अवेस्त्याची व्यवस्थित जुळवाजुळव करण्याची कामगिरी त्याच्यावर सोपवली. त्याने ते कार्य पुरे केले. या तयार झालेल्या ग्रंथाला मग धर्मग्रंथ म्हणून मान्यता देण्यात आली. हे काम दुसरा शापूर राजा याच्या कारकिर्दीत (इ. स. ३०९-३७९) झाले. या ग्रंथात वैद्यक, ज्योतिष व भूगोल हे धर्मेतर विषयही समाविष्ट करण्यात आले. अशा प्रकारे तयार झालेल्या या ग्रंथात २१ नस्क असून, त्यांतले २० नस्क मूळ ग्रंथाबरहुकूम आहेत. या २१ नस्कांपैकी पहिल्या सातांना गाथा, दुसऱ्या सातांना दात व तिसऱ्या सातांना हधमाथ्र अशी संज्ञा आहे.

पहिल्या नस्कात स्तोतयश्त, सूत्कर, वर्श्त, मानसर, बक, वश्तग, हाथोक्त व स्पंद या गाथांचा अंतर्भाव होतो. त्यात स्तोतयश्त हे फार पवित्र मानलेले आहे. त्याची ३३ प्रकरणे असून, त्यांपैकी २२ प्रकरणे पद्यमय आहेत. त्यांची भाषा फार प्राचीन आहे. बाकीची ११ प्रकरणे गद्यमय व प्रचलित भाषेची आहेत. सूत्कर, वश्त, मानसर व बक यांमध्ये प्रत्येकी २२ प्रकरणे होती. पण ती सर्व उपलब्ध नाहीत. हाथोक्ताची २३ प्रकरणे आहेत.

आचारविषयक नस्कांत निकातम, गनबा, सूरनिगत, हस्पारम, इ. प्रकरणांचा अंतर्भाव होतो. या सातांपैकी पहिल्या पाचांत धर्मविषयक कायदे दिलेले आहेत. शेवटच्या दोन नस्कांत विश्वोत्पत्तिविषयक व पौराणिक कथांचा संग्रह आहे. फित्रदात या नस्कात इराण देश व मानव जात यांच्या उत्पत्तीची माहिती असून, झरथुष्ट्राच्या जन्मापर्यंतचा इतिहास दिलेला आहे.

हधमाथ्र नस्कात दामदात, नातर, रतदात, पागग, इतग, बरीज, कस्किश्रव, विश्ताश्प, अशी सात प्रकरणे असून, ती अतिशय विस्कळित झालेली आहेत. या विभागात श्रौतविधी, कालाचे विभाग, नीतितत्त्वे, विस्ताश्पाला झरतुष्ट्राने दिलेली धर्मदीक्षा व झरथुष्ट्राच्या अर्गास्पविरुद्ध झालेल्या लढाया, यांचे वर्णन आलेले आहे.

शिकंदराच्या स्वारीने अवेस्त्याची जेवढी हानी झाली, त्यापेक्षा जास्त हानी मुसलमानांच्या स्वाऱ्यांनी झाली. मुसलमानांनी इराण पादाक्रांत केल्यावर इराणी लोकांचा धर्मच्छल आरंभिला. जिथे जिथे अवेस्त्याची प्रत सापडेल, तिथे तिथे ती जाळून भस्म करावी, अशी त्यांनी फर्माने सोडली. अशा स्थितीतही त्या अत्याचारांना तोंड देऊन जे थोडे झरथुष्ट्री लोक पर्शियात राहिले व जे पळून भारतात आले, त्यांनी अवेस्त्याच्या ज्या भागाचे जतन केले, तेवढाच काय तो भाग आजमितीस उपलब्ध आहे. भारतात आल्यावर पारश्यांनी अवेस्ता ग्रंथ पुन्हा लिहून काढला. त्यातल्या काही प्रती इ. स. च्या १३ व्या व १४ व्या शतकांतल्या असून, त्याच सांप्रत उपलब्ध आहेत. मात्र कोणत्याही एका प्रतीत समग्र अवेस्ता एकत्र झालेला नाही. सांप्रतचा अवेस्ता तुटक तुटक भाग एकत्र करून तयार केलेला असल्यामुळे, तो अपूर्ण अवस्थेत आहे. सस्सानियन कालातल्या अवेस्त्याचा एकतृतीयांश भाग एवढाच तो भरतो. सांप्रतचा अवेस्ता पुढील चार विभागांत विभक्त आहे –

(१) **यस्न** – (यज्ञ किंवा पूजाविधी) हा ग्रंथ प्रामुख्याने पाराहोम (दूध व काही सुवासिक द्रव्ये यांनी मिश्रित सोमरस) या विधीला वाहिलेला आहे. यात अहुरमज्द व इतर देवता यांच्या प्रार्थना व अनेक विधिविधाने आहेत. याचे ७२ भाग असून, या संख्येचे प्रतिनिधी म्हणून पारश्यांच्या कस्तीत ७२ लोकरीचे धागे एकत्र केले जातात. या भागातली १७ सूक्ते झरथुष्ट्राची उपदेशपर वचने असून त्यांना गाथा म्हणतात. या गाथांची नावे अहुवनइती, उश्तवहती, स्पेन्तमैन्यू, वोहुक्षथ्र व वहिश्तोइश्त अशी आहेत. अवेस्त्याचा हा भाग प्राचीन व महत्त्वाचा मानला जातो. हा भाग म्हणजे झरथुष्ट्री धर्माचे प्राचीन स्वरूप होय. झरथुष्ट्र हा सत्यशोधनासाठी घरदार सोडून निघाला व दहा वर्षे भ्रमण केल्यानंतर त्याला असे ज्ञान झाले, की अहुरमज्द हाच एकमेव देव आहे.

या विभागात झरथुष्ट्राच्या उपदेशाची आणखी काही वैशिष्ट्ये दिसून येतात. सत् व असत्, चांगले व वाईट असे नैतिक द्वंद्व किंवा द्वैत सृष्टयुत्पत्तीपासून आहे, असे झरथुष्ट्र

सांगतो. त्याचबरोबर त्याने मानवाचे आचारस्वातंत्र्यही मान्य केले आहे. त्याच्या मते या सदसताच्या लढचात मानवाचे कर्तव्य हे, की त्याने सत् तेवढे ग्राह्य करून ईश्वराची सत्ता वाढविण्यास व असताविरुद्ध सताला विजय मिळविण्यास मदत करावी. झरथुष्ट्र यज्ञ व तपश्चरण या गोष्टींना अनुकूल नाही. याउलट मानवाने आपली भौतिक उन्नती करून घ्यावी असाच त्याचा उपदेश आहे. त्यासाठी कृषी व गोरक्ष्य हीच साधने व हीच सत्कृत्ये त्याने सांगितली आहेत. झरथुष्ट्र हा मानव असून अहुरमज्द हा मित्राने मित्राशी बोलावे, तसा त्याच्याशी बोलतो. मानवाला सत्यकथन करण्यासाठी ईश्वराने त्याची निवड केली, अशा अनेक गोष्टी अवेस्त्याच्या या भागात आढळून येतात. भाषा, छंद व शैली या तीनही बाबतींत हा भाग इतर भागांहून वेगळा आहे. भाषेच्या दृष्टीने तर तो ऋग्वेदाच्या अगदी जवळ येतो.

(२) **विस्परद** – हा विभाग २४ अध्यायांचा (कर्दे) असून, यात पारश्यांचे कर्मकांड सांगितले आहे. शिवाय अरिष्टशांतीसाठी अनेक प्रार्थनाही यात आहेत. यस्न साहित्यात भर पडून हा ग्रंथ तयार झालेला आहे. त्यामुळे यस्नापेक्षा याचे महत्त्व कमी मानतात. यातली छोटी छोटी प्रार्थनासूक्ते केवळ उपाध्यायांनीच नव्हे; तर सर्व गृहस्थांनी विशिष्ट प्रसंगी विशिष्ट तऱ्हेने म्हणायची असतात.

(३) **वेंदिदाद** – विशेषेकरून शुद्धीच्या नियमांचा प्रतिपादक हा ग्रंथ आहे. यात धार्मिक व व्यावहारिक कायदेकानूंचेही वर्णन आहे. याचे २२ फरगर्द (प्रकरणे) आहेत. पारश्यांच्या धार्मिक विधींमध्ये यस्न व गाथा यांच्या पठनाबरोबर, वेंदिदादचेही पठण करतात. दुसऱ्यावर आघात, नियमभंग, स्त्री-पुरुषांचे अनैतिक संबंध, गर्भपात, इ. पातकांबद्दल या ग्रंथात शिक्षा व प्रायश्चित्ते सांगितली आहेत. यात प्राचीन इराणी समाजातल्या चालीरीतींची माहिती असल्यामुळे वेंदिदाद या ग्रंथाला ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्व प्राप्त झाले आहे. याशिवाय अहुरमज्दाने मानव व पशू यांच्यासाठी पृथ्वीचा विस्तार केल्याची कथा, त्याचा हिमाशी झालेला धर्मविषयक संवाद, हिमयुग व जलप्रलय यांच्या कथा, इ. गोष्टी यांत आल्या आहेत.

या ग्रंथामधल्या मुख्य प्रार्थना न्यैश या होत. मिथ्र, चंद्र, जल, अग्नी व सूर्य यांना उद्देशून या छोट्या छोट्या प्रार्थना आहेत. यांतल्या सीरोझ या प्रार्थना महिन्याच्या तीस दिवसांच्या अधिष्ठात्री देवतांना उद्देशून रचलेल्या आहेत. आफ्रिगान या आशीर्वादपर प्रार्थना असून, त्या नवस फेडण्यासाठी केलेल्या बलिदानानंतर म्हटल्या जातात. यांत देवदूत किंवा मृत जीवात्मा यांना आवाहन असते.

(४) **यश्त** – यात देवतांची स्तोत्रे असलेली २१ प्रकरणे आहेत. ही यश्ते पद्यमय व सामान्यतः अष्टवर्णात्मक आहेत. यांत यझत (देवदूत) व प्राचीन इराणी वीर यांची प्रशंसा आहे. यातल्या ५ व्या प्रकरणात अनाहित या जलदेवतेची स्तुती आहे. ८ व्यात तिशत्रिय ताऱ्याने अवर्षणाच्या दैत्यावर विजय मिळविला, त्याचे गुणगान आहे. १० व्यात मिथ्र, १३ व्यात फ्रावशी या सज्जनरक्षक आत्म्याचे व १४ व्यात वेरेथ्रघ्नाचे स्तोत्र आहे. यातल्या काही देवता वैदिक देवतांना समान अशा दिसतात. त्यावरून या देवतांची मूळ निर्मिती वैदिक-इराणी काळात झाली असावी, असे म्हणतात. इतर देवता मात्र निव्वळ इराणी आहेत. या ग्रंथातल्या काही स्तोत्रांत दुष्ट मांत्रिक व चेटुक करणारे यांना ठार मारण्याचे सामर्थ्य आहे, असे मानतात. ज्वर, मृत्यू व इतर आपत्ती यांचाही नाश करण्याचे सामर्थ्य या मंत्रांत आहे, अशी पारश्यांची श्रद्धा आहे. या स्तोत्रांचे सामर्थ्य मनावर बिंबावे म्हणून यश्ते ही अहुरमज्द व झरथुष्ट्र यांच्या संवादातून निर्माण झाली आहेत, अशी कल्पना केलेली आहे. यस्न व यश्त यांमध्ये झरथुष्ट्री धर्माचे उत्तरकालीन स्वरूप दिसून येते. यात झरथुष्ट्राच्या पूर्वी प्रचलित असलेल्या धर्मांतील काही तत्त्वे पुनरुद्धृत केलेली आहेत. हओम संप्रदायांचेही यात पुनरुज्जीवन झाले आहे.

**खोर्द अवेस्ता** – उपासनेच्या दृष्टीने तयार केलेला हा मोठ्या अवेस्त्याचा संक्षिप्त सारभाग आहे. यात चंद्र, सूर्य, अग्नी, जल, खुर्शिद, आतश, इ. देवांची व देवतांची स्तवने आहेत.

वर जे अवेस्त्याचे विभाग सांगितले, त्याशिवाय पूर्वीच्या नष्ट झालेल्या अवेस्त्यातले काही भाग पहलवी वाङ्मयात आढळतात. त्यांपैकी निरंगिस्तान हा धार्मिक ग्रंथ महत्त्वाचा आहे. त्याचे तीन अध्याय आहेत. प्राहंग इ ओईम ऐवाक या नावाचा आणखी एक ग्रंथ असून, तो म्हणजे अवेस्त्यातील शब्द व वाक्प्रचार यांचा कोशच होय.

सस्सानियन राजवंशाच्या काळातच अवेस्ता ग्रंथ दुर्बोध होऊ लागला होता. त्यासाठी त्याचे पहलवी भाषेत भाषांतर करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. तदनुसार १९ नस्कांचे शब्दशः पहलवी भाषांतर तयार करण्यात आले. त्यातला काही भाग सांप्रत उपलब्ध आहे. हे भाषांतर सर्व बाबतीत प्रमाणभूत मानीत नाहीत. तरी पण पुष्कळ बाबतींत तो ग्रंथ मार्गदर्शक म्हणून मानला जातो. इ. स. च्या १२ व्या शतकात या पहलवी अवेस्त्याचे संस्कृत भाषांतरही काही पारशी पुरोहितांनी केले आहे.

काही ठिकाणी झेंद–अवेस्ता असा जोडशब्द वापरलेला आढळतो. झेंद याचा अर्थ भाष्य किंवा विवरण असा आहे. झेंद-अवेस्ता म्हणजे मूळ ग्रंथ व त्यावरील पहलवी भाषेतले भाष्य.

वेदवाङ्मयाचे संशोधक व इतिहासवेत्ते यांच्या मते अवे-

व इराणी या दोन्ही एकाच मूळ जातीच्या दोन शाखा आहेत. दोन्हीही अग्निपूजक व गोरक्षक आहेत. आर्यांचे सर्वस्व म्हणजे वेदसाहित्य; त्याचप्रमाणे इराणी लोकांचे सर्वस्व म्हणजे गाथा व अवेस्ता हे होय. आर्य इंद्रपूजक होते, तर इराणी अहुरमज्दाचे पूजक अर्थात असुरोपासक होते. वैदिक साहित्यात असुराची निंदा केलेली आहे; तर झरतुष्ट्री साहित्यात इंद्राची निंदा केलेली आहे. श्री. होडीवाला यांच्या मते ऋग्वेदात झरथुष्ट्राचीही निंदा असून, त्याला जाळून मारल्याचाही उल्लेख आहे. त्यांच्या मते ऋग्वेदातला जरूथ हाच झरथुष्ट्र होय. या बावतीत ऋग्वेदाचा एक मंत्र पुढीलप्रमाणे आहे—

**विश्वा अग्नेऽप दहारातीर्येभिस्तपोभिरदहो जरूथम् ।**
(ऋ. ७.१. ७)

अर्थ – हे अग्ने, ज्या तेजाने तू कर्कश शब्द करणाऱ्या जरूथाला जाळलेस, त्या तेजाने राक्षसांना जाळून टाक.

ऋ. ७.९.६ व १०.८०.३ या मंत्रांतही जरूथाला जाळल्याचा उल्लेख आहे. वरील तीनही मंत्रांवरून कळून येते, की जरूथाला अग्नीत जाळूनच मारले होते. पारश्यांच्या दिनकर्द, बेहेरामयश्त, दाहेस्तन इत्यादी ग्रंथांवरूनही झरथुष्ट्राचा मृत्यू अग्नीत जळूनच झाला, ही गोष्ट कळून येते.

पारश्यांच्या धर्मग्रंथांत झरथुष्ट्राला दख्युमा (दस्यू) व दख्युनाम सूरो (दस्यूंतला विद्वान) म्हटले आहे. पारशी साहित्यात दस्यूचा अर्थ सन्मानपर आहे; पण वैदिक साहित्यात दस्यूचा अर्थ हीनत्वदर्शक आहे. अवेस्त्यातला विस्ताश्प हाच ऋग्वेदातला इष्टाश्व (ऋ. १.१२२.१३) व अरजास्प हाच ऋग्वेदातला ऋज्राश्व होय. अरजास्पाचा बाप वानदरे मैनी हा होता. त्याचा अर्थ निर्भय असा आहे. हा शब्द भयमान शब्दाचा अपभ्रंश आहे. भयमान हाच वैदिक ऋज्राश्वाचा बाप आहे. अवेस्त्यातल्या गाथांत ऋग्वेदाच्या ऐतिहासिक नावांशी साम्य असलेली आणखीही काही नावे आढळतात. अवेस्त्यातल्या गाथा या ऋग्वेदातल्या पद्धतीवरच निर्माण केलेल्या आहेत. त्यांत वैदिक आचार-विचारांशी साधर्म्य असलेल्या बऱ्याच गोष्टी आढळतात. अवेस्त्यात बऱ्याचशा वैदिक देवता, विभिन्न उच्चारांनी व विभिन्न रूपांनी घेतलेल्या आहेत. काही वैदिक श्रद्धा आणि परंपराही स्वीकारलेल्या आहेत.

अवेस्त्यामध्ये सांगितले आहे, की वृत्रासुराने बाबिलोन नरकातून आर्यांना हुसकून लावण्यासाठी अद्विशूर नावाच्या देवीची उपासना केली होती; पण त्या प्रयत्नात त्याला यश आले नाही. तिथे असेही सांगितले आहे, की फारसचा राजा सायरस याने ज्याप्रमाणे तैग्रिस नदीचा प्रवाह रोखून बाबिलोन जिंकले, त्याचप्रमाणे वृत्रानेही आर्यभूमीवर अधिकार मिळविण्याची इच्छा केली होती. एका काळी बाबिलोन नगर आर्यांच्या अधिकारात होते, हे अवेस्त्यातल्या गाथांवरूनच कळून येते.



अवेस्त्यात वृत्राला वेरेथ्र म्हटले आहे व इंद्राला त्याचा कट्टर शत्रू मानले आहे. ऋग्वेदातही तीच गोष्ट आहे. ऋग्वेदात (१.५२.५) त्रित असे एक नाव येते. हा त्रित असुरांचा घोर शत्रू होता. अवेस्त्यात तोच थ्रेतन या नावाने पूज्य मानला गेला आहे. इराण्यांची ती प्राचीन देवता आहे. ज्या मंत्रांत त्रिताचा उल्लेख येतो, त्याच मंत्रांत वलनामक असुराच्या वधाचाही उल्लेख आहे. ऋग्वेदातला हा वल म्हणजेच बाबिलोनचा अधिपती बेल होय, असे रे. बानर्जी म्हणतात. अवेस्त्यात अग्निपूजेचे विशद उल्लेख आहेत. अग्नी ही इराण्यांची प्रिय देवता आहे. आतर या नावाने ते तिची पूजा करतात. पर्शिया आणि भारत या दोन्ही ठिकाणीं पारश्यांची अशी अनेक अग्निकुंडे आहेत, की ज्यांतला अग्नी आजवर शेकडो वर्षे अविच्छिन्न प्रज्वलित ठेवलेला आहे. अवेस्त्यात सोमाला हओम म्हटले आहे. इराणी लोक मित्राला मिथ्र, वरुणाला वरण, असुराला अहुर व यातुधानाला (राक्षस) यातुमान म्हणतात.

अवेस्त्यातल्या वृत्तांचे निरीक्षण केल्यास त्यांचे भिन्न भिन्न भाग कोणत्या वेळी लिहिले गेले, त्याचे अनुमान करता येते. त्याचा प्राचीन भाग छंदोबद्ध असून, मागाहून लिहिलेला भाग गद्यरूप आहे. अवेस्त्यातल्या छंदोबद्ध भागाला गाथा म्हणतात. या अष्टाक्षरी वृत्तात रचलेल्या आहेत.

अवेस्ता ज्या भाषेत लिहिला गेला, तिला अवेस्ता म्हणतात. इंडोजर्मेनिक भाषासमूहातली इराणी शाखेची ही भाषा असून, तिचे संस्कृताशी विलक्षण साम्य आहे. अवेस्त्याच्या प्रामाण्यनिश्चयाचे हे एक बलवत्तर साधन ठरले आहे. ध्वनिशास्त्रदृष्ट्या या दोन्ही भाषांतील स्वरांत पुष्कळ साम्य आहे; मात्र इ व ओ या स्वरांचे अनेक प्रकार अवेस्तनमध्ये होतात, तसे ते संस्कृतात होत नाहीत. अवेस्त्यातल्या बऱ्याच व्यंजनांचे संस्कृत व्यंजनांशी ध्वनिसाम्य आहे. संस्कृत स चे अवेस्त्यात ह असे रूप होते. वैदिक संस्कृताप्रमाणे अवेस्ताभाषेतही पुंस्त्री-नपुंसक अशा तीन्ही लिंगांची, तीन्ही वचनांची व प्रथमादी संबोधनान्त आठही विभक्तींची रूपे आढळतात. क्रियापदांच्या रूपांच्या बाबतीतही दोन्ही भाषांत साम्य आहे. वर्तमान, भूत व भविष्य, हे तीन काल; तसेच स्वार्थ, आज्ञार्थ, संशयार्थ व संकेतार्थ हे अर्थ आहेत. धातुसाधित नामे व विशेषणे, तसेच धातूंची मूळ रूपेही आहेत.

फरक आढळतो तो वाक्यरचनेच्या बाबतीत. अवेस्त्यात दोन पोटभाषा दिसतात. एक गाथांची व दुसरी नंतरची. या दोन्हींमधला फरक वैदिक संस्कृत व विदग्ध संस्कृत यांमधील फरकाप्रमाणे आहे. गाथांची भाषा व वाक्यरचना शुद्ध असून;

नंतरची भाषा मिश्र आहे. तिच्यात बरेच अपभ्रष्ट शब्द येतात.

अवेस्ता भाषेच्या मानाने अवेस्ता लिपी ही बरीच नंतरची असावी, असे दिसते. हिच्यातील अक्षरे सस्सानियन काळातल्या पहलवी लिपीतून घेतली असावी. ही लिपी उर्दूप्रमाणे उजवीकडून डावीकडे वाचायची असते. मूळच्या अवेस्तन लिपीसंबंधीची माहिती अद्यापि उपलब्ध नाही.

हस्तलिखत अवेस्त्याचा अर्थ लावून त्याचा उलगडा करणे व सदर ग्रंथाकडे पाश्चात्य पंडितांचे लक्ष वेधणे, याचे श्रेय अँक्वेतिल डुपरॉं (इ. स. १७७१) या फ्रेंच विद्वानास दिले पाहिजे. त्यापुढे अनेक विद्वानांनी अवेस्त्याच्या अभ्यासाला स्वतःस वाहून घेतले. बुर्नोफ, वेस्टर गार्ड, स्पीगेल, गीगेर, रॉथ, हॉग, वार्थोलोमे, वेस्ट, मिल्स, डर्मेस्टेटर व गेल्डनर हे पाश्चात्य पंडित अवेस्त्यावरचे अधिकारी समजले जातात.

अवेस्त्यातील काही मंत्र पुढे दिले आहेत –

अषॅम् वोहु वहिश्तॅम् अस्ती ।
उश्ता अस्ती उश्ता अह्माइ ।
ह्यत् अषाइ वहिश्ताइ अषॅम् ।

(यस्न ५६. ५)

अर्थ – सात्त्विकपणा म्हणजे सर्वोच्च सद्भाग्य (व) जीवनातील प्रकाश होय. सर्वश्रेष्ठ अँषच्या प्राप्तीसाठी जो मनुष्य सात्त्विक वृत्तीने राहतो, त्याला हा प्रकाश प्राप्त होतो.

पञ्चनाँम् अह्मि पञ्चनाँम् नोइत् अह्मि ।
हुमतह् अह्मि दुश्मतह् नोइ अत्ह्मि ।
हुख्तह् अह्मि दुजूख्तह् नोइ् अह्मि ।
ह्वर्श्तह् अह्मि दुज्वर्श्तह् नोइत् अह्मि ।
स्रअॅषह् अह्मि अस्रुश्तोइश् नोइत् अह्मि ।
अषवॅनो अह्मि द्रवतो नोइत् अह्मि ।
अत्चित् अह्मात् यथ अपॅमॅम् ।
मनिवो अङ्हत् निवाइतिश् ।।

(यस्न १०.१६)

अर्थ – मी पाचांमधला एक आहे, मी पाचांमधला एक नाही.

जे सद्विचार करतात त्यांच्यापैकी मी आहे, जे कुविचार करतात त्यांच्यापैकी नाही.

जे सद्वचन बोलतात त्यांच्यापैकी मी आहे, दुर्वचन बोलणाऱ्यांपैकी नाही.

जे सत्कृत्य करतात, त्यांच्यापैकी मी आहे; दुष्कृत्य करणाऱ्यांपैकी नाही.

जे श्रवण करतात त्यांच्यापैकी मी आहे, श्रवण न करणाऱ्यांपैकी नाही.

मी सज्जनांपैकी एक आहे, दुर्जनांपैकी नाही आणि असाच शेवटपर्यंत आध्यात्मिक सृष्टीचा नाश होईपर्यंत राहीन.

यो यअॅम् कारयॅइति हो अषॅम् कारयें इति ।
हो दरनाँम् मज्दयस्नीम् फ़वाज् वज़इते ।
हो इमाँम् दएनांम् मज्दयस्नीम् फ़पिन अॅाइति ॥

(वेंदिदाद ३.३...)

अर्थ – जो धान्य पेरतो, तो सात्त्विकपणाची पेरणी क... व त्यामुळे तो मज्दच्या धर्माचा फैलाव आणि जोपासना क... [ डॉ. म. अ. मेहेंदळे; श्री. सोनटक्के; एन्सा. रि. ए.; म. ज्ञा. ...

## अव्यंग सप्तमी

एक तिथिव्रत. श्रावण शुद्ध सप्तमीन... व्रत करतात. यात सूर्याला अव्यंग ... करतात. अव्यंग याचा अर्थ कापसाच्या धाग्यांची ... कातीसारखी १२२ अंगुळे लांब शुभ्र पट्टी. ही साम... पारश्यांच्या कस्तीसारखी असते. अव्यंग हे अवेस्ता... ऐव्यंधन या शब्दाचे संस्कृतीकरण वाटते. त्याचाही अर्थ ... असाच आहे. सूर्यपूजेची ही विशिष्ट पद्धती इराणमधून ... मगांनी भारतात आणली असावी अथवा पारश्यांच्या ... विधीतून हिंदूंनी ती घेतलेली असावी. या व्रताची कथा ... आहे, ती कृष्णपुत्र सांवाचीच आहे. सांवाने आपले कु... होण्यासाठी सूर्याची उपासना केली व त्यानिमित्त शाक... (इराण) मग नावाचे ब्राह्मण आणले, अशी कथा आहे (... ब्रा. १४२.-२९). यावरूनही या व्रताचा संबंध इरा... सूर्यपूजेशी लागतो. या सप्तमीस हस्त नक्षत्र असल्यास ... महत्त्व असते (नारद पु. १.११६). पाहा – नवजोत. [ हि. ...

## अव्वैयार

(१) तमिळनाडमधली संघम्कालीन क... तमिळसाहित्यातली ही पहिली विदुषी व ... यित्री होय. तमिळनाडमधले लोक तिरुवल्लुवरनंतर हि... नाव घेतात व हिला सरस्वतीचा अवतार मानतात. हि... जन्मकाळ निश्चित सांगता येत नाही. इ. स. च्या पहिल्या ... दुसऱ्या शतकात ती जन्मली असावी, असा तर्क आहे. ... वरून कळते ते असे, की ही भगवान व आदी या दां... कन्या होती व कावेरीच्या उगमाजवळच्या थगादुर या ... हिचा जन्म झाला होता.

ही आईबापांची ज्येष्ठ कन्या होती. जन्मताच त्यांनी ... त्याग केला व ती एका गायकदंपतीच्या हाती लागली. ... जोडप्याने तिचे पालनपोषण केले. वालपणीच तिला ... देणे लाभले व आपल्या कवित्वाने ती भल्याभल्यांना ... करू लागली. उपवर झाल्यावर तिच्या लग्नाचे बेत सुरू ... पण आजन्म कुमारी राहण्याच्या निर्धाराने तिने ते ...

काढले. मग एक दिवस ती घरातून निघाली आणि अधिकमान नेडुमान अंजी या राजाच्या दरबारात गेली. तिथे बराच काळ राहिली. राजा तिचा मोठा आदर करी. तिनेही राजाच्या पराक्रमावर अनेक पद्ये लिहिली. तिच्या ज्ञानावर व तीक्ष्ण बुद्धीवर राजाचा विश्वास होता. एकदा तर त्याने तिला आपली राजदूत बनवून कांचीच्या दरबारात पाठविले. अव्वैय्यारने आपल्या पद्यातून अनेक प्रश्नांची उत्तरे काव्यमय शैलीत दिली आहेत. 'जगात मधुर काय' या प्रश्नाचे ती पुढीलप्रमाणे उत्तर देते –

'एकान्त मधुर असतो. त्याहून मधुर दिव्य कादंबरी. त्याहून ज्ञानी पुरुषांचा सहवास. पण सर्वांत मधुरतम म्हणजे स्वतःला अहर्निश ज्ञानसाधनेत निमग्न करणे.'


अव्वैयार

सेरमानशी झालेल्या युद्धात अंजी राजा मारला गेला. त्या गोष्टीचे अव्वैय्यारला परम दुःख झाले. पुढे काही काल तिथेच राहून त्या राजाच्या पुत्राला तिने नीतिशिक्षण दिले. मग ती तिथून निघाली व जन्मभर भटकत राहिली. तिला त्यापुढच्या आयुष्यात अनेक संकटांना तोंड द्यावे लागले. त्याविषयीच्या कितीतरी आख्यायिका तमिळनाडमध्ये प्रचलित आहेत. चेर, चोल व पांड्य या तीन्ही राजांच्या दरबारात तिला मान-मरातब मिळाला. पुरनानूरू या काव्यसंग्रहात अव्वैय्यारच्या पदांचा संग्रह केलेला आहे. तमिळनाडमधली मुले तिच्या नीतिपर कवितांनी तमिळकाव्याचे पाठ सुरू करतात. तिने मानवजातीला पुढील संदेश दिला आहे–

'दान करण्याची इच्छा धर. क्रोध आवर. कोणी दानधर्म करीत असल्यास त्याच्या आड येऊ नको. जवळ असेल ते फोडू नकोस. श्रमात कसर करू नकोस. संख्या व अक्षरे यांच्याकडे दुर्लक्ष करू नकोस. भिक्षा मागणे ही गोष्ट लाजिरवाणी समज.' [त. सा. सं.; म. ज्ञा. को.]

(२) (इ. स. चे १२ वे शतक) हिचे तमिळ भाषेतले चार नीतिपर काव्यग्रंथ उपलब्ध असून, त्यांची अक्षरवाङ्मयात गणना होते. त्यांची नावे आत्तिशूडी कौन्रैवेन्दन, मूदुरै आणि नल्वळि अशी आहेत. नीतिपर आणि व्यवहारोपयोगी तत्त्वांची सूत्रबद्ध वचने त्यांत असून, ती सुबोध आहेत. त्यांतील नीतिपर कविता आजही शाळेतली मुले व प्रौढ माणसे अभिमानाने पाठ करतात. गरीब शेतकऱ्यांची व कामकऱ्यांची कवयित्री म्हणून तिची विशेष ख्याती आहे. ती अत्यंत साधेपणाने राही. तिच्या विषयी अनेक आख्यायिका प्रचलित आहेत. [म. वि. को.]

**अशून्य व्रत** एक काम्यव्रत. श्रावणमासापासून पुढे चार महिने वद्य द्वितीयेला हे व्रत करावे. या दिवशी चंद्राला द्यावयाचे अर्घ्य, अखंड अक्षता व फळे अर्पण करावी. जर द्वितीया तिथी तृतीयायुक्त असेल तर, त्या तिथीला हे व्रत करावे. फल– सौभाग्यप्राप्ती. [हिं. ध.]

**अशून्यशयन व्रत** एक तिथिव्रत. आषाढ कृ. द्वितीयेपासून पुढे चार महिने प्रत्येक कृ. द्वितीयेस हे व्रत करायचे असते. व्रतावधी चार महिने. यात विष्णू-लक्ष्मीच्या मूर्ती मंचकावर स्थापून त्यांची पूजा करतात. प्रार्थनामंत्र असा–

लक्ष्म्या न शून्यं वरद यथा ते शयनं सदा ।
शय्या ममाप्यशून्याऽस्तु तथाऽत्र मधुसूदन ।।

(कृत्यरत्नाकर)

अर्थ–हे मधुसूदन विष्णो! जशी तुझी शय्या लक्ष्मीविरहित असत नाही, तशीच माझीही शय्या पत्नीविरहित नसो.

या व्रताने स्त्रियांना सौभाग्य व पुरुषांना भार्येचा अविरह प्राप्त होतो. तेलंगणातल्या एका शिलालेखात (इ. स. १२७६) एका काकतीय राजाच्या सेनापतीची पत्नी कुप्पांबिका हिने हे व्रत केल्याचा उल्लेख आहे. [हि. ध.]

**अशोक** (सनपूर्व ३०४–२३७) मौर्य वंशातील महान सम्राट. हा चंद्रगुप्त मौर्याचा नातू आणि बिंदुसाराचा पुत्र होय. बिंदुसाराला १६ राण्या व १०१ पुत्र होते. जैन परंपरे-प्रमाणे अशोक हा सुभद्रांगी नामक राणीचा पुत्र होय.

बौद्ध परंपरेप्रमाणे बिंदुसाराच्या १०१ पुत्रांत सुमन (किंवा सुसीम) हा ज्येष्ठ पुत्र होता. पण सुभद्रांगीच्या मनात आपला पुत्र युवराज व्हावा, अशी महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली. त्या दृष्टीने तिने कारस्थाने सुरू केली. त्या कामी बिंदुसाराचे दोन मंत्री तिला अनुकूल झाले. बिंदुसार मरण पावला त्या वेळी सुमन एका मोहिमेवर गेला होता. ती संधी साधून राधागुप्त नामक मंत्र्याच्या साहाय्याने अशोक सम्राट झाला. त्याने राधा-गुप्ताला आपला मुख्य प्रधान नेमले. ही वार्ता तक्षशिलेत सुम-

नाला समजली. त्याला या वार्तेने क्रोध आला आणि आपल्या हक्काचे साम्राज्य हस्तगत करण्यासाठी तो झपाट्याने तिक-



सम्राट अशोक

डून परत फिरला. पण अशोक सावध होता. त्याने एक षड्यंत्र निर्माण करून सुमनाचा वध केला. अशा प्रकारे अशोकाने आपला एक प्रबळ शत्रू नाहीसा करून मगध साम्राज्यावर आपली सत्ता प्रस्थापित केली. त्याचा राज्याभिषेक मात्र राज्यप्राप्तीनंतर पुढे चार वर्षांनी झाला.

अशोकाला साम्राज्याचा लाभ होण्यापूर्वी तो तक्षशिला व उज्जयिनी येथे प्रशासक म्हणून काम करीत होता. मगध साम्राज्यातली ही दोन महत्त्वाची केंद्रे होती. अशोकाने राज्यकारभाराचा अनुभव तिथेच घेतला आणि त्या दोन प्रदेशांचा राज्यकारभार सुव्यवस्थित चालविला. त्याने काश्मीर प्रांत जिंकून श्रीनगर नावाचे शहर वसविले, असे कल्हण सांगतो.

सनपूर्व २६२ साली अशोकाने कलिंग देशावर स्वारी केली. त्या काळचा कलिंग म्हणजे आजचा ओडिसाप्रदेश होय. कलिंग देशाचा राजा शूर होता आणि चतुरंग दलाने समर्थ होता. त्याची प्रजाही निष्ठावंत होती. अशा या प्रबल राज्यावर अशोकाने आत्मविश्वासपूर्वक धाड घातली. कलिंगाने मोठ्या धैर्याने त्याला टक्कर दिली; पण अखेरीस त्याचे सामर्थ्य कमी पडले आणि अशोकाचा विजय झाला. या विजयाने एक मोठा प्रदेश अशोकाच्या साम्राज्याला जोडला गेला. हे कलिंगयुद्ध महाघोर झाले. 'या युद्धात एक लक्ष कलिंग – वीर धारातीर्थी पडले, दीड लक्ष बंदी झाले आणि युद्धजन्य रोगराईने लक्षावधी माणसे मृत्युमुखी पडली,' असे अशोकाच्या चौदाव्या शिलालेखात नमूद केलेले आहे. याच प्रमाणात अशोकाच्या सैन्याचीही कमीअधिक हानी झाली असली पाहिजे.

या अपरिमित मानवसंहाराने शेवटी अशोकाला पश्चात्ताप झाला. तो युद्ध या प्रकारालाच विटला. 'यापुढे आपण युद्धासाठी हाती शस्त्र धरणार नाही,' अशी प्रतिज्ञा त्याने केली. अशोकाचा हा खेद आणि पश्चात्ताप त्याने आपल्या शिलालेखात कोरून ठेवला आहे.

कलिंगावर स्वारी करण्यापूर्वीच अशोक हा बौद्ध धर्माच्या प्रभावाखाली आला होता. त्याच्या दरबारी बौद्ध भिक्षूंचे वजन होते. बौद्ध धर्माचा सर्वत्र प्रसार करण्याची महत्त्वाकांक्षा त्यांनीच अशोकाच्या मनात रुजविली होती. बुद्धाचा धर्म जगभर प्रसारित करायचा तर त्याआधी आपल्या सभोवतालच्या बौद्ध धर्माला विरोधी असलेल्या राजांचा पाडाव करणे आवश्यक आहे, असे अशोकाला वाटले. कलिंग राजा वैदिक धर्माचा कट्टर अभिमानी होता. तो पराक्रमीही होता. त्याला पराभूत केल्यास बौद्ध धर्माला ते राज्य मोकळे मिळेल, या उद्देशानेच अशोकाने ही स्वारी केली होती. या विजयामुळे त्याची शक्ती वाढली. जिंकलेल्या कलिंग देशाचा राज्यकारभार तिथल्या प्रजेला सुखावह होईल, अशाच प्रकारे त्याने तिथली राज्यव्यवस्था केली. एकूण साम्राज्यातील सर्वच प्रजेचे त्याने पुत्रवत पालन केले.

अशोकाच्या जीवनातील घटनांचा कालक्रम श्री. राधाकुमुद मुखर्जी यांनी पुढीलप्रमाणे दाखविला आहे –

| | | |
|---|---|---|
| इ. सनपूर्व | ३०४ | जन्म. |
| ,, | २७४ | सिंहासनारोहण. |
| ,, | २७० | राज्याभिषेक. |
| ,, | २६५ | अशोक बुद्धाचा उपासक झाला. |
| ,, | २६२ | कलिंगयुद्ध. |
| ,, | २६० | बोधगयेची प्रथम तीर्थयात्रा. |
| ,, | २५७ | १४ शिलालेखांच्या द्वारा धार्मिक आज्ञांची घोषणा. आजीविक पंथीयांना दायाला गुहांचे दान. |
| ,, | २५६ | कोणाकमनचा स्तूप मोठा केला. |
| ,, | २५३ | तृतीय बौद्ध परिषद. |
| ,, | २५० | बौद्ध तीर्थांची यात्रा व कोणाकमनच्या स्तूपाजवळ स्मारकस्तंभ उभा केला. |
| ,, | २४३ | स्तंभलेखांत धार्मिक आज्ञा. |
| ,, | २४० | राणी असंधिमित्रेचा मृत्यू व तिष्यरक्षितेशी विवाह. |
| ,, | २३७ | मृत्यू. |

अशोकाचे साम्राज्य अत्यंत विशाल होते. दक्षिण भारताचा काही भाग सोडला, तर सर्व भारतवर्ष त्याच्या छत्राखाली होता. बलुचिस्तान, अफगणिस्तान, दक्षिण हिंदुकुश, सिंध, काश्मीर खोरे, नेपाळ, हिमालयाचा सखल प्रदेश आणि आजच्या मद्रास-पर्यंतचा भाग, एवढी त्याच्या साम्राज्याची व्याप्ती होती. एवढ्या मोठ्या साम्राज्याचा कारभार राजधानीच्या केंद्रा-तून चालविणे अशक्य होते. हे जाणून त्याने राज्यव्यवस्थेच्या सोयीसाठी साम्राज्याचे प्रादेशिक विभाग करून त्यांवर प्रशासक नेमले. हे प्रदेश दोन प्रकारचे असत. एक, राजकारणाच्या दृष्टीने महत्त्वाचा, व दुसरा सामान्य. मोठ्या प्रदेशावर प्रशासक म्हणून राजघराण्यात-लाच एखादा पुरुष नेमला जाई. या प्रशाससकांना कुमार म्हणत. दुसऱ्या प्रकारच्या प्रांतांवर सामान्य श्रेणीतल्या कर्त्या पुरुषांची नेमणूक होई. अशोकाच्या साम्राज्यात तक्ष-शिला, सुवर्णगिरी, तोसली आणि उज्जयिनी असे पहिल्या श्रेणीचे चार प्रांत होते. हे चारी प्रांत कुमारशासित होते.




अशोकाच्या शिलालेखांवरून भारताबाहेरच्या कित्येक देशांशी त्याचे राजकीय संबंध असावे, असे दिसते. अशोकाचे वकील त्यांच्या दरबारी होते. अशोकाचे साम्राज्य विस्तीर्ण असल्याने त्याच्या राज्यात सगळीकडे एकसारखी राज्यपद्धती नव्हती. अधिराज्याचा नाममात्र अधिकार स्वतःकडे ठेवन त्याने काही प्रांतांना व जमातींना अंतर्गत पूर्ण स्वातंत्र्य दिले होते.

सिंहासनावर बसल्यानंतर आठ वर्षांनी अशोकाने बौद्ध धर्माचा स्वीकार केला. हा नवा धर्म स्वीकारताना तो प्रथम ‘उपासक’ व त्यानंतर ‘शासनदायाद’ झाला. ‘अडीच वर्षा-हून अधिक काल मी उपासक होतो,’ असे त्याने एका शिला-लेखात लिहिले आहे. आपण स्वीकारलेल्या धर्माचा सर्वत्र प्रसार व्हावा, अशी आकांक्षा त्याने धरली व त्यासाठी देशोदेशी धर्मप्रचारक पाठविण्याची योजना केली. आपला पुत्र महेंद्र व कन्या संघमित्रा यांना-ही त्याने धर्म-प्रचारासाठी श्रीलंकेत पाठ-वले होते. धर्म-प्रचारासाठी बाहेरच्या देशांत धर्म-प्रचारक पाठविण्याची कल्पना मुळात भारतीय आहे आणि त्या कल्प-नेचा जनक सम्राट अशोकच आहे, ही गोष्ट आता पाश्चात्य पंडितांनी ही मान्य केली आहे. पुढच्या काळात ख्रिस्ती आणि मुस्लीम या धर्मांनीही पर-देशांत आपापले धर्मप्रचारक धाडले. पण त्यांच्या आणि अशोका-च्या धर्मप्रचाराच्या पद्धतीत जमीनअस्मानाचे अंतर होते. अशोकाचा धर्मप्रचार सर्वस्वी प्रेम आणि हृदयपरिवर्तन यांवर अधिष्ठित होता. त्यात अहिंसेला प्राधान्य होते आणि माणुस-कीला आवाहन होते. भारतातल्या बौद्ध धर्माच्या प्रचारकांनी धर्मप्रचारासाठी कधीही शस्त्र धारण केले नाही. जगाच्या बऱ्या-

चशा भागावर अशोकाने धर्मविजय मिळविला तो केवळ हृदयपरिवर्तनाच्या बळावर. बुद्धाच्या धर्माबरोबरच भारतीय विद्या, कला आणि शासनपद्धती त्या त्या देशांत गेल्या. नव्या भारतीय तत्त्वज्ञानाचा सर्वत्र जयघोष गाजू लागला.

अशोकाने बौद्ध धर्माचा स्वीकार केला, तेव्हा बौद्ध धर्म भारतातही फारसा पसरला नव्हता. किंबहुना बुद्धानंतरच्या शंभर वर्षांत बौद्ध संघामध्ये अंतःस्थ कलह माजून राहिल्यामुळे त्याचा प्रसार होण्याऐवजी संकोचच होऊ लागला होता. अशोकाने बौद्ध संघातले हे दोष दूर व्हावे, म्हणून मोग्गलिपुत्त तिष्य याच्या अध्यक्षतेखाली एक धर्ममहासभा भरविली. या महासभेत देशात आणि विदेशातही धर्मप्रचारक पाठविण्याची योजना सिद्ध झाली. त्यासाठी एक हजार भिक्षूंची निवड करून त्यांना प्रचारपद्धतीचे शिक्षणही देण्यात आले.

अशोक आपल्या धर्मविजयाचे कार्य धर्ममहामात्र व धर्मयुत या नावाच्या अधिकारीवर्गांकडून चालवी. अशोकाचा संदेश घरोघर पोचविणे हे या अधिकाऱ्यांचे काम होते. लोकांचे हित व सुख जेणेकरून होईल असे वर्तन करणे, अनाथ आणि वृद्ध यांचे संरक्षण करणे, दयाधर्माने वागणे, पवित्र जीवन जगणे, हा अशोकाचा मुख्य संदेश होता. अशोकाने धर्म शब्द विशिष्ट संप्रदायाबद्दल वापरलेला नाही. धर्माबद्दल तो म्हणतो –

'पापापासून दूर राहणे, उत्तम कार्य करणे, दम, दान, सत्य व शौच यांचे पालन करणे, हा धर्म होय.'

तो स्वतः धर्माप्रमाणे वागला. दया, प्रेम व अहिंसा या गुणविशेषांना अनुसरूनच त्याने आपले साम्राज्य चालविले. त्याने माणसांनाच नव्हे, तर पशूंनाही औषध मिळण्याची व्यवस्था केली; राज्यातली पशुहिंसा कायद्याने बंद केली व सदर कायदा मोडणाऱ्यास ५० पण दंड ठेवला. त्याने पाणपोया व धर्मशाळा उघडल्या; दोन दोन हजार मैलांचे रस्ते बांधून त्यांच्या कडेने वृक्ष लावले. जन्ममृत्यूंची नोंद सुरू केली. उद्याने, नाट्यगृहे व पाठशाळा निर्माण केल्या. व्यापारवृद्धीच्या योजना आखल्या. आपल्या प्रजेची सत्य परिस्थिती कळावी म्हणून तो स्वतः राज्यात हिंडे. अशा प्रकारे परोपकार आणि प्रजेची अभिवृद्धी यांच्यासाठी झटणारा हा सम्राट भारताप्रमाणेच अन्य देशांतल्या लोकांनाही आदरणीय झाला यात नवल नाही. तो राजा असूनही खऱ्या अर्थाने राजकारणी नव्हता. तो धार्मिक प्रवृत्तीचा पुरुष होता. लोकांत दयादाक्षिण्यादी सद्गुणांचे संवर्धन कसे होईल याच गोष्टीची त्याला अहोरात्र तळमळ होती. धर्मप्रसाराच्या बाबतीत पाश्चात्य इतिहासकारांनी त्याची कॉन्स्टन्टाइन बादशहाशी तुलना केली आहे. पण त्या दोघांत एक फरक होता. कॉन्स्टन्टाइनने ख्रिस्ती धर्माच्या प्रचारासाठी शस्त्रबळ वापरले व रक्त सांडले; पण अशोकाने मात्र शस्त्राची मदत घेतल्यावाचून धर्मप्रसार केला. त्याच्या काळी भारतात अनेक धर्मसंप्रदाय होते आणि त्यांच्यामध्ये चुरसही होती. पण अशोकाने त्यांना वाक्संयम उपदेशिला अणि अन्य धर्मांची निंदा त्याज्य ठरविली.

भारताच्या प्राचीन इतिहासात अशोकाचे साम्राज्यच सर्वांत विशाल होते. मात्र त्याचे व्यक्तिमत्व, त्याचे सद्गुण, त्याचे उन्नत धार्मिक व नैतिक विचार आणि त्याची आदर्श शासनव्यवस्था यांसाठी पाश्चात्य इतिहासकार त्याला सर्वश्रेष्ठ राजा मानतात.

बुद्धचरित्रातली महत्त्वाची स्थळे पाहण्यासाठी अशोकाने धर्मविजयप्रक्रम नावाची वैभवशाली यात्रा काढली आणि प्रत्येक महत्त्वाच्या ठिकाणी स्तूप, लेख, विहार अशा स्वरूपात बुद्धाची चिरस्थायी स्मारके उभारली. अशोक डोंगरावर, गुहांमध्ये किंवा खडकांवर आपले शिलालेख कोरून ठेवीत असे. जिथे खडक मिळाले नाहीत तिथे त्याने त्यासाठी भव्य स्तंभ उभारले आहेत.

अशोक आपला राज्यारोहणदिन महोत्सवाने साजरा करी. त्या दिवशी कैद्यांची मुक्तता, अपराधी लोकांवर दया, प्रजेला काही विशेष सवलती अशा गोष्टी तो करी.

अशोकाला पाच राण्या होत्या – (१) विदिशा (२) असंधिमित्रा (ही पट्टराणी होती) (३) कारुवाकी (४) पद्मावती व (५) तिष्यरक्षिता. विदिशा ही शाक्यकुमारी असून, तिला महेंद्र नावाचा पुत्र व संघमित्रा नावाची कन्या अशी दोन अपत्ये झाली. त्याला चारुमती नावाची आणखी एक कन्या होती. संघमित्रेचा विवाह अग्निब्रह्मा नावाच्या ब्राह्मणकुमाराशी झाला होता. चारुमतीचा विवाह देवपाल नावाच्या क्षत्रियाशी झाला. ती नेपाळात जाऊन मठवासिनी झाली. संघमित्रा लंकेत धर्मप्रचारासाठी गेली. तिष्य आणि कुणाल असे अशोकाचे आणखी दोन पुत्र होते. जलौक नावाच्या तिसऱ्या पुत्राला त्याने काश्मीरचा प्रशासक म्हणून नेमले. हा अशोकापासून फटकून वागे. अशोकाच्या मृत्यूनंतर काश्मीर देश साम्राज्यातून फोडून त्याने तिथे आपले स्वतंत्र राज्य स्थापले असे कल्हणाने सांगितले आहे. दशरथ नावाच्या नातवाला अशोकाने युवराजपद दिले व अशोकानंतर तो मौर्य सम्राट बनला.

**अशोकाचे लेख** – अशोकाने आपले धार्मिक आणि नैतिक विचार चिरकाल लोकांच्या पुढे राहावे म्हणून भारतात अनेक ठिकाणीं शिलालेख कोरून ठेवले; त्याचप्रमाणे स्तंभलेख आणि गुहालेखही लिहिले. शिलालेखांची प्रथा अशोकानेच प्रथम सुरू केली. पुढच्या सम्राटांनी मग तिचे अनुकरण केले. अशोकाचे हे शिलालेख ब्राह्मी व खरोष्ट्री अशा दोन लिप्यांत लिहिलेले आहेत.

या लिप्या सांप्रत व्यवहारात नाहीत. मध्यंतरीच्या अंधकार-युगात तर त्या प्रायः लुप्तच झाल्या होत्या. त्यामुळे हे शिलालेख सापडूनही, त्यांचे वाचन करणे ही गोष्ट अवघड होऊन बसली होती. पण जिज्ञासू पंडितांनी कालांतराने ती लिपी उलगडली. या कामात खटपट करणाऱ्या पाश्चात्य पंडितांत श्री. जेम्स प्रिन्सेप हे अग्रगण्य होत. टोपरा स्तंभावरील लेख त्यांनीच प्रथम संपूर्ण वाचला.

अशोकाच्या शिलालेखांचे दोन भाग पडतात. त्याचे चौदा लेख विशिष्ट क्रमाने लिहिलेले बऱ्याच ठिकाणीं आढळले आहेत. हा पहिला भाग. अन्य काही ठिकाणीं फक्त दोन लेख एकत्र आढळतात. हा दुसरा भाग होय. चौदा शिलालेख खैबर घाटा-जवळ शहावाझगढी या ठिकाणी सापडले आहेत. यांत १ ते ११ व १३ ते १४ असे लेख एका मोठ्या खडकावर असून, १२ वा लेख थोड्या अंतरावर दुसऱ्या खडकावर कोरलेला आहे. या चौदा लेखांची दुसरी प्रत हजारा जिल्ह्यात मानसेरा गावी, तिसरी मसुरीजवळ कालसी गावी, चौथी गिरनार टेकडीच्या पायथ्याशी, पाचव्या प्रतीचा काही भाग महाराष्ट्रातील सोपारा गावी, सहावी प्रत तमिळनाडमध्ये येरागुडी गावी, सातवी प्रत ओडिसा प्रांतात धौली या गावी (यात ११, १२ व १३ हे लेख नाहीत) व आठवी प्रत तमिळनाडमध्ये जौगढ या ठिकाणी सापडली आहे.

विद्वानांच्या मते हे चौदा शिलालेख असलेल्या जागी अशोकाच्या काळी मोठी शहरे किंवा त्या त्या प्रांतांच्या राजधान्या असाव्या.

स्तंभलेखांचेही दोन वर्ग असून, पहिला वर्ग सात स्तंभलेखांचा व दुसरा दुय्यम स्तंभलेखांचा आहे. हे सात स्तंभलेख पुढील-प्रमाणे आहेत – यमुनातटाकी सापडलेला स्तंभ, फेरोजशहा तुगलक याने दिल्लीस आणलेला टोपरा स्तंभ, मेरठ येथील स्तंभ, प्रयाग स्तंभ (यावर दोन लेख आहेत), चंपारण्यातील लौरिया अरराजस्तंभ, तिथलाच दुसरा नंदगड स्तंभ व तिथलाच रामपुरवा स्तंभ. सांची व सारनाथ येथे आणि नेपाळमध्ये असे स्तंभ आहेत. या स्तंभलेखांच्या जागांचा विचार केला म्हणजे असे दिसते की हे स्तंभ तीर्थक्षेत्रांत किंवा त्यांच्या मार्गावर उभारलेले होते.



अशोक स्तंभ लौरिया नंदनगड

अशोकाचे गुहालेख गयेजवळील बरावर व नागार्जुनी टेकड्यांत कोरलेले आहेत. सारनाथ व सांची या ठिकाणीं त्याचे लघु स्तंभलेख आहेत. कर्नाटक राज्यातल्या रायचूर जिल्ह्यात म्हस्की येथे त्याचा गुहालेख असून, त्याचे वैशिष्ट्य हे की, अशोक हे नाव त्याच गुहालेखात आढळते. असे एकंदर ३५ लेख आढळतात. हे सर्व लेख मागधीसारख्या कोणत्या तरी प्राकृत भाषेत आहेत. थोडाफार फरक असेल तो स्थलपरत्वे समजावा.

अशोकाच्या या शिलालेखांवर 'देवानां प्रिय प्रियदर्शी राजाचे असे म्हणणे – अशी इच्छा आहे' असा प्रारंभ आढळतो. अशोक स्वतःला 'देवानां प्रिय प्रियदर्शी' असे विरुद लावून घेत असे. देवानां प्रिय म्हणजे देवांना प्रिय असलेला, देवांची कृपा अथवा मर्जी असलेला. 'प्रियदर्शी म्हणजे प्रिय दिसणारा अथवा लोकांचे प्रिय करणारा. अशोकाचा आजा चंद्रगुप्त मौर्य याचा उल्लेख काही पाली ग्रंथांतून प्रियदर्शी असा आढळतो. त्यावरून वाटते की अशोकाने आपल्या आजाचे हे विरुद स्वतःसाठी घेतले असावे.

अशोकाच्या शिलालेखांत त्याच्या आयुष्याच्या उत्तरार्धाची माहिती मिळते व त्याचे धार्मिक विचारही आहेत. मात्र त्याच्या आयुष्याच्या पूर्वार्धाची माहिती त्यांत मिळत नाही. त्या शिलालेखांपैकी पहिला शिलालेख पुढीलप्रमाणे आहे –

'हा धर्मलेख देवानां प्रिय प्रियदर्शी राजाने लिहविला आहे. कोण्याही प्राण्याचा बली देण्यात येऊ नये; अथवा समाज भरवू नये. कारण देवानां प्रिय प्रियदर्शी राजाच्या दृष्टीने या समाजात बरेच अनिष्ट प्रकार घडत असतात. तथापि काही विवक्षित प्रकारचे समाज हितावह आहेत असे प्रियदर्शी राजाला वाटते.

अशोकाच्या स्तंभलेखांपैकी पहिला लेख पुढीलप्रमाणे आहे–'देवानां प्रिय प्रियदर्शी राजाचे म्हणणे असे आहे – राज्याभिषेकानंतर सव्विसाव्या वर्षी हा धर्मलेख लिहविला आहे. उत्कट धर्मप्रेम, उत्कट आत्मपरीक्षण, उत्कट आज्ञाधारकपणा, उत्कट पापभीरुता व उत्कट उल्हास हे गुण अंगी असल्याशिवाय इह व परलोकी उन्नती करणे दुरापास्त आहे. पण माझ्या शिकवणीमुळे धर्माबद्दलचा आदर व धर्मप्रेम यांची लोकांत वृद्धी झाली आहे व ती दिवसानुदिवस होत राहील आणि माझे जिल्हाधिकारी–मग ते उच्च, मध्यम वा कनिष्ठ दर्जाचे असोत–त्याप्रमाणे वागतील व त्यांची वाढ करतील. प्रजेला उत्तेजन देण्यास ते समर्थ आहेत. आणि त्याप्रमाणे सीमाप्रदेशांतील महामात्रही समर्थ आहेत. त्यांना माझी ही शिकवण आहे – धर्माचे पालन करा. धर्माने राज्यकारभार चालवा. धर्माने लोकांना सुखी करा व धर्माने लोकहित साधा...'

त्याने आपल्या विशाल साम्राज्यात जी शासनव्यवस्था सुरू

केली होती तिच्यातील व्यापक सिद्धान्त, दूरदृष्टी, मानवता, आंतरराष्ट्रीय भावना या गोष्टी आजही सर्व जगाला आदर्शभूत आहेत. त्याचे साम्राज्य सत्य, अहिंसा व विश्वशांती या तत्त्वां-वर आधारलेले होते. अनेक भिन्न जातींच्या व भिन्न धर्मांच्या लोकांनी परस्परांशी कसे वागावे याविषयी त्याने जे आदेश दिलेले आहेत ते आजच्या काळातही धार्मिक व नैतिक दृष्टीने शिरोधार्य आहेत.

अशोकाने अनेक नगरे व प्रासाद उभारून वास्तुकला व शिल्पकला यांचा विकास केला. त्याने जलाशय, कालवे, रस्ते, विश्रामधामे व रुग्णालये बांधून जनतेच्या सुखसोयीत भर घातली. गिरनार पर्वताजवळचे सुदर्शन सरोवर चंद्रगुप्ताने निर्माण केले; ते काम अशोकाने पूर्ण केले. पाणीपुरवठ्याची ही योजना स्थापत्याच्या दृष्टीने अलौकिक ठरली आहे.

अशोकाचे स्तंभ म्हणजे शिल्पकला व वास्तुकला यांचे अपूर्व नमुने आहेत. विस्तीर्ण पहाडांतून ५० टन वजनाचे आणि ५० फूट उंच असे अखंड पाषाणस्तंभ तोडून काढणे आणि दूरदूरच्या जागी नेणे हे कल्पनेलाही थक्क करणारे महाकठीण काम होते. हे सर्व स्तंभ बहुधा चुनारच्या पहाडांतून काढलेले असावे. हे स्तंभ कलाकौशल्याने परिपूर्ण असून त्यांवरील चमक आधु-निक कारागिरांनाही सहजसाध्य नाही. या स्तंभांचा शिरोभाग अत्यंत सुंदर असतो.

अशोक बौद्ध धर्माचा कट्टर अनुयायी असूनही त्याच्या अंगी सहिष्णुता व उदारता होती. तो स्वतः भिक्षू बनला नसला तरी, त्याने बौद्ध भिक्षूंच्या संघांना खूप सहाय्य दिले. पशूंच्या लढती, अतिरिक्त मद्यपान व मांसभक्षण या गोष्टी ज्यांत असत असे उत्सव त्याने बंद केले आणि नवीन प्रकारचे समारंभ (देवतांची मिरवणूक, रोषणाई, प्रदर्शने इत्यादी) सुरू केले. स्वतःच्या जीवना-तही त्याने साधेपणा व संयम आणला. सर्व प्रकारचे भोगविलास बंद करून तो धार्मिक यात्रा करीत राहिला.

अशोकाच्या राजधानीत मानवधर्माला आणि लोककल्याणाला प्राधान्य होते हे आपण पाहिले. पण त्यासाठी त्याने शस्त्रसंन्यास करायला नको होता. श्री. जयस्वाल यांच्या मते त्याने इतके 'धर्मभीरू' बनायला नको होते. त्याने जर आपल्या पूर्वजांचे राजकीय धोरण चालविले असते तर, बिंदुसाराच्या काळापर्यंत मौर्य साम्राज्यात सामील न झालेली जनपद राज्ये त्याला आपल्या साम्राज्यात विलीन करून घेता आली असती. तो इराणच्या सरहद्दीपासून कन्याकुमारीपर्यंत समस्त जंबुद्वीपाचा एकछत्री सम्राट होऊ शकला असता; पण अशोक त्या बाबतीत उदासीन राहिला.

भारतवर्षात आर्यसत्तेची स्थापना अशोकाच्या पूर्वीच पुरी झाली होती. भारतातल्या विभिन्न जातीजमाती आर्यांच्या व्यापक संस्कृतीत समाविष्ट झाल्या होत्या. भारतात राजनैतिक स्थिरता व एकता निर्माण करणे ही त्यापुढची कामगिरी होती. अशोकाने मगधसाम्राज्य व्यापक व दृढ करून भारताचे राजनैतिक ऐक्य व स्थैर्य यांच्यासाठी झटायला हवे होते; पण त्याने दिग्विज-याच्या ऐवजी धर्मविजयाची आकांक्षा धरली. त्यामुळे जनतेत राजकीय पराक्रम व राजकीय आकांक्षा निर्माण होण्याऐवजी, आध्यात्मिक उन्नतीसाठीच झटावे, अशी प्रवृत्ती बळावली.

अशोकाने निदान तमिळ राज्ये तरी आपल्या साम्राज्यात सामील करून घ्यायला हवी होती. त्यामुळे समस्त भारत एक सार्वभौम साम्राज्याच्या रूपाने एकत्र येऊन संघटित झाला असता. सर्वत्र एक कायदा, एक व्यवहार आणि एक राष्ट्रीयता यांची स्थापना झाली असती; पण अशोकाने तेवढेही काम पुरे केले नाही, ही इतिहासवेत्त्यांची तक्रार आहे. [बु. इं.; म. ज्ञा. को.; चक्रवर्ती अशोक; अशोक आणि त्याचे लेख - श्री. गुंडोपंत हरिभक्त, १९५३; प्रा. भा. वि. वि.; हि. क. इं. पी. २]

## अशोक वृक्ष

'नास्ति शोको यस्मात्' = ज्याच्यापासून शोक होत नाही तो अशोक होय (हलायुध). हा वृक्ष पौराणिक कालापासून सौंदर्य व उपयुक्तता या गुणां-मुळे प्रसिद्ध आहे. हा वृक्ष आम्रवृक्षा-सारखाच दिसतो. मात्र याची पाने आंब्याच्या पानां-पेक्षा थोडी लांब व तुकतुकीत असतात. याला लालसर भगव्या फुलांचे वाटोळे घोस येतात. भारतात समुद्र-किनाऱ्यालगत हा आढळतो. हिंदूंप्रमा-णेच बौद्धही याला पवित्र मानतात. बुद्धाचा जन्म याच्या खाली झाला, अशी आख्यायिका आहे.



अशोक वृक्ष

'पादाघातादशोको विकसति' = रमणीच्या लत्ताप्रहाराने

याला फुले येतात, असा कविसंकेत आहे (सा. द.). संस्कृत महाकाव्ये आणि चंपूकाव्ये यांतून याचे उल्लेख येतात. रावणाने सीतेला लंकेत नेल्यावर अशोकवनात ठेवले होते. मदनाच्या पंचबाणांत याचे फूल आहे. शिवाने मदनाला जेव्हा जाळले, तेव्हा तो अशोकाच्या आश्रयाने उभा होता. याचे फूल प्रेमाचे प्रतीक मानले आहे. चैत्र शु. त्रयोदशीला याची पूजा करावी असे व्रतराजात सांगितले आहे.

बंगालमध्ये अशोकषष्ठीच्या दिवशी स्त्रिया याच्या कळ्या भक्षण करतात. याला दुःखपरिहारक आणि कल्पवृक्ष मानले आहे. पद्म पुराणात याची एक कथा सांगितलेली आहे, ती अशी – एके दिवशी पार्वतीने शिवाला याचे माहात्म्य विचारले. शिव म्हणाला, 'हा कल्पवृक्ष आहे; याच्यापाशी तुला हवे ते माग.' पार्वतीने एक स्त्री मागितली. ती तावडतोब पुढे उभी राहिली. पार्वतीने तिला आपली कन्या मानून अशोकसुंदरी असे तिचे नाव ठेविले. 'तुझे नहुषाशी लग्न होईल' असा वर पार्वतीने तिला दिला. [ सु. वि. को. ]

**अशोक-कलिका-प्राशन** एक काम्य विधी. चैत्र शुद्ध अष्टमीला पुनर्वसू नक्षत्र आले असता, अशोकाच्या आठ कळ्यांचे प्राशन (भक्षण) करतात. त्याचा मंत्र असा आहे –

**त्वामशोकवराभीष्टं मधुमाससमुद्भवम् ।**
**पिबामि शोकसन्तप्तं मामशोकं सदा कुरु ।।**

अर्थ – हे अशोकश्रेष्ठा, इष्ट फल देणाऱ्या व चैत्र मासात उत्पन्न झालेल्या तुझे (तुझ्या कळ्यांचे) मी प्राशन करीत आहे. शोकसंतप्त अशा मला तू विशोक कर. [ निर्णयसिंधु ].

**अशोक त्रिरात्र व्रत** एक तिथिव्रत. हे विशेषेकरून स्त्रियांसाठी आहे. ज्येष्ठ, भाद्रपद किंवा मार्गशीर्ष शुद्ध त्रयोदशीपासून तीन रात्री हे व्रत करतात. व्रतावधी एक वर्ष. रुप्याचा अशोकवृक्ष करून त्याची व त्याचबरोबर पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या रात्री अनुक्रमे ब्रह्मा-सावित्री, उमा-महेश्वर व लक्ष्मी-नारायण यांच्या मूर्तींची पूजा व अशोकाला १०८ प्रदक्षिणा, असा याचा विधी आहे. व्रताच्या शेवटी अशोकवृक्षासह मूर्तिदान. फल – व्याधिनाश, दीर्घायुष्य, संपत्ती व संतती यांची प्राप्ती. [ व्रतराज; हि. ध. ]

**अशोक द्वादशी** एक तिथिव्रत. आश्विन शुद्ध दशमीपासून प्रारंभ. यात केशवाची पूजा करायची असते. त्या दिवशी अल्पाहार, एकादशीस उपवास व द्वादशीस पारणे असा याचा विधी आहे. व्रतावधी एक वर्ष. फल – आरोग्यलाभ व शोकमुक्ती. [ हि. ध. ]

**अशोक पूर्णिमा** एक तिथिव्रत. फाल्गुन पूर्णिमेचे नाव. व्रतावधी एक वर्ष. या व्रतात पृथ्वी व केशव यांची पूजा आणि चंद्राला अर्घ्यदान करतात. पृथ्वीपूजेत पहिले चार महिने धरणी, दुसरे चार महिने मेदिनी व तिसरे चार महिने वसुंधरा या नावांनी तिची पूजा करतात. प्रत्येक चार महिन्यांच्या शेवटी केशवाची पूजा करतात. [ हि. ध.]

**अशोक प्रतिपदा** एक तिथिव्रत. केवळ स्त्रियांसाठी हे व्रत आहे. आश्विन शुद्ध प्रतिपदेला अशोकवृक्षाची, त्याच्या रौप्य प्रतिमेची किंवा चित्राची पूजा करणे हा याचा विधी आहे. फल – दुःखनाश व सौभाग्यप्राप्ती. [ हि. ध.]

**अशोक रोहिणी व्रत** जैन नाक्षत्र व्रत. प्रत्येक मासातल्या रोहिणी नक्षत्रावर उपवास करतात. व्रतावधी दोन वर्षे व तीन महिने. फल – स्वर्गातील सुखभोगांची प्राप्ती. [ जै. व्र. वि. सं. ]

**अशोक षष्ठी** एक तिथिव्रत. यात चैत्र शुद्ध षष्ठीला षष्ठी देवीचे पूजन करतात व अशोकाच्या सहा कळ्या सहा मुगांचे दाणे मिसळून दह्याबरोबर खातात. फल – सुख व अपत्यप्राप्ती [ हिं. हॉ. से. ]

**अशोक संक्रांती** एक व्रत. अयन अथवा विषुव संक्रांतीला व्यतीपात योग असेल, तेव्हा तिलदान करणे, असा याचा विधी आहे. [ हि. ध. ]

**अशोका** जैन यक्षिणी. शीतलनाथाची सेविका. हिचे वर्णन निर्वाणकलिकेत पुढीलप्रमाणे केले आहे – अशोका मुगाळी वर्णाची, कमलासना (दिगंबरमते सूकरावर बसलेली), चतुर्भुज, उजवे हात वरदमुद्रा आणि पाश धारण करणारे; डावे हात फल व अंकुश धारण करणारे.

ही जशी यक्षिणी तशीच विद्यादेवीही आहे. [ जै. इ. ]

**अशोकाष्टमी व्रत** एक काम्य व्रत. या व्रताचे बरेच पर्याय आहेत; त्यांपैकी दोन खाली दिले आहेत.

(१) चैत्र शुद्ध अष्टमीला सर्व तीर्थे व नद्या ब्रह्मपुत्रा नदीत येतात. या वेळी बुधवार व पुनर्वसू नक्षत्र असेल तर या नदीत

स्नान करावे. फल – वाजपेय यज्ञाची सर्व फले मिळतात.

(२) वर्षातल्या सर्व अष्टमी या व्रततिथी होत. वर्षभर व्रत करणे जमले नाही, तर निदान आश्विन वद्य अष्टमीला हे व्रत करावे, असा नियम आहे. या व्रतात अशोका देवीची पूजा व चंद्रोदयापूर्वी नक्त भोजन करतात. फल – शोकनाश. पाहा – अशोक-कलिका – प्राशन. [ हिं. ध.; व्रतराज ]

**अश्मक** एक क्षत्रकुलोत्पन्न जमात. अश्मक लोक हे नेमके कुठे होते, यावद्दल संशोधकांत मतभेद आहेत. वेदांत यांचा उल्लेख आढळत नाही. पुराणांत अश्मक आणि मूलक यांचे निर्देश पुष्कळदा जोडीने येतात. या दोन्ही जमाती एकाच वंशाच्या शाखा असाव्या. मूलक हा अश्मकाचा पुत्र होता, असे भागवत पुराणात म्हटले आहे (९.९). अश्मकाने पौदन्य नावाची पुरी स्थापिली होती. अस्सक जातकात (२. १५५) हिलाच पोतन किंवा पोतली म्हटले असून, तिचा काशीच्या राज्यात समावेश होता, असेही सांगितले आहे. असंगाच्या सूत्रालंकार या ग्रंथात अश्मकांना सिंधुनदीच्या तीरावरचे एक राष्ट्र म्हटले आहे. अश्मक शब्द हा अश्वक शब्दावरून बनला असावा. ग्रीक लोक ज्यांना अस्पसियन म्हणतात, ते हेच लोक असावे. कारण इराणी अस्प आणि संस्कृत अश्व हे समानार्थक शब्द आहेत. त्यावरून अस्पसियन ही अश्वकांची पश्चिमेकडील एक शाखा होती, असे दिसते. महाभारतात अश्मकांचा उल्लेख असून (भीष्म ९.४४) त्यांनी भारतीय युद्धातही भाग घेतला होता, असे कळते.

अश्मकांविषयी डॉ. केतकर पुढीलप्रमाणे विवेचन करतात – वऱ्हाडच्या सरहद्दीवर म्हणजे अजंटयाच्या आसपासचे अस्सक किंवा अश्मक या नावाने परिचित असलेले राष्ट्र भारतीय युद्धाच्या काळात देखील होते (भीष्म ९). हे अश्मक राष्ट्र याच नावाने वाकाटकांच्या कालापर्यंत देखील विश्रुत होते.

अश्मकांचे अस्तित्व कुरुयुद्धाच्या कालापासून एकसारखे आहे. त्यांचे स्वतंत्र राज्य या नात्याने अस्तित्व तात्पुरते उदयनकाली नष्ट झाले होते काय, असा प्रश्न उत्पन्न होतो. कारण, त्यांचा उल्लेख कथासरित्सागरात आढळत नाही. अश्मकांचे पंचवीस राजे नंदपूर्वकालीच झाले, अशी साक्ष मत्स्यपुराणात पुढील ओळीत मिळते –

**कलिंगाश्चैव द्वात्रिंशद् अश्मकाः पंचविंशतिः ।**

नवनंदांपूर्वी अश्मक राजे २५ होऊन गेले व दर राजास १५ वर्षे याप्रमाणे नंदागमकालापूर्वी ६२५ वर्षे वजा केली, म्हणजे अश्मक राज्याच्या प्रारंभीचा काळ येतो. नंदांनी ज्या वेळी मगध राज्य ताब्यात घेऊन पुढे इतरही राज्ये जिंकली आणि सर्व क्षत्रिय वंश नाहीसे केले, तेव्हा अश्मक वंशदेखील नाहीसा झाला.

या अश्मक वंशाच्या ताब्यात काही दिवस तरी विदर्भाचे राज्य होते. अश्मक राष्ट्राविषयी वाङ्मय थोडेच उपलब्ध आहे.

अश्मक वंशावर संस्कृतात एक काव्य होते आणि ते भामहाच्या कालात वैदर्भी रीतीचे दर्शक म्हणून सुप्रसिद्ध झाले होते. हे काव्य जर उपलब्ध होईल, तर महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासावर आणखी प्रकाश पडेल.

डॉ. अय्यंगार असे समजतात की अश्मक हे यादव होते. महाभारतात अश्मकी राजकन्येचा उल्लेख असून, तिला यादवी म्हटले आहे आणि अश्मक राजाला अभिमन्यूने मारले, असे सांगितले आहे. अश्मकीसंबंधाच्या या उल्लेखावरून अश्मक ही यादवांचीच एक शाखा असावी, असा ऐतिहासिक अर्थ डॉ. अय्यंगार यांनी काढला आहे.

अश्मक हे एक प्राचीन जनपद असून, प्रतिष्ठान ही त्याची राजधानी होती. श्री. भगवानलाल इंद्रजी हे अश्मक म्हणजे खानदेश असे समजतात. डॉ. मिराशी यांच्या मते अश्मक हे खानदेशाचे प्राचीन नाव नव्हे. अश्मक देश गोदातीरी असून, त्यात अहमदनगर व बीड या जिल्ह्यांचा अंतर्भाव होत होता. [ हि. जॉ. ए. इं.; म. ज्ञा. को.; वा. नृ. का.; ए. से. ए. इं.; ट्रा. ए. इं.; पा. का. भा. ]

**अश्मयुग** एक विज्ञानाधिष्ठित आधुनिक युगकल्पना. हे युग ५-६ लक्ष वर्षांपूर्वी सुरू झाले आणि इ. स. पूर्व ५००० च्या सुमारास संपले, असे शास्त्रज्ञांचे अनुमान आहे. ह्या युगाचे तीन स्थूल विभाग मानण्यात आले आहेत – (१) पुराश्मयुग (२) मध्याश्मयुग व (३) नवाश्मयुग. उत्तर आशिया व युरोप या भागांत सापडलेल्या त्या कालातील अश्मास्थी, तसेच प्रस्तरांत व गुहांत सापडलेली चित्रे यांवरून त्या भागाच्या तत्कालीन संस्कृतीवर बराच प्रकाश पडतो. गुहेत राहणारे सिंह, अस्वल, लोकरवाला गेंडा, हिमगज, इत्यादी अनेक प्रचंड भयानक प्राणी त्या काळी मानवाभोवती वावरत होते. त्यांच्यापासून आत्मसंरक्षण करण्यासाठी आदिमानव आपले गट करून जीवन जगत होता.

पुराश्मयुगाच्या प्रारंभी मनुष्य गारगोटीच्या दगडापासून परशूसारखे आयुध बनवीत असे. त्याचा उपयोग पशूंना मारण्यासाठी व कंदमुळे उकरण्यासाठी होत असे. दगडाचे तुकडे पाडून व ते एकमेकांवर घासून ही ओबडधोबड हत्यारे बनविली जात. त्या वेळच्या मानवाला रोजच्या रोज अन्न मिळवून खावे लागे. ते साठवून ठेवणे शक्य नव्हते; कारण गरजेपेक्षा अधिक पदार्थ मिळतच नसावे.

दगडी हत्यारांना लाकडी दांडा लावण्याची प्रथा त्या काळी असावी. धनुष्य-बाणांचाही उपयोग माहीत असावा. त्यामुळे सावजावर दुरून प्रहार करणे शक्य होत असे. गारगोटीच्या किंवा लाकडाच्या घर्षणाने अग्नी उत्पन्न करण्याची कल्पना त्या काळातलीच आहे.

कालांतराने भल्लमुख, शरमुख, पाते, क्रकच, घर्षणी, तासणी, छेदक, दाभण, इत्यादी नानाविध उपकरणे त्या काळातल्या माणसाने बनविली. मध्याश्मयुगात हिमवर्षाव कमी झाल्यामुळे युरोपमध्ये हवामान सुधारले होते. त्या वेळच्या शिकारी मानवाची आयुधे बहुतेक दगडाची, क्वचित हाडांचीही असत; पण ती फार लहान म्हणजे सुमारे एक इंच लांबीची होती.

सर्व प्राचीन धर्मांत आढळणाऱ्या भू-माता व आकाश-पिता यांविषयीच्या कल्पना याच काळातील असाव्या. भू-मातेची प्रतिमा सर्वप्रथम मध्याश्मयुगात सापडते. निसर्गातील नियमित घडामोडी आणि अद्भुत घटना पाहून स्तंभित झालेला तत्कालीन मानव संकटकाळी निसर्गदेवतांची आराधना करू लागला असावा. त्यांच्याशी बंधुत्वाचे, प्रेमाचे नाते जोडून व नृत्य-गायनाने त्यांना प्रसन्न करून त्यांचे सहाय्य मिळविण्याचा प्रयत्न त्याने सुरू केला. प्राण्यांची चित्रे काढून, त्यांच्यावर शरसंधान करून, त्या माध्यमातून खऱ्या पशूंवर मांत्रिक प्रभुत्व मिळविणे, हेही त्या वेळच्या मनुष्याला साधले होते. चामडचाचे ढोल, शंख, इत्यादी वाद्ये करणे; कवडचा, शंख, शिंपले, अस्थी, यांची आभूषणे तयार करणे; गोंदणे, वृक्षांची पाने, साली व पशूंची कातडी, यांची पांघरुणे तयार करून वापरणे, या गोष्टी तो करीत होता.

इ. सनपूर्व २०,००० च्या सुमारास, पृथ्वीच्या इतिहासातील शेवटचे हिमयुग संपल्यानंतर हत्ती, अस्वले, सांबर, इत्यादी प्राणी नामशेष झाले आणि मानवाला मांसाचा तुटवडा पडू लागला. म्हणून त्याने आपोआप उगवणाऱ्या धान्याची पेरणी करून धान्योत्पादन सुरू केले. ते इतके यशस्वी झाले, की त्याला इतर गोष्टी करण्यास भरपूर वेळ मिळू लागला. नवाश्मयुगातील मानवाने आपली अश्म-शस्त्रे घासून अधिक तीक्ष्ण व घाटदार केली. शेतीसाठी नदीचे खोरे अधिक उपयुक्त असल्यामुळे तो नदीकाठी वसाहती करू लागला. शेती, लाकूडतोड, शिकार, शस्त्रनिर्मिती, इत्यादी कष्टाची कामे पुरुषांकडे व घरकामे, शेतीची राखण, ही कामे स्त्रियांकडे, अशी श्रमांची विभागणी त्याच काळात झाली.

त्या काळातील मातीची भांडी उपलब्ध झाली आहेत. अन्न शिजविण्यासाठी लहान व धान्य साठविण्यासाठी मोठी भांडी प्रथम हातांनी बनवून ती कच्चीच वापरीत असत. कालांतराने चाकाचा उपयोग व भाजणे हे शोध लागले. चाकावरून टकळीचा शोध लागला असावा. त्यामुळे सूत कातून कापसाची वस्त्रे बनविणे शक्य झाले.



पुराश्मयुगीन हत्यारे – तापीचे खोरे

त्या कालात स्त्री हीच कुलप्रमुख मानली जात होती. त्या युगातील मानवांना भूमातेचे महत्त्व पटले होते. पृथ्वीच्या मातृत्वाबरोबरच तिच्या धारिणी व कराल अशा उभय रूपांची कल्पना याच युगात उदय पावली असावी.

धातुयुगाच्या आरंभी जी प्रचंड दगडी स्मारके दफनभूमीवर उभारलेली आढळली आहेत, ती अश्मयुगातीलच असावी असे वाटते. ती तत्कालीन मानवाच्या जीवनातील व विचारांतील परिवर्तन दर्शवितात. त्या काळच्या माणसाला मृत मनुष्याविषयी आदर वाटू लागला होता व मृत्यूनंतरही त्याच्या अन्नपाण्याची व्यवस्था करणे, हे धार्मिक कर्तव्य वाटू लागले होते. मनुष्याच्या मालकीच्या वस्तू शवाजवळ ठेवण्याची प्रथा याच कल्पनेतून उगम पावली आहे.

वरील सर्व ज्ञान युरोपात झालेल्या सशोधनावरून प्राप्त झालेले आहे. भारतातील अश्मयुग नेमके केव्हा सुरू झाले, यासंबंधी तज्ज्ञांचे अजून एकमत झालेले नाही. भारतातल्या भिन्न भागांत जी आयुधे व उपकरणे सापडली आहेत, त्यांचे नीट वर्गीकरण अद्याप झालेले नाही. त्यामुळे भारतातील अश्मयुगासंबंधी विशेष ज्ञान अद्याप प्राप्त झालेले नाही. तथापि गंगा, साबरमती, नर्मदा, तापी, महानदी, गोदावरी, कृष्णा, तुंगभद्रा, ब्राह्मणी, पेन्नार, पालार, इत्यादी नद्यांच्या खोऱ्यांत गारगोटी व तत्सदृश पाषाणांचे परशू अनेक ठिकाणी सापडले आहेत. ते बदामी आकाराचे, धारदार, पण ओबडधोबड आहेत. युरोपातील अश्मयुगाच्या प्रारंभीची उपकरणे आणि हे परशू यांत बरेच साम्य आहे. त्यावरून पुराश्मयुगात भारतात सर्वत्र आदिमानवाची वस्ती होती, असे वाटते. या मानवाने प्रथम पंजाबच्या वायव्य भागातील डोंगराळ प्रदेशात प्रवेश केला



नवाश्मयुगीन हत्यारे – नागार्जुनकोंड

असावा, असे एक अनुमान आहे. काही शास्त्रज्ञांनी दुसरे एक अनुमान केले आहे, की भारतीय आदिमानव प्रथम दक्षिण भारतात उदय पावला आणि तिथून पहिल्या हिमयुगाच्या शेवटी पंजाबकडे सरकला.

मध्याश्मयुगातील छोटी उपकरणे भारतात सर्वत्र सापडली आहेत, पण ती भूपृष्ठाजवळ सापडल्यामुळे त्यांचा कालनिर्णय करता येत नाही. कर्नाटकातील ब्रह्मगिरी, पंचमढी येथील महादेव डोंगर, पंजाबमधील उचली, गुजरातमधील लांघणाज व हिरपूर या ठिकाणी सापडलेली उपकरणे मात्र मध्याश्मयुगीन असावी. गुजरातमध्ये मानवांचे सांगाडे व प्राण्यांची हाडेही सापडली आहेत. तिथे नंतरच्या काळातील अवशेष नाहीत. त्यावरून तिथली दगडी आयुधे अत्यंत प्राचीन असावी. त्या वेळी प्रेते पुरण्याची चाल होती. कर्नाटक, गुजरात, काश्मीर, इ. प्रदेशांत नवाश्मयुगीन तीक्ष्ण व घोटीव आयुधे सापडली आहेत. ती गारगोटीची नसून, उत्तम प्रतीच्या हिरव्या दगडाची आहेत. तशी आयुधे भारतात सर्वत्र सापडतात; पण त्यांच्याबरोबरच नंतरच्या काळातील अवशेषही सापडले आहेत. त्यामुळे त्यांच्या कालनिर्णयाला अडचण पडत आहे. त्या काळच्या भारतातील मानवाला अग्नीचा उपयोग माहीत होता, मातीची भांडी करता येत होती, तो धान्योत्पादन व पशुपालन करीत होता, असे अनुमान काही तज्ज्ञांनी केले आहे. पण त्याला सबळ पुरावा अजून उपलब्ध झालेला नाही.

भारतात सर्वत्र आढळणारा नवाश्मयुगीन सस्कंध परशू आग्नेय व दक्षिण आशियातील विस्तीर्ण भूप्रदेशात किल्येक मागसलेल्या जमातींच्या हाती आढळतो. त्यावरून तो ऑस्ट्रिक वंशाशी संबद्ध असावा आणि ऑस्ट्रिक वंशाचे लोक भारतातील नवाश्मयुगीन संस्कृतीचे जनक असावे, असे वाटते. नारळ, जांभूळ, लिंबू, तांबूल, भोपळा, कापूस, कापड, कोंबडा, हत्ती, इत्यादी शब्द ऑस्ट्रिक भाषा-गटांतूनच भारतीय भाषांत आले आहेत, असे भाषा-शास्त्रज्ञांनी दाखवून दिले आहे.

गेल्या पंचवीस-तीस वर्षांतील पुरातत्त्वीय संशोधनामुळे अश्मयुगाविषयी उपलब्ध झालेली माहिती डॉ. शां. भा. देव यांनी आपल्या पुस्तकात दिली आहे, ती अशी –

केरळ आणि गंगा-यमुना-दुआब हे प्रदेश सोडून भारतात सर्वत्र आद्य पुराश्मयुगीन हत्यारे सापडली आहेत. मध्य-पुराश्मयुगातील हत्यारांचा आकार लहान, घडणीचे तंत्र वेगळे व दगड उत्कृष्ट पोताचा असतो. अशी हत्यारे भारतात अनेक ठिकाणीं सापडली आहेत. गोदावरी, प्रवरा, मुळा, तापी, व नर्मदा या नद्यांच्या काठी तत्कालीन प्राण्यांच्या अश्मास्थींचे अवशेषही सापडले आहेत. यांचा काल दीड लक्ष ते पन्नास हजार वर्षे इतका प्राचीन आहे.

उत्तर-पुराश्मयुगातील हत्यारे अलिकडे आंध्र प्रदेशात व

उत्तर प्रदेशात सापडली आहेत. त्यांची पाती लांब व टोके अणकुचिदार असतात.

मध्याश्मयुगाचे अवशेष भारतात फारसे सापडलेले नाहीत. गुजरातेत लांघणाज व बंगालमध्ये विरभानपूर येथे त्या काळातली लघु-अश्मशस्त्रे सापडली आहेत. लांघणाज येथे मुडपलेल्या अवस्थेत पुरलेले मानवी सांगाडेही सापडले आहेत.

नवाश्मयुगातील वसाहतींचे अवशेष मुख्यत: काश्मीर, कर्नाटक, आंध्र, आसाम व अरुणाचल या प्रदेशांत मिळाले आहेत. त्यांचा काल स. पू. २००० च्या आसपास असावा. पूर्व भारतात नवाश्मयुगीन दगडी कुऱ्हाडी सापडल्या आहेत. एका जागी मानवाचे गर्तावास आणि प्रेते पुरण्याच्या जागा आढळल्या आहेत. या कालखंडात मानव शेती करून स्थिर जीवन जगू लागला होता. त्यांची दगडी हत्यारे घोटून गुळगुळीत व धारदार केलेली असत. मातीची भांडी बनविणे व वस्त्रे विणणे या कला त्याला अवगत होत्या. शेतीला उपयुक्त अशी जनावरे तो पाळू लागला होता. त्याआधी मनुष्य सहज उत्पन्न झालेले अन्न गोळा करून खात असे. या कालखंडात तो अन्नपदार्थांचे उत्पादन करू लागला. स्थिर जीवनामुळे वस्तुसंचय व व्यापार सुरू झाला. अन्न भरपूर मिळाल्यामुळे लोकसंख्या वाढू लागली. इतर कलांची प्रगती होऊन कारागीरवर्ग निर्माण झाला.

काश्मीरमध्ये इ. स. पू. २३७५ च्या सुमारास नवाश्मयुगीन वसती होती. ते लोक जमिनीत खड्डे खोदून, वर गवती छप्पर घालून राहत आणि मातीच्या चुली व भांडी हातांनी बनवीत. धारदार दगडी कुऱ्हाडीप्रमाणेच ते हाडांच्या सुया, मत्स्यबाण, कोरके व टोकदार काडचा वापरीत. त्यानंतरच्या वसतीत मातीची व विटांची घरे आढळतात.

कर्नाटकात अनेक ठिकाणी नवाश्मयुगातील मातीची भांडी, दगडी पाटे व वत्ते, गोल घरे यांचे अवशेष सापडले आहेत. त्या वसतीचा काल इ. स. पू. २३००-१५०० असावा. पूर्व भारत व मध्य भारत या प्रदेशांतही नवाश्मयुगीन धारदार हत्यारे सापडली आहेत. [ वे. ए.; क. हे. इं.; पुरातत्त्व विद्या ]

**अश्मा** ब्राह्मणांच्या और्ध्वदेहिकात आवश्यक असा एक दगड. चितेभोवती प्रदक्षिणा करताना पाण्याने भरलेले मडके ज्या दगडाने फोडतात, तोच दगड अश्मा म्हणून प्रेतदहनानंतर घरी आणतात. मृताला उद्देशून दहा दिवस त्या दगडावरच तिलांजली देतात. या तिलांजलिदानाचा सूत्रात उल्लेख नाही; पण रूढी मात्र तशी आहे. मृताचा आत्मा दहा दिवसपर्यंत त्या अश्म्यात राहतो, अशी कल्पना याच्या मुळाशी असावी. यालाच अन्य जातींत 'जीवखडा' म्हणतात.

**अश्व** एक पाळीव पशू. वैदिक वाङमयात अश्व हा शब्द घोडा या अर्थी वापरलेला आढळतो. याला अर्वत, वाजिन, हय, इत्यादी अन्य नावेही आहेत. याची उत्पत्ती पुढील सात प्रकारांनी सांगितली आहे –

अमृताद् वाष्पतो वह्नेर्वेदेभ्योऽण्डाच्च गर्भतः।
साम्नो हयानामुत्पत्तिः सप्तधा परिकीर्तिता ।

अर्थ – अमृत, वाष्प, अग्नी, वेद, अंड, गर्भ व साम या सातांपासून घोडचाची उत्पत्ती होते.

शिवतत्त्वरत्नाकर नामक ग्रंथात अश्वशास्त्रावर एक प्रकरण आहे. त्यात अनेक पुराण-कथा दिल्या आहेत. एका कथेत असे सांगितले आहे की पूर्वी अश्वांना पंख होते; ते इंद्राच्या आज्ञेवरून शालिहोत्र मुनीने कापून टाकले. त्या ग्रंथात घोडचांच्या विविध जाती दिलेल्या असून, त्यांची शुभाशुभ लक्षणेही सांगितली आहेत. प्राचीन मराठी जैन ग्रंथात घोडे व त्यांच्या जाती यासंबंधी माहिती आहे. गुणकीर्तीने शालिहोत्रकृत अश्वशास्त्राला अनुसरून काही माहिती दिली आहे. पाहा – घोडा. [ प्रा. म. जै. सा.; डॉ. थिटे, नवभारत, एप्रिल १९७४ ]

**अश्वघोष** (इ. स. चे १ ले शतक) संस्कृत भाषेचा एक महाकवी. हा कनिष्काचा समकालीन असल्याबद्दल सर्वांचे मतैक्य आहे. कनिष्क आणि अश्वघोष ही दोन नावे इतिहासाने जोडून टाकलेली आहेत. अश्वघोष प्रथम मगधनरेशाच्या दरबारात होता. कनिष्काने त्याचा पराभव केल्यावर अश्वघोषाला तिथून पुरुषपुराला नेले व शेवटपर्यंत तो कनिष्काच्या आश्रयाने राहिला, अशी आख्यायिका आहे.

हा मूळचा साकेताचा (अयोध्या) रहिवासी होता. त्याने आपल्या आईचे नाव सुवर्णाक्षी असे सांगितले आहे (सौंदरनंद); पण बापाचे नाव सांगितले नाही. हा पुढे बौद्ध बनला असला, तरी मूळचा ब्राह्मण होता. विद्यार्थिदशेत त्याला ब्राह्मणी धर्माचे शिक्षण मिळाले होते. तो वेदवेदांगपारंगत होता. महाभारत, पुराणे, दर्शने, अर्थशास्त्र, नाटचशास्त्र, इ. विषयही त्याने चांगले अभ्यासले होते, याबद्दल त्याच्याच काव्यकृतींतून पुरावे मिळतात. हिंदू देव-देवतांचे आणि पुराणांतल्या कथांचे किती तरी संदर्भ त्याच्या काव्यात आढळतात.

विद्या पूर्ण झाल्यावर तो निरनिराळ्या पंडितांशी खंडनमंडनात्मक शास्त्रार्थ करू लागला. 'त्याला सोडविता आला नसता, असा एकही प्रश्न नव्हता; त्याने खोडून टाकला नसता, असा एकही आक्षेप नव्हता. ज्याप्रमाणे सोसाटचाचा वारा जुनाट वृक्ष मोडून टाकतो, त्याप्रमाणे तो आपल्या प्रतिस्पर्ध्याचा पाडाव करीत असे.' असे त्याच्या तिबेटी चरित्रकाराने लिहून

ठेवले आहे. युआन च्वांगने तर त्याला पांडित्यातला प्रतिसूर्यच म्हटले आहे.

पण अशाही प्रतिसूर्य पंडिताला पार्श्व नावाचा एक वृद्ध आणि महापंडित बौद्ध भिक्षू भेटला आणि त्याच्याशी वाद जुंपला असता अश्वघोषाला पराभूत व्हावे लागले. त्याच्याकडूनच मग अश्वघोषाने बौद्ध धर्माची दीक्षा घेतली. तो भिक्षू बनला. लवकरच तो नागार्जुन, वसुमित्र, इत्यादी बौद्ध पंडितांच्या तोडीचा मानला जाऊ लागला. आपल्या धर्माचे नियम तो कटाक्षाने पाळी. तो जसा पंडित होता, तसाच सुरेल गायकही होता. प्रवचन आणि गायन या दोन्ही साधनांच्या द्वारे त्याने बौद्ध धर्माचा प्रचार केला व अनेकांना त्या धर्माची दीक्षाही दिली. त्याची संगीतमय वाणी चालू झाली की रस्त्यावरून जाणारा घोडादेखील आपला 'फुरफुर' घोष थांबवून स्तब्ध होई, अशी आख्यायिका आहे. म्हणूनच त्याला 'अश्वघोष' असे नाव मिळाले, असे म्हणतात. हीनयान पंथाच्या सिद्धान्ताशी अश्वघोषाचे विचार मिळते-जुळते आहेत. त्यावरून प्रारंभी महायान व मूळ बौद्ध धर्म यांत विशेषसे अंतर नव्हते, असे दिसते. महायान पंथाच्या स्थापनेपूर्वी अश्वघोष हा सर्वास्तिवादी असावा. पुढे तो महायान पंथाच्या संस्थापकांपैकी एक बनला. कनिष्काने बोलाविलेल्या चतुर्थ धर्मपरिषदेची संघटना त्यानेच केली. तोच तिचा संचालकही होता. त्याचे विचार उदार होते. त्याच्या हृदयात भक्ती आणि करुणा होती. तत्कालीन कारागिरांना बुद्धाची मूर्ती घडवायला लावून त्याने कलेला धर्मोन्मुख बनविले व धर्मकाजासाठी परंपरागत संस्कृत भाषेलाच प्राधान्य दिले.

अश्वघोषाने पुढील ग्रंथ लिहिले आहेत –

१ बुद्धचरित (महाकाव्य)
२ सौंदरनंद ( „ )
३ गंडिस्तोत्रगाथा (धार्मिक लघुकाव्य)
४ सूत्रालंकार (कथासंग्रह)
५ शारीपुत्रप्रकरण (नाटक)
६ महायान श्रद्धोत्पादसूत्र (तत्त्वज्ञानात्मक ग्रंथ)
७ वज्रसूची (वर्णव्यवस्थेविरुद्ध वादग्रंथ)

या सर्वांत बुद्धचरित हे त्याच्या प्रतिभेचे मधुर महाफल आहे. बुद्धाभोवती अतिशयोक्त दंतकथांचे जे जाळे निर्माण झाले होते, ते तोडून त्याने शुद्ध व सरस असे बुद्धचरित्र मानवजातीला दिले. धर्मप्रेम आणि स्वतःची वर्णनशैली या साधनांनी त्याने त्या काव्याला रमणीय आणि आस्वाद्य बनविले आहे. कल्पना, कथा आणि वर्णन या तीन्ही गुणविशेषांचा त्या काव्यात त्रिवेणीसंगम झाला आहे. अश्वघोषाच्या कोणत्याही कृतीत धर्मपरिवर्तनाचा अदम्य उत्साह दिसून येतो. मतामतांच्या जंजाळात न पडता माणसाने बुद्धप्रणीत अष्टांगिक मार्गाचे अनु... करून जीवन सार्थकी लावावे, असा त्याचा आग्रह आहे. बुद्ध... संदेश त्याने रसाळ करून जनतेच्या हृदयापर्यंत पोचविला... त्याचे महत्कार्य होय.

गहन तात्त्विक सिद्धान्त दृष्टान्ताने विशद करून सांग... त्याची हातोटी विलक्षण आहे. निर्वाणाची कल्पना त्याने पु... प्रमाणे सांगितली आहे –

**दीपो यथा निर्वृतिमभ्युपेतो नैवावनिं गच्छति नान्तरिक्षम्।**
**दिशं न कांचिद्विदिशं न कांचित् स्नेहक्षयात्केवलमेति शान्तिम्॥**

(सौंदरनंद १६.२...)

अर्थ – दिवा विझला की तो पृथ्वीवरही जात नाही... अंतरिक्षातही जात नाही. कुठल्या दिशेलाही जात नाही... कुठल्या विदिशेलाही जात नाही. तर तेल संपल्यामुळे... (जिथल्या तिथे) शांत होतो.

अश्वघोषाने आपल्या काव्याची प्रेरणा वाल्मीकीच्या रा...यणाकडून मिळविली. मानवी जीवनाची क्षणभंगुरता, हे... प्रतिपाद्य आणि करुणा हा महामंत्र आहे.

संन्यास घेतल्यावर फिरून गृहस्थ बनण्याची आकांक्षा... णाऱ्या सुंदरनंदाविषयी त्याने खेद व्यक्त केला आहे –

**कृपणं बत यूथलालसो महतो व्याघ्रभयाद्विनिःसृतः।**
**प्रविवक्षति वागुरां मृगश्चपलो गीतरवेण वञ्चितः॥**

अर्थ – महान व्याघ्रभयापासून (एकवार) सुटलेला ... मृग कळपात शिरण्याच्या लालसेने (पुनश्च मागे वळतो) ... गीतध्वनीने फसविला जाऊन पुन्हा व्याधाच्या ... (जाळ्यात) पडण्याची इच्छा करतो, हे खरोखर खेदजनक ...

अश्वघोषाची काव्यशैली वैदर्भी आहे. तिच्यात ... माधुर्य, स्वाभाविकता व ओघ हे गुण भरलेले आहेत. ... दृष्टान्त विषयाला अनुरूप तर असतातच; शिवाय ते ... चितही वाटतात. तर्कशुद्ध विचार व मधुर भाव यांचा ... काव्यात मनोज्ञ संगम झाला आहे. शृंगार व करुण या ... त्याने वर्ज्य मानले नसले, तरी त्याच्या काव्याचा प्रधान रस ... हाच आहे. त्याने आपले व्याकरणपटुत्व ठायी ठायी प्रक... आहे; तसेच काही ठिकाणीं आर्षप्रयोगही केले आहेत. ... उठाव देणारे विविध छंद वापरण्यात तो पटाईत आहे. ... संप्रदायात त्याला फार मोठा मान मिळाला, इतकेच ... तर सातव्या शतकापर्यंत तो बोधिसत्त्व या रूपाने पूजा... बनला. [ सं. सा. इ.; सं. सा. सो. इ.; म. ज्ञा. को.]

**अश्वत्थ** (१) पिंपळाचे झाड. 'अश्वत्थं जलम् अस्य ... मले सिक्तत्वात्' (= मुळात शिंपल्यामुळे ...

पाणी दुसऱ्या दिवशी टिकत नाही असा वृक्ष) म्हणजे अश्वत्थ होय, अशी याची व्याख्या आहे. अश्वत्थाची आणखी एक उपपत्ती तैत्तिरीय ब्राह्मणात पुढीलप्रमाणे दिली आहे – एकदा अग्नी देवांपासून निघाला व त्याने अश्वरूप धारण केले. तो त्या स्वरूपात अश्वत्थ वृक्षावर एक संवत्सरपर्यंत राहिला, म्हणून त्या वृक्षाला अश्वत्थ म्हणू लागले (१.१.९१).

अश्वत्थ हा वेदपूर्वकालापासून पूज्य ठरला आहे. ऋग्वेदात व वेदोत्तर वाङ्मयातही याचे अनेक उल्लेख आढळतात. याच्या लाकडाच्या नौका बनवीत असल्याचे ऋग्वेदावरून कळते (ऋ. १.१३५.८; १०.९७.५). यज्ञात अग्निमंथन करण्यासाठी उत्तरारणी अश्वत्थाची करीत. सोमरसासाठी अनेक पात्रे अश्वत्थाच्या लाकडापासून तयार करीत असत. या वृक्षाला वैबाध असेही नाव आहे. याचे कारण हा दुसऱ्या वृक्षांवर आपली



अश्वत्थ वृक्ष

मुळे रुजवून मूळ वृक्षाची पाळेमुळे नाहीशी करतो, हे आहे (अथर्व. ३.६). अश्वत्थाचे पिप्पल हे नाव सूत्रवाङ्मयात आढळते. पिप्पली हे त्याचे फळ होय. याची फळे गोड असून, पक्षी ती खातात (ऋ. १.१६४.२० – २२). तिसऱ्या स्वर्गात अश्वत्थ हे देवसदन मानले आहे (अथर्व. ५.४.३; छांदोग्य. ८.५३; कौषी. १.३).

वेदपूर्वकाली भारतात जी सिंधुसंस्कृती नांदत होती, तिच्यामध्ये अश्वत्थाला निर्मितीचे प्रतीक मानलेले दिसते. तिथे सापडलेल्या एका मुद्रेत एक देवता अश्वत्थाच्या दोन फांद्यांमध्ये उभी आहे. दुसऱ्या एका मुद्रेत पिंपळाचा एक रोपा वर येत असून दोन एकशृंग देवता त्याला लपेटून त्याचे रक्षण करीत आहेत. 'महिषमुंड' ही सिंधुजनांची श्रेष्ठ देवता असून, ती अश्वत्थनिवासिनी होती. हा महिषमुंड देव सिंधुसंस्कृतीत सृष्टिकर्ता दिसतो. वैदिक प्रजापतीचे ते पूर्वरूप असावे. ऋग्वेदात अश्वत्थाला यम व पितर यांचे निवासस्थान मानले आहे. यामुळेच गयेसारख्या क्षेत्रात अश्वत्थाच्या मुळात पिंडदान करण्याची पद्धत पडली असावी. बौद्धांनी अश्वत्थाला बुद्धाचे प्रतीक मानले आहे. बुद्धाला ज्या वृक्षाखाली बोधी प्राप्त झाली, तो वृक्ष अश्वत्थच होता. पुराणकालात या वृक्षाला फार महत्त्व मिळाले. श्रीकृष्णाने गीतेत 'अश्वत्थः सर्ववृक्षाणाम्' (= सर्व वृक्षांमध्ये मी अश्वत्थ आहे) असे सांगितले आहे (१०.२६). चातुर्मासमाहात्म्य, कार्तिक व श्रावण माहात्म्ये, व्रतराज, व्रतकौमुदी, इ. ग्रंथांतून याची अनेक व्रते वर्णिली आहेत. अश्वत्थमाहात्म्याची एक कथा पद्मपुराणात दिली आहे, ती अशी –

धनंजय नावाचा एक विष्णुभक्त ब्राह्मण होता. त्याची सत्त्वपरीक्षा पाहण्यासाठी विष्णूने त्याला दरिद्री केले. त्यामुळे आप्तेष्टांनी त्याचा त्याग केला. तो थंडीच्या दिवसांत शेकोटी पेटवून स्वतःचे रक्षण करी. त्यासाठी लाकडे तोडण्याच्या उद्योगात असता त्याने एकदा पिंपळाची फांदी तोडली. त्या क्षणी विष्णू तिथे प्रगट झाला. त्याने ब्राह्मणाला सांगितले, की 'तू पिंपळावर कुऱ्हाड घातलीस, त्यामुळे माझ्या सर्वांगी जखमा झाल्या आहेत.' ब्राह्मणाला ते ऐकून दुःख झाले. तो कुऱ्हाडीने स्वतःचे मस्तक तोडायला निघाला. तेव्हा विष्णू प्रसन्न होऊन त्याला म्हणाला 'तू नित्य अश्वत्थपूजा करीत जा.' ब्राह्मण त्या दिवसापासून अश्वत्थपूजा करू लागला व कुबेराने त्याचे दारिद्र्य नष्ट केले (क्रियाखंड अ. १२).

अश्वत्थमाहात्म्याचा निष्कर्ष पुढील श्लोकात सांगता येईल –

**अश्वत्थः सर्ववृक्षाणां राजा ब्राह्मणवर्णकः ।**
**अश्वत्थः पूजितो येन सर्वं संपूजितं भवेत् ।।**

अर्थ – अश्वत्थ सर्व वृक्षांचा राजा असून, तो ब्राह्मण वर्णाचा आहे. ज्याने अश्वत्थ पूजिला, त्याने सर्व काही पूजिले असे होईल.

अश्वत्थ हा प्रथम सृष्टिकर्त्या प्रजापतीचे प्रतीक होता. पण पुढे तो विष्णुरूप मानला गेला. कन्येला वैधव्य येऊ नये म्हणून प्रथम तिचा अश्वत्थाशी विवाह करावा, असे संस्कारप्रकाशात सांगितले आहे. या प्रसंगी विष्णुप्रतिमेची पूजा करून ती ब्राह्मणाला दान देतात. स्त्रिया संतानप्राप्तीसाठी अश्वत्थाला प्रदक्षिणा घालतात. नष्ट झालेली व्यक्ती किंवा वस्तू परत मिळावी, म्हणूनही अश्वत्थाला प्रदक्षिणा घालण्याची रूढी आहे. ज्ञाने-

श्वरांची आई आपला परागदा झालेला पती परत यावा म्हणून अश्वत्थाचीच उपासना करीत होती, असे त्यांच्या चरित्रात लिहिलेले आहे. स्त्रिया पिंपळाची पूजा क र ण्या पू र्वी त्याला सूत गुंडाळतात, ही प्रथाही फार पुरातन आहे. श्रीमती दुर्गा भागवत यांनी या प्रथेचे मूळ पुढील लोककथेच्या द्वारे सांगितले आहे –

खोडियाल व पिंपळाज या दोन देवकन्या होत्या. तहान-भूक कशी असते हे पाहण्यासाठी त्या मृत्युलोकी आल्या. त्या दोघी विंध्यपर्वतावर वड व पिंपळ यांच्या रूपाने अवतरल्या. शेतीच्या कामास प्रारंभ करतेवेळी तिथल्या माणसांनी त्यांना पाणी व नरमांसाचा नैवेद्य दिला. तेव्हापासून त्यांना भूक व तहान लागू लागली आणि त्या माणसाच्या अंकित झाल्या. हळूहळू त्यांची भूक वाढली. पण पुढे त्यांना मनुष्याचे मांसच मिळेनासे झाले. म्हणून मग माणसांनी त्यांना ऊस व गहू आणून दिले. खोडियाल त्याने तृप्त झाली; पण पिंपळाज नरबळीकरिता अडून बसली. तिने रोग उत्पन्न करून नरबली मिळविले. खोडियालला त्या माणसांची दया आली. तिने पिंपळाजला दोरीने बांधून ठेवले. पिंपळाज पराधीन झाली व गयावया करू लागली. खोडियाल तिला म्हणाली की 'तू जेवढे नरबली घेतलेस, तेवढे परत करशील तर माणसे तुला पूजतील.' तेव्हापासून पिंपळदेवता घेतलेले बळी पुत्ररूपाने स्त्रियांना परत करू लागली. स्त्रियाही सूत गुंडाळून तिला बांधण्याचे कृत्य अजूनही करतात.

अश्वत्थाचे उपनयन करतात व त्याचे तुळशीशी लग्नही लावतात. संस्कारविधीत अश्वत्थाच्या समिधांची गरज असते. ग्रहयज्ञात गुरूसाठी अश्वत्थाच्या समिधा वापरतात. शनिवारी सूर्योदयापूर्वी अश्वत्थाची पूजा केल्यास संतती आणि संपत्ती लाभते, असे अश्वत्थाच्या व्रतकथांतून सांगितले आहे. विशेषतः श्रावणातल्या शनिवारी ही अश्वत्थपूजा करतात.

(२) सृष्टिरूप वृक्ष. 'अ+श्व+स्थ' (= आज आहे, उद्या नाही असा.) सतत परिवर्तनशीलता हा याचा धर्म आहे. त्यामुळे सृष्टी सदैव ताजी टवटवीत असते. या वृक्षाचे छेदन शक्य नाही. कारण तो नित्य आहे. हा वृक्ष वेद्य आहे. याच्या ज्ञानानेच मोक्ष मिळतो. ऋग्वेदात याला वरुणाच्या लोकातला वृक्ष म्हटले असून, त्याच्या किरणांचे मूळ वर आहे व किरण खाली आहेत, असे सांगितले आहे (१.२४.७). 'द्वा सुपर्णा' श्रुतीत ज्या 'पिप्पल' फळाचा उल्लेख आहे ते याच विश्ववृक्षाचे फल होय (ऋ. १.१६४.२०). हे रूपक पुढे उपनिषदांत उतरले –

**ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थः सनातनः ।**
**तदेव शुक्रं तद् ब्रह्म तदेवामृतमुच्यते ।।**

(कठोप. ६.१).

अर्थ–ज्याचे मूळ वर व शाखा खाली आहेत असा हा अश्वत्थ सनातन आहे. तेच शुक्र, तेच ब्रह्म व तेच अमृत असे म्हटले आहे.

उपनिषदांतून हे रूपक पुढे गीतेतही आले आहे (१५.१.४). सारांश, परमेश्वराच्या मायेने उत्पन्न झालेले हे जग म्हणजे एक मोठा अश्वत्थ वृक्षच होय. सांख्य या दृश्य सृष्टीला म्हणजेच या अश्वत्थाला 'प्रकृतीचा विस्तार' म्हणतात व वेदान्ती 'मायेचा पसारा' समजतात. अनुगीतेत यालाच ब्रह्मवृक्ष व ब्रह्मवन म्हटले आहे (म. भा. अश्व. ३५ व ४७). एका सूक्ष्म बीजापासून ज्याप्रमाणे विस्तृत व गगनचुंबी वृक्ष बनावा, तसा एका अव्यक्त परमेश्वरापासून हा सृष्टिरूप वृक्ष विस्तारला आहे, अशी ही कल्पना आहे. प्राचीन अन्य धर्मांतही सृष्टीला 'विश्ववृक्ष' असेच म्हटलेले आढळते. [ हिं. ध.; वै. नि.; ऐ. इं.; क. ब्र.; म. ज्ञा. को.; गी. र.; म. जी. २.]

## अश्वत्थपट व्रत

एक काम्य व्रत. वंगाली स्त्रिया वैशाख महिन्यात हे व्रत करतात. यात अश्वत्थवृक्षाची पूजा करायची असते. फल – सुख व शांती यांची प्राप्ती.

## अश्वत्थप्रदक्षिणा व्रत

एक काम्य व्रत. स्नानादी नित्य कर्मे आटोपून पिंपळाखालची जागा सारवतात. मग गेरूने वृक्षमूळ रंगवितात. स्वस्तिवाचन, ऋत्विग्वरण, संकल्प इ. झाल्यावर प्रथम विष्णूची व नंतर अश्वत्थाची पूजा करतात. मग विष्णुसहस्रनाम म्हणत वा भगवच्चिंतन करीत पिंपळाला प्रदक्षिणा घालतात. प्रदक्षिणांची संख्या हेतूला अनुसरून एक लक्ष ते बारा लक्षांपर्यंत असते. या प्रदक्षिणा नित्य ठराविक संख्येने घालून पुऱ्या करायच्या असतात. व्रतकालात यम-नियम पाळावे लागतात. प्रदक्षिणांची संख्या पुरी झाल्यावर पुढीलप्रमाणे उद्यापन करतात –

ऋत्विग्वरण, घृतपायस व चरू यांचे हवन, तर्पण, तिल-राशीवर सुवर्णाची अश्वत्थप्रतिमा स्थापून तिचे पूजन व दान, गोप्रदान, दक्षिणा व ब्राह्मणभोजन.

या व्रताचा दुसरा पर्याय असा – कार्तिक मासात महिनाभर अश्वत्थवृक्षाखाली राधा-दामोदरांची पूजा व लक्ष प्रदक्षिणा, रात्री जागरणं, कथाकीर्तन व व्रताच्या शेवटी वरीलप्रमाणे उद्यापन. व्रताचे फल – पुत्रप्राप्ती, गतवैभवाची पुनःप्राप्ती, उत्पातशांती, रोगनाश व सौख्यलाभ. [ व्रतराज ]

## अश्वत्थविद्या

विश्वविद्या किंवा आध्यात्मिक सृष्टिरहस्य. अव्यय, अक्षर व क्षर या तीन तत्त्वांची समाप्ती म्हणजे हे विश्व होय. यांच्या अतीत असलेल्या ... तत्त्वाला परात्पर म्हणतात. परात्पराच्या पलीकडे एक ...

आहे. त्याला निर्विशेष म्हणतात. परात्पराचे स्वरूप रसमय असून, त्याच्याच ठिकाणी महामायेच्या बलाने अव्ययरूपी 'अश्वत्थ' वृक्षाचा म्हणजेच विश्वाचा जन्म होतो. अशी विश्वे अनेक असतात.

'अश्ववत् तिष्ठति इति अश्वत्थः' = अश्वाप्रमाणे तीन पाय स्थिर व चौथा उचलून उभा राहतो, तो अश्वत्थ होय. हे प्रजापतीचे पूर्ण रूप आहे. त्याचा विश्वरूप पाय प्रत्येक क्षणाला परिवर्तनशील असतो. विश्व हे 'अश्व' आहे. 'न श्वः इति अश्वः'= जे आज आहे; (पण) उद्या नाही. आत्मा याच्या विरुद्ध म्हणजे आज आहे तोच उद्याही आहे. विश्व हे अलातचक्र (जळते कोलीत फिरवल्याने दिसणारे चक्राकार वर्तुळ) आहे. ते सारखे फिरत असते. प्रत्येक क्षणी त्याचा समोरचा बिंदू पुढे सरकून त्याच्या जागी दुसरा येत असतो. सारे बिंदू सतत बदलत असतात. जो बदलत नाही तो नामरूपातीत 'आभ' व जे बदलते ते नामरूपात्मक 'अम्व' होय. अश्वत्थविद्येचे मूळ रस-बल यांच्या तारतम्यात आहे. रस म्हणजे बलाकडे असलेली ओढ किंवा सिसृक्षा. बल म्हणजे रसाकडे ओढ घेणारी बुभुक्षा. रस म्हणजे शांत, स्थिर अशी भूमी. बल म्हणजे क्षुब्ध, चंचल अवस्था. या दोहोंचे सम्यक ज्ञान म्हणजेच अश्वत्थविद्या होय. [ डॉ. वासुदेवशरण अग्रवाल – आजकल, मे १९५७ ]

## अश्वत्थसेचन व्रत

एक काम्य व्रत. चैत्रादी चार महिने हा व्रतकाल. नित्य घडाभर पाणी अश्वत्थमुळात घालणे हा याचा विधी आहे. याचा मंत्र असा –

सिञ्चाम्यश्वत्थ ते मूलं मम सन्ततिवृद्धये ।
अश्वत्थरूपो भगवान् प्रीयतां मे जनार्दनः ।।

अर्थ – हे अश्वत्था ! माझ्या संतानवृद्धीसाठी मी तुझे मूळ शिंपीत आहे. (या कृत्याने) अश्वत्थरूपी भगवान मजवर प्रसन्न होवो. [ व्रतराज ]

## अश्वत्थोद्यापन

अश्वत्थाचे झाड लावून आठ, अकरा किंवा बारा वर्षे झाल्यावर त्याच्याभोवती पार बांधून त्याचे विधिपूर्वक उद्यापन करतात. अश्वत्थाला लागून पाच किंवा नऊ कुंडे असलेला मंडप घालतात. प्रथम संकल्पपूर्वक विधानास घरी प्रारंभ करून मग मंडपात प्रवेश करतात. आचार्य व इतर ऋत्विज यांची योजना झाल्यावर सर्वतोभद्र व वास्तुमंडल अशी दोन मंडले निर्माण करून त्यांवर कर्मांग देवतांचे आवाहन व पूजन करतात. अश्वत्थ, नारायण, वासुदेव, रुक्मिणी, सत्यभामा, सरस्वती व गणपती या देवतांच्या सुवर्णप्रतिमा करून त्या मंत्रपूर्वक स्थापितात. अश्वत्थाभोवती अष्टदिशांना कलश मांडून त्यांवर वरुणाचे आवाहन करतात. मग निरनिराळ्या कुंडांत अग्निस्थापना केल्यावर प्रधान होम करतात. नवग्रहांसाठी समिधा, चरू व आज्य आणि मुख्य देवतेसाठी पळसाच्या समिधा, तिल व आज्य ही हविर्द्रव्ये सांगितली आहेत. प्रत्येकाच्या १०८ किंवा २८ आहुती द्यायच्या असतात. प्रधान होम झाल्यावर बलिदानापर्यंत सर्व कर्मे शांतिकर्माप्रमाणे करतात. मग पिंपळाच्या जवळच खड्डा खणून त्यात चार किंवा पाच हात लांबीचा एक यूप पुरतात. त्यावर ब्रह्मा-विष्णू-शिव यांचे आवाहन–पूजन करतात. याला यूपाधिवास असे म्हणतात. त्या रात्री पुराण श्रवण करायचे असते. दुसऱ्या दिवशी या अश्वत्थाचे संस्कार करतात.

पुंसवनापासून उपनयनापर्यंत सर्व संस्कार व्याहृतिमंत्रांनी करतात. मग अश्वत्थाचे अभिमंत्रण करून रुद्रसूक्ताचे पठण करतात. यज्ञोपवीत, कृष्णाजिन, मेखला, दंड या वस्तू अश्वत्थाला देतात. मग समावर्तन करून त्याच्या विवाहाची सिद्धता करतात. तदंगभूत अग्निस्थापना करून अग्नी, वायू व चंद्रमा या प्रधान देवतांसाठी तिल व आज्य यांच्या आहुती देतात. मग मंगलाष्टके म्हणून तुळस व अश्वत्थ यांचा विधिपूर्वक विवाह करतात. शेवटी क्षेत्रपालाला बलिदान करून पूर्णाहुती करतात. यजमान व त्याचा परिवार यांना अभिषेक करतात.

हे विधान पंचकुंडी किंवा नवकुंडी असते. तेवढे करणे शक्य नसेल तेव्हा एकाच कुंडावर सर्व अनुष्ठान करतात. या अश्वत्थोद्यापनाने श्रीकृष्ण संतुष्ट होतो असे सांगितले आहे. सामान्यतः निपुत्रिक माणसे अश्वत्थोद्यापन करून आपला पुत्रहीनत्वाचा दोष घालवितात. [ ऋ. ब्र. स. ]

## अश्वदान

तरणा, उमदा व अव्यंग असा घोडा वस्त्रालंकारांनी भूषवून दान दिल्याने, घोड्याच्या अंगावर जितके केस असतील तितकी वर्षे सूर्यलोकात राहता येते, असे सांगितले आहे. याचे विधान असे– ब्राह्मणयोजना व अश्वपूजा. घोड्याला जी किंमत पडली असेल, तिच्या एकतृतीयांश दक्षिणा. दानमंत्र असा –

उच्चैःश्रवास्त्वमश्वानां राज्ञां विजयकारक ।
सूर्यवाह नमस्तुभ्यमतः शान्तिं प्रयच्छ मे ।।

अर्थ – हे अश्वा, तू सर्व अश्वांतला उच्चैःश्रवा आहेस. तू राजांना विजय देणारा व सूर्याला वाहून नेणारा आहेस. तुला नमस्कार असो. मला शांती दे.

ज्याला अश्वमेध करण्याचे सामर्थ्य नसेल, त्याने पांढऱ्या घोड्याचे दान करावे, असे गरुडपुराणात सांगितले आहे. दान देताना घोड्याचा कान ब्राह्मणाच्या हाती देतात. मंत्र असा –

**महार्णवसमुत्पन्न उच्चैःश्रवसपुत्रक ।**
**मया त्वं विप्रमुख्याय दत्तो हय सुखी भव ।।**

अर्थ – महासागरातून उत्पन्न झालेल्या व उच्चैःश्रव्याचा पुत्र असलेल्या हे अश्वा, मी श्रेष्ठ ब्राह्मणाला तुझे दान करीत आहे. तू सुखी हो.

मग ब्राह्मण त्या घोड्यावर बसून निघून जातो. यजमान त्याच्या पुढे सत्याहत्तर पावले चालत जाऊन सूर्यदर्शन करतो व परत घरी येतो. [ दानचंद्रिका ]

**अश्वदीक्षा** नक्षत्रव्रत. आश्विन शुक्लपक्षात चंद्र स्वाती नक्षत्रात येईल त्या दिवशी उच्चैःश्रव्याची पूजा करतात. त्या दिवशी नवमी असल्यास घरच्या घोड्यांची पूजा करतात व चार रंगांचे दोरे घोड्याच्या गळ्यात बांधतात. फल – दीर्घायुरारोग्य व बल यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**अश्वनृत्य** तमिळनाडमधले एक लोकप्रिय नृत्य. घोड्याचे तोंड तयार करून ते काठीच्या टोकाला बांधतात, काठीला घुंगुर बांधतात आणि ती काठी दोन पायांमध्ये घेऊन नृत्य करतात. घोड्याचे तोंड आरसे वगैरे लावून शृंगारतात; तो घोडा घेऊन नाचणारे पुरुष राजेशाही पोषाख करतात. या नृत्याला नागस्वरम्, कुंडलम्, इ. वाद्यांची साथ करतात. नर्तक वाद्यवृंदाभोवती फेर धरून नाचतात. नाचताना ते एका हाताने घोडा धरून दुसऱ्या हाताने रुमाल हलवितात. या नृत्यात वीररसाचा चांगलाच परिपोष होतो. त्यामुळे इतर लोकनृत्यांपेक्षा हे नृत्य अगदी वेगळ्या धर्तीचे वाटते. युद्धोपयोगी प्राणी म्हणून घोडा हा तमिळनाडला प्राचीन काळापासून परिचित व प्रिय आहे. त्या आवडीतूनच हे नृत्य निर्माण झाले आहे. [ मार्च ऑफ इंडिया, १९५९ ]

**अश्वपती कैकय** उपनिषत्कालीन आत्मज्ञानी राजा. काही तत्त्वजिज्ञासू पुरुष आत्म्याविषयी निश्चित ज्ञान मिळविण्यासाठी याच्याकडे आले असता याने त्यांचा सत्कार केला व त्यांना काही दक्षिणाही देऊ केली. पण ते लोक दक्षिणा घेईनात. तेव्हा अश्वपतीला वाटले की आपल्या ठिकाणी काही दोष आहे, अशा शंकेने हे दक्षिणा घेत नाहीत. म्हणून तो त्यांना म्हणाला –

**न मे स्तेनो जनपदे न कदर्यो न मद्यपो ।**
**नानाहिताग्निर्नाविद्वान् न स्वैरी स्वैरिणी कुतः ।।**

अर्थ – माझ्या जनपदात चोर नाही, कृपण नाही, मद्यपी नाही, आहिताग्नी नसलेला व अविद्वान असाही कोणी नाही; त्याचप्रमाणे स्वैराचारी नाही. मग स्वैरिणी कुठून असणार?

अश्वपतीचे ते शब्द ऐकून आलेले लोक म्हणाले की, आम्ही दक्षिणेसाठी आलो नसून, आत्मज्ञान मिळविण्यासाठी आलो आहो. तेव्हा मग अश्वपतीने त्यांना वैश्वानर आत्म्याचे ज्ञान सांगितले ( छांदो. ५.११–१२ ). [ प्रा. च. को. ]

**अश्वपूजा** ज्यांच्या घरी घोडे असतील त्यांनी आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून नवमीपर्यंत रोज अश्वपूजा करावी, असे सांगितले आहे. पूजाविधान असे–शांती व स्वस्त्ययन करून धणे, बिब्बे, कोष्टकोळिंजन, वेखंड व मोहरी यांची पुरचुंडी करून घोड्याच्या गळ्यात बांधणे. वायू, वरुण, सूर्य, विष्णू, विश्वेदेव व अग्नी यांच्या मंत्रांनी हवन करणे. [ निर्णयसिंधु ]

**अश्वमेध** एक महान सोमयाग. सर्व मनोरथ, सर्वत्र विजय व सर्व प्रकारची समृद्धी प्राप्त करून घेऊ इच्छिणाऱ्याने अश्वमेधाने यजन करावे, असे आश्वलायन श्रौतसूत्रात सांगितले आहे (१०.६.१). प्राचीन काळी साम्राज्य वाढविण्याचा तो एक वैध मार्ग होता. 'श्रीर्वै राष्ट्रमश्वमेधः' (= अश्वमेध म्हणजे राष्ट्र व समृद्धी होय, असे म्हणून त्याला राष्ट्राचे व समृद्धीचे प्रतीकच मानले आहे. 'राजा वा एष यज्ञानां यदश्वमेधः' (=अश्वमेध हा सर्व यज्ञांचा राजा) असेही म्हटले आहे (श. ब्रा. १३.२.२.१; १३.२.९.२; तै ब्रा. ३.९.७.१).

हा यज्ञ ऋग्वेदकालापूर्वी बरीच वर्षे प्रचारात होता, असे दिसते. याच्या उत्पत्तीची आख्यायिका तैत्ति. संहितेत पुढीलप्रमाणे सांगितली आहे –

एकदा प्रजापतीच्या डोळ्यातले एक बुबुळ गळून जमिनीवर पडले. त्यातून अश्व उत्पन्न झाला. नंतर देवांनी अश्वमेध करून प्रजापतीचे ते बुबुळ परत त्याच्या डोळ्यात बसविले. त्या वेळे-पासून प्रजापतीला संतुष्ट करण्यासाठी अश्वमेध करण्याची प्रथा पडली (५.४-१२).

अश्वमेधासाठी श्यामकर्ण घोडा लागतो. त्याच्या शुभ्र वर्णावर काळे ठिपके असावे, असेही सांगितले आहे. त्याला प्रथम जलाशयावर नेऊन मंगल स्नान घालतात. अध्वर्यू शंभर राज-पुत्रांसह त्याच्या पूर्वेस उभा राहतो. राज्याला अनधिकारी अशा शंभर क्षत्रियांसह ब्रह्मा त्याच्या दक्षिणेस उभा राहतो. सारथी व ग्रामाधिपती अशा शंभर पुरुषांसह होता त्याच्या पश्चिमेस उभा राहतो. क्षत्ता जातीतल्या व कोशागारावरच्या शंभर लोकांसह उद्गाता उत्तरेस उभा राहतो. हे चौघे ऋत्विज पाणी शिंपडून घोड्याला स्वच्छ धुतात. घोड्याबरोबर एक कुत्रे पाण्यात सोडतात व मुसळांनी त्याला ठार मारून त्याचे

प्रेत घोड्याच्या पोटाखाली तरंगत ठेवतात. स्नान घातल्यावर घोड्याला यज्ञशाळेत अग्नीजवळ आणतात. त्याच्या अंगावरून पाणी निथळून जाईपर्यंत अग्नीला आहुती देतात. मुंजमेखलेने प्रथम त्याला बांधतात व मग सर्व देशात वर्षभर संचार करण्यासाठी मोकळा सोडतात. त्याच्या रक्षणासाठी चारशे शस्त्रसज्ज लोक त्याच्या मागून जातात. जो राजा त्या घोड्याला पकडील, त्याच्याशी ते रक्षक युद्ध करून घोडा सोडवून घेतात.



अश्वमेधाचा घोडा – दगडी शिल्प
(इ. स. चे ४ थे शतक)

अशा प्रकारे घोडा सर्वत्र विजयी झाला म्हणजे एका वर्षाने त्याला परत आणतात. त्या मुदतीत त्रिकाळ सारस्वत्य नामक इष्टी करतात. इष्टीनंतर ब्राह्मण राजस्तुतिपर गाथा गातो. होता राजाला पारिप्लव नामक आख्यान सांगतो. घोडा सोडल्यापासून तो परत येईपर्यंत अध्वर्यू हाच राजा होतो, असे आपस्तम्ब सांगतो. घोडा आपल्या संचारात आजारी पडला किंवा मेला, तर अनेक प्रायश्चित्ते सांगितली आहेत. शत्रूने घोडा पळविला व तो परत मिळविता आला नाही तर अश्वमेध होतच नाही.

अश्वमेधाचा विधी सत्याषाढ श्रौतसूत्रात पुढीलप्रमाणे सांगितला आहे –

चैत्र पौर्णिमेस यज्ञाचा प्रारंभ होतो. कर्ता राजा प्रथम सांग्रहणी इष्टी करतो. मग तो ऋत्विजांचे वरण व यज्ञाचा संकल्प करतो आणि नंतर दीक्षा घेतो. (अश्वमेधात दीक्षा, उपसद व सुत्यादिन यांची संख्या बारा असते.) मग तो केस व नखे काढतो. नंतर तो स्नान करून वस्त्रालंकार घालतो; मौन पाळतो. मग राजाच्या चार राण्या राजाजवळ येतात. यजमान त्यांच्यासह अग्निशालेत प्रवेश करून गार्हपत्याच्या पश्चिमेस उत्तराभिमुख बसतो.

या यज्ञात घोड्यासह अनेक पशूंचे हनन व्हायचे असते. त्या पशूंना बांधण्यासाठी बेलाचे, खैराचे व पळसाचे प्रत्येकी सहा, देवदारूचे चार व रगतरोड्याचा एक असे एकूण २१ यूप तयार करतात. २० यूपांना प्रत्येकी ९ असे मिळून १८० पशू बांधतात. रगतरोड्याचा यूप हा अश्वासाठी असतो. तो मुख्य यूप होय. त्याला चातुर्मास्य, ऐकादशिन व दशिन, इ. नावांचे आणखी अनेक पशू बांधतात. या सर्व पशूंचे ग्राम्य (गावातले म्हणजे पाळीव) व आरण्यक (रानातले) असे दोन वर्ग असतात. आरण्यक पशूंना मारीत नाहीत. त्यांच्यावर काही संस्कार करून त्यांना सोडून देतात.

अश्वमेधात सुत्यादिनांपैकी दुसरा महत्त्वाचा दिवस असतो. त्या दिवशी प्रथम मेध्य अश्वाला इतर तीन घोड्यांसह रथाला जुंपतात. त्या रथात बसून यजमान व अध्वर्यू प्रथम जलाशयावर जातात. मग तो रथ यज्ञभूमीच्या सभोवती फिरवितात. रथावर विजयध्वज फडकत ठेवतात. रथ यज्ञभूमीत आणल्यावर राजाच्या राण्या घोड्याच्या अंगाला आज्य चोळतात. यूपाजवळ ब्रह्मा व होता यांच्यामध्ये ब्रह्मोद्य नामक कूटप्रश्नोत्तरे होतात. वेदीच्या बाहेर पट्टराणीला उद्देशून होता बीभत्स व ओंगळ असे काही शब्द उच्चारतो. राणीही त्याला तसेच प्रत्युत्तर देते. राजाच्या राण्या घोड्याच्या अंगाला काही ठिकाणी सोन्यारुप्याच्या सुया टोचून खुणा करतात.

घोड्याला मारायला नेताना त्याच्या पुढे एक घोडी चालवितात. मग एका ठिकाणी वेतस वृक्षाच्या डहाळ्या पसरतात. त्यांवर तुपात भिजवलेले लोकरीचे वस्त्र अंथरतात. त्यावर पांघरायचे कातडे पसरतात. त्यावर सुवर्णखचित शय्या पसरतात. तीवर रुप्याचा पत्रा ठेवतात. मग त्या पत्र्यावर घोड्याला आडवे पाडून त्याला मारतात. अश्वमेधात पट्टराणी व मृत घोडा यांचे मैथुन विहित आहे (कात्या. श्रौ. सू. २०.६.१५-१६). वाल्मीकिरामायणातही (बाल. १४.३४) याचा निर्देश आहे.

पतत्रिणा तदा सार्धं सुस्थितेन च चेतसा ।
अवसद्रजनीमेकां कौसल्या धर्मकाम्यया ।।

अर्थ –(घोड्याला मारल्यावर) कौसल्येने धर्मकामना मनात धरून स्थिर चित्ताने त्या (मृत) अश्वासह एक रात्र घालविली.

याला उपसंवेशन विधी म्हणतात. या विधीत प्रत्यक्ष समागमाची कल्पना असंभवनीय आहे. तैत्तिरीय ब्राह्मणात (३.९.१७.४) अश्वाला प्रजापतीचे रूपच मानले आहे आणि अश्वाचे राजाशी तादात्म्यही मानले आहे (६.१.१). यावरून अश्व हे राजाचे प्रतीक असून, उपसंवेशन विधीत राजा व राणी यांच्या संबंधाचा संकेत आहे, असे दिसते.

घोड्याला मारल्यानंतर त्याच्या शरीरातील चंद्र नामक मेदाचा याग करतात. सदस व ऋत्विज एकमेकांना कोडी घालतात. अनेक देवतांना आहुती देतात. राजाला अभिषेक करतात. शेवटी वरुणप्रतीक समजून एका खल्वाटाच्या (टक्कल पडलेला माणूस) डोक्यावर आहुती ठेवतात. त्याला शंभर गायी व एक बैलगाडी देतात. या यज्ञात अध्वर्यू होता, इत्यादी ऋत्विजांना अगणित दक्षिणा मिळते.

अवभृथस्नानासाठी समुद्रावर वा नदी-जलाशयावर जातात. यजमानाने स्नान केल्यावर अनेक लोक त्या जलात बुडचा मारतात. तसे केल्याने सर्व पापांचा नाश होतो, अशी धारणा आहे.

ऋग्वेदात अश्वमेधाचे उल्लेख अनेकवार आले आहेत. ऋग्वेदात मेध्य अश्वाला यम, आदित्य, त्रित आणि सोम म्हटले आहे (ऋ. १.१६३.३). ऋग्वेदातले या अश्वाचे वर्णन उत्साही, ओजस्वी आणि तपशीलवार आहे. त्याच्याविषयी पुढील प्रार्थना केलेल्या आहेत –

मा त्वा तपत्प्रिय आत्मापियन्तं
मा स्वधितिस्तन्व आ तिष्ठिपत्ते ।
मा ते गृध्नुरविशस्तातिहाय
छिद्रा गात्राण्यसिना मिथू कः ।।
न वा उ एतन्म्रियसे न रिष्यसि
देवाँ इदेषि पथिभिः सुगेभिः ।
हरी ते युञ्जा पृषती अभूता –
मुपास्थाद्वाजी धुरि रासभस्य ।।
(ऋ. १.१६२.२०-२१)

अर्थ – तू इहलोक सोडून जाताना तुझ्या प्राणाला यातना न होवोत व कापणाऱ्याची सुरी तुझ्या अंगात कुचंबून न राहो. कापणारा अडाणीपणाने एखाद्या गिधाडाप्रमाणे तुझी गात्रे आपल्या सुरीने भलत्याच ठिकाणी तोडतोडून खराब न करो (२०). हे पाहा, तू काही मरत नाहीस किंवा नष्ट होत नाहीस; तर सुलभ मार्गांनी देवाकडेच जात आहेस. साक्षात इंद्राचे हरितवर्ण अश्व किंवा (मरुतांच्या) हरिणी या तुझ्या जोडीस येतील किंवा अश्वी देवांच्या मोठ्याने खिंकाळणाऱ्या अश्वाच्या धुरेला तूच बलिष्ठ जोडला जाशील (२१).

वेदोत्तर कालात हळूहळू अश्वमेधाचा ऱ्हास होऊ लागला. पण कृती थांबली तरी स्मृती शिल्लक होती. म्हणून उपनिषत्कालात त्याला आध्यात्मिक स्वरूप दिले गेले. वर दिलेले ऋग्वेदातील अश्ववर्णन व पुढे दिलेले उपनिषदातील अश्ववर्णन या दोहोंतला फरक सहज कळण्याजोगा आहे –

उषा म्हणजे यज्ञीय अश्वाचे शिर, सूर्य हा त्याचा डोळा, वायू हा श्वास, अग्नी हे मुख, वर्ष हे शरीर, ऋतू हे अवयव, ओटीपोट ही पृथ्वी, फुप्फुसे म्हणजे पर्वत, केस म्हणजे औषधी वनस्पती (बृह. १.१.१).

या उताऱ्यात मेध्य अश्वाचे विश्वावर रूपक केले आहे. हे संपूर्ण विश्व म्हणजेच यज्ञाश्व होय, असे सांगण्याचा इथे हेतू आहे. यावरून उपनिषत्कालात प्रत्यक्ष अश्वमेध करण्यापेक्षा संपूर्ण विश्वात त्याची धारणा करावी, असा आध्यात्मिक आशय त्याला येऊ लागला होता, असे दिसते.

भारतात त्यापुढच्या काळात अश्वमेधप्रथा जवळजवळ बंद पडली. जातकांत अश्वमेधाचा उल्लेख नाही. कौटिल्याने तो फक्त एकदाच केला आहे. हरिवंशपुराणान्वये जनमेजयानंतर पुष्यमित्रानेच अश्वमेध केला (३.१९२.४०-४१). त्याच्या समकालीन सातकर्णीनेही दोन अश्वमेध केले. भारशिवांनी दहा अश्वमेध केल्याचे इतिहास सांगतो. इ. स. च्या ४ थ्या शतकात सम्राट समुद्रगुप्तानेही अश्वमेध केला होता. इ. स. च्या १ ल्या शतकापासून पुढच्या ७ शतकांत जी जी प्रबळ राज्ये स्थापन झाली, त्या त्या राज्यांच्या भूपतींनी अश्वमेधाचा पुनरुद्धार करणे, हे आपले कर्तव्य मानले. या ७ शतकांच्या कालखंडाला अश्वमेधाच्या पुनरुद्धाराचे युग असे मानतात. बौद्ध व जैन या धर्मांच्या आदर्शांविरुद्ध ती प्रतिक्रिया होती. अश्वमेधाचाच नव्हे; तर वैदिक धर्माचाच पुनरुद्धार झाला पाहिजे, असे त्या प्रतिक्रियेचे स्वरूप होते. ही प्रतिक्रिया केवळ राजकारणापुरतीच मर्यादित नसून, ती त्या युगाच्या समग्र जीवनातच भरून राहिली होती.

पण तरीही वैदिक युगातले जीवन आणि संस्कृती ही पुन्हा त्या मूळ स्वरूपात परत येऊ शकली नाहीत. वैदिक संस्कृतीचे पुनरुद्धारक त्या धर्मातला उत्तम अंश तेवढाच परत आणू शकले. त्याबरोबरच त्यांना जैन-बौद्धांच्या संस्कृतीतला चांगला व युगानुकूल भागही स्वीकारावा लागला.

वैदिक संस्कृतीच्या पुनरुद्धाराच्या या प्रयत्नांतून एक नवाच धर्म निर्माण झाला. तो वैदिकही नव्हता व बौद्धही नव्हता. तो होता पौराण धर्म ! या धर्माने प्रकृतिदेवता यज्ञ व त्याचे अवडंबर यांना दुर्लक्षून अवतार, मूर्तिपूजा, तीर्थस्थळे यांना महत्त्व दिले. पण त्याही कालात अश्वमेधाची स्मृती लुप्त झाली नव्हती. त्याची भव्यता जनतेच्या मनात घर करून राहिली होती. म्हणून या नव्या पौराण अथवा भागवत धर्माने पूजा, व्रत, नामस्मरण, तीर्थयात्रा, स्तोत्रपाठ या सर्व भक्तिप्रकारांत अल्प श्रमात अश्वमेधाचे पुण्य लाभते, असे सांगून जनांची या नव्या धर्माकडे प्रवृत्ती वाढविली. त्यानंतर पुनश्च अश्वमेधप्रथा बंद पडली.

डेहराडून जिल्ह्यात कालसीजवळ यमुनेच्या तीरावर १९५३ साली जे उत्खनन झाले, त्यात अश्वमेधाची यज्ञवेदी तयार करण्यासाठी वापरलेल्या विटा व श्येनचितीचा काही भाग सापडला आहे. त्यांतल्या काही विटांवर पुढील श्लोक आढळला आहे –

नृपतेर्वार्षगण्यस्य पोणषष्ठस्य धीमतः ।
चतुर्थस्याश्वमेधस्य चित्योऽयं शीलवर्मणः ।।

अर्थ – वृषगणात सामील असणारा व पोणापासून सहावा असलेला जो शीलवर्मा नावाचा राजा, त्याने केलेल्या चौथ्या अश्वमेधाची ही चिती आहे.

अक्षरवटिकेवरून हा इष्टकालेख इ. स. च्या तिसऱ्या शतकातला वाटतो.

पाणिनीच्या गर्गादी गणांत वृषगणाचे नाव आले आहे. पण त्यावरून वृषगण म्हणजे नक्की कोणते लोक ते कळत नाही. पोण हे या गणराज्यातल्या पहिल्या किंवा अतिपराक्रमी राजाचे नाव असावे. [ हि. ध.; म. ज्ञा. को.; सो. इं. ट्रॅ.; क. हि. वा. पु.; भा. इ. रू.; डॉ. वि. श्री. भांडारी–वि. सं. मं. वा., १९७३ ]

**अश्वमेध–जैमिनी** एक पुराणग्रंथ. महाभारतातील अश्वमेधपर्व हे जैमिनीच्या अश्वमेध या ग्रंथाचा अनुवाद आहे, असा लोकप्रवाद आहे. जैमिनी मुनीने व्यासांप्रमाणेच संपूर्ण भारत रचले होते; परंतु व्यासांनी त्या भारताला शाप दिला आणि त्यातील अश्वमेध प्रकरण अपूर्व असल्याने त्याचा तेवढा आपल्या महाभारतात समावेश केला, अशीही कथा आहे. महाभारतातील अश्वमेधपर्व व जैमिनी-अश्वमेध यांतील अनेक विषय समान आहेत. परंतु त्यांत सर्वस्वी एकवाक्यता नाही.

जैमिनिकृत अश्वमेधात वाचकांच्या अंतःकरणात सद्भाव उत्पन्न करून त्यांना आत्महिताचा मार्ग दाखविलेला आहे. ऐतिहासिक व भौगोलिक दृष्टीनेही हा ग्रंथ अपूर्व व अमोल आहे. पांडवांनी सोडलेला अश्वमेधाचा श्यामकर्ण घोडा संचार करीत ज्या ज्या ठिकाणी गेला त्या त्या स्थळांचे भूगोलवर्णन यात दिलेले आहे.

या ग्रंथात ६८ अध्याय असून, एकूण श्लोकसंख्या ५१६९ एवढी आहे. महाभारताप्रमाणे 'नारायणं नमस्कृत्य' हा श्लोक झाल्यावर ग्रंथाला सुरुवात झाली आहे.

या ग्रंथांत पांडवांनी केलेल्या अश्वमेध यज्ञाचे समग्र वर्णन आहे. अश्वमेधाला आवश्यक असलेला श्यामकर्ण घोडा यौवनाश्व राजाजवळ होता. त्याच्यापासून तो मिळविण्याची भीमाने प्रतिज्ञा केली. त्यासाठी तो द्वारकेला गेला व श्रीकृष्णाला भेटला. त्या दोघांचे संभाषण मोठे विनोदी आहे. वृषकेतू व प्रभावती यांचा विवाह, द्रौपदी व सत्यभामा यांचे गुप्त संभाषण, हंसध्वजाची परीक्षा, सुधन्व्याची हरिभक्ती, सुरथाचा पराक्रम, नीलध्वजाचे सामर्थ्य, स्त्रीराज्यातील राणी प्रमिला हिचा अर्जुनाशी विवाह, बभ्रुवाहन व अर्जुन यांच्यामधील युद्ध व त्यात अर्जुनाचा मृत्यू, असे अनेक कथाप्रसंग यात आहेत. याशिवाय मयूरध्वज व चंद्रहास यांची रम्य चरित्रे, दुःशीलेची कथा, वकदाल्भ्यदर्शन, धर्मराजाचे असिधाराव्रत, श्यामकर्णाची मोक्षप्राप्ती हे विषयही यात आलेले आहेत.

या ग्रंथात अनेक ठिकाणीं भोजनसमारंभाचे वर्णन येते. त्यावरून त्या काळच्या खाद्यपदार्थांची चांगली कल्पना येते. उदा० श्रीकृष्णाच्या भोजनाचे हे वर्णन (९.३५–३९) पाहा – त्या भोजनातले विविध पदार्थ असे –

पायसं चन्द्रसङ्काशं सितशर्करया युतम् ।
भक्तं कुमुदवर्णाभं मुद्गदालिस्तथैव च ।।
नानाव्यञ्जनसंयुक्तं त्रिभिः पंक्तिभिरेव च ।
निम्बूरसेन सार्द्रेण फलमूलयुतेन च ।।
विकृतानि कृतान्येव शतशो भोजने विभोः ।
मरीचं पिप्पली चार्द्रं रम्भा शर्करया युता ।।
सितया सहितेनाथ दुग्धेन क्वथितेन च ।
घृतं सितायुतं देव्या दत्तं प्रीत्या यशोदया ।।
पूरिकाश्च तथा क्षीरविकाराश्च प्रसाधिताः ।
मृद्विकाशिशुपाचूतकरमर्दकृताः शुभाः ।।

अर्थ – पांढरी साखर घातलेला चांदण्यासारखा पायस, श्वेतकमळाच्या वर्णाचा भात, तसेच मुगाचे वरण; तीन ओळींनी वाढलेल्या नाना प्रकारच्या चटण्याकोशिंबिरी; लिंबाचा रस, आले व फळेमुळे यांची शेकडो तोंडीलावणी, मिरपूड, पिंपळी, आले, पांढरी साखर घालून दुधात शिजविलेली केळी, तूपसाखर वगैरे पदार्थ देवी यशोदेने (श्रीकृष्णाच्या पात्रात) वाढले होते. पुऱ्या व दह्या-दुधाचे श्रीखंड, बासुंदी इ. पदार्थ तिने तयार केले होते. द्राक्षे, आंबे, करवंदे, यांची लोणची बनविली होती.

त्याचप्रमाणे खिचडी, फेण्या, मोदक, लाडू वगैरे पदार्थांचेही वर्णन आहे. त्यावरून या ग्रंथाच्या रचनाकाळी म्हणजे इ. स. २०० च्या सुमारास प्रचलित असलेल्या भक्ष्य-भोज्य पदार्थांची कल्पना येते.

या पुराणातील काही सुभाषिते पुढीलप्रमाणे –

तावद्देहे नृणां मोहो यावन्नो साधुसंगतिः ।
(जै. अश्व. १६.३२)

अर्थ – जोपर्यंत सज्जनसंगती घडत नाही, तोवरच माणसांची देहावर आसक्ती असते.

पररन्ध्रेषु सर्वेषां दृष्टिर्गच्छत्यचेतसाम् ।
(जै. अश्व. १७.३०)

अर्थ – सर्व अज्ञानी लोकांची दृष्टी दुसऱ्याची छिद्रे (दोष, व्यंगे) पाहणारी असते.

आज्ञाभङ्गो नरेन्द्राणां विप्राणां मानखण्डनम् ।
पृथक्शय्या च नारीणामशस्त्रवध उच्यते ।।
(जै. अश्व. १७.४१)

अर्थ – राजांचा आज्ञाभंग, ब्राह्मणांची मानखंडना आणि स्त्रियांची (पतीपासून) वेगळी शय्या हा त्यांचा शस्त्राविना केलेला वधच होय. [ श्री. बा. मो. कानिटकर ]

**अश्वरथदान** याचा विधी असा – सुवर्णाचा अश्वयुक्त रथ बनवून, त्यात इष्ट देवतेची स्थापना व पूजा करावी आणि मग त्याचे दान करावे. फल – शिवपदप्राप्ती.

**अश्वविद्या** घोड्याविषयीचे ज्ञान किंवा घोड्यांना शिकविण्याची विद्या. ही नलराजाला अवगत होती. ती त्याने ऋतुपर्णाला शिकविली. (भाग. पु. ९.९.१७).

**अश्वसूक्ती काण्वायन** एक सूक्तद्रष्टा. हा गोषूक्ती काण्वायन या नावानेही ओळखला जातो. ( ऋ. ८.१४.१५). हा सामद्रष्टाही होता (पं. ब्रा. १९.४.१०). पाहा – गोषूक्ती काण्वायन.

**अश्वसैन्य** फार प्राचीन काळापासून युद्धात घोड्यांचा उपयोग केला जात होता. घोडेस्वार ही एक सैन्यातली मोठी शक्ती होती. कांबोज, बाल्हीक व सिंधू या देशांतले घोडे युद्धकार्यासाठी प्रशंसिले जात होते (वा. रा. १.२.६). चिखल, पाणथळ व खडकाळ भूमी वगळून अन्य स्थळी घोडदळ हेच महत्त्वाचे मानले जात होते. जिंकलेला प्रदेश व जंगलांतली सैनिकशिबिरे यांवर पहारा करण्याचे काम घोडेस्वारच करीत. पादचारी सैन्याचे संचालनही घोडदळाच्या साहाय्याने होत असे. सैन्याची पिछाडीही घोडदळच सांभाळीत असे. शत्रूवर प्रथम आक्रमण व्हायचे ते घोडदळाकडूनच. शत्रुसैन्याला तुडविणे, राजकुमारांना पळविणे, पाठलाग करणे या कामी घोडदळच उपयुक्त ठरे. धनुष्यबाणांनी लढणे, तलवार चालविणे व भाला फेकणे, इ. प्रकारांनी घोडेस्वार लढाई करीत. [ प्रा. भा. सां. ]

**अश्वारूढा** एक शाक्त देवता. हिचे वर्णन असे – त्रिनेत्र. उजव्या हाती काठी. रक्तवर्षाव करणारी. तांबड्या घोड्यावर बसणारी. चतुर्भुज. हिच्या चरणांशी सुवर्णदंडाने ताडित झालेला 'साध्यक' हात जोडून पाया पडत असतो. [ श्रीविद्यार्णवतंत्र ]

**अश्विनी** अश्विन्यादी नक्षत्रगणनेतले पहिले नक्षत्र. आयनिक वृत्ताच्या उत्तरेस देवयानी व कृत्तिका यांच्या त्रिकोणात हे नक्षत्र आकाशात दिसते. याच्या तीन तारका मानतात. तिहींत दोन जवळजवळ असून, त्यांत उत्तरेची तारका अधिक तेजस्वी आहे. या तीन तारकांमुळे याची आकृती अश्वमुखासारखी दिसते. घोडीचे रूप धारण करणाऱ्या संज्ञा नामक सूर्यपत्नीच्या ठिकाणी सूर्यापासून दोघे अश्विनीकुमार जन्मास आले, ही कथा या नक्षत्राशी संबद्ध आहे. या नक्षत्राचा वेदांत अश्वयुजौ असा उल्लेख आहे (तै. सं. ४.४.१० तै. ब्रा. १.५.१; अथर्व १९.१). हा शब्द द्विवचनी असल्यामुळे वेदकाळात या नक्षत्राच्या दोनच तारका मानीत, असे दिसते. महाभारतात मात्र सांप्रत प्रचारात असलेला अश्विनी हाच शब्द योजलेला आहे ( अनु. ६४ व ८९). अश्विनौ ही या नक्षत्राची देवता असून, हे नक्षत्र अश्वक्रांता या छंदाची देवता आहे. या नक्षत्रावर केलेले श्राद्ध फलप्रद होते.

हेमाद्रीने या नक्षत्राचे ध्यान पुढीलप्रमाणे सांगितले आहे-

तत्रादावश्विनी ज्ञेया पद्मपत्रनिभा शुभा ।
अश्ववक्त्राम्बुजारूढा द्विभुजा च सिताम्बरा ।
दक्षे दिव्यौषधीपात्रं बिभ्रती पुस्तकं करे ॥

(च. व. चि.)

अर्थ – कमलपत्रासारख्या कांतीची, कमलावर बसलेली, शुभ्र अश्वमुख असलेली, शुभ्रवस्त्र नेसलेली, द्विभुज, उजव्या हातात दिव्य औषधीचे पात्र व डाव्या हातात पुस्तक धारण करणारी अशी अश्विनीची मूर्ती करावी. [ श. क.; पु. इं. ]

**अश्विनी मुद्रा** हठयोगातली एक मुद्रा. हिची क्रिया पुढीलप्रमाणे सांगितली आहे –

आकुञ्चयेद् गुदद्वारं प्रकाशयेत् पुनः पुनः ।
सा भवेदश्विनीमुद्रा शक्तिसद्बोधकारिणी ॥

अर्थ – वारंवार गुदाचे आकुंचन व प्रसरण करीत राहिल्याने ही मुद्रा होते. ती शक्ती व ज्ञान देते.

फल – गुह्यरोगांचा नाश, बल व शुद्धी यांची प्राप्ती. [ स. पॉ.; यो. सो. पू. ]

**अश्विनौ** एक देवतायुग्म. इंद्र, अग्नी व सोम यांच्या नंतर ऋग्वेदातली महत्त्वाची देवता म्हणजे अश्विनौ हीच होय. या देवतेविषयी ५० सूक्ते आहेत. मात्र सृष्टीतल्या कोणत्या विशिष्ट व्यापाराशी या देवतेचा अधिकृत संबंध आहे ते वैदिक सूक्तांवरून स्पष्ट होत नाही. प्रारंभीच्या वेदार्थकारांपासून सर्वांनाच या देवतेच्या खऱ्या स्वरूपाबद्दल कोडे पडले आहे. अश्विनौ हे जुळे बंधू असून, त्यांची जोडी कधीच फुटत नाही (ऋ. ३.३९.३). ते विवस्वानाचे पुत्र असून, सरण्यू त्यांची माता आहे (ऋ. १०.१७.२). ते तरुण, वीर्यवान, दानशूर, विद्वान, संपत्तिमान व शुभांचे स्वामी आहेत. ते मधुपा म्हणजे मद्य पिणारे व सोमपान करणारे आहेत.

सोनेरी रथात बसून ते सर्वत्र संचार करीत असतात. ...

रथ तीन चाकांचा व तीन खांबांचा असतो ( ऋ. १. ११८. २.). त्या रथाला मधुवर्ण किंवा मधुवाहन म्हटले आहे. तो शीघ्रगामी असून, एका दिवसात द्यावा – पृथिवींभोवती फिरून जातो (ऋ. ३. ५८. ८). उषा व सूर्य यांच्या उदयकालामध्ये यांचा उदय होतो. सूर्यकन्या सूर्येचे ते पती आहेत (ऋ. ४. ४३. ६). ती त्यांच्या रथावर चढते. म्हणूनच ऋग्वेदातल्या विवाह-सूक्तात विवाहित वधूला आपल्या रथावर बसवून घरी आणण्याबद्दल त्यांची प्रार्थना केली आहे (ऋ. १०. ८५).

अश्विनौच्या वसतिस्थानासंबंधी विविध उल्लेख आहेत. द्यावा – पृथिवी, द्यौ, अंतरिक्ष, गिरिशिखर, मोठे वृक्ष ही त्यांची मुख्य वसतिस्थाने मानली आहेत.

विपत्तींतून प्राण्यांचा उद्धार करणे, हे त्यांचे प्रधान कार्य आहे. ते देवांचे कुशल वैद्य आहेत. ते अंधांना दृष्टी देतात. त्यांनी च्यवनभार्गवाला वार्धक्यातून मुक्त करून पुनश्च तारुण्य दिले, अत्री सप्तवध्री हा आगीच्या खाईत पडला असता त्याला वर काढले, तुग्रपुत्र भुज्यू समुद्रात पडला असता शंभर वल्ह्यांच्या नौकेतून पुढे येऊन त्यांनी त्याला वर काढले. ऋज्राश्वाला त्यांनी दृष्टी दिली (ऋ. १. ११७. १७), विश्पलेचा पाय युद्धात टला असता त्या जागी लोखंडाचा पाय बसविला (ऋ. १. ११६. १५); घोषेला तिचा रोग दूर करून चांगला पती मिळवून दिला (ऋ. १. ११७. ७); अथर्वणपुत्र दध्यङ् ऋषीचे शिर तोडून त्या जागी घोड्याचे तोंड बसवून हे त्याच्यापासून मधुविद्या शिकले (ऋ. १. ११७. २२).

ही सर्व त्यांची अलौकिक कृत्ये सर्वांना मान्य असली, तरी त्यांचा भौतिक आधार काय व अश्विनौ म्हणजे नक्की कोण याविषयी संशोधकांत मतैक्य नाही. यास्काने हा मतामतांचा गलबला सूचित केला आहे. पाश्चात्य संशोधक त्यांच्याविषयी अनेक उपपत्ती सांगतात. सर्वांत अधिक मान्य मत असे आहे, की अश्विनौ हे अर्धा तमोमय व अर्धा प्रकाशित अशा प्रभातकालाचे प्रतीक आहे.

गुरु-शुक्रांच्या सान्निध्यावरून अश्विनौची कल्पना उत्पन्न झाली, असे श्री. शं. वा. दीक्षित म्हणतात. काहींच्या मते ही देवता केवळ भारतीय नसून, त्यापूर्वीच्या इण्डो-युरोपीय काळातील असावी. ग्रीक वाङ्मयात झेउसच्या दोन पुत्रांची कल्पना केलेली आहे. हेलेना ही त्या दोघांची बहीण आहे. अश्विनौची उषा ही भगिनी आहे. त्यावरून त्या दोघांत साम्य असावे. अश्विनौविषयी डॉ. संपूर्णानंद यांनी पुढील विवेचन केले आहे –

ऋग्वेदात म्हटले आहे की – ' हे स्वर्गाच्या रक्षक अश्वींनो; ज्या समयी काळ्या गायी लाल गायींत मिसळतात अशा समयी मी तुमचे आवाहन करतो ' (१०.६१.४). याचा अर्थ असाच होऊ शकतो की रात्रीचा काळा अधार जाऊन जव्हा पूर्व क्षितिजावर तांबडे फुटते तो काल अश्विनौच्या उपासनेचा काल होता. पुराणात ज्या प्रकारे मित्र, वरुण, इ. वैदिक देव मूलस्थानावरून च्युत झाले, तसेच अश्विनौचेही झाले आहे. अश्विनौचे वेदांतले स्थान फार उंच असले, तरी पुराणकाळात त्यांना देवांबरोबर बसून यज्ञभाग ग्रहण करण्याचाही अधिकार उरला नाही.


अश्विनीकुमार

ऋग्वेदातले अश्विनौ हे पुराणात अश्विनीकुमार या नावाने प्रसिद्ध झाले. विवस्वानाची भार्या संज्ञा ही घोडी होऊन फिरत असता विवस्वानाने अश्वरूप घेऊन तिच्याशी संग केला. तो परपुरुष असावा अशा कल्पनेने तिने ते वीर्य आपल्या नाकपुडीतून बाहेर टाकले. त्यातून यांची उत्पत्ती झाली. यांच्यापैकी थोरल्याचे नाव नासत्य व धाकट्याचे नाव दस्र असे आहे. हे देवांचे वैद्य, वैवस्वत मन्वंतरातले देव आणि वर्णाने शूद्र आहेत. नकुल सहदेव हे माद्रीचे पुत्र यांच्याच अंशापासून जन्मास आले.

यांची मूर्ती पुढीलप्रमाणे करावी, असे विष्णुधर्मोत्तर पुराणांत सांगितले आहे –

कमलपत्राप्रमाणे कांती, द्विभुज, सुंदर डोळ्यांचे व सर्वाभरणसंपन्न अशा त्यांच्या मूर्ती बनवाव्या. त्यांच्या उजव्या हातात पुस्तक असावे. पार्श्वभागी एक नारीयुग्म निर्माण करावे. [ ऋ. द.; वै. सा. सं.; आ. आ. दे.; म. ज्ञा. को.; प्रा. च. को.]

**अष्टकर्णी** गाय या अर्थी वैदिक प्रतिशब्द. वैदिक काळी बहुधा गायीच्या कानाच्या आठ पाकळ्या कापीत असावे अथवा आठ हा अंक त्यावर डाग देऊन अंकित करीत असावे. त्यावरून अशा गायीला अष्टकर्णी म्हणायची प्रथा सुरू झाली असावी. त्यासाठी तांब्याची सुरीच वापरली पाहिजे; लोखंडाची

सुरी किंवा बाण वापरू नये, असा दंडक होता. डागून चिन्ह करायचे तर उसाचा तुकडा वापरीत. [ वे. इं. ]

**अष्टक वैश्वामित्र** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशेचार क्रमांकाचे सूक्त याच्या नावावर आहे. इंद्र ही या सूक्ताची देवता असून, त्याचा पराक्रम वर्णन करणे हा सूक्ताचा विषय आहे. याची एक ऋचा अशी –

**सप्तापो देवीः सुरणा अमृक्ता याभिः सिंधुमतर इंद्र पूर्भित ।**
**नवतिं स्रोत्या नव च स्रवन्तीर्देवेभ्यो गातुं मनुषे च विन्दः ।।**
(ऋ. १०.१०४.८)

अर्थ – देवमनुष्यकल्याणार्थं नव्याण्णव नदीमार्ग सिद्ध करणाऱ्या हे नगरभेत्त्या इंद्रा, तुझ्या सात जलविमोचित नद्या वहात आहेत.

वैदिक आर्यांच्या पराक्रमाची दिशा सांगणारे एक सूक्त म्हणून या सूक्ताला ऐतिहासिक महत्त्व आहे.

ऐतरेय ब्राह्मणानुसार अष्टक हा विश्वामित्राचा मुलगा होता (ऐ. ब्रा. ७.१७). माधवी ही त्याची आई असल्याचा उल्लेख महाभारतात आढळतो. (उद्योग. ११९. १८-१९). विश्वामित्राने त्याला धर्म व अर्थ देऊन संपन्न केले होते. 'तू गर्वामुळे पतन पावशील' असे नारदाने त्याला सांगितले होते. (म. भा. वन. १९८). अष्टकाने एक अश्वमेधयज्ञही केला होता (म. भा. वन). १९८). हा विश्वामित्र गोत्राचा प्रवर ऋषी आहे. [ ऋ. म. भा.; प्रा. च. को.; सी. ऋ ].

**अष्टका** श्राद्ध व होम अशा उभयविध स्वरूपाचे हे कर्म आहे. सर्व सूत्रकारांनी अष्टकाश्राद्ध म्हणून या कर्माचा पाकयज्ञसंस्थेत अंतर्भाव केला आहे. अष्टका शब्दाचा अर्थ अष्टमी असा आहे. मार्गशीर्ष, पौष, माघ व फाल्गुन या चार महिन्यांच्या वद्य अष्टमीस अष्टका असे म्हणतात. माघ वद्य अष्टमी ही एकाष्टका, म्हणजे मुख्य अष्टमी होय. अष्टकाश्राद्धाच्या आदल्या दिवशी एक श्राद्ध करतात. अनुराधा नक्षत्रावर हे श्राद्ध करावे, असे सत्याषाढ गृह्यसूत्रात सांगितले आहे. (२. १४. ३). या श्राद्धाचा विधी मासिक श्राद्धाप्रमाणेच असतो. यात औपासनाग्नीवर चारही पार्वणांच्यासाठी 'उदीरतामवर उत्परास...' इ. मंत्रांनी पायस, ओदन (भात), कृसर (तिलमिश्रित भात) व अपूप यांची आहुती देतात, ब्राह्मणांना भोजन घालतात व पिंडदान करतात.

अष्टकाश्राद्धाचा विधी तीन दिवस चालतो. तीन दिवस निरनिराळी श्राद्धे करतात. प्रत्येक श्राद्धविधीत औपासनाग्नीवर होम करतात. याविषयी वायुपुराणतला श्लोक (८१.३-४)-

**आद्याऽपूपैः सदा कार्या मांसैरन्या भवेत्सदा ।**
**शाकैरन्या तृतीया स्यादेष द्रव्यगतो विधिः ।।**

अर्थ – पहिल्या श्राद्धात अपूप किंवा पुरोडाश, दुसऱ्यात मांस व तिसऱ्यात शाक (लाह्या वगैरे) यांचा होम करावा.

या तीनही श्राद्धांचा विधी पुढीलप्रमाणे आहे –

अष्टमीच्या दिवशी गाय हा पशू मारून त्याचा याग करतात. गाय न मिळाल्यास बोकड, मेंढी या पशूंचे किंवा अन्य कोणत्याही पशूचे मांस घेतले तरी चालते. औपासनाग्नीवर अग्निमुखतंत्राप्रमाणे सर्व विधी करून, प्रधान होमाच्या वेळी पितरांच्यासाठी आहुती देतात. नंतर ब्राह्मणभोजन, पिंडदान, इ. विधी मासिक श्राद्धाप्रमाणे करतात. या श्राद्धात काम व काल या विश्वेदेवांसाठी भोजनास ब्राह्मण सांगतात. केवळ सुवर्णदान देऊन किंवा बैलाला चारा घालूनही हे श्राद्ध करावे; पण श्राद्ध केल्यावाचून राहू नये, असे बौधायन गृह्यसूत्रांत सांगितले आहे (२.११). तीनही अष्टकाश्राद्धे एकाच दिवशी केली तरी चालतात, असेही एक मत आहे.

अष्टकाश्राद्धाच्या दुसऱ्या दिवशी अन्वष्टका श्राद्ध करतात. याचाही सर्व विधी मासिक श्राद्धाप्रमाणेच आहे. याची हविर्द्रव्ये ओदन, कृसर, पायस, दधिमंथ व मधुमंथ (घुसळलेले दही व मध) ही असतात. अष्टकाश्राद्धातल्या अवशिष्ट मांसाचा उपयोग या श्राद्धात करायचा असतो. या श्राद्धात स्त्री-पितरांना सुरा व आचाम (पेज) देतात (आश्व. गृ. सू. २.५). [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे; म. ज्ञा. को. ]

**अष्टछाप कवी** पुष्टिमार्गाचे संस्थापक वल्लभाचार्य यांचे चार शिष्य आणि वल्लभाचार्यांचे पुत्र विठ्ठलनाथ यांचे चार शिष्य मिळून व्रजभाषेचे आठ भक्त-कवी अष्टछाप या नावाने प्रसिद्ध आहेत. हे श्रेष्ठ कवी संगीतज्ञ आणि कीर्तनकार होते. विठ्ठलनाथांनी या आठ भक्त-कवींचे एक मंडल बनवून, त्यांना व्रजातल्या गोवर्धन क्षेत्रातील श्रीनाथांची कीर्तनसेवा नेमून दिली. पुष्टिमार्गातल्या अनेक शिष्यांतून आठांची निवड करून विठ्ठलनाथाने त्यांना आशीर्वाद दिला म्हणून ते अष्टछाप या नावाने प्रसिद्ध झाले. त्यांची नावे अशी –

(१) कुंभनदास — (वल्लभाचार्यांचा शिष्य)
(२) सूरदास — ''
(३) परमानंददास — ''
(४) कृष्णदास — ''
(५) गोविंदस्वामी — (विठ्ठलनाथांचा शिष्य)
(६) नंददास — (विठ्ठलनाथांचा शिष्य)

(७) छीतस्वामी — (विठ्ठलनाथांचा शिष्य)
(८) चतुर्भुजदास — ,,

जेव्हा श्रीनाथ गोवर्धनावर प्रकट झाले, तेव्हा त्यांचे अंतरंगसखे असलेले आठही कवी उत्पन्न झाले, अशी पुष्टिमार्गी लोकांची समजूत आहे. म्हणून पुष्टिमार्गात त्यांना अष्टसखा असेही म्हणतात. या आठही कवींनी मनोहर पद्यरचना करून तिच्या द्वारे श्रीनाथाची कीर्तनसेवा केली. पाहा — अष्टसखा, वल्लभाचार्य. [ अष्टछापपरिचय ]

**अष्टपदी** गीतगोविंदकर्ता जयदेव व त्याचे अनुकरण करणारे अन्य कवी यांनी रचिलेल्या प्रबंधांना अष्टपदी म्हणतात. यांचे ध्रुव व आभोग असे दोन अवयव आणि पद व विरुद अशी दोन अंगे आहेत. अष्टपद्यांचे राग व ताल कर्त्यानेच निश्चित केलेले असतात. उदा० —

अथ तृतीयप्रबन्धो वसन्तरागेण रूपकताले गीयते —
विहरति हरिरिह सरसवसंते । नृत्यति युवतिजनेन समं
सखि विरहिजनस्य दुरन्ते ॥ध्रु०॥
ललितलवङ्गलतापरिशीलनकोमलमलयसमीरे ।
मधुकरनिकरकरम्बितकोकिलकूजितकुञ्जकुटीरे ॥१॥
अथ चतुर्थप्रबन्धो रामकरिरागेण रूपकताले गीयते —
चन्दनचर्चितनीलकलेवरपीतवसनवनमाली ।
केलिचलन्मणिकुण्डलमण्डितगण्डयुगस्मितशाली ॥१॥

पण पुष्कळसे गायक कर्त्याचा नियम मोडून या अष्टपद्या अन्य रागांतही गातात. [ संगीतशास्त्र ]

**अष्टपाश** दुर्गासप्तशतीत अशी कथा सांगितली आहे की, शुंभ दैत्याने दुर्गेच्या विरुद्ध लढण्यासाठी पुढील आठ दैत्यांना पाचारण केले — उदायुध, कंबू, कोटिवीर्य, धौम्र, कालक, दौहृद, मौर्य व कालकेय. कुलार्णवतंत्रात या आठ दैत्यांचा अध्यात्मदृष्टीने विचार केला असून, त्यांना अष्टपाश म्हटले आहे. त्यांची नावे अशी —

घृणा लज्जा भयं शङ्का जुगुप्सा चेति पञ्चमी ।
कुलं शीलं तथा जातिरष्टौ पाशाः प्रकीर्तिताः ।
पाशबद्धो भवेज्जीवः पाशमुक्तः सदाशिवः ॥

अर्थ — घृणा, लज्जा, भय, शंका, जुगुप्सा, कुल, शील व जाती हे आठ पाश होत. या पाशांनी जो बद्ध असतो तो जीव आणि त्यांच्यापासून जो मुक्त असतो तो सदाशिव होय.

या अष्टपाशांचे आध्यात्मिक स्वरूप असे —

(१) **उदायुध** — ज्याचे आयुध उचललेले आहे तो. हा दैत्य म्हणजेच घृणा नावाचा पाश. घृणा म्हणजे दुसऱ्याविषयी तिरस्कारभावना. ती उत्पन्न झाली, की अहंकार वाढतो. 'षडशीतिरुदायुधाः' असे म्हणून उदायुधांची संख्या ८६ सांगितलेली आहे. घृणेचे प्रकारही ८६च आहेत.

(२) **कंबू** — म्हणजे शंख. जीवाचा लज्जारूप दुसरा पाश तोच कंबू होय. शंख जातीचा एक जलचर प्राणी असतो. ज्या वेळी त्याला प्रतिकूल वेदना होते, तेव्हा तो अवयवांचे आकुंचन करून कवचात लपून बसतो. लज्जेचे स्वरूपही असेच आहे. मनुष्य आपली दुर्बलता दिसू नये म्हणून लज्जारूपी कंबूचे आवरण घेतो. कंबूंची संख्या ८४ मानलेली आहे. त्याचप्रमाणे लज्जेचेही तितकेच प्रकार आहेत.

(३) **कोटिवीर्य** — ज्याच्या पराक्रमाची तुलना करता येत नाही, तो कोटिवीर्य. जीवाचा भय नावाचा पाशही तसाच आहे. जीवाला आपल्या अस्तित्वाचा नाश होईल, याचे विलक्षण भय असते. त्यामुळे तो मोकळ्या मनाने सांसारिक भोग घेत नाही किंवा पूर्णपणे भक्तिभावही अंगीकारीत नाही. त्यामुळेच त्याच्या ठिकाणी पारमार्थिक गोष्टींचे अज्ञानही राहते. कोटिवीर्यांची पन्नास कुले होती. तसेच या भयाचेही ५० भेद होतात.

(४) **धौम्र** — विपर्ययज्ञानामुळे उत्पन्न होणारी शंका हा चौथा पाश होय. भय व शंका यांत भेद आहे. स्वतःच्या अस्तित्वाचा नाश होण्याची आशंका म्हणजे भय; व आपणाशी संबंध असलेल्या वस्तूच्या विनाशाची आशंका म्हणजे शंका होय. या पाशाचे प्रकार १०० होतात. धौम्राची कुलेही शंभरच होती.

(५) **कालक** — हा काळ्या वर्णाचा असुर म्हणजेच जुगुप्सानामक पाश होय. अज्ञानाचा वर्ण काळाच मानलेला आहे. अज्ञानामुळे भेदज्ञान व त्यापासून जुगुप्सा म्हणजे निंदा किंवा छपवून ठेवण्याची इच्छा प्रादुर्भूत होते. साधकाला जोवर अभेदाची अनुभूती घडत नाही, तोवर जुगुप्सेच्या हातून त्याची सुटका होत नाही.

(६) **दौहृद** — म्हणजे कुलाचा अभिमानरूप पाश. साधकाला अद्वैताचा कितीही वेळा उपदेश दिला तरी अभिमानरूप पाश शिल्लक असेल, तर त्या उपदेशाचा प्रभाव पडत नाही.

(७) **मौर्य** — हा जीवाचा शील नावाचा पाश आहे. शील म्हणजे स्वभावप्रकृती. अद्वयपदाला पोचण्याच्या कामी ही प्रकृती अडथळा आणते.

(८) **कालकेय** — हा जाती नावाचा आठवा पाश होय. भेदज्ञानाने जातीविषयीचा अभिमान वाढीस लागतो. या पाशातून मुक्त होण्यासाठी पुष्कळ परिश्रम करावे लागतात.

अष्टपाश जीवाला बंधात टाकणारे आहेत. ते तोडल्यावाचून विमलबोधरूप भगवत्साक्षात्कार होऊ शकत नाही. जो साधक आपले सर्व प्रकारचे सदसद्भाव परमात्म्यापुढे ठेवतो म्हणजेच

त्यांच्या जाणिवेसह भगवंताला शरण जातो, तो भगवंताच्याच कृपेने या अष्टपाशांतून मुक्त होतो. [ कल्याण – साधनांक ]

**अष्टपुत्रा सौभाग्यवती** सुवासिनीला 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव'=आठ पुत्र तुला होवोत, असा आशीर्वाद देण्याची प्रथा आहे. त्यापूर्वी 'दशपुत्रा सौभाग्यवती भव' असा आशीर्वाद देण्याचा प्रघात असावा. ऋग्वेदात असा एक मंत्र आहे – 'दशास्यां पुत्रानाधेहि पतिमेकादशं कृधि'=इंद्रा, हिच्या (या वधूच्या) ठिकाणी तू दशपुत्रांचे आधान कर आणि हिचा पती हा अकरावा होईल असे कर (ऋ० १०.८५.४५). गृहप्रवेशानंतर लक्ष्मीपूजन, इ. विधी करतात, त्या वेळी हा मंत्र म्हणतात. पण हल्लीची रूढी मात्र 'अष्टपुत्रा' म्हणण्याचीच आहे. ऋग्वेदाच्या परिशिष्टात 'अष्टपुत्रा भव त्वं च' असे वचन आले आहे. त्यावरून वाटते, की हे दोन्ही संप्रदाय एकाच वेळी प्रचलित असावे. त्यांतला दशपुत्री संप्रदाय पुरातन असून, अष्टपुत्री संप्रदाय त्यानंतरचा असावा. पहिला संप्रदाय मागे पडण्याचे बीज 'पतिमेकादशं कृधि' या वचनात असावे. दहा पुत्र झाल्यानंतर पत्नीशी असलेला वैवाहिक संबंध तोडावा लागत असे, हे त्या वचनावरून ध्वनित होते. तेव्हा ही आपत्ती टाळण्यासाठी अष्टपुत्रा भव हा आशीर्वाद प्रचलित केला असावा. [ वै. नि. ]

**अष्टभोग** (१) सुगंध (२) स्त्री (३) वस्त्रे (४) संगीत (५) तांबूल (६) शय्या (७) भोजन व (८) पुष्प हे अष्टभोग होत. सोमेश्वराच्या मानसोल्लास या ग्रंथात यांचे विशेष वर्णन आले आहे –

(१) **सुगंधभोग** – घामाचा वास घालविण्यासाठी निरनिराळ्या उटण्या किंवा उटणी लावणे.

(२) **स्त्रीभोग** – यात राजाने ज्या स्त्रियांशी लग्ने करायची, त्यांच्या अंगी कोणते गुण असावे ते वर्णिले आहे.

(३) **वस्त्रभोग** – यात राजाने कोणत्या ऋतूत कोणते वस्त्र वापरावे, त्याचे ऋतुमानाप्रमाणे रंग कसे असावे आणि त्याचा जाडतलमपणा कसा असावा ते सांगितले आहे.

(४) **संगीतभोग** – मानसोल्लासात याचे वर्णन बरेच आहे.

(५) **तांबूलभोग** – यात सुपाऱ्या कुठून मागवाव्या, त्या कशा वाळवाव्या व कातराव्या, हे सांगितले आहे. खास राज-तांबूल पिकलेल्या ५२ पानांचा असावा, त्याला मोत्यांचा चुना लावावा व त्यात कापूर, कस्तूरी, इ. सुगंधी द्रव्ये घालावी, अशा सूचना दिल्या आहेत.

(६) **शय्याभोग** – यात सात प्रकारच्या शय्या आणि आठ प्रकारचे मंचक सांगितले आहेत. तोयशय्या म्हणजे आत पाणी भरलेली चामड्याची गादी होय. हंसजा म्हणजे हंसाच्या पिसांची बनवलेली शय्या होय. त्याशिवाय पुष्पशय्या, कमलतंतूंची शय्या, साधी कापडाची शय्या, असे शय्येचे विविध प्रकार सांगितलेले आहेत.

(७) **अन्नभोग** – यात ऋतुमानाप्रमाणे शाकपदार्थ, मांसपदार्थ व पक्वान्ने कशी बनवावी, हे सांगितले आहे. भारतीयांच्या आहारशास्त्राचा इतिहास लिहायचा झाल्यास मानसोल्लासातील हे प्रकरण मोलाचे वाटेल.

(८) **पुष्पभोग** – यात राजाने कोणत्या फुलांच्या माळा घालाव्या त्याचा निर्देश असून, चंपक, मल्लिका, उत्पल, पाटल, इ. अनेक फुलांची नावे दिलेली आहेत. [ मानसोल्लास ]

**अष्टमंगलकमाला** आठ मंगल वस्तूंची माला. या वस्तूंची नावे अशी – मीनमिथुन, देवविमानगृह, श्रीवत्स, वर्धमान, त्रिरत्न, पुष्पदाम, इंद्रयष्टी किंवा वैजयंती आणि पूर्ण कलश. सांची येथील एका तोरणस्तंभावर ही माला



अष्टमंगलकमाला

अंकित आहे. मात्र तिथल्या एका मालेत अकरा आणि दुसरीत तेरा मंगल चिन्हे ग्रथित केलेली आहेत. पुढे कुशाणकालात मंगलांची संख्या आठांवर येऊन तीच रूढ झाली. पृथ्वी जिंकण्यासाठी अभियान करणारे नृपती आणि सेनापती मंगलासाठी अशा माला धारण करीत. [ ह. च. सां. अ. ]

**अष्टमांगल्य** हा त्रैवर्णिकांचा एक संस्कार आहे. याला 'आठांगुळे' म्हणतात. गर्भाधान संस्कार यथाकाल न होता स्त्री गर्भिणी झाल्यास आठव्या महिन्यात हा संस्कार करण्याची रूढी आहे. हा सूत्रोक्त नाही. पुंसवन आणि अनवलोभन या दोन संस्कारांना जोडून हा करतात. याचा सर्व विधी ऋतुशांतीसह गर्भाधानाप्रमाणेच असतो. संस्कारकौस्तुभात या संस्काराचा उल्लेख आहे. [ म. ज्ञा. को. ]

**अष्ट यंत्रबल सिद्धी** प्राचीन युद्धोपयोगी साधनांत अष्ट यंत्रबल सिद्धी प्रमुख होत्या. ही आठ प्रकारची वाहने होती व त्यांत बसून युद्धे लढली जात होती. त्यांची नावे व संक्षिप्त परिचय पुढीलप्रमाणे –

(१) **दिव्य विमान** – वैदिक युगात ऋभू नावाचा एक वर्ग होता व तो शिल्पविद्येत पारंगत होता. ऋग्वेदावरून कळते, की ऋभूंनी एका दिव्य विमानाची रचना केली होती. हे विमान यंत्रबलाने आकाश, भूमी व जल या तीन्ही ठिकाणीं अबाधित गतीने चालत असे (ऋ. ४. ३६. १).

(२) **पुष्पक विमान** – वाल्मीकिरामायणात याचे विस्तृत वर्णन मिळते. हे संकल्पशक्तीने चालत व थांबत असे (वा. रा. युद्ध. १२३. २४).

(३) **सौभ विमान** – हे शाल्व राजाकडे होते व त्याचा आकारही फार मोठा होता. महाभारतात याचे आकार, प्रकार, संचालन व उपयोग यांचे वर्णन केले आहे (म. भा. वन. २२).

(४) **सूत विमान** – पारा व अभ्रक यांचा धातूंशी संयोग करून याची रचना करीत.

(५) **हर्यश्व विमान** – हे लाकडाचे बनवीत व त्याला दोन लाकडी घोडे जोडीत. त्याची कळ दाबताच ते घोडे तीव्र गतीने धावू लागत. हे विमान केवळ इंद्राच्या उपयोगासाठी बनविले गेले होते.

(६) **प्लव विमान** – सुधन्वा राजाच्या पुत्रांसाठी ऋभूंनी याची रचना केली होती. हे लाकडी वाहन असून, ते समुद्रसंतरणाचे एक साधन होते.

(७) **अमृतगवी** – हा एक प्रकारचा रथ होता. ऋग्वेदात याचे सुंदर वर्णन आहे (४. ३३. ८).

(८) **शीलासंतरिणी** – नदी-नाले पार करण्यासाठी उपयुक्त. एक रसायन तयार करून त्याचा पाषाणाला लेप देत. त्यामुळे तो पाषाण पाण्यावर तरंगत राही. असेच लेपयुक्त पाषाण एकापुढे एक रचून नल, नील, इ. वानरांनी रामाचे सैन्य लंकेत नेण्यासाठी समुद्रावर सेतू बांधला होता. [ चिं. न. च. ]

**अष्टयाम** हिंदी भाषेतला एक काव्यप्रकार. याचा विकास विशेषेकरून रीतिकाळात झाला. या प्रकारात एखाद्या अवताराची अथवा भक्ताची दिनरात्रिचर्या वर्णित असते. कालिदासाने जशी आपल्या ऋतुसंहारात ऋतुपरत्वे विलासी व्यक्तींची जीवनचर्या सांगितली आहे, तशाच प्रकारची जीवनचर्या अष्टयाम काव्यात आढळते. देवकवी, विश्वनाथसिंह, हितवृंदावनदास, खुमान व रघुराजसिंह यांची अष्टयाम काव्ये विशेष उल्लेखनीय आहेत. [ हिं. सा. को. ]

**अष्टयाम सेवा** पुष्टिमार्गी भक्तिसंप्रदायाची श्रीनाथपूजा, अष्टयाम सेवा या नावाने आठ प्रहरांत विभागलेली असते. ही सेवा प्रातःकालापासून रात्री देवाच्या निद्रासमयापर्यंत चालते. मंगला, शृंगार, ग्वाल, राजभोग, उत्थापन, भोग, सायंकालीन आरती आणि शयन अशी हिची आठ रूपे आहेत. गोस्वामी विठ्ठलनाथांनी ही अष्टयाम सेवा विशेष रूपाने प्रचारात आणली. त्यांनी अष्टछाप कवींना प्रत्येक उपचारप्रसंगी त्या त्या उपचाराला अनुसरून कीर्तनसेवा नेमून दिली. प्रभुचरण हरिराय यांनी आपल्या साहस्रीभावना या ग्रंथात अष्टयाम सेवेचे वर्णन केले आहे –

(१) **मंगला** – यात श्रीकृष्णाला जाग आणतात आणि नंतर त्याच्यापुढे मंगलभोग ठेवून आरती करतात. श्रीकृष्णाचे हे मंगलदर्शन पुढीलप्रमाणे निरूपित आहे –

> **जनन्युत्सङ्गसंलग्नः प्रदर्शितमुखाम्बुजः ।**
> **यशोदाचुम्बितमुखो नन्दाद्युत्सङ्गलालितः ॥**
> (साहस्रीभावना ७)

अर्थ – बाळकृष्ण यशोदेच्या मांडीवर वसलेला आहे. तो तिला आपले मुखकमल दाखवितो. यशोदा त्याच्या मुखाचे चुंबन घेते. (नंतर) नंदादी गोपाल कृष्णाला मांडीवर घेऊन त्याचे कौतुक करतात.

(२) **शृंगारसेवा** – यशोदा बाळकृष्णाला उटणी वगैरे लावून स्नान घालते, पीतांबर नेसविते आणि त्याचा ललित शृंगार करते. भक्तगण ते रसमय दर्शन घेऊन स्वतःला धन्य समजतात.

(३) **ग्वालसेवा** – श्रीकृष्ण गोपाल सवंगड्यांसह गायी चारण्यासाठी वनात जायला निघतो. त्या वेळी यशोदा त्याला उपदेश करते – 'माझ्या बाळा, गहन वनात आणि जलाशयाकडे जाऊ नको. कंटकित भूमीवर तुझे कमलकोमल चरण ठेवू नको. गायींच्या पाठीमागून धावू नको. सवंगड्यांशी भांडू नको.'

(४) **राजभोगसेवा** – श्रीकृष्ण वनात गेला आहे. त्याच्या भुकेच्या वेळी यशोदा गोपींच्या हस्ते सुरस पक्वान्नें आणि अन्य भोजनसामग्री वनात पाठवीत आहे. सारे पदार्थ सोन्यारुप्याच्या पात्रांत आहेत. बाळकृष्ण कालिंदीच्या तीरावर बसून भोजन करीत आहे –

> **यमुना तट भोजन करत गोपाल**
> **बिबिध भाँती दे जसुमति व्यंजन बहुत रसाल**
> **ग्वाल मंडली मध्य विराजत हँसत हँसावत ग्वाल**
> **कमलनयन मुसकाय मंद हँस करत परस्पर ख्याल**

अर्थ – यमुनातीरावर गोपाल भोजन करीत आहेत. यशोदेने (त्यांना) नाना प्रकारची रसाळ पक्वान्नें पाठवून दिली आहेत.

गोपबालांच्या मंडलात विराजित होऊन कृष्ण हसतो आहे आणि मित्रांना हसवितो आहे. कमलनयन श्रीकृष्ण मंदस्मित करीत आहे. तो गवळ्यांसंगे नाना प्रकारच्या मसलती करीत आहे.

(५) **उत्थापनसेवा** – राजभोगानंतर बाळकृष्ण मध्यान्ह-शयनासाठी कुंजात प्रवेश करीत आहे. सहा घटिका दिवस शिल्लक राहिल्यावर त्याला जाग आणली जात आहे.

(६) **भोग** – श्रीकृष्ण शय्येवरून उठल्यावर त्याला डोंगरातून आणलेली कंदमूळफळे समर्पित करतात. मग बाळ-कृष्ण वनातून घरी येण्यासाठी उत्सुक होतो.

(७) **संध्या आरती** – श्रीकृष्ण मंदमधुर मुरली वाजवीत वनातून गायीवासरांसह परत येतो. यशोदा त्याच्या दर्शनाने मुदित होते आणि त्याला आरती ओवाळते.

(८) **शयनसेवा** – यशोदा श्रीकृष्णाला शयनभोगासाठी बोलाविते. सुवर्णपात्रात नवनीत आणि मिश्री त्याच्यापुढे ठेवते. श्रीकृष्ण भोजन करतो. नंतर निद्रासुखासाठी दुग्धधवल शय्येवर विराजमान होतो. यशोदा त्याच्या पाठीवर हात फिरवून त्याला म्हणते, 'बाळ, आता झोपी जा.' त्याला झोप लागली असे समजून यशोदा घरात जाते. पाठोपाठ गवळणी तिथे येऊन त्याला सांगतात की 'राधा तुझ्या दर्शनासाठी प्रतीक्षा करीत राहिली आहे.' ते ऐकून –

> कोटिकन्दर्पलावण्यो मदनाधिकसुंदरः ।
> सखीप्रदर्शितपथश्चलितो मन्दमन्थरः ।।
>
> (साहस्रीभावना १०८९)

अर्थ – कोटी मदनांप्रमाणे ज्याचे लावण्य आहे, जो मदना-हूनही सुंदर आहे, ज्याला सखीजनांनी मार्ग दाखविला आहे, असा (राधारमण शय्येचा त्याग करून) मंद गतीने घरातून निघाला आहे.

वरीलप्रमाणे विविध भोग समर्पून आणि प्रसंगाला अनुरूप असे भजन-कीर्तन करून ही अष्टयाम सेवा वल्लभसंप्रदायात केली जाते. पाहा – वल्लभसंप्रदाय. [ कल्याण – भक्तिअंक ]

## अष्टयोग

एक प्रायश्चित्ताचा प्रकार. याने महापातकांचेही क्षालन होते. याचा विधी असा – प्रथम सात दिवस उपोषण, नंतर एखाद्या शिवालयाचा जीर्णोद्धार, बेलाचे झाड लावणे, शीर्षासन व प्राणायाम. प्राणायामाच्या वेळी नाडीला उद्दे-शून म्हणायचे –

'हे देवी, तुझ्यामध्ये पापी जीव वास्तव्य करतो, त्याला बाहेर घालव.' अशा प्रकारे पूरक – रेचक झाल्यावर मग नाडीला पुन्हा म्हणायचे. 'तू आता पापमुक्त झालीस.' शिवाने याच विधानाने ब्रह्महत्येचे पातक घालविले. [ हिं. मॅं. क. से. ]

## अष्टवर्ग

सारस्वत ब्राह्मणांच्या लग्नातला एक विधी. वरा[त] निघण्यापूर्वी वरपिता आपल्या कुळातली आठ माणसे वरासहित एका पंक्तीत बसवितो. त्यांना अष्टवर्ग म्हणतात. व[धू] त्यांना केळीच्या पानावर फराळ वाढते आणि वराच्या पाना-पासून शेवटच्या पानापर्यंत तुपाची धार न खळविता ओतली जाते. मग ती त्या अष्टवर्गांना पानसुपारी देऊन आरती ओवाळते. एवढे झाल्यावर अष्टवर्ग फराळ करतात. [ ल. वि. सो. ]

## अष्टविनायक

महाराष्ट्रात विनायकांची आठ स्थाने हे गणपतिक्षेत्रे म्हणून प्रसिद्ध आहेत. मुद्गल पुराणात त्यांचे वर्णन आढळते. त्यांची नावे पुढीलप्रमाणे –

| देवतानाम | स्थान | जिल्हा |
|---|---|---|
| १ मोरेश्वर | मोरगाव | पुणे |
| २ बल्लाळेश्वर | मुरुड (पाली) | कुलाबा |
| ३ विनायक | महड | कुलाबा |
| ४ चिंतामणी | थेऊर | पुणे |
| ५ गिरिजात्मज | लेण्याद्री | पुणे |
| ६ विघ्नेश्वर | ओझर | पुणे |
| ७ गणपती | रांजणगाव | पुणे |
| ८ गजमुख | सिद्धटेक | नगर |

वरील प्रत्येक क्षेत्राची माहिती त्या त्या नावाखाली कोशात दिली आहे. [ म. ज्ञा. को. ]

## अष्टशील

बौद्ध धर्मातले एक व्रत. याला उपोसथशील असेही म्हणतात. प्रत्येक महिन्याच्या दोन अष्टम्या, पौर्णिमा व अमावस्या या चार उपोसथाच्या तिथी असतात. त्या दिवशीच अष्टशीलांचे पालन करायचे असते. अष्टशील ग्रहण करणाऱ्या व्यक्तीला एखाद्या भिक्षूकडे जाऊन ते ग्रहण करावे लागते. यात पुढीलप्रमाणे आठ प्रतिज्ञा करायच्या असतात –

(१) मी प्राणिहिंसेपासून विरत राहीन, (२) चोरीपासून विरत राहीन, (३) अब्रह्मचर्यापासून विरत राहीन, (४) असत्य भाषणापासून विरत राहीन, (५) सुरा व मादक पदार्थांच्या सेवनापासून विरत राहीन, (६) अकाल भोजना-पासून विरत राहीन, (७) नृत्य, गायन, वादन आणि तमाशा यांपासून, तसेच पुष्पमाला, सुगंधित द्रव्ये व शरीराच्या शृंगारा-साठी कोणत्याही प्रकारचे आभूषण धारण करणे यापासून विरत राहीन व (८) उंच व मौल्यवान शय्येवर निजण्यापासून विरत राहीन. [ बौद्धचर्याविधी ]

**अष्टसखा** पुष्टिमार्गातील एक कल्पना. गोपालकृष्णाचे अनेक सवंगडी होते. त्या सर्वांना समागमे घेऊन कृष्णाने गोकुळात अनेक प्रकारच्या बाललीला केल्या. त्या सवंगड्यांत समानवय व समानशील असे कृष्णाचे सात परम मित्र होते. कृष्ण धरून त्यांची संख्या आठ होते. हे आठ मित्र पुष्टिमार्गात अष्टसखा या नावाने प्रसिद्ध आहेत. त्यांची नावे पुढीलप्रमाणे – कृष्ण, तोक, अर्जुन, ऋषभ, सुबल, श्रीदामा, विशाल आणि भोज.

अष्टछाप कवींना त्यांच्या सख्यभक्तीमुळे आणि अनन्यभावामुळे 'अष्टसखा' मानले गेले आहे. सूरदासाला कृष्ण, परमानंददासाला तोक, कुंभनदासाला अर्जुन, कृष्णदासाला ऋषभ, छीतस्वामीला सुबल, गोविंदस्वामीला श्रीदामा, चतुर्भुजदासाला विशाल आणि नंददासाला भोज समजतात. पाहा – अष्टछाप. कवी. [ हिं. सा. को. ]

**अष्टादशांगुळ** बासरीच्या वर्गातले एक वाद्य. यात मुखाजवळच्या छिद्रापासून शेवटच्या छिद्रापर्यंत १८ बोटांचे अंतर असे. १ ते ७ ही छिद्रे बोटांनी बंद करून ही बासरी वाजविल्यावर मंद्र षड्ज निघतो. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**अष्टादंष्ट्र वैरूप** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे अकरावे सूक्त याने रचले आहे. इंद्रपराक्रम हा या सूक्ताचा विषय आहे. इंद्राने वज्रप्रहार करून कपटी वृत्राला मारल्याचा निर्देश या सूक्तात आहे. याची एक ऋचा (१०-१११.१०) पुढे दिली आहे –

सध्रीचीः सिन्धुमुशतीरिवायन् त्सनाज्जार आरितः पूर्भिदासाम्।
अस्तमा ते पार्थिवा वसून्यस्मे जग्मुः सूनृता इन्द्र पूर्वीः ॥

अर्थ – पतिमीलनोत्सुक नवतरुणीसदृश समुद्रगामी जलांचा अधिपती अशा हे नगरभेत्त्या आणि शत्रुजेत्या इंद्रा, तू आम्हांस पृथ्वी, संपत्ती आणि निवासस्थान दे.

'जेव्हा उषादेवी सूर्याशी संलग्न असते, तेव्हा त्याचे अनेक वर्णांचे किरण अद्भुत शोभा धारण करतात' असे याने एका ऋचेत (ऋ. १०.१ ११.७) म्हटले आहे. हा सृष्टिचमत्कार ध्रुवप्रदेशातला असावा. हा ऋषी सामद्रष्टाही आहे (पं. ब्रा. ८.९.२१). [ प्रा. च. को.; ऋ. म. भा. ]

**अष्टाध्यायी** पाणिनिविरचित व्याकरणावरचा सूत्ररूप ग्रंथ. वेदाच्या सहा अंगांत याची गणना आहे. यात ३९८१ सूत्रे असून, आरंभी वर्णसमाम्नायाची १४ प्रत्याहारसूत्रे आहेत. ही प्रत्याहारसूत्रे शिवाच्या डमरूतून निघाली, अशी जनश्रुती आहे. हा ग्रंथ एक हजार अनुष्टुभ श्लोकांच्या बरोबरीने भरतो. महाभाष्यांत अष्टाध्यायीला सर्ववेदपरिषच्छास्त्र म्हटले आहे. सर्व वैदिक संहिता व त्यांची प्रातिशाख्ये यांचा पाणिनीने समादर केला आहे. अष्टाध्यायीत शाकटायन, शाकल्य, आपिशली, गार्ग्य, गालव, शौनक, स्फोटायन, भारद्वाज, काश्यप व चाक्रवर्मण या वैयाकरण पूर्वाचार्यांचा उल्लेख केला आहे.

अष्टाध्यायीत आठ अध्याय असून, प्रत्येकाचे चार पाद आहेत. प्रत्येक अध्यायात व पादात सूत्रांची समान वाटणी झालेली नाही. पाणिनीच्या सूत्रांचे पाच प्रकार आहेत– संज्ञा, परिभाषा, विधी, नियम व अतिदेश.

पहिल्या व दुसऱ्या अध्यायांत संज्ञा व परिभाषा यांच्याविषयी सूत्रे आहेत. त्यांत क्रियेसाठी आत्मनेपद, परस्मैपद व संज्ञांच्या साठी विभक्ती व समास हे विषय आले आहेत. तीन ते पाच या अध्यायांत कृदन्त, तद्धित या प्रत्ययांचे निरूपण आहे. सहाव्या अध्यायात द्वित्व, संप्रसारण, संधी, स्वर, आगम, लोप, दीर्घ, इ. विषयांवरची सूत्रे आहेत. सातव्या अध्यायात, 'अंगाधिकार' प्रकरण आहे. त्यात प्रत्ययामुळे मूळ शब्दात व मूळशब्दांमुळे प्रत्ययात होणाऱ्या परिवर्तनांचे विवरण आहे. आणि आठव्या अध्यायात द्वित्व, प्लुत, णत्व, षत्व यांचे नियम दिले आहेत. पाणिनीची सूत्ररचना योजनाबद्ध आहे. तिच्यात कुठेही गौरवदोष नाही. एकदा सूत्र रचल्यानंतर पाणिनी त्यात पुन्हा फिरवाफिरव करीत नाही, असे पतंजली सांगतो.

याव्यतिरिक्त वर्ण्य विषयाशी संबद्ध अशी गणपाठ व धातुपाठ नामक दोन प्रकरणे असून, तीही पाणिनिकृतच मानली गेली आहेत. अष्टाध्यायीत वैदिक संस्कृत व तत्कालीन शिष्ट भाषेतले संस्कृत यांचा सर्वांगपूर्ण विचार केलेला आहे. पाणिनीने तत्कालीन संस्कृत भाषेचे फार चांगले सर्वेक्षण केलेले आहे. अष्टाध्यायीच्या रचनेपूर्वी भारतात शब्दविद्येचा अनेकांगी विकास झालेला होता. पण अष्टाध्यायीसारखा बंदिस्त व सर्वांगपरिपूर्ण ग्रंथ निर्माण झाल्यावर त्यापूर्वीचे ग्रंथ लोप पावले. अष्टाध्यायीचेच आसेतुहिमाचल अध्ययन होऊ लागले व तिलाच प्रामाण्य लाभले. अष्टाध्यायीपुढे फक्त यास्काचे निरुक्तच तेवढे टिकले. कारण त्याचे ध्येय वैदिक अर्थाचे विवरण करणे हे होते.

पाणिनीच्या अष्टाध्यायीचे एक निराळ्या दृष्टीनेही महत्त्व आहे. निरुक्ताप्रमाणेच तोही ग्रंथ एककर्तृक आहे. अष्टाध्यायीत काही फेरफार झाले असतील तर ते अगदीच मामुली. बर्नेल म्हणतो की अडीच हजार वर्षांच्या प्रदीर्घ कालानंतरही अष्टाध्यायीचा पाठ जितका शुद्ध व प्रामाणिक मिळतो, तितका दुसऱ्या कोणत्याही संस्कृत ग्रंथाचा मिळत नाही.

पाणिनीच्या रचनेचे सर्वांत आगळे वैशिष्ट्य हे, की त्याने धातूंपासून शब्दनिर्वचनाच्या पद्धतीचा अंगीकार केला. त्याने लोकप्रचलित सर्व धातूंचा संग्रह 'धातुपाठा'त केला आहे. भारतातल्या आर्य भाषा व बोली यांच्या तौलनिक अध्ययनासाठी हा धातुपाठ अत्यंत मौलिक आहे. युरोपीय पंडितांना जेव्हा अष्टाध्यायीचा परिचय झाला, तेव्हा त्यांच्या मनावर पाणिनीची विलक्षण छाप पडली. वेबरने तर अष्टाध्यायीला जगातल्या सर्व व्याकरणग्रंथांत श्रेष्ठ मानले आहे. पाणिनीची सूत्रे अत्यंत संक्षिप्त आहेत. त्यांना स्वल्पाक्षर बनविण्यासाठी पाणिनीने ज्या प्रत्याहारादी युक्त्या योजल्या आहेत, त्या त्याच्या बुद्धीची सूक्ष्मता प्रगट करतात. पाणिनीने अष्टाध्यायी रचून संस्कृत भाषेला अमर पदवी दिली. त्याने संस्कृत भाषेच्या सर्व अंगांवर प्रकाश टाकला. संस्कृत भाषेचा जिथवर विस्तार आहे, तिथवर पाणिनीच्या व्याकरणाला प्रामाण्य आहे.

अष्टाध्यायीच्या निर्मितीपासून अर्थव्याख्येला मदत करणारी अशी एक वृत्ती तिच्या जोडीने होती. पतंजलीने अष्टाध्यायीला वृत्तिसूत्र असे नाव दिले आहे, ते त्यासाठीच. आणखीही काही वृत्ती होत्या, त्यांतली 'काशिकावृत्ती' आजमितीस उपलब्ध आहे. त्यानंतर सुमारे दोनशे वर्षांनी कात्यायनाने अष्टाध्यायीच्या सूत्रांची बहुमुखी समीक्षा करणारी चार हजार वार्तिके सूत्रशैलीतच निर्माण केली. पुढे पतंजलीने त्यांच्या आधारावरच आपले व्याकरणमहाभाष्य रचले. पाणिनीच्या सूत्रांचे अर्थ, उदाहरणे व प्रक्रिया या तीन्ही दृष्टींनी व्याकरणमहाभाष्य हा ग्रंथ सर्वोत्तम आहे. पाहा – पाणिनी. [पा. का. भा.; हिं. वि. को.]

**अष्टाह्निक पर्व व्रत** जैन पूजापर्व. आषाढ, कार्तिक व फाल्गुन या तीन महिन्यांत तीन वेळा याची प्राप्ती होते. याचा काल शुद्ध अष्टमीपासून पूर्णिमेपर्यंत असतो. अनेक प्रकारे हे व्रत केले जात असले तरी, त्यातले तीन विधी मुख्य आहेत –

(१) सप्तमीच्या दिवशी एकाशन.

(२) अष्टमी ते पूर्णिमा उपवास व (३) 'ॐ ह्रीं नंदीश्वरसंज्ञाय नमः' या मंत्राचा जप. या आठ दिवसांत जिनमंदिरात पंचमेरूची स्थापना करून त्यावर नंदीश्वरप्रतिमा बसवितात व तिची पूजाअर्चा करतात. म्हणून याला 'नंदीश्वर पर्व,' असे म्हणतात.

याची कथा अशी – अयोध्येत कुबेरमित्र नावाचा एक श्रेष्ठी होता. श्रीवर्म, जयवर्म व जयकीर्ती असे त्याला तीन पुत्र होते. त्यांनी हे व्रत केले व इहलोकी राज्यादी वैभव भोगून अंती ते मोक्षाला गेले. [जै. व्र. वि. सं.]

**अष्टावक्रगीता** एक आध्यात्मिक ग्रंथ. याला अष्टावक्रसंहिता असेही नाव आहे. ही गीता अष्टावक्राने जनक राजाला सांगितली. मुक्तीची इच्छा करणाऱ्याने सर्व विषयांचा त्याग करून क्षमा, आर्जव, दया, संतोष व सत्य यांचा आश्रय करावा; तसेच, सर्वसाक्षी चैतन्यरूप आत्मा हा सर्वव्यापी असून, तो देहापेक्षा निराळा आहे, याचे भान ठेवावे, असे या गीतेत सांगितले आहे.

आब्रह्मस्तम्बपर्यन्तमहमेवेति निश्चयी।
निर्विकल्पः शुचिः शान्तः प्राप्ताप्राप्तविनिर्वृतः॥

अर्थ – ब्रह्मापासून गवतापर्यंत सर्वत्र मीच आहे, अशी अनुभूती प्राप्त केलेला आणि संकल्परहित, शुद्धस्वरूप, शांत, लाभालाभरहित, असा पुरुष आत्मानंदात परिपूर्ण असतो.

अशा प्रकारचे भगवद्गीतेसारखेच आत्म्याविषयीचे अजरामर तत्त्वज्ञान या ग्रंथात अष्टावक्राने सांगितले आहे. [सार्थ अष्टावक्रगीता – अनुवाद श्री. शांताराम थत्ते]

**अष्टाक्षरी मंत्र** 'ॐ नमो नारायणाय' हा अष्टाक्षरी वैष्णव मंत्र होय. याचा ऋषी नारायण, देवता विष्णु व गायत्री हा छंद आहे. याचा उपदेश गुरूकडून घ्यावा असतो. हा मंत्र मोक्षदायक आहे. (पद्म पु. उ. खं. २२६)

**असंग** एक बौद्ध पंडित. याचा काल भिक्षू जगदीश काश्यप याच्या मते इ. स. चे दुसरे शतक व पं. राहुल सांकृत्यायन यांच्या मते इ. स. ३५० होय. भारतीय बौद्ध दर्शनाला अंतिम विकासाप्रत पोचविण्यासाठी पहिला फार मोठा प्रयत्न असंग व वसुबंधू या दोन पेशावरी बंधूंनी केला. असंग हा थोरला बंधू होय. याने योगाचारभूमी, उत्तरतंत्र, इ. ग्रंथ लिहून विज्ञानवादाचे समर्थन केले. वसुबंधूने अभिधर्मकोश हा विज्ञानवादावरचा मोठा ग्रंथ लिहून आपल्या मोठ्या बंधूच्या दार्शनिक विचारांना सुव्यवस्थित रूप दिले. वसुबंधूचा आणखी एक ग्रंथ म्हणजे वादविधान हा होय. या ग्रंथाने तो मध्यकालीन न्यायदर्शनाचा जनक ठरला.

असंगाचा जन्म पुरुषपूर (पेशावर) येथे एका ब्राह्मण कुटुंबात झाला. याहून त्याच्या चरित्राविषयी अधिक माहिती उपलब्ध होत नाही. हा विज्ञानवाद्यांचा प्रमुख आचार्य होता. विज्ञानवाद हा असंगाच्या पूर्वीही अस्तित्वात होता. लंकावतारसूत्र, संधिनिर्मोचनसूत्र, इ. महायानी सूत्रग्रंथांत त्याचे दिग्दर्शन आलेले होते. पण त्या वादाला बौद्ध दर्शनात सुप्रतिष्ठित केले ते असंगाने. विज्ञानवाद हा विज्ञानालाच परमार्थतत्त्व मानतो. पाच इंद्रियांची पाच विज्ञाने आणि मनाचे विज्ञान हे सहावे विज्ञान, याव्यतिरिक्त

या वादात एक सातवे आलयविज्ञान मानलेले आहे. आलयविज्ञान म्हणजे एक समुद्र आहे. समुद्रावर जसे तरंग उत्पन्न होतात व नष्ट होतात त्याचप्रमाणे आलयविज्ञानाच्या सागरात विश्वातल्या साऱ्या जड-चेतन वस्तू उत्पन्न आणि विलीन होतात.

असंगाने महायानोत्तरतंत्र, सूत्रालंकार, बोधिसत्त्वपिटकावदाद, वस्तुसंग्रहणी व योगाचारभूमी असे पाच ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकी योगाचारभूमी हा त्याचा महत्त्वाचा ग्रंथ आहे. हा वस्तुतः विज्ञानवादी तत्त्वज्ञानाचाच ग्रंथ आहे; पण या ग्रंथातल्या योगाचार या नावावरून त्याच्या संप्रदायाला योगाचार हे नाव मिळाले. विज्ञानभूमी, मनोभूमी, सवितर्कसविचारभूमी, इ. १७ भूमी (प्रकरणे) या ग्रंथात आहेत. योगाचाराचे सिद्धान्त शंकराचार्यांच्या वेदान्त तत्त्वज्ञानाशी बरेचसे जुळते आहेत. म्हणूनच शंकराचार्यांना प्रच्छन्न बौद्ध म्हटले गेले.

वसुबंधू हा प्रथम सर्वास्तिवादी होता; पण पुढे असंगाच्या बौद्धिक प्रभावामुळे तोही योगाचारसंप्रदायात दाखल झाला. असंगाच्या योगाचार-भूमीचे तिबेटी व चिनी भाषांत अनुवाद झाले आहेत. असंग हा न्यायदर्शनातलाही मोठा पंडित होता. पाहा – वसुबंधू. [ द. दि.; पु. त. नि.; हिं. वि. को. ]

**असत्** (न+सत्=सताचे विरोधी.) 'सत्तावद्भिन्नम्' = ज्याला सत्ता आहे त्याच्याहून भिन्न. 'नामरूपाभ्यामव्याकृतं कारणात्मना स्थितं सूक्ष्मरूपमव्यक्तम्' = नामरूपांनी व्याकृत न झालेले व कारणरूपाने असलेले सूक्ष्मरूप अव्यक्त म्हणजे असत् होय (वेदान्ती मत). 'अकिञ्चित्करम् अभावादिकम् = जे काही करू शकत नाही असे अभावादिक ते असत् (बौद्ध). जग उत्पन्न होण्यापूर्वी प्रथम असत् होते. पुढे त्यापासून सत् निर्माण झाले. अव्यक्त होते ते व्यक्त झाले व त्याने आपल्या आवडीचे रूप धारण केले (तै. उ. २.७). पण असत्सारख्या अभावात्मक कल्पनेपासून जगाची उत्पत्ती झाली, हे ज्यांना मान्य नव्हते, त्यांनी असत्चा अर्थ अभावसदृश अमूर्त वस्तू असा लावला. असत्ची अज्ञेयात्मक कल्पना ऋग्वेदाच्या नासदीय सूक्तात प्रथम दिसते (ऋ. १०.१२९).

गुरुदेव रा. द. रानडे यांनी असत्चा अर्थ 'नामरूपात्मक सत्शी विरोधी; पण सत्शी समानधर्मी असलेले' असा केला आहे. पाहा – सत्. [ उपनिषद्रहस्य ]

**असहकार** सहकार्य न करणे, असा याचा अर्थ आहे. मनुष्याचे सर्व जीवन परस्पर-सहकार्यावरच अवलंबून असते. कुटुंब, समाज, संस्था, उद्योग, शिक्षण, शासन, इ. सर्व क्षेत्रांत सहकारावाचून कोणताही व्यवहार पूर्ण होऊ शकत नाही. पती व पत्नी, मालक व मजूर, विद्यार्थी व शिक्षक, शासक व शासित यांच्यांतील सहकार्य संपले तर सर्व व्यवहार विस्कळीत होतो. एखाद्या व्यक्तीच्या, संस्थेच्या किंवा सत्तेच्या कार्याशी सहकार्य करणे, न्यायनीतीच्या दृष्टीने अयोग्य वाटू लागले असता त्या कार्यात सहभागी न होण्याचा निश्चय करणे, याला असहकार म्हणतात. अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठी असहकार हा एक प्रभावी उपाय ठरला आहे. त्याचा प्रयोग प्रथम महात्मा गांधींनी इ. स. १९२० मध्ये केला. त्यासाठी असहकारी व्यक्तीच्या ठायी आत्मबलाची आवश्यकता असते. स्वतःच्या ध्येयावर व मार्गावर दृढ निष्ठा आणि अपार कष्ट, हाल किंवा मरण यांसाठी मनाची सिद्धता याला आत्मबल म्हणतात.

असहकार हा सत्याग्रहाचाच एक प्रकार मानता येईल. स्वातंत्र्यप्राप्तीसाठी परकीय सत्तेविरुद्ध असहकाराचे अहिंसक आंदोलन म. गांधींनी सुरू केले होते. विधिमंडळे, न्यायालये, शासकीय कार्यालये, विद्यालये या सर्वांवर बहिष्कार व सरकारी नोकरीचा त्याग असे त्याचे स्वरूप होते. पण ते त्यांना स्थगित करावे लागले. पाहा – गांधी (खंड २ रा). [ म. वि. को. ]

**असिक्नी** पंजाबातील एक नदी. ऋग्वेदात गंगा-यमुनांच्या बरोबर हिचाही उल्लेख आला आहे (ऋ. १०.७५.५). यास्काच्या मताप्रमाणे ही वर्तमान चेनाब नदी होय (निरुक्त ९.२६). हिच्या तीरावर अनेक रोगहर वनस्पती असल्याचे लिहिले आहे (ऋ. ८.२८.२५). ग्रीक लोकांनी असेकिनेस या नावाने हिला उल्लेखिले आहे. हिलाच पुढे चंद्रभागा असे नाव पडले. असिक्नी म्हणण्याचे कारण हिचे पाणी काळे दिसते, हे होय. [ वै. सा.; हिं. ध. ]

**असित** (१) हिमालयात राहणारा एक ऋषी. याला पाच दिव्य शक्ती प्राप्त होत्या. लुंबिनी वनात बोधिसत्त्वाचा (गौतम बुद्ध) जन्म झाला आहे, हे याला दिव्य दृष्टीने समजले. हा त्याला वंदन करण्यासाठी आकाशमार्गाने कपिलवस्तूत गेला. दर्शनाची इच्छा व्यक्त करताच शुद्धोदनाने त्याला म्हटले, की 'राजकुमार झोपला आहे.' तेव्हा हा म्हणाला, की 'असे महापुरुष फार वेळ कधीच झोपत नाहीत; किंबहुना ते सदैव जागृतच असतात.' ते ऐकून शुद्धोदनाने त्याला आपल्या मुलाकडे नेले. त्याच्या शरीरावरची बत्तीस लक्षणे पाहून हा म्हणाला. 'हा मुलगा एक तर चक्रवर्ती होईल अथवा संन्यासी होईल.' बोलता बोलता असिताच्या नेत्रांत पाणी आले. राजाने त्याचे कारण विचारले. त्यावर असित म्हणाला. 'माझ्या दुःखाचे कारण राजकुमाराविषयी काही

अशुभाची शंका हे नव्हे; हा मुलगा मोठेपणी सर्व दुःखी जीवांना एका सत्यधर्माचा उपदेश करील. त्या वेळी तो उपदेश ऐकायला मी मात्र जिवंत असणार नाही.' [ उ. प्र. बौ. वि. ]

(२) एक पवित्र पर्वत. असित ऋषीचे निवासस्थान. (वायु पु. ७७.३९) श्राद्धयोग्य क्षेत्र. (ब्रह्मांडपु. ३.१३.३९) [पु. इं.]

**असित काश्यप** एक सूक्तद्रष्टा. याला देवल असेही म्हणतात. ऋग्वेदाच्या ९ व्या मंडलातील पाच ते चोवीस क्रमांकाची सूक्ते याने रचली आहेत. पाचवे सूक्त हे आप्रीसूक्त म्हणून प्रसिद्ध आहे. अन्य सर्व सूक्तांमध्ये पवमान सोमाची स्तुती आढळते. याची एक ऋचा (९.६.८) अशी–

आत्मा यज्ञस्य रंह्या सुष्वाणः पवते सुतः ।
प्रत्नं नि पाति काव्यम् ॥

अर्थ – कामपूरक आणि द्रुतगामी यज्ञमुख्य सोम नूतन पराक्रमांनी स्वतःच्या पुरातन ख्यातीस उजळा देतो.

देवलाच्या पवमान सूक्तांमध्ये सोमनिर्मितीची पद्धत दिलेली आहे. उदा० कुटलेली सोम वनस्पती मेंढीच्या लोकरीच्या गाळण्यातून गाळून तो रस शुद्ध करीत असत. मग त्या सोमात दूध किंवा दही मिसळत असत. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ.]

**असिधारा व्रत** ( असि = खड्ग, धारा = धार ) एक खडतर व्रत. आश्विन अथवा कार्तिक पौर्णिमेपासून पाच दिवस, दहा महिने, एक वर्ष किंवा बारा वर्षे अशा चढत्या क्रमाने व्रताची कालमर्यादा आहे. पाण्यात उभे राहून जप करणे, भर उन्हाळ्यात पंचाग्निसाधन, भूमिशयन, रात्रौ अन्नग्रहण, पत्नी शेजारी असताही ब्रह्मचर्यपालन करणे, अशा उग्र व कठोर नेमधर्मांना असिधाराव्रत असे नाव दिलेले आहे. हे व्रत तलवारीच्या धारेवरून चालण्याइतके तीक्ष्ण व कठीण असल्यामुळे त्याला हे नाव पडले आहे. या व्रताच्या भिन्न कालावधीप्रमाणे फलेही भिन्न भिन्न मिळतात. या व्रताच्या बारा वर्षांच्या अनुष्ठानाने जगावर स्वामित्व व अंती श्रीविष्णूशी सरूपता मुक्ती लाभते (विष्णुध. पु. ३.२१८). भरताने राज्यवैभवाचा त्याग करून, राम वनवासाहून परत येईपर्यंत जे त्याग-वैराग्यपूर्ण व्रत आचरिले, त्याची तुलना कालिदासाने असिधाराव्रताशी केली आहे (रघु. १३.६७)–

पित्रा विसृष्टां मदपेक्षया यः श्रियं युवाप्यङ्कगतामभोक्ता ।
इयन्ति वर्षाणि तया सहोग्रमभ्यस्यतीव व्रतमासिधारम् ॥

अर्थ – तो भरत, पित्याने दिलेल्या व अगदी हातात आलेल्या राज्यलक्ष्मीचा, तरुण असताही, केवळ माझ्यावरील भक्तीमुळे उपभोग घेता झाला नाही. यावरून तो तिच्याबरोबर इतकी वर्षे कठीण असे असिधाराव्रतच आचरीत आहेसे वाटे.

या व्रताविषयी आणखी एक संकेत आहे, तो असा – विशिष्ट कालासाठी ब्रह्मचर्य पालन करणाऱ्या पुरुषाने आपण व पत्नी या दोघांच्यामध्ये धार वर करून तरवार आडवी ठेवायची असते. त्यात जरा हालचाल झाली तरी दुखापत होण्याची भीती असते. पत्नी शेजारी असूनही पुरुषाने स्वतःच्या मनाची चलविचल होऊ न देणे व झाल्यास तिचा कठोर निग्रह करणे, हेच या व्रतातले काठिण्य होय. [ हि. ध ]

**असिपत्रवन** असि = तलवार. तिच्यासारखी धारदार पाने असलेले वृक्ष ज्यात आहेत, असे वन. २८ नरकांपैकी एक नरक. वेदमार्गविरोधी व पाखंडी, तसेच उंटांचा वध व व्यापार करणारे, प्राणिवध करणारे, अकारण वृक्ष तोडणारे व कर्मभ्रष्ट लोक या नरकात जातात. तिथे त्यांच्या शरीराचे असिपत्रांनी खांडोळी केली जातात. (भाग. पु. ५.२६.१५; वायुपु. ५६.७९; विष्णुपु. २.६.३)

**असी** वाराणसीजवळची एक नदी. हिला शुष्क नदी असेही नाव आहे. असी आणि वरुणा हे दोन शब्द मिळून 'वाराणसी' शब्द बनला आहे. वाराणसीहून निघून पंचक्रोशीची यात्रा करताना गंगा व असी यांच्या संगमावर एक दिवस थांबायची प्रथा आहे. [ हि. ध. ]

**असुर** (१) न + सुर = असुर. देवांचे शत्रू. यांना आणखीही नावे आहेत –– 'असुरा दैत्य – दैतेय – दनुजेन्द्रारि दानवाः' (अमर). हे प्रजापतीच्या मांडीपासून जन्म पावले. हे यज्ञधर्माचे विरोधी होते. यांचे निवासस्थान पृथ्वीच्या खाली (अधोलोक) आहे (भा. पु. ८.१.१७; ११.२४.१३.). यांनी पृथ्वीवर दहा युगे राज्य केले. त्यांची देवांशी बारा युद्धे झाली. पुढे दैत्यगुरू शुक्र याने शाप दिल्यामुळे पृथ्वी दैत्यांच्या हातून देवांकडे गेली (ब्रह्मांड पु. ३.७२.६९–९३; वायुपु. ९७.६८–९३). हे बर्हिषद पितरांचे पूजन करतात. वामनावताराच्या वेळी असुरांचे तेज नष्ट झाले. असुर हे रात्र व अंधकार यांचे प्रतिनिधी असून तमोव्याप्त आहेत (विष्णुपु. १.५.३१–३४).

तैत्तिरीय ब्राह्मणात असुर शब्दाची व्याख्या पुढीलप्रमाणे दिली आहे–

तेनासुनासुरानसृजत । तदसुराणामसुरत्वम् । (२.३.८.२)

अर्थ – (प्रजापतीने) त्या असूने म्हणजे प्राणाने त्यांना उत्पन्न केले म्हणून ते असुर ठरले.

असुर शब्दाचा खरा अर्थ प्राणवान्, वीर्यवान्, पराक्रमी असा आहे.

दितीचे पुत्र ते दैत्य व दनूचे पुत्र ते दानव होत. या दोघांनाही असुर अशी संज्ञा आहे.

देव आणि असुर हे दोघेही प्रजापतीचे पुत्र असून, त्या दोघांनाही आपल्या पित्याचा दायभाग प्राप्त झाला (श. ब्रा. १.७.२.२२). प्रजापतीने दिवसा देवांना व रात्री असुरांना उत्पन्न केले. देव हे प्रजापतीचे धाकटे पुत्र असून, असुर हे थोरले पुत्र आहेत (श. ब्रा. १४.४.१.१). ते सापत्न व भ्रातृव्य आहेत (श. ब्रा. १३.८.२.१). प्रजापतीने अपानातून असुरांची उत्पत्ती केल्याच्या कथा ऐतरेय व शतपथ या ब्राह्मणांत आल्या आहेत. तै. आरण्यकात प्रजापतीने जलबिंदूंतून असुरांची उत्पत्ती केली, असे म्हटले आहे. विष्णू आणि वायू या पुराणांच्या मते असुर हे ब्रह्मदेवाच्या मांडीच्या सांध्यातून निर्माण झाले. प्रजापतीने असुरांना अंधकार आणि माया या वस्तू दिल्या म्हणून असुर हे मायेची उपासना करू लागले व त्यांनी रात्रीचा आश्रय केला (श. ब्रा. २.४.२.५; ऐ. ब्रा. ४.५).

असुर हा शब्द ऋग्वेदात सुमारे १०५ वेळा आलेला असून त्यांपैकी ९० ठिकाणी त्याचा उपयोग देव या अर्थाने केलेला आहे. ऋग्वेदात वरुणाला आणि इतर अनेक देवांना असुर म्हटले आहे. 'त्वमग्ने रुद्रो असुर...' (तै. ब्रा. ३.११.२.१) या मंत्रात अग्नीलाही असुर म्हटले आहे. यजुर्वेद व ब्राह्मणग्रंथांच्या कालापासून असुर शब्दाचा देवशत्रू असा अर्थ रूढ झाला. ऋग्वेदाच्या अर्वाचीन भागात व अथर्ववेदात याच अर्थाने हा शब्द येतो. ब्राह्मणग्रंथांत देव-असुरांच्या युद्धांचे अनेक उल्लेख आलेले आहेत. असुर हे स्वतःला देवांच्या बरोबरीचे समजत. उघडपणे त्यांनी देवांशी लढाया केलेल्या असून, अनेकदा देवांवर विजयही मिळविला आहे. देवांचे पौरोहित्य बृहस्पतीकडे असून, असुरांचे पौरोहित्य भार्गव–शुक्राने स्वीकारले होते.

असुर म्हणजे कोणते लोक, याविषयी तीनचार मते आहेत—(१) प्राचीन सुमेरियन लोक, (२) प्राचीन असीरियन लोक, (३) मगध किंवा दक्षिण विहारमधील लोक व (४) प्राचीन इराणी अहुरमज्दाचे अनुयायी.

भारतात आर्यसंस्कृतीचा प्रवेश होण्यापूर्वी असुर, दैत्य, दानव व नाग असे अनेक नावांचे व भिन्न भिन्न संस्कृतींचे समाज नांदत होते. हे लोक आर्यसंस्कृतीचे विरोधक होते. यावरून असुर हा आर्यपूर्व भारतातला एक प्रबळ समाज होता, असे दिसते. या बाबत पुरावा असा – सायण म्हणतो, की 'मेरुपर्वतावर अमरावती नगरी असून, तिथे देवांचे वास्तव्य आहे; तर मेरुपर्वताच्या खालच्या अंगास इरावती ही असुरांची नगरी आहे.' सायणाचे हे विधान सत्य आहे. इरावती नदीच्या काठी जे उत्खनन झाले, त्यामध्ये एका प्राचीन नगराचे अवशेष मिळाले आहेत. या नगराचे नाव हडप्पा. वैदिक 'हरियूपीया' या शब्दाचा हा अपभ्रंश असावा. ऋग्वेदात रुद्राला असुरघ्न म्हटले आहे. इंद्राने वरशिख नावाच्या असुरावर स्वारी करून त्याला व त्याच्या वंशजांना ठार मारले, असे जे ऋग्वेदात (ऋ. ६. २७) वर्णन येते, त्याचा संबंध हडप्पा या नगराशीच लागतो. त्यावरून सिंधुखोऱ्यातील संस्कृतीचे जनक असुरच होत, हेही कळून येते, भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर या असुरांची राज्ये होती. गुजरातमधले भृगुकच्छ (भडोच)ही बली या असुराची राजधानी होती. बली आणि वामन यांच्या मधला त्रिपाद भूमीचा प्रसंग भृगुकच्छ येथेच घडला, असे पुराणात सांगितले आहे.

प्राचीन असीरियाची राजधानी म्हणजे निनेव्हे हे शहर होय. त्या ठिकाणी अलिकडेच उत्खनन झाले असून, त्या उत्खननात बाबिलोनी भाषांच्या क्युनिफोर्म या लिपीत विटांवर लिहिलेले बरेच ग्रंथ हाती लागले आहेत. या लिखित विटांवरून असुरांविषयी बरीच माहिती मिळू शकते. युफ्रातिस आणि तैग्रीस या नद्यांच्या तीरी राहणाऱ्या प्राचीन लोकांना 'सेमाइट' म्हणत. असुर हे त्यांचेच वंशज होत, असा अनेक विद्वानांचा तर्क आहे. सुमेरियन लोक हे असुरांचे शेजारी होते. सुमेरियनांच्या संपर्काने असुरांच्या ठिकाणी नागरिक सभ्यतेचा प्रादुर्भाव झाला. पुढे या सेमाइट लोकांनी इराकच्या मध्यभागात अकाड आणि उत्तरभागात अस्सुर ही नगरे स्थापिली. इसवी सनपूर्व २५००च्या सुमारास अकाडवाल्यांनी सुमेरियनांना पादाक्रांत केले. त्यानंतर बाबेलू नगराचा उदय झाला. यालाच ग्रीक लोक बाबिलोन म्हणू लागले. बाबिलोनियाच्या एका सेमाइट राजाने इराकचे दक्षिण आणि मध्य हे दोन्ही भाग जिंकून एक साम्राज्य स्थापिले. सुप्रसिद्ध बाबिलोनचे साम्राज्य ते हेच होय. असुर हे काही काळ बाबिलोनच्या अंकित राहिले. इसवी सनपूर्व १८००च्या सुमारास उत्तरेहून आर्यांच्या टोळ्या बाबिलोनियात उतरल्या. त्यांना 'कश्शी' म्हणत. त्यांनी बाबिलोनचे साम्राज्य जिंकले. इसवी सनपूर्व १३८० च्या सुमारास असुरांची ताकद विलक्षण वाढली. त्यांनी बाबिलोनिया जिंकून तिथे असुर साम्राज्याची स्थापना केली. इसवी सनपूर्व ७४६ ते ६२६ पर्यंत ज्या असुर सम्राटांनी असुर साम्राज्यावर सत्ता चालविली, त्यात तिग्लथ, पिलेसर, शालमनेसर, सारगन, सेन्नचेरीब, अस्सुरबनिपाल हे सम्राट प्रसिद्ध आहेत. त्यानंतर पारस देशाचे मीड आणि बाबिलोनचे लोक यांनी संघटित होऊन असुर साम्राज्यावर आक्रमण केले. त्यात निनेव्हे या राजधानीचे पतन झाले.

असुर राजांच्या नावाला जोडून बल हा शब्द वारंवार येतो.

त्याचे संस्कृत रूप वली होऊ शकते. उपल्लित नावाचा जो असुर राजा दिसतो, तोच प्रल्हाद असावा. यानेच असुर साम्राज्य पुनश्च ऊर्जितावस्थेस आणले. त्याचा पुत्र उलुश हा विरोचन व त्याचा पुत्र बलकुदर उसुर हाच पुराणांतला बलिराजा असणे शक्य आहे. बलीचा पुत्र बाणासुर होय. त्याच्या राजधानीला पुराणांत शोणितपुर म्हटले आहे. शोणितपुर म्हणजेच असुर-राजधानी निनेव्हे होय. बायबलच्या जुन्या करारात निनेव्हेला 'रक्ताचे नगर' असेच म्हटले आहे. कृष्णाच्या काळात तिथे बाणासुर राज्य करीत होता. उषा ही बाणासुराची कन्या. तिचे अनिरुद्धावर मन जडले आणि तिच्या सखीने अनिरुद्धाला द्वारकेतून शोणितपुरात उचलून नेले. नारदाने हे स्थान द्वारके-पासून ११००० योजने दूर आहे, असे म्हटले आहे. कृष्णाने तिथपर्यंत जाऊन शोणितपुरावर स्वारी केली आणि बाणाचा पराभव करून उषा-अनिरुद्धांचा विवाह घडवून आणला.

श्री. डेवुर्ग हे असुरांच्या संबंधात लिहितात, की सर्व प्राचीन जमातींत असुर हे महाक्रूर व भयंकर होते. असुरांचा इतिहास म्हणजे युद्धे व आक्रमणे यांचा इतिहास होय. असुर आपल्या शत्रूंशी सूडबुद्धीने वागत.

डेवुर्गचे हे वर्णन पुराणांतल्या असुरवर्णनाशी तंतोतंत जुळणारे आहे. या शोणितपुरातच कार्तिकेयाचा जन्म झाल्याचे पुराणे सांगतात. कार्तिकेय हा अग्निपुत्र आहे. ज्या ठिकाणी निनेव्हे हे असुरनगर वसले होते, त्याच्या आसपास भूगर्भात तेल आणि वायू यांचे साठे होते. ते जेव्हा बाहेर निघत तेव्हा चहूबाजूंनी आग उत्पन्न होई. पुराणांत शोणितपुराला अनलावरुद्ध म्हणजे आगीने घेरलेले असे म्हटले आहे. त्याचे कारण हेच असावे. कार्तिकेय हा सेनापती आहे. हाच कार्तिकेय निनेव्हे नगरात युद्धदेव म्हणून पुजला जात होता. शुलमनू असे त्याचे नाव होते. हा शुलमनूच दक्षिण भारतात येऊन सुब्रह्मण्य झाला असावा.

बाबिलोनियामधूनच असुर लोक हळूहळू भारतात आले असावे. आर्यांच्या अगोदर पश्चिमेकडून येऊन असुरांनी भारतात वस्ती केली होती. येथील कोल, चंड, मुंड, इ. वन्य आदिवासींचे साहाय्य घेऊन व त्यांचे पुढारीपण करून त्यांनी आर्यांशी झगडे केले. श्रीकृष्ण व पांडव यांच्या काळात बकासुर, जरासंध, कंस, मयासुर, इ. अनेक असुर भारतात आपापली राज्ये स्थापून वसल्याचे महाभारतावरून कळते. यांपैकी काही असुरांना पांड-वांनी मारले व काहींना कृष्णाने मारले. त्याच्याही आधी पिप्र, वृत्र, इ. असुरांना इंद्राने ठार केल्याचे उल्लेख ऋग्वेदात आहेत (ऋ. १०.१३८). पांडवकाळात मगध, मथुरा, कच्छ, इ. प्रदेशांत असुरांची राज्ये दृढमूल झालेली होती. शंखासुर, बाणासुर, जटासुर, तारकासुर, जम्भासुर, मय, कैटभ, कुम्भ, निकुम्भ, किर्मीर, अंकध, अघ, वृत्र, धुंधू, धेनुक, नरक, नमुची, सुंद, उप-सुंद, इ. असुरनामे काही वेदकालीन तर काही कृष्णकालीन आहेत.

व्हिन्सेंट श्मील याने असुर-देवतांच्या दिलेल्या यादीत असुर मझाश ही एक देवता असून, तिचा संबंध अहुरमज्द या झरथुष्ट्री देवतेशी जोडण्यात आला आहे. अहुरमज्द हा शब्द असुरमहस् याचा अपभ्रंश असावा, असे राजवाडे म्हणतात. यावरून खाल्डियन, इराणी व भारतीय आर्य यांचे पूर्वज कोण्या एका काळी एकत्र असावे व त्यांच्या काही सामान्य देवता असाव्या असे दिसते. नंतर त्यांच्यांत फूट पडून विशिष्ट शाखेत विशिष्ट देवतेला प्राधान्य मिळाले व इतरांच्या देवतांना दूषणे लावण्याची प्रथा पडली. यामुळे असुर हा शब्द भारतीयांत दैत्यवाचक बनला व देव हा शब्द इराणी शाखेत दैत्यवाचक बनला. भारतीयांनी इंद्राला असुरघ्न हे विशेषण लावले; तर इराणी लोकांनी इंद्राला 'अंग्रमन्यू' बनविले.

असुर हे देवांच्या दृष्टीने अपभ्रष्ट भाषा बोलत. शबर-स्वामीने पिक, नेम, तामरस, इ. शब्द असुर भाषेतून आले आहेत, असे म्हटले आहे. असुरांचा व मानवांचा लग्नसंबंध झाल्याची उदाहरणेही पुराणांत पुष्कळ आहेत. वसुदेवाची पत्नी देवकी ही असुरकुलातली होती. उषा-अनिरुद्धांचा विवाह झाला त्या वेळी वऱ्हाडी म्हणून गेलेल्या अनेक यादवांनी तिथल्या असुरकन्यांशी विवाह केले, असे हरिवंशात म्हटले आहे. अष्टविवाहांत आसुर नावाचा विवाहाचा एक प्रकार आहे. तो असुरांमध्ये प्रचलित असावा. आर्यांप्रमाणेच असुरांमध्येही श्राद्ध-विधी असावा, असे राजारामशास्त्री भागवत यांनी अनुमानिले आहे. आश्वलायन गृह्यसूत्रातल्या श्राद्धकल्पात 'आसुर' श्राद्धाचा उल्लेख आहे. असुर हे शिवभक्त असल्याच्या अनेक कथा पुराणांतरी आढळतात. असुरांची शिवोपासना उग्र होती व बहुतेकांना शिवाकडूनच वर मिळाले होते. भारताच्या बाहेर असताना ते प्रजापतीचे उपासक असावे. वृत्राला, तारकासुराला व शंखासुराला प्रजापतीकडूनच वरप्राप्ती झाली होती. वैष्णव धर्माचा अंगीकार करणारा पहिला असुर प्रल्हाद हा होय. त्याच्या कुलातही पुढे विष्णुभक्ती चालू राहिली, हे बलीच्या कथेवरून दिसते. [ रा. ले. सं.; क्ला. डि. हिं. मा.; म. ज्ञा. को.]

(२) छोटा नागपूरच्या नेतरहाट पठारावर राहणारी एक लहान जमात. या जमातीचे बीर असुर, बिरजिया आणि अगारिया असे तीन पोटभेद आहेत. पण बिहारमध्ये बिरजिया आणि मध्य प्रदेशात अगारिया या स्वतंत्र जमाती मानल्या जातात. या लोकांचा वैदिक असुरांशी संबंध आहे.

**वेषभूषा**–असुर पुरुष धडधाकट आणि मध्यम उंचीचे असतात

त्यांचे नाक रुंद असून गालाची हाडे वर आलेली असतात. त्यांचा वर्ण काळा असतो. ते कमरेला एक लंगोटी लावतात आणि वर एक कपडा पांघरतात. डोक्याभोवती एक फडके गुंडाळतात. हल्ली काही लोक सदरा वापरतात. तरुण मुले अर्ध्या चड्डया घालतात. असुर स्त्रिया कमरेभोवती गुडघ्यापर्यंत पोचणारे लांब वस्त्र गुंडाळतात आणि त्याचा पदरही घेतात. तरुणी बाजाराला किंवा जत्रेला जाताना अंगात पोलके घालतात. पुरुष व स्त्रिया या दोघांनाही अलंकारांची आवड आहे. पुरुष गळयात पोवळ्याच्या किंवा इतर मण्यांच्या माळा घालतात. स्त्रिया केस नीट विंचरून व तेल लावून त्यांचा अंबाडा बांधतात. स्त्रिया हातांत बांगडया, पायांत साखळया, कानांत अनेक वलये आणि गळयात मण्यांच्या किंवा लहान नाण्यांच्या माळा घालतात.

**घरे** – असुरांची गावे उंचावरील सपाट जागी वसलेली असतात. गावाला ते पाट म्हणतात. गावाच्या मध्यभागी नृत्यासाठी आखाडा असतो. तिथेच ग्रामपंचायतीच्या सभाही होतात. तिथून जवळच तरुणांसाठी शय्यागृह असते. काही गावांत एकाच गोत्राची कुटुंबे राहतात.

या लोकांची घरे मोठी, टिकावू आणि चांगली बांधलेली असतात. घरात सर्वसाधारणपणे एक स्वयंपाकघर, झोपायची खोली आणि गोठा असतो. घराला तीन बाजूंनी ओटी असते आणि ती बंदिस्त असते. घराला एकच दार असते आणि खिडकी मुळीच नसते. घराच्या भिंती मातीच्या असतात. मोठ्या लाकडी ओंडक्यांवर कौले घालून घराचे छप्पर बनवतात. कौले ते स्वतःच तयार करतात. गावकरी घराचे छप्पर उभारण्याच्या कामी एकमेकांना मदत करतात.

घर बांधण्यापूर्वीच हे लोक काळजीपूर्वक जागा निवडतात. घराच्या जागेच्या चारही कोपऱ्यांत तांदुळाचे लहान ढीग ठेवतात. दुसऱ्या दिवशी त्यांतला एक ढीग जरी कमी झाला, तरी ती जागा अशुभ म्हणून सोडून देतात.

त्यांच्या घरात सामान असे फारसे नसतेच. शिंदीच्या पानांच्या घरी विणलेल्या चटयांवर ते झोपतात. गरीब लोकांचा संसार गाडग्यामडक्यांचा असतो. तर जरा बऱ्या स्थितीतल्या लोकांकडे थोडी पितळेची भांडी असतात. सध्या या लोकांनी लोखंड वितळवण्याचा धंदा सोडला असला तरी पूर्वी त्यासाठी वापरलेली भाते, चिमटे व हातोडा ही हत्यारे त्यांनी जपून ठेवलेली आहेत.

**आहार** – तांदूळ, मका, कडधान्ये, भाजीपाला व मांस असा या लोकांचा आहार असतो. याशिवाय, कंदमुळे व फळे यांचाही ते खाण्यासाठी उपयोग करतात.

हे लोक गाईचे दूध काढीत नाहीत. ते वासरांसाठी ठेवतात. म्हशीचे दूध मात्र ते काढतात आणि त्याचे दही करून खातात.

तांदुळाची आणि मोहाची दारू ही यांची आवडती पेये आहेत. तांदुळाची दारू ही पौष्टिक असते, अशी यांची समजूत असल्यामुळे ते ती फार पितात. वर्षातून तीनदा ते पितरांना दारू अर्पण करतात. त्या वेळी स्त्रिया आंघोळ करून व कुणाशी न बोलता दारू तयार करतात.

**उद्योगधंदे** – नेतरहाट पठारावर लोहमिश्रित माती सापडते. त्यापासून लोखंड वितळवण्याचा धंदा हे लोक पूर्वी अनेक शतके करीत असत. इ. स. १८२७ मध्ये एकोणतीस भट्टयांत हे काम चालू होते. पण सांप्रत मात्र हा व्यवसाय बंद पडला आहे. शेती हाच हल्ली या लोकांचा मुख्य व्यवसाय बनला आहे. झूम पद्धतीने हे शेती करतात. आणि दर तीन वर्षांनी शेतीची जागा बदलतात. प्रत्येक कुटुंबाकडे साधारणपणे दहा ते पस्तीस एकर जमीन असते. तिच्यात ते भात, मका, इ. धान्ये पिकवतात. पण हे पिकवलेले धान्य त्यांना वर्षभर पुरत नाही. त्यामुळे त्यांना इतर ठिकाणी मजुरी करावी लागते. हे लोक गाई-म्हशी पाळतात. बैल आणि रेडे यांचा त्यांना नांगरण्यासाठी उपयोग होतो. स्त्रियांनी नांगराला स्पर्श करणे हे निषिद्ध मानलेले आहे. त्याव्यतिरिक्त स्त्रिया पुरुषांना शेतीच्या कामात मदत करतात.

आठवडयाच्या बाजारात जाऊन हे धान्य किंवा जंगलातून गोळा केलेले जिन्नस विकतात. त्यासाठी त्यांना दहा-पंधरा मैल चालत जावे लागते. पण या चालण्याच्या श्रमाचे त्यांना काही विशेष वाटत नाही. उलट बाजाराला जाणे ही त्यांच्या दृष्टीने आनंदाची व करमणुकीची बाब असते. बाजारात काही वेळा तरुण-तरुणींची लग्नेही जमतात.

असुर लोकांत तरुणांसाठी सामूहिक शय्यागृहे असतात. शय्यागृहातील तरुण-तरुणी एकत्र जमून दुसऱ्या गावातील शय्यागृहांना भेट देतात. तिथे ते खातात, पितात, मजा करतात आणि नृत्य करतात. मुले व मुली एकमेकांशी मोकळेपणाने वागतात. लग्नापूर्वी मुलगी कुमारी असलीच पाहिजे, असा या लोकांचा आग्रह नाही. शय्यागृहातील जवळिकीतून अनेक लग्नेही जमतात.

**विवाहप्रथा**–मुलामुलींची लग्ने ती वयात आल्यावर होतात. मुलगा साधारण अठरा-एकोणीस वर्षांचा झाला, की मुलाचा बाप मध्यस्थामार्फत मुलीचा शोध करतो. मध्यस्थ त्यासाठी मुलीच्या गावी जाताना त्याला जर वाटेत लांडगा रस्ता ओलांडताना दिसला, किंवा हरीण किंवा पाण्याचा रिकामा घडा घेतलेला माणूस दिसला, तर ही दुश्चिन्हे समजून तो तसाच परत येतो. याउलट, कावळयाची कावकाव ऐकू आली किंवा

वाघ किंवा साप दिसला तर ते शुभ शकुन मानतात. मुलगा व मुलगी एकमेकांना पसंत पडल्यावर साखरपुडा होतो. नंतर विवाहविधी करण्याइतकी दोघांची परिस्थिती अनुकूल नसेल तर मुलीला इदी-मे या पद्धतीने मुलाच्या घरी नांदायला आणतात व ती दोघे नवरा-बायकोप्रमाणे राहू लागतात.

असुर लोकांत फक्त तीन रुपये देज देण्याची पद्धत आहे. नेहमीच्या पद्धतीप्रमाणे वर लग्नासाठी वधूच्या घरी जातो. लग्न मांडवात न लागता घरात लागते. तिथे त्या वेळी बाहेरच्या कुणाला येऊ देत नाहीत. लग्नासाठी पुरोहिताची आवश्यकता नसते. एखादा जाणकार पुरुषच लग्न लावतो. वरपिता वधूला दोन वार नवे कापड देतो आणि तिच्या मैत्रिणींना काही पैसे देतो. त्यानंतर जमलेले आप्तेष्ट अहेर देतात. सर्वजण मांडवात बसतात. पाण्याने भरलेल्या तांब्यात आंब्याची डहाळी खोचतात. मग एकजण सर्वांवर आंब्याच्या डहाळीने पाणी शिंपडतो. आणि जवळच ठेवलेल्या पत्रावळीवर ऐपतीप्रमाणे दोन पैसे किंवा रुपया ठेवतो. नगारा वाजवून एकजण हा अहेर मोठ्याने जाहीर करतो. जमलेले पैसे मुलीच्या बापाला मिळतात. वरात आल्यावर वरगृहीसुद्धा असाच कार्यक्रम होतो.

असुर पुरुष स्त्रियांना फार मान देतात. हे लोक पहिली बायको जिवंत असताना दुसरे लग्न करीत नाहीत व पत्नीला घटस्फोटही देत नाहीत.

समान देवकांत विवाह होत नाही. यांच्यांत बालविवाह प्रचलित नाही. विधवाविवाह आणि बहुपतित्व यांना संमत आहे.

**प्रसूतिप्रथा** – गरोदर स्त्रीला काही नियम पाळावे लागतात. विजा चमकत असताना किंवा ढग गडगडत असताना तिने बाहेर जाता कामा नये, तसेच एरवीही बाहेर जाताना तिने सर्व अंग झाकून घेतले पाहिजे. स्त्रीला पहिली मुलगी झाली, की या लोकांना फार आनंद होतो. सठीनंतर सुवेर संपतो. सठीच्या दिवशी आप्तेष्टांना जेवण व दारू देतात. त्याच दिवशी मुलाचे नावही ठेवतात. मूल ज्या वारी जन्मले असेल, त्या वाराचे नाव ठेवतात. उदा० रविवारी जन्मलेल्या मुलाला इतवा व मुलीला इतवारी असे नाव देतात.

प्रत्येक गावाची पंचायत असते. पंचायतीच्या मुख्याला महतो असे नाव आहे. त्याचा अधिकार वंशपरंपरा चालतो. गावातील तंट्यावखेडचांचा व गुन्ह्यांचा निकाल पंचायत देते.

**देवधर्म** – सर्वश्रेष्ठ देवाला हे लोक भगवान असे नाव देतात. याशिवाय ते ग्रामदेवतांनाही भजतात आणि सरहुल सणाच्या दिवशी सर्व देवतांना कोंबडे बळी देतात. भुताखेतांवर त्यांचा विश्वास आहे आणि त्यांनी त्रास देऊ नये म्हणून त्यांनाही ते कोंबडे बळी देऊन संतुष्ट राखतात. हे लोक पितृपूजक आहेत. पितरांतही दुष्ट व सज्जन असा भेद करतात. दुष्टात्म्यांना संतुष्ट करण्यासाठी चुलीपुढे कोंवडचांचा बळी देतात.

**सण व उत्सव** – सरहुल हा या लोकांचा एक महत्त्वाचा उत्सव आहे. साल वृक्षांना नवी पाने आली आणि पांढुरक्या रंगाच्या लहान पुष्पगुच्छांनी ती आच्छादिली गेली, की या सणासाठी दिवस ठरवतात. साधारणपणे मार्चअखेर किंवा एप्रिलच्या सुरुवातीला पवित्र सालवनात हा उत्सव साजरा करतात. धरतीमातेने आपल्याला जास्त पीक द्यावे हा या उत्सवामागचा उद्देश आहे. या दिवशी पुरोहित व इतर काही लोक स्नान करून सालवनात जातात, तिथे एका साल वृक्षाखाली बसून पुरोहित मंत्र म्हणतो आणि भुताखेतांना दोन कोंबडी बळी देतो. नंतर तिथेच कोंबडी शिजवून सर्वजण भोजन करतात आणि दारू पितात. नंतर पुरोहिताला खांद्यावर बसवून त्याच्या घरी नेतात. तिथे पुरोहित व त्याची पत्नी यांचे लग्न लावतात. पुरोहित हा सूर्याचे व त्याची पत्नी ही धरतीचे प्रतीक मानतात. यानंतर सर्वजण खातात, पितात, गातात आणि नृत्य करतात. हा उत्सव झाल्याशिवाय लोकांना शेतात पेरणीची कामे करता येत नाहीत.

हरिआरी हा यांचा दुसरा उत्सव शेतीशी संबंधित आहे. भात पेरून त्याला अंकुर फुटले आणि शेत हिरवेगार दिसू लागले, की हा उत्सव साजरा करतात. एका ठरलेल्या दिवशी ग्रामपुरोहित व गावकरी ठरलेल्या ठिकाणी जमतात. पुरोहित मंत्र म्हणून गाव सुखी राहावे, पीकपाणी चांगले यावे अशी प्रार्थना करतो आणि जमवलेली कोंबडी बळी देतो. नंतर त्या कोंबड्यांचे मांस शिजवून खातात आणि सर्वजण खूप दारू पितात. या उत्सवानंतर लोक भाताची लावणी करायला मोकळे होतात.

सोहराई हा यांचा आणखी एक सण आहे. महाराष्ट्रातील बैलपोळ्यासारखाच हा सण असतो. कार्तिकी अमावास्येच्या रात्री गोठ्यात व परसदारी पणत्या पेटवून ठेवतात. दुसऱ्या दिवशी सकाळी गुरांना नदीवर नेऊन आंघोळ घालतात. त्यांच्या खुरांना आणि शिंगांना शेंदूर माखतात आणि त्यांना शिजवलेले धान्य खाऊ घालतात. काहीजण या दिवशी गोरेया देवतेला कोंबडे बळी देतात. म्हशी बाळगणारे लोक काळे डुक्कर बळी देतात.

फाल्गुन प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत यांचा फागू सेंद्र नावाचा उत्सव असतो. सर्व स्त्रीपुरुष यात भाग घेतात. यात भाग न घेतल्यास दंड होतो. याच दिवसांत केव्हातरी लोखंड वितळवणारे लोक आपल्या हत्यारांची पूजा करतात. रोज संध्याकाळी व रात्री नृत्याचा कार्यक्रम होतो.

**असुर भाषा** – असुरांच्या भाषेला ' डुकमा ' म्हणतात. ही

कोलारियन भाषासमूहातली एक बोली आहे. असुरांनी ती मुंडांकडून घेतली असावी. आर्य लोकांशी संपर्क आल्यामुळे असुरांच्या भाषेत संस्कृत शब्दही पुष्कळ आढळतात.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर या लोकांची परिस्थिती सुधारण्यासाठी सरकार प्रयत्नशील आहे. मुलांच्या शिक्षणासाठी या प्रदेशात वसतिगृहयुक्त शाळा चालवल्या जात आहेत. तिथे विद्यार्थ्यांना जेवणखाण, कपडालत्ता, पुस्तके वगैरे सरकार मोफत पुरवते. मुलांना काहीच खर्च करावा लागत नाही. याचा फायदा बरीच मुले घेऊ लागली आहेत. तसेच, लोकांना औषधोपचार मिळावे म्हणून सरकारी दवाखानेही निघाले आहेत. त्याचाही लोक हळूहळू उपयोग करून घेऊ लागले आहेत.

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते पुरतात. माणूस मेल्यावर त्याला आंघोळ घालून तेल लावतात व नव्या कपड्यात गुंडाळतात. स्मशानात जमलेले नातेवाईक एकदोन नाणी प्रेतासाठी देतात. ती सर्व त्याच्या कपड्याच्या टोकाला बांधतात. मृत व्यक्तीचे धनुष्य-बाण आणि आवडीच्या वस्तू त्याच्याबरोबरच पुरतात. मृत्यूनंतर दोन दिवसांनी चाइ भीतर नामक एक विधी करतात. त्यासाठी गाव आणि स्मशान यांच्या मध्यभागी एक गवती झोपडी उभारतात. त्यात मृताची मातीची प्रतिमा करून ठेवतात आणि झोपडीला आग लावतात. मग जमलेले आप्तेष्ट मृताला त्याच्या नावाने हाक मारतात. लगेच एकजण आपले अंग झाकून मृताच्या घरी जाऊन त्याचे दार ठोठावतो व आपण मृतात्मा असल्याचे सांगतो. मग घराचे दार उघडले जाते. यानंतर मृतात्म्याला घरच्या पितरांत स्थान मिळते. दहा दिवसांनंतर आप्तेष्टांना जेवण देतात. गरीब कुटुंबाला या वेळी गावकरी धान्य देऊन मदत करतात. वर्षातून तीनदा हे लोक पितरांना जेवण व दारू देतात व त्यांनी आपले भले करावे, अशी त्यांची प्रार्थना करतात. [ एन्सा. रि. ए.; दि असुर–के. के. लेवा ]

**अस्तेय** स्तेय = चौर्य. त्याच्या विरुद्ध ते अस्तेय होय. याची व्याख्या पुढीलप्रमाणे – 'अनादानमदत्तस्यास्तेय – व्रतमुदीरितम्' = एखाद्याची वस्तू त्याने न दिल्यास तिचा अपहार न करणे हे अस्तेयव्रत म्हटले आहे (सर्व. द. सं.). अस्तेय हे जसे व्रत आहे, तसेच ते पाच यमांपैकी एक आहे (पा. यो. सू. २. ३०). देह व इंद्रिये यांचे योग्य धारणपोषण होऊन त्यांच्या द्वारे वर्णाश्रमोचित कर्तव्ये नीटपणे पार पडावी, यासाठी अन्न-वस्त्रादी विषयांचा आवश्यक तेवढा स्वीकार करावाच लागतो. पण माणसे विषयलुब्ध होऊन अधिक विषयांचा अधिक प्रमाणात संग्रह व उपयोग करीत असतात. तात्त्विक दृष्ट्या अशा अनावश्यक वस्तूंचा संग्रह करण म्हणजे स्तेय होय. देहादिकांच्या गरजेसाठी अत्यावश्यक ते आणि तेवढेच विषयसेवन हे स्तेय नव्हे. कारण ती ईश्वरी योजना आहे. पण ते इष्ट व आवश्यक भोगही शास्त्रविहित मार्गाने देवादिकांना अर्पण करून मगच त्यांचा उपभोग घ्यावा, हा अस्तेय व्रताचा आशय आहे. याने बुद्धीत सत्त्वगुणाची वृद्धी होऊ लागते. या अस्तेय व्रताचे फल पुढीलप्रमाणे सांगितले आहे – (पा. यो. सू. २.३७)

अस्तेयप्रतिष्ठायां सर्वरत्नोपस्थानम् ।

अर्थ – साधकाच्या चित्तात अस्तेय वृत्ती सुप्रतिष्ठित झाली, की पृथ्वीवरील रत्ने म्हणजे त्यांनी उपलक्षित अशी सर्व साधन-संपत्ती त्याच्या इच्छामात्रे (लोककल्याणार्थ) त्याच्यापुढे उपस्थित होते.

याचे तात्पर्य असे, की अस्तेयप्रतिष्ठा ही एक योगसिद्धी असून, अशा योगी पुरुषाला एखाद्यावर अनुग्रह करण्याची इच्छा झाल्यास, केवळ संकल्पाने पृथ्वीवरील सर्व संपत्ती तो त्याच्या-पुढे उपस्थित करू शकतो.

बौद्ध भिक्षूंच्या नियमावलीतही अस्तेय व्रताला फार महत्त्व आहे. त्यांच्या प्रार्थनेत 'मी न दिलेले घेणार नाही, चोरी करणार नाही' अशा प्रतिज्ञा आढळतात. या प्रार्थनांना शिक्षा-पदे म्हणतात. पाहा – यम. [ भा. मा. शा. ]

**अस्त्रविद्या** प्राचीन काळी आयुधांचे शस्त्र व अस्त्र असे दोन भेद करीत. तीक्ष्ण असून, घाव घातल्याबरोबर छेद किंवा जखम करणाऱ्या व मृत्यूला कारणीभूत होणाऱ्या आयुधाला शस्त्र म्हणत. मंत्राच्या साहाय्याने किंवा अग्नी, वायू, विद्युत्, इ. अन्य साधनांनी चालणाऱ्या आयुधाला अस्त्र म्हणत. अस्त्र–शस्त्रांतला भेद असा –

दूरे चान्ते च यत् शस्त्रं शत्रुघातकरं भवेत् ।
तदस्त्रमिति जानीयादन्यथा शस्त्रमुच्यते ।।

अर्थ – जे दूर तसेच जवळ असलेल्या शत्रूचा घात करण्यास उपयोगी पडते, ते अस्त्र होय. केवळ जवळच्याच शत्रूला मारण्यास उपयोगी असते, ते शस्त्र होय.

अस्त्राचे दोन प्रकार असे – (१) मंत्रशक्तीने चालणारे व (२) यांत्रिक साधनांनी फेकले जाणारे. मंत्रशक्ती असणाऱ्या अस्त्राला दैवी म्हणत. दैवी अस्त्रावर मंत्रातल्या देवतेचा अधिकार चालत असे. योद्धा धनुष्याला बाण जोडून त्यावर विशिष्ट देवतेचा मंत्र जपत असे, त्या वेळी तो बाणच अस्त्ररूप होई. बाणाप्रमाणेच अंकुश व दर्भ यांवरही अस्त्रमंत्र जपीत. शस्त्रापेक्षा अस्त्राचे संहारक सामर्थ्य अनेक पटींनी अधिक असे. धनुर्वेदात विविध अस्त्रांचे मंत्र ओंजळीत पाणी घेऊन जपावे, असे सांगितले आहे. अस्त्रयोजनेच्या चार अवस्था मानलेल्या आहेत–

मंत्र, उपचार, प्रयोग व संहार. त्यावरूनच अस्त्राला चतुष्पाद म्हटले आहे (म. भा. उ. ३).

अस्त्रांचे मायिक व निर्माय असेही आणखी दोन प्रकार आहेत. आकार, शब्द वगैरेवरून ज्याच्या शक्तीचा अंदाज करता येईल, ते अस्त्र निर्माय होय. ज्याच्या शक्तीचा आगाऊ अंदाज करता येत नाही, ते अस्त्र मायिक होय. मायिक म्हणजे मय नामक शिल्पज्ञाने केलेल्या रचनेप्रमाणे माणसाला फसविणारे, माणसाला मोह उत्पन्न करणारे आयुध होय. ही अस्त्रे ज्या शक्तींच्या साहाय्याने फेकली जातात, त्यांवरून त्यांचे तंत्रास्त्र किंवा पाणिमुक्त, यंत्रास्त्र किंवा यंत्रमुक्त व मंत्रास्त्र किंवा मंत्रमुक्त असे तीन प्रकार होतात.

अस्त्रांची अकारादी क्रमाने नामावली – असिरत्न, आग्नेय, ऐंद्र, ऐप्पिम, कंपन, कापल, कालमुद्गर, कैंकर, क्रौंच, गंधर्व, त्वाष्ट्र, नंदक, नारसिंह, नारायण, पपान, पाशुपत, पैशाच प्रमथन, प्रस्वापन, प्रस्थापन, ब्रह्मशिरस, ब्राह्म, भावन, भैरव, मथन, महाबल, मायाधर, मोहन, मौसल, रौद्र, वायव्य, वारुण, विकंपन, शातन, शामन, शैल, शोषद, संवर्तन, सार्प, सावित्र, सोम व हयशिरस (पु. इं.).

पुराणकाळी प्रत्येक क्षत्रियाला धनुर्वेदाच्या अभ्यासात या अस्त्रविद्येचाही अभ्यास करावा लागे. अस्त्र हे मंत्रप्रणीत असल्यामुळे मंत्र शिकविण्याचा अधिकार ब्राह्मणांनाच होता. काही विशेष अस्त्रांची नावे पुढीलप्रमाणे आहेत –

(१) **आग्नेयास्त्र** – हा विस्फोटक बाण होता. हा सोडल्यानंतर पावसाप्रमाणे अग्नीचा वर्षाव होऊन यच्चयावत वस्तू जळून खाक होत असत. याचा प्रतिकार करण्यासाठी पर्जन्यास्त्राचा उपयोग करीत.

(२) **पर्जन्यास्त्र** – याने कृत्रिम वादळ तयार होऊन पावसाचा वर्षाव होई, विजा चमकू लागत व प्रचंड वारा वाहू लागे.

(३) **वायव्यास्त्र** – याने भयंकर तुफानी वादळ होऊन जिकडे तिकडे अंधकार पसरे.

(४) **पन्नगास्त्र** – याने सर्प उत्पन्न होऊन थैमान घालू लागत. याचा प्रतिकार करण्यासाठी गरुडास्त्राचा उपयोग करीत.

(५) **ब्रह्मास्त्र** – हे अत्यंत भयानक अस्त्र होते. शत्रूचा धुव्वा उडावा म्हणून हे अस्त्र सोडीत. याचा प्रतिकार ब्रह्मास्त्राविना अन्य कोणत्याही अस्त्राने करता येत नाही.

(६) **पाशुपतास्त्र** – अखिल विश्वाचा नाश करण्याचे सामर्थ्य यात आहे, असे मानीत.

(७) **नारायणास्त्र** – हे अस्त्रही पाशुपतास्त्राप्रमाणेच महाभयंकर आहे. नारायणास्त्राचा प्रतिकार करील अशी एकही शक्ती या विश्वात नाही. अस्त्र सोडणाऱ्याला नम्रतापूर्वक आत्मसमर्पण करणे, एवढाच याच्या प्रतिकाराचा उपाय आहे.

प्रल्हादपुत्र विरोचन याला भवाकडून विशिष्ट अस्त्रे मिळाली होती. सगराने परशुरामाकडून आग्नेयास्त्र मिळविले होते. अर्जुनाला शिवाकडून पाशुपतास्त्र व लोकपालांकडून दिव्य अस्त्रे मिळाली होती (म. भा. वन. २८ व ४९). कृष्णाला 'परमास्त्रवित्' असे म्हटले आहे. कौरव-पांडवांचा गुरू द्रोणाचार्य याला अस्त्रविद्या उत्तम अवगत होती.

भारतीय युद्धाच्या वेळी भीष्म, द्रोण, अश्वत्थामा, अर्जुन, इ. काही पुरुषांनाच अस्त्रविद्या अवगत होती, असे दिसते. अर्जुनाने पाशुपतास्त्र तपश्चर्या करून मिळविले होते. शिष्याची योग्यता पाहून गुरू त्याला अस्त्रविद्या शिकवीत. द्रोणाचार्यांनी अर्जुनाला अति दुर्धर असे ब्रह्मशिरस हे अस्त्र शिकविले. त्या वेळी त्यांनी त्या अस्त्राच्या उपयोगाचा नियम सांगितला (आदि. संभव. १३३.१९), तो असा – मनुष्यांवर याचा प्रयोग केव्हाही करू नये. कदाचित अल्पतेज असणाऱ्या पुरुषावर हे अस्त्र सोडले तर सर्व जग भस्म होऊन जाईल.

कोणी अमानुष शत्रू पीडा देत असेल तरच त्याच्या वधासाठी याचा उपयोग करावा, असेही सांगितले आहे.

ज्याला अस्त्राचा उपसंहार करता येत नसेल, त्याने त्याचा उपयोग करूच नये, असाही नियम होता. अस्त्रांचा प्रयोग सहसा अधर्माने केला जात नसे व युद्धक्षेत्राबाहेरील लोकांवर त्यांचा आघात होत नसे. प्राचीन अस्त्रे नवयुगातील अण्वस्त्रांसारखीच असावीत. मात्र त्यांची शास्त्रीय प्रक्रिया अज्ञात राहिली. कालांतराने ती परंपराच नष्ट झाली. [ म. भा. उ.; कल्याण संस्कृति-अंक; मतिप्रकाश ]

## अस्थिपुर

कुरुक्षेत्राजवळचे एक तीर्थ (पद्म पु. १.२७.६२). हे थानेश्वराच्या पश्चिमेस आणि औजसघाटाच्या दक्षिणेस आहे. भारतीय युद्धात मृत्यू पावलेल्या वीरांचे देह इथे एकत्र करून त्यांचा दाहसंस्कार केला गेला. युआन च्वांग या चिनी प्रवाशाला इथे मोठमोठी हाडे दाखविली गेल्याचे उल्लेख आहेत. [ हि. ध. ]

## अस्थिसंचयन

प्रेतदहनानंतर त्याच्या अस्थी गोळा करून घेतात त्याला अस्थिसंचयन असे नाव आहे. हे दहनानंतर कोणत्या दिवशी करावे, याविषयी भिन्न मते आहेत. धर्मसिंधूत मुख्यतः तिसरा दिवस सांगितला आहे. याचा विधी असा –

वयस्क पुरुषाने चितास्थानाला उलट्या तीन प्रदक्षिणा घालून

राखेवर शमीच्या डहाळीने दूध-पाणी शिंपडावे. प्रथम पायाच्या व शेवटी मस्तकाच्या अस्थी गोळा कराव्या. त्या सुपाने झटकून मडक्यात भराव्या. ते मडके एका खड्डयात पुरून ठेवावे. हे सगळे समंत्रक करावे. घरी येऊन स्नान करावे (आश्व. गृ. सू. ४.५). ज्याचे उपनयन झाले नाही, त्याच्या अस्थी गोळा करू नयेत (निर्णयसिंधू). या अस्थी पुढे सवडीप्रमाणे मृताच्या पुत्राने किंवा जवळच्या आप्ताने गंगेत नेऊन टाकाव्या (विष्णू ध. सू. १९. ११-१२). विसर्जनापूर्वी त्यांची शुद्धी करावी. मग एका मातीच्या गोळ्यावर फुले, तीळ व तूप यांच्यासह त्या अस्थी ठेवून गंगेत सोडाव्या. त्यानंतर स्नान करून सूर्यदर्शन घ्यावे व ब्राह्मणास दक्षिणा द्यावी. पाहा – अंत्येष्टी. [ धर्मसिंधू ३; हि. ध. ]

**अस्थी** शरीरातील हाडे म्हणजे अस्थी होत. प्राचीन धर्मकल्पनांत व मानसशास्त्रात अस्थींना महत्त्वाचे स्थान होते. मृतात्म्याचा व अस्थींचा निकट संबंध मानला आहे. मृतात्म्याचा उद्धार होण्यासाठी दाहक्रियेनंतर त्याच्या अस्थींचे संचयन करून त्या अस्थी गंगेत अथवा अन्य एखाद्या पवित्र नदीत टाकतात. अस्थींविषयी जगात अनेक प्रकारच्या कल्पना आहेत–

एखाद्याचा ज्याने खून केला असेल, त्याने त्यानंतर वीस-पंचवीस वर्षांनी जरी त्याच्या हाडांना स्पर्श केला, तरी त्या हाडांतून रक्त निघते. हाडांत प्राण असतो व त्यांना ताजे रक्त लाभल्याने माणूस पुनश्च सजीव होतो. काही वन्य समाज पितर म्हणून हाडांची पूजा करतात. हाडांत अडकून पडलेल्या आत्म्याला मुक्त करायचे असल्यास ते हाड फोडून खड्डयात पुरतात. शिकार केलेल्या जनावरांची हाडे काळजीपूर्वक राखून ठेवतात. तसे केल्याने शिकार चांगली मिळते, अशी समजूत आहे. काही आदिवासी लोक बायकांना मासिक रजोदर्शनाच्या काळात हाडांना स्पर्श करू देत नाहीत. खुनाचा सूड घेण्याची प्रतिज्ञा केलेला माणूस खून झालेल्या माणसाचे हाड आपल्या भाळ्याला लावतो. जादूटोणा व अभिचार या कृत्यांत माणसाचे हाड व कवटी यांचा उपयोग करतात. वज्र हे आयुध दधीचीच्या अस्थींचे बनविलेले होते. हिंदुधर्मात अस्थींना अपवित्र मानले असून, त्यांचा स्पर्श झाल्यास सचैल स्नान करावे, असे सांगितले आहे. मात्र संत-महात्मे यांच्या अस्थी पवित्र मानतात. बौद्ध लोकांनी अनेक स्तूप उभारून त्यांत बुद्धाचे अस्थिरूप अवशेष संरक्षून ठेवले आहेत. पाहा – अस्थिसंचयन. [ एन्सा. रि. ए. ]

**अस्पस–अस्सकेन** अलीशांग व कुनार या दोन नद्यांच्या दुआबात राहणाऱ्या जमातीचे नाव अस्पस असे होते. गौरी आणि सुवास्तू यांच्या दुआबात राहणाऱ्या जमातीला अस्सकेन असे म्हणत. ग्रीकांनी यांच्या नावाचा अपभ्रंश केला. मूळ नावे कदाचित अश्वक व अष्टक किंवा अश्वायन व अश्वकायन अशी असावी. मशकावती ही अश्वकायनांची राजधानी होती. या दोन्ही जमातींनी सिकंदराशी प्राणपणाने लढा दिला होता. [ भा. इ. रू.; हि. क. इं. पी. २]

**अस्पृश्यता** हिंदू समाजात काही जाती अशा आहेत, की त्या जातींत जन्मलेला माणूस केवळ जन्मामुळेच अस्पृश्य मानला जातो. ज्यांच्या केवळ स्पर्शाने सवर्ण हिंदूंना विटाळ होऊ शकतो, अशा सुमारे ४२९ जाती भारतात असून, त्यांची जनसंख्या सहा कोटींच्या वर आहे. अशा अस्पृश्यांचा चातुर्वर्णिकांच्या शरीराला, वस्त्राला, पाण्याला व अन्नाला प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष स्पर्श झाला असता, त्याचा विटाळ मानणारे लोक सचैल स्नान करतात व त्या स्पृष्ट अन्नोदकांचा त्याग करतात. अशा अस्पृश्यांचा स्पर्श टाळण्यासाठी ते त्यांना दूर ठेवतात. त्यांना आपल्या बैठकीवर बसू देत नाहीत. घरात किंवा देवळात येऊ देत नाहीत. आपल्या विहिरीवर पाणीही भरू देत नाहीत. वैदिक लोक अस्पृश्यांच्या कानी वेदाक्षर पडू देत नाहीत. या सर्व आचाराला व त्यामागील विचाराला अस्पृश्यता हे नाव आहे. अस्पृश्यता पाळणे हा धर्म आहे, असा स्पृश्य हिंदूंचा समज आहे. पण स्वतंत्र भारताच्या राज्यघटनेत ही अस्पृश्यता पाळणे हा आता अपराध ठरविलेला असून, त्याला दंड व शिक्षाही सांगितलेली आहे. अशा प्रकारे आजमितीस अस्पृश्यता ही कायद्याने दूर झालेली असली, तरी जुन्या परंपरेचा पगडा असलेल्या लोकांच्या मनातून ती अद्यापि नष्ट झालेली नाही. ती घालविण्यासाठी निष्ठावंत प्रयत्नांची आवश्यकता आहे.

ही अस्पृश्यता पुरातन काळापासून चालत आलेली असली, तरी मध्ययुगात जनमनावर तिचा पगडा विशेष बसला. विसाव्या शतकाच्या पहिल्या पंचविशीपर्यंत या कल्पनेचा समाजात विलक्षण प्रभाव होता. एखादा अस्पृश्य न्यायालयात साक्ष देण्यासाठी आला, तर तिथे उपस्थित असलेले सवर्ण हिंदू चटकन दूर होत. अस्पृश्यांना सार्वजनिक पाणवठ्यावर पाणी भरता येत नसे. त्यांना गावाबाहेर राहावे लागे. काश्मीरमध्ये मेघ, डोन, इ. जातींना आजही गावाबाहेरच राहावे लागते. वायव्य सीमा प्रदेशांत धोबी, रंगारी, रयसज, या लोकांनाही अस्पृश्य समजले जाते. गुजरातेतील अस्पृश्यांना आपण अस्पृश्य आहो, हे लोकांना ओळखू येण्यासाठी पूर्वी डोक्याला एक शिंग लावावे लागत असे.

दक्षिण भारतात अस्पृश्यतेची भावना उत्तर भारतापेक्षाही अधिक कठोर आहे. नायाडी जातीचा माणूस दीडशे हात अंतराच्या आत आला, तरी ब्राह्मणाला विटाळ होत असे. त्यामुळे

अशा हीन जातींच्या लोकांना बाजारात किंवा सार्वजनिक रस्त्यावर येण्यास बंदी असे. यायचेच झाले, तर त्याला आपण येत असल्याचे आधी ओरडून जाहीर करावे लागे. महाराष्ट्रात अस्पृश्याच्या सावलीचासुद्धा विटाळ मानला जात असे.

ही अस्पृश्यता केवळ सवर्ण व अंत्यज यांच्यांतच आहे, असे नाही. अस्पृश्यांतही परस्परांना अस्पृश्य मानण्याची प्रथा आहे. महार मांगाला अस्पृश्य समजतो. दक्षिणेत पुलयन लोक परियाचा विटाळ मानतात. कुरिच्छ नावाची एक जंगली जमात आहे तिला इतर सगळ्या जंगली जमातींचा विटाळ होतो. होलेय जातीचे लोक या सर्वांत अधिक सोवळे आहेत. कारण ते ब्राह्मणांनाही अस्पृश्य मानतात व त्यांना आपल्या वस्तीत येऊ देत नाहीत. अशी किती तरी उदाहरणे आहेत.

अस्पृश्यता ही श्रुतिस्मृतिप्रतिपादित आहे व ती पाळली पाहिजे, असा सनातनी पंडितांचा आग्रह आहे. पण श्रुतीत अस्पृश्य शब्द आढळत नाही. क्वचित अंत किंवा अंत्य हा शब्द दिसतो. अमुक एक जात किंवा विशिष्ट हीन धंदा करणारे लोक, हे अस्पृश्य असल्याबद्दल श्रुतीत कुठेही उल्लेख नाही. स्मृतीत मात्र हा शब्द वारंवार आढळतो. मनुस्मृतीत निषाद, आयोमेद, अंध्र, चुंचू, मद्‌गू, क्षत्त पुक्कस, धिग्वण व वेण या लोकांनी गावाच्या बाहेर राहावे, असे म्हटले आहे (१०.४८–५५). तैत्तिरीय ब्राह्मणात 'वायवे चाण्डालम्' असे वचन येते (३.४.१७.१). पण आजच्या अर्थाचा तो चाण्डाल नव्हे. 'नमः क्षत्तृभ्यः' या वचनात क्षत्त्यांना नमस्कार केलेला आहे (तै. सं. ४.५.२). स्मृतींच्या भाषेत शूद्राला क्षत्रिय स्त्रीपासून झालेली संतती म्हणजे क्षत्ता होय. पण श्रुतीतला क्षत्ता अस्पृश्य नाही. निषाद हा सांप्रत अस्पृश्य गणला आहे; पण श्रुतीत त्याला वेदमंत्रांनी रुद्रेष्टी करण्याचा अधिकार होता. सूतही वैदिक काळी अस्पृश्य नव्हता. राजांची स्तुती गाण्याचे काम त्याच्याकडे होते, हे 'गीताय सूतम्' या वचनावरून समजते. आयोगवाकडे यज्ञातल्या वस्तू विकत घेण्याचे काम होते, हे 'आक्रयायायोगवम्' या वचनावरून लक्षात येते. ऐतरेय ब्राह्मणात आलेला मरुत्त आविक्षित हा राजा आयोगव होता. मागध म्हणजे भाट किंवा चारण. श्रुतीत 'अतिक्रुष्टाय मागधम्' असा त्याचा उल्लेख येतो (तै. ब्रा. ३.४.१.१). अर्थात वैदिक काळी तोही अस्पृश्य नव्हता. त्यावरून हे शब्द स्मृतीत श्रुतीहून निराळ्या अर्थाने आले आहेत, हे उघड दिसते. विंदलकार म्हणजे बुरुड व किरात म्हणजे भिल्ल, हे श्रुतीत अस्पृश्य नव्हते व आजही नाहीत.

स्मृतीत चाण्डाल तीन प्रकारचे सांगितले आहेत– (१) ब्राह्मण स्त्री व शूद्र पुरुष यांची प्रजा. (२) सगोत्र विवाहाने झालेली संतती. व (३) विवाहापूर्वी कन्येला झालेली संतती. चाण्डालांचा चौथाही एक प्रकार होता. संन्यास घेतल्यानंतर पुनश्च एखाद्या पुरुषाने गृहस्थधर्म स्वीकारला, तर तो व त्याची संतती चाण्डाल समजावी, असे लघुशातातस्मृतीत सांगितले आहे. हे सर्व 'जन्मचाण्डाल' होत. याशिवाय 'कर्मचाण्डाल' म्हणून काहींचा उल्लेख केलेला आहे. आव्हायक (दवंडी देणारा), देवलक (पुजारी), नाक्षत्र (ज्योतिषी), ग्रामयाजक व स्मशानजीवी पाशुपत, अशा ब्राह्मणांना कर्मचाण्डाल मानले आहे (म. भा. शांति. ७६.६).

चाण्डाल शब्द वैदिक वाङ्मयात अनेक वेळा येतो; पण संदर्भावरून त्याचे स्वरूप कळून येत नसल्यामुळे तो अस्पृश्य होता, असे मानायला आधार नाही. फक्त तो हीन पदवीचा मनुष्य असावा असे दिसते. पण पुढे अस्पृश्यता वाढत जाऊन ती जन्मसिद्ध ठरविण्यापर्यंत मजल गेली, तेव्हा तो अस्पृश्य मानला गेला असावा. पाणिनीने निरवसित व अनिरवसित असे शूद्रांचे दोन भेद सांगितले आहेत (अष्टा. २.४.१०). अनिरवसित या शब्दाचा खुलासा पतंजलीने पुढीलप्रमाणे केला आहे– 'यैर्भुक्ते पात्रं संस्कारेण शुध्यति ते अनिरवसिताः' ज्यांनी भांड्यांतून खाणेपिणे केले असता ते भांडे धुवून किंवा घासून शुद्ध होते व त्रैवर्णिकांना चालते, ते अनिरवसित होत.

प्राचीन स्मृतिकारांचा विशेष कटाक्ष चाण्डालादिकांवरच होता. त्यांनाच ते जन्मजात अस्पृश्य समजत. अंत्यजांपैकी चाण्डालांनीच गावाबाहेर राहावे, असे विष्णुस्मृतीत म्हटले आहे (१६.४). मनूचाही चाण्डालांवरच कटाक्ष आहे. त्यांनी गावाबाहेर, चैत्य वृक्षाच्या खाली, स्मशानात किंवा डोंगरदऱ्यांत राहावे आणि मृतांची वस्त्रे, फुटकी भांडी व लोखंडाचे दागिने वापरावे, असे तो सांगतो (१०.५०-५७). शूद्राला ब्राह्मण स्त्रीपासून झालेला तो चाण्डाल अशी मनूने त्याची व्याख्या दिली आहे.

अस्पृश्यता ही घाणेरडे धंदे करण्यामुळे उत्पन्न झाली, असे काहीजण म्हणतात. पण तसे असते, तर अस्पृश्यता ही सर्व जगातच उत्पन्न झाली असती. पण ती केवळ भारतातच असल्यामुळे तिच्या उत्पत्तीचे कारण दुसरे असले पाहिजे. ते शोधण्याचा साक्षेपी प्रयत्न श्री. विठ्ठल रामजी शिंदे यांनी केला आहे. त्यांनी 'भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न' या नावाचा एक ग्रंथ लिहिला असून, त्यात अस्पृश्यांबद्दलची समाजशास्त्रीय उपपत्ती मांडली आहे. त्या माहितीचा सारांश पुढीलप्रमाणे –

अस्पृश्यता ही एक स्वतंत्र मानवी संस्था आहे. मानव जातीच्या प्राथमिक अवस्थेतच तिचा उदय झाला असला पाहिजे. प्रारंभी ही अस्पृश्यता वैयक्तिक व प्रासंगिक होती. बाळंतीण, तिची खोली, मृतांची जागा, त्यांचे आप्त, विशिष्ट

रोगी, झपाटलेली माणसे, विक्षिप्त झाडे, खुनासारख्या अपघाताची ठिकाणे, वगैरे गोष्टी प्राथमिक काळातच अस्पृश्य आणि वर्जनीय ठरल्या होत्या. जादूगार व पुरोहित हे देखील सोवळे म्हणजे एक प्रकारे अस्पृश्यच असत. यज्ञातल्या ऋत्विजांना सोवळधात म्हणजेच अस्पृश्य अथवा अलग स्थितीतच राहावे लागे. कर्नाटकात मादिगांचे धर्मगुरू म्हणून प्रसिद्ध असलेल्या ढकलगारांना त्यांचे अनुयायीही शिवत नाहीत. इतकेच नव्हे; तर त्यांना आपल्या पाणवठ्यांनाही शिवू देत नाहीत. अशा या अपधर्मातच अस्पृश्यतेचा उगम आहे. या अपधर्माला उत्तरोत्तर जसजसे गूढ व दृढ स्वरूप प्राप्त झाले व पुरोहितांच्या द्वारे त्याची परंपरा आणि घटना वनत चालली, तसतशी अस्पृश्यतेच्या वैयक्तिक व स्थानिक स्वरूपाची परिणती जातीय, सार्वत्रिक व नित्यस्वरूपात होऊ लागली. अभिचारमूलक अपधर्म हा अस्पृश्यतेचे मूळ कारण आहे. ते मूळ कारण पुढे लुप्त व विस्मृत झाले, तरी अस्पृश्यता मात्र शिल्लक उरली.

असली अस्पृश्यता प्राचीन आर्यांतच होती, असे नसून ती बऱ्याच प्राथमिक राष्ट्रांतही होती. अस्पृश्यतेचा विकास वैयक्तिक स्वरूपातून जातीय स्वरूपात होण्यापूर्वी राज्यांचा विकास होऊन ती साम्राज्यांत रूपांतरित झाली असणे शक्य आहे. जेव्हा एक जात अथवा राष्ट्र दुसऱ्या सबंध जातीला किंवा राष्ट्राला कायमचे अस्पृश्य मानते व ती जात आणि ते राष्ट्रही तसे मानून घेते, तेव्हाच जातीय गुलामगिरीचा ऊर्फ अस्पृश्यतेचा उदय होणे शक्य असते. जातीय अस्पृश्यता हा एक गुलामगिरीचाच अतिकठोर प्रकार होय.

वर दर्शविलेली अस्पृश्यता सामान्यत्वे नित्य आणि नैमित्तिक अशा दोन स्वरूपांची असते. याशिवाय, तिरस्करणीय व आदरणीय अशीही तिची दोन स्वरूपे असतात. पहिल्या स्वरूपाला मराठीत विटाळ व दुसऱ्याला सोवळे अशी नावे आहेत.

भारतात वरच्या लक्षणांनी युक्त अशी अस्पृश्यता केव्हा रूढ झाली, हे नक्की सांगणे कठीण आहे. कारण, या संस्थेविषयी ग्रांथिक किंवा शिलालेखीय पुरावा मिळत नाही. मात्र, पुरावा नसला तरी अस्पृश्यता भारतात अनादिकालापासून होतीच, असे मानण्याचे कारण नाही. आर्य आणि द्रविड या भाषांतील वाङ्मयावरूनही अस्पृश्यतेच्या उत्क्रांतीविषयी नीट पुरावा मिळविणे अद्यापि सुगम झालेले नाही.

गौतम बुद्धाचा उदय म्हणजे भारताच्या किंबहुना आशिया खंडाच्या इतिहासातली एक मेख होय. अस्पृश्यतेचा छडा लावण्यासाठी या मेखेच्या आगे व मागे शोधीत गेले पाहिजे. बुद्धकाली म्हणजेच सनपूर्व सहाशे वर्षांच्या सुमारास उत्तर भारतात आर्यांनी चातुर्वर्ण्य स्थापित केले होते व ती वर्णव्यवस्था जन्मसिद्ध मानली जाऊ लागली होती. ब्राह्मण व क्षत्रिय या दोघांत वर्चस्वासाठी परस्पर संघर्ष चालू झाला होता. हा संघर्ष बुद्धाच्या पूर्वीच विकोपाला गेला होता, हे पाली व संस्कृत वाङ्मयावरून उघड होते. या दोघांनी वैश्य वर्गालाही तुच्छ मानले होते; मग आर्येतर शूद्रांची कथा काय! अशा वेळी शूद्रत्वाचाही मान ज्यांना मिळाला नव्हता, असे अतिशूद्र त्या काळात पूर्णपणे बहिष्कृत ठरले होते. मानीव चातुर्वर्ण्याचा हळूहळू लोप होऊन हल्ली दृढ झालेल्या जाती-पोटजातींची उभारणी आर्थिक पायावर होऊ लागली होती. या उभारणीत अतिशूद्रांना कोणत्याही वृत्तीचा अधिकार दिला गेला नव्हता. अस्पृश्य जाती ग्रामबाह्य ठरून त्या वंशपरंपरेने नीच आणि व्यवहाराला वर्ज्य ठरल्या होत्या.

अस्पृश्यतेचा व्याप आणि घटना कमीअधिक मानाने सर्व जगभर आहे, तरी भारतात या घटनेला विशेष स्थैर्य आले, ही गोष्ट ध्यानात घेण्यासारखी आहे. भारतातही उत्तरेपेक्षा दक्षिणेत अस्पृश्यतेचा पाया अधिक खोल असून, त्याचा परिणामही अधिक तीव्र आहे. या गोष्टीला काहीतरी विशेष कारण असले पाहिजे. कदाचित आर्यांच्या आगमनापूर्वीही या देशात ही संस्था होती की काय, अशी आशंका उत्पन्न होते. पण तिचे समाधान होईल, असे पुरावे मात्र आढळत नाहीत. एक अनुमान असे निघते, की आर्यांपूर्वी या देशात काही धनसंपन्न जाती वस्ती करून राहिल्या होत्या. त्यांच्या सहवासाने कदाचित अस्पृश्यतेचा शिरकाव आर्यांच्या समाजघटनेत झाला असावा.

उत्तरेच्या आर्यांप्रमाणे दक्षिणच्या द्रविडांतही प्राचीन काळी चातुर्वर्ण्य होते. म्हणजेच सांपत्तिक दृष्ट्या उच्चनीच भाव असलेले चार भिन्न समाज तिथे होते. द्रविड देशांत जे लोक स्वतःला शूद्र म्हणवितात, ते शूद्र म्हणजे आर्येतर असा त्याचा अर्थ समजतात. मानीव अस्पृश्यांना ते शूद्र हे बहुमानाचे नाव देत नाहीत. मुदलियार या शब्दाचा यौगिक अर्थ 'मूळचा' असा आहे. यावरून अस्पृश्य जे परिया लोक, त्यांना परके समजण्यात येत असे, असे दिसते.

अस्पृश्यता रूढ होण्याची स्वाभाविक कारणे दोन आहेत — एक जातिद्वेष किंवा वर्णद्वेष आणि दुसरे वृत्तिमत्सर. उत्तर भारतात आर्यांचा जम हळूहळू बसू लागल्यावर त्यांनी यथानुक्रम ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र अशी व्यवस्था लावली आणि ज्यांच्या गुण-कर्मांचा तिटकारा वाटला, अशा जंगली जातींना दूर ठेवण्याचा प्रयत्न केला. पुढे अर्थशास्त्राच्या पायावर आर्यांमध्ये निरनिराळ्या वृत्तींचा अर्थात धंद्यांचा विकास झाला, तसतशी वर्णद्वेषात वृत्तिमत्सराची भर पडली व पूर्वीच दूर

ठेवलेल्या जातींत वृत्तिबहिष्कृत लोकांची भर पडून अस्पृश्यतेचा विस्तार झाला. अर्थात हे निश्चित विधान नसून हा एक अनुमानित संभव आहे.

मनुस्मृतीच्या काळात सुतार, लोहार, इ. कुशल पांचाळांची मान्यता वाढलेली दिसते. त्याचबरोबर अकुशल श्रम करणाऱ्या व अंगी विशेष क्षात्रतेज नसलेल्या आर्येतरांची गणना अस्पृश्यांत होऊन त्यांना गावाबाहेर टाकलेले आढळते. ग्रामबाह्य मानलेल्या जातींचे सारे व्यवहार हत्या व हीन कर्मे यांच्याशीच अधिकाधिक निगडित होत गेल्यामुळे त्यांची अस्पृश्यता उत्तरोत्तर दुणावली व दृढ झाली. बौद्धांची अहिंसा व जैनांचा कडकडीत शाकाहार यांमुळे त्या दोघांचाही कल अस्पृश्यतेच्या निवारणापेक्षा तिच्या दृढीकरणाकडेच वळला.

भारतीय अस्पृश्यतेच्या उगमाचा व विकासाचा आर्यांच्या वर्णव्यवस्थेशी जितका संबंध आहे, त्याहून जास्त तो आर्य-द्रविडांच्या ग्रामसंस्थेशी आहे. ग्रामसंस्थेमुळे चातुर्वर्ण्यातल्या सर्व ग्रामस्थांचा योगक्षेम नीट चालू झाला व ग्रामबाह्यांच्या उन्नतीच्या सर्व वाटा मात्र बंद झाल्या. बलुत्याचा हक्क हा भारतीय अस्पृश्यांना आजवर महत्त्वाचा वाटत आला आहे. या बलुत्याच्या हक्कापायीच भारतीय अस्पृश्यांची अधिकाधिक अवनती होत गेली, असे म्हणता येते.

मनुस्मृतीच्या काळात बौद्ध धर्म घसरणीला लागला होता व त्याच प्रमाणात ब्राह्मणी संस्कृतीची पुनःप्रतिष्ठा होऊ लागली होती. मनुस्मृतीच्या दहाव्या अध्यायात चंडाल, पुक्कस, निषाद वगैरे मानववंशाची जी ऐतिहासिक मीमांसा केली आहे, ती इतिहासाच्या दृष्टीने निराधार आहे. चांडालादी लोक हे स्वतंत्र मानववंश असून त्यांची उत्पत्ती संकरजात मानणे म्हणजे तो वर्णद्वेषाचाच एक प्रकार आहे. ही संकरकल्पना गुप्त काळापासून पुढे सारखी वाढतच गेली. वर्णसंकर झाला नाही, असे कोणाचेही म्हणणे नाही; पण हल्लीच्या सर्व जाती केवळ वर्णसंकरामुळेच झाल्या, ही उपपत्ती मात्र ऐतिहासिक नव्हे. मनुस्मृतीत उल्लेखिलेल्या अस्पृश्य जातींच्या पलिकडे आजच्या समाजस्थितीत महार, मातंग, ढोर, धेड, परिया, चिरुमा, नामशूद्र, मेघवाल, इ. अनेक मानीव अस्पृश्य जातींची नावे आढळतात. त्यांचा उल्लेख कोणत्याही स्मृतीत किंवा पुराणांतही आढळत नाही आणि या जाती तर भारतात सर्वत्र आढळतात. यावरून असे म्हणावे लागते, की आजकालच्या मानीव अस्पृश्यांची उपपत्ती केवळ वर्णव्यवस्थेच्या धोरणाला धरून न लावता ती राजकीय, सामाजिक आणि विशेषतः आर्थिक कारणावरूनच लावली पाहिजे. अस्पृश्यतेच्या प्रश्नात मनोधर्माचाही बराच पगडा आहे. आपण जे करतो ते न करणारे, आपल्याहून कमी दर्जाचे, असे मानण्याकडे मनुष्याच्या मनाचा कल असतो. त्याला अनुलक्षून स्नान-संध्या करणारे, ती न करणाऱ्यांना कमी लेखू लागले, मांसाहार न करणारे तो करणाऱ्यांना हीन मानू लागले व असे मानणे हे धार्मिकतेचे लक्षण ठरले. काही लोकांना काही कारणास्तव अस्पृश्य मानल्यावर तसे न मानणारे अधार्मिक ठरू लागले व अशा प्रकारे अस्पृश्यता दृढमूल झाली. कर्मसिद्धान्त व पुनर्जन्म यांच्यामुळे तिला बळ प्राप्त झाले.

भारतात अस्पृश्यतेचे पुढील प्रकार आढळतात –

(१) **परिस्थितिजन्य अस्पृश्यता**– उदा० बाप व मुलगा किंवा पंक्तीतले लोक जेवताना एकमेकांना शिवत नाहीत. स्त्री रजस्वला असता तिला शिवत नाहीत. मलाशौच व मृताशौच असताही तो मनुष्य अस्पृश्य असतो, इत्यादी. ही अस्पृश्यता परिस्थिती बदलल्यावर किंवा प्रायश्चित्त घेतल्याने दूर होते.

(२) **निंद्य कर्मांनी होणारी** – उदा० ब्रह्महत्या, सुरापान, इत्यादी. पण योग्य प्रायश्चित्ताने ती दूर होते.

(३) **व्यवसायामुळे उत्पन्न होणारी** – उदा० तीन वर्षे पैसा घेऊन सतत देवपूजा करणारा अस्पृश्य होतो, असे अपरार्क म्हणतो. त्यालाही प्रायश्चित्त आहेच.

(४) **वंशभेदाने उत्पन्न होणारी** – उदा० शबर, पुलिंद, म्लेच्छ, यवन, किरात हे देशभिन्नत्वामुळे अस्पृश्य झाले आहेत.

(५) **द्वेषमूलक अस्पृश्यता** – उदा० बौद्ध, जैन, पाशुपत, कापालिक, वैष्णव, शैव, इ. भिन्नपंथीय लोक एकमेकांना केवळ द्वेषामुळे दूर ठेवतात.

(६) **जन्मजात अस्पृश्यता** – ही अस्पृश्यता कुठल्याही प्रायश्चित्ताने दूर होणारी नसते व ती त्या व्यक्तीला व जातीला जन्मभर चिकटून राहते.

वरील अनेक प्रकारच्या अस्पृश्यांपैकी बऱ्याच लोकांची अस्पृश्यता आपण आजवर घालविली आहे. अत्रिस्मृतीत सांगितलेले रजक, नट, बुरुड, इ. अंत्यज आज बहुतेक स्पृश्य झालेले आहेत. ही सारी अस्पृश्यता रूढीने आली व रूढीनेच गेली. श्रुतीत तिला आधार नाही व स्मृतीतही थोडाच आहे.

सांप्रत अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतीत सार्वजनिक ठिकाणे, पाणवठे व देवळे ही तीन ठिकाणे महत्त्वाची ठरली आहेत. अंत्यजांनी देवळात जावे असे जसे एखाद्या स्मृतीत आढळत नाही, तसे त्यांनी देवळांत जाऊ नये, असेही एखादी स्मृती सांगत नाही. अत्री तर म्हणतो –

देवयात्राविवाहेषु यज्ञप्रकरणेषु च ।
उत्सवेषु च सर्वेषु स्पृष्टास्पृष्टिर्न विद्यते ।।
(अत्रिस्मृ. २४९)

अर्थ – देवयात्रा, यज्ञप्रकरण व सर्व उत्सव यांत स्पर्शदोष

नाही. ('स्पृष्टास्पृष्टि' म्हणजे स्पृष्टांना लागणारा अस्पृश्यतेचा दोष.)

अस्पृश्यांची सावलीही अंगावर पडू देऊ नये, असा एक अस्पृश्यतेतला भाग आहे. पण हा छायादोष अतिरेकी मनोधर्मातूनच उत्पन्न झाला आहे. त्याला शास्त्राधार नाही.

पुराणादी ग्रंथांत अस्पृश्यता घालविण्याचे उपायही सांगितलेले आहेत. 'ज्याच्या कपाळावर ऊर्ध्वपुण्ड्र लावलेला दिसतो, तो चांडालही शुद्धात्मा व पूज्य होय', असे पद्मपुराण म्हणते (५.३७. ७१). भागवतातही परमेश्वराचे नाव घेणारा श्वपचही (चांडाल) श्रेष्ठ होय व भगवंताचे श्रवण, कीर्तन व ध्यान यांनी अंत्यजदेखील पवित्र होतो, असे म्हटले आहे (३.३३; १०.७०).

बौद्ध साहित्यात हीन जाती या नावाने निषाद, चांडाल, पुक्कस, इ. अंत्यजांचा उल्लेख येतो. हे लोक गावाबाहेर राहत (जातक ४.३७६). ते पीतवस्त्र आणि रक्तमाला धारण करीत. खांद्यावर कुऱ्हाड व हातात कटोरा घेत. चांडाल स्त्रिया जादूटोणा करीत (चुल्लधम्मजातक). पण बौद्ध परंपरेत हिंदूंपेक्षा अस्पृश्यतेचे स्तोम कमी होते, असे दिसते. धर्मज्ञ पुष्करसारी याच्या कन्येचा विवाह चांडालराज त्रिशंकूशी झाल्याचे दिव्यावदानावरून कळते. बुद्धाने छुंद या अस्पृश्याच्या घरचे भोजन स्वीकारले होते. बुद्धशिष्य आनंद याने चांडालकन्येच्या हातून जलप्राशन केले होते (दिव्यावदान पृष्ठ ६११). चांडालराज त्रिशंकू हा स्वतः वेद व इतिहास यांत पारंगत होता. त्याच्या पुत्रानेही वेदवेदांगांचे अध्ययन केले होते, हे शार्दूलकर्णावदान या अवदानकथेवरून कळते. बुद्धाने तर चांडालादिकांनाही निर्वाणाचा अधिकार असल्याची निःसंदिग्ध घोषणा केली आहे.

जैन वाङ्मयातही अस्पृश्यतेचा आढळ होतो. आदिपुराणात कारूंचे (शिल्पी) स्पृश्य व अस्पृश्य असे दोन भेद केले आहेत व धोबी, सुतार, लोहार यांना अस्पृश्य वर्गात घातले आहे. डोंब, चांडाल व किणिक यांना अस्पृश्यांतलेही हीन मानले आहे.

तंत्रमार्गात स्पर्शास्पर्शाचा विधिनिषेध नसल्यामुळे अस्पृश्यतेला स्थान नाही. शाक्त तंत्रातल्या डोंबी, चांडाली, इ. मुद्रा या अस्पृश्य जातीतल्याच स्त्रिया असत. कुलार्णवतंत्राने भैरवचक्र प्राप्त झाले असता सर्व वर्ण हे द्विजच होतात, असे म्हटले आहे (८. ९६).

मध्यकालीन वैष्णव संतांनी मात्र अस्पृश्यतेचा तिरस्कार केलेला दिसतो. कबीरपंथ, दादूपंथ, वारकरी पंथ, इ. कित्येक पंथांत अनेक अस्पृश्य जातींतले संत होऊन गेले व त्यांचा आदरही झाला.

एकोणिसाव्या शतकात म. फुले, राजा राममोहन रॉय व स्वामी दयानंद यांनी अस्पृश्यतानिवारणाचे कार्य सुरू केले. काँग्रेसनेही १९१७ साली अस्पृश्यता नष्ट करण्याचा ठराव संमत केला. म. गांधी हे तर अस्पृश्यता हा हिंदुधर्मावरचा कलंक आहे, असे मानीत. अस्पृश्यतानिवारण हे त्यांनी आपले एक जीवनकार्य ठरविले होते. अस्पृश्यांना त्यांनी हरिजन असे नवे नाव ठेवले व त्यांच्या उद्धारासाठी आमरण प्रयत्न केला. त्यांनी काँग्रेसच्या रचनात्मक कार्यात हरिजनोद्धार हा महत्त्वाचा कार्यक्रम म्हणून समाविष्ट केला. इ. स. १९३२ साली त्यांनी 'कम्युनल अवॉर्ड' च्या विरुद्ध पुण्यात प्रायोपवेशन केले. त्या कायद्याने हरिजनांना सवर्ण हिंदूंपासून अलग करण्याचा ब्रिटिश सरकारचा डाव होता. या प्रायोपवेशनाने हरिजनोद्धाराची लाट सर्व देशभर पसरली. याच सुमारास हरिजनसेवकसंघाची स्थापना झाली. पुढे पुढे म. गांधी एखाद्या ठिकाणी गेले, तर तिथल्या हरिजन वस्तीतच आपला मुक्काम करीत. हरिजनांच्या उद्धाराचे कार्य देशव्यापी करण्याचे श्रेय म. गांधींनाच आहे.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारतीय राज्यघटनेने अस्पृश्यता नष्ट केली आहे व कोणत्याही स्वरूपात अस्पृश्यतेचे पालन करणे, हा गुन्हा असल्याचे घोषित केले आहे. या कायद्याने अस्पृश्यांची परंपरागत सामाजिक, व्यावसायिक तशीच औद्योगिक अयोग्यता दूर केली असून, त्याबरोबरच लोकसभा व राज्यविधानसभा यांत काही वर्षांसाठी लोकसंख्येनुसार आपला विशेष प्रतिनिधी निवडून देण्याचा त्यांचा अधिकारही सुरक्षित ठेवला आहे. आजमितीस हरिजनसेवकसंघ, भारतीय डिप्रेस्ड क्लासेस लीग, हरिजनाश्रम, इ. काही प्रमुख संस्था केवळ हरिजनोद्धाराचेच कार्य करीत आहेत.

डॉ. आंबेडकर हे अस्पृश्यांचे प्रमुख पुढारी होते. अस्पृश्यवर्ग त्यांना देवासमान मानतो. ते स्वतः अस्पृश्य जातीतच जन्माला आले होते. अस्पृश्यांची तीव्र दुःखे त्यांना स्वानुभवाने कळून आली होती. त्यामुळे त्यांनी अस्पृश्यांवरचे राजकीय व सामाजिक अन्याय दूर करून त्यांचा उद्धार करण्यासाठी आपले सारे आयुष्य खर्च केले. अस्पृश्यवर्गाला जागृत करण्यासाठी त्यांनी मूकनायक, बहिष्कृत भारत व जनता ही तीन वृत्तपत्रे चालविली. ठिकठिकाणी सभा-संमेलने भरवून त्यांनी अस्पृश्य समाजात प्रथम जागृती निर्माण केली. मग त्या जागृत व संघटित समाजबळाचा त्यांनी प्रत्यक्ष चळवळीसाठी उपयोग केला. त्यांनी पहिला सत्याग्रह केला तो महाड येथील चवदार तळ्यावर पाणी भरण्याचा (मार्च १९२७). दुसरा सत्याग्रह नासिक येथील राममंदिरात अस्पृश्यांना घेऊन प्रवेश करण्याचा (मार्च १९३०). या दोन्ही सत्याग्रहांमुळे अस्पृश्यांची संघटना प्रभावशाली झाली. महाड येथील चवदार तळ्यावरील सत्याग्रहाचे प्रकरण न्यायालयात गेले व अखेर १९३७ मध्ये चवदार तळ्यावर पाणी

भरण्याचा अस्पृश्यांचा हक्क न्यायालयाने मान्य केला.

पण असल्या अवांतर उपायांनी खरे अस्पृश्यतानिवारण होणार नाही, असे वाटल्यामुळे त्यांनी राजकीय लढा देण्याचे ठरविले. १९३१-३२ साली त्यांनी ब्रिटिश सरकारचे निमंत्रण स्वीकारून गोलमेज परिषदेत अस्पृश्यांची गाऱ्हाणी मांडली व अस्पृश्यांना राजकीय सत्तेत वाटा मिळाला पाहिजे, असे आग्रहाने प्रतिपादले. त्यामुळे अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ देण्याचा निर्णय त्या परिषदेत घेण्यात आला; पण म. गांधींनी पुणे येथे त्याविरुद्ध प्राणांतिक उपोषण मांडल्यामुळे डॉ. आंबेडकरांनी तडजोड म्हणून म. गांधींबरोबर एक नवा राजकीय करार केला. 'पुणे करार' या नावाने तो प्रसिद्ध आहे. अस्पृश्यांनी प्रथम आपणांतून चार प्रतिनिधी निवडावे आणि त्यांतील एकाची संयुक्त मतदार संघातर्फे निवड व्हावी, असे त्या कराराने ठरले.

इ. स. १९३६ साली त्यांनी 'स्वतंत्र मजूर पक्ष' स्थापून मुंबई कौन्सिलच्या निवडणुका लढविल्या. त्या निवडणुकीत ते स्वतः निवडून आले. इ. स. १९४२-४६ पर्यंत ते व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळात मजूरमंत्री होते. त्या काळात त्यांनी अस्पृश्यवर्गाची शैक्षणिक व आर्थिक उन्नती करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. 'शेड्यूल्ड कास्ट फेडरेशन' ही अस्पृश्यांची प्रातिनिधिक राजकीय संस्था त्यांच्याच नेतृत्वामुळे प्रभावी झाली.

शेवटी स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारताची राज्यघटना तयार करण्याचे काम डॉ. आंबेडकर यांच्यावरच सोपविण्यात आले आणि त्या घटनेत सर्वानुमते अस्पृश्यता नष्ट करण्यात आली.

अशा प्रकारे शासकीय दृष्टीने अस्पृश्यतेचा अंत झालेला असला तरी, प्रत्यक्ष व्यवहारात ती तशीच राहिली आहे. डॉ. आंबेडकरांचे सर्व सायास व्यर्थ ठरल्यामुळे त्यांना हिंदू धर्माचा त्याग करावासा वाटला. लाखो अनुयायांसह त्यांनी बौद्ध पंथ स्वीकारला. त्यामुळे हिंदू हरिजन व बौद्ध हरिजन असे विभाजन झाले एवढेच. त्यांची समस्या संपली नाही. उलट राजकीय हेवेदावे व सत्तास्पर्धा यांमुळे ती अधिकच तीव्र झाली आहे. शहरांत अस्पृश्यतेची जाणीव फारशी होत नसली तरी, खेडोपाडी ती कायम आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर तीस वर्षे होऊन गेली तरी हरिजनांवर अन्याय व अत्याचार होत आहेत. सरकारी सवलतींमुळे त्यांची आर्थिक स्थिती थोडीशी सुधारलेली आहे असे वाटते. पण सामाजिक व राजकीय अन्याय चालू आहे. खास सवलती व निरनिराळ्या क्षेत्रांत राखीव जागा त्यांच्यासाठी ठेवल्यामुळेही सवर्ण जाती त्यांचा अधिकच द्वेष करू लागल्या आहेत. अस्पृश्यतेची भावना जनमानसात खोलपर्यंत रुजलेली आहे, रक्तात भिनलेली आहे. शिक्षणाचे प्रभावी संस्कार आणि आर्थिक व सामाजिक समतेचा प्रसार केल्यावाचून ती भावना नष्ट होणे शक्य नाही. [ध. शा. वि.; ध. वि. स्व.; हिं. वि. को.]

**अस्वल** सस्तन वर्गातील एक हिंस्र पशू. याच्या अंगावर खूप लांब व जाड, काळे केस असतात. याचे तोंड लांबट असून, नाकाच्या जागी लहानशी टणक सोंड असते. याच्या नख्या वाकदार असतात. याचे पंजे लांबरुंद असल्यामुळे हा प्राणी मागील दोन पायांवर उभा राहून, माणसाप्रमाणे काही पावले चालू शकतो. मात्र नेहमी तो चारी पायांवरच चालतो.



अस्वल

हा पशू दांडगा व क्रूर असला तरी, विनाकारण मनुष्यावर हल्ला करीत नाही. मनुष्य हालचाल न करता स्वस्थ पडून राहिला तर हा त्याला त्रास देत नाही. पण त्याला डिवचल्यास मात्र तो क्रूरपणे हल्ला करून माणसाला ठार मारतो.

हा पशू हिंस्र व मांसाहारी असला तरी, त्याला फळे व मध हे पदार्थ अधिक आवडतात. काही जातींच्या अस्वलांना मुंग्या खायला आवडतात. हा डोंगरावर वसती करतो आणि उंच झाडावर सहज चढू शकतो.

वैदिक वाङ्मयात हिंस्र पशू म्हणून याचा निर्देश आढळतो. रामायण, महाभारत व पुराणे या ग्रंथांत जांबवान नामक ऋक्षराजाची कथा आहे. ऋक्ष या शब्दाचा अर्थ अस्वल असा आहे. रामाने लंकेवर स्वारी केली तेव्हा ऋक्षराज जांबवान याने आपल्या अस्वलाच्या सैन्यानिशी त्याला मदत केली होती. तो ब्रह्मदेवाच्या जांभईतून जन्माला आला, अशी आख्यायिका आहे. तो शूर, योद्धा व चतुर सल्लागार होता. तो मनुष्य होता की पशू, हे समजत नाही. मात्र त्याची कन्या जांबवती ही मानवी स्त्री होती. स्यमंतक मण्याचा शोध करीत श्रीकृष्ण जांबवानाच्या गुहेत शिरला तेव्हा त्या दोघांचे घनघोर द्वंद्वयुद्ध झाले. अखेरीस जांबवान श्रीकृष्णाला शरण आला व त्याने

स्यमंतक मणी श्रीकृष्णाला दिला; आपली कन्या जांबवतीही त्याने श्रीकृष्णाला अर्पण केली.

प्राकृत वाङ्मयातही या पशूचे उल्लेख व कथा आढळतात. हा प्राणी हिंस्र असला तरी लवकर माणसाळतो आणि मग माणसांना त्याची भीती वाटत नाही. दरवेशी त्याच्या नाकात वेसण घालून त्याला रस्तोरस्ती फिरवतो व खेळ करायला लावतो. याच्या संपर्कामुळे रोग बरे होतात, अशा समजुतीमुळे काही अडाणी लोक लहान मुलांना माणसाळलेल्या अस्वलाच्या पाठीवर बसवतात व त्याचे केस ताइतात घालून तो गळचात बांधतात. [ सु. वि. को.; पशुपुराण ]

**अहंकार** (१) सांख्यांच्या २५ तत्त्वांपैकी दुसरे तत्त्व. प्रलय-दशेत प्रकृती साम्यावस्थेत राहते; म्हणजेच सत्त्व, रज व तम हे तिचे तीन गुण समभावाने राहतात. प्रकृतीचा पुरुषाशी संयोग होताच या त्रिगुणांत क्षोभ निर्माण होतो. तिथून पुढे सृष्टिकार्याला प्रारंभ होतो. ज्याची प्रथम सृष्टी होते ते महत्तत्त्व होय. त्रिगुणांच्या योगे महत्तत्त्व क्रियाशील झाल्यावर त्यातून अहंकाराची निर्मिती होते. मी व माझे असा अभिमान धारण करणे, हे अहंकाराचे स्वरूप आहे. या अहंकारामुळेच पुरुष नाना प्रकारच्या भ्रमात पडून 'मी कर्ता, मी भोक्ता, मी स्वामी' असे मानू लागतो. गुणवैषम्यामुळे या अहंकाराची तीन रूपे होतात– (१) ज्यात सत्त्वगुणाचे प्राधान्य असते, तो वैकृत अर्थात सात्त्विक अहंकार (२) रजोगुणाचे प्राबल्य असते, तो तैजस अहंकार व (३) तमोगुणाचे प्राधान्य असते, तो भूतादी अर्थात तामस अहंकार होय.

तैजस अहंकार हा अन्य दोन अहंकारांचा प्रवर्तक असतो; सात्त्विक अहंकारापासून पंचज्ञानेंद्रिये व पंचकर्मेंद्रिये व मन हे उत्पन्न होतात; तसेच तामस अहंकारापासून तन्मात्र उत्पन्न होतात (सांख्य. का. २४ व २५). मीपणा, अभिमान, गर्व, घमेंड, ही अहंकाराची सामान्य नावे आहेत. [ भा. द. ]

(२) वज्रयानी साधनेत साधकाने स्वतःला देवताच समजणे, याला अहंकार म्हटले आहे. या साधनेत साधक 'ओ सर्वतथागतात्मकोऽहम्' किंवा 'ओ शून्यताज्ञानवज्रस्वभावात्मकोऽहम्' या मंत्राचे पुरश्चरण करतो व त्यानंतर तथागतासारखेच आचरण करू लागतो. साधक तथागत (बुद्ध) बनला, की प्रज्ञापारमिता ही त्याची मुद्रा होते. मग त्याच्या अंतरात त्याच्या साध्य देवतेचा आवेश जागृत होतो व ती देवता त्याच्या माध्यमातून स्वतःला अभिव्यक्त करते. या पद्धतीत काम-क्रोधादी अनेक आवेश येत असतात. त्यांचा उपशम झाल्यावर साधक मंडलात प्रवेश करतो. [ सि. सा. ]

**अहम्** या शब्दाने जीवात्म्याचा बोध होतो. याचे वाच्य व लक्ष्य असे दोन अर्थ आहेत. देहेंद्रियांशी तादात्म्य हा वाच्यार्थ असून, देहेंद्रियांहून भिन्नत्व हा लक्ष्यार्थ आहे. या 'अहम्' वरच कर्तृत्व, भोक्तृत्व, इ. धर्म भासतात. तत्त्वज्ञानात या अहम्‌चेच ब्रह्माशी तादात्म्य करायचे असते. अहम्‌च्या वाच्यार्थामुळेच जगातले सर्व व्यवहार चालतात. या वाच्यार्थानेच सर्वत्र 'मी मी' करणे, यालाच अहंकार किंवा गर्व असे म्हणतात. त्याच्या लक्ष्यार्थासाठी श्रवण-मननादी साधनांची जरुरी असते. [ हि. इं फि., १ ]

**अहरिमन्** झरथुष्ट्री धर्मात सांगितलेला दुष्कृत्यांचा देव किंवा सैतान. जुन्या अवेस्त्यात याचे नाव अंग्र मैन्यू असे सांगितले असून, त्याला स्पेन्त मैन्यूचा (पवित्र आत्मा) शत्रू मानले आहे. हा अज्ञानी, लबाड, मत्सरी व कुटिल आहे. याचा ओढा सदैव दुष्कृत्याकडे असतो. तो पापाचाराला उत्तेजन देतो व सदाचाराला विरोध करतो. तो अयांग तमोलोकातून वर आला आहे. त्याला अहुर मझ्दाच्या अस्तित्वाची जाणीव नसते. तो इतका बलाढ्य आहे, की आजवर कोणाही माणसाला त्याचा पराभव करता आला नाही. झरथुष्ट्रानेच फक्त त्याचा पाडाव केला. नाना प्रकारची दुष्ट कृत्ये करण्यासाठी त्याने स्वतःचे सैन्य निर्माण केले असून, ते नरकलोकात राहते. पुनरुत्थानाच्या दिवशी तो असहाय होऊन शरण येतो व शेवटी त्याचा संपूर्ण नाश होतो. सैतान व अहरिमन् यांच्यांत बरेच साधर्म्य आहे. अर्वाचीन अवेस्ती पंडित अहरिमनला व्यक्ती न मानता मानवी मनातील असत्प्रवृत्तीला ते नाव देतात. पाहा – अहुरमझ्द, झरथुष्ट्री धर्म. [ एन्सा. रि. ए. ]

**अहर्गण** अहः + गण = दिवसांचा समुदाय. अहर्गण हा सावन (सौर) दिवसांचा समुदाय असतो. दिवसांचा उल्लेख जसा वाराने करता येतो, तसाच तो क्रमांकानेही करता येतो. कोणत्या तरी एखाद्या महत्त्वाच्या घटनेपासून एक, दोन, तीन अशा क्रमाने विशिष्ट दिवशी जी दिवससंख्या येईल तिला अहर्गण म्हणतात. कलियुगाच्या आरंभापासून उलटलेल्या दिवसांची अशी गणना करण्याचा प्रघात आहे. वेगवेगळे ज्योतिषग्रंथकार आपल्या सोयीनुसार वेगवेगळे अहर्गण मानतात. सिद्धान्तग्रंथात सृष्ट्यारंभापासून इष्ट दिवसापर्यंत सावन दिवस मोजून संख्या काढतात, त्याला 'सृष्ट्याद्यहर्गण' म्हणतात. युगारंभापासून व शकारंभापासून मोजलेल्या दिवसांना अनुक्रमे युगाद्यहर्गण व शकाद्यहर्गण म्हणतात. अहर्गणाचा केवळ गणित ज्योतिषातच उपयोग असतो; व्यवहारात नाही. अहर्गणाच्या

आधारे मध्यम ग्रहसाधन करतात. [ पं. ज्यो. शा.; सु. वि. को. ]

**अहली पहली** गुजरातमधला होळीच्या सणातला एक भाग. याचे मराठी नाव 'मूठपसा' असे होऊ शकेल. होळी पौर्णिमेच्या आधी आठ दिवस गुजरातमधल्या लहान मुली गटागटांनी अहली पहली मागायला बाहेर पडतात. घरोघरी जाऊन हातांनी टाल देत त्या गाऊ लागतात –

अहली दे जे बाई पहली दे जे पहलीना पाच डेरा देजे

अर्थ – मूठ द्या बाई पसा द्या. पशाचे पाच डेरे द्या.

घरोघरीच्या गृहिणी त्या मुलींना धान्य घालतात. एखादीने ते घातले नाही, तर मुली लगेच तिला उण्या उत्तराने बोलतात. आठ दिवस असे धान्य गोळा केल्यावर मुली ते विकून त्याच्या बदली खजूर विकत घेतात व सर्व मुली एकत्र जमून पौर्णिमेस होळीचे दर्शन घेतल्यावर तो खजूर खातात. [ कंकावटी भा. १ ]

**अहल्या** ब्रह्मदेवाची मानसकन्या व गौतमाची भार्या. ही ब्रह्मदेवाने निर्माण केलेली पहिली अत्यंत रूपमती स्त्री होय. ब्रह्मदेवाने तिला शारद्वत गौतमाजवळ ठेव म्हणून ठेवले. ती वयात आल्यावर गौतमाने तिला ब्रह्मदेवाकडे परत पाठविले. गौतमाचे ते जितेंद्रियत्व पाहून ब्रह्मदेव प्रसन्न झाला व त्याने तिचे गौतमाशीच लग्न लावून दिले (वा. रा. उ. ३०).

या कथेचा दुसरा पर्याय असा –

इन्द्र, अग्नी, वरुण, इ. देवांना, तशीच दानवांनाही अहल्येची अभिलाषा उत्पन्न झाली. तेव्हा ब्रह्मदेवाने पण लावला, की 'जो पृथ्वीप्रदक्षिणा सर्वांत आधी पुरी करील, त्याला मी ही कन्या देईन.' त्यावर सर्व देव-दानव पृथ्वीप्रदक्षिणेला निघाले. पण, गौतमाने अर्धप्रसूत धेनू ही पृथ्वीच आहे, या शास्त्राधारानुसार त्या धेनूलाच प्रदक्षिणा घातली व तो ब्रह्मदेवाकडे गेला. गौतम प्रथम आला, हे पाहून ब्रह्मदेवाने त्याला अहल्येचे कन्यादान केले. ही वार्ता ऐकून इंद्राला फार दुःख झाले; कारण त्याला तिची अत्यंत अभिलाषा होती.

विवाहानंतर गौतम व अहल्या ब्रह्मगिरीवर राहायला गेली, तरी इंद्राने तिची अभिलाषा सोडली नाही. एके दिवशी तो गौतमाच्या आश्रमात आला. गौतम आश्रमातून बाहेर गेलेला पाहून त्याने गौतमाचेच रूप घेतले व अहल्येशी संभोग केला. अहल्येला त्याचे कपट ओळखता आले नाही. इंद्र अशा प्रकारे बरेच दिवस अहल्येकडे येऊन तिचा उपभोग घेत असे. तो आपला पती नसून इंद्र आहे, हे अहल्याही जाणत होती, असे वाल्मीकिरामायणात म्हटले आहे (१. ४८. १९). एके दिवशी इंद्र आश्रमात असता गौतम ऋषी परत आला, ते पाहून अहल्या भयभीत झाली. तिने पतीच्या पाया पडून घडलेला अपराध त्याला सांगितला (गणेश पु. १.३०). गौतमाने क्रोधाविष्ट होऊन त्या दोघांनाही शाप दिला. तो इंद्राला म्हणाला, 'तू शत्रूकडून पराभूत होशील. तू जार कर्माचा उत्पादक आहेस; त्यामुळे मनुष्यलोकात यापुढे होणाऱ्या प्रत्येक जारकर्माचे अर्धे पाप तुझ्या माथी बसेल' (वा. रा. उ. ३०. ३४). 'तुझ्या अंगावर सहस्र भगे पडतील' (म. भा. अनु. ४१). 'तुला वृषण राहणार नाही' (लिंग पु. १.२९).

नंतर तो अहल्येला म्हणाला, 'तू अदृश्य रीतीने इथे नाश पावशील व तुझे रूप सर्वत्र विभागले जाईल. जेव्हा दाशरथी राम इथे येईल, तेव्हाच तुझा उद्धार होईल' (वा. रा. १.४८). 'तू शिला होशील' 'तुझ्या देहावर केवळ अस्थिचर्म राहील. तुझ्या या रूपाने स्त्रियांना पापकर्माची दहशत बसेल' (स्कंद पु. १.२.५२).

वेदात 'अहल्यायै जार' असे इंद्राचे गौरवयुक्त वर्णन आहे (श. ब्रा. ३.३.४.१८) जार या शब्दाचा अर्थ स्तुत्य असाही आहे. त्यावरून अहल्या-इंद्र ही कथा रूपकात्मक असावी, असे वाटते. शतपथ ब्राह्मण व जैमिनिसूत्रे या ग्रंथांवरूनही तिची रूपकात्मकता कळून येते. अहल्या म्हणजे रात्र, गौतम म्हणजे चंद्र व इंद्र म्हणजे सूर्य होय. याचे स्पष्टीकरण असे, की इंद्ररूपी सूर्याने अहल्यारूपी रात्रीचे घर्षण केले. अर्थात ही कथा निसर्गदृश्यावर आधारित आहे.

डॉ. उषा करंबेळकर यांनी या रूपकाचा अर्थ सांगितला आहे, तो असा –

इंद्र ही पर्जन्य-देवता आहे. वेदांत गो चा अर्थ सूर्यकिरणे असा आहे. त्यावरून गौतम म्हणजे सूर्य होय. 'अहल्या या शब्दाची व्युत्पत्ती वाचस्पत्यम् नामक कोशात, 'न हलं अर्हति इति' = हलाने नांगरता येत नाही, अशी जमीन, पाणथळ जमीन, अशी दिली आहे. यावरून गौतम नसताना, सूर्य ढगाआड गेला असताना, इंद्र अहल्येचे घर्षण करतो, पर्जन्यवृष्टी करतो. सहस्रभग इंद्र म्हणजे मेघातून सहस्रावधी जलधारा पडतात. अहल्येला दिलेला शाप 'निराहारा वातभक्षा ......' म्हणजे जिथे केवळ वारा वाहतो, अन्नधान्य उत्पन्न होत नाही, अशी जमीन. [ प्रा. च. को.; नवभारत, मे १९७४ ]

**अहल्यातीर्थ** (१) अहल्येच्या मुक्तीसाठी गौतमऋषीने गोदावरीकाठी कोटितीर्थावर तप केले. त्यायोगे तिथे एक सरोवर निर्माण झाले. तेच हे अहल्यातीर्थ होय. तिथे मग गौतमाने लिंगस्थापना केली (स्कंदपु. १.२.५२)

(२) नर्मदेवरचे एक तीर्थ. इथे अहल्येने तप करून मुक्ती मिळवली. चैत्र शुद्ध चतुर्दशीच्या दिवशी इथे जो अहल्येची पूजा करील, तो स्त्रियांना प्रिय होतो (मत्स्यपु. १९०.९०–९३).

**अहल्याबाई** पेशवाईच्या अखेरच्या काळातली एक कर्तबगार स्त्री. माळव्याचा सुभेदार मल्हारराव होळकर याची ही सून होती. पती खंडेराव याच्या मृत्यूनंतर हिने होळकरांच्या जहागिरीचा कारभार उत्तम प्रकारे सांभाळला. ती धार्मिक वृत्तीची व दानी होती. पाहा – होळकर अहल्याबाई (कोश–खंड १० वा).

**अहाड** एक उत्खनित स्थान. राजस्थानातील उदेपूरचा एक भाग. बनास नदीच्या खोऱ्यातील काळचा आणि तांबड्या मृद्‌भांडांच्या संस्कृतीचे हे प्रमुख स्थान आहे. हे इतिहासपूर्व काळातील असले तरी इथल्या लोकांना फक्त तांब्याचे ज्ञान होते. म्हणून या स्थानाला 'ताम्रयुगीन' असे म्हटले जाते. या युगातील वस्तीचे तीन उपविभाग असून, त्यांचा संपूर्ण काळ इ. स. पूर्व १६५० ते १४०० असा आहे. पांढऱ्या रंगात ठिपक्यांची व रेषांची नक्षी काढलेले काळे-तांबडे कोनयुक्त वाडगे हे या संस्कृतीचे वैशिष्टय आहे. इथली घरे मोठी, दगडगोटयांच्या पायाची व भिंती चिखल व क्वार्टझ्च्या गोटयांच्या होत्या. त्यांच्या चुली मातीच्या होत्या. तांब्याच्या, चपटया कुऱ्हाडी व मासेमारीचे गळ हे लोक वापरीत होते. [ प्रो. हि. अ.; पुरातत्त्वविद्या ]

**अहार** एक जैन क्षेत्र. मध्य प्रदेशात टीकमगडापासून ६ कोसांवर हे क्षेत्र असून, इथे चार जैन मंदिरे आहेत. मुख्य मंदिरात शांतिनाथाची ९ हात उंचीची मूर्ती असून, ५ हात उंचीची कुंथुनाथाचीही मूर्ती आहे. [ कल्याण–तीर्थांक ]

**अहिच्छत्रा** एक प्राचीन नगर. उत्तर प्रदेशातल्या बरेली जिल्ह्यातल्या रामनगर या गावाजवळ हे नगर होते. सांप्रत ते भग्नावशिष्ट रूपात दिसते. इथे एका प्राचीन किल्ल्याचे अवशेष आहेत. त्या किल्ल्याला आदिकोट म्हणतात. युआन च्वांगने याच्या तटबंदीचे वर्णन केले आहे. वैदिक साहित्यात या नगराचे नाव परिचक्रा असे आढळते. ही उत्तर पांचालची राजधानी होती. अर्जुनाने युद्धात द्रुपदाचा पराभव करून अहिच्छत्रा व कांपिल्य ही दोन नगरे द्रोणाचार्यांना दिली होती (म. भा. आदि. १३८). महाभारतात व पाणिनीच्या अष्टाध्यायीत अहिच्छत्र, अहिक्षेत्र, अशीही नावे आढळतात. जैन ग्रंथांत अहिच्छत्रा किंवा संख्यावती अशी नावे आहेत. विविध तीर्थकल्प या ग्रंथात अहिच्छत्रा नावाविषयी पुढील कथा आहे – एकदा पार्श्वनाथ या नगरीत वास्तव्याला आला असता, कमठ नावाच्या दानवाने त्याच्यावर मुसळधार पर्जन्य-वृष्टी सुरू केली. नागराज धरणींद्र याला ही वार्ता समजताच तो तिथे आला व त्याने आपले फणाछत्र पार्श्वनाथावर उभारून त्याचे रक्षण केले. त्यामुळे त्या दिवसापासून या नगराला अहिच्छत्रा असे नाव पडले.



हत्तीशी झुंज (अहिच्छत्रा येथे सापडलेली गुप्तकालीन मूर्ती)

महाभारतकाळात या नगराची बरीच प्रसिद्धी होती. बुद्धोत्तर काळात हे मगध साम्राज्यात समाविष्ट झाले. त्यानंतर शुंगांनी यावर सत्ता गाजविली. इ. स. च्या तिसऱ्या शतकात यावर नागवंशी राजांचे आधिपत्य होते. अच्युत नावाच्या एका राजाचे शिक्के या भागात सापडतात. तो राजा नागवंशीच असावा, असे विद्वानांचे मत आहे. त्याचा पराभव करून समुद्रगुप्ताने त्याचे राज्य गुप्तसाम्राज्यात समाविष्ट केले.

गुप्तकाळानंतर अहिच्छत्रेचा विशेष वृत्तांत उपलब्ध होत नाही. इ. स. च्या सातव्या शतकात हा प्रदेश हर्षवर्धनाच्या साम्राज्यात समाविष्ट झाला होता. याच काळात भारतात आलेल्या युआन च्वांगने लिहिले आहे, की या नगराचा विस्तार दीड कोस असून, इथे बौद्धांचे दहा संघाराम होते व त्यांत एक हजार हीनयानी भिक्षू राहत होते. याशिवाय नऊ देवमंदिरे असून, त्यांत पाशुपत मताचे ३०० साधू राहत होते. बौद्धांचे अनेक स्तूप व मठ आजही भग्नावस्थेत इथे आढळतात. इथल्या उत्खननात अनेक धार्मिक वस्तू मिळाल्या आहेत. त्यांत कित्येक शैव चिन्हे व शिव-पार्वतींच्या सुंदर मूर्ती मिळाल्या आहेत.

हर्षवर्धनाच्या नंतर कोणत्या राजवंशांनी इथे राज्य केले त्याची निश्चित माहिती मिळत नाही. इ. स. १८६२ साली ज. कनिंगहॅमने व त्यानंतर १८९१ साली डॉ. फुहररने इथे उत्खनन केले. तिसरे उत्खनन १९४० साली हाती घेतले गेले. या उत्खननात सापडलेली मंदिरे अधिकांश कुशाण व गुप्त यांच्या काळातली आहेत. या उत्खननात भिन्न भिन्न काळातली मातीची

भांडी व अनेक राजवंशांचे शिक्के मिळाले आहेत. मूर्तींमध्ये गुप्त काळातल्या मूर्ती सर्वांत अधिक आहेत. मृण्मय मूर्तींत बुद्ध,



मातीची भांडी, अहिच्छत्रा

विष्णु अग्नी, शिव, कुबेर, इ. देव मिळाले आहेत. प्राचीन जैन मूर्तीही सापडल्या आहेत. उत्तर भारतात अहिच्छत्रा हे नगर बरीच शतके जैनांचे एक प्रमुख केंद्र होते. आजही जैन लोक या स्थानाला पुण्यतीर्थ मानतात. इथे जैनांची अनेक मंदिरे आहेत. एक विशाल मंदिर उत्खननातच सापडले आहे. दर वर्षी कार्तिकात इथे जत्रा भरते. [ अहिच्छत्रा; हि. जॉ. ए. इं. ]

## अहिराणी भाषा

मराठीच्या पोटभाषांपैकी एक. खानदेशात ही बोलली जाते. जळगाव व धुळे हे दोन जिल्हे, नासिक जिल्ह्याचा उत्तर भाग व बऱ्हाणपूर, एवढ्या क्षेत्रात या भाषेचा वापर केला जातो. लिखित साहित्याच्या अभावामुळे ही भाषा अजून बोलीच्याच अवस्थेत आहे. तिच्यात प्रदेशपरत्वे पोटभेदही निर्माण झाले आहेत. उत्तरेकडे गुजराती भाषेचा निकटचा संबंध आल्यामुळे हिच्यावर पदोपदी गुजरातीचा ठसा दिसतो. त्यामुळेच अहिराणी ही मराठी भाषेचा पोटभेद आहे, की गुजरातीचा, याविषयी भाषापंडितांना संशय आहे. डॉ. ग्रियर्सन यांच्या मते ती गुजरातीची पोटभाषा आहे. मुख्यत्वे खानदेशात बोलली जात असल्यामुळे हिला खानदेशी असेही म्हणतात.

खानदेशाचा उत्तर भाग सातपुडा पर्वताच्या रांगांनी व्यापलेला आहे. या भागातून तापी व नर्मदा या दोन मोठ्या नद्या वाहतात. या प्रदेशात भिल्ल व ठाकूर या जातींचा भरणा विशेष आहे. याशिवाय उत्तरेकडील बऱ्याच फिरत्या टोळ्या या लोकांत येऊन मिसळल्या असण्याचा फार संभव आहे. आभीर लोकही असेच उत्तर व पश्चिम या देशांतून येऊन या भागात स्थायिक झाले. आभीरांना अहीर म्हणतात. त्यांच्या नावावरूनच या भाषेला अहिराणी असे नाव पडले आहे. अहीरांच्या शाखा खानदेशाच्या बाहेरही पसरल्या. त्यांच्या प्रसारामुळे भाषेचे क्षेत्रही विस्तारले.

या भाषेची ढोबळ खूण म्हणजे 'ळ' कारावद्दल 'य' कार येणे ही होय. उदा० डोळा–डोया, कावीळ–कावीय, जळगाव–जयगाव. तसेच 'स' बद्दल 'छ' येतो. उदा० सावली–छावली. 'ण' बद्दल 'न' येतो. उदा० पानी, वानी, पाहुना; 'र'च्या पुढे ड आल्यास र बद्दल 'ल' येतो. उदा० रडू–लडू, ओरडणे–वलडणे. या भाषेत विभक्तीचे प्रत्यय पुढीलप्रमाणे आहेत–

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | — | — |
| द्वितीया | ले | सले, हूले |
| तृतीया | न्ही, नी, कडतीन, कड | सन्ही–सनी, सकडतीन, सकड |
| चतुर्थी | ले, से | सले, सकरी, ससे |
| पंचमी | तिन, थिन, पान | सतिन, सथिन, सपान |
| षष्ठी | न्ह, न्ही, न, नी | सन्ह, सन्ही, सन, सनी |
| सप्तमी | म, मा, मझार | सम, समा, समझार |
| संबोधन | ओ | ओ |

अहिराणीत विभक्तिप्रत्यय लागण्यापूर्वी नामाचे सामान्यरूप होत नाही. उदा० घरले, समले. सर्वनामांत प्रथमा विभक्तीत मी चे अनेकवचन आम्हू व तू चे अनेकवचन तुम्हू होते. द्वितीया–चतुर्थीत मले–आम्हले, तुले–तुम्हले, पंचमीत मनपान, आम्हनपान, तुनपान, तुमुनाथीन, षष्ठीत मन्ह, मनो–आम्हना, आमनी व सप्तमीत, मनमा, आम्हनामा, तुमा तुमनामा होते. क्रियापदाचे प्रत्यय लिंगाप्रमाणे बदलत नाहीत. तीन्ही लिंगी, तीन्ही पुरुषी व दोन्ही वचनी क्रियापदाच्या एकाच मूळरूपाने भूतकाळ दाखविला जातो. उदा० मी टाक, तू टाक, त्यानी टाक. संस्कृतमधील भविष्याचा 'स्य' प्रत्यय अहिराणीत आला आहे. उदा० 'तो करनारसे' = तो करणार आहे.

अहिराणी भाषेचा एक नमुना पुढीलप्रमाणे –

उत्तर हिंदुस्थानमा अयोध्या नावन यक सहेर शे. तठे येक राजा होइ ग्या. त्यान्ह नाव दसरथ व्हत. तो धलडा होइग्या, पन त्याले पोरसोर झाय नी. तव्हह त्यानी काय के, की त्यान्हा जो ब्राह्मण गुरु व्हता त्याले बलाइसन आन अन "डिकराती काही तजवीज आमले दरखाज" अशा त्याना रावन्याकिच्यात बामननी येक उपाय दखाडा. रूसिसरिंग नावना येक रूसी व्हता; त्याले गावमझार लइ येवान ठयरन......

वरील विवेचनावरून कै. कृ. पां. कुलकर्णी यांनी या भाषे-

संबंधी पुढील निर्णय अनेक कारणांसह सांगितला आहे –

अहिराणीत मराठी भाषेचीच लक्षणे अधिक असल्यामुळे तिला मराठीची पोटभाषा मानणे, हेच शास्त्रशुद्ध आहे. याची कारणे पुढीलप्रमाणे–

(१) मराठी–गुजराती शब्दांचे प्रमाण १००:४१ (२) नामविभक्तींपैकी प्रथमा, संबोधन, द्वितीया, चतुर्थी, तृतीया, पंचमी, सप्तमी, या मराठी दिसतात. (३) षष्ठी विभक्ती गुजराती दिसते. (४) आख्यात–विभक्तीत वर्तमान, भविष्य, आज्ञार्थ, अकरणरूप, हे सर्व मराठी दिसतात. (५) ल्यवंतरूप गुजराती आहे; परंतु त्याचे धातू मराठी तद्भव दिसतात. (६) अस्तिवाचक क्रियापद 'से' हे गुजराती आहे. हे कधी मराठी आख्याताला तर कधी गुजराती आख्याताला चिकटलेले दिसते. (७) वाक्प्रचार मराठी वळणाचे आहेत. (८) वर्णप्रक्रियांत मराठीच उच्चार प्रामुख्याने आढळतात. गुजराती उच्चार कानांवर ठसण्यासारखा आढळून येत नाही. [ म. भा. उ. वि. ]

**अहिर्बुध्न्य** एक वैदिक देवता. ऋग्वेदात अहिर्बुध्न्याचा बारा वेळा उल्लेख असून, तीन ऋचांत त्याला आवाहन केलेले आहे (ऋ. ५.११.१६; ७.३४.१६–१७). याच्याबरोबर येणाऱ्या देवता म्हणजे अपांनपात् व अज एकपाद् या होत. अहिर्बुध्न्य ही अंतरिक्षातील देवता असावी, असे निघंटूवरून वाटते (५.४). भक्तांना दुखापत न करण्याविषयी याला प्रार्थिले आहे त्यावरून त्याचा स्वभाव पीडादायक असावा. पुढच्या काळात याचा संबंध गार्हपत्य अग्नीशी लावला गेला आहे. 'एष ह वा अहिर्बुध्न्यो यदग्निर्गार्हपत्यः' ( = गार्हपत्य अग्नी हाच अहिर्बुध्न्य होय) (ऐ. ब्रा. ३. ३६). उत्तरकालीन वाङ्मयात रुद्र-शिवाला हे नाव मिळाले असून, त्याचे रूप अहिब्रध्न असे झाले आहे. हलायुधाने अहिब्रध्न म्हणजे रुद्रविशेष असे सांगून, पुढील कथासंदर्भ दिला आहे–महादेवाच्या प्रसादाने सुरभीला कश्यपापासून अजैकपाद्, अहिब्रध्न, त्वष्टा इ. अकरा रुद्र, झाले (हरिवंश १३). अहिर्बुध्न्य ही चंद्राची संज्ञा असून, प्राचीन काळी जसे सूर्योपासक लोक होते, तसेच चंद्रोपासकही होते, असे वेदार्थयत्नकारांचे मत आहे. [ म. ज्ञा. को. वेदविद्या ]

**अहिर्बुध्न्य संहिता** पांचरात्र संप्रदायाचा प्रमुख ग्रंथ. अहिर्बुध्न्याने दीर्घ काळ तप करून संकर्षणाकडून सत्यज्ञान प्राप्त करून घेतले आणि त्या ज्ञानातूनच ही संहिता प्रकट झाली. या संहितेतील सिद्धान्त असे–अंतिम सत्य हे अनादी, अनंत, शाश्वत, नामरूपरहित, अविकारी व वाङ्मनसातीत आहे. त्यालाच परमात्मा, भगवान, वासुदेव, अव्यक्त, इ. नावांनी संबोधित केले जाते. या ज्ञानाच्या द्वारे जीवाची पापपुण्ये समाप्त झाली, वासना नष्ट झाल्या व त्रिगुणांचे बंध तुटले, की मग त्याला त्या परब्रह्म परमात्म्याचा अनुभव घडतो.

हे परब्रह्म प्राकृतिक गुणांनी विरहित असूनही ज्ञान, शक्ती, ऐश्वर्य, बल, वीर्य व तेज या षड्गुणांनी मंडित आहे. परब्रह्माची शक्ती, चांदणे जसे चंद्रापासून अविभक्त असते, तशी त्याच्यापासून अपृथक् आहे. विश्व ही त्याच शक्तीची अभिव्यक्ती होय. ही शक्ती आनंदरूप व निरपेक्ष आहे. तिलाच लक्ष्मी, श्री, कमला, अदिती इ. नावे आहेत. तिच्यापासूनच भौतिक व आध्यात्मिक सत्ता उत्पन्न होतात. तिच्याच प्रेरणेने प्रकृति-पुरुषांचा समागम होतो व त्रिगुणात्मक प्रकृती विश्वरचनेसाठी प्रवृत्त होते.

शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्रभाष्यात (२. २. २४ वरील) संकर्षणाला जीव, प्रद्युम्नाला मन व अनिरुद्धाला अहंकार मानले आहे. अहिर्बुध्न्य संहितेनुसार अनिरुद्ध हा सत्त्वगुणाचा अधिष्ठाता असून, पुरुष-प्रकृतिभेद संकर्षणापासून नसून प्रद्युम्नापासून सुरू होत आहे. षड्गुणांत ज्ञान-बलांपासून संकर्षणाचा, ऐश्वर्य-वीर्यांपासून प्रद्युम्नाचा व शक्ति-तेजांपासून अनिरुद्धाचा जन्म झाला आहे. हे तीन आध्यात्मिक व्यूह मानले जात असून, तेही वासुदेवाप्रमाणेच षड्गुणमंडित आहेत.

या संहितेत जीव-ब्रह्मांचा संबंध वेदातल्याप्रमाणेच सयुजा व सखा या स्वरूपाचा आहे. सृष्टीच्या आविर्भावसमयी जीव ब्रह्मापासून पृथक् होतात व प्रलयकाली पुनश्च परब्रह्मात लीन होतात. मुक्तिसमयी ते भगवद्रूप होत असले, तरी त्यांची स्वतंत्र सत्ता टिकून राहते. जीव अणुरूप असला, तरी तो प्रभूच्या सायुज्याने सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् बनतो. पाहा – पांचरात्र संप्रदाय, चतुर्व्यूह. [ भ. वि. ]

**अहिर्बुध्न्य स्नान** एक नक्षत्र व्रत. अहिर्बुध्न्य ही उत्तराभाद्रपदांची देवता आहे (बृ. सं. ९७.५). या व्रताचा विधी असा–दोन मोठ्या भांड्यांत पाणी भरून त्यात कुश, गंध, उदुंबराची पाने व पंचगव्य टाकतात आणि त्या जलाने स्नान करतात. मग अहिर्बुध्न्य, सूर्य, वरुण, चंद्र, रुद्र व विष्णु यांची पूजा करतात. फल – गोधनप्राप्ती व समृद्धी. [ हि. ध. ]

**अहिंसा** (न+हिंसा = अहिंसा). हिंसेच्या काही व्याख्या व अर्थ पुढीलप्रमाणे –

(१) 'साक्षान्मरणानुकूलव्यापारः' ( = प्रत्यक्ष मरणाला अनुकूल असा प्रयत्न अथवा उद्योग) (दिनकरी). (२) 'द्रोहः इति परे मन्यन्ते' ( = हिंसा म्हणजे द्रोह असे दुसरे (पंडित) मानतात) (गौतमसूत्रवृत्ती). (३) 'हिंसा चौर्यादि कर्म च'

( =चौर्य, वृत्तिनाश, इ. कर्मे म्हणजे हिंसा होय) (अमर).

हिंसेच्या विरुद्ध ती अहिंसा. तिच्या काही व्याख्या पुढीलप्रमाणे – (१) हिंसा न करणे, काया–वाचा–मनें कोणाही प्राण्यास पीडा न देणे, भूतमात्रावर प्रेम करणे. (२) देहाने कोणास न मारणे, त्रास न देणे, देहाला कोणी मारले, त्रास दिला, तरी सहन करणे (गीताई शब्दार्थ कोश).

योगशास्त्रात यमांना फार महत्त्व दिलेले असून, त्यांत अहिंसेला प्रथम स्थान दिलेले आहे (पा. यो. सू. २.३०). मनुष्याच्या हातून जे व्यवहार घडतात, त्या सर्वांचा संबंध शरीर, वाणी व मन या तीहींशी येत असतो. या तीहींच्याही द्वारे इतरांना म्हणजे केवळ माणसांनाच नव्हे; तर मानवेतर योनींनाही दुःख होणार नाही अशा प्रकारे वागणे म्हणजे अहिंसाव्रताचे पालन करणे होय. शारीरिक व्यापारांमुळे इतरांना प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष पीडा होणार नाही असे वागणे, ही कायिक अहिंसा. वाणीनें कठोर, मर्मभेदी भाषण न करणे, कुचेष्टा, उपहास, निंदा न करणे, ही वाचिक अहिंसा. मानसिक अहिंसा ही वरील दोहींपेक्षाही कठिण आहे. कारण तिच्यात हिंसक विचार मनातच येऊ द्यायचे नसतात. ही गोष्ट निर्वैर वृत्तीची साधना करूनच साध्य करावी लागते. कोणाचेही अशुभ, अनिष्ट न व्हावे अशी मनःस्थिती कायम राखणे, ही मानसिक अहिंसा होय.

अहिंसाव्रत अंतरात सुस्थिर झाल्यावर त्याचा परिणाम पुढीलप्रमाणे होतो, असे पातंजल योगसूत्रात म्हटले आहे (२.३५)–

अहिंसाप्रतिष्ठायां तत्सन्निधौ वैरत्यागः ।

अर्थ – (योग्याच्या अंतरात) अहिंसेची प्रतिष्ठा झाली, की त्याच्या सान्निध्यात जे येतील, त्यांच्या चित्तातलेही वैर नाहीसे होते.

भारतीय आर्यधर्माच्या अनेक उदात्त तत्त्वांपैकी अहिंसा हे एक प्रमुख तत्त्व आहे. अहिंसा हा धर्म म्हणून मानला गेला आहे. भारतीयांच्या ४८ संस्कारांत अहिंसा हा एक आत्मसंस्कार म्हणून मानलेला आहे. अहिंसा ही प्रथम एक मोक्षसाधन म्हणूनच प्रचारात आली. आत्मज्ञानी पुरुष कोणाची हत्या करीत नाही अथवा कोणाला दुखापत करीत नाही. कारण प्राणिमात्र म्हणजे एकाच परब्रह्माची अनेक रूपे होत, हे त्याला माहीत असते. अहिंसा धर्म हा बौद्ध व जैन यांनीच प्रथम उपदेशिला, असे कित्येकांचे मत आहे; पण ते खरे नसून भारतीय आर्यधर्मात जैन-बौद्धांच्याही पूर्वी अहिंसातत्त्व उदयाला आले आहे. ज्ञानमार्गी मनुष्य कोणत्याही मोक्षसाधनाचा अवलंब करो; त्याने अहिंसातत्त्व मान्य केलेच पाहिजे, हा सिद्धान्त भारतीय तत्त्ववेत्त्यांनी पुरातन काळीच प्रतिपादिला आहे. छांदोग्योपनिषदात पुरुषरूपी यज्ञाची 'अहिंसा' ही दक्षिणा आहे, असे म्हटले आहे (३.१७.४). अहिंसा धर्म हा सर्वांनी पालन करायचा धर्म आहे. कोणत्याही प्रकारची हिंसा करणे हे पाप आहे, असे मत महाभारतकाळी लोकसमाजात पूर्णपणे प्रस्थापित झाले होते. संसार सोडून अरण्यवास पत्करणारे निवृत्तिमार्गी यति–मुनी हिंसा करीत नसत व मांसाहारही करीत नसत, अशी साक्ष आद्य ग्रीक इतिहासकार हिरोडोटस (सनपूर्व ४५०) याने देऊन ठेवली आहे. भारतीय आर्यांच्या आहारशुद्धीसंबंधी ज्या काही कल्पना होत्या, त्यांत मांसाशनाने माणूस अशुची होतो, अशी एक कल्पना होती. त्यामुळे अहिंसेच्या प्रचाराला पुष्कळच मदत झाली. मनूने धर्मविहित हिंसा ही अहिंसा मानली असली तरी, केवळ मांसभक्षणासाठीच केली जाणारी हिंसा त्याज्य ठरविली आहे (मनु. ५.४४–४८). ज्याचे मांस भक्षण केले असेल तो प्राणी पुढच्या जन्मी माणसाला खातो, अशीही कल्पना पुढच्या स्मृतिकारांनी पुढे आणली. त्यामुळे मांसाशनाला मोठ्या प्रमाणात पायबंद बसला. प्रारंभी मात्र ही कल्पना नव्हती. आर्य जसजसे पूर्वेला आणि दक्षिणेला सरकत गेले, तसतसा त्यांना धान्य व भाजीपाला विपुल प्रमाणात मिळू लागला. त्यामुळे मांसाशनाची तेवढीशी गरज उरली नाही. मांसभक्षण न करण्याच्या कारणांबद्दल मतभेद असू शकतील; पण भारतातील बहुसंख्य लोकांनी त्यांचे पूर्वज दीर्घकालपर्यंत मांसभक्षण करीत असताही अहिंसा धर्माला प्राधान्य देऊन मांसाचा स्वेच्छेने त्याग केला, ही गोष्ट मात्र मानवी इतिहासात अभूतपूर्व अशीच आहे.

अहिंसेचे हे तत्त्व जैनांनी पराकोटीला नेऊन पोचविले. जैनांच्या पंचमहाव्रतांत अहिंसा हे आद्य व्रत आहे. प्रत्येक श्रमणाने विचार, आचार व उच्चार करताना कोणत्याही प्राण्याला पीडा होणार नाही अशी दक्षता घ्यावी, पाणवठ्यावर उभे राहू नये, प्राण्यांनी गजबजलेल्या स्थळी वास करू नये, प्राणी असलेल्या जागी मलमूत्रादी विसर्जित करू नये, इ. दंडक जैन धर्मशास्त्राने घालून दिलेले आहेत. कळत नकळत त्यांचा भंग झाल्यास अनेक प्रकारची प्रायश्चित्तेही सांगितली आहेत.

अहिंसा पूर्णपणे पाळली जावी म्हणून जैनांतील स्थानकवासी पंथाचे यती प्रवास करताना वाट झाडण्यासाठी आपल्याबरोबर नेहमी सुताचा कुंचा बाळगतात. जीवजंतू तोंडात जाऊन त्यांची हत्या होऊ नये म्हणून तोंडावर फडक्याची पट्टी बांधतात. अंगावरचे कपडे झाडले असता त्यावरचे जीव मरतील, म्हणून कपडेही झाडीत नाहीत. ढुंढचे जैन तर थंड पाण्यातले जीवजंतू मरतील म्हणून थंड पाणी न पिता भाताची पेज अथवा भाजीचे पाणी पिऊन राहतात. स्नान करणे, दात घासणे, इ. देहशुद्धीची

कर्मेही केवळ याच कारणासाठी जैन यतींनी निषिद्ध मानली आहेत.

बौद्धांनीही अहिंसातत्त्वाला मान्यता दिली असली, तरी त्याच्या पालनाला काही अपवाद सांगितले आहेत. त्या धर्मात अहिंसा ही मानवधर्माला अनुसरून योजिली आहे. अष्टांगिक मार्गात अहिंसा ही योग्य आकांक्षांच्या यादीत एकदा व सद्वर्तनांच्या यादीत दुसऱ्यांदा आलेली आढळते. बौद्धांनी आपल्या पंचशीलात अहिंसेला पहिले स्थान दिले आहे. अशोकाने आपल्या शिलालेखांतल्या आज्ञांमध्ये तीन वेळा अहिंसा नमूद केली आहे. कोणत्याही जीवाची हिंसा केली जाऊ नये, असे अशोकाला वाटत होते. अतिथिसत्कारासारख्या प्रसंगी बैल व बकरी मारून त्यांच्या मांसाने अतिथीला संतुष्ट करण्याचा प्रघात त्या काळी होता. अशोकाने त्या कृत्याला बंदी करून आपल्या पाकशाळेत रोज शिजविल्या जाणाऱ्या प्राण्यांचे जीव वाचविले. अहिंसेच्या बाबतीत बुद्ध मात्र अतिरेकी नव्हता. भिक्षूने जी भिक्षा मिळेल तिचा स्वीकार करावा असा त्याचा शिष्यांना आदेश होता. त्यावरून कोणी मांसभिक्षा दिली, तर तिचाही स्वीकार करावा, असा त्या संप्रदायात प्रचार सुरू झाला. देवदत्ताला ही गोष्ट न आवडून त्याने बुद्धाचा निर्णय मागितला. बुद्धाने केवळ शाकाहाराचे तत्त्व नाकारून म्हटले, की मांसाशनाने मनुष्य भ्रष्ट होत नसून तो दुष्कृत्यांनी बिघडतो, भ्रष्ट होतो (विनय. २.११७; ३.२५३). चंड नावाच्या लोहाराच्या घरी बुद्धाने भिक्षा म्हणून दिलेले डुकराचे मांस सेवन केले होते. यावरून अहिंसेच्या बाबतीत जैन व बौद्ध यांच्या विचारांत किती फरक आहे, ते कळून येईल.

भागवत धर्माने अहिंसामंत्राचा प्रचार करून हिंसाप्रधान यज्ञाला विरोध दर्शविला. महाभारतातल्या नारायणीयोपाख्यानात उपरिचर राजाचे आख्यान दिलेले आहे (शांति. ३३६). तो राजा भागवतधर्माचा अनुयायी होता. त्याने अश्वमेध यज्ञ केला; पण त्यात पशुहिंसा न करता यवांच्या आहुती देऊन कर्म पूर्ण केले. भगवान् नारायणाने वैष्णवधर्माचे सिद्धान्त सांगत असता ब्रह्मादी देवांना असा आदेश दिला आहे –

यत्र वेदाश्च यज्ञाश्च तपः सत्यं दमस्तथा ।
अहिंसाधर्मसंयुक्ताः प्रचरेयुः सुरोत्तमाः ।
स वो देशः सेवितव्यो मा वोऽधर्मः पदा स्पृशेत् ।।
(म. भा शांति. ३४०.८९)

अर्थ – (ब्रह्मादी देव हो,) ज्या देशात वेद, यज्ञ, तप, सत्य, दम ही अहिंसाधर्माने युक्त असतील, त्या देशात तुम्ही राहावे. अधर्म तुम्हांला पदस्पर्श न करो.

पशुयागाच्या विषयात मीमांसक व सांख्य यांची मते भिन्न आहेत. मीमांसक म्हणतात, की पशुयाग श्रुतिसंमत असल्यामुळे कर्तव्य आहे. त्यात यजमानाला अदृष्ट फलाची सद्यःप्राप्ती होते व यज्ञात मृत्यू आल्याने पशूही पशुभाव सोडून मनुष्यभावाची प्राप्ती न होताही देवत्व प्राप्त करून घेतो. यज्ञीय हिंसा ही हिंसाच नव्हे; अतएव यजमान व पशू या दोहोंच्याही दृष्टीने पशुयाग उपादेय आहे. पण सांख्यमताप्रमाणे पशुयाग ही हिंसाच आहे. पशुवधाच्या प्रसंगी त्या पशूला प्राणवियोगाच्या असह्य वेदना भोगाव्या लागतात आणि पशूला दिलेल्या या क्लेशाने यजमानाच्या समग्र पुण्यात थोडी तरी घट होतेच. व्यासभाष्यात याला आवापगमन असे म्हटले आहे (२.१३).

वेदविहित यज्ञांत पशुहिंसा होत असे, ही गोष्ट निर्विवाद आहे. जैनांनी, विशेषतः बौद्धांनी पशुहिंसेविरुद्ध मोहीम सुरू करून सार्वजनिक लोकमत पशुहिंसेच्या विरुद्ध वनविले, हेही खरे आहे. पण असे असले तरी, वैदिक धर्माचे कट्टे अनुयायी ब्राह्मण व क्षत्रिय हे मात्र पशुयाग सोडायला तयार नव्हते. महाभारतकालापर्यंत हिंसाप्रधान असे मोठमोठे यज्ञ होतच राहिले होते. इतकेच काय, पण महाभारतकाळानंतर जेव्हा जेव्हा बौद्ध-जैनांचा पाडाव करून आर्यधर्म विजयी झाला, तेव्हा तेव्हा त्या पराक्रमी क्षत्रिय राजांनी अश्वमेध यज्ञ मुद्दाम केले. पुष्यमित्र व चंद्रगुप्त या राजांनी, तसेच भारशिव नृपतींनी अनेक अश्वमेध केल्याचे इतिहासात नमूद आहे.

वैष्णव धर्म जसजसा प्रभावी होऊ लागला, तसतसा एकंदर जनतेत हिंसाप्रयुक्त यज्ञाविषयी तिटकाराच उत्पन्न झाला. या दोन्ही प्रवृत्तींचा परिचय महाभारतातच मिळतो. वनपर्वातील धर्मव्याधाच्या आख्यानात हिंसा व मांसान्न याचे समर्थन केलेले आहे (२०८); तर शांतिपर्वातल्या तुलाधार–जाजलिसंवादात हिंसा व मांसान्न यांची निंदा केलेली आहे (२६४–६५). तिथे म्हटले आहे–

अव्यवस्थितमर्यादैर्विमूढैर्नास्तिकैर्नरैः ।
संशयात्मभिरव्यक्तैर्हिंसा समनुवर्णिता ।।

अर्थ – ज्यांची मर्यादा चळली आहे अशा, विमूढ, नास्तिक संशयात्म व यज्ञाद्वारेच स्वतःची प्रसिद्धी करणाऱ्या लोकांनीच हिंसेचा पुरस्कार केला आहे.

याच अध्यायात पुढे सांगितले आहे, की श्रीविष्णूचे यजन करायचे ते (पशुहिंसा सोडून) पायस, फुले व यज्ञीय वृक्षांच्या समिधा यांनी करावे. कर्णपर्वात श्रीकृष्णानेही अहिंसा हाच परम धर्म असल्याचे (६९.२३) सांगितले आहे –

प्राणिनामवधस्तात सर्वज्यायान्मतो मम ।
अनृतं वा वदेद्वाचं न च हिंस्यात्कथं च न ।।

अर्थ – (अर्जुना) प्राण्यांची हिंसा न करणे ही गोष्ट मला

सर्वांत महत्त्वाची वाटते. एक वेळ खोटे बोलावे लागले तरी चालेल; पण हिंसा (मात्र) करू नये.

गीतेतल्या ज्ञानलक्षणांत अहिंसेचा समावेश आहे व ते एक शारीर तप असल्याचेही सांगितले आहे (१७.१४). श्रीकृष्णाच्या काळी यज्ञयागांचे पूर्ण प्राबल्य होते. म्हणून त्याने यज्ञीय हिंसा वर्ज्य करावी असा उपदेश केला नाही. पण स्वर्गाच्या इच्छेने काम्य यज्ञ करण्याच्या विरुद्ध त्याचा कटाक्ष होता, हे मात्र दिसून येते (गी. ९.२०–२१). श्रीकृष्णाच्या काळातच हिंसायुक्त यज्ञाच्या विरुद्ध लोकमत हळूहळू वाढू लागले होते. गवालंभ तर कृष्णभक्तीमुळेच भारतीयांनी बंद केला, असे म्हणायला हरकत नाही.

महाभारतावरून असे दिसून येते, की भारतात अहिंसेचा उद्घोष प्राचीन काळी झाला असला, तरी जैनांप्रमाणे भारतीय धर्मशास्त्रकारांनी अहिंसेत अतिरेकीपणा केला नाही. हिंसेतही परिहार्य–अपरिहार्य असा विवेक त्यांनी केला आहे. वनपर्वातल्या ब्राह्मण-व्याधसंवादात धर्मव्याध अहिंसेचे श्रेष्ठत्व प्रतिपादूनही तिच्यातला विवेक सांगतो –

'वृक्षांत, फळांत व पाण्यातही पुष्कळ जीव असतात. चालताना पायाखालचे जीव मरतात. तसेच बसताना, निजताना अनेक जीवांची हत्या होते, असे सांगून धर्मव्याध पुढे म्हणतो –

के न हिंसन्ति जीवान्वै लोकेऽस्मिन्द्विजसत्तम।
बहु सञ्चिन्त्य इति वै नास्ति कश्चिदहिंसकः ॥
अहिंसायां तु निरता यतयो द्विजसत्तम ।
कुर्वन्त्येव हि हिंसां ते यत्नादल्पतरा भवेत् ॥
(म. भा. वन. २०८.३३–३४)

अर्थ – हे ब्राह्मणश्रेष्ठा, या लोकात जीवहिंसा कोण करीत नाही ! पुष्कळ विचार केल्या अंती (असे दिसते, की या जगात) अहिंसक कोणीच नाही. हे द्विजश्रेष्ठा, अहिंसेच्या ठिकाणी रत असलेले यती(ही) हिंसा करतातच. (एवंच, हिंसा ही अपरिहार्य आहे.) प्रयत्नाने ती (फार तर) कमी होईल.

म. गांधी हे चालू शतकात सत्याग्रह नावाचे एक अभिनव तत्त्व घेऊन राजकारणात उतरले आणि त्याचे अधिष्ठान म्हणून त्यांनी अहिंसेला प्राधान्य दिले. सत्तेची संघटना व विस्तार करण्यासाठी विविध प्रकारची हिंसात्मक दमनसामर्थ्ये वापरणे, हे राज्यशास्त्रात सूक्त व प्रशस्त मानले जाते. पण म. गांधींनी याच मूलभूत मुद्द्यावर आघात करून भौतिक दमनशक्तींना हतप्रभ करणाऱ्या अहिंसात्मक आत्मशक्तीला आवाहन केले. जगातील मानवी प्रगती अहिंसेच्या दिशेनेच होत आहे, अशा विश्वासाने ते लिहितात –

'इतिहास जेथपासून ज्ञात आहे, तेथपासून थेट आजपर्यंतच्या काळाकडे आपण नजर टाकली, तर आपणाला असे आढळून येईल की मानवाची हळूहळू अहिंसेकडे प्रगती होत आहे. आपले प्राचीन पूर्वज नरमांसभक्षक होते. नंतर असा काळ आला, की त्यांना नरमांसभक्षणाचा वीट येऊन ते शिकारीवर राहू लागले. त्यानंतरच्या अवस्थेत मानवाला आपल्या भटक्या जीवनाची शरम वाटू लागली. म्हणून त्याने शेतीकडे लक्ष दिले व आपल्या अन्नासाठी तो भूमातेवर विसंबून राहू लागला. अशा तऱ्हेने भटके जीवन सोडून मानव खेडी व शहरे यांवर आधारलेल्या सुसंस्कृत स्थिर जीवनात स्थायिक झाला. एका कुटुंबाचा घटक होता त्याऐवजी तो एका जमातीचा व राष्ट्राचा घटक बनला. प्रगमनशील अहिंसेचे व हिंसा अस्तंगत होत असल्याचे हे सगळे दाखले आहेत. जर खरा प्रकार याच्या उलट असता, तर ज्याप्रमाणे अनेक कनिष्ठ प्रकारच्या प्राण्यांच्या जाती नष्ट होऊन गेल्या, त्याप्रमाणेच मानवजातही आज नाहीशी झाली असती (हरिजन ११–८–४० भाषांतर-दिवाकर).

आचार्य विनोबा हे अहिंसेचे प्रमुख भाष्यकार आहेत. ते म्हणतात –

"आम्ही अहिंसेचा अर्थ हिंसा न करणे एवढाच समजतो. परंतु त्याचा इतकाच अभावात्मक अर्थ नाही. त्याचे तीन अर्थ आहेत – पहिला आहे निर्भयता, दुसरा आहे प्रेम आणि सहकार करणे (म. गांधींनीही अहिंसेचा प्रेम असाच अर्थ केला आहे). तिसरा अर्थ आहे रचनात्मक कार्यावर विश्वास ठेवणे. हिंसेवर विश्वास ठेवणारे नेहमी भयभीत असतात. ते शरीरालाच आत्मा समजतात. शरीराला कोणी मारले, तर ते मारणाराला लवकरच शरण जातात. आपल्याला जर अहिंसा वाढविण्याची इच्छा असेल तर आम्ही कुणाला भिणार नाही व भिवविणारही नाही. 'न भिणे व न भिवविणे' हे व्रत घ्यावे लागेल."

अहिंसेचा तात्त्विक अर्थ सांगताना ते म्हणतात – अहिंसा ही आत्म्याची शक्ती आहे. आत्मा मरत नाही ही त्याची शक्ती आहे. हिंसा ही देहाची शक्ती आहे. पण देह मारला जाऊ शकतो. आत्म्याची शक्ती ही देहाहून फार मोठी आहे, हे सर्वमान्य आहे. पण आपण देहबुद्धीत गुंतून पडतो. देहाचे आवरण सोडून देहाच्या पलीकडे जी वस्तू आहे तिच्याकडे दृष्टी ठेवली तर आपला सारा व्यवहार, बोलण्याचालण्याची व विचार करण्याची सारी पद्धतच बदलून जाईल. सारे जग एका वेगळ्याच रंगाने रंगलेले, नटलेले दिसेल. असे झाले तर अशा मनुष्याच्या सहवासात जो जो येईल त्याच्यावर हा रंग चढेल. अहिंसा ही हृदयपरिवर्तनाच्या द्वाराच परिणाम घडवून आणते, बाह्य परिवर्तनाच्या द्वारा नव्हे.

श्री. धनंजयराव गाडगीळ यांनी अहिंसेविषयी व्यक्त केलेले विचार –

अहिंसेच्या मार्गाचा निश्चयात्मक स्वीकार होण्यास यापूर्वी कधीही नव्हती एवढी अनुकूल भूमिका आज मानवेतिहासात वनू पाहत आहे. आधुनिक शस्त्रास्त्रांच्या क्रांतीमुळे, सार्वराष्ट्रीय संबंधाचे स्वरूप बदलले आहे. औद्योगिक क्रांतीमुळे सार्वजनिक सुबत्ता शक्य ठरली; तर आता अस्त्रांच्या प्रचंड संहारक शक्तीमुळेच कोणतेही महायुद्ध अशक्य ठरू पाहत आहे. यापुढे मानवाला जगायचे असल्यास अहिंसेचे आत्यंतिक पथ्य पाळण्याचा उपक्रम त्याला करावा लागेल, असे जगातील अनेक विचारवंत मानू लागले आहेत. अहिंसेचा पुरस्कार म्हणजे परस्परांशी होणाऱ्या व्यवहारात अहिंसा शक्य तितकी आचरणात आणणे, हे आपले खरे कर्तव्य आहे. [ म. भा. उ.; म. ज्ञा. को.; हिं ध.; भा. सं.; भूदानगंगा; म. जी. १; हि. जै. मो. ]

**अहिंसा व्रत** एक व्रत. याचा कालावधी एक वर्ष. मांसाशन न करणे आणि व्रताच्या अंती गाय व सुवर्णहरिण दान देणे, असा याचा विधी आहे. फल – दीर्घायुरारोग्याची प्राप्ती. [ हि. ध. ]

**अही** वृत्राला ऋग्वेदात अही म्हटले असावे, असे वाटते. कारण तिथे एकमेकांची विशेषणे एकमेकांना लावलेली आढळतात (ऋ. १.३२). 'अहिं च वृत्रहाऽवधीत्' ( = इंद्राने अहीला मारले) असेही वर्णन आहे (ऋ. ८.८२.२).

हा शब्द वहुवचनी येतो तेव्हा त्याने त्या नावाच्या राक्षसकुलाचा बोध होतो. अही हा प्रबल असून, तो दुर्गम अशा गिरिकुहरात राहत असे (ऋ. २.११.५). तो दास म्हणजे आर्येतर असून, स्वतःला अमर समजत असे (ऋ. २.११.२). अही हा एका जमातीचा पुढारी असून, त्याने सिंध प्रांत बळकाविला होता, तो इंद्राने त्याला मारून सोडवून घेतला, असा या घटनेचा अर्थ असावा (ऋ. १०.१३३.२). वल नावाचे अहीचे स्थान म्हणजे बलुचिस्तान असावे.

वेदांत आणि तदुत्तर काळात अही हा शब्द सर्प या अर्थीही योजलेला दिसतो. याने आपली कात टाकल्याचा व याचा दंश विषारी असल्याचा ऋग्वेदात उल्लेख आहे (ऋ. ९.८६.४४; ७.१०४.७). हिवाळयात याला जडत्व येते, म्हणून हा पृथ्वीच्या पोटात शिरत असल्याचे अथर्ववेदात सांगितले आहे (१२.१.४६). अवेस्त्यात अही शब्दाशी सदृश असा अझी हा शब्द त्याच अर्थाने आला आहे. त्याविषयीच्या इराणी कथा सर्पाशीच संबद्ध आहेत. पाहा – नागपूजा. [ ऋ. द.; म. ज्ञा. को. ]

**अहीन याग** सोमयागाचे प्रकार. यांचा प्रारंभ पौर्णिमेला करतात. एकापेक्षा अधिक दिवस या यागांत सोमसवन होते. यांची समाप्ती अतिरात्राने होते. दीक्षा व उपसद यांचे दिवस धरून ते महिन्यापेक्षा अधिक होता कामा नयेत, असा नियम आहे. त्रिरात्र, पंचरात्र, षडह, असे यांचे गट आहेत. अश्वमेध व द्वादशाह हे अहीन यागांतले प्रमुख होत. द्वादशाह हे सत्रही आहे. पाहा – अतिरात्र, अश्वमेध, द्वादशाह. [ हि. ध. ]

**अहीर** एक जात. हे लोक विहार, ओडिसा, उत्तर प्रदेश, राजस्थान, पंजाब, सौराष्ट्र व खानदेश या भागात पसरलेले आहेत. अहीर हा आभीर या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश आहे. गुजर आणि अहीर यांची नावे एकत्र घेतली जातात. आजही हे लोक गुजरांप्रमाणेच गुरे पाळतात. दोन्ही जमाती मुळात एकाच वंशाच्या आहेत. त्यांचे मूलस्थानही एकच असावे असे म्हणतात. हे लोक मध्य आशियातून प्रथम सिंधूच्या खोऱ्यात उतरले. हे सिथियन वंशाचे असावे, अशी समजूत होती; पण अधिक संशोधनाच्या अंती ते आर्यच असले पाहिजेत, असे आता मानले जाते. सनपूर्व पहिल्या अथवा दुसऱ्या शतकात यांचे भारतात आगमन झाले असावे. मात्र ते गुजरांच्या बरोबर आले असे वाटत नाही. आणि आले असल्यास ते एकाच ठिकाणी कुठे स्थायिक झाले नाहीत. जाट, गुजर व अहीर यांचा परस्पर रोटीव्यवहार चालतो, त्यावरून त्यांचा सामाजिक दर्जा समान मानला जातो. जाट हे उंट पाळणारे, गुजर डोंगरात गुरे चारणारे, तर अहीर हे समुद्रसपाटीचे गवळी आहेत. अर्थात हा मुळातला भेद आज राहिलेला नाही. हल्ली सगळेच शेतकरी बनले आहेत.



अहीर – पुरुष (राजस्थान)

अहीरांची मथुरावंशी नावाची एक पोटजात आहे. हे देहाने उंच, रंगाने गव्हाळी व चेहऱ्याने कोवळे व रेखीव दिसतात. मगधातले अहीर काळे, मोठ्या हातापायांचे व ओबडधोबड चेहऱ्याचे दिसतात. रसेल व हिरालाल यांच्या मते अहीरांत जातिसंकरही झाला असून, अन्य जातींच्या मिश्रणाने काही

पोटजाती निर्माण झाल्या आहेत. उत्तर भारतातील कित्येक अहीरांनी इस्लाम धर्म स्वीकारला असून, त्यांना घोसी किंवा गड्डी असे म्हणतात. अहीरांना बंगालमध्ये गोआला व मध्य प्रदेशात गवळी किंवा ग्वाला असे म्हणतात. रावत, कहर व महाकुल अशीही यांना प्रदेशपरत्वे नावे आहेत. अहीरांच्या सुतार, सोनार, लोहार अशा आणखीही पोटजाती बनल्या आहेत.

अहीरांची रावत ही पोटजात मुख्यत्वे छत्तीसगडामध्ये राहते. हे लोक कवने रचण्यात पटाईत असून, छत्तीसगडातील लोकसाहित्यात त्यांच्या कवनांनी महत्त्वाची भर घातली आहे. 'अहीर ददरिया' हा त्यांचा काव्यप्रकार दोह्यासारखा असून, ती कविता दोन अथवा चार ओळींची असते. बहुतेक रचना शृंगारिक असते.

बिहारमध्ये गंडक नदीच्या काठी वसलेल्या अहीरांना गोप व गोयला अशीही नावे आहेत. त्यांच्या मज्रौत, किष्णौत, गोरिया व कनोज या पोटजाती आहेत. किष्णौतांच्या कुळात कृष्ण जन्मला, असे ते मानतात.

अहीर हे मुख्यत्वे कृष्णभक्त असले, तरी स्थानपरत्वे त्यांनी निरनिराळे देव केले आहेत. नर्मदेच्या खोऱ्यात राहणारे अहीर हे मिलाट देवीची उपासना करतात. ते गायीला पूज्य मानतात. त्याशिवाय तुळशीश्याम, देवी, हव्वेस असे आणखीही त्यांचे स्थानिक देव आहेत. हरिदासबाबा हा अहीरांचा पूज्य साधू आहे.

हे लोक प्रत्येक वर्षी एका ठराविक दिवशी लग्ने लावतात. विधवेला धाकट्या दिराशी लग्न करता येते. पाहा—आभीर. [ एन्सा. रि. ए.; रजःकण; रा. जा.; सु. वि. को. ]

## अहुर मझ्द

झरथुष्ट्री धर्मातला सर्वशक्तिमान व सर्वश्रेष्ठ देव किंवा परमेश्वर. अहुर हे यातले विशेषण असून, मझ्द हे विशेष्य आहे. संस्कृत असुर या शब्दाचा जो अर्थ, तोच अहुरचा आहे. अहुर म्हणजे प्राणवान, वीर्यवान. हे विशेषण केवळ मझ्दालाच लावलेले नसून, मिथ्र आणि अपांनपात यांनाही योजलेले आढळते (यस्न २.५ : १०५; ६२. १२). तथापि अहुर ही पदवी विशेषत्वाने मझ्दाचीच समजण्यात येते. अहुर मझ्द म्हणजे संस्कृत असुरमहत असे राजवाडे म्हणतात. असुरमेधस् असाही पर्यायशब्द काही लोक सुचवितात. त्याचा अर्थ सर्वसाक्षी असा होतो. ऋग्वेदात हा गुण वरुणाला लावलेला असून, त्याला असुरप्रचेताः असे म्हटले आहे (ऋ. १.२६.१४).



अहुर मझ्द

ससॅनियन काळात मझ्द संप्रदाय पूर्णावस्थेस पोचला व अहुर मझ्द हाच त्याचा श्रेष्ठ देव ठरला. पहलवी ग्रंथांतून त्याला पूर्ण, उत्कृष्ट, शुद्ध व प्रकृतीची प्रकृती असे म्हटले आहे. हा सर्वांचे हित साधणारा, उपकारी व दयाळू आहे. तो प्रकाश व वृद्धी यांचे अधिष्ठान आहे. अहरिमन् ही त्याच्या विरोधी अशी देवता आहे. त्यामुळे त्या दोघांची स्थानेही भिन्न आहेत. अहुर मझ्द हा अखंड प्रकाशात, तर अहरिमन् हा अंधतमात वास्तव्य करतो.

अहुर मझ्दाची आणखी सहा रूपे मानलेली आहेत. झरथुष्ट्राने या सहा रूपांचे प्रत्येकात एक याप्रमाणे सहा मुख्य गुण सांगितले आहेत ते असे —

(१) **अष**=ऋत—जगाची नियामक शक्ती.
(२) **वोहुमनह्**—प्रेम व पावित्र्य.
(३) **स्पेन्त आर्मैति**—सद्बुद्धी, धार्मिक निष्ठा.
(४) **क्षथ्र वैर्य**—प्रभुत्व.
(५) **हौर्वतात**—संपूर्णता.
(६) **अमेरेतात**—अमरत्व.

झरथुष्ट्राने या सहा गुणांनी युक्त अशा अहुरमझ्दाची आराधना करण्याचा उपदेश लोकांना केला आहे. अहुरमझ्दाच्या सहा गुणांची ही कल्पना षाड्गुण्यविग्रह विष्णूच्या कल्पनेशी मिळतीजुळती आहे. नंतरच्या काळात या गुणांचे दैवतीकरण झाले व त्या सहा देवतांना मिळून अमेश स्पेन्त असे नाव मिळाले. [ वि. ध. द. ]

## अहेतुवाद

काही संदेहवादी दार्शनिक विद्वान विश्वात कार्यकारणनियम किंवा हेतुवाद आहे, असे मानीत नाहीत. इस्लामी दार्शनिकांमध्ये अश–अरी या दार्शनिकाने कार्यकारणनियम म्हणजे ईश्वराच्या सर्वशक्तिमत्त्वाला बाधा आहे, असे मानले. तो म्हणतो, की कोणतीही वस्तू उत्पन्न होण्यासाठी कोणतेही कारण उपस्थित असावे लागत नाही. अल्लाह प्रत्येक वस्तू प्रत्येक वेळी खास नवी अशी असतातून सद्रूपात आणतो, असे त्याचे मत आहे. काही प्राचीन दार्शनिकही अहेतुवाद मांडणारे आहेत, असे धर्मकीर्ती हा बौद्धाचार्य सांगतो. त्यांच्या मते काट्यांमध्ये तीक्ष्णता असण्याला जसे काही कारण नाही, त्याचप्रमाणे हे सारे जग निर्माण व्हायलाही काही कारण लागत नाही. जग अहेतुक आहे. [ द. दि. ]

## अहेरिया

(१) द्रविड वंशाची एक जमात. ही पंजाब व उत्तर प्रदेश यांत आढळते. हे लोक मुख्यत्वे शिकारी असून चोरीमारीबद्दलही प्रसिद्ध होते. पंजाबातले अहेरिया काही

शीख व काही मुसलमान बनले आहेत. उरलेले सर्व हिंदू असले तरी ते हिंदुधर्माच्या संपर्कात न आल्यामुळे वन्यधर्मीच राहिले आहेत.

हे लोक पिकाच्या कापणीसाठी टोळ्या करून फिरतात. हे निसर्गपूजक असून भुताखेतांचीही पूजा करतात. जे हिंदूंच्या संपर्कात आले, ते देवीची पूजा करतात. अहेरिया याच नावाची त्यांची देवी आहे. मात्र त्यांचा मुख्य देव मेखासुर (मेष+असुर) हा आहे. गुग्गा अथवा जाहर पीर याची ते मुसलमानांच्या मार्फत पूजा करतात. मिरान साहेब हा मुस्लिम अवलियाही त्यांना पूज्य वाटतो. जखिया हा त्यांच्यांतला देवत्वाप्रत पोचलेला एक झाडूवाला आहे. त्याला ते भजतात, डुकराचा बळी देतात. व भूतबाधा होऊ नये म्हणून त्या बळीचे रक्त मुलाबाळांच्या कपाळी लावतात. बराई व चामर ही त्यांची ग्रामदैवते होत. चामराला गव्हाचा रोट व प्रसंगविशेषी बकऱ्याचा बळी देतात. बळीचे मांस लगेच देवासमोरच भक्षण करतात. देवतांना बळी द्यायचा तो विशिष्ट कुलातल्याच माणसाने द्यावा लागतो. काही विधींत पशूची हत्या न करता त्याच्या कानातून रक्त काढून त्याला सोडून देतात.

प्रेताला अग्नी दिल्यावर घरी जाताना चितेवर दगड टाकतात. मृताच्या भुताने आपल्या मागून येऊ नये, हा त्यातला उद्देश असतो.

हे लोक रामायणकर्त्या वाल्मीकीला आपला आद्य गुरू मानतात. [पॉ. रि. फो. नॉ. इं.; ट्रा. का. नॉ. प्रॉ. औ.]

(२) राजस्थानातला एक शिकारीचा सण. हा फाल्गुन महिन्यात येतो. या दिवशी राजपूत लोक रानडुकराच्या शिकारीसाठी निघतात. ही शिकार चुरशीची असते. कारण प्रत्येक शिकाऱ्याला आपण शिकार साधावी अशी महत्त्वाकांक्षा असते. शिकारी लोक घोड्यावर बसून रानडुकराचा पाठलाग करतात. भाला व तलवार ही आयुधे त्यांच्याजवळ असतात. उदेपूर संस्थानात या शिकारीचे महत्त्व फार असे. राजज्योतिषी शिकारीचा मुहूर्त काढून देत असे. आदल्या दिवशी उदेपूरचा राणा आपल्या नोकरांना हिरवा पोषाख देत असे. या शिकारीतली घोडदौड बेफाम असे. तिच्यात घोडेस्वाराला अपघात होण्याचीही शक्यता असे. राणा चुंडावत याचा या शिकारीत पाय मोडला होता व त्याच्या मुलाच्या दंडाला भाल्याची जखम झाली होती. या शिकारीत राणा व त्याचा लवाजमा यांचे जेवण रानात होत असे.

शिकारीत ठार केलेल्या डुकराचे मांस रानातच शिजवायचे, असा संकेत राजस्थानात प्रचलित आहे. राजपूत लोक रानडुकराला गौरीचा शत्रू समजतात. त्यामुळे ही शिकार धार्मिक स्वरूपाची समजली जाते. [बॅ. अॅ. रा.]

**अहोई आठे** एक व्रत. कार्तिक वद्य अष्टमीला उत्तर प्रदेशात हे नाव आहे. हे पुत्रवती स्त्रीचे व्रत असते. त्या दिवशी उपवास करून सायंकाळी भिंतीवर आठ कोठे असलेला एक देवीचा कणा रेखतात. त्याच्या खाली एक साळ व तिचे पिल्लू काढतात. भिंतीच्या मुळात कलशस्थापना करतात. मग त्या सर्वांची पूजा करून दूधभाताचा नैवेद्य दाखवितात. नंतर पुढील कथा ऐकतात –

एका स्त्रीला आपल्या घराची भिंत सारवायची होती. म्हणून ती माती आणायला गेली. जिथे ती खणत होती, तिथे खाली साळीचे बिळ होते. तिची कुदळ नकळत त्या बिळातल्या साळीच्या पिलावर पडली आणि ते मेले. त्या पापाने तिची सातही मुले एका वर्षात मरून गेली. बाई दुःखी झाली. तिने घडली गोष्ट गावातल्या वृद्ध स्त्रियांना सांगितली. त्यांनी तिला देवीची पूजा करण्याचा उपदेश केला. बाईने अहोई आठेच्या दिवशी देवीचे व्रत केले आणि तिला पुनश्च सात मुलगे झाले.

**अहोबल** (१) (इ. स. चे १७ वे शतक) संगीतपारिजात या सुप्रसिद्ध संस्कृत ग्रंथाचा कर्ता. हा द. भारतातील द्रविड ब्राह्मण होता. याच्या बापाचे नाव श्रीकृष्ण पंडित. बापाजवळच याने संगीतशास्त्र अभ्यासिले. पुढे याने धनवड संस्थानाच्या आश्रयाला राहून हिंदुस्थानी संगीताचा अभ्यास केला. याच्या ग्रंथांत, श्रुती व स्वर हे भिन्न नसून एकच आहेत, असे प्रतिपादिले आहे. षड्ज ग्रामातील पहिल्या चार स्वरांच्या दिढीने पुढील चार स्वर ध्वनिदृष्ट्या उच्च आहेत, असे याने सांगितले आहे. याने सात शुद्ध व पाच विकृत अशा बारा स्वरांची स्थाने तारेच्या लांबीने कायम करून ठेवली आहेत. विशिष्ट स्वराचा ध्वनी निघण्यास विशिष्ट लांबीची तार हवी, हे याने शोधून ठरविले. सुधारलेल्या शास्त्रीय साधनांचा अभाव असता हे काम याने केले, म्हणून याचे महत्त्व मानतात. याचा संगीतपारिजात हा ग्रंथ सर्वमान्य ठरला आहे. [म. च. को.; सु. वि. को.]

(२) एक पवित्र क्षेत्र. हे आंध्र राज्यातील कर्नूल जिल्ह्यात नंदियाल पासून ३० मैलांवर आहे. हे स्थान निर्जन व घनदाट अरण्यात असल्यामुळे, इथे देवस्थानाच्या नोकरवर्गाव्यतिरिक्त अन्य लोकांची वसती नाही. प्राचीन काळी इथे हिरण्यकशिपूची राजधानी होती. प्रल्हादाच्या रक्षणासाठी इथेच नृसिंह अवतार प्रकट झाला व त्याने हिरण्यकशिपूचा वध केला, असे सांगतात. याच्या आसपास प्रल्हादचरित्रातली अनेक स्मारके दाखविली जातात. इथल्या पर्वताच्या शिखरावर एक मंदिर आहे. त्याला अहोबिल मंदिर म्हणतात. इथे छत्रीच्या आकाराचे एक बिळ किंवा विवर आहे. इथल्या पर्वतमालेला गरुडाचल म्हणतात.

कश्यपाच्या आदेशानुसार गरुडाने याच पर्वतावर तपश्चर्या केली, असे सांगतात. इथले सर्वांत मोठे मंदिर म्हणजे प्रल्हाद-वरदमंदिर होय. हे मंदिर डोंगराच्या तराईत आहे. इथून दीड कोसावर एक छोटा तलाव आहे, त्याला भार्गवतीर्थ म्हणतात. इथे मंदारै नावाची एक वेल आहे. क्षेत्रात आल्यावर तिच्या पानावर भोजन करण्याची प्रथा आहे. हे नृसिंह क्षेत्र असल्यामुळे इथे नृसिंहाचे ९ विग्रह (मूर्ती) आहेत – (१) ज्वाला (२) प्रल्हादवरद (३) मालोल (४) क्रोडाकार (५) कारंड (६) गुहा (७) योगानंद (८) छत्नवट व (९) पवन. हे क्षेत्र रामानुज संप्रदायाच्या अष्टपीठांतले मुख्य पीठ आहे. इथल्या आचार्याला शठकोपाचार्य म्हणतात. [दक्षिण-दर्शन, अर्धवार्षिक, जाने. १९६१, मद्रास; कल्याण – तीर्थांक ]

**अहोरात्र** ' सूर्योदयद्वयपरिच्छिन्नत्रिंशन्मुहूर्तात्मकः कालः ' (= एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचा ३० मुहूर्तांचा (= २ घटिका) काळ म्हणजे अहोरात्र होय.) (हलायुध). शतपथ ब्राह्मणात अहोरात्राचे ३० भाग करून त्या प्रत्येकाला मुहूर्त असे नाव दिले आहे (१२. ३. २. ५). तैत्तिरीय ब्राह्मणात मुहूर्ताचे आणखी लहान-लहान विभाग केले आहेत, त्यांचे कोष्टक असे –

१ मुहूर्त = १५ क्षिप्र, १ क्षिप्र = १५ एतर्हि
१ एतर्हि = १५ इडानी, १ इडानी = १५ निमेष

शांखायन आरण्यकात हे विभाग पुढीलप्रमाणे आहेत – मुहूर्त, क्षण, कला, काष्ठा, निमेष (७. २०). पुरुषार्थचिंतामणीत याचे जे कोष्टक मिळते ते असे –

| | | |
|---|---|---|
| २ निमेष | = | १ त्रुटी |
| १० त्रुटी | = | १ प्राण |
| ६ प्राण | = | १ विनाडिका |
| ६० विनाडिका | = | १ नाडिका (घटिका) |
| ६० नाडिका | = | १ अहोरात्र |

एका लघू अक्षराचा उच्चार करण्यास जो वेळ लागतो, तो निमेष होय.

मकरसंक्रांतीनंतर सूर्य जसजसा उत्तरेकडे जातो, तसतसा दिवस मोठा होत जातो व त्या मानाने रात्र लहान लहान होत जाते. सूर्य दक्षिणेकडे जाऊ लागला, की याच्या उलट होते. तथापि दिवस व रात्र मिळून अहोरात्राचे कालमान सारखेच असते. पाहा – दिवस, रात्र. [ वे. इं.; पु. चिं. ]

**अक्षक्रीडा** प्राचीन कालापासून चालत आलेले एक मनो-विनोदनाचे साधन. अक्ष म्हणजे फासा. फाशांच्या आधाराने केली जाणारी क्रीडा ती अक्षक्रीडा होय. ऋग्वेदांत अक्षक्रीडेचे रोचक वर्णन आहे. तिथे ५३ (त्रिपंचाशः) फाशांचा उल्लेख आहे (ऋ. १०.३४.८). वैदिक कालातले फासे बेहड्याच्या फळांचे असत. त्या काळात या क्रीडेची इतर साधनसामग्री काय होती, त्याची निश्चित माहिती मिळत नाही. पाणिनीच्या काळी हा खेळ अक्ष व शलाका यांच्या साहाय्याने चाले, हे ' अक्षशलाकासंख्याः परिणा ' (अष्टा. २.१.१०) या सूत्रावरून कळते. तैत्तिरीय ब्राह्मणात राजसूयाच्या प्रसंगात पाच फाशांचा उल्लेख आलेला आहे (१. ७. १०. ५). या पाच फाशांची नावे अनुक्रमे अक्षराज, कृत, त्रेता, द्वापर व कली अशी होती. या द्यूताला पंचिकाद्यूत असे म्हणत. फासा फेकण्याला ग्रह (अथर्व. ४.३८.१) किंवा ग्राम (ऋ. ८.८१.१) म्हणत. ज्या खळग्यात फासे फेकीत त्याला देवन असे म्हणत (ऋ. १०. ४३.५). पुरस्कार द्रव्याला लक्ष अशी संज्ञा होती (ऋ. २. १२.४). पाणिनीने त्यालाच ग्लह असे म्हटले आहे (अष्टा. ३.३.७०). पाचही फासे एकसारखे चित किंवा पट पडले तर त्याला कृत म्हणत. कृत डाव पडल्याने जीत होत असे. पाचांतला एक उलटा पडला तर त्या डावाला अक्षपरी, दोन उलटे पडले तर द्विपरी, तीन उलटे पडले तर त्रिपरी व चार उलटे पडले तर चतुष्परी म्हणत. पाली ग्रंथांत कली शब्दाने हार व कृत शब्दाने जीत सांगितली आहे (धम्मपद २५२). पाणिनीनेही या दोन डावांचा उल्लेख केला आहे (अष्टा. ३.१.२१). यज्ञादी प्रसंगात एक अनुष्ठान या रूपाने अक्षक्रीडा चाले. अग्न्याधान-प्रसंगी यजमानाला आपल्या पत्नीबरोबर फासे खेळावे लागत. राजसूयप्रसंगी दिग्विजयाचे प्रतीक या रूपाने फासे खेळण्याची पद्धती होती. त्या वेळचे फासे सोन्याचे असत (तै. सं. १.८. ४.१२; श. ब्रा. ५.४.४.६). पाहा – द्यूतक्रीडा. [ प्रा. भा. म. ]

**अक्षत देणे** लग्न किंवा मुंज या मंगलकार्याला उपस्थित राहण्यासाठी यजमानदंपती प्रथम घरच्या देवाला, मग गणपती, देवी व ग्रामदेवता यांना निमंत्रण देतात. त्या वेळी कुंकुमपत्रिकेवर कुंकुमाक्षता, विडा, नारळ व तिळांचा लाडू देवापुढे ठेवून आरंभिलेले मंगलकार्य निर्विघ्न सिद्धीस नेण्याविषयी देवाची प्रार्थना करतात. मग आप्तेष्टांस निमंत्रण देण्यासाठी जातात. त्या वेळीही कुंकुमपत्रिकेबरोबर कुंकुमाक्षता देण्याची चाल महाराष्ट्रात आहे. या प्रकाराला अक्षत देणे, असे म्हणतात. पाहा – कुंकुमपत्रिका.

**अक्षता** पिंजर किंवा केशर टाकून रंगविलेल्या अक्षत (अखंड) तांदुळाना अक्षता म्हणतात. अक्षतांचे अनेक उपयोग

आपल्या धर्मकृत्यांत सांगितले आहेत. अक्षता हे पूजोपचारांतले प्रतिनिधी द्रव्य आहे. म्हणजे देवपूजेत एखादा उपचार उपलब्ध नसेल, तर त्याऐवजी देवाला अक्षता वाहतात. महापूजेतील अंगपूजा, आवरणपूजा, इ. पूजा अक्षता वाहूनच करतात. पीठावर देवतेसाठी ठेवलेल्या सुपारीवर अक्षता वाहूनच त्या त्या देवतेचे आवाहन करतात. अक्षता हा पूजेतला एक गौण पण स्वतंत्र असा उपचारही आहे. त्याचा मंत्र असा –

अक्षतास्तण्डुलाः शुभ्राः कुङ्कुमेन विराजिताः ।
मया निवेदिता भक्त्या गृहाण परमेश्वर ।।

अर्थ – कुंकुमाने रंगविलेले शुभ्र तांदूळ म्हणजेच अक्षता मी तुला भक्तीने समर्पिल्या आहेत. हे परमेश्वरा, त्यांचे ग्रहण कर.

लग्न-मुंजीच्या प्रसंगी वधू-वरांच्या व मुंज मुलाच्या मस्तकावर अक्षता टाकतात. वधूवरांवर अक्षता टाकण्याची ही चाल पुरातन आहे. अक्षतेतले धान्य सुपीकपणाचे प्रतीक समजले जात असे. वधू-वरांचा विवाह संततीने सुफलित व्हावा, हा उद्देश त्यात आहे. याशिवाय धान्याच्या ठिकाणी भुताखेतांचे निवारण करण्याची शक्ती असल्यामुळे वधूवरांना भुताखेतांची दृष्ट लागू नये, म्हणूनही त्यांच्यावर अक्षता टाकतात. लग्नविधीत 'अक्षतारोपण' हा एक स्वतंत्र विधीच आहे.

या मंगलाक्षता तांदूळ, ज्वारी व अन्य कोणत्याही धान्याच्या असू शकतात. प्राचीन ग्रीसमध्येही वधू-वरांवर याच कारणासाठी पीठ व मिठाई उधळण्याची चाल होती. प्राचीन पर्शियन विवाह समारंभातही तांदुळांना महत्त्वाचे स्थान होते. आजही पारश्यांत लग्न व नवजोत या प्रसंगी अक्षता टाकण्याची प्रथा आहे.

ब्राह्मण आशीर्वादाचे मंत्र म्हणून यजमानाला मंत्राक्षता देतात. अक्षता या बल, समृद्धी व दीर्घायुष्य देणाऱ्या आहेत. [ व्रतराज; क. म.; की. पां. ]

**अक्षतारोपण** लग्नात कंकणबंधन झाल्यावर हा विधी करतात. एका पात्रात शुभ्र तांदूळ व दुसऱ्या पात्रात दूध व तूप एकत्र करतात. वधू-वरांना समोरासमोर बसवितात. वर प्रथम वधूच्या ओंजळीत दुधाचा शिडकाव करतो, मग तांदूळ घालतो, नंतर पुन्हा दुधाचा शिडकाव करतो. वधूपिता याचप्रमाणे वराच्या ओंजळीत करतो; मग उभयतांच्या ओंजळीत सुवर्ण ठेवतो. वराची ओंजळ वधूच्या ओंजळीवर धरून 'कन्या तारयतु, पुण्यं वर्धताम्' इ. मंत्र म्हणतो. मग प्रथम वधू व नंतर वर एकमेकांच्या मस्तकांवर त्या ओंजळीतल्या अक्षता टाकतात. असे तीन वेळा करतात. नंतर वधू-वर आपल्या मुंडावळ्यांतले एकेक फूल काढून त्या दुधात भिजवितात व त्याने परस्परांच्या कपाळी तिलक करतात. मग एकमेकांना पुष्पहार घालतात. वधू-वरांच्या आयुष्यवृद्धीसाठी हा विधी असतो.

याला 'आर्द्राक्षतारोपण' असेही नाव आहे. प्राचीन काळी वधू-वरांचे नातलग त्यांच्या मस्तकावर आर्द्राक्षता टाकण्याचा समारंभ करीत, असे रघुवंशावरून कळते. अजइंदुमतीच्या लग्नातल्या या विधीचे वर्णन कालिदासाने केले आहे (रघु. ७-२८). हा वृद्धाचार असल्याचे काही टीकाकार लिहितात. देशावर आजमितीस ही चाल दिसत नाही; पण कोकणात व गोव्यात प्रचलित आहे. [ ल. वि. सो. ]

**अक्षपाद** (इ. स. १५० चा सुमार) न्यायसूत्रांचा कर्ता. हा षोडशपदार्थवादी होता. इ. स. चौथ्या शतकातला न्यायभाष्याचा कर्ता वात्स्यायन म्हणतो, की न्यायसूत्र हे अक्षपादाच्या पूर्वीच संगतवार रचले गेले होते. पण सहाव्या शतकातल्या उद्योतकराने अक्षपादालाच न्यायसूत्रांचा कर्ता मानले आहे. माधवाचार्यांनीही सर्वदर्शनसंग्रहात न्यायशास्त्राला अक्षपाददर्शन असेच म्हटले आहे. पद्मपुराणात (उ. खं. २६३) व अन्य काही पुराणांत न्यायशास्त्र, गोतम अथवा गौतम याने निर्मिले, असे म्हटले आहे. न्यायसूत्रवृत्तीचा कर्ता विश्वनाथ त्या सूत्राला गौतमसूत्र असेच म्हणतो. त्यामुळे न्यायसूत्रांचा कर्ता अक्षपाद का गौतम असा दुसरा प्रश्न उद्‌भवतो. कदाचित्त गौतम व अक्षपाद या दोघांनीही ते लिहिले असावे.

न्यायसूत्रात पाच विषय आहेत – (१) प्रमाण (२) प्रमेय (३) वाद (४) अवयव व (५) अन्यमतपरीक्षा. या विषयांपैकी पहिल्या तीन विषयांचा ऊहापोह प्राचीन ब्राह्मणी, बौद्ध व जैन ग्रंथांतून केलेला आहे. गौतमही आपल्या आन्वीक्षिकी विद्येत याच विषयांचा परामर्श घेतो. पण अक्षपादाने वरील विषयांपैकी १, ४ व ५ या विषयांचेच आन्वीक्षिकीत यथाक्रम विवरण केले आहे. नंतर याच आन्वीक्षिकी विद्येस न्यायसूत्र म्हणू लागले. यावरून अक्षपाद हाच न्यायसूत्रांचा कर्ता ठरतो. यानेच गौतमाच्या आन्वीक्षिकीस न्यायसूत्राचे स्वरूप दिले.

याशिवाय गौतम व अक्षपाद यांच्यांत स्थानभेदही आहे. गौतम मिथिलेचा; तर अक्षपाद काठेवाडातील प्रभास क्षेत्रातला. ब्रह्मांडपुराणात अक्षपादाचा पिता सोमशर्मा व बंधू कणाद असे सांगितले आहे. पण गौतम व अक्षपाद हे दोघे एकच होत, असे मानू लागल्यावर त्याविषयी एक दंतकथाही निर्माण केली गेली – गौतम हा सदैव तत्त्वचिंतनात गढलेला असे. एके दिवशी तो असाच विचार करीत जात असता एका विहिरीत पडला. लोकांनी त्याला मोठ्या कष्टाने बाहेर काढले. पुनश्च त्यावर असला प्रसंग येऊ नये म्हणून मग देवांनी त्याच्या पायांनाच डोळे निर्माण केले.

ही दंतकथा अक्षपाद या शब्दाचा अर्थ सांगण्यासाठी निर्माण झाली हे उघड दिसते. श्री. बलदेव उपाध्याय यांच्या मते वर्तमान न्यायसूत्रांत दोन कालखंडांतल्या चिंतनांची उपलब्धी स्पष्ट दिसते. न्यायदर्शनाचा मूळ निर्माता गौतम आहे व त्यात नवीन विषयांचा समावेश करून मूळ ग्रंथाचे संशोधन करणारा अक्षपाद आहे. [ म. ज्ञ. को.; हिं. वि. को. ]

**अक्षमाला** (१) रुद्राक्षांची माळ. ही अनेक देवतांच्या हातांत असते. योगी व शैव साधू ही गळचात घालतात. जप करताना व आरोग्यवृद्धीसाठी हिचा उपयोग केला जातो.

(२) अकारादी क्षकारान्त वर्णमाला. तंत्रसार या ग्रंथात या वर्णमालेची रचना सांगितली आहे, ती अशी –

पञ्चाशल्लिपिभिर्माला विहिता जपकर्मसु ।
अकारादिक्षकारान्ता अक्षमाला प्रकीर्तिता ॥
क्षर्णमेरुमखं तत्र कल्पयेन्मुनिसत्तम ।
अनया सर्वमन्त्राणां जपः सर्वसमृद्धिदः ॥

अर्थ – अ ते क्ष अशा एकावन्न वर्णांची अक्षमाला होते. अ ते ळ हे पन्नास वर्ण हे साधे मणी व क्ष हा मेरुमणी होय. या अक्षमालेने केलेला सर्व मंत्रांचा जप सकल समृद्धी देणारा होतो. [ श. क. ]

**अक्षमालिकोपनिषद्** १०८ उपनिषदांपैकी ६७ वे उपनिषद. हे ऋग्वेदात अंतर्भूत आहे. अक्षमालेतील मण्यांच्या अनुरोधाने यात संस्कृत भाषेतील ५० वर्णांचा विचार केला आहे. अक्षमालेचे लक्षण, भेद, सूत्रे, घटना, वर्ण, प्रतिष्ठा, अधिदेवता व तिचे फल, यांची माहिती प्रजापती व गुह यांच्या संवादरूपाने यात सांगितली आहे.

**अक्षयनिधिव्रत** जैनव्रत. श्रावण शुद्ध दशमी व भाद्रपद शुद्ध व कृष्ण दशमी या व्रततिथी होत. यांना अक्षयदशमी म्हणतात. उपवास, जिनप्रतिमांचे पूजन, जिनमंदिरात जाऊन आदिनाथावर अभिषेक, असा याचा विधी आहे. व्रतावधी पाच किंवा दहा वर्षे. याची कथा अशी –

राजगृह नगरीत मेघनाद नामक राजाने हे व्रत केले. त्यामुळे प्रथम तो स्वर्गात गेल्यानंतर देवत्व पावला. पुढे मनुष्ययोनीत जन्म झाल्यावर तपाच्या द्वारे कर्मनाश करून त्याने मोक्ष मिळविला. [ व्र. ति. नि.; जै. व्र. वि. सं. ]

**अक्षयफलदशमी व्रत** जैन तिथिव्रत. श्रावण शुद्ध दशमीला हे व्रत करतात. त्या दिवशी उपवास व ' ॐ ह्रीं वृषभजिनाय नमः ' या मंत्राचा जप करायचा असतो. व्रतावधी दहा वर्षे. या व्रताची कथा अशी –

राजगृह नगरीत मेघनाद नावाच्या राजाला पुत्रसंतान नव्हते. शुभंकर मुनीने त्यासाठी त्याला हे व्रत करायला सांगितले आणि त्या व्रताच्या प्रभावाने राजाला सात पुत्र व पाच कन्या झाल्या. [ जै. व्र. वि. सं.; व्र. ति. नि. ]

**अक्षय भंडार** द. भारतात वर्षाच्या अखेरीस सुवासिनीला पात्र भरून हळदीचे दान करतात. या दानाने वैधव्याचे संकट टळते, अशी समजूत आहे.

**अक्षयमती** दुसरा बोधिसत्त्व. बौद्ध धर्मग्रंथांत याला महत्त्वाचे स्थान मिळालेले आहे. निष्पन्नयोगावलीत तीन मंडलांत याचे वेगवेगळे वर्णन केलेले आहे, ते असे –



अक्षयमती

(१) पीत वर्ण, उजव्या हातात खड्ग व डाव्या हातात कमळ व अभय मुद्रा. (२) सोनेरी वर्ण, डाव्या हाताची मूठ छातीजवळ व उजव्या हाताची वरद मुद्रा. (३) शुभ्र वर्ण व दोन्ही हातीं ज्ञानामृताचा कलश. चीनमध्ये याची एक मूर्ती सापडली असून, ती ध्यानी बुद्ध अमोघसिद्धी याच्या मूर्तीशी बरीच मिळतीजुळती आहे, असे संशोधकांचे मत आहे. [ इं. बु. इ. ]

**अक्षयवट** एक प्राचीन, पवित्र वटवृक्ष. संस्कृत साहित्याच्या अनुशीलनावरून असे दिसते, की प्राचीन काळी प्रयाग क्षेत्रात एक महान वटवृक्ष होता व तो मध्ययुगापर्यंत तिथे उभा होता. श्रीरामासह वनवासात चित्रकूटाला जात असता सीता या क्षेत्रात आली होती आणि तिने पातिव्रत्यधर्माच्या पालनाचे सामर्थ्य या वृक्षाकडे मागितले होते (वा. रा. २.२३.२४). वनवासाहून परत येताना रामाने हा वृक्ष पाहिला व तो सीतेला म्हणाला –

त्वया पुरस्तादुपयाचितो यः सोऽयं वटः श्याम इति प्रतीतः ।
राशिर्मणीनामिव गारुडानां सपद्मरागः फलितो विभाति ।।
(रघु. १३.५३)

अर्थ – (हे सीते) ज्याची पूर्वी तू प्रार्थना केली होतीस, तो हा श्याम नामक वटवृक्ष फळाला आल्यामुळे पद्मराग मण्यांनी युक्त असलेल्या पाचमण्यांच्या राशीप्रमाणे दिसत आहे.

भवभूतीच्या उत्तररामचरितातही या श्याम वटाचा उल्लेख आलेला आहे (अंक १). या वृक्षाला अक्षयवट हे नाव व्यासांनी दिले असावे. पांडव वनवासात असताना चार महिने याच्या आश्रयाने राहिले होते (वन. ९५.१३–१५).

यावरून असे दिसते, की महाभारत रचले गेले तेव्हा अक्षयवटाचे धार्मिक माहात्म्य प्रस्थापित झाले होते. त्यापूर्वी अनेक शतके त्या वृक्षाचे बीजारोपण झाले असले पाहिजे.

वायू, मत्स्य, कूर्म, पद्म, अग्नी, स्कंद या पुराणांत, अक्षयवटाजवळ देहत्याग केल्याने मोक्ष मिळतो, असे सांगितले आहे.

गया क्षेत्रातही एक अक्षयवट असून, त्याचा निर्देश महाभारताच्या आरण्यक पर्वात (८२.७२)आला आहे, तो असा–

तत्राक्षयवटो नाम त्रिषु लोकेषु विश्रुतः ।
पितृणां तत्र वै दत्तमक्षयं भवति प्रभो ।।

अर्थ – तिथे अक्षयवट नामक, तीन्ही लोकांत प्रख्यात असा वटवृक्ष आहे. तिथे पितरांसाठी दिलेले सर्व काही अक्षय्य होते.

महाप्रलयाच्या वेळी या वृक्षाची एक शाखा प्रलयजलाच्या वर राहते आणि श्रीविष्णू बालकरूपाने त्या शाखेवर बसलेला मार्कंडेय मुनीला दिसतो, अशी कथा महाभारताच्या आरण्यक पर्वातच (१८६.८१–८३) आहे.

वायुपुराणातील गया-माहात्म्यात या कथेचा उल्लेख आढळतो. तसेच तिथे अक्षयवटासमीप केलेल्या श्राद्धाचे माहात्म्यही सांगितले आहे.

प्रयागमधील अक्षय वटवृक्ष सांप्रत अस्तित्वात नाही. तिथले क्षेत्रोपाध्ये प्रयागच्या किल्ल्यात अक्षयवट म्हणून एका वृक्षाचे खोड दाखवितात. कारण तिथल्या तीर्थयात्राविधीत अक्षयवटाचे दर्शन घ्यावे लागते.

गयाक्षेत्रातही अक्षयवट म्हणून एक वृक्ष दाखवितात व तो प्रयागमधल्या मूळ वृक्षाचाच शाखाविभाग आहे, असे म्हणतात. [हि. ध.; श्री. रामेश बेदी–आजकल, मार्च १९५८; प. कृ. गोडे–अॅं. भा. ओ. रि. इ. ३८, १९७७]

**अक्षया चतुर्थी** मंगळवारी येणारी चतुर्थी. या तिथीला केलेली उपवासादी व्रते विशेष फलदायक होतात, असे सांगितले आहे. [हि. ध.]

**अक्षय्य तृतीया** साडेतीन मुहूर्तांपैकी एक. वैशाख शुद्ध तृतीयेला हे नाव पडण्याचे कारण मदनरत्न या ग्रंथात पुढीलप्रमाणे दिले आहे –

अस्यां तिथौ क्षयमुर्पैति हुतं न दत्तं
तेनाक्षयेति कथिता मुनिभिस्तृतीया ।
उद्दिश्य दैवतपितॄन्क्रियते मनुष्यैः-
स्तच्चाक्षयं भवति भारत सर्वमेव ।।

अर्थ – (श्रीकृष्ण म्हणतो) हे युधिष्ठिरा, या तिथीस केलेले दान व हवन क्षयाला जात नाही, म्हणून हिला मुनींनी अक्षय्य तृतीया असे म्हटले आहे. देव आणि पितर यांना उद्देशून या तिथीस जे कर्म केले जाते, ते सर्व अक्षय्य (अविनाशी) होते.

या तिथीस महत्त्व येण्याचे कारण म्हणजे हा कृतयुगाचा (काहींच्या मते त्रेता युगाचा) प्रारंभदिन आहे. कालविभागाचा कोणताही प्रारंभदिवस भारतीयांना नेहमीच पवित्र वाटतो. म्हणून अशा तिथीस स्नानदानादी धर्मकृत्ये सांगितली गेली आहेत. या दिवसाचा विधी असा –

पवित्र जलात स्नान, विष्णूची पूजा, जप, होम, दान व पितृतर्पण. या दिवशी अपिंडक श्राद्ध करावे व ते जमत नसेल तर निदान तिलतर्पण तरी करावे, असे सांगितले आहे. या दिवशी सामान्न (शिध्यासह) उदकुंभही द्यायचा असतो. याशिवाय उन्हापासून संरक्षण करणाऱ्या छत्री, जोडा, इ. वस्तूही दान द्यायच्या असतात. या व्रताची कथा अशी –

एक व्यापारी होता. तो नित्य दानधर्म करी व संतमहात्म्यांच्या कथा आवडीने ऐके. कालांतराने त्याला दारिद्र्य आले. पुढे एकदा त्याने असे ऐकले, की बुधवारी रोहिणीयुक्त तृतीया आल्यास त्या दिवशी केलेले दान-पुण्य अक्षय्य होते. मग तसा दिवस येताच त्याने ते सगळे केले. पुढल्या जन्मी तो कुशावती नगरीचा राजा झाला. त्याने मोठमोठे यज्ञ केले व अनेक प्रकारचे वैभवही भोगले. पण तरीही त्याच्या पुण्याचा क्षय झाला नाही (भविष्योत्तर पुराण).

याच दिवशी परशुरामाचा जन्म झाला. म्हणून या तिथीस प्रदोषकाळी परशुरामाची पूजा करून त्याला अर्घ्य देतात. स्त्रियांना हा दिवस महत्त्वाचा असतो. त्यांना चैत्रात बसविलेल्या चैत्रगौरीचे त्या दिवशी विसर्जन करायचे असते. त्यानिमित्त त्या हळदीकुंकूही करतात.

ऋषभदेव याने एक वर्ष आणि काही दिवस एवढ्या कालानंतर हस्तिनापुरचा राजा श्रेयांस याच्या घरी या तिथीस उसाच्या रसाचे प्राशन केले. त्यामुळे राजाची भोजनशाला अक्षय्य झाली. म्हणून या तिथीस हे नाव पडले. या दिवशी आदिनाथ ऋषभदेवाची पूजा करतात व त्याला उसाच्या रसाचे

स्नान घालतात. [ म. ज्ञा. को.; व्रतराज; व्र. ति. नि. ]

**अक्षय्य नवमी** कार्तिक शुद्ध नवमी. या दिवशी विष्णूने कूष्मांड दैत्याचा वध केला, म्हणून या तिथीला महत्त्व प्राप्त झाले आहे. या तिथीस विष्णूची पूजा करतात. [ व्रतराज ]

**अक्षय्य फलावाप्तिव्रत** वैशाख शुद्ध तृतीयेला हे व्रत करतात. त्यात विष्णुपूजा हा मुख्य विधी होय. या तिथीस कृत्तिकानक्षत्र असल्यास विशेष फल असते. [ नि. सिं.; हि. ध. ]

**अक्षर** (न+क्षर). ज्याला क्षरण किंवा क्षय नाही ते अक्षर. याचा धात्वर्थ असा – न विरघळणारे, विकार न पावणारे, कूटस्थ, नित्य, सर्वभावातीत व केवलनिर्गुण. याचे वेगवेगळ्या पंथांत व तत्त्वज्ञानाच्या संप्रदायांत भिन्न भिन्न अर्थ होतात –

(१) अविनाशी आत्मा (बृहदा. उप. ३. ८. ८–१२).

(२) 'वर्णस्मारकरेखात्मकलिपिसन्निवेशः' – वर्णांचे स्मरण करून देणारा रेखात्मक लिपिप्रकार (न्यायकोश).

(३) परब्रह्म, मोक्ष (वेदान्त).

(४) लक्ष्मी (माध्वमत).

(५) 'भगवदंशभूतो भगवद्रूपो धामविशेषः' = भगवंताचे अंशभूत व भगवद्रूप असे स्थान (वल्लभमत).

(६) ओंकार, वेदांचे सार व ईश्वर यांचे वाचक (गीता ८.११; १०.२५).

(७) अकारादी क्षकारान्त एकावन्न वर्णे –

षाण्मासिके तु सम्प्राप्ते भ्रान्तिः संजायते यतः ।
धात्राक्षराणि सृष्टानि पत्रारूढाण्यतः पुरा ॥

(आह्निकतत्त्व)

अर्थ – सहा महिने झाल्यावर (अक्षरावद्दल) संदेह निर्माण होतो, म्हणून ब्रह्मदेवाने अक्षरे पत्रारूढ केली (त्यांची लिपी बनविली).

जगांतल्या भिन्न भिन्न भाषांच्या विविध ध्वनींना व्यक्त करणाऱ्या चिह्नांना अक्षर म्हणतात. प्राचीन संस्कृत साहित्यात अक्षर शब्दाचा प्रयोग ध्वन्यात्मक (उच्चारित) व संकेतात्मक (लिखित) अशा दोन्ही अर्थी सापडतो. ऋग्वेदात वर्णमालेला अक्षर असे म्हटले आहे (ऋ. १. १६४. २४–३९). अक्षर = न पाझरणारे, असा व्युत्पत्तीने येणारा अर्थ आहे. ऋग्वेदकाळी अक्षरे कोरून काढीत असावे. कोरलेले अक्षर पाणी पडले असता शाईच्या अक्षराप्रमाणे क्षरत अर्थात पाझरत नाही. वर्ण शब्द केवळ संकेतात्मक चिह्न या अर्थीच आढळतो. वर्ण शब्द रंगणे किंवा रंगवणे या अर्थाच्या वर्ण् या धातूवरून आला आहे. वैदिक काळी तो अक्षरांचा पर्याय शब्द बनला होता. यावरून त्या काळी अक्षरे रंगीत शाईने काढीत असत, असे दिसते.

ध्वनिशास्त्राप्रमाणे एका वेळी तोंडातून बाहेर पडणारा ध्वनी म्हणजे अक्षर होय; मग तो लिहून दाखवायला लिपीतील चिह्न एक लागो अथवा अनेक लागोत. अक्षराचे अधिष्ठान स्वरावर असते; मग त्यात आरंभी वा अंती व्यंजनोच्चार मिळो वा न मिळो. 'राजन्' या शब्दाच्या लेखनाकडे पाहून त्यात तीन अक्षरे आहेत, असे समजणे चूक होईल. त्यात 'रा' व 'जन्' अशी दोनच अक्षरे आहेत. 'रा' हे स्वरान्त आहे, तर 'जन्' हे व्यंजनान्त आहे. स्वरान्त अक्षराला विवृत व व्यंजनान्त अक्षराला संवृत म्हणतात.

अक्षराचे लघु-गुरू असे आणखी दोन भेद आहेत. ऱ्हस्वस्वरान्त अक्षराला लघू व दीर्घ स्वरान्त अक्षराला गुरू म्हणतात. ऱ्हस्वाची मात्रा एक धरली, तर दीर्घाच्या दोन धरतात. ऱ्हस्वाच्या उच्चाराला जेवढा काळ लागतो, त्याच्या दुप्पट काळ दीर्घाचा गणावा, असा संकेत आहे. याशिवाय तिसरा प्रकार म्हणजे प्लुत हा होय. तीन मात्रांच्या अक्षराला प्लुत म्हणतात. म्हणजे प्लुत उच्चारताना स्वर थोडा लांबवून तीन मात्रांचा काळ व्ययित करायचा असतो. वरील आशय भरताने पुढील श्लोकात सांगितला आहे–

एकमात्रं भवेद् ऱ्हस्वं द्विमात्रं दीर्घमिष्यते ।
प्लुतं चैव त्रिमात्रं स्यादक्षरं स्वरयोजनात् ॥

(नाट्यशास्त्र १७. ११६)

शुक्ल यजुर्वेदात अक्षर हा शब्द अनेक ठिकाणीं आढळतो. तैत्तिरीय संहितेतही हा शब्द अनेक ठिकाणीं आलेला आहे व सर्वत्र त्याचा छंदांशी संबंध आहे. वाजसनेयी संहितेत आलेला अक्षरपंक्ती हा शब्द त्याच अर्थाने तैत्तिरीय संहितेत दोन ठिकाणीं आला आहे. ऋग्वेदाप्रमाणे अथर्ववेदातही अक्षराचे उल्लेख आहेत. येथे अक्षर या शब्दावर विशेष जोर दिलेला आहे. जे क्षरत नाही ते अक्षर, म्हणजे बोललेल्या वाचेपेक्षा ज्यात अधिक स्थिरपणा आहे अशी वाणी. अर्थात कोणत्यातरी वस्तूवर अंकित केलेली वाणी, असा अर्थ होतो.

वर्णात्मक अक्षरांचा आविष्कार लेखनकलेच्या उच्चतम विकासाचा निदर्शक आहे. या पद्धतीत एक चिह्न एकाच ध्वनीला व्यक्त करते; अनेक ध्वनींना नव्हे. या दृष्टीने अरबी व रोमन ही अक्षरे अजून अपूर्ण आहेत. देवनागरी अक्षरे ही या बाबतीत श्रेष्ठ समजली जातात; कारण त्यांमध्ये एक अक्षर एकच ध्वनी दर्शविते. वर्णात्मक अक्षरांत ध्वनी व अक्षर यांच्यामध्ये कोणताही

आकृतिमूलक वास्तव संबंध नसतो; परंपरेने तो मानला जातो.

अक्षरे व वर्ण यांतही शुभाशुभ कल्पना केलेली आहे. वर्णांचे शुभ, अशुभ व दग्ध असे वर्गीकरण आढळते. काव्यारंभी अशुभ अक्षर नसावे, असा संकेत आहे (छन्दोरचना).

अक्षरे अ – क – च – ट – त – प – य – श – या आठ वर्गांत विभाजित केलेली आहेत. प्रत्येक वर्गाची विशिष्ट देवता असून श्लोक वा पद्य यांच्या आरंभी विशिष्ट वर्गातली अक्षरे योजिल्याने विशिष्ट फल मिळते, असेही सांगितले आहे. याविषयीचे कोष्टक पुढीलप्रमाणे –

| वर्ग | देवता | फल |
|---|---|---|
| अ | सोम | आयुर्वृद्धी |
| क | अंगारक | कीर्ती |
| च | बुध | धनप्राप्ती |
| ट | गुरू | सौभाग्य |
| त | शुक्र | कीर्ती |
| प | शनैश्चर | मंदता |
| य | सूर्य | मृत्यू |
| श | राहू | शून्यता |

[सं. शा.; छन्दोरचना; वै. सं. वि.; म. ज्ञा. को. ५ ]

**अक्षर अनन्य** (इ. स. १८ वे शतक) बुंदेलखंडी संत कवी. सेंवढा ही याची जन्मभूमी आहे. याचे मूळ नाव अछिरू असे होते. देवीने वरदान देऊन त्याचे अक्षर अनन्य असे नाव ठेवले, असे सांगतात. याने ३१ ग्रंथ लिहिले आहेत. त्यांतले २१ ग्रंथ संशोधकांना उपलब्ध झाले आहेत. हे सर्व ग्रंथ निर्गुणसिद्धांतावर आधारित आहेत. उत्तमचरित्र व महिमासमुद्र हे अनुक्रमे दुर्गासप्तशती व काशीखंड यांचे भावानुवाद आहेत. कबीर हा कामिनी व कांचन यांना अध्यात्मसाधनेतील विघ्न मानतो. पण अक्षर अनन्याला हे मत मान्य नाही. तो म्हणतो –

बैठबे को हठ नहीं आसन डिगोने कहा,
पूजा जप नेम नाहीं चूक कहा परि है ।
व्यसन वैराग्य नाहीं अपसरा छेले कहा,
देव को अराध नाहीं भूल कहा परि है ।
दुख-सुख हानि-वृद्धि स्वप्न के समान जान,
सिद्धि औ असिद्धि तें पन कहा परि है ।
अक्षर अनन्य गुरु अक्षर सुरति ध्यान,
ऐसे ज्ञान योग को विघन कहा करि है ।

भावार्थ – ज्याचे मन इंद्रियांच्या स्वाधीन आहे व जो विषयदर्शनाने विचलित होतो, तो साधक ज्ञानयोगीच नव्हे. साधकाला समाधीच्या स्थितीपर्यंत पोचायला क्रमशः गुरू, श्रद्धा, धर्म, नियम, प्रेम, धारणा, सुरती व अभेदज्ञान या पायऱ्या चढून जावे लागते. ज्ञानयोगाची समाधी ही अखंड समाधी असते.

ओरछाचा राजा पृथ्वीसिंह याची व अक्षर अनन्याची भेट झाली होती. राजाने त्याच्या प्रतिभेवर लुब्ध होऊन त्याला आपल्याबरोबर सेंवढा येथे आणले. असेही सांगतात, की धामपंथाचे प्रवर्तक श्रीप्राणनाथ यांनी पृथ्वीसिंहाला आपल्या पंथाची दीक्षा देऊ केली होती. अशा स्थितीत राजाला त्या पंथापासून परावृत्त करण्यासाठी त्याच्या राणीने अक्षर अनन्याला सेंवढा येथे बोलावून आणले.

हा संत ज्ञानाश्रयी परंपरेचा होता. त्यामुळे तो कविराच्या सिद्धांताशी सहमत नाही. त्याने स्पष्ट म्हटले आहे, की कविराचा उपदेश हा निरक्षर व ग्रामीण लोकांसाठी आहे. [ विंध्यभूमी – १५ जून १९५६ ]

**अक्षर धाम** अ + क्षर = अविनाशी. धाम = स्थान. अर्थात् भगवंताचे अंशभूत आणि भगवद्रूप असे विशेष स्थान (वल्लभमत). वल्लभाचार्य सच्चिदानंद ब्रह्माची तीन मुख्य रूपे मानतात. – (१) पूर्ण पुरुषोत्तम अथवा श्रीकृष्ण. यालाच अक्षर धाम म्हटले आहे. (२) काल, कर्म व स्वभाव यांना अनुसरून प्रकट झालेली जीवसृष्टी व दैवतसृष्टी व (३) अंतर्यामी रूप. पूर्ण पुरुषोत्तम श्रीकृष्ण हा आपल्या अक्षर धामात (गोलोक) नित्य आनंदलीलानिमग्न असतो, असे पुष्टिमार्गात सांगितले आहे. [ हिं. सा. को. ]

**अक्षरब्रह्म** ज्या ब्रह्मात आनंदाचा अंश किंचिन्मात्र तिरोहित (झाकलेला) असतो, त्याला अक्षरब्रह्म व आनंदपरिपूर्ण ब्रह्माला परब्रह्म असे वल्लभसंप्रदायात म्हटले जाते. पाहा – पुष्टिमार्ग.

**अक्षरमूल्ये** ज्योतिष व गणित या विषयांवरील ग्रंथांमध्ये एकसारखा संख्या सांगण्याचा प्रसंग येतो. सांकेतिक शब्दांनी संख्या व्यक्त करण्याची पद्धतही अशा कित्येक प्रसंगीं त्रासदायक व लांबट असल्याचे प्रत्ययास येऊ लागले. म्हणून एकेरी व संयुक्त वर्णांनी संख्या दाखविण्याची युक्ती उपयोगात आणली गेली. हिचा प्रथम प्रयोग पहिल्या आर्यभटाच्या आर्यभटीय अथवा आर्यसिद्धांत (इ. स. ४९९) नामक

प्रसिद्ध ग्रंथात केलेला आढळतो. हिचे सामान्य स्वरूप असे –
क् = १, ख् = २, ग् = ३, घ् = ४, ङ = ५,
च् = ६, छ् = ७, ज् = ८, झ् = ९, ञ् = १०,
ट् = ११, ठ् = १२, ड् = १३, ढ् = १४, ण् = १५,
त् = १६, थ् = १७, द् = १८, ध् = १९, न् = २०,
प् = २१, फ् = २२, ब् = २३, भ् = २४, म् = २५,
य् = ३०, र् = ४०, ल् = ५०, व् = ६०, श् = ७०,
ष् = ८०, स् = ९०, ह् = १००, अ – आ = १,
इ–ई = १००, उ – ऊ = १००००, ऋ – ॠ = १००००००,
लृ = १००००००००, ए = १००००००००००,
ओ = १ ० ० ० ० ० ० ० ० ० ० ० ० ० ०,
औ = १ ० ० ० ० ० ० ० ० ० ० ० ० ० ० ० ०.

या पद्धतीने संख्या दाखविताना स्वरयुक्त साधे व्यंजन आल्यास दोघांचा गुणाकार करायचा असतो. जसे–च=च्×अ=६ ×१= ६; गि=ग्×इ = ३×१००=३००. स्वरयुक्त संयुक्त व्यंजनांतील दोन्ही व्यंजनांस स्वराने गुणून आलेल्या गुणाकारांची बेरीज करायची असते. जसे–ख्यु = ख्×उ+य×उ = उ (ख्+य्) =१०००० (२+३०) = ३२००००. पण लृ या अक्षराचे निदान सध्याचे स्वरूप असे आहे, की हे अक्षर केवळ स्वरही होऊ शकेल व ल्+ऋ ही होऊ शकेल. यामुळे याची नेहमीच दोन मूल्ये होतील. यांपैकी कोणते मूल्य कुठे घ्यायचे, हे संदर्भावरून ठरवावे लागेल.

अक्षरांनी संख्या दाखविण्याची आणखी एक पद्धत दुसऱ्या आर्यभटाने (११वे शतक) दिली आहे, ती अशी–

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | ० |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| क् | ख् | ग् | घ् | ङ | च् | छ् | ज् | झ् | ञ् |
| ट् | ठ् | ड् | ढ् | ण् | त् | थ् | द् | ध् | न् |
| प् | फ् | ब् | भ् | म् | | | | | |
| य् | र् | ल् | व् | श् | ष् | स् | ह् | ळ् | |

या पद्धतीत स्वर निरर्थक अथवा शून्यवाचक असतो. संयुक्त व्यंजनांतील प्रत्येक व्यंजन एकेक स्वतंत्र अंक दाखविते. संस्कृतात सामान्यतः 'अङ्कानां वामतो गतिः' अशी पद्धती आहे. म्हणजे प्रथम एकम्, नंतर दहम्, तदनंतर शतम् अशा क्रमाने संख्येतील आकडे उजवीकडून डावीकडे सांगितले जातात. पण इथे सर्वोच्च स्थानापासून सर्वाधम स्थानाकडे आकडे सांगत जायचे असते. कधी कधी शिलालेख, ताम्रपट व पोथ्या-पुस्तके यांतून या पद्धतीने काल सांगितलेला आढळतो.

याशिवाय मलबार व तेलंगण या प्रदेशात पोथ्यांच्या पानांची संख्या दाखविण्यासाठी आणखी एका पद्धतीचा उपयोग केलेला आढळतो, तो असा– १ ते ३४ अंकांसाठी क ते ळ, ३५ ते ६८ साठी का ते ळा, ६९ ते १०२ साठी कि ते ळि, १०३ ते १३६ अंकांसाठी की ते ळी अशा क्रमाने बाराखड्यांची अक्षरे वापरतात. ब्रह्मदेशातील पोथ्यांमध्ये क–कः, ख–खः, ग–गः, इ. बाराखड्यांनी अनुक्रमे १ ते १२, १३ ते २४, २५ ते ३६ इ. संख्या दाखविण्याची पद्धत आहे. लंकेमध्ये ऋ, ॠ, लृ, ॡ या स्वरांचा समावेश करून प्रत्येक बाराखडी १६ अक्षरांची करीत व क–कः, ख–खः, ग–गः, इ. सोळाखड्यांनी १ ते १६, १७ ते ३२, ३३ ते ४८ इ. संख्या दाखविल्या जात. सर्व सोळाखड्या संपल्यावर २क ते २कः अशा तऱ्हेने पुढील संख्या दाखवीत.

अक्षरांनी संख्यानिर्देश करण्याची पद्धत पुष्कळ प्राचीन आहे. पाणिनीच्या अष्टाध्यायीमध्ये 'स्वरितेनाधिकारः' (१.३.११) असे सूत्र आहे. त्याचे तात्पर्य असे आहे, की एखाद्या सूत्रातील एखाद्या शब्दाची पुढील एका किंवा अधिक सूत्रांत अनुवृत्ती असेल, तर तन्निदर्शनासाठी त्या शब्दाचा स्वरित उच्चार करावा. अर्थात एवढ्याने त्या सूत्राची अनुवृत्ती असणाऱ्या सूत्रांची संख्या निश्चित होत नाही. पण या सूत्रावरील कात्यायनाची वार्तिके व कैयटाने दिलेली उदाहरणे, यावरून असे सिद्ध होऊ शकते की अनुवृत्त सूत्रांची संख्या दाखविण्यासाठी माहेश्वर सूत्रांतील वर्णांचा उपयोग करीत आणि उपयुक्त वर्णांचा माहेश्वर सूत्रांतील अनुक्रमांक अनुवृत्त सूत्रांची संख्या दाखवी. उदा० एखाद्या सूत्रावर ऐ अक्षर घातले असल्यास, ऐचे अष्टाध्यायीतील माहेश्वरसूत्रांत आठवे स्थान असल्याने त्या सूत्राची अनुवृत्ती पुढील आठ सूत्रांत आहे, असे समजत.

संस्कृतादी भाषांप्रमाणे अरबी-फार्सी भाषांमध्येही अक्षरांनी संख्या दाखविण्याची पद्धत आहे. तिला अब्तस किंवा हिसाब –इ– जुम्मल पद्धत म्हणतात. हिच्यामध्ये वाढत्या संख्या दाखविण्यासाठी घेतलेल्या अक्षरांचा क्रम पाहिला, तर असे वाटते, की हिची घडण फार प्राचीन काळी झाली असली पाहिजे. कारण हिच्यामधील अक्षरांचा क्रम सध्याच्या क्रमाहून भिन्न आहे. पहिल्या बावीस अक्षरांपर्यंत तो हिब्रू व फिनिशियन वर्णमालेतील अक्षरांशी जुळता आहे.

टिपूने आणखी एक नवीनच पद्धत सुरू केली होती. तिच्यात अरबी वर्णमालेची अक्षरे क्रमाने घेऊन त्यांस १ ते ९, १० ते ९०, १०० ते ९०० व १००० अशा किंमती दिल्या होत्या. हिच्यामधील पहिली चार अक्षरे अलिफ्, बे, ते, से, ही असल्याने हिला अब्तस पद्धती म्हणतात.

संस्कृत, अरबी, फार्सी या प्राचीन व अर्वाचीन युरोपीय भाषांमध्येही अक्षरांनी संख्यानिर्देश करण्याची पद्धत चालू होती व सध्याही आहे. घड्याळाच्या तबकडीवर तासांची संख्या, पुस्तकात ग्रंथगर्भाशिवाय प्रस्ताव, विषयप्रवेश, अनुक्रमणिका,

इत्यादींनी व्यापलेला पृष्ठांचा क्रम, जुन्या छापील पुस्तकांत मुख्यतः छपाईचे वर्ष, प्रतिमापत्रांचा क्रम, इ. व्यक्त करण्यासाठी अक्षरांचा उपयोग करतात. [ सं. मि. ]

**अक्षरविद्या** हृदयविद्या किंवा केंद्रविद्या हिचे नाव. जी वस्तू जीवित आहे, तिच्यामध्ये हृदय असते व त्याच्या केंद्रात अक्षर किंवा प्राणतत्त्व वास्तव्य करते. या प्राणतत्त्वामुळेच जीवित शरीरात हालचाल होत असते. गती, आगती व स्थिती या तिघांची समष्टी म्हणजे अक्षर होय. गतीला रुद्र, आगतीला विष्णू, आणि स्थितीला ब्रह्मा म्हटले आहे. अक्षरविद्या म्हणजे निराळ्या अर्थाने प्राणोपासनाच आहे. [भा. सा. ]

**अक्षरारंभविधी** मुलाला पाचवे वर्ष लागल्यावर त्याला अक्षरे लिहिण्यास शिकवायचे असते. याच्या विधीत अक्षतपुंजांवर गणपती, हरी, लक्ष्मी, सूत्रकार व विद्या यांच्या नावे सुपाऱ्या ठेवून त्यांचे आवाहन करतात. वाळूचे एक स्थंडिल करून त्यात पळसाची फांदी खोचतात व तिच्यावर सरस्वतीचे आवाहन करतात. मग सर्व देवतांची यथाविधि पूजा झाल्यावर अग्निस्थापना करून वरील देवतांच्या नाममंत्राने आहुती देतात. हा विधी हिरण्यकेशी ब्रह्मकर्मात सांगितला आहे. एवढे झाल्यावर मग आचार्य मुलाला 'ॐ नमः सिद्धम्' ही अक्षरे लिहायला शिकवितो. या अक्षरांना मातृका म्हणतात. मग देवतांचे उद्वासन (उत्थापन) करतात.

लौकिक विधीत एका फळीवर वस्त्रगाळ माती पसरून व मुलाचे बोट धरून त्याने 'श्रीगणेशाय नमः' 'ओनामासिधम्' ही अक्षरे गिरवून घेत. हा विधी पूर्वकाली दसऱ्याच्या किंवा वर्षप्रतिपदेच्या दिवशी करीत. सांप्रत हा विधी लुप्त झाला आहे. पाहा – विद्यारंभ. [ ऋ. ब्र. स. ]

**अक्षोभ्य** ध्यानी बुद्धांपैकी दुसरा बुद्ध. अमिताभाच्या खालोखाल याचे महत्त्व आहे. अद्वयवज्रसंग्रह या ग्रंथात याचे वर्णन आहे, ते असे–

नीलवर्ण. हुंकारातून उत्पन्न. द्विभुज. भूमिस्पर्श मुद्रेत असणारा. वज्रपर्यंकावस्थेत वसलेला व कृष्ण वज्र हे चिन्ह धारण करणारा.

याचा मंत्र 'आः वज्रधुक् हुम् ।' असा आहे. याचा एक स्वतंत्र स्वर्गलोक आहे, त्याचे नाव अक्षोभ्य व्यूह होय. याच नावाच्या ग्रंथात त्याचे वर्णन आहे. याच्या मूर्ती व चित्रे उत्तर भारतात सर्वत्र आढळतात. एखाद्या स्तूपावर याची पूर्वाभिमुख मूर्ती कोरलेली असते. हत्ती हे याचे वाहन होय. [ इं. बु. इ. ]

**अक्षौहिणी** भारतीय युद्धशास्त्राप्रमाणे सैन्याचा एक विभाग. अक्षौहिणीचा अर्थ रथसमूहयुक्त सेना. (अक्ष = रथ; ऊहिनी = समूहयुक्त.) अक्षौहिणीत २१,८७० रथ, तितकेच हत्ती, ६५,६१० घोडे व १०९,३५० पायदळातील सैनिक असत. अक्षौहिणीचे कोष्टक असे–

| | |
|---|---|
| ३ पत्ती | = १ सेनामुख |
| (१ रथ, १ हत्ती, ३ घोडे व ५ पदाती) | |
| ३ सेनामुख | = १ गुल्म |
| ३ गुल्म | = १ गण |
| ३ गण | = १ वाहिनी |
| ३ वाहिनी | = १ पृतना |
| ३ पृतना | = १ चमू |
| ३ चमू | = १ अनीकिनी |
| १० अनीकिनी | = १ अक्षौहिणी |

भारतीय युद्धात १८ अक्षौहिणी सेना होती, असे म्हणतात. पण महाभारताच्या आदिपर्वात व उद्योगपर्वात अक्षौहिणीची माहिती भिन्न दिली आहे. अक्षौहिणीचा अर्थ निश्चित सांगता येत नाही [ म. भा. उ. ]

**अज्ञातयौवना** एक नायिकाभेद. जिला आपल्या यौवनाच्या आगमनाची जाणीव नाही, अशी नायिका. हा मुग्धेतला एक भेद आहे. संस्कृतात हा भेद कोण्याही साहित्यशास्त्रज्ञाने स्वीकारला नाही. पण हिंदी कवींनी या जातीची नायिका मानली आहे. [ हिं. सा. को. ]

**अज्ञान** ज्ञानाचा अभाव किंवा अविद्या. सर्वदर्शनसंग्रहात याचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे –

अनादि भावरूपं यद्विज्ञानेन विलीयते ।
तदज्ञानमिति प्राज्ञा लक्षणं सम्प्रचक्षते ।।

अर्थ – अनादी, भावरूप (अनुमानप्रमाणाने) असे जे (काही) विज्ञानाने नाश पावते, ते अज्ञान होय, असे त्याचे लक्षण प्राज्ञ सांगतात.

अज्ञानाचे हे लक्षण मायावादी वेदान्त्यांचे आहे. भगवद्गीतेत ज्ञान व अज्ञान यांचे स्वरूप पुढील श्लोकात सांगितले आहे (१३.११).

अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।
एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ।।

अर्थ – अध्यात्मज्ञान नित्य आहे, अशी बुद्धी होणे व तत्त्वज्ञानाच्या सिद्धान्तांचे परिशीलन यांस ज्ञान म्हटले आहे. याखेरीज जे दुसरे, ते अज्ञान होय.

मनुष्यमात्राला जी दुःखे होतात, त्यांना अज्ञान हेच कारण आहे. आत्म्याचे अज्ञान म्हणजे तो परमानंदरूप आहे, हे न समजणे. त्यामुळे विषयभोगांकडे प्रवृत्ती होते. आत्मस्वरूपाच्या अज्ञानामुळेच विषयवासना होते व ती दुःखरूप असते. ही प्रक्रिया पुढीलप्रमाणे होते–अज्ञानापासून अविवेक, त्यापासून अभिमान, त्यापासून राग-द्वेष, त्यापासून कर्म, त्यापासून शरीरपरिग्रह व त्यापासून दुःख.

हे अज्ञान नष्ट करण्याचा मार्ग म्हणजे त्याचे प्रतियोगी जे ज्ञान, तेच मिळविले पाहिजे; त्यावाचून दुसरा उपाय नाही. आत्मा किंवा ब्रह्म स्वयंप्रकाश असल्यामुळे तिथे अज्ञानाचा प्रवेश होतोच कसा, ही या ठिकाणी आशंका आहे. तिचे उत्तर असे, की आत्मा व अज्ञान यामध्ये विरोध नाही. झोपेतून उठलेला माणूस आपल्या निद्रासुखाचा व त्या अवस्थेतील अज्ञानाचा अनुभव सांगतो. यावरून सुषुप्तीत आत्मानुभव व अज्ञान या दोन वस्तू एकत्र असू शकतात. इतकेच नव्हे; तर आत्मप्रकाश हा अज्ञानाचा साधक आहे; बाधक नव्हे. तसे नसते, तर इतका वेळ मला काही समजले नाही, असा स्वानुभव झोपून उठलेल्या माणसाने प्रगट केला नसता. मग ज्ञान व अज्ञान यांचा शास्त्रात व लौकिकात विरोध दिसतो तो का? या प्रश्नाचे उत्तर असे–

ज्ञानाचे प्रकार दोन–स्वरूपज्ञान व वृत्तिज्ञान. केवळ ज्ञप्तिरूप आत्मा ते स्वरूपज्ञान व घटज्ञान, पटज्ञान हे वृत्तिज्ञान. पहिल्याला विशेष चैतन्य व दुसऱ्याला सामान्य चैतन्य म्हणतात. ज्ञानाने अज्ञानाची निवृत्ती होते, हा नियम वृत्तिज्ञानाविषयी लागू आहे; स्वरूपज्ञानाविषयी नाही. उदा० काष्ठात व्यापून असलेला अग्नी काष्ठाला जाळीत नाही व अंधकाराचा नाशही करीत नाही. पण त्याच काष्ठाच्या मंथनातून प्रकट झालेला अग्नी ते काष्ठही जाळतो व वातीच्या आश्रयाने अंधाराचाही नाश करतो. त्याचप्रमाणे आत्म्याच्या सामान्य प्रकाशाने अज्ञानाचा नाश न झाला, तरी तेच आत्मचैतन्य वृत्तीमध्ये प्रविष्ट ( प्रतिबिंबित ) झाले असता अज्ञानाचा नाश होतो (ब्र. सि. मा.).

अज्ञानाला हृदयग्रंथी म्हटले आहे. सद्‌गुरूच्या उपदेशाने शिष्याच्या त्या हृदयग्रंथीचा भेद होतो. सद्‌गुरू ज्ञानांजनाच्या शलाकेने अज्ञानाने अंध झालेल्या शिष्याचे चक्षुरुन्मीलन (डोळे उघडणे) करतो. अज्ञान हे तमाचे फल आहे (गी. १४.१६.). अज्ञानामुळेच हा संसार आहे (योगतत्त्वोपनिषत् १६).

**अज्ञानमलपङ्कं यः क्षालयेज्ज्ञानतोयतः ।**
**स एव सर्वदा शुद्धो नान्यः कर्मरतो हि सः ॥**

(जाबालिदर्शनोपनिषद्)

अर्थ – ज्ञानाच्या जलाने जो अज्ञानाचा मल–चिखल धुवून काढतो, तोच सार्वकाल शुद्ध होय. दुसरा जो कर्मातच रमणारा, तो (शुद्ध) नव्हे. **पाहा – ज्ञान.**

## अज्ञानदास

शिवकालीन महाराष्ट्रीय शाहीर. याने अफझलखानाच्या वधावर पोवाडा रचला आहे. सर्व पोवाड्यांत हा पोवाडा जुना समजला जातो. त्यात कथानकाच्या अनुषंगाने तत्कालीन महाराष्ट्राच्या परिस्थितीवर काही प्रकाश पडतो. शिवाजी महाराजांनी या पोवाड्याच्या रचनेवर खूष होऊन त्याला सोन्याचा तोडा व एक घोडा बक्षीस दिला होता. हा पोवाडा एकतारीवर म्हणता येतो. [ म. सा.]

## अज्ञानवाद

ज्ञानाला तुच्छ करून अज्ञानातच मोक्ष आहे, असे मानणाऱ्या एका पंथाचे महावीराने वर्णन केले आहे. या पंथाची विचारसरणी अशी–

दोन भिन्न व्यक्तींचे ज्ञान भिन्न असू शकते. त्या दोन व्यक्तींतल्या ज्ञानविषयक चर्चा व वादविवाद यांच्या योगाने मने कलुषित होतात. त्यामुळे त्यांना अधिक काळ संसारबंधात राहावे लागते. पण ज्ञानच नसले, तर अभिमान व द्वेष उत्पन्न होत नाही व मोक्ष त्वरित मिळतो. ज्ञानामुळे इच्छा उत्पन्न होते व त्यामुळे जे कर्म घडते, त्याचे परिणाम अधिक तीव्र असतात. मनाच्या प्रेरणेवाचून केवळ शरीराने घडणाऱ्या कर्मांचे परिणाम फार वाईट व दुःखदायक नसतात आणि चांगले कर्म करून त्या परिणामांचा निरास करता येतो. म्हणून मुमुक्षूने अज्ञानात राहावे हे चांगले. मोक्षासाठी ज्ञान आवश्यक आहे असे क्षणभर मानले, तरी खरे ज्ञान कोणते हा प्रश्न शिल्लक राहतोच. प्रत्येक तत्त्वज्ञानी पुरुषाचे ज्ञान निराळे असते. महावीरासारखे पुरुष म्हणतात, की 'मला दिव्यज्ञान झाले आहे.' पण त्याला प्रमाण काय ? ज्ञानासंबंधी कोणत्याही विधानावर प्रमाणावाचून विश्वास ठेवता येत नाही. म्हणून ज्ञानापेक्षा अज्ञानच श्रेष्ठ होय.

अज्ञानवादाचे ६७ उपपंथ होते. [ स्कू. से. जै. लि. ]

## अज्ञानसिद्ध

(इ. स. चे १४ वे शतक) नागेश संप्रदायाचा एक प्रमुख कवी. नागेशाचा एक भक्त हेगरस याचे चरित्र उद्धवचिद्घनाने लिहिले आहे. त्यावरून अज्ञानसिद्धाचे चरित्र पुढीलप्रमाणे सांगतात. हेगरस हा सोलापूरजवळच्या मोहोळ गावी राहात होता. त्याला अहिल्या नावाची मुलगी होती. ती मसुरगावला दिली होती. तिला अज्ञानसिद्ध, विदेहसिद्ध व नरेंद्रसिद्ध असे तीन मुलगे होते. त्यांचे गोत्र जमदग्नी होते. अज्ञानसिद्धाला बालपणीच सिद्धी प्राप्त झाली म्हणून त्याला अज्ञानसिद्ध हे नाव मिळाले, असे सांगतात. मग त्याच्या आईने

त्याला नागनाथाला अर्पण करायचे ठरविले व त्याप्रमाणे वडवळ येथे जाऊन तिने त्याला अर्पण केले. नागनाथाने अज्ञानसिद्धाला साक्षात दर्शन देऊन त्याच्यावर कृपा केली. पुढे काही काळ वडवळला राहिल्यावर नागनाथाच्या आज्ञेने अज्ञानसिद्ध नरंद्याला जाऊन राहिला. हे नरंदे कोल्हापूर जिल्ह्यात हातकणंगले तालुक्यात आहे. तिथे त्याला अनेक भक्त मिळाले. तिथेच त्याने जिवंत समाधी घेतली.

नरंद्याला अज्ञानसिद्धाचा दत्तचैतन्य नावाचा एक प्रमुख शिष्य होता. त्यानेच गुरूची समाधी बांधली. अज्ञानसिद्धाची शिष्यपरंपरा फार मोठी असून, ती सर्वसमावेशक आहे.

अज्ञानसिद्धाने बरीच ग्रंथरचना केली आहे. तत्त्वबोध, जीव-ब्रह्मभेदलक्षण, पृच्छापत्र, काळज्ञान, संकटहरणी, हे त्याचे स्फुट ग्रंथ आहेत. संकटहरणी हे शिवरात्र-माहात्म्याचे स्तोत्र आहे. वरदनागेश हा अज्ञानसिद्धाचा महत्त्वाचा भाष्यग्रंथ असून, त्यात नागेश संप्रदायाचे तत्त्वज्ञान विशद केले आहे. हा ग्रंथ बारा अध्यायांमध्ये विभागला असून, त्याची ओवीसंख्या २१३१ इतकी आहे. या ग्रंथात पुढील विषयांचे विवरण आहे. स्वरूपानुभव-दृढीकरण, पंचीकृत उत्पत्ती, त्वंपद-तत्पदमिश्रित विवरण, पिंड-ब्रह्मांडऐक्य, स्थूलदेह, लिंगदेह, कारणदेह, महा-कारणदेह, तत्पददेहत्रय, तत्पदभेदनिरसन, महावाक्यविवरण, जीव-शिव ऐक्य, विकल्प-माया-निरास. पाहा — नागेश संप्रदाय. [जु. वा. न. सं.; वरदनागेश; नागेश संप्रदाय.]

## आंगिरस

अंगिरसाच्या वंशातल्या लोकांना हा शब्द कुलनाम म्हणून लावलेला आढळतो. यांची वंशावळही सापडते (छांदो. १.२.१०.; पं. ब्रा. २०.२१; तै. सं. ७.१.४.१). अंगिरसाने रथीतराच्या स्त्रीच्या ठिकाणी उत्पन्न केलेल्या ब्रह्मक्षत्र संततीलाही आंगिरस म्हणत. अंगिरस हा अथर्ववेदाचा प्रवर्तक होय. याच्या कुलातील ऋषींनी सत्र केले. यज्ञानुष्ठानात दूध लागते म्हणून त्यांनी एक गाय बाळगली होती. पण अवर्षणामुळे तिला चारा मिळेना आणि यज्ञात कुटलेल्या सोमरसाच्या चोथ्यावर त्या गायीचे पोषण होईना. त्यामुळे आंगिरसांना दुःख झाले. या गायीला पुरेसा चारा उत्पन्न करण्याची शक्ती जर आमच्यात नाही, तर आम्ही सत्र तरी कशाला करावे, असा विचार त्यांच्या मनात आला. मग त्यांनी कारीरी नामक इष्टी केली. त्यामुळे चारा पुष्कळ मिळू लागला; पण पितरांनी त्यात विष उत्पन्न केल्यामुळे गायीला तो चारा मानवेना. त्यासाठी मग त्यांनी पितरांना हविर्भाग दिला व त्यानंतर त्या गायीला निर्दोष चार मिळू लागला. ती खूप दूध देऊ लागली (तै. ब्रा. २.१.१.). यांनीच द्विरात्रयाग सुरू केला (तै. सं. ७.१.४.). पाहा— अंगिरस कुल. [प्रा. च. को.]

## आंगिरसस्मृती

या स्मृतीत बहात्तरच श्लोक आहेत. पण तो संक्षिप्त ग्रंथ असावा, असे म. म. डॉ. पां. वा. काणे मानतात. या संक्षिप्त ग्रंथात अंत्यजाचे अन्नोदक घेतल्यास व गायीला मारहाण केल्यास कोणते प्रायश्चित्त घ्यावे, ते सांगितले आहे.

याज्ञवल्क्याने धर्मशास्त्रकारांच्या यादीत अंगिरसाचे नाव दिलेले आहे. विश्वरूप, अपरार्क, मेधातिथी व हरदत्त यांनी आणि मिताक्षरा टीकेत अंगिरसाची आशौच, प्रायश्चित्त, सती, परिषद्, इ. विषयांवरील मते उद्धृत केलेली आहेत. [हि. ध.]

## आंजणा

एक कुणबी जात. हे लोक मुख्यत्वे गुजरातमध्ये आढळतात. यांची चेहेरेपट्टी राजपुतांप्रमाणे दिसते. पुरुष राजपुतांप्रमाणे कल्लेही राखतात. काही लोकांच्या नावाच्या शेवटी सिंग हे उपपद असते. यांच्यांत एकंदर ३३ गोत्रे असून त्यांच्यामध्ये रोटी-बेटी व्यवहार होतो. हे लोक मूळचे नवसारी प्रांतातल्या वन्यधर्मी चोध्रा वंशाचे असावे. अजूनही ते आपणास चोध्रा म्हणवितात. उत्तर गुजरातेतल्या राजपूत राजांनी या जातीतल्या काही लोकांना गाडी हाकण्यास ठेवले होते, असे म्हणतात. हे शेती करतात. यांच्यात रामानुज, शैव, आणि स्वामी नारायण असे पंथ आढळतात. औदीच, मेवाड, मोढ व नागर या ब्राह्मणांना पौरोहित्याला बोलावतात.

मुलाचे जातकर्म करतात. जुन्या काळी लग्ने ११ व्या वर्षापूर्वी करीत असत. विधवाविवाह व घटस्फोट रूढ आहेत. पुनर्विवाहाला 'नात्रू' म्हणतात. पूर्वीचा नवरा हयात असतानाही विशिष्ट कारणासाठी नात्रू लावता येते. हा विधी मंगळवारी किंवा रविवारी करतात.

**विवाहप्रथा** — सामान्य लग्नविधी पुढीलप्रमाणे असतो — मुलाच्या लहानपणीच त्याच्या लग्नाच्या वाटाघाटी सुरू होतात. मुलाजोगती मुलगी ज्याच्या घरी जन्मली असेल, त्याला वर-पिता दुसऱ्याच्या मार्फत विचारतो. वधूपित्याकडून रुकार मिळताच वराकडील मंडळी रुपया, गूळ व खोबऱ्याची वाटी घेऊन मुलीकडे जातात. मग वाटाघाटी होऊन लग्न ठरते. पंचांच्या संमतीने लग्नाचा मुहूर्त ठरतो. मग एका कलशावर गणपतिस्थापना करून 'माणेकस्तंभ' पुरतात. लग्नापूर्वी एक दिवस वराचा मामा त्याला पोषाख देतो. वरपिता त्याला पागोटे बांधतो. मामा वराच्या हाती कटचार देतो. वराची मिरवणूक वधूच्या मांडवाशी येताच वधूमाता वराच्या हाती नारळ देते. पुरोहित लाल सुतांच्या माळा बनवून त्या वधू-वरांना घालायला

देतो. मातीच्या कुंडात अग्नी आणून त्याच्या भोवती सप्तपदी होते. वधूमाता कंसार (शिरा) व तूप आणून ते वधू-वरांपुढे ठेवते. वर त्या पदार्थांना स्पर्श करून सासूचा पदर धरतो. तिने मनाजोगती देणगी देण्याचे कबूल केल्यावर मग तो तिचा पदर सोडतो. नंतर वरमाता वधू-वरांवर अक्षता टाकते. वधूकडील पोक्त मनुष्य वधूला वराकडील पोक्त माणसाच्या मांडीवर बसवितो. एवढे झाल्यावर लग्न संपते. वधू वयात आलेली असल्यास त्याच वेळी तिला सासरी नेतात. लहान असल्यास माहेरीच ठेवतात. मुलीच्या पाठवणीच्या वेळी तिचा बाप जावयाला व वरपिता मुलीला वस्त्र-भूषणे देतो.

**मर्तिकप्रथा** – मृतासाठी रडायला बायकांना बोलावितात. त्यांना शिजविलेले गहू किंवा जोंधळे देतात. [ल. वि. सो.]

## आंडय्या

(इ. स. चे ११ वे शतक) एक कन्नड कवी. आंडय्याने काव्यरचना करण्यापूर्वी अशी प्रतिज्ञा केली होती, की मी माझ्या काव्यात एकाही संस्कृत शब्दाचा प्रयोग करणार नाही. या प्रतिज्ञेप्रमाणे त्याने कविगरकावा किंवा सोबगिन सुग्गी नामक ग्रंथ रचला. त्यामुळे त्याला साहित्यिक व ऐतिहासिक असे दोन्ही दृष्टींनी महत्त्व प्राप्त झाले आहे.

## आंडाळ

तमिळनाडमधली एक भक्त व कवयित्री. बारा आळवारांत हिची गणना होते. हिला 'दख्खनची मीरा' म्हणतात. इ. स. च्या आठव्या शतकाच्या उत्तरार्धात हिचा जन्म झाला. विष्णुचित्त नामक एका वैष्णव भक्ताला तुळशीच्या वनात नुकतीच जन्मलेली एक मुलगी सापडली. भगवंताच्या आदेशाला अनुसरून त्याने ती मुलगी घरी आणली व तिचे 'कोदई' असे नाव ठेवले. कोदई म्हणजे फुलांच्या हाराप्रमाणे कमनीय होय. बालपणापासूनच हिची कृष्णावर भक्ती जडली. त्याला सोडून अन्य कुणाला वरायचे नाही, असे तिने ठरविले व त्याप्रमाणेच ती वागली.

पुढे भगवंताची कृपा व प्रेम प्राप्त झाल्यावर तिला आंडाळ हे नाव मिळाले. विष्णुचित्ताला देवाच्या गळ्यात घालण्यासाठी फुलांचे हार गुंफून देण्याचे काम आंडाळकडे होते. परंतु त्याआधी तो हार आपल्या गळ्यात घालून ती एका आरशात स्वतःचे सौंदर्य निरखी. विष्णुचित्ताला या गोष्टीचा पत्ता नव्हता. पण एक दिवस हारात एक केस सापडला. त्यामुळे तो हार शिळा समजून त्याने तो रंगनाथाच्या गळ्यात घातला नाही. हा अपराध आपल्या मुलीचा आहे, हे समजल्यावर तो आंडाळवर खूप रागावला. पण त्या रात्री रंगनाथाने स्वप्नात येऊन विष्णुचित्ताला सांगितले, की आंडाळने आधी गळ्यात घातलेला पुष्पहारच मला अधिक प्रिय आहे. त्यावरून विष्णुचित्ताला तिच्या भक्तीची कल्पना आली. एक दिवस रंगनाथाने 'आंडाळबरोबर माझा विवाह करा' असा देवालयाच्या अधिकाऱ्यांना आदेश दिला. त्याप्रमाणे अधिकाऱ्यांनी इतर उत्सवांप्रमाणेच रंगनाथाचा हा लग्नसोहळा साजरा केला. आंडाळ मंदिरात आल्याबरोबर रंगनाथाच्या शेषशय्येवर चढली. त्याबरोबर सर्वत्र दिव्य प्रभा पसरली व त्या तेजात ती विलीन होऊन गेली, अशी ही आख्यायिका आहे. द. भारतातील वैष्णवमंदिरांत अद्यापही प्रतिवर्षी आंडाळ व रंगनाथ यांचा विवाहसोहळा साजरा होतो.



आंडाळ

आंडाळची भक्ती प्रेम व कारुण्य यांनी ओथंबलेली आहे. श्रीहरीच्या नामसंकीर्तनात ती स्वतःला विसरून गेलेली आहे. रंगनाथ (श्रीकृष्ण) पती मिळावा म्हणून तिने गोकुळातल्या गोपींप्रमाणे कात्यायनीव्रत केले होते. ते व्रत 'पावै व्रत' या नावाने अद्यापही तमिळनाडमधल्या कुमारी करतात. तिरुप्पावै नावाचा एक संग्रह आंडाळने मुख्यतः या व्रतासाठी रचलेला आहे. नच्चियार तिरुमोळी हा तिचा दुसरा काव्यग्रंथ होय. आजही तमिळ स्त्रिया माघ मासी प्रातःकाळी व्रताच्या स्नानासाठी जात असताना त्या ग्रंथातली आंडाळची गाणी प्रेमाने म्हणतात. त्यांतली काही गीते नायिकेला जागे करण्यासाठी आहेत. काही गीतांतून 'नप्पिन्नै' म्हणजे राधा हिला उपालंभ (टोमणा) आहे. कारण भक्तस्त्रिया पूजेसाठी मंदिरद्वारात येऊन उभ्या राहिल्या, तरी नप्पिन्नै आपली कृष्णाला जवळ घेऊन झोपलेलीच असते. आंडाळ म्हणते—

मैत्तडं कण्णिनाय् । नी उन् मणाल नै
ॲत्तनै पॉदुम् तुयिलॅळ् वॉट्टाय काण
ॲत्तनै एळुम् पिरिवाट्र किल्ळायाळ्
तत्तुवमन्ऱु तकवेॅलो रॅम्पावाय्

**अर्थ** – हे नप्पिन्नै, तू आपल्या प्रियतमाला किती वेळपर्यंत आपल्या मायानिद्रेत असे गुंगवून ठेवणार आहेस ? तुला क्षणभरही वियोग सहन होत नाही काय ? हे काय योग्य झाले ?

आंडाळ ही तिचा आराध्य देव कृष्ण याच्या अनुग्रहासाठी तळमळत होती. तिला गोकुळात जाऊन गोपीचे जीवन जगण्याची

उत्कंठा लागली होती. त्याच भावनेने ती एका गीतात म्हणते –

करवंकळ पिन्चॅरू कानम् चॅर्दुन्बोम्
अरिवॉन्रूमिळ्ळाद आयकुळुत्तु उन्दन्नैप्
पिरवि पॅरुन्दनै पुण्णियम् यामुडै योम
कुरैवान्रूमिळ्ळाद गोविंदा। उन्दन्नोडु
उखेळु नमक्कु इंगु ऑळिक्क ऑळियादु

अर्थ – हे कृष्णा, आम्ही तुझ्यासह वनात गायी चारायला येत आहो. तिथेच आमचे जीवन आहे. कारण तू आम्हां अडाणी गवळ्यांच्या घरी जन्म घेतलास ना! म्हणून आमचे नशीव उगवले. हे गोविंदा, तुझा आमचा संबंध आता अतूट आहे. आम्ही प्रेमविव्हल होऊन तुझ्या नावाचा पुकारा करतो. त्यावद्दल आम्हांला क्षमा कर.

आराध्य कृष्णाला आवडतील अशा गोष्टींचा संकल्प, त्याला प्रतिकूल अशा गोष्टीचे वर्जन, दृढ विश्वास, रुसवा, देवावर सर्व भार, आत्मसमर्पण आणि दीनता हे भाव आंडाळच्या सर्व काव्यांत ठळकपणे दिसतात. [ भा. सं. ]

**आंडी** तमिळनाडमधले वैरागी. शूद्रांच्या अनेक जातींतून यांची जमात बनलेली आहे. जोगी, जंगम, कोविल, मुद्रव असे यांचे पोटभेद आहेत. सगळेच आंडी भिक्षा मागत नाहीत. काहीजण मंदिरात देवाच्या सेवेचे काम करतात; काही लग्नात व पशुवली देत असताना पौरोहित्य करतात. भिक्षा मागणारे हाताने घंटा वाजवितात. [ का. ट्रा. स. इं. ]

**आंदोलन व्रत** एक तिथिव्रत. या व्रतात चैत्र शुद्ध तृतीयेस शिव आणि पार्वती यांच्या मूर्तींची पूजा करतात व दोल्यावर बसवून त्यांना झोके देतात. फल—सौभाग्य-प्राप्ती. पाहा – चैत्रगौर [ हिं. ध. ]

**आंधळी कोशिंबीर** लहान मुला-मुलींचा एक खेळ. प्रारंभी हा खेळ फक्त मुलीच खेळत होत्या असे दिसते. विद्याकल्पतरू नामक ग्रंथात लपंडावालाच आंधळी कोशिंबीर म्हटले आहे. पण या दोन खेळांत फरक आहे.

आंधळी कोशिंबीर हा खेळ खेळण्यासाठी साधारणपणे दहाहून कमी मुले लागतात. नाहीतर खेळात रंगत येत नाही. खेळ खेळताना मुले प्रथम चकतात आणि एकावर राज्य देतात. ज्याच्यावर राज्य येते त्याचे डोळे बांधतात आणि इतर मुले त्याच्या भोवती पळतात. ज्याला तो आंधळा शिवेल त्याच्यावर राज्य येते. राज्य येणारा पुन्हा आंधळा बनून खेळू लागतो. अशा प्रकारे हा खेळ बराच वेळ चालतो. खेळासाठी ठराविक मैदान असते. खेळगड्यांनी त्या मैदानाच्या बाहेर जायचे नाही, असा नियम असतो. पाहा – लपंडाव. [ म. ज्ञा. को. खंड ७ वा; स. म. खे. पु.; कोल्हा. गॅझे.; सु. वि. को. ]

**आंध्र प्रदेश** भारतीय संघराज्यातील एक घटक राज्य. १ ऑक्टोबर १९५३ या दिवशी या राज्याची स्थापना झाली. भाषिक तत्त्वानुसार स्थापना झालेले हे पहिलेच राज्य होय. १ नोव्हेंबर १९५६ रोजी तेलंगणाचाही काही प्रदेश या राज्यात समाविष्ट करण्यात आला. याचे क्षेत्रफळ २,७६,८१४ चौ. किलोमीटर असून, लोकसंख्या सुमारे साडेचार कोटी आहे. पूर्वेला बंगालचा उपसागर, पश्चिमेला महाराष्ट्र व कर्नाटक, दक्षिणेला तमिळनाडू आणि उत्तरेला महाराष्ट्र, मध्य प्रदेश व ओडिसा अशा आंध्र प्रदेशाच्या चतु:सीमा आहेत. हैदराबाद ही या प्रदेशाची राजधानी आहे.

आंध्राचे मुख्य तीन विभाग आहेत, ते असे –(१) समुद्र-किनारी प्रदेश–यात श्रीकाकुलम, विशाखापट्टनम, पश्चिम गोदावरी, पूर्व गोदावरी, कृष्णा, गुंटूर व नेल्लोर हे ७ जिल्हे येतात. (२) पठारी प्रदेश किंवा तेलंगण – यात महबूबनगर, हैदराबाद, मेदक, निजामाबाद, आदिलाबाद, करीमनगर, वरंगळ, खम्माग व नलगोंडा हे ९ जिल्हे आहेत. (३) रायलसीमा–यात चित्तूर, कडप्पा, अनंतपूर व कर्नूल या जिल्ह्यांचा समावेश होतो.

समुद्रकिनारी भाग समृद्ध आहे. इथली भूमी अत्यंत सुपीक आहे. इथे पाऊसही पुष्कळ पडतो. त्यामुळे वर्षातून इथे तीन पिके निघतात. फळे आणि भाजीपालाही तऱ्हेतऱ्हेचा पिकतो. या भागाच्या एका बाजूला डोंगर आहेत. त्यांची उंची चार हजार फुटांपेक्षा अधिक नाही. या डोंगरांना उत्तरेला आनंदगिरी, मध्यभागी नल्लमलै व श्रीपर्वत व काही ठिकाणी यर्रमलै अशी नावे आहेत. या डोंगरांतच सिंहाचलम, श्रीशैलम व तिरुपती ही पुण्यक्षेत्रे आहेत.

तेलंगणात फारसा पाऊस पडत नाही आणि तिथली जमीनही तेवढी सुपीक नाही. पण या भागात अनेक नद्या आणि तलाव आहेत. त्यांच्या पाण्यावर शेती होते. रायलसीमा भाग मात्र नेहमी दुष्काळग्रस्त असतो.

आंध्राला नद्यांचा प्रदेश असे म्हणता येईल. कारण यातून लहान-मोठ्या सुमारे चौतीस नद्या वाहतात. त्यांपैकी गोदावरी, कृष्णा, पेन्नार, वंशधारा व नागवल्ली या मुख्य आहेत.

खनिज संपत्तीच्या दृष्टीनेही हा प्रांत समृद्ध आहे. इथे दगडी कोळसा, अभ्रक, मॅंगेनीज, लोखंड, ॲसबेस्टॉस, इ. खनिजांच्या खाणी आहेत.

विशाखापट्टनम्, काकिनाडा (कोकोनाडा) व मच्छलीपट्टम्

ही आंध्रातली प्रमुख बंदरे व हैदराबाद, विजयवाडा, गुंटूर, वरंगळ ही प्रमुख शहरे होत.

बौद्धधर्माच्या उत्कर्षकालात या प्रदेशाला मंजीरदेश, वज्रदेश व नागभूमी अशी तीन नावे होती. तेलुगू व तेनुगू हे दोन्ही शब्द समानार्थक असले तरी त्यांच्या व्युत्पत्तीबद्दल विद्वानांत मतभेद आहेत. काहींच्या मते तेलुगू शब्दाचे मूळ रूप त्रिलिंग आहे, तर काहींच्या मते त्रिकलिंग आहे. प्रतापरुद्रयशोभूषण या ग्रंथाचा कर्ता विद्यानाथ म्हणतो, की श्रीशैल, कालेश्वर व द्राक्षाराम यांच्या अंतर्गत जो भूभाग येतो, तो त्रिलिंग होय. कारण या भागात मल्लिकार्जुन, कालेश्वर व भीमेश्वर ही तीन शिवलिंगे आहेत. या त्रिलिंग देशात जी शिवमंदिरे आहेत, त्यांनी आंध्र संस्कृतीला एक विशिष्ट स्वरूप प्राप्त करून दिले आहे. या भागात लहान-मोठे पुष्कळ तलाव असून, त्यांच्या काठी सर्वत्र शिवमंदिरे उभारलेली आहेत. त्रिलिंग-संस्कृतीला तडागसंस्कृती असे म्हटले, तरी ते शोभून दिसेल. या भागाचे जीवनच या तलावांत गुंतलेले आहे. या प्रत्येक तलावाच्या तळाशी काहीना काही चित्तवेधक इतिहास दडलेला आहे. प्रजेचे दुःख निवारण करण्यासाठी एका राजाने देवीकडे वर मागितला, की 'माझ्या हातून एक मोठा तलाव निर्माण होऊ दे.' त्यावर देवी त्याला म्हणाली, 'तू हातात एक काठी घेऊन ती भूमीवरून ओढीत चल. मात्र तसे करताना मागे पाहू नको. तू जिथवर जाशील, तिथवर मी पाणी आणून सोडीन.' राजा त्याप्रमाणे वरीच भूमी चालत गेला. पुढे त्याला राहवेना. त्याने मागे वळून पाहिले, तेव्हा देवी तिथेच थांबली. पण तेवढ्याने सुमारे तीन कोस विस्तीर्ण असे तळे त्या भूमीवर निर्माण झाले.




श्रीशैलाजवळच्या कंबम येथील तलावाचीही अशीच कथा आहे–विजयनगरचा सम्राट् कृष्णदेवराय याने उत्कलराजकन्या जिंकून आणली होती. पुढे त्याला कळले, की ती आपल्या वधाचा प्रयत्न करीत आहे. त्यामुळे तो तिच्यावर नाराज झाला व त्याने तिला परत उत्कलदेशात पाठवून दिले. जाताना ती कंबम येथे काही काल राहिली व आपल्याजवळचे द्रव्य खर्चून तिने तिथे एक तलाव बांधला. त्या तलावामुळे हजारो लोकांचे जीवन सुखी झाले. थोड्याच कालात ही गोष्ट कृष्णदेवरायाच्या कानी गेली व तिच्यावरचा राग सोडून त्याने तिला परत आपणाकडे आणले.

आंध्र लोकांचा उल्लेख प्रथमतः ऐतरेय ब्राह्मणात येतो. विश्वामित्राला एकशे एक पुत्र होते. त्यांतले पन्नास मधुच्छंदाहून मोठे व पन्नास लहान होते. मोठ्या पन्नास पुत्रांनी शुनःशेप या विश्वामित्राच्या मानलेल्या पुत्राला भाऊ मानण्याचे नाकारले. तेव्हा विश्वामित्राने त्यांना शाप दिला, की 'तुमची संतती शूद्र होईल.' त्या शापाप्रमाणे त्यांची संतती आंध्र, पुंड्र, शबर,

पुलिंद, इ. नावांनी दस्यू म्हणजे शूद्र बनली (ऐ. ब्रा. ३.६.१८). या दस्यू शब्दावरून आंध्र लोक हे दक्षिणेतील जमाती टोळ्यांपैकी होते व त्यांची वस्ती कृष्णा व गोदावरी यांच्या मधल्या प्रदेशात होती, असे समजते. मेगॅस्थिनीस यांच्या लिखाणाचा आधार घेऊन व्हिन्सेंट स्मिथने लिहिले आहे, की चंद्रगुप्त मौर्याच्या काळात श्रीकाकुलम् येथे आंध्रांची राजधानी असून, चंद्रगुप्ताच्या सैन्याच्या खालोखाल भरेल, इतके आंध्रांचेही सैन्य मोठे होते. हे लोक वैदिक धर्म मानीत असले, तरी त्यांचा ओढा बौद्ध धर्माकडे होता म्हणूनच त्यांना पुराणांत शूद्र म्हटले आहे (भाग. पु. १२.१).

मौर्यांनी आंध्रांवर आपली पूर्ण सत्ता स्थापन केली होती की नाही व केली असल्यास ती कोणत्या कालात, याचा नक्की शोध लागत नाही. पण अशोक मौर्याने शस्त्रसंन्यास केल्यावर थोड्याच कालात इतरांप्रमाणेच आंध्रांनीही आपला राज्यविस्तार करायला प्रारंभ केला असावा, असे अनुमान निघते.

अशोकाच्या शिलालेखातही या सातवाहनांचा उल्लेख आढळतो. यांपैकी शातकर्णी हा दक्षिणापथाचा पती म्हणून प्रसिद्ध होता. याने प्रतिष्ठान येथे आपली राजधानी स्थापून अश्वमेध केला व आपल्या कुलाला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. (सनपूर्व १ ले शतक) मध्यंतरी काही काळ शकनेता नहपान याने सातवाहनांच्या सत्तेला पायबंद घातला होता; पण गौतमीपुत्र शातकर्णी याने शक-यवनादी परकीयांचा पराभव करून महाराष्ट्र, सौराष्ट्र, अपरान्त, विदर्भ व अवंती इथवर पुन्हा सातवाहनांची सत्ता प्रस्थापित केली (इ. स. १०६–१३०). यज्ञश्री शातकर्णी हा त्या वंशातला शेवटचा राजा होय (इ. स. १७४–२०३).

पुराणांत ज्याला आंध्र म्हटले आहे, तो वंश सातवाहन या नावाने प्रख्यात आहे. त्या वंशाचे राज्य महाराष्ट्रात होते. त्या वंशाच्या राजवटीच्या उत्तरार्धात, इ. स. दुसऱ्या शतकात, त्याची सत्ता आंध्र प्रदेशावर होती. पण इ. स. च्या तिसऱ्या शतकाच्या प्रारंभी ती नष्ट झाली. त्यानंतर इक्ष्वाकू वंशाचे राज्य तिथे काही काल होते. मात्र ते कृष्णा–गुंटूर भागापुरतेच मर्यादित होते. इक्ष्वाकू वंशाचा पराभव करून पल्लव वंशाने तिथे आपली सत्ता स्थापली, ती इ. स. च्या ६ व्या शतकाच्या अंतापर्यंत चालू होती. त्याच वेळी कृष्णा व गोदावरी या नद्यांच्या दुआवात वेंगी येथे स्वतंत्र राज्याची स्थापना झाली. तिथे प्रथम शालंकायन व नंतर विष्णुकुंडिन या वंशांनी राज्य केले. त्यानंतर बादामीच्या चालुक्यांच्या एका शाखेने ४०० वर्षे वेंगीदेशावर राज्य केले (चालुक्य राजवंश पाहा).

आंध्रात एका काळी बौद्ध धर्माचा बराच प्रसार झाला होता. पण राजराजनरेंद्राच्या पूर्वीच चारशे वर्षे आंध्रातला बौद्ध धर्म ऱ्हास पावला. चालुक्य राजे शैव होते. त्यामुळे त्यांच्या राज्यांत शैवपंथाचीच चलती होती. शैवाप्रमाणेच शाक्त पंथानेही आंध्रात प्रवेश केला होता. समाजात ब्राह्मणांचे वर्चस्व होते. चालुक्य राजे क्षत्रिय नव्हते; पण ते स्वतःला क्षत्रिय म्हणवून घेत. त्या काळचे बरेचसे राजवंश स्वतःला सूर्य किंवा सोम वंशातले म्हणवून घेऊन आपली प्रतिष्ठा वाढवीत. चालुक्य राजे विद्या-कलांचे भोक्ते होते. आंध्रात देशी काव्याला चालुक्यांनीच उत्तेजन दिले, असे नन्नय्य चोडू सांगतो. राजराजनरेंद्र चालुक्याच्या दरबारात अनेक कवी व विद्वान् होते. षड्दर्शनांच्या अध्ययनासाठी राज्यात जागोजाग विद्यालये होती. त्याच्या काळात दक्षिणेतल्या शिल्पकलेचाही बराच उत्कर्ष झाला. त्या काळात लोकांच्या न्यायनिवाड्यासाठी ग्रामपंचायती असत. त्यांचे सभासद विद्वान्, सत्यवादी व निःस्पृह असत.

**काकतीय राजे** – आंध्रामध्ये वरंगळ येथे इ. स. ११५० ते १३२५ या कालात काकतीय राजांनी राज्य केले. काकतीय हे मुळात राष्ट्रकूट असले, तरी त्यांचे आंध्रीकरण फार लवकर झाले. मान्यखेटाच्या राष्ट्रकूटांचे हे मांडलिक होते. पण वेंगीचे चालुक्य जेव्हा तमिळनाडूमधल्या चोळ राजांच्या गादीवर हक्क सांगू लागले, तेव्हा त्या दोन सत्तांमध्ये संघर्ष सुरू झाला. त्यात काकतीयांनी चालुक्यांना मदत केली. चालुक्य युवराज कुलोत्तुंग या नावाने चोळ राज्याच्या गादीवर बसला. अशा प्रकारे एक राजसत्ता दोन्ही प्रदेशांचा कारभार पाहू लागली. याचा परिणाम म्हणून चालुक्यांचे आंध्रावरचे लक्ष कमी झाले. त्याचा फायदा काकतीयांनी घेतला. त्यांनी चालुक्यांची आंध्रावरची उरली-सुरली सत्ता नष्ट करून शंभर वर्षांच्या अविरत प्रयत्नांनंतर सर्व आंध्र देशात एकछत्री साम्राज्य उभे केले.

या दोनशे वर्षांच्या काळात (१११० – १३२०) आंध्रात अनेक धार्मिक व सामाजिक चळवळी प्रचंड प्रमाणात झाल्या. चालुक्यांच्या अखेरच्या काळात तिथे जैन धर्म प्रबल झाला होता. काकतीय राजेही प्रथम जैनच होते. त्यांनी जैन धर्माला व जैन धार्मिक संस्थांना उदार आश्रय दिला. पुढे ते शैव बनले. त्यामुळे आंध्रात शैवपंथाची चळवळ फोफावली व त्या पंथाच्या दोन शाखा प्रबल झाल्या. एक अद्वैतवादी शैव पंथ आणि दुसरा बसवप्रणीत वीरशैव (लिंगायत) पंथ. दक्षिण आंध्रात रामानुजांच्या विशिष्टाद्वैत मताने वळ धरले. रेड्डींनी शैवमताचा स्वीकार केला, तर वेलमांनी वैष्णव मत स्वीकारले. प्रत्येक पंथ आपापल्या वर्चस्वासाठी प्रयत्न करू लागला. शास्त्रार्थ व वादविवाद यांच्या बळावर वीरशैवांनी जैनांना आपल्या धर्मात ओढण्याचा खूप प्रयत्न केला; पण जैनांनी त्यांना दाद दिली नाही. त्यामुळे वीरशैव त्यांच्यावर उलटले. त्यांनी जैनांची अनेक ठिकाणी

हिंसा केली. अनेक राजांना अंकित करून त्यांनी त्यांना वीरशैवपंथाची दीक्षा दिली व आपण त्यांचे मंत्री आणि सेनापती बनले. जैनांच्या मूर्तींचा उच्छेद करून त्यांनी त्या त्या जागी लिंगस्थापना केली.

अशा प्रकारे जैन धर्माचे आंध्रातून उच्चाटन झाल्यावर मग वीरशैव व वीरवैष्णव यांच्यांत स्पर्धा सुरू झाली. दोन्ही पंथांनी सर्व जातींत आपले अनुयायी वाढविण्यासाठी कंबर कसली. शैवांनी आपल्या अनुयायांच्या गळयांत लिंग अडकवले, तर वैष्णवांनी आपल्या अनुयायांच्या शरिरावर तप्त मुद्रा ठोकल्या. जातीपातींचा भेद न धरता त्यांनी आपले संप्रदाय वाढविले.

काकतीयांच्या कालात समाजामध्ये अनेक अनुलोम-प्रतिलोम विवाह घडून आले. आजकाल दक्षिणेत अन्नछत्रांमध्ये केवळ ब्राह्मणांना भोजन मिळते; पण काकतीयकालात तिथे सर्व जातींना भोजन मिळे. शैव संप्रदायांच्या छत्रांत तर अस्पृश्यांनाही अन्न-वस्त्र दान मिळण्याची व्यवस्था होती.

काकतीयांनी अनेक शिवमंदिरे बांधली व जागोजाग आपले शिलालेख खोदविले. त्यांनी ललितकलांचाही विकास केला. अनेक ठिकाणी कलाशाला निर्माण केल्या. त्यांच्या कारकीर्दीत चित्रकलेचीही अभिवृद्धी झाली. त्या काळातले लोक चित्रित पदर नसलेली साडी किंवा धोतर नेसणे अशुभ समजत. घरांच्या भिंती चित्रित करण्याचीही प्रथा होती. आंध्रातील मलमल प्राचीन कालापासून प्रसिद्ध आहे. मछलीपट्टम् हे मलमल विणण्याचे एक मोठे केंद्र होते. वरंगळ येथे लोकरीची सुंदर कांबळी बनत होती. रेशमाचाही मोठा धंदा होता. रेशमी विणकाम कलाकुसरीचे होत असे. चंदनकावू, पट्टेडुकावू, कादंबकावू, कारकंचुवोम्मंचू, रुद्राक्षवन्ने, नागावंधनम्, तारा-मंडल, हंसावली, लक्ष्मीविलास, वसंतविलास, रायशृंगार, इ. रेशमी वस्त्रांचे अनेक प्रकार होते.

काकतीय राजे प्रजाहिततत्पर होते. आपल्या राज्यात त्यांनी औषधालये व प्रसूतिगृहे स्थापली होती. इ. स. च्या १३ व्या शतकाच्या उत्तरार्धात सुप्रसिद्ध काकतीय राणी रुद्रमहादेवी हिने वेलगपुडी नावाचे एक गाव लोककल्याणार्थ दान देऊन तिथे एक मठ व धर्मसत्र स्थापिले होते. त्या गावाच्या रक्षणासाठी वीरभद्र व वीरमुष्टी अशी उपाधी असलेले शिपाई नियुक्त केले होते.

काकतीयकालात आंध्रामध्ये अनेक तलाव बांधले गेले. कारसमुद्र, चौडसमुद्र, साब्विसमुद्र, गौरसमुद्र, कोमटीसमुद्र, इ. नावांनी ते प्रसिद्ध आहेत. मोटुपल्ली व मछलीपट्टम् ही त्या काळची प्रसिद्ध बंदरे होत. तिथून पूर्व-पश्चिमेच्या देशांत व्यापार चाले. बंदरात तटकर घेतला जाई. वेगवेगळ्या करांचे दर एका शिलेवर कोरून ठेवलेले असत.

काकतीय राजांनी सोन्याचांदीची नाणीही पाडली होती.

वरंगळचा किल्ला गणपतीदेव याने बांधला. त्या किल्ल्याला सात कोट होते. सर्वांत आतल्या शिलाकोटात राजाचा निवास असे. शैव पंथ स्वीकारल्यावर काकतीयांनी वरंगळ येथे सहस्रस्तंभी शिवमंदिर बांधले. काकतीयांचे सैन्यही मोठे म्हणजे नऊ लाख होते, असे म्हणतात. भाले व तलवारी ही त्यांची महत्त्वाची आयुधे होती. बरेचसे सैन्य सरहद्दीवरील सरदारांच्या हाताखाली असे. हे सरदारच पुढे काकतीयांच्या पतनानंतर आंध्रातल्या लहानमोठ्या राज्यांचे संस्थापक बनले.

वरंगळ शहरात अनेक अभ्यागतगृहे होती. तिथे कुंटणखानेही चालत. राजे, सामंत व धनिक लोक रखेल्या ठेवीत व समाजातही उघडपणे त्यांना बरोबर नेत. कोंबड्यांची, बकऱ्यांची झुंज, बुद्धिबळे व कळसूत्री बाहुल्यांचा खेळ, ही त्या काळची मनोरंजनाची साधने होती.

**रेड्डी व वेलमा** – काकतीयांच्या पतनानंतर त्यांच्या हाताखालच्या सरदार-सेनापतींनी जी स्वतंत्र राज्ये स्थापिली, त्यांत रेड्डी व वेलमा यांची राज्ये प्रमुख होती. रेड्डींनी इ. स. १३२४-१४३४ पर्यंत राज्य केले. कर्नूल ते विशाखापट्टनम इथवर त्यांचा राज्यविस्तार होता. रेड्डी हे शेतकरीवर्गातून वर आलेले होते. त्यांनी वीरशैव पंथ स्वीकारला होता. त्यांनी अनेक शिवसूत्रांचा उद्धार केला. ते दिवसातून सहा वेळा शिवाची पूजा करीत. त्यांनी व त्यांच्या मंत्र्यांनी शैव धर्माचा खूप प्रचार केला. श्रीशैल पर्वतावर चढण्यासाठी रेड्डी राजांनीच पायऱ्या बांधल्या.

त्या काळात शिवाची शक्ती या नात्याने अनेक देवींची पूजा केली जात असे. नूकांब, घट्टांबिक, मणिकादेवी, एकवीरा या देवी प्रसिद्ध होत्या. तिथल्या शैव पंथात पुढे तांत्रिक वामाचारही शिरला. बरेच तंत्रसाहित्यही निर्माण झाले. शिवलिंगाच्या पूजाप्रसंगी आत्मबलिदान करणाऱ्या व्यक्तींची गणना वीर पुरुषांत होऊ लागली. त्यांचे स्मारक म्हणून लोक जागोजाग वीरशिला उभ्या करू लागले. कित्येक एकांतिक शिवभक्त मोक्षाच्या आकांक्षेने कनुमारी नामक मार्ग स्वीकारू लागले. कनुमारी म्हणजे श्रीशैल पर्वताच्या एका विशिष्ट कड्यावरून उडी घेऊन आत्मघात करणे होय.

रेड्डी हे शेतकरी वर्गातले असूनही यज्ञयाग, सोमपान, इ. क्षत्रियकर्मे करीत. इतकेच नव्हे; तर चोळ, पल्लव, इ. क्षत्रिय राजांशी त्यांनी विवाहसंबंधही जोडले होते. रेड्डी राजांना ब्राह्मणांविषयी अत्यंत आदर होता. त्यांनी विद्वान ब्राह्मणांना अग्रहार दिले होते. त्यांच्या दातृत्वाची कीर्ती ऐकून दूरदूरच्या प्रदेशांतली ब्राह्मणकुटुंबे आंध्रप्रदेशात आली व रेड्डींच्या आश्रयावर तिथे स्थायिक झाली.

आंध्रात सर्व जमीन राजाच्या मालकीची असे. ठराविक काळासाठी ती शेतकऱ्यांना कसण्यासाठी दिली जाई. शेतकरी आपल्या बैलांच्या संख्येनुसार भागीदारीत शेती करीत. बलुतेदारांना धान्यातला ठराविक वाटा देऊन व राजासाठी एक-षष्ठांश भाग बाजूला काढून मग उरलेले धान्य शेतकरी आपल्या हिश्शाप्रमाणे वाटून घेत. ती एक प्रकारे सामुदायिक शेतीचीच पद्धत होती. जमीनमोजणीसाठी ठराविक लांबीचा एक मापनदंड असे, त्याला गडी म्हणत. कवी मल्लनाने लिहिलेल्या गणितशास्त्र या ग्रंथात तत्कालीन शेती व जमीन मोजणी याविषयी बरेच विवेचन केले आहे. क्षेत्रगणित या नावाने ताडपत्रांवर शेतांच्या नकाशासहित मोठमोठे ग्रंथही त्या काळात निर्माण झाले होते.

रेड्डी युगात आंध्राचा व्यापार विशेषतः ब्रह्मदेश, मलाया, इंडोनेशिया, चीन, लंका, इराण, अरबस्तान या देशांशी होत असे. या व्यापारापासून रेड्डी राजांना खूप प्राप्ती होत असे. देशातील अराजकतेमुळे पूर्वी बंद पडलेले मोटुपल्ली बंदरही रेड्डी राजांनी पुन्हा सुरू केले. तसेच सर्व व्यापारी मार्गही सुरक्षित केले. काही मालावरील जकात त्यांनी कमी केली, तर काही मालावरील माफ केली. परदेशातील व्यापाऱ्यांना ते सन्मानाने वागवीत असत.

तेलंगणातील तलवारी त्या काळी खूप प्रसिद्ध होत्या. काचेचे आरसेही तिथे होत असत. लेखनाचे काम ताडपत्रांवर लोखंडी लेखणीने करीत. या लेखणीला गंटामू असे म्हणत. राजे, मंत्री वगैरे लोक सुवर्ण-गंटामूने कागदावर लिहीत.

रेड्डी राजांच्या दरबारात विद्वान व कलावान यांचा आदर होता. भारताच्या अन्य प्रांतांतील विद्वान व कलावंतही राजाच्या दरबारात येत असत. त्यांची योग्यता पारखण्यासाठी व त्यांची संभावना करण्यासाठी राजाने कविसार्वभौम श्रीनाथ याला नेमले होते. राजे-महाराजे स्वतः साहित्य, संगीत, नृत्यशास्त्र यांचा अभ्यास करीत. याशिवाय अश्वशास्त्र, गजशास्त्र, राजनीती व युद्धनीती हे तर त्यांचे अभ्यासाचे मुख्य विषय होते.

मुसलमानांच्या संपर्कामुळे आंध्रप्रदेशात फारसी नृत्याचा प्रचार झाला. पेदें कोमटीने आपल्या 'नाट्यशास्त्रा'त फारसी नृत्याचाही अंतर्भाव केला आहे व त्याला 'मत्ताल्लिनर्तन' असे नाव दिले आहे.

साधारणतः लोक धोतर नेसत. खालच्या वर्गातले लोक चड्डी वापरीत. बहुधा सर्व लोक खांद्यावर शाल व डोक्याला गोल साफा गुंडाळीत. पुष्कळसे लोक कमरेला फेटा कशीत.

त्या काळातील लोकांची घरे बंद पेटीसारखी असत. घरांना खिडक्या ठेवण्याची पद्धत नव्हती. उजेडासाठी छतांत गवाक्षे असत. जनावरेही घरातच बांधीत. श्रीमंत मात्र गुरांसाठी वेगळे गोठे बांधीत. राजप्रासाद वास्तुशास्त्राच्या नियमांनुसार बांधीत.

वेलमा हा धर्म शब्दाचा अपभ्रंश आहे. रेड्डींच्या बरोबरच यांचेही राज्य निर्माण झाले. पण या दोन राज्यांत कधीही सख्य नांदले नाही. प्रामुख्याने हा वर्ग सरंजामी आहे. हे लोक मोठे शूर व उदार आहेत. त्यांना आपल्या क्षत्रियत्वाची सतत जाणीव असते.

ज्या काळी आंध्र देशात रेड्डी व वेलमा यांची राज्ये उदयाला येत होती, त्याच काळात दुसऱ्या बाजूने कर्नाटकात विजयनगरचे साम्राज्य जन्म घेत होते. विजयनगरच्या राज्याची स्थापना इ. स. १३३६ साली झाली, असे बहुतेक इतिहासकार मानतात. कृष्णदेवराय हा विजयनगरच्या साम्राज्याचा धुरंधर पुरुष होय. तो इ. स. १५२९ साली मृत्यू पावला. इ. स. १५६५ साली तालिकोटच्या लढाईत विजयनगरचा मुख्य प्रधान रामराजा मारला गेला व त्यानंतर दक्षिणेत मुसलमानी सत्ता प्रस्थापित झाली. इ. स. १६४० च्या सुमारास संपूर्ण आंध्र मुसलमानांच्या कबज्यात गेला. इ. स. १३२३–१६४० या कालखंडात आंध्रांनी सतत तीनशे वर्षे मुसलमानी वर्चस्वाला प्रखर विरोध केला. वरील तीन्ही राज्ये या कामी एकजुटीने झगडली. दक्षिण भारताच्या इतिहासाला ही गोष्ट निःसंशय भूषणावह होय. इ. स. १६४० – १७५५ पर्यंत आंध्रावर मुसलमानांनी राज्य केले. इ. स. १७५५ मध्ये आंध्रातले समुद्रकाठचे जिल्हे प्रथम इंग्रजांच्या ताब्यात आले. इ. स. १८०० च्या सुमारास दक्षिण आंध्र त्यांनी घेतला. पण तेलंगण हा आंध्राचा एक तृतीयांश प्रदेश १९४८ सालापर्यंत निजामाच्या ताब्यात राहिला व त्या साली तो भारतीय संघराज्यात समाविष्ट झाला.

मद्रास इलाख्यातून आंध्र प्रांत वेगळा काढावा म्हणून तेलुगू भाषिकांनी इ. स. १९१३ पासून आंदोलन सुरू केले होते; पण १९५० पर्यंत ते यशस्वी न झाल्यामुळे पोट्टी श्रीरामलू यांनी ५८ दिवस उपोषण करून शेवटी डिसेंबर १९५२ मध्ये स्वप्राणार्पण केले. मग १ ऑक्टोबर १९५३ या दिवशी ११ जिल्ह्यांचे आंध्र राज्य वेगळे स्थापण्यात आले. कुर्नूल ही त्याची राजधानी होती. राज्यपुनर्घटना समितीच्या शिफारसीप्रमाणे नोव्हेंबर १९५६ मध्ये तेलंगणाचे ९ जिल्हे जोडून आंध्रप्रदेशाचे राज्य स्थापण्यात आले आणि त्याची राजधानी हैदराबाद येथे स्थापण्यात आली.

**लोक** – आंध्रातील लोक पूर्णपणे आर्य किंवा द्रविड नाहीत, इथे जातींचे संमिश्रण झाले आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चारही वर्णांचे लोक इथे राहतातच. पण याशिवाय, चेंचू, गदब, सवर, कोया, खोंड, कोलमी, नायकपोड, कोंडदोरा, वाल्मीकी, भगत, चटायू, लमाणी, इ. अनेक आदिवासी इथल्या रानावनात राहतात. लमाणी लोक मात्र पठारी प्रदेशात वास्तव्य करून आहेत. यांच्यापैकी काही भटकेही आहेत.

इथल्या शूद्रांची स्थिती चांगली आहे. त्यांच्यापैकी बरेचसे लोक शेतीवर उपजीविका करतात. सांप्रत अनेक क्षेत्रांत ते अग्रणी आहेत. यांच्यापैकी रेड्डी, नायडू, चौधरी, इ. जाती राजकारणात व समाजकारणात अग्रेसर आहेत.

इथल्या माला, मादिग, इ. हरिजन जातींची गावाजवळच वेगळी वस्ती असते. तिला मालपल्ली किंवा गूडिम असे म्हणतात.

एका जातीत अनेक उपजाती असतात व त्यांच्यांत परस्पर विवाहसंबंध होत नाहीत. वर्ण व जाती अनेक असल्या तरी सर्वजण हिंदू धर्माचे अनुयायी असल्यामुळे त्यांचे संस्कार, व्रते, श्रद्धा वगैरे सारख्याच आहेत.

**उद्योगधंदे** – शेती हा इथला प्रमुख व्यवसाय आहे. शेतकरी तांदूळ, ज्वारी, बाजरी, मका, कडधान्ये, तंबाखू, मिरची, हळद, इ. पिके काढतात. तांदळाचे तर हा प्रदेश कोठारच आहे. इथून बराच तांदूळ दुसऱ्या राज्यात जातो. आंबा, केळे, माल्टा, नारळ, फणस, इ. फळेही इथे विपुल प्रमाणात पिकतात. काही लोक कापडगिरण्या, कागद, सिमेंट, चिनी मातीची भांडी वगैरे वस्तू बनविण्याचे कारखाने, जहाजबांधणी कारखाना, इ. ठिकाणी कामे करतात. याशिवाय, सूत कातणे, शिंग व हस्तिदंत यांवर कोरीव काम करणे, लाखेची खेळणी व लाकूडसामान तयार करणे, रेशमाचे किडे पाळणे, इ. गृहोद्योगही इथे चालतात.

**गृहोद्योग** – आंध्रातील कोंडापल्ली येथील खेळणी साऱ्या भारतात प्रसिद्ध आहेत. कोंडापल्लीच्या आसपासच्या जंगलात मिळणाऱ्या एका विशिष्ट प्रकारच्या लाकडापासून ती तयार करतात. ही खेळणी रंगीबेरंगी असून सहा आंगुळांपेक्षा मोठी नसतात. यांत देवदेवतांच्या मूर्ती अधिक असतात. इथे बनविलेल्या दशावतारांच्या मूर्ती फार लोकप्रिय असून, आंध्रांतील बहुतेक घरांत त्या आढळतात. तिरुपती गावातही आसपास सापडणाऱ्या लालसर लाकडापासून देवदेवतांच्या मूर्ती बनवतात. इथे येणारे यात्रेकरू या मूर्ती खरेदी करतात. तेलंगणातील निर्मल येथे खेळण्यांबरोबरच धातूच्या वस्तूंवर नक्षी कोरून आकर्षक अशा शोभेच्या वस्तूही तयार करतात.

आंध्र प्रदेशातील मलमल व लोकरीची कांबळी प्राचीन काळी प्रख्यात होती. रेशमी वस्त्रेही प्रसिद्ध होती. इथे हातमागावर कापड विणण्याचा गृहोद्योग मोठ्या प्रमाणावर चालतो. इथे तीन लाखांवर हातमाग आहेत. धार्मिक कार्यात व भेट देण्यासाठी याच वस्त्रांचा उपयोग करतात. या वस्त्रांत रंग व रचना यांचे वैविध्य असून ती सुंदर दिसतात. ती स्वस्त असतात आणि टिकाऊही असतात. अलिकडे या वस्त्रांना परदेशातूनही मागणी येऊ लागली आहे.

वेंकटगिरी व धर्मावरम येथील साड्या फार प्रसिद्ध आहेत.

वरंगळ व एलुरू येथे सुती गालिचेही चांगल्या प्रकारचे तयार होतात. यातील आकृतिरचना फार जटिल असतात.

इथे तंबाखू खूप पिकत असल्यामुळे अनेक ठिकाणी स्त्रिया व पुरुष विड्या वळण्याचे काम करतात.

चांदीची नक्षी केलेले दागिने व पक्षी, फुले, बांगड्या, ब्रूच, बटन, अत्तरदाण्या, सिगारेटदाण्या, इ. विविध वस्तू करीमनगर गावात तयार होतात.

मसूलीपत्तनम येथे सनपूर्व सहाव्या शतकापासून कलमकारी हा वैशिष्ट्यपूर्ण कपडा तयार होतो. यात कापडावर पातळ मेण पसरून त्यावर कुंचल्याने वनस्पतिजन्य रंगांनी सुंदर रेखाकृती काढतात. साड्या, चादरी, पडदे, इ. कपडे अशा तऱ्हेने तयार करतात. त्याचप्रमाणे सूत व रेशीम किंवा कृत्रिम रेशीम यांच्या धाग्यांनी फुलापानांचे विविध आकृतिबंध तयार करतात. अशा प्रकारच्या कपडचाला हिमरू असे नाव आहे. हिमरू शाली फार प्रसिद्ध आहेत.

आकर्षक रंग व कलात्मक आकृतिबंध यामुळे हैदराबाद येथील खड्यांच्या बांगड्या फार लोकप्रिय आहेत.

तिरुपती येथील चंदनाची व पितळेची खेळणी, कोंडापल्लीची लाकडी खेळणी आणि विशाखापट्टनमचे हस्तिदंती कोरीव काम अत्यंत प्रसिद्ध आहे.

**आहार** – भात हे इथल्या लोकांचे मुख्य अन्न आहे. इथे मिरची खूप पिकते आणि लोक स्वयंपाकात तिखटाचा वापर खूप करतात. झणझणीत लोणचे किंवा तिखटजाळ चटणी हा त्यांच्या जेवणातला आवश्यक पदार्थ आहे. भाताबरोबर खूप चिंच घालून केलेली रसदार भाजी ते खातात. मिरची आणि चिंच यांचा त्रास होऊ नये म्हणून हे लोक तूपही खूप खातात. गरीब किंवा श्रीमंत, सर्व लोक जेवणात ताक किंवा दही घेतात. गोडाची मात्र या लोकांना फारशी आवड नाही.

**विवाहप्रथा** – इथे आतेभाऊ व मामेबहीण यांचा सर्रास विवाह होतो. तसेच, मुलीने मामाशी विवाह करण्याचीही प्रथा आहे. याला मेनारिकम संबंध असे नाव आहे. पण सांप्रत ही प्रथा कमी कमी होत चालली आहे. विवाह बहुधा सजातीय होतात. विधवा-विवाह प्रचलित व्हावा, म्हणून वीरेशलिंगमसारख्या सुधारकांनी खूप प्रयत्न केले; पण त्यांना फारसे यश लाभले नाही.

प्रत्येक परिवाराला स्वतःचे असे नाव असते. परिवारातील सर्व लोक आपल्या नावाच्या आधी ते नाव लावतात. त्याला इंटिपेरू असे म्हणतात.

**प्रसूतिप्रथा** – मूल जन्मल्यावर बाराव्या दिवशी बारसे करतात. बारशाचा विधी असा नसतो. फक्त मुलाला पाळण्यात

घालून त्याची आरती करतात आणि सुवासिनींना हळदीकुंकू व फराळाचे पदार्थ देतात. मंगलारती गाणे हे आंध्राचे एक वैशिष्ट्य आहे. प्रत्येक सणासाठी लिहिलेल्या अशा गाण्यांचा एक मोठा संग्रह आंध्रात प्रसिद्ध आहे.

**सण व उत्सव** – कोणतेही मंगल कार्य व सण आल्यास त्याआधी घर धुवून काढतात. जमीन शेणाने सारवून उंबरठा व दाराची चौकट यांवर पिवळ्या रंगाने कणे काढतात. उगादी हा आंध्रातला वर्षप्रतिपदेचा सण होय. या दिवशी सर्व लोक तैलाभ्यंग स्नान करतात व नवे कपडे घालतात. या दिवशी जेवायला गोडधोड करतात. याशिवाय पच्चडी नावाची चटणी करून सर्वांना खायला देतात. गूळ, चिंचेचा कोळ, मिरची, मीठ, कडुलिंबाची फुले यांपासून ही चटणी बनवतात. याचा अर्थ पुढच्या वर्षात कडू-गोड असे सर्व प्रकारचे अनुभव माणसाला घ्यावे लागतील असा आहे. संध्याकाळी घराच्या अंगणात, मंदिराच्या प्रांगणात किंवा एखाद्या सार्वजनिक ठिकाणी पुरोहित पंचांगाचे वाचन करतो.

रामनवमीच्या उत्सवात नाटके, बुर्रकथा, इ. कार्यक्रम करतात.

एरुवाक पुन्नम – ज्येष्ठ पौर्णिमेला हा सण येतो. शेतकऱ्यांचा हा सण आहे. या दिवशी शेतकरी बैलांना सजवून त्यांची पूजा करतात. संध्याकाळी नांगर सजवून शेतकरी तो खांद्यावर टाकतात आणि वाजत-गाजत मिरवणुकीने आपापल्या शेतात जातात आणि शेत नांगरतात. वर्षभर पीक चांगले यावे, म्हणून या वेळी भूमीची प्रार्थना करतात.

विवाहित मुली श्रावणातल्या मंगळवारी नोमू म्हणजे गौरीचे व्रत करतात. महाराष्ट्रातल्या मंगळागौरीसारखेच हे व्रत असते. श्रावणातल्या दुसऱ्या शुक्रवारी वरलक्ष्मीव्रत करतात. हे व्रत फक्त सुवासिनींनीच करायचे असते. पूजा, उपवास व हळदी-कुंकू हे विधी या व्रतात मुख्य असतात. श्रावण शु. अष्टमीला महाकालीचा दिवस मानतात. त्या दिवशी सुवासिनी एका मातीच्या घड्यात अन्न भरतात, वर कडुलिंबाची पाने घालतात आणि त्यावर एक मातीचे गाडगे ठेवून त्यात दिवा लावतात. मग ते घडे डोक्यावर घेऊन मिरवणुकीने देवीच्या देवळात जातात.

भाद्रपद शु. तृतीयेला कुमारिका गौरीचे व्रत करतात. त्याचा विधी असा – कुमारिका पहाटे अंधारातच फराळ करतात आणि दिवसभर फळे व विडा याव्यतिरिक्त काही खात नाहीत. रात्री चंद्रोदय झाल्यावर उडदाचे दीडशे पोळे तयार करतात. त्यांतले पन्नास चंद्राला, पन्नास ब्राह्मणाला व पन्नास आईला देऊन मग उपास सोडतात. या व्रताला अट्लतद्दी असे म्हणतात.

याचाच दुसरा प्रकार म्हणजे सोळा गौरी नोमू. यात व्रतकर्त्या कुमारी सोळा पदार्थ तयार करून ते ब्राह्मणाला दान देतात. आपल्याला चांगला पती मिळावा, ही या व्रतामागची कामना असते.

नवरात्रात गौर मांडून तिची आरास करतात. तेलंगणात स्त्रिया व मुली रंगीबेरंगी फुले गोळा करून एका तबकात त्यांची रास रचतात. तिच्या डोक्यावर भोपळ्याचे फूल किंवा ते न मिळाल्यास हळदीचा उभट आकाराचा गोळा करून तो ठेवतात. या रचनेला ब्रतुकम्म म्हणतात. संध्याकाळी आजूबाजूच्या सर्व मुली आपापल्या ब्रतुकम्म एकत्र करून त्यांच्या भोवती फेर धरतात. खेळून झाल्यावर ब्रतुकम्म विहिरीत किंवा तळ्यात बुडवतात. असा क्रम नऊ दिवस चालतो.

दिवाळीचा सण इतर भागांपेक्षा तेलंगणात मोठ्या प्रमाणावर साजरा होतो. कारण तेलंगणात ते दिवस सुगीचे असतात. संक्रांतीचा सण तेलंगणाखेरीज इतर भागात थाटाने होतो. कारण तिकडे ते दिवस सुगीचे असतात. या सणात रांगोळीला फार महत्त्व असते.

संक्रांतीच्या दिवशी लोक दाने देतात व नोकर-चाकरांना भेटवस्तू देतात. मुली शेणाचे लहान लहान गोळे तयार करून त्यांवर झेंडूची फुले खोचतात. याला गोब्बम्मा असे म्हणतात. गोब्बम्माच्या भोवती फेर धरून मुली टाळ्या वाजवतात व नाचतात. या दिवशी गृहिणी गोब्बा किंवा गौरीव्रत करतात.

संक्रांतीचा सण तीन दिवस करतात. पहिल्या दिवसाला भोगी असे नाव आहे. त्या दिवशी अंगणात होळी पेटवतात. दुसरा दिवस मकरसंक्रांतीचा. त्या दिवशी ब्राह्मणांना दाने देतात व पितृतर्पण करतात. तिसऱ्या दिवशी शेतकरी बैलांना सजवतात व स्वतःही नवे कपडे घालून नव्या धान्याची खिचडी करून खातात. संध्याकाळी कोंबड्यांची व मेंढ्यांची झुंज लावण्याचा कार्यक्रम होतो.

कृष्णजन्माष्टमी, विजयादशमी, दीपावली, गणेशचतुर्थी, इ. सण सर्व भारतात त्याप्रमाणे आंध्रातही सर्वसाधारणपणे साऱ्याच पद्धतीने साजरे होतात.

**प्रेक्षणीय स्थळे** – हैदराबाद ही आंध्राची राजधानी आहे. मुहम्मद कुली कुतुबशाहने या नगराची स्थापना केली व आपल्या प्रेयसीच्या नावावरून त्याला भागानगर असे नाव दिले. शहरातील चार मिनार, मक्का मशीद, सालारजंग म्युझियम, इ. स्थळे प्रेक्षणीय आहेत. इथे उस्मानसागर व हिमायतसागर असे दोन मोठे तलाव आहेत.

विशाखापट्टनम हे बंदर असून, इथे गोदीत अनेक तऱ्हेची जहाजे बांधली जातात.

काकिनाडा हेही लहानसे बंदर असून, आंध्रातील हे एक स्वच्छ नगर आहे. विजयवाडा हे मोठे रेल्वेस्टेशन असून व्यापाराचे मोठे केंद्र आहे. याच्या जवळपास प्राचीन गुंफा आहेत.

याशिवाय, मछलीपट्टनम, गुंटूर, नेल्लोर, कुर्नूल, कडप्पा, चित्तूर, इ. काही शहरे प्रसिद्ध आहेत. पण आंध्र हा लहान गावांचाच



चार मिनार, हैदराबाद

प्रदेश आहे. याच्या इतकी स्वच्छ, संपन्न व विशाल गावे इतर प्रांतांत क्वचितच आढळतील.

या प्रांतात तीर्थक्षेत्रेही बरीच आहेत. तिरुमलै पहाडावरील तिरुपती हे प्रसिद्ध वैष्णव क्षेत्र आहे. सर्व भारतातून इथे भाविक दर्शनासाठी गर्दी करतात. अहोवल हे कुर्नूल जिल्ह्यातील एक वैष्णव क्षेत्र आहे. इथेच विष्णूने हिरण्यकश्यपूला मारले अशी कथा आहे. त्यामुळे इथे विष्णूची नरसिंहाच्या रूपात पूजा करतात. सिंहाचलम येथेही नरसिंहाचे मंदिर आहे. आठशे फूट उंच टेकडीवर हे मंदिर असून, हिरण्यकश्यपूचा पुत्र प्रल्हाद याने हे मंदिर उभारले, असे सांगतात. इथे मूर्तीवर नेहमी चंदनाचा लेप लावलेला असतो, कारण हिरण्यकश्यपूच्या वधानंतर चंदनाच्या लेपानेच नरसिंहाचा कोप शांत झाला, असे मानतात. दर वैशाखीला लेप बदलण्याचा उत्सव होतो. हे क्षेत्र विशाखापट्टनमच्या जवळ आहे.

**कालहस्ती** – हे प्रसिद्ध शैव क्षेत्र असून, दोन टेकड्यांच्या मध्ये स्वर्णमुखी नदीच्या किनाऱ्यावर आहे. आदिशेष आणि वायू यांच्यांत मेरू पर्वतावरून भांडण झाले, तेव्हा मेरू पर्वताचा एक तुकडा इथे पडला, म्हणून हे स्थान पूज्य मानतात. इथल्या जुन्या मंदिराचे नूतनीकरण केलेले असून, ते फार विशाल आहे.

श्रीशैलम हे आंध्रातले प्रसिद्ध ज्योतिर्लिंग आहे. ते नल्लमलै पर्वतावर आहे.

भद्राचलम येथे एका टेकडीवर रामचंद्राचे मंदिर असून, त्याच्या चारही बाजूंना लहानमोठी चोवीस मंदिरे आहेत. हे स्थान गोदावरीच्या तीरावर आहे. कुतुबशाहीच्या काळात गोपन्ना नावाच्या एका सरकारी सेवकाने सरकारी पैशाने इथे रामचंद्राचे मंदिर बांधले. त्यासाठी त्याला कारावासही भोगावा लागला. तो कैदेत असताना स्वत: प्रभू रामचंद्र त्याच्या समोर प्रगट झाले आणि त्यांनी मंदिरासाठी खर्च झालेला सर्व पैसा त्याला दिला, अशी आख्यायिका सांगतात. त्यानंतर गोपन्ना रामदास म्हणून प्रसिद्ध झाला.

आलमपूर हे तीर्थक्षेत्र मेहबूबनगर जिल्ह्यात तुंगभद्रेच्या तीरावर कुर्नूलपासून जवळ आहे. तिथे अनेक शिवमंदिरे असून, ते शक्तिपीठही मानले जाते. तिथे योगिनीचे व भूदेवीचे मंदिर आहे.

**स्थापत्य व शिल्प** – या दृष्टीने आंध्रांतील काही मंदिरे वैशिष्ट्यपूर्ण आहेत. वरंगळजवळ असलेल्या रामप्पा येथील मंदिरात काही नृत्यमुद्रा कोरलेल्या आहेत, त्या अत्यंत आकर्षक आहेत. तसेच हनमकोंड येथे काकतीय कालातील एक मंदिर असून त्यात एक हजार स्तंभांचा मंडप आहे. विजयनगरकालात बांधलेल्या लेपाक्षी येथील मंदिरातील सुंदर भित्तिचित्रे अजूनही चांगल्या अवस्थेत आहेत. इथे काही स्तंभ असे आहेत, की ते वरून लटकलेले आहेत, पण खाली जमिनीला त्यांचा स्पर्श होत नाही. त्यांच्या खालून कपडा सरकवता येतो.

आंध्रात काही प्राचीन गुंफा आहेत. मुगल-राजपुरम व अमरावती येथील गुंफा प्रसिद्ध आहेत.

नागार्जुनकोंडा येथे कृष्णा नदीवर हल्ली एक मोठे धरण बांधले आहे. त्याला नागार्जुनसागर असे नाव आहे. त्याच्या मध्ये एका लहानशा टेकडीवर एक संग्रहालय उभे केलेले असून त्यात नागार्जुनकोंडा येथील पुष्कळशा शिल्पाकृती सुरक्षित ठेवल्या आहेत.

चोळराजा तोंडेमान याने गुडाली येथे संगमेश्वराचे मंदिर बांधले. दुसऱ्या एका चोळराजाने गंडवरम येथे शिवमंदिर बांधले असून, त्याला दिशासाधन आहे. दिमिले येथील मंदिरातील नग्नेश्वराची मूर्ती अप्रतिम आहे.

काकतीय राजा पहिला रुद्र (इ. स. चे १२ वे शतक) याने आंध्रात ११ देवालये बांधली. याशिवाय नन्नेपडू येथे सोमेश्वर, पेनुगुडुरूपडू येथे विंध्यवासिनी, अमृतलूर येथे अमृतेश्वर, कोंडकांची येथे श्रीकंठ, भट्टिप्रोलु येथे भोगीश्वर, श्रीरामपुरम येथे चोडेश्वर, पेद्दमक्केन येथे अमरेश्वर, कोवूर येथे मदनगोपाल,

चवली येथे पापेश्वर, अशी अनेक मंदिरे आंध्रात निर्माण झाली. कृष्णेच्या डाव्या तीरावरचे श्रीकाकुलम येथील श्रीकाकुल-स्वामीचे (विष्णू) मंदिर आंध्रात सुप्रसिद्ध असून, ते प्राचीन कालापासून यात्रेचे एक महत्त्वाचे स्थान आहे. तेलुगू वाङ्मयात इथला देव आंध्रेश्वर किंवा आंध्रविष्णू या नावाने उल्लेखित आहे. या मंदिराला जोडून तीनशे देवदासींची वसाहत होती.

श्रीशैल (जि. कुर्नूल) हे आंध्रातले सर्वांत महत्त्वाचे क्षेत्र होय. बारा ज्योतिर्लिंगांत इथल्या मल्लिकार्जुनाची गणना होते. हे स्वयंभू लिंग असून, लिंगचक्रवर्ती या नावाने त्याची व माधवी या नावाने शक्तीची पूजा केली जाते. द्राक्षारामम (जि. पूर्व गोदावरी) येथे पहिल्या चालुक्य भीमाने भीमेश्वराची स्थापना करून, त्या स्थळाला महत्त्व प्राप्त करून दिले. गणपती या काकतीय राजाने (इ. स. ११९८–१२६१) श्रीशैलाच्या पायथ्याला त्रिपुरांतकाचे व तिथेच एका तलावात त्रिपुरसुंदरीचे मंदिर बांधून ते क्षेत्र प्रसिद्धीस आणले. इथे प्राचीन काळी नरबली देत असत, असा उल्लेख आहे.

पूर्व चालुक्य वंशातील राजांनी आंध्रात अनेक भव्य-सुंदर मंदिरे उभारली. कुब्ज विष्णुवर्धन (इ. स. च्या ७ व्या शतकाचा पूर्वार्ध) याच्या काळात बांधलेल्या एका भव्य शिवमंदिराच्या



वादक व नर्तक – विजयवाडा येथील शिल्प

प्रवेशद्वाराजवळ अखंड पाषाणाच्या द्वारपालमूर्ती आहेत. पूर्व चालुक्य शैलीचे हे सर्वांत जुने नमुने होत. त्याची राणी अय्यन महादेवी हिने विजयवाडा येथे काही जैन मंदिरे बांधली होती (इ. स. चे ७ वे शतक). पूर्व चालुक्यांचे शिल्प प्रारंभी पश्चिमी चालुक्य शिल्पाप्रमाणेच अतिभव्य होते. गुप्त आणि वाकाटक शैलीची मंदिरेही अशीच भव्य होती.

इ. स. च्या ९ व्या शतकाच्या आरंभी राज्य करणारा दुसरा विजयादित्य याने १०८ मंदिरे बांधली. त्यांतली अद्यापि काही शिल्लक आहेत. इंद्रकील पर्वतावर एक स्तंभ आहे. त्याच्या बाजूंवर किरातार्जुनीय काव्यातले काही प्रसंग कोरलेले आहेत. बिक्कावल येथील गोलिंगेश्वराच्या व राजराजाच्या मंदिरात विपुल कोरीव काम असून, ते तिसरा विजयादित्य (इ. स. च्या ९ व्या शतकाचा उत्तरार्ध) याच्या काळातले आहे. तिथे चतुर्भुज नटराज, वीरभद्र, शिव, स्कंद, ब्रह्मा यांच्या मूर्ती प्रेक्षणीय असून, कौमारीचे कोरीव चित्र फारच सुरेख आहे. तिथल्या एका मंदिर-द्वारावर गंगा-यमुनांचे उठावाचे चित्र दिसते, ते गुणग राजाने राष्ट्रकूट राजा दुसरा कृष्ण याला जिंकल्याचे स्मारक म्हणून निर्माण केलेले आहे.

कलिंग व आंध्र या दोन देशांचा राजकीय व सांस्कृतिक संबंध दीर्घ काळ होता. त्यामुळे ओरिसातील देवालयांत आढळणारे मिथुनशिल्प व लकुलीशरूप पूर्व चालुक्यांच्या शिल्पांतही अनेक जागीं आढळते.

काकतीयांची (इ. स. १०००–१३२५) कलाशैली अधिक कलाकुसरीची होती. त्यांनी निर्मिलेले स्तंभ चकचकीत असून, ते शिंगाचे बनविले आहेत, असे वाटते. वरंगळ येथे सापडलेली गणेशपट्टी कोरीव कामाने भरलेली असून, काकतीय कलेचा तो एक सुंदर नमुना आहे. काकतीयांनी निर्मिलेल्या देवालयात स्तंभ व छत यांवर इतिहास-पुराणांतील अनेक प्रसंग खोदलेले आढळतात. त्रिपुरांतकम येथील शिल्पकाम म्हणजे काकतीय कलेचे श्रेष्ठ उदाहरण होय.

पालनाड (जि. कृष्णा) व गुंटूर या भागात इ. स. च्या १४ व्या शतकातील रेड्डी राजांच्या शिल्पशैलीची अनेक मंदिरे आढळतात. रेड्डीशैली ही काकतीय शैलीसारखीच आहे. त्या वंशातील अनवेमा या श्रेष्ठ राजपुरुषाने श्रीशैल येथील शिवमंदिराचे पुनर्निर्माण करून, तिथल्या प्रकारात शैव संतांच्या जीवनातले अनेक प्रसंग कोरून ठेवले आहेत. रेड्डीशिल्पशैलीचे वेगळेपण तिथे कळते.

**आंध्रातील धर्मपंथ** – आंध्र प्रदेशातील वेलूनाडूचे चोड राजे देवभक्त होते. त्यांनी देवालये बांधली आणि देवाची पूजाअर्चा व उत्सव यासाठी उदार देणग्या दिल्या. राजाचे मंत्री, सेनापती व इतर धनिक लोकही अहमहमिकेने अशा मंदिरांना देणग्या देत असत. देवालये व तीर्थे या ठिकाणी जाणाऱ्या यात्रेकरूंसाठी रस्ते, धर्मशाळा व पाणपोया बांधण्यात आल्या होत्या.

काही चोड राजे बौद्ध धर्माचे अनुयायी बनले, तेव्हा मात्र हिंदुधर्मातील चातुर्वर्ण्यव्यवस्था काहीशी विस्कळीत झाली. पण पुढे बौद्ध धर्मातील काही तत्त्वांचा हिंदूधर्मात समावेश करून घेऊन वर्णाश्रमव्यवस्थेचे पुनरुज्जीवन करण्यात आले.

चोड राजे हे शैवपंथी होते, तरीही ते शिवाबरोबरच विष्णूचीही अभेदभावाने उपासना करीत व दोन्ही पंथांच्या लोकांना आश्रय देत. त्यांच्या परधर्मसहिष्णुता व सदिच्छा या

गुणांमुळेच आंध्रात शैवपंथ लोकप्रिय झाला व त्याचा सर्वत्र प्रसार झाला.

पुढे या शैवांना बौद्ध व जैन धर्मांच्या आक्रमणापासून स्वसंरक्षण करण्याची आवश्यकता भासू लागली. याच वेळी कन्नड देशात बसव आणि तेलुगू देशात एकांतद रामय्या, मल्लिकार्जुन व पद्मरस हे तीन पंडित उदयाला आले. बसवाने या तिघा पंडिताच्या साहाय्याने वर्णाश्रमधर्मांतर्गत जातिभेद झुगारून देऊन वीरशैव पंथ नावाचा नवा शैव संप्रदाय निर्माण केला. आंध्रातील या तीन पंडितांनी प्रारंभी वीरशैव पंथाचा प्रचार केला खरा; परंतु नंतर मात्र त्यांचा बसवाशी मतभेद होऊ लागला.

या तीन पंडितांपैकी मल्लिकार्जुनाची (इ. स. ११२०–११७५) वेदांवर श्रद्धा होती व तो ब्राह्मणांना पूज्य मानीत होता. प्राचीन चालीरीतींचा वेदांना अनुसरून पुनरुद्धार करून शैव पंथाला चिरस्थायित्व देण्याचा त्याचा प्रयत्न होता. त्यासाठी त्याने बौद्ध व जैन या धर्मांशी लढा देऊन पाशुपत शैव पंथाचा पुरस्कार केला. मल्लिकार्जुनाने शिवतत्त्वसार हा ग्रंथ लिहून वीरशैव पंथाचा आग्रही पुरस्कार केला. आजही आंध्रातील आराध्य-पंथीय लोक मल्लिकार्जुन पंडिताच्या मतप्रणालीने चालतात. त्यांच्या पंथाला पंडित संप्रदाय हे नाव असून, ते ब्राह्मणांचे धार्मिक विधी पाळतात.

आंध्रात पालनाड येथे हैहय राजे राज्य करीत असताना शैव पंथ लोकप्रिय होता व वीरशैव पंथाचा प्रचार मोठ्या प्रमाणावर झाला होता. बलमल्लीदेव, अनुगू व नरसिंग हे शैवपंथी होते; तर कामराज व त्याचा पुत्र अलराज वीरशैव होते. अलराजाच्या पितामहाच्या कारकीर्दीत नव्वद हजार वीरशैव केवळ भिक्षेवर निर्वाह करीत असले, तरी ते उत्तम सैनिकही होते. वीरशैव पंथात काळे डगलेवाले व तांबडे डगलेवाले असे आणखी दोन पोटभेद होते.

वेलनाडू चोड राजांपैकी पहिला चोड, पहिला व दुसरा गोंक व दुसरा चोड हे राजे विष्णुभक्त होते. वीरवैष्णव पंथ हा वैष्णव पंथाचाच एक भेद आहे. वीरवैष्णव पंथाचा प्रसार आंध्रात बराच झाला होता. वीरपूजन हे या पंथाचे मूलभूत तत्त्व आहे.

आंध्र प्रांतात बौद्ध व जैन या धर्मांचाही प्रसार बराच झाला होता. श्रीशैलम हे बौद्ध धर्माचे केंद्र होते. दुसरा चोड राजा स्वतः बौद्धधर्मी होता व त्याचा राजधर्मही बौद्धच होता. वर्धमानपूरच्या गोन राजांच्या कारकिर्दीत मात्र बौद्ध व जैन या दोन्ही धर्मांच्या खाणाखुणा दिसत नाहीत. पालनाडच्या हैहय राजांच्या कारकिर्दीत या दोन्ही धर्मांची चलती होती, तर दोड्डनायडू व पैवेडू यांना जैन-बौद्धांचे वावडे होते. कोंडपडुमट्टी राजे प्रथम बौद्धधर्मानुयायी होते; पण पुढे ते पंडित संप्रदायाचे अनुयायी झाले. कोट राजांच्या कारकिर्दीत अमरावती हे बौद्ध धर्माचे मोठे केंद्र होते. दुसरा केत राजा व त्याच्या दोन राण्या आणि मन्मगेताची बय्यला राणी हे सर्व बुद्धाचे उपासक होते. अशा रीतीने शैव, वीरशैव, वैष्णव, वीरवैष्णव, बौद्ध व जैन हे सर्व धर्मपंथ जुन्या काळी लहान मोठ्या प्रमाणावर आंध्रात वावरत होते, असे इतिहासावरून कळून येते.

कुचिपुडी हे आंध्रातील वैशिष्ट्यपूर्ण नृत्य आहे. हे नृत्यनाट्य असून, एखादी पौराणिक कथा नृत्याच्या माध्यमातून यात सादर केली जाते. (कुचिपुडी पाहा). तसेच, यक्षगान हा इथला खास नाट्यप्रकार आहे. इथे वीथिनाटकांचाही बराच प्रसार झालेला आहे.

हरिकथा म्हणजे कीर्तन इथल्या लोकांना विशेष प्रिय आहे. यातील भाषा संस्कृतप्रचुर असते. तर बुर्रकथा हा लोकभाषेतील मनोरंजनाचा प्रकार आहे. यात एक मुख्य कथाकार व त्याचे दोन साथीदार असतात. कथाकार हातात एकतारी घेऊन पद्ये गाऊन कथा सांगतो.

बोम्मलाट किंवा छायानाटक हे खास आंध्राचे वैशिष्ट्य आहे. रात्रीच्या वेळी दिव्यांच्या प्रकाशात एखाद्या मंडपात बोम्मलाटचे प्रयोग होतात. पडद्याच्या मागे दिवे ठेवून चित्रांच्या छाया पडद्यावर पाडतात व मागे राहून सूत्रधार ही चामड्यांची चित्रे हलवतात व त्यांचे संवाद आपण बोलतात. रामायण, महाभारत व भागवत यांतील कथा मुख्यत्वे या छायानाट्यात दाखवतात. [ आंध्र प्रदेश; फोकलोअर ऑफ आंध्र प्रदेश, बी. राम राजू; आं. सा. इ.; इं. स्क.; ज. आं. हि. रि. सो. ]

( २ ) एक जात. मनू म्हणतो की, आंध्र ही जात अगदी निकृष्ट उपजात असून, वैदेहक पुरुष व कारावर स्त्री यांची संतती होय. हे गावाबाहेर राहून रानटी जनावरे मारून त्यांवर उपजीविका करीत. अशोकाच्या शिलालेखांत यांचा पुलिंदाशी संबंध जोडलेला आहे.

शुनःशेपाला आपला पुत्र मानायला तयार न झालेल्या आपल्या पन्नास पुत्रांना विश्वामित्राने शाप दिला व ते आंध्र, पुंड्र, शबर, पुलिंद व मूतिब झाले, अशी ऐतरेय ब्राह्मणात कथा आहे (३३.६). ओरिसात आदि-आंध्र नावाची एक वर्गीकृत जमात आहे, तिचा आंध्रांशीच संबंध असावा.

आंध्रक, आंध्रवाक अशी दुसरी नावे आहेत, तीही याच जमातीची असावी. [ हि. ध. ]

## आंध्र ब्राह्मण

आंध्र प्रदेशातल्या ब्राह्मणाना हे नाव आहे. हे मुळात कर्नाटकातले होते. पण तिथून येऊन हे आंध्रात स्थायिक झाले. हे तेलुगू भाषा बोलतात. यांच्या सोळा

पोटजाती आहेत. आपल्या गोत्राच्या बाहेर असलेल्या पोटजातीतल्या व्यक्तीशी हे विवाह करतात. यांच्या चालीरीती मराठी लोकांप्रमाणे आहेत. [ भा. ब्रा. जा. प्र. ]

**आंबा** एक उत्कृष्ट फळ. आंब्याचा वृक्ष हा अत्यंत लोकप्रिय, उपयोगी, दीर्घजीवी व विशाल असतो. भारतात सर्व ठिकाणीं आंब्याची लागवड होते.

भारतीय वाङ्मयात आम्रवृक्षाला व त्याच्या मंजरीला स्थान मिळालेले आहे. कालिदासाच्या निसर्गवर्णनात वसंतागमनसूचक तांबुस, हिरव्या आणि पांढुरक्या आम्रमंजरीचे वर्णन नेहमी असते. कामदेवाच्या पंचशरांत आम्रमंजरीचाही अंतर्भाव आहे.

आंब्याची लागवड भारतात फार प्राचीन काळापासून होत होती. बृहदारण्यकोपनिषदात (४.३.३६) या फळाचा उल्लेख आहे. ज्याप्रमाणे पिकलेला आंबा झाडापासून गळतो त्याप्रमाणे पुरुष देहापासून मुक्त होतो, असे तिथे म्हटले आहे. रामायण (२.४९.९), महाभारत (३.१५८.४४), पतंजलीचे महाभाष्य, पाणिनीची अष्टाध्यायी (८.४.५), इ. ग्रंथांत या वृक्षाचे संदर्भ येतात. अब्भंतर जातकात, कोसल राजाने उद्यानातील झाडावरचे पिकलेले आंबे आणून, त्याच्या साली काढून, त्यात साखर मिसळून रस तयार केल्याची माहिती आहे. या रसामुळे बिंबादेवीचा वातशूळही थांबला होता.

आंब्याच्या झाडाच्या मुळचांची राख इतर काही द्रव्यांसह अंगाला लावल्यास अंगाचा दाह होतो, असे कौटिलीय अर्थशास्त्रात सांगितेले आहे. आंब्याच्या रसापासून सुरा बनवीत, असेही त्या ग्रंथात सांगितले आहे. भू-सीमा दाखविण्यासाठी आंब्याची झाडे लावण्याची पद्धत होती, असे बृहत्संहितेवरून कळते. द्राविड भाषांतील अनेक ग्रंथांत आंब्याची माहिती मिळते.

चरकसंहिता व सुश्रुतसंहिता या ग्रंथांत आंब्याचा उल्लेख आहे. निघंटूमध्ये आंब्याचे गुणवर्णन केलेले आहे. या फळाचे असंख्य प्रकार असून, त्यांचे रंगरूप, रसाची चव यांतही विविधता आहे. याची गोडी अवीट असते.

हिंदूंच्या सर्व सणांत व उत्सवांत आंब्याला फार महत्त्व असते. कोणताही धार्मिक विधी आंब्याच्या पानावाचून करीत नाहीत. आम्रवृक्ष हा मंगलकारक मानलेला आहे. माघ शु. द्वितीयेच्या दिवशी चंद्राला व शिवरात्रीच्या दिवशी शंकराला आम्रमंजरी अर्पण करतात. मंगलकार्याच्या प्रसंगी मंडपात आणि दारावर आंब्याच्या पानांची तोरणे बांधायची पद्धत आहे. पुण्याहवाचनातल्या किंवा कोणत्याही कलशावर आम्रपल्लव ठेवून, मग त्यावर नारळ किंवा पूर्णपात्र ठेवतात. लग्नानंतर वधू-वरांनी आंबा शिंपण्याची चाल महाराष्ट्रात आहे.

दशाहराच्या व्रतात व वटपौर्णिमेला स्त्रिया आंब्याची वाणे देतात. आम्रफल हे वांझपण नष्ट करणारे व गर्भप्रद मानतात. दैवी कृपेचे आम्रफल खाल्ल्याने वंध्या स्त्रीही गर्भवती होते, हे कथाबीज भारतीय साहित्यात अनेक ठिकाणीं आढळते. आदिवासींच्या कथांतूनही ही कल्पना आहे. छत्तीसगढातील व छोटा नागपुरातील शेतकरी व आदिवासी आंब्याची कच्ची कैरी खाण्याच्या विधीपासून पहिले पिकलेले फळ खाण्यापर्यंतचे विधी नाचून गाऊन साजरे करतात. परधान आदीवासींपैकी मारकम् या टोळीचे आंबा हे देवक आहे.

काही लोक प्रथम आंब्याचा विवाह करून मग त्याची फळे खातात. काही आदिवासी जातींत पुरुषाचा विवाह प्रथम आंब्याशी आणि मग स्त्रीशी लावतात.

आंब्याची लागवड उष्ण प्रदेशात केली जाते. त्याला कडक थंडी सोसत नाही. थंडीमुळे किंवा धुक्यामुळे आंब्याचा मोहोर नष्ट होतो. पावसामुळेही त्याला हानी पोचते. उत्तर भारतातील उंच पर्वतराजी वगळून भारतात सर्वत्र आंबा होतो. त्याच्या सुमारे २०० जाती आहेत. आम्रवृक्षाचे सर्व भाग उपयोगी आहेत. कैरीचा उपयोग लोणची, चटणी व पन्हे यांसाठी होतो. मुरंबा दीर्घकाळ टिकतो. आंबापोळी हा कोकणचा मेवा प्रसिद्ध आहे. आंब्रोशीचा उपयोग चिंचेसारखा होतो. झाडाची साल कातडी कमावण्यासाठी वापरतात. तिच्यापासून रंगही तयार करता येतात. पिकलेले फळ फारच लोकप्रिय आहे. कोयीचे पीठ पौष्टिक असते. लाकूड चांगले असल्यामुळे सर्वत्र उपयोगी पडते. याचे अनेक औषधी उपयोगही आहेत.



आंब्याचे झाड

गदबा व कोंड आदिवासींच्या कथांत आंब्याचा संबंध पुरुषाच्या वृषणाशी जोडलेला आढळतो. आंब्यामुळे मृत्यू पृथ्वीवर अवतरला, असे एका बोंडो आदिवासींच्या कथेत सांगितले आहे. गदबा आणि बोंडो आदिवासींत अंत्यसंस्कार करून घरी परतण्यापूर्वी आंब्याची साल ओलांडण्याची पद्धत आहे. सर्व आदिवासी जमाती आंब्याच्या पहिल्या फळाचा उत्सव करतात व मगच

आंबे खातात. आंब्याविषयी भारतात अनेक लोकगीते, आख्यायिका व कथा प्रचलित आहेत. [ म. ज्ञा. को.; भा. व. इ.; नंदादीप; डॉ. गुलाब जयवंत – वसंत मासिक, जून १९८० ]

**आंबा शिंपणे** लग्नविधीतला एक सोहळा. ऐरिणीदान झाल्यावर वधू-वरांना गौरीहरापाशी नेतात. तिथे भिंतीवर आंब्याचे झाड काढलेले असते. हा आंबा वधूने शिंपायचा असतो. त्यासाठी वधू आपला डावा पाय वराच्या उजव्या मांडीवर ठेवते व नागवेलीचे पान कुंकवाच्या पाण्यात बुडवून तो चित्रित वृक्ष शिंपते. कोकणात हा विधी वधूचा गृहप्रवेश झाल्यावर दुसऱ्या दिवशी करतात. वधू-वर खऱ्या आंब्याची पूजा करून त्याला पाणी घालतात. आंबा हा प्रजोत्पादक मानलेला असल्यामुळे लग्नविधीत त्याच्या पूजेला स्थान मिळाले आहे. [ ल. वि. सो. ]

**आंबिये सोहिरोबा** (इ. स. १७१४–१७८९) एक मराठी संतकवी. हा जातीने सारस्वत ब्राह्मण होता. याचे पूर्वज गोव्यातून सावंतवाडी संस्थानातील बांदे गावी येऊन राहिले होते. बांदे गावचे कुलकर्णीपण त्याच्याकडे आले होते; पण ते चालवीत असताही त्याचा ओढा परमार्थाकडेच होता.

एक दिवस सावंतवाडीच्या राजाकडून त्याला काही जरुरीच्या कामाकरिता सावंतवाडीला बोलावणे आले. बांद्यापासून सावंतवाडी तीन कोस दूर आहे. देवपूजा आटपल्यावर न जेवताच तो वाडीला निघाला. वाटेत फराळासाठी त्याने एक फणस बरोबर घेतला. इनसुली गावातील ओढ्यावर हातपाय धुवून तो फणसातले गरे खायला बसला. इतक्यात एक तेज.पुंज दिव्य पुरुष तिथे अवतीर्ण झाला. सोहिरोबाची व त्या महापुरुषाची दृष्टिभेट होताच एकमेकांना परस्परांच्या अंतरंगांची मनोमन खूण पटली. त्याने सोहिरोबाकडे फणस मागितला व तो खाऊन झाल्यावर प्रसाद म्हणून काही गरे सोहिरोबाला दिले. सोहिरोबाच्या मस्तकी वरदहस्त ठेवून तो दिव्य पुरुष अदृश्य झाला.

तो पुरुष मच्छिंद्रनाथांचा शिष्य गैवीनाथ होय, असे सोहिरोबाने आपल्या कवितेत सांगितले आहे. तो पुरुष अंतर्धान पावल्यानंतर सोहिरोबाची ब्रह्मानंद समाधी लागली. समाधीतून देहभानावर आल्यावर सावंतवाडीला जाऊन त्याने लेखणी व दप्तर राजापुढे ठेवले व आपल्या कुलकर्णीपणाचे त्यागपत्र दिले.

त्यानंतरचा सोहिरोबाचा सर्व काळ भगवद्भजन, अध्यात्मनिरूपण व ग्रंथलेखन यांत जाऊ लागला. गैवीनाथांच्या कृपेमुळे त्याला कवित्वस्फूर्ती लाभली व त्याने पुष्कळ कविता लिहिल्या. त्याने कुलकर्णीपणाच्या त्यागपत्राच्या वेळी एकदा जी लेखणी खाली ठेवली, ती परत हातात धरली नाही. त्यामुळे त्याची सर्व कविता दुसऱ्याने विशेषतः त्याच्या बहिणीने लिहून घेतलेली आहे.



सोहिरोबा आंबिये

वयाच्या ६० व्या वर्षी सोहिरोबा आपल्या दोन पुत्रांसह उत्तर भारताच्या यात्रेला निघाला. काशी, प्रयाग करीत करीत तो इ. स. १७७१ च्या सुमारास ग्वाल्हेरला आला. त्या वेळी महादजी शिंदे ग्वाल्हेरच्या गादीवर होता. शिंद्यांच्या जिवबा दादा केरकर या गोमंतकीय सेनापतीने सोहिरोबाला दरबारात नेले. त्या वेळी महादजीने आपल्या काही स्वरचित कविता सोहिरोबाला दाखविल्या. सोहिरोबाला त्या आवडल्या नाहीत. त्याने तसे स्पष्ट सांगितले. त्यामुळे महादजी संतापला. त्यावर सोहिरोबानेही त्याला सांगितले –

अवधूत नहीं गरज़ तेरी । हम बेपर्वा फकिरी ।।
तुम हो राजा मैं हूं जोगी । पृथक् पंथ का न्यारा ।
चार कोट जहागीर तुमारी । ओही पंथ हमारा ।।
सोना चांदी हमकु नहि चाहिये । अलख भुवनका वासी ।
महाल मुलुख झांट बराबर । हम गुरुनामोपासी ।।
तुमबी डूबे हम बी डुबाये । तेरा हम क्या लिया ।
कहे सोहिरा सुने महादजी । प्रकाशजोत गमाया ।।

या प्रसंगानंतर महादजी शिंद्याने सोहिरोबाचा अधिकार ओळखून त्याला पुन्हा सन्मानाने दरबारात बोलावून नेले. पुढे त्याने उज्जैन येथे सोहिरोबाला एक मठ बांधून दिला. उज्जैन येथे सोहिरोबा दहा वर्षे होता. तिथे त्याचा शिष्यसमुदाय बराच वाढला. इ. स. १७८९ साली रामनवमीस सोहिरोबा मठातून बाहेर पडला, तो पुन्हा आलाच नाही.

सोहिरोबाचे ज्ञान शुद्ध व वैराग्य कडकडीत होते. तो चार चार दिवस समाधिस्थितीत असे. तो योगी व पूर्ण वेदान्ती होता. सगुण भक्तीपेक्षा निर्गुण भक्तीकडे त्याचा विशेष ओढा होता.

सोहिरोबाचा ग्रंथसंभार प्रचंड आहे. त्यांपैकी अक्षयबोध, महदनुभवेश्वरी, पूर्णाक्षरी, अद्वयानंद सिद्धान्तसंहिता हे ग्रंथ प्रमुख आहेत. याशिवाय त्याने मराठी व हिंदी मिळून सुमारे चार हजार पदे रचली आहेत. [ गो. च. पं.; भा. सं. म. ]

**आंबेजोगाई** मराठवाड्यातील एक प्रसिद्ध ऐतिहासिक स्थान. हे बीड जिल्ह्यात, बालाघाट डोंगरावर, जयंती नदीच्या तीरावर वसलेले आहे. देवगिरीच्या यादवांच्या राजवटीत हे एक समृद्ध नगर होते. इथे काही यादवकालीन शिलालेख सापडले आहेत. एक आलेख राष्ट्रकूटांच्या काळातलाही आहे. गणेशमंदिरातील कोरीव लेखात या नगराच्या वैभवाचे, इथल्या मंदिरांचे व भक्कम तटबंदीचे वर्णन आढळते. त्यात सिंघण यादवाचा प्रसिद्ध सेनापती खोलेश्वर याचाही उल्लेख आहे.

निजामाच्या कारकिर्दीत इ. स. १९०३ साली आंबेजोगाईच्या तहसिलदाराने या नगराचे नाव मोमिनाबाद असे ठेवले होते. पण महाराष्ट्र राज्याची स्थापना झाल्यानंतर त्याला आंबेजोगाई हे पूर्वीचे नाव पुन्हा देण्यात आले.

प्रसिद्ध कवी मुकुंदराज याचा जन्म इथे झाला आणि दासोपंताचे वास्तव्यही इथेच होते. दोघांच्या समाध्या या नगरात आहेत. इथे ब्राह्मणी व जैन मंदिरे व लेणी बरीच आहेत. त्यांतील योगेश्वरीचे (जोगाईचे) मंदिर सर्वांत प्रसिद्ध आहे. ते जयंती नदीच्या काठी असून, ते खडकात खोदलेले आहे. गाभाऱ्यात



योगेश्वरी देवीचा तांदळा, आंबेजोगाई

देवीचा तांदळा आहे. समोर भव्य सभामंडप आहे. हे देवस्थान जागृत आहे, अशी समजूत आहे.

इथले सकलेश्वराचे मंदिर शके ११५० च्या सुमारास बांधलेले आहे. पण आता त्याचे भग्नावशेष तिथे पसरलेले आहेत. सभामंडपाच्या मध्यभागी गोल गाभारा असून, सभामंडपाला बारा खांब आहेत. भग्नावशेषांत अनेक सुरेख मूर्ती व शिल्पे पाहायला मिळतात.

इथे शके ११५० मधला एक कोरीव लेख असून, त्यात सेनापती खोलेश्वर याने सकलेश्वर मंदिराला दिलेल्या दानांचे वर्णन आहे. त्या आलेखावरून या स्थानाचे पूर्वीचे नाव आम्रपूर होते, असे कळते.

नगराच्या चौबारा भागात एक हेमाडपंती गणेशमंदिर आहे. त्याचे शिल्पकाम अत्यंत सुरेख आहे. तिथला खोलेश्वराचा शिलालेख विशेष महत्त्वाचा आहे.

खोलेश्वराने एक शिवमंदिर इथे बांधले, ते खोलेश्वरमंदिर म्हणून प्रसिद्ध आहे. ते शके ११६२ मध्ये बांधलेले असल्याचा उल्लेख तिथल्या संस्कृत आलेखात आढळतो.

याशिवाय या नगराच्या आसमंतात अचलेश्वर महादेवाचे मंदिर, हत्तीखाना गुंफा, नागझरी तीर्थ, जैन लेणी, वैष्णव लेणी, नरसिंह-तीर्थ, जैत्रपालाची गढी, इ. अनेक प्रेक्षणीय ठिकाणे आहेत. मुकुंदराजाची समाधी गावापासून २ मैल अंतरावर डोंगराच्या उतरणीवर आहे. दासोपंताची समाधी नरसिंह-तीर्थाजवळ आहे.

स्वामी रामानंदतीर्थ यांनी या शतकात निजामशाहीविरुद्ध स्वातंत्र्यसंग्राम सुरू केला तो याच ठिकाणी. पाहा – दासोपंत, मुकुंदराज, योगेश्वरी. [ बीड गॅझे.; देवीकोश २; म. वि. को.]

**आंबेडकर, डॉ. भीमराव** (इ. स. १८९१–१९५६) अस्पृश्यांचे एक थोर पुढारी. यांचा जन्म १४ एप्रिल १८९१ या दिवशी महू येथे झाला. यांच्या वडिलांचे नाव रामजी सकपाळ व आईचे नाव भीमाबाई होते. रामजी सकपाळ हे महार जातीचे असून, फार उद्योगी व महत्त्वाकांक्षी गृहस्थ होते. प्रथम सैन्यातील महार पथकात साधे सैनिक होते. कालांतराने ते लष्करी छावणीतील शाळेत मुख्याध्यापक झाले आणि सुभेदार-मेजर या पदापर्यंत चढले. ते नाथपंथी असून, त्यांनी रामायण, ज्ञानेश्वरी, इ. ग्रंथांचा अभ्यास केला होता.

भीमरावाचे शिक्षण सातारा व मुंबई येथे झाले. सातारा येथील शाळेत आंबेडकर नावाचे एक ब्राह्मण शिक्षक होते. या मुलावर त्यांचा फार लोभ होता. त्याचे मूळ आडनाव आंबावडेकर होते, ते त्यांना आवडत नसे. म्हणून त्यांनी त्याला आंबेडकर हे नाव लावण्यास सांगितले आणि शाळेच्या दप्तरात तशी नोंदही करून टाकली.

बी. ए. झाल्यावर ते श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांच्या मदतीने अमेरिकेला गेले व कोलंबिया विद्यापीठाचे एम. ए., पीएच्. डी. झाले (१९१६). अमेरिकेहून परत आल्यावर त्यांनी वडोदे संस्थानात नोकरी धरली. या नोकरीत असताना अस्पृश्य म्हणून त्यांना फार वाईट अनुभव आले. त्यानंतर कोल्हापूरच्या शाहू महाराजांचे साहाय्य घेऊन वॅरिस्टर होण्यासाठी ते इंग्लंडला गेले. इंग्लंडमध्ये अभ्यास करून व 'दि प्रॉब्लेम ऑफ दि रुपी' हा प्रबंध लिहून त्यांनी लंडन विद्यापीठाची डी. एस्सी. ही दुर्मिळ पदवी संपादन केली. नंतर वॅरिस्टरीचीही परीक्षा देऊन ते मायदेशी परत आले.

उच्च शिक्षणासाठी भीमराव परदेशांत गेले होते, तेव्हा त्यांना फार हालअपेष्टा भोगाव्या लागल्या. द्रव्याची कमतरता असल्यामुळे ते कित्येक दिवस अर्धपोटी राहत होते. मात्र त्यांनी आपले अध्ययन जिद्दीने चालू ठेवले आणि सर्व शिक्षणक्रमात यश संपादले.

उच्चविद्याविभूषित असूनही अस्पृश्य जातीत जन्माला आल्यामुळे त्यांना आयुष्यात फार अपमान सोसावे लागले. शेवटी त्यांनी अस्पृश्यांच्या उद्धाराची व त्यांच्यावर होणाऱ्या अन्यायांचे निर्मूलन करण्याची प्रतिज्ञा केली. आपल्या प्रतिज्ञेला अनुसरून त्यांनी स्वतःला अस्पृश्योद्धाराच्या कामी सर्वस्वी वाहून घेतले.

'मूकनायक', 'वहिष्कृत भारत', 'जनता', 'समता' व 'प्रबुद्ध भारत' अशी पाच वृत्तपत्रे त्यांनी सुरू केली. त्यांच्या नेतृत्वाखाली अस्पृश्य समाजाने दोन प्रखर सत्याग्रह केले. पहिला महाडला चवदार तळ्यावर पाणी भरण्याचा (मार्च १९२७) व दुसरा नाशिकच्या राममंदिरप्रवेशाचा (मार्च १९३०). या सत्याग्रहांमुळे अस्पृश्यांमध्ये जागृती होऊन त्यांची संघटना झाली. इ. स.१९३० ते ३२ पर्यंत ते गोलमेज परिषदेचे सभासद होते. या परिषदेत त्यांनी अस्पृश्यांची बाजू घेऊन त्यांना स्वतंत्र मतदार संघ मिळावा, अशी मागणी केली व गोलमेज परिषदेत ती मंजूरही झाली. परंतु त्यावरूनच म. गांधी व आंवेडकर यांच्यांत मतभेद निर्माण झाला. गांधीजींना अस्पृश्यांचा हा सवता सुभा मान्य नव्हता. म्हणून तो निर्णय वदलून घेण्यासाठी गांधीजींनी पुणे येथे प्राणांतिक उपोषण आरंभिले. त्या वेळी आंवेडकर व गांधीजी या दोघांत या प्रश्नावर चर्चा होऊन सुप्रसिद्ध 'पुणे करार' जन्माला आला. इ. स. १९३६ साली त्यांनी स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापना केली. पुढे ते मुंबई कौन्सिलवर निवडून आले. इ. स. १९४२ ते ४६ या काळात ते व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळाचे मजूरमंत्री होते. त्या अवधीत त्यांनी अस्पृश्य वर्गाची शैक्षणिक व आर्थिक उन्नती करण्याच्या कामी आटोकाट प्रयत्न केले. त्यांनी त्यासाठी मुंबईत सिद्धार्थ कॉलेज स्थापन केले. 'शेडयूल्ड कास्ट फेडरेशन' ही अस्पृश्यांची संस्था त्यांच्याच खंबीर नेतृत्वाखाली वाढली. पुढे



डॉ. भीमराव आंवेडकर

स्वतंत्र भारताची राज्यघटना निर्माण करण्याच्या कामी त्यांची योजना झाली. तीन वर्षे सतत परिश्रम करून त्यांनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी भारताची नवी राज्यघटना तयार केली. आंवेडकरांच्या दृष्टीने या घटनेतील महत्त्वाचा भाग म्हणजे अस्पृश्यता नामशेष करणारे कलम हा होय. भारत स्वतंत्र झाल्यावर केंद्रीय मंत्रिमंडळात कायदामंत्री म्हणून त्यांची नेमणूक झाली. १९४८ च्या ऑक्टोवरमध्ये हिंदू कोड विल लोकसभेला सादर करण्याचा मानही त्यांनाच मिळाला.

त्यांच्या पहिल्या पत्नीचे नाव रमाबाई असे होते. त्या १९३५ साली निवर्तल्या. त्यानंतर तेरा वर्षांनी म्हणजे १९४८ साली डॉ. लक्ष्मीवाई कवीर या सारस्वत महिलेशी त्यांनी द्वितीय विवाह केला.

स्पृश्यांकडून अस्पृश्यांवर होत असलेला अन्याय त्यांच्या धर्मांतरावाचून दूर होणार नाही, अशा धारणेने सन १९३५ साली आंवेडकरांनी धर्मांतराची घोषणा केली होती; पण पुढे वीस वर्षांनंतर १४ ऑक्टोवर १९५६ रोजो दसऱ्याच्या मुहूर्तावर नागपूर येथे आपल्या ५ लाख अनुयायांसह त्यांनी हिंदू धर्माचा त्याग करून वौद्ध धर्म स्वीकारला. जन्मभर आलेल्या कटू अनुभवाने ते चिडले होते. आपल्या अस्पृश्य बांधवांना समाजात समानतेने वागविले जात नाही, हे शल्य त्यांच्या मनाला सदैव बोचत होते. त्याचीच परिणती या सामुदायिक धर्मांतरात झाली. वौद्ध धर्मात जातिभेद नाही, या तत्त्वावर त्यांनी बौद्ध धर्म स्वीकारला.

डॉ. आंबेडकरांनी अर्थशास्त्र, इतिहास, समाजशास्त्र, राजकारण, इ. विषयांवर अनेक ग्रंथ लिहिले. त्यांची नावे अशी – प्राचीन भारतातील व्यापार (१९१५), भारतातील जातिसंस्था, तिची यंत्रणा, उत्पत्ती आणि विकास (१९१६), भारताच्या राष्ट्रीय नफ्याचा वाटा – एक ऐतिहासिक पृथक्करणात्मक परिशीलन ( १९१६ ), ब्रिटिश भारतातील प्रांतिक व अर्थशास्त्रीय उत्क्रांती (१९२४), भारतातील जाती (१९२४), पाकिस्तानविषयी विचार (१९४०), काँग्रेस आणि गांधी यांनी अस्पृश्य वर्गास कसे वागविले (१९४५), शूद्र पूर्वी कोण होते? (१९४६), बुद्ध आणि त्याचा धम्म ( १९५७ ), गांधी आणि अस्पृश्य जनांचे बंधविमोचन. त्यांच्या प्रकांड पांडित्यामुळे ते आधुनिक मनू म्हणून ख्याती पावले होते.

६ डिसेंबर १९५६ रोजी दिल्ली येथे आंबेडकरांचा अंत झाला. एक कडवा सुधारक, विद्वान संशोधक, हरिजनांचा झुंझार नेता, अर्थशास्त्रज्ञ, थोर कायदेपंडित आणि भारतीय घटनेचे प्रमुख शिल्पकार म्हणून ते कीर्तिरूपे अमर राहतील. [डॉ. बाबासाहेब आंबेडकर – श्री. धनंजय कीर, १९७७]

**आंबेर** जयपूर संस्थानाची पूर्वीची राजधानी. हे शहर जयपूरच्या ईशान्येला सात-आठ मैलांवर वसलेले आहे. इथले राजप्रासाद पहाडांच्या मध्यभागी बांधलेले असून, त्यांच्या पार्श्वभागी उंच डोंगरावर झारगड आहे. राजप्रासादात कुरुंदी व संगमरवरी पाषाणाचे अप्रतिम शिल्पकाम आहे. परंतु आंबेर अधिक प्रसिद्ध आहे, ते तिथल्या शिलादेवीच्या मंदिरामुळे. या देवीविषयी पुढील आख्यायिका सांगतात –

आंबेरचा राजा मानसिंह याने यज्ञ करून शिलादेवीला संतुष्ट केले. म्हणून देवीने आपला पहिला भक्त, बंगालचा राजा केदार याच्याकडून मान सिंहाकडे येण्याची इच्छा प्रदर्शित केली. तेव्हा मानसिंहाने तिला आंबेर येथे आणून एका भव्य मंदिरात तिची प्रतिष्ठापना केली.

जैसोरमध्ये सिद्धशिला नामक एक शिला होती. कोण्या ऋषीने तिच्यावर बसून गायत्री मंत्राची २४ पुरश्चरणे केली होती. मानसिंहाला ते समजले व त्याने त्या शिलेची शास्त्रोक्त मूर्ती घडवून घेतली, असे तिथले पुजारी सांगतात.

जगत्‌शिरोमणीमंदिर, अंबिकेश्वरीमंदिर, अथिनीकुंड, मानसागर ही आंबेर येथील अन्य प्रेक्षणीय स्थळे आहेत.

आंबेर या नावासंबंधी पुढील उपपत्ती सांगतात – अवध देशाचा अंबरीष नावाचा राजा होता. त्याने इथे अंबिकेश्वराची स्थापना केली व त्यामुळे हे शहर आंबेर या नावाने प्रसिद्ध झाले. [सं. राजस्थान; ज. द.]



**आ** द्वितीय स्वरवर्ण. याचे स्थान कण्ठ आहे. हा दीर्घ व प्लुत होतो. याच्याविषयी कामधेनुतंत्रात पुढीलप्रमाणे वर्णन आलेले आहे –

आकारं परमाश्चर्यं शङ्खज्योतिर्मयं प्रिये ।
ब्रह्मविष्णुमयं वर्णं तथा रुद्रमयं प्रिये ।
पञ्चप्राणमयं वर्णं स्वयं परमकुण्डली ।।

अर्थ – हे पार्वती, आकार हा परमाश्चर्यरूप, शंखासारखा तेजस्वी, ब्रह्मा, विष्णू व रुद्र यांचे निवासस्थान, पंचप्राणात्मक व परमकुंडली (वर्तुळाकार) आहे.

वर्णाभिधानात याची विजय, अनंत, विनायक, अशी अनेक नावे दिली आहेत. [श. क.]

**आईजी** खारडिया शीख लोकांची कुलदेवी. मारवाडातील बीलाडा येथे आईजीचे मंदिर आहे. शीख लोक त्या मंदिराला दरगाह असे म्हणतात. मंदिरात नंदादीप अखंड तेवत असतो. त्याच्या ज्योतीचे काजळ पिवळट रंगाचे असते, म्हणून त्याला केशर म्हणतात. देवीच्या पुजाऱ्याला दीवान हे नाव असून, त्याची नेमणूक वंशपरंपरा असते. भाद्रपद शु. द्वितीयेला देवी अंतर्धान पावली, म्हणून त्या दिवशी इथे उत्सव करतात. त्या दिवशी अनेक भाविक शीख इथे जमतात व नंदादीपाचे आणि गादीचे दर्शन घेतात. दळायला बसण्यापूर्वी आईजीच्या नावाने एक मूठभर धान्य एका हंडयात टाकायचे, असा शीख स्त्रियांचा रिवाज आहे. असे धान्य गोळा करण्यासाठी आईजीच्या मंदिरातर्फे भगव्या वस्त्राने मढविलेल्या बैलगाड्या मारवाड, मेवाड व माळवा प्रांतांत फिरत असतात. अशा प्रकारे शेकडो मण धान्य आईजीच्या मंदिरात जमते व त्याचा सदावर्तात उपयोग करतात. ज्या शीख कुटुंबात वीस माणसे किंवा वीस जनावरे असतात, त्यांतील एक देवीला अर्पण करतात व कालांतराने त्याबद्दल काही पैसे ऋयमूल्य म्हणून देवीला देऊन त्या व्यक्तीला किंवा जनावराला परत घरी नेतात.

**आई पंथ** नाथपंथाची एक शाखा. गोरखनाथाची एक शिष्या विमलादेवी ही या शाखेची प्रवर्तक होय. ती आई या उपाधीने प्रसिद्ध झाली. म्हणून तिच्या पंथाला आई पंथ असे नाव पडले. ती गुजरातेत जन्मली व तिने आपले निवासस्थान मारवाडात केले. आई पंथाचे केंद्र बिलाडा (जोधपूर) हे आहे. तिथेच तिने सर्व जातींच्या लोकांना आपली दीक्षा देण्यास सुरवात केली. तिथून आई पंथ सुरू झाला. तिला लोक नवदुर्गेचा अवतार मानून भजतात. रोहटक (हरियाणा) व हरिद्वार (उत्तरप्रदेश) इथेही या पंथाचे मठ

आहेत. या पंथात अनेक संत व कवी होऊन गेले. त्यांचे साहित्य जनतेत प्रसार पावलेले आहे. [ गो. च. प.; वरदा ]

**आओ नाग** आसाममधील नाग लोकांच्या १९ प्रमुख जमातींपैकी एक जमात. हे लोक मंगोल वंशाचे आहेत. आपली उत्पत्ती पाषाणस्वरूपी एका देवतेपासून झाली, असे हे लोक मानतात. आओ जमात एकजिनसी नाही. माँगसेन व चुंग्ली या दोन घटक जमाती एकत्र होऊन ती बनली आहे. याबाबत पुढीलप्रमाणे दंतकथा आहे–

माँगसेन जमात भूमीतून निर्माण झाली व ती कुबोक येथे राहू लागली. चुंग्ली जमात चुंग्लीयिन्ती येथे प्रस्थापित झाली. प्रारंभी दोन्ही जमातींची सामाजिक व शासनविषयक व्यवस्था अगदी पृथक होती. शिवाय या उभय जमातींत सतत संघर्षही चालत असे. एक जमात दुसरीवर वर्चस्व गाजविण्यासाठी नेहमी बद्धपरिकर असे. अशा स्थितीत शिलुती नावाचा एक वीरपुरुष चुंग्लीयिन्ती येथील जमातीत निर्माण झाला. त्याने चढाई करून कुबोकच्या लोकांना आपल्या शासनाखाली आणले. मग या दोन्ही जमाती शेजारी शेजारी दोन निरनिराळ्या खेलांमध्ये (आळी किंवा पेठ) नांदू लागल्या. कालांतराने त्यांच्यामध्ये सांस्कृतिक समन्वय घडून आला. ते बहुतांशी एकमेकांत मिसळले व मग त्या संयुक्त जमातीला आओ हे नाव पडले. पण अशा प्रकारे संयुक्त होऊनही त्यांच्यांत काही फरक राहिले आहेत, ते पुढीलप्रमाणे –

(१) दोन्ही जमाती एकाच वस्तीत राहत असल्या तरी त्या निरनिराळ्या खेलांत राहतात.

(२) दोन्ही जमातींची बोलभाषा वेगळी आहे. पण अलिकडे ख्रिस्ती मिशनऱ्यांनी बायबलाचे भाषांतर चुंग्ली भाषेत केल्यामुळे ती भाषा आता उभय जमातींना सामान्य झाली आहे. गीते व काव्ये मात्र अजूनही माँगसेन भाषेतच रचली जातात.

(३) चुंग्ली जमातीत गावातल्या प्रमुख लोकांचे विधिमंडळ असते व ते निवडणूक होऊन अधिकारावर येते. माँगसेन जमातीत ही पद्धत नाही.

(४) उभय जमातींतल्या स्त्रियांची वेषभूषा भिन्न असते.

(५) चुंग्ली जमात खाद्यपदार्थांच्या बाबतीत सोवळे ओवळे किंवा विटाळ मानीत नाही. माँगसेन जमात ते सगळे पाळते.

एके काळी आओ संस्कृतीने गणराज्यपद्धतीत श्रेष्ठत्व मिळविले होते. प्रत्येक आओ गावात प्राचीन कालापासून गणराज्य अस्तित्वात होते. प्रत्येक गावाचे क्षेत्र ठरलेले असे व त्या क्षेत्रापुरती त्यांची राज्यघटना असे. गावातल्या प्रमुखांचे एक सभासदमंडळ त्या गावाचा सर्व कारभार पाही. अशा सभासदांना तातार म्हणत. अनेक बाह्य संकटांना तोंड देऊन त्यांनी ही लोकशाही उभारली होती. चुंग्लीयिन्ती ही वसाहत प्रत्येक गावाला आदर्शभूत असे.



आओ नाग युवती

पुढे चुंग्लीयिन्तीची वसाहत वाढली व वाढत्या लोकसंख्येला जागा व निर्वाहाची साधने कमी पडू लागली, म्हणून कित्येक लोक तिथून बाहेर पडले व त्यांनी सांप्रतच्या आओ प्रदेशात नवी गावे स्थापन केली. दक्षिणेकडे गेले त्यांनी सेम व लोथ या प्रदेशात नव्या वसाहती स्थापल्या. बऱ्याच पिढ्या ते वरील प्रदेशात नांदले; पण पुढे बाहेरून उपद्रव होऊ लागल्यामुळे ते परत आओ प्रदेशात आले.

आओ नाग हे धाडसी व महत्त्वाकांक्षी होते. भावाभावांत किंवा कुलाकुलांत सत्तासंघर्ष सुरू झाला, की त्यांतला कर्तबगार असेल तो नव्या जागी जाऊन आपले बस्तान मांडी. मग तिथे इतरही अनेक कुटुंबे त्याच्या भोवती येऊन वसत. मग तिथे प्रमुख लोकांचे गणराज्य स्थापन होई. वस्तीत एखाद्याने ग्रामद्रोही कृत्य केल्यास त्याला वस्तीतून हाकलून दिले जाई. नवी गावे सामान्यपणे शत्रूला दुर्लंघ्य अशा उंच टेकडीच्या माथ्यावर बसवीत. तसे करताना हवा–पाणी चांगले व भोवतालची जमीन सुपीक आहे की नाही, ते पाहत. लोकसंख्या वाढून गावातली शेतजमीन अपुरी पडते, असे दिसून आल्यावर शेजारच्या वस-

हतीकडे जमिनीची मागणी करीत. त्या वसाहतीने नकार दिल्यास त्यांच्यावर भाले-तलवारी घेऊन चाल करीत. लढाईत विजय मिळाला, तर जिंकलेल्या वसाहतीची जमीन आपल्या वसाहतीत सामील करीत. लुटलेल्यापैकी स्थावर मालमत्ता गावाच्या मालकीची व जंगम मालमत्ता जमातीच्या पुढाऱ्याच्या मालकीची होत असे. खाजगी मिळकतीचे तत्त्व आओ नागांच्या प्रदेशात पुरातन कालापासून मान्य झाले आहे.

**ग्रामव्यवस्था** – आओंच्या प्रत्येक गावात वरचा व खालचा असे दोन खेल अर्थात भाग असतात. प्रत्येक खेलात अनेक कुटुंबे नांदतात. खेलामध्ये बखेडा निर्माण झाल्यास तातार म्हणजे ग्रामसभेचे सभासद एकत्र जमून त्याचा निवाडा करतात. प्रत्येक खेलाचे आणखी पोटविभाग असतात. त्यांना मेपू म्हणतात. एका मेपूत एक कुल राहते. जितके मेपू तितकी कुलांची संख्या असते. वाघाची शिकार, रस्ते, इ. गोष्टी खेलातील लोक एकजुटीने करतात; पण शत्रूवर हल्ला करायचा असल्यास मात्र गावातल्या धाडसी व तगड्या पुरुषांचीच निवड होते. सार्वजनिक हिताची कामे करण्यासाठी स्वयंसेवकांची एक समिती नेमतात. तिला मापांग असे नाव आहे. या समितीत हुशार व तज्ज्ञ लोकांची नेमणूक होते. याशिवाय ग्रामसंरक्षक म्हणूनही एक संघटित दल असते. आग लागणे, अपघात घडणे, शत्रूची स्वारी, इ. प्रसंगी हे दल नगारा वाजवून गावाला धोक्याचा इशारा देत असे; पण ही चाल अलिकडे बंद पडली आहे.

**समाजरचना** – नाग प्रदेशातली प्राचीन समाजरचना चांगली होती व त्यांचे जीवन सुखी होते; पण अलिकडे परदेशांतल्या ख्रिस्ती मिशनऱ्यांनी त्यांच्यांत शिरकाव करून घेतल्यापासून आओ नाग हे आपल्या परंपरागत जीवनाला वंचित होऊ लागले आहेत. त्यांनी पुनश्च आपल्या प्राचीन समाजव्यवस्थेचा स्वीकार करावा, असे मत ताजेंयुब आओ या त्यांच्यांतल्याच एका विद्वानाने व्यक्त केले आहे. नाग कुटुंबात नवराबायको, त्यांची मुले, निराश्रित आप्त व एखादा पोरका नातेवाईक, इतकी माणसे असतात. सगळी मिळून शेतीचे काम करतात. शेतीची मालकी सामाइक असते. फक्त स्त्रीला माहेराकडून वारसा-हक्काने मिळालेली मिळकत तेवढी तिच्या एकटीच्या मालकीची असते. कुटुंबातले मुलगे मोठे होऊन त्यांची लग्ने झाली, की ते विभक्त होऊन निराळे घर थाटतात. वडिलार्जित उत्पन्नात विवाहित पुत्रांचा हिस्सा बापाच्या बरोबरीने असतो. आओंच्या प्रत्येक वस्तीत आरिचू नावाचे एक सार्वजनिक शयनगृह असते. १२ वर्षांवरील सर्व मुले रात्री तिथे झोपतात. तिथेच त्यांना युद्धकलेचेही शिक्षण दिले जाते. त्यांच्या आपसांत लुटुपुटीच्या लढायाही होतात. मध्यरात्री दिवा न घेता एकट्या मुलाला जंगलात पाठविणे, सापळ्यात सापडलेल्या वाघाशी कुस्ती खेळायला लावणे, इ. धाडसी कामे करवून आओ आपल्या मुलांना धीट बनवितात. आरिचूमध्ये त्यांचे एक लष्करी मंडळच असते. त्यात निरनिराळ्या श्रेणींचे अधिकारीही असतात. युद्धकलेवरोबरच तिथल्या मुलांना नृत्यगायनही शिकवितात. एक आरिचू लहान पडू लागले, की त्यातलीच मुले लगेच दुसरे उभारतात. आरिचूच्या खांबावर चित्रे कोरतात. असेच एक मुलींचेही आरिचू असते. त्याची पालिका एखादी विधवा स्त्री असते. कित्येक ठिकाणी त्या पालिकेच्या घरातच मुली जमतात. त्यांना सूतकताई, विणकाम, गृहव्यवस्था, इ. विषय शिकविले जातात. पुष्कळदा मुले-मुली एकत्र जमून वसतीची महत्त्वाची कामे सहकार्याने करतात. अशा वेळी त्यांच्या प्रणयालाही अवसर मिळतो. मात्र आओ मुली आपला सहचर निवडताना त्याची कसून परीक्षा घेतात. आओंचे विवाह व घटस्फोट यासंबंधीचे नियम सामान्यतः हिंदू कायद्याप्रमाणेच आहेत. विशेष नियम ते असे –

(१) कोणालाही स्वतःच्या कुलातील मुलीशी लग्न करता येत नाही.

(२) या जमातीत पुरुषाला अनेक स्त्रिया व स्त्रीला अनेक पती करण्याची बंदी आहे.

(३) हुंडा किंवा देज देण्याची पद्धत नाही. विवाह ठरला म्हणजे साखरपुड्यासारखा एक विधी असतो. त्या वेळी वराचा बाप वधूच्या बापाला थोडे भात व काही नाणी देतो.

(४) वाङ्‌निश्चयाची मुदत तीन वर्षे असते. त्या मुदतीत वर-वधू परस्परांशी एकनिष्ठ राहतात. नवरा मुलगा वधूच्या आईबापांना सर्व महत्त्वाच्या कामांत मदत करतो व विवाहोत्तर स्वतंत्र राहण्यासाठी नवे घर बांधतो.

(५) एका कुलातल्या किंवा नजीकचे नाते असलेल्या वर-वधूंचा विवाह झाला, तर त्या जोडप्याला समाजबहिष्कृत करून गावाबाहेर हाकलून देतात.

(६) लग्नापूर्वी मूल झाल्यास त्या संततीला वैध मानीत नाहीत; पण गर्भधारणा झाल्यावर मूल जन्मास येण्यापूर्वी विवाह झाला तर त्या संततीला वैध मानतात.

(७) अनौरस मुलाचा बाप कोण, हा प्रश्न मूल जन्माला येण्यापूर्वीच सोडवावा लागतो. अशा प्रसंगी सदर स्त्री ज्या पुरुषाशी संबंध असल्याचे पुराव्यानिशी शाबीत करील, तो इसम त्या मुलाचा बाप मानला जातो व ते मूल वयात येईपर्यंत त्याच्या पोषणाची जबाबदारी त्या इसमावर राहते.

(८) व्यभिचार, छळ व त्याग ही कारणे घटस्फोटाला पुरेशी असतात. विधवेला पुनर्विवाह करणे असल्यास पतीच्या मरणोत्तर किमान एक वर्ष थांबावे लागते.

[आओ नाग – कस्टमरी लॉज, श्री. ताजेनयुव आओ, १९५७]

**आकर्षण धनुरासन** या आसनाने संधिवात दूर होतो आणि नाक, डोळे व गळ्याच्या खालच्या भागातली हाडे, यांचे दोष दूर होतात. याची पद्धती पुढीलप्रमाणे –

उजवा पाय पसरून त्यावर डावा पाय पसरावा. त्यानंतर उजवा पाय वाकवून डाव्या पायाच्या वरच्या भागावर ठेवावा. वाकलेल्या उजव्या पायाच्या अंगठ्याला डाव्या हाताने धरून उजव्या हाताने डाव्या पायाचा अंगठा पकडावा. मग उजव्या



आकर्षण धनुरासन

पायाला डाव्या कानापर्यंत खेचीत राहावे. डोके सरळ ठेवावे. मग वेगाने दोन्ही हात सोडून द्यावे व उजवा पाय डाव्या पायाच्या बगलेत पसरवून जमिनीवर ठेवावा. हे आसन करताना सर्व शरीर ताणून ठेवावे व पूरक करावा. हळूहळू याचा अभ्यास वाढवावा. [उ. यो. द.]

**आकाश** याचे अर्थ (१) अंतराळ, मधला अवकाश, पोकळी (लौकिक प्रयोग). (२) पंच महाभूतांतले शब्द-गुणक महाभूत. (३) सर्वव्यापी अनंत अवकाशरूप तत्त्व. काल-तत्त्व जसे भौतिक सृष्टीहून वेगळे पडते, तसेच हेही भौतिक सृष्टीहून वेगळे आहे. वर दिलेला अर्थ विशिष्ट आहे आणि आकाश म्हणजे अंतराळ अथवा पोकळी या अर्थाहून तो भिन्न आहे. कारण त्या अर्थाप्रमाणे जिथे घन आहे, तिथे आकाश नसणार. पण व्यापक आकाशतत्त्व घनातही मावते आणि घनही त्यात मावते.

प्रवाहण जैवलीच्या मते आकाश हे सर्व जगाचे उत्पत्तिकारण आहे. ही कल्पना अत्यंत परिणत आहे. या विश्वाची गती काय होईल, असा प्रश्न त्याला विचारला असता तो म्हणाला –

> आकाश इति होवाच । सर्वाणि वा इमानि
> भूतान्याकाशादेव समुत्पद्यन्ते । आकाशं प्रत्यस्तं यन्ति ।
> आकाशो हि एव एभ्यो ज्यायान् । आकाशः परायणम् ।
> (छान्दो. १.९.१)

अर्थ– सर्व भूते आकाशापासून उत्पन्न होतात व शेवटी आकाशातच लीन होतात. आकाश सर्वश्रेष्ठ. तेच शेवटचे परमस्थान. ही कल्पना सृष्टिनिर्माणशास्त्राच्या इतिहासात प्रगत व उच्चतर आहे, असे गुरुदेव रा. द. रानडे म्हणतात.

वैरोचनापासून आकाश उत्पन्न झाले असे बौद्ध मानतात. बौद्धमतानुसार आकाश म्हणजे सूक्ष्म वायू किंवा शून्य होय. ते स्वतःतूनच प्रकृतिधर्मानुसार निर्माण होते व स्वतःवर स्वतःच सत्ता चालविते. ते अनंत आहे. सर्व वस्तुमात्र आकाशात शोषले जाते. ते उत्पत्ति– स्थिति–लयाचे मूलकारण आहे. पंचमहाभूते व बौद्धिक सूक्ष्मता यांचे ते मूलतत्त्व आहे.

जैन दर्शनात आकाश हे पाच अस्तिकायांपैकी एक आहे. जीवादी अस्तिकाय द्रव्यांना आकाशच आधार देते. जैन दर्शनात आकाशाची सत्ता अनुमानाने अंगीकारली आहे. जीव, पुद्गल, धर्म व अधर्म हे पदार्थ बहुप्रदेशव्यापी आहेत. त्यांच्या विस्ताराच्या सिद्धीसाठी आकाश या द्रव्याची सत्ता मानणे तर्कसंगत ठरते. जैनांनी आकाशाचे दोन प्रकार मानले आहेत– (१)जीव पुद्गलादी द्रव्ये ज्या भागात राहतात, ते लोकाकाश, व (२)त्याच्या वरच्या भागातील आकाश ते अलोकाकाश होय.

चर्मचक्षूंना आकाश हे क्षितिजापाशी पृथ्वीवर टेकलेल्या एखाद्या प्रचंड घुमटाप्रमाणे दिसते. ज्योतिषशास्त्राच्या बाल्यावस्थेत मनुष्याच्या आकाशासंबंधीच्या कल्पना बऱ्याच अज्ञानमय होत्या. आकाश ही जड वस्तू आहे व म्हणून ते चार दिशांना असलेल्या चार स्तंभांवर आधारलेले आहे, अशी प्राचीन मिसरी लोकांची कल्पना होती; तर पृथ्वीभोवती असलेल्या पर्वतांच्या तटांवर आकाशाचा घुमट बसविला आहे, असे खाल्डी लोक समजत होते. वैदिक काळच्या भारतीयांची आकाशविषयक कल्पना मात्र बरीचशी वस्तुस्थितीला धरून होती, असे वाटते. जसजशी ज्योतिषशास्त्राची प्रगती होत गेली, तसतसे आकाश म्हणजे अवकाश (पोकळी) आहे, हे ज्ञान भारतीयांना झाले व त्या पोकळीत दिसणाऱ्या सूर्य, चंद्र, ग्रह, उपग्रह, तारे, धूमकेतू, उल्का, तारकागुच्छ यांविषयी त्यांना जिज्ञासा उत्पन्न झाली. मग त्या दृष्टीने ते प्रयत्न करू लागले.

भूपृष्ठावर कुठेही उभे राहून पाहिले तरी हवेतील धुळीच्या कणांमुळे आकाशाचा रंग निळा दिसतो. भूपृष्ठापासून जो जो जास्त उंचीवर जावे, तो तो हा निळा रंग जास्त गडद होत जातो

व खस्वस्तिकाच्या जागी त्याला विशेषच गडदपणा येतो.

जगातील सर्व प्रमुख व सुधारलेल्या धर्मांत, त्याचप्रमाणे असंस्कृत अशा सर्व धर्मपंथांतही आकाशाला देवता मानलेले आहे. या देवतेचे स्वरूप, दर्जा व वैशिष्ट्य मात्र भिन्न भिन्न प्रकारचे आहे. आकाशदेवतेच्या कार्याबद्दल अनेक धर्मांतील वर्णनात साम्य आहे. पाऊस आणि त्याचे भूपृष्ठावर होणारे परिणाम, हे आकाशदेवतेचे पहिले कार्य होय. पर्जन्यवृष्टीने भूपृष्ठावर अनेक प्रकारची जीवोत्पत्ती होते, हे निदर्शनास आल्यावर आकाश ही प्राणदात्री देवता आहे आणि वीज पडून मृत्यू येतो हे पाहिल्यावर ती देवता मरणदात्रीही आहे, अशी कल्पना उद्‌भवली. अनेक धर्मांत आकाशदेवतेला उत्पत्तिकार्यात प्रमुख स्थान दिलेले आहे. पाहा– द्यावा–पृथिवी. [ गॉ. नॉ. बु.; म. ज्ञा. को.; उ. र.; भा. द. ]

**आकाशगंगा** रात्रीच्या वेळी सर्व आकाशभर परसलेली दुधिया रंगाची जी मेखला दिसते, तिला हे नाव दिलेले आहे. हा तारकांचा संघ असून, त्यात सुमारे चाळीस अब्ज तारे आहेत, अशी कल्पना आहे. याचे केंद्र पृथ्वीपासून दक्षिणेला धनुराशीच्या दिशेला सुमारे तीस हजार प्रकाशवर्षे अंतरावर आहे. त्या बाजूला ताऱ्यांची संख्या खूप मोठी असल्यामुळे आकाशगंगा तिथे अत्यंत तेजस्वी दिसते. आकाशगंगेचा व्यास सुमारे एक लाख प्रकाशवर्षे असून, आपली सूर्यमाला तिच्या मध्यबिंदूपासून सुमारे वीस हजार प्रकाशवर्षे अंतरावर आहे. सूर्य हा आकाशगंगा या संघातला एक सामान्य तारा आहे. आकाशगंगेला दूधगंगा असेही म्हणतात. कारण तो तारकासंघ अतिशय दूर असल्यामुळे दुधासारखा दिसतो. तै. ब्रा. (१.७.६.६) व श. ब्रा. (५.३.२.१) या ग्रंथांत 'अर्यम्णः पन्थाः' असे जे शब्द आहेत, ते आकाशगंगेला उद्देशून आहेत, असे काही विद्वानांचे मत आहे; तर अन्य काही विद्वानांच्या मते त्याचा अर्थ क्रांतिवृत्त असा आहे.

आकाशगंगेविषयी पुढील समजुती प्रचलित आहेत – (१) एकचक्र रथात बसून सूर्य जातो तो मार्ग. (२) वामनावतारी विष्णू तिसरे पाऊल टाकीत असता ते एका अंडयाला लागले आणि ते फुटून हा प्रवाह निघाला, व (३) स्वर्गावर चढण्याची शिडी. आकाशगंगा ही स्वर्गातल्या अमरावतीला वेढून राहिली आहे, असे भागवत पुराणात सांगितले आहे (८.१५.१४). [ पु. इं.; वे. इं.; ज्योतिर्विलास; नक्षत्रलोक ]

**आकाशगर्भ** एक बोधिसत्त्व. याला खगर्भ असेही नाव आहे. आकाशाच्या किंवा खगोलाच्या गर्भात वास्तव्य करणारा, असा त्याचा अर्थ होय. रत्न हे याचे चिन्ह आहे. निष्पन्न योगावलीच्या धर्मधातुवागीश्वर मंडलात याचे वर्णन केलेले आहे, ते असे – याचा वर्ण श्याम असून, तो उजव्या हाताने सर्व प्रकारच्या रत्नांचा वर्षाव करतो आणि डाव्या हाती चिंतामणी रत्न धारण करतो.



आकाशगर्भ

याची आणखीही विविध रूपे आढळतात. एका मूर्तीत तो उजव्या हाती कमल धारण करतो व डाव्या हाताने वरद मुद्रा दर्शवितो. एका रूपात तो त्रिमुखी व षड्‌भुज दिसतो. साधनमालेत याचे वर्णन खगर्भ या नावाने केलेले आहे. [ इं. बु. इ. ]

**आकाशदिवा** आश्विन शु. एकादशी ते कार्तिक शु. एकादशीपर्यंत, घराच्या बाहेर एक उंच खांब पुरून त्यावर दोरीच्या साहाय्याने जो दिवा टांगतात, त्याला आकाशदिवा असे म्हणतात. त्याचा विधी पुढीलप्रमाणे –



आकाशदिवे

घरापासून जवळच थोडी जमीन गोमयाने सारवावी. तीवर चंदनयुक्त जलाने प्रोक्षण करून अष्टदळ कमळ काढावे. मध्यभागी वीस हात, नऊ हात किंवा पाच हात लांबीचा खांब

पुरावा. तो वस्त्र, पताका, अष्टघंटा, कलश, यांनी सुशोभित करावा. त्यावर अष्टदलाकृती दीप करून अडकवावा. त्या दीपात मोठा दिवा लावावा. त्याभोवती कमळाच्या प्रत्येक पाकळीत एक असे आठ दिवे धर्म, हर, भूती, दामोदर, धर्मराज, प्रजापती, पितर ( तमःस्थित ) व प्रेत यांना उद्देशून लावावे. दिव्यात तिळाचे तेल घालावे. नंतर दीपाची पंचोपचार पूजा करून तो पुढील मंत्राने वर चढवावा –

दामोदराय नभसि तुलायां लोलया सह।
प्रदीपं ते प्रयच्छामि नमोऽनन्ताय वेधसे ॥

याचे फल लक्ष्मीप्राप्ती हे आहे.

सांप्रत दिवाळीच्या उत्सवात घरोघरीं विविध आकार-प्रकाराचे रंगी-बेरंगी आकाशदिवे लावले जातात, ते अत्यंत शोभिवंत दिसतात. [ व्रतराज; नि. सिं. ]

**आकाशपंचमी** एक जैन व्रत. तिथी भाद्रपद शु. पंचमी. आदल्या दिवशी एकभुक्त. पंचमीला उपवास. रात्री णमोकारमंत्राचा जप, स्तोत्रपठण आणि शास्त्राध्ययन. व्रतावधी पाच वर्षे. याची कथा अशी –

सौराष्ट्र देशात तिलकपूर नावाचे नगर होते. तिथल्या भद्रशाह नामक व्यापाऱ्याला विशाला नावाची कन्या होती. तिने हे व्रत केले, त्यामुळे चतुर्थ स्वर्गात तिला मणिभद्र देवाचा जन्म मिळाला. नंतर उज्जयिनी नगरीत प्रियंगुसुंदर राजाच्या पोटी सदानंद नावाच्या पुत्राच्या रूपाने तिने जन्म घेतला. पुष्कळ वर्षे राज्योपभोग घेतल्यावर सदानंदाने जिनदीक्षा घेतली आणि मोक्ष मिळविला. [ व्र. ति. नि. ]

**आकासकन्निगे** द. भारतातल्या ग्रामदेवता. या कुमारी असून, तलावाचे संरक्षण करतात. तळ्याच्या बांधांना जिथे भेगा पडायचा संभव असतो, तिथे यांच्या मूर्ती बसवितात. पुष्कळदा त्या तळ्याच्या बांधावर जमून भांडतात आणि त्यामुळे बांध फुटतो, अशी समजूत आहे. गावाला पुराचा धोका निर्माण होतो, तेव्हा त्यांतली एखादी लहान मुलीच्या रूपाने दारोदार हिंडून लोकांना तशी सूचना देते, अशीही समजूत आहे. महाराष्ट्रातही अशा जलदेवता आहेत. त्यांना आसऱ्या असे म्हणतात.

**आखाडा** (१) एक नृत्यप्रकार. महाराष्ट्रात लग्नाची वरात निघाली असता लेजीम, तलवारी, लाठ्या, इ. हत्यारे घेऊन काही लोक तिच्या पुढे नाचत जातात, त्याला आखाडा असे म्हणतात. जेव्हा वर आणि वधू या दोन्ही पक्षांकडील लोक आखाडा नाचतात, तेव्हा त्या नृत्यात विशेष रंग भरतो. [ फो. डा. म. ]

(२) कुस्ती, मलखांब, जोर, बैठका यासारखे व्यायाम करण्याची व शिकण्याची जागा. संस्कृत भाषेत याला मल्लशाला मल्लगृह किंवा मल्लभूमी असे शब्द आहेत. प्राचीन मराठीत अखाडा असा शब्द आढळतो (ज्ञाने. ११-५४८). हा शब्द अक्षवाट या संस्कृत शब्दाचे मराठी रूप होय. अक्षवाट शब्दाचा मूळ अर्थ जुगार खेळण्याची जागा असा आहे. पण त्याचे अर्थांतर होऊन त्याला आजचा अर्थ प्राप्त झाला, असे दिसते.

हरिवंशात (२.२९), भागवतात (१०.४२) आणि सोमेश्वराच्या अभिलषितार्थ चिंतामणीत आखाड्याची वर्णने आहेत. घत जातकातही याचे वर्णण आढळते. हरिवंशातील वर्णनाचा सारांश पुढीलप्रमाणे आहे – मथुरेतील हा आखाडा अष्टकोनी होता. त्याचे द्वार पूर्वाभिमुख होते. तो दोन मजली होता. त्यात स्त्रियांची व पुरुषांची बसण्याची व्यवस्था स्वतंत्र होती. त्यात बसण्यासाठी लाकडी मंच होते. राजघराण्यातील स्त्रिया दुसऱ्या मजल्यावर बसत. त्या ज्या खिडक्यांतून कुस्ती बघत त्या खिडक्यांना पुष्पांच्या माळा होत्या. कंसाची बसायची जागा पूर्वाभिमुख असून ती विशेष शोभिवंत केलेली होती.

सोमेश्वराने दिलेल्या आखाड्याच्या वर्णनात अधिक बारकावे आढळतात. या आखाड्याला सोळा खांब असून, त्याच्या पश्चिमेला दीड हात उंचीचा एक लाकडी चौकोनी मंच होता. त्याच्या जवळच एक लहानसा मंडप असून त्यात श्रीकृष्णाचा पुतळा होता. त्याच्या समोरच दहा हात रुंद व तीस हात लांब असा हौदा होता. हौदयात मऊ माती होती. मातीवर किंचित पाणी टाकून ती खणली जात असे. आखाडा बनविण्याचे काम ग्रामप्रमुखाकडे होते.

सोमेश्वराच्या या वर्णनात आणि आजच्या तालमीत फारसा फरक नाही. श्रीकृष्णाची जागा आता हनुमंताने घेतली आहे, एवढाच महत्त्वाचा फरक दिसतो.

आखाड्यातील कार्यक्रमांना प्रारंभ करण्यापूर्वी त्याची पूजा करण्याची पद्धत प्राचीन काळापासून आढळते. भागवतात आखाड्याची पूजा केल्याचा संदर्भ आहे (१०.४२.३३).

आखाड्याच्या लांबीरुंदीवरून आणि मातीवरून त्याचे निरनिराळे प्रकार पडतात. सुमारे दोनशे हात लांबीरुंदीचा आखाडा देवमान म्हणून ओळखतात. पन्नास हात लांबरुंद व एकवीस हात लांबरुंद हे आखाडे हे अनुक्रमे दैत्यमान व मर्त्यमान होत. निरनिराळ्या रंगाच्या मातीचे मिश्रण असलेला आखाडा त्याज्य मानला जात होता. अलिकडे बहुतेक सर्व आखाड्यांतून तांबडीच माती असते.

प्राचीन कालापासून निरनिराळ्या प्रसंगी कुस्त्यांचे फड होत असत. विराट नगरात असाच एक मोठा उत्सव झाल्याचे वर्णन महाभारतात आहे (म. भा. विराट. १३). याच आखाड्यात भीमाने जीमूताला ठार केले होते. विविध गावी निरनिराळ्या प्रसंगी आजही असे फड होतात. महाराष्ट्रात हनुमानजयंतीच्या वेळी असे आखाडे भरतात. पाहा – मल्लविद्या. [ मा. सां. अ.; सिद्धार्थ जातक; भा. म. उ. वि. ]

(३) गोसाव्यांचे आखाडे म्हणजे धार्मिक व लष्करी शिक्षण देणारे मठ होते. त्यामुळे गोसाव्यांत क्षात्रतेज निर्माण झाले. हे आखाडे फार प्राचीन काळापासून अस्तित्वात होते. पृथ्वीराज व जयचंद यांनी गोसाव्यांचे आखाडे पुन्हा व्यवस्थित केले, असे दसनामधर्म या पुस्तकावरून कळते. शंकराचार्यांच्या वेळी सनातनी, निर्वाणी, निरंजनी, अटल, अभान, आनंद व अग्नी या नावाचे सात आखाडे होते. प्रत्येक आखाड्याचा देव वेगळा, तसाच ध्वजही वेगळा असतो. सांप्रत कुंभमेळ्यांत या आखाड्यांचे गोसावी स्वतंत्रपणे भाग घेतात. ते हत्ती, घोडे, उंट यांवर बसून थाटाने मिरवणूक काढतात. पूर्वी ते शूर व धाडसी होते.

वैष्णव वैराग्यांचेही आखाडे आहेत. ते इ. स. च्या १७ व्या शतकात स्थापन झाले, असे म्हणतात. दिगंबर, निर्वाणी, निर्मोही, निरालंबी, संतोषी, महानिर्वाणी व खाकी अशी त्यांची नावे आहेत. चारी वैष्णव पंथांचे स्वतंत्र आखाडे आहेत. तेही कुंभपर्वाच्या वेळी गंगास्नानाला जाताना हत्ती, घोडे, उंट यांवर बसून थाटाने व वाजत-गाजत जातात. [ गो. त्यां. सं.; सा. इं. ]

**आखाडी** कोकणातल्या दशावतारी खेळासारखा एक प्रकार. महाराष्ट्राच्या ग्रामीण भागात याचा प्रचार आहे. शेतीचा हंगाम संपल्यावर आखाडीला सुरुवात होते आणि पावसाळा सुरू होईपर्यंत हे खेळ चालतात. यांत सगळ्या जातींचे लोक भाग घेतात. आखाडीत निरनिराळ्या देवांची सोंगे आणून नाचायचे असते. एखाद्या घराण्यात काही सोंगे वंशपरंपरेने चालू असतात. आखाडीतले सोंग मिळणे हा मान समजला जातो. या खेळाला बोहाडा असेही नाव आहे. बोहाडा नासिक, धुळे या भागांत खेळला जातो. पाहा–बोहाडा. [ फो. डा. म. ]

**आखेती** अक्षय्य तृतीयेच्या दिवशी मराठादी जातींतील स्त्रिया पाणवठ्यावर गोळा होतात आणि टिपऱ्यांच्या तालावर फेर धरून नाचतात. काही ठिकाणीं नदीकाठी असलेल्या गावांतील स्त्रिया दोन्ही तीरांवर जमून परस्परांची उणीदुणी काढतात. काही खेड्यांत तर एकमेकांवर दगड फेकण्याचीही चाल आहे. आखेती हे अक्षय्य तृतीयेचे नाव आहे. पाहा–अक्षय्य तृतीया.

**आख्यान** सामान्य अर्थ – कथन, निवेदन, कथा, कहाणी. विशेष अर्थ – पुरावृत्तकथन, ऐतिहासिक कथा, पौराणिक कथा. विशेषत: जुन्या काळी घडलेल्या एखाद्या घटनेच्या कथनकाला आख्यान ही संज्ञा आहे. ऋग्वेदसंहितेतच आख्यानांच्या अस्तित्वाचे प्रमाण सापडते. ऋग्वेदात आलेल्या सुपर्ण, पुरूरवा, इ. आख्यानांच्या संग्रहाला अथर्ववेदादी ग्रंथांत पुराणसंहिता असे म्हटलेले आहे. आख्यान हा शब्द मात्र ब्राह्मणवाङ्मयात प्रथम आढळतो. ऐ. ब्राह्मणात राजसूय यज्ञाच्या प्रसंगी होता शुन:शेपाचे आख्यान सांगतो, असा उल्लेख आहे (७.१८.१०).

ऋग्वेदात तीस आख्यानांचा स्पष्ट उल्लेख आलेला आहे. त्यांपैकी काही इंद्र व अश्विनौ यांसंबंधी असून, त्यांत या देवतांचा पराक्रम व त्यांची दुसऱ्यांवर उपकार करण्याची बुद्धी या गोष्टी दर्शविलेल्या आहेत. ऋग्वेदातील शुन:शेप (१.२४), अगस्त्य व लोपामुद्रा (१.१७९), गृत्समद (२.१२), वसिष्ठ व विश्वामित्र (३.५३; ७.३३), सोमाचे अवतरण (३.४३), त्र्यरुण व वृशजान (५.२), अग्नीचा जन्म (५.११), श्यावाश्व (५.३२), बृहस्पतीचा जन्म (६.७१), राजा सुदास (७.१८), नहुष (७.९५), अपाला (८.९१), नाभानेदिष्ठ (१०.६१–६२), वृषाकपी (१०.८६), उर्वशी आणि पुरूरवा (१०.९५), सरमा–पणी (१०.१०८), देवापी व शंतनू (१०.९८), नचिकेता (१०.१३५) ही आख्याने प्रसिद्ध आहेत. यांशिवाय दानस्तुतिमंत्रांतही काही आख्यानांचे सूचन आहे.

ऋग्वेदाव्यतिरिक्त इतर वैदिक वाङ्मयातही आख्याने आलेली आहेत. यांतील काही आख्याने नवीन आहेत; तर काही ऋग्वेदात सूचित केलेल्या आख्यानांत भर घालून वाढविलेली आहेत. बृहद्देवता, सर्वानुक्रमणी, निरुक्त, नीतिमंजरी व सायणभाष्य यांत काही आख्यानांतील काही प्रसंगांचे वर्णन केलेले आहे. पुराणांत वेदांतील काही आख्याने विस्तार पावलेली असली, तरी काही मूळ वैदिक आख्यानांत संकोचही झालेला आहे. ब्राह्मणग्रंथांत आणि श्रौतसूत्रांतही काही आख्यानांचा विकास केलेला दिसतो. च्यवन (पुराणांतील च्यवन) भार्गव व सुकन्या मानवी या आख्यानाचा ऋग्वेदात (१.११६–११८; १०.३९) केवळ उल्लेख आहे; परंतु तांड्य ब्राह्मण (१४.६.११), निरुक्त (४.१९), श. ब्रा. (४.१.५) व भागवतपुराण (९.३) या ग्रंथांत त्याचा खूप विस्तार केलेला आहे. अशा प्रकारे रामायण, महाभारत व पुराणे या ग्रंथांत वैदिक आख्यानांचा मनोरंजक विकास व विस्तार झालेला दिसतो.

या आख्यानांच्या तात्पर्याबाबत विद्वानांत बरेच मतभेद आहेत. काही विद्वानांनी या आख्यानांना रहस्यमय मानले आहे.

उदा० पुरूरवा-उर्वशी या आख्यानात कुमारिलभट्ट, सायण, इत्यादींच्या मते एक गंभीर रहस्य साठवलेले आहे, ते असे – पुरूरवा हा सूर्य असून उर्वशी ही उषा आहे. सूर्य व उषा यांचा संयोग क्षणभरच होतो; तर वियोग मात्र दीर्घ कालाचा असतो. विरही झाल्यावर सूर्य दिवसभर उषेच्या शोधात फिरत राहतो व पुन्हा दुसऱ्या दिवशी उषेशी त्याचा क्षणिक समागम होतो.

या आख्यानांचे परिशीलन करताना एक गोष्ट ध्यानात येते. ती ही, की यांतील आचार व विचार मानवसमाजाला कल्याणकारक असे आहेत. तेव्हा मानवी मूल्यांच्या दृष्टिकोनातून या आख्यानांचा विचार केला पाहिजे, त्याचप्रमाणे ज्या काळात ही आख्याने रचली गेली, त्या काळाचेही अवधान ठेवले पाहिजे.

भारतीय संस्कृतीत देव आणि मानव परस्परसंबद्ध आहेत. मनुष्य यज्ञात देवांसाठी आहुती देतो व देव प्रसन्न होऊन मानवाचे ईप्सित पुरे करतात. इंद्र व अश्विनौविषयक आख्याने ही याची द्योतक आहेत. यजमानाने दिलेल्या सोमरसाचे पान करून इंद्र संतुष्ट होतो व त्याची कामना पुरी करतो. अवर्षणाचा दैत्य वृत्र याला इंद्र आपल्या वज्राने ठार करतो व नद्यांचे अडवलेले प्रवाह मोकळे करतो.

प्रत्येक आख्यानाच्या मुळाशी एखादे बोधक तत्त्व आढळते. अपाला–आत्रेयीच्या आख्यानावरून स्त्रीचरित्राची उदात्तता व तेजस्विता यांचे सम्यक दर्शन घडते. राजा त्र्यरुण, वैवृष्ण व वृशजान यांची आख्याने वैदिककालीन पुरोहिताचे श्रेष्ठत्व सांगणारी आहेत. श्वावाश्व आत्रेयाची कथा ऋषीचे श्रेष्ठत्व, प्रेमाचा महिमा व कवीची साधना, यांचे सुंदर दर्शन घडविते. वैयक्तिक क्षुद्र स्वार्थाला मागे सारून राष्ट्राच्या उन्नतीसाठी वेळीप्रसंगी प्राणार्पणही करण्याचा संदेश दध्यङ्ग आथर्वणाच्या आख्यानातून मिळतो. पुराणात याच ऋषीला दधीची असे म्हटले आहे. या सर्व आख्यानांच्या मुळाशी ईश्वरावरील असीम श्रद्धा व मानवावरील प्रेम दिसून येते. काही आख्यानांत काही ऋषींचे अनैतिक आचरणही रेखाटलेले दिसेल. परंतु तसे न घडावे, हे दर्शविण्यासाठीच ही आख्याने लिहिलेली आहेत.

ही वैदिक आख्याने पुराणांत बरीचशी विकृत झाली आहेत. त्या काळच्या बदललेल्या सामाजिक व धार्मिक परिस्थितीला अनुसरून काही वेळा ती मुळाशी विरोधीही बनलेली आहेत.

ही सर्व वैदिक-पौराणिक आख्याने पवित्र मानली जात. म्हणूनच श्राद्धाच्या प्रसंगी ती ब्राह्मणांना ऐकवावी, असे मनू सांगतो (३.२३२).

आख्यानाचे अन्वाख्यान व अनुव्याख्यान असे पोटभेद आहेत. अन्वाख्यान म्हणजे आख्यानाला अनुसरणारे पूरक निवेदन. अनुव्याख्यान म्हणजे मंत्राचे विवरण. [ हिं. सा. को.; हिं. वि. को. ]

## आख्यायिका

प्रारंभीच्या वैदिक वाङ्मयात हा शब्द आढळत नाही. तैत्तिरीय आरण्यकात एकदाच तो येतो (१.६.३); पण तिथेही तो नेमक्या कुठल्या अर्थाने वापरला आहे, ते नीटसे समजत नाही.

महाभारतापासून मात्र हा शब्द कथा या अर्थी रूढ झाला. राज्यकर्त्यांच्या वंशाची गद्यरूपाने प्रशंसा करणे, तसेच कन्याहरण, संग्राम, विप्रलंभ, इ. प्रसंग उच्छ्‌वास, परिच्छेद यांनी विभागून विस्तारपूर्वक सांगणे, म्हणजे आख्यायिका होय, असे अग्निपुराणात सांगितले आहे. संस्कृत गद्यकाव्याचे आख्यायिका आणि कथा असे दोन प्रकार मानलेले आहेत. 'आख्यायिकोपलब्धार्था' (= ज्ञात किंवा सत्य विषयाचे प्रतिपादन करणारी ती आख्यायिका होय) (अमर). उदा० हर्षचरित. काल्पनिक विषय रंगविणारी ती कथा होय. उदा० बाणभट्टाची कादंबरी. विश्वनाथाने आपल्या साहित्यदर्पण या ग्रंथात आख्यायिकेविषयी पुढील श्लोक लिहिला आहे –

> आख्यायिका कथावत् स्यात् कवेर्वंशादिकीर्तनम्।
> अस्यामन्यकवीनां च वृत्तं पद्यं क्वचित् क्वचित् ॥

अर्थ – आख्यायिका कथेसारखीच असून, तिच्यात कवीच्या वंशादिकांचे वर्णन असते. क्वचित इतर कवींच्या वृत्तांतांचा आणि क्वचित् त्यांच्या पद्यांचाही समावेश असतो. [ हिं. सा. को.; लो. सा. रू. ]

## आगतपतिका

नायिकाभेद. हा हिंदी कवींनी मानलेला भेद आहे. आपल्या पतीच्या आगमनाने हर्षित होते ती, आगतपतिका होय. हिचेही पुन्हा परकीया, सामान्या, मुग्धा, मध्या आणि प्रौढा असे भेद आहेतच. मुग्धा आपल्या मनाचा उल्लास व्यक्त करताना लाजते. मध्या लज्जाप्रेमांचा आवेग दाखविते. प्रौढेचा भाव निस्संकोच असतो. परकीया आगतपतिका प्रियमीलनासाठी अत्यंत उत्सुक असते, तर सामान्या ती उत्सुकतेतही प्रियकराने आपल्यासाठी काय आणले आहे, त्याकडे लक्ष देते. रीतिकालीन हिंदी काव्यात हिचे विविध प्रकारे चित्रण केलेले आहे. [ हिं. सा. को. ]



आगतपतिका

**आगम** याची व्याख्या पुढीलप्रमाणे – 'आगच्छन्ति बुद्धिमारोहन्ति यस्माद् अभ्युदयनिःश्रेयसोपायाः स आगमः' = अभ्युदय व निःश्रेयस यांचे उपाय ज्याच्यामुळे बुद्धीवर आरूढ होतात, तो आगम होय (तत्त्ववैशारदी १०७).

वाराही तंत्रात आगमांचे स्वरूप पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

सृष्टिश्च प्रलयश्चैव देवतानां यथार्चनम् ।
साधनं चैव सर्वेषां पुरश्चरणमेव च ॥
षट्कर्म साधनं चैव ध्यानयोगश्चतुर्विधः ।
सप्तभिर्लक्षणैर्युक्तमागमं तद् विदुर्बुधाः ॥

अर्थ – सृष्टी, प्रलय, देवतार्चन, सर्वसाधन, पुरश्चरण, षट्कर्म साधन (शांती, वशीकरण, स्तंभन, विद्वेषण, उच्चाटण व मारण) व चतुर्विध ध्यानयोग या सात लक्षणांनी युक्त असलेल्या ग्रंथांना जाणते लोक आगम म्हणतात.

आगमाचे वैदिक व अवैदिक असे दोन प्रकार आहेत. बौद्धादी आगम हे अवैदिक असून वेद, इतिहासपुराणे व तंत्रे हे वैदिक आगम होत. वेदांना निगम हे दुसरे नाव आहे, त्याचप्रमाणे तंत्रांना आगम ही अन्य संज्ञा आहे. शैव, शाक्त व वैष्णव असे आगमांचे तीन भेद आहेत. त्यांपैकी शैवागमांचे पुन्हा कापालिक, कालामुख, पाशुपत व शैव असे चार प्रकार आहेत. यांतील शेवटच्या शैवागमाचे काश्मीर व शैवसिद्धांत असे दोन पोटभेद आहेत.

सर्व शैवागमांत शंकराचे परमश्रेष्ठत्व व त्याचे पूजाविधान प्रामुख्याने वर्णिलेले असते.

काश्मीर आगमांचा उत्तर भारतात विशेष व दक्षिण भारतात तुरळक प्रचार आहे. शैव सिद्धान्तांचा मात्र फक्त दक्षिण भारतातच प्रसार आहे.

शाक्तागमांचे दक्षिणाचार व वामाचार असे दोन भेद आहेत. दक्षिणाचार प्रायः वैदिकधर्मानुसारी असून, वामाचार वैदिक मार्गांपासून च्युत आहे. या दोन्ही शाक्तागमांत शक्तीला श्रेष्ठत्व देऊन तिची उपासना सांगितली आहे.

वैष्णवागमांचे वैखानस व पांचरात्र असे दोन भेद आहेत.

निरनिराळ्या तंत्रांवर निष्ठा असलेले लोकच शैव व शाक्त आगमांना प्रमाण मानतात. बादरायणाने शारीरकशास्त्राच्या पाशुपताधिकरणात 'पत्युरसामञ्जस्यात्' (२.२.३५) या सूत्राने शैवागम हे श्रुतिविरोधी असल्याने अप्रमाण होत, असे म्हटले आहे. तुल्य न्यायाने शाक्तागमही अप्रमाण ठरतात. वैष्णवागम मात्र प्रमाण मानलेले आहेत.

परंपरेनुसार आगम अठ्ठावीस व उपागम एकशे आठ मानलेले आहेत. हे सर्व आगम व उपागम अद्यापि उपलब्ध झालेले नाहीत. प्रमुख अठ्ठावीस आगमांची नावे पुढीलप्रमाणे–

शैव– कामिक, योजक, चिंत्य, कारण, अजित, दीप्त, सूक्ष्म सहस्र, अंशुमान व सुप्रभ किंवा सुप्रभेद.

रौद्रिक– विजय, निश्वास, स्वायंभुव, आग्नेयक, भद्र, रौरव, मकुट, विमल, चंद्रहास (चंद्रज्ञान), मुखयुग्बिंव, (मुखबिंब), उद्गीत (प्रोद्गीत), ललित, सिद्ध, संतान, नारसिंह (सर्वोक्त किंवा सर्वोत्तर), परमेश्वर, किरण व पर (वातुल).

प्रत्येक आगमाचे स्वतंत्र उपागमही आहेत.

आगमग्रंथ केव्हा तयार झाले, यावद्दल आगमान्तशैव पंथात एक परंपरागत कथा आहे– गोदावरी नदीच्या काठी मंत्रकाली या ठिकाणी शैवांचे वास्तव्य होते. गावातील मंत्रकालेश्वराच्या देवळाभोवती शैवांचे चार मठ होते. एकदा राजेंद्र चोळ उत्तरेकडे दिग्विजयार्थ गेला असता, त्याला हे शैव भेटले. राजाने त्यांना आपल्या राज्यात येऊन राहण्याविषयी विनंती केली. तिला मान देऊन शैव लोक तोंडैमंडल व चोळमंडल या प्रदेशांत जाऊन राहिले. तिथे शैव पंथाच्या प्रसाराला उत्तेजन मिळाले व याच काळात आगम ग्रंथाची रचना झाली.

ख्रिस्तपूर्व दुसरे शतक हा आगमग्रंथांचा काल मानतात. [ लक्ष्मीतंत्र; रि. इं.; प्र. वि. ]

**आगमान्त शैव** अर्थात शुद्ध शैव संप्रदाय. हा दक्षिण भारतात प्रचलित असून, शैवागमांवर आधारित आहे. शैव आगमांची संख्या २८ असून, ते साक्षात शिवप्रणीत आहेत, असे हे लोक मानतात. पती (शिव), पशू (जीव) व पाश (मल, कर्म, माया किंवा रोध्र शक्ती) या तीन पदार्थांवर त्यांचे दर्शन उभारले आहे. शैवागम हे स्त्रिया, शूद्र व प्रतिलोम प्रजा यांच्यासह सर्व शिवभक्तांना पठन करता येतात व 'नमः शिवाय' हा मंत्रही सर्वांना जपता येतो, असे यांचे मत आहे.

या पंथाच्या तत्त्वांचा अर्थ सांकेतिक पद्धतीने सुचविणाऱ्या काही शिवमूर्ती दक्षिणेत निर्माण झाल्या असून, त्यांची नावे सदाशिवमूर्ती, महासदाशिवमूर्ती व महेशमूर्ती अशी आहेत. सदाशिवमूर्ती पंचमुख व दशभुज असून, पद्मासनावर बसलेली आहे. ही पंचमुखे सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष व ईशान या शिवरूपांची प्रतिनिधी आहेत. शैवागमांना धरूनच घडविलेली एक मूर्ती परळ (मुंबई) येथे सापडली असून, तिच्या एका पूर्णाकृतीतून सहा अर्धाकृती उगम पावल्या आहेत. सर्वांच्या मस्तकी जटाभार असून, सर्वांना दोनदोन हात आहेत. वरची मूर्ती चतुर्भुज असून, सर्वांचे उजवे हात अभयमुद्रा दर्शवितात. या अर्धाकृती षडक्षर (ॐ नमः शिवाय) मंत्रातल्या वर्णांची प्रतीके असाव्या. पाहा–काश्मिरीय शैवदर्शन. [ डे. हिं. इ. ]

**आगरकर गोपाळ गणेश** ( इ. स. १८५६–१८९५ ) महाराष्ट्रातील एक ध्येयवादी समाजसुधारक. सातारा जिल्ह्यातील टेंभू गावी यांचा जन्म झाला. घरची गरिबी असल्याकारणाने यांना शिक्षणासाठी अत्यंत कष्ट सोसावे लागले. अकोल्याच्या हायस्कूलमधून ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. इ. स. १८७८ साली ते बी. ए. झाले व १८७९ मध्ये फेलो होऊन एम. ए. चा अभ्यास करू लागले. याच वर्षी लो. टिळकांशी त्यांचा स्नेह जडला. एम. ए. झाल्यावर मोठ्या पगाराच्या नोकरीची आशा न धरता त्यांनी चिपळूणकरांनी काढलेल्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये शिक्षकाची नोकरी पत्करली. इ. स. १८८१ साली न्यू इंग्लिश स्कूलच्या चालकांनी 'केसरी' व 'मराठा' ही दोन वृत्तपत्रे लोक-जागृतीसाठी सुरू केली. त्यांपैकी केसरीचे संपादन आगरकरांकडे व मराठ्याचे टिळकांकडे आले. पण केसरी सुरू होऊन वर्ष होते न होते, तोच कोल्हापूरच्या बर्वेप्रकरणात टिळक व आगरकर यांना एकशे एक दिवस कारावासाची शिक्षा झाली. टिळक व आगरकर यांचे सामाजिक सुधारणेच्या अग्रक्रमाबद्दल मतभेद होतेच. डोंगरीच्या तुरुंगातून बाहेर पडल्यावर यापुढे केसरीतून आपल्या मतांचा हिरीरीने पुरस्कार करणे आपल्याला जमणार नाही, याबद्दल आगरकरांची खात्री पटली व त्यांनी केसरीशी असलेला आपला संबंध तोडून सुधारक नावाचे नवीन वृत्तपत्र सुरू केले. लोककल्याणाच्या तळमळीने प्रेरित होऊन त्यांनी अनिष्ट सामाजिक रूढींवर कठोर प्रहार करायला सुरुवात केली, तेव्हा सनातनी लोक त्यांच्यावर अतिशय खवळले. 'आम्ही तुम्हांला सळो की पळो करून सोडू' अशी त्यांनी आगरकरांना धमकी दिली. इतकेच नव्हे; तर 'यापुढे लेखणी न आवराल तर प्राणाला मुकाल' अशी खुनाच्या धमकावणीची पत्रेही त्यांना येऊ लागली. काही लोकांनी तर त्यांच्या जिवंतपणी त्यांची प्रेतयात्रा काढली. त्यांनी त्यांच्या पत्नीचाही छळ केला. पण त्या दहशतीची यत्किंचितही तमा न बाळगता, केवळ परहितैकदृष्टीने त्यांनी समाजसुधारणेचा प्रयत्न चालूच ठेवला. आगरकर एकीकडे सुधारक पत्र चालवीत होते, तर दुसरीकडे शिकविण्याचे कामही करीत होते. अध्यापनक्षेत्रात त्यांची उत्तरोत्तर बढती होत गेली. ते पुढे न्यू इंग्लिश स्कूलचे सुपरिंटेंडेंट झाले. नंतर फर्ग्युसन कॉलेजमध्ये प्राध्यापक झाले व १८९२ साली प्रा. वामन शिवराम आपटे मृत्यू पावल्यावर त्याच कॉलेजचे प्रिन्सिपॉलही झाले. या सर्व धकाधकीत त्यांची शरीर-प्रकृती मात्र बिघडली. इ. स. १८९० पासून त्यांचा दम्याचा विकार बळावला व शेवटी १८९५ साली त्याच विकाराने त्यांचा अंत झाला.



गोपाळ गणेश आगरकर

डोंगरीच्या तुरुंगातील एकशे एक दिवस, विकारविलसित हे हॅम्लेटचे रूपांतर, वाक्यमीमांसा हा व्याकरणविषयक ग्रंथ, केसरीतील निवडक निबंध, विविधविषयसंग्रह व निबंधसंग्रह (सुधारकातील) एवढे त्यांचे साहित्य उपलब्ध आहे. आगरकरांच्या निबंधांच्या विषयांचे स्थूल मानाने पुढील चार भाग पडतात – (१) व्यक्तीचे नैमित्तिक आचरण, (२) सामाजिक इतिहास, (३) नैमित्तिक पक्षभेद व (४) स्त्रियांची उन्नती. सुधारकातील त्यांच्या सर्व निबंधांचे मूलभूत तत्त्व म्हणजे प्रखर बुद्धिवाद ! असा निखळ बुद्धिवाद आगरकरांनीच प्रथम महाराष्ट्राला शिकविला. या बुद्धिवादानेच त्यांना अज्ञेयवादी बनविले. व्यक्तिस्वातंत्र्य हे आगरकरांच्या विचारसरणीचे दुसरे वैशिष्ट्य होय. आपल्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या पुरस्काराचा हेतू त्यांनी पुढील शब्दांत दिला आहे– 'समाजाचे कुशल राहून त्यास अधिकाधिक उन्नतावस्था येण्यास जेवढी बंधने अपरिहार्य आहेत, तेवढी कायम ठेवून बाकी सर्व गोष्टींत व्यक्तिमात्रास ( पुरुषास व स्त्रीस ) जितक्या स्वातंत्र्याचा उपभोग घेता येईल, तितका घ्यावयाचा हे अर्वाचीन पाश्चिमात्य सुधारणेचे मुख्य तत्त्व आहे व हे ज्यांच्या अंतःकरणात बिंबले असेल त्यांना आमच्या समाजव्यवस्थेतील अनेक दोषस्थळे दिसणार आहेत, हे उघड आहे. ही दोषस्थळे वारंवार लोकांच्या नजरेस आणावी, ती दूर करण्याचे उपाय योजावे आणि युरोपीय सुधारणेत अनुकरण करण्यासारखे काय आहे, ते पुनःपुनः दाखवावे, यास्तव हे सुधारक पत्र काढलेले आहे.'

मानवाचे ऐहिक सुखवर्धन हे आगरकरांच्या जीवननिष्ठेचे तिसरे मूलभूत तत्त्व आहे. 'सुधारणा आणि कलह' या निबंधात त्यांनी लिहिले आहे – 'मनुष्यतेचे ऐहिक सुखवर्धन या भावी सार्वत्रिक धर्माची ज्यांनी दीक्षा घेतली असेल, त्यांनी कोणास न भिता जे शुद्ध, प्रशस्त, कल्याणप्रद वाटत असेल ते दुसऱ्यास सांगावे आणि तदनुसार होईल तेवढे आचरण करावे, हेच त्यांस उचित आहे.'

त्यांचे राजकीय विचार लो. टिळकांसारखेच जहाल होते. त्यांनी केसरीत लेख लिहून राजकीय विचार-जागृतीचे काम केले. त्यांच्या निबंध-लेखनामुळे मराठी साहित्यात मोलाची भर पडली.

आजच्या समाजहिताला उपकारक असा जो अंश भारतीय आचार-विचारांत असेल, तो पाश्चात्य विद्येच्या स्वीकारानंतरही टिकून राहील; पण जे काही सदोष व अहितकारक आहे, ते सर्व पाश्चात्य ज्ञानकुंडात जळून खाक होणार, असे आगरकरांचे मत होते. तर्ककर्कश विवेचन, बिनतोड युक्तिवाद, निर्भीड स्पष्टवक्तेपणा व प्रखर ध्येयवाद या त्यांच्या गुणांमुळे तत्कालीन समाजाचा त्यांच्यावर रोष झाला असला, तरी पुढील पिढीतील लोकांच्या मनांत मात्र त्यांनी आदराचे स्थान मिळविले आहे.

'इष्ट असेल ते बोलणार व शक्य असेल ते करणार' हा आगरकरांचा महामंत्र होता. [ म. ज्ञा. को.; आ. म. वा. इ. ]

**आगरतारा** बंगालमधील आगरतारा नामक देवीचे स्थान. तिरहूत जिल्ह्यातील बाणगाव नावाच्या खेड्यात हे स्थान आहे. देवीपुराणात या देवतेची महती वर्णिली आहे. नवरात्रात या देवीची जत्रा भरते. [ स. भा. प्र. व. ]

**आगरद्वीप** बंगालमधील नदिया जिल्ह्यात भागीरथी नदीत हे बेट आहे. तिथे गोपीनाथ नामक श्रीकृष्णाचे मंदिर फार जुन्या काळापासून प्रसिद्ध आहे. श्रीचैतन्यांचे शिष्य घोसठाकूर यांनी या गोपीनाथाची इथे स्थापना केली. या देवाच्या उत्सवाप्रीत्यर्थ दर वर्षी वसंतदोलोत्सवानंतर मोठी यात्रा भरते. [ स. भा. प्र. व. ]

**आगरी** महाराष्ट्रातील एक जात. आगर म्हणजे माड-पोफळींची बाग किंवा मीठ पिकविण्याची जागा. त्यावरून आगरी लोकांना खारकी, खारपाटे किंवा आगळे कुणबी अशीही नावे आहेत. शुद्ध आगरी, दास आगरी व वरप आगरी असे या जातीचे पोटभेद आहेत.

शुद्ध आगरी जातीच्या मीठआगरी, जसआगरी व ढोलआगरी अशा तीन शाखा आहेत. स्वतःला ढोलआगरी म्हणविणारे कोणीही लोक हल्ली सापडत नाहीत, असे श्री. काळे लिहितात. वरील सर्व आगरी स्वतःला मीठआगरी किंवा आगरी असे म्हणवून घेतात. दासआगरी मुख्यतः पालघर तालुका व अलिबाग तालुका यांत आढळतात. तिथे यांना कराडआगरी असे म्हणतात. वास्तविक, ही एक निराळीच जमात असून, हे लोक मीठआगरी लोकांबरोबर रोटीबेटीव्यवहार करीत नाहीत. यांच्या उत्पत्तीसंबंधी पुढील दंतकथा सांगतात –

एका स्त्रीची मुले जगत नव्हती म्हणून तिने महारांच्या देवाला नवस केला, की माझे मूल जगले, तर मी डोक्यावर गायीचे हाड व कानावर लोकरीचे फूल खोवून महारवाड्यात प्रवेश करीन. या नवसानंतर तिचे मूल जगले. तिने आपला नवस बोलल्याप्रमाणे फेडला. या धर्मबाह्य कृत्याबद्दल लोकांनी तिला जातिबहिष्कृत केले. दासआगरी हे तिचेच वंशज होत.

वरपआगरी लोकांनी प्रथम ख्रिश्चन धर्म स्वीकारला व नंतर पुन्हा ते हिंदू धर्मात आले. त्यांना मग नवे मराठे असे नाव मिळाले. मीठआगरी त्यामुळेच यांना हलके मानतात.

आगरी लोकांच्या पूर्वजांची परंपरागत माहिती मिळते, ती अशी—आगरी लोक रावणाचे गायक-वादक होते. या कामगिरीबद्दल बक्षीस म्हणून रावणाने त्यांना पश्चिम किनाऱ्यावरील जमीन दिली. त्यांचे वंशज म्हणजे हल्लीचे आगरी होत. ढोल वाजविण्याच्या धंद्यावरून पडलेले ढोलआगरी हे नाव या परंपरेचे सूचक आहे. अजूनही बरेच आगरी गायक-वादकाचा धंदा करतात.

**इतिहास** – आगरी मंडळी आपल्या जातीचा इतिहास सांगतात, तो असा – सुमारे ६०० वर्षांपूर्वी अलिबाग तालुक्यात चौल, आवास-सासवणे आणि सागरगड या ठिकाणी तीन लहान राज्ये होती. चौल व आवास येथे हिंदू राज्ये होती. सागरगडावर मात्र दिल्लीच्या बादशहाच्या वतीने एक मुसलमान सरदार राहत होता व तो दोन्ही हिंदू राजांकडून करभार वसूल करून दिल्लीला पाठवीत होता. पुढे सागरगडावरील तो सरदार बलिष्ठ होऊन दिल्लीच्या बादशहाला जुमानीनासा झाला. म्हणून बादशहाने त्याच्या पारिपत्याकरिता एका सरदाराला पाठविले. परंतु तो पराभूत होऊन दिल्लीला परत गेला. बादशहाने मग दुसरा सरदार पाठविला व मुंगीपैठणच्या बिंब राजाला त्याला मदत करण्यास विनविले. त्याप्रमाणे दोघांनी मिळून गडावरच्या सरदाराला पकडून दिल्लीला पाठविले. बिंब राजा मग मुंगीपैठणला न जाता सागरगडावरच राहू लागला. शेजारची दोन्ही हिंदू



आगरी पुरुष

राज्ये त्याने जिंकली. नंतरच्या शांततेच्या काळात त्याच्याजवळच्या मोठ्या सैन्याची त्याला गरज नव्हती; म्हणून पुरेसे सैन्य जवळ ठेवून बाकीच्यांना त्याने मिठागरे बांधून दिली व जरूर त्या ठिकाणी गावठाणे वसवून तिथे त्यांची वसाहत केली.

पुढे हळूहळू मिठागरे व वसाहती वाढत जाऊन आगरी लोकांची वस्ती कुलाबा व ठाणे जिल्ह्यांतील अलिबाग, पेण, पनवेल, कर्जत, रोहे, जंजिरा इथवर समुद्रकिनाऱ्यावर जिथे खारटाणाचा भाग आहे, तिथे व त्याच्या लगतच्या प्रदेशात पसरली. याप्रमाणे हाती आलेला मीठ पिकविण्याचा धंदा या जातीने पिढ्यान्‌पिढ्या चालू ठेवला,

**ग्रामरचना** – हल्ली ठाणे जिल्ह्यातील पालघरपासून तो कुलाबा जिल्ह्यातील श्रीवर्धनपर्यंत समुद्रकिनाऱ्यावर आगरी लोकांचीच वस्ती आहे. आगरी खेड्यांचे वैशिष्ट्य असे, की त्यांत फक्त आगरी लोकांचीच वस्ती असते. इतर जातीचा माणूस त्या खेड्यांत औषधालासुद्धा सापडणार नाही.

भातशेतांच्या मध्यभागी उंचवटा असेल तिथे आगरी खेडे वसलेले असते. सर्वसाधारणपणे एका खेड्यात पन्नास ते साठ घरे असतात. मोठ्या खेड्याचे पाडे नावाचे लहान भाग पाडलेले असतात व एका पाड्यात एकाच आडनावाची २५ ते ४० कुटुंबे राहतात. या खेड्यात बहुधा पिण्याच्या पाण्याचा दुष्काळ असतो. गावात एक देऊळ असते. तिथे पंचायतीची सभा होते. काही खेड्यांत पीरही आढळतो. प्रत्येक घर व घरापुढचे अंगण शेणाने सारवून स्वच्छ केलेले असते; परंतु एकंदरीत खेडे घाणेरडेच असते. त्यामुळे एखादी रोगाची साथ आल्यास तिचा त्वरित फैलाव होतो.

आगरी लोकांची घरे चौकोनी असतात. पुढे उघडी ओटी, नंतर एक मधली खोली, तिच्या एका बाजूला स्वयंपाकघर आणि दुसऱ्या बाजूला कोठीची खोली, अशी घराची रचना असते. घराच्या भिंती मातीच्या असून, वर गवताचे छप्पर असते. आपल्या शेतात मिळणारे हे साहित्य घेऊनच आगरी माणूस स्वतःचे घर बांधतो.

आगरी लोक वर्णाने काळे असून, मजबूत बांध्याचे असतात. एक धोतर, एक किंवा दोन सदरे, एक कबजा व खांद्यावर एक घोंगडी एवढेच त्यांचे कपडे असतात. शेकडा नव्वद पुरुषांना ताडीचे वा गावठी दारूचे व्यसन असते. या व्यसनाचा दुष्परिणाम त्यांच्या शरीरावर दिसू लागलेला आहे.

आगरी स्त्री सात किंवा आठ वारी लुगडे गुडघ्यापर्यंत लांब व अंगाबरोबर चापून चोपून नेसते. हल्लीच ती चोळी घालू लागली आहे. घरातली सर्व कामे ती करतेच; शिवाय हंगामाच्या दिवसांत शेतातही काम करते. १४ ते १८ या वयात तिचे लग्न होते. हल्ली काही मुली प्राथमिक शाळेत शिकू लागल्या आहेत.



आगरी स्त्री

भात, भाकरी, मासे, हे आगरी लोकांचे मुख्य अन्न आहे. गणेशचतुर्थी, गौरी, दिवाळी, होळी या सणांना ते मोदक, वडे, पुरणपोळी, इ. पक्वान्ने करतात.

हे लोक जी भाषा बोलतात, तिला 'आगरी' असे नाव आहे. ती मराठीचीच एक बोली आहे.

आगरी लोकांची भातशेती सर्वस्वी पावसावर अवलंबून असते. त्यामुळे, अवर्षण पडल्यास ते पावशी देवीचा उत्सव करतात. शंकराच्या देवळात एका कोपऱ्यात पावशी देवीची एक मोठी दगडी मूर्ती स्थापलेली असते. ती मूर्ती बाहेर काढून एका पालखीत ठेवतात व वाजतगाजत गावातल्या तळ्यापर्यंत मिरवीत नेतात. मग गावचा पुढारी ती मूर्ती तळ्यात एका जागी बुडवून ठेवतो. पाऊस सुरू झाला, की मग तिला पुन्हा देवळात आणतात.

आगरींचा भुतांखेतांवर विश्वास आहे. एखाद्याला भुताने पछाडले असे वाटले, की भगत व मांत्रिक त्यावर इलाज करण्यासाठी येतात.

आगरी लोक मूल जन्माला आल्यावर तिसऱ्या, पाचव्या, सहाव्या व बाराव्या दिवशी सठीची पूजा व अन्य संस्कार करतात.

**विवाहप्रथा** – मार्गशीर्ष ते वैशाख या महिन्यांत आगरी लोक लग्ने करतात. कारण या दिवसांत नवीन पिके तयार झालेली असतात व त्यांच्या धान्याच्या कणग्या भरलेल्या असतात. मुलाचे लग्न १८ ते २५ या वयात होते. देजाची पद्धत आहे. एकाच आडनावाच्या कुटुंबात विवाह होत नाहीत. लग्नसमारंभ मुलीच्या घरी होतो. साखरपुड्याने लग्नविधीस प्रारंभ होतो. लग्नसोहळा एकंदर पाच दिवस चालतो व एकामागून एक असे चाळीस विधी त्यात असतात. हे विधी धवलारिणीच्या देखरेखीखाली चालतात. धवलारीण म्हणजे स्त्री पुरोहित होय. प्रत्येक विधीच्या वेळी ती त्या विधीचे गाणे म्हणते. त्या गाण्यांना धवळे असे नाव आहे. लग्नाच्या स्वयंपाकासाठी लाकडे तोडून

आणणे, मसाला कुटणे, भात भरडणे, तांदूळ दळणे, मंडप उभारणे, ही सर्व कामे आसपासच्या स्त्रीपुरुषांच्या साहाय्याने करतात.

मंडपदेवता स्थापणे व माळ घालायला लावणे हे दोनच विधी ब्राह्मण पुरोहित करतो. बाकीचे सर्व धवलारीण चालविते. तेलवण, गौरन्हाणे, उष्टावळ (घास देणे), सोयरी समजावणे; तोंड धुणे, सुपारी लपविणे, विडचा तोडणे, गोंधळ घालणे, इ. विधी आगरी लोक साग्रसंगीत करतात. जातीबाहेर लग्न केल्यास त्याला बहिष्कृत व्हावे लागते.

विधवेला विधुराशी पाट लावण्याची मुभा आहे. पण पाट मात्र रात्री बारा वाजल्यावर लावतात. अलिकडे त्यांच्यांतल्या विधवा एकाकी जीवन घालविणे अधिक पसंत करतात. कारण नवऱ्याबाबतचा त्यांचा अनुभव विशेषसा चांगला नसतो व पुन्हा त्या त्रासात पडण्याची त्यांची इच्छा नसते.

आगरी लोकांत लग्न ही एक फार खर्चाची बाब आहे. कितीही गरीब माणूस असला तरी तो कर्ज काढून लग्नसमारंभाचा थाट करतो. यांच्यांत घटस्फोटाची चाल आहे.

समाजव्यवस्था – आगरी लोकांच्या ग्रामपंचायती असून, व्यक्तीच्या व समूहाच्या सामाजिक आचाराचे नियम त्या ठरवून देतात. त्याविरुद्ध वर्तन करणाऱ्याला लगेच समज दिली जाते किंवा त्याला दंडही केला जातो. काही गावे मिळून एक टप्पा होतो व त्यावर एक सरपंच किंवा मुकादम असतो. तो बहुधा वंशपरंपरा अधिकारी असतो. त्याच्या अधिकारातील प्रत्येक गावाच्या देखरेखीसाठी तो काही पंच नेमतो. सर्वसाधारणपणे पंच हा वयोवृद्ध, अनुभवी व व्यवहारी असतो. ग्रामपंचायतीचा निकाल मान्य नसल्यास सरपंचाकडे जाता येते. त्याचा निकाल निर्णयिक असतो. टप्प्याबाहेरच्या प्रदेशावर सरपंचाचा अधिकार चालत नाही.

देवधर्म – आगरी लोक खंडोबा, बहिरी, भवानी, म्हसोबा, पिंपळोबा, पीरसाहेब, इ. देवतांना भजतात. शिकलेल्या आगरी कुटुंबांत मात्र यांची जागा राम, विष्णू, गणपती या श्रेष्ठ देवतांनी घेतलेली आहे. हे ग्रामदेवतेला बोकड बळी देतात.

नाचगाणे, कुस्ती खेळणे, बैलगाड्यांच्या शर्यती लावणे, भजन करणे ही आगरी लोकांची करमणुकीची साधने होत. गणेशचतुर्थी व शिमगा या दोन सणांना पुरुष नाचतात व गातात. स्त्रियाही गौरीच्या व शिमग्याच्या दिवसांत एकत्र जमून गाणी गातात व नाचतात. त्यांच्या गौरीच्या गाण्याचा एक नमुना पुढीलप्रमाणे –

येकच पाय हालवतंय । आपले घोला बोलवतंय
आपला घो लाडका । ओटीत घेतल्या खारका
खारका लागल्या गोड । जिभला आले फोड
जिभच फोड फुटं नाय । दारचा पावना उठूं नाय

काही आगरी मीठ पिकविण व भातशेती करणे यांवरोबरच गुलाव, नेवाळी, अॅस्टर, गुलछडी, इ. फुलांच्या बागा व तोंडली, घेवडा, पपई, आंबा, इ. फळझाडांची लागवड करतात. [ आगरी–सोशियो इकॉनॉमिक सर्व्हे – डॉ. डी. एन. काळे; म. ज्ञा. को. ७; ठाणे – गॅझे.; बदलापूर ]

## आगाखानी पंथ

शमसुद्दीन फकीर नावाच्या एका साधूने पंजाबात शमसीमत नावाचा एक धर्मपंथ चालू केला. हसन अल्ली शाहा (१ ले आगाखान) यांचे पुत्र सर आगाखान हे त्या धर्मपंथाचे आचार्य होत. अनेक हिंदू व मुसलमान यांनी या धर्मपंथाचा स्वीकार केलेला असून याच्या हिंदू अनुयायांना आगाखानी व मुसलमान अनुयायांना खोजे असे म्हणतात. हे लोक सर आगाखानाना विष्णूचा कलंकी अवतार मानतात. बऱ्याच हिंदूंनी या मताचा स्वीकार केला, त्याचे कारण हेच आहे.

विष्णूने मुसलमान लोकांत अवतार का घेतला, याबद्दल शमसीमताच्या धर्मग्रंथांत पुढील कथा आहे– एकदा युधिष्ठिर यज्ञ करीत असता परमेश्वराने चांडाळाच्या रूपाने तिथे जाऊन त्याचे सत्त्व पाहायचे ठरविले. ही गोष्ट ऋत्विजांना अंतर्ज्ञानाने समजली होती; पण त्यांनी ती धर्मराजाला सांगितली नाही. चांडाळ यज्ञाजवळ पोचल्यावर धर्मराजाने यज्ञाभोवती एक काळा पडदा उभा केला. पण परमेश्वराच्या तेजाने त्या पडद्याचा रंग पांढरा झाला. त्यावरून धर्मराजाला उमगले, की हा चांडाळ नसून ईश्वर आहे. मग त्याने ईश्वराची क्षमा मागितली. पण ईश्वर ब्राह्मणांवर रागावला आणि त्याने ब्राह्मणांना सांगितले, की 'आजवर मी हिंदूंमध्ये नऊ अवतार घेतले, पण यापुढचा दहावा कलंकी अवतार मी मुसलमानांत घेईन.'

हा दहावा अवतार म्हणजेच सर आगाखान होत, असे ते लोक समजतात. आगाखानाचे ज्येष्ठ वंशजही अवतारच असतील, अशी शमसीमताच्या अनुयायांची श्रद्धा आहे. विष्णूचा अवतार असल्यामुळे त्यांना 'धनी सलामत दातार' असे म्हणतात.

शमसुद्दीन फकीराने हा पंथ काढला खरा; पण त्याच्या हयातीत त्याचा फारसा प्रसार झाला नाही. पुढे त्याचा नातू सदरुद्दीन याने हा पंथ वाढवायचे ठरविले व त्यासाठी ग्रंथरचना करण्यास सुरुवात केली. सध्या या पंथाची लहानमोठी चाळीस-पन्नास पुस्तके आहेत. त्यांतली काही सिंधी भाषेत असून काही मिश्र भाषेत आहेत. काहींची नावे पुढीलप्रमाणे–(१) मंगल समाचार (२) सुंदर पुराणी कथा (३) दान-अतिदान (४) धर्मपुस्तकसार (५) गुरुज्ञान (६) जैसी करणी तैसी भरणी (७) गीता की पोथी, इत्यादी.

काही अवतार प्रसिद्ध, तर काही गुप्त असतात, असे या पंथाने मानलेले आहे. दशावतारांबरोबरच मुसलमानी पैगंबरही हिंदूंनी मानावे, असा प्रयत्न या पंथाच्या पुढाऱ्यांनी केलेला आहे. सकाळी, संध्याकाळी व रात्री अशी तीन वेळा संध्या करावी, असेही शमसीमतात सांगितले आहे.

शमसीमताचे शिष्य या पंथाला 'गुप्तपंथ' किंवा 'गुप्तमत' आणि स्वतःला 'गुप्ती' असे म्हणतात. आपल्या पंथाची तत्त्वे व आचार गुप्त राखणे, हे ते आपले कर्तव्य समजतात. त्यामुळे त्यांची पुस्तकेही त्यांच्या शिष्यशाखेत प्रवेश केल्याशिवाय मिळत नाहीत. आजवर जरी हा पंथ गुप्त राहिला असला, तरी आता त्याचा लोकांत प्रचार होऊ लागला आहे. [ आगाखानी संप्रदाय – श्री. दा. सातवळेकर, १९४७ ]

**आगू** श्रौत कर्मांतला पारिभाषिक शब्द. कोणत्याही यागात ज्या देवतेला उद्देशून याज्या पठण केली जाते, त्या देवतेचा उल्लेख करण्यापूर्वी 'ये यजामहे' असा मंत्र म्हणतात. यालाच आगू अशी संज्ञा आहे. याचा क्रम असा – प्रथम अध्वर्यू 'आश्रावय' असा मंत्र म्हणतो. मग आग्नीध्र 'अस्तु श्रौषट्' म्हणतो. नंतर अध्वर्यू 'यज' म्हणतो. नंतर होता 'ये यजामहे' हा मंत्र म्हणजेच आगू पठण करून पुढे याज्या व तिच्या शेवटी 'वौषट्' असे म्हणतो. असे हे सगळे यागविषयक शब्द आहेत. पुढील श्लोक श्राद्धप्रयोगात विष्णुप्रीत्यर्थ म्हणतात, त्याचा अर्थ वरील संदर्भाने लागतो –

चतुर्भिश्च चतुर्भिश्च द्वाभ्यां पञ्चभिरेव च ।
हूयते च पुनर्द्वाभ्यां स मे विष्णुः प्रसीदतु ॥

अर्थ – चतुर्भिः = आश्रावय चतुर्भिः = अस्तु श्रौषट् हे शब्द. द्वाभ्याम् = यज हा शब्द. पञ्चभिः = ये यजामहे हे शब्द व शेवटचा द्वाभ्याम् = वौषट् हा शब्द होय. अशा प्रकारे ज्याच्या उद्देशाने हवन केले जाते, तो विष्णू मला प्रसन्न होवो. [ म. ज्ञा. को. ]

**आगेर** कर्नाटकातील एक जात. देवकांवरून या लोकांत पुष्कळ गोत्रे झाली आहेत. उदा० कद्विनवाली, द्यावनवाली, आनेवाली, इत्यादी. द्यावन (कासव) वाली गोत्राचे लोक कासव खात नाहीत; तर आने (हत्ती) वाली गोत्राचे लोक हत्तीला पूज्य मानतात आणि हस्तिदंताचे दागिने अंगावर घालीत नाहीत. इतर गोत्रांचे लोकही आपल्या देवकप्राण्याचा आदर करतात. या लोकांत सगोत्र विवाह होत नाही. मामेबहिणीशी लग्न होते. पण आते व मावसबहिणीशी होत नाही. मुलीचे लग्न ६ ते १० वर्षांपर्यंत व मुलाचे ६ ते २५ वर्षांपर्यंत पूर्वी होत असे. बहुपत्नीकत्वाची चाल नाही. वधू-वरांवर अक्षता टाकणे हा विवाहसमारंभातील मुख्य भाग असतो. पुनर्विवाहाची चाल आहे; पण प्रथम वराला विधवेशी लग्न करता येत नाही. जातीतला पुढारी मनुष्यच उपाध्यायाचे काम करतो. त्याला कोळकार म्हणतात. कर्नाटकातील इतर जातींप्रमाणे हे लोक कृष्णाला भजतात. शहाळे ही यांची गृहदेवता आणि हनुमंत ही कुलदेवता होय. दगड, वारूळे वगैरे वस्तूंनाही हे देवता म्हणून पुजतात. त्यांच्या घरात देवमूर्ती नसतात.

भीठ तयार करणे हा यांचा मुख्य धंदा होय. याशिवाय शेतात काम करणे, ताडाच्या पानांच्या छत्र्या तयार करणे, इ. कामेही हे करतात.

हे लोक मांसाहारी आहेत. यांची भाषा कानडी आहे. पुरुष किंवा बायका कासोटा घालीत नाहीत. दोघेही कानात कुंडले घालतात. यांच्यांत कुलनामे नसतात. तथापि धंद्यावरून किंवा गावावरून काही आडनावेही आलेली आहेत.

बुधवंत व गौडा हे दोन अधिकारी जातीच्या प्रश्नांचा विचार करतात. अंकोला (जि. कारवार) येथील वेंकटरामण्णा मंदिराचा मठाधिपती हा त्या लोकांचा धर्मगुरू आहे. अंकोला येथेच या लोकांची मध्यवर्ती संस्था आहे. महत्त्वाच्या खटल्यांचा निकाल ही मध्यवर्ती संस्था देते. जारकर्माबद्दल स्त्रियांना जातीबाहेर टाकतात आणि देवाची सेवा करायला लावतात. [ म. ज्ञा. को. ]

**आगोटा-फागोटा** कोकणातील एक लोकनृत्य. दोन स्त्रिया समोरासमोर कमरेवर हात ठेवून उभ्या राहतात आणि नाचत नाचत एकमेकींच्या जवळ येतात, तशाच दूर जातात. नाचताना जे गाणे म्हणतात, त्यात एका संत्रस्त स्त्रीचे वर्णन असते. देशावरही मंगळागौरीच्या प्रसंगी मुली हे नृत्य करतात.

**आगोम** मुंडा आदिवासी बोंगाला नवस बोलतात, त्याची पद्धती. आजारी माणसासाठी नवस असेल, तर घराच्या छपरावर मडके पालथे घालतात. त्याचा अर्थ माणूस बरा झाला, तर बोकड देऊ असा होतो. बैल देण्याचा नवस असेल, तर बैलाला भात खायला देतात. कोंबड्याचा नवस असेल, तर त्याचे नख किंवा पीस तोडून घेतात. [ एन्सा. मुंडा. ]

**आग्नावैष्णवीष्टी** ज्याला शत्रू असतील अशा यजमानाने पूर्णमासेष्टीला जोडून अग्नाविष्णूसाठी एकादशकपाल पुरोडाश आणि सरस्वती व सरस्वन्त यांच्यासाठी चरू यांचा याग करावा, असे तै. संहितेत सांगितले आहे.

(२.५.४.). या इष्टीचे तंत्र पूर्णमासेष्टीप्रमाणेच आहे. दर्शेष्टीला जोडूनही ही केल्यास चालेल, असे एक मत आहे. हिला काम्य दर्शपूर्णमास असेही म्हणतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**आग्निवेश गृह्यसूत्र** अग्निवेशाने स्थापन केलेली आग्निवेश्य शाखा तैत्तिरीयांच्या वाधूल शाखेची एक पोटशाखा आहे व हे गृह्यसूत्र त्या शाखेचे आहे. यात वर्णिलेल्या नारायणबली, यतिसंस्कार, वानप्रस्थविधी, रविकल्प, व्यासबली, इ. विषयांवरून हे सूत्र अलिकडच्या काळात रचले गेले आहे, असे दिसते. [ इं. वे. क. सू. ]

**आग्नीध्र** अध्वर्यूंच्या हाताखालचा एक ऋत्विज. अध्वर्यूंच्या सगळ्या कामांची याला माहिती असावी लागते. कारण त्यालाच त्या कामाची पूर्वतयारी करायची असते. विविध कर्मांप्रमाणे 'अग्नीद् बर्हिः स्तृणाहि', 'अग्नीदग्नीन् विहर', 'अग्नीदग्निं त्रिस्त्रिः संमृड्ढि' इ. अनेक प्रैष त्याला दिले जातात. यांशिवाय, यज्ञाचे रक्षण करणे, हे याचे प्रमुख काम आहे. प्रत्येक यागाच्या पूर्वी अध्वर्यू त्याला 'सर्व ठीक आहे असे सांग' असे म्हणतो. त्यावर हातात स्फ्य (लाकडी तलवार) घेऊन हा 'सर्व ठीक आहे' असे सांगतो. याला प्रत्याश्रावण असे म्हणतात. दर्शपूर्णमास, पशुयाग, सोमयाग, इ. सर्व यागांत आग्नीध्र असावा लागतो. सोमयागात याला विशेष महत्त्व असते. त्याच्यासाठी स्वतंत्र आग्नीध्रीय मंडप असतो. तो याज्या मंत्र म्हणतो. या यागात त्याला सर्वांच्या आधी दक्षिणा मिळते. ब्रह्मगणात याचे तिसरे स्थान आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**आग्नीध्रीय** एक यज्ञीय मंडप. आग्नीध्रीय व मार्जालीय हे दोन मंडप अनुक्रमे महावेदीच्या उत्तरेला व दक्षिणेला घालतात. या मंडपांचा अर्धा भाग महावेदीच्या आत आणि अर्धा बाहेर असतो. दोन्ही मंडप चौरस १२० अंगुलांचे असतात. आग्नीध्रीय मंडपाला दक्षिणेस तोंड करून आणि मार्जालीयाला उत्तरेस तोंड करून एक दार असते. [ म. ज्ञा. को. ]

**आग्नेयकृच्छ्र** एक प्रायश्चित्त. बारा दिवस केवळ तीळ खाऊन राहणे, असे याचे विधान विष्णुधर्मोत्तर पुराण व प्रायश्चित्त प्रकाश यांत सांगितले आहे. [ हि. ध. ]

**आग्नेयव्रत** एक तिथिव्रत. कोणत्याही नवमीस एकदा हे व्रत करतात. विंध्यवासिनीची पंचोपचार पूजा हा या व्रताचा प्रमुख विधी आहे. [ हि. ध. ]

**आग्नेयस्नान** स्नानाचा एक प्रकार. अंगाला भस्म लावून हे स्नान करतात. शरीराच्या असमर्थतेमुळे जलस्नान करणे शक्य नसेल, तेव्हा हे स्नान करतात. [ हि. ध. ]

**आग्नेयास्त्र** अग्नीचे अस्त्र. भरद्वाजाने अग्निपुत्र अग्निवेश याला हे अस्त्र दिले आणि त्याने ते द्रोणाला दिले. असेच एक अस्त्र और्वाने आपला शिष्य राजा सगर याला दिले होते. सगराने त्याच्या मदतीने त्याची पैतृक मालमत्ता बळकावणाऱ्या क्रूर टोळ्यांचा पराभव केला, असे विष्णुपुराणात सांगितले आहे. पाहा – अस्त्रविद्या. [ क्ला. डि. हिं. मा. ]

**आग्नेयी** पूर्व व दक्षिण यांमधली एक उपदिशा. 'उदयगिरिसंनिहिता सुमेरुव्यवहिता च दिक्' (= उदयपर्वताच्या (पूर्व) जवळ असलेली व सुमेरू पर्वताने वेगळी झालेली दिशा) (न्यायकोश). अग्नी हा या दिशेचा स्वामी आहे.

**आग्रयण** एक इष्टी. गोभिलस्मृतीत (३.१०३) हिला नवयज्ञ आणि मनुस्मृतीत (४.२७) नवसस्येष्टी असे म्हटले आहे. आपस्तंब गृह्यसूत्राच्या टीकेत सुदर्शनाने आग्रयणाची व्याख्या पुढीलप्रमाणे दिली आहे –

**येन कर्मणा अग्रं नवद्रव्यं देवान् प्रापयतीति**
**यत्कर्म कृत्वैव वाग्रयणं प्रथमायनं नवान्नप्राशन–**
**प्राप्तिर्भवतीति ।**

(१९.६)

अर्थ – ज्या विधीने अग्र म्हणजे नवीन धान्य देवांना अर्पण करतात किंवा जो विधी केल्यावर नवधान्य भक्षण करतात, त्याला आग्रयण असे म्हणतात.

प्रत्येक नव्या धान्याच्या निर्मितीच्या वेळी ही इष्टी करावी असा संकेत होता. त्यामुळे इष्टीचा काल थोडाफार मागेपुढे झाला तर बिघडत नसे. क्वचित प्रसंगी नव्या धान्याची इष्टी करणे शक्य झाले नाही, तर अग्निहोत्र होम नव्या धान्याने करावा, अथवा अग्निहोत्री धेनूला नवे धान्य खायला घालून तिच्या दुधाने अग्निहोत्र होम करावा असेही सांगितले आहे. याशिवाय अन्यही काही पर्याय आहेतच. फळे, भाजीपाला इत्यादींची आग्रयणेष्टी केली किंवा न केली तरी चालते. ही इष्टी अमावास्या किंवा पौर्णिमा या तिथीला करतात.

आग्रयणाच्या इंद्राग्नी, विश्वेदेव, द्यावापृथिवी व सोम या देवता होत. वसंतऋतूत पर्व दिवशी नव्या यवाने आणि शरद् ऋतूत नव्या भाताने आग्रयणेष्टी करावी असे मानव गृह्यसूत्र सांगते. वैखानसाने या इष्टीशी पितरांचा संबंध जोडला आहे.

मोडकी पण दुरुस्त केलेली बैलगाडी, रेशमी वस्त्र, मधुपर्क आणि पावसाळ्यात वापरलेले वस्त्र ही या इष्टीची दक्षिणा होय, असे कात्यायन श्रौतसूत्रात म्हटले आहे (४.६.१८). काहींच्या मते माघ पौर्णिमेला जन्मलेले पहिले वासरू दक्षिणा म्हणून द्यायचे असते.

या इष्टीचा पर्याय आजही पाहायला मिळतो. दक्षिणेत आश्विन पौर्णिमेला नव्याची पौर्णिमा असे नाव आहे. या दिवशी नव्या धान्याच्या लोंब्या फुलांबरोबर गुंफतात आणि त्या दारावर तोरणासारख्या लावतात.

आहिताग्नी पुरुषांना ही इष्टी विहित आहे, असे आश्व. श्रौतसूत्रांत सांगितले आहे (२. ९). आग्रयणयज्ञ नवधान्याचा असून, तो श्रौतसूत्राप्रमाणे किंवा आश्व. गृ. सूत्राप्रमाणे त्रेताग्नीवर करावा, असे नारायण सांगतो. आहिताग्नी नसलेल्या गृहस्थाला औपासन अग्नीवर आग्रयणयज्ञ करता येतो. आग्रयणात सतरा सामिधेनी ऋचा असतात. पाहा – नवान्नभक्षण. [ हि. ध.; नि. सिं.; श्रौ. ध. स्व. चि.; हिं. ध. त. ]

**आग्रहायणी** सप्त पाकयज्ञांपैकी एक यज्ञ. मार्गशीर्ष पौर्णिमेला हे नाव असून, त्या दिवशी जो विधी करतात, त्यालाही त्याच नावाने संबोधतात. श्रावण पौर्णिमेपासून सर्पाच्या भीतीने पलंगावर झोपण्यास सुरवात करावी व मार्गशीर्ष पौर्णिमेला त्याचा त्याग करावा, असे सांगितलेले आहे. म्हणून या विधीला प्रत्यवरोहण असेही दुसरे नाव आहे. काहींच्या मते आग्रहायणी व प्रत्यवरोहण हे दोन निरनिराळे विधी असून, ते अनुक्रमे मार्गशीर्ष पौर्णिमेला व हेमंत ऋतूतल्या पहिल्या रात्री करतात. हल्ली हा विधी प्रचारात नाही. पाहा – प्रत्यवरोहण [ हि. ध. ]

**आग्रा** हे शहर उत्तर प्रदेशात, दिल्लीपासून १२२ मैल अंतरावर यमुना नदीच्या काठावर वसले आहे. या शहराला प्राचीन परंपरा असून, महाभारतात याचा अग्रवन असा उल्लेख आहे. महाभारतकाळी हे नगर अत्यंत समृद्ध असून शूरसेनाच्या प्रदेशात त्याचा अंतर्भाव होत होता. इथेच कंसाचे कारागृह होते. या नगरात शहराच्या चारही कोपऱ्यांवर व मध्यभागी महादेवाची स्थापना केलेली होती. या ठिकाणी यमुना नदी पश्चिमवाहिनी असल्यामुळे इथे स्नान करणे पुण्यप्रद मानतात.

आग्र्याजवळील बटेश्वर क्षेत्रात श्रीकृष्णाचे पूर्वज व वंशज यांच्या वसाहतीचे अनेक अवशेष सापडले आहेत. त्यांत श्रीकृष्णाचा पुत्र प्रद्युम्न व नातू अनिरुद्ध यांच्या नावांनी वसलेली पदमनखेडा ' व ' औंधखेडा ' ही गावे आहेत.

आग्रा हे व्रजप्रदेशातील प्रमुख नगर होते. तिथल्या बारा वनांपैकी अग्रवन हे एक होते. आर्य भारतात आल्यावर त्यांनी ज्या पाच ठिकाणी वस्ती केली, त्यांत आग्रा हेही एक ठिकाण होते. त्या वेळी त्याला आर्यग्रह हे नाव होते. या आर्यगृह किंवा अग्रवन या नावावरूनच पुढे या शहराला आग्रा हे नाव मिळाले.

इ. स. च्या ११ व्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत या शहरावर हिंदू राजांचे आधिपत्य होते. पण इ. स. १०७५ मध्ये पंजाबचा सुभेदार, गझनीच्या महमुदाच्या वंशातील दुसरा महमूद याने आग्र्याचा राजा जयपाल याचा पराभव करून ते शहर जिंकले. गुलाम, खिलजी, तुगलुक व सय्यद या घराण्यांतील सुलतानांच्या काळी हे एक सामान्य शहर होते. त्यानंतर शिकंदर लोदीने त्याचा विकास केला व तिथे आपली राजधानी स्थापली.

इ. स. १५२६ साली बाबराने हे शहर जिंकले. त्यानंतर २५ वर्षांनी अकबर बादशाहाने इथे मोगलांची राजधानी स्थापली आणि अनेक सुंदर इमारती बांधून शहराचे सौंदर्य वाढवले. तथापि शहाजहानने बांधलेल्या ताजमहालामुळेच हे शहर प्रख्यात झाले.

शहाजहानने पुढे आपली राजधामी दिल्लीला हालविली. त्यानंतर आग्रा शहरावर बरीच आक्रमणे झाली. भरतपूरच्या जाटांनी त्याच्यावर हल्ला केला. मग मराठ्यांनी ते काबीज केले. पुन्हा इ. स. १७७३ साली नजफखानाने ते हस्तगत केले. बारा वर्षांनंतर पुन्हा एकदा मराठ्यांनी ते जिंकले. त्यानंतर इ. स. १८०३ साली इंग्रजांनी त्याचा ताबा घेतला. आजही ते भारतातले एक प्रेक्षणीय स्थळ म्हणून प्रसिद्ध आहे.


इतिमद् उद्दौल्याची कबर

आग्रा शहरातील किल्ला प्रेक्षणीय आहे. अकबराने या भव्य किल्ल्याची रचना केली. त्यानंतरच्या राजांनी अनेक सुंदर इमारती त्या किल्ल्याला जोडल्या. सध्या ज्या ठिकाणी किल्ला बांधलेला

आहे, तिथे पूर्वी बादलगड होता, असे काही इतिहासकार सांगतात. हा किल्ला लाल दगडांचा असून, त्याचे बांधकाम सुमारे आठ वर्षे (इ. स. १५६५ – १५७३) चालले होते. किल्ल्याच्या आतील बऱ्याचशा इमारती मात्र शहाजहानने बांधलेल्या आहेत. किल्ल्याचा परीघ दीड मैलांचा असून, भोवती दुहेरी तटबंदी आहे. दोन भिंतींमधील अंतर चाळीस फूट असून, मधला भाग दगडगोट्यांनी भरलेला आहे. भिंतींची उंची ७० फूट आहे. किल्ल्याला चार दरवाजे आहेत. किल्ल्यांतील अकबराचा महाल, जहांगीराचा महाल, खास महाल, शीशमहाल, दिवाण–इ–खास, मच्छीभवन, दिवाण-ई-आम, मोती मशीद या वास्तू सुंदर आहेत.

याशिवाय, इतिमद्–उद्–दौलाची कबर, चिनीका रौझा, रामबाग, जामा मशीद, जसवंत सिंहाची छत्री, सिकंदरा येथील अकबराची कबर, या वास्तूही प्रेक्षणीय आहेत.

शिकंदर लोदी याच्या काळापासून आग्रा हे विद्येचे केंद्र होते. अकबराच्या कारकिर्दीत तिथे फारसी भाषा व साहित्य यांचे अध्ययन–अध्यापन चाले. या स्थानाचे सांस्कृतिक महत्त्व जाणून सूरदास इथे येऊन राहिला होता. तानसेनच्या काळापासून हे संगीताचेही प्रमुख केंद्र मानले गेले आहे. दयालबाग नामक उपनगर हे राधास्वामी संप्रदायाचे केंद्र आहे. पाहा– ताजमहाल. [आ. ए. सां. प.; आ. फ. सि.; हि. क. इं. पी. ५]

**आग्रेय** एक प्राचीन मानवगण. हे लोक अग्रोदक प्रदेशात राहत होते व यांचे गणराज्य होते. पंजाबमधील हिस्सार जिल्ह्यात अगरोहा हे गाव आहे, तेच अग्रोदक होय. इथे आग्रेयांची नाणी सापडली आहेत. पाहा–अगरोहा. [अ. हि. नॉ. इं.]

**आघाटी** याचा अर्थ टाळ किंवा झांज, असा आहे. वेदकाळी नृत्याला साथ करण्यासाठी हे वाद्य वाजवीत (ऋ. १०. १४६. २). [वे. इं.]

**आघाडा** संस्कृतात याला अपामार्ग म्हणतात. भाद्रपदात ज्येष्ठागौर बसवितात, त्या वेळी आघाड्याची रोपटी एकत्र बांधून ती भांड्यावर ठेवतात व त्यावर गौरीचे चित्र बांधतात. आघाडा पावसाळ्यात फार होतो आणि त्याची उंची ४ ते ६ फूट असते. देवीला याची पत्री फार आवडते. देवतांच्या पत्रपूजेत याच्या पानाचा समावेश केलेला आहे. पाहा – अपामार्ग. [सु. वि. को.]

**आघार** आहवनीय अग्नीत अध्वर्यू जी आज्याहुती देतो, तिला आघार असे नाव आहे. आघाराचे दोन प्रकार आहेत. एकात प्रजापती ही देवता असून, तिला वायव्येकडून आग्नेयीकडे आहुती देतात. दुसऱ्यात इंद्र ही देवता असून, तिला नैर्ऋत्येकडून ईशान्येकडे आहुती देतात. पाहा– अग्निमुख. [हि. ध.]

**आघारी** (सं. आघार) शूद्रांत श्राद्धाच्या दिवशी तूपभाताचा होम करतात, त्याला हे नाव आहे. प्रथम जमीन सारवून तिथे अग्नी प्रज्वलित करतात व त्यावर हा होम करतात. मग सभोवती पाणी फिरवून त्याला नमस्कार करतात. श्राद्धप्रयोगातल्या अग्नौकरणाचाच हा एक पर्याय आहे.

**आचमन** 'आचम्यतेऽम्भोऽनेनाचमनम्' = ज्यात जलप्राशन केले जाते ते आचमन होय (क्षीरस्वामी). 'वैधकर्मारम्भात् पूर्वं वारत्रयं जलपानपूर्वक–यथाक्रमाष्टाङ्गस्पर्शरूपशुद्धिजनकक्रिया' = विधिप्रयुक्त कर्मांच्या प्रारंभापूर्वी तीन वेळा जलपानपूर्वक यथाक्रम अष्टांगांना स्पर्श करणे एतद्रूप शुद्धिजनक क्रिया, म्हणजे आचमन होय. उजव्या हाताच्या तळव्यावर शुद्ध व शीत उदक घेऊन ते केशव, नारायण, माधव या तीन नामांचा उच्चार करून प्राशन करणे, याला आचमन म्हणतात.

त्रिराचामेदपः पूर्वं द्विः प्रमृज्यात्ततो मुखम् ।
संमृज्याङ्गुष्ठमूलेन त्रिभिरास्यमुपस्पृशेत् ।। (गरुड पु. २१५)

अर्थ – प्रथम जलाचे तीनदा प्राशन करावे. नंतर दोनदा तोंड पुसावे. नंतर अंगठ्याच्या मुळाने मुखावर मार्जन करून तीनदा जलाने मुखाला स्पर्श करावा.

ओल्या हाताने डोळे, कान, नाक, हृदय आणि मस्तक यांना स्पर्श करावा; भोजन, हवन, दान, दोन्ही संध्या, उपहार, प्रतिग्रह, हविर्भक्षण, या प्रसंगी व कर्मान्ती दोनदा आचमन करावे व आचमन शक्य नसेल, तेव्हा नुसता उजव्या कानाला स्पर्श करावा, असे सांगितले आहे. श्रौत, स्मार्त व आगमोक्त असे आचमनाचे तीन प्रकार आपस्तंब सांगतो–प्रत्यक्ष श्रुतीने विहित व दर्शपूर्णमासाचे अंग ते श्रौताचमन होय. स्मार्ताचमन हे संध्यादी कर्माचे अंग आहे. आगम किंवा पौराण आचमन हे शौचादी कर्माचे अंग असते. आचमनाच्या वेळी पहिल्या केशवादी तीन नावांनी उदक प्राशन करायचे असते व पुढच्या गोविंदादी एकवीस नावांनी शरीराच्या विविध अंगांना स्पर्श करायचा असतो. भूमीवर पाय ठेवून पूर्व अथवा उत्तर दिशेकडे तोंड करून आचमन करतात. आसनावर पाय ठेवून अथवा आसनमांडी घालून व हात गुडघ्याबाहेर ठेवून आचमन करू नये. आचमनाच्या वेळी हातात पवित्रक, निदान दर्भ तरी असावे. स्नान, दान, जप, यज्ञ, स्वाध्याय व नित्यकर्म करताना हातात दर्भपवित्रक असण्याची आवश्यकता आहे. [हि. ध. आह्निकसार; व्रतराज]

**आचमनीय** मुखप्रक्षालनासाठी पाणी देणे. देवाच्या षोडशोपचार पूजेतील हा एक उपचार आहे. हे जल कसे असावे, त्याचे वर्णन पुढे दिले आहे–

दद्यादाचमनीयं तु सुगन्धिसलिलैः शुभैः ।
कर्पूरवासितैर्वापि कृष्णागुरुसुधूपितैः ।।

(कालिका पु. ६७)

अर्थ – पवित्र, सुगंधी, कापराचा वास असलेले किंवा कृष्णागुरूचा धूर दिलेले सुवासिक जल आचमनीय म्हणून द्यावे.

हे जल स्वच्छ, फेसवर्जित असावे व ते तेजस्वी पात्रातून किंवा शंखातून देवाला अर्पण करावे, असेही सांगितले आहे.

आयुर्बलं यशोवृद्धिं प्रदायाचमनीयकम् ।
लभते साधको नित्यं कामांश्चैव यथेप्सितान् ।।

अर्थ – हे आचमनीय अर्पण केल्याने साधकाला नेहमी दीर्घायुष्य, बल, यश व इच्छित वस्तू यांचा लाभ होतो. [ श. क. ]

**आचमनोपनिषद** एक गौण उपनिषद. यात आचमनविधीचे वर्णन केलेलें आहे. तीनदा आचमन करावे, पहिल्या आचमनाने ऋग्वेद, दुसऱ्याने यजुर्वेद व तिसऱ्याने सामवेद प्रसन्न होतो; ब्राह्मणाच्या उजव्या हाताच्या ठिकाणी देव, ऋषी, पितर, ब्रह्म व अग्नी, अशी पाच तीर्थे असतात, असे यात सांगितले आहे.

**आचाम्लव्रत** जैन श्रावकांचे एक व्रत. अष्टम्यादी पर्वतिथींना जैन धर्मात निर्जल उपवास सांगितलेला आहे. पण तसा तो करण्याची शक्ती नसेल, तेव्हा आचाम्लव्रत करतात. यात एक वेळ रुक्ष व नीरस अन्न ग्रहण करतात. मात्र केवळ पाण्यात शिजविलेले अन्न किंवा नुसती चपाती लिंबू किंवा चिंचेच्या पाण्याबरोबर खाल्ली तरी चालते. [ व. श्रा. ]

**आचार** आचरण किंवा अनुष्ठान असा याचा अर्थ आहे. धर्मसंमत व शिष्टसंमत अशी वागण्याची पद्धती म्हणजे आचार होय. आचाराचे म्हणजेच वागणुकीचे सदाचार व कदाचार (निंद्य आचार) असे दोन भेद होतात. इथे आचार शब्दाने सदाचार अपेक्षित आहे. कोणतेही कर्म शास्त्राला अनुसरून करणे याला सदाचार म्हणावे. भारतीय संस्कृतीत आचाराला फार महत्त्वाचे स्थान दिले आहे. श्रुतिस्मृतींनी सांगितलेल्या आचारधर्माचे पालन प्रत्येकाने केले पाहिजे, असा धर्मशास्त्राचा आग्रह आहे.

आचार हे एक धर्माचे प्रमाण मानले आहे. धर्माच्या निरनिराळ्या अंगोपांगांचा विचार करून धर्म शब्दाच्या अनेक व्याख्या भिन्न भिन्न ग्रंथांत आढळतात. धर्माच्या जशा सर्वसंग्राहक व्याख्या आहेत, तशाच त्या धर्मातील महत्त्वाच्या गोष्टींचा निर्देश करून बनविलेल्या एकांगी अशाही काही आहेत. वसिष्ठस्मृतीने (६.१) आचाराला प्राधान्य देऊन पुढील व्याख्या केली आहे–

आचारः परमो धर्मः सर्वेषामिति निश्चयः ।

अर्थ– आचार हा सर्वांचा श्रेष्ठ धर्म होय, असा निश्चय आहे.

धर्माचे लक्षण आचार आहे, असे म्हणत असता सज्जनांचा आचार म्हणजेच सदाचार, असाच अर्थ गृहीत धरला जातो. सज्जन किंवा शिष्ट जी गोष्ट करतात, ती आचरणात आणणे म्हणजेही धर्म पाळणे होय. श्रेष्ठ लोक जे जे आचरितात, त्याचेच अनुकरण सामान्यजन करीत असतात, असे भगवद्गीतेत म्हटले आहे (३.२१). वेदांत अथवा धर्मशास्त्रात ज्या गोष्टी आचरणीय म्हणून सांगितल्या असतील, त्यांचे पालन केले तरच विहित फल मिळते. म्हणूनच श्रुतींचे तत्त्व आचारावर अवलंबून आहे, असे पाराशर स्मृतीत सांगितले आहे. धर्मशास्त्रांत आचार, व्यवहार व प्रायश्चित्ती या तीन गोष्टींचा विचार केलेला असतो. या तीहींत आचारालाच प्राधान्य दिलेले आहे.

मनू, याज्ञवल्क्य, इ. स्मृतिकारांनी धर्माची चार प्रमाणे सांगितली आहेत, ती अशी –

श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः ।

(याज्ञ. १.७)

अर्थ – श्रुती, स्मृती, सदाचार आणि आत्मतुष्टी ही धर्माची चार लक्षणे होत.

श्रुती म्हणजे वेद. श्रुतीला सर्व शास्त्रकारांनी स्वतःप्रमाण मानले आहे. 'चोदनालक्षणोऽर्थो धर्मः' = वेदविहित कर्म म्हणजे धर्म होय, असे जैमिनीने धर्माचे लक्षण केले आहे. तात्पर्य श्रुती हाच वैदिक धर्माचा आधार आहे. याच अर्थाने अखिल वेद हेच धर्माचे मूळ आहे, असे मनूने म्हटले आहे (२.६).

वेदांचे प्रामाण्य मानून वेदविहित कर्माचाच विस्तार स्मृतींमध्ये केलेला असतो. म्हणूनच स्मृती हेसुद्धा धर्माचे प्रमाण ठरते. 'स्मृतिस्तु धर्मसंहिता' = स्मृति म्हणजेच धर्मशास्त्र होय. (अमर).

धर्माचे तिसरे प्रमाण सदाचार हे आहे. वेदांत अथवा स्मृतींत एखाद्या गोष्टीला आधार मिळाला नाही, तर सज्जन किंवा शिष्ट ज्याप्रमाणे आचरण करीत असतील, त्याप्रमाणे त्या गोष्टींचे आचरण करणे, म्हणजे धर्माचे पालन करणे होय, हाच आशय पुढील वचनात सांगितला आहे.

श्रुतिस्मृतिविहितो धर्मः । तदलाभे शिष्टाचारः प्रमाणम् ।

(वसिष्ठ स्मृ. १.४)

कल्पसूत्रांत श्रौत, गृह्य व धर्म असे तीन विभाग असतात. धर्मसूत्रांच्या प्रारंभीच धर्माचे व्याख्यान करताना आचाराचा

उल्लेख येतो. धर्म म्हणजे आचार असाच अर्थ त्या ठिकाणी गृहीत धरलेला असतो.

अथातः सामयाचारिकान् धर्मान् व्याख्यास्यामः ।

(आप. ध. सू. १.१.१)

अर्थ – यानंतर निरनिराळ्या वेळी पाळायचे आचार म्हणजे धर्म यांचे व्याख्यान करीत आहो.

धर्माचे चौथे प्रमाण आत्मतुष्टी हे होय. सज्जनांना ज्या ठिकाणी संशय उत्पन्न होईल व जिथे दुसरे कोणतेही प्रमाण मिळणार नाही, तिथे स्वतःच्या अंतःकरणाला जे योग्य वाटेल, त्याचेच आचरण सज्जन करीत असतात. या आचारालाही धर्माचे प्रमाण म्हणून मानतात.

वर उल्लेखिलेल्या चार प्रमाणांमध्ये पहिल्या पहिल्या प्रमाणास अधिक प्राबल्य असून उत्तरोत्तर गौणत्व आहे.

धर्माचे प्रमाण म्हणून सदाचाराचा विचार करीत असता सज्जन किंवा शिष्ट कोण, याचाही विचार केलेला आहे. ज्यांना वेदांचे यथार्थ ज्ञान असते; जे निरहंकार, निर्मत्सर व स्थिर असतात; तसेच दंभ, दर्प, लोभ, मोह, मद व क्रोध हे ज्यांनी जिंकलेले असतात, ते शिष्ट होत, असे बौधायन स्मृतीत सांगितले आहे (१०५). शिष्ट हे वेदांत प्रत्यक्ष न सांगितलेल्या गोष्टीचे अनुमान करू शकतात. शिष्टांच्यामुळेच आपणांस वेदांचे प्रत्यक्ष ज्ञान होत असते. म्हणूनच स्मृतींमध्ये शिष्टांना 'श्रुतिप्रत्यक्षहेतवः' असे म्हटले आहे. शिष्ट लोक धर्मबुद्धीने निःस्वार्थपणे जो आचार पाळतात, तो सदाचार होय.

जनपदधर्म, ग्रामधर्म, कुलधर्म हेही सदाचारात गणले जातात. जरी ते श्रुतिस्मृतिप्रतिपादित नसले, तरी विवाहादी संस्कारांच्या प्रसंगी त्यांचे पालन करावे, असे सांगितले आहे. उदा० विवाहातला कंकणबंधाचा विधी. तो श्रुतिस्मृतिप्रतिपादित नाही; पण तरीही तो एक सदाचार असल्यामुळे त्याचा विवाहविधीत समावेश केलेला आहे. ज्या देशात जे आचार परंपरेने चालत आलेले असतात व ज्यांचा श्रुतिस्मृतींशी विरोध नसतो, असे आचार सदाचार म्हणून पाळले जावे, असाच सर्व धर्मशास्त्रकारांचा उपदेश आहे.

प्रजेचे धारण करतो तो धर्म अशी धर्माची सामान्य व्याख्या आहे. या धर्माचे पालन सदाचाराचे नियम पाळूनच केले पाहिजे. धर्माचे पालन म्हणजे धर्मशास्त्रात सांगितलेल्या गोष्टींचे आचरण करणे होय. कारण धर्म हा आचाराधीन आहे.

आचारप्रभवो धर्मो धर्मस्य प्रभुरच्युतः ।

अर्थ– धर्म हा आचारापासून उत्पन्न झाला असून त्या धर्माचा प्रभू पुराणपुरुष अच्युत म्हणजे श्रीविष्णू हा आहे.

धर्म हा व्यक्ती, समाज व राष्ट्र यांना व्यापून राहणारा आहे. धर्माबरोबरच आचार हाही सर्व ठिकाणी दाखल होतो. सदाचार हा तो आचरण करणाऱ्या व्यक्तीच्या उन्नतीस जसा कारण होतो, तसाच तो समाजाच्या उन्नतीसही हातभार लावतो. म्हणूनच धर्मशास्त्रात सदाचरणी व्यक्तीची प्रशंसा आढळते, तशीच आचारहीनाची निंदाही आढळते. 'आचारहीनं न पुनन्ति वेदाः' = आचारहीन पुरुषाला वेदाध्ययनानेही पावित्र्य येत नाही, असे स्मृतींनी म्हटले आहे.

सदाचार किंवा शिष्टाचार हे एक धर्माचे प्रमाण मानल्यामुळे वैदिक–विशेषतः पौराणिक–धर्म सर्वसंग्राहक ठरला आहे. या देशांत अनेक पंथोपपंथ निर्माण झाले आणि त्या सर्वांचा धर्मात समावेश होऊ शकला. शिष्टाचार प्रामाण्यामुळेच श्रुतिस्मृतींत न सांगितलेल्या कित्येक गोष्टींचा धर्मांत समावेश करणे शक्य झाले. कित्येक प्रसंगी वेदप्रामाण्य न मानणाऱ्यांचीही काही तत्त्वे शिष्टाचारामुळेच आपण स्वीकारली आहेत. शिष्टाचार हे परंपरेने, रूढीने चालत आलेले असतात. सज्जन किंवा शिष्ट हे निरनिराळ्या कालखंडांत निरनिराळे असतात. त्यामुळे त्यांनी संमत केलेले आचारही युगपरत्वे भिन्न भिन्न असतात. याच कारणामुळे धर्म हा काही बाबतीत परिवर्तनीय आहे, असे म्हणता येते. वेद आणि स्मृती यांच्याशी विरोध न येईल, असा आचार स्वीकारण्यास धर्मशास्त्राने अनुमती दिलेली आहे.

भारतीय दर्शनांत आचारविषयक प्रश्नांना महत्त्वपूर्ण स्थान दिलेले आहे. भारतीय दर्शनांनी मोक्ष हे जीवाचे परम साध्य मानलेले असून, त्या मोक्षाच्या सिद्धीसाठी सदाचारनियमांची समीक्षा केलेली आहे. आस्तिक व नास्तिक अशा दोन्ही प्रकारच्या दर्शनांची या बाबतींत काही मर्यादेपर्यंत एकवाक्यता आहे. जैन दर्शनात अर्हत्पदाच्या प्राप्तीसाठी आचारनियमांची विस्तृत चर्चा केलेली असून, अहिंसा हा त्या बाबतीत सर्वश्रेष्ठ आचार मानलेला आहे. बौद्ध दर्शनात अनेक विभिन्न आणि परस्परविरोधी संप्रदाय असले, तरी त्या सर्वांनी बुद्धाच्या आचरणविषयक उपदेशांचा स्वीकार केलेला आहे. बुद्धाने उपदेशिलेल्या चार आर्यसत्यांपैकी चौथे आर्यसत्य दुःखनिरोधमार्ग हे असून तेच त्यांच्या आचारशास्त्राचा आधार ठरले आहे. त्याचे व्यावहारिक स्वरूप मध्यममार्ग हे आहे. एका बाजूने निरर्थक आत्मपीडा व दुसऱ्या बाजूने क्षणिक सुखांचा हव्यास या दोन अतींचा परिहार करून मध्यममार्गाचे अवलंबन करणे, हाच सदाचार होय, असे त्याने मानले आहे. त्यामुळे प्रतीत्य समुत्पादाचा अंत होऊन भवचक्रांतून सुटका होते. प्रेम, सहानुभूती, दया व प्राणिमात्राविषयी मैत्रीची भावना या सद्गुणांवर बौद्ध आचारशास्त्रात विशेष भर दिलेला आहे.

भारतीय दर्शनांच्या सर्व संप्रदायांनी आचाराच्या बाबतीत उपनिषदे व भगवद्गीता यांच्या मुख्य सिद्धान्तांचा स्वीकार केलेला आहे. ब्रह्मज्ञान हे उपनिषदांचे परम लक्ष्य आहे. त्याचा विचार करीत असताना उपनिषदांनी आत्मसाधना व शील यांच्या व्यावहारिक बाजूकडेही दुर्लक्ष केलेले नाही. भगवद्गीता ही तत्त्वज्ञानापेक्षा आचारशास्त्राच्या दृष्टीने अधिक महत्त्वपूर्ण आहे. गीतेत ब्राह्मी स्थितीच्या प्राप्तीसाठी निष्काम कर्माचा अनेक प्रकारे उपदेश केलेला आहे. अकर्मण्यता ही त्याज्य असून कर्मसंन्यासापेक्षा फलासक्ती टाकून कर्तव्यकर्म करीत राहणे, हेच मोक्षप्राप्तीसाठी श्रेयस्कर होय. धैर्य, मनोनिग्रह व आत्मबुद्धी हे गुण सदाचाराला आधारभूत असतात. मोक्षासाठी चित्तशुद्धीची आवश्यकता असते व चित्तशुद्धीसाठी वर्णाश्रमविहित कर्मे आचरावी लागतात, असे शंकराचार्यांनी स्पष्टपणे प्रतिपादिले आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

## आचारज ब्राह्मण

मारवाडातील ब्राह्मणांची एक जात. यांनाचा कार्टिया ब्राह्मण असेही नाव आहे. आचारज हे आचार्य शब्दाचे विकृत रूप आहे. हे लोक प्रेतदहनाचे पौरोहित्य करतात. मृताच्या बारा दिवसांत मृत माणसांच्या आप्तेष्टांनी दिलेले अन्न हे ग्रहण करतात. त्यामुळेच हे लोक हीन दर्जाचे मानले गेले आहेत. पंजाबात यांना गावाच्या आत प्रवेशही मिळत नसे. दुसरे ब्राह्मण यांना अस्पृश्य मानतात. हे शिवाचे उपासक असून, सिनावड, दिलीवाल, जोशी, वनवाला, सारस्वत, इ. यांच्या पोटजाती आहेत. [ रा. जा. ]

## आचारवर्धनव्रत

एक जैन व्रत. व्रतावधी ११९ दिवस. यात १०० उपवास आणि ५० पारणा असतात. कुठल्याही महिन्यात व्रताचा प्रारंभ करता येतो. [ जै. व्र. वि. सं.]

## आचार्य

या शब्दाच्या व्याख्या – (१) 'मन्त्रव्याख्याकृदाचार्य:' (=मंत्रांची व्याख्या करणारा, तो आचार्य होय) (अमर.).

(२) 'यस्माद्धर्मानाचिनोति स आचार्य:' (=ज्याच्यापासून शिष्य धर्माचा संग्रह करतो, तो आचार्य होय) (आप. ध. सू.).

(३) 'आचार्य: कस्मादाचारं ग्राहयति आचिनोत्यर्थानाचिनोति बुद्धिमिति वा।' (= जो आचार शिकवितो, अर्थ (शुल्कधन) गोळा करतो किंवा शिष्याची बुद्धी संपन्न करतो, तो आचार्य होय) (निरुक्त).

(४) उपनीय तु य: शिष्यं वेदमध्यापयेद् द्विज:।
सकल्पं सरहस्यं च तमाचार्यं प्रचक्षते ।। (मनु. २.१४०).

अर्थ – जो ब्राह्मण शिष्याचे उपनयन करून त्याला वेद, यज्ञकर्म, उपनिषदे यांचे शिक्षण देतो, त्याला आचार्य असे म्हणतात.

प्राचीन काळी आचार्यपद शिक्षणाशी निगडित होते. विद्येच्या क्षेत्रात आचार्यांचे स्थान फार उच्च होते. त्यामुळे आचार्याकडून विद्या ग्रहण केली असता ती सफळ होते, अशी त्या काळी लोकांची धारणा होती. आचार्यांबरोबरच गुरू व उपाध्याय या तिघांची उच्चतम कोटीच्या अध्यापकांत गणना केली जात असे. पण त्यांच्यामध्ये आचार्यांचे स्थानच सर्वश्रेष्ठ मानले जाई.

जो आपल्या उपजीविकेसाठी विद्यार्थ्यांकडून शुल्क घेऊन त्याला वेदाचा काही भाग किंवा वेदांगे शिकवीत असे, त्याला मनुस्मृतीत उपाध्याय असे म्हटलेले आहे (२.१४१).

शिष्याचे उपनयन करण्याचा अधिकार फक्त आचार्यालाच असतो. ज्याचे उपनयन अविद्वान करतो, तो अंधकारातून घोर अंधकारात प्रवेश करतो. त्यामुळे कुलीन, विद्यासंपन्न व बुद्धिमान् अशा माणसाचीच आचार्यपदासाठी निवड केली पाहिजे, असे आप. धर्मसूत्रात सांगितले आहे (१.१.१.११–१३).

आचार्य उपनयमानो ब्रह्मचारिणं कृणुते गर्भमन्त:।
(अथर्व. ११.५.३)

अर्थ – आचार्य उपनयनसंस्कार करून ब्रह्मचाऱ्याला आपल्या विद्यागर्भात प्रविष्ट करतो.

ज्याप्रमाणे मातेच्या गर्भात मुलाचे पोषण होते, त्याचप्रमाणे आचार्याच्या विद्यागर्भात ब्रह्मचारी शिष्याचे आध्यात्मिक पोषण होते (म. भा. उ. ४४.६).

व्याकरण, कल्पसूत्रे, स्मृती, पुराणे, दर्शने, भाष्ये, इ. ग्रंथांच्या कर्त्यांनाही आचार्य म्हणत. पाणिनी, पतंजली, बौधायन, आपस्तंब, वसिष्ठ, गौतम, शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, वल्लभाचार्य, हे आचार्य मानले गेले आहेत. बौद्ध व जैन ग्रंथांची रचना करणारे अनेक आचार्य होऊन गेले. जैनांच्या विविध गच्छांमध्ये आचार्याला मोठा मान असे. दरोडेखोरांनी हल्ला केला असता, आचार्याच्या जीवाला धोका पोचू नये म्हणून, एखादा श्रमणक स्वत: आचार्य असल्याचा बहाणा करी. महापूर, आग, दुष्काळ या आपत्तीत प्रसंगविशेषी इतर श्रमणकांचे प्राण देऊनही आचार्यांचे रक्षण करावे, असे जैनांचे मत आहे. [ हि. ध.; हि. जै. मो. ]

## आचेरी

हे एका लहान मुलीचे भूत असून, ते डोंगरावर राहते व रात्री खाली येते. हे आपली सावली टाकून मुलांना आजार उत्पन्न करते. लाल रंगाचे पांघरुण असलेल्या मुलाला ते बाधा करीत नाही. उत्तर भारतात याच्याविषयी अशा अनेक समजुती आहेत. याच्यापासून संरक्षण होण्यासाठी

मुलांच्या गळ्यात तांबडा दोरा बांधतात. [ फो. लो. नॉ. इं. ]

**आजगरव्रत** अजगर नावाच्या सर्पजातीच्या वृत्तीला धरून कल्पिलेले एक व्रत. हे व्रत ऋषभदेवाने आचरिले होते. अजगर जसा भक्ष्य गिळल्यावर स्वस्थ पडून राहतो, त्याप्रमाणे यदृच्छाप्राप्त मिळेल त्या अन्नावर संतुष्ट राहून स्वस्थ पडून असणे, असे याचे स्वरूप आहे (भाग. पु. ५.५.३२).

**आज़ाद मौ. अबुल कलाम** (इ. स. १८८८–१९५८) भारताचे एक अग्रगण्य मुसलमान पुढारी व म. गांधींचे अनुयायी. यांचा जन्म मक्केत झाला. त्यांचे बालपणही तिथेच गेले. त्यांचे वडील नामांकित धर्मशास्त्री व श्रेष्ठ चारित्र्याचे पुरुष होते. त्यांच्या हाताखालीच आज़ादांचे शिक्षण झाले. त्यांनी अरबी व फारसी या दोन भाषांचे सखोल ज्ञान प्राप्त करून घेतले. त्यानंतर ते भारतात आले. हळूहळू कलकत्त्याच्या वृत्तपत्रांतून ते लेखन करू लागले. इ. स. १९०५ साली ते लखनौ येथील अन-नदवा या पत्राचे संपादक म्हणून नियुक्त झाले. त्यानंतर दोन वर्षांनी ते अमृतसर येथे गेले व तिथल्या वकील या पत्राचे संपादक बनले.

इ.स.१९१२ साली त्यांनी कलकत्ता येथे स्वतःचे अल् हिलाल नामक साप्ताहिक पत्र सुरू केले. त्या काळात उर्दूमध्ये इतक्या उच्च कोटीचे दुसरे कोणतेही साप्ताहिक नव्हते. आज़ादांनी आपल्या स्वतंत्र शैलीने आणि पांडित्याने उर्दू गद्याला नवे वळण लावले. इंग्रजांशी राजनिष्ठ राहणे व काँग्रेसला विरोध करणे, हा मुसलमानांचा धर्म आहे, अशा प्रकारचा प्रचार भारतातल्या प्रमुख मुसलमानांनी त्या वेळी चालविला होता. तरुण आज़ादांना या प्रतिगामी वृत्तीची चीड आली आणि त्यांनी अल् हिलाल-मधून त्या वृत्तीवर प्रखर हल्ला चढविला.


मौ. आज़ाद

हिंदुस्थान हा एक आहे, त्याचे स्वातंत्र्य हे सर्वांचे स्वातंत्र्य आहे व ते मिळविण्यासाठी हिंदू व मुस्लिम या दोहोंचे अढळ ऐक्य पाहिजे, हा विचार त्यांनी आपल्या वृत्तपत्रातून पुरस्कारिला. त्यांच्या त्या लेखांनी मुसलमानांत नव जागृती निर्माण झाली. सुशिक्षित मुसलमानांचे हळूहळू त्या दिशेने मतपरिवर्तन होऊ लागले आणि त्यामुळेच इंग्रज सरकारला आज़ादांना स्वतंत्र ठेवणे धोक्याचे वाटू लागले. इ. स. १९१५ साली ब्रिटिश सरकारने त्यांना रांची येथे स्थानबद्ध केले. इ. स. १९१९ साली ते मुक्त झाले; पण १९२१ साली स्वातंत्र्यसंग्रामात भाग घेण्याबद्दल त्यांना पुन्हा पकडण्यात आले.

स्थानबद्धतेच्या काळात त्यांनी कुराणाच्या सटीक उर्दू अनुवादाचे काम हाती घेतले. वर्तमानपत्राचे संपादन करीत असतानाच त्यांनी इंग्रजी व फ्रेंच या भाषांचे अध्ययन केले. त्यांचे आधुनिक शिक्षण स्वसंपादित व स्वकष्टार्जित होते. या शिक्षणाने त्यांच्या बुद्धीचे क्षेत्र विस्तारले. इस्लामी धर्माकडे व संस्कृतीकडे ते चिकित्सक दृष्टीने पाहू लागले. त्यांची राजकारणी दृष्टीही व्यापक होत गेली. अल् हिलालच्या द्वारे त्यांनी एक अभिनव राजकीय तत्त्वज्ञान प्रतिपादिले व नव्या जगाशी समरस होण्याच्या कामात मुसलमानांचे नेतृत्वही केले.

इ. स. १९३० साली इतर सर्व नेत्यांबरोबर आज़ादांनाही तुरुंगवास घडला. इ. स. १९३०–३१ सालच्या सत्याग्रहात काही मुसलमान लोक सामील झाले. त्याचे श्रेय आज़ादांनाच दिले पाहिजे. इ. स. १९३९ साली ते पुनश्च काँग्रेसचे अध्यक्ष निवडले गेले. इ.स. १९४२ साली म. गांधींनी 'चलेजाव'ची चळवळ सुरू केली. तिच्यात आज़ादांना पुनश्च बंदिवास भोगावा लागला. धर्माधिष्ठित राष्ट्रवादाला त्यांनी कधीच मान्यता दिली नाही. पण १९४७ साली प्रादेशिक जनतेच्या आकांक्षांच्या पूर्तीसाठी त्यांनाही देशाच्या फाळणीला मान्यता द्यावी लागली. स्वातंत्र्यानंतर ते केंद्रीय मंत्रिमंडळात सामील झाले व शेवटपर्यंत भारताचे शिक्षणमंत्री म्हणून काम करीत राहिले. इ. स. १९४७ पासून १९५८ सालापर्यंत आज़ाद हे काँग्रेसच्या राजकारणात आघाडीवर होते. काँग्रेसमध्ये पं. नेहरूंच्या खालोखाल त्यांचेच वजन होते.

तज़्केरा, गुब्बारे खातिर्, कौले फ़ैसल, दास्ताने करबला, इ. त्यांनी लिहिलेले ग्रंथ प्रसिद्ध आहेत; पण त्यांच्या लौकिकात विशेष भर पडली ती 'तरजुमानुल कोरान' या कुराणाच्या उर्दू अनुवादाने. इंडिया विन्स फ्रीडम् या नावाचे आत्मचरित्रही त्यांनी लिहिले आहे. [ माझे समकालीन; हिं. वि. को. ]

**आजीवक पंथ** एक धार्मिक संप्रदाय. प्राचीन काळीही आजच्याप्रमाणेच भारतात अनेक धर्मपंथ होते. पाणिनीच्या काली मस्करी नामक परिव्राजकांचा एक संप्रदाय होता. बुद्धाच्या काळातील आजीवक नावाचा पंथ व मस्करी संप्रदाय हे एकच असले पाहिजेत, कारण बौद्ध साहित्यात आजीवक लोकांचे जे मूळ सिद्धान्त वर्णिलेले आहेत, ते मस्करी लोकांच्या सिद्धान्तांपेक्षा भिन्न नाहीत.

सीताहरणाच्या वेळी रावण 'मस्करी'चा वेष धारण करून आला होता, असे कुमारदासाने (इ. स. चे ६ वे शतक) आपल्या 'जानकीहरणा'त सांगितले आहे.

मस्करीच्या मस्तकावर लांब जटा वाढविलेल्या असत. उदापी कुंडियान हा या पंथाचा संस्थापक व आद्य आचार्य होता. मस्करी लोक आजीवकवृत्तीने राहत, म्हणजे उपजीविकेसाठी लोकांचे भविष्य सांगत हिंडत. अनेकांना त्यांच्या भविष्याची प्रचीती येई; त्यामळे लोकांत यांना मान होता. ब्राह्मण, बौद्ध व जैन ग्रंथांत या संप्रदायाची माहिती मिळते.

बुद्धाने ' मंखली गोशाल ' याचा जैन तीर्थंकरांच्या मालिकेत उल्लेख केला आहे. मंखली हे ' मस्करी'चेच पाली रूप आहे. काही जैन ग्रंथांत मंखली गोशाल याला आजीवक पंथाचा संस्थापक मानले आहे. जैनांच्या सातव्या अंगात गोशालाने सद्दालपुत्त नावाच्या पुरुषाला आजीवक पंथात समाविष्ट करून घेतल्याचा उल्लेख आहे. भगवतीसूत्रात त्याचे चरित्र दिलेले आहे ते असे —

गोशालाच्या बापाचे नाव मंखली असून, तो भिक्षेकरी होता. एका गोठ्यात याचा जन्म झाला, म्हणून त्याला गोशाल हे दुसरे नाव मिळाले. मोठेपणी गोशाल भिक्षा मागत हिंडत असता, त्याची महावीराशी अनेकदा गाठ पडली होती. महावीराला लोकांमध्ये मान मिळतो, हे पाहून गोशाल हर प्रयत्नांनी महावीराचा शिष्य बनला. परंतु गोशाल हा लबाड व अविश्वासू असल्यामुळे सहा वर्षांच्या अवधीत त्या दोघांची मैत्री तुटली. यानंतर गोशालाने आजीवक लोकांचा एक निराळा पंथ स्थापन केला. आजीवक संप्रदायाच्या इतिहासात श्रावस्ती नगरात राहणाऱ्या हालाहला नावाच्या कुंभारणीला महत्त्वाचे स्थान आहे. ती धनाढ्य, सुंदर व बुद्धिमती होती. आजीवकमताच्या प्रचारासाठी तिने खूप पैसा खर्च केला. गोशाल तिच्याच घरी राहत होता. पुढे सोळा वर्षांनी महावीर श्रावस्तीनगरीत आला असता, त्याला गोशालाची चलती आढळली, त्याने गोशालाचे ढोंगी स्वरूप लोकांच्या नजरेस आणले. तेव्हा दोन्ही पंथांची मारामारी होऊन तीत महावीराचा जय झाला. या अपकीर्तीचा गोशालाच्या मनावर अनिष्ट परिणाम झाला व सर्व नीतिनियम धाब्यावर बसवून तो नाचरंग व मद्यपान या व्यसनात दंग झाला. मात्र पुढे त्याला आपल्या कृत्यांचा पश्चात्ताप झालेला दिसतो. सनपूर्व ५०० च्या सुमारास गोशाल मरण पावला.

गोशाल किंवा त्याचा एखादा शिष्य याने आपल्या पंथाचा आचारधर्म किंवा विचारपद्धती याबद्दल काहीच लिहून ठेवलेले नाही. त्यामुळे आजीवकांच्या माहितीसाठी बौद्ध व जैन ग्रंथांचाच आधार घ्यावा लागतो. या संप्रदायाचे भिक्षू व गृहस्थ असे दोन प्रकारचे अनुयायी होते. भिक्षू विवस्त्र राहून तपःसाधना करीत; शरीराला भस्म लावीत. ते क्रमाने दुसऱ्या, तिसऱ्या व सातव्या घरी भिक्षा मागत आणि भिक्षा न मिळाल्यास उपाशी राहत.

आजीवकांचे नीतिनियम कडक होते. ते कठोर वैराग्य पाळीत. गृहजीवनाचा त्याग करीत. देह गलिच्छ ठेवीत. नग्नता झाकण्यासाठी चटईसारखे काहीतरी कमरेभोवती गुंडाळीत. अशोक वृक्षाची पूजा करीत. उंबर, वट, बोर,सतर व पिलंखू या वृक्षांची फळे खात नसत. हातात मोराचा पिसारा घेऊन फिरत. स्थानांग सूत्रात यांची चार प्रकारची सूत्रे सांगितली आहेत. औपपादिक सूत्रात त्यांच्या भिक्षाचर्येचे नियम दिलेले आहेत. भगवतीसूत्रात त्यांचे तत्त्वज्ञान सांगितले आहे.

आजीवक हे आत्मवादी असून, ते पुनर्जन्म व मोक्ष मानीत. नियतिवाद हे त्यांचे प्रमुख तत्त्व होते. मस्करी शब्दाचा व्युत्पत्तिलभ्य अर्थ काम न करणारा, अकर्मण्यतावादी किंवा दैववादी असा आहे. बौद्ध निकायात या अर्थाला पुरेशी पुष्टी मिळते. जगातली कोणतीही गोष्ट मानवाच्या प्रयत्नाने होत नसून, ती नियतीने घडते. जीव जे सुख वा दुःख भोगतो, त्याला काही कारण असत नाही व ते टाळण्यासाठी मनुष्य काही करूही शकत नाही. कारण मनुष्य निर्बल आहे, निर्वीर्य आहे. अशा प्रकारच्या त्यांच्या विचारपद्धतीचे उल्लेख दीर्घनिकाय, उवासगदसाओ, इ. बौद्ध व जैन ग्रंथांत आलेले आहेत. परस्त्रीगमन केल्याने मुनीला कसल्याही प्रकारचे पाप लागत नाही, अशी गोशालाची शिकवणूक असल्याचे महावीराने सांगितले आहे. गोशाल हा काही दिवस महावीराचा शिष्य होता. यावरून त्या दोघांची विचारसरणी सामान्यतः सारखी होती, हे सिद्ध होते. महावीर व गोशाल या दोघांची पुढील दोन तत्त्वे समान होती – (१) उत्तराध्ययनसूत्रात सांगितल्याप्रमाणे सर्व प्राण्यांची एकेंद्रिय, द्विरिंद्रिय, त्रिरिंद्रिय, चतुरिंद्रिय व पंचेंद्रिय अशी वर्गवारी व (२) मानवजातीची सहा अभिजातींमध्ये विभागणी.

परंतु काही बाबतीत मात्र महावीर व गोशाल यांच्या विचारसरणीत असलेले भेद जैन आख्यायिकांमध्ये सांगितले आहेत. महावीराने आत्म्याचे बद्ध व मुक्त असे दोन भाग पाडले; परंतु गोशालाचे म्हणणे असे, की या आत्म्यांखेरीज तिसरा ' ना बद्ध ना मुक्त ' असा एक भेद पाडला पाहिजे. कारण महावीराच्या मुक्त अवस्थेतही एक प्रकारचा तात्त्विक उद्दामपणा आहे व आपल्या संप्रदायाच्या प्रतिष्ठेची लालसा आहे. त्यामुळे हे मुक्त जीवही वस्तुतः बद्धच होत.

गोशालाने पुनर्जन्माच्या कल्पनेशी ' चैतन्यसंक्रमणा 'चे नवीन तत्त्व जोडून दिले. गोशालाच्या नीतिबाह्य वर्तनाबद्दल महावीराने टीका केली होती. त्याची तीव्रता कमी करण्यासाठी गोशालाने हा प्रयत्न केला, असे भगवतीसूत्रात सांगितले आहे.

आपल्या गुरूच्या चरित्राला अनुसरून त्याच्या शिष्यांनी अष्ट चरमवाद नावाच्या सिद्धान्ताचा प्रचार केला: भगवती-

सूत्रात या 'अठ्ठचरमाणि' (शेवटच्या आठ गोष्टी) पुढील-प्रमाणे सांगितल्या आहेत – शेवटचा मद्याचा पेला, शेवटचे गीत, शेवटचा नाच, शेवटचे प्रियाराधन, शेवटचा झंझावात, शेवटचा तुषार उडविणारा हत्ती, शिलायुक्त अस्त्रांचे शेवटचे युद्ध व शेवटचा तीर्थंकर मंखलीपुत्त. गोशालाच्या आयुष्यात अखेरीस ज्या काही घटना घडल्या त्यावरून वरील आठ चरम तत्त्वांची उत्पत्ती झालेली दिसते. त्यांपैकी पहिले चार प्रसंग म्हणजे गोशालाने निधनापूर्वी केलेली कृत्ये होत. शेवटच्या तीन घटना त्याच्या मृत्युसमयी घडलेल्या आहेत.

गोशालाच्या मृत्युसमयी घडून आलेल्या अशाच एका प्रसंगावरून 'चत्तारि पाणगाइम्‌ चत्तारि अपाणगाइम्‌' म्हणजे प्राशन करायच्या चार गोष्टी व प्राशन न करता केवळ स्पर्श करायच्या चार गोष्टी, या विशिष्ट तत्त्वांची उत्पत्ती झाली. तापाच्या झटक्यात गोशालाने एक आंबा हातात घेतला व कुंभाराच्या अंगणात असलेल्या चिखलात स्वतःला बुडवून घेतले, असे सांगितले आहे. या प्रसंगावरून त्याला एकदम वरील विचार सुचले असावे.

महावीर व गोशाल यांचे मतभेद तात्त्विक नसून केवळ आचारासंबंधी होते. शीतजलप्राशन, न शिजविलेले धान्य खाणे, मुद्दाम तयार केलेल्या वस्तूंचा परिग्रह करणे व स्त्रीसंग करणे या चार गोष्टींबद्दल महावीराने जे निर्बंध घातले होते, ते गोशालाला मान्य नव्हते. गोशालाच्या नीतिबाह्य वर्तनामुळे महावीराला ब्रह्मचर्यव्रताची कठोर योजना करावी लागली व त्यावरूनच महावीर व गोशाल यांचे भांडण झाले.

महावीर व गोशाल यांचे दुसरेही काही मतभेद होते. महावीराने जैन मुनींना भिक्षेकरिता एक पात्र वाळगण्याची अनुमती दिली होती; तर गोशालाचे म्हणणे, की अन्न हे हातांच्या अंजलिरूप भिक्षापात्रातूनच सेवन केले पाहिजे. त्याचप्रमाणे महावीराने जरुरीपुरते कटिबंधन-वस्त्र वापरण्याची अनुज्ञा त्यांना दिली होती; तर गोशालाने नग्न स्थितीत राहण्याचाच उपदेश केला.

अशोकाच्या शिलालेखांत आजीवकांचा प्रथम उल्लेख येतो. या शिलालेखांचा काल सनपूर्व २५७ हा आहे. त्यानंतर वराहमिहिराने (इ. स. सुमारे ५५०) बृहज्जातक व लघुजातक या आपल्या ग्रंथांत आजीवकांसह सहा प्रकारच्या तापसांचा उल्लेख केलेला आहे. शीलार्क (इ. स. सुमारे ८७६) नावाच्या जैन टीकाकाराने आजीवकांचा दिगंबर जैन म्हणून उल्लेख केलेला आहे. हलायुधाच्या अभिधानरत्नमाला नामक शब्दकोशात दिगंबर जैन लोकांनाच आजीवक म्हणतात, असे सांगितले आहे. परंतु मुनी कल्याणविजयजींच्या मते, आजीवक पंथाचे अनुयायी हे दिगंबर जैन पंथाचे नसून, ते भिन्न संप्रदायाचे होते.

गोशालाला मंखलीपुत्त किंवा मंखली (दंडधारी) असे म्हणत असत. यावरून तो मुळात एकदंडी तापसांच्या पंथापैकी एक होता, हे स्पष्ट दिसते. पुढे जरी त्याने महावीराची विचार-पद्धती स्वीकारली, तरी आपली स्वतःची काही मते व दंड घेण्याची चाल कायम ठेवली. यामुळेच निर्ग्रंथ पंथामध्ये गोशालाच्या अनुयायांना आजीवक किंवा एकदंडी हे नाव मिळाले. सांप्रतही दिगंबर जैन हातात दंड धारण करतात.

इ. स. च्या ८ व्या शतकात आजीवकांचा स्वतंत्र संप्रदाय नष्ट झाला व हळूहळू ते शैव व वैष्णव संप्रदायांत शिरले, असे काही विद्वान मानतात. आजकालच्या नाग लोकांत त्यांचा अंतर्भाव झाला, असेही एक मत आहे. पाहा – मंखली गोशाल.
[ म. ज्ञा. को.; विश्वधर्म दर्शन; बौ. द. मी. ]

**आज्य** 'अजायाः इदम्‌ आज्यम्‌' = शेळीचे तूप. मुळात आज्य म्हणजे शेळीचे तूप अभिप्रेत असावे. पुढे आज्य हा शब्द गायीचे तूप या अर्थी रूढ झाला.

**आज्यं हव्यमनादेशे जुहोतिषु विधीयते**

(गोभिल गृ. १.११३)

अर्थ – एखाद्या विधीत हवनीय द्रव्याचा आदेश केला नसेल, तर त्या जागी आज्य हे हवनीय म्हणून घेतले जाते.

**घृतं वा यदि वा तैलं पयो वा दधि यावकम्‌ ।**
**आज्यस्थाने नियुक्तानामाज्यशब्दो विधीयते ॥**

अर्थ – घृत, तेल, दूध, दही किंवा यवांचा पदार्थ, ही आज्य-स्थानी नियुक्त केल्यास त्यांनाही आज्य असेच म्हणतात.

**आज्यदान** एक दान. एक प्रस्थ म्हणजे सुमारे वीस शेर तूप या दानासाठी घेतात.

**कामधेनोः समुद्भूतं सर्वक्रतुषु संस्थितम्‌ ।**
**देवानामाज्यमाहार अतः शान्तिं प्रयच्छ मे ॥**

अर्थ – कामधेनूपासून उत्पन्न झालेले, सर्व यज्ञांत असलेले आज्य देवांचा आहार आहे. तेव्हा (या दानाने) मला शान्ती दे. प्रार्थना करून ब्राह्मणाला आज्याचे दान देतात. [ दा. चं. ]

**आज्यप** एक पितृगण. हे कर्दम प्रजापतीच्या सत्ताक्षेत्रात वास्तव्य करतात. अजा = शेळी, हिचे तूप प्राशन करतात, म्हणून यांना हे नाव मिळाले आहे. हे पुलहाचे वंशज असून, दक्षकन्या स्वधा ही या सर्वांची पत्नी आहे. तिला या पितरांकडून वयुना व धारिणी अशा दोन कन्या झाल्या व त्या दोघीही ब्रह्मवादिनी बनल्या (भाग. पु. ४.१.६३-६४).

विरजा ही नहुषाची पत्नी आज्यपांची मानसकन्या होती. वैश्यवर्ग या पितरांचे पूजन करतो. [पु. इं.]

**आज्यभाग** होमाच्या प्रारंभी आघारानंतर स्थंडिलावर प्रथम उत्तरेकडे व नंतर दक्षिणेकडे अग्नी व सोम यांना उद्देशून ज्या दोन घृताच्या वर्तुळाकृती आहुती देतात, त्यांना आज्यभाग म्हणतात. आज्यभाग हे यज्ञाचे चक्षू होत. पूर्णमास यागात या आज्यभागांना वार्तघ्न व दर्शयागात वृधन्वन्त असे नाव आहे. [सं. कौ.; हि. ध.]

**आट्यापाट्या** एक महाराष्ट्रीय खेळ. हा खेळ किती प्राचीन आहे, ते सांगता येत नाही. पण तुकारामाच्या अभंगांत या खेळातील मृदुंगपाटीचा उल्लेख आलेला आहे. पूर्वी शिमग्याच्या सणाच्या वेळी हा खेळ खेळत असत.

या खेळात पाट्या पाडलेल्या असतात. आरंभीच्या पाटीला चांभारपाटी अगर कपाळपाटी असे म्हणतात. सर्व पाट्यांना दुभागून जाणाऱ्या आडव्या पाटीला मृदुंगपाटी किंवा सूरपाटी असे नाव आहे. शेवटच्या पाटीला लोणपाटी म्हणतात. सूरपाटी व इतर पाट्या यांमधील छेद तो कांडेछेद होय. सूरपाटीच्या योगाने झालेला पाटीचा प्रत्येक विभाग म्हणजे पाटीचे कांडे होय. दोन पाट्यांमधील सूरपाटीचा भाग हा सूरपाटीचे कांडे होय.

चांभारपाटी वा सूरपाटी धरणाऱ्याला मृदुंग किंवा सूर असे नाव आहे. पाट्यांवर उभे राहून विरुद्ध पक्षाला अडविण्याचा प्रयत्न करणाऱ्या पक्षाला धरणारे व त्याविरुद्ध पक्षाला खेळणारे असे म्हणतात. खेळणाऱ्याने पाटी धरणाऱ्याला चांभारपाटीच्या विरुद्ध दिशेला तोंड करायला सांगणे, याला तोंड मागणे म्हणतात.

धरणाऱ्याच्या शरिराचा कोणताही भाग पाटीच्या मर्यादेच्या बाहेर मागील अगर पुढील बाजूला जमिनीवर लागला, तर त्याचा पाय चुकला असे म्हणतात. धरणाऱ्याची पावले व गुडघे यांशिवाय कोणताही भाग जमिनीला टेकला, तर त्याने हात टेकले असे म्हणतात. धरणारा इसम एक पाऊल जमिनीपासून उचलून दुसऱ्या पायावर उभा राहिला असता, त्याने पाय उचलला असे होते. खेळणाऱ्याचे पाऊल मर्यादेच्या बाहेर गेल्यास त्याचा पाय बाहेर गेला असे म्हणतात. हे सर्व खेळातील दोष होत. विरुद्ध पक्षाच्या खेळगड्याला नियमांचे उल्लंघन न करता हाताने स्पर्श करणे, याला गडी मारणे असे नाव आहे. चांभार-पाटीकडून लोणपाटीकडे खेळत जाणे याला वरून खाली जाणे व लोणपाटीकडून उलटून चांभारपाटीकडे खेळत येणे याला खालून वर येणे, असे म्हणतात. खेळगड्यांपैकी खालून वर येणारा व वरून खाली जाणारा यांची गाठ पडल्यास त्याला लोण मिळणे असे नाव आहे आणि ते पहिल्याने दुसऱ्याला पोचविले असे म्हणतात. चांभारपाटीतील कांडेछेदात निदान एक पाऊल ठेवून व पुढच्या पाटीतील कांडेछेदात निदान एक पाऊल टाकून पुन्हा चांभारपाटीतील कांडेछेदात एक पाऊल टाकणे, या सर्व क्रियेला कांडे चिरणे अशी संज्ञा आहे.

खेळापूर्वी ओली-सुकी होते. जिंकणारा नायक मर्जीप्रमाणे पाट्या धरणे अगर खेळणे पत्करतो. खेळणाऱ्या संघातील सर्व गडी चांभारपाटीबाहेर, त्या पाटीच्या बाहेरच्या रेषेला पाय लावून पाट्या ओलांडण्याच्या तयारीने उभे राहतात. पाटी धरणारे खेळाडू चांभारपाटी सोडून, त्या पाटीकडे तोंड करून एका पाटीवर एक याप्रमाणे लोणपाटीपर्यंतच्या आठ पाट्यांवर खेळणाऱ्याला अडविण्याच्या तयारीने उभे राहतात. चांभार-पाटीच्या कांडेछेदात एक पाऊल ठेवून सूर, कांडे चिरण्याच्या तयारीने सुरावर उभा राहतो. डाव सुरू होताच सूर कांडे चिरू लागतो व खेळणारे चांभारपाटीवरून आत घुसून पाट्या ओलांडू लागतात. सुराचे कांडे चिरणे होईपर्यंत खेळणाऱ्यांपैकी बहुतेक गडी तिसऱ्या पाटी धरणाऱ्यापर्यंत येऊन पोचतात. एवढ्यात सूर तिसऱ्या पाटीपर्यंत येतो व तिसऱ्या पाटीवाल्याबरोबर कोंडी करून खेळाडूंना अडवितो. मग पाटीवाल्याचे अथवा सूराचे आपणाकडे फारसे लक्ष नाही असे पाहून 'लागणारे' (हुलका-वणी देणारे) गडी मोठ्या कुशलतेने कोंडी फोडतात. लागलेला एक गडी कोंडीतून बाहेर पडला, की त्याची जागा दुसरा घेतो व पुन्हा हुलकावणी द्यायला सुरवात होते. याप्रमाणे गडी कोंडीच्या बाहेर पडतात. कोंडीतून सुटलेला गडी पाटीवर जाण्यासाठी पाटीवाल्याला हुलकावण्या देतो व पाटीतून जातो. खेळणाऱ्यांपैकी एकाने लोणपाटी ओलांडली, की तो त्या पाटी-वाल्याच्या मागे येऊन 'तोंड' असे म्हणतो. मग पाटीवाला तोंड फिरवितो. नंतर खेळणारा ती पाटी ओलांडण्याचा प्रयत्न करू लागतो. ही पाटी ओलांडण्यापूर्वी जर वरून एखादा गडी मागच्या बाजूने त्या पाटीवाल्यापर्यंत आला, तर तो गडी तोंड मारणारा गडी ज्या चौकात नसेल, त्या चौकात येतो. म्हणजे त्याला लोण मिळते. नंतर दोहोंपैकी एक त्या पाटीतून वर जातो व त्या दुसऱ्या पाटीवाल्यामागे जाऊन 'तोंड' असे म्हणतो. लगेच तो पाटीवाला तोंड फिरवितो. त्याच्या पाटीत वरच्या बाजूला जर खेळणारे गडी असतील, तर ते वरप्रमाणेच हा पक्का गडी ज्या चौकात असेल, त्या चौकात येतात व त्यांनाही लोण मिळते. याप्रमाणे खालून वर जाताना पुढचा खेळाडू दरेक पाटी-वाल्याजवळ तोंड मागतो व त्या पाटीतले गडी खाली येऊन लोण मिळवितात. लोण घेऊन खेळाडू पाटी ओलांडून वर वर येऊ लागले, की सूर पुन्हा कोंडी सोडतो व पुढचा लोणवाला

गडी ज्या पाटीत असेल त्या पाटीत जाऊन कोंडी करतो. लोण आले, की खेळाला जास्त रंग चढतो. खेळात थोडी गडबड व गोंधळ सुरू होतो. लोण आणणाऱ्याला, कच्च्या गड्याला लोण पोचविताना कोणी बारगळणार नाही, याची काळजी घ्यावी लागते; तर कच्च्या गड्याला पक्क्या गड्याकडे जाताना सूर मधे आडवा येणार नाही, याकडे लक्ष ठेवावे लागते. सूरही पक्क्या गड्यांना कोंडीत अडवीत अडवीत वर येतो किंवा एखादा खेळाडू पकडण्यासाठी सूरावर धावपळ करीत राहतो. खेळणारे पाट्या ओलांडीत चांभारपाटीपर्यंत वर आले व त्यांच्यापैकी एखाद्याने ती पाटी ओलांडली, की लोण होते. प्रतिपक्षावर किती लोणे लागली त्यावरून जय-पराजय ठरवितात. या खेळावावत बरेच नवीन नियम झाले आहेत. [ व्या. ज्ञा. को.; म. ज्ञा. को. ]

**आठवडा** आठ दिवसांचा कालखंड, असा याचा मूळ अर्थ आहे. संस्कृत अष्टवासर व प्राकृत अठ्ठवाड या शब्दांवरून हा शब्द आला असावा. पण त्याला सप्ताह म्हणजे सात वार हा अर्थ केव्हापासून प्राप्त झाला, हे समजत नाही. रविवार, सोमवार, मंगळवार, बुधवार, गुरुवार, शुक्रवार व शनिवार ही सात वारांची नावे आहेत. वर्षाचे दिवस ३६५ असून, त्यांत सात दिवसांचे बावन्न आठवडे अधिक १ दिवस अशी गणना करणे सोयीचे होते. सप्ताहाला आठवडा म्हणण्याची ही प्रथा बरीच जुनी आहे. [म. व्यु. को.]

**आठविंद** कुणबी लोकांचा एक सण. आश्विन वद्य अष्टमी ही या सणाची तिथी होय. या दिवशी संध्याकाळी घरासमोर रांगोळीचा कणगा काढतात व त्याला शिडी लावलेली दाखवितात. त्याच्या पुढे एकापासून आठापर्यंत मानवाकृती काढतात. या आकृतींना गोसावी असे म्हणतात. संध्याकाळी या गोसाव्यांची पूजा करून त्यांना काकडीच्या घावनांचा नैवेद्य दाखवतात. हे गोसावी कणग्याचे रक्षक असावे. कित्येकदा खळ्यावर कणगे काढतात. पण त्या वेळी गोसावी मात्र काढीत नाहीत. [ बदलापूर ]

**आडनाव** आडनाव म्हणजे कुलनाव. इतरांपेक्षा कोकणस्थ ब्राह्मणांत आडनावे प्रामुख्याने दिसतात. ती कशावरून पडली, हे सांगता येत नाही. कारण ती धंद्यांवरून किंवा हुद्यांवरून पडलेली नाहीत, असे ना. गो. चापेकर यांचे मत आहे. आडनाव याला उपनाव असा प्रतिशब्द आहे. एका कुलातील सर्वांचा निर्देश ज्याने करता येतो, ते आडनाव होय. अर्धनाम या संस्कृत शब्दाचे आडनाव हे अपभ्रष्ट रूप आहे, असे काहीजण प्रतिपादितात. परंतु ही व्युत्पत्ती अर्थाला अनुकूल नाही. शब्दकोशात आडनावाची व्युत्पत्ती पुढीलप्रमाणे दिलेली आहे — अड्डनाम= आडनाव = श्रेष्ठ नाव. कानडीत अड्डु शब्दाचा श्रेष्ठ असा होतो.

पण आडनाव म्हणजे श्रेष्ठ नाव असा अर्थ घेता आला, तरी त्याचा वाईट नाव असाही अर्थ होऊ शकेल. काळे, आगलावे, तिरडे, घुले, आचारी, कामाठी, भस्मे, ही आडनावे कमीपणा दाखविणारीच आहेत. गौण अथवा दुय्यम प्रतीचे नाव सुचविणारा उपनाम शब्द अगोदरचा असला पाहिजे. आडनाव हा शब्द त्यानंतरचा असावा.

इंग्रजी राज्य आल्यावर आडनावांचे महत्त्व वाढले. जुन्या काळी व्यक्तीचे नाव व पुढे बापाचे नाव, एवढाच नामनिर्देश करीत. उदा० वासुदेव बळवंत, अण्णाजी दत्तो, इत्यादी. आडनावे अस्तित्वात येतात, त्यामागे बहुधा काही कारणे असतात. अनेक कारणांनी आडनावे बदलतातही. उदा० इचलकरंजीकर ब्राह्मणवंशाला घोरपडे हे मराठा जातीचे नाव मिळाले आहे. बागल, पोळ, सावंत, थोरात वगैरे आडनावे ब्राह्मण कुळांनी मराठा जातीच्या आपल्या धन्यांवरून घेतलेली आहेत. काही प्रभू व ब्राह्मण नोकरांनी इंग्रज मालकांची नावे स्वीकारली आहेत. कांही प्रांतांत कुलवाचक आडनावे नसतात, तेव्हा आडनावांप्रमाणेच कांही विशिष्ट आळीची, गावांची किंवा दुसरी नावे वैयक्तिक नावाच्या पुढे किंवा मागे जोडून आडनावाचे कार्य भागवितात.

मराठ्यांतील बरीच आडनावे फार प्राचीन असावी. कारण शेलार, पवार, मोरे, चाळके, पालव, कदम ही त्यांची आडनावे अनुक्रमे शिलाहार, प्रमार (परमार?) मौर्य, चालुक्य, पल्लव, कदंब, यांपासून व्युत्पादितात. महारांची काही आडनावे नागकुलांच्या नावांवरून आलेली आहेत, असे श्री. वि. का. राजवाडे यांनी दाखविले आहे. कित्येकांनी आपल्या देवकांची नावे आडनावे म्हणून स्वीकारली आहेत; तर काही ब्राह्मणांनी गोत्रनामच आडनाव म्हणून लावले आहे. प्रभुदेसाई, पट्टवर्धन, भानू, उपाध्याय, पाठक व घळशे ही आडनावे यादव व चालुक्य यांच्या ताम्रपटांत सापडली आहेत.

बंगालमधील शास्त्री, आचार्य, भट, भट्टाचार्य, उपाध्याय, मुखोपाध्याय ही आडनावे मूळच्या उपाध्यायपेशाची निदर्शक आहेत. बोस व घोष, दत्त व मित्र, सेन व गुप्त ही नावे जातिबोधक आहेत. गुप्त हे नाव वैद्यांत व दास हे कायस्थांत आहे. पण एकंदरीत, बंगाल प्रांतात आडनावे फार कमी आहेत. मद्रास, म्हैसूर या भागांतील ब्राह्मणांत अय्यर व अय्यंगार ही पंथदर्शक आडनावे प्रचलित आहेत. त्याच भागातील शूद्रांमधील नायडू,

मुदलियार, पिळ्ळै ही नावे विशिष्ट अधिकारवाचक आहेत. शीख व रजपूत लोकांत आडनावेच नसतात. ते आपल्या नावापुढे सिंग (सिंह) हे पद जोडतात. काही लोक देवकांची नावे घेऊन त्यांची आडनावे बनवितात; तर कित्येक लोक नावातील उत्तर भाग हाच आडनाव असे समजतात. पंजाबी व काश्मीर हिंदूंत अशी काही नावे आहेत.

मलबारात नायर व मेनन या जातिवाचक पदव्या आडनावाप्रमाणे योजतात. उत्तर भारतात राम, प्रसाद, दास, लाल, चंद, मल्ल, नंद ही नावे जेव्हा व्यक्तीच्या नावात अंतर्भूत असतात तेव्हा इंग्रजीत लिहिताना हा उत्तर भाग आडनावासारखा लिहितात. मुसलमानांत आडनावे क्वचितच असतात. वक्ष, दीन, गुलाम, ख्वाजे, फकीर, काझी, मुनशी, शेख, सय्यद ही पंथदर्शक किंवा पदवीवाचक नावे हल्ली ते आडनावाप्रमाणे योजू लागले आहेत. पारशी लोकांची आडनावे राहण्याच्या ठिकाणांवरून किंवा धंद्यावरून पडलेली असतात. उदा० बाटलीवाला, रेडीमनी, कॉंट्रॅक्टर, सकलातवाला, एडनवाला, पन्थकी, जोशी, संजाना इत्यादी.

महाराष्ट्रीय आडनावांचे वर्गीकरण सामान्यतः पुढीलप्रमाणे केलेले आहे –

धंद्यावरून किंवा पदवीवरून पडलेली नावे – कारखानीस, देशमुख, देशपांडे, कुलकर्णी, जोशी, पाटील, पोतदार, सुतार, माळी, पुराणिक, फडणीस, भट, आचार्य, इत्यादी.

गावावरून पडलेली नावे – पुणेकर, सोलापूरकर, दाभोळकर, चिपळूणकर, म्हैसूरकर, आजगावकर, इत्यादी.

रंगांवरून पडलेली नावे – काळे, गोरे, हिरवे, पांढरे, पिवळे, करडे, इत्यादी.

प्राणिवाचक नावे – रेडे, घोडे, तट्टू, ढेकणे, वाघ, मांजरे, एडके, बगळे, कावळे, राजहंस, कोकीळ, ढोर, टोळ, इत्यादी.

नात्यावरून पडलेली नावे – नातू, पोरे, सातपुते, अष्टपुत्रे, दशपुत्रे, नवरे, इत्यादी.

वृक्षवनस्पतींवरून पडलेली नावे – पिंपळे, मोगरे, फुले, पळशे, उंबरे, खैरे, कळके, मुळचे, भेंडे, इत्यादी.

पदार्थांवरून पडलेली नावे – साखरे, तेले, कस्तुरे, पितळे, सोने, तांबे, पर्वते, इत्यादी.

निंदाव्यंजक नावे – आगलावे, घोडमुखे, नकटे, बोंबले, खुळे, बाताडे, कोळसे, इत्यादी.

गुणवाचक नावे – धुरंधर, अजिंक्य, दाते, पूर्णपात्रे, सहस्रबुद्धे, पंडित, महाबळ, मनोहर, रास्ते, विनोद, जयवंत, इत्यादी.

प्राचीन ऋषींवरून पडलेली नावे – वैशंपायन, व्यास, अत्रे, गर्गे, पराशर, गौतम, विश्वामित्र, जमदग्नी, इत्यादी.

शरीरावयवांवरून पडलेली नावे – पोटे, डोळे, माने, काणे, डोके, इत्यादी.

अश्लील शब्दांवरून आलेली नावे – हगवणे, लवडे, नलवडे, गांडेकर, झवकिरे, इत्यादी.

वि. का. राजवाडे यांनी पौराणिक व श्रौतसूत्री गोत्रांवरून अनेक आडनावे व्युत्पादिली आहेत. जसे – कौरव्या:पासून कर्वे, आकशायेया:पासून आगाशे; श्वानेया:पासून साने; गोधिलिपासून गोंधळे इत्यादी. परंतु यात अडचण अशी आहे, की कर्वे यांचे गोत्र कौरव्य नसून गार्ग्य आहे, आगाशे यांचे गोत्र आकशायेय नसून कौशिक आहे, तर मराठे यांचे कपी आहे.

काही वेळा आडनावे विचित्र पद्धतीने लिहिलेली आढळतात. महाराष्ट्रातले जे लोक कर्नाटक, तंजाऊर या भागांत गेले आहेत, ते प्रथम वडिलांचे नाव, नंतर आडनाव ही आद्याक्षरांत लिहितात व शेवटी स्वतःचे नाव लिहितात. उदा० व्ही. पी. माधवराव म्हणजे माधवराव विश्वनाथ पाटणकर.

भारतात आडनावे बदलण्यास कायद्याने बंदी नाही. त्यामुळे काही ब्राह्मणेतरांनी ब्राह्मणी आडनावे घेतलेली आहेत. तमिळनाडू प्रदेशात सौराष्ट्र जातीचे लोक अय्यर व अय्यंगार ही आडनावे लावू लागले आहेत. [ चित्पावन; म. ज्ञा. को. ]

## आडपाप

द. भारतातल्या जमीनदार स्त्रियांच्या दासींना हे नाव आहे. यांना लग्न करण्याची परवानगी नसल्याने त्या वेश्यावृत्तीने राहतात. यांचे पुत्र स्वतःला बलिज म्हणवून घेतात. [ का. ट्रा. स. इं. ]

## आडंबर

एक रणवाद्य. एक प्रकारचा ढोल. हा वाजविणाऱ्याला आडंबराघात असे म्हणत. पुरुषमेधातल्या बलींच्या यादीत आडंबराघाताचे नाव आहे (वा. सं. ३०.१९; श. ब्रा. १४.४.८.१). या शब्दाच्या मागे एक कथा असून, ती सुवण्णकक्कट जातकात सापडते –

सुवण्णकक्कट नावाचा एक प्रचंड खेकडा गंगेच्या डोहात राहून हत्तींना मारून खात असे. बोधिसत्त्वाने हत्ती होऊन त्याला मारले. त्याचे दोन आकडे गंगेच्या प्रवाहातून वाहत गेले. एक आकडा वासुदेव कृष्णाला मिळाला. त्याचा त्याने आनक नावाचा दुंदुभी केला. दुसरा आंकडा समुद्रात गेला, तो असुरांना मिळाला. त्याची त्यांनी आडंबर नामक भेरी केली. इंद्राने त्या असुरांचा पराजय केल्यावर ती भेरी इंद्राला मिळाली. मेघगर्जना होते ती इंद्राच्या या आडंबरभेरीचीच गर्जना होय, अशी कल्पना आहे. या आडंबरावरूनच 'अवडंबर माजविणे' हा वाक्प्रचार रूढ झाला आहे. [ लो. सा. रू. ]

**आढक** द्रव पदार्थ मोजायचे एक प्राचीन माप. चरकाच्या मते आढक व पात्र हे एकमेकांचे पर्याय शब्द आहेत (कल्पस्थान १२.९४). चरकाने दिलेले आढकाचे कोष्टक असे–

४ कर्ष = १ पल
२ पल = १ प्रसृती = ८ तोळे
२ प्रसृती = १ अंजली किंवा कुडव = १६ तोळे
४ कुडव = १ प्रस्थ = २५६ तोळे
४ प्रस्थ = १ आढक
४ आढक = १द्रोण = १०२४ तोळे =१२$\frac{4}{5}$ शेर

पाणिनीने दोहोंचाही एकदम उल्लेख केला आहे. [ पा. का. भा. ]

**आततायी** 'आततेन विस्तीर्णेन शस्त्रादिना अयितुं शीलमस्य' = धनुष्याला दोरी लावून जातो तो अर्थात् चढाई करायला किंवा ठार मारायला उद्युक्त झाला आहे, तो आततायी (वाचस्पत्यम्). शुक्रनीतीत याविषयी एक श्लोक येतो, तो असा –

अग्निदो गरदश्चैव शस्त्रोन्मत्तो धनापहः ।
क्षेत्रदारहरश्चैतान् षड् विद्यादाततायिनः ॥

अर्थ – आग लावणारा, विषप्रयोग करणारा, हाती शस्त्र मिळाल्यामुळे उन्मत्त झालेला, दरोडेखोर, शेत कापून नेणारा, किंवा दुसऱ्याची बायको पळविणारा असे सहा प्रकारचे लोक आततायी होत.

गुरुं वा बालवृद्धौ वा ब्राह्मणं वा बहुश्रुतम् ।
आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन् ।
(मनु. ८.३५)

अर्थ – गुरू, बाल, वृद्ध किंवा बहुश्रुत ब्राह्मण यांपैकी जर कोणी आततायी होऊन आला असेल, तर त्याला कसलाही विचार न करता ठार मारावे.

तपस्वी, विद्वान अशा ब्राह्मण आततायीला ठार मारले असता, ती ब्रह्महत्या होत नाही, असे भृगूचे मत असल्याचे कात्यायन सांगतो. पण याउलट, ब्राह्मण आततायीला ठार मारू नये, असे मेधातिथी, अपरार्क व कुल्लूक म्हणतात.

**आतपत्र** 'आतपात् त्रायते इति' = उन्हापासून रक्षण करते ते आतपत्र होय. देवाच्या व राजाच्या मस्तकावर धरल्या जाणाऱ्या छत्राला आतपत्र म्हणतात. हे जेव्हा शुभ्र असते, तेव्हा त्याला सितातपत्र म्हणतात. पाहा – छत्र.

**आतश बेहेराम** प्राचीन काळापासून आर्य लोकांत सूर्य व अग्नी यांच्या विषयी पूज्यभाव आहे. पारशी लोक हे आर्यांच्या इराणी शाखेचे वंशज असल्यामुळे त्यांच्यांतही अग्नीचे महत्त्व फार आहे. परमेश्वराची प्रार्थनासुद्धा ते लोक अग्नीसमक्ष किंवा सूर्यासमक्ष करतात. अग्नी जतन करून ठेवण्यासाठी पारशी लोक मंदिरे उभारतात. या मंदिरांना आतश बेहेराम, आतश अद्रान, आतश दादगा, आतशखाना, अग्यारी इ. नावे आहेत. आतश बेहेराम हे या सर्वांत श्रेष्ठ होय. यातील अग्नी सिद्ध करण्यास एक वर्षाच्या वर विधी करावे लागतात. आतश अद्रान सिद्ध करण्यास मात्र चार दिवस पुरतात. अग्यारी (अग्निगृह) ही सर्व मंदिरांत कनिष्ठ प्रतीची मानतात. पण जिथे जिथे पारशांची थोडीबहुत तरी वस्ती आहे, तिथे तिथे अग्यारी ही असतेच. आतश दादगा हा पारशांचा गृह्याग्नी होय. पारशी जेव्हा घर बदलतात, तेव्हा आतश दादगा आपल्यावरोबर घेऊन जातात व तो कधी विझू देत नाहीत.

भारतात एकंदर आठ आतश बेहेराम आहेत. त्यांपैकी चार मुंबईत आहेत. पहिला आतश बेहेराम उदवाडयास (गुजरात) सुमारे इ. स. १७४२ साली बांधला गेला. दुसरा नवसारी येथे इ. स. १७६५ साली व तिसरा इ. स. १७८३ साली दादाभाई नोशीरवानजीने कदमी पारशांसाठी मुंबईत बांधला. चौथा बाई



आतश बेहेराम, मुंबई

जाईनीने इ. स. १८२३ साली सुरतेला शाहनशाही पारशांकरिता बांधला. सुरतेलाच कदमी पारशांकरिता पेस्तनजी काळाभाई वकील याने १८२३ साली पाचवा उभारला. सहावा बमनजी, रुस्तमजी व अर्देसर हरमजी वाडिया या तीन बंधूंनी १८३० साली शाहनशाही पारशांकरिता बांधला. सातवा व आठवा अनुक्रमे १८४५ व १८९७ साली मुंबईला बांधले गेले.

आतश बेहेरामचा अग्नी सिद्ध करण्याचा विधी अतिशय बिकट

असून, तो अग्नी एकंदर हजार अग्नींपासून तयार करायचा असतो. प्रथम पुढील सोळा अग्नी वेगवेगळ्या ठिकाणांहून जमवितात–मृताच्या दहनाचा, रंगारी, राजा, कुंभार, विटा करणारा, तांबट, सोनार, टांकसाळवाला, लोहार, शिकलगार, भडभुंजा, दारुभट्टीवाला, योद्धा, धनगर, पुरोहित या सर्वांच्या घरचा व आकाशातील विजेचा असे ते एकूण सोळा होतात. यांतील प्रत्येक अग्नी शुद्ध करून घेतात. उदा० प्रेतदहनाचा अग्नी मिळाल्यावर तो दुसऱ्या एका जागी नेतात. त्यावर छिद्रे पाडलेला धातूचा पत्रा अग्नीला स्पर्श न होईल अशा बेताने धरतात. त्या पत्र्यावर चंदन, धूप, इ. सुगंधी द्रव्ये ठेवलेली असतात. वाऱ्याने व उष्णतेने ही द्रव्ये पेटली म्हणजे जो नवा अग्नी तयार होतो, तो दुसऱ्या जागी नेतात. तिथे वितीवितीच्या अंतरावर एक्याण्णव खड्डे खणलेले असतात. त्या प्रत्येकात इंधन असते. एका खड्ड्यात पत्र्यावरील अग्नी टाकतात व ज्वाला निर्माण झाली म्हणजे त्यावर धातूचा पत्रा पुन्हा धरून त्यातील अग्नीने दुसऱ्या खड्डुयातील इंधन पेटवितात. याप्रमाणे सर्व खड्डुयातील अग्नी प्रज्वलित झाले, की शेवटच्या खड्डुयातील अग्नी मंदिरात नेतात. तिथे त्या अग्नीच्या काही भागावर यस्न मंत्रांनी संस्कार करून तो बाजूला ठेवतात. दुसऱ्या व तिसऱ्या दिवशी अग्नीच्या बाकीच्या भागावर यस्न मंत्रांनी संस्कार करतात. मग अहुरमज्द महिन्याच्या प्रतिपदेपासून पुढे अठ्ठ्याऐशी दिवस त्यावर यस्न व वेंदिदाद मंत्रांनी संस्कार करतात. याप्रमाणे एक अग्नी तयार होतो.

बाकीच्या पंधरा अग्नींवरही याप्रमाणेच संस्कार करतात. दुसऱ्या अग्नीला ८०, तिसऱ्याला ७०, चौथ्या, नवव्या, दहाव्या, अकराव्या व बाराव्या अग्नीला ६१, पाचव्याला ७५, सहाव्याला ५०, सातव्याला ६०, आठव्याला ५५, तेराव्याला ३५, चवदाव्याला ३३, पंधराव्याला १८४, व सोळाव्याला ९० याप्रमाणे संस्कारासाठी दिवस लागतात. अशा रीतीने हा अग्नी सिद्ध होण्यास दीर्घ कालावधी लागतो. तो तयार झाल्यावर चांदीच्या अगर ब्रॉंझच्या धातूच्या पेल्यात ठेवून तो एका दगडी चबुतऱ्यावर ठेवतात. ज्या खोलीत हा अग्नी ठेवायचा असेल, त्या खोलीत भिंतीवर एक तलवार, चोपदाराच्या दोन काठ्या व प्रत्येक कोपऱ्यात पितळी घंटा टांगतात. दिवसा व रात्री मिळून पाचदा अग्नीची उपासना करतात. या प्रत्येक वेळेला किंवा प्रहराला गेह असे म्हणतात. अग्नीवर चारित्र्यसंपन्न पुरोहितांचा नेहमी पहारा असतो. ते हा अग्नी सतत प्रज्वलित ठेवतात. अग्नी विझल्यास ते दुश्चिन्ह समजतात. भाविक पारशी रोज अग्निदर्शन करतात; तर बाकीचे दर महिन्याच्या तीन, नऊ, सतरा व वीस या तिथींना अग्निदर्शन घेतात. मंदिरात गेल्यावर पारशी हात, पाय, तोंड धुऊन कस्तीचा मंत्र म्हणतो व अग्नीच्या गाभाऱ्याशी जातो. तिथे उंबरठ्यावर गुडघे टेकून तो उभा राहतो व मंत्र म्हणतो. पुजारी त्याला अंगारा देतो व तो पुजाऱ्याला दक्षिणा व चंदनाचे खोड देतो. स्त्रियाही अग्निदर्शनार्थ मंदिरात जातात.

आतश अद्रानला फक्त चार दिवसांचा विधी असतो. याच्या मंदिराला दार–ई–मेहेर (सूर्याचे द्वार) म्हणतात. पुरोहिताशिवाय अन्य कोणी या अग्नीला स्पर्श करायचा नसतो.

आतश बेहेरामजवळ काम करणारे पुरोहित तोंडावर एक कापड बांधतात, त्याला पदान असे नाव आहे. आतश बेहेरामविषयी पारशांची अत्यंत पूज्य भावना असते. त्याच्यावर कुठलाही प्रकाश पडलेला त्यांना चालत नाही. [पारशांचा इतिहास]

## आतार

एक मुसलमान जात. महाराष्ट्रात व अन्यत्रही या लोकांची वस्ती आढळते. यांचे मूळ नाव महलनुतार असे होते. पण पुढे त्यांनी अत्तरे व सुगंधी द्रव्ये यांचा व्यापार सुरू केल्यामुळे त्यांना आतार हे नाव मिळाले. हिंदूंत हा धंदा तेली, गुरव व बेलदार करतात. आतार हेही पूर्वी हिंदूच होते. पण औरंगजेबाच्या काळात त्यांनी इस्लाम धर्म स्वीकारला. पिंजारी, कसाई व कुंजडे या जाती सोडून इतर मुसलमानांशी हे लग्नसंबंध करतात. हे हिंदूंना धर्मांतर करायला लावून आपल्या जातीत घेतात. बाटविलेल्या माणसाची सुंता करतात. पण तो म्हातारा असल्यास किंवा त्याच्या जननेंद्रियावर पुढील कातडे नसल्यास तिथे विड्याच्या पानाची गुंडाळी धरून ती कापतात व तेवढ्याने सुंता झाली असे समजतात.

**विवाहप्रथा** – रजोदर्शनापूर्वी मुलीचे लग्न करतात. तसे न केल्यास आईबापांना मानवहत्त्येचे पाप लागते, असे समजतात. मुलाचा बाप योग्य वाटेल त्या ठिकाणी मुलीला मागणी घालण्यासाठी एखाद्या बाईला पाठवितो. वधूपिता लग्नापूर्वी वराला छाप नावाची आंगठी देतो. वधूला लग्नाचे आंदण म्हणून स्वैपाकाची भांडी, गादी व पलंग देतो. लग्न झाल्यावर वधूवरांस पलंगावर बसवून बायका गाणी म्हणतात. वधू-वरांचे प्रतिबिंब परस्परांस आरशातून दाखवितात. वरात घरी आल्यावर वराच्या घरच्या स्त्रिया वधू-वरांच्या शृंगारिक चेष्टा करतात. मग मेजवानी होते. तिला तामवलीमा म्हणतात. वधू-वरे वयाने लहान असली तरी त्यांना शयनगृहात ढकलून कोंडून ठेवतात. तेल-हळद, कंकणबंध, इ. हिंदूंच्या कित्येक चाली आतारांनी स्वीकारल्या आहेत.

लग्नापूर्वी मुलीला पुरुषसंबंध घडला तरी, जर तिला गर्भ राहिला नसेल, तर तिचे लग्न विधिपूर्वक होऊ शकते. ती गर्भवती

झाल्यास मात्र प्रसूतीपर्यंत लग्न थांबते व मग ते विधवाविवाहाप्रमाणे होते. ते कानीन मूल तिच्याबरोबर राहते; पण तिच्या नवऱ्याकडून त्याला कसलाही वारसाहक्क मिळत नाही. विधवेला पतीच्या मृत्यूनंतर ४० दिवसांनी लग्न करता येते. ती धाकट्या दिराशी लग्न करू शकते. दोघांपैकी कोणाच्याही इच्छेने घटस्फोट घेता येतो. दोन साक्षीदारांच्या समक्ष पतीने 'तू मला मातेसमान आहेस,' असे पत्नीला म्हटले, की विवाहविच्छेद होतो. मामेबहिणीशी लग्न होते. लग्नात काजीला सव्वा रुपया किंवा पागोटे देतात.

आतार हे सुन्नी पंथाचे मुसलमान आहेत. हे पिरांना भजतात. शबरात या सणात पितरांच्या थडग्यावर हलवा ठेवून दिवा लावतात. कुत्र्याला अपवित्र व कोळचाला पवित्र समजतात. एका पेल्यातून शरबत प्याल्याने त्यांचे गुरुशिष्य हे नाते जुळते. हे मृताशौच पाळीत नाहीत. मद्य-मांस सेवन करतात. वारसाकायदा हिंदूंचाच मानतात. देवी आल्यावर 'मातां' ची पूजा करतात. बायका पडदा पाळीत नाहीत. दातांना दांतवण लावतात व तंबाकू आणि अत्तरे विकतात. [ म. ज्ञा. को. ]

**आतिथ्य** हिंदूंच्या आचारधर्मांत अतिथिसत्काराला फार महत्त्व आहे. आतिथ्य हाच यज्ञ होय, असे अथर्ववेदात सांगितले आहे. अतिथीच्या सत्कारात भोजनाला प्राधान्य असते. हिंदू धर्मातील चातुर्वर्ण्यव्यवस्थेमुळे व जातिभेदाच्या कडक नियमांमुळे कनिष्ठ वर्णाच्या अतिथीला यजमानाच्या पंक्तीचा लाभ मिळत नसला, तरी त्याला भोजन हे मिळत असेच. धर्मशास्त्रात ब्राह्मण अतिथीविषयी अधिक आस्था दाखविलेली असली, तरी इतर कोणत्याही वर्णाच्या अतिथीविषयी अनादर दर्शविलेला नाही. स्मृतिग्रंथांत याविषयी नियम सांगितले आहेत, ते असे –

यदि त्वतिथिधर्मेण क्षत्रियो गृहमाव्रजेत् ।
भुक्तवत्सु च विप्रेषु कामं तमपि भोजयेत् ।।
वैश्यशूद्रावपि प्राप्तौ कुटुम्बेऽतिथिधर्मिणौ ।
भोजयेत्सह भृत्यैस्तावानृशंस्यं प्रयोजयन् ।।
(मनु. ३.१११–११२)

अर्थ – क्षत्रिय जर अतिथिधर्माने ब्राह्मणाच्या घरी आला, तर ब्राह्मणाचे भोजन झाल्यावर त्यालाही पोटभर जेवू घालावे. ब्राह्मण कुटुंबात वैश्य व शूद्र अतिथी म्हणून आले, तर त्यांना सदयतेने गडीमाणसांबरोबर जेवायला वाढावे. अतिथी, आप्तेष्ट व घरचे नोकर यांचे जेवण झाल्यावर मग यजमानाने आपल्या पत्नीसह अवशिष्ट अन्नाचे ग्रहण करावे.

अतिथिसत्काराची कल्पना वेद, ब्राह्मणग्रंथ व उपनिषदे यांतही आढळते. ऐतरेय ब्राह्मण व कठोपनिषद् यात अतिथिपूजनाचे अनेक उल्लेख आहेत. नचिकेता यमाकडे गेला असता तीन रात्री त्याला उपाशी राहावे लागले, याबद्दल यमाने हळहळ व्यक्त केली व तो नचिकेताला अतिथी म्हणून तीन वर देता झाला (कठ. १). बलिराजाची कथाही या बाबतीत उद्बोधक आहे. वटू वामनाला अतिथी म्हणूनच त्याने त्रिपादभूमी दिली व शुक्राचार्यांनी देवांच्या कपटाची जाणीव दिली असताही आतिथ्यधर्माला जागणे हे कर्तव्य समजून त्याने वामनाच्या हातावर दानोदक सोडले. पुराणे व त्यानंतरचे धार्मिक वाङ्मय, यात तर अतिथिसत्काराला खूपच महत्त्व दिलेले आहे. शिवलीलामृतातील श्रियाळ-चांगुणा यांची कथा हे याचे उत्कृष्ट उदाहरण होय. आजही समाजातील सर्वच वर्गांत अतिथीसत्काराची भावना इतकी दृढमूल झालेली आहे की, कुठेही गेल्यास आपल्याला घासभर अन्न मिळेल, याची खात्री भारतात प्रत्येकाला वाटते. मग तो कोणत्याही जातीचा व धर्माचा असो. कोणत्याही सणा-समारंभाच्या प्रसंगी ब्राह्मणभोजन घालण्याची जी प्रथा भारतात सर्वत्र आढळते, तिच्या मुळाशी निःस्पृह व विद्वान ब्राह्मणांचे श्रेष्ठत्व व त्यांना संतुष्ट केल्यामुळे लाभणारे पुण्य, या कल्पना आहेत.

बौद्धांच्या आतिथ्यविषयक कल्पना वरीलप्रमाणेच आहेत. बौद्ध भिक्षूंचा, ब्राह्मणांप्रमाणेच सर्वत्र सत्कार होत असे. जातपात, पंथभेद यांचा विचार न करता सर्वांचे सारखेच आतिथ्य करावे, अशी या धर्माची आज्ञा आहे.

जैन धर्मातही आतिथ्याला महत्त्वाचे स्थान आहे. विशेषतः जैन मुनी ( निग्रंथ ) अतिथी म्हणून घरी आल्यास त्याच्या सत्काराचे विशेष फल सांगितले आहे.

येशू ख्रिस्तापूर्वी युरोपमध्ये भारताप्रमाणेच व्यक्तिगत आतिथ्याची चाल होती. पण ख्रिस्ताने त्याला सामाजिक आतिथ्याचे स्वरूप दिले. समाजात जे कोणी अनाथ, अपंग, भुकेले व रोगग्रस्त असतील, त्यांना सर्व समाजाने आसरा, अन्नपाणी व औषधे दिली पाहिजेत, ही कल्पना त्याने लोकांच्या मनावर बिंबविली. त्या प्रेरणेने युरोपात रुग्णालये व अन्नछत्रे उघडण्यात आली. हे काम प्रथम धर्मगुरूंवर सोपविलेले होते. त्यामुळे रंजल्यागांजलेल्यांची सेवाशुश्रूषा करणे हे त्यांचे श्रेष्ठ कर्तव्य ठरले. पाहा – अतिथी. [ म. ज्ञा. को.; एन्सा. ब्रि. ए. ]

**आतिशबाजी** सण, उत्सव व मंगल कार्ये या प्रसंगी शोभेची दारू उडवितात, त्या प्रकाराला आतिशबाजी असे नाव आहे. भारतात आतिशबाजीची कला केव्हापासून अस्तित्वात होती, ते कळण्यासाठी भारतीय साहित्याचा मागोवा

घेतला पाहिजे. महानवमी सणाच्या दिवशी विजयनगरात विविध प्रकारचे शोभिवंत दारूकाम लावीत असत, असे अब्दुर रझाक याने लिहून ठेवले आहे. तो विजयनगरचा राजा दुसरा देवराय याच्या दरबारात इ. स. १४४३ मध्ये पर्शियाचा वकील म्हणून काम पाहत होता. यावरून १५ व्या शतकात भारतातील लोकांना ही कला ज्ञात होती, हे सिद्ध होते. ही शोभेची दारू विजयनगरात तयार होत असे, की ती परदेशातून आणीत, हे त्यावरून समजत नाही. परंतु ती उडविण्याची माहिती विजयनगरच्या लोकांना होती, एवढे निश्चित. कदाचित त्यापूर्वीच्या काळातही लोकांना ते ज्ञान असावे.

यानंतरचा आतिशबाजीचा उल्लेख रामचंद्र काक याने केला आहे. काश्मीरचा राजा झेन अल् अबिदिन (इ. स. १४२१–१४७२) याने शोभेची दारू कशी तयार करावी, यासंबंधी प्रश्नोत्तररूपी एक ग्रंथ पर्शियन भाषेत लिहिला आहे, अशी माहिती काक याने दिली आहे.

यानंतरच्या काळात बार्बोसा याने आपल्या प्रवासवर्णनात (इ. स. १५१८) एका गुजराती ब्राह्मणाच्या लग्नसमारंभाचे वर्णन केले असून, त्या प्रसंगी शोभेची दारू उडविली गेल्याचे लिहिले आहे. यावरून इ. स. १५०० च्या सुमारास भारतात मोठ्या प्रमाणावर शोभेची दारू तयार होत असे व गुजरातेत लग्नसमारंभाच्या प्रसंगी असे दारूकाम उडविण्याची प्रथा होती, असे दिसते.

भारतीय ग्रंथकारांचेही याबाबत उल्लेख सापडतात–

गजपती प्रतापरुद्रदेव (इ. स. १४९७–१५३९) या ओडिसातील प्रसिद्ध धर्मशास्त्रकाराने कौतुकचिंतामणी नावाचा एक संस्कृत ग्रंथ लिहिला असून त्यात शोभेची दारू कशी तयार करावी, ते सांगितले आहे. 'राजविनोदनानि' या सदराखाली त्याने कल्पवृक्षबाण, चामरबाण, चंद्रज्योती, चंपाबाण, पुष्पवर्ती, छुछुंदरीरसबाण, तीक्ष्णनाल, पुष्पबाण या शोभेच्या दारूच्या प्रकारांचा निर्देश केला असून गंधक, यवक्षार, अंगार, तीक्ष्ण-लोहचूर्ण, लोहचूर्ण, ताम्रोद्भव, जांगल नामक द्रव, तालक, काव, खदिराचे लाकूड, पोकळ बांबू, वात, पंचक्षार, तीक्ष्ण-लोह, आशुपाषाणमंत्र, चिन्नुकान्वय, एरंडबीजमज्ज, पारा, अन्नपिष्ट, शिसे किंवा जस्त, अर्कांगार, गोमूत्र, हिंगुळ व हरिताल ही त्यांची घटकद्रव्ये असल्याचे सांगितले आहे.

शोभेच्या दारूचा शोध भारताच्या आधी चीन देशात लागला होता. तिथेही बहुतेक वरील सर्व घटकद्रव्यांचा उपयोग करून शोभेची दारू बनवीत असत. कदाचित् इ. स. १४००च्या सुमारास चीनमधील शोभेच्या दारूच्या घटकद्रव्यांची माहिती भारतातील लोकांना मिळाली असेल व त्या द्रव्यांपैकी जी द्रव्ये भारतात उपलब्ध नव्हती, त्यांच्या ऐवजी भारतीय द्रव्यांचा उपयोग करून भारतातील लोकांनी शोभेची दारू बनविली असेल, अशीही शक्यता आहे.

आकाशभैरवकल्प नामक एका संस्कृत हस्तलिखित ग्रंथातही राजाच्या मनोविनोदनासाठी केल्या जाणाऱ्या आतिशबाजीचा उल्लेख आढळतो.

संस्कृत वाङ्मयाशिवाय मराठी वाङ्मयातही आतिशबाजीचे बरेच निर्देश आलेले आहेत.

एकनाथांनी आपल्या रुक्मिणीस्वयंवर या काव्यात कृष्ण-रुक्मिणींच्या वरातीच्या वेळी शोभेचे दारूकाम कशा प्रकारचे झाले, त्याचे वर्णन केले आहे. अग्नियंत्र, हवई, सुमनमाला, चिचुंदरी, भुइनळा, हातनळा, बाण, चंद्रज्योती, असे त्याचे विविध प्रकार नाथांनी वर्णिले आहेत. अद्यापही वरातीपुढे व भिक्षावळीपुढे शोभेची दारू उडविण्याची प्रथा महाराष्ट्रात आहे. एकनाथांनंतर रामदास, श्रीधर, या कवींच्या ग्रंथांत आणि पेशवेबखरींतही आतिशबाजीचे निर्देश आढळतात.

राजस्थानातील दिवाळीच्या आतिशबाजीला दारूची लंका असे म्हणत. त्या प्रसंगी रावणाची एक प्रतिमा करून ती मध्यभागी ठेवीत व तिच्या सभोवती राक्षस, वानर व मारुती यांच्या प्रतिमा बसवीत. मग मारुतीच्या शेपटीला आग लावीत. तो मग लंकेतील सगळ्या घरांना आग लावीत सुटे.

यावरून इ. स. च्या अठराव्या शतकात राजस्थानात आतिशबाजी लोकप्रिय झालेली होती व राजे लोकांची करमणूक करण्यासाठी मोठ्या प्रमाणावर तिचा उपयोग करीत असत, हे कळते.

लखनौच्या नवाबाच्या कारकिर्दीत काही इंग्रज लोक आपली ही कला भारतातील राजांना दाखवून त्यांना खूष करीत असत, असे उल्लेख सापडतात.

यानंतरच्या काळात आतिशबाजीचे उल्लेख अनेक वेळा येतात. सवाई माधवरावांच्या कारकिर्दीत शोभेच्या दारूच्या विविध प्रकारांची नावे सापडतात – उदा० तावदानी रोषणाई, आकाशमंडळ तारांगण, चादरी दारूकाम, नारळी झाडे, प्रभाचमक, कैचीची झाडे, बादलगर्ज, बाण, पाणकोंबडी, महताफा, इत्यादी. महादजी शिंदे यांनी सवाई माधवरावांसमोर दारूची लंका हा कार्यक्रम केला होता.

आधुनिक काळात भिक्षावळ, वरात, इ. प्रसंगी व दिवाळीच्या सणात मोठ्या प्रमाणावर आतिशबाजी करण्याची प्रथा आहे. गेल्या काही वर्षांत दिवाळीच्या दिवसांतील दारूकाम अत्यंत भयानक झाले आहे. आवाजाचा व आगीचा त्रास असह्य झाला असून, अगणित द्रव्याची त्यामुळे राख होते. [ स्ट. इं. क. हि. २]

**आतुर संन्यास** रुग्ण व आसन्नमरण पुरुष ज्या प्रकारचा संन्यास घेतो, त्याला आतुर संन्यास म्हणतात. अशा पुरुषाने संन्यासाचा संकल्प करून 'संन्यस्तोऽहम्' असा फक्त उच्चार करायचा असतो. संकल्प, क्षौर, सावित्रीप्रवेश व प्रैषोच्चार एवढ्या गोष्टी आतुर संन्यासालाही आवश्यक आहेत. बाकीचे विधान विविदिषा संन्यासाप्रमाणे यथासंभव करावे, असे सांगितले आहे. पाहा–संन्यास. [ हि. ध.; ध. सिं. ]

**आत्मनिवेदन** आत्मसर्वस्वसमर्पण. भक्तीचा एक प्रकार. अहंकाररहित होऊन आपले तन-मन-धन, परिवार व आपले म्हणून जे काही असेल, ते सारे प्रेमपूर्वक व श्रद्धायुक्त अंतःकरणाने भगवंताला अर्पण करणे, याला आत्मनिवेदनभक्ती असे नाव आहे. नवविधा भक्तीतला हा परमोच्च प्रकार मानलेला आहे –

**इष्टं दत्तं तपो जप्तं वृत्तं यच्चात्मनः प्रियम् ।**
**दारान् सुतान् गृहान् प्राणान् यत्परस्मै निवेदनम् ॥**

(भागपु. ११.३.२८)

अर्थ – यज्ञ, दान, तप, जप, धर्मानुष्ठान, स्वतःला प्रिय असेल ते, स्त्री, पुत्र, घर, प्राण, इ. सर्व परमेश्वराला अर्पण करावे.

भागवतपुराणात या भक्तीवर विशेष भर दिलेला आहे. या भक्तीमुळे भक्त परमेश्वरात पूर्णपणे विलीन होतो; त्याची वेगळेपणाची जाणीव नष्ट होते. [ कल्याण-साधनांक; रा. स. रा.]

**आत्मपूजोपनिषद्** एक गौण उपनिषद्. यात निश्चिंतन हे ध्यान, सर्वकर्मनिराकरण हे आवाहन, निश्चल ज्ञान हे आसन, इ. राजयोगी पुरुषाच्या सर्वात्मक पूजेचे उपचार सांगितले आहेत.

**आत्मषष्ठवाद** जैन धर्मातील एका पंथाचे तत्त्वज्ञान. या पंथाचा सिद्धान्त असा – पृथिव्यादी पंचमहाभूते हे पाच व आत्मा हा सहावा पदार्थ हेच विश्वाचे मूळ घटक असून, ते कोणत्याही कारणामुळे नाश पावत नाहीत. नसलेले काहीही उत्पन्न होत नाही व असलेले मूलतःच अनंत (अविनाशी) असते. [ स्कू. से. जै. लि. ]

**आत्मसाक्षात्कार** अध्यात्मातील एक श्रेष्ठ अनुभव. हा अनुभव घडेपर्यंत नाद, रंग, रूप, इ. इतर पुष्कळ अनुभव आले, किंवहुना मोठमोठ्या सिद्धीही प्राप्त झाल्या, तरी साधकाची साधना पूर्णतेला गेली, असे म्हणता येत नाही. न्यायदर्शनात 'साक्षात्प्रतीतिः' अशी प्रत्यक्ष प्रमाणाची व्याख्या दिली आहे. प्रत्यक्षाचे ज्ञान म्हणजेच इंद्रियांना होणारे ज्ञान, हे वस्तूशी निगडीत असून संकेतविरहित असते. इंद्रियांच्या कक्षेत ज्याप्रमाणे असे निःसंशय ज्ञान प्रत्यक्षप्रमाणाने होते, त्याचप्रमाणे अतींद्रियक्षेत्रात ज्या वेळी आत्म्याच्या अस्तित्वाबद्दल साक्षात ज्ञान होते, त्या वेळी त्या ज्ञानाला आत्मसाक्षात्कार असे म्हणतात. आत्मसाक्षात्कार म्हणजे इंद्रियातीत प्रत्यक्ष होय. त्या अनुभवाचे प्रधान लक्षण असे, की साधकाला स्वतःच्या हृदयात आत्म्याच्या अस्तित्वाची साक्षात जाणीव होते. 'अहं ब्रह्मास्मि' अशी त्याला निःसंशय प्रतीती येते.

कोणताही साधक साधनेच्या प्रथमावस्थेत बहिर्मुख असतो. त्याचे सर्व ज्ञान बाहेरून आत आणलेले असते. हृदयस्थ आत्म्याचे ज्ञान देखील तो प्रथम शब्दरूपाने म्हणजे दुसऱ्याकडून त्याविषयी श्रवण करून संपादन करतो. पण इथून पुढे अंतर्मुख बनण्याची क्रिया सुरू होते. श्रवणानंतर मनन, नामस्मरण, सत्संग, ईश्वरार्पण बुद्धीने केलेले कर्म, या गोष्टींनी चित्तशुद्धी होऊन त्याच्या मनाला सूक्ष्मता आणि स्थिरता येऊ लागते. नंतर ध्यान सुरू होते. ध्यानाच्या अवस्थेत साधकाचा भगवंताशी एक प्रकारचा एकान्त असतो.

मानवी जीवनातील अनेक प्रकारच्या अनुभवांत आत्मसाक्षात्कार हा अनुभव सर्व दृष्टींनी विलक्षण असतो. यालाच आत्मज्ञान, अपरोक्षानुभूती, सोऽहंबोध, इ. अनेक नावे आहेत. या साक्षात्कारात ज्ञाता हा ज्ञेयाशी तादात्म्य पावतो व जीवाचे जीवपण नष्ट होते. त्याचबरोबर त्याची देहबुद्धीही हरपून जाऊन गुरू व शिष्य एकाच पदावर आरूढ होतात.

सामान्यतः जाग्रत्-स्वप्न-सुषुप्ती या तीन अवस्था आपल्या अनुभवाच्या असतात. पण आत्मदर्शनात या तीहींहून विलक्षण अवस्था अनुभवाला येते, तिला तुरीय किंवा चौथी अवस्था असे म्हणतात. या अवस्थेत साधकाला देहाचा पूर्ण विसर पडतो. पण ती बेशुद्धी नसते, तशीच ती जागेपणाची शुद्धीही नसते. तिलाच देहभाव हरपणे, असे साधुसंत म्हणतात.

या तुर्यावस्थेला योगशास्त्रात संप्रज्ञातसमाधी असे नाव असून, पाश्चात्य तत्त्वज्ञ तिला एक्स्टसी म्हणतात. या समाधीत साधकाला लोकविलक्षण आनंद अनुभवास येतो. या आनंदाला ज्ञानेश्वरांनी 'महासुखाची दिवाळी' असे नाव दिले आहे. याचे वैशिष्ट्य हे, की या आनंदात तृप्ती, क्षय, अपूर्णता व काळाचे भान यांपैकी कांहीही नसते. [श्री. बेलसरे – प्रसाद, जून १९६१]

**आत्महत्या** हेतुपूर्वक स्वतःचे प्राण देणे, आत्मघात करणे, या प्रकारांना आत्महत्या म्हणतात. प्राचीन काळचे आर्यलोक जीवनात रस घेणारे होते. जीवन आनंदमय

आहे, उपभोगात सुख आहे, अशी त्यांची धारणा होती. त्यामुळे आत्महत्येकडे त्यांची प्रवृत्ती नव्हती. ऋग्वेदात आत्महत्येचा उल्लेख नाही. तै. संहितेत मात्र तिचा उल्लेख आहे. सर्व यज्ञांत आत्मयज्ञ श्रेष्ठ होय, असे तिथे सांगितले आहे. त्याचप्रमाणे शतपथ ब्राह्मणात म्हटले आहे, की पुरुषमेध व सर्वमेध या यज्ञांत सर्वस्वाचे दान करून कर्त्याने वनात जावे व लवकर मृत्यू येईल अशा रीतीने जीवन घालवावे. इथेही दूरान्वयाने देहत्यागाचा उल्लेख आलेला आहे.

आत्मा व परमात्मा वस्तुत: एकच असून, मायेच्या योगाने त्यांच्यांत भेद दिसतो; तेव्हा हे लक्षात घेऊन ज्ञानयोगाने परब्रह्माशी एकरूप होणे, ही सर्वोच्च स्थिती होय, असे उपनिषदांत प्रतिपादन केलेले आहे. जाबाल व कठश्रुती या उत्तरकालीन उपनिषदांत आत्मज्ञान झालेल्या संन्याशाने अग्निप्रवेश, जलप्रवेश, उपवास, इ. मार्गांनी देहत्याग करण्यास हरकत नाही, असे म्हटले आहे.

संन्याश्याने हळूहळू अन्न कमी करून फळे, कंदमुळे, पाने, बी व तृण भक्षण करावे; नंतर क्रमाने केवळ जलपान व वायुभक्षण करावे व शेवटी सूक्ष्म वायू भक्षण करावा, असे आपस्तंब धर्मसूत्रात सांगितले आहे (२.९.२३.२). अग्निप्रवेश केल्याने ब्रह्मलोक प्राप्त होतो, असे वसिष्ठ धर्मसूत्रात सांगितले आहे (२९.४).

हिंदू धर्मात अशा प्रकारे धार्मिक आत्महत्या गौरवास्पद मानलेली आहे. रोगग्रस्तासाठी मनू (६.३१) आत्मघाताचा पुढील उपाय सांगतो –

अपराजितां वास्थाय व्रजेद्दिशमजिह्मगः ।
आनिपाताच्छरीरस्य युक्तो वार्यनिलाशनः ।।

अर्थ – रोगग्रस्त व दुर्दैवी ब्राह्मणाने ईशान्य दिशेकडे प्रस्थान ठेवावे आणि पाणी व वायुभक्षण करून देहपातापर्यंत चालत राहावे.

जलसमाधी, कडेलोट, अग्निप्रवेश, उपवास या प्राचीन ऋषींच्या मार्गाने प्राणत्याग करणारा ब्रह्मलोकाला जातो, असेही मनूने म्हटले आहे.

महाभारतात सामान्यपणे आत्महत्येला हीन मानले आहे. परंतु घरात अंथरुणावर पडून मरणे, त्या काळच्या ब्राह्मणांना संमत नव्हते. ब्राह्मणाला व क्षत्रियाला देहपाताला योग्य जागा म्हणजे अनुक्रमे अरण्य व युद्धभूमी या होत, अशी त्यांची धारणा होती. त्यामुळे दुर्योधनाने जेव्हा प्राणत्यागाचा संकल्प केला, तेव्हा त्या प्रसंगाचे उदात्त वर्णन महाभारतात केलेले आहे.

पुढील काळात भक्तिसंप्रदायातून आत्मत्यागाचा एक नवाच प्रकार रूढ झालेला दिसतो. सगुण परमेश्वराची भक्ती करता करता शेवटी देहत्याग करून त्याच्या स्वरूपात विलीन होणे, हा तो प्रकार होय. उदा० मीराबाई, आंडाळ व कान्होपात्रा या भक्त स्त्रिया अनुक्रमे श्रीकृष्ण, रंगनाथ व पांडुरंग यांच्या स्वरूपात विलीन झाल्या, असे त्यांच्या चरित्रात लिहिले आहे. जगन्नाथपुरीला जगन्नाथाच्या रथाखाली पडून आत्मत्याग करणे, हाही एक भक्तीचाच उत्कट प्रकार असे मानलेले आहे. हिमालयात व ओंकारमांधाता येथे भृगुपतन नामक स्थान आहे. तसेच आंध्र प्रदेशातील श्रीशैलावर कनुमारी नावाचे एक स्थान आहे. तिथे कड्यावरून स्वत:ला लोटून प्राणत्याग करण्याची प्रथा होती. त्याचप्रमाणे गंगेच्या मुखाजवळ समुद्रात प्राणार्पण करण्याची प्रथा गेल्या शतकाच्या प्रारंभापर्यंत रूढ होती. असे करण्यामागे अमरत्वाची व अक्षयसुखाची कामना असे. प्रयागच्या गंगा-यमुना संगमात देहत्याग केल्याने मोक्ष मिळतो, असे धर्मग्रंथ सांगतात. अशा प्रकारे धार्मिक भावनेने आत्महत्या करण्याचे अनेक प्रकार हिंदू धर्मशास्त्राने संमत केलेले आहेत. आता आत्महत्येला कायद्याने बंदी झाली, तरी सुद्धा अधूनमधून असे प्रकार घडतातच.

मात्र हिंदुधर्मात धार्मिक आत्महत्येशिवाय इतर कारणांसाठी केलेल्या आत्महत्येचा निषेधच केलेला आहे. पूर्ण जीवन जगून व संन्यस्त वृत्तीने राहून ज्याने काही सिद्धी प्राप्त केली असेल, त्यालाच आत्मत्याग करण्याचा अधिकार धर्मशास्त्राने दिलेला आहे. रामदासांनी आत्महत्येचा निषेध केला आहे (दास. २.६. १०; १४.१.६६)

बुद्धाने देहदंडाच्या सर्व प्रकारांचा व धार्मिक आत्महत्येचा निषेध केला आहे. जैन धर्माने मात्र त्याला संमती दिली असून, त्याचा पुरस्कारही केला आहे. मात्र आत्मघाताची ही अनुज्ञा केवळ अर्हत्पदाला पोचलेल्या यतींनाच होती. अन्नपाणी वर्ज्य करून ते देहपात करीत. सल्लेखना असे त्या प्रकारचे नाव आहे. इ. स. ११७२ साली हेमचंद्र या जैन विद्वानाने गुजरातच्या कुमारपाल राजाच्या मृत्यूनंतर प्रायोपवेशनाने देह ठेवला, असे सांगतात.

दैवी अंश व सामर्थ्य असलेले पुरुष स्वत:चे दैवी सामर्थ्य कमी झाले, की आपला अवतार संपवीत, अशा कथा पुराणांत आहेत. जुना देह टाकून नवा अधिक सचेतन देह धारण करणे, हा त्यामागचा हेतू असे. काही देशांत राजा निधन पावला, की त्याचे दासदासीसुद्धा त्याच्या थडग्यात स्वत:ला पुरून घेत असत. धन्यावरील प्रेम, निष्ठा व परलोकातही आपण त्याची सेवा करू शकू, ही श्रद्धा त्या आत्महत्येच्या मागे असे. त्यात धार्मिक भावनेचा अंशही नसे. धार्मिक भावना प्रकर्षाने दिसते, ती सती जाण्याच्या चालीत. पती हेच सर्वस्व मानून भारतात हजारो पतिव्रता स्त्रियांनी इतिहासकाळात जळत्या चितेवर पतीला साथ आरोहण केले आहे. जीवनात तसेच मरणातही

देणाऱ्या या पतिव्रतांच्या आत्मत्यागाचे स्वरूप अत्यंत उदात्त व पुण्यपावन आहे.

प्राणापेक्षाही शील व चारित्र्य ही श्रेष्ठ आहेत आणि प्रसंगी प्राणार्पण करूनही त्यांचे संरक्षण करणे हे कर्तव्य आहे, या भावनेने मध्ययुगात हजारो राजपूत स्त्रियांनी जोहार केला, ही गोष्ट राजस्थानाच्या इतिहासात ठळकपणे दिसून येते. हे त्यांचे हौतात्म्यही परम मंगल व स्फूर्तिप्रद मानले गेले आहे.

मागसलेल्या समाजात मात्र आत्महत्येला विरोध आढळतो; पण त्याचे कारण थोडे निराळे आहे. आत्महत्या करणारा माणूस असंतुष्ट असेल किंवा त्याच्यावर अन्याय झालेला असेल, तर तो भूत होईल व सूड घेण्याचा प्रयत्न करील, अशी त्यांची समजूत असते. या समजुतीमुळेच आत्महत्या करणाऱ्याच्या प्रेताला इजा करण्याची प्रथा काही ठिकाणी आहे.

माणसे आत्महत्या करायला का प्रवृत्त होतात, याची मीमांसा हल्ली नीतिशास्त्राच्या व समाजशास्त्राच्या दृष्टिकोनातून करतात. आधुनिक काळात आत्महत्या करणाऱ्यांमध्ये धार्मिक भावनेपेक्षा मनाचा कमकुवतपणाच अधिक आढळतो.

स्वा. विनायकराव सावरकरांनी स्वतः आत्मसमर्पण करण्यापूर्वी, आत्महत्या व आत्मसमर्पण यांतील सूक्ष्म भेद स्पष्ट केला, तो असा – अत्यंत असमाधानाने, विफलतेच्या तीव्र जाणिवेने संकटांना कंटाळून, सुखाने जगता येत नाही म्हणून अत्यंत अतृप्त, अशा मनःस्थितीत, वैतागाच्या भरात जे बळाने जीव देतात त्यांच्या त्या कृत्याला आत्महत्या म्हटले जाते. परंतु आपले जीवितकार्य, जीवनाचे ध्येय, जीवनाचा हेतू पूर्णपणे सफल झालेला आहे, अशा कृतकृत्यतेच्या भावनेने जे आपल्या ऐहिक अस्तित्वाची हर्षभराने समाप्ती करतात त्यांच्या त्या कृत्यास आत्मसमर्पण असे म्हणतात. कुमारिल भट्ट, आद्य शंकराचार्य, महाप्रभू चैतन्य, ज्ञानेश्वर, रामदास, एकनाथ, तुकाराम यांचे निधन हे असे आत्मसमर्पणच होते.

भारतीय राज्यघटनेने कोणत्याही कारणासाठी केलेली आत्महत्या हा दंडनीय अपराध ठरविला आहे. [एन्सा. रि. ए.; सु. वि. को.; सं. सा. लो. सा. ]

**आत्मा** भारतीय तत्त्वज्ञानात आत्मा ही एक अत्यंत महत्त्वाची कल्पना असून, यास्काने या शब्दाची व्युत्पत्ती पुढीलप्रमाणे दिली आहे (निरुक्त ३.१३.२)–

आत्माऽततेर्वाप्तेर्वापि वाप्त इव स्याद्
यावद् व्याप्तिभूत इति ।

अर्थ – आत्मा शब्द अत्=सतत चालणे किंवा अप्= व्यापणे या धातूपासून बनलेला आहे. सतत गतिशील असल्यामुळे त्याला ही संज्ञा मिळाली आहे.

शंकराचार्यांनी आत्मा शब्दाची व्युत्पत्ती देताना एक प्राचीन श्लोक उद्धृत केला आहे, तो असा –

यच्चाप्नोति यदादत्ते यच्चात्ति विषयानिह ।
यच्चास्य सन्ततो भावस्तस्मादात्मेति कीर्त्यते ।।

अर्थ – हा वस्तुजाताला व्यापून राहतो, वस्तुमात्राचे ग्रहण करतो, या लोकात विषयांचा उपभोग घेतो व याचा सदैव सद्भाव असतो, म्हणून याला आत्मा म्हणतात.

भिन्न भिन्न दर्शनांतल्या आत्मविषयक व्याख्या भिन्न भिन्न आहेत. त्यांचे दिग्दर्शन पुढीलप्रमाणे –

लोकायतिक चैतन्यविशिष्ट देहाला आत्मा समजतात व त्याला कर्ता व भोक्ता मानतात. वेगवेगळ्या अतिप्राचीन सांप्रदायिक दर्शनांत बृहस्पतिप्रणीत सूत्रग्रंथांतील अनेक सूत्रे उद्धृत केली आहेत. त्यांपैकी आत्माविषयक सूत्र पुढीलप्रमाणे –

चैतन्यविशिष्टः कायः पुरुषः ।

अर्थ – चैतन्यविशिष्ट शरीर म्हणजेच आत्मा होय.

लोकायतिकांपैकी काही इंद्रियांना, काही प्राणांना तर काही मनालाच आत्मा मानतात.

माध्यमिक बौद्धांच्या मते आत्मा म्हणजे शून्य होय. विज्ञानवादी बौद्धांच्या मते क्षणिक विज्ञान संतान म्हणजेच आत्मा होय. वैभाषिक हे अनादिकालापासून निर्वाणकालापर्यंत स्थायी असलेल्या प्रवाहपतित विज्ञानाच्या धारेला आत्मा मानतात. योगाचारांच्या मते चित्त अथवा आत्मा आलयविज्ञानात्मक आहे.

जैन लोक जीवतत्त्वाला आत्मा मानतात. त्यांच्या मते जीवाचा स्वभाव पाच प्रकारचा आहे – औपशमिक, क्षायिक, क्षायोपशमिक, औदयिक व पारिणामिक. प्रत्येकात पुन्हा अवांतर भेद आहेतच. जीव (आत्मा) हा सूक्ष्म व अतींद्रिय असल्यामुळे दिसत नाही.

न्याय– वैशेषिक मतानुसार आत्मा नित्य व विभुद्रव्यविशेष आहे, आत्मे व मने अनेक आहेत. ज्ञान, इच्छा, प्रयत्न, सुखदुःख, धर्माधर्म व भावनाख्य संस्कार हे आत्म्याचे विशेष गुण आहेत.

आत्मा किंवा पुरुष नित्य व चिद्रूप म्हणजेच ज्ञानस्वरूप आहे, तो केवल द्रष्टा असून कूटस्थ आहे, असे सांख्य कल्पितात. पातंजल मतानुयायी सांख्यांच्याच आत्मविषयक सिद्धान्ताला मान्यता देतात.

आत्मा अहंप्रतीतीचा विषय असून तो सुखदुःख उपाधिरहित नित्य वस्तू आहे, असे मीमांसकांचे मत आहे. आत्मा हा अंशभेदाने ज्ञानस्वरूप व जडस्वरूप आहे, अशी भाट्ट मीमांसकांची धारणा आहे.

तांत्रिकांच्या मते आत्मा हा विश्वोत्तीर्ण प्रकाशात्मक आहे.

आत्मा हा विश्वमय आहे, असे कुलाम्नायात सांगितले आहे.

अद्वैत वेदान्त्यांची आत्मव्याख्या पुढीलप्रमाणे आहे –

चिद्रूपः कर्तृत्वादिरहितः परस्मादभिन्नः प्रत्यगात्मा।

अर्थ – (प्रत्यक्) आत्मा हा चैतन्यरूप, कर्तृत्व–भोक्तृत्वादिरहित व परब्रह्माहून अभिन्न आहे.

आत्म्याच्या स्वरूपाविषयी उपनिषदांत बराच विचार केलेला आहे. हा शब्द ऋग्वेदात प्रथम आढळतो. मात्र काही ठिकाणी तो प्रत्यक्ष आहे, तर काही ठिकाणी सूचित आहे. उदा० 'अमर्त्यो मर्त्येना सयोनिः' (=मर्त्य शरीराशी अमर्त्य संलग्न असतो), असे ऋग्वेदातील 'अस्यवामीय' या गूढ सूक्तात अनेकवार सांगितले आहे (ऋ. १. १६४). अमर्त्य व मर्त्य एकमेकांचे सयोनी बंधू आहेत, असे तिथे म्हटले आहे. असू, प्राण व आत्मा हे शब्द समान अर्थाने ऋग्वेदात अनेक ठिकाणी येतात.

आत्मन् हा शब्द दोन मुख्य अर्थांनी वेदात आला आहे. शरीरातील जीवनशक्ती हा पहिला अर्थ व संपूर्ण व्यक्ती हा दुसरा अर्थ होय. संपूर्ण व्यक्तीत शरीर, इंद्रियें, अवयव, मन, वाणी, इ. गोष्टी अंतर्भूत होतात. या सर्व व्यक्तित्वाचा 'अहम्' या संज्ञेने आविष्कार होतो. आत्मा हा शब्द साधारणरूपाने 'अहम्' या अर्थाचा बोधक म्हणूनच वैदिक परिभाषेत रूढ आहे. वेदांतील तात्त्विक किंवा धार्मिक विचारांत आत्मा शब्द चैतन्य, जीवनशक्ती, प्राण अथवा जीव या अर्थी आलेला आहे. वायू व प्राण हे तत्त्वतः एकच होत, अशी ऋग्वेदकालात लोकांची कल्पना होती व तीच पुढेही कायम राहिली आहे. ऋग्वेदात वायूला उद्देशून आत्मा ही संज्ञा अनेक वेळा योजिली आहे. मृताचा चक्षू सूर्यात व आत्मा वायूत विलीन होतो, असे ऋग्वेदात सांगितले आहे. परंतु आत्मा शब्दाचा जीवनशक्ती हाच अर्थ तात्त्विक दृष्ट्या ऋग्वेदात रूढ होता, असे दिसते. 'आत्मन्' किंवा 'त्मन्' हा शब्द 'स्वतः' या दर्शक सर्वनामार्थी ऋग्वेदात वारंवार येतो. उदा० द्युलोक व पृथ्वी सर्व विश्वाला स्वतःच (आत्मना) धारण करतात, असे ऋग्वेदात म्हटले आहे. यावाचून, शरीराचा मध्यभाग या अर्थी आत्मा शब्द यजुर्वेदात व ब्राह्मणग्रंथांत पुष्कळ वेळा वापरलेला आहे. उपनिषदांतील आत्मकल्पनेचा विचार करताना वरील सर्व अर्थ उपयोगी पडतात.

उपनिषत्पूर्व वैदिक वाङ्मयात विश्वाच्या अंतिम सत्याचा उल्लेख 'पुरुष' किंवा 'ब्रह्म' या संज्ञेने अनेक वेळा केला असला, तरी आत्मन् शब्द त्या अर्थी सर्रास योजलेला आढळत नाही. उपनिषदांत मात्र त्याचा वापर सर्वत्र होऊ लागला व त्याची चर्चाही सर्व अंगांनी सुरू झाली. पुढे जागतिक तत्त्वज्ञानातही ही आत्मकल्पना महत्त्व पावली.

'अहम्' हा आत्मशब्दाचा पर्याय आहे, असे म्हटले असले तरी मनुष्य आपल्या जीवनशक्तीला आत्मा या शब्दाने निर्दिष्ट करतो. जागृती, स्वप्न व सुषुप्ती या अवस्था किंवा जन्म व मरण या अवस्था, ज्यात ओवलेल्या आहेत, असे जीवन, प्राण किंवा चैतन्यरूपी सूत्र म्हणजे आत्मा होय. उत्पत्ती, स्थिती व लय या तीन अवस्थांतून विश्व जात असते. या तीन्ही अवस्थांना व्यापणारी जीवनशक्ती या अर्थी आत्मा हा शब्द परमपुरुषाला उपनिषदांनी लावला. ऋग्वेदात इंद्र ही मुख्य देवता आहे. इंद्र स्वतःचा 'अहम्' म्हणून निर्देश करतो. हा 'मी' म्हणजेच आत्मा होय (ऋ. १०.४८).

माणूस विश्वशक्तीला देव म्हणून भजू लागला व त्याच्याशी आपले अभेदाचे नाते प्रस्थापित करायला उत्सुक झाला, ही गोष्ट उपनिषत्पूर्व काळातील वैदिक वाङ्मयात अनेक ठिकाणी व्यक्त झाली आहे. 'मीच विश्वशक्ती देवता आहे,' या भावनेचा निष्कर्ष 'विश्वशक्ती आत्मा आहे' असा निघाला. याप्रमाणे राजा त्रसदस्यू हा वरुण व इंद्र या देवतांशी एकात्मभाव अनुभवीत असल्याचे वर्णन ऋग्वेदात आहे (४.४२).

अशा रीतीने भक्त व पुरुषोत्तम एकच आहेत, हे निश्चित झाल्यावर आत्मा या शब्दाने त्या एकतेचा निर्देश होऊ लागला. विश्वाचे मूळ तत्त्व प्राण, प्रजापती किंवा ब्रह्म असून ते मनुष्यात प्रविष्ट झाले, असा विचार उपनिषत्पूर्व वैदिक वाङ्मयात आलेला आहे. मनुष्य हे विश्वशक्तीचे एक रूप आहे व याउलट, विश्वशक्ती मनुष्याचे मूळ स्वरूप होय, असा दुहेरी निष्कर्ष वेदांत काढलेला आहे. याच निश्चयाची पुढे उपनिषदांत 'विश्व-सत्य आत्मा आहे,' अशी परिणती झाली.

अशा प्रकारे वैदिक वाङ्मयातील आदिपुरुषाची कल्पना परमदेवता किंवा विश्वशक्ती तिच्या उपासकाहून भिन्न नाही, असा प्रत्यय; व आदिपुरुष, प्रजापती किंवा ब्रह्म मनुष्यात प्रविष्ट झाले ही कल्पना, यांवर उपनिषदांतील आत्मविषयक विस्तृत कल्पना अधिष्ठित झालेली आहे.

सुरवातीला आत्मा शब्दाचा प्रयोग स्वभाव किंवा वस्तूची सत्ता(वस्तुत्व) किंवा वस्तूची एकता अशा अर्थी होत असे. पुढे त्याला सातत्यभावाची जोड देण्यात आली व जो सततगामी आहे, त्याला आत्मा म्हणू लागले. एकता व सततगामिता यांच्या आधारे तत्त्वविचार सुरू झाला व 'तत्त्व' म्हणून आत्मा शब्दाचा प्रयोग होऊ लागला. छांदोग्योपनिषदात अधिदैवतरूपाने आदित्य, चंद्रमा, विद्युत्, मेघ, वायू, आकाश, अग्नी व जल यांना क्रमशः आत्मतत्त्व मानलेले आहे. त्याच उपनिषदात अध्यात्मरूपाने आदर्श (आरसा), छाया, प्रतिध्वनी, शब्द, शरीर, दक्षिण नेत्र व सव्य नेत्र यांना क्रमशः आत्मतत्त्व म्हटलेले आहे. पुढे

अध्यात्मपर चिंतन प्रगत झाल्यावर वाक्, प्राण, चक्षु, श्रोत्र, मन व हृदय यांनाच आत्मा असे म्हणू लागले. ऐतरेयोपनिषदात आत्मा हे जगताचे आदिकारण किंवा मूलतत्त्व असून त्याच्यापासूनच सृष्टीची उत्पत्ती झाली, असे सिद्ध केले आहे.

ब्रह्म हे जगताचे आदिकारण मानलेले आहे. त्यामुळे आत्मा म्हणजेच ब्रह्म असे समीकरण पुढे रूढ झाले. 'ब्रह्मभावश्चाहमात्मा ब्रह्म' (= आत्मा ब्रह्म आहे,) असा स्पष्ट उल्लेख बृहदारण्यकोपनिषदात आला आहे (२.५.१९). छांदोग्योपनिषदाने 'तत् त्वमसि' (= ते (ब्रह्म) तू आहेस,) असे उद्घोषित केले (६.८.७). तेव्हापासून आत्मा हा प्रत्यगात्मा म्हणजे सकल विषयांचा ज्ञाता अशा अर्थी व ब्रह्म हे जगताचे मूळ कारण अशा अर्थी रूढ झाले. 'सोऽहमस्मि' या अनुभवात आत्मा व त्याचा ब्रह्माशी अभेद यांचे प्रत्यक्ष ज्ञान होते.

परंतु द्वैतवादी लोकांना आत्मा व ब्रह्म यांचे हे अद्वैत आवडले नाही व त्यांनी प्रत्यगात्म्याला जीवात्मा व ब्रह्माला परमात्मा अशा संज्ञा दिल्या. त्यामुळे आत्मा म्हणजे जीवात्मा हा अर्थ पुढे प्रचलित झाला.

या आत्म्याचे वास्तव्य हृदयात असते, असे बहुतेक उपनिषत्कारांचे मत आहे. आत्मा व शरीर यांचा परस्परसंबंध काय, याचे उत्तर देताना प्रजापती सांगतो, की 'ह्या देहरूपी रथाचा आत्मा हा सारथी असून तो शुद्ध, शांत, शाश्वत, अज व स्वतंत्र आहे (मैत्रा. उ. २. ३–४). तो सर्व शारीरिक व्यापारांचा अधिपती व इंद्रियांचा राजा आहे. तो इंद्रियांच्या द्वारे उपभोग घेतो व इंद्रिये त्याच्या आश्रयावर जिवंत राहतात (कौषी. उ. ४.२०). आत्मा हा आकाराने 'अंगुष्ठमात्र' असल्याची कल्पना उपनिषत्काली सर्वश्रुत असावी, असे दिसते. कुठे त्याला 'प्रादेशमात्र' (वितीएवढा) असेही म्हटले आहे. आत्मा हा यवाएवढा, अंगुष्ठाएवढा, प्रादेशमात्र, प्रत्येकाच्या शरीरात शरीराएवढा व सरतेशेवटी सर्वव्यापी अनंत, अशी त्याच्या आकाराची उत्तरोत्तर प्रगती होत गेली आहे.

जीवात्म्याला कोणी कर्ता, कोणी भोक्ता तर कोणी ज्ञाता मानतात. परंतु वेदान्तदर्शनात आत्म्याला सच्चिदानंदरूप मानले आहे. आत्मा चैतन्यरूप आहे. आपण अनेक वस्तू पाहतो, ऐकतो व आपल्याला त्यांचे ज्ञान होते. चैतन्य किंवा ज्ञाता जर नसता, तर या वस्तूंचे ज्ञान झाले नसते. ज्या अर्थी ते होते, त्या अर्थी त्यांचा ज्ञाता कोणीतरी अवश्य असला पाहिजे व तो कोणीतरी म्हणजे आत्माच होय. आत्मा सगळ्या ज्ञेय वस्तूंचा आधार आहे. त्यामुळे तो कधी ज्ञेय म्हणजे ज्ञानविषय होत नाही.

रामानुजाचार्यांच्या मते जीवात्मा हा अणू असून, सत्य आहे (श्रीभाष्य २.३.२३). तो चिद्रूप व चैतन्यगुणवान आहे.

काही लोक आत्म्याचे अस्तित्वच मानीत नाहीत व त्याला 'अभाव' किंवा 'शून्य' असे म्हणतात. परंतु 'अभाव', 'शून्य' हे पुन्हा ज्ञानाचे विषय अर्थात् ज्ञेय आहेत, असे एकदा मानले, की त्याच्या पाठोपाठ ज्ञाता व ज्ञान ही आलीच. नास्तिकही अशा रीतीने आत्म्याचे अस्तित्व पर्यायाने मानतातच.

आत्मा ज्या अर्थी शरीरात वास करतो, त्या अर्थी त्याला काही मानसिक अवस्थांचा अनुभव येत असावा, असे मानणे प्राप्त आहे. मांडूक्य उपनिषदात 'सोऽयमात्मा चतुष्पात्' (= आत्मा हा चतुष्पाद आहे,) असे सांगून जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ती व चौथी स्वसंवेद्य अशा त्याच्या चार अवस्था वर्णिल्या आहेत: जाग्रत् अवस्थेत विश्व, स्वप्न अवस्थेत तेजस् व सुषुप्ती अवस्थेत प्राज्ञ अशी अवस्थाभेदाने त्याला भिन्न नावे दिली आहेत. मांडूक्य उपनिषदात आत्म्याचे शुद्ध रूप तुरीय या नावाने दर्शविले आहे. जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ती या अवस्थांहून भिन्न अशी शुद्ध आत्म्याची जी अंतरंगदशा तीच तुरीय अवस्था होय. या अवस्थेतील आत्म्याला अदृष्ट, अग्राह्य, अव्यवहार्य, अचिंतनीय, अव्यपदेश्य, शांत, शिव, अद्वैत अशा विशेषणांनी गौरविले आहे. ओंकाराची तुरीय अर्धमात्रा ही शुद्ध आत्म्याच्या या अवस्थेची द्योतक होय. शुद्ध आत्मा व ब्रह्म यांत वस्तुतः भेद नाही.

जो मनुष्य या जगात सर्वत्र व्यापून राहिलेल्या एकत्वाचा म्हणजेच चैतन्यरूप आत्मतत्त्वाचा अनुभव घेतो, त्याला त्या ज्ञानाच्या बळावर याच जन्मी मोक्ष मिळतो आणि म्हणूनच आत्मसाक्षात्कार हे उपनिषदांनी मानवाचे परम लक्ष्य मानले आहे –

**तमेव विदित्वाऽतिमृत्युमेति नान्यः पन्था विद्यतेऽयनाय ॥**
(श्वेता. ३.८)

अर्थ – त्यालाच (आत्म्यालाच) जाणून मनुष्य मृत्यूच्या पलिकडे जातो. मोक्षप्राप्तीसाठी यापेक्षा निराळा मार्ग नाही.

'ऋते ज्ञानान्न मुक्तिः' म्हणजे ज्ञानावाचून मुक्ती नाही, असे भारतीय तत्त्वज्ञानात उच्चरवाने उद्घोषित केले आहे. 'स्व'रूपाचा साक्षात्कार झाल्यावाचून शास्त्रांचे केवल अध्ययन व्यर्थ आहे. म्हणून उपनिषदांत ध्यानयोग व तत्त्वज्ञान यांच्या आधारे परमतत्त्वाची उपलब्धी हेच मानवी जीवनाचे ध्येय होय, असे सांगितले आहे.

**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुधा श्रुतेन ॥**
(कठ. १.२.२२)

अर्थ – आत्मा केवळ प्रवचनाने, कुशाग्र बुद्धीच्या साहाय्याने किंवा बहुश्रुतपणाने प्राप्त होत नाही. (त्यासाठी साधना करावी लागते.)

आत्मज्ञान किंवा आत्मप्राप्ती यांच्यासाठी पुढील नैतिक सद्गुणांची आवश्यकता आहे, असे मुंडकोपनिषदात सांगितले आहे–

**सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम् ॥**

अर्थ – सत्य, तपाचरण, सम्यग्ज्ञान व अखंड ब्रह्मचर्य या गुणांनी आत्मलाभ होतो.

आत्मज्ञानाचा आणखी एक मार्ग बृहदारण्यकोपनिषदात याज्ञवल्क्याने मैत्रेयीला सांगितला आहे, तो असा – श्रवण, मनन व निदिध्यासन या उपायांनी आत्म्याचे ज्ञान होते व एकदा आत्मज्ञान झाल्यावर मग सर्व वस्तूंचे ज्ञान होते (२.४.५).

श्रवण म्हणजे उपनिषदांतील वाक्यांचा स्वाध्याय, मनन म्हणजे त्यावर प्रमाणपूर्वक विचार करणे व निदिध्यासन म्हणजे आत्म्याचे सतत चिंतन करणे, यालाच ज्ञानमार्ग म्हणतात. यावाचून, कर्ममार्ग व भक्तिमार्ग असे आत्मज्ञानाचे आणखीही दोन मार्ग सांगितलेले आहेत. [ वै. सं. वि.; हिं. सा. को.; भा. द. सं.; पंचदशी; हिं. वि. को. ]

**आत्मानंद** (१) शरीरस्थ आत्म्याला जीव व चराचर. सृष्टीत व्याप्त असलेल्या आत्म्याला ब्रह्म म्हणतात. पहिला पिंडाचे, तर दुसरा ब्रह्मांडाचे संचालन करतो. पहिल्याला जीवात्मा म्हणतात, तर दुसऱ्याला परमात्मा म्हणतात. ब्रह्म म्हणजे परमात्माच होय. अद्वैतवादी जीवात्मा व परमात्मा यांत भेद मानीत नाहीत. या आत्म्याचा आनंद म्हणजेच आत्मानंद होय. त्याचा अर्थ जीवात्म्याने परमात्म्यात लीन होणे किंवा दोघांचे सामरस्य होणे असा आहे. [ अ. अ. ]

(२) (इ. स. १४ वे शतक) वेदभाष्यकार. याने ऋग्वेदाच्या 'अस्यवामीय' सूक्तावर भाष्य लिहिले आहे. या भाष्यात उद्धृत केलेल्या स्कंदादिभाष्यकारांच्या नावांत सायणाचे नाव नाही. त्यावरून हा सायणपूर्वकालातला असावा. हा वेदविद्येत पारंगत होता. याने त्या सूक्तातल्या प्रत्येक मंत्राचा अर्थ परमात्मपर लावला आहे व तेच त्याच्या या भाष्याचे वैशिष्टय आहे. याचा शाकपूणीच्या निरुक्ताशी विशेष परिचय दिसतो. [ वै. सा. सं.; म. च. को. ]

**आत्मारामस्वामी** (इ. स. चे१८ वे शतक) देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. आडनाव शिंदखेडकर. महाराष्ट्रात चाळीसगाव येथे याचे वास्तव्य होते. याने वृद्धावस्थेत आनंदसंप्रदायाला धरून संन्यासदीक्षा घेतली व शिरपूर (जि. धुळे) येथे आपला मठ स्थापला. याने आपल्या अलौकिक सामर्थ्याने हिंदू-मुसलमानांत ऐक्याची भावना निर्माण केली व औरंगजेबाला अल्ला व ईश्वर हे एक आहेत असे सिद्ध करून दाखविले, असे सांगतात. हजारो हिंदूंना याने इस्लामच्या तावडीतून वाचवून स्वधर्मात राखले, अशीही त्याची ख्याती आहे. याने पुढील ग्रंथ लिहिले आहेत—आत्मबोध, चतुर्दशचक्रावली, परज्ञानसागर, महार्णवचित्रप्रकाश, नीलांबरशास्त्र इत्यादी. याची कन्नड, तेलुगू, वऱ्हाडी, गोंडी वगैरे अनेक भाषांत स्फुट कविता बरीच आहे. [ म. क. च. ]

**आत्रेय** (१) लोक व देश. मार्कंडेय व मत्स्य पुराणांत यांचा उल्लेख आहे. हे ब्राह्मण जातीचे लोक सरस्वतीच्या तीरी राहत असत. यांच्याबरोबर भारद्वाज, कुशेरक, लंपाक या लोकांचेही उल्लेख येतात. हे अत्रिकुलोत्पन्न लोक होत, असे ब्रह्मांड पुराणात म्हटले आहे. वरील सर्व लोक आत्रेयांबरोबरच जवळपास राहत, असे दिसते. [ ट्रा. ए. इं. ]

(२) या नावाचा एक पुरुष तैत्तिरीय संहितेचा पदपाठ तयार करणारा असावा, असे चित्रावशास्त्री म्हणतात. तै. शाखेच्या आचार्यतर्पणात याचा समावेश आहे. [ प्रा. च. को. ]

(३) पूर्वमीमांसेचा एक प्राचीन आचार्य. 'स्वामिनः फलश्रुतेरित्यात्रेयः' असा ब्रह्मसूत्रात त्याच्या नावाचा उल्लेख आलेला आहे (ब्र. सू. ३.४.४४). प्रस्तुत सूत्राचा विषय उपासना हा आहे. अंगाश्रित उपासनेचे दोन प्रकार आहेत-एक यजमानाने केलेली व दुसरी पुरोहिताकरवी केलेली. या उपासनेचे फल कोणाला मिळते, यजमानाला का पुरोहिताला या आशंकेत आत्रेयाचे मत असे, की ते यजमानाला मिळते. ब्रह्मसूत्रकारांनी या मताचे खंडन केले आहे. पूर्वमीमांसेत दोन ठिकाणी आत्रेयाचा उल्लेख आहे (४.३.१८; ६.१.२६). [ हिंदुत्व; शंकराचार्य ]

(४) यज्ञाला जे प्रेक्षक जमतात, त्यांच्यापैकी एखाद्या श्रेष्ठ पुरुषाची अग्रपूजा करतात. अशा पुरुषाला आत्रेय म्हणतात. तो अत्रिकुलोत्पन्न असावा, असा संकेत आहे. तसा कोणी नसल्यास दुसऱ्या कोणाची तरी आत्रेय समजून पूजा करतात.

**आत्रेय पुनर्वसु** आयुर्वेदातील कायचिकित्साशास्त्राचा प्रवर्तक. चांद्रभाग किंवा कृष्णात्रेय या नावांनीही हा प्रसिद्ध आहे. चरकसंहितेच्या प्रत्येक अध्यायाच्या आरंभी 'भगवान आत्रेयाने असे सांगितले,' असे म्हटलेले असते. ओषधिवनस्पतींचे गुणधर्म शोधण्यात गुंतलेला प्राचीनतम काळचा हा पहिला ऋषी होय, असा याचा बावर हस्तलिखितात उल्लेख आला आहे. हा विचारविनिमय व विचारस्वातंत्र्य यांचा फार भोक्ता होता. चरकसंहितेत विचारविनिमयाचे नियम दिलेले असून, आत्रेयाच्या नेतृत्वाने वादविवाद होत असत, असाही उल्लेख आहे. याचा श्रेष्ठ शिष्य अग्निवेश होय. त्याने सर्व आयुर्वेदशास्त्राचे तंत्र संकलित केले. [ वै. वि. भा. प. ]

**आदम** आदिमानव. मुसलमान पंडित त्याला पहिला द्रष्टा मानतात. त्यांच्या धर्मग्रंथातील दहा भागांचा (शहीफह्) त्याला दृष्टान्त झाला व 'शफीयुल्लाह' (देवाने निवडलेला) अशी पदवी मिळाली. [ डि. इ. ]

**आदरसिंहासन व्रत** एक बंगाली स्त्रीव्रत. व्रतकाल-वैशाख मास. या व्रतात प्रतिदिन एक सवाष्ण बोलावून, तिला चौरंगावर बसवितात व न्हाविणीकडून तिच्या हातापायांची नखे काढतात. मग तिचे हातपाय अळित्याने रंगवितात. तेल लावून तिची वेणी घालतात. भांगात शेंदूर भरतात. हातांत गजरे घालून अत्तर लावतात. मिष्टान्नाचे भोजन घालतात. महिनाभर असे करतात. चार वर्षे असे व्रत केल्यावर मग त्याचे उद्यापन करतात. फल – सौभाग्यवृद्धी.

**आदिकूर्म** ललितादेवीच्या उजव्या हाताच्या तर्जनीच्या नखापासून उत्पन्न झालेला एक कूर्म (कासव)-रूपी देव. याचा विस्तार एक योजन होता. भंड नावाच्या दैत्याने अर्णवास्त्र सोडून निर्माण केलेले जलाशय याने प्राशन केले (ब्रह्मांडपु. ४.२९.९२).

**आदिकेशव** तमिळनाडू प्रदेशात तिरुवट्टार येथे ताम्रपर्णी नदीच्या तीरावर आदिकेशवाचे मंदिर आहे. मंदिरात शेषशायी विष्णूची भव्य मूर्ती आहे. एका दारातून त्याच्या श्रीमुखाचे, दुसऱ्यातून वक्षःस्थळाचे व तिसऱ्यातून चरणांचे दर्शन होते. शेषाच्या खाली एक राक्षस दबलेला आहे. [ कल्याण – तीर्थांक ]

**आदिग्रंथ** शिखांचा पवित्र ग्रंथ. याला ग्रंथसाहिब असेही म्हणतात. शिखांचा पाचवा गुरू अर्जुनसिंह याने गुरू नानक व इतर अनेक भगत व शेख यांच्या लेखनाचे संकलन करून जो ग्रंथ तयार केला, तो आदिग्रंथाचा पहिला भाग. दुसऱ्या भागाला दसम पादशाही किंवा दसम ग्रंथ म्हणतात. दसम पादशहा म्हणजे गुरू गोविंदसिंह हा होय. बहुसंख्य शीख लोक पहिला भाग प्रमाण मानतात. काही जहाल मताचे शीख तेवढे दुसऱ्या ग्रंथाला प्रामाण्य देतात. हल्लीच्या स्वरूपात असलेला आदिग्रंथ अर्जुनसिंह याने इ. स. १५८१–१६०६ या कालात तयार केला. त्याच्या नंतर त्यात तेगबहादुराची काही पदे व गुरू गोविंदसिंहाचा एक दोह्रा एवढे साहित्य समाविष्ट करण्यात आले. यात कोणाकोणाची पदे आहेत, ते पुढील वर्गवारीवरून कळेल –

**शीख गुरू** – नानक, अंगदशाह, अमरदास, रामदास, अर्जुनसिंह, तेगबहादुर, गोविंदसिंह यांची पदे पहिल्या भागात आहेत.

**भगत** – वेणी, भीकन, धन्ना, फरीद (शेख), जयदेव, कबीर, नामदेव, पीपा, रामानंद, रविदास, सधना, सैणू, सूरदास, त्रिलोचन.

**भट्ट** – भलहउ, भिका, दास, गंगा, हरिबंश, जलन, जालप, शल (कलु, कल्हु), कलसू, कलसहार, कीरतू, मथुरा, नल, रड, सल.

भगतांपैकी नामदेव हा मराठी संत आहे. हा पहिला असून, तोच या ग्रंथातला प्राचीन लेखक दिसतो. या ग्रंथातले कबिराचे दोहे फारच उठावदार आहेत. रामानंद व सूरदास यांची परमार्थपर पदे त्यांत समाविष्ट असल्याने हा ग्रंथसाहिब शीखेतर हिंदूंनाही परका वाटण्याजोगा नाही. आणखी एका दृष्टीने पाहिले तर शीखपंथ व महाराष्ट्रातला भागवत धर्म यांचा निकट संबंध आहे. नामदेव हा शीखांचा आदिकवी, तर मराठी संतांतलाही तो जुन्यांपैकी आहे. ग्रंथसाहिब हा भाई गुरुदास याच्या हस्ते गुरुमुखी लिपीत लिहिला गेला आहे.

या ग्रंथाचे विभाग पुढीलप्रमाणे आहेत –

**(१) जपुनी साणू (जपुजी)** – ही नानकाची गद्यमय तात्त्विक रचना असून, चिंतन व मनन यांसाठी तिचा मोठा उपयोग असल्यामुळे अर्जुनदेवाने त्या रचनेला प्रातःस्मरणीय म्हणून प्रथम स्थान दिले आहे.

**(२) सोदरु पहला** – आस व गुजरी रागांतील सायंप्रार्थना.

**(३) सो पुरुखु** – आस रागातील सायंप्रार्थना.

**(४) सोहिला** – गौरी, आस व धनाश्री रागांतील निजण्यापूर्वीची प्रार्थना.

**(५) राग** – हा या ग्रंथाचा मुख्य भाग आहे. हे राग ३१ असून, त्यांत निरनिराळ्या गुरूंची पदे समाविष्ट आहेत. रागाच्या नावावरून आतील विषयांचा काही बोध होत नाही. प्रत्येक रागाच्या शेवटी भगतांची वचने कशी तरी जोडून दिलेली असतात. पहिल्या चार रागांत महत्त्वाचा विषय असून, पुढील रागांतून आलेले विषय ग्रंथाचा व्याप वाढविण्यासाठीच आहेत.

**(६) भोग** – म्हणजे ग्रंथपरिणती. यात निरनिराळ्या गुरूंचे व भगतांचे श्लोक आणि पदे आली आहेत.

वरील पहिले चार भाग उपासनेसाठी आवश्यक म्हणून प्रथम दिले आहेत.

ग्रंथातले साहित्य वेगवेगळ्या ठिकाणांहून संग्रहीत केलेले असल्यामुळे भाषादृष्ट्या हा ग्रंथ समान शैलीचा न राहता संमिश्र स्वरूपाचा झाला आहे. उदा० नामदेवाची रचना जुन्या मराठीत आहे. जयदेवाची संस्कृत व अर्वाचीन अशी मिश्र आहे. रामानंद व कबीर यांची भाषा जुनी हिंदी आहे. नानक व त्याच्या पुढचे गुरू

हे पंजाबातले असूनही त्यांनी हिंदीला जवळच्या अशा भाषेतच रचना करावी, हे आश्चर्यकारक वाटते. पण कबीर व इतर भगत यांची धार्मिक शिकवण जशी नानकादी गुरूंनी उचलली, त्याचप्रमाणे त्यांची भाषाही उचलली, असे म्हटले पाहिजे. पण त्यामुळे त्यातला बराचसा भाग अर्वाचीन शीखांना दुर्बोध झाला आहे.

या ग्रंथात दोहरा, दुपदी, तिपदी, चौपदी, पंचपदी, अष्टपदी, श्लोक, डखणा, छंट, पउरी, सवैय्या व गाथा ही वृत्ते आढळतात.

आदिग्रंथाला गुरुबानी असेही म्हणतात. शीखांच्या दृष्टीने तो ग्रंथ गुरुस्वरूप आहे, म्हणून त्याला स्वच्छ रेशमी वस्त्रांनी वेष्टून एका चांदव्याखाली उंच गादीवर प्रतिष्ठित करतात, त्याला फुले वाहतात, त्याच्यावर चवऱ्या ढाळतात व त्याची आरती करतात. शुचिर्भूत होऊनच त्याच्या दर्शनाला जातात. कधी कधी त्याची मिरवणूकही काढतात. कधी त्याचा अखंड पाठ, तर कधी सप्ताह पाठही करतात. बालकाचे नामकरण, त्याची दीक्षा, विवाहादी मंगल कृत्ये व प्रेतसंस्कार अशा प्रसंगी त्या ग्रंथातली विशिष्ट वचने वा पद्ये म्हटली जातात. प्रस्तुत ग्रंथातले काही भाग प्रातःकाळ, सायंकाळ व शयनवेला या प्रसंगी म्हणण्यासाठी निश्चित केलेले आहेत. शीखांचे संपूर्ण धार्मिक जीवन या आदिग्रंथाने प्रभावित झालेले आहे. पाहा – जपुजी; शीख धर्म. [ म. ज्ञा. को.; हिं. वि. को.; दि सिख्स ]

## आदित्य

(१) वैवस्वत मन्वंतरातील एका देवतासमूहाला हे नाव आहे. ऋग्वेदात यांच्या वर्णनपर सहा सूक्ते आहेत. या देवतासमूहात मित्र, अर्यमा, भग, वरुण, दक्ष व अंश अशा सहा देवतांचा समावेश होतो (ऋ. २.२७.१).

**त आदित्यास उरवो गभीरा अदब्धासो दिप्सन्तो भूर्यक्षाः ।**
**अन्तः पश्यन्ति वृजिनोत साधु सर्वं राजभ्यः परमा चिदन्ति ।।**
**(ऋ. २.२७.३)**

अर्थ – ते आदित्य राजे विशाल, गंभीर, अजिंक्य, शत्रुघातक, सहस्राक्ष व चांगले-वाईट पाहणारे आहेत. दूरचा पदार्थही त्यांना अगदी जवळ दिसतो.

**धारयन्त आदित्यासो जगत्स्था देवा विश्वस्य भुवनस्य गोपाः**
**(ऋ. २.२७.४)**

अर्थ – ते आदित्य स्थावर–जंगम पदार्थांचे धारणकर्ते असून, सर्व भुवनांचे रक्षण करणारे आहेत.

सत्याच्या योगाने त्यांचा महिमा वाढला आहे. जो आदित्यांच्या मर्जीत असतो, त्याला जवळून अगर दुरून कोणीही ठार करू शकत नाही, असे ऋग्वेदात म्हटले आहे.

आदित्य हे अदितीचे पुत्र असून त्यांची संख्या आठ आहे, असे अथर्ववेदात सांगितले आहे (८.९.२१). तै. ब्राह्मणात अंश, भग, धाता, इंद्र, विवस्वान्, मित्र, वरुण व अर्यमा, अशी त्यांची नावे दिलेली आहेत (१.१.९.१–३). ऋग्वेदात व शतपथात अदितीच्या आठव्या पुत्राला मार्तंड असे म्हटलेले आहे.

आदित्यांची संख्या बारा असून, ते बारा महिन्यांचे निदर्शक आहेत, असेही श. ब्रा. मध्ये सांगितले आहे (११.६.३.८). त्यांच्यापैकी विष्णू हा सर्वश्रेष्ठ आदित्य होय. आदित्य हे कश्यप व अदिती यांचे पुत्र होत. (१) अंशुमान (२) अर्यमा (३) इंद्र (४) त्वष्टा (५) धाता (६) पर्जन्य (७) पूषा (८) भग (९) मित्र (१०) वरुण (११) विवस्वान् व (१२) विष्णू अशी त्यांची नावे भविष्यपुराणात दिली असून, स्कंदपुराणातील वेगळी नामावळी पुढीलप्रमाणे आहे–

(१) लोलार्क (२) उत्तरार्क (३) सांबादित्य (४) द्रुपदादित्य (५) मयूखादित्य (६) अरुणादित्य (७) वृद्धादित्य (८) केशवादित्य (९) विमलादित्य (१०) गंगादित्य (११) यमादित्य व (१२) सकोलकादित्य (स्कंदपु. २.४.४६).

हे बारा आदित्य वर्षाच्या बारा मासांवर आधिपत्य करतात. यांना साध्य असेही नाव आहे. कालरूपधारी भगवान आदित्य वेगवेगळ्या बारा गणांसह बारा महिन्यांचे संचालन करतो. हा आदित्य विश्वसंचार करीत असता चारही वेदांचे ऋषी त्याला सूक्ते गातात. गंधर्व–अप्सरा त्याच्यापुढे नृत्य करतात. नाग त्याचा रथ अधांतरी धरतात. नैर्ऋत पाठीमागून तो ढकलतात. वालखिल्य त्याच्या पुढे चालत असतात. या सर्व समुदायाला मिळून 'आदित्यव्यूह' असे नाव आहे (भाग. पु.१२.११). पाहा– सूर्य. [ ऋ. द.; प्रा. च. को. ]

(२) बासरीचा एक प्रकार. संगीतरत्नाकरात हिचा उल्लेख आहे. या बासरीचे मुखाजवळील छिद्र व तर्जनी ठेवण्याचे छिद्र यांत बारा आंगुळांचे अंतर असते. [ डि. सा. इं म्यु. म्यु.]

## आदित्यदर्शन

बाळ-बाळंतिणीचा एक संस्कार. याला निष्क्रमण, उपनिष्क्रमण किंवा निर्णयन असे नाव आहे. पाहा – निष्क्रमण.

## आदित्य राणूबाई

महाराष्ट्रातील स्त्रियांचा एक व्रत (व्रत). श्रावणातील पहिला रविवार हा या व्रताचा दिवस होय. या दिवशी स्त्रिया मौन धरून अंथरुणातून उठतात; स्नान करून पाण्याचा तांब्या जमिनीवर न ठेवता भरून आणतात; विडयाच्या पानावर रक्तचंदनाने सूर्याचे चित्र काढतात व तिथेच एका वर्तुळात षट्कोनी आकृती काढतात. सहा पदरी दोरा घेऊन त्याला सहा गाठी मारतात व मग या सर्वांची मिळून पूजा करतात. त्यानंतर एका सवाष्ण स्त्रीला

सेवायला वाढतात. या वशाची कहाणी पुढीलप्रमाणे आहे – एक गरीब ब्राह्मण होता. तो रानात लाकडे आणायला गेला होता. तिथे अप्सरा, नागकन्या पूजा करीत होत्या. ब्राह्मणाने विचारले, 'तुम्ही कसली पूजा करता ?' त्यांनी आदित्य राणूबाईची पूजा व तिचे विधान ब्राह्मणाला सांगितले. हा वसा केल्याने दैन्य फिटते व धनदौलत मिळते, असेही सांगितले. ब्राह्मणाने तो वसा वसला. सूर्य त्याच्यावर प्रसन्न झाला. त्याला धनदौलत मिळाली.

त्याला दोन मुली होत्या. त्यांची लग्ने राजपुत्र व प्रधानपुत्र यांच्याशी झाली. राजाच्या राणीला चार मुलगे झाले. बारा वर्षांनी बाप त्या मुलींना भेटायला गेला. त्या दिवशी श्रावणातला रविवार होता. त्याने मुलीला म्हटले, की 'मी कहाणी सांगतो तेवढी तू ऐक.' राणी म्हणाली, 'राजा शिकारीला निघाला आहे; मला आता वेळ नाही.' त्यावर बाप उठून दुसऱ्या मुलीकडे गेला. तिने बापाची कहाणी ऐकली. राणीने कथा न ऐकल्याने आदित्य राणूबाईचा अपमान झाला. त्यामुळे राणीवर संकट ओढवले. राजा शिकारीला गेला होता. तो वाट चुकला व परत आलाच नाही. पुढे राणीला दारिद्र्य आले. मग दर रविवारी एक याप्रमाणे आपल्या चौघाही मुलांना तिने आपल्या श्रीमंत वहिणीकडे पाठविले.आपल्या चारही भाच्यांना प्रधानाच्या सुनेने सोन्यानाण्यांचे व हिऱ्यांचे गुप्त दान दिले, पण आदित्याच्या अवकृपेने वाटेतच ते नाहीसे झाले. चारही मुलगे हात हलवीत घरी परतले. शेवटी राणी स्वतः उठून वहिणीकडे गेली. बहिणीने राणीला सांगितले, की 'तू आदित्य राणूबाईला विसरलीस म्हणून तुला असे दिवस आले.' राणीला पश्चात्ताप झाला. तिने आदित्य राणूबाईची पूजा करून क्षमा मागितली. सूर्य तिच्यावर प्रसन्न झाला. तिला धनदौलत परत मिळाली व राजाही घरी सुखरूप आला.

खानदेशात राणूबाईला रणादेवी म्हणतात. तिथे अनेक घराण्यांत मंगलकार्यापूर्वी तिचे सूर्याशी लग्न लावण्याची प्रथा आहे. राजस्थान, सौराष्ट्र, गुजरात व नमाड या प्रदेशांत हिची मंदिरे आहेत.ही निमाडी लोकगीतांची अधिष्ठात्री देवता आहे.[लो.अ.]

**आदित्यवार** विशिष्ट तिथी व विशिष्ट नक्षत्रे यांनी युक्त आदित्यवार जेव्हा विशिष्ट महिन्यात येतो, तेव्हा त्याला विविध नावे मिळतात. असे एकंदर बारा वार आहेत. मार्ग० शुद्ध षष्ठीला आदित्यवार आल्यास त्याला नंद हे नाव आहे. या दिवशी नक्तभोजन व सूर्याची अगस्त्याच्या फुलांनी पूजा करतात. भाद्र० शुद्ध पक्षातल्या आदित्यवाराला भद्र ही संज्ञा असून, त्या दिवशी नक्त किंवा उपवास करतात. याप्रमाणे सौम्य = रोहिणीनक्षत्रयुक्त; कामद = मार्ग० शुद्ध षष्ठीला आलेला; जय = दक्षिणायनातील; जयंत = उत्तरायणातील; विजय = रोहिणीनक्षत्रयुक्त सप्तमीला आलेला; पुत्रद = रोहिणी किंवा हस्तनक्षत्रयुक्त; या दिवशी एकभुक्त राहून सकाळपासून सूर्यास्तापर्यंत महाश्वेतामंत्राचा जप करतात. हृदय = संक्रांतियुक्त. या दिवशी नक्त करून सूर्यमंदिरात सूर्याकडे तोंड करून आदित्यहृदय-मंत्राचा १०८ वेळा जप करतात. रोगह=पूर्वाफाल्गुनीयुक्त. या दिवशी रुईच्या फुलांनी सूर्याची पूजा करतात. महाश्वेताप्रिय = सूर्यग्रहणयुक्त. या दिवशी उपवास करून महाश्वेतामंत्राचा जप करतात.

**आदित्यवार नक्तव्रत** एक काम्य व्रत. ज्या रविवारी हस्त नक्षत्र असेल, त्या दिवशी एकभुक्त राहून व्रताला आरंभ करतात व तेव्हापासून रविवारी नक्तभोजन करतात. सूर्याला नमस्कार घालून ब्राह्मणभोजन घालतात. सूर्य व त्याच्या रथाचे घोडे यांच्या आकृत्या काढून त्यांना अर्घ्य देतात. वर्षभर असे व्रत करून उद्यापनाच्या वेळी सुवर्णकमळ, सवत्स गाय व गुळाने भरलेले ताम्रपात्र ब्राह्मणाला दान देतात. व्रताचे फल – पापनाश व सूर्यलोकप्राप्ती. [ कृ. क. त. ]

**आदित्यवार व्रत** मार्गशीर्ष महिन्यातल्या रविवारपासून या व्रताला प्रारंभ होतो. व्रतावधी एक वर्ष. प्रत्येक रविवारी सूर्याची पूजा. बारा महिन्यांच्या बारा सूर्यांची वेगवेगळी नावे आहेत. त्या नावांनी त्याची पूजा करायची असते. उदा० मार्गशीर्ष महिन्यात मित्र, पौषात विष्णू, इत्यादी. या दिवशी आदित्यहृदयाचा पाठ व गणाधिप आणि महाश्वेता या मंत्राचा जो जप करतो तो सूर्यलोकाला जातो, असे सांगितले आहे. व्रताचे फल—कुष्ठादी रोगांचा नाश. [हि. ध.; कृ. क. त.]

**आदित्यव्रत** (१) आश्विनातील रविवारी याचा प्रारंभ करतात. व्रतावधी—एक वर्ष. देवता सूर्य. स्कंदपुराणात याविषयी पुढील कथा आहे – कृष्णाने सांबाला 'तुला कुष्ठरोग होईल' असा शाप दिल्यावर सांबाने हे व्रत केले व त्याचा कुष्ठरोग बरा झाला.

(२) चतुर्दशी तिथी व रेवतीनक्षत्रयुक्त रविवारी किंवा अष्टमी तिथी व मघानक्षत्रयुक्त रविवार या दिवशी हे व्रत करतात. यात शिवाची पूजा करतात.

(३) ब्रह्मचाऱ्याने करायचे एक व्रत. व्रतावधी एक वर्ष. व्रताला प्रारंभ करण्यापूर्वी तो नवीन मृगाजिन, जानवे व मेखला धारण करतो. [ हि. ध. ]

**आदित्यशयन व्रत** रविवारी, सप्तमी, हस्तनक्षत्र व सूर्यसंक्रांती, अशा योगावर हे व्रत विहित आहे. या दिवशी सूर्य व शिव यांची एकत्र पूजा करतात. आच्छादने व उश्या यांनी सुशोभित शय्या व एक गाय दान देतात. फल – दीर्घायुरारोग्याची प्राप्ती. [ हि. ध. ]

**आदित्यशांतिव्रत** एक वारव्रत. हस्तनक्षत्रयुक्त रविवारी हे व्रत करतात. सूर्यप्रतिमेची पूजा व रुईच्या समिधांचे हवन, हा याचा विधी आहे. फल – आरोग्य व बल यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**आदित्यहृदयविधी** संक्रांतियुक्त रविवारी सूर्यमंदिरात आदित्यहृदय या मंत्राचा १०८ वेळा जप करतात, त्याला हे नाव आहे. रावणाबरोबरच्या युद्धात अंती जय प्राप्त व्हावा, म्हणून अगस्त्य ऋषीने रामचंद्राला आदित्यहृदयनामक सूर्याच्या स्तुतीचा जप करायला सांगितले होते, असे वाल्मीकीने सांगितले आहे (युद्ध. १०७). [ हि. ध. ]

**आदित्याभिमुखविधी** एक व्रत. सकाळी स्नान करून सूर्याकडे तोंड करून सूर्यास्तापर्यंत उभे राहावे, उशीला टेकून महाश्वेतामंत्राचा जप करावा, सूर्याची पूजा करावी, ब्राह्मणाला दक्षिणा द्यावी व नंतर भोजन करावे, असा या व्रताचा विधी आहे. फल – पापनाश. [ हि. ध. ]

**आदिनाथ** (१) जैनांचा पहिला तीर्थंकर. यालाच ऋषभदेव असेही म्हणतात. हा गर्भात असताना याच्या आईला चौदा स्वप्ने पडली, त्यांत बैलाचे स्वप्न पहिले होते.

इक्ष्वाकू वंशात हा जन्मला. पूर्वजन्म – सर्वार्थसिद्धी. काळ – सुसम दुःसम. नक्षत्र–उत्तराषाढा. जन्मस्थान–अयोध्या. पित्याचे नाव–नाभिराज. मातेचे नाव–मेरुदेवी. उची–५०० धनुष्ये. वर्ण–सुवर्ण. ज्ञानवृक्ष–न्यग्रोध (वड). गणधर – ८४. आसन– पर्यंकासन. वय–८४ लक्षपर्व. लांछन – वृषभ. यक्ष–यक्षिणी– गोमुखचक्रेश्वरी. निर्वाणस्थान–कैलासपर्वत. उपासक–भरत व बाहुबली. आदिनाथाच्या पंचकल्याणिकाच्या पर्वतिथी पुढीलप्रमाणे–

गर्भकल्याण आषाढ व. द्वितीया; जन्मकल्याण व दीक्षाकल्याण चैत्र व. नवमी; केवलज्ञानकल्याण फाल्गुन व. एकादशी; मोक्षकल्याण मार्ग० व. चतुर्दशी.

भागवतात जो ऋषभदेव वर्णिला आहे, त्याचीही मातापितरे मेरू व नाभी हीच आहेत (५.३.६). हा शेवटी जडोन्मत्ताप्रमाणे नग्नावस्थेत राहू लागला. कोणी त्रास दिला, तरी हा स्वस्वरूपी स्थिर राहत असे, असे सांगितले आहे. त्यावरून बुद्धाप्रमाणे यालाही पौराण व्यक्तींत स्थान मिळाले असावे.

उदेपूर–अहमदाबाद रस्त्यावर ऋषभनाथ नावाचे एक गाव आहे, तिथे ऋषभदेवाचे मंदिर आहे. पूर्वी एक गाय एका विवक्षित ठिकाणी येऊन नियमितपणे पान्हा सोडीत असे. पुढे तिथे खणले असता ऋषभनाथाची मूर्ती सापडली. त्या स्थानावर नंतर मंदिर उभारण्यात आले. कित्येक स्वयंभू शिवलिंगांच्या बाबतीतही अशाच कथा सांगितल्या जातात. हे मंदिर आता बरेच प्रसिद्ध झाले असून, जैन लोकांचे यात्रास्थान बनले आहे. [ जै. इ.; म. ज्ञा. को. ]

(२) नवनाथांपैकी एक. नेवासे गावाच्या जवळ मर्मरगिरीत याचे स्थान आहे. याला वृद्धेश्वर किंवा म्हातारदेव असेही म्हणतात. याच्या आसपास मत्स्येंद्र, गोरक्ष व गहिनी या नाथांच्या समाध्या आहेत. [ म. च. को. ]

**आदिनाथजयंती व्रत** जैन व्रत. फाल्गुन व. एकादशीस आदिनाथ या पहिल्या तीर्थंकराला केवलज्ञानप्राप्ती झाली व याच दिवशी त्याने पहिले प्रवचन केले म्हणून, या दिवशी जैन लोक उपवास व 'ओम् ऱ्हीं श्रीवृषभाय नमः' या मंत्राचा त्रिकाल जप करतात. [जै. व्र. वि. सं.]

**आदिनाथनिर्वाणोत्सव व्रत** जैन व्रत. माघ वद्य चतुर्दशीस आदिनाथाला निर्वाणप्राप्ती झाली म्हणून जैन लोक या दिवशी उपवास व 'ओम् ऱ्हीं श्रीवृषभाय नमः' या मंत्राचा जप करतात. [जै. व्र. वि. सं.]

**आदिनाथ भैरव** (इ. स. चे १९ वे शतक) एक नाथपंथी सिद्ध. याचा जन्म पुण्याजवळ निघोजे येथे झाला. याने विटे गावी इ. स. १८३४ मध्ये नाथलीलामृत हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथाचे २८ अध्याय असून, ओवीसंख्या ५४९३ आहे. ग्रंथाची भाषाशैली प्रासादिक आहे. आदिनाथाच्या सांप्रदायिक ग्रंथाध्ययनाची या ग्रंथावरून चांगली कल्पना येते. [ गो. च. प. ]

**आदिपुरम्** द. भारतातील एक उत्सव. आदि = आषाढ. या मासात पुरम् हे नक्षत्र असते, त्या दिवशी द. भारतात सर्व देवालयांतून हा उत्सव साजरा करतात. या दिवशी शक्तिदेवीने अवतार घेतला म्हणून तिची पूजा करतात. या नक्षत्री शुक्रवार असेल तर तो विशेष योग समजतात. या उत्सवाची कथा पुढीलप्रमाणे –

श्रीविल्लिपुत्तुर येथे पेरियाळवार नावाचा वैष्णव संत रहात होता. तो निपुत्रिक होता- एकदा शेत नांगरताना त्याला एक सुंदर मुलगी सापडली. त्याने तिचे संगोपन केले व ती मोठी झाल्यावर श्रीरंगम येथील श्रीरंगनाथाशी तिचे लग्न लावून दिले. या मुलीचे नाव आंडाळ असून तिलाच देवीचा अवतार मानून तिचा हा उत्सव करतात. मदुरा, श्रीविल्लिपुत्तुर, तिनेवेल्ली, वेदारण्यम, तिरुवन्नामलै, इ. तीर्थक्षेत्रांतील देवालयांत हा उत्सव थाटामाटाने साजरा होतो. चिदंबरम येथे तो आदिमासात न करता अर्पिसी महिन्यात करतात. पाहा—आंडाळ. [सा. इं. फे.]

**आदिपुराण** (१) अठरा उपपुराणांपैकी एक. याला आद्य-पुराण असेही नाव आहे. हे उपपुराण वैष्णव पंथाचे आहे. हे इ. स. च्या ६ व्या शतकात रचले गेले असावे. या ग्रंथाचे एकही हस्तलिखित उपलब्ध नाही. तथापि, त्यातील उतारे अनेक टीकांमध्ये व निबंधग्रंथांत घेतलेले आढळतात. त्यांवरून त्यातील विषयांची कल्पना करता येते. साधारणपणे त्यात पुढील विषयांची चर्चा आढळते – चातुर्वर्ण्याच्या लोकांना वसाहती करण्यासाठी योग्य प्रदेश, सदाचार, विवाहविधी, अंत्यसंस्कार, आशौचनिर्णय, शुद्धीचे उपाय, दाने, व्रते, शुभाशुभशकुन व लक्षणे.

या पुराणाच्या काळात नर्मदा, सिंधू व करतोया या नद्यांनी सीमित केलेल्या आर्यावर्ताच्या प्रदेशाबाहेर जाणे निषिद्ध मानलेले होते. तसा कोणी गेल्यास त्याला प्रायश्चित्त घ्यावे लागे. [स्ट. उ. पु.]

(२) जैनांचे एक प्रसिद्ध पुराण. जैन धर्मात त्रिषष्टी = त्रेसष्ट पुरुष प्रतिभाशाली धर्मप्रवर्तक व चारित्र्यसंपन्न मानलेले असून, ते शलाकापुरुष या नावाने प्रसिद्ध आहेत. २४ तीर्थंकर, १२ चक्रवर्ती, ९ वासुदेव, ९ प्रतिवासुदेव, ९ बलदेव किंवा बलभद्र हे सगळे मिळून ६३ शलाकापुरुष होतात. यांच्या जीवनविषयक ग्रंथांना श्वेतांबर लोक 'चरित्र' व दिगंबर लोक 'पुराण' म्हणतात. आचार्य जिनसेनाने या सर्व महापुरुषांचे चरित्र संस्कृत भाषेत काव्यनिबद्ध करण्यासाठी 'महापुराण' ग्रंथाला प्रारंभ केला. परंतु ग्रंथ समाप्त होण्यापूर्वीच तो मरण पावल्यामुळे गुणभद्र नामक त्याच्या शिष्याने उरलेला ग्रंथ पुरा केला (इ. स. चे ९ वे शतक). या ग्रंथाच्या पहिल्या भागात ४८ पर्वे व १२ हजार श्लोक असून, त्यात ऋषभदेव या पहिल्या तीर्थंकराचे जीवनचरित्र वर्णिलेले आहे. पहिल्या भागाला लौकिकात आदिपुराण व उत्तर भागाला उत्तरपुराण असे म्हणतात. आदिपुराणातील संपूर्ण ४२ पर्वे व ४३ व्या पर्वातील ३ श्लोक म्हणजे एकंदर १०,३८० श्लोक जिनसेनाने रचले आहेत व १६२० श्लोक एवढी गुणभद्राची रचना आहे. जिनसेनकृत आदिपुराणाचा भाग इ. स. ८४३ च्या सुमाराला पूर्ण झालेला दिसतो. दिगंबर संप्रदायातील प्रथमानुयोगाचा हा प्रधान ग्रंथ असून, जैन वाङ्मयातील एक उत्तम ग्रंथ म्हणून त्याची ख्याती आहे. जैन लोकांच्या सर्व कथांचा, चरित्रांचा व भूगोलादी माहितीचा कवीने यात मोठ्या कौशल्याने संग्रह केलेला आहे. जैन संप्रदायातील सर्वसामान्य तत्त्वांची माहिती या ग्रंथात कोणत्या ना कोणत्या तरी संदर्भात करून दिलेली आहे. त्यानंतरच्या ग्रंथकारांनी या ग्रंथातील अवतरणे 'आर्ष' म्हणून उद्धृत केली आहेत.

या ग्रंथाला काव्य म्हणूनही मान्यता मिळाली आहे. महाकाव्याची बहुतेक सर्व लक्षणे यात आढळतात. शृंगारादी नवरसांनी हा ग्रंथ नटलेला असून, त्यातील काव्यही उच्च प्रतीचे आहे. याचे कथासूत्र मनोवेधक असून, भाषासरणी ओघवती व प्रासादिक आहे. हा ग्रंथ म्हणजे उत्कृष्ट दृष्टान्त व सुभाषिते यांचे एक भांडारच आहे. [जै. सा. इ.; हिं. वि को.; म. ज्ञा. को.]

**आदिबदरी** हिमालयातले एक क्षेत्र. हे कर्ण प्रयागापासून ११ कि. मी. अंतरावर आहे. आदिबदरीचे दर्शन हे बदरीनाथाच्या दर्शनासमान मानतात. येथील बदरीनाथाची मूर्ती प्रथम तिबेटात होती व ती आद्य शंकराचार्यांनी भारतात आणली, अशी आख्यायिका आहे. [कल्याण – तीर्थांक]

**आदिबुद्ध** कालचक्रयानपंथाची प्रमुख देवता. आदी म्हणजे आद्यंतरहित. आदिबुद्ध सर्वज्ञ आहे. पद्मकारंड-व्यूहात त्याचे जे वर्णन आले आहे, ते योगदर्शनातील नित्यमुक्त व सर्वज्ञ ईश्वराच्या कल्पनेशी जुळणारे आहे. समस्त विश्वाच्या प्रारंभी आदिबुद्ध हा स्वयंभू किंवा आदिनाथ या नावाने प्रकट झाला व समाधीत त्याने विश्व निर्माण केले. वज्रयानातील बुद्धाप्रमाणेच यालाही सहज, धर्म, संभोग व निर्माण असे चार काय आहेत.

आदिबुद्ध हा प्रज्ञा व करुणा यांची मूर्ती आहे. तो जेव्हा मानवी रूप घेतो, तेव्हा त्याला वज्रधर म्हणतात. वज्रधराची एकाकी व यब्-युम् (मिथुनीभूत) अशी दोन रूपे आढळतात. नेपाळमध्ये स्वयंभू आदिबुद्धाचे मंदिर असून तिथे त्याची पूजा-अर्चा चालते. आदिबुद्ध हा त्या ठिकाणी ज्वालेच्या रूपात प्रकट झाला व मंजुश्रीने त्या ज्योतिस्वरूपावर मंदिर बांधले, असे सांगतात. नेपाळात बौद्धांचे अनेक संप्रदाय असून त्यांतले काही अमिताभाला, तर काही वैरोचनाला आदिबुद्ध मानतात. नामसंगीती या ग्रंथात मंजुश्रीलाच आदिबुद्ध मानलेले आहे.

महायानी बौद्धांनी ईश्वर या रूपाने आदिबुद्धाला आकाराला आणले. पुढे इ. स. च्या १० व्या शतकात नालंदा येथे या



आदिबुद्ध अवलोकितेश्वर

कल्पनेचा अधिक विकास झाला. पुढे संपूर्ण आशिया खंडात या आदिबुद्धाची प्रसिद्धी झाली. आजही लंकेतले व जपानमधले बौद्ध आदिबुद्धालाच भजणारे आहेत. पाहा – वज्रधर, ध्यानी बुद्ध. [ बौ. द. मी.; बौ. ध. द.; इं. बु. इ. ]

**आदिबुद्ध–पंथ** बुद्धाला ईश्वर मानणारा नेपाळातील एक पंथ. या पंथात ध्यानी बुद्धांची कल्पना व इतर पूर्वकालीन विचारपद्धती यांचा समन्वय आहे. बुद्ध हे ब्रह्माप्रमाणेच आदितत्त्व असून, सामान्य जनांसाठी त्याला सगुण रूप घ्यावें लागले, असे हे मानतात.

आदिबुद्ध आपल्या ध्यान-कर्मांनी पाच ध्यानी बुद्ध निर्माण करतो. ते आपल्या शक्तीच्या द्वारे ध्यानी बोधिसत्त्व निर्माण करतात व मग हे बोधिसत्त्व या जड, नश्वर विश्वाची निर्मिती करतात. अशी तीन विश्वे आतापर्यंत नष्ट झाली असून, सध्या अवलोकितेश्वरनिर्मित चौथे विश्व चालू आहे.

आदिबुद्ध किंवा परमादिबुद्ध हे नाव प्राचीन लेखांत आढळते. कालचक्रयानाशी या पंथाचा निकटचा संबंध आहे. आदिबुद्धाचे दर्शन हे तांत्रिक बौद्ध धर्माशी मिळतेजुळते आहे. या पंथाचे वैशिष्ट्य हे, की त्याने सहाही बुद्धांच्या वरचा समंतभद्र नावाचा एक बुद्ध धर्मकाय-रूपात मानलेला आहे व त्याच्या ठिकाणी सकल बुद्धांच्या व सकल अर्हतांच्या ठिकाणी वास करणाऱ्या बत्तीस गुणांचा अध्यारोप केलेला आहे. या समंतभद्रापासून या जगाची उत्पत्ती होते, असे या



आदिबुद्ध

पंथाचे मत आहे. पाहा – समंतभद्र. [ म. ज्ञा. को. ]

**आदिब्राह्मसमाज** बंगालमधील एक धर्मपंथ. श्री. देवेंद्रनाथ ठाकूर हे प्रथम ब्राह्मसमाजाचे अध्वर्यू होते. पण पुढे त्यांचे पुढारीपण श्री. केशवचंद्र सेन यांच्याकडे गेले व वरील दोघांत मतभेद निर्माण झाले. मग देवेंद्रनाथ व त्यांचे अनुयायी यांनी केशवचंद्र सेनांचा पंथ सोडून जो ब्राह्मसमाज चालविला, तो आदिब्राह्मसमाज या नावाने ओळखला जाऊ लागला. पाहा – ब्राह्मसमाज [ सं. चा. अ. ]

**आदिमानव** मानवाचा उगम केव्हा व कसा झाला, हे अद्याप निश्चितपणे सांगता येत नाही. इतिहासवेत्ते, मानववंशशास्त्रज्ञ, पुराणवस्तुसंशोधक यांनी त्याविषयी अनेक प्रकारचे तर्क केलेले आहेत; पण ती केवळ अनुमाने असून, त्यांत एकमत झालेले नाही. मानवाचा जन्म प्रथम पृथ्वीच्या कोणत्या भागात झाला तेही कोणाला माहीत नाही. तथापि लक्षावधी वर्षांपूर्वी पृथ्वीवर वावरणाऱ्या मानवाचे जीवन कसे असेल, याविषयी शास्त्रज्ञांना पुष्कळ ज्ञान प्राप्त झाले आहे. त्या मानवी प्राण्याला ते आदिमानव म्हणतात. तो आदिमानव अडाणी व रानटी होता; त्याला अग्नी माहीत नव्हता. जंगली हिंस्र पशूंपासून तो स्वतःचे रक्षण करू शकत नव्हता. त्याला अन्न शिजवणे माहीत नव्हते. जंगलात सापडणारी कंदमुळे, फळे आणि सहजपणे हाती सापडणाऱ्या पशुपक्ष्यांचे कच्चे मांस यांवर तो जगत असे.

दगडी हत्यारे आणि अग्नी यांचे साहाय्य मिळाल्यामुळे मानवाचे जीवन खूपच बदलले. तो जंगली पशूंची शिकार करू

लागला व त्याचे मांस भाजून खाऊ लागला. सहज, आपोआप उत्पन्न झालेले धान्य किंवा कंद शिजवून किंवा भाजून खाण्याची रीत त्याला समजली. अशा प्रकारे तो रानटी आदिमानव सुधारला. त्यानंतर शेती, पशुपालन, मातीची भांडी बनवणे, इ. उद्योग तो करू लागला. आदिमानवाचा प्रगत मानव झाला. मात्र तो आदिमानव पूर्णपणे नाहीसा झालेला नसून, आजही त्याचे गुणधर्म, विकार-विचार, भावना, श्रद्धा व परंपरा सुसंस्कृत मानवात अंशतः आढळतात. अजूनही घनदाट जंगलात काही रानटी माणसे आदिमानवाप्रमाणे कंदमुळे व जंगली पशूंचे मांस यांवर जगतात. पाहा – अश्मयुग, मानववंश. [ क. म. ]

**आदिमाता** मातृदेवता. हिची पूजा वेदपूर्वकालापासून प्रचलित असावी. सिंधुसंस्कृतीच्या अवशेषांत हिची प्रतीके सापडली आहेत. सर्व आदिम अर्धसंस्कृत समाजात समृद्धीसाठी आवश्यक असे सुफलताविधी रूढ होते. योनी, स्तन, लिंग ही त्यांतील पूज्य प्रतीके होत. जननशक्तीचे प्रतीक म्हणजे आदिमाता होय. पाहा – मातृपूजा.

**आदिमाया** परमेश्वराची आदिशक्ती, हिला महामाया असेही नाव आहे. हिच्यापासून सर्व चराचर विश्व उत्पन्न झाले आणि हिच्यामुळेच सर्व सृष्टिक्रम चालू आहे. पाहा – महामाया, शक्तिदेवता. [ नंदादीप ]

**आदिमूर्ती** ब्राह्मी शक्तीचे नाव. ही चतुर्भुज आहे. हिचे दोन हात अभय व वरद या मुद्रेत असून, दुसऱ्या दोन्ही हातांत कमंडलू व रुद्राक्षमाला या वस्तू असतात. [ स. पॉं. ]

**आदियप्पय्य पच्छिमिरियम्** (जन्म इ. स. १७३०) एक कर्नाटकी संगीताचार्य. 'विरिबोणी' या भैरवी रागातील व 'अट' तालातील प्रसिद्ध 'वर्णा'चा रचयिता. तो कुशल वैणिक होता. रक्ती व देशीय रागात त्याने अनेक कृती रचल्या आहेत. राग आलापन, मध्यमकाल व पल्लवी यांच्या गायनपद्धतीत त्याने एक विशिष्ट रचनाबद्धता आणली. प्रतापसिंह महाराज ( इ. स. १७४१–६४ ) व तुळजा महाराज ( इ. स. १७६५–८७ ) यांच्या कारकिर्दीत तंजाऊर येथे तो आस्थानविद्वान होता. पुदुकोट्टई व उडैयार पालयम या राज्यांचाही त्याला राजाश्रय होता. तो माध्व ब्राह्मण असून, श्रीवेंकटरमण अशी स्वतःची सही करीत असे. हा तेलुगू व संस्कृत भाषांचा पंडित असून, याने देशी रागात गमक जातींनी युक्त अशी अनेक कीर्तने रचली. त्याला 'तानवर्णमार्गदर्शी' ही पदवी मिळाली होती. श्यामशास्त्री, घनमुकृष्ण-अय्यर, पल्लवी गोपालअय्यर व त्याचा भाऊ संजीव अय्यर हे त्याचे प्रमुख शिष्य होत. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**आदिरामायण** या ग्रंथाची एक हस्तलिखित प्रत उपलब्ध झाली आहे. यात मंजरी, मुग्धा, मध्या, प्रौढा, इ. नायिकांचे प्रसंग आहेत. 'चित्रकूटमाहात्म्य' नावाचा एक हस्तलिखित ग्रंथ आहे तो आदिरामायणाचाच एक भाग आहे, असे श्री. कामिल बुल्के यांचे म्हणणे आहे. चित्रकूटावर सांतानक वनातील सरोवराच्या मध्यभागी एक रम्य मंडप बनलेला असून, तिथे एका वेदिकेवर सीता व तिच्या सख्या यांसह श्रीराम नित्य रासक्रीडा करतो, असे वर्णन या ग्रंथात आहे. [ रा. सा. म. उ. ]

**आदिवराह** वराह म्हणजे डुक्कर. 'विध्यद्वराहं तिरो अद्रिमस्ता' वृत्ररूप वराहाच्या अंगावर (विष्णूने) आपले अस्त्र तिरपे फेकून त्याचा देह छिन्नविच्छिन्न करून टाकला (ऋ. १.६१.७.) व एमुष नामक वराहाला इंद्राने मारले (ऋ. ८.६६.१०), असे ऋग्वेदात आदिवराहाविषयी उल्लेख आहेत. याच एमुष वराहाने पृथ्वीला वर काढले, असे तैत्तिरीय संहितेत म्हटले आहे (१४.१.२.११). तै. संहितेप्रमाणे वराह हे प्रजापतीचे रूप आहे, तर पुराणांन्वये ते विष्णूचे रूप आहे.

भारतीय शिल्पकलेत वराहमूर्ती दोन प्रकारची आढळते. एक पशुरूप व दुसरी नर-पशू अशी मिश्र. पहिले रूप हे आदिवराहाचे आहे. उत्तर भारतात आदिवराहाच्या पशुरूप मूर्ती अनेक ठिकाणीं आढळतात. मध्यप्रदेशात खजुराहो येथे आदिवराहाची पशुरूप भव्य मूर्ती आहे. नर-पशू अशा मिश्ररूपातली सर्वांत प्राचीन मूर्ती उदयगिरी येथील चौथ्या गुंफेत आहे. याशिवाय यज्ञवराह व प्रलयवराह अशी त्याची आणखी दोन रूपे आहेत. पाहा – वराह अवतार, यज्ञवराह.

**आदिवारम्** द. भारतातली रविवारविषयक व्रते. ही व्रते सुवासिनी स्त्रियांची आहेत –

(१) प्रवत्स आदिवारम् – यात रविवारी दंपतीपूजन करतात. फल – संतानप्राप्ती.

(२) अपादलेणी आदिवारम् – रविवारी एकभुक्त सुवासिनींना पाच रोट, रोवळीभर तांदूळ, चोळी व इतर सौभाग्य वस्तूंचे दान. फल – संपत्तीलाभ.

(३) चपिट्टी आदिवारम् – वर्षभर प्रत्येक रविवारी अळणी भोजन. फल – संततीस दीर्घायुष्य. [ का. ट्रा. स. इं. ]

**आदिवासी** नागर संस्कृतीपासून दूर राहिलेले मूळचे रहिवासी. आर्य व द्रविड हे भारतातले दोन मोठे मानवसमाज सोडून, त्यांच्याही पूर्वी भारतात राहणाऱ्या किंवा बाहेरच्या देशांतून येऊन, वने व पर्वत यांच्या आश्रयाने स्थायिक झालेल्या जमातींना वन्य जाती किंवा आदिवासी असे म्हणतात. मानववंशशास्त्रदृष्ट्या वन्य जाती हा भारतीय लोकसमाजाचा प्राचीनतम विभाग आहे. जगातल्या सर्व देशांत वन्य जातींचा आढळ होतो. त्यांची माहिती देतांना निरनिराळ्या लेखकांनी व अभ्यासकांनी त्या त्या देशांच्या प्राचीन परंपरा, इतिहास, सामाजिक संस्था इत्यादिकांस अनुसरून निरनिराळ्या पद्धतींचा अवलंब केलेला आहे. भारतातही प्रशासक, मानववंशशास्त्रज्ञ, सामाजिक कार्यकर्ते, इ. लोकांनी कातडीचा वर्ण, डोक्याचा आकार, भाषा, चालीरीती, राहणी व जातीय परिस्थिती, इ. गोष्टींच्या आधारे क्वचित परस्परविरोधी अशाही कसोट्या लावून वन्य जमातीचे वर्णन केलेले आहे.

भारतात प्राचीन काळी प्रोटो-आस्ट्रलाइड, मंगोलाईड व नेग्रिटो हे भिन्न मानववंश राहत होते. सांप्रत आपण ज्यांना आदिवासी म्हणतो, त्यांची उत्पत्ती वरीलपैकी कोणत्यातरी मानववंशापासून झाली असली पाहिजे, हे मत आता दृढ झाले आहे. आदिवासी हे भारतातील आद्य वसाहतकार मानले जातात. हे लोक आत्मसंरक्षणास तितकेसे समर्थ नव्हते, त्यामुळे भारतात पश्चिम, वायव्य व ईशान्य या दिशांकडून आलेल्या अनुक्रमे द्रविड, इंडोआर्यन व मोंगोलियन या लोकांपुढे त्यांचा टिकाव लागला नाही. नवागत लोक हे संख्याबलानेच नव्हे, तर साधनसामग्रीनेही वरचढ असल्यामुळे वन्य जमातींना त्यांच्यापुढे हार खावी लागली व डोंगरदऱ्यांचा किंवा जंगलांचा आश्रय करावा लागला. आजही ते अशाच जागी कायमची वस्ती करून राहिलेले दिसतात. त्यांच्यापैकी ज्यांनी आपले मूलस्थान सोडले नाही, ते हळूहळू नष्ट तरी झाले किंवा नवागतांशी एकरूप होऊन आपले स्वतंत्र अस्तित्वच हरवून बसले.

या आदिवासींचे सांप्रत अनेक जाती-पोटजातींत विभाजन झालेले असून, त्यातली प्रत्येक जात स्वतंत्र समजली जाते. प्रत्येक जात आपल्या जातीत किंवा पोटजातीतच विवाहसंबंध करते. प्रत्येक जातीच्या स्वतःच्या अशा काही चालीरीतीही आहेत. तथापि सर्वांचा साकल्याने विचार करता सर्व आदिवासींची सामान्य अशी पुढील लक्षणे दिसतात.

(१) ते सुधारलेल्या जगापासून दूर, तसेच दुर्गम दऱ्याखोऱ्यांत राहतात.

(२) नेग्रिटो, प्रोटो– आस्ट्रलाईड किंवा मंगोलाईड यांपैकी कोणत्यातरी एका मानववंशाशी त्यांचा संबंध आहे.

(३) जातिविशिष्ट अशी एकच बोली ते बोलतात.

(४) ते भुताखेतांची व पितरांची पूजा करतात.

(५) शिकार, कंदमुळे, फळे व शेतात पडलेला दाणागोटा, यांवर ते आपली उपजीविका करतात. क्वचित डोंगरातली शेती करतात.

(६) बहुतेक सगळे मांसाहारी असतात.

(७) ते नग्न किंवा अर्धनग्न स्थितीत राहतात. लज्जारक्षणासाठी झाडांची पाने व साली यांचा उपयोग करतात.

(८) त्यांच्यांत भटकण्याची प्रवृत्ती असते.

(९) त्यांना मद्य व नृत्य यांची विशेष आवड असते.

इंडियन कॉन्फरन्स ऑफ सोशल वेल्फेअर वर्क्स या संस्थेच्या विद्यमाने ट्रायबल वेल्फेअर कमिटीचे कलकत्ता येथे जे अधिवेशन झाले, त्या प्रसंगी एकत्र आलेल्या मानववंशशास्त्रज्ञांनी व समाजकार्यकर्त्यांनी सध्या भारतात विद्यमान असलेल्या वन्य जातींचे वर्गीकरण केले आहे, ते असे –

(१) **वन्यसमाज** – दऱ्याखोरी किंवा दाट अरण्ये अशा मूल वसतिस्थानांना धरून राहिलेले व प्राचीन जीवनक्रम चालविणारे लोक या वर्गात येतात.

(२) **अर्धवन्यसमाज** – ग्रामीण भागात गावालगत येऊन वसलेले व शेती आणि तदनुषंगिक व्यवसाय करणारे लोक या वर्गात येतात.

(३) **संस्कारित वन्य जमाती** – जे शहरात किंवा अर्धनागरी प्रदेशात जाऊन सुधारलेल्या उद्योगधंद्यांत पडले आहेत व ज्यांच्यावर आधुनिक जीवनाचे संस्कार झाले आहेत, असे लोक या वर्गात येतात.

(४) **विलीन जमाती** – हिंदुसमाजरचनेत पूर्णपणे विलीन झालेले लोक या वर्गात येतात.

वन्यजमातींची प्रदेशवार विभागणी – गुजरातच्या पूर्वेस, मध्यप्रदेशातील पठाराच्या दक्षिण भागात पसरलेला, विंध्य व सातपुडा यांच्याशी जवळजवळ समांतर असा, जंगले व दऱ्याखोरी यांनी व्यापलेला जो प्रदेश आहे, ते या वन्यजमातींचे प्रमुख वसतिस्थान होय. याच्या खालोखाल वन्यजमातींचा दुसरा मोठा भूप्रदेश म्हणजे आसामला ब्रह्मदेशापासून विभक्त करणारा डोंगराळ प्रदेश हा होय. भारतातील वन्यजमातींची वस्ती ज्या भू-भागात केंद्रित झाली आहे, ते भूभाग विचारात घेऊन वन्य जमातींच्या वस्तीचे भौगोलिक विभाग पुढीलप्रमाणे दिसतात –

(१) हिमालयाला लागून असलेला प्रदेश, भारताच्या पूर्व सीमेवरील पर्वतराजी, मध्यखासिया व गारो टेकड्या हा एक विभाग होय.

(२) नर्मदा व गोदावरी यांच्यामधला प्रदेश, दक्षिण

भारताला व उत्तर भारताला विभक्त करणारी जी पर्वतराजी आहे, ते वन्य जमातीचे प्राचीन काळापासूनचे प्रमुख आश्रय-स्थान आहे. पूर्वेस संताळ परगणा, दक्षिणेस हैद्राबाद (आंध्र), पश्चिमेस गुजरात व उत्तरेस राजस्थान या चतुःसीमांमध्ये हा प्रदेश येतो. यात प्रामुख्याने भिल्लांची वस्ती आहे.

(३) पश्चिम घाटातला, दक्षिणेकडील वायनाडपासून कन्याकुमारीपर्यंत पसरलेला प्रदेश.

वर उल्लेखिलेल्या विभागांखेरीज भारताच्या अन्य काही भागांत व अंदमान-निकोबार या बेटांत राहणाऱ्या वन्यजमातींचा आणखी एक विभाग कल्पिता येईल.

भारतातील भिन्न भिन्न प्रदेशांत पुढील आदिवासी व वन्य जमाती आढळतात –

**आंध्र प्रदेश** – चेंचू, कोया, गदव, जतपुस, कोंडा – दोरा, कोंडा–कापुस, कोंडा – रेड्डी, खोंड, सुगली (लंबागी), येनाडी, येरुकुल, भिल्ल, गोंड, डोंगरी, रेड्डी, कोलाम, वाल्मिकी, परधान (बोगता).

**आसाम** – गारो, खासी, कुकी, मिझो, मिकिरनाग, अबोर, डफला, मिश्मी, अपातानी, सिंग्फो (काचरी).

**बिहार** – असुर, बैगा, बंजारे, बिरहोर, गोंड, हो, खाडीया, खोंड, मुंडा, कोरवा, उरांव, संताळ, माल पहाडिआ, भूमिज, सवर, पहाडिया (मुसाहर, भारु).

**महाराष्ट्र व गुजरात** – भिल्ल, गोंड (यांत अगारिया, असुर, कोया यांचा समावेश होतो), वारली, कोळी, ठाकूर, दुबळा, बैगा, गदव, कमार, कातकरी, खाडिया, खोंड, कोल, कोलाम, कोरकू, कोरवा, मुंडा, उरांव, परधान आणि वाघरी.

**केरळ** – कदर, इरुल, मुथुवन, कनिक्कर, मलंकुरवन, मलयरयन, मलवेतन, मलयन (मालंपटारम येरवा), मन्नन, उल्लतन, उरळी, विशवन, अरनदन, कट्टुनैकन, कोरग, कोत, कुरिच्चियन, कुरुमन, पनियन, पुलयन, मालसर, कुरुंब.

**मध्य प्रदेश** – कोरल, भिल्ल, बैगा, गदबा, गोंड, खोंड, कोल, कोलम, उरांव, परधान.

**तमिळनाडू** – तोड, कदर, इरुल, कोत, अदियन, अरनदन, कट्टुनैकन, कोरग, कुरिचियम, मालसर, कुरुमन, मुयुवन, पसियन, पुलयन, मलयाली, कुरुंब, एरवल्लन, कनिक्कर, मन्नन, पलियन, उरळी, विशवन (हळवा).

**कर्नाटक** – गौदल, हविपिक्वी, इरुलिग (बेरड, सोलेगा) जेनू कुरुब, मलैकुडी, भिल, गोंड, तोड, वारली, चेंचू, कोया, अरनदन, येरव, होलेय, कोरम.

**प. बंगाल** – हो, कोल, मुंडा, उरांव, भूमिज, संताळ, गारो, लेपचा, असुर, बैगा, गोंड, बिरहोर, खोंड, कोरवा, लोहार.

**ओडिसा** – बैगा, बंजारे, बिरहोर, बोंडो, चेंचू, गदबा, गोंड, हो, जतपुस, जुआंग, खडिया, कोल, खोंड, कोया, उरांव, संताळ, सवरा (पोरजा).

**पंजाब** – गद्दी, स्वंगल, भोट.

**राजस्थान** – भिल्ल, गरासिया, दुबळा, गोंड, कोरकू, कोळी, सेहरिया.

**हिमाचल प्रदेश** – गद्दी, गुर्जर, लहौल, लांव, पगवल.

**मणिपूर** – अंगामी, मिझो, कोम, पैते, पुरुम सेमा.

**त्रिपुरा** – लुशाई, मग, कुकी, हलम, खासी, भूतिया, मुंडा, संताळ, भिल्ल, जमतिया, रिआंग व उच्छै.

आदिवासी किंवा वन्य ही काही एकरस, अखंड जमात नव्हे. त्यांच्यात तीनशेहून अधिक वेगवेगळ्या जमाती आहेत. या सर्व जरी वन्य असल्या, तरी भाषा, पोषाख, चालीरीती, देवधर्म या सर्व गोष्टींत त्यांच्यामध्ये खूप फरक आहे.

आदिवासींच्या जुन्या भाषा आता नष्टप्राय झाल्या आहेत. सर्व आदिवासी भाषांत गोंडी ही प्रमुख भाषा होय. ही भाषा सुमारे १५ ते २० लाख लोक बोलतात. तिच्यातही अनेक पोट-भाषा आहेत. कुरुख ही उरांव आदिवासींची भाषा आहे. प्राचीन तमिळ भाषेशी हिचे नाते लागते. खोंड आदिवासी कान्ध किंवा कुई ही भाषा बोलतात. छोटा नागपूर व त्याच्या आसपासच्या प्रदेशात मुंडा भाषा व तिच्या अनेक बोली बोलल्या जातात. सवर व गदव यांच्या स्वतंत्र भाषा आहेत.

कोरकू भाषेचे खेरवारी भाषेशी पुष्कळ साम्य आहे. आसाममध्ये नागा टोळीवाल्यांच्या भाषेशिवाय आणखी वेगवेगळ्या १६ भाषा बोलल्या जातात. पुष्कळशा आदिवासी जमाती द्वैभाषिक आहेत, तर कित्येक आदिवासी आपली मूळ भाषा विसरून गेले आहेत. लिखित वाङमयाची परंपरा नसल्यामुळे व निरनिराळे समाज दूरदूर राहत असल्यामुळे त्यांच्या भाषांची परस्पर दुर्बोधता वाढली आहे.

**सांस्कृतिक विभाग** – भारतातील आदिवासींचे चार मुख्य सांस्कृतिक विभाग पडतात –

पहिल्या गटातील आदिवासी हे खरेखुरे गिरिजन आहेत. त्यांनी आपल्या प्राचीन परंपरा व आचार अजून टिकवून ठेवले आहेत. या कामी त्यांना भौगोलिक परिस्थितीचेही साहाय्य मिळाले आहे. त्यांचा सखल प्रदेशांतील लोकांशी क्वचितच संबंध येतो. त्यांच्या सांस्कृतिक जीवनाचे प्रमुख विशेष पुढीलप्रमाणे –

कुटुंबे मोठी. एक खेडे म्हणजे एक कुटुंबच म्हटले तरी चालेल. सामुदायिक शेजघर. आर्थिक जीवनही सामुदायिकच. काही खेड्यांत धान्याची कोठारेही सामुदायिकच असतात. काही ठिकाणीं कर देखील सामुदायिकच भरला जातो. जमीन

सामुदायिक मालकीची असते. हे आदिवासी गिरिजन दरवर्षी डोंगरातले शेतीपुरते जंगल तोडून व ते जाळून तिथे धान्य पेरतात. [ही त्यांची] पुरातन पद्धत असून त्यांच्या कथांतही तिच्यावर भर दिलेला आढळतो. हे लोक निरागस व प्रामाणिक असतात. त्यांच्यांत गुन्हेगारी जवळ जवळ नसतेच. व्यभिचार हा मोठा अपराध समजतात. हे लोक कपडे अगदी अल्प वापरतात. बस्तर मधील माडिया, जुआंग, गदब, बोंडो, बैगा या आदिवासींच्या स्त्रियांचे वक्षःस्थल उघडेच असते.



मयूर चित्र – कोंड

दुसऱ्या वर्गातले आदिवासी वनप्रदेशांतच राहतात. तेही आपल्या प्राचीन परंपरा सांभाळून आहेत. पण हळूहळू त्यांच्यांत स्थित्यंतर होत आहे. यांचे मुख्य विशेष पुढीलप्रमाणे –

हे व्यक्तिवादी आहेत. त्यांची कुटुंबे सामुदायिक नसतात. प्रत्येकाचे घर वेगळे असते. तथापि त्यांतल्या मुडिया, भुइया व उरांव यांची मात्र शेजघरे सामुदायिक असतात. यांचे व्यवहारही स्वतंत्र असतात. परस्पर स्पर्धेचीही भावना असते. यांच्या जमिनीचे वाटप होते. हे गुरे पाळतात. गरज पडेल त्याप्रमाणे एकमेकांची शेतीची अवजारे वापरतात. यांचा बाह्य जगाशी वारंवार संबंध येतो. पहिल्या वर्गाच्या मानाने हे कपडे अधिक वापरतात. पहिल्या वर्गापेक्षा ते अधिक चलाख व कमी प्रामाणिक असतात.

आदिवासींतला तिसरा गटही बराच मोठा आहे. त्यांचा बाह्य जगाशी वरचेवर संबंध येत असल्यामुळे त्यांची जुनी संस्कृती, धर्मविषयक कल्पना व सामाजिक संघटना, या गोष्टी लुप्त होण्याच्या मार्गावर आहेत.

चौथा गट खानदानी आदिवासींचा. भिल्ल, नागांचे टोळीप्रमुख, गोंड राजे, भुइया जमीनदार, कोरकूंतली कुलीन घराणी, संताळांतले श्रीमंत, उरांव लोकांचे मुखंड व शिक्षण घेतलेले मुंड, यांचा या गटात समावेश होतो. यांनी आपल्या प्राचीन संस्कृतीचा पूर्णतया त्याग केलेला नसला, तरी या लोकांवर हिंदूधर्माचे बरेच संस्कार झालेले आहेत. या गटातील सुखवस्तू आदिवासींनी स्वपराक्रमावर समाजात मानाचे स्थान मिळविले आहे. या गटात मंत्रिपद भूषविणारे, मोठे सरकारी अधिकारी, विद्वान् व धर्मोपदेशकही आहेत. हिंदूंशी व ख्रिस्ती मिशनऱ्यांशी संपर्क आल्यामुळे त्यांच्यांत ही सुधारणा झालेली आहे.

पण या अन्य संस्कृतींच्या संपर्कामुळे या लोकांचे काही बाबतीत नुकसानही झाले आहे. लैंगिक रोग, क्षय, वेश्याव्यवसाय, लांडीलबाडी, इ. अनिष्ट व्याधी व दुर्गुण त्यांच्यांत शिरले आहेत. नागा आदिवासींत बरेच लोक ख्रिस्ती झाले आहेत. या धर्मांतरामुळे त्यांना पाश्चात्य राहणी व पोशाख यांची गोडी वाटू लागली आहे. पण आर्थिक दृष्ट्या त्यांना या दोन्ही गोष्टी परवडण्याजोग्या नसल्यामुळे त्यांची कुचंबणा होत आहे. त्यांची जुनी जीवनशक्तीही कमी कमी होत आहे. त्यांचे जुने सामाजिक जीवन नष्ट झाले आहे. याचे प्रमुख उदाहरण म्हणजे नृत्य. पूर्वी आदिवासींच्या जीवनात नृत्याला फार मोठे स्थान होते. पण आता त्यांच्यांत नृत्याचे समारंभ क्वचितच होतात. कारण, नृत्य करणे त्यांना आता कमीपणाचे वाटते. ब्रिटिश राज्य कारभार आणि ख्रिस्ती मिशनऱ्यांचा धर्मप्रचार, या गोष्टींनी तिसऱ्या व चौथ्या गटांतल्या आदिवासींच्या सामाजिक व सांस्कृतिक जीवनाची उलथापालथ करून टाकली. त्यांचे वांशिक ऐक्य, सणांचा आनंद, सामुदायिक जीवनातली अद्भुतरम्यता, रंगीबेरंगी पोशाखाची आवड या गोष्टी ख्रिस्ती मिशनऱ्यांनी सततच्या प्रचाराने नष्ट करून टाकल्या आहेत.



कलात्मक तपकिरीची डबी

ख्रिस्ती मिशनऱ्यांना हिंदू धर्माच्या मदतीशिवाय कुठल्याच आदिवासीत आपला धर्मप्रसार करता आला नाही. ज्या लोकांत हिंदू धर्माचा प्रवेश झाला होता, तिथेच ख्रिस्ती मिशनऱ्यांना आपला धर्मप्रचार करणे शक्य झाले. इतर ठिकाणी ते आदिवासींचे धर्मांतर करण्यात अपयशी ठरले आहेत.

ब्रिटिशांच्या राज्यकारभारामुळेही आदिवसींच्या अवनतीत भर पडली. शहरवासी लोकांकडून त्यांची पिळवणूक होऊ लागली. सावकारांनी त्यांच्या जमिनी घशात घातल्या. सरकारने त्यांना जंगलतोड करून शेती करण्यास प्रतिबंध केला, त्यामुळे डोंगरांतील आदिवासी शेतीला मुकले. बहुतेक आदिवासींच्या सणात शिकार हा महत्त्वाचा भाग असतो. परंतु सरकारी निर्बंधांमुळे त्यांना हल्ली शिकार करता येत नाही. त्यांच्या मद्यपानावरही अनेक निर्बंध पडले आहेत. शिकार व मासे हे त्यांचे

महत्त्वाचे अन्न. पण तेच हल्ली दुर्मिळ झाल्यामुळे त्यांचे जीवन खुरटत चालले आहे.

शिकारीप्रमाणे दारू ही देखील आदिवासींच्या जीवनातील महत्त्वाची बाब आहे. त्यांचा कुठलाही सण-उत्सव दारूवाचून साजरा होत नाही. त्यांच्या धार्मिक कृत्यांनाही दारू लागते. पूर्वी त्यांना दारू गाळण्यास प्रतिबंध नव्हता; पण आता त्यांना आपल्या हातभट्ट्या चालविता येत नाहीत.

हल्ली आदिवासींमध्ये शिक्षणाचा प्रसार पुष्कळच होऊ लागला आहे. याचे श्रेय अर्थात भारतीय स्वातंत्र्याला दिले पाहिजे. ब्रिटिश आमदानीत त्यांच्या शिक्षणाकडे दुर्लक्षच केले गेले. त्या काळी आदिवासींच्या प्रदेशातील प्राथमिक शाळा जिल्हा सल्लागार मंडळाच्या हाती असत. या मंडळावरचे सभासद जमीनदार, वकील आणि व्यापारी या वर्गातले असत. आदिवासींची अनेक प्रकारे पिळवणूक करून ते गबर झालेले असत. त्यामुळे आदिवासींच्या शिक्षणाला त्यांचा मनातून विरोध असे. हे लोक शिकले सवरले, तर ते आपणावर उलटतील व आपल्या स्वार्थाला टाच लागेल, अशी त्यांना भीती वाटे. पण भारताला स्वातंत्र्य मिळाले आणि ही स्थिती पालटली. भारत सरकारने त्यांच्या अभ्युदयाकडे लक्ष दिले. त्यांच्या मुलांना शेती व विविध धंदे यांचे तांत्रिक शिक्षण मिळण्याचीही सोय केली.

या शिक्षणप्रसारामुळे आदिवासींचा व्यावहारिक फायदा होऊ लागला ही गोष्ट खरी; पण, फायद्याबरोबरच काही तोटेही



नवरदेवाचे बाशिंग

झाले, हे विसरता येणार नाही. आदिवासी मुले शिक्षणासाठी शहरांत आली, की ती शहरी जीवनाचे अनुकरण करतात. त्यांना फिरून आपल्या समाजात जावेसे वाटत नाही. त्यांना आपल्या चालीरीतींचीही लाज वाटू लागते. काही गोष्टी अशा असतात की त्यांचे जतन व्हायलाच हवे आहे. उदा० आदिवासींची गाणी व त्यांचे नृत्य. त्यांच्या या दोन्ही कला उच्च दर्जाच्या आहेत. पण आज मितीस त्यांचा हळूहळू लोप होत आहे. काही आदिवासींच्या मुलांचे, विशेषत: मुडिया आदिवासींच्या मुलांचे खेळ फारच मनोरंजक असतात. पण या दर्जेदार खेळांची आज उपेक्षा होऊ लागली आहे.

मृत पूर्वजांना न विसरणे, भूमीचे प्रेम, बहुरंगी सण-उत्सव, शिस्तीचे नियम, या गोष्टी अशा आहेत, की त्या आदिवासी जीवनातून जाता कामा नयेत. त्या जतन करण्यासाठी सरकारने व सुसंस्कृत लोकांनी काळजी घेतली पाहिजे. काही आदिवासींची सामुदायिक अर्थयोजना व त्यांचे सामुदायिक जीवन, हे तर आधुनिक जगाहून कितीतरी वर्षांनी पुढे आहे. प्रत्येक वस्तू विभागून खाणे व एकमेकांच्या सुखदुःखात सहभागी होणे या त्यांच्यांतल्या प्रवृत्ती निस्संशय स्पृहणीय आहेत. त्यांचा साधेपणा, प्रामाणिकपणा, विनोदबुद्धी हे सद्‌गुणही विलोभनीय आहेत. कौटुंबिक निष्ठा हा त्यांचा आणखी एक गुणविशेष. सुधारलेल्या जगानेही या बाबतीत त्यांचा कित्ता गिरवावा. पण आजच्या शिक्षणपद्धतीमुळे आदिवासी समाज या सद्‌गुणांना आणि सहजप्रवृत्तींना मुकत चालला आहे.

आदिवासींचे परंपरागत जीवन साधे आणि समाधानी असते. नैसर्गिक आनंदाने ते परिपूर्ण असते. आदिवासी नेहमी अरुणोदयापूर्वी उठतात, भोपळ्यांतल्या पाण्याने तोंड धुतात, आदल्या रात्री करून ठेवलेली पेज पितात. धडधाकट माणसे सूर्योदयाबरोबरच कामाला जातात. म्हातारी माणसे घरी राहतात. ती टोपल्या, चटया वगैरे विणणे, धान्य सुकी फळे वगैरे वस्तू उन्हात वाळविणे, इ. कामे करतात. पुरुष जंगलांतील झाडे तोडून लाकडे करतात. बायका पत्रावळी व द्रोण यांच्यासाठी पाने गोळा करतात आणि कंदमुळे व रानटी फळे मिळवून आणतात. धाडसी तरुण डोंगरकड्यांवर चढून मध गोळा करतात. मुले शेळ्या-मेंढ्यांना चारायला नेतात व रानटी उंदीर व पाखरे यांची शिकार करतात. बांसरी हे बहुतेक आदिवासींचे आवडते वाद्य. रानावनातून त्याचे स्वर निनादत राहतात. प्रेमी युगुले झाडावर चढून एकमेकांस उद्देशून प्रेमगीत म्हणतात.

बहुतेक आदिवासी जमातींत स्त्रीचे स्थान उच्च आणि मानाचे असते. सगळीकडे ती अनिबंध संचार करते. आपल्या नवऱ्या बरोबर ती शेतात व जंगलात काम करते. तिचे लग्न ती वयात आल्यानंतर होते व तो संबंध जर अयशस्वी झाला तर तिला घटस्फोट घेण्याचा अधिकार असतो. तिचा पती निधन पावला तरी तिला वैधव्यात राहावे लागत नाही. ती पुनर्विवाह

करू शकते. काही आदिवासींत तर तिला मृत पतीची मालमत्ता प्राप्त होते. तिचे जीवन असे मुक्त असल्यामुळे तिच्या मनात नेहमी काव्यमय विचार घोळत असतात. तिच्या जिभेवर विनोद नाचत असतो. ती सर्व कार्यांत पतीची सहधर्मिणी असते.

आदिवासी लोक दिवसातून दोनदा जेवतात. पहिले जेवण सकाळच्या पहिल्या प्रहरानंतर व दुसरे सूर्यास्ताच्या सुमारास. डोंगरी भात व कडधान्ये हे त्यांचे मुख्य अन्न होय. पूरक अन्नात कंदमुळे, डाळी, मका, महुआ, चिंच, इ. वस्तूंचा अंतर्भाव असतो. त्यांच्यापाशी जनावरांची कमतरता असल्यामुळे मांसाहारासाठी त्यांना ससे, खारी, वाघुळे, उंदीर वगैरे प्राण्यांवर अवलंबून राहावे लागते. कांही भुकेकंगाल आदिवासी माकडाचे व गायी-चेही मांस खातात. सायंकाळी कामावरून घरी आल्यावर ते ताडी पितात. रात्रीचे जेवण झाल्यावर लगेच निद्राधीन होतात. म्हातारी माणसे शेकोटीभोवती गोष्टी करीत बसतात व सामुदायिक शयनगृहांतून मुलामुलींचे हास्यकल्लोळ ऐकू येतात.

वरील दैनंदिन जीवनात काही वेळा व्यत्यय येतो, तो पुढील कारणांनी – परवानगी काढून करण्यात येणारी मोठी शिकार, सामुदायिक मच्छीमारी, जंगली हत्ती किंवा वाघ यांचा पाठलाग, सण, लग्ने व नृत्याच्या सफरी.

आदिवासींचे जीवन सुखी व समृद्ध नसले, तरी ते स्वतंत्र असते, हे त्याचे वैशिष्ट्य ! बाकी त्यांनाही चिंता व विवंचना असतातच. रोगराई व भय यांच्याशी त्यांना सदैव सामना द्यावा लागतो. डास त्यांना सतावून सोडतात. निरनिराळ्या साथींनी ते हैराण होतात. पावसाच्या अनियमितपणामुळे त्यांच्या पिकांची नुकसानी होते. नाना प्रकारच्या सरकारी कायद्यांनीही ते संत्रस्त असतात.

**आदिवासी धर्म** – आदिवासींचा धर्म मूलतः निसर्गवादी आहे. निसर्गातल्या प्रत्येक वस्तूंत एक काहीतरी शक्ती असते आणि त्या शक्तीला मानवी जीवनात बरेवाईट स्थान असते, असे ते मानतात. मृतात्मे व निसर्गातल्या दुष्ट शक्ती यांच्या कल्पनेवर आदिवासींचा धर्म आधारलेला आहे. आदिवासींचे मृतात्मे म्हणजे त्यांचे पितर होत. ते दगडांत, नद्यांत व झाडांवर राहतात. झाडे-झुडपे व जनावरे माणसाशी बोलू शकतात व त्याच्या भवितव्यावर प्रभाव पाडतात, असे कोरवा आदिवासींना वाटते. माणसाच्या अंगांतही एक अदृश्य अशी शक्ती असते, असे बंगालमधील पोलिया आदिवासी समजतात. ते कोणालाही आपला फोटो काढू देत नाहीत. त्या फोटोबरोबर त्या माणसातली शक्ती निघून जाते, अशी त्यांची समजूत आहे. निसर्गाची प्रक्रिया लहरी अशा विशिष्ट शक्तींच्या हातात असते, अशी त्यांची समजूत आहे. म्हणून तिला नियंत्रित करून तिच्याकडून इष्ट कार्य साधून घेण्यासाठी ते जमातीतल्या देवर्षी, भगत किंवा पुरोहित अशा लोकांचा सल्ला घेतात व त्यासाठी उपाय व उपचार करतात.



धार्मिक कृत्यांसाठी मुखवटा

आदिवासी धर्म ही एक प्रकारची सत्ता-स्पर्धा असते. निसर्गातल्या दुष्ट शक्तींवर विजय मिळविण्याचा तो एक लढा असतो. प्रत्येक आदिवासी जमातीची शक्ती-विषयक कल्पना भिन्न भिन्न असते. ती धूसर अतएव अस्पष्ट असते. पण सर्व श्रद्धा आणि उपासना यांचे तीच मूळ कारण असते. ज्या नैसर्गिक घटनांचा त्यांच्या जीवनावर परिणाम होतो, त्यांचा अर्थ लोक त्यांना मिळालेल्या अनुभवांवरून लावतात. त्या घटनांचा कोणत्या तरी शक्तीशी, देवाशी, किंवा मृतात्म्याशी ते संबंध जोडतात. मृतात्म्यांची शक्ती आपल्याला उपकारक ठरावी, या हेतुनेच ते त्यांची पूजा करतात.

पशुपक्षी ही आणखी एक शक्ती होय. तिच्या आराधनेतून त्यांच्यांतल्या पशुपूजेचा जन्म झाला आहे. वृक्षोपासना हीही त्याच श्रद्धेतून निर्माण झाली आहे. आदिवासी लोक वृक्षांना सुबत्तेचे प्रतीक समजतात. दगड, पिसे, हाडे, मणी, इ. पदार्थ देखील सजीव आहेत आणि त्यांच्यामध्येही गूढ शक्तीचे वास्तव्य आहे, असे ते समजतात. म्हणूनच आदिवासींच्या धर्मात जादू-टोण्याला विशेष महत्त्व प्राप्त झाले आहे. महामारी, तापसरी, देवी, इ. प्राणघातक साथींनाही त्यांनी शक्तिरूप देवत्व कल्पिले असून, त्या त्या देवांना त्यांनी नावेही दिली आहेत. त्या शक्तींची बाधा होऊ नये म्हणून विशिष्ट प्रसंगी त्या शक्तिरूप देवतांना ते बलिदान करतात.

दुष्ट शक्तींप्रमाणेच सौम्य व उपकारक शक्तींचीही आदिवासींना जाणीव आहे. अशा शक्तींच्या उपासनेचाही अंतर्भाव त्यांच्या धर्मात होतो. धरती, वनस्पती, सूर्य, चंद्र, व तारे यांचीही ते पूजा करतात. मुंडा लोक सूर्याला 'सिंगबोंगा' म्हणतात. त्यांच्या मते हा देव चांगला असून, तो कोणाचेच अकल्याण करीत नाही. प्रत्येक आदिवासी जमातीचा, जमात

निर्माण करणारा असा एक देव असतो. तो देवही त्या जमातीचे नेहमी कल्याणच करतो. पण आश्चर्याची गोष्ट ही, की या



मुडिया गोंडांची फणी

कल्याणकर्त्या देवांकडून त्यांना कसलीच भीती नसल्यामुळे ते त्यांच्यापेक्षा दुष्ट देवांचीच पूजा मोठ्या श्रद्धेने करतात.

बोंगा या नावाने कित्येक आदिवासींनी आपल्या सर्वश्रेष्ठ देवाची कल्पना केली आहे. हिंदूंच्या परमेश्वराचे बरेच गुणधर्म बोंगामध्ये आहेत. बोंगाच्या या कल्पनेनेच ते हिंदूंच्या पौराण धर्माच्या जवळ आले आहेत.

**आदिवासी संस्कृती** – आदिवासींच्या भाषेतच नव्हे, तर त्यांच्या आचार-विचारांतही भरपूर विविधता आढळते. काही जमातींत पितृप्रधान कुटुंबसंस्था आहे, तर काहीत ती मातृ-प्रधान आहे. काही जमातींत बहुपत्नीकत्व आहे, तर काहीत बहु-पतित्वही आहे. काहीत उच्च-नीच अशा कुळचाही आहेत. काही जमातींत अस्पृश्यताही आढळते. परधान हे गोंडांचे आश्रित व अस्पृश्य गणले जातात. गंदा, पंका, कम्मार, ओझा, नागरची, इ. आदिवासी अस्पृश्य गणले जातात. ज्यांनी आपले सांस्कृतिक स्वातंत्र्य टिकवून ठेवले आहे, असे गोंड, मेइथेइ, हे स्वतःला क्षत्रिय समजतात. सामान्यतः निकृष्ट शेती करणारे हीन व उत्कृष्ट शेती करणारे उच्च समजले जातात.

आदिवासींच्या संस्कृतीची घडण अगदी साधी आहे. जे काही विनामूल्य व सुलभतेने मिळते, त्यावर ते आपल्या चालीरीती, हौसामौजा व उत्सव–समारंभ भागवून नेतात. सामान्यतः सर्व आदिवासींत स्वातंत्र्यप्रियता आढळते. नोकरी करणे किंवा कायमचे एखाद्या ठिकाणी स्वतःला बांधून घेणे, हे त्यांना आवडत नाही. एखादी नोकरी सोडून द्यायला त्यांना नाममात्र निमित्त पुरते.

बहुतेक सर्व आदिवासींना विस्तव तयार करणे, हत्यारे बनविणे, घरे बांधणे, मातीची भांडी बनविणे, लाकुडकाम करणे, व वस्त्रे विणणे, या कला अवगत असतात. प्रत्येक जमातीला आपली अशी स्वतंत्र भाषा आहे. शिक्षणाची किंवा पारंपरिक ज्ञान देण्याघेण्याची पद्धतही सर्वत्र सारखीच आहे. काय करावे व काय करू नये याचे शिक्षण प्रत्येक आदिवासीला त्याच्या आई-बापाकडून मिळत असते. परंपरागत लोककथा, दैवतकथा, यांच्या आधारे त्यांचे जीवन-व्यवहार नियमित होतात. जी गोष्ट त्यांच्या कल्पनेच्या आटोक्यात येत नाही, ती करून दाखविणारी व्यक्ती त्यांना असामान्य वाटते.

नृत्य ही त्यांच्या आनंदाची परिसीमा आहे. काही आदिवासी चर्मवाद्ये व सुषिरवाद्ये स्वतः बनवितात व नृत्यात त्यांचा उपयोग करतात. नृत्यात बेहोषी येण्यासाठी दारू पिण्याची चाल बहुतेक आदिवासींत आहे. त्यांची नृत्ये त्यांच्या देवाधर्माशी संबद्ध असतात.

समाजव्यवस्था अगदी साधी असते. जोवर मुलांना स्वतःचे अन्न स्वतंत्ररीत्या मिळविणे शक्य नसते, तोवरच आईबाप त्यांची जबाबदारी वाहतात. मुले-मुली वयात आल्यावर त्यांची लग्ने होतात. स्त्री-पुरुषांवर विशिष्ट कालात काही बंधने असतात. गरोदरपणी स्त्रियांनी पाळावयाचे नियम प्रत्येक जमा-तीत निरनिराळे असतात. जन्म, मृत्यू, विवाह, इ. प्रसंगी पुरुषांनी पाळायचे नियमही भिन्न भिन्न असतात. मुलांना पूर्वजांची नावें ठेवतात. मृतात्म्यांच्या संतोषासाठी श्राद्धासारखे काहीतरी विधी करायची प्रथा सर्व आदिवासींत आढळते. बायका अंगावर गोंदून घेतात. जुन्या काळी स्तनांवर व पाठीवर चोळीसारखे गोंदून घेण्याची प्रथा होती; पण आता ती हळूहळू नष्ट होत आहे.

**विवाहपद्धती** – विवाह कोणाशी करावा, या बाबतीत आदिवासींत काही नियम ठरलेले आहेत. प्रत्येकाने आपल्या जमातीतूनच आपला जोडीदार निवडला पाहिजे, असा नियम आदिवासी जमातीत दिसून येतो. याचप्रमाणे एखाद्या विशिष्ट प्रदेशात राहणाऱ्या जमातीने त्याच प्रदेशातील व एका गावातील लोकांमधून जोडीदार निवडला पाहिजे, असेही काही नियम आढळतात. काही वेळा एखाद्या जमातीचे काही विभाग पडतात व ते वेगवेगळ्या ठिकाणी राहू लागतात. त्यांच्यापैकी एखाद्या विभागातील लोक आपल्याला इतर विभागापेक्षा श्रेष्ठ मानतात व त्या विभागातील लोकांशी रोटी-बेटीव्यवहार करीत नाहीत. ते फक्त आपल्या विभागात लग्ने करतात. उदा० ढोर, कातकरी व सोन कातकरी परस्परांशी विवाह करीत नाहीत. एकाच कुटुंबातील लोकांनी आपापसात विवाह करायची प्रथाही काही जमातींत आढळते. केरळच्या पेरिंथलमन्न तालुक्यातील अल्लार जमातीत बापाने आपल्या मुलीबरोबर विवाह करण्याचा रिवाज

अजून चालू आहे. तसेच, केरळमधील कुडिय व विषवन या जमातींत विधवा मातेने आपल्या मुलाबरोबर विवाह करणे आवश्यक समजले जाते. याच्या उलट काही आदिवासींत एकाच कुटुंबात, एकाच कुलात, एकाच आडनावात, एकाच गावात किंवा देवकात विवाह करू नयेत, असेही नियम आहेत.



लग्नातला ठाणदिवा

आते-मामे भावंडे, चुलत किंवा मावस भावंडे, दीर-भावजय व मेहुणा-मेहुणी यांचे विवाह आदिवासींना मान्य आहेत.

वधूपक्षाला कसलाही मोबदला न देता वधू मिळवण्याच्या पद्धतींना रूढ संप्रदायानुरूप नसलेल्या पद्धती असे म्हणतात. या पद्धती सर्वथैव निषिद्ध नाहीत. पण समाजात त्यांना विशेष मान्यता असत नाही. यात अपहरणविवाह, परीक्षणविवाह, सहपलायनविवाह, हठागमनविवाह व परस्पर संमतिविवाह हे प्रमुख आहेत. प्रत्यक्ष अपहरणाच्या प्रकारात वधूपक्षाच्या लोकांवर हल्ला करून वधूचे जबरदस्तीने हरण केले जाते. नागा लोकांत अशी पद्धत होती. औपचारिक अपहरणाच्या प्रकारात वधूचे वास्तविक अपहरण न करता तिच्या अपहरणाचे नाटक केले जाते. या प्रकारात सर्वसाधारणपणे एखाद्या सार्वजनिक ठिकाणी प्रियकर आपल्या प्रेयसीच्या मस्तकावर चारचौघां-समक्ष सिंदूर टाकतो. नंतर दोन्ही पक्षांत वाटाघाटी होऊन त्यांचे लग्न लावतात. वारली जमातीत अशी प्रथा आहे. परीक्षणविवाहात वराच्या अंगातील धाडस, शौर्य, इ. गुणांची परीक्षा करून मग त्याला मुलगी देतात. घरातून विवाहाला विरोध झाला असता प्रियकर-प्रेयसी पळून जाऊन पति-पत्नी-प्रमाणे राहू लागतात. हा सहपलायन विवाह होय. एखाद्या मुलीला एखादा मुलगा आवडला असल्यास आणि तो तिच्याशी लग्न करायला तयार नसला, तर मुलगी त्याच्या घरात घुसते आणि त्याच्याशी लग्न करण्याचा हट्ट धरून बसते. मग नाइलाजाने तिचे लग्न त्या मुलाशी लावून द्यावे लागते. संताळ जमातीतील अशी मुलगी तांदळाच्या दारूचे भांडे घेऊन मुलाच्या घरात शिरते व तिथेच राहण्याचा हट्ट करते. घरातील माणसे तिला मिरचीचा धूर देतात. पण तो त्रास सहन करून ती तिथेच राहिली तर त्या घरात सून म्हणून राहण्याचा अधिकार तिला आपोआप प्राप्त होतो. हा हठागमन विवाह होय. तरुण-तरुणींच्या एकमेकांच्या संमतीने होणाऱ्या विवाहाला परस्पर संमतिविवाह असे म्हणतात. मध्यप्रदेशातील गोंड जमातीत प्रेयसीने आपल्या प्रियकराच्या अंगावर हळदीचे पाणी टाकले म्हणजे त्या दोघांचे लग्न झाले, असे समजतात.

उत्तर भारतातल्या आदिवासींत मुले-मुली वयात आल्यावर त्यांचे विवाह होत असले, तरी त्यांच्यामध्ये विवाहपूर्वकालात लैंगिक संबंध घडून येतात. पण द. भारतातल्या आदिवासींत मात्र असे प्रकार होऊ नयेत, याची काळजी घेतली जाते. दक्षिणेत मुला-मुलींची शयनगृहे वेगवेगळी असतात. विशेषतः अविवाहित मुलींच्या शयनगृहावर जमातीतल्या वृद्ध स्त्रियांची कडक देखरेख असते. विवाहाचे प्रकार कालमान आणि समाजस्थिती यांच्या अनुरोधाने बदलत आले आहेत. हे प्रकार पुढीलप्रमाणे आहेत –

(१) **राक्षसविवाह किंवा जबरीविवाह** – हा प्रकार सर्वांत प्राचीन होय. याचे अवशेष आजही केरळात मन्नान व मुथुवन या गिरिजनांत पाहायला मिळतात. विवाह निश्चित झाला, की मुथुवन नवरदेव आपल्या वधूला जंगलात पळवून नेतो. मन्नान तरुणाचे एखाद्या मुलीवर प्रेम बसले व तिने जर त्याच्याशी विवाह करण्यास नकार दिला, तर तो तरुण तिला रानात पळवून नेतो व काही काल तिच्यासह राहतो. नातेवाईक मग त्यांचा शोध करून त्यांना घरी आणतात व त्यांचे लग्न लावून देतात. खारिया व बिरहोर या जमातींतही तरुण मुलगे आवडलेल्या मुलीला एकटे गाठून तिच्या अंगाला तेलहळद लावतात. विवाह-संबंधाची ती प्राथमिक निशाणी समजली जाते. एकमेकांच्या वस्तीवर हल्ले चढवून किंवा जत्रेत दोन जमाती एकत्र जमल्या असता दुसऱ्या जमाती-वर हल्ला करून मुलीचे अपहरण करण्याची चाल कित्येक आदिवासींत होती. आजही ती कुठे कुठे दिसते.



गोंडांचा लोखंडी दीपस्तंभ

(२) **सेवाविवाह** – वधूपित्याच्या घरी काही काळ नोकरी करून त्या नोकरीच्या मोबदल्यात वधू मिळविणे, अशीही पद्धत मन्नान, पलियन, गोंड, बैगा, इ. जमातींत आहे. जेव्हा वधू मिळविण्यासाठी द्रव्य देणे दारिद्र्यामुळे अशक्य असते, तेव्हा आदिवासी तरुण अशा सेवाविवाहाचा मार्ग अवलंबितात.

(३) **क्रयविवाह** – वधूच्या बापाला पैसे किंवा अन्य वस्तू देऊन मुलगी मिळविणे, ही प्रथा आजही सर्वत्र रूढ आहे. मुलींची किंमत निरनिराळ्या आदिवासी जमातींत कमीजास्त असते. हो जमातीत मुलीची किंमत फार असते. त्यामुळे लग्ने जमणे अवघड होते. म्हणूनच त्या जमातीत वाढलेल्या मुली व अविवाहित पुरुष पुष्कळ आढळतात. त्यांतले कित्येक धाडसी तरुण मग राक्षसविवाहाचा अवलंब करतात. नागा आदिवासींतल्या आओ व अंगामी या आदिवासींत मुलींचे दर कमी असल्यामुळे स्त्रियांचा दर्जाही कमी आहे. याच्या उलट रेंगमा जमातीत मुलींची किंमत वाजवी असल्यामुळे त्यांचा दर्जा उच्च असतो व त्यांना संरक्षणही चांगले मिळते.

(४) **साटेलोटे विवाह** – एकमेकांच्या बहिणी एकमेकांना देऊन विवाहबद्ध होण्याची दक्षिणेतल्या कित्येक आदिवासींत प्रथा आहे. त्यामुळे ज्या मुलाला बहीण नसते त्याचे लग्न होणे कठीण जाते. विशेषतः उरळी जमातीत ही चाल कडक आहे. मामाच्या मुलाशी सर्रास लग्न होते. आतेबहिणीशी मात्र ते काही तुरळक जमातींतच होते.

**एकपत्नीकत्व व बहुपत्नीकत्व** – काही वन्य जमातींत एक बायको असता दुसरी करण्याची प्रथा नाही. अनेक बायका करण्याची चाल नागा, गोंड, बैगा, इ. अनेक जमातींत आहे. पुरुष आणि स्त्रिया यांच्या संख्येतली विषमता हे बहुपत्नीकत्वाचे एक कारण आहे, असे मानतात. दुसरे कारण म्हणजे, अनेक बायका केल्याने एखाद्याच्या भौतिक सुखात अधिक भर पडते. काम करायला सत्तेची माणसे अधिक मिळाल्याने त्याच्या आर्थिक उत्पादनातही वाढ होते व त्यामुळे त्याचा सामाजिक दर्जाही उंचावतो. म्हणूनच उरळी आदिवासीत एखादा पुरुष जितक्या बहिणी असतील तितक्या बायका घरी आणू शकतो.

**बहुपतिकत्व** – ज्या जमातींत स्त्रियांपेक्षा पुरुष अधिक असतात, तिथे बहुपतिकत्वाची प्रथा संभवते. सामान्य नियम असा, की जिथे सुबत्ता असते, तिथे स्त्रियांची संख्या अधिक असते व जिथे अन्नाची कमतरता असते, तिथे पुरुष अधिक असतात. मालापुलयन, उरळी, पलियन या जमातींत स्त्रियांहून पुरुष अधिक आहेत. त्यामुळे त्या जमातींत तसेच खासी, तोड कोटा, इ. जमातींत अनेक भावांना मिळून एकच बायको असते. कित्येक वेळा चुलत भावांचीही एकच बायको असते.

**घटस्फोट व पुनर्विवाह** – व्यभिचार, वांझपणा, विजोडपणा पुरुषांमधले व्यंग व षंढत्वादी दोष इ. कारणांसाठी सर्व आदिवासींत स्त्रीला लग्नविच्छेदाचा अधिकार आहे. परस्परांच्या संमतीनेही त्यांना विभक्त होता येते. मात्र, ज्या व्यक्तीला विभक्त व्हायचे असेल, त्या व्यक्तीने दुसऱ्या व्यक्तीस नुकसानभरपाई दिली पाहिजे. विधवेला पुनर्विवाह करण्याचा अधिकार असतो. पुष्कळ ठिकाणीं ती आपल्या धाकट्या दिराशी लग्न करते. काही थोड्याच जमातींत तिला थोरल्या दिराशी लग्न करता येते.

**ऋतुप्राप्ती व लैंगिक संबंध** – पुष्कळ आदिवासींत मुली वयात आल्यावरच त्यांचे विवाह होत असले, तरी काही जमातींत बालविवाह रूढ आहेत. अशा विवाहानंतर मुलीला रजोदर्शन होण्यापूर्वीही तिचा पतीशी संबंध घडवून आणण्याची चाल दक्षिणेतल्या काही आदिवासींत आढळते. अशा अकाली संभोगामुळे स्त्री-पुरुषांच्या आरोग्यावर व प्रजोत्पादनावर अनिष्ट परिणाम झालेला दिसून येतो. कनिकूकार जमातीत गर्भस्रावाचे प्रमाण फार आहे, त्याचे कारण हेच असावे, असे मानतात.



भांड्यांवरील चित्रकला

**व्यभिचार** – आदिवासी लोक स्त्रीच्या नैतिक आचरणाला फार महत्त्व देतात. तिचे पाऊल वाकडे पडले, तर तिला कडक शिक्षा मिळते. व्यभिचार हा मोठा गुन्हा मानला जातो. दक्षिणेतल्या काही आदिवासींत व्यभिचाराबद्दल पुरुषाला झाडाला उलटे टांगून खालून धूर देत असत. शिवाय त्याला पंचवीस फटकेही मारीत. स्त्रीला पंधरा फटक्यांची शिक्षा असे; पण ती शिक्षा अलिकडे कायद्याने बंद झाली आहे. व्यभिचाराच्या कारणास्तव स्त्रीला घटस्फोटही दिला जात असे. पूर्वी आदिवासी लोकांचा सुधारलेल्या जगाशी क्वचितच संपर्क येई; पण अलिकडे हा संपर्क वाढत चालल्यामुळे आदिवासींच्या नैतिक आचरणावर त्याचा अनिष्ट परिणाम होऊ लागला आहे. त्यांच्या स्त्री-पुरुष संबंधांत शैथिल्य निर्माण होऊ लागले आहे.

**आदिवासींचे विधिनिषेध** – आदिवासी कपडे कमी वापरतात; पण वस्त्रांविषयी त्यांच्यांत आख्यायिका पुष्कळ आहेत. बोंडो आदिवासी हे बहुतांशी नग्न असले तरी ते स्वतः वापरीत नसलेल्या विविध वस्त्रांच्या कथा सांगतात. छत्तिसगडचे

आदिवासी कमरेभोवती केवळ एक वस्त्राची पट्टी वापरतात. त्याबद्दल ते दंतकथा सांगतात ती अशी —

एकदा महादेव कपडे वाटीत होता. त्या वेळी सगळे लोक तिथे वेळेवर जमले; पण उशीर केला तो छत्तिसगडी लोकांनी. महादेव त्यांना म्हणाला. 'आता तुमच्या वाट्याला कापडाच्या काही पट्ट्या उरल्या आहेत, त्या तुम्ही घ्या !'

हो आदिवासी जांभई देताना तोंड झाकून घेतात. तसे केले नाही तर तो माणूस वाघाचे भक्ष्य होतो, असे समजतात. याशिवाय, या जांभईचा संबंध त्यांनी मुलीचे देज घेण्याशी लावलेला आहे. ती कथा अशी —

एका मुंडाच्या मुलीने तोंड झाकून न घेता जांभई दिली. त्यासाठी लोकांनी तिला वाघाच्या गुहेत नेऊन ठेवले. एका धनगराने ही गोष्ट दुरून पाहिली. त्याने संध्याकाळी त्या गुहेत जाऊन वाघाला मारले आणि त्या मुलीला आपल्या घरी आणले. ती दोघे पतिपत्नीच्या नात्याने राहू लागली. कालांतराने ती गोष्ट उघडकीस आली. मुंडांनी त्या धनगराला मारायचा बेत केला. धनगर घाबरला. तो मुंडांकडे जाऊन म्हणाला. 'मी तुम्हांला एक रेडा व तीन विसा गाई देतो. तुम्ही आमच्या लग्नाला परवानगी द्या.' मुंडांनी ती गोष्ट मान्य केली व तेव्हांपासून मुलाकडून मुलीचे देज घेण्याची प्रथा पडली.

हिंदूंप्रमाणेच आदिवासीही लग्नात कुंकू वापरतात. हे कुंकू नवऱ्याने नवरीला लावायचे असते. याविषयी उराँव आदिवासीत एक कथा आहे, ती अशी —

चौघे मित्र होते. ते उद्योगधंदा शोधण्यासाठी प्रवासाला निघाले. रात्री एका रानात आंब्याच्या झाडाखाली झोपले. तिघांनी झोपायचे आणि एकाने पहारा करायचा असे ठरले. पहिला पहारेकरी सुतार होता. त्याने वेळ जाण्यासाठी एक लाकूड घेऊन त्याची एक मुलगी बनवली. दुसरा पहारेकरी सोनार होता. त्याने त्या मुलीला दागिने घडविले. तिसरा पहारेकरी विणकर होता. त्याने त्या मुलीला वस्त्रे नेसविली. चौथा पहारेकरी कुंकवाचा व्यापारी होता. त्याने तिच्या कपाळी मळवट भरला. त्यासरशी ती जिवंत झाली. चौघेही उठले आणि म्हणू लागले, की ही माझी बायको.



खेळणे

मग त्यांच्यांत भांडण सुरू झाले. एवढ्यात एक साधू तिथे आला. त्याने त्या तंट्याचा निवाडा केला. तो म्हणाला, 'ज्याने हिला बनविली तो हिचा बाप, ज्याने हिला नेसविली तो हिचा भाऊ, ज्याने हिला दागिने घातले तो हिचा मामा आणि ज्याने तिच्या कपाळी मळवट भरला तोच हिचा नवरा.' तेव्हापासून उराँव आदिवासींत कुंकवाची प्रथा चालू झाली.

कित्येक आदिवासींत रतिक्रिया रात्री आणि घरात करू नये अशी समजूत आहे. पशु-पक्षी रात्री संभोग करीत नाहीत, या निरीक्षणातून या कल्पनेचा उगम झाला असावा. त्यांच्या घरांतून पितरांच्या नावाने काही भांडी ठेवलेली असतात. त्यांच्या सान्निध्यात रतिक्रिया करणे उचित नव्हे, या कल्पनेतूनही ही चाल पडली असावी. त्यांच्या वस्तीजवळच रानात काही जागा स्वच्छ करून ठेवलेल्या असतात. संभोगाची इच्छा होताच ते जोडपे त्या ठिकाणी जाते आणि आपण तिथे असताना दुसऱ्या कोणी तिकडे फिरकू नये म्हणून त्या वाटेवर काटेरी झुडूप ठेवून देते. देवाने दिवस हा कामासाठी आणि विषयोपभोगासाठी दिलेला असून, रात्र केवळ विश्रांतीसाठी दिलेली आहे, अशी सवर आदिवासींची समजूत असल्याचे श्री. रॉय सांगतात.

पुष्कळ आदिवासींत गोंदून घेण्याचीही प्रथा आहे. मृत्यूनंतर माणसाला आपल्याबरोबर काहीतरी घेऊन जाता यावे, या कल्पनेतून ही गोंदण्याची प्रथा सुरू झाली असावी. परिया आदिवासींत बायका दंडावर चोळीच्या आकाराचे गोंदून घेतात, पण स्तनांवर मात्र गोंदीत नाहीत. कुमाँऊ प्रदेशात अशी श्रद्धा आहे, की जेव्हा मृत मनुष्य भगवानापुढे उभा राहतो, त्या वेळेला तो हिंदू आहे की मुसलमान आहे, हे त्याच्या गोंदण्याच्या पद्धतीवरूनच भगवानाला समजते.

**अंत्यसंस्कार** — आदिवासींचे अंत्यसंस्कार विविध आणि विचित्र असतात. माणूस मृत्युपंथाला लागला म्हणजे त्याच्या प्राणाला बाहेर जायला अडथळा होऊ नये म्हणून काही आदिवासी घरांची दारे-खिडक्या उघड्या टाकतात. काही जमातींत मृताला बायका बाहेर आणतात व त्याला स्नान घालून त्याचे केस विंचरतात. नीलगिरीच्या आदिवासींत मृताच्या डोक्याचे काही केस कापून घेऊन ते जतन करून ठेवण्याची पद्धती आहे. सवर आदिवासींत मृताची तिरडी स्मशानात नेण्याचे काम बायका करतात. मृताबरोबर त्याचे कपडे, चीजवस्तू व आयुधे जाळतात किंवा पुरतात. तसे केले नाही, तर मेलेला माणूस भूत होऊन त्या वस्तू मागायला येतो, अशी त्यांची समजूत आहे.

दक्षिणेकडे पाय करून प्रेत पुरतात. अलिकडे पुष्कळ जमातींत प्रेते जाळण्याची पद्धत सुरू झाली आहे. साथीने मेलेल्या रोग्यांना मात्र पुरतात. त्याचप्रमाणे पाच वर्षांच्या आतल्या

मुलांनादेखील वडाच्या किंवा मोहाच्या झाडाखाली पुरतात. गरोदर स्त्री मेल्यास तिला दूर जंगलात नेऊन पुरतात. ज्या जागी प्रेत जाळायचे असेल तिथे प्रथम कोंबड्या-बकऱ्याचा किंवा अन्य पशूचा बळी देतात. पुरुषासाठी सात थरांची व स्त्रीसाठी आठ थरांची चिता रचतात. जाळण्यापूर्वी मृताची पूजा करून त्याला अन्न देतात. त्याच्या सर्व शरीराला तेल-हळद लावतात. चितेवर वस्त्र, द्रव्य व अलंकार ठेवतात. घरचा वृद्ध पुरुष चितेला अग्नी देतो. तोवर इतर लोक ढोल वाजवून गातात, नाचतात. प्रेत अर्धे जळल्यावर त्यांचा पुरोहित हातात काठी घेऊन मृतात्म्याला सांगतो– 'जगाचा मोह सोडून तू स्वर्गाला जा. इथे तुझे कोणी नाही. जा, जा.' आणि मग तो ती काठी मोडून जळत्या चितेत टाकतो. गारो आदिवासी प्रेत चार दिवस-पर्यंत चितेत ठेवून देतात व मग मध्यरात्री ती चिता पेटवितात. पूर्वकाळी त्यांचा एखादा सरदार मेल्यावर त्याच्या सेवकांना बळी देण्याची पद्धत होती; पण आता ती बंद झाली आहे. बस्तरच्या आदिवासींत एक निराळीच प्रथा आहे. तिथले लोक प्रेत जाळण्यापूर्वी एका जागी तीन पाने मांडून त्यांवर थोडे तांदूळ ठेवतात. तिरडी वाहणारे लोक तिथे आल्यावर मृताचा नातेवाईक त्यांना मृत्यूचे कारण विचारतो. त्या वेळी मृताचा आत्मा प्रेत वाहणाऱ्या लोकांच्या अंगात येतो. ते लोक त्यांच्या प्रेरणाशक्तीने त्या तीन पानांपैकी कोणत्या तरी पानाजवळ जाऊन उभे राहतात. पहिल्या पानाजवळ गेल्यास मृत्यू नैसर्गिक रीतीने, दुसऱ्या पानाजवळ गेल्यास पितरांच्या कोपाने व तिसऱ्या पानाजवळ गेल्यास जादूटोण्याने झाला, असे समजण्यात येते. जादूटोणा हे कारण असल्यास त्याचे निराकरण झाल्याशिवाय प्रेताचा अंत्यसंस्कार करीत नाहीत.


टोपली विणणारा कारागीर

मृत्यूच्या नवव्या दिवशी मृतात्म्याला परत बोलाविण्याचा धार्मिक विधी बऱ्याच आदिवासींत केला जातो. मृताचे नातेवाईक, विशेषतः स्त्रिया, मृताची राख टाकण्यासाठी नदीवर जातात व मृताचे नाव घेऊन त्याला हाका मारतात. मग पाण्यात उतरून काही किडे किंवा मासळी पकडून घरी आणतात. त्या रूपाने मृताचा आत्मा घरी परत येतो, अशी त्यांची श्रद्धा आहे. पाण्यात जी स्त्री प्रथम एखादा जीव पकडते तिच्या पोटी तो मृतात्मा जन्म घेतो, अशीही समजूत आहे.

पुरुष क्षौर करतात. हे क्षौर न्हावी करीत नाही; तर मृताच्या कुटुंबियांपैकीच कोणीतरी करतो. बैगा आणि नागा आदिवासींत क्षौराची पद्धत नाही. ते दहाव्या दिवशी 'कुंडा मिलाना' हा विधी करतात. मृत माणूस आपल्या पितरांना भेटला की नाही, ते पाहण्यासाठी एका भांड्यात पाणी भरून त्यात दोन तांदूळ टाकतात. ते तांदूळ एकमेकांजवळ आले, तर मृतात्मा पितरांना भेटला, असे समजतात. तसे झाले नाही, तर एका महिन्यानंतर तोच विधी पुन्हा करतात. गोंड आदिवासीत कोज्जी नावाचा एक विधी करतात. एक कापड अंथरून त्यावर पायलीभर पीठ घालून त्याचा त्रिकोणी आकार बनवितात शेजारी एका टोपलीखाली एक दिवा झाकून ठेवतात. मृतात्मा रात्री त्या पिठावर काही खुणा करतो, अशी समजूत आहे. सकाळी तो दिवा पाण्यात सोडतात व त्या पिठाच्या पोळ्या करून त्या प्रसाद म्हणून सर्व नातेवाईकांना वाटतात. सवर आदिवासींत प्रेत जळून गेल्यावर त्यांचा पुरोहित त्याची हाडे गोळा करतो व मृत्यू कशाने आला, त्याचा शोध लावतो. मग ती हाडे एका खड्ड्यात पुरून त्यावर एखादी झोपडी किंवा काही तरी स्मारक उभारतात. मुंडा आदिवासी सर्वांत उत्तम स्मारके बनवितात. पंचमढीच्या जवळ कोरकुईचे स्मारक प्रसिद्ध आहे. ते दगडांचे बनविलेले असून, त्यावरचे कलात्मक खोदकाम प्रेक्षणीय आहे. माडिया आदिवासी आपल्या पितरांची स्मारके स्पष्ट दिसावी, म्हणून ती उंच जागी बांधतात. भिल्लांचे स्मारक ख्रिस्ती लोकांप्रमाणे दगडांचे बांधलेले असते. ही स्मारके तीन ते आठ फूट एवढी उंच असतात. त्यावर आदिवासींच्या संस्कृतीची छाप स्पष्ट दिसते. त्याच्या शिखराचा भाग बहुधा निमुळता असतो. त्यावर लोखंडाची सळई उभी केलेली असते. तिच्यावर कोणत्यातरी पक्ष्याची आकृती बसविलेली असते. बहुसंख्य आदिवासी कावळ्याची प्रतिमा बसवितात. कावळा अमर असून तो देवलोकापर्यंत जातो, असा त्यांचा विश्वास आहे. स्मारकावर नाना प्रकारची चित्रे काढतात किंवा कोरतात. त्या चित्रावरून त्यांचे दैनंदिन जीवन, व्यवसाय, राहणी, वेषभूषा, इ. गोष्टींचा परिचय होतो.

**आदिवासींचे नृत्य** – आदिवासी लोक नाच-गाण्यांचे विलक्षण शौकीन असतात. करमा, बिहू, बा परब, इ. आदिवासी नृत्ये प्रसिद्ध आहेत. त्यांच्या नृत्य-गीतांचा उगम निसर्गातल्या शक्तींना संतुष्ट करण्यासाठी झाला आहे. निसर्गशक्तींना संतुष्ट केल्याने पीक-पाणी अमाप येते व शिकार चांगली मिळते, अशी त्यांची पूर्वापार समजूत आहे. जन्माला आल्यापासून मर्तिका-

पर्यंत सर्व संस्कारांमध्ये त्यांच्या नृत्याचे आयोजन असते. सण व उत्सव या प्रसंगीसुद्धा ते बेहोष होऊन नाचतात. त्यांची बहुतेक नृत्ये संमिश्र स्वरूपाची असतात. स्त्री-पुरुष व मुले-मुली एकत्र नाचतात. त्यांच्या नृत्यातले पदन्यास, अंगविक्षेप व हिर्र-हुर्र हे उद्गार अर्थपूर्ण असतात. त्यांत निसर्गातल्या कोणत्या तरी प्रक्रियेचे अनुकरण असते किंवा त्यांच्या दैवतांच्या स्वभावविशेषाचे निदर्शन असते. क्वचित कृषिकर्मातल्या विविध क्रियांचेही अनुकरण असते. कित्येकदा नृत्यप्रसंगी गायिल्या जाणाऱ्या गीतांचा आशय अभिनयाच्या द्वारे व्यक्त केला जातो. आदिवासींच्या जीवनातून नृत्य व गीत वगळल्यास ते जीवन निरानंद व भकास ठरेल.



बैगा नर्तक

**आदिवासींची कला व कामगिरी** – आदिवासींच्या कलेला पुढील तीन उद्देशांनी प्रेरणा मिळाली आहे – (१) वस्तूंना सुंदर व आकर्षक बनविणे, (२) समाजात प्रतिष्ठा मिळविणे व (३) धर्म. ज्याच्या दारावर खोदकाम केलेले असेल, किंवा ज्याचे घर सजविलेले असेल, तो गृहस्थ त्या जमातीत श्रेष्ठ समजला जातो. आपले घर सुंदर दिसावे, म्हणून ते भिंतींवर पुराणांतल्या कथा चितारतात व दारांवर शिकारीची दृश्ये चित्रित करतात.

सजावटीची प्रवृत्ती सर्वप्रथम शरीर शृंगारण्यात दिसून येते. तरुण-तरुणींची केशरचना, गळाभर दागिने, नृत्यासाठी शरीरावर फुलांची व पिसांची रचना, यातून त्यांची कलात्मकता दिसून येते. फण्या व तंबाखूच्या डब्या कोरून नक्षीदार करणे, त्यांना फार आवडते. या डब्यांचे आकार मासा, पक्षी, पशू, इ. प्राण्यांचे असताल. तंबाखू ओढण्याच्या त्यांच्या नळया विविध आकृतींच्या असतात. नृत्याच्या वेळी ते जे मुखवटे घालतात, त्यावरही चित्रे व नक्षीकाम असते. हे मुखवटे त्यांच्या पौराणिक कथांच्या आधारावर बनवितात. भुता-खेतांपासून नर्तकाचे रक्षण व्हावे, हा त्यातला उद्देश असतो.

विवाहप्रसंगी तर त्यांच्या कलेला बराच वाव मिळतो. वधू-वरांसाठी ते सुंदर मुकुट तयार करतात व त्यांवर रंगी-बेरंगी मणी बसवितात. संताळ लोक वधू-वरांसाठी छानदार मेणे सजवितात. त्यांवर गाय-वासरू, उराउरी भेटणारे दोन मित्र, मुलाला स्तनपान देणारी माता, गर्भवती स्त्री, इ. चित्रे कोरतात. प्रत्येक चित्राला काहीतरी प्रतीकात्मक अर्थ असतो. त्यातून मांगल्य व प्रजावृद्धी सूचित होत असते. लग्नाच्या दिवशी तांदळाचे पीठ कालवून त्या द्रवाने भूमीवर चित्रविचित्र कणे रेखतात. माणसाच्या उंचीचा ठाणदिवा तयार करून तो लग्न-मंडपात ठेवतात.

काही जमातींत थडग्यांवरही चित्रे कोरलेली आढळतात. प्राचीन काळच्या थडग्यांवरची चित्ररचना ओबडधोबड असते; पण अलिकडच्या काळात ती सुरेख व घाटदार बनली आहे. माडिया जमातीत मृतांच्या स्मारकांसाठी मोठमोठे खांब उभारतात व त्यावर मृतांच्या आवडत्या वस्तू, अन्न व मद्य वाढणाऱ्या स्त्रिया, सालंकृत नर्तकी, शिकारीचे देखावे, इ. चित्रे कोरतात. आसाममधील फोम व कोन्यक आदिवासींतही ही प्रथा आहे. उराँव आदिवासींच्या वस्तीचे हत्ती, घोडा, मगर, अशासारखे प्रतीक असते. उत्सवप्रसंगी ते लोक त्या प्रतीकाची मांडणी करतात.

सवर व जंगम या आदिवासींची कला धर्मभावनेतून प्रकट झाली आहे. देवता व मृतात्मे संतुष्ट व्हावे व त्यांनी मुलाबाळांना त्रास देऊ नये, या भावनेने त्यांच्या चित्रकलेला प्रेरणा मिळाली आहे. त्यांच्या प्रत्येक वस्तीत असा एखादा चित्रकार असतोच. लोकांच्या भिंती चित्रित करणे हेच त्याचे काम. ज्या भिंतीवर चित्रे काढायची असतील, तिच्या मुळात तो आदल्या रात्री झोपतो व त्याला स्वप्नात ज्या आकृती दिसतात, त्याच दुसऱ्या दिवशी तो भिंतीवर रेखाटतो. सवरांच्या चित्रकलेत रानडुक्कर



आदिवासींची भित्तिचित्रे

व मोर हे हमखास आढळतात. डुकराला ते परलोकातला रक्षक व मोराला पुरोहित समजतात. आदिवासींच्या धर्मात मूर्तिपूजेला स्थान नसल्यामुळे त्यांच्या चित्रकलेत देवमूर्ती आढळत नाहीत. सूर्य, चंद्र व तारे यांची चित्रे मात्र सर्व जमातींच्या चित्रांत दिसतात.

पण अलिकडे नागर संस्कृतीच्या संपर्कामुळे आदिवासी आपल्या मूळ कलेला विसरत चालले आहेत. तिच्यात विकृतीही शिरू लागली आहे. एखाद्या वस्तींत शाळेची इमारत उभारली गेली, तर तिथले आदिवासी तिच्या भिंतींवर आपली परंपरागत चित्रे काढायला लाजतात. त्यांना आपली पूर्वीची वस्त्रभूषणेही आवडेनाशी झाली आहेत. शेकडो वर्षांच्या आर्थिक शोषणामुळे त्यांच्या सर्वच कला ऱ्हासाच्या मार्गाला लागल्या आहेत. सौंदर्याचा अनुभव घेणे व कलेच्या द्वारे त्याचा आविष्कार करणे, या दोन्ही शक्ती त्यांच्यातून हळूहळू लोपत चालल्या आहेत.

आसामातले आदिवासी विणकामाच्या कलेत तरबेज आहेत. आसामी लोक लाकडावर खोदकाम करतात व सुंदर खेळणी बनवितात. लुशाई आदिवासींत रंगीबेरंगी विणकामाची आवड व कला आज वाढतच आहे. अबोर, वोंडो, इ. काही आदिवासी लोकरीचे कापड विणून थंडीपासून आपले संरक्षण करतात. मिश्मी स्त्रिया आपल्या पुरुषांसाठी सुंदर कोट बनवितात व नाना प्रकारच्या थैल्या तयार करतात. लाकडी खोदकामात खाम्प्टी लोक फार प्रसिद्ध आहेत. पुष्कळ आदिवासी वेत व बांबू यांच्या अनेक वस्तू बनवितात. आदिवासींच्या कलात्मक वृत्तीला आजमितीस त्या त्या प्रदेशाच्या सरकारांकडून प्रोत्साहन मिळत आहे, ही गोष्ट चांगली आहे.

भारत स्वतंत्र झाल्यानंतर भारताच्या राज्यकारभाराबाबत जो घटना-कायदा पसार करण्यात आला, त्या घटनेतील एका स्वतंत्र कलमान्वये आसाम प्रांतातील आदिवासी लोकांनी व्यापलेल्या प्रदेशाचा राज्यकारभार स्वतंत्र रीत्या चालविण्यासाठी स्वतंत्र शासकाची नेमणूक करण्यात आली आहे. जमिनीची वाटणी, करआकारणी, शिक्षण, व्याजबट्टा व व्यापारविषयक सर्व व्यवहारांवर नियंत्रण, या गोष्टींची व्यवस्था पाहण्याची जबाबदारी त्यांच्यावर सोपविली आहे. तसेच इतर राज्यांपैकी ज्या राज्यात आदिवासींची वस्ती असून, त्यांनी स्वतंत्ररीत्या व्यापलेले प्रदेश आहेत, त्याविषयी उत्पन्न होणाऱ्या निरनिराळ्या प्रश्नांवर त्या त्या राज्यांच्या राजप्रमुखांना सल्लामसलत देण्यासाठी आदिवासी-मार्गदर्शक मंडळे निर्माण केली आहेत.

सदर घटनेतील दुसऱ्या एका कलमान्वये वन्य जातींचे लक्षण स्पष्ट केलेले असून, त्यांना योग्य ते संरक्षण मिळण्याचीही तरतूद केली आहे. कायदा अमलात आल्यापासून दहा वर्षेपर्यंत लोकसभा व विधानसभा यांत त्या जमातींच्या लोकसंख्येच्या प्रमाणात त्यांना आपले प्रतिनिधी निवडण्याचे हक्क दिले आहेत. त्यांच्यासाठी स्वतंत्र जागा राखून ठेवण्याची व्यवस्थाही केलेली आहे. त्याप्रमाणेच जिल्हा परिषदा, नगरपालिका, ग्रामपंचायती, इ. स्थानिक स्वराज्य संस्थांतही त्यांना लोकसंख्येच्या प्रमाणात प्रतिनिधित्व मिळावे, अशी तरतूद केली आहे.



जादुगार

या घटना कायद्यातील कलमान्वये आसाम प्रांतासाठी सुचविण्यात आलेल्या सहा जिल्हा मंडळांपैकी पाच अस्तित्वात आलेली असून, त्यांचे कार्य चालू झालेले आहे. या मंडळांना जमिनीची वाटणी, जमीनधारणा, जमिनी राखून ठेवणे किंवा त्यांचा उपयोग करणे, राखीव जंगलांव्यतिरिक्त इतर जंगलाची व्यवस्था, कालवे व त्यांच्या पाण्याचा शेतीसाठी उपयोग, ग्राम व नागर सभांची स्थापना, वारसा हक्क, वैवाहिक व सामाजिक चालीरीती, इ. गोष्टींच्या बाबत जरूर ते कायदेकानू करण्याचे अधिकार दिलेले आहेत.

घटनेतील दुसऱ्या एका कलमान्वये सरकारी नोकरीत आदिवासी जमातींनाही त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात निरनिराळ्या श्रेणीत जागा मिळण्याची व्यवस्था केली आहे. त्या जागांवर इतर समाजातून नोकरांची भरती करू नये, असेही हुकूम संबंधित अधिकाऱ्यांना देऊन ठेवले आहेत.

आदिवासींचे निरनिराळ्या बाबतींतील हितसंबंध अबाधित राहण्यासाठी कायद्याने त्यांना जे संरक्षण दिले आहे, त्याची अंमलबजावणी योग्य प्रकारे होत आहे की नाही, ते पाहण्यासाठी व त्यासंबंधी प्रतिवृत्त तयार करून ते वरिष्ठांकडे पाठविण्यासाठी स्वतंत्र आयुक्तांची नेमणूक केलेली आहे.

सामाजिक व आर्थिक बाबतीत आदिवासी—हित-संवर्धक अशा निरनिराळ्या योजना आखण्यात आलेल्या असून, इ. स. १९५२ सालापासून त्यांची अंमलबजावणी होऊ लागली आहे. त्यासाठी

मध्यवर्ती सरकारकडून नियमितपणे अनुदानेही दिली जात आहेत.

पंचवार्षिक योजनेत आदिवासी–समाजकल्याण – कार्याला विशेष चालना मिळालेली असून, मध्यवर्ती सरकारकडून व राज्यसरकारकडूनही त्या कार्यासाठी निराळ्या रकमा काढून ठेवलेल्या आहेत. समाजकल्याण कार्याच्या चळवळीचे काम व्यवस्थितपणे चालावे, यासाठी शिक्षणविभाग, आर्थिक पुनर्रचनाविभाग व संकीर्णविभाग, असे तीन स्वतंत्र विभाग केलेले असून त्या त्या प्रांतांच्या निकडीच्या गोष्टींकडे लक्ष पुरविले जात आहे.

आदिवासींच्या वसाहतीत कालवे खोदणे, शेतीची प्रात्यक्षिके, धान्यकोठारे, डोंगरटेकड्यांतून शेते खणून तयार करणे, इ. नवीन गोष्टींविषयी प्रयोग चालू आहेत.

आदिवासींच्या कल्याणासाठी सर्वोदय, आदिम जातिसेवासंघ डांग सेवा मंडळ, विश्व हिंदू परिषद, कल्याण आश्रम, विवेकानंद, केंद्र. इ, काही संस्थाही उत्स्फूर्तपणे बहुमोल कार्य करीत आहेत. [ ट्रा. इं.; मि. मि. इं.; दि अबोरिजिनल्स; प्रि. क. इं.; रे. क. इं.; एन्सा. रि. ए.; आमची संस्कृती ]

**आदीश्वर** जैन धर्मात याला सृष्टीतला मूळ पुरुष मानलेले आहे. जैनांचे चार वेद यानेच निर्माण केले, असे समजतात. आदीश्वर स्वर्गातून पृथ्वीवर आला व एक कोटी वर्षे राहिला. त्याने मानवात जातिभेद निर्माण केले व त्यांना विधि-नियम लावून देऊन राज्यकारभार कसा चालवावा, ते शिकविले. हा जैनांचा आदीश्वर हिंदूंच्या ब्रह्मदेवाहून निराळा नाही.

**आद्यगौड ब्राह्मण** गझनीच्या महमुदाने केलेल्या आक्रमणाच्या वेळी हे कान्यकुब्ज देशातून इ. स. १०१७ मध्ये दक्षिण कोकणातल्या कुडाळ प्रांतात आले. यांचा मूळ पुरुष सामंत प्रभू नावाचा होता व तो कान्यकुब्जच्या राजाचा मांडलिक होता. कदंब राजाच्या आश्रयाने यांनी कुडाळ प्रांतात आपली वसाहत केली. यादवांच्या राजवटीत यांच्या एका पूर्वजाने सावंतवाडी भागावर राजसत्ताही उपभोगिली होती. हे मूळचे गौड व शुक्ल यजुर्वेदी. परंतु क्षात्रवृत्ती स्वीकारल्यामुळे शाखालोप होऊन यांचे पुरोहित असलेल्या कऱ्हाड्यांचा ऋग्वेद या ज्ञातीने स्वीकारला. हे स्मार्त व अद्वैत मतानुयायी आहेत. यांची मठपरंपरा स्वतंत्र आहे. हे मासे खातात. पाहा–कुडाळदेशकर ब्राह्मण. [ ब्रा. भि. वि. ]

**आद्यपाप** ख्रिस्ती धर्मातील ही एक मूलभूत कल्पना आहे. माणसाच्या मनात पापाची वासना का उत्पन्न होते, याचा शोध घेण्याची तळमळ धर्मवेत्त्यांना व तत्त्ववेत्त्यांना प्राचीन काळापासून लागलेली आहे. सर्व प्रथम सेंट पॉल याने पापाची उपपत्ती पुढीलप्रमाणे मांडली – मानवजातीचा आद्य पुरुष जो आदम याने प्रथम पाप केले व त्यामुळे त्याचे अधःपतन झाले आणि आदमची पापप्रवृत्ती मानवाच्या पुढील पिढ्यांतही संक्रांत झाली. त्यामुळे त्याचे सर्व वंशज कुमार्गी व नीतिभ्रष्ट झाले. आदमच्या या आदिपापामुळेच समस्त मानवजात ईश्वराच्या कृपेला पारखी झाली असून, मृत्यू, दुःख आणि विषयवासना यांची शिकार बनली आहे. पण असे असले तरी येशू ख्रिस्त आपल्या दयाबुद्धीने या पापापासून मानवाचा उद्धार करू शकेल, असे सेंट पॉलचे मत होते.

पुढे सेंट आगस्टाईन याने असे प्रतिपादिले, की आदमचे पाप पुढील सर्व पिढ्यांत संक्रांत झाले, याचे कारण मानवाची स्त्री-पुरुषविषयक आसक्ती हे होय. ही आसक्तीच मूळ पापमूलक आहे. मध्ययुगीन रोमन कॅथॉलिक व सनातनी प्रॉटेस्टंट या दोन्ही पंथांच्या अनुयायांनी ही उपपत्ती ग्राह्य मानली आहे. आधुनिक प्रॉटेस्टंट मात्र ही उपपत्ती विज्ञानाशी विसंगत असल्यामुळे ती त्याज्य मानतात. [ एन्सा. रि. ए. ]

**आधण ओयरणे** मकर संक्रांतीच्या दिवशी एका ब्राह्मणाच्या घरी जाऊन त्याच्या कुटुंबातील माणसांना एक वेळ अन्न पुरेल इतके तांदूळ त्याच्या घरातल्या चुलीवरच्या आधण पाण्याच्या भांड्यात ओयरतात. तांदूळ ओयरताना पुढील मंत्र म्हणतात –

स्थाल्यां तप्ताम्बुयुक्तायामक्षय्यान्नप्रतुष्टये ।
कुटुम्बाशनपर्याप्तांस्तण्डुलान्निर्वपाम्यहम् ॥

अर्थ – आधण पाण्याने भरलेल्या तपेल्यात अक्षय्य अन्नाची प्राप्ती व्हावी म्हणून कुटुंबाच्या एक वेळच्या जेवणाला पुरेल, इतके तांदूळ मी ओतीत आहे. [ व्रतराज ]

**आनंतर्य व्रत** एक स्त्रीव्रत. व्रतारंभ मार्ग० शु. तृतीयेपासून करतात. पंधरवड्यातल्या तृतीयेस उपवासपूर्वक उमेची पूजा करणे, हा या व्रताचा विधी आहे. व्रतावधी एक वर्ष. फल – पति-पुत्रांचा अवियोग [ हि. ध. ]

**आनंद** (१) सुखदुःखातीत सहज समाधान म्हणजे आनंद होय. आनंद शब्द ब्रह्मानंदाचा वाचक आहे. 'आनन्दो ब्रह्मेति व्यजानात्'– आनंद ब्रह्म असे जाणता झाला (तै. उ. ३)

रसो वै सः । रसं ह्येवायं लब्ध्वाऽऽनन्दी भवति
एष ह्येवानन्दयति । (तै. उ. २.७.१)

अर्थ – तो ब्रह्मानंद रस आहे. तो रस प्राप्त झाल्यावर

मनुष्य आनंदी होतो. तो रस सगळ्यांना आनंदित करतो.

आनंदाच्या अंशमात्र आधारानेही सर्व प्राणी जगतात, असे बृहदारण्यकोपनिषदात म्हटले आहे.

आनंद हे आत्म्याचे लक्षण आहे. अद्वैत वेदान्त्यांनी आत्म्याला आनंदरूप मानले आहे. जेव्हा मनुष्य दुःखी-कष्टी असतो, तेव्हा त्याची ही अस्वाभाविक अवस्था आहे, असे जाणून लोक त्याला दुःखी होण्याचे कारण विचारतात. परंतु तो सुखी असतो, तेव्हा त्याच्याबद्दल त्याला कोणी कारण विचारीत नाहीत. कारण, ती माणसाची स्वाभाविक अवस्था आहे, असे समजले जाते. यावरून दुःख हे आत्म्याचे उपलक्षण आहे म्हणजे तो त्याचा आगंतुक किंवा परिवर्तनशील गुण आहे व आनंद हे त्याचे स्वाभाविक लक्षण आहे, हे सिद्ध होते.

आनंद नित्य आहे. त्यामुळे त्याचा अभाव कधीच संभवत नाही. जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ती या तीन्ही अवस्थांत आनंदाचा काही ना काही अनुभव येतोच. सुषुप्तीत विषयांचा अभाव असतो, तरीही आनंदाचा अनुभव घडतो. झोपेतून जाग आलेल्या प्रत्येकाला हा प्रत्यय येतोच. जाग्रत् व स्वप्न या अवस्थांत सुख व दुःख या दोहोंचाही अनुभव येतो. आनंद हा या सुखदुःखांच्या मुळाशी असतो. सुषुप्तीत मात्र सुख-दुःखांचे द्वंद्व दबले जाऊन केवळ आनंदाचा अनुभव येतो. यावरून आनंद नित्य आहे व त्याचा प्रत्यक्ष अनुभव घडतो, हे सिद्ध होते. तै. उपनिषदात आनंदाची मीमांसा करताना म्हटले आहे, की आरोग्य, धन, गुण, सामर्थ्य, सौभाग्य, या गुणांनी युक्त असलेल्या पुरुषाला जो आनंद होऊ शकतो, तो एक मानुष आनंद होय. त्या आनंदाच्या कोटिगुणित संख्येइतका आनंद म्हणजे ब्रह्मानंद होय.

सामान्य जन सुख व आनंद ही दोन्ही एकच मानतात. परंतु त्या दोहोंत फरक आहे. वेदान्ती सुखाला सातिशय सुख व आनंदाला निरतिशय सुख म्हणतात. सुख अस्थिर व भंगुर आहे; तर आनंद स्थिर व नित्य आहे. सुख हे दुःखसापेक्ष आहे. सुख व दुःख मिळून एक द्वंद्व बनते. आनंद या द्वंद्वापासून मुक्त आहे. सुखाचा संबंध शरीर व इंद्रिये यांच्याशी आहे. तर आनंदाचा आत्म्याशी आहे.

आनंद हा आत्म्याचा स्वभाव आहे. त्यामुळे आत्मज्ञान झाल्याशिवाय आनंदाचेही भान होत नाही. या आनंदाची गोडी एकदा ज्याने चाखली, त्याला इतर सर्व सुखे तुच्छ वाटतात. ही आनंदप्राप्ती म्हणजेच मोक्षाचा लाभ होय.

आनंदाचे तीन प्रकार मानलेले आहेत –

ब्रह्मानन्दो वासना च प्रतिबिम्ब इति त्रयम् ।
अन्तरेण जगत्यस्मिन्नानन्दो नास्ति कश्चन ।।

(पंचदशी ११.८७)

अर्थ–या जगात ब्रह्मानंद, वासनानंद व विषयानंद असे तीन आनंद आहेत. याव्यतिरिक्त कोणताच आनंद नाही.

अनुकूल विषय प्राप्त झाला असता इच्छातृप्ती होऊन मनुष्याला सुख होते, त्याला विषयानंद म्हणतात. त्या वेळी मनोवृत्ती अंतर्मुख होऊन त्यात ब्रह्मानंदाचे प्रतिबिंब पडते. सुखीही नाही व दुःखीही नाही, अशी जी मनाची अवस्था असते, तिला वासनानंद म्हणतात. आज मला कोणतीही काळजी नाही, माझे मन शांत आहे, या शब्दांनी माणूस ब्रह्मानंद व्यक्त करतो. सर्व लोकांना सुषुप्तीत व योग्यांना समाधीत या ब्रह्मानंदाचा अनुभव घडतो.

सांसारिक आनंद हा अनर्थ असून, वेदविहित धर्माचे पालन केल्याने आनंदाची प्राप्ती होते, असे पूर्वमीमांसा दर्शनात सांगितले आहे. शरीराला फार कष्ट दिल्यावर ते 'ऊर्ध्वगमन' करते व त्याला अपार आनंदाची उपलब्धी होते, असे जैन संप्रदायाचे मत आहे.

बौद्ध दर्शनात स्थूल दृष्टीने आनंदाचे चार भेद मानलेले आहेत – (१) आनंद (२) परमानंद (३) विरमानंद व (४) सहजानंद. ज्या वेळी कामाच्या द्वारे मनात क्षोभ निर्माण होतो, त्याच वेळी आनंदाचाही उगम होतो. वास्तविक हा भावाचाच विकास असतो. शक्तीच्या अभिव्यक्तीने याचा आविर्भाव होतो. यानंतर जेव्हा अभिव्यक्त शक्तीशी मीलनाचे पूर्णत्व सिद्ध होते, तेव्हा बोधिचित्तही पूर्ण होते. या आनंदाला परमानंद म्हणतात. बौद्ध तांत्रिक परिभाषेत शरीराच्या सारभूत अंशाला बिंदू म्हणतात. याचेच नाव बोधिचित्त होय. ललाटापासून बोधिबिंदूचा जो क्षण होतो, तोच अमृतक्षण होय. या अवस्थेला ज्वालावस्था म्हणतात. हाच विरमानंद होय. यानंतर जेव्हा वाचेच्या व चित्तबिंदूच्या अवसानात चतुर्बिंदूचा निर्गम होतो, तेव्हा सहजानंदाचा आविर्भाव होतो. हीच निर्वाणावस्था होय.

भारतीय साहित्यशास्त्रावरही आनंदवादाचा प्रभाव पडला आहे. साहित्यशास्त्रकारांनी काव्यानंद हा 'ब्रह्मानंदसहोदर' ब्रह्मानंदाचा सख्खा भाऊ मानला आहे. 'वाक्यं रसात्मकं काव्यम्' अशी काव्याची व्याख्या करून हा रस म्हणजे विशुद्ध ब्रह्मानंद होय, अशी कल्पना केलेली आहे. संत व भक्त यांनी भक्ती हाच मुख्य रस मानून त्यालाच सर्वश्रेष्ठ आनंद म्हटले आहे. [ हिं. सा. को.; बौ. ध. द.; हिं. वि. को.; ब्र. सि. मा ]

( २ ) गालव्य कुलातला ब्राह्मण. याने ब्रह्म्याचे अधिकार धारण करून नवीन यज्ञपद्धती, विवाहपद्धती व वर्णाश्रमपद्धती स्थापन केली. ( वायुपु. १.२१.२६; म. भा. शांति. ५९ ).

(३) गौतम बुद्धाच्या प्रमुख शिष्यांपैकी एक. हा शाक्य वंशातील क्षत्रिय असून, बुद्धाचा पट्टशिष्य होता. बुद्ध आपले

सगळे मनोगत त्याला सांगे. बुद्धाने आपल्या निर्वाणापूर्वी आनंदाची, त्याच्या लोकमान्यतेची व सुबोध धर्मप्रवचनांची प्रशंसा केली आहे. भिक्षुणीसंघ स्थापन करण्याच्या कामी यानेच पुढाकार घेऊन बुद्धाची त्याबाबत संमती मिळविली. पण पुढे राजगृह येथे भरलेल्या संगीतीमध्ये त्याला या स्त्रीपक्षपाताबद्दल जाब द्यावा लागला. बुद्धाच्या हयातीत त्याला अर्हतपदाच्या प्राप्तीसाठी साधना करायला सवड मिळाली नाही; पण बुद्धाच्या निर्वाणानंतर त्याने ते पद प्राप्त करून घेतले, असे सांगतात. बुद्धवचनांचा संग्रह करण्यासाठी वैभार पर्वताच्या सप्तपर्णी गुहेच्या दारावर जेव्हा भिक्षुसंघ बसला होता, तेव्हा आनंद योगबलाने आपल्या आसनावर उपस्थित झाला, असे म्हटले आहे. बुद्धोपदिष्ट धर्माचा संग्रह करण्याच्या कामी हाच प्रमुख होता. [ एन्सा. रि. ए.; त्रिपिटक; हिं. वि. को. ]

**आनंदकंद** हृदयाच्या अधोभागी एक रक्तवर्ण, अष्टदल पद्म असते, त्याला आनंदकंद म्हटले आहे. षट्चक्रांहून हे वेगळे आहे. ते आराध्य देवतेचे स्थान मानून, तिथे तिची मानसपूजा करतात. [ स. पॉ. ]

**आनंदगिरी** ( इ. स. चे. १२ वे शतक ) एक महान टीकाकार. याने शंकराचार्यांच्या सर्व भाष्यांवर टीका लिहिल्या आहेत. आचार्यांच्या भाष्यांतले भाव हृदयंगम करण्याच्या दृष्टीने याचे ग्रंथ उपयुक्त आहेत. याची सर्वांत पांडित्यपूर्ण रचना म्हणजे सुरेश्वराचार्यांच्या बृहदारण्यकवार्तिक या ग्रंथावरची टीका होय. सायण भाष्यातले काही उतारे जसेच्या तसे याच्या ग्रंथातून येतात, त्यावरून काही संशोधक याचा काल इ. स. चे १५ वे शतक हा ठरवितात; पण सायणानेच त्याच्या ग्रंथातून अवतरणे घेतली असावी, असे वाटते. शांकरदिग्विजय हा ग्रंथही याचाच मानतात; पण ग्रंथाच्या पुष्पिकेत ग्रंथकाराचे नाव अनंतानंदगिरी असे आढळते. त्यावरून हा कोणीतरी वेगळा आनंदगिरी असावा, असे म्हणतात. हा पुढे शंकराचार्यांच्या गादीवर बसला. कामकोटिपीठाचे लोक त्याला आपल्या पीठाचा अधिकारी मानतात; तर द्वारकापीठाचे लोक आपल्या पीठाचा समजतात. अद्वैतवेदान्ताच्या इतिहासात याने आपले नाव अजरामर करून ठेवले आहे. [ हिंदुत्व; शंकराचार्य; म. च. को. ]

**आनंदतनय** (इ. स. चे १७ वे शतक) एक मराठी कवी. याच्या चरित्राविषयी विश्वसनीय माहिती उपलब्ध नाही. परंतु वि. का. राजवाडे व काव्यसंग्रहकर्ते जोग यांनी याच्याविषयी थोडेबहुत लिहून ठेवले आहे, ते असे –

शहाजीच्या व व्यंकोजीच्या काळात काही देशस्थ ब्राह्मण घराणी तंजाऊरच्या बाजूला जाऊन स्थायिक झाली. त्यांपैकी एका घराण्यात आनंदतनयाचा जन्म झाला. याचे मूळचे नाव गोपाळ असून, याच्या वडिलांचे नाव आनंद व आडनाव वेदोभास्कर असे होते. परंतु आपल्या काव्यात याने स्वतःचा गोपाळ असा उल्लेख न करता आनंदतनय, आनंदसुत, आनंदात्मज अशा नावांनी केला आहे. मुरार परब्रह्म नामक साधूचा हा शिष्य व शहाजीचा गुरू होय. कर्नाटकातील अरणी परगण्याची मामलत याच्याकडे होती व याचे वास्तव्यही अरणीलाच होते, असे सांगतात. याने स्वतःला अरणीचा शिपाई म्हणवून घेतले आहे. यावरून तो योद्धाही असावा, असे वाटते.

**कंगाल ते ब्राह्मण आरणीचे । परंतु ते शूर रणांगणींचे।**

हा त्याचा श्लोकार्ध दक्षिणेतील महाराष्ट्रीयांना मुखोद्गत आहे.

रघुनाथ पंडित व आनंदतनय हे समकालीन असून, एकमेकांचे व्याही होते, अशी सर्वसामान्य समजूत आहे.

आनंदतनयाने भारत, भागवत, रामायण, मार्कंडेयपुराण यांच्या आधारे रचलेली वीस काव्ये आजपर्यंत उपलब्ध झाली असून, ती काव्यसंग्रह मासिकात प्रसिद्ध झाली आहेत. त्याच्या काव्यग्रंथांची काही नावे पुढीलप्रमाणे – शबरीआख्यान, शिशिकथा, उमा-रमासंवाद, कंदुकाख्यान, कृष्णचरित्र, सेतुबंध, राधाविलास, इत्यादी. यांशिवाय याने अनेक पदे रचली असून, त्यांपैकी १५६ पदे ' काव्यसंग्रह ' मासिकात छापली आहेत.

आनंदतनयाची भाषा प्रौढ, सरस व प्रसंगविशेषी अलंकारयुक्त आहे. याची वर्णनशैली चित्तवेधक असून, चित्रकाव्याकडे त्याचा विशेष कल आहे. मराठीतील अक्षरगणवृत्तात्मक काव्यरचना व दिंडी वृत्ताचा वापर प्रथम यानेच केला, असे म्हणतात. याची बरीच रचना महाराष्ट्रातील हरिदासांच्या मुखी आहे.

'सीतास्वयंवर' हे आनंदतनयाचे श्रेष्ठ काव्य आहे. रामचंद्राने जनकाचा पण जिंकल्यावर सीता त्याला वरमाळ घालण्यासाठी निघाली, त्या वेळचे हे वर्णन पाहा –

**तों त्या सौधतटीं सख्यांस निकटीं चांफेकळी गोरटी।**
**सीता सिंहकटी ससंभ्रम उठी कासे घटी गोमटी ॥**
**सज्जीं चालत सज्जनस्तुतगणा ते भव्य भागीरथी।**
**पावे दाशरथी कृपाब्धिजवळी तैं कोण लीला कथी ॥**
**डोळे मीन विलोल ते तळपती हस्तांध्रि पद्मे नवीं।**
**वक्षोजद्वय चक्रवाक कच ते भृंगालि ओघच्छवी ॥**

आनंदतनय रामोपासक होता. त्याचे नित्यपूजेचे रामपंचायतन अद्यापि तंजाऊर येथील त्याच्या वंशजांकडे आहे. [ प्रा. म. सं.; म. ज्ञा. को. ]

**आनंदतृतीया व्रत** वैशाख, भाद्रपद व मार्गशीर्ष या मासांतल्या शु. तृतीयेस ललिता देवीची पूजा करून त्याबरोबरच सुवासिनींचीही पूजा करणे, हा या व्रताचा विधी आहे (मत्स्य पु. ६२).

**आनंदनवमी व्रत** व्रतारंभ फाल्गुन शु. नवमीस होतो. व्रतावधी एक वर्ष. व्रतकाल पंचमीपासून नवमीपर्यंत पाच दिवस. या दिवसांत अनुक्रमे एकभुक्त, नक्त, अयाचित व उपवास करायचा असतो. देवीची पूजा हा याचा मुख्य विधी होय. [ कृ. क. त.; हि. ध. ]

**आनंदपूर** शीख लोकांचे पंजाबातील एक तीर्थक्षेत्र. शिखांचा नववा गुरू तेग बहादूर याने इ. स. च्या १७ व्या शतकात शिवालिक टेकड्यांच्या उतरणीवर अंबाल्यापासून ८५ मैल अंतरावर हे गाव वसविले. गुरू तेग बहादूर व गोविंदसिंग यांच्या वास्तव्यामुळे याला क्षेत्रमाहात्म्य आले. केशगढ हा येथील सर्वांत भव्य गुरुद्वारा होय. खालसा पंथाच्या चार तख्तांपैकी एक इथे आहे. गुरू गोविंदसिंगाने आपल्या पाच शिष्यांना आत्मत्यागाची दीक्षा दिली ती इथेच. 'गुरूका महाल' 'गुरुद्वारा तेग बहादूर' (त्याच्या मस्तकाच्या दहनाची जागा), 'डमडम साहिब' (गोविंदसिंग गुरू झाला, ते स्थान), 'आनंदगढ' अशी अनेक पवित्र स्थळे त्या गावात आहेत.



गुरुद्वारा, आनंदपूर

होळीच्या व त्याच्या दुसऱ्या दिवशी इथे शिखांची मोठी जत्रा भरते. सर्व भारतातून यात्रेकरू इथे जमतात. होळीच्या दिवशी प्रवचने, गाणी व अन्नदान असा कार्यक्रम असतो. दुसऱ्या दिवशी गुरूंच्या शस्त्रांची मिरवणूक काढतात. [ श्री. शर्मा – इलस. वीकली ऑफ इंडिया, २९ नोव्हेंबर १९५३ ]

**आनंदबोध यती** ( इ. स. चे १२ वे शतक ) अद्वैत वेदान्ताचा एक मोठा आचार्य. शांकर वेदान्तावर याने न्यायमकरंद, न्यायदीपावली व प्रमाणमाला असे तीन ग्रंथ लिहिले आहेत. न्यायमकरंद या ग्रंथात त्याने निरनिराळ्या ग्रंथांतील चांगली तत्त्वे ग्रथित केली आहेत. या ग्रंथामुळे अद्वैताच्या इतिहासात याचे नाव अमर झाले आहे. याने अनेकात्मवाद व अनेकविषयवाद यांचे खंडन केले आहे. त्याचप्रमाणे न्याय, मीमांसा व बौद्ध तत्त्वज्ञान यांतील भ्रमप्रक्रियांचे त्याने केलेले विवेचनही चांगले आहे. तो अनिर्वचनीयवादाचा पुरस्कर्ता आहे. आत्मा हा संविद्रूप आहे, असे त्याचे मत आहे. न्यायदीपावली या ग्रंथात त्याने शुक्ति-रजत दृष्टान्ताने जगन्मिथ्यात्व सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. आत्मवास हा याचा गुरू होय. [ हि. इं. फि. १ ]

**आनंदमूर्ती** (मृत्यू इ. स. १६९६) एक महाराष्ट्रीय संतकवी. रामदास-पंचायतनातील हा सर्वांत धाकटा होय. याचे पहिले नाव अनंतभट. याचे पूर्वज भेंडच गावचे जोशी. पण याने आगळगावी स्थायिक होऊन अठरा गावांची जोशीपणाची वृत्ती मिळविली.

रघुनाथस्वामी हे याचे गुरू. आनंदमूर्ती १७ व्या वर्षी त्यांच्या भजनी लागला. पण त्याच्या वडिलांना हे न आवडून त्यांनी बायकोमुलांसह आनंदमूर्तीला घराबाहेर काढले. तेव्हा रघुनाथस्वामींनी स्वतः चार वर्षे भिक्षा मागून या शिष्याचे पालन केले व त्याला ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला. पुढे रघुनाथस्वामींनी त्याला ब्रह्मनाळ ( जि. सातारा ) येथे राहण्यास सांगितले. त्याच्या आनंदी वृत्तीवरून त्याला आनंदमूर्ती हे नाव पडले. आनंदमूर्तीचे अनेक चमत्कार प्रसिद्ध आहेत. त्याची वाणी रसाळ असून, तो कीर्तन उत्तम करीत असे. रघुनाथस्वामी समाधिस्थ झाल्यावर ब्रह्मनाळ गावी त्यांचे वृंदावन बांधण्यात आले. आनंदमूर्ती समोर कीर्तनाला उभा राहिला, की ते वृंदावन डोलत असे, असे सांगतात. ब्रह्मनाळला गुरूच्या शेजारीच आनंदमूर्तीचीही समाधी आहे. तिथे कार्तिक शु. चतुर्दशी व पौर्णिमा या दिवशी त्याचा उत्सव होतो.

आनंदमूर्तीच्या सहा भूपाळ्या व सात वारांची पदे प्रसिद्ध आहेत. [ म. वा. इ.; मु. वि. को. ]

**आनंदयोग** बुधवारी हस्त नक्षत्र येणे, या योगाला आनंद योग अशी संज्ञा आहे.

**आनंद राजानक** (इ. स. च्या १७ व्या शतकाचा उत्तरार्ध) पंडिती परंपरेतला एक टीकाकार. राजानक या उपाधीवरून हा काश्मीरचा रहिवासी असावा, असे अभ्यासकांचे मत आहे. याने श्रीहर्षाच्या नैषधावर 'नैषधीय तत्त्वविवृत्ती' आणि मम्मटाच्या काव्यप्रकाशावर 'काव्यप्रकाश निदर्शन' अशा दोन टीका रचल्या आहेत. काव्यप्रकाश हा ग्रंथ एकट्या मम्मटाचा नसून त्याच्या दुसऱ्या कर्त्याचे नाव अल्लट

होय, हे प्रथम आनंदाने सांगितले. परिकर अलंकारानंतरचा भाग अल्लटाचा आहे, असे आनंदाचे मत आहे. या मतामुळेच तो काव्यशास्त्राच्या इतिहासात प्रसिद्ध आहे. पाहा – मम्मट. [ नै. प.; काव्यप्रकाश.; सं. सा. इ. ]

**आनंदरामायण** रसिक संप्रदायाचा एक प्रमुख ग्रंथ: काल इ. स. चे १५ वे शतक. या ग्रंथात बारा हजार दोनशे बावन्न श्लोक व नऊ कांडे आहेत. पहिल्या कांडात रामजन्म ते सीताहरण, दुसऱ्यात रामचंद्राची तीर्थयात्रा, तिसऱ्यात रामाश्वमेध, चौथ्यात सीतेचे नखशिखान्त वर्णन, रामसीतेची जलक्रीडा व विहार, रामचंद्राने एकपत्नीव्रत घेतल्यामुळे पुढील अवतारात त्याला अनेक भार्या मिळतील, असे आश्वासन मिळाल्याची कथा, पाचव्यात लव-कुशांचा जन्म व त्यांचे रामाच्या सैन्याशी युद्ध, सहाव्यात आठ पुत्रांचा विवाह व सातव्यात विजययात्रा, इ. विषय आहेत. त्या कांडाच्या एकविसाव्या सर्गात एक दासी रामाचा तांबुलरस पिते व त्यामुळे तिला राधा होण्याचे वरदान मिळते, असा विषय आहे. आठव्या कांडात रामोपासनेचा विधी असून, नवव्या कांडात कुशाचा अभिषेक व रामाचे स्वर्गारोहण हे विषय आले आहेत. [ रा. सा. म: उ.; रा. भ. शा. ]

**आनंदलहरी** दक्षिणेतील एक तंतुवाद्य. तुणतुण्याच्या भांड्यासारखे एक लाकडी भांडे, त्याच्या



आनंदलहरी

मधोमध एक उभी तार व त्या तारेला वर गोल खुंटीचे टोपण अशी त्याची रचना असते. हे वाद्य धनुकलीने वाजवितात. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**आनंदवर्धन** (इ. स. च्या ९ व्या शतकाचा उत्तरार्ध) एक संस्कृत कवी व 'ध्वन्यालोक' या ग्रंथाचा कर्ता. याच्या पित्याचे नाव नोण असे होते, असा उल्लेख देवीशतकात आहे. काश्मीरच्या अवंतिवर्मा राजाच्या (इ. स. ८५५-८८३) दरबारात हा सभापंडित होता, असे कल्हण सांगतो.

आनंदवर्धनाचे पुढील चार ग्रंथ प्रसिद्ध आहेत –(१) देवीशतक–त्रिपुरसुंदरीच्या स्तुतिपर काव्य (२) अर्जुनचरित–अर्जुनाच्या शौर्याचे वर्णन करणारे महाकाव्य (३) विषमबाण–मदनाच्या लीला कथन करणारे प्राकृत काव्य व (४) ध्वन्यालोक. पण त्याची कीर्ती अजरामर झाली ती ध्वन्यालोक या ग्रंथामुळे ! ध्वन्यालोकाने संस्कृत साहित्यशास्त्रात एक नवे युग सुरू केले. वेदान्तात ब्रह्मसूत्रांचे जे स्थान, तेच साहित्यशास्त्रात ध्वन्यालोकाचे आहे.

ग्रंथकाराची गाढ विद्वत्ता व सूक्ष्म विवेचनशक्ती या ग्रंथात पानोपानी प्रत्ययाला येते. आनंदवर्धनाने काव्यात 'ध्वनी' सिद्धान्ताची स्थापना केली. त्याच्या मतानुसार काव्यात 'वाच्य' अर्थाबरोबर एक व्यंग अर्थही असतो. त्यालाच वैयाकरण ध्वनी असे म्हणतात: याच ध्वनीचा विचार ध्वन्यालोकात केला आहे. ग्रंथाचे पद्यमय कारिका, गद्यवृत्ती व उदाहरण असे तीन भाग आहेत. आनंदवर्धनानेच प्रथम काव्याच्या अन्तस्तत्त्वाचे विश्लेषण केले. त्यामुळे त्याला आलंकारिकांच्या पद्धतीचा प्रस्थापक मानतात. [ सं. सा. इ. ]

**आनंद सफल सप्तमी** एक तिथिव्रत. व्रतारंभ भाद्र. शु. सप्तमीस करतात. व्रतावधी एक वर्ष. सूर्यपूजा व उपवास हा याचा मुख्य विधी होय. फल–आरोग्य व बल यांची प्राप्ती. [ कृ. क. त. ]

**आनंदसभा** जामनगर येथील मुक्ताश्रमी आनंददेवनामक एका ब्राह्मण साधूने या सभेची स्थापना केली. सभेचे अनुयायी यालाच आपला गुरू मानतात. याने रचलेले रामायण, आनंदविलास वगैरे ग्रंथ हे सभेचे पूज्य ग्रंथ होत. रामोपासनेचा प्रचार, कलाकौशल्याची वृद्धी व सामाजिक सुधारणा हे या सभेचे उद्देश आहेत. [ म. ज्ञा. को. ]

**आनंदानवमी व्रत** एक काम्यव्रत. फाल्गुन शु: नवमीला आनंदानवमी हे नाव आहे. पंचमीला एकभुक्त, षष्ठीला उपवास, सप्तमीला अयाचित वृत्तीने राहणे, अष्टमीला पुनश्च उपवास व नवमीला देवाची पूजा, खिरीचा नैवेद्य व देवीचा जप, असा याचा विधी आहे.

या व्रताचे दुसरे विधान पुढीलप्रमाणे –

प्रत्येक महिन्याच्या नवमीला कुमारीला भोजन. आषाढापासून आश्विनापर्यंत प्रत्येक नवमीला भगवती देवीची पूजा. पंचमीला एकभुक्त राहून षष्ठीला व अष्टमीला उपवास. शिवाय सप्तमीला अयाचित वृत्तीने राहून नवमीला उपवास. शिवा देवीचे पूजन. यथाशक्ति ब्राह्मण, सुवासिनी व कुमारिका

यांना भोजन. व्रताचे फल – ब्रह्मलोकप्राप्ती. [ कृ. क. त. ]

**आनर्त** भारतातला एक प्राचीन देश. याचे दक्षिण व उत्तर असे दोन भाग होते. शर्यातीचा पुत्र आनर्त याच्या नावावरून हा देश प्रसिद्धीस आला. महाभारत, भागवत, बृहत्संहिता, इ. ग्रंथांतून याचे उल्लेख आढळतात (म. भा. सभा. २६; भाग. पु. १.१०.३५; ९.३.२८; बृ. सं. १४.१७). अर्जुनाने एका प्रसंगी या देशातील आनर्तांना जिंकले होते. हल्लीचे वडनगर (गुजरात) याला पूर्वी आनर्तपुर म्हणत व तेच त्या राज्याची राजधानीही होते. काही पुराणांतून सौराष्ट्राचा आनर्त देशात समावेश केलेला आढळतो. द्वारका ही आनर्तांची राजधानी असेही म्हटलेले दिसते. पण आनर्ताची व्याख्या व त्याच्या चतुःसीमा यांविषयी सगळीकडची वर्णने मोघमच आहेत. रुद्रदामनचे शिलालेख व महाभारत यांवरून द्वारकेच्या आसपासचा प्रदेश तोच आनर्त देश होय, असे कळते (इ. स. १५० चा गिरनार येथील शिलालेख). हा प्रदेश महाक्षत्रप रुद्रदामन याने जिंकून घेतला व तिथे आपले राज्य स्थापन केले (जुनागड येथील इ. स. ७२ चा शिलालेख). [ क. हि वा. पु.; हि. जॉ. ए. इ. ]

**आनीचांपी** गुजरातमधील सोनारांचा एक लग्नविधी. वरघोडा निघाल्यावर मार्गात नवऱ्या मुलाला एखाद्या देवीच्या मंदिरात नेऊन तिचे दर्शन करवितात. नंतर नवरा मुलगा, त्याचे एक दोघे सोबती व मशालजी एवढे लोक थोडेसे अंतर पायी चालत जाऊन परत येतात, याला आनीचांपी असे म्हणतात. [ ल. वि. सो. ]

**आनेगुंदी** कर्नाटकात हंपीजवळ तुंगभद्रा नदीच्या उत्तर तीरावरील एक मध्ययुगीन नगर. वालीची किष्किंधा नगरी इथेच होती, असे सांगतात. या शहराला मजबूत तटबंदी होती. हरिहर व बुक्क या दोघा बंधूंनी या शहरास महत्त्व आणले. इ. स. १३३४ मध्ये सुलतान महमुदाने हे शहर काबीज करून तिथे आपला कारभारी नेमला. त्यानंतर वरील दोघा बंधूंनी तुंगभद्रेच्या दक्षिणतीरावर विजयनगर हे नवे शहर वसविल्यामुळे आनेगुंदीचे महत्त्व कमी झाले. इथे रंगनाथ व लक्ष्मी यांची मंदिरे असून, लक्ष्मीच्या मंदिरातल्या गरुड–हनुमंत या लाकडी मूर्ती सुबक आहेत. उत्सवप्रसंगी त्यांची मिरवणूक निघते. जवळच एका कोसावर पंपा सरोवर आहे. इथले राममंदिर, हनुमानाचे मंदिर व चक्रतीर्थही उल्लेखनीय आहे. आनेगुंदीच्या एका राजाने पंढरपूरची विठ्ठलमूर्ती तिकडे नेली होती, ती भानुदासाने परत आणली, अशी आख्यायिका आहे. या शहराच्या नावाचे अनागोंदी असे रूप मराठीत प्रचलित आहे. इथला एक राजा स्वतःला सार्वभौम समजे व सर्व पृथ्वीचा वसूल आपल्या जमेच्या खाती लिहून त्या त्या देशाच्या नावे खर्ची टाकी. हा त्याचा एक छंद होता. त्यामुळे एखाद्या ठिकाणी गैरशिस्त हिशेब किंवा कारभार दिसला, की त्याला ‘अनागोंदी कारभार’ म्हणणे असा एक वाक्संप्रदाय मराठीत रूढ आहे. [ सु. वि. को.; स. भा. प्र. व. ]

**आनेराज व्यास** एक महानुभाव ग्रंथकार. अनंतभट्ट किंवा अनंतकूची हा कन्हर-देवराय जाधव यांचा कोशाधिकारी होता. त्याला चक्रपाणी नावाचा मुलगा होता. चक्रपाणीला दोन पुत्र होते. त्यांपैकी एकाचे नाव गोपाळ पंडित होते व त्याला जन्मल्यावरोबरच चक्रधराला अर्पण केले होते. त्यालाच पुढे अनंत पंडित किंवा आनेराज व्यास म्हणू लागले. गोपाळ पंडिताने म्हाइंभटाच्या लीळाचरित्रातून सूत्रे ग्रथित करून गद्य सूत्रपाठ तयार केला. या सूत्रपाठात चक्रधराची वचने गोवलेली आहेत. या पाठात साडे दहा प्रकरणे असून, त्यांत महानुभावपंथियांना उपदेश केलेला आहे. या पाठातील काही सूत्रे अशी –

कर्म धर्मविधि:
विखया वेगळेया होआवे ॥ ५२ ॥
निरसा निरासा निराया होआवे ॥ ५३ ॥
निरक्षेपा होआवे ॥ ५४ ॥
निरभिमानिया होआवे ॥ ५५ ॥
ब्रह्मविद्यें इतउत्तर विद्या अनुखंगिका:
रिधित्वें प्रकटति कां विघ्नत्वें ॥ ५६ ॥
परि मोक्षुचि ऐसा नाही ॥ ५७ ॥

महानुभाव दीक्षावंत व उपदेशी या ग्रंथाचे नित्य पठण करतात. [ म. म. वा. ]

**आन्वीक्षिकी** प्राचीन काळी विद्येचे वर्गीकरण त्रयी, आन्वीक्षिकी, वार्ता व दण्डनीती असे करण्यात येत असे. आन्वीक्षिकीची लक्षणे व अर्थ विविध आहेत.

प्रत्यक्षागमाभ्याम् ईक्षितस्यान्वीक्षणम् अन्वीक्षा
तया प्रवर्तत इत्यान्वीक्षिकी न्यायविद्या न्यायशास्त्रम् ।
(वात्स्या. १.१.१)

अर्थ – प्रत्यक्ष, प्रमाण व आगम यांनी जे पाहिले त्याचे मागाहून (चिंतनाने) पुनः ईक्षण करणे म्हणजे अन्वीक्षा होय. अन्वीक्षेने प्रवृत्त होते ती आन्वीक्षिकी अर्थात न्यायविद्या अथवा न्यायशास्त्र होय.

**आन्वीक्षिकी दण्डनीतिस्तर्कविद्यार्थशास्त्रयोः । (अमर.)**

अर्थ – दंडनीती, तर्कविद्या व अर्थशास्त्र म्हणजे आन्वीक्षिकी. कौटिल्याच्या मते सांख्य, योग व लोकायत ही दर्शने आन्वीक्षिकीत येतात ( अर्थ १. २ ). शुक्रनीती व राजनीतीप्रकाश यांच्या मते 'आत्मज्ञानोपयोगिनी न्यायविद्या '= आत्मविद्येला साधनीभूत अशी तर्कविद्या म्हणजे आन्वीक्षिकी होय. ब्राह्मण व क्षत्रिय या दोघांनीही आन्वीक्षिकीचा अभ्यास करावा, असे सांगितले आहे.

कौटिल्याने विद्यांची नामावली देताना आन्वीक्षिकीला प्रथम स्थान दिले आहे. आन्वीक्षिकी ही विद्या संदेहनिर्णयाला उपयोगी पडते व ती वाणी व कृती यांच्यामध्ये समतोलपणा राखते. इतर सर्व प्रकारच्या ज्ञानाला आन्वीक्षिकी हे शास्त्र मार्गदर्शक असून, ते सर्व कार्यात सौकर्य उत्पन्न करते. भवभूतीच्या मालतीमाधवात आन्वीक्षिकीचा उल्लेख येतो (अंक १). त्यावरून त्याच्या काळीदेखील ( इ. स. चे ८ वे शतक ) आन्वीक्षिकीचा अभ्यास करण्याकडे विद्वानांची प्रवृत्ती होती, असे दिसून येते. [ हि. ध.; म. ज्ञा. को. ]

**आप** एक वैदिक देवता. जल आणि नदी या दोहोंनाही वैदिक आर्य आप या नावाने संबोधीत. ऋग्वेदात आपोदेवतेविषयी चार सूक्ते आहेत. आपल्या वज्राच्या साहाय्याने इंद्र आपाला मार्ग आखून देतो व त्या मार्गाने आप निरंतर वाटचाल करीत असते, असे ऋग्वेदात म्हटले आहे.

आप हे शुद्ध, मधुर व निर्दोष असून, ते समुद्रात राहते, आकाशातून बाहेर पडते व समुद्राकडे वाहत जाते. ते सर्व – रोगनिवारक असून, त्याने सर्व स्थावर–जंगम सृष्टी उत्पन्न केली आहे, अशी वैदिक धारणा आहे (ऋ. १०.१७.१०).

अंबरीष हा वैदिक ऋषी आपाची पुढीलप्रमाणे स्तुती करतो– ' हे आपोदेवींनो, तुम्ही कल्याणमय आहा. तुम्ही आम्हाला धन द्या व चांगल्या दर्शनासाठी ज्ञान द्या. हे देवींनो, तुमच्यापाशी असलेला मंगलमय रस, प्रेमळ माता आपल्या बालकाला दुधाचा आस्वाद देते, तसा आम्हांला प्राशन करवा. हे आपोदेवींनो, माझ्या ठिकाणी जे जे पातक असेल ते ते धुवून टाका. मी कोणाचा द्रोह केला असेल, कोणाला शिव्याशाप दिले असतील किंवा खोटे बोललो असेन तर तेही सर्व धुवून टाका, (ऋ. १०.९).

आपो ज्योती रसोऽमृतं ब्रह्म भूर्भुवःस्वरोम् ।

वरील वचनाप्रमाणे वेदामध्ये आप शब्दाचा प्रयोग ज्योती, रस, अमृत, ब्रह्म, भूर्भुवःस्व व ओम् अशा अर्थी होतो.

दार्शनिकांनी याला अशेष कारण, चेतना, इ. मानले आहे. योगी याला ब्रह्म व अमृत आणि पौराणिक मधुर क्षीर समजतात. याच्या विस्तारात साकार ब्रह्म आपल्या मायाव्यूहासह पहुडले आहे.

जगदुत्पत्तीच्या कारणांत आपाला महत्त्वाचे स्थान आहे. विश्वकर्म्याचा जन्म आदी आपापासून झाला, असे तै. संहितेत सांगितले आहे. ऋग्वेदात (१०.१२९.३) याविषयी म्हटले आहे, ते असे –

**तम आसीत् तमसा गूळ्हमग्रेऽप्रकेतम् ।**
**सलिलं सर्वमा इदम् ।**

अर्थ–प्रथमतः तम उत्पन्न झाले. ते तमही तमानेच व्याप्त होते. नंतर ज्याला कोणतेही रूप अथवा आकार नाही असे जलतत्त्व सर्वत्र भरून राहिले.

'जल हेच सर्व वस्तूंच्या उत्पत्तीचे मूळ कारण आहे,' असेही तिथेच म्हटले आहे.

आप हे दिव्य आहे; त्याचप्रमाणे ते पार्थिव जलमार्गातूनही वाहते व शेवटी समुद्राला जाऊन मिळते (ऋ. ७.४९).

अग्नी जलात प्रवेश करतो व आपोदेवी अग्नीच्या माता होऊन त्याला उत्पन्न करतात. आपोदेवी आपल्या स्पर्शाने इतरांना स्वच्छ व पवित्र करतात. त्या घाण वाहून नेतात. नैतिक अपराध, पाप, शाप यांपासून मुक्त होण्यासाठी यांचेच आवाहन करतात (ऋ. १.२३).

जलाच्या लहरी मधाने भरलेल्या आहेत. घृताशी संयुक्त होऊन हे जल इंद्राचे पेय बनले व इंद्र ते पिऊन प्रसन्न झाला (ऋ. ७.४७). घृत, दूध व मध यांनी संपन्न झालेल्या आपांची सोमयुक्त पुरोहितांशी तुलना केली आहे (ऋ. १०.३०). पाहा – जल. [ ऋ. द.; वै. सा. सं.; भा. प्र. वि.; वै. मा.]

**आपटा** एक वृक्ष. याला संस्कृतात अश्मंतक म्हणतात. हा जंगली वृक्ष असून, त्याला कांचनासारखी वाटोळी दुहेरी पाने असतात. विजयादशमीच्या दिवशी शमीवृक्ष उपलब्ध नसेल, तर अश्मंतक वृक्षाची पूजा करावी, असे निर्णयसिंधूत सांगितले आहे. महाराष्ट्रात दसऱ्याच्या दिवशी सीमोल्लंघनानंतर आपट्याची पाने आप्तेष्टांना सोने म्हणून वाटतात. हा वृक्ष औषधीही आहे. पाहा – विजयादशमी.

**आपडी–थापडी** एक खेळ. मुले एकमेकांच्या मांडीला मांडी लावून बसतात व हातावर हात उतरे पालथे करीत डावी–उजवीकडे डुलत पुढील गाणे म्हणतात –

**आपडी थापडी गुळाची पापडी ।**
**धम्मक लाडू तेल पाडू ।**
**तेलंगीचं एकच पान । धर ग बिब्बे हाच कान ।**

शेवटची ओळ म्हणताना एकदम कुणाचा तरी कान पकडून



आपडी-थापडी

खूप हसतात. दुसऱ्या कोणी आपला कान पकडू नये म्हणून प्रत्येक मुलगी या वेळी खबरदारी घेते.

**आपदेव** (इ. स. चे १७ वे शतक) एक सुप्रसिद्ध मीमांसक. याच्या पित्याचे नाव अनंतदेव असून, तोच त्याचा गुरू होता. याचा 'मीमांसान्यायप्रकाश' हा पूर्वमीमांसेवरील प्रकरणग्रंथ अत्यंत विद्वत्तापूर्ण म्हणून प्रख्यात आहे. याने सदानंदाच्या वेदान्तसारावर बालबोधिनी नामक टीका लिहिली आहे, त्यावरून मीमांसक असूनही याचा अद्वैताकडे ओढा असल्याचे कळून येते. [ हिंदुत्व; मी. द. ]

**आपद्धर्म** चातुर्वर्ण्य पद्धतीत प्रत्येक वर्णाचा व्यवसाय ठरवून दिलेला आहे. उदा० ब्राह्मणांनी षट्कर्मे, क्षत्रियांनी युद्धविषयक कृत्ये, वैश्यांनी कृषी, गोरक्ष्य, वाणिज्य व शूद्रांनी त्रैवर्णिकांची सेवा, ही कर्मे करून आपली उपजीविका चालवावी. कित्येकदा दिव्य-भौम उत्पात, दुष्काळ, स्थलांतर, इ. आकस्मिक कारणांनी समाजव्यवस्था विस्कळीत होऊन वर्णांना आपापली विहित कर्मे आचरून जगता येत नसे. अशा वेळी, अन्य वर्णाचा धर्म अपवाद म्हणून स्वीकारायला हरकत नाही, अशी सोय शास्त्रकारांनी करून ठेवली आहे. हिलाच आपद्धर्म ( आपदि कर्तव्यो धर्मः = आपत्तीत आचरायचा धर्म ) म्हणतात. एका वर्णाच्या मनुष्याने दुसऱ्या वर्णाचा व्यवसाय पत्करणे हा धर्मशास्त्राने सामाजिक अन्याय मानलेला आहे; पण एखादा माणूस एखाद्या वेळी अशा काही प्रतिकूल परिस्थितीत सापडतो, की त्याला स्वतःच्या वर्णाचा धंदा करणे अशक्य होऊन बसते. अशा वेळी आपद्धर्म म्हणून ब्राह्मण-क्षत्रियांनी पुढील गोष्टी करण्यास हरकत नाही, असे मनू सांगतो (१०.११६)–

विद्या शिल्पं भृतिः सेवा गोरक्ष्यं विपणिः कृषिः ।
धृतिर्भैक्ष्यं कुसीदं च दश जीवनहेतवः ।।

अर्थ – विद्या, कलाकुसरीची कामे, नोकरी, सेवा, गोपालन, विक्रय, शेती, धृती( =धाडस, युद्ध), भिक्षा मागणे व सावकारी हे दहा व्यवसाय (ब्राह्मण-क्षत्रियांनी) करावे.

यांशिवाय बैलगाड्या हाकणे, डोंगरावरून गवत किंवा सरपण आणून विकणे, हेही व्यवसाय त्यांनी करण्यास हरकत नाही, असे याज्ञवल्क्य सांगतो.

आपत्तींतही ब्राह्मणाने शूद्र वृत्तीचा व हीन वर्णाच्या पुरुषाने ब्राह्मणादी उत्तम वर्णांच्या वृत्तीचा आश्रय करू नये, असे वसिष्ठाचे मत आहे. पण क्षत्रिय व वैश्य या दोन वर्णांचा व्यवसाय कोण्याही आपद्ग्रस्ताने स्वीकारण्यास हरकत नाही; मात्र, आपत्ती नष्ट झाल्यावर आपद्धर्म म्हणून स्वीकारलेली हलक्या वर्णाची वृत्ती टाकून प्रायश्चित्त घ्यावे व पुन्हा आपल्या वृत्तीत प्रतिष्ठित व्हावे, असे बहुतेक धर्मशास्त्रकारांचे मत आहे.

ब्राह्मणाला वैश्याचा व्यवसाय पत्करावा लागला, तरी त्याने उटणी, तेले, चामडी, गोरस, फल-पुष्प, मद्य-मांस, गवत, पाणी, गुलाम, कालवड, इ. वस्तूंचा व्यापार करू नये, असे गौतमधर्मसूत्रात सांगितले(७.१५). आपस्तंबाने ब्राह्मणाला ज्या पदार्थांची विक्री करू नये असा निर्बंध घातला आहे त्याच पदार्थांचा काही अपवाद करून विनिमय करण्यास मात्र संमती दिली आहे (आप. ध. सू. १.२०१६.; १.२१.१-२). ब्राह्मणाने वृत्तिसंकटाच्या वेळी धर्मशास्त्रातले सर्व नियम बाजूस सारून कोणत्याही साधनाने उदरनिर्वाह करावा; पण सेवावृत्ती आचरू नये, असे गौतम सांगतो (७.२२); पण सेवावृत्ती स्वीकारायला हरकत नसल्याची इतर शास्त्रकारांची मतेही उद्धृत करतो. वैश्य व शूद्र यांनी आपत्काली कोणते नियम पाळावे, ते मात्र कोणीही सांगितले नाही. क्षत्रियांवरही निर्बंध घातलेले नाहीत. त्यावरून असे निष्पन्न होते, की वैश्यशूद्रांना आपत्प्रसंगी वरच्या वर्णाचा व्यवसाय न करता अन्य कोणतेही निर्वाहसाधन स्वीकारायला हरकत नसावी.

सच्छील, कुलीन व विद्वान ब्राह्मण आपत्तीत सापडल्यास राजाने त्याच्या धर्मवृत्तीची व्यवस्था करावी; अन्यथा त्याला दोष लागतो, असेही मनूने सांगितले आहे. [ हि. ध.; ध. सू. ]

**आपस्त•** एक भृगुकुलोत्पन्न ब्रह्मर्षी. हा तैत्तिरीय शाखेचा होता. कश्यप ऋषीने दितीकडून पुत्रकामेष्टी करविली; त्या प्रसंगी हा आचार्य होता. याच्या पत्नीचे नाव अक्षसूत्रा व पुत्राचे नाव कर्की असे होते. कृष्णयजुर्वेदाच्या पंधरा अध्वर्यु-शाखांपैकी तैत्तिरीय ही एक शाखा असून, त्या शाखेत अंतर्भूत असलेल्या आपस्तंब या उपशाखेचा हा सूत्रकार होता. तैत्तिरीय शाखेच्या सर्व उपशाखा सूत्रभेदावरून निर्माण झाल्या आहेत; त्यांतलीच आपस्तंब एक उपशाखा आहे. याज्ञवल्क्यस्मृतीत स्मृतिकार म्हणून याचा उल्लेख येतो. तर्पणात याचे नाव बौधायनानंतर व सत्याषाढ हिरण्यकेशीच्या पूर्वी येते, यावरून याची शाखा हिरण्यकेशीच्या बऱ्याच पूर्वीची असावी.

आपस्तंब आंध्रातला असावा व ती शाखाही तिथेच जवळपास निघाली असावी, असे डॉ. श्री. व्यं. केतकर व म. म. पां. वा. काणे यांचे मत आहे. डॉ. बुल्हर याचेही मत असेच आहे. तो या संबंधांत पुढील पुरावे देतो – (१) महार्णव ग्रंथात आपस्तंबाची जन्मभूमी आंध्र असल्याचे सांगितले आहे. (२) आपस्तंबशाखेचे ब्राह्मण सांप्रत बहुतांशी दक्षिण भागातच राहतात. (३) आपस्तंब आपल्या धर्मसूत्रात (२.७.१७.१७) एका चालीचा 'उदीच्यांची चाल' म्हणून उल्लेख करतो. वरील पुराव्याला हरकत घेऊन श्री. रामगोपाल हे, आपस्तंब हा उदीच्य म्हणजे कुरुपांचाल देशातला किंवा त्याच्या निकटच्या देशातला असल्याचे सांगतात. त्यांच्या मते आपस्तंबशाखेचे अनुयायी पूर्वी उत्तरेतच राहत होते. पुढे त्यांनी दक्षिणेत स्थलांतर केले असावे.

आपस्तंबाने पुढील ग्रंथ केले आहेत – (१) आपस्तंब श्रौतसूत्र, (२) आ. गृह्यसूत्र. (३) आ. ब्राह्मण (४) आ. मंत्रसंहिता (५) आ. संहिता (६) आ. सूत्र (७) आ. स्मृती (८) आ. उपनिषद् (९) आ. अध्यात्मपटल (१०) आ. अन्त्येष्टिप्रयोग (११) आ. अपरसूत्र (१२) आ. प्रयोग (१३) आ. शुल्बसूत्र (१४) आ. धर्मसूत्र. याच्या श्रौतसूत्रांतच श्रौत, गृह्य, धर्म, शुल्ब, मंत्रसंहिता, इ. भाग आहेत. या ग्रंथांवरून आपस्तंबशाखेचे महत्त्व समजून येते.

महाराष्ट्रात आपस्तंबशाखी लोक बहुधा देशस्थ ब्राह्मण असतात. भारतात आपस्तंबांची वस्ती सर्वत्र आहे. [ हि. ध.; म. ज्ञा. को.; इं. वे. क. सू.; प्रा. च. को. ]

**आपस्तंब कल्पसूत्र** कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेच्या या कल्पसूत्राचे ३० भाग असून, त्यांना प्रश्न अशी संज्ञा आहे. त्यांतले पहिले २४ प्रश्न म्हणजे श्रौतसूत्र होय. यात वैतानिक यज्ञासंबंधी माहिती आहे. दर्शपूर्णमास, अग्निहोत्र, चातुर्मास्य, विच्छयपराधप्रायश्चित्त, सोमयाग, वाजपेय, अश्वमेध, महाव्रत, चयन, इ. यज्ञविषयक विवेचन या श्रौतसूत्रात येते. २४ वा प्रश्न श्रौतसूत्राच्या परिभाषेचा आहे. २५ व २६ हे प्रश्न म्हणजे मंत्रपाठ होय. २७ वा प्रश्न म्हणजे गृह्यसूत्र होय. २८ व २९ हे प्रश्न धर्मसूत्र म्हणून ओळखले जातात. यांत चातुर्वर्णिकांची कर्तव्ये सांगितली आहेत. ३० वा प्रश्न हे शुल्बसूत्र होय. [ वै. सा.; म. ज्ञा. को.; हिंदुत्व ]

**आपस्तंब गृह्यसूत्र** आपस्तंब कल्पसूत्राचा २७ वा प्रश्न म्हणजे आपस्तंब गृह्यसूत्र होय. आपस्तंबाने या सूत्रात गृह्यसंस्कारांविषयी अल्पशी चर्चा केली असून, त्यांचे विस्तृत विवेचन आपल्या धर्मसूत्रात केले आहे. विवाहसंस्काराविषयीची चर्चा मात्र गृह्यसूत्रातच सविस्तर असून, धर्मसूत्रात प्राजापत्य व पैशाच या दोनच विवाहपद्धतींचा उल्लेख आहे. आपस्तंब कल्पसूत्राचे २५ व २६ हे प्रश्न मंत्रपाठाचे आहेत. मंत्रपाठ व गृह्यसूत्र यांचा परस्परसंबंध, मंत्रब्राह्मण व गोभिल गृह्यसूत्र यांच्यामधील संबंधासारखाच आहे. हे गृह्यसूत्र संक्षिप्त पण सरस आहे. [ इं. वे. क. सू. ]

**आपस्तंब धर्मसूत्र** आपस्तंब कल्पसूत्राचे २८ व २९ हे दोन प्रश्न म्हणजे आपस्तंब धर्मसूत्र होय. नावावरून हे आपस्तंब ऋषीने लिहिले असल्याचे सूचित होते. पण ते त्यानेच लिहिले, का त्या शाखेच्या कोण्या अन्य आचार्याने लिहिले, हे सांगणे कठीण आहे.

याचा निश्चित काल ठरविण्यास पुरेसा पुरावा अद्यापि उपलब्ध झालेला नाही. यातल्या पुष्कळशा संस्कृत शब्दांची रूपे अपाणिनीय आहेत. यावरून ते बरेच प्राचीन असावे, असे वाटते. बुल्हरच्या मते याचा काळ सनपूर्व ३००च्या अलिकडे येऊ शकत नाही. डॉ. पां. वा. काणे त्याच्याशी सहमत आहेत. त्यांच्या मते जेव्हा जैमिनीचा पूर्वमीमांसा संप्रदाय स्थापित झाला, त्या काळात हे धर्मसूत्र तयार झाले असावे. यात बौद्ध व तत्सदृश पंथांचा उल्लेख नाही, यावरून त्याचा काळ सनपूर्व ६०० ते ३०० हा मानावा लागतो.

दुसरा प्रश्न स्थलाचा. आपस्तंब शाखा दक्षिण भारताव्यतिरिक्त दुसरीकडे कुठे नाही. आपस्तंब उदीच्य वृत्तीचा म्हणजे उत्तर भारतीयांत रूढ असलेल्या एका चालीचा उल्लेख करतो (२.७.१७.१७). त्यावरून आपस्तंब शाखा व हे सूत्र दक्षिण भारतातच निर्माण झाले असावे, असे वाटते.

या सूत्रात व बौधायन धर्मसूत्रात काही परिच्छेद सारखे आहेत. यावरून एकातले उतारे दुसऱ्याने घेतले असावे, हे निश्चित ठरते. पण बौधायनाने आपस्तंबाचे उतारे घेतले का

आपस्तंबाने बौधायनाचे उतारे घेतले, ते सांगणे कठीण आहे.

या सूत्रात आचार, प्रायश्चित्त, ब्रह्मचारिधर्म, यज्ञोपवीत-धारण, श्राद्ध, अध्ययन, गृहस्थधर्म, वारसाहक्क, नीती, अध्यात्म, इ. विषयांची चर्चा केलेली आहे. कण्व, कुत्स, वार्ष्यायणी, पुष्कर, इ. पूर्व धर्मशास्त्रकारांची मते आपस्तंबाने उद्धृत केली आहेत. बौधायनाशी कित्येक ठिकाणी त्याने आपला मतभेद दाखविला आहे. बौधायन नियोगाला मान्यता देतो, तर आपस्तंब त्याचा निषेध करतो. जैमिनीची बरीचशी मते व पारिभाषिक शब्द आपस्तंब धर्मसूत्रात आढळतात. राजधर्माविषयी विवेचन करताना तो एका ठिकाणी म्हणतो, की 'ब्राह्मणाचे चोरीस गेलेले धन परत मिळविण्याच्या प्रयत्नांत राजाला मृत्यू आला, तर तो त्याचा यज्ञच ठरतो' (१०.२६.२). न्यायाधीश ऊहापोहकुशल, निर्णयसमर्थ, शुद्ध कुलांतले व प्रमादरहित असावे व अपराधाविषयी संशय असता त्यांनी कोणाला शिक्षा करू नये, असे त्याने सांगितले आहे (११.२९.५;५.११.२).

या सूत्राची ११ पटले असून पहिल्या व दुसऱ्या पटलांत अनुक्रमे ३२ व २९ कंडिका आहेत. हे धर्मसूत्र बौधायन धर्मसूत्रापेक्षा अधिक सुसंबद्ध आहे. हे गद्यात्मक असून यात जे श्लोक आहेत, ते इतरांचे घेतलेले आहेत. या सूत्राला प्राचीन काळापासून प्रामाण्य लाभले आहे. शाबरभाष्य, तंत्रवार्तिक, ब्रह्मसूत्र–शांकरभाष्य व मेधातिथी आणि विश्वरूप यांच्या मनुयाज्ञवल्क्यांवरील टीका, यांत आपस्तंबाचे उतारे घेतले आहेत. या सूत्रावर हरदत्ताने उज्ज्वला नावाची टीका लिहिली आहे.

आपस्तंबाचे धर्मसूत्र आहे, तसेच श्रौत व गृह्यसूत्रही आहे. पण ही तीन्ही सूत्रे एकाच आपस्तबाच्या हातची आहेत की काय, याविषयी संदेह आहे. गृह्य व धर्म ही सूत्रे एका आपस्तंबाची असावी व श्रौत दुसऱ्या कोणाचे तरी असावे, असे म्हणतात. [ हि. ध.; इं. वे. क. सू.; म. ज्ञा. को. ]

**आपस्तंब ब्राह्मण** हे देशस्थ ब्राह्मण असून, कर्नाटकात म्हैसूरपर्यंत वस्ती करून राहिले आहेत. यांची धर्मकृत्ये यजुर्वेदाच्या आपस्तंब शाखेप्रमाणे चालतात. पाहा – आपस्तंब. [ ब्रा. भि. वि. ]

**आपस्तंब श्रौतसूत्र** आपस्तंब कल्पसूत्र पाहा.

**आपस्तंब स्मृती** (१) या स्मृतीचे १० अध्याय असून, त्यात प्रायश्चित्तांचा विचार केलेला आहे. गायीसंबंधी अपराध, बालसंगोपनात निष्काळजीपणा, उच्छिष्ट-भोजन, दूषितोदकप्राशन, अभक्ष्यभक्षण, रजोदोष, अगम्यागमन, इ. अपराधांसाठी कोणती प्रायश्चित्ते घ्यावी, ते सांगितले आहे. चांद्रायण, कृच्छ्र, पंचगव्यस्नान, इ. उपायांनी दोषमुक्ती होते, असेही सांगितले आहे. म्हणून या स्मृतीला धर्मशास्त्र असे मानतात. [ हिंदुत्व ]

(२) याशिवाय आणखी एक आपस्तंब स्मृती अड्यार येथील ग्रंथालयात असून, ती अद्यापि छापली गेली नाही. ती स्मृती वरील स्मृतीहून वेगळी आहे. सदर हस्तलिखित स्मृतीचा अभ्यास केल्याअंती कळते, की ही स्मृती म्हणजे कोणत्या तरी एका मोठ्या कृतीचा भाग असावा. या स्मृतीत कर्त्याचा वैष्णव संप्रदायाकडे कल दिसून येतो. विष्णूला नैवेद्य दाखवून मगच श्राद्ध करावे, असे तो सांगतो. हे त्याचे लिहिणे रामानुजाचार्यांनी घालून दिलेल्या नियमाला धरून आहे. ही स्मृती लक्ष्मीधराच्या स्मृतीहून प्राचीन आहे. पण तिचा काळ मात्र निश्चित ठरविता येत नाही. या अमुद्रित स्मृतीची ६ पटले असून, पहिल्या पटलात कात्यायनाचा उल्लेख आला आहे. त्यावरून ही स्मृती इ. स. च्या ८ व्या शतकातली असावी, असे वाटते. [ के. व्ही. आर. ऐ. को. व्हॉ ].

**आपाकदान** आपाकाला मराठीत आवा म्हणतात. आवा म्हणजे लहानमोठ्या मृत्तिकापात्रांचा समुच्चय होय. मकर संक्रांतीच्या दिवशी लहानमोठ्या आकाराची संसारोपयोगी मातीची भांडी धान्याच्या राशीवर ठेवून ती पुढील मंत्राने सुवासिनींना दान देतात –

> नानाविधानि भाण्डानि स्थूलसूक्ष्माण्यनेकशः ।
> राशीकृतानि दास्यामि सर्वकामप्रसिद्धये ॥

अर्थ – नाना प्रकारची लहानमोठी भांडी एकत्र करून मी सर्व कामना पूर्ण होण्यासाठी दान देत आहे. [ व्रतराज ]

**आपापंथ** मुन्नादास नावाच्या एका सोनाराने या पंथाची स्थापना केली. अयोध्या प्रांतातील माडवा गावी या पंथाचे मुख्य पीठ आहे. नेपाळातही या पंथाचे अनुयायी दिसतात. हे लोक निर्गुण ब्रह्माचे उपासक असून, जातिभेद मानीत नाहीत. एकमेकांची भेट झाली असता 'बंदगीसाहेब' असे म्हणून नमस्कार करतात.

**आपिशली** (इ. सनपूर्व ७५०–७००) पाणिनिपूर्व व्याकरणकार. पतंजलीने याच्या शिष्यांचा उल्लेख केला आहे (भाष्य ६.२.३६). काशिकेत म्हटले आहे, की आपिशलीने लघु-गुरु नियमांचे विशेष रूपाने प्रतिपादन केले आहे (६.२.१४).

पाणिनीने आपल्या ह्रस्व–दीर्घ प्रकरणात याच्या सामग्रीचा उपयोग केलेला असण्याची शक्यता आहे. [पा. का. भा.; प्रा. च. को.]

**आप्तवाक्य** आप्त शब्दाच्या काही व्याख्या पुढीलप्रमाणे आहेत–(१) 'आप्तः खलु साक्षात्कृतधर्मा' = ज्याला धर्मसाक्षात्कार झाला आहे असा पुरुष. (२) 'यथार्थ-वक्ता' = यथार्थ बोलणारा. उदा० व्यास, गौतम, इ. (ऋषी) हे आप्त होत (त. सं.). (३) वस्तुतत्त्वाच्या अनुभवाने ज्याचा संपूर्णपणे निश्चय झाला आहे व रागद्वेषादी विकार उत्पन्न झाले, तरी जो खोटे किंवा विपरीत बोलत नाही, तो आप्त होय, अशी पतंजलीची व्याख्या आहे (न्यायकोश). अशा आप्ताचे जे वाक्य किंवा 'यथादृष्टस्यार्थस्य चिरव्यापयिषया प्रयुक्तः शब्दः'=यथादृष्ट अर्थाच्या प्रस्थापनासाठी योजलेला शब्द म्हणजे आप्तवाक्य होय. हे एक प्रमाण म्हणून मानलेले आहे.

**आप्तोर्याम** सोमसंस्थांपैकी एक याग. हा ब्रह्म्याच्या चौथ्या मुखापासून उत्पन्न झाला (ब्रह्मांड पु. २८). अतिरात्र यागाच्या पुढचा हा याग आहे. अतिरात्रापेक्षा यात चार स्तोत्रे व शस्त्रे अधिक असतात. यात अग्नी, इंद्र, विश्वेदेव व विष्णू यांना एकेक चमस अर्पण करतात. ज्याची गुरे जगत नाहीत किंवा ज्याला उत्तम गायीबैलांची कामना आहे, त्याने हा याग करावा, असे आश्वलायन सांगतो (श्रौ. सू. ९.११.१). या यागात एक सहस्र गायींपासून असंख्य गायींपर्यंत दक्षिणा सांगितली आहे. यात पांढरी खेचरे जोडलेला रथ होत्याला द्यायचा असतो. आप् = मिळणे, मिळविणे; यावरून इष्ट वस्तू प्राप्त करून देणाऱ्या या यागाला आप्तोर्याम अशी संज्ञा मिळाली आहे. [ हि. ध.; म. ज्ञा. को. ]

**आप्यायन** (१) तर्पण, प्रीणन किंवा शक्तिसंवर्धन. सोमयागात सोम विकत घेतल्यापासून प्रतिदिन सर्व ऋत्विज त्या सोमावर कोमट पाणी मंत्र म्हणून शिंपडतात, त्याला आप्यायन असे नाव आहे. सोमयागाच्या प्रधान दिवशी त्याचा रस काढतात.

मंत्रशास्त्रात मंत्राचे आप्यायन अर्थात त्याचे सामर्थ्यवर्धन पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

**कुशोदकेन जप्तेन प्रत्यर्णं प्रोक्षणं मनोः ।**
**वारिबीजेन विधिवदेतदाप्यायनं मतम् ।।**

अर्थ – वारिबीजाचा जप करून कुशोदकाने मंत्राच्या प्रत्येक वर्णाचे विधिवत प्रोक्षण करणे, याला आप्यायन म्हणतात. [ सर्व–दर्शनसंग्रह ]

(२) पितृकार्यातले विशिष्ट कृत्य. यात पितरांना उद्देशून तिल, मधुर रस, इ. दाने द्यावी, असे मत्स्यपुराणात (१५.३२–४१) सांगितले आहे. [ पु. इं. ]

**आफ्रिदी** वायव्य सीमा प्रांतातली एक संघटित व बलाढ्य जमात. ऋग्वेदात 'अपरीत' नावाने ज्या लोकांचा निर्देश आहे, ते लोक हे असावे. सफेद कोह नावाच्या टेकड्यांत यांचे वास्तव्य आहे. सुप्रसिद्ध खैबरखिंड ती याच प्रदेशात आहे. ही खिंड म्हणजे भारत व मध्य आशिया यांच्यामधला सांधा आहे. दुसरी कोहट ही खिंडही याच जमातीच्या प्रदेशात आहे. त्यामुळे या जमातीला वायव्य सीमा प्रांतात महत्त्व प्राप्त झाले आहे. आफ्रिदींचा पठाण जमातीत समावेश होतो. यांच्यांत काही ग्रीक संस्कृतीचे अवशेष आढळतात. प्राचीन काळी ग्रीको–बॅक्ट्रियन राजांचे या प्रदेशावर राज्य होते, हे त्याचे कारण असावे. शिकंदराची भारतावर स्वारी याच प्रदेशातून झाली होती.

आफ्रिदी प्रदेश डोंगराळ पण ओसाड आहे. तिथे अक्रोडाची झाडे वाढतात व रताळी पिकतात. हे लोक जाडेभरडे कापड व जाळी विणतात. या वस्तूंना पेशावरच्या बाजारात मागणी असते. आफ्रिदी माणूस बंदुकीचा मोठा भोक्ता असतो. केवळ बंदुकीच्या मोहाने ते ब्रिटिश सैन्यात भरती होत असत. त्यांतले कित्येक लोक बंदूक मिळाली, की संधी साधून सैन्यातून पळही काढीत. यांची नेमबाजी अचूक असते. हे कष्टाळू व धाडसी असल्यामुळे चांगले सैनिक होऊ शकतात. गनिमी काव्याच्या युद्धातही हे फार हुशार असतात. ब्रिटिश राजवटीशी यांचे हाडवैर असूनही, कित्येक ब्रिटिश लेखकांनी यांचे कौतुक केले आहे. आदरसत्कार हा त्यांचा विशेष गुण आहे.

आफ्रिदी माणूस पिळदार, मजबूत, उंच व सडपातळ असतो. त्याचा चेहरा लांबट व नाक उंच असते. वर्ण हस्तिदंती गोरा असतो. चुणीदार सैल विजार, पैरण, जाकिट व पगडी हा आफ्रिदी लोकांचा सर्वसामान्य पोषाख असतो. ते बंदुकीशिवाय सहसा बाहेर पडत नाहीत. त्यांच्यांत अनेक टोळ्या असतात व परस्परांत बेबनावही असतो. पण त्यांच्या स्वातंत्र्याला धोका येईल तेव्हा ते सगळे एक होतात. त्यांनी एकदा शपथ घेतली, की मग ते ती कधीही मोडीत नाहीत. भौगोलिक परिस्थितीमुळे ते भटके बनले आहेत. ते आपल्या टोळीच्या प्रमुखाला 'मलिक' म्हणतात. खैबरच्या मलिकाला सर्वश्रेष्ठ मानतात. इ. स. १८३९-१९३० या कालखंडात ब्रिटिश फौजा व आफ्रिदी टोळ्या यांच्यामध्ये अनेक रक्तलांच्छित संघर्ष झाले. इ. स. १९३० सालचा संघर्ष 'सरहद्द गांधी' अबदुल गफारखान यांना ब्रिटिशांनी अटक केल्यामुळे झाला. गफारखानांनी यांच्यामधूनच

लाल डगलेवाले अहिंसक सैनिक निर्माण केले होते. आफ्रिदी टोळ्यांची विभागणी आठ कुळांमध्ये झालेली आहे. प्रत्येक कुळीत आणखी बऱ्याच पोटकुळांचाही असतात. [ रे. क. इं. ]

**आबदस्त** मुसलमान लोक प्रार्थनेपूर्वी जे विधियुक्त स्नान करतात, त्याला आबदस्त, वझू किंवा वुझू असे नाव आहे. जेव्हा विटाळ झालेला असतो, तेव्हा सर्वांगस्नान करावे लागते. इतर वेळी हातपाय धुवून डोक्यावरून व मानेवरून ओला हात फिरविला की काम भागते. काही वेळा शरीराचे गुह्य भागही धुवावे लागतात. पाणी दुर्मिळ असेल किंवा प्रकृतीला मानवत नसेल, तर मातीने किंवा वाळूने शरीरशुद्धी केली तरी चालते. या प्रकाराला तयम्मुम म्हणतात.

एकदा सर्वांगस्नान केल्यावर मध्यंतरी विटाळ न झाल्यास प्रत्येक प्रार्थनेच्या वेळी सर्वांगस्नान करण्याची जरुरी नसते. मुहम्मदाने सर्वांगस्नानाचे महत्त्व जागोजाग वर्णिले आहे. तो म्हणतो, 'अशा स्नानामुळे सर्व देह पापापासून मुक्त होतो. शेवटच्या निवाड्याच्या दिवशी प्रत्येकाने हात, पाय, तोंड स्वच्छ धुवून यावे. शरीराच्या ज्या भागाला पाण्याचा स्पर्श झाला असेल, त्या जागी रत्नालंकार झळकू लागतील.' (मिश्कात ३.१.).

प्रत्येक मशिदीत स्नानासाठी विहीर किंवा हौद बांधून पाण्याची सोय केलेली असते. [ डि. इ. ]

**आबादबी** एक खेळ. मुले चिंध्यांचा किंवा रबराचा चेंडू घेऊन तो वर उडवितात. जो मुलगा तो चेंडू झेलतो, तो इतर मुलांना चेंडू फेकून मारतो. मुले आपला मार चुकवीत चेंडू झेलायचा प्रयत्न करतात व अशा रीतीने खेळ चालू राहतो.

**आभासवाद** अद्वैतमतात आत्माच तेवढा सत्य व आत्मभिन्न सर्व वस्तू मिथ्या आहेत. आत्मा अंतर्यामी नाही, साक्षी नाही व जगत्कारणही नाही. तथापि तो जेव्हा अज्ञानरूप उपाधीने युक्त होऊन अज्ञानाशी तादात्म्य पावतो, तेव्हा त्यात पडलेल्या चिदाभासाच्या अविवेकामुळे तो अंतर्यामी, साक्षी आणि ईश्वर म्हटला जातो. बुद्धि-उपहित तादात्म्याला प्राप्त होऊन बुद्धिगत स्वकीय चिदाभासाला न जाणल्याने जीव हा कर्ता, भोक्ता व प्रमाता मानला जातो. या मताला आभासवाद म्हणतात. या वादानुसार जीव नाना असून, ईश्वर एक आहे.

पूर्ण संविद्रूप परमेश्वराच्या ठिकाणी प्रतिबिंबित होणारे हे विश्व परमेश्वराहून अभिन्न असूनही घटपटादी रूपांनी भिन्न अवभासित होते, असा प्रत्यभिज्ञादर्शनाचाही सिद्धान्त आहे. [ भा. द.; प्रत्यभिज्ञादर्शन ]

**आभीर** लोक व देश. ब्राह्मण पुरुष व अंबष्ठ स्त्री यांपासून उत्पन्न झालेल्या संततीला आभीर म्हणतात, असे मनू सांगतो (१०.१५). महाभारतात त्यांचा दस्यू व म्लेच्छ या नावांनी उल्लेख आहे. सभापर्वात त्यांचा पारदाशी संबंध जोडलेला दिसतो ( ३२). हे वृत्तीने पशुपाल किंवा गवळी आहेत. आजचे अहीर हे मूळच्या आभीरांचेच वंशज होत. पुराणकालापासून भारतातील एक जमात म्हणून आभीर लोक प्रसिद्ध आहेत. सांप्रत उत्तर प्रदेश, बिहार, राजस्थान, गुजरात व सौराष्ट्र या भागात यांची वस्ती मोठ्या प्रमाणात आहे. आभीर हे परद्वीपस्थ असून, ते पुढे हिंदूंच्या चातुर्वर्ण्यात शूद्रवर्गात समाविष्ट झाले, असे काही समाजशास्त्रज्ञ म्हणतात.

भारतात आभीरांच्या स्वाऱ्या वायव्येकडून झाल्या. सनपूर्व दुसऱ्या शतकात आभीरांचा प्रदेश बॅक्ट्रियन ग्रीकांनी जिंकून घेतला व त्या भागात आपली वसाहत केली. टॉलेमी या प्रदेशाला 'इंडोसिथिया' म्हणतो. इंडोसिथियात अबेरिया किंवा अबीरीया याचा समावेश टॉलेमीने केला आहे. अबेरिया म्हणजेच आभीरांचा प्रदेश होय. भारतात आभीर सत्तेचा उदय इ. स. १८० च्या सुमारास मानावा लागतो, असे जयचंद्र विद्यालंकार म्हणतात. क्षत्रपांचा सेनापती रुद्रमूर्ती आभीर याचा एक लेख इ. स. १८१ चा आहे. आभीर लोक पश्चिम राजस्थानात सिंध प्रांताच्या सीमेवर राज्य मिळवून बसले होते. रुद्रदामन्ने मारवाडची मरुभूमी जिंकल्यावर आभीरांचे राज्य क्षत्रपांच्या राज्यात विलीन झाले. पुढे आभीर लोक हळूहळू क्षत्रपांच्या सत्तेत उच्चाधिकार मिळवू लागले. नंतर थोड्याच काळात त्यांनी क्षत्रप राज्याचा पश्चिम भाग परत जिंकून घेतला व तिथे आपला राजवंश स्थापित केला. शेवटी तर काही क्षत्रपांचे सगळे राज्य व महाराष्ट्राचा उत्तर भागही त्यांच्या ताब्यात आला होता. आंध्रांच्या नंतर आभीरांनी भारताच्या पश्चिम विभागावर राज्य मिळविले. ईश्वरसेन या नावाचा एक आभीरांचा राजा इतिहासात आढळतो. ईश्वरदत्त नावाचा एक आभीर पुरुष पश्चिम भारताचा महाक्षत्रप झाला होता व त्याने इ. स. च्या २ ऱ्या शतकात महाराष्ट्राचा काही प्रदेश सातवाहनांकडून जिंकून घेतला होता. ईश्वरसेनाचे राजघराणे व अपरान्ताचा त्रैकूटक वंश हे दोन्ही एकच होत. आंध्रांनंतर उत्तर महाराष्ट्र व त्या नजिकचा प्रदेश यांवर इ. स. २४८ साली आभीरांची सत्ता सुरू झाली.

पार्गिटर म्हणतो, की भारतीय युद्धानंतरच्या काळात ज्या अनेक घडामोडी झाल्या, त्यांच्याशी आभीरांचा काही ना काही संबंध लागतोच. आभीरांनी गुजरातच्या यादवांवर हल्ला करून त्यांचा मोड केला. अलाहाबाद येथील समुद्रगुप्ताच्या स्तंभ-

लेखात म्हटले आहे, की आभीर देश हे नैर्ऋत्य भारतातील जमातीच्या राज्यांपैकी एक राज्य असून, त्याचे राजे गुप्त सम्राटांचे मांडलिक होते. गुप्त काळात ते पूर्व राजस्थान व माळवा या प्रदेशांत पसरले होते.

दक्षिणेत येण्यापूर्वी अबेरियात म्हणजेच उत्तर सिंध प्रदेशात आभीरांची वस्ती होती. पुढे ते सिंधमधून खाली उतरून जल-मार्गाने कोकणात उतरले असावे आणि त्यानंतर नाशिककडे आले असावे. मार्कंडेय पुराणात आभीरांना दक्षिण देशाचे रहि-वासी म्हटले आहे (५७–५८). आभीरांची एक शाखा दक्षिणेत गेली व तेच तिकडे पुंड्रक, केरळ, पुलिंद, आंध्र, इ. नावांनी ओळखले जाऊ लागले.

आभीरांच्या भाषेला अपभ्रंश असे नाव आहे. श्रीकृष्णाचे बालरूप हे आभीरांचे उपास्य होय. पाहा – आभीर राजे. [ हि. जॉ. ए. इं.; भा. इ. रू.; हि. ध.; क्ला. डि. हिं. मा.; म. ज्ञा. को. ]

## आभीर राजे

पुराणात भविष्यकालीन राजवंश सांगताना आंध्रांनंतर दहा आभीर राजांचा निर्देश आहे – 'दशाभीरास्तथा नृपाः' (मत्स्य पु. २७२.१८). आंध्रां-नंतर यांचा उल्लेख येत असल्यामुळे आभीर राजांचा काल आंध्रांनंतरचा ठरतो. इ. स. २२५ नंतर पुढे ६७ वर्षांत हे दहा आभीर राजे होऊन गेले असावे. त्यांची नावे मात्र स्पष्टपणे आढळत नाहीत.

विष्णुपुराणात आंध्र राजांच्या नंतर सात आभीर राजे होऊन गेले, असा उल्लेख आहे (४.२४). भागवतात सात आवभृत्य राजे होऊन गेले, असे जे म्हटले आहे, ते बहुधा आभीरांबद्दलच असावे. वायुपुराणात या राजांची संख्या दहा सांगितली आहे.

आभीर ईश्वरदत्त याने क्षत्रपांचा पराभव करून पश्चिम भारतावर आपली सत्ता स्थापली. पण पुनश्च थोड्याच कालात पश्चिम प्रदेशावर क्षत्रपांची राजवट सुरू झाली, असे नाण्यांवरून वाटते. इ. स. २५० च्या सुमारास महाराष्ट्रात आभीर राजा ईश्वरसेन याने आपली सत्ता स्थापली आणि गुजरात व मध्यभारत यांवर साम्राज्य स्थापले. त्याने आपला संवतही चालू केला होता. वीरसेन या आभीर राजाची सत्ता इ. स. ४१९ मध्ये खानदेशावर होती, असे नाशिकच्या शिला-लेखात म्हटले आहे. इ. स. च्या ८ व्या शतकात मध्यप्रांताच्या पूर्वेकडील भागावरही आभीरवंशाची राजवट होती, असे दिसते. अहीर हे आभीर शब्दाचे अपभ्रष्ट रूप होय. सात-वाहनानंतर तीनशे वर्षे आभीर राजे खानदेश, नाशिक, काठे-वाड, पालनपूर व कच्छ या प्रदेशांवर राज्य करीत असावे. इ. स. च्या ८ व्या शतकात काठी लोक गुजरातेत आले तेव्हा तिथे सर्वत्र आभीरांचे राज्य होते, असे इतिहास सांगतो. हेम-चंद्राच्या द्व्याश्रय काव्यात, जुनागडाजवळच्या वनथळी येथे राज्य करणारा चूडासमा गृहरिपू हा राजा आभीर होता, असे म्हटले आहे. हस्तिनापुरावरही एका अहीर वंशाने राज्य केले आहे. भारतेतिहास या पुस्तकात अहीर वंशातल्या सोळा राजांनी २२७ वर्षे राज्य केले, असे म्हटले आहे. अहीर राजां-विषयी अनेक दंतकथा प्रचलित आहेत. तात्पर्य आभीर किंवा अहीर नावाचा एक बलाढ्य राजवंश इ. स. च्या पहिल्या पाच शतकांत भारतात नांदत होता, असे कळून येते. [ म. च. को.; सं. मु.; उज्जयिनी ]

## आभ्युदयिक श्राद्ध

मंगलप्रसंगी केले जाणारे श्राद्ध. पुत्र-जन्म, उपनयन, विवाह, वापीकूपोत्सर्ग, इ. प्रसंगी हे श्राद्ध विहीत आहे. याचा विधी असा – समसंख्य ब्राह्मणांना भोजन, सव्याने पूजोपचार, तिळाऐवजी यवांचा वापर, दर्भ सरळ धरणे, ब्राह्मणाच्या हातावर होम, नान्दीमुख नामक पितरांचे आवाहन व 'स्वधा' शब्दाचे वर्जन (आश्व. गृ. सू. २.५.१३–१५; गोभिल गृ. सू. ४.३.३५–३७). पाहा – नांदीश्राद्ध. [ हि. ध. ]

## आमर्दक क्षेत्र

हे क्षेत्र व बारा ज्योतिर्लिंगांतले औंढ्या नागनाथ ही दोन्ही क्षेत्रे एकच असावी. याला हे नाव पडण्याचे कारण पुढील श्लोकार्धात सांगितले आहे –

आमर्दयानि पापानि तस्मादामर्दकं मतम्।

अर्थ – इथे पापे चिरडली जातात म्हणून याला आमर्दक मानले आहे.

या क्षेत्राला कृतादी चार युगांत अनुक्रमे ज्योतिर्मय, मुक्ती, स्पर्श व नागनाथ अशी नावे पडली आहेत. पाहा – औंढ्या नागनाथ. [ हि. ध. ]

## आमर्दकी व्रत

व्रतारंभ कोणत्याही मासाच्या शु. द्वादशी-पासून करतात. व्रतावधी एक वर्ष. आव-ळीच्या झाडाखाली विष्णु-लक्ष्मींची पूजा व रात्रौ जागरण हा याचा मुख्य विधी आहे. फल – सौभाग्यप्राप्ती. [ हि. ध. ]

## आमलकमुष्ट्यादिक्रीडा

प्राचीन भारतातील एक खेळ. एका खेळाडूने मुठीत काही आवळे घेऊन दुसऱ्या गड्याला त्यांची संख्या विचारायची. उत्तर बरोबर आले, तर ते आवळे दुसऱ्या गड्याला द्यायचे व उत्तर चुकले, तर दुसऱ्या गड्याने पहिल्याला त्याच्या हातात असतील

त्याच्या दुप्पट आवळे द्यायचे, असा या खेळाचा नियम असे.

अजूनही गडे – फाडे नावाचा असाच एक खेळ कोकणातली मुले खेळतात. फक्त ती आवळ्यांऐवजी काजू, चिंचोके, सुपाऱ्या वगैरे वस्तू घेतात. [ प्रा. भा. म.

**आमलकस्नान** संपत्तीची इच्छा करणाऱ्या मनुष्याने नेहमी आवळ्याचा कल्क अंगाला लावून स्नान करावे, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे. परंतु सप्तमी, नवमी या तिथींना, तसेच पर्वकाली व चंद्र-सूर्यग्रहणांच्या वेळी आमलकस्नान करू नये, असा त्याचा निषेधही सांगितला आहे. [ नि. सिं ]

**आमलकी एकादशी** फाल्गुन शु. एकादशीचे नाव. या दिवशी उपवास करून आवळीच्या झाडाखाली विष्णु-लक्ष्मींची पूजा करतात. या व्रताची कथा अशी–

एके दिवशी देव आवळीच्या झाडाखाली गेले असता, विष्णूने आकाशवाणीच्या द्वारे त्यांना आवळीचे माहात्म्य ऐकविले. ते ऐकून देवांनी फाल्गुन शु. एकादशीच्या दिवशी आमलकीव्रत केले व ते महापदाला चढले. [ हि. ध. ]

**आमलो घोटन** बिहारमधील लग्नसमारंभातला एक विधी. वधूपक्षाची कोणीतरी वडीलधारी स्त्री वधूच्या आईच्या हातात पैसे किंवा दागिने ठेवते. नंतर न्हावीण वधूच्या आईला आंब्याच्या पानाच्या शिरा काढून देते. त्या ती एकदा चावून ठेवून देते. नंतर त्या शिरा वधूच्या डोक्यापासून पायांपर्यंत ओढतात. मग वधूला विचारतात, ' तू शांत झालीस का ?' ती ' होय ' असे उत्तर देते. या विधीला भागलपूरमध्ये फार महत्त्व आहे. [ वि. पे. ला. ]

**आमश्राद्ध** आम म्हणजे न शिजविलेले अन्न. त्याने करायचे श्राद्ध ते आमश्राद्ध होय. ते केव्हा करावे, याविषयी स्कंदपुराणात एक श्लोक आहे(७.१.२०६), तो असा –

**द्रव्याभावे द्विजाभावे प्रवासे पुत्रजन्मनि ।**
**आमश्राद्धं प्रकुर्वीत यस्य भार्या रजस्वला ॥**

अर्थ – द्रव्य नसता, ब्राह्मण मिळत नसता, प्रवासात, पुत्रजन्माच्या प्रसंगी व पत्नी रजस्वला असता आमश्राद्ध करावे.

ज्याला पार्वणश्राद्ध करण्याचा अधिकार असेल, त्यानेच आमश्राद्ध करायचे असते. मरीची सांगतो, की जे श्राद्ध ज्या तिथीस नियमित असेल, अशा अमावास्यादी श्राद्धांविषयी आमश्राद्धाचा पर्याय विहित आहे. मासिक व सांवत्सरिक श्राद्धांना हा पर्याय योजू नये.

अशा श्राद्धात इतर श्राद्धविधी यथोक्त करून, भोजन वाढण्याच्या प्रसंगी केवळ शिधा पुढे ठेवतात. आमान्नाचे प्रमाण पक्वान्नाच्या चौपट, दुप्पट किंवा निदान त्याच्याइतके असावे, असे सांगितले आहे. शूद्रांना आमश्राद्धच विहित आहे (मत्स्य पु. १७.७०). [ ध. सिं.; नि. सिं.; हि. ध. ]

**आमषष्ठी व्रत** एक काम्यव्रत. ज्येष्ठ शु. षष्ठीला हे करतात. व्रताचा विधी पुढीलप्रमाणे – सौभाग्यवती स्त्रिया तांदुळाच्या पीठाचे एक मांजर बनवितात. मग षष्ठी देवीची व त्या मांजराची पूजा करतात. त्याबरोबरच मंतरलेल्या सुताच्या गुंड्याचीही पूजा करतात. व त्याचा दोरा बनवून नवीन जन्मलेल्या मुलाच्या हातात बांधतात. या दिवशी स्त्रिया उपास करतात. व्रताचे फल – संततीला दीर्घायुष्याची प्राप्ती.

याची कथा पुढीलप्रमाणे –

एका ब्राह्मणाची सून चोरून खात असे व मांजरावर आळ घेत असे. ते मांजर षष्ठीदेवीचे वाहन होते. पुढे त्या सुनेला मुलगा झाला, पण तो सहाव्या दिवशी नाहीसा झाला. असे पुढील आठ बाळंतपणांत घडले. त्यामुळे घरातले लोक सुनेला चेटकी म्हणू लागले. त्या रागाने ती वनात गेली व मोठ्याने शोक करू लागली. तेव्हा षष्ठीदेवी तिच्यापुढे प्रगट झाली. देवीने तिला सांगितले, की ' तू मांजरावर आळ घेतेस; म्हणून मी तुझी मुले नाहीशी करते. माझे हे काळे मांजर इथे मृतप्राय होऊन पडले आहे, त्याच्या अंगाला तू दही लाव व ते सगळे दही आपल्या जिभेने चाटून खा. ' मग सुनेने त्याप्रमाणे केल्यावर तिला तिची सगळी मुले परत मिळाली. [ हिं. हॉ. से. ]

**आमियाजी** राजस्थानातील मुलींचा एक खेळ. सर्व मुली एकमेकींचे हात धरून वर्तुळ करतात. मग एक मुलगी मासोळी बनून त्या वर्तुळात उभी राहते. सर्व मुली गोलाकार फिरत फिरत आतल्या मासोळीला विचारतात, ' मछली मछली कितनो पाणी ? ' मासोळीही वर्तुळात फिरत आपल्या पायांना स्पर्श करून ' इतनो पाणी ' असे उत्तर देते.

तिसऱ्यांदा विचारल्यावर ती आपल्या डोक्याच्या वर पाणी आहे, असे सांगते. ते ऐकताच सर्व मुली ' मछली डूबगी, मछली डूबगी ' असे म्हणत पळू लागतात. मासोळीही त्यांच्या मागे पळते व एखाद्या मुलीला शिवते. मग पुढच्या डावात ती शिवलेली मुलगी मासोळी होते.

**आमिष पदार्थ** प्राण्यांच्या हाडांचा चुना, चर्म-पात्रातले पाणी, महाळुंग, ईडलिंबू, वैश्वदेव न झालेले

अन्न, विष्णूला अर्पण न केलेले अन्न, मसुरा व मांस हे आठ आमिष पदार्थ होत. [ धर्मसिंधू ]

**आमिक्षा** तापलेल्या दुधात दही ओतल्याने जो दुधाचा चोथा बनतो, त्याला आमिक्षा म्हणतात ( आप. श्रौ. ८.२.६.). हा एक यज्ञीय हवी आहे. आमिक्षा फडक्यातून गाळताना जो द्रवपदार्थ खालच्या पात्रात पडतो, त्याला 'वाजिन' म्हणतात. आमिक्षेला पयस्या असेही नाव आहे. विविध देवतांना आमिक्षा हा हवी सांगितलेला आहे. उदा० वैश्वदेवी आमिक्षा, मैत्रावरुणी आमिक्षा इत्यादी. वाजिनाची देवता वाजिन् ही आहे (मै. सं. १.१०.१). आमिक्षेची देवता बदलली, तरी वाजिनाची बदलत नाही. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**आमेन** हा हिब्रू शब्द असून, त्याचा अर्थ 'तथास्तु' किंवा तसे असो असा आहे. जुन्या करारात स्तुतिवचन, शाप किंवा शपथ याला अनुमती देण्यासाठी हा शब्द योजलेला आहे. यहुदी लोकांच्या सिनेगॉगमध्ये (प्रार्थनामंदिरात) स्तुतिवचनानंतर व धर्मगुरूच्या आशीर्वचनानंतर अशी सांघिक अनुमती देत असत. वैयक्तिक किंवा सामुदायिक प्रार्थनेनंतर प्रभुस्तवन झाले, तरच हा शब्द उच्चारायचा असे. जेवणापूर्वी व नंतर प्रभुस्तवन करून आमेन म्हणावे, अशी ख्रिस्ती धर्माची आज्ञा आहे. शिवाय हा शब्द उच्चारल्याने शपथ, शाप, सदिच्छा इ. गोष्टींना सार्वत्रिक मान्यता मिळते. ख्रिस्ताचे विशेषनाम म्हणूनही काही वेळा हा शब्द योजतात. काही पंथांत हे एका देवदूताचे नाव मानलेले आहे. हिब्रू आमेन आणि भारतीय ॐ या दोन शब्दांत बरेच साधर्म्य आहे. 'तथास्तु' किंवा अनुमती हा ओंकाराचाही अर्थ सांगितलेला आहे. [ एन्सा. रि. ]

**आम्नाय** याचे तीन अर्थ दिलेले आहेत – (१) 'सम्यगभ्यासः'= नियम धारण करून व गुरुमुखश्रवणपूर्वक अध्ययन करणे, (२) 'सम्यक् पाठः'= चांगल्या प्रकारे पठन करणे व (३) वेद (न्यायकोश). आम्नाय शब्दाचा मूळ अर्थ त्या त्या शास्त्राचा आदिग्रंथ अथवा उपदेश असा आहे. गौतम धर्मसूत्रात मानवधर्मशास्त्राला आम्नाय मानले आहे (१.५१; १०.२२). धर्मशास्त्राचा तोच आदिग्रंथ असून, त्याच्या आधारावरच पुढे स्वायंभुव मनूचे धर्मशास्त्र रचले गेले. जैमिनीच्या सूत्रांत आम्नाय शब्दाचा प्रयोग अनेकदा येतो. 'आम्नायस्य क्रियार्थत्वात् ...' (१.२.३) या सूत्रातले आम्नायपद मीमांसा व याज्ञिक यांच्या मूल ग्रंथांचे अर्थात ब्राह्मणग्रंथांचे वाचक आहे. वैदिक ग्रंथांमध्ये शाखांच्या आदिग्रंथाला आम्नाय म्हणत. कात्यायनाने ऋक्सर्वानुक्रमणीच्या प्रारंभी लिहिले आहे की –

अथ श्री ऋग्वेदाम्नायके शाकलके ...

याचा अर्थ शैशिरी आदी शाखांचे मूळ शाकलक आम्नाय हे होते, असा आहे. महाभारतात (शांति. २६६) हाच अभिप्राय अधिक स्पष्ट केलेला आहे –

आम्नायेभ्यः पुनर्वेदाः प्रसृताः सर्वतोमुखाः

अर्थ – आम्नायांमुळे वेद पुनश्च प्रसार पावले व सर्वतोमुखी झाले.

याचा भावार्थ आम्नाय=चरण यांच्यामुळे वेदशाखांचा विस्तार झाला, असा आहे. पाहा – चरण. [ वै. वा. इ. ]

**आम्रकुब्जासन** जैन धर्मग्रंथांत श्रमणांसाठी सांगितलेले एक आसन. आंब्याच्या आकारासारखी शरीराची अवस्था करून राहणे, याला आम्रकुब्जासन असे म्हणतात. जैन श्रमणांना तपश्चरणासाठी जी आसने विहित आहेत, त्यांत आम्रकुब्जासनाचा अंतर्भाव होतो. [ हि. जै. मो. ]

**आम्रकूट** शोण व नर्मदा यांचे उगमस्थान. विंध्यश्रेणीतील अमरकंटक या स्थानालाच पुराणात आम्रकूट म्हटले आहे. पाहा – अमरकंटक. [ पुराणतत्त्वमीमांसा ]

**आम्रपुष्पभक्षण** वर्षप्रतिपदेला मदनपूजेचा एक भाग म्हणून आंब्याचा मोहर खावा, असे विधान आहे. निर्णयसिंधूत हा विधी फाल्गुन पौर्णिमेला सांगितला आहे. त्याचा मंत्र असा –

चूतमग्र्यं वसन्तस्य माकन्द कुसुमं तव।
सचन्दनं पिबाम्यद्य सर्वकामार्थसिद्धये ॥

अर्थ – हे आम्रवृक्षा, वसंताचे अग्रपुष्प असलेला तुझा मोहर मी चंदनमिश्रित करून सर्व कामनांच्या सिद्धीसाठी प्राशन करीत आहे. [ हि. ध.; निर्णयसिंधू ]

**आम्रातकेश्वर** मत्स्यपुराणातील आठ गुह्य लिंगांपैकी एक. वसरा (इराक) येथे सापडलेल्या एका लंबगोल मुद्रेवर एक शिवलिंग दाखविले असून, त्याखाली 'आम्रातकेश्वर' अशी अक्षरे आहेत. हे एका पर्वताचेही नाव आहे. पाहा – गुह्य लिंगे. [ डे. हिं. इ. ]

**आयतन** (१) बौद्ध दर्शनातली एक संज्ञा. 'आयं प्रवेशं तनोतीति आयतनम्' = प्रवेशद्वार. चक्षू, श्रोत्र, रसना, इ. षडिंद्रिये व रूप, शब्द, रस, इ. त्यांचे विषय, ही

ज्ञानाच्या उत्पत्तीची द्वारे होत, म्हणून त्यांना आयतन अशी संज्ञा आहे. यांपैकी इंद्रियांना ‘ अध्यात्म आयतन ’ व विषयांना ‘ बाह्य आयतन ’ म्हणतात. [ बौ. द. मी. ]

(२) यज्ञस्थान, देवस्थान व चैत्य असे याचे अर्थ आहेत. वैदिक वाङ्मयात प्रारंभी या शब्दाचा अर्थ गृह किंवा वसतिस्थान असा होता. कालांतराने त्याला प्रांगण किंवा परिसर हा अर्थ प्राप्त झाला. मठ व मंदिरे यांनी युक्त अशा वसाहतीलाही आयतन हे नाव होते. पुढे त्याला देवालय हा अर्थ मिळाला (मत्स्य पु. २७७.२८–३४). पंचायतन (पाच देवांचे स्थान) हा शब्द अग्निपुराणात (४३.१) व देवायतन हा शब्द भविष्यपुराणात (१३०.१७) आला आहे. [ एन्सा. हिं. आ. ]

**आयतुल् कुर्सी** कुराणातले एक गीत. याला ‘ सिंहासन गीत ’ असे नाव आहे (२.२५६). रात्री झोपण्यापूर्वी जो हे गीत म्हणेल, त्याच्या घराचे देव संरक्षण करील, असे मुहम्मदाने म्हटले आहे. [ डि. इ. ]

**आयतुल् फतह** कुराणातला एक भाग. याच्या पठनाने मनोरथ पूर्ण होतात, अशा श्रद्धेने प्रत्येक प्रार्थनेनंतर हा भाग म्हणण्याची चाल आहे. [ डि. इ. ]

**आयतुल् हिफ्ज़** कुराणातल्या काही संरक्षक गीतांना हे नाव आहे. मुसलमान लोक ताइतांवर ती कोरून ते गळचात वा दंडात बांधतात. [ डि. इ. ]

**आयंबिल वद्धमाण** जैन श्रावकांचे एक उपवासव्रत. या व्रताचरणात दिवसातून एक वेळ फक्त आयंबिल अन्नाचे सेवन करतात. आयंबिल म्हणजे केवळ शिजविलेला भात होय. त्याला कोणतेही तोंडीलावणे घ्यायचे नाही किंवा त्या भातात काहीही कालवण घालावयाचे नाही. आयंबिल सेवनानंतर चउत्थ उपवास, मग दोन वेळा आयंबिल भोजने, मग पुन्हा चउत्थ उपवास, असे सत्र शंभरावे आयंबिल भोजन येईपर्यंत करायचे असते. या संपूर्ण सत्राला चौदा वर्षे, तीन महिने व वीस दिवस लागतात. [ हि. जै. मो. ]

**आयरिय** (सं. आचार्य) जैन मठात ज्या व्यक्तीने आठ वर्षे श्रमणाचे जीवन व्यतीत केले असेल व ज्याला स्थानांग व समवायांग या अंगांचे ज्ञान असेल, त्यालाच आचार्यपद मिळत असे. आचार्याचे नैतिक आचरण शुद्ध असावे यावरही कटाक्ष असे. इच्छुक श्रावकांना श्रमणधर्माची दीक्षा देणे व त्यांना शिकविणे ही कामे जैन आचार्यांने करायची असत. मठातील श्रमणींवर त्याचीच देखरेख असे. [ हि. जै. मो. ]

**आयरी** शिकारीत मेलेल्या माणसाच्या भुताला उत्तर प्रदेशात आयरी हे नाव आहे. अनेक भुते आयरीची अनुयायी असतात. हे भूत महाभयंकर खरे; पण प्रसन्न झाल्यास ते गुप्त धन दाखविते, अशी समजूत आहे. उत्तर प्रदेशात वर्षातून एकदा याला बळी वगैरे देऊन संतुष्ट करतात. [ फो. लो. नॉ. इं. ]

**आयागपट्ट** (सं. आर्यकपट्ट) जैन मंदिरांतील फरशीवर जिनमूर्ती कोरून त्या फरशीचा चौरंगाप्रमाणे पूजेसाठी उपयोग करतात, त्याला आयागपट्ट अशी संज्ञा आहे.



आयागपट्ट, मथुरा

हा पूजेचा पट्ट आहे. मथुरेतील कंकाळी टेकडीवर असे अनेक आयागपट्ट मिळाले असून, ते धार्मिक व मांगलिक चिन्हांनी अलंकृत आहेत. त्यांवर तीर्थंकरांच्या मूर्तीही आहेत. अर्हंताच्या पूजेसाठी त्यांची स्थापना झाली होती. [ जै. इ.; भा. प्रा. जै. ती.; प्रा. भा. लो. ध. ]

**आयुध** ‘ आयुधं तु प्रहरणम् ’ = प्रहार करण्याचे साधन म्हणजेच शस्त्र (अमर). सर्व प्रकारची युद्धसामग्री असाही त्याचा व्यापक अर्थ होतो. ऋग्वेदात धनुष्य व बाण या दोन आयुधांचा प्रामुख्याने उल्लेख असून, त्या आयुधांवर विलक्षण विश्वासही व्यक्त केला आहे (ऋ. ६.७५). जसजसा वैदिक आर्यांचा सांस्कृतिक व वैज्ञानिक विकास होत गेला, तसतशी आयुधांच्या प्रकारांत भर पडत गेलेली दिसते. महा-

भारत व पुराणे यांत अनेक आयुधांची नावे व त्यांचे भिन्नभिन्न उपयोग दिलेले आढळतात.

विश्वातल्या सर्व प्राणिमात्रांत संरक्षणात्मक व आक्रमणात्मक अशा उभयविध प्रवृत्ती दिसतात. प्रत्येक प्राण्याचे अवयवही याच प्रवृत्तींना अनुरूप असे निर्माण झाले आहेत. काही अवयवांनी ते स्वतःचे संरक्षण करतात. उदा० नाक, कान, डोळे, पापण्या, हात व त्वचा. काही अवयवांनी ते दुसऱ्यावर आक्रमण करतात. उदा० दात, नखे, शिंगे, कुसे, पाय, इत्यादी.

माणूस आपल्या विकासाच्या उषःकालात आपल्या अवयवांनीच आयुधांचे काम भागवीत होता. पशूंप्रमाणेच तोही दात, नखे, पाय व हात यांचा आक्रमणाच्या कामी उपयोग करीत होता. जसजसा त्याच्या बुद्धीचा विकास होऊ लागला तसतसा त्याने लढाईचा नवा प्रकार निर्माण केला. शत्रूवर दुरून वार करणे व शिरस्त्राण, कवच, इ. साधनांनी शत्रूच्या शस्त्रास्त्रांपासून स्वतःचे संरक्षण करणे, या पद्धती त्याने शोधून काढल्या. काठी, दगड, मुद्‌गर, मुसळ, इ. नवीन प्रहारसाधने त्याने निर्माण केली. तो एकटे राहायचे सोडून समूहाने राहू लागला. एक व्यक्ती दुसऱ्या एकटया व्यक्तीला भिडण्याऐवजी एक समूह दुसऱ्या समूहाशी टक्कर देऊ लागला. शत्रूवर दरड कोसळून घालणे, वृक्ष उन्मळून पाडणे, अशा अचाट कृत्यांनी मानवसमूह आपल्या शत्रूचा धुव्वा उडवू लागले. मारुतीने वृक्ष व गिरिशिखर उपटून त्यांच्या द्वारे राक्षसांचा संहार केल्याचे उल्लेख रामायणात आहेत (वा. रा. ६.४३). भीमसेनाचीही वृक्षयुद्धे महाभारतात अनेक ठिकाणीं वर्णिली आहेत.

मानवसमाज सुधारणेच्या युगाकडे जसजसा प्रगत होऊ लागला तसतसे त्याला लोखंड, तांबे, इ. धातूंचे ज्ञान झाले व त्याने त्रिशूल, भाला, बरची, तलवार, कटयार, कुऱ्हाड, कुदळ,




(१) पादत्राण (२) हस्तत्राण (३) वक्षत्राण (४) शिरस्त्राण

इ. आक्रमणकारी आयुधे निर्माण केली. त्याचप्रमाणे स्वतःच्या संरक्षणासाठी ढाल, वर्म, कवच, शिरस्त्राण, हृदयत्राण, अंगुलित्राण, पादत्राण, इ. साधने त्याने शोधून काढली. याबरोबरच तो नेमबाजीतही प्रवीण होऊ लागला. आणि तिरंदाजीवरोबरच गोफणीत दगड घालूनही शत्रूला हैराण करू लागला.

पुढच्या युगात, विशेषतः महाभारतकालात, त्याने अनेक प्रकारच्या यंत्रांचाही विकास केला. शतघ्नी (तोफ), तैलगुडवालुयंत्र, आशीविषधरयंत्र, शालर्भिदिपाल, इ. या युगातली




प्राचीन तोफा

उल्लेखनीय यंत्रे होत. ज्यांच्या द्वारे आग, पाणी आणि वादळी हवा निर्माण करून शत्रूला जेरीस आणता येईल अशी अनेक अस्त्रे महाभारतात आढळतात. त्या काळात आयुधांचे मुख्यतः दोन प्रकार दिसतात – (१) प्रहार करणारी आयुधे व (२) प्रहारापासून संरक्षण करणारी आयुधे. प्रहारक आयुधांत पुढील प्रकार होते –(१) कापणारी शस्त्रे. उदा० परशू, तलवार, इ. (२) चूर करणारी शस्त्रे. उदा० मुद्‌गर, गदा, मुसळ व घन. (३) शरीरात घुसणारी शस्त्रे. उदा० कटयार, सुरी, इ. (४) दुरून शरीरात घुसणारी शस्त्रे. उदा० भाला, शूल, शक्ती, इ. (५) दुरून फेकण्याने शत्रूचा वध करणारी शस्त्रे. उदा० बाण, ध्वंसकारी यंत्रे व अस्त्रे.

भारतीय देवतासुद्धा विरोधी शत्रूशी व शक्तीशी झगडताना दिसतात. यासाठी दैवतशास्त्रात विशिष्ट देवतांच्या विशिष्ट आयुधांची कल्पना केलेली आहे. उदा० शिवाचा त्रिशूल, विष्णूचे सुदर्शन, वरुणाचा पाश, गणपतीचा अंकुश, इत्यादी. ही आयुधे त्या त्या देवतांच्या अव्यक्त शक्तींची व्यक्त प्रतीके होत. म्हणून देवतांबरोबरच त्यांच्या आयुधांचेही ध्यान-पूजन केले जाते. जैन व बौद्ध हे हिंसाविरोधी खरे; पण त्यांच्या देवदेवताही आयुधसज्ज असतात. पाहा – शस्त्रास्त्रे. [ हिं. वि. को. ]

**आयुधपुरुष** दैवतशास्त्रात विविध देवतांना ज्याप्रमाणे मानवी रूपे देण्यात आली, त्याचप्रमाणे त्यांच्या हातांतल्या आयुधांनाही मानवरूपे देऊन त्यांच्या मूर्ती बनविण्याची प्रथा मध्ययुगीन काळापासून सुरू झालेली दिसते.

विष्णूच्या हातांतील शंख, चक्र, गदा, पद्म यांच्या मानवी मूर्ती झाल्या असून, त्यांना 'आयुधपुरुष' हे नाव मिळाले आहे. मध्ययुगीन वैष्णव शिल्पांत या मूर्ती आढळतात. मूर्तिकलेच्या साहित्यात वज्र, शक्ती, खड्ग, त्रिशूळ, इ. आयुधांचे मानवरूप वर्णिलेले आढळते; पण तशा मूर्ती मात्र क्वचितच पाहायला मिळतात. आयुधपुरुषाचे अतिप्राचीन चित्रण इंडो-सिथियन काळात झालेले आढळते. त्या काळच्या काही ताम्रमुद्रांवर वज्रमानवाचे चित्र असून, इंद्राने त्याच्या मस्तकावर हात ठेवला आहे. अशा मूर्तींच्या मागे किंवा मस्तकावर जे विशिष्ट आयुध दिसते, त्याच आयुधाची ती मूर्ती समजतात. देवगढ येथील 'अनंतशयन' शिल्पात चक्र, शंख, धनुष्य, इ. आयुधांच्या मूर्ती आहेत. बंगालमध्ये शरिशदह येथे एक चक्रपुरुषाचे शिल्प सापडले आहे. त्यात गरुडाच्या खांद्यावर एक चक्र असून, त्याच्या मध्यभागी एक चतुर्भुज मानवमूर्ती नृत्य करीत आहे. [ डे. हिं. इ. ]



आयुधपुरुष (सुदर्शनचक्र)

**आयुधव्रत** श्रावणापासून चार महिने वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध यांची प्रतीके म्हणून श्रीविष्णूच्या शंख–चक्र–गदा–पद्मांची पूजा करणे हा याचा विधी आहे (विष्णु ध. पु. ३.१५५). फल – सामर्थ्यवृद्धी.

**आयुर्वेद** आयुर्वेद म्हणजे दीर्घायुष्यासंबंधी विचार करणारा वेद होय. याची व्याख्या अशी – 'तत्रायुर्वेदयतीत्यायुर्वेदः...... यतश्चायुष्याण्यनायुष्याणि च द्रव्यगुणकर्माणि वेदयत्यतोऽप्यायुर्वेदः' – जो आयुष्याचे ज्ञान करवितो, तो आयुर्वेद होय......तसेच जो आयुष्याला हितप्रद व हानिकारक अशी द्रव्य–गुण–कर्मे समजावून सांगतो, तो आयुर्वेद होय (च. सू. ३०.३३). जीवनाच्या विकासाच्या दृष्टीने या शास्त्राची उभारणी झालेली आहे. केवळ रोगोपचार सांगणे हा या शास्त्राचा उद्देश नाही. तर रोगोच्छेदाबरोबरच स्वास्थ्यानुवृत्ती कशी राहील, याचीही चर्चा आयुर्वेदात केली आहे. याला अथर्ववेदाचा उपवेद मानतात. काय, शल्य, शालाक्य, बाल, ग्रह, विष, रसायन व वाजीकरण अशी आयुर्वेदाची आठ अंगे आहेत. आयुर्वेदाच्या सर्व संहिता व संग्रहग्रंथ यांत ब्रह्याला आयुर्वेदाचा आदिप्रवक्ता म्हटले आहे –

स्वयंभूर्ब्रह्मा प्रजाः सिसृक्षुः प्रजानां
परिपालनार्थमायुर्वेदमेवाग्रेऽसृजत्...... ।

(काश्यपसंहिता, विमानस्थान)

अर्थ – प्रजा उत्पन्न करण्याची इच्छा करणाऱ्या स्वयंभू ब्रह्याने प्रजेच्या परिपालनासाठी प्रथम आयुर्वेदच निर्माण केला.

ब्रह्याने आयुर्वेदाची लक्ष श्लोकात्मक एक संहिता लिहिली. तिचे नाव ब्रह्मसंहिता होते. ही संहिता उपलब्ध नाही. परंतु त्याने उपदेशिलेले सोळांहून अधिक योग अद्यापही आयुर्वेद ग्रंथांत सापडतात. चंद्रप्रभावटी, ब्राह्मी तेल व ब्राह्मरसायन, हे त्यांपैकी तीन होत. ब्रह्मदेवाने आपली ही विद्या दक्ष प्रजापती व भास्कर यांना दिली. दक्षाच्या आयुर्वेदविषयक परंपरेत सिद्धान्ताला व भास्कराच्या परंपरेत चिकित्सापद्धतीला प्राधान्य होते. दक्ष प्रजापतीकडून अश्विनीकुमारांनी समग्र आयुर्वेदाचे अध्ययन केले.

अमृत मिळविण्यासाठी औषधी निवडून काढणे व योग्य स्थानी त्यांची निगा करणे, हे अश्विनीकुमारांचे विशेष कार्य होय. यासाठी क्षीरसागराच्या भोवतीचा चंद्रपर्वत त्यांनी पसंत केला होता.

द्वितीयः पर्वतश्चन्द्रः सर्वौषधिसमन्वितः ।
अश्विभ्याममृतस्यार्थे ओषध्यस्तत्र संस्थिताः ।।

(वायु पु. ४९)

अर्थ– (क्षीरसागराभोवतीच्या चार पर्वतांपैकी) दुसरा पर्वत चंद्र नामक असून, त्यावर सर्व प्रकारच्या औषधी होत्या. अश्विनीकुमारांनी अमृतप्राप्तीसाठी त्या तिथे लावल्या होत्या.

अश्विनीकुमारांनी वृद्ध च्यवन ऋषीला आपल्या चिकित्सेने तारुण्य प्राप्त करून दिले, ही कथा सर्वविश्रुतच आहे. त्यांनी आयुर्वेदावर ग्रंथरचनाही केली आहे. हे ग्रंथ उपलब्ध नाहीत; पण आश्विनसंहिता, चिकित्सासारतंत्र, अश्विनीकुमारसंहिता या त्यांच्या ग्रंथांचे इतर ग्रंथांतून उल्लेख आढळतात.

अश्विनीकुमारांनीच इंद्राला आयुर्वेद शिकवला. इंद्राची आयुर्वेदाविषयीची रचना उपलब्ध नाही. परंतु त्याचे ऐंद्रिय रसायन, सर्वतोभद्र, दशमूलाद्य तैल व हरीतक्यवलेह हे योग प्रसिद्ध आहेत. इंद्राने भृगू, अंगिरा, अत्री, वसिष्ठ, कश्यप, अगस्त्य, पुलस्त्य, वामदेव, असित व गौतम या दहा ऋषींना आयुर्वेदाचे ज्ञान करून दिले. भृगू चिकित्साप्रवीण होता. अत्री हा महान आयुर्वेदज्ञ होता. कश्यपाची आयुर्वेदविषयक संहिता

वृद्धजीवकीयतंत्र या नावाने प्रसिद्ध आहे. कश्यपाने यात सिद्धयोग सांगितले आहेत. अगस्त्याने भिषक्‌क्रियाविषयक द्वैधनिर्णयतंत्र लिहिले आहे. नावनीतक व चिकित्सासारसंग्रह यांत अगस्त्याचे काही योग उद्धृत केले आहेत. वामदेवानेही आयुर्वेदसंहिता लिहिली होती. गदनिग्रहात याच्या एका योगाचा उल्लेख आहे. गौतमाचा आयुर्वेदविषयक ग्रंथ उपलब्ध नाही; परंतु 'माधवनिदाना'चा व्याख्याकार विजयरक्षित याने गौतमाच्या वचनांचा उल्लेख केला आहे. चरकसंहितेत सांगितले आहे, की लोककल्याणाच्या आकांक्षेने ऋषींनी भरद्वाजाला आपला प्रतिनिधी म्हणून इंद्राकडे पाठविले व इंद्राने त्याला आयुर्वेदाचा उपदेश केला (सूत्रस्थान १). त्यानंतर सर्व ऋषींनी हा आयुर्वर्धक वेद भरद्वाजाकडून शिकून घेतला.

इंद्राकडून मिळविलेले ज्ञान भरद्वाजाने तंत्ररूपात निबद्ध केले, असे भावप्रकाशात सांगितले आहे (१.१५). या व्यतिरिक्त भेषजकल्प व भारद्वाजीय प्रकरण हेही त्याचे ग्रंथ हस्तलिखित रूपात मद्रास येथील ग्रंथभांडारात आहेत.

भरद्वाजाकडून द्वितीय धन्वन्तरीने भिषक्‌क्रियेसहित आयुर्वेदाचे ज्ञान प्राप्त करून घेतले. नंतर त्याने आयुर्वेदाचे अष्टांगांत विभाजन केले व तो शिष्यांना शिकविला. या धन्वंतरीला 'सर्वरोगप्रणाशन' व 'आयुर्वेदप्रवर्तक' अशा पदव्या आहेत. त्याने शल्यशास्त्राचा प्रसार केला. सन्निपातकलिका, धातुकल्प, रोगनिदान, वैद्यचिंतामणी, धन्वंतरिनिघंटू, इ. ग्रंथ याने लिहिले आहेत.

भरद्वाजाचाच दुसरा शिष्य म्हणजे पुनर्वसू आत्रेय. चरकसंहितेत सांगितले आहे, की पुनर्वसू आत्रेय हा महान जिज्ञासू होता. अनेक ऋषींना बरोबर घेऊन तो औषधी वनस्पतींची पाहणी करीत हिमालयात हिंडत असे. अनेक ठिकाणी संचार करीत असतानाच तो शिष्यांना ज्ञानदान करीत असे (बावर हस्तलेख). आत्रेयाचे ते एक हिंडतेफिरते आयुर्वेद विद्यालयच होते. चरकसंहितेत पुनर्वसू आत्रेयाला जी अनेक विशेषणे दिली आहेत, त्यांत भिषग्विद्याप्रवर्तक असे एक विशेषण आहे. भिषग्विद्या याचा अर्थ इथे कायचिकित्सा असा आहे. पुनर्वसूचा सहाध्यायी धन्वन्तरी याने भिषक्‌क्रिया म्हणजे शल्यतंत्र हस्तगत केले; तर पुनर्वसूने भिषग्विद्येचा पुरस्कार केला. अग्निवेश, भेल, जतूकर्ण, पराशर, हारीत व क्षारपाणी असे आत्रेयाचे सहा प्रमुख शिष्य होते. त्या सर्वांनी एकाच काळी अध्ययन केले. नंतर प्रत्येकाने स्वतः ग्रंथरचना केली. मग अनेक ऋषींची व आचार्यांची सभा भरली. सर्व शिष्यांनी रचलेली तंत्रे त्या सभेत वाचून दाखविण्यात आली. सर्व ऋषींनी ती सम्मत केल्यावर मगच ती प्रसिद्ध करण्यात आली.

या सर्व तंत्रांत अग्निवेशाचे तंत्र विशेष प्रसिद्ध झाले. याव्यतिरिक्त आत्रेयाच्या अध्यक्षतेखाली आणखी तीन वार सभा झाल्याचा उल्लेख चरकसंहितेत आहे. आत्रेयाने स्वतः आयुर्वेदविषयक संहिता लिहिली होती, तिची हस्तलिखिते उपलब्ध आहेत.

अग्निवेश हा सूक्ष्म बुद्धीचा होता. त्याचे तंत्र अष्टांगात्मक असून, कायचिकित्साप्रधान होते. याशिवाय त्याने नाडीपरीक्षा, अग्निवेश्यहस्तिशास्त्र या नावाचे ग्रंथही लिहिले आहेत.

आत्रेयाचा दुसरा शिष्य भेल. भेलाचा पाठभेद भेड असा आहे. भेडाची संहिता छापलेली आहे. पराशर भेलाचा समकालीन होता. पराशराचे आयुर्वेदीय तंत्र कायचिकित्साप्रधान होते. वाग्भटाने पराशरतंत्र पाहिले होते. पराशराने आपल्या तंत्रात आर्याछंदाचा उपयोग केला आहे. पराशराच्या हस्त्यायुर्वेद, गोलक्षण, वृक्षायुर्वेद, कृषिशास्त्र, या ग्रंथांचा अन्य ग्रंथकारांनी उल्लेख केला आहे.

जतूकर्ण हा आत्रेयाचा आणखी एक शिष्य होय. त्याची जतूकर्णसंहिता कायचिकित्सापर होती. हा ग्रंथ सध्या उपलब्ध नाही.

हारीत ऋषी हा सम्राट मांधात्याच्या वंशातील चौथा पुरुष होता. हारीताची आयुर्वेदीय संहिता कायचिकित्सापर होती. या व्यतिरिक्त त्याचा 'चिकित्साशास्त्रसंग्रह' नावाचा ग्रंथही आहे. हारीताचे बारा योग गिरींद्रनाथांनी उद्धृत केले आहेत. आत्रेयाचा सहावा शिष्य क्षारपाणी. याने कायचिकित्सापर एक तंत्र लिहिले आहे.

चरकसंहितेत (सू. ३०.२८) आयुर्वेदाचे ज्या क्रमाने वर्णन केले आहे, त्यात दुसरे अंग शालाक्य हे आहे. ऊर्ध्वजत्रुगत म्हणजे नाक, कान, घसा, इत्यादी रोगांच्या चिकित्सेत शलाकेचा उपयोग होत असे, म्हणून त्याला शालाक्य असे नाव पडले. इंद्राचा शिष्य निमी याने शालाक्यतंत्राचे विस्तृत ज्ञान लोकांना प्रथम उपलब्ध करून दिले, म्हणून त्याला आद्यभिषक असे नाव मिळाले आहे.

रामायण व पुराणे यांतील वंशावळी पाहता निमी हा विदेह राज्याचा संस्थापक होता, असे कळते. जनक हा निमीचा नातू होय. आयुर्वेदाच्या तंत्रात निमीचे शालाक्यतंत्र प्रमाण मानले जाते. हे समग्र तंत्र सध्या उपलब्ध नसले, तरी त्यातील वचने अन्य ग्रंथांत उद्धृत केलेली आढळतात.

निमीचा शिष्य कराल. हा शालाक्यतंत्रकार असून, चरकसंहितेतील अक्षिरोगप्रकरणात करालतंत्राचाच आधार घेतलेला आहे. नेत्ररोग शहाण्णव प्रकारचे आहेत, असे कराल सांगतो.

यानंतरचा शालाक्यतंत्रकार शौनक होय. काही यालाच भद्रशौनक असे म्हणतात; तर काही शौनक व भद्रशौनक या

व्यक्ती भिन्न मानतात. भद्रशौनकाचा आयुर्वेदविषयक ग्रंथ होता. शौनकाचे तंत्र प्रसिद्ध होते.

काङ्कायन हा आणखी एक शालाक्यतंत्रकार. हा वाल्हीक देशाचा निवासी असून, त्या देशातील श्रेष्ठ वैद्य होता. याचे अनेक शिष्य होते.

गार्ग्याने धन्वन्तरीजवळ शल्यशास्त्राचे अध्ययन करून शालाक्यतंत्राची रचना केली. याशिवाय गालव व सात्यकी यांनीही शालाक्यतंत्राची रचना केली आहे.

आयुर्वेदाचा तिसरा भाग शल्यचिकित्सा हा होय. मानवलोकात सर्वप्रथम दिवोदास धन्वन्तरीने शल्यचिकित्सेचा प्रसार केला. धन्वन्तरीचे सात मुख्य शिष्य होते. सुश्रुत हा त्यांपैकीच एक होय. तो विश्वामित्राचा पुत्र होता, असे सुश्रुतसंहितेत सांगितले आहे (चि. २.३). सुश्रुत हा ऋषी असून, शालिहोत्राचा पुत्र होता, असे शालिहोत्रसंहितेच्या प्रारंभी लिहिले आहे. हे दुसरे मत. यावरून कदाचित दोन सुश्रुत असावे, असेही वाटते. सुश्रुताच्या शिष्यांना सौश्रुत म्हणत असत. धन्वन्तरीकडून मिळविलेले शल्यमूलक आयुर्वेदज्ञान सुश्रुताने सुश्रुतसंहितेत संग्रहीत केले. हा ग्रंथ अजूनही उपलब्ध आहे. सुश्रुत, वृद्धसुश्रुत व लघुसुश्रुत हे बहुधा सुश्रुतसंहितेचेच तीन पाठ असावे.

या व्यतिरिक्त औपधेनव, औरभ्र, पौष्कलावत हे धन्वन्तरीचे शिष्य असून, त्यांनी ग्रंथरचना केली आहे. करवीर्य, गोपुररक्षित, वैतरण, भोज, भालुकी, दारुक, हे सर्व सुश्रुताच्या नंतर झालेले भिषक असून, त्यांचीही ग्रंथरचना आहे.

अष्टांग आयुर्वेदाच्या पहिल्या तीन अंगांच्या आचार्यांची माहिती दिल्यावर 'कौमारभृत्या'च्या आचार्यपरंपरेचा उल्लेख करणे आवश्यक आहे. कौमारभृत्याचा प्रसिद्ध आचार्य जीवक याने प्रजापती कश्यपाकडून या तंत्राचे ज्ञान मिळविले. जीवक हा भृगुवंशी ऋचीकाचा पुत्र होय. काश्यपसंहितेत या जीवकाविषयी पुढील माहिती दिलेली आहे –

महर्षी कश्यपाने ब्रह्मदेवाच्या आज्ञेनुसार ज्ञानचक्षूंनी पाहून कुमारतंत्राची रचना केली. ऋचीकपुत्र जीवक याने हे महान तंत्र ग्रहण केले व त्याचा संक्षेप केला. परंतु लहान मुलाचा उपदेश म्हणून इतर मुनींनी त्याचा स्वीकार केला नाही. तेव्हा पाच वर्षांच्या जीवकाने सर्वांसमक्ष कनखल येथे गंगाद्वारात बुडी मारली व दुसऱ्याच क्षणी तो श्वेतकेशश्मश्रुयुक्त होऊन बाहेर आला. ते पाहून सर्व ऋषींना आश्चर्याचा धक्का बसला व त्यांनी त्या मुलाचे नाव वृद्धजीवक असे ठेवले.

काश्यपसंहिता किंवा वृद्धजीवकीयतंत्र हा त्याचा ग्रंथ प्रजापती कश्यपाचा उपदेश या स्वरूपात जीवकाला प्राप्त झाला व वात्स्याने या तंत्राचे प्रतिसंस्करण केले. दुसरा एक कौमारभृत्याचार्य म्हणजे रावण. त्याचे कुमारतंत्र, बालतंत्र, बालचिकित्सा, नाडीपरीक्षा, अर्कप्रकाश, उड्डीशतंत्र हे ग्रंथ उपलब्ध आहेत. याशिवाय पार्वतक व बंधक या दोन कौमारभृत्याचार्यांचा सुश्रुतव्याख्याकार डल्हण याने उल्लेख केला आहे.

भूतविद्या हेही एक आयुर्वेदाचे अंग आहे. तन्मात्रांचा दुसरा सर्ग हा भूतसर्ग आहे (म. भा. शांति. २८०.२० नीळकंठी टीका). पंचतन्मात्रांचे कार्य जे सूक्ष्म तत्त्व त्याला भूत असे म्हणतात. प्राकृतिक नियमांच्या उल्लंघनाने सूर्यचंद्रादिकांचा सूक्ष्म प्रभाव मनुष्यशरीरातील तन्मात्रांवर पडतो व त्या वेळी अनेक रोग उत्पन्न होतात, असे चरक सांगतो (नि. ७.१३).

आयुर्वेदात अगद शब्दाला पारिभाषिक अर्थ प्राप्त झाला आहे. आचार्य डल्हणाने अगदतंत्राची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे–

अगदो विषप्रतिकारस्तदर्थं तन्त्रम् अगदतन्त्रम् ।

अर्थ – विविध विषांच्या शमनाचे उपाय सांगणारे तंत्र, ते अगदतंत्र होय.

काश्यप, उशना व बृहस्पती हे तिघेही अगदतंत्राचे आचार्य होते. यांशिवाय आलंबायन हाही एक अगदतंत्रज्ञ होता. याचा काल भारतीय युद्धाच्या अगोदरचा असावा. सुश्रुतसंहितेच्या कल्पस्थानावरील डल्हणाच्या व्याख्येत जागोजाग आलंबायनाची वचने उद्धृत केलेली आहेत. याशिवाय दारुवाह किंवा नग्नजित व आस्तीक हेही अगदतंत्राचे विशारद होते.

आयुर्वेदाचे सर्वांत प्रभावी अंग म्हणजे रसतंत्र होय. या रसतंत्रात अनेक आयुष्ययोग उद्धृत केलेले आहेत. सुश्रुतसंहितेत रसायनतंत्राची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे –

**रसायनतन्त्रं नाम वयःस्थापनमायुर्मेधाबलकरं रोगापहरणसमर्थं च ।** (सू. १.७)

अर्थ – रसायनतंत्र हे (शंभर किंवा त्याहून जास्त वर्षे) आयुष्य देणारे, बुद्धि-बल वाढविणारे व रोगाचा अपहार करणारे आहे.

अनेक ऋषी योगबल व रसायनबल यांच्या योगाने दीर्घायू बनले आहेत. शिव हा रसतंत्राचा प्रधान आचार्य होय. भृगू, अगस्त्य व वसिष्ठ हेही रसतंत्राचार्य होते. यांच्या पश्चात आचार्य मांडव्याचे रसतंत्रात विशेष स्थान आहे. या व्यतिरिक्त व्याडी, पतंजली, नागार्जुन, हेही रसतंत्रकार होते. नागार्जुनाने या शास्त्रावर लोहशास्त्र, रसरत्नाकर, कक्षपुटम, आरोग्यमंजरी, योगसार, रसेन्द्रमंगल, रतिशास्त्र, रसकच्छपुट, सिद्धनागार्जुन असे ग्रंथ लिहिले आहेत.

या व्यतिरिक्त 'अष्टांगसंग्रह'कार वृद्ध वाग्भट, 'अष्टांगहृदय'-कर्ता वाग्भट, 'रुग्विनिश्चय' किंवा 'माधवनिदान' याचा कर्ता माधवकर, चक्रपाणिदत्त, वंगसेन, मिल्हण, बोपदेव, लोलिंबराज,

सुरेश्वर, नरहरी, मदनपाल, पृथ्वीमल्ल, विश्वनाथसेन, मोरेश्वर, इ. अनेक आयुर्वेदाचे ग्रंथकार होऊन गेले.

**हिताहितं सुखं दुःखमायुस्तस्य हिताहितम् ।**
**मानं च तस्य यत्रोक्तमायुर्वेदः स उच्यते ॥**

(चरक सू. १.४१)

अर्थ – हितायू, अहितायू, सुखायू, दुःखायू अशा चार प्रकारच्या आयुष्याचे हित, अहित व प्रमाण ज्यात सांगितले आहे, त्याला आयुर्वेद असे नाव आहे.

आयुर्वेदाचे स्वास्थ्यानुवृत्तिकर व रोगच्छेदकर असे दोन भाग व हेतू, लक्षणे व औषधिविज्ञान असे तीन स्कंध आहेत. म्हणून त्याला त्रिस्कंध आयुर्वेद असे म्हणतात. यात शरीराचा विचार पुढीलप्रमाणे केलेला आहे (चरक शा. ६)–

**तत्र शरीरं नाम चेतनाधिष्ठानभूतं**
**पञ्चमहाभूतविकारसमुदायात्मकम् ।**

अर्थ – शरीर म्हणजे चेतनतत्त्वाला अधिष्ठान असलेली व पंचमहाभूतांच्या अनेक विकारांनी युक्त असलेली वस्तू होय.

देह, इंद्रिये, मन व आत्मा मिळून शरीर बनते. या चारींच्या संयोगाला जीवित किंवा आयुष्य अशी संज्ञा आहे. 'पंचमहाभूतविकारसमुदायात्मक' ते स्थूल शरीर व 'चेतनाधिष्ठानभूत' ते सूक्ष्म शरीर होय. सचेतन परमाणू हाच शरीरावयवांचा शेवटचा भाग असून, त्याचे स्वरूप अतिसूक्ष्म व अतींद्रिय आहे. तसेच हे परमाणूही अनेक आहेत. इथपर्यंत आधुनिक शास्त्रे व आयुर्वेद यांचे सामान्यतः साम्य आहे. परंतु हे परमाणू स्वतंत्र नसून, कर्मस्वभावाला धरून त्यांचे संयोग-विभाग होतात, असे मानणे हे आयुर्वेदाचे वेगळेपण आहे. मन हे स्वतंत्र, अणू व द्रव्य आहे, अशी आयुर्वेदाची धारणा आहे. विचार करणे, तर्क करणे, बाह्यज्ञानावरून निश्चय करणे, स्वतःचा व इंद्रियांचा निग्रह करणे इ. मनाची कर्मे होत. शरीरातील स्वयंस्फूर्त चेतना हा आत्म्याचा गुण आहे. शरीरातील पंचमहाभूते व शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध ही पाच तन्मात्रे मिळून शरीरातील 'पंचमहाभूतद्रव्यगुणसंग्रह' होतो. मन, त्याचा विषय, बुद्धी व आत्मा हा 'अध्यात्मद्रव्यगुणसंग्रह' होय.

माणसाने भक्षण केलेल्या अन्नापासून सजीव कण बनतात व त्या कणांचे शरीरात तीन स्थूल धातू बनतात. हे त्रिधातू म्हणजे वायू, पित्त व कफ हे होत. हे धातू शरीराचे मुख्य आधार असून, ते शरीरव्यापी असतात व शरिराचे धारण-पोषण करतात.

**शरीरधातूनां प्रकृतिभूतानां तु खलु वातादीनां फलमारोग्यम् ।**

(चरक शा. ६)

अर्थ – शरीरातील प्रकृतिभूत वातादी धातूंचे फल म्हणजेच आरोग्य होय.

त्रिधातू देहाचे धारण करतात, म्हणून त्यांना धातू अशी संज्ञा आहे (धारणाद् धातवः). धातू चित्परमाणूंत आहेत व बाहेरही आहेत.

एकपेशीमय प्राण्यांच्या शरीरांतील चलन, वलन, पचन, उत्सर्ग वगैरे कार्ये त्यांच्या लहानशा शरीरांतील त्रिधातूंमुळे लहान अवकाशात होतात. अनेकावयवी प्राण्यांत या त्रिधातूंची कार्ये निरनिराळ्या अवयवांतून घडतात. प्रत्येक परमाणूत हे तीन्ही धातू असले तरी, ते स्थानभेदाने असतात. त्यांचे प्रत्येकी पाच भेद आहेत.

त्रिधातूंच्या साम्यावस्थेवर शरीरस्वास्थ्य अवलंबून आहे. ते विकृत झाले, तर शरीर विकृत होते. ते समस्थितीत असले, की शरीरही निरोगी राहते. त्रिधातू समस्थितीत असतानाच त्यांना धातू ही संज्ञा आहे. त्यांच्यात वैषम्य निर्माण झाले, की त्यांनाच दोष असे म्हणतात (दूषणाद् दोषाः). धातुक्रिया सुरू असता, दोष उत्पन्न होतच असतात; परंतु शरीरातील साम्य-प्रवृत्तीमुळे ते वैषम्य लगेच नाहीसे होत असते. म्हणून काही शास्त्रज्ञ धातू व दोष हे दोन शब्द समानार्थी वापरतात आणि त्रिधातूंनाच त्रिदोष असेही म्हणतात.

दोष वाढून त्यांचा प्रकोप झाला, की त्यांना किंवा शरीर-व्यापारांत उत्पन्न होणाऱ्या निरुपयोगी द्रव्यांना मल अशी संज्ञा आहे (मलिनीकरणान्मलः). म्हणून त्यांनी शरीराची दुसरी व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे – 'दोषधातुमलमूलं हि शरीरम्' = दोष, धातू व मल एतन्मूलक ते शरीर होय.

'साम्यं प्रकृतिरुच्यते' = धातुसाम्याला प्रकृती म्हणतात. धातुसाम्य असले म्हणजे शरीर स्वस्थ, निरोगी राहते आणि धातुवैषम्य उत्पन्न झाले की ते विकृत होते, या उपपत्तीवर आयुर्वेदातील इंद्रियविज्ञान, स्वस्थवृत्त, रोगविज्ञान व चिकित्सादी शास्त्रे उभारलेली आहेत. 'धातुसाम्यक्रिया प्रोक्ता तंत्रस्यास्य प्रयोजनम्' = धातुसाम्यक्रिया हे चिकित्साशास्त्राचे प्रयोजन होय, असे आयुर्वेदात मानले आहे.

धातुसाम्य कसे टिकवावे, याचा विचार स्वास्थ्यानुवृत्तिकर शास्त्रात केला आहे. धातुवैषम्य किंवा रोग कसा होतो, कोणत्या कारणांनी होतो व ती नष्ट करून धातुसाम्य कसे प्रस्थापित करावे, याचा विचार आयुर्वेदात विस्तृत रीतीने केला आहे.

**असात्म्येन्द्रियार्थसंयोगः प्रज्ञापराधः**
**परिणामश्चेति त्रिविधं रोगकारणम् ।**

(चरक नि. १)

अर्थ – असात्म्येंद्रियार्थसंयोग, प्रज्ञापराध व परिणाम ही तीन रोगांची कारणे होत.

असात्म्य म्हणजे न सोसलेले, मानवलेले.. शब्द, स्पर्श, रूप,

रस व गंध हे पाच इंद्रियार्थ, होत. इंद्रियार्थांचे ग्रहण आभ्यंतर इंद्रियाच्या योगाने होते. परंतु आभ्यंतर इंद्रियाशी मनाचा संयोग असेल, तरच इंद्रियार्थ ग्रहण होतो. नेहमीच्या सवयीने जे मानवते किंवा सोसते, ते सात्म्य व जे सवयीचे नसते, ते असात्म्य होय. म्हणजे शरीरस्वास्थ्य हे नेहमीच्या खाणेपिणे, आचारविचार, इ. सवयींवर अवलंबून असते. शरीरावयवांच्या साहाय्याने इंद्रिये कार्य करतात व इंद्रियार्थांचे ग्रहण करतात. यांचे अतियोग म्हणजे अतिमात्र सेवन, विपरीत सेवन व अल्प सेवन यांमुळे त्रिधातूंच्या व्यापारांत व मनोव्यापारांतही वैषम्य उत्पन्न होते आणि मग रोगोत्पत्तीला प्रारंभ होतो.

प्रज्ञापराध म्हणजे जाणूनबुजून आपल्या मानसिक भावनेच्या विरुद्ध वर्तन करणे. याचा परिणाम प्रथम मनावर व नंतर शरीरावर होतो. साहस, अतिस्त्रीसंग, दुरुत्तरे करणे, ही त्याची उदाहरणे होत.

तिसरे कारण परिणाम. दोषाचे चय, प्रकोप व प्रशम हे ऋतू, रात्र, दिवस यांमधील शीतोष्णादी फरकाने होत असतात. दोषांत वैषम्य उत्पन्न होते. त्यांची स्वस्थानी वाढ होणे म्हणजे चय, स्वस्थानातून ते उन्मार्गगामी झाल्याने प्रकोप व दोषांचे दुष्टत्व कमी होणे म्हणजे प्रशम होय. पावसाळा, उन्हाळा व हिवाळा या निरनिराळ्या ऋतूंत दोषांच्या चयादी निरनिराळ्या अवस्था संभवतात. याशिवाय विष, गर, कृमी वगैरे बाह्य कारणेही रोग उत्पन्न करतात.

रस, रक्त, मांस, मेद, अस्थी, मज्जा व शुक्र हे सात स्थूल धातू किंवा दूष्ये होत. त्रिधातूंच्याच योगाने ते उत्पन्न होतात व व्यवस्थित राहतात. दोषत्व प्राप्त झाल्यावर हेच दुष्ट होतात. म्हणून त्यांना दूष्ये अशी संज्ञा आहे. या दूष्यांत जंतूंची वाढ होते, त्यालाच रोग असे म्हणतात. अशा प्रकारे आयुर्वेदाचार्यांनी देहदोष व मनोदोष ह्यांची समता राखण्याची उपपत्ती शोधून काढून ती व्यवहारात आणली आहे. रोगबीजे ज्या क्षेत्रात वाढतात, ते क्षेत्र रोगबीजे वाढायला निरुपयोगी कसे होईल, याचाच विचार आयुर्वेदात प्रामुख्याने केलेला आहे. आयुर्वेदाचे आचार्य रोगबीजांच्या मागे लागले नाहीत. शरीर स्वस्थ व समधातुमय असले, की त्यावर रोगबीजांचा काही परिणाम होत नाही, असा त्यांचा निर्वाळा आहे.

रोगाची लक्षणे अत्यंत बारकाईने पाहून, दोषवैषम्याचा ठाम निश्चय करून रोगाची परीक्षा करावी व नंतर औषधोपचार करावा, असे आयुर्वेदात सांगितले आहे. ही रोगचिकित्सा दोन प्रकारची आहे. दोषांच्या अनुरोधाने औषधयोजना करणे ही दोषप्रत्यनीक चिकित्सा आणि व्याधी ठरवून तदनुरोधाने विपरीत चिकित्सा करणे, ही व्याधिप्रत्यनीक चिकित्सा होय. व्याधीचा निश्चय करतानासुद्धा तिचे मूळ कारण जे दोष, त्यांचा प्रथम विचार करावा लागतो. म्हणून आयुर्वेदात दोषप्रत्यनीक चिकित्साच मुख्य मानलेली आहे.

> याभिः क्रियाभिर्जायन्ते शरीरे धातवः समाः ।
> सा चिकित्सा विकाराणां कर्म तद्भिषजां स्मृतम् ॥
> (चरक सू. १६.३४)
>
> त्यागाद्विषमहेतूनां समानां चोपसेवनात् ॥
> विषमा नानुबध्नन्ति जायन्ते धातवः समाः ॥
> (चरक. सू. १६.३६)

अर्थ – ज्या क्रियांच्या योगाने शरीरात धातुसाम्य प्रस्थापित होईल, त्या क्रियांचे नाव चिकित्सा व तेच वैद्यांचे कर्म होय.

विषम हेतूंचा त्याग व साम्योत्पादक साधनांचे सेवन या योगाने वैषम्योत्पादन न होता व त्यांचा अनुबंध न टिकता शरीरात धातुसाम्य प्रस्थापित होते.

दोष व दोषसंयोग यांच्या विचारानंतर दूष्यांचा म्हणजे रसरक्तादी धातूंचा विचार चिकित्सेच्या वेळी करावा लागतो. धातूंचे कोणते गुण वाढले आहेत व ते कोणत्या दूष्यांत स्थिरावले आहेत, याचा निश्चय करावा लागतो. याशिवाय रोग्याचे बल, काल, हवामान, प्रकृती, वय, मनोरचना, आहार, इ. गोष्टींचाही सूक्ष्म विचार चिकित्सेच्या आधी करावा लागतो. अशा प्रकारची चिकित्सा कधीही निष्फळ होणार नाही, असा आयुर्वेदाचा सिद्धांत आहे.

शरीरातील नको असलेली द्रव्ये बाहेर काढून टाकणे, ही शरीराची प्रवृत्ती आहे. पण काही वेळा त्यासाठी इतरही उपाय योजावे लागतात. शरीराच्या वेगवेगळ्या मार्गांतून शरीरातील दोष बाहेर काढून टाकणे याला शुद्धि-उपचार म्हणतात. बस्ती (एनिमा), वमन, विरेचन (शौचास साफ करविणे), नस्य (नाकावाटे वरच्या अवयवांची शुद्धी करणे) व रक्तमोक्षण (दूषित रक्ताचा शरीराबाहेर निचरा करणे), अशा पाच प्रकारांनी शरीरशुद्धी साधतात. या शुद्धि-उपचारापूर्वी व नंतरही काही कर्मे करायची असतात. स्नेह आणि स्वेद ही महत्त्वाची पूर्वकर्मे आहेत.

चिकित्सेचे द्रव्यभूत व अद्रव्यभूत असे दोन प्रकार आहेत. औषधे, आहार, बस्ती, शस्त्रे, यंत्रे इत्यादींच्या साहाय्याने केलेली चिकित्सा ती द्रव्यभूत चिकित्सा होय. आयुर्वेदात द्रव्यांचे कितीतरी कल्प सांगितलेले आहेत. स्वरस, हिम, फांट, काढा, आसवे, घृते, तैले, क्षार, सत्त्वे, भस्मे, गुटिका, वटिका, सिद्धरसायने इत्यादी. आयुर्वेदात या द्रव्यचिकित्सेचा विस्तार फार मोठा आहे. आश्वासन, सूचना, मंत्र, चोळणे, त्रास देणे, भय दाखविणे, लंघन करविणे, ही अद्रव्यभूत चिकित्सा होय.

औषधे देताना उत्तान दोष, गंभीर दोष, तिर्यग्गत दोष, वगैरेंचा विचार करून औषधांचे लहान-मोठे प्रमाण ठरवावे लागते. औषध घेण्याच्या वेळाही निरनिराळ्या म्हणजे जेवणात, जेवणानंतर, वारंवार, अनशा पोटी, सकाळी, सायंकाळी, इ. दहा दिलेल्या आहेत. दोषदूष्यादिकांचा विवेक करूनच या वेळा ठरविल्या आहेत.

अंत:स्रावक पिंडांच्या विकृतीपासून उत्पन्न होणाऱ्या विकारांत त्या त्या ग्रंथींचे कल्प करून देण्याची आजच्या वैद्यकाची वहिवाट आहे. आयुर्वेदात त्या बाबतीतही काही गुणकारी औषधे आहेत. आरोग्यवर्धिनी, पूर्णचंद्रोदय, सुवर्णराजवंगेश्वर, पुष्पधन्वा, वसंतकुसुमाकर वगैरे औषधे याच वर्गापैकी होत. आयुर्वेदातील व्रणशोधन व व्रणरोपण योग हे गुणकारी असल्याबद्दल आधुनिक विद्वानांनीही त्यांची प्रशंसा केलेली आहे.

औषधी उपचारांत पूर्वी वनस्पती आणि प्राणी यांचा उपयोग करीत. पुढे नागार्जुनापासून पारा, गंधक, खनिज धातू इत्यादींपासून तयार केलेल्या औषधांची त्यात भर पडली. पाऱ्याला रस म्हणतात. म्हणून या औषधांना रसायने असे नाव मिळाले. पण सांप्रत शास्त्राला अनुसरून अशी रसायने तयार होत नसल्यामुळे त्यांचा अपेक्षेप्रमाणे गुण येत नाही, असे जाणकार वैद्य सांगतात. कायाकल्प व रसायनविधी या आयुर्वेदात वर्णिलेल्या खास गोष्टीही सांप्रत ग्रंथांतच राहिल्या आहेत. पूर्वी च्यवनप्राश, अगस्तिप्राश, अश्विनीप्राश, इ. औषधी कल्प कायाकल्पासाठी योजीत असत. शरीराची प्रतिक्षणी होणारी झीज विश्रांतीने मंद करायची; पंचेंद्रियांचे विषय कमीत कमी सेवन करायचे, एकांतात व अंधारात राहायचे व एकूणच योग्याप्रमाणे राहून शक्तीची साठवण करायची या तत्त्वावर कायाकल्पविधी आधारलेला आहे. पण अशा प्रकारच्या प्रयोगांची परंपरा खंडित झाल्यामुळे आता त्याचे पुनरुज्जीवन करणे अशक्यप्राय झाले आहे. वर्धमान पिंपळी योगासारखे लहान रसायनविधी घरच्या घरी होण्यासारखे आहेत व ते थोड्या-फार प्रमाणात प्रचारात आहेत.

आहारविहाराला आयुर्वेदात फार महत्त्व दिलेले आहे. आहारविहार योग्य तऱ्हेने सांभाळला, तर औषधाची गरजच उरणार नाही, असे चरकसंहितेत म्हटले आहे. कारण आहारविहारातील प्रमादामुळेच मुख्यत: व्याधींचा उद्भव होतो. म्हणून आहारविहाराच्या माध्यमातूनच व्याधींचा प्रतिबंध केला पाहिजे, असे आयुर्वेद सांगतो. योग्य आहारविहारामुळेच अग्निशक्ती टिकते व रोगप्रतिकार-शक्तीची जोपासना होते.

'आहारशुद्धौ चित्तशुद्धि:' या वचनाप्रमाणे मानसिक आरोग्यही आहारविहारावरच अवलंबून असते.

आयुर्वेदाने आहारामध्ये वनस्पतींच्या आहाराप्रमाणे प्राणिज आहाराचेही शास्त्र बनविले आहे. अनेक प्राण्यांच्या वेगवेगळ्या शरीरावयवांचे गुणधर्म त्यात सांगितले आहेत. त्याचप्रमाणे विहाराच्या क्षेत्रात समागमाचेही विधिनिषेध आयुर्वेदाने स्पष्ट केले आहेत. यावरून आयुर्वेदीय शास्त्रकारांनी आयुष्याचा किती खोलवर विचार केला आहे, ते कळून येते.

नाडीविज्ञान हे आयुर्वेदाचे खास वैशिष्ट्य आहे. अरब देशातील लोकांच्या शिवाय जगात कुठल्याही वैद्यकशास्त्रात नाडीविज्ञान आढळत नाही. अरबांनीही ही विद्या भारतीयांपासूनच ग्रहण केली आहे. मनुष्याची नाडी पाहून त्याच्या रोगाचा पूर्वइतिहास व त्याची सद्य:स्थिती जाणणे, हे काम भारतीय वैद्य करू शकतात.

एका काळी भारतीय वैद्यकाला फार प्रतिष्ठा होती. प्लास्टिक सर्जरीत भारतीय वैद्य अग्रेसर होते. एका जर्मन शल्यविशारदाने भारताला प्लास्टिक सर्जरीचा पाळणा असे म्हटले आहे. मोतीबिंदूची शस्त्रक्रिया, तुटलेले कान जोडणे, तुटलेले ओठ जोडणे, नाकाचे शस्त्रकर्म इतकेच नव्हे, तर सौंदर्याचे लक्षण म्हणून ललनांच्या गालावर खळ्या निर्माण करण्याचे काम भारतीय वैद्य निर्दोषपणे करीत असत. हाडे जोडण्यास पोलादी खिट्ट्या घालण्याचे कामही ते करीत. पण नंतरच्या कालात या सर्व क्रिया लोपल्या. शस्त्रकर्माचे पूरक अंग म्हणजे संमोहन कशा प्रकारे करीत, याचेही धागेदोरे आज उपलब्ध नाहीत.

आयुर्वेदात सांगितलेली शवच्छेदनाची पद्धती हल्लीच्या पद्धतीपेक्षा निराळी आहे. प्रेत वाहत्या पाण्यात आठवडाभर संरक्षित स्थितीत भिजत ठेवावे आणि मग त्याचे सुटे झालेले नैसर्गिक विभाग व पापुद्रे उकलून अभ्यासावे, असे आयुर्वेदात सांगितले आहे.

आयुर्वेदाने संपूर्ण शरीराचा साकल्याने विचार केलेला आहे. त्याला शरीराच्या रुग्ण स्थितीचाही सर्व बाजूंनी विचार करता येतो. शरीर सेंद्रिय, सजीव धातूंच्या योगाने चालते व ते त्यांच्या दोषांनी विकृत होते. शरीरात उत्पन्न झालेली विकृती दूर करून धातुसाम्य प्रस्थापित करण्यासाठी दोषधर्म नाहीसे करून धातुगुण प्रस्थापित करावे लागतात. एकदा धातुसाम्य प्रस्थापित झाले, की शरीर निरोगी होते. धातू सेंद्रिय असल्याने सेंद्रिय द्रव्यांनी व मानसिक व्याधींत मनाच्या प्रसन्नतेने धातुसाम्य प्रस्थापित होते, हे धातुसाम्यचिकित्सेतील मर्म होय. धातुसाम्य प्रस्थापित झाल्यानंतर रासायनी उपचार करून शरीर लोहासारखे सुदृढ करणे शक्य होते आणि म्हणूनच आयुर्वेदाला आयुष्याचे विज्ञान अथवा धातुसाम्यकर वैद्यक म्हणतात.

[ आ. इ.; वे. शा. दी.; पू. म. भा. ]

**आयुर्व्रत** (१) एक शिवव्रत. विष्णूच्या पुढे शिवलिंग रेखाटून पूजा करणे, हा याचा विधी आहे. व्रतावधी एक वर्ष. धेनू व जलकुंभ यांचे दान. फल–सर्वकामसिद्धी. (मत्स्य पु. १००.२२)

(२) शंभू व केशव या देवतांना वर्षभर चंदनाचे गंध लावणे व जलपात्रासह गोप्रदान.

(३) पौर्णिमेस विष्णू-लक्ष्मीची पूजा, उपवास व ब्राह्मण-सुवासिनींना वायनदान (हे. व्र. २.२२७).

**आयुष्कामेष्टी** आयुष्यवृद्धीसाठी करायच्या इष्टी. या अनेक आहेत. प्रजापतीसाठी १०० कृष्णल (सोन्याचे लहान तुकडे) यांचा याग करावा, असे आप. श्रौतसूत्रात सांगितले आहे (१९.२१.१). अग्नी, सोम, वरुण, सरस्वती व अग्नाविष्णू यांच्यासाठी दुसरी एक इष्टी आहे. रोगजर्जर पुरुषाने रोगमुक्तीसाठी ही इष्टी करायची असते (तै. सं. २.३.११). या प्रसंगी एका खैराच्या पात्रात आज्य भरून त्यात कर्णभूषण टाकतात. यजमान त्याचे अवलोकन करतो. प्रधान यागानंतर ब्रह्मा ते भूषण पात्रातून बाहेर काढतो. सर्व ऋत्विज ब्रह्म्याच्या हाताला स्पर्श करतात. तो ते भूषण यजमानास देतो. मग ते आशीर्वादमंत्र म्हणतात. हे कर्णभूषण शंभर भारांचे किंवा जितकी वर्षे जगण्याची इच्छा असेल, तितक्या भारांचे करतात. या सर्व इष्टींचे तंत्र दर्शपूर्णमासाप्रमाणे असते. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**आयुःसंक्रांतिव्रत** एक काम्य व्रत. याचा विधी असा – सूर्यसंक्रांतीच्या दिवशी सूर्याची पूजा करावी आणि कांस्यपात्रात दूध, तूप व सुवर्ण घालून त्याचे दान द्यावे. दानमंत्र असा –

**सत्क्षीरं सुरभीजातं पीयूषं समसर्पियुक् ।**
**आयुरारोग्यमैश्वर्यं मह्यं दद्यात् द्विजार्पितम् ।।**

वर्षाखेर व्रताचे उद्यापन करतात. फल – शतायुष्याचा लाभ. [व्रतराज; व्रतार्क]

**आयू काण्व** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या आठव्या मंडलातील बावन्न क्रमांकाचे सूक्त याने रचले असून, त्याची वालखिल्य सूक्तांमध्ये गणना होते. प्रस्तुतच्या सूक्तात मनू वैवस्वत, पृषध्र या राजांवर तसेच त्रित, मेध्य, मातरिश्वन, इ. ऋषींवर इंद्राने कृपा केल्याचा निर्देश आहे. याची एक ऋचा (८.५२.८) अशी –

**यस्मै त्वं मघवन्निन्द्र गिर्वणः शिक्षो शिक्षसि दाशुषे ।**
**अस्माकं गिर उत सुष्टुतिं वसो कण्ववच्छृणुधी हवम् ।।**

अर्थ – पुरातन कण्व ऋषींनी स्तविलेल्या हे धनदात्या, स्तुतिप्रिय, आणि उदार इंद्रा, तू आमची स्तोत्रे श्रवण कर.

विष्णूला त्रैलोक्यव्यापनाची प्रेरणा इंद्राने दिली, असें या सूक्तात म्हटले आहे. [प्रा. च. को.; ऋ. म. भा.]

**आरंग** मध्य प्रदेशात रायपूरपासून २२ मैलांवर हे शहर असून, इथे एक प्राचीन जैन मंदिर आहे. इथे हिंदू देवतांचीही अनेक मंदिरे आहेत. त्यांपैकी महामायेचे मंदिर इ. स. च्या ११ ते १२ व्या शतकात निर्माण झाले असावे. कारण त्या काळात रायपूर जिल्ह्यात शैव तांत्रिकांचा फार प्रभाव होता. शंकराच्या तंत्रमान्य स्वरूपाच्या मूर्तींचे अवशेष इथे बरेच आढळतात. सांप्रतही नवरात्रात काही साधक इथे साधना करताना दिसतात. [खं. वै.]

**आरट्ट** एक प्राचीन देश. पंजाबातल्या पाच नद्या व सिंधू यांच्या मधल्या प्रदेशाला हे नाव होते (म. भा. कर्ण. ४३.७). या देशातले लोक धर्मबाह्य व अपवित्र असतात, म्हणून आर्यांनी तिथे दोन दिवससुद्धा राहू नये, असे कर्णपर्वातच म्हटले आहे (म. भा. कर्ण. ४४.४०).

**आरणघाटा** बंगालमधील नडिया जिल्ह्यातील राणाघाटापासून तीन कोसांवरचे एक क्षेत्र. चूर्णी नदी याला लागून वाहते. इथे जुगलकिशोर देवाचे मंदिर असून, हे एक पवित्र स्थान मानले गेले आहे. [हि. जॉ. ए. इं.]

**आरण्यके** वैदिक वाङ्मयातला एक विभाग. निर्जन अरण्यात निवास करणारे ऋषि–मुनी ब्राह्मण ग्रंथांच्या ज्या भागाचे पठण करीत त्या भागाला आरण्यके असे म्हणतात. आरण्यके म्हणजे वानप्रस्थाश्रमात अरण्यवासी असताना अध्ययन करण्याचे ग्रंथ होत, असे ऐतरेय आरण्याकावरील भाष्यांत सायणाचार्य सांगतात –

**अरण्ये एव पाठ्यत्वादारण्यकमितीर्यते ।**

आरुणेय उपनिषदात सांगितले आहे, की वानप्रस्थात वेदांपैकी आरण्यके व उपनिषदे यांचेच अध्ययन करावे. विद्यार्थ्यांना आरण्यकांची संथा देतेवेळी ती गावात न देता अरण्यातच देत असत. सांप्रतही यांचे अध्यापन एखाद्या देवळातच करतात.

याव्यतिरिक्त आरण्यकांचे अरण्यात अध्ययन करण्याचे आणखी एक स्पष्टीकरण ज्ञानकोशात दिले आहे –

" यज्ञसंस्थेमध्ये दृष्ट होणारी प्रवर्ग्य संस्था यज्ञाशिवायही

होत असे, पण ती घरी न करता गावाबाहेर, विशेषकरून अरण्यात व्हावी, असा परिपाठ असे. त्या प्रवर्ग्य संस्थेचे विवेचन ब्राह्मणांऐवजी आरण्यक वाङ्मयात असते. अरण्यात म्हणजे गावाबाहेर होणाऱ्या विधींचा ग्रंथ आरण्यक होय."

वेदकालीन यज्ञसंस्थेचा ब्राह्मणकालात अफाट विस्तार झाला. यज्ञातल्या कर्मकांडाची क्लिष्टता व जटिलता याज्ञिकांनी कमालीची वाढविली. पण याच काळात असा एक वैदिकांचाच वर्ग होता, की त्याला या कर्मकांडात रस वाटत नसे. हा वर्ग यज्ञसंस्थेपासून अलिप्त होऊन अरण्यात राहत असे. अशा अरण्यवासी ऋषि–मुनींनी विजनवास पत्करून यज्ञाच्या मूलभूत रहस्याचे चिंतन सुरू केले. त्यात बाह्य कर्मांपेक्षा नैतिक व मानसिक उपासनाही श्रेष्ठ होत, असे त्यांना कळून आले. त्यामुळे स्वर्गप्राप्तीपेक्षा आत्मप्राप्तीकडे त्यांचे मन वळले. केवळ यज्ञाचाच नव्हे; तर सृष्टयुत्पत्ती, जीवात्मा, परमात्मा, जन्म, मृत्यू, पुनर्जन्म, इ. अनेक विषयांचा त्यांनी तात्त्विक व नैतिक विचार सुरू केला. आरण्यकांचा विषय यज्ञ हा नसून, यज्ञांतर्गत आध्यात्मिक तथ्यांची मीमांसा हा आहे; यज्ञीय अनुष्ठान हा नसून, तदंतर्गत दार्शनिक विचार हा आहे.

सर्व आरण्यके ही ब्राह्मण ग्रंथांची अखेरची प्रकरणे आहेत. त्यांतील तत्त्वज्ञान प्रधान प्रकरणांना उपनिषदे म्हणतात. आरण्यकांतल्या एकंदर विवेचनावरून पाहता ती ब्राह्मणांपेक्षा उपनिषदांनाच अधिक जवळची वाटतात.

आरण्यक वाङ्मय वेदांगे व ब्राह्मणे यांचे संयोजक आहे. गृह्यसूत्रांत सांगितलेली किंवा तत्सदृश अशी अन्य नित्यकर्मे आरण्यकांत सांगितली आहेत (तै. आ. २.११). यांत उच्चारविषयक काही नियमही दिलेले आहेत (ऐ. आ. २.२). त्यावरून शिक्षा विषयाचे पूर्वस्वरूप आरण्यकांत दिसून येते. वेदांगांत अंतर्भूत न होणारे परंतु तदुत्तर वाङ्मयात दिसणारे शकुन, अपशकुन, इ. विचारही यांत आढळतात.

आरण्यकांत यज्ञसंस्थेपैकी महाव्रत, उख्य, पितृमेध, अरुणकेतुचयन, इ. याज्ञिक विषयांचे विवरण आलेले आहे. पण यज्ञाच्या आधिदैविक व आध्यात्मिक स्वरूपाचे विवेचन हा त्यांचा मुख्य उद्देश आहे. त्यात यज्ञाचा रहस्यात्मक व प्रतीकात्मक अर्थ सांगितला आहे. आरण्यकांतील वाक्यरचना सरळ, संक्षिप्त व क्रियाबहुल आहे. त्यांचा बाह्य यज्ञापेक्षा मानसिक यज्ञावर विशेष भर आहे. यज्ञाची दार्शनिक व्याख्या यांत आढळते. यज्ञ हा विश्वाचा नियंता असून, चराचराचे कल्याण करणारा आहे, अशी आरण्यकांची धारणा आहे. सकाम कर्म व कर्मफल यांच्याविषयी तिथे श्रद्धेचा भाव नाही. कर्ममार्ग हाच केवळ आत्यंतिक सुखाचा मार्ग नव्हे; त्याला ज्ञानमार्गाची जोड मिळाली पाहिजे, अशी आरण्यकांची विचारसरणी आहे. लोकांची केवळ बाह्यकर्मांतली रुची व श्रद्धा कमी करून ती मानसिक उपासनेकडे वळविणे, हे आरण्यकांचे क्रांतिकारक कार्य होय.

सांप्रत उपलब्ध असलेली आरण्यके पुढीलप्रमाणे आहेत–

**ऋग्वेद** – ऐतरेय व शांखायन (कौषीतकी).

**शुक्ल यजुर्वेद** – माध्यंदिन बृहदारण्यक व काण्व बृहदारण्यक.

**कृष्ण यजुर्वेद** – तैत्तिरीय आरण्यक. मैत्रायणी शाखेच्या मैत्र्युपनिषद् या ग्रंथालाही मैत्रायणी आरण्यक असे म्हणतात (वै. सा.).

**सामवेद** – तलवकार आरण्यक. सामवेदातल्या आर्चिकांचा अवलंब करून गायिल्या जाणाऱ्या विभागालाही छांदोग्यारण्यक असे म्हणतात. पण हे इतर आरण्यकांहून सर्वथा भिन्न आहे.

**अथर्ववेद** – याचे एकही आरण्यक उपलब्ध नाही.

बृहदारण्यकात संन्यासाचे विधान फार सुंदर रीतीने सांगितले आहे (बृह. ४.४.२२)–

**एतमेव विदित्वा मुनिर्भवति। एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति। एतद्ध स्म वै तत्पूर्वे विद्वांसः प्रजां न कामयन्ते। किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्माऽयं लोक इति ते ह स्म। पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति।**

अर्थ – याच आत्म्याला जाणून मुनी होतो. ब्रह्मलोकाची इच्छा करणारे संन्यास ग्रहण करतात. पूर्वकाळचे विद्वान प्रजेची कामना करीत नव्हते. 'आम्हांला प्रजा मिळवून काय करायचे आहे! आम्हाला हा आत्मा व हा लोकच इष्ट आहे,' असे ते म्हणत. म्हणूनच पुत्र, धन, व कीर्ती यांच्या एषणेचा त्याग करून भिक्षा मागत (व तिच्यावर निर्वाह करीत).

प्राणविद्येचे प्रतिपादन हा आरण्यकांचा एक विशेष विषय आहे. प्राणविद्येचे महत्त्व सांगताना आरणके ऋग्वेदातल्या मंत्रांचा उद्धार करतात (ऋ. १.१६४.३१,३८). त्यावरून त्या विद्येच्या दीर्घकालीन परंपरेचा बोध होतो. ऐ. आरण्यकात (ऐ. आ. २.१.६) प्राणांची श्रेष्ठता सांगताना म्हटले आहे ते असे –

**सोऽयमाकाशः प्राणेन बृहत्या विष्टब्धः तद्यथा यमाकाशः प्राणेन बृहत्या विष्टब्ध एवं सर्वाणि भूतानि आपिपीलिकाभ्यः प्राणेन बृहत्या विष्टब्धानीत्येवं विद्यात्।**

अर्थ – प्राण या विश्वाचा धारक आहे. प्राणशक्तीनेच हे आकाश जसे स्वस्थानी स्थित आहे, त्याप्रमाणे सर्वांत मोठ्या प्राण्यापासून तो किडामुंगीपर्यंत समस्त जीव या प्राणाने विधृत आहेत.

जितक्या ऋचा, जितके वेद व जितके घोष आहेत, ते सर्व प्राणरूप आहेत. या प्राणाची ही भिन्न भिन्न रूपे व गुण जाणून त्या त्या रूपाने त्याची उपासना केली पाहिजे.

अशा प्रकारे उपनिषदांतल्या कित्येक आध्यात्मिक तत्त्वांचा संकेत आरण्यकांत झालेला दिसतो. वैदिक तत्त्वमीमांसेच्या इतिहासात आरण्यकांना महत्त्वाचे स्थान आहे. [क. है. इं.; वै. सा. सं.; म. ज्ञा. को.]

**आरती** प्रज्वलित नीरांजन, पणती किंवा दिवा तबकात ठेवून त्याने देव व गुरू यांना ओवाळण्याच्या विधीला आरती म्हणतात. तसेच, त्या वेळी देवाचे किंवा गुरूचे स्तुतिपर गीत म्हणतात, त्यालाही आरती असेच नाव आहे. आरात्रिक या संस्कृत शब्दापासून आरती हा शब्द तयार झाला आहे. बंगाली भाषेत आरतीसाठी आरात्रिक हा शब्दच वापरतात.

आरतीत त्या त्या देवतेची स्तुती केलेली असते आणि तिच्याकडे मंगलाची आणि ऐश्वर्याची कामना केलेली असते. सुखकर्ता दुःखहर्ता ही गणपतीची, लवथवती विक्राळा ही शंकराची, दुर्गे दुर्घट भारी ही देवीची, युगे अठ्ठावीस ही पांडुरंगाची, आरती ज्ञानराजा ही ज्ञानेश्वरांची, इ.आरत्या महाराष्ट्रात प्रसिद्ध आहेत.

मराठी भाषेच्या आरंभकालापासून आजमितीपर्यंत आरतीची रचना चालू आहे. इ. स. च्या बाराव्या शतकातील महानुभाव कवींनी आणि ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास या संतश्रेष्ठांनी आरत्या रचल्या आहेत. याशिवाय काही पंडित कवींनी आरत्या लिहिलेल्या आहेत. आधुनिक संतांच्या शिष्यांनीही गुरूंच्या आरत्या रचून गुरूबद्दल कृतज्ञता व्यक्त केली आहे. सिद्धारूढस्वामी, अक्कलकोटचे स्वामी, गोंदवलेकर महाराज, यशवंतमहाराज, साईबाबा, गुरुदेव रानडे, अशा कितीतरी सत्पुरुषांच्या आरत्या रचण्यात आलेल्या आहेत.

श्री. ल. रा. पांगारकर यांनी आरतीवाङ्मयाविषयी गौरवोद्गार काढले आहेत. ते म्हणतात, 'मराठी भाषेतील आरत्या हे भक्तिरसप्रधान काव्यमंदिरातील एक स्वतंत्र असे देवघर आहे. या देवघरात परमेश्वराचे सुरम्य, सगुण स्वरूप आणि भक्त यांशिवाय इतर काही दिसायचे नाही. देव आणि भक्त यांच्या मधील पूज्य-पूजकसंबंधाचे साक्षात दर्शन घडविणारे आरसे म्हणजेच या आरत्या होत. यातील गणपतीच्या आरत्यांतील सहजोक्तीची वर्णने, विष्णूच्या आरत्यांतील साहित्यप्रचुर वर्णने, मारुतीच्या आरत्यांतील भयजनक वर्णने, अशा अनेक प्रकारच्या वर्णनचमत्कृती नवनवोन्मेषाने या आरत्यांमध्ये उल्हसित झालेल्या आहेत. आणि या सर्व वर्णनचमत्कृतींची माला एकाच भक्तिसूत्रात गुंफून, ती ईश्वरार्पण केलेली आहे.'

इ. स. च्या बाराव्या शतकापासून अठराव्या शतकापर्यंत रचल्या गेलेल्या आणि उपलब्ध असलेल्या आरत्यांची संख्या सुमारे सात-आठशे आहे. ज्ञानेश्वरांनी थोड्याच आरत्या रचलेल्या आहेत. त्यांची 'फळले भाग्य माझे' ही आरती विशेष उल्लेखनीय आहे. त्या आरतीत सद्‌गुरु-उपदेशाची महती सांगून पंढरीरायाच्या राउळात आलेला दिव्य अनुभव त्यांनी मार्मिकपणे सांगितला आहे. त्याच कालखंडातील नामदेवांनी बऱ्याच आरत्या रचल्या आहेत आणि त्या विठ्ठलाच्या आहेत. नित्यारती, काकडारती, शेजारती अशा विविध आरत्या त्यांनी लिहिल्या. आजही पंढरपूरच्या विठ्ठलमंदिरात युगे अठ्ठावीस, उठा उठा हो साधक, इ. आरत्या म्हटल्या जातात. यानंतरच्या काळात गुरुचरित्रकार गंगाधरसरस्वती, दासोपंत, पाठकमंडळी, नरहरी, विष्णुदास नामा, त्र्यंबक, कृष्णदास, इ. अनेक कवींनी आरत्या लिहिल्या. पुढे इ. स. च्या सोळाव्या शतकात एकनाथ, रामा जनार्दन, जनी जनार्दन, विठा रेणुकानंदन, कृष्णदास, अनंतसुत, इ. कवींनी आरत्यांची रचना केली. एकनाथांचा नातू मुक्तेश्वर यांनी आरतीलेखनातही आपले वैशिष्ट्य दाखवले आहे. त्यांनी बऱ्याच आरत्या लिहिल्या असून, एकनाथांच्या चरित्रावर त्यांनी लिहिलेल्या आरत्या नावीन्यपूर्ण आहेत. इ. स. च्या सतराव्या शतकात तुकाराम, रामदास, यांसारखे महान संत व वामन, रघुनाथ यांसारखे पंडित कवी होऊन गेले. या सर्वांनी आरतीवाङ्मयात मोलाची भर घातली आहे. तुकारामाच्या आरत्या भावपूर्ण आहेत. पण या कालखंडातील रामदासी संप्रदायाचा वेगळेपणा त्याच्या आरत्यांमध्येही दिसतो. त्या संप्रदायाचे दैवत श्रीराम आणि त्याचा भक्त हनुमान यांच्या अनेक आरत्या त्या काळात रचल्या गेल्या. रामदासांच्या आरत्यांत शब्दप्रभुत्व, आशय व काव्य यांचा संगम झालेला आढळतो. त्यांच्या शिष्यांनी सद्‌गुरुविषयी आरत्या लिहिल्या.

वामन पंडित व मौनी हा सिद्ध यांच्या आरत्याही उल्लेखनीय आहेत. त्या काळातील शेख महंमद या मुसलमान कवीनेही आरत्यांची रचना केली आहे.

पुढील शतकातही आरत्यांची रचना चालूच राहिली. श्रीधर, मोरोपंत, कृष्णदयार्णव, जगजीवन, परशुराम, तुका विप्र, मोरेश्वरसुत, नरहरी, निरंजन, विप्र नारायण, महीपती, ठाकुरदास, इ. कवींनी आपापल्या पद्धतीने आरत्या रचल्या.

मौनीविरचित विठ्ठलाची एक आरती अशी —

जय जय कटिकर विठ्ठल चिन्मयसुखराशी।
सर्वही व्यापक ब्रह्म तू पंढरपुरवासी।
पुंडलिकवरप्रद आपणां म्हणविसी।
निजभक्तांस्तव नाना नटवेषा धरिसी ॥ १ ॥

जय देव जय देव जय विठ्ठलराया ।
करुणामृत सुखसागर वंदित तव पाया ॥ ध्रु ॥
भीमातट निजनिकटीं राहुनिया देवा ।
विठ्ठल विठ्ठल स्मरणे तारीसी जीवा ।
अखंड भजनानंदी दृढ धरुनी भावा ।
वैष्णव नाचति रंगणि करिती तव सेवा ॥ २ ॥
रत्नखचित मुकुटादी तुळसीच्या माळा ।
अम्लाना कुसुमांच्या घालुनिया गळां ।
कस्तुर्यादी तिलकें शोभविसी भाळा ।
मौनी वंदित चरणीं अभेद गोपाळा ॥ ३ ॥

पाचसहा कडवी असलेले, ध्रुवपदात आरती किंवा ओवाळणे हे शब्द व जयजयकार येणारे, असे जे गेय पद्य त्याला आरती म्हणता येईल.

आरत्यांचे काही प्रकारही आहेत. प्रमुख देवस्थानांत प्रातःकाळी काकडारती आणि रात्री शेजारती करतात. तसेच, पूजोपचारातील वेगवेगळ्या क्रियांच्या वेळी वेगवेगळ्या आरत्या म्हणण्याची पद्धत आहे. उदा० नैवेद्य दाखवताना नैवेद्यारती म्हणतात.

त्याचप्रमाणे आरतीच्या साहित्यात समाविष्ट असणाऱ्या व स्वतंत्रपणे ज्यांनी देवाला ओवाळतात, अशा काही वस्तूंचा उल्लेख करून त्या नावाने आरती ओवाळण्याचीही पद्धत आहे. उदा० दीपारती, धूपारती, नीरांजनारती, कर्पूरारती, पंचारती, काकडारती (काकडा म्हणजे कापडाची जाड वात).

याशिवाय विष्णू, शिव, देवी, दत्त, इ. देवता; सत्यनारायण, अनंतव्रत, संकष्टी चतुर्थी, इ. व्रते; तुलसी, वड, इ. वृक्ष; सूर्य, चंद्र, शनी, इ. ग्रह; गरुड, शेष, इ. वाहने; बारा ज्योतिर्लिंगे, केदार, पंढरपूर, इ. क्षेत्रे; गंगा, कृष्णा, इ. नद्या; निवृत्ती, ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, रामदास, मोरया गोसावी, इ. संतमहात्मे; भगवद्गीता, भागवत, ज्ञानेश्वरी, दासबोध, इ. ग्रंथ यांना उद्देशूनही आरत्या रचलेल्या आहेत.

आरतीमध्ये नादानुकारी व रसानुकूल शब्दयोजना केलेली असते. आणि तिच्या शेवटी कर्त्याचे नाव गोवलेले असते.

भारतातील सर्व धर्मग्रंथांत आणि बहुतेक भाषांत आरत्यांची रचना झालेली आहे. आरतीचा उपचार पूजेच्या शेवटी करतात. या वेळी पुष्पनैवेद्यादी समर्पणाचा उपचार पूर्ण झालेला असतो. प्रसन्न आणि पवित्र वातावरणात देवाच्या मूर्तीपुढे दिवा ओवाळून व टाळ – मृदंगाच्या साथीत तालासुरावर आरती गाऊन देवाची आराधना केली जाते.

पूर्वी राजेमहाराजे, विजयी सेनापती व विद्वान पंडित यांनाही आरत्या ओवाळीत. भुताखेतांची किंवा माणसांची दृष्ट बाधू नये म्हणून ही प्रथा निर्माण झाली. देवाच्या आरतीतही हाच हेतू असतो. मंगल कार्यांत वधू-वरांना व मुंज्या मुलालाही आरती ओवाळतात. वधू-वरांना ओवाळल्या जाणाऱ्या आरतीला कुर्वंडी करणे, असे म्हणतात. दिवाळीच्या सणात पाडव्याच्या दिवशी पत्नी पतीला व भाऊबीजेच्या दिवशी बहीण भावाला आरती ओवाळते. देवाची आरती पूजा करणारा करतो व इतरांची आरती सुवासिनी स्त्रिया किंवा देवदासी करतात. कीर्तनाच्या अंती कीर्तनकार देवाची आरती गातात.

लिंगायत लोकांत, पुरुषाचे प्रेत घरात असेपर्यंत त्याची पत्नी त्याच्या तोंडाभोवती आरती ओवाळते. त्याचा आत्मा भूतयोनीत प्रविष्ट होऊ नये, म्हणून हा विधी असतो. अग्निमंथनाकरिता अरणी सिद्ध करण्यासाठी अग्निहोत्री जेव्हा अश्वत्थाच्या फांद्या तोडतो, तेव्हा आरती ओवाळून त्या अश्वत्थाला तो आपला कठोरपणा विसरायला सांगतो. याशिवाय नवीन विहीर खोदण्याच्या जागेवर, शिवरात्रीला बिल्ववृक्षाभोवती, मुलाच्या बारशाच्या, वाढदिवसाच्या व उष्टावणाच्या दिवशी त्याला आरती ओवाळण्याची प्रथा आहे. आरतीत सर्व प्रकारची शक्ती सामावलेली असते, असा समज आहे. आरतीतले नीरांजन ताम्हनातून पडले व त्याची ज्योत विझली, तर घरातल्या कोणत्यातरी माणसाचा मृत्यू ओढवतो, अशीही समजूत आहे. तसे झाले तर संभाव्य अरिष्टाच्या निवारणासाठी दीपपतनशांती करतात.

सगुणोपासक भक्तांनी आपल्या मनातील भाव प्रकट करण्यासाठी आरत्यांची रचना केली आहे. आपल्या मनातले आर्त आरतीच्या द्वारा ते आपल्या उपास्य दैवताला उघड करून दाखवतात. त्यामुळे व्यक्तिपरत्वे अभिव्यक्ती बदलत जाते आणि एकूण आरतीची रचना भावगर्भ बनते. स्वतःची दुरवस्था, दैवताचे चरित्र, त्याचे मनोहर स्वरूपवर्णन, देवदर्शनात होणारा विलंब, इ. विषयांचे भक्तांनी जिव्हाळ्याने वर्णन केले आहे. बद्ध, मुमुक्षू, साधक, सिद्ध, अशा विविध प्रकारच्या भक्तांनी आपले भक्तिमार्गातील अनुभव आरत्यांत सांगितल्यामुळे भक्तिमार्गातील सर्व अवस्थांचे यशस्वी चित्रण त्यांत पाहायला मिळते.

[की. पॉ.; हिं. सा. को.; मराठी आरती]

## आरंभवाद

कार्यासंबंधी न्यायशास्त्राचा सिद्धांत. कारणापासून कार्याची उत्पत्ती होत असते. उत्पत्तीच्या पूर्वी कार्य असत नाही. जर कार्य हे उत्पत्तीच्या पूर्वी असते, तर उत्पादनाची गरज नव्हती. पुष्कळशी कारणसामग्री एकत्र येऊन कोणत्यातरी पूर्वी असत् असलेल्या कार्याच्या निर्मितीचा आरंभ करते, असा न्यायशास्त्राचा सिद्धान्त आहे. यालाच आरंभवाद असे म्हणतात. याच्या उलट सत्कार्यवादी दर्शनांत उत्पत्तीच्या

पूर्वी कार्य हे सत् मानले जाते. कार्याची उत्पत्ती म्हणजे त्याची केवळ अभिव्यक्ती होय, असे सत्कार्यवादी मानतात. पण न्याय-दर्शनाला उत्पत्तीपूर्वी कार्याची स्थिती मानणे, हे हास्यापद वाटते. नैयायिक म्हणतात, की जर तेल पूर्वीच विद्यमान असेल तर तिळांचे मर्दन करण्याची आवश्यकताच काय? तिळ पाण्यात घालून तेल काढणे याचा अर्थच असा, की तेल त्यापूर्वी नव्हते. उपभोगयोग्य तेल पूर्वी नव्हते, तिळ पाण्यात घालून रगडल्यावर मगच त्याची उत्पत्ती झाली. म्हणून न्यायशास्त्राच्या मते कार्य नेहमीच आपल्या कारणातून नवीन निर्माण होते.

**आरसा** आदर्श व काच हे शब्द संस्कृत वाङ्मयात प्राचीन काळापासून रूढ आहेत. यावरून आरसा तयार करण्याची रीत भारतीयांना फार प्राचीन काळापासून माहीत असावी, असे दिसते. प्राचीन काळी धातूंचा पत्रा गुळगुळीत करून त्यात आपले प्रतिबिंब पाहत असावे, असे वाटते. पण काचेचे आरसे निश्चित कोणत्या काळी वापरात आले, त्याबद्दल मात्र विश्वसनीय माहिती मिळत नाही.

कौषीतकी उपनिषदात 'एष आदर्शे पुरुषस्तमेवाहमुपासे' — आरशातल्या या पुरुषाची मी उपासना करतो, असा आरशाचा उल्लेख आलेला आहे (४.११). इ. स. च्या प्रारंभी उत्तर भारतात धातूचे आरसे असत, असे मिलिंदपन्हातील उल्लेखावरून वाटते (४.१.६०). यापुढील वाङ्मयात आरशाचा उल्लेख वारंवार येतो.

संस्कृत साहित्यात व लोकसाहित्यात आरशाचे अनेक उल्लेख आहेत. अप्सरा व नायिका हातात आरसा घेऊन प्रसाधन करीत असल्याची चित्रे व मूर्ती सापडतात. वेणी व प्रसाधन यांसाठी आरसा ही अत्यंत आवश्यक वस्तू आहे.

प्राचीन उत्खननात तीन आरसे मिळाले आहेत. त्यांतला एक काशाचा व अंडाकार आहे.

कुमारसंभवात शिवाने पार्वतीला एक मणिदर्पण दिल्याचा उल्लेख (६.२९) कालिदासाने केला आहे.

**प्रियेण दत्ते मणिदर्पणे सा सम्भोगचिह्नं स्ववपुर्विभाव्य ।**
**त्रपावती तत्र घनानुरागं रोमाञ्चदम्भेन बहिर्बभार ॥**

अर्थ – प्रियकराने दिलेल्या मणिदर्पणात आपल्या शरीरावर उमटलेली संभोगचिह्ने पाहून पार्वतीची काया लज्जेने पुलकित झाली व त्या प्रकारावरून तिचे शिवावर किती प्रगाढ प्रेम होते, ते व्यक्त झाले.

आरशात समोरच्या माणसाचे जे प्रतिबिंब दिसते, तो त्या माणसाचा आत्मा होय, अशी एक समजूत आहे. पाहा–प्रसाधन.
[प्रा. भा. प्र.; म. ज्ञा. को.]

**आराकू** आंध्रात विशाखपट्टणम्‌पासून सत्तर मैलांवर आराकू खोरे वसलेले असून, समुद्रसपाटीपासून त्याची उंची ३००० फूट आहे. खोऱ्यात जागोजागी धबधबे व नद्या आढळतात. या खोऱ्यात विविध टोळ्यांचे सुमारे ३५००० आदिवासी राहतात. त्यांनाही आराकू म्हणतात.

यांची घरे मातीची पण बिनखिडक्यांची असतात. घराचे छप्पर बांबू व गवत यांचे असते. विस्तव पेटविण्यासाठी ते दोन काठ्या एकमेकांवर घासतात. त्याला अड्डा म्हणतात. ते पितळेची भांडी वापरतात. थंडीच्या दिवसांत घरात रात्रभर शेकोटी पेटवून ठेवतात.

शेती हा आराकूंचा मुख्य व्यवसाय आहे. बहुतेकांच्या स्वतःच्या मालकीच्या जमिनी आहेत. ज्यांच्याजवळ जमीन नाही, ते शेतमजुरी करतात. हल्ली या भागात समाजविकास योजनेचे कार्य सुरू झाल्याने आराकूंना मुबलक काम मिळते.

नाचणी व भात हे त्यांचे मुख्य अन्न होय. शिवाय ते मांसाहारी असल्याने त्यासाठी शेळ्या, कोंबड्याही पाळतात. आराकू निरागस व साधे असतात. त्यांच्यामध्ये गुन्हेगारी प्रवृत्ती आढळत नाही. भांडणे सामोपचाराने किंवा पंचायत भरवून सोडवितात. अपराध्याला दंड करतात. दंडाचे पैसे चैनीत खर्च करतात. प्रत्येक गावात एक नाईक असतो. त्याचे गावावर मोठे वजन असते व त्याची आज्ञा सहसा कोणी मोडीत नाही.

आराकू आदिवासींतील मुलींचे लग्न साधारणतः सोळाव्या वर्षी होते. हल्ली तरुण-तरुणी आपापली लग्ने स्वतःच ठरवितात. पूर्वी विवाहेच्छू मुलगा मुलीच्या आईबापांकडे जाऊन त्यांना दारूचे एक भांडे भेट देत असे. त्यावरून आईबापांना समजे, की या तरुणाला आपल्या मुलीशी लग्न करायचे आहे. हल्लीची लग्ने आठवड्याच्या मेळाव्यात ठरतात. प्रेमबद्ध तरुण-तरुणी एक दिवस जंगलात जाऊन राहतात व मग घरी परततात. यानंतर ती दोघे विवाहबद्ध झाल्याचे जाहीर करतात. हा एक प्रकारचा गांधर्व विवाहच होय. हे जातिभेद पाळतात. त्यांच्यांत आंतरजातीय विवाह होत नाहीत. हुंड्याची चाल नाही. बहुपत्नीकत्वाची पद्धत आहे. लग्न पुरोहित चालवितो. लग्नातल्या जेवणावळीत 'जिलुगू कालू' या गावठी दारूचा उपयोग करतात. आराकूंचे हे आवडते पेय असून, जिलुगू नावाच्या वृक्षापासून ते तयार करतात.

प्रत्येक खेड्यात एक पुरोहित असतो. त्याच्याजवळ पंचांग असते. त्याला थोडेसे ज्योतिषाचे व वैद्यकाचेही ज्ञान असते.

आराकू आदिवासी जंगलात राहत असल्याने ते फारसे कपडे वापरीत नाहीत. पुरुष लंगोटी नेसतात व स्त्रिया अंगाभोवती साडी गुंडाळतात. हल्ली काही स्त्रिया चोळी घालू लागल्या

आहेत. स्त्रिया पितळेचे किंवा ॲल्युमिनियमचे दागिने घालतात. त्यांच्या गळचांत 'कांते' नावाची एक धातूची सरी असते. आराकू आदिवासींत हिंदूंशिवाय ख्रिश्चन व जैन धर्मांचेही लोक आहेत. प्रत्येकाचे सण वेगवेगळे असले तरी 'चैती' हा सण मात्र सार्वजनिक आहे. हा सण महिनाभर चालू असतो. शिकार हे या सणाचे वैशिष्टच होय. जो जास्त शिकार करतो, तो हुषार ठरत असल्यामुळे त्यांच्यांत शिकारीची चुरस लागते.

आराकू हे संगीत व नृत्य यांचे शौकीन आहेत. त्यांना जवळजवळ बारा नृत्ये अवगत आहेत. रोज रात्री त्यांचा कसला ना कसला तरी नाचगाण्याचा कार्यक्रम असतोच. त्यांना नाटकाचीही आवड असून 'गोपीलीला', 'सोसी सेना' या नावांची लोकनाटचे ते करतात. नृत्यात स्त्रिया व पुरुष दोघेही भाग घेतात. आराकूंचे सर्वांत सुंदर नृत्य म्हणजे मयूरनृत्य होय. मोराची पिसे पागोटचात खोचून पुरुष हे नृत्य करतात. नृत्याच्या वेळी मोर आणि लांडोर यांच्या प्रेमावर आधारलेली गीते गातात. [ इलस्ट्रेटेड वीकली, ३० एप्रिल १९५८ ]

**आराधना** जैन मुनिधर्मावरील एक ग्रंथ. यापनीय संप्रदायाच्या शिवार्य नामक आचार्याने हा ग्रंथ रचला असून, तो शौरसेनी प्राकृतात आहे. त्यात एकूण २१७० गाथा असून सम्यग दर्शन, सम्यग ज्ञान, सम्यक चरित्र व सम्यक तपरूप या चार आराधनांचे वर्णन आहे.

अमितगतीने या ग्रंथाचा संस्कृत अनुवाद केला असून, त्याला आराधना हेच नाव दिले आहे. [ जै. सा. इ. ]

**आराधी** महाराष्ट्रातील एक अल्पसंख्य जात. वास्तविक हा एक पंथ आहे. ब्राह्मणांपासून अंत्यजापर्यंत हिंदुअहिंदूंचा यात प्रवेश झालेला आहे. एखाद्याला मूल होत नसेल, तर तो देवीला नवस करतो, की 'मूल झाल्यास ते मी तुला अर्पण करीन.' काही असाध्य रोगी देवीला नवस बोलतात, की 'रोगमुक्त झाल्यास मी आराधी बनून तुझी सेवा करीन.' अशा प्रकारे ही जात निर्माण झाली आहे. आराधिणींना लग्न करता येत नाही. पुरुष मात्र आपापल्या जातीतल्या मुलींशी लग्ने करतात.

एखाद्याला आराधी बनायची इच्छा झाल्यावर तो कोल्हापूर, तुळजापूर, राशीन, इ. क्षेत्रांपैकी आपल्या इष्ट देवतेच्या क्षेत्रात जाऊन तिचा आराधी बनतो. काही कारणाने क्षेत्रात जाणे न जमल्यास त्याला पुढील विधीने आराधी बनवितात – गायीच्या शेणाने सारविलेल्या जमिनीवर चौरंग मांडून व त्यावर शुभ्र वस्त्र पसरून त्यावर घटाची स्थापना करतात. चौरंगाच्या खुरांना उसाची कांडी किंवा बाजरीची धाटे बांधतात. मग एक आराधी गुरू घटाची पूजा करतो व आराधी होऊ इच्छिणाऱ्या माणसाच्या हातात तेलात भिजविलेला पलिता पेटवून देऊन त्याच्या गळचात कवडचांची माळ घालतो. नंतर हा नवा आराधी भवानीला नमस्कार करतो. मग आपल्या जातिबांधवांना जेवण घालतो. सर्व विधी झाल्यावर सदर इसम आराधी झाला, असे जाहीर करतात. आराधी पुरुष जाकीट व पायघोळ अंगरखा घालून वर कवडचांच्या माळा घालतो. 'यमाई तुकाईचा जोगवा' असे म्हणून हा भिक्षा मागतो. त्याच्या हातात पेटता पलिता असतो व काखेत अडकविलेल्या बुधल्यात पलित्याला लागणारे तेल असते.

आराधी मनुष्य मृत्यू पावल्यावर त्याच्या अंगावरील कवडचांच्या माळा व हातातील परडचा त्याच्या बरोबर जाळतात किंवा पुरतात. [ बाँ. बे. क्रा. ]

**आराध्य ब्राह्मण** तेलुगू ब्राह्मणांची एक शाखा. हैदराबाद व मद्रास या भागांत यांची पुष्कळशी वस्ती आहे. हे लोक गळचात यज्ञोपवीताबरोबर लिंगप्रतिमाही धारण करतात. हे स्वत:ला स्मार्त समजतात आणि भस्म व रुद्राक्ष धारण करतात. लिंगायत धर्माचा संस्थापक बसव याच जातीचा होता. या जातीत काही वैष्णवही आहेत. ते मात्र गळचात लिंग बांधीत नाहीत. आराध्य ब्राह्मण पूर्वी त्रिशूलादिकांच्या तप्तमुद्रा घेत असत. परंतु हल्ली घेत नाहीत. वीरशैवांचे पाच आचार्य मुळात याच ब्राह्मणांपैकी असावे, असे भांडारकरांचे मत आहे.



आराध्य ब्राह्मण

आराध्य ब्राह्मण क्वचित नियोगी पोटजातीतील मुलींशी लग्न करतात. या वरून, आराध्य पंथात येण्यापूर्वी ते नियोगी असावे, असे वाटते. वीरशैवांप्रमाणे ते मृतांना बसलेल्या स्थितीत पुरतात. दहा दिवस सुतक पाळतात व एकोद्दिष्ट वगैरे श्राद्धे करतात. ते वर्षश्राद्ध न करता त्या दिवशी आराधना करतात. त्यांच्या आराधनेला दर्भ व पिंड या वस्तू लागत नाहीत. त्यांच्यात विधवांचे केशवपन करीत नाहीत.

पालकुर्की सोमनाथ (इ. स. चे १४ वे शतक) हा तेलुगू कवी आराध्य ब्राह्मण होता. त्याने बसवपुराण व पंडिताराध्य चरित्र असे दोन ग्रंथ लिहिले आहेत. यांच्यांत पिडुपर्थी सोमनाथ व बसवकवी (इ. स. चे १६ वे शतक) हे दोघे भाऊही मोठे ग्रंथकार होऊन गेले. [ का. द्रा. स. इं. ]

**आराही** तंत्रमार्गातली एक देवता. हिचे वर्णन – कमलाचे आसन, डुकराचे तोंड, कृष्ण वर्ण, मुंडमाला धारण करणारी, चतुर्भुज, दोन हातांत नांगर व मुसळ असून, दोन हात वरद व अभय या मुद्रेत असतात. [ श्रीविद्यार्णवतंत्र ]

**आरुणी** उद्दालकाचे पैतृक नाव. (बृहदा. उप. ३.६.१) हा अरुण औपवेशी गौतमाचा पुत्र व श्वेतकेतूचा पिता होता. उद्दालक आरुणी हा सुब्रह्मण्याचा गुरू असून, याने हृदयस्थ अष्टदल कमलाच्या ठिकाणी ब्रह्मदृष्टी ठेवून ब्रह्मोपासना केली (ऐ. आ. २.१.४). वासिष्ठ चैकितायनाकडून याने ज्ञान मिळविले. हा याज्ञवल्क्याचा गुरू होता, असे काहींचे म्हणणे आहे. हा मानसशास्त्रज्ञ व तत्त्वज्ञही होता. ' सुवर्णाच्या अलंकारांचे ज्याप्रमाणे सुवर्ण हे उपादान कारण आहे, त्याप्रमाणेच ब्रह्म हे सर्व भूतमात्राचे अंतिम उपादान कारण आहे. हे मूलाधारभूत ब्रह्मच तेवढे सत्य असून, बाकी सर्व नामरूपात्मक पदार्थ मिथ्या आहेत, ' असे याचे मत आहे. आरुणीने वेदान्तातील मायावादाची पूर्वतयारी करून ठेवली, असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. ' तत्त्वमसि ' हे महावाक्य त्याने आपला पुत्र श्वेतकेतू याला वारंवार उपदेशिले आहे. आरुणि-श्वेतकेतू संवादात हे जग कसे बनले व मानवशरीरात कोणते घटक आहेत, या प्रश्नावर भर दिलेला आहे. ' जगाचे आदिकारण सत् असून, त्यातून क्रमाने तेज, तेजातून आप्, आप्मधून अन्न, अशी भौतिक मूलतत्त्वे निर्माण झाली; त्या तत्त्वांत सद्रूपी आत्मतत्त्वाने प्रवेश केला व या तत्त्वांच्या घटकांच्या मिश्रणातून ही सृष्टी व मानव निर्माण झाला, ' असे त्यात वर्णन आहे (छान्दो. उप. ६.८.१६). मन, प्राण, वागिंद्रिय ही अनुक्रमे अन्न, जल व तेज यांतून निर्माण झाली, असे याने दाखविले आहे. [ उ. र.; प्रा. च. को.; नवभारत, सप्टें. १९५८ ]

**आरुण्युपनिषद** एक संन्यासविषयक गौण उपनिषद. यात नऊ मंत्र आहेत. यात प्रथम संन्यास घेऊ इच्छिणाऱ्या पुरुषाची कर्तव्ये सांगितलेली असून, संन्यास घेतल्यानंतरचे आसनादी नियम सांगितले आहेत. यतीने ' ॐ हि ॐ हि ॐ हि ' या मंत्राने सूर्यमंडलातल्या आत्म्याचे अनुसंधान करीत भिक्षेसाठी गावात जावे, असे सांगितले आहे.

**आरे** द. कर्नाटकातील मराठी शेतकऱ्यांची एक जात. आरे हा शब्द आर्य शब्दापासून बनलेला आहे. आरे लोक गळ्यात जानवे घालतात, ब्राह्मणांकडून धार्मिक संस्कार करवितात व शृंगेरी मठाच्या अधिपतीला मानतात.

मुलगी वयात येण्याच्या सुमारास तिचे लग्न करतात. विधवाविवाह अशास्त्रीय मानतात. स्त्रीने व्यभिचार केल्यास नवऱ्याला घटस्फोट घेता येतो; पण नवऱ्याने व्यभिचार केल्यास तिला तसे करता येत नाही. मांसाशन निषिद्ध नाही; पण मद्यप्राशन वर्ज्य आहे. द. कर्नाटकातील आरे मराठी किंवा कोकणी बोलतात; कासरगोड तालुक्यातले कानडी बोलतात.

द. कर्नाटकातील मराठी बोलणारे आरेयवरू किंवा आर्यवरू पैतृक वारसा हक्काचा कायदा पाळतात. यांचे पौरोहित्य शिवल्ली ब्राह्मण करतात. लग्नविधीतील एक मजेदार प्रकार म्हणजे नवरा युद्धासाठी रणक्षेत्रावर जायचा आव आणतो व आपले क्षत्रियत्व व्यक्त करतो.

अम्मनोरू (दुर्गा) ही यांची देवता होय. [ का. द्रा. स. इं. ]

**आरोग्य** ' शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् ' = धर्म आचरण्याचे पहिले साधन शरीर होय, असे कालिदासाचे वचन आहे (कु. सं. ५.३३). भिषग्वर्य चरकानेही ' धर्मार्थकाम-मोक्षाणामारोग्यं मूलमुत्तमम् ' = धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारही पुरुषार्थांचे आरोग्य हे मूळ आहे, असे सांगितले आहे. आरोग्याचे अनेक उपाय भारतीय शास्त्रज्ञांना प्राचीन काळापासून ज्ञात आहेत. व्यायाम हा आरोग्यरक्षणाचा मुख्य उपाय होय, हे त्यांनी जाणले आहे. त्यामुळे बलोपासनेला जीवनात अतिशय महत्त्व दिले जाते.

वैदिक काळी आरोग्यरक्षणार्थ लोक ईश्वराची प्रार्थना व मंत्रतंत्रादी उपचार करीत. सूर्योपासना ही विशेषतः आरोग्यासाठीच सांगितली आहे. ' आरोग्यं भास्करादिच्छेत् ' असे त्याविषयी वचनच आहे. अथर्ववेदात ताप, मधुमेह, क्षय, जलोदर वगैरे रोगांपासून मुक्तता व्हावी, अशा अर्थाची अनेक सूक्ते आहेत. पर्जन्य, मित्र, वरुण, चंद्र व सूर्य हे मानवाच्या आरोग्याचे रक्षण करतात, असे आरोग्यसूक्तात सांगितले आहे. पापांमुळे रोग होतात आणि पुण्यकर्मे केल्यामुळे आरोग्य व दीर्घायुष्य मिळते असेही सांगितले आहे.

वैदिक काळानंतर चरक, सुश्रुत, धन्वंतरी, जीवक, असे अनेक भिषग्वर्य भारतात होऊन गेले. त्यांनी रोगनिवारणार्थ व आरोग्यवृद्ध्यर्थ अत्यंत परिश्रम घेतले आहेत. चरकाने अन्न, वस्त्र, हवा, पाणी, औषधी, उपचार यांबद्दल विस्तृत माहिती दिली असून शरीराची बहिःशुद्धी व अंतःशुद्धी करणारे चूर्णे,

उटणी, वमन, विरेचन, संग्रहण, शोधन, दीपन, इ. अनेक उपाय सांगितले आहेत. त्यांनी शारीरिक रोगांबरोबर मानसिक रोगांचाही विचार केलेला असून 'सत्समागम' हाही आरोग्यरक्षणाचा एक उपाय म्हणून निर्देशिला आहे. प्रजा निरोगी राहावी आणि रोग झाल्यास त्याचे निवारण करता यावे, याच उद्देशाने वैद्यकशास्त्र प्रवृत्त झाले आहे.

आहाराच्या बाबतीतही त्यांनी 'इष्टं धर्मेण योजयेत्' या न्यायाने सर्व इष्ट गोष्टींची सांगड घालून दिली आहे. त्यात ऋतुमानाचाही विचार केलेला आहे. उदा० वर्षप्रतिपदेस कडुलिंबाची पाने खावी, चातुर्मासात कांदा, वांगी वर्ज्य करावी, थंडीच्या दिवसांत संक्रांतीच्या निमित्ताने तीळ लावलेली भाकरी खावी, तिळगूळ खावा, शिशिरात कैरी खावी, इ. विधी आरोग्यमूलकच आहेत.

पुष्कळदा खाद्य व पथ्य ही दोन्ही एकच असतात. उन्हाळ्यात कोकणामध्ये आंबील खातात, गोंडांत 'बासी' खातात, बंगालमध्ये 'पांता भात' म्हणजे शिळ्या भातात पाणी घालून तो दुसऱ्या दिवशी खातात. चातुर्मासातील निराहार किंवा एकभुक्त उपोषणे आरोग्याची दृष्टी डोळ्यांपुढे ठेवूनच सांगितली आहेत. दर पंधरा दिवसांनी येणाऱ्या एकादशीस उपवास करावा, या विधानातही कोठ्याला एक दिवस विश्रांती दिल्याने माणसाचे आरोग्य चांगले राहील, हा विचार अंतर्भूत आहेच.

भारतात प्राचीन काळापासून शाकाहाराच्या बरोबर मांसाहारही चालू होता व आहे. त्याचा विचार करून चरकाने खाद्य व औषधी म्हणून काही पशुपक्ष्यांच्या मांसाचा उपयोग सांगितला आहे. तो म्हणतो –

**शरीरबृंहणे नान्यत् खाद्यं मांसाद्विशिष्यते।**

(चरक सू. २७.८७)

अर्थ – शरीरपुष्टीसाठी मांसासारखे दुसरे अन्न नाही.

योग्य प्रमाणात मद्यपान केल्यास ते पुष्टिदायक ठरते, असेही चरकाने म्हटले आहे. पाहा – वलोपासना. [ अ. सु. अ.; सं. वि. ]

## आरोग्यद्वितीयाव्रत

एक काम्य व्रत. पौष शु. द्वितीयेस आरंभ. प्रत्येक मासाच्या शु. द्वितीयेस चंद्रकोरीचे पूजन. व्रतावधी एक वर्ष. फल – आरोग्य व समृद्धी यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

## आरोग्यप्रतिपद्व्रत

एक स्त्रीव्रत. चैत्र शु. प्रतिपदेस प्रारंभ. आदल्या दिवशी उपोषण, व्रतदिनी सूर्यपूजा व महानैवेद्य. यात ब्राह्मणभोजन झाल्यावर यजमानाने अवशिष्ट पदार्थांतून ग्रासमात्र ग्रहण करायचा असतो. व्रतावधी एक वर्ष. फल– आयुरारोग्य व सौभाग्य यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

## आरोग्यव्रत

(१) एक काम्य व्रत. फाल्गुन अमावास्येस उपवास. वर्षप्रतिपदेच्या दिवशी सूर्यप्रतिमेची स्थापना व पूजा. सल्लकी वृक्षाचा धूप व तुपाचा दिवा लावावे. ब्राह्मणभोजन झाल्यावर यजमानाने ग्रासमात्र अन्न भक्षण करावे. याप्रमाणे प्रत्येक शु. प्रतिपदेस करायचे असते. व्रतावधी एक वर्ष. नंतर उद्यापन. त्या प्रसंगी होम व सूर्यप्रतिमेचे दान करतात. फल – आरोग्यलाभ व उत्तम गती. [ व्रतराज ]

(२) भाद्र० वद्य प्रतिपदेपासून आश्विन पौर्णिमेपर्यंत प्रतिदिनी कमलांनी अनिरुद्धमूर्तीची पूजा. उद्यापनाच्या आधी तीन दिवस उपवास, होम व ब्राह्मणभोजन. फल – आरोग्य व सौंदर्य यांचा लाभ. (विष्णुध. पु. ३. २०५. १–७). [ हि. ध. ]

(३) दशमीव्रत. नवमीस उपवास व दशमीस विष्णुलक्ष्मी यांची पूजा.

फल – आयुरारोग्य व समृद्धी यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

## आरोग्यशाला

अनेक रुग्णांना एकत्र ठेवून त्यांना रोगचिकित्सा करून त्यांना आरोग्य प्राप्त करून देण्यासाठी स्थापलेली रुग्णालये. चरक व सुश्रुतसंहितांमध्ये यांचे वर्णन आढळते. वैदिक वाङ्मयात आरोग्यशालांचा उल्लेख नाही. पण पुराणांत त्यांचे महत्त्व वर्णिलेले आहे. आरोग्यदान हे महान पुण्यकर्म मानलेले आहे. प्राचीन काळी या आरोग्यशाला सर्व सुखसोयींनी युक्त असत. मौर्य सम्राट अशोकाच्या वेळी त्यांचा पुष्कळ विकास झाला. दक्षिण भारतातील आरोग्यशाला शैव मंदिरांशी संबंधित होत्या. चिनी यात्री फाहियान व युआन च्वांग यांनी उत्तर भारतातील अनेक आरोग्यशालांचे वर्णन केलेले आहे. त्यांत रुग्णांना औषधोपचाराबरोबर अन्न व वस्त्रेही मिळत असल्याचा उल्लेख केलेला आढळतो. [ आयुर्वेदाचा इतिहास – वैद्य सि. वि. वडोदकर, १९७३ ]

## आरोग्यसप्तमी

एक काम्य व्रत. मार्गशीर्ष शुद्ध सप्तमीस प्रारंभ. प्रत्येक मासाच्या शुद्ध सप्तमीला उपवास व सूर्यपूजा करतात. व्रतावधी एक वर्ष. फल – आरोग्य व समृद्धी यांचा लाभ. [ हि. ध. ]

## आरोरा

सिंधमधील एक जात. हे लोक पंजाबमध्येही आढळतात. दोन्ही प्रदेशांतील लोकांचे गोत्र एकच आहे. ते स्वतःला क्षत्रिय समजतात व लोहाणांप्रमाणे आपणही परशुरामाच्या भयाने इतस्ततः पांगलो, असे सांगतात. सिंधप्रांतात

रोहीर येथे यांनी एक कोट बांधला होता. त्याला आरोरेकोट असेच नाव आहे. आजही त्याचे अवशेष तिथे दिसतात. [ सि. क. ]

**आर्चिक** सामवेदात ज्या ऋचा आल्या आहेत, त्यांना आर्चिक म्हणतात. आर्चिक ग्रंथ तीन आहेत – छंद, आरण्यक व उत्तर. उत्तरार्चिकात एक स्वर, एक छंद, व एक तात्पर्य असलेल्या तीन-तीन ऋचांचा समूह घेऊन त्यांचे एकेक सूक्त बनविलेले असते. या सूक्तांना 'तृच' म्हणतात. वरीलप्रमाणेच दोन-दोन ऋचांच्या समष्टीला 'प्रगाथ' म्हणतात. तृच व प्रगाथ यांच्यातल्या प्रत्येक पहिल्या ऋचेचा छंद आर्चिकातून घेतला गेला आहे. म्हणून या पहिल्या ऋचेला योनिऋक् व आर्चिकाला योनिग्रंथ म्हणतात. योनिऋचेच्या उत्तर दलात ज्या दोन किंवा एक ऋचा मिळवितात, त्यांना उत्तरार्चिक अशी संज्ञा आहे.

अरण्यातच ज्याचे अध्ययन करायचे असते, अशा एकाध्यायात्मक ग्रंथाला आरण्यक म्हणतात. छंदोग्रंथांतल्या सामांचे गायन करणाऱ्यांना 'छंदोग' अशी संज्ञा आहे. त्यांच्या कर्मकांडासाठी जे ब्राह्मणग्रंथ उपयोजिले जातात, त्यांना 'छांदोग्य' म्हणतात. [ हिंदुत्व ]

**आर्त्विजीन** ऋत्विक्‌कर्मांत दक्ष व निष्णात असलेल्या ब्राह्मणांना ही संज्ञा आहे (अष्टा.५.१.१७१.). यज्ञांत प्रयुक्त होणाऱ्या वेदमंत्रांचे शुद्ध उच्चारण करणाऱ्या ब्राह्मणांना आर्त्विजीन म्हणावे, असे षड्विंशब्राह्मणात सांगितले आहे (१.३.१६.). [ पा. का. भा. ]

**आर्द्रा** अश्विन्यादी गणनेतले सहावे नक्षत्र. मृगाचा पुढचा डावा पाय व पुनर्वसूतला दक्षिणेकडचा तारा यांना सांधणाऱ्या रेषेवर, दोहोंच्या मध्यभागी हे नक्षत्र येते. या नक्षत्राची देवता रुद्र आहे(तै. सं. ४.४.१०). 'आर्द्रया रुद्रः प्रथमान एति' असे वचन तै. ब्रा. मध्ये आहे ( ३.१.१.३ ). आर्द्रेची मूर्ती कशी करावी, ते हेमाद्रीने चतुर्वर्ग चिंतामणीच्या व्रतखंडात पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

श्वमुखी कृष्णवर्णा तु रक्तार्द्रा शूलपाणिनी ।
नीलवस्त्रा वृषारूढा वाऽस्थिमालाविभूषणा ॥

अर्थ – कुत्र्याचे तोंड, कृष्ण वर्ण, रक्ताप्रमाणे आर्द्र, हातात शूल, निळे वस्त्र, वृषभ वाहन, हाडांचा अलंकार धारण करणारी अशी आर्द्रेची मूर्ती करावी.

आर्द्रा म्हणजे ओली, जलमय. पूर्वी आर्द्रा हे पावसाचे पहिले नक्षत्र होते. पंचांगात संवत्सर फल देतात, त्यात आर्द्रा नक्षत्री सूर्याचा प्रवेश होतो, त्या वेळेवरून पर्जन्याची फले ठरवितात आणि ज्या वारी सूर्य आर्द्रेत प्रवेश करतो त्या वाराला मेघांचा स्वामी मानतात. सांप्रत मृग हे पावसाचे पहिले नक्षत्र मानले जाते. नक्षत्रे सायन मानली तर असा बदल होणार नाही, असे श्री. शं. बा. दीक्षितांचे मत आहे. [ भा. ज्यो. शा.; नक्षत्र-लोक ]

**आर्द्रानंदकरी तृतीया** एक काम्य व्रत. कोणत्याही मासाच्या तृतीयस पूर्वाषाढा, उत्तराषाढा, मृग, हस्त व मूळ यांपैकी एखादे नक्षत्र असेल त्या दिवशी व्रताचा आरंभ करतात. शिव-भवानीची पूजा हा या व्रताचा विधी आहे (मत्स्यपु. ६४.१.२८). [ हि. ध. ]

**आर्भव पवमान** आर्भव = ऋभुविषयक. अग्निष्टोम यागात तृतीय सवनाच्या वेळी या नावाचे स्तोत्र गातात. ऋभू हे मर्त्य होते; पण प्रजापतीने त्यांना अमर्त्य करून तृतीय सवनात भाग दिला, अशी कथा आहे (ऐ. ब्रा. २८.४). म्हणूनच तृतीय सवनाच्या पहिल्या स्तोत्राला आर्भव पवमान असे नाव पडले आहे. [ हि. ध. ]

**आर्य** अत्यंत प्राचीन काळी सुमारे तीन सहस्र वर्षांपूर्वीपासून भारतात वास्तव्य करणारा एक सुसंस्कृत समाज. या समाजातील ऋषींनी ऋग्वेदादी वैदिक साहित्याची रचना केली. त्या साहित्यात आर्यांच्या सामाजिक, धार्मिक व राजकीय जीवनाची माहिती मिळते. हे लोक इंद्र, अग्नी, रुद्र, मरुत, इ. देवतांची उपासना करीत होते. यज्ञयाग हा त्यांचा मुख्य धर्म होता.

वैदिक आर्यांचे मूळ वसतिस्थान भारतात होते, की ते भारताच्या बाहेरून भारतात आले याविषयी विद्वानांत मतभेद आहेत. भारत व इराण या दोन देशांतील संस्कृतींत बरेच साम्य दिसते. आणि संस्कृत व काही प्रमुख युरोपीय भाषा यांच्यांतही साम्य आढळते. त्यावरून आर्य लोक हे बाहेरून आले असावे, असे अनुमान केले जाते. त्यांनी भारतात कोठे वसाहती केल्या व आपल्या संस्कृतीचा विस्तार कसा केला ते वेदांतील भूवर्णनांवरून समजते. ऋग्वेदात सप्तसिंधवः हे एका प्रदेशाचे नाव आले आहे. पंजाबातील पाच नद्या आणि सिंधू व सरस्वती या दोन मिळून सात नद्यांचा प्रदेश त्या वेळी आर्य लोकांनी व्यापला होता. आर्य लोकांच्या अनेक टोळ्यांनी निरनिराळ्या प्रदेशांत वसाहती करून राज्ये स्थापली होती. भरत नावाची टोळी विशेष प्रसिद्ध आहे. तिचे नाव या देशाला मिळाले आहे. सरस्वती व यमुना या नद्यांच्या मध्ये त्या लोकांचे राज्य होते. पुरू, यदू, अनू, द्रुह्यू व तुर्वश हे पाच जनसमुदाय त्या काळी प्रसिद्ध होते.

भरतांतील तृत्सू नामक कुलात सुदास हा महान राजा होऊन गेला. त्याने वरील पंचजन आणि अन्य पाच राजे या दहा राजांचा युद्धात पराजय केला. या युद्धाला दाशराज्ञयुद्ध म्हणतात.

ऋग्वेदानंतरच्या संहिता, ब्राह्मणे, उपनिषदे, व सूत्रे या ग्रंथांतील स्थलनिर्देशांवरून आर्य लोकांनी त्या काळी हिमालय व नर्मदा नदी यांच्या मधला सर्व प्रदेश व्यापला होता, असे समजते. पूर्वेकडे सदानीरा नदीपर्यंत ते पोचले होते. त्यांच्या संस्कृतीचे केंद्रस्थान कुरुक्षेत्रात होते. या सर्व प्रदेशाला आर्यावर्त हे नाव होते.

सुमारे सहा हजार वर्षांपूर्वी यज्ञरूपाने अग्नीची पूजा करणारा एक पराक्रमी व बुद्धिमान समाज या देशात उदयाला आला. यज्ञसंस्था व वेदविद्या यांमुळे हा वर्ग स्वतःला श्रेष्ठ व आर्य मानू लागला. आर्य या शब्दाचे सत्कुलोद्भव, मान्य, उदारचरित, शांतचित्त असे अनेक अर्थ आहेत. शब्दकल्पद्रुमात याची एक व्याख्या दिली आहे ती अशी —

**कर्तव्यमाचरन् काममकर्तव्यमनाचरन् ।**
**तिष्ठति प्राकृताचारे स तु आर्य इति स्मृतः ।।**

अर्थ — जो कर्तव्याचे पालन करतो, निषिद्ध, निंद्य आचरण करीत नाही व सामान्य जनांचे रूढ शिष्टाचार पाळतो, त्याला आर्य असे म्हणतात.

आर्यत्व हे चारित्र्यावर अवलंबून आहे, धनावर नाही, असे महाभारतात सांगितले आहे. सारांश, आर्य हा शब्द संस्कृतिवाचक व गुणवाचक आहे; वंशवाचक किंवा वर्णवाचक नाही. आर्य शब्द वंश, वर्ण या अर्थी वेदात एकदाही आलेला नाही. श्रेष्ठत्व, प्रभुत्व असाच त्याचा अर्थ आहे.

अशा आर्य समाजाव्यतिरिक्त भारतात प्राचीन काळी द्रविड, असुर, राक्षस, वानर, दैत्य, दानव, नाग, निषाद, किरात, कैवर्त, दास, दस्यू, पुलिंद, शक, आंध्र, यवन, पणी, इ. जमाती वसलेल्या होत्या. त्यांना अनार्य हे नावे दिले जाते. त्यांतील असुर, द्रविड, दैत्य, नाग या जमाती लवकर आर्य समाजात समाविष्ट झाल्या. अन्य अनार्य (यज्ञविरोधी) जमातींनी आर्यांशी दीर्घ काळ संघर्ष केला. पण अखेरीस आर्यांचे वर्चस्व प्रस्थापित झाले. 'कृण्वन्तो विश्वमार्यम्' हे त्यांचे ध्येय होते. म्हणून त्यांनी या सर्व लोकांना आपल्या संस्कृतीत स्थान देण्यासाठी योजनाबद्ध प्रयास केले. अनेक ऋषींनी घनदाट अरण्यांत आपले आश्रम स्थापून तिथे वसलेल्या अनार्य लोकांना यज्ञयाग, संस्कृत भाषा व वेदविद्या शिकवून सुसंस्कृत बनवले.

मनूच्या काळी केवळ उत्तर भारत हाच आर्यावर्त होता. कालांतराने आर्यांनी दक्षिण भारतातही आपले वर्चस्व स्थापन केले. आणि हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत संपूर्ण देशाला भारतवर्ष हे नाव दिले. श्रीकृष्णाच्या यादव वंशाने राजस्थान, माळवा, गुजरात, दक्षिण व प. भारत या सर्व प्रदेशांत आर्य संस्कृतीचा ध्वज उभारण्याचे महान कार्य केले. यादवांनी अनार्यांशी विवाहसंबंध केल्यामुळे हे कार्य सोपे झाले.

या आर्यांचे रंगरूप कसे होते, त्याविषयी ऋग्वेदात विशेष वर्णन नाही. पण निरनिराळ्या सूक्तांतून त्यांच्या देवतांचे जे रंगरूप कळून येते, तेच त्यांचेही असावे, असे समजायला हरकत नाही. त्यांचा वर्ण गोरा, केस पिंगट, डोळे निळे, नाक धारदार, छाती विशाल आणि गर्दन पुष्ट होती. त्यांची शरीरे मजबूत होती. ते पट्टीचे घोडेस्वार होते. ते मोकळ्या मैदानात वसाहत मांडून राहणे अधिक पसंत करीत. ते लोकरीची वस्त्रे विणीत व वापरीत. ते बायकांप्रमाणे आपले केस लांब राखीत. काही लोक दाढी-मिशा ठेवीत, तर काही लोक त्या काढीत. त्यांची सामाजिक व्यवस्था कुलबद्ध होती. कुलांच्या समुदायाला ग्राम म्हणत. ग्रामाच्या मुख्याला ग्रामणी म्हणत. गायी, घोडे, मेंढ्या, बकऱ्या, हे त्यांचे मुख्य धन होते. ते मांसभोजी होते. त्यांना सोमरसाची विशेष आवड होती. ते महान् पुरुषार्थी आणि विजेते होते.

आर्य सैनिक शिस्तबद्ध असत. हजारोंच्या संख्येने ते शत्रूवर धाड घालीत. आर्यांचे सैन्य चतुरंग नसून ते रथ, घोडे व पायदळ असे त्र्यंग होते. गजदळ हे चौथे अंग त्यापुढील काळात निर्माण झाले. दास किंवा दस्यू हे आर्यांचे मुख्य शत्रू होते. शंबर हा त्यांचा सर्वांत मोठा वैरी होय. हिमाचल पर्वताच्या आश्रयाने तो अनेक पुरे उभारून आपले राज्य करीत होता. दिवोदासाला त्याचा पराजय करण्यासाठी सतत चाळीस वर्षे युद्ध करावे लागले. आर्य वीरांना आर्य ऋषींनी त्यांच्या पराक्रमात पुष्कळच साथ दिली आहे. निरनिराळ्या आर्यजनांचे निरनिराळे पुरोहित होते. भृगू हे द्रुह्यूंचे, अत्री हे पुरूंचे, भरद्वाज, वसिष्ठ व विश्वामित्र हे भरतांचे आणि कण्व हे यदूंचे पुरोहित होते. त्यांनी आपापल्या यजमानांच्या राजकीय आणि सामाजिक कारभारात आत्मविश्वासाने व समरसतेने भाग घेतलेला दिसतो.

आर्य हा शब्द विशिष्ट मानववंशाचा वाचक नाही. युरोपात जेव्हा संस्कृत भाषेचा आणि तुलनात्मक भाषाशास्त्राचा अभ्यास सुरू झाला आणि प्राचीन भारतीय व प्राचीन युरोपीय, यांचे एकवंशसंभवत्वाचे नाते पाश्चात्यांना दिसू लागले, तेव्हा या सर्व मोठ्या मानववंशाला लागू पडेल, अशा एका शब्दाची गरज निर्माण झाली. त्यासाठी वैदिक संस्कृतात आढळणारा आर्य हा शब्द निवडला गेला आणि त्याचे आर्यन् असे रूपांतर करून तो शब्द विशिष्ट मानववंशवाचक किंवा भाषावंशवाचक म्हणून स्वीकारला गेला. पुढे विशिष्ट मानववंश आपणांस आर्य म्हणवीत असे, ही कल्पना सिद्ध करण्यास अडचणी दिसू लागल्या, तरी

तो शब्द मात्र टाकला गेला नाही. त्याचा अर्थ मात्र भिन्न आहे.

अनेक भाषाशास्त्रज्ञांनी आर्यन् हा शब्द अनेक अर्थांनी वापरला आहे. मॅक्स म्यूलर तो इंडो-जर्मन यांचा समानार्थक म्हणून वापरतो व त्या भाषा बोलणाऱ्यांना आर्यन म्हणतो. त्याने इरा म्हणजे पृथ्वी या शब्दावरून आर्य शब्द व्युत्पादिला आहे. पण ही व्युत्पत्ती ज्ञानकोशकारांना मान्य नाही. ॲरियोव्हिस्टस्, इ. शब्दांमध्ये ॲरियो हा जो भाग आहे, त्याचे व आर्य शब्दांचे मूळ एक असण्याचा संभव आहे, असे ते मानतात. वैदिक संस्कृतात, दास किंवा दस्यू यांचा विरोधी, या अर्थाने आर्य हा शब्द वापरला जातो. आर्य शब्दाच्या उत्पत्तीविषयी स्पष्ट असे काहीही विधान करणे कठीण आहे, असे ज्ञानकोशकारांना वाटते.

पण काही असले तरी हा शब्द कोणत्या तरी उच्च अर्थाने इंडो-जर्मन लोकांच्या पूर्वशाखेचे लोक स्वतःला लावून घेत असत असे दिसते. सांप्रत हा शब्द वरील दोन्ही शाखांना लावतात व इराणी आर्यांपासून भिन्नत्व दाखविण्यासाठी भारतीय आर्यांना इंडो-आर्यन् म्हणतात. आर्य लोक बाहेरून कुठून तरी भारतात आले व त्यांची पहिली वसाहत सप्तसिंधूंच्या (पंजाब) प्रदेशात झाली, असे सर्वसामान्य विद्वन्मत आहे. या लोकांनाच 'वैदिक आर्य' असे म्हणतात. यांनीच ऋग्वेदाची रचना केली. ऋग्वेदातली पुष्कळशी सूक्ते पंजाबातच निर्माण झाली आहेत.

यानंतर पुढचा प्रश्न येतो, तो या वैदिक आर्यांच्या मूळवसतिस्थानाचा. या विषयात डॉ. रा. ना. दांडेकर यांनी साधकबाधक विचार करून जो निष्कर्ष सांगितला आहे, तो असा —

या आर्यांचे म्हणजेच वैदिक भारतीयांच्या प्राचीन पूर्वजांचे मूळ वसतिस्थान आणि त्यांच्या इतिहासात घडलेली निरनिराळी स्थित्यंतरे याविषयीच्या प्रश्नाने विद्वानांचे लक्ष फार पूर्वीपासून वेधून घेतले आहे. पिक्टेट याने इ. स. १८५९-६३ च्या दरम्यान 'प्राचीन आर्यांचे म्हणजे यूरोभारतीयांचे मूळ' हा आपला द्विखंडात्मक फ्रेंच ग्रंथ प्रसिद्ध केला. इ. स. १८७५ साली प्रसिद्ध झालेल्या मॅक्स म्यूलरच्या या विषयावरील लेखाला अधिक प्रसिद्धी मिळाली आणि मॅक्स म्यूलरने पुढे मांडलेल्या उपपत्तीस या विषयावरील पहिली उपपत्ती असे मानण्यात येऊ लागले. बहुसंख्य पाश्चात्य विद्वानांनी या प्रश्नाचा विचार मुख्यतः भाषाशास्त्राच्या आधारेच केलेला आहे. अलिकडील काळातही नवनव्या दृष्टिकोनातून या विषयाची चर्चा चालू आहे आणि नवनव्या उपपत्ती पुढे मांडल्या जात आहेत. त्यांपैकी काही उपपत्तींचा थोडक्यात वस्तुनिष्ठ पद्धतीने पण चिकित्सकपणे आढावा घेतला पाहिजे.

आर्य या शब्दाने निरनिराळ्या लोकांना निरनिराळे अर्थ अभिप्रेत असतात. , ज्यांनी वेदांची रचना केली, ते मुख्यतः आर्य लोक होत, असा समज सामान्यपणे भारतात प्रसृत आहे. पण इराणी लोकांनी आपल्या देशाच्या इराण या नावात आर्य हा शब्द अद्यापि अवशिष्ट ठेवला आहे आणि आपल्या प्राचीन वाङ्मयात तो शब्द अनेक वेळा आणि अनेक रूपांत उपयोजिला आहे, ही गोष्ट ध्यानात घेतली म्हणजे आर्य हे नामाभिधान केवळ वेदांच्या प्रणेत्यांनाच देणे, हे ऐतिहासिकदृष्टया मान्य होण्यासारखे नाही. शिवाय वेदांच्या प्रणेत्यांनाच आर्य असे म्हणण्यात आर्यांचे मूळस्थान भारतातच होते ही गोष्ट एक प्रकारचे गृहीतकृत्य म्हणूनच सुचविल्यासारखी होते.

आर्य हे एक विशिष्ट मानववंशाचे नाव आहे, असे काही विद्वान मानतात; पण हे मत आधुनिक मानववंशशास्त्रज्ञांस मान्य नाही. कारण निरनिराळ्या मानववंशांना जी नावे दिली जातात, ती सामान्यपणे देहावयववैशिष्ट्यनिदर्शक (उदा० लांब डोक्याचे, लांब नाकाचे मानव), त्वक्केशवर्णनिदर्शक (उदा० गौर-पीत-कृष्ण मानव व सुवर्ण केशी मानव) किंवा देशनिदर्शक (उदा० आल्पाइन, नॉर्डिक वगैरे) अशी असतात. ज्याला नॉर्डिकवंश असे म्हणतात, त्या वंशाचे लांब डोक्याचे, नाजूक आणि रेखीव नाकाचे, गौर वर्णाचे, सोनेरी केसांचे, उंच लोक, म्हणजेच खरे आर्य, असे मत काही वर्षांपूर्वी जर्मनीत, विशेषतः नात्सी राजवटीत, मोठ्या आग्रहाने पुढे मांडण्यात येत असे.

काही संशोधक सर्वच यूरोभारतीय भाषांना आर्य भाषा आणि त्या यूरोभारतीय भाषा बोलणाऱ्या सर्वच लोकांना आर्य असे नामाभिधान देतात. असे करणेही फारसे सयुक्तिक नाही. कारण खुद्द आर्य हा शब्द यूरोभारतीय भाषांत उपयोजिलेला आढळून येत नाही. याच्या उलट वैदिक भारतीय आणि प्राचीन इराणी यांनी आपल्या वाङ्मयांत आर्य हा शब्द स्वतःला उद्देशून अनेकदा आणि काही विशिष्ट अर्थाने वापरलेला आहे. यावरून असे अनुमान करण्यास हरकत नाही, की प्राचीन इराणी आणि वैदिक भारतीय यांचे पूर्वज एकत्र वास्तव्य करीत असता ते आपणास आर्य म्हणवू लागले. त्यांची भाषा, जिला वैदिक भाषा आणि अवेस्तन भाषा यांची अगदी निकटची पूर्वज अशी समजता येईल ती आर्य भाषा, मूळ यूरोभारतीय भाषेचे एक विशिष्ट परिणत स्वरूप दर्शविते. तसेच त्यांचा धर्म हा प्राथमिक वैदिक धर्म आणि प्राचीन इराणी धर्म यांची निकटची प्राक्कालीन अवस्था दर्शवितो. म्हणजेच आर्य या शब्दास सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीने एक विशिष्ट अर्थ प्राप्त झालेला आहे.

भाषाशास्त्रज्ञांनी त्या मूळ भाषेस, तिच्याशी संबंध असलेल्या भाषा ज्या भूप्रदेशात प्रचलित होत्या व आहेत, तो सर्व भूप्रदेश सूचित करणारे, 'यूरोभारतीय भाषा' असे अगदी साधे पण समर्पक नाव दिले आहे. या नावात विशिष्ट वंशाची किंवा

सत्तेची कल्पना मुळीच समाविष्ट नाही. एकरूप-मूल-यूरो-भारतीय भाषा बोलणारे लोक एका अर्थी वैदिक आर्यांचे प्राचीन पूर्वजच होते. तेव्हा आज आपल्याला अभिप्रेत आहे ते मूळ वसतिस्थान या एकरूप – यूरोभारती – भाषा-भाषकांचेच ! आर्यांच्या मूळ वसतिस्थानाचा शोध करणे म्हणजेच मूल-यूरो-भारतीय भाषा बोलणाऱ्या मानवसमूहांच्या वसतिस्थानाचा शोध करणे होय. कारण ऐतिहासिक दृष्टया वैदिक आर्यांचा संबंध स्पष्टपणे आणि असंदिग्ध रीतीने पोचू शकतो, तो त्याच मानवसमूहापर्यंत. इथे आणखी एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे; आणि ती ही, की मूल-यूरोभारतीय भाषा बोलणाऱ्या लोकांच्या वसतिस्थानाचा शोध करीत असता, त्या भाषेला तिचेच विशिष्ट म्हणून समजता येईल असे स्वरूप ज्या ठिकाणी प्राप्त झाले, तिथ-पर्यंतच आपण जाऊ शकतो. ज्यांच्या आधारावर आपणांस त्याच्याही पलीकडे जाता येईल असा पुरावा आज तरी उप-लब्ध झालेला नाही. म्हणून वर उल्लेखिलेल्या मर्यादित अर्थाने ज्याला यूरोभारतीय-भाषा-भाषकांचे मूळ वसतिस्थान म्हणता येईल, त्याचाच शोध करणे आज आपणांस अभिप्रेत आहे.

आर्यांच्या मूळ वसतिस्थानासंबंधीची लो. टिळकांची उपपत्ती सर्वविश्रुत आहे. आर्क्टिक होम इन् दि वेदाज या पुस्तकात प्रतिपादिलेल्या आपल्या उपपत्तीला टिळकांनी वेदवाङ्मया-तील उल्लेख, ज्योतिषशास्त्र आणि भूगर्भशास्त्र यांचा आधार मुख्यत: घेतला आहे. ऋग्वेदीय देवतांच्या वर्णनांमध्ये काही भाग असे आहेत, की त्यांचा समाधानकारक अर्थ लावायचा झाल्यास त्यांचा उत्तर ध्रुवाच्या आसपासच्या प्रदेशाशी संबंध लावणे आवश्यक ठरते. किंबहुना केवळ उत्तर ध्रुवप्रदेशातच ज्या निसर्गघटना घडू शकतील, अशा काही घटनांचाच उल्लेख वैदिक ऋषींनी आपल्या काही दैवतशास्त्रीय कथांच्या आणि निर्देशांच्या रूपाने केलेला आहे (ऋ. १.६४.१६; २.३२.२; ५.५४.१५; ६.४८.८ वगैरे), असे टिळकांचे मत आहे. या दैवत-शास्त्रीय कथांचा आणि निर्देशांचा निसर्गघटनात्मक अर्थ लावू लागले, तर त्यातून नेहमीच एक प्रकारचे सौम्य आणि उत्साह-दायी हवामान सूचित होते, ही गोष्टही लक्षात ठेवण्यासारखी आहे. पृथ्वीच्या इतिहासात निदान दोन तरी हिमयुगे होऊन गेली असली पाहिजेत. या दोन हिमयुगांच्या मध्यंतरीच्या कालखंडात– ज्याला आंतरहिमयुग असे म्हणता येईल त्या कालखंडांत – आशिया आणि यूरोप या दोन्ही खंडांत समाविष्ट झालेल्या ध्रुव-प्रदेशातील हवामान अगदी सौम्य आणि उत्साहकारक असेच होते. शीत उन्हाळा आणि उबदार हिवाळा, म्हणजेच निरन्तर वसन्तसदृश हवामान, हे आंतरहिमयुगाचे वैशिष्टय होते. आणि सामान्यत: समशीतोष्ण हवामानाच्या प्रदेशातच आज उपलब्ध होणाऱ्या ओषधी-वनस्पतींची जोमदार वाढ त्या युगात उत्तर ध्रुवप्रदेशातही होत असे. यावरून सहजच असे निगमन काढता येते, की वैदिक दैवतशास्त्रातील वर उल्लेखिलेल्या कथा आणि निर्देश उत्तर ध्रुवप्रदेशातील या आंतरहिमयुगाचेच द्योतक असले पाहिजेत. भूगर्भशास्त्रज्ञांच्या मते या आंतरहिमयुगाचा काल इसवी सनापूर्वी १०,००० वर्षांहून अधिक इतका असावा. वेद-वाङ्मयातील ज्योतिष्यकीय उल्लेखांवरून वैदिक मंत्रांचा काल इसवी सनापूर्वी ५ ते ६ हजार वर्षे तरी असला पाहिजे, असे दाखविण्याचा लो. टिळकांनी इतरत्र प्रयत्न केला आहे. म्हणजेच मंत्रदृष्टया वैदिक ऋषींचे पूर्वज आंतरहिमयुगात – म्हणजे मंत्र-कालारंभाच्या पूर्वी निदान पाच सहस्र वर्षे – उत्तर ध्रुव-प्रदेशात राहत असले पाहिजेत. इसवी सनापूर्वी १०,००० वर्षांच्या सुमारास आर्यांच्या या उत्तर ध्रुवप्रदेशातील मूळ वसतिस्थानाचा अंतिम म्हणजेच दुसऱ्या हिमयुगामुळे नाश झाला. त्यानंतर या प्रदेशातून आर्यांची मोठी निर्गमने सुरू झाली. त्या आर्यांपैकी वैदिक आणि इराणी आर्यांनी आपल्या पूर्वजांनी ५००० वर्षांपूर्वी उत्तर ध्रुवप्रदेशात अनुभविलेल्या निसर्गघटना आपल्या वाङ्मयात ग्रथित करून ठेवल्या आहेत.

लो. टिळकांनी आपली उपपत्ती ज्या मार्मिक आणि मौलिक पद्धतीने पुढे मांडली, त्याबद्दल सर्वच ज्ञानोपासकांना आदर-युक्त कौतुक वाटते, यात संदेह नाही. परंतु त्या उपपत्तीला आधुनिक संशोधकांची मान्यता मात्र फारशी मिळाली नाही. नाही म्हणायला, काही वर्षांपूर्वी तारापोरवाला यांनी या उपपत्तीचा पुनरुच्चार आणि पुरस्कार केलेला आढळतो. टिळकांनी दिग्दर्शित केलेल्या इराणी आर्यांच्या वेन्दिदाद या ग्रंथातील पुराव्याचाच अनुवाद आणि विस्तार तारापोरवाला यांनी केला आहे. यूरोभारतीय भाषा बोलणाऱ्या सर्व प्राचीन लोकांच्या पुराण-परंपरांतून त्यांच्या पूर्वजांचे मूळस्थान उत्तरे-कडे होते, हे सूचित झालेले आहे. इराणी आर्यांच्या वाङ्मयात या गोष्टीचा उल्लेख इतक्या स्पष्टपणे केलेला आढळत नाही, असे तारापोरवाला यांचे म्हणणे आहे. ऐर्यन वएजो (म्हणजेच आर्यांचे बीज किंवा मूलस्थान) हे अहुर मज्दाने वेहृदाती नदीच्या काठी निर्माण केले व ते नष्ट करण्याकरिता अंग्रो मैन्यूने अही आणि हिम यांची योजना केली (वेन्दि.१.१-३), या इराणी दैवतशास्त्रातल्या वर्णनावरून हिमयुगामुळे नष्ट झालेल्या आर्यांच्या मूळवसतिस्थानाचीच आठवण होते.

वैदिक दैवतशास्त्राचा अर्थ केवळ निसर्गघटनात्मक लावणे फारसे प्रत्ययदायी नाही, ही गोष्ट आता बहुसंख्य वेदाभ्यास-कांना पटू लागली आहे. वरुण, इंद्र, विष्णू, इ. वैदिक देवतांची मूळची आणि सारभूत अशी प्रकृती अगदी वेगळी होती; पण

दैवतशास्त्रीय विकासक्रमात त्या देवतांच्या मूळच्या व्यक्तित्वावर निरनिराळ्या निसर्गशक्तींचा अध्यारोप केला गेला, ही विकसनशील दैवतशास्त्राची उपपत्ती आता बरीच मान्यता पावली आहे. त्यामुळे वेदांतील अनेक निर्देशांचा संबंध केवळ ध्रुवप्रदेशातच घडू शकतील अशा निसर्गघटनांशी लावणे, हा जो टिळकांनी पुढे मांडलेल्या आर्यांच्या वसतिस्थानाविषयीच्या उपपत्तीचा मुख्य पाया, तोच डळमळीत ठरू पाहत आहे. आपण उल्लेखिलेल्या वैदिक निर्देशांचा टिळकांनी स्वतः लावलेला अर्थ पुष्कळच ओढाताणीचा आहे, असेही वाटते. शिवाय त्या निर्देशांचा अर्थ निसर्गघटनांना उद्देशूनच लावायचा असे जरी ठरविले, तरी त्या निसर्गघटना ध्रुवप्रदेशातच घडल्या असल्या पाहिजेत, असे अपरिहार्यपणे समजण्याची मुळीच आवश्यकता नाही.

टिळकांच्या कालगणनेप्रमाणे आर्य लोक उत्तर ध्रुवप्रदेशात इ. सनपूर्व १०,००० वर्षांपूर्वी अनेक वर्षे वास्तव्य करून राहात असले पाहिजेत. ज्या हिमयुगामुळे आर्यांचे तेथील वसतिस्थान नष्ट झाले व त्यांना यूरोप आणि आशिया या खंडांतील निरनिराळ्या प्रदेशांत निर्गमने करावी लागली, त्या हिमयुगाचा आरंभाचा काल इ. सनपूर्व १०,००० वर्षे इतका तरी निदान धरला पाहिजे. वैदिक मंत्र रचिले गेले ते, टिळकांच्या मते इ. सनपूर्व ५००० वर्षांच्या सुमारास ! आणि यापैकीच काही मंत्रांत उत्तर ध्रुवप्रदेशातील निसर्गघटनांचा उल्लेख आला आहे, असे टिळकांचे म्हणणे ! म्हणजे असे, की ५००० वर्षांहून अधिक कालापूर्वी आपल्या पूर्वजांना उत्तर ध्रुवप्रदेशात जे निसर्गघटनात्मक अनुभव आले, ते अनुभव मंत्रद्रष्टया वैदिक ऋषींच्या स्मृतीत, परंपरेने का होईना पण, जिवंत राहिले होते, असे मानावे लागते. परंतु मध्यंतरी एवढा मोठा काल गेला असता — तो कालही शांततेचा किंवा स्थिर जीवनाचा नव्हता — आणि इतकी स्थित्यंतरे झाली असता, अशा प्रकारची स्मृती कायम राहील, ही गोष्ट शक्य वाटत नाही. दुसरे असे, की अशी स्मृती विशेषेकरून वैदिक आर्य आणि इराणी यांनाच तेवढी का राहिली ?

भूगर्भशास्त्राच्या दृष्टीने विचार केला तरीही टिळकांची उपपत्ती बुद्धीला पटण्यासारखी नाही. क्रोलच्या ज्या हिमयुगविषयक मताचा आधार टिळकांनी आपल्या उपपत्तीस घेतला आहे, ते मतच शास्त्रज्ञांनी आता असिद्ध ठरविले आहे. भूगर्भशास्त्र आणि पुराणवस्तुसंशोधनशास्त्र यांच्या पुराव्यावरून अलिकडे संशोधकांनी मानवेतिहासाचे सामान्यपणे पुढील टप्पे ठरविले आहेत —

(१) चौथे आणि शेवटचे हिमयुग (गुहामानव) — इ. सनपूर्व ५०,००० वर्षे.

(२) पूर्वाश्मयुग — इ. सनपूर्व ३५,००० वर्षे.

(३) उत्तराश्मयुग (रेनडिअर — मानव) — इ. सनपूर्व १५,००० वर्षे.

(४) नवाश्मयुग — इ. सनपूर्व १०,००० वर्षे.

(५) अश्म — धातुयुग (सुमेरी संस्कृती) — इ. सनपूर्व ६००० वर्षे.

(६) ब्रॉझयुग (मानवाची सृजनशक्ती विशेषत्वाने प्रकट होऊ लागली) — इ. सनपूर्व ४००० वर्षे.

(७) अयोयुग (कृषितंत्रवादी) — इ. सनपूर्व १५०० वर्षे.

ही युगरचना जर मान्य केली, तर टिळकांनी उल्लेखिलेले आंतरहिमयुग त्यांनी गृहीत धरलेल्या काळापेक्षा किती तरी मागे न्यावे लागेल ! आर्यांच्या वसतीला पुरेसा भूप्रदेश तरी उत्तरध्रुवानजीक उपलब्ध होता किंवा नाही याबद्दलही चिकित्सक टीकाकारांनी संशय व्यक्त केला आहे. टिळकांनी ज्योतिष्यकीय पुराव्यावरून वैदिक मंत्रांचा काल इ. सनपूर्व ५-६ सहस्र वर्षे धरला आहे. वैदिक भाषा आणि तिचा इतर यूरोभारतीय भाषांशी असलेला विशिष्ट संबंध यांचा विचार केला, तर ही कालगणना स्वीकार्य वाटत नाही. किंबहुना आपली उपपत्ती पुढे मांडताना टिळकांनी भाषाशास्त्राची दखल जवळजवळ मुळीच घेतली नाही, असे म्हटले तरी चालेल.

आर्यांचे मूळ वसतिस्थान भारतातच होते. या उपपत्तीचा पुरस्कार जरी अलिकडे काही — विशेषतः भारतीय विद्वानांनी केला असला, तरी आधुनिक संशोधकांकडून तिला फारशी मान्यता मिळालेली नाही. या उपपत्तीच्या प्रवर्तकांनी पुढे मांडलेले पुरावे जरी वेगवेगळे असले, तरी त्यांवरून आर्यांचे मूळ वसतिस्थान म्हणून वायव्य भारतातील कोणतातरी प्रदेश सामान्यतः सूचित झालेला आहे. 'आर्यों का आदिदेश' या आपल्या हिंदी प्रबंधात श्री. संपूर्णानंद यांनी प्रथम पाश्चात्य पंडितांनी याविषयी मांडलेल्या उपपत्तीचे खंडन करण्याचा प्रयत्न केला आहे. आर्यांचे मूळ वसतिस्थान उत्तर ध्रुवप्रदेशात होते, या टिळकांच्या मताचे विस्तृत विवेचन करून ते मतही अग्राह्य आहे, असे त्यांनी पुढे म्हटले आहे. प्राचीन ग्रीक, प्राचीन इराणी आणि वैदिक भारतीय हे सर्व लोक एकाच, म्हणजे आर्य मानववंशातील होते. व तो आर्य मानवसमूह प्रथम सिंधू आणि सरस्वती या नद्यांमधील ऋग्वेदात सप्तसिंधू या नावाने प्रसिद्ध असलेल्या प्रदेशात वसती करून राहिला होता. परंतु पुढे एक प्रकारचे धार्मिक युद्ध — ज्याचा वैदिक वाङ्मयात देवासुरसंग्राम असा वारंवार उल्लेख केलेला आहे — उद्भवून आर्यांच्या काही टोळयांना सप्तसिंधूतून इराणाकडे व नंतर तेथूनही कॅस्पियन आणि कृष्ण समुद्राच्या बाजूंनी बाल्कन देश आणि मध्यसमुद्रावरील बेटे यांच्याकडे निर्गमने करावी लागली. म्हणजे आर्यांच्या निर्गमनाचे कारण त्यांच्या मूळ

वसतिस्थानात झालेली लोकसंख्येची वाढ हे नसून, देवासुरसंग्राम हे होते. संपूर्णानंदांनी आपली उपपत्ती मुख्यतः ऋग्वेदात उपलब्ध झालेल्या पुराव्यावर आधारलेली आहे. ते पुढे म्हणतात, की अलिकडे ज्ञात झालेली मोहेंजोदडो-हडप्पा संस्कृती अनार्य (सेमिटिक) आहे. ती ऋग्वेदोत्तरकालीन आहे; पण तिच्यावर आर्यसंस्कृतीचा प्रभाव मात्र मुळीच पडलेला दिसत नाही.

श्री. लक्ष्मीधर कल्ला यांचे मत असे आहे, की प्राचीन परंपरा लक्षात घेता आर्य लोक आणि हिमालय पर्वत हे दोन्ही पहिल्यापासूनच अविभाज्य असे होते. म्हणजे आर्यांची प्राथमिक वसती हिमालयात होती, असे मानणे अपरिहार्य आहे. लक्ष्मीधर यांनी या आपल्या विधानास पोषक असे एकूण अकरा मुद्दे आपल्या प्रबंधात नमूद केले आहेत. नीलमतपुराणाच्या आधारे ते पुढे असे म्हणतात, की हल्लीचा काश्मीर प्रांत आहे, तिथे पूर्वी एक सरोवर होते. आपल्या मूळस्थानाहून खाली येऊन आर्यांच्या काही पहिल्या टोळ्यांनी त्या सरोवरातील पाणी बाहेर काढले व तो भूभाग वसतीस योग्य असा केला. नंतर त्या भूभागास, आपल्या नेत्याच्या म्हणजे कश्यपाच्या नावावरून, कश्यपमिर हे नाव दिले व तिथे आपल्या निर्गमनातली पहिली वसाहत केली.

आर्यांच्या मूळ वसतिस्थानासंबंधी चिकित्सा करताना, आर्य या शब्दाच्या अर्थाचा प्रथम विचार करणे अवश्य आहे, असा उपक्रम करून रामचरित सिंग असे सांगतात, की पुढे जरी आर्य या शब्दाचा अर्थ कुलीन, उदात्त, श्रेष्ठ असा झालेला असला, तरी मूलतः तो शब्द ‘ अर् ’ म्हणजे नांगरणे या धातूपासून साधित झाला आहे व त्याचा मूळ अर्थ कृषीवल असाच होता. याच अर् धातूपासून हर किंवा हल हा शब्द सिद्ध झाला असला पाहिजे, असेही ते पुढे सुचवितात. प्राचीन काळी कृषिकर्म हा सर्वोत्कृष्ट आचार मानला गेलेला असल्यामुळे आर्य या शब्दाचा साहजिकपणेच श्रेष्ठ असा अर्थ झाला. म्हणजेच असे, की आर्य हे कुठल्याही विशिष्ट मानववंशाचे नाव नव्हते, तर ज्या लोकांनी कृषिकर्म हे व्यवसाय म्हणून प्रथमतः स्वीकारले, ते लोक आपणांस आर्य असे म्हणवू लागले. आणि कृषितंत्र हा मानवी संस्कृतीच्या विकासातील एक युगप्रवर्तक असा टप्पा असल्यामुळे आर्य या नावाचा त्यांना अभिमानही वाटू लागला.

कृषिकर्मांचा व्यवसाय प्रथमच करणारे हे आर्य कोण ? व त्यांचे मूळस्थान कोणते ? प्रसिद्ध रशियन वनस्पतिशास्त्रज्ञ व्हासिलोव्ह यांच्या मते मानवजातीच्या इतिहासाकडे दृष्टी टाकली, तर निरनिराळे मानववंश एका काळी दक्षिण आशियात एकत्र राहत होते, असे दिसून येते. याच मताचा अनुवाद सिंग यांनी केला आहे. त्यांच्या मते चार मानववंशांचे — म्हणजे गौर, मोंगोलियन, नीग्रॉइड आणि ऑस्ट्रलॉइड या मानववंशांचे—विशिष्टीकरण भारतात झाले असले पाहिजे. त्यांपैकी पहिले दोन वंश उत्तर भारतात आणि दुसरे दोन दक्षिण भारतात उत्क्रांत झाले. उत्तर भारतातील या गौर मानववंशानेच सुमारे १२,००० वर्षांपूर्वी कृषिकर्माचा शोध लावला व स्वतःला आर्य म्हणविण्यास सुरुवात केली. आणि ही सर्व घटना घडली ती काश्मीर व त्याच्या आजूबाजूच्या प्रदेशात ! आर्यांचा प्राचीन पूर्वज जो कश्यप, त्याच्या नावावरूनच त्या प्रदेशाला कश्यपमेरू ही संज्ञा प्राप्त झाली. वेदवाङ्मयात वारंवार उल्लेखिलेल्या यव या धान्याची लागवड प्रथम याच प्रदेशात झाली. या आपल्या मूळस्थानापासून, म्हणजे काश्मीरपासून, आर्यांनी पुढे पश्चिमेकडील प्रदेशावर आक्रमण केले आणि इराण, मेसापोटामिया, वगैरे प्रदेशांत आपल्या वसाहती स्थापिल्या.

आर्यांचे मूळ वसतिस्थान भारतातच होते, या मताचा दुसरा एक पर्याय राजबली पांडे यांनी सुचविला आहे. त्यांनी ऋग्वेदातील नदीसूक्ताचा ( ऋ. १०.७५ ) या प्रश्नाच्या दृष्टीने विचार करून असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे, की आर्यांचे मूलस्थान मध्यदेश म्हणजेच अयोध्या आणि प्रतिष्ठान (हल्लीचे अलाहाबाद) यांमधील प्रदेश हे असले पाहिजे.

श्रीकंठशास्त्री यांनीही मध्यदेश म्हणजे सिंधू आणि गंगा या नद्यांचे खोरे, हेच आर्यांचे मूलस्थान होते, असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे.

आर्य लोक हे भारताचेच मूळचे रहिवासी होते, असे मानले तर त्यांची वैदिक संस्कृत भाषा यूरोभारतीय भाषांची अगदी प्राथमिक अवस्था दर्शविते, असे गृहीत धरावे लागेल. पण ते आधुनिक भाषाशास्त्राशी सुसंगत ठरणारे नाही.

भारतीय मूलस्थानाची उपपत्ती स्वीकारली, की आणखी एक अडचण उपस्थित होते. ती म्हणजे वैदिक संस्कृती आणि मोहेंजोदडो-हडप्पा संस्कृती यांच्या पौर्वापर्यासंबंधी. मोहेंजोदडो-हडप्पा संस्कृती ही वेदोत्तरकालीन आहे, असे मानल्याखेरीज भारतीय मूलस्थानाची उपपत्ती सुसंगत ठरत नाही. आणि असे मानणे हे तर बुद्धीला मुळीच पटण्यासारखे नाही. सैंधवी संस्कृती ही वैदिक आर्यांहून भिन्न अशा लोकांची संस्कृती होती, ही गोष्ट आता बहुतेक सर्व संशोधकांनी मान्य केली आहे. त्या लोकांत प्रसृत असलेली विशिष्ट प्रकारची मूर्तिपूजा, त्यांना अवगत असलेली लेखनकला, त्यांच्या संस्कृतीत दिसून येणारा अश्वांचा अभाव, वगैरे गोष्टी या संदर्भात महत्त्वाचा पुरावा म्हणून पुढे मांडता येतील. सप्तसिंधूतील आर्य लोकच जर भारताचे मूळचे रहिवासी असतील, तर हडप्पासंस्कृतीचे लोक भारतात केव्हा व कोठून आले ? त्यांच्या संस्कृतीच्या स्वरूपावरून ते लोक सिंधुखोऱ्यात दीर्घकाल वसती करून राहिले असले पाहिजेत, हे स्पष्ट दिसून येते. मग त्या काळात आर्य लोक कुठे होते ? आणि

वेदोत्तर वाङ्मयात हडप्पियन लोक किंवा त्यांची नागर संस्कृती, यांचा उल्लेख का नसावा ? या प्रश्नांची उत्तरेही समाधानकारक रीतीने देता येण्यासारखी नाहीत. तसेच भारतीय मूलस्थानाची उपपत्ती आणि ज्योतिःशास्त्रीय पुरावे यांवरून सिद्ध होणारा वेदकाल इतका मागे जातो, की तो गृहीत धरून वेदकालीन इतिहास आणि वेदोत्तरकालीन इतिहास यांचा योग्य समन्वय करणे अवघड होते.

श्री. पिठावाला यांची उपपत्ती वर वर्णिलेल्या उपपत्तीपेक्षा पुष्कळच शास्त्रीय स्वरूपाची आहे. पिठावाला यांच्या मते भूगोलशास्त्र हेच इतिहासाचे मुख्य अधिष्ठान समजले पाहिजे. कारण एखाद्या मानवसमूहाचा इतिहास आणि संस्कृती काही विशिष्ट प्रकाराने घडविण्यात तो मानवसमूह जिथे वास्तव्य करून राहिला होता, तिथल्या भौगोलिक परिस्थितीचा फार मोठा हात असतो. ज्यांचे जीवन जवळजवळ पूर्णपणे निसर्गावलंबी होते, त्या आर्यांच्या इतिहासाचा अभ्यास करताना तर भूगोलशास्त्राची उपेक्षा करून मुळीच चालणार नाही. पिठावाला यांच्या विवेचनाचा हा प्रारंभबिंदू सर्वांना सामान्यपणे पटेल असाच आहे.

प्राचीन इराणी लोकांचा अवेस्ता हा ग्रंथच पिठावाला यांनी मुख्यतः प्रमाणभूत मानला आहे. त्यात वर्णन केलेली संस्कृती म्हणजेच मूळच्या आर्यांची संस्कृती आणि त्यात उल्लेखिलेले ऐर्यन वएजो म्हणजेच आर्यांचे मूळ वसतिस्थान होय. पिठावाला यांच्या मते ऐर्यन वएजोपासून आर्यांची संस्कृती नंतर पश्चिमेकडे आयर्लंड, पूर्वेकडे चीन, उत्तरेकडे स्कँडिनेव्हिया आणि दक्षिणेकडे ईस्ट इंडिज, या प्रदेशाकडे पसरली. ही गोष्ट शक्य होण्यासाठी भूगोलशास्त्राच्या दृष्टीने असे अनुमान करणे प्राप्त होते, की आर्यांचे मूळ वसतिस्थान कुठे तरी म्हणजे आशियात मध्यवर्ती असे असले पाहिजे. आर्यांच्या मूळ संस्कृतीबद्दल पिठावाला यांनी पुढील गोष्टी गृहीत धरल्या आहेत – ती संस्कृती सुसंरक्षित अशी नदीखोऱ्यांतील संस्कृती होती. मूळचे आर्य लोक स्थिर जीवन कंठीत होते. पशुपालन हा त्यांचा मुख्य व्यवसाय होता. त्यांच्या मूळ वसतिस्थानाच्या प्रदेशात अनेक नैसर्गिक प्रतिरोध त्यांच्या मार्गात आले असले पाहिजेत. आणि त्यामुळे त्यांना आपल्या विकासास प्रोत्साहनच मिळाले असले पाहिजे. गेल्या १०,००० वर्षांत पृथ्वीची स्थिती जवळजवळ मुळीच बदलली नाही, असे आणखी गृहीत धरून मध्यआशियातील ६६ १/२ अक्षांश आणि ४० अक्षांश यांमधील भूप्रदेशाची वरील प्रकारची संस्कृती निर्माण होण्याच्या शक्यतेच्या दृष्टीने पिठावाला यांनी छाननी केली आहे. या बाबतीत प्रथम डोळ्यासमोर प्रदेश येतो, तो सैबेरियाचा. परंतु तो प्रदेश फारच विस्तृत आणि विस्कळित स्वरूपाचा असल्यामुळे तिथे आर्यांच्या संस्कृतीसारखी एकसंधी संस्कृती निर्माण झाली असणे केवळ अशक्य आहे. शिवाय आर्यांनी तिथून उत्तरेकडे किंवा दक्षिणेकडे निर्गमने केली असण्याची शक्यताही फार थोडी आहे.

सैबेरियाच्या खाली मध्य-आशियात ५५ आणि ५० अक्षांशांमध्ये एक काळ्या जमिनीची पट्टी लागते. तिथे गवतही पुष्कळ निर्माण होते. पण आर्यांच्या मूलस्थानात नद्यांच्या पाण्याची सुबत्ता जशी अस्तित्वात असली पाहिजे, तशी या भूप्रदेशात नाही. पुढे पूर्वेस येनिसियी नदीचे खोरे, पश्चिमेस व्होल्गा नदीचे खोरे वगैरे भूप्रदेशांची चाचणी करीत करीत पिठावाला यांनी शेवटी सिरदर्या आणि अमुदर्या या नद्यांमधील प्रदेशात आर्यांचे मूळ वसतिस्थान असणे सर्वांत अधिक संभाव्य आहे, असे मत प्रदर्शित केले आहे. भूगोलशास्त्राच्या अनुरोधाने निश्चित केलेल्या या प्रदेशास वेन्दिदादमध्ये केलेले ऐर्यन वएजोचे वर्णन लागू पडते, असेही त्यांनी पुढे म्हटले आहे. तसेच त्यांच्या मते सिरदर्या या नावात अवेस्तातील आर्दुइ सुरा या नदीच्या नावाची स्मृती कायम ठेवली गेली असावी.

पिठावाला यांच्या उपपत्तीची पद्धती बरीच शास्त्रीय स्वरूपाची आहे, यात शंका नाही; पण वर दर्शविल्याप्रमाणे तिला मर्यादाही बऱ्याच आहेत. दोनच गोष्टींचा उल्लेख करायचा झाल्यास असे म्हणता येईल, की पिठावाला वाङ्मयदृष्ट्या वेन्दिदाद या प्राचीन इराणी ग्रंथापलिकडे गेले नाहीत. आणि त्यांनी मूल-यूरोभारतीय भाषेचा मुळीच विचार केलेला नाही. याचा परिणाम म्हणजे त्यांना यूरोभारतीय-भाषिकांचे मूलस्थान निश्चित करता आले नाही.

आर्यांचे मूळ वसतिस्थान शोधून काढण्यासाठी आधुनिक संशोधकांनी भाषाशास्त्रावलंबी पुराणवस्तुविज्ञान या शास्त्राचा मुख्यतः आधार घेतला आहे. प्रस्तुत विषयाचा अभ्यास करण्याची हीच पद्धती सर्वांत अधिक सयुक्तिक आहे. या विषयाच्या दृष्टीने भाषाशास्त्रावलंबी पुराणवस्तुविज्ञान या शास्त्राच्या आधारे विद्वानांनी प्रतिपादिलेली काही विधाने मूलभूत आणि सिद्ध म्हणून मानायला काही हरकत नाही.

पश्चिमेकडे आयर्लंडपासून तो पूर्वेकडे भारतापर्यंत पसरलेल्या विस्तृत भूप्रदेशात ज्या मुख्य भाषा प्राचीन काळी प्रचलित होत्या, त्या सर्व भाषांचे मूळ अशी एक भाषा – जिला मूल-यूरोभारतीय भाषा अशी संज्ञा देणे योग्य ठरेल, – एके काळी अस्तित्वात असली पाहिजे. ती मूल-भाषा काही काळ तरी एका विशिष्ट मर्यादित अशा प्रदेशात उपयोजिली जात असली पाहिजे. अर्थातच ती भाषा बोलणाऱ्या मूळच्या लोकांतही एक प्रकारची एकरूपता अस्तित्वात असली पाहिजे. ती एकरूपता वांशिक स्वरूपाची नव्हती, हे निर्विवाद आहे. भाषा आणि वंश ही

कोणत्याही अपरिहार्य बंधनांनी परस्परांशी संबद्ध नसतात, ही गोष्ट मुद्दाम लक्षात घेतली पाहिजे. म्हणून मूल-यूरोभारतीय भाषा बोलणारे लोक यूरोभारतीय मानववंशाचे होते, असे मानणे सर्वथैव अशास्त्रीय होते. प्रागैतिहासिक पुराणवस्तुसंशोधनशास्त्र निश्चितपणे असे मानण्याविरुद्ध साक्ष देते. त्या लोकांत राजकीय दृष्ट्या एकराष्ट्रीयत्व होते, असेही मानता येणार नाही. मग ही एकरूपता कोणत्या प्रकारची होती ? जर खोलवर विचार केला तर असे आढळून येईल, की ती एकरूपता अर्थजीवनात्मक असली पाहिजे. मूल-यूरोभारतीय भाषिकांची भोवतालची परिस्थिती भौगोलिक दृष्ट्या; तसेच पशुसंपत्ती, वृक्षसंपत्ती, इ. दृष्टींनी समान असल्यामुळे त्यांचे भौतिक किंवा आर्थिक जीवन आणि धर्मकल्पना यांच्या एकरूपतेसंबंधी अनुमान करणे कठीण नाही. भाषा, भौतिक जीवन आणि धर्मकल्पना या बाबतीत साधारण असलेल्या या लोकांचे मूळ वसतिस्थान कुठे असले पाहिजे, हीच भाषाशास्त्रावलंबी पुराणवस्तुविज्ञानाची मुख्य समस्या आहे.

यूरोभारतीय-भाषिकांच्या मूळ वसतिस्थानासंबंधी भाषाशास्त्रदृष्ट्या चर्चा करताना मूल-यूरोभारतीय भाषा ही एका अर्थी स्वयंसिद्ध किंवा अनन्याश्रयी भाषा होती, असे सामान्यतः समजण्यात येत असे. उत्तरकालीन निरनिराळ्या यूरोभारतीय भाषांच्या अभ्यासावरून त्या भाषांची सर्वप्रथम पूर्वज अशी जी भाषा भाषाशास्त्राच्या साहाय्याने सिद्ध करता येते, ती भाषाच अशा चर्चेचा प्रारंभबिंदू म्हणून मानली जात असे; परंतु त्या भाषेच्या या सिद्ध स्वरूपाशीच न थांबता त्याच्याही मागे जाऊन त्या भाषेचा उद्‌गम व प्राथमिक विकास होत असता तिच्यावर तिच्यापूर्वी प्रचलित असलेल्या किंवा तिच्या समकालीन असलेल्या निरनिराळ्या परकीय भाषांचा जो परिणाम अपरिहार्यपणे झाला असला पाहिजे, तो या संदर्भात लक्षात घेणे आवश्यक आहे. तसेच या मूल-यूरोभारतीय भाषेवरून ती भाषा बोलणाऱ्या लोकांच्या संस्कृतीविषयी जे निष्कर्ष काढले जाऊ शकतात, त्या निष्कर्षांचा प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, प्रागैतिहासिक पुराणवस्तुसंशोधनशास्त्र, मानववंशशास्त्र, इ. शास्त्रांच्या अभ्यासाने निघणाऱ्या निष्कर्षांशी प्रत्ययकारी समन्वय लावणे, हेही आवश्यक आहे.

या दृष्टीने मूल-यूरोभारतीय भाषेचा विचार केला तर आपणांस एक गोष्ट स्पष्टपणे प्रतीत होते की त्या भाषेवर उग्रो-फिनिश भाषेचा चांगलाच परिणाम झालेला आहे. कोलिंडर या भाषाशास्त्रज्ञाने मूल-यूरोभारतीय भाषा आणि उग्रो-फिनिश भाषा यांच्या घडणीतील बहुविध साम्य दाखविले आहे. हे साम्य केवळ परस्परांनी केलेल्या वरवरच्या उसनवारीच्या स्वरूपाचे नाही. त्या दोन भाषांचा अगदी निकटचा संबंध आला असला पाहिजे – आणि तोही त्या भाषांच्या प्राथमिक अवस्थेत आला असला पाहिजे – असेच ते साम्य दर्शविते. भाषाशास्त्राच्या अभ्यासावरून जो हा निष्कर्ष काढता येतो, त्याला पोषक असा बराच महत्त्वाचा पुरावा मानवेतिहासशास्त्राच्या आधारे उपलब्ध करून दिला गेला आहे.

मूल-यूरोभारतीय-भाषिकांच्या सांस्कृतिक जीवनावर जो आणखी परिणाम झालेला दिसतो, तो अल्ताइक लोकांचा. मूल-यूरोभारतीय भाषा आणि कॉकेशियननजीकच्या आशियातील भाषा यांच्यामधील संबंधाचा विचार केला, तर मूल-यूरोभारतीय-भाषिकांचे वास्तव्य उरल प्रदेशाच्या दक्षिणेस – म्हणजेच जिथे त्यांच्यावर अल्ताइक लोकांच्या संस्कृतीचा प्रभाव पडणे शक्य होते, अशा प्रदेशात – असले पाहिजे, असे मानावे लागते. सेमिटिक भाषा आणि मूल-यूरोभारतीय भाषा यांचा तौलनिक अभ्यास केल्यास असे दिसून येईल, की काही विशिष्ट बाबतीत त्या भाषांचे परस्परांशी बरेच साम्य आहे. उदाहरणार्थ, यूरोभारतीय आणि सेमिटिक या दोन भाषाकुटुंबांतच व्याकरणातील तीन लिंगे मुख्यतः अस्तित्वात आहेत.

म्हणजे ज्या प्रदेशात उग्रो-फिनिश, अल्ताइक आणि सेमिटिक या भाषांचा प्रभाव तिच्यावर पडणे शक्य होते, अशा प्रदेशातच मूल-यूरोभारतीय भाषेचा उद्‌गम आणि प्राथमिक विकास झाला असला पाहिजे आणि असा एक प्रदेश म्हणजे उत्तर किरघीज प्रदेश हाच होय.

या निष्कर्षास उपोद्बलक असा बराचसा पुरावा इतर मार्गांनीही उपलब्ध होऊ शकतो. मूल-भारतीय Peku (सं. पशू) हा शब्द प्राचीन असून, तो मूळचा माणसाळलेल्या मेंढ्यांचा वाचक असा होता. पुढे अर्थविकासक्रमाने तो शब्द सर्व माणसाळलेल्या प्राण्यांना उद्देशून वापरण्यात येऊ लागला. याच्या उलट मूल-यूरोभारतीय Ouis (सं. अवि) हा शब्द निश्चितपणे नंतरचा आहे. Peku या शब्दाच्या मूळच्या अर्थाचा विस्तार होऊन जेव्हा तो शब्द सर्व माणसाळलेल्या प्राण्यांना लावण्यात येऊ लागला, तेव्हाच Ouis हा शब्द अस्तित्वात आला असला पाहिजे. यावरूनच असे अनुमान काढता येणे शक्य आहे, की मूल-यूरोभारतीय-भाषिकांनी सर्वप्रथम माणसाळविलेले प्राणी म्हणजे मेंढ्याच होत. प्राणिशास्त्राचा असा एक सामान्य सिद्धान्त आहे, की ज्या प्रदेशात एखाद्या प्राण्याची रानटी जात आढळते, त्या प्रदेशातच त्या प्राण्याला माणसाळविले जाते. रानटी मेंढ्यांचे मुख्य स्थान म्हणजे उरल-अल्ताय प्रदेश: आणि रानटी मेंढ्या माणसाळविणाऱ्या मूल-यूरोभारतीयांचे वसतिस्थानही तिथेच असले पाहिजे.

मूल-यूरोभारतीयांना परिचित असलेला दुसरा प्राणी म्हणजे घोडा. त्या लोकांना घोडयाचा परिचय कसा झाला असेल यासंबंधी नैरिंग याने बरेच विवेचन केले आहे. प्राणिशास्त्र आणि प्रागैतिहासिक पुराणवस्तुसंशोधनशास्त्र यांच्या आधारे त्याने असे दाखविले आहे, की घोडे पाळण्याच्या तंत्राचा अवलंब प्रथम अल्ताइक लोकांनी केला व नंतर ते तंत्र मूल-यूरोभारतीयांना अल्ताइक लोकांच्या संपर्कामुळे अवगत झाले.

मूल-यूरोभारतीय Guos (सं. गौः) या शब्दासंबंधी अलिकडे जे भाषाशास्त्रीय संशोधन झाले आहे, त्याचा निष्कर्षही वरील निष्कर्षास जुळता असाच आहे. मूल-यूरोभारतीय भाषेत तो शब्द सुमेरियन gu(d) या शब्दापासून घेतला असावा, असे मत इप्सेन याने पुढे मांडले आहे. परंतु ते मत स्वीकारण्यात अनेक अडचणी आहेत. मूळ सुमेरियन शब्द gud असा आहे. तो मूल-यूरोभारतीय भाषेत घेतला गेला तेव्हा त्यातील शेवटच्या व्यंजनाचा लोप झालेला होता. सुमेरियन शब्दातील शेवटच्या d या व्यंजनाचा लोप होण्यास प्रारंभ झाला, तो बऱ्याच उशीराने म्हणजे इ. सनपूर्व २५०० च्या सुमारास. मूल-यूरोभारतीय guos या शब्दापासून सिद्ध झालेले शब्द बहुतेक सर्व महत्त्वाच्या यूरोभारतीय भाषांत अस्तित्वात आहेत. आणि या भाषा बोलणाऱ्या लोकांची मूळ वसतिस्थानापासून निर्गमने सुरू झाली, ती निश्चितपणे इ. सनपूर्व २५०० च्या पूर्वीपासून. म्हणजेच guos हा शब्द त्याच्याही पूर्वी मूल-यूरोभारतीय भाषेत आला असला पाहिजे. अर्थात तो शब्द सुमेरियन भाषेतून घेतला गेला असणे शक्य नाही.

त्याचप्रमाणे मूल-यूरोभारतीय भाषा-भाषकांस परिचित असलेल्या कुत्रा आणि सूकर या प्राण्यांचाही प्राणिशास्त्र, प्रागैतिहासिक, पुराणवस्तुसंशोधनशास्त्र आणि भाषाशास्त्र यांच्या दृष्टींनी नैरिंग याने विचार केला आहे. मूल-यूरोभारतीयांना ज्ञात असलेल्या पशुधनाच्या संबंधीच्या विवेचनावरून शेवटी त्याने असा निष्कर्ष काढला आहे, की मूल-यूरोभारतीयांस परिचित असलेल्या प्राण्यांचे मूलस्थान उरल व अल्ताय या प्रदेशांतच असले पाहिजे आणि त्या प्राण्यांना माणसाळविण्याचे तंत्र मूल-यूरोभारतीय लोक आंतर-आशियातील लोकांपासूनच शिकले असावेत.

यूरोभारतीयांच्या मूळ वसतिस्थानाच्या प्रश्नाचा विचार करताना आणखी एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. मूल-यूरोभारतीय मानवसमूहातून ज्या निरनिराळ्या लोकांची निर्गमने झाली, त्या लोकांचा उत्तरकालीन इतिहास पाहिला तर त्यावरून मूल-यूरोभारतीयांच्या कालासंबंधी काही अनुमान करणे शक्य आहे. उदा० पहिल्या ट्रोजन संस्कृतीचे स्वरूप निश्चितपणे यूरो-भारतीय होते आणि त्या संस्कृतीचा काल इ. सनपूर्व ३००० वर्षे इतका असला पाहिजे, असे मानता येते. तसेच हडप्पा संस्कृतीच्या अंताचा काल इ. सनपूर्व २५००-२००० हा आहे. त्या संस्कृतीचा नाश वैदिक आर्यांनी केला, असे सामान्यपणे गृहीत धरले जाते. आणि त्या आर्यांचे पूर्वज तर या कालापूर्वी अनेक वर्षे मूल-यूरोभारतीयांपासून विभक्त झाले होते, असे दाखविता येते. म्हणजे मूल-यूरोभारतीयांचा काल ख्रिस्तपूर्व ४०००-३५०० हा होता, हे साहजिकपणेच प्राप्त होते. पुराणवस्तुसंशोधनशास्त्राच्या आधारे असे दाखविता येते, की मृत माणसांना पुरून त्यावर तांबड्या रेतीचे ढीग करणाऱ्या लोकांची संस्कृती (जिला कुर्गन संस्कृती असे म्हणता येईल), रज्जुमुद्रित मृत्पात्रे निर्माण करणाऱ्या लोकांची संस्कृती आणि त्रिपोलजे संस्कृती या तीन संस्कृतींशी मूल-यूरोभारतीयांचा अगदी निकटचा संबंध आला होता. या तीन्ही संस्कृती ख्रिस्तपूर्व चौथ्या सहस्रकाच्या पहिल्या अर्धात उरल-अल्ताय प्रदेशाच्या आजूबाजूस अस्तित्वात असल्याचे पुराणवस्तुसंशोधनशास्त्राने सिद्ध केले आहे. या तीन संस्कृतींच्या प्रतिनिधिभूत असलेल्या लोकांपैकी रज्जुमुद्रित मृत्पात्रे निर्माण करणारे लोक म्हणजेच मूल-यूरोभारतीय लोक, असे सुचविणारा पुरावाही उपलब्ध झाला आहे.

त्यापेक्षाही कुर्गन संस्कृती ही मुख्यतः मूल-यूरोभारतीयांची संस्कृती होती, असे सिद्ध करणारा अधिक भक्कम पुरावा उपलब्ध झाला आहे. मूल-यूरोभारतीय लोकांत प्रेते पुरण्याची चाल अस्तित्वात असल्याचे दिसून येते. प्रेताची विल्हेवाट करण्याची पद्धती ही कोणत्याही मानवसमूहाच्या जीवनातील एक मूलभूत अशी बाब समजली पाहिजे. या बाबतीतली आपली पद्धती सोडायला तो मानवसमूह सहसा तयार होत नाही. प्रत्येक मृत माणसासाठी वेगवेगळा खड्डा खणून त्यात त्याचा देह पुरायचा, त्या खड्ड्यावर खणलेल्या मातीचा ढीग रचायचा आणि अशा ढिगाभोवती एक किंवा दोन लाकडी कुंपणे घालायची, अशी प्राचीन यूरोभारतीय भाषिकांची पद्धती होती. ऋग्वेदातही अशा प्रकारच्या कुंपणाचा उल्लेख आला आहे (ऋ. १०.१८.४,१३). त्यावरून ती पद्धती किती दूरवर पसरली होती, याची कल्पना यईल. किरघीज प्रदेशात अशी मृतांची थडगी किंवा कुर्गन अनेक आढळतात. बोगडानोव्ह या रशियन पुराणवस्तुशास्त्रज्ञाच्या मते त्यांपैकी बरेच कुर्गन नवाश्मयुगकालीन आहेत. याचाच अर्थ असा, की मृतदेह दुमडलेल्या स्थितीत खड्डयात पुरून त्यावर तांबडया मातीचा ढीग रचण्याचा प्रघात किरघीज प्रदेशातूनच पुढे पश्चिमेकडे आणि आग्नेयीकडे प्रसृत झाला. मूल यूरो — भारतीय-भाषिकांचे वैशिष्ट्यपूर्ण युद्धपरशूही उत्तर किरघीज

प्रदेशातील काही उत्खननांत उपलब्ध झाले आहेत. म्हणजे या बाबतीत पुराणवस्तुसंशोधनशास्त्र आणि मानवेतिहासशास्त्र या शास्त्रांनी भाषाशास्त्राचा चांगलाच पाठपुरावा केला आहे.




मूल-यूरोभारतीय-भाषिकांचे वसतिस्थान आणि त्यांची मुख्य निर्गमने दर्शविणारा स्थूलालेख

तात्पर्य मूल-यूरोभारतीय भाषेला तिचेच असे विशिष्ट स्वरूप प्राप्त झाले, ते उत्तर-किरघीज प्रदेशात. म्हणून त्याच प्रदेशास ती भाषा बोलणाऱ्या लोकांचे, म्हणजेच वैदिक भारतीयांचा संबंध ज्यांच्यापर्यंत स्पष्टपणे आणि निःसंदिग्धपणे पोचू शकतो अशा त्यांच्या सांस्कृतिक पूर्वजांचे, मूल वसतिस्थान, असे आपण मर्यादित अर्थाने म्हणू शकतो. त्या वसतिस्थानापासून मूल-यूरोभारतीय भाषिकांची दोन मोठी निर्गमने घडून आली. ज्या लोकांनी पश्चिमेकडे जाऊन युरोपातील प्रिप्रेट प्रदेशात पुन्हा काही काळ वसती केली, त्यांना सामान्यपणे पूर्व-युरोपीय अशी संज्ञा देता येईल. या पूर्व-युरोपीयांच्याही पूर्वी मूल-यूरोभारतीय भाषिकांच्या काही टोळ्यांनी उत्तर-किरघीज प्रदेशातून बल्ख प्रदेशाकडे प्रयाण केले होते. हेच लोक पूर्वार्य होत. या पूर्वार्यांनी बल्ख प्रदेशात बऱ्याच कालपर्यंत वसती केली होती; पण पुढे त्यांचीही तीन मोठी निर्गमने झाली. मिटानी, हुरियन, इ. लोकांचे पूर्वज मध्यआशियात गेले. प्राचीन इराण्यांचे पूर्वज इराणकडे गेले आणि वैदिक भारतीयांच्या पूर्वजांनी वृत्रहा आणि पुरंदर अशा इंद्राच्या नेतृत्वाखाली सप्तसिंधुप्रदेशावर विजयाक्रमण केले. पाहा—आर्यावर्त, मध्यदेश, वेद, हिंदुसमाज. [ आर्यांचे मूळ वसतिस्थान—डॉ. रा. ना. दांडेकर, पुणे विद्यापीठ पत्रिका (ज्ञानखंड), १९५८; ऋ. आ.; हिं. स. सं. वि. ]

**आर्य अष्टांगिक मार्ग** निर्वाणप्राप्तीचा मार्ग. गौतम बुद्धाने दुःख निरोधाचा म्हणजे संसार-निवृत्तीचा, तृष्णाक्षयाचा अर्थात निर्वाणप्राप्तीचा जो एकमेव मंगल मार्ग सांगितला आहे त्याचे नाव. स्वतःला प्राप्त झालेले ज्ञान बुद्धाने चार आर्य सत्यांच्या रूपाने भिक्षूंना उपदेशिले; त्यांतील चौथे आर्य सत्य 'दुःखनिरोधगामिनी प्रतिपद' हेच होय. पाहा – बौद्ध धर्म. [ ध. भ. बु. द. ]

**आर्य घोटक** घोटक = घोडा. हा शब्द कोशांत आढळत नाही. प्राचीन काळी सोन्या-चांदीच्या अलंकारांनी सजवून एक घोडा वरातीपुढे चालवीत, त्याला हे नाव होते. या घोड्यावर कोणी बसत नव्हते. सांप्रतही ही चाल अनेक ठिकाणीं दिसते. [ शं. हा. ]

**आर्यभट** (इ. स. चे ४ थे शतक) हा कुसुमपुराचा (पाटणा) रहिवासी असून, महान गणिती व ज्योतिर्विद होता. याने प्राचीन ज्योतिषग्रंथांचे संशोधन व स्वतःचे अनुभव यांच्या आधारे आर्यभटीय या ग्रंथाची रचना केली. हा ग्रंथ अत्यंत महत्त्वाचा समजला जातो. त्याची रचनापद्धती वैज्ञानिक असून, भाषा सुश्लिष्ट आहे. या ग्रंथाचे चार पाद असून, त्यांत सर्व मिळून १२१ श्लोक आहेत –

(१) **गीतिकापाद** – यात अक्षरांच्या आधारे संक्षेपात संख्या लिहिण्याची स्वनिर्मित पद्धती दिली आहे.

(२) **गणितपाद** – यात अंकगणित, बीजगणित व रेखागणित यांच्यासंबंधी काही सूत्ररूप नियम दिले आहेत.

(३) **कालक्रियापाद** – यात कालगणना, युगे, त्यांचा उत्सर्पिणी व अवसर्पिणी हा कालविभाग, ग्रहांची मध्यम व स्पष्ट

गती, इ. विषय आले आहेत. मात्र यातील युगपद्धती भिन्न आहे.

(४) गोलपाद – यात क्रांतिवृत्त, संपातबिंदू, सूर्यापासून ग्रहांची अंतरे, खगोलवर्णन, ग्रहणे वर्तविण्याची रीती, इ. विषय आले आहेत.

या ग्रंथाचा प्रचार द. भारतात विशेष रूपाने झाला. इ. स. च्या १६-१७ व्या शतकापर्यंत दक्षिणेत याचे अध्ययन-अध्यापन सुरू होते. याच ग्रंथाच्या आधारे बनणारे पंचांग आजही दक्षिणेतल्या वैष्णवपंथात मान्य आहे. त्या मानाने त्याचा उत्तर भारतात विशेषसा प्रचार झाला नाही. आर्यभटाचे कुसुमपूर हे द. भारतात असावे, असे श्री. शं. बा. दीक्षितांचे मत आहे. आर्यभटाच्या मागून झालेल्या ब्रह्मगुप्ताने आर्यभटाची अनेक कारणांसाठी निंदा केली असली, तरी त्यालाही आपल्या खंडखाद्यक या ग्रंथात आर्यभटाचेच अनुकरण करावे लागले आहे. हा प्रथम आर्यभट केवळ गणिती नव्हता, तर तो आकाशस्थ ज्योतींचे वेध घेण्यातही कुशल होता. दृक्प्रत्ययावरून कोणत्याही ज्योतिषग्रंथाची योग्यता ठरते. त्या दृष्टीने आर्यभटाची योग्यता मोठी आहे. अन्य ज्योतिषग्रंथांत संख्या-दर्शक भू = १, राम=३ अशा संज्ञा योजलेल्या असतात. परंतु आर्यभटाने त्या ऐवजी अक्षरांच्या संज्ञा वापरल्या आहेत. उदा० अ =१, इ=१००, उ =१०००० इत्यादी. या पद्धतीमुळे अगदी थोडक्यात काम होते. [ हिं. वि. को.; वै. वि. भा. प. ]

**आर्यभट्ट द्वितीय** (इ. स. चे १० वे शतक) – हाही एक गणिती व ज्योतिर्विद होता. याचा महासिद्धांत नामक एक ज्योतिष ग्रंथ सुप्रसिद्ध आहे. या ग्रंथाचे १८ अधिकार असून, ६२५ आर्यांत तो निबद्ध आहे. याच्या ग्रंथात अयनगती आहे. ब्रह्मगुप्ताने पहिल्या आर्यभटाच्या ग्रंथात जे दोष दाखवले आहेत, ते सर्व याने सुधारले आहेत. [ हिं. वि. को. ]

## आर्य मंजुश्री मूलकल्प

मंत्रयान संप्रदायाचा ग्रंथ. या ग्रंथात शक्तिवादाचा प्रचार आहे, त्याबरोबरच त्यात साधनमार्गातील मुद्रा, मंडल, यक्षिणी, डाकिनी, आसुर देवता, यांचाही प्रपंच आहे. तसेच यात मंजुश्री बोधिसत्त्वाचे माहात्म्य वर्णिलेले आहे. मंजुश्रीचे मंत्र प्राणिमात्राला आयुरारोग्य देणारे व भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारे असून, या मंत्रांनी अनेक अलौकिक सिद्धिही प्राप्त होतात, असे यात म्हटले आहे. यात सिद्धिप्राप्तीसाठी ध्यान व विधी या दोन गोष्टी आवश्यक मानलेल्या असून, प्रत्येक तांत्रिक क्रियेसाठी संपूर्ण विधि-विधान दिलेले आहे.

प्रस्तुत ग्रंथात काही महत्त्वाची ऐतिहासिक माहिती उपलब्ध होते. विशेषत: उत्तरकालीनगुप्त राजे व मौखरी राजे यांच्याबद्दल बरीच महत्त्वाची माहिती त्यात आलेली आहे. [ तां.बौ.सा.सा. ]

## आर्यरक्षितसूरी

(इ. सनपूर्व ४ ते इ. स. ३१) एक जैन विद्वान. याने पाटलिपुत्र नगरीत येऊन चौदा विद्यांचे अध्ययन केले (प्रभावकचरित्र). हा जैन मुनी होता. याने इ. स. १८ मध्ये जैनदीक्षा घेतली व जैन धार्मिक साहित्य धर्मकथानुयोग, चरणकरणानुयोग, द्रव्यानुयोग व गणितानुयोग अशा चार भागांत विभाजित केले. [ खो. प. ]

## आर्यवृद्धा

एक देवी. हिचा उल्लेख आर्या व वृद्धिका या दोन नावांनी महाभारताच्या वनपर्वात आला आहे (२१७.९; २२०.१६). आर्येला शिशुमाता म्हटले आहे. कुषाण कालाच्या सुमारास या देवीला स्त्रियांमध्ये खूप मान्यता होती. कंकाली टेकडीवर आर्यवतीची पाषाणावर खोदलेली एक मूर्ती सापडली आहे. या मूर्तीला आतापर्यंत राणीची मूर्ती असे म्हणत. परंतु तिची अभयमुद्रा तिचे देवत्व सूचित करते. आर्यवतीला सर्व धर्मांत सारखीच मान्यता असावी, असे वाटते. ही सापडलेली मूर्ती जैनांनी स्थापन केली आहे. आर्यवती व आर्यवृद्धा देवी एकच असली पाहिजे. सांप्रत लोक जिला बिहाई (वृद्ध आर्या) किंवा बीमाता (वृद्धिका माता) म्हणतात आणि सठीच्या दिवशी जी मुलाचे विधिलिखित त्याच्या भाळी लिहिते असे म्हणतात, तीच ही आर्यवृद्धा देवी असावी.

बिहाई व बीमाता ही एकाच मातृदेवतेची दोन नावे आहेत. संध्याकाळी बाळंतिणीच्या डोक्याजवळ उजव्या हाताला तांदूळ पसरून व त्यांवर बीमातेची मूर्ती ठेवून तिची पूजा करतात. ही मूर्ती प्राय: शेणाची असते. हिच्या गीतांना बिहाई गीते असे नाव आहे. [ का. ए. सां. अ. ]

## आर्यशूर

(इ. स. चे दुसरे ते पाचवे शतक) एक बौद्ध कवी. हा व अश्वघोष या दोन्ही व्यक्ती एकच होत, असे मानीत असत; पण शोधाअंती आर्यशूर हा अश्वघोषाहून भिन्न असल्याचे ठरले आहे. याने अश्वघोषाच्या काव्यशैलीचे बेमालूम अनुकरण केले असल्यामुळे, लोकांमध्ये त्याच्या भिन्न व्यक्तिमत्त्वाविषयी संशय निर्माण झाला होता. जातकमाला हा याचा सुप्रसिद्ध ग्रंथ होय. यात ३४ जातकांचे सरस मनोज्ञ शैलीत वर्णन आहे. याची काही जातके पाली जातकांच्या आधारावर रचलेली आहेत, तर काही प्राचीन बौद्ध आख्यायिकांच्या आधारे लिहिलेली आहेत; जातकमाला चंपूशैलीत (गद्य-पद्यात्मक) निबद्ध आहे. बौद्ध धर्माच्या प्रचारासाठी या ग्रंथाचा पुष्कळच उपयोग झालेला दिसतो. अजंटाच्या लेण्यां-

तील चित्रांत जातकमालेतल्या कथाप्रसंगांवरून काही चित्रे काढलेली दिसतात. त्याच ठिकाणी तद्विषयक श्लोकही खोदलेले आढळतात.

याचा अलिकडेच प्रकाशात आलेला दुसरा ग्रंथ म्हणजे पारमितासमास हा होय. यात सहा पारमितांचे सहा सर्गांत वर्णन केलेले आहे. त्यातला एक श्लोक असा –

**छायातरोः स्वादुफलप्रदस्य छेदार्थमाघूर्णपरश्वधानाम् ।**
**धात्री न लज्जां यदुपैति भूमिर्व्यक्तं तदस्या हतचेतनत्वम् ।।**

अर्थ – शीतल छाया व मधुर फळे देणाऱ्या वृक्षावर ज्याने कुऱ्हाड उचलली, अशा माणसाचा भार वाहताना पृथ्वी लज्जित होत नाही, यावरूनच ती जड आहे, हे स्पष्ट होते.

आर्यशूराच्या ग्रंथांना भारतात, त्याचप्रमाणे भारताबाहेरही लोकप्रियता मिळाली. इ. स. च्या १० व्या शतकात त्याच्या जातकमालेचा चिनी भाषेत अनुवाद झाला. तिबेटी भाषेतही त्याचे अनुवाद आहेत. इत्सिंग या चिनी प्रवाशाने (इ. स. चे ८ वे शतक) त्याच्या काव्याविषयी गौरवाने लिहिले आहे. [सं. सा. इ.; सु. वि. को.]

## आर्य सत्ये

जीवनाच्या सार्थकतेचा विचार करीत असता बुद्धाला चार आर्यसत्यांची प्रतीती झाली. या आर्यसत्यांच्या सम्यक ज्ञानानेच गौतमाला संबोधी प्राप्त होऊन तो बुद्ध ठरला. सत्यांची संख्या अनंत आहे. पण अत्यधिक महत्त्वामुळे त्यांतली चार सर्वश्रेष्ठ मानलेली आहेत. या सत्यांना आर्य हे विशेषण लावण्याचा अभिप्राय हा आहे, की आर्य म्हणजे विद्वज्जनच या सत्यांपर्यंत पोचू शकतात. यांची नावे अशी –

(१) दुःखम् (२) दुःखसमुदयः (३) दुखःनिरोधः (४) निरोधगामिनी प्रतिपद्.

बुद्धाने या चार सत्यांचा आविष्कार केला अशी जरी समजूत असली, तरी ऐतिहासिक दृष्टीने पाहिल्यास या सत्यांचे उद्‌घाटन बुद्धाच्या पुष्कळ पूर्वी भारतीय अध्यात्मवेत्त्यांनी केलेले दिसून येईल. वरील सत्यांचे क्रमवार निरूपण पुढीलप्रमाणे –

**दुःख** – बुद्ध म्हणतो, ‘ भिक्षूंनो, दुःख हे एक आर्य सत्य आहे. या लोकातील जन्म, जरा, रोग, मृत्यू, अनिष्टसंयोग, इष्टवियोग, इच्छाविघात, या गोष्टी दुःख(मय) आहेत. संक्षेपात सांगायचे, तर रागद्वारा उत्पन्न पाचही स्कंध (रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान) दुःख आहेत. ’

संसार दुःखमय असल्याचा अनुभव सर्वांनाच प्रतिदिनी येत असतो. पण सामान्य किंवा मूढ मनुष्य संसाराचे हे सत्य स्वरूप न जाणता भोगसामग्री मिळविण्यासाठी सतत प्रयास करतो व दुःखातून दुःखच निर्माण करतो. बुद्धाला मात्र त्याच्या दुःखमयतेचा सत्य अनुभव आला. पतंजलीने म्हटले आहे, की ‘ दुःखमेव सर्वं विवेकिनः ’ विवेकी पुरुषाच्या दृष्टीने हा समस्त संसार दुःखच आहे (योगसू. २.१५). बुद्धाची दृष्टीही अशीच आहे.

**दुःखसमुदय** – म्हणजे दुःखोदयाचे कारण. कारणावाचून कार्य उत्पन्न होत नाही. दुःखाचे कारण आहे तृष्णा. ती पौनर्भविक म्हणजे वारंवार उत्पन्न होणारी आहे. ती सर्वत्र आपल्या तृप्तीच्या शोधात असते. कामतृष्णा (इंद्रियसुखाची तृष्णा), भवतृष्णा (जगाची आसक्ती) व विभवतृष्णा (ऐहिक–पारलौकिक वैभवाची तृष्णा) असे तिचे तीन प्रकार आहेत. ही तृष्णाच जगातल्या समस्त विद्रोहांची जननी व समस्त पापकर्मांचे निदान आहे.

**दुःखनिरोध** – निरोध म्हणजे नाश किंवा त्याग. हे तिसरे आर्यसत्य होय. बुद्धाने नुसते दुःखच सांगितले नाही, तर त्याच्या नाशाचा उपायही सांगितला आहे. तो म्हणतो. ‘ तृष्णेचा संपूर्ण त्याग किंवा सम्यक वैराग्य याने दुःखनिरोध होऊ शकतो. तृष्णेच्या नाशाने याच जीवनात पुरुष निर्वाण मिळवू शकतो.’

**निरोधगामिनी प्रतिपद्** – प्रतिपद् म्हणजे मार्ग. दुःखनिरोधापर्यंत पोचविणारा मार्ग हे चौथे आर्यसत्य होय. निर्वाण हे प्रत्येक प्राण्याचे गन्तव्य स्थान आहे. त्याप्रत पोचविणारा हा मार्ग अष्टांगिक आहे. हा मार्ग म्हणजे बौद्धांच्या आचारमीमांसेतले श्रेष्ठ साधन आहे. या मार्गाचा सम्यक अवलंब केल्यास शांती अवश्य प्राप्त होईल, हे बुद्धाच्या उपदेशाचे सार आहे.

बुद्धाने या चार आर्यसत्यांच्या रूपाने आपल्या संदेशाचे सारसर्वस्व जगाला दिले आहे. या आर्यसत्यांना गूढवादाचा यत्किंचितही स्पर्श नाही. सूर्य, समुद्र व आकाश यांचे अस्तित्व आबालवृद्धांना प्रतीत होते. पण त्यांचे परिणाम, गांभीर्य व विशालता केवळ विचारवंतांनाच मननाने समजते. त्याप्रमाणेच बुद्धाच्या गंभीर चिंतनातून ही आर्यसत्ये प्रकट झाली आहेत. [बौ. द. मी.; वै. सं. वि.]

## आर्यसमाज

एक पंथ. याची स्थापना स्वामी दयानंद सरस्वती यांनी १० एप्रिल १८७५ रोजी मुंबई येथे केली. या पंथाची मुख्य तत्त्वे पुढीलप्रमाणे आहेत –

(१) सर्व यथार्थ ज्ञानाचा उगम व सर्व वस्तूंचे आदिकारण परमेश्वर आहे.

(२) ईश्वर हा सच्चिदानंदस्वरूप असून तो अनादी, अनंत, निराकार, निष्कलंक, सर्वशक्तिमान, सर्वसाक्षी, परमन्यायी, कनवाळू, सर्व जगाचा निर्माता, शास्ता व पालक आहे. त्याचेच भजनपूजन करावे.

(३) वेद हे त्या ईश्वराचीच निःश्वसिते होत, यथार्थ ज्ञानाचा

उगम वेदातच असल्यामुळे वेदांचे अध्ययन करणे व करविणे, हे प्रत्येक आर्याचे पवित्र कर्तव्य आहे.

(४) प्रत्येक आर्याने सत्याचा स्वीकार व असत्याचा त्याग करण्याची तयारी दर्शविली पाहिजे.

(५) व्यवहारातील प्रत्येक कृत्य धर्माला अनुसरून केले पाहिजे. प्रत्येक कृत्य करण्यापूर्वी ते नीतिनियमांना धरून असल्याबद्दल खात्री करून घेतली पाहिजे.

(६) मानवाची आधिभौतिक, सामाजिक, आध्यात्मिक, इ. प्रत्येक बाबतीत उन्नती करून मनुष्यजातीचे सर्वांगीण कल्याण साधणे, हाच आर्यसमाजाचा मुख्य उद्देश आहे.

(७) प्रेमाने व न्यायाने वागणे, हे प्रत्येक आर्य व्यक्तीचे कर्तव्य आहे.

(८) अज्ञानाचा नाश करून ज्ञानाचा प्रसार करणे, हे ध्येय असावे.

(९) केवळ स्वतःच्या कल्याणातच समाधान न मानता प्रत्येकाने दुसऱ्याच्या उत्कर्षातच आपला उत्कर्ष आहे, असे मानले पाहिजे.

(१०) सामाजिक कल्याणासाठी प्रत्येकाने वैयक्तिक मतभेद व हेवेदावे विसरून झटले पाहिजे. परंतु खासगी व वैयक्तिक हिताच्या बाबतीत प्रत्येकाला आपल्या मताप्रमाणे वागण्याचे स्वातंत्र्य आहे.

आर्यसमाजाच्या या दहा तत्त्वांपैकी पहिली तीन तत्त्वे धार्मिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाची आहेत. बाकीची तत्त्वे हे केवळ नीतिनियम होत. आर्यसमाजाची पंथतत्त्वे फार थोडी आहेत, हे यावरून समजेल.

स्वामी दयानंदांची वेदांच्या सिद्धांतांविषयी कल्पना पुढीलप्रमाणे आहे –

वेद शब्दाचा अर्थ ज्ञान असा आहे. वेदांतील ज्ञान ईश्वरप्रणीत असल्यामुळे ते शुद्ध व परिपूर्ण आहे. ईश्वरप्रणीत अशा या ग्रंथात सर्व शास्त्रांची मूलतत्त्वे ग्रथित आहेत. जगातील एकंदर तत्त्वांचा आविष्कार ईश्वराने चार वेदांत व सृष्टीत केला आहे. अग्नी, वायू, सूर्य व अंगिरा या चार ऋषींना कोट्यवधी वर्षांपूर्वी जगदुत्पत्तीच्या आरंभी ईश्वराने हे वेद शिकविले. ईश्वराने वेदांतील सिद्धांतांनुसार सृष्टी निर्माण केली.

स्वामी दयानंद म्हणतात, ' मी वेदांकडे स्वयंसिद्ध सत्य म्हणून बघतो. त्यांच्याविषयी माझ्या मनात रतिमात्रही संदेह नाही आणि त्यांचे श्रेष्ठत्व मान्य करताना मी अन्य कुठल्याच ग्रंथांचा आधार घेत नाही ! '

स्वामी दयानंदांनी केवळ चार वेदच प्रमाण मानले. सहा शास्त्रे व अठरा पुराणे त्यांनी कवडीमोल ठरविली. वेदात मूर्तिपूजा, अवतारवाद, तीर्थे, पौराणिक अनुष्ठाने, इ. गोष्टींचा पुरस्कार नाही, म्हणून दयानंदांनी या सर्व गोष्टी मिथ्या मानल्या. केवळ वेद प्रमाण मानण्याची कारणे त्यांनी सांगितली, ती अशी –

(१) वेद हे ईश्वरप्रणीत आहेत; कारण त्यांतील ज्ञानाचा सृष्टिप्रक्रियेशी पूर्ण मेळ आहे.

(२) दुसऱ्या कोणत्याही ग्रंथांतील ज्ञानाचा सृष्टीतील गोष्टींशी इतका मेळ बसत नाही.

(३) वेदग्रंथ हे मानवजातीच्या वैज्ञानिक व पारमार्थिक विचारांचे उगम होत.

अशा प्रकारची तत्त्वप्रणाली स्वीकारून आर्यसमाजाने भारताला पुनश्च वैदिक मार्गावर नेणे व सर्व जगाला वैदिक धर्म शिकविणे, ही दोन आपली परमश्रेष्ठ कर्तव्ये मानिली. या तत्त्वांना अनुसरून आर्यसमाजाने वेदांच्या उद्धाराचे व प्रचाराचे कार्य हिरिरीने चालू केले. त्याबरोबरच दयानंद स्वामींनी देशात एक नवा अंधविश्वास निर्माण केला, असेही म्हणावे लागते. याविषयी श्री. दिनकर म्हणतात –

' दयानंदांच्या पूर्वीही वेद हे हिंदूंना प्रमाण होते व आजही आहेत. पण दयानंदांचा वेदांविषयी अभिनिवेश असा, की वेदात केवळ धार्मिक गोष्टीच आहेत असे नव्हे; तर विज्ञानही प्रच्छन्नपणे भरलेले आहे. पण या त्यांच्या अभिनिवेशामुळे शास्त्रीय जिज्ञासेला खीळ पडली. याचा परिणाम असा झाला, की भारतात वेद व आर्य या दोहोंनाच अवास्तव महत्त्व प्राप्त झाले. इतिहासकारांचीही अशी धारणा झाली, की भारताची सभ्यता व संस्कृती वैदिक आर्यांनीच निर्माण केली आहे. भारतात अनेक जातींचा जो सांस्कृतिक समन्वय झाला होता, त्याकडे त्या काळात सर्वांनी दुर्लक्ष केले. द. भारतातील हिंदूंचा संस्कृतीच्या जडणघडणीतील न्याय्य वाटा नाकारला गेला. त्यामुळेच द. भारतात आर्यविरोधी वातावरण निर्माण झाले.

आर्यसमाजाच्या धारणेतील हा एक मोठा दोष खरा; पण त्या काळात या समाजाने हिंदुत्वाची ध्वजा फडकत ठेवली. त्याने आपल्या आक्रमक प्रचाराने सारा हिंदी प्रांत भारून टाकला. आर्यसमाजाच्या प्रभावात सापडलेल्या कित्येक हिंदूंनी मूर्तिपूजा सोडून दिली. पुष्कळांनी घरातल्या देव-देवतांच्या प्रतिमा छिन्नविच्छिन्न करून फेकून दिल्या. बहुतेकांनी श्राद्धे बंद केली व पुरोहितांनाही रजा दिली. जे विधियुक्त आर्यसमाजी बनले नाहीत, त्यांचाही शास्त्रे व पुराणे यांच्यावरचा विश्वास डळमळला. राम-कृष्ण हे ईश्वराचे अवतार आहेत की नाहीत, असाही भ्रम त्यांच्या मनात निर्माण झाला.

आर्यसमाजाने वर्ण जन्मजात न मानता ते कर्माप्रमाणे मानले. आर्यसमाजी कोणत्याही जातीला अस्पृश्य मानीत नाहीत व सर्वांना

वेदाध्ययनाचा अधिकार देतात. आर्यसमाजाने प्रारंभी मूर्तिपूजेविरुद्ध बंड उभारले खरे; पण पुढे त्यांनी त्या बाबतीतला अभिनिवेश सोडून दिला. त्यांनी हिंदुसंस्कृतीविषयी अनेक पुस्तके लिहिली व लोकांत त्यांचा प्रसार केला. सुरुवातीला विरोधी मतांचे खंडन करण्यात त्यांचा बराचसा काळ गेला असला, तरी पुढे त्यांनी विधायक कार्ये उभारायला सुरुवात केली. उ. भारतातील प्रमुख ठिकाणी त्यांनी गुरुकुले, शाळा, विश्वविद्यालये, अनाथालये, विधवाश्रम, वगैरे अनेक संस्था स्थापन केल्या. आजही त्यांचे कार्य व्यवस्थित चालू आहे. सिंध, पंजाब व वायव्य प्रदेश, या भागांत आर्यसमाजाचे कार्य विशेष आहे.

हिंदुधर्मातली अवतारकल्पना त्यांना मान्य नाही. रामकृष्णादिकांना ते ईश्वर मानीत नसून पुरुषविशेष मानतात. निरनिराळ्या धर्मांत प्रतिपादिलेले पापक्षमेचे तत्त्वही आर्यसमाजाला मान्य नाही. ईश्वराने पापी लोकांना पापाबद्दल क्षमा केली, तर लोक निर्भयपणे पाप आचरीत राहतील, अशी त्यांची विचारसरणी आहे.

आर्यसमाजाने जीव, प्रकृती, व ब्रह्म ही तीन तत्त्वे भिन्न भिन्न मानली आहेत. दुःखाचा आत्यंतिक विध्वंस म्हणजे मोक्ष, अशी त्यांची मोक्षाविषयीची कल्पना आहे. मुक्ती मिळाल्यावर जीव ब्रह्मानंदाचा उपभोग घेतो; पण महाकल्पानंतर पुनश्च तो संसारात येतो, असे मुंडकोनिषदाचा हवाला देऊन 'सत्यार्थप्रकाशा'त सांगितले आहे. मोक्ष मिळविणे हेच प्रत्येकाचे ध्येय असून ते प्रत्येकाने स्वप्रयत्नाने मिळविले पाहिजे. मोक्षाची पूर्ण तयारी करता यावी, म्हणूनच ईश्वराने पुनर्जन्माची योजना केलेली आहे. तथापि असे असले, तरी ईश्वराची सत्ता मर्यादित आहे.

**विवाहप्रथा** – आर्यसमाजाने प्रौढ विवाह प्रशस्त मानलेला आहे. सोळा वर्षांच्या आत मुलीचे व पंचवीस वर्षांच्या आत मुलाचे लग्न करू नये, असा त्यांचा नियम आहे. आर्यसमाजाचा लग्नविधी पुढीलप्रमाणे होतो –

प्रथम एक घटिका रात्र झाल्यानंतर वधू-वर सुवासिक जलाने स्नान करतात व वस्त्रालंकार लेवून यज्ञशाळेत येतात. नंतर समंत्रक आचमन व मार्जन करून परमेश्वराची प्रार्थना करतात. त्यानंतर स्वस्तिवाचन, शांती, अग्न्याधान, समिधाधान ही कर्मे होतात. अग्नीत वेदमंत्रांनी आज्याहुती देतात. वराचा मधुपर्कादी सत्कार झाल्यावर गोत्र-प्रवरांचा उच्चार करून वधूपिता कन्यादान करतो. वधू-वर नवीन वस्त्रे परिधान करून व यज्ञशाळेतील ऋत्विजांपुढे 'आम्ही परस्परांचा स्वीकार करीत आहो,' असा उच्चार करून यज्ञकुंडाला प्रदक्षिणा घालतात. नंतर निरनिराळे होम करून वधू-वर एकमेकांना गृहस्थाश्रमाला उपयुक्त अशी समंत्रक अभिवचने देतात. वर वधूचे पाणिग्रहण करतो व नंतर अश्मारोहण, लाजाहोम, सप्तपदी, इ. विधी होतात. त्यानंतर वधूगृहाच्या ईशान्येला मुद्दाम एक घर करून ठेवलेले असते, तिथे जाऊन उत्तरविधी करतात. सूर्यास्तानंतर नक्षत्रे दिसू लागल्यावर पुनश्च अग्निकार्य करून ध्रुव व अरुंधती यांचे दर्शन घेतात. मग अग्नीवर स्थालीपाक करतात व दोघेही त्यातला थोडा थोडा भात खातात. नंतर सामवेदाचे गायन होते व भोजनसमारंभ झाल्यावर वरात निघते.

आर्यसमाजाला 'नियोग'पद्धती मान्य आहे. वंश चालविण्यासाठी पुरुषसंतती निर्माण करणे व कामविकार अनावर झाल्यास त्याच्या उपशमासाठी नीतियुक्त मार्ग उपलब्ध करून देणे आणि अशा प्रकारे व्यभिचार व जारकर्म यांना पायबंद घालणे, हे उद्देश मनात धरून, दयानंदांनी नियोग धर्म्य ठरविला आहे. विवाहाप्रमाणे नियोगही सार्वजनिक विधिपूर्वक आचरावा, असे सत्यार्थप्रकाशात म्हटले आहे.

नियोग केव्हा अनुसरावा, त्याबाबत त्यांनी काही नियम घालून दिले आहेत, ते असे –

आर्यसमाज पति-पत्नींना किंवा विधवा व विधुर यांना खालील नियमांनुसार नियोगसंबंध करण्यास परवानगी देत आहे –

(१) जेव्हा पती किंवा पत्नी, रोग किंवा इतर काही कारणांमुळे प्रजोत्पादनास असमर्थ असेल,

(२) जेव्हा पती काही धार्मिक कारणांकरिता, अध्ययनाकरिता, किंवा द्रव्यार्जनाकरिता काही ठराविक काळ घर सोडून गेलेला असेल,

(३) जेव्हा पती किंवा पत्नी त्रासदायक किंवा कटू भाषण करणारी असतील,

(४) जेव्हा पत्नी वंध्या असेल, किंवा विवाह झाल्यावर आठ वर्षांत मूल झाले नसेल,

(५) जेव्हा झालेली सर्व मुले अल्पायुषी असतील.

(६) जेव्हा पत्नीला सगळ्या मुलीच झाल्या असतील,

(७) जर आणि जेव्हा पत्नी गर्भवती किंवा सतत आजारी असेल किंवा नवरा आजारी असेल आणि दोघांपैकी एकाला भर ज्वानीमुळे काम आवरणे शक्य नसेल, तर नियोग आचरयला हरकत नाही.

दयानंदांचे हे नियोगतत्त्व आक्षेपार्ह आहे. परंतु सुदैवाने आर्यसमाजाच्या अनुयायांना हे तत्त्व अंमलात आणण्याचे धाडस झाले नाही.

हिंदूंचे सोळा संस्कार आर्यसमाजाला मान्य आहेत; मात्र त्यांचे वेदकालीन साधे स्वरूप तेवढेच त्यांनी स्वीकारले आहे. याशिवाय, प्रत्येक आर्यसमाजी पुरुषाने पुढील पंचमहायज्ञ अवश्य

केले पाहिजेत, अशी समाजाची सर्व अनुयायांना आज्ञा आहे —

(१) ब्रह्मयज्ञ — संध्या व नियमित काही वेदपठण.

(२) देवयज्ञ — अग्नीला आहुती देणे.

(३) पितृयज्ञ — वडीलधाऱ्यांची सेवा.

(४) अतिथियज्ञ — विद्वान अतिथीला किंवा संन्याशाला भोजन देणे.

(५) बलियज्ञ — अंध, पंगू, अनाथ व पशु-पक्षी यांना अल्प-स्वल्प अन्न देणे.

इ. स. १८८३ मध्ये स्वामी दयानंद मृत्यू पावल्यावर आर्यसमाजाच्या अनुयायांत फूट पडून त्याच्या दोन शाखा झाल्या. मांसाहार व उच्च शिक्षण हे या दोन शाखांतील मतभेदाचे मुद्दे होते. यांपैकी ज्या लोकांनी मांसाहाराचा पुरस्कार केला, त्यांना मांसाहारी व इतरांना शाकाहारी अशी नावे मिळाली. त्याचप्रमाणे ज्यांनी महाविद्यालयीन शिक्षणाला मान्यता दिली, त्यांना महाविद्यालयपक्ष व इतरांना महात्मापक्ष किंवा पुराणवादीपक्ष अशी नावे पडली.

आर्यसमाजाच्या स्थानिक, प्रांतीय व अखिल भारतीय, अशा स्वरूपाच्या एकूण तीन सभा आहेत. आर्यसमाजाच्या दहा तत्त्वांवर श्रद्धा असणारे, दयानंदांनी वेदांचा अर्थ लावण्याकरिता ठरविलेल्या नियमांवर विश्वास ठेवणारे, आपल्या उत्पन्नाचा शतांश 'सभासदशुल्क' म्हणून देणारे व सभेला नियमित हजर राहणारे लोक, हे समाजाचे सभासद होऊ शकतात.

आर्यसमाजाची धार्मिक उपासना आठवड्यातून एकदा दर रविवारी सकाळी होते. ती सुमारे तीन-चार तास चालते. व्यासपीठाजवळ वैदिक अग्नीची वेदी असते. त्या अग्नीला समंत्रक आहुती देऊन मग उपासनेला प्रारंभ करतात. स्वामी दयानंदांची प्रार्थनापर पद्ये म्हणणे, प्रवचन ऐकणे, व शेवटी आर्यसमाजाच्या तत्त्वांचा उच्चार करणे, एवढा भाग उपासनेत येतो.

आर्यसमाजाची काम करण्याची पद्धती मिशनऱ्यांसारखी आहे. त्यांची उदारमतवादीशाखा शिक्षणाकडे व महात्माशाखा उपदेशात्मक कार्याकडे विशेष लक्ष देते. आर्यसमाजाची शुद्धिविषयक चळवळ ही सर्वांत महत्त्वाची कामगिरी होय. ही कामगिरी व्यापक असून तिचे तीन प्रकार आहेत —

(१) अहिंदू लोकांना हिंदू धर्माची दीक्षा देऊन आर्यसमाजात सामील करून घेणे.

(२) मुळात हिंदू असून परधर्माचा स्वीकार केलेल्या, पण पुन्हा स्वधर्मात प्रवेश करू इच्छिणाऱ्या लोकांना शुद्ध करून घेणे.

(३) मागसलेल्या व अस्पृश्य मानल्या जाणाऱ्या जातींना शिक्षण देऊन त्यांचा उद्धार करणे व त्यांना समान दर्जा देणे.

आर्यसमाजाने विशेषतः या मागसलेल्या जातींच्या उद्धारासाठी फार परिश्रम केले आहेत. ज्या जातींना यज्ञोपवीत धारण करण्याचा अधिकार नव्हता, त्यांना तो देऊन त्यांचे द्विजत्व त्यांनी मान्य केले व त्यांना शिक्षण देऊन त्यांची नैतिक व धार्मिक उन्नती होण्यास मदत केली.

इ. स. १९२१ साली मलबारात मोपला मुसलमानांनी भयानक बंड केले व असंख्य हिंदूंना जबरदस्तीने मुसलमान बनविले. त्या संकटकाळी आर्यसमाजी लोक धैर्याने मलबारात गेले व सुमारे अडीच हजार भ्रष्ट हिंदू कुटुंबांना त्यांनी पुनश्च हिंदू धर्मात आणले. यानंतर राजस्थानातील मलकाना राजपुतांचे शुद्धीकरण केले. इ. स. १९३७ साली आर्यसमाजाने पुन्हा एकदा आपल्या अंगच्या धैर्याचा लोकांना प्रत्यय आणून दिला. हैदराबादच्या निजामसरकारने आपल्या राज्यात आर्यसमाजाच्या प्रचाराला बंदी केली असता या बंदीविरुद्ध त्यांनी सत्याग्रहाचे शस्त्र उपसले व बारा हजार लोकांनी त्या कामी बंदिवास पत्करला.

ख्रिस्ती व इस्लाम या दोन धर्मांच्या आक्रमणांपासून हिंदू धर्माचे रक्षण करण्यासाठी आर्यसमाजाने जितक्या संकटांना तोंड दिले आहे, तितक्यांना अन्य कोणत्याच संस्थेने दिलेले नाही. खऱ्या अर्थाने उत्तर भारतातील हिंदूंना जागे करून त्यांना प्रगतिशील करण्याचे सारे श्रेय आर्यसमाजालाच आहे.

स्वामी दयानंदांनी चैत्र शु. प्रतिपदा संवत १९३२ (१० एप्रिल १८७५) या दिवशी मुंबई येथे आर्यसमाजाची स्थापना केली. प्रत्येक वर्षप्रतिपदेला आर्यसमाजी लोक हा स्थापनादिन साजरा करतात. या दिवशी प्रत्येक आर्यसमाजी आपल्या घराची साफसफाई करतो व स्वदेशी वस्त्र परिधान करतो. नंतर वैदिक मंत्रांनी होमहवन करतो. त्या दिवशी आर्यसमाजी लोकांची एक सभा भरते व त्या सभेत समाजाची वर्तमानस्थिती व पूर्व-इतिहास यांबद्दल माहिती दिली जाते. [ म. ज्ञा. को.; सं. चा. अ.; वि. ध. द.; ल. वि. सो.; व्रत चंद्रिका ]

## आर्या

**आर्या** हा एक मराठी पद्यरचनाप्रकार आहे. आर्या ही प्राकृत गाथेवरून विकास पावली आहे. प्राकृतात ज्याप्रमाणे प्रबंधांची किंवा महाकाव्यांची रचना खूप झाली, त्याप्रमाणेच स्फुट मुक्तकरचनाही पुष्कळ झाली. त्यात हालाच्या 'गाहासत्तसई' चे स्थान वरचे आहे. ही हालाने संग्रहीत केलेली गाथारचना महाराष्ट्रात फार रूढ होती. पुढे त्या गाथेचाच गीतिप्रकार आर्या या नावाने महाराष्ट्रात फार लोकप्रिय झाला. या गाथेचे सुसंस्कृत रूप म्हणजे मूळ आर्या होय. गाथे-

तील अंत्य चरणातील दिडकेपणा, तीन मात्रांची कूस भरून काढून घालविल्यावर त्याची गीती बनली. तीच मराठीतील मोरोपंती आर्या होय. या गीती (आर्या) च्या समचरणांत एकेक द्विमात्रक अधिक वाढवून त्याची आर्यागीती झाली.

मोरोपंतांनी गीतीचा उपयोग लोकप्रिय केला व तिलाच आर्या हे नाव दिले. आर्येचे गायन कीर्तनप्रसंगी होत असता विषम चरणान्ती चार मात्रांची कूस व समचरणान्ती सहा मात्रांची कूस भरून काढावी लागते व ती तानेने पूरक मात्रा घेऊन भरून काढतात. तसे केल्याने आर्या मृदंगाच्या किंवा तवल्याच्या ठेक्यात पूर्णपणे बसते. आर्येतील मात्रिक आवर्तने अष्टमात्रक पद्मावर्तने असतात. मात्र दुसऱ्या व चौथ्या चरणांत नववी मात्रा लघुअक्षरयुक्त असावी व तिथे शक्यतो 'ज' गण असावा, अशी रूढी पडलेली आहे.

मराठी भाषेतील काव्य हे मुळारंभी मुख्यत: ओवी या छंदात अवतीर्ण झाले. नामदेव-तुकारामादी भगवद्भक्तांनी अभंगाचा स्वीकार केला व पंडित कवी अक्षरगणवृत्तांना अनुसरले. या दीर्घ काळात, हाताच्या बोटांवर मोजण्याजोगे अपवाद सोडले, तर गीती हे वृत्त अभावानेच दिसते. कालिदासादी महाकवींच्या संस्कृत काव्यांतही गीती वृत्त दिसत नाही. व संस्कृत नाटके सोडली, तर आर्यावृत्तही क्वचितच दिसते. तथापि जगन्नाथ पंडिताने मात्र गीती वृत्ताचा काहीसा उपयोग केलेला दिसतो. मोरोपंतांकडे असलेल्या हस्तलिखित ग्रंथांची जी यादी पांगारकरांनी मोरोपंतचरित्रात दिली आहे, तीत जगन्नाथ पंडिताच्या अश्वधाटी व भामिनीविलास या ग्रंथांचे उल्लेख आहेत. त्यामुळे गीतिवृत्त उचलण्याची कल्पना पंतांच्या मनात जगन्नाथ पंडिताकडून आली असावी, असे वाटते. 'श्रुतबोध' या संस्कृत वृत्तदर्पणात गीती वृत्ताचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे–

आर्यापूर्वार्धसमं द्वितीयमपि यत्र भवति हंसगते ।
छन्दोविदस्तदानीं गीतिंताममृतवाणि भाषन्ते ।।

अर्थ–ज्या कवितेत आर्येच्या पूर्वार्धाप्रमाणेच उत्तरार्धही असते, तिला छंदोवेत्ते गीती म्हणतात.

आर्येचे दोन नमुने पुढीलप्रमाणे आहेत–

आर्यां आर्यांसि रुचे ईच्या ठायीं जशी असे गोडी ।
आहे इतरां छंदीं गोडी, परि यापरीस ती थोडी ।।
(भीष्मभक्तिभाग्य १.१०)

आर्या देखुनि सज्जन चित्तीं होतील फार सानंद ।
मंदाज्ञानिच सरतिल मागे कीं ठाउकें नसे छंद ।।
(भगवद्गीता–आर्याटीका)

पंतकाली व पंतोत्तर शंभर-दीडशे वर्षे सर्व मराठी कीर्तनकार आर्येचा मोठ्या प्रमाणात उपयोग करीत. [ श्री. रा. टि. ढेरे; मराठी छंदोरचना ]

**आर्यावर्त** आर्यांच्या वसाहतीला पूर्वी आर्यावर्त अशी संज्ञा होती. ऋग्वेदकाळी आर्यांची वस्ती सप्तसिंधूंच्या प्रदेशात म्हणजे वायव्य सरहद्द प्रांत व पंजाब या प्रदेशात होती. ऋग्वेदातील नदीसूक्तात सप्तसिंधूंच्या प्रदेशात कुभा (काबूल नदी), क्रुमू (कुर्रम), गोमती (गोमल), सिंधू, परुष्णी (रावी), शुतुद्री (सतलज), वितस्ता (झेलम), सरस्वती, यमुना व गंगा या प्रमुख नद्या वाहत होत्या, असे सांगितले आहे (१०.७५). वैदिक आर्य ज्या प्रदेशात राहत होते, त्या प्रदेशाच्या सीमा या नद्यांनी दर्शविलेल्या आहेत. पुढे हळूहळू आर्य सप्तसिंधूंच्या प्रदेशातून पूर्वेकडे व दक्षिणेकडे सरकू लागले. नंतरच्या काळात कुरुपांचाल व कोसलविदेह हे देश आर्यांचे सांस्कृतिक केंद्र बनले. ब्राह्मणग्रंथांची निर्मिती याच प्रदेशात झाली. अनेक यज्ञयाग याच प्रदेशात झाले, त्यावरून या प्रदेशाला 'प्रजापतीची नाभी' असे म्हणू लागले. कुरुपांचालांतील भाषा अतिशय उत्तम आहे, असे शतपथ ब्राह्मणात सांगितले आहे. उपनिषदांच्या काळात आर्यांची संस्कृती पूर्वेला काशीपासून विदेह जनपदापर्यंत फैलावली. म्हणजे पंजाबपासून तो मिथिलेपर्यंत आर्यांची वसाहत वाढली, असा त्याचा अर्थ होतो.

धर्मसूत्रांच्या काळात मात्र आर्यावर्ताच्या सीमेबद्दल बरेच मतभेद दिसतात. वासिष्ठ धर्मसूत्रांत आर्यावर्ताची व्याख्या पुढीलप्रमाणे दिली (१.८–९) आहे–

आर्यावर्तः प्रागादर्शात् प्रत्यक् कालकवनादुदक् ।
पारियात्राद्दक्षिणेन हिमवतः उत्तरेण च विन्ध्यस्य ।

अर्थ–सरस्वती नदी जिथे गुप्त झाली, त्या प्रदेशाच्या पूर्वेला, कालकवनाच्या पश्चिमेला, पारियात्र व विंध्य या पर्वतांच्या उत्तरेला व हिमालयाच्या दक्षिणेला आर्यावर्त देश पसरलेला आहे.

याशिवाय वसिष्ठाने आर्यावर्ताच्या सीमेविषयी आणखी दोन मते उद्धृत केली (१.१२–१३) आहेत–

गङ्गायमुनयोरन्तरेप्येके । यावद्वा कृष्णमृगो विचरति
तावद् ब्रह्मवर्चसमित्यन्ये ।

अर्थ– गंगा व यमुनांच्या दुआबामधला प्रदेश म्हणजे आर्यावर्त देश, किंवा ज्या प्रदेशात कृष्णमृग अनिर्बंध संचार करतो तो प्रदेश यज्ञिय असतो व तोच आर्यावर्त देश होय.

बौधायनाने आपल्या धर्मसूत्रांत आर्यावर्ताच्या सीमा वासिष्ठ धर्मसूत्राप्रमाणेच दिल्या आहेत. मात्र त्याने 'आदर्श' ऐवजी 'विनशन' शब्द योजला आहे. आदर्श व विनशन ही दोन

नावे एकाच प्रदेशाची असली पाहिजेत. कारण 'विनशनक्षेत्री सरस्वती गुप्त झाली' असे वनपर्वात सांगितले आहे.

मनूची (२.२२) आर्यावर्तविषयक व्याख्या अशी –

आसमुद्रात्तु वै पूर्वादासमुद्रात्तु पश्चिमात् ।
तयोरेवान्तरं गिर्योरार्यावर्तं विदुर्बुधाः ॥

अर्थ – हिमालय व विंध्य या पर्वतांच्या मधला व पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत पसरलेला प्रदेश तो आर्यावर्त होय.

वसिष्ठाचा आर्यावर्त व मनूचा मध्यदेश हे दोन्ही प्रदेश एकच होत. यांतील ब्रह्मावर्त नावाचा एक लहान व पवित्र प्रदेश सरस्वती व दृशद्वती या दोन नद्यांच्या मध्ये असून यातील परंपरागत आचार हा सदाचार म्हणून प्रसिद्ध आहे. आर्यावर्ताच्या याच सीमा असून याच्या बाहेरील प्रदेशांना म्लेच्छ देश असे नाव होते व त्या देशात यात्रेशिवाय अन्य कारणाकरिता गेल्यास प्रायश्चित्त घेणे किंवा इष्टी करणे या गोष्टी




आर्यावर्त

प्राचीन काळी विंध्याच्या दक्षिणेकडील प्रदेश हा आर्यसंस्कृतीच्या कक्षेबाहेरचा होता, हे यावरून समजेल.

वसिष्ठ ज्या प्रदेशाला आर्यावर्त म्हणतो, त्याच प्रदेशाला मनू मध्यदेश म्हणतो (२.२१). वसिष्ठाने आर्यावर्ताची पूर्वेकडील सीमा कालकवन सांगितली असून मनूने मध्यदेशाची पूर्वेकडील सीमा प्रयाग असल्याचे म्हटले आहे. परंतु कालकवन व प्रयाग या दोहोंचाही अभिप्राय एकच आहे. प्राचीन काळी प्रयागच्या जवळच एक मोठे वन होते, असे वाल्मीकिरामायणात सांगितले आहे (अयोध्याकांड ५४.५५). म्हणजे आवश्यक होत्या. पूर्वेला अंग, वंग, कलिंग व पश्चिमेला सिंधू, सौवीर, इ. देशांत गेल्यास पुनस्तोम किंवा सर्वपृष्ठ यज्ञ करावा, असे बौधायन सांगतो (बौ. ध. सू. १.१.२९-३०). यावरून हे स्पष्ट होते, की बौधायनाच्या काळी हे देश आर्यावर्ताच्या बाहेर मानले जात होते.

तत्कालीन ब्राह्मणवर्गाच्या धार्मिक उत्साहामुळे आर्यांची संस्कृती ज्या अनेक देशांत पसरली, त्या देशांचाही अंतर्भाव आर्यावर्तात करणे वस्तुतः योग्य आहे. मेधातिथीने याबाबत आपले मत पुढीलप्रमाणे व्यक्त केले आहे –

'ज्या देशात सदाचारी क्षत्रिय राजा म्लेच्छांना जिंकून त्या देशात चातुर्वर्ण्याची स्थापना करील, तो देश यज्ञिय होईल. कारण पृथ्वी स्वतः अपवित्र नाही; तर अपवित्र माणसांच्या संसर्गाने ती दूषित होते '(मनु. २.२३ वर मेधातिथिभाष्य). जिंकलेल्या देशांना अशा प्रकारे आर्यावर्तात स्थान द्यावे, असे मेधातिथीचे मत आहे. कारण कालाच्या ओघात संस्कृतीची केंद्रे बदलून जातात. जुन्या केंद्रांची जागा नवीन केंद्रे घेतात व जुनी केंद्रे पुष्कळदा संस्कृतिहीन बनतात. उदा० पंजाब हे प्राचीन काळी वैदिक आर्यांचे संस्कृतिस्थान होते; परंतु महाभारतकाळी यवनांच्या वर्चस्वामुळे पंजाब प्रांत आचारहीन बनला, असे कळते. तेथील रहिवासी धर्मबाह्य व अपवित्र वर्तन करणारे असल्यामुळे ते स्थान दोन दिवस राहण्याच्या योग्यतेचे सुद्धा नाही, असे कर्णपर्वात सांगितले आहे (४३.५–८). आर्यावर्ताबद्दल वैदिक ऋषी व स्मृतिसूत्रकार यांना प्रेम, आदर व अभिमान वाटत होता. आर्यावर्तातली संस्कृती व जीवनपद्धती ही सर्व जगात श्रेष्ठ आहे, अशी त्यांची धारणा होती. मनू (२.२०) म्हणतो –

एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः ।
स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः ।

अर्थ – या देशात जन्मलेल्या ब्राह्मणांकडून पृथ्वीवरील सर्व मानवांनी आपापले धार्मिक व नैतिक आचरण शिकावे. [ इं. इ.; हि. ध. ; हिं. वि. को. ]

## आर्यासप्तशती

हालाच्या गाथासप्तशतीचे अनुकरण करून ७०० आर्यांचा हा ग्रंथ गोवर्धन कवीने रचला. हा कवी बंगालचा अंतिम राजा लक्ष्मणसेन (इ. स. ११२६) याच्या दरबारात होता. याची रचना अलंकारप्रचुर व वक्रोक्तिपूर्ण असून, ग्रंथात शृंगाररसाला प्राधान्य दिलेले आहे. स्वतःच्या आर्यांचे त्याने पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे –

मसृणपदरीतिगतयः सज्जनहृदयाभिसारिकाः सुरसाः ।
मदनाद्वयोपनिषदो विशदा गोवर्धनस्यार्याः ॥

अर्थ – कोमल पदन्यासाची गती असलेल्या, सज्जनांच्या हृदयाशी अभिसार करणाऱ्या, रसयुक्त, शृंगारसाध्य अद्वैताची उपनिषदे असलेल्या आणि सुस्पष्ट अशा (या) गोवर्धनाच्या आर्या आहेत.

शृंगाराच्या विविध अवस्थांचे यांत मनोहर वर्णन केलेले असून संयोग-वियोगसमयी स्त्रीहृदयाची होणारी घालमेल, त्याने मार्मिकपणे रंगविली आहे –

अपमानितमिव सम्प्रति गुरुणा ग्रीष्मेण दुर्बलं शैत्यम् ।
स्नानोत्सुकतरुणीस्तनकलशनिबद्धं पयो विशति ॥

अर्थ – कडक उन्हाळ्याने जणू अपमानित केलेले बिचारे शैत्य स्नानोत्सुक तरुणीच्या स्तनरूपी कलशांत असलेल्या पयात शिरून बसले आहे.

सा सर्वथैव रक्ता रागं गुञ्जेव न तु मुखे वहति ।
वचनपटोस्तव रागः केवलमास्ये शुकस्येव ॥

अर्थ – ती गुंजेप्रमाणे अनुरक्त आहे. तिच्या केवळ मुखावरच राग नाही. वाक्पटू असा तुझा अनुराग मात्र पोपटाप्रमाणे केवळ मुखावरच आहे. [ सं. सा. सो. इ. ]

## आर्षविवाह

विवाहाचा एक प्रकार. याचे लक्षण मनुस्मृतीत पुढीलप्रमाणे दिले आहे (मनु. ३.२९) –

एकं गोमिथुनं द्वे वा वरादादाय धर्मतः ।
कन्याप्रदानं विधिवदार्षो धर्मः स उच्यते ॥

अर्थ—स्वतःच्या यागादिसिद्धीसाठी वराकडून एक किंवा दोन गायी-बैलांच्या जोडया घेऊन वराला विधियुक्त कन्यादान करणे, याला आर्ष विवाह म्हणतात.

हा विवाहप्रकार निकृष्ट गणला गेला आहे. आपल्या यागात दूधदुभते मिळावे यासाठी गायी-बैलांची जोडी आपल्या मुलाकडून न घेता ती भावी जावयाकडून घेणे, ही गोष्ट चमत्कारिक दिसते. वधूपित्याला द्रव्य देऊन कन्या मिळविली काय किंवा गाय-बैल देऊन ती मिळविली काय; दोन्ही गोष्टी तत्त्वतः सारख्याच आहेत. त्यामुळे हा विवाह आसुरविवाह या सदरात घालावा, असे काही शास्त्रकारांचे मत आहे. दुसरे शास्त्रकार मानतात, की गाय-बैल हे काही मुलीचे शुल्क (देज) नव्हे. शुल्कच म्हणायचे, तर प्राचीन काळी कन्याशुल्क घेण्याची जी पद्धती होती, तिचा हा अवशेष आहे, असे फार तर मानावे. [ पो. वी. हिं. सि.; हि. ध. ]

## आर्षेय उपनिषद

एक गौण उपनिषद. विश्वामित्र, जमदग्नी, भरद्वाज, गौतम व वसिष्ठ यांच्या परस्पर विचारांतून हे उपनिषद निर्माण झाले. यात ब्रह्म हे दूरही नाही, जवळही नाही व त्याचे महिमान कोणालाही कळणार नाही, असे सांगितले आहे. यात पुंड्र, सुह्म, कुलुंभ, दरद व बर्बर या लोकांचा उल्लेख आला आहे.

## आर्षेय ब्राह्मण

सामवेदाचे चौथे ब्राह्मण. यज्ञांत जी सामे म्हणतात, त्यांचे ऋषि-दैवत-छंद माहीत नसले तर दोष घडतो, या समजुतीने प्रत्येक सामाचा ऋषी, छंद व देवता या ब्राह्मणात सांगितल्या आहेत. या ब्राह्मणग्रंथाचे अध्ययन करणाऱ्याला गायत्र, गेय, आरण्य व महानाम्न या

सामांची नावे यथाक्रम कळून येतात. ऊह व ऊह्य सामगाना-संबंधीचीही माहिती यात दिली आहे. कोणती विशिष्ट सामे कोणत्या स्वरांत आरंभ करून गावी, याविषयीचीही थोडी माहिती या ब्राह्मणात सांगितली आहे. याचे तीन प्रपाठक व आठ खंडे आहेत. सामगायकांच्या प्रारंभिक प्रचारक ऋषींचे यात वर्णन असल्यामुळे या ग्रंथाला ऐतिहासिक दृष्टीनेही महत्त्व आहे. [ वै. सा. सं.; हिंदुत्व ]

**आलकरी** मुख्यत: खानदेशात वसलेली एक जात. हे लोक आपणांस राजपूत म्हणवून घेतात. हे अळित्याच्या झाडापासून रंग तयार करून उपजीविका करीत, म्हणून यांना आलकरी हे नाव पडले. यांना श्रावगी व गोलालारे असेही म्हणतात. यांचे पाच पोटभेद आहेत.

**विवाहप्रथा** – आते-मामे-मावस अशा तीन्ही प्रकारच्या बहिणींशी लग्ने होत नाहीत. लग्नात माणकस्तंभ रोवून त्याची पूजा करतात. एकाच कुलात त्याचप्रमाणे इतर नातलगात लग्ने होत नाहीत. सख्ख्या बहिणी सख्ख्या जावा होऊ शकतात. पाच पिढ्यांच्या आत लग्नसंबंध करीत नाहीत. अनेक बायका करण्याची मोकळीक आहे. विधवाविवाह व घटस्फोट रूढ आहे. प्रथमवराला विधवेशी लग्न करायचे असल्यास प्रथम त्याचे अंगठीशी लग्न लावतात.

आलकरी शिवोपासक आहेत. चितोडची भवानी ही त्यांची कुलदेवता आहे. विवाहित मृतांना जाळतात व अविवाहित मृतांना पुरतात. पितरांचे श्राद्ध करतात. आकस्मिक मृत्यू आल्यास मृताच्या स्मरणार्थ वीरांची स्थापना करतात. यांना मद्य-मांस चालते. [ म. ज्ञा. को. ]

**आलम** (इ. स. चे १७ वे शतक) अवधी भाषेचा एक कवी. 'माधवानल-कामकंदला' या काव्याचा कर्ता. अकबराचा अर्थमंत्री तोडरमल याने या कवीला आश्रय दिला होता. आलमच्या काव्याची अवधी भाषा संस्कृतप्रचुर, परिष्कृत व प्रवाही आहे. उदाहरणार्थ –

नृत्य गीत विद्या चतुराई । गई बिसरी गुन की अतुराई ।
बदन मलीन पीतरंग भयऊ । रकत माँस सूखि सब गयऊ ।
राजा बोलति मीठे बैना । बिरहिनि नारि न जोरै नैना ।
राजा बोलहि उतर नहीं देई । बरुनी छूटि नैन भरि लेई ।।

अर्थ – (या) विरहिणीला नृत्य, गीत, विद्या, चातुर्य, या गुणांचा विसर पडला आहे. रक्त, मांस सगळे सुकून गेल्याने चेहरा पिवळा पडला आहे, म्लान झाला आहे. तिच्याशी राजा अतिशय गोड भाषण करतो आहे; परंतु विरहिणी स्त्री ह्याच्या डोळ्याला डोळाही देत नाही. राजा बोलतो आहे; परंतु ती उत्तरही देत नाही. तिच्या पापण्या विलग झालेल्या आहेत आणि आसवांनी डोळे भरून आले आहेत.

या नावाचा दुसराही एक कवी असून, त्याने, आलम-केली नामक ग्रंथ रचला आहे. [ अ. उ. सा. ]

**आलमपूर** आंध्र प्रदेशात मेहबूबनगर जिल्ह्यात, तुंगभद्रेच्या तीरावर वसलेले एक प्राचीन तीर्थक्षेत्र. कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांचा संगम जवळच आहे. या क्षेत्राला दक्षिण काशी असेही म्हणतात. स्थलपुराणात याला हेमलापुरी हे नामाभिधान दिलेले असून, तीच काशी असे म्हटले आहे. इथे मंदिरांचे दोन समूह आहेत. एकाचे नाव नवब्रह्मेश्वर व दुसऱ्याचे पापनाथ. पापनाथ मंदिरसमूह गावाच्या दक्षिणेला एक मैलावर तुंगभद्रेच्या उजव्या तीरावर आहे.

नवब्रह्मेश्वर या समूहात नऊ शिवमंदिरे एकाच गढीसारख्या प्राकारात उभी आहेत. त्यांची नावे बालब्रह्मेश्वर, कुमारब्रह्म, अर्कब्रह्म, वीरब्रह्म, विश्वब्रह्म, तारकब्रह्म, गरुडब्रह्म, स्वर्गब्रह्म व परब्रह्म अशी आहेत. या मंदिरांचे शिल्पकाम देखणे आहे. बालब्रह्मेश्वराच्या जवळ जोगुळांवा नावाच्या देवीचे स्थान आहे. ही ब्रह्मेश्वराची अर्धांगी योगिनी या नावानेही प्रसिद्ध आहे. हिचे रूप उग्र आहे. इथल्या शिल्पसंभारात महिषासुरमर्दिनीच्या अनेक सुंदर मूर्ती आढळतात.

नवब्रह्मेश्वराच्या प्राकारातच एका देवळीत देवीची एक मूर्ती होती. ती आता आलमपूरच्या संग्रहालयात ठेवली आहे. ही मूर्ती उताण्या नग्न स्त्रीची असून, तिला मस्तक दिसत नाही. ही रेणुकेची मूर्ती असून, हिचे मस्तक, सौंदत्ती येथे एल्लम्मा देवीच्या रूपात आहे, असे मानले जाते. हिला भूदेवी म्हणतात. स्त्रिया संततीसाठी हिची पूजा करतात.

अष्टादशपीठम् या नावाचे अठरा शक्तिपीठांची नावे देणारे एक संस्कृत प्रकरण आहे, त्यात आलमपुराचा एक शक्तिपीठ म्हणून उल्लेख आढळतो. मत्स्यपुराणात (२२.५०) श्राद्धयोग्य स्थानांत आलमपुराचा समावेश केलेला आहे.

नवब्रह्मेश्वर मंदिरांची रचना पट्टदकल येथील पापनाथाच्या मंदिरासारखी वाटते. त्यांची शिखरे ओडिसातील मंदिरांच्या शिखरांप्रमाणे वाकदार व अलंकृत आहेत. त्यांचा अंतर्भाग मात्र प. भारतातील गुहामंदिरांसारखा आहे.

या मंदिरांची निर्मिती इ. स. च्या ७ व्या शतकात झाली. त्यांच्या भिंतींवर कोनाडे, सुंदर मूर्ती व नक्षीकाम आहे. इथले कोरीव काम उत्तर भारतीय पद्धतीचे वाटते. बालब्रह्मेश्वराचे मंदिर विशाल असून, त्यात अनेक स्तंभ आहेत. या

मंदिरातील शिल्पकाम सर्वांत विकसित व कौशल्यपूर्ण आहे.

आलमपूर हे श्रीशैलम या प्रख्यात क्षेत्राचे पश्चिम द्वार मानले जाते. श्रीशैलमला जाणारे सर्व यात्रेकरू या तीर्थक्षेत्राची यात्रा करतात.

आलमपूरच्या आसमंतात तुंगभद्रा नदीत पापविनाशन तीर्थ, गणिकसिद्धेश्वर व राजराजेश्वर ही पवित्र स्थाने आहेत. संगमाजवळ संगमेश्वराचे मंदिर आहे. तेही अत्यंत पवित्र मानले जाते. [ टें. ली. आं. प्र.; टें. सा. इं.; लज्जागौरी; अजन्ता मासिक, नोव्हेंबर १९५८ ]

## आलापिनी वीणा

वीणेचा एक प्रकार. हिचा दंड वेळूचा व नऊ मुष्टी (अंदाजे ३४ इंच) लांब असतो. छिद्राचा व्यास दोन अंगुळे व तन्त्री (तार) बकरीच्या आतड्याची असते. तुंब्याची रुंदी एक वीत व मुखाचे माप चार अंगुळे असते. हिची नाभी हस्तिदंताची बनवितात. तुंबा पोटाशी धरून दंडाचा खालचा भाग डाव्या हाताच्या पकडीत धरतात. ही दोन्ही हातांनी वाजवितात. डाव्या हाताच्या चार बोटांनी चार स्वर व उजव्या हाताच्या तीन बोटांनी तीन स्वर वाजवितात. पाहा – वीणा. [ सं. शा. ]

## आलिंगन

'प्रीतिपूर्वकपरस्पराश्लेषः'=प्रेमपूर्वक एकमेकांना मिठी मारणे (हलायुध). वात्स्यायन व कल्याणमल्ल यांनी आलिंगनाचे बारा प्रकार सांगितले आहेत –

(१) **स्पृष्टक** – समाजात कोणालाही संशय येऊ न देता या प्रकाराचा अवलंब करता येतो. गर्दीत प्रियकर आपल्या प्रियेच्या जवळून जाताना तिच्या अंगाला आपले अंग घसटतो. त्यामुळे प्रियेला आलिंगनाचे सुख मिळते; पण इतरांना मात्र त्याचा पत्ता लागत नाही.

(२) **विद्धक** – पहिल्याप्रमाणेच हाही चोरटचा आलिंगनाचा प्रकार आहे. पण या प्रकारात स्त्री पुढाकार घेते. आपल्या प्रियकराच्या मागून किंवा पुढून जाताना ती आपल्या स्तनयुगुलाने, कोणाच्याही लक्षात न येईल, अशा प्रकारे त्याच्या अंगाला स्पर्श करते.

(३) **उद्घृष्टक** – अंधार असला तर गर्दीतही प्रियकर आपल्या प्रियेला बराच काळ किंवा वारंवार आलिंगन देतो. अंधारामुळे इतरांच्या ते ध्यानात येत नाही.

(४) **पीडितक** – उद्घृष्टकाचीच ही पुढची पायरी होय. अंधारात प्रियकर किंवा प्रिया खांबाला किंवा भिंतीला टेकून उभी राहते. त्यामुळे दुसऱ्याला दृढ आलिंगन देणे सुकर होते.

(५) **लतावेष्टितक** – हा एकान्तातील आलिंगनप्रकार आहे. वेल जशी वृक्षाला बिलगते त्याप्रमाणे स्त्री आपल्या प्रियकराच्या अंगाभोवती हातांचा विळखा घालते व उत्कंठित होऊन त्याच्याकडे बघते. तो मग तिचे चुंबन घेण्या सा खाली वाकतो.



आलिंगन (लतावेष्टितक)

(६) **वृक्षाधिरूढक** – एक पायावर उभी राहून स्त्री आपल्या उजव्या पायाने प्रियकराच्या उजव्या पायाला विळखा घालते. एका हाताने ती प्रियकराच्या खांद्याला धरते व दुसरा हात त्याच्या कमरेला दावून धरून ती वृक्षावर चढावे त्याप्रमाणे चढण्याचा प्रयत्न करते व चुंबनासाठी मुख वर उचलते.

(७) **तिलतंडुलक** – स्त्री व पुरुष यांचे अतिशय दृढ असे आलिंगन.



आलिंगन (ललाटिक)

(८) **क्षीरनीरक** – पाणी जसे दुधात पूर्णपणे एकजीव होते, त्याप्रमाणे स्त्री व पुरुष परस्परांना एकजीव करणाऱ्या

हेतूने झोपलेल्या किंवा बसलेल्या स्थितीत दृढ आलिंगन देतात.

(९) ऊरूपगहन – स्त्री व पुरुष एकमेकांकडे तोंड करून कुशीवर झोपतात व एकमेकांच्या मांडयांत मांडया गुंतवितात.

(१०) जघनोपगूहन – पुरुष उताणा झोपतो व स्त्री त्याला जोराने आवळते. या वेळी दोघांचे कटिप्रदेश एकत्र जुळतात.

(११) स्तनालिंगन – या प्रकारात स्त्री पुरुषाच्या हृदयाला आपल्या स्तनांचा दाब देऊन आलिंगन देते.

(१२) ललाटिक – आलिंगनाचा एक सौम्य प्रकार. यात स्त्री-पुरुषांचे डोळे नाक व ओठ परस्परांना भिडतात. कपाळाचा मात्र नुसता स्पर्श होतो. [ कामसूत्र; कामकल्प ]

## आलीढ मुद्रा

मूर्तिकलेतील एक अवस्था. उजवा पाय पुढे पसरलेला व डावा पाय गुडघ्यात थोडासा दुमडलेला, अशी ही अवस्था असते. धनुष्याला बाण लावून त्याची दोरी ओढताना जो पवित्रा असतो, तशी ही मुद्रा असते. [ गॉ. नॉ. बु.; इं. बु. इ. ]

## आलुपवंश

दक्षिणेतला एक राजवंश. या वंशाने इ. स. च्या दुसऱ्या शतकापासून सोळाव्या शतकापर्यंत तुळुनाडूवर राज्य केले. आलुक हे शेषाचे नाव आहे. त्यावरून आलुपांचा नागवंशातून उदय झाला असावा, असे वाटते. मंगलोर येथील गोल्लर गणपतीच्या देवालयात एका शिलालेखावर फणाधारी नागाची एक आकृती कोरलेली आहे, त्यामुळे वरील कल्पनेला पुष्टी मिळते.

या राजवंशाचे कुलदैवत शिव (भैरव) हे असून, उदयावर (उडुपी तालुका) या राजधानीच्या शहरी, त्याचे 'शंभू कल्लू' नावाचे मंदिर आहे.

या वंशाचा इ. स. ५७५ पूर्वीचा इतिहास उपलब्ध नाही. या वंशातील मारम्म आळूवरसर (इ. स. ५७५), सकलश्रीमत आळूवरसर (इ. स. ६००), कुंदवर्मरस (इ. स. ६२५), त्याचा पुत्र आळुवरसर गुणसागर (इ. स. ६५०) व चित्रवाहन प्रथम (इ. स. ६७५-७००). यांच्याविषयी शिलालेख व ताम्रपट यांवरून थोडीशी माहिती मिळते. त्यानंतरच्या तीनचार शतकांत या वंशात रणसागर, श्वेतवाहन, पृथ्वीसागर आळुपेंद्र, विजयादित्य आळुपेंद्र, चित्रवाहन द्वितीय, आळुव रणंजय, दत्तालुपेंद्र, श्रीमार, कुंदवर्म, बंकिदेव, आळुपेंद्रदेव, इ. राजे होऊन गेले. यांपैकी शेवटचा राजा इ. स. च्या ११ व्या शतकाच्या मध्यात अगदी स्वतंत्रपणे राज्य करीत होता. इ. स. च्या १२ व्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेलेल्या भुजबल कवी आळुपेंद्र याच्यासंबंधी अनेक शिलालेख उपलब्ध आहेत. त्यांवरून त्याने पुष्कळ वर्षे राज्य केले, त्याच्या राजधानीचे नाव बारहकन्यापूर असे होते व त्याच्या राज्यात समृद्धी नांदत होती, या गोष्टी कळतात.

त्यानंतर इ. स. ११७० – १२१५ या कालखंडात भुजबल कुलशेखर आळुपेंद्र याने राज्य केले. त्याच्या कारकीर्दीत राज्याला चांगले स्थैर्य प्राप्त झाले. त्याने प्रथमच स्वतःला पांड्य ही उपाधी घेतली व त्याच्या नंतर त्या वंशातील काही राजांनी ती उपाधी पुढे चालू ठेवली. इ. स. च्या १४ व्या शतकाच्या उत्तरार्धात या वंशातील राजांनी जैन धर्माला आश्रय दिला, असे दिसते. इ. स. १३८५ पासून आलुपांच्या राज्याचा विजयनगरच्या साम्राज्यात समावेश झाला.

आलुप राजे हे स्वतंत्र नसून मांडलिक राजे होते. इ. स. ५७५ च्या सुमारास चालुक्य राजा कीर्तिवर्मा (प्रथम) याने आळुवखेड (तुळव राज्य) जिंकून आलुप राजा मारम्म आळुवरसर याला आपला मांडलिक बनविले. तेव्हापासून इ. स. च्या १२ व्या शतकाच्या अखेरपर्यंत तुळुव राज्य चालुक्यांच्या सत्तेखाली होते. [ ए. क. भा. १ ]

## आलेखनकला

रांगोळी, तांदुळाचे पीठ, भाताचे जाळलेले तूस, इ. च्या साहाय्याने जमिनीवर, भिंतीवर किंवा कागदावर आकृती रेखाटणे म्हणजे आलेखन होय.



आलेखनकला – द. भारत

वैदिक साहित्यात हाताने मूर्ती रेखाटण्याचे उल्लेख आहेत किंवा नाहीत, हा संशोधनाचा विषय आहे. परंतु पौराणिक ग्रंथांत मात्र तसे उल्लेख सापडतात. भविष्य पुराणातील एक उल्लेख असा –

**श्रावणे मासि पञ्चम्यां शुक्लपक्षे नराधिप।**

द्वारस्योभयतो लेख्या गोमयेन विषोल्वणाः ।।

अर्थ – हे राजा, श्रावण शुद्ध पंचमीच्या दिवशी दाराच्या दोन्ही बाजूंना गोमयाने विषारी नाग काढावे.

मत्स्यपुराणातही खड्गखेटकधारी नागांची आकृती काढावी, असे सांगितले आहे.

गोवत्स द्वादशीच्या दिवशी सवत्स गाईची आकृती काढून तिची पूजा करावी, असे नारदपुराणात सांगितले आहे. हेमाद्रीने आपल्या व्रतखंडात त्या त्या व्रताशी संबद्ध अशा देव-देवतांच्या आकृती कशा काढाव्या, ते सांगितले आहे. भविष्यपुराणात व्रतविषयक मंडले दिलेली आहेत, तीही आलेखनाचाच प्रकार आहे. बंगालमधील अलिपनेचे विविध प्रकार निरनिराळी व्रते व संस्कार यांच्याशी संबद्ध आहेत. उत्तर प्रदेश, राजस्थान, माळवा, महाराष्ट्र व द. भारत या प्रदेशांत प्रचलित असलेले रांगोळीचे प्रकारही धार्मिक स्वरूपाचेच आहेत. या आलेखनात जी स्वस्तिक, अष्टदळ, इ. प्रतीके वापरली जातात, त्यांनाही विशिष्ट अर्थ असतो.



आलेखनकला – बंगाल

नारदाने चित्रांकनाचे शाश्वत व तात्कालिक असे दोन भेद मानलेले असून, चित्रांचे तीन प्रकार मानले आहेत – (१) भौम-भूमीवर रेखाटली जाणारी चित्रे. (२)कुडयक – भिंतीवर रेखाटलेली चित्रे व (३) ऊर्ध्वक – छतावर काढलेली चित्रे. पाहा–अलिपना, कोलम, रांगोळी. [भारती, जून१९६०]

**आलेख्यसर्पपंचमी** एक तिथिव्रत. भाद्रपद शुद्ध पंचमीला रंगीत रांगोळीने नागाची आकृती काढून त्याची पूजा करतात. सर्पांपासून अभय, हे या व्रताचे फल होय (भाग. पु. ब्राह्मपर्व ३७.१–३). [हि. ध.]

**आलोकदान** प्राचीन काळी गृहस्थ प्रतिदिन काही विशिष्ट ठिकाणी दिवे, भाताचे पिंड व फुलांचे हार देव, राक्षस व यक्ष यांच्या संतोषासाठी ठेवीत. तसेच धोक्याच्या ठिकाणीं, मंदिरांत व चव्हाट्यावर रोज दिवा लावल्याने अशुभाचा परिहार होतो, असे मानीत. [म. भा. उ.]

**आल्हखंड** अवधी भाषेतील एक वीरकाव्य. अवधीतील हा सर्वप्रथम काव्यग्रंथ असून, जगनिक कवीने इ. स. ११७३ मध्ये याची रचना केली. महोबे येथील दोन वीर आल्हा व ऊदल यांच्या चरित्राशी या काव्याचा संबंध आहे. काव्याची भाषा ओजस्वी व प्रवाही आहे.

उत्तर भारतात हे काव्य अतिशय लोकप्रिय असून, सर्वसाधारण लोक तुलसीरामायणाप्रमाणे मोठ्या आवडीने ते वाचतात. हे काव्य वरीच वर्षे मौखिक स्वरूपातच राहिल्यामुळे त्यातील भाषा व पाठ बरेच विकृत झालेले आहेत. इ. स. १८६५ मध्ये चार्ल्स इलियटने ते लिपिबद्ध केले. [अ. उ. सा.]

**आल्हा** अवधी भाषेतील एक छंद. भानू कवीच्या 'छंदप्रभाकर' या ग्रंथात छंदांची वीर, अश्वावतारी व मात्रिक सवैया अशी आणखी तीन नावे दिलेली आहेत. अवधी भाषेतील प्रसिद्ध वीरकाव्य 'आल्हखंड' याची रचना याच छंदात आहे. चौपाई व दोहा या छंदांनंतर आल्हा छंद लोकांच्या अधिक परिचयाचा आहे. [अ. उ. सा.]

**आवंती** एक प्राकृत उपभाषा. ही प्राचीन अवंती देशाची भाषा होती. नाटयशास्त्रात तिला स्थान दिलेले आहे. ही शौरसेनीची उपभाषा असून, शौरसेनी व महाराष्ट्री या दोन भाषांच्या संकरातून जन्म पावली आहे. [वि. स्मृ. ग्रं.]

**आवरणदेवता** मानवाच्या लिंगशरीरात जी षट्चक्रे आहेत, त्यांत निवास करणाऱ्या देवतांना योगशास्त्रात हे नाव दिलेले आहे. त्यांची संख्या ३६० आहे. या देवतांना प्रसन्न केल्यावाचून साधकाला षट्चक्रभेद करता येत नाही. [स. पॉं.]

**आवश्यक क्रिया** श्वेतांबर जैनांचे एक मूलसूत्र. या ग्रंथात सहा अध्याय असून, जैन साधूंना अवश्य कर्तव्य अशा सहा गोष्टींचे वर्णन आहे. वैदिक लोकांत संध्येला, पारशी लोकांत खोर्द अवेस्त्याला, ख्रिश्चन लोकांत प्रार्थनेला किंवा मुसलमान लोकांत नमाजाला जे महत्त्व आहे,

तेच जैनलोकांत आवश्यक क्रियांना आहे, असे म्हणता येईल.

दैवसिक, रात्रिक, पाक्षिक, चातुर्मासिक व सांवत्सरिक असे आवश्यकांचे प्रकार आहेत. आवश्यक क्रिया सर्वांसाठी एकच नसून, अधिकारभेदाने ती भिन्न भिन्न आहे. आवश्यकांची क्रिया ज्ञानपूर्वक केली असता ती आत्म्याला गुणांनी वासित करते, म्हणून तिला 'आवासक' असेही म्हणतात. स्थूल दृष्टीने आवश्यक क्रियेचे सहा विभाग आहेत – (१) सामायिक (२) चतुर्विंशतिस्तव (३) वंदन (४) प्रतिक्रमण (५) कायोत्सर्ग व (६) प्रत्याख्यान.

रागद्वेषांच्या अधीन न होता सर्वांशी आत्मौपम्य बुद्धीने वागणे, याला सामायिक असे नाव आहे. चौवीस तीर्थंकरांची स्तुती करणे, म्हणजे चतुर्विंशतिस्तव होय. कायिक, वाचिक व मानसिक अशा तीन्ही प्रकारच्या क्रियांनी पूज्य व्यक्तींविषयी आदर प्रकट करणे, याला वंदन असे म्हणतात. वंदनालाच चितिकर्म, कृतिकर्म किंवा पूजाकर्म असे पर्यायशब्द आहेत. काही प्रमादांमुळे शुभ योगापासून च्युत होऊन अशुभ योग प्राप्त होणे व त्यानंतर पुनश्च शुभ योग प्राप्त होणे, याला प्रतिक्रमण अशी संज्ञा आहे. मन धर्मकारणी लावून शरीराच्या ममतेचा त्याग करणे, म्हणजे कायोत्सर्ग होय. कायोत्सर्गाने देहाची व बुद्धीचीही जडता नष्ट होऊन विचारशक्तीचा विकास होतो. प्रत्याख्यान म्हणजे त्याग. त्याज्य वस्तू द्रव्यरूप व भावरूप अशा दोन प्रकारच्या आहेत. अन्नवस्त्रादी बाह्य वस्तूंचा त्याग हा द्रव्यरूप असून अज्ञान, असंयम, इ. दोषांचा त्याग हा भावरूप होय. प्रत्याख्यानामुळे अनेक गुण अंगी बाणतात, म्हणून त्याला गुणधारण असे दुसरे नाव आहे. कायोत्सर्ग करून ज्याने चित्तशुद्धी, एकाग्रता व आत्मबल प्राप्त करून घेतले, तोच प्रत्याख्यानाचा खरा अधिकारी होतो.

या सहा आवश्यकांचा जो क्रम आहे, तो कार्यकारणभावाच्या शृंखलेवर आधारित आहे.

आवश्यक क्रिया हे जैन धर्माचे प्रधान अंग आहे. त्यामुळे आवश्यक क्रिया व तद्बोधक आवश्यक सूत्र हे जैनांच्या श्वेतांबर व दिगंबर या दोन्ही शाखांत मिळणे स्वाभाविक होते; पण तसे झाले नाही. श्वेतांबर संप्रदायातील साधुपरंपरा अखंड चालू राहिल्यामुळे, त्या संप्रदायातील साधू व श्रावक या दोघांचेही आवश्यक क्रिया व आवश्यक सूत्र हे ग्रंथ टीकेसहित उपलब्ध आहेत. परंतु दिगंबर संप्रदायातील साधूंची परंपरा खंडित झाल्याने त्यांच्यातील साधूंच्या आवश्यक क्रिया लुप्तप्राय झाल्या व त्याचबरोबर त्यांच्यातील श्रावकासंबंधी आवश्यक क्रियाही दुर्मिळ झाल्या. त्यामुळे दिगंबर संप्रदायातील आवश्यक सूत्र संपूर्ण उपलब्ध नाही. [ द. चिं. ]

**आवसथ्य** एका अग्नीचे नाव. 'अवसथ भवः आवसथ्यः' = अवसथ म्हणजे अतिथिगृह, त्यात असणारा तो आवसथ्य होय. अग्निहोत्र्याने अवसथातही एक अग्नी ठेवावा व त्याचे आधान (स्थापना) विवाहाच्या वेळी करावे, असे सांगितले आहे (पार. गृ. सू. १.२). सांप्रत आवसथ्य अग्नी ठेवण्याची पद्धती नाही. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**आवळा** एक पवित्र फळ. या वृक्षाचे किंवा त्याच्या फळाचे उल्लेख प्राचीन वाङ्मयात आढळतात. जैमिनीय उप. ब्राह्मण ( १.३८.६ ), छांदोग्योपनिषद् ( ७.३.१ ), शिवोपनिषद ( ६.२१ ), रामायण (२.९४.९), महाभारत (३.१५८.४७), कौटिलीय अर्थशास्त्र (२.३६), जातक कथा (दसब्राह्मण जातक, कुंभजातक), इ. ग्रंथांत मिळतात. पतंजली, पाणिनी यांनीही त्याचे उल्लेख केले आहेत. हे फळ पिकल्यावर तांबूस पिवळसर होते, असे पतंजलीने सांगितले आहे. चरक, सुश्रुत, काश्यपसंहिता, इ. आयुर्वेदाच्या ग्रंथांतून औषधी गुणधर्मांच्या निमित्ताने याचा वारंवार उल्लेख येतो.

आवळा बहुगुणी आहे. त्यामुळे त्याला देवसान्निध्य लाभले असावे. या देवप्रिय वृक्षाच्या निर्मितीच्या कथा पुराणांमध्ये आढळतात. शिवपुराणातील कथा अशी –

विष्णूने जालंदरपत्नी वृंदेचे पातिव्रत्य भ्रष्ट केले, म्हणून तिने अग्निप्रवेश केला. पण तिच्या अनावर ओढीने विष्णू तिच्या चितेजवळ बसून राहिला. विष्णूने तिथून उठावे म्हणून गौरी, लक्ष्मी व सरस्वती यांनी दिलेली बीजे देवांनी वृंदेच्या चिताभूमीत टाकली. काही काळाने सरस्वतीने दिलेल्या बीजापासून धात्री (आवळी), लक्ष्मीच्या बीजापासून मालती आणि गौरीच्या बीजापासून तुलसी या वनस्पती उत्पन्न झाल्या. विष्णूने त्या वनस्पती पहिल्या. धात्रीने व तुलसीने विष्णूकडे प्रेमाने पाहिले. त्यामुळे त्या वनस्पती त्याच्या आवडत्या झाल्या. विष्णू त्या दोघींना घेऊन वैकुंठात गेला (रुद्र सं. युद्ध. २६).

अशाच स्वरूपाच्या कथा स्कंदपुराण व पद्मपुराण यांतील कार्तिकमाहात्म्यात आढळतात.

हे झाड कुठे लावावे यासंबंधीचे काही संकेत ब्रह्मवैवर्त पुराणात सांगितलेले आहेत (अ. १०४).

आवळा अलक्ष्मीचा नाश करतो. हे फळ सूर्याला आवडत नाही, म्हणून रविवारी त्याला शिवत नाहीत. कार्तिकात तुळशीचे लग्न करताना वृंदावनात आवळे ठेवतात. त्यापूर्वी आवळा खाऊ नये, असा संकेत आहे. मरणोन्मुख माणसाच्या नाक, कान व केस या ठिकाणी आवळा ठेवल्यास मरणारा विष्णुलोकी जातो, आवळीचे झाड लावणारा पुनर्जन्मातून मुक्त होतो व

ज्याच्या दारी आवळीचे झाड असेल, त्याच्या घरात कोणालाही भूतबाधा होत नाही, असे पुराणांत सांगितले आहे. आवळ्याचे माहात्म्य सांगणारी कथा अशी –

एक चांडाल शिकारीला गेला असता त्याला तहान लागली आणि आवळीच्या झाडावर चढून त्याने खूप आवळे खाल्ले. पण एवढ्यात तो खाली पडला व मृत्यू पावला. तेव्हा त्याला नेण्यासाठी पिशाच तिथे आले; पण त्यांना त्या चांडालाला नेता येईना. तेव्हा तिथल्या एका ऋषीने पिशाचांना सांगितले, की 'आवळे खाल्ल्यामुळे याचा देह पवित्र झाला असून हा विष्णुलोकाचा अधिकारी झाला आहे. तुम्हालाही पिशाचयोनीतून उद्धरून जायचे असेल, तर तुम्हीही आवळे खा.' पिशाचांनी लगेच तसे केले व तेही उद्धरून गेले (प. पु. सृ. खं. ६०). [भा. व. इ.; प. का. भा.; पा. का. भा.]

## आवळीपूजन

मृदुमान्य दैत्याने देवांना स्वर्गातून स्थानभ्रष्ट केले, तेव्हा त्यांनी पृथ्वीवर येऊन आवळीच्या झाडाचा आश्रय घेतला. त्या दिवसापासून या



६० . आवळ्याचे झाड

वृक्षाला पूज्यता प्राप्त झाली. कार्तिक पौर्णिमेस या वृक्षाची पूजा विहित आहे. या पूजेच्या वेळी आवळीला सूत्रवेष्टन करतात, श्रीफलयुक्त अर्घ्य देतात, तिच्या चारही दिशांना बलिदान करतात, अष्टदिशांना तुपाचे दिवे लावतात व पुढील मंत्राने प्रार्थना करतात–

**धात्रि देवि नमस्तुभ्यं सर्वपापक्षयंकरि ।**
**नीरोगं कुरु मां नित्यं निष्पापं धात्रि सर्वदा ॥**

अर्थ – धात्री (आवळी) देवी, तू सर्व पापांचा क्षय करणारी आहेस. तुला नमस्कार असो. तू मला सर्वकाल निरामय व निष्पाप कर.

नंतर पितरांचे तर्पण, घृतपात्रदान व दंपती-भोजन करून व्रत समाप्त करतात. [व्रतराज]

## आवळीभोजन

कार्तिक शु. दशमीपासून पौर्णिमेपर्यंत एखाद्या दिवशी आवळीच्या झाडाखाली स्वयंपाक करून इष्टमित्रांसह भोजन करतात. पूजाविधी आवळीपूजनाप्रमाणेच असतो. महाराष्ट्रात व कर्नाटकात देवस्थान असेल, त्या ठिकाणी देवाची मूर्ती पालखीत बसवून आवळीच्या झाडाखाली आणतात. मग देवाला तिथे महानैवेद्य करून भोजन झाल्यावर सायंकाळी देव मिरवणुकीने परत देवळात नेतात.

## आशादशमी

एक तिथिव्रत. कार्तिक किंवा कोणत्याही महिन्याच्या शुद्ध दशमीपासून व्रताला प्रारंभ करतात. व्रतावधी सहा महिने ते दोन वर्षे. अंगणात दहा दिशांच्या दिक्पालांच्या आकृती स्त्रीरूपांत काढून त्यांची पूजा करतात. पुढील मंत्राने प्रार्थना करतात –

**आशाः स्वाशाः सदा सन्तु सिध्यन्तां मे मनोरथाः ।**
**भवतीनां प्रसादेन सदा कल्याणमस्त्विति ॥**

अर्थ – मला सर्व दिशा शुभकारक होवोत. माझे मनोरथ पूर्ण होवोत. तुमच्या प्रसादाने (माझे) सार्वकाल कल्याण असो.

व्रतोद्यापनाच्या वेळी दिशांच्या सुवर्णप्रतिमा किंवा ते शक्य नसेल तर पिठाच्या प्रतिमा करून ब्राह्मणाला दान देतात. व्रताचे फल – कामनापूर्ती. [व्र. प.; व्रतराज; हिं. ध.]

## आशादित्यव्रत

एक काम्य व्रत. आश्विन मासातील रविवारी या व्रताला प्रारंभ करतात. व्रतावधी एक वर्ष. रोज जमिनीवर गोमयाने वर्तुलाकार मंडल करतात व त्या मंडलावर सूर्याला अर्घ्य देतात. त्याचा मंत्र असा –

**यथाशा विमलाः सर्वाः सूर्यभास्वरभानुभिः ।**
**तथाशाः सफला देव कुरु नित्यं ममार्घ्यतः ॥**

अर्थ – हे सूर्या, ज्याप्रमाणे तुझ्या किरणांनी सर्व दिशा निर्मल होतात, त्याप्रमाणे हे देवा, या अर्घ्यदानामुळे माझ्या सर्व आशा सफल कर.

उद्यापनाच्या वेळी आदित्याची सुवर्णप्रतिमा करतात व तिची सूर्य, वरुण, माधव, धाता, हरी, भग, इ. बारा नावांनी पूजा करतात. व्रताचे फल – व्याधिनाश व कुष्ठरोगनिवारण. व्रताची कथा अशी –

एकदा दुर्वास ऋषी श्रीकृष्णाला भेटण्यासाठी द्वारकेस आला. श्रीकृष्णाने त्याचा यथोचित सत्कार केला. परत निघण्याच्या वेळी श्रीकृष्णपुत्र सांब त्याला हसला. दुर्वासाला त्या गोष्टीचा अतिशय राग आला, पण त्या वेळी त्याने तो आवरला. नंतर तो नारदाकडे गेला. नारदाला त्याने घडलेली सर्व हकीकत सांगितली व सांबाला शिक्षा होईल, असे काहीतरी करण्यास सांगितले. मग नारद द्वारकेत गेला व श्रीकृष्णाला त्याने सांबाचा उद्धटपणा सांगितला. ते ऐकून श्रीकृष्णाने सांबाला 'कुष्ठरोगी हो' असा शाप दिला. पुढे श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून त्याने आशादित्यव्रत केले व तो रोगमुक्त झाला. [ व्रतराज ]

**आशाधर** (इ. स. चे १२ वे शतक) एक जैन पंडित. हा मांडलगड ( मेवाड ) येथे राहत होता. पुढे शिहाबुद्दीन घोरीच्या आक्रमणांनी त्रस्त होऊन तो माळव्याची राजधानी धार येथे जाऊन राहिला. तो व्याघ्रेरवाल किंवा बघेरवाल या वैश्य जातीचा होता. याने न्याय, व्याकरण, काव्य, अलंकार, योगशास्त्र, वैद्यक, इ. विविध विषयांवर एकोणीस, ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकी काहींची नावे पुढीलप्रमाणे – प्रमेयरत्नाकर, भरतेश्वराभ्युदय काव्य, ज्ञानदीपिका, अध्यात्मरहस्य, रत्नत्रयविधान, इत्यादी. [ जै. सा. इ. ]

**आशाधरभट्ट** (इ. स. चे १७ वे शतक) एक साहित्यशास्त्रज्ञ. याचे कोविदानंद, त्रिवेणिका, अलंकारदीपिका, अद्वैतविवेक व प्रभापटल असे पाच ग्रंथ आहेत. [ म. च. को. ]

**आशानंद** (इ. स. चे १६ वे शतक) राजस्थानातील एक चारण कवी. जोधपुरनरेश राव मालदेव याची आशानंदावर मर्जी होती. इ. स. १५३३ साली राव मालदेवाने बीकानेरवर स्वारी केली तेव्हा हा त्याच्याबरोबर होता.

आशानंदाच्या नावावर पुढील सहा ग्रंथ आहेत – लक्ष्मणायण, निरंजनप्राण, गोगाजी री पेडी, बाघा रा दूहा, उमादे भाटियाणी रा कवित्त व फुटकळ गीते. हे सर्व ग्रंथ डिंगल भाषेत आहेत. याची भाषा मधुर असून कविता हृदयस्पर्शी आहे. याच्या कवितेचा नमुना पुढीलप्रमाणे–

सज्ञ सोलै सिणगार, सत्तव्रत अंग सनाहै ।
अरक बांर मुख्न उग नीर गंगाजल नाहै ।।
चीर पहर अस चढै मुकुट वेणी सिर खुलै ।
देती परदिरवर्णाँह, हंस गत राणी हलै ।।
सर भुवण पैस लीधौ सरग साम तणौ मन रंजियौ ।
रुसणौ मालदे रास सूँ भटियाणी इम भंजियौ ।।

आपला मित्र बाघा कोटडिया याच्या मृत्यूनंतर याने लिहिलेले करुणरसपूर्ण दोहे प्रसिद्ध आहेत. [ रा. भा. सा. ]

**आशापुरी** गुजरातमधील एक देवता. ही अनेकांची कुलदेवता आहे. गुजरातच्या वेगवेगळ्या भागांत हिची वेगवेगळ्या नावांनी पूजा करतात. आपल्या कुलदेवीचे स्थान फार लांब असू नये, या उद्देशाने आशापुरी देवीची स्थापना



आशापुरी देवीचे मंदिर, कच्छ

अनेक मध्यवर्ती ठिकाणी झालेली दिसते. माघ महिन्यात यात्रेकरूंचे संघ त्या त्या ठिकाणी जातात, त्या वेळी तिथे भवाई नामक नृत्य होते. अनेक लोक त्या वेळी मुलासाठी केलेले नवस फेडतात. भाद्रपद शु. अष्टमीला आशापुरी येथे मोठी यात्रा भरते.

**आशीर्वाद** 'आशीः + वाद (उच्चारण) ' = "होवो" या शब्दाचा प्रयोग करून उच्चारलेले वचन. उदा० 'भवतु ते शिवप्रसाद :' = तुला शिवप्रसाद होवो. 'इष्टार्थाविष्करणम्' = (यजमानाला) इष्ट असलेल्या अर्थाचे आविष्करण, अशीही ' आशीः ' या शब्दाची व्याख्या आहे (न्यायकोश). कनिष्ठाने ज्येष्ठ किंवा वरिष्ठ याला प्रणाम केला असता, तसेच शिष्याने गुरूला व यजमानाने ब्राह्मणाला नमस्कार केला असता, त्या ज्येष्ठ-वरिष्ठांनी प्रणामकर्त्याचे मंगल चिंतिणे व तदर्थक 'स्वस्त्यस्तु, कल्याणं भवतु, आयुष्मान् भव,

(स्त्रीला) सौभाग्यवती पुत्रवती भव, ' इ. वाक्ये उच्चारणे याला आशीर्वाद म्हणतात. शब्द कल्पद्रुमात याचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे –

**वात्सल्याद्यत्र मान्येन कनिष्ठस्याभिधीयते ।**
**इष्टावधारकं वाक्यमाशीः सा परिकीर्तिता ।।**

अर्थ – मान्य पुरुषाने कनिष्ठाविषयी वात्सल्य धरून त्याच्या इष्टसिद्धीला पोषक असे वाक्य उच्चारणे, याला आशीर्वाद म्हणतात.

कोणत्याही शुभ व मंगल कृत्यात वडीलधाऱ्यांचा व ब्राह्मणांचा आशीर्वाद घेण्याची पद्धती आहे. आशीर्वादग्रहणावाचून कोणत्याही कृत्याची सांगता होत नाही. ब्राह्मण वेदांतले कल्याणपर मंत्र आशीर्वादासाठी म्हणतात.

**शतं जीव शरदो वर्धमानः**
**शतं हेमन्ताञ्शतमु वसन्तान् ।**
**शतमिन्द्राग्नी सविता बृहस्पतिः**
**शतायुषा हविषेमं पुनर्दुः ।।**
**आहार्षं त्वाविदं त्वा पुनरागाः पुनर्नव ।**
**सर्वाङ्ग सर्वं ते चक्षुः सर्वमायुश्च तेऽविदम् ।।**

(ऋ. १०.१६१.४-५)

अर्थ – तू शंभर शरदृतू, शंभर हेमंत ऋतू आणि शंभर वसंत ऋतूंपर्यंत जीवमान राहा. तू उत्तरोत्तर उत्कर्ष पाव. कारण इंद्र, अग्नी, सविता आणि बृहस्पती यांनी ज्याच्या योगाने मानवाला शंभर वर्षे आयुष्य लाभते, अशा हविर्भागाने (प्रसन्न होऊन) तुला शंभर वर्षांचे पूर्ण आयुष्य दिले आहे. मी तुला (आरोग्याच्या स्थितीत) आणले आहे; तुझी सर्व परिस्थिती जाणली आहे. पुनः नवीन देह धारण करणाऱ्या पुरुषा, तूही आता (उत्तम स्थितीत) पुनः आला आहेस; हे पूर्णारोग्ययुक्ता, तुझी चक्षुरादिक सर्व इंद्रिये, किंबहुना तुझे पुढील आयुष्यसुद्धा मी पूर्ण जाणलेले आहे.

आशीर्वादमंत्र झाल्यावर मग यजमान उजव्या हाताखालून उपरण्याचा पदर घेऊन त्यात ब्राह्मणांच्याकडील अक्षता ग्रहण करतो. त्या वेळी ब्राह्मण पुढील मंत्र म्हणतात –

**श्रीर्वर्चस्वमायुष्यमारोग्यमाविधाच्छोभमानं महीयते ।**
**धान्यं धनं पशुं बहुपुत्रलाभं शतसंवत्सरं दीर्घमायुः ।।**

वरील मंत्रात ' शोभमान ' ऐवजी ' पवमान ' आणि ' धान्यं धनं ' या ऐवजी ' धनं धान्य ' असाही पाठभेद आहे.

आशीर्वादाचा वैदिकेतर मंत्र असा –

**आशीर्वादाः सफलाः सन्तु पूर्णाः सन्तु मनोरथाः ।**
**शत्रूणां नाशनं चास्तु मैत्राणामुदयस्तव ।।**

मग यजमानआपल्या स्त्री-पुत्रांसह ब्राह्मणांना नमस्कार करतो.

आशीर्वाद व वरदान या दोहोंमध्ये थोडा फरक आहे. ब्राह्मण किंवा पुरोहित आपल्या यजमानाला, वडीलधारी माणसे आपल्या पुत्रपौत्रादी नातेवाइकांना आणि गुरू किंवा सत्पुरुष आपल्या शिष्यांना आयुरारोग्यादी इष्टार्थाच्या प्राप्तीबद्दल वचन बोलतात, त्याला आशीर्वाद म्हणतात व ईश्वर, देवता किंवा अवतार आपल्या भक्तांना इष्टसिद्धीविषयी जे वचन बोलतात, त्याला वरदान म्हणतात.

## आशौच

' न शुचिः अशुचिः तस्य भावः ' = अशुचित्वाचा भाव म्हणजे आशौच होय. आशौच हे विशिष्ट कालानंतर स्नानादी शुद्धिकारक क्रिया केल्याने संपते. हे पिंडोदकदानादी विधीला व अध्ययन थांबविण्याला निमित्त होते (याज्ञ. वरील मिताक्षरा ३.१).

एखाद्याच्या जन्माने अथवा मृत्यूने त्या घटनेचा परिणाम म्हणून एक वा अनेक व्यक्तींना आलेले अशुचित्व म्हणजे आशौच होय. आशौच प्राप्त झालेल्या व्यक्तीला विशिष्ट कालपर्यंत धार्मिक अथवा अधार्मिक कृत्ये करणे निषिद्ध असते व अशा व्यक्तींच्या संपर्काने इतरांनाही अशुचित्व प्राप्त होते. जननाशौचापेक्षा मृताशौचाविषयीचे निषेध अधिक तीव्र आहेत. या निषेधांचे कारण स्पष्ट नाही. मृतव्यक्तीचे शव हे स्वयमेव भयाचे कारण असेल, ते मृत्यूचे वाहन असेल किंवा त्यातला आत्मा हा त्या कुलातल्या व्यक्तींच्या आत्म्याशी अशरीरी अशा संबंधाने संबद्ध असल्यामुळे त्यापासून भय किंवा पीडा संभवत असेल, अशा कोणत्या ना कोणत्या तरी धारणेने आशौच-कल्पना जन्माला आली आहे. काही असले तरी मृताचे आप्त-स्वजन त्यानंतर काही निश्चित कालावधीसाठी समाजापासून अलग होतात, ही गोष्ट जगात सर्वत्र रूढ आहे. ज्यांनी मृताचा अंत्यसंस्कार केला असेल, त्यांचे अशुचित्व इतर नातेवाइकांपेक्षा जास्त मानले जाते. मृताशौच कुळातल्याच लोकांना पाळावे लागते असे नव्हे; तर मृताच्या अंत्यसंस्काराला एखादे गाव एकत्र झाले असेल, तर त्या गावालाही निश्चित कालासाठी अशुची मानले जाते.

आशौचाचा कालावधी दूर-निकटसंबंधाने कमी-अधिक असतो. भिन्न परिस्थितीप्रमाणे तो स्नान, एक रात्र, एक दिवस इथपासून तो काही महिने इथपर्यंत वेगवेगळा असतो.

त्याचप्रमाणे आशौचाचा काल मृताची जात, वय व लिंग यांच्या भेदानुसारही भिन्न होतो. गृह्यसूत्रांच्या मताप्रमाणे आशौचाचा सामान्य अवधी दहा दिवसांचा आहे (पार. गृ. सू. ३.१०.३०). पारस्कर ब्राह्मण-क्षत्रियांच्या आशौचात भेद करीत नाही; पण वैश्य व शूद्र यांच्यासाठी त्याचा काल अनुक्रमे पंधरा दिवस व एक महिना सांगतो (३.१०.३८). परवर्ती

स्मृतिग्रंथ विशिष्ट परिस्थितीत व विशिष्ट व्यक्तींना आशौचातून केवळ स्नानाने मुक्त करतात. ऋत्विज, दीक्षित, यज्ञीय कर्म करणारा, दीर्घ सत्र चालविणारा, ब्रह्मचारी, ब्रह्मवेत्ता, कारागीर, शिल्पी, वैद्य, दास-दासी, नापित, राजा व श्रोत्रिय हे 'सद्यःशौच' म्हणजे स्नान केल्याने तात्काळ शुद्ध होणारे होत (याज्ञ. ३.२८). हे अपवाद समाजाच्या सोयीला धरून केले आहेत, हे स्पष्ट दिसते.

आशौचाचा मुख्य कालावधी प्रौढ व्यक्तींच्या मृत्यूसंबंधातच लागू आहे. बालमृत्यूचे आशौच अल्प असते. गृह्यसूत्रांच्या मते दोन वर्षे होण्याच्या पूर्वी मृत झालेल्या बालकाचे आशौच केवळ मातापित्यांस एक किंवा तीन रात्री लागू होते (पार. गृ. सू. ३.१०.२-५). दात आलेल्या व चूडाकरण झालेल्या मुलाच्या मृत्यूचे आशौच मात्र सर्व बांधवांना लागू आहे. विवाहपूर्व कन्येचा मृत्यू झाल्यास तीन दिवस आशौच असते. दहा दिवसांचे मृताशौच असता त्यात दहा दिवसांचे अथवा त्याहून कमी असे मृताशौच प्राप्त झाल्यास, पूर्वीचे आशौच संपते त्याच्याबरोबरच दुसरेही संपते. संबंधी आणि मित्र यांच्यासाठी आशौच पाळणे ऐच्छिक आहे. कुलपुरोहित, श्वशुर, मित्र, विवाहामुळे झालेले नातेवाईक व भाचा, यांच्या मृत्यूचे आशौचही गृह्यसूत्रांत ऐच्छिक मानले आहे (पार. गृ. सू. ३.१०.४६-४७). पण धर्मसूत्रे आणि स्मृती मात्र हे आशौच अनिवार्य मानतात (आप. ध. सू. १.६).

जननाशौच पुढीलप्रमाणे मानतात – गर्भिणी सातव्या महिन्यापासून पुढे केव्हाही प्रसूत झाल्यास सपिंडांना दहा दिवस जननाशौच पाळावे लागते. या आशौचात बाळंतिणीस दहा दिवस अस्पृश्यत्व असते. पुत्र झाल्यास वीस दिवस व कन्या झाल्यास एक महिना तिला धर्मकृत्यांचा अधिकार नसतो.

आशौचासंबंधीचा विस्तृत तपशील धर्मसिंधू व निर्णयसिंधू या ग्रंथांत पाहायला मिळतो. आशौचाच्या अवधीत विधिनिषेधात्मक असे दोन प्रकारचे नियम पाळावे लागतात. भोगविलासांचा व जीवनव्यवसायाचा त्याग, वेदाध्ययन, क्षौरकर्म, गृह्य होम, इ. बाबतींत निषेध आहे. संयम, भूमिशयन, केवळ मध्याह्नभोजन, हे विधी आहेत. त्या कालावधीनंतर स्नान व पंचगव्य प्राशन करून शुद्ध व्हावे लागते. पाहा– सुतक. [धर्म-सिंधू; हिं. सं.]

**आश्मरथ्य** वेदान्त तत्त्वज्ञानाचा एक आचार्य. ब्रह्मसूत्रांत याच्या मताचा उल्लेख असून, तो परमेश्वर प्रादेशमात्र असल्याचे सांगतो. परमेश्वर अनंत असूनही भक्तावर अनुग्रह करण्यासाठी हृदयादी स्थानविशेषी प्रकट होतो. या प्रदेशांत सीमित होत असल्यामुळे त्याला प्रादेशमात्र म्हटले आहे. आश्मरथ्याच्या मते विज्ञानात्मा व परमात्मा यांमध्ये परस्पर भेदाभेद संबंध आहे. यावरून शंकराचार्य व वाचस्पती मिश्र यांनी त्याला विशिष्टाद्वैतवादी म्हटले आहे. आश्मरथ्याच्या या भेदाभेदवादाचा पुढे यादवप्रकाशाने अंगीकार व परिपोष केला. [हिंदुत्व; श्री शंकराचार्य]

**आश्रम** (१) हा शब्द 'श्रम्'= कष्ट करणे या धातूपासून साधलेला आहे. याची व्याख्या अशी – 'आश्रम्यन्ति अस्मिन् अनेन वा इति' (=ज्यामध्ये, ज्याच्या योगाने (माणसांना) श्रम – तपःस्वाध्यायादी कष्ट करावे लागतात; किंबहुना ज्याच्या आधारे कर्तव्यपालनाचे सर्व परिश्रम करावे लागतात, तो आश्रम होय.) आश्रम ही एक आर्यांची संस्था किंवा व्यवस्था आहे.

वर्णांचा उल्लेख ऋग्वेदात प्रथम पुरुषसूक्तात येतो. वेदातही प्राचीन व अर्वाचीन असे भाग होतात. वर्णांचा उल्लेख असलेले पुरुषसूक्त अर्वाचीन विभागातले मानतात. चार आश्रम तर ऋग्वेदात कुठेच आढळत नाहीत. अवस्थाभेददर्शक ब्रह्मचारी व गृहपती हे दोनच शब्द ऋग्वेदात आहेत. पण त्यावरून त्या काळी आश्रमव्यवस्था निर्माण झाली होती, असे म्हणता येत नाही.

आर्यवर्ण व दासवर्ण असे दोनच वर्ण प्राचीन वैदिक काळात आढळतात. हाच दासवर्ण पुढे शूद्र या नावाने वर्णव्यवस्थेत आला. पण या वर्णाला आर्यांच्या धार्मिक व सामुदायिक जीवनात मिसळण्यास प्रतिबंध होता. पुढे आर्यांतच विश्, राजन्य आणि ब्राह्मण असे तीन अंतर्गत भेद निर्माण झाले. विश् म्हणजे वसाहत करून कृषी, वाणिज्य व कारागिरी हे व्यवसाय चालविणारे व राजन्य हे शस्त्र धारण करून राज्य करणारे व इतरांना संरक्षण देणारे होत. आणि या दोहोंहूनही स्वतःचे श्रेष्ठत्व प्रस्थापित करणारा ब्राह्मण हा तिसरा किंवा श्रेष्ठत्वाने पहिला समजला गेलेला वर्ग होय. या ब्राह्मणवर्णाच्या मुखात वेदमंत्र होते आणि त्यांच्या पठनावाचून आर्यांचे कोणतेही धार्मिक कृत्य पार पडत नसे. त्या काळी वेदांच्या अध्ययनाशिवाय शिक्षणक्रम पुरा होत नसे. प्रथम अध्ययन वेदांचे व मग इतर विषयांचे. हे शिक्षणही त्या काळी ब्राह्मणांच्याच हाती होते. त्यामुळे राजन्य व विश् यांच्या मुलांना शिक्षणासाठी ब्राह्मण गुरूकडेच जावे लागे. त्रैवर्णिक विद्यार्थी गुरूच्या घरी राहून विद्याभ्यास करीत असल्याची उदाहरणे उपनिषदांत अनेक ठिकाणी आढळतात.

हे विद्यार्थी गुरुगृही कामे करीत, गुरूची गुरे राखीत, गुरूच्या शेतात राबत, दोन्ही वेळा अग्नीला समिधा देत व गावात भिक्षा मागून उदरनिर्वाह करीत. फावल्या वेळात गुरु त्यांना शिकवी.

गुरू संथा देईल, त्याप्रमाणे वेद-वेदांगे व इतर विद्या मुखोद्गत करणे व वारंवार आवृत्ती करून पाठांतर तयार ठेवणे, हा त्या काळातल्या शिक्षणातला महत्त्वाचा भाग होता. हा विद्यार्जनाचा काल कित्येक वर्षांचा व विद्यार्थ्याला कष्टप्रद असा असे.

या गुरुगृहीच्या वास्तव्यातून आणि विद्यार्थ्यांच्या त्या काळातल्या कर्तव्यांतून ब्रह्मचर्य या आश्रमाची कल्पना विकसित झाली. विद्याध्ययन समाप्त केल्यावर सगळेच स्वगृही जाऊन गृहस्थाश्रम स्वीकारीत असे नाही. त्यांतले काही 'नैष्ठिक' ब्रह्मचारी बनून आयुष्यभर गुरुगृहीच राहत. दुसरे काही वनात जाऊन तप व आत्मचिंतन करीत, त्यांना 'वानप्रस्थ' म्हणू लागले. सर्वसंगपरित्याग करून म्हणजेच संन्यासी बनून भिक्षेवर उपजीविका करणारा व सतत मोक्षासाठी ध्यान-साधना करणारा असाही एक वर्ग त्या काळी समाजात निर्माण झाला होता. अशा माणसाला घर नसे व तो सतत फिरत राही म्हणून त्याला 'परिव्राजक' म्हणत.

परिव्राट्, यती, मुनी, श्रमण, वैखानस, अशा नावांनी उल्लेखिला जाणारा असा एक वर्ग वैदिक आर्यांच्याही पूर्वीपासून भारतात होता. हा वर्ग विरक्त व संन्यस्त वृत्तीने राहत असे. वैदिक आर्यांची कर्मकांडाकडे प्रवृत्ती असल्यामुळे ते या कर्महीन वर्गाविषयी आदर दाखवीत नसत. वैदिक काळात स्वतंत्र आश्रम म्हणून या यति-मुनींच्या पंथाला मान्यता नव्हती. उपनिषदांच्या काळात वैदिकांचे मन अंतर्मुख झाले, ते मानवी जीवनाचे गंभीर चिंतन करू लागले, कर्मकांडात गढून राहण्यापेक्षा वैराग्य धारण करून आत्मचिंतनात रममाण व्हावे, अशी आकांक्षा कित्येक लोकांच्या मनात बळावली व अशा प्रकारे वैदिक आर्यांच्याच समाजात वैराग्यशील व मोक्षप्रधान संन्यासधर्माकडे प्रवृत्ती वाढू लागल्यामुळे संन्यासाला आश्रमपदवी देणे त्यांना भाग पडले. वेदोत्तर काळापर्यंत वानप्रस्थ व संन्यास या दोहोंत विशेषसा फरक मानीत नसत; पण पुढे मुंडक (२.१.७) व जाबाल (४) या उपनिषदांत चारही आश्रमांचा स्पष्ट उल्लेख केला गेला आहे.

(१) ब्रह्मचर्य (२) गार्हस्थ्य (३) वानप्रस्थ व (४) संन्यास हे चार आश्रम होत. सूत्रकालात या चारही आश्रमांची परिगणना होऊ लागली. पण तरीही त्यांच्या नावांत फरक होता. आपस्तंब धर्मसूत्रात गार्हस्थ्य, आचार्यकुल (ब्रह्मचर्य), मौन व वानप्रस्थ अशी त्यांची नावे सांगितली आहेत (२.९.२१.१). वासिष्ठ धर्मसूत्रात गृहस्थ, ब्रह्मचारी, वानप्रस्थ व परिव्राजक अशी त्यांची नावे दिली आहेत. या दोन्ही सूत्रांत गृहस्थाश्रमाला पहिले स्थान दिले आहे. गौतमधर्मसूत्रात ब्रह्मचारी, गृहस्थ, भिक्षू व वैखानस अशी यांची नावे आहेत (३.२). बौधायनाने आश्रमांच्या उत्पत्तीविषयी पुढील कथा दिली आहे –

प्रल्हादपुत्र कपिल या असुराने देवांविषयी मनात वैरभाव बाळगून आश्रमव्यवस्था निर्माण केली. हेतू हा, की वानप्रस्थ व संन्यास या आश्रमांत यज्ञ करायचा अधिकार नसतो; त्यामुळे देवांना हविर्भाग न मिळून ते कमजोर होतील (६.२९-३१).

पण आश्रमव्यवस्थेची उत्पत्ती याहून वेगळ्या प्रकारे सांगता येण्याजोगी आहे. आपल्या शास्त्रकारांनी सर्वसाधारण मानवी आयुष्य शंभर वर्षांचे कल्पून त्याची चार भागांत विभागणी केली आहे. पहिला विभाग ब्रह्मचर्य. यात गुरुगृही राहून अध्ययन व व्रतपालन करायचे असते. मनूने ब्रह्मचाऱ्याचे धर्म विस्ताराने कथन केले आहेत (२.२४१–२४४). अध्ययन समाप्त झाल्यावर गुरूला दक्षिणा देऊन समावर्तन करायचे व मग गृहस्थाश्रमाचा स्वीकार करायचा. यात यज्ञ, प्रजोत्पत्ती व स्वाध्याय यांच्या द्वारे देव, पितर व ऋषी यांचे ऋण फेडायचे असते. मनूने या गृहस्थाश्रमाला फार महत्त्व दिले आहे. तो म्हणतो (३. ७७)—

यथा वायुं समाश्रित्य सर्वे जीवन्ति जन्तवः ।
तथा गृहस्थमाश्रित्य वर्तन्ते सर्व आश्रमाः ॥

अर्थ – ज्याप्रमाणे प्राणवायूच्या आधाराने सर्व जीव जगतात त्याचप्रमाणे गृहस्थाश्रमाच्या आधाराने सर्व आश्रम आपला निर्वाह करतात.

गृहस्थाने अशा प्रकारे वरील तीन्ही ऋणे फेडून मग केस पांढरे होऊ लागले व अंगावर सुरकुत्या दिसू लागल्या, की गृहत्याग करून वनात जायचे, म्हणजे वानप्रस्थ स्वीकारायचा. त्या आश्रमात काही काल घालवून मग आयुष्याच्या अखेरच्या कालात संन्यास घेऊन आत्मज्ञानाने मोक्ष प्राप्त करून घ्यायचा. हा व्यक्तीचा क्रममार्ग झाला. पण एखाद्यास वैराग्य उत्पन्न होऊन त्याने ब्रह्मचर्यातून एकदमच संन्यास घ्यायचे ठरविले, तरी त्याला तशीही मुभा होती. 'यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत्'(= ज्या दिवशी वैराग्य उत्पन्न होईल त्याच दिवशी संन्यास करावा), असे जाबालोपनिषदात (४) सांगितले आहे. मनूने (६. ३९) अशा संन्यासाविषयी म्हटले आहे —

यो दत्त्वा सर्वभूतेभ्यः प्रव्रजत्यभयं गृहात् ।
तस्य तेजोमया लोका भवन्ति ब्रह्मवादिनः ॥

अर्थ – सर्व भूतांना अभय देऊन जो गृहाश्रमातून प्रव्रजित होतो, त्या ब्रह्मवेत्त्या पुरुषाला तेजोमय हिरण्यगर्भादी लोक प्राप्त होतात.

वर्णभेदाप्रमाणे कोणी किती आश्रम करावे, याविषयी पराशरमाधवीयात याज्ञवल्क्याचा पुढील श्लोक दिला आहे—

चत्वारो ब्राह्मणस्योक्ता आश्रमाः श्रुतिचोदिताः ।
क्षत्रियस्य त्रयः प्रोक्ता द्वावेको वैश्यशूद्रयोः ।।

अर्थ – ब्राह्मणाला चारही आश्रम विहित आहेत. क्षत्रियाला पहिले तीन, वैश्याला पहिले दोन व शूद्राला केवळ गृहस्थाश्रमच सांगितला आहे.

या आश्रमव्यवस्थेच्या पालनाबाबत समुच्चय, विकल्प व बाध असे तीन पक्ष आहेत. समुच्चयवादी पक्षाचे मत चारही आश्रम एकामागून एक असे स्वीकारावे; त्यांतला एखादा वगळून पुढचा स्वीकारू नये, असे आहे. मनू या मताचा पुरस्कर्ता आहे. विकल्पवादी पक्षाचे मत असे, की ब्रह्मचर्य किंवा गार्हस्थ्य यांतून एकदम संन्यास करायला हरकत नाही. वसिष्ठ, याज्ञवल्क्य व आपस्तंब हे या मताचे आहेत. गौतम हा बाधवादाचा पुरस्कर्ता होय. त्याच्या मते गृहस्थाश्रम हाच खरा आश्रम असून, इतर आश्रम त्या मानाने कमी दर्जाचे आहेत.

या तीन्ही मतांचा समन्वय सर्वज्ञ नारायणाने केला आहे. ब्रह्मचर्यात ज्याने आपल्या इंद्रियांवर व वासना-विकारांवर पूर्ण तावा मिळविला, त्याने ब्रह्मचर्यानंतर एकदम संन्यास करायला हरकत नाही. पण ही गोष्ट ज्याला साधली नसेल, त्याने क्रमाने चारही आश्रम स्वीकारून हळूहळू वासना – विकारांचा त्याग करावा व अंती मुक्त व्हावे, असे तो सांगतो.

जन्म-मृत्यूचे फेरे चुकविणे किंवा संसारबंधातून मुक्त होणे, हे भारतीय आर्यांचे परमोच्च ध्येय होते. पण मोक्ष मिळवायचा तर वैराग्याची आवश्यकता असते. आणि ते काही सहजासहजी येत नाही. वासना, विकार, सुखोपभोग, यांतून माणूस सहसा मुक्त होऊ शकत नाही. इंद्रिये ताब्यात आणायची, तर त्यालाही फार कष्ट पडतात. हे सर्व जाणून प्रत्येक अवस्थेत मनाला हळूहळू निग्रहाचे शिक्षण मिळून अंती त्याला इंद्रियजय साध्य व्हावा, या हेतूने प्राचीन भारतीयांनी आश्रमव्यवस्था निर्माण केली. तिच्यामागे मानसशास्त्रीय विचार होता. ब्रह्मचर्यात विद्येबरोबरच माणसाला विवेक, संयम व इंद्रियनिरोधाची शक्ती हे गुण अंगी बाणविता येतात. गृहस्थाश्रमात त्याला परिष्कृत अशा वैषयिक सुखांचा आनंद उपभोगता येतो व त्याबरोबर मुलांबाळांविषयीची व समाजाविषयीची कर्तव्येही पार पाडता येतात. पन्नाशीची झुळूक लागली, की त्याला भौतिक सुखाची क्षणभंगुरता कळून येते. मग जीवनातले शाश्वत तत्त्व काय असेल, याविषयी तो जिज्ञासू बनतो. मृत्यूनंतर आपले पुढे काय होणार, याविषयीही त्याच्या मनात टोचणी सुरू होते. मग तो तत्त्वचिंतनासाठी वनात जातो व आत्मक्लेशपूर्वक तपश्चरण करतो. अशा प्रकारे केलेल्या साधनेतून त्याच्या सर्व वासक्ती नष्ट झाल्या, की मग तो संन्यस्त होतो व त्या आश्रमात 'तत्त्वमसि' साक्षात्कार घडून मुक्त होतो. कित्येकदा हा मोक्षलाभ होण्यासाठी त्याला अनेक जन्मही घ्यावे लागतात.

प्रत्येक व्यक्ती ही समाजाचा एक घटक असते. त्यानुसार प्रत्येकाला समाजविषयक काही कर्तव्ये पार पाडावी लागतात. त्यांचे योग्य मार्गदर्शन व नियमन करण्यासाठी भारतात वर्णव्यवस्था निर्माण झाली. पण सामाजिक कर्तव्ये करीत असताना त्या व्यक्तीचाही विकास झाला पाहिजे व तिच्या उत्कर्षालाही अवसर मिळाला पाहिजे, हे सर्व लक्षात घेऊन आश्रमव्यवस्थेची आखणी करण्यात आली आहे.

बौद्ध व जैन यांनी इतर आश्रमांना हीनत्व देऊन केवळ संन्यासाचीच, केवळ यतिजीवनाचीच तरफदारी केली. पण त्याचा परिणाम असा झाला, की समाजात भिक्षूंची संख्या अतोनात वाढली. त्यामुळे समाज तर दुर्बल झालाच; शिवाय भिक्षुसंघातही भ्रष्टाचार माजले. अपरिपक्व वयोवस्थेत अर्थकामांच्या प्रेरणा दावून टाकल्या, तर त्या वाकडे वळण घेऊन उन्मार्गगामी वनतात, हा अनुभव आहे. त्यामुळे व्यक्तीचा व समाजाचाही अधःपात होतो. माणसाच्या अंतरातल्या अर्थकामांना योग्य तो वाव देऊन हळूहळू त्याला त्यांपासून निवृत्त करून विवेक-वैराग्याच्या मार्गावर आरूढ करणे, हेच हितावह असते. मानवी जीवन आश्रमव्यवस्थेत नियमित केल्यानेच हा उद्देश सफल होईल, हे भारतीय धर्मधुरीणांनी जाणले व आश्रमव्यवस्था पक्की केली. आणि म्हणूनच, आश्रमव्यवस्थेतल्या उच्च तत्त्वांची व आदर्शांची बरोबरी करणारी दुसरी कोणतीही संस्था आजवर जगातल्या कोणत्याही मानवसमाजात निर्माण झाली नाही, अशी प्रशंसा डॉयसेन व गेडेन या समाजशास्त्रज्ञांनी केली आहे. [ वे. इं.; हि. ध.; एन्सा. रि. ]

(२) वसतिस्थान, मठ, देवालय असे या शब्दाचे अर्थ आहेत. प्राचीन काळी वैदिक ऋषी अरण्यात पर्णकुटी बांधून तिथे वसती करीत. त्यांच्या निवासस्थानांनाही आश्रम हेच नाव होते. त्यांच्याजवळ वेदाध्ययन करण्यासाठी अनेक विद्यार्थी राहत होते. पुराणांत अशा शेकडो आश्रमांची वर्णने आढळतात. रामायण व महाभारत या ग्रंथांतही कित्येक ऋषींच्या आश्रमांचे उल्लेख आहेत. अगस्त्य, कण्व, धौम्य, भरद्वाज, भृगू, वसिष्ठ, विश्वामित्र यांचे आश्रम प्रख्यात होते. आजही निरनिराळ्या ठिकाणी प्राचीन ऋषींच्या आश्रमांची स्थाने दाखवली जातात. पाहा – देवालये, मठ.

**आश्रमव्रत** चैत्र शुद्ध चतुर्थीपासून प्रारंभ. तीन महिन्यांचा एक, असे वर्षाचे चार भाग करून, प्रत्येक भागात अनुक्रमे वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध यांची पूजा करणे,

असा याचा विधी आहे. व्रतावधी एक वर्ष असतो. [ हि. ध. ]

**आश्लेषा** वैदिक आश्रेषा (तै. सं. ४.४.१०). सत्तावीस नक्षत्रांपैकी अश्विनीपासून नववे नक्षत्र. हे आकाशात पुष्याच्या दक्षिणेस दिसते. याच्या पाच तारका आहेत व त्या मंदप्रभ आहेत. सर्प ही याची देवता आहे (तै. ब्रा. १.५.१.). चतुर्वर्गचिंतामणीत याचे मूर्तिध्यान पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

**कोकास्या वा बिडालास्या रक्ताश्लेषा चतुर्भुजा ।**
**अक्षकुण्डीधरा द्वाभ्यां सर्पालिङ्गनकारिणी ।**

अर्थ – आश्लेषांची मूर्ती ही रक्तवर्ण, लांडग्याच्या किंवा मांजराच्या तोंडाची, चतुर्भुज, दोन हातांत फासे व कुंड धारण करणारी आणि दोन हातांनी सर्पाला आलिंगन देणारी अशी करावी.

आश्लेषा हे नक्षत्र अधोमुख, मंदाक्ष, व स्त्रीलिंगी आहे. यावर जन्मलेली व्यक्ती धीट, भावनाशून्य व ताठर असते. [ श.क.; नक्षत्र लोक ]

**आश्लेषाजननशांती** आश्लेषा नक्षत्रावर जन्म झाल्यास शांती करावी लागते. प्रथम गोप्रसव शांती करतात. आश्लेषांची देवता सर्प आहे. म्हणून मग सर्पप्रतिमा कलशावर ठेवून तिची पूजा करतात. ही या विधानाची मुख्य देवता होय. तिच्याबरोबरच पुष्य व मघा या नक्षत्रांच्या देवता आणि बृहस्पती व पितर यांचीही पूजा करतात. मग ऋत्विज मुख्य देवतेची सूक्ते पठण करतो. अग्नी सिद्ध करून आज्यमिश्रित पायस, समिधा, चरू व आज्य या हविर्द्रव्यांचा होम करतात. सर्व देवतांना बलिदान करतात. पूर्णाहुती व बालकासह यजमानदंपतीला अभिषेक करतात. अभिषेकाच्या मंत्रांत पुढील एक मंत्र असतो–

**आश्लेषाऋक्षजातस्य मातापित्रोर्धनस्य च ।**
**भ्रातृज्ञातिकुलस्थानां दोषं सर्वं व्यपोहतु ॥**

अर्थ – आश्लेषांवर जन्मलेला (हा) बालक, त्याचे आईबाप, धन, बांधव, ज्ञातीतले व कुळातले लोक, या सर्वांच्या दोषाचे (हे शांतिकर्म) निराकरण करो. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**आश्वकायन** पाणिनिकालीन एक गण. ग्रीक लोकांनी याला 'अस्सकेनोआइ' असे नाव दिले आहे. मस्सग किंवा मशकावती ही आश्वकायनांची राजधानी होती. सुवास्तू किंवा स्वात नदीच्या खालच्या भागात, बाजौर (जि. कांगडा, पंजाब) पासून २४ मैलांवर मजग किंवा मस्सनगर नावाचे एक शहर आहे. हीच प्राचीन मशकावती होय. हे लोक लढवय्ये होते. बाहेरून हल्ला होई, तेव्हा आश्वकायन स्वात नदीच्या वरच्या बाजूला आपल्या पहाडी दुर्गांत आश्रय घेत. आश्वकायन घोड्यांचे प्रेमी असावे व युद्धात ते घोड्यांचा उपयोग करीत असावे. [ पा. का. भा. ]

**आश्वयुजीकर्म** सप्त पाकयज्ञांपैकी एक. आश्विन पौर्णिमेस हा यज्ञ करतात. नित्यस्थालीपाकाच्या तंत्रानेच याचे कृत्य करायचे असते. या यज्ञात पशुपतीला उद्देशून पुढील मंत्राने पृषातकाच्या आहुती देतात–

**पशुपतये शिवाय शङ्कराय पृषातकाय स्वाहा ।**

पृषातकाची व्याख्या गोभिलगृह्यसूत्राच्या टीकेत पुढीलप्रमाणे दिली आहे –

**आज्यसंयुक्तं पयो दधि वा पृषातकमित्युच्यते**
(गो. गृ. सू. ३.८.१ वरील टीका)

अर्थ – तुपात दूध किंवा दही मिसळले, की त्याला पृषातक म्हणतात.

हा यज्ञ मुख्यत्वे गोधनाच्या वृद्धीसाठी असतो आणि म्हणून यात पशुपतीला आहुती द्यायच्या असतात.

या यज्ञात अश्विनौ, पूर्णचंद्र, शरदृतू व पशुपती यांना आज्याहुती द्याव्या, असे शांखायन गृह्यसूत्र सांगते. या यज्ञात इंद्रासाठी पायस शिजवावा व त्यात दही, मध व तूप घालून त्याच्या इंद्र, इंद्राणी, अश्विनौ, पूर्णचंद्र व शरद् यांना आहुती द्याव्या आणि वैभवप्राप्तीसाठी वनस्पती व लाख यांनी भरलेले ताईत यजमानाने व त्याच्या कुटुंबियांनी दंडांत बांधावे, असे गोभिल गृह्यसूत्रात सांगितले आहे (३.८.१–८).

काठक गृह्यसूत्रात या यज्ञाच्या निमित्ताने पुढील विशेष विधी सांगितले आहेत –

गावाच्या उत्तरेस एका सुशोभित वेदीवर विविध रसांनी भरलेली व धान्याने भरलेली पात्रे ठेवावी. तिथेच अग्नी सिद्ध करून वरुण, अग्नी व वर दिलेल्या देवता यांना आहुती द्याव्या. पशूंना स्नान घालावे. घोड्यावर खोगीर घालावे व त्यांना वाहनांना जुंपून किंवा त्यांवर स्वार होऊन वेदीला प्रदक्षिणा घालाव्या. जयघोष करावे. करमणुकीचे खेळ खेळावे. गायींच्या मुखात मीठ घालावे (काठक गृ. सू. ५९.१-९).

या दिवशी घर शृंगारावे व रात्री वासरांना गायींजवळ ठेवावे, असेही सांगितले आहे. [ हि. ध.; इं. वे. क. सू. ]

**आश्वलायन** एक शाखाप्रवर्तक आचार्य. ऋग्वेदाच्या ऋषितर्पणात याचा उल्लेख आहे. हा

शौनकाचा शिष्य होता. शौनकाने एक मोठे सूत्र तयार केले होते. पण आश्वलायनाचे सूत्र संक्षिप्त व अधिक चांगले आहे असे त्याला दिसून आल्यावर त्याने स्वतःचे सूत्र फाडून टाकले, असे सांगतात. याचे गृह्यसूत्र ऋग्वेद्यांच्या गृह्यकर्माला प्रमाण मानले जाते. याच्या शाखेचे संहिता, ब्राह्मण इत्यादी ग्रंथ उपलब्ध नाहीत. [प्रा. च. को.]

**आश्वलायन गृह्यसूत्र** याचे चार अध्याय आहेत. पहिल्या अध्यायात विवाह, पार्वण, पशुयाग, चैत्य, संस्कार, इ. विषय आले आहेत. दुसऱ्यात श्रावणी, आश्वयुजी, आग्रहायणी, अष्टका, गृहनिर्माण, इ. विषय आहेत. तिसऱ्यात पंचमहायज्ञाचे विवरण असून ते अवश्य कर्तव्य म्हणून सांगितले आहेत. याच अध्यायात आपत्काल व युद्धकाल यांतील कर्मांचे वर्णन आहे. चौथ्या अध्यायात अंत्येष्टी व श्राद्ध यांचे सविस्तर वर्णन आहे. अग्निहोत्री मृत झाला असता त्याचे शव तीन्ही अग्नींनी प्रज्वलित करावे. त्याला आहवनीय अग्नी प्रथम स्पर्श करील, तर मृत पुरुषाला स्वर्ग मिळाला, गार्हपत्य अग्नीने प्रथम स्पर्श केल्यास अंतरिक्षलोक मिळाला, दक्षिणाग्नीने प्रथम स्पर्श केल्यास मनुष्यलोक मिळाला व तीन्ही अग्नींनी एकदम स्पर्श केल्यास मोक्ष मिळाला असे समजावे, असे त्यात सांगितले आहे. अग्निहोत्री मृत झाला असता त्याची यज्ञपात्रे त्याच्यासह दहन करावी, असेही सांगितले आहे. पण त्याची सगळी मातीची भांडी (कौलालम्) त्याच्या पुत्राने जतन करून ठेवावी, असे सांगितले आहे (४. ३. १८).

या सूत्रात तर्पणविधी सांगताना ऋग्वेदाचे मंडलवार ऋषी घेतलेले आहेत. जिथे नामोल्लेख अशक्य वाटला तिथे, प्रगाथ, क्षुद्रसूक्त, महासूक्त व मध्यम असा उल्लेख केला आहे. याव्यतिरिक्त सुमंतू, जैमिनी, वैशंपायन, पैल, सूत्रकार, भाष्यकार व भारतकार यांचाही उल्लेख आहे.

श्री. चिं. वि. वैद्यांच्या मते या सूत्राचा काळ इ. सनपूर्व १२०० वर्षे हा आहे, तर पं. राम गोविंद त्रिवेदी यांच्या मते तो त्याहूनही प्राचीन आहे. [वै. सा.; हि. ध.]

**आश्वलायन श्रौतसूत्र** ऋग्वेदाची आश्वलायन शाखा उपलब्ध नसली, तरी तिची गृह्य व श्रौत ही सूत्रे उपलब्ध असून, फार प्रसिद्ध आहेत. ऐतरेय ब्राह्मणाशी आश्वलायनाचा घनिष्ट संबंध आहे. अश्वल ऋषी हा विदेहराजा जनक याच्याकडे होता व तोच या उभय सूत्रांचा प्रवर्तक आहे, असे काहींचे मत आहे. ऐ. आरण्यकाच्या चौथ्या कांडाच्या प्रवर्तकाचे नावही आश्वलायनच आहे. हा शौनक ऋषीचा शिष्य होय.

ऐ. ब्राह्मण व ऐ. आरण्यक या ग्रंथांत जे श्रौतयज्ञ विस्तृत रूपाने सांगितले आहेत, त्यांचे विधान संक्षेपात सांगणे हा या सूत्राचा उद्देश आहे. याचे १२ अध्याय आहेत. यात प्रामुख्याने होत्याच्या कर्मांचे विवेचन आहे. इष्टियागांचा प्रकृतियाग म्हणजे दर्श-पूर्णमास हा होय. म्हणून यात प्रथम त्याचेच विधान सांगितले आहे. अग्न्याधान, आग्रयण, काम्येष्टी, चातुर्मास्य; सौत्रामणी, सोमसंस्था, सत्र व शेवटी गोत्रप्रवरांचा संग्रह, इ. विषय यात आले आहेत. आश्मरथ्य, कौत्स, गाणगारी, गौतम, तौल्वली व शौनक, या आचार्यांचा यात उल्लेख येतो. यात श्रौत कर्माविषयी काही नियम सांगितले आहेत, ते असे –

(१) आहिताग्नी पुरुष हाच यज्ञाचा अधिकारी होतो.

(२) यजमानाने प्रत्येक देवकार्यात यज्ञोपवीती (जानवे उजव्या खांद्याखालून असणे) व पितृकार्यात प्राचीनावीती (जानवे डाव्या खांद्याखालून असणे) आवश्यक आहे.

(३) विहारभूमीला प्रदक्षिणा करणे होत्याचे प्रथम व आवश्यक कर्तव्य आहे.

(४) विहारभूमीत (यज्ञमंडपाचा विशिष्ट भाग) जोवर काही कार्य चालत असेल, तोवर तिला पाठ दाखविता कामा नये.

(५) जिथे जिथे मस्तक, अंगुली, इ. नावे आली असतील, तिथे तिथे त्या अंगाचा दक्षिणभाग समजावा.

(६) 'दान करावे' असा जिथे जिथे विधी असतो, तिथे तिथे तो यजमानासाठीच समजावा.

(७) प्रायश्चित्त प्रकरणात अथवा जप-होमासमयी जो विधी उक्त असतो, तो ब्रह्म्यासाठी समजावा.

(८) जिथे मंत्राचा प्रथम चरण उल्लेखिलेला असेल तिथे तो संपूर्ण मंत्र समजावा. जिथे चरणाहून अधिक अक्षरे दिली असतील, तिथे तीन ऋचा समजाव्या व जिथे चरणाहूनही कमी अक्षरे दिली असतील, तिथे समग्र सूक्त समजावे.

(९) जप (पाठ), अनुमंत्रण (अर्थस्मरणासहित पठण), अभिमंत्रण (ज्यावर संस्कार करायचे अशा हविर्द्रव्यांकडे दृष्टी लावून पठण), आप्यायन (वारंवार जलस्पर्श करीत पठण) व उपस्थान (विनम्र भावाने पठण) हे विधी जिथे जिथे सांगितले असतील, तिथे तिथे मंत्रांचा प्रयोग उपांशू (अशब्द उच्चारण) असला पाहिजे.

(१०) सारे अनुष्ठान समंतक असले पाहिजे.

(११) वेदीची उत्तर श्रोणी हेच होत्याचे कर्मस्थान होय.

(१२) अध्वर्यूकडून प्रैष मिळाल्यावरच होत्याने मंत्र

म्हणावे. होम करीत असतां डाव्या हाताची बोटे पसरून हृदयावर ठेवावी. [ वै. सा.; हि. ध. ]

**आश्विक** एक जात. क्षत्रिय पुरुष व वैश्य स्त्री यांची ही विवाहबाह्य संतती होय, असे वैखानस सांगतो. हे लोक घोडयांचा व्यापार करीत. [ हि. ध. ]

**आश्विन** चैत्रादी मासांतला सातवा व शरद् ऋतूचा पहिला मास. याला 'इष' असेही दुसरे नाव आहे. या या मासाच्या पौर्णिमेस किंवा आगे मागे अश्विनी नक्षत्र असते म्हणून याला आश्विन म्हणतात. या मासात सूर्याचे तुला राशीत संक्रमण होते.

**आश्विनमासकृत्ये** – या मासात धार्मिक विधी व उत्सव पुष्कळ असतात. नवरात्राच्या घटस्थापनेने या मासाच्या धर्मकृत्यांचा प्रारंभ होतो. आश्विन शु. प्रतिपदेस मातामहश्राद्ध. चतुर्थीस सतीची पूजा. त्या दिवशी सुवासिनींचा सन्मान. पंचमीस कुशतृणाने बनविलेल्या नागांची व इंद्राणीची पूजा.



आश्विन मासाचे सांकेतिक चित्र

त्याच दिवशी ललितेची पूजा. त्याच पक्षात मूळ नक्षत्रावर सरस्वतीचे आवाहन. पूर्वाषाढा नक्षत्रावर तिची स्थापना, उत्तराषाढा नक्षत्रावर तिची पूजा व श्रवण नक्षत्रावर तिचे विसर्जन. नवमीस आयुधपूजा व दुर्गादेवीसाठी हवन व बलिदान. दशमीस सीमोल्लंघन. पौर्णिमेस नवान्नभक्षण व कार्तिकस्नानाचा प्रारंभ. वद्य पक्षात द्वादशीस गोवत्सांची पूजा. त्याच दिवशी दत्तात्रेयाचा उत्सव. त्रयोदशीस यमासाठी दीपदान. चतुर्दशीस दिवाळीचे अभ्यंगस्नान. अमावास्येस लक्ष्मीपूजन.

या मासातले विशेष कृत्य म्हणजे घृतदान हे आहे. त्याचप्रमाणे पद्मनाभाच्या प्रीतीसाठी गाय, बैल, घोडा, तीळ, दही, इ. दाने करावी, असेही सांगितले आहे. तमिळनाडूमध्ये या मासाला तुलामास म्हणतात व त्या महिन्यांत विशेषतः अमावास्येस कावेरी नदीत स्नान करतात. [ पु. चि.; हि. ध. ]

**आश्विनशस्त्र** अश्विनौ देवतेच्या स्तुतिपर ऋग्वेदातील अनेक ऋचांच्या समूहास आश्विनशस्त्र म्हणतात. अतिरात्र यागामध्ये पहाटेपासून सूर्योदयापर्यंत होता नावाचा ऋत्विज् या शस्त्राचे पठण करतो. या शस्त्रासंबंधीची कथा अशी–

प्रजापतीने आपली मानलेली कन्या सूर्यासावित्री सोमराजाला दिली. त्या वेळी तिला वरण्यासाठी सर्व देव आले. तेव्हा प्रजापतीने त्यांच्यापुढे सहस्रऋचात्मक एक शस्त्र ठेवले. त्या वेळी ते आपल्याला मिळावे म्हणून देव आपसात भांडू लागले. त्यावर तोंड म्हणून त्यांनी असे ठरविले, की गार्हपत्य अग्नीपासून आदित्यापर्यंत धावण्याची शर्यत लावायची. ती शर्यत जो जिंकील, त्याने ते शस्त्र घ्यावे. त्यानंतर ती शर्यत झाली. अश्विनौ देवांनी त्या शर्यतीत जय मिळविला व त्यांना ते शस्त्र मिळाले. त्या दिवसापासून त्या शस्त्राला 'आश्विनशस्त्र' असे नाव पडले. [ वै. नि. ]

**आश्विनी** आश्विन मासातील पौर्णिमेला सायंकाळी आई आपल्या सर्वांत मोठ्या मुलाला (मुलगा किंवा मुलगी) ओवाळून त्याचे औक्षण करते व त्याला दूध प्यावयास देते. विशेषतः महाराष्ट्रात हा प्रघात आहे. याला मुलांची आश्विनी करणे, असे म्हणतात.

**आषाढ** चैत्रादी मासांतला चौथा व ग्रीष्म ऋतूचा दुसरा महिना. याला 'शुची' असेही दुसरे नाव आहे. या मासाच्या पौर्णिमेस किंवा तिच्या आगे मागे पूर्वाषाढा किंवा उत्तराषाढा नक्षत्र असते, म्हणून या मासाला आषाढ ही संज्ञा मिळाली आहे. या मासात सूर्याचे कर्कसंक्रमण होते. तिथून दक्षिणायन सुरू होते. कर्कसंक्रमणाच्या वेळी श्राद्ध करावे, असे सांगितले आहे.

**आषाढमेकभक्तेन स्थित्वा मासमतन्द्रितः ।**
**बहुधान्यो बहुधनो बहुपुत्रश्च जायते ।**

अर्थ – आषाढ महिन्यात एकभुक्त करून निरलस राहिल्याने पुष्कळ धनधान्य व पुत्र याचा लाभ होतो.

**उपानद्युगलं छत्रं लवणामलकानि च ।**
**आषाढे वामनप्रीत्यै दातव्यानि तु भक्तितः ।।**

अर्थ – आषाढ महिन्यात वामनाच्या प्रीतीसाठी पादत्राणे; छत्री व मिठातले आवळे भक्तिपूर्वक दान द्यावे.

याशिवाय आषाढ शु. द्वितीया पुष्यनक्षत्रयुक्त असेल, तर त्या दिवशी कृष्ण, बलराम व सुभद्रा यांचा रथोत्सव करावा. षष्ठीला उपवास व सप्तमीला सूर्य पूर्वाषाढा नक्षत्रात असला, तर त्या दिवशी सूर्याची वैवस्वत या नावाने पूजा करावी.



आषाढ मासाचे सांकेतिक चित्र

अष्टमीला महिषासुरमर्दिनीची पूजा, दशमीला वरलक्ष्मीव्रत, एकादशीला उपवास, पौर्णिमेला अन्नदान, कृष्ण अष्टमीला विनायकपूजा, इ. कृत्ये करावी. आषाढ महिना अधिकमास आल्यास कोकिला व्रत करावे.

आषाढाच्या शुक्ल पक्षातील एकादशी शयनी एकादशी म्हणून विख्यात आहे. त्या दिवशी लक्षावधी विठ्ठलभक्त वारकरी पंढरपुरी पांडुरंगाचे दर्शन घेऊन धन्य होतात. अन्य वैष्णव पुण्यक्षेत्रांतही भक्तांची गर्दी होते. या दिवशी चातुर्मासाला आरंभ होतो.

आषाढी पौर्णिमेला गुरुपौर्णिमा म्हणतात. त्या दिवशी व्यासपूजा करण्याची प्रथा आहे.

कृष्ण एकादशीला कामिका हे नाव असून, त्या दिवशीही लाखो विठ्ठलभक्त विष्णूचे दर्शन घेतात.

आषाढी अमावास्येला दिव्याची अवस म्हणतात. त्या दिवशी दीपपूजा करतात. काही ठिकाणी बैलपोळाही साजरा केला जातो. **पाहा** – कामिका एकादशी, कोकिलाव्रत, गुरुपौर्णिमा, दिव्याची अवस, शयनी एकादशी. [हि. ध.; पु. चि.]

## आसक्ती

आसक्ती शब्दाचा अर्थ ‘एखाद्या ठिकाणी मन जडणे’ असा आहे. भागवत संप्रदायानुसार परमात्म्याच्या ठिकाणी भक्त ११ प्रकारांनी आसक्त होऊ शकतो. त्या आसक्तींचे प्रकार पुढीलप्रमाणे–

(१) **गुणमाहात्म्यासक्ती** – हिच्यात भगवान किंवा त्याचे अवतारविशेष याच्या गुणांच्या माहात्म्यावर भक्त आकर्षित होतो.

(२) **रूपासक्ती** – हिच्यात अवतारविशेषाच्या रूपावर भक्ताचे मन मुग्ध होते.

(३) **पूजासक्ती** – हिच्यात भगवंताच्या पूजा-अर्चेविषयी आवड निर्माण होते.

(४) **स्मरणासक्ती** – हिच्यात भगवंताच्या नाम-गुणकर्मांचे स्मरण करून भक्त सुख मिळवितो.

(५) **दास्यासक्ती** – भगवंतावताराच्या ठिकाणी दासभावनेने सेवा-धर्माचे आचरण.

(६) **सख्यासक्ती** – भगवंताशी सख्यभावाने भक्तियुक्त वर्तन.

(७) **कान्तासक्ती** – हिच्यात भक्त स्वतःला परमात्म्याची प्रेयसी समजून त्याची भक्ती करतो.

(८) **वात्सल्यासक्ती** – हिच्यात भगवंताविषयी वात्सल्यभाव प्रकट केला जातो.

(९) **आत्मनिवेदनासक्ती** – हिच्यात भक्त परमेश्वरापुढे आपल्या अवगुणांचे वर्णन करतो.

(१०) **तन्मयासक्ती** – हिच्यात भक्त देहभाव विसरून परमेश्वराच्या ठिकाणी तन्मय होतो.

(११) **परमविरहासक्ती** – हिच्यात भक्त भगवंताच्या विरहात सदैव व्याकुळ राहतो. [हिं. सा. को.]

## आसंग प्लायोगी

वैदिक काळातला दानशूर राजा व मंत्रद्रष्टा (ऋ. ८. १. ३२-३३). याचे पुरुषत्व नष्ट होऊन याला स्त्रीत्व प्राप्त झाल्यामुळे त्याची पत्नी शश्वती हिला दुःख झाले. तिने मेध्यातिथी ऋषीकडे जाऊन, आपल्या पतीला पुनश्च पुरुषत्व मिळवून देण्याबद्दल

प्रार्थना केली. मेध्यातिथीने मंत्रसामर्थ्याने त्याला पौरुष दिले. एका ऋचेत त्याला 'याद्व 'म्हटले आहे, त्यावरून हा यदुवंशातला असावा, असे वाटते. याने काण्व प्रगाथाला दश सहस्र मुद्रा व दहा अश्व एवढी देणगी दिली होती. [ ऋ. इ.; प्रा. च. को. ]

**आसंदी** या शब्दाचा अर्थ उच्चासन असा आहे. ऋग्वेदात त्याचा उल्लेख नाही; पण अथर्ववेदात आहे (१५.३.२). याशिवाय तै. संहिता (७.५.८.५), वाज. संहिता. (८.५६), ऐ. ब्राह्मण (८.५), श. ब्राह्मण (३.३.४.२६), इ. ग्रंथांत आसंदीचे उल्लेख येतात. ही लाकडाची बनवीत. राज्याभिषेकाच्या वेळी राजा औदुंबराच्या आसंदीवर बसतो व ते आसन 'मुंज' तृणाने विणलेले असते, असे तिचे विशेष वर्णन ऐ. ब्राह्मणात आहे (८.५; ६.१२). त्यावरून असे वाटते, की राजाचे विशेष प्रसंगी बसण्याचे ते एक सुखासन होते. पर्यंक हे आसंदीचेच बृहत्-रूप आहे. धनाढ्य व शासक लोक आसंदीचा बसण्यासाठी व आराम करण्यासाठी ही उपयोग करीत. अमरावतीच्या शिल्पात बुद्ध आसंदीवर बसलेला आहे, असे दृश्य आहे.


आसंदीचे दोन भिन्न प्रकार

काही आसंदींची लांबी दोन माणसांना बसण्याइतकी असे. शक्र व मांधाता, राजा व राणी, नागराज व त्याचा मित्र, एका आसंदीवर बसले आहेत, अशीही दृश्ये अमरावतीच्या शिल्पांत दिसतात. अधिकारभेदपरत्वे आसंदी या उंचीला कमी अथवा अधिक असत. आसंदीला अभ्रा घालीत असत (अथर्व. १५.३.७.). राजसूय यज्ञात आसंदीवर व्याघ्राजिनाचे आस्तरण घालीत (ऐ. ब्रा. ८.५). [ वे. इं.; वै. सा. सं.; अ. स्क. म. म्यू. ]

**आसने** हात व पाय एका विशिष्ट अवस्थेत ठेवून व शरीर ताठ व स्थिर करून ध्यानधारणेसाठी बसणे, याला आसन म्हणतात. भारतातल्या सर्व धार्मिक संप्रदायांत आसनांची कल्पना आहे. मनाच्या एकाग्रतेसाठी अशा आसनांचा चांगला उपयोग होतो, असे अनुभवी लोक सांगतात.

हठयोग आणि राजयोग या दोन्ही योगमार्गांत आसनांचे फार महत्त्व मानलेले आहे. पातंजल योगसूत्रांत आसनाचे पुढील लक्षण सांगितलेले आहे – 'स्थिरसुखमासनम्' ( = ज्या योगाने शरीर स्थिर राहून मनाला सुख वाटते, अशा बसण्यास आसन म्हणावे) (साधनपाद सू. ४६). हठयोगाचे तर आसन हेच प्रथम अंग आहे.

**हठस्य प्रथमाङ्गत्वादासनं पूर्वमुच्यते ।**
**कुर्यात्तदासनं स्थैर्यमारोग्यं चाङ्गलाघवम् ॥**

अर्थ – हठयोगाचे प्रथम अंग आसन होय. म्हणून प्रथम आसन करून नंतर स्थिर होण्यासाठी प्रयत्न करावा. आसनामुळे शरीर चपल व आरोग्यवान होते.

जैनांचे तीर्थंकर हे योगीच होते. त्यामुळे जैन शिल्पकारांनी त्यांच्या मूर्ती विशिष्ट आसनबंधांतच खोदलेल्या दिसतात. कायोत्सर्गासारखी काही आसने जैनांनी स्वतंत्रपणे शोधून काढली आहेत. ज्ञानार्णव या जैन ग्रंथात आसनांचे मुख्यतः पाच प्रकार मानले आहेत, ते असे –

**पर्यङ्कमर्धपर्यङ्कं वज्रं वीरासनं तथा ।**
**सुखारविन्दपूर्वं च कायोत्सर्गश्च सम्मतः ॥**

अर्थ – पर्यंक, अर्धपर्यंक, वज्र, वीर व सुखासन–पद्मासनपूर्वक कायोत्सर्ग. (या पाच आसनांना मोक्षासने असेही म्हणतात.)

अहिर्बुध्न्य संहितेत (अ. ३०) अकरा प्रमुख आसनांची नावे वर्णनासह आली आहेत. त्यांचा उपयोग मनाच्या एकाग्रतेसाठी सांगितला आहे. बसण्याची पद्धती या दृष्टीने आसन शब्दाचा अर्थ घेतल्यास त्यात पुढील आसने प्रसिद्ध आहेत–

**वीरासन** – उजवे पाऊल जमिनीवर ठेवून डाव्या पायाची फक्त बोटे व गुडघा जमिनीला टेकवून त्यांवर सर्व शरीर तोलून धरणे आणि छाती पुढे काढून शौर्याचा आविर्भाव दाखविणे, हे वीरासन होय.


वीरासन

**कूर्मासन** – दोन्ही पाय दुमडून टाचा गुदद्वाराखाली घेणे, याला कूर्मासन असे म्हणतात. मोहेंजोदडो व हडप्पा या ठिकाणी सापडलेल्या काही मुद्रांवर पशुपती कूर्मासनावर बसलेला दिसतो.

**पद्मासन** – डावे पाऊल उजव्या मांडीवर व उजवे पाऊल

डाव्या मांडीवर ठेवून बसणे, या स्थितीला पद्मासन म्हणतात.

**कुक्कुटासन** – (१) पद्मासन घालून दोन्ही हात जमिनीवर टेकणे व त्यांवर भार घालून सर्व शरीर उचलून अधांतरी लोंबत ठेवणे. (२) दोन्ही पावले जमिनीवर ठेवून गुडघे उभे करणे व शरीराचा भार पायांवर घालून उकिडवे बसणे.

**सिंहासन** – कूर्मासनाप्रमाणेच पाय दुमडून बसणे. हाताची बोटे पसरून दोन्ही तळवे मांड्यांवर ठेवणे. तोंड उघडे व दृष्टी नासाग्र ठेवणे.

**भद्रासन** – दोन्ही पाय दुमडून टाचा अंडाखाली घेणे व दोन्ही हातांनी पायांचे आंगठे धरणे.



भद्रासन

**वज्रासन** – पावले मांड्यांवर घेऊन त्यांचे तळवे उताणे दाखविणे व त्यांवर हातांचे तळवे ठेवणे.

याव्यतिरिक्त चक्र, मयूर, स्वस्तिक, मुक्त व गोमुख अशीही आसने सांगितली आहेत.

योगसूत्रांवरील व्यासभाष्यात वरील आसनांव्यतिरिक्त दंडासन, सोपाश्रय (ज्यात योगपट्टाचे साहाय्य लागते, असे आसन), पर्यंक, क्रौंच-निषदन, हस्तिनिषदन, उष्ट्रनिषदन, समसंस्थान, स्थिरसुख व यथासुख अशी अधिक आसने सांगितली आहेत.

भारतीय मूर्तिकलेत सामान्यपणे पद्मासनाचा उपयोग केलेला दिसतो. राजकारणी व्यक्तींच्या प्रतिमा बहुधा वीरासनावर दिसतात. सुखासनी मूर्ती डावा पाय सरळ, उजवा पाय गुडघ्यात वाकवून जवळच उभा व उजवा हात गुडघ्यावर पसरलेला अशा स्थितीत असतात. ऐहोळे येथील विष्णुमूर्ती व शशांकाच्या एका सुवर्ण-मुद्रेवरील शिवप्रतिमा सुखासनी दिसतात. काही देवता उत्कूटिकासनावरही आढळतात. टाचा ढुंगणाजवळ येतील अशा पद्धतीने मांडी घालणे, गुडघे वर उचलणे, पुढे वाकून दोन्ही हात गुडघ्यांवर ठेवणे व गुडघे स्थिर राहावे म्हणून त्यांना योगपट्टाने बांधणे, असे हे आसन असते. पर्यंकासनात मूर्तींची बैठक उंच असून, दोन्ही पाय खाली लोंबते सोडलेले असतात. ललितासनात एक पाय लोंबता व दुसरा दुमडून घेतलेला असतो. (यौगिक आसने त्या त्या नावाखाली पाहा).

**योगासने** – योगशास्त्रात शरीराच्या व मनाच्या आरोग्यासाठी ज्या क्रिया सांगितल्या आहेत, त्यांना आसने म्हणतात. योग साधनेला प्राणायामापासून आरंभ होतो. त्यापूर्वी नाडीशोधनासाठी षट्कर्मे व आसने करणे आवश्यक असते. आसनांमुळे शरीर निरोगी व चपळ होऊन प्राणायाम करणे सोपे होते.

**धर्मकृत्याची आसने** – जपजाप्य व धर्मकृत्ये यांसाठी बसायला जी आसने घेतात, त्यांत पुढील आसने प्रशस्त असल्याचे आह्निकसारात सांगितले आहे.

**कौशेयं कम्बलं चैव अजिनं पट्टमेव च ।**
**दारुजं तालपत्रं वा आसनं परिकल्पयेत् ।।**

अर्थ – रेशमी वस्त्र, कांबळे, कृष्णाजिन, तलम रंगीत वस्त्र, लाकडी (पाट) व ताडपत्र यांपैकी एखादे आसन घ्यावे.

वेळूची चटई, दगड, गवत व पल्लव ही आसने निषिद्ध होत. गवती आसनाचा निषेध हा दर्भ किंवा कुश यांच्या आसनाला लागू नाही. कोणतेही आसन घेतले, तरी त्यावर कुशासन घालावेच, असे शास्त्रवचन आहे (व्रतराज).

कृष्णमृगचर्माच्या आसनावर साधकाला मुक्ती मिळते. व्याघ्रचर्मावर संपत्ती लाभते. कंबलासनावर इष्टकामाची पूर्ती होते. कुशासनावर मंत्रसिद्धी मिळते. त्रिपुरसुंदरीच्या पूजेसाठी तांबडे कंबलासन सर्वोत्तम होय (गंधर्वतंत्र ७). यती, वानप्रस्थ, ब्रह्मचारी व भिक्षू यांना कृष्णमृगासन प्रशस्त होय. मातीचे आसन दुःखदायक व लाकडी आसन दुर्भाग्यकारक होते. लाकडी आसन व कंबलासन एकत्र वापरल्यास पुण्यक्षय होतो (योगिनीहृदय). चर्मासन केसाळ असलेले वापरू नये. तसे केल्यास सर्व सिद्धी नष्ट होतात (हंसमहेश्वरतंत्र).

आसन शब्दातल्या तीन अक्षरांचे वेगवेगळे अर्थ आहेत – आ = आत्मसमाधी. स = सर्वरोगप्रतिबंध आणि न = सिद्धिप्राप्ती (कामधेनुतंत्र ३१). [यो. सो. पू.; जै. इ.; डे. हिं. इ.]

## आसनविधी

एखाद्या धार्मिक कृत्यास प्रारंभ करण्यापूर्वी आसनावर बसून आत्मशरीराच्या शुद्धीसाठी भूशुद्धी, भूतशुद्धी, प्राणप्रतिष्ठा, अन्तर्मातृकान्यास व बहिर्मातृकान्यास हे विधी करायचे असतात. या विधींत प्रथम पुढील श्लोकाने पृथ्वीचे ध्यान करून आसनावर बसतात—

**पृथ्वि त्वया धृता लोका देवि त्वं विष्णुना धृता ।**
**त्वं च धारय मां देवि पवित्रं कुरु चासनम् ।।**

अर्थ – हे पृथ्वी, तू लोकांना धारण केले आहेस. हे देवी, तुला विष्णूने धारण केले आहे. हे देवी, तू मला धारण कर व (माझे) आसन पवित्र कर.

नंतर व्याहृतिमंत्रांनी न्यास करतात. अक्षरमातृकांचे बाह्य अवयवांवर आवाहन करून गुरूस वंदन करतात. मग आपल्या भोवती असलेल्या पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश या

महाभूतांचे ध्यान करून पायांपासून मस्तकापर्यंत आपल्या शरीरावर त्यांचे प्रतिष्ठापन करतात. य, व, र, ल, ह इत्यादी अक्षरे अनुस्वारयुक्त घेतल्यावर ती बीजे होतात. या बीजांसह महाभूतांचे ध्यान करायचे असते. याला भूतशुद्धी म्हणतात. या पाच महाभूतांपासून आपली उत्पत्ती झाली आहे, अशी भावना त्या वेळी करायची असते. यानंतर शरीरामध्ये प्राणशक्तीची स्थापना विधिपूर्वक करतात. प्राणप्रतिष्ठेचा मंत्र म्हणण्यापूर्वी न्यास करतात. अक्षरमातृकांनी 'युक्त' असे हे प्राणप्रतिष्ठेचे मंत्र आहेत. ज्ञानेन्द्रिये, कर्मेन्द्रिये, प्राण इत्यादी सर्वांचे प्राणशक्तीमध्ये आवाहन करतात. प्राणशक्तीचे गर्भाधानापासून पंधरा संस्कार होण्यासाठी पंधरा वेळा प्रणवाची आवृत्ती म्हणायची असते. नंतर प्राणशक्तीचे ध्यान केले जाते. एखाद्या प्रतिमेची प्राणप्रतिष्ठाही वरील पद्धतीनेच करायची असते. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

## आसमाई

आशा पूर्ण करणारी एक देवता. वैशाख, आषाढ व माघ या महिन्यांतल्या रविवारी उ. भारतात आसमाईची पूजा करतात. बाराजीत (बारा आदित्य) व आसमाई यांची पूजा एकदम करतात. मुख्यत्वे पुत्रवती स्त्रिया हे व्रत करतात. या दिवशी अळणी जेवतात. एका पानावर चंदनाने आसमाईचे चित्र काढून तिच्यावर चार कवड्या ठेवतात. शेजारी कलश स्थापून त्या सर्वांची पूजा करतात. पूजा समाप्त झाल्यावर पुरोहित बारा गाठींचा एक गंडा व्रतिनी स्त्रीला देतो. ती तो हातात बांधते. उत्तरपूजा झाल्यावर सर्व पूजासामग्री व गंडा पाण्यात सोडतात. फक्त कवड्या तेवढ्या दारात ठेवतात. आसमाईची कथा पुढीलप्रमाणे—

एका राजाला एक पुत्र होता. तो फार खोडकर होता. तो प्रजेला अनेक प्रकारे त्रास देई. शेवटी राजाने त्याला नगराबाहेर हाकलून दिले. वाटेत त्याला भूकमाई, प्यासमाई, नीदमाई व आसमाई या नावांच्या चार म्हाताऱ्या भेटल्या. त्यांनी राजपुत्राला चार कवड्या दिल्या. त्या कवड्यांत विलक्षण सामर्थ्य होते. राजपुत्र त्या घेऊन दुसऱ्या एका राज्यात गेला. तिथल्या घाटावर त्याला एक जुगारी धोबी भेटला. राजपुत्राने त्याला जुगारात जिंकले. धोब्याने ती गोष्ट राजाला सांगताच राजाने त्या राजपुत्राला बोलावून घेतले. दोघांचे द्यूत झाले. त्यात राजा हरला. राजाला त्याचा राग आला. परंतु आपल्या प्रधानाच्या सांगण्यावरून राजाने त्याला आपला जावई केले. काही दिवस तिथे राहून तो परत आपल्या बापाकडे गेला. त्याचे आई-बाप पुत्रशोकाने आंधळे झाले होते. मुलगा परत येताच परत त्यांना दृष्टी आली. मग सर्वजण सुखाने राहू लागले. हे सगळे आसमाईच्या कृपेने घडले, म्हणून त्या दिवसापासून लोक तिची पूजा करू लागले.

## आसवपान

आसव = मद्य, पान = प्राशन. मध्ययुगातला एक चैनीचा समारंभ. चतुर्भाणी या ग्रंथात याचे अनेक ठिकाणी वर्णन आहे. धूर्तविटसंवाद या भागात थोरामोठ्यांनी वेश्यांना आपल्या अर्धासनावर बसवून त्यांच्यासह केलेल्या आसवपानाचे वर्णन आले आहे. याचे दुसरे नाव आपानकोत्सव. अजंट्याच्या भित्तिचित्रांत अशा प्रकारची दृश्ये



आसवपान केलेली स्त्री, कुशाणकालीन शिल्प (मथुरा)

आहेत. गुप्तयुगापूर्वीची एक मातीची गाडी सापडली असून तिच्यावर खात, पीत व एकमेकांना आलिंगन देत असलेल्या स्त्रीपुरुषांच्या मूर्ती आहेत. [ शृं. हा. ]

## आसाम

भारतीय संघराज्यातील एक घटक राज्य. ते भारताच्या ईशान्येला वसले आहे. पूर्वीच्या आसाममधून नागभूमी म्हणून ओळखला जाणारा प्रदेश १९६३ साली स्वतंत्र झाला. एक स्वायत्त राज्य म्हणून तो अस्तित्वात आहे. त्यानंतर गारो, खासी व जयंतिया टेकड्यांचा प्रदेशही १९७० साली मेघालय या नावाने स्वायत्त राज्य म्हणून अस्तित्वात आला. नेफा व मिझो या नावाने ओळखला जाणारा आसामचा डोंगरी

भाग अनुक्रमे अरुणाचल व मिझोराम या नावाने केंद्रशासित प्रदेश म्हणून २० जानेवारी १९७२ रोजी घोषित करण्यात आला. त्यामुळे सांप्रतचा आसाम ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यापुरताच मर्यादित झाला आहे.

सांप्रतच्या आसाम राज्यात काचार, दारांग, गोलपारा, कामरूप, लखिमपूर, नौगाँग, शिवसागर, मिकिर टेकड्या व उत्तर काचार टेकड्या हे नऊ जिल्हे आहेत.

आसाममध्ये बहुसंख्य म्हणजे सुमारे ६७ टक्के लोक हिंदू असून, त्याखालोखाल मुसलमान, ख्रिश्चन, बौद्ध, जैन व शीख आणि इतर स्थानिक वन्यधर्मी लोक आहेत.

गौहाटी हे राजधानीचे शहर फक्त एक लाखाहून जास्त लोकवस्ती असलेले आहे. पाच हजार ते एक लाख वस्ती असलेली पंचाहत्तर गावे आसामात असून, बाकीची पंचवीस हजारांवर खेडी आहेत.

आसामी ही राज्याची मुख्य भाषा आहे. सुमारे ५७ टक्के लोक ही भाषा बोलतात. १७ टक्के लोक बंगाली बोलतात.

आसामचे क्षेत्रफळ ७८,५२३ चौ. कि. मी. असून, लोकसंख्या १,४६,२५००० आहे.

आसामचे तीन नैसर्गिक विभाग आहेत : (१) ब्रह्मपुत्रेचे खोरे (२) सुरमा नदीचे खोरे व (३) त्यांच्या मधला डोंगराळ प्रदेश.




आसाम प्रदेश

ब्रह्मपुत्रा ही आसामातील प्रमुख नदी होय. हिमालयाच्या उच्च पर्वतश्रेणीत उगम पावून ती आसाम खोऱ्यात उतरते. दिबाँग, सुबनसिरी, दिसाँग, धनश्री, इ. नद्या तिला येऊन मिळतात. वर्षाऋतूत येणाऱ्या महापुरांमुळे ब्रह्मपुत्रेचे पात्र विस्तीर्ण होते व काही ठिकाणी तर त्याला सागरासारखे विशालत्व प्राप्त होते. या महापुरांमुळे आसामची दरवर्षी अपरिमित हानी होते. सुरमा किंवा बराक ही नदी मणिपूरमधून उत्तराभिमुख होऊन आसामात शिरते व पश्चिमेला वाहत जाऊन बांगलादेशात शिरते. तिचे खोरे गाळाने उंच व सुपीक झाले आहे.

आसामात वारंवार भूकंप होतात. कारण तिथले जमिनीचे स्तर नवीन व अस्थिर आहेत.

दगडी कोळसा व पेट्रोलियम ही येथील मुख्य खनिज उत्पन्ने होत. इ. स. १९४९ साली सुमारे साडेतीन लाख टन कोळसा या प्रदेशात मिळाला. परंतु आता दिवसेंदिवस कोळशाचे प्रमाण कमी कमी होत आहे. आसामातील दिगबोई, नाहरकटिया व मोरान या ठिकाणी तेलाचे साठे आहेत व त्यांतून वार्षिक ६५० लाख गॅलन पेट्रोलियम निघते. या खनिजांशिवाय कोरंडम दगड, चिकणमाती, चुनखडी, सोने, मीठ, इ. पदार्थही थोड्या प्रमाणात मिळतात.

आसामात पावसाचे वार्षिक प्रमाण सरासरी २४० सें. मी. आहे. कामरूप जिल्ह्यात १७८ सें. मी. व काचार जिल्ह्यातील बराकखोऱ्यात ३०५ सें. मी. पाऊस पडतो.

आसामातील २२ टक्के जमीन जंगलांनी व्याप्त असून, त्या जंगलांत साल, देवदार, साग, शिसवी, वेत, कळक, बांबू व अनेक औषधी वनस्पती आढळतात. पहाडी प्रदेशात ओक व चीड हे वृक्ष वाढतात. या झाडांपासून लाकूड, लाख, रबर, मसाले, इ. अनेक पदार्थ मिळतात. आसामात हत्ती, गेंडे, वाघ, चित्ते, भालू, इ. रानटी पशू सापडतात.

आसाम हा कृषिप्रधान देश आहे. ब्रह्मपुत्रा व सुरमा या नद्यांची खोरी फार सुपीक आहेत. त्यांत मुख्यत्वे तांदूळ पिकतो. याशिवाय मिरची, कापूस, बाजरी, नाचणी, कडधान्ये, ताग, तंबाकू हीही पिके होतात. परंतु व्यापारीदृष्ट्या आसामचे मुख्य पीक चहा हे होय.

**इतिहास** – आसाम राज्याचा इतिहास फार प्राचीन असून, पुराणांतही त्याचे उल्लेख येतात. आसामचे प्राचीन नाव कामरूप होते. दीड हजार वर्षांपूर्वी कामरूप देशात ब्रह्मपुत्रा नदीचे खोरे व पूर्व बंगाल आणि भूतानचे उत्तुंग पर्वत यांचा अंतर्भाव होत असे. कामरूपाचे राजे पराक्रमी होते, तसेच सुसंस्कृतही होते. त्यांनी ब्राह्मणांना सदैव उदार आश्रय दिला. त्यामुळे त्या प्रदेशात हिंदू धर्माचा प्रसार होण्यास खूप मदत झाली. हिंदू धर्मातील तांत्रिक पंथाची स्थापनाही प्राग्ज्योतिषपूर या

नगरात झाली, असे मानतात. गौहाटीच्या जवळच नीलाचल पर्वतावरील कामाख्या देवीचे मंदिर प्राचीन काळापासून सुप्रसिद्ध आहे. कामरूपाचा उल्लेख महाभारत, कालिकापुराण व योगिनीतंत्र या ग्रंथांत आढळतो. तिथल्या असुर राजांत नरक हा प्रसिद्ध राजा होऊन गेला. त्यानेच प्राग्ज्योतिषपूर म्हणजे हल्लीचे गौहाटी हे शहर वसविले. श्रीकृष्णाने या नरकाला ठार मारले, तेव्हा दुर्योधनाचा पक्षपाती असलेल्या त्याच्या भगदत्त नामक पुत्राने चीन व किरात यांचे सैन्य आपल्या मदतीला बोलाविले होते. भारतीय युद्धात अर्जुनाने भगदत्ताला ठार मारले.

रघुवंशात कामरूपाचा उल्लेख असून, कामरूपाधिपतीने रघुराजाला हत्तींचा नजराणा दिला, असे सांगितले आहे (रघु. ४.८३). यावरून प्राचीन काळापासून आसाम हत्तींबद्दल प्रसिद्ध होता, असे दिसते. इ. स. ६४० च्या सुमारास भगदत्ताचा वंशज कुमार भास्करवर्मा हा कामरूपावर राज्य करीत होता, असे युआन च्वांग या चिनी यात्रेकरूने लिहून ठेवले आहे. त्यानंतर दोन शतकांनी कामरूपाच्या मूळ रहिवाशांच्या हातांत राजसत्ता गेली. पण पुढे प्रलंभ नामक पुरुषाने त्यांचा नाश करून तिथे आपली सत्ता स्थापिली. याचे घराणे शिवपूजक होते. हारूपेश्वर हे जरी त्यांच्या राजधानीचे ठिकाण होते, तरी त्याचे वंशज स्वतःला प्राग्ज्योतिषपूरचे राजे म्हणवून घेत. पुढे इ. स. च्या अकराव्या शतकाच्या प्रारंभी पाल वंशाचे राज्य सुरू झाले.



आसामातील हत्ती

त्या वंशातील तिसरा राजा रत्नपाल याने 'पृथ्वी देवालयांनी व आकाश यज्ञधूमाने आच्छादून टाकले', असा उल्लेख आहे.

इसवी सनाच्या ७ व्या ते १२ व्या शतकांच्या दरम्यानचे जे ताम्रपट व शिलालेख आसाममध्ये सापडले आहेत, त्यांवरून या काळात आसाममध्ये होऊन गेलेल्या काही राजांची माहिती मिळते. इ. स. १२८२ साली आहोम लोक ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यांतून कामरूपात घुसले. त्यांनी पूर्वीच्या राजांना पादाक्रांत करून तिथे आपली सत्ता स्थापिली व प्राग्ज्योतिषपूर हीच आपली राजधानी केली. त्यांनी शिवसागर व इतर शहरे वसविली व अनेक राजवाडेही बांधले. पुढे आहोम राजे व त्यांचे आहोम प्रजाजन यांचा आसाममधील इतर रहिवाशांशी शरीरसंबंध सुरू झाला. इतकेच नव्हे; तर तिथल्या तांत्रिक हिंदू धर्माचे



आसामातील गेंडे

ते मोठे पुरस्कर्ते बनले. कामाख्या ही त्यांनी आपली उपास्य देवता केली.

इ. स. च्या पंधराव्या शतकात खेन नावाचे राजघराणे आसामचा दक्षिण भाग व बंगालजवळचा प्रदेश या भागावर राज्य करीत होते. या घराण्यातील नीलांबर नामक तिसऱ्या राजाचा बंगालच्या हुसेनशहा या मुसलमान राजाने १४९८ साली पराभव केला व त्याची कामतापूर ही राजधानी जिंकली.

पुढे इ. स. १५१५ च्या सुमारास बिश्वसिंग हा कोच राजा गादीवर आला. त्याचा पुत्र नरनारायण याने आपले राज्य बरेच वाढविले. सोनार गावच्या सरदार इसाखानाने त्याचा पराभव केल्यावर नरनारायणाचा पुत्र लक्ष्मीनारायण राजा झाला. रघुराजाचा पुत्र परीक्षित याच्याशी त्याचे वाकडे आले, म्हणून परीक्षिताचा पाडाव करण्यासाठी लक्ष्मीनारायणाने मुसलमानांची मदत घेतली. मुसलमानांनी परीक्षिताला कैद केले. लक्ष्मीनारायणाचा भाऊ बळिनारायण हा प्रतापसिंग या आहोम राजाकडे पळून गेला. मुसलमानांचा पराभव करून प्रतापसिंगाने बळिनारायणाला राज्य परत मिळवून दिले. पण इ. स. १६३७ साली मुसलमानांनी पुन्हा स्वारी करून त्याला ठार मारले व आहोम लोकांनाही कामरूपाच्या बाहेर घालवून दिले. पुढे प्राणनारायण या कोच राजाने मुसलमानी सत्ता झुगारून दिली खरी; परंतु त्याला स्वतःलाच आहोम राजाकडून

पदच्युत व्हावे लागले. इ. स. १६८१ साली गदाधरसिंगाने मुसलमानांचा पुरता पाडाव केला.

गदाधरसिंगानंतर रुद्रसिंग गादीवर बसला. मुसलमानांच्या स्वाऱ्यांचे भय न उरल्यामुळे त्याने आपले राज्य वाढविण्यास सुरुवात केली. त्याचा पुत्र शिवसिंग हा शाक्त होता. याच्याच कारकिर्दीत इ. स. १७८६ मध्ये मोआरिया जातीने बंड उभारून आहोम राजा गौरीनाथ याचा पराभव केला. नंतर गौरीनाथाने इंग्रजांची मदत मागितली. कॅ. वेल्स हा त्याच्या मदतीकरिता आला. त्याने राज्यात सर्व स्थिरस्थावर केले. तो परत गेल्यावर पुन्हा आसाममध्ये बखेडे सुरू झाले. इ. स. १८१० मध्ये चंद्रकांत राजा गादीवर होता. त्याने आपले राज्य स्थिर करण्यासाठी ब्रह्मी राजाची मदत मागितली. त्यामुळे पुढे काही वर्षे आसाम ब्रह्मदेशाच्या अंकित झाला. नंतर इ. स. १८२४ मध्ये ब्रह्मी लोक व इंग्रज यांच्यामध्ये युद्ध झाले. इ. स. १८२६ मध्ये त्या दोघांत तह झाला व त्या अन्वये ब्रह्मी लोकांनी आसाम प्रांत ईस्ट इंडिया कंपनीस दिला. अशा प्रकारे आसाम इंग्रजांच्या आधिपत्याखाली गेला.

त्यानंतर स्वातंत्र्यासाठी काही तरुणांनी प्रयत्न केले. आहोम वंशातील राजपुत्र गोमधर याने पहिला प्रयत्न केला. पण तो अयशस्वी झाला. यू तिरोतसिंग व पियली बडफूकन यांनी केलेले उठावही असफल झाले.

**आसामातील धर्मपंथ** – आसाममध्ये फार प्राचीन काळापासून हिंदू धर्म प्रचलित असावा, असे समजण्यास प्रत्यवाय नाही. आसामचे कामरूप हे प्राचीन नाव, शंकराने आपला भालनेत्र उघडून कामाचे दहन केले, या घटनेवरून पडले आहे. तांत्रिक शाक्त पंथाची स्थापना प्राग्ज्योतिषपूर या ठिकाणी झाली. हिंदुकल्पना व आसामात वस्ती करून असणाऱ्या रानटी गिरिजनांचे जारण-मारणाचे आचार यांच्या मिश्रणाने तांत्रिक शाक्त पंथाची निर्मिती झाली असावी, असे वाटते. तांत्रिक शाक्त पंथ हा हिंदू धर्मातील एक फार जुना पंथ असल्यामुळे कामरूपाचे राजे व उच्चवर्णीय लोक हिंदू होते, हे त्यावरून सिद्ध होते. परंतु कामरूप देशाची बहुसंख्य प्रजा हिंदू नव्हती. हिंदू धर्म ब्रह्मपुत्रा व सुरमा नद्यांच्या खोऱ्यांपुरताच मर्यादित होता. पहाडी प्रदेशात राहणाऱ्या रानटी टोळ्यांमध्ये त्याचा मागमूसही नव्हता. नंतर त्यांनी हिंदू धर्म स्वीकारला, हे जरी खरे असले, तरी आजही बरेच लोक हिंदू धर्माच्या बाहेर आहेत.

आसामातील शाक्त लोकांच्या आचारांपैकी देवीला बळी देणे, हा प्रमुख आचार होता. चूटिया राजे कालीमातेचे भक्त असून, ते कालीची निरनिराळ्या स्वरूपांत पूजा करीत. सदिया शहरी चूटिया राजांनी बांधलेले कालीचे एक ताम्रमंदिर होते. तिथे ते देवीला पशुबळी व नरबळी अर्पण करीत असत. इ. स.च्या १६ व्या शतकाच्या सुमारास आसामातील बहुतेक राजे शिव व शक्ती यांचे उपासक होते. तेस्वत: जरी शैव किंवा शाक्त असले, तरी त्यांचा वैष्णवांना विरोध नव्हता. इ. स. १५१५च्या सुमारास बिश्वसिंग या कोच राजाने कामाख्येच्या मंदिराचा जीर्णोद्धार केला व त्याचबरोबर वैष्णवांनाही अनेक दाने दिली. मुसलमानांनी पुढे या कामाख्यामंदिराचा विध्वंस केला. पण नरनारायणाने पुन्हा ते उभारले. नरनारायणाच्या कारकिर्दीत आसामात शाक्त पंथ तेजीत होता. या नव्या मंदिराच्या उद्घाटनप्रसंगी एकशेचाळीस नरबळी देण्यात आले, असे सांगतात. नरनारायणाचा शाक्त पंथाकडे ओढा होता, परंतु तो इतर पंथीयांनाही सहिष्णुतेने वागवीत असे. आसामातील वैष्णव धर्माचा प्रचारक, महापुरुषिया संप्रदायाचा संस्थापक शंकरदेव हा त्याचा समकालीन होता. त्यालाही त्याने पुष्कळ उत्तेजन दिले. आसामातील वैष्णवांनी सत्ताधाऱ्यांची मर्जी संपादन करण्याचा प्रयत्न केला नाही. त्यांनी कनिष्ठवर्गीय हिंदूंना मोठ्या प्रमाणात आपल्या पंथात ओढले.

शंकरदेवाच्या मृत्यूनंतर त्याचा पट्टशिष्य माधव याने गुरूच्या कार्याची धुरा वाहिली. माधवाच्या पंथाला महापुरुषिया पंथ म्हणतात. पण माधव हा कायस्थ असल्याकारणाने ब्राह्मणांनी त्याचे अनुयायित्व स्वीकारले नाही व त्यांनी स्वत:चे वेगळे पंथ स्थापन केले. त्यांच्यापैकी दामोदरदेव, हरिदेव व गोपाळदेव हे प्रमुख होत. त्यांनी अनेक सत्रे म्हणजे मठ स्थापन केले. शंकरदेवाचा अनिरुद्ध नावाचा एक कलिता शिष्य होता. शंकरदेवाशी न पटून त्याने मोआमारिया नावाचा पंथ स्थापन केला. आसामच्या इतिहासात या लोकांनी केलेले बंड प्रसिद्ध आहे.

महापुरुषिया व बामनिया गोसावी यांनी आसामातून शाक्त पंथाचे जवळजवळ उच्चाटन केले होते; पण त्याची पुनश्च प्रस्थापना आहोम राजा रुद्रसिंग (इ. स. १६९६-१७१४) याने केली. बंगालमधील कृष्णराम भट्टाचार्य नावाच्या एका पंडिताकडून त्याने शाक्त पंथाची दीक्षा घेतली. रुद्रसिंगाने त्याला कामाख्या देवीचा पर्वतिया गोसावी किंवा मुख्य पुजारी नेमले. रुद्रसिंगाचा पुत्र लक्ष्मीसिंग याचे कृष्णराम भट्टाचार्याशी न पटल्यामुळे त्याने बंगालमधून दुसऱ्या एका शाक्त पुजाऱ्याला आणविले. त्याला ना-गोसावी म्हणजे नवीन पुजारी असे नाव पडले. हा पुजारी नाती गोसावी पंथाचा संस्थापक होय.

अर्वाचीन कालात वैष्णव पंथाच्या सर्वसामान्य अनुयायांवर कोणत्या ना कोणत्या तरी 'सत्रा'च्या गोसाव्यांची धार्मिक सत्ता चालते. हे सत्रातील भक्त लोकांना अधूनमधून भेट देतात व सत्राचा खर्च चालविण्यासाठी त्यांच्याकडून भिक्षा

घेतात. सत्रातील कौलिया भक्त हे ब्रह्मचारी व संन्यासी असतात. ते जातिभेद मानीत नाहीत. मूर्तीची पूजा करीत नाहीत. पण सर्वसामान्य अनुयायांसाठी त्यांच्या सत्रात विष्णूची मूर्ती मात्र ठेवलेली असते.



मुलींचे लोकनृत्य – आसाम

महापुरुषिया पंथाचे लोक शंकरदेव व माधवदेव या दोघांना कृष्णाचे अवतार मानतात. सत्कृत्ये केल्याने मुक्ती मिळते, असे यांचे मत आहे. सत्कृत्यांच्या अभावी ईश्वरनामसंकीर्तनानेही ती मिळू शकते. तात्त्विक दृष्टचा हे जातिभेद मानीत नाहीत; परंतु व्यावहारिक दृष्टचा मात्र अद्यापि जातिभेदाचे उच्चाटन झालेले नाही. हे लोक मांसाहारी आहेत. परंतु ते शस्त्राने मारलेल्या पशूंचे मास न खाता काठीने मारलेल्या पशूंचे खातात. शंकराचे 'कीर्तन' व 'दशम' आणि माधवाचे 'नामघोषा' व 'रत्नावली' हे ग्रंथ प्रमाणभूत मानतात.

दामोदरीय पंथाचे लोक कृष्णाची पूजा करतात व दामोदराला ईश्वरी अंश मानतात. हरिदेवाचे अनुयायी हरिदेवाला कृष्णाचा अवतार मानतात. हे लोक हल्ली दामोदरीय पंथाच्या अनुयायांत मिसळतात. गोपाळदेवाच्या अनुयायांत व महापुरुषियांत बरेच साधर्म्य आहे. शंकर व माधव यांनी घालून दिलेले सर्व नियम हे पाळतात.

आसाममध्ये प्राचीन काळापासून हिंदुकरणाची प्रथा चालत होती. ब्राह्मण लोक एखाद्या टोळीप्रमुखाजवळ जाऊन, त्याचे पूर्वज पूर्वी हिंदूच होते व काही अज्ञात कारणाने त्यांनी आपला हिंदू धर्म लपविला, असे त्याला सांगत. एवढ्यावरच न थांबता त्याच्या पूर्वजांचा एखाद्या हिंदू देवतेशीही संबंध जोडून देत. त्या गोष्टीमुळे त्या टोळीप्रमुखाला आनंद होई व तो हिंदू धर्म स्वीकारायला तयार होई. त्याच्याबरोबर त्याचे अनुयायीही मग हिंदू धर्म स्वीकारीत.

अशा रीतीनेच कोच राजांना शिवाचे वंशज ठरविण्यात आले. ते राजे हिंदू होताच त्यांच्या प्रजाजनांनीही हिंदू धर्म स्वीकारला. हे प्रजाजन मूळ क्षत्रिय होते; पण परशुरामाच्या भयाने त्यांनी गिरिकंदरांचा आश्रय घेतल्यामुळे त्यांचे वंशज पुढे आपला धर्म विसरून गेले, अशी आख्यायिका रचून ब्राह्मणांनी कोच राजाच्या सर्व प्रजेला क्षात्र वर्णात समाविष्ट केले. त्याप्रमाणे काचारी राजांना भीमाचे वंशज ठरविण्यात आले. त्यांच्या प्रजाजनांनाही क्षत्रिय ठरवून त्यांना यज्ञोपवीत घालण्याचा अधिकार देण्यात आला. मणिपूरच्या राजांचा संबंध अर्जुनाशी जुळविण्यात येऊन त्यांना त्यांच्या प्रजेसह हिंदू धर्माची दीक्षा देण्यात आली. त्याचप्रमाणे आहोमांचा मूळ पुरुष इंद्र होता, असे सांगून त्यांनाही हिंदू धर्माच्या छत्राखाली आणले गेले.

ब्रह्मपुत्रा नदीच्या खोऱ्यात आसामी भाषा बोलणारे आणि धर्माने हिंदू असणारे लोक राहतात. ते आहोम राजांच्या कारकिर्दीत परप्रांतांतून आणलेल्या ब्राह्मणांचे वंशज असून आसामात फक्त त्यांनाच पौरोहित्याचा अधिकार आहे. ब्राह्मणांच्या आडनावांपैकी गोहाई (गोसावी) हे प्रमुख आहे. ब्राह्मणांच्या नंतर कायस्थ येतात. त्यांचे ब्राह्मणांशी साधर्म्य असून दत्त हे त्यांच्यातले प्रमुख आडनाव होय.

याशिवाय कलिता नावाची एक हिंदू जात असून, तिची संख्याही बरीच मोठी आहे. आसामात प्रथमच आलेल्या आर्य लोकांची व स्थानिक स्त्रियांची ही संतती होय, अशी सर्वसाधारण समजूत आहे. कलिता व आहोम हे आसामातील सुप्रतिष्ठित सनातनी हिंदू लोकांत मोडतात. सध्याचे आहोम हे प्राचीन आहोम राजांचे वंशज आहेत. त्यांची संख्या सुमारे अडीच लाख भरेल. आहोम लोक हिंदू असले, तरी सर्वसामान्य आसामी माणूस हिंदू व आहोम असे दोन वेगवेगळे वर्ग मानतो.

याशिवाय चौडांग नावाची एक जात आहे. आहोम राजांनी सहा ते सात हजार आसामी लोक आपले शरीररक्षक म्हणून नेमले होते, त्यांचे हे वंशज होत. यांपैकी बरेच लोक अहिंदू आहेत. डोम किंवा कैवर्त ही आसामातील एक खालची जमात असून, तीही हिंदू धर्माच्या कक्षेत आलेली नाही.

**सण-उत्सव** – आसामात अनेक सण व उत्सव साजरे होतात. पण व्रतवैकल्ये मात्र इथे आढळत नाहीत. याचे कारण असे, की इथला बहुसंख्य हिंदू समाज मूर्तिपूजक नाही. नामसंकीर्तनावर या लोकांची फार श्रद्धा आहे. त्यामुळे इथे ठिकठिकाणी नामघरे आढळतात. या नामघरांत मूर्तीऐवजी भागवताची पोथी ठेवलेली असते. इथे निराकाराची पूजा-प्रार्थना चालते.

आसाममधले काही प्रमुख उत्सव पुढीलप्रमाणे आहेत–

आसामात शाक्त पंथाचे अनुयायी बरेच आहेत. ते शिवाला भजतातच; पण शिवपत्नी दुर्गा हिलाही मातृदेवता म्हणून भजतात. आसामातील स्त्रिया आपले ईप्सित पुरे होण्यासाठी तिची करुणा भाकतात. बंगालप्रमाणेच आसामातही नवरात्रात दुर्गापूजेचा उत्सव थाटामाटात साजरा होतो. दुर्गादेवीच्या जीवनातील दोन घटनांना या उत्सवात विशेष स्थान असते. लोकांच्या कल्याणासाठी तिने महिषासुराचा वध केला, ही त्यांपैकी एक घटना होय. महिषासुराचे प्रतीक म्हणून या उत्सवात तिला रेडा बळी देतात. उमा हे दुर्गेचे दुसरे रूप आहे. कैलासाधिपती शंकराशी उमेचा विवाह झाल्यावर ती प्रथमच माहेरी येते ही दुसरी घटना होय. या घटनेचे स्मारक म्हणून दुर्गापूजेच्या वेळी कुटुंबातल्या माहेरवाशिणी घरी आणतात.हा दुर्गादेवीचा उत्सव म्हणजे आसामी लोकांना आनंदाची पर्वणी असते.

आद्य शक्तीचे काली हे स्वरूपही आसामात पूजनीय ठरले आहे. दुर्गापूजेनंतर एक महिन्याने कालीपूजेचा उत्सव करतात. चहाच्या मळ्यांतील कामगार या उत्सवात विशेष उत्साहाने भाग घेतात. या उत्सवात देवीला एक काळा बकरा व बाकीचे पांढरे बकरे बळी देतात.

ज्येष्ठ व आषाढ या महिन्यांत अंबुवाची उत्सव साजरा करतात. याला आसामी लोक हाट असे म्हणतात. या दिवसांत पृथ्वी ऋतुमती होते, असे मानतात.

याशिवाय खास आसामचे असे बिहू नावाचे दोन सामाजिक उत्सव आहेत. यांपैकी माघ बिहू हा आसामातील वर्षारंभ होय. महाराष्ट्रातील होळीसारखाच हा सण आहे. या दिवशी होळी पेटवितात, म्हणून या उत्सवाला अग्निपूजा असेही म्हणतात. खेड्यांतील मुले या उत्सवाच्या कितीतरी दिवस आधी झोपडीच्या आकाराची एक होळी तयार करतात व माघ बिहूच्या मध्यरात्री ती पेटवितात. या दिवशी जनावरांच्या शर्यती व रेड्यांच्या झुंजी लावतात. आहोम राजांच्या कारकिर्दीत या दिवशी रेडे, वाघ, हत्ती यांच्या शर्यती लावीत असत. माघ बिहूच्या दिवशी ब्रह्मपुत्रेसारख्या मोठ्या नदीत स्नान करणे पुण्यप्रद मानतात.

बहाग बिहू हा उत्सव वसंत ऋतूत येतो व तो सात दिवस चालतो. नृत्य करणे आणि गुरांना नदीवर नेऊन आंघोळ घालणे, ही या उत्सवाची वैशिष्ट्ये होत. या सात दिवसांत आसाममध्ये नृत्याला उधाण येते. आसामी उच्चवर्णीय हिंदूच हा उत्सव साजरा करतात असे नव्हे; तर काचारी, तेंगल, चौडांग, हुनवाल, इ. सर्व लोक त्यात भाग घेतात. चौडांग स्त्री-पुरुष दारू, भांग, इ. मादक पेय पिऊन या सणात नृत्य करतात. बिहू सणाचे आणखीही काही प्रकार प्रचलित आहेत.

काही खेडेगावांत 'बिसवरी पूजा' हा उत्सव होतो. शिव, ब्रह्मा, इंद्र, विष्णू, इ. सात देवांच्या पत्नींची ही पूजा असते.

**नृत्यकला** – आसामी लोकांत अनेक नृत्ये प्रचलित आहेत. बिहू हे या लोकांचे प्रमुख नृत्य आहे. वैष्णव लोक कृष्णलीलेवर आधारित असे नृत्य करतात. त्याला केलिगोपाल असे नाव आहे. तसेच दशावतारावर आधारित महारास नृत्य इथे प्रचलित आहे. भक्तिप्रधान बडगीतांवरोबर वैष्णव लोक सत्र नृत्य करतात. या नृत्यावर मणिपुरी नृत्याचा प्रभाव आहे. मृदंग आणि झांज यांच्या तालावर हे नृत्य करतात. या नृत्यात फक्त पुरुषच भाग घेतात.

आसाममध्ये अनेक नाट्यप्रकारही प्रचलित आहेत. अंकिया नाट हा त्यांपैकी प्रमुख आहे. इथले थोर वैष्णव संत शंकरदेव यांनी स्वत: अनेक अंकिया नाट लिहून सादर केले. या नाटाचे स्वरूप एकांकिकेसारखे असते. यात काव्यावरोबर गद्याला महत्त्व असते. याचे जत्रा आणि झमूरा असे दोन भेद आहेत. ही नाटके रात्रभर चालतात. विशिष्ट पात्राच्या प्रवेशाच्या वेळी शोभेची दारू उडवून आतषबाजी करतात.

**विवाहप्रथा** – आसामातील ब्राह्मणांत वयाच्या ११ ते १३ या वर्षांच्या दरम्यान मुलीचा वाङ्निश्चय होतो. लग्न मात्र मुलगी वयात आल्यावर करतात. पण वाङ्निश्चय झाला, की मुलीचे लग्न झाल्यासारखेच मानतात. त्यामुळे यदाकदाचित नियोजित वराला लग्नाच्या पूर्वी मृत्यू आला, तरी ती मुलगी लग्न न होताही विधवा होते. तिला पुन्हा लग्न करता येत नाही. ब्राह्मणांशिवाय इतर जातीत मात्र मुला-मुलींची लग्ने लहान वयात होत नाहीत.

काही उच्चवर्णीय हिंदूंत लग्नापूर्वी तीन, पाच किंवा सात रात्री अगोदर एक शुद्धीकरण विधी करतात. एका रात्री किंवा पहाटे वधूपक्षाकडील व वरपक्षाकडील स्त्रिया स्वतंत्र रीतीने मिरवत व गाणी म्हणत मोठ्या तळ्यावर जाऊन शुद्धोदक घेऊन येतात. मग त्या जलाचे वधू-वरांवर प्रोक्षण करतात व त्यांना नवी वस्त्रे देतात. लग्नात होमहवनादी झाल्यावर वधू-वर एकमेकांना पान देतात व लग्नसमारंभ संपतो.

आहोम लोकांच्या विवाहविधीला पुरोहित लागतोच असे नाही. आहोमांत लग्नासाठी मोठ्या प्रमाणात हुंडा द्यावा लागतो. याशिवाय अंथरूण, पांघरूण, दोन वर्षे पुरतील एवढे कपडे व संसाराची सगळी भांडीही द्यावी लागतात.

कलिता कायस्थांचे विवाह रात्री होतात. मुलामुलींच्या पत्रिका जुळल्या, की लग्न पक्के करतात आणि त्यानंतर वधूला वराकडून अंगठी मिळते. विवाहाचा मुहूर्त ठरला, की वरपक्षाकडील मंडळी वधूगृही अहेर घेऊन जातात. हा अहेर ऐपतीप्रमाणे

असतो. उत्तर आसामात साधारणपणे पाच-सात कपडयांचे जोड, सोन्याची साखळी, कर्णफुले व बांगडया एवढे देण्याची पद्धत आहे; तर दक्षिण आसामात कपडयांचा एक जोड, अंगठी, तेल, शेंदूर, मासे, मिठाई व नारळ-सुपारी एवढे देतात. शिवाय केळीच्या पानात गुंडाळून एक मोठा मासा देतात. वधूपिताही वराला सोन्याची अंगठी व पोषाख देतो. या सर्व प्रसंगीं गीते गातात.

लग्नात नवऱ्यामुलाची मिरवणूक रस्त्यात एक बांबू टाकून वधूपक्षाकडील तरुण अडवतात. आणि वराकडे काही पैसे मागतात. त्याने ते दिले, की मिरवणूक पुढे चालू होते. मजा म्हणून हा प्रकार करतात.

वधूच्या घरात प्रवेश केल्यावर वराला होमाजवळ बसवून मंत्र म्हणतात. नंतर नवरीमुलगी आईच्या मदतीने बोहल्यावर चढते. संप्रदानाचा विधी झाल्यावर विवाहविधी पूर्ण होतो.

सर्वसाधारण आसामी माणसाला आपल्याला बरेच पुत्र असावे असे वाटते. कारण ते शेतीच्या कामात उपयोगी पडतात व वृद्धापकाळी त्याला पोसतात. परंतु अनेक मुली असणे, हे मात्र त्याला संकटच वाटते. कारण त्यांना उजविण्यासाठी होणाऱ्या भरमसाट खर्चापायी त्याला कर्जबाजारी व्हावे लागते.

**मृतकप्रथा** – जेव्हा एखादा माणूस आसन्नमरण होतो, तेव्हा त्याला घराच्या बाहेर आणून ठेवतात. कारण माणसाला घरात मृत्यू येणे अशुभ मानतात. घरात मृत्यू आल्यास आसामी लोक ते घर सोडून दुसरीकडे राहायला जातात व ते घर कायमचे सोडन देतात. ब्राह्मणांत व कायस्थांत तेराव्या दिवशी ब्राह्मणांना व नातेवाइकांना श्राद्धाला जेवायला बोलावितात. या वेळी एका वृद्ध माणसालाही भोजन घालतात. जेवायला सुरुवात त्यानेच प्रथम करायची असते. या दिवशी जो प्रथम जेंवायला सुरुवात करतो, तो लवकर मरतो अशी त्यांची समजूत आहे.

आसाम खोऱ्यात लहान लहान खेडी वसलेली आहेत. सभोवार भाताची शेते व मध्ये असलेल्या उंचवटयावर जवळ जवळ वसलेल्या अनेक लहान घरांचा पुंजका, अशी त्या खेडयाची मांडणी असते. या वस्तीभोवती बांबू, केळी, आंबे, फणस, इ. अनेक झाडे असतात. पावसाळ्यात भातशेते जेव्हा पाण्याखाली बुडतात, तेव्हा या वस्त्यांना एखाद्या बेटाचे स्वरूप प्राप्त होते. भातशेतांची रचना अशा रीतीने केलेली असते, की केवळ पावसाच्या पाण्यातच ती शेते चार पाच महिने बुडून राहावी. पेरणीच्या व झाडे लावण्याच्या दिवशी चौडांग लोक देवाची पूजा करतात. ही पूजा सर्वसाधारणपणे वडाच्या झाडाखाली होते. पूजेनंतर नृत्य होते. या रात्री अनेक चौडांग युवक आपल्या मैत्रिणीबरोबर शयन करतात.

एखाद्या वर्षी पावसाला उशीर झाला, तर पाऊस लवकर पडावा म्हणून, काही आसामी लोक पुढील विधी करतात.

गावातल्या दोन सुंदर मुली निवडतात. त्या दोघींना एकेक बेडूक पकडायला लावतात. मग पुरोहित या दोन बेडकांचे यथाविधि लग्न लावतो. बेडकांच्या कपाळी कुंकू लावून त्यांच्या गळयांत दागिने घालतात. गावातील स्त्री-पुरुष मंगलाष्टके म्हणतात. शेवटी त्या दोन मुली त्या बेडकांना आंघोळ घालतात.



खेडयातली घरे – आसाम

या विधीनंतर सात दिवसांच्या आत पाऊस पडेल, अशी त्या लोकांची धारणा असते.

आसामी हिंदूंत एकत्र कुटुंबपद्धती अस्तित्वात आहे. घरातली सर्व सत्ता सासूच्या हाती असते. तिच्यामागून ती मोठ्या सुनेकडे येते. घरात तीन जावा असल्या, तर मोठ्या जावेला स्वयंपाकपाणी करावे लागते. तिच्याहून लहान जाऊ घरातल्या मुलाबाळांना सांभाळते व तिच्याहून धाकटी झाड-सारवण करून घर नीटनेटके व स्वच्छ ठेवते. घरातल्या बायका कापड विणतात. विणता येणे हा मुलींच्या शिक्षणातलाच एक भाग समजतात. हे लोक रेशमी वस्त्रे विणण्यासाठी रेशमाचे किडे सांभाळतात. त्यांची जोपासना करणे व रेशमाची वस्त्रे विणणे, ही कामे घरातल्या वृद्ध स्त्रिया करतात.

खेडयांतील स्त्री-पुरुष त्रिकाल स्नान करताना आढळतात. प्रत्येक कुटुंबात रामायणाची एक प्रत असते व घरातली माणसे मोठ्या आवडीने ते वाचतात. बायका सर्वसाधारणपणे बाहेर रात हिंडताना दिसत नाहीत. आसामी लोक हत्ती हे गणपतीचे रूप आहे, असे मानतात. त्यामुळे माहूत हत्तीवर चढण्यापूर्वी प्रथम गणपतीला नमस्कार करतो. गणपतीचा अपमान होईल, या भीतीने आसामी स्त्रिया कधीही हत्तीवर बसत नाहीत.

**प्रमुख शहरे** – गौहाटी – ही आसामची राजधानी असून, ती ब्रह्मपुत्रेच्या काठी वसलेली आहे. इथे जवळच कामाख्या देवीचे

मंदिर आहे. इथे मोठा तेलशुद्धीकरण कारखाना आहे. ही आसामची मोठी बाजारपेठ असून, इथे चहाचा मोठा व्यापार चालतो. इथे एक शिवमंदिर, नवग्रहमंदिर व उग्रतारेचे मंदिरही आहे. गौहाटीजवळच महर्षी वसिष्ठांचा आश्रम आहे. संध्या, ललिता व कांता या तीन नद्यांचे प्रवाह इथून वाहतात. हे एक अत्यंत रमणीय स्थळ आहे.



शिवमंदिर, शिवसागर

शिवसागर – ही आहोमांची राजधानी होती. त्यांनी बांधलेला करंगधर प्रासाद इथे आहे. इथल्या शिवसागर तलावाच्या काठी शिवाचे मोठे मंदिर आहे. शिवरात्रीला इथे मोठी यात्रा भरते.

नामरूप येथे मोठा खतकारखाना आहे.

नाहरकटिया येथे तेल व गॅस काढण्याचे कारखाने आहेत. कारण या भागात तेल व नैसर्गिक वायूंचा बराच मोठा साठा आहे.

माजुली हे ब्रह्मपुत्रेच्या प्रवाहातील एक बेट आहे. इथे वैष्णवांचे मोठे केंद्रसत्र आहे.

उमानंद हे ब्रह्मपुत्रेच्या प्रवाहातील दुसरे बेट आहे. इथे आहोम राजा गदाधरसिंग याने १६९४ मध्ये बांधलेले शिवमंदिर आहे. यातील खडकात कोरलेल्या देवतांच्या मूर्ती प्रेक्षणीय आहेत.

**आसामातील वन्य जमाती** – आसामातील पहाडी प्रदेशात अनेक आदिवासी जमातींची वस्ती आहे. इंडोचीन वंशातील या जमाती असून, त्यांचे दोन वर्ग पडतात. प्राचीन काळी ईशान्येकडून आलेल्या टोळ्यांचे वंशज खासी हे एका वर्गात येतात; तर दिमासा किंवा पहाडी काचारी, बोंडो, रामा, कारो, लालुंग, डफला, मिरी, अबोर, आपातानी व मिश्मी, या जमातींचा समावेश दुसऱ्या वर्गात होतो.

आसामी टेकड्या पूर्वी सुसंस्कृत जगापासून अलग पडल्या होत्या. पण दळणवळणाची साधने वाढल्यापासून त्यांचा आता सुधारलेल्या जगाशी संबंध येऊ लागला आहे. पहाडी प्रदेशात रस्ते झाल्यामुळे तिथले लोक चहाच्या मळ्यांत मजुरी करण्यासाठी पहाडी प्रदेशांतून खाली उतरू लागले व परकीय ख्रिस्ती मिशनऱ्यांनी त्यांच्या प्रदेशांत चंचुप्रवेश केला. पण सुसंस्कृत लोकांशी संबंध आल्यामुळे या वन्य टोळ्यांचा फायदा होण्याऐवजी तोटाच झाला आहे. त्यामुळे या प्रदेशाचे जुने निरागस जीवन नष्ट झाले असून, सुसंस्कृत जगातील दुर्गुणांचा व रोगराईचा मात्र त्यांच्या प्रदेशांत फैलाव झाला आहे. सुधारणा त्या मानाने कमीच झाली आहे.



अलंकृत स्त्री – आसाम

**वेषभूषा** – आसामी पुरुषाचा परंपरागत पोषाख म्हणजे सदरा, धोतर व रुमाल असा असतो. आसामी स्त्री कमरेपासून खाली परकरवजा मेखला वापरते. वरच्या अंगाला, अंगाभोवती घट्ट गुंडाळलेली रिहा असते. सांप्रत जुन्या बायका व विवाहित स्त्रिया तेवढ्या रिहा वापरतात. सर्वसामान्य स्त्रिया व मुली त्याऐवजी पोलके घालतात. सर्वांत वर आच्छादन म्हणून चद्दर असते. ही चद्दर म्हणजे तीनवारी साडीच असते. मेखला सामान्यत: मुगा रेशमाची व चद्दर पांढऱ्या रंगाची असते. अलिकडे सुधारक मुली रंगीत प्रिंटेड वायल किंवा नायलॉन यांचा चद्दर म्हणून उपयोग करतात. सहावारी साड्याही मोठ्या शहरातील मुली नेसू लागल्या आहेत.

पूर्वी खानदानी स्त्रिया खूप जरीकाम केलेल्या किनखापाचा पोषाख करीत. सांप्रत पाट या मुलायम रेशमी वस्त्राचा श्रीमंत स्त्रिया वापर करतात.

रोजच्या वापरासाठी स्त्रिया बहुधा रंगीत किनार व बुट्ट्या

असलेली वस्त्रे पसंत करतात. सण-समारंभप्रसंगी त्या मुगा रेशमाची वस्त्रे नेसतात.

आसामी स्त्रिया हातात वांगड्या, कर्णफुले, साखळी, अंगठी, इ. अलंकार घालतात. तिला रंगीबेरंगी सुवासिक फुले माळायला फार आवडतात.

आपला वापरायला लागणारा कपडा आसामी स्त्री घरच्या घरीच हातमागावर विणून तयार करते. सूतकताई व विणकाम तिला लहानपणीच शिकवण्यात येते.

आसामी स्त्री उद्योगी आहे. ग्रामीण भागातील स्त्रियांना तर फार कष्ट करावे लागतात. शेतात नांगर धरण्यापासून शेतीची सर्व कामे तिला करावी लागतात. कपडा विणणे आणि घर चालवणे ही तर खास तिचीच कामे असतात. त्या मानाने आसामी शेतकरी आळशीच आहे. दोन-तीन महिने शेतात काम करून बाकीचे दिवस तो घरी बनवलेली तांदुळाची दारू लाओ-पाती पीत आराम करतो.


आसामी स्त्री

सासरी व माहेरी स्त्रीला मानाने वागवतात. स्त्री ही उद्योगी असल्यामुळे अद्यापही काही ठिकाणीं वराकडून वधूला हुंडा मिळतो.

**आहार** – आसामातील लोकांचे मुख्य अन्न म्हणजे भात व मासळी. तांदूळ हे इथले मुख्य पीक आहे. इथे प्रत्येकाच्या दारात लहान-मोठी पोखरी म्हणजे तलाव असतात. त्यातून ताजी मांगुर किंवा कावई मासळी हवी तेव्हा मिळते. मोठ्या शहरात पोखरी नसतात. त्याऐवजी मोठ्या भांड्यात मासे पाळतात व हवे तेव्हा वापरतात. हे लोक भाज्याही खातात. नारळाचा उपयोग जेवणात भरपूर करतात. सर्व पदार्थ सरसूच्या तेलात करतात. पीठा हे इथले मुख्य पक्वान्न. तांदुळाच्या पिठात नारळ, खसखस, तीळ, बदाम, बेदाणे, इ. घालून त्याचे लहान गोल वडे करून ते तुपात तळतात. पिठाचे पासष्ट प्रकार रूढ असून त्यासाठी तांदूळ निरनिराळ्या प्रकाराचा घेतात. बांबूच्या कोवळ्या कोंबाची चटणी व लोणचे ही त्यांची आवडती तोंडी-लावणी होत.

इथले ब्राह्मणही मासे खातात. काही उच्चवर्णीय हिंदू कुटुंबांत कोंबडीचे मांस व अंडी खात नाहीत. त्याऐवजी बदके व त्यांची अंडी खातात. कबुतराचे मांसही खातात.

दूधदुभते व फळे यांचाही या लोकांच्या आहारात समावेश असतो. त्यांच्या घराभोवती केळी, पपई, नारळ यांची झाडे व बांबूची बने असतात. बांबूच्या पोकळ पेऱ्यांमधून हे लोक मीठ, मिरची, डाळ, तांदूळ, इ. पदार्थ भरून ठेवतात. पाणी साठवण्यासाठीही त्यांचा उपयोग होतो. प्रवासात त्यातून भात व मासळी नेतात. हिरव्या बांबूच्या पेऱ्यात तांदूळ व पाणी भरून त्याचे तोंड तागाने बंद करतात आणि ते जाळात टाकतात. बांबूच्या पेराच्या बाहेरील पाला-पाचोळा जळू लागतो. तेव्हा त्यातील पाण्याच्या वाफेने आतला भात शिजून तयार होतो. हा भात अतिशय रुचकर व पौष्टिक असतो.

सर्व स्त्री-पुरुष तांबूल खातात. कच्च्या सुपारीलाच लोक तांबूल म्हणतात. ही सुपारी जमिनीत पुरून आंबवलेली असते. हे लोक पानाला नुसताच चुना लावतात. कात वगैरे घालत नाहीत. घरी कोणी अतिथी आला, की प्रथम त्याच्या पुढे सुंदर पानदान ठेवतात. त्याने तांबूल घेतलाच पाहिजे, असा नियम आहे. नवख्या माणसाने हा तांबूल खाल्ला, तर त्याला घाम फुटतो व डोके गरगरते.

हे लोक चहा पितात. कॉफी मात्र क्वचितच घेतात.

**उद्योगधंदे** – आसाम हा कृषिप्रधान प्रदेश असून, राज्यातील ७० टक्के जमिनीत भातशेती केली जाते. चहा, कापूस, ताग, ऊस, इ. पिकेही होतात. चहा हे महत्त्वाचे पीक असून ७ टक्के जमीन चहासाठी वापरली जाते. आसामात ७५० चहाचे मळे आहेत.

आसामच्या भूमीत विपुल खनिजसंपत्ती आहे. तेल, वायू, कोळसा, चुनखडी यांचे मोठे साठे सापडले आहेत. तेल व [illegible]


चहाचा मळा – आसाम

यांची निर्मिती हे प्रचंड उद्योग चालतात. त्यांच्या अनुषंगाने

रासायनिक द्रव्ये, पॉलिथिन, रबर, प्लॅस्टिक यांचे कारखानेही निघाले आहेत. जंगलात बांबू व लाकूड भरपूर मिळत असल्यामुळे ते उद्योगही मोठ्या प्रमाणावर चालतात.

**कला-विकास** – इ. स. च्या ७ व्या शतकापासून हस्त-लिखित ग्रंथांवर सुंदर चित्रे रंगविण्याची परंपरा आसामात विकास पावली. जुनी भित्तिचित्रेही पाहायला मिळतात.

आसाममध्ये काही प्राचीन मंदिरे आहेत. पर्वतिया गावाजवळ आहोमांच्या काळातले शिवमंदिर आहे. त्याच्या महाद्वाराची चौकट गुप्तकालीन नक्षीकामाची साक्ष देते. या मंदिराच्या भग्नावशेषांतही काही उत्कृष्ट शिल्पकाम आढळते. शिवसागर शहराच्या परिसरातही काही सुंदर मंदिरे आहेत.

अल्पना, सुंदर विणकाम, पितळेची सुरेख भांडी, वेत व बांबू यांपासून सुबक वस्तू बनवणे, हस्तिदंती नक्षीदार वस्तू, इ. कलाकुसरीची कामेही आसामात चालतात. पाहा – अरुणाचल प्रदेश, नागभूमी, मणिपूर, मेघालय. [ एन्सा. रि. ए.; म. ज्ञा. को. ; हिं. वि. को.; से. इं. १९३१; कामरूप आसाम –श्री. राजा मंगळवेढेकर, १९७३ ]

## आसामी ब्राह्मण

कनोजी ब्राह्मणांतून निघालेली एक शाखा. हे आपल्याला वैदिकधर्मी म्हणवीत असले, तरी यांच्यातले पुष्कळचे लोक तंत्रमार्गी आहेत. काही वैष्णवही आहेत. यांच्यातही पोटजाती असून हे लोक गोत्राच्या बाहेर आपल्या पोटजातीत विवाह करतात. [ भा. ब्रा. जा. प्र. ]

## आसामी भाषा व साहित्य

क्षेत्रफळाच्या दृष्टीने आधुनिक आसामचा प्रदेश सुमारे ७८,५०० चौ. कि. मी. इतका विस्तृत आहे. याच्यात पहाडी भागही मोठा आहे आणि तो राज्याच्या चारही अंगांना पसरला आहे. ब्रह्मपुत्रा नदीच्या पर्वतराजींतल्या सहा जिल्ह्यांत आसामी भाषा मुख्यत्वे बोलली जाते. सुरमाची पहाडी आणि तिच्या आजूबाजूचा डोंगराळ विभाग यांत मातृभाषा या नात्याने आसामी बोलणाऱ्यांची संख्या फारच थोडी आहे.

वर्तमान आसामी लिपी हे देवनागरीचेच एक वेगळे रूप आहे. हिचे सर्वांत प्राचीन स्वरूप भास्करवर्म्याच्या इ. स. ६१० च्या ताम्रपटात पाहायला मिळते. तेव्हापासून या लिपीचा सतत विकास होत आला आहे. प्राचीन हस्तलिखित ग्रंथांची लिपी आणि आधुनिक लिपी या दोहोंत थोडे अंतर दिसते. वस्तुतः मैथिली, बंगाली आणि आसामी या तीनही लिपींचे उगमस्थान एकच आहे. आधुनिक आसामी लिपी मैथिली लिपीला अधिक जवळची आहे. र आणि व या दोन वर्णांत बंगाली लिपीशी तिचा भेद दिसतो. कारण व हा वर्ण बंगाली लिपीत नाही.

आसामी भाषा, तिची वर्णमाला आणि लिपी यांच्या विकासात आर्यभाषांचा पूर्णतया सहयोग असला, तरी आसामी भाषा आपल्या उगमस्थानातल्या दुसऱ्या भाषांचे शब्द आणि ध्वनी यांच्या प्रभावापासून मुक्त राहू शकलेली नाही. म्हणूनच अन्य भारतीय भाषांच्या वर्णोच्चारांपेक्षा आसामी वर्णोच्चार भिन्न आहेत. आसामीचे सर्व ध्वनी कोमल आहेत. द्वित्व झालेले वर्णसुद्धा कठोर उच्चारले जात नाहीत. मूर्धन्य आणि दन्त्य वर्ण लिखित रूपात वेगळे दिसत असले, तरी त्यांच्या उच्चारात फरक होत नाही.

आसामीची जडणघडणही अन्य भारतीय भाषांपेक्षा थोडी वेगळी आहे. एखाद्या वस्तूचा गुण विशेषरूपाने सांगायचा, तर तद्दर्शक शब्दांचे द्वित्व करण्याची प्रवृत्ती या भाषेत आहे. ही प्रवृत्ती द्रविड, कोल आणि खासी या भाषांतून आली आहे. अनार्य भाषांप्रमाणे शब्दाच्या दुसऱ्या अक्षरावर जोर देणे हेही आसामीचे एक वैशिष्ट्य आहे. संबंधवाचक शब्दांना व्यक्तिवाचक प्रत्यय लावून कौटुंबिक नाती दाखविली जातात. पुरुषभेदाने प्रत्ययभेदही होतो. खासी, कोलारी आणि मलय या तीन भाषा आग्नेय लोकांच्या भाषा मानल्या जातात. आसामी भाषेत ज्या शब्दांना व रूपांना देशज मानतात, त्यांतले बहुतेक शब्द आग्नेय भाषांतून आलेले आहेत. जननेंद्रियविषयक बोलाचालीतले शब्द, जवळच्या कौटुंबिक नात्याविषयी प्रयुक्त होणारे शब्द, पशूंची नावे, इ. अनेक बाबींतले शब्द आग्नेय भाषांतूनच घेतलेले आहेत. स्थलनामांच्या बाबतीतही अशीच गोष्ट आहे. उदा० – कामाख्या, प्राग्ज्योतिष, ही नावे मूलतः आग्नेयच आहेत. का + मै + खा, प्राग् + जु + थिस ही त्यांची मूलरूपे होत. ग्रामनामांच्या अंती येणारी ता आणि तूल ही अक्षरे आग्नेय प्रभावामुळेच आलेली आहेत. उदा० – कामता, धर्मतूल, इत्यादी. आसामीच्या शब्दप्रक्रियेवर प्रभाव टाकणाऱ्या बोंडो आणि आहोम या दोन मुख्य भाषा होत. बोंडो भाषिकांनी आणि आहोम लोकांनी भिन्न भिन्न काळी आसामवर राज्य केले होते, त्याचा तो परिणाम आहे.

असे असले तरी आसामी भाषेवर वरील अनार्य भाषांपेक्षा आर्य भाषांचा प्रभावच व्यापक आहे, हे लक्षात घेतले पाहिजे. डॉ. काकती यांच्या मताप्रमाणे आसामी ही आर्य भाषांचे स्वरूप घेऊन विकसित झाली, याची दोन महत्त्वपूर्ण कारणे आहेत –

(१) भारताला दूर पूर्वेत जाण्यासाठी आसाममधून रस्ता होता आणि त्यामुळे आर्यभाषी लोकांशी आसामचा संबंध व संपर्क निरंतर येत राहिला. (२) तेराव्या शतकात आसामी

भाषेत साहित्यनिर्मिती सुरू झाली, आणि त्यामुळे व्यवहाराची भाषा स्थिर होऊन तिचे आर्यभाषांशी नाते दृढ झाले. यामुळेच आग्नेय भाषांतून सतत येणारा शब्दांचा ओघही कुंठित झाला.

आसामीची शब्दावली मुख्यत्वे संस्कृतच आहे. त्या शब्दांची

| অ | আ | ই | ঈ | উ | ঊ | ঋ | এ | ঐ | ও | ঔ | ং | ঃ | ঁ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ[ऑ] | आ | इ | ई | उ | ऊ | ऋ | ए | ऐ | ओ | औ | अनुस्वार | विसर्ग | चंद्रबिंदु |

| ক | খ | গ | ঘ | ঙ | চ | ছ | জ | ঝ | ঞ | ট | ঠ | ড | ঢ | ণ | ত | থ | দ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| क[कॉ] | ख[खा] | ग[गॉ] | घ[घॉ] | ङ[ङॉ] | च[सॉ] | छ[सॉ] | ज[जॉ] | झ[झॉ] | ञ[ञॉ] | ट[टॉ] | ठ[ठॉ] | ड[डॉ] | ढ[ढॉ] | ण[णॉ] | त[तॉ] | थ[थॉ] | द[दॉ] |

| ধ | ন | প | ফ | ব | ভ | ম | য | য় | ৰ | ল | ৱ | শ | ষ | স | হ | ক্ষ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ध[धॉ] | न[नॉ] | प[पॉ] | फ[फॉ] | ब[बॉ] | भ[भॉ] | म[मॉ] | य[जॉ] | य[यॉ] | र[रॉ] | ल[लॉ] | व[वॉ] | श[हॉ] | ष[षॉ] | स[हॉ] | ह[हॉ] | क्ष[क्षॉ] |

आसामी लिपी

रूपेही संस्कृत व्याकरणावरच आधारित आहेत. व्यवहारात संस्कृत तत्सम शब्दांचा वापर कमी होतो. त्यांच्या स्थानी बहुतांशी अर्धतत्सम किंवा तद्भव शब्द घेतले जातात. उदा० सत्य, श्लोक, स्वाद, इ. शब्दांसाठी ग्रामीण भागात सइत, सोलोक, सोवाद, असे शब्द प्रयुक्त होतात. आसामी भाषेच्या काही शब्दांशी सादृश्य असलेले शब्द मराठी आणि गुजराती भाषांतही आढळतात. आसामीची वाक्यरचना आर्यभाषांप्रमाणेच आहे. तिच्यातही कर्ता, कर्म आणि क्रियापद असाच क्रम असतो. व्याकरण संस्कृतला अनुसरणारे आहे. संधी, समास, यांत स्थानपरत्वे थोडाबहुत फरक होतो एवढेच.

आसामीच्या लिखित साहित्याचे पाच कालखंड कल्पिता येतात – (१) प्राग्वैष्णव काल – इ. स. १२०० ते १४४९ (२) वैष्णव काल – इ. स. १४४९ ते १६५० (३) गद्य बुरुंजी-काल – इ. स. १६५० ते १९२६ (४) आधुनिक काल – इ. स. १९२६ ते १९४७ व (५) स्वातंत्र्योत्तर काल –

आसामी भाषेत ग्रंथलेखनास नेमका केव्हा प्रारंभ झाला, ते अजून निश्चित झालेले नाही. कारण जुन्या हस्तलिखितांचे संशोधन अद्यापि व्हायचे आहे. आसाममध्ये सरकारी दफ्तरखाना असा कधी नव्हताच. तिथल्या राजांनी तो कधी ठेवला नाही आणि ठेवला असल्यास तो राजकीय उलथापालथीत नष्ट झाला असण्याचीही शक्यता आहे. पण असे असून देखील कौटिल्याचे अर्थशास्त्र, भासाची नाटके आणि राजा भोजाचा समरांगण सूत्रधार यांची हस्तलिखिते आजवर प्रकाशात आली आहेत.

आसामी भाषेतील प्राचीन ग्रंथ आज उपलब्ध नसले, तरी आसामी लोक बुद्धिमान, प्रगल्भ विचारांचे आणि सत्याच्या प्रचारासाठी सर्व बाजूंनी प्रयत्न करणारे होते. आसामात पूर्वी मोठमोठे पंडित होऊन गेले. तिथल्या राजांनीही त्यांची कदर केली. युआन च्वांगच्या वृत्तांतावरून आणि जुन्या ताम्रपटांवरून प्राचीन काळचे राजे पंडितांना आणि कवींना कशा प्रकारे आश्रय देत असत, त्याची कल्पना येते. आसामी पंडितांच्या वाङ्मयीन प्रतिभेचा आविष्कार जुन्या ताम्रपटांतही पाहायला सापडतो. हे ताम्रपट संस्कृत भाषेत आणि नादमधुर शैलीत लिहिलेले आढळतात. त्यांचे काही नमुने पुढीलप्रमाणे –

राजा भास्करवर्मा याच्या दिग्विजयाची प्रशंसा निधानपूर ताम्रपटात आली आहे, ती अशी – 'ज्याप्रमाणे सूर्याचे (भास्कर) प्रतिबिंब जलपूर्ण अशा अनेक पात्रांत एकाच वेळी दिसते, त्याप्रमाणे भास्करवर्मा राजाच्या पराक्रमामुळे त्याची मूर्ती प्रत्येक मांडलिकाच्या अंतरंगात (सर्वांना) दिसू लागली'. रत्नपाल राजाची राजधानी दुर्जयनगरी ही आदर्श राजधानी होती, असे त्या ताम्रपटात पुढीलप्रमाणे म्हटलेले आहे – 'दुर्जय नगरीची तटबंदी काक पक्ष्यांच्या कुंपणासारखी वलाढ्य आहे. ती पाहून गुर्जरनृप संत्रस्त व्हावा, गौंडराजांच्या वनगजांना ज्वरबाधा व्हावी, दक्षिणाधिपती अस्वस्थ व्हावा आणि त्या तटबंदीसमोर कोणत्याही शत्रूचा पराभव व्हावा. या राजधानीत निस्तेजपणा आढळू शकेल, पण तो इथल्या प्रजेत नव्हे तर हारात; चंचलपणा दिसेल, पण तो माकडांत; चलविचल दिसेल; पण ती भ्रुकुटींच्या वक्रतेत'. इत्यादी

या आलेखांवरून आसाममधील तत्कालीन संस्कृताचे बाणभट्टी वळण कळून येऊ शकते. भास्करवर्म्याच्या काळात विपुल ग्रंथ निर्माण झाले असण्याची शक्यता आहे. भास्कर-

वर्म्याने कनोजच्या सम्राट हर्षवर्धनाला अनेक सुंदर ग्रंथ भेट म्हणून दिल्याची माहिती मिळते. त्या ग्रंथांत सुभाषितांचाही एक संग्रह होता.

आसामी लोक संगीताचे भोक्ते असून, त्या प्रांतात अनेक संगीतज्ञ होऊन गेले, अशी माहिती शिलालेखांवरून मिळते. आसामी लोकगीतांचा ठेवा फार मोठा आहे. ती आजही लोकप्रिय आहेत. आसामी भाषेच्या प्राचीन काळात ती अशिक्षित शाहिरांनी रचलेली आहेत. विवाह, वसंतोत्सव, आणि देवतांचे कोपशमन, इ. प्रसंगी ती गायिली जातात. बियानाम, बिहुनाम, अलिनाम आणि देशबिचरारनाम या नावांनी ती प्रसिद्ध आहेत. राजे आणि राजकुमार यांच्यावरही लोकगीते आहेत. त्यांचे पडसाद बौद्ध साहित्यांतही पडलेले आहेत. एका गीतात फुलकुंवर या राजपुत्राची प्रेमकथा निवेदिली आहे. त्या राजपुत्राची प्रेयसी आपल्या आईला धमकी देते, की माझे प्रेम जर सफळ झाले नाही, तर मी तुझी सवत व्हायलाही कमी करणार नाही. ही कल्पना जगावेगळी आणि घृणास्पद आहे; पण ती पाली साहित्यांतील भिक्षुणी उत्पलवर्णा हिच्याविषयीच्या गाण्यातही आढळते.

आसामी भाषेत साहित्यनिर्मिती होण्यापूर्वी त्या देशात डाक नावाचा एक तत्त्वज्ञ होऊन गेला. त्याच्या वचनांना आजही वेदवाक्यांइतकी मान्यता आहे. ही वचने 'डाकारवचन वेदारवाणी' या नावाने प्रसिद्ध आहेत. बंगाल आणि बिहार या प्रदेशांतही डाकची वचने प्रचलित आहेत. डाक हा कामरूप जिल्ह्यातील लेहीडांगर या गावचा रहिवासी होता. त्याच्या काही वचनांचे बौद्ध साहित्याशी आश्चर्यजनक साम्य आहे. डाकने प्रसववेदनांवर काही उपचार सांगितले आहेत, तेच महाउन्मार्गजातकातही पाहायला मिळतात. डाक हा धर्मनिष्ठ होता. त्याने दान-धर्माचा उपदेश केला आहे. मंदिरे बांधावी, झाडे लावावी, असेही तो सांगतो. पुरुषांना आकर्षित करण्यासाठी तिथल्या स्त्रिया ज्या मार्गांचा अवलंब करतात, त्यांचे वर्णन डाकने केले आहे. आजही कामरूप हा भाग वशीकरण व जादूटोणा यांचा भाग म्हणून ओळखला जातो. आसामी स्त्रियांच्या अंगी पुरुषांना कोकरू बनविण्याची अलौकिक शक्ती असल्याच्या कथा भारतात सर्वत्र आहेत. आजही आसामात मंत्रतंत्र बऱ्याच प्रमाणात आहे. या मंत्रांची भाषा पराकाष्ठेची आर्ष असून, त्यांतल्या कल्पना गूढ आहेत. हे मंत्र म्हणजे आसामी साहित्याची नांदीच म्हटले तरी चालेल. तांत्रिक बौद्धांनी इ. स. च्या आठव्या ते बाराव्या शतकांच्या दरम्यान लिहिलेल्या एका कवितांचा आणि सूत्रांचा संग्रह हरप्रसाद शास्त्री यांना नेपाळमध्ये सापडला. त्याचे नाव चर्यापाद असे आहे. त्यातले काही दोहे कामरूपात निर्माण झाले असावे, असा तर्क आहे.

साहित्य या अर्थाने आसामी साहित्याचा प्रारंभ होतो, तो इ. स. च्या तेराव्या शतकात. त्याच सुमारास कामरूपमधील हिंदुराज्याचा नाश होऊन कामतापूर येथे कामता या नव्या राज्याचा उदय झाला. त्याचा विस्तार करतोया नदीपासून बार नदीपर्यंत होता. त्यात रंगपूर, कुचबिहार, गोलपाडा आणि कामरूप या जिल्ह्यांचा समावेश होता. पूर्व आसामच्या काही प्रदेशा वर आहोम राजांची सत्ता प्रस्थापित झाली होती. कामता हे नवे राज्य असले, तरी त्याच्याकडे जुन्या कामरूप राज्याचा वारसा होता. त्यामुळे तिथल्या कवींनी आणि पंडितांनी त्या राज्याचा आश्रय घेतला. हेमसरस्वती आणि हरिहरविप्र हे दोघे त्या काळातले प्रसिद्ध कवी होत. हेमसरस्वतीने प्रल्हाद चरित्र हे काव्य लिहिले आहे. याशिवाय या कालातील आणखी तीन काव्ये म्हणजे लवकुशारयुद्ध, बभ्रुवाहनयुद्ध व जयद्रथवध ही होत. हे चार ग्रंथ प्राचीन असमिया काव्याचे नमुने आहेत.

प्राग्वैष्णव कालातला सर्वांत मोठा कवी माधव कंदली हा आहे. महामाणिक्य राजाच्या आश्रयाखाली याने आसामी भाषेत रामायण रचले. याच्या काव्यात आसामी भाषा स्वतःच्या प्राकृतिक रूपात प्रकट झाली. तिच्यावरचे संस्कृतचे दडपण कमी झाले. त्याच्या रामायणाच्या सहा सर्गांपैकी फक्त पाचच उपलब्ध आहेत. त्याच काळात गीतिकाव्य लिहिणारे बरेच कवी होऊन गेले. दुर्गावर, पीतांबर, मनकर, इ. त्यांची नावे आहेत. दुर्गावराने लौकिक गेय छंदांत रामायण रचले. पीतांबराने उषापरिणय आणि मनकराने बेवुला लखिन्दर ही प्रणयकाव्ये लिहिली.

यापुढचा काल वैष्णव काल म्हणून ओळखला जातो. हेमसरस्वती, माधव कंदली, इ. कवींनी आपल्या काव्यांतून भक्तीचा प्रचार केला आणि वैष्णव कालातल्या भक्ति-आंदोलनाची भूमिका तयार करून ठेवली. वरील कवींची भक्ती ही निःसंशय वैष्णव भक्तीच होती. मात्र तिला एखाद्या चळवळीचे स्वरूप आले नव्हते. कारण त्या काळात शाक्त लोक व आहोम आणि कोच राजे हे भक्तिसंप्रदायाच्या वाढीला अडथळे निर्माण करीत होते. पुढे ही परिस्थिती बदलली. कोच राजे वैष्णव झाले आणि आहोम राजांमध्ये सहिष्णुता निर्माण झाली.

या कालखंडातला प्रख्यात कवी आणि महापुरुष शंकरदेव हा होय. आसामी साहित्याचा तो केवळ नवनिर्माताच नव्हे, तर संपूर्ण आसामी जीवनाला नवे वळण लावणारा, असा तो महाभाग होता. साहित्य, समाज, संस्कार, धर्म, कला, संगीत आणि सामाजिक संघटन या सर्वांनाच त्याने नवजीवन दिले

आणि नवी दिशाही दाखविली. त्याने आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या माधवकंदलीला अप्रमादी कवी म्हणून आपली आदरांजली वाहिली आहे. त्याची विनयशीलता एवढी, की पूर्वसूरींना तो ऐरावत म्हणतो व स्वतःला मशक म्हणवून घेतो. याने भागवती धर्माची मुहूर्तमेढ रोवली आणि भागवत पुराणाचा अनुवाद केला. शंकरदेवाची प्रधान रचना कीर्तनघोषा ही आहे. तिच्यात भागवत आणि अन्य पुराणे यांतून भक्तिपूर्ण आख्यानांची निवड करून त्याने त्यांचा अनुवाद केला आहे. या ग्रंथाच्या रचनेबाबत काही विद्वान म्हणतात, की एका ठिकाणी बसून शंकरदेवाने ग्रंथरचना केली नसून वेळोवेळी त्याने जी गीते रचली, त्यांचा संग्रह या कीर्तनघोषेत केलेला आहे. या ग्रंथात एकूण दोन हजार दोनशे एकसष्ट पदे आहेत.

माधवदेवाने या कीर्तनघोषेत आपलीही सहस्रघोषा या नावाची पद्ये सम्मीलित केली आणि पुढे गुरु-शिष्यांनी मिळून बनविलेला हा गीतग्रंथ संयुक्त कीर्तनघोषा या नावाने आसामी वैष्णवांचा पवित्र ग्रंथ बनला. आसाममधले अशिक्षित खेडूतही यातली पदे प्रेमाने गातात.

भक्तिप्रदीप हा ग्रंथ शंकरदेवाने आपल्या धर्माचा सिद्धान्त-ग्रंथ म्हणून लिहिला. याशिवाय निविनवसिद्ध, रुक्मिणीहरण, गुणमाला, लीलामाला, इ. ग्रंथही त्याने लिहिले. भक्तिरत्नाकर हा त्याचा संस्कृत ग्रंथ आहे. माधव कंदलीचे हरवलेले उत्तरकांड याने स्वतः रचून त्याला जोडले.

शंकरदेवापासून आसामी कवितेला नवा बहर आला. शंकरदेवाच्या शिष्यांनीही आसामी भाषेची बहुमोल सेवा केली. या कालातले बहुतेक काव्य विष्णू आणि त्याचे विविध अवतार यांच्या वर्णनाचे आहे.

शंकरदेव हा आसामी भाषेचा पहिला नाटककारसुद्धा आहे. त्याच्या नाटकांना अंकिया नाट म्हणतात. कारण ती सर्व नाटके एकांकीच आहे. या नाटकांत विष्णूची श्रेष्ठता दाखविलेली आहे. रामविजय, कालियादमन, पारिजातहरण, रुक्मिणीहरण, पत्नीप्रसाद ही त्याच्या नाट्यकृतींतली महनीय रत्ने आहेत. या अंकिया नाटकांत जो पद्यभाग असतो, त्याला 'बड (वर) गीत' म्हणतात. ही गीते ब्रजबुली भाषेत आहेत. शंकरदेवाच्या वैष्णव पंथाला खूप लोकप्रियता मिळाली व त्याचा प्रसारही पुष्कळ झाला. त्यामुळे आसामी साहित्याच्या निर्मितीत मोठीच भर पडली. महाकाव्ये, पुराणे आणि इतर अभिजात संस्कृत साहित्य आसामी भाषेत अनुवादित झाले. नाट्यरचनाही पुष्कळच झाली. धार्मिक समारंभाच्या प्रसंगी व नामवंत पाहुण्यांच्या स्वागतार्थ त्यांचे प्रयोगही होऊ लागले. कुचबिहारचा राजा नरनारायण (इ. स. १५४०–१५८१) याने दरबारी पंडितांची एक सभा भरवून त्यांना व्याकरण, खगोल, गणित, महाकाव्ये, पुराणे, इ. संस्कृत ग्रंथांची आसामी भाषेत भाषांतरे करण्यास प्रोत्साहन दिले.

रामसरस्वती हा तत्कालीन कवी म्हणतो, 'राजा नरनारायण याने मला महाभारताचे आसामी भाषेत भाषांतर करण्याची आज्ञा दिली व माझे कार्य निरावाध चालावे म्हणून द्रव्य, ग्रंथ आणि नोकरचाकर या सर्व गोष्टी माझ्या दिमतीला आणून उभ्या केल्या.' रामसरस्वतीची कल्पनाशक्ती प्रखर होती. मूळ महाभारतात नसलेली कित्येक आख्याने त्याने आपल्या अनुवादात भरली आहेत. याशिवाय त्याने कित्येक वधकाव्येही लिहिली आहेत. आपल्या भीमचरित्रात त्याने आसाममधले ग्रामजीवन विनोदपूर्ण पद्धतीने चित्रित केले आहे.

सतराव्या शतकाच्या मध्यापासून पूर्व आसाममधील आहोम राजांकडून कवी आणि पंडित यांना वाढता राजाश्रय मिळू लागला. इ. स. १६९६ ते १७६९ या कालखंडात झालेल्या सर्व आहोम राजांनी अनेक कविपंडितांच्या करवी आसामी भाषेची अभिवृद्धी केली. कविराज चक्रवर्ती हा त्या काळातला सर्वश्रेष्ठ कवी होय. त्याने ब्रह्मवैवर्त पुराण, गीतगोविंद व शाकुंतल यांचे आसामी भाषेत भाषांतर केले. माधव-सुलोचना नावाचे एक प्रणयकाव्यही त्याने लिहिले. राजा रुद्रसिंग व त्याचा पुत्र शिवसिंग हे दोघेही चांगले कवी होते. राजेश्वरसिंग हा त्या कुळातला राजपुत्र चांगला लेखक होता. त्याने कीचकवध नावाचे नाटक लिहिले आहे. त्याचा पुत्र चारुसिंग. चारुसिंगाची पत्नी प्रेमदा सुंदरी. या दंपतीच्या मनोविनोदासाठी कविशेखर भट्टाचार्य या कवीने कामशास्त्रावर हरिवंश नावाचा ग्रंथ रचला (इ. स. १७५१ – १७६९). आहोम राज्यातला एक अधिकारी खरगरिया फू याने कल्किपुराणाचे रूपांतर केले. याच कालात वैष्णव सत्रांमधून अनेक भक्तकवींनी अनेक प्रार्थनागीते रचली. श्रीरामवर यदुमणी, अनिरुद्ध, भुइयां पुरुषोत्तमदास ठाकूर, इ. अनेक भक्तकवी त्या कालात चमकले. या कविसमुदायात काही स्त्रियाही होत्या.

शंकरदेवाच्या नंतर दुसरा तितक्याच तोलामोलाचा कवी माधवदेव हा झाला. तो संस्कृत भाषेचा पंडित, गायक आणि नाटककारही होता. शंकरदेवाच्या नंतर भागवती धर्माचा यानेच मोठ्या निष्ठेने प्रचार केला. माधवदेवाची महत्त्वाची रचना नामघोषा ही आहे. हा ग्रंथ अध्यात्मपर आहे. याच्या काळातला दुसरा कवी अनंत कंदली हा होय. याने कुमरहरण काव्य व सीतारपातालप्रवेश हे नाटक लिहिले. श्रीधर कंदली नावाच्या दुसऱ्या एका कवीने श्रीकृष्णाच्या बालजीवनातील घटनांशी संबंधित असलेले कानखोवा नावाचे मनोरंजक काव्य

लिहिले. हे काव्य अत्यंत लोकप्रिय झाले. आसामी स्त्रिया आपल्या मुलांना झोपविताना ओवीसारखा त्याचा उपयोग करू लागल्या. या कवीची विनोदशक्ती धुनुचा या काव्यात प्रस्फुटित झाली असून, ते आख्यानही आता 'कीर्तन' संग्रहातच समाविष्ट केले गेले आहे. श्रीकृष्णाने इंद्रद्युम्नाची कन्या धुनुचा हिचे पाणिग्रहण केले ती कथा या काव्यात आहे.

शंकरदेवाने आसामी गद्याची बैठक मांडली हे खरे; पण त्याला स्पष्ट आणि स्थायीरूप भट्टदेवाने दिले. हा कवी इ. स. च्या सोळाव्या शतकात होऊन गेला. याने भागवतपुराण आणि गीता यांचा आसामी गद्यात अनुवाद केला. इ. स. १५९७ साली त्याने आपला भागवतानुवाद पुरा केला.

सोळाव्या शतकाच्या अखेरीस आसामी भाषेत वैष्णव भक्तांची जीवनचरित्रे लिहिण्याला प्रारंभ झाला. यांतली बहुतेक चरित्रे पद्यमय असून सविस्तर लिहिलेली आहेत. माधवदेवाचा पुतण्या रामचरण ठाकूर आणि त्याचा पुत्र दैत्यारी ठाकूर या दोघांनी ही चरित्रे लिहिली आहेत. या कालखंडात आसाममध्ये संस्कृत भाषा उत्कर्षबिंदूवर होती. या काळात संस्कृत भाषेतल्या काही ग्रंथांचे संकलन झाले व काही संस्कृत नाटकेही अनुवादित झाली.

यानंतर गद्य बुरुंजी यांचा कालखंड येतो. या कालापर्यंत आसाममध्ये वैष्णव धर्माचा सर्वत्र प्रसार झाला होता. समाजाच्या अंतःकरणात त्याची पाळेमुळे रुजली होती. राजपरिवारातही त्याच्याविषयी आदर वाढला होता. त्यामुळे अन्य सांप्रदायिक आंदोलने शिथिल आणि प्रभावशून्य झाली. या काळात धार्मिक साहित्यावरोबरच धर्मनिरपेक्ष अशा साहित्याचीही रचना होऊ लागली. या धर्मनिरपेक्ष साहित्यात गद्य बुरुंजीला महत्त्वाचे स्थान आहे. बुरुंजी हा टाई भाषेतला शब्द आहे. याचा अर्थ अज्ञात कथांचे भांडार किंवा इतिहास असा होतो. आसाम हे एक स्वतंत्र राज्य होते. परकीय आक्रमण व अंतर्गत शैथिल्य या दोन्ही बाबतींत त्याला सदैव सावध राहणे आवश्यक होते. त्यातूनच या इतिहासलेखनाला प्रारंभ झाला. आहोम राजांनी सर्वप्रथम ही परंपरा सुरू केली. हे काम राजपुरोहित करीत असे. सुरुवातीला आहोमांच्या टाई भाषेतच हा इतिहास लिहिला जाई. पण पुढे आहोम राजे आसामी जनतेशी समरस झाले आणि त्यांनी आसामी भाषेचाही स्वीकार केला. तेव्हापासून बुरुंजीलेखन आसामी भाषेत होऊ लागले. त्यानंतर हे कार्य पुरोहितांच्या हातांतून सुटून दफ्तरखान्यावरच्या अधिकाऱ्यांच्या हाती आले. बुरुंजीमध्ये बोलभाषेला विशेष स्थान मिळाले. बुरुंजी साहित्य इतिहासाशी प्रामाणिक राहून लिहिले गेल्यामुळे त्यातल्या माहितीवरून आसामच्या व त्या द्वारे भारताच्या इतिहासावरही चांगलाच प्रकाश पडतो. लोकांची आर्थिक स्थिती, त्यांच्या चालीरीती व एकंदर समाजजीवन याविषयीची त्यावरून चांगली माहिती मिळते. भारतातल्या अन्य भाषांच्या साहित्यात अशा स्वरूपाचे वाङ्मय आढळत नाही. बुरुंजी साहित्याव्यतिरिक्त या काळात राजवंशांच्या वंशावळीही लिहिल्या गेल्या. त्यांत सूर्यखरी बलदेव याची दरराज वंशावली व रतिकांत द्विज याची राजवंशावली या दोन वंशावली मुख्य आहेत. आहोम नरेशांची वीरगाथा या बुरुंजी वाङ्मयातच पाहायला मिळते. सेनापती, सामंत व परदेशांत पाठविलेले राजदूत यांनी राजाला दिलेले अहवाल, न्यायनिवाड्याचे कागदपत्र व राजसभेची दिनचर्या, हे सर्व लिखाण बुरुंजी साहित्यातच समाविष्ट आहे. आधुनिक असमिया गद्य या बुरुंजी साहित्यातून उत्क्रांत झालेले आहे. युद्धकला, किल्ले व राजवाडे यांची बांधणी; हत्ती, घोडे वगैरेंचे आजार, या विषयांमध्ये या कालात प्रबंधरचना झाली. राज्याची अभिवृद्धी, संरक्षण व कार्यक्षमता या दृष्टींनी अशा प्रकारच्या प्रबंधांची आवश्यकता होतीच. कला, दर्शन, ज्योतिष, गणित, आयर्वेद, इ. विषयांवरही या कालात नामांकित ग्रंथ रचले गेले.

बुरुंजीनंतर आसामी साहित्याचा आधुनिक काल येतो. तिथून पुढे १८ व्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंतचा काल आसाममध्ये निष्क्रियतेचा गेला. वैष्णव पंथाचा प्रभाव ओसरू लागला आणि ज्ञानलालसाही मंद झाली. राजकीय परिस्थितीही या गोष्टीला पुष्कळ अंशी कारणीभूत होती. अंतर्गत हेवेदावे, ब्रह्मी लोकांच्या स्वाऱ्या व अफूबाजी या गोष्टींमुळे आसामी जनतेच्या सामाजिक व राजकीय जीवनाची घडी पार विस्कटून गेली. इ. स. १८५४ साली ब्रिटिशांनी आसाम पादाक्रांत केला व काही अंशी राजकीय व सामाजिक स्थैर्य प्रस्थापित केले.

त्यानंतर इथे नवविचारांचा प्रादुर्भाव झाला. रेव्हरंड नायान ब्राऊन व ओ. टी. कोट्टर हे अमेरिकन मिशनरी याच सुमारास आसाममध्ये आले. त्यांनी आपल्याबरोबर एक छापखानाही आणला. ख्रिस्ताचा संदेश जनतेच्या भाषेत सर्वत्र पोचविण्यासाठी ते आसामी भाषा शिकले. इ. स. १८४६ साली अमेरिकन बाप्टिस्ट मिशनने शिवसागर येथे अरुणोदय नावाचे मासिक सुरू केले. त्यातून साहित्य, इतिहास, विज्ञान, धर्म, इ. विषयांवर लेख प्रसिद्ध होऊ लागले. अशा रीतीने आसामी भाषेच्या या आधुनिक कालखंडाची सुरुवात या मिशनऱ्यांनीच केली, असे म्हणायला हरकत नाही. त्यांच्या द्वारेच आसामी लोकांना पाश्चात्य कल्पना व ज्ञानविज्ञान यांचा परिचय झाला. या मिशनऱ्यांनी आसामी भाषेत कित्येक इंग्रजी ग्रंथांची भाषांतरेही केली. त्यांनी विद्यार्थ्यांसाठी शालेय पुस्तकेही तयार केली.

हळूहळू आसाममधील सुशिक्षित वर्ग जागृत झाला. पारतंत्र्यामुळे आपली व आपल्या प्रांताची सर्व प्रकारे दुर्दशा होत आहे, हे त्यांच्या ध्यानी आले. भारतात राष्ट्रीय जागृतीचा तो काल होता. याच वेळी आनंदराम धेकीयाल फुकन या नावाचा एक बुद्धिमान तरुण पुढे आला. तो राजा राममोहन राय यांचा समकालीन होता. त्याने आपल्या लेखनातून लोकांना आळस झाडून राष्ट्रकार्यासाठी झटण्याचे आवाहन केले. फुकनकडून ज्या नव्या लेखकांना प्रेरणा मिळाली, त्यांत कमलाकांत भट्टाचार्य हे गृहस्थ होते. त्यांनी कविता आणि निबंध यांच्या द्वारे लोकजागृतीचे कार्य सुरू केले. भट्टाचार्य आणि त्यांच्या बरोबरीचे अन्य लेखक यांनी आधुनिक आसामी साहित्याच्या मंदिराचा पाया घातला व हेमचंद्र बरुआ आणि गुणाभिराम बरुआ या लेखकांनी त्या पायावर मंदिराची इमारत उभी केली. हेमचंद्र बरुआ यांनी अफूच्या दुष्परिणामावर कनियारकीर्तन नावाचे एक सुंदर नाटक लिहिले. त्याने इ. स. १९०० मध्ये आसामी भाषेचा शब्दकोश आणि व्याकरणही तयार केले. लक्ष्मीनाथ बेझबरुआ हा ग्रंथकार हेमचंद्रांच्या गंभीर विडंबनात्मक शैलीचा पालव धरून पुढे आला. त्याची परंपरा गुणाभिराम बरुआ, सत्यनाथ बोरा, दंडिनाथ, लक्ष्मीनाथ, इ. लेखकांनी यशस्वी रीत्या पुढे चालविली. विशेषतः लक्ष्मीनाथ बेझबरुआ यांनी तर आसामी विनोदी साहित्यावर कळसच चढविला.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात आसामी गद्याला योग्य तो परिपक्वपणा प्राप्त झाला. काव्यप्रांतात मात्र विशेषशी प्रगती झाली नाही. सुरुवातीचा काळ तर निव्वळ अनुकरणाचाच होता. प्रारंभीचे आसामी कवी मुख्यत्वे इंग्रजी व बंगाली कवितेचे अनुकरण करीत होते. इ. स. च्या १९ व्या शतकाच्या शेवटच्या पंचविशीत रमाकांत चौधरी व भोलानाथ दास यांनी अनुक्रमे अभिमन्युवध व सीताहरण ही दोन खंडकाव्ये रचली.

त्यानंतर चंद्रकुमार अगरवाल, लक्ष्मीनाथ बेझबरुआ व हेमचंद्र गोस्वामी या तीन साहित्यिक मित्रांनी कलकत्ता शहरात विद्यार्जन करीत असता इ. स. १८८९ साली 'जोनाकी' मासिक सुरू केले. या मासिकाने इंग्लंडमधील अद्भुतरम्यतावादाच्या चळवळीचा पुरस्कार केला. निसर्गाविषयी गूढ सहानुभूती आणि प्रेम हा त्यांच्या अद्भुत रम्यतेचा पाया होता. या लेखकांनी कविता, निबंध, लघुकथा, कादंबरी, नाटक हे ललित साहित्याचे सर्व प्रकार हाताळले. बेझ बरुआ हे या काळातील अष्टपैलू लेखक होते. त्यांनी कित्येक साहित्यप्रकार आसामी भाषेत आणले. त्यांचे 'ओमार अपनार देस' हे गीत आसामी राष्ट्रगीत म्हणून ओळखले जाते. त्यांच्या 'बर्गी अरुवीन' या देशभक्तिपर काव्याइतके श्रेष्ठ काव्य त्या भाषेत निर्माण झाले नाही, असे म्हणतात.

हेमचंद्र गोस्वामी यांनी काही उत्कृष्ट सुनीते लिहिली. पण काव्यलेखनापेक्षा त्यांचे ऐतिहासिक संशोधन महत्त्वाचे आहे. त्यांनी आसामची वैभवशाली राजकीय परंपरा आपल्या गद्यातून जगाच्या निदर्शनास आणली. चंद्रकुमार अगरवाल हे आसामीचे प्रथम श्रेणीचे भावकवी होते. त्यांच्या कवितेत राष्ट्रवाद व विश्वबंधुत्व यांचा समन्वय दिसतो. पद्मनाथ गोहाई, बरुआ व रजनीकांत बराली हे एकोणिसाव्या शतकाच्या अखेरचे प्रथितयश कादंबरीकार होत. श्री. बार्डोलाय यांच्या कादंबऱ्या आसामी लोकांच्या पराक्रमावर व वैष्णव पंथाच्या गुणदोषांवर आधारलेल्या आहेत. बेझबरुआनंतर शरच्चंद्र गोस्वामी यांनी लघुकथेत नाव कमावले. रघुनाथ चौधरी हे नामवंत कवी झाले. त्यांच्यानंतर काव्यक्षेत्रात अंबिका गिरिराय चौधरी यांचे नाव सुप्रसिद्ध आहे. स्वातंत्र्य-आंदोलनात भाग घेतल्यावद्दल त्यांना कारावास भोगावा लागला. तिथेही त्यांनी अनेक प्रक्षोभक कविता लिहिल्या. त्यांची शैली नाजूक नसून घणाघाती आहे. ते एका कवितेत म्हणतात —

"माझे गाणे हास्य किंवा मौज निर्माण करणारे नाही, की ज्याच्या श्रवणाने थकलेल्या अवयवांना विश्रांती लाभावी. माझे गाणे म्हणजे अग्निवीणेवरचा टोला आहे. मृत व जिवंत यांचा सांधा जुळविणारे ते आहे."

विसाव्या शतकातील आसामी कविता व्यक्तिनिष्ठ बनली. हितेश्वर बरुआ, देवकांत बरुआ, जतींद्रनाथ हे २० व्या शतकातले आघाडीवरचे कवी होत. त्यांच्यावर इंग्रजी काव्याचा प्रभाव पडला असला, तरी त्यामुळे त्यांचे व्यक्तिवैशिष्ट्य नष्ट झालेले नाही. रवींद्रनाथ ठाकुरांचे अनुकरणही आसामी काव्यात झालेले दिसेल. आसामी काव्याचा आत्मा हा निरागस व मनमोकळा असल्याने बंगाली काव्याची सजावट आणि त्याच्या कल्पनांची गूढता त्याला मानवत नाही. कथाकादंबरीच्या क्षेत्रात देवचंद्र तालुकदार व दंडिनाथ कलिता या दोन लेखकांची कामगिरी प्रशंसनीय आहे. या दोन्ही लेखकांनी रजनीकांत बार्डोलाय यांच्यापेक्षा जरा खोल जाऊन स्त्री-पुरुष संबंधाचे अधिक संशोधन करण्याचा प्रयत्न केला. युद्धपूर्व कालात आसामी भाषेत कथाकादंबऱ्यांची विपुल निर्मिती झाली. बीना बरुआ यांची जीवनार बातांत ही सुप्रसिद्ध कादंबरी याच काळातली आहे.

बेझबरुआ यांनी आसामी निबंधाचा पाया घातला. त्यानंतरच पुढे राजकीय निबंध जन्मास आला. निबंधलेखनात हिलाराम डेका, सोनाराम चौधरी, सूर्यकुमार भुईजा, वेणुधर शर्मा हे प्रख्यात निबंधकार होत. या सर्वांत वाणीकांत काकती हे

अग्रगण्य समजले जातात. हे सुविख्यात टीकाकारही आहेत. दुसऱ्या महायुद्धात, विशेषत: १९४२ च्या राष्ट्रीय आंदोलनापासून आसामी जनतेच्या विचारांना समाजवादी वळण लागले. लेखकांच्या दृष्टिकोनात बदल झाला. मार्क्सवादी विचारांच्या परिचयाने राष्ट्रीयता आणि दलितांच्या दुःखाबद्दल संवेदना या गोष्टीत तीव्रता राहिली नाही. आजच्या तरुण कवींवर युरोपातल्या प्रतीकवादी कवींचा प्रभाव पडलेला आहे. त्यांच्या प्रतिमा नव्या आणि वेगळ्या झाल्या आहेत. कथा-कादंबरीही पुष्कळच बदलली आहे. वास्तववादी व्यक्तिचित्रण व अनिर्बंध निवेदन हे आजच्या कथा-कादंबरीचे विशेष आहेत. लेखकांचे बौद्धिक क्षितिज विशेषतः तरुण कलावंतांचा जीवनविषयक दृष्टिकोन अधिक विशाल असून, आर्थिक प्रश्नांवर त्यांचे लक्ष केंद्रित झाले आहे. मनोविश्लेषण व संज्ञाप्रवाह ही नवी तंत्रे मान्यता पावली आहेत. [श्री. बारुआ–मार्च ऑफ इंडिया, एप्रिल १९५६; हिं. सा. को.]

## आसामी रंगभूमी

आसाममध्ये नाट्यप्रयोगाला भावोना म्हणतात. नटाला भावोरिया व विदूषकाला बाहुआ म्हणतात; भावोरियांचे खेळ आसाममध्ये पुरातन काळापासून चालत आले आहेत. तिथल्या सामाजिक जीवनातील घटनांना नाट्यरूप देणे हे त्यांचे काम होय. भावोरिया शीघ्रकवी असतो. तो कुठल्याही खेळात समयस्फूर्त गाणी म्हणतो. या खेळातली बाहुआदी विनोदी पात्रे प्रेक्षकांना हसविण्यासाठी असतात. धुलिया हे एका विशिष्ट प्रकारच्या खेळाचे नाव आहे. यात अभिनयाला प्राधान्य असते. ओझापाली हे आसाममधील नाटकाचे प्राचीन रूप होय. ओझा हे त्यातील प्रमुख पात्र. हा माणूस पौराणिक कथा संवादरूपाने सांगतो. त्या संवादांत दयनापाली हा ओझाबरोबर भाग घेतो. सर्व पालींत तो प्रमुख असतो. पाली म्हणजे खेळ करणारी पात्रे. नाचणे आणि गाणे हे काम त्यांच्याकडे असते. ही नृत्ये नाट्यशास्त्राच्या नियमानुसार बसविलेली असतात. या नृत्यनाट्य पद्धतीने रामायण-महाभारतातील कथा रंगभूमीवर आणतात. बेहुला आणि लखिंदर ही कथाही लोकप्रिय आहे. देवधानी हे ओझापालीतील मूक स्त्री-पात्र बेहुलाची भूमिका वठविते व मनसादेवीच्या प्रसन्नतेसाठी नृत्य करते.

आसाममध्ये वैष्णव संप्रदायाचा प्रसार झाल्यानंतर ओझापालीत भागवत पुराणातल्या कथांचा अंतर्भाव होऊ लागला. आसामी नाट्यसृष्टीत वैष्णव विषयांचा अंतर्भाव करण्याचे श्रेय आसामचा महान संत शंकरदेव याजकडे जाते. तो नृत्य व संगीत या दोन्ही कलांचा प्रणेता होता. त्याच्या कालातच आसाममध्ये खऱ्या अर्थाने नाटकाची उभारणी झाली. शंकरदेव व त्याचा शिष्य माधवदेव या दोघांनी मिळून बारा एकांकी नाटके लिहिली, त्यांना अंकिया नाट असे म्हणतात. ही नाटके संस्कृत नाटकांच्या धर्तीवर लिहिलेली असली, तरी त्यांचे तंत्र निराळे होते. संगीत, नृत्य आणि छंद यांना त्यांत प्राधान्य होते. वैष्णव पंथाच्या प्रसाराचे एक प्रमुख साधन म्हणून या अंकिया नाटांचा उपयोग करण्यात आला. त्यांच्या द्वारे त्यांनी कृष्णचरित्र जनतेच्या हृदयात बिंबविले.

अंकिया नाटांचे जत्रा आणि झमूरा असे दोन भेद आहेत. पूर्वी राजे-लोक यात्रेला जात त्या वेळी त्यांच्या मनोरंजनासाठी व एखाद्या महोत्सवात मूर्तीची मिरवणूक काढताना केल्या जाणाऱ्या प्रहसनांना यात्रा म्हणत. शंकरदेवाचे अशा प्रकारचे चिन्हयात्रा हे पहिले नाटक आहे. झमूरा ही छोटी नाटके असून, त्यांत नांदी नसते. सर्व कथाभाग पद्यात असतो. नाटकातील सामान्य पात्रांना कारीता व मुख्य पात्रांना नाटुआ म्हणतात. गाणाऱ्यांना गायन म्हणतात आणि वादकांना बायन म्हणतात. नाटकांचे अनुसंधान सूत्रधार करतो. काही पौराणिक नाटकांत बकासुर, कालियनाग, इ. पात्रे प्रचंड मुखवटे धारण करतात. नाटकात ब्रजबुली भाषेचा वापर केलेला असतो.

अंकिया नाटकांतला प्रमुख विषय म्हणजे कृष्णभक्ती. वस्तुतः युद्ध, स्नान, वस्त्रपरिधान, भोजन, कामचेष्टा, असले प्रसंग संस्कृत नाटकांत वर्ज्य असूनही लोकांना आकर्षण वाटावे म्हणून अंकिया नाटकांत ते दाखविले जात. नाटकांतल्या गाण्यांना अंकियागीते व भातीया म्हणतात. अंकिया गीते प्रत्यक्ष नाट्याशी संबंधित असतात; तर भातीया प्रार्थनेची व नमनाची पदे असतात. ती खोल आणि झांज या वाद्यांच्या साथीवर म्हटली जातात. नाट्यगृहाला रभा म्हणतात. रभा म्हणजे समुदाय, एकत्र जमण्याचे ठिकाण. आसामात स्थायी नाट्यगृहे नाहीत. उत्सवातल्या नाटकासाठी नामघर किंवा कीर्तनघर अशा ठिकाणी, दिवाणखान्यात किंवा बाहेर मंडप घालून तिथे रंगभूमी बनवितात. रंगभूमीच्या एका बाजूला एक पोथी ठेवतात, तिला थापना असे म्हणतात. तिच्यावरच नाटक सुरू करण्यापूर्वी कृष्णाची पूजा करतात. दुसऱ्या बाजूला दोहारची म्हणजे वाद्यवृंदाची जागा असते. नाटक रात्रभर चालते. विशिष्ट पात्रांच्या प्रवेशाच्या वेळी दारू उडवून आतषबाजी करतात. नाटकाच्या प्रसंगी खोल वाजवून घेमालीरघोष म्हणजे एक समूहगीत म्हटले जाते. नंतर खोलवाले वरधेमाली व देवधेमाली हे बोल वाजवितात व फेर धरून नाचतात. मग गुरूचे स्तवन होते. त्याला गुरुघाट म्हणतात. नंतर सूत्रधार प्रथम नृत्य करतो, कृष्ण आणि राम यांना आवाहन करतो व नंतर संस्कृत भाषेतली नांदी गातो.

नाटकाची अखेर मुक्तिमंगल व भट्टिमा या गाण्यांनी होते.

शंकरदेवाच्या अनुयायांनी त्यांच्या नंतरही अंकिया नाटांच्या मार्फतच वैष्णव पंथाचा प्रचार चालू ठेवला. ही नाटके बहुरंगी व समाजाच्या भावनेला आवाहन करणारी असत. त्यांत अद्भुत-रम्यता भरपूर असे. आसामी रंगभूमीची ही अवस्था प्रदीर्घ काल चालू राहिली. त्या काळी नाट्यसंस्थेला राजाश्रय मिळे; पण पुढे तो बंद झाला व त्यामुळे आसामी रंगभूमीची पीछेहाट झाली.

आसाममधील आधुनिक नाटकांचे स्थूल मानाने पौराणिक, सामाजिक, ऐतिहासिक व स्वच्छंदवादी अशा चार प्रकारांत वर्गीकरण करता येईल. पौराणिक नाटकांच्या कथावस्तू रामायण व महाभारत यांतील कथांवर आधारलेल्या आहेत. पौराणिक नाटकांपैकी देवनाथ वार्दोलायकृत वैदेहीविच्छेद (सीतात्याग), रमाकांत चौधरीकृत सीताहरण, पूर्णकांत शर्मांचे हरधनुर्भंग, भरतचंद्रदासाचे अभिमन्युवध, बेनुधर राजखोवालिखित दक्षयज्ञ व दुर्योधनेर उरुभंग, दुर्गेश्वर शर्मांचे पार्थपराजय व बालिवध (वालिवध), दुर्गाप्रसाद मजिंदर बरुआचे वृषकेतू आणि गुरुदक्षिणा ही नाटके प्रसिद्ध आहेत. सर्वसाधारण लोकांना आकृष्ट करण्यासाठी यांत विनोदी प्रवेश घातलेले आहेत.

सामाजिक नाटकांपैकी गुणाभिराम बरुआकृत रामनवमी, रुद्रराम वार्दोलायकृत बंगाल-बंगालनी, हेमचंद्र बरुआकृत कानियार कीर्तन ही नाटके विशेष गाजली. रामनवमी नाटकात विधवाविवाहाच्या आवश्यकतेवर भर दिला आहे. बंगाल-बंगालनी या नाटकात रूढिबाह्य प्रेम, बदमाषी व ठकबाजी यांचे चित्रण आहे. कानियार कीर्तन हे अफीणबाजीच्या दुष्परिणामावरील प्रचारवजा नाटक आहे.

ऐतिहासिक नाटकांची संख्या इतर नाटकांच्या मानाने जास्त आहे आणि ती अधिक लोकप्रियही आहेत. लक्ष्मीकांत बेझबरुआंनी तीन ऐतिहासिक नाटके व चार फार्स लिहिले आहेत. जयमती कुंवरी, चक्रध्वज सिंह आणि बेलिमार ही नाटके इ. स. १९१४ ते १९१६ या दरम्यान लिहिली गेली आहेत. जयमती कुंवरीमध्ये आपल्या पतीच्या व मातृभूमीच्या कल्याणासाठी स्वेच्छेने प्राणार्पण करणाऱ्या राजकन्येची कथा आहे. चक्रध्वज सिंह या राजाच्या कारकिर्दीत आसामवर मोगलांनी आक्रमण केले असता आसामी सैन्याने आपल्या थोर सेनापतीच्या मार्गदर्शनाखाली ते कसे परतवून लावले, याचे चित्रण चक्रध्वज सिंह या नाटकात आहे. बेलिमारमध्ये आहोम साम्राज्याच्या ऱ्हासाचे चित्र रंगवले आहे. या तीनही नाटकांत नाटककार इतिहासाशी प्रामाणिक राहिला आहे.

पद्मनाथ गोहइन बरुआ यांची चार ऐतिहासिक, एक पौराणिक व तीन फार्स अशी आठ नाटके आहेत. जयमती, गदाधर, साधनी व लाच्चित बडफुकन ही चार नाटके आहोम इतिहासावर आहेत. यांपैकी पहिल्या तीन नाटकांतील मुख्य पात्रे नेहमी निर्यमक कवितेत बोलतात. ही नाटके फारशी यशस्वी झाली नाहीत. कथावस्तूच्या बांधणीत काटकसर, अनावश्यक भावनाप्रधानता, गूढ गोष्टींची कंटाळवाणी वर्णने, निरर्थक लांबलचक संवाद, असंबद्ध विनोदी प्रवेश, ऐतिहासिक कालव्यत्यास हे या नाटकांतले दोष आहेत. बाणरजा हे त्याचे पौराणिक नाटक हरिवंशावर आधारलेले आहे. या नाटकाची भाषा संस्कृतप्रचुर आणि कृत्रिम असून, त्यात कल्पकताही फारच कमी आहे. गावबुढा, तेटोन तामुली, व भूत ने भ्रम हे त्याचे फार्स मात्र रंगतदार आहेत.

बेनुधर राजखोवा यांनी दोन नाटके व तीन प्रहसने लिहिली. त्यांच्या सेडती किरण या नाटकावर शेक्सपिअरचा बराच प्रभाव आहे. उरुभंग ही शोकांतिका आहे. पण त्यांना प्रहसनकार म्हणून मोठा लौकिक मिळाला आहे. कुरिशतिकार सभ्यता, तिनि घइणी, अशिक्षित घइणी, तोपनिर परिणाम, चोरर सृष्टि ही त्यांची प्रमुख प्रहसने होत.

चंद्रधर बरुआ यांनी मेघनादवध व तिलोत्तमासंभव अशी दोन पौराणिक नाटके लिहिली आहेत. दोन्ही नाटके निर्यमक कवितांत आहेत. नाटककाराची शैली ओघवती व आनंददायी आहे. भाग्यपरीक्षा हे त्यांचे प्रहसनही बरेच लोकप्रिय आहे.

विद्यमान प्रहसनकारांमध्ये मित्रदेव महंत यांचे स्थान महत्त्वाचे आहे. त्यांची बियाबिपर्यय आणि कुकरीकणार आठमंगला ही प्रहसने अत्यंत लोकप्रिय असून, एके काळी आसाममध्ये प्रत्येक नाट्यगृहात त्याचे प्रयोग झाले होते. नंतरच्या काळात त्यांनी लिहिलेली एटा चुरट, तेंगर-भेंगर, इ. प्रहसने मात्र साहित्यगुणांत कमी पडतात.

इंद्रेश्वर बडठाकूर यांनी श्रीवत्सचिंता हे एक श्रेष्ठ नाटक लिहिले आहे. याशिवाय प्राचीन भारतीय नाट्य व अभिनय यांवर त्यांनी अनेक विचारपरिप्लुत लेख लिहिले आहेत.

अतुलचंद्र हझारिका यांनी विविध विषयांवर अनेक नाटके लिहिली आहेत. त्यांपैकी नंददुलाल, कुरुक्षेत्र, रुक्मिणीहरण, बेडला, शकुंतला, श्रीरामचंद्र, इ. नाटके पौराणिक आहेत. त्यांनी मूळ कथानकात काही बदल केलेला नाही. पण काही ठिकाणी स्थानिक वातावरण निर्माण केले आहे. ही नाटके तीन अंकांपासून सात अंकांपर्यंत आहेत. निर्यातिता व रुक्मिणीहरण यांत नाटककाराने अर्वाचीन नाट्यतंत्र आणि वैष्णव अंकखंडातील तंत्र यांचा समन्वय केलेला आहे. आणि असे करताना जुन्या तंत्रातील उत्कृष्ट विशेष प्रकट करून एक नवीन राष्ट्रीय नाट्यशैली विकसित करण्याचा प्रयत्न केला आहे.

बनीज कोवार, कनोजकुमारी आणि छत्रपती शिवाजी ही त्यांची ऐतिहासिक नाटके होत. तर मर्जियाना, मानसप्रतिमा, आहुती आणि रंगमहल ही विविध विषयांवरची नाटके आहेत.

अतुल हझारिकांनी लेखनाला सुरुवात करण्यापूर्वी आसामी रंगभूमीवर गिरीशचंद्र घोष आणि द्विजेंद्रलाल रॉय या बंगाली नाटककारांच्या नाटकांची जवळजवळ मक्तेदारीच होती. ती मोडून काढण्यासाठी त्यांनी आसामी रंगभूमीच्या गरजा भागविणारी नाटके लिहिली आणि बंगाली नाटकांवरील परावलंबन कायमचे नाहीसे केले. त्यांच्या यशामुळे पुष्कळ लेखकांना आसामी रंगभूमीसाठी लिहिण्याची स्फूर्ती मिळाली.

देवचंद्र तालुकदार यांची बिप्लव, बामुणी कुवर आणि भास्करवर्मा ही नाटके उल्लेखनीय आहेत. बिप्लव हे सामाजिक नाटक असून, त्यात समाजवादी समाजरचनेचे चित्रण आहे. बामुणी कुवर हे आहोम इतिहासातील एका प्रसंगावर आधारलेले आहे. भास्करवर्मा हे इ. स. च्या सातव्या शतकातील कामरूपाचा सम्राट भास्करवर्मा याच्यावर लिहिलेले आहे.

ज्योतिप्रसाद आगरवालांची फक्त तीन नाटके प्रसिद्ध झाली आहेत. शोणितकुवारी, कारेंगर लिगिरी आणि लभिता ही त्यांची नावे होत. त्यांची अन्य नाटके हस्तलिखित स्वरूपात पडून आहेत. कारेंगर लिगिरी हे सामाजिक नाटक असून, ते त्यांच्या नाटकांत उत्कृष्ट आहे. यात मानव आणि परिस्थिती, जुनी परंपरा व नवीन दृष्टिकोन आणि मानव व दैव यांतील संघर्ष दाखवला आहे.

आगरवाल हे वृत्तीने स्वच्छंदवादी व सौंदर्यवादी आहेत. त्यांच्या नाटकांत आदर्श आणि जीवनातील साधेपणा यांवर भर दिलेला आहे. त्यांचे संवाद जिवंत व नैसर्गिक आहेत. पात्रांचा स्वभावपरिपोषही त्यांनी नैसर्गिक रीतीने केला आहे.

नकुलचंद्र भूयान यांनी बदन बडफुकन व चंद्रकांत सिंह ही दोन ऐतिहासिक नाटके लिहिली आहेत. आहोम कालखंडातील गौरवशाली घटनांवर ती आधारलेली आहेत.

कमलानंद भट्टाचार्य हे नाटककार होते, तसेच नटही होते. त्यांची नगा कुवाँर व अवसान ही नाटके विशेष उल्लेखनीय आहेत. नगा कुवाँर हे आहोम राजकुमार कामसेंग याच्या जीवनावर आहे. आणि अवसान हे श्रीकृष्णाच्या मृत्यूवर आहे.

पार्वतीप्रसाद बरुआंची लक्ष्मी आणि सोणेर सोलेंग ही भावगीतमय नाटके प्रतीकात्मक आहेत. लक्ष्मी हे शरद् ऋतूला निरोप देणारे आणि हेमंत देवतेचे स्वागत करणारे संगीत नाटक आहे. सोणेर सोलेंग हा अनेक मधुर व प्रतीकात्मक गीतांचा संग्रह आहे. यातील नायक हा अखंड परमानंदाच्या शोधात असतो.

या काळात शेक्सपिअरच्या काही नाटकांचे अनुवाद आसामी लेखकांनी केले; पण ते रंगभूमीवर यशस्वी झाले नाहीत.

आधुनिक काळातली बरीचशी नाटके प्रामुख्याने शहरी जीवनातील समस्यांची चर्चा करताना दिसतात. पूर्वीच्या काळातील समाजसुधारणेचे उद्दिष्ट आता मागे पडले आहे. नवीन नाटकांत स्त्रियांच्या प्रश्नांवरही चिकित्सा केलेली आढळते. शारदा बार्डोलाय यांच्या पहिला तारिख या नाटकात कनिष्ठ मध्यमवर्गियांच्या आर्थिक हलाखीचे चित्रण केलेले आहे.

आसाममध्ये अजूनही धंदेवाईक नाटचसंस्था नाहीत. बहुधा हौशी नाटचसंस्थाच नाटचप्रयोग करतात. आतापर्यंत स्त्रियांना रंगभूमीवर उभे राहण्यास सक्त निर्बंध होता. अलिकडेच स्त्रिया रंगभूमीवर प्रवेश करू लागल्या आहेत. [ आ. सा. इ. ]

## आसामी लोकसाहित्य

आसामचे लोकसाहित्य बरेच जुने आहे. ते परंपरेने आजवर चालत आले आहे. आसामी साहित्याच्या प्राचीन युगाला गीतियुग म्हटले जाते. धाइनाम, गरखीयानाम, बिहुनाम, फुलकुँवर, पगला पार्वतीर गीत, टोकारीनाम, सुचरीनाम, आइनाम, इ. गीते आसामी साहित्याच्या प्राचीन युगात निर्माण झाली आहेत.

यापैकी एक लोकगीत पुढे दिले आहे –

पानीर जिकमिक पानी रे परुआ,<br>
फुलर जिकमिक पाहि ।<br>
सेनाई जिकमिक तेजरे बलते,<br>
मुखट ऐ नुगुचे हाँहि ॥

अर्थ – पाण्याचे किडे पाण्यात चमकतात, फुलपाखरे फुलात चमकतात. माझा प्रियकर आपल्या तेजाने चमकतो, त्याच्या मुखावरचे हास्य कधीच मावळत नाही.

आसामी अंगाईगीताचे हे एक उदाहरण –

जोनबाई ए बेजी एति दिया ।<br>
बेजीनो केलाइ ? मोना सीबलाइ ।<br>
मोनानो केलाइ ? धान भराबलाइ ।<br>
धान्नो केलाइ ? हाती किनिबलाइ ।<br>
हातीनो केलाइ ? उथि फुरिबलाइ ।<br>
उथि फुरिले की हे ? बर मानुह हे ।<br>
बर मानुहे की करे ? गधूलिटे गधूलिटे<br>
दबा कोब डुडुम डुम ...।

अर्थ – जोनबाई, मला एक सुई दे. सुई कशाला ? एक थैली शिवायला. थैली कशाला ? रुपये भरायला. रुपये कशाला ? हत्ती घ्यायला. हत्ती कशाला ? पाठीवर बसायला. हत्तीवर बसायचे कशाला ? मोठ्ठा माणूस व्हायला. मोठ्ठा माणूस काय

करतो ? मोठ्ठा माणूस संध्याकाळी डुडुम डुम ढोल वाजवतो !

वरील अंगाईगीतात आलेली जोनबाई म्हणजे चंद्र. चंद्राला आसामात लहान बाळाची बहीण मानले आहे.

धाइनाम, गरखीयानाम, इ. गीतांतली भावना व अनुभूती अत्यंत सरळ आहे. लहान मुलांना खेळविणे-हसविणे या गोष्टींची मनोहर भंगिमा यांत पाहायला मिळते. नावखेलवागीत, टोकरीगीत, बारहमासा, इ. सुंदर लोकगीते आसामी भाषेत प्रसिद्ध आहेत. कित्येक लोकगीते आसामच्या प्राचीन इतिहासाची ओळख करून देतात. फुलकुँवर, मणिकुँवर ही गीते या जातीची आहेत. या गीतांत विशेषेकरून मातृभूमीसाठी आत्मबलिदान करणाऱ्या वीरांचे यशोगान असते. [ रा. अ. ग्रं; का. आ. ]

## आसावरी

औडव संपूर्ण वर्गातला मृदुला जातीचा एक राग. हा धैवताने आंदोलित असतो. यातले सर्व स्वर कोमल असल्यामुळे, भैरवीपासून याला दूर ठेवणे कौशल्याचे काम आहे. एका गायकी परंपरेत यात तीव्र ऋषभ वापरतात; पण याचे खरे स्वरूप कोमल ऋषभानेच सिद्ध होते. कोमल ऋषभ तर लावायचा; पण भैरवीचा भास होऊ



आसावरी रागिणी

द्यायचा नाही; आणि त्याचबरोबर विलासखानीलाही दूर ठेवायचे, या दोन जबाबदाऱ्या गायकाला विशेषतः अवरोहाच्या वेळी सांभाळाव्या लागतात. हा हृदयस्पर्शी आणि करुण असा राग आहे. सा रि म प ध सा हा याचा आरोह आणि सा नि ध प म ग रि सा हा अवरोह होय.

आसावरीचे ध्यान पुढीलप्रमाणे आहे –

श्रीखण्डशैलशिखरे शिखिपिच्छवस्त्रा ।
मातङ्गमौक्तिकमनोहरहारवल्ली ।।
आकृष्य चन्दनतरोरुरगं वहन्ती ।
आसावरी वलयमुज्ज्वलनीलकान्तिः ।।

अर्थ – मलय पर्वताच्या शिखरावर बसलेली, मोरपिसासारखे वस्त्र नेसलेली, गजमौक्तिकांची सुंदर माला धारण केलेली, चंदनवृक्षावरील साप ओढून जिने आपल्या हातांत कंकणाप्रमाणे धारण केले आहेत व जिची कांती उज्ज्वल आणि निळसर आहे, अशी ही आसावरी रागिणी आहे.

गानसमय-सकाळच्या पहिल्या प्रहारानंतर. [ क. सं.; सं. द. ]

## आसुर विवाह

विवाहाचा एक प्रकार. वराने वधूला किंवा वधूपित्याला धनाच्या रूपाने काही मूल्य देऊन किंबहुना कन्या विकत घेऊन तिच्याशी विवाह करणे, या पद्धतीला ' आसुर विवाह ' असे नाव आहे (आश्व गृ. सू. १.६.१). कदाचित असुर जमातीतून ही चाल आर्यांच्या समाजसंस्थेत आली असावी. पैशाच व राक्षस विवाहांपेक्षा हा प्रकार श्रेष्ठप्रतीचा आहे, यात शंका नाही. कन्या व तिचे कुल यांना काही दर्जा व मान आहे; तेव्हा मोबदला न घेता कन्यादान करणे बरे नव्हे, अशी समजूत या प्रकाराच्या मुळाशी असावी. कन्या पतिगृही गेल्यामुळे तिच्याकडून होणाऱ्या कौटुंबिक मदतीला वधूपित्याला मुकावे लागते, त्याबद्दलही अंशतः ही भरपाई असू शकेल. काही जातींत वराने वधूपित्याला द्रव्य न देता विशिष्ट कालपर्यंत त्याच्या घरी नोकरी करावी, अशीही चाल आढळते.

या पद्धतीमुळे कन्येलाही काही किंमत आहे, या गोष्टीची समाजाला जाणीव झाली व विवाहानंतर नवऱ्याकडून होणाऱ्या पत्नीच्या छळाची मात्रा बरीच कमी झाली. छळाने वैतागून एखाद्या स्त्रीने आत्महत्या केल्यास पुरुषाला दुसरी पत्नी मिळणे, ही गोष्ट आर्थिक कारणामुळे दुष्कर होऊ लागली. त्या दृष्टीने या आसुर पद्धतीचा समाजास अप्रत्यक्ष फायदाच झाला, असे म्हणावयास हरकत नाही.

वैदिक काळातही आसुर विवाह प्रचलित होता; पण त्याला फारशी मान्यता नव्हती. अशा प्रकारे विवाहबद्ध झालेल्या पुरुषाला ' विजामाता ' अशी हीनार्थक संज्ञा दिली जात असे, त्यावरून हे कळून येते. पौराणिक काळातले कैकेयी, माद्री, गांधारी यांचे विवाह आसुर पद्धतीनेच झालेले आहेत. पण पुढे मात्र धर्मशास्त्रकारांनी या पद्धतीचा तीव्र निषेध सुरू केला. ऐतिहासिक काळात बालविवाहाची पद्धत रूढ होऊ लागली व विवाहाच्या बाबतीत मुलींना काही मतच उरले नाही. उलट-

पक्षी कित्येक वधूपित्यांना द्रव्यलोभ उत्पन्न होऊन विवाह-संस्काराला जणू लिलावाचे स्वरूप प्राप्त झाले. धर्मशास्त्र-कारांनी मात्र आसुर विवाहाला तीव्र विरोध केला.

पण सुशिक्षित समाजात आजमितीस याच्या उलट परि-स्थिती आहे. म्हणजे इष्ट वर मिळविण्यासाठी कन्येच्या पाल-कालाच 'हुंडा' या रूपाने वराला मोठ्या रकमेने द्रव्य द्यावे लागते. पण उलट अर्थाने चालू झालेल्या या आसुर विवाहाला आता कायद्याने प्रतिबंध झालेला आहे. शेतकरी, कारागीर व आदिवासी या जातींत मात्र मुलीचे 'देज' घेण्याची पद्धत आजही सर्वत्र आहे. ते रोख रक्कम किंवा धान्य आणि कपडा-लत्ता या स्वरूपात घेतले जाते. [ पो. वी. हिं. सि.; हि. ध. ]

**आसुरी** माध्यंदिनांच्या ऋषितर्पणात याचे नाव येते. वास्तविक याचे स्थान आचार्यतर्पणात असायला हवे. पण माध्यंदिनांनी आचार्यांनाच ऋषी बनविले आहे, त्यामुळे ते बदलले. शतपथ ब्राह्मणात आसुरीचे नाव पुष्कळदा येते. हा सायंहोमाचा पुरस्कर्ता असल्यामुळे याला आसुरी हे टोपणनाव मिळाले असावे. हा उदितहोमाच्या विरुद्ध होता. [ तर्पण ]

**आसुरी दुर्गा** एक तांत्रिक देवता. ही अथर्वण व कटुका यांची कन्या होय. पद्मासना, चतुर्भुज व शूल-अंकुश धारण करणारी, असे हिचे ध्यान आहे. हिचा मंत्र –

ॐ कटुके कटुकपत्रे सुभगे आसुरि रक्ते रक्तवाससे अथर्वणस्य दुहिते अघोरे अघोरकर्मकारिकेऽमुकस्य गतिं दह दह उपविष्टस्य गुदं दह दह सुप्तस्य मनो दह दह प्रबुद्धस्य हृदयं दह दह हन हन पच पच तावद्दह तावत्पच यावन्मे वशमायाति हुंफट् स्वाहा ।

इष्टसिद्धीसाठी हा मंत्र जपतात. [ श्रीविद्यार्णवतंत्र; मं. म. ]

**आस्तिक** 'परलोकाद्यस्तित्ववादी' ( = परलोकादिकांचे अस्तित्व मानणारा तो आस्तिक होय.) (न्याय-कोश). 'नरकभीरुरास्तिकशब्दवाच्यः' = नरकाचे भय बाळगणारा तो आस्तिक होय (तत्त्वप्रकाशिका), अशीही दुसरी व्याख्या आहे. पुढील सहा दर्शने ही वेदांचे प्रामाण्य मानणारी अतएव आस्तिक दर्शने मानलेली आहेत–(१) पूर्व मीमांसा (२) उत्तर मीमांसा (वेदान्त) (३) सांख्य (४) योग (५) न्याय व (६) वैशेषिक. मात्र सर्वसामान्य लोक ईश्वराची सत्ता मानणाऱ्या मनुष्याला आस्तिक म्हणतात. [ वि. द. ले. सं. १ ]

**आस्तीक** भृगुकुलोत्पन्न जरत्कारू ऋषी व तक्षकाची भगिनी जरत्कारू या दंपतीचा पुत्र. याने गर्भात असता-नाच शिवाचा उपदेश ग्रहण केला. याच्या मातेने पतीला गर्भा-विषयी विचारले असता याने आतून उत्तर दिले, की 'अस्ति' म्हणून याला आस्तीक नाव पडले. याने च्यवन-भार्गवापाशी सांग वेदाध्ययन केले. शंकराने याचा व्रतबंध करविला. जनमेजयाने सर्पसत्र आरंभिले असता तक्षकाचा मृत्यू होण्याची वेळ आली, तेव्हा सर्प याच्या मातेकडे गेले व सर्पकुलाच्या रक्षणाबद्दल त्यांनी तिला गळ घातली. तिने ती गोष्ट आस्तिकाला सांगितली. आस्तीक जनमेजयाच्या यज्ञमंडपात गेला व त्याने जनमेजयाचे मन वळवून त्याचे सर्पसत्र बंद पाडले (म. भा. आदि. ५८). सर्पांनी आस्तिकाचा गौरव केला. त्या वेळी 'माझे हे व्याख्यान जे पठन करतील, त्यांना सर्पांनी पीडा देऊ नये' असा वर त्याने मागितला. जनमेजयाने सर्पसत्र बंद केले, त्या दिवशी नंदिवर्धिनी नावाची पंचमी होती. म्हणून तो दिवस नागांना प्रिय ठरला (भवि. पु. ब्रा. ३२). या आख्यानावरूनच जुन्या पिढीतले लोक रात्री झोपतेवेळी 'आस्तीक' नावाचा त्रिवार उच्चार करीत. सर्पाला आस्तिकाची शपथ घालण्याचीही रूढी आहे.

अगस्तिर्माधवश्चैव मुचकुन्दो महामुनिः ।
कपिलो मुनिरास्तीकः पञ्चैते सुखशायिनः ।।

या शांतिपाठातल्या मंत्रात आस्तिकासह वरील पाचांना 'सुखशायी' म्हणजे स्मरणकर्त्याला सुखनिद्रा देणारे, असे म्हटले आहे. [ प्रा. च. को. ]

**आस्थानमंडप** प्राचीन राजदरबारातला एक मंडप. चार सुवर्णदंड उभे करून त्यांवर चांदवा ताणला व त्याखाली सिंहासन मांडले, की हा मंडप तयार होत असे. बहुधा हा चांदवा लाल रंगाचा असे. माघाने लाल चांदव्याचाच उल्लेख केला आहे (शिशु. ५.२१). याला दुकूलवितान असेही म्हणत. अजंटा येथील भित्तिचित्रांत उपरिवर्णित आस्थान-मंडपाचे चित्र आहे. [ का. ए. सां. अ. ]

**आस्रव** जैन दर्शनांतला पारिभाषिक शब्द. जीवाच्या मनात भलेबुरे विचार चालू असणे, याला आस्रव म्हणतात. शुभ व अशुभ असे दोन प्रकारचे आस्रव आहेत. शुभ विचारांच्या चिंतनाने जीवाला स्वर्गादी सुखे प्राप्त होतात व अशुभांच्या चिंतनाने नरक व पशुयोनी प्राप्त होतात. आस्रव हे कर्माचे द्वार आहे. नावेला छिद्र पडल्याने जसे समुद्राचे पाणी नावेत शिरते, त्याचप्रमाणे मिथ्यात्व, अविरती (अखंडत्व), कषाय (प्रपंचा-सक्ती), व योग या चार कारणांच्या द्वारे जीवाच्या ठिकाणी कर्मे आस्रवित होते (व. श्रा. ३९). 'आस्रवः कर्मणां बन्धः' ( = जीवाच्या कर्मबंधास आस्रव हे कारण आहेत.) (स. द. सं.)

बौद्धांनीही आस्रव मानले आहेत. त्यांच्या अभिधर्मानुसार आस्रव चार प्रकारचे आहेत–

(१) कामास्रव (२) भवास्रव (३) दृष्टचास्रव व (४) अविद्यास्रव. हे जीवाच्या चित्तात घर करून राहतात व त्याला भवबंध उत्पन्न करतात. मुमुक्षू योगी या आस्रवांतून सुटल्यावर मगच त्याला अर्हत्पदाचा लाभ होतो. आस्रवाचा विरोधी शब्द 'संवर' हा आहे. 'आस्रवो भवहेतुः स्यात्संवरो मोक्षकारणम्, (= आस्रव हा संसाराला कारण असून, संवर हा मोक्षाचे कारण आहे.) (सर्व. द. सं. आर्हं). आस्रव हे चित्ताचे मल म्हणून अन्य दर्शनांतही सांगितले आहेत. पाहा – संवर. [ भा. द. सं. ]

**आहवनीय** 'आहूयते आज्यादिभिरस्मिन्' (= आज्यादी हवनीय द्रव्यांनी ज्यात आहुती दिल्या जातात, तो आहवनीय अग्नी होय.) अग्निहोत्र्याच्या तीन अग्नींपैकी हा एक असतो. अग्निशाळेत गार्हपत्याच्या मध्यापासून पूर्वेस आठ, बारा किंवा त्याहून अधिक प्रक्रमांवर आहवनीयाचे आयतन (स्थान) असते. ते चौकोनी असून, त्याला दोन मेखला (कट्टयाचे थर) असतात. गार्हपत्यांतून अग्नी आणून आहवनीय सिद्ध करतात. पाहा – गार्हपत्य. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**आहिंडिक** एक जात. निषाद पुरुष व वैदेही स्त्री यांच्या संततीला हे नाव आहे (मनु. १०. ३७). ही दुहेरी प्रतिलोम जात आहे. उशनसाच्या मताप्रमाणे गुन्हेगारांना तुरुंगात ठेवतात, त्या जागी अनोळखी लोकांना येऊ न देणे, हा यांचा व्यवसाय होता. जेव्हा हे लोक चर्मकाराचा धंदा करीत, तेव्हा त्यांना कारावर असे म्हणत (मनु. १०.३६). [ हि. ध. ]

**आहिताग्नी** ज्याने विधिपूर्वक तीन अग्नींचे आधान केले आहे, अशा यजमानास आहिताग्नी अशी संज्ञा आहे (तै. सं. १. ५. ९; १. ७. १; ३. ४. १०). आहिताग्नीने धारण केलेल्या अग्नींचे संरक्षण करण्याचे दायित्व मुख्यत्वे त्याच्या पत्नीवर असते. आहिताग्नीने प्रतिदिन सकाळ-संध्याकाळ अग्नीला होम द्यायचा असतो. त्या होमाच्या वेळी पत्नी त्याच्या जवळ असावी लागते. आहिताग्नी प्रवासाला गेल्यास होमाचे काम अध्वर्यू करतो. मात्र त्या वेळी पठण करायचे मंत्र आहिताग्नीला प्रवासातही म्हणावे लागतात. आहिताग्नीने प्रवासाला निघताना अग्नीचे उपस्थान (उभे राहून स्तवन) करायचे असते. आहिताग्नी अथवा त्याची पत्नी मृत झाल्यास अग्निहोत्र तिथेच थांबते. मग अंत्येष्टी करून अग्निहोत्राची सर्व पात्रे मृताच्या बरोबर जाळून टाकतात. आहिताग्नीला त्याच्या तीन्ही अग्नींनी यज्ञपात्रांसह जाळावे, असे शबरस्वामी म्हणतो (जै. ११. ३. ३४१ वरील भाष्य). [ सु. वि. को.; हि. ध. ]

**आहुक** एक जमात. महाभारतात या जमातीचा उल्लेख आला असून, रुक्मी हा तिचा पुढारी होता, असे सांगितले आहे. वायुपुराणात आहुक हा उत्तरेकडील प्रदेश आहे, असे म्हटले आहे. [ क. हि. वा. पु. ]

**आहुती** अग्नीत हवनीय द्रव्य टाकणे, याला आहुती म्हणतात. आज्य म्हणजे तूप घालणे याला आज्याहुती म्हणतात. ही आज्याहुती देण्याचा सर्वसाधारण विधी असा – अध्वर्यू पात्रात आज्य घेऊन ते पात्र गार्हपत्य अग्नीवर ठेवतो. आज्य पातळ झाल्यावर ते खाली उतरून तो त्यात 'पवित्र' संज्ञक दोन दर्भ फिरवून ते शुद्ध करतो. स्रुव नावाच्या पळीने जुहू नामक स्रुची (लाकडाची पळी) भरतो व ते आज्य 'स्वाहा' या उच्चारासह अग्नीला अर्पण करतो. यजमान 'अग्नय इदं न मम' (= हे अग्नीसाठी आहे; माझे नव्हे.) असे म्हणतो. [ हि. ध. ]

**आहेर** हा शब्द सं. आहार्य या शब्दावरून आला असावा. त्याचा अर्थ वस्त्र धारण करणे, असा होतो. लग्न, मुंज, केळवण, ओटीभरण, गर्भाधान, इ. आभ्युदयिक प्रसंगी वस्त्रालंकारादी वस्तूंचा आहेर करण्याची पद्धत आहे. पण हा शास्त्रविहित आचार नसून लौकिक आहे. याशिवाय देवदर्शन, तीर्थाला जाणे, दुखवटा, मेजवानी, प्रथम भेट, शुभवार्ता कानी पडणे, हे वस्त्रदानाचे म्हणजेच वस्त्राचा आहेर करण्याचे प्रसंग सांगितलेले आहेत. मंगलकार्यात आप्तेष्ट यजमान-दंपतीला, वधूवरांना किंवा सत्कार्य व्यक्तीला आहेर करतात. अशा वेळी पुरोहित 'युवं वस्त्राणि' (ऋ. १. १५२. १) हा मंत्र म्हणतो. [ सु. वि. को. ]

**आहोम** आसामच्या दरीतली एक जमात. ही मंगोलियन मानववंशाच्या ताई जातीची उपशाखा आहे. ताई पेदिए हा मानववंशशास्त्रज्ञ म्हणतो, की आहोम हे मॉंस, नेग्रिटो व चिनी यांच्या संकरातून निर्माण झालेले लोक होत. यांची वस्ती सयामच्या आखातापासून उत्तरेस आसामपर्यंत पसरलेली आहे. इ. स. १२८२ साली सु-का-फा राजाच्या नेतृत्वाखाली हे ब्रह्मदेशातून पात्कोई खिंडीतून ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यात उतरले व तिथून पुढे कामरूपामध्येही घुसले. त्यांनी तिथल्या हिंदू राजांना जिंकून आपले राज्य स्थापले व गौहाटी येथे आपली राजधानी

केली. त्यावरूनच त्या प्रदेशाला आसाम हे नाव मिळाले आहे. त्यापूर्वी या प्रदेशाला कामरूप म्हणत. त्यांनी लक्किमपुर व शिव-



आहोमांचा राजवाडा

सागर ही नवी नगरेही वसविली. आपली राजमुद्रा पंखयुक्त सिंह अशी बनविली. ब्रह्मी लोक त्यांना शान, किंवा शाम म्हणत. आहोमांनी अनेक ठिकाणी मोठमोठे राजवाडे बांधले. त्यांची सत्ता हळूहळू वाढू लागली. औरंगजेबाच्या काळी सदिया ते गोलपाडा व दक्षिणेकडील पर्वतराजीपासून उत्तरेस भूतियासरहद्दीपर्यंत त्यांनी आपला राज्यविस्तार केला होता. त्यांनी 'बुरुंजी' या नावाने ज्या बखरी लिहून ठेवल्या आहेत, त्यांवरून ते आसाममध्ये शिरल्यापासून ब्रिटिशांच्या अमदानीपर्यंत त्यांचा सुसंगत इतिहास उपलब्ध झाला आहे. त्यांच्या सत्तेचा सर्वोच्च उत्कर्ष रुद्रसिंहाच्या कारकीर्दीत झाला. हा राजा इ. स. १६९५-मध्ये गादीवर बसला. पुढच्या शतकात अंतःकलह व बाहेरून शत्रूंच्या स्वाऱ्या, यांमुळे आहोमांच्या सत्तेला उतरती कळा लागली. त्यांच्यातल्याच एका भांडखोर पक्षाने इ. स. १८१० मध्ये ब्रह्मी लोकांना आपल्या साहाय्यार्थ बोलाविले. ते आले ते सगळे ब्रह्मपुत्रेचे खोरेच बळकावून बसले. इ. स. १८२५ साली ब्रिटिशांनी त्यांना पिटाळून लावीपर्यंत ब्रह्मी लोकांनी तिथे अमानुषपणे राज्य केले.

आहोमांनी आपल्या सत्ताकाळात आपल्या मूळ 'शान' घराण्याचीच राज्यपद्धती कायम ठेवली. ते प्रजेकडून द्रव्यरूपाने कर घेण्याऐवजी वैयक्तिक चाकरीच्या रूपाने तो घेत.

आहोमांनी आसाममधल्या पूर्वीच्या लोकांशी शरीरसंबंध केले. आणि त्यांनी हळूहळू हिंदू धर्मही स्वीकारला. ते हिंदू पद्धतीची नावे व पदव्या घेऊ लागले. कामरूपामधल्या तांत्रिक धर्माचा स्वीकार करून ते कामाख्येचे उपासक बनले. त्यांच्या धार्मिक कल्पनांवर बौद्ध धर्माचाही थोडासा प्रभाव पडला आहे. त्यामुळे ते एकेश्वरवादी आहेत.

आहोमांना मद्याचे व अफूचे व्यसन जबरदस्त आहे. त्यांचा पोषाख आसामी शेतकऱ्यांसारखाच असतो. श्रीमंत लोक रेशमी पगडी व लांब कोट घालतात. हे भातशेती करतात. यांच्यात सात पोटजाती आहेत. त्यांतली देवधाई ही पोटजात बाकीच्यांचे पौरोहित्य करते. ज्यांनी हिंदुधर्म स्वीकारला नाही, अशा आहोमांचा लग्नविधी वेगळ्या पद्धतीने होतो.



आहोम राजमुद्रा

यांचे राज्य असताना यांचा राज्यारोहणसमारंभ डामडौलाने होत असे. प्रथम राजा आपल्या पट्टराणीसह चोराईदेव नावाच्या टेकडीवर जाऊन तिथे दोन केळीची झाडे लावी. नंतर परत येऊन बांबूच्या सिंहासनावर बसे. त्याच्या आसनाखाली काही पशू व एक माणूस बसवीत. त्या आसनावर राजाला स्नान घालीत. मग राजा आपल्या तलवारीने खालच्या माणसाचे मुंडके तोडी. शेवटी मेजवानी होऊन समारंभ संपे.

आहोम लोक मृताला पुरतात. मृताबरोबर त्याला उपयुक्त अशा काही वस्तूही पुरतात. आहोमांचा प्राचीन धर्म व प्राचीन भाषाही आजमितीस नष्ट झाली आहे. आजमितीस त्यांच्या काही जुन्या भिक्षुक घराण्यांत वरील दोन्ही गोष्टींचे काही अवशेष दिसतील. आहोमांची भाषा ही सयामी-चिनी भाषाकुलाच्या ताई शाखेतली जुनी भाषा असून, तिची स्वतःची वर्णमालाही होती. पाहा – आसाम. [ एन्सा. रि. ए.; बॅकग्राउंड्स ऑफ आसामीज कल्चर; सु. वि. को. ]

## आह्निक

सामान्यतः दिवसात करायच्या धार्मिक कृत्यांना आह्निक म्हणतात. गृहस्थाची आह्निक कृत्ये पुढीलप्रमाणे सांगितली आहेत – ब्राह्ममुहूर्ती उठणे व प्रातःस्मरण म्हणणे. पुढील मंत्राने भूमीची प्रार्थना करणे –

समुद्रवसने देवि पर्वतस्तनमण्डले ।
विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे ।।

अर्थ – समुद्राचे वस्त्र नेसलेल्या, पर्वतरूपी स्तनमंडल असलेल्या, विष्णुपत्नी देवी, तुला नमस्कार असो. तू माझ्या पदस्पर्शाबद्दल (मी तुला पदस्पर्श करितो त्याबद्दल) मला क्षमा कर.

नंतर गायीचे दर्शन, बहिर्दिशेस जाणे, चूळ भरून (तोंड धुवून) आचमन, नदी किंवा तीर्थ यांच्या जलात स्नान, भस्म

अथवा गोपीचंदन यांचे धारण, द्विजांनी संध्या करणे, औपासन होम, स्वाध्याय, ब्रह्मयज्ञ, पंचमहायज्ञ, देवपूजा, भोजन, तांबूलभक्षण, द्रव्यार्जन, इतिहासपुराणांचे श्रवण, देवदर्शन, रात्रिभोजन, झोपण्यापूर्वी रात्रिसूक्ताचे पठण, नित्य काहीतरी दान देणे व विशिष्टकाली यज्ञ करणे, इ. कृत्ये आह्निक या सदरात येतात. आह्निकात न्यूनाधिक्य झाल्यास विष्णुस्मरणरूप प्रायश्चित्त करावे लागते. पाराशरस्मृतीत (१.३९) द्विजांची महत्त्वाची आह्निक कर्मे पुढीलप्रमाणे सांगितली आहेत —

सन्ध्या स्नानं जपो होमो देवतातिथिपूजनम् ।
आतिथ्यं वैश्वदेवं च षट् कर्माणि दिने दिने ।।

आह्निक म्हणजे नित्यनेम. तो न चालविता जीवन जगणे हे पशुवत् होय. मनावर नित्य शुभ संस्कार होत राहावे व माणसाला सर्वकाळ ईश्वराचे स्मरण राहावे, या उद्देशानेच आह्निकाची योजना केलेली आहे. [ हि. ध.; धर्मसिंधू. ]

**आळंद** कर्नाटकात, गुलबर्गा जिल्ह्यातील एक प्रसिद्ध स्थान. याला आळंद-गुंजोटी असेही म्हणतात. इथे राघवचैतन्य या प्रख्यात सिद्ध पुरुषाची समाधी आहे. राघवचैतन्य हे संत तुकारामांच्या गुरुपरंपरेतील आद्यपुरुष होते. बहमनी सुलतान महंमूदशाहावर त्यांचा बराच प्रभाव असल्यामुळे हिंदूंप्रमाणे मुसलमान लोकही त्यांचे भक्त झाले होते. त्यांनी या गावी जीवत्समाधी घेतल्यानंतर हिंदू व मुसलमान यांनी मिळून तिथे त्यांची समाधी बांधली. हिंदू लोक राघव चैतन्य या नावाने आणि मुसलमान लोक राघवदराज या नावाने त्यांची पूजा करतात. इ. स. १५७० च्या सुमारास समाधीवर घुमटी बांधण्यात आली. चंदनाचा संदल (लेप) चढवण्याची प्रथाही सुरू झाली. सांप्रत हे समाधिस्थान दरगा म्हणूनच प्रसिद्ध आहे. हा दरगा आळंद गावाच्या पश्चिमेला एक मैलावर आहे.

या दरग्याचे आवार प्रशस्त आहे. त्यात प्रवेश करताना दोन मनोऱ्यांमध्ये भव्य कमानी-दरवाजा लागतो. या मनोऱ्यांच्या व कमानीच्या बांधकामात जुन्या मंदिरांचे घडीव दगड वापरलेले दिसतात. कमानीवर शिलालेख आहे. हे बांधकाम इ. स. १६४१-४२ च्या सुमारास झाले असावे. दरग्याच्या दरवाज्यापर्यंत मोकळे मैदान आहे. दरग्याच्या उजव्या बाजूच्या आवारात काही कबरी व पडकी देवळे आहेत. दरग्याचा दरवाजा उंचावर आहे. त्याच्या आतील आवारात अनेक इमारती दिसतात. एका बाजूला दरग्याचे पूर्वाभिमुख प्रवेशद्वार दिसते. त्याच्या दोन्ही बाजूंवर जयविजयांच्या मूर्ती आहेत. या दारातून आत गेल्यावर एक ओटा, एक कमान, एक कबर व दोन रांजण लागतात. त्यानंतर एका उंच चौथऱ्यावर समाधिमंदिर बांधलेले दिसते. त्याचे शिखर घुमटाकृती असून, त्यावर पाच मनोरे आहेत. त्या मनोऱ्यांवर सोनेरी कळस आहेत. घुमटाखाली 'तुरबत' म्हणजे समाधी आहे. दरवर्षी गंधाचा लेप चढवला जात असल्यामुळे ती गंधाचीच बनली आहे.

दरग्याचे बाहेर दक्षिण बाजूला 'काळी मशीद' आहे, ती जैन देवालयावर उभारलेली आहे. दरग्याच्या आवारात सोमेश्वर व आनंदी भवानी यांची मंदिरे होती. त्यांचे भग्नावशेष तिथे आढळतात. त्यांत हिंदू देवतांच्या मूर्तीही आहेत. आनंदी देवीची मूर्ती आळंदपासून दीड मैलावर होन्नहळ्ळी गावी ओढ्याच्या काठी पालथी पडलेली आहे. त्याच अवस्थेत तिची पूजा केली जाते. आता तिथे लहानसे देऊळ बांधलेले आहे. या देवीचा रिकामा गाभारा राघव चैतन्यांच्या समाधीजवळ अजूनही पाहायला मिळतो. ही देवी अनेकांची कुलदेवता असून, होन्नहळ्ळी येथील देवीचे स्थान जागृत आहे, असे म्हणतात. तिथे वैशाख पौर्णिमा, माघी पौर्णिमा आणि प्रत्येक मंगळवार व शुक्रवार या दिवशी भक्तांची खूप गर्दी असते. [ तु. म. गु. प.; प्रसाद शक्ति–विशेषांक, ऑगस्ट १९७१ ]

**आळंदी** महाराष्ट्रातले एक तीर्थक्षेत्र. ज्ञानेश्वरांची जन्मभूमी. पुण्यापासून सुमारे तेरा मैलांवर इंद्रायणीच्या तीरी आळंदी हे गाव वसलेले आहे. ज्ञानेश्वरांच्या समाधीमुळे आळंदीला जास्त महत्त्व प्राप्त झालेले असले, तरी त्यापूर्वी एक शिवपीठ म्हणून आळंदीचा महिमा गाजत होता. पुराणात आळंदीला सिद्धक्षेत्र म्हटलेले असून, आजही इंद्रायणीच्या पात्रात 'सिद्धबेट' नावाचे एक स्थान दाखवितात. या सिद्धबेटाशी अनेक सिद्ध पुरुषांचा संबंध होता. आळंदीत सिद्धेश्वराचे मंदिरही आहे.

स्कंद पुराणाच्या सह्याद्रिखंडात आळंदीची आनंदविपिन, वारुणा, कपिल, अलका व सिद्धक्षेत्र अशी पाच नावे आहेत. संतांच्या अभंगांत अलंकापुरी, अलंकापूर, अलंकावती या नावांनी आळंदीचा उल्लेख येतो. कृष्णराज राष्ट्रकूटाच्या, शके ६९० च्या तळेगाव येथील ताम्रपटात आळंदीचा 'अलंदिय' असा उल्लेख सापडतो, तो आळंदी या रूढ नावाशी जुळता आहे.

आजमितीस आळंदीला भक्तभाविकांची जी गर्दी जमते, ती ज्ञानेश्वरांच्या समाधीच्या दर्शनासाठी. कार्तिक वद्य त्रयोदशी शके १२१८ रोजी ज्ञानेश्वरांनी इथे जीवत्समाधी घेतली.

ज्ञानेश्वरांची समाधी ज्या वास्तूत आहे, तिला देऊळवाडा म्हणतात. त्याच्या चारही बाजूंना मोठ्या भिंती असून, तीन भिंतींत उंच दरवाजे आहेत. पूर्वेच्या बाजूला गणपती आहे म्हणून त्या बाजूच्या दरवाज्याला गणेशद्वार म्हणतात. पश्चिमेला नदी असून, त्या बाजूच्या दरवाज्याला पाणदरवाजा म्हणतात.

उत्तरेकडील भिंतीत महाद्वार आहे. या महाद्वाराच्या पायऱ्या चढून देऊळवाड्यात प्रवेश करताना जी पहिली पायरी लागते.



ज्ञानेश्वरांची समाधी, आळंदी

ती हैबतबाबांची पायरी म्हणून प्रसिद्ध आहे. कारण त्या पायरीखाली त्या भक्ताचा देह चिरविश्रांती घेत आहे. आत शिरल्यानंतर एका बाजूला मारुतीचे व दुसऱ्या बाजूला गरुडाचे लहान देऊळ आहे. मध्यभागी मोठा सभामंडप दिसतो. हा मंडप इ. स. १७६० साली शिंदे महाराजांचे दिवाण रामचंद्र मल्हार शेणवी यांनी बांधला.

सभा मंडपाच्या दोन्ही बाजूंना दोन मंडप आहेत. उजव्या बाजूच्या मंडपात विठ्ठलरखुमाईंच्या मूर्ती आहेत. डाव्या बाजूच्या मंडपात कीर्तने, भजने होतात, म्हणून त्याला भजनीमंडप म्हणतात.

गाभाऱ्यात एकावर एक अशा चार शिळा ठेवलेल्या आहेत. हीच संत ज्ञानेश्वरांची समाधी. गाभारा इ. स. १७५० साली पुरंदरचे आंबेकर देशपांडे यांनी बांधला. इ. स. १८७१ मध्ये त्या गाभाऱ्यावर शिखर बांधण्यात आले. गाभाऱ्यात समाधीच्या मागे विठ्ठलरखुमाईंच्या मूर्ती आहेत.

समाधीच्या भोवती प्रदक्षिणा-मार्गावर प्रथम एक गणेशमूर्ती दिसते. नंतर मुक्ताबाईचा मंडप लागतो. त्यात मुक्ताबाईचे मंदिर आहे. ते आळंदीचे साधू श्रीनृसिंह सरस्वती यांनी इ. स. १८८१ मध्ये बांधले. पुढे गेल्यावर उजव्या हाताला एक नंदी दिसतो. त्या नंदीच्या खाली समाधीचे द्वार आहे. नंदीसमोर सिद्धेश्वराचे मंदिर आहे. ते स्थान फार जुने असून, त्याच्यामुळेच आळंदी हे सिद्धक्षेत्र म्हणून प्रसिद्ध होते.

सिद्धेश्वराच्या उजव्या बाजूला अजान वृक्ष दिसतो. ज्ञानेश्वरांच्या हातातला दंड निवृत्तिनाथांनी जमिनीत रोवला, त्याचाच हा वृक्ष झाला, अशी आख्यायिका आहे. प्रदक्षिणा पूर्ण करून महाद्वाराजवळ येताना पिंपळ वृक्ष लागतो. हा सोन्याचा पिंपळ ज्ञानेश्वरांच्या मातेला पावला होता. महाद्वाराच्या



पश्चिमेला हैबतबाबांची ओवरी असून, तीत त्यांच्या पादुका व विठ्ठलरखुमाईंच्या मूर्ती आहेत. त्या ओवरीसमोर नाथांचा पार व त्याच्या मागे केसरीनाथ व लक्ष्मीनाथ या नाथपंथी गुरुशिष्यांच्या समाध्या आहेत. जवळच भोजलिंगकाका यांचीही समाधी आहे. केसरीनाथ व लक्ष्मीनाथ यांची समाधिस्थाने देऊळवाड्यातच आहेत. या समाध्या केसरीनाथांचे शिष्य शिवदिननाथ यांनी इ. स. १७२५ मध्ये बांधल्या.

देऊळवाड्याच्या पश्चिमेला हरिहरेंद्रस्वामींचा मठ आहे. त्यात हरिहरेंद्रस्वामी, त्यांचे शिष्य माधवेंद्र व पद्मनाभेंद्र यांच्या समाध्या आहेत. हरिहरेंद्रस्वामी इ. स. १७६१ च्या सुमारास पैठणहून आळंदीला आले व सिद्धबेटात वास्तव्य करून राहिले. तिथे ज्ञानेश्वरांनी त्यांना कानिफनाथाच्या स्वरूपात दर्शन दिले. त्यांच्याच आज्ञेवरून ते समाधिमंदिराजवळ येऊन राहिले.

ज्ञानेश्वरांचा सुरुवातीचा काळ सिद्धबेटातच गेला. हैबतरावबाबा, हरिहरेंद्रस्वामी. इ. संतांनी इथे साधना केली.

आळंदी क्षेत्राविषयी सर्व भाविकांच्या मनातील भाव प्रकट करताना तुकाराममहाराज म्हणतात –

**चला आळंदीला जाऊं । ज्ञानेश्वर डोळां पाहूं ।।**
**होतील संतांचिया भेटी । सांगू सुखाचिया गोष्टी ।।**
**ज्ञानेश्वर ज्ञानेश्वर । मुखीं म्हणता चुकती फेर ।।**
**जन्म नाही रे आणिक । तुका म्हणे माझी भाक ।।**

आधुनिक काळात गुजरातेतील प्रसिद्ध सत्पुरुष जलाराम महाराज यांचे मंदिर आळंदीत बांधण्यात आले आहे. ते अतिशय सुरेख आहे. तिथे गुजराती व अन्य भाविकांची गर्दी सतत असते.

याशिवाय आळंदीत जोगमहाराज, मल्लाप्पा वासकर, सोनोपंत दांडेकर, इ. पुरुषांची समाधिस्थाने, ज्ञानेश्वरांनी चालवलेली भिंत व चक्रतीर्थ ही स्थळे दर्शनीय आहेत.

ज्ञानेश्वरांच्या पालखीचा वार्षिक सोहळा ज्येष्ठ वद्य अष्टमीला सुरू होतो. ही पालखी पंढरपुरास जाऊन आषाढ वद्य दशमीच्या रात्री आळंदीला परत येते.

प्रत्येक एकादशीला इथे वारकऱ्यांचा व भक्तांचा मेळावा जमतो. कार्तिक वद्य एकादशीची यात्रा फार मोठी असते. यात्रेकरूंसाठी इथे अनेक प्रशस्त धर्मशाळा बांधलेल्या आहेत.
[ ज्ञानोबा माउली – श्री. रा. चिं. ढेरे, १९६०; श्रीक्षेत्र आळंदी– श्री. ग. ह. खरे; श्रीज्ञानदेवांची आळंदी – श्री. स. के. नेऊरगावकर, १९६६; ना. सं. उ. वि. ]

## आळवार

तमिळनाडमधील वैष्णव संत व कवी. द. भारतातल्या वैष्णव पंथांत दोन मुख्य भेद आहेत– एक आचार्यपरंपरा मानणारा व दुसरा आळवारपरंपरा मानणारा.

आचार्य असंख्य आहेत; पण आळवारांची संख्या फक्त बारा आहे. आळवार याचा अर्थ भक्त किंवा परमेश्वराच्या प्रेमसागरात बुडून गेलेला, असा आहे. हे आळवार निरनिराळ्या काळी व निरनिराळ्या स्थळी जन्मले. त्यांची नावे व काल पुढीलप्रमाणे–

| | नाव | काल (इसवीसनपूर्व) |
|---|---|---|
| १ | पोयगई – आळवार (सरोयोगी) | ४२०३ |
| २ | भूतत्तार – आळवार (भूतयोगी) | ४२०३ |
| ३ | पेय – आळवार (महयोगी) | ४२०३ |
| ४ | तिरुमळिसै – आळवार (भक्तिसार) | ४२०३ |
| ५ | नम्म – आळवार (शठकोप) | ३१०२ |
| ६ | मधुरकवी – आळवार | ३१०२ |
| ७ | कुलशेखर – आळवार | ३०७५ |
| ८ | आंडाळ – आळवार (गोदा) | ३०५६ |
| ९ | पेरी – आळवार (विष्णुचित्त) | ३००५ |
| १० | तोंडरडिपोडी – आळवार (भक्तांघ्रिरेणू) | २८१४ |
| ११ | तिरुप्पाण – आळवार (योगीवाहन) | २७६० |
| १२ | तिरुमंगयी – आळवार (परकाल) | २७०६ |

हे आळवारांचे काल तमिळ ग्रंथांवरून घेतलेले आहेत. पण ते विश्वसनीय मानणे कठिण आहे. मात्र, त्यांचा अनुक्रम बरोबर आहे. पहिले चार आळवार प्राचीन असून, त्यांची विशेष माहिती उपलब्ध नाही. पुढचे पाच मध्ययुगीन असून, त्यांची माहिती थोडीबहुत सापडते. शेवटचे तीन आळवार ऐतिहासिक या सदरात येतात. महत्त्वाच्या दृष्टीने या सर्व आळवारांत नम्माळवार हा पहिला ठरतो.

'नालायिर दिव्य प्रबंधम्' नावाच्या तमिळ ग्रंथात या सर्व आळवारांच्या गीतांचा संग्रह झालेला आहे. तमिळनाडमधील वैष्णवपंथात गीतेइतकाच 'प्रबंधम्'ला मान आहे. चार हजार पद्यांचा हा संग्रह असून, यांतली सर्वांत अधिक म्हणजे १३६१ एवढी पद्ये तिरुमंगयी आळवाराच्या नावावर आहेत. त्याच्या खालोखाल नम्माळवाराची पदे आहेत.

आळवार हे बहुंशी गूढगुंजनवादी संत होते. त्यांनी भक्तीला लोकप्रियता मिळवून देण्यासाठी तिला नवीन दिशा दाखविली. ही दिशा म्हणजे संपूर्ण शरणागती होय. पांचरात्र हा भक्तीचा संप्रदाय आहे. त्याचे एक खास तत्त्वज्ञान आहे. त्यात वासुदेव, व्यूह, विभव, अंतर्यामी व अर्चं अशी परमात्म्याची पाच रूपे मानली आहेत. आळवारांना ती मान्य आहेत. मात्र त्यांचा विशेष भर अर्चांवर (शुभाश्रय) आहे. आळवारांनी वेद व आगम यांच्या तत्त्वज्ञानात समन्वय घडवून आणला व परमेश्वराकडे नेणाऱ्या साधनांची व्याख्या केली. श्रीव्यंकटनाथाने आळवारांच्या भक्तीवर लिहिताना म्हटले आहे, की त्यांची भक्ती देवाला सर्वभावे शरण जाण्याची असून, भक्तीच्या व्याख्येहून ती वेगळी आहे. आळवारांचा भक्तिमार्ग दिसायला सोपा असला, तरी तो दुष्कर आहे. त्याला बुद्धीची जोड लागते. ती बुद्धी प्राचीन ग्रंथांतील भक्तीचे मार्ग जाणण्यासाठी व संतांचा सदुपदेश श्रवण करून तो चित्तात ठसविण्यासाठी उपयोगी पडते.

आळवारांचा भक्तिमार्ग हा सार्वजनिक आहे. तो जातपात किंवा वर्णाश्रम यांच्या मर्यादा मानीत नाही. जो ईश्वराला पूर्णपणे शरण जातो, तो कोणत्याही जातीचा वा धर्माचा असो; परमेश्वर त्याचा उद्धार व रक्षण करतो. ईश्वर सर्वव्यापी असून, तो माणसात आणि सृष्टीतील सर्व वस्तूंत वास्तव्य करीत आहे. म्हणून मानवाने आपले शरीर हे देऊळ आहे, असे समजून त्याची अंतर्यामी भक्ती करावी. हाच सिद्धान्त गीतेत सांगितला आहे, अशी आळवारपंथी वैष्णवांची धारणा आहे.

रामानुजाचार्यांनी आळवारांच्या या संपूर्ण शरणागतीवरच आपले प्रपत्तीचे तत्त्वज्ञान मांडले आहे. भक्तियोगात वर्ण आणि आश्रम यांच्या दृष्टीने काही मर्यादा आहेत; पण प्रपत्तीत त्या नाहीत. प्रपत्तीला अन्य गुणांची जरुरी नसते आणि हाच तिचा मोठा गुण आहे. प्रपत्ती ही मानवाला केवलज्ञानी किंवा अतिमानवी सिद्ध बनविते. इतकेच नव्हे; तर त्याला जळी-स्थळी ईश्वराच्या साक्षात्काराचा आनंद मिळवून देते.

आळवार हे निरनिराळ्या वैष्णव-क्षेत्रांच्या यात्रा करून स्वत: भक्तीचे सुख घेत होते व इतरांनाही देत होते. श्रीरंगम् व इतर प्रमुख वैष्णव देवस्थाने यांतून आळवारांच्या मूर्ती दिसतात. रामानुजाचार्यांच्या आदेशावरून त्यांची स्थापना झाली, अशी समजूत आहे. आळवारांत सर्व जातींचे लोक दिसतात आंडाळ ही एक स्त्रीही त्यांच्यातच गणली गेली आहे. दक्षिणेतील वैष्णवांना आळवार हे आचार्यांपेक्षा श्रेष्ठ वाटतात. कारण ते आचार्यांपेक्षा प्राचीन आहेत व जीवन्मुक्त विभूती आहेत. आजवर उपलब्ध झालेला ऐतिहासिक पुरावा लक्षात घेता असे दिसते, की आळवार हे इ. स. चे ४ थे ते ९ वे शतक या काळात होऊन गेले. [ श्री. के. सी. वरदाचारी – भां. प्रा. सं. मं. रौप्य महोत्सव विशेषांक; आ. भ. त. प्र.; ए. इं. सा. हि. क.]

**आज्ञाचक्र** योगविद्येत सांगितलेले भ्रूमध्यस्थित चक्र. हे मस्तकात, मेंदूमध्ये असते. योगमार्गात गुरूंची आज्ञा याच ठिकाणी ग्रहण केली जाते, म्हणून याला आज्ञाचक्र म्हणतात. याच्याच अंतर्गत मानसचक्र आहे –

एतत्पद्मान्तराले निवसति च मनः सूक्ष्मरूपं प्रसिद्धम्॥

अर्थ – आज्ञाचक्राच्या पद्माच्या अंतराळात सूक्ष्मरूप मन वास्तव्य करते, हे प्रसिद्ध आहे.

हे द्विदल पद्म असून, त्याच्या दोन पाकळ्यांवर हं व क्षं हे वर्ण असतात. ॐ हे त्याचे बीज, हंसरूप परम शिव ही देवता व डाकिनी ही शक्ती आहे. याच्या त्रिकोण-योनीत आत्मा ज्योती-प्रमाणे तळपतो. या जागी आत्म्याचा व नादब्रह्माचा साक्षात्कार होतो आणि स्वस्वरूपाचे ज्ञान प्राप्त होते. या चक्रावर प्रभुत्व मिळ-विता आले की सर्व शरीरव्यापारावर ताबा मिळविता येतो, असे म्हणतात. [श्रीगुरुदत्तयोग; स. पॉ.; ष. द. भे.]



आज्ञाचक्र

**आज्ञापत्र** रामचंद्रपंत अमात्यप्रणीत स्वराज्यनीतीवरचा ग्रंथ. हा ग्रंथ इ. स. १७१५ साली आज्ञापत्राच्या स्वरू-पात लिहिलेला आहे. आज्ञापत्र म्हणजे शासनपत्र. राजाज्ञापत्र किंवा लिखित आज्ञा होय. शिवाजीमहाराजांचा नातू, राजा-रामाचा पुत्र संभाजी (इ. स. १६९३–१७६०) याने रामचंद्रपंत अमात्यांना उद्देशून हे आज्ञापत्र लिहिले आहे व त्यात द्वितीय संभाजीने अमात्यांना त्यांचे राजनैतिक विचार राजकुमाराला शिकविण्याचा आदेश दिला आहे, असा प्रास्ताविक भाग ग्रंथारंभी आहे. हा शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यनीतीवरील सूत्रग्रंथ आहे.

या ग्रंथात एकूण नऊ प्रकरणे असून, त्यांत राज्याच्या अनेक घटकांचा फार मार्मिकपणे विचार केला आहे. पहिली दोन प्रकरणे प्रस्तावनेसारखी असून, तिसऱ्या प्रकरणात राजावरील जबाबदारी व त्याच्या राज्यातील धार्मिक लोक, पुजारी, यती, वैरागी, तपस्वी, पाखंडी, गवई, नर्तक, आंधळे, लंगडे, इ. नाना-विध लोक, देवळे, मठ, तीर्थे, समाधी, इ. संस्था, याविषयींची कर्तव्ये सांगून राजाने खजिना, फौज, शस्त्रास्त्रे, इ. संबंधात कसे सावधान असावे, यासंबंधी उपदेश केलेला आहे. चौथ्या प्रकर-णात प्रधान अथवा सरकारकून यांची कशी निवड करावी, माणसांची पारख करून त्यांचा संग्रह कसा करावा, याविषयी उपदेश आहे. पाचव्या प्रकरणात सावकार व व्यापारी यांचे महत्त्व सांगून इंग्रजांसारख्या घरघेऊ व्यापाऱ्याशी कसे सावध-गिरीने वागावे, त्याचा निर्देश आहे. सहाव्या प्रकरणात देशमुख, कुलकर्णी, इ. वतनदार डोईजड न होता सेवातत्पर होतील असे वर्तन कसे करावे, त्याचा ऊहापोह आहे. पुढील तीन प्रकरणांत अनुक्रमे पूर्वापार चालत आलेल्या वृत्ती, गड-किल्ल्यांचा बंदोबस्त व आरमाराविषयीचे कर्तव्य यासंबंधी उपदेश आहे. [आज्ञापत्र]

**आज्ञासंक्रांती** एक व्रत. एखाद्या संक्रांतीला हे व्रत सुरू करतात. यात सूर्यपूजा करायची असते. व्रताच्या उद्यापनाच्या वेळी सूर्याच्या सपरिवार सुवर्णमूर्तीचे दान करतात. फल – सर्वत्र निःसंदिग्ध सत्ता प्राप्त होणे. [हि. ध.]

**इंगळ न्हाणे** दृष्ट, भूतबाधा वगैरेंचा निरास होण्यासाठी माणसावरून जळते निखारे ओवाळून टाकतात, त्याला इंगळ न्हाणे, असे म्हणतात.

**इंझवार** भंडारा (महाराष्ट्र) व बालाघाट (म. प्रदेश) जिल्ह्यांतील एक जात. वैनगंगेच्या खोऱ्यात राहून हे लोक शेतमजुरी व मासेमारी हे धंदे करतात. इंझवार हे विंझ-वार या शब्दाचे अपभ्रष्ट रूप असावे. इंझवारांनी आसपास राहणाऱ्या मराठीभाषी लोकांकडून बऱ्याच सामाजिक चाली-रीती उचलल्या आहेत. हे लोक विंध्यटेकड्यांमधील विंध्यदेवीची पूजा करतात. महाराष्ट्रातील गोवारी लोकांशी इंझवारांचा संबंध आहे. इंझवारांना काही वेळा दूध-गोवारी असेही म्हण-तात. याचे कारण असे, की एक इंझवार स्त्री गोवाऱ्यांच्या मूळ पुरुषाची दाई होती. इंझवार लोकांत गोवारी रक्ताचे मिश्रण झाले असण्याचीही शक्यता आहे. इंझवार लोक गोवाऱ्यांना आपल्यापेक्षा वरच्या दर्जाचे मानतात आणि त्यांच्या हातचे अन्नपाणी ग्रहण करतात. इंझवारांची काही कुलनामे गोंड लोकां-कडून घेतलेली आहेत. यावरून त्यांच्यात गोंड रक्ताचेही मिश्रण असावे, असे वाटते. इंझवार हे गोंड, गोवारी व विंझवार किंवा बैगा या जातींच्या संकराने निर्माण झाले असावे.

इंझवारांच्या एकूण चार उपजाती आहेत. त्यांची नावे लांजी-वार, कोर्रे, चांदेवार आणि सोंझरिया अशी आहेत. सोंझरियांची मेस्राम, टेकाम, मरई व उक्य ही कुलनामे गोंडांमधून आलेली आहेत. इतर काही उपजातींपैकी एका जातीचे नाव पीठवाल्या असे आहे. पौनिपत ही दुसरी उपजात कमळाला व त्याच्या पानाला स्पर्श करीत नाही. कमळ उगवलेल्या तळ्यातील पाणीही पीत नाही. यांच्या आणखी एका उपजातीचे नाव दोबकरिया रावत असे आहे. कारण हे लोक देवाला दोन बकरी अर्पण कर-तात. सोनवाणी या उपजातीत पौनपत सोनवाणी, गुढीवाल, सती सोनवाणी, मुंगफाटिय सोनवाणी, असे आणखी पोटप्रकार आहेत. या पोटप्रकारांत परस्पर विवाहसंबंध होत नाहीत.

बहुतेक इंझवार शेती किंवा शेतमजुरी करतात. त्यांच्यापैकी

सोंझरिया इंझवार नदीतून सोने काढण्याचा धंदा करतात. चांदेवार स्त्रिया सुईणीचे काम करतात. चांदेवार लोक साप, सुसरी, इ. प्राण्यांचे मांसही खातात. ब्राह्मण, धीमर, माळी व गोवारी या जातींतल्या लोकांना हे आपल्या जातीत घेतात. त्यांनी ५ ते १५ रुपये दिले आणि ज्ञातिभोजन घातले म्हणजे हे काम होते. जातीत येणारा पुरुष असो वा स्त्री असो, त्यांना क्षौर करावे लागते. इंझवार स्त्रीने किंवा पुरुषाने अन्य जातींतील पुरुषाशी किंवा स्त्रीशी संबंध ठेवल्यास ज्ञातिभोजन दिल्याने त्यांना माफी मिळते. मात्र ती जात अगदी कनिष्ठ प्रतीची असता कामा नये.

**विवाहप्रथा** – यांच्यामध्ये समान कुलांत विवाह होत नाहीत. त्याचप्रमाणे दोघा भावांचा दोघी बहिणींशी विवाहही निषिद्ध आहे. साधारणपणे मुलगी वयात आल्यावर तिचे लग्न होते. वरपिता वधूला मागणी घालण्यासाठी वधूगृही जातो व वधूपित्याला तो संबंध पसंत असेल, तर तो वरपित्याचे पाय धुवून आपली संमती व्यक्त करतो. साधारणपणे वधूशुल्क म्हणून २० रुपये देण्याची पद्धत आहे. वर विधुर असेल, तर मात्र हे शुल्क वाढते. वधू-वरांवर अक्षता टाकल्या, की विवाहविधी पुरा होतो. घटस्फोट व पुनर्विवाह यांची चाल आहे. प्रथमवराला विधवेशी लग्न करायचे असेल, तर आधी रुईशी त्याचा विवाह करतात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते पुरतात व मृताची उत्तरक्रिया करतात. मृताचा आत्मा पुढच्या जन्मी कोणत्या योनीत प्रवेश करणार, हे ठरविण्याची यांची एक पद्धत आहे. मृताच्या थडग्याजवळ रात्रीच्या वेळी कसले तरी पीठ पसरून ठेवतात आणि दुसऱ्या दिवशी सकाळी त्यावर कोणाच्या पावलांचा ठसा उमटला आहे, ते पाहतात. तो मनुष्याचा, पशूचा अथवा पक्ष्याचा असेल, त्याप्रमाणे मृतात्म्याने तो जन्म घेतला, असे मानतात. हे लोक अक्षय्य तृतीयेला व कार्तिक महिन्यात पितृतर्पण करतात. त्या वेळी मृत पुरुषासाठी एक मोठा मातीचा घडा पाण्याने भरून ठेवतात. घड्याच्या पुढे दिवा तेवत ठेवतात आणि माळी पुरुष किंवा स्त्री यांना जेवू घालतात. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**इंद परब** मुंड लोकांचा एक उत्सव. ज्या गावाचा जमीनदार नागवंशी असतो, त्या गावात आद्य नागवंशी जमीनदाराच्या स्मृतिप्रीत्यर्थ हा उत्सव करतात. त्यासाठी सालवृक्षाचे दोन खांब जमिनीत पुरून त्यांवर एक आडवे लाकूड बसवितात. लाकडावर मध्यभागी एक उंच खांब उभारतात. या खांबाला इंद खांब असे म्हणतात. त्याच्या टोकावर मोहरमच्या ताबूतासारखी सजावट करतात व जमीनदाराने दिलेले शुभ्र वस्त्र त्यावर पसरतात. सातव्या दिवशी हा इंद खांब उतरवितात. पहिल्या दिवशी ग्रामपुरोहित या खांबाजवळ बकरा बळी देतो व शेवटच्या दिवशी देवांना मद्याचा नैवेद्य दाखवितो. [ एन्सा. मुंडा. ]

**इंदिरा एकादशी** एक तिथिव्रत. भाद्रपद कृ. एकादशीला हे नाव आहे. या व्रताने पितरांचा उद्धार होतो. व्रताची कथा पद्मपुराणात (उ. खं. ५८) सांगितली आहे, ती अशी – इंद्रसेन नावाचा एक राजा होता. त्याच्या सभेत एक दिवस नारद आला. त्याने राजाला सांगितले, की 'तुझा पिता यमलोकात खितपत पडला असून, त्याने आपल्या उद्धारासाठी तुला इंदिरा एकादशीचे व्रत करायला सांगितले आहे.' राजाने ते व्रत केले व त्याचा पिता स्वर्गलोकी गेला.

**इंदी** मुंड लोकांचा एक सण. भाद्रपद महिन्यात करम सणाच्या दुसऱ्या दिवशी म्हणजे वद्य द्वादशीला किंवा भाद्रपद पौर्णिमेनंतर आठ दिवसांनी हा सण येतो. काही ठिकाणी दसऱ्याच्या दिवशीही हा सण साजरा करतात. दसऱ्याच्या सणाला 'दसाइ इंदी' म्हणतात. गावात इंदीसाठी एक खास जागा राखून ठेवलेली असते. त्या जागेत एक भक्कम लाकडी चौकट बसवितात. इंदीच्या दिवशी या चौकटीला लागून एक उंच खांब उभा करतात. पहन (ग्रामप्रमुख) त्या खांबाजवळ चंडी बोंगाला एक कोंबडा अथवा बकरा बळी देतो. या दिवशी पिकांना इंदीची नजर बाधू नये. म्हणून शेतात एका उंच काठीला करेबांचा तुरा बांधतात. दुपारी पहनाच्या घरापासून मिरवणूक निघते. मिरवणुकीत एक गवताचे आसन असते व त्यावर बावटा असतो. मिरवणूक त्या पुरलेल्या खांबाजवळ आल्यावर मिरवणुकीतील ते आसन खांबाजवळच्या लाकडी चौकटीवर ठेवतात. नंतर सगळेजण त्या आसनाच्या गवताचे तुरे चुंबून ते खांबावर फेकतात. तसे केल्याने पिके चांगली येतात, अशी समजूत आहे. खांबावर उभारलेला बावटा ज्या दिशेला फडकेल, त्या दिशेला पिके चांगली येतील, असे मानतात.

दुपारी खांबाजवळ सर्व लोक जमून नृत्य करतात. नाचणारे आंगभर पिसे लावतात. या मेळाव्यात तरुण-तरुणी भाग घेतात व एकमेकांची थट्टामस्करीही करतात. थोडक्यात म्हणजे हा सण जसा धान्योत्सव आहे, तसाच तो अविवाहित तरुण-तरुणीचाही आहे. [ एन्सा. मुंडा. ]

**इंदुव्रत** साठ संवत्सरव्रतांपैकी अठ्ठावन्नावे व्रत. व्रत करणारा दिवसभर उपवास करतो व सायंकाळी एका दांपत्याची वस्त्राभरणांनी पूजा करतो. वर्षअखेर ब्राह्मणाला एक

याय दान देतो. व्रताचे फल–मोक्षप्राप्ती. [ कृ. क. त.; हि. ध. ]

**इंद्र** (१) वैदिक आर्यांची सर्वश्रेष्ठ व पराक्रमी देवता. ऋग्वेदातील एकूण सूक्तांच्या एक चतुर्थांश सूक्ते इंद्रविषयक आहेत. यास्काने इंद्र शब्दांची व्युत्पत्ती अनेक प्रकारे (निरुक्त १०.८) दिली आहे –

**इन्द्रः इरां दृणातीति वा । इरां ददातीति वा । इरां दधातीति वा । इरां दारयत इति वा । इरां धारयत इति वा । इन्दवे द्रवतीति वा । इन्दौ रमत इति वा ।**

अर्थ – इंद्र बी फोडून धान्य बाहेर काढतो किंवा तो अन्न देतो किंवा तो अन्न धारण करतो किंवा पृथ्वीला भेगा पाडतो किंवा पृथ्वीला धारण करतो. इंद्र सोमपानासाठी धावत सुटतो किंवा सोमात रमतो.

'इदमदर्शम्' (हे पाहिले) यावरून इदंद्र हे नाव व त्यावरून पुढे इंद्र हे नाव रूढ झाले, असे ऐतरेयोपनिषदांत सांगितले आहे (३.१३.१४).

वैदिक इन्द्रवर्णनात त्याचा स्वभाव व आकृती ही एखाद्या मानवी वीराला साजेशी रंगविली आहेत. इंद्राच्या पित्याचे नाव द्यु असून आईची नावे अनेक आहेत; त्यापैकी अदिती हे एक आहे. आपल्या मातेच्या उदरात इंद्र एक हजार महिने व असंख्य वर्षे राहिला होता (ऋ. ४.१८.४). त्याचप्रमाणे निसर्गसिद्ध मार्गाने जन्माला न येता तो मातेच्या पार्श्वांतून जन्मला (ऋ. ४.१८.१–२). जन्मल्याबरोबर त्याने पराक्रम गाजवायला सुरवात केली व पृथ्वी आणि आकाश ही दोन्ही आपल्या तेजाने भरून टाकली. इंद्राचा वर्ण हिरण्यासारखा असून, त्याचे केस व श्मश्रू हीही हिरण्यवर्णाचीच आहेत. त्याचे बाहू दीर्घ आहेत. दोन हरितवर्ण घोडे जोडलेल्या रथात बसून तो संचार करतो. हा रथ त्याला ऋभूंनी तयार करून दिला. वज्र हे याचे आयुध असून, त्वष्ट्याने दधीचीच्या अस्थींपासून ते बनविले (५.३१.४). दुसऱ्या ठिकाणी इंद्राचे हे वज्र 'आयसम्' म्हणजे कोणत्या तरी धातूचे केलेले आहे व त्याला चार किंवा शंभर कोन आणि सहस्र अग्रे आहेत, असे म्हटले आहे (ऋ. ४.२२.२; ४.१७.१०; ८.६.६).

याच्या पत्नीचे नाव इंद्राणी आहे. (ऋ. १०.८६) या व्यतिरिक्त याला सीता नावाची एक पत्नी असल्याचाही उल्लेख आहे. (पार. गृ. सू. १७.९). इंद्राला सोमाबद्दल अत्यंत आसक्ती आहे. त्यामुळे 'सोमपा' हे विशेषण त्याचेच निदर्शक बनले आहे. सोमपान करून उन्मत्त झाल्यावर तो स्वर्ग व पृथ्वी यांच्याही कक्षेबाहेर जातो (ऋ. १०.१००.४). सोमपान केल्यावर त्याच्या अंगी अमित उत्साह व शौर्य यांचा संचार होतो व त्या बळावर तो मोठमोठी वीरकृत्ये पार पाडतो.

इंद्राचा आकार इतका प्रचंड आहे, की पृथ्वी दहापट मोठी झाली, तरच ती त्याच्या आकाराची होईल. तो अत्यंत बलाढ्य असून, मानवांना व देवांनाही त्याच्या सामर्थ्याचा अंत लागत नाही. इंद्राचा अग्नी, वरुण, मरुत्, इ. देवतांसह संयुक्त रूपाने अनेकदा उल्लेख केलेला आहे. विशेषतः मरुद्गणाशी त्याचे साहचर्य अनेक वेळा दिसून येते. म्हणूनच त्याला 'मरुत्वान्' हे विशेष अभिधान प्राप्त झाले आहे. कोणत्याही मानवापेक्षा किंवा देवापेक्षा इंद्र शक्तिमान मानलेला आहे.

इंद्राचे अनेक शत्रू ऋग्वेदात वर्णिले आहेत. शंबर हा त्यातला प्रमुख शत्रू होय. याव्यतिरिक्त शुष्ण, वल, पिप्रू, कुयव, अही, चुमुरी, नमुची, इ. इंद्राच्या अनेक शत्रूंची नावे ऋग्वेदात आली आहेत. वृत्र हा त्याचा दुसरा महत्त्वाचा शत्रू, त्याने जलाला व्यापून टाकले होते व त्याच्या प्रवाहाला प्रतिबंध केला होता. तो स्वतःला अजिंक्य व अमर समजत होता (ऋ. ५.३२.३) व मोठ्या धूर्तपणाने इंद्रापासून लपून राहिला होता. परंतु चाळीस वर्षांनी इंद्राने त्याला शोधून काढले व आपल्या शतपर्व वज्राच्या प्रहाराने त्याचे शिर धडावेगळे केले (ऋ. ८.६.६) –

**वि चिद् वृत्रस्य दोधतो वज्रेण शतपर्वणा ।**
**शिरो बिभेद वृष्णिना ॥**

अर्थ–(जगाला) हालविणाऱ्या वृत्राचे मस्तक, इंद्राने आपल्या शत धारांच्या शौर्यवर्धक वज्राने छिन्नभिन्न केले.

सुतार ज्याप्रमाणे झाड तोडतो, त्याप्रमाणे इंद्र ढग विदीर्ण करून वारिधारांना मुक्त करतो (ऋ. ८.१२.६); पर्वतांचे चूर्ण करतो व जलांना प्रवाहित होण्यासाठी मुक्त करतो. याचा ऐतिहासिक अर्थ असा होऊ शकतो, की वृत्राने सप्तसिंधू प्रदेशातल्या सातही नद्यांचे प्रवाह रोखून धरले होते. वृत्राच्या वधानंतर त्या सातही नद्या पुन्हा वाहू लागल्या.

इंद्र व वृत्र यांच्या युद्धाचे हे वर्णन प्रभावी असून, वीररसाचा परिपोष करणारे आहे. वेदांत इंद्रविषयक जी वर्णने आली आहेत, त्यांत इंद्राचे वृत्राशी झालेले युद्ध व त्या युद्धात इंद्राला मिळालेला विजय, हा त्या सर्वांचा मध्यबिंदू आहे. हा वृत्र म्हणजे नेमका कोण होता, याबद्दल प्राचीन विद्वानांची मते निरनिराळी असली, तरी वृत्र हा मेघ होता, हे निरुक्तकार यास्काचे मत सायणाचार्यांनाही मान्य आहे. वृत्र ही एक दैत्यस्वरूप निसर्गशक्ती आहे. ही शक्ती जलाचा अवरोध करते व त्यामुळे पर्जन्यवृष्टी होऊ शकत नाही. परंतु इंद्र आपल्या वज्राने या वृत्राचा निःपात करतो व जलाचे विमोचन करतो. त्यामुळे मग पर्जन्यवृष्टी होते. इंद्राचे हे वज्र म्हणजे वीज व इंद्र म्हणजे पर्जन्याधिपती देव होय. रोथ, मॅक्डोनेल, ओल्डेनबर्ग, इ. पाश्चात्य

पंडितांनीही इंद्र-वृत्रसंघर्षाचा असाच अन्वयार्थ लावलेला आहे; पण डॉ. रा. ना. दांडेकर यांना हे मत मान्य नाही. त्यांचे म्हणणे असे, की या सर्व वर्णनांत मेघ, विद्युत्, घनध्वनी, पर्जन्य हे पावसाशी संबद्ध असे शब्द प्रत्यक्षपणे केव्हाच उपयोजिलेले नसून नेहमी त्याऐवजी वृत्र, वज्र, पर्वत, आप, इ. प्रतीकात्मक शब्दांचाच उपयोग केलेला आहे. इंद्रासारख्या प्रमुख देवतेचे असे संदिग्ध वर्णन वैदिक ऋषींनी केले असेल, हे शक्य वाटत नाही. तेव्हा इंद्र ही पर्जन्यदेवता मानणे हे चूक आहे. इंद्राच्या बहुसंख्य वर्णनात मानवी धर्म इतक्या स्पष्टपणे प्रत्ययाला येतात, की त्याला एखाद्या निसर्गशक्तीचे प्रतीक न मानता मानवी वीर मानणेच अधिक सयुक्तिक ठरेल. डॉ. दांडेकर यांचा इंद्रविषयक सिद्धान्त पुढीलप्रमाणे आहे –

वेदांतील इतर देवतांपेक्षा इंद्र या देवतेच्या वर्णनांत मानवी स्वभावधर्मांचा उपयोग अधिक केलेला आढळतो. वैदिक आर्यांच्या वैयक्तिक व सामाजिक जीवनात इंद्राचा संबंध फार जवळचा व जिवंत आहे. एखाद्या निसर्गशक्तीला देवतास्वरूप दिल्यामुळे इंद्रविषयक दैवतशास्त्रीय कल्पना उद्भूत झाली असे मानले, तर इंद्राच्या जन्मासंबंधी जे उल्लेख वेदांत आढळतात, त्यांना आनर्थक्य येईल. याशिवाय इंद्राचे देवपद हे जन्मसिद्ध नव्हते, ते त्याने स्वपराक्रमाने मिळविले होते, असे सूचक उल्लेख ऋग्वेदात अनेकवार आलेले आहेत. त्यावरून इंद्र ही एक ऐतिहासिक व्यक्ती होती, असे कळून येते. इंद्राच्या पराक्रमाचे व त्याच्या गुणांचे वर्णन करीत असताना वैदिक ऋषींनी त्याच्या स्वभावदोषांचेही दिग्दर्शन केले आहे. इंद्राच्या व्यक्तिमत्त्वात 'मानवा' चा व 'अतिमानवा' चा हृदयंगम संगम झालेला आहे. त्याच्या स्वभाववर्णनात त्यामुळे एक प्रकारचा जिवंतपणा आढळतो. ते केवळ प्रतीकात्मक वाटत नाही. सोमपान करून मदस्फूर्त झालेल्या इंद्राचे विडंबन वैदिक कवींनी लवसूक्तात केले आहे, ते या बाबतीत उद्बोधक ठरेल. इंद्राची सोमविषयक अतिरिक्त अभिलाषा, स्त्रियांविषयी त्याला वाटणारे विशिष्ट प्रकारचे कुतूहल (ऋ. २.१५.७; ७.३८.२), वृषाकपीच्या प्रसादाने झालेले त्याचे वीर्यवर्धन (ऋ. १०.८६), काही विशिष्ट प्रसंगी त्याला वाटलेले भय (१.३२.१४), नेहमी त्याच्याशी एकनिष्ठ राहणाऱ्या मरुतांशी काही वेळी त्याचे उडालेले खटके (१.१७०.२; १.१७१.६; ८.७.३१), या सर्व गोष्टी, इंद्र हा मानव होता व तो इतिहासकालातील पुरुष होता, याच्या द्योतक आहेत. वैदिक दैवतशास्त्राच्या विकासक्रमातील एका अवस्थेत त्याने आर्यांची मूळची पर्जन्यदेवता जी त्रित आप्त्य, तिला स्थानभ्रष्ट करून, तिचे काही स्वभावविशेष आपल्या व्यक्तिमत्त्वात सामावून घेतले असले पाहिजेत.

या अतिमानवी वीराच्या कोणत्या पराक्रमामुळे त्याला प्रत्यक्ष देव नसतानाही देवाधिदेवाचे श्रेष्ठ पद प्राप्त झाले व त्याच्या व्यक्तिमत्त्वात पर्जन्यदेवतेचे काही स्वभावविशेष कसे शिरले, हे बघण्यासाठी वेदपूर्वकालीन इतिहासाचा मागोवा घेतला पाहिजे.

ज्या एका मानवसमूहातून आर्य बाहेर पडले, तो मानवसमूह अगदी प्राचीन काळी उत्तर किरघीज प्रदेशात एकत्र वास्तव्य करीत होता. या मानवसमूहाला पूर्व-यूरोभारतीय असे नाव आहे. या मानवसमूहाच्या सांस्कृतिक इतिहासाच्या अगदी पहिल्या अवस्थेतच त्याच्यातून एक टोळी बाहेर पडली व कास्पियन समुद्राच्या उत्तर बाजूने कॉकेशस पर्वत ओलांडून पूर्वीच्या आशिया मायनर या प्रदेशात येऊन ठेपली. कालांतराने या मूळ यूरोभारतीय मानवसमूहातून आणखी दोन मोठ्या टोळ्या बाहेर पडल्या. त्यांपैकी एका टोळीने आपल्या मूळ वसतिस्थानाच्या आग्नेय दिशेकडे वळून वल्ख (बाह्लीक) प्रदेशाच्या आसपास वसती केली. या बाह्लीक प्रदेशात वसाहत केलेल्या टोळीला प्राचीन आर्य किंवा पूर्वार्य असे म्हणतात. या प्रदेशातच या लोकांनी आपल्या पूर्वार्य भाषेचा व दैवतशास्त्राचा विशिष्ट प्रकारे विकास केला. त्यांची भाषा म्हणजे वैदिक संस्कृत व प्राचीन इराणी भाषा, या भाषांची पूर्वज होय आणि त्यांचे दैवतशास्त्र म्हणजे अवेस्त्यातील व वेदातील दैवतशास्त्राचे मूळ होय.

बाह्लीक प्रदेशात पूर्वार्यांची वसती दीर्घ काळपर्यंत झाली असावी. कारण पुढे पुढे ते लोक आपले उत्तर किरघीज प्रदेशातील मूलस्थान विसरले व बाह्लीक प्रदेशालाच आपले मूलस्थान मानू लागले. या पूर्वार्यांच्या सांस्कृतिक इतिहासाच्या अगदी पहिल्या अवस्थेत त्यांच्यातून काही टोळ्या फुटून निघाल्या व आशिया मायनर प्रदेशात येऊन दाखल झाल्या. या टोळ्या निघून गेल्यानंतर जे लोक शिल्लक राहिले, तेच प्राचीन इराणी व वैदिक भारतीय यांचे पूर्वज होत. यांनाच आर्य असे म्हणतात. पुढे या आर्य लोकांतूनही निर्गमने सुरू झाली. त्यांतील शांतताप्रिय लोक हळूहळू इराणकडे सरकू लागले व आर्यांपैकी अधिक साहसी व महत्त्वाकांक्षी होते ते पूर्वेकडे निघाले. या प्रयाणात त्यांना अनेक विरोधी मानवसमूहांना तोंड द्यावे लागले. पण आपल्या पराक्रमी नेत्याच्या नेतृत्वाखाली त्यांनी सर्व विरोधी लोकांचा निःपात केला व ते सप्तसिंधू प्रदेशांत येऊन पोचले. हे आक्रमक लोक म्हणजे वैदिक भारतीय असून, त्यांचा नेता म्हणजे इंद्र होय. आर्यांच्या दैवतशास्त्राचे वैदिक भारतीयांच्या दैवतशास्त्रात रूपांतर होत असता वैदिक भारतीयांनी आपल्या महान नेत्याला देवपदी बसविले. त्याची अशी सर्वोच्च स्थानी प्रतिष्ठापना केल्यामुळे वैदिक दैवतशास्त्र इंद्रप्रधान बनले

राष्ट्रीय नेत्याचा राष्ट्रीय वीर व राष्ट्रीय वीराची राष्ट्रीय देवता, असा हा दैवतशास्त्रीय विकास सहज आकलनीय आहे. इंद्राचा प्रतियोगी असा देव प्राचीन इराणी लोकांच्या दैवतशास्त्रात नाही, याचे रहस्य यावरून स्पष्ट होईल. वैदिक भारतीयांच्या या नव्या देवतेने आर्यांच्या असुर वरुण या देवतेला मागे टाकले.

असुर कल्पनेबरोबरच दुसरी एक कल्पना पूर्वार्यांच्या दैवतशास्त्रात निर्माण झाली होती; ती म्हणजे 'वृत्र-वृत्रहा' ची. ही कल्पना बव्हंशी अमूर्त स्वरूपाची होती. प्राचीन इराणी लोकांच्या दैवतशास्त्रात ती तशीच राहिली; पण वैदिक भारतीयांच्या दैवतशास्त्रात त्या अमूर्त कल्पनेला एक प्रकारचे मूर्त स्वरूप प्राप्त झाले. कारण वैदिक भारतीयांच्या पुढे 'वृत्र' म्हणजे प्रतिबंध मूर्त स्वरूपात प्रकट झाला होता व त्याचबरोबर त्या मूर्त मानवी प्रतिबंधाचा नाश करणारा वीर नेताही त्यांच्यात निर्माण झाला होता. त्या वीरालाच 'वृत्रहा' हे विरुद विशेषत्वाने शोभण्यासारखे होते. अशा प्रकारे आर्यांची अमूर्त अशी 'वृत्रहा'ची कल्पना भारतीयांच्या मूर्त अशा इंद्राशी संबद्ध होऊन मूर्तत्व पावली व 'वृत्रहा इंद्र' निर्माण झाला.

इंद्र या शब्दाचा भाषाशास्त्रीय विचार अनेक विद्वानांनी केला आहे. यास्काने हा शब्द निरनिराळ्या तेरा प्रकारांनी साधलेला आहे. इंद्र म्हणजे सूर्यदेवता, या उपपत्तीशी जुळण्याकरिता 'इंद्र' शब्द 'इन्ध्' या धातूपासून साधण्याचा काही पंडितांनी प्रयत्न केला आहे. दुसऱ्या काही पंडितांनी 'इंद्र' हा शब्द भाषाशास्त्रदृष्ट्या 'इंदु' शब्दाशी सदृश असल्याचे सुचवून इंद्राचा पर्जन्यबिंदूशी किंवा सोमबिंदूशी संबंध जोडला आहे. डॉ. दांडेकरांनी मात्र इंद्र व इंदू हे दोन्ही शब्द यूरोभारतीय Oid या शब्दाशी संबद्ध मानून त्या यूरोभारतीय शब्दाचा पुढे विकसित झालेला अर्थ 'वर्धमान पौरुष', 'वर्धमान पुरुषवीर्यबिंदू' असा आहे, असे सांगितले आहे. इंद्र या नावाने वैदिक भारतीयांच्या नेत्याच्या पौरुषाचाच गौरव झालेला आहे.

वाह्लीक प्रदेशात राहत असताना आर्यांच्या दैवतशास्त्रात असुर-ऋत कल्पना हीच प्रमुख कल्पना होती. सप्तसिंधू प्रदेशात आलेल्या आर्यांनी आपले नवीन इंद्रप्रधान दैवतशास्त्र निर्माण केले. परंतु त्यांच्यापैकी काही लोक प्राचीन असुरधर्माशी एकनिष्ठ राहिले. फलतः वैदिक दैवतशास्त्रात प्राचीन असुरवरुणप्रधान पंथ व नवीन इंद्रप्रधान पंथ असे दोन पंथ स्पष्टपणे दिसू लागले. अनेक ऋग्वेदीय सूक्तांत वरुण व इंद्र यांच्यातील विरोधाचे सूर उमटलेले दिसतात, त्याचे कारण हेच. परंतु शेवटी इंद्राने असुरधर्मावर मात केली व तो सर्वश्रेष्ठ देव बनला. अर्थात काही ऋषींनी इंद्रधर्म व वरुणधर्म या दोन धर्मांत समेट घडवून आणण्याचाही प्रयत्न केलेला दिसतो.

वैदिक दैवतशास्त्रात सर्वश्रेष्ठ स्थान प्रस्थापित केल्यावर इंद्राच्या व्यक्तिमत्त्वात पुढे आणखी काही अंश समाविष्ट झाले. 'वृत्रहा' इंद्र प्रथम मानवी 'वृत्रां'चा संहारकर्ता होता. त्यालाच पुढे वैदिक कवींनी निसर्गातील 'वृत्रां'चा संहारकर्ता बनविले. इंद्राच्या व्यक्तिमत्त्वात पर्जन्यदेवतेचे काही अंश दिसून येतात, त्याचे कारण हेच आहे.

इंद्राच्या व्यक्तिमत्त्वाच्या विकासात आणखी एक पायरी आहे. इंद्र ही मूळची व्यक्ती होती, तिचे दैवतशास्त्रीय संस्थेत रूपांतर झाले. त्याचप्रमाणे इंद्र-वृत्रसंघर्षाचे ऐतिहासिक स्वरूप नाहीसे होऊन त्याला जेव्हा दैवतशास्त्रीय स्वरूप प्राप्त झाले, तेव्हा त्यासंबंधीच्या कल्पनेचा प्राचीन पुराणांतर्गत अशा दुसऱ्या एका सदृश कल्पनेशी समन्वय करण्यात आला. ती कल्पना म्हणजे वीर आणि अही किंवा सर्पस्वरूपी राक्षस यांच्यामधील संघर्षाची होय. जवळजवळ प्रत्येक प्राचीन पुराणशास्त्रात अशा प्रकारची कल्पना दिसून येते. झ्यूस व टायफन, हरक्युलीस व हैड्रा, अपोलो व पायथन, या वीर आणि अही यांच्या जोड्या अन्य प्राचीन पुराणांतही दिसतात. वैदिक कवींनीही इंद्र-वृत्र ही अशीच जोडी मानली. ऋग्वेदात वृत्राला व इंद्राच्या इतर शत्रूंना 'अही' असे संबोधिले आहे. त्याचे कारण हेच आहे. वैदिक आर्यांच्या दैवतकथाशास्त्राची उभारणी मुख्यत्वे इंद्रकथांवर झालेली आहे.

ऋग्वेदातील इंद्रकथा गतिशील आहेत. इंद्राची देवप्रमुख म्हणून प्रतिष्ठापना करणे हेच या कथांचे प्रयोजन आहे. ऋग्वेदात इंद्रविषयक पुढील कथाबीजे आढळतात – अंगिराने स्फूर्ती दिल्यामुळे याने वलाला ठार केले (ऋ. २.१५.८). सूर्याचे चक्र फेकून एतशाला वाचविले (ऋ. ४.१८.१४). दशद्यूंचे व श्वित्राच्या गायींचे संरक्षण केले (ऋ. १.३३.१४–१५). अपालेचे कोड घालविले (ऋ. ८.९१). नेम नावाचा ऋषी इंद्राच्या अस्तित्वाविषयी शंका घेऊ लागला असता याने त्याला आपण प्रत्यक्ष असल्याचे दाखविले (ऋ. ८.१००).

इंद्राच्या पौराणिक कथांचा संभार फार मोठा आहे. पुराणांत देव म्हणून इंद्राला मुख्य स्थान नसले, तरी ब्रह्मा-विष्णू-महेशांच्या खालोखाल याचा क्रमांक लागतो. याला पूर्व दिशेचा, स्वर्गाचा व अंतरिक्षाचा अधिपती मानलेले आहे. अमरावती ही याची नगरी असून, नंदन नावाचे याचे उद्यान आहे. गंधर्व व अप्सरा यांचा समुदाय याचा मनोविनोदक आहे. उच्चैःश्रवा हा याचा घोडा आहे. जयंत हा याचा पुत्र आहे. इंद्राची नित्यपूजा होत नसली, तरी इंद्रध्वज उत्सवात याच्या पूजेचे विधान आहे. (इंद्रध्वजोत्सव पाहा)

इंद्राविषयी काही पौराणिक कथा पुढे दिल्या आहेत –

याने गौतमपत्नी अहल्या हिच्याशी जारकर्म केले. रुक्मांगदाच्या वेषाने वाचक्नवी ऋषीची पत्नी मुकुंदा हिच्याशीही संभोग केला (गणेश पु. १.३६-४०). विश्वरूप, वृत्र व नमुची यांना ठार केल्यामुळे ब्रह्महत्या पाठीस लागली, तेव्हा हा कमळात दडून बसला. पुढे ही ब्रह्महत्या भूमी, वृक्ष, जल व स्त्री यांच्या ठिकाणी विभागून दिल्यामुळे हा पापमुक्त झाला. दुर्वास व बृहस्पती यांचा अवमान केल्यामुळे हा ऐश्वर्यभ्रष्ट झाला. समुद्रमंथनातून जी रत्ने निघाली, त्यांतले एक याला मिळाले. त्यानंतर असुरांचा पराभव होऊन याला पुनश्च स्वर्गाचे आधिपत्य मिळाले (भाग. पु. ६.९). एकदा इंद्र अंगुष्ठमात्र असलेल्या वालखिल्य ऋषींना तिरस्काराने हसला. त्यामुळे ते दुसरा इंद्र निर्माण करण्याच्या उद्योगास लागले. तेव्हा कश्यपाला मध्यस्थ घालून याने त्यांचा राग शांत केला (म. भा. आदि. ३०). शर्यातीने केलेल्या यज्ञात अश्विनीकुमारांना हविर्भाग मिळू नये, म्हणून याने च्यवनावर वज्र उगारले. पण च्यवनाच्या सामर्थ्यापुढे त्याचे काही न चालल्यामुळे त्याला अश्विनीकुमारांचा हविर्भाग मान्य करावा लागला.

प्रत्येक मन्वंतरात कोणीतरी इंद्र असतोच. 'भूर्भुवः स्वः' या तीन लोकांचे तो आधिपत्य करतो. शंभर यज्ञ करणाऱ्याला इंद्रपद लाभते. इंद्राचे शतक्रतू हे नाव त्यावरूनच पडले आहे. म्हणून इंद्र कोणाचेही शंभर यज्ञ पुरे होण्याच्या वेळी त्यांत विघ्न आणतो. तसेच कोणी प्रखर तप करीत आहे असे दिसले, की तो आपणांस पदच्युत करील, या भीतीने अप्सरांना त्या तपोधनाकडे पाठवून त्यांचा तपोभंग करण्याचा प्रयत्न करतो. सप्तर्षी हे त्याचे सल्लागार असून, गंधर्व-अप्सरा हे त्याचे वैभव आहे.

काही संशोधकांच्या मते काही कथा रूपकात्मक असून, त्यांचे भिन्न अर्थ लावता येतात.

भागवतातल्या गोवर्धन पर्वताच्या आख्यानात कृष्णामुळे इंद्राला गौणत्व आल्याचे सूचित होते. वैष्णव संप्रदायाच्या वाढीबरोबर मूळच्या उपेंद्राला म्हणजे विष्णूला महत्त्व येऊन इंद्र मागे पडला, असा तो इतिहास आहे. जैनांच्या दैवतकथांत इंद्राला यक्षाचे स्थान दिले गेले आहे. तीर्थंकरांचे जन्ममंगल करणारा एक सेवक, म्हणून तो जैन वाङ्मयात दिसतो. बौद्ध वाङ्मयात त्याचे स्थान याहून जरा उंच आहे. जातककथांत तो मानवप्रेमी व दीनबंधू दाखविलेला आहे. संबुला जातकात तो संबुलेला एका कामुक यक्षाच्या तावडीतून सोडवितो. भूमिया आदिवासी याला पाऊस व आकाश यांचा देव मानतात. तोच त्यांचा मृत्युदेवही आहे. इंद्राने आईच्या पार्श्वातून बाहेर यायचे ठरविले, या कल्पनाबंधावर आधारलेली एक लोककथा मध्यप्रदेशात सापडते, ती अशी –

कमलपती ही कमळाची देवी. इंद्रराजा तिच्या वरशोधून निघाला. इंद्राचा मुलगा मौनकुंवर. माळ्याची मुलगी रंभेंद्र. त्या दोघांचे लग्न लागले. वरातीच्या वेळी माळ्याचे ठेंगणे छत मोडले. इंद्राने ते वर फेकले. तेच इंद्रधनुष्य बनले.

कातोडी, कुंभार, गोंड यांच्यामध्येही इंद्रकथा आहेत.

इंद्राची मूर्ती कशी करावी, ते हेमाद्रीने आपल्या चतुर्वर्गचिंतामणीत पुढीलप्रमाणे सांगितले आहे.

शक्रश्चतुर्भुजः कार्यो द्विभुजा च तथा शची।
पद्माङ्कुशौ च कर्तव्यौ वामदक्षिणहस्तयोः॥
वामं शचीपृष्ठगतं द्वितीयं वज्रसंयुतम्।
वामे शच्याः करे कार्या रम्या सन्तानमञ्जरी॥
दक्षिणं पृष्ठविन्यस्तं देवराजस्य कारयेत्।

अर्थ – इंद्राची मूर्ती चतुर्भुज व शचीची द्विभुज करावी. इंद्राच्या डाव्या-उजव्या हातांत अनुक्रमे कमल व अंकुश असावे. इंद्राचा दुसरा डावा हात शचीच्या पाठीवर टेकलेला व दुसरा उजवा हात वज्रधारी असावा. शचीच्या डाव्या हातात मंजरी असावी व उजवा हात इंद्राच्या पाठीवर असावा.

इंद्राची मूर्ती ऐरावतावर बसलेली अशी करतात. या ऐरावताला चार सुळे असतात. चिदंबरम् येथे अशा प्रकारची मूर्ती आहे. इंद्राच्या तीन हातांत धनुष्य, शंख, व चक्र अशी तीन आयुधे असावी व चौथा हात अभयमुद्रेत असावा, असे शिल्पसार ग्रंथात सांगितले आहे. इंद्रपत्नी शची ही त्याच्या डाव्या मांडीवर बसलेली असायलाच हवी, असा हेमाद्रीचा आग्रह आहे. इंद्राचा एक हात शचीच्या पाठीवर व शचीचाही एक हात इंद्राच्या पाठीवर असावा. शचीच्या दुसऱ्या हातात कल्पवृक्षाच्या फुलांचा गुच्छ असावा, असे सांगितले आहे.



इंद्रमूर्ती – चालुक्यशैली

इंद्रासंबंधीची आजची सर्वसामान्य कल्पना म्हणजे तो देवांचा राजा आहे ही होय. पण देवांचा राजा असूनही नित्याच्या देवपूजेत इंद्राला आज स्थान नाही. शांतिक, पौष्टिक कर्मांत एक लोकपाल म्हणून त्याला आहुती मिळते. प्राचीन काळी रानडुक्कर हा त्याचा बळी होता. 'इन्द्राय सूकरम्' असे तै. ब्राह्मणात वचन आहे. इंद्रविषयक सण व उत्सव आजमितीस क्वचितच राहिले आहेत. मात्र इंद्राशी संबंधित अशा काही व्रतांचा व यज्ञांचा उल्लेख पुराणांत व धर्मशास्त्रात आढळतो. बंगालमध्ये मात्र इंद्रपूजा अस्तित्वात आहे. भाद्रपद शु. चतुर्दशीस तिकडच्या स्त्रिया इंद्रमूर्तीची पूजा करून इंद्राला चौदा फळे व चौदा लाडू यांचा नैवेद्य दाखवितात. चौदा ही संख्या चौदा मन्वंतरांतील चौदा इंद्रांवरून आलेली असावी. सूर्यास्तानंतर मूर्तीचे विसर्जन करतात. [ वै. दे. अ. द.; लो. सा. रू.; प्रा. च. को.; वै. मा. ]

(२) संस्कृत भाषेचा एक व्याकरणकार. कथासरित्सागराच्या चौथ्या तरंगावरून कळते, की पाणिनीच्या पूर्वी एक व्याकरणकारांचा संप्रदाय होता. व्याडी, वररुची व इंद्रदत्त हे त्या संप्रदायातले प्रमुख होते. हे ऐंद्र व्याकरणकार म्हणून ओळखले जात. पाणिनीचे व्याकरण पुढे विद्वन्मान्य झाले व त्यामुळे हा संप्रदाय लुप्त झाला. बर्नेलच्या मते तोलकाप्पियम् या तमिळ व्याकरणात ऐंद्र पद्धतीचेच अनुकरण आहे. पाणिनी, कात्यायन, इ. व्याकरणकार प्राचाम्, एके, इ. शब्दांनी ज्या व्याकरणकाराचा उल्लेख करतात, तो हा इंद्रच असावा. इंद्राचा व्याकरणग्रंथ उपलब्ध नाही; पण अभिनव शाकटायनाच्या शब्दानुशासनात त्याचा उतारा पाहायला मिळतो. बोपदेवही आपल्या कविकल्पद्रुमात इंद्राचा उल्लेख करतो. इंद्र व इंद्रगोमी हे दोघे एकच होत. [ म. च. को. ]

**इंद्रगोप** (१) एक रत्न. याचा रंग पोपटाच्या चोचीसारखा असतो. नर्मदेच्या किनाऱ्यावर पूर्वी ही रत्ने मिळत असत. [ नवनीत, नोव्हेंबर १९५७ ]

(२) एक किडा. याला मृगाचा किडा असेही म्हणतात. हा तांबड्या रंगाचा असतो. हे किडे शेतांत दिसू लागले, की पृथ्वी ऋतुस्नात झाली असे समजतात व ते किडे दिसेनासे होईपर्यंत शेतांत नांगरणी करीत नाहीत.

**इंद्रजत्रा** नेपाळातील एक उत्सव. हा इंद्रोत्सव असून, तो भाद्रपद महिन्यात करतात. या दिवशी नेपाळातील नर्तक इंद्राचे मुखवटे घालून काळभैरवाला साष्टांग नमस्कार घालतात. जत्रेच्या दिवसांत एका सुंदर मुलीला कुमारिका देवतेचे प्रतीक समजून रथात बसवितात व तिची मिरवणूक काढतात. ही जत्रा आठवडाभर चालते.

**इंद्रजाल** याची व्याख्या अशी – 'इन्द्राणामिन्द्रियाणां जालं आवरकम्' ( = इंद्र अर्थात् इंद्रिये ( ज्ञानेंद्रिये ) यांना जे आवरण घालते, ते इंद्रजाल होय) (श. क.). सामान्यत: जादूविद्येला इंद्रजाल म्हणतात.

भ्रांतिकृत चमत्कार, वस्तू नाहीशी करणे किंवा तिचे रूपांतर करणे, या सर्व गोष्टी इंद्रजालात येतात. तंत्रग्रंथांत अशा अनेक विधींची वर्णने आढळतात. प्राचीन काळी अशी जादूविद्या ज्याला येत असे, त्याला लोक भीत व त्याच्या आज्ञेत वागत. राजसभेतही त्याला मान मिळत असे.

हे इंद्रजाल प्रथम एक चमत्कार या स्वरूपात होते. पुढे त्याला मंत्र-तंत्राची जोड मिळाली व ती अभिचार विद्या म्हणून प्रसिद्धी पावली. जारण, मारण, वशीकरण, स्तंभन, इ. कर्मे इंद्रजालविद्येची अंगे ठरली. पाहा– जादुविद्या. [प्रा. भा. क. वि.]

**इंद्रदमन** उत्तर भारततले एक पर्व. पावसाळ्यात ज्या दिवशी नदीचे पाणी पात्राची मर्यादा ओलांडून वाहू लागते, त्या दिवशी हे पर्व साजरे करतात. प्रयागात गंगा-यमुनांच्या संगमावर अशा दिवशी पिंपळाच्या डहाळीने वर्षाजलाला स्पर्श करतात व त्या दिवशी इंद्रदमन उत्सव करतात. याला देवदमन असेही नाव आहे. [ अ. अ. ]

**इंद्रद्युम्नसर** (१) अवंतीचा राजा इंद्रद्युम्न याने उत्कल प्रदेशातील जगन्नाथक्षेत्रात अश्वमेध यज्ञ केला. त्याने या यज्ञाचे अवभृथस्नान ज्या सरोवरात केले, ते इंद्रद्युम्नसर या नावाने प्रसिद्ध झाले. या सरोवरात स्नान व श्राद्ध पुण्यकारक मानतात – (ब्रह्म पु. ५१.२९-३०) [ हि. ध. ]

(२) गंधमादन पर्वताच्या दुसऱ्या अंगाला असलेले एक सरोवर. या सरोवरातून पावनी नदी उगम पावते, असे ब्रह्मांडपुराणात सांगितले आहे. इथे पांडूने तप केले, असा उल्लेख महाभारतात आहे. [ हि. ध.; पु. इं. ]

**इंद्रधनुष्य** आकाशात एका बाजूला सूर्य दिसत असताना दुसऱ्या बाजूला पाऊस पडत असेल तर, पावसाच्या जलधारांमध्ये एक भव्य, सप्तरंगी कमान दिसू लागते, तिला इंद्रधनुष्य म्हणतात. सूर्य ज्या दिशेला असतो, तिच्या विरुद्ध दिशेला ही कमान दिसते. सूर्याचे किरण जलबिंदूंमधून पार जाताना त्यांचे वक्रीभवन झाल्यामुळे हे सप्तरंगी धनुष्य

निर्माण होते. त्याच्याविषयी काही लोकसमजुती प्रचलित आहेत, त्या अशा –

हे इंद्राचे धनुष्य असून, पर्जन्याची मुक्तता करण्यासाठी तो ते सज्ज करतो. काही लोक याला सीतास्वयंवरप्रसंगी रामाने मोडलेल्या शिवधनुष्याचा तुकडा मानतात. याचे दर्शन काही लोक अशुभ मानतात व संकट टळावे म्हणून मडक्यावर मडकी आपटून ती फोडतात. अन्य काही लोक ते दिसताच इंद्राची पूजाही करतात. पावसाच्या कमीजास्तपणाची भविष्ये याच्या-वरून वर्तविली जातात.

**इंद्रध्वजोत्सव** वैदिक काळी इंद्र हा आर्यांचा सर्वप्रमुख देव होता. त्याच्या प्रीत्यर्थ प्राचीन काळचे लोक व राजे-महाराजे प्रतिवर्षी एक उंच स्तंभ उभारून त्याचा महोत्सव साजरा करीत. या उंच स्तंभाला इंद्रयष्टी असे दुसरे नाव होते. ऋग्वेदातल्या एका (ऋ. १.१०.१). ऋचेवरून या उत्सवाची सूचना मिळते, असे बार्नेटप्रभृती पाश्चात्य विद्वान म्हणतात.

या उत्सवाच्या उत्पत्तीसंबंधी दोन कथा उपलब्ध आहेत –

(१) चेदी देशाचा राजा उपरिचर वसू याने एकदा राज्याचा त्याग करून उग्र तप आरंभिले. त्या तपाने संतुष्ट होऊन इंद्राने त्याला एक विमान, एक वैजयंतीमाला व आर्तत्राणासाठी वेळूचा एक दंड, अशा तीन वस्तू दिल्या. वसूने तो आर्तदंड उभारून त्याला जरतारी कपडे वेढले व त्याला इंद्राचे प्रतीक मानून प्रजेसह त्याचा उत्सव केला. तो दिवस वर्षप्रतिपदेचा होता (म. भा. आदि. ६३).

(२) असुरांकडून पराभूत झाल्यावर इंद्र ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून विष्णूकडे गेला. विष्णूने इंद्राला एक ध्वज देऊन सांगितले, की 'या ध्वजाच्या प्रभावाने तुझा विजय होईल.' इंद्राने तो ध्वज फडकावून दैत्यांचा संहार केला. पुढे इंद्राकडून तो चेदिराज वसू याला मिळाला. त्याच्या पूजनाने वसूची भर-भराट झाली (बृ. सं. ४३).

भाद्रपद शु. अष्टमी ते पूर्णिमा हा या उत्सवाचा काल होय. 'शिलप्पधिकारम्' या तमिळ महाकाव्यात चैत्रपूर्णिमेपासून पुढे २८ दिवस एवढा याचा काल दिलेला आहे. जैनांच्या स्थानांग-सूत्रांत आश्विन शु. नवमी ते पूर्णिमा हा याचा काल सांगितला आहे. या उत्सवाचे विधान सामान्यतः पुढीलप्रमाणे आहे –

भाद्रपद शुद्ध अष्टमीस मिरवणुकीने वाजतगाजत रानात जाऊन सावर, चाफा, अर्जुन, कळंब यांपैकी एक वृक्ष निवडावा. यचा त्याची पूजा करून प्रार्थना करावी – 'हे वृक्षा, तू आम्हांला इंद्रध्वजासाठी आपला दंड दे.' दुसऱ्या दिवशी सकाळी तो वृक्ष तोडून त्याचे लांब खोड तासून नगरात आणावे. ५२ हात उंचीचा दंड उत्तम, ३२ हातांचा मध्यम व २२ हातांचा कनिष्ठ मानला जाई. नगरद्वारात किंवा राज-द्वारात तो ध्वजदंड उभारला जाई. त्याला वस्त्रालंकारांनी नटवीत. त्याच्या मुळाशी इंद्राची मूर्ती करून वसवीत. तिची विधियुक्त पूजा करून इंद्राच्या उद्देशाने बलिदानही करीत. या निमित्ताने नाट्य, नृत्य, इ. करमणुकीचे सामुदायिक कार्यक्रम होत. सैनिक आपापले शस्त्रकौशल्य दाखवीत. मल्ल कुस्त्यांच्या दंगली करीत. द्यूतही खेळत. भरत म्हणतो, की 'समुद्रमंथन' हे जगातले पहिले नाटक याच उत्सवाच्या निमित्ताने स्वर्गातल्या रंगभूमीवर करण्यात आले. ब्रह्मदेवाने ते लिहिले व गंधर्व आणि अप्सरा यांनी त्याचा प्रयोग केला.

इंद्रध्वज आणताना वाजतगाजत समारंभाने आणीत; पण विसर्जन करताना मात्र तो गुप्तपणे अरण्यात नेऊन टाकीत. विसर्जनासाठी तो नेला जात असता कोणीही त्याच्याकडे पाहू नये, असा समज असल्याचे 'मृच्छकटिक' नाटकावरून कळून येते (१०.७). कालिकापुराणातही (६०) याविषयी पुढील श्लोक दिलेला आहे –

उत्थापयेत् तूर्यरवैः सर्वलोकस्य वै पुरः
रहो विसर्जयेत् केतुं विशेषोऽयं प्रपूजने ॥

अर्थ – (इंद्रध्वज) सर्व लोकांसमक्ष वाजतगाजत उभारावा व त्याचे विसर्जन एकांती करावे. हा याच्या पूजनाचा विशेष आहे.

सातवाहन राजाच्या अमदानीत पैठण येथे हा उत्सव करण्याचा प्रघात होता. भाजे येथील शेवटच्या लेण्यात ऐरा-वतावर आरूढ झालेला इंद्र व त्याच्या मागे ध्वजधारी पुरुष असे शिल्प कोरलेले आहे, ते या प्रथेशी संबद्ध असावे.

पावसाळ्यांत पाडलेल्या पावसाबद्दल इंद्राला कृतज्ञता दर्श-विणे व शरद् ऋतूतही इंद्राने खरीपाच्या पिकांना अधूनमधून वृष्टी करून जीवन द्यावे, या दुहेरी उद्देशाने हा इंद्रध्वजोत्सव सुरू झाला असावा. यालाच इंद्रमहोत्सव, इंद्रमह, इंद्रयष्टी अशी अन्य नावे आहेत. [स्वा. के. अ. ग्रं.; गा. स.; ह. कु. प्रा. लो.]

**इंद्रपौर्णमासी** एक व्रत. भाद्रपद पूर्णिमेस उपवास व तीन दंपतींना भोजन व वस्त्रालंकार देणे, हा या व्रताचा विधी आहे. फल–मोक्ष. [हि. ध.]

**इंद्रप्रस्थ** पांडवांनी स्थापन केलेले नगर. या नगराला शक्रप्रस्थ, शक्रपुरी, शतक्रतुप्रस्थ आणि खांडवप्रस्थ अशीही नावे आहेत. महाभारतात इंद्रप्रस्थाचे सविस्तर वर्णन

दिले आहे. द्रौपदीचे स्वयंवर झाल्यावर तिला घेऊन पांडव हस्तिनापुराला यायला निघाले, तेव्हा धृतराष्ट्राला भीती पडली की आता कौरवांचे व पांडवांचे भांडण होईल. आणि म्हणून त्याने विदुराकरवी धर्मराजाला निरोप पाठविला, की हस्तिनापुराजवळ खांडववन किंवा इंद्रवन नावाचे अरण्य आहे; ते तोडून तुम्ही तिथे नवे नगर वसवा व राज्य करा. धर्मराजाने त्याप्रमाणे खांडववन जाळून तिथे नवीन नगर वसविले व त्याला इंद्रप्रस्थ किंवा खांडवप्रस्थ असे नाव दिले. इथेच युधिष्ठिराने राजसूय यज्ञ केला. हे नगर अत्यंत सुंदर होते. त्यामुळेच पुढे शिष्टाईच्या वेळी कौरवांकडे पांडवांनी जी पाच गावे मागितली, त्यांत या गावाचा क्रमांक पहिला होता. दिल्लीच्या दक्षिणेस एका कोसावर इंद्रपत नावाचे गाव आहे, तिथेच हे नगर होते.

द्वारका समुद्रात बुडून जाईल, या भीतीने कृष्णाने यादवांना इंद्रप्रस्थाला नेले (भाग. पु. १०.५८.१) व श्रीकृष्णाच्या मृत्यूनंतर अर्जुनाने वज्रनामक एका यादवाला इंद्रप्रस्थाच्या गादीवर बसविले (म. भा. मौसल ७.७२).

या इंद्रप्रस्थात इंद्राने अनेक याग केले, विष्णूकडून वर मिळविण्यासाठी अनेक वेळा तपश्चर्या केली व नारायणासमोर ब्राह्मणांना पुष्कळ दानधर्म केला. तेव्हापासून इंद्रप्रस्थ ख्यातनाम झाले, असे पद्मपुराणात सांगितले आहे.

धनंजय कोरव्व हा कुरुवंशीय राजा इंद्रपट्टाचा राजा होता व तक्षशिलेच्या विद्यापीठात अध्ययन केलेला विदुर हा पंडित त्याचा पुरोहित व प्रधान होता, असे जातकात सांगितले आहे (६). हा राजा अत्यंत उदार असून, त्याने आपला पांढरा हत्ती कलिंग देशातील ब्राह्मणांना त्यांच्या मागणीवरून दान दिला.

हुमायूं बादशहाने इथे एक किल्ला बांधला व त्याला 'दीन पनाह' असे नाव दिले. सांप्रत त्याला पुराणा किल्ला म्हणतात. हुमायूं या किल्ल्यातून पळून गेल्यावर त्याचा प्रतिस्पर्धी शेरशहा याने या किल्ल्याला शेरगड किंवा शाहागड असे नवे नाव दिले. याच किल्ल्याच्या आतील भागात किल्ला कोना मशीद व शेरमंडल अशा दोन जुन्या इमारती आहेत. यांपैकी किल्लाकोना मशीद ही तांबूस संगमरवराची असून, मोगल कालीन शिल्पकलेचा एक उत्कृष्ट नमुना मानला गेला आहे. **पाहा –** दिल्ली. [ म. ज्ञा. को.; इं. इं. २; पु. इं.; हि. ध. ]

**इंद्रभूती** (इ. स. चे ८ वे–९ वे शतक) एक प्रसिद्ध वज्रयानी ग्रंथकार. हा चौऱ्यायंशी सिद्धांतला बेचाळीसावा सिद्ध आहे. हा उड्डियान (स्वात) देशाचा राजा असून, पद्मसंभवाचा पिता होता. कंबलपा हा इंद्रभूतीचा गुरू होय. याने सम्ये या प्रसिद्ध विहाराची स्थापना केली, अशी समजूत आहे. तंजूर येथे याच्या तेवीस ग्रंथांचा अनुवाद मिळतो. कुरुकुल्लासाधन व ज्ञानसिद्धी हे याचे दोन संस्कृत ग्रंथ उपलब्ध आहेत. ज्ञानसिद्धी हा ग्रंथ वीस लहान-मोठ्या परिच्छेदांत विभागला असून, त्यात गुरुशिष्य, अभिषेक, साधना, इ. विषयांचे विस्ताराने विवेचन आहे.



इंद्रभूती

वज्रयानी साहित्यात इंद्रभूतीची बहीण लक्ष्मी अथवा लक्ष्मींकरा ही फार प्रसिद्ध आहे. उड्डियानमधील लंकापुरीचा राजा जालेंद्र याच्या मुलाबरोबर तिचा विवाह झाला होता. [ आ. सं.; ना. सं.; हिं. सा. बि. ]

**इंद्रभूती गौतम** (इ. स. पूर्व ६०७-५१५) याला गौतम असेही म्हणत. हा महावीराचा शिष्य व जैन धर्माचा पहिला प्रचारक होता. महावीराचे उपदेश एकत्रित करण्याचे काम याने केले. महावीराच्या ११ गणधरांपैकी हा एक होता. याचा जन्म मगधात व मृत्यू राजगृह प्रांतातल्या गणय या गावी झाला. [ म. च. को. ]

**इंद्रमातृ देवजामी** एक सूक्तद्रष्ट्री. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे त्रेपन्न क्रमांकाचे सूक्त हिने रचले आहे. इंद्र ही या सूक्ताची देवता असून, त्याची स्तुती हा सूक्ताचा विषय आहे. एक ऋचा (१०.१५३.२) अशी –

**त्वमिन्द्र बलादधि सहसो जात ओजसः ।**
**त्वं वृषन् वृषेदसि ॥**

अर्थ – हे कामपूरक इंद्रा, तुझे शत्रुजेते सामर्थ्य आणि धैर्य सुविख्यात आहे.

हे एक लघुसूक्त आहे. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा. ]

**इंद्रयज्ञ** एक नैमित्तिक याग. या यज्ञाचा विधी पुढीलप्रमाणे सांगितला आहे – हा यज्ञ भाद्रपद पौर्णिमेस करतात. यजमान इंद्रासाठी पायस व पुरोडाश तयार करून पुरोडाशाचे चार भाग अग्नीभोवती ठेवतो. दोन आज्यभाग झाल्यावर मग इंद्राला पायस अर्पण करतो. इंद्र, इंद्राणी, अज एकपाद्, अहिर्बुध्न्य व प्रोष्ठपद यांना आज्याहुती देतो. नंतर इंद्राला पुनश्च पायस समर्पितो. मग पुरोडाशाचे स्वतः सेवन

करून मरुतांना अश्वत्थाच्या पानावर बळी देतो. अश्वत्थ हे मरुतांचे निवासस्थान असल्यामुळे मरुतांसाठी त्याचे पान घेतात. बलिदानाच्या वेळी 'शुक्रज्योतिश्च, चित्रज्योतिश्च...' इ. मंत्र मोठ्याने व 'उग्रश्च भीमश्च...' इ. मनात म्हणायचे असतात. त्यानंतर ब्राह्मणांना भोजन घालून यजमान यज्ञ पूर्ण करतो (पार. गृ. सू. २.१५). [हि. ध.; इं. वे. क. सू.]

**इंद्रयाग** गोकुळात नंदादी गोप पर्जन्याधिपती इंद्राला संतुष्ट करण्यासाठी प्रतिवर्षी हा याग करीत असत. परंतु कृष्णाने त्यांना सांगितले, की 'पर्जन्य ही एक नैसर्गिक घटना असून, पाऊस पाडण्याचे श्रेय इंद्राला मुळीच नाही. तेव्हा इंद्रयाग करण्याऐवजी तुम्ही गायी, ब्राह्मण व पर्वत यांची पूजा करा.' गोपांनी त्याप्रमाणे सुरुवात केल्यावर इंद्र रागावला व त्याने जोराची पर्जन्यवृष्टी सुरू केली. त्यामुळे सर्व गोप भयभीत झाले. तेव्हा कृष्णाने आपल्या करंगळीवर गोवर्धन पर्वत उचलून धरला व त्याखाली सर्व गोपांना सुरक्षित ठेवले. सतत सात दिवस कृष्णाने गोवर्धन पर्वत उचलून धरलेला पाहून इंद्राला आश्चर्य वाटले व त्याने पर्जन्यवृष्टी थांबविली. नंतर कृष्णाने गोवर्धन पर्वताची पुनश्च त्याच्या जागी स्थापना केली (भाग. पु. १०.२४). [पु. इं.]

**इंद्र वैकुंठ** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील अठ्ठेचाळीस ते पन्नास अशी तीन सूक्ते याने रचली आहेत. इंद्र वैकुंठाने स्वमुखाने आपला पराक्रम या सूक्तांमधून सांगितला आहे. कवीची आत्मस्तुती म्हणून ही सूक्ते सर्वज्ञात आहेत. बृहद्देवतामते विकुंठा नावाच्या असुरस्त्रीने पुत्राच्या प्राप्तीसाठी तप केले असता, इंद्राने वैकुंठ इंद्र नावाने तिच्या पोटी जन्म घेतला (बृहद्दे. ७.५९-६०). याची एक ऋचा अशी – (ऋ. १०.४८.५)

**अहमिन्द्रो न परा जिग्य इद्धनं न मृत्यवेऽव तस्थे कदा चन।**
**सोममिन्मा सुन्वन्तो याचता वसु न मे पूरवः सख्ये रिषाथन ॥**

अर्थ – धनापहार आणि मृत्यू यांच्या अतीत असा मी सोमदात्या भक्तांना धन देतो. हे पुरु भक्तांनो, तुम्ही माझे सख्य तोडू नका.

प्रस्तुत सूक्तद्रष्ट्याच्या एका सूक्तात श्रुतर्वन आर्क्ष नावाच्या राजाला इंद्राने मदत केल्याचा उल्लेख आहे (१०.४९.५).

डॉ. व. ग. राहूरकर यांनी इंद्र वैकुंठाच्या ऐतिहासिक अस्तित्वाबद्दल शंका व्यक्त केली आहे. त्यांच्या मते ही सूक्ते कदाचित सप्तगू आंगिरसाने रचली असून, ती इंद्रमुखाने वदविली असावी. [प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ.]

**इंद्रव्रत** साठ संवत्सरव्रतांपैकी सत्तेचाळिसावे व्रत. वर्षाऋतूत उघड्या जागी निजणे व व्रताच्या अंती दुभती गाय दान देणे, असा याचा विधी आहे. फल – इंद्रलोकी निवास. (मत्स्य पु. १००.६९). [हि. ध.; पु. इं.]

**इंद्रसालगुहा** मगधातील अंबसद गावाच्या उत्तरेला वेदियक पर्वतात ही गुहा आहे. गुहेच्या दाराशी इंद्रसाल वृक्ष होता, त्यावरून गुहेला हे नाव मिळाले. गुहेत बुद्धाने इंद्राला 'सक्कपण्ह-सुत्तंत' निवेदन केले. [हि. जॉ. ए. इं.]

**इंद्रसावर्णी** चौदावा मनू. उरू, ब्रध्न, गंभीर, इ. त्याचे पुत्र, शुची हा त्याच्या कालातला इंद्र, अग्निबाहु, मागध, इ. ऋषी व बृहद्भानू हा अवतार होय. (भाग. पु. ८-१३.३३–३५). [पु. इं.; श. क.]

**इंद्रस्तुत** एक याग. काही मंत्रांचा फरक सोडल्यास हा याग जवळजवळ अग्निष्टुत यागासारखाच आहे. यात पंचदशस्तोम पद्धतीने मुख्यतः इंद्राची स्तुती केलेली असते. [म. ज्ञा. को.]

**इंद्राणी** इंद्रपत्नी व एक सूक्तद्रष्ट्री. ऋग्वेदात हिच्या अनेक ऋचा आहेत. सवतीचा नक्षा उतरावा म्हणून हिने तिच्यावर जडीबुटीचा काही प्रयोग केला आहे (ऋ. १०.१४५). दुसऱ्या एका सूक्तात हिची तेजस्विता प्रगट झाली आहे (ऋ. १०.८६). आपल्यापेक्षा वृषाकपीला इंद्र अधिक मान देतो, हे सहन न होऊन ती इंद्रावर रागावते. मानवांप्रमाणेच देवसमाजातही कौटुंबिक कलह चालत होते, हे तिच्या सूक्तावरून कळते.

हिला शची असे दुसरे नाव आहे. ही अत्यंत सुंदर व आकर्षक असल्यामुळे अनेक देवतांमधून इंद्राने हिला पसंत केले, असे तै. ब्राह्मणात सांगितले आहे.

ही पुलोमा दैत्याची मुलगी होती, असे रामायणात व पुराणांत म्हटले आहे. इंद्राने हिला पळवून नेले व पुलोम्याने आपल्याला शाप देऊ नये, म्हणून त्याला ठार मारले. इंद्राबरोबर ही त्याच्या सभेत बसत असे. हिने पुत्रेच्छा धरून गौरीव्रत केले व त्यामुळे तिला जयंत हा पुत्र झाला (भवि. पु. ब्राह्म. २२).

इंद्राणीला अखंड सौभाग्यवती मानलेले आहे. म्हणून लग्नात वाङ्‌निश्चयाच्या वेळी वधूकडून तिची पूजा करवितात.

विदर्भात इंद्राणीचे मंदिर आहे. रुक्मिणी आपल्या विवाहपूर्वी याच मंदिरात तिच्या पूजेसाठी गेली होती. इंद्र-इंद्राणी या

विदर्भातील काही लोकांच्या कुलदेवता आहेत. (भाग. पु. १०. ५३. ४९-५०). ओडिसात इंद्राणीची एक प्रचंड मूर्ती सापडली आहे. [सु. वि. को.; पु. इं.; क्ला. डि. हिं. मा.; प्रा. च. को.]

**इंद्रिय** 'स्वविषयग्रहणलक्षणानीन्द्रियाणि' (=स्वतःच्या विषयांचे ग्रहण करणे), हे इंद्रियांचे लक्षण होय (वात्स्या. १. १. १२). त्वक्, चक्षू, श्रोत्र, जिव्हा व घ्राण, ही इंद्रिये असून, त्यांच्या द्वारे आपल्याला शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध, या बाह्य विषयांचे व मनाच्या द्वारे सुखदुःखादी आभ्यंतर विषयांचे ज्ञान होते. इंद्रिये नसती तर विषयांचे ज्ञान अन्य कोणत्याही साधनाने झाले नसते. म्हणूनच तर्कभाषेत 'शरीरसंयुक्तं ज्ञानकरणमतीन्द्रियम्' (=इंद्रिय हे शरीराशी संयुक्त असे अतींद्रिय (इतर इंद्रियांनी ग्रहण न होणारे) व ज्ञानाचे करण होय), अशी इंद्रियाची व्याख्या केली आहे.

न्यायशास्त्रानुसार इंद्रियांचे बहिरिंद्रिय व अंतरिंद्रिय असे दोन भेद आहेत. चक्षू, रसना, घ्राण, त्वक् व श्रोत्र ही बहिरिंद्रिये असून, मन हे अंतरिंद्रिय आहे. मन हे अणुपरिमाण असून, हृदयाच्या आत असते.

सांख्यमतात इंद्रियांची संख्या अकरा मानली आहे. पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये व एक मन मिळून ती अकरा होतात. वर उल्लेख केलेली पाच ही ज्ञानेंद्रिये असून मुख, हात, पाय, गुदद्वार व जननेंद्रिय ही पाच कर्मेंद्रिये होत.

पाणिनीने इंद्रिय शब्दाची व्युत्पत्ती इंद्र शब्दावरून दिली आहे, ती अशी –

इन्द्रियम् इन्द्रलिंगम् इन्द्रदृष्टम् इन्द्रसृष्टम् इन्द्रजुष्टम् इन्द्रदत्तम् इति वा। (अष्टा. ५. २. ९३)

इंद्रलिंग – इंद्रिये ही इंद्राचे बाह्य लिंग किंवा प्रतीके होत. जोपर्यंत इंद्रिये स्वकर्म करीत असतात, तोपर्यंत इंद्र शरीरात वास्तव्य करतो.

इंद्रदृष्ट – इंद्राने इंद्रिये पाहिली म्हणजे त्यांचा अनुभव घेतला, म्हणून त्यांना इंद्रिय हे नाव पडले. यास्काच्या मतानुसार हे आचार्य औपमन्यवाचे मत होते.

इंद्रसृष्ट – इंद्राने निर्माण केली, म्हणून त्यांना इंद्रिय हे नाव मिळाले. हे मत आग्रायणाचे आहे, असे यास्क म्हणतो.

इंद्रजुष्ट – इंद्राच्या प्रिय भावनांनी युक्त असल्यामुळे यांना इंद्रिय हे नाव मिळाले. इंद्र जेव्हा इंद्रियांच्या बरोबर असतो, तेव्हा तो सर्वांत जास्त प्रसन्न असतो.

इंद्रदत्त – इंद्राने इंद्रियांना आपापल्या विषयांच्या उपभोगाचे प्रदान केले आहे, म्हणून त्यांना इंद्रिय असे नाव आहे. साधकाने इंद्रियांवर विजय मिळविणे, ही मोक्षमार्गातली पहिली पायरी मानलेली आहे. [हिं. वि. को.; पा. का. भा.]

**इ** देवनागरी वर्णमालेतील तिसरा स्वर. याचे स्थान तालू आहे. उदात्तानुदात्त-स्वरितभेदाने तो त्रिविध होतो. अनुनासिक व निरनुनासिक असे त्याचे आणखी दोन भेद होतात. हा परमानंददायक, सुगंधी फुलाच्या कांतीचा, ब्रह्माविष्णुमहेशात्मक, शक्तिमय व गुणत्रयसमन्वित असल्याचे कामधेनुतंत्रात सांगितले आहे. वर्णाभिधानतंत्रात सूक्ष्मा, शाल्मली, विद्या, इ. याची अनेक नावे दिली आहेत. मातृकान्यासात याचे स्थान उजव्या डोळ्यावर येते. हा ब्रह्मदेवाच्या तिसऱ्या

'इ'च्या रूपाचा विकासक्रम

मुखापासून उत्पन्न झाला व यजुर्वेद याच्यापासून उत्पन्न झाला. याची पहिली अवस्था इ. सनपूर्व ३ऱ्या शतकातील गिरनार येथील अशोकाच्या शिलाशेखात दिसते, दुसरी इ. स. ४९३मधील जयनाथाच्या दानपत्रावरून कळते व तिसरी राजा जाजल्लदेव याच्या काळातील लेखात दिसते. चौथी चीरवा गावी सापडलेल्या, मेवाडचा अमरसिंह याच्या काळातल्या (इ.स.चे १३ वे शतक) लेखात आढळते. [श. क.; म. ज्ञा. को.]

**इकबाल सर मुहम्मद** (इ. स. १८७३-१९३८) एक तत्त्वज्ञ व कवी. सियालकोट (पश्चिम पंजाब, पाकिस्तान) येथे याचा जन्म झाला. त्याच्या पूर्वजांचे आडनाव सप्रू असून, ते काश्मीरी ब्राह्मण होते. 'इकबाल' म्हणजे भाग्य. हे कवीचे टोपण नाव आहे. इ. स. १८९९ साली त्याने पंजाब विद्यापीठाची एम. ए. ही पदवी मिळविली. नंतर त्याने प्राध्यापकाची नोकरी केली.

इस्लामच्या जागृतीवर त्याचा भर असला, तरी त्याच्या विचारांत राष्ट्रीयताही होती. इकबाल हा फार्सी, उर्दू व हिन्दी भाषांतील श्रेष्ठ दर्जाचा कवी व तत्त्वज्ञानी होता. त्याची 'तराना-ए-हिन्दी' ही कविता प्रसिद्ध आहे, ती अशी –

सारे जहाँ से अच्छा हिंदोस्ताँ हमारा
हम बुलबुलें हैं इसकी, यह गुलिस्ताँ हमारा
गुर्बत में हों अगर हम, रहता है दिल वतन में
समझो वहीं हमें भी दिल हो जहाँ हमारा
परबत वो सबसे ऊँचा, हमसाया आसमाँ का

वह संतरी हमारा, वह पासबाँ हमारा
गोदीमें खेलती हैं इसकी हजारों नदियाँ
गुलशन है जिनके दमसें रश्के जिनाँ हमारा
ऐ आबे रूदे गंगा ! वो दिन हैं याद तुझको
उतरा तेरे किनारे जब कारवाँ हमारा
मजहब नहीं सिखाता आपसमें बैर रखना
हिन्दी हैं हम, वतन है हिन्दोस्ताँ हमारा
यूनानो मिस्त्री रूमा सब मिट गये जहाँ से
अबतक मगर है बाक़ी नामोनिशाँ हमारा
कुछ बात है कि हस्ती मिटती नहीं हमारी
सदियों रहा है दुश्मन दौरे जमाँ हमारा
इकबाल कोई महरम अपना नहीं जहाँमें
मालूम क्या किसीको दर्दे निहाँ हमारा

अर्थ – साऱ्या जगात आमचा हिंदुस्थान चांगला आहे. हा आमचा बगीचा असून आम्ही या बागेतील बुलबुल आहो. आम्ही परदेशात असलो, तरी आमचे हृदय या स्वदेशातच असते. जिथे आमचे अंत:करण असेल, तिथेच आम्ही आहो असे समजा. आकाशाचा शेजारी असलेला तो सर्वांत उंच पर्वत हिमालय, आमचा रक्षक व पहारेकरी आहे. या भारताच्या मांडीवर हजारो नद्या खेळत असतात. त्यांच्यामुळे आमचा हा बगीचा स्वर्गालाही हेवा वाटावा असा सुंदर बनलेला आहे. हे प्रवाहिनी गंगे, तुझ्या काठी आम्हा आर्यांचा समुदाय उतरला, ते दिवस तुला आठवतात काय ? खरा धर्म हा आपसांत वैर करण्यास शिकवीत नाही. आम्ही हिंदी आहो आणि हिंदुस्थान ही आमची मातृभूमी आहे. ग्रीस, इजिप्त व रोम हे जगातून नाश पावले. परंतु आमची नावनिशाणी मात्र अद्यापि शिल्लक आहे. शतकानुशतके कालचक्राने आमच्याशी वैर केले; तरी आमचे अस्तित्व नष्ट होत नाही, ही काही मामुली गोष्ट नव्हे. इकबाल म्हणतो, जगात आमचा कोणी मित्र नाही; त्यामुळे आमचे झाकलेले दुःख कोणाला माहीत असणार ?

इकबालने 'खुदी' विषयक एक सिद्धांत मांडला होता. इकबालची खुदी म्हणजे आत्मा नसून, ते माणसाचे व्यक्तित्व आहे. इकबाल आत्मा व शरीर हे दोन न मानता एकच मानतो. त्याने 'असरारे खुदी' (जीवाची रहस्ये) हे पर्शियन काव्य लिहिले आहे. [ सं. चा. अ.; मुलांचे इकबाल ]

## इकरी बोंगा

सखोल पाण्यातील भुताला मुंड आदिवासी इकरी बोंगा म्हणतात. सिङबोंगाने असुरांना ठार मारल्यावर आकाशात प्रयाण केले व जाताना एक ग्रामरक्षक पिशाच म्हणून इकरी बोंगाची पृथ्वीवर नेमणूक केली. असुर दंतकथांत सांगितले आहे, की जे कोणी खोल पाण्यात बुडून मेले ते सगळे इकरी बोंगा झाले. काही खेड्यांत इकरी बोंगाची खास जागा असते. त्या जागेत कोणीही पेरणी करता कामा नये, असा नियम आहे. त्या जागेतील झाडेही जमातीच्या पुढाऱ्याच्या परवानगीशिवाय कुणाला तोडता येत नाहीत.

इकरी बोंगाविषयी ज्या काही दंतकथा उपलब्ध आहेत, त्यांवरून तो एक दुष्ट वेताळ आहे, असे वाटते. जादूटोणा करणाऱ्या लोकांना तो प्रसन्न होतो. तो नेहमी दुष्ट कारवाया करीत असतो. [ एन्सा. मुंडा ]

## इख्लाष

मुसलमान लोक सर्व धार्मिक कृत्ये एकान्तात करतात. त्यामुळे फक्त परमेश्वराला ती दिसतात; इतरांना नाही. या प्रथेला इख्लाष असे नाव आहे. [ हि. इ. ]

## इचलकरंजीकर, बाळकृष्णबुवा

(इ. स. १८४९-१९२७) हिंदुस्थानी संगीताचे थोर आचार्य व श्रेष्ठ गायक. यांचे घराणे मूळचे कोल्हापूर जवळच्या चंदूर गावचे. यांचे वडील रामभट हेही प्रसिद्ध गवई होते. बाळकृष्णबुवा पंधरा वर्षांचे असताना त्यांचे आई-वडील एका पाठोपाठ निवर्तले. त्यानंतर ते आपल्या चुलत्यांकडे राहू लागले. परंतु बाळकृष्णबुवांची गाणे शिकण्याची उत्कट इच्छा चुलत्यांना न आवडल्यामुळे त्यांनी बाळकृष्णबुवांना घरातून घालवून दिले.

मग बाळकृष्णबुवांनी अत्यंत हालअपेष्टा सोसून आणि भारतभर भ्रमंती करीत आपले संगीताध्ययन पुरे केले. विष्णुबुवा जोगळेकर, अलिदातखाँ, भाऊबुवा कागवाडकर, वामनबुवा कवठेकर, देवजीबुवा, वासुदेवबुवा जोशी, मुहम्मद खाँ, इ. श्रेष्ठ गवयांनी आणि संगीतसम्राटांनी बाळकृष्णबुवांना विद्यादान केले.

संगीतविद्या हस्तगत केल्यानंतर बाळकृष्णबुवांनी तिच्या प्रसारासाठी अनेक उद्योग आरंभले. ठिकठिकाणी हिंडून सुरेल गळ्याची मुले त्यांनी एकत्र आणली व त्यांना गायनाचे शास्त्रोक्त शिक्षण दिले. त्यासाठी त्यांनी मुंबईला एक 'गायनसमाज' नावाची संस्था चालवली. या संस्थेत रामकृष्णपंत भांडारकर, महादेव चिमणाजी आपटे, न्यायमूर्ती तेलंग, इ. विविध क्षेत्रातील नामवंत मंडळी संगीताचे शिक्षण घेत. या संस्थेद्वारा संगीतदर्पण नामक एक मासिकही चालवले जाई.

पं. गुंडोबुवा इंगळे, विष्णू दिगंबर पलुस्कर, अनंत मनोहर जोशी, यशवंतबुवा मिराशी, इ. नंतरच्या काळी गाजलेले गवई हे सारे बाळकृष्णबुवांचेच शिष्योत्तम होत.

बाळकृष्णबुवांनी संगीतविद्या आत्मसात करण्यासाठी आणि तिचा प्रसार करण्यासाठी केलेल्या परिश्रमांची तुलना पुराणकालातील भगीरथाशी केली जाते. गायनविद्येवर त्यांनी भरपूर कीर्ती आणि संपत्ती प्राप्त केली. [अ. च. को.]

**इच्छ** सौराष्ट्रातील भाटिया लोकांतला लग्नापूर्वीचा एक सोहळा. वधू-वरांना आपापल्या घरी कणकेच्या स्वस्तिकावर बसवून मंगल तिलक लावतात व श्रीफळासह लग्नपत्रिका त्यांच्या हाती देतात. या सोहळ्याला इच्छ असे नाव आहे. [ल. वि. सो.]

**इझावा** तिरुवितांकुर (त्रावणकोर) भागातील एक जात. यांना इळवा असेही म्हणतात. मध्य व उत्तर त्रिवांकुरमध्ये यांना चोवा असे म्हणतात. तमिळभाषी शानार व मलबारातील थिय्या यांच्याशी या जातीचा संबंध असावा, असे मानतात. इझावा लोक सिंहलद्वीपातून इकडे आले असावे. कारण इझाम या सिंहली बेटातील लोक ते इझावा, असे काही भाषाशास्त्रज्ञ मानतात. डॉ. काल्डवेलनेही या लोकांना बाहेरच्या देशातलेच मानले आहे. मध्ययुगात त्रिवांकुरचे राजे नायरांप्रमाणे इझावांकडूनही लष्करी कामे करून घेत.

इझावांचे तीन वर्ग पडतात– (१) पांडी किंवा तमिळ जिल्ह्यातील इझावा (२) मलयाळम् इझावा किंवा चोवा व (३) मलबारचे थिय्या. श्रीमंत व मध्यम स्थितीतील इझावा पुरुष देखणे असतात व ते नायरांसारखे दिसतात. इझावांमध्ये 'मरुमक्कतायम्' या कायद्याप्रमाणे वारसा मुलाकडे न जाता मुलीकडे येतो.

नारळाची व ताडीची झाडे लावणे व दारू गाळणे हा यांचा मुख्य धंदा आहे. सुपारी, चाफा व लिंबे यांची झाडे इझावांनीच प्रथम केरळात आणली. यांच्या स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीने कामे करतात.

इझावांची घरे नायरांच्या घरांप्रमाणे पूर्वाभिमुख असतात. त्यांची वेषभूषा व दागिनेही नायरांच्याच पद्धतीचे असतात. हे लोक मांसभोजी आहेत.

**देवधर्म** – इझावांचे काही प्रचलित धार्मिक विधी पुढीलप्रमाणे– (१) भाताच्या पहिल्या पेंढीचे दाणे दुसऱ्या पेंढीवर टाकतात व ते झाकतात. (२) पहिल्या पिकाची पेंढी प्रमुख जमीनदाराला देतात व त्याने ती दुसरे पीक निघेपर्यंत जपून ठेवायची असते. (३) थोडेसे धान्य ताडीत भिजवून क्षेत्रदेवतेला अर्पण करतात. या वेळी पुजारी 'शेतात चांगले पीक येऊ दे', असा उद्घोष करतो.

पुष्कळ ठिकाणी यांची स्वतःची देवळे असून, तिथले पुरोहितही इझावाच असतात. भद्रकाली ही बहुतेकांची उपास्यदेवता आहे; परंतु भद्रकालीला पशुबळी द्यावा लागतो तो टळावा म्हणून कित्येक देवळांत तिच्या ऐवजी सुब्रह्मण्याची स्थापना केलेली असते. याशिवाय ते शास्ता, वीरभद्र व माता यांनाही भजतात.

**विवाहप्रथा** – मुलगी वयात आली म्हणजे नायर लोकांतल्याप्रमाणे तिच्या गळयात ताळी (मंगळसूत्र) बांधण्याचा समारंभ करतात. ज्याने तिच्या गळयात ताळी बांधली, तोच तिचा नवरा होतो, असे मात्र नाही. वस्त्रदान-समारंभ झाला, की मग मुलीचे खरे लग्न झाले असे समजतात. वस्त्र देणारा तो पुरुष ताळी बांधणाऱ्याहून वेगळाही असू शकतो. इझावांतील न्हावी स्त्रीला धार्मिक संस्कारांत बरेच महत्त्व असते. ही स्त्री नवरीच्या मनगटाभोवती 'प्रतिसरम्' बांधते व नवऱ्या मुलाच्या हाती ताळी देते. वस्त्रदानाच्या वेळी वधूकडील मंडळींना ऐपतीप्रमाणे हुंडा द्यावा लागतो. मुलगी वयात येण्यापूर्वी तिचे लग्न झाले तर त्या लग्नाला 'ताळिकेटटु कल्याणम्' व नंतर झालेल्या लग्नाला 'संबंधम्' म्हणतात.

**प्रसूतिप्रथा** – गर्भवती स्त्रीच्या सातव्या महिन्यात पुढील संस्कार करतात – एका संध्याकाळी गर्भवतीला घराच्या दक्षिण दिशेला असलेल्या चिंचेच्या झाडाकडे नेतात. नंतर ती स्त्री एका दोऱ्यात चांदीचे कडे ओवून तो दोरा चिंचेच्या झाडाभोवती गुंडाळते. दुसऱ्या दिवशी तो दोरा काढून घेतात. तिचा पती तिला चिंचेची पाने खायला देतो. घरी गेल्यावर तिला चिंचेचे पाणी प्यायला देतात. नंतर पुरोहिताची पत्नी गर्भवतीच्या बेंबीवर विडयाच्या पानाने थोडे तेल लावते. तेल ज्या तऱ्हेने वाहू लागेल, त्यावरून मुलगा होणार का मुलगी, ते ठरवितात. मुलाचे बारसे अठ्ठाविसाव्या दिवशी करतात. त्या दिवशी मुलाच्या पायांत लोखंडाचे तुकडे ओवून बांधतात. सहाव्या महिन्यात उष्टावणाच्या वेळी लोखंडाचे दागिने काढून त्या जागी सोन्या-चांदीचे घालतात.

**मर्तिकप्रथा** – मृताच्या पावलांना गंध लावून त्याचे ठसे एका फळीवर उमटवितात व ती फळी घरात जपून ठेवतात. फळीवर मृताचे नाव व मृत्युतिथी लिहितात. मृताला जाळतात; पण गर्भवती किंवा मुले मृत झाल्यास त्यांना मात्र पुरतात. [का. ट्रा. स. इं.]

**इट भार्गव** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील १७१वे सूक्त याने रचले आहे. इंद्रस्तुती हा सूक्ताचा विषय आहे. इंद्राने याच्या रथाचे रक्षण केले, असे १ल्या

ऋचेत म्हटले आहे. त्याची एक ऋचा (१०.१७१.२) अशी –

त्वं मखस्य दोधतः शिरोऽव त्वचो भरः ।
अगच्छः सोमिनो गृहम् ॥

अर्थ – हे भक्तांच्या घरी जाणाऱ्या, सोमप्राशक इंद्रा, देवलोकपलायनेच्छू, मनुष्यरूपधारी यज्ञाचे मस्तक व कातडे तू हरण केलेस.

या ऋचेत धनुर्धारी पुरुषरूपी यज्ञदेवाचा (विष्णूचा) इंद्राने शिरच्छेद केल्याचा निर्देश आहे, असे अभ्यासकांचे मत आहे. पौराणिक साहित्यातील हयग्रीव अवताराचा हा पहिला निर्देश इंद्र-विष्णू विरोधाचा द्योतक होय, असे मानतात. या सूक्तात कविनामाचा आढळ होतो. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा. ]

**इडक्क** मलबारमध्ये प्रचलित असलेला एक ढोल. हे वाद्य वाळूच्या घटिकापात्राच्या आकाराचे असून, ते लाकडाचे बनविलेले असते. दोन वाटोळी कडी घेऊन, त्यांत चामडे बसवून, ती कडी दोन्ही बाजूंवर घट्ट बसवितात. त्या कड्यांना दोऱ्या आवळलेल्या असतात. हाताने दोऱ्या दाबून वादक चामड्याला ताण देतो.



इडक्क

हे वाद्य शारिके (छडी)ने वाजवितात. यावर निरनिराळे स्वर स्पष्ट काढता येतातच; शिवाय एका सप्तकातील साधी गीतेही वाजविता येतात. दोऱ्यांवरील हाताचा दाब कमीजास्ती करून स्वराची उंची कमीअधिक करण्यात वादकाचे कौशल्य दिसून येते.

इडक्क हे एक संमिश्र स्वरूपाचे वाद्य आहे. त्याच्या दोन्ही तोंडांवर व्यासाशी समांतर दोन तांती लावलेल्या असतात. त्यांचे व चामड्याचे मिळून जे कंपन होते, त्यामुळे ध्वनी उत्पन्न होत असतो. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**इडली व दोशे** कर्नाटक व द. भारत या प्रदेशात इडली व दोशे यांचा सर्रास प्रचार असून, महा-राष्ट्रातही हे पदार्थ लोकप्रिय झाले आहेत. इ. स. ११०० ते १६०० या कालातील या इडली-दोश्यांचा इतिहास आता उपलब्ध झाला आहे.

सोमेश्वराच्या (इ. स. ११३०) मानसोल्लास या ग्रंथा-तल्या अन्नभोग या प्रकरणात इडली व दोशे यांचा उल्लेख आला आहे. तिथे त्यांची कृती दिली आहे, ती अशी –

विदलं चणकस्यैवं पूर्वसंभारसंस्कृतम् ।
ताप्यां तैले (ल) विलिप्तायां धोसकान् विपचेद् बुधः ॥
माषस्य राजमाषस्य वट्टाणस्य च धोसकान् ।
अनेनैव प्रकारेण विपचेत् पाकतत्त्ववित् ॥

अर्थ – चण्यांच्या डाळीचे चांगले पीठ तयार करून घेऊन तेलाचा लेप दिलेल्या तव्यावर पाकवेत्त्याने धोसक (दोशे) भाजावे. उडीद, चवळी व वाटाणे यांचेही अशाच प्रकारे पाक-तत्त्ववेत्त्याने दोशे तयार करावे.

इडरिका किंवा इडली हिची पाकक्रिया मानसोल्लासात पुढीलप्रमाणे दिली आहे –

अम्लीभूतं माषपिष्टं वटिकासु विनिक्षिपेत् ।
वस्त्रगर्भाभिरन्याभिः पिधाय परिपाचयेत् ॥
अवतार्यात्र मारीचं चूर्णितं विकिरेदनु ।
घृताक्ता हिंगुसर्पिभ्यां जीरकेण च धूपयेत् ।
सुसिता धवला (:) श्लक्ष्णा एता इडरिका वराः ॥

अर्थ – उडदाचे पीठ आंबवून ते गोल वाट्यांत घालावे व ते वस्त्रात लपेटून शिजवावे. नंतर खाली उतरून त्यांना तूप माखावे व त्यांवर काळ्या मिरीची पूड पसरावी. हिंग व जिरे यांची तुपातली फोडणी द्यावी. अशा तयार झालेल्या स्वच्छ पांढऱ्या इडरिका मोठ्या साजूक लागतात.

नारायण व्यास (इ. स. चे १४ वे शतक) याने रचलेल्या 'ऋद्धिपुरवर्णन' या ग्रंथात इडलीचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे –

पूर्ण चंद्राचा अनुकारी
चोखलापणे भजिजे इडारी

एकनाथांच्या रुक्मिणीस्वयंवरातही 'सुकुमारा इडुरिया' असा उल्लेख आहे.

याशिवाय रघुनाथ नवहस्त (नवाथे) यांच्या भोजन-कुतूहल या ग्रंथात धिरडी, पूरिका, गोधूमफेणी या पदार्थांबरोबर इडलीचे वर्णन आले आहे. [ नवभारत, एप्रिल १९५७ ]

**इडसून** यज्ञात लागणारी एक लाकडी फळी. या फळीवर पशूंची अंगे ठेवून स्वधितीने त्यांचे अवदान

(हवनासाठी योग्य असा भाग) घेतात. बौधायन सूत्रात इड-सूनाचा उल्लेख आहे (४.८). इतर श्रौतसूत्रांत लाकडी फळीऐवजी पिंपरीची फांदी घ्यावी, असे सांगितले आहे.

**इडा(ळा)** (१) ऋग्वेदात 'इडा' शब्दाचा अर्थ अन्न, श्रमपरिहारक द्रव्य किंवा दुग्धनिषेक असा आहे. परंतु नंतरच्या वाङ्मयात त्याला स्तवनस्त्रोत हा अर्थ प्राप्त झाला. इळेलाच वाग्देवी असेही म्हटले आहे. इळा ही पृथ्वीची अधिष्ठात्री देवता आहे, असे सायणाचार्य म्हणतात (ऋ. ५.४१.१९ वरील भाष्य).

प्रलयात आश्रय केलेल्या पर्वतावरून खाली उतरल्यानंतर मनूने संततीसाठी यज्ञ केला, तेव्हा यज्ञकुंडातून जी एक कन्या वर आली, तिचे नाव इळा होते, असे श. ब्राह्मणात सांगितले आहे. ती मित्रावरुणांच्या अंशाने झाल्यामुळे तिच्यावर त्यांचा हक्क होता; पण तिने आपल्या पित्याचा, मनूचा त्याग केला नाही. मनू तिच्यासह राहू लागला व तिने मनूची वंशवृद्धी केली (श. ब्रा. १.६.३.७-११).

तै. ब्राह्मणात (१.१.४) इडा व मनू यासंबंधीं पुढील माहिती आहे – मनूची संबंधी व यज्ञतत्त्वांचे प्रकाशन करणारी इडा नामक एक स्त्री होती. देवासुरांनी अग्न्याधान केले, असे कळल्यावरून ती ते पाहण्यास गेली. तिने पाहिले की दोघांचाही अग्निस्थापनेचा क्रम चुकला आहे. मग ती मनूकडे गेली व म्हणाली, 'देवासुरांप्रमाणे तुझा यज्ञ निष्फळ होऊ नये, म्हणून मी अग्नींची योग्य क्रमाने स्थापना करते,' त्याप्रमाणे तिने गार्हपत्य, दक्षिणाग्नी व आहवनीय अशा क्रमाने अग्नींची स्थापना केली. त्यामुळे मनूचा यज्ञ सफल होऊन तो प्रजा व पशू यांनी समृद्ध झाला.

मनू यज्ञ करीत असल्यामुळे देवांना ऐश्वर्य प्राप्त झाले. एकदा इडा मनूकडे गेली असता देवांनी प्रत्यक्षपणे व असुरांनी अप्रत्यक्षपणे तिला आपल्याकडे बोलावले. पण इडा देवांकडे गेली; त्यामुळे सर्व प्राणीही असुरांचा त्याग करून देवांकडे गेले (तै. सं. १. ७. १).

पुराणांत इडा ही वैवस्वत मनूची मुलगी, बुद्धाची पत्नी व पुरुरव्याची माता मानलेली आहे.

(२) शरीराच्या उजव्या भागात असणाऱ्या एका नाडीला इडा म्हणतात.

(३) पंच संवत्सरांत एक इडा नामक संवत्सर मानले आहे. [प्रा. च. को.; वै. इं.; म. ज्ञा. को.; क्ला. डि. हिं. मा.]

**इडापात्र** एक यज्ञीय उपकरण. हे अश्वत्थ वृक्षाचे बनवितात. हे चार आंगळे रुंद व यजमानाच्या पायाएवढे किंवा एक अरत्नी लांब असते. त्याचा दांडा चार आंगळे लांब असतो. हविःशेष एका पात्रात घेऊन त्यावर इडेचे आवाहन करतात. हा हविःशेष ज्या पात्रात ठेवतात त्याला इडापात्र म्हणतात. [हि. ध.]



**इडावत्सर** पंचसंवत्सरात्मक युगाचे तिसरे वर्ष. याला इद्वत्सर असेही म्हणतात (भाग. पु. ३.११.१४).

**इडिग** तमिळनाडूमधील उत्तर अर्काट व चिंगलपेट जिल्ह्यांतील जात. हे लोक स्वतःला व्यासाचे वंशज मानतात. उडू इडिग व बालिज इडिग असे यांचे दोन भेद आहेत. यांचा मुख्य धंदा खजूर व ताडी काढणे, हा आहे. दर रविवारी हे ताडीच्या कलशांची पूजा करतात. एळ्ळम्म ही यांची मुख्यदेवता. ते वर्षप्रतिपदेच्या दिवशी तिला कोंबड्याचा बळी देतात. यांचे पुरोहित ब्राह्मण असतात. इडिग लोक मृताला पुरतात. काही प्रांतांत यांना चेट्टी असेही म्हणतात. [का. ट्रा. स. इं.]

**इडेकट्टू सिद्धर** द. भारतातील एक सिद्ध कवी. दोन गवळ्यांच्या संवादाच्या रूपाने याने आपली ग्रंथरचना केली आहे. कवीचे मन बालकाच्या मनाप्रमाणे सरळ आहे व हीच सरलता त्याच्या काव्यातही दृग्गोचर होते. त्याचे आध्यात्मिक व योगविषयक प्रतिपादन सुलभ आहे. मन हे एक पिशाच आहे, असे कल्पून त्याने मनाला उपदेश केला आहे. केवळ योगसामर्थ्याने सिद्धी मिळत नाही; तर त्यासाठी आत्मज्ञानाचीही जरुरी आहे, असे याचे मत आहे. [द. द.]

**इणंगू** केरळातील नायरांच्या मातृसत्ताक कुटुंबसंस्थेला तरवाड म्हणतात. अनेक तरवाड मिळून जो एक गट बनतो, त्याला इणंगू असे नाव आहे. एका तरवाडात मंगल कार्य व्हायचे असेल, तर इणंगूतील इतर तरवाड त्याला मदत करतात. अशा गटातील तरवाडांमध्ये रोटीबेटी व्यवहार होऊ शकतो. ताळिकेट्टु कल्याणम् या समारंभात ताळी बांधण्यासाठी इणंगु-गटांतील कुटुंबांतल्या मुलाची निवड पुष्कळ वेळा केली जाते. पाहा – तरवाड, ताळिकेट्टु कल्याणम् [सो. चें. म.]

**इतिहास** 'इति ह आस' = असे घडले, अशी या शब्दाची व्याख्या आहे. पुरावृत्त, प्राचीन कथा असेही याचे अर्थ आहेत. वाङ्मयाचा एक प्रकार म्हणून याचा वैदिक साहित्यात अनेकदा उल्लेख आढळतो.

इतिहास या शब्दाच्या अर्थाविषयी भिन्न भिन्न मते आहेत.

याविषयी दुर्गाचार्य (नि. २.१० वृत्ति) म्हणतो ते असे –

**इति हैवमासीदिति यः कथ्यते स इतिहासः ।**

अर्थ – असे घडले अशा प्रकारे जे सांगितले जाते, तो इतिहास होय.

राजशेखर आपल्या काव्यमीमांसेत लिहितो –

**स च द्विविधा परक्रियापुराकल्पाभ्याम् ।**

अर्थ – परक्रिया व पुराकल्प अशी इतिहासाची द्विविध गती आहे.

परक्रियेत एक नायक वर्णित असतो व पुराकल्पात अनेक प्रधान पुरुष वर्णित असतात. पहिल्याचे उदाहरण रामायण व दुसऱ्याचे महाभारत.

विष्णुपुराणाच्या श्रीधरस्वामीकृत टीकेत इतिहासाचा व्यापक अर्थ सांगितला आहे, तो असा –

**धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितम् ।**
**पुरावृत्तकथायुक्तमितिहासं प्रचक्षते ।।**

अर्थ – धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांच्या उपदेशाने व पुरावृत्तकथेने युक्त (असा जो वाङमयप्रकार) त्याला इतिहास असे म्हणतात.

व्यासांनी इतिहासाचे महत्त्व सांगताना म्हटले आहे –

**इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत् ।**

अर्थ – इतिहास व पुराणे यांच्या योगे वेदाचे उपबृंहण (वृद्धी) करावे.

भारतीय वाङमयात इतिहास या शब्दाशी मिळता जुळता असा दुसरा शब्द ऐतिह्य हा आहे. विशिष्ट वक्त्याचे नाव न सांगता जे परंपरागत वृत्त सांगितले जाते, त्याला ऐतिह्य म्हणतात (पारम्पर्योपदेशः स्यात् – अमर). ऐतिह्य शब्दाने इतिहास-पुराणांचे ग्रहण होते, असे भट्टभास्कर सांगतो.

भारतीय साहित्यात इतिहासाला वेदाच्या बरोबरीने मानले आहे. ऋग्वेदसंहितेत इतिहासयुक्त मंत्रांचा संग्रह आहे (१.११२.१०; १.१.२; ७.३३.५ इत्यादी). छांदोग्योपनिषदात नारदाने इतिहास-पुराणाला पंचम वेद म्हटले आहे (७.१.२). यास्काने ऋचांचे विशदीकरण करताना 'इतिहासमाचक्षते' म्हणून प्राचीन आचार्यांनी सांगितलेल्या कथा उद्धृत केल्या आहेत. वेदार्थांचे निरूपण करणारे जे भिन्न भिन्न संप्रदाय आहेत, त्यांत ऐतिहासिकांचाही एक निराळा संप्रदाय होता. 'इति ऐतिहासिकाः' (= असे ऐतिहासिक म्हणतात,) असा यास्क त्यांचा उल्लेख करतो. कौटिल्याने इतिहासवेदाची गणना अथर्ववेदाबरोबर केली आहे.

उत्तरकालीन संस्कृत वाङमयात इतिहास याचा सामान्य अर्थ दंतकथा किंवा गोष्ट असा होऊ लागला. त्याला आख्यान, आख्यायिका, कथा, इ. प्रतिशब्द वापरले जाऊ लागले. सामान्यत : संस्कृत वाङमयात कथेच्या रूपाने केलेला उपदेश म्हणजे इतिहास, असा त्याचा अर्थ प्रामुख्याने गृहीत आहे. 'जेव्हा एखादा इसम मरण पावतो, तेव्हा त्याचे इष्टमित्र एकत्र बसून प्रसिद्ध पुरुषांच्या गोष्टी सांगतात व त्याच वेळी मनावर चांगले संस्कार करणारी इतिहास-पुराणेही सांगितली जातात' असे गृह्यसूत्रात सांगितले आहे (आश्व. गृ. सू. ४.६.६). राजाने आपल्या दैनंदिन कार्यक्रमात इतिहासाचेही श्रवण करावे, म्हणजे त्यायोगे त्याचे शिक्षण पुरे होते, असे कौटिल्याने म्हटले आहे (अर्थ. १.५.; १०.१४). तो पुढे सांगतो, की प्रधानाने इतिवृत्त व पुराण यांचे दाखले देऊन राजाला चुकीच्या मार्गापासून परावृत्त करावे (अर्थ. ५.६).

संस्कृत वाङमयात महाभारताला 'महापुण्य इतिहास' असे म्हटले आहे. महाभारतात पुष्कळ ऐतिहासिक गोष्टी येतात; पण त्यात त्यांच्या उपदेशात्मक भागालाच विशेष महत्त्व असते. कौटिल्याने इतिहास हा शब्द समुदायवाचक अर्थाने वापरला आहे. त्याच्या कल्पनेप्रमाणे इतिहासात पुराण, इतिवृत्त, आख्यायिका, उदाहरण, धर्मशास्त्र व अर्थशास्त्र इतक्या विषयांचा समावेश होतो.

इतिहास किंवा इतिहासवेद या नावाचा ग्रंथसमुदाय प्राचीन काळी अस्तित्वात होता, असे मानायला सबळ पुरावा आहे. अथर्ववेद (१५.६.३), बृहदारण्यक (४.१.२), तैत्तिरीय आरण्यक (२.९), आश्व. गृ. सू. (२.३.१) या ग्रंथांत इतिहास हा शब्द पुराण या शब्दाबरोबर आढळतो. काही ठिकाणी त्यांचा स्वतंत्र द्वंद्व समासही केलेला दिसतो. यावरून इतिहास नामक स्वतंत्र ग्रंथ प्राचीन काळी अस्तित्वात होते, हे निर्विवाद सिद्ध होते. कौटिल्याच्या उल्लेखावरूनही इ. सनपूर्व तिसऱ्या शतकात इतिहासवेद अस्तित्वात होता, असे ठरते (अर्थ. १.३).

या प्राचीन इतिहासग्रंथांचे अवशेष ब्राह्मण ग्रंथांतल्या दंतकथा व कल्पित गोष्टी या रूपात उरले आहेत. विशेषतः अर्थवाद या सदराखाली त्या गोष्टी येतात. निरुक्तावरून असे दिसते, की त्या काळातील पंडितांचा एक वर्ग वेदमंत्रांचा अर्थ लावण्याच्या कामी इतिहासग्रंथाचा उपयोग करीत असे. कित्येक मंत्रांना लहान लहान कथात्मक भाग जोडून दिले आहेत, त्यांना यास्क इतिहास किंवा आख्यान असे नाव देतो. अशा प्रकारचे इतिहास बृहद्देवता, अनुक्रमणीग्रंथ, यांत आणि दुर्ग, षड्गुरुशिष्य व विशेषतः सायण यांची भाष्ये, यांत आढळतात.

मात्र प्राचीन ग्रंथकारांना खरी ऐतिहासिक दृष्टी नव्हती. कालानुक्रमाला धरून लिहिलेला इतिहास भारतात प्राचीन काळी निर्माण झाला नाही, ही वस्तुस्थिती आहे. निरनिराळ्या राज्यांत

भूर्जपत्रे, ताडपत्रे, कागद, इ. वर लिहिलेले शासनाचे लेख असले पाहिजेत. पण त्यांचा उपयोग करून लिहिलेला एकही प्राचीन ग्रंथ नाही. कल्हणाची राजतरंगिणी हा इतिहासाचा ग्रंथ समजला जातो; पण त्यांतही इतिहासाची पारंपरिक कल्पनाच आहे. राजतरंगिणी काय, किंवा हर्षचरित काय हे इतिहास असले तरी त्यांतली दृष्टी शुद्ध ऐतिहासिक स्वरूपाची नाही. बुद्धपूर्व भारताचा व्यवस्थित इतिहास आपल्याला मिळत नाही. ग्रीक व चिनी प्रवासी यांचे ग्रंथ नसते, तर बुद्धोत्तर इतिहासही 'इतिहास' झाला नसता.

इतिहास ही कला आहे, की शास्त्र आहे याविषयी बराच वाद आहे. इतिहास हा काही झाले तरी वाङमयाश्रयी आहे. घडामोडी हा त्याचा आत्मा असला, तरी वाङमय हे त्याचे शरीर आहे. वाङमय म्हटले, की तिथे रचनेची प्रक्रिया आली आणि तिथेच कलेचा प्रांतही उघड झाला. त्यामुळे इतिहास ही कला आहे काय, हा वाद प्रचलित झाला. पण वाङमयाच्या माध्यमातून ज्या गतकालातल्या घडामोडी सांगायच्या त्यांतले सत्यत्व वादातीत असले पाहिजे, ही इतिहासाची कसोटी हळूहळू उत्क्रान्त होत गेली व त्यांतूनच ऐतिहासिक घटनांचे सत्यत्व पारखण्याचे एक शास्त्र प्रगत झाले. आणि त्यामुळेच इतिहास हे शास्त्र आहे, असे म्हणणे क्रमप्राप्त झाले. वास्तविक इतिहास हे शास्त्र की कला हा प्रश्नच गैरलागू वाटतो. इतिहासाचा आत्मा हा शास्त्रपूत सत्यान्वेषणात्मक असून, तो सांभाळला गेला पाहिजे व त्याचे शरीर हे वाङमयीन कलागुणांनी युक्त असले पाहिजे, असे त्याचे दुहेरी उत्तर संभवते.

हिंदी लोकांना इतिहासाचे महत्त्व कळत नाही असे अल्बिरूनीने लिहून ठेवले असले, तरी इतिहास हा शब्द मात्र वेदकालीच अवतीर्ण झालेला आढळतो. हा शब्द स्पष्टार्थवाचक आहे. (समाजाच्या चरित्रातील) गतगोष्टींची जी हकीगत ती इतिहास होय. किंवा वर्तमान क्षणाच्या पाठीमागील गतकाळी पृथ्वीवरील नव्या व जुन्या सर्व प्रकारच्या उलाढालींची जी हकीगत ती इतिहास होय, असे वि. का. राजवाडे आपल्या ऐतिहासिक प्रस्तावना या ग्रंथात सांगतात.

मानव हा इतिहासाच्या केंद्रस्थानी आहे. कारण इतिहासादी सर्व व्यवहार मनुष्यप्रेरित, मनुष्यनिर्मित व मनुष्यपुरस्कृत आहेत. मनुष्यनिर्मित सर्वच शास्त्रांचे अंतिम उद्दिष्ट मानवाचे अभीष्ट साधणे हे आहे. इतिहासही त्याला अपवाद नाही. मानवसमाजात जे काही घडले, ते सर्वच इतिहास किंवा शोधाचा विषय ठरते. माणसे जे जे करतात, सुख-दुःख रूपाने जे जे भोगतात, तसेच जे जे घडवितात किंवा मोडतात, ते ते सर्व इतिहासाचे क्षेत्र आणि इतिहासाचाच विषय होय.

विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी आपल्या 'इतिहास' या निबंधात इतिहासाचे स्वरूप, त्याची साधने व त्याचे उपयोग याविषयी विस्तृत चर्चा केली आहे. भूगोल व कालक्रम, देशस्थिती व तिचे परिणाम, विद्या-कलांचा विकास, रीतिरिवाज, पेहेराव या सर्वांची माहिती इतिहासात आली पाहिजे, असे त्यांनी प्रतिपादले आहे. आपल्याकडे जुने इतिहास ग्रंथ उपलब्ध नसले तरी इतिहासाची विपुल साधने उपलब्ध आहेत. ग्रीक व रोमन प्रवासी यांचे लेख, चिनी ग्रंथ, जयस्तंभ, ताम्रपत्रे, लेण्यांत व अन्यत्र आढळणारे शिलालेख यांतून आपल्या देशाची बरीच माहिती मिळते.

इतिहासाचे उपयोग – विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी इतिहासाचे जे विविध उपयोग सांगितले आहेत, ते असे – (१) इतिहास वाचल्यामुळे मनुष्याची जिज्ञासा तृप्त होते. (२) इतिहासातील कथांच्या द्वारा प्रत्यक्ष उदाहरणे दाखवून नीतिबोध करता येतो. (३) थोर पुरुषांची चरित्रे इतिहासात वाचून मनाची उन्नती होते. व मनाला प्रसन्नता येते. कारण त्या पुरुषांच्या कर्तृत्वामुळे व यशामुळे प्रेरणा आणि उत्साह प्राप्त होतो, आशा वाटू लागते. (४) इतिहास-वाचनामुळे मनोरंजन होते कारण त्यात विलक्षण सत्यकथा असतात. (५) इतिहासातील निरनिराळे अनुभव समजल्यामुळे आपला मार्ग ठरवणे सोपे होते. (६) इतिहासामुळे मनाचे पोषण होते, स्मरणशक्ती, कल्पनाशक्ती व विचारशक्ती वाढते.

जगाच्या केंद्रस्थानी सुप्रतिष्ठित झालेल्या मानवाचे बाह्यदृष्टिक्षेत्र जसे पिढ्यान् पिढ्या वाढत आहे, तशीच मानवाची आंतर दृष्टीही क्रमशः प्रकट होत आहे. भौतिक दृष्टीमुळे त्याला लाभलेले ज्ञान सारग्रहण, पृथक्करण, इ. द्वारा सुसंगत बनवून, त्याने त्याची एक प्रकारची शास्त्रीय व्यवस्था निर्माण केली आहे. या शास्त्रीय प्रगतीमुळेच मानवी व्यवहाराच्या अभ्यासात सूक्ष्मता येऊन, त्या व्यवहाराचेच भिन्न भिन्न पैलू, अभ्यासविषय म्हणून पुढे आले. अशा प्रकारे एकट्या मानवाचाच अभ्यास करणारी अनेक शास्त्रे संवर्धित झाली व त्या शास्त्रांना साहाय्यक अशी अनेकविध उपशास्त्रे निर्माण झाली. मानवसमाजाचा इतिहास म्हणजे अनंत मानवी कर्तृत्वाचा इतिहास, मानवी बुद्धीच्या प्रगतीचा इतिहास, असे साधे समीकरण उत्पन्न झाल्याने इतिहास-साधनांची व्याप्ती अपरिहार्यपणे वाढली आहे.

इतिहासाचा उद्देश नीतिधर्मादी शास्त्रांतील दंडक प्रस्थापित करणे हा नाही. कारण त्या शास्त्रांत कालानुरूप बदल घडत असतो. घटना लहानशी असली, तरी तिच्या वाढीमागे सत्य तत्त्व काय, हाच खरा कुतूहलाचा विषय असतो. एखाद्या घटनेचा उदय, तिचा विकास व तिच्या परिणतीचा क्रम या-

बद्दलच आपल्याला जिज्ञासा असते आणि तिची पूर्ती करणे हेच इतिहासाचे उद्दिष्ट ठरते. एखादी व्यक्ती, संस्था, समाज किंवा घटना यांचा इतिहास म्हटला तरी त्याचा व्याप एवढा मोठा होतो, की त्या सर्वांचे संकलित वृत्त एकत्र देण्याचा उद्योग करतानाही एक विशिष्ट दृष्टी न ठेवल्यास त्या संकलनाचा उपयोग करता येणे कठिण होते. केवळ साधनसंभार म्हणजे इतिहासलेखन नव्हे. इतिहास हा अशा साधनसंभाराचा परिपाक असला पाहिजे.

इतिहासाच्या अखंडत्वाचा विचार प्रा. फ्रीमन यांनी मांडला. इतिहासाचे कृत्रिम कालखंड पाडणे, राष्ट्राराष्ट्रांचे स्वतंत्र इतिहास सांगण्याची संकुचित दृष्टी ठेवणे त्यांना मान्य नव्हते. प्राचीन ग्रीसपासून रोमन साम्राज्यापर्यंत, तसेच साम्राज्यशाही रोमपासून थेट मध्ययुगीन व अर्वाचीन युरोपपर्यंत सर्व इतिहास हा एकच एक परस्परसंबद्ध व सलग प्रवाह आहे, हे त्यांनी सिद्ध करून दाखविले. ह्याच अखंडत्वाचा न्याय सर्वच्या सर्व जागतिक इतिहासाला लावणे शक्य आहे. एवढेच नव्हे; तर आजच्या शास्त्रीय प्रगतीमुळे जगाचा अभूतपूर्व संकोच झालेला प्रत्यक्ष दिसत असताना इतिहासाला हा अखंडत्वाचा नियम लावणे अपरिहार्यच आहे. पूर्वीच्या कालात आजच्यासारखी दळणवळणाची साधने नसतानाही दूरदूरच्या मानव समाजांचा एकमेकांवर चमत्कारिकपणे परिणाम झालेला दिसून येतो व त्यामुळे इतिहासाच्या अखंडत्वाचा हा सिद्धान्त म्हणजे केवळ कल्पना नसून प्रत्यक्ष वस्तुस्थिती असल्याचे सिद्ध होते.

वरील सर्व गोष्टी ध्यानात धरून इतिहासाची व्याख्या मांडायची, तर ती पुढीलप्रमाणे मांडता येईल–सलग अशा मानवसंस्कृतिपटातील विवक्षित घटितांचे स्थान आणि त्यांची उत्क्रांती दर्शविणारा सत्य, संपूर्ण, साधार व सप्रमाण लेखनिविष्ट वृत्तान्त म्हणजे इतिहास होय.

**इतिहास संशोधन** – आधुनिक विज्ञानयुगाच्या पूर्वी इतिहास हे साहित्याचेच एक अंग मानले जात होते. पण सांप्रत इतिहासाने साहित्याशी असलेला आपला संबंध तोडून वैज्ञानिक स्वरूप धारण केले आहे. इतिहासविज्ञानाने या युगात आपली मोठीच उन्नती केली आहे. इतिहासासंबंधी आजच्या कल्पना कालच्यापेक्षा अधिक प्रौढ, प्रामाणिक व गंभीर आहेत. पूर्वीचे इतिहासकार आपल्या आधार–ग्रंथांचे समालोचन करीत नव्हते. त्या आधारांना सत्याच्या निकषावर घासून पाहण्याची त्यांना गरज वाटत नव्हती. लोकांना शिक्षण मिळावे व इतिहासाचे ज्ञान त्यांच्या जीवनात उपयुक्त व्हावे, याच एका हेतूने पूर्वीचे इतिहासकार आपले ग्रंथ लिहीत. ते अलंकारिक वर्णनांनी इतिहासातील घटनांना फुलोराही आणीत. कवी, दार्शनिक, समाजशास्त्रवेत्ते व राजकारणी मुत्सद्दी यांनी इतिहासाचा पुष्कळ उपयोग केलेला दिसतो. पण इतिहासाचे लक्षण व प्रयोजन काय, त्याची मीमांसा काय, त्याच्या संशोधनाची गरज आहे किंवा नाही, इ. प्रश्नांवर त्यांनी गंभीर विचार केलेला नव्हता. ग्रीक इतिहासकार हिरोडोटस् म्हणतो, की 'इतिहासकार हा एक प्रकारचा महाकवीच असतो व वीर पुरुषांच्या गुणगाथा लिहून लोकांचे मनोरंजन करणे, हे त्याचे कार्य असते.' थ्युसिडाइडीज या दुसऱ्या ग्रीक पंडिताने इतिहासाला लोकोपयोगी शिक्षणाचे साधन मानले आहे. इतिहास हा मानवचरिताचा बृहत्कोश असून, त्याच्यापासून लोकशिक्षणासाठी उत्तम आदर्श व दृष्टान्त मिळतात, अशी परदेशांतल्या प्राचीन पंडितांचीही धारणा होती. इंग्लंडचे सुप्रसिद्ध लेखक मेकॉले व कार्लाइलही वरील सिद्धान्ताचेच अनुयायी होते. पण आधुनिक इतिहासविज्ञानाने आता आपला मार्ग वदलला आहे. इतिहासलेखनात स्वच्छंद विहाराला अवकाश नसून, शब्दावडंबर न करता घटनांचे यथातथ्य वर्णन करणे आणि त्यांतही जे सांगायचे ते सप्रमाण सांगणे हे महत्त्वाचे असते. इतिहासाला दार्शनिक व साहित्यिक सिद्धान्तापासून वेगळे करून त्याचा अभ्यास करणे ही सांप्रतची वैज्ञानिक रीत आहे. यालाच इतिहाससंशोधन असे म्हणतात. ज्या साधनांच्या द्वारे इतिहास तयार करायचा, त्या साधनांची साद्यंत तपासणी करणे, या गोष्टींना संशोधनात फार महत्त्व असते. त्या कामी तर्कबुद्धी तीव्र असावी लागते. संशोधनाच्या द्वारे इतिहासातील सत्यासत्याचा निर्णय कसा करावा, याविषयी आता वैज्ञानिक सिद्धान्त स्थापित झाले आहेत.

एकोणिसाव्या शतकापासून विज्ञानाच्या इतर क्षेत्रांबरोबर इतिहासातही प्रगतीचे नवे युग सुरू झाले. नवे मार्ग, नव्या रीती, यांनी सत्यसंशोधनाला प्रारंभ झाला. ज्या प्रमाणांच्या चौथऱ्यावर पूर्वीच्या इतिहासाची इमारत उभी होती, तो पायाच खरा की खोटा, याची तपासणी प्रथम सुरू झाली. काही विद्वान परंपरागत इतिहासातले तथ्य शोधण्याच्या प्रयत्नात गढून गेले; तर काही संशोधक नवनवीन ऐतिहासिक साधनांची गवेषणा करू लागले. या संशोधकांना प्राचीन ग्रंथभांडारातून आपल्या विषयाची सामग्री गोळा करावी लागली. प्राचीन प्रतीके, शिल्पे व भग्नावशेष यांचा अभ्यास करावा लागला; शब्दविज्ञान, मानवविज्ञान, पुरातत्त्व, नाणकशास्त्र, लिपिशास्त्र, इ. अन्य विद्यांचेही साहाय्य घ्यावे लागले. प्राचीन ग्रंथांतून ऐतिहासिक घटनांचे तुरळक आढळणारे उल्लेखही शोधून काढावे लागले. इतिहासाचे प्राचीन ग्रंथ फारच कमी प्रमाणात मिळत असल्यामुळे तत्कालीन इतिहासाच्या

प्रनासाठी त्यांना नाणी, शिक्के, शिलालेख, भग्नावशेष, पत्र-व्यवहार, दप्तरे व उकरून वर काढलेल्या वस्तू, यांची मदत घ्यावी लागली. इतिहासाच्या पुनरुद्धाराच्या कामी पुरातत्त्व-सामग्री उपयुक्त ठरली आहे. गौतम बुद्धाच्या ऐतिहासिक अस्तित्वाविषयी काही कालापूर्वी इतिहासवेत्ते संदेह प्रकट करीत होते; पण पुरातत्त्व विज्ञानाने बुद्धविषयक अनेक स्मृति-चिन्हे उजेडात आणून बुद्धाचे अस्तित्त्व आता निस्संदेह सिद्ध ठरविले आहे. तसेच अनेक शिलालेख व ताम्रपट सापडल्या-मुळे ग्रंथांतरी अनुलेखित अशा अनेक प्रतापी राजांचे अस्तित्व सिद्ध झाले आहे.

भारताच्या प्राचीन लिपींचे वाचन करणाऱ्या पंडितांत श्री. जेम्स प्रिन्सेप या पंडिताचे नाव अग्रगण्य मानले पाहिजे. त्याने मोठ्या प्रयासाने ब्राह्मी व खरोष्ठी या लिपींची वर्णमाला बसवून दाखविली. प्राचीन लिपींच्या ज्ञानाने जुने शिलालेख, ताम्रपट व मुद्रालेख सरळ रीतीने वाचता येऊ लागले. त्यामुळे भारताच्या प्राचीन इतिहासातल्या कित्येक अज्ञात गोष्टी संशो-धकांना विदित झाल्या. हे शिलालेख व ताम्रपट पाहिल्यावर डॉ. फ्लीटने लिहिले, की 'प्राचीन हिंदुलोकांत इतिहासलेख-नाची योग्यता व जाणीव होती.' या शिलालेखांचे स्वरूप दस्तऐवजासारखे असते. त्यांवर व्यक्तीचे पूर्ण नाव, गाव, वंश-वृत्त, मिती या गोष्टी आवर्जून लिहिलेल्या असतात. तत्कालीन देशस्थिती, रीतिरिवाज, देवधर्म, इ. विषयांवर हे अभिलेख पुष्कळच प्रकाश टाकतात. भारताच्या पश्चिमोत्तर प्रदेशांत शक, यवन, पल्हव या राजांची राज्ये पुष्कळ काळपर्यंत नांदली, हे या अभिलेखांनीच आपल्याला विदित केले आहे. या राजांची वंशावळ त्यांच्या शिक्क्यांवरून आपल्याला मिळू शकते. गुप्त-काल हे भारताच्या इतिहासातले सुवर्णयुग होते, याची निस्सं-दिग्ध माहिती आपल्याला त्यांच्या शिक्क्यांनी आणि नाण्यांनी पुरविली आहे.

पुरातत्त्वसाधनांव्यतिरिक्त प्राचीन हस्तलिखित ग्रंथांतूनही इतिहासाचे धागेदोरे मिळू शकतात; मात्र त्या ग्रंथांचे प्रामाण्य, त्यांचा लेखनकाल व त्यांचा कर्ता या गोष्टींचा नीट अभ्यास करावा लागतो. अशा कालनिर्णयाच्या कामी बहिरंग प्रमाण उपलब्ध न झाल्यास त्याची अंतरंग परीक्षा करून तो काल-निर्णय निश्चित करावा लागतो. हे काम मोठ्या कष्टाचे असते. ग्रंथाची शैली व त्यातले विषय यांचे विश्लेषण करून, त्या देशातल्या तद्विषयक अन्य ग्रंथांशी त्याची तुलना करावी लागते. अन्य ग्रंथांतील त्या ग्रंथाचे उल्लेख व त्या ग्रंथातील अन्य ग्रंथांचे उल्लेख या सर्व गोष्टींचा बारीक विचार करून त्या ग्रंथाचे देश-काल ठरवावे लागतात. एखाद्या ग्रंथात प्रक्षिप्त भागही असू शकतो. नंतरच्या कालात त्याची वाढही झालेली असते. तेव्हा त्या ग्रंथाला प्रामाण्य प्राप्त करून देण्यासाठी प्रथम वरील गोष्टींचे निराकरण करावे लागते. आणि मग अशा रीतीने संशोधित झालेला तो ग्रंथ इतिहासाचे साधन म्हणून उपयुक्त होऊ शकतो.

इतिहास-विज्ञानासाठी ग्रंथांतल्या शब्दांची यथार्थ व्याख्या करणे, हेही फार महत्त्वाचे कार्य ठरते. भिन्न भिन्न युगांत शब्दांचे अर्थ बदलतात. त्यांत संकोच-विकासही होऊ शकतो. शब्दाचा अशुद्ध अर्थ इतिहासात भ्रमनिर्मितीला कारण होत असतो. म्हणून इतिहाससंशोधकाला त्याचाही निश्चय करावा लागतो. अशा प्रकारे प्राचीन ग्रंथांच्या विवेचनातून इतिहासा-तल्या भिन्न भिन्न घटनांचा पत्ता लागू शकतो. मात्र त्या घटना संबंधरहित असतात; म्हणून मग त्यांना कार्यकारणभावाच्या सूत्रात यथायोग्य ठिकाणी गुंफण्याची आवश्यकता निर्माण होते. ऐतिहासिक घटना जोवर कार्यकारणाच्या महानियमात ग्रथित होत नाहीत, तोवर त्याचे महत्त्व किंवा प्रयोजन कळू शकत नाही. त्यांची जेव्हा परस्पर संगती लागते किंवा त्या शृंखलाबद्ध होतात, तेव्हाच त्यांतून खऱ्या इतिहासाची प्राप्ती होऊ शकते.

अशा प्रकारे ऐतिहासिक घटनांची प्रगती, त्यांचा विकास-क्रम व त्यांचे तात्पर्य सुस्पष्ट करण, हीच श्रेष्ठ इतिहासकाराची कर्तबगारी होय. भूतकालातली मेलेली, गाडलेली मढी उकरून काढणे, याच एका गोष्टीवर तो संतुष्ट नसतो; तर इतिहासाची अंतःशक्ती आणि त्याचा जीवनस्रोत प्रकट करणे, हे तो आपले परम कर्तव्य समजतो. इतिहासाचे परिशीलन हे आपल्या मानसिक विकासाचे फार मोठे साधन आहे. चालू युगाच्या मानसिक जीवनावर ऐतिहासिक विचारशैलीचा गंभीर प्रभाव पडलेला आहे.

कोणत्याही विषयाच्या चर्चेत तद्विषयक इतिहास पाहावा लागतो. सांप्रत सर्व विद्या—कलांचे विवेचन व समालोचन ऐति-हासिक दृष्टीला धरूनच केले जाते. ॲरिस्टॉटल्चे म्हणणे आहे, की 'जो मनुष्य कोणत्याही विषयाचा पूर्वापार विकासक्रम लक्षात घेऊन त्याचा विचार करतो, त्यालाच त्या विषयाचे पूर्ण व विशद ज्ञान प्राप्त होऊ शकते.' वस्तुस्थिती अशी आहे, की ज्ञानाच्या कोणत्याही शाखेचे तिच्या इतिहासाच्या अभ्या-सावांचून योग्य प्रकारे आकलन होणेच शक्य नाही.

खरा इतिहासकार कोणत्याही जातीच्या धर्मग्रंथांना अपौरु-षेय अथवा ईश्वरकृत मानीत नाही. कारण ते ग्रंथ मनुष्याच्या अशा बोलीत लिहिले गेले आहेत, की ज्या बोलीचा इतिहासात हळूहळू विकास झाला आहे. त्या ग्रंथांचा देशकालपरिस्थितीशी घनिष्ट संबंध असतो, त्यांत देशकालांचे पूर्ण प्रतिबिंब पडलेले

असते. इतिहासकार आधुनिक दर्शन–शास्त्रांचीही आलोचना ऐतिहासिक विचारशैलीने करतात. ते त्यातल्या प्राचीन व अर्वाचीन सिद्धान्ताचे तुलनात्मक अध्ययन करून जे विचार पुढे मांडतात, ते पुढील अभ्यासकांना मार्गदर्शक ठरतात.

मानवजातीने आपल्या इतिहासकालात ज्या ज्ञाननिधीचा संग्रह करून ठेवला आहे, त्याच्या आधारावरच विज्ञानाची उन्नती झालेली आहे. मनुष्य इतिहासाला विसरेल, तर तो भिन्न भिन्न ऐतिहासिक अनुभवांच्या ज्ञानालाही वंचित राहील व वर्तमानकालात पुढे उभ्या ठाकणाऱ्या अनेक जटिल समस्यांची उकल करण्यासही असमर्थ ठरेल. [ प्रा. गंगाप्रसाद मेहता – द्विवेदी अभिनंदन ग्रंथ; म. ज्ञा. को. ८; सं. सा. इ.; प्रा. दि. वि. काळे – द. आ. स्मा. ग्रं. ]

**इतुपूजा** इतू ही बंगालमधील एक देवता असून, ती नवसाला पावते, असे समजतात. आश्विनातील सूर्यसंक्रांतीला व कार्तिकातील प्रत्येक रविवारीही स्त्रिया तिला पूजतात. इतूचा संबंध सूर्याशी आहे, असे मानतात. एका मोठ्या मातीच्या परळात चार लहान बोळकी आत माती घालून ठेवतात व त्यात भात, जव, गहू, किंवा इतर धान्ये पेरतात. दर रविवारी त्या 'शेताला' पाणी घालतात. चार भांडी ही चार ऋतूंची प्रतीके मानतात. इतूला तांदुळाची खीर व मिठाई यांचा नैवेद्य दाखवितात. नंतर तिची कहाणी ऐकतात ती अशी –

एक दरिद्री व अधाशी ब्राह्मण होता. एक दिवस त्याला घिरडे खावेसे वाटले; म्हणून त्याने बायकोला घिरडी करायला सांगितले. पण त्याच्या दोन मुली जुम्नो व उम्नो यांनी एकेक घिरडे खाल्ले व त्यामुळे ब्राह्मणाला पोटभर घिरडी मिळाली नाहीत. त्या रागाने त्याने त्या दोन्ही मुलींना रानात नेऊन सोडले. तिथे त्या मुलींनी काही पऱ्यांच्या बरोबर इतू देवतेची पूजा केली. देवी त्यांच्यावर प्रसन्न झाली. मग घरी येऊन त्या मुलींनी आपल्या बापाला श्रीमंत केले. [ हिं. हॉ. से. ]

**इत्सिंग** (इ. स. ६३५-७१३) भारताची यात्रा करणारा चिनी बौद्ध भिक्षू. याने वयाच्या बाराव्या वर्षीच बौद्ध धर्माचा अभ्यास सुरू केला, चौदाव्या वर्षी प्रव्रज्या (प्राथमिक दीक्षा) घेतली आणि विसाव्या वर्षी उपसंपदा (पूर्ण दीक्षा) घेतली इ. स. ६७१ मध्ये तो भारतात येण्यासाठी निघाला. तो सुमात्रा बेटात सहा महिने राहिला आणि नंतर मलायू येथे दोन महिने राहिला. इ. स. ६७३ मध्ये तो समुद्रमार्गे ताम्रलिप्तीला पोचला. तिथे एक वर्ष राहून त्याने संस्कृत भाषेचे पूर्ण ज्ञान मिळविले. त्यानंतर तो नालंदा, वैशाली व कुशीनगरला गेला. तिथून बुद्धगयेला जाताना वाटेत त्याचे हाल झाले.

इत्सिंग नालंदा येथे दहा वर्षे राहिला. त्या काळात त्याने विविध दर्शनांचे अध्ययन केले आणि अनेक धर्मग्रंथ जमा केले.

इ. स. ६८५ मध्ये तो चीनला परत जाण्यासाठी ताम्रलिप्ती येथून निघाला. त्याने असंख्य संस्कृत ग्रंथ बरोबर घेतले होते. तो सुमात्रा बेटात श्रीविजय येथे चार वर्षे राहिला व तिथे त्याने काही ग्रंथांचा अनुवाद केला. मग इ. स. ६८९ मध्ये तो चीनला परत गेला.

सुमात्राला परत येऊन आणखी काही ग्रंथ न्यायचे असा त्याचा विचार होता. म्हणून तो काही भिक्षू मित्रांना घेऊन परत आला. सुमात्रामध्ये तो पाच वर्षे राहिला. तिथे अनेक संस्कृत ग्रंथांचा चिनी भाषेत अनुवाद करून तो इ. स. ६९५ मध्ये चीनला परत गेला. चीनची राणी वू टेत्सीन हिने त्याचे भव्य स्वागत केले. त्याने एकूण छप्पन ग्रंथांचा अनुवाद केला. [ भगवान बुद्धासाठी; आजकल, वार्षिक अंक डिसें. १९५६. ]

**इदानकञ्झी** द. भारतांतील एक शैव संत. हा राजकुलात जन्मला होता. शंकराच्या मंदिरात पूजाअर्चा व अतिथिसत्कार या गोष्टी यथासांग चालाव्या म्हणून हा दक्ष असे. एकदा दुसऱ्या एका भक्ताने आपली अतिथिसेवा अव्याहत चालावी या हेतूने इदानकञ्झीच्या कोठारावर हल्ला केला. इदानकञ्झीला त्याचा हेतू कळताच त्याने स्वखुशीने आपले भांडार त्या भक्ताच्या स्वाधीन केले. या त्याच्या कृत्यावरून तो महान् संत म्हणून ओळखला जाऊ लागला. [ पे. पु. ]

**इदू मिश्मी** भारताच्या ईशान्य सरहद्दीवरील डोंगराळ प्रदेशात मूळ रहिवाशांच्या अनेक जमाती आहेत. त्या सर्वांना मिश्मी असे नाव आहे. हे मिश्मी लोक पूर्वी उत्तरेकडील कोणत्या तरी प्रदेशात राहत असावे व तिथून हळूहळू खाली सरकत तिबेटातून या प्रांतांत उतरले असावे, असा विद्वानांचा तर्क आहे. सांस्कृतिक व भाषिक दृष्ट्या या जमाती परस्परांपासून अगदी भिन्न आहेत. तसेच त्यांचे आपापसांतले संबंधही सलोख्याचे नाहीत.

हिमालयाच्या पायथ्याला लागून असलेल्या लोहित व दिबाँग या नद्यांच्या खोऱ्यांत मिश्मींची जी जमात राहते तिला इदू अशी संज्ञा आहे. इदू हा शब्द 'मिदू' शब्दाचा अपभ्रंश आहे. इदू जमातीच्या सात आठ उपशाखा आहेत. दिबांग नदीला मिळणाऱ्या अनेक नद्यांच्या काठी या निरनिराळ्या पोटजमाती राहतात व त्या नदीचे नाव धारण करतात. इदू

लोकांची चेहरेपट्टी मंगोलियन वंशातल्या लोकांसारखी असते. त्यांच्यातले उत्तर सरहद्दीकडचे लोक उंच व देखणे असून दक्षिण



इदू मिश्मींचे घर

भागातील लोकांपेक्षा शारीरिक व मानसिक दृष्ट्या अधिक उत्साही दिसतात. निसर्गरम्य व दुर्गम अशा प्रदेशात राहत असल्यामुळे या लोकात नैसर्गिक साधी राहणी व सौंदर्याची आवड दिसते. त्यांच्या सांस्कृतिक परंपरा व चालीरीतीही प्राचीन काळापासून आजतागायत कायम राहिल्या आहेत. आधुनिक सुधारणेचा त्यांना यत्किंचितही संपर्क झालेला नाही.

इदू लोक वाघ व वानर यांच्याशी आपला वांशिक संबंध मानतात. हा संबंध कसा आला, ते सांगणाऱ्या अनेक दंतकथा त्यांच्यात प्रचलित आहेत. पृथ्वीवर आपली उत्पत्ती कशी झाली, यासंबंधी ते पुढील कथा सांगतात–

पृथ्वीवर पूर्वी पुरुष नव्हता. प्रथम सूर्य, चंद्र, वायू, व अग्नी हे चार देव व एक स्त्री उत्पन्न झाली. देवांना स्त्री-पुरुष भेदाची काहीच कल्पना नव्हती. नेहमी ते उघडे राहून भटकत असत. पण एकदा त्या स्त्रीच्या मनात कामेच्छा उत्पन्न झाली व ती शमविण्यासाठी काय करावे, ते तिला सुचेना. विषण्ण होऊन ती एका टेकडीवर पाय पसरून बसली. त्याच टेकडीवर वायुदेव 'अमाया खिन्यू' राहत होता, त्याने तिला पाहिले. कुतूहलाने तो तिच्या गर्भात प्रविष्ट झाला. त्यामुळे तिचे पोट हळूहळू वाढू लागले व योग्य वेळी तिला मुलगा झाला. तो मुलगा हाच आमचा मूळ पुरुष होय.

आसाम प्रांतावर ब्रिटिशांचा अंमल येण्यापूर्वी हे लोक तिथल्या प्रशासकांच्या हुकमतीत निष्ठापूर्वक राहत. पण निसर्गतःच त्यांची वृत्ती लढाऊ असल्यामुळे जवळपासच्या जमातींबरोबर त्यांचे सदैव झगडे चालू असत. लुटालूट, मारामारी व कत्तल या गोष्टी त्यांच्या जणू अंगवळणीच पडल्या होत्या. परंतु पुढे ब्रिटिशांनी त्यांच्यावर पूर्ण पगडा बसविला व त्यांच्या वृत्तीत बदल घडवून आणला, असे सांगतात.

इदू लोकांच्या वस्तीची रचना पद्धतशीर नसते. प्रत्येक कुटुंबप्रमुख आपापल्या सोयीप्रमाणे घर बांधतो व त्यामुळे खेड्याचे स्वरूप एकंदरीत अव्यवस्थितच दिसते.

इदू लोक एकत्र कुटुंबपद्धतीने राहतात. त्यामुळे कुटुंबात माणसे बरीच असतात. त्या सर्वांना सोयीस्करपणे राहता येईल असे घर ते बांधतात. घर बांधण्याच्या जागी प्रथम जमिनीत लाकडाचे खुंट पुरतात व त्यांवर जमिनीपासून ५-६ फूट उंचीवर घराची उभारणी करतात. हे घर म्हणजे एकमेकांना लागून असलेल्या खोल्यांची एक मालिकाच असते. सर्व बांधकाम बांबूचे व जंगली लाकडाचे केलेले असते. प्रत्येक खोलीत स्वयंपाकासाठी व शेकण्यासाठी एक अग्निकुंड असते. घराच्या पडवीत हरणे, डुकरे, इ. प्राण्यांची मुंडकी टांगलेली असतात.

प्रत्येक घरात मृत प्राण्यांच्या कवट्या, शेतीची व विणकामाची अवजारे, काही लोखंडी व पितळी भांडी, बांबूच्या व वेताच्या विणलेल्या चटया, एक-दोन पत्र्याच्या पेट्या, एवढे साहित्य असते.

इतर मिश्मी जमातींपेक्षा इदूंची केशरचना निराळी असते. ते दोन्ही कानशिलांवरील केस काढून टाकून मागच्या बाजूचे लांब सडक वाढवितात व त्यांच्या अग्रांची गाठ बांध-



इदू मिश्मींचा गळ्यातला अलंकार

तात. इदू लोकांना रंगीबेरंगी पोषाखाची फार आवड असते. पुरुष काळा कोट घालतात व लंगोटी नेसतात. कापडाचा एक

तुकडा छातीपोटावर पट्ट्याने बांधून ठेवतात. त्यांचा कोट झाडांच्या सालीतील तंतू व माणसाचे केस यांनी बनविलेला असतो. तो इतका मजबूत असतो, की त्यात भालादेखील खुपसला जात नाही. ते डोक्याला वेताची टोपी घालतात. स्त्रिया सैलसर पोलकी घालतात व कमरेभोवती रंगीत वस्त्र गुंडाळतात.

इदूंचे अलंकार मोजकेच असतात. स्त्री व पुरुष दोघेही लहानमोठ्या मण्यांच्या अनेक माळा गळ्यांत घालतात व कान टोचून त्यांत वांबूचे तुकडे बसवितात.

इदू लोक डोंगरउतारावर शेती करतात व अरुम, टॅपिओका, राळ, मका, तंबाखू, इ. पदार्थ, तसेच घेवडा, भोपळा, इ. भाज्या पिकवितात. तिरकमठा व बंदूक यांच्या साहाय्याने ते शिकारही करतात. त्यांना मासे मारण्याचाही छंद असतो. ते पशुपक्ष्यांचे मांस, मासे, उंदीर, तांदूळ, राळे व भाजीपाला यांचा जेवणात उपयोग करतात. तांदुळापासून तयार केलेली दारू हे त्यांचे राष्ट्रीय पेय आहे. त्यांना तंबाखूचे जबरदस्त व्यसन असते. इदूंना वर्ष व महिने ही दोनच कालपरिमाणे माहीत आहेत. स्त्रियांच्या दोन मासिक पाळ्यांतील काल म्हणजे एक महिना, अशी त्यांची समजूत असून ती एका दंतकथेवर आधारित आहे. त्यांच्या वर्षाचा प्रारंभ पावसाळ्यात होतो.

इदू लोकांची स्वतंत्र भाषा असून तिचा अंतर्भाव मिश्मी भाषांमध्ये होतो. अस्पष्ट उच्चारणामुळे ही भाषा आजपर्यंत इतरांना अगम्यच राहिलेली आहे.

**सामाजिक जीवन** – कौटुंबिक बाबतीत हे लोक कुटुंबप्रमुखाचा शब्द प्रमाण मानतात. बाप, आजा व चुलता यांच्याविषयी प्रत्येक माणसाला आदर असतो. जमीन-जुमला, पशु-पक्षी, अन्न-धान्य, घर-दार या गोष्टींवर कुटुंबाची सामायिक मालकी असते. परंतु दागदागिने, कपडालत्ता, पैसाअडका, या गोष्टी मात्र वैयक्तिक मालकीच्या असतात.

इदू जमातीत अनेक शाखा आहेत. एक शाखा म्हणजे, कोण्यातरी एका मूळ पुरुषाची संतती असते. ते परस्परांना अन्ना या नावाने संबोधतात. पूर्वी एक शाखा एकाच खेड्यात किंवा अनेक खेड्यांच्या एका गटात राहत असे व त्या खेड्याला त्या शाखेचे नाव मिळत असे. परंतु ही प्रथा आता मोडत चालली आहे. कारण उद्योगधंद्यासाठी हे लोक आता आपापली खेडी सोडून अन्यत्रही जाऊ लागले आहेत. इदूंचा सामाजिक दर्जा ते कोणाचे दास आहेत, की स्वतंत्र आहेत त्यावरून ठरवितात. या दोन वर्गात परस्पर बेटी व्यवहार होत नाही. इदूंची राहणी अगदी साधी असते. स्त्रिया घरकाम सांभाळून पुरुषाला शेतीच्या कामांत मदत करतात. तरुण मुले तिरकमठा घेऊन उंदीर, सरडे, पक्षी यांची शिकार करतात. आईबाप या मुलांना शिक्षण देण्याची काहीच व्यवस्था करीत नाहीत. त्यामुळे त्यांच्या मनात वडील माणसांविषयी अप्रीती निर्माण होत असलेली दिसते.



इदू मुलगी

केवळ स्त्री-पुरुष संबंध झाल्याने संतती होत नाही; तर त्यासाठी ईश्वरी कृपेची आवश्यकता आहे, अशी इदूंची समजूत आहे. त्यामुळे वांझ स्त्रीला समाजात योग्य तो मान मिळत नाही. वांझपण टळावे यासाठी स्त्रिया अनेक दैवी उपायांचा अवलंब करतात. गर्भपात होतो, तो पुरोहिताने केलेल्या जादूटोण्यामुळे होतो, असे ते मानतात. त्यामुळे गरोदर स्त्री व तिचा पती हरणाच्या शिंगाला स्पर्श न करणे, हरणाचे मांस न खाणे, इ. नियम कटाक्षाने पाळतात. त्याचप्रमाणे गर्भपात टळावा, प्रसूती सुलभ व्हावी, मुलांना भूतबाधा होऊ नये, यासाठीही त्यांची काही विधिविधाने असतात. मूत अंगावर पीत असेतो इदू लोक ब्रह्मचर्य पाळतात.

**विवाहप्रथा** – इदु तरुणांत विवाह होण्यापूर्वी प्रणययाचना करण्याची पद्धती आहे. मात्र ती अत्यंत गुप्तपणे करावी लागते. कारण प्रियाराधन उघडकीस आल्यास जबर दंड भरावा लागतो. मुलीची संमती आहे, असे दिसल्यास मध्यस्थामार्फत तिच्या बापाकडे तिला मागणी घालण्यात येते. मुलीचे आई-वडील आपल्या नातलगांची व मुलीची संमती घेऊन देज वगैरे पुढील सर्व व्यवहार ठरवितात. लग्नात आईबाप मुलीला आंदण म्हणून अनेक वस्तू देतात. मुलींची लग्ने साधारणपणे १२ ते १९ या वयात होतात.

मुलींच्या चारित्र्याला इदू लोक फार जपतात. मुलीचे पाऊल वाकडे पडल्याचा नुसता संशय आला; तरी त्याबद्दल

तिला देहदंड सावा सोलागतो. इदू लोकांत बहुपत्नीकत्व आहे. इदू लोक हे वृत्तीने रांगडे आणि रागीट असतात. क्षुल्लक कारणांवरूनही ते खुनासारखे गंभीर गुन्हे करायला प्रवृत्त



इदू सैनिक

होतात. तडजोडीची वृत्ती त्यांच्यात दिसत नाही. असे असले तरी, हे लोक दगलबाजी किंवा चोरी मात्र करीत नाहीत.

व्यभिचार, बालहत्या, खून, इ. गुन्ह्यांचा न्यायनिवाड करण्यासाठी इदू जमातीत न्यायमंडळे असतात. गावातील अनुभवी, वृद्ध, समजूतदार व निःपक्षपाती असे लोक त्या मंडळात नेमलेले असतात. न्यायदानाबद्दल दोन्ही पक्षांकडून त्यांना मानधन मिळते. न्याय करताना ते गुन्ह्यामागच्या हेतूकडे विशेष लक्ष देतात. मृत्यु, कैद, नुकसानभरपाई, दंड व फटके मारणे, असे त्यांचे शिक्षेचे प्रकार आहेत.

**धार्मिक कल्पना** – इदू लोक परमेश्वराला सर्वश्रेष्ठ सृष्टिकर्ता असे मानतात. त्याला ते इन्नी असे म्हणतात. तो न्याय देणारा आहे, अशी त्यांची धारणा आहे. सर्व धार्मिक विधींच्या प्रारंभी ते ईश्वराचे स्मरण करतात. भूतपिशाचांवरही त्यांची श्रद्धा असून, दैनंदिन जीवनातील सर्व गोष्टींवर व निसर्गातील घटनांवर भुताखेतांचे वर्चस्व असते, अशी त्यांची समजूत आहे. रोगराई होते, ती या भूतपिशाचांच्या कोपामुळेच होते, अशी इदूंची श्रद्धा असते. रोगी बरा होण्यासाठी ते भुतांना बलिदान देऊन संतुष्ट करतात. हे सर्व करणारा एक उपाध्याय वर्ग त्यांच्यात असतो.

**मृतकप्रथा** – ज्या घरी मृत्यू झाला असेल, त्या घरच्या माणसांनी पाच दिवसपर्यंत बाहेर जाता कामा नये व बाहेरच्या माणसांनी त्या घरी येता कामा नये, असा त्यांच्यात नियम आहे. हे मृताला पुरतात. मृत व्यक्ती लौकर नजरेआड होऊ नये, यासाठी दोन किंवा तीन दिवससुद्धा ते अंत्यसंस्कार करीत नाहीत. [ दि इदू मिश्मी – श्री. तपनकुमार बारुआ ]

## इदैयन

तमिळ प्रांतातील धनगरांची एक जात. हल्ली या जातीचे लोक मेंढरे पाळण्याव्यतिरिक्त इतरही काही धंदे व नोकऱ्या करतात. यांचे मुख्य वर्ग दोन – एक पूर्णपणे सुधारलेला व दुसरा आपल्या जातीचे मूळ वैशिष्ट्य कायम ठेवून असणारा. पहिल्या वर्गातील लोक वैष्णव असून गंधाचा नाम लावतात व स्वतःला यादव वंशातील समजतात. दुसऱ्या वर्गातील लोक भुताखेतांना भजतात. ते शैवपंथी असल्यामुळे कपाळी भस्म लावतात.

विजयनगरच्या कृष्णदेवराजाचा दिवाण तिम्मराज हा इदैयन जातीचा होता, असे हे लोक मानतात. शिबी, कलकट्टी, पासी, पाल, पेंडुक्कुमेक्की, शिवियन, संगुकट्टी, सांबन, पडुनाटू वगैरे यांच्यात पुष्कळ पोटजाती आहेत. शिबी लोक पूर्वी पालखी वाहण्याचे काम करीत असत. पालखीला शिबिका असे नाव आहे, ते या शिबी लोकांवरूनच पडले असावे. संगुकट्टी जातीचे लोक शंखाचे दागिने घालतात, तर सांबन लोक अंगाला भस्म चर्चितात.

पडुनाटू पुरुषाला चुलत बहिणीशी लग्न करता येते. लग्नात पुरोहिताचे काम ब्राह्मण करतात. नवऱ्या मुलाची बहीण नवरीच्या गळ्यात ताळी बांधते. यांना घटस्फोट किंवा विधवाविवाह मान्य नाही. संतती नसलेल्या विधवा स्त्रीची संपत्ती भाऊ, बाप, किंवा मामा यांच्याकडे जाते. ग्रामपंचायतीकडून तिला नवऱ्याच्या संपत्तीपैकी उपजीविकेपुरताच पैसा मिळतो. पुरुषाची संपत्ती त्याच्या मुलाला न मिळता ती जावयाला मिळते. जावई सासऱ्याकडेच राहतो.

काही ठिकाणी मुलीला ऋतू प्राप्त झाल्यावर तिचा मामा किंवा मामेभाऊ माडाच्या हिरव्या चुडतांचे एक झोपडे बांधून त्यात तिला सोळा दिवस ठेवतो व नंतर तिची ऋतुशांती केली जाते.

**विवाहप्रथा** – पोटभेदांपरत्वे लग्नपद्धतीत थोडाफार फरक आढळतो. कोइमतूर येथे लग्नापूर्वी देवापुढे तांबडे किंवा पांढरे फूल विडयाच्या पानात गुंडाळून ठेवतात व लहान मुलाला ते

उचलायला लावतात. मुलाने पांढरे फूल उचलले तर तो मनात योजलेल्या लग्नाला शुभ शकुन मानतात.

काही लोक प्रौढ मुलीचे लग्न कधी कधी दहा बारा वर्षाच्या मुलाशीही करतात.

**मर्तिक प्रथा** – मृताला स्मशानभूमीत नेल्यावर त्याच्या तोंडात तांदूळ, पाणी व एक नाणे ठेवतात. दहन केलेल्या जागेवर नंतर लहानशा नांगराने नांगरतात व तिथे नऊ प्रकारची धान्ये पेरतात. सोळाव्या दिवशी ब्राह्मण त्यांच्या अंकुरांची मानवाकृती तयार करतो व मृताचा मुलगा तिची पूजा करतो.

तिरुवितांकुर येथील काही इदैयन तमिळ भाषा बोलतात, तर काही मल्याळम् बोलतात. [ का. ट्रा. स. इं. ]

## इध्म

'इध्यते अग्निः अनेन इति' (=ज्याने अग्नी प्रज्वलित केला जातो ते अर्थात् समिधा म्हणजे इध्म होय.) यज्ञ करताना हवनासाठी वृक्ष-वनस्पतींच्या शाखोपशाखांच्या लहान काटक्यांचा उपयोग करतात. त्यांना इध्म किंवा समिध् असे नाव आहे. पलाश, अश्वत्थ, खदिर (खैर), रोहित (रक्त रोहिडा), हरिता (दूर्वा) व उदुंबर या वृक्ष-वनस्पतींच्या समिधा घ्याव्या, असे मरीची ऋषीने सांगितले आहे. या वनस्पती मिळणे शक्य नसेल, तेव्हा काटे नसलेल्या कोणत्याही वनस्पती चालतात, असे त्याने पुढे सांगितले आहे. कात्यायनाने आपल्या नामावलीत हरिता व रोहित या वगळल्या असून शमी, न्यग्रोध (वड), प्लक्ष (पिंपरी), वैकंकत (वेकळी), बिल्व, चंदन, सरल, शाल (साण) व देवदारू यांचा अंतर्भाव केला आहे. समिधेसाठी शाखेचा अग्राकडचा भाग घेतात. ती शाखा मात्र खुरटलेली, सडलेली, आखूड, वेडीवाकडी व फार बारीक नसावी.

एका इध्मात साधारणतः एकवीस काष्ठे असतात. परंतु काही वेळा ही संख्या कमी-जास्ती होते. दर्शपूर्णमास यागासाठी एकवीस काष्ठांचा इध्म असतो. इध्म्यामध्ये तीन परिधी (हात भर लांब) असतात. परिधींची लांबी सामान्यतः ३६ अंगुळे असते. समिधांची लांबी प्रादेशमात्र (टीचभर) असते. इध्म्याला बांधायच्या त्रिसंनहन नामक दर्भांच्या तिपदरी दोरीला इध्मबंधनरज्जू असे म्हणतात. ही दोरी यज्ञकर्माच्या शेवटी अग्नीत टाकतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

## इध्मवाह दार्ढच्युत

एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या नवव्या मंडलातील सव्वीस क्रमांकाचे पवमान सूक्त याने रचले आहे. पवमान सोमाची स्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. याची एक ऋचा अशी –

तं वेधां मेधयाह्यन् पवमानमधि द्यवि । धर्णसिं भूरिधायसम् ॥ (ऋग्वेद ९.२६.३)

अर्थ – कर्तुत्ववान आणि सर्वाधार सोमाला बुद्धिमान स्तोते स्वर्लोकी पाठवितात.

इध्मवाह हा अगस्त्याचा मुलगा असून, ऋतूने त्याला दत्तक घेतले होते (मत्स्य पु. अ. २०२). हा एक गोत्रकार होता. [ ऋ. म. भा. ; प्रा. च. को. ]

## इनामगाव

पुणे जिल्ह्यातील शिरूर तालुक्यातले एक गाव. हे पुण्याच्या पूर्वेस ८० किलोमीटर अंतरावर घोडनदीच्या काठी आहे. महाराष्ट्रातील जोर्वे-संस्कृतीची अधिक माहिती मिळविण्याच्या हेतूने डेक्कन कॉलेजच्या पुरातत्त्व विभागाने इ. स. १९६९ साली इथे उत्खनन सुरू केले. गेल्या २५-३० वर्षांत नेवासे, दायमाबाद, प्रकाश, बहाळ, टेकेवाडा, सोनगाव, चांदोळी, इ. ठिकाणी केलेल्या उत्खननामुळे या ताम्रपाषाणयुगीन संस्कृतीचे बरेच ज्ञान प्राप्त झाले होते. इनामगाव येथील उत्खननामुळे माळवा-जोर्वे-संस्कृतीच्या वसाहतींचे स्वरूप समजले. सुमारे साडेतीन हजार वर्षांपूर्वी माळव्यातून काही लोक या प्रदेशात येऊन वसले असावे. त्या वसाहतीचा कालखंड इ. स. पूर्व १६०० ते १३०० हा होता. त्यानंतरचा पूर्वजोर्वे संस्कृतीचा काळ इ. स. पूर्व १३००-१००० हा होय. त्या कालातले लोक काटकोन-चौकोनी आकाराची कुडाची घरे बांधीत. त्यांची छपरे लाकडी वाश्यांवर आधारलेली असत. ते लोक प्रेते घरात किंवा अंगणात पुरत. त्या कालखंडातील मातीची भांडी सुबक, घाटदार, टणक व लाल असून, त्यांवर काळ्या रेघांचे नक्षीकाम असते. त्यात नावेचे व बैलगाडीचे चित्र दिसते. ती भांडी भाजण्यासाठी तयार केलेली भट्टीही इथे सापडली आहे. घोडनदीचे पाणी वळवून ते साठवण्यासाठी दगड-मातीचा बंधारा बांधण्यात आला आहे.

त्या काळात मृत मुलांना दोन कुंभात पुरले जाई. बरोबर बोळकी वगैरे वस्तू ठेवीत.

या काळातील लोक मातृदेवता, शिरोहीन पुरुष देवता यांची पूजा करीत.

येथील एका गढीच्या उत्खननामुळे जोर्वे संस्कृतीच्या उत्तर कालखंडाचे (इ. स. पूर्व १००० ते ७००) ज्ञान मिळाले आहे. या कालखंडात गोल झोपड्या बांधू लागले होते. घरातील जमीन व भिंती चांगल्या प्रकारे काळ्या मातीच्या केल्या जात होत्या. जोर्वे संस्कृतीच्या पूर्वार्धातील भांडी या कालखंडात चालू होती, पण ती निकृष्ट प्रतीची वाटतात.

इथल्या उत्खननात वसतीभोवती बांधलेल्या दगडी तट-बंदीचे अवशेष सापडले आहेत.

हे लोक पूर्वीप्रमाणेच दगडी हत्यारे वापरीत होते. पण ते तांब्याची हत्यारे अधिक प्रमाणात वापरू लागले होते. गळ-सुरी, छिन्नी, इ. हत्यारे सापडली आहेत. तांब्याचे दागिने, गार, अकीक, इ. दगडांचे मणी त्या काळात बनवीत होते. भाजक्या मातीची कुंडले कानात घालीत.

यांची प्रेते पुरण्याची पद्धत पूर्वी सारखीच होती. मोठ्या माणसाचे प्रेत खड्यात व लहान मुलाचे प्रेत मडक्यात ठेवून पुरीत.

हे लोकही मातृदेवतेची पूजा करीत. यांचा मुख्य उद्योग शेती हा असून, ते पशुपालन व शिकारही करीत. ते गहू मोठ्या प्रमाणावर पिकवीत होते. काही कडधान्येही ते पिकवीत होते. घोटून चुना करणे हा त्यांचा मुख्य कुटिरोद्योग होता. सोन्याचा पातळ पत्रा बनवून त्याचे मणी ते तयार करीत. इथे एका भाड्यांवर स्वस्तिक रंगवलेले आढळले आहे. त्यावरून असे वाटते, की आर्यांची एखादी टोळी उत्तरेकडून येऊन तिने इथे वसाहत केली असावी.

येथील उत्खननात इ. स. पूर्व १३०० च्या सुमाराचे घरांचे अवशेष पाहून घरांची बांधणी, लोकसंख्या समाजरचना, वर्ग यांविषयी कल्पना करता येते. इनामगाव हे जोरवे-संस्कृतीचे मोठे केंद्र ठरले आहे. [ महाराष्ट्राचा आद्य शेतकरी – डॉ. सांकलिया, डॉ. अन्सारी, डॉ. ढवळीकर; पु. त. वि. ]

**इनामाय** विदर्भातली एक देवी. तेथील अनेक गावांत दसऱ्याला हिची पूजा करण्याची चाल होती. ही पूजा कोतवालाकडे मांडीत व देवीला रेडा बळी देत. हल्ली मात्र ही प्रथा बंद पडली आहे. स्त्रिया उंच जागी पाळणा बांधून त्यात झोके घेत पंधरा दिवसपर्यंत इनामायची विविध गाणी गातात. [ सर्वोदय – लोक साहित्य अंक, १ मे १९६१ ]

**इलुपसनिंगलू वेंकटरामय्या** (इ. स. च्या १८ व्या शतकाचा उत्तरार्ध) एक संगीतकार व तेलुगू भाषेचा पंडित. गोपालकृष्ण या नावाने त्याने तेलुगू भाषेत अनेक कीर्तनें रचली आहेत. भजन हा प्रकार साहित्यात प्रथमच निर्माण करणाऱ्या बोधेंद्र स्वामीचे भजन याने रचले आहे. तोडी रागातील हे भजन गुरुकीर्तन म्हणून प्रत्येक भजनाच्या सुरुवातीला म्हणण्याची पद्धत आहे. मरुडा-नल्लूर मठाच्या पहिल्या अधिपतीच्या स्तवनपर कीर्तनेही याने रचली आहेत. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**इन्क्विझिशन** ख्रिस्ती धर्मसमीक्षणसभा. इ. स. च्या १३ व्या शतकात, युरोपियन देशांत, लोकांच्या धर्माचारांचे निरीक्षण करण्यासाठी व ते धर्माचार जर कॅथॉलिक धर्माशी जुळणारे नसतील, तर त्या लोकांना शिक्षा ठोठावून त्या अमलात आणण्याचे कार्य करण्यासाठी एक सभा स्थापन झाली होती, तिला इन्क्विझिशन असे नाव आहे. प्रा. अ. का. प्रियोळकर यांनी इन्क्विझिशन याच नावाचा एक ग्रंथ लिहिला असून, त्यात यासंबंधी माहिती दिली आहे, ती पुढीलप्रमाणे –

ख्रिस्ताच्या मृत्यूनंतर त्याचे काही शिष्य युरोपात पळून गेले व त्यांनी आपल्याबरोबर ख्रिस्ती धर्म तिथे नेला. पण यहुदी प्रदेशातल्याप्रमाणे युरोपातही त्यांचा छळ सुरू झाला. सुमारे दोन-अडीचशे वर्षे असा छळ सहन केल्यावर पुढे त्यांचे दिवस पालटले. रोमच्या कोंस्तातीन या राजाने, ख्रिस्तानुयायांच्या औषधींनी त्याची मुलगी रोगमुक्त झाली म्हणून, ख्रिस्ती धर्म स्वीकारला. त्यामुळे ख्रिस्ती धर्माला एकदम राजाश्रय मिळाला. तो मिळाल्यावर ख्रिस्ताचा धर्म युरोपमध्ये फोफावू लागला. ख्रिस्ती धर्मा-ऐवजी रेलिजिआव कातोलिक आपास्तोलिक रोमान हे नाव त्याला मिळाले. मग राजसत्तेच्या बळावर ख्रिस्ती धर्माचे अनुयायी इतर धर्मीयांचा छळ करू लागले. त्यांना सक्तीने नव्या धर्माची दीक्षा देऊ लागले. पण नव्या धर्माची दीक्षा मिळूनही त्या नवख्रिस्ती लोकांनी आपले पूर्वीचेच धर्माचार चालू ठेवले. तेव्हा त्या लोकांना ताळ्यावर आणण्यासाठी ख्रिस्ती धर्मगुरू पोप ९ वा ग्रेगरी, याने इ. स. १२२९ साली इन्क्विझिशन ही संस्था स्थापन केली. नंतर त्याने बिशप व आर्चबिशप यांची एक परिषद भर-विली व तीत ४५ ठराव पास केले. हे ठराव म्हणजेच या संस्थेची नियमावली होय. पुढे इटली, फ्रान्स, जर्मनी व स्पेन या कॅथॉलिक देशांत त्या संस्थेचा अंमल सुरू झाला. त्या देशांत स्थायिक झालेल्या ज्यू लोकांना सक्तीने ख्रिस्ती धर्माची दीक्षा



इन्क्विझिशनचे प्रतीक चित्र

देण्यात आली. पण ते ख्रिस्ती धर्माचे आचार पाळीत नाहीत, असे दिसून येताच इन्क्विझिशनचे अधिकारी त्यांना फासावर लटकवू लागले. या आसुर शिक्षाप्रकारांना घाबरून बरेच ज्यू पोर्तुगालमध्ये पळून गेले. परंतु तिथेही पोर्तुगीजांनी त्यांना ख्रिस्ती केले. व नंतर ते ख्रिस्ती धर्म आचरीत नाहीत, म्हणून त्यांना इन्क्विझिशनच्या धारेवर धरले. या सर्व प्रकरणात लाखो ज्यू धार्मिक अत्याचारांना बळी पडले.

इ. स. १५१० साली पोर्तुगिजांनी गोमंतकात प्रवेश केला. त्या वेळी फक्त तीस गावांचा तिसवाडी महाल त्यांच्या ताब्यात आला. पुढे १५४२ मध्ये सासष्टी व बारदेश हे महाल त्यांच्या आधिपत्याखाली आले. तिसवाडी महालात सक्तीचे ख्रिस्तीकरण करण्यास १५४० मध्येच सुरुवात झाली होती. पुढे नवख्रिस्त्यांस धर्मशिक्षण देण्याच्या निमित्ताने सेंट फ्रान्सिस झेवियर हा गोवा शहरात आला. त्याला ज्या रीतीन ख्रिस्तीकरण करावे असे वाटत होते, त्या रीतीला अधिकाऱ्यांची मान्यता मिळत नव्हती. म्हणून त्या अधिकाऱ्यांविरुद्ध कागाळ्या करून त्याने पोर्तुगालच्या बादशहाला इन्क्विझिशनची एक शाखा गोव्यात उघडण्याची विनंती केली. त्याच्या हयातीत ती उघडली गेली नाही. पुढे इ. स. १५६० साली गोवा शहरात ती सुरू झाली. त्याच वर्षी सासष्टी व बारदेश या महालांत ख्रिस्तीकरण सुरू झाले. तत्कालीन व्हाइसरॉय दों कोंस्तांतीनु याने २ एप्रिल १५६० या दिवशी पुढील आशयाचे एक आज्ञापत्रक काढले –

सर्व हिंदू लोकांना, जर ते ख्रिस्ती धर्म स्वीकारीत नसतील तर, तिसवाडी महालाच्या बाहेर हाकलून द्यावे. जर ते सासष्टी किंवा बारदेश या महालांतले असतील, तर त्यांना त्यांच्या गावी जाण्यास परवानगी द्यावी. इतरांस कैद करून त्यांची संपत्ती सरकारजमा करावी. जाणाऱ्या लोकांनी एका महिन्याच्या आत आपली जमीन विकून जावे. जो कोणी जाणार नसेल, त्याचे नाव सरकारला कळवावे. अशा लोकांना त्यांची अर्धीच संपत्ती द्यावी व बाकीची सरकारजमा करावी.

त्यानंतर ८ जूनच्या हुकुमान्वये सोनारांनाही अशीच ताकीद देण्यात आली. सोनार हे मूर्ती घडवणारे असल्यामुळे त्यांच्यावर पाद्र्यांचा विशेष राग होता.

गोव्यातील इन्क्विझिशनच्या शाखेने आपली कार्यपद्धती ठरविली व नवख्रिस्त्यांनी कोणत्या गोष्टी करू नयेत, याची जंत्री तयार केली. या जंत्रीविरुद्ध वागणाऱ्यांना फटके मारण्यापासून जिवंत जाळण्यापर्यंतच्या शिक्षा देण्यात आल्या. हे नियम आधी ख्रिस्ती समाजापुरते मर्यादित होते, ते पुढे हिंदूंनाही लागू करण्यात आले. या भयाने हिंदूत त्याचप्रमाणे नवख्रिस्तीही आपली घरेदारे सोडून मद्रास, म्हैसूर, कोचीन, इ. ठिकाणी गेले. हे सर्व अत्याचार करण्यात डोमिनिकन पंथाचे अनुयायी अग्रेसर होते.

इ. स. १७७० च्या सुमारास पोंबाल नावाचा उदारमतवादी गृहस्थ पोर्तुगालचा मुख्य प्रधान झाला. त्याने डोमिनिकन मिशनऱ्यांची व गोवा शाखेची अनन्वित कृत्ये पाहून इ. स. १७७४ मध्ये गोव्यातील इन्क्विझिशनची शाखा बंद केली. त्याने तिथल्या सर्व पंथांच्या मिशनऱ्यांना हाकलून लावले व त्यांची विपुल



इन्क्विझिशनमधील अत्याचाराचे एक दृश्य

संपत्ती सरकारजमा केली. पोंबालच्या मृत्युनंतर दोनामारिया ही पोर्तुगालची राणी झाली. तिने ती शाखा पुनरुज्जीवित केली. पण तिला आता पूर्वीचे तेज उरले नव्हते. ही शाखा इ. स. १८०८ मध्ये बंद झाली ती कायमचीच. इन्क्विझिशनच्या सत्ताकालात गोमंतक, चौल, वसई, सासष्टी, दमण, दीव व पोर्तुगीज सत्तेखालील इतर पौर्वात्य प्रदेश इन्क्विझिशनच्या कार्यक्षेत्राखाली होते.

या शाखेचा २४८ वर्षांचा इतिहास हा असा भयानक व क्रूर आहे. या शाखेच्या कार्यालयाचे दप्तर जरी पोर्तुगीजांनी नष्ट केले किंवा गुप्त ठेवले असले, तरी फ्रेंच व्यापारी देलोन व डॉ. बुचानन यांनी स्वतः कैदेत राहून इन्क्विझिशनच्या या छळवादाचा अनुभव घेतला व त्यावर ग्रंथही लिहिले. त्यामुळे जगाला इन्क्विझिशनच्या अनन्वित कृत्यांची कल्पना आली. [ इन्क्विझिशन – प्रा. अ. का. प्रियोळकर. ]

**इब्नबतूता** (इ. स. १३०४-१३७८) एक मुसलमान प्रवासी. याने २८ वर्षे प्रवास करून अनेक देश पाहिले. याचा जन्म टांजियर (मोरोक्को, आफ्रिका) येथे झाला. तो इ. स. १३३३ साली सिंधू नदीच्या काठी आला.

दिल्लीचा सुलतान मुहंमद तुगलुक याने बोलावले म्हणून तो दिल्लीला गेला. तिथे दिल्लीचा काजी म्हणून तो आठ वर्षे राहिला. त्यानंतर तो कालिकत येथे गेला आणि त्याने पश्चिम किनाऱ्यावरील अनेक शहरे पाहिली. काही दिवस मालदीव बेटावर राहून तो लंकेला गेला. तिथून तो चितगांव (बंगाल) ला गेला. तिथे त्याने शेख जलालद्दीन या साधूची भेट घेतली. मग तो जावा-सुमात्रामार्गे चीनला गेला. तिथून तो सुमात्रा, मलबार, ओमान, बगदाद, दमास्कस, जेरुशलेम, कायरो या मार्गाने टांजियरला परत गेला.

इब्नबतूताने आपल्या प्रवासाचे वर्णन लिहून ठेवले आहे. अजायबुल अस्फार हे त्याचे नाव आहे. त्यात भारतातील कित्येक नगरांचे सुंदर वर्णन केलेले आहे. त्या वेळी द. भारतात मुसलमानी सत्ता प्रस्थापित झालेली नव्हती म्हणून त्याने केलेल्या वर्णनाला विशेष महत्त्व आहे. [ म. ज्ञा. को.; अ. भा. सं. ]

**इब्राहीम** ज्यांच्या द्वारे ईश्वराने आपले विशेष आदेश जगाला दिले अशा सहाजणांपैकी एक. म्हणून इब्राहीमला 'खलिलुल्लाह' असे म्हणतात. इस्लामी धर्मग्रंथाचे वीस भाग प्रथम यालाच ज्ञात झाले. [ डि. इ. ]

**इभ्य** पाणिनीने दंडादिगणांत याचा उल्लेख केला आहे (५.१.६). जातकांतही हा शब्द आढळतो. इभ्य म्हणजे धनिक खरा; पण तो सामान्य नव्हे, तर निगमसभेचा (व्यापारी व कारागीर यांच्या संघाचा) सदस्य असणारा श्रेष्ठी होय. पाणिनीच्या काळात याला राजाकडून हत्तीवर बसून जाण्याचा अधिकार प्राप्त होत असे. 'इभमर्हति इति' (= हत्तीवर बसण्याचा अधिकारी तो इभ्य होय) अशी त्याची व्याख्या होती. कालांतराने इभ्यालाच नैगम किंवा महाजन म्हणू लागले. [ पा. का. भा. ]

**इमान** इमान म्हणजे इस्लामी धर्माविषयी श्रद्धा. ही श्रद्धा अंत:करणात असली पाहिजे आणि ती मुखानेही व्यक्त झाली पाहिजे. इमान मुज्मल म्हणजे कुराण व अहादीस यांच्याविषयी श्रद्धा बाळगणे व इमान मुफस्सल म्हणजे मुस्लीम धर्माच्या सहा मूल तत्त्वांवर विश्वास असल्याची घोषणा करणे. अर्थात या विश्वासाबरहुकूम आचरण करणे, हे महत्त्वाचे मानलेले आहे. [ डि. इ. ]

**इमाम** मुसलमानांचा नेता किंवा खलीफा याला इमाम असे म्हणतात. नेता कसा असावा, ते हिदायामध्ये सांगितले आहे. तो इस्लामनिष्ठ, स्वातंत्र्यप्रिय, तीव्र बुद्धीचा, वयाने परिपक्व व सर्वमान्य असला पाहिजे. त्याने इस्लाम धर्माचा प्रचार करून त्याचे सामर्थ्य वाढविले पाहिजे, विद्वान व धार्मिक व्यक्तींचा मानसन्मान केला पाहिजे व सर्व मुसलमानांना न्यायाने वागविले पाहिजे. नेता तसा वागत नसेल तर सर्व लोकांनी त्याला तसे वागायला भाग पाडावे, असेही सांगितले आहे.

सुन्नी पंथाचे लोक आपल्या नेत्यांना खलीफा म्हणतात; तर शिया पंथी आपल्या बारा नेत्यांना इमाम म्हणतात. हे सर्व बाराही नेते अलीचे वंशज आहेत. त्यांची नावे अशी — हजरत अली, हसन, हुसैन, जैनुल आबिदैन, मुहम्मद बाकर, जाफर सादिक, मूसा काजिम, अली राजा, मुहम्मद तकी, अली नकी, हसन अस्करी, मुहमद अल मुतजर, (इमाम मेहदी). [ डि. इ.; हिं. वि. को. ]

**इमाम ज़मिनी** मुसलमान लोक पालनकर्त्या साधूला अर्पण केलेल्या वस्तूला इमाम जमिनी असे म्हणतात. प्रवासाला निघालेल्या किंवा आपत्ती आलेल्या माणसाच्या डाव्या दंडात नाणे किंवा अंगठी हळदीने रंगविलेल्या कापडात गुंडाळून बांधण्याची प्रथा मुसलमानांत आहे. संकल्पित प्रवास पूर्ण झाल्यावर किंवा आपत्तीचे निवारण झाल्यावर त्या बांधलेल्या वस्तूच्या किंमतींत थोडी भर घालून तेवढ्या किंमतीची मेवामिठाई रक्षणकर्त्या साधूच्या नावाने सदाचरणी लोकांना वाटतात. [ डि. इ. ]

**इमामबारा** मुहर्रमच्या सणासाठी धनिक मुसलमान लोक एक साधारण चौकोनी इमारत बांधून त्यावर घुमटाकार छत बसवितात, तिला इमामबारा असे नाव आहे. इमारतीत जमिनीवर खजुरीच्या पानांच्या चटया घालून वर सतरंजी पसरतात व तिच्यावर तलम कापड अंथरून बैठक तयार करतात. एका भिंतीजवळ मक्केकडे तोंड करून ताझिया (ताबूत) ठेवतात. जवळच एक ओटा बांधलेला असतो. तो चांदी, हस्तिदंत, किंवा लाकूड यांच्यापासून करतात. त्यावर रंगीबेरंगी भरजरी कापड अंथरतात. या ओट्यावर कुराण ठेवून व मक्केकडे तोंड करून मौलवी ते वाचतो व समोर जमलेले लोक भाविकपणे ते ऐकतात. मखमली किंवा रेशमी पडदे, आरसे, पताका, हंड्या, झुंबरे, यांनी त्या सर्व इमारतीत आरास करतात.

मुहर्रमचे दहाही दिवस रोज सकाळ, संध्याकाळ, इमामबारामध्ये 'मजलिस' (शोकसभा ) भरते. त्या वेळी लोक

मौलवीचे मजलिस—वाचन ऐकतात. नंतर 'मरसिया' (शोक-गीत) गातात व उभे राहून मुहंमद पैगंबरानंतरच्या सर्व थोर पुरुषांची नावे घेऊन त्यांच्या आत्म्याला शांती मिळावी म्हणून प्रार्थना करतात. नंतर ते दुष्ट खलिफांची नावे घेऊन त्यांना शिव्याशाप देतात आणि शेवटी हसन व हुसेन यांच्या नावाचा उद्घोष करीत, हातांनी छाती पिटून घेऊन नाचतात. पाहा — मोहरम. [ऑ. मु. इं.]

**इयरकोन कलिकाम्म** द. भारतातील एक शैव संत. याने संत सुंदररचा अपमान केला म्हणून शंकराने याला व्याधिग्रस्त केले व सुंदरर याच्याच हस्ते ती व्याधी दूर होईल, असा दृष्टान्त दिला. एकदा सुंदरर कलिकाम्माच्या भेटीला आला असता याने आपलेच शिर उडविले, असे सांगतात. सुंदररला ते पाहून फार दुःख झाले व तो स्वतः देहत्याग करायला उद्युक्त झाला, तेव्हा शंकराने कलिकाम्माला जिवंत केले. कलिकाम्माने मग सुंदररचे पाय धरले व त्याचे शिष्यत्व पत्करले. [पे. पु.]

**इरजिक** महाराष्ट्रात एखाद्याच्या शेतावर पेरणी, काढणी, व मळणी या कामांत इतर शेतकरी मदत करतात, त्यांना न्याहारी, दुपारी जेवण व संध्याकाळी मोठे जेवण द्यावे लागते. अशा प्रकारच्या कामाला व त्याच्या भोजनात्मक संभावनेला इरजिक असे नाव आहे. महार, मांग, वगैरे लोकांना इरजिकीला बोलावीत नाहीत. इरजिकीच्या वेळी मांग डफ वाजवीत राहतो व कामकरी 'शाब्बास रे वाघा' 'भलरि दादा' अशी पालुपदे उंच स्वरात गातात. [गांवगाडा]

**इरयिम्मन तंपी** (इ. स. १७८३-१८५८) केरळातला एक साहित्यकार. तिरुवितांकुरच्या स्वाती तिरुनाल महाराजाच्या दरबारात हा आस्थान विद्वान होता. हा कवी व नाटककार असून, याने दक्षयागम्, कीचकवधम् व उत्तरास्वयंवरम् ही नाटके लिहिली आहेत. नवरात्रिप्रबंधम् या काव्यात त्याने त्रिवेंद्रम्च्या नवरात्र उत्सवाचे वर्णन केले आहे. याने तानवर्ण, पदवर्ण, कीर्तने व पदेही रचली आहेत. [डि. सा. इं. म्यु. म्यु.]

**इराणी** (१) एक भटकी जमात. मुगल टोळीपैकी हे लोक असून, ते अत्यंत उपद्रवी आहेत. सर्व भारतभर हे गुन्हे करीत हिंडतात, परंतु पोलिसांच्या तावडीत मात्र सापडत नाहीत. चाकू, कात्र्या, बनावट रत्ने, मोती, खेळणी, मणी, इ. वस्तू विकणे हा यांचा धंदा आहे. जिप्सी लोकांशी यांचे बरेच साम्य आहे. कोंबड्यांच्या झुंजी लावणे यांना फार आवडते. [का. ट्रा. स. इं.]

(२) इराणी या नावाने ओळखला जाणारा आणखी एक वर्ग भारतात आहे. हे इस्लामी धर्माचे नसून, पारशी धर्माचे आहेत. मुसलमानांशी यांचा विरोधच दिसून येतो. मुसलमानांना समजू नये म्हणून हे लोक एक वेगळीच भाषा बोलतात. पर्शियन भाषेचीच ती एक बोली आहे. उपाहार-गृहे चालविणे हा यांचा प्रमुख धंदा आहे.

**इरावती** सांप्रतच्या रावी नदीचे प्राचीन नाव. ऋग्वेदातील परुष्णी नदीलाच इरावती म्हणत, असे निरुक्तात सांगितले आहे (९.२६). ही सर्वकल्मषनाशिनी आहे (वामन पु. ७९.७). हिला पितरांनी पवित्र मानले आहे. इरा नामक सरोवरातून हिचा उगम झाला, असे कालिकापुराणात सांगितले आहे (२४.१४०). पतंजलीने आपल्या महाभाष्यात हिचा उल्लेख केला आहे.

बाणगहलच्या अनेक नद्यांनी व्यापलेल्या डोंगराळ भागात ही नदी उगम पावते व पीरपंजालच्या दक्षिण उतारावरून खाली येते. हिच्या हिमालयातील प्रवाहाची लांबी एकशेवीस मैल आहे. ही काश्मीरमधून चंबामध्ये प्रवेश करते आणि लाहोरजवळून वाहत जाऊन चिनाब नदीला मिळते.

सांप्रत इरावती या नावाने प्रसिद्ध असलेली नदी मात्र भारतात नसून ब्रह्मदेशात आहे. [हि. जॉ. ए. इं.; हि. ध.; पु. इं.]

**इरिंबिठी काण्व** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या आठव्या मंडलातील सोळा ते अठरा क्रमांकांची सूक्ते याने रचली आहेत. इंद्रस्तुती हा याच्या सूक्तांचा विषय आहे. इंद्राचे शारीरवर्णन करताना कवी म्हणतो (८.१७.८)-

तुविग्रीवो वपोदरः सुवाहुरन्धसो मदे ।
इन्द्रो वृत्राणि जिघ्नते ।।

अर्थ — विशालस्कंध, सुबाहू, विस्तीर्णोदर, आणि सोममद-प्राप्त झालेला इंद्र समस्त शत्रूंचा संहार करतो.

याने इंद्राला शृंगवृष ऋषींचा पुत्र म्हटले आहे (८.१७.१३). सायणाचार्यांच्या मते शृंगवृष नावाच्या कुंडपायिन् वंशातल्या ऋषीवर कृपा करण्यासाठी इंद्राने त्याच्या पोटी जन्म घेतला. काही भाष्यकार शृंगवृष हे आदित्याचे एक नाव आहे, असे म्हणतात.

शनी या ग्रहासाठी म्हटला जाणारा 'शमग्निरग्निभिः' (८.१८.९) हा मंत्र याचाच आहे. [ऋ. म. भा.; प्रा. च. को.]

**इरुलर** द. भारतातील एक जमात. या लोकांची वस्ती प्रामुख्याने केरळातल्या पालघाट जिल्ह्यात आहे आणि या जिल्ह्याला लागून असलेल्या तमिळनाडू व कर्नाटक या प्रदेशांच्या भागातही ती विखुरलेली आहे. इरुल शब्दाचा अर्थ काळा असा आहे. आणि यांची बहुतेक सर्व नावे इरुलशी संबंधित आहेत. हे लोक मध्यम उंचीचे, लांब हाताचे, कुरळ्या केसांचे आहेत. यांच्या गालाचा जबडा रुंद असून, नाक आखुड असते. हे इरुल नावाची बोली बोलतात. ही बोली म्हणजे मल्याळम् व तमिळ या भाषांचे भ्रष्ट रूप आहे. यांच्यांत पुंगकरू, कुडगर, कलकट्टी, वेल्लक, देवाल, कोप्पिलिंगम् असे वर्ग आहेत.


इरुल पुरुष

इरुल लोक आपल्या जमातीची उत्पत्ती ऋषीपासून झाली असे मानतात.

यांची घरे चिखलाची असतात. भिंतींना हवा-उजेडासाठी खिडक्या असतात. हे आपल्या उद्योगधंद्याजवळ किंवा जंगलाजवळ डोंगराच्या उतरणीवर राहतात. विस्तवाभोवती वर्तुळाकार झोपतात. लहान मुलांना उबेसाठी विस्तवाशेजारीच एक लहानसा खड्डा खणून त्यात ठेवतात.

**उद्योग** – शेती करणे व मेंढ्या पाळणे हे यांचे प्रमुख व्यवसाय होत. भात, नाचणी, मिरची, केळी, हळद, इ. पदार्थ हे पिकवितात. शेतात पुरुष व स्त्रिया बरोबरीने काम करतात. जंगलातले बांबू, सरपण व कंदमुळे गोळा करणे हे त्यांचे जोडधंदे आहेत. धान्य नसेल तर इरुलर कंदमुळांवर निर्वाह करतात. काही इरुलर स्त्री-पुरुष लोकांचे भविष्यही सांगतात. बायका एका टोपलीत कवड्या घालून भविष्य सांगण्यासाठी दारोदार हिंडतात. पुरुष घरीच बसून हे काम करतात. भविष्य सांगताना त्यांच्या अंगी संचार होतो, अशी समजूत आहे.


इरुल स्त्री

**विवाहप्रथा** – हे लोक भिन्न कुळीत विवाह करतात. मुले-मुली वयात आल्यानंतर त्यांचे विवाह होतात. विवाह वधू-वरांच्या परस्पर संमतीवर अवलंबून असतो. विवाहात देजाची पद्धत आहे. मुलीला वडील नसतील, तर तिचे भाऊ ती देजाची रक्कम वाटून घेतात. हे पैसे विवाह-समारंभापूर्वी द्यावे लागतात. विवाहाच्या दिवशी नवरदेव मुलीच्या घरी जातो, तिच्या पदरात चार पैसे बांधतो आणि तिला आपल्या घरी घेऊन जातो. कुटुंबप्रमुख किंवा एखादा वृद्ध माणूस वधूच्या गळयात ताळी बांधतो. वराला ऐपत असेल तर त्या दिवशी मेजवानी व नृत्य होते.

यांच्या लग्नसमारंभातील लोकगीते, नृत्ये, इ. गोष्टींवरून यांच्यात पूर्वी राक्षसविवाह रूढ असावा, असे वाटते. यांना घटस्फोट व विधवाविवाह मंजूर आहेत. पुरुष अनेक बायका करतात.

**देवधर्म** – हे कन्निअम्मा व मारी या देवतांना भजतात. मरिअम्मा ही देवीच्या रोगाची देवता समजून तिची हे पूजा करतात. हे रंगस्वामी या स्वरूपात विष्णूला भजतात. शिवमंदिरात बोकडाचा बळी देतात आणि त्याचे मांस प्रसाद म्हणून सर्वांना वाटतात.

यांच्या जमात-प्रमुखाला ओआर आणि उपप्रमुखाला भंडारी असे म्हणतात. काही ठिकाणी हे यजमान किंवा गौड या नावांनीही ओळखले जातात. ओआर हा विवाहसमारंभाचा व मर्तिकप्रथेचा पुरोहित असतो. याशिवाय मन्नुकरण नावाचे त्यांचे स्वतंत्र पुरोहितही असतात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृताला बसलेल्या स्थितीत पुरतात. मृताला झोपडीतून बाहेर हलवीपर्यंत स्त्री-पुरुष नाच करतात. तिसऱ्या दिवशी बकरा कापून भोजन देतात. आणि मृताला पुरले असेल त्या ठिकाणी थोडे तेल टाकून त्या स्थानाची पूजा करतात. [ द्रा. के.; का. द्रा. स. इं. ]

## इरैयण्णार अगप्पोरुळ

तमिळ भाषेतील एक प्रणयप्रधान काव्य. या काव्यात साठ सूत्रे असून, त्यांवर उत्कृष्ट टीकाही आहे. याच्या रचनेचा काल इ. स. ५ ते ७ या शतकांच्या मधला असावा. यात उल्लेखिलेली स्थळे आजही आढळतात. तमिळ भाषेच्या तिसऱ्या संघाला आश्रय देणाऱ्या एकूणपन्नास राजांपैकी शेवटचा राजा उग्रप्पेरुवाळुदी याच्या कारकीर्दीत एकदा मोठा दुष्काळ पडला. त्यामुळे त्याने पदरच्या विद्वानांना रजा दिली. बारा वर्षांनंतर पुनश्च स्थिर-स्थावर झाल्यावर त्याने त्या पंडितांना परत बोलाविले. पण आलेल्या पंडितांत इरैयण्णार अगप्पोरुळ या काव्याचा निश्चित अर्थ सांगणारा कोणी नव्हता. प्रत्येक जण वेगवेगळा अर्थ सांगू लागला. त्यामुळे खरा अर्थ कसा मिळवायचा, याबद्दल राजाला चिंता पडली. एवढ्यात आकाशवाणी झाली, ती अशी –

'रुद्रशर्मा नावाच्या आंधळ्या मुलाला व्यासपीठावर बसवून पंडितांनी त्याच्यापुढे आपापला अर्थ सांगावा. जो अर्थ

ऐकत असताना आंधळ्या मुलाच्या डोळ्यांतून अश्रू येतील, तोच अर्थ खरा, असे समजावे.'

त्याप्रमाणे केले असता नक्कीरर हा पंडित आपला अर्थ सांगू लागला, तेव्हा त्याच्या प्रत्येक शब्दावरोवर आंधळ्याच्या डोळ्यांतून अश्रू गळू लागले. त्यावरून तोच अर्थ खरा, असे ठरविण्यात आले. मग त्या अर्थाची टीका नीलकंठण्णार याने लिहून काढली.

या काव्यात नेडुमारण राजाची प्रशंसा आहे. हा राजा पांड्य वंशातला असून, त्याला तेरा बिरुदे लावलेली आहेत. त्याने एकंदर वीस लढाया मारल्या; त्यांपैकी बऱ्याचशा चेर राजांशी झाल्या. या राजाने समुद्रमंथन करून देवांना अमृत मिळवून दिले, असेही त्या काव्यात म्हटले आहे. [म. ज्ञा. को.]

**इलयंकुडी मार** द. भारतातील एक शैव संत. याने साधु-संतांच्या सेवेत आपली सर्व संपत्ती खर्च केली. एकदा पावसाळ्यात शंकराने त्याच्या घरी येऊन भोजनाची इच्छा प्रदर्शित केली असता इलयंकुडीच्या पत्नीने शेतात पेरलेले भात वेचून आणले, त्याचा स्वयंपाक केला व अतिथीला भोजन वाढले. या तत्पर आतिथ्याने प्रसन्न होऊन शंकराने त्या उभयतांवर कृपा केली. [पे. पु.]

**इलयतू** तमिळनाडू व केरळमधील तिरुवितांकूर या प्रदेशांतील एक जात. इलयतू शब्दाचा अर्थ कनिष्ठ किंवा लहान असा आहे. हे मलवारी ब्राह्मणांपैकीच असून, ते मलयाळम् शूद्रांचे उपाध्येपण करतात. खाणेपिणे, कपडालत्ता, दागदागिने, या बाबतीत त्यांचे नंपूतिरी ब्राह्मणांशी बरेच साम्य आहे.

इलयतूंना एलदय असेही म्हणतात. हे नायरांची भिक्षुकी करून तिच्यावर उपजीविका करतात. परंतु ही मिळकत फार थोडी असल्यामुळे यांचे सर्व जीवन दारिद्र्यातच जाते. यांच्या घराजवळ सर्पवाटिका असते व त्या ठिकाणी ते नागाची पूजा करतात. नंपूतिरी हे यांचे उपाध्ये असतात.

**विवाहप्रथा** – यांची विश्वामित्र व भारद्वाज अशी दोनच गोत्र आहेत. मुलींची लग्ने वारा ते अठरा वर्षांपर्यंत होतात. यांच्यात हुंड्याची चाल नाही. तरीपण वराला कमीत कमी एकशेचाळीस रुपये तरी द्यावे लागतात. याचे कारण असे, की नंपूतिरीप्रमाणे इलयतू कुटुंबात फक्त वडील मुलाचेच लग्न होते. वाकीचे पुरुष नायर किंवा अंबलवासी स्त्रियांशी संबंधम् करतात.

ब्राह्मणांचे सोळा संस्कार हे पाळतात. पतिनिधनानंतर स्त्रिया केशवपन करीत नाहीत. बाळंतपणानंतर बायकांना नऊ दिवस विटाळ असतो, असे मानतात. हे यजुःशाखेचे असून, आश्वलायन व बौधायन सूत्रे प्रमाण मानतात. [म. ज्ञा. को.]

**इला** (१) वैवस्वत मनूची कन्या (म. भा. आदि. ६३.६९; ह. वं. १.१०). पुराणांत हिच्याविषयी कथा आहे ती अशी – मनूने पुत्रप्राप्तीसाठी मित्रावरुणांना उद्देशून एक यज्ञ केला. पण त्यात चुकीचा हवी पडल्याने पुत्राऐवजी यज्ञकुंडातून इला नावाची स्त्रीच उत्पन्न झाली. मित्रावरुणांच्या अंशाने झाली; म्हणून ती त्यांच्याकडे गेली. मित्रावरुणांनी तिचा स्वीकार केला व 'पुढे तू सुद्युम्न नामे पुरुष होशील' असे तिला सांगितले. नंतर ती परत जात असताना वाटेत तिला बुध भेटला. त्याच्यापासून तिला पुरूरवा हा पुत्र झाला. मात्र देवीभागवतात सुद्युम्नाला इला हे स्त्रीरूप प्राप्त झाले, असे सांगितले आहे.

इला ही मनूची आठवी संतती असून, तिने रेत व शोणित यांचे आधान करून पुरुषसंयोगाशिवाय पुरूरव्याची उत्पत्ती केली, अशीही कथा आहे (म. भा. आदि. ७५).

(२) पृथ्वीला इला हे नाव आहे. शारीरिक सामर्थ्य प्राप्त होण्याकरिता हिचे पूजन करतात (भाग. पु. २.३.५). हिने विष्णूची आराधना केली व विष्णूने मत्स्यावतार घेऊन तिचे रक्षण केले (भाग पु. ११.४.१८). [प्रा. च. को.; म. ज्ञा. को.; पु. इं.]

**इलावृत्त** जंबुद्वीपातील नऊ वर्षांपैकी एक. याच्या उत्तरेला नील, श्वेत व शृंगवान्, दक्षिणेला निषध, हेमकूट व हिमालय, पूर्वेला माल्यवान् व पश्चिमेला गंधमादन हे पर्वत आहेत. इलावृत्त हे शिवाचे निवासस्थान असून, या प्रदेशात जाणारा पुरुष पार्वतीच्या शापाने स्त्री होतो, असे सांगितले आहे. या ठिकाणी शिव हा संकर्षणाची पूजा करतो (भाग. ५. १६.७.१०).

याचा आकार धनुष्यासारखा व वर्ण कमलासारखा आहे. कदंब, जंबू (जांभूळ), पिप्पल व वट हे वृक्ष या प्रदेशात विपुल करून होतात. इथले लोक जंबूफले खातात व १३००० वर्षे जगतात.

आग्नीध्र व उपचिती अप्सरा यांचा इलावृत नावाचा पुत्र या वर्षाचा अधिपती असल्यामुळे या वर्षाला त्याचे नाव मिळाले आहे (विष्णु पु. २.१).

इलावृत्त हा या प्रदेशाचा पहिला राजा होता. इथे बरीच अनेक यज्ञ केले (मत्स्य पु. ११३.१९).

इलावृतात चैत्ररथ, गंधमादन, वैभ्राज व नंदन ही वने असून, चार सरोवरेही आहेत. [प्रा. च. को.; पु. इं.]

मुसलमान लोकांचे सौर वर्षमान. धार्मिक दृष्ट्या मुसलमान लोक हिजरी सनाला महत्त्व देतात.

**इलाही** परंतु हिजरी काल हा चांद्रमानाचा असल्यामुळे हिशेबाच्या किंवा व्यवहाराच्या दृष्टीने त्यात बऱ्याच अडचणी येतात. त्या टाळण्यासाठी बहुतेक सर्व मुसलमानी देशांत कोणत्या ना कोणत्या तरी रूपाने सौरवर्षमानाचा स्वीकार केला गेला आहे. अकबर गादीवर आला तेव्हा हिजरी सन चालू होता. पुढे अकबराने आपल्या २९ व्या राजवर्षी (इ. स. १५८४) 'तारीख-इ-इलाही' या नव्या सौर कालाचा प्रचार आपल्या राज्यात सुरू केला. इतकेच नव्हे; तर गतकालातील माहितीही याच कालमानाप्रमाणे देण्याविषयी फर्माविले.

केवळ सौरमान धरल्याने प्रत्येक वर्षाचा आरंभ मेष-संक्रांतीच्या दिवशी किंवा प्रायः ता. ११ (जुनी पद्धत) किंवा ता. २१ (नवी पद्धत) मार्च रोजी होई. क्वचित एखादा दिवस मागेमागेही होई. इलाही वर्षातील महिने व दिवस इराणी पद्धतीचे आहेत.

शाहजहानपासून पुढील बादशहांनी इलाही कालाचा सामान्यतः त्याग केला असला, तरी त्याचा प्रचार शेवटच्या मोगल बादशहाच्या अखेरीपर्यंत चालू होता. [ सं. मि. ]

**इलिगेर** कर्नाटकातील एक जात. यांना कलाल आणि शिंगीदार असेही म्हणतात. यांच्यांत चार पोटभेद आहेत. हे लोक बसव, तुळजाभवानी, हनुमान, यल्लम्म व रतनराय यांना भजतात. धर्मविधी चालविण्यासाठी ब्राह्मण व जंगम या दोघांनाही बोलावितात. यांचा अजय्या नावाचा लिंगायत धर्मगुरू असतो. ताडी काढणे हा यांचा धंदा आहे; पण हे ताडी पीत नाहीत. कारण ताडीला ते बहीण मानतात. इतर विधी कब्बलिगरांप्रमाणे करतात. पाहा – कब्बलिगर.

**इलेश्वरोपाध्याय** (इ. स. चे ८ शतक) तेलंगी कवी व विद्वान. श्रीशैलाजवळच्या इलेश्वर या गावी हा राहत असे. न्याय, मीमांसा, व्याकरण, धर्मशास्त्र, इ. शास्त्रांत हा पारंगत होता. हा शांकरमताचा अनुयायी असून, वादपटू होता. याला अनेक राजांकडून इनामे व बक्षिसे मिळाली होती. ज्योतिष्मती व इलेश्वरविजय हे ग्रंथ याने रचले आहेत. याने एक विद्यालय स्थापले होते. [ म. च. को. ]

**इल्म** या शब्दाचा अर्थ ज्ञान असा आहे. इस्लामी धर्मशास्त्रात हा शब्द धर्मज्ञान अशा अर्थी वापरलेला आहे. ज्ञानाचे प्रकार दोन – पहिला इल्मुल्-मबादी म्हणजे प्राथमिक ज्ञान. कुराणाचे व हदीस (देव-वचन) चे पाठान्तर केल्याने हे ज्ञान होते. दुसरा इल्मुल्-मकासीद म्हणजे त्यातील तत्त्वांचे ज्ञान. ज्ञानाचा एक तिसराही प्रकार आहे. तो म्हणजे सिद्ध पुरुषांना होणारे अंतर्ज्ञान किंवा त्यांच्या हृदयात पडणारा दिव्य प्रकाश होय. याला ते इल्मुल्-मुकाशफा असे म्हणतात. या दिव्य ज्ञानाला इल्मुल्-हकीका असेही नाव आहे. धर्मज्ञान मिळविणे व ते दुसऱ्यांना देणे, हा फार स्तुत्य उपक्रम होय, असे मुहंमद पैगंबराने सांगितले आहे. [ डि. इ. ]



**इल्यास की किश्ती** हिंदूंच्या श्रावण महिन्यात प्रत्येक शुक्रवारी मुसलमानी पुराणांतील 'ख्वाज खिज्र' नावाच्या जलदेवतेला प्रसन्न करण्यासाठी मुसलमान लोक हा उत्सव करतात. एलिशा किंवा इल्यास या देवदूताला ते जलदेवतेचा अवतार समजतात. इल्यासने अनेक वर्षे तपश्चर्या केली व त्याला जलदेवता प्रसन्न झाली. त्याच्या विनंतीवरून, तिने पर्जन्यवृष्टी करून सर्वत्र समृद्धी केली. त्या गोष्टीची स्मृती म्हणून हा उत्सव करतात. त्यासाठी नावेच्या आकाराचा एक बांबूचा सांगाडा तयार करून त्यावर सुती, रेशमी किंवा जरतारी कापड ताणून बसवितात. या नावेला किश्ती असे नाव आहे. किश्तीत अनेक पणत्या लावतात व तिची नदीपर्यंत ढोल-ताशांच्या गजरात मिरवणूक काढून ती नदीत सोडून देतात. [ आ. मु. इं. ]

**इल्लम्** केरळातील नंपूतिरी ब्राह्मणांच्या पितृसत्ताक कुटुंबपद्धतीला मलयाळम् भाषेत इल्लम् असे नाव आहे. इल्लम् कुटुंबात फक्त ज्येष्ठ पुत्रच पैतृक संपत्तीचा वारस होतो. इतर भावांना त्यात वाटा मिळत नाही. त्याचप्रमाणे फक्त थोरल्या मुलालाच जातीतल्या मुलीशी लग्न करता येते. बाकीचे मुलगे नायरांच्या मुलींशी 'संबंधम्' करतात. 'संबंधम्' म्हणजे वैदिक संस्काराशिवाय केलेले लग्नच; पण त्यात इच्छेनुसार विभक्त होण्याची मोकळीक असते. संबंधम्ची वधू नवऱ्याच्या घरी नांदायला न येता सदैव माहेरीच राहते. तिचा पतीच रात्री तिच्या घरी राहायला जातो. तिच्या पालन-पोषणाची जबाबदारीही नवऱ्यावर न पडता तिच्या माहेरच्या माणसांवर असते. वर्षाला लागणारे तेल आणि दोन साड्या फक्त नवऱ्याने तिला द्यायच्या असतात. संबंधम्च्या या पद्धतीमुळे इल्लम्मध्ये भर पडत नाही व मिळकतही विभागली जात नाही.

इल्लम्मध्ये जातीतल्या मुलीशी लग्न केलेला मोठा मुलगाच मिळकतीचा सर्वाधिकारी असतो. त्याला कुटुंबात मोठाच मान

असतो. तोच धाकट्या भावांचे आणि मुलांचे भरण पोषण करतो. इल्लम्‌मधील देवघर आणि होमशाळाही तोच चालवितो. संस्कार आणि वार्षिक सण यांच्यासाठी तोच आपल्या गंगाजळीतून सगळा खर्च करतो. त्या घरात त्याला एकट्यालाच शयनगृह असते. इतर पुरुष रात्री आपापल्या संबंधम् केलेल्या वधूच्या घरी जातात.

नंपूतिरी लोकांच्या जीवनात शिक्षणाला महत्त्वाचे स्थान आहे. नंपूतिरींच्या धार्मिक समजुती बऱ्याच तीव्र आहेत. सोवळे-ओवळेही कडक आहे. घरातल्या मुलामुलींना ते कडक शिस्तीत वागवितात. स्त्रियांच्या पातिव्रत्याची कसोशीने जपणूक करतात. त्यासाठी त्यांनी स्त्रियांना पडदा पाळायला लावले आहे. धाकट्या भावाने वडील भावजयीशी बोलणे किंवा तिच्याकडे पाहणेही ते निषिद्ध मानतात.

विवाह ठरविण्यापूर्वी नंपूतिरी लोक पुष्कळ चिकित्सा करतात. पूर्वी शिक्षण पूर्ण करून पंधराव्या किंवा सोळाव्या वर्षी मुलगा घरी परत आला, की सामान्यतः त्याचा विवाह होत असे. सांप्रत ही वयोमर्यादा वाढली आहे. ते कुलशील व गणगोत्र पाहून वधू-वर निश्चित करतात. वरपक्ष वधूपक्षाकडून बराच हुंडा घेतो. यांच्यांत विवाह होण्यापूर्वी वधू-वरांनी एकमेकांना पाहण्याची पद्धत नाही. म्हणूनच विवाहविधीची सुरुवात मुखदर्शन या विधीने करतात. नंपूतिरींत बहुपत्नीकत्वाची चाल आहे. पण तरीसुद्धा नंपूतिरी समाजात बऱ्याच मुलींना कुंवार राहावे लागते.

कुटुंबातील ज्येष्ठ भावाशिवाय इतर भावांना संसारसुख फारसे मिळत नाही. कारण संबंधम् केलेली पत्नी व तिची मुले यांचा नंपूतिरी घरात विटाळ मानला जातो. या विचित्र रूढीमुळे घरात पुष्कळ असंतोष निर्माण होतो. पण इ. स. १९३३ पासून सर्व नंपूतिरी पुरुषांना स्वजातीतील मुलींशी लग्न करण्याची कायद्याने परवानगी मिळाल्याने ही परिस्थिती आता पालटत आहे. त्याच कायद्यामुळे पैतृक मालमत्तेवरील हक्क व तिची विभागणी, यासंबंधीही पुष्कळ सुधारणा झाल्या आहेत. त्यामुळे मूळ व्यवस्थेत बराच फरक पडला आहे. हिंदू कायद्याने एकपत्नीकत्वही त्यांना सक्तीचे झाले आहे.

इल्लम्‌मध्ये विधवाविवाह व कनिष्ठ जातींतील पुरुषांशी विवाह करण्याची चाल नाही. [सो. चें. म.; केरळ.]

**इल्लय** (इ. स. चे १५ वे शतक) एक कवी व ज्योतिषी. हा विजयनगरच्या विरूपाक्ष (इ. स. १४६५-१४८५) राजाच्या दरबारात होता. याने सूर्यसिद्धान्त या ग्रंथावर टीका लिहिली आहे. [म. च. को.]

**इल्लुपिन्नू** आदिवासी एक गृहदेवता. पूर्वकाळी कोंड, मरिया; इ. आदिवासी या देवतेसाठी नरबळी देत असत. पण हल्ली ही प्रथा बंद पडली आहे. बळी देण्याच्या वेळी ते एक लाकडी खांब पुरीत व बळी द्यायच्या माणसाला त्या खांबांशी घट्ट बांधून पुढचे विधी करीत. नरबळीचे हे स्मारक-स्तंभ अद्यापि त्यांच्या वस्तीत आढळतात. काही ठिकाणी ते झोपडीत धान्याच्या कणगीजवळ पुरलेले असतात. तर काही ठिकाणी बहुसंख्येने रस्त्याच्या कडेला पुरलेले आढळतात. या खांबांची टोके निमुळती असून, कित्येकदा त्यांना वर टोकदार दुबेळकीही असतात. कोंड लोक आपले निवासस्थान बदलताना ते खांबही आपल्या बरोबर उपटून नेऊन नव्या जागी पुरतात. कोंड तरुण लग्न झाल्यावर नवी मठी उभारतो, तेव्हा अशा प्रकारचा एक खांब तिथे पुरतो. हे खांब ते विविध प्रकारे सजवितात. वर्षांतल्या ठराविक दिवशी त्यांची पूजा करून कुटुंबाचे बरे भले व्हावे म्हणून प्रार्थना करतात. [ट्रा. आ.मि. इं.]



नरबळी – स्तंभ

**इशैक्कोल्लम्** रांगोळीचा एक संगीत प्रकार. संगीताचा ठेका किंवा सूर धरून जमिनीवर किंवा फळ्यावर ही रांगोळी रेखतात. या रांगोळीत ठराविक ठिपके व ठराविक ओळी असतात. ठिपके काढण्याची कृती वाद्यांच्या ठेक्यावर करतात. त्यासाठी आकर्षक संगीत व ठेका असणारे गीत निवडतात रांगोळीतले ठिपके व ओळी यांची संख्या समान असते. एखाद्या रांगोळीत ओळी व ठिपके यांची संख्या जर १२८ असेल तर १६ आवर्तांचा आदि तालवर्ण (१६ × ८ = १२८) उपयुक्त ठरतो. यांत पुनरावृत्ती होते. गीत व रांगोळी दोन्ही एकदमच

संपली पाहिजेत, असा नियम आहे.

याशिवाय वातावरणातील रांगोळी असाही एक प्रकार आहे. यांत अनेक मुलांना भाग घेता येतो. प्रथम एक मोठी आकृती जमिनीवर काढतात व त्याच्याभोवती मुले उभी राहतात. गीत सुरू झाल्यावर प्रत्येक ठेक्याला एकेक मुलगा ठिपक्याच्या जागी जाऊन उभा राहतो. याप्रमाणे सर्व जण जागच्या जागी उभे राहिल्यावर आकृती पूर्ण होते. सर्व मुले समान उंचीची असल्यास आकृती चांगली दिसते. [डि. सा. इं. म्यु. म्यु.]

**इष आत्रेय** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील सात व आठ क्रमांकाची दोन सूक्ते याने रचली आहेत. अग्निस्तुती हा उभय सूक्तांचा विषय आहे. अग्नीची जन्मकथा सांगताना हा म्हणतो (५.७.८)–

शुचिः ष्म यस्मा अत्रिवत् प्र स्वधितीव रीयते ।
सुषूरसूत माता क्राणा यदानशे भगम् ।।

अर्थ – खादाड पशूप्रमाणे अथवा तीक्ष्ण कुऱ्हाडीप्रमाणे वनस्पतिभक्षक आणि अन्नभक्षक अशा प्रज्वलित कर्तृत्ववान अग्नीला अरणीरूपी सुमातेने उत्पन्न केले.

हा ऋषी फार महत्त्वाकांक्षी आहे. नास्तिक व स्वार्थी लोकांचा पराजय करण्याचे सामर्थ्य आपल्या अंगी यावे, अशी याने अग्नीकडे मागणी केली आहे. [प्रा. च. को.; ऋ. म. भा.]

**इष्टका** वीट. ही पक्व, सच्छिद्र व रंगीबेरंगी असावी, असे तै. संहितेत सांगितले आहे (४.२.९.). विटा बनविण्याची क्रिया यजुर्वेदकाळी प्रगत अवस्थेला पोचलेली होती.

अग्निचयनात श्येन, रथचक्र, द्रोण, कंक, गरुड, इ. अनेक आकृती करायला सांगितल्या आहेत. या सर्व आकृती इष्टका म्हणजे विटा त्या त्या आकारात रचून तयार करीत. त्यांचे आकार व मापे काय असावी, यासंबंधी शुल्बसूत्रांत बराच तपशील दिलेला आहे. चयनसंस्था ही संपूर्णपणे इष्टकांवरच आधारलेली संस्था आहे. मोहेंजोदडो येथे सनपूर्व ३००० वर्षांच्या भाजलेल्या विटा सापडल्या आहेत. गुजरातमधील लोथल येथील उत्खननातही विटांची भट्टी व विटांची घरे सापडली आहेत. अनेक प्राचीन मंदिरांच्या व प्रासादांच्या विटांनी बांधलेल्या भिंती अद्यापि चांगल्या अवस्थेत आढळतात. पाहा – अग्निचयन. [एन्सा. हिं. आ.]

**इष्टजात्यवाप्ती** एक काम्य व्रत. चैत्र किंवा कार्तिक मासात व्रताचा आरंभ. विष्णूची पूजा व व्रताच्या शेवटी गोप्रदान, असा याचा विधी आहे. फल–अन्य जन्मी इष्ट जातीत जन्म मिळणे (विष्णुध. पु. ३.२००.१–५). [हि. ध.]

**इष्टदेवता** कोणतेही महत्त्वाचे धार्मिक किंवा मांगलिक कृत्य निर्विघ्नपणे पार पडावे, म्हणून प्रथम काही संरक्षक देवतांचे स्मरण व पूजन करतात. या देवतांत इष्टदेवता म्हणूनही काही देवता असतात. कुलदेवतांप्रमाणेच इष्टदेवताही वेगवेगळ्या कुलांच्या वेगवेगळ्या असतात. सामान्यतः विशिष्ट प्रसंगी नवसाला पावणाऱ्या किंवा कर्त्याच्या आवडीच्या असणाऱ्या देवतांची इष्टदेवतांत गणना होते. प्रत्येक कृत्याच्या संकल्पात ‘इष्टदेवताभ्यो नमः, कुलदेवताभ्यो नमः’ असा प्रारंभीच नमस्कार असतो. इष्टदेवतेसंबंधी काही वार्षिक कृत्येही असतात.

**इष्टलिंग** वीरशैव किंवा लिंगायत संप्रदायाचे लोकही शंकराच्या मूर्तीची पूजा न करता शिवलिंगाची पूजा करतात. हे लिंग ते सदैव अंगावर बाळगतात. याला इष्टलिंग म्हणजे इष्टदेवतांचे लिंग असे नाव आहे. या लिंगाची उपासना हीच सर्वश्रेष्ठ उपासना होय, असे त्यांचे मत आहे. [डे. हिं. इ.]

**इष्टापूर्त** (इष्ट + पूर्त) हा शब्द फार प्राचीन आहे. ऋग्वेदात तो आढळतो. ‘सं गच्छस्व पितृभिः सं यमेनेष्टापूर्तेन परमे व्योमन्’ (१०.१४८) या मंत्रात त्या शब्दाचा अर्थ ‘यज्ञ व परोपकारी कृत्ये यांपासून मिळालेले फल किंवा पुण्य’ असा आहे. अथर्ववेदातही अशाच अर्थी इष्टापूर्त हा शब्द आलेला आहे.

इष्ट व पूर्त असे या शब्दाचे दोन भाग पडतात. इष्ट म्हणजे यज्ञयाग आणि पूर्त म्हणजे जे भरलेले असते ते.

एकाग्निकर्म हवनं त्रेतायां यच्च हूयते ।
अन्तर्वेद्यां च यद्दानमिष्टमित्यभिधीयते ।
वापीकूपतडागानि देवतायतनानि च ।
अन्नप्रदानमारामः पूर्तमित्यभिधीयते ।

अर्थ – गृह्याग्नी व श्रौताग्नी यांत केलेल्या हवनाला आणि श्रौतयज्ञात वेदीत केलेल्या दानाला इष्ट असे नाव आहे; तर वापी, कूप, तलाव, देवस्थान व अन्न यांचे दान करणे व सार्वजनिक उद्याने तयार करणे, यांना पूर्त असे नाव आहे.

ग्रहणप्रसंगी सूर्यसंक्रांतीला व द्वादशीला दान देणे व रुग्णशुश्रूषा करणे, यांचाही काही शास्त्रकार इष्टापूर्तांत समावेश करतात. अत्री म्हणतो –

इष्टापूर्तो द्विजातीनां धर्मः सामान्य इष्यते ।
अधिकारी भवेच्छूद्रो पूर्ते कर्मे न वैदिके ।।

अर्थ – इष्टापूर्त हा त्रैवर्णिकांचा सामान्य धर्म आहे. शूद्र पूर्तधर्माचा अधिकारी होऊ शकतो; पण वैदिक म्हणजे इष्ट धर्माचा होऊ शकत नाही.

यावरून इष्टधर्म हा वैदिक परंपरेतील उच्च वर्णांचा असून, पूर्तधर्म हा पौराणिक म्हणजे सर्वसामान्य लोकांचा धर्म आहे, हे कळून येते. [हि. ध.]

**इष्टिश्राद्ध** स्मृतिचंद्रिकेत श्राद्धाचे बारा प्रकार सांगितले आहेत. त्यांपैकी कर्मांगश्राद्ध तेच इष्टिश्राद्ध होय.

याला श्राद्धतत्त्वात इच्छाश्राद्ध (इच्छेला येईल तेव्हा केलेले श्राद्ध) असे नाव दिलेले आहे. [ हि. ध. ]

**इष्टी** यज्ञसंस्थेतले एक विधान. इष्टी म्हणजे याग. दर्शेष्टी व पूर्णमासेष्टी या प्रकृति-इष्टी होत. विविध कामनांच्या पूर्तीसाठी श्रौतसूत्रांत विविध इष्टी सांगितल्या आहेत.

**इसराज** दिलरुब्यासारखे एक तंतुवाद्य. याचा वरचा भाग सतारीसारखा व खालचा भाग सारंगीसारखा असतो. या दोन भागांना अनुक्रमे डांड व कुंडी अशी नावे आहेत. इसराजाची कुंडी बकऱ्याच्या चामड्याने मढविलेली असते. या वाद्यात पोलादाचे किंवा पितळेचे सोळा पडदे असतात. यातील ४ तारा मुख्य असून, बाकीच्या १५-२० गौण असतात. त्यांना तरब असे म्हणतात. यातील सतारीसारखा भाग डाव्या हाताने व खालचा भाग उजव्या हातात धनुकली घेऊन वाजवितात. हे वाद्य सारंगीसारखे वाजविले जात अस त्यामुळे या वाद्यात गायकाच्या गळ्यातील सुरावट पूर्णपणे दाखविता येते. त्याचप्रमाणे याला पडदे असल्यामुळे याच्यावर गतकारीही करता येते. याचा नाद दिलरुब्यापेक्षा मृदू असतो. [ 'संगीत' मासिक, जानेवारी १९५१; भा. वा. इ. ]



इसराज

**इसवी सन** ही कालगणना आता आंतरराष्ट्रीय व्यवहारासाठी जगात सर्वत्र प्रचलित आहे. येशू ख्रिस्ताच्या जन्मापासून ही कालगणना मानतात. ख्रिस्ताच्या जन्मानंतर सुमारे ५३० वर्षांनी एका ख्रिस्ती धर्माधिकाऱ्याने गणिताच्या आधारे ख्रिस्तजन्माचा काळ ठरविला व तेव्हापासून ही गणना सुरू झाली.

सौर वर्ष हे ३६५ दिवस, ५ तास ४८ मिनिटे व ४५.३७ सेकंद एवढ्या मानाचे असते. परंतु इसवी सनात वर्षाचे ३६५ दिवस धरल्यामुळे चार वर्षांनी सुमारे चोवीस तास कमी पडतात. ते भरून काढण्यासाठी चार या संख्येने पूर्ण भाग जाणाऱ्या वर्षी फेब्रुवारीचे दिवस २९ धरतात व त्या वर्षाचे दिवस ३६६ होतात. या वर्षाला लीपवर्ष असे नाव आहे. पण या योजनेने जो थोडासा काल अधिक होतो, तो कमी करण्यासाठी १०० या संख्येने नि:शेष भाग जाणाऱ्या वर्षी म्हणजे १७००, १८०० इ. वर्षी सदर एक दिवस जास्त धरीत नाहीत. पण याही प्रकाराने काही काळ कमी पडतोच. तो ४०० ने नि:शेष भाग जाणाऱ्या वर्षी ३६६ दिवस धरून भरून काढतात. या प्रकारे इ. सनाचे ३६५ किंवा ३६६ दिवस मानून गणितागत वर्षमानाशी त्याचा मेळ घालतात.

इ. स. च्या गणनेत नवी व जुनी अशा दोन पद्धती आहेत. ज्यूलियस सीझरने वर्षाचे ३६५ दिवस मानून दर चौथ्या वर्षी एक दिवस अधिक धरावा, असे ठरविले. पण या योजनेने दर वर्षी सुमारे ११ मिनिटे १४ सेकंद एवढा काळ अधिक होत होता. इ. स. १५८२ पर्यंत असे दहा दिवस वाढले होते. म्हणून १३ वा पोप ग्रेगरी याने त्या वर्षी ऑक्टोबर महिन्यात दहा दिवस कमी करावे, असा हुकूम काढला. रोमन कॅथॉलिक पंथाच्या राष्ट्रांनी हा हुकूम मानला. परंतु इंग्लंडने इ. स. १७५२ पर्यंत जुनी पद्धतच चालू ठेवली. तोपर्यंत शास्त्रशुद्ध व लौकिक वर्षमान यांत आणखी एका दिवसाचा म्हणजे ११ दिवसांचा फरक पडला होता. म्हणून त्याच वर्षी इंग्लंडमध्ये वर्षाचे अकरा दिवस कमी करण्यात येऊन ३ सप्टेंबरला १४ सप्टेंबर मानून वरील सुधारणेला मान्यता देण्यात आली. या पद्धतीच्या पंचांगालाच ग्रेगरियन कॅलेंडर म्हणतात. [ पं. ज्यो. शा.; सं. भि. ]

**इसिगिलिपस्स** राजगृहाभोवती असलेल्या पाच टेकड्यांपैकी एका टेकडीचे नाव. या टेकडीवर पाचशे बुद्ध राहत होते. ते या टेकडीवर गेल्याचे लोकांनी पाहिले; पण परत आल्याचे मात्र पाहिले नाही. त्यामुळे या टेकडीला ऋषी व आचार्य यांना गिळणारी टेकडी असे नाव मिळाले (मज्झिम ३.६८.७१). बुद्धाने अनेक भिक्षूंसह या टेकडीवर वास्तव्य करून काही प्रवचने केली होती. [ हि. जॉ. ए. इं. ]

**इस्तिखारा** इस्लामी धर्मातील, वर किंवा आशीर्वाद मागण्यासाठी केलेली प्रार्थना. 'मी हाती घेतलेल्या कार्यात मला यश दे, मला मार्गदर्शन कर,' अशा प्रकारे ही प्रार्थना करावी, असे मुहंमद पैगंबराने सांगितले आहे. पुढे या प्रार्थनेचा उपयोग कौल लावण्यासाठी होऊ लागला. एखादा संकल्प मनात धरून तो सिद्धीस जाईल की नाही, हे पाहण्यासाठी ही प्रार्थना करायची व मग त्याचा पडताळा पाहायचा, अशी प्रथा मुसलमानांत रूढ आहे. [ डि. इ. ]

**इस्माईल हाजी मौलवी मुहंमद** (इसवी सन १७८१-१८३१) याचा जन्म दिल्लीजवळच्या फोव्हा गावी झाला. याने मक्केची यात्रा केली होती. इस्लामी धर्म हिंदू धर्माच्या तावडीत सापडला असून, त्याचे स्वरूप विकृत झाले आहे, असे याचे मत होते. म्हणून इस्लामचे शुद्ध स्वरूप पुनश्च प्रस्थापित करण्यासाठी शुद्ध इस्लामी मताचा याने उपदेश सुरू केला. याला अनुयायीही बरेच मिळाले. याच्या पंथाला इस्माइली पंथ म्हणतात. पण याची चळवळ तत्कालीन ब्रिटिश सरकारला रुचली नाही. त्यामुळे याला दिल्लीहून पंजाबात जावे लागले. तिथे अफगाणांच्या मदतीने याने शिखांविरुद्ध लढाई सुरू केली. त्या लढाईतच पुढे हा मरण पावला. अद्यापि वायव्य सरहद्दीवरच्या पहाडांतून याचे अनुयायी दिसतात. [ म. च. को. ]

**इस्लाम** मुहंमद पैगंबराने स्थापन केलेल्या धर्माला इस्लाम अशी संज्ञा आहे. इस्लाम हा अरबी शब्द असून, त्याचा अर्थ शांतीमध्ये प्रवेश करणे असा आहे. परमेश्वराला शरण जाणे, मानवमात्रावर प्रेम करणे, व अहिंसा धर्माने वागणे हे शिकविते, तो इस्लाम, असा त्याचा लाक्षणिक अर्थ आहे.

मुहंमद पैगंबराचा जन्म इ. स. ५७० साली झाला. त्याने हा धर्म स्वतःच्या बुद्धीने निर्माण केला नाही, तर त्याला या धर्माचे इलहाम (समाधिस्थितीत दर्शन) झाले. तेव्हापासून लोक त्याला पैगंबर, नबी व रसूल म्हणू लागले. मुहंमदाच्या द्वारे ईश्वराने आपला पैगाम (संदेश) पृथ्वीवर पोचविला, म्हणून मुहंमदाला पैगंबर ही उपाधी मिळाली. नबी म्हणजे परम ज्ञानाची घोषणा करणारा. याचा दुसरा अर्थ परमेश्वर व समजदार प्राणी यांच्यातलां मध्यस्थ असाही आहे. रसूल म्हणजे प्रेषित किंवा दूत होय. मुहंमद हा रसूल आहे. कारण त्याने परमेश्वर व मानव यांच्यामध्ये धर्मदूताचे काम केले.

'ला इलाह इल्लिल्लाह मुहम्मदुर्रसूलिल्लाह' हा इस्लामचा मूलमंत्र आहे. अल्लावाचून दुसरा कोणी पूजनीय नाही व मुहंमद त्याचा रसूल अर्थात दूत आहे, असा या मंत्राचा अर्थ आहे. केवळ अल्लाला मानणारा मुसलमान हा पाक मुसलमान ठरत नाही; तर जो अल्लाबरोबरच मुहंमदालाही नबी, रसूल व पैगंबर मानतो, तो खरा मुसलमान होय.

इस्लामचे इमान (श्रद्धा) व अमल (आचरण) असे दोन विभाग पडतात. इमान म्हणजे पुढील सहा गोष्टींवर श्रद्धा ठेवणे होय-(१) अल्लाह (२) देवदूत (३) देवप्रणीत ग्रंथ (४) देवाचे प्रेषित (५) अंतिम निवाड्याचा दिवस व (६) ईश्वराचे आदेश. नबीने घोषित केलेल्या सत्याची स्वीकृती म्हणजे इमान होय. अहादीसमध्ये वचन आहे, की इमानच्या ७० शाखा असून त्यांतली सर्वोच्च शाखा, अल्लाहव्यतिरिक्त कोणाची पूजा करू नये ही असून, एखाद्याचे नुकसान होईल, ती गोष्ट न करणे ही सर्वांत खालची शाखा आहे.

कुराणाच्या अमल या विभागात पुढील गोष्टी आवश्यक धार्मिक कृत्ये म्हणून सांगितल्या आहेत-(१) कलमा- 'ला इलाह . . .' या मंत्राचे पठण करणे (२) नमाज- दिवसातून पाच वेळा ईश्वराची प्रार्थना करणे (३) रोजा - रमजान महिन्यात महिनाभर फक्त एकदा संध्याकाळी सूर्यास्तानंतर भोजन करणे. (या उपवासासाठी हा महिना अशाकरिता निवडला, की याच महिन्यात कुराण पृथ्वीवर अवतीर्ण झाले.) (४) जकात - वार्षिक उत्पन्नाचा चाळिसावा हिस्सा दानधर्मात खर्च करणे व (५) हज - मक्केची यात्रा करणे.

अशा प्रकारे सहा गोष्टींवर पूर्ण श्रद्धा व पाच आचारांचे पालन मिळून इस्लाम धर्म बनतो. इस्लामचे पूर्ण अर्थाने पालन करणाऱ्याला मुअमिन म्हणतात व वरीलपैकी एखादे श्रद्धास्थान किंवा एखादाही आचार अमान्य समजणाऱ्या माणसाला काफिर म्हणतात. मुस्लिमेतर लोक हे मुसलमानांच्या दृष्टीने काफिर होत.

ईश्वर हा एक, केवळ एक आहे, या तत्त्वावर मुहंमदाचा सर्वांत अधिक भर आहे. या विषयात तो कोणालाही कसलीही शंका उपस्थित करू देत नाही. तो म्हणतो, की 'ईश्वर एक आहे व त्याचीच उपासना केली पाहिजे हे सांगण्यासाठी मी आलो आहे.'

इस्लामने केवळ व्यक्तीच्याच नव्हे, तर साऱ्या समाजाच्या सर्व आचारांचे निर्धारण केले आहे. कुराणात केवळ पारलौकिक गोष्टींचीच चर्चा नसून ऐहिक जीवनाविषयीही तिथे पूर्ण विचार केलेला आहे. माणसा-माणसांतले संबंध, राजनीती, न्याय, शासन, युद्ध, शांती, विवाह, घटस्फोट, सावकारी, दान, इ. अनेक विषयांवर कुराणात उपदेश आहे. व्याज घेणे पाप आहे (३.१४.१), कृपणता हा गुन्हा आहे (४.६.४), मद्यपान व द्यूत महापाप आहे (२.२७.३) जो मनुष्य दुसऱ्यावर अन्याय करतो व जगात धर्मात्मा म्हणून स्वतःचा बडेजाव मिरवितो, त्याला घोर यातना भोगाव्या लागतात (५२.४.१२.) असे कुराणात प्रतिपादिले आहे.

जिहाद हे इस्लामने एक राष्ट्रीय कर्तव्य मानले आहे. जिहादचा अर्थ धर्मयुद्ध असा आहे. क्लेन नावाच्या एका विद्वानाने याचा अर्थ संघर्ष असा केला असून, त्याची तीन क्षेत्रे मानली आहेत-(१) दृश्य शत्रूच्या विरुद्ध संघर्ष, (२) अदृश्य शत्रूच्या विरुद्ध संघर्ष व (३) इंद्रियांच्या विरुद्ध संघर्ष.

सामान्यपणे इस्लामच्या प्रचारासाठी जी युद्धे लढली गेली, त्यांना पवित्र अर्थ देण्यासाठी या शब्दाचे प्रचलन झाले आहे.

इस्लाम हा प्रारंभी केवळ मानवाचा जीवनधर्म होता; पण मुहंमदानंतर थोड्याच काळात इस्लामचे राज्य व त्यासाठी सैन्यसंघटन एवढा व्यापक अर्थ त्याला प्राप्त झाला. समस्त विश्वात इस्लामचे साम्राज्य प्रस्थापित करण्याची कल्पना मुहंमद पैगंबराच्याच मनात जागृत झाली होती. शेवटी शेवटी त्याला असे वाटू लागले होते, की सारी पृथ्वी एक राज्य, एक धर्म आणि एक नबी, यांच्या आधिपत्याखाली यावी.

मुहंमदानंतर इस्लाम याच प्रेरणेने प्रस्फुरित होऊन जग जिंकायला निघाला. त्या काळी ख्रिस्ती देशांत राजा व धर्मोपदेशक या दोन वेगळ्या संस्था होत्या. भारतवर्षातही राजा आणि पुरोहित हे भिन्न होते. पण इस्लामी धर्मात धर्मगुरू व राजा या दोन्ही संस्था एका व्यक्तीत एकवटल्या. धर्मामुळे त्यांच्या तलवारीला तेज चढले व तलवारीमुळे धर्माचा दरारा वाढला.

इस्लाम हा जगातला सर्वांत अधिक अपरिवर्तनीय असा धर्म आहे. पहिल्या प्रथम हा धर्म जेव्हा अरबस्तानाच्या बाहेर पसरू लागला, तेव्हा त्यावर अनेक प्रकारच्या अन्य मतांचा प्रभाव पडू लागला होता. त्यामुळे मूळ इस्लामच्या आचारविचारांत परिवर्तन होते की काय, अशी शंका खलिफांना येऊ लागली. आणि तसे काही घडू नये म्हणून, त्यांनी इस्लामच्या नियंत्रणासाठी त्रिविध व्यवस्था पुढीलप्रमाणे करून ठेवली –

(१) **इज्मा** – सर्व युगांत व सर्व ठिकाणी इस्लामच्या उपदेशकांत पूर्ण मतैक्य असावे. जेव्हा एखाद्या प्रश्नावर मतभेद उत्पन्न होईल, तेव्हा उलेमांच्या सभेत (धर्मपंडितांच्या) त्यावर चर्चा व्हावी आणि तिच्यात जो निर्णय ठरेल, तो सर्वांनी मान्य करावा.

(२) **सुन्ना** – पैगंबराने जे कार्य केले, त्याचे अनुकरण अहादीसच्या आधारे केले जावे. (अहादीस म्हणजे मुहंमदाच्या वचनांचा संग्रह होय. सर्व प्रकारच्या ज्ञानाच्या बाबतीत मुस्लीम लोक अहादीसचे प्रामाण्य मानतात.)

(३) **कयास** – पैगंबराच्या मूळ उपदेशातून कोणता अर्थ निष्पन्न होतो, त्यावर, विद्वानांचे विवेचन म्हणजे कयास होय. अर्थात हे विवेचनही कुराण, अहादीस व इज्मा यांच्या आधारेच केलेले असले पाहिजे.

अशा प्रकारे मूळ कुराण व त्यानंतर अहादीस, इज्मा व कयास असे इस्लामचे चार आधारस्तंभ ठरले.

इस्लाम या जगात भ्रातृभावाला फार महत्त्व देतो. मुहंमदाने म्हटले आहे, की 'सर्व मुसलमान एकमेकांचे बंधू आहेत; म्हणून एकमेकांत लढणाऱ्या त्या बंधूंचे ऐक्य करा' (४.१.१०). इस्लामच्या वैभवकाळात त्या धर्मातले राव-रंक खांद्याला खांदा लावून लढले, मांडीला मांडी लावून मशिदीत नमाज पढले व एका पंक्तीला बसून एकत्र जेवले. मुहंमदानंतरच्या काही खलिफांनीही जाणीवपूर्वक या भ्रातृभावाची त्या समाजात वाढ केली.

**स्वर्ग-नरक** – इस्लामी कल्पनेप्रमाणे स्वर्ग सातव्या आकाशात (अर्श) अवस्थित आहे. नरक उत्तरेस व स्वर्ग दक्षिणेस असून त्या दोहोंच्या मध्ये एक भिंत आहे. स्वर्गात एक पुष्पोद्यान असून, त्यामध्ये निर्झर खळाळतात, कारंजी उडतात आणि दूध व मध यांच्या नद्या वाहतात. तिथे सोन्याचे बुंधे असलेले वृक्ष असून, त्यांना मधुर फळे लागतात. तिथली शराब मधुर व सफेत असते. ती प्याल्याने नशा चढत नाही. तिथे हूरयुल आयून जातीच्या तरुणी असतात. त्यांचे डोळे काळे आणि दीर्घ असतात (कु. ३७.२.२०-२६). त्याशिवाय तिथे पुण्यात्म्यांच्या परिचर्येसाठी सुंदर सुंदर लडकेही असतात.

कुराणात अनेक प्रकारच्या नरकांचीही कल्पना केलेली आहे. हे नरक अत्यंत भयानक आणि विकराल आहेत. मनुष्य हे नरकातल्या अग्नीचे इंधन असते (२.३.४). कुराणावर विश्वास न ठेवणाऱ्या माणसाला आगीच्या खाईत फेकले जाते. तिथे मृत्यू जीवाच्या जवळ येतो पण जीव मरत मात्र नाही. जीवाचे स्वर्ग-नरक भोग हे त्याच्या कर्माच्या अधीन आहेत. कुराणातले स्वर्ग व नरक हे दोन्ही अनंत काल भोगावे असतात. हिंदुकल्पनेप्रमाणे इस्लामी कल्पनेत भोगाने पुण्यपापांचा क्षय होत नाही. कुराणाचा फातिहा नामक अध्याय हा कर्मफलाच्या विवेचनाचा अध्याय असून, प्रत्येक मुसलमानाला रोज पाच वेळा त्याचे स्मरण करविले जाते. त्यात म्हटले आहे की मनुष्याला बऱ्यावाईट कर्मांचे परिणाम अवश्य भोगावे लागतात. कणभर सत्कृत्य किंवा दुष्कृत्य यांची फळे 'याचि देही याचि डोळा' भोगावी लागतात. कुराणाच्या मताप्रमाणे मनुष्य-जन्म हा पहिला आणि तोच शेवटचा जन्म आहे. देहाच्या संबंधाने आत्म्यावर सुख-दुःखाची छाप पडते, असे कुराण म्हणते; पण ते आत्म्याला देहाहून भिन्न मानीत नाही. मानवदेह कबरीत जातो तेव्हा तिथून त्याच्या ज्या दुसऱ्या एका जीवनाचा आरंभ होतो, त्याला बरज़ाख असे नाव आहे. पार्थिव जीवन समाप्त करून कयामतच्या दिवसाची मार्ग-प्रतीक्षा करीत कबरीत पडून राहणे, असा बरजाख शब्दाचा अभिप्राय असला तरी बरजाख म्हणजे नेमके काय, याविषयी इस्लामी धर्माचार्यांत मोठा विवाद आहे. माणसाला दुसऱ्या जीवनाचे भान करून देणारी अशी ती अवस्था आहे. कदाचित

ती अर्धचेतन अवस्थाही असू शकेल. मुहंमदाच्या वचनावरून दिसते, की ही अवस्था जाणीवरहित नसते. मनुष्याचा मृत्यू हा केवळ त्याच्या पार्थिव शरीराचा नाश असतो. त्याचा आत्मा कोणत्या तरी वेगळ्या स्वरूपात कबरीत जीवित असतो व याच आत्म्याला कयामतच्या दिवशी कबरीतून उठून ईश्वराच्या पुढे उभे राहावे लागते.

**कयामत** – निवाडयाच्या दिवसाला कयामत असे नाव आहे. कुराणातले कयामतचे वर्णन महाभीषण आहे. ते पुष्कळ अंशी कल्पान्तकालीन महाप्रलयासारखे आहे. उदा० जेव्हा कयामत येईल, तेव्हा सूर्य-चंद्र एक होतील, आकाशाचे तुकडे तुकडे होतील, तारे लुप्त होतील, पर्वतांची धूळ उडेल इत्यादी. त्या दिवशी सूरचा आवाज होताच प्रत्येक आत्मा आपापल्या कबरीतून वर उठेल व ईश्वरापुढे जाऊन उभा राहील. त्या दिवशी त्याला शुभाशुभ कर्माबद्दल बक्षीस किंवा शिक्षा मिळेल. त्या वेळी प्रत्येक माणसाचे पुण्य-पाप तोलण्याचे काम जिबरील हे देवदूत करतील. ज्याचे पुण्य अधिक भरेल, तो स्वर्गात व ज्याचे पाप अधिक भरेल, तो नरकात जाईल. त्या दिवशी कोणी कोणाचा मित्र राहणार नाही आणि कोणाला कोणाची मदत होणार नाही.

**ईश्वरकल्पना** – इस्लामी धर्मात अल्लाशिवाय दुसरा कोणी ईश्वर नाही. भूमी आणि आकाश अर्थात समस्त विश्व हे त्याच्याचसाठी आहे. तो सर्वज्ञ व सर्वसाक्षी आहे (कु. २.३४.२). तो कोणापासून उत्पन्न झाला नाही. आद्यंती व अंतर्बाह्य तोच आहे. ईश्वर सातव्या आसमानात सिंहासनावर (फरिश्ता=देवदूत) बसून फरिश्त्यांच्या द्वारे साऱ्या सृष्टीचे शासन करतो (कु. १०.१.३; १३.१.२; ३२.१.४).

**फरिश्ते** – हिंदू पुराणांत ज्याप्रमाणे शिवदूत किंवा विष्णूदूत मानलेले आहेत त्याचप्रमाणे इस्लामी धर्मात फरिश्ते नावाचे दूत मानलेले आहेत. ते ईश्वराच्या अधीन असतात. ते आस्तिकांच्या जवळ जाऊन त्यांना सांगतात, की 'आमचा धनी परमेश्वर आहे व आमची त्याच्यावर श्रद्धा आहे. भिऊ नका. दुःख करू नका. त्याचा स्वर्गीय संदेश ऐका. त्याच्याशी मीलन होण्याबद्दल तुम्हाला वचन दिलेले आहे.' (४१.४.५).

**शैतान** – फरिश्त्यांव्यतिरिक्त कुराणात विशिष्ट प्रकारच्या अदृष्ट पापात्म्यांचीही कल्पना केलेली आहे. त्यांना शैतान असे म्हणतात. फरिश्त्यांप्रमाणेच तेही सर्वसंचारी आहेत. पण ते माणसाला शुभकर्मापासून परावृत्त करून अशुभ कर्मांची प्रेरणा देतात. इब्लिस हा त्यांचा सरदार असून, त्याला ईश्वराने स्वर्गातून हाकलून दिल्याची कथा कुराणात आलेली आहे. बायबलानेही अशीच शैतानाची कल्पना केलेली आहे. सूक्ष्म विचारांती असे दिसते, की फरिश्ते व सैतान हे मानवाच्या आंतरजीवनातले एक द्वंद्व आहे. फरिश्ते म्हणजे सद्विचार व शैतान म्हणजे दुर्विचार असे समजायला हरकत नाही. मानवाच्या अंतरात या दोन विरोधी शक्तींचा संघर्ष सतत चालू असतो. त्यात कधी फरिश्त्यांचा विजय होतो; तर कधी शैतानांचा.

इस्लामी धर्माचे आचार व तत्त्वप्रणाली यांचा सामान्य परिचय वरीलप्रमाणे आहे.

**रीतिरिवाज** – पैगंबराच्या आज्ञेप्रमाणे मुसलमानांनी रोज पाच वेळा नमाज पढायचा असतो. काही लोक लहानपणी नमाज करण्यात कसर राहिली असली, तर मोठेपणी जादा नमाज करून ती भरून काढतात. एखाद्याला वाईट दिवस आले, तर त्याच्या हितासाठी अधिक नमाज करणारेही लोक असतात. कुराण-पठण हे पवित्र कर्तव्य समजले जाते. प्रार्थनेसाठी मशिदीत जायचे असते; पण ते शक्य न झाल्यास ती कुठेही केली तरी चालते. प्रार्थना अरबी भाषेतच करणे आवश्यक असते. अन्यथा तिचे पावित्र्य कमी होते, असे मानतात. जुम्मा म्हणजे शुक्रवार हा त्यांचा पवित्र दिवस होय. त्या दिवशीची प्रार्थना रोजच्याहून अधिक असते. त्या दिवशी कोणत्याही कार्याचा आरंभ करणे लाभदायक मानतात.

स्वतःपेक्षा श्रेष्ठ व्यक्तीला काहीतरी वस्तू किंवा द्रव्य अर्पण करण्याची मुसलमानांत प्रथा आहे, त्याला नज़र असे म्हणतात. नज़राणा शब्द त्यावरूनच आला आहे. राजेरजवाडे, श्रीमंत व सरदार हे सणाच्या दिवशी कनिष्ठ व्यक्तींकडून नज़राणे स्वीकारतात व त्यांची त्याहून अधिक प्रमाणात परतफेडही करतात.

एखादा माणूस आजारी पडला, तर एका थाळीत धान्य घालून व त्यावर काही द्रव्य ठेवून ती थाळी रात्रभर आजारी माणसाच्या बिछान्याखाली ठेवतात. धान्याऐवजी भाकरीही ठेवण्याची चाल आहे. सकाळी ते धान्य व द्रव्य गरिबांना वाटतात. एखाद्या माणसाचा अपघात किंवा गंडांतर टळले, तर त्याचे इष्टमित्र त्याच्याकडे धान्य, तेल व द्रव्य असा आहेर पाठवितात. संकटमुक्त माणसाने त्या पदार्थांना स्पर्श केल्यानंतर ते गरिबांना वाटून टाकतात. आजारी मनुष्यावरून द्रव्य, वस्त्र किंवा धान्य ओवाळून टाकण्याचीही पद्धत आहे. या ओवाळणीने आजारी माणसाचा रोग, त्या पदार्थासह निघून जातो, अशी समजूत आहे. या पद्धतीला षद्‌काह किंवा सुटका असे म्हणतात.

इंग्रजी रिवाजाप्रमाणे दुसऱ्याने एखादी गोष्ट आपल्यासाठी केल्यास 'थँक्स' म्हणून आपण धन्यवाद देतो. पण मुसलमान लोक कोणत्याही व्यक्तीला कधीही धन्यवाद देत नाहीत. व्यक्तीकडून लाभ किंवा कार्य झाले, तरी तो परमेश्वराचाच

कृपाप्रसाद असतो, अशी त्यांची समजूत असते. त्यामुळे ते सर्व धन्यवाद 'शुक्र अल्लाह' (सर्व धन्यवाद परमेश्वराला) असे म्हणून परमेश्वराला देतात.

मुसलमानी महिने हे चंद्राच्या गतीवर ठरविलेले असतात. अमावास्येनंतर प्रतिपदेस चंद्रदर्शन होते, तेव्हा त्यांचा महिना सुरू होतो आणि तो दिवस महत्त्वाचा मानला जातो. शुक्ल प्रतिपदेच्या चंद्रकोरीला ते हिलाल म्हणतात. मुसलमानांत चंद्राला पराकाष्ठेचे महत्त्व आहे. त्यांच्या धार्मिक व सामाजिक जीवनावर चंद्राचा विलक्षण प्रभाव आहे. प्रत्येक महिन्याच्या प्रारंभी अर्थात प्रतिपदेच्या चंद्रदर्शनाच्या वेळी ते उत्सव करतात. लग्नसमारंभासाठी पौर्णिमा हा शुभ दिवस मानतात. कोणतेही कार्य सुरू करण्यासाठी चंद्राच्या कला पाहून मुहूर्त ठरवितात.

मुसलमानांत पूर्णचंद्रप्राशन नावाचा एक उपचार प्रचलित आहे. मज्जातंतूंची दुर्बलता व हृदयविकार या रोगांवर तो उपचार करतात. चांदीच्या थाळीत पाणी भरून तीत पूर्ण-चंद्राचे प्रतिबिंब पडेल, अशा प्रकारे ती ठेवतात. रुग्ण मनुष्य त्या प्रतिबिंबावर थोडावेळ नजर रोखतो व मग ते पाणी एका-दमात पिऊन टाकतो.

चंद्र-शुक्रांची युती शुभकारक मानतात. त्या वेळी मंत्र लिहू-वून व तो चांदीच्या ताइतात घालून मुलांच्या दंडाला बांधतात. चंद्रग्रहण ही घटनाही महत्त्वाची समजतात. ईश्वरी कोपामुळे चंद्राला ग्रहण लागते, अशी त्यांची समजूत असते व त्यामुळेच त्यांना चंद्रग्रहणाची भीती वाटते. त्या काळात ते प्रार्थना व दानधर्म करतात. गरोदर स्त्रियांना ग्रहणकालात झोपू देत नाहीत. गाभण पशूंनासुद्धा या काळात जपतात. त्यांचा गर्भपात होऊ नये, म्हणून शेणात काही औषधे टाकून ते गाभण जना-वरांच्या पोटावर थापतात व त्यांना उघड्यावर जाऊ देत नाहीत. जखमेवर चांदण्याचा परिणाम वाईट होतो, अशीही त्यांची समजूत आहे.

मुसलमान लोकांत ज्योतिषाचे बरेच प्रेम आहे. जुन्या काळी प्रत्येक कुटुंबाचा एक ज्योतिषी ठरलेला असे. त्याला नजूम म्हणत. नजूम लोक ज्योतिषशास्त्राचे थोडेसे ज्ञान मिळ-वून त्यावर सर्वांना झुलविण्यात फार तरबेज होते. नजूम-वर एकदा विश्वास बसला, की कौटुंबिक जीवनातल्या लहान-मोठ्या प्रत्येक घटनेसाठी त्याचा सल्ला घेतला जाई. त्याने नको म्हटले, की मग काहीही करायचे नाही, असा प्रघात होता. ज्योतिषाप्रमाणेच मुसलमानांची जादू व चेटूक यांच्या-वरही श्रद्धा असते. बुद्धिमान व सुशिक्षित लोकही भुताखेतां-वर विश्वास ठेवताना दिसतात. धर्मनियम कडकपणे पाळणारे व परमेश्वराचे सदैव चिंतन करणारे अवलिये, चेटूक किंवा भूतबाधा यांच्या तावडीतून माणसांना सोडवू शकतात, असाही समज आहे. भूतबाधा होऊ नये म्हणून साधुपुरुषांनी मंतरून दिलेले ताईत किंवा गंडे गळ्यांत किंवा दंडांत बांधतात.

मुसलमानी कुटुंबातील अंत:पुराला जनाना म्हणतात. पूर्वी मोठाले वाडे असत व त्यातील मागच्या चौकात त्यांचा जनाना असे. जनान्यातल्या स्त्रिया जवळच्या नातलगावाचून कोणाच्या नजरेस पडत नसत. लहानपणापासूनच त्यांना या बंदिवासाची सवय झालेली असल्यामुळे त्यांना त्याचे काही वाटत नसे. या बंदिस्त विभागात त्या आनंदाने राहत. ही पडदापद्धती मुहं-मदाच्या काळापासून व त्याच्या आज्ञेनेच सुरू झाली आहे. पुढे भारतावर स्वाऱ्या करणाऱ्या तैमूरलंगासारख्या आक्रमकांनी आपल्या स्त्रियांवर एतद्देशीय लोकांची दृष्टी पडू नये म्हणून ही पद्धती अधिक कडक केली व ती आजपावेतो अंमलात आहे. जनान्यातल्या बहुतेक स्त्रियांचे मनोरंजनाचे मार्ग म्हणजे गोष्टी सांगणे व सोंगट्या किंवा गंजीफा खेळणे हे असतात. तिथल्या सर्व स्त्रियांना निजण्यासाठी नवारीचे पलंग असतात. मात्र दिवसा बसण्यासाठी सर्व खोलीभर सतरंजी पसरतात. मुख्य स्त्रीसाठी सतरंजीच्या मध्यभागी गालिच्याची मसनद (खास बैठक) असते. पैजामा, अंगिया, झिरझिरीत कुडती व दुपट्टा, असा मुसलमानी स्त्रीचा पोशाख असतो. त्यांना डोळ्यांत काजळ घालणे व हातापायांना मेंदी लावणे फार आवडते. सोन्याचे वलय व त्यात माणिक-मोती गुंफलेली, असे त्यांचे नासाभूषण असते. ते सौभाग्यचिन्ह म्हणून त्यांना कायम वाप-रावे लागते. फक्त मुहर्रमच्या दिवसांत ते काढून ठेवतात. विधवा स्त्रिया नाकातला दागिना घालीत नाहीत. मुसलमान स्त्रिया दोन्ही कानांत सोन्याच्या किंवा चांदीच्या अनेक कड्या घालतात. केसांची लांब वेणी घालून तिच्या अग्राला गोंडे बांधतात. सणासुदीला बाहेर पडताना जरीचे काम केलेले मखमलीचे नाजूक चढाव पायांत घालतात.

मूल होणे ही भाग्याची गोष्ट समजतात. मुलगा झाला तर आनंदोत्सव करतात. मुलगी झाल्यास तिचा विशेषसा उत्सव करीत नाहीत. पुत्रजन्मानिमित्त तोफा किंवा बंदुका यांचे बार काढण्याची पद्धत पूर्वी होती. गरीब माणूससुद्धा बंदुकीचा एक तरी बार काढीतच असे. कारण बंदुकीच्या आवाजाने भुतेखेतें पळून जातात, अशी समजूत होती. पूर्वी श्रीमंत कुटुंबांतल्या स्त्रिया स्वत:च्या मुलांना पाजीत नसत. त्यासाठी दाई ठेवण्याची चाल होती. दाई वेळेवर मिळाली नाही, तर मुलाला शेळीचे दूध पाजीत. पुष्कळदा मुलाच्या निमित्ताने घरात आलेली दाई मरेपर्यंत तिथेच राहत असे. नवजात मुलाला मुसलमानी समा-जात पहिले तीन दिवस केवळ बाळगुटीवरच ठेवतात. चौथ्या

दिवशी दूध पाजतात. ९ व्या दिवशी स्नान घालतात. ४० व्या दिवशी त्याचे जावळ काढून नाव ठेवतात. नामकरणाचा समारंभ करतात. प्रत्येक वाढदिवशी एका दोरीला गाठ मारतात. त्या गाठीला 'साल गिरह' किंवा 'बरसगांठ' म्हणतात. सातव्या वर्षी मुलाची सुंता करतात.

जुन्या काळी नवाब, अमीर, उमराव यांच्या कुटुंबात स्त्री-पुरुष गुलाम ठेवण्याची प्रथा होती. गुलाम हा पुरुष असला तर त्याला खच्ची करून नपुंसक बनवीत व मग त्याची जनान्यावर नेमणूक करीत. त्याला यूनक म्हणत. काही नवाब आपल्या एखाद्या यूनकला कुटुंबात उच्चाधिकारही देत. मालक गुलामांशी माणुसकीने व दयाबुद्धीने वागत. त्यामुळे गुलाम आपल्या धन्याशी एकनिष्ठ राहत. एखाद्या धन्याने आपल्या गुलामांना स्वातंत्र्य देऊ केले, तरी ते धन्याला सोडून जायला तयार नसत.

ते दिवसाचे चार सारखे भाग पाडतात. प्रत्येक भागाला पहर म्हणतात. रात्रीचेही चार पहर असतात. प्रत्येक पहराचे आठ भाग पाडून त्या प्रत्येक भागाला घडी म्हणतात. दीन, अपंग व गरीब लोकांना अन्नवस्त्र देणे, हे प्रत्येकाचे कर्तव्य आहे असे मानतात. सणासुदीला, तसेच सामाजिक किंवा धार्मिक प्रसंगी सढळ हाताने अन्नदान करतात. अन्न, वस्त्र व द्रव्य दुसऱ्याला दिल्याने दात्याला ईश्वर अनंत पटींनी ते देऊन सुखी करतो, अशी त्यांची श्रद्धा असते. मक्केची यात्रा करणे हे जीवनातले एक पवित्र कर्तव्य मानतात. पैगंबराने दिलेली आज्ञा पाळावी व त्याने पवित्र ठरविलेले स्थान एकदा तरी स्वतःच्या डोळ्यांने बघावे, ही इच्छा अनेकांच्या मनांत अत्यंत प्रबल असते. काही कारणांनी ज्यांना मक्केला जाणे शक्य नसेल त्यांनी निदान एका तरी गरीब यात्रेकरूचा मक्केच्या प्रवासाचा खर्च करावा, असाही संकेत आहे.

**इस्लामी संस्कार** – मुसलमान लोकांत जे संस्कार प्रचलित आहेत, त्यांपैकी कुराणात फारच थोडे सांगितले आहेत. बहुतेक संस्कार परंपरेने चालत आलेले असून, काहींवर त्या त्या देशांतल्या रीतिरिवाजांचा प्रभाव पडलेला दिसून येतो. मुहंमदाने काही संस्कार पूर्वीच्या अरबी संप्रदायातून घेतले व काही स्वतः निर्माण केले. भारतात आल्यावर इस्लामने हिंदुधर्माचाही पुष्कळ प्रभाव ग्रहण केला आहे. देश-पथपरत्वे त्यांच्या संस्कारांत फरक पडला असला, तरी प्रत्येक संस्काराच्या प्रसंगी ईश्वरस्मरण ही गोष्ट सर्व देशांत व सर्व पंथांत आढळते. त्याचप्रमाणे त्यांचा कोणताही संस्कार मौलवीवाचून अडत नाही. पैदाइश (जन्म), खत्ना (सुंता), बिस्मिल्ला (विद्यारंभ), निकाह (विवाह), व वफ़ात (मृत्यू) हे त्यांचे मुख्य संस्कार होत.

**विवाहसंस्कार** :– मुसलमान लोकांच्या विवाहसंस्काराला निकाह (अरबी) किंवा शादी (फारसी) असे म्हणतात. या शब्दांचा अर्थ आनंदोत्सव असा आहे. हा संस्कार धार्मिक असून, तो एक सामाजिक करार असतो. त्यात काजीची उपस्थिती अपरिहार्य नसते. कुराणातील लग्नविषयक मंत्र म्हणून कोणीही निकाह लावू शकतो. मुसलमानांत बालविवाहाची चाल नाही. कित्येकदा मुलांच्या सहाव्या किंवा सातव्या वर्षीच त्यांची जोडी जमवून ठेवतात; पण लग्नसमारंभ मात्र मुले वयात आल्यावरच केला जातो. वधू-वरांचे कुलशील पाहून ठरविलेले व विधियुक्त केलेले लग्न हा विवाहाचा सर्वमान्य प्रकार होय. ते ठरविण्यापूर्वी चिठ्ठ्या टाकून कौल घेण्याचीही प्रथा आहे. कधी स्वप्नातील आदेशानुसार सोयरिक जुळवितात तर कधी वधू-वरांच्या नावांची आद्याक्षरे विशिष्ट पद्धतीने जुळतात की नाही, हे पाहून मगच पुढची बोलणी करतात. वराचा पिता वधूच्या पित्याकडे वराच्या वंशाची संपूर्ण माहिती लिहून पाठवितो. तिच्यासोबत काही द्रव्यही भेट म्हणून धाडतो. त्याचा स्वीकार केला गेल्यास मग वधूला मागणी घालतो. मागणीच्या वेळीही वस्त्रालंकार पाठविण्याची पद्धत आहे. गरीब लोक रेशमी रुमालात फक्त एक रुपया बांधून पाठवितात. मग लग्नाचा दिवस निश्चित करतात.

मुलीचा सक्तीने एखाद्याशी निकाह लावू नये, असा कायदा इस्लामच्या स्थापनेपासून प्रचलित आहे. इस्लामने स्त्री व पुरुष यांचा दर्जा बहुतांशी समान मानला आहे. त्यामुळे लग्नाला वधूची संमती आवश्यक असते. तदनुसार मौलवी किंवा तिच्या नात्यातला एखादा पुरुष तिचा वकील म्हणून तिची संमती मिळवितो व वराला ती कळवितो. या संमतीला कमीत कमी दोन साक्षीदार लागतात. अलिकडे मात्र हा केवळ उपचार झाला आहे. बहुतेक लग्ने मुलीचे वडीलधारे लोकच ठरवितात व वधूची मान्यता गृहीत धरतात. मुसलमानांत वराने आपल्या ऐपतीप्रमाणे वधूला काही रक्कम हुंडा म्हणून द्यायची असते. तिला मेहेर म्हणतात. त्या रकमेवर वधूची खास मालकी असते. पुष्कळसे गरीब लोक वधूकडून हा मेहेर माफ करवून घेतात.

मुख्य लग्नविधी वधूच्या घरी होतो. सर्वसाधारणपणे तो तीन दिवस चालतो. वरपक्ष लवाजम्यासह वधूगृही आल्यावर प्रथम त्याचे स्वागत होते. पहिल्या दिवशी दोन्हीकडचे सोयरे एकत्र बसून खाणेपिणे, हुक्का, पानसुपारी, नाचगाणे, इ. कार्यक्रमांत वेळ घालवितात. दुसऱ्या दिवशी वधूकडून मेंदी, कपडे, मिठाई व चैनीच्या वस्तू वराकडे वाजत गाजत नेतात. वराच्या हातापायांना मेंदी लावतात व एका तासाने ती धुवून टाकतात. मग नवरदेव वधूकडून आलेले कपडे घालतो. तिसरा दिवस वरातीचा असतो. त्या दिवशी वधूच्या हातापायांना मेंदी लावली

जाते. तिला मग न्हाऊ घालून वराकडून आलेल्या वस्त्रालंकारांनी सजवितात. संध्याकाळी नवरदेव डोक्याला बाशिंग बांधून मिरवणुकीने वधूगृही जातो. तिथे एका बाजूस बैठक तयार केलेली असते. बैठकीला लागून पडदा असतो. पडद्याआड वधूसह सर्व स्त्रिया बसलेल्या असतात. बैठकीवर नवरदेव, मुलामुलीचे वडील, काजी व एकदोन मित्र एवढेच बसतात. काजी वधूला लग्नाबद्दल तिची संमती विचारतो. तिने 'हो' म्हटल्यावर तो नवरदेवाला कुराणातील लग्नविषयक कायदा वाचून दाखवितो. या वेळी मेहेर किती देणार असा प्रश्न वराला विचारला जातो. त्यावर नवरा मुलगा मनात धरलेली रक्कम उच्चारतो. ती रक्कम त्या वेळी द्यायची नसते. काही कारणाने लग्नविच्छेद करण्याची वेळ आलीच, तर त्या वेळी ती रक्कम त्या वराने तिला द्यायची असते.

एवढे झाल्यावर वराशिवाय सर्व पुरुष बाहेर जातात. वधू व तिची आई या दोघींशिवाय इतर स्त्रियाही दुसऱ्या खोलीत जातात. मग वधूच्या मातेसमक्ष वधू-वरांची भेट होते. त्या वेळी नवरदेव वधूचे मुख प्रथम आरशात पाहतो. काजी वधू-वरांना आशीर्वाद देतो, की 'आदम व हव्वा, हजरत अली व फातमा, या जोडप्यांप्रमाणे तुम्हांलाही ईश्वर सुखी करो!' मग इतर लोक हात वर करून त्या आशीर्वादात सहभागी होतात. मग काजी वधू-वरांकडून कुराणातील सहा कलमे (पवित्र मंत्र) म्हणवून घेतो. मग खारका वाटल्या जातात. काजी आपल्या दफ्तरात त्या लग्नाची नोंद करून घेतो.

वराकडील मंडळींना मेजवानी व वराला आंदण म्हणून द्यायच्या वस्तू देऊन झाल्यावर वरात निघते. नवरदेव वधूला उचलून आणून मेण्यात बसवितो. वरात वाजतगाजत नवरदेवाच्या घरी येते. त्यानंतर दोन, तीन दिवसांनी वरपक्षाकडची मेजवानी होते. एवढे झाल्यावर लग्नसमारंभ समाप्त होतो. तसे पाहिले तर इस्लामी लग्नविधी अगदी सुटसुटीत आहे; पण हिंदूंचे अनेक विवाहविषयक रीतिरिवाज त्यांच्यामध्ये शिरल्यामुळे तो समारंभ विस्तारला आहे. अलिकडे गोरगरीब लोकसुद्धा लग्नासाठी ऐपतीबाहेर खर्च करताना दिसतात.

एका पुरुषाला दोन बहिणींशी लग्न करता येत नाही; मात्र मृत पत्नीच्या बहिणीशी लग्न करता येते. मृत भावाच्या पत्नीशीही लग्न करता येते. चुलत भावंडांचे लग्न सर्वमान्य आहे.

इस्लामच्या स्थापनेपूर्वी अरबस्तानात स्त्रीला एक भोग्य वस्तू यापलिकडे किंमत नव्हती. पुरुष हव्या तितक्या बायका करीत. मुहंमदाने या प्रकाराला आळा घालून पुरुषाला जास्तीत जास्त चार बायका करता येतील, असा नियम केला.

मुसलमान समाजात तलाक अर्थात् काडीमोड देण्याची पद्धती आहे. पण तरीही व्यवहारात काडीमोडीची उदाहरणे फार कमी घडतात. कारण इस्लामने ती गोष्ट 'कायदेशीर; पण ईश्वराला नापसंत' ठरविली आहे. काडीमोड घ्यायची असेल तर पतिपत्नी एकमेकांना साक्षीदारांसमोर जाणीव (नोटिस) देतात. पतीने पत्नीला काडीमोड द्यायची असल्यास त्याला मेहेरची रक्कम तिला द्यावी लागते. उलटपक्षी पत्नीला काडीमोड हवी असेल, तर तिने लग्नात घेतलेल्या हुंड्यापैकी काही भाग पतीला परत करायचा असतो. या सर्व प्रकारांत स्त्रीला न्याय देण्याची दृष्टी असते. मुसलमानांत विधवाविवाहाला बंदी नाही.

**प्रसूतिप्रथा** – गरोदरपणी स्त्रीची विशेष काळजी घेतात. तिचे डोहाळे पुरवतात. भुताखेतांपासून तिचे संरक्षण व्हावे म्हणून तिच्या कमरेला गुजरातेत रेशमी दोरा बांधतात. तिला लग्नसमारंभ किंवा घरगुती समारंभ इ. ठिकाणी जाऊ देत नाहीत. द. भारतात स्त्रीला गर्भधारणा झाली आहे, हे लोकांना सांगण्यापूर्वी तिची व तिच्या पतीची विविध फळांनी ओटी भरतात. त्या रात्री स्त्रिया रात्रभर गाणेबजावणे करून भुताखेतांना पळवून लावतात.

स्त्रीचे पहिले बाळंतपण माहेरीच होते. प्रसूती सुलभ व्हावी म्हणून अनेक तोडगे करतात. प्रसूतीच्या वेळी सुईण मदत करते. प्रसूती झाल्याबरोबर स्त्रीला तांब्याचा तुकडा खायला देतात. त्यामुळे वार लवकर बाहेर पडते, असे समजतात. नाळ सुरीने कापून एका तांब्याच्या भांड्यात ठेवून खोलीच्या एखाद्या कोपऱ्यात किंवा थंड जागी पुरतात. भूतबाधा होऊ नये म्हणून बाळंतिणीच्या बाजेजवळ लिंबू, कडुलिंबाची पाने, सुरी, इ. वस्तू ठेवतात.

उ. भारतात मुलगा झाल्यास त्याचा पिता घराच्या छपरावरून बंदुकीची फैर झाडून ही वार्ता आजूबाजूच्या लोकांना कळवितो. मुलाला स्नान घातल्यावर त्याच्या उजव्या कानात बांग व डाव्या कानात कलमा म्हणतात. मुलाचे नाव बहुधा जन्माच्या दिवशी किंवा आठव्या दिवशी ठेवतात. कारण काही कुटुंबांत नामकरणाच्या आधी बाळंतिणीला प्यायला पाणीही देत नाहीत. मुलाचे ग्रहमान पाहून त्याच्या नावाचे आद्याक्षर निश्चित करतात व कुराणातले कोणतेही पान उघडून त्या अक्षराने सुरू होणारे नाव मुलाला ठेवतात. किंवा ज्या वारी मुलगा जन्मला असेल त्या वाराशी निगडित केलेली विशिष्ट नावे असतात, त्यांतले एक मुलाला ठेवतात. उदा० रविवारी जन्मलेल्या मुलाचे इब्राहीम, सुलेमान, दाऊद, इ. नावांपैकी एक व मुलीचे हबिबा, झैनब, खादिजा, इ. नावांपैकी एक ठेवतात.

सठीच्या दिवशी मुलाला एखाद्या सत्पुरुषाने वापरलेल्या

कापडाचे झबले घालतात. या वेळी उपस्थितांना जेवण देतात. सातव्या, चौदाव्या, एकविसाव्या वगैरे दिवशी मुलाचे जावळ काढतात व बकऱ्याचे बलिदान करतात.

मुलगी एक-दोन वर्षांची झाल्यावर तिचे कान टोचतात.

धर्मदीक्षा – मुलगा किंवा मुलगी चार वर्षे चार महिने व चार दिवसांची झाल्यावर त्यांचा बिस्मिल्ला नावाचा विधी करतात. या दिवशीच मुलीची प्रथम वेणी घालतात. मुलाला दोन तीन दिवस आधी पिवळे कपडे घालतात आणि घराबाहेर जाऊ देत नाहीत. या विधीसाठी स्त्रियांच्या घरी वेलदोडे पाठवून व पुरुषांना पत्र पाठवून निमंत्रण देतात. या विधीच्या दिवशी त्याला धर्मगुरूसमोर बसवतात. त्यांच्याजवळ मिठाईचे तबक ठेवतात. शिवाय सोने, चांदीचा पत्रा, दौत, टाक या वस्तू ठेवतात. या वस्तू नंतर धर्मगुरूला देतात. धर्मगुरू चांदीच्या पत्र्यावर चंदनाने 'दयाळू, कृपाळू, परमेश्वराच्या नावे' असे लिहितो व ते मुलाला चाटायला सांगतो. कुराणाचे पहिले प्रकरण लाल मिऱ्याच्या कागदावर लिहिण्याची पद्धत आहे. हे शब्द व कुराणातील इतर काही ठरलेली वाक्ये मुलाला उच्चारायला सांगतात.

मुलीला प्रथम रजोदर्शन झाले, की द. भारतात तिला सात दिवस एका स्वतंत्र खोलीत ठेवतात. सुवासिनी तिच्या अंगाला सुगंधी द्रव्ये लावतात, तिच्या गळ्यात फुलांचा हार घालतात व गाणी म्हणतात. या काळात तिला फक्त खिचडी खायला देतात. सातव्या दिवशी सुवासिनी तिला स्नान घालतात. रात्रभर जागरण करतात. कारण त्यामुळे भुताखेतांची भीती राहत नाही, अशी समजूत आहे.

अंत्यसंस्कार – याला वफात असे नाव आहे. हिंदूंप्रमाणेच मसलमानांतही मरताना देवाचे नाव घेण्याची प्रवृत्ती आहे. त्या वेळी कुराणातील काही वचनेही कानी पडावी, असे त्यांना वाटते. मरणोन्मुख व्यक्तीच्या तोंडात सरबत किंवा शक्य असल्यास मक्का येथील पवित्र विहिरीचे पाणी घालतात. प्राण निघून जाताच मृताचे तोंड व डोळे बंद करतात. हातपाय सरळ करतात. मग बंदिस्त जागी सर्व कपडे काढून मृताला सर्वांगस्नान घालतात. स्नानाच्या पाण्यात बोरीची किंवा डाळिंबीची पाने कृमिनाशक म्हणून टाकतात. त्या वेळी कुराणातील काही मंत्र म्हणतात. मग मृताच्या शरीराला कापूर, चंदन, वगैरे सुगंधी द्रव्ये चोळून त्याच्याभोवती कफन म्हणजे शुभ्र वस्त्र गुंडाळतात. पुरुषांचे कफन तीन तुकड्यांचे व स्त्रियांचे पाच तुकड्यांचे असते. नंतर मृताला पुष्पमाला घालतात. मग बाजेवर किंवा शवपेटीत ठेवून त्याला कबरस्तानात नेतात. प्रेताला खांदा देणे पवित्र समजतात. कबरस्तानात गेल्यावर प्रथम प्रार्थना करतात. नंतर खड्डा खणतात. मृताचे तोंड मक्केकडे राहील, अशा बेताने शव कबरीत ठेवून जमलेले लोक त्यावर मूठमूठ माती टाकतात. 'तू मातीतून निर्माण झाला आहेस, मातीतच मिळून जात आहेस व अंतिम निवाड्याच्या दिवशी तुला मातीतूनच उठविण्यात येईल,' अशा अर्थाचा मंत्र म्हणतात. सर्व दफनविधी चालू असताना सुराए यासीन व सुराए तबारक हे कुराणातले मंत्र म्हणतात. कबरीवर पक्के बांधकाम करणे हे इस्लामी धर्मात निषिद्ध आहे; पण कालान्तराने तो निषेध शिथिल होऊन मुसलमान लोक कबरीवर सर्रास थडगी बांधू लागले.

कबरस्तानातून घरी आल्यानंतर प्रेतयात्रेस गेलेल्या सर्वांना साधे भोजन किंवा काही पेय देतात. मृताच्या घरी तीन दिवस स्वयंपाक होत नाही. त्या अवधीत मृत व्यक्तीचे नातेवाईक त्या घरच्या लोकांसाठी जेवण पाठवितात. दफनानंतर दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशी मुल्ला-मौलवींना बोलावून त्यांच्याकडून कुराण वाचून घेतात. त्यांना जेवण व बिदागी देतात. भुकेल्या गरिबांसाठी ४० दिवस रोज मशिदीत जेवण पाठवितात. ४० व्या दिवशी पुनश्च कुराणपठण व इष्टमित्रांना मेजवानी होते. त्या वेळी गरिबांना व फकिरांना कपडे, भांडी, इ. वस्तू वाटतात. वार्षिक श्राद्धाच्या दिवशीही दानधर्म करतात.

**शिया व सुन्नी** – इस्लाम धर्मातही अनेक संप्रदाय आहेत. पण त्यांतले प्रमुख संप्रदाय शिया व सुन्नी हे होत. सर्व संप्रदाय कुराण व मुहंमद पैगंबर यांना मानतात. सर्वांत सुन्नींची संख्या अधिक आहे. मुहंमद पैगंबर इ. स. ६३२ साली मृत्यू पावला. त्यानंतर त्याच्या जागी खलीफा कोणी व्हावे याबाबत मुसलमानांत तंटा निर्माण झाला. काही लोक म्हणू लागले, की बहुमताने निवडून येईल तोच खलीफा होईल. तदनुसार अबू बक्र, उमर व उस्मान हे तिघे क्रमाने खलीफा झाले. या खलीफांना धर्मनेते मानणाऱ्या लोकांना सुन्नी म्हणतात. मुहंमद पैगंबराचा जावई अली, हाच खरा खलीफा होय, असे दुसऱ्या गटाचे मत आहे. त्यामुळे ते लोक पहिल्या तीन खलीफांना मानीत नाहीत. या पंथाच्या लोकांना शिया असे म्हणतात. हे लोक हजरत अली व त्याचे वंशज मिळून बारा इमाम म्हणजे धार्मिक नेते मानतात. त्यावरूनच शियांना इमाम असेही दुसरे नाव पडले आहे.

शियापंथी लोक कुराणातला काही भाग उस्मानने लिहिला आहे, असे समजतात व तेवढा भाग वगळून कुराणाला मानतात. तसेच ते अलीच्या प्रशंसेचा मजकूर कुराणात अधिक घालतात व कुराणाच्या काही भागाचा अर्थ सुन्नी लोकांच्यापेक्षा वेगळ्या तऱ्हेने लावतात. शिया हे पिराला मानीत नाहीत. शियांतील काही लोक वद्य प्रतिपदेपासून महिन्याचा आरंभ धरतात. सुन्नी

लोक दिवसातून पाच वेळा व शिया तीन वेळा नमाज पढतात.

शिया व सुन्नी यांच्या संघर्षापूर्वी इस्लाममध्ये एकरूपता व एकवाक्यता नांदत होती. त्याचे सर्वांत मोठे कारण हे, की त्या काळात इस्लाम व मुसलमान हे दोन्ही खलीफांच्या नियंत्रणाखाली होते. खलीफांच्या मंजुरीशिवाय त्या वेळी धार्मिक रीतिरिवाजांत तिळभरसुद्धा फरक करता येत नसे. पण शिया-सुन्नींचे झगडे चालू झाले व खलीफांच्या धार्मिक नियंत्रणात ढिलाई झाली. इ. स. १९१८ साली तुर्कस्तानचा अधिनायक केमालपाशा याने तर खिलाफतच उडवून दिली.

**इस्लामचा इतिहास** – मुहंमद पैगंबर अरब देशातल्या मक्का शहरी जन्मला. त्याच्या काळी जदीस, समूद, कहतान, इस्माइल, यहुदी, इत्यादी जमाती अरबस्तानात वास्तव्य करून होत्या. अरबवासी लोकांची अवस्था त्या काळी अत्यंत दीन आणि दयनीय झाली होती. भोगवाद पराकोटीला गेला होता. नरबली, व्यभिचार, जुगार आणि मद्यपान या प्रकारांना ऊत आला होता. अरब लोकांत गरिबी वाढली होती व गरिबांची पिळवणूकही वाढली होती. विधवा, अनाथ स्त्रिया व दुर्बल माणसे यांचा कोणी त्राता उरला नव्हता. श्रीमंत कुटुंबात कर्ता पुरुष मेल्यावर त्याच्या असंख्य बायका दायभाग म्हणून त्याच्या मुलांना वाटून दिल्या जात होत्या. अरब समाजात विवाह-संस्थेविषयी आदर उरला नव्हता. स्त्री-पुरुषांच्या संबंधाचें पावित्र्य नष्ट झाले होते. स्त्रियांच्या अब्रूला काही किंमत राहिली नव्हती. युद्धकैद्यांची कत्तल चालू होती. त्या कैद्यांच्या बरोबर त्यांच्या बायका-मुलांचाही शिरच्छेद केला जात होता. निज-लेल्या लोकांवर आक्रमण करून त्यांना लुटणारे आणि मारणारे क्रूर लोक यांचा फातक व फत्ताक या शब्दांनी गौरव होत होता. कोमल बालकांवर तिरंदाजी करणे, एखाद्याला जळत्या खाईत फेकणे, एखाद्याचे नाक, कान कापणे, एखाद्याचे अवयव तोडणे, इ. क्रूर कर्मे म्हणजे बलिष्ठांचा नुसता खेळ झाला होता.

हुब्ल, लात, मनात, उज्ज, इ. अनेक देवतांच्या मूर्ती अरब लोक पुजीत होते. केवळ काबाच्या एका मंदिरात ३६० देव-मूर्ती होत्या. मक्केच्या प्रत्येक मंदिरात मूर्तींचा नुसता खच होता. या सर्वांत हुब्ल या देवतेची प्रतिष्ठा सर्वाधिक होती.

अशा या नेमक्या काळात मुहंमदाचा जन्म झाला. त्याने तत्त्वज्ञानाच्या जंजाळात न पडता सरळ कर्ममय धर्माचा पुरस्कार केला. ‘ ईश्वर एक आहे व मुहंमद हा त्याचा पैगंबर आहे ’ या दोन सिद्धान्तांवर विश्वास ठेवणाऱ्यांसाठी त्याने वर उल्लेखलेली कलमा, नमाज, इ. पाच कर्मे आदेशिली. मुहंमद मूर्तिपूजेचा कट्टर विरोधी बनला. तत्कालीन अरब हे मूर्तिपूजक असल्यामुळे मुहंमदाचा मूर्तिविरोध त्यांना समजला नाही व रुचलाही नाही. त्यामुळे ते मुहंमदावर तुटून पडले. त्याच कारणास्तव मुहंमदाला मक्केतून मदिनेला पळून जावे लागले. ही घटना इस्लामी जगात ‘ हिजराज ’ या नावाने ओळखली जाते. मदिनेत मात्र मुहंमदांचे व त्याच्या धर्मतत्त्वांचेही स्वागत झाले. पुढे आपल्या अनुयायांची संघटना बांधून त्याने मक्केवर स्वारी केली व तिथे आपल्या एकेश्वरवादी धर्माची स्थापना केली.

मुहंमदाने ज्या धर्माचा पुरस्कार केला, तो धर्म अत्यंत सरळ व सर्वसुलभ होता. त्यामुळे अरब जनता त्याकडे सहजपणे आकृष्ट झाली. मुहंमदाने ज्या गोष्टीवर विशेष भर दिला ती गोष्ट ही, की इस्लामचा स्वीकार केल्यानंतर माणसा-माणसांत कोणताही भेद राहत नाही व राहता कामा नये. त्यामुळे इस्लामची लोकप्रियता वाढली. समाजाच्या खालच्या थरातल्या लोकांना, दलितांना, अपमानितांना या समतेचे विशेष आकर्षण वाटले व त्या लोकांत हा धर्म सुलभतेने फैलावला.

इस्लामने यतिवृत्ती व वैराग्य यांना कधीही प्रोत्साहन दिले नाही. त्या धर्मात लौकिक सुखांच्या त्यागाची भलावण नाही. गिब हा इतिहासकार लिहितो, की ‘ पूर्व आशियातल्या सर्व धर्मांत इस्लाम हाच एक धर्म असा आहे, की जो गृहस्थधर्माच्या जवळ व वैराग्यापासून दूर राहिला आहे. ’ इस्लामने लौकिक सुखभोगांना मर्यादा घातली; पण त्यांचा त्याग उपदेशिला नाही.

इस्लाम हा प्रथम एक मानवधर्म एवढ्याच रूपाने उदयाला आला, पण थोड्याच काळात तत्कालीन परिस्थितीने त्याला राजनैतिक स्वरूप प्राप्त करून दिले. मुहंमदाला मक्केतून पळून मदिनेत यावे लागले आणि त्याच वेळी त्याने मनाशी निर्धार केला, की नव्या धर्माच्या प्रसारासाठी केवळ घटना पुरेशी नाही; तर त्यासाठी तलवारीचीही जरूरी आहे. या त्याच्या निर्धारासरशी अरबांच्या विखुरलेल्या शक्ती मुहंमदाच्या झेंड्याखाली एकत्र येऊ लागल्या. अरबांची जी संघटना तयार झाली, तिच्यात राजनीती आणि धर्म ही दोन्ही एकत्र येऊन मिळाली. अरबी संघटना अरबी साम्राज्याचे केंद्र बनली आणि खलिफे हे तिचे पुढारी बनले. खलिफे हे मुसलमानांचे शासकही होते आणि धर्मगुरूही होते. या खलिफांविषयी गिब या इतिहासकाराने लिहिले आहे –

या खलिफांची वागणूक अत्यंत साधी होती. ते न्यायी होते आणि अन्यायाचे कर्दनकाळही होते. ते आपल्या अनुयायांना उपदेश देत – ‘ मुसलमान बंधूंनो, बहादुर बना. शत्रूसमोर नतमस्तक होण्यापेक्षा मरण बरे. तुम्ही दयाळू बना. बाल, वृद्ध आणि स्त्रिया यांच्यावर तलवार उगारणे पाप आहे, असे समजा. फळे देणाऱ्या वृक्षांना आणि शेतीच्या जनावरांना कापू नका. शत्रूलासुद्धा जर तुम्ही एखादे वचन दिले असेल, तर ते

पाळणे हा तुमचा धर्म आहे. तुम्ही गोरगरीब आणि अश्राप जनतेवर जुलूम करू नका.'

सुरुवातीस इस्लाम हा एक क्रांतिकारक धर्म होता. अंधविश्वास, तात्त्विक खंडन–मंडने आणि मूर्तिपूजा, यांपासून जनतेला दूर ठेवणे व एकाच ईश्वराला शरण जायला लावणे, हे त्याने आपले ध्येय व उद्दिष्ट ठरविले होते. सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही, की कोणताही आणि कसाही मनुष्य एकदा मुसलमान झाला की अमीर आणि सत्ताधारी मुसलमानही त्याला आपला खरा धर्मबंधू समजून समान दर्जाने वागवीत होते. इस्लाममधल्या या बंधुभावाने त्या काळात विलक्षण क्रांती केली, असे दिसून येते. मानवेंद्रनाथ रॉय लिहितात – अरब वीर जिथे जिथे गेले, तिथे तिथे जनतेने त्यांना आपले त्राते मानून त्यांचे स्वागत केले. ही सर्व जनता त्या काळी धर्माच्या नावाखाली वरिष्ठ वर्गाकडून भरडली जात होती. कुठे रोमन सम्राट त्या जनतेची पायमल्ली करीत होते, कुठे इराणी सम्राट तिच्यावर जुलूम करीत होते, तर कुठे ख्रिस्ती धर्मगुरू अंधश्रद्धेच्या जाळ्यात पकडून तिला लुबाडीत होते. या साऱ्या जनतेने इस्लामचे सहर्ष अंत:करणाने स्वागत केले आणि त्याला धन्यवाद दिले.

मुहंमदाच्या मृत्यूनंतर शे-दीडशे वर्षांच्या आतच अरबांचे धर्मसाम्राज्य उत्तर आफ्रिका, स्पेन, द. फ्रान्स, इराण, मध्य आशिया आणि मंगोलिया इथपर्यंत पसरले.

**इस्लाम व भारत** – इस्लाम धर्म पुढे थोड्याच काळात अरबांच्या स्वाऱ्यांच्या रूपाने भारतातही आला. भारतावरची मुसलमानी आक्रमणे ही एक राष्ट्रीय आपत्ती होती. हा धोका आकस्मिक किंवा अकल्पितही नव्हता. कारण इस्लामच्या जन्मापासून सतत पाच शतके भारतीय जनता त्या धोक्याखाली वावरत होती. मुसलमानांच्या आक्रमणांमुळे जुन्या इराणचा विध्वंस झाला होता. तिथले काही लोक आपला धर्म राखण्यासाठी निर्वासित होऊन भारतात आले होते. भारतालाही तोच धोका आहे, हे त्यांच्या आगमनावरून सूचित झाले होते. मुसलमानांनी सबंध पश्चिम आशिया आपल्या अधिसत्तेखाली आणला होता; पण तेवढ्याने त्यांची राज्यतृष्णा व धर्मतृष्णा शमली नव्हती. त्यांना आपल्या राज्यविस्तारासाठी आणखी प्रदेश हवा होता आणि त्या दृष्टीने त्यांची लोभी नजर भारताकडे वळणे हे स्वाभाविक होते. इ. स. ६५० सालापूर्वीच अरबांनी भारताच्या सरहद्दीवरच्या प्रदेशात आपल्या मोहिमा सुरू केल्या व इ. स. ७१२ पर्यंत ते सिंध प्रांतात घुसले. त्यानंतर ५०० वर्षे त्यांच्या स्वाऱ्या अधूनमधून सतत चालू राहिल्या. इ.स. ६३४ ते ६४३ या नऊ वर्षांच्या काळात दुसरा खलिफा उमर याने भारतावर एकूण तीन आरमारी स्वाऱ्या केल्या, असे दिसते. पण त्यांत त्याला फारसे यश आले नाही. नंतर अरब खुष्कीच्या मार्गाने भारतावरच्या स्वारीस निघाले. त्यांनी काबूल, कंदाहार, जिंकून सिंधपर्यंत धडक मारली. पण त्यांची तीही स्वारी यशस्वी झाली नाही.

उमरनंतर अली हा खिलाफतीच्या गादीवर आला. त्यानेही सिंध प्रांतातल्या कैकण या डोंगराळ भागावर आपले सैन्य घातले. पण त्या स्वारीत अरबांचा धुव्वा उडाला, असे त्यांचाच इतिहास सांगतो. मात्र असे त्यांचे अनेक पराभव झाले, तरी भारत जिंकण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा मात्र सदैव जागृत राहिली यात शंका नाही.

इ. स. ७०८ साली त्यांनी सिंधवर स्वारी करण्याचा एक मोठा बेत आखला. महंमद इब्न कासीम याच्या आधिपत्याखाली ६००० मुसलमानी सैन्य सिंधवर चालून आले. सिंधचा राजा दाहर याने या अरबी आक्रमकांचा प्राणपणाने प्रतिकार केला. त्या युद्धातही मुसलमानांचा पराभव होण्याची वेळ येऊन ठेपली होती; पण दुर्दैवाने दाहर धारातीर्थी पडला आणि लढाईचे पारडे फिरले. अरबांना जय मिळाला. त्यांनी दाहरची राजधानी असलेले अलोर हे शहर आणि त्याचबरोबर ब्राह्मणाबाद व मुलतान ही शहरे जिंकून घेतली. पण सिंधसारख्या एका लहान प्रदेशाच्या राजाने पश्चिम आशियातल्या एका बलाढ्य सत्तेचा प्रतिकार करायला दंड थोपटून उभे राहणे, ही घटना काही सामान्य नव्हे. या लढाईत दाहरला स्वजनांकडूनच दगाबाजी झाली नसती, तर मुसलमानांना भारतावर सत्ता स्थापन करणे फार जड गेले असते. इतिहास असे सांगतो, की मुसलमान आक्रमकांना भारतातल्या फितुरांची आणि देशद्रोह्यांची मदत झाली आहे.

अशा प्रकारे सिंधमध्ये मुसलमानांचे आसन स्थिर झाल्यावर त्यांनी तिथून भारताच्या इतर प्रांतांवर स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. ते पूर्वेस माळवा आणि दक्षिणेस भडोच इथपर्यंत पोचले. पण पूर्वेस प्रतिहार राजा नागभट्ट व दक्षिणेस चालुक्य राजा पुलकेशी या दोघांनी त्यांचा पराभव केल. त्यांच्या सौराष्ट्रावरील स्वारीचीही वाताहतच झाली. तात्पर्य मुसलमानांची भारतातील सत्ता कित्येक शतकेपर्यंत सिंधपुरतीच मर्यादित राहिली. सिंधमध्येही कित्येक शतके मुसलमान सुरक्षित नव्हते. हिंदू लोक त्यांच्यावर वारंवार हल्ले चढवीत आणि त्यांच्या सत्तेला धक्के देत.

सिंधबाहेरच्या हिंदूंना सिंधविषयी इतकी आस्था बाळगण्याचे एक महत्त्वाचे कारण, म्हणजे मुलतानमधले सूर्यमंदिर हे होय. त्या काळात सौराष्ट्र व राजस्थान या भागात सूर्योपासक लोक बरेच होते. मुसलमानांनी हिंदूंचे हे वर्म बरोबर

ओळखले होते. त्यांनी ते सूर्यमंदिर जणू ओलीस ठेवून घेतले होते. जेव्हा जेव्हा हिंदूंकडून सिंधवर स्वारी होण्याचा धोका निर्माण होई, तेव्हा तेव्हा मुसलमान लोक मुलतानचे ते सूर्यमंदिर उद्ध्वस्त करण्याची त्यांना धमकी देत. दहाव्या शतकातला अरब इतिहासकार मसऊदी याने ही गोष्ट आपल्या ग्रंथात नमूद करून ठेवली आहे. इब्न-हाऊकल या दुसऱ्या एका अरब इतिहासकाराने देखील ही गोष्ट मान्य केली आहे. तो म्हणतो, की मुलतानमध्ये सूर्यमंदिर नसते व त्याच्या नाशाची भीती हिंदूंना वाटली नसती, तर हिंदूंनी मुलतानमधली मुसलमानांची सत्ता केव्हाच उखडून टाकली असती.

जगातील इतर देशांत मुसलमानी सत्तेचा प्रसार झपाट्याने आणि पुष्कळ अंशी विनविरोध झाला, असे इतिहास सांगतो. पण भारत त्यांना तशा प्रकारे पादाक्रांत करता आला नाही. त्यांना ठायी ठायी प्रतिकार झाला. काश्मीरचे राजे, कनोजचे प्रतिहार आणि दक्षिणेचे राष्ट्रकूट यांनी मुसलमानांचे आक्रमण अनेकवार थोपवून धरले. पण दुर्दैवाची गोष्ट ही, की वरील राजमंडळ मुसलमानी सत्तेचा पुरता बंदोबस्त मात्र करू शकले नाही. त्यांनी जर संघटितपणे प्रतिकार केला असता, तर त्यांच्या संयुक्त सामर्थ्यापुढे मुसलमानी सत्तेला निश्चितपणे हार खावी लागली असती. पण तसे घडले नाही.

भारतावरील मुसलमानी आक्रमणाची दुसरी अवस्था गझनीच्या महंमुदाच्या स्वाऱ्यांपासून सुरू होते. या आक्रमणांचा शाही वंशातील राजे जयपाल, आनंदपाल व त्रिलोचनपाल यांनी प्राणपणाने प्रतिकार केला. सुलतान महंमुद हा एका मोठ्या राज्याचा राजा होता व कुशल सेनापतीही होता. तो एवढा पराक्रमी होता, की मध्य आशियातल्या त्याच्या कडव्या शत्रूंना देखील त्याचे नाव ऐकताच धडकी भरत असे. पण अशा एका प्रबल पराक्रमी सुलतानाशी झुंज घ्यायलाही तत्कालीन हिंदू राजे पुढे आले, ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. कित्येकदा ते अगदी विजयाच्याजवळ जाऊन पोचत; पण काही तरी आकस्मिक कारण उद्भवून विजयश्री त्यांच्यापासून दूर जाई. हिंदूंच्या दुफळीमुळे मुसलमानांचे फावले व त्यांना भारत पादाक्रांत करता आला, हे जरी खरे असले तरी हिंदूंनी एक दोन वेळा मुसलमानांना संघटितपणे सामना दिला होता, ही गोष्टही विसरता कामा नये. हिंदूंचे हे ऐक्य वर उल्लेखिलेल्या जयपाल व आनंदपाल या दोन शाही राजांच्या आमदानीत विशेष प्रकर्षाने दिसून आले. त्यांतल्या त्यांत जयपाल राजाने तर मुसलमानी सत्तेवर मूलाघात करायचे ठरवून आपले सारे बळ एकत्रित केले आणि खुद्द गझनीवरच स्वारी केली; पण त्या मोहिमेत एकाएकी प्रचंड हिमवृष्टी झाली आणि त्यामुळे त्याची स्वारी फसली. त्याने दुसऱ्यांदा तसाच प्रयत्न केला, तोही निष्फळ ठरला.

आनंदपाल जयपालाचा मुलगा. तो हिंदूंच्या ऐक्याचा दुसरा प्रणेता होय. त्याने इस्लामी आक्रमणाबाबत भारताला खडबडून जागे केले व त्याच्या ऐक्यासाठी शिकस्त केली. त्याच्याविषयी एक मुसलमान बखरकार म्हणतो, की हिंदू स्त्रियांनी आपले दागिने विकून तो पैसा आनंदपालाच्या मोहिमेसाठी दूरवरच्या प्रदेशात पाठवून दिला होता. पण त्यालाही अयशस्वी व्हावे लागले. त्याचा जेव्हा पराभव झाला, तेव्हा मुसलमानांनी हिंदूंवर भयंकर सूड उगवला. कत्तल, जाळपोळ, लुटालूट, स्त्रियांवर अत्याचार, इ. गोष्टींशिवाय गझनीच्या त्या मुसलमानांनी काही काळ दुसरे काहीच केले नाही. त्यानंतर १०२४ साली सौराष्ट्रातल्या सोमनाथाचे मंदिर फोडून, तोडून महंमुद तिथली प्रचंड धनसंपदा लुटून घेऊन गझनीला निघून गेला.

महंमद घोरीच्या स्वारीने भारतावरची मुसलमानी आक्रमणाची तिसरी अवस्था सुरू होते. याने प्रथम मुलतान व उच्छ जिंकले. पेशावरवर स्वारी करून ते शहरही त्याने आपल्या ताब्यात घेतले. इ. स. ११८५ पर्यंत लाहोरपर्यंतचा मुलूख काबीज करून त्याने आपली सत्ता स्थिर केली. इ. स. ११९२ मध्ये पृथ्वीराजाचे आणि त्याचे युद्ध झाले, आणि त्यात पृथ्वीराजाचा पूर्ण पराभव झाला. पृथ्वीराजाच्या मृत्यूने दिल्लीचे हिंदुराज्य नष्ट झाले व भारतात मुसलमानी सत्तेचा पाया दृढ झाला.

भारतात मोगल राजवंशाची प्रतिष्ठा करणारा पुरुष म्हणजे बाबर हा होय. मंगोल वंशाशी त्याचा संबंध आहे. मंगोल हे जितके पराक्रमी तितकेच क्रूरही होते. चंगीजखान (इ. स. चे १३ वे शतक) हा त्यांचा पुढारी होता. हा धर्माने बौद्ध होता; पण याने जी निर्दय आणि सामूहिक हिंसा केली ती माणुसकीला काळे फासणारी होती, असेच म्हटले पाहिजे. विश्वविजयाच्या उद्देशाने तो युद्धयात्रेला निघाला आणि त्याने बुखारा, समरकंद, हिरात आणि बल्ख ही शहरे जाळून भस्मसात केली.

तैमूरलंगाने इ. स. १३९८ मध्ये दिल्लीवर स्वारी केली. थोडाच काळ तो भारतात होता; पण तेवढ्या अवधीत त्याने जे रक्ताचे पाट वाहविले आणि जी अगणित द्रव्यसंपदा लुटून नेली, त्याला तोड नाही. त्यानंतर इ. स. १५०० साली बाबराने भारतावर पहिली स्वारी केली. इतिहासातल्या या साऱ्या घटनांचे विश्लेषण करून श्री. रामधारीसिंह दिनकर व श्री. एम. एन. रॉय यांनी भारतातील मुसलमानी अत्याचारांचे एक निराळे स्पष्टीकरण दिले आहे, ते असे —

इस्लाम हा आपल्या प्रगतिशील भारतात आला नाही. आता असला तरी सिंध आणि त्याच्या आसपासचा भाग एवढ्या-

पुरताच तो मर्यादित राहिला. गझनीच्या महंमुदापासून इस्लामची भारतावरची आक्रमणे सुरू झाली. पण महंमुद काय, घोरी काय आणि बाबर काय, हे इस्लामचे खरे प्रतिनिधी नव्हतेच. भारतात आलेला इस्लाम हा तुर्क आणि तार्तार यांच्या हातांनी दूषित झालेला होता. इस्लामचे हे नवे अनुयायी अर्धसभ्य आणि क्रूर होते. लूटमार आणि पाशवी अत्याचार हाच त्यांचा धर्म होता. इस्लामच्या विशुद्ध तत्त्वांची आणि अबू बक्र, उमर, इ. खलिफांच्या धार्मिक चारित्र्याची त्यांना लवमात्र जाणीव नव्हती. असले हे लुटारू लोक इस्लामचा झेंडा घेऊन भारतात आले. या देशात त्यांनी केलेले अत्याचार इतके भयानक आहेत, की जगाच्या इतिहासात त्यांना तोड नाही. या अत्याचारांनी हिंदूंच्या हृदयावर दुस्सह आघात झाला आणि त्यांच्या मनांत मुसलमानांविषयी तिरस्काराची भावना खोलवर रुजून राहिली. फोडलेली देवळे, भंगलेल्या मूर्ती आणि बाटविलेली तीर्थक्षेत्रे, यांच्या रूपांनी मुस्लीम अत्याचाराच्या निशाण्या आजही भारतभर सर्वत्र दृष्टीस पडतात. हिंदूंच्या अंतःकरणांतले हे शल्य भारतातल्या धार्मिक आणि सुसंस्कृत मुसलमानांनाही जाणवल्यावाचून राहत नाही. आधुनिक मुसलमान इतिहासकार डॉ. हबीब यांनी गझनीच्या महंमुदाच्या संबंधात लिहिले आहे, की 'गझनीच्या सैन्याने भारतीय मंदिरांचा जो घोर विध्वंस केला, तो कोणत्याही इमानदार इतिहासकाराने लपविता कामा नये. इस्लाम धर्माचा अभ्यास केलेला कोणीही मुसलमान महंमुद गझनीच्या या अत्याचारांचे समर्थन करणार नाही.

गेली कित्येक शतके भारतात हिंदू व मुसलमान हे एकत्र राहतात; पण तरीही त्यांचा परस्परांवर पूर्ण विश्वास आढळत नाही. दोन्ही समाजांत भावनात्मक ऐक्यापेक्षा दुराव्याची लक्षणेच अधिक दिसतात. याची कारणमीमांसा करताना श्री. हुमायूं कबीर यांनी पुढील विचार मांडले आहेत—

हिंदू विचारधारा व इस्लाम या दोहोंत बौद्धिक समन्वय न झाल्याकारणाने भारतीय मुसलमानांची बरीच हानी झाली आहे. भारतीय मुसलमान आपल्या इतिहासातल्या निष्कर्षांना आपल्या बौद्धिक जगात स्थान देऊ शकले नाहीत. सिकंदर हा मूर्तिपूजक होता; पण तरीही संपूर्ण पश्चिम आशियातल्या मुसलमानांनी त्याला आपला राष्ट्रीय महापुरुष मानले. सोहराव, रुस्तुम व नौशेरवाँ हे पुरुष मुहंमदाच्या जन्मापूर्वी कित्येक वर्षे होऊन गेले. त्यांच्या अनेक साहसपूर्ण कार्यांचा तसे पाहिले तर, इस्लामच्या उपदेशांशी कोणत्याही प्रकारचा संबंध नाही; पण त्यांनाही आपल्या सांस्कृतिक परंपरेत स्थान देणाऱ्या भारतीय मुसलमानांनी भारताच्या प्राचीन महापुरुषांना मात्र आपल्या सांस्कृतिक वारशात सामील करून घेतले नाही. त्याचा परिणाम असा झाला, की भारताचा प्राचीन इतिहास व भारतीय परंपरा यांच्यांत बद्धमूल झाल्याने जी शक्ती आणि सुदृढता भारतीय मुसलमानांना मिळू शकली असती, ती वरील गोष्टींच्या अभावी त्यांना मिळू शकली नाही. भारताच्या प्राचीन इतिहासाचा स्वीकार न केल्यामुळे भारतीय मुसलमानांचा सांस्कृतिक वारसा कमकुवत झाला. भारतात प्राचीन कालापासून भिन्न-भिन्न जाती-जमातींचे संमिश्रण होत आले आहे. मुसलमानांच्या बाबतीतही तसे व्हायला हरकत नव्हती. कारण इस्लाम हा मनुष्यमात्राच्या समानतेचा समर्थक आहे. त्याच्या ठिकाणी रंग किंवा जाती यांच्यावर आधारित अशा कोणत्याही भेदभावाला जागा नाही. भारतातल्या प्रत्येक मुसलमानाच्या धमन्यांत ज्या पूर्वजांचे रक्त आहे, ते मुसलमान नव्हते, हे त्यांनी ओळखायला हवे होते. भारतीय मुसलमान दुसऱ्या देशांतल्या दुसऱ्या धर्मांच्या अनुयायांशी ज्या मैत्रीने वागतात, तीच त्यांची मैत्री भारतीय देशबांधवांशी असणे आवश्यक होते. अन्य देशांतून आलेले इस्लामी मतप्रवाह मुसलमानांनी जसे स्वीकारले, त्याचप्रमाणे त्यांनी भारतीय तत्त्वांचाही स्वीकार करायला हवा होता. या देशात समन्वय आणि ऐक्य यांना पूर्वीपासून वातावरण अनुकूल होते; पण भारतीय मुसलमानांनी त्याचा उपयोग करून घेतला नाही. त्यांनी मुख्यत्वे अन्यदेशीय इस्लामी परंपरा व धर्मकथा यांतूनच प्रेरणा घेतली. भारतात राहायचे पण प्रेरणा मात्र अभारतीय स्वीकारायच्या, या दुरंगीपणामुळे भारतीय मुसलमानांची सदैव ओढाताण झालेली आहे. भारतावर मुसलमानांची सत्ता होती त्या वेळी काहीही समस्या निर्माण झाल्या नाहीत. मोगल बादशहांनी आपल्या प्रजेशी राजनैतिक दृष्ट्या समानता राखण्याचा प्रयत्न केला होता असे कळते. मुस्लिम सत्तेच्या ऱ्हासकालात भारतीय जीवनपद्धतीचा तिच्या सर्व अंगांसह स्वीकार करणे, या गोष्टीची अधिक आवश्यकता होती. पण त्या काळातले पुष्कळसे भारतीय मुसलमान प्रतिष्ठा व प्रभाव यांच्या स्थानांना वंचित झाल्यामुळे ते आपल्या अवास्तव भूतकालाची स्वप्ने पाहू लागले. त्यांच्या अडचणी जितक्या वाढत गेल्या, तितके तितके ते कूपमंडूक वृत्तीने आपला संकोच करून राहू लागले. त्यांनी आपल्या देशबांधवांशी तादात्म्य कमी कमी करीत आणले व भारताबाहेरच्या मुस्लिम इतिहासाशी आणि परंपरेशी आपले संबंध घनिष्ट करण्याचा प्रयत्न केला. अर्थात तो असफल होणे हेच स्वाभाविक होते. या दुरंगीपणाचा विपरीत परिणाम मुसलमानांच्या सांस्कृतिक जीवनावर तर झालाच; शिवाय तो हिंदूंवरही झाल्याशिवाय राहिला नाही. भारतीय मुसलमानांनी मुस्लिमपूर्व भारताचा सांस्कृतिक वारसा

मनोभावे न स्वीकारल्यामुळे मुस्लिमेतर भारतीयांनीही, त्याची प्रतिक्रिया म्हणून, आपल्या देशवासी मुसलमानांच्या अभारतीय तत्त्वांना आपल्या परंपरेत स्थान दिले नाही. अशा प्रकारे दोन्ही धर्मांचे समाज भारतात अलग अलग पडले. यातून मग वारंवार संघर्ष निर्माण होऊ लागले व त्यामुळे दोन्ही समाजांची फार मोठी हानी झाली.

हिंदूंच्या बाबतीत सांगायचे, तर बौद्धिक समन्वयाच्या अभावी या देशातले अधिकतर हिंदू इस्लामच्या तत्त्वांविषयी अज्ञानी राहिले. मुस्लिम जीवनाच्या बाह्य अंगांशी त्यांचा परिचय झाला व अनेक बाबतींत हिंदूंवर त्या अंगांचा प्रभावही पडला; पण खऱ्या अर्थाने इस्लामची ओळख न झाल्याकारणाने त्यांच्या मनात इस्लामविषयी आदर व श्रद्धाभाव निर्माण होऊ शकला नाही. याचा परिणाम असा झाला, की हिंदू आणि मुसलमान भारतात शेजारी राहूनही मानसिक दृष्टचा एकमेकांच्या जवळ आले नाहीत. सुशिक्षित हिंदूंना ग्रीस आणि रोम येथील महापुरुषांची जेवढी माहिती असते, तेवढी ती आपल्या मुस्लिम देशबांधवांच्या महापुरुषांच्या बाबतीत नसते हे सत्य आहे. हा अपरिचय किंवा दुरावा मुसलमानांनाच नव्हे, तर हिंदूंनाही हितकारक नाही. आणि या अलगपणाच्या भावनेने भारताचे खरे कल्याणही होणार नाही (अलिगढ विश्वविद्यालयातले दीक्षान्त भाषण–आजकल; फेब्रु. १९६२). [डि. इ.; सं. चा. अ.; वै. सं. वि.; इं. मु. क.; ऑ. मु. इं.]

**इळंगो अडिगळ** (इ. स. चे पहिले शतक) ‘शिलप्पधिकारम’ या तमिळ महाकाव्याचा कर्ता. चेरनाडूचा राजा चेरलआडन याचा हा द्वितीय पुत्र व चेरनशेंगुट्टुवन याचा धाकटा भाऊ होता. इळंगो शब्दाचा अर्थ छोटा राजकुमार असा आहे. त्यामुळेच याला इळंगो म्हणू लागले. पुढे संन्यास घेतल्यावर याला इळंगो अडिगळ असे नाव पडले.

याने संन्यास ग्रहण केला, त्यामागे एक कथा आहे – इळंगो लहान असताना त्याच्या पित्याच्या दरबारात एक ज्योतिषी आला. त्याने राजाला भविष्य सांगितले, की लवकरच तुझा अंत होणार असून, राजपुत्र इळंगो राजा होणार आहे. ते भविष्य इळंगोला कळले. मोठ्या भावाला राज्य न मिळता ते आपल्याला मिळणार, हे ऐकून त्याला वाईट वाटले व ती भविष्यवाणी खोटी ठरविण्यासाठी त्याने तात्काळ संन्यास घेतला. पुढे तो नगराबाहेर एका मठात राहू लागला. त्यानंतर अनेक देशांत हिंडून त्याने अनेक विद्या-कलांचा अभ्यास केला. त्याने आपले पुढील सर्व आयुष्य साहित्यसेवेत घालविले.

इळंगोच्या काळासंबंधी विद्वानांत बरेच मतभेद आहेत; परंतु त्याच्या काव्यावरून व इतर सामग्रीवरून इसवी सनाचे पहिले शतक हा त्याचा काळ आता सर्वमान्य झाला आहे. पाहा – शिलप्पधिकारम. [त. सा. सं.]

**इळादध** एक याग. पशू व अन्न यांची समृद्धी व्हावी, अशी इच्छा असणाऱ्याने हा याग करावा, असे शांखायन ब्राह्मणात सांगितले आहे (४.५). या यागात प्रथम अग्नी, अग्नीषोम, सरस्वती व इंद्र यांच्यासाठी पूर्णिमेच्या दिवशी इष्टी करतात. या इष्टीत इंद्रासाठी सान्नाय्य म्हणजे दूध व दही यांचा याग असतो. या इष्टीचे तंत्र दर्शपूर्णमासेष्टीप्रमाणेच असते. प्रधानयाग झाल्यावर सर्वजण दही भक्षण करतात. पुढे पंधरा दिवस यजमान कोरे वस्त्र नेसतो व व्रतस्थ राहतो. अमावास्येला अग्नी व सरस्वती यांच्यासाठी याग करून दुसऱ्या दिवशी इंद्राग्नीसाठी पुरोडाश व मित्रावरुणासाठी आमिक्षेचा याग करतात. आश्व. सूत्रात प्रजापतीसाठी एक वर्षभर प्रतिदिन याग करावा, असे सांगितले आहे (२.१४).

बौधायनाने याला इळादध असे नाव दिले आहे. त्याने पूर्णिमेस करावयाच्या इष्टीत अग्नी, अग्नीषोम व इंद्र आणि अमावास्येच्या इष्टीत अग्नी, इंद्र व मित्रावरुण या देवता घ्याव्या, असे सांगितले आहे. दर्शपूर्णमासाचाच हा एक काम्य प्रकार आहे. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**इक्षुदंडादिदान** मकर संक्रांतीच्या दिवशी एकशे आठ ऊस, तितकेच नारळ व तितक्याच गुळपापड्या या वस्तू सुवासिनी स्त्रियांकडून लुटवितात. दान मंत्र असा–

सकृद्घातमिक्षुदण्डानां पीयूषरसवर्षिणम् ।
नानाभोगसुखायेमं हारयाम्यर्कतुष्टये ।।

अर्थ – अमृतरसाचा वर्षाव करणारा, उसाच्या कांड्यांचा भारा मी सूर्याच्या संतोषासाठी व नाना सुखभोगांच्या प्राप्तीसाठी लुटवीत आहे. [व्रतराज]

**इक्षुमती** कुमाऊँ व कनोज (उत्तर प्रदेश) या प्रदेशांतून वाहणारी नदी. अयोध्येहून निघाले असता प्रथम मालिनी, नंतर गंगा, या नद्या, त्यानंतर कुरुक्षेत्र व त्यानंतर ही नदी लागते. फरुखाबाद (उ. प्र.) जिल्ह्यातली ‘ईखन’ नदी हीच प्राचीन इक्षुमती समजतात. ही नदी पितरांना प्रिय आहे, असे सांगितले आहे (मत्स्य पु. २२.१७).

**इक्ष्वाकुवंश** (१) वैवस्वत मनूच्या दहा पुत्रांपैकी इक्ष्वाकू हा सर्वांत मोठा पुत्र होय (भवि. पु. ब्राह्म. ७९).

याच्या उत्पत्तीची कथा अशी – एकदा मनूला शिंक आली व त्या शिंकेतून एक पुत्र उत्पन्न झाला. म्हणून मनूने त्याला इक्ष्वाकू असे नाव ठेवले (ह. वं. १.११; दे. भा. ७.८; ब्रह्म. पु. ७.४४). नंतर मनूने त्याला राजवंश निर्माण करण्यास सांगितले व त्याच्या कार्याची रूपरेषा आखून दिली.

मनूने मित्र व वरुण या देवतांना उद्देशून याग केला व त्याला इक्ष्वाकू व इतर पुत्र झाले; तसेच मनूने पृथ्वीचे दहा भाग करून ते वसिष्ठाच्या आज्ञेवरून इक्ष्वाकूला दिले, अशीही दुसरी कथा आहे (वायु पु. २.२३).

इक्ष्वाकू हा अयोध्येचा पहिला राजा होता. वसिष्ठ हा त्याचा कुलगुरू होय. इक्ष्वाकूला मध्यप्रदेशाचे राज्य मिळाले होते (हरिवंश १.१०; मत्स्य पु. १२.१५). याने वसिष्ठापासून अध्यात्मविद्या संपादून परमपद प्राप्त करून घेतले.

इक्ष्वाकूला शंभर पुत्र होते व ज्येष्ठ पुत्राचे नाव विकुक्षी होते. इक्ष्वाकूच्या मागून हाच अयोध्येचा राजा झाला. विकुक्षी-पासूनच पुढे निमिवंश निर्माण झाला. इक्ष्वाकूला दंडक या नावाचा एक पुत्र होता. याच्याच नावावरून एका अरण्याला दंडकारण्य हे नाव पडले (भाग. पु. ९.६; विष्णु पु. ४.२). याच्या दहाव्या मुलाचे नाव दशाश्व असून, तो माहिष्मतीचा राजा होता (म. भा. अनु. २.६). इक्ष्वाकूने शंभरही पुत्रांना आपले राज्य वाटून दिले. शकुनिप्रभृती पन्नास पुत्रांना उ. भारताचे व शांतिप्रभृती पुत्रांना द. भारताचे राज्य मिळाले. अयोध्येला इक्ष्वाकूचे राज्य बराच काळपर्यंत नांदले. या वंशात अनेक थोर पुरुष होऊन गेले. त्यामुळे बहुतेक पुराणांत याची वंशावळ सापडते. सर्व पुराणांतील वंशावळीचा सूक्ष्म अभ्यास केल्याअंती पुढील नामावली निश्चित होते–

**मनू वैवस्वत**

१ इक्ष्वाकू, २ विकुक्षी (= देवराट, शशाद), ३ पुरंजय (= ककुत्स्थ, इन्द्रवाह), ४ अनेता (=सुयोधन, अयोधन), ५ पृथू, ६ दृषदश्व (=विश्वगश्व, विष्टराश्व), ७ आर्द्र (=आद्र, वान्ध्र, चान्द्र), ८ युवनाश्व (१), ९ श्रावस्त, १० वत्सक (= वंशक, वत्सुक), ११ बृहदश्व, १२ कुवलाश्व (= धुन्धुमार), १३ दृढाश्व, १४ प्रमोद व १५ हर्यश्व (हे दोघे दृढाश्वाचे भाऊ होते), १६ निकुम्भ, १७ संहताश्व, १८ कृशाश्व १९ प्रसेनजित, २० युवनाश्व (२), २१ मांधाता

२२ अंबरीष (१) — २३ युवनाश्व (३); २४ पुरुकुत्स — २५ त्रसुदस्यू, २६ सम्भूत, २७ अनरण्य, २८ त्रसदश्व, २९ हर्यश्व, ३० वसुमना (=वसुमान, सुमन, सुमती, सुधन्वा), ३१ त्रिधन्वा, ३२ त्रय्यारुण, ३३ सत्यव्रत (= त्रिशंकू), ३४ हरिश्चंद्र, ३५ रोहित (= रोहिताश्व), ३६ हरित, ३७ चंचू (= चंप, धुन्धु), ३८ विजय, ३९ रुरुक (= भीरुक, कारुक, अलर्क), ४० वृक, ४१ बाहू (= असित), ४२ सगर, ४३ असमंजस (= पंचजन), ४४ अंशुमान, ४५ दिलीप (१), ४६ भगीरथ, ४७ श्रुत (= विश्रुत, श्रुतवान), ४८ नाभाग, ४९ अम्बरीष (२), ५० सिन्धुद्वीप, ५१ अयुतायू, (अयुताजित), ५२ ऋतुपर्ण, ५३ सर्वकाम, ५४ सुदास (= इन्द्रसाख, हंसमुख), ५५ मित्रसह, (= कल्माषपाद), ५६ सर्वकर्मा, ५७ अवरण्य, ५८ निघ्न, ५९ अनमित्र, ६० रघू (१), ६१ दुलिदुह, ६२ दिलीप (=खट्वाङ्ग) [दुसरी शाखा-कल्माषपाद–अश्मक–उरकाम–मूलक – शतरथ – इडविड – वृद्धशर्मा – विश्वसह – दिलीप (खट्वाङ्ग)] ६३ रघू (= दीर्घबाहू), ६४ अज, ६५ दशरथ, ६६ राम, ६७ कुश, ६८ अतिथी, ६९ निषध, ७० नल, ७१ नभ, ७२ पुण्डरीकाक्ष, ७३ क्षेमधन्वा, ७४ देवानीक, ७५ अहीनगू, ७६ सुधन्वा (= रुरू), ७७ पारिपात्र, ७८ शिल (=शल, दल, देवल), ७९ दल (=बल, वच्चल, अनल), ८० उन्नाभ (=औंक, उलूक, उत्क, उक्थ), ८१ वज्रनाभ, ८२ शंखन, ८३ व्युशिताश्व (= युषिताश्व), ८४ विश्वसह, ८५ हिरण्यनाभ, ८६ पर कौसल्य (=हैरण्यनाभ), ८७ ब्रह्मनिष्ठ (=वसिष्ठ, वरिष्ठ), ८८ पुष्य (=पुष्प), ८९ ध्रुवसंधी (=अर्थसिद्धी), ९० सुदर्शन, ९१ अग्निवर्ण, ९२ शीघ्र (= शीघ्रग), ९३ मरू (=मनू), ९४ प्रसुश्रुत, ९५ सुसंधी, ९६ अमर्षण (=अमर्ष), ९७ सहस्वान, (=महस्वान), ९८ विश्रुतवान (=विश्वभव), ९९ बृहद्बल.

या इक्ष्वाकू कुलाविषयी डॉ. श्री. व्यं. केतकर पुढीलप्रमाणे माहिती देतात –

इक्ष्वाकुकुल सूतसंस्कृतीतील प्रसिद्ध कुलांपैकी एक होते. पण मात्र (वैदिक) संस्कृतीच्या लोकांत अध्वर्युप्रधान यज्ञसंस्थेचा उदय होईपर्यंत या कुलाचा फारसा परिचय नव्हता. अथर्ववेदात इक्ष्वाकू हा कुष्टरोगावरची ओषधी जाणणारा, म्हणून उल्लेखिला जातो. यावरून मात्र लोक पूर्वेकडे गेले, तेव्हा त्यांना इक्ष्वाकू नामक एक प्राचीन पुरुष होऊन गेला एवढेच त्याच्याबद्दल ठाऊक होते. ऋग्वेदातल्या एका सूक्तात असमाती नामक राजाचा आज्ञाधारक वीर या स्वरूपात इक्ष्वाकूचे दर्शन होते (१०.६०).

ब्राह्मणकालात मात्र इक्ष्वाकूला बरेच प्राधान्य मिळाले. या कालात मंत्रोक्त राजांचा संबंध इक्ष्वाकूशी जोडण्यात आला

व इक्ष्वाकू कुलातील राजांचा संबंध श्रौतविधींशी जोडण्यात आला. बृहद्देवतेत त्र्यरुण राजाला व शतपथ ब्राह्मणात पुरुकुत्साला इक्ष्वाकुकुलोत्पन्न बनविले आहे. महाभारत, रामायण आणि भागवत, इ. अनेक पुराणे ही इक्ष्वाकुवंशाच्या इतिहासाची साधने होत. [श्री. राय कृष्णदास – पुराणम् व्हॉ. २, जुलै १९६०; प्रा. च. को.; म. ज्ञा. को. ]

(२) सातवाहन राजवंशाची सत्ता नष्ट झाल्यानंतर आंध्रप्रदेशातील कृष्णा-गुंटुर भागावर राज्य करणारा एक वंश. अयोध्येच्या इक्ष्वाकुवंशातील काही लोक दक्षिणेत येऊन स्थायिक झाले असावेत, असे वाटते. त्यांतील एका घराण्यातील शांतमूल नामक पुरुष या राजवंशाचा संस्थापक मानला जातो. तो इ. स. च्या ३ ऱ्या शतकाच्या मध्यात होऊन गेला. कृष्णेच्या खोऱ्यावर याची सत्ता होती. नागार्जुनकोंडाच्या आसमंतातील विजयपुरी ही त्याची राजधानी होती. याने अश्वमेध, वाजपेय, इ. वैदिक यज्ञयाग केले होते.

शांतमूलाचा पुत्र वीरपुरुष दत्त हा इ. स. च्या ३ ऱ्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेला. त्याचे शिलालेख अमरावती, जगय्यपेट व नागार्जुनकोंडा येथील बौद्ध विहारांच्या अवशेषांत सापडले आहेत. त्यांत इक्ष्वाकुवंशातील महिलांनी बौद्ध विहारांना दिलेली दानपत्रे बरीच आहेत. राजे वैदिक धर्मानुयायी असले तरी त्यांच्या राण्या बौद्ध पंथाच्या होत्या. मात्र या राजाने यज्ञयाग केल्याचे माहीत नाही. त्याने सुमारे वीस वर्षे राज्य केले.

वीरपुरुषदत्ताचा पुत्र एहुवुल हा शांतमूल (दुसरा) या नावाने गादीवर बसला. त्याने सुमारे २१ वर्षे राज्य केले. इ. स. च्या ३ ऱ्या शतकाच्या शेवटी पल्लववंशाने या वंशाची सत्ता नष्ट केली. [वा. गु. यु. ]

**ई** चतुर्दशमुखी विधात्याच्या चौथ्या मुखापासून निर्माण झालेला चौथा स्वरवर्ण. याचे उच्चारस्थान तालू हे आहे. हा द्विमात्रक आहे. याचे वर्णन कामधेनुतंत्रात पुढीलप्रमाणे दिले आहे –

**ईकारं परमेशानि स्वयं परमकुण्डली ।**
**ब्रह्मविष्णुमयं वर्णं तथा रुद्रमयं सदा ।।**

अर्थ – हे देवी, ईकार हा परमकुंडली असून, ब्रह्म-विष्णु-रुद्रात्मक आहे.

हा वर्ण स्त्रीरूपी असून, याला महामाया, लोलाक्षी, शिवा, बिन्दुमालिनी, कामकला, इ. नावे आहेत. मातृकान्यासात डावा डोळा हे याचे स्थान आहे. याचा अक्षरविकास 'इ' सारखाच असून, वरचा रफार कलचुरी नृपती जाजल्लदेवाच्या वेळच्या (इ. स. ११९४) एका लेखात आढळतो. [ म. ज्ञा. को.; ग्र. कृ.]

**ईद** या शब्दाचा अर्थ मेजवानीचा दिवस असा आहे. ईद-उल्–फित्र व ईद–उल्–अज्हा हे दोन मोठे मुसलमानांचे सण आहेत. पाहा – बकरी ईद, रमज़ान ईद. [डि. इ.]

**ईदगाह** मुसलमान लोकांची प्रार्थनेची जागा. ही जागा बहुधा गावाबाहेर असते. याच ठिकाणी ते रमजान ईद व बकरी ईदच्या दिवशी वाएज (उपदेश) ऐकतात. [ वि. मुं. रा. प. ]

**ईदिग** तेलुगू ताडीकलालांची एक जात. तमिळनाडूमधील सेलम, उ. अर्काट व चिंगलपेट आणि आंध्र प्रदेशातील नेलोर व कडाप्पा या जिल्ह्यांत यांची वस्ती आहे. हे लोक बलिज वंशांतील असून, धंद्यामुळे या भागात आले, असे काही लोकांचे म्हणणे आहे. ईदिगांचे दंडू ईदिग व बलिज ईदिग असे दोन वर्ग आहेत. तमिळनाडूमधले शानान व ईदिग यांच्यांत ताडी काढण्याच्या बाबतीत भेद आहे. तमिळ ताडीकलाल माडापासून ताडी काढतात, तर तेलुगू ताडीकलाल खजुरापासून ती काढतात. ईदिगांचा पिढीजात धंदा ताडी काढण्याचा असला तरी हल्ली फारच थोडे लोक हा धंदा करतात. पुष्कळ लोकांनी अलिकडे मोलमजुरी, शेती व इतर धंदे पत्करले आहेत. हे मद्यदेवता एल्लम्म हिला भजतात. हे दारू पीत नाहीत. यांची मूळ भाषा तेलुगू आहे.

विवाहप्रथा – या लोकांत बहुपत्नीकत्व रूढ आहे. विवाह प्रौढपणीच करावा, असा निर्बंध आहे. जातिभ्रष्टता व व्यभिचार या गुन्ह्यांखेरीज पुरुषाला स्त्रीचा त्याग करता येत नाही. नवरा जातिभ्रष्ट झाला, तरच स्त्रीला घटस्फोट घेता येतो.

मर्तिकप्रथा – हे मृतांना पुरतात व बारा दिवस सुतक पाळतात. यांच्यांत श्राद्ध करण्याची पद्धत नाही. परंतु सर्वांच्या अमावास्या व वर्षप्रतिपदा या दिवशी ते पितरांच्या नावाने दानधर्म करतात. यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात.

ताताचार्य नामक एक वैष्णव ब्राह्मण यांचा गुरु असतो. कित्येकांचा गुरू 'सनातनी' असतो. उच्च जातीच्या लोकांना हे आपल्या जातीत घेऊ शकतात. यांच्यांत एक भिक्षुकांचा वर्ग असून हे ठराविक वेळी देणग्या देतात. हे व्यासापासून आपली उत्पत्ती मानतात. [ म. ज्ञा. को. ]

**ईशकृपा** ईश्वराचा अनुग्रह झाल्यावाचून जीवात्म्याचा संसारबंध नष्ट होत नाही व त्याला मोक्ष मिळत नाही,

नाही, अशी सर्व ईश्वरवादी पंडितांची धारणा आहे. ईश्वराची भक्ती केल्याने ईशकृपेचा लाभ होतो. हिंदू धर्मातील भक्तिपंथाप्रमाणेच ख्रिस्ती धर्मातही ईश्वरी कृपेला अत्यंत महत्त्व आहे. त्यात दोन मतभेद आहेत. एक मत असे आहे की, ईशकृपेमुळे सर्वच जीवात्मे मुक्त होऊ शकतात. मात्र प्रत्येकाने कृपा-प्राप्तीचा मार्ग अनुसरला पाहिजे. दुसऱ्या मतानुसार ईश्वर काही निवडक मानवात्म्यांनाच मोक्षपात्र म्हणून केवळ स्वेच्छेने निवडतो. अशा व्यक्तींच्या जीवनात ईशकृपेची लक्षणे दिसून येतात. [ म. वि. को. ]

**ईशान** (१) ईशान्य दिशेचा अधिपती. शिवाचे एक नाव. 'ईश्वरः शर्व ईशानः' (अमर). याची मूर्ती चतुर्भुज असते. याचा एक हात रिकामा असून, बाकीच्या तीन हातांत डमरू, तलवार व खंजीर अशी आयुधे असतात. त्याच्या शेजारी वृषभाची प्रतिमा असते. कारण वृषभ हे त्याचे वाहन आहे. अष्ट दिक्पालांत याला प्रमुख मानतात. याच्या पत्नीचे नाव शिवा असून, दोघां पुत्रांची नावे मनोजव व अविज्ञानगती अशी आहेत (वायु पु. २७.१२.३२–५२).

(२) दहाव्या कल्पाला ईशान असे नाव आहे. [ पु. इं. ]

**ईशानबली** शूलगव पाहा.

**ईशानव्रत** एक काम्य व्रत. याचा विधी असा—पौषातील पुष्य नक्षत्रयुक्त पौर्णिमेला शुभ्र वस्त्र आंथरलेल्या वेदीवर चार दिशांना चार व मध्ये एक अशा अक्षतांच्या राशी करतात. त्यांवर पूर्वेला विष्णू, दक्षिणेला सूर्य, पश्चिमेला ब्रह्मा, उत्तरेला रुद्र व मध्ये ईशान यांच्या प्रतिमा स्थापून त्यांची पूजा करतात. व्रतकर्त्याने गोमूत्र प्राशन करून उपवास करायचा असतो व ब्राह्मणभोजन घालून एक गाय व एक बैल यांचे दान करायचे असते. व्रताचा अवधी पाच वर्षांचा आहे. गोप्रदान देताना प्रत्येक वर्षी एकेक गाय वाढवीत जातात. बैल मात्र प्रत्येक वर्षी एकेकच असतो.

व्रताचे फल – सुख व ऐश्वर्य यांची प्राप्ती. [ व्र. प. ]

**ईशावास्योपनिषद** शुक्ल यजुर्वेदाच्या वाजसनेयी संहितेच्या चाळिसाव्या अध्यायाला ईशावास्योनिषद असे नाव आहे. याच्या आरंभी 'ईशावास्यम्' असा शब्द आलेला असल्यामुळे याला हे नाव मिळाले आहे. याशिवाय याला, ईशोपनिषद, वाजसनेयी उपनिषद, संहितोपनिषद, मंत्रोपनिषद अशीही अन्य नावे आहेत. इतर सर्व उपनिषदे ब्राह्मणग्रंथांत किंवा आरण्यकांत अंतर्भूत आहेत. परंतु हे उपनिषद मात्र वाजसनेयी संहितेत अंतर्भूत आहे.

हे उपनिषद्र अवघे अठरा मंत्रांचे असले, तरी त्यांतील विचारांवरून त्याच्या कर्त्याची सूक्ष्म दृष्टी व अगाध ज्ञान दिसून येते. कर्म व ज्ञान या विरोधी द्वंद्वाचा तर्कशास्त्रदृष्ट्या समन्वय हा या उपनिषदाचा मुख्य विषय आहे. यातील पहिलाच मंत्र असा –

ईशावास्यमिदं सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत् ।
तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्यस्विद्धनम् ॥

अर्थ – या पृथ्वीवरचे सर्व जीवन परमात्म्याने अधिष्ठित आहे, अशी भावना करावी. त्यागबुद्धीने या सर्वांचा उपभोग घ्यावा. कोणच्याही धनाची हाव धरू नये.

हाच विचार विशेष स्पष्टीकरणाने पुढे सांगितला आहे, तो असा –

या लोकात ईश्वरार्पण बुद्धीने कर्मे करावी. तसे केल्याने कर्मांचा बंध लागत नाही. कर्मबंधन टाळण्यासाठी याशिवाय अन्य मार्ग नाही. वीतराग स्थितप्रज्ञाचे पुढील मंत्रांनी वर्णन केले –

यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति ।
सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ॥
यस्मिन् सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः ॥
तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः ॥

अर्थ – जो मनुष्य सर्व प्राणिमात्राला परमात्म्याच्या ठिकाणी व परमात्म्याला सर्व प्राण्यांच्या ठिकाणी पाहतो, तो कोणाचीही घृणा करीत नाही. ज्या स्थितीत ज्ञानी पुरुषाला सर्व प्राणीमात्र परमात्मरूपानेच प्रतीत होतात आणि प्राणी व परमात्मा यांच्या एकत्वाचा साक्षात्कार घडतो, त्या वेळी व त्या अवस्थेत त्याचे शोक आणि मोह शिल्लक उरत नाहीत.

अनुभूती ही कर्म व ज्ञान यांच्या पुढची पायरी असून तिच्यात कर्म व ज्ञान ही दोन्ही सामावतात, अशी समन्वयाची उपपत्ती या उपनिषदात लावली असून ती नवी व महत्त्वाची आहे. या व्यतिरिक्त विशेष लक्षात येण्याजोगी गोष्ट म्हणजे या उपनिषदात 'ब्रह्म' या शब्दाऐवजी 'ईश' हा शब्द वापरलेला असून, संभूती, असंभूती, मातरिश्वा, इ. काही शब्द अर्थाच्या दृष्टीने विवाद उत्पन्न करणारेही आले आहेत.

या उपनिषदावर शंकराचार्य, आनंदतीर्थ, इ. अनेक विद्वानांनी टीका लिहिल्या आहेत. [ उ. र.; सु. वि. को. ]

**ईश्वर** ईश् =स्वामित्व करणे, ताब्यात ठेवणे, सत्ता चालविणे, नियमन करणे, किंवा अश् = व्यापून राहणे या

धातूपासून ईश्वर शब्द बनला आहे. ईश्वर =स्वामी, सत्ताधीश.

भारताच्या सांस्कृतिक इतिहासात वेद, यज्ञ, तप, स्वर्ग, मोक्ष, ईश्वर, इ. शब्दांना फार महत्त्व आहे. पण या शब्दांबद्दल विद्वानांत मतभेदही तितकेच तीव्र आहेत. ईश्वर हा शब्द सामान्यपणे जगन्नियंता, सृष्टी–स्थिती–प्रलयाचा कर्ता, सर्व-व्यापक, सर्वांतर्यामी आणि देवाधिदेव अशा अर्थांनी घेतला जातो. शिव, विष्णू, राम, कृष्ण, हे शब्दही ईश्वरवाचकच मानले जातात; पण ईश्वर या अर्थाबरोबरच ते एक सांप्रदायिक भावही प्रकट करतात. ईश्वर किंवा परमेश्वर हे शब्द मात्र संप्रदाय-निरपेक्ष परम प्रभू हाच केवळ अर्थ सूचित करतात.

ईश्वर शब्दाच्या इतिहासावर दृष्टिक्षेप करता असे दिसून येते, की हा शब्द परमेश्वर या अर्थी फार उशीरा प्रचारात आला आहे. प्रारंभी त्याचा उपयोग राजा किंवा शास्ता या अर्थानेच होत असे. ऋग्वेदात ईश्वर शब्द एकदाही आलेला नाही. पण तो ज्या ईश् धातूपासून निघाला, त्या धातूचा प्रयोग मात्र अनेकवार झालेला आढळतो. उदा – 'मा नो दुःशंस ईशत' (१.२३९.) 'ईशे ह्यग्निरमृतस्य' (७.४.६). 'ईशे यो विश्वस्यादेववीतेः (१०.६.३).

ईश्वर शब्दाप्रमाणेच ईश् धातूपासून निघालेला दुसरा शब्द म्हणजे ईशान हा होय. त्याचा अर्थ समर्थ किंवा स्वामी असा असून तो शब्द इंद्रादी देवतांना उद्देशून योजलेला आहे. उदा०– 'ईशानो यवया वधम्' (ऋ. १.५.१०). ईशानासो ये दधते स्वर्णः' (ऋ. ७.९०.६).

ईशान शब्द यजुर्वेदात व अथर्ववेदात व मुख्यत्वे शिव किंवा रुद्र यांचे विशेषण म्हणून प्रयुक्त आहे. पुढे हे विशेषण, विशेषण म्हणून न राहता ते शिवाचे नामच बनले. 'ईश्वरः शर्व ईशानः' या श्लोकातल्या शिवाच्या नामावळीत ते स्वतंत्र नाम म्हणूनच दिले आहे (अमर).

शुक्लयजुर्वेदसंहिता व सामवेदसंहिता यांतही ईश्वर शब्दाला स्थान नाही. अथर्ववेदसंहितेत ईश्वर शब्द आढळतो; पण तोही स्वामी, धनी या अर्थीच.

मनुस्मृती व भगवद्‌गीता यांमध्ये मात्र परमेश्वर या अर्थी ईश्वर शब्दाचा प्रयोग झालेला आहे. पण पुढच्या काळात निर्माण झालेली शैव पुराणे, कालिदास, बाणभट्ट, इ. कवींची काव्ये यात ईश्वर शब्द महेश्वर या अर्थी केवळ शिवालाच, उद्देशन योजलेला आहे. ईश्वर शब्दाला संप्रदायनिरपेक्ष असा, परमेश्वर हा अर्थ भारतीय दर्शनात प्राप्त झाला. सांप्रत द. भारत वगळल्यास सामान्यपणे ईश्वर शब्दाचा अर्थ सर्वसाक्षी, सर्वव्यापक परमेश्वर असाच करतात.

ईश्वरकल्पनेचा विकास कोणत्या प्रकारे झाला, हे पाहणेही बोधक ठरेल. ईश्वर हा जगताचा उत्पादक, जगन्नियंता, सर्वांतर्यामी, सृष्टीचा स्वामी, पण सृष्टीहून भिन्न, पूज्य, देवाधिदेव व पुरुष आहे. ईश्वराच्या या व्यापक अर्थावरून एक गोष्ट स्पष्ट होते ती ही, की ब्रह्मा, शिव, विष्णू, इ. देव हे ईश्वर नाहीत; कारण सृष्टीच्या घडामोडीत त्यांना आपल्या परिवारातील अन्य देवतांची गरज भासते. त्याचप्रमाणे ब्रह्म हेही ईश्वर नव्हे, कारण ते मननविषय झाले, तरी पूजाविषय होऊ शकत नाही.

जिला ईश्वर किंवा परमेश्वर म्हणता येईल, अशी एकही देवता वैदिक दैवतसमूहात दिसत नाही. वेदांतल्या इंद्र, अग्नी, मित्र, वरुण, इ. देवता ईश्वरपदवीला पोचलेल्या नाहीत. त्यांना 'नियतकर्माणः' म्हणजे नेमून दिलेले काम करणाऱ्या देवता असे म्हटले आहे. ऋग्वेदात पुढीलप्रमाणे एक मंत्र आहे –

एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः॥
(१.१६४.४६)

अर्थ – तो (ईश्वर) वस्तुतः एकच आहे. ज्ञानी जन त्याला पुष्कळ प्रकारची नावे देतात. त्याला अग्नी, यम, मातरिश्वा म्हणतात.

यावरून वरील सर्व देवतांच्या मागे कोणती तरी एक आध्यात्मिक शक्ती किंवा एकता असून तीच सर्व देवतांच्या ठिकाणी वास्तव्य करते, अशी कल्पना वैदिक द्रष्टयांच्या अंतरांत प्रादुर्भूत झालेली दिसते. या आध्यात्मिक एकतेचाच पुढे वेदान्त्यांच्या ब्रह्मकल्पनेत विकास झाला.

ब्रह्म शब्द नपुंसकलिंगी असल्यामुळे कर्मकांडांत ब्रह्म हे पूजाविषय होऊ शकत नाही. पुंलिंगी किंवा स्त्रीलिंगी असलेले दैवतच पूजायोग्य असते, असा दैवतशास्त्रातला नियम आहे. त्यामुळे वैदिक कर्मकांडात ब्रह्माला स्थान न मिळता ते इंद्र, अग्नी, इ. देवतांना मिळाले. पण तत्त्वज्ञानी लोकांची उपासना ही मानसिक असल्यामुळे त्यांना वेदांतल्या नाना देवतांशी काही कर्तव्य नव्हते. ते स्वभावतःच भेदात अभेद व नानात्वात एकत्व पाहणारे असल्यामुळे त्यांना ब्रह्मकल्पना स्वीकारायला कोणतीही अडचण पडली नाही.

सांप्रतचा हिंदुधर्म हा निगमागम धर्मांच्या संमिश्रणातून व समन्वयातून बनलेला आहे. निगम म्हणजे वेद व आगम म्हणजे तंत्रविद्या होय. आधुनिक हिंदुधर्मातील देवता व कर्मकांड ही वैदिक धर्मापेक्षा कितीतरी भिन्न आहेत. ऐतिहासिक दृष्टीने पाहता तांत्रिक धर्म हा वैदिक धर्मापेक्षाही प्राचीन असल्याचे समजते. आगमधर्मात शिवाला प्रमुख स्थान आहे. तंत्रांची रचना त्यानेच केली, असे मानतात. वेदकालीन आर्यांनी तांत्रिक धर्माला दूर ठेवण्याचा व त्यापासून अलिप्त राहण्याचा खूप प्रयत्न केला, पण भारतातील फार मोठ्या वैदिकेतर समा-

आचा तो लोकधर्म असल्यामुळे वैदिकांना त्याला दूर ठेवणे शक्य झाले नाही. कालांतराने तांत्रिक धर्मातील काही गोष्टींचा वैदिक धर्मात अंतर्भाव करणे त्यांना भाग पडले.

अशा या काळातच वैदिक रुद्र व तांत्रिक शिव यांचे एकीकरण झाले. ऋग्वेदातील अनेक देवतांना लागणारे ईशान हे विशेषण पुढे एकट्या शिवालाच प्राप्त झाले व ईशान हा शब्द शिव या अर्थी रूढ झाला. श्वेताश्वतरासारख्या प्राचीन उपनिषदात महेश्वर हा शब्द शिवाचा पर्यायी म्हणूनच योजलेला आहे. शैव साहित्यात केवळ शिव हाच ईश्वर ठरला आहे.

त्यापुढचा काळ हा दर्शनांचा काळ होय. त्या काळात ईश्वर हा सांप्रदायिकतेच्या कक्षेतून बाहेर पडला. तो दार्शनिक विचाराचा विषय बनला, तेव्हा त्याला जगन्नियंता परमेश्वर असे स्वरूप प्राप्त झाले. विविध दर्शनांच्या मूलसूत्रांतून ईश्वर शब्द आढळतो, तो संप्रदायनिरपेक्ष आहे. पुढे पुढे ही ईश्वरविषयक प्रवृत्ती वाढीस लागली आणि दार्शनिक विचारांत ईश्वरसिद्धीला महत्त्व प्राप्त झाले. न्यायकुसुमांजली व ईश्वरानुमानचिंतामणी हे दोन ग्रंथ ईश्वरसिद्धीसाठी निर्माण झाले आहेत.

ईश्वरकल्पना मुळात निर्माणच का झाली, हा यापुढचा प्रश्न आहे. या कल्पनेच्या उगमाला कारणे संभवतात, ती अशी — आपल्या आवतीभोवती पसरलेल्या या अपार सृष्टीचे निरीक्षण केले असता सृष्टीतील समस्त व्यापारांमागे काही योजकता, शिस्तबद्धता आणि सुसूत्रता दिसते. ऋतूंमागून ऋतू त्याच क्रमाने येणे, दिवस-रात्र यांचा पाठशिवणीचा खेळ, वनस्पतींचा नियमबद्ध पत्रपुष्पफलरूप विकास, पशू व मनुष्य यांच्या गर्भधारणेतला निश्चित कालावधी, या सर्व गोष्टींत काहीतरी व्यवस्था असल्याचे दिसून येते. योजकता किंवा व्यवस्था ही आपोआप घडणारी गोष्ट नव्हे. अर्थात या समस्त विश्वव्यापारांमागे त्यांचा कोणीतरी नियंता असला पाहिजे. आणि हा जो कोणी असेल, तोच ईश्वर होय. तोच या विश्वाचा कर्ता, धर्ता आणि संहर्ता असून चैतन्य किंवा ज्ञान हे त्याचे वैशिष्ट्य आहे. हिंदुधर्माप्रमाणे अशा ईश्वराचे अस्तित्व व वेदांचे प्रामाण्य मानणाऱ्याला आस्तिक व ते न मानणाऱ्याला नास्तिक अशी संज्ञा आहे. दार्शनिक तत्त्ववेत्त्यांनी ईश्वरसिद्धीकरिता पुढील आठ प्रकारचा युक्तिवाद सांगितला आहे —

(१) विश्वाची रचना व व्यवस्था नियमबद्ध आहे. ही रचना कोण्यातरी अत्यंत कुशाग्र बुद्धीच्या कर्त्याकडून झाली असली पाहिजे. तो बुद्धिमान कर्ता म्हणजेच ईश्वर होय. आकाशातील सूर्य, तारका व ग्रह यांच्या गतीचे नियम अत्यंत सूक्ष्म व निरपवाद आहेत. मानवी शरीर हेही रचनाकौशल्याचे उत्तम उदाहरण आहे. जगात कुठेही अव्यवस्था व घोटाळा नाही. म्हणून हे जग अत्यंत विचारपूर्वक कोणीतरी निर्माण केले असले पाहिजे.

(२) जगात सर्वत्र प्रेरणा दिसते. प्रेरणेला प्रेरकाची अपेक्षा असते. जगातल्या अणुरेणूंत सर्वत्र गती आहे. त्या गतीला प्रथम प्रारंभ ज्याने केला, तोच ईश्वर होय. सारथी ज्याप्रमाणे घोड्यांना हाकतो, त्याप्रमाणे ईश्वर मूलद्रव्यांना चालना देतो.

(३) जगात सर्वत्र उद्देश, संकल्प, किंवा हेतू आढळतो. हा उद्देश ज्याच्या मनात आहे, तोच ईश्वर होय. पाणी नसलेल्या ठिकाणी वनस्पती उत्पन्न होत नाहीत. पाणी व प्राणी यांचा संबंध हेतुपूर्वक दिसतो. त्याचप्रमाणे प्राण्यांना अन्नाची गरज असते, म्हणून ते उत्पन्न होते. ते शोधण्यासाठी प्राण्यांना डोळेही मिळतात.

(४) जे जे इंद्रियांना गोचर होते, बुद्धीला कळते, ते ते द्रष्टयावर अवलंबून असते. प्राणिमात्र झोपी गेले तरी विश्व हे असतेच. म्हणजे त्याचा अनुभव घेणाराही कोणीतरी असतोच. तोच ईश्वर होय.

(५) जगात मोहक, मंगलमय व विस्मयजनक सौंदर्य नेहमी प्रतीतीस येते. त्याच्या मुळाशी विशाल, विशुद्ध व अनंत कलाविलासिनी अशी प्रतिभा असलीच पाहिजे. ही प्रतिभा ज्या कोणाची असेल, तोच ईश्वर होय.

(६) मनुष्यमात्राकरिता नीति-अनीती, सत्कर्म-दुष्कर्म, शुभ-अशुभ यांचे नियम ठरविणारा व त्याप्रमाणे निर्णय देणारा, सर्वांत वरिष्ठ आणि प्रमादरहित असा कोणीतरी न्यायाधीश या जगात असलाच पाहिजे. तो नसल्यास सगळी नैतिक मूल्ये व शुभाशुभ विचार निराधार ठरतील. सुकृताचे शुभ-फल मिळवून देणारा व दुष्कृत्याबद्दल शासन करणारा या विश्वात कोणीतरी असलाच पाहिजे. तसेच अमुक सत्कर्म व अमुक दुष्कर्म हे निश्चित ठरविणारी चेतनाशक्ती असलीच पाहिजे. ही शक्ती म्हणजेच ईश्वर होय.

(७) ईश्वर, आत्म्याचे अमरत्व व कर्मविपाकवाद या कल्पनांना मानवी जीवनात काही मूल्य आहे. त्यांचे अस्तित्व गृहीत धरल्याशिवाय माणसाला संसारातली कर्मे धीराने करता येणार नाहीत. बुद्धीपलिकडच्या या वस्तू अस्तित्वात आहेत, असे मानल्यानेच मनुष्याला आपले जीवन कृतार्थ करता येते. हेच त्या वस्तूंच्या कल्पनांचे मूल्य होय.

(८) विचारवंत व संशोधक सांगतात, की मानवजातीचा धार्मिक अनुभव हाच ईश्वरी सत्तेचा पुरावा आहे. जगात एकही जात किंवा जमात अशी नाही, की जिच्यात धर्मसंस्था अस्तित्वात नाही. रानटी समाजापासून तो सुधारणेच्या शिखरावर पोचलेल्या समाजापर्यंत सर्वत्र धर्मसंस्थेचे अस्तित्व

दिसून येते. रानटी लोकांच्या धार्मिक कल्पना व सुधारलेल्या समाजातील तत्त्वज्ञांच्या व साधुसंतांच्या धार्मिक कल्पना यांत फार मोठी तफावत असली, तरी अलौकिक शक्तीच्या अस्तित्वाचा प्रत्यय ही गोष्ट उभयसाधारण आहे. त्याचबरोबर ऋषिमुनींचा व साधुसंतांचा दिव्य, अलौकिक अनुभव हे एक ईश्वरी सत्तेचे महत्त्वाचे प्रमाण होय, असे धार्मिक लोक सांगतात. इन्द्रियजन्य अनुभवापेक्षा हा अतीन्द्रिय अनुभव श्रेष्ठ मानलेला आहे.

वर दिलेल्या या युक्तिवादांवर नास्तिकांनी आक्षेप घेतले आहेत, ते यथाक्रम पुढीलप्रमाणे आहेत –

(१) जग हे अत्यंत विचारपूर्वक कोणीतरी निर्माण केले असले पाहिजे, हा युक्तिवाद सकृद्दर्शनीच खरा आहे. बुद्धी, जाणीव किंवा ज्ञान या साधनांची गरज नेहमीच लागते असे नाही. मानवाच्या व्यवहारात बुद्धीची गरज असते, हे खरे असले तरी तेवढ्यावरून विश्वरचनेसाठी बुद्धीची गरज आहे, असे ठरत नाही. जीवाच्या शरीरातल्या पचन, रुधिराभिसरण इ. गुंतागुंतीच्या क्रिया अजाणता होत असतात. त्याचप्रमाणे नियमित गती हा ग्रह-ताऱ्यांचा स्वभावच आहे. तेव्हा त्यासाठी ईश्वराची आवश्यकता नाही.

(२) प्रत्येक गतीला स्वतंत्र प्रेरकाची गरज नसते. कारण प्रत्येक वस्तूत स्वयंगती-शक्ती असते व एक वस्तू दुसऱ्या वस्तूच्या गतीला कारण होते. मूलद्रव्याला प्रथम प्रेरणा देणारा म्हणून ईश्वर मानायचे कारण नाही. कारण विश्व हे अनादी असल्यामुळे ‘ प्रथम ’ ही कालदर्शक कल्पनाच चुकीची ठरते.

(३) उद्देश किंवा हेतू म्हणजे कोणती तरी इच्छा. ईश्वराला इच्छा आहे असे मानल्यास तो अपूर्ण व अतृप्त आहे, असे सिद्ध होते व त्यामुळेच तो अनीश्वर आहे, असे म्हणावे लागते.

(४) कोणतीही वस्तू तिच्या ज्ञानावर अवलंबून नसते; तर ज्ञान हे वस्तूवर अवलंबून असते. जी वस्तू जाणीव असेल तरच असते व जाणीव नसेल तर नसते, ती काल्पनिक असते. म्हणून या जगाचा अनुभव घेणारा कोणी (ईश्वर) नसला तरी जग हे असणारच. त्याच्या अनुभवासाठी ईश्वराची गरज नाही.

(५) विश्व हे केवळ सौंदर्यरूपच आहे, असे म्हणता येत नाही. समजा तसे मानले, तरी ते सौंदर्य कोण्या प्रतिभासंपन्न शक्तीने निर्मिले आहे, याला काही आधार नाही. सुंदरता किंवा कुरूपता ही तिचा भोग घेणाऱ्या मानवाच्या अनुभवावरून ठरते. मानवाला दोन्ही प्रकारचा अनुभव येतो. शिवाय जगातील सौंदर्याचा अनुभव हा परिस्थितिसापेक्ष आहे. त्यावरून विश्व हे वस्तुतः सौंदर्यमयच आहे, असे विधान करता येत नाही. सौंदर्य निर्माण करणारी प्रतिभाशक्ती त्या सौंदर्याच्या मागे असलीच पाहिजे, हेही अनुमान चुकीचे आहे. कारण सौंदर्य हा विश्वाचा स्वभाव आहे व तो शाश्वत आहे. सौंदर्य कोणीतरी निर्मिले असे म्हणणे म्हणजे त्याच्या निर्मितीपूर्वी विश्व कुरूप होते, असे म्हणावे लागेल. आणि या विधानाला प्रमाण नाही.

(६) नीतिमूलक ईश्वरानुमानही चुकीचे आहे. शुभाशुभ-कल्पना आणि नीतिनियम हे व्यवहाराच्या सुलभतेसाठी आणि सुस्थितीसाठी मानवानेच बनविले आहेत. विद्रोह, कलह, हिंसा, इ. दुराचारांचे दुष्परिणाम याच जगात अनुभवायला मिळतात. परस्पर सहकार्य, सहानुभूती, प्रेम, जिव्हाळा या गुणांच्या योगाने जीवनात श्रेयाची प्राप्ती होते. ही गोष्टही अनुभवाला येणारी आहे. या गोष्टी सांगायला ईश्वराची गरज नाही.

(७) ईश्वरावर श्रद्धा व आत्म्याच्या अमरत्वाची कल्पना या अलौकिक अथवा पारलौकिक मूल्यांपेक्षा केवळ ऐहिक मूल्यांच्या स्वीकारानेच इतिहासात फार मोठ्या घटना घडल्या आहेत व वर्तमानकाळातही घडून येत आहेत. विद्या, कला, उत्साह, पराक्रम, त्याग, इ. मानवी सद्‌गुण पराकोटीला पोचविण्याचे सामर्थ्य बुद्धिगम्य अशा ऐहिक मूल्यांतच आहे.

(८) धार्मिक अनुभवावरून ईश्वरसिद्धी होऊ शकत नाही. अलौकिक शक्तीच्या अस्तित्वाचा प्रत्यय ही भावना वास्तव अनुभूतीच्या कक्षेत बसत नाही. तशी ती असती, तर सर्वांनीच ती प्रमाण मानली असती. कारण प्रत्यक्ष अनुभव हाच मनुष्याच्या बुद्धिवादाचा खरा आधार आहे. धार्मिक भावना ही श्रद्धामूलक असते व श्रद्धा म्हणजे प्रत्यक्ष अनुभव नव्हे. मानवजातीने खोट्या कल्पनांनी निर्मिलेल्या अशा कितीतरी अंधश्रद्धा उराशी बाळगल्या आहेत. अंधश्रद्धेमुळे अनेक प्रकारचे प्रत्यक्ष आभास तयार होतात व भ्रांती निर्माण होते. साधुसंतांचा अनुभव म्हटला तरी त्यातही ऐकमत्य व सारखेपणा नाही. एकाच वस्तूबद्दल परस्पर विसंगत असे अनुभव येत असतील, तर त्या अनुभवांपैकी कोणाता खरा ते तर्कशास्त्रातील नियमांच्या आधारे ठरवावे लागते. ईश्वराचे सत्यत्व तर्कदृष्ट्या सिद्ध होत नाही आणि म्हणून कपिल, बुद्ध, महावीर व चार्वाक यांचा ईश्वराच्या नास्तित्वाचाच अनुभव खरा, असे म्हणणे भाग पडते. ज्या साधुसंतांना आपल्याला ईश्वरानुभव घडला असे वाटते, त्यांचा तो अनुभव भावनेचे बळ, श्रद्धा किंवा निरंतर ध्यास यांमुळे आलेला असतो. तो अनुभव ईश्वर या वस्तूच्या सन्निकर्षामुळे आलेला नसतो.

चार्वाकमतवादी हे केवळ प्रत्यक्ष प्रमाण मानतात. ईश्वर प्रत्यक्ष दिसत नाही, म्हणून तो नाही, असे त्यांचे मत आहे. पण त्यांचे हे विधान बरोबर नाही. कारण, तसे मानल्यास

विचार, सत्ता या गोष्टीही खोट्या मानाव्या लागतील. कारण त्या बाह्य ज्ञानेंद्रियांचा विषय होऊ शकत नाहीत. भूमीतून तृणांकुर उत्पन्न करणारी शक्ती आपल्याला दिसत नसली, तरी ती नाकारता येत नाही. ईश्वर ही एक व्यक्ती नसल्यामुळे ती दाखविता येत नाही. सृष्टीला कर्ता पाहिजे, असे म्हटल्यास ईश्वरालाही निराळा कोणी तरी कर्ता मानावा लागतो; पण अशी ही कर्त्याची मालिका कधीच संपणारी नाही. त्यापेक्षा सृष्टीला कर्ताच नाही असे म्हणणे संयुक्तिक ठरेल, असा आणखी एक आक्षेप घेतला गेला आहे. या आक्षेपाचे निराकरण असे —

पंचमहाभूतांचे अस्तित्व सर्वच मान्य करतात. पण ती स्वतः जड आहेत. तेव्हा त्यांना निर्माण करणारा कोणीतरी असलाच पाहिजे, तोच ईश्वर होय. तो सामर्थ्यसंपन्न असल्यामुळे त्याला दुसरा निर्माता असेल, असे मानण्याची आवश्यकता नाही. तो स्वतंत्र व स्वतःला उत्पन्न करणारा असाच असेल.

वैषम्य व नैर्घृण्य हे दोन दोष ईश्वराच्या अंगी काही आक्षेपक चिकटवितात. ईश्वराच्या ठिकाणी समता असती, तर त्याने सर्वांनाच सारखे सुखी किंवा दुःखी ठेवले असते; पण व्यवहारात तसे अनुभवाला येत नाही. काही माणसे जन्मभर पूर्ण सुखोपभोग घेतात, तर असंख्य माणसे जन्मभर दुःखात पिचत राहतात. ईश्वराला निर्घृण अशासाठी म्हणावे लागते, की तो तरुण स्त्रीचा पती मृत्युमुखी पाडून तिला वैधव्याच्या यातना देतो. तो वृद्ध मात्यापित्यांचा एकमेव आधार असलेला पुत्र त्यांच्यापासून हिरावून नेतो; इतकेच काय; तो अनेकांवर अनेक प्रकारच्या आपदा आणतो.

पण आस्तिकांच्या मते वरील दोष ईश्वराच्या अंगी लागत नाहीत. ईश्वर हा केवळ कर्माध्यक्ष आहे. तो प्रत्येकाच्या पूर्वकर्मानुसार ज्याला त्याला बरे वाईट फळ देत असतो.

ईश्वराविषयी आस्तिक व नास्तिक यांची मते वरीलप्रमाणे आहेत. आस्तिकांनी जे ईश्वरविषयक विचार मांडले आहेत, त्यांचा निष्कर्ष पुढीलप्रमाणे सांगता येईल.

ईश्वर हा सिद्ध आहे. तो सर्वज्ञ व सर्व शक्तिमान आहे. म्हणून त्याला दुसऱ्या निर्मात्याची गरज नाही. तो स्वतःच स्वतःला निर्माण करतो. ईश्वरी शक्ती ही एक आंतरिक शक्ती आहे. कळीचे फूल बनते तेव्हा त्याला बाहेरून पाकळ्या चिकटवाव्या लागत नाहीत. आतील शक्तीनेच ती कळी फुलते, विकसित होते. ईश्वराच्या एकविध शक्तीतून अनेकविध जीव व वनस्पती निर्माण होतात. सृष्टीला आतून उत्तेजन देऊन फुलविणारी आणि एकातून अनेक निर्माण करणारी परमेश्वरी शक्ती अधिष्ठानरूपाने या जगताचे कारण आहे. एखादा घट पाहिला, की कुंभाराने तो निर्माण केला आहे, हे लक्षात येते; पण कुंभाराचे घटकर्तृत्व व ईश्वराचे सृष्टिकर्तृत्व यांत एक मोठाच फरक आहे. घट एकदा बनविला की कुंभाराचा घटाशी संबंध राहत नाही; पण ईश्वराचे तसे नाही. जग निर्माण केल्यावरही जगाशी असलेला त्याचा संबंध सुटत नाही. जगात त्याच्या अनंत शक्तीचे अंश वास करीत असतात. वनस्पती, पशू, पक्षी, मानव हे निर्माण झाल्यावर त्यांच्यांत क्रमाने विशिष्ट मर्यादेपर्यंत वाढ होत राहते व पुनरपी त्यांच्या क्षयाला सुरुवात होते. शेवटी जे जन्मले आणि वाढले, त्या सर्वांचा अंत होतो. पृथ्वी खचते, उल्का पतन पावतात, जंगले जळतात, समुद्र, आटतात, पर्वत कोसळतात, रोगांच्या साथी पसरतात आणि युद्धे भडकतात. विश्वात कुठे उभारणी दिसते, तर कुठे संहारणी दिसते. या सर्व घडामोडीत ईश्वराच्या शक्तीचे अंश काम करीत असतात. त्यावरून ईश्वर हा चराचराला व्यापून उरणारा आहे, असे मानावे लागते.

वेगवेगळ्या दर्शनांतील ईश्वरविषयक विचार असे —

**न्यायदर्शन** — न्यायदर्शनात ईश्वराला महत्त्वाचे स्थान आहे. ईश्वराच्या अनुग्रहाशिवाय पुरुषाला प्रमेयांचे यथार्थ ज्ञान होत नाही किंवा तो मोक्षाचा अधिकारीही होत नाही, असे नैयायिक मानतात. त्यांच्या मते ईश्वर हा जगाच्या उत्पत्ति-स्थितीलयाचा कर्ता आहे. सार्वकाल विद्यमान असणाऱ्या अणूपासून तो जग निर्माण करतो. जगात व्यवस्थाही तोच लावतो. त्यांच्या मते ईश्वर हा विश्वाचे निमित्तकारण आहे. उपादानकारण नाही. वेदान्तात त्याला निमित्तकारण व उपादानकारणही मानले आहे. मनुष्य जे कर्म करतो, त्याला तो केवळ निमित्तमात्र असतो. ईश्वरच त्या कर्माचा प्रयोजक कर्ता असतो. अशा प्रकारे ईश्वर हा प्राणिमात्राचा नैतिक शासक, त्यांच्या कर्मफलांचा दाता व सुखःदुःखाचा नियामक आहे. नैयायिक ईश्वरसिद्धी पुढील तीन प्रमाणांनी करतात.

(१) **कार्यकारणसंबंध** — विश्वातील सर्व पदार्थ हे कार्य आहेत, म्हणजे ते उत्पन्न झालेले आहेत. याचे कारण असे, की ते सावयव आहेत व त्यांचे परिमाण सीमित आहेत. कार्याला कोणीतरी कर्ता असतो, हा नेहमीचा अनुभव आहे. तदनुसार या कार्यरूप जगताचा कोणीतरी कर्ता असलाच पाहिजे. तोच चेतन व सर्वशक्तिमान ईश्वर होय. तो सर्वज्ञ आहे व सर्वव्यापकही आहे.

(२) **अदृष्ट** — सृष्टीतील मानवप्राणी सगळे सारखे नसतात. कोणी राजवैभवात लोळत असतो, तर कोणी दुपारच्या ग्रासमात्र अन्नालाही महाग असतो. याचे कारण काय ? ज्याचे त्याचे कर्म हेच कारण. माणूस जसे बरेवाईट कर्म करतो, तसे त्याला फळ मिळते. ते फळ अदृष्टद्वारा त्याला प्राप्त होते, असे नैयायिक

मानतात. अदृष्ट स्वत: जड आहे. ईश्वर त्याला प्रेरित करतो. तो अदृष्टाचा नियंता व अदृष्टाप्रमाणे मानवाचे सुख:दुःख, उत्कर्ष-अपकर्ष व हर्ष-विषाद यांचा संपादक आहे.

(३) **वेदप्रामाण्य** – आपल्या धर्मात वेदांची प्रामाणिकता सर्वतोमुखी आहे. वेद सांगतो तो धर्म व तो ज्याचा निषेध करतो, तो अधर्म होय. वेदांना इतकी मान्यता आहे, याचे कारण वेद हे ईश्वररचित आहेत. सर्वज्ञ, सर्वशक्तिमान व सर्वव्यापक ईश्वराने वेद रचलेले असल्यामुळेच अस्तिकांची वेदांच्या प्रामाण्यावर श्रद्धा आहे. वेदच सांगतो, की ईश्वर आहे.

**एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा ।**
**कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ।।**
(श्वेताश्व. ६.११)

अर्थ – एक देव सर्व प्राणिमात्रांत गूढरूपाने राहिलेला आहे. तो सर्वव्यापी, सर्व भूतांचा अंतरात्मा, कर्मांचा अध्यक्ष, सर्व भूतांचे आश्रयस्थान, साक्षी, चेतन, एकमेव व निर्गुण आहे. म्हणून ईश्वराचे अस्तित्व मान्य केले पाहिजे. उदयनाचार्यांनी न्यायकुसुमांजली या ग्रंथात ईश्वरसिद्धीसाठी पुढील आठ प्रमाणे सांगितली आहेत –

**कार्यायोजनधृत्यादेः पदात् प्रत्ययतः श्रुतेः ।**
**वाक्यात् संख्याविशेषाच्च साध्यो विश्वविदव्ययः ।।**

अर्थ – कार्य, आयोजन, धृती, पद, प्रत्यय, श्रुती, वाक्य व संख्याविशेष या प्रमाणांनी ईश्वराची सिद्धी होते.

**योगदर्शन** – योगदर्शनात ईश्वराचे स्थान फार मोठे आहे. ईश्वर शब्दाची व्याख्या तिथे पुढीलप्रमाणे दिली आहे –

**क्लेशकर्मविपाकाशयैरपरामृष्टः पुरुषविशेषः ईश्वरः ।**
(योगसूत्र १.२४)

अर्थ – क्लेश, कर्मविपाक व आशय (=कर्मफलानुरूप संस्काराचा संपर्क) यांनी रहित असणारा पुरुषविशेष म्हणजे ईश्वर होय.

ऐश्वर्य व ज्ञान यांची पराकाष्ठा म्हणजेच ईश्वर. तो तीन्ही कालांनी अनवच्छिन्न आहे. तो गुरूंचाही गुरू आहे. वेद-शास्त्रांचा प्रथम उपदेष्टा तोच आहे. तो नित्य, सर्वज्ञ, सर्वव्यापी परमात्मा आहे. विश्वातल्या सर्व जीवांहून तो भिन्न आणि श्रेष्ठ आहे.

योगदर्शनाच्या आचार्यांनी ईश्वरसिद्धीसाठी तीन स्वतंत्र प्रमाणे पुढे केली आहेत –

(१) ईश्वरसिद्धीसाठी सर्वश्रेष्ठ प्रमाण म्हणजे शब्द. श्रुती आणि शास्त्र एका स्वराने ईश्वराची सत्ता उद्घोषित करतात व त्याची प्राप्ती हे जीवनाचे परमसाध्य मानतात.

(२) वस्तूंमध्ये दोन प्रकारच्या कोटी असतात. एक अल्पतम कोटी व दुसरी उच्चतम कोटी. वस्तूंचे सर्वांत लहान रूप म्हणजे परमाणू व सर्वांत मोठे म्हणजे आकाश. त्याच प्रकारे ज्ञानाची सर्वांत मोठी यात्रा जिथे राहते, तोच ईश्वर होय. तोच जगतातील ज्ञानधारेचा मूलस्रोत आहे. या जगात लोकांना जे ज्ञान मिळते, ते गुरूपासून मिळते. गुरूला त्याच्या गुरूकडून आणि त्याला त्याच्याही गुरूकडून मिळते. अशा प्रकारे गुरुत्वाची जी अंतीम कोटी तोच ईश्वर होय. एखाद्या ऋषि-मुनीला या अंतिम कोटीत बसविणे शक्य नाही. कारण ऋषी किंवा मुनी विशिष्ट कालातच अस्तित्वात असतो. ईश्वराचे तसे नाही. तो दिक्कालाद्यनवच्छिन्न व म्हणूनच नित्य आहे. तो ज्ञानाचा परमनिधी आहे.

(३) प्रकृती व पुरुष यांचा संयोजक व वियोजक म्हणून ईश्वराची सिद्धी होते. सर्वज्ञ ईश्वराला प्रत्येक पुरुषाचे कर्म व अदृष्ट यांचे ज्ञान असते व तदनुसार तो प्रकृति-पुरुषांचा संयोग घडवून आणतो आणि जीव-जगत यांच्या सृष्टीसाठी प्रकृतीला प्रेरणा देतो.

योगाच्या साधनेतही ईश्वराला महत्त्व दिलेले आहे. ईश्वर-प्रणिधानामुळे समाधी सिद्ध होते, असे योगशास्त्रात मानले आहे.

**मीमांसादर्शन** – प्राचीन मीमांसक निरीश्वरवादी होते; पण पुढच्या मीमांसकांना ही गोष्ट खटकली व कर्मफलाचा दाता म्हणून त्यांनी ईश्वराचा स्वीकार केला. चेतनपुरुषाच्या अधि-ष्ठानाशिवाय कर्म हे स्वकीय फल उत्पन्न करायला असमर्थ आहे, असे जाणून बादरायणाने ईश्वराला कर्मफलाचा दाता मानले. जैमिनीच्या मतानुसार यज्ञापासून त्याच्या फलाची प्राप्ती होते; त्यासाठी ईश्वराची गरज नाही. पण नंतरच्या मीमांसकांनी यज्ञपतीच्या स्वरूपात ईश्वराचा स्वीकार केला.

**वेदान्तदर्शन** –हे दर्शन ईश्वर मानणारे आहे. जेव्हा निर्विशेष ब्रह्म मायेने आवृत्त होऊन सविशेष किंवा सगुण भाव धारण करते, तेव्हा त्याला ईश्वर म्हणावे, असे वेदान्ती सांगतात. विश्वाच्या सृष्टि-स्थिति-लयाचे कारण ईश्वरच आहे. परमे-श्वराचा हा सृष्टिव्यापार लीलारूप आहे. व्यवहारात सर्व मनोरथ सिद्ध झालेल्या पुरुषाचे व्यापार जसे निरुद्देश होत असतात, तद्वतच ही सकलसृष्टी म्हणजे सर्वज्ञ व सर्वकाम ईश्वराचा लीला-विलास आहे.

**प्रकृतिश्च प्रतिज्ञादृष्टान्तानुपरोधात् ।**
(ब्र. सू. १.४.२३)

या सूत्रावर भाष्य करताना शंकराचार्यांनी ईश्वर हा जग-ताचे निमित्तकारण आहे व त्याचबरोबर उपादानकारणही आहे, असे सिद्ध केले आहे. कुंभार ज्याप्रमाणे मातीपासून माठ

प्रकारची गाडगी बनवितो, त्याचप्रमाणे ईश्वर स्वतःमधून जगत् निर्माण करतो. मायोपाधिक ब्रह्म म्हणजेच ईश्वर होय. त्यामुळे ईश्वर चेतन आहे. चैतन्यपक्षाचा अवलंब केल्यास ब्रह्म हे जगताचे निमित्तकारण ठरते व उपाधिपक्ष स्वीकारल्यास ते जगताचे उपादानकारणही होते.

रामानुजाचार्यांच्या मते सर्वोत्कृष्ट व गुणसंपन्न तो ईश्वर होय. ते निर्गुण निराकार ब्रह्माला न मानता सगुण पुरुषोत्तमालाच मानतात. ईश्वर हा सेव्य असून जीव हा त्याचा सेवक आहे. ईश्वर शरणागताला शरण्य आहे. त्याची कर्मरूप उपासना केल्याने जीव मुक्त होतो.

मध्वाचार्य ईश्वर हा सर्व गुणसंपन्न व दोषवर्जित आहे व तोच नारायण होय, असे मानतात.

वल्लभाचार्यांच्या मते ईश्वर हा सगुण व निर्गुण अशा दोन्ही रूपांत आहे. त्याच्या अनंत शक्तींपैकी माया ही एक शक्ती आहे. जीव हा परमेश्वरी अंश असून ईश्वरसेवा हे त्याचे ध्येय आहे. ते पुष्टिमार्गाच्या द्वारे साध्य होते.

गीता – गीतेत ईश्वरतत्त्वाचा सर्वांगीण विचार केलेला दिसतो. तिथे ईश्वराचे वर्णन अनेक ठिकाणी अनेक प्रकारे आले आहे. श्रीकृष्ण हा गीतेचा वक्ता असून, तो पुरुषोत्तम आणि योगेश्वर आहे. तेव्हा तिथले बऱ्याच ठिकाणचे ईश्वरवर्णन प्रथमपुरुषात केलेले आहे. सर्वव्यापी, निर्गुण, निराकार असे परब्रह्म आणि विश्वाची घडामोड करणारा सगुण-साकार ईश्वर, यांत गीतेत भेद मानलेला नाही. सर्व विश्व ईश्वरापासून निर्माण होते व त्याच्या ठिकाणीच विलीन होते; पण त्यामुळे ईश्वराच्या अकर्तृत्वाला बाध येत नाही. तो जगन्निर्मितीचे काम प्रकृतीवर सोपवितो आणि त्या सर्व कर्मापासून अलिप्त राहतो. जगातले सर्व पदार्थ ईश्वरामध्ये आणि ईश्वराच्या आधाराने राहतात. दोऱ्यात मणी ओवावे, त्याप्रमाणे सर्व विश्व ईश्वरात ओवलेले आहे. जगातील सर्व सात्त्विक, राजस आणि तामस पदार्थ ईश्वरापासूनच उत्पन्न होतात; पण ईश्वर मात्र त्यांच्यात राहून मर्यादित होत नाही.

नवव्या अध्यायात श्रीकृष्ण आपला ऐश्वर्ययोग पुढीलप्रमाणे विशद करतो –

मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।
मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ।।
न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।
भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ।।
यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।
तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ।।

(भगवद्गीता ९.४–६)

अर्थ – मी आपल्या अव्यक्त स्वरूपाने हे जग विस्तारिले किंवा व्यापिले आहे. माझ्या ठायी सर्व भूते आहेत, पण मी त्यांच्या ठायी नाही. आणि माझ्या ठायी सर्व भूतेही नाहीत ! पाहा (कशी ही) माझी ईश्वरी करणी किंवा योग सामर्थ्य ! भूते उत्पन्न करणारा माझा आत्मा भूते धारण करूनही (पुनः) भूतांत नाही ! सर्वत्र वावरणारा महान वायू ज्याप्रमाणे सर्वदा आकाशाच्या ठायी, त्याप्रमाणे सर्व भूते माझ्या ठायी आहेत, असे समज.

ईश्वर हा जर सर्व विश्वाचा निर्माता आहे आणि तो जर दयाळू आहे, तर त्याच्या जगात दुष्ट, अमंगळ आणि असुंदर पदार्थ का दिसावे, हा प्रश्न अनादिकालापासून प्रत्येक ईश्वरवाद्याला भेडसावीत आलेला आहे. जगातील दोषांमुळे ईश्वर दूषित होऊ शकत नाही, हे फार तर गीतेतल्या विवेचनावरून समजू शकेल; पण जगात ईश्वराने वाईट पदार्थ निर्माणच का करावे, हा प्रश्न शिल्लक राहतोच. याला गीतेतले उत्तर पुढीलप्रमाणे आहे –

जगात वाईट किंवा अशुभ केवळ भासते; त्याला वास्तव अस्तित्व नाही. केवळ अज्ञानामुळेच काही पदार्थ वाईट भासतात. ते अज्ञान दूर झाले म्हणजे बऱ्यावाईट सर्व पदार्थांत सारखाच व्यापून राहिलेला ईश्वर जाणवू लागतो. चांगले व वाईट या कल्पना दृश्याच्या क्षेत्रातील आहेत. सत्य त्या दोहोंच्याही पलिकडे असते. म्हणूनच दृश्यातीत झालेले पंडित समदर्शी होतात.

व्यावहारिक जगात बरे-वाईट हा भेद राहणारच. याला कारण स्वभाव हेच आहे. व्यवहारात बऱ्याचे बरेपणही वाईट काही असल्यावाचून प्रत्ययास येत नाही. पण म्हणून ते ईश्वर निर्माण करतो असे म्हणणे चूक आहे. ईश्वर कोणाचेही पापपुण्य घेत नाही. मात्र ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणे तो ज्याला त्याला त्याचे फल देतो. ही गोष्ट स्पष्ट करण्यासाठी शंकराचार्यांनी 'ईश्वरस्तु पर्जन्यवत् द्रष्टव्यः' असे म्हटले आहे. ईश्वर सर्वांच्या सुखदुःखांचे साधारण कारण असला, तरी जगात दिसणारे वैषम्य ज्याच्या त्याच्या कर्मामुळेच उत्पन्न होते. पर्जन्य हा सर्व वनस्पतींच्या वाढीला साधारण कारण असला, तरी त्या वनस्पतींना येणारी फळे मात्र त्यांच्या बीजावर अवलंबून असतात. त्याबद्दल पर्जन्याला दोष देता येत नाही. हे जसे, तसाच ईश्वरही जगातील वैषम्यामुळे दोषी ठरत नाही.

हे उत्तर जग निर्माण झाल्यानंतर ठीक आहे. परंतु निर्मितीच्या पूर्वी कर्मच ज्या वेळी उत्पन्न झाले नव्हते, तेव्हा वैषम्य कुठून आले ! यावर उत्तर असे, की संसार हा अनादी असल्यामुळे 'निर्मितीच्या पूर्वी' असा त्याच्याविषयी प्रश्नच येऊ शकत नाही. संसाराचे हे अनादित्व गीतेच्या पंधराव्या अध्यायात

श्रीकृष्णांनी विशद केले आहे. पण तेवढ्यानेही ज्यांचे समाधान होत नाही, त्यांना गीतेतील उत्तर असे, की जगातले वैषम्य केवळ अज्ञानाने किंवा मायेने भासते, निर्दोष व सम अशा ब्रह्मात ईश्वरात लवलेशही नाही.

हा ईश्वर प्राणिमात्रांच्या हृदयात निवास करतो, असे गीतेत (१८.६१) सांगितले आहे –

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।**
**भ्रामयन्सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया ॥**

अर्थ – हे अर्जुना ! ईश्वर सर्व भूतांच्या हृदयात राहून यंत्रावर चालविल्याप्रमाणे सर्व भूतांना (आपल्या) मायेने चालवीत असतो.

अशा या ईश्वराला शरण गेल्याने मायेच्या दुस्तर सागरातून तरून जाता येते. ईश्वरभजनाने दुराचारी माणसाचीही बुद्धी बदलते, वर्तन सुधारते. याउलट सद्वर्तनी माणसाचेही ईश्वरानुसंधान सुटले, तर त्याचाही अधःपात होण्याची शक्यता असते. कोणत्याही स्थितीत जोवर ईश्वरानुसंधान दृढ आहे, तोवर कोणतेही भय संभवत नाही. म्हणूनच गीतेत सांगितले आहे की, कोणतेही कर्म करायचे ते ईश्वरार्पण बुद्धीने करावे.

माया किंवा प्रकृती यांच्या साहाय्याने व्यक्त रूप धारण करणारा आणि कर्मफल देणारा ईश्वर, हा स्वरूपतः ब्रह्मच असल्याचे गीतेत सांगितले आहे. पण त्यातही गीतेचे वैशिष्ट्य हे की उपनिषदांतील ब्रह्मविद्येला ईश्वरवादाची जोड देऊन ती सर्वसामान्य व्यक्तींना सुगम केली. म्हणूनच ईश्वराचे वास्तवरूप 'कूटस्थ नित्य' असले, तरी सामान्य माणसाने त्याच्या, प्राप्तीसाठी व्यक्तोपासनेचाच मार्ग अवलंबिणे अधिक श्रेयस्कर, असे गीतेत सांगितले आहे. मात्र व्यक्तोपासना करीत असताही ईश्वराचे वास्तवरूप जाणून सर्व काही ईश्वरच आहे, अशी भावना ठेवणे आवश्यक असते, असेही गीतेत सांगितले आहे.

**ख्रिस्ती धर्म** – हा धर्मही ईश्वराला मानतो. किंबहुना तो एकेश्वरवादी धर्म आहे. इ. स. पूर्व नवव्या शतकापासून इस्राएलचा इतिहास व त्याचे साहित्य यांचे अवलोकन केले असता असे कळते, की त्या काळी भिन्न भिन्न मानवसमूह अनेक देवताना भजत होते. पुढे या अनेक देवतांतूनच एकेश्वराची कल्पना उदयास आली. जुन्या करारातच हा एकेश्वरी सिद्धान्त प्रस्थापित झालेला दिसतो. सर्वश्रेष्ठ, दिव्य व असामान्य अशी एकच शक्ती विश्वाचे नियमन करते व म्हणून तिचीच उपासना केली पाहिजे, ही कल्पना जुन्या करारातच स्पष्ट झालेली आहे.

इस्राएलच्या यहुदी धर्मात ईश्वराला जेहोवा असे नाव असून तो स्वयंभू स्वयंपूर्ण, विश्वकर्ता व चिन्मय आहे. हा ईश्वर इंद्रियगोचर नाही; पण तो वेळोवेळी आपल्या प्रतिनिधीच्या रूपाने स्वतःचे रूप व्यक्त करीत असतो. प्रॉफेट किंवा प्रेषित हा केवळ त्याचा संदेशवाहक नसून, तो त्याचा अवतार असतो. ईश्वर भक्तांवर कृपा करतो व दुष्टांचा नाश करतो.

ग्रीक युगात वरील ईश्वरविषयक कल्पनेत तात्त्विक फरक पडत नसला, तरी ईश्वराला अधिक अलौकिक स्थान प्राप्त झाले. मानव व ईश्वर यांतील अंतर अनेक पटींनी वाढले. ईश्वराला मानवी रूप देण्याची प्रवृत्ती कमी झाली. त्याच्या भोवतीचे पावित्र्याचे वलय अधिकच गडद झाले.

येशू ख्रिस्ताने ईश्वरविषयक वरील सर्व कल्पनांचा पुरस्कार केला असून, 'जगाचा पिता' ही त्याला विशेष संज्ञा दिली आहे. ईश्वर हा प्राणिमात्राकडे पित्याच्या प्रेमळ दृष्टीने पाहतो. मुले अर्थात मानव प्राणी कसेही वागले, तरी या 'बापाचे' त्यांच्यावरचे प्रेम कमी होत नाही. तो भेदभाव न ठेवता सर्वांवर सारखीच कृपा करतो. तो क्षमाशील आहे. अपराध्याला शासन करतानाही तो स्वतः दुःखी होतो. आणि शासन करतो तेही मानवाने सुधारावे म्हणूनच. ख्रिस्त सांगतो, की 'मी ईश्वराचा श्रेष्ठ पुत्र असून, मला त्याचे सामर्थ्य व त्याची दयाबुद्धी प्राप्त झालेली आहे. तेव्हा सर्वांनी माझ्यावर पूर्ण विश्वास ठेवावा.'

ईश्वराच्या इतर सर्व गुणांबरोबर त्याच्या प्राणिमात्राविषयीच्या प्रेमाला नव्या करारात प्राधान्य मिळाले. परमेश्वर हा पिता, ख्रिस्त हा त्याचा पुत्र व जगाच्या उद्धारासाठी ईश्वराने केलेली योजना असे ईश्वराचे त्रिविध रूप आहे, असे ख्रिस्ती धर्म मानतो (जॉन ३.१६).

**पारशी धर्म** – झोरास्ट्रियन अर्थात पारशी धर्मही एकेश्वरवादीच आहे. या जगात एकच पूज्य देव आहे आणि तो ज्ञान, जीवन, सत्य व सद्गुण यांचा अधिष्ठाता आहे. त्याला अहुरमज्द म्हणजे सर्वज्ञ ईश्वर असे म्हणतात. अवेस्त्यातील पहिल्याच ऋचेत त्याचे सामर्थ्य व गुणविशेष प्रकट केलेले आहेत–

'अहुरमज्द हा जगाचा कर्ता आहे. तो तेजस्वी, वैभवशाली श्रेष्ठ, उत्कृष्ट, अतिसुंदर, अत्यंत दृढ, सर्वज्ञ, संपूर्ण व अत्युदार आहे.'

झरथुष्ट्राने विविध गाथांतून त्याला पुढील विशेषणे योजली आहेत – सृष्टीचा कर्ता, सर्वसाक्षी, सर्वज्ञ, सर्वश्रेष्ठ, सर्व शक्तिमान, सखा, सत्य-न्यायाचा जनक, सन्मानाचा जनक, कल्याणकारी व उदार. अवेस्त्यानंतरच्या पारशी धर्मग्रंथांत अहुरमज्दाची १०१ नावे दिलेली आहेत.

**इस्लाम** – परमेश्वर आहे आणि तो एक आहे, हा इस्लामचा मुख्य संदेश आहे. अल्ला या नावाने तो ओळखला जातो. इस्लामी धर्मसाहित्यात अल्लाचे पुढील गुणविशेष सांगितले :

आहे– तो एकमेव, सर्वसाक्षी, सर्वश्रोता, सर्ववक्ता, सर्वज्ञ, सर्वसंकल्प, अचिंत्य, अनिरुद्ध, सर्वशक्तिमान व रब्ब (प्रभू) आहे. तो प्रेम करणारा आहे, हे खरे; पण त्याचे प्रेम सज्जन, मुहंमदाचे अनुयायी, निगर्वी, सदाचरणी, श्रद्धावंत व परमेश्वराचा पक्ष घेऊन लढणारे, यांनाच मिळते. अल्लाच्या ठिकाणी 'कर्तुमकर्तुम् अन्यथाकर्तुम्' शक्ती आहे, असे कुराणात वारंवार सांगितले आहे. ख्रिस्ती धर्मातल्याप्रमाणे अल्लाचे मानवाशी पिता-पुत्राचे नाते नाही. अल्ला हा धनी असून मानव हा त्याचा गुलाम आहे. अल्लाच्या आदेशानुसारच मानवप्राणी कामे करीत असतात. ईश्वर सातव्या अस्मानात अर्श (सिंहासन)वर विराजमान झाला आहे (५७१.४). तो आपल्या सिंहासनावरून फरिश्त्यां (देवदूतां)च्या द्वारे साऱ्या विश्वावर अधिराज्य करतो. त्यानेच जिबरीलच्या द्वारे मुहंमदाकडे कुराण पाठविले. कुराणातला ईश्वरविचार द्वैताद्वैतभावाचे संमिश्रण आहे. [भा. द.; ज. वि. ध.; वि. ध. द.; गी. ए. अ.; जडवाद]

**ईश्वरकृष्ण** सांख्यकारिकांचा कर्ता. याचा काल साधारणपणे इ. स. चे चौथे शतक मानतात. परंतु तो याहूनही प्राचीन असावा, असे श्री. बलदेव उपाध्याय यांचे मत आहे. इ. स. च्या सहाव्या शतकात परमार्थाने चिनी भाषेत सांख्यकारिकांचा वृत्तीसह अनुवाद केला आहे. चिनी भाषेत या ग्रंथाला हिरण्यसप्तती किंवा सुवर्णसप्तती असे म्हणतात. अनुयोगद्वारसूत्र (इ. स. १००) या जैन ग्रंथांत काविलं, सट्ठितंतं, माठरं, या ग्रंथांबरोबर कणगसत्तरीचा उल्लेख आहे. कणगसत्तरी हे सांख्यकारिकेचेच चिनी नाव आहे. यावरून ईश्वरकृष्णाचा काळ, इ. स. च्या पहिल्या शतकाच्या अलिकडचा नाही, असे पं. बलदेव उपाध्याय म्हणतात.

शंकराचार्यांनी आपल्या शारीरकभाष्यात सांख्यमताचा उपन्यास करताना सांख्यकारिकांतील अवतरणे दिली आहेत. सांख्यकारिकांवर अनेक विद्वत्तापूर्ण टीका उपलब्ध आहेत. त्यांपैकी माठरवृत्ती ही सर्वांत प्राचीन आहे. [म. च. को.; भा. द.]

**ईश्वरगणगौरीव्रत** चैत्र शु. प्रतिपदेपासून चैत्र कृ. तृतीयेपर्यंत रोज शिव-गौरी यांची पूजा करणे, हा या व्रताचा विधी आहे. हे व्रत फक्त सुवासिनीकरिताच उक्त आहे. फल – सौभाग्यप्राप्ती. पाहा – गणगौर. [हि. ध.]

**ईश्वरचंद्र विद्यासागर** (१८२०-१८९१ इ. स.) बंगालमधील एक सुप्रसिद्ध संस्कृत पंडित व विधवाविवाह कायद्याचे जनक. मेदिनीपूर जिल्ह्यातल्या वीरसिंह गावी यांचा जन्म झाला. यांच्या वडिलांचे नाव ठाकूरदास वंद्योपाध्याय असे होते. त्यांची आर्थिक स्थिती ठीक नव्हती. ईश्वरचंद्रांना लहानपणापासून विद्येची गोडी लागली. आपल्या मुलाला उत्तम शिक्षण मिळावे म्हणून वडिलांनी ईश्वरचंद्रांना वयाच्या अवघ्या नवव्या वर्षी कलकत्त्याला आणून तिथल्या संस्कृत कॉलेजात दाखल केले. दारिद्र्य व शरीराचे अनारोग्य यांच्याविरुद्ध झगडून ईश्वरचंद्रांनी आपला विद्याभ्यास पुरा केला.

इ. स. १८४१ साली फोर्ट विलियम कॉलेजमध्ये मुख्य पंडित म्हणून त्यांची नेमणूक झाली. त्याच वेळी त्यांना 'विद्यासागर' ही पदवीही मिळाली. इ. स. १८५१ साली ते त्या कॉलेजचे प्राचार्य बनले. पुढे त्यांनी शाळाखात्यात इन्स्पेक्टर म्हणूनही काम केले. तेवढ्या अवधीत त्यांनी पाठशाळांच्या जुन्या पद्धतीत फरक करून नवी शिक्षणपद्धती सुरू केली. पुढे वरिष्ठ अधिकाऱ्यांशी मतभेद झाल्यामुळे त्यांनी आपल्या सरकारी नोकरीचे त्यागपत्र दिले आणि ते सामाजिक व वाङ्मयीन कार्यासाठी मोकळे झाले.

स्वतःचे प्रारंभिक जीवन अत्यंत हालअपेष्टात गेल्यामुळे गरीब जनतेबद्दल त्यांना अत्यंत कळकळ वाटे. त्यांनी कित्येक गरीब विद्यार्थ्यांना आणि दुर्दैवी असहाय्य विधवांना आर्थिक मदत केली. हा त्यांचा कनवाळू स्वभाव पाहून लोक त्यांना 'दयासागर' म्हणू लागले. निर्धनांच्या सेवेतच त्यांना खरा आनंद लाभत असे. त्यांनी स्वतःजवळचा बहुतेक पैसा रंजल्या-गांजल्यांसाठीच खर्च केला. समाजाच्या



ईश्वरचंद्र विद्यासागर

व्रतीसाठी, अज्ञानांना सज्ञान करण्यासाठी, विशेषतः हिंदू बालविधवांच्या उद्धारासाठी ईश्वरचंद्रांनी आपली सारी बौद्धिक शक्तीही खर्च केली. बंगालला सामाजिक सुधारणेचा प्रकाश त्यांनीच दाखविला.

असे सांगतात, की एका बालविधवेने आपल्याला पुढील जीवनाचा मार्ग दाखविण्याबद्दल ईश्वरचंद्रांची कळकळून प्रार्थना केली. त्या मुलीचा पुनर्विवाह घडवून आणणे हाच तिच्या

दुःखपरिहाराचा उपाय होय, असे त्यांनी मनाशी ठरविले. पण त्या काळच्या समाजात विधवेचा पुनर्विवाह ही कल्पनाही महापाप समजली जात होती. कारण रूढी आणि धर्मशास्त्र दोहोंचाही त्या गोष्टीला सक्त विरोध होता. म्हणून मग त्यांनी धर्मशास्त्राचे सूक्ष्म परिशीलन करायचे ठरविले. त्या अभ्यासात त्यांना विधवाविवाहाला अनुकूल असे किती तरी उल्लेख सापडले. त्या सर्वांची व्यवस्थित मांडणी करून त्यांनी विधवा-विवाह या विषयावर एक पुस्तक लिहिले. पण सनातनी पंडित त्यामुळे खवळले आणि त्यांचे खंडन करायला सरसावले. ईश्वरचंद्रांनी या विरोधकांना उत्तर देण्यासाठीही बरेच लेखन केले. सनातनी पंडितांचा विरोध संस्कृत भाषेतून व्यक्त होत होता, तर ईश्वरचंद्र त्या विरोधाला बंगाली भाषेतून सविस्तर उत्तरे देत. त्यामुळे ईश्वरचंद्राचे तद्विषयक विचार सर्व समाजात प्रसृत झाले आणि त्यांना लोकमताची अनुकूलता लाभली. त्यांच्या या अदम्य प्रयत्नाला अखेर यश लाभले आणि इ. स. १८५६ मध्ये विधवाविवाहाचा कायदा संमत झाला. याच कायद्यान्वये विधवेची संततीही कायदेशीर ठरली.

आपले विचार आचरणात आणण्याच्या कामीही ते कचरले नाहीत. त्यांनी आपल्या मुलाचे लग्न एका बालविधवेशीच लावले.

त्यांच्या कालापर्यंत कलकत्त्याच्या संस्कृत कॉलेजात केवळ ब्राह्मण व वैद्य याच जातींच्या विद्यार्थ्यांना प्रवेश मिळत असे; पण ईश्वरचंद्रांनी चौफेर प्रयत्न करून समस्त हिंदूंना त्या कॉलेजाचे द्वार खुले करून दिले. स्त्री-शिक्षणाचे ते प्रबळ समर्थक होते. श्री. बेथ्यून यांच्या साहाय्याने त्यांनी कलकत्ता येथे गर्ल-स्कूलची स्थापना केली व तिच्या संचालनाचा भारही आपल्या शिरावर घेतला. या त्यांच्या प्रयत्नशील तळमळीमुळे बंगालमधील सारा स्त्रीसमाज त्यांना आपला उद्धारकर्ता या नात्याने मान देऊ लागला.

ईश्वरचंद्र हे परम मातृभक्त होते. आपली आई आजारी आहे, असे समजताच ते पावसाळ्यात धो धो वाहणाऱ्या नदीत उडी टाकून पैलथडीस गेले व आपल्या रुग्ण मातेस भेटले.

ईश्वरचंद्रांना आधुनिक बंगाली गद्याचे जनक मानतात. त्यांनी बंगाली भाषेला नवे वळण लावले व तिला साहित्याचे समर्थ वाहन बनविले. एक प्रकारे त्यांनी बंगाली भाषेचे पंगुत्वच दूर केले. वासुदेवचरित, वेतालपंचविंशती, बांगलार इतिहास, जीवनचरित, बोधोदय, कथामाला, शकुंतला, सीतावनवास, इ. अनेक ग्रंथ त्यांनी बंगाली भाषेत लिहिले.

साधेपणा, निर्भयपणा, नीतिमत्ता, इ. गुणांनी ते संपन्न होते. [ अ. च. को.; हिं. वि. को.; ज्ञानदूत, दिवाळी अंक, १९६१ ]

**ईश्वरपुरी** ( जन्म इ. स. १४३६ ) एक वैष्णवभक्त. याच्या पित्याचे नाव श्यामसुंदर राठी असे असून, तो कुमारहट्टाचा आचार्य होता. ईश्वरपुरीने वेदांचे शास्त्रशुद्ध अध्ययन केले होते. पुढे माधवेन्द्रपुरीने याला वैष्णवधर्माची दीक्षा दिली व हा भक्तिमार्गाकडे वळला आणि महान भक्त म्हणून प्रसिद्धीस आला. चैतन्य महाप्रभूंना गया क्षेत्रात याचे दर्शन झाले होते व त्यामुळे चैतन्याने आपली यात्रा सफल मानली होती. प्रेमविलासादी अनेक वैष्णव ग्रंथांत ईश्वरपुरीचे वर्णन आले आहे. [ भा. सं. ]

**ईश्वरपूर** भारतातल्या शक्तिपीठांपैकी एक. या ठिकाणी सतीचा डाव्या हाताचा तळवा पडला होता. हे गाव खुलना जिल्ह्यात आहे. [ कल्याण–तीर्थांक ]

**ईश्वरयक्ष** जैन दैवतसमूहातील एक यक्ष. श्रेयांशनाथाचा सेवक. याचे वर्णन प्रतिष्ठासारसंग्रहात पुढील-प्रमाणे केलेले आहे –

**त्रिनेत्रो वृषवाहनः फलाक्षसूत्रसंयुक्तः सत्रिशूलश्चतुर्भुजः।**

अर्थ – त्रिनेत्र, बैलावर बसलेला, फूल, माला, त्रिशूल धारण करणारा, चतुर्भुज (श्वेतांबरमते मुंगूस, माला, दंड, व फल धारण करणारा.)

याची मूर्ती कलकत्त्याच्या संग्रहालयात आहे. याचे नाव आणि लक्षणे पाहता, हा यक्ष म्हणजे पुराणांतला शिवच असून तो जैनसंप्रदायात यक्षरूपाने तीर्थंकराचा सेवक बनविला गेला आहे, असे दिसते. [ जै. इ. ]

**ईश्वरव्रत** कोणत्याही महिन्याच्या कृ. चतुर्दशीला शिवाची पूजा करणे, हा या व्रताचा विधी आहे. फल-शिवलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

**ईश्वरसंहिता** कांजीवरम् येथे इ. स. १९२३ मध्ये ही पांचरात्र मताची संहिता प्रकाशित झाली. या संहितेत एकूण २४ अध्याय असून, त्यांपैकी १६ अध्यायांत पूजाविधानाचे वर्णन आहे. इतर अध्यायांत मूर्तीचे विवरण, ध्यान, दीक्षा, मंत्र, प्रायश्चित्त, संयम, पावित्र्य, इ. विषय वर्णिलेले आहेत. समस्त वेदांचा उगम एकायन वेद हा असून, तो वासुदेवप्रणीत आहे, असे या संहितेत सांगितले आहे.

एकायन वेद सृष्टीच्या प्रारंभी अस्तित्वात होता. त्याच्यापासूनच इतर वेद निर्माण झाले. ते विकारवेद होत. या वेदांच्या उदयापासून मनुष्य संसारी बनला, म्हणून वासुदेवाने त्या वेदां-

पासून एकायन वेद अलग केला व सन, सनत्, सुजाती, सनक, सनंदन, सनत्कुमार, कपिल व सनातन अशा निवडक अधिकारी व्यक्तींना तो शिकविला. मरीची, अत्री, अंगिरस, इ. ऋषींनी नारायणाकडून या वेदाचे ज्ञान मिळविले. याच वेदाच्या आधारावर एका बाजूने पांचरात्र संहिता व दुसऱ्या बाजूने मन्वादी धर्मशास्त्रे निर्माण झाली, असेही यात सांगितले आहे. [भ. वि.]

**ईसरदास** (इ.स.१६३८-१७१८) जोधपूर राज्यातील भाद्रेस गावी चारणकुलात याचा जन्म झाला. याच्या पित्याचे नाव सूजा व आईचे नाव अमरबाई होते. हरसूर व आशानंद असे त्याचे दोन चुलते कवी म्हणून प्रसिद्धी पावले होते. ईसरदासाचा विवाह वयाच्या १४ व्या वर्षी झाला व लगेच त्याचे आईबाप वारले. त्यानंतर त्याचे शिक्षण व संगोपन आशानंदानेच केले. त्याच्या एकविसाव्या वर्षी त्याची पत्नी देवलबाई मरण पावली. त्यामुळे हा संसारातून विरक्त झाला. पुढे त्याने आशानंदासह द्वारकेची यात्रा केली. तिथून परतताना वाटेत जामनगर येथे त्याचा मुक्काम झाला. तोवर कवी म्हणून ईसरदासाने बरीच प्रसिद्धी मिळविली होती. त्यामुळे जामनगरच्या जामसाहेबाने त्याला आपल्या दरबारात बोलाविले व त्याचा सन्मान केला. पुढे तो तिथेच राजाश्रयाने राहिला. जामनगरच्या दरबारात त्याची प्रतिष्ठा उत्तरोत्तर वाढत गेली. सौराष्ट्रातील राजांचे यशोगान करून त्याने जामसाहेबांचे प्रेमही संपादिले. जामसाहेबाने त्याचे दुसरे लग्न केले. ईसरदास पुनश्च गृहस्थ बनला. त्याच दरबारात पीतांबरभट्ट नामक एक संस्कृत पंडित होता. ईसरदासाने त्याच्याजवळ संस्कृत भाषेचे अध्ययन केले. पुढे त्या दोघा गुरुशिष्यांत तेढ उत्पन्न झाला व ईसरदास आपल्या गुरूचा मत्सर करू लागला, असे सांगतात; पण पीतांबरभट्टाच्या उदार अंतःकरणाचा त्याला एक दिवस साक्षात्कार घडला आणि त्याचे हृदयपरिवर्तन झाले. त्या पुढे तो केवळ शब्दज्ञानी कवी राहिला नाही, तर त्याने अध्यात्मक्षेत्रातही आपली पुष्कळ प्रगती केली. ईसरदास चाळीस वर्षे जामसाहेबाच्या आश्रयाला राहिला. त्यानंतर तो परत आपल्या जन्मभूमीस आला. आयुष्याच्या अखेरीस लूनी नदीच्या तीरी गुडा गावाजवळ एक पर्णकुटी बांधून तो राहू लागला. ऐंशीव्या वर्षी त्याचा मृत्यू झाला.

राजस्थानात त्याची एवढी कीर्ती झाली, की सर्व जनता त्याला 'ईसरो सो परमेसरा' = ईसरदास हा परमेश्वराचा अवतार आहे, असे समजू लागली.

ईसरदासाचे समग्र काव्य राजप्रशंसा, हरिभक्ती आणि वीरगाथा अशा तीन विभागांत विभाजित करता येते. प्रशंसात्मक काव्यात त्याची जामसाहेबाच्या प्रशस्तिपर असलेली कविता येते. भक्तिकाव्यांत त्याचा हरिरस हा ग्रंथ सर्वश्रेष्ठ ठरलेला आहे. या ग्रंथात त्याने अनेक आध्यात्मिक रहस्यांवर विवेचन केले आहे. प्रस्तुत ग्रंथ कर्म, उपासना व ज्ञान यांचा संगमच आहे. तो म्हणतो. 'ईश्वर राम होवो वा कृष्ण होवो; तो त्याही स्वरूपात ईश्वरच आहे. त्याचे वर्णन होऊ शकत नाही. तो अथांग आहे, अग्राह्य आहे, अजात आहे, अतीत आहे.'

भक्ताच्या हृदयात निवास करणाऱ्या परमेश्वराचे वर्णन तो पुढीलप्रमाणे करतो —

**तिलाँ तेल पोहप फुलेल, उज्झेलत सायर।**
**अगनि काठे जोवन्न घट्ट, भगवट्ट सुकायर।।**
**ईख रस्स अहि फेण, अरथ आगम-उरटाहे**
**पानाँ चंग मजीठ रंग, उछरंग विमाहे।।**
**खरगनीर धीर अंतर खरा, मद कुंजर वपु जिम मयण।**
**मन बसें तेम तूं मांहरे, मो मन बसियो महमहण।**

अर्थ — तिळात तेल, फुलात अत्तर, समुद्रात तरंग, काष्ठात अग्नी, शरीरात यौवन, कायर पुरुषांत पळापळ, उसात रस, सर्पांत नाग, वेदांत अर्थ, तांबूलांत उन्मत्तता, मंजिष्ठात रंग, विवाहात आनंद, तलवारीत पाणी, अंतःकरणात सच्चाई, हत्तीत मद, जीवनात काम तसा हे महामहिम परमेश्वरा, तू माझ्या मनात वसलेला आहेस.

ईसरदासाचा हा हरिरस ग्रंथ प्रातःपठनीय ठरला आहे. तो राजस्थानी भक्तमंडळींचा कंठमणी ठरला आहे. भक्त-भाविकांना त्याच्या पठनातून आध्यात्मिक उपदेश लाभतो.

त्याच्या वीरकाव्यांत 'हालाँ झालाँ रा कुंडलिया' हे काव्य अद्वितीय मानले जाते. ती दोन रणधुरंधर वीरांची गौरवगाथा आहे. राजपूत वीरांच्या नावापुढे सिंह हा शब्द जोडलेला पाहून तो त्याचे रहस्य पुढीलप्रमाणे सांगतो —

**एको लाखाँ आँगमें सीह कहीजै सोय।**
**सूराँ जे थी रोड़ियँ कळहळ ते थी होय।।**
**सादूळौ आपा समौ बियौ न कोय गिणंत।**
**हाक बिडाणी किम सहै धण गजियै मरंत।।**
**केहरि मरूँ कळाइयाँ रुहिरज रतड़ियाँह।**
**हेकणि हाथळ गै हणै दंत दुहत्त्या ज्याँह।।**

अर्थ — सिंह त्याला म्हणावे, की जो एकटा लाखांची बरोबरी करू शकतो. तो जिथे जिथे शूरांना प्रेरून टाकतो, तिथे तिथे कोलाहल माजतो. स्वच्छंदगतीने संचार करताना तो दुसऱ्या कोणाची पर्वा करीत नाही. तो दुसऱ्याचा हुंकारही सहन करीत नाही. त्याची पत्नी त्याच्या रक्ताने भरलेल्या पंजांवर आपला जीव ओवाळून टाकते. कारण तिला माहीत असते, की

आपल्या पतीने पर्वतप्राय हत्तीला एका प्रहारातच लोळविले आहे. वस्तुतः सिंह आकाराने लहान असतो; पण हत्तीचे मानमर्दन करून तो श्रेष्ठ ठरतो. [ रा. भा. सा. ]

**ईस्टर** एक ख्रिस्ती सण. येशू ख्रिस्ताच्या पुनरुत्थानाच्या स्मरणार्थ हा सण साजरा करतात. परंतु काही लोकांचे म्हणणे असे, की प्राचीन अँग्लोसॅक्शन लोकांची ईस्टर नामक ऋतुदेवता होती व तिच्या प्रीत्यर्थ ते एप्रिल–मे महिन्यात हा सण साजरा करीत असत. अन्य काही लोकांच्या मताप्रमाणे प्राचीन काळी प्रचलित असलेल्या विषुवदिनाच्या सणाचा हा अवशेष आहे.

गोमंतकात या दिवशी (शनिवारी) सकाळी प्रत्येक चर्चमधे व चॅपेलमध्ये खास मीस (प्रार्थनासभा) असते. त्याच्या आधी शनिवारच्या मध्यरात्रीही मीस होते. या मिसापूर्वी एक विशिष्ट मेणबत्ती चर्चच्या बाहेर पेटवतात व ती अंधारात असलेल्या चर्चमध्ये नेतात. ही पेटती मेणबत्ती म्हणजे येशूच्या पुनरुत्थानाचे प्रतीक होय. या मेणबत्तीवरून पाद्री व इतर लोक यांच्या हातांतील मेणबत्त्या पेटवतात. नंतर सर्व लोक येशूच्या पुनरुत्थानासंबंधीची गीते गातात. यानंतर बरोबर मध्यरात्री बारा वाजता मासला प्रारंभ होतो. हा ईस्टर मास होय. मास संपल्यावर चर्चमधील घंटा वाजवतात व ऑर्केस्ट्रातून आनंद व्यक्त करणारे स्वर निनादतात. शेवटी पेटत्या मेणबत्त्या हातांत घेऊन पाद्री, इतर धर्मोपदेशक व सर्व लोक चर्चमधून मिरवणुकीने बाहेर पडतात. चर्चच्या आवारात हिंडून मिरवणूक पुन्हा चर्चमधे येते व नंतर सर्व लोक आनंदाने घरोघर परततात. तेव्हा ईस्टरचा रविवार उजाडलेला असतो. या दिवशी जेवणासाठी गोड पदार्थ करतात. इष्टमित्रांच्या भेटीगाठी, खेळ व करमणूक यात दिवस घालवतात.

हा सण कधी करावा, याविषयी ख्रिस्ती धर्मगुरूंत बराच वाद होता. पुढे इ. स. ३२५ त असे ठरले, की २१ मार्चनंतर जी पौर्णिमा येईल, तिच्या नंतर येणाऱ्या रविवारी ईस्टर सण धरावा. लीग ऑफ नेशन्सच्या कॅलेंडर कमिटीने याचा पुन्हा विचार केला व इ. स. १९२८ मध्ये पार्लमेंटात असा कायदा केला गेला, की एप्रिलमधील दुसऱ्या शनिवारानंतर येणारा रविवार हा ईस्टरचा दिवस मानावा. ईस्टरच्या दिवशी अंडी वाटण्याची प्रथा आहे. कारण अंडे हे पुनरुत्थानाचे जुने प्रतीक आहे. [ क. म.; एन्सा. रि.; सु. वि. को. ]

**उंछवृत्ती** शेतातले पीक कापून नेल्यावर तिथे पडलेल्या धान्याचा एकेक दाणा पक्ष्याप्रमाणे गोळा करून, त्यावर पंचमहायज्ञ करून निर्वाह करणे, याला उंछवृत्ती असे नाव आहे. उंछवृत्ती हा तपस्येचाच एक प्रकार आहे. [ श. कृ. ]

**उंट** एक चतुष्पाद पशू. हा खूप उंच असून, याची मान लांब व कमानदार असते. याच्या पाठीवर एक किंवा दोन मदारी (उंचवटे) असतात. याचे पाय उंच, बारीक, लवचीक व मजबूत असून, त्यांचे तळवे मोठे व मऊ असतात. हा प्राणी मुख्यतः वाळवंटी प्रदेशात फार उपयोगी आहे. तो पोटात बरेच पाणी साठवून ठेवू शकतो, त्यामुळे अनेक दिवस पाणी मिळाले नाही तर त्याचे नडत नाही. वाळवंटात वादळ केव्हा होणार, हे त्याला आधीच समजते व तो पुढले गुडघे टेकून मानही जमिनीला लावतो आणि वादळ थांबेपर्यंत नाकपुड्या बंद करून बसतो.

मदारीचा उंट, विशेषतः मादी अतिशय वेगवान असल्यामुळे, जलद प्रवासासाठी वापरतात. अशा मादीला सांडणी म्हणतात. राजस्थान, पंजाब, हरियाणा या प्रदेशात उंटांचा उपयोग वाहतुकीसाठी बराच केला जातो.

प्राचीन काळापासून युद्धात उंटांचा उपयोग केला जात असे. वाळवंटातून सैन्याचा प्रवास करताना सामान वाहून नेण्यासाठी उंटांचा ताफा वापरीत. पूर्वी भुइकोट किल्ल्याचे भक्कम दरवाजे हत्तीच्या धडकेने मोडून टाकीत, त्या वेळी हत्तीच्या मस्तकात दरवाज्याचे सुळे शिरू नयेत म्हणून मधे उंटाचा बळी दिला जात असे.

उंट हा शब्द उष्ट्र या संस्कृत शब्दापासून आलेला आहे. वैदिक साहित्यात याचा उल्लेख अनेक ठिकाणी आहे. दहा हजार गाई व शंभर उंट दान दिल्याचा निर्देश ऋग्वेदात (८.५.३७) आढळतो. पाणिनीने याचे अनेक उपयोग सांगितले आहेत. उंटांच्या समूहाला औष्ट्रक हे नाव होते. त्याचा सैन्यात उपयोग करीत. उंटाचे केस, चामडी व आतडी यांपासून विविध प्रकारच्या वस्तू बनवीत.

उंटाचे दूध व मांस अत्यंत सकस व चवदार असते. अरब लोकांचे हे पदार्थ अत्यंत प्रिय आहेत. मुसलमान लोक सणाच्या दिवशी उंटाला बळी देऊन त्याचे मांस भक्तीने खातात. मांस रोगहारक असते. त्याचे केस भूतबाधा नष्ट करतात. [ पा. इ. भा.; सु. वि. को.; डि. इ.; की. पॉं.; हि. ध. ]

**उंदीर** कुरतडणाऱ्या प्राण्यांच्या जातीतला एक प्रमुख प्राणी. नासधूस करणारा प्राणी म्हणून याची ख्याती आहे. जो उंदराप्रमाणे दुष्ट आहे, त्याला सोमाने ठार करावे, अशी प्रार्थना ऋग्वेदात आहे (९.६७.३०). अथर्ववेदात त्याच्या

विषयी एक संपूर्ण सूक्त असून, ते मूषकसंहारसूक्त (अथर्व. ६.५०) म्हणून प्रसिद्ध आहे. त्या सूक्तातील एका ऋचेचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे –

हे अश्विनौ देवांनो, बिळातील मूषकांचा शिरच्छेद आणि अस्थिभंग करून, आमचे धान्य भक्षिणारे, त्यांचे मुख तुम्ही बंद करा. आमचे धान्य तुम्ही निर्भय करा.

शुक्ल यजुर्वेदात भूमी, अंतरिक्ष, द्युलोक व सर्प या देवतांसाठी उंदरांचा बळी द्यावा, असे सांगितले आहे (शु. यजु. २४.२६,३६). त्यात उंदराला रुद्राचा पशू म्हटले आहे (३.५७). अन्य वैदिक वाङ्मयातही हा विचार आढळतो (तै.सं. १.८.६.; श. ब्रा. २.६.२.१०.; तै. ब्रा. १.६.१०.२). त्र्यंबकहोमाच्या संदर्भात हा अर्थ अधिक स्पष्ट होतो. या होमात उंदराने उकरलेल्या बिळाजवळ एक पुरोडाश ठेवतात आणि " हे रुद्रा ! उंदीर हा तुझा पशू आहे, " असा मंत्र म्हणतात.

हा दुष्ट प्राणी नाहीसा करण्यासाठी यातूचे अनेक प्रयोग केले जातात. गोभिल गृह्यसूत्रात उंदराला धान्याचा नैवेद्य दाखवून त्याला वश करून घ्यायचा उपाय सुचविला आहे (४.४.२९–३०). अमावास्येला व पौर्णिमेला उंदरांची पूजा केली म्हणजे उंदीर कमी होतात, असा तोडगा कौटिल्याने अर्थशास्त्रात (अ. ८०) सांगितला आहे. कोकणातले कातकरी आणि इतर लोक; तसेच कर्नाटकातल्या अनेक जाती, गणेशचतुर्थीच्या दुसऱ्या दिवशी उंदराला नैवेद्य दाखवतात. यामुळे उंदीर कमी होतात, अशी त्यांची धारणा आहे.

उंदीर हे गणपतीचे लोकप्रिय वाहन आहे. उंदीर गणपतीचे वाहन कसा झाला याविषयी एक कथा पुढीलप्रमाणे आहे – क्रौंच गंधर्वाने सौभरी ऋषीच्या रूपवती पत्नीचा हात धरला. त्यामुळे ऋषीने गंधर्वाला शाप दिला, की तू मूषक होशील. शापाने घाबरलेला क्रौंच सौभरीला शरण गेला. त्याला उःशाप देताना ऋषीने म्हटले, द्वापरयुगात तू गणेशाचे वाहन होशील आणि मग तुला लोक मान देतील (ग. पु. क्रीडा. १३५).

उंदीर धान्याची व वस्त्राची अतोनात नासधूस करतात; ते शेतातील पिकेही नष्ट करतात. ज्या घरात फार उंदीर असतात ती घरे अशुभ मानली जातात; (वा. रा. अयोध्या. ३३.१९. म. भा. मौसल. २.५). कौटिल्य या प्रकारांची दैवी प्रकोपात गणना करतो (अ.८०).

उंदीर पांढऱ्या व काळ्या रंगाचे असतात. याशिवाय अन्य प्रकारेही उंदरांचे वर्गीकरण करण्यात येते. पांक्त व काश जातीच्या उंदरांचा उल्लेख शु. यजुर्वेदात केला आहे (२४.२६). अरण्यनिवासी म्हणजे रानटी उंदरांचा उल्लेख अथर्ववेदात (६.५०.३) आढळतो.

उंदीर हा विषारी प्राणी असून, तो माणसाला चावला तर माणूस मृत्युमुखी पडण्याचा संभव असतो. [ वे. इं.; श्रौ. ध. स्व. चि.; हिं. ध. त.; म. ज्ञा. को. खंड ९ ]

**उंबर** एक वृक्ष. हा सदापर्णी व खूप उंच असून, ब्रह्मदेशात, श्रीलंकेत व भारतात सर्वत्र आढळतो. याची साल जाड, गुळगुळीत व पिंगट असते. याची पाने मोठी अंडाकृती असतात. याला तीन प्रकारची फुले येतात. याच्या फळांचे घोस दिसतात. पक्षी ही फळे खातात व त्यांच्या विष्ठेतून बीजांचा प्रसार होतो. याचे लाकूड पांढुरके किंवा लालसर, मऊ व हलके असते. त्यापासून विविध प्रकारच्या वस्तू बनवता येतात. सालीपासून काळा रंग बनवता येतो. पाने व फळे गुरेढोरे खातात. याच्या चिकापासून गोंद तयार करतात.

हा वृक्ष पवित्र मानलेला आहे. याच्या लहान फांद्यांचा उपयोग समिधा म्हणून केला जातो. पाहा–उदुंबर. [ म. वि. को. ]

**उंबऱ्या–उंबरी** आगरी लोकांत लग्न ठरले म्हणजे मुलाच्या अगर मुलीच्या राशींना जुळतील अशी व ज्यांच्या राशीस गुरुबल आहे, अशी दोन जोडपी लग्नातले मंगल विधी करण्यासाठी निवडतात. त्यांतल्या पुरुषाला उंबऱ्या व स्त्रीला उंबरी म्हणतात. यांनी उंबराचे टहाळे आणून मंडपस्थापना करायची असते.

कोकणात अनेक जातींत उंबरा–उंबरी निवडण्याची चाल आहे. ब्राह्मणादी जातीत उंबऱ्या–उंबरी नेमीत नाहीत; पण लग्न लागताना बोहल्याजवळ दोन जोडपी उभी करणे व कळसवाणी आणण्यासाठी दोन जोडप्यांची योजना करणे, या स्वरूपात ही चाल दिसते. [ बदलापूर ]

**उंबेक** कुमारिलभट्टाचा एक शिष्य. भवभूती व उंबेक या दोन्ही व्यक्ती एकच होत, असे काही पंडित मानतात. दर्शन शास्त्रावरील ग्रंथांत उंबेक नामक आचार्यांच्या मतांचा व वाक्यांचा अनेकदा उल्लेख येतो. कुमारिलभट्टाच्या श्लोकवार्त्तिकाच्या एका कारिकेवर उंबेकाने लिहिलेल्या टीकेचा, चित्सुखाचार्यांच्या तत्त्वप्रकाशिका नामक ग्रंथावरील टीकेत भगवान नावाच्या टीकाकाराने उल्लेख केला आहे. चित्सुखाचार्यविरचित चित्सुखी ग्रंथात उंबेकाचा नामनिर्देश असून, चित्सुखीच्या टीकाकाराने उंबेक व भवभूती या व्यक्ती अभिन्न असल्याचे सांगितले आहे. श्लोकवार्त्तिकावरील तात्पर्यटीका व मंडनमिश्राच्या भावनाविवेकावरील टीका, हे उंबेकरचित ग्रंथ उपलब्ध आहेत. पाहा – भवभूती. [ पू. म. भा. ]

**उ** नागरी लिपीतील पाचवा स्वरवर्ण. याला हल्लीचे स्वरूप प्राप्त होण्यापूर्वी चार अवस्थांतून जावे लागले आहे. पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार येथील शिलालेखात (सनपूर्व ३ रे शतक) पाहायला मिळते. दुसरी अवस्था मथुरेच्या लेखांत (सनपूर्व १ ले शतक) दृष्टीस पडते. तिसरी अवस्था

उचा विकास क्रम

दुसरीच्या खालच्या रेघेला बाक पडून घडली आहे. चवथे वळण राजा यशोधर्म याच्या वेळच्या मंदोसरलेखांतील (इ. स. ५३२) आहे. आजचा 'उ' हा इ. स. ८३७ च्या जोधपूरलेखात स्पष्ट व वळणदार असा पाहायला मिळतो.

याचे स्थान ओष्ठ असून, हा ऱ्हस्व-दीर्घ-प्लुतभेदाने त्रिविध होतो. याचे वर्णन कामधेनुतंत्रात पुढीलप्रमाणे दिले आहे –

उकारं परमेशानि अधः कुण्डलिनी स्वयम् ।
पीतचम्पकसङ्काशं पञ्चदेवमयं सदा ।
पञ्चप्राणमयं देवि चतुर्वर्गप्रदायकम् ।।

अर्थ – हे देवी, उकार हा अधोभागी कुंडलाकार होत असून, तो पिवळ्या चाफ्यासारखा व पंचदेवमय आहे. हा पंचप्राणात्मकही असून चतुर्विध पुरुषार्थ प्राप्त करून देणारा आहे.

वर्णाभिधानात याला शंकर, वर्तुलाक्षी, भूत, इ. नावे दिलेली आहेत. मातृकान्यासात उजवा कान हे याचे स्थान आहे. [ श. क.; म. ज्ञा. को. ]

**उकिरडा** केर-कचरा टाकण्याची जागा. उकिरडा हा शब्द उत्कर या संस्कृत शब्दापासून बनला आहे. यज्ञवेदीच्या उत्तरेला थोड्या अंतरावर उत्कर असतो. वेदीतील माती उकरून ती वेदीच्या जवळच बाहेरच्या बाजूला जिथे टाकतात त्या जागेला उत्कर म्हणावे, असे ऐतरेय ब्राह्मणात सांगितले आहे (६.३). निर्माल्य, वापरून झालेल्या यज्ञीय वस्तू, वेदीवरचा केर इथे टाकला जातो. वैदिक वाङ्मयात अन्यत्रही उत्कराचे विपुल संदर्भ मिळतात. (काठक सं. ३१.१२; श. ब्रा. ८.७.२.१६; ३.५.१.२६; ३.६.१.६; ३.७.१.३). सुब्रह्मण्या नावाचे निगदमंत्र उत्करावर उभे राहून म्हटले जातात (ऐ. ब्रा. ६.३).

फार प्राचीन काळापासून उत्कराचा आणि यातूचा संबंध असावा, असे वाटते. उत्तरेला उत्कर खणून झाल्यावर, त्यात पूर्वेला टोक करून उदुंबर ठेवतात. त्यामुळे राक्षसांच्या माना कापल्या जातात असे त्यांचे स्पष्टीकरण शतपथ ब्राह्मणात आढळते (३.६.१.५१६).

यातूनच उकिरड्यासंबंधी अनेक प्रकारच्या समजुती निर्माण झाल्या आहेत. चेटकिणींचा उकिरड्याशी संबंध असल्याची धारणा कर्नाटकात आहे. अलक्ष्मीचा किंवा अवदसेचा निवास उकिरड्याजवळ असतो. दिवाळीत उकिरड्यावर पाणी शिंपून त्याच्या शेजारी दिवा लावण्याची प्रथा बहुतेक सर्व भारतभर आहे. ही उकिरड्याची पूजा म्हणजे अलक्ष्मीची पूजा होय. अशुभ शक्तींची पूजा करून त्यांना अनुकूल बनवणे, ही धारणा या पूजेमागे दिसून येते.

विवाहसमारंभात विवाहापूर्वी उकिरड्याची पूजा करण्याची चाल हरियाणा, उत्तरप्रदेश, मध्यप्रदेश, महाराष्ट्र, इ. प्रदेशांमध्ये आहे. ही पूजा सार्वजनिक उकिरड्याची असते. विवाहापूर्वी वधू-वरांना त्यांचे डोळे बांधून उकिरड्याकडे नेले जाते. तिथे त्याच्यावर पाणी शिंपडून स्वस्तिक काढतात आणि दिवा लावून परततात. परत येत असताना नवरामुलगा (किंवा नवरीमुलगी) तिथली थोडी माती बरोबर घेतो आणि न बोलता ती माती कोठीघरात ठेवतो.

लमाणी, कहार, मारवाडी या जातींतही हा प्रकार आढळतो.

उकिरड्यासंबंधी अनेक भाव-भावना व्यक्त करणारी लोकगीते हिंदी, मराठी या भाषांमधून आढळतात. मराठीतील एका खानदेशी लोकगीताचा नमुना असा –

उखल्डा म्हणे मी उखल्डा देवा ।
हाई उखल्डा कोनी व टाका ।।
हाई उखल्डा मायनी टाका ।
मायनी मनी शे सोनानी डालकी ।।
सोनानी डालकीवरे रुप्याना खराटा ।
मायनी मनी व मोतीस्नी चुंभग ।।
पुल्हायले झाडे ती गायना गोठा ।
उखल्डा देवा तूं व्हई जाय मोठा ।।

उकिरड्यावर थुंकू नये, थुंकल्यास घशाचे रोग होतात, अशी समजूत आहे. तसेच उकिरड्यावर लघवी करू नये, किंवा त्याला लाथही मारू नये.

होळीच्या दिवशी होळीवर तापविलेल्या पाण्याने स्नान करून, तिथला एक नैवेद्य उकिरड्यावर बसून खाल्ला तर खरूज, गजकर्ण, नायटे यासारखे रोग नाहीसे होतात, अशी श्रद्धा आहे. [ श्रौ. ध. स्व. चि.; हिं. ध. त.; प. का. भा.; कौ. पॉ.; लो. सा. अं.; ब्र. लो. सा. अ.; हृ. प्र. लो. सा.; मा. लो. वि. अ.; म. लो. मा. खंड २; लौ. दं. ]

**उक्थ्य** सप्त सोमसंस्थांपैकी एक संस्था. या यागात पंधरा स्तोत्रे गातात व पंधरा शस्त्रे म्हटली जातात. आपस्तंब सांगतो, की गोधनाची इच्छा करणाऱ्याने हा याग करावा (१४.१.२). या यागात सुत्येच्या दिवशी इंद्र व अग्नी यांना उद्देशून एक पशू बळी देतात. या यागाचे सर्व विधान अग्निष्टोमाप्रमाणे असते. [ हि. ध. ]

**उखळ** धान्य कांडण्याचे एक साधन. उलूखल या संस्कृत शब्दाचे हे मराठी रूप होय.

हे एक यज्ञीय पात्र असल्याने वैदिक वाङ्मयात याचे विपुल संदर्भ आढळतात. ऋग्वेद (१.२८), शु. यजुर्वेद (१.१४.१५); अथर्ववेद (१२.३), तैत्तिरीय संहिता (१.६.८.३), मैत्रायणी संहिता (२.७.१६), शतपथ ब्राह्मण (७.५.१.३८), इ. अनेक ठिकाणी उखळाचे उल्लेख आहेत.

उखळ हे लाकडापासून बनवीत असावे (ऋ. १.२८.६; अथर्व. १२.३.१८). पण हे लाकूड नेमके कोणते याचा बोध होत नाही. पतंजलीने मात्र, पलाश वृक्षाच्या काष्ठापासून उखळ बनवितात, असे सांगून, ते बारा अंगुळे उंचीचे असावे, असे म्हटले आहे.

उखळा-मुसळाचा उल्लेख जोडीने होतो. या जोडीसंबंधी प्राचीन कालापासून अनेक समजुती प्रचलित आहेत. ओल्या हातांनी उखळा-मुसळाला स्पर्श करू नये, असा संकेत अथर्ववेदात सांगितला आहे (१२.३). त्यांना लाथाडू नये, गरोदर स्त्रियांनी त्यावर वसू नये, अशासारख्या काही समजुती मार्कंडेय पुराणात उल्लेखिल्या आहेत (अ. ५०,५१).

जनाबाई, एकनाथ, तुकाराम, मध्वमुनी, इ. मराठी संतांनी कांडन या विषयावर अनेक पदे रचली आहेत. या पदांमधून त्यांनी जीवनाचे तत्त्वज्ञान ग्रथित केले आहे. पाहा – मुसळ. [ प. का. भा.; सह्याद्रि, ऑक्टोबर १९७० ]

**उखा** यज्ञातील एक पात्र. उखा एका विशिष्ट पद्धतीने निर्माण करतात. ती निर्माण करण्यासाठी मंत्रपूर्वक माती खणतात व ती गाढवावरून यज्ञमंडपाजवळ आणतात. नंतर त्या मातीत खापराचे तुकडे, भाताच्या काड्या, बारीक वाळू, कृष्णाजिनाचे केस, इ. पदार्थ मिसळतात व माती पाण्याने कालवून मंत्रपूर्वक उखा तयार करतात. टीचभर उंच व चोवीस अंगुळे लांब व तितकेच रुंद, असे हे चौकोनी पात्र असते. उखेचा आकार वाटोळा असावा, असा एक पक्ष सत्याषाढ श्रौतसूत्रांत सांगितला आहे (११.१.५३). आभिचारिक कर्म म्हणूनच यज्ञ असेल, तर उखा नऊ कोपरे असलेली बनवितात. नंतर गार्हपत्याग्नीच्या पुढे एक खड्डा खणून त्यात सर्व बाजूंनी अग्नी घालतात व उखा चांगली भाजतात.



उखा नामक पात्र

**उखां करोतु शक्त्या बाहुभ्यामदितिर्धिया ।**
**माता पुत्रं यथोपस्थे साऽग्निं बिभर्तु गर्भ आ ।**
(तै. सं. ४.१.५)

अर्थ – अदिती आपल्या बुद्धीने, हस्तकौशल्याने व सामर्थ्याने ही उखा उत्पन्न करो. आई आपल्या मुलाला ज्याप्रमाणे मांडीवर घेते. त्याप्रमाणे कर्मसमाप्तीपर्यंत ही उखा (पुत्ररूप) अग्नीला आपल्या गर्भात धारण करो.

यजमानाच्या दीक्षाविधीच्या वेळी उखेत अग्नी उत्पन्न करतात, त्याला उख्याग्नी असे म्हणतात. यजमानाच्या गळ्यात मुंज गवताचे एक शिंके अडकवून त्यात अग्नीसह उखा ठेवतात. दीक्षाकाल संपेपर्यंत उखा आसंदीवर किंवा यजमानाच्या गळ्यात अडकविलेली असते. दीक्षेचा काल संपला म्हणजे गार्हपत्याग्नीच्या चयनावर उखेतील अग्नी ठेवतात. मग महाग्नीचयनाच्या जागी मध्यभागी वाळू भरून ती उखा ठेवतात व वर विटा मांडतात.

तुंगभद्रेच्या काठी उत्खननामध्ये एक उखापात्र सापडले असून, ते धारवाड येथे आहे. हे पात्र सुमारे साडेतीन चार हजार वर्षांपूर्वीचे असावे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**उखाणा** यालाच संस्कृतात प्रहेलिका असे नाव आहे. दैवतकथेप्रमाणेच हा प्रकार प्राचीन आहे. याची बैठक केवळ धार्मिक व सांस्कृतिकच नाही; तर तो एक साहित्यप्रकारही समजला जातो. ज्ञान व मनोरंजन हे त्याचे उद्देश आहेत. उखाण्यालाच आहाणा, कोहाडा, उमान किंवा उमाण असे प्रतिशब्द आहेत. हिंदीत याला पहेली म्हणतात. पहेली हा प्रहेलिकेचा अपभ्रंश आहे. बंगालीत धामघा, कानडीत आंगणू, तेलुगूत विडिकथ व तमिळ आणि मल्याळम्‌मध्ये विडिकदाई, असे त्याला प्रतिशब्द आहेत. ब्रह्मदेवाने

आपल्या कन्येशी संभोग केला, त्याच्या निषेधार्थ त्याच्या 'अगुणां'चे वर्णन सुरू झाले. त्यातूनच उखाण्याची म्हणजे प्रहेलिकेची उत्पत्ती झाली. ब्रह्मदेवाच्या पूजेचा निषेध भारतात सार्वत्रिक आहे. लग्नातल्या उखाण्यातली अश्लीलता यातूनच पुढे आली, असे श्रीमती दुर्गा भागवत सांगतात.

प्रश्न व उत्तर या दोहोतून उखाणा बनतो. प्रश्नात रूपकाच्या आश्रयाने एखादी गोष्ट लपविली जाते व उत्तरात तिचा गौप्यस्फोट होतो. गोपन हा उखाण्याचा प्राण होय. अन्य कोणत्याही साहित्यिक परंपरेपेक्षा उखाण्यांतून लौकिक कल्पकता अधिक आढळते. त्याची घडण नेटकी व हृद्य असते. उखाण्याची सांस्कृतिक पार्श्वभूमी विस्तृत आहे.

मनोरंजक उखाणे सोडले तर बाकीचे उखाणे महत्त्वाच्या प्रसंगी वापरायचे असतात, असा प्राचीन काळापासून संकेत आहे. मानवी जीवनातले महत्त्वाचे प्रसंग म्हणजे पावसाचे येणे-जाणे, शेतीची लावणी, लग्नादी संस्कार व मर्तिक हेच प्रामुख्याने होत. अशा प्रसंगी उखाणे घालण्याची प्रथा जागतिक आहे. भारतातला उखाणाही वेदकालापासून प्रचलित आहे. ब्रह्मोद्य असे त्याचे वैदिक नाव आहे. (ब्रह्मोद्य पाहा) ऋग्वेदात पुढील उखाणा आढळतो –

**सप्त युञ्जन्ति रथमेकचक्रमेको अश्वो वहति सप्तनामा ।**
**त्रिनाभि चक्रमजरमनर्वं यत्रेमा विश्वा भुवनाधि तस्थुः ।।**
**(ऋ. १.१६४.२)**

अर्थ – सातजण एक एकचाकी रथ फिरवितात. तो रथ एक 'सात' नावाचा घोडा ओढतो. त्या चाकाला बिनधावेच्या आणि फिरताना न थांबणाऱ्या अशा तीन अऱ्या आहेत. त्या चाकात प्राणिमात्र राहतात. याचा आशय असा –

सात पुरोहित यज्ञाच्या योगाने सूर्याचा रथ चालवितात. हा रथ सात घोडे ओढतात. सूर्यरथाच्या चाकाला तीन ऋतूंच्या तीन अऱ्या आहेत. या ऋतुचक्रात सारे प्राणी जगतात.

मुलांच्या खेळांत उखाण्याचा प्रकार आढळतो. त्याचा एक नमुना असा –

**घमघम घमाटा सोन्याची घंटा**
**विषाचा कांटा आंत गोड गोटा**

फणसाच्या आतले पिवळे धमक गरे, पिकल्याचा दरवळ आणि त्यावरचे काटे यांना उद्देशून हा उखाणा आहे.

**सुक्या विहिरीत पाखरे फडफडतात**

हा कढई व लाह्या ह्यांच्यावरचा उखाणा आहे.

**दो बहिनों बहिनों का जुडगया हेत**
**दो बहिनों के पेटमें लडका एक**

दोन बहिणी, त्यांचे मन जुळले. त्या दोघींच्या पोटात मिळून एकच बालक जन्मले. हा छत्तीसगडी परधानांतला उखाणा असून, याचा आशय दोन शिंपल्यातले एक मोती किंवा आकाश-पृथ्वी यांच्या आतली सृष्टी असा आहे.

उखाण्यात ग्राम्यता व अश्लीलताही पुष्कळदा आढळते. काही ठिकाणी रचना अश्लील; पण उत्तर श्लील असते; तर काही ठिकाणी रचना श्लील; पण उत्तर अश्लील असते.

नाव घेण्याचे उखाणे हे प्रश्नविरहित उखाण्यांचे उत्तम उदाहरण होय. यांत केवळ गोपनक्रिया असते. बायकोने नवऱ्याचे व नवऱ्याने बायकोचे नाव घेऊ नये कारण नाव घेतले तर त्या व्यक्तीचे आयुष्य कमी होते, हा संकेत सर्व भारतभर रूढ आहे. एका प्रसिद्ध श्लोकात याचा निर्देश आला आहे –

**आत्मनाम गुरोर्नाम नामातिकृपणस्य च ।**
**श्रेयस्कामो न गृह्णीयात् ज्येष्ठापत्यकलत्रयोः ।।**

अर्थ – ज्याला श्रेयाची कामना असेल त्याने स्वतःचे, गुरूचे, अतिकृपणाचे, थोरल्या मुलाचे आणि पत्नीचे नाव घेऊ नये.

पण महाराष्ट्रात आणि कर्नाटकात लग्नादी मंगलप्रसंगी पत्नीने पतीचे व पतीने पत्नीचे नाव घेण्याची पद्धत आहे. मात्र ते सुटे न घेता उखाण्यात गुंफून घ्यायचे असते. शब्दांच्या अवडंबरात गुंफून नाव घेतल्यामुळे ते मृत्यूच्या कानात पडत नाही, अशी समजूत असते. नाव गुप्त राखणे हा आदिम संस्कृतीचा एक विशेष व अवशेषही आहे. लग्नात नवरी मुलगी आपल्या पतीचे नाव पुढीलप्रमाणे घेईल –

**(१) लवंगी वाडी बदामी बंगला**
**× × ×रावांच्या प्रपंचात जीव माझा रंगला**
**(२) मोठे मोठे डोळे पाहण्याची खुबी**
**× × ×रावांची छबी माझ्या नजरेसमोर उभी**
**(३) द्राक्षांच्या वेलीला त्रिकोणी पान**
**× × × रावांचं नाव घेते राखते सर्वांचा मान**
**(४) संसाररूपी सागरात पतीपत्नींची नौका**
**× × × रावांचं नाव घेते कान देऊन ऐका**

नवरा मुलगा आपल्या नववधूचे नाव घेण्यासाठी पुढील उखाणा घेईल –

**भाजीत भाजी मेथीची × × × माझ्या प्रीतीची**

लग्न समारंभातील सांकेतिक अश्लीलता, शिवराळपणा व भांडकुदळपणा हे प्रकार सर्वत्र आढळतील. मध्यप्रदेशात या प्रकाराला 'भडौनि' असेच म्हणतात. लग्नात असे अनेक अश्लील व बोचक उखाणे घालून विहिणी व करवल्या यांची एकमेकांवर तोंडसुख घेण्याची जणू स्पर्धाच लागते. उदाहरणार्थ–

**आळा गोटा, निळा गोटा**
**विहीणबाईचा ठमकाराच मोठा**

नवरा नवरी सुताएवढी नवऱ्याची आई भुताएवढी

नवरा नवरी सुताएवढी नवऱ्याची आई भुताएवढी झिम्मा, फुगडी वगैरे खेळ खेळतानाही मुली एकमेकींना उखाणे घालतात. फुगडीत दोनच मुली असतात. तेव्हा उखा-ण्यांची स्पर्धा रंगते–

गुलाबाचे अत्तर डबीमधे ××× चा नवरा पेटीमधे
पाठीवर शेपटा लडबडतो म्हातारा नवरा बडबडतो

अशा प्रकारे या उखाण्यांतून एकमेकींची उणीदुणी काढली जातात. महार समाजातले चेष्टेचे आणि उपहासाचे उखाणेही मनोरंजक असतात. त्यांतला एक नमुना असा –

अशी लेक साळचाची भाकरी खाईना राळचाची
पाणी पिईना शाडूचं काम करीना कवडीचं
कांदा खाईना पातीचा नवरा मागते जातीचा

उखाणा आणि कथा यांची सांगडही काही ठिकाणी आढळते. देशावर कुणबी लोकांत नाव घेण्याच्या वेळी जो उखाणा घेतात, त्यात असे काही कथाप्रसंग गुंफलेले आढळ-तात. शेवटी त्या कथेचा संबंध नवऱ्याशी आणून त्याचे नाव घ्यायचे असते. उदाहरणार्थ–

आड भिंत पड भिंत, पड भिंतीत कोनाडा, त्यात पाच गहू, त्यात जलमले पाच भाऊ, त्यात एक जल्मला तिरंशिगराव, भाऊ नगराला, नगराशेजारी भिंगार (एक गाव), बांधल्या भाकरी जाऊ रोजगाराला, रोजगार जयंतसिंग, घरची अस्तुरी भावसबहीण, एक भाकरीचं बांधलं पीठ, भाकरीची नाही सुध, पोळचा जेवला सासुरवाडी, तीनशेची घेतली गाडी, तिचा केला चकणाचूर, मग पाहिला मोती मोर, बाळपणीचा पटका, बाळपणीची बंडी, अस्तुरपणाची लेंडी, त्या बंडीची काय वाट, महाबळेश्वरी (एक गाव) सभा दाट, दांडा मोडला खांडासाठी, रुपया मोडला पानासाठी, येवढा सायास कोणासाठी, ××× रावा नावासाठी.

पतीचे आयुष्य वाढावे या हेतूने काही स्त्रिया असा लांब-लचक उखाणा घेतात.

उखाण्यात लैंगिकतेला गोपनाने भूषवून निर्मितीचे आवाहन केलेले असते आणि हा प्रकार प्राचीन कालापासून आजपावेतो चालू आहे.

उखाणे हे मराठी लोकसाहित्याचे एक लेणे आहे. [एन्सा. रि. ए.; म. जी.; लो. सा. रू.]

**उखार** अघोरपंथी साधू. हे सुरापान व अभक्ष्यभक्षण करतात. यांचा पंथ सुखार व रुखार या अघोर पंथाच्या दोन शाखांपासून निघाला असावा. हे स्वैराचारी असतात. पाहा – रुखार, सुखार. [एन्सा. रि. ए.]

**उग्र** (१) एक जात. बृहदारण्यकातील उल्लेखावरून हे राजाचे सरदार असावे, असे वाटते (४.३.३०). पुढे क्षत्रिय पुरुष व शूद्र स्त्री यांच्या संततीला उग्र असे नाव मिळाले (याज्ञ. १.९१). ऋग्वेदात उग्रांचा उल्लेख आहे (१०.९७.१२). बौधायन, मनू व याज्ञवल्क्य सांगतात, की ही अनुलोम जात असून, क्षत्रिय पुरुष व शूद्र स्त्री यांची संतती आहे. गौतमाच्या मते ती वैश्य पुरुष व शूद्र स्त्री यांची संतती होय. मनू सांगतो, की बिळात राहणाऱ्या प्राण्यांना पकडून व मारून त्यावर त्यांनी उपजीविका करावी (१०.४९). उशनस् सांगतो, की त्यांनी राजदंड हाती घेऊन राहावे व गुन्हेगारांच्या शिक्षा अमलात आणाव्या. सह्याद्रिखंड व शूद्रकमलाकर या ग्रंथात उग्रांना राजपूत म्हटले असून, जातिविवेकात राऊत म्हटले आहे.

(२) शिवाचे एक रूप (मत्स्य पु. २६५.४१; वायु पु. २७.१५). याच्या पत्नीचे नाव दीक्षा असून, पुत्राचे नाव संतान आहे. हे महादेवाचे सातवे नाव होय. [पु. इं.; हि. ध.]

**उग्रचंडा** शाक्त पंथाची एक देवता. हिचे वर्णन असे आहे–

या मूर्तिः षोडशभुजा भद्रकालीति विश्रुता ।
तथैव मूर्तिर्बाहुभ्यामपराभ्यां तु बिभ्रती ।।
दक्षिणाधो गदां वामपाणिना पानपात्रकम् ।
सुरापूर्णं च शिरसा मुण्डमालां बिलेशयम् ।।
भिन्नाञ्जनचयप्रख्या प्रचण्डा सिंहवाहिनी ।
रक्तनेत्रा महाकाया युक्ताष्टादशबाहुभिः ।।

अर्थ – षोडशभुजा भद्रकालीप्रमाणेच उग्रचंडेची मूर्ती असून, तिच्यापेक्षा हिला दोन हात अधिक आहेत. तिच्या या दोन हातांपैकी उजव्या हातात गदा व डाव्या हातात मदिरापात्र आहे. तिच्या गळयात नररुंडांची माला असून, डोक्यावर सर्पाने फणा धरला आहे. ती सिंहारूढ असून, प्रचंड देह, अठरा भुजा व लाल डोळे, यांमुळे भयंकर उग्र दिसते.

कौशिकी, शिवदूती, हैमवती, ईश्वरी, शाकंभरी, दुर्गा, महोदरी या उग्रचंडेच्या सख्या होत. [बी. के. बारुआ – गोडे गौरवग्रंथ.]

**उग्रतारा** दुर्गेचे एक रूप. उग्र किंवा भय यांपासून भक्तांना तारते, ती उग्रतारा होय, अशी तिच्या नावाची निरुक्ती सांगितली आहे. ही मातंगीच्या देहातून निर्माण झाली. हिमालय हे हिचे स्थान होय. हिला कालिका किंवा कामाख्या असेही म्हणतात. पाहा – कामाख्या.

शक्तिसंगमतंत्रात (१५.११) हिचे रूप ध्यान वर्णिले आहे.

ते असे – चतुर्भुजा, त्रिनयना, मुंडमाला विभूषित, श्यामवर्णाची, मुक्त केशी; खड्ग, कमल, कपाल, कर्तृका हाती धारण करणारी वरदान करणारी, अतिशय उग्र व प्रत्यालीढ अवस्थेत बसलेली.

महिषा (जि. भागलपूर) या गावी हिचे मंदिर आहे. ते एक शक्तिपीठ मानले जाते, कारण इथे सतीचा डोळा पडला. या मंदिरात देवीच्या मस्तकावर नागफणी आहे. दरभंग्याच्या राजाचा कुष्ठरोग या देवीच्या कृपेने बरा झाला म्हणून महाराणीने हे मंदिर बांधले.

या देवीच्या स्मरणाने वादळ शांत होते आणि पिशाचभय नाहीसे होते, अशी श्रद्धा आहे. [ श. क.; दे. को. २ ]

**उग्ररथशांती** मनुष्याच्या वयाला साठ वर्षे पूर्ण झाली म्हणजे उग्ररथशांती करतात. या वयात माणसाला येणारी शारीरिक व मानसिक विकलता नष्ट होऊन त्याला दीर्घायुरारोग्य प्राप्त व्हावे व अपमृत्यू टळावा, म्हणून या शांतीचे विधान सांगितले आहे –

**अशेषविघ्नशान्त्यर्थं सर्वदोषप्रशान्तये।**
**षष्ट्यब्दसन्धौ कर्तव्या शान्तिरुग्ररथाभिधा ॥**

अर्थ – सर्व विघ्ने व सर्व दोष यांची शांती व्हावी म्हणून साठाव्या वर्षाच्या संधीत उग्ररथ नामक शांती करावी.

सबंध साठाव्या वर्षालाच उग्ररथ असे नाव असून, ते वर्ष लागल्यावर किंवा पूर्ण झाल्यावर ही शांती करायची असते. म्हणून हिला षष्ट्यब्दपूर्तिशांती किंवा षष्टितमाब्दिशांती असे नाव आहे. मार्कंडेय ही या शांतीतील प्रधान देवता असल्यामुळे हिला मार्कंडेयशांती असेही म्हणतात.

बौधायन गृह्यशेषसूत्रात (५.८) या शांतीचा विधी दिला आहे, तो असा –

जन्मनक्षत्रावर किंवा जन्म झाला असेल त्या महिन्यात शांती करावी. प्रथम अग्निस्थापना करून त्याच्या आग्नेय दिशेला कलशावर मृत्युदेवतेची सुवर्णप्रतिमा स्थापून तिची पूजा करावी. प्रधान होमाच्या वेळी मृत्यूदेवतेला शिजलेल्या अन्नाच्या व घृतसूक्ताने आज्याच्या आहुती द्याव्या. अग्निमुखाच्या विधीप्रमाणे सर्व कर्म केल्यावर यजमानाला अग्नीच्या पश्चिमेला बसवून मृत्युसूक्त, आयुष्यसूक्त व अभिषेकमंत्र म्हणून त्याला अभिषेक करावा.

ब्रह्मकर्मादी इतर ग्रंथांतही उग्ररथशांतीचा प्रयोग दिला आहे, तो पुढील प्रमाणे –

प्रथम प्रायश्चित्त विधी करून आत्मशुद्धी करावी. विधिपूर्वक स्नान, पंचगव्यप्राशन व गायत्रीपुरश्चरण किंवा सहस्र गायत्री जप करावा. नंतर पुण्याहवाचन करून लिंगतोभद्रमंडलदेवतांची स्थापना व पूजा करावी. मार्कंडेय या प्रधान देवतेची सुवर्णप्रतिमा करून ती कलशावर मांडावी. मृत्यू व अग्नि या दोन अधिदेवता – प्रत्यधिदेवता प्रधान देवतेच्या दोही बाजूंना मांडून अश्वत्थामा, बली, व्यास, इ. सप्त चिरंजीव व तिथी, वार व नक्षत्र यांच्या देवतांचीही त्याच पीठावर स्थापना करावी.

**मार्कण्डेय महाभाग सप्तकल्पान्तजीवन।**
**आयुरारोग्यमैश्वर्यं देहि मे मुनिपुङ्गव ॥**

अर्थ – हे सप्त कल्पांच्या अंतापर्यंत जगणाऱ्या, मुनिश्रेष्ठ, मार्कंडेय, महाभागा, तू मला आयुरारोग्य व ऐश्वर्य दे.

या मंत्राने मार्कंडेयाचे पूजन करावे. नंतर प्रधान होम करून ग्रह, लोकपाल व मृत्युंजय यांना आहुती द्याव्या. नंतर तीळ, दूर्वा, दूध, आज्य (गाईचे तूप), परमान्न, या हविर्द्रव्यांच्या प्रत्येकी एकशे आठ किंवा एक हजार आठ आहुती देऊन प्रधान देवतेसाठी होम करावा. शेवटी 'समुद्रादूर्मि...' (ऋ. ४.५८) या सूक्ताने पूर्णाहुती द्यावी व नंतर वसोर्धारा करावी. या वेळी रुद्राध्यायातील चमकानुवाक व 'अग्निमीळे...' (ऋ. १.१) इ. सूक्ते म्हणावी. मग कलशातील जलाने यजमानाला अभिषेक करावा. अभिषेकानंतर देवतांचे विसर्जन करावे व यजमानाने आचार्याला देवतापीठ दान द्यावे. पाहा – अग्निमुख. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**उग्राणी** द. भारतांतील एक जात. कारवारच्या दक्षिणेस हे लोक आढळतात. हे ग्रामसेवकाचे काम करतात व गावातील धान्याची कोठारे, खजिना व भूतस्थाने यांवर पहारा करतात. इ. स. १९०७ साली सरकारने यांना गावपोलिसांची कामे दिली व तेव्हापासून ते आपल्या दंडावर 'ग्रामपोलिस' अशी अक्षरे असलेला पितळी बिल्ला लावू लागले.

चोरी, घरफोडी, आत्महत्या, इ. गुन्हे; जमिनीबाबतचे तंटे; फकीर, बैरागी व दुर्वर्तनी इसम यांचे गावात आगमन व वास्तव्य; रस्ते, पूल, गुरांचे कोंडवाडे व सरकारी झाडे, इत्यादींचे नुकसान, या सर्व गोष्टी त्यांना मामलेदाराला कळवाव्या लागतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**उचकी** एक श्वासरोग. संस्कृत भाषेत हिला हिक्का असा शब्द आहे. पोटातला वायू मुखावाटे बाहेर पडताना हिक् असा आवाज होतो, म्हणून हिला हिक्का असे म्हणतात. उचकी अपचनाने, घाईघाईने जेवल्याने, अतिश्रमाने किंवा फार तखट खाल्याने लागते. कारणांवरून हिचे क्षुद्रा, यमला, महती वि गंभीरा असे प्रकार सांगितले जातात. या सर्व प्रकारांचे सविस्तर वर्णन गरुड पुराणाच्या हिक्काध्यायात आढळते. अन्नज

माणसाला एकदम ढेकर आली तर तिचे रूपांतर उचकीत होण्याची शक्यता असते, असे काश्यप संहितेच्या वेदनाध्यायात सांगितले आहे.

उचकीच्या कारणांची ही स्थूल शास्त्रीय मीमांसा असली तरी, लोकशास्त्रीय मीमांसा काही भिन्न आहे.

उचकीचा आणि बालग्रहांचा निकटचा संबंध आहे. मुलाला उचकी लागली की, त्याला पूतनेने, रेवतीग्रहीने पछाडले असे निदान काश्यप संहितेमध्ये बालग्रह चिकित्साध्यायात केले आहे. आजारी माणसाला उचकी लागणे हे मृत्युसूचक म्हणून अशुभ मानण्याची पद्धत भारतभर आढळते. गरुड पुराणात या समजुतीला स्थान आहे. उचकी लागली की कोणीतरी आठवण केली, असे मानतात. ज्याने आठवण करण्याची शक्यता असेल त्यांची नावे घेतली जातात. ज्या व्यक्तीचे नाव उच्चारताच उचकी थांबते, तिने आपली आठवण केली, असे समजतात. उचकीच्या या प्रकारच्या संकेताची अनेक लोकगीते हरियाणा, राजस्थान, इ. प्रदेशांतून पाहायला मिळतात.

उचकी थांबावी म्हणून काही तोडगेही करतात. उचकी लागताच गणेशसहस्रनामाचा पाठ करावा, असे गणेश पुराणात म्हटले आहे (ग. पु. उपा. ४६.१९१). कधी कधी तिच्यावर गावठी औषधेही देतात. थोडा गूळ खाऊनही उचकी थांबते.

उचकी माणसांप्रमाणे पक्षांनाही लागते, असे महाभारतावरून दिसून येते. पोपटाला उचकी लागली तर, त्याला ताप आला, असे मानतात (म. भा. शांति. २८३.५५). [ म. ज्ञा. को. भाग ९; राजस्थानी लोकगीत; हृ. प्र. लो. सा.; बदलापूर ]

**उचथ्य आंगिरस** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या ९ व्या मंडलातील पन्नास ते बावन अशी तीन सूक्ते याच्या नावावर आहेत. पवमान सोमस्तुती हा या सूक्तांचा विषय आहे.

याची एक ऋचा (९.५२.१) अशी –

**परि द्युक्षः सनद्रयिर्भरद्वाजं नो अन्धसा ।**
**सुवानो अर्ष पवित्र आ ।।**

अर्थ – भक्तांना अन्नबल देणाऱ्या हे धनदात्या, तेजस्वी आणि पिळलेल्या सोमा, तू दशापवित्रातून प्रवाहित हो.

उचथ्याने एका सूक्तात 'वाण' नामक वाद्याचा उल्लेख केला आहे (ऋ. ९.५०.१). डॉ. राहूरकरांनी याचे नाव उतथ्य असे दिले आहे. [ ऋ. म. भा.; सी. ऋ. ]

**उचली नृत्य** या नृत्यात पुरुष आपल्या जोडीदार तरुणीला उंच उचलून धरून नाचतो, म्हणून या नृत्याला हे नाव मिळाले आहे. हे जादूविद्येतले एक जागतिक नृत्य आहे. या नृत्यात प्रजोत्पादनाची क्षमता असते, असे पुष्कळ जमाती मानतात.

**उचले** एक विमुक्त जमात. या लोकांना गाठचोर, घंटीचोर, कामाठी, भामटे, इ. अन्य नावेही आहेत. पुणे जिल्ह्यातील बारामती, हवेली, खेड व शिरूर या तालुक्यांत यांची वस्ती आहे. मुळात हे तेलंगणातले असावे. कारण हे आपसात मोडकी तोडकी तेलुगू भाषा बोलतात. कर्नाटक व मध्यप्रदेश या राज्यांतही हे लोक आढळतात. हे पूर्वी लोकांच्या घरांत शिरून किंवा गर्दीच्या ठिकाणी जाऊन चोरी करीत. खिसे कापण्यासाठी त्यांच्याजवळ कोयत्याच्या आकाराची बारीक सुरी असे. ती ते तोंडात किंवा जिभेखाली लपवून ठेवीत.

यांचा रंग काळा आणि देह खुजा पण दणकट असतो. यांच्यातील स्त्रियांना दागिन्यांची खूप आवड असते. त्या हातांवर व तोंडावर गोंदवून घेतात.

यांच्या दोन कुळ्या असून, त्यांचे परस्पर लग्नसंबंध होतात. एकाच कुळीत संबंध करीत नाहीत. चोरी करण्यात तरबेज पुरुषच लग्नाला योग्य मानला जात असे. यांच्यांत विधवाविवाह व घटस्फोट रूढ आहेत.

यांच्यातील काही जण शेती वगैरे अन्य उद्योग करू लागले आहेत. यांच्यांत छत्री व मराठी भामटे असे दोन पोट भेद आहेत. गुजरात मधून आलेल्यांना छत्री भामटे म्हणतात.

प्रत्येक वस्तीत एक नाईक असतो. तो तंटे मिटवतो. हे लोक भवानी, बहिरोबा, यल्लमा या देवतांना भजतात.

उचल्यांच्या टोळीत महार, मांग सोडून कोणाही हिंदूला प्रवेश मिळतो. उचल्यांच्या जातीत शिरण्यापूर्वी माणसाला बराच विधी करावा लागतो. प्रथम उचल्यांच्या जातीतल्या सर्वांची संमती मिळवावी लागते व प्रवेशशुल्क म्हणून १५ ते २५ रुपये द्यावे लागतात. एवढे झाल्यावर ते लोक या नव्या मनुष्याला आंघोळ घालून नवा पोषाख देतात. नंतर एक वृद्ध उचल्या त्याच्या तोंडात चिमूटभर हळद व साखर टाकतो. नंतर भोजनाच्या वेळी हा नवा उचल्या व दोन तीन वृद्ध उचले एका ताटात जेवतात. अशा रीतीने हा विधी संपतो.

या नव्या उचल्याला कोणत्या तरी एका आडनावाचा पुरुष आपला कुटुंबीय मानतो व दुसऱ्या आडनावाचा मनुष्य त्याला आपली मुलगी देतो. या सर्व गोष्टी विधिपूर्वक आणि वाजंत्री लावून होतात.

मर्तिकप्रथा – हे लोक प्रेते पुरतात किंवा जाळतात. [ बॉं. बे. ऋा.; म. ज्ञा. को. ]

**उच्चाटन** एक आभिचारिक प्रयोग. भूत, प्रेत, पिशाच व शत्रू यांचे त्यांच्या स्थानावरून उच्चाटन व्हावे, या उद्देशाने उच्चाटनाचे विविध प्रयोग केले जातात. या प्रयोगांनी कार्य सिद्ध होते, अशी श्रद्धा प्राचीन काळापासून आहे. आजच्या वैज्ञानिक युगातही ही श्रद्धा नष्ट झालेली नाही. जारण-मारण, उच्चाटन, इ. प्रयोग करणारे काही मांत्रिक असतात. ते लिंबाला सुया टोचणे, गुलाल शिंपडून भाताचा बळी देणे, कागदावर किंवा भूर्जपत्रावर यंत्र तयार करून त्यात मंत्राची अक्षरे लिहिणे, इ. प्रयोग करतात. या उच्चाटनाचा विधी मंत्रमहोदधीत पुढील प्रमाणे दिला आहे –

कृष्ण चतुर्दशीस पडक्या घरात कुक्कुटासन घालून दक्षिणाभिमुख बसावे. केस मोकळे सोडावे. निळे वस्त्र नेसावे. माळेच्या ऐवजी गांठी घातलेली दोरी हातात घेऊन पुढील मंत्र २००० वेळा जपावा.

ॐ ब्लूंस्लूंम्लूंश्लूंकालरात्रिमहाध्वांक्षिअमुकमाशूच्चाटयोच्चाटय छिन्धि छिन्धि भिन्धि स्वाहा ह्रौं कामाक्षि क्रोम् ।

जप पुरा झाल्यावर २०० संख्येने मोहऱ्यांचे हवन करावे. नंतर तेल व पाणी यांनी युक्त अशा मोहरीच्या पेंडीचे बलिदान करावे. [ मंत्रमहोदधी ]

**उच्चैःश्रवा** समुद्रमंथनातून निघालेला घोडा. चौदा रत्नांत याची गणना केलेली आहे. हा इंद्राचे वाहन आहे. याचा रंग पांढरा असून, अमृत हे याचे खाद्य आहे. याला सात तोंडे आहेत. गांधर्वीच्या पोटी याचा जन्म झाला (ब्रह्मांड पु. ३.३.७६; मत्स्य पु. ८.८). दसऱ्याच्या दिवशी घोडयाची पूजा करतात, ती तो उच्चैःश्रव्याचा प्रतिनिधी म्हणून. त्या पूजेचा विधी असा –

सकाळी पाणवठ्यावर नेऊन घोडयाला धुतात. त्याच्या गळयात फुलांच्या माळा, पाठीवर शेला, पायांत तोडा वगैरे अलंकार घालून त्याला शृंगारतात. दुपारी त्याची मिरवणूक काढतात.

या अश्वपूजेचा मंत्र असा –

गन्धर्वकुलजातस्त्वं मा भूयाः कुलदूषकः ।
ब्रह्मणः सत्यवाक्येन सोमस्य वरुणस्य च ।।
प्रभावाच्च हुताशस्य वर्धय त्वं तुरङ्गमान् ।
रिपून् विजित्य समरे सहभर्त्रा सुखी भव ।।

अर्थ– हे अश्वा, तू गंधर्वकुलात उत्पन्न झाला आहेस. तरी तू कुलदूषक होऊ नकोस. ब्रह्मदेवाच्या सत्य वाक्याने व सोम, वरुण, अग्नी, यांच्या प्रभावाने तू (माझ्या) घोडयांची वृद्धी कर व युद्धात शत्रूंना जिंकून धन्यासह सुखी हो. [ पु. इं. ]

**उच्छिष्ट** भुक्तावशेष = खाऊन उरलेले. दुसऱ्याच्या पानातले उरलेले किंवा दुसऱ्याने तोंड लावून टाकलेले खाऊ नये; खाल्ल्यास त्या दोषाबद्दल प्रायश्चित्त करावे, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे. याबाबतचे नियम पुढील प्रमाणे –

शूद्रोच्छिष्टाशने च वमनं कृत्वा सप्तरात्रमुपवसेत् ।

अर्थ– शूद्राचे उच्छिष्ट भक्षण केले असता ते ओकून टाकून सात दिवस उपवास करावा.

चाण्डालपतितादीनामुच्छिष्टान्नस्य भक्षणे ।
द्विजः शुध्येत् पराकेण शूद्रः कृच्छ्रेण शुध्यति ।।

अर्थ– चांडाल, पतित, इ. च्या उच्छिष्टाचे भक्षण केले असता ब्राह्मण पराक प्रायश्चित्ताने व शूद्र कृच्छ्र प्रायश्चित्ताने शुद्ध होतो.

मात्र काही उपासनासंप्रदायांत गुरूचे उच्छिष्ट खाण्याविषयी अनुरोध आहे. जुन्या काळी बायकोने नवऱ्याच्या उष्ट्या ताटात जेवणे ही गोष्ट पत्नीधर्मात गणली जात असे. [ श. ह. ]

**उच्छिष्ट गणेश** गणेशाचे एक रूप. उत्तराम्नायात याच्या प्रतिमेचे लेखन पुढील प्रमाणे सांगितले आहे – पद्मासन घातलेला, उन्मत्त, त्रिलोचन, रक्तवर्ण व चतुर्भुज, चार हातांत अनुक्रमे पाश, अंकुश, मोदकपात्र व दंत धारण करणारा असा उच्छिष्ट गणेश रेखावा.

दुसरा पर्याय असा – श्वेतार्क किंवा मर्कटीकाष्ठ यांच्या मुळाची अंगुष्ठमात्र प्रतिमा करावी किंवा रक्तपद्मासनावर बसून चाप, बाण, धनुष्याची दोरी व अंकुश ही चार आयुधे चार हातांत धारण करणारा व नग्न शक्तीशी रतिक्रीडा करणारा, अशी याची प्रतिमा करावी. याचा मंत्र श्रीविद्यार्णवतंत्रात पुढीलप्रमाणे दिला आहे –

ॐ नमो भगवते एकदंष्ट्राय हस्तिमुखाय, लंबोदराय, उच्छिष्टमहात्मने आं क्रौं ह्रीं गं घे घे स्वाहा ।

तंत्रमार्गातले वामाचारी लोक या गणपतीची आराधना करतात. उच्छिष्टगणपतिपंथाचे अनुयायी जातीपातींचा भेद मानीत नाहीत. मद्य व मैथुन हे दोन 'म' कार या पंथात विहित आहेत. या पंथाचे लोक कपाळावर लाल टिळा लावतात. [ श्रीविद्यार्णवतंत्र ]

**उच्छिष्ट चंडाली** तंत्रमार्गातील एक देवता. ही प्रेतावर बसणारी असून, हिच्या गळ्यात गुंजांच्या माळा असतात. हिच्या एका हातांत खड्ग व दुसऱ्या हातात कपाल असते. दुसरा पर्याय म्हणजे ती रक्तवस्त्र नेसून, शूल व वीणा धारण करते. हिचे व्रत करणाऱ्या व्यक्तीला दोन जेवणांच्या मधल्या काळात तोंडांत भाकरीचा

तुकडा ठेवून तिच्या मंत्राचा जप करावा लागतो. दासबोधात (७.९.२३; ८.१०.३५) हिचा उल्लेख आहे. [ श्रीविद्यार्णवतंत्र ]

**उच्छिष्ट पिशाचयंत्र** व्यापार आणि उदीम करणाऱ्या व्यक्तीच्या मार्गात जर कोणी अडथळे आणू लागला, तर त्याला प्रतिबंध करणासाठी उच्छिष्ट पिशाचयंत्राचा प्रयोग करतात. स्वतःच्या रक्तात गोरोचन मिसळून त्या मिश्रणाने भूर्जपत्रावर हे यंत्र काढतात. नंतर त्याची पूजा करतात. मग 'ॐ आकर्षय स्वाहा' हा मंत्र म्हणत त्या यंत्राचे तुकडे करून ते शत्रूच्या मार्गांत टाकतात. असे केल्याने शत्रू पराभूत होतो, असे समजतात. [ यं. चिं. ]




उच्छिष्ट पिशाचयंत्र

**उजैन** उत्तर प्रदेशाच्या कुमाऊँ विभागातील एक क्षेत्र. इथे ज्वालादेवीचे मंदिर आहे. हिला उजयिनीदेवी असेही म्हणतात. चैत्र शुक्ल अष्टमीला इथे मोठी यात्रा भरते. याशिवाय भूतेश्वर, मुक्तेश्वर, नागनाथ व जगेश्वर यांचीही इथे लहान लहान मंदिरे आहेत. जगेश्वर महादेवाच्या समीप २० फूट उंचीची व २०० फूट व्यासाची विटांची एक टेकडी आहे. तिथे बौद्धकालातील एखादा विहार किंवा स्तूप असावा.

युआन च्वांगने वर्णन केलेल्या प्राचीन गोविषाण नगराचे अवशेष इथेच आहेत, असे कनिंगहॅमचे मत आहे. या नगराभोवती बरेचसे तलाव असून, द्रोणसागर हा त्यांपैकी सर्वांत मोठा आहे. इथे एक जुना किल्ला आहे. [ कुमाऊँ ]

**उज्जनक** नैनिताल जिल्ह्यातील एक शिवक्षेत्र. इथे भीमशंकर शिवाचे विशाल मंदिर आहे. काही विद्वानांच्या मते हे ज्योतिर्लिंग असून, भीमशंकराचे स्थान आहे व हा प्रदेश म्हणजेच प्राचीन कामरूप किंवा डाकिनी देश होय. [ कल्याण–तीर्थांक ]

**उज्जैन** हिला उज्जयिनी किंवा अवंती असेही नाव आहे. पुराणकाळी शंकराने या ठिकाणी त्रिपुरासुरावर विजय मिळविला, म्हणून या स्थानाला उज्जयिनी नाव पडले, असे स्कंदपुराणांतर्गत आवंत्य खंडात सांगितले आहे. अशोकाच्या शिलालेखांत या स्थानाला उजेनी असे म्हटले आहे; तर पेरिप्लस व टॉलेमी यांनी त्याला ओजेनी असे नाव दिले आहे. स्कंदपुराणानुसार भिन्न भिन्न कल्पांत ही नगरी कनकशृंग, कुशस्थली, अवंती, उज्जयिनी, पद्मावती, कुमुदवती, अमरावती व विशाला, अशा विविध नावांनी प्रसिद्ध होती.

अयोध्या, मथुरा, इ. मोक्षदायिनी सात पुरींमध्ये अवंतीचाही (उज्जैन) अंतर्भाव आहे. समग्र तीर्थस्थाने जर देहस्वरूप मानली तर अवंतिका ही त्यांतला नाभिदेश आहे, असे वराहपुराणात म्हटले आहे. द्वादश ज्योतिर्लिंगांपैकी महाकालनामक ज्योतिर्लिंग इथे असून, एकावन्न शक्तिपीठांपैकी हे एक पीठ आहे. इथे सतीचे कोपर गळून पडले व हे शक्तिपीठ बनले. इथल्या मंदिरात देवीच्या मूर्तीऐवजी कोपराचीच पूजा होते.

भोपाळपासून ११३ मैलांवर शिप्रा नदीच्या तीरावर हे नगर वसले आहे. इथले प्रसिद्ध स्थळ म्हणजे महाकाल मंदिर हे होय.



महाकाल – मंदिर उज्जैन

आकाशे तारकं लिङ्गं पाताले हाटकेश्वरम्।
मृत्युलोके महाकालं लिङ्गत्रय नमोऽस्तु ते ।।

अशी या महाकालाची महती आहे.

या मंदिराला पाच मजले असून, त्यांपैकी एक मजला जमिनीखाली आहे. मुख्य मंदिरात अंधार असतो. त्यामुळे तिथे नित्य दीप तेवत असतात. औरंगजेबाने इथे रोज चार शेर तुपाचे नंदादीप लावावे, अशी आज्ञा केली होती. इथल्या शिवलिंगाला ओंकारेश्वर असे म्हणतात. हे महाकाल – शिवलिंग विशाल असून, नागपरिवेष्टित आहे. कोणत्याही देवाला एकदा फुले वाहिली, की ती काढल्यावर निर्माल्य बनतात. परंतु ज्योतिर्लिंग या नियमाला अपवाद आहे. ज्योतिर्लिंगाला एकदा वाहिलेले

बिल्वपत्र पुन्हा धुवून लिंगावर वाहता येते (शिव पु. १.४२).

शिवपुराणात या महाकालाची कथा दिली आहे ती अशी – अवंती नगरात एक धार्मिक व योगी ब्राह्मण राहत होता. एकदा दूषण नावाच्या एका राक्षसाने नगरातील लोकांना त्रास द्यायला सुरुवात केली. तेव्हा सर्व लोक त्या ब्राह्मणाकडे गेले व त्यांनी आपल्याला या त्रासातून सोडविण्याची त्याला विनंती केली. ब्राह्मणाने मग त्यासाठी उग्र तप केले. पृथ्वी दुभंग करून महाकाल त्याच्यापुढे प्रकट झाला. ब्राह्मणाच्या इच्छेप्रमाणे त्याने राक्षसाचा संहार केला. नंतर भक्तांनी त्याला तिथेच राहण्याविषयी प्रार्थना केली व ती महाकालाने मान्य केली (शिव पु. १.४६).

स्कंदपुराणात या क्षेत्राला महाकालवन म्हटले आहे. हे सर्वोत्तम तीर्थ आहे, असे अग्निपुराणात सांगितले आहे. महाकालाच्या दर्शनाने मुक्ती मिळते व अकालमृत्यू टळतो, अशीही भाविकांची श्रद्धा आहे.

उज्जैनमधील दुसरे महत्त्वाचे मंदिर म्हणजे हरसिद्धीचे. स्कंदपुराणात या मंदिराविषयी पुढील कथा आहे – एकदा शंकर कैलासावर गौरीबरोबर सारीपाट खेळत असता चंड व प्रचंड या दोन राक्षसांनी त्यांच्या खेळात विघ्न आणले व नंदीलाही घायाळ केले. तेव्हा शंकराने देवीची प्रार्थना करून तिला राक्षसांचा संहार करायला सांगितले. देवीने राक्षसांच्या वधाविषयी हराचे काम सिद्ध केले, म्हणून तिला हरसिद्धी असे नाव मिळाले (५.१.१९).

उज्जैन नगरातले आणखी एक यात्रास्थान म्हणजे सिद्धवट. हा वट आकाराने अतिशय लहान आहे व कित्येक वर्षांपासून त्याचा आकार तेवढाच असल्याचे सांगतात.

कृष्ण, बलराम व सुदामा हे तिघे या नगरीतच सांदीपनी ऋषीच्या आश्रमात अध्ययनासाठी राहिले होते.


सांदीपनीचा आश्रम

प्राचीन साहित्यात उज्जैनचे अनेक उल्लेख सापडतात मौर्य कालात मालवप्रदेशाचा समावेश मौर्य साम्राज्यात होत होता व उज्जयिनी ही या प्रदेशाची राजधानी होती. अशोक हा तिथे काही वर्षे प्रशासक म्हणून राज्य करीत होता. मौर्यानंतर गंधर्वसेनाच्या (गर्दभिल्ल) राजवंशाने मालव देशावर राज्य केले. नंतर काही काळ तिथे शकांचे राज्य आले. पुढे इ. स. पूर्व ५७ मध्ये विक्रमादित्याने शकांचा पराभव करून माळव्यावर आपली सत्ता स्थापिली. पण इ. स. ७५ च्या सुमारास पुन्हा शकांनी हा प्रदेश काबीज केला व त्यावर पुढे सुमारे तीनशे वर्षे राज्य केले. चौथ्या शतकाच्या शेवटी गुप्त सम्राट चंद्रगुप्त विक्रमादित्याने शकांना परास्त करून माळव्यावर आपले राज्य स्थापिले.

विक्रमादित्यानंतर उज्जयिनी नगराची चांगली भरभराट झाली. अनेक वर्षे उज्जयिनी हे वैदिक, बौद्ध व जैन या तीन्ही धर्मांच्या शिक्षणाचे केंद्र होते. ज्योतिषविषयक शिक्षण तर इथे सर्वोत्कृष्ट मिळत असे. गुप्तकालात संस्कृत काव्य व नाट्यशास्त्र यांच्या उच्च शिक्षणाचे हे मोठेच केंद्र होते. कालिदास, भवभूती, भारवी, भर्तृहरी, इ. कवी इथे बराच काळ राहिले होते, आशा अख्यायिका आहेत.

महाराज जयसिंहाने इथे एक वेधशाळा बांधली आहे. जयसिंह (इ. स. १६८६–१७४३) हा ज्योतिषशास्त्रातील मोठा विद्वान होता व ज्योतिषशास्त्राच्या उत्कर्षाची त्याला तळमळ होती. उज्जयिनी हे भारतातील ग्रीनिच आहे. भूमीची मध्यरेखा अर्थात मुख्य रेखावृत्त उज्जयिनीवरून जाते, असे तिथिचिंतामणीत म्हटले आहे.

भारतीय खगोलशास्त्रज्ञांच्या मते शून्य रेखांशावर हे नगर वसले आहे. प्रत्येक बारा वर्षांनी जेव्हा गुरू वृश्चिक राशीत प्रवेश करतो, तेव्हा इथे कुंभमेळा भरतो. कालिदासाने मेघदूतात उज्जयिनीविषयी आपला प्रेमभाव प्रकट केला आहे. यक्ष मेघाला सांगतो (मेघ. पू. २७)–

वक्रः पन्था यदपि भवतः प्रस्थितस्योत्तराशाम् ।
सौधोत्सङ्गप्रणयविमुखो मा स्म भूरुज्जयिन्याः ॥

अर्थ – उत्तर दिशेला निघालेला तू वाकडी वाट करून का होईना, उज्जयिनीला जा व तिथल्या रमणींच्या सौधतलांवर चाललेल्या शृंगारचेष्टा पाहायला विसरू नकोस.

रघुवंशातही कालिदासाने स्वयंवराच्या प्रसंगी सुनंदेच्या मुखाने अवंतिनाथाचे वर्णन केले आहे (६.३२–३४).

स्कंदपुराणात या क्षेत्राचे माहात्म्य पुढीलप्रमाणे सांगितले (अवन्तिक्षेत्रमाहात्म्य. २६.१७–१९) आहे –

महाकालः सरिच्छिप्रा गतिश्चैव सुनिर्मला ।
उज्जयिन्यां विशालाक्षि वासः कस्य न रोचयेत् ॥
स्नानं कृत्वा नरो यस्तु महानद्यां हि दुर्लभम् ।
महाकालं नमस्कृत्य नरो मृत्युं न शोचयेत् ॥
मृतः कीटः पतङ्गो वा रुद्रस्यानुचरो भवेत् ।

अर्थ – जिथे महाकालाचा निवास आहे व शिप्रा नदीचा सुनिर्मल प्रवाह आहे, त्या उज्जयिनी नगरात राहणे कोणाला

आवडणार नाही! महानदी शिप्रेत स्नान करायला मिळणे दुर्लभ होय. ते करून जो महाकालाला नमस्कार करतो, त्याला मृत्यूचे भय राहत नाही. इथे मेलेला कीटक किंवा पतंगही त्याचा अनुचर होतो.

सांप्रतचे उज्जैन नगर प्राचीन उज्जयिनीच्या स्थानापासून थोडे दूर वसले आहे. पूर्वी जिथे महाकालवन होते, तिथे आज गजबजलेले उज्जैन शहर नांदते आहे व त्याचबरोबर प्राचीन उज्जयिनी आजमितीस उजाड पडली आहे. तिला हल्ली गढ असे म्हणतात. हे स्थान सांप्रतच्या नगराच्या उत्तरेला शिप्रा नदीच्या उजव्या तीरावर आहे. आजूबाजूच्या भूमीपेक्षा हे स्थान तीस–चाळीस फूट उंच आहे. याच्या चारही बाजूंना पूर्वी प्राकारही असावा, असे वाटते. नगराचा विस्तार दक्षिणोत्तर सुमारे एक मैल व पूर्व–पश्चिम सुमारे पाऊण मैल एवढाच होता; परंतु नगराची उपनगरे मात्र दूरवर पसरलेली होती.

ग्वाल्हेर राज्यातील पुरातत्त्व विभागाने गढ, वैशा टेकडी व कुंभार टेकडी या ठिकाणी इ. स. १९३९ मध्ये उत्खनन सुरू केले. ते काम दोन वर्षे चालले होते. इथे सापडलेल्या वस्तूंपैकी सर्वांत मनोरंजक वस्तू म्हणजे गोलाकार कूप होत. यांची बनावटही जरा विचित्र आहे. मातीचे दोन फूट व्यासाचे व सात–आठ इंच उंचीचे वीस ते पंचवीस गोल नळ एकमेकांत बसविलेले सापडलेले आहेत. या कूपात मातीच्या मुद्रा, भांडी, मातीचे घोडे, सुरया, दिवे, खेळणी, मणके, हस्तिदंती सामान गाळवाची हाडे, इ. वस्तू मिळाल्या आहेत. हे गोल कूप धान्य किंवा गरजेच्या वस्तू साठविण्यासाठी उपयोगात आणीत असावे, असे अनुमान आहे. मातीची मोठमोठी पात्रेही इथे मिळाली असून त्यातील एकात माणसाच्या अस्थी सापडल्या आहेत. त्या पात्रातच मातीची एक मुद्रा असून, तिच्यावरचे नाव ज्या व्यक्तीच्या त्या अस्थी आहेत, त्याचे असावे. दुसऱ्या एका मुद्रेवर एका बाजूला मानवी शिर व दुसऱ्या बाजूला कमळ काढलेले आहे. इ. स. १९६०–६१ मध्येही इथे पुन्हा उत्खनन झाले. त्यांत तिथल्या प्राचीन खंदकाजवळ हाडांच्या सुया, मासे धरण्याचे गळ, बाणाग्रे व गुप्तकालीन तांब्याची एक मूर्ती अशा वस्तू सापडल्या आहेत.

इथल्या उत्खननात विविध प्रकारची नाणी सापडली आहेत. त्यांतील बहुसंख्य नाण्यांवर एक विशिष्ट चिह्न आढळते. त्याला उज्जैन चिह्न हे नाव देण्यात आले आहे. फुलीच्या चारी टोकांवर वर्तुळे, असे ते चिह्न असते. या चिह्नाबरोबर स्वस्तिक, वृषभ, इ. आकृतीही दिसतात.

नाण्यांच्या दुसऱ्या बाजूवर जी चिह्ने असतात, ती आहत नाण्यांवरील चिह्नांशी मिळतीजुळती आहेत. काही नाण्यांवर मनुष्याकृती (स्त्री किंवा पुरुष) आढळते. [ श्री. दवे – भारती १६ डिसेंबर १९५७; कल्याण-तीर्थांक; अजन्ता, नोव्हेंबर १९५८; प्रा. भा. ना. शा.; वि. स्मृ. ग्रं. ]

**उज्ज्वल रस** रूप गोस्वामी यांनी मानलेला एक रस. ते काव्यशास्त्राच्या परिभाषेला धरूनच त्याचे प्रतिपादन करतात. पण ध्रुवदास वगैरे हिंदी कवींनी या रसाच्या बाबतीत साहित्यशास्त्राला प्रामाण्य न देता ते स्वानुभूतीला दिले आहे. रूप गोस्वामी सांगतात–

**स्थायिभावोऽत्र शृङ्गारे कथ्यते मधुरा रतिः ।**

अर्थ – शृंगारप्रधान अशा या रसाचा मधुरा रती हा स्थायीभाव आहे.

कृष्णरतीलाच मधुरा रती असे म्हणतात. ही रती कृष्णमूर्ती किंवा तिचे अनुकरण करणारी व्यक्ती यांच्याविषयीही होऊ शकते. हा रत्यात्मक स्थायीभाव विभाव, अनुभाव व संचारीभाव, यांच्या योगाने उज्ज्वल बनून भक्तांचे अंतःकरण रसमय करतो. भक्तांच्या मनात जेव्हा राधा व कृष्ण यांचा परस्पर प्रेमभाव भरून राहतो, तेव्हा या रसाची निष्पत्ती होते. मग त्या भावाचे कथन करण्याच्या कामी वाणी असमर्थ ठरते.

या रसाची देवता विष्णू (कृष्णरूप) आहे. विष्णू हा श्यामवर्ण आहे. पण त्याचा वेष उज्ज्वल आहे. उज्ज्वल शब्द कालुष्यहीनतेचाही द्योतक आहे. रूप गोस्वामींनी उज्ज्वल नीलमणी नावाचा ग्रंथ लिहिला आहे. त्यात उज्ज्वल हा शब्द अलौकिक, रागानुगा मधुर भक्तीसाठी प्रयुक्त केला आहे. या शब्दांत त्यांनी शृंगाराचा पूर्ण अंतर्भाव केलेला आहे. कृष्णाला नायक व राधेला नायिका मानून या ग्रंथात कृष्णप्रेमाचे विशद वर्णन केलेले आहे. हरिभक्तिरसामृतसिंधूत भक्तीचे पाच भाव सांगितले आहेत. पाचवा भाव माधुर्य आहे आणि त्याचाच विस्तार उज्ज्वल नीलमणी या ग्रंथात उज्ज्वल रसाच्या रूपाने केलेला आहे. या रसाची विलक्षणता ही, की याच्या अनुभूतीत भक्त देहसुखही विसरून जातो व प्रेमरंगात रंगून राहतो. [ रा. रा. का.; हिं. सा. को. ]

**उडक्यांचा नाच** हे नृत्य कोकणात पाहायला मिळते. नर्तक परस्परांच्या दंडांत दंड अडकवून उभे राहतात व उजव्या पायाने उड्या मारीत नाचतात. उड्या मारीत करण्याची सर्व नृत्ये ही समानोत्पत्तिक जादूविद्येशी संबंधित आहेत. नाचणारा जेवढी उंच उडी मारील, तेवढी पिके उंच वाढतील, असा त्यातला गर्भित आशय असतो. या नृत्याला तरापी या वाद्याची साथ असते. [ भा. लो. नृ. ]

**उडत कोंबडा** मुलींचा एक खेळ. एक मोठी मुलगी उभी राहते व तिच्या पुढ्यात एक लहान मुलगी बसून आपले हात मागे नेते व मोठ्या मुलीचे पाय धरते. उभी मुलगी आपल्या हातांनी तिचे हात धरते व दोघीजणी उडत उडत फिरतात. [ व्या. ज्ञा. को. ]

**उडत रुमाल** महार, मांग वा तत्सम जातींच्या लोकांना दिला जाणारा मराठी राज्यातला एक किताब. जे लढाईत बहादुरी गाजवीत, त्यांना हा किताब मिळे. असा किताब धारण करणारा माणूस रस्त्याने निघाला, की त्याचे दोन नोकर स्वच्छ पांढरे हातरुमाल हातात घेऊन ते चवरीप्रमाणे त्याच्यावर वारीत दोही अंगी चालत. अशा किताबधारी लोकांना सरकारातून काही नेमणूकही मिळत असे. [ जुन्या ऐतिहासिक गोष्टी, इ. सं. – पारसनीस ]

**उडियाबाबा** (इ. स. १८७६–१९४८) ओडिसातील एक संत. याचे आईबापही मोठे ईश्वरभक्त होते. वयाच्या पाचव्या वर्षी याचे उपनयन झाले व त्याने ओडिया भाषा, संस्कृत व गणित या विषयांचे अध्ययन केले. नंतर मयूर-भंज येथील पाठशाळेत तो शास्त्रे शिकला. तो एकोणीस वर्षांचा असताना ओडिसात मोठा दुष्काळ पडला. त्या वेळी याने गौहाटी येथील कामाख्या मंदिरात जाऊन तिथे मंत्रानुष्ठान केले. पुढे त्याला वाचासिद्धी प्राप्त झाली. त्यानंतर त्याने गोवर्धन मठाच्या शंकराचार्यांकडून संन्यासदीक्षा घेतली. आचार्यांनी मग त्याचे पूर्णानंदतीर्थ असे नाव ठेवले. उडियाबाबा हे त्याला लोकांनी दिलेले नाव असावे. उडियाबाबा शांकरमतानुयायी होता. उपासना हा मनाचा स्वाभाविक धर्म असून, त्याला जर भगवद्-भक्तीत गुंतविले नाही, तर ते सांसारिक विषयात आसक्त होते, असे याचे मत आहे. [ भा. सं. म. ]

**उडियासांझिया** एक जात. हे लोक गवंडीकाम व मजुरी करतात. हे उड्र किंवा ओड्र नावाच्या फिरत्या लोकांचे वंशज आहेत. हे संबळपुरात राहतात. उडिया राजांच्या पदरी हे लोक पडतील ती कामे करीत.

बनेटिया व खांदाईत असे यांचे दोन वर्ग आहेत. बनेटिया लोक खांदाइतांच्या मुलींशी लग्न करतात; पण त्यांच्या घरी अन्न मात्र खात नाहीत; फक्त दहीसाखर तेवढी खातात.

यांच्यांत मुलींची लग्ने ७ ते १० वर्षांच्या दरम्यान होतात. १२ व्या वर्षांपर्यंत मुलीचे लग्न न झाल्यास विधवाविधीने तिचे लग्न होते. लग्न उडिया पद्धतीने लागते व लग्नाची मिरवणूक फार थाटाची असते. वरात घरी आल्यावर नवरा मुलगा पाण्याने भरलेली सात भांडी उपडी करतो. नंतर तो आपले तोंड धुवून ती भांडी फोडतो व तिथून पळतो. नंतर वरपक्षाकडील त्याला हुडकून काढून त्याच्यावर रंग ओततात. नवव्या दिवशी वधू सासरच्या सर्व माणसांच्या कपाळाला दहीसाखरेचा टिळा लावते. या लोकांना घटस्फोट व विधवाविवाह संमत आहे.

हे लोक विश्वकर्म्याची पूजा करतात. त्याचप्रमाणे हे श्राद्धेही करतात. [ म. ज्ञा. को. ]

**उडीद** एक द्विदल धान्य. वाजसनेयिसंहितेत मूग व उडीद यांचा उल्लेख आला आहे (१८.१३). याव्यतिरिक्त तै. सं. (५.१.८.१), का. सं. (१२.७), मै. सं. (४.३.२), इ. ग्रंथांतही माष म्हणजे उडीद याचे उल्लेख आले आहेत. अथर्ववेदात (१२.२.४) माषाज्य = भरडलेल्या उडदांचा नैवेद्य, असा शब्द आहे. काठक (३२.७) व मैत्रायणी संहितेत (१.४.४०) हे धान्य निषिद्ध मानले आहे. जव व उडीद यांच्या पिकासाठी जी जमीन चांगली असे, तिला व्यय किंवा माष्य असे म्हणत असत. उडीद हा मांसाचा प्रतिनिधी म्हणून श्राद्धाच्या स्वयंपाकात वापरतात. उडदामध्ये भूतबाधा दूर करण्याचे सामर्थ्य आहे, असेही समजतात. शांतिकर्मातल्या बलिदानात भातावर उडीद टाकतात. [ पा. का. भा. ]

**उडुपी** दक्षिण कानडा (मंगळूर) जिल्ह्यातील एक क्षेत्र. याचे प्राचीन नाव उडुपा असे होते. उडु म्हणजे नक्षत्र व पा म्हणजे पालक. उडुपा शब्दाचा अर्थ चंद्र असा होतो. चंद्राने इथे तपश्चर्या केली व शंकराने प्रसन्न होऊन त्याला आपल्या मस्तकी धारण केले, अशी कथा आहे. उडुपीला रजतपीठपूर, रौप्यपीठपूर व शिवाली अशीही प्राचीन नांवे होती.

द्वैतमतवादी मध्वाचार्य यांच्या वास्तव्यामुळे उडुपीला क्षेत्राचे स्वरूप प्राप्त झाले. त्यांनी आपले धार्मिक कार्य उडुपी येथेच केले. इथे त्यांनी मठस्थापना केली त्यामुळे हे एक धार्मिक क्षेत्र बनले आहे. इथली मध्वस्थापित कृष्णमूर्ती पाहण्यासाठी दूरदूरचे यात्रेकरू येऊ लागले. चैतन्य व पुरंदरदास यांनीही इथे येऊन इथल्या श्रीकृष्णाची पूजा केली होती, असे सांगतात. या मंदिराच्या छतावर चांदीचा पत्रा असून, त्यावर सोन्याची पाने व फुले काढलेली आहेत व भिंतीवर दशावतारांची चित्रे चितारलेली आहेत. इथली श्रीकृष्णाची मूर्ती शाळिग्राम शिळेची असून, अत्यंत प्रेक्षणीय आहे. मूर्तीच्या चारही बाजूंना चार समया तेवत असतात. त्यांपैकी एक मध्वाचार्यांच्या वेळेपासून आजवर सतत तेवत आहे, असे सांगतात.

दहा दिवस इथे मोठा उत्सव होतो.

मकरसंक्रांतीपूर्वी इथली कृष्णमूर्ती मध्वाचार्यांना कशी मिळाली, त्याविषयी पुढील आख्यायिका सांगतात– उडुपीजवळच्या मालपे बंदरात द्वारकेहून गोपीचंदनाची माती घेऊन एक जहाज आले होते ते किनाऱ्याजवळ पोचते न पोचते तोच मोठे वादळ झाले. मध्वाचार्यांनी दैवी शक्तीने ते वादळ शांत केले; तेव्हा गलवताच्या मालकाने मध्वाचार्यांना विचारले, की 'तुम्हाला काय बक्षिस पाहिजे?' त्यावर त्यांनी जहाजांतील विवक्षित ठिकाणची गोपीचंदनाची ढेकळे मागितली. ही मूर्ती त्या ढेकळांतच दडलेली होती. मग स्वामींनी ती मंदिरात आणून तिची स्थापना केली.

उडुपीला मध्वाचार्यांनी आठ मठ स्थापन केले असून, त्यांत एकेक मध्वमतानुयायी संन्यासी राहतो. यांपैकी प्रत्येक संन्यासी आळीपाळीने दोन दोन वर्षे देवाची पूजा व इतर धार्मिक कृत्ये करतो. दोन वर्षांनी होणाऱ्या खांदेपालटाला 'पर्यायम्' असे नाव असून, त्या वेळी तिथे मोठा उत्सव होतो. त्यासाठी शेकडो यात्रेकरू तिथे जमतात.

इथे चंद्रेश्वर व अनंतेश्वर यांची दोन प्राचीन मंदिरे आहेत. परशुरामाने इथे शंकराची आराधना केली होती, असे सांगतात. त्याने स्थापन केलेल्या शिवलिंगाला अनंतेश्वर असे नाव आहे. [कल्याण–तीर्थांक]

**उडेरोलाल** सिंध प्रांतातला एक देव. हा सिंधुनदाचा अवतार असून, त्याचा आविष्कार इ. स. ९५१ मध्ये झाला. याची आख्यायिका अशी– त्या काळात सिंधमधील ठठ्टा या नगरात मर्खं नावाचा मुसलमान राजा राज्य करीत होता. त्याने एके दिवशी फर्मान काढले, 'राज्यातल्या सर्व हिंदूंनी तावडतोब मुसलमान व्हावे. जे या आज्ञेचा भंग करतील, त्यांचा शिरच्छेद केला जाईल व त्यांची मालमत्ता सरकार जमा होईल.' तो हुकूम ऐकताच सर्व हिंदू घाबरले व सिंधुनदाच्या तीरावर एकत्र जमून त्यांनी त्या नदाची आळवणी सुरू केली. तिसऱ्या दिवशी त्या नदाच्या पात्रातून आवाज उठला, की 'मी आठ दिवसांनी नरसापूर येथे अवतार घेईन व तुमचे संकट निवारीन. माझं नाव उडेरोलाल असे असेल.'

आठ दिवसांनी त्याने नरसापूर येथे आरोड जातीतील एक प्रख्यात हिंदू पुढारी रतनराय ठाकूर याची पत्नी देवकी हिच्या उदरी जन्म घेतला. त्या दिवशी वर्षप्रतिपदा होती. काही क्षणातच तो दाढी-मिशांचा तरुण बनला व हे अघटित राजाच्या कानापर्यंत पोचले. राजाने त्याला ठठ्टा येथे बोलावणे धाडले. उडेरोलाल त्याच्यापुढे उभा ठाकला. त्याने राजाला सांगितले, की 'हिंदू व तुर्क समान आहेत; तेव्हा तू हिंदूंवर धर्मांतराची सक्ती करू नको.' राजाला त्याच्या धिटाईचा राग आला व त्याने उडेरोलालला पकडण्याचा हुकूम दिला. पण शिपायांना ती गोष्ट शक्य झाली नाही. राजाच्या उद्दामपणाचा उडेरोलाललाही राग आला व त्याने अग्नीला ठठ्टा नगरी भस्मसात करण्याची आज्ञा दिली. शहर जळू लागताच मग राजाचे डोळे उघडले व तो उडेरोलालला शरण गेला. त्या घटनेमुळे हिंदूचे धर्मांतर टळून त्यांना त्या राज्यात धर्माचरणाचे स्वातंत्र्य मिळाले.

मत्स्यावर आसनमांडी घालून बसलेला व घोड्यावर स्वार झालेला अशी उडेरोलालची दोन रूपे आहेत. पहिल्या रूपात त्याच्या हाती पुस्तक व जपमाळ आहे. दुसऱ्या रूपात त्याने आपल्या हाती ध्वज व खड्ग धारण केले आहे. कराचीजवळ पीर पाथो व पीर मांघो नावाची जी दोन देवस्थाने आहेत, ती उडेरोलालचीच आहेत. हिंदूंप्रमाणेच मुसलमानही त्या ठिकाणी त्याला भजतात. ठठ्टा व सक्कर येथेही त्यांची मंदिरे आहेत. उडेरोलाल जेव्हा हिंगलाजहून कराचीला आला, तेव्हा तो तिथल्या मनोराबेटावर राहिला होता. तिथे त्याने बांधलेले मंदिर अद्यापि चांगल्या अवस्थेत आहे. इथे चैत्र व आषाढ या महिन्यांच्या पौर्णिमेस मोठी जत्रा भरते. दर्यापंथी लोक उडेरोलालला भजतात. त्यांनी अनेक ठिकाणी त्याची मंदिरे बांधली आहेत.

शेवटी भूमी दुभंग होऊन उडेरोलाल हा तिच्यात अदृश्य झाला, अशी आख्यायिका आहे. [सिंधी कल्चर]

**उड्डीयान कुरुकुल्ला** बौद्धांची एक देवता. ही रक्तवर्ण असून, हिचे ध्यान भयप्रद आहे. हिचे आसन अर्धपर्यंक व वाहन प्रेत आहे. हिच्या गळ्यात कपालमाला असते व हिची जीभ व सुळे बाहेर आलेले असतात. केस तांबूस असून, ते ज्वालेप्रमाणे वर गेलेले असतात. ही व्याघ्रचर्म परिधान करते. हिला तीन डोळे व चार हात असून, हातांत पुष्प, धनुष्य व बाण या वस्तू असतात. [इं. बु. इ.]

**उड्डीयानबंध** हठयोगातील एक बंध. उड्डीयान = वर उडणे; बंध = नियंत्रण. या बंधामुळे प्राणशक्ती शरीराच्या खालच्या भागातून वर प्रवाहित केली जाते. याचा विधी पुढीलप्रमाणे –

उदरे पश्चिमं तानं नाभिरूर्ध्वं तु कारयेत् ।
उड्डीयानो ह्यसौ बन्धो मृत्युमातङ्गकेसरी ॥
समग्राद् बन्धनाद्वेतदुड्डीयानं विशिष्यते ।
उड्डीयाने समभ्यस्ते मुक्तिः स्वाभाविकी भवेत् ॥

अर्थ – बेंबीच्या वरचे पोट मकाळी नेऊन बेंबी वर करणे याला उड्डीयानबंध असे म्हणतात. हा मृत्युगजाचा सिंह आहे,

सर्व बंधांत श्रेष्ठ आहे व याचा अभ्यास केला असता मुक्ती सहज मिळते.

याच्या अभ्यासाने दीर्घायुष्य प्राप्त होते, उदराचे व मूत्राशयाचे विकार दूर होतात, नाभिस्थित समान व कृकल या प्राणांत स्थिरता येते, वात, पित्त व कफ शुद्ध होतात. जठराग्नी प्रदीप्त होतो आणि सुषुम्ना नाडीचे द्वार खुले होते. [ यो. सो. पू.; गा. म. वि. ]

**उड्र** ओडिसातल्या लोकांना प्राचीन काळी उड्र म्हणत. यांचा उल्लेख महाभारत, बृहत्संहिता, मनुस्मृती, इ. ग्रंथांत आढळतो. यांना ओड्र किंवा औड्र असेही म्हणत. पाहा–ओडिसा.

**उतथ्य गीता** मांधात्याबरोबर उतथ्याने क्षात्रधर्मावर संवाद केला, तो उतथ्यगीता या नावाने प्रसिद्ध आहे. उतथ्य हा अंगिरस व स्वराज यांचा पुत्र होय. परशुरामाने पृथ्वी निःक्षत्रिय केल्यानंतर याने क्षत्रियांचे पुनर्वसन केले आणि त्यांना कार्यप्रवण केले. ममता ही याची पत्नी होय. तिचा आंधळा पुत्र म्हणजे दीर्घतमा औतथ्य होय.

उतथ्याला भद्रा नावाची आणखी एक पत्नी होती. वरुणाने तिचे अपहरण केले तेव्हा उतथ्याने समुद्राचे शोषण केले आणि त्याचे वाळवंटात रूपांतर केले, तसेच सरस्वती नदीलाही त्याने जलरहित व अदृश्य केले. शेवटी समुद्राने त्याला त्याची भार्या परत दिली.

उचथ्य असाही याच्या नावाचा एक पाठभेद आहे.

उतथ्य गीता – महाभारताच्या शांतिपर्वात (१२.९०–९१) ही गीता आलेली आहे. उतथ्याने यात राजधर्म सांगितले आहेत. तो म्हणतो –

संविभज्य यदा भुङ्क्ते नृपतिर्दुर्बलान् नरान् ।
तदा भवन्ति बलिनः स राज्ञो धर्म उच्यते ।।
यदा रक्षति राष्ट्राणि यदा दस्यूनपोहति ।
यदा जयति संग्रामे स राज्ञो धर्म उच्यते ।।

अर्थ – दुर्बल लोकांना वाटून देऊन जो राजा धनाचा उपभोग घेतो, तो दुर्बलांना बलवान करतो. हाच राजाचा धर्म होय. जो राजा राष्ट्राचे रक्षण करतो, दस्यूंना पिटाळून लावतो आणि युद्धात जय मिळवतो, तोच उत्तम धर्म आचरतो, असे ठरते.

तसेच, जो राजा साधूंचे, अतिथींचे पूजन करतो, भूमीचे दान करतो, सत्याने वागतो आणि प्रजेचे नीट पालन करतो, तोच राजा धर्माने वागतो, असे म्हणता येते.

अशाच राजाला इहलोकी व परलोकी सुख मिळते, असे शेवटी उतथ्याने म्हटले आहे. [ प्रा. च. को. हिंदी ]

**उतारा** अंगावरून ओवाळून टाकलेला पदार्थ व ती ओवाळण्याची क्रिया. लिंबू, मीठ, तांदूळ, पाणी, भाकरीचा तुकडा, दहीभात, इ. पदार्थ उताऱ्याचे होत. संस्कृतमध्ये या क्रियेला अवतरणकमंगल असे नाव आहे. स्त्रियांच्या धार्मिक क्रियांत उताऱ्याला महत्त्वाचे स्थान आहे. काही उतारे मांगलिक, तर काही जादूटोण्यातले असतात. नवरदेव लग्नाच्या मंडपात आल्यावर, नववधू पतीसह घरी आल्यावर, बाळ-बाळंतीण दहाव्या दिवशी घरी आल्यावर, त्यांच्यावरून लिंबलोण, पाणी किंवा भाकरीचा तुकडा ओवाळून टाकण्याची चाल आहे. ज्याला दृष्ट लागली असेल त्याच्या तोंडाभोवती मीठ-मोहरी, मिरच्या, तुरटी, राख, बिब्बा, केस, भूस, नारळ, इ. पदार्थ ओवाळून विस्तवात टाकतात; किंवा दूर फेकून देतात.

खेडेगावात उताऱ्याचा पुढील प्रकार आढळतो– शिजविलेले अन्न, लाल कापड, सव्वा रुपया, कोळसा, शेंदूर, सुर्मा, बिब्बा व नारळ हे पदार्थ एका मातीच्या परळात ठेवतात. मग ते साहित्य रोग्याच्या अंगावरून ओवाळतात. नंतर मांत्रिक ते परळ व नागवी तलवार घेऊन स्मशानात जातो. त्याच्या मागून लोकही नाचत व ढोलकी वाजवीत जातात. मांत्रिक ते परळ स्मशानात ठेवतो व सर्व मंडळी मागे न पाहता परत येतात. कोंबडीचे पिल्लू, दहीभात, इ. पदार्थही रोग्यावरून ओवाळून टाकण्याची पद्धत आहे. [ लौ. दं.; का. ए. सां. अ. ]

**उत्कटासन** योगमार्गातले एक आसन. याला अंगुष्ठासन असेही म्हणतात. याचा विधी असा –

अङ्गुष्ठाभ्यामवष्टभ्य धरां पार्ष्णी च खे गतौ।
तत्रोपरि गुदं न्यस्य विज्ञेयमुत्कटासनम् ।।

अर्थ – पायाचे दोन्ही अंगठे जमिनीवर टेकून दोन्ही टाचा वर आणाव्या, त्या टाचांवर गुद ठेवून बसावे. याला उत्कटासन असे नाव आहे. [ उ. यो. द.; यो. सो. पू. ]

**उत्कंठिता** अष्टनायिकांपैकी एक नायिका. हिला 'उत्का' असेही म्हटलेले आहे. भरताने प्रथम हिचा उल्लेख केला आहे. ' संकेतस्थलं प्रति भर्तुरनागमनकारणं या चिन्तयति' (= संकेत-स्थळी जाऊन (नायकाच्या येण्याची जी मार्गप्रतीक्षा करते, आणि) तो अजून का आला नाही अशी चिंता करते, ती उत्कंठिता होय,) अशी भानुदत्ताने तिची व्याख्या केली आहे. तिच्या अवस्थेत प्रतीक्षेबरोबरच उत्सुकता विशेष जाणवते. भक्तिकाव्यांत व रीतिकाव्यांत या नायिकेची भावविह्वलता, चिंता, उत्सुकता, आकांक्षा व आतुरता या मनोवस्थांचे सुंदर चित्रण केलेले आहे. [ हिं. सा. को. ]

**उत्कर** यज्ञमंडपात वेदीच्या उत्तरेला दोन पावलांवर वेदीतील कचरा टाकण्याची जागा असते, तिला उत्कर असे नाव आहे. सामान्यतः दर्भांचे तुकडे, पुरोडाश तयार करताना पडलेला कोंडा, इ. पदार्थ उत्करात टाकतात. उत्कर शब्दापासून मराठीत उकिरडा शब्द आला असावा. पाहा – उकिरडा [श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**उत्कल** अर्वाचीन ओडिसा या प्रदेशाचे प्राचीन नाव. हा देश ऋषिकुल्या नदीपासून सुवर्णरेखा आणि महानदी यांच्यापर्यंत पसरला होता (स्कंद पु. ६.२७). उत्कल देशाची पूर्वसीमा कपिशा नदी व पश्चिमसीमा मेकल लोकांचे राज्य, अशी होती. सुद्युम्नपुत्र उत्कल याचे राज्य प्रथम या प्रदेशावर निर्माण झाले, म्हणून याला उत्कल देश म्हणू लागले. पुराणात उत्कलांचा उल्लेख उड्र, मेकल, कलिंग व आंध्र यांच्याबरोबर केलेला आढळतो. पाहा – ओडिसा.

**उत्कल ब्राह्मण** ओडिसात निवास करणाऱ्या ब्राह्मणांपैकी एक जात. यांचे दोन भेद आहेत – दाक्षिणात्य व जाजपूरी. कटक, पुरी, इ. ठिकाणी दाक्षिणात्यांची वसती आहे. जाजपूर, अंगलेट या भागात राहणारे ते जाजपूरी होत. सामंत, मिश्र, नंद, पती, कर, आचार्य, तत्यापथी, वेदी, सेनापती, पर्णग्राही, इ. त्यांच्या उपाधी आहेत.

त्यांच्यातलाच आणखी एक पोटभेद म्हणजे महापात्र ब्राह्मण हा होय. हे लोक श्राद्धे, प्रायश्चित्ते, इ. कार्यांत पौरोहित्य करतात. उत्कल ब्राह्मणांतील काही लोक पुरी येथे पंडेगिरीही करतात. या पंड्यांची सहा गोत्रे असून, हे शुक्लयजुर्वेदाच्या माध्यंदिन शाखेचे आहेत. [ भा. ब्रा. जा. प्र. ]

**उत्कील कात्य** एक सूक्त द्रष्टा. ऋग्वेदाच्या तिसऱ्या मंडलातील पंधरा व सोळा या दोन सूक्तांचा हा कर्ता आहे. ही दोन्ही सूक्ते अग्निस्तुतिपर आहेत. आर्यांचा जीवनविषयक दृष्टिकोण या सूक्तांमधून उत्तमप्रकारे प्रतिबिंबित झाला आहे. उत्कील म्हणतो (३.१५.७)–

इळामग्ने पुरुदंसं सनिं गोः शश्वत्तमं हवमानाय साध ।
स्यान्नः सूनुस्तनयो विजावा ऽग्ने सा ते सुमतिर्भूत्वस्मे ।।

अर्थ – हे अग्ने, तुझ्या भक्तांना तू चिरस्थायी, सुपीक, आणि गोसंवर्धक भूमी, तसेच वंशकर संतती प्रदान कर. तुझी चिरंतन कृपा आम्हास प्राप्त होऊ दे.

उत्कीलाने एका मंत्रात (३.१५.४) अग्नीला प्रथम यज्ञांचा नेता बनण्याचे आवाहन केलेले आहे. सायणाचार्यांच्या मते हा 'ज्योतिष्टोम' नावाच्या यज्ञाचा उल्लेख असावा. अन्य यज्ञ त्या यज्ञाच्या विकृती मानल्या जातात. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ. ]

**उत्क्रांतिधेनुदान** सर्व पापांचा क्षय होऊन प्राणांचे उत्क्रमण सुखाने व्हावे, म्हणून धेनूचे दान देतात. आसन्नमरण पुरुष हे दान देतो अथवा त्याच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र ते देतो. एका दुभत्या गायीची शिंगे व खूर सोन्यारुप्याने मढवून, तिच्या अंगावर दोन वस्त्रे घालून, तिची व ब्राह्मणाची पूजा करतात.

अमुत्क्रान्तौ प्रवृत्तस्य सुखोत्क्रमणसिद्धये ।
तुभ्यमेनां संप्रददे धेनुमुत्क्रान्तिसंज्ञिकाम् ।।

या मंत्राने ती ब्राह्मणाला दान देतात. गायीच्या अभावी तत्प्रतिनिधिभूत गोमूल्य देतात. या धेनुदानाला मोक्षधेनुदान असेही म्हणतात. [ दा. चं.; ध. सिं. तृ. प. ]

**उत्खनित संस्कृती** भूगर्भाचे उत्खनन करून सापडलेल्या विविध पुराण वस्तूंवरून कल्पिलेली संस्कृतीची रूपरेखा. भारतातील प्राचीन आधिभौतिक संस्कृतीच्या ज्या विविध अवस्था आतापर्यंत ज्ञात झाल्या आहेत. त्या केवळ उत्खननांमुळे झाल्या नसून, उत्खननपूर्व जे प्राथमिक संशोधन करावे लागते, त्यामुळे प्राचीन संस्कृतीची केंद्रे ज्ञात झाली. विशेषतः अश्मयुगीन संस्कृतीचा शोध घेण्याकरिता उत्खनन फारसे करावे लागत नाही. निरनिराळ्या नद्यांच्या काठांच्या छेदांची सूक्ष्म आणि शास्त्रीय पाहणी अश्मयुगीन संस्कृतींची ओळख करून घेण्याकरिता मूलभूत उपयोगाची ठरते. भारतात अशा संशोधनामुळे आणि उत्खननामुळे जी अनेक संस्कृतींची ओळख झाली ती मूलतः गेल्या पन्नास वर्षांत या क्षेत्रात केल्या गेलेल्या कार्यामुळेच होय.

पन्नास वर्षांपूर्वीच्या कालखंडात भारतात जे संशोधन आणि जी उत्खनने झाली, त्यामध्ये सुसूत्रता, शास्त्रीयदृष्टी आणि साधने यांचा बराचसा अभाव होता. या कालातील पुराणवस्तुसंशोधनाचे कार्य बहुतांशी बौद्धकालीन पुरातन नगरींचा ठाव घेणे आणि या प्रयत्नात हाती आलेल्या विविध पुरातन अवशेषांचा संग्रहालयांचे उद्दिष्ट डोळ्यांसमोर ठेवून साठा करणे, एवढ्यापुरतेच मर्यादित होते. यात या प्राचीन अवशेषांच्या कलात्मकतेबद्दलचा कौतुकाचाच भाग अधिक होता. अशा विविध अवशेषांचे गट पाडून त्यांचा तौलनिक अभ्यास करून त्यावरून प्राचीन संस्कृतीच्या टप्प्यांचा मागोवा घेण्याची दृष्टी नव्हती. यामुळेच ब्रूस फूट यांना जरी इ. स. १८६२ साली

मद्रासजवळ प्राचीन अश्मयुगीन मानवाचे दगडी हत्यार सापडले, तरी त्या संस्कृतीची अखिल भारतीय व्याप्ती पटविण्यास जवळजवळ शंभर वर्षे लागली. या शतकाच्या प्रथम पादात उजेडात आलेल्या सिंधुसंस्कृतीची व्याप्ती केवळ सिंध-पंजाबापुरती मर्यादित राहिलेली नसून, ती सौराष्ट्र–गुजरात–राजस्थान या प्रदेशांतही दृढमूल झालेली होती, हे कळायला मार्शल आणि वत्स यांनी केलेल्या उत्खननानंतर एक पंचविशी उलटावी लागली.

भारतातील उत्खनित संस्कृतींचा आढावा विभागशः घेणे इष्ट ठरते. अश्मयुगातील प्राथमिक संस्कृतीपासून मध्ययुगीन संस्कृतीपर्यंतच्या निरनिराळ्या अवस्थांचा अवशेषरूपी पुरावा भारतात फार मोठ्या प्रमाणात हाती आलेला आहे; आणि या निरनिराळ्या अवस्थांचे अश्मयुग, ताम्रयुग, लोहयुग असे विभाग पाडता येतात.

अश्मयुगातही प्राचीन अश्मयुग, मध्य अश्मयुग आणि नव अश्मयुग असे तीन उपविभाग पाडता येतात. यांपैकी प्राचीन अश्मयुगाचे प्राचीनतम, प्राचीनतर आणि प्राचीन असे तीन भेद करता येतात. भारतातील आतापर्यंतच्या संशोधन-उत्खननात या बहुतेक सर्व अवस्थांचे दर्शन झालेले असल्याने ढोबळपणे सुसंगतरीत्या मानवी संस्कृतीच्या वाटचालीचे दिग्दर्शन करता येण्याजोगी परिस्थिती निर्माण झाली आहे.

**अश्मयुगीन संशोधन** – ताम्रयुगीन संस्कृतीच्या विविध अवस्थांचा प्रत्यय केवळ गेल्या पन्नास वर्षांच्या संशोधनाने आणून दिला आहे. त्याआधीच्या कालात अश्मयुगीन संस्कृतीचे दर्शन अत्यंत त्रुटित स्वरूपात आणि प्रादेशिक दृष्ट्या असंबद्धरीत्या झालेले होते. तमिळनाडू, उत्तर गुजरात, मराठवाड्यातील पैठण, नर्मदाकाठी भुत्रा आणि पंजाब-काश्मीर प्रदेश या ठिकाणी रॉबर्ट ब्रूस फूट, वायने, हॅकेट, टॉड, वाडिया, डिटेरा आणि पॅटरसन यांच्या संशोधनाला यश येऊन प्राचीनतम अश्मयुगातील मानवी हत्यारे तुरळक प्रमाणात सापडली. अर्थात डिटेरा आणि पॅटरसन यांचे शास्त्रीय प्रयत्न सोडल्यास बाकीच्यांचे संशोधन योजनाबद्ध नसल्याने इ. स. १९४० पर्यंतच्या कालखंडातील सर्व काम त्रुटित स्वरूपात राहिले.

गेल्या चाळीस वर्षांत मात्र प्राचीन अश्मयुगाबद्दलच्या संशोधनाने क्रांतिकारक काम केले आहे. या कालातील दगडांची बनविलेली अनेक प्रकारची हत्यारे संशोधकांनी शोधून काढली. आणि त्यावरून आंध्र, कर्नाटक, महाराष्ट्र, मध्यप्रदेश, राजस्थान, ओडिसा, पूर्व पंजाब या विस्तृत भूभागावर प्राचीनतम अश्मयुगीन मानवाचे वास्तव्य होते, असे निश्चितपणे म्हणण्यासारखा पुरावा आता उपलब्ध झाला आहे.

**प्राचीनतम अश्मयुग** – या प्राचीनतम अश्मयुगीन संस्कृतीचे तीन प्रमुख विभाग दगडी हत्यारांच्या बनावटीच्या तंत्रावरून पाडण्यात आलेले आहेत. सोहनपूर्व संस्कृती, सोहन संस्कृती आणि हातकुऱ्हाड वापरणाऱ्यांची संस्कृती अशी त्यांची नावे आहेत. सोहन् (संस्कृत– शोभना) ही पश्चिम पंजाबातील एक नदी असून, ती रावळपिंडीजवळून वाहते. तिच्या खोऱ्यात जे संशोधन झाले आणि त्यावरून अश्मयुगीन हत्यारांचे जे विभाग पाडता आले, त्यामुळे या संस्कृतींना सोहनच्या अनुषंगाने नावे दिली गेली आहेत.

**सोहनपूर्व संस्कृती** – दगडी हत्यारांबद्दल फारशी माहिती मिळत नाही. हत्यारांची दुर्मिळता या गोष्टीला कारणीभूत आहे. मात्र या हत्यारांबाबत एवढे सांगता येते, की ही सोहन खोऱ्यांतील सर्वांत खालच्या दगडगोट्यांच्या थरात सापडल्याने आणि या खोऱ्याचा भूगर्भशास्त्रदृष्ट्या अभ्यास केला गेला असल्याने ती भारतात अत्यंत प्राचीन समजली जातात. यांचे स्वरूप सर्वसाधारणपणे अत्यंत ओबडधोबड असल्याने त्यांना हत्यारे समजणेही अवघड वाटते. ही आकाराने मोठी असून, त्यांत सोहन संस्कृतीच्या अथवा त्यानंतरच्या कालातील दगडी हत्यारांत आढळणारा नीटनेटकेपणा आणि तंत्रप्रयोजनाची जाणीव दिसून येत नाही. ही हत्यारे मोठ्या छिलक्यांपासून बनवलेली असल्यामुळे या संस्कृतीला छिलका संस्कृती असेही म्हणतात.

**सोहन संस्कृती** – या संस्कृतीची दगडी हत्यारे मात्र बनावटीच्या तंत्रज्ञानाची जास्त प्रगल्भता दाखवितात. असे असूनदेखील हातकुऱ्हाडीच्या बनावटीत जो तंत्रप्रकर्ष दिसतो, त्याचा सोहन संस्कृतीच्या हत्यारांत अभाव जाणवतो. सोहन संस्कृतीची ही दगडी हत्यारे एका विशिष्ट तंत्राने बनविलेली आढळतात. मोठमोठे दगडी गोटे एकमेकांवर आपटल्यास त्याचे दोन तुकडे होतात. अशा अर्धच्छिन्न गोट्याचा तुकडा घेऊन, तुटलेल्या बाजूवर खालून आणखी ठोके देऊन छिलके काढल्याने तुटलेल्या बाजूचे धारदार कडेत रूपांतर होते. या दगडी गोट्यांचा बराच मोठा भाग अविच्छिन्न नैसर्गिक स्वरूपात कायम राहतो. फक्त एक बाजू तोडण्याच्या अथवा छिलण्याच्या कामी उपयोगात येईल, अशी बनविली जाते.

**सोहन संस्कृतीची व्याप्ती** – सोहन संस्कृतीची हत्यारे फक्त पंजाब-काश्मीर विभागातच सापडल्याने व तद्विषयक अपुऱ्या संशोधनामुळे सोहन संस्कृतीचा मानव केवळ याच विभागात ठाण देऊन बसला होता, असा संशोधकांचा समज झाला होता. तसेच तो सांस्कृतिक आणि वांशिक दृष्ट्याही 'हातकुऱ्हाड' बनविणाऱ्या मानवापेक्षा भिन्न होता, असे मानले जात होते. परंतु गेल्या पन्नास वर्षांतील संशोधनामुळे या मताचा फोलपणा

सिद्ध झाला आहे. सोहन संस्कृतीतल्यासारखी दगडी हत्यारे आता गुजरात, बिहार, ओडिसा, महाराष्ट्र, मद्रास आणि मध्यप्रदेश या विस्तृत भूभागावर सापडली असल्याने सोहन संस्कृतीचा मानव सौराष्ट्र, पश्चिम राजस्थान, गंगा-यमुना दुआब, केरळ, आसाम आणि सिंध हे प्रदेश सोडून इतर सर्व प्रदेशांत हिंडत होता, असे म्हणता येते. याही विभागात योजनापूर्वक संशोधन झाल्यास सोहन संस्कृतीच्या निशाण्या मिळण्याची शक्यता आहे.

**'हातकुऱ्हाड' संस्कृती**—सोहन संस्कृतीच्या हत्यारांच्या बाबतीत जसे संकुचित समज होते, तसेच हातकुऱ्हाडी वापरणाऱ्यांच्या बाबतीतही होते. हा मानव केवळ तमिळनाडू आणि उत्तर गुजरात एवढ्याच भूभागावर वास्तव्य करून असावा, असे त्या प्रदेशांत सापडलेल्या हत्यारांवरून सांगितले जाई. परंतु अलिकडील संशोधनाने हातकुऱ्हाडी आणि संलग्न हत्यारे सापडण्याच्या भूभागाची व्याप्ती मोठ्या प्रमाणावर ज्ञात झाली असल्याने सोहन संस्कृतीप्रमाणेच ही संस्कृतीही व्यापक होती किंबहुना सोहन संस्कृतीची आणि तिची व्याप्ती प्रादेशिकदृष्टचा तत्सम होती, असे दिसून आले आहे.

हातकुऱ्हाडीशी संलग्न असलेल्या संस्कृतीची मानवी हत्यारे विविध, उत्कृष्ट बनावटीची आणि तांत्रिक प्रगतीची निदर्शक वाटतात. तोडण्याकरिता बदामाच्या आकाराच्या; पण मापाने मोठ्या व हातात धरून वापरता येण्यासारख्या कुऱ्हाडी, फरशीसारखी धारदार कड असलेली हत्यारे, छिलण्याकरिता उपयोगी पडतील अशी हत्यारे आणि छिद्रे पाडण्याकरिता उपयोगी येतील अशी हत्यारे, हे मुख्यत: या संस्कृतीच्या हत्याराचे मुख्य प्रकार होत. सोहन संस्कृतीत न आढळणारी, छिलके उत्कृष्टपणे व नियोजनपूर्वक काढून हत्यारे बनविण्याची कला, या कालात आढळून येते.

**मानवी जीवन**—सोहन संस्कृती आणि हातकुऱ्हाडी वापरणाऱ्यांची संस्कृती यातील मानवी जीवनाची कथा मात्र अद्याप अज्ञात आहे. या दोन्ही संस्कृतींच्या हत्यारांची भारतीय व्याप्ती डोळ्यात भरण्यासारखी असूनही या संस्कृतींचा जनक मात्र अजून संशोधकांना अज्ञात आहे. या संस्कृतीच्या मानवाचे अवशेष अद्याप हाती न आल्याने त्याच्या वंशसंबंधाचा अथवा त्याच्या मेंदूच्या बौद्धिक प्रगतीचा अंदाज करणे शक्य झालेले नाही. मात्र त्याच्या कालातील नैसर्गिक परिस्थितीचा मागोवा घेतल्यास, नद्यांकाठच्या प्रदेशाचा व ज्या थरात ही हत्यारे सापडली त्या थराचा भूगर्भशास्त्राच्या दृष्टीने अभ्यास केल्यास, त्या कालात पावसाचे प्रमाण आजच्यापेक्षा खूपच अधिक होते, असे सांगता येते. ही हत्यारे दगडगोट्यांच्या थरात सापडल्याने, पर्जन्यविपुलतेमुळे नदीच्या पाण्याचा जोर मोठा होता आणि त्यामुळे हे दगडगोटे आणि त्याबरोबरच ही हत्यारे वाहून नेण्याचे सामर्थ्य नदीच्या पाणलोटात होते, हे स्पष्ट होते. तेव्हा प्राचीनतम अश्मयुगातील हा मानव घनदाट जंगलात राहत असावा, असे अनुमान करता येते. त्याच्या हत्याराच्या आकारावरून व बोजडपणावरून त्याच्या प्राथमिक गरजांचे स्वरूपही प्रतीत होते. तो गुहेत राहत असावा आणि रानटी हत्ती, बैल, इ. स्थूल जनावरांना हाका घालून व कोंडीत पकडून दरडीवरून खाली उडी घ्यायला भाग पाडीत असावा. बाणाची टोके म्हणून वापरता येणारी हत्यारे अथवा पळणाऱ्या जनावराला फेकून मारता येतील अशा तऱ्हेची भाल्याची टोके असलेली हत्यारे त्याला निकडीची भासत नसत. कारण त्या काळची जनावरेच बोजड आणि मंद गतीची असल्याने दरडीखाली कोसळून ती गतप्राण झाल्यावर सावकाश हातकुऱ्हाडीने अथवा फरशीसारख्या दगडी हत्याराने त्या प्राण्यांच्या मृत शरीराची तोड करण्यास त्याला भरपूर वेळ होता. मानवी जीवनाच्या अत्यंत प्राथमिक गरजांपलिकडे त्याची दृष्टी नव्हती. त्यामुळे जनावरांच्या कळपांमागे अन्नशोधार्थ भटकत तोही भटके आयुष्य घालवीत असे.

**प्राचीनतर अश्मयुग**—अश्मयुगीन संस्कृतींच्या विविधतेचा प्रत्यय अलिकडील संशोधनाने विलक्षणरीत्या आलेला आहे. प्राचीनतम अश्मयुगातील सोहन संस्कृती आणि हातकुऱ्हाडी वापरणाऱ्यांची संस्कृती या पेक्षा वेगळ्या अशा प्राचीनतर अश्मयुगातील हत्यारांचा शोध गोदावरीकाठी मुंगीपैठणला वायने यांना इ.स.१८६३ सालीच लागला होता. परंतु या शोधाचे नावीन्य अथवा तिचे अनन्यसाधारणत्व पटायला जवळजवळ ऐंशी-पंचाऐंशी वर्षांचा कालावधी जावा लागला. त्या वेळी फक्त सोहन आणि हातकुऱ्हाड या संस्कृतींची हत्यारेच जास्त परिचयाची असल्याने वायने यांना सापडलेल्या अकीक दगडाच्या हत्यारांचे महत्त्व दुर्लक्षिले गेले.

प्राचीनतर अश्मयुगीन संस्कृतीच्या हत्यारांच्या बाबतीत गेल्या २५—३० वर्षांत मात्र भरभक्कम पुरावा हाती आला आहे. आता त्यांच्या शोधालाही शास्त्रीय दृष्टी मिळाल्याने या संस्कृतीच्या निराळेपणाबद्दल आणि खरेपणाबद्दल शंका राहिली नाही. भारतात आज अनेक नद्यांच्या काठांच्या छेदांत सर्वांत खाली जो दगडगोट्यांचा थर सापडतो व ज्यात ट्रॅप, क्वार्ट्झ, क्वार्ट्झाईट, इ. दगडांची, हातकुऱ्हाडी, फरशी, इ. प्राचीनतम अश्मयुगाची प्रातिनिधिक हत्यारे सापडतात, त्या थराच्या वर दुसरा एक पिवळ्या मातीचा थर दिसतो. या थरावर जाडसर वाळूचा थर दृष्टोत्पत्तीस येतो आणि याच थरात ही प्राचीनतर अश्मयुगातील हत्यारे आतापर्यंत सापडत आलेली आहेत. यावरून प्राचीनतम अश्मयुगानंतर कमी पर्जन्याचा अथवा

कोरडा कालखंड येऊन गेला आणि त्यानंतर पुन्हा एकवार जास्त पर्जन्याचा अथवा ओला कालखंड आला, असे कळते. आणि याच दुसऱ्या ओल्या कालखंडात या दुसऱ्या अथवा जातीत प्रतीत होते आणि यावरून ही संस्कृती प्राचीनतम हत्यारांशी तुलना करता वेगळी आणि वैशिष्ट्यपूर्ण वाटे. लहान आकारावरून ही प्राचीन अश्मयुगाची निर्देशक न




१, २, ३–सोहनसंस्कृतीतील हत्यारे, ४–फरशी, ५–तासणी, ६–हातकुऱ्हाड, ७–प्राचीनतर अश्मयुगीन हत्यारे, ८–मध्याश्मयुगीन हत्यारे व ९–नवाश्मयुगीन हत्यारे.

प्राचीनतर अश्मयुगाची संस्कृती उदयास आली.

या अश्मयुगाचे वैशिष्ट्य हत्यारांच्या लहान आकारात, त्यांच्या प्रकारात आणि त्याकरिता वापरलेल्या दगडांच्या मानता, ज्या नंतरच्या कालखंडात गारगोटीच्या छिलक्यांची लहान लहान हत्यारे वापरात आली, त्या लघु अश्मयुगाची प्रातिनिधिक मानण्याकडे सुरवातीस कल दिसून आला. परंतु

आता प्राचीनतर अश्मयुग आणि लघुअश्मयुग या दोन्ही संस्कृती वेगवेगळ्या व एकमेकांपासून कालखंडाच्या दृष्टीनेही भिन्न अशा आहेत, असे सिद्ध झालेले आहे.

**व्याप्ती व वैशिष्टये** – या प्राचीनतर अश्मयुगीन संस्कृतीची दृढ ओळख पहिल्या प्रथम महाराष्ट्रात प्रवरा–गोदावरीच्या परिसरात झाली. त्यानंतर भारतात महाराष्ट्राशिवाय आंध्र, कर्नाटक, मध्य प्रदेश, उत्तर प्रदेश, राजस्थान आणि ओडिसा एवढ्या विस्तृत प्रदेशांतही तिच्या निशाण्या मिळाल्या आहेत. या प्रदेशांत हाती आलेली हत्यारे बहुधा उत्कृष्ट पोत्याच्या दगडाची – उदाहरणार्थ, अकीक, जास्पर – बनविलेली आढळतात. आकाराने लहान असलेल्या या हत्यारांत विविध प्रकार आहेत. छिद्रे पाडण्यास वापरता यावी या हेतूने बनविलेली टोकदार हत्यारे, छिलण्यास उपयोगी पडावी अशी हत्यारे आणि बाणाच्या टोकाप्रमाणे काम देतील अशी हत्यारे, हे तीन प्रकार बहुतांशी या संस्कृतीच्या हत्यारांत आढळतात.

प्राचीनतम अश्मयुगीन संस्कृतीच्या मानवाप्रमाणेच प्राचीनतर अश्मयुगीन मानव अद्याप अज्ञात राहिलेला आहे. मात्र त्याच्या हत्यारांची बनावट, त्याच्या सभोवतालच्या परिस्थितीच्या बदलाची कल्पना देतें. बाणाच्या टोकासारखी वापरास योग्य हत्यारे त्या मानवाने वापरलेल्या धनुष्याची अथवा भाल्याची कल्पना सूचित करतात. भोके पाडण्याकरिता उपयोगी पडणारी टोकदार हत्यारे तो कदाचित जनावरांच्या कातड्यास छिद्रे पाडण्यास उपयोजीत असावा, तर छिलण्याची हत्यारे कातडी कमावण्यास अथवा मांस छिलून काढण्यास वापरली जात असावी. भाला अथवा बाण त्या काळच्या जलद धावणाऱ्या प्राण्यांचे अस्तित्व सूचित करतात आणि ज्या थरात ही हत्यारे सापडतात, त्या थरात मोठमोठे दगडगोटे नसून जाड वाळू असल्याने या कालात पर्जन्यमान प्राचीन-अश्मयुगापेक्षा कमी झाले असावे, असे अनुमान करता येते.

**प्राचीन अश्मयुग** – प्राचीन अश्मयुगाच्या या शेवटच्या अवस्थेचा विस्तृत पुरावा मात्र भारतात अद्याप मोठ्या प्रमाणावर उपलब्ध झालेला नाही. युरोपात या कालातील संस्कृतीची वैशिष्ट्ये म्हणजे दगडाचे अथवा गारगोटीचे काढलेले लांब धारदार छिलके आणि उभा काटकोनात टोला दिल्याने निघालेल्या छिलक्यामुळे टोकदार नोक असलेली गारगोटीची हत्यारे ही होत. या कालात हवामानातही बदल झाल्याचा पुरावा तिकडे मिळतो.

मुंबईजवळ खांदिवली येथे आणि आंध्रात कर्नूलजवळ अशा तऱ्हेच्या प्राचीन अश्मयुगातील हत्यारांशी संलग्न वाटणारी हत्यारे सापडलेली आहेत. मात्र याबद्दल दुमत असल्याने प्राचीन अश्मयुगीन संस्कृतीचे भारतीय स्वरूप अद्याप अज्ञातच राहिले आहे.

**प्राचीन अश्मयुगीन संस्कृतीचा आढावा** – प्राचीन अश्मयुगीन संस्कृतीच्या तीनही अवस्थांत मानवाभोवतालची परिस्थिती जरी बदलती असली आणि तिचा प्रभाव जरी मानवाच्या हत्यारांच्या बनावटीच्या तंत्रावर झाल्याचे दिसत असले, तरी या सर्व अवस्थांत मानव भटक्याच राहिला. अन्न आणि आसरा या मूलभूत गरजांपलिकडे त्याची निकड गेली नाही. हवामानात प्रचंड उलथापालथी झाल्या आणि ओले आणि कोरडे कालखंड येऊन गेले, तरी अश्मयुगीन संस्कृतीच्या व्याप्तींत मात्र फरक पडल्याचे दिसत नाही.

प्राचीन अश्मयुगीन संस्कृतीच्या कालखंडाची निश्चिती करणे हे कठिण काम आहे. मात्र पंचवीस वर्षांपूर्वी प्राचीनतर अश्मयुगीन संस्कृतीची रंगीबेरंगी दगडांची लहान आकाराची हत्यारे ज्या जाड वाळूच्या थरात सापडली, त्याच थरात गोदेच्या काठी अश्मीभूत झालेला एक बैलाचा जबडा सापडला. या रानटी बैलाची जात आता अस्तित्वात नाही आणि त्याचा कालखंड दीड लाख वर्षांपूर्वीचा असावा, असे प्राणिशास्त्रज्ञांचे मत पडल्याने प्राचीनतर अश्मयुगाचा कालही तोच असावा आणि या आधीचे प्राचीनतम अश्मयुग दीड लक्ष वर्षांपूर्वी बरेच प्राचीन असावे, असे म्हणायला हरकत नाही.

या तीनही अश्मयुगांतील मानवांचा वंश कोणता, तो एकच होता का भिन्न, त्यांच्या हत्यारांची तंत्राच्या दृष्टीने संलग्न उत्क्रांती होती किंवा कसे आणि त्यांचा एकमेकांशी कितपत संपर्क आला, याचे उत्तर सध्या हाती असलेल्या पुराव्यावरून देणे शक्य होत नाही.

**मध्याश्मयुग** – प्राचीन अश्मयुग आणि सर्वांत शेवटचे नवअश्मयुग यांमधील कालखंडात जी संस्कृती विकसित झाली, तिला इंग्रजीमध्ये ‘ मेसोलिथिक ’ असे नामाभिधान दिले गेले आहे. या संस्कृतीचे वैशिष्टय हे, की या कालात मानवाचा भटकेपणा आणि रानटीपणा कमी झालेला दिसून येतो. गारगोटीच्या छिलक्यापासून लहान लहान भौमितिक आकाराची हत्यारे बनविण्याकडे त्याची प्रवृत्ती झाल्याने या कालखंडास ‘ लघुअश्मयुग ’ असे सार्थ नाव देण्यास हरकत नसावी. बारीक छिलक्यांचे पुन्हा बारीक बारीक छिलके काढून त्रिकोण, चंद्रकोर, असमांतरभुज चौकोन (trapezium) अशा प्रकारची हत्यारे बनवून ती ओळीने लाकडाच्या अथवा हाडांच्या तुकड्यात खोबणीत बसवून या कालातला मानव हत्यारांचा करवतीसारखा अथवा विळ्यासारखा उपयोग करीत असे. अशा तऱ्हेचे गारगोटीच्या पात्याचे विळे पॅलेस्टाईनमध्ये संशोधकांना

सापडले आहेत. परंतु भारतात मात्र केवळ असे शेकडो छिलकेच फक्त सापडले आहेत, त्यामुळे या कालातील संस्कृतीचा पुरावा अद्याप विस्तृतरीत्या हाती न आल्याने, या कालांतील मानवी जीवनाचे संपूर्ण चित्र भारतापुरते तरी उभे करता येत नाही.

लघुअश्मयुगीन कालांतील मानवी जीवनाचे त्रुटित चित्र मात्र गुजरातमधील लांघणज येथील उत्खननामुळे काही अंशी पाहायला मिळते. याशिवाय मद्रासमधील तिनेवेल्ली, पश्चिम बंगालमधील विरभानपूर आणि कर्नाटकप्रदेश या विभागातही अशाच तऱ्हेची हत्यारे सापडल्याने याही प्रदेशावर लघु-अश्मयुगीन संस्कृतीचे अधिराज्य होते, असे तात्पुरते म्हणायला प्रत्यवाय नसावा.

**मानवी जीवन** – लांघणज येथील उत्खननात जो पुरावा हाती आला, त्यावरून असे म्हणता येते, की या कालातील मानवी वस्ती मोठमोठ्या तळ्यांजवळ जरा उंचवटयावर असे. अर्थात या वस्तीतील घरकुलांचे स्वरूप कसे होते, याबद्दल काहीही सांगता येत नाही. मात्र हे रहिवासी शिकार आणि मच्छीमारी यांवर आपली उपजीविका करीत असत, हे अशा वस्त्यांशी संलग्न असलेल्या थरांत सापडलेल्या हरिण, नीलगाय, गाय-बैलांसारखी जनावरे, डुकरे, कासवे आणि मासे यांच्या हाडांवरून कळून येते. यांतील डुकरांसारखी जनावरे मुद्दाम पाळून ती खाण्याकरिता मारली जात असावी. धान्याच्या अभावामुळे व सापडलेल्या पाट्यांच्या अत्यंत लहान आकारांवरून हे लोक शाकाहारी नसावे, हे अगदी उघड आहे. जनावरांचे मांसही भाजून खात किंवा कसे हेही चुलीच्या अथवा इतर अग्निसंलग्न कार्यांच्या पुराव्यांच्या अभावी सांगणे कठीण आहे. तसेच हे लोक मातीची गाडगी-मडकी किती प्रमाणावर वापरीत असत, हेही निश्चितपणे सांगता येत नाही. खुद्द लांघणजला अत्यंत छोटया-छोटया खापरांचे तुकडे अत्यंत माफक प्रमाणावर सापडले आहेत. परंतु त्यावरून लघुअश्मयुगातील मातीच्या मडक्यांची कल्पना पूर्णपणे येत नाही.

मात्र या युगातील मानवी बांध्याची कल्पना लांघणज येथेच सापडलेल्या मानवी सांगाडयावरून करता येते. हे स्त्रीपुरुषांचे सांगाडे गुडघे मुडपून एका अंगावर निजविलेल्या अवस्थेत उघडकीस आलेले आहेत. या मृतांना बहुधा उत्तर-दक्षिण म्हणजे उत्तरेकडे डोके आणि दक्षिणेकडे पाय अशा अवस्थेत ठेवीत असत. दक्षिणेकडे पाय करून जिवंतपणी निजू नये, अशी आजही समजूत आहे ! मृताच्या अंगावरील डॅंटीलियमच्या मण्यांवरून या लोकांचा सागरी विभागाशी संपर्क आला असावा असे अनुमान करता येते आणि सांगाडयांच्या अभ्यासावरून हे लोक उंच, लांब डोक्याचे आणि खालचा ओठ थोडासा पुढे आलेले अशा ठेवणीचे होते हे कळते. वांशिक दृष्टया इजिप्तमधील हॅमिटिक लोकांशी त्यांचे साम्य दिसते, असे डॉ. सांकळिया यांचे मत आहे.

या कालातील मानवी वस्तीचे स्वरूप जास्त स्थिर झाल्यासारखे दिसते हे खरे; पण या मानवांचा इतर समकालीन मानवांशी वांशिक संबंध कोणता, तसेच ही संस्कृती भारतात उत्क्रांत झाली किंवा कसे आणि तिची परिणती अथवा विनाश कशा प्रकारे झाला, हे अद्यापही कूट प्रश्नच आहेत. परंतु या काली सध्यापेक्षा पर्जन्यमान जास्त असून त्यामुळे भोवताली दाट गवताची वाढ झालेली असली पाहिजे.

**नवाश्मयुग** – अश्मयुगातील उत्क्रान्तीची सर्वांत शेवटची अवस्था नवाश्मयुगात पाहायला मिळते. लघुअश्मयुगात दिसणारी मानवी जीवनाची स्थिरता या संस्कृतीत जास्त दृढ झाल्याचे प्रत्ययास येते. या आधीच्या कालात मानवाला मांसादी अन्नाकरिता जनावरांच्या कळपामागे भटकावे लागे; पण या कालात मानवाने शेती करण्याची कला हस्तगत केल्याने त्याला आपल्या अन्नावर ताबा मिळविता येऊन एके ठिकाणी स्थिर वस्ती करून राहता येऊ लागले. अन्न रांधण्याकरिता त्याने अग्नीचा उपयोग केला आणि साठवणीकरिता म्हणून मातीची मडकी चाकावर घडविण्याची कला आत्मसात केली. चाकाच्या तंत्राचा शोध, ही एक क्रांतिकारक घटना होती, यात शंका नाही.

नवाश्मयुगीन संस्कृतीच्या व्याप्तीवरही अलिकडील संशोधनाने आणि उत्खननांनी बराच प्रकाश पाडला आहे. काही वर्षांपूर्वी आंध्रप्रदेशातल्या बेल्लारी येतील उत्खननात नवाश्मयुगातल्या घोटून घोटून गुळगुळीत केलेल्या दगडी कुऱ्हाडी, छिन्न्या आणि रापी, राखी रंगाच्या मातीच्या मडक्यांबरोबर सापडल्या होत्या. असाच पुरावा नागार्जुनकोंडा येथील उत्खननातही मिळाला. आणखी संशोधन केल्याअंती आंध्र-कर्नाटकांत आणि महाराष्ट्रातील विस्तृत क्षेत्रांत या संस्कृतीचे धागेदोरे उघडकीस आले. याचबरोबर आसाम-ओडिसा या विभागांतही अशा तऱ्हेच्या गुळगुळीत व धारदार केलेल्या दगडी कुऱ्हाडी मिळाल्या आहेत. परंतु त्यांचा आकार आंध्र-कर्नाटकांतील कुऱ्हाडींपेक्षा वेगळा आहे. दक्षिणेतील कुऱ्हाडी धारदार बहिर्गोल कड एका बाजूस आणि दुसरे टोक निमुळते टोकदार, अशा स्वरूपाच्या आहेत. या उलट पूर्व भारतातील या हत्यारांचे फाळ चौकोनी असून ते लाकडांत अडकविण्यास सोपे जावे म्हणून त्यांना वर एक दांडाही बनविलेला आढळतो.

या दोन प्रकारच्या हत्यारांचा वापर करणारे मानव भिन्न वंशाचे असावे, असे दिसते. कारण टोकदार शीर्ष असलेल्या

कुऱ्हाडी प्रामुख्याने दक्षिण भारत आणि अलिकडे काश्मीरमध्ये बूर्झाहोम या ठिकाणीच सापडतात, तर या उलट दांडायुक्त कुऱ्हाडी फक्त पूर्व भारतातच आढळतात. या लोकांचा एकमेकांशी कितपत संपर्क आला, हे पूर्णपणे सांगता येत नाही. पण टोकदार शीर्ष नसलेल्या कुऱ्हाडी वापरणारे लोक भारतात आग्नेय आशियातून आले असावे, असे डॉ. दानी वगैरे विद्वानांचे मत आहे. दक्षिणेतील आणि काश्मीरमधील टोकदार शीर्षाच्या कुऱ्हाडी वापरणारे लोक काहींच्या मते पश्चिम आशियातून भारतात आलेले असावे, याबाबत निश्चितपणे मत देता येत नाही, एवढे खरे. श्री. सांकळिया सुचवितात त्याप्रमाणे भारतातील संबंधित प्रदेशांतील आदिवासींच्या हत्यारांचा आणि त्यांच्या जीवनक्रमाचा सखोल अभ्यास केल्यास कदाचित हे आदिवासीदेखील नवाश्मयुगीन संस्कृतीचे जनक ठरण्याचा संभव आहे.

**नवाश्मयुगीन मानवी जीवन** – नवाश्मयुगीन संस्कृतीतील मानवी जीवनाच्या काही काही वैशिष्ट्यांवर बेल्लारी, ब्रह्मगिरी, पिकळीहाळ, उटनूर आणि बूर्झाहोम येथील उत्खननांनी प्रकाश टाकण्यास मदत केली आहे.

लघुअश्मयुगात मातीच्या खापरांचा पुरावा जितक्या निःसंदिग्ध स्वरूपात मिळायला हवा होता, तितक्या स्वरूपात गुजरातेतील लांघणजला तो मिळाला नाही. नवीन अश्मयुगात मानवाने चाकावर खापरे बनविण्यास मोठ्या प्रमाणावर सुरुवात केली असल्याचा पुरावा वरील सर्व उत्खननांमध्ये मिळाला आहे. काळचा-राखी रंगाची विपुल मडकी या कालात वापरात होती. विशेषत: तोटीची भांडी हे तर त्यांचे वैशिष्ट्यच समजण्यास हरकत नाही. नेवासे आणि बूर्झाहोम येथील उत्खननांत या लोकांची जमिनीत खड्डा करून त्यात राहण्याची पद्धती उजेडात आली. या खड्डयावरच्या लाकडी वाशांवर वांबूचे तट्टे टाकून ते आपले घर झाकीत असत. या लोकांच्या संस्कृतीच्या परंपरेत बसतील अशा चौकोनी आकाराच्या, मातीने वाजू लिंपलेल्या भट्टयाही नेवाश्याला सापडल्या. पिकळीहाळ आणि उटनूरच्या उत्खननात मानवी वस्तीशी संलग्न असलेल्या पाळीव प्राण्यांची हाडे आणि शेणाचे मोठमोठाले साठेही उघडकीस आले. त्यामुळे हे लोक स्थिर वस्तीचे असून ते शेणाचा उपयोग जळणासाठी करीत असावे असे कळून आले. नागार्जुनकोंडा येथे या लोकांची दफनपद्धती आणि मानवी सांगाडेही सापडले आहेत. त्यांचा जास्त अभ्यास झाल्यावर या लोकांच्या वांशिक वैशिष्ट्यांवर जास्त प्रकाश पडेल, यात शंका नाही.

**कालखंड** – नवाश्मयुगीन संस्कृतीचा कालखंड निश्चित करणे पुरेशा उत्खननाभावी शक्य झालेले नाही. परंतु अलिकडे या उत्खननात सापडलेल्या अवशेषांचा कालखंड कर्ब १४, या पद्धतीने निश्चित करण्याचा प्रयत्न चालू आहे. पिकळीहाळ येथील अवशेषांचा काळ या पद्धतीनुसार इ. स. पूर्व २००० असा आला आहे. तर काश्मीरमधील बूर्झाहोम येथील अशा वस्त्यांचा काळ इ. स. पूर्व अठरावे शतक इतका ठरवला गेला आहे. त्यावरून भारतातील नवाश्मयुगीन संस्कृती कमीत कमी आजपासून चार-साडेचार हजार वर्षांइतकी प्राचीन आहे, असे आता सांगता येते. अर्थात या संस्कृतीची सुरुवात केव्हा झाली आणि शेवट कोणत्या परिस्थितीत आणि कसा झाला, हे प्रश्न अद्याप अनिर्णीत अवस्थेतच राहिलेले आहेत. या लोकांचा ताम्रयुगीन संस्कृतीशी महाराष्ट्र-कर्नाटकात मात्र संपर्क आलेला दिसतो. इतरत्र असा पुरावा अद्याप मिळालेला नाही.

**ताम्रयुगीन संस्कृती** – नवाश्मयुगाच्या अखेरीपर्यंतच्या अश्मयुगाच्या सर्व अवस्थांमध्ये कुठल्याही तऱ्हेच्या धातूचा वापर मानवाला माहीत नव्हता. यानंतर आलेल्या ताम्रयुगीन संस्कृतीत मात्र पहिल्याप्रथम मानवाने तांब्याचा आणि ब्राँझचा वापर दगडी हत्यारांवरोबरच सुरू केला. धातूचे विशुद्धीकरण आणि त्यापासून वस्तू बनविण्याची कला, ही मानवी संस्कृतीच्या इतिहासात एक क्रांतिकारक घटना ठरली, यात शंका नाही. आणि त्यामुळेच सिंधुसंस्कृतीसारख्या नागरी संस्कृतींचा विस्तार झाला.

सिंधुसंस्कृतीची उपलब्धी, तिचे स्वरूप, तिचा विस्तार, माळवा, दख्खन, गुजरात-सौराष्ट्र आणि कर्नाटक या प्रदेशांत आढळणाऱ्या या ताम्रयुगीन संस्कृतीची विविध स्वरूपे, त्यांचा विनाश आणि कालखंड यांबद्दल गेल्या काही वर्षांत विलक्षण शोध लागलेले असल्याने ताम्रयुगीन संस्कृतीबद्दलच्या कल्पना आता बऱ्याच अंशी बदलाव्या लागल्या आहेत. विशेषतः सिंधुसंस्कृतीची व्याप्ती आणि दख्खनमधील ताम्र-पाषाणयुगीन संस्कृतीचे अस्तित्व या दोन बाबतींत - आमूलाग्र बदल करावा लागला आहे.

**सिंधुसंस्कृती** – सिंधुसंस्कृतीचा शोध कसा लागला आणि तिची अवशेषरूपी वैशिष्टये कोणती, याचे विवेचन दुसरीकडे केलेलेच आहे (सिंधुसंस्कृती, मोहेंजोदडो, हडप्पा पाहा). या संस्कृतीची वैशिष्टये खापरांची बनावट, आकार आणि रंगीत नक्षीकाम यांची विविधता, तांब्याची हत्यारे, रंगीत दगड आणि फिॲन्स व स्टिअटाईट यांचे मणी व इतर अलंकार अद्याप वाचल्या न गेलेल्या शेकडो मुद्रा, शिस्तबद्ध व योजनापूर्वक बांधण्यात आलेली घरे, स्नानगृहे, धान्याची गुदामे, बहुविध मृण्मय मूर्ती, आणि मुद्रांवरील विविध देवतासदृश आकृत्या, या सर्व बाबी आता सर्वसाधारणपणे परिचित झालेल्या आहेत.

**व्याप्ती** – सिंधुसंस्कृतीच्या व्याप्तीचे क्षेत्र आता केवळ सिंधु

आणि पंजाब एवढ्यापुरतेच मर्यादित राहिले नसून, या संस्कृतीचे अवशेष आता पंजाबात अंबाला, भटिंडा आणि जालंदर हे जिल्हे, गुजरातेत अहमदाबाद जिल्ह्यातले लोथल आणि इतर अनेक स्थळे, सौराष्ट्रात रोजडी, सोमनाथ व इतर कित्येक ठिकाणे आणि उत्तर प्रदेशात मीरतच्या पश्चिमेस सतरा मैलांवर असलेले अलमगीरपूर या ठिकाणी सापडलेले आहेत.

स्वरूप – अर्थात या सर्व ठिकाणी सापडलेल्या सिंधुसंस्कृतीच्या अवशेषांचे स्वरूप एकजिनसी आणि अविकृत नाही. गुजरात-सौराष्ट्र, पंजाब, राजस्थान आणि उत्तरप्रदेश या प्रदेशांत या संस्कृतीचा खुणा जरी सापडल्या तरी, त्यांचा इतर संस्कृतींशी काही काही ठिकाणी संपर्क आल्यासारखा वाटतो. त्यामुळे या सर्वच ठिकाणी सिंधुसंस्कृतीचे निर्भेळ स्वरूप पाहायला मिळते असे नाही.

गुजरात-सौराष्ट्रात सिंधुसंस्कृतीच्या निशाण्या जरी अनेक ठिकाणी मिळाल्या असल्या, तरी यांतील फक्त लोथल, रंगपूर, रोजडी आणि सोमनाथ प्रभासपाटण, या ठिकाणीच उत्खनन बऱ्या प्रमाणावर झालेले आहे.

अहमदाबाद जिल्ह्यातील लोथल या ठिकाणच्या उत्खननात संपूर्णतया सिंधुसंस्कृतीसारखी खापरे, मणी, मुद्रा, घरांची रचना या गोष्टी सापडल्या आहेत. लोथलला सिंधुसंस्कृतीच्या वस्त्यांच्या सर्व थरांत काळीतांबडी खापरे सापडतात.

राजस्थानात ही खापरे वापरणाऱ्यांच्या मोठमोठ्या वस्त्यांचे अवशेष नुकतेच हाती लागले आहेत. त्यांचा कालखंडही इ. स. पूर्व अंदाजे २००० असावा, असे अनुमान झाले आहे. त्यामुळे लोथलला जरी हडप्पा-मोहेंजोदडोची संस्कृती उघडकीस आणली गेली असली, तरी काळ्या-तांबड्या खापरांच्या संलग्नतेमुळे ती निर्भेळ वाटत नाही आणि म्हणूनच काही विद्वान लोथलसंस्कृतीला सिंधुसंस्कृती न म्हणता उपसिंधुसंस्कृती असे म्हणू लागले आहेत.

लोथलचे दुसरे वैशिष्ट्य असे, की तिथे एक मोठी जहाजांची गोदी (dock yard) उघडकीस आली आहे. ७१० फूट × १२० फूट अशा मोजणीच्या या गोदीला पूर्वेकडे २३ फूट रुंदीचे मोकळे दार सोडलेले आहे. त्यातून भरतीच्या वेळी गोदीमध्ये भरपूर पाणी आले म्हणजे मोठमोठी जहाजे लोथलच्या परिसरात येत. भरतीचे जादा पाणी वाहून जावे म्हणून दक्षिणेच्या भिंतींतून हे पाणी काढून लावण्याचीही व्यवस्था केल्याचे आढळले.

अशा तऱ्हेच्या पुराव्यावरून जसा एक निष्कर्ष काढता येतो, त्याचप्रमाणे एक नवा प्रश्नही उभा राहतो. पहिला निष्कर्ष असा, की लोथल समुद्रापासून फार दूर नसावे आणि साबरमती, सध्या वाहते त्यापेक्षा, लोथलच्या जास्त जवळून वाहत असावी. भरतीच्या वेळी जादा पाण्यामुळे जहाजांना जवळ येणे सुलभ होत असावे. दुसरा प्रश्न उभा राहतो तो असा, की गुजरातेत ज्या या सिंधुसंस्कृतीच्या वसाहती झाल्या, त्यांचे जनक सिंध-पंजाबमधून या प्रदेशात कसे आले ? या प्रश्नाच्या सोडवणुकीबद्दल एकमत नाही. सौराष्ट्रात ते सिंध-कच्छ प्रदेशातून समुद्रमार्गे आले असावे, असा एक मतप्रवाह आहे. आणि सौराष्ट्राच्या किनाऱ्याकिनाऱ्यावरच नव्हे, तर आंतपर्यंत सिंधुसंस्कृतीचे अवशेष सापडल्याने या लोकांनी समुद्रमार्गे अनेक गटागटांनी बोटींतून सबंध सौराष्ट्रात वसाहती केल्या असाव्या, असे म्हणण्यास दुजोरा मिळतो. दुसरा मतप्रवाह याहून भिन्न आहे. राजस्थानच्या भूभागाची जी रासायनिक तपासणी केली गेली आहे, त्यावरून त्यामध्ये सागरी सैंधवाचे प्रमाण बरेच सापडल्याने राजस्थान पूर्वी मोठा सागर होता, असे वाटते. हे खरे असल्यास सौराष्ट्र-गुजरातेत सिंधुसंस्कृतीच्या लोकांनी राजस्थानच्या सागरातून नालसरोवराच्या मार्गे प्रवेश केला असण्याची शक्यता दृष्टीआड करून चालणार नाही.

लोथलचे आणखीही एक वैशिष्ट्य आहे. तिथे गावाबाहेर मानवांच्या दफनाची जागा सापडली आहे. आतापर्यंत तिथे जवळजवळ पंधरापेक्षा जास्त मानवी सांगाडे सापडले आहेत. हे बहुधा उत्तरेकडे डोके आणि दक्षिणेकडे पाय करून खड्ड्यांत ठेवलेले आहेत. यांतील एकात एक पुरुष आणि एक स्त्री असे दोन सांगाडे आढळल्याने लोथलला सतीची चाल होती, असे म्हणतात. परंतु सतीची कल्पना आणि पद्धती (जाळून घ्यायची) वेगळी असल्याने या मताशी सहमत होणे कठिण आहे. या सर्व सांगाड्यांचा मानववंशशास्त्रज्ञांनी अभ्यास केल्यास या लोकांचा सिंधुसंस्कृतीच्या लोकांशी वंशशास्त्राच्या दृष्टीने काय संबंध होता, यावर प्रकाश पडेल.

सौराष्ट्रात रंगपूर, रोजडी आणि सोमनाथ या ठिकाणच्या उत्खननांत सिंधुसंस्कृतीच्या संपर्काचा पुरावा मिळाला आहे. मात्र या ठिकाणी सिंधुसंस्कृतीबरोबरच इतरही सांस्कृतिक संपर्काचे दुवे हाती आल्याने सिंधुसंस्कृतीचेच फक्त निर्भेळ स्वरूप सर्व थरांत मिळते असे नाही. रंगपूरला हडप्पासारखी खापरे, विटांची घरे, गटारे, दागदागिने, इ. वस्तू जशाच्या तशा मिळाल्या; परंतु मुद्रा अगर मातीच्या देवतांच्या मूर्ती मात्र अजिबात मिळालेल्या नाहीत. पण उत्कृष्ट तऱ्हेच्या तांबड्या झिलईचे चषक, जे सिंधुसंस्कृतींत मिळत नाहीत, ते इतर पहिल्याप्रथम सापडल्याने ते नवीन सांस्कृतिक संपर्क दर्शवितात, असे मानायला हरकत नाही.

रोजडी आणि सोमनाथ येथील उत्खननांतही विविध

तऱ्हेचा पुरावा हाती आला आहे. दोन्ही ठिकाणी सर्वांत पहिली वस्ती खापरे, दागिने, तांब्याची हत्यारे, या बाबतीत सिंधु-संस्कृतीशी संलग्नता दाखवीत असली, तरी नंतरच्या थरांत, खापरांत आणि मानवी जीवनातील इतर आधिभौतिक गोष्टींत मात्र बदल झाल्याचे प्रत्ययास येते. रोजडी येथे पांढऱ्या रंगात नक्षीकाम केलेली काळी-तांबडी खापरे आणि हिरवट-राखी रंगाची खापरे आढळून येतात, तर सोमनाथला फिकट तांबड्या रंगात पांढरट पिवळसर पृष्ठभागावर नक्षीकाम केलेले वैशिष्टय-पूर्ण वाडगे सापडतात. या व इतर अवशेषांवरून सौराष्ट्रात हडप्पासंस्कृतीचे निर्भेळ स्वरूप पाहायला मिळत नसून, तिथे विविध सांस्कृतिक संपर्कांचा प्रत्यय येतो.

सौराष्ट्र-गुजरातखेरीज पंजाबात व उत्तरप्रदेशातही सिंधु-संस्कृतीचे अवशेष हाती आलेले आहेत. परंतु तेथील पुरावा गुजरात-सौराष्ट्रापेक्षा जरा निराळा वाटतो. पंजाबातील रूपड येथे सर्वांत प्रथम वस्ती सिंधुसंस्कृतीच्या लोकांनी केली, हे तिथे सर्वांत खालच्या थरात सापडणाऱ्या दागदागिन्यांवरून, मुद्रांवरून आणि मडक्यांवरून स्पष्टपणे उघड होते. याशिवाय खड्डे खणून त्यात मृतांना पुरण्याची पद्धतही रूपडला आढळून आली. आठ फूट लांब आणि दोन फूट खोल खड्डा खणून त्यात सभोवार मातीची मडकी ठेवून ते लोक मृतांना पुरीत असत. मडक्यांची संख्या मृतांचे सामाजिक वा आर्थिक स्थान दर्शवीत असावी, असे अनुमान करण्यास हरकत नाही.

रूपडची सिंधुसंस्कृतीची ही दफने राखी रंगाची खापरे वापरणाऱ्यांनी काही ठिकाणी उद्ध्वस्त केलेली आढळतात. चाकावर बनविलेल्या राखी रंगाच्या खापरावर काळ्या रंगात नक्षी काढलेली खापरे वापरणाऱ्या लोकांच्या वसाहतीत हस्तिना-पूरजवळ मोठ्या प्रमाणात उत्खनित करण्यात आल्या आहेत.

उत्तर प्रदेशातील अलमगीरपूरच्या उत्खननातील प्राचीन स्तरांतही सिंधुसंस्कृतीचे आणि राखी रंगाची खापरे वापर-णाऱ्यांच्या संस्कृतीचे अवशेष हाती आले आहेत. या ठिकाणी सर्वांत प्राचीन वस्ती सिंधुसंस्कृतीच्या लोकांची होती, हे त्या स्तरांत मिळालेल्या फिआन्सच्या दागिन्यांवरून, खापरांवरून आणि विटांच्या वास्तूंच्या अवशेषांवरून सिद्ध झालेले आहेच. मात्र या संस्कृतीच्या लोकांच्या वसाहतींचा शेवट कसा झाला हे सांगता येत नाही. या संस्कृतीचे अवशेष देणाऱ्या स्तरांचा माथा मात्र बराच काळ वस्ती न झाल्याने निसर्गाहत होऊन पांढरट आणि कठिण वाटल्याचे उत्खनक सांगतात. यावरून सिंधुसंस्कृतीच्या वस्तीनंतर बराच काल अलमगीरपूरला वस्ती झाली नसावी, असे मानण्यास दुजोरा मिळतो. यानंतरची जी दुसरी वस्ती झाली, ती रूपडप्रमाणेच राखी रंगाची खापरे वापरणाऱ्यांची झाली. अलमगीरपूरच्या सिंधुसंस्कृतीच्या अव-शेषांत पीठ दळण्याच्या मातीच्या कथरोटांवर कापडाची प्रति-कृती उमटली आहे, तिचा उल्लेख मुद्दाम करणे आवश्यक आहे.

गुजरात-सौराष्ट्र, पंजाब, उत्तरप्रदेश या विभागांशिवाय राजस्थानातही सिंधुसंस्कृतीच्या वसाहतींचा पुरावा अलिकडे झालेल्या संशोधनात उजेडात आला आहे. बिकानेर प्रदेशात अशा अनेक वसाहतींचे अवशेष सापडलेले आहेत. परंतु त्यांपैकी एकाही स्थलाचे विस्तृत उत्खनन न झाल्याने याबद्दल जास्त माहिती मिळालेली नाही. मात्र भारत-पाकिस्तान-सरहद्दीजवळील कालीबंगाँ या ठिकाणच्या प्राथमिक उत्खनना-मध्ये अशा तऱ्हेचा पुरावा निश्चितपणे मिळालेला आहे.

**सिंधुसंस्कृतीचे समालोचन** – वर केलेल्या समालोचनावरून सिंधुसंस्कृतीचा विस्तार किती मोठा होता, हे कळून येईल. मात्र या विस्तारापोटी सिंधुसंस्कृतीच्या लोकांचा इतरांशी आलेला सांस्कृतिक संपर्क, त्याचे मानवी आधिभौतिक जीवनावर झालेले परिणाम आणि त्यामुळे इतर प्रदेशांत दिसून येणारे या संस्कृतीचे बदललेले स्वरूप, यांवरून ह्या प्रश्न अधिकच गुंतागुंतीचा झालेला आहे. लोथलला सिंधुसंस्कृतीच्या अव-शेषांबरोबरच आढळून येणारी काळी-तांबडी खापरे, रोजडी आणि सोमनाथ येथे आढळणारी फिकट तांबड्या रंगाची खापरे, रंगपूरला सापडणारी उत्कृष्ट तांबड्या झिलईची खापरे, या सर्व गोष्टी, सिंध-पंजाब विभागातून बाहेर पडल्या-नंतर सिंधुसंस्कृतीच्या लोकांचा इतर संस्कृतींशी आलेला संपर्क दाखवितात आणि त्याबरोबरच या लोकांच्या संस्कृ-तीच्या उत्पत्तीची मीमांसा, त्यांचे मूलस्थान, इ. कूट प्रश्नही उभे करतात, यात शंका नाही.

याबरोबरच खुद्द सिंधुसंस्कृतीबद्दलचे अनेक प्रश्न अद्यापही अनिर्णित आहेत. या संस्कृतीशी संलग्न असलेल्या मुद्रांवर जी लिपी आहे, ती वाचता आल्याशिवाय या संस्कृतीबद्दलचे गूढ पूर्णपणे उकलले जाईल, असे वाटत नाही. मात्र अशाच मुद्रा पश्चिम आशियातही सापडल्याने संस्कृतीचा संपर्क भारता-बाहेरील प्रदेशांतही आला होता, हे सिद्ध झालेले आहे. अगदी अलिकडील संशोधनात तर काही बाबिलोनियन ग्रंथांत बलु-चिस्थान, सिंध आणि सौराष्ट्र यांतील स्थलांचा आणि विभागांचा उल्लेख आल्याचे सूचित केले गेले आहे.

सिंधुसंस्कृतीचा विनाश कसा झाला, याबद्दलही अद्याप एकमत झालेले नाही. काहींच्या मते ही संस्कृती पुरामुळे नष्ट झाली असावी. परंतु तसा निर्णायक पुरावा हाती आलेला नाही. काहींच्या मते ही शांतताप्रिय संस्कृतीची शहरे पुरं-दर इंद्राच्या आधिपत्याखाली आर्यांनी धुळीस मिळवली. पण

हे मतही चुकीचे ठरते. कारण या संस्कृतीच्या हडप्पा, रोजडी, इ. ठिकाणी सापडलेल्या तटबंदीवरून ही संस्कृती निर्भेळ अहिंसक अथवा शांततेचा उद्घोष करणारी होती, असे दिसत नाही. शिवाय आर्यांनी जर या संस्कृतीचा नाश केला असेल, तर 'आर्य' अवशेष त्यांबरोबरच तिथे मिळायला पाहिजेत; पण तसे ते मिळालेले नाहीत. हडप्पाला उजेडात आलेल्या 'सिमेटरी एच्' या भागातील मानवी सांगाडचांचा आर्यांशी संबंध जोडून हे मत सिद्ध करण्याचा प्रयत्नही फारसा निर्णायक ठरलेला नाही. काही संशोधकांच्या मते उत्क्रांतीच्या नियमाप्रमाणे एखाद्या संस्कृतीच्या उच्चतम परिपोषातच तिच्या विनाशाची वाटचाल नकळत सुरू होते. हे मत ग्राह्य धरल्यास, सिंधुसंस्कृतीच्या परिपूर्णतेतूनच तिच्या अवनतीची गती सुरू होऊन, तिचा विनाश पायऱ्यापायऱ्यांनी होत गेला, असे म्हणावे लागते. अर्थात हे सिद्ध करण्यास हडप्पा-मोहेंजोदडो येथील उत्खननांत जर क्रमाक्रमाने स्तरवार आधिभौतिक अवनतीचे चित्र हाती आले असते, तर मदत झाली असती. परंतु अद्याप तरी सिंधुसंस्कृतीची वैशिष्ट्ये सगळीकडे एकजिनसी, एकसारखी आणि अविकृत स्वरूपात आढळून आलेली आहेत.

**राजस्थानातील ताम्रयुगीन संस्कृतीचे स्वरूप**–इ. स. १९५४–५५ साली राजस्थानात उदेपूरच्या आहाड विभागात उत्खनन झाले, तेव्हा राजस्थानातील ताम्रयुगीन संस्कृतीवर संशोधकांचे लक्ष केंद्रित व्हावे अशी परिस्थिती निर्माण झाली. या ठिकाणी काळी-तांबडी खापरे वापरणाऱ्या लोकांच्या वसाहतीच्या अवशेषांचे स्वरूप मोठ्या प्रमाणावर उघडकीस आणले गेले. गुजरातमधील लोथल येथेही सिंधुसंस्कृतीच्या खापरांबरोबर काळी-तांबडी खापरे सर्व स्तरांत सापडली आहेत. अशीच खापरे



राजस्थानातील ताम्रयुगीन काळा – तांबडा वाडगा

माळव्यात आणि इतरत्र सापडली होती. याशिवाय ऐतिहासिक कालातही 'उलटी भाजणी' च्या पद्धतीने खापरांच्या बनावटीचे तंत्र वापरात असल्यामुळे अशा काळ्या-तांबड्या खापरांचा काल काय असावा, याची गूढता होतीच. या तंत्राची प्राचीनता केवळ ऐतिहासिक कालाइतकीच नव्हे; तर ताम्रयुगात सिंधुसंस्कृतीच्या कालाइतकी आहे, हे लोथलच्या उत्खननाने सिद्ध केले असल्याने, अहाडचे उत्खनन महत्त्वाचे ठरावे, यात नवल नाही.

या दृष्टीने पाहता १९५४–५५ च्या उत्खननापेक्षा १९६०-६१ सालचे विस्तृत उत्खनन फार फलदायी ठरलेले आहे. काळी-तांबडी खापरे वापरणाऱ्या लोकांच्या एकावर एक अशा कमीत कमी १६-१७ वस्त्यांचे अवशेष या उत्खननात आढळून आले. या वस्त्या एकंदर तीन खंडांत विभागता आल्या. पहिल्या वस्तीतील लोक काळी-तांबडी, काळ्या रंगात नक्षी काढलेली पिवळसर खापरे आणि तांबडी खापरे वापरीत असत. यांत वाडगे, उंच मानेचे घडे, स्टॅण्डवरील थाळ्या, मोठमोठाले रांजण, वाट्या, इ. प्रकार होते. त्यांची घरे ओबडधोबड दगडाच्या पायाची असून भिंती मातीच्या असत. छप्पर कसे होते याचा उलगडा झाला नाही. परंतु खांबाचे दर न मिळाल्याने छप्पर आडव्या तुळईवर दोहो बाजूस उतरते असावे, असे दिसते. भिंतीला भक्कमपणा येण्याकरिता चिखलात गारगोट्यांचे तुकडे मिसळीत. अशाच बनावटीची घरे अद्याप राजस्थानात आढळून येतात. खापरांवरील नक्षी बहुधा ठिपके आणि रेघा यांची असून ठिपक्यांची खडी वस्त्रावर काढून घेण्याची पद्धत अजून राजस्थानातील स्त्रियांच्या वस्त्रप्रावरणांत प्रकर्षाने आढळून येते.

या वरील तीन वस्त्यांची धाटणीही सर्वसामान्यपणे अक्षीण राहिली. खापरांचे आकार, घरांची बांधणी, इ. गोष्टी अविकृतच राहिल्या. फक्त काळ्या-तांबड्या खापरांच्या आकारात बदल झाला. उंच मानेचे आणि मानेवर आणि मानेखाली पन्हाळीची नक्षी असलेले तांबड्या रंगाचे मोठमोठे रांजण, राखी रंगाचे, विविध नक्षी असलेले, पातळ बुडाचे माठ व झाकण्या, शंख आणि फिआन्सचे मणी, तांब्याच्या, काटकोनचौकोनी पण बहिर्गोल धारदार कड असलेल्या कुऱ्हाडी, धान्य वाटण्याकरिता केलेले मोठमोठे पाटे, मोठमोठ्या चुली, बहुधा तांबे गाळण्याकरिता केलेल्या भट्ट्या व सुपारीच्या आकाराचे, पण उत्कृष्ट कोरीव नक्षीकाम केलेले मातीचे मणी, मागच्या टोकाचे लंबक, इ. गोष्टी या लोकांच्या जीवनावर प्रकाश पाडतात. यांतील मातीचे मणी, स्टॅण्डवरील वाडगे, इ. अवशेष पश्चिम आशिया आणि क्रीट येथील संस्कृतीशी संपर्क दाखवितात.

आहाडपासून पंचेचाळीस मैलांवर असलेल्या गिलुंड येथेही

काळी-तांबडी खापरे वापरणाऱ्यांच्या वस्तीचे अवशेष मिळाले आहेत. मात्र येथे मातीच्या विटांच्या ज्या वास्तू मिळाल्या आहेत, त्यांच्या रचनेचा अथवा वापराचा बोध मात्र अजून झालेला नाही. अशा वास्तूंबरोबरच भाजलेल्या विटांची व दगडी पाया असलेली मोठी भिंत उघडकीस आली आहे. ही भिंत कोटाची असावी. मात्र आहाडपेक्षा गिलुंडला विविध तऱ्हेची खापरे सापडलेली असल्याने येथील संस्कृती जास्त विविध वाटते.

या संस्कृतीच्या लोकांचे जीवन इतके साधे आणि अप्रगत असताना एवढ्या कालखंडात ते कसे टिकले, हा एक प्रश्नच आहे. सर्व वस्त्यांच्या अवशेषांत दगडी अथवा धातूची हत्यारे अत्यंत अल्प प्रमाणात सापडली, हे वैशिष्टचच म्हटले पाहिजे. केवळ तांबे गाळून त्यापासून विविध वस्तू बनवणे, या त्यांच्या धंद्यामुळेच या वस्त्या आर्थिक दृष्टचा तग धरून राहिल्या असाव्या, या अनुमानाला उत्खननात सापडलेला कच्च्या तांब्याचा साठा पुष्टी देतो.

गिलुंड आणि आहाड येथे सापडलेली काळी-तांबडी, पांढऱ्या नक्षीची मडकी, माळव्यातही नावडातोडी येथे सर्वांत खालच्या थरात सापडल्याने राजस्थानातील ताम्रयुगीन संस्कृती माळव्यापेक्षा प्राचीन असावी, असे आता निश्चित झाले आहे. हेच कार्बन १४ च्या पद्धतीनेही सिद्ध केलेले आहे. माळव्यातील नावडातोडीचे सर्वांत खालचे थर इ. स. पूर्व अठराव्या शतकात पडतात. या दृष्टीने आहाडची संस्कृती याहीपेक्षा प्राचीन असावी, हे उघड आहे. सिंधुसंस्कृतीशी या संस्कृतीचा माळव्यातील संबंध आणि ताम्रयुगीन संस्कृतीच्या संपर्काची व्याप्ती, या दोन गोष्टी अजून संशोधकांना समजलेल्या नाहीत.

**माळव्यातील ताम्रयुगीन संस्कृती** – आहाडच्या ताम्रयुगीन संस्कृतीनंतरच्या कालखंडात प्रसारित झालेल्या माळव्यातील ताम्रयुगीन संस्कृतीचे चित्र मुख्यत्वेकरून नर्मदाकाठी नावडातोडी आणि चंबळतीरी नागदा या ठिकाणच्या उत्खननांतून प्रकट झाले आहे. याशिवाय या संस्कृतीची व्याप्ती माळव्याच्या विस्तृत प्रदेशावर होती, हेही अनेक स्थलांच्या पाहणीवरून सिद्ध झालेले आहे.

आहाडला सापडलेली काळी-तांबडी खापरे नावडातोडी येथे सर्वांत खालच्या स्तरात सापडल्याने नावडातोडी येथील वसाहत नंतरच्या कालखंडातील आहे, हे उघड होते. मात्र आहाडला काळी-तांबडी खापरे वापरणाऱ्यांच्या संस्कृतीचे जे बरेचसे अविकृत स्वरूप दिसते, त्यापेक्षा नावडातोडीच्या संस्कृतीत विविधता दिसते. काळी-तांबडी, दुधट रंगाची, तांबडी, राखी, खण खणीत तांबडी, अशी तऱ्हेतऱ्हेची खापरे येथे सापडलेली आहेत.

नावडातोडी येथील वसाहतीचे चार कालखंड पडतात. सर्वांत प्रथम वस्तीचे लोक पांढऱ्या रंगात नक्षी काढलेले काळे-तांबडे छोटे वाडगे, छोट्या आकाराची मडकी, दुधट रंगाच्या



नावडातोडी येथील ताम्रयुगीन वर्तुळाकार वास्तू

पृष्ठभागावर काळ्या रंगात नक्षी काढलेले बहिर्गोल बाजू असलेले वाडगे, अंतर्वक्र बाजू असलेले वाडगे, पिंपळाच्या पानासारखी नक्षी काढलेले व त्याच आकाराचे खोलगट मातीचे दिवे, दांडा असलेल्या झाकण्या, पळणाऱ्या हरणाची नक्षी असलेले घडे व मानवांचे समूहनृत्य दाखविणारे कप वापरीत असत. यांची घरे काटकोनी-चौकोनी असून त्यांच्या भिंती, बांबूच्या तट्टयांवर माती लिंपून व मध्ये मजबुतीकरिता लाकडी वासे पुरून तयार केलेल्या असत. छपराची कल्पना येत नाही; पण ते गवत-माती-बांबू यांचे बनविलेले असावे. भिंतीवर उत्कृष्ट लिंपण देण्याची पद्धत होती. घराच्या खोलीचा आकार आपल्या सध्याच्या खोलीसारखाच म्हणजे १०×८ फूट असा होता. याशिवाय ८ ते ९ फूट व्यास असलेली गोल घरेही बांधली जात असत. त्यांच्या सभोवार लाकडी वासे पुरीत असत. अर्थात अशा वास्तूंचा उपयोग राहण्यापेक्षा धान्य साठवण्यासाठी कणगीसारखा करीत असावे. यांतील आणि घरातील जमिनी चुन्याने उत्कृष्टपणे सारवून तयार करीत. हत्यारे म्हणून येथील रहिवासी गारगोटीची लांबसडक पाती आणि तांबड्या काटकोन-चौकोनी कुऱ्हाडी वापरीत असत.

नावडातोडी येथे एकंदर चार मुख्य वस्त्या झाल्या; पण त्या सर्व आगीच्या भक्ष्यस्थानी पडल्याने बरेचसे अवशेष आगीची झळ पोचलेल्या स्वरूपात, मिळाले. या चारही वस्त्यांचे स्वरूप सर्वसाधारणपणे फारसे बदललेले दिसत नाही. फक्त खापरांचे स्वरूप मात्र बदलते. सर्वप्रथम वस्तीशी संलग्न असलेली काळी-तांबडी खापरे फक्त प्रथम खंडातच मिळाली, तर दुधट रंगाची खापरे प्रथम आणि द्वितीय खंडात मिळाली.

तृतीय खंडात तांबड्या रंगाची मडकी प्रकर्षाने वापरात होती. त्यांचे आकारही विविध होते. स्टॅण्डवरील थाळ्या, वाडगे, कप, लोटे, कळश्या, माठ आणि याचबरोबर जाड्याभरड्या तांबड्या पोताचे मोठाले रांजण, पीठ मळण्याकरिता मातीच्या पराती, धुण्याकरिता घमेल्यासारखी भांडी, राखी रंगाची मडकी व रांजण, असे विविध प्रकार वापरात होते. चतुर्थ खंडात या तांबड्या रंगाच्या माळवा–पोताच्या खापरांबरोबरच खणखणीत आवाजाची, उत्तम भाजणीची आणि चाकावर घडविलेली मडकी मिळाली. अशीच खणखणीत मडकी दख्खन व कर्नाटक प्रदेशात फार मोठ्या प्रमाणात ताम्रपाषाणयुगाची प्रातिनिधिक म्हणून मिळालेली आहेत.

या लोकांची वसाहत मुख्यत्वेकरून शेतीप्रधान स्वरूपाची



इराणच्या संस्कृतीशी साम्य दर्शविणारा
नावडातोडी येथील तोटीचा वाडगा

होती. नावडातोडी येथे एका जळलेल्या घरात, उत्कृष्टपणे तयार केलेल्या चुलखंडाभोवती मूग, हरभरा, तांदूळ, तीळ, मसूर, वाटाणे आणि गहू जळलेल्या स्थितीत फार मोठ्या प्रमाणावर सापडल्याने वरील अनुमानास निश्चिती आली आहे. या लोकांच्या धर्मविषयक मतांची कल्पना काही काही अवशेषांवरून येते. मोठमोठ्या रांजणांवर मानवी युगुलांच्या आकृत्या चिकटविणे, वाडग्याच्या आतील बाजूस त्रिशूळ घेतलेल्या व केस पिंजारलेल्या मानवी आकृती काढणे, दोन्ही हातात धरून, आडवा कापलेल्या व तोटी असलेल्या वाडग्यांतून जलादी द्रव अर्घ्यासारखे ओतणे, अशा तऱ्हेच्या मूर्तींवरून आणि अशा तऱ्हेच्या क्रिया दर्शविणाऱ्या मातीच्या भांड्यांच्या आकारांवरून या लोकांच्या धर्मभावनांची ओळख पटते.

याशिवाय धान्य भरडण्याकरिता वापरात आणले जाणारे दगडी पाटे; ठोकण्याच्या कामी उपयोगी पडणारे दगडाचे गोल घण; धान्याबरोबरच मांसाहाराकरिता उपयोगात आणली गेलेली हरणे, बकरी आणि डुकरे यांचे अवशेष; हत्यारे म्हणून बनविलेल्या तांब्याच्या कुऱ्हाडी आणि तलवारी; मासे





नावडातोडी येथील ताम्रयुगातल्या तांब्याच्या कुऱ्हाडी

पकडण्याकरिता तांब्याचे गळ; दररोजच्या व्यवहारात अथवा शेतीचे पीक कापण्याकरिता वापरात असलेली शेकडो गारगोटीची पाती आणि फिआन्स, स्टिअटाईट, अकीक, कार्नेलियन, मायक्रोक्लाईन, इ. चे विविध मणी, या लोकांच्या जीवनाच्या निरनिराळ्या अंगांवर प्रकाश पाडतात.

नावडातोडीच्या ताम्रयुगीन वसाहतीच्या संस्कृतीची तीन वैशिष्ट्ये नजरेत भरण्यासारखी आहेत. पहिले असे, की ही संस्कृती राजस्थानातील संस्कृतीनंतरची असली, तरी प्रथमावस्थेत तिचा राजस्थानाशी संपर्क आला होता. दुसरे वैशिष्ट्य असे, की या संस्कृतीचे काही अवशेष इराणमधील ताम्रयुगीन संस्कृतीशी विलक्षण साम्य दर्शवितात. तोटीचे वाडगे, उंच व पन्हाळीची नक्षी असलेली भांडी, मान व उदर असलेले माठ, मद्याचे चषक, काही तांब्याची हत्यारे, या सर्व गोष्टी इराणच्या संस्कृतीशी संलग्न वाटतात. तिसरी गोष्ट अशी, की या वसाहतींच्या चतुर्थ खंडात जी खापरे सापडतात, तशीच खापरे महाराष्ट्र-कर्नाटकातील ताम्रयुगीन संस्कृतीशी संलग्न असल्याने माळव्यातील ताम्रयुगीन लोक महाराष्ट्राकडे वसाहतीच्या निमित्ताने सरकले, असा कयास बांधता येतो.

कालखंडाच्या दृष्टीने माळव्यातील संस्कृती ही आहाडपेक्षा नंतरची' आहे हे जसे खापरांच्या अभ्यासावरून सांगता येते, तसेच ते कार्बन १४ पद्धतीने आलेल्या कालावरून निश्चित करता आलेले आहे. आहाडचा काल इ. स. पूर्व २००० पर्यंत जातो, तोच काल नावडातोडीच्या बाबतीत इ. स. पूर्व १७०० ते १३०० च्या दरम्यान पडतो. नावडातोडीच्या संस्कृतीनंतर दख्खनची संस्कृती उदयास आल्याने दख्खनच्या बाबतीत हा

काल इ. स. पूर्व १३०० ते ११०० या कालखंडात स्थिर होतो.

**द. भारतातील ताम्रयुगीन संस्कृती** – गेल्या २५–३० वर्षांमधील संशोधन आणि उत्खनन यांमुळे ताम्रयुगीन संस्कृतीच्या बाबतीत विलक्षण शोध लागलेले आहेत. काही वर्षांपूर्वी 'महाराष्ट्रात ताम्रयुग झालेच नाही, तेथील मानव अश्मयुगातून एकदम लोहयुगात आला,' अशा तऱ्हेची मते विद्वानांत प्रचलित होती. पण घोड, गोदा, प्रवरा, भीमा, कृष्णा, तापी, गिरणा, मुळा, इ. महाराष्ट्राच्या प्रमुख नद्यांच्या खोऱ्यांत ही ताम्रयुगीन संस्कृती विस्तीर्णपणे पसरली होती, हे या प्रदेशांत मिळणाऱ्या अवशेषांवरून आता सिद्ध झालेले आहे.



नावडातोडी येथील ताम्रयुगीन मद्य – चषक

माळव्यातील ताम्रयुगीन लोक सरकत सरकत तापीच्या काठावर आणि घोडच्या काठावर येईपर्यंत त्यांनी आपली वापरांतील वनावटीची वैशिष्ट्ये कायम ठेवल्याचे आढळते. परंतु महाराष्ट्राच्या मध्य आणि दक्षिण प्रदेशांत येत असताना त्यांचा आंध्र-कर्नाटकाच्या नवाश्मयुगीन लोकांशी संपर्क आला आणि या संपर्कातून जी एक मिश्र संस्कृती निर्माण झाली, तिचा प्रत्यय महाराष्ट्र-कर्नाटकात अनेक ठिकाणी आलेला आहे.

या मिश्र संस्कृतीचे चित्र मात्र एकजिनसी स्वरूपात मिळते. चाकांवर वनविलेली, उत्तम भाजणीची, खणखणीत आवाजाची भांडी, तांवड्या रंगावर काळ्या रंगाने भौमितिक आकाराची नक्षी काढलेले वाडगे, उंच व बुटक्या मानेच्या कळश्या, तोटीची व फनेलच्या आकाराचे तोंड असलेली भांडी, हे या संस्कृतीचे वैशिष्ट्य होय. याशिवाय हातबनावटीचे मोठाले रांजण, राखी रंगाचे, गोल बुडाचे व पसरट तोंडाचे मृत बालकांना पुरण्याकरिता वापरण्यात येणारे मृद्‌घट, तांब्याच्या छिन्न्या, दांडा विभाजित केलेल्या कट्यारी, काटकोन-चौकोनी आकाराच्या कुऱ्हाडी, वाळे, बांगड्या, अंगठ्या, मणी, गारगोटीच्या छिलक्यांची धारदार पाती, कुठे बांबूच्या तट्ट्यांवर माती लिंपून वनविलेल्या घरांच्या भिंती, तर काही ठिकाणी जमिनीत खड्डे घेऊन त्यांतच राहण्याची केलेली संभाव्य व्यवस्था, मातीच्या चुली व चुन्याच्या जमिनी, फिआन्स, स्टिअटाईट व अकीकादी दगडांचे मणी, बैल, वकरे यांच्या मांसाची आहारात योजना, घोटून घोटून गुळगुळीत आणि धारदार कडक केलेल्या काळ्या दगडाच्या कुऱ्हाडी, राप्या व छिन्न्या, या सर्व गोष्टी महाराष्ट्रातील ताम्रयुगीन जीवनाचे प्रतिबिंब दर्शवितात.



नेवासे येथील ताम्रयुगीन संस्कृतीतले तोटीचे मडके



चांडोली येथील ताम्रयुगीन कटयार

मात्र या संस्कृतीची खास

वैशिष्टये दोन-तीन आहेत. या लोकांच्या घोटीव दगडी कुऱ्हाडी, तोटीची मडकी आणि राखी रंगाची खापरे ज्याप्रमाणे नवाश्मयुगीन वैशिष्टयांचा प्रभाव दर्शवितात, तोच प्रभाव या लोकांच्या दफनपद्धतीतही दिसून येतो. नेवासे, दायमाबाद, चांडोली, वहाळ आणि प्रकाशे या सर्व ठिकाणी या संस्कृतीच्या लोकांची शेकडो दफने सापडलेली आहेत. लहान अडीच-तीन वर्षांपर्यंतची मृत मुले बहुधा तोंडास तोंड लावून ठेवलेल्या दोन राखी मडक्यात ठेवून पुरीत असत. डोके उत्तरेकडे व पाय दक्षिणेकडे या पद्धतीने मृतांना ठेवले जाई. प्रौढांना मोठमोठ्या रांजणात अथवा ओळीने ठेवलेल्या ५–६ मडक्यात



नेवासे येथील ताम्रयुगीन मुलांची दफन पद्धती

याचप्रमाणे पुरीत असत. परंतु पुरण्याकरिता खणलेल्या खड्डयांच्या निशाण्या मात्र सापडलेल्या नाहीत. काही काही वेळा तर प्रौढांना मडक्यात न झाकता तसेच उघडया अंगाने पुरले जाई. ही सर्व दफने घरातील जमिनीतच उरकली जात आणि मृतांबरोबर त्यांच्या वयोमानाप्रमाणे खेळणी, बोळकी, मोठाली तोटीची भांडी व वाडग्यांचा संच पुरला जात असे. मृत्यूनंतरच्या अवस्थेत यामुळे त्यांच्या अन्नपाण्याची सोय व्हावी, अशी समजूत असावी. त्याचबरोबर लहान मुलांना जी खेळणी प्रिय असत, ती त्यांच्यावरोबरच पुरण्याचीही हृद्य तरतूद या संस्कृतीत आढळून येते. बहुधा राखी रंगाची मडकी जरी दफनाकरिता वापरली जात, तरी काही वेळा इतर प्रकारची मडकीही उपयोगात आणीत. काही वेळा तर हाती येतील त्या वाडग्यांनीही मृताचा देह झाकल्याचे आढळून आले आहे. हे सर्व बालकांच्या आईवडिलांच्या आर्थिक परिस्थितीवर आणि सामाजिक दर्जावर अवलंबून असावे असे वाटते. नेवासे आणि चांडोली येथील् उत्खननात काही बालकांच्या गळ्याभोवती तांब्याच्या मण्यांची माळ जशीच्या तशी आढळली. या बाळलेण्याचे पृथक्करण करता हे सर्व मणी कापूस आणि रेशीम यांच्या संयुक्तपणे बनविलेल्या धाग्यातओवलेले असल्याचे दिसून आले. याशिवाय या दोऱ्यास शेणाचे व तेलाचे अवशेष चिकटलेले असल्याने मृतांना पुरण्यापूर्वी गोमय व तेल यांच्या लेपनाचे संस्कार करीत असावे असे वाटते.

दुसरे वैशिष्टय असे, की महाराष्ट्र-कर्नाटकात जरी आतापर्यंत सर्वसाधारणपणे ताम्रयुगीन खापरांचा सारखेपणाच आढळून येतो, तरी नगर जिल्ह्यातील दायमाबाद येथील उत्खननात सर्वांत पहिल्या वस्तीची खापरे वेगळेपणा दाखवितात. ही खापरे तांबडी असली तरी त्याचा आकार आणि बनावट खणखणीत खापरांपेक्षा वेगळी असल्याने, माळव्यातून संभाव्य रीतीने आलेल्या ताम्रयुगीन संस्कृतीच्या लोकांनी दख्खनच्या या मूळ रहिवाश्यांवर प्रभाव पाडून आपला सांस्कृतिक ठसा त्यांच्यावर पूर्णपणे उमटविल्याचे दिसून येते.

तिसरे वैशिष्टय असे, की राखी रंगाची तोटीची भांडी, दफनपद्धती, गुळगुळीत दगडी कुऱ्हाडी, ही सर्व नवाश्मयुगीन वैशिष्टये फक्त महाराष्ट्र–कर्नाटकातील ताम्रयुगीन संस्कृतीशी संलग्न सापडतात. ती माळवा अथवा इतर ठिकाणी न सापडल्याने माळव्यातून दक्षिणेकडे सरकणाऱ्या ताम्रयुगीन संस्कृतीचा आणि आंध्र–कर्नाटकातून उत्तरेकडे पसरणाऱ्या नवाश्मयुगीन संस्कृतीचा मिलाफ महाराष्ट्रात झाल्याचे मनोरम चित्र उघडकीस येते.

महाराष्ट्रातील ताम्रयुगीन संस्कृतीचा कालखंड नेवासे आणि चांडोली येथील उत्खननातील अवशेषांच्या, कार्बन १४ या पद्धतीने आलेल्या कालावरून निश्चित झालेला आहे. या दोन्ही ठिकाणीं इ. स. पूर्व १२०० ते ११०० या कालात आणि तत्पूर्वी थोडे आधी महाराष्ट्रात या संस्कृतीची पाळेमुळे रुजू लागली असावी, असे दिसते.

या संस्कृतीचा विनाश कसा झाला हे सांगणे कठिण आहे. परंतु या विनाशानंतर बरीच वर्षे महाराष्ट्रात वस्ती झाली नसावी असे दिसते. नेवाशाला ताम्रयुगीन संस्कृतीच्या वस्तीचा शेवटचा थर जंगलाच्या वाढीमुळे काळसर झाल्याचे आढळून आले. त्यानंतर जी वस्ती झाली, ती मात्र इ. स. पूर्व दुसऱ्या, तिसऱ्या शतकात झाली. या ऐतिहासिक कालातील लोकांना लोखंडाचा वापर माहीत असल्याने त्यांनी आपल्या हत्यारांनी महाराष्ट्राच्या भूभागावरील घनदाट जंगले तोडून आपल्या वसाहती स्थापन केल्या.

**गंगा-यमुना दुआबातील ताम्रयुगीन संस्कृतीचे स्वरूप** : राजस्थान, माळवा, सौराष्ट्र अथवा महाराष्ट्र या ठिकाणी ताम्रयुगीन संस्कृतीचे जे स्वरूप दिसून येते, त्यापेक्षा वेगळे स्वरूप गंगा-यमुना दुआबात दिसून येते, उत्तरप्रदेशात आतरंजीखेडा, गीरपूर, मथुरा, अहिच्छत्रा, हस्तिनापूर, बिहारात श्रावस्ती, राजस्थानात बिकानेर, पंजाबात रूपड आणि मध्यप्रदेशात

उज्जैन, येथे या संस्कृतीची निदर्शक राखी रंगाची, चाकावर घडविलेली, उत्तम भाजणीची, शुद्ध चिखलाची आणि काळ्या-रंगात नक्षी काढलेली खापरे सापडलेली आहेत. हस्तिना-पूरच्या उत्खननात यांचा काल इ. स. पूर्व ११०० ते ८०० असा पडतो. वाडगे आणि थाळ्या याव्यतिरिक्त दुसरे आकार या खापरांत आढळत नाहीत. थाळ्या स्वतंत्रपणे इतरत्र ताम्रयुगात फारश्या आढळत नाहीत, हे लक्षात ठेवले पाहिजे. राखी रंगाच्या या खापरांचे साहचर्य महाभारतकालीन अहिच्छत्रा, हस्तिनापूर, कौशाम्बी, या नगरांशी आढळते. याशिवाय या खापरांचे बलुचिस्तानात मिळणाऱ्या राखी रंगाच्या खापरांशीही साधर्म्य दिसते, ते महत्त्वाचे ठरते.

या लोकांच्या राहणीची फारशी माहिती विस्तृत उत्खननाच्या अभावी मिळालेली नाही. मात्र हस्तिनापूर, आलमगीरपूर आणि रूपड येथील उत्खननात या लोकांच्या, वेताच्या जाळीवर चिखल थापून केलेल्या घरांच्या भिंतींचे अवशेष मिळाले आहेत. याशिवाय हे लोक तांदूळ आणि मांसही खात असत. यांना तांब्याच्या हत्यारांचा आणि आर्य संस्कृतीशी संलग्न असलेल्या अश्वांचा वापर माहीत होता, असे दिसते. अश्वांचा वापर आणि महाभारतकालीन नगरांशी साहचर्य, यावरून हे लोक आर्यवंशापैकी महत्त्वाचा घटक असावे, असे अनुमान करता येते.

**ताम्रयुगीन संस्कृतींचे समालोचन** – सिंधुसंस्कृतीच्या सुरवातीपासून तो हस्तिनापूरच्या, राखी रंगाची खापरे वापरणाऱ्या लोकांच्या कालापर्यंत भारतात ताम्रयुगीन संस्कृतीचे बदलते चित्र दृष्टोत्पत्तीस येते. सिंधुसंस्कृतीचे नागरी स्वरूप मात्र त्यानंतर येणाऱ्या कुठल्याही इतर ताम्रयुगीन संस्कृतीत दिसत नाही.

सिंधुसंस्कृतीव्यतिरिक्त उघडकीस आलेल्या ताम्रयुगीन वसाहती नागरी स्वरूपाच्या नसून छोट्या छोट्या वस्त्यांच्या स्वरूपात होत्या. मात्र राजपुताना, माळवा, पंजाब, उत्तरप्रदेश महाराष्ट्र, या ठिकाणच्या वसाहतींचा एकमेकींशी किती प्रमाणावर संपर्क आला, याची शहानिशा पूर्णतया झालेली नाही. त्यांच्या प्रगतीच्या वेगवेगळ्या पायऱ्यांना कोणती परिस्थिती – आर्थिक, नैसर्गिक वा तांत्रिक – कारणीभूत झाली, याचाही पडताळा घेता आलेला नाही.

सिंधुसंस्कृतीचा विनाश आर्यांनीच केला की काय, याबद्दल एकमत नाही. परंतु माळवा, राजस्थान, उत्तर महाराष्ट्र आणि उत्तरप्रदेश या ठिकाणी अनुक्रमे इराणातल्या सारखी खापरे, कौटमध्ये आढळतात त्याप्रमाणे मातीचे नक्षीचे मणी, दांडयाचे टोक विभाजित केलेल्या तांब्याच्या कट्यारी अथवा भाले आणि महाभारतकालीन आर्यांचे सूचित होणारे साहचर्य, यांवरून भारतातील आर्यांच्या आगमनाचा प्रश्न सुटण्याच्या मार्गावर आहे, असे म्हणावेसे वाटते.

फक्त महाराष्ट्रातच ताम्रयुगीन संस्कृतीचा नवाश्मयुगीन संस्कृतीशी संपर्क आल्यासारखे वाटते. इतरत्र मात्र निर्भेळ ताम्रयुगीन संस्कृतीचे दर्शन होते.

या ताम्रयुगीन संस्कृतीचे जनक कोण, याबद्दल अद्याप उलगडा होत नाही. कदाचित इराणातून आर्यांच्या निरनिराळ्या टोळ्या भारतात येऊन त्यांनी आपल्या वसाहती स्थापन केल्या असाव्या. हे आगमन एककाली न झाल्याने या संस्कृतीचे बदलते चित्र आपणांस पाहायला मिळते.

लोथल, रूपड व इतर अनेक ठिकाणी उजेडात आलेल्या मानवी सांगाड्यांचा अभ्यास झाल्यास ताम्रयुगीन संस्कृतीतील विविध मानववंशांवर प्रकाश पडेल. नेवाशाला सापडलेल्या सांगाड्यांपैकी प्रौढांचा जो अभ्यास झाला आहे, त्यावरून हे लोक रुंद चेहेऱ्याचे, अरुंद डोक्याचे, बसक्या नाकाचे आणि खालचा जबडा वरच्यापेक्षा जरा पुढे आलेले असे होते, असे समजून आले. मानववंशशास्त्रज्ञांच्या मते महाराष्ट्राच्या आदिवासी जमातींची ठेवणही अशीच आहे. यावरून ताम्रयुगीन संस्कृतीपैकी काही लोक तरी महाराष्ट्राच्या आदिवासींपैकी असावे, असे वाटते.

**भारतातील लोहयुगीन संस्कृती** – महाराष्ट्रात ताम्रयुगानंतर इ. स. पूर्व दुसऱ्या, तिसऱ्या शतकात लोहयुगीन लोकांनी वसाहती केल्याचा उल्लेख पूर्वी केलाच आहे. उत्तरप्रदेशातही हस्तिनापूरला राखी रंगाच्या खापरांच्या उत्तरकालात लोखंडाच्या वापराचा पुरावा मिळाल्याचा निर्देश आलाच आहे. उज्जैनच्या उत्खननात उत्तर भारतात लोखंडाचा वापर इ. स. पूर्व पाचव्या, सहाव्या शतकात झाल्याचा पुरावा मिळाला आहे. यावरून उत्तर भारतात आणि दक्षिण भारतात लोखंडाचा वापर झाल्याचे कालखंड भिन्न असल्याचे स्पष्ट होते.

दक्षिणेतील संस्कृतीचे जरी लोहाशी साहचर्य आढळून आलेले असले, तरी ही ऐतिहासिक कालातील लोहसंस्कृतीपासून व त्याआधीच्या ताम्रयुगीन संस्कृतीपासून भिन्न वाटते, यात शंका नाही. या संस्कृतीचे अवशेष मुख्यत्वेकरून दक्षिण भारतात वैपुल्याने सापडतात आणि या संस्कृतीला संशोधकांनी बृहदश्म संस्कृती असे नामाभिधान दिलेले आहे.

या संस्कृतीचे वैशिष्ट्य हे, की या संस्कृतीचे लोक मृतांना दगडी कुंडांत अथवा मातीच्या शवपेटिकेत पुरून त्यावर मोठमोठ्या दगडांची वर्तुळे अथवा दगडी सोट उभारीत. अशा तऱ्हेच्या दफनाचे अनेक प्रकार आढळतात; परंतु मुख्यत्वेकरून

तीन तऱ्हा जास्त प्रचलित होत्या असे दिसते. अश्मवर्तुळे, अश्मछत्रे, प्रस्तरगुहा, दगडी सोट, इ. अनेक प्रकार आहेत. हे उकरल्यावर त्यांत मधोमध एका दगडी चौकटीत अथवा मातीच्या घरात, मृताचे अवशेष, मणी, मातीची भांडी, शंखांचे अलंकार, लोखंडाची हत्यारे व इतर वस्तू ठेवलेल्या आढळतात. सबंध सांगाडा सहसा सापडत नाही; पण मृताचे शरीर उघड्यावर टाकून काही कालानंतर जे त्याच्या अस्थींचे अवशेष मिळतील, तेवढेच घटामध्ये ठेवण्याची पद्धत असावी असे दिसते.



महापाषाण युगातील दफनपद्धती

दक्षिणभारताव्यतिरिक्त आसाम, ओडिसा आणि बिहार या प्रदेशांतही या संस्कृतीचे अवशेष सापडलेले आहेत. परंतु यांतील बरीचशी दफने नसून त्या केवळ स्मृतिशिला आहेत.

या संस्कृतीच्या लोकांचा वंश कोणता, याबद्दल निश्चितपणे सांगता येत नाही. ब्रह्मगिरी, नागार्जुनकोंडा, बहाळ व इतर अनेक ठिकाणी जे सांगाडे सापडलेले आहेत, त्यांचा अभ्यास अजून झालेला नाही. परंतु यांच्या काळ्या-तांबड्या खापरांची बनावट उत्कृष्ट असून त्यांचे आकारही वैशिष्ट्यपूर्ण असल्याने त्यांचा सांस्कृतिक संपर्काच्या दृष्टीने अजून वेध घेतला गेला नाही. काहींच्या मते दक्षिणेत या लोकांची संस्कृती ताम्रयुगीन संस्कृतीच्या पाठोपाठ आल्याने व काळ्या-तांबड्या खापरांचे तंत्रही काही काही ताम्रयुगीन लोकांना माहीत असल्याने संपर्काचा संभव दिसतो. मृतांना घटात घालून पुरण्याची पद्धती बृहदश्मयुगीन लोकांनी नवाश्मयुगीन व ताम्रयुगीन लोकांपासून उचलली असावी, असे संभवते. दक्षिणेतील संघम साहित्यात यांच्या काही प्रथांचा उल्लेख आलेला आहे.

दफनाव्यतिरिक्त या लोकांच्या इतर बाबींची फारशी माहिती मिळालेली नाही. त्यामुळे या संस्कृतीबद्दल फार मोठे गूढ अजूनही अस्तित्वात आहे. या संस्कृतीच्या उत्पत्तीबद्दल दोन मतप्रवाह आहेत. काही सांगाड्यांचा जो अभ्यास झाला आहे, त्यावरून हे लोक मूळचे द्रविड वंशाचे असावे असे काहीजण समजतात; तर या उलट हे लोक भूमध्यसमुद्रांच्या परिसरातून भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर उतरले व तिथून आत पसरले आणि त्यांनी दक्षिण भारतातील नवाश्मयुगीन व ताम्रयुगीन लोकांवर मात केली, असे दुसऱ्या काही विद्वानांचे मत आहे. युरोपातील मेगॅलिथिक संस्कृती भारतीय संस्कृतीपेक्षा जवळ जवळ पंधराशे वर्षांनी प्राचीन आहे. परंतु याच लोकांनी दक्षिणेत द्रविड भाषा आणल्या असेही मत मांडले जाते, ते तितकेसे पटणारे नाही. कारण यासाठी ब्रह्मगिरीसारखी शास्त्रशुद्ध उत्खनने, खापरांच्या आकारांचा तौलनिक अभ्यास, सांगाड्यांचा वांशिक दृष्टीने अभ्यास, इ. सर्व बाबींचा सूक्ष्मपणे अवलंब केला पाहिजे.

**लोहयुगातील नागरी संस्कृतीचा उदय –** इ. स. पूर्व ६ व्या शतकापासून तो गुप्तकालाच्या अखेरीपर्यंत भारतात लोहयुगातील संस्कृतीचे भव्य नागरी स्वरूप विविधतेने भरलेले आढळते. पाकिस्तानातील तक्षशिला, चारसद्दा; उत्तर प्रदेशातील अहिच्छत्रा, हस्तिनापूर, जगत्ग्राम, कौशाम्बी, राजघाट, सारनाथ, भीटा, कांसिया, सहेथमहेथ; बिहारातील राजगीर, वैशाली, लौरिया नंदनगड, कुम्राहार, नालंदा; राजस्थानातील बैराट, आहाड, रंगमहाल, रैर, सांभर व नगरी; बंगालातील तामलुक, बाणगड, पहारपूर, मैनामती; ओडिसातील रत्नागिरी व शिशुपालगड; मध्यप्रदेशातील उज्जैन, महेश्वर, विदिशा, महाराष्ट्रातील कोल्हापूर, नासिक, तेर, सोपारा, पैठण, कोंडापूर, कौंडिण्यपूर, नेवासे, प्रकाशे; गुजरातेतील शामळाजी, बडोदरा, अमरेली, टिम्बवी आणि दक्षिणेतील अरिकामेडू, ब्रह्मगिरी, चंद्रवल्ली, अमरावती, नागार्जुनकोंडा; अशा अनेक ठिकाणच्या उत्खननांतून प्राचीन ऐतिहासिक कालातील जीवनाची विविधता प्रत्ययास आलेली आहे. अर्थात या सर्वांचा आढावा येथे घेणे शक्य व आवश्यक नसल्याने यातील वैशिष्ट्यांचाच तेवढा विचार करणे योग्य होईल.

प्राचीन ऐतिहासिक कालातील सर्वांत वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट म्हणजे मौर्य-सातवाहन कालातील काळ्या झिलईची खापरे ही होय. मुख्यतः वाडगे, कप आणि थाळ्या, हेच प्रकार यात सापडतात आणि यांचा काल इ. स. पूर्व पाचवे, सहावे शतक ते इ. सनाचे पहिले शतक असा ढोबळ मानाने देता येतो. या कालात समाजावर बौद्ध धर्मीयांची पकड जबरदस्त असल्याने या उत्कृष्ट मडक्यांचा प्रसार गावोगाव भ्रमंती करणाऱ्या बौद्ध भिक्षूंच्या मार्फत झाला असल्यास नवल नाही. ही खापरे मुख्यत्वेकरून उत्तर भारतातच जास्त सापडतात. दक्षिणेत ही

सापडली असली, तरी त्यांचा काल उत्तर भारतातील त्यांच्या कालखंडाइतका प्राचीन ठरत नाही.



वरचे चित्र – मौर्यकालीन झगझगीत काळचा रंगाचा पेला.
खालचे चित्र – मौर्यकालीन झगझगीत काळचा रंगाची थाळी.

इ. स. च्या पूर्वी पहिल्या शतकात आणि त्यानंतर दोन शतके सौराष्ट्र आणि दक्षिण भारत यांचा रोमन साम्राज्याशी जो व्यापारी आणि सांस्कृतिक संपर्क आला व ज्याबद्दलचे वृत्तान्त रोमन व ग्रीक मुसाफिरांच्या लिखाणात आढळतात, त्यांचा वस्तुरूप पुरावा अनेक ठिकाणी मिळालेला आहे. रोमन नाणी, रोमन बनावटीची उत्कृष्ट तांबडी खापरे, कप, वाडगे, दिवे, पुतळे, अर्चनाकुंडे, काचसामान, मणी, नाण्यासारख्या मातीच्या व शिशाच्या पुतळचा, रोमन मद्यकुंभ व कुजे, या वस्तू आतापर्यंत अरिकामेडू, नासिक, तक्षशिला, नेवासे, बडोदे, तेर, कौंडिण्यपूर आणि सौराष्ट्र या भागात अनेक स्थळी उत्खननात सापडलेल्या आहेत. नेवाश्याला तर मद्यकुंभाच्या एका तुकड्याला रोमन मद्याचा महत्त्वाचा घटक असलेली राळ अद्याप चिकटलेल्या स्वरूपात जशीच्या तशी सापडली आहे.

मौर्यकालीन काळचा झिलईची खापरे, इ. स. च्या सुरवातीच्या कालातील रोमन बनावटीची झगझगीत तांबडी खापरे व आतील भागांवर नक्षी असलेल्या काळचा थाळचा, ही ऐतिहासिक कालातील नाण्यांइतकीच कालखंडनिश्चितीची साधने आता ठरलेली आहेत.

मौर्यकाल आणि त्यानंतरचा काल, यांतील वाङ्मयात आणि प्रवाशांच्या वर्णनात अजरामर केली गेलेली मोठमोठी तटवंदीची शहरेही उत्खननांत सांपडलेली आहेत. पाटलिपुत्र येथील तटवंदी व मेगॅस्थिनीसने वर्णिलेला मौर्यांचा प्रासाद, उज्जैन, शिशुपालगढ व कौशाम्बी येथील उघडकीस आलेली मातीची तटवंदी, अहिच्छत्रा, शिशुपालगढ, नेवासे, नासिक, राजघाट, वैशाली, तक्षशिला येथील रेखीव वास्तूंचे आणि सांडपाण्याच्या कूपांचे अवशेष, या गोष्टी त्या काळच्या नागरी आखणीची कल्पना देण्यास पुरेश्या आहेत.

धार्मिक वावतीतही बौद्ध आणि ब्राह्मणी धर्माची साक्ष देणारे अनेक महत्त्वाचे अवशेष हाती आलेले आहेत. तक्षशिला, महेश्वर, वैशाली, नागार्जुनकोंडा, कौशांबी, सिरपूर, रत्नागिरी व सोपारा येथील बौद्धस्तूप, विहार आणि शिल्पे बौद्ध धर्माच्या प्रभावाची कल्पना देतात; तर कौशांबी येथील श्येनचितीची वास्तू डेहराडूनजवळील जगत् ग्राम येथील अश्वमेधाचे अवशेष आणि राजस्थानातील यूप, ब्राह्मणीधर्माच्या पुनरुज्जीवनाची साक्ष पटवितात. मातीच्या देवता, यक्षमूर्ती, आणि दगडाचे ताईत बहुजनसमाजातील धर्मसमजुतींचा प्रत्यय देतात. याबरोबरच तक्षशिलेला परकीयांच्या आधिपत्यामुळे भारतीय जीवनात अनेक रोमन-ग्रीक देवतांच्या आणि अर्चनाकुंडांच्या पूजेसारख्या प्रकारांचा शिरकाव झाल्याचे दृष्टोत्पत्तीस येते. मात्र गेल्या काही वर्षांतील सर्वांत महत्त्वाचा शोध म्हणजे कौशांबीला भगवान बुद्धाला अर्पण केलेल्या घोषिताराम विहाराचे अवशेष व त्या दानाबद्दलचा एका आयागपट्टावर केलेला ब्राह्मी लिपीतील उल्लेख हा होय! वाङ्मयीन माहितीला दुजोरा देणारा इतका निःशंक पुरावा दुसरा क्वचितच असेल!



रोमन मद्यघट



कोल्हापूर येथे सापडलेली ब्राँझची भांडी

या कालांतील घरे पक्क्या विटांची बांधलेली आणि बहुधा काटकोन-चौकोनी आकाराच्या खोल्या असलेली होती. घरांचे पाये दगडगोट्यांनी पक्के करीत. छपराचा पुरावा फारसा

शाबूत असा कुठे मिळाला नाही. मात्र बहुतेक घरांना जोडून विटांचा अथवा मातीच्या कड्यांचा सांडपाण्याकरिता बांधून



कौशांबी येथील श्वेनचितीचे अवशेष

काढलेला कूप असे. यावरून या लोकांच्या सामाजिक व आरोग्यविषयक कल्पना लक्षात येतात.

वस्त्र-प्रावरणांच्या बाबतीत या कालात कमालीचे वैचित्र्य आढळून येते. अर्थात कापडाचा फारसा पुरावा मिळलेला नाही. परंतु या कालातील काही खापरांवर व पुरचुंडीत बांधून ठेवलेल्या नाण्यांवर नासिक व पैठण येथील कापडाच्या प्रतिकृतीचा पुरावा मिळालेला आहे. याशिवाय विविध शिल्पांतून व मातीच्या मूर्तींतून स्त्री-पुरुषांच्या वस्त्र प्रावरणांचे व नेसण्याच्या पद्धतींचे दर्शन झालेले आहे. तक्षशिला येथे सापडलेल्या मूर्तींत ग्रीक व रोमन छाप दिसते, तर राजस्थानातील रंगमहाल येथे सापडलेल्या मातीच्या स्त्री-मूर्तींचा ओढणी, लेहंगा आणि चोळी असा पोषाख सध्याच्या तेथील स्त्रीपोषाखाशी विलक्षण साम्य दर्शवितो.

सिंधुसंस्कृतीत ज्याप्रमाणे सोन्याचे आणि इतर विविध दागदागिने वापरीत होते, त्याप्रमाणेच उत्कृष्ट दागदागिने तक्षशिला, नागार्जुनकोंडा, इ. ठिकाणच्या उत्खननात सापडलेले आहेत. समकालीन वाङ्मयात आणि शिल्पांतही हरतऱ्हेच्या बांगड्या, नूपुर, बाजुबंद, मेखला, शिरोभूषणे व कंठाभरणे दृष्टोत्पत्तीस येतात. त्यावरून या कालातील लोकांची सुस्थिती, कलात्मकता आणि रसिकता प्रकर्षाने जाणवते. विशेषत: निरनिराळ्या दगडांचे विविध प्रकारचे मणी व ताईत बनविण्याची मोठमोठी केंद्रे भारतात:या कालात भरभराटीस आली. गुजरातमधील खंबायतजवळ अशा तऱ्हेचा धंदा आजही चालू आहे, हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.

प्राचीन ऐतिहासिक कालातील संस्कृतीचे लोक शाकाहारी तद्वतच मांसाहारीही होते, असे दिसते. अनेक उत्खननांत धान्यावशेषांबरोबर हरिण, बकरे, यांच्या हाडांचेही अवशेष मिळाल्याने या अनुमानास दुजोरा मिळतो. धान्य वाटण्या-

प्राचीन ऐतिहासिक कालातील मणी व ताईत

करिता वापरात आणल्या जाणाऱ्या दगडी पाट्यांवर त्रिरत्नादी बौद्धधर्मीय चिन्हे ज्या स्वैपाकघरात सापडली, त्याच ठिकाणी

सातवाहनकालातील पाटा-वरवंटा

हरणांचे अवशेष जळलेल्या स्थितीत नासिकच्या आणि नेवासाच्या उत्खननांत सापडले आहेत. याशिवाय नेवासाच्या हरभरे, करडी, बाजरी, गहू, नाचणी, धने, इ. धान्यांचे अवशेषही मोठ्या प्रमाणावर हाती लागले आहेत.

या कालातील लोखंडाच्या वापराचा विपुल पुरावा मिळालेला आहे. लोखंडाचे बाण, चाकू, सुऱ्या, विळे, दिवे, भाले, अशा विविध वस्तू वापरात होत्या. आपल्या लोहविषयक तांत्रिक ज्ञानाच्या जोरावरच प्राचीन ऐतिहासिक कालातील लोकांनी आपला प्रभाव पाडून नागरी संस्कृती उभारली. या संस्कृतीच्या विविधतेचा प्रत्यय जसा वाङ्मयात येतो, तसाच तो उत्खनित अवशेषांवरूनही येतो. चाणक्याच्या अर्थशास्त्रात उल्लेखिलेले अर्धचंद्राकृती टोक असलेले बाण आणि अणकुचीदार टोके असलेले त्रिक उत्खननांत सापडले आहेत. हे त्रिक जमिनीवर पसरून ठेवल्यास घोडदळाला पुढे जाणे कठीण

जाते. असेच विक पहिल्या महायुद्धात फ्रान्समध्येही वापरले गेले होते!

शैक्षणिक प्रगतीचा प्रत्ययही उत्खननांत आलेला आहे. शेकडो मुद्रा, नाणी, शिलालेख, इष्टकालेख, मातीच्या मडक्यावर कोरलेले लेख, अशोकाचे द्विभाषिक आणि एकभाषी लेख, आणि नालंदा, तक्षशिला येथील विद्यालयांचे अवशेष या कालातील बौद्धिक प्रगतीची आणि सुसंस्कृततेची पातळी दाखवितात. नेवाश्याच्या सातवाहनांच्या नाण्यांवरून त्यांचा कालखंड ठरविणे जसे शक्य झाले तद्वतच इ. स. च्या पूर्वी एक-दोन शतके व तितकेच नंतर एवढ्या कालातल्या राजकीय इतिहासाची रूपरेषा ठरविण्यास मुख्यत्वेकरून नाणीच उपयुक्त ठरली आहेत. याशिवाय त्यांवर जी विविध देवतांची आणि इतर धार्मिक चिन्हे आढळून येतात, त्यांवरून परदेशांतली राजघराणी भारतीय जीवनाशी कितपत समरस झाली आणि भारतातही धार्मिक जीवनाचे स्वरूप काय होते, हे कळून येण्यास फार मोठी मदत झाली आहे. नालंदा विश्वविद्यालयाच्या मुद्रा, भाजे येथील लाकडी तुळईवरील लेख, कौशांबी येथील घोषितारामासंबंधीचा लेख, कंदाहारजवळ सापडलेला अशोकाचा ग्रीक आणि अर्मेनियन भाषेतील लेख, यांनी प्राचीन ऐतिहासिक संस्कृतीवर विलक्षण प्रकाश टाकला आहे.

समृद्ध ऐहिक जीवन, राजकीय स्थिरता आणि मजबूत सामाजिक जीवनाची ठेवण, ही लोहयुगातील वैशिष्ट्ये होत. आणि यामुळेच कलेच्या क्षेत्रातही अलौकिक कामगिरी झाली असल्याचे प्रत्ययास येते. मथुरा, गंधार, भरहूत, सांची व अमरावती येथील शिल्पपद्धतीची वैशिष्ट्ये; तामलुक, अहिच्छत्रा, राजघाट येथील मृत्तिकामूर्ती; तेर येथील उत्कृष्ट हस्तिदंती आणि मृण्मय मूर्ती आणि गुप्तकालीन नाण्यांची मनोहारी बनावट, या गोष्टी केवळ राजकीय स्थिरता आणि भौतिक समृद्धता यामुळेच होऊ शकल्या यात शंका नाही.

मौर्यकालापासून गुप्तकालअखेरपर्यंत ही समृद्धता विकसित झाल्याचे उत्खनित अवशेषांवरून प्रत्ययास येते. मात्र मध्ययुगाच्या सुरवातीपासून घडी बिघडू लागली. राजकीय अनिश्चितता, परकीयांच्या स्वाऱ्या आणि अंतर्गत यादवी यांमुळे जनतेच्या जीवनाचे धागे विस्कळित झाल्यासारखे दिसतात आणि त्याचा प्रत्यय मध्ययुगीन स्थलांच्या उत्खननांत येतो. मुसलमानी अमदानीत कलेचे क्षेत्र जास्त संकुचित झाले. प्राचीन कालात समाजातील विविध स्तरांतील लोकांनी एकत्र येऊन उभारलेली कार्ल्यासारखी क्षेत्रे जशी सर्व समाजाच्या सामूहिक प्रयत्नांची निशाणी दाखवितात, तशी निशाणी मुसलमानी अमदानीत फारशी दिसत नाही. या कालातील सर्वसामान्यांच्या जीवनात आलेल्या आर्थिक विस्कळितपणाचे चित्र उत्खनित वास्तूंवरून आणि घराघरांतून चालत असलेल्या काचेच्या बहुरंगी बांगड्यांच्या धंद्यावरून चटकन दिसून येते.

भारतातील उत्खनित संस्कृतीचे चित्र जितके विविध तितकेच कालदृष्ट्या अतिविस्तृत आहे. अश्मयुगापासून मध्ययुगाच्या अखेरीपर्यंत येथे अनेक प्रकारच्या संस्कृती मूळ धरून राहिल्या, बदलल्या आणि नामशेषही झाल्या. या विविध संस्कृतींच्या परंपरांचे आणि जीवनपद्धतींचे विविध धागे एकत्र होऊन भारतीय जीवन समृद्ध आणि बहुरंगी झालेले आहे. आणि याचाच प्रत्यय भारतातल्या उत्खननांत स्पष्टपणे आलेला आहे.

गेल्या वीस-पंचवीस वर्षांत केलेल्या उत्खननांमुळे जी नवीन माहिती उपलब्ध झाली आहे, ती अशी –

अश्मयुगाच्या निरनिराळ्या विभागांची नावे बदलण्यात आली आहेत. (१) प्राचीन अश्मयुग याला आता पुराश्मयुग हे नाव देण्यात आले आहे. त्याचे तीन विभाग : पूर्व-पुराश्मयुग, मध्य-पुराश्मयुग व उत्तर-पुराश्मयुग. (२) मध्याश्मयुग व (३) नवाश्मयुग. ही नावे जुनीच आहेत. अश्मयुगाच्या या निरनिराळ्या कालखंडांविषयी नवीन पुरावा उपलब्ध झालेला आहे; त्याची माहिती अश्मयुग या लेखात दिली आहे.

**ताम्रयुग** – या युगातील सिंधुसंस्कृतीच्या व्याप्तीबद्दल नवीन पुरावा उपलब्ध झाला आहे. पंजाबातील रूपड, राजस्थानातील कालीबंगन, कच्छमधील सुरकोटडा, गुजरातमधील लोथल, उ. प्रदेशातील अलमगीरपूर, इ. ठिकाणी सिंधुसंस्कृतीचे अवशेष सापडले आहेत. लोथल येथील जहाजांची गोदी, कालीबंगन येथील हडप्पापूर्व संस्कृतीचे अवशेष, हडप्पा येथील मानवी दफने व तटबंदी आणि खालच्या थरात सापडलेली हडप्पापूर्व मातीची भांडी विशेष उल्लेखनीय आहेत. सिंधुसंस्कृतीच्या नाशाची कारणेही काही पंडितांनी शोधून काढली आहेत.

त्यानंतरच्या काळातील निरनिराळ्या ताम्रपाषाणयुगीन संस्कृतींचे अवशेष भारताच्या निरनिराळ्या भागांत गेल्या पंचवीस वर्षांत सापडले आहेत. राजस्थानातील बनास संस्कृती (इ. स. पू. २०००), मध्यप्रदेशातील माळवा संस्कृती (इ. स. पू. १६००) व कायथ संस्कृती; महाराष्ट्रातील जोर्वे संस्कृती (इ. स. पू. १५५०–१०००) अशी नावे त्या संस्कृतींना देण्यात आली आहेत. बनास संस्कृतीचे केंद्र अहाड, माळवा-संस्कृतीचे नावडातोडी आणि जोर्वे संस्कृतीचे इनामगाव ही स्थाने तेथील उत्खननांमुळे आता खूप महत्त्वाची ठरली आहेत.

महापाषाण-युगाचे अवशेष मुख्यतः द. भारतात सापडले आहेत. तमिळनाडूमधील आदिचनल्लूर येथील उत्खननात मानवी दफनांचे विविध प्रकार आढळतात. शिळावर्तुळे, दगडी

किंवा मातीच्या पेट्या, कुंभ यांत मृताबरोबर त्याचे दागिने, शस्त्रे, मातीची भांडी व घोडा पुरण्याची पद्धत होती. ब्रह्मगिरी येथील उत्खननानुसार या संस्कृतीचा काल इ. स. पू. ३ रे शतक ठरवण्यात आला होता. पण विदर्भ व कर्नाटक या प्रदेशांतील उत्खननानुसार तो इ. स. पू. सुमारे १००० ठरला आहे. इनामगाव येथे ताम्रपाषाणयुगीन जोरवे-संस्कृती व ही महा-पाषाणयुगीन संस्कृती यांचा संपर्क आला होता, असे दिसते.

दक्षिण भारतातील महाश्मयुगीन दफने वैशिष्टयपूर्ण आहेत. त्यांना शिळावर्तुळे म्हणतात. अशी शिळावर्तुळे महाराष्ट्रात नागपूरजवळ व माहुरझरी येथे बरीच सापडली आहेत.

उत्तर प्रदेशातील अत्रंजीखेडा येथे केलेल्या उत्खननात ताम्रपाषाणयुगीन व लोहयुगीन संस्कृतीचे अवशेष सापडले आहेत. तिथे आरंभी मुख्यतः लाल मातीची भांडी वापरणाऱ्या लोकांची वसाहत होती. त्यानंतर काळी-तांबडी भांडी वापरणाऱ्या लोकांची वसती सापडते. ही भांडी राजस्थानातील अहाड येथे सापडलेल्या भांड्यांसारखी आहेत. त्यानंतरच्या वसाहतीची चित्रित राखी भांडी इ. स. पू. ६–७ व्या शतकातली आहेत.

राजस्थानातील आहाड हे बनास नदीच्या खोऱ्यातील काळ्या-तांबड्या भांड्यांच्या संस्कृतीचे मुख्य केंद्र आहे. ही संस्कृती ताम्रयुगीन होती. तिचा काळ इ. स. पू. १६००–१४००. पांढऱ्या रंगात ठिपके किंवा रेषा अशी नक्षी असलेले काळे-तांबडे वाडगे हे या संस्कृतीचे वैशिष्टय होय. त्या लोकांची घरे मोठी, दगडगोट्यांचा पाया घातलेली होती; भिंती चिखल व गोटे यांच्या, चुली मातीच्या होत्या. तांब्याच्या चपट्या कुऱ्हाडी व मासेमारीचे गळ ते वापरीत होते.

दक्षिण सिंधमधील आम्री येथे हडप्पापूर्व संस्कृतीचे व संक्रमण काळातले अवशेष सापडले आहेत. त्यांत बरीच विविधता आढळते. निरनिराळ्या कालखंडांतली भिन्न प्रकारची भांडी व घरे सापडली आहेत.

इनामगाव येथे विस्तृत उत्खनन करण्यात आले. त्यात तीन कालखडांतील वसाहतींचे पुरावे मिळाले आहेत.

मध्यप्रदेशातील कायथा हे ताम्रपाषाणयुगीन संस्कृतीचे स्थान आहे. तिथेही तीन वसाहतींचे पुरावे उपलब्ध झाले आहेत. पहिली वसाहत हडप्पा-संस्कृतीशी मिळतीजुळती आहे. दुसरी वसती बनास संस्कृतीची काळी-तांबडी, मातीची भांडी वापरणाऱ्यांची होती. तिसरी वसती माळवा संस्कृतीच्या लोकांची. या वसाहतींचा काल इ. स. पू. २००० ते १५०० होता.

राजस्थानातील कालिबंगन हे सिंधुसंस्कृतीचे एक स्थान आहे. हे घग्गर नदीच्या काठी असून, तिथे केलेल्या उत्खननात दोन कालखंडांतील वसाहतींचे अवशेष मिळाले आहेत. पहिला कालखंड सिंधुपूर्व संस्कृतीचा व दुसरा कालखंड सिंधुसंस्कृतीचा.

पूर्व बिहारमधील चिरांद येथील उत्खननात विविध वस्तूंचा पुरावा सापडला आहे. इ. स. पू. ८ वे शतक या कालखंडातील अवशेषांत दगडी पाती, हाडांची व शिंगांची बाणाग्रे, तांब्याच्या वस्तू आहेत. त्या कालातली घरे कुडाची आणि मृद्भांडी काळी-तांबडी, व पांढरी नक्षी असलेली. इ. स. पू. ७ व्या शतकात तिथे लोखंडाचा वापर सुरू झाला व उत्तरेकडील चमकदार काळी भांडी वापरात आली.

नागपूरजवळ जुनापानी येथे सुमारे तीनशे महाश्मयुगीन शिळावर्तुळे सापडली आहेत. उत्खननात लोखंडी व तांब्याच्या वस्तू मिळाल्या आहेत. तिथली मृद्भांडी मुख्यतः काळी-तांबडी व अभ्रकयुक्त लाल असून, त्यांचा काळ इ. स. पू. १ ले सहस्रक.

कर्नाटकातील टेक्कलकोटा हे नवाश्मयुग व ताम्रपाषाणयुग या काळातील संस्कृतीचे स्थान होते. पहिल्या वस्तीत नवाश्मयुगीन दगडी हत्यारे व गोल झोपड्या आहेत. पाळीव जनावरे व धान्य यांचेही अवशेष सापडले आहेत. दुसऱ्या वसतीत तांब्याची व ब्राँझची उपकरणे मिळाली आहेत. तिसरी वसती लोहयुगीन होती. पहिल्या वसतीचा काल इ. स. पू. १७८० ते १६१५, दुसरीचा इ. स. पू. सुमारे ३३५.

महाराष्ट्रात वर्धा जिल्ह्यातील पवनार येथे इ. स. पू. १ ल्या सहस्रकातील महाश्मयुगीन वसतीचे अवशेष सापडले आहेत. त्यांत काळी-तांबडी मातीची भांडी व काही लोखंडी वस्तूही आहेत. त्यानंतरची वसती सातवाहन कालातली व सातवाहनोत्तर कालातली आढळते.

धुळे जिल्ह्यात प्रकाशे येथे पहिली वसती ताम्रपाषाणयुगातली होती. ते लोक राखी रंगाची व माळवा वर्गाची भांडी वापरीत होते. नंतर ते जोर्वे व रंगपूर वर्गाची भांडी वापरू लागले. तांब्याच्या वस्तू कमी पण लघु-अश्म-शस्त्रे बरीच सापडली आहेत. विविध प्रकारचे दगडी मणी, मातीचे बैल व खेळण्यातील बैलगाडीची चाके इथे सापडली आहेत.

पश्चिम बंगालमधील पांडुराजरे ढिबी येथे हडप्पोत्तर ताम्र-पाषाणयुगीन वसतीचे पुरावे मिळाले आहेत. नवाश्मयुग व लोहयुग या काळातली हत्यारे व मृद्भांडीही मिळाली आहेत.

भंडारा जिल्ह्यातील पौनी येथे प्रचंड स्तूपांचे अवशेष सापडले आहेत. ते शुंग-सातवाहनकालातले आहेत.

पूर्व खानदेशातील बहाळ येथे ताम्रपाषाणयुगातल्या वसाहतींचे अवशेष मिळाले आहेत.

राजस्थानातील बागोर येथे मध्याश्मयुगीन (इ. स. पू. ५०००–२८००) हत्यारे व वसाहतींचे अवशेष मिळाले आहेत. त्यानंतरच्या कालखंडातील तांब्याच्या वस्तू व मातीची भांडी तिथे

आहेत. तिथली तिसरी वसती लोहयुगीन (इ. स. पू. ६०० ते इ. स. २००) आहे.

औरंगाबादपासून ४० मैलांवर भोकरदन येथे केलेल्या उत्खननात सातवाहन कालातील व त्यानंतरच्या वस्त्यांचे अवशेष सापडले आहेत. तिथे मोठे कलाकेंद्र होते, असे दिसते.

नागपूरजवळ माहूरझरी येथे शिळावर्तुळांत मानवी सांगाडे व भाले, कुऱ्हाडी वगैरे शस्त्रे, सुतारकामाची हत्यारे, दिवे, कड्या, तांब्याच्या बांगडया, थाळ्या व सोन्याचे दागिने मिळाले. तिथे चमकदार काळी मातीची भांडी आहेत.

गुजरात (सौराष्ट्र) मधील रंगपूर येथील उत्खननात दोन कालखंडांतील वस्तू मिळाल्या आहेत. त्यांत हडप्पा संस्कृतीचे व नंतरच्या संस्कृतीचे अवशेष आढळतात.

गुजरातेत अहमदाबादच्या उत्तरेस लांघणज येथे इ. स. पू. सुमारे २००० च्या आसपास किंवा त्यापूर्वी क्षुद्राश्मशस्त्रे वापरणाऱ्यांची वसती होती. ही शस्त्रे गारगोटयाच्या छिलक्यापासून बनवलेली आहेत. इथे १४ मानवी सांगाडे सापडले आहेत. ते मिश्र वंशाचे, उंच मोठया डोक्याचे होते. शिकार व मासेमारी करून ते पोट भरत होते.

कच्छमधील सुरकोटडा येथे हडप्पा व हडप्पोत्तर संस्कृतीचे ताम्रपाषाणयुगीन अवशेष सापडले आहेत.

पुणे जिल्ह्यातील नीरा-कऱ्हा नदीकाठी सोनगाव येथे ताम्रपाषाणयुगीन संस्कृतीचे अवशेष सापडले आहेत. नवाश्मयुगीन व मध्याश्मयुगीन हत्यारांबरोबरच तांब्याची उपकरणेही मिळाली आहेत. पाळीव पशूंचे अवशेष, गहू, माळवा व जोर्वे वर्गांची मृद्‌भांडी त्यांत आहेत.

उत्तर प्रदेशात मथुरेजवळ इ. स. पू. ७०० ते १००० या कालातल्या वस्तीचे पुरावे मिळाले आहेत. त्या वसाहतीतले लोक चित्रित राखी मृद्‌भांडी वापरीत होते. त्यानंतरची वस्ती मौर्यशुंग काळातली व तिसरी वसती कुशाणकाळातली होती. त्या काळातले शिल्प, मूर्ती नाणी इ. वस्तू उत्खननात मिळाल्या आहेत.

कर्नाटकातील धारवाड जिल्ह्यात हल्लूर येथे नवाश्मयुगीन-ताम्रपाषाणयुगीन व मध्याश्मयुगीन वसाहतींचे पुरावे मिळाले आहेत. त्यांचा काल इ. स. पू. ११०५ ते ९५५ हा होता. [डॉ. शां. भा. देव; पु. त. वि. ]

**उत्तम** तिसरा मनू. हा प्रियव्रताचा पुत्र असून, एका मन्वंतराचा अधिपती होता. पवनादी त्याचे पुत्र होते. या मन्वंतरात वसिष्ठाचे प्रमदादी पुत्र सप्तर्षी होते. सत्य, वेदश्रुत व भद्र हे देव होते व सत्यजित हा इंद्र होता (भाग. पु. ५.१.२८; ८.१.२३-२४; विष्णुपु. ३.१.६.२४). [प्रा. च. को.; पु. इं. ]



**उत्तमभर्तृप्राप्ती** एक स्त्रीव्रत. वसंत ऋतूतल्या शु. द्वादशीस विष्णूची पूजा, हा या व्रताचा विधी आहे. फल – उत्तम भर्त्याची प्राप्ती. [ हि. ध. ]

**उत्तममुक्तावलिव्रत** एक जैन व्रत. याचा प्रारंभ भाद्र० शु. सप्तमीला होतो. व्रतविधी नऊ वर्षे. या व्रतात उपवास मुख्य आहे. त्या दिवशी जिनेंद्राचा अभिषेक व पूजा करायची असते. फल – तिसऱ्या भवात मोक्ष. [ व्र. ति. नि. ]

**उत्तमश्लोक** ( इ. स. १७०९–१७८६ ) एक महाराष्ट्रीय कवी. याचे मूळचे नाव माधवराव असे असून, पुढे कृष्णदयार्णवाने त्याला उत्तमश्लोक हे नाव दिले. हा बीड ( मराठवाडा ) येथील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होता. हा नाथपंथी असून, कृष्णदयार्णवाचा पट्टशिष्य होता. कृष्णदयार्णवाने ओवी सांगावी व उत्तमश्लोकाने ती लिहून घ्यावी, अशा प्रकारे भागवताच्या दशमस्कंधावरील कृष्णदयार्णवाची हरिवरदा नामक ओवीबद्ध टीका ८७ व्या अध्यायाच्या २३ व्या श्लोकापर्यंत निर्माण झाली. त्यानंतर कृष्णदयार्णव समाधिस्थ झाला व पुढचा ग्रंथ उत्तमश्लोकाने लिहून पुरा केला. त्याच्या काव्यात भक्तीचा जिव्हाळा व पांडित्यही आहे. त्याची भाषा प्रसन्न आहे.

उत्तमश्लोकाने प्रबोधसार नावाचा ग्रंथ लिहिला असून, त्याची ओवीसंख्या ३२१ आहे. याची समाधी पैठण येथे आहे. [ पुरुषार्थ – सत्पुरुष विशेषांक, जून-जुलै १९६४; म. चं. को.]

**उत्तमा** गुण किंवा प्रकृती यांचा विचार करून ठरलेला एक नायिकाभेद. भरताने ही नायिका मानली आहे. 'अहितकारिण्यपि प्रियतमे हितकारिण्युत्तमा' = प्रियकराचा अपराध असूनही जी त्याचे हित व प्रियच करते, ती उत्तमा समजावी, अशी भानुदत्ताने तिची व्याख्या केली आहे (रसमंजरी). गीतगोविंदातली राधा ही उत्तमा नायिकेचे उदाहरण ठरण्यासारखी आहे. ती म्हणते –

गणयति गुणग्रामं भ्रामं भ्रमादपि नेहते ।
वहति च परितोषं दोषं विमुञ्चति दूरतः ।।
युवतिषु चलत्तृष्णे कृष्णे विहारिणि मां विना ।
पुनरपि मनो वामं कामं करोति करोमि किम् ।।

अर्थ – कृष्ण जरी मला सोडून अन्य स्त्रीशी विहार करीत असला, तरी माझे मन त्याचे गुण पाहते, त्याच्यावाचून अन्याचा विचार करीत नाही, दोष दूर ठेवून परितोष धारण करते आणि

त्याचीच कामना करते, त्याला मी काय करू ! [ हिं. सा. को. ]

**उत्तरकाशी** हिमालयातील एक महान तीर्थक्षेत्र. हे हरद्वारच्या उत्तरेला सुमारे १०० मैल दूर भागीरथीच्या तीरावर आहे. इथे अनेक प्राचीन मंदिरे असून, त्यांपैकी विश्वनाथाचे व एकादशरुद्राचे ही दोन अत्यंत प्रेक्षणीय आहेत. विश्वनाथमंदिराजवळच गोपेश्वर, परशुराम, दत्तात्रेय, भैरव, अन्नपूर्णा, रुद्रेश्वर, लक्षेश्वर, शिव–दुर्गा व जडभरत यांची मंदिरे आहेत. [ कल्याण–तीर्थांक; हिमालयदर्शन ]

**उत्तर कुरू** उत्तरेकडील कुरू लोकांचा देश. उत्तर प्रदेशातील गढवालचा उत्तर भाग. अर्जुनाने दिग्विजयाच्या वेळी हा प्रदेश जिंकला होता व आपल्या राज्याला जोडला होता. राजसूय यज्ञाच्या वेळी या प्रदेशातून पुष्कळ रत्ने धर्मराजाला उपायन म्हणून मिळाली होती.

परीक्षित् राजाने हा देश जिंकून घेतला होता (भाग. पु. १.१६.१३). इथल्या स्त्रिया अप्सरांपेक्षाही सुंदर आहेत. इथली जोडपी चक्रवाक पक्ष्याप्रमाणे एकमेकांवर प्रेम करतात. पुरूरव्याने उर्वशीसह काही काल या ठिकाणी वास्तव्य केले होते.

हिमालयाच्या उत्तर भागाला उत्तर कुरू म्हणतात, असे ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे (८.१४). या प्रदेशाला देवक्षेत्र असेही नाव होते. ललितविस्तरात उत्तर कुरुदेशालाच प्रत्यंतद्वीप असे म्हटले आहे.

हा देश केवळ दंतकथात्मक व काल्पनिक आहे, असे काही विद्वानांचे मत आहे. [ पु. त. मी.; पु. इं.; हि. जॉ. ए. इं.; वै. सा. ]

**उत्तर कोकणस्थ माध्यंदिन ब्राह्मण** हे ब्राह्मण शुक्ल यजुर्वेदी वाजसनेयी शाखेचे आहेत. पारस्कर व कात्यायन या सूत्रांच्या आधारे ते आपली धर्मकृत्ये करतात. यमाई व महालक्ष्मी या त्यांच्या कुलदेवता आहेत. मार्गशीर्षात यांचे नवरात्र असते. आश्विनात दर रविवारी हे उपास करतात. भाद्र० व प्रतिपदेस यांचा मुका पाडवा नावाचा सण असतो. हे वर्षातून एकदा व्यंकोबाची समाराधना करतात. एका काळी हे व चित्पावन ब्राह्मण यांच्यामध्ये भयंकर वितुष्ट होते; पण आता ते मोडले आहे.

यांच्यापैकी पुरुषोत्तमपंत कावळे नावाचा एक ब्राह्मण बिंब (यादव वंशातील भीमदेव, इ. स. चे १३ वे शतक) राजाबरोबर उत्तर कोकणात आला. त्याने बिंब राजाचा अंमल स्थिर करायला चांगली मदत केली. पुढे त्याने त्या भागातली जोशीवृत्ती चांगुणाबाई नावाच्या एका विधवा स्त्रीकडून विकत घेऊन ती स्वकीयांस वाटून दिली. पुढे पोर्तुगीजांनी केलेल्या बाटवाबाटवीत जिवापाड श्रम करून या ब्राह्मणांनी हिंदुत्वाचे रक्षण केले व बाटलेल्यांना शुद्ध करून परत जातीत घेतले. [ मुं. इ. जा.; ब्रा. भि. वि. ]

**उत्तरकोसल** एक प्राचीन देश. अयोध्या ही याची राजधानी होती, असे रामायणात सांगितले आहे. श्रावस्ती ही नंतरच्या काळातील राजधानी होय. दक्षिण कोसल देशापासून उत्तर कोसलाचे पार्थक्य ध्यानात यावे, म्हणून पुढे त्याला श्रावस्ती देश असे म्हणू लागले. युआन च्वांग यानेही उत्तर कोसलाचे श्रावस्ती हे नाव सांगितले असून, त्याचे क्षेत्रफळ ६०० चौ. मैल एवढे दिले आहे. कोसलाचे राज्य इ. सनपूर्व ५ व्या शतकाच्या सुमारास मगध राज्यात समाविष्ट झाले. पाहा – कोसल. [ हि. जॉ. ए. इं. ]

**उत्तर दिशा** पूर्वेस तोंड करून उभे राहिल्यावर डाव्या हाताला येते, ती उत्तर दिशा होय. कुबेर हा या दिशेचा स्वामी आहे. ही दिशा शुभ मानलेली असून, कोणत्याही शुभकर्माच्या प्रसंगी पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख बसण्याची पद्धत आहे.

**उत्तरपथ** उत्तर भारतात प्राचीन काळी गंधार देशापासून पाटलिपुत्र नगरापर्यंत एक हमरस्ता होता. या महामार्गाला उत्तरपथ असे म्हणत. पाणिनीने एका सूत्रात उत्तरपथाचा उल्लेख केला आहे. या मार्गाने येणाऱ्या मालाला किंवा या मार्गावर फिरणाऱ्या लोकांना त्या काळी औत्तरपथिक अशी संज्ञा होती. अशोक, शेरशहा, अकबर इ. राजांच्या कारकिर्दीतही तो चालू होता. मेगॅस्थिनिसच्या मते या हमरस्त्याचे दोन मोठे फाटे होते. त्यांपैकी एक वंक्षपासून निघून कास्पियन सागर व काळा समुद्र यांच्यावरून युरोपपर्यंत जात असे. याच मार्गाने भारतातील माल पश्चिमी देशांत जात असे.

या मार्गाचा दुसरा फाटा भारतवर्षातच होता. तो गंधारच्या राजधानी असलेल्या पुष्कलावती नगरीपासून निघून मार्गात सिंधु, शुतुद्री व यमुना या नद्या पार करून हस्तिनापूर, प्रयाग, पाटलिपुत्र गा नगरांवरून ताम्रलिप्तीपर्यंत गेला होता. या मार्गावर पथिकांना विश्रांती घेण्यासाठी धर्मशाळा, विहिरी व छावेतांडे वृक्ष लावलेले होते. मार्गावर सर्वत्र एकेका कोसावर तद्दर्शक दगड बसविले होते. याच मार्गाचा एक मधला फाटा तक्षशिला व पुष्कलावतीपासून बाल्हिक देशात जात होता. व अशा प्रकारे भारत व पश्चिम देश यांना जोडणारा हा महामार्ग जगातील

व्यापारी रस्त्यांमध्ये फार महत्त्वाचा ठरला होता. [पा. का. भा.]

**उत्तरपंथा** स्वर्गाचा मार्ग. याला उत्तरापथ व उत्तरमार्ग अशीही नावे आहेत. हा मार्ग नागवीथी, गजवीथी व ऐरावतीवीथी यांनी बनलेला आहे (ब्रह्मांड पु. २.२७. १२४). [पु. इं.]

**उत्तरपुराण** एक जैन पुराण. जिनसेनानें आदिपुराण लिहायला घेतले होते; पण ते पुरे होण्याच्या आतच त्याला मृत्यू आला. नंतर त्याच्या शिष्यांनी ते पुरे केले व बाकीच्या तीर्थंकरांचे चरित्र लिहिण्याच्या उद्देशाने उत्तरपुराणाची रचना केली. यात दुसरा तीर्थंकर अजितनाथ याच्यापासून चौविसावा तीर्थंकर महावीर यांच्यापर्यंत तेव्वीस तीर्थंकरांची चरित्रे आली आहेत. एका तीर्थंकराच्या नावावर एक पुराण, अशी तेव्वीस पुराणे या ग्रंथात अंतर्भूत आहेत.

आदी व उत्तर या दोन्ही पुराणांत प्रत्येक तीर्थंकरांच्यापूर्वी काही राजांच्या कथा दिलेल्या असून, तीर्थंकरांचे ते पूर्वजन्म मानलेले आहेत.

उत्तरपुराणात श्रीकृष्णाला तीर्थंकर नेमिनाथाचा शिष्य व त्रिखंडाचा अधिपती म्हटले आहे. यात जैन धर्माच्या दीक्षेचीही वारंवार चर्चा आलेली आहे.

आदी व उत्तर या पुराणांत चौवीस तीर्थंकर, बारा चक्रवर्ती, नऊ वासुदेव, नऊ शुक्ल बल व नऊ विष्णुद्वीप अशा त्रेसष्ट महापुरुषांची चरित्रे दिलेली असल्यामुळे त्या दोन ग्रंथांना त्रिषष्ट्यवयवी असे नाव मिळाले आहे. [हिंदुत्व; वि. ध. द.]

**उत्तरपूजा** कोणत्याही देवतेचे विसर्जन करतेवेळी तिची जी पूजा करतात, तिला उत्तरपूजा असे नाव आहे. ही पूजा सामान्यत: पंचोपचारच असते. [सं. कौ.]

**उत्तर प्रदेश** भारतीय संघराज्यातील एक घटक राज्य. उत्तर प्रदेशाच्या उत्तरेला नेपाळ आणि तिबेट, पश्चिमेला आणि नैर्ऋत्येला हिमाचल प्रदेश, हरयाणा, दिल्ली व राजस्थान हे प्रदेश, दक्षिणेला मध्यप्रदेश आणि पूर्वेला बिहार असे प्रदेश आहेत. या प्रदेशाचे क्षेत्रफळ सुमारे २,९४००० चौ. कि. मी. असून, भारतातील हे एक चौथे मोठे संघराज्य आहे. यात ५४ जिल्हे आहेत. त्यांची नावे अशी –

उत्तर काशी, डेहराडून, टेहरी– गढवाल, चमोली, सहराणपूर, गढवाल, अलमोडा, पिठोरगड, मुज-फरनगर, बिजनोर, नैनिताल, मीरत, मोरादाबाद, रामपूर, बुलंदशहर, बदाऊन, बरेली, पिलभित, मथुरा, अलिगड, इटाह, शहाजहानपूर, लखिमपूर, आग्रा, मैनपुरी, फतेहगड, हरदोई, सितापूर, बहारिच, एटवा, ओराई, कानपूर, उन्नाव, लखनौ, बाराबंकी, गोंड, झाशी, ललितपूर, हमीरपूर, फतेहपूर, रायबरेली, सुलतानपूर, फैजाबाद, बस्ती, गोरखपूर, बांदा, अलाहाबाद, जौनपूर, अझमगढ, देवरिया, मिर्झापूर, वाराणसी, गाझीपूर व बालिया.

उत्तर प्रदेशाचे तीन भौगोलिक विभाग पडतात – (१) उत्तरेकडील हिमालयाचा प्रदेश (२) मध्यभागी असलेले गंगेचे खोरे आणि (३) दक्षिणेकडील विंध्य पर्वत व पठारी प्रदेश.

हिमालयाच्या प्रदेशात उत्तर काशी, चमोली, पिठोरगड, टेहरी-गढवाल, गढवाल, अल्मोडा, आप्ती नैनिताल व डेहराडून या जिल्ह्यांचा काही भाग एवढा प्रदेश येतो. अगदी उत्तरेकडील प्रदेशात नेहमी बर्फ पडलेले असते आणि त्या प्रदेशात वहाणाऱ्या नद्यांना या बर्फापासून कायमचे पाणी मिळते. हिमालयाच्या उंच भागात बंदरपूंछ, माऊंट कामेट, त्रिशूळ, डूनगिरी, नंदादेवी, बद्रीनाथ आणि केदारनाथ ही शिखरे आहेत.

या विभागात वहातुकीच्या साधनांचा अभाव असल्यामुळे लोकवस्ती अत्यंत विरळ आहे. या भागात फळे चांगली होतात. तांदूळ आणि गहू इथे थोडाबहुत पिकतो. डेहराडून प्रदेशात चहाची लागवड करतात. हिमालयाच्या दक्षिणेकडील पायथ्याशी शिवालिक टेकडया आहेत. तो भाग शिळांनी भरलेला असून, त्याला भाभर असे नाव आहे. यात सहराणपूर, बिजनोर, गढवाल, नैनिताल आणि पिलभित हे जिल्हे येतात. या प्रदेशात दाट जंगले आहेत. भाभर प्रदेशाच्या दक्षिणेला तराईचा प्रदेश असून, त्यात दाट जंगले व पाणथळ प्रदेश आहेत. यात हत्ती गवत खूप उगवते. आता मात्र या प्रदेशात पाणथळ जागा बुजवून गहू, तांदूळ, ऊस आणि ज्यूट ही पिके घेतली जातात.

गंगेच्या खोऱ्याचे तीन विभाग केलेले आहेत. पूर्वेकडील चौदा जिल्ह्यांचा प्रदेश – यात मधूनमधून पूर येतात आणि दुष्काळही पडतो. या प्रदेशातील लोकवस्ती अत्यंत दाट आहे. त्या मानाने खोऱ्याचा मध्य आणि पश्चिम भाग कालवे आणि पाटबंधारे यामुळे अधिक समृद्ध आहे.

गंगेच्या खोऱ्यात गंगा आणि यमुना या मुख्य नद्या असून, रामगंगा, गोमती, घाग्रा आणि गंडक या तिच्या मोठया उपनद्या आहेत. हा प्रदेश अत्यंत सुपीक आहे. प्राचीन काळापासून इथे शेती होत असून सध्या ७०% हून जास्त जमिनीवर शेती केली जाते. गहू, तांदूळ, चणे, सातू, ऊस ही मुख्य पिके आहेत.

गंगेच्या खोऱ्याच्या दक्षिणेला विंध्य पर्वत आणि पठारी प्रदेश आहे. त्यात झाशी, जालौन, बांदा, हमीरपूर व मिर्झापूर

हे जिल्हे आहेत. या विभागात बेतवा आणि केन या नद्या यमुनेला मिळतात. या विभागात पाऊस कमी पडतो आणि पाण्याचीही कमतरता आहे. त्यामुळे तिथे कोरडवाहू शेती केली जाते.

**हवामान** – उत्तर प्रदेशात वेगवेगळ्या प्रकारचे हवामान आढळते. हिमालयाच्या प्रदेशात हवा नेहमी थंड असते. साधारण ४००० मीटर उंच जागी नेहमी बर्फ पडलेले असते. या प्रदेशात १०० ते २०० सें. मी. पाऊस पडतो. पठारी प्रदेशात हवामान सुखद असते. जानेवारीत ते ३–४ डिग्री सें. ग्रे. इतके खाली उतरते आणि मे–जूनमध्ये ४२–४५ सेल्शिअसवर चढते. सर्वसाधारणपणे इथे तीन ऋतू आढळतात. आक्टोबर ते फेब्रुवारी हिवाळा, मार्च ते जून उन्हाळा आणि जून ते सप्टेंबर पावसाळा.

या प्रदेशात वारंवार पूर येतात आणि जीवित, वित्त आणि पिके यांची फार हानी होते. गंगा, यमुना, गोमती, घाग्रा, राप्ती रामगंगा, इ. नद्यांमुळे हे पूर येतात.

**जंगले** – या प्रदेशाचा सुमारे १३% विभाग जंगलाने व्यापलेला आहे. हिमालयाचा प्रदेश आणि गंगेच्या खोऱ्यातील तराई आणि भाभर प्रदेश यात पुष्कळ जंगले आहेत. बर्फाळ प्रदेशाच्या जवळ डोडेंड्रॉन आणि भूर्जपत्र यांची जंगले आहेत. त्याच्या खाली सिल्व्हर फर, देवदार, चीड आणि ओक हे वृक्ष वाढतात. हिमालयाच्या पायथ्याशी आणि तराई, भाभर प्रदेशात साल आणि हलदू हे वृक्ष आढळतात. नद्यांच्या काठाने शिसवीचे वृक्ष उगवतात. विंध्यातील जंगलात ढाक सागवान, महुआ, सलाई, चिरोंजी आणि तेंदू यांची राने आहेत. तसेच इथे औषधी वनस्पतीही अनेक प्रकारच्या आढळतात.

**प्राणी** – या प्रदेशात निरनिराळ्या तऱ्हेचे हवामान असल्यामुळे अनेक प्रकारचे प्राणीही आढळतात. इथल्या जंगलात वाघ, चित्ते, जंगली डुकरे, अस्वले, चितळ, सांबर, कोल्हा, साळिंदर, जंगली मांजर, ससा, खार, लांडगा, इ. अनेक प्राणी वस्ती करून आहेत. हिमालयाच्या उंच प्रदेशात कस्तुरी मृग आणि तपकिरी अस्वले आढळतात. वन्य प्राण्यांपैकी गंगेच्या खोऱ्यातील सिंह आणि तराई प्रदेशातील गेंडा हे प्राणी नामशेष झाले आहेत. आणखीही काही प्राण्यांची तीच गत होण्याची वेळ आली आहे. तेव्हा या वन्य प्राण्यांचे संरक्षण करण्यासाठी सरकारने कॉर्बेट नॅशनल पार्क स्थापन केला आहे. त्याचे क्षेत्रफळ सुमारे ३२४ कि. मी. आहे. या शिवाय बारा अभयारण्येही स्थापन केली आहेत.

उत्तर प्रदेशाची मुख्य नदी गंगा होय. तिला डाव्या बाजूने रामगंगा, गोमती व घाग्रा या नद्या मिळतात, तर उजव्या बाजूने यमुना नदी मिळते. टेहरी-गढ़वाल जिल्ह्यातल्या देवप्रयाग या ठिकाणी अलकनंदा व भागीरथी यांचा संगम होतो. त्या दोघींचा मिळून जो एक प्रवाह पुढे वाहू लागतो, त्यालाच गंगा म्हणतात. गंगा नदी हरिद्वाराजवळ मैदानात उतरते व राज्याच्या आग्नेय दिशेकडे वाहू लागते. यमुना नदी हिमालयात उगम पावते व उत्तर प्रदेशाच्या पश्चिम व दक्षिण सीमांचे जवळून वाहत जाऊन प्रयाग क्षेत्रात गंगेला मिळते.

**प्राचीन काळ** – उत्तर प्रदेशाच्या दक्षिण भागात पश्चिमेकडून पूर्वेकडे कैमूर पर्वताची रांग जाते. हा पर्वतीय भाग प्राचीन इतिहासाचे केंद्र होते. त्याची माहिती हळूहळू बाहेर येत आहे. जवळजवळ सर्व युगातील कालखंडात या भागात मानवांच्या अस्तित्वाच्या खुणा सापडतात. अलाहाबादपासून एकसष्ट मैल ईशान्येला बेलन नदीचे खोरे आहे. तिथे माणसांची वस्ती होती. तिथे उत्खनन केले असता नदीच्या गाळाच्या जाड थराखाली प्राचीनतम मानवाची हातकुऱ्हाड, स्क्रेपर, छिलणारी हत्यारे अशी हत्यारे सापडली आहेत.

त्यानंतरच्या कालातही इथे दोन नवीन अश्मयुगांचा उदय झाला. या काळात मानवाने आपल्या राहण्याच्या पद्धतीत काही सुधारणा केल्या. दुसऱ्या अश्मयुगातील लहान लहान हत्यारे इथे सापडली आहेत. तर तिसऱ्या अश्मयुगातील दगडाचे धारदार पाते सापडले आहे. त्यावरून त्याला बऱ्यापैकी शिकार करता येऊ लागली असावी. तसेच कंदमुळे, भाज्या वगैरे चिरता येऊ लागल्या असाव्या आणि लहान लहान हत्यारे बनविता येऊ लागली असावी, असे दिसते.

मिर्झापूर येथे केलेल्या उत्खननात एका चार फुटी जाड थरात अनेक मायक्रोलिथिक हत्यारे सापडली आहेत. तसेच तिथे उत्तर-दक्षिण दिशेत आडवी ठेवलेली सतरा मृत शरीरे मिळाली आहेत. हे सांगाडे एकावर एक रचलेले आहेत. अगदी वरच्या थरात काही मातीची भांडी आढळली आहेत.

यानंतर इथे नवाश्मयुगाचा उदय झाला. त्यात सापडलेल्या काही हत्यारांवरून या काळात थोडी शेती मानव करीत असावा, असे दिसते. बांदा जिल्ह्यातही पॉलिश केलेली हत्यारे व वेगवेगळ्या प्रकारच्या कुऱ्हाडी सापडल्या आहेत.

अशा प्रकारे डॉ. सांकलियांच्या मते या प्रदेशात प्राचीन व मध्य पॅलिओलिथिक, प्रगत मेसोलिथिक व निओलिथिक अशा पाच अश्मयुगीन संस्कृती नांदल्या. वैदिक वाङमयात मात्र उत्तर प्रदेशातल्या या संस्कृतीचा उल्लेख नाही. सनपूर्व सहाव्या शतकापासून वैदिक काळापर्यंत भारताच्या पुरातत्त्वविषयक माहितीचे काहीच पुरावे सापडत नाहीत. याच काळात रामायण व महाभारत या महाकाव्यांची रचना झाली.

अलीकडेच काही उत्खनने झाली आहेत..त्यांवरून या मधल्या कालखंडावर थोडा प्रकाश पडतो. प्राचीन काळी पांचालांची राजधानी असलेल्या सांप्रतच्या अहिच्छत्र नगरीत काही मृद्‌भांडी मिळाली आहेत. अशीच भांडी गंगा-यमुनेच्या दुआबातील उत्खननात सापडली आहेत. या स्थानांपैकी अहिच्छत्र, हस्तिनापूर, तिलपत, पानिपत, सोनपत, इ. गावांचा महाभारतात उल्लेख आहे.

हस्तिनापूर येथे काही खापरे सापडली आहेत. अशाच तऱ्हेची खापरे पुढच्या काळात उ. प्रदेशाच्या पश्चिम भागात शंभराहून जास्त ठिकाणी मिळाली आहेत. इथे सापडलेली ही सर्वांत प्राचीन खापरे होत. या खापरांवरून, इथे राहणारे लोक भटके नव्हते; त्यांचीही एक संस्कृती होती आणि ती सिंधू किंवा हडप्पा संस्कृतीपेक्षा फारशी कनिष्ठ प्रतीची नव्हती हे कळते. गंगा-यमुना दुआवात आलेल्या महापुरात ही संस्कृती नष्ट झाली असे श्री. वी.·बी. लाल म्हणतात.

कौशांवी, हस्तिनापूर आणि राजघाट येथील उत्खननात आणि विशेषत: कौशांवी येथे भाजलेल्या विटांची घरे, विहिरी व स्नानगृहे सापडली आहेत. याशिवाय, अनेक लहान लहान वस्तू उदा० नाणी, शंख व हस्तिदंत यांच्या बांगड्या, मातीच्या मूर्ती वगैरे उपलब्ध झाल्या आहेत. या सर्व वस्तू बुद्धपूर्व कालातील आहेत.

इतिहास – आर्यांनी पंजावातून पूर्वेला सरकून गंगा आणि यमुना यांच्या तीरावर आपल्या वसाहती स्थापन केल्या. हा काळ सनपूर्व २५०० ते १५०० असावा असे विद्वान मानतात. इथल्या मूळ रहिवासी असलेल्या दास लोकांशी लढाई केल्यानंतरच त्यांना इथे राहता आले. या कालाचे ज्ञान चार वेद, वेदांगे, ब्राह्मणे, आणि उपनिषदे इ. ग्रंथावरून आपल्याला मिळते. त्या वेळच्या आर्यांची राहणी साधारणपणे सध्याच्या आपल्या राहणीसारखीच होती. त्यांच्यात कुटुंबसंस्था होती. त्यांची घरे लाकडाची होती. आणि ते शेती करून राहत होते. राजा प्रजेवर राज्य करीत असे आणि त्याबाबतीत सभा आणि समिती त्याला सल्ला देत असत. जातिसंस्थाही नुकतीच अस्तित्वात आली होती.

इ. सनपूर्व ६०० च्या सुमारास आर्य आधिक पूर्वेकडे आणि दक्षिणेकडे सरकले आणि तिथले मूळ रहिवासी हे शूद्र बनले. नवीन निर्माण झालेल्या आर्य राजांमध्ये कुरू, पांचाल; काशी, कोसल आणि विदेह ही राज्ये आधिक महत्त्वाची होती. त्यांपैकी पहिली चार सांप्रतच्या उत्तर प्रदेशात होती. ही सर्व राज्ये आपापसात लढून आपले वर्चस्व स्थापण्याचा प्रयत्न करीत असत. सनपूर्व ७ व्या शतकाच्या शेवटी उत्तर भारतात अशी सोळा जनपदे आपसात भांडत होती. त्यातली आठ सध्याच्या उत्तर प्रदेशात होती. त्या वेळी उत्तर प्रदेशाला मध्य देश, आर्यावर्त किंवा अंतरदेश अशी नावे होती. ही आठ राज्ये पुढील प्रमाणे कुरू (मिरत, दिल्ली आणि ठाणेश्वर, राजधानी इंद्रप्रस्थ) पंचाल (वरेली, बुदावून आणि फरुकावाद राजधानी अहिच्छत्र) शौर्यसेन (मथुरा प्रदेश, राजधानी मथुरा), वत्स (अलाहाबाद प्रदेश राजधानी कौशांबी), कोसल (अवध राजधानी साकेत किंवा अयोध्या आणि श्रावस्ती किंवा सहेत-महेत), मल्ल (देवरिया जिल्हा राजधानी कुशीनगर), काशी (वाराणसी राजधानी वाराणसी), चेदी (बुंदेलखंड राजधानी शक्तिमती).

या कालात एक महान घटना घडली. ती म्हणजे इ. सनपूर्व ६२३ च्या सुमारास नेपाळमधील लुंबिनी इथे गौतमाचा जन्म झाला. गौतम हा शाक्यांचा राजपुत्र होता. शाक्य लोक सध्याच्या उत्तर प्रदेशाच्या पूर्व भागात मोठ्या संख्येने राहत होते. लोकांचे दु:ख, दैन्य, दारिद्र्य पाहून गौतम कळवळला आणि यावर उपाय शोधण्यासाठी तो वनात निघून गेला. तिथे अनेक वर्षे खडतर तपश्चर्या केल्यावर त्याला बोधी म्हणजे ज्ञान प्राप्त झाले. म्हणून त्याला गौतम बुद्ध असे म्हणू लागले. त्याने आपले पहिले प्रवचन सारनाथ इथे केले. त्याने बौद्ध धर्माची स्थापना केली आणि तो धर्म केवळ भारतातच प्रसार पावला, असे नव्हे तर चीन आणि जपान या देशातही तो पोचला. बुद्धाने आपल्या तत्त्वांचा अनेक ठिकाणी प्रचार केला. त्यांपैकी उत्तर प्रदेशात बरीच ठिकाणे आहेत. त्यांना आता बौद्ध क्षेत्रांचे माहात्म्य प्राप्त झाले आहे. बुद्धाच्या समकालीन महावीराचा उदय झाला आणि त्याने जैन धर्म स्थापन केला. त्याचाही भारतात अनेक ठिकाणी प्रसार झाला.

इ. सनपूर्व ५ व्या शतकाच्या शेवटी मगधाचे राज्य उदयाला आले. अजातशत्रू हा त्याचा पहिला राजा होता. मगधाचे साम्राज्य अनेक शतके टिकून होते. या काळात उत्तर प्रदेशाचा इतिहास म्हणजे बहुतांशी मगधाचाच इतिहास होता. अजातशत्रू आणि बिंबिसार यांच्यानंतर महापद्मनंदाने नंद वंशाची स्थापना केली. महापद्माच्या साम्राज्यात उत्तर भारताचा बराच भाग मोडत होता.

इ. सनपूर्व ३२२ च्या सुमारास चंद्रगुप्त मौर्याने नंद वंशाचा उच्छेद केला. या बाबतीत त्याला चाणक्याचे खूपच सहाय्य झाले. चंद्रगुप्त आणि बिंदुसार या दोघांनी मिळून एक फार मोठे साम्राज्य स्थापन केले.

मौर्य वंशातला सर्वांत प्रसिद्ध राजा म्हणजे अशोक (इ. सनपूर्व २७३ ते २३२) हा होय. सारनाथ येथे सापडलेल्या अशोकाच्या एका स्तंभाचे शीर्ष सध्याच्या भारतीय सरकारचे चिन्ह आहे. बुद्धाच्या धर्मचक्राचाही सरकारने आपले बोधचिन्ह म्हणून

स्वीकार केला आहे. अशोकाने अनेक स्तूप उभारले. त्यांपैकी सारनाथ येथील स्तूप फार प्रसिद्ध आहे.

अशोकाच्या मृत्यूनंतर मौर्य साम्राज्य खिळखिळे होऊन त्याचे अनेक तुकडे झाले. याचा फायदा घेऊन मिनांडरच्या अधिपत्याखाली ग्रीकांनी पंजाबवर स्वारी केली. पण त्यांना पूर्वेकडे, मध्य देशात मात्र विजय मिळवता आला नाही. कारण शुंग वंशातल्या पुष्यमित्राने त्यांची डाळ शिजू दिली नाही. शुंगानंतर काण्व वंशाने राज्य केले; पण सनपूर्व २७ च्या सुमारास आंध्राने त्यांची सत्ता उखडून टाकली. या मधल्या काळात भारतावर पार्थियन, शक आणि कुशाण या परकी लोकांनी हल्ले केले., शकांच्या एका राज्याची मथुरा ही राजधानी होती. कुशाणांनीही आपले मोठे राज्य स्थापन केले. कडफायसेस दुसरा याने वाराणसीपर्यंत राज्याची सीमा वाढवली.

त्यानंतर कनिष्क हा राजा गादीवर आला, त्याच्या दरबारात अश्वघोष हा बौद्धपंडित आणि चरक हा आयुर्वेदाचार्य हे विद्वान होते. अश्वघोषाने कनिष्काला बौद्ध धर्माची दीक्षा दिली.

कनिष्काच्या मृत्यूनंतर राज्याला उतरती कळा लागली आणि त्याचे तुकडे पडू लागले. तरीही कुशाणांनी सुमारे ३०० वर्षे राज्य केले. कुशाण साम्राज्यातून फुटून नाग वंशाने आपले राज्य मथुरा आणि कांतीपुरी येथे स्थापन केले. पाशिवाय अहिच्छत्र, कौशांबी आणि अयोध्या या ठिकाणीही नवी राज्ये उदयाला आली.

कुशाणानंतर सुमारे १०० वर्षांनी चंद्रगुप्ताने आपले साम्राज्य स्थापन केले. उत्तरप्रदेश हा त्यांच्या विशाल राज्याचाच एक भाग होता. चंद्रगुप्त दुसरा याच्या कारकीर्दीत फाहियान या चीनी प्रवाशाने त्याच्या राज्याला भेट दिली. त्याने त्या वेळच्या लोकांच्या सुखसमृद्धीचे व वैभवाचे वर्णन करून ठेवले आहे. गुप्तांचा काळ हा सुवर्णयुग म्हणून ओळखला जातो.

यानंतर कुमारगुप्त आणि स्कंदगुप्त हे दोन पराक्रमी राजे या वंशात झाले. स्कंदगुप्ताच्या कारकिर्दीत मध्य आशियातल्या हूणांनी भारतावर स्वारी केली आणि खूप लूटालूट केली. स्कंदगुप्ताने त्यांचा पराभव केला. स्कंदगुप्ताच्या मृत्यूनंतर हूण राजा तोरमाण आणि त्याचा पुत्र मिहिरगुल यांनी इथल्या लोकांवर खूप अत्याचार केले. तेव्हा माळव्यातल्या यशोधर्म्याने त्यांचा पराभव करून त्यांना पिटाळून लावले.

इ. स. ४६७ च्या सुमारास स्कंदगुप्ताचा मृत्यू झाला आणि गुप्त साम्राज्याला उतरती कळा लागली. तरी गुप्त राजांनी ६ व्या शतकाच्या मध्यापर्यंत आपला अधिकार गाजवला. गुप्त साम्राज्य मोडल्यावर मौखरी वंशाने कनौज येथे आपले राज्य स्थापन केले. त्यांनी मगधापर्यंत आपला राज्यविस्तार केला. याच सुमारास स्थानेश्वर येथे हर्ष नावाचा राजा राज्य करीत होता. त्याची बहीण राजश्री कनोजच्या राजाला दिलेली होती. माळव्याच्या राजाने त्याला ठार मारले, तेव्हा कनोजच्या मंत्र्याने हर्षाला राज्यकारभार चालवण्यासाठी पाचारण केले. त्यामुळे हर्षाचे बळ वाढले. माळव्याच्या राजाला मारून त्याने आपल्या बहिणीची सुटका केली. नंतर तो दिग्विजयासाठी बाहेर पडला. आणि उत्तर भारताचा बराचसा भाग त्याने आपल्या ताब्यात आणला.

हर्षवर्धनाने हिंदुधर्माप्रमाणे बौद्ध धर्मालाही राजाश्रय दिला. त्याच्या राज्यात सर्वांना अन्न, वस्त्र मिळत असे. कनौज हे अत्यंत भरभराटलेले नगर होते.

हर्षाच्या मृत्यूनंतर पुन्हा उत्तर भारतात अव्यवस्था निर्माण झाली. त्याच्या राज्याचे तुकडे पडले आणि बौद्ध धर्माचा ऱ्हास होऊन हिंदू धर्म पुनरुज्जीवित झाला. ८ व्या शतकात यशोवर्म्याने कनोजवर तावा मिळविला आणि तीच आपली राजधानी केली. काश्मीरच्या राजाच्या मदतीने त्याने तिबेटी लोकांचा पराभव केला. दुर्दैवाने याच काश्मीरच्या राजाने कट करून यशोवर्म्याला ठार मारले.

यानंतर कनौजवर स्वामित्व मिळविण्यासाठी दक्षिणेचे राष्ट्रकूट, बंगालचे पाल आणि पश्चिम भारतातील गुर्जर-प्रतिहार यांच्यामधे आपसात लढाया सुरू झाल्या. शेवटी प्रतिहारांनी विजय मिळविला. त्यांचा प्रमुख भोज याने गोरखपूरच्या बलाढ्य अशा चेदी राजांची मदत मिळविली आणि आपल्या शत्रूंचा पराभव करून पंजाब, अवध आणि इतर प्रदेशावर आपले स्वामित्व स्थापले. त्याची राजधानी मात्र कनौज हीच होती. प्रतिहारांनी पश्चिमेकडून येणारे मुसलमानांचे आक्रमण थोपवून धरले. भोजानंतर महेंद्रपाल गादीवर आला आणि त्याने आपल्या राज्याचा विस्तार केला. पण त्याचा पुत्र महिपाल याच्या कारकिर्दीत राष्ट्रकूटांनी कनौजवर काही काळ तावा मिळवला. पण नंतर त्यांनी तिथून माघार घेतली. प्रतिहारांच्या राज्याला यावेळी उतरती कळा लागली आणि नेमकी याचवेळी मुसलमानी आक्रमणांना सुरवात झाली.

प्रतिहारांच्या सामंतापैकी बुंदेलखंडाचे चंदेल यावेळी बलवान ठरले. त्यांनी प्रतिहारांचा पराभव केला. आणि आपले राज्य वाराणसीपर्यंत वाढवले. कलिंजरच्या किल्ल्याच्या आश्रयाने त्यांनी मुसलमानांविरुद्ध फळी उभारली आणि उत्तर प्रदेशातून त्यांना काही काळ तरी बाहेर हाकलून लावले.

चंदेलांशिवाय प्रतिहारांपासून फुटून निघालेले अनेक सामंत

होते. त्यांपैकी अजमेरचे चौहान, माळव्याचे परमार, गोरखपूरचे चेदीपासून फुटलेले कलचुरी, सपादलक्षाचे चाहमान, मेढपाटचे गहलौत आणि कनौजचे गाहडवाल हे प्रसिद्ध होते. हे सर्व राजपूत असून अत्यंत शूर होते. परंतु त्यांना दूरदृष्टीचा अभाव असल्याने त्यांनी मुसलमानांच्या विरुद्ध एकत्र येऊन देशाचे रक्षण केले नाही. इ. स. १० व्या शतकाच्या अखेरीला महमूद गझनवीने भारतावर पहिली स्वारी केली आणि त्यानंतर त्याने अशाच एकूण सतरा स्वाऱ्या भारतावर केल्या. कनोज शहर त्याने दोनदा लुटले आणि त्याची दुर्दशा करून टाकली. (इ.स.१०१९) इ. स. १०२० मधे त्याने चंदेल राजावर स्वारी केली; पण त्यात त्याला यश आले नाही. महमूद उत्तर भारताची लूट करून परत आपल्या देशाला निघून गेला.

त्यानंतर १५० वर्षांनी मुहम्मद घोरीने इ. स. ११९१ मध्ये चाहमान राजा पृथ्वीराजाच्यावर स्वारी केली परंतु पृथ्वीराजाने मुहम्मद घोरीचा तराई येथील युद्धात पराभव केला. आणि घोरीला उरलेल्या थोड्या सैनिकांनिशी आपले घर गाठावे लागले. या नंतर काही महिन्यांनी त्याने पुन्हा मोठ्या सैन्यांनिशी भारतावर हल्ला केला. पृथ्वीराजाने कनोजच्या गाहडवाल जयचंद या राजाची मदत मिळविण्याचा प्रयत्न केला; पण तो निष्फळ ठरला. पुन्हा तराई येथेच युद्ध झाले आणि त्यात पृथ्वीराज मारला गेला. त्याच्या मृत्यूने उत्तर भारतावरील हिंदू राजांची सत्ता संपुष्टात आली.

मुहम्मद घोरीने दुसऱ्याच वर्षी चांदवड येथे झालेल्या लढाईत जयचंदाला ठार मारले आणि लगेच मिरत, अलिगड, असनी, कनौज आणि वाराणसी ही नगरे जिंकून घेतली. अशा रीतीने जवळजवळ सर्व उत्तर भारत त्याच्या अधिपत्याखाली आला. फक्त चंदेल राजे टिकून होते आणि त्यांनी मुहम्मद घोरीला दक्षिणेकडे येऊ दिले नाही. चंदेलांनी सुमारे २०० वर्षे अशा प्रकारे राज्य केले.




मुहम्मद घोरीने स्वदेशी परत जाताना कुतुबुद्दिन ऐबक नावाच्या आपल्या एका गुलामास या नवीन जिंकलेल्या प्रदेशाचा प्रशासक नेमले. घोरीच्या मृत्यूनंतर (इ.स.१२०६) ऐबक स्वतःला स्वतंत्र सुलतान म्हणवू लागला. त्यानंतर सुमारे ६०० वर्षे दिल्लीवर निरनिराळ्या मुसलमान सुलतानांनी राज्य केले. आणि उत्तर प्रदेश हा दिल्लीच्या राज्याचा एक भाग बनला.

गुलाम घराण्याचा इ. स. १२९० मध्ये नाश झाला आणि खिलजी घराणे अधिकारावर आले. त्यांतल्या अलाउद्दीन खिलजीने फार मोठे साम्राज्य स्थापन केले; पण ते तितक्याच लवकर मोडकळीला आले आणि त्याचे तुकडे पडले.

त्यांपैकी एक राज्य उत्तर प्रदेशातील जौनपूर येथे उदयाला आले. त्याला शराकी सलतनत असे नाव होते. शराकींनी सुमारे ८४ वर्षे राज्य केले. त्यांचे राज्य अवध, गंगेचे खोरे आणि

पश्चिमेला कोईलपासून पूर्वेला तिरहूत आणि बिहार इतके पसरलेले होते. मधून-मधून हे दिल्लीवरही हल्ला करीत असत. त्यांच्या कारकीर्दीत जौनपूर हे अत्यंत वैभवशाली नगर बनले. दिल्लीची सत्ता कमकुवत झाल्यावर तिमूर याने इ. स. १३९८ मध्ये भारतावर स्वारी केली आणि अमानुष कत्तल, लुटालूट, जाळपोळ करून तो समरकंद ह्या आपल्या गावी परतला. या आक्रमणाची उत्तर प्रदेशाला विशेष झळ लागली नाही. यानंतर तुघलक वंशाचा नाश झाला आणि त्याचबरोबर भारतावरील तुर्कांचे आधिपत्य संपले. यानंतर अफगाण, सय्यद आणि लोदी या वंशांनी दिल्लीवर इ. स. १४१४ ते १५२६ या काळात राज्य केले. लोदी वंशाचा संस्थापक बहलोल याने इ. स. १४७८ मध्ये जौनपूर काबीज केले; पण उत्तर प्रदेशाच्या बऱ्याच मोठ्या भागावर अनेक हिंदू आणि मुसलमान सामंतांची सत्ता होती. त्यांना नष्ट करण्यासाठी इब्राहिम लोदीने आग्रा ही आपली राजधानी बनविली. उत्तर प्रदेशाच्या इतिहासातील ही महत्त्वाची घटना होय.

यानंतर दिल्लीच्या राजघराण्यात सत्तेसाठी अनेक कट-कारस्थाने होऊन त्यांपैकी एकाने काबूलमधील बाबर राजाला आपल्या मदतीला बोलावले. त्याने इब्राहिम लोदीचा इ. स. १५२६ मध्ये पानिपतावर पराभव केला. यानंतर भारतावर मुगलांचे राज्य सुरू झाले. मुगल वंशातील शेवटचा पराक्रमी राजा औरंगजेब हा १७०७ साली मरण पावला. आणि राज्याचे तुकडे होण्यास सुरवात झाली. इ. स. १७३९ मध्ये बंगाल, बिहार, ओडिसा, अवध आणि रोहिलखंड ही जवळजवळ स्वतंत्र राज्ये उदयाला आली. अवध आणि रोहिलखंड यांचा उदय १७३२ साली झाला आणि ते राज्य १८२६ पर्यंत टिकले. अवधाचा पहिला नवाब बुऱ्हाण-उल्-मुल्क सादतखान हा होता. अवधच्या अनेक नबाबांपैकी असफउद्दौला हा फार चांगला होता. दुष्काळात लोकांना मदत करण्यासाठी त्याने लखनौ इथे प्रसिद्ध इमाम-बारा बांधले. लखनौ हे त्या वेळी हिंदू-मुसलमानांच्या संमिश्र संस्कृतीचे केंद्र बनले होते. परंतु याच सुमारास इंग्रजांनी (इ. स. १७५७) प्लासीच्या लढाईनंतर बंगालमध्ये आपले पाय रोवले होते आणि अवधच्या राज-कारणात ते मधूनमधून हस्तक्षेप करीत होते. अशा रीतीने त्यांनी नवाबांकडून अवधाचा बराच भाग आपल्या ताब्यात घेतला. इ. स. १८५६मध्ये अवधाचा शेवटचा नवाब वाजिदअली शाह याला ईस्ट इंडिया कंपनीने गादीवरून काढून टाकले. आणि कलकत्त्याला पाठवून दिले. नंतर अवधावर चीफ कमिशनरचे राज्य सुरू झाले. मध्यंतरी ईस्ट इंडिया कंपनीने कुमाऊँ, गढवाल आणि डेहराडून हे प्रदेश घेतले. आणि त्या सर्वांना मिळून नॉर्थ वेस्टर्न प्रॉव्हिन्स असे नाव दिले. आणि त्याच्यावर एका लेफ्टनंट गव्हर्नरची नियुक्ती केली. इ. स. १८७७ मध्ये अवधाचे बारा जिल्हे या प्रॉव्हिन्सला जोडण्यात आले. इ. स. १९०२ मध्ये या प्रदेशाला युनायटेड प्रॉव्हिन्सेस ऑफ आग्रा अँड अवध हे नाव मिळाले व १९५० मध्ये त्याला उत्तर प्रदेश असे नाव मिळून ते एक स्वतंत्र राज्य झाले.

इ. स. १९२१ पर्यंत लेफ्टनंट गव्हर्नर उत्तर प्रदेशाचे राज्य चालवत होता. आणि त्याच्या मदतीला सरकारी सचिव होते. इ. स. १९२१ मध्ये उत्तर प्रदेशाची गव्हर्नरचा प्रॉव्हिन्स अशी पदोन्नती झाली आणि दोन एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर आणि दोन मंत्री गव्हर्नरच्या मदतीला देण्यात आले. हा गव्हर्नर व्हाइसरॉयतर्फे भारताच्या सेक्रेटरी ऑफ स्टेट याला जबाबदार होता. इ. स. १९३५ मध्ये गव्हर्न्मेंट ऑफ इंडिया अॅक्टनुसार उत्तर प्रदेशाच्या राज्यकारभाराची सर्व जबाबदारी लोकप्रति-निधींवर सोपविण्यात आली. भारताला १९४७ मध्ये स्वातंत्र्य मिळाले. त्यानंतर उत्तर प्रदेशात रामपूर, टेहरी गढवाल आणि वाराणसी या संस्थानांची भर पडली.

**सांस्कृतिक परंपरा–** उत्तर प्रदेश भारतीय संस्कृतीच्या विकासाचे एक प्राचीन क्षेत्र आहे. याचा इतिहास हा अविरत भारताच्या सांस्कृतिक इतिहासाचा एक अविभाज्य घटक आहे. या प्रदेशातील गंगेचे खोरे म्हणजे प्राचीन संस्कृतीचे उगम-स्थान म्हणावे लागेल. सिंधुसंस्कृती आणि वैदिक संस्कृती यांना जोडणारा हा एक दुवाच असावा. वाराणसी नगरी, ही मोहेंजोदडो, ऊर, बाबिलोन, मेंफिस या नगरांहून पुरातन असावी असे डॉ. नंदलाल चटर्जी म्हणतात. आर्यांनी हा प्रदेश व्यापल्यानंतर या भागात हस्तिनापूर, पांचाल, कोसल, इ. अनेक बलिष्ठ राज्ये स्थापन झाली. हिंदूंच्या औपनिषदिक तत्त्व-ज्ञानाची हीच उगमभूमी आहे. षड्दर्शने, नीतिशास्त्र, दैवतशास्त्र इ. शास्त्रांचा जन्म याच भूमीत झाला. इथल्या नैमिषारण्यातील ऋषींचे आश्रम ही विद्येची अधिष्ठाने होती. याज्ञवल्क्य, वसिष्ठ, विश्वामित्र, वाल्मीकी, भारद्वाज, कपिल, व्यास इ. महर्षी याच भागात राहत होते. रामायण आणि महाभारत ही दोन महाकाव्ये याच प्रदेशात निर्माण झाली. प्राचीन काळी या प्रदेशातील काशी, प्रयाग, अयोध्या, कौशांबी, मथुरा इ. नगरे विद्या व कला यांची माहेरघरे होती.

इ. स. ५०० पर्यंत उत्तर प्रदेशावर मगध सम्राटांची सार्वभौम सत्ता असली तरी, या प्रदेशातील सांस्कृतिक जीवन प्राचीन परंपरेला धरून अबाधित चालू होते. ग्रीक, यवन, शक, कुषाण इ. परकीय लोकांची आक्रमणे आली ! पण ते लोक इथल्या संस्कृतीतच समाविष्ट झाले. इ. स. च्या ६ व्या शतकात मौखरी

राजवंशाचे स्वतंत्र राज्य प्रस्थापित होऊन या प्रदेशाला वैभव प्राप्त झाले. तेव्हापासून कनौज नगराला उज्जैन व पाटलीपुत्र या नगरांची प्रतिष्ठा प्राप्त झाली. हर्षवर्धनाच्या साम्राज्याची ती राजधानी होती. गुर्जर-प्रतीहारांच्या काळातही कनौजचे व उ. प्रदेशाचे वैभव वाढले.

इ. स. च्या १३ व्या शतकात दिल्लीवर मुसलमानी सत्ता स्थापित झाल्यानंतर उ. प्रदेशही हळूहळू मुसलमानी सत्तेखाली गेला. त्यापूर्वी तिथे प्राचीन काळातली सांस्कृतिक परंपरा सुरक्षित होती. त्यानंतर मात्र ती तशी राहू शकली नाही. आगरा हे शहर मुसलमानांचे राजधानीचे शहर बनले होते.



हिंदुविद्यापीठ – वाराणसी

हिंदू समाजावर मुस्लीम संस्कृतीचा विशेष प्रभाव पडला, तो याच प्रदेशात. इथे झालेल्या हिंदु-मुस्लीम साधु-संतांनी अन्य धर्मातील तत्त्वे व विचार जाणून घेतले व उभय संस्कृतींना समन्वयाचे आणि सहिष्णुतेचे वळण लावण्याचा प्रयत्न केला. कबीर व त्याचे शिष्य यांनी या प्रदेशात हिंदु-मुस्लीम सलोख्याचे वातावरण निर्माण केले. सूफी संतांनीही तेच कार्य केले. मोगल बादशहा शहाजहाँ याचा पुत्र दारा शुकोह याने संस्कृत भाषा व हिंदू तत्त्वज्ञान यांचा अभ्यास करून या समन्वयाला हातभार लावला होता. रामानंद, कबीर, सूरदास या श्रेष्ठ संतांनी याच प्रदेशात भक्तीचा मळा फुलविला. उत्तर प्रदेशातला सर्वश्रेष्ठ संतकवी तुलसीदास हा होय. त्याने ‘ रामचरितमानस ’ लिहून जनतेपुढे मानवी जीवनाचे नैतिक आदर्श उभे केले व तिथल्या जनतेत रामधुन पसरून दिली. तुलसीदासामुळेच ‘ सियराम ’ हा उत्तर प्रदेशाचे परम उपास्य ठरला.

धर्माप्रमाणेच कला व साहित्य यांच्या क्षेत्रांतही हिंदु-मुस्लीम संस्कृतीचा समन्वय उत्तर प्रदेशातच विशेषत्वाने झालेला दिसतो. आगरा येथील ताजमहाल हिंदू व इस्लामी अशा समन्वित स्थापत्याचा उत्कृष्ट नमुना आहे. हिंदी व उर्दू या दोन भाषांचे सहजीवन याच प्रदेशात घडले. सामाजिक जीवनातही हिंदु-मुस्लीम समन्वय याच प्रदेशात विशेषत्वाने घडून आला. मोगल सत्ता दुबळी झाल्यानंतरही ही समन्वित संस्कृती या प्रदेशातील अवध संस्थानात टिकून राहिली. मोगल कालात सांस्कृतिक नेतृत्व दिल्लीकडे होते, ते पुढे लखनौकडे गेले.

१८५७ च्या क्रांतियुद्धात या प्रदेशाने फार मोठा भाग घेतला होता. या युद्धाची प्रमुख केंद्रे याच भागात होती व युद्धाचे बरेचसे नेते याच प्रदेशातले होते. ब्रिटिश सत्ता प्रस्थापित झाल्यानंतर उत्तर प्रदेश हा एक प्रांत बनविला गेला. त्याची सांस्कृतिक प्रगती त्यानंतर नव्या धर्तीने सुरू झाली. या भागात पुढे अनेक विद्यापीठे स्थापन झाली. पं. मैथिलीशरण, पं. सुमित्रानंदन, महाकवी निराला, श्रीमती महादेवी इ. हिंदी कवी आणि साहित्यिक, तसेच गालिब, मौ. आजाद. नज़ीर अहमद, अकबर, प्रेमचंद इ. उर्दू लेखक, या प्रदेशात विख्यात झाले. राजकीय क्षेत्रात पं. अयोध्यानाथ, पं. गंगाप्रसाद, पं. मोतीलाल नेहरू, पं. मालवीय, श्री. लालबहादुर शास्त्री, श्रीमती इंदिरा गांधी, इ. थोर राजकीय नेते या प्रदेशाला लाभले. भारताचे सुपुत्र पं. जवाहरलाल नेहरू हे याच प्रदेशातले होते. आंतरराष्ट्रीय जगात त्यांनी आपल्या शांतिप्रिय धोरणामुळे आणि व्यापक दृष्टिकोनामुळे फार मोठी कीर्ती मिळविली.

प्राचीन काळी दाशरथी राम व भगवान श्रीकृष्ण हे दोघे महान अवतार याच प्रदेशात प्रकट झाले. त्यांच्याही पूर्वकाळात शिव, विष्णू व दुर्गा या तीन महान दैवतांची ही लीलाभूमी होती. म्हणून या प्रदेशात राम-कृष्ण व शिव-विष्णू यांची असंख्य मंदिरे उभारली गेली आहेत. एका वाराणसीतच सुमारे २००० मंदिरे आहेत. काशीची यात्रा करणे व विश्वेश्वराचे दर्शन घेणे हे समस्त हिंदू जातीने आजवर महत्पुण्यकृत्य मानले आहे. गंगा आणि यमुना या दोन लोकपावनी नद्या याच प्रदेशाची भूमी पवित्र करतात. प्रयाग येथे त्या दोघींचा संगम झाला असून, त्या क्षेत्राला ‘ तीर्थराज ’ ही पदवी आहे. पुण्यनगरी वाराणसी गंगेच्या तीरावरच वसली आहे.

कोसलाची राजधानी अयोध्या हिला प्रभू रामचंद्रामुळे गौरव प्राप्त झाला. श्रीकृष्णाचा जन्म व त्याच्या बाललीला, यांमुळे मथुरा व गोकुळ-वृंदावन या स्थळांना तीर्थरूपता प्राप्त झाली आहे. मिर्जापूरपासून सात मैलांवर गंगेच्या काठी एका डोंगरावर विंध्याचल नावाचे एक क्षेत्र आहे. तिथूनच विंध्याची पर्वतराजी सुरू होते. तिथले विंध्यवासिनीचे मंदिर प्रसिद्ध आहे. कानपूरपासून चौदा मैलांवर बिठूर (ब्रह्मावर्त) हे क्षेत्र आहे. ब्रह्म-

देवाने विश्वनिर्मितीचे कार्य पूर्ण झाल्यानंतर इथेच अश्वमेध केला होता, असे सांगतात. वाल्मीकीचा आश्रम इथे असून सीतेने आपल्या लव-कुश नामक पुत्रांना इथेच जन्म दिला होता. सीतापुर जिल्ह्यातील गोमतीच्या तीरावरचे निमसर म्हणजेच पुराणकालीन नैमिषारण्य होय. हे शौनकादी ऋषींच्या वसा-



लव–कुशांची जन्मभूमी, ब्रह्मावर्त

हतीचे मोठे क्षेत्र होते. त्या ठिकाणी त्यांची मोठमोठी सत्रेही चालत. हरिद्वार हे गंगा नदी मैदानात उतरते, त्या ठिकाणचे मोठे क्षेत्र आहे. इथे १२ वर्षांनी कुंभमेळा भरतो. पुराणप्रसिद्ध दक्षयज्ञ इथून जवळच असलेल्या कनखल क्षेत्रात झाला. या ठिकाणी आर्य समाजाने चालविलेल्या शिक्षणसंस्था आहेत. तिथून पुढे २४ कि. मी. अंतरावर हृषिकेश हे क्षेत्र गंगेच्या काठीच आहे. हे नारायणाचे स्थान समजले जाते. हिमालयातील केदारनाथाचे मंदिर हे भारतातले सुप्रसिद्ध क्षेत्र मानले जाते. कारण तिथले शिवलिंग हे एक ज्योतिर्लिंग आहे. हे मंदाकिनीच्या खोऱ्यात असून त्याच्या जवळच 'महापंथ' शिखर आहे. हिमालयातले सर्वश्रेष्ठ तीर्थक्षेत्र म्हणजे बदरीनारायणाचे स्थान होय. या बदरीनारायणाचे प्राचीन काळीच नष्ट झालेले मंदिर शंकराचार्यांनी पुनश्च बांधले, असे सांगतात. हिमालयात अशी अनेक तीर्थे आणि क्षेत्रे आहेत. इतकेच नव्हे; तर समग्र हिमालयच देवतात्मा मानलेला आहे. हिमाचल ही ऋषींची तपोभूमी व योग्यांची ध्यानभूमी आहे. हिमालयात बदरिकाश्रमी वास्तव्य करूनच व्यासांनी भारताची रचना केली.

महाकाव्यांच्या कालानंतर इथे अनेक संस्कृतीचे स्रोत वाहू लागले. त्यांपैकी गौतम बुद्धाने स्थापलेला बौद्ध धर्म आणि महावीराचा जैन धर्म हे दोन फार महत्त्वाचे होते. या दोन धर्मांच्या खुणा वाङ्मय, कला, स्थापत्य आणि राज्यभर पसरलेले प्राचीन भग्नावशेष यांच्या रूपाने पाहायला मिळतात.

बौद्ध धर्माचा उदय वाराणसीजवळ सारनाथ येथे झाला. बौद्धग्रंथांत त्या स्थानाला इसिपत्तन किंवा मृगदाव असे म्हटले आहे. अशोकाने तिथे स्तूप व स्तंभ उभारले, तेव्हापासून बौद्ध जगात त्याचे माहात्म्य वाढले. सनपूर्व ३०० ते इ. स. १२०० पर्यंतच्या १५०० वर्षांतील भिन्न भिन्न स्मारकांचे भग्न अवशेष तिथे सापडले आहेत. त्यांत चौखंडीचा स्तूप, धमेखस्तूप, सिंहशीर्ष स्तंभ व मूलगंधकुटी हे प्रमुख होत. श्रावस्ती ही नगरी उत्तर कोसलाची प्राचीन राजधानी होती. तिचाही बुद्धाच्या जीवनाशी घनिष्ठ संबंध आला होता. बुद्धाने तिथे अनेक प्रवचने केली होती व वर्षावासही केला होता. त्या घटनांचे स्मारक म्हणून तिथे अनेक स्तूप व विहार बांधले गेले होते. त्या नगरीचें अवशेष राप्ती नदीच्या तीरावर सहेथ-महेथ (श्रावस्ती) या ठिकाणी सापडले आहेत.

सांकास्य हे नगरही बुद्धाच्या तेथील वास्तव्यामुळे विख्यात बौद्ध क्षेत्र बनले होते. फरुकाबादजवळचे संकिस हे गाव म्हणजेच प्राचीन सांकास्य होय, असे आता सिद्ध झाले आहे. बुद्धाचे महापरिनिर्वाण ज्या ठिकाणी झाले, ते कुशिनारा हे गाव याच प्रदेशात आहे. सांप्रत त्याला कसिया म्हणतात. इथे परिनिर्वाण अवस्थेतली बुद्धाची प्रचंड मूर्ती आहे.

**लोक** – उत्तर प्रदेश हे भारतातील राज्यांपैकी सर्वांत दाट लोकवस्तीचे राज्य आहे. १९७१ च्या शिरगणनेनुसार त्याची लोकसंख्या नऊ कोटी होती. त्यात बहुसंख्य म्हणजे ८३ टक्क्यांहून जास्त हिंदू व सुमारे पंधरा टक्के मुसलमान आहेत. बाकी मग शीख, ख्रिश्चन, पारशी, इ. लोक आहेत.

सुमारे साठ टक्के लोक मागसलेले, वर्गीकृत जाती व जमातींचे आहेत. आदिवासी लोकांची वस्ती डोंगराळ प्रदेश, तराईभाबर आणि विंध्य प्रदेशात आहे. वर्गीकृत जातीजमातींची बहुतेक वस्ती खेड्यापाड्यांत असते. निरनिराळ्या जाती, उदा. अहीर, गुजर, कर्मी, भूमिहार या संघटितपणे एकत्र राहिलेल्या आहेत.

मुसलमानांची वस्तीही मीरत, आग्रा, रोहिलखंड या पश्चिमेकडील भागात आणि पूर्वेला गोंड, बहरिच, आझमगड, जौनपूर आणि गाझीपूर या भागात एकवटलेली आहे.

उत्तर प्रदेशात सुमारे दहा लाख लोक वन्य जमातींचे आहेत. त्यांची वस्ती गढवाल, कुमाऊं यांचा डोंगराळ प्रदेश, उत्तराखंड, तराई भाबर प्रदेश, विंध्यभूमीचा पट्टा या भागात आहे. विंध्यभूमीच्या मिर्झापूर. अलाहाबाद, वाराणसी व बुंदेलखंड या भागात त्यांची संख्या जास्त आहे.

बोरा, भोटिया आणि राजी या जमातींची वस्ती गढवाल,

कुमाऊ, पिठोरगड, उत्तरकाशी आणि चमोली या भागात आहे. खस, औजी, डोम, कोळी, कोइसर, कोल्टा या जमाती डेहराडून जिल्ह्यात राहतात. भोकसा आणि थारू यांनी तराई-भावर प्रदेशात वस्ती केली आहे. अगारिया, भिल्ल, भूमिहार, चेरो, घासिया, गोंड, कोल, कोरवा, उराँव, इ. जमातींनी विंध्याचा पट्टा व्यापला आहे.

त्यांच्यापैकी खस, बोरा, थारू आणि भोकसा हे मुळात शेतकरी आहेत. पण त्यांच्याजवळ जमीन थोडी असल्यामुळे त्यांना शेतमजूर म्हणून काम करावे लागते. राजी आणि कोरवा हे तर अजूनही कंदमुळे, फळे खाऊनच जगतात. भोटिया हे मात्र व्यापारावर आपली उपजीविका करतात. हे आदिवासी लोक स्वतःला हिंदू म्हणवतात.

सर्वसाधारण भारतीय लोकांप्रमाणे उत्तर प्रदेशातील बहुसंख्य लोक खेड्यांत राहतात. मातीच्या भिंती, त्यावर कौले किंवा गवत शाकारलेले, अशा अस्ताव्यस्त पसरलेल्या झोपड्यांचा पुंजका म्हणजे खेडे होय. त्यात सांडपाण्याची किंवा दिवाबत्तीची काहीच सोय नसते. बाहेर जाण्यासाठी गल्ल्या किंवा बोळ असतात. खेड्यांतील वस्ती पाचशेपासून पाच हजारांपर्यंत असते. या खेड्यांवर काळाचा प्रभाव फारसा पडलेला नाही. क्वचित कुठे एखादे विटांचे किंवा सिमेंट काँक्रीटचे घर दिसते, तेवढेच.

अत्यंत दारिद्र्यामुळे १९ व्या शतकाच्या अखेरीस व २० व्या शतकाच्या सुरवातीला इथले लाखावर लोक फिजी, मॉरिशस, वेस्ट इंडीज, नाताळ, इ. देशांत मजूर म्हणून गेले. नंतरच्या काळात अनेक लोक आसाम, बंगाल, मध्य प्रदेश मुंबई, इ. राज्यांत कामधंद्यासाठी स्थलांतरित झाले. अजूनही कलकत्ता, मुंबई यांसारख्या महानगरांत खेड्यातील लोकांचे जथे रोजच्या रोज लोटत असतात.

गावातील जमीनदार बहुधा उच्च वर्णीय असतात. त्यांना गावात मान असतो. ते गावातल्या लोकांना शेतावर काम देतात. अशाच प्रकारे जाट, अहीर व भूमिहार यांचे वर्चस्व असलेली अनेक गावे उत्तर प्रदेशात आहेत.

खेड्यातील आयुष्यक्रम तसा कंटाळवाणा असतो. त्यामुळे गावात लग्नकार्य निघाले, की लोकांच्या उत्साहाला उधाण येते. सर्वजण कार्यात मदत करतात. लग्नात डामडौल, आणि भपका यांचे प्रदर्शन होते. संबंधित लोक कार्यात आपल्या ऐपतीबाहेर खर्च करतात आणि कर्जबाजारी होतात. मर्तिकाच्या प्रसंगीही ज्ञातिभोजन द्यावे लागत असल्याने असाच खर्च होतो.

यांची करमणुकीची साधने म्हणजे मधून मधून भरणारे मेळे, जत्रा व उत्सव ही होत. त्या वेळी नौटंकी, कठपुतळी, आल्हा-उदलचे पोवाडे, इ. कार्यक्रम होतात. ते त्यांना फार आवडतात.

गावात किंवा आसपास आठवड्यातून एकदा, दोनदा किंवा तीनदाही बाजार भरतो. तिथे खेडूत आपला माल विकायला घेऊन जातात आणि गरजेच्या वस्तू विकत आणतात. कापड, खोटे दागिने वगैरे मात्र ते जवळच्या शहरातून आणतात.

**सण आणि उत्सव** – सर्व भारतातल्याप्रमाणे उ. प्रदेशातही वर्षभर कसले ना कसले सण आणि उत्सव चालूच असतात. त्यांतले काही सण पुढे दिले आहेत –

नवरात्रात इथे दुर्गापूजेचा उत्सव असतो. श्रीरामाला मदत करण्यासाठी ती पृथ्वीवर अवतरली असे सांगतात. सप्तमी आणि अष्टमी हे तिच्या विशेष पूजेचे दिवस असतात. नवमीला तिच्या मूर्तीचे वाजतगाजत नदीत अगर तळ्यात विसर्जन करतात. नवरात्रातच निरनिराळ्या ठिकाणी रामलीलेचे प्रयोग होतात आणि दसऱ्याला रावण, मेघनाद आणि कुंभकर्ण यांच्या भल्या मोठ्या प्रतिमा करून जाळतात.

आश्विन वद्य चतुर्थीला सुवासिनी स्त्रिया पतीच्या आयुरारोग्यधनप्राप्तीसाठी करवाँ चौथ हे व्रत करतात. त्या दिवसभर उपास करतात. आणि चंद्रोदयानंतर चंद्राची पूजा करून उपास सोडतात. आश्विन वद्य अष्टमीला अहोई अष्टमी असे नाव आहे. त्या दिवशी स्त्रिया मुलांच्या कल्याणासाठी उपास करतात.

दिवाळी हा त्यांचा महत्त्वाचा सण. त्याच्या आधी चार दिवस घर स्वच्छ झाडून, सारवून ठेवतात. धनत्रयोदशीच्या दिवशी स्त्रिया आपले दागिने स्वच्छ करतात. त्या दिवशी पुरुष बाजारातून एक तरी नवे भांडे विकत आणतो; कारण तसे आणणे शुभ मानतात. नरकचतुर्दशीला स्त्रिया व पुरुष यांच्या आंघोळी होतात. आश्विनी अमावास्येला मोठ्या थाटात लक्ष्मीपूजन होते. कार्तिक प्रतिपदेला अन्नकोट असतो. त्या दिवशी संध्याकाळी गोवर्धनपूजा करतात. भाऊबीजेला बहीण भावाला ओवाळते आणि तो तिला भाऊबीज घालतो. या दिवशी शस्त्रे, टाक आणि दौत यांची पूजा करतात. कार्तिकी पौर्णिमेला अनेक नद्यांच्या काठांवर निरनिराळ्या शहरी मोठे मेळे भरतात. असंख्य भाविक लोक या दिवशी नद्यांत स्नान करतात. या शिवाय वसंतपंचमी, शिवरात्री, होळी, रक्षाबंधन, गणेशचतुर्थी इ. सण ते मोठ्या धूमधडाक्याने साजरे करतात.

**स्थापत्य व वास्तुशिल्प** –मौर्य काळात भारतात प्रथमच भव्य अशी वास्तुशिल्पे निर्माण झाली. ग्रीकांशी संबंध आल्यामुळे त्यांच्या स्थापत्याचाही इथल्या स्थापत्यावर परिणाम झाला.

अशोकाच्या काळात ही कला उत्कर्षाला पोचली. अशोकाने निरनिराळ्या ठिकाणी उभारलेले स्तंभ हे कलात्मक आहेतच; शिवाय स्थापत्यशास्त्रातील चमत्कारांतच त्यांची गणना करावी लागेल. एकसंध दगडात पन्नास टन वजनाचे असे स्तंभ निर्माण करणे, ते दुसरीकडे वाहून नेणे आणि उभे करणे हे काम अतिशय कौशल्याचे होते. सारनाथ येथील अशोक स्तंभ हा स्थापत्यातील एक सर्वोत्कृष्ट नमुना समजला जातो.

अशोकाच्या काळानंतर उत्तर प्रदेशात मथुरा आणि सारनाथ येथे दोन नव्या शिल्पशैली उदयाला आल्या. मथुरा शैलीत अतिशय भव्य अशा यक्ष आणि यक्षिणी यांच्या मूर्ती निर्माण झाल्या. सुंदर सुंदर मूर्ती निर्माण करणे हे या कलेचे वैशिष्ट्य होते. जीवनातील आनंद दर्शविणारे, स्त्रियांचे खेळ, उद्यानक्रीडा अशा अनेक गोष्टी त्यांनी शिल्पातून साकार केल्या. याशिवाय गांधार शैलीप्रमाणे मथुरा शैलीत प्रथमच बुद्धाचे पुतळे तयार करण्यात आले. यानंतर गुप्त काळातही सुंदर सुंदर शिल्पे होऊ लागली. या काळात सारनाथ येथे बुद्धाची मिळालेली प्रतिमा पुढील शिल्पकारांनी आदर्श मानली. या प्रतिमांमध्ये सौंदर्य, नाजूकपणा, मुखावरील सात्त्विकभाव इ. गोष्टींना प्राधान्य दिलेले आहे. मथुरा शैलीतील उभ्या बुद्ध मूर्ती या गुप्तकालातील सर्वोत्कृष्ट ठरल्या आहेत. गुप्त काळात हिंदू स्थापत्यकला ही भरभराटलेली होती. देवगड येथील मंदिरातील शिव व विष्णू यांची शिल्पे ही याची उदाहरणे होत. मथुरा शैलीत टेराकोटाच्या अनेक प्रतिमा निर्माण झाल्या. त्यावरून त्या काळातील वेषभूषा, दागिने, खेळ, शस्त्रे, घरातील फर्निचर इ. ची माहिती कळते.

गुप्त काळातील स्थापत्यशास्त्राचे एक वैशिष्ट्य म्हणजे हिंदू मंदिरांवर शिखर उभारले जाऊ लागले. अशी देवळे भितरगाव आणि देवगड इथे सापडली आहेत. इथे शिखरांचे दोन उत्कृष्ट नमुने आहेत. याशिवाय या काळात अनेक भव्य मंदिरे निर्माण झाली. अशा तऱ्हेचे एक मंदिर मथुरा नगरीत होते. तसे मंदिर जर पुन्हा बांधायचे तर त्याला कोटयवधी रुपये आणि दोनशे वर्षे लागली असती, असे महमूद गझनीचा सचिव अल्-उत्-बी याने लिहून ठेवले आहे. तिथल्या मूर्तींपैकी काही मूर्ती पंधरा फूट उंच असून, अधांतरी टांगलेल्या होत्या. मूर्तींच्या डोळ्यांच्या जागी माणके जडवलेली होती. याशिवाय अनेक किमती रत्ने मूर्तींच्या अंगावर होती. महमूद गझनीच्या आदेशानुसार हे आणि इतर अनेक मंदिरे जाळण्यात आली.

मध्ययुगापर्यंत उत्तर प्रदेशाच्या शिल्पकारांची सृजनात्मक शक्ती नष्ट झाली होती आणि ते केवळ भव्योदात्त कृतींचे अनुकरण करीत राहिले होते. या काळात कनौज, कालिंजर, वाराणसी, आणि मथुरा ही कलेची आणि संस्कृतीची केंद्रे होती. या शहरी राजवाडे, किल्ले आणि मंदिरे होती. मथुरेतील मंदिरे सौंदर्य आणि संपत्ती यांनी समृद्ध होती. यानंतर शर्की राजांनी भव्य आणि उदात्त अशा मशिदी, राजवाडे आणि किल्ले जौनपूर येथे बांधले. त्यांपैकी अतल मशीद ही फार प्रसिद्ध आहे आणि जौनपूर कलेचा नमुना म्हणून तिच्याकडे बोट दाखवता येईल. मोगलांच्या काळात हिंदू आणि मुस्लिम स्थापत्याचा समन्वय होऊन त्या धर्तीवर अनेक इमारती उभ्या राहिल्या. अकबराच्या कारकीर्दीतील अंबर, बिकानेर, जोधपूर, ओर्च्छा आणि दतिया येथील राजवाडे या शैलीचे आहेत. अकबराने बांधलेल्या आग्रा येथील लाल किल्ल्यावर ग्वाल्हेरच्या किल्ल्याचा प्रभाव आहे. फत्तेपूर-शिक्री येथील स्थापत्यावर हिंदू स्थापत्याचा खूपच प्रभाव आहे. तिथली शहराच्या मध्यभागी बांधलेली मशीद ही एखाद्या हिंदू मंदिरासारखीच दिसते. फत्तेपूर-शिक्री येथील राजवाड्यातील अकबराचे सिंहासन हे विष्णूच्या सिंहासनाच्या प्रतीकासारखे आहे. शहाजहानने आपल्या इमारतीच्या बांधकामासाठी जास्त करून संगमरवराचा उपयोग केला. आग्रा किल्ल्यातील मोती मशीद ही जगातल्या संगमरवरी मशिदींतील सर्वांत मोठी मशीद आहे. ताजमहालला तर संगमरवरातील काव्य असेच म्हणतात. औरंगजेबाच्या कारकीर्दीत स्थापत्यशास्त्राला फारसे बरे दिवस राहिले नाहीत. अवधच्या नबाबाने मात्र ही कलात्मक परंपरा थोडी पुढे चालू ठेवली. फैजाबाद येथील मकबरा आणि गुलाबबारी या दोन वास्तू या कलेची साक्ष देतात. याच सुमारास इंग्रजांनीही आपल्या स्थापत्याचा प्रभाव इथल्या स्थापत्यावर पाडला होता. या समन्वित कलेचे वैशिष्ट्य मोठ्या छत्राखालील घुमट, गच्च्या, तळघरे आणि मत्स्य हे होते. लखनौ येथील महत्त्वाच्या इमारतींपैकी बडा आणि छोटा इमामवारा, रूमी दरवाजा, छतर मंझिल इ. इमारती फार प्रसिद्ध आहेत. बडा इमामवारा हा एकच कमान असलेला जगातील सर्वांत मोठा दिवाणखाना समजला जातो. वाराणसी, वृंदावन आणि हरिद्वार येथील स्थापत्येही वैशिष्ट्यपूर्ण आहेत. गंगेच्या एका काठावरून दुसऱ्या काठावरील सुंदर राजवाडे आणि मंदिरे यांची शोभा सकाळच्या कोवळ्या उन्हात अप्रतिम दिसते.

दिल्लीला सुलतानी सत्ता सुरू झाल्यानंतर उत्तर प्रदेशात असंख्य मशिदी बांधल्या गेल्या. प्रांतिक व बादशाही असे त्यांचे दोन वर्ग आहेत. इटा, इटावा, कनौज, जौनपूर इ. शहरांतल्या मशिदी पहिल्या वर्गातल्या असून, त्या साध्या पण मजबूत आहेत. जौनपूर येथे इ. स. च्या १५ व्या शतकात बांधल्या गेलेल्या मशिदी या वर्गातील उत्कृष्ट उदाहरणे होत. स्त्रियांसाठी सुंदर, जाळीदार सज्जे या मशिदींत बनवलेले आहेत.

बादशाही मशिदी भव्य, सुंदर आणि नक्षीकामाने सुशोभित केलेल्या असून, त्यांत मुख्यत: संगमरवराचा वापर केलेला दिसतो. बादशाही सत्तेची व वैभवाची ती प्रतीकेच वाटतात. आग्रा व फत्तेपूर-शिक्री येथील भव्य मशिदी या वर्गातल्या आहेत. फत्तेपूर-शिक्री येथे अकबराने बांधलेली जामे मशीद उत्तर प्रदेशातल्या सर्व मशिदींत अतिभव्य आणि सुंदर आहे.

वाराणसी व मथुरा येथे औरंगजेबाने बांधलेल्या मशिदींचे स्वरूप याहून भिन्न आहे. त्यांत सौंदर्याला महत्त्व नसून इस्लामच्या गौरवाला महत्त्व दिलेले आहे. त्या नुसत्या भव्य आहेत. त्या हिंदू कारागिरांनी बांधलेल्या नसल्या तरी, त्यांच्या रचनेत स्थानिक मंदिरांचे अवशेष विपुल प्रमाणात वापरलेले आढळतात.

त्यानंतरच्या काळात लखनौ, अवध, इ. शहरांत बांधलेल्या मशिदी धर्मप्रेम व कलाप्रेम या दोन्ही दृष्टींनी प्रेक्षणीय आहेत. उत्तर प्रदेशातील बहुतेक सर्व मशिदींत हिंदू-मुस्लिम संमिश्र शिल्पकला आढळते; ती अनेक शतके टिकून राहिली.

इतिहासकाळात उत्तर प्रदेशामध्ये अनेक ठिकाणी गड किंवा कोट होते. काही दगडी, काही विटांचे तर काही मातीचे. प्रदेश मैदानी असल्यामुळे गावे किंवा शहरे यांच्या संरक्षणासाठी त्या काळी कोट बांधण्याची प्रथा होती. त्याचप्रमाणे राज्याच्या संरक्षणासाठी जागोजाग मोक्याच्या ठिकाणी गडही बांधलेले होते. सांप्रत त्यांतले बहुतेक गड-कोट उद्ध्वस्त व जमीनदोस्त झाले आहेत. मोगलकालातले किल्ले-कोट मात्र अजून बरेच शाबूत आहेत. याचे कारण ते भरीव वाळूपाषाणाचे असून, त्यांचे तट व बुरूज अत्यंत भक्कम आहेत. त्यांची रचना चमत्कृतिपूर्ण असून, शिल्पकामही दर्शनीय आहे. अशा प्रकारच्या किल्लेकोटांत आगरा, अलाहाबाद, चुनार व झाशी येथील किल्ले विशेष उल्लेखनीय आहेत.

**चित्रकला** – मिर्झापूर आणि बांदा जिल्ह्यांत प्राचीन गुहांमध्ये काही प्रागैतिहासिक चित्रे आढळली आहेत. ही चित्रे बहुधा शिकारीचीच आहेत.

रामायण आणि महाभारत यांत राजवाड्यातील चित्रसौधांचा उल्लेख आढळतो; पण अशा प्रकारची जुनी चित्रे उत्तर प्रदेशात अद्याप तरी सापडली नाहीत.

मोगल राजांनी आपल्या पदरी चित्रकारांचे ताफे बाळगले होते. आणि सर्व चित्रकार मिळून चित्रे काढीत होते. औरंगजेबाच्या कारकीर्दीत इथल्या चित्रकारांनी निरनिराळ्या राजांकडे आश्रय घेतला. त्यांपैकी काही गढवालमध्ये डोंगरी प्रदेशात जाऊन राहिले. इथेच पुढे गढवाली चित्रशैलीचा उगम झाला. याशिवाय काही कलाकार बुंदेलखंड, महोबा आणि लखनौ इथे जाऊन राहिले. लखनौ येथे लखनौकलम या नावाची एक नवीन शैली इ. स. च्या १८ व्या शतकात निर्माण झाली.

**संगीत** – उत्तर प्रदेशाने भारतीय शास्त्रीय संगीतालाही काही देणगी दिली आहे. संगीताची जी वेगवेगळी घराणी निर्माण झाली, त्यांत रामपूर घराणे हे प्रसिद्ध आहे. वजीरखान याने हे घराणे निर्माण केले. रामपूरच्या दरबारात त्याने अनेक गायक आणि वादक यांना बोलावून घेतले. वाराणसी हे उत्तर प्रदेशातील संगीताचे दुसरे केंद्र होय. तिथे आंतरराष्ट्रीय ख्याती मिळविलेले तबलावादक आणि सारंगीवादक राहतात. उत्तर प्रदेशातील संगीताचे आणखी एक घराणे म्हणजे आग्रा घराणे होय. यात गुलाम अब्बास खाँ, कल्लन खाँ, नथ्थन खाँ, फैयाज खाँ यासारखे नामवंत गायक होऊन गेले. लखनौ येथे नबाबी काळात ठुमरी फार लोकप्रिय होती. शेवटचा नबाब वाजिद अली शाह हा ठुमरीचा मोठा चाहता होता. त्याने स्वत: काही ठुमऱ्या रचल्या होत्या. त्याने त्याच्या ठुमरीवर नृत्य-नाटचे बसवली होती.

**नृत्यकला** – कथक नृत्य ही उत्तर प्रदेशाने शास्त्रीय नृत्यकलेला दिलेली देणगी आहे. सुरवातीला कथक ही भक्तिपूर्ण नृत्यशैली होती. त्या नृत्याच्या द्वारे राधा आणि कृष्ण यांच्या दिव्य प्रेमाची महती मथुरा आणि वृंदावन इथल्या मंदिरांत अभिव्यक्त करीत असत. त्यानंतर काही कथक नृत्यकार मंदिरांचा आश्रय सोडून नवाब आणि राजे यांच्या दरबारांत गेले. जे कलाकार अवधच्या नवाबाच्या दरबारात गेले त्यांनी कथक नृत्याचे लखनौ घराणे स्थापन केले. या नृत्यप्रकारात कृष्ण हा देवापेक्षा एक कामुक व्यक्ती म्हणून दाखविला आहे. ठुमरी, दादरा, गझल यांच्या साथीने हे नृत्य होऊ लागले. कथकाचे अधोगतीला नेणारे हे रूप प्रकाशजी, ठाकूरप्रसाद, बिंदादिन इत्यादींनी सावरून धरले आणि कृष्णाला पुन्हा देवत्व आणून दिले. यानंतर कथकाची परंपरा आजतागायत पुढे अखंड चालू राहिली.

याशिवाय अनेक लोकनृत्ये उत्तर प्रदेशात प्रचलित आहेत. कृष्ण व राधा यांची रासलीला ही त्यांपैकी एक महत्त्वाचे नृत्य होय. व्रजभूमीत याचा विशेष प्रचार आहे. कजरी, नौटंकी यांसारखे नृत्यप्रकार लोकप्रिय आहेत.

**कलाकुसर** – फार प्राचीन काळापासून उत्तर प्रदेश हा कलाकौशल्याच्या कामासाठी प्रसिद्ध आहे. रामायणात जनकाने सीतेला लग्नाच्या वेळी जरीने भरतकाम केलेले वस्त्र दिले होते, त्याचप्रमाणे रत्नजडित फुलपाखरे आणि इतर रत्नांनी तिचा विपुल केशसंभार सजवला होता, असे सांगितले आहे. याशिवाय, जनकाने तिला रेशमी तलम वस्त्रे, लोकरीची वस्त्रे

आणि अनेक रत्ने भेट म्हणून दिलेली होती, असे वर्णन आहे.

काही विद्वानांच्या मते भारतातील प्रसिद्ध मलमल आणि किनखापाचे कापड हे मनूच्या काळापूर्वीही तयार होत असे. बाबिलोनमधील जरीने भरतकाम केलेले आणि निरनिराळ्या रंगाचे कापड हेही मुळात वाराणसी येथेच तयार झालेले होते, असे डॉ. रुस्तुम मेहता म्हणतात.

ऐतिहासिक काळात अशोकाचा सारनाथ येथील प्रसिद्ध स्तंभ हा कलाकुसरीचा उत्कृष्ट नमुना असून, तसा त्यानंतर पुढे कधी निर्माण झाला नाही. इथल्या स्थानिक कलाकारांनीच तो स्तंभ निर्माण केला होता. कनिष्काच्या काळात मथुरा येथील दगडावर छिन्नी मारून तयार केलेली शिल्पे, पुतळे, आणि सजवलेले कोनाडे यांना भारतात आणि बाहेरही खूप मागणी होती. याशिवाय उत्तर प्रदेशातील वाराणसी येथून रेशमी वस्त्र आणि किनखापाचे कापड, भदोही आणि मिर्झापूर येथील गालिचे, लखनौ येथील चिकन, आग्र्याच्या संगमरवरी वस्तू, मुरादाबाद आणि वाराणसी येथील नक्षीदार पितळी पात्रे, सहराणपूर येथील कोरीव लाकडी वस्तू, हातमागाचे कापड आणि कलात्मक बाहुल्या व खेळणी यांची निर्यात परदेशांत होत असे.

हातमागावर वस्त्रे विणण्याचा व्यवसाय अद्यापही इथे भरभराटीत आहे. इथे सुमारे ३ लाख हातमाग असून, त्यावर ४५०० लाख मीटर कापड दरवर्षी तयार होते. आणि ते अत्यंत श्रीमंत लोकांपासून ते गरिबापर्यंत सर्वांना परवडेल अशा प्रकारचे असते.

वाराणसी, आझमगड, मौनाथभंजन, गाझीपूर, गोरखपूर, लखनौ, तंडा, शहाजहानपूर, हरदोई, सांडिला, रामपूर, मिरत, मुरादाबाद आणि आग्रा ही हातमागाची विशेष प्रसिद्ध अशी केंद्रे आहेत. हातमागाच्या वस्त्रांपैकी अत्यंत लोकप्रिय अशी वस्त्रे म्हणजे वाराणसी येथील किनखाप आणि रेशमी वस्त्रे, तंडा येथील जमदानी, गोरखपूर येथील टॉवेल, बेडकव्हर्स, मौनाथभंजन येथील सुती साड्या, अमरोहा आणि रामपूर येथील सतरंज्या, आझमगड येथील सॅटीन ही होत. लखनौ येथील चिकन हे नाजूक धाग्यांसाठी देशभर प्रसिद्ध आहे. हा अत्यंत प्राचीन व्यवसाय असून, गरीब स्त्रिया हे भरतकाम करीत असतात.

लखनौ, आग्रा आणि फरुकाबाद ही जरीची लेस बनविण्याबद्दल प्रसिद्ध आहेत. फरुकाबाद हे कॅलिको प्रिंटिंगसाठी प्रसिद्ध आहे. साध जातीच्या लोकांच्या हातात हा व्यवसाय आहे. रजया, बेडकव्हर्स, पडदे, टेबल क्लॉथ इ. या पद्धतीने तयार केलेले कपडे अतिशय लोकप्रिय असून, इतर ठिकाणीही काहींनी हा व्यवसाय सुरू केला आहे. यातील डिझाइन ठळक आणि परंपरागत असते. याशिवाय खुर्जा, चुनार, लखनौ, रामपूर, बुलंद शहर इ. ठिकाणी परंपरागत पद्धतीने मातीची भांडी, फुलदाण्या, बश्या, घडे इ. बनवले जातात. त्यावरील नक्षीकाम अत्यंत सुंदर असून गडद हिरवा, निळा, केशरी, तपकिरी इ. रंगांत ती रंगविलेली असतात. सध्या सरकारी चिनहाट फॅक्टरी ही काचेच्या भांड्यांसाठी प्रसिद्ध आहे, इथल्या विविध आकाराचे चकाकणारे कप, बश्या, चहाची भांडी, प्लेटस, मग, जग इ. वस्तू फारच लोकप्रिय आहेत. प्राचीन काळापासून वाराणसी ही पितळेच्या नक्षीदार व साध्या अशा दोन्ही प्रकारच्या भांड्यांसाठी प्रसिद्ध आहे. तसेच इथे देवदेवतांच्या पितळ, तांबे, अष्टधातू, सोने, चांदी, लाकूड आणि माती यांपासून उत्कृष्ट मूर्ती बनवल्या जातात. मुरादाबाद येथे बेस मेटलपासून गृहोपयोगी उपकरणे आणि इतरही नक्षीदार वस्तू बनवतात. वाराणसी, लखनौ, आग्रा, आणि इतर ठिकाणीही सोन्या-चांदीचे, कलाकौशल्याचे अलंकार बनवतात. तसेच मीनाकारीचे काम इथे होते. लखनौ आणि वाराणसी येथील खेळणी प्रसिद्ध आहेत. याशिवाय अत्तरे, सुवासिक तेले, लाखेच्या बांगड्या, रंगीत मणी, बांबूच्या चटया इ. कलाकुसरीच्या वस्तूही इथे निर्माण होतात.

**तीर्थक्षेत्रे व प्रेक्षणीय स्थळे** – उत्तर प्रदेशात अनेक पवित्र तीर्थक्षेत्रे आहेत. हरद्वार, हृषिकेश, काशी, प्रयाग, गया, अयोध्या, मथुरा, गोकुळ-वृंदावन ही क्षेत्रे अत्यंत प्रसिद्ध असून, सर्व भारतभरचे लोक यांच्या यात्रा करण्याची इच्छा मनात बाळगून असतात. केदारनाथ व बद्रिनाथ या हिमालयातील दुर्गम क्षेत्रांनाही असंख्य लोक जातात व त्यांच्या दर्शनाने कृतकृत्य होतात. नैनीताल, अल्मोडा, मसूरी, डेहराडून ही इथली थंड हवेची ठिकाणे प्रसिद्ध आहेत. लखनौ ही तर उत्तर प्रदेशाची राजधानी आहे. हे व्यापारी केंद्र आहे. याशिवाय, गोरखपूर, मिर्जापूर, मेरठ, सहारनपूर, बरेली, मुरादाबाद इ. शहरे व्यापार, उद्योगधंदे यासाठी प्रसिद्ध आहेत. [ उत्तर प्रदेश – एम बी. माथुर, १९७६; उत्तर प्रदेश – हरिदत्त शर्मा; उत्तर प्रदेश – जे. पी. चतुर्वेदी, १९७०; ग्लो. उ. प्र.; हिं. वि. को. ]

**उत्तरबोधी** एक मुद्रा. दोन्ही हात छातीशी टेकलेले, बोटे एकमेकांत गुंतविलेली, अंगठा व तर्जनी उभी आणि उभय तर्जनींची टोके जुळविलेली, अशी ही मुद्रा असून ती अच्युच्च पूर्णतेची निदर्शक आहे. [ गॉं. नॉं. बु. ]

**उत्तरमद्र** एका प्राचीन देशाचे व त्यातील लोकांचे नाव. हे लोक हिमालयाच्या उत्तरेला राहत होते (ऐ. ब्रा. ८.१४). मद्र व कंबोज हे प्रदेश एकमेकांना लागून असावे,

असे वंशब्राह्मणातील वर्णनावरून दिसते. [ वे. इं.; वैं. सा. ]

**उत्तरमीमांसा** एक दर्शन. वेदांच्या उपनिषद्रूप शेष भागाला उत्तर भाग असे म्हणतात. त्याची पंचांग-त्याने युक्त अशा वाक्यसमुदायाने मीमांसा करणारे शास्त्र ते उत्तरमीमांसा होय. बादरायण व्यासांनी 'अथातो ब्रह्म-जिज्ञासा' (ब्र. सू. १.१.१) या सूत्रापासून प्रारंभ करून 'अनावृत्तिः शब्दात्' (ब्र. सू. ४.४.२३) या सूत्रापर्यंतच्या चार अध्यायांत जो ब्रह्मविचार केला, त्याला उत्तरमीमांसा असे म्हणतात. या दर्शनालाच वेदान्त असे दुसरे नाव आहे. वेदान्तमत हे अद्वैतप्रतिपादक असल्यामुळे त्याला अद्वैतदर्शन असेही म्हणतात. पाहा – अद्वैतदर्शन.

**उत्तराधी** एक संप्रदाय. यात पंजाबच्या बाजूच्या धनिक लोकांचाही अंतर्भाव आहे. या संप्रदायातील बहुतेकांचा व्यवसाय औषधे देणे व जमाखर्च लिहिणे हा आहे. बनवारीदास हा या संप्रदायाचा प्रवर्तक होय. पण काही लोक रज्जबजीला संप्रदायप्रवर्तक मानतात. या पंथाचे ५२ याँवे पृथक् पृथक् स्थापलेले आहेत व फक्त डेहरा गावातच याच्या चौदा गाद्या विद्यमान आहेत. पंथाचे मुख्य महंत हिसार जिल्ह्यातील रसिया गावी राहतात. [उ. भा. सं. प.]

**उत्तराध्ययनसूत्र** जैनांचे एक मूल सूत्र. जैन धर्म व जैन दर्शन या दोहोंच्याही दृष्टीने याला महत्त्व आहे. या ग्रंथात प्राचीन काळातली पुष्कळशी धार्मिक कविता, पद्यबद्ध आख्याने, वार्तालाप, इ. मनोरंजक विषयांचे संकलन आहे. यात अनेक ऐतिहासिक कथाही आल्या आहेत. याचे ३६ अध्याय असून, तेविसाव्या अध्यायात जैनांच्या मूल सिद्धान्तांचे विवेचन आहे.

उत्तराध्ययनसूत्रात एक प्रश्न वारंवार उपस्थित केलेला आहे, की युवावस्थेत सकल कामभोगाचा त्याग करून वैराग्य घेणे श्रेयस्कर, की कामभोग भोगून वृद्धावस्थेत ते घेणे श्रेयस्कर? यशा नामक स्त्री तारुण्यात विषयभोग अवश्य भोगावे अशा मताची होती, तर तिचा पती भृगू हा तिच्या विरुद्ध होता. पण सती राजमतीच्या कथेत तिचा पती रथनेमी हा राजमतीला हा आवाहन करतो, की 'तू जवळ ये. आपण या दुर्लभ मानवजन्मातल्या तारुण्याचा पुरेपूर रस घेऊ आणि सकल भोग भोगून मग जिनमार्गाचा स्वीकार करू.' त्यावर राजमती त्याचा धिक्कार करून त्याला म्हणते, की 'विषय हे वमन-सदृश आहेत. त्यांची कामना धरण्यापेक्षा तुम्हाला मरण येणे, हे माझ्या दृष्टीने अधिक चांगले.' [आ. सं.; रा. रा. का.]

**उत्तरापथ** उत्तर भारताचे एक नाव. काही वेळा उत्तरा-पथाऐवजी उदीचीपथ असाही उल्लेख येतो. कनोजचा हर्षवर्धन हा उत्तरापथाचा अथवा उत्तर प्रदेशाचा प्रभू होता, असे पश्चिम चालुक्यांच्या इतिहासात लिहिले आहे. बृहत्संहितेत उत्तरापथाचा उल्लेख आहे. [म. ज्ञा. को.]

**उत्तरा फल्गुनी** अश्विन्यादी नक्षत्रगणनेतले बारा वे नक्षत्र. अर्यमा ही या नक्षत्राची देवता आहे. हे नक्षत्र ऊर्ध्वमुख, ध्रुव, स्त्री व शुभ आहे. हे नक्षत्र सिंह राशीत येते. आकाशातल्या सिंहाच्या आकृतीत ते पुच्छभागी दिसते. हे शुभ नक्षत्र आहे. उत्तरेचे ध्यान हेमाद्रीने पुढीलप्रमाणे सांगितलेले आहे –

**व्याघ्राननोत्तरा गौस्था शुभ्रवर्णा चतुर्भुजा ।**
**द्विचक्षिणी सूत्रखट्वाङ्गधारिणी परिकीर्तिता ।।**

अर्थ – उत्तरा ही वाघाच्या तोंडाची, बैलावर बसणारी, शुभ्रवर्ण, चतुर्भुज, द्विनेत्र, व सूत्र आणि खट्वांग धारण करणारी करावी असे सांगितले आहे.

**उत्तराभाद्रपदा** अश्विन्यादी नक्षत्रगणनेतले २६ वे नक्षत्र. अहिर्बुध्न्य ही याची देवता असून, हे मीन राशीत येते. हे नक्षत्र ध्रुव, ऊर्ध्वमुख, पुंनक्षत्र व शुभ आहे. वैदिक काळात पूर्वा-उत्तरा-भाद्रपदांना प्रोष्ठपदा म्हणत. या दोहोंच्या दोन तारका दक्षिणोत्तर असून, आकाशात त्यांचा चौकोन दिसतो. आकाशातला हा सर्वांत मोठा चौकोन होय. या चौकोनाचे पाश्चात्य नाव पेगासस् असे आहे. हेमाद्रीने उत्तरा-भाद्रपदेचे ध्यान पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

**गर्दभास्या वृषारूढा सिता भाद्रपदोत्तरा ।**
**पात्रं च डमरुं धत्ते द्विभुजेयमुदीरिता ।।**

अर्थ – उत्तराभाद्रपदा ही गाढवाच्या तोंडाची, वृषभवाहन, गोरी व द्विभुज आहे. हिच्या हातांत पात्र व डमरू असतो.

**उत्तरायण** सूर्याच्या मकरसंक्रमणापासून कर्कसंक्रमणापर्यंतचा सहा महिन्यांचा काळ. या काळात मृत्यू आल्यास माणसाला मोक्ष मिळतो, अशी समजूत आहे –

**आपन्ने तूत्तरां काष्ठां सूर्ये यो निधनं व्रजेत् ।**
**नक्षत्रे च मुहूर्ते च पुण्ये राजन् स पुण्यकृत् ।।**
(म. भा. शांति. २९८.२३)

अर्थ – हे राजा, सूर्य उत्तर दिशेला गेल्यावर चांगल्या

नक्षत्रावर व पुण्य मुहूर्तावर ज्याला मृत्यू येईल, तो पुण्यवान समजावा.

उत्तरायणाचा काल दक्षिणायनापेक्षा अधिक निरामय असतो. सूर्याचा प्रकाश जसा पृथ्वीवर पडतो, तसाच तो इतर ग्रहांवरही पडतो. त्यामुळे त्या ग्रहांवर उत्पन्न होणारे तेज पृथ्वीवरील सृष्टीलाही मिळते. असे ग्रह उत्तरेकडील आकाशात अधिक संख्येने असल्यामुळे उत्तरायणात त्यांना अधिक सूर्य-प्रकाश मिळतो व त्या प्रमाणात पृथ्वीला त्यांच्याकडून अधिक तेजही मिळते. त्यामानाने दक्षिणायनात पृथ्वीला तेज कमी मिळते, म्हणून तो काळ रोगट व अशुभ समजतात. पाहा — देवयान व पितृयान. [ हि. ध.; सा. इं. फे. ]

**उत्तराषाढा** अश्विन्यादी नक्षत्रगणनेतले २१ वे नक्षत्र. या नक्षत्राची देवता विश्वेदेव आहे. हे नक्षत्र ऊर्ध्वमुख, मंदाक्ष, स्त्री शुभ आहे. याचा प्रथम चरण धनुराशीत व पुढचे तीन चरण मकरराशीत येतात. अनुराधातली वरची तारका व वृश्चिकपुच्छातले शेवटचे नक्षत्र यांच्यावरून दोन समांतर रेषा पूर्वेकडे ओढल्या असता त्या दोहींच्या मध्ये पूर्वाषाढा व उत्तराषाढा ही नक्षत्रे दिसतील. त्यांचा चौकोन आहे. उत्तराषाढेचे ध्यान हेमाद्रीने पुढीलप्रमाणे सांगितले आहे—

**सर्पगा चोत्तराषाढा गौरवर्णा सुरूपिणी ।**
**नागबन्धजटास्वर्णकुण्डलभूषिता ।**
**अक्षनागधरा दक्षे वामे पुस्ती सकुण्डिका ।।**

अर्थ — उत्तराषाढा ही सर्पावर बसणारी, गोरी, सुंदर, नागदोरीने जटाजूट बांधणारी, सुवर्णाची कुंडले घालणारी आणि उजव्या हाती फासे व नाग, तसेच डाव्या हाती पुस्तिका व कुंड धारण करणारी आहे.

**उत्थान** एक शिशुसंस्कार. वैखानस (३.१८) व शांखायन गृह्यसूत्र (१.२५) या दोनच ग्रंथांत या संस्काराचा उल्लेख आहे. वैखानसाने याचा विधी पुढीलप्रमाणे दिला आहे—

मुलाच्या जन्माच्या दहाव्या किंवा बाराव्या दिवशी पित्याने श्मश्रू करून आंघोळ करावी व गृहशुद्धी करावी. नंतर जातकाग्नीत भिन्नगोत्रीय गृहस्थाकडून भूमीला उद्देशून याग करावा. नंतर त्या अग्नीत धाता व इतर देवता यांना आहुती द्याव्या व ब्राह्मणभोजन घालावे [ हि. ध. ]

**उत्पल** (इ. स. च्या १० व्या शतकाचा पूर्वार्ध) काश्मीर-मधील शैवमताच्या प्रत्यभिज्ञाशाखेचा एक महान आचार्य. हा सोमानंदाचा पुत्र होय. ईश्वरप्रत्यभिज्ञा हा प्रमेय-बहुल ग्रंथ लिहून व त्यात अन्य मतांचे युक्तिपूर्वक खंडन करून याने प्रत्यभिज्ञादर्शनाला उच्च कोटी प्राप्त करून दिली. सर्व-सामान्य जनतेलाही प्रत्यभिज्ञादर्शन कळावे म्हणून याने कित्येक ग्रंथ लिहिले आहेत. उदा० स्तोत्रावली, सिद्धित्रय, शिवदृष्टि-व्याख्या इत्यादी. शैव दर्शनाला प्रत्यभिज्ञा हे नावही यानेच दिले. याचे पुत्र व शिष्य यांनीही प्रत्यभिज्ञादर्शनक्षित पांडित्य मिळ-विले. [ सं. सा. इ. २; हिं. वि. को. ]

**उत्पलदेव** (इ. स. चे ९ वे शतक) एक संस्कृत कवी. त्रिक-दर्शनाचा हा एक आचार्य होता. याची शिव-स्तोत्रावली प्रसिद्ध आहे. या ग्रंथात २१ स्तोत्रे असून, त्यांत शिवाची स्तुती केलेली आहे. उदा० —

**कण्ठकोणविनिविष्टमीश ते कालकूटमपि मे महामृतम् ।**
**अप्युपात्तममृतं भवद्वपु — र्भेदवृत्ति यदि मे न रोचते ॥**

अर्थ — हे भगवन्, तुझ्या कंठातील कोपऱ्यात साठलेले विषही मला महान अमृताप्रमाणे वाटेल. परंतु तुझ्या शरीरापासून वेगळे असणारे अमृतही लाभले, तरी ते मला आवडणार नाही. [ सं. सा. इ. —पं. वलदेव उपाध्याय ]

**उत्पलवर्णा** बौद्ध भिक्षुणीसंघातली प्रसिद्ध स्थविरा. ही श्रावस्ती नगरीतील एका श्रेष्ठीची कन्या होती. हिचा वर्ण नीलोत्पलासारखा असल्यामुळे हिचे नाव उत्पलवर्णा असे ठेवण्यात आले. हिच्या सौंदर्यावर भाळून अनेक राजकुमा-रांनी हिला मागणी घातली. परंतु एका राजपुत्राला कन्या दिली, तर बाकीच्या राजपुत्रांचा रोष ओढवेल, या भयाने तिच्या पित्याने उत्पलवर्णेला प्रव्रज्या घेण्याचा उपदेश केला. त्याप्रमाणे भिक्षुणीसंघात दाखल होऊन तिने प्रव्रज्या घेतली. नंतर तिने त्रिपिटकाचे अध्ययन करून पुढे अर्हत्पदही मिळविले. त्यानंतर चमत्कार करून दाखविणे (ऋद्धी) या गोष्टीत ती पारंगत झाली. म्हणून बुद्धाने तिला ऋद्धिमती हे भिक्षुणींतील श्रेष्ठ पद बहाल केले. [ पा. वा. ते. भि. र. ]

**उत्पवन** दूध, तूप, इ. हविर्द्रव्यांचे मंत्रपूर्वक शुद्धीकरण. दोन्ही हातांचे अंगठे व करंगळीजवळील बोटे यांनी दोन दर्भ (पवित्रक) धरून ते प्रोक्षणी वगैरे पात्रांतील द्रव पदार्थांत बुडवून, ते वर काढून उडविणे, याला उत्पवन असे म्हणतात. आज्याचे उत्पवन करताना दर्भाचे पवित्रक विरळ धरून आज्यामध्ये बुडवितात. नंतर ते पुढे व मागे नेऊन पुन्हा मध्यभागापासून वर उचलतात, याला पुनराहार-उत्पवन असे म्हणतात. [ सं. कौ.; श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**उत्पात** 'उत्पतति अकस्माद् आयाति इति' (= एकाएकी घडून येणाऱ्या घटनेला उत्पात असे म्हणतात.) प्राणिमात्रांना शुभाशुभसूचक अशा पंचमहाभूतांच्या आविष्कारांना उत्पात म्हणावे, असे अमरकोशाच्या टीकेत भरत म्हणतो.

उत्पात हा त्रिविध आहे – (१) दिव्य म्हणजे पर्वकाल नसताना चंद्रसूर्यांचे ग्रहण इत्यादी, (२) आन्तरिक्ष म्हणजे उल्कापातादी व (३) भौम म्हणजे भूकंप, प्रलय इत्यादी. ऋतुमानानुसार होणारे उत्पात दोषावह नाहीत, असे मत आहे. चंद्रसूर्याला खळे पडणे, अग्नीशिवाय ज्वलन होणे, पृथ्वीला भेगा पडणे, दिवसा ग्रहनक्षत्र तारे दिसणे, यक्षराक्षसादिकांचे दर्शन होणे, इ. घटनांनाही उत्पात म्हणतात.

हे उत्पात होण्याचे कारण गर्गसंहितेत पुढीलप्रमाणे दिले आहे–

अतिलोभादसत्याद्वा नास्तिक्याद्वाऽप्यधर्मतः ।
नरापचारान्नियतमुपसर्गः प्रवर्तते ।।
ततोऽपचारान्नियतमपवर्जन्ति देवताः ।
ताः सृजन्त्यद्भुतांस्तास्तु दिव्यनाभसभूमिजान् ।।
त एव त्रिविधा लोके उत्पाता देवनिर्मिताः ।
विचरन्ति विनाशाय रूपैः संबोधयन्ति च ।।

अर्थ – अतिलोभ, खोटेपणा, नास्तिकता, अधर्म अशा प्रकारच्या मानवाच्या दुर्वर्तनांमुळे उत्पात घडतात. या दुराचारांमुळे देवता क्रुद्ध होतात व त्या अंतराळात, आकाशात व भूमीवर उत्पात निर्माण करतात. हे उत्पात स्वतःच्या रूपांनी जगाला आपली जाणीव देतात.

कलिदोषामुळे उत्पात घडून येतात आणि त्यांमुळे वेगवेगळी संकटे सूचित होतात, असे शिवतत्त्वरत्नाकरात सांगितले आहे. पाहा – अरिष्ट. [ श. क.; नवभारत, एप्रिल १९७४ ]

**उत्पातादी योग** जातकशास्त्रातील विविध प्रकारचे शुभ किंवा अशुभ योग. या योगांची सिद्धी पुढीलप्रमाणे होते –

द्वीशात्तोयाद्वासवात्पौष्णभाच्च
ब्राह्मात्पुष्यादर्यमर्क्षाद्युगर्क्षैः ।
स्यादुत्पातो मृत्युकाणौ च सिद्धि
र्वारेऽर्काद्येतत्फलं नामतुल्यम् ।।

अर्थ – विशाखा, पूर्वाषाढा, धनिष्ठा, रेवती, रोहिणी, पुष्य, आणि उत्तराफल्गुनी या सात नक्षत्रांपैकी प्रत्येक नक्षत्रापासून चार नक्षत्रे रविवारादी सात वारी आली असता अनुक्रमे उत्पात, मृत्यू, काण व अमृतसिद्धी हे योग होतात. त्यांची फळे नावाप्रमाणे असतात.

हे चार योग खालील कोष्टकावरून स्पष्ट होतील –

| वार | उत्पात | मृत्यू | काण | अमृतसिद्धी |
|---|---|---|---|---|
| रविवार | विशाखा | अनुराधा | ज्येष्ठा | मूळ |
| सोमवार | पूर्वाषाढा | उत्तराषाढा | अभिजित् | श्रवण |
| मंगळवार | धनिष्ठा | शततारका | पूर्वाभाद्रपदा | उत्तराभाद्रपदा |
| बुधवार | रेवती | अश्विनी | भरणी | कृत्तिका |
| गुरुवार | रोहिणी | मृगशीर्ष | आर्द्रा | पुनर्वसू |
| शुक्रवार | पुष्य | आश्लेषा | मघा | पूर्वा |
| शनिवार | उत्तरा | हस्त | चित्रा | स्वाती |

यांतील पहिले तीन योग अशुभ असतात व चौथा अमृतसिद्धियोग शुभ असतो. [ मुहूर्त-चिंतामणी ]

**उत्सर्ग** विहिरी, तळी यांचा उत्सर्ग करावा, म्हणजे त्यांतले पाणी उपसून बाहेर टाकावे, असे शास्त्रवचन आहे. तसे न केल्यास त्यातील पाणी अपवित्र व म्हणून अपेय ठरते. ते जो प्राशन करील, त्याने चांद्रायण प्रायश्चित्त करायला हवे, असे भविष्यपुराणात सांगितले आहे. या उत्सर्गाचा विधी असा–

शुभ दिवशी वापी, कूप, तलाव, इ. जलाशयांच्या समीप अग्निस्थापना करून त्यावर वरुणदेवतेकरिता चरू शिजवितात. नंतर आज्यभागापर्यंत तंत्र झाल्यावर 'समुद्रज्येष्ठाः...' या सूक्ताच्या प्रत्येक ऋचेने आज्याहुती देतात. चरूच्याही आठ आहुती देतात. नंतर स्विष्टकृत् होम करून त्या जलाशयात एक गाय सोडतात व पुढील मंत्र म्हणतात –

इदं सलिलं पवित्रं कुरुष्व शुद्धाः पूताः अमृताः सन्तु नित्यम् ।
मां तारयन्तीं कुरु तीर्थाभिषेकं लोकाल्लोकं तरते तीर्यते च ।।

गाय जलाशयात शिरताना तिचे पुच्छाग्र धरून यजमान जलात उतरतो व मार्जन केल्यावर ईशान्य दिशेला गायीला वर काढतो. नंतर ती गाय अलंकृत करून ब्राह्मणाला दान द्यायची असते. एवढे झाल्यावर त्या जलाशयाचा उत्सर्ग करतात म्हणजे त्यातले पाणी बाहेर काढून टाकतात व ब्राह्मणभोजन घालतात. [ निर्णयसिंधू ]

**उत्सर्जन** वेदाध्ययन काही काल बंद ठेवण्यासाठी करायचा विधी. आपस्तंबाने उत्सर्जनाला समापन असे नाव दिले आहे. हा विधी केव्हा करावा, याबद्दल सूत्रकारांत मतभेद आहेत. बौधायन सांगतो की पौष किंवा माघ पौर्णिमेला उत्सर्जन करावे. आश्वलायनाच्या मते उपाकर्मानंतर सहा महिन्यांनी ते करावे म्हणजे श्रावण पौर्णिमेला उपाकर्म केल्यास माघ पौर्णिमेला उत्सर्जन करावे.

पौष महिन्यात चंद्र रोहिणी नक्षत्रात असताना उत्सर्जन करावे, असे पारस्कर गृह्यसूत्रात म्हटले आहे.

पारस्कर गृह्यसूत्रात (२.१२) उत्सर्जनाचा विधी दिला आहे, तो पुढीलप्रमाणे – आचार्य आपल्या शिष्यांसह नदी-किनाऱ्यावर जातो व देव, छंद, वेद, ऋषी, पूर्वाचार्य, गंधर्व, अन्य आचार्य, संवत्सर, पितर इ. चे जलाने तर्पण करतो. सर्व-जण चारवेळा सावित्री म्हणतात व 'आम्ही वेदाध्ययन थांब-विले आहे,' असे उद्घोषित करतात. यानंतर अनध्याय असतो.

ऋग्वेदी लोकांचा उत्सर्जनविधी पुढीलप्रमाणे असतो –

प्रथम आचमन, प्राणायाम, देशकालसंकीर्तन करून संकल्प करतात. नंतर पंचगव्य प्राशन करून अग्निमुख करतात. यातल्या अग्नीचे नाव बलवर्धन असते. उपाकर्म देवताना आज्या-हुती व अग्न्यादी वीस देवतांना चरूच्या आहुती दिल्यावर ब्रह्मयज्ञ करतात व सर्वजण 'उत्सृष्टा वै वेदाः ( = आम्ही वेदांचे उत्सर्जन केले,)' असा उद्घोष करतात. यानंतर अग्नीला प्रायश्चित्तादाखल आज्याहुती देतात.

उत्सर्जनानंतर उपाकर्मापर्यंत म्हणजे जवळजवळ पाच-सहा महिने वेदाध्ययन बंद ठेवणे, हे सूत्रकाराना योग्य वाटले नाही; म्हणून त्यांनी पर्याय सांगितला तो असा– शुक्लपक्षात वेदाध्ययन करावे व कृष्णपक्षात ते बंद ठेवून वेदांगांचे अध्ययन करावे. हल्ली हा विधी उपाकर्माच्या दिवशीच प्रथम करतात. [ हि. ध. ]

**उत्सव** याची व्याख्या अशी – 'नियताह्लादजनकव्यापारः (= निश्चितपणे आल्हाद उत्पन्न करणारा व्यापार म्हणजे उद्योग तोच उत्सव होय)' (श. क.) 'मह उद्धव उत्सवः' असे त्याचे पर्यायशब्द अमरकोशात दिले आहेत. ज्या एखाद्या धार्मिक समारंभात तो करणाऱ्या व त्यात भाग घेणाऱ्या लोकांना हर्ष, आनंद आणि मनःप्रसाद यांचा अनुभव घडतो, त्याला उत्सव म्हणतात.

सामान्यपणे सर्व उत्सव साक्षात किंवा पर्यायाने तरी धार्मिकच असतात. भारतीयांच्या सर्व उत्सवांना मुळापासून धार्मिक असेच स्वरूप आहे. भारतीयांचे यज्ञयागादी सर्व विधी देवा – धर्मांवरच आधारलेले आहेत. इतर सामाजिक समा-रंभांनाही येन केन प्रकारेण धर्माचे अधिष्ठान असतेच.

मनुष्य हा स्वभावतःच सामाजिक प्राणी आहे. समाजाला सोडून त्याला जगणे कठीण असते व जगला तरी ते जीवन असुरक्षित आणि निरानंद होते. 'जीवनार्थं कलह' हा जसा प्रत्येक प्राण्याच्या मागे लागलेला आहे, तसाच तो मानवालाही लागलेला आहे. जगण्यासाठी आणि वाढण्यासाठी त्याला खूप कष्ट करावे लागतात. योगक्षेमाची चिंता करीत सदैव धडपडत राहणे, यालाच संसार म्हणतात. संसार हा कष्टमय आणि दुःखमय आहे, हा सर्वांचाच अनुभव असतो. तेव्हा अशा संसार-ग्रस्त मानवाला त्याच्या दैनंदिन व्यवसायातून आणि चिंता-व्यथांतून बाजूला काढून त्याच्या शरीराला विश्रांती व मनाला आनंद मिळवून देणे आणि त्याला सामाजिक सुखाचा अनुभव घडविणे, या उद्देशांनी मानवसमाजात उत्सवाची प्रथा निर्माण झाली आहे. वर्षातून ठराविक ऋतूंत, ठराविक दिवशी माणसाने समाजात मिसळावे, सर्वांनी मिळून आमोद–प्रमोद करावा, निसर्ग आणि ललितकला यांचा रस द्यावा – घ्यावा आणि आपले भावजीवन समृद्ध करावे, हा उत्सवांच्या मागचा प्रधान विचार आहे. म्हणूनच वात्स्यायनाने समाज आणि मेळावे यांना 'संभूय क्रीडा' असे नाव दिले आहे.

मध्ययुगात हे उत्सव सामान्यतः पितृपूजा, वीरपूजा, नांग-रणी, पेरणी, कापणी इ. कृषिकर्मे, ऋतुपरिवर्तन, गणदेवता, ग्रामदेवता इ. संबंधी असत. याशिवाय काही उत्सव राजा आणि राज्यशासन यांच्यामार्फतही होत असत. उदा० हलि-मंगल, वप्पमंगल, जयपान इत्यादी. काही उत्सवांना केवळ मेळा किंवा समाजोत्सव असे स्वरूप असे. त्यात कोणत्याही धर्माचा किंवा कर्मकांडाचा समावेश नसे. त्यामुळे जनता अशा उत्सवांत सहभागी होत असे. अशा प्रसंगी वाह्यात भाषण, स्वच्छंद वर्तन, मद्यपान, जुगार, नाचगाणे यांना मोकळेपणी अवसर मिळत असे. ऋग्वेदात अशा एका समाजोत्सवाचे वर्णन आले आहे. त्याचे नाव 'समन' असे होते. या उत्सवात स्त्री-पुरुष मुक्तपणे भाग घेत. कवी, धनुर्धारी, वेश्या आणि उपवर तरुणीही तिथे गोळा होत. त्या प्रसंगी घोड्यांच्या शर्यतीही होत असत. (ऋ १. १२४. ८; १. ४८.६; २. १६.७)
(समन पाहा.)

रामायणात कित्येक ठिकाणी 'समाज' हा शब्द प्रयुक्त झाला असून तो सार्वजनिक उत्सव या अर्थीच आहे. वाल्मीकीने अयोध्येचे वर्णन करताना तिला 'समाजोत्सवशालिनी' म्हटले आहे. कामसूत्रांत जे आमोद-प्रमोदांचे प्रकार सांगितले आहेत, त्यांत समाजोत्सवाला प्रथम स्थान आहे. या समाजोत्सवात नाचगाणी व नाटकेही होत असल्याचे वात्स्यायनाने सांगितले आहे. जैनांच्या आचारांगसूत्रात 'संखडी' नामक उत्सवाचा उल्लेख येतो. या उत्सवातही नृत्य, नाट्य, भोजन, सुरापान, इ. प्रकार चालत.

प्राचीन काळी नगरात एखादा उत्सव व्हायचा असला, की तिथल्या राजाकडून छनभेरी नावाचा ढोल वाजवून नागरि-कांना त्याची सूचना दिली जात असे. असा एक मोठा उत्सव म्हणजे कौमुदीमहोत्सव होय. याशिवाय उद्यानयात्रा, पर्वतयात्रा इ. सार्वजनिक उत्सवांच्या बाबतीतही अशीच ढोल वाजवून सूचना देण्याची पद्धत होती. आजही कोकणात जेव्हा एखादा

ग्रामदेवतेची जत्रा असते, तेव्हा सकाळी त्या देवळाजवळ ढोल वाजवितात.

जसजसा धर्माचा विकास होत गेला, नवे अवतार, नवी दैवते, नवे संप्रदाय निर्माण झाले, तसतशी उत्सवांची संख्याही वाढत गेली. त्यांचे विधिविधान अंगप्रत्यंगांनी वाढले. ते ते उत्सव साजरे करण्याची पंचांगातली मास-तिथी-नक्षत्रेही निर्धारित केली गेली. आम जनतेचे कित्येक साधे सरळ उत्सव वैदिकांनी आपल्या यज्ञसंस्थेत समाविष्ट केले आणि त्यात कर्म-कांडाची जटिलता निर्माण केली. उदा० चातुर्मास्य, सीता-यज्ञ, आग्रयणीष्टी इत्यादी. आज आपण संप्रदाय-निरपेक्ष असे वर्षप्रतिपदा, अक्षय्यतृतीया, नागपंचमी, गौरीगणपती, दसरा, दिवाळी, मकरसंक्रमण, होळी. इ. जे उत्सव करतो, त्या सर्वांचे मूळ प्राचीन ऋतूत्सवात किंवा कृषिविषयक उत्सवात असल्याचे आढळेल.

जैनांच्या भगवतीसूत्रात इ. स. च्या पहिल्या सहस्रकात होणाऱ्या उत्सवांची एक यादी दिलेली आहे, ती पुढीलप्रमाणे—

इन्द्रमह – इन्द्रोत्सव
स्कंदमह – कार्तिकेयाचा उत्सव
रुद्रमह – शिवाचे उत्सव
मुकुंदमह – कृष्णविषयक उत्सव
भूतमह – भूत, प्रेत, पिशाच, भैरव यांचे उत्सव
यक्षमह – यक्ष, कुबेर यांचे उत्सव
नागमह – नागपूजोत्सव
स्तूपमह – बौद्धस्तूपांचे उत्सव
चैत्यमह – मठ, विहार यांचे उत्सव
वृक्षमह – वृक्षपूजेचे उत्सव
गिरिमह – पर्वतयात्रा
दरीमह – दऱ्याखोऱ्यांतला विहार
अगडमह – विहिरीचे उत्सव
तडागमह – पुष्करिणीचे उत्सव
दहमह – तळ्यांचे उत्सव
नदीमह – नद्यांच्या स्नानासाठी यात्रा
सरमह – सरोवरांच्या स्नानासाठी यात्रा
सागरमह – समुद्रस्नानाचे पर्व
आगरमह – भूगर्भातल्या खाणींची पूजा

(भ. सू. ९. ३३)

वरील यादीतील उत्सवांचे पृथक्करण केल्यास प्राचीन काळातले लोकोत्सव पुढील चार प्रकारांत विभागून दाखविता येतात – (१) श्रेष्ठ देवतांचा सन्मान (२) क्षुद्रदेवतांची कृपा संपादन करणे (३) भूतकालात होऊन गेलेले धर्मप्रवर्तक व महात्मे यांचे पुण्यस्मरण व (४) पंचमहाभूते आणि निसर्गातल्या उपयुक्त वस्तू यांचा गौरव किंवा कृतज्ञता.

उत्सव, सण, समारंभ हे मानवाच्या मनाचे अन्न आहे. मानवाच्या सामाजिक जीवनाचा विकास उत्सव-समारंभांच्या द्वारेच होत असतो. त्याच्या कलात्मक प्रवृत्तीला उत्सव-प्रसंगीच आविष्काराची संधी मिळते. दक्षिणेतल्या नृत्य-नाट्य-कला, देवस्थाने आणि उत्सवसमारंभ यांच्या अनुषंगानेच वाढल्या, विकसित झाल्या. उत्सव हे जीवनातला एकसुरीपणा घालवितात; काही नवे करायची, पाहायची, अनुभवायची संधी देतात; जीवनातली दैन्य-दुःखे तेवढ्या कालापुरती तरी विसरायला लावतात.

भारतात अनेक संप्रदाय आपापल्या परीने धर्मकार्य करीत आहेत. त्यांचे प्रतिवर्षी विशिष्ट क्षेत्रात मेळावे भरतात. राज-कीय पक्षही आपापली वार्षिक अधिवेशने भरवितात. या धार्मिक आणि राजकीय उत्सवांचा उद्देश संप्रदायाच्या किंवा पक्षाच्या माणसांनी एकत्र यावे, सहविचार, सहभोजन आणि सहश्रवण करावे, मागील कार्याचा आढावा घेऊन पुढील कार्याच्या योजना आखाव्या आणि मनावर येणारे शिळेपणाचे किंवा मालिन्याचे पटल झटकून पुनश्च नव्या जोमाने कार्यप्रवृत्त व्हावे, हाच असतो.

राष्ट्रीय उत्सवांसंबंधी लो. टिळकांनी प्रकट केलेले विचार असे –

धर्मोत्सवांचे प्रधान भाग दोन आहेत. पहिला भाग जनमन-रंजन व दुसरा लोकशिक्षण. होय. आमची धर्मबुद्धी जागृत राहावी, आमची राष्ट्रीयत्वाची ज्योत नेहमी प्रकाश देणारी असावी, म्हणूनच आमच्या वाडवडिलांनी या उत्सवांची योजना केलेली आहे. आमच्या औदासिन्यामुळे मलिन झालेले हे उत्सव सतेज करण्याचे काम सुशिक्षितांनी आपल्या शिरावर घेतले पाहिजे. कीर्तने, पुराणे, व्याख्याने या लोकशिक्षणाच्या साध-नांचा उपयोग धार्मिक, नैतिक व राजकीय चळवळीचा प्रसार लोकांत करण्याचे कामी केला पाहिजे.

लो. टिळकांनी सार्वजनिक गणेशोत्सव सुरू केला तो याच हेतूने. भारताला स्वातंत्र्य मिळण्यापूर्वीच्या काळात त्यांचा जन-जागृतीचा उद्देश सफल झाला; पण सांप्रत त्या उत्सवाला अगदी वेगळेच स्वरूप प्राप्त झाले आहे. केवळ मनोरंजन हा उद्देशही राहिलेला नाही; पुष्कळ द्रव्य गोळा करून मौज करणे, सजावटीवर अतोनात खर्च करणे आणि धांगडधिंगा करणे असे विकृत वळण या धार्मिक उत्सवाला लागले आहे.

वर्षाच्या निरनिराळ्या ऋतूंत 'नेमेचि' येणारे हे सण किंवा उत्सव नसतील, तर जीवन एकसुरी आणि निरानंद होईल.
[एत्सा. रि. ए.; म. नि. वा.; ह. कु. प्रा. लो.]

**उत्सव–संकेत** जोडीने उल्लेखिले जाणारे दोन प्राचीन गण. कालिदासाने यांचा उल्लेख किन्नरां-बरोबर केला असून किन्नर व किरात यांच्यामध्ये त्यांचे स्थान सांगितले आहे ( रघु. ४.८७ ). लडाख व कनौर यांच्या मध्यभागी कनौर–दामा उपवर्गातल्या बोली बोलणारे जे लोक आहेत, त्यांचे हे पूर्वज होत. रघुवंशाच्या एका टीकेत या जोड-शब्दांची व्याख्या पुढीलप्रमाणे दिली आहे –

> उत्सव आनन्दजनकः सङ्केतः स्त्रीपुंसयो
> रत्यर्थमनुरागादाव्हानं यस्य .

अर्थ – रतिक्रियेसाठी आव्हान केल्यावर तशा संकेतस्थळी उत्सवासाठी ( आनंद उपभोगण्यासाठी ) जे येतात, ते उत्सव-संकेत होत.

या दोन गणांत विवाहसंस्था निर्माण झाली नव्हती व त्यांचे स्त्री-पुरुषसंबंध खुले होते, असे म्हटलेलें आहे. [ भा. इ. रू. ]

**उथमपालयम्** मदुरा जिल्ह्यातील कंबम् खोऱ्यातील एक क्षेत्र. या क्षेत्रात कालहस्तीश्वराचे मंदिर आहे. या मंदिराविषयी एक आख्यायिका सांगतात ती अशी –

त्या गावात कालहस्तीश्वराचा एक भक्त राहत होता. तो नियमाने कालहस्तीची वारी करी. एक दिवस त्याला दृष्टान्त झाला, की 'तुला यापुढे कालहस्तीला येण्याची आवश्यकता नाही. तू गावातच माझी पूजा कर.'

त्यानंतर इथे कालहस्तीश्वराचे मंदिर निर्माण झाले. त्याच्या प्रवेशद्वारात एक शिला असून, तिच्याभोवती प्रदक्षिणा केल्यास सर्पदंश उतरतो, अशी समजूत आहे.

इथे द्रौपदीचेही एक मंदिर आहे. त्यातल्या मूर्तीला ब्राह्मण विधवेने वर्षातून एकदा उजळा दिला पाहिजे, अशी रूढी आहे.

करुपन्नस्वामीच्या मंदिराजवळील एका खडकावर अनेक जैनमूर्ती कोरलेल्या असून, एका शिलालेखात काही जैनगुरूंची नावेही आहेत. त्यावरून पांड्य राजांच्या राजवटीत जैन लोकांचे हे एक महत्त्वाचे केंद्र असावे, असे वाटते. [मदुरा गॅझे.]

**उदकशांती** ग्रहांची पीडा दूर व्हावी व सर्वांना शांती मिळावी म्हणून उदकशांती करतात. जलात सर्व देवतांचा वास असतो व जल हे स्वभावतःच शांत असते. तेव्हा अशा शांत व पवित्र जलाने दुरित नष्ट व्हावे म्हणून उदकशांतीचा विधी बौधा. गृ. शेषसूत्रांत (१.४) सांगितला आहे, तो असा–

संकल्प करून चार ब्राह्मण चार दिशांना बसवितात. मध्य-भागी धान्याचे एक स्थंडिल करून त्यावर सुवर्णाने रेषा काढतात. एक कलश घेऊन तो प्रथम धूपाच्या धुराने भरून घेतात. मग तो कलश जलाने भरून त्यात गंध, फुले, दूर्वा व फळे घालतात. मग त्यावर पूर्णपात्र ठेवून त्यात षडंग सहित ब्रह्माची स्थापना करून त्याची पूजा करतात. त्या कलशाला दर्भाने स्पर्श करून सर्व ब्राह्मण राक्षोघ्नसूक्त, आयुष्यसूक्त, राष्ट्रभृत्होममंत्र, विहव्यसूक्त, पावमानी, इ. मंत्रांचा पाठ करतात. शेवटी ओंकाराचा उच्चार करून तो कुंभ सगळे मिळून उचलतात व त्यातील जलाने यजमान व त्याचे कुटुंबीय यांना अभिषेक करतात. ब्राह्मणांना सोने, रुपे, कासे व वस्त्र, दक्षिणा म्हणून देतात. हा विधी तीन, पाच, सात किंवा नऊ दिवस करावा म्हणजे अपमृत्यू टळतो, असे बौधायन सांगतो. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**उदक सप्तमी** एक काम्य व्रत. कोणत्याही सप्तमीस ओंजळ-भर पाणी पिऊन राहणे, हा या व्रताचा विधी आहे. फल – सुखप्राप्ती. [ हि. ध. ]

**उदकक्ष्वेडिका** एक प्राचीन मनोविनोद. याला शृंगक्रीडा असेही म्हणत. पोकळ वांवूत पाणी भरून त्यातून सिंहगर्जनेसारखा आवाज काढणे, असे या क्रीडेचे स्वरूप होते. लंकेतील सिगिरिया गुहेत या क्रीडेचे चित्र आढळते. [ प्रा. भा. म. ]

**उदकुंभदान** उदकुंभ = उदकपूर्ण कुंभ. अक्षय्य तृतीयेला उदकुंभाचे दान दिल्याने मोक्षप्राप्ती होते, अशी समजूत आहे. उदकुंभदान स्वतःसाठी, त्याचप्रमाणे पितरांची अक्षय्य तृप्ती व्हावी म्हणूनही देतात.

प्रथम उदकुंभाला गंध लावून त्यात फळे व यव घालून त्याला सूत गुंडाळतात. मग स्वतःसाठी असल्यास –

> एष धर्मघटो दत्तो ब्रह्मविष्णुशिवात्मकः ।
> अस्य प्रदानात् सफला मम सन्तु मनोरथाः ॥

हा मंत्र म्हणून व पितरांसाठी असल्यास त्याचा उत्तरार्ध-

> अस्य प्रदानात् तृप्यन्तु पितरोऽपि पितामहः ।

असा बदलून तो कुंभ ब्राह्मणाला दान देतात. [ व्रतराज ]

**उदकुंभश्राद्ध** याचा विशेष असा, की यात देवाचे कर्म वर्ज्य असते. केवळ पितरांसाठीच हे श्राद्ध करतात. त्याचा विधी पार्वणश्राद्धाप्रमाणेच असतो. पिंडदान मात्र करा-यचे नसते. या प्रसंगी जलपूर्ण कुंभ ब्राह्मणाला दान देतात. हे श्राद्ध नित्य, वर्षभर, एक महिना अथवा निदान एकदा तरी

करावे, असे सांगितले आहे. पाहा – प्रार्वणश्राद्ध. [ ऋ. ब्र. स. ]

**उदंतपुरी महाविहार** उदंतपुरी हे बंगालमधल्या नवद्वीपाजवळचे एक गाव आहे. नवद्वीप हे संस्कृतभाषेच्या, विशेषतः न्यायदर्शनाच्या अभिवृद्धीसाठी, तर उदंतपुरी हे पालिभाषेच्या अभिवृद्धीसाठी प्रसिद्ध होते. बौद्धांच्या हीनयान पंथाचे ते एक मोठे केंद्र होते. तिथे येणाऱ्या विद्यार्थ्यांना त्या पंथाची दीक्षा दिली जाई. इथे सहस्रावधी विद्यार्थी निरनिराळ्या आचार्यांजवळ शिक्षण घेत. शांतरक्षित, अतीश, रत्नाकरशांती, प्रभाकर, अभयकरगुप्त, हे येथील प्रसिद्ध आचार्य होत. हे सर्व आचार्य जसे महापंडित होते, तसेच ते निरलस लोकसेवकही होते. सेवा, ज्ञान व चारित्र्य या त्रयीच्या बळावर ते लोकांच्या मनात बौद्ध धर्माविषयी आदर उत्पन्न करीत. बौद्ध धर्माचा प्रसार करण्यासाठी सर्व प्रकारचे शिक्षण देऊन भिक्षू तयार करणे, हा उदंतपुरीच्या विहाराचा प्रसिद्ध उद्योग होता. इ. स. च्या १० व्या शतकाच्या अखेरीस इथल्या भिक्षूंची संख्या सहा हजारांच्या वर गेली होती. जसजशी या विहाराची भरभराट होत गेली, तसतसे राजेरजवाड्यांचे लक्ष उदंतपुरीकडे आकृष्ट होऊ लागले. गुप्त सम्राटांनी नालंदा हे जसे आपले विद्यापीठ मानले, तसाच बंगालच्या पाल राजांनी उदंतपुरीचा विहार हा आपला विहार मानून त्याला सढळ हाताने मदत केली. पालराजे हे बौद्ध होते. त्यांनीच या विहाराचे नाव सर्वतोमुखी केले. पुढे तो साधा विहार न राहता महाविहार बनला. इ. स. च्या आठव्या शतकापासून अकराव्या शतकापर्यंत उदंतपुरीने उत्कर्षाचे शिखर गाठले. नालंदाप्रमाणेच इथेही फार मोठा ग्रंथसंग्रह होता. पण इ. स. ११९९ मध्ये बखत्यार खिलजीने तो सगळाच्या सगळा जाळून टाकला. त्यामुळे या विहारासंबंधी तपशीलवार माहिती मिळू शकत नाही. [ प्रा. भा. वि. ]

**उदबत्ती** सुगंधी पदार्थांची कांडी. चंदन, कृष्णागुरू, नागरमोथा, देवदार, ऊद, मैंदालकाडी, कोळसा, गूळ व शिलारस या द्रव्यांपासून उदबत्ती बनवितात. उंची उदबत्तीत गुलाबकळी, पाचपाल, वेलदोडे, वाळा, अंबर, कस्तुरी इ. द्रव्ये अधिक वापरतात. ही सर्व द्रव्ये कुटून त्यांची वस्त्रगाळ पूड करतात व तिला शिलारस गरम करून चोळतात. नंतर त्यात गूळ किंवा मध मिसळतात. मग हा सर्व मसाला भिजवून काड्यांना लावतात. मसाला वाळल्यावर उदबत्ती तयार होते. जाड उदबत्तीला अगरबत्ती असे म्हणतात. उदबत्ती हळूहळू जळत राहते व तिचा सुगंध बराच वेळ दरवळत राहतो. पूर्वी धूप, ऊद, चंदन, कापूर, इ. द्रव्ये निखाऱ्यांवर टाकून जाळण्याची प्रथा होती. त्यामुळे त्या द्रव्यांचा सुगंध आसमंतात पसरत असे. त्यासाठी मातीचे किंवा धातूचे विशेष आकाराचे पात्र वापरीत, पण सुगंधी उदबत्ती पेटवून ठेवणे सोयीचे होते. पूजा-अर्चा, धार्मिक विधी, उत्सव-सण-समारंभ भोजन-समारंभ अशा प्रसंगी उदबत्त्या पेटवून वातावरण प्रसन्न केले जाते.

उदबत्तीची निर्मिती कर्नाटक, महाराष्ट्र व तमिळनाडू इ. प्रदेशात होते. केवळ कर्नाटकातले उत्पादन ७०% आहे. आणि अन्य राज्यांत ३०% होते. भारतातून मलेशिया, अरबस्तान, सूदान, इंग्लंड, अमेरिका, इ. देशांना उदबत्त्यांची निर्यात केली जाते. [ सु. वि. को.; म. वि. को. ]

**उदुंब्रा ब्राह्मण** उदुंबर ऋषीवरून या ब्राह्मणांना हे नाव मिळाले आहे. यांच्यांत तीन पोटभेद आहेत. हे भिक्षुकी व भिक्षा यांवर निर्वाह करतात. गुजरातमध्ये यांची वस्ती आहे. [ मुं. इ. जा. ]

**उदयकुंकुम** द. भारतातील स्त्रियांचे एक व्रत. सौभाग्यवती गृहिणी सूर्योदयापूर्वी पाच सुवासिनींना बोलावून त्यांना कुंकू लावते. असे केल्याने अखंड सौभाग्य प्राप्त होते, अशी समजूत आहे. [ का. ट्रा. स. इं. ]

**उदयगिरी** मध्य प्रदेशात भेलसा (विदिशा) शहरापासून पाच मैलांवर हे स्थान आहे. इथे एकूण वीस गुंफा आहेत. त्यांपैकी दोन गुंफा जैनांच्या आहेत. एका गुंफेत चंद्रगुप्त २ रा याचा एक शिलालेख आहे. शिल्पकलेच्या दृष्टीने उदयगिरीमधील ५ व्या क्रमांकाची गुहा सर्वांत अधिक महत्त्वाची आहे. त्या गुहेत वराहावताराचा देखावा कोरलेला आहे. वराहाची प्रतिमा हे गुप्तकालीन कलेचे अप्रतिम उदाहरण आहे. या वराहाची मूर्ती बारा फूट उंच असून, तिला दोन हात आहेत. धड मानवाचे आणि मुख वराहाचे अशी ही मूर्ती आहे. त्याच्या दंताग्रावर स्त्रीरूपधारिणी पृथ्वी आहे. तिचे मुख तुटलेले असले, तरी बाकीचे शरीर अभग्न असून, ते मूर्तिकाराच्या अनुपम सौंदर्यनिर्मितीची साक्ष देते. वराहाचे शरीरही इतके दृढ व ओजस्वी आहे, की त्याच्या अंगप्रत्यंगांतून शक्ती व चैतन्य ओसंडत आहे, असे वाटावे. वराहाने पृथ्वीचा उद्धार केल्यामुळे ब्रह्मा, शिव, यक्ष, किन्नर, राक्षस हे सर्व वराहाची स्तुती करीत आहेत व पृथ्वीच्या उद्धाराबद्दल आनंद व्यक्त करीत आहेत, असा तो सर्व देखावा आहे.

क्रमांक ६च्या गुहेच्या दारावर दोन्ही बाजूंना विष्णूच्या दोन

मूर्ती उभ्या आहेत. विशेषतः उजव्या हाताची मूर्ती गुप्तकालीन



वराहमूर्ती–गुंफा क्र. ५

मूर्तिकलेचे वैशिष्टय दाखविणारी आहे. विष्णूच्या मस्तकी मुकुट, गळयात कौस्तुभमणिहार व गुडघ्यापर्यंत रुळणारी वैजयंतीमाला आहे. मूर्तिकाराने त्याच्या हातातील गदेला स्त्रीरूप व चक्राला पुरुषरूप दिले आहे.



सिंहमुक्त स्तंभशीर्ष

याव्यतिरिक्त या गुहेत दोन गणेशमूर्ती आहेत. या मूर्तींच्या अंगांवर कोणताही अलंकार नाही किंवा गणपतीचे कोणतेच सांप्रदायिक चिन्हही नाही. म्हणून ही मूर्ती गणेशाच्या प्राचीनतम मूर्तींपैकी एक आहे, असे डॉ. पाटील सांगतात. १७ क्रमांकाच्या गुहेतील गणेशमूर्तीच्या मस्तकावर मात्र मुकुट दिसतो. गुहा क्रमांक ६ मधील गणेशमूर्ती मात्र पूर्णतया सांप्रदायिक चिन्हांनी युक्त आहे.

उदयगिरीतील गुहाद्वारांवर जे द्वारपाल उभे आहेत, त्यांपैकी क्रमांक ६ च्या गुहाद्वारावरील द्वारपाल सर्वांत अधिक डोळ्यांत भरतात. त्यांचा विपुल केशकलाप, सुदृढ शरीर व हातातील मोठे परशू यांमुळे ते अत्यंत भीषण दिसतात.

इथे एक स्तंभशीर्ष सापडले आहे. त्या शीर्षाखाली पालथे कमल आहे. त्यावर गोल पीठ असून, त्याच्यावर चार सिंह बसले आहेत. त्याचप्रमाणे त्या पीठावर सूर्य व इतर बारा राशी यांच्या मूर्तीही खोदलेल्या आहेत. याप्रमाणे गुप्त राजांनी मौर्यांचे सिंह हे प्रतीक राज्यप्रतीक म्हणून स्वीकारले; पण त्याच्याभोवती बारा राशींच्या पौराणिक रूपांचे चित्रण करून त्याला अधिक आकर्षक बनविले. गुप्तकालात झालेल्या ज्योतिषाच्या विकासाचे ते द्योतक होय. [ हि. जॉ. ए. इं.; वि. स्मृ. ग्रं.]

## उदयगिरी–खंडगिरी

जैनांचे एक क्षेत्र. ओडिसात भुवनेश्वरापासून पश्चिमेला सात मैलांवर उदयगिरी व खंडगिरी नावाचे दोन पर्वत आहेत. या ठिकाणी कलिंग देशातील पाचशे मुनी मोक्षाला गेले, असे जैन पुराणात सांगितले आहे. त्यामुळे हे स्थान जैनांचे तीर्थक्षेत्र बनले आहे.

उदयगिरीला कुमारीगिरी असेही नाव आहे. महावीराने या ठिकाणची यात्रा केली होती. या पर्वतात अनेक गुहामंदिरे आहेत. अलकापुरी गुहा, जय–विजयगुहा, राणीगुहा, गणेशगुहा अशी त्यांची नावे आहेत. अनेक गुहा नैसर्गिक आहेत.



राणीगुंफा

गणेशगुहेच्या बाहेर दोन हत्ती आहेत. म्हणून तिला हत्तीगुंफा म्हणतात. गणेशगुहा पाहून परत येताना स्वर्गगुहा, मध्यगुहा व पाताळगुहा लागतात. पाताळगुहेच्यावर हत्तीगुहा आहे. हत्ती-

गुहा किंवा हत्तीगुंफा या गुहेत कलिंग–नरेश खारवेल (इ. स. पूर्व २ रे शतक) याचा सुप्रसिद्ध शिलालेख आहे. या सर्व गुहात अनेक मूर्ती खोदलेल्या आहेत. दालनांच्या दारांवर अर्धवर्तुळाकार तोरणे आहेत.

उदयगिरीच्या जवळच खंडगिरी आहे. त्यावर पाच गुहा आहेत. शिखरावर जैन मंदिरे आहेत. एका तटाच्या आत एक मोठे व एक लहान अशी दोन मंदिरे आहेत.

जवळच आकाशगंगाकुंड आहे. त्याच्यापुढे गुप्तगंगा, श्यामकुंड व राधाकुंड ही कुंडे आहेत. तिथून जवळच इंद्रकेसरीगुंफा आहे. या गुहेच्या मागे आणखी एक गुहा असून, तीत चौवीस तीर्थंकरांच्या प्रतिमा कोरल्या आहेत. पाहा – खंडगिरी. [ कल्याण – तीर्थांक; प्रा. भा. क. ].

**उदयनाचार्य** (इ. स. १० व्या शतकाचा उत्तरार्ध) मिथिलेतील करिओन गावी याचा जन्म झाला. हा जातीने ब्राह्मण असून याला उदयकर असेही म्हणत. भारतात याच्यासारखे प्रौढ विद्वान अगदी क्वचितच आढळतील. न्यायशास्त्राचा तो एक प्रधान आचार्य होता. तात्पर्यटीकेवर परिशुद्धी नामक एक विस्तृत टीका त्याने लिहिली आहे. त्याशिवाय वैशेषिक दर्शनातल्या रहस्यांचे उद्‌घाटन करण्यासाठी याने किरणावली नावाची एक पांडित्यपूर्ण व्याख्या लिहिली असून ती प्रशस्तपादभाष्यावरची टीका आहे. आत्मतत्त्वविवेक व न्यायकुसुमाञ्जली हे याचे सर्वश्रेष्ठ ग्रंथ होत. आत्मतत्त्वविवेकात क्षणभंगवाद व शून्यवाद यांचे खंडन केलेले असून न्यायसंमत आत्मतत्त्वाचे विस्तृत निरूपण केलेले आहे. न्यायकुसुमाञ्जली हा तर उदयनाचार्यांच्या ग्रंथांतील मेरुमणीच होय. यांत सांख्यादी वैदिक व बौद्धादी वेदबाह्य दर्शनातील ईश्वरनिषेधविषयक प्रमाणांचे मार्मिक व विद्वत्तापूर्ण खंडन केलेले आहे. हा ईश्वरसिद्धिविषयक तर्कप्रधान ग्रंथ न्यायदर्शनाच्या जगात अद्वितीय समजला जातो. याच्या मृत्यूबद्दल पुढील आख्यायिका प्रसिद्ध आहे –

ईश्वराच्या अस्तित्वाविषयी एकदा याचा बौद्धांशी वाद चालू असता याला अनुमान प्रमाणाने ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करता आले नाही. त्यामुळे चिडून जाऊन त्याने एका निराळ्याच प्रकारे ईश्वरसिद्धी करायचे ठरविले. तो एक श्रमण व एक ब्राह्मण यांना घेऊन एका टेकडीवर गेला व तिथून त्याने त्या दोघांचाही कडेलोट केला. पडता पडता ब्राह्मण ओरडला, की 'मला ईश्वराचे अस्तित्व मान्य आहे.' श्रमण ओरडला की 'मला ते मान्य नाही.' त्यामुळे ब्राह्मण बचावला; पण श्रमण मात्र मरण पावला. या प्रसंगावरून ईश्वराचे अस्तित्व सिद्ध झाले खरे; परंतु उदयनाचार्यांवर मात्र खुनाचा आरोप आला. तेव्हा तो उदयनपुरीच्या जगन्नाथाच्या मंदिरात गेला. त्या काळी अशी समजूत होती, की जगन्नाथ फक्त पुण्यवान लोकांनाच दर्शन देतो. उदयनाचार्याला दोन दिवस जगन्नाथाचे दर्शन झाले नाही. तिसऱ्या दिवशी जगन्नाथाने त्याला स्वप्नात येऊन सांगितले, की तू काशीला जा व स्वतःला जाळून घेऊन घडल्या पापाचे प्रायश्चित कर. मगच तुला माझे दर्शन घडेल. त्याप्रमाणे काशीस जाऊन त्याने आपला देह अग्नीला अर्पण केला. ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करण्यासाठी आपण एवढे कष्ट घेतले, तरी जगन्नाथाने आपल्यावर दया केली नाही, हे पाहून त्याला जगन्नाथाचा अत्यंत राग आला व मरतेसमयी त्याने पुढील उद्‌गार काढले –

**ऐश्वर्यमदमत्तोऽसि मामवज्ञाय वर्तसे ।**
**प्रवृत्ते बौद्धसम्पाते मदधीना तव स्थितिः ।।**

अर्थ – देवा, तुला ऐश्वर्याचा माज चढला आहे; म्हणून तू माझा धिक्कार करीत आहेस. (पण) बौद्धलोक बळावले असता तुझे अस्तित्व माझ्याच हातांत होते (हे लक्षात ठेव). [ भा. द.; प्रा. च. को. ]

**उदयपूर** राजस्थानातील एक अत्यंत सुंदर शहर. इ. स. १५५९ मध्ये महाराणा उदयसिंह याने चितोडच्या पश्चिमेस साठ मैलांवर उदयपूर हे नवे शहर वसविले. इ. स. १५६७ मध्ये अकबर बादशाहाने चितोड गडाला वेढा घातल्यावर महाराणा उदयसिंहाने उदयपूर येथे राजधानी स्थापली.

हे शहर अरवली पर्वतावर वसलेले असून, तिथले भव्य संगमरवरी प्रासाद, स्वच्छ जलाचे तलाव, प्रशस्त उद्याने व उत्तुंग कमानी प्रेक्षकांचे मन वेधून घेतात. शहराभोवती तटबंदी असून, शहरात प्रवेश करण्यासाठी पाच दरवाजे आहेत.

उदयपुरात एकूण तीन राजवाडे आहेत. त्यांपैकी महाराणाप्रासाद हा पिचोला तलावाच्या पश्चिम काठावर उभा आहे. वालुकामय दगड व संगमरवर यांच्या चौथऱ्यावर हा राजवाडा बांधलेला आहे. त्याची दक्षिणोत्तर लांबी सुमारे १५०० फूट व जास्तीत जास्त रुंदी ८०० फूट आहे. राजवाड्याला अनेक मजले आहेत; पण इमारतीच्या कामात एकसूत्रीपणा दिसत नाही. कारण इ. स. १५७१ पासून गादीवर आलेल्या प्रत्येक राजाने त्यात काही ना काही नवीन भर घातली आहे. राजवाड्यातील छोटी चित्रशाळा,. माणिकमहाल, मोतीमहाल, बारी महाल व चिनीका चित्रमहाल, हे महाल अत्यंत प्रेक्षणीय असून, रंगीबेरंगी काचा, आरसे आणि अनेक चित्रे त्यांच्या सौंदर्यात भर घालतात.

इथला दुसरा राजवाडा म्हणजे जगत्‌निवास प्रासाद हा होय. महाराणा जगत्‌सिंग (दुसरा) याने इ. स. १७५७ मध्ये पिचोला तलावाच्या काठी हा प्रासाद उभारला. शिल्पकलेचे अत्युच्च वैभव दर्शविणारा चकचकीत पांढऱ्या संगमरवराचा हा राजवाडा म्हणजे दगडातले काव्यच आहे. प्रारंभी राजपरिवारातल्या स्त्रिया व वारांगना यांचा निवास या राजवाड्यात असे.

पिचोला तलावाच्या दक्षिण टोकाला जगमंदिर राजवाडा



राजवाडा–उदयपूर

असून, तलावाच्या पाण्यात त्याचे प्रतिबिंबच दिसते. जहांगीरच्या विरुद्ध बंड करून उठलेला राजपुत्र खुर्रम (शहाजहाँ) याला याच प्रासादात आश्रय मिळाला होता. इ. स. १६१५ साली महाराणा अमरसिंग (पहिला) याच्या कारकिर्दीत या राजवाड्याचे बांधकाम सुरू झाले व १६२२ साली महाराणा करणसिंग याच्या राजवटीत ते पुरे झाले. त्याचा पुत्र महाराणा जगत्‌सिंग (पहिला : १६२८–१६५२ इ. स.) याने या प्रासादाला आणखी थोडी जोड दिली व त्याला आपले नाव दिले. या छोट्या प्रासादात एकावर एक तीन मजले असून, वर गोलाकार सुरेख घुमट आहे.

पिचोला तलाव हे इथले आणखी एक प्रेक्षणीय स्थळ होय. तलावाच्या सभोवती असलेले डोंगर, स्नानासाठी बांधलेले घाट, मंदिरे व राजवाडे यांमुळे हे सरोवर नितांत सुंदर दिसते. याचे क्षेत्रफळ सुमारे चार चौरस मैल आहे. इ. स. च्या १४ व्या शतकाच्या अखेरीस लाखा वनजारा या लमाण व्यापाऱ्याने हा तलाव खोदला, असे म्हणतात.

याच्या उत्तरेला फत्तेसागर नामक दुसरा एक कृत्रिम तलाव आहे व मधे एक कालवा काढून हे दोन्ही तलाव जोडलेले आहेत. महाराणा फत्तेसिंगाने हा तलाव निर्मिला असून, तो सुमारे दीड मैल लांब व मैलभर रुंद आहे. फत्तेसागराच्या जवळच ' सहेलियों की बारी ' नावाचे एक रमणीय उद्यान आहे.

याशिवाय इथे व्हिक्टोरिया हॉल म्युझियम, सरस्वती-भवन हे संस्कृत, प्राकृत, हिंदी व फारसी या भाषांतील दुर्मिळ हस्त-



पिचोला तलाव व राजप्रसाद–उदयपूर

लिखितांचे संग्रहालय, जगदीश मंदिर ही स्थाने प्रेक्षणीय आहेत. उदयपूरच्या परिसरातच उदयपूरपासून २२.४ कि. मी. अंतरावर कैलाशपुरी येथे मेवाडच्या महाराण्याचे कुलदैवत असलेल्या एकलिंगजीचे मंदिर आहे. पाहा – कैलाशपुरी.
[ उदयपूर दिग्दर्शन – श्री. दलपतसिंह दुगड, १९५९ ]

**उदयसप्तमी** मार्गशीर्ष शु. सप्तमी. त्या दिवशी एक तिथिव्रत करतात. व्रतावधी एक वर्ष. यात प्रत्येक महिन्यात सूर्याची निरनिराळ्या नावांनी पूजा करतात. फल–दीर्घायुरारोग्याची प्राप्ती. [ हि. ध. ]

**उदरबंध** एक अलंकार. बहुतेक शिल्पांत सामान्यतः पुरुषाच्या अंगावर हा अलंकार आढळतो. अमरावतीच्या शिल्पात उत्तरकालीन (इ. स. चे ३ रे शतक) आकृतीत फक्त एकाच मूर्तीत उदरबंध आढळतो. एका नागराजाच्या अंगावर यज्ञोपवीतासारखा तो रुळताना दिसतो.

**उदररोगनाशक मंत्र** उदररोग नाहीसा करणारा हा चौवीस– अक्षरी मंत्र पुढीलप्रमाणे–

यो यो हनुमन्तफलफलितधगधगित आयुराष परुडाह ।

या मंत्राचा ऋषी ईश्वर, छंद अनुष्टुभ, देवता हनुमान, बीज हुं व शक्ती स्वाहा.

मंत्राची प्रयोग करण्याची पद्धती अशी –

प्लीहायुक्त उदरावर विड्याचे पान ठेऊन ते आठपडी वस्त्राने झाकतात. नंतर मारुतीचे स्मरण करून त्या वस्त्रावर बोरीची एक वेळूचा तुकडा ठेवतात. रानशेणीच्या विस्तवावर बोरीची एक

काठी चांगली तापवितात व तिने बांबूच्या तुकड्यांवर समंत्रक सात वेळा ताडन करतात. असे केल्याने उदरप्लीहारोग नष्ट होतो, असे सांगितले आहे. [ मंत्र महोदधि ]

**उदवाडा** पारशी लोकांचे मुख्य पवित्र स्थान. सुरत जिल्ह्यात बलसाडपासून १० मैलांवर उदवाडा स्थानक असून, तिथून चार मैल अंतरावर पारशांचे अग्निमंदिर आहे. इ. स. १४९० नंतर मुसलमानांच्या आक्रमणामुळे पारशी लोक संजाणहून पळाले ते नवसरीला गेले. तिथून ते इ. स. १७३३ च्या सुमारास पेंढाऱ्यांच्या भीतीने सुरतेला गेले. शेवटी इ. स. १७४२ साली ते उदवाडा येथे जाऊन स्थायिक झाले आणि त्यांनी बरोबर नेलेल्या अग्नीची स्थापना तिथे केली. तो अग्नी अजूनही तिथे आहे; त्यांनी तो विझू दिला नाही. आदर व अरदी बेहस्त या महिन्यांत इथे पारशी लोक यात्रेसाठी जमतात.

तिथून जवळच श्रीरामेश्वराचे प्राचीन मंदिर आहे. महाशिवरात्रीच्या दिवशी तिथे मोठी जत्रा भरते. [ पारशांचा इतिहास; कल्याण – तीर्थांक; वि. मुं. रा. प. ]

**उदसेविका** एक प्राचीन उत्सव. भूतमाताउत्सव असे याचे दुसरे नाव आहे. इंद्रध्वजमहोत्सव संपल्याबरोबर भाद्र० शु. त्रयोदशीला हा उत्सव साजरा करीत. उदसेविका ही अंगाला माती माखणारी देवता असून, ती भैरवाची पत्नी आहे. भैरव व उदसेविका यांचा जन्म अनुक्रमे शिव व पार्वती यांच्या मनापासून झाला. नंतर ती दोघे भाद्र. शु. त्रयोदशीला विवाहबद्ध झाली. त्या विवाहाच्या स्मृतीचा हा उत्सव प्राचीन काळी करीत. त्या दिवशी अश्लील बोलत. स्त्रीपुरुष गाढव, बैल किंवा कुत्रा यांच्यावर बसून हिंडत. म्हातारेकोतारेसुद्धा लहान मुलासारखे चाळे करीत; गवळी, डोंब किंवा न्हावी यांची सोंगे घेत किंवा उघडेही फिरत.

या उत्सवात जो कोणी भाग घेत नाही, त्याचा बली देव किंवा पितर ग्रहण करीत नाहीत, असे स्कंदपुराणात सांगितले आहे. या उत्सवाच्या काळाविषयी मात्र मतभेद आहेत. हेमाद्री व वायुपुराणकार यांच्या मते हा काळ ज्येष्ठ प्रतिपदा ते पूर्णिमा असा आहे. [ हि. ध. ]

**उदान** (१) पंचप्राणांतील कंठस्थ प्राणवायू. हा सदैव ऊर्ध्वगामी असतो.

उदानो नाम यस्तूर्ध्वमुदैति पवनोत्तमः ।
तेन भाषितगीतादिविशेषोऽभिप्रवर्तते ।।

अर्थ – जो ऊर्ध्व जाणारा वायू तो उदान होय. त्याच्या योगाने बोलणे, गाणे, इ. शब्दविशेष प्रवर्तित होतात [ श. क. ]

(२) भगवान बुद्धाच्या मुखातून भावातिरेकामुळे बाहेर पडलेल्या प्रीतिवाक्यांचा संग्रह. बुद्धाने काही विशिष्ट वेळी उच्चारलेली गंभीर व समाधी–अवस्थेची सूचक अशी वाक्ये उदानात आहेत. बौद्ध जीवनाचे स्पष्ट दर्शन हे उदानाचे वैशिष्ट्य आहे. यात बुद्धाच्या जीवनातील अनेक प्रसंग आहेत. त्या व्यतिरिक्त चित्ताची शांती, निर्वाण, पुनर्जन्म, कर्म व आचारतत्त्व यासंबंधीचाही उपदेश उदानात आहे.

उदानात आठ वर्ग (वग्ग) आहेत, ते पुढीलप्रमाणे – (१) बोधी वग्ग (२) मुचलिंद वग्ग (३) नंद वग्ग (४) मेधिय वग्ग (५) सोणत्थेरस्स (शोणस्थविरसंबंधी) वग्ग (६) जच्चंध (जात्यंध) वग्ग (७) चूल वग्ग व (८) पाटलिगामिय (पाटलिग्राम) वग्ग. प्रत्येक वर्गात प्रायः दहा सूक्ते आहेत. सातव्या वर्गात मात्र नऊच सूक्ते आहेत. उदानातल्या गाथांची शैली साधी व सरळ आहे. [ पा. सा. इ. ]

**उदासी पंथ** शीख संन्याशांचा एक पंथ. इ. स. च्या १५ व्या शतकात हिंदु-मुस्लिम समन्वयाची प्रक्रिया सुरू झाली, तिच्यातून या पंथाचा उगम झाला आहे. हा पंथ सुधारकवादी असून, त्यात स्त्री-शूद्रांनाही प्रवेश मिळे. प्रारंभी तर मुसलमानांनाही या पंथात घेत. हिंदू देवतांपैकी शिव, विष्णू, सूर्य, दुर्गा व गणपती या पंचायतनाचा त्या पंथाने स्वीकार केला आहे, हा त्याच्या सुधारणावादाचा एक भाग होय. उदासी साधू हे अद्वैत तत्त्वज्ञानाचे पुरस्कर्ते आहेत. यांचा मूर्तिपूजेला विरोध असला, तरी तो कडवा नाही. पण हे लोक ग्रंथसाहिबाला जे महत्त्व देतात, त्यावरून कुराणाचे अनुकरण त्यांना प्रिय असावे, असे वाटते. या पंथाचा मुळात शैव संप्रदायासी संबंध होता. बहुतेक शैव पंथ हे स्मार्त आहेत. पण उदासी पंथ मात्र स्वतःला श्रौत समजतो.

गुरू नानकाचा पुत्र श्रीचंद्र हा या पंथाचा संस्थापक होय. नानकाच्या नंतर त्याची गादी आपल्याला मिळणार नाही, म्हणून श्रीचंद्र उदास झाला आणि त्यामुळे त्याच्या पंथाला उदासी किंवा उदासीन असे नाव पडले, असे दसनामी म्हणतात. उदासींना नानकपुत्र असेही दुसरे नाव आहे. हा पंथ ओंकारापासून निघाला असून, श्रीचंद्र हा त्याचा ७३ वा गुरू होय, असे त्यांची परंपरा सांगते. दुसऱ्या एका परंपरेनुसार सनक, सनंदन, सनातन, सनत्कुमार व नारद हे या पंथाचे पहिले पाच प्रवर्तक मानलेले आहेत.

उदासी पंथाचा दीक्षाविधी अत्यंत साधा आहे. ज्याच्याकडून

दीक्षा घ्यायची त्याचे चरणतीर्थ त्यात थोडी साखर घालून प्राशन करायचे म्हणजे दीक्षाविधी पुरा होतो.

चरण साधका धो धो पियो।
मरण साधको अपना जियो ॥

हा त्यांचा आवडता मंत्र या विधीचाच निदर्शक आहे. दीक्षेनंतर गुरू त्याला मंत्र देतो व नवीन नावही देतो. उदासी लोक अविवाहित राहतात.

उदासी साधूंचे नागा (नंगे) व परमहंस असे दोन भेद आहेत. नागा साधूंच्या नावाच्या शेवटी दास किंवा शरण हा शब्द असतो; जो परमहंस दीक्षा घेतो त्याच्या नावाच्या अंती आनंद हा शब्द लागतो. परमहंस उदासी भगवी वस्त्रे परिधान करतात; नागा उदासी फक्त कटिवस्त्र गुंडाळून सर्वांगाला भस्म फासतात. उदासी लोक 'ॐ नमो ब्रह्मणे ॐ' असे म्हणून एकमेकांना अभिवादन करतात.

उदासी साधू हिंदूंचे धार्मिक सण व उपवासादी नियम पाळतात. भाद्रपद शु. नवमीला ते श्रीचंद्राची जयंती मोठ्या थाटामाटाने साजरी करतात.

पूर्वी सिंधमधील सक्कर गावी उदासींचे साधुबेला नामक मोठे केंद्र होते. सिंधमधील बहुतेक मंदिरांतील पुजारी उदासी असत. त्यांच्या मागून त्यांच्या शिष्यांची त्या जागेवर नेमणूक होई. यांची बहुतेक वस्ती पंजाब व सिंध या प्रांतांतच होती. वाराणसी, वृंदावन व हरद्वार या ठिकाणी उदासींचे मठ असून, तिथे पाठशाळा चालविल्या जातात.

उदासी पंथाच्या चार शाखा आहेत, त्यांना धुनी असे म्हणतात. काबूलच्या उदासी मठात श्रीचंद्राने (जन्म इ. स. १४९४) जी धुनी पेटविली होती, ती आजपावेतो अव्याहत प्रज्वलित आहे, असे उदासी सांगतात.

चार शाखांचे चार प्रवर्तक आहेत. फूलसाहेबाची शाखा बहादुरपूरला, बाबा हसन याची चरनकौल या ठिकाणी, अल्मस्तसाहेबाची पुरी व नैनिताल येथे आणि गोविंदसाहेबाची शिकारपूर व अमृतसर येथे आहे. हे सर्व पंथ स्वतंत्र असून, त्यांची व्यवस्थाही वेगवेगळ्या महंतांकरवी चालते.

या सर्व पंथांच्या उदासींची 'बडा आखाडा' नावाची एक सभा आहे. दुसरा एक 'छोटा आखाडा' ही असून, तो हरराय नावाच्या शीख गुरूच्या फेरू नामक शिष्याने स्थापला आहे.

या चार पंथांशिवाय संगत साहिब नावाचा आणखी एक पंथ आहे. दक्षिण व पश्चिम पंजाबमध्ये या पंथाचा बराच प्रसार आहे.

रामदास उदासी या नावाच्या दुसऱ्या एका पंथाची स्थापना गुरुदत्त याने केली. उदासी संप्रदायाच्या प्रत्येक पंथाची व्यवस्थित संघटना असते. प्रत्येक पंथाचा एक मुख्य श्रीमहंत असून, त्याच्या हाताखाली दुसरे काही महंत असतात.

उदासी संप्रदायात वाचिक, मानसिक व कायिक अशी त्रिविध साधना आहे. सामान्य जनांना उपदेश करून ईश्वराचे ध्यान करण्याकडे प्रवृत्त करणारी जी साधना असते, तिला वाचिक साधना म्हणतात. मौन पाळून लोकांचे चित्त ईश्वराचे ध्यान करण्याकडे आकर्षित करणे, याला मानसिक साधना म्हणतात व स्वत: समाधी लावून लोकांनाही समाधी लावण्यास प्रवृत्त करणे, याला कायिक साधना म्हणतात. [इं. सा.; म. ज्ञा. को.; कल्याण – साधनांक]

**उदीच्य** उत्तरेकडील ब्राह्मण. यांची भाषा अतिशय शुद्ध असून, हे कुरु-पांचालांतील ब्राह्मणांना वादविवादात पराभूत करीत, असे म्हटले आहे (श. ब्रा. ११.४.१०.१; गो. ब्रा. १.३.६). ब्राह्मण विद्यार्थी त्यांच्याकडे विद्याभ्यासासाठी जात (कौषी. ब्रा. ७.६). [वे. इं.]

**उद्दुपे** एक प्रकारचा ढोल. याचा आकार पंचपात्रीसारखा असतो. कर्नाटकातील लिंगायत लोक धार्मिक समारंभांत हा ढोल वाजवतात. [म्यु. इं.]

**उदुंबर** एक वृक्ष. याला उंबर व औदुंबर अशी अन्य नावे आहेत. ऋग्वेदात याचा उल्लेख नाही. अथर्ववेदात मात्र याचे नाव आढळते (१९.३१.१). पूर्वी सर्व धार्मिक विधींत याच्या लाकडाचा उपयोग करीत असत. यूप, लाकडी पळी, ताईत, इ. वस्तू याच्या लाकडाच्याच करीत. उदुंबराचे फळ वर्षातून तीनदा पिकते व ते मधुर असते, असे ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे (७.१५; ५.२४). राज्याभिषेक-समारंभात राजासाठी औदुंबराच्या लाकडांचे सिंहासन करीत.

उदुंबर वृक्ष पवित्र असल्यामुळे त्याची पूजा करावी, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे.

उदुम्बरे वसेन्नित्यं भवानी सर्वदेवता।
ततः सा प्रत्यहं पूज्या गन्धपुष्पाक्षतादिभिः ॥
(आचारेन्दुः)

अर्थ – उदुंबर वृक्षात नेहमी सर्व देवतांमध्ये श्रेष्ठ अशा भवानीचा वास असतो. तिची प्रतिदिन सकाळी गंध, फूल, अक्षता, इ. द्रव्यांनी पूजा करावी.

उदुंबर किंवा औदुंबर हा दत्ताचा आवडता वृक्ष आहे. औदुंबराच्या तळवटी दत्तात्रेयाचा निवास असतो, असे समजतात. जिथे दत्तस्थान असते, तिथे बहुधा औदुंबराचा वृक्ष असतोच.

गृहयज्ञात गुरूसाठी औदुंबराच्या समिधा घेतात. औदुंबराच्या खाली मलमूत्रविसर्जन करीत नाहीत. औदुंबराचे झाड असेल तिथे विहीर खोदल्यास तिला पाणी लागते, अशीही समजूत आहे. [ वे. इं.; इं. वे. क. सू. ]

**उदुंबर लोक** एक प्राचीन मानवगण. पाणिनीच्या राजन्यादी गणात (४.२.५३) तसेच महाभारत, महामायूरी, बृहत्संहिता व मार्कंडेयपुराण या ग्रंथांत उदुंबरांचा उल्लेख आहे. उदुंबरांची प्राचीन नाणी कांगडा प्रदेशात बियास व रावी या नद्यांच्या मधल्या प्रदेशात मिळाली आहेत. ही नाणी इ. स. च्या दुसऱ्या, तिसऱ्या शतकांतली आहेत. पठाणकोट नगरातही उदुंबरांच्या पुष्कळ मुद्रा सापडल्या आहेत. बुद्धकालीन जीवन नावाच्या वैद्याने तक्षशिलेपासून मथुरेपर्यंत जी यात्रा केली, त्या यात्रावृत्तात उदुंबरांच्या प्रदेशाचा उल्लेख आहे. यावरून शाकल, अग्रोदक व रोहटक या नगरांवरून तक्षशिलेला जाणाऱ्या राजरस्त्यावर उदुंबरांचा प्रदेश होता, असे दिसून येते.

उदुंबर लोक सधन होते, हे त्यांच्या सापडलेल्या नाण्यांवरून समजते. उदुंबरांचे राज्य मगध आणि काश्मीर यांना जोडणाऱ्या राजरस्त्यावर होते आणि हिमालय जवळ असल्यामुळे पर्वत व मैदाने यांमधील मोक्याचे स्थान त्याला प्राप्त झाले होते. या भौगोलिक परिस्थितीचा या लोकांना फायदा मिळाला असावा.

स्थानिक उद्योगधंदे हे उदुंबरांच्या समृद्धीचे आणखी एक कारण असावे. हिमालयाच्या पठारावर मेंढ्यांची निपज होते व त्यांच्या लोकरीपासून सुंदर कापड तयार होते. पठाणकोट शहरात लोकरीच्या उत्तम शाली आजही बनतात. पठाणकोट हे त्या काळी उदुंबरांच्या राज्यातील एक महत्त्वाचे औद्योगिक केंद्र होते व तिथे व्यापारी उलाढाली मोठ्या प्रमाणावर चालत. या प्रदेशातून वाहणाऱ्या कोणत्या तरी एका नदीला उदुंबरावती असे नाव होते.

पुरातत्त्ववेत्त्यांच्या मते बियासच्या उत्तरेला व रावीच्या दक्षिणेला असलेली अरुंद दरी धरून, त्रिगर्ताच्या प्रवेशद्वारात उदुंबरांचे राज्य असावे. [ पा. का. भा.; ना. प्र. प. विक्रमांक, १९४३; इं. स्ट. पा. प्रे., भा. १, जुलै १९६० ]

**उदैयन** तमिळनाडूमधील एक जात. देवराज नावाचा एक चेर राजा होऊन गेला. त्याला तीन जातीच्या तीन राण्या होत्या. त्यांपैकी एका राणीचा पुत्र या उदैयन जातीचा मूळ पुरुष होय असे मानतात. हे लोक शेतकरी पेशाचे आहेत. हे जानवे घालतात.

**विवाहप्रथा** – लग्न ठरण्यापूर्वी वधूचे आप्तेष्ट वरगृही जाऊन वरासह भोजन करतात. नवरा मुलगा अन्न किती खातो, त्यावरून त्याची लायकी ठरवितात. मुलगा लहान असतानाच त्याच्या कपाळी भस्म लावून व त्याला नवे वस्त्र आणि चटई देऊन वाङ्‌निश्चय करून ठेवतात.

कुटुंबातील एखादा माणूस असाध्य रोगाने आजारी पडला, तर त्याच्यासाठी काली देवतेच्या नावाने एक रेडा सोडतात व रोगी इसम बरा झाल्यावर त्या रेड्याचा बळी देतात.

**मर्तिकप्रथा** – स्मशानात गेलेले मृताचे आप्तेष्ट परत येताना तोंडात भात चावून तो थुंकत थुंकत येतात. मृताची बायको असेल, तर ती सोळाव्या दिवशी दिव्याची पूजा करते व मिठाच्या भांड्याला स्पर्श करते. [ का. ट्रा. स. इं. ]

**उद्‌गाता** यज्ञप्रसंगी सामगान करणाऱ्यांपैकी एक प्रमुख ऋत्विज. ज्या यज्ञात सामगान असते, अशाच यज्ञात याची आवश्कता असते. दर्शपूर्णमासेष्टी किंवा चातुर्मास्य याग यांमध्ये उद्‌गाता नसतो. यज्ञात ज्या देवतांना हविर्भाग द्यायचा असतो, त्याची स्तुती होता करतो, त्याचप्रमाणे उद्‌गाताही करतो. उद्‌गात्याच्या गटात प्रस्तोता, प्रतिहर्ता व सुब्रह्मण्य असे तीन ऋत्विज असतात. सामगानाचा भाग या तिघांत विभागलेला असतो. कोणत्याही सामाचा प्रस्ताव म्हणजे प्रारंभ प्रस्तोता करतो, उद्‌गीथ हा मुख्य भाग उद्‌गाता गातो व प्रतिहर्ता प्रतिहार अर्थात शेवट करतो. उद्‌गाते जी विशिष्ट सामे म्हणतात, त्यांना स्तोत्रे असे नाव असून, ती सामवेदात असलेल्या ऋचांवर बसविलेली असतात. एका ऋचेवर अनेक प्रकारची सामे असतात. त्यामुळे उद्‌गाता सामवेदी असावा लागतो. सोमयागात सदोमंडपामध्ये औदुंबरीजवळ बसून उद्‌गाते सामगान करतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**उद्‌गीथ विद्या** प्रणवाला उद्‌गीथ अशी संज्ञा आहे. त्याचा जप केल्याने आत्मज्ञानाची प्राप्ती होते, असे योगदर्शनात व उपनिषदांत सांगितले आहे. ‘ उद्‌गीथाक्षराण्युपासीत ’ = उद्‌गीथाच्या अक्षरांची उपासना करावी, असे छांदोग्य म्हणते (१.३.६). वाणी हे पुरुषांतले सारतत्त्व आहे. सर्व वाङ्‌मयात ऋक् व साम हे यथार्थतत्त्वरूप आहेत. प्रणव (उद्‌गीथ) हे त्यांचे सार होय. ‘ प्रणवात्मकं ब्रह्म ’ ब्रह्म हे प्रणवात्मक आहे (त्रिपाद्विभूतिमहानारायणोपनिषद् १.३). त्याची शक्ती लक्षात घेता ईश्वराचे ध्यान करण्यास प्रणवासारखा श्रेष्ठ शब्द नाही, असे म्हटले पाहिजे. त्याच्या उच्चाराने वाक् व प्राण यांची एकता होते. उद्‌गीथाच्या उपासनेने

सर्व मनोरथ पूर्ण होतात, असे छांदोग्य उपनिषदात सांगितले आहे. [ कल्याण–साधनांक ]

**उद्दालक व्रत** ज्याची उपनयनाची वयोमर्यादा टळून गेली आहे व त्यामुळे जो द्विजत्वापासून भ्रष्ट झाला आहे, अशा पुरुषाने हे व्रत करायचे असते. आमिक्षा (दुधाचा चोथा) व आटीव दूध यांवर प्रत्येकी दोन महिने निर्वाह करणे, आठ दिवस दह्यावर व तीन दिवस तुपावर राहणे आणि एक दिवस पूर्ण उपोषण करणे असा याचा विधी आहे. (वसि. ध. सू. ११.७६–७७) [ हि. ध. ]

**उद्दालकेश्वर** वाराणसीतले एक तीर्थस्थान. हे कपिलेश्वर या तीर्थस्थानाच्या समोर असून, त्या ठिकाणी उद्दालक ऋषीला परमसिद्धी प्राप्त झाली, असे लिंगपुराणात सांगितले आहे. [ कृ. क. त. ]

**उद्देहिक** एक प्राचीन जमात. पुष्यमित्र शुंगाच्या मृत्यूनंतर गंगा–यमुनांचे खोरे, राजस्थान व पूर्व पंजाब या प्रदेशांत काही लहान राज्ये अस्तित्वात आली होती, त्यांपैकी हे एक गणराज्य होते. इ. सनपूर्व दुसऱ्या शतकातील यांची काही नाणी सापडली असून, त्यांवर उदेहकी अशी ब्राह्मी लिपीतली अक्षरे कोरलेली आहेत. कनौजच्या नैर्ऋत्येला ११२ मैलांवर वज्रन जवळ उद्देहिक होते, असे अल्बिरुनी सांगतो. [ अ. हि. नॉ. इं. ]

**उद्धव चिद्घन** (इ. स. च्या १७ व्या शतकाची अखेरी) एक चरित्रग्रंथकार. हा बीड जिल्ह्यातील धारूरचा रहिवासी असून, याचे आडनाव कोकीळ असे होते. उद्धव चिद्घन हे जोडनाव आहे. त्यातले उद्धव हे कवीचे व चिद्घन हे त्याच्या गुरूचे नाव आहे.

हा चैतन्य संप्रदायातला होता. गुरूपदेश झाल्यावर याने काव्यरचनेस प्रारंभ केला. अनुभवशतक, गीतार्थमंजरी, शुकरंभा-संवाद, गोराकुंभार, नागनाथ, इ. संतांची चरित्रे अशा प्रकारचे याचे साहित्य आहे. याने रचलेली संतमाला प्रसिद्ध आहे. याची समाधी धारूर येथे आहे.

ज्याचे वंशीं कुलधर्म रामसेवा ।
त्याचे वंशीं मज जन्म घडो देवा ॥

हे उद्धव चिद्घनाचे पद प्रसिद्ध आहे.

कृष्णा धाव रे लवकरी । संकट पडलें भारी
हरि तूं आमुचा कैवारी । आलें विघ्न निवारी ॥

हा त्याने रचलेला धावा करुणापूर्ण असून, तो कृष्ण काळच्या स्त्रिया आवडीने म्हणत. [ म. सा.; म. ज्ञा. को. ]

**उद्बंधक** एक प्राचीन जात. ही संकरजाती असल्याचे उशना सांगतो. वैखानसाच्या मते ही वैश्य पुरुष व क्षत्रिय स्त्री यांची संतती होय. [ हि. ध. ]

**उद्बोधनाथ** (समाधी इ. स. १६८७) महाराष्ट्रातल्या राशिन (जि. अहमदनगर) गावातले मल्हार नाईक ठिपसे यांचा हा मुलगा होय. मूळ नाव उद्धव. गंगाबाई नावाच्या नाथपरंपरेतल्याच एका स्त्रीने याला उपदेश दिला व पुढे हा उद्बोधनाथ झाला. पदे, अभंग, इ. याची काव्यरचना आहे. योगमार्गावर याने वरीच पदे रचली आहेत. राशिन येथे याची समाधी आहे. [ म. सा. ]

**उद्भट** ( इ. स. ८०० चा सुमार ) काश्मीरी पंडित. हा जयापीड राजाच्या दरबारात सभापती होता. याचे रोजचे वेतन एक लक्ष दीनार ( सुवर्णमुद्रा ) होते, असे राजतरंगिणीत लिहिले आहे (४. ४९५). ध्वन्यालोककार आनंदवर्धनाचार्य याचा हा वारंवार उल्लेख करतो. याने भामहाच्या ग्रंथावर भामहविवरण नामक ग्रंथ लिहिला आहे. पण उद्भटाची कीर्ती झाली, ती त्याच्या काव्यालंकारसंग्रह या ग्रंथामुळे. यात ६ वर्ग व ७६ कारिका असून, ४१ अलंकारांचे वर्णन आहे. या ग्रंथावर कोकणातल्या प्रतीहारेन्दुराज याने टीका लिहिली आहे. उद्भटाने भरताच्या नाट्यशास्त्रावरही टीका लिहिली होती, असे संगीतरत्नकारावरून कळते. याचा उद्भटालंकार नावाचा आणखी एक ग्रंथ आहे. [ सा. शा. इ. ]

**उद्यंतक गिरी** अगस्त्याने गया क्षेत्रात स्थापिलेला एक पर्वत. इथे ब्रह्मा विष्णू यांनी उग्र तप केले. इथे पिंडदान केल्याने पितर ब्रह्मलोकाला जातात. [ पु. इं. ]

**उद्यान** मोठा बगीचा, उपवन असे याचे पर्यायशब्द आहेत. ‘ राज्ञः साधारणं वनम् ’ = राजाने निर्माण केलेले साधारण वन म्हणजे उद्यान होय, असे अमरकोशात म्हटले आहे. उद्यानात विविध प्रकारचे लतावृक्ष, लताकुंज, कृत्रिम पर्वत, निरनिराळ्या आकारांचे चबुतरे, लतामंडप, जलोच्छ्वास, क्रीडाविलासस्थळे, तलाव, पुष्करिणी; त्यांत हंस-कारंडवादी पक्षी, इ. गोष्टी असत. उद्यानाचे एक किंवा अनेक रक्षक असत. त्यांत नगरातले रसिकजन आणि प्रेमी युगुले

सहलीसाठी व प्रेमक्रीडेसाठी जात असत. इंद्राचे नंदनवन, कुबेराचे चैत्ररथवन व रावणाचे अशोकवन ही उद्याने पुराणां-तही प्रसिद्ध आहेत. प्राचीन काळी अशा उद्यानातून सामाजिक व ऋतुसंबंधी उत्सव होत असत. राजेलोक आपल्या राजधानीत एखादे उद्यान निर्माण करणे, हे आपले एक सामाजिक कर्तव्य समजत.



निशात बाग--काश्मीर

इतिहासकालात मोगल सम्राट हे उद्याननिर्मितीचे शौकीन समजले जातात; पण त्यांच्या आगमनापूर्वीही भारतात उद्यान-निर्मिती चालू होती, असे श्री. विलियम क्रूक म्हणतो. त्याने लिहिले आहे, 'चौदाव्या शतकात फिरोजशहाने दिल्लीच्या आसपास १२०० बगीचे निर्माण केले होते.' मोगलांच्या आग-मनापूर्वीच भारतात उद्यानकला विकसित झाली होती. या उद्यानांची शैली प्राचीन भारतीय उद्यानकलेशी मिळतीजुळती होती. मोगलकाली उद्यानकलेचा जो विकास झाला तो मात्र, भारतीय पद्धतीला धरून झाला नाही. मोगली उद्यानकलेवर इराण व तुर्कस्तान या देशांतील कलेचा विशेष प्रभाव होता.

मोगलांच्या उद्यानात तलाव, पुष्करिणी आणि लहान मोठे पाट असत. उद्यानात जाण्याच्या मार्गावर दोन्ही अंगी पाणी वाहते ठेवीत. रांगेने काही चवुतरे बांधीत. त्यांच्या शेजारी वृक्ष लावीत. मंडपगृहे निर्माण करीत. गुलाबाची रोपटी विशेष प्रमाणात लावीत. याशिवाय मोठमोठे वृक्ष आणि फळ-झाडेही या उद्यानात असत. जिथे राजकुमार व बडेबडे सरदार यांचा दफनविधी होत असे, तिथे कबर बांधणे व तिच्या भोवती बगीचा निर्माण करणे, अशी प्रथा बाबराच्या कालांत सुरू झाली होती. अशा कबरींच्या जवळच लहानमोठे जलाशय निर्माण केले जात व त्यांत कारंजीही निर्माण करीत. मोगल राजेच बगीचे बनवीत असे नसून त्यांचे मोठमोठे सरदारही उद्याने तयार करीत. मोगल सम्राट राजकीय कार्यासाठीही उद्यानांचा उपयोग करीत. उद्यानातल्या लतामंडपांत किंवा खास बनविलेल्या महलात बसून त्यांची राजकारणाची खलबते चालत.



चष्मशाही उद्यान--काश्मीर

बाबर बादशहा हा फुलवेडा होता. त्याला सृष्टिसौंदर्याची विलक्षण आवड होती. आगऱ्याच्या एका उद्यानात त्याने एक खजुरीचे झाड लावले होते. त्याची उंची अकबराच्या काला-पर्यंत ९० फूट झाली होती. त्याच्या 'जौहरबाग' नावाच्या उद्यानात ६० विहिरी होत्या. अकबरालाही बागेचा छंद होता. तो फळाफुलांच्या रोपट्यांना ईश्वराची अपूर्व देणगी समजत असे व त्यांच्या वाढीकडे पूर्ण लक्ष देत असे. त्याने आपल्या बागा सुशोभित करण्यासाठी इराण व तुराण या देशांतून मोठमोठे उद्यानपंडित बोलाविले होते. काश्मीरमधील दल सरोवराच्या तीरावरील नसीमबाग व फत्तेहपूर सीकरी येथील कित्येक उद्याने अकबराच्या उद्यानरुचीची स्पष्टपणे साक्ष देत आहेत. जहांगिरही उद्यानांचा विलक्षण प्रेमी होता. राज्यरोहणा-पूर्वीचे त्याने उदयपूर येथे अनेक बगीचे बनविले होते. अहमदा-बादच्या उद्यानात त्याने फळझाडांची विशेष प्रमाणात लागवड केली होती. त्याला पुष्पशय्येची विशेष आवड होती.

ताजमहालाच्या भोवतालचे उद्यान हे शहाजहाँच्या कालातले प्रसिद्ध उद्यान होय. लाहोर येथील प्रसिद्ध शालिमार बाग ही शहाजहाँचीच निर्मिती आहे. आगरा येथील खास महालाच्या समोरची अंगुरी बाग व दिल्ली जवळची तालकटोरा बाग या दोन बागाही शाहजहाँनेच निर्माण केल्या आहेत. लाहोरच्या बादशाही मसजिदच्या सभोवती एक सुंदर बगीचा आहे व तो औरंगजेबाने बनविला आहे. औरंगजेबाची कन्या जेबुन्निसा

हिनेही लाहोरात 'चार बुर्ज' नावाचे एक उद्यान निर्माण केले होते. मोगलकालात काश्मीर व उत्तरप्रदेश या भागात अशी



शालिमार बाग–लाहोर

कितीतरी लहान-मोठी उद्याने निर्माण झाली व त्यांनी प्रजेच्या रसिक वृत्तीचे समाधान केले.

श्रीनगर येथील निशात व शालिमार ही उद्याने जगप्रसिद्ध आहेत. याशिवाय त्या ठिकाणी मोगलनिर्मित अनेक बगीचे आजही विद्यमान आहेत. निशात बागेविषयी पुष्कळ लिहिले गेले आहे. तिच्यातल्या प्रत्येक चबुतऱ्याची लांबी-रुंदी, प्रत्येक पायरीची उंची व प्रत्येक निर्झरिणीची खोली मोजलेली असून, त्यांच्या आकडेवारीचे तक्तेही तयार झालेले आहेत. या बागेची रचना मोठ्या कुशलतेने केलेली आहे. तिथली सोपानश्रेणी, प्रपात, फुलझाडे, वृक्ष, जागोजाग नाचत नाचत वाहणाऱ्या निर्झरिणी, इ. अनेक गोष्टींनी निशात बागेत गतिशीलता, उत्साह आणि अनंत जीवनाचे वातावरण निर्माण झालेले आहे. निशात बागेतले सर्व प्रयोग शालिमार बागेतही केलेले आहेत. तिथेही पाण्याचे पाट वाहतात, नर्गिसची फुले फुलतात, चिनारचे वृक्ष डोलतात. बागेत आल्यावर मनाचे चांचल्य नष्ट होते व त्याला घटकाभर असीम शांतीचा लाभ घडतो.

श्री. हॅवेल म्हणतो, की 'मोगल सम्राटांनी उद्यानांच्या रूपाने भारतीय कलेला एक महान देणगी दिली आहे.'

महाराष्ट्रात शाहूमहाराजांपूर्वी फळबागा व फुलबागा फारशा नव्हत्या. त्यांनी जागोजाग नाना प्रकारची रोपे लावून बागा निर्माण केल्या. थोरले बाजीराव पेशवे व चिमाजीअप्पा यांनी त्या कामी शाहूमहाराजांना पुष्कळ साहाय्य केले. साताऱ्याच्या आसपास आरळे, धावडशी, तुने, इ. गावी अनेक फळबागा आढळतात. ब्रह्मेंद्रस्वामींनीही ठिकठिकाणाहून शाकभाज्या, फळझाडे व फुलझाडे यांची रोपे मागवून धावडशी येथे उत्तम बगिचे बनवले आणि मराठे सरदारांनाही त्यांनी बागबगिचे लावण्यास प्रोत्साहन दिले. शाहूमहाराजांचे कार्य पेशव्यांनी पुढे चालवले आणि पुणे येथे व इतरत्र बागा निर्माण केल्या. अशा कित्येक बागांची नावे पेशवे दप्तरात आहेत. [अजन्ता–मे १९५३; पे.का.म.; आकाशवाणी प्रसारिका जाने.-मार्च १९५६]

**उद्यानयात्रा** एखाद्या ऋतुविषयक किंवा सामाजिक उत्सवासाठी उद्यानात जाणे, याला प्राचीन काळी उद्यानयात्रा म्हणत. फलपुष्पांनी बहरलेल्या वसंत ऋतूत उद्यानयात्रा करणे, ही एक आनंददायक गोष्ट असे. निश्चित दिवशी सकाळी नागरिकजन उद्यानयात्रेसाठी नटून सजून घोड्यावरून किंवा पायीच जात. कित्येक वेळी नगरातील शेठसावकार व सरदार यांच्या उद्यानयात्रेत गणिकाही सामील असत. राजे लोक अंत:पुरातल्या राण्यांना घेऊन जात. वाटेत कोंबड्यांच्या व मेंढ्यांच्या झुंडी, तसेच निरनिराळे खेळ पाहत आणि रमत-गमत ही यात्रा होत असे. उद्यानात गेल्यावर झोपाळ्यावर झोके घेणे, समस्यापूर्ती, कथाकथन, उखाणे व कोडी घालणे, अशा प्रकारचे खेळ व मनविनोद करीत (कामसूत्र पृ ९३). पालीग्रंथात उद्यानयात्रेची वर्णने अनेक ठिकाणी आढळतात. काशीचा राजा ब्रह्मदत्त कित्येकदा आपल्या परिवारासह दिवसभर उद्यानात रमून सायंकाळी नगरात परत येत असे. वाराणसीचे नगरश्रेष्ठी व राजपुरोहित यांच्या मुली खाद्यपेय सामग्री घेऊन उद्यानक्रीडेसाठी जात.

कित्येकदा कुमारिका व विवाहित स्त्रिया पुरुषांना बरोबर न घेता स्वतंत्रपणे उद्यानयात्रा करीत. श्रीमंत स्त्रिया व गणिका पालखी-मेण्यांतून जात व त्यांच्या परिचारिकांचा समुदाय पाठीमागून पायी जाई. पण कामसूत्रावरून असे कळते, की तरुण मुलींनी अशा प्रकारे पुरुषाच्या सोबतीवाचून उद्यानयात्रेला जाणे, त्या काळातही बिनधोक नव्हते. पुष्कळ वेळा अशा प्रसंगी गुंड लोक मुलींचे अपहरण करण्याची संधी साधीत. [प्रा. भा. म.; प्रा. भा. क. वि.]

**उद्यापन** एखादे व्रत घेऊन ते पुरे केल्यावर त्याची सांगता करण्यासाठी जो जप, होम, पूजा, इ. कृत्ये केली जातात, त्या सर्वांना मिळून उद्यापन म्हणतात. उद्यापन केले नाही, तर व्रत सफल होत नाही, असे शास्त्रवचन आहे. उद्यापन कसे करावे, ते त्या त्या व्रताच्या विधानातच सांगितलेले असते. जिथे ते सांगितलेले नसते, तिथे गोप्रदान व सुवर्णदान यांच्या योगे उद्यापन पूर्ण होते, असे समजतात.

व्रतावधी संपल्यावर, ज्या तिथीस व्रत घेतले असेल, त्याच तिथीवर उद्यापन करणे, हा सर्वश्रेष्ठ मार्ग होय. काही व्रतांच्या उद्यापनाचा काल आधी, मध्ये किंवा अंती सांगितलेला असतो.

यथोक्त काली उद्यापन करता आले नाही, तर ते कोणत्याही एकादशीस किंवा मार्गशीर्षात किंवा माघ शु. द्वादशीस किंवा सोमवारी करावे, असे सांगितले आहे. यांपैकी कोणताही पर्याय सोयीचा नसेल, तर ज्या वेळी द्रव्य जवळ असून, इच्छा होईल, त्या वेळी ते करावे, अशीही शास्त्राने सवलत ठेवली आहे. द्रव्य व साहित्यसामग्री मिळविण्याच्या कामी असमर्थता असेल, तर ब्राह्मणाला यथाशक्ति दक्षिणा देऊन 'तुझ्या व्रताची पूर्ती झाली' असा आशीर्वाद त्याच्याकडून घ्यावा. मात्र व्रताचे उद्यापन केल्यावाचून राहू नये. उद्यापनाचा सामान्य विधी असा–

नदीत किंवा जलाशयात यथाविधि स्नान, स्नानांगतर्पण, देवालयात, नदीतीरी किंवा घरी मंडप घालून तो लतापल्लवांनी सुशोभित करणे. मंडपात ग्रहवेदी व कुंड तयार करणे. संकल्प, गणपतिपूजन, आचार्यवरण, प्रतिमास्थापन व पूजन, धान्यराशीवर कलशस्थापन, विशेषार्घ्यदान, इ. गोष्टी करणे. रात्री कथाश्रवणादी कार्यक्रम व जागरण. दुसऱ्या दिवशी प्रातःकाळी आज्यादी उक्त हविर्द्रव्यांनी होम, पूर्णाहुती, अभिषेक, पीठदेवतांची उत्तरपूजा, आचार्यपूजा, पीठ-प्रतिमादान, वायनदान. ब्राह्मण, सुवासिनी व दंपती यांस भोजन, अन्नदान, कर्म ईश्वरार्पण करणे, आशीर्वादग्रहण व आप्तेष्टांसह भोजन. [ व्रतराज ]

**उद्योतकर** (इ. स. चे ७ वे शतक) एक शैव आचार्य. याचे जन्मस्थान नक्की कळत नाही. स्थानेश्वरापासून २० कोसांवर यमुनेच्या पूर्वभागी असलेल्या स्रुघ्न नावाच्या गावाचा तो उल्लेख करतो (न्यायवार्तिक १.३३); पण ते त्याचे जन्मगाव असेलच असें म्हणवत नाही. सतीशचंद्र विद्याभूषणांच्या मते न्यायवार्तिक लिहितेवेळी तो स्थानेश्वर (पंजाब) येथे राहत होता. कदाचित त्याला स्थानेश्वराधिपतीचा राजाश्रय असावा. तो भारद्वाज गोत्रातला होता. बौद्ध पंडित धर्मकीर्ती हा याचा समकालीन होय.

याचा न्यायवार्तिक हा ग्रंथ सुप्रसिद्ध आहे. हा ग्रंथ म्हणजे न्यायसूत्रांवरची टीका आहे. दिङ्नाग, नागार्जुन व त्याच्या पूर्वी होऊन गेलेल्या बौद्ध तार्किकांचे खंडन करणे, हा प्रस्तुत ग्रंथाचा मुख्य उद्देश आहे. याने बौद्ध न्यायाचा सखोल अभ्यास केला होता. याची शैली प्रौढ व पांडित्यपूर्ण आहे. याला पाशुपताचार्य असेही म्हणत. [ हि. इं. लॉ. ]

**उद्र** एक प्राचीन मानवगण. मानव धर्मशास्त्रात या लोकांचा प्रथम उल्लेख आढळतो. पुराणांत पुंड्र, उत्कल, मेखल, कलिंग या लोकांसमवेत उद्रांचाही निर्देश आहे.

उद्रांचा देश व्रजमंडलाच्या उत्तरेकडे असून, त्यात पुरुषोत्तम किंवा श्रीक्षेत्र, अर्कक्षेत्र व विरज क्षेत्र अशी तीन क्षेत्रे वैतरणा नदीच्या काठी होती, असे ब्रह्मपुराणात सांगितले आहे.

हे लोक काळे व अतिशय चिकाटीचे होते. त्यांच्यापैकी काही बौद्ध धर्मानुयायी होते व ते मध्यभारतात राहत होते, असे युआन च्वांगने म्हटले आहे. त्यानंतरच्या वाङ्मयात मात्र त्यांच्याविषयी कसलेच उल्लेख सापडत नाहीत. [ ट्रा. ए. इं. ]

**उद्वृषभ यज्ञ** प्राचीन काळी ज्येष्ठ पूर्णिमेस बैलांची पूजा करून त्यांना समारंभाने पळवीत, त्याला हे नाव होते. (जै. न्या. १. ३. ८).

**उनकेश्वर** महाराष्ट्रातले एक क्षेत्र. नांदेड जिल्ह्यात माहूरच्या पूर्वेला सुमारे २० मैलांवर अत्यंत दुर्गम ठिकाणी हे क्षेत्र वसलेले आहे. इथे महादेवाचे एक मंदिर असून त्याच्या दक्षिणेला व पूर्वेला अशी दोन गरम पाण्याची कुंडे आहेत. या पाण्यात स्नान केल्याने कुष्ठरोग व त्वचारोग बरे होतात, असे सांगतात. या कुंडांसंबंधी एक आख्यायिका आहे, ती अशी – पूर्वी या ठिकाणी शरभंग ऋषीचा आश्रम होता. त्याने रामचंद्राची प्रार्थना केली व रामाने भूमीत बाण मारून तिथे उष्णोदकाचे झरे निर्माण केले.

उनकेश्वर मंदिराच्या सभामंडपात भिंतीत एक यादवकालीन शिलालेख (इ. स. १२८९) असून त्यात हेमाद्रिपंत, राजपुत्र वेंकदेव, सोमदेव पंडित, इ. व्यक्तींचे उल्लेख आहेत. या स्थानाच्या आसपास दहा-बारा मैलांच्या परिसरात भीमेश्वर, सिद्धेश्वर, कपीश्वर व सोमेश्वर अशी चार शिवस्थाने आहेत. [ मातापूरची जगन्माता – आनंदयात्री, १९६० ]

**उनपदेव** महाराष्ट्रातील गरम झऱ्यांचे एक ठिकाण. जळगाव जिल्ह्यात चोपडयाजवळ हे ठिकाण आहे. या ठिकाणी २०० वर्षांपूर्वी बांधलेले मुरलीधराचे मंदिर असून, जवळच महादेव व कृष्ण-बलराम यांची दोन देवालये आहेत. पौष महिन्यात इथे जत्रा भरते. उष्ण पाण्याचा प्रवाह एका मंदिराच्या खालच्या गोमुखातून बाहेर पडतो आणि ते पाणी एका जलाशयात साठविले जाते. त्या पाण्याचे उष्णतामान १४०° असून, त्याला एक प्रकारचा वास येतो; पण तो गंधकाच्या वासापेक्षा वेगळा आहे. या पाण्याने त्वचारोग बरे होतात, असे सांगतात. इथे पूर्वी शरभंग ऋषीचा आश्रम होता. शरभंगाला पाण्याची सोय हवी होती, म्हणून रामचंद्राने या जागी बाण मारून पाण्याचा झरा निर्माण केला, अशी आख्यायिका सांगतात. [ म. जि. जळगांव ]

**उन्नी** अंबलवासी समाजातील पुष्पकन, ब्राह्मण, तियत्तुनी व नत्तुपत्तर या चार पोटजातींची पदवी. या पोटजाती स्वतःला नायरांपेक्षा उच्च मानतात.

त्यांच्यापैकी पुष्पकन ही फार प्राचीन जात असून, त्या लोकांना परशुरामाने मलबारमधील देवालयात फुलांचे हार करण्याचे काम दिले होते, अशी आख्यायिका आहे. नंबियस्सन ही पुष्पकनांचीच एक पोटजात असून, ते मल्लविद्येत प्रवीण आहेत. त्यांनी तालीमखाने व लष्करी शिक्षणाच्या शाळा चालविल्या आहेत.

या समाजातले ब्राह्मण तिरुवितांकुरमधील शूद्र जातींचे पौरोहित्य करतात.

तियत्तुन्नी लोक देवळांतून काही विशिष्ट धार्मिक कामे करतात. या जातीच्या उत्पत्तीची दंतकथा अशी सांगतात –

भद्रकालीने दरिकाला ठार मारल्यावर शिवाने आपल्या भूत-गणांपैकी ज्या एकाला तिच्या स्तुतिपर कवने गायला सांगितले, त्याचेच वंशज हे तियत्तुनी लोक होत. आजही ते नायरांच्या विवाहसमारंभात धार्मिक गीते गातात.

नत्तुपत्तर यांना पत्तर उन्नी व करप्पुरम उन्नी असे म्हणतात. करप्पुरम् उन्नी हे मुळात शूद्र होते; पण केरळच्या चेरमल पेरुमल नामक एका प्राचीन राजाने त्यांना सांप्रतचा उच्च दर्जा दिला. त्यांना ब्राह्मणांची कामे करण्याची व उन्नी ही पदवी धारण करण्याची परवानगी त्यानेच दिली.

पुष्पकनांच्या घराला पुष्पकम्, पुन्तुम् किंवा पदोदकम् असे म्हणतात. घराला पदोदकम् म्हणण्याचे कारण असे, की घर अगदी देवळाजवळच असते व देवाचे चरणतीर्थ या घराजवळ पडते.

पुष्पकन उन्नी लोक ब्राह्मणांप्रमाणे ताडपत्री छत्री घेऊन व नायर जातीतली मोलकरीण बरोबर घेऊन सार्वजनिक ठिकाणी जातात.

साथीचे रोग उद्भवल्यास हे लोक भद्रकाली व गणपती यांची पूजा करतात व नृत्य-गायनाने त्यांना संतुष्ट करतात. प्रसंगी एक इसम भद्रकालीचा वेष करून दरिक राक्षसाला ठार मारण्याचा नाटयप्रवेशही करतो.

**विवाहप्रथा** – मुलीचा विवाह बाराव्या वर्षानंतर करतात. विवाहाच्या आदल्या दिवशी सायंकाळी वधू स्नान करून देवीची पूजा करते. विवाहसमारंभ वधूच्या घरी होतो. कुटुंबातला वडील मुलगा तेवढाच जातीतल्या मुलीशी लग्न करतो व बाकीचे नायर स्त्रियांशी संबंधम करतात.

तियत्तुनी हे दहा दिवस, ब्राह्मण बारा दिवस व नत्तुपत्तर तेरा दिवस सुतक पाळतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**उन्नेता** अध्वर्युगणातला चौथा ऋत्विज. अध्वर्यूबरोबर सोम कुटणे, हविर्धान मंडपातल्या सोमरसाच्या घागरी-मधून वेळोवेळी सोम काढून देणे व प्रत्येक सवनाला पुरेल इतका सोम सिद्ध ठेवणे, ही कामे मुख्यतः उन्नेत्यावर सोप-विलेली असतात. यज्ञ संपल्यावर सोमरस शिल्लक राहू नये, अशी दक्षताही त्यानेच घ्यायची असते. थोडक्यात म्हणजे यज्ञातले सोमविषयक सर्व काम उन्नेत्याकडे असते. अवभृथ स्नानाच्या वेळी सर्वांना नदीतून बाहेर काढण्याचे कामही याच्याकडेच असते.

उन्नेता हा नारायणाच्या पायापासून निघालेला ऋत्विज होय, असे मत्स्यपुराणात म्हटले आहे (१६७-१०). [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**उन्मनी** एक अवस्था. अर्थात मनाचे मनपण हरवणे. हठ-योगातील पाच मुद्रांपैकी एक मुद्रा. यात साधक नासिकाग्रावर दृष्टी स्थिर करून भुवया वर चढवितो. उन्म-नीची साधना ही साधकाला अत्यंत उपयोगी आहे, असे गोरख, कबीर इ. संतांनी म्हटले आहे –

तूटी डोरी रस कस बहै । उन्मनी लागा अस्थिर रहै ।
उन्मनि लागा होइ आनंद । तूटी डोरी बिनसै कंद ।

उन्मनीभाव ही आनंदाची एक अवस्था असून, हिच्यात मनाचा लय होतो व प्राणाचा संचार अजिबात बंद होतो. सहजिया संतांच्या मते जीवाचा हाच निज स्वभाव आहे [ हिं. सा. को.; बौ. द. मी. ]

**उन्मीलनी एकादशी** जी अहोरात्र पूर्ण असून, दुसऱ्या दिवशी एक घटिका उरते, त्या एकादशीला हे नाव आहे. या दिवशी विष्णुपूजा व दान यांचे विधान सांगितले आहे. (प. पु. उ. खं. ३५)

**उन्ह उन्ह सावली** एक खेळ. कोवळ्या उन्हात अगर चांदण्यात हा खेळ खेळतात. काही ठिकाणी प्रकाश व काही ठिकाणी सावली असलेली जागा या खेळासाठी निवडतात. ज्याच्यावर राज्य येईल, तो मुलगा प्रकाशात उभा राहतो व इतर मुले सावलीत उभी राहतात. सावलीतील मुले मधून मधून उन्हात येतात. राज्य घेतलेला मुलगा त्यांना शिवायला धावला, की ती लगेच सावलीत पळ-तात. सावलीत जाण्यापूर्वी जर एखाद्या मुलाला पकडले, तर त्याच्यावर राज्य येते. मग पूर्वीचा राज्य घेतलेला मुलगा इतर मुलांत सामील होतो व खेळ पुन्हा सुरू होतो. [ व्या. ज्ञा. को. ]

'प्रधानाङ्गीभूतोपकारकद्रव्यम्'=मुख्य विधींला
**उपकरण** उपकारक द्रव्य किंवा वस्तू म्हणजे उपकरण होय, असे म्हटले आहे, उदा० राजाची छत्र-चामरे, भोजनातल्या शाकभाज्या व पूजेतल्या नैवेद्यादी वस्तू, ही त्या प्रकरणातली उपकरणे होत. देवपूजेत ज्या पात्रातून देवाला उपचार-समर्पण होते, त्या पात्रांनाही उपकरणे म्हणतात. व्यापक अर्थाने पाहिल्यास पूजकाचे शरीर व मन हेही एक उपकरणच असते. म्हणूनच सर्व उपकरणांवरोबर पूजकाची देहशुद्धी व मन:शुद्धीही देवपूजेत अपेक्षित असते. [ श. क. ]

(इ. सनपूर्व ३ रे शतक) एक प्रसिद्ध बौद्ध अर्हत.
**उपगुप्त** दिव्यावदानात याच्यासंबंधी माहिती आहे. भिक्षू शाणकवासी हा त्याचा गुरू होता. हा शाणकवासी एका सुगंधी व्यापाऱ्याकडे भिक्षा मागण्यासाठी जात असे. एक दिवस तो कोणाही शिष्याला बरोबर न घेता त्या व्यापाऱ्याच्या घरी गेला. तेव्हा व्यापाऱ्याने त्याला आपला एक पुत्र शिष्य म्हणून देण्याचे मान्य केले. व्यापाऱ्याला कालांतराने दोन पुत्र झाले. परंतु त्या दोन्ही पुत्रांच्या बाबतीत व्यापाऱ्याने आपले वचन पाळण्याची टाळाटाळ केली. तिसरा पुत्र उपगुप्त मोठा झाल्या-वर मात्र त्याने त्याला बौद्ध धर्माची दीक्षा देण्याचे ठरविले.

पुढे उपगुप्ताच्या ऐन उमेदीच्या वयात मथुरेची वासवदत्ता नावाची एक वारांगना त्याच्यावर मोहित झाली व तिने एक दिवस त्याला आपल्या भेटीसाठी बोलाविले. पण उपगुप्ताने तिला निरोप पाठविला की योग्य वेळी मी तुझी भेट घेईन. पुढे मथुरेच्या राजाने वासवदत्तेच्या काही अपराधाबद्दल तिचे नाक-कान कापून तिला स्मशानात नेऊन टाकले. त्या वेळी मात्र उपगुप्ताने तिची भेट घेतली व तिच्यापुढे मानवी शरी-राच्या क्षणभंगुरतेचे वर्णन करून तिला चार आर्य सत्यांचा उपदेश केला. तिला उपदेश केल्यामुळे उपगुप्तालाही अनागामी अवस्था प्राप्त झाली. या घटनेनंतर शाणकवासीने त्याला बौद्ध धर्माची दीक्षा दिली व पुढे तो अर्हत् बनला.

उपगुप्त हा सम्राट अशोकाचा गुरू होता, असे स्मिथने म्हटले आहे. उपगुप्ताने अशोकाला बुद्धाच्या जीवनातील महत्त्वाची स्थळे दाखविली व अशोकाने त्या ठिकाणी बुद्धाची स्मारके उभारली.

उपगुप्ताचे पुष्कळ शिष्य होते. त्यांपैकी कित्येक अर्हत्-पदाला पोचले. त्याच्या अर्हत्पदी पोचलेल्या शिष्यांकडून त्याला जे काष्ठदंड मिळाले, त्यांनी एक मोठी गुंफा भरून गेली असे सांगतात. पुढे त्याच काष्ठांनी त्याची चिता रच-ण्यात आली. बौद्ध धर्मातील सर्वास्तिवाद संप्रदायात उप-गुप्ताचे स्थान वरच्या श्रेणीचे मानतात. [ उ. प्र. बौ. वि. ]



**उपचार** सेवा, पूजा, आदर, आराधना, आतिथ्य असे उपचाराचे अनेक अर्थ आहेत. फल, पुष्प, इ० पूजा साधनांचाही उपचारात अंतर्भाव होतो. नित्याची आणि व्रतांतली देवपूजा सामान्यत: सोळा उपचारांनी करतात. तिला षोडशोपचारपूजा असे म्हणतात. क्वचित दहा किंवा पाच उपचारांनीही पूजा करतात. सनत्कुमारतंत्रात इष्टदेवतेची पूजा सोळा, दहा किंवा पाच उपचारांनी करावी, असे सांगितले आहे. शारदातिलकाचा तांत्रिक टीकाकार राघवभट्ट हा पूजेच्या उपचारांचे अडतीस, सोळा, बारा, दहा व पाच इतके पर्याय सांगतो.

**अडतीस उपचार** – आसन, आवाहन, उपस्थिती, सान्निध्य, आभिमुख्य, स्थिरीकृती, प्रसादन, अर्घ्य, पाद्य, आचमन, मधु-पर्क, पुनराचमन, स्नान, नीराजन, वस्त्र, वस्त्रोत्तर आचमन, उपवीत, उपवीतोत्तर आचमन, भूषण, दर्पणावलोकन, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, पानीय, पानीयोत्तर आचमन, हस्तवास, तांबूल, अनुलेपन, गीत, वाद्य, नृत्य, स्तुती, प्रदक्षिणा, नमस्कार, मंत्रपुष्प व पुनर्नमस्कार असे हे अडतीस उपचार होत.

**छत्तीस उपचार** – निबंधतंत्राच्या ५५ व्या पटलात पुढील छत्तीस उपचार दिले आहेत – आसन, दंतकाष्ठ, उद्वर्तन विरूक्षण, संमार्जन, अभ्यंजन, स्नान (घृताचे), आवाहन, पाद्य, अर्घ्य, आचमनीय, स्नानीय, मधुपर्क, आचमनीय, नमस्कार, नृत्य, गीत, वाद्य, स्तुती, होम, प्रदक्षिणा, दर्पणदर्शन, चामर-व्यजन, शय्या, अनुलेपन, वस्त्र, अलंकार, उपवीत, गंध, पुष्प, धूप, दीप, बलिदान, तर्पण, आत्मसमर्पण व विसर्जन.

**अठरा उपचार** – फेत्कारिणी तंत्राच्या ३ ऱ्या पटलात पुढील अठरा उपचार सांगितले आहेत – आसन, आवाहन, अर्घ्य, पाद्य, आचमनीय, स्नान, वस्त्र, उपवीत, भूषण, गंध, पुष्प, धूप, दीप, अन्न, तर्पण, माल्य, अनुलेपन व नमस्कार.

**सोळा उपचार** – नित्यपूजेतले सोळा उपचार, आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आचमनीय, स्नान (अभ्यंग, पंचामृत इ.), वस्त्र, उपवीत, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, मंत्रपुष्प, प्रदक्षिणा व नमस्कार.

**बारा उपचार** – स्वतंत्रतंत्रात सांगितलेले अर्घ्य, पाद्य आचमनीय, मधुपर्क, आचमन, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, प्रदक्षिणा व नमस्कार.

**दहा उपचार** – कालीतंत्रात सांगितलेले अर्घ्य, पाद्य, आचमनीय, मधुपर्क, आचमन, गंध, पुष्प, धूप, दीप व नैवेद्य.

**सात उपचार** – हे उपचार प्रयोगसार या ग्रंथात सांगि-

तलेले आहेत – अर्घ्य, गंध, पुष्प, अक्षता, धूप, दीप व नैवेद्य.

**पाच उपचार** – निबंधतंत्राच्या ५५ व्या पटलात हे सांगितले आहेत – गंध, पुष्प, धूप, दीप व नैवेद्य ( सायंकाळी धूपारतीच्या वेळची पूजा पंचोपचार असते.)

**तीन उपचार** – गंध, पुष्प, व नैवेद्य.

वर दिलेल्या ३८ उपचारांनी पूजा श्रेष्ठ मानली जाते.

पाहा – देवपूजा. [ हि. ध.; पूजातत्त्व; प्रि. तं. ]

## उपदेश

गुरूने शिष्याला तत्त्वज्ञान सांगणे, दीक्षा देणे किंवा मंत्र सांगणे, याला उपदेश असे म्हणतात.

**चन्द्रसूर्यग्रहे तीर्थे सिद्धक्षेत्रे शिवालये।**
**मन्त्रमात्रप्रकथनमुपदेशः स उच्यते ॥**

अर्थ – चंद्र-सूर्याच्या ग्रहणात, तीर्थांच्या ठिकाणी, सिद्धक्षेत्रांत (व) शिवालयात (गुरू) मंत्र सांगतो, त्याला उपदेश म्हणतात.

आप्ताने (जाणत्या, वडीलधाऱ्या माणसाने) शिष्याला, लहानाला किंवा अजाण माणसाला हितवाक्य सांगणे यालाही उपदेश म्हणतात. उपदेशाने गुरु-शिष्यसंबंध निर्धारित होतो. गुरूकडून शिष्याला विशिष्ट संप्रदायाची दीक्षा मिळणे, यालाही उपदेशच मानतात.

व्याकरणात आद्योच्चारणाला उपदेश म्हटले आहे. मीमांसक, अपेक्षित अर्थाचा प्रतिपादक ठरणाऱ्या ग्रंथसंदर्भाला उपदेश समजतात. (न्या. को.).

अध्ययन समाप्त झाल्यावर स्नातकाला गुरूकडून मिळणारा सामान्य उपदेश पुढीलप्रमाणे असतो –

**सत्यं वद। धर्मं चर। स्वाध्यायान्मा प्रमदः। आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तु मा व्यवच्छेत्सीः। सत्यान्न प्रमदितव्यम्। धर्मान्न प्रमदितव्यम्। कुशलान्न प्रमदितव्यम्। भूत्यै न प्रमदितव्यम्। स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम्। देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम्। मातृदेवो भव। पितृदेवो भव। आचार्यदेवो भव। अतिथिदेवो भव। यान्यनवद्यानि कर्माणि। तानि सेवितव्यानि। नो इतराणि। ...... एष उपदेशः।**
(तै. उप. शिक्षावल्ली)

अर्थ – सत्य बोल. धर्माचे आचरण कर. स्वाध्याय (वेदांचे अध्ययन) सोडू नको. आचार्याला (गुरुदक्षिणारूप) प्रियधन देऊन प्रजातंतू विच्छिन्न होऊ देऊ नको. गृहस्थाश्रमाचा स्वीकार कर. सत्याला चुकू नको. धर्माचरणाच्या कामी प्रमाद होऊ देऊ नको. प्रावीण्यापासून च्युत होऊ नको. ऐश्वर्यापासून च्युत होऊ नको. स्वाध्याय आणि प्रवचन (अध्यापन) यांना सोडू नको. देव आणि पितर यांची कार्ये वेळच्या वेळी कर. मातेला देवता मान. पित्याला देव मान. आचार्याला देव मान. अतिथीला देव मान. जी स्तुत्य कर्मे असतील, ती कर. निंद्य कर्मे आचरू नको...हा (तुला माझा) उपदेश आहे.

## उपद्रष्टा

यज्ञकर्मातला साक्षीपुरुष. ऋत्विज व यजमान हे यजनकर्मात व्यापृत असता स्वतः अव्यापृतपणे जवळ राहून जो त्या यजनकार्यातले गुणदोष पाहतो, त्याला उपद्रष्टा म्हटले आहे. परमात्म्यालाही त्याच्या साक्षित्वामुळे उपद्रष्टा म्हणतात (गीता १३.२२).

## उपनयन

कुमाराचा एक प्रमुख संस्कार. याला मौंजीबंधन व व्रतबंध अशीही नावे आहेत. उपनयनाची व्याख्या अशी –

**गृह्योक्तकर्मणा येन समीपं नीयते गुरोः।**
**बालो वेदाय तद्योगाद्बालस्योपनयं विदुः ॥**

अर्थ – ज्या गृह्यसूत्रोक्त कर्माने बालाला वेदाध्ययनासाठी गुरूजवळ नेले जाते, त्याला उपनयन असे म्हणतात.

मौंजीबंधन हा शब्द, या संस्कारात बटूच्या कमरेत मुंजतृणाची मेखला बांधतात, त्यावरून आला आहे. व्रतबंध याचा अर्थ ब्रह्मचर्यासाठी बटूला विशिष्ट नियमांनी बद्ध करणे, असा होतो.

उपनयन संस्कार किती प्राचीन आहे, ते निश्चितपणे सांगता येत नाही. पारशी लोकांत नवजोत नावाचा एक उपनयनासारखाच संस्कार आहे. उपनयनाने मुलाला दुसरा जन्म मिळतो अशी जी हिंदूंत धारणा आहे, तीच नवजोतविषयी पारश्यांचीही आहे. त्यावरून एवढे म्हणता येते, की भारतीय आर्य व इराणी हे जेव्हा एकत्र राहत होते, त्या काळात या संस्काराचा उगम झाला असावा.

धार्मिक विद्यांचे अध्ययन या अर्थी ब्रह्मचर्य या शब्दाचा प्रयोग ऋग्वेदात आढळतो ( १०.१०९.५ ). वैदिक काळात छात्राला ब्रह्मचारी व अध्यापकाला आचार्य म्हणत. हाच आशय अथर्ववेदाच्या पुढील मंत्रात (११.५.३) सांगितला आहे –

**आचार्य उपनयमानो ब्रह्मचारिणं कृणुते गर्भमन्तः।**
**तं रात्रीस्तिस्र उदरे बिभर्ति तं जातं द्रष्टुमभिसंयन्ति देवाः॥**

अर्थ – उपनयन करणारा आचार्य ब्रह्मचाऱ्याला गर्भात धारण करतो. तो तीन रात्री त्याला उदरात रक्षितो. जेव्हा तो जन्म (द्वितीय) ग्रहण करतो, तेव्हा देव त्याच्या दर्शनासाठी येतात.

याविषयी डॉ. स. अं. डांगे यांनी केलेले विवेचन असे –

उपनयनाच्या संस्कारात विद्यादान किंवा वेदाध्ययन याला

महत्त्व नसून पुनर्जन्माला महत्त्व असते. आचार्य बटूला आपला गर्भच मानतो आणि तिसऱ्या दिवशी तो पुन्हा जन्माला येतो. हे सावित्री (गायत्री) मंत्राच्या प्रभावामुळे घडते. हा विधी सांकेतिक आहे. पुनर्जन्मासाठी सांकेतिक गर्भधारणा व गर्भधारणेसाठी सांकेतिक मृत्यू आवश्यक होय. उपनयनात त्याचाही संकेत आहे. मृत्यू व पुनर्जन्म या उपनयनातील अत्यंत महत्त्वाच्या कल्पना आहेत. आचार्य बटूला वेगवेगळ्या देवतांना अर्पण करतो. अर्थात हे अर्पण सांकेतिक असून, मंत्रांच्या द्वारेच सिद्ध होते. त्यामुळे बटूचे व्यक्तिमत्त्व सुरक्षित राहते. (शत. ब्रा. ११.५.४.३).

ब्राह्मणकालात उपनयनाचा विधी हळूहळू निश्चित होऊ लागला होता. गृह्यसूत्रांच्या कालात तो तपशीलवार निश्चित होऊन त्या संस्काराला प्रतिष्ठा प्राप्त झाली. समस्त गृह्यसूत्रांनी बटूच्या द्विजत्वप्राप्तीसाठी उपनयन संस्कार आवश्यक मानला असून, त्यासंबंधीचे नियम विस्तारपूर्वक दिले आहेत.

उपनयनसंस्थेच्या प्रदीर्घ इतिहासात उपनयनविषयक धारणांमध्ये अनेक परिवर्तने झालेली दिसतात. अथर्ववेदात ब्रह्मचाऱ्याचे आचार्यद्वारा ग्रहण या अर्थी तो शब्द आला आहे. ब्राह्मणकालातही उपनयनाचा हाच अर्थ समजला जात होता. सूत्रकालात बटूने ब्रह्मचर्यासाठी आचार्याची प्रार्थना करणे व आचार्याने त्यासाठी बटूचा स्वीकार करणे, हाच उपनयनसंस्काराचा केंद्रबिंदू होता. पण पुढच्या काळात उपनयनाचा रहस्यात्मक अर्थ करण्याची प्रवृत्ती वाढली व गायत्री मंत्राच्या द्वारे बटूला द्वितीय जन्माची प्राप्ती होते, या धारणेने ब्रह्मचर्यदीक्षेच्या मूळ कल्पनेवर आवरण पडले. मनू म्हणतो–

तत्र यद् ब्रह्मजन्मास्य मौञ्जीबन्धनचिह्नितम् ।
तत्रास्य माता सावित्री पिता त्वाचार्य उच्यते ।।
(मनुस्मृती २.१७०)

अर्थ – ब्रह्मचाऱ्याचा दुसरा जन्म (ब्रह्मजन्म) हा मौञ्जीबंधनाने चिन्हित असतो. त्याचे प्रतीक मुंजमेखला धारण करणे, हे असते. सावित्री ही त्याची माता व आचार्य हा पिता असे सांगितले जाते.

याज्ञवल्क्याचा टीकाकार अपरार्क लिहितो, की उपनयन शब्दाने छात्र व गायत्री मंत्र यांच्यामधला संपर्क अभिप्रेत असून, आचार्याच्या द्वारे तो संपर्क प्रस्थापित होतो (याज्ञ. स्मृ., १.१४ अपरार्काची व्याख्या).

कोणत्या वर्षी बालकाचा उपनयन संस्कार करावा, हा प्रश्न या विषयात महत्त्वाचा होता. आश्व. गृह्यसूत्रात सांगितले आहे, की ब्राह्मणाचे उपनयन ८ व्या वर्षी, क्षत्रियाचे ११ व्या वर्षी व वैश्याचे १२व्या वर्षी करावे (१.१९). त्रैवर्णिकांत ही वयाची भिन्नता का सांगितली, याविषयी अनेकांनी अनेक तर्क केले आहेत. कित्येक विद्वान या भेदकल्पनेत ब्राह्मणांचा दंभ असल्याचे समजतात.

पण या भेदाला काही व्यावहारिक आधारही सापडण्याजोगा आहे. अतिप्राचीन काळी ब्राह्मण पिता हा आपल्या मुलांचा आचार्यही होऊ शकत होता. तोच त्याचे उपनयन करी. त्यामुळे ८ व्या वर्षी म्हणजे इतक्या कमी वयात तो संस्कार करणे, गैरसोयीचे वाटत नव्हते. कारण त्या मुलाला विद्याभ्यासासाठी गृहत्याग करावा लागत नसे. क्षत्रिय व वैश्य यांची स्थिती याहून वेगळी होती. त्यांच्या मुलांना अध्ययनासाठी आईबापांना सोडून गुरुगृही दूर जावे लागे. त्यामुळे आठव्या वर्षी मुलाला आपल्यापासून तोडणे आईबापांना जड जात असे. म्हणून त्यांच्या सोयीसाठी धर्मशास्त्रकारांनी क्षत्रिय-वैश्यांच्या उपनयनाचे वय वाढवून दिले असण्याची शक्यता आहे. या बाबतीत मनूने आणखी एक विकल्प सांगितला आहे –

ब्रह्मवर्चसाच्या प्राप्तीसाठी ब्राह्मण कुमाराचे उपनयन पाचव्या वर्षी, बलप्राप्तीसाठी क्षत्रियाचे उपनयन सहाव्या वर्षी व ऐश्वर्यप्राप्तीसाठी वैश्याचे उपनयन आठव्या वर्षी करावे (२.३७). विभिन्न गुणांसाठी अशा प्रकाराचे विकल्प बौधायनानेही सांगितले आहेत; पण ते आपाततः काल्पनिकच वाटतात.

उपनयन संस्काराची अंतिम वयोमर्यादा ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांना अनुक्रमे १६, २२ व २४ अशी मानलेली आहे (पार. गृ. सू. २.५.३६-३८). पण जेव्हा उपनयनाला एक शारीरिक संस्कार असे स्वरूप प्राप्त झाले, तेव्हा कितीही विलंब होवो, उपनयन हे लग्नासाठी कधी तरी केलेच पाहिजे, असे मानले जाऊ लागले. इतके विकल्प असूनही ज्यांचे उपनयन होत नसे, ते पतित समजले जात. त्यांच्यावर धार्मिक बहिष्कार घातला जाई. ते संस्कारहीन म्हणूनच व्रात्य ठरत.

सूत्रकालाच्या पूर्वी प्रत्येक कुमाराचे उपनयन केलेच पाहिजे, असा निर्बंध नव्हता. तो एक ऐच्छिक संस्कार होता. तो संस्कार केवळ सुसंस्कृत कुळे व पुरोहितवर्ग एवढ्यापुरताच मर्यादित होता. अध्ययनाची आवड असलेला कोणीही कुमार वा तरुण गुरूकडे जाऊन स्वतःचे उपनयन करीत असे. उपनिषत्कालाच्या शेवटी कधीतरी तो अनिवार्य मानला जाऊ लागला. या अनिवार्यतेच्या मुळाशी एक सांस्कृतिक कारण होते. कोणत्याही प्रगतिशील समाजात शिक्षण हे आवश्यक मानले जाते. वैदिक समाज हा प्रगतिशील होता. त्याने ठरविले, की प्रत्येक मुलाने आपल्या जीवनाचा काही भाग गुरुकुलात किंवा कोणत्या तरी

शिक्षणसंस्थेत विद्यार्जनाच्या कामी सार्थकी लावलाच पाहिजे. उपनिषत्कालाच्या अंती ज्ञानाच्या विविध शाखा विकसित होऊ लागल्या होत्या. त्या विद्यांचे रक्षण करणे व त्यांचा विस्तार करणे, हे एक पवित्र सामाजिक कर्तव्य त्याकाळी मानले जात होते. या ज्ञानासाठी ब्रह्मचारी बनायचे, तर वटू हा उपनयन संस्काराने पात्र व पवित्र झालाच पाहिजे, अशा प्रकारची धारणा होती. उपनयनाच्या सक्तीचे हे दुसरे कारण. आभिजात्य किंवा उच्चत्व हे शेवटचे कारण होय. विद्येची साधना होवो वा न होवो, ब्रह्मचर्य राहो वा न राहो, ज्या अर्थी माझ्या खांद्यावर यज्ञोपवीत आहे, त्या अर्थी बहुजनसमाजापेक्षा मी वेगळा आणि उच्च आहे, ही भावना उपनयन संस्काराने निर्माण केली व जोपासली. संपूर्ण अभिजातवर्ग केवळ या यज्ञोपवीतामुळेच स्वतःला द्विज म्हणवून घेऊ लागला. आणि अशा प्रकारे उपनयन संस्कार अपरिहार्य ठरल्यावर लोक त्याचे मूळ प्रयोजन विसरले.

प्राचीन काळी उपनयन हा विद्यासंस्कार होता व त्यामुळेच अध्ययनाला अयोग्य अशा कुमारांना उपनयनाचा अधिकारही नव्हता; पण जेव्हा हा संस्कार एक दैहिक संस्कार या रूपात परिवर्तित झाला, तेव्हा मुके, बहिरे व आंधळे यांचेही उपनयन केलेच पाहिजे, असे मानले जाऊ लागले. जोवर त्रैवर्णिकांवर वैदिक धर्माचे कडक नियंत्रण होते; तोवर त्या समाजात उपनयन अनिवार्यपणे चालू राहिले. पण मध्ययुगात भारतावर एकाहून एक अधिक प्रखर अशी मुसलमानी आक्रमणे होऊ लागली. हिंदुधर्मावर आकाशीची कुऱ्हाड कोसळली. हिंदूंचे धार्मिक जीवन संकटात सापडून विस्कळितही झाले. क्षत्रिय व वैश्य हा समाजातला वर्ग आपल्या मूळ व्यवसायापासून च्युत होऊन साधारण शेतकरी या अवस्थेला प्राप्त झाला. त्यामुळे कालांतराने असे मत प्रचलित झाले, की 'कलावाद्यन्तयोः स्थितीः'=कलियुगात ब्राह्मण व शूद्र असे दोन वर्णच आहेत. परंतु हे मत सार्वत्रिक स्वरूपात मान्य होऊ शकले नाही. अनेक प्रदेशांतल्या बहुतेक क्षत्रिय-वैश्यांनी उपनयन संस्काराचा मात्र त्याग केला.

प्रारंभी उपनयन संस्कार अत्यंत साधा होता. ब्राह्मण कुलांत वेदाध्ययन पिढ्यान् पिढ्या चालत होते. बाप हाच मुलाचा गुरू होत होता. उपनिषत्कालातील आचार्यत्व हे पित्याकडेच असे, हे बृहदारण्यकातल्या एका उल्लेखावरूनही कळून येते (५.२.१). उपनिषदांतून उपनयनाची जी अनेक उदाहरणे आढळतात, ती पाहिल्यावर त्या संस्काराचा साधेपणा व सुटसुटीतपणा कळून येतो. विद्यार्थी हाती समिधा घेऊन गुरूकडे जाई व गुरू त्याचे कुलगोत्र विचारून शिष्य या नात्याने त्याचा स्वीकार करी. तिथून त्या विद्यार्थ्याचे अध्ययन सुरू होई. पुढे हळूहळू त्यात कर्मकांड शिरले व त्याच्या अनेक अंगांचा विकास झाला. उपनयनाच्या या संपूर्ण विकसित स्वरूपाचे विशद वर्णन गृह्यसूत्रे करतात. उपनयनाचा असा विस्तार होत असता त्यात वैदिक अर्थात लौकिक विधी समाविष्ट केले गेले.

प्राचीन काळी मुलींचेही उपनयन करण्याची चाल होती. कूर्मपुराणात तसा उल्लेख आहे –

**पुराकल्पे हि नारीणां मौञ्जीबन्धनमीरितम् ।**

अर्थ – पूर्वीच्या कल्पात स्त्रियांचे मौंजीबंधन सांगितले आहे. बाप, चुलता वा भाऊ मुलींना विद्यादान करी. अन्य पुरुषाला मात्र त्या कामी मनाई असे. ब्रह्मचारिणी मुलगी स्वगृहातच भिक्षा मागे. स्त्रियांचे उपनयन अमंत्रक करीत, असे मनु सांगतो, (२.६६). यावरून मनूच्या काळीच ही प्रथा हळूहळू लोपत चालली असावी, असे वाटते.

पुढच्या काळात कन्येचे वराकडून होणारे पाणिग्रहण हाच कन्येचा मुख्य संस्कार मानला गेला. संस्कार-रत्नमालेच्या उपनयनप्रकरणात हारीतस्मृतीतल्या वचनाला धरून स्त्रियांचे दोन प्रकार सांगितले आहेत–(१) ब्रह्मवादिनी – ब्रह्मतत्त्वाचे अध्ययन करू इच्छिणारी ती ब्रह्मवादिनी. तिचे उपनयन करून तिला वेदाध्ययन करू द्यावे व (२) सद्योवधू–संसाराची इच्छा बाळगणारी असेल ती सद्योवधू. तिचे उपनयन करून लगेच तिचा विवाह करावा, असे सांगितले आहे. आर्यसमाजी लोक आजही मुलींचे उपनयन करतात.

**शुभमुहुर्तादी** – माघापासून ज्येष्ठापर्यंतचे पाच महिने, शुक्लपक्ष (वद्यपक्षात फक्त पंचमीपर्यंत), हस्त, चित्रा, स्वाती, पुष्य, धनिष्ठा, आश्विनी, मृगशीर्ष, पुनर्वसू, श्रवण व रेवती ही नक्षत्रे व गुरू, शुक्र, बुध हे वार, अशी दिनशुद्धी उपनयनाला उत्तम आहे.

**गुरुबल** – गुरू हा ज्ञानदाता ग्रह मानलेला आहे. उपनयनाला त्याचे आनुकूल्य पाहावे लागते. यालाच गुरुबल असे म्हणतात. मुलाच्या जन्मराशीवरून गुरू २, ५, ७, ९ व ११ या राशींत असेल, तर मुलाला गुरुबल लाभते, असे मानतात. ६, ३, १, १० या राशींत असेल, तर गुरुबल नाही पण गुरूची पूजा करून उपनयन करायला हरकत नाही, असा मध्यमपक्ष मानलेला आहे. ४, ८ व १२ या ठिकाणीं गुरू असल्यास गुरुबळ लाभत नाही, अतएव उपनयन करू नये, असे सांगितले आहे.

**उपनयनप्रयोग** – उपनयन संस्काराचे विधान सर्व गृह्यसूत्रकारांनी सांगितले आहे. मुलाचे उपनयन करण्याचा पहिला अधिकार बापाचा मानलेला आहे. तो नसेल, तर कुलातल्या

अन्य कोण्यातरी पुरुषाने उपनयन करावे. उपनयन केल्यानंतर त्या कुमाराला वेदांचे अध्यापन करण्याचे सामर्थ्य कर्त्याला असले पाहिजे, असे मानले आहे. उपनयनात गायत्री मंत्राचा उपदेश हा एक प्रमुख विधी आहे. या मंत्रोपदेशाची पात्रता येण्यासाठी कर्त्याने अनुष्ठान करावे, असेही सांगितले आहे. मुलाचे उपनयनाच्या पूर्वीचे संस्कार झालेले नसल्यास ते या वेळी करावे लागतात अथवा ते न केल्याबद्दल प्रायश्चित विधी करून मग उपनयन करतात.

मुलाला वेदाध्ययनाचा अधिकार प्राप्त होवो आणि त्याला द्विजत्व मिळो, असा कर्ता प्रथम संकल्प करतो. मग गणपती पूजन, पुण्याहवाचन व मंडपदेवतांची प्रतिष्ठा केली जाते. मग कुमारास भोजन घालतात. हे भोजन त्याने आपल्या आईबरोबर करायचे असते. याला मातृभोजन असे म्हणतात. भोजनानंतर मुलाचे वपन करून त्याला शेंडी ठेवतात. मग त्याला मंगलस्नान घालून त्याच्या कपाळी कुंकुमतिलक लावतात व डोक्याला मुंडावळचा बांधतात. अशा प्रकारे मुलगा विभूषित होऊन मंडपात आल्यावर लगेच त्याचे उपनयन करावे, असे ऋग्वेदीय ब्रह्मकर्मात सांगितले आहे. त्यासाठी कर्ता व कुमार यांच्या मध्ये अंतरपाट धरून पुरोहित व जमलेले लोक मंगलाष्टके म्हणतात. कुमारास लंगोटी, कृष्णाजिन वगैरे दिल्यानंतर मंगलाष्टके म्हणावी, असे हिरण्यकेशी ब्रह्मकर्मात सांगितले आहे.

मग कर्ता कुमाराला आपल्या उजव्या बाजूस बसवून स्थंडिलावर अग्नीची स्थापना करून अन्वाधान करतो. आज्यसंस्कारापर्यंतचे कर्म केल्यावर कुमाराला 'युवं वस्त्राणि... या मंत्राने लंगोटी नेसवितो व शुभ्र वस्त्र पांघरायला देतो' 'मित्रस्य चक्षुः...' या मंत्राने त्याला हरणाचे कातडे देऊन 'यज्ञोपवीतं परमं पवित्रम्...' या मंत्राने यज्ञोपवीत घालायला देतो. मग आपल्या व अग्नीच्या मधून कुमाराला उत्तर बाजूस नेतो व त्याला आचमन करायला लावून पहिल्या जागी आणून बसवितो. मग 'अग्न आयूंषि...' इ. चार मंत्रांनी अग्नीला चार आज्याहुती देतो. हा या संस्कारातला प्रधानहोम होय.

मग अवक्षारण विधी होतो. त्यासाठी प्रथम संकल्प करून कर्ता शुद्धोदकाने कुमाराची ओंजळ भरतो व स्वतःची पुरोहिताकडून भरवितो. 'तत्सवितुर्वृणीमहे...' हा मंत्र म्हणून तो स्वतःच्या ओंजळीतील पाणी कुमाराच्या ओंजळीत ओततो व कुमार ते उदक आपल्या ओंजळीतून खाली सांडतो. कर्ता कुमाराचा उजवा हात अंगठ्यासह आपल्या उजव्या हाताने धरून 'देवस्य...हस्तं गृह्णामि' हा मंत्र म्हणतो. असे हे अवक्षारण तीनदा करायचे असते. तीन्ही वेळी विधी एकच पण त्या वेळी म्हणायचे मंत्र वेगवेगळे असतात.

त्यानंतर कर्ता 'अग्निराचार्यस्तव...' हा मंत्र म्हणून कुमाराचा हात धरतो. 'देव सवितः...' या मंत्राने कुमाराला सूर्यदर्शन करवितो. आपण प्राङ्मुख उभा राहून कुमाराला समोर उभा करतो. 'कस्य ब्रह्मचार्यसि...' हा मंत्र म्हणतो. कुमाराच्या दोन्ही खांद्यांवर हात ठेवतो.

मग कुमार अग्नीला समिधा देऊन उपस्थान करतो. कुमार कर्त्याला अभिमुख होऊन उजवा गुडघा भूमीवर टेकवितो व दोन्ही हातांनी कानांस स्पर्श करून मग कर्त्याच्या दोन्ही पायांना गुडघ्यापासून पावलांपर्यंत स्पर्श करतो. स्वतःच्या गोत्र-प्रवराचा आपल्या नक्षत्रनामाचा उच्चार करून कर्त्याला अभिवादन करतो. कर्ता त्याला दीर्घायुष्याचा आशीर्वाद देतो.

त्यानंतर गायत्रीचा उपदेश होतो. कुमार कर्त्याच्या शेजारी उजव्या मांडीवर ब्रह्मांजली ठेवून बसतो. कर्ता त्याचे दोन्ही हात वस्त्राने झाकतो. नंतर त्याला गायत्रीचा उपदेश करतो. प्रथम मंत्राचा चरण, नंतर अर्धी ऋचा व नंतर संपूर्ण मंत्र अशा क्रमाने व्याहृतिपूर्वक मंत्र शिकवून तो कुमाराकडून म्हणवून घेतो. मग त्याच्या हृदयाला दोन्ही हातांनी स्पर्श करून पुढील मंत्र म्हणतो —

**मम व्रते हृदयं ते दधामि। मम चित्तमनुचित्तं ते अस्तु।**
**मम वाचमेकव्रतो जुषस्व। बृहस्पतिष्ट्वा नियुनक्तु मह्यम्।**

अर्थ — माझ्या व्रताच्या ठिकाणी मी तुझे हृदय ठेवतो. तुझे चित्त माझ्या चित्ताला अनुकूल असो. तू एकव्रत होऊन माझ्या वाणीचे सेवन कर. बृहस्पती तुझ्यासाठी माझी नियुक्ती करो.

नंतर कुमाराच्या कमरेत मुंजतृणाची तिपेडी मेखला बांधतो. ब्राह्मण कुमाराला मुंजतृणाची, क्षत्रियाला धनुष्याच्या दोरीची व वैश्याला शण नावाच्या वनस्पतीची मेखला करावी, असे मनू. सांगतो (२.४२). मग कुमाराच्या हाती दंड देतो. ब्राह्मणकुमाराचा दंड पळसाचा व मस्तकाच्या केसांना लागेल इतक्या उंचीचा असावा, तसेच क्षत्रियाचा दंड औदुंबराचा वा ललाटाइतक्या उंचीचा असावा आणि वैश्याचा दंड बेलाचा व हृदयाइतक्या उंचीचा असावा, असे आश्व. गृह्यसूत्रात सांगितले आहे. कर्ता कुमाराला ब्रह्मचर्याश्रमासंबंधी आचारांचा उपदेश करतो, तो असा —

'तू ब्रह्मचारी आहेस. लघुशंका, शौच, इ. झाल्यावर आचमन करीत जा. संध्या, अग्निकार्य, इ. नियमित वेळी कर. दिवसा झोप घेऊ नको. आचार्याच्या आज्ञेत राहून वेदाध्ययन कर. इथून पुढे बारा वर्षेपर्यंत अथवा वेदाध्ययन संपेपर्यंत ब्रह्मचर्य पाळायचे आहे, हे ध्यानात ठेव. सांजसकाळ भिक्षा मागत जा. सांजसकाळ अग्नीला समिधा देत जा. भिक्षा घालायला

नाकारणार नाही, अशा पुरुषाकडे किंवा स्त्रीकडे प्रथम भिक्षेला जा. आधी आईकडे जा किंवा बापाकडे जा.'

हा उपदेश झाल्यावर कर्ता स्विष्टकृत, होमापासून पुढची अग्निमुखासंबंधीची सर्व कर्मे संपवितो. मग ब्रह्मचारी कुमार दंड व भिक्षापात्र हाती घेऊन प्रथम मातेकडे जातो व 'भवति भिक्षां ददातु' असे म्हणून भिक्षा मागतो. भिक्षेत तांदूळ अथवा जे काही मिळेल, ते गुरूच्या स्वाधीन करतो. ब्रह्मचाऱ्याने सूर्यास्त होईपर्यंत मौन धरून उभे राहायचे असते. मग ब्राह्मणांना भोजन घातले जाते. एवढे झाल्यावर हा उपनयनाचा विधी समाप्त होतो.

उपनयनाच्या दिवशीच सायंकाळी अनुप्रवचनीय होम करावा, असे आश्व. गृह्यसूत्रांत सांगितले आहे (१.२२.१०). त्यासाठी अग्नी प्रज्वलित करून त्यावर चरू शिजवतात. सदसस्पती, सविता व ऋषी या देवतांसाठी त्या चरूच्या आहुती देतात. त्या चरूचे नाव ब्रह्मौदन असे असते. त्याचेच ब्राह्मणांना भोजन घालतात.

**त्रिरात्रव्रत** – उपनयनविधी पुरा झाल्यावर ब्रह्मचाऱ्याला तीन दिवसपर्यंत कठोर संयमाचे व्रत पाळावे लागते. त्याला त्रिरात्र व्रत म्हणत. क्वचित त्याचा काळ १२ दिवस किंवा १ वर्ष एवढाही असे. विद्यार्थिजीवनातल्या कठोर व्रतपालनाचा हा प्रारंभ असे. त्याला जेवणातले आंबट तिखट वर्ज्य करावे लागे. दिवसा निजायचे नाही व रात्री जमिनीवर झोपायचे, असाही नियम असे.

या व्रताच्या शेवटी बुद्धी, धारणा व प्रज्ञा यांना तीक्ष्ण करण्यासाठी मेधाजनन नावाचा विधी करतात. पाहा – गायत्री मेधाजनन. [ ऋ. ब्र. स.; हिं. सं. ]

## उपनिषदे

संहिता व ब्राह्मण या ग्रंथांनंतर उपनिषदांचा क्रमांक येतो. प्राचीन भारतीय आर्यांचे तत्त्वज्ञानविषयक विचार उपनिषदांत ग्रंथित झाले आहेत. 'सद्' या धातूला उप आणि नि हे उपसर्ग लागून उपनिषद हा शब्द सिद्ध झाला आहे. सद् याचा अर्थ बसणे व उप या उपसर्गाचा अर्थ जवळ, यावरून उपनिषद म्हणजे जवळ बसणे, असा त्या शब्दाचा धात्वर्थ होतो. अत्यंत भक्तिभावाने गुरूजवळ बसून शिष्य जी परमार्थविद्या गुरूकडून संपादन करतो, त्या विद्येला उपनिषद् असे म्हणतात.

कठोपनिषदावरील भाष्याच्या प्रारंभी शंकराचार्यांनी उपनिषद् या शब्दातील 'सद्' धातूचे विशरण, गती व अवसादन असे तीन अर्थ दिले आहेत. विशरण म्हणजे विध्वंसन. ज्या विद्येमुळे मुमुक्षूच्या अविद्येचा विध्वंस होऊन त्याला पराविद्येची प्राप्ती होते, त्याला विध्वंसन म्हणावे. गती हा अर्थ ब्रह्माचे ज्ञान, अशा अर्थी सांगता येतो. आणि अवसादन म्हणजे जन्म, जरा, मृत्यू या तापांचे निवारण होते, ती विद्या होय. अशा प्रकारे शंकराचार्यांनी वरील शब्दाचा त्रिविध अर्थ सांगून त्या विद्येला 'अविद्याविध्वंसिनी ब्रह्मविद्या' असे म्हटले आहे.

अशी ही ब्रह्मविद्याप्रतिपादक उपनिषदे किती आहेत, हे नक्की सांगता येणे कठिण आहे. मुक्तिक उपनिषदाच्या कथनानुसार उपनिषदांची संख्या १०८ आहे. अन्य कोणी त्यांची संख्या २५० पर्यंत असल्याचे सांगतात. या २५० उपनिषदांत अल्लोपनिषद्, खंडोपनिषद अशा अगदी अर्वाचीन उपनिषदांचीही गणना होते. पण निरनिराळ्या आचार्यांनी आपापल्या भाष्यांत ज्या उपनिषदांचा वेळोवेळी उल्लेख केला आहे, तीच उपनिषदे महत्त्वाची, प्राचीन व विश्वसनीय मानतात. शंकराचार्यांनी ज्या उपनिषदांवर भाष्य लिहिले, ती उपनिषदे सर्वांत महत्त्वाची समजतात. त्यांची नावे पुढीलप्रमाणे-

(१) ईश (२) केन (३) कठ (४) प्रश्न (५) मुंडक (६) मांडूक्य (७) तैत्तिरीय (८) ऐतरेय (९) छांदोग्य (१०) बृहदारण्यक आणि (११) नृसिंहपूर्वतापनी. (या प्रत्येक उपनिषदाचा परिचय त्या त्या नावाखाली पाहावा.) याशिवाय शंकराचार्यांनी आणखी पाच सहा अन्य उपनिषदांचा उल्लेख आपल्या ग्रंथांतून केला आहे.

वैदिक वाङ्मयात उपनिषदे ही शेवटी येतात, म्हणून त्यांना वेदान्त असेही म्हटले आहे. शिवाय उपनिषदे ही वेदांचे ज्ञानकांड असल्यामुळे त्यांना ब्रह्मविद्या असेही नाव पडले आहे. वेदान्ताचार्यांनी पुढच्या काळात वेदान्तशास्त्र तीन प्रस्थानांत विभक्त केले. ती प्रस्थाने श्रुती, स्मृती, आणि न्याय ही होत. उपनिषद हे श्रुतिप्रस्थान, भगवद्गीता, सनत्सुजातसंहिता, इ. ग्रंथ हे स्मृतिप्रस्थान आणि ब्रह्मसूत्रादी ग्रंथ हे न्यायप्रस्थान होय.

काही उपनिषदे मंत्रात्मक असून, काही गद्यात्मक आहेत. मंत्रात्मक उपनिषदांना मंत्रस्वर आणि गद्यात्मक उपनिषदांना ब्राह्मणस्वर असतात. तदनुसार त्यांचे अध्ययन केले जाते.

उपनिषदे तत्त्वज्ञान उपदेशितात, म्हणून त्यांना ब्रह्मविद्या म्हटले आहे. ब्रह्मविद्या हीच पराविद्या किंवा श्रेष्ठविद्या होय. ती मोक्षाचे एकमेव कारण आहे. उपनिषदांचे एकमात्र प्रतिपाद्य म्हणजे ब्रह्म ! हे ब्रह्म काय आहे ? त्याच्या ठिकाणी विश्वाचा अध्यास कसा आणि का होतो ? ब्रह्मप्राप्ती कोणत्या उपायाने होते ? आत्मा ही काय वस्तू आहे ? आणि ब्रह्मात्मैक्यज्ञानाचे रहस्य काय ? इ. विषयांचा विस्तृत आणि सूक्ष्म विचार उपनिषदांत आलेला आहे.

उपनिषदांचे मुख्यतः प्राचीन व अर्वाचीन असे दोन विभाग पडतात. ईश, केन, इ. दहा आणि श्वेताश्वतर, कौषीतकी व मैत्रेयी मिळून तेरा उपनिषदांचा पहिल्या विभागात समावेश होतो. दुसऱ्या विभागात बृहज्जाबाल, नारद, परिव्राजक, महानारायण, सुबाल, इ. उपनिषदे येतात. सनपूर्व १२०० ते ६०० हा कालखंड उपनिषद्काल म्हणून मानतात. या कालानुरूपच त्यांचे पौर्वापर्य ठरविणे भाग आहे. बाह्य आणि अंतःस्थ अशा प्रमाणांचा विचार करून ग्रंथांचा कालानुक्रम ठरविण्याची पद्धती आहे. त्या दृष्टीने विचार करता बृहदारण्यक व छांदोग्य ही उपनिषदे सर्वांत प्राचीन आहेत, असे ठरते. ईश व केन ही उपनिषदे त्यानंतरची आणि समकालीन असावी, असे वाटते. ऐतरेय उपनिषद हे जुने असले, तरी ते बृहदारण्यकाइतके प्राचीन नसावे. तैत्तिरीय आणि कौषीतकी ही दोन उपनिषदे ऐतरेयाला जवळची वाटतात. कठोपनिषदापेक्षा मुंडक अलिकडचे दिसते. प्रश्नोपनिषद हे सर्वांत अर्वाचीन होय. मैत्री उपनिषद हे पौराणिक काळाच्या प्रारंभी निर्माण झाले असावे. प्राचीन उपनिषदांमध्ये मांडूक्य उपनिषद हे सर्वांत शेवटचे ठरेल. याला धरून उपनिषदांचे पौर्वापर्य पुढीलप्रमाणे गटवारीने दाखविता येईल –

(१) बृहदारण्यक व छांदोग्य.
(२) ईश व केन.
(३) ऐतरेय, तैत्तिरीय व कौषीतकी.
(४) कठ, मुंडक व श्वेताश्वतर.
(५) प्रश्न, मैत्री व मांडूक्य.

उपनिषदांत मुख्यतः तीन विषय प्रतिपादिले आहेत – धर्म, सृष्टी व अंतिम वस्तुतत्त्व म्हणजेच आत्मा किंवा परमात्मा. उपनिषदांनी आत्मा किंवा ब्रह्म हे अंतिम आणि शाश्वत मूल्य मानले आहे. ब्रह्म हे अंतिम सत्य असून, ते त्रिकालाबाधित आहे. हा उपनिषदांचा सिद्धान्त आहे. अंतिम वस्तुसत्याचे स्वरूप, पुरुष, आत्मा किंवा ब्रह्म, या तीन कल्पना उपनिषद्पूर्व वेदवाङ्मयात रुजून वाढीस लागल्या होत्या. त्यांचीच पूर्णता पुढे उपनिषदांत झाली. अंतिम वस्तुसत्याचे ज्ञान हेच जीवाचे परमसाध्य, असे त्यांनी ठरविले.

**कस्मिन्नु खलु भगवो विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवति ।**
**(मुंड. १.१–३)**

अर्थ – ज्याचे ज्ञान झाले असता बाकी सर्व गोष्टींचे ज्ञान होते, असे तत्त्व कोणते ?

उपनिषद्कालीन तत्त्वज्ञांच्या पुढे हाच मुख्य प्रश्न होता. म्हणून अंतिम सत्याचा शोध घेण्यासाठी त्यांनी सृष्टीतील जड पदार्थांपासून शोध घ्यायला प्रारंभ केला. त्या अनुषंगानेच सृष्टिविषयक विचार उपनिषदांत झाला आहे. अंतिमसत्य हे जीवनाचे रहस्य असून, ते अनुभवगम्यही आहे. म्हणूच जीवनाचा व विश्वाचा अर्थ किंवा कार्यकारणभाव उलगडून दाखविल्याने अंतिम सत्याचा आविष्कार होण्यास मदत होते. धर्म हे सत्यदर्शनाचे साधन आहे. श्रेयाची प्राप्ती त्यावरच अवलंबून असते. धर्म शब्दाने या ठिकाणी यज्ञरूप कर्मकांड घ्यायचे नसून व्रते, नियम व शमदमादी मोक्षसाधने घ्यायची आहेत.

उपनिषदांतील व्यापक, शुद्ध आणि तात्त्विक कल्पनांचे मूळ पूर्वीच्या वेदवाङ्मयात सापडते. वेदांत परमात्माविषयक कल्पना सुस्पष्टपणे आढळत नसली, तरी तिचे बीजारोपण ऋग्वेदातील नासदीय सूक्तात झाले आहे, असे दिसून येईल.

सृष्टीच्या प्रारंभी सर्वत्र अंधकाराने वेष्टिलेला अंधकार होता. सर्व काही अज्ञात व जलमय होते. जे काही सर्वव्यापी तत्त्व असेल ते अविद्यमान वस्तूने आच्छादिलेले होते. तपस्व्यांच्या प्रभावाने तिथेच एक तत्त्व उत्पन्न झाले. प्रकृततत्त्वाला कोण बरे जाणील ? कोण त्याचे वर्णन करील ? ही सृष्टी कोणत्या उपादानकारणातून उत्पन्न झाली ? कोणत्या निमित्तकारणाने या विविध सृष्टी निर्माण झाल्या ? देवता सृष्टीच्या नंतरच निर्माण झाल्या काय ? हे सर्व या सृष्टीच्या परमधामात वास्तव्य करणारा स्वामीच जाणत असेल. कदाचित त्यालाही ठाऊक असेल अथवा नसेल (ऋ. १०.१२९).

भारतीय तत्त्वज्ञानाची पार्श्वभूमी समजून घेण्यासाठी ऋग्वेदापर्यंत मागे जावे लागते. उपनिषदातील तत्त्वज्ञानाचा वैचारिक कार्यकारणभाव समजून घेण्यासाठी चारी वेदांतील देवताविषयक व यज्ञविषयक विचारांचे परिशीलन करायला हवे. उपनिषदे ज्ञानकांडाचे प्रतिपादन करतात; पण वेदांतील कर्मकांडाचा ज्ञानकांडाशी एकजीव सांधा कुठे झाला आहे, हे जर समजले नाही, तर उपनिषदांतील ज्ञानकांड कसे प्रगट झाले, ते समजणे शक्य नाही.

वैदिक कल्पनांच्या पैकी धर्मदृष्ट्या व तत्त्वदृष्ट्या अत्यंत महत्त्वाच्या कल्पना म्हणजे पुरुष, आत्मा आणि ब्रह्म या होत. इथे पुरुष शब्दाने परमेश्वर घ्यायचा आहे. विश्वाचे अंतिम सत्य हे पुरुषसूक्तांत आणि तेच पुढे उत्तम पुरुष या संज्ञेने छांदोग्यात निर्दिष्ट केलेले आहे. पुरुष हा अग्निरूप किंवा सूर्यरूप आहे, असे ऋग्वेदात सांगितले आहे. यजुर्वेदात पुरुषरूप अग्नीसाठी अग्निचयन नामक विधी सांगितला आहे. अग्निचयनाशी उपनिषदांचा संबंध फार निकटचा आहे. उपनिषदांतील हिरण्मय पुरुष प्रथम अग्निचयनात उपलब्ध होतो. त्याची सुवर्णमूर्ती करून ती सोन्याच्या तबकडीवर स्थापन करावी, असे सांगितले आहे (तै. सं. ५.२.७). हिरण्मय पुरुष म्हण-

जेच उपनिषदांतील परमात्मा होय. (पुरुष पाहा)

पुरुष या कल्पनेतून आत्मा ही कल्पना निघाली. आत्मा हा शब्द पुरुष शब्दापेक्षा अधिक सूक्ष्म आणि निर्दोष आहे. विश्वसत्य पुरुषरूप आहे, या विचारातूनच तो आत्मा आहे, हा विचार निष्पन्न झाला. कोणाचेही व्यक्तित्व अहम्(अस्मद्) या संज्ञेने व्यक्त होते. अहम् हा आत्मन् शब्दाचा पर्याय आहे. मनुष्य ( पुरुष ) स्वतःच्या जीवनशक्तीला आत्मा या दृष्टीने निर्दिष्ट करतो. जागृती, स्वप्न व सुषुप्ती या अवस्था किंवा जन्म–मृत्युरूप अवस्था ज्यात ओवल्या आहेत, असे सूत्र म्हणजे आत्मा होय. म्हणून उपनिषदांत आत्मविचार हा अधिकाधिक सूक्ष्म होत गेला. विश्वसत्य आत्मा आहे, या सिद्धान्तापर्यंत उपनिषद्कालीन ऋषी येऊन ठेपले. (आत्मा पाहा)

आत्मकल्पनेइतकीच दार्शनिकदृष्टचा अत्यंत महत्त्वाची कल्पना ब्रह्म ही आहे. आत्मकल्पना आदिपुरुषाच्या कल्पनेतून निघाली, तर ब्रह्मकल्पना स्वतंत्रपणे परिणत झाली. ब्रह्मपदाचा ऋग्वेदातील मूळ अर्थ ' देवांचा महिमा वर्णन करणारे काव्य, ' असा आहे. ब्रह्म शब्द बृह् या धातूपासून बनला आहे. मोठे होणे, विस्तार पावणे, असा या धातूचा अर्थ आहे. त्यावरून देवांचा महिमा वर्णन करणारे काव्य या अर्थी ब्रह्म शब्द प्रथम रूढ झाला. ब्रह्म म्हणजे विश्वशक्तीचे किंवा त्याचे नियमन करणाऱ्या देवतांचे स्तोत्र होय. या स्तोत्रात अद्भुत सामर्थ्य भरलेले आहे व तेच विश्वशक्तीचेही जीवनभूत तत्त्व आहे, अशी भावना वैदिक ऋषींच्या मनात भिनलेली होती. यातूनच ब्रह्म शब्दाचा तात्त्विक, गहन व व्यापक अर्थ परिणत झाला. उपनिषदांत उदय पावलेल्या ब्रह्मविचाराचा उषःकाल अथर्ववेदात प्रथम दिसू लागतो. अथर्ववेदात एक ब्रह्मसूक्त आहे. हे सूक्त सर्व विश्व ब्रह्ममय असल्याचे सविस्तरपणे सांगते. उपनिषदांतील ब्रह्मविचाराची मुख्य बीजे चार असून, ती अथर्ववेदाच्या ब्रह्मसूक्तात निर्दिष्ट केलेली आढळतात —

(१) मनुष्य शरीर हे ब्रह्मपुर व त्यात आत्म्याचा निवास.

**पुण्डरीकं नवद्वारं त्रिभिर्गुणेभिरावृतम् ।**
**तस्मिन् यद्यक्षमात्मन्वत्तद्वै ब्रह्मविदो विदुः ॥**

(अथर्व. १०.२.३२)

अर्थ – (मनुष्याचे) शरीर हे नवद्वार पुंडरीक व त्रिगुणांनी वेष्टिलेले असे ब्रह्मपूर असून, त्यात आत्मवान् यक्ष (ब्रह्म) प्रविष्ट झाला आहे आणि त्याला ब्रह्मवेत्त्यांनी जाणले आहे.

(२) ब्रह्म हे नियामक.

**स्कम्भो दाधार द्यावापृथिवी ।** (अथर्व. १०.७.३५)

अर्थ – ब्रह्म हे स्कंभ म्हणजे द्यावा – पृथिवीची नियंत्रक शक्ती आहे.

(३) ब्रह्म हे सर्वांत ज्येष्ठ.

**तदेव मन्येऽहं ज्येष्ठ ।**

(अथर्व. १०.८.१६)

अर्थ – ब्रह्म हेच सर्वांत ज्येष्ठ आहे, असे मी मानतो.

(४) ब्रह्म हे विश्वात्मक.

**यो भूतं च भव्यं च सर्वं यश्चाधितिष्ठति ।**

(अथर्व. १०.८.१)

अर्थ – तो आत्मा (किंवा ब्रह्म) भूत आणि भविष्य असून, सर्वांचे अधिष्ठान आहे.

यावरून उपनिषदांच्याकडे अथर्ववेदाचे ऋण फार मोठे आहे, हे कळून येईल. उत्साह, स्फूर्ती, आनंद, स्वसंवेद्यत्व, आश्चर्यमय सामर्थ्य आणि स्वातंत्र्य हा उपनिषदांतील ब्रह्म शब्दाचा भावार्थ आहे. सर्वव्यापित्व किंवा विभुत्व हा त्याचा व्युत्पत्त्यर्थ आहे. म्हणून छांदोग्यात त्याला भूमा असे म्हटले आहे. स्वयंभू सर्वात्मक चैतन्य हे त्याचे लक्षण होय. (ब्रह्म पाहा)

समृद्ध, सुखपूर्ण आणि उत्साहप्रद अशा वैदिक काळातच वैद्धिक ऋषींच्या मनात मोक्षाची अंधुकशी कल्पना स्फुरण पावली. तिथून पुढे ज्ञानमार्गाचे चिंतन सुरू झाले. कर्म आणि ज्ञान हे दोन्ही मार्ग वेदांत सांगितले आहेत. संहिता आणि ब्राह्मण या ग्रंथात कर्मकांडाला प्राधान्य आहे आणि हे कर्म यज्ञात्मक आहे. यज्ञाने देवता प्रसन्न होऊन इहलोकी विजय आणि परलोकी स्वर्ग देतात, अशी वैदिकांची श्रद्धा होती; पण यज्ञसंस्थेच्या उत्कर्षकालातच कित्येक ऋषी, कर्मकांड हा मानवाचा स्थूलधर्म-आहे; याहून उच्चतर अशा मानसिक आणि नैतिक धर्माचा आपण विचार केला पाहिजे, असा विचार करू लागले. यज्ञाने प्राप्त होणारी सुख आणि स्वर्ग ही फले नाशवंत आहेत आणि खऱ्या शाश्वत सुखाचा मार्ग याहून वेगळा असला पाहिजे, अशी कल्पना त्यांच्या मनात उदित झाली. यातूनच ज्ञानप्रधान अशा उपनिषदांचा जन्म व विकास झाला. मोक्ष हेच सर्वश्रेष्ठ सुख असून, त्याच्यापुढे अन्य सुखे तुच्छ आहेत, असे उपनिषदांनी उद्घोषित केले. जन्म आणि मृत्यु यांच्यापासून सुटका म्हणजे मोक्ष होय, असा मोक्ष शब्दाचा अर्थ त्यांनी सांगितला. त्याच्या प्राप्तीसाठी वैराग्य आणि संन्यास यांचा साधन म्हणून उपदेश केला. भारतीय दर्शनात नैराश्याची, वैराग्याची, अलिप्ततेची जी एक सूक्ष्म छटा सर्वत्र दिसते, तिचा प्रारंभ उपनिषदांत झाला आणि जैन व बौद्ध धर्मात याच वैराग्य-संन्यासांची पराकाष्ठा झाली.

उपनिषदांतील ब्रह्मविचारातून द्वैतवाद प्रतिपादणारी अनेक दर्शने निर्माण झाली असली, तरी उपनिषदांत अद्वैतच प्रतिपादिले आहे, असेच आपण परंपरेने मानीत आलो आहो.

इंद्र, वरुण, सूर्य, अग्नी, इ. दृश्य देवतांपासून मानवाला बाजूला खेचून निराकार ब्रह्माकडे त्याची दृष्टी वळविण्याचे महत्कार्य उपनिषदांनीच केले.

आत्मा, परमात्मा किंवा परब्रह्म हे तीन्ही शब्द उपनिषदात सामान्यपणे एकाच तत्त्वाचा बोध करतात. आकाश जसे आत-बाहेर सर्वत्र पसरले आहे, त्याचप्रमाणे ब्रह्महो सृष्टीच्या कणा-कणामध्ये व्याप्त आहे, असे उपनिषदांत सांगितले आहे.

**सर्वं खल्विदं ब्रह्म तज्जलानिति शान्त उपासीत । अथ खलु क्रतुमयः पुरुषो यथा क्रतुरस्मिंल्लोके पुरुषो भवति तथेतः प्रेत्य भवति । स क्रतुं कुर्वीत ।**

(छांदो. ३.१४.१)

**अर्थ** – हे सारे जगत ब्रह्म आहे. हे ब्रह्मातूनच उत्पन्न झाले, ब्रह्मातच अवस्थित आहे आणि पुढे ब्रह्मातच विलीन होणार आहे. संयत होऊन त्याची उपासना करावी. पुरुष कर्ममय आहे. तो इहलोकी जसे कर्म करतो, तसे परलोकी फल भोगतो. म्हणून धर्माचरण करावे.

या एकाच मंत्रात सारे ब्रह्मज्ञान, समस्त कर्मवाद आणि समग्र धर्माचरण यांचे रहस्य सूत्ररूपाने येऊन गेले आहे.

उपनिषदांत एकाच विशिष्ट प्रकारचे तत्त्वज्ञान प्रतिपादलेले आहे, असे म्हणता येत नाही.

उपनिषदांतले कित्येक सिद्धान्त परस्पर विरोधी आहेत. उपनिषद्कर्ते ऋषी कधी ब्रह्म निर्विकार असल्याचे सांगतात; तर कधी ब्रह्मानेच सृष्टी केली, असे म्हणतात. कधी आत्मा आणि पर-मात्मा यांत अभेद मानतात; तर कधी त्या दोघांच्या सामर्थ्यात फरक मानतात. परमात्मा आनंद स्वरूप; तर आत्मा दुःख जर्जर. परमात्मा सर्वशक्तिमान; तर आत्मा मर्यादित शक्तीचा, असेही मानतात. या विरोधी प्रतिपादनामुळेच द्वैत, विशिष्टा-द्वैत, अद्वैत, इ. भिन्न दर्शने उपनिषदांतूनच निर्माण झाली. पण इथे आपण एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे, की उप-निषदकर्ते ऋषी हे दार्शनिक नसून द्रष्टे होते. त्यांच्या एकान्त-चिन्तनातून प्रसंगी त्यांना जे विचार स्फुरले ते उपनिषदांत ग्रथित झाले आहेत. त्या विचारांच्या मागे त्या त्या ऋषीची किंवा चिंतकाची अनुभूती उभी आहे. त्यांच्या प्रतिभेतून ते ज्ञानस्फुलिंग बाहेर पडले आहेत. सहज ज्ञानाच्या बलावर जे जसे अनुभूतीत चमकले ते तसे त्यांनी मंत्रबद्ध करून ठेवले.

उपनिषदांच्या रूपाने मौलिक तत्त्वचिंतनास प्रारंभ झाला, विरक्त व सिद्ध योग्यांचा उदयकाल झाला. यज्ञप्रधान वैदिक संस्कृती व वैदिकेतरांची संस्कृती यांच्या संघर्षातून उपनिषदांतील तत्त्वज्ञान निर्माण झाले.

प्राचीन भारतीयांच्या ज्ञानविकासातील अत्यंत महत्त्वाचे क्रान्तिकारक युग म्हणजे उपनिषद्काल हे होय. उपनिषदांत विशाल, भव्य आणि शुद्ध कल्पनांचे सर्जन कार्य दिसून येते. उपनिषदांचे लेखन बांधीव स्वरूपाचे नाही; त्याचप्रमाणे त्यात कल्पनांची संगतवार व्यवस्थित मांडणीही नाही. उच्च विचारांचे ते प्राथमिक आविष्कार आहेत. उपनिषद्कालीन समाज हा यज्ञविषयक कर्मकांडालाच परम धर्म मानीत होता. आणि इह-परलोकांतल्या वैषयिक सुखोपभोगासाठी आसुसलेला होता. उपनिषद्कर्त्यांनी या समाजापुढे निराळे आदर्श उभे केले, धर्माचे सूक्ष्म स्वरूप त्यांना दाखविले आणि सांगितले, की जीवनातील श्रेष्ठ सुख भोगांत नसून त्यागात आहे. जन्ममरणांतून सुटणे, हीच मानवमात्राची खरी समस्या असून, मोक्ष हे तिचे अंतिम आणि एकमेव उत्तर आहे.

यासाठी उपनिषदांनी सदाचाराचा आदेश दिला, सद्गुणांची आवश्यकता प्रतिपादिली, त्याग आणि तपस्या यांचा महिमा सांगितला आणि ब्रह्मज्ञान हीच जीवनाची कृतार्थता होय, असा उद्घोष केला. उपनिषद् ग्रंथ हे भारतीय तत्त्वज्ञानाचा मूलस्रोत असून, प्राचीन भारतीयांच्या तात्त्विक विचारांची सर्वोच्च अवस्था उपनिषदांत दिसून येते.

**ऋषी व आचार्य** – उपनिषत्कालीन ऋषि-मुनी व आचार्य यांच्याविषयी फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. त्या थोर महात्म्यांच्या जीवनावर कालाचा पडदा पडला आहे. उपनिष-दांत असे कितीतरी मंत्र आहेत, की त्यांचा कर्ता अमका तमका ऋषी आहे, असे सांगता येणार नाही. तथापि ज्या थोड्या स्त्री-पुरुषांची नावे उपनिषदांत आढळतात, त्यांत अध्यात्म-पारंगत या दृष्टीने याज्ञवल्क्य हा सर्वांचा मेरुमणी ठरतो. जन-काच्या दरबारातल्या विद्वत्परिषदेत याज्ञवल्क्याचा जो अमृत-मय वाक्स्रोत वाहिला, त्यात तिथले सर्व विद्वान मज्जन करून पावन झाले. त्याला प्रतिप्रश्न करायला कोणाची छातीच होईना. शेवटी गार्गीने तिथल्या ऋषींना आणि आचार्यांना असा सल्ला दिला, की 'तुम्ही नमस्कार करून या ब्रह्मवेत्त्या-पासून आपली सुटका करून घ्या. तुमच्यापैकी कोणीही या ब्रह्मवेत्त्याला जिंकू शकणार नाही' (बृहदा. ३.८.१२).

याज्ञवल्क्यानंतर आरुणी, सनत्कुमार, रैक्व, शांडिल्य, ऐत-रेय, दधीच, इ. विद्वान आचार्यांची नावे दिसतात. मृत्यूवर विजय मिळविण्यासाठी यमाच्या दरबारात जाऊन त्यालाच आपला गुरू करणारा कुमार नचिकेत आणि विद्याप्राप्तीसाठी गुरुगृही पडतील ते कष्ट सोसणारा सत्यकाम जाबाल हे दोघे उपनिषदांतले आदर्श ब्रह्मचारी होत. उपनिषदांत पुरुषांबरो-बरच ब्रह्मवादिनी अशा दोन स्त्रियाही आढळतात. गार्गी आणि मैत्रेयी ही त्यांची नावे होत.

**आत्मा आणि ब्रह्म** – पिंडात असलेला आत्मा व ब्रह्माण्डाच्या बुडाशी असलेले ब्रह्म ही दोन्ही एकच होत, असा उपनिषद्कारांचा सिद्धान्त आहे (ईश. १६; तैत्ति. २.८).

आत्मब्रह्मैक्य ही एक गृहीत धरलेली कल्पना नाही; तर मानवी बुद्धी, भावना व इच्छाशक्ती यांच्या स्वरूपाचे विश्लेषण केल्यानंतर त्यातून निघालेला तो अपरिहार्य सिद्धान्त आहे. उपनिषदांत जागृती, स्वप्न, सुषुप्ती व तुर्या अशा आत्म्याच्या चार अवस्था मानलेल्या आहेत. त्यांपैकी पहिल्या तीन अवस्थांचा प्रत्येकाला प्रत्यक्षही अनुभव येतो. आत्मविद्येची साधना करील त्याला चौथी अवस्था प्राप्त होते. या अवस्थेत ज्ञाता व ज्ञेय हा भेद उरत नाही. द्रष्टा, दृश्य व दर्शन ही त्रिपुटीही मावळते. या अवस्थेतील आत्मा व ब्रह्म ही एकच आहेत. उपनिषदांतील ब्रह्म हे चैतन्यमय व सर्वशक्तिमान असे तत्त्व असून, तेच सर्वांचे मूळ व सर्वांचा आधार आहे. सच्चिदानंद हे त्याचे स्वरूप आहे. ते स्वयंभू आहे. ज्ञान, बल व क्रिया हा त्याचा स्वभाव आहे (श्वेता. ६.८).

**ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ।**
**पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥**

अर्थ – ते पूर्ण आहे. हे पूर्ण आहे. पूर्णातून पूर्ण उत्पन्न होते. पूर्णातून पूर्ण काढून घेतल्यावर देखील पूर्णच शिल्लक राहते.

'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' असे जे तैत्तिरीयात म्हटले आहे, तेही त्या पूर्णब्रह्माचेच पूर्ण वर्णन होय.

**सृष्टिविषयक कल्पना** – सृष्टीची उत्पत्ती कशी झाली, याची अतिप्राचीन उपनिषदांतून केलेली मांडणी तितकीशी पद्धतशीर नाही. आरंभी उपनिषदांतील ऋषींच्या मनावर यज्ञसंस्थेचा बराच प्रभाव होता. त्यामुळे त्यांच्या सृष्ट्युत्पत्तिविषयक मतांवर यज्ञसंस्थेचा परिणाम दिसल्यावाचून राहिला नाही. बृहदारण्यकात (१.२) सृष्टीच्या उत्पत्तीचा क्रम पुढीलप्रमाणे दिला आहे –

प्रारंभी या जन्मात काही नव्हते. बुभुक्षारूपी मृत्यूने हे सर्व व्यापलेले होते. बुभुक्षा म्हणजे भक्षण करण्याची इच्छा. तोच मृत्यू होय. आपण देहवान व्हावे, असे त्याच्या मनाने घेतले. तो मृत्युरूपी देव उपासना करू लागला. त्याच्यापासून पृथ्वी, आप व तेज ही महाभूते उत्पन्न झाली. या तेजाची सूर्य, अग्नी व वायू अशी तीन स्वरूपे होती. वायू म्हणजेच प्राण होय.

त्या प्राणापासून निरनिराळे लोक उत्पन्न झाले. मग आपले दुसरे स्वरूप निर्माण करावे, अशी बुभुक्षारूप मृत्यूने इच्छा केली. त्याने मन व वाणी या जोडप्याचे रूप धारण केले. त्याचे रेत हेच संवत्सर झाले; पण एवढी सृष्टी उत्पन्न करूनही त्या मृत्युदेवाचे समाधान झाले नाही. त्याला ती सृष्टी अल्प वाटली. मग त्याने वाणीपासून ऋक, यजुः, साम, छंद, यज्ञ, प्रजा आणि पशू हे सर्व उत्पन्न केले. त्याने जे जे उत्पन्न केले, ते ते सर्व भक्षण करण्याचे ठरविले (प्रत्येक सृष्ट-पदार्थ कालवश बनला). आपण मोठ्या यज्ञाने यजन करावे, अशी त्या मृत्युदेवाला इच्छा झाली, म्हणून तो अश्व बनला.

या वर्णनावरून यज्ञसंस्थेची पूर्तता हेच सृष्टीच्या उत्पत्तीचे उद्दिष्ट असल्याचे या ऋषीचे मत दिसते. शिवाय ज्या क्रमाने इथे सृष्टीची उत्पत्ती दिली आहे, त्यात तर्कशुद्धता फार थोडी दिसते.

मुंडकोपनिषदात (२.१) सृष्ट्युत्पत्तीचे वर्णन पुढीलप्रमाणे दिले आहे –

प्रारंभी अक्षर पुरुष होता. त्याच्यापासून प्राण, मन, इंद्रिये, पंचमहाभूते, वृक्ष-वनस्पती, वेद, यज्ञ, काल, लोक, देव, मनुष्य, पशू, पक्षी, सत्य, ब्रह्मचर्य, इ. सर्व उत्पन्न झाले.

या उपपत्तीतही सृष्ट्युत्पत्तीचा शास्त्रीय क्रम दिसत नाही. सृष्टीच्या उत्पत्तीविषयी उपनिषदांत निरनिराळी मते आढळतात. काही ठिकाणी पंचमहाभूतांपैकी एक किंवा अनेक भूते सृष्टीचे मूळकारण म्हणून मानलेली आहेत. काही ठिकाणी असत्, सत् अथवा प्राण यांपैकी एखाद्या निर्विशेष तत्त्वाला सृष्टीचे आदिकारण म्हटले आहे. काही ठिकाणी आत्मा, ईश्वर किंवा प्रजापती यापैकी एखाद्याला सृष्टिनिर्माता म्हटले आहे.

या सर्व सृष्टिनिर्मितीच्या उपपत्तीत ऐतरेयोपनिषदातला (१.१) सृष्ट्युत्पत्तीचा क्रम व्यवस्थित व विस्तृत आहे –

**आत्मा वा इदमेक एवाग्र आसीन्नान्यत्किंचन मिषत् ।**
**स ईक्षत लोकान्नु सृजा इति ।**

अर्थ – सृष्टी उत्पन्न होण्याच्या अगोदर एक आत्मतत्त्वच होते. दुसरे व्यापारवान असे काहीच नव्हते. आपण लोक निर्माण करावे, अशी त्याला इच्छा झाली.

तैत्तिरीयोपनिषदात (२.१) या आत्मतत्त्वापासूनच आकाश, आकाशापासून वायू, वायूपासून अग्नी, अग्नीपासून आप, आपापासून पृथ्वी, पृथ्वीपासून वनस्पती, वनस्पतीपासून अन्न व अन्नापासून पुरुष उत्पन्न झाला, असे सांगितले आहे.

वरील विविध उपपत्तींवरून तीन गोष्टी निश्चितपणे सिद्ध होतात –(१) ही सर्व सृष्टी एका आत्म्यापासूनच उत्पन्न झाली आहे (२) सृष्टी सत्य आहे व (३) आत्मा किंवा ब्रह्म सृष्टीच्या आतबाहेर ओतप्रोत भरून राहिले आहे.

**जीवकल्पना** – सर्व सान्त पदार्थांत जीव हा परमात्म्याचा सर्वश्रेष्ठ अंश आहे, असे उपनिषद्कारांचे मत आहे. जीवात्मा हा परमात्मा नाही; पण तो इतर सर्व भूतसृष्टीपेक्षा त्याच्या अधिक जवळ आहे. अर्थात जीवाचा विचार करीत असता

आपण ज्याला शरीरसंघात या नावाने ओळखतो, त्यापेक्षा ते स्वतंत्र व निराळे तत्त्व आहे, हे गृहीत धरलेले आहे. ऋग्वेद-कालापासून जीव हे शरीराहून निराळे तत्त्व आहे, ही समजूत आर्यांच्यामध्ये चालत आलेली आहे.

प्रारंभी जीव प्राणस्वरूप आहे, अशी कल्पना होती व ती स्वाभाविक होती. वाचारहित, नेत्ररहित, श्रोत्ररहित व मनोरहित असा प्राणी जगू शकतो; पण प्राणावाचून मात्र तो जिवंत राहू शकत नाही (कौषी. ३.३). पण पुढे या बाबतीत विचारांची प्रगती होऊन जीवात्मा मनोमय असून हृदयातील आकाश हे त्याचे स्थान आहे, असे मानले गेले. छांदोग्यात तो तेज, आप व अन्न यांचा बनला आहे, असे म्हटले आहे (६.३.२). जीव हा बुद्धी व आत्मतत्त्व यांच्या मिश्रणाने बनला आहे; कारण आत्म्यानेच जीवरूपाने शरीरात प्रवेश केला आहे, असे तैत्तिरीयात म्हटले आहे. पण विचारांची वाढ इथेच थांबली नाही. जीवात्मा हा मनोमय अथवा प्रज्ञास्वरूप आहे. एवढेच नव्हे; तर जे तेज ब्रह्माण्डाच्या मुळाशी आहे, तेच या जीवात्म्यातही आहे, असे मानण्यापर्यंत विचाराची भरारी गेली.

जीवात्मा आणि परमात्मा या दोघांत जीव कर्मफलाचा भोक्ता व परमात्मा केवळ त्याचा साक्षी, अशी कल्पना आहे. जीव सान्त असून परमात्मा अनन्त आहे. जडप्रकृतीशी अहर्निश झगडणारा जीव सर्व सृष्ट पदार्थांत श्रेष्ठ असला, तरी ज्याची प्राप्ती त्याला करून घ्यायची आहे, तो त्याच्याहिपेक्षा श्रेष्ठ आहे. परमात्म्याचे स्वातंत्र्य व त्याचा आनंद यांच्या प्राप्तीचा जीवाला अधिकार आहे. मात्र त्यासाठी त्याने सान्ताचा अनन्तात लय करायला पाहिजे व त्यासाठी परमात्म्याशी तद्रूप झाले पाहिजे. गाढ झोपेत या तद्रूपतेचा अनुभव जीवाला घडत असतो; पण अज्ञानामुळे त्याला त्याची जाणीव नसते. त्याच्या अंतःकरणात जो निधी आहे, त्याचे त्याला ज्ञान नसते. म्हणून तो हीन, दीन, कृपण बनतो. सान्त व अनन्त यांच्या या संघर्षात जीवात्मा जेव्हा विजय मिळवील, तेव्हाच त्याला परमात्म्याची प्राप्ती होईल.

**मोक्षकल्पना** – जीवाला मिळणाऱ्या मुक्तीचे सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता असे चार भेद आहेत. त्याचप्रमाणे विदेहमुक्ती आणि जीवनमुक्ती असेही तिचे कालदृष्ट्या दोन भेद मानतात. मोक्षांच्या या सर्व प्रकारांना उपनिषदांत कमीअधिक प्रमाणांनी आधार मिळतो. म्हणूनच भिन्न भिन्न संप्रदायांच्या आचार्यांना आपली मोक्षाची कल्पना उपनिषदांत आहे, असे प्रतिपादन करणे शक्य झाले. कारण उपनिषदे अनेक असून, त्यांचे ऋषीही अनेक आहेत. तेव्हा ईश्वर, मोक्ष इ. तात्त्विक सिद्धान्ताविषयी उपनिषदांत निरनिराळी मते प्रदर्शित होणे स्वाभाविक आहे. विकासवादाच्या नियमानुसार त्यांची संगती लावता येण्याजोगी आहे, तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात विकासवादाचे तत्त्व एकदा मान्य केले, की अद्वैतवाद व सायुज्यमुक्ती हे उपनिषदांचे अखेरचे मत आहे, असे मान्य करावे लागते.

छांदोग्यात एका ठिकाणी सलोकतामुक्ती सांगितलेली आहे (२.२०.२). मुण्डकातील काही वर्णनावरून समीपता व सरूपता यांचाही बोध होतो (१.२.६); पण ब्रह्मामध्ये संपूर्णपणे विलीन होणे, म्हणजेच मुक्ती होय, असे उपनिषदांत जागोजागी सांगितलेले आढळते (मुंड. ३.२.७-८; प्रश्न. ६.५; छांदो. ६.९.१-२; ६.१०.१).

उपनिषत्कारांच्या मते सायुज्यमुक्तीच्या या सर्वश्रेष्ठ अवस्थेत 'मी' या वैयक्तिक भावनेचे अस्तित्व उरत नाही; मात्र त्या वेळी व्यक्ती शून्य होते किंवा नाश पावते, असा त्याचा अर्थ नव्हे. पारमार्थिक दृष्टीने संकुचित व्यक्तित्वाला सत्यत्व नाही. पुरुषाच्या ठिकाणी जे काही सत्य व शिव आहे, ते अनंत आहे. जोवर देहाची आसक्ती आहे, तोवर त्या अनंताचे दर्शन पूर्णतया होत नाही. देहासक्ती सुटते, तेव्हा मात्र त्याचे संपूर्ण दर्शन घडते. निराळ्या शब्दात सांगायचे, तर मुक्तावस्था म्हणजे आत्मसूर्याचा संपूर्ण उदय होय. उपनिषदांतल्या ऋषींच्या मते ब्रह्म हे आनंदरूप आहे, म्हणून ब्रह्माची प्राप्ती म्हणजे सर्वश्रेष्ठ आनंदाची प्राप्ती होय. अर्थात आनंदाची ही अवस्था सामान्य बुद्धीला सर्वथा अगम्य आहे. ही स्थिती अवर्णनीय असल्यामुळे उपनिषद्कार एवढेच सांगतात, की या सर्वश्रेष्ठ अवस्थेत जीव-ब्रह्माची संपूर्ण तन्मयता होते. ही मोक्षावस्था म्हणजे ऋषींची केवळ कल्पना नाही; तर उपनिषदांतील काही ऋषींनी आपले तद्विषयक काही अनुभवही नमूद करून ठेवले आहेत (छांदो. ८.१३.१; तैत्ति. १.१०).

उपनिषदांत वर्णिलेली ही सायुज्यमुक्तीची अवस्था अभावरूप नसून भावरूप आहे. ती शून्यस्थिती नसून आनंदस्थिती आहे आणि ती क्रिया, स्वातंत्र्य व पूर्णावस्था यांची द्योतक आहे. मुक्ताचे जीवन हे अवर्णनीय असे ब्रह्मात्मैक्य-जीवन आहे. सूर्यकिरण सूर्यात, तरंग सागरात, किंवा सूर नादात लय पावला म्हणजे त्याचा नाश झाला, असे मानणे योग्य नव्हे. हाच न्याय जीव-शिवसंगमाला लागू आहे, मुक्ताच्या ठिकाणी निराळेपणाचा भाव उरत नसला, तरी त्याचे व्यक्तित्व कायम असते. त्यात फक्त अहंकाराचे विसर्जन झालेले असते. बृहदारण्यकात (४.४.७) म्हटले आहे, ते असे–

**यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः ।**
**अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ।।**

अर्थ – जेव्हा या जीवाच्या हृदयात आश्रय करून राहिलेल्या

सर्व कामना नष्ट होतात, तेव्हा मर्त्य जीव हा अमृत होतो (आणि) इहलोकी ब्रह्मानुभव घेतो.

जीव-परमात्मयोग हेच अमरत्व होय. व्यवहारात यालाच मोक्ष किंवा जन्म-मरणाच्या फेऱ्यातून सुटका असे म्हणतात.

**साधनमार्ग** – सर्व विश्वाचा आधार व सर्वांतर्यामी असा जो आत्मा त्याचे दर्शन, त्याचे ज्ञान किंवा त्याचा साक्षात्कार हेच उपनिषद्कारांनी आपले अंतिम ध्येय मानले आहे; पण यापुढे प्रश्न असा येतो, की ते उद्दिष्ट साध्य करण्यास मनुष्या-जवळचे साधन कोणते ? मन-बुद्धीसह पंचज्ञानेंद्रिये ही ज्ञान-प्राप्तीची साधने मानली जातात; पण आत्मज्ञानाच्या क्षेत्रात ती अपुरी आहेत. कठोपनिषदात सांगितले आहे ते असे–

**नैव वाचा न मनसा प्राप्तुं शक्यो न चक्षुषा ।**

(२.३.१२)

अर्थ – (तो आत्मा) वाणीने, मनाने किंवा चक्षुरिंद्रियाने प्राप्त होणे शक्य नाही.

आत्मा इंद्रियगोचर किंवा बुद्धिगोचर नाही (तैत्ति. २.४.१). आत्मा हा ज्ञाता असून, त्याला सर्वज्ञान होते, म्हणून तो दुसऱ्याच्या ज्ञानाचा विषय होऊ शकत नाही (श्वेता. ३.१९). पण यावर असा प्रश्न उत्पन्न होतो की, आत्म्याला जाणू शकेल, असा अन्य कोणी नसला तरी तो स्वतःच स्वतःला जाणू शकतो की नाही ? या प्रश्नाला उपनिषद्कारांचे 'होय' असे उत्तर आहे. स्वतःला जाणणे हे आत्म्याला शक्य आहे, असे याज्ञवल्क्य म्हणतो ( मुंड. ३.१.८ ). त्याच्या मते स्वयंप्रज्ञान हीच अंतिम वस्तू आहे. स्वयंप्रज्ञान शक्य नसेल, तर या जगात काहीच शक्य नाही. आत्म्यामध्ये स्वतःचे दोन विभाग करून स्वतःला जाणण्याची विलक्षण शक्ती आहे. तो स्वतःच ज्ञाता व ज्ञेय अशी दोन रूपे घेऊ शकतो.

मात्र अशा रीतीने आत्मदर्शन हे शक्य असले, तरी तो अनुभव सर्वांना सहजपणे येण्यासारखा नाही. त्यासाठी तप-श्चर्येची किंवा खडतर साधनांची गरज असते (केन. ४.८). त्यासाठी वैराग्याचीही नितान्त आवश्यकता असते. मनात विषयांबद्दल निर्वेद व आत्मज्ञानाबद्दल तीव्र तळमळ उत्पन्न होणे, याला वैराग्य म्हणतात. म्हणून विवेकी व वैराग्यसंपन्न साधकाने गुरुमुखातून आत्मविद्या ग्रहण करावी, असे उप-निषद्कारांचे म्हणणे आहे.

**तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्**
**समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्**

(मुंड. १.२.१२.)

अर्थ – आत्मज्ञानासाठी शिष्याने समिधा हातात घेऊन श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ अशा गुरूकडे जावे.

साधकाने गुरूपासून आत्मविद्येचा उपदेश मिळविल्याच्या अनेक कथा उपनिषदांत आढळतात. ब्रह्मविद्येचा उपदेश कर-णारा गुरूही अधिकारी असणे आवश्यक आहे. तो शास्त्र-संपन्न तर असलाच पाहिजे; कारण त्याशिवाय शिष्याच्या आशंकांचे त्याला समाधान करता येणार नाही. त्याचप्रमाणे तो ब्रह्मनिष्ठही असला पाहिजे. त्याशिवाय तो शिष्याला अनुभविक मार्गदर्शन करू शकणार नाही.

साक्षात् आत्मदर्शनाचे साधन म्हणून उपनिषदांत योगा-चाही उपदेश केला आहे. चित्ताच्या अनंत वृत्ती इंद्रियद्वारा बाहेर पडत असतात. त्यांचा निरोध करून मनासह सर्व इंद्रियांना आत्म्याच्या ठिकाणी एकाग्र करणे, हाच योग होय. हाच आशय कठोपनिषदातल्या पुढील मंत्रात (२.३.११) सांगितला आहे–

**तां योगमिति मन्यन्ते स्थिरामिन्द्रियधारणाम् ।**

योगाभ्यासाने प्राणांचे नियमन केल्याने चित्त शुद्ध होते व त्या शुद्ध चित्तात आत्मा स्वतःच प्रकट होतो (मुंड. ३.१.९). आत्म्याचे प्रत्यक्ष दर्शन घडविणाऱ्या या योगाचा अभ्यास कसा करावा याची पद्धतशीर माहिती श्वेताश्वतर उपनिषदात दिली आहे (२.८.११). ध्यानयोगाने आत्म्याची उपासना करीत असता प्रणवाचा प्रतीक म्हणून अवलंब करावा, असे सांगून कठोपनिषद्कारांनी शेवटी ॐ हेच परब्रह्म आहे, असे म्हटले आहे (१.२.१५). मनाची एकाग्रता, चित्ताची निष्कंपता व अखंड ब्रह्मभावना ही यशस्वी योगाची लक्षणे होत. आत्मा आतबाहेर सर्वत्र व्यापून राहिला आहे (मुंड. २.१.२). म्हणून तो शरीरात विशिष्ट ठिकाणी राहतो, असे म्हणणे योग्य नव्हे; तथापि आत्मदर्शी पुरुषांनी, तो ध्यानासाठी शरीराच्या एका खास भागात म्हणजे हृदयात उपलब्ध होतो, असे सांगितले आहे (कठ. २.३.१७). तो मनोमय आत्मा शरीर व प्राण याचा चालक आहे. बुद्धीचा आश्रय करून तो विश्वात राहतो. ज्यांची बुद्धी ज्ञानाने शुद्ध व विकसित झाली आहे, ते त्या आनंदरूप, अमृतमय व स्वयंप्रकाश आत्म्याला पाहतात (मुंड. २.२.७).

**नीतिकल्पना** – उपनिषदांतला नीतिविचार मानवासाठी निश्चित ठरविलेल्या उत्तम पुरुषार्थाचे साधन म्हणून केलेला आहे. ब्रह्म जाणणे व ब्रह्म होणे हाच तो उत्तम पुरुषार्थ होय.

**एषाऽस्य परमा गतिरेषाऽस्य परमा संपदेषाऽस्य ।**
**परमलोक एषोऽस्य परमआनन्दः ॥**

(बृहदा. ४.३.३२)

अर्थ–आत्मा हीच जीवाची परम गती, हीच परम संपत्ती, हेच परम ध्येय व हाच परम आनंद होय.

या परमोच्च आत्म्याखेरीज बाकी सगळे आर्त म्हणजे दुःखयुक्त किंवा नाशवंत आहे, असे उपनिषदे सांगतात. या आत्मदर्शनरूप किंवा मोक्षरूप पूर्णत्वाकडे जाण्याच्या अंतःकरणातील नैसर्गिक तळमळीमुळे मनुष्य जो प्रयत्न करतो, तीच नीती होय. आत्मसाक्षात्कार हेच नीतीचे ध्येय आहे. देहभावना व विषयासक्ती यांपासून मुक्त होणे, जे अल्प व सान्त असेल त्याच्यापासून सुटका करून घेणे व सर्व भूते आत्म्यामध्ये पाहणे हे नैतिक सदाचरण होय. नीतीचे हे ध्येय साध्य करायचे, तर मनुष्याने व्यक्तित्वाची संकुचित कुंपणे मोडून सर्व भूते आत्मवत मानली पाहिजेत. मनुष्य हा जड व चैतन्य यांच्या सांध्यावर उभा आहे. त्याच्या अंतरात दैवी व आसुरी या दोन्ही प्रवृत्ती तुंबळ माजवीत असतात. नीतीचा आधार घेऊन त्याला आसुरी प्रवृत्तींशी झगडा द्यावा लागतो. माणसाचा जन्म जणू या युद्धासाठीच असतो व त्याचा विकासही त्या युद्धातूनच व्हायचा असतो. मनुष्याचे निरनिराळे वासना–विकार त्याच्या ठिकाणी असलेल्या दिव्य शक्तीची वाढ होऊ देत नाहीत व त्याचे जीवन स्वार्थी व संकुचित बनवितात. जीवनाच्या विकासासाठी त्या वासना–विकारांचे नियंत्रण करणे जरूर असते. इंद्रियसुख आणि वासनातृप्ती म्हणजे नैतिक जीवन नव्हे. मनुष्याच्या जीवननौकेचे सुकाणू जर वासनेच्या हाती जाईल, तर ती नौका संसारसागरात फुटल्याशिवाय राहणार नाही. देह हाच आत्मा असे समजून त्याची पूजा करणाऱ्या विरोचनाची कथा याच संदर्भात छांदोग्यात दिली आहे (८.८.४.५). हा विरोचनाचा संप्रदाय म्हणजेच असुरसंप्रदाय होय.

आत्मा हा नीतीचे साध्य आहे, असे ठरल्यावर त्या नीतिधर्मात त्याग व वैराग्य यांना आपोआप महत्त्व येते. मात्र विरागी म्हणजे अंगाला राख फासून संसारातून उठून गेलेला माणूस असा त्याचा अर्थ नव्हे. सर्वच वासना निंद्य किंवा त्याज्य नसतात. काम हीसुद्धा सर्वस्वी त्याज्य वस्तू नव्हे. फक्त त्या कामाला माणसाने आपल्यावर स्वार होऊ देता कामा नये. उपनिषदातले कित्येक ऋषी गृहस्थाश्रमी व संसारी होते. परिवारात राहून इहलोकीची जीवनयात्रा सफल करणे, यात ते पुरुषार्थ मानीत. तैत्तिरीयातला (१.४) तो ऋषी पुढील प्रकारची आकांक्षा बाळगताना दिसतो–

"हे परमेश्वरा, मी अमृतरूप वेदांचे धारण करणारा व्हावे. माझे शरीर कार्यक्षम असावे. माझी वाणी अत्यंत मधुर असावी. मी कानांनी पुष्कळ श्रवण करावे. हे देवा, माझ्या विद्येचे रक्षण कर. वस्त्रे पुरविणारी, माझे गोधन वृद्धिंगत करणारी आणि खाद्यपेये देणारी लक्ष्मी मला प्राप्त करून दे."

उपनिषदांत चित्तशुद्धीचे साधन म्हणून तपाचे अनुशासन केले असले, तरी तप या शब्दाने देहदंडना करणारी कृच्छ्र-चांद्रायणादी व्रते उपनिषद्कारांना अभिप्रेत नाहीत. इंद्रियांसह मनाचा निग्रह करून त्याला आत्म्यामध्ये स्थिर करणे, हाच तपाचा मुख्य अर्थ आहे. उपनिषदांतले ऋषी आत्मज्ञानाच्या क्षेत्रात आहारशुद्धीला फार महत्त्व देतात (छांदो. ७.२६.२). अंतःकरणाच्या शुद्धीसाठी आहारशुद्धीची फार जरुरी आहे. शास्त्रविहित व परिमित असे विषयसेवन करणे, हा आहारशुद्धीचा अर्थ आहे. चित्तशुद्धीने माणसाला आत्मबल प्राप्त होते. या आत्मबलाने त्याची विवेकबुद्धी जागृत होते व तो देहाच्या दास्यातून मुक्त होतो.

जीवन हा एक यज्ञ आहे आणि तप, दान, सरलता, अहिंसा व सत्यवचन या त्या यज्ञाच्या दक्षिणा आहेत, असे छांदोग्यात म्हटले आहे (३.१७.४). हे सगळे नैतिक गुण आहेत. त्यामध्ये वैयक्तिक व सामाजिक नीतीचा अंतर्भाव होतो. मनुष्याने केवळ व्यक्तिधर्माचे पालन केले, म्हणजे त्याचा जीवनयज्ञ यथासांग पुरा झाला, असे म्हणता येणार नाही. त्यासाठी त्याने सामाजिक कर्तव्यांचेही पालन केले पाहिजे. आत्मसंयमन हे सर्व सद्गुणांचे मूळ होय. म्हणूनच नारायणीय उपनिषदात यज्ञाचे वर्णन करताना शम–दमांना त्या यज्ञाची दक्षिणा म्हटले आहे. काम, क्रोध व लोभ हे माणसाचे शत्रू असल्यामुळे त्यांना जिंकण्यासाठी दम, दया व दान या गुणांची उपासना करावी, असे बृहदारण्यकातील एका कथेत (५.२.३) सांगितले आहे.

उपनिषद्कारांनी सर्व गुणांत सत्याला पहिले स्थान दिले असून, अनेक ठिकाणी त्याची महती गायिली आहे. बृहदारण्यकात सत्यालाच धर्म म्हटले आहे (१.४.१४). प्रत्यक्ष मृत्यूपासूनही रक्षण करण्याचे सामर्थ्य सत्याच्या ठिकाणी आहे, अशी त्या ऋषींची श्रद्धा आहे. असत्याने माणसाचा नाश होतो, असे सुकेशा ऋषी म्हणतो (प्रश्न. ६.१). 'सत्यमेव जयते' असा मुंडकोपनिषदाचा उद्घोष आहे.

उपनिषदांत नीतीचा विचार आत्मप्राप्तीचे साधन म्हणून केला आहे, असे वर सांगितले; पण त्याबरोबरच उपनिषदांतल्या ऋषींनी सामाजिक जीवनाच्या दृष्टीनेही नीतीचा विचार केला होता, असे दिसते. अध्ययन व अध्यापन सदैव चालवावे आणि त्याबरोबरच व्रत, सत्य, तप, शम, दम, यज्ञ, अतिथिसत्कार, भूतदया, इ. गोष्टी माणसाने आचरिल्या पाहिजेत, असा उपदेश उपनिषदांत जागोजाग केलेला आढळतो.

नैतिक जीवनाची परिणती आध्यात्मिक अनुभूतीत झाली पाहिजे, असा उपनिषदांचा आशय आहे. धर्मश्रद्धा हा नीतीचा पाया आहे व जीवनात शांती व समाधान यांचा लाभ हे नीतीचे

फळ आहे. जगात सर्वत्र संघर्ष, दुःख व अमंगलता दिसत असली, तरी जीवनाचे अन्तिम स्वरूप मंगल व आनंदमय आहे असे वाटणे, हीच धर्मश्रद्धा होय. या श्रद्धेनेच जीवन ईश्वरमय व सेवामय बनते. अशा जीवनात शांती व समाधान ही येऊन निवास करतात. अशा अवस्थेप्रत पोचलेल्या पुरुषाच्या जीवनात मग नीतीच्या विधि-निषेधांचे काही प्रयोजनच उरत नाही. ' नैनं कृताकृते तपतः ' = त्याला काही केल्याने वा न केल्याने ताप होत नाही (बृहदा. ४.४.२२). अशा पुरुषांच्या जीवनात भूत, वर्तमान व भविष्य या तीन्ही काळांतील सर्व सुकृते व दुष्कृते पाण्याच्या लोंढ्यापुढे वाळूचा ढीग वाहून जावा, त्याप्रमाणे वाहून जातात. हिलाच ब्राह्मी स्थिती किंवा सिद्धावस्था म्हटले आहे. अशा पुरुषाला बऱ्यावाईटाचा लेप लागत नाही. ज्यांच्यामध्ये अंशतः का होईना; स्वार्थाचा मल शिल्लक आहे. त्यांना नीतीच्या बंधनाची गरज असते. याउलट जे आत्मानुभवी असतात, त्यांचा नीती हा स्वभावच बनून जातो. ईशोपनिषदात (६–७) म्हटले आहे –

यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति ।
सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ।।
यस्मिन्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः ।।
तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः ।।

अर्थ – जो ब्रह्मवेत्ता पुरुष सर्व भूते आत्म्याच्या ठिकाणी पाहतो व सर्व भूतांच्या ठिकाणी आत्म्याला पाहतो, तो कोणाचीही घृणा करीत नाही. ज्या ज्ञानी पुरुषाला सर्व विश्व आत्मरूपच झाले, त्याच्या ठिकाणी शोक व मोह कुठून शिल्लक राहणार !

विद्वद्रत्न के. ल. दप्तरी यांनी उपनिषदांचा सखोल अभ्यास करून, उपनिषदांचा वेगळा अर्थ सांगितला आहे, तो असा –

जगाचे आदिकारण जे ब्रह्म, त्याचा विकास होऊनच जीव बनला. ब्रह्माच्या ठिकाणी आभास होऊन जीव बनला, असे उपनिषदांमध्ये सांगितलेले नाही. जीवावस्थेतच आनंदाचा अनुभव येऊ शकतो. म्हणून जीवस्थितीत आनंदाचा अनुभव कसा होईल, याच प्रश्नाचे उत्तर देण्याकरिता उपनिषदे लिहिली गेली. जीवस्थितीचा पूर्णपणे उपभोग घ्यावा व पूर्ण आनंद भोगावा हेच उपनिषदांचे म्हणणे आहे. हा पूर्ण आनंद भोगण्याचा उपाय उपनिषदांमध्ये सांगितला आहे, तो असा की, आपणच सर्व जीवांमध्ये आहोत असे मानून, सर्वांच्या आनंदाकरिता मरेपर्यंत कर्म करावे.

डॉ. गणेश थिटे यांनी उपनिषदांतील यातुधर्मात्मक घटकांची माहिती दिली आहे, ती अशी – प्राचीन, मुख्य उपनिषदांत यातुधर्मात्मक कर्मकांडही आढळते. अन्नरूप ब्रह्माची उपासना करण्याचा यात्वात्मक उपयोग आहे, असे तैत्तिरीय उपनिषदात (३.१०) सांगितले आहे. कौषीतकी ब्राह्मण उपनिषदात (१.४) ब्रह्मज्ञान्याला मिळणाऱ्या ऐंद्रिय उपभोगांचे कल्पनारम्य वर्णन केले आहे. बृहदारण्यक उपनिषदात (६.४.१४) संततीच्या प्राप्तीसाठी विधी सांगितले आहेत. कौषीतकी ब्राह्मण उपनिषदात दीर्घायुष्यप्राप्तीसाठी, पापनाशासाठी, शत्रुनाशासाठी अनेक प्रकारचे अभिचार–विधीही सांगितले आहेत.

**नव्य उपनिषदे** – यज्ञप्रधान ब्राह्मणधर्माच्या उतरत्या काळात इतर वेदबाह्य तत्त्वज्ञानांची वाढ होऊ लागली होती. बौद्ध व जैन या धर्मांचे प्रचारक व आचार्य वैदिक धर्माला आव्हान देत होते. समाजात नव्या श्रद्धा, नवी दैवते व नव्या उपासनापद्धती प्रचलित होऊ लागल्या होत्या; पण धर्माचरणाच्या या नव्या स्वरूपाला वैदिक धर्मात स्थान नव्हते. या नव्या धर्माला समाजात मान्यता मिळवून द्यायची, तर त्यासाठी त्याला उपनिषदांचा आधार मिळवून देण्याची गरज होती. कारण, जुन्या उपनिषदांना उपासना व तत्त्वज्ञान या क्षेत्रांत प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. त्यामुळे नव्या संप्रदाय-प्रवर्तकांना वाटले, की आपल्या संप्रदायांच्या लोकमान्यतेसाठीही अशा उपनिषदांची गरज आहे. म्हणून त्यांनी आपापल्या संप्रदायाची उपनिषदे रचण्यास प्रारंभ केला. त्यामुळे उपनिषदांची संख्या वाढत गेली. वैदिक धर्माला विरोधकांच्या हल्ल्यांपासून वाचविण्याच्या उदात्त हेतूने ही नव्य उपनिषदे लिहिली गेली, असे म्हटल्याने त्यांचे महत्त्व लक्षात येईल. या नवरचनेत अथर्ववेदाच्या ऋषींचा पुढाकार होता हे आथर्वण उपनिषदांच्या मोठ्या संख्येवरून दिसून येते.

या सांप्रदायिक उपनिषदांत विष्णू, सूर्य, शिव, देवी व गणपती या पंचदेवतांचे व त्यांच्या अवताराचे वर्णन आहे; त्या त्या देवतांचे पराक्रम, इतर देवांचा त्यांच्याशी संबंध, मूर्तिकल्प, पूजाविधी, मंत्र-यंत्र-तंत्र, गायत्रीमंत्र, अथर्वशिरस पूर्वोत्तरतापिनी, इष्टवस्तू, अप्रिय वस्तू, प्रतीक, अभिषेकपद्धती, मानसपूजा, इ. विषय आले आहेत. तसेच इतर देवता या उपास्य देवतेच्या अंगभूत मानून अखेर सगुण उपास्याचे निर्गुण निराकार परब्रह्माशी ऐक्य कल्पिलेले आहे. वैष्णव उपनिषदांत दशावतारांचे व त्या अवतारांच्या स्वतंत्र संप्रदायांचे वर्णन व त्यांच्या आध्यात्मिक स्वरूपाचे स्पष्टीकरण असते. सूर्य व विष्णू यांचे एकरूपत्व मान्य असूनही सौर उपनिषदांत त्याचे वेगळे महत्त्व सांगितले आहे. शैव उपनिषदांत शिवाची प्रसिद्ध रूपे आणि बटुक व शरभ ही अप्रसिद्ध रूपे, यांचे सविस्तर वर्णन आहे. शाक्त उपनिषदांत देवीच्या सौम्य व उग्र अशा उभय रूपांचे वर्णन आहे. गाणपत्य उपनिषदांत गणेशाच्या तांत्रिक उपासनेची

सविस्तर माहिती असून, हेरंब या त्याच्या स्वरूपाचे स्वतंत्र वर्णन आहे.

अशा प्रकारे या नव्य उपनिषदांत पंचायतनदेवतांना प्राधान्य दिलेले असले, तरी त्यांच्या अनुषंगाने इंद्र, अग्नी, काम, ज्वर, वासुकी, सोम, हनुमान, इ. देवतांचेही स्वरूप, महत्त्व आणि सामर्थ्य वर्णिलेले आहे.

नव्य उपनिषदांत वक्ता, श्रोता व उपासक या नात्यांनी बरेच नवे ऋषी आढळतात. कित्येक देवता याच त्या उपनिषदांच्या कर्त्या या स्वरूपात दिसतात. नव्य उपनिषदांच्या या लेखकांनी केवळ देवताविषयकच उपनिषदे रचली नसून, योग, संन्यास व वेदान्त या विषयांवरही ती रचली आहेत. भक्तिविषयक स्वतंत्र उपनिषदे नसली, तरी सर्व उपनिषदांतून भक्तीचा ओघ वाहताना दिसतो. भक्तिकल्पनेत मूर्त व अमूर्त यांची पूजा, तसेच उपचारपूजा व मानसपूजा असे दोन्ही प्रकार पुरस्कारिलेले असून, देवतेच्या नामजपाचेही माहात्म्य सांगितले आहे. भक्ताला प्राप्त होणाऱ्या विविध लोकांची वर्णनेही तिथे आहेत. योगविषयक उपनिषदांत योगाची पंधरा अंगे व त्यांचे विवरण, तसेच योगावस्था, योगबंध, योगमुद्रा व कुंडलिनी जागृत करण्याचे विविध उपाय दिलेले आहेत. प्रणवाचेही महत्त्व प्रतिपादिले आहे. संन्यासाचे सविस्तर वर्णन हे नव्य उपनिषदांचे एक वैशिष्ट्यच म्हणावे लागेल. कुटीचक, बहूदक, इ. संन्याशांचे चढत्या श्रेणीचे प्रकार, त्यांची दिनचर्या, विधि–निषेध व त्यांना प्राप्त होणारा मोक्ष इ. गोष्टींचे विस्तृत वर्णन संन्यासविषयक उपनिषदांत आहे. वेदान्तपर उपनिषदांत जीवात्मा, परमात्मा, प्रणव, मुक्ती व तिच्या सात पायऱ्या, यांचे वर्णन आहे.

ही नव्य उपनिषदे गद्यपद्यात्मक असून, त्यांतला गद्य भाग बराच मोठा आहे. पद्यरचनेत प्रामुख्याने अनुष्टुभ छंद आढळतो. कधी संवादरूपाने, कधी उपदेशरूपाने, कधी सरळ व्याख्यानरूपाने, तर कधी प्रश्नाचे उत्तर या रूपाने त्यांची मांडणी झालेली आहे. त्यांची भाषा सोपी, मनोवेधक, समर्पक उदाहरणांनी युक्त व क्वचित अलंकारिक असते. त्या त्या उपनिषदांची फलश्रुती आकर्षक वाटावी, अशा प्रकारे दिलेली असते. धर्मार्थकाममोक्षांची प्राप्ती, हा या उपनिषदांच्या अभ्यासाचा उद्देश आहे. सर्व उपनिषदांचा अद्वैतावरच भर आहे. सृष्टिनिर्माणशास्त्र व जीवाची मरणोत्तर अवस्था, या बाबतीत जुन्या उपनिषदांचे सिद्धांत गृहीत धरून नव्य उपनिषदे तेच नव्या पद्धतीने मांडण्याचा प्रयत्न करतात. सर्व मार्ग मोक्षाकडेच जातात, हे तत्त्व नव्य उपनिषदांनी सूचित केले आहे.

ही नव्य उपनिषदे गौण असली, तरी ती उपेक्षणीय नसून, अनेक दृष्टींनी अभ्यसनीय आहेत. हिंदूंच्या सांप्रतच्या पौराण धर्माला त्यांनीच प्रामाण्य प्राप्त करून दिले आहे. हिंदूंच्या सामाजिक व धार्मिक इतिहासात त्यांना महत्त्वाचे स्था आहे.

१०८ नव्य उपनिषदांची नावनिशी मुक्तिकोपनिषदात दिलेली आहे. यांखेरीज आणखी ७२ उपनिषदे आता प्रकाशित झाली आहेत. दोन्ही मिळून ही संख्या १८० भरते. त्यांत ईश, केन, इ. १० उपनिषदे व ११ वे श्वेताश्वतर ही प्राचीन उपनिषदे मिळविल्यास उपनिषदांची संख्या १९१ होते. त्यांतली १० ऋग्वेदाशी, १९ शुक्लयजुर्वेदाशी, ३२ कृष्णयजुर्वेदाशी, १६ सामवेदाशी व उरलेली सर्व म्हणजे ११४ उपनिषदे अथर्ववेदाशी संबंधित आहेत. नव्य उपनिषदांचे विषयवारीने वर्गीकरण स्थूलमानाने सांगता येते ते असे – वैष्णव उपनिषदे ३४, सौर ५, शैव २७, शाक्त २७, गाणपत्य ४, योग २२, संन्यास २० व वेदान्त ४१.

या सर्व उपनिषदांची कालनिश्चिती करणे कठीण आहे. विशेषतः सांप्रदायिक उपनिषदे ही त्या त्या संप्रदायांच्या स्थापनेआधी, त्या त्या संप्रदायाच्या वृद्धीबरोबर किंवा त्या त्या संप्रदायांचे तत्त्वज्ञान निश्चित झाल्यावर लिहिली गेली, हे सांगणे अवघड आहे. स्थूल मानाने एवढेच म्हणता येईल की, या सर्व उपनिषदांची रचना इ. स. ४०० ते १४०० पर्यंतच्या विस्तृत कालखंडात झाली असावी. वरील सर्व उपनिषदांची नामावली पुढीलप्रमाणे आहे –

**मुख्य उपनिषदे** – (१) ईश (२) केन (३) कठ (४) छान्दोग्य (५) बृहदारण्यक (६) तैत्तिरीय (७) ऐतरेय (८) प्रश्न (९) मुंडक (१०) मांडूक्य (११) श्वेताश्वतर.

**अन्य उपनिषदे** –(१२) अक्षमाला (१३) अक्षी (१४) अथर्वशिखा (१५) अथर्वशिरस (१६) अद्वयतारक (१७) अद्वैत (१८) अध्यात्म (१९) अन्नपूर्णा (२०) अमृतनाद (२१) अमृतबिंदू (ब्रह्मबिंदू) (२२) अल्ला (२३) अवधूत (गद्यपद्यात्मक) (२४) अवधूत (दर्शन) (२५) अव्यक्त (२६) आचमन (२७) आत्म (२८) आत्मपूजा (२९) आत्मप्रबोध (आत्मबोध) (३०) आथर्वण द्वितीया (३१) आरुणिक (आरुणेयी) (३२) आर्षेय (३३) आश्रम (३४) इतिहास (३५) ऊर्ध्वपुंड्र (३६) एकाक्षर (३७) कठरुद्र (कंठ) (३८) कलिसंतरण (हरिनाम) (३९) कात्यायन (४०) कामराजकीलितोद्धार (४१) कालाग्निरुद्र (४२) कालिका (४३) कालिमेधादीक्षित (४४) कुंडिका (४५) कृष्ण (४६) कैवल्य (४७) कौषीतकी ब्राह्मण (४८) क्षुरिका (४९) गणपत्यथर्वशिरस (५०) गणेशपूर्वतापिनी (वरदापूर्वतापिनी) (५१) गणेशोत्तरतापिनी (वरदोत्तर तापिनी) (५२) गरुड (५३)

गर्भ (५४) गायत्री (५५) गायत्रीरहस्य (५६) गुह्यकाली (५७) गुह्यषोढान्यास (५८) गोपालपूर्वतापिनी (५९) गोपालोत्तरतापिनी (६०) गोपीचंदन (६१) चतुर्वेद (६२) चाक्षुष (६३) छागलेय (६४) जाबाल (६५) जाबाल दर्शन (६६) जाबाली (६७) तारसार (६८) तुरीय (६९) तुरीयातीत (७०) तुलसी (७१) तेजोबिंदू (७२) तैत्तिरीय (७३) त्रिपादविभूतिमहानारायण (७४) त्रिपुरा (७५) त्रिपुरा तापिनी (७६) त्रिशिखाब्राह्मण (७७) दक्षिणामूर्ती (७८) दत्तात्रेय (७९) देवी (८०) द्वय (८१) ध्यानबिंदू (८२) नादबिंदू (८३) नारद (८४) नारदपरिव्राजक (८५) नारायणपूर्वतापिनी (८६) नारायणोत्तरतापिनी (८७) नारायण–याज्ञिक्युपनिषद, (८८) निरालंब (८९) निरुक्त (९०) निर्वाण (९१) नीलरुद्र (९२) नृसिंहपूर्वतापिनी (९३) नृसिंहषट्चक्र (९४) नृसिंहोत्तरतापिनी (९५) पंचब्रह्म (९६) परब्रह्म (९७) परमहंस (९८) परमहंस परिव्राजक (९९) पारमात्मिक (१००) पारायण (१०१) पाशुपतब्रह्म (१०२) पिंड (१०३) पीतांबरा (१०४) पैंगल (१०५) प्रणव (गद्यात्मक) (१०६) प्रणव (पद्यात्मक) (१०७) प्राणाग्निहोत्र (१०८) वटुक (वटुक) (१०९) बहूवृच (११०) बष्कलमंत्र (१११) बिल्वा (११२) बृहज्जाबाल (११३) ब्रह्मविद्या (११४) ब्रह्मा (११५) भस्मजाबाल (११६) भावना (कपिल) (११७) भिक्षुक (११८) मठाम्नाय (११९) मंडलब्राह्मण (१२०) महा (१२१) महानारायण (बृहन्नारायण किंवा उत्तरनारायण) (१२२) महावाक्य (१२३) मांत्रिक (१२४) मुक्तिक (१२५) मुद्‌गल (१२६) मृत्युलांगुल (१२७) मैत्रायणी (१२८) मैत्रेयी (१२९) यज्ञोपवीत (१३०) याज्ञवल्क्य (१३१) योग (१३२) योगकुंडलिनी (१३३) योगचूडामणी (१३४) योगतत्त्व–१ (१३५) योगतत्त्व–२ (१३६) योगराज (१३७) योगशिखा (१३८) राजश्यामलारहस्य (१३९) राधा (१४०) राधिका (१४१) रामपूर्वतापिनी (१४२) रामरहस्य (१४३) रामोत्तरतापिनी (१४४) रुद्र (१४५) रुद्रहृदय (१४६) रुद्राक्ष जाबाल (१४७) लांगूल (१४८) लिंग (१४९) वज्रपंजर (१५०) वज्रसूचिका (१५१) वनदुर्गा (१५२) वराह (१५३) वासुदेव (१५४) विश्राम (१५५) शरभ (१५६) शाट्यायनीय (१५७) शांडिल्य (१५८) शारीरिक (१५९) शिव (१६०) शिवसंकल्प – १ (१६१) शिवसंकल्प –२ (१६२) शुकरहस्य (१६३) शौनक (१६४) श्यामा (१६५) श्रीकृष्णपुरुषोत्तम (१६६) श्रीचक्र (१६७) श्रीविद्यातारक (१६८) षोढोपनिषद (१६९) संकर्षण (१७०) सदानंद (१७१) संन्यास (अध्यायात्मक) (१७२) संन्यास (वाक्यमय) (१७३) सरस्वतीरहस्य (१७४) सर्वसार (१७५) सामरस्य (रसिकानंद) (१७६) सावित्री (१७७) सिद्धान्त (१७८) सिद्धान्तसार (१७९) सीता (१८०) सुदर्शन (१८१) सुवाल (१८२) सुमुखी (१८३) सूर्य (१८४) सूर्यतापिनी (१८५) सौभाग्यलक्ष्मी (१८६) स्कंद (१८७) स्वसंवेद (१८८) हयग्रीव (१८९) हंस (१९०) हंसषोढा व (१९१) हेरंब. [डॉ. सी. ग. देसाई; उ. र.; उपनिषत्सार; वै. सं. वि.; स्मृतिगंध; डॉ. दप्तरी लेखसंग्रह, भाग १; नवभारत, सप्टें. १९७४.]

**उपनिषद्व्रत** उपनीत बटूचे एक व्रत. हे महाव्रताप्रमाणेच करायचे असते. ' संवत्सरमुपनिषद्व्रतं चर'. एक वर्ष उपनिषद्व्रताचे आचरण कर, असा बटूस प्रैष देतात. 'उपनिषदं भो अनुब्रूहि' असे बटू म्हणतो. अनुप्रवचनीय होमाच्या वेळी; ' उपनिषदे स्वाहा ' अशी मध्यम आहुती देतात. व्रताच्या वेळी गुरूपासून जे ऐकायला मिळते, त्यानेच महा अध्ययनाची सिद्धी होते, असा त्यात अभिप्राय आहे. म्हणून नाम्नीच्या श्रवणानंतर, ज्यांनी पूर्वी अध्ययन केले नसेल त्यांनी फाल्गुन पौर्णिमेपासून श्रावण पौर्णिमेपर्यंत अध्ययन करावे, असे सांगितले आहे. आचार्य नसल्यास महाव्रतादींचे अध्ययन शिष्याने स्वतःच करावे, असे पारिजात ग्रंथातील वचन आहे. [ सं. कौ. ]

**उपपातक** पापाचा एक प्रकार. उपपातके ४९ सांगितली आहेत. त्यांची नावे अशी–गोवध, अयाज्ययाजन, परदारागमन, आत्मविक्रय, गुरुत्याग, मातृत्याग, पितृत्याग, वडिलांची शुश्रूषा न करणे, स्वाध्यायत्याग, अग्नित्याग, पुत्रत्याग, ज्येष्ठाच्या आधी कनिष्ठाने विवाह करणे, परिवेत्त्याला कन्यादान, परिवेत्त्याचे याजन, कन्यादूषण, वार्धुष्य (निषिद्ध व्याजावर उपजीविका करणे) व्रतलोप (ब्रह्मचाऱ्याने स्त्रीसंग करणे), तडागविक्रय, आरामविक्रय, दारविक्रय, अपत्यविक्रय, बांधवत्याग, व्रात्यत्व ( योग्य काळी उपनयन न होणे ), भृताध्ययन भृताध्यापन ( वेतन घेऊन विद्या शिकविणे ), (वेतनप्रदानपूर्वक अध्ययन), अविक्रेय वस्तूंचा विक्रय, सोन्यारुप्याच्या खाणीवर अधिकार करणे, महायंत्रप्रवर्तन (तेलाचा घाणा, शस्त्राला धार लावणारे यंत्र इ. चालविणे), औषधींची हिंसा, कुटुंबातल्या स्त्रियांना वेश्याकर्म करायला लावून त्यावर उपजीविका करणे, अभिचारकर्म (जारणमारणादी), मूलकर्म (वशीकरण), ओले झाड तोडणे, स्वास्थ्य असता देव-पितर यांच्या उद्देशाने पाकादी क्रिया न करणे, निंदितान्नाचे भक्षण,

आहिताग्नी न होणे, स्तेय (चौर्य, अपहार), ऋणाशोधन (ऋणत्रय न फेडणे), पाखंडशास्त्राचे अध्ययन करणे, कौशील-व्यक्रिया (नृत्य-वाद्यांचे सतत अनुष्ठान), धान्यचौर्य, पशुचौर्य, सोन्यारुप्याव्यतिरिक्त इतर धातूंचे चौर्य, मद्य पिणाऱ्या स्त्रीचा उपभोग, स्त्रीवध, शूद्रवध, वैश्यवध, क्षत्रियवध व नास्तिकता [श. क.]

**उपपुराणे** संस्कृत साहित्यात अठरा महापुराणांव्यतिरिक्त जी अन्य पुराणे आहेत, त्यांना उपपुराणे म्हणतात. ही उपपुराणे कोणत्या ना कोणत्या महापुराणाशी संलग्न आहेत. उपपुराणे ही महापुराणांच्या नंतर रचलेली व कनिष्ठ प्रतीची आहेत, असा गैरसमज फार पूर्वीपासून प्रचलित आहे. पण काही उपपुराणे महापुराणांपेक्षाही प्राचीन असल्याचे सिद्ध झाले आहे. एकूण सर्वच उपपुराणांत मोलाची ऐतिहासिक माहिती साठवलेली आहे. गुप्तपूर्वकालातील संस्कृती, कला, साहित्य, समाजव्यवस्था व धर्मसंस्था यांविषयी बरीच माहिती उपपुराणांत आढळते.

उपपुराणांची नेमकी संख्या किती, याबद्दल मात्र मतभेद आहेत. अनेक संस्कृत ग्रंथांत त्यांची नामावली दिली असून, त्यांची संख्या सर्वत्र अठराच सांगितली आहे. यांपैकी काही नावे सर्व ग्रंथांत समान असून, काही मात्र भिन्न आहेत. सर्व ठिकाणची एकूण उपपुराणांची नावे पाहता त्यांची संख्या १८ पेक्षा जास्त भरते. प्रचलित उपपुराणांची नावे पुढीलप्रमाणे –

(१) आद्य किंवा सनत्कुमारीय (२) नारसिंह (३) स्कान्द (४) शिवधर्म (५) दुर्वासोक्त (६) नारदीय (७) कापिल (८) वामन (९) औशनस (१०) ब्रह्माण्ड (११) वारुण (१२) कालिका (१३) माहेश्वर (१४) साम्ब (१५) सौर (१६) पराशरोक्त (१७) मारीच (१८) भार्गव (१९) नंदी (२०) वायवीय (२१) नन्दिकेश्वर-युग्म (२२) दैव (२३) भास्कर (२४) मानव (२५) भागवतद्वय (२६) पाद्म (२७) शौक्रेय (२८) बार्हस्पत्य (२९) कौर्म (३०) आणू (३१) बृहन्नारदीय (३२) बृहन्नंदीश्वर (३३) क्रियायोगसार (३४) धर्म (३५) विष्णुधर्मोत्तर (३६) विष्णुधर्म (३७) वृहद्धर्म (३८) शौक्र (३९) बृहन्नारसिंह (४०) बृहद्वैष्णव (४१) गारुड (४२) प्रभासक (४३) लीलावती (४४) देवी (४५) आखेटक (४६) एकाम्र (४७) एकपाद (४८) लघुभागवत (४९) मृत्युंजय (५०) आंगिरसक (५१) गणेशक.

या उपपुराणांशिवाय आणखीही काही उपपुराणे उपलब्ध आहेत. काही उपपुराणे नष्ट झाली असेही कळते.

कूर्मपुराणात ज्या १८ उपपुराणांची नावे आली आहेत, ती इ. स. ६५० ते ८५० या काळात रचली गेली असावी. या उपपुराणांच्या रचनेचा आरंभ गुप्तकाळी झाला, असे साधारणपणे म्हणता येईल. कित्येकांच्या मते काही उपपुराणे यापेक्षाही प्राचीन आहेत.

वैदिक काळापासूनच पुराणे ही सूतवाङ्मय या स्वरूपात प्रचलित होती. वैदिक आर्य त्यांना वेदांच्या खालोखाल पवित्र मानीत. कालांतराने बौद्ध व जैन या धर्मांच्या प्रसारामुळे वैदिक धर्मावर आघात बसल्यासारखे झाले. तेव्हा स्मार्त ब्राह्मणांनी आपापल्या पंथाच्या उत्कर्षासाठी त्या पुराणसाहित्याचा उपयोग करून घेतला व त्याच्या आधारे वर्णाश्रमधर्माचे पुनरुज्जीवन केले. त्या वेळी ब्रह्मा, विष्णू व महेश या देवतांची उपासना करणारे ब्राह्म, पांचरात्र व पाशुपत हे पंथ अस्तित्वात होते. पुढे गुप्तकालात भागवत पंथाचा उत्कर्ष झाला.

स्मार्तपंथी ब्राह्मणांनी जी पुराणे रचली, ती महापुराणे या नावाने प्रसिद्धीला आली. इ. सनापूर्वी त्यांच्या रचनेला आरंभ झाला होता. ही पुराणे रचली गेल्यावर त्यांची एकूण संख्या अठरा झाली. ती संख्या शुभ आहे असे समजून निश्चित ठरविली गेली. त्यानंतर ब्राह्म, पांचरात्र व पाशुपत या पंथांचे आणखी उपपंथ निर्माण झाले. त्या पंथांपैकी स्मार्त लोकांनी नवीन पुराणे रचली. पण अठरा पुराणे मानणाऱ्यांनी या नवरचित पुराणांना आपल्या गटात स्थान दिले नाही. परंतु ती प्रसिद्ध व लोकप्रिय झाल्यामुळे त्यांना दुय्यम स्थान तरी देणेच भाग होते. म्हणून मत्स्यपुराणात काही श्लोकांची भर घालून त्यात नवीन पुराणांचे वर्णन उपपुराणे म्हणून करण्यात आले.

महापुराणांप्रमाणेच उपपुराणांतही सर्ग, प्रतिसर्ग, वंश, मन्वंतर व वंशानुचरित हे विषय असावे, असे काही ठिकाणीं म्हटले आहे. पण प्रत्यक्षात मात्र तसे क्वचितच आढळते. ही उपपुराणे विशिष्ट पंथाच्याच तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करण्यासाठी रचलेली असल्यामुळे त्यांच्या कर्त्यांनी राजवंशावळीला काही वेळा मुळीच महत्त्व दिले नाही. काही ठिकाणी उपपुराणांत राजवंश दिलेले असतात; पण त्यांची माहिती यथार्थ नसते. त्यांत दंतकथाही बऱ्याच घुसडलेल्या आढळतात. पण असे असूनही धार्मिक व सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीने ही उपपुराणे अत्यंत उपयुक्त ठरली आहेत. हिंदूंची सामाजिक स्थिती, त्यांचे तत्त्वज्ञान, विज्ञानाचा विकास व साहित्य, यांविषयी पुष्कळ माहिती या उपपुराणांमध्ये आढळते. 'महापुराणे ही श्रेष्ठ प्रतीची व अधिकृत मानली गेल्यामुळे त्यांतही पुढे पुष्कळच भर घालून त्यांचे उपबृंहण केले गेले. त्यामुळे सांप्रत उपलब्ध असलेली महापुराणे ही इतिहासाच्या दृष्टीने विश्वसनीय राहि-

लेली नाहीत. पण उपपुराणांची गोष्ट तशी नाही. ती दुय्यम प्रतीची म्हणूनच उपेक्षणीय राहिल्यामुळे त्यांवर नवीन संस्कार झाले नाहीत किंवा त्यांत भरही पडली नाही. त्यामुळेच त्यांचे मूळ रूप बहुशः अबाधित राहिले. त्यांतील माहितीही त्यामुळे अधिक विश्वसनीय ठरते. [स्ट. उ. पु.]

**उपयज होम** पशुयागात अनुयाजाच्या वेळी करायचा एक होम. शामित्र अग्नी वेदीत ठेवून त्या अग्नीवर पशूच्या गुदकांडाच्या अकरा भागांच्या आहुती देतात. या होमाचे मंत्र शुक्ल यजुर्वेदामध्ये सांगितले आहेत (६.२१). प्रतिप्रस्थाता ऋत्विज, हा होम हाताने अथवा गुदकांडाचा तुकडा स्रुचीत घेऊन त्याने करतो. उपयज होम झाल्यावर होमकर्त्याने बर्हीवर हात पुसून आपल्या हृदयास स्पर्श करायचा असतो. ज्या यागात पशुयाग असेल, तिथे अनुयाजाबरोबर हा होम करतात. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**उपवर्ष** एक महान आचार्य. याने पूर्व व उत्तर मीमांसा यांवर वृत्ती लिहिली आहे. शबरस्वामीने आपल्या मीमांसासूत्रभाष्यात भगवान उपवर्ष असे म्हणून याला गौरविले आहे (१. १. ५). शंकराचार्यही याला सर्वज्ञ भगवान ही उपाधी लावतात. शबरस्वामी याचा उल्लेख करतो यावरून उपवर्ष तत्पूर्वकालीन ठरतो. उपवर्षाने व्याकरणातील स्फोटवादाचे खंडण केले आहे. पतंजली हा स्फोटवादाचा प्रवर्तक असून, त्याचा काल सनपूर्व दुसरे शतक मानतात. त्यावरून उपवर्ष हा पतंजलीच्या नंतर व शबरस्वामीच्या पूर्वी म्हणजे सनपूर्व २०० ते इ. स. २०० या कालखंडात कधीतरी होऊन गेला, एवढेच म्हणता येते. [प्रा. मौ. बि.; हिंदुत्व; श्रीशंकराचार्य.]

**उपवसथ** यागाच्या आदल्या दिवसाला उपवसथ म्हणतात. दुसऱ्या दिवशी यागासाठी ज्या देवता असतील, त्यांचे आवाहन करून 'आजच्या दिवस तुम्ही अग्नीत राहा,' असे उपवसथाच्या विधीत त्यांना सांगायचे असते. याला देवतोपवासन असेही म्हणतात. या दिवशी यजमानदंपती उपवास करतात व देवतांच्या सान्निध्यात राहतात.

**उपवास** अन्नपाणी वर्ज्य करून राहणे म्हणजे उपवास होय. याचे लक्षण पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

**उपावृत्तस्य पापेभ्यो यस्तु वासो गुणैः सह ।**
**उपवासः स विज्ञेयः सर्वभोगविवर्जितः ।।**

अर्थ – पापकर्मापासून निवृत्त झालेल्या माणसाचा सद्गुणांसह वास म्हणजे उपवास होय. त्यात (खानपानादी) सर्व भोग वर्ज्य करायचे असतात.

सर्वसाधारणपणे उपवासाचा अर्थ हलका व मित आहार घेणे, असा करतात (तै. सं. १०६.१०७.३). उपवास हा पापक्षालनाचा एक मार्ग होय, असे गौतम धर्मसूत्रात सांगितले आहे (१९.११). उपनिषत्कालीही जाणत्या लोकांना उपवासाचे महत्त्व माहीत झाले होते. बृहदारण्यकात परमेश्वराप्रत जाण्याचे जे अनेक मार्ग सांगितले आहेत, त्यांत उपवासाचाही निर्देश आहे –

**तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति**
**यज्ञेन दानेन तपसाऽनाशकेन ।**

अर्थ – वेदवचनाधार घेऊन यज्ञ, दान, तप व उपवास हे परमेश्वरप्राप्तीचे मार्ग आहेत, असे ब्राह्मण सांगतात.

तपाच्या निरनिराळ्या प्रकारात उपवास हा मुख्य व श्रेष्ठ आहे, असे महाभारतात सांगितले आहे. म. भा. च्या अनुशासनपर्वात विविध प्रकारचे उपवास व त्यांची फले यांचे वर्णन आहे (१०६.५). या सर्व फलांचे तात्पर्य स्वर्गप्राप्ती हे आहे.

गृह्यसूत्रांत उपवास शब्दाचा अर्थ थोडा वेगळा केला आहे. यज्ञकर्माला उपयुक्त असे धान्य शिजवून अल्पाहार करणे म्हणजे उपवास होय, असे काठक गृह्यसूत्रात सांगितले आहे (४६.२).

कोणतेही वैदिक कर्म करण्यात हयगय झाली, तर त्याने प्रायश्चित्त म्हणून एक दिवस उपवास करावा, असे मनुस्मृतीत (११.२०३) व विष्णुधर्मसूत्रात (५४.२९) सांगितले आहे.

अहोरात्राच्या उपवासाला संपूर्ण उपवास म्हणतात. एकादशी, शिवरात्री, रामनवमी, जन्माष्टमी, हरितालिका इ. संपूर्ण उपवास होत. दिवसात एकदा जेवणे याला एकभुक्त म्हणतात. सोमवार, शनिवार, इ. वारांचे उपवास हे एकभुक्त करावे असतात. संकष्टचतुर्थी, प्रदोष हेही एकभुक्तच होत. अशा उपवासांत दुपारी किंवा रात्री, एकदा भोजन करतात.

अंजन, गंध, पुष्प, माला, अलंकार, दंतधावन, गात्राभ्यंग, तांबूल, दिवसा झोप, अक्षक्रीडा, मैथुन, अतिजलपान, इ. गोष्टी उपवासाच्या दिवशी वर्ज्य होत. व्रती मनुष्य उपवास करण्याच्या कामी असमर्थ असेल, तर त्याच्या प्रतिनिधीने उपवास केला तरी चालतो.

**पुत्रं वा विनयोपेतं भगिनीं भ्रातरं तथा ।**
**एषामभाव एवान्यं ब्राह्मणं विनियोजयेत् ।।**

अर्थ – विनयशील पुत्र, बहीण, भाऊ किंवा त्यांच्या अभावी ब्राह्मण यांना उपवासासाठी प्रतिनिधी नेमावे.

**भार्या भर्तृव्रतं कुर्यात् भार्यायाश्च पतिस्तथा ।**
**असामर्थ्ये द्वयोस्ताभ्यां व्रतभङ्गो न जायते ।।**

अर्थ – पत्नीने पतीचे व पतीने पत्नीचे व्रत केल्यास चालते,

पण ती दोघेही जर त्या कामी असमर्थ असतील, तर त्यांना व्रतभंगाचा दोष लागत नाही.

उपवास करणे शक्य नसेल तर त्यासाठी आणखीही एक पर्याय सांगितला आहे –

**उपवासासमर्थश्चेदेकं विप्रं तु भोजयेत् ।**
**तावद्धनानि वा दद्याद् यद् भक्ताद् द्विगुणं भवेत् ।**
**सहस्रसम्मितां देवीं जपेद्वा प्राणसंयमान् ।**
**कुर्याद् द्वादशसंख्याकान् यथाशक्ति व्रते नरः ।**

अर्थ – उपवास करणे शक्य नसेल तर एका ब्राह्मणाला भोजन द्यावे किंवा भाताच्या (शिध्याच्या) दुप्पट किंमतीचे द्रव्य द्यावे. देवीचा जप एक हजार संख्येने करावा. बारा वेळा प्राणायाम करावा. हे सर्व यथाशक्ति केले तरी चालेल.

**नक्तं हविष्यान्नमनोदनञ्च फलं तिलाः क्षीरमथाम्बु चाज्यम् ।**
**यत्पञ्चगव्यं यदि वाथ वायुः प्रशस्तमत्रोत्तरमुत्तरञ्च ।।**

अर्थ — नक्तभोजन, भात वगळून हविष्यान्न, फळे, तीळ, दूध, पाणी, तूप, पंचगव्य व वायू यांचे भक्षण करून केलेला उपवास उत्तरोत्तर प्रशस्त होय.

जैनांनी उपवासाचे महत्त्व फारच वाढविले आहे. त्यांनी सरसकट सर्वांना उपवास करण्याचा आदेश दिल्यामुळे खालच्या वर्गातही त्या धर्माचा प्रसार होण्यास मदत झाली. जैन धर्मात अखंड ४२ दिवसांपर्यंतचा उपवास सांगितला आहे. त्यांच्या उपवासात अन्नाबरोबर पाणीही वर्ज्य असते.

फार प्राचीन काळी कधीतरी माणसाला अन्नाचे दुर्भिक्ष झाले असावे व त्यातून धार्मिक उपवासाची कल्पना निघाली असावी. त्यामुळे उपवासकालात होणारा शारीरिक व मानसिक त्रास म्हणजे तपच होय, असे मानले गेले आहे. मृताशौचात उपवास करण्याची पद्धत पुष्कळ देशांत आढळून येते. पापाचे परिमार्जन व ईश्वराची क्षमा, यांसाठीही कित्येक लोक उपवास करतात. विषयवासना शमावी व आत्मिक उन्नतीच्या मार्गातल्या सर्व अडचणी व बाधा दूर व्हाव्या, म्हणूनही उपवास करतात. उपवास ही धार्मिक आचारांतली एक शिस्त आहे. उपवासाने जप, तप, ध्यान, इत्यादी गोष्टींना तेज येते. उपवास किती दिवस करावा, हे त्या त्या धर्मकृत्याच्या विधीवर अवलंबून असते. ख्रिस्ती व इस्लाम या धर्मांतही उपवास विहित असून, त्या धर्मांनी त्याचे दिवसही ठरवून दिलेले आहेत. पारशी धर्मात मात्र उपवास सर्वथा वर्ज्य ठरविलेला आहे. [हि. ध.; श. क.; म. भा. उ. सं.; एन्सा. रि.]

**उपवीर** पिशाचांचा एक वर्ग. हा वृक्षांच्या साली परिधान करून स्मशानात राहतो. [पु. इं.]

**उपवेद** प्रत्येक वेदाला एक या प्रमाणे चार वेदांचे चार उपवेद आहेत, ते पुढीलप्रमाणे – ऋग्वेदाचा आयुर्वेद, यजुर्वेदाचा धनुर्वेद, सामवेदाचा गांधर्ववेद व अथर्ववेदाचा अर्थशास्त्र हा उपवेद होय.

**उपवेशन** एक शिशुसंस्कार. उपवेशन म्हणजे बालकाला भूमीवर बसविणे. हा संस्कार पाचव्या महिन्यात करायचा असतो. उत्तरात्रय, मृग, पुष्य, ज्येष्ठा, अश्विनी व अनुराधा, ही नक्षत्रे या संस्कारास शुभ असतात. दुसरी गोष्ट म्हणजे मंगळ शुभस्थानी असावा लागतो. या प्रसंगी वराह व पृथ्वी यांची पूजा करून बालकाला भूमीवर बसवितात व पुढीलप्रमाणे भूमीची प्रार्थना करतात –

**रक्षैनं वसुधे देवि सदा सर्वगतं शुभे ।**
**आयुःप्रमाणं सकलं निक्षिपस्व हरिप्रिये ।।**
**चराचराणां भूतानां प्रतिष्ठानाव्यया ह्यसि ।**
**कुमारं पाहि मातस्त्वं ब्रह्मा तदनुमन्यताम् ।।**

अर्थ – हे पृथ्वी, तू या मुलाचे सर्वत्र रक्षण कर. याला संपूर्ण आयुःप्रमाण (शतायुष्य) दे. तू चराचर भूतांची प्रतिष्ठा व अव्यय आहेस. तू या कुमाराचे रक्षण कर. ब्रह्मा या गोष्टीला मान्यता देवो. [नि. सिं.]

**उपशून्य** (इ. स. चे ६ वे शतक) हा मध्य भारतात राहणारा एक भिक्षू होता. याने चीनमध्ये जाऊन तीन बौद्ध ग्रंथांचे चिनी भाषेत भाषांतर केले. [म. ज्ञा. को.]

**उपश्रुती** अदृष्ट कथन करणारी एक देवता. इंद्राणीच्या प्रार्थनेवरून हिने इंद्र जिथे लपला होता, ते ठिकाण तिला दाखविले. (म. भा. उद्योग. १३–१४)

**उपस्तुत वार्ष्टिहव्य** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे पंधरावे सूक्त याने रचले आहे. अग्निस्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. त्याची एक ऋचा (१०.११५.१) अशी –

**चित्र इच्छिशोस्तरुणस्य वक्षथो न यो मातरावप्येति धातवे ।**
**अनूधा यदि जीजनदधा च नु ववक्ष सद्यो महि दूत्यं चरन् ।।**

अर्थ – द्यावा-पृथ्वीरूपी स्वमातेचे दूध कधीही न पिणारा, तरुण, नाजूक आणि वर्धिष्णू बालअग्नी हव्यवाहनाचे कार्य आरंभितो.

ऋग्वेदात उपस्तुताचा कण्व मेध्यातिथीबरोबर उल्लेख येतो. (१.३६.१०; १७) शिवाय बहुवचनी स्तोते म्हणूनही याचा

निर्देश आढळतो (ऋ. ८.१०३.८). हा वृष्टिहव्याचा पुत्र असून, कण्व कुलोत्पन्न आहे. वृष्टिहव्याचा हा ज्येष्ठ पुत्र असावा, असे डॉ. राहूरकरांचे मत आहे. उपस्तुताने अग्नीचा कण्वांचा सखा म्हणून उल्लेख केला आहे. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ. ]

**उपस्थान** उप = जवळ, स्थान = स्थिती. आचारेन्दूत याची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे –

**उपस्थानं तदेव स्यात्प्रणतिस्यानसंयुतम्**

अर्थ – मंत्राला नमस्कारविषयाची जोड दिली, की ते उपस्थान होते.

उपस्थानात उभे राहून देवाचे स्तोत्र करतात. संध्यावंदनात गायत्रीजप झाल्यावर उभे राहून उपस्थान करतात. सकाळी 'मित्रस्य चर्षणी' (ऋ. ३.५९.६–९) इ. मंत्रांनी सूर्याचे व सायंकाळी 'जातवेदसे' (ऋ. १.९९.१) या मंत्राने अग्नीचे उपस्थान करतात. [ आह्निकसार ]

**उपज्ञात** वैदिक साहित्यातला एक प्रकार. एखाद्या आचार्यांच्या प्रथम आविष्काराला उपज्ञात ही संज्ञा आहे. अशा प्रकारच्या प्रयत्नाला आद्य आचिख्यासा म्हणत (अष्टा. २.४.२१). आपिशली, शाकटायन व पाणिनी यांच्या सारख्या महान आचार्यांच्या कृती या सदरात येतात. उपज्ञात साहित्य हे प्रोक्त साहित्याच्या अंतर्गत मानतात. छंदोग्रंथ किंवा शाखाग्रंथ हे केवळ प्रोक्त आहेत; उपज्ञात नाहीत. प्रवचनकर्त्या ऋषींनी मूळ संहितांमध्ये काही फेरफार करून त्या आपल्या शिष्यांना शिकविल्या. त्यामुळे एकाच वेदाच्या कित्येक शाखा परस्पर मिळत्या-जुळत्या आढळतात. पाणिनीची अष्टाध्यायी मात्र प्रोक्त व उपज्ञात अशा दोन्ही सदरांत येऊ शकते (पाणिनिना प्रोक्तम् पाणिनिना उपज्ञातम् – काशिका). पाणिनीच्या नव्या व्याकरणशास्त्राला प्रोक्तलक्षण लागू पडते ते असे, की छंदोग्रंथांप्रमाणेच त्याचीही गुरु-शिष्यपरंपरा प्रवर्तित झाली व त्याचे उपज्ञातलक्षण हे, की त्या शास्त्रात पाणिनीचे स्वतंत्र कर्तृत्व मानले गेले. [ पा. का. भा. ]

**उपाकर्म** याला उपाकरण असेही म्हणतात. संस्कारपूर्वक श्रुतीचे ग्रहण करणे, म्हणजे उपाकरण होय. उपाकर्म म्हणजे वार्षिक वेदाध्यनाचा प्रारंभ करणे व उत्सर्जन म्हणजे वेदाध्ययन काही काल बंद ठेवणे होय. प्राचीन काळी हे दोन विधी वेगवेगळ्या दिवशी करीत; पण पुढे वेदाध्ययनाचा ऱ्हास होऊ लागला आणि हे दोन्ही विधी एकाच दिवशी प्रथम उत्सर्जन व मग उपाकर्म असे क्रमशः करण्यात येऊ लागले.

उपाकर्माला काही सूत्रांत अध्यायोपाकरण किंवा अध्यायोपाकर्म असे म्हटले आहे. यांतील अध्याय शब्दाचा अर्थ वेदाध्ययन असा आहे. तेव्हा उपाकर्म म्हणजे वेदाध्ययनाला प्रारंभ करण्याचा विधी असा त्याचा अर्थ होतो. हे वर्षाऋतूत करतात किंवा वर्षातून एकदा करतात, म्हणून याला वार्षिक असेही म्हटलेले आढळते. उपाकर्म केव्हा करावे, याबद्दल सूत्रकारांत मतभेद आहेत. आश्वलायन म्हणतो –

**ओषधीनां प्रादुर्भावे श्रवणेन श्रावणस्य पञ्चमां हस्तेन वा।**

अर्थ–ओषधी उगवल्या म्हणजे चंद्र श्रवण नक्षत्रात असता (श्रावण पौर्णिमेला) किंवा चंद्र हस्त नक्षत्रात असता श्रावण पंचमीला उपाकर्म करावे.

या बाबतीत प्रत्येकाने आपापल्या गृह्यसूत्राप्रमाणे वागावे, असे टीकाकार सांगतात. ऋग्वेदी लोक श्रावण शु. ५ मी किंवा १४ शी किंवा पौर्णिमा या तिथींना उपाकर्म करतात. गोभिल व खादिर गृह्यसूत्रे भाद्रपदपौर्णिमा व हस्तनक्षत्र यांच्या योगावर कर्म विहित समजतात. ब्रह्मचारी, गृहस्थ व वानप्रस्थ या तिघांनाही उपाकर्म करावे लागते. ते सकाळी करतात. आचार्य आपल्या शिष्यांसह गृह्याग्नीवर हा विधी करतो, असे पारस्कर सांगतो. याचा विधी असा –

आचार्य व शिष्य एकत्र जमून स्थंडिलावर संकल्पपूर्वक अग्नी सिद्ध करतात. आज्यभागान्त कर्म झाल्यावर सावित्री, ब्रह्मा, श्रद्धा, मेधा, प्रज्ञा, धारणा, सदसस्पती, अनुमती व छंदसांऋषी या नऊ देवतांना आज्याहुती देतात. नंतर सातूचे पीठ दह्यात मिसळून त्याच्या गोळ्या करतात व अग्नी, अप्तृगसूवं, इ. देवतांना त्यांच्या आहुती देतात. मग स्विष्टकृत करून आचार्य व शिष्य त्या अवशिष्ट उरलेल्या सातूच्या पिठाचे सेवन करतात. मग आचमन, मार्जन, यज्ञोपवीतधारण, गायत्रीजप, इ. विधी करतात. सांगतेसाठी ब्राह्मणांना भोजन घालून दक्षिणा देतात.

उपाकर्माला सांप्रत श्रावणी म्हणतात. श्रावणी म्हणजे नवे यज्ञोपवीत घालण्याचा वार्षिक दिवस, अशी हल्ली समाजात सार्वत्रिक समजूत आहे; पण ती भ्रममूलक होय. गृह्यसूत्रांत उपाकर्माचे विधान सांगताना त्यात यज्ञोपवीत धारणाचा विधी सांगितलेला नाही. तो उपाकर्माचा प्रधान हेतू नव्हेच. प्रतिवर्षी वेदाध्ययनास किंवा वेदांच्या उजळणीस प्रारंभ करण्याच्या प्रसंगी विद्यार्थ्यांनी आपल्या गुरुजनांसमवेत करण्याचा तो एक सोपा, सुटसुटीत, परंतु शिक्षणशास्त्रदृष्ट्या महत्त्वपूर्ण असा विधी होता.

असे असेल, तर सांप्रत गुरु-शिष्यांव्यतिरिक्त समाजातील इतरही सर्व उपनीत गृहस्थाश्रमी लोक श्रावणी करतात, तो

का, असा प्रश्न उपस्थित होतो. पूर्वकालीन समाजसुधारकांनी घडवून आणिलेली ती एक सामाजिक सुधारणा आहे, असे त्याचे उत्तर द्यावे लागते. शिक्षण संपले व पदवी प्राप्त झाली, म्हणजे विद्यार्थी शिकलेले बहुतेक सगळे विसरू लागतात, असा आजचा जो अनुभव, तोच पूर्वीचाही होता. वेदाध्ययन विसरू नये, म्हणून नित्य ब्रह्मयज्ञाची योजना केलेली होती. या ब्रह्मयज्ञात थोडा वेळ तरी स्वाध्याय करावा लागे. पण रोजच्या व्यावहारिक दगदगीत पुढे या स्वाध्यायाचीही हेळसांड होऊ लागली. त्यामुळे शिकलेले वेदमंत्र जर विस्मृतीत नष्ट होऊ द्यावयाचे नसतील आणि त्या मंत्रांना येणारा शिळेपणा काढून टाकायचा असेल, तर याहून निराळी काही तरी व्यवस्था करणे आवश्यक आहे, असे समाजधुरीणांना वाटू लागले.

आपला देश कृषिप्रधान आहे. भारतात आषाढापासून भाद्रपदापर्यंत केव्हातरी पावसाळा सुरू होतो. शेतीची पेरणी वगैरे काम झाल्यावर काही महिने शेतकऱ्याला फुरसतीचे मिळतात. म्हणून या कालात सर्व स्नातकांनी प्रतिवर्षी शिकलेल्या वेदांची उजळणी करावी, अशा हेतूने उपाकर्म अर्थात श्रावणी सर्वांना सक्तीची करण्यात आली. हस्तनक्षत्राची देवता सविता ही होय. गायत्रीमंत्रातही त्याच देवतेची प्रार्थना आहे. तेव्हा प्रतिवार्षिक वेदाध्ययनाचे अधिवेशन श्रावण महिन्यातील हस्तनक्षत्राच्या दिवशी म्हणजे शु. ५ मीस करावे, अशी प्रथा पडली. प्रारंभी गुरुमुखातून श्रवण करूनच शिष्य वेद शिकत. तेव्हा उपाकर्मासाठी श्रावण महिन्यातील श्रवण नक्षत्राचा दिवस म्हणजेच पौर्णिमा हीही मान्य करण्यात आली. आजही उपाकर्म श्रावण शु. ५ मीस झाले नाही, तर ते पौर्णिमेस करतात. उपाकर्माच्या वेळी वैदिक देवतांचे हवन करून बुद्धी व धारणा प्राप्त व्हावी म्हणून प्रार्थना करतात. त्याचबरोबर मंत्रद्रष्ट्या ऋषींनाही कृतज्ञतापूर्वक प्रणाम करतात. प्रत्येक शाखेचे उपाकर्म भिन्न असते. उत्सर्जनविधी हा उपाकर्माचे अधिवेशन संपण्याच्या वेळी करीत असत. उत्सर्जन झाले, की पाठशाळांना सुट्टी होत असे. पण सांप्रत हे दोनही विधी केवळ यांत्रिकच झाल्यामुळे श्रावणी करणारे लोक उत्सर्जन व उपाकर्म एकाच दिवशी करून मोकळे होतात. पाहा – उत्सर्जन; श्रावणी. [ प्रा. भा. शि. प.; हि. ध.; ऋ. ब्र. स. ]

**उपाख्यान** कोणत्याही मोठ्या कथानकात विशिष्ट प्रसंगाने समाविष्ट केलेली दुय्यम कथा म्हणजे उपाख्यान होय. ही कथा स्वयमेव परिपूर्ण असते व मुख्य कथेला उपोद्बलक म्हणून सांगितली जाते. सत्यवान-सावित्री, नल-दमयंती, इ. कथा ही महाभारतातली उपाख्यानेच होत.

**उपांगललिताव्रत** आश्विन शु. ५ मीच्या दिवशी हे व्रत करतात. हे काम्य व्रत असून, स्त्री-पुरुषांना करता येते. विशिष्ट कामनेने हे व्रत करतात. ललिता देवी ही या व्रताची देवता आहे. यात एखाद्या करंडकाचे झाकण तिचे प्रतीक म्हणून पूजेला घेतात. सकाळी आघाड्याच्या काडीने दंतधावन करतात. केळीचे खांब व पुष्पमाळा यांनी देवीसाठी मखर बांधतात. देवीचे ध्यान पुढील मंत्राने करतात–

**नीलकौशेयवसनां हेमाभां कमलासनाम् ।**
**भक्तानां वरदां नित्यं ललितां चिन्तयाम्यहम् ।।**

अर्थ – कमलावर अधिष्ठित, निळे, रेशमी वस्त्र परिधान करणारी, सुवर्णकांतीची, भक्तांना नित्य वर देणारी, अशा ललितेचे मी चिंतन करतो.

या पूजाविधानात पुष्पांजली समर्पण झाल्यावर गंधाक्षतायुक्त व साग्र अशा ४८ दूर्वा ललितेला वाहतात. नैवेद्यासाठी लाडू, वडे, घारगे वगैरे पदार्थ करतात. पूजेच्या अंती घारग्यांचे वायन देतात. रात्री जागरण व कथाश्रवण करतात. दुसऱ्या दिवशी देवीचे विसर्जन करतात.

**उद्यापनविधी** – या व्रताचे उद्यापन करण्यास एक आचार्य व इतर वीस ऋत्विज यांची आवश्यकता असते. या विधीत कलशावर ब्रह्मादी देवतांच्या पीठावर मध्यभागी ललितेची प्रतिमा ठेवतात. पूजा झाल्यावर उसाचे करवे, पांढरे तीळ व पायसान्न यांच्या १०८ आहुती देतात. वेळूच्या शिप्तरात २० घारगे ठेवून त्यांचे वायन देतात. ब्राह्मणभोजन घालून व्रताची सांगता करतात. या व्रताची कथा अशी–

प्राचीन काळी भृगुक्षेत्रात गौतम नावाचा एक ब्राह्मण राहत असे. त्याचा बंधुवर्ग मोठा होता. त्याला म्हातारपणी दोन पुत्र झाले. श्रीपती व गोपती अशी त्याने त्यांची नावे ठेवली. पुढे थोड्याच काळात तो निवर्तला. त्याची पत्नी सती गेली. त्यामुळे मुले उघडी पडली. त्यांच्या चुलत्याने सर्व धनदौलत बळकावून त्या मुलांना घरातून हाकलून दिले. ते देशोधडीस लागले. फिरत फिरत विशालनगरीस आले. विवेक नावाच्या ब्राह्मणाच्या दारी उभे राहिले. ब्राह्मणाने त्यांना घरात बोलावून त्यांची हकीकत ऐकली. मुले पोरकी आहेत, असे समजल्यावर त्यांना आपल्या घरी ठेवून घेतले. तिथेच ते मुलगे विद्या शिकू लागले.

पुढे आश्विन महिना आला. ब्राह्मणाने उपांगललितेचे व्रत केले. दोन्ही मुलांनी त्या व्रताचे विधान विचारून घेतले व आपणही ते आचरिले. त्या दोघांतला श्रीपती हा थोरला मुलगा होता. तो विद्वान झाल्याचे पाहून ब्राह्मणाने आपली गुणवती नामक कन्या त्याला दिली.

नंतर काही दिवसांनी श्रीपती व गोपती दोघेही आपल्या

गावी जाण्यास निघाले. गुणवतीही त्यांच्या समागमे होतीच.

एवढ्या अवधीत चुलत्याला आपल्या वर्तनाचा पश्चात्ताप झाला होता. त्यामुळे पुतण्ये परत आलेले पाहून तो आनंदित झाला. नंतर त्याने गोपतीचेही लग्न करून दिले; पण गोपती विषयलंपट निघाला. त्याने ललिताव्रत सोडून दिले. त्यामुळे त्याचे सर्व वैभव नष्ट होऊन ती नवराबायको अन्नान्नदशेला पोचली. श्रीपती मात्र नियमितपणे व्रत आचरीत होता. एके दिवशी श्रीपतीच्या घरी व्रतानिमित्त अन्नसंतर्पण चालू असता गोपती तिथे गेला; पण पंगती भरल्या असल्यामुळे त्याला जागा मिळाली नाही. तो मग पाकशाळेत जाऊन बसला व तिथेच भोजन मागू लागला; पण भावजयीने त्याला झिडकारून लावले.

मग गोपतीला आपली चूक कळून आली. आपण व्रत सोडले म्हणून आपली अशी दुर्दशा झाली, हे त्याला पटले. त्याने निर्धार केला, की आता तपश्चर्या करून ललितेची कृपा संपादन केल्याशिवाय परत यायचे नाही. म्हणून तो तिथून निघून अरण्यात गेला. भाऊ उपाशी परत गेल्याचे समजून श्रीपतीला दुःख झाले.

गोपतीने आपल्या निर्धाराप्रमाणे देवीच्या कृपेसाठी निराहार तप केले. देवीने त्याच्यावर अनुग्रह केला. मग तो तिथून पुढे निघाला. फिरत फिरत उपांगराजाच्या नगरीत पोचला. तिथे त्याला ललितेचे मंदिर दिसले. त्या मंदिरात त्याने वसती केली. रात्री त्याला देवीचा स्वप्नदृष्टान्त झाला. तदनुसार तो राजाकडे गेला. त्याने करंडकाचे झाकण देण्याविषयी राजाला प्रार्थिले. राजाने ते त्याला दिले. ते घेऊन तो घरी आला. त्याने पत्नीसह ललितेचे व्रत आचरिले. त्यामुळे त्याचे वैभव त्याला परत मिळाले. [ व्रतराज ]

**उपाध्याय** अध्यापक. 'उपाध्यायोऽध्यापकोऽथ' (अमर). मिताक्षरेत (१. ३५) याची व्याख्या दिली आहे, ती अशी –

**एकदेशं तु वेदस्य वेदाङ्गान्यपि वा पुनः ।**
**योऽध्यापयति वृत्त्यर्थमुपाध्यायः स उच्यते ।**

अर्थ – वेदांचा काही भाग किंवा वेदांगे यांचे उपजीविकेसाठी जो अध्यापन करतो, त्याला उपाध्याय असे म्हणतात.

महाराष्ट्रात धार्मिक विधीचे पौरोहित्य करणाऱ्यालाच उपाध्याय म्हणण्याची पद्धत आहे.

**उपाय** शत्रूला वश करून घेण्याचे मार्ग. हे साम, दान, भेद व दंड, असे चार आहे. 'सामदाने भेददण्डावित्युपायचतुष्टयम्' (अमर). यांत उपेक्षा, माया व इंद्रजाल अशा तीन अधिक उपायांची भर घातली, की ते सात होतात (मत्स्य पु. २२२.१–३). उपाययुक्त केलेली कर्मे फलद्रूप होतात.

**उपायेन हि यच्छक्यं न तच्छक्यं पराक्रमैः ।**

अर्थ – जे उपायाने शक्य होते, ते पराक्रमांनी सिद्ध होत नाही. [ श. क.; पु. इं. ]

**उपायकौशल** बौद्ध धर्मातला एक पारमिताग्रंथ. बौद्ध भिक्षु सर्वत्र संचार करून या पारमितेच्या द्वारे जनतेत बुद्धाचा संदेश व महायान पंथाचे सिद्धान्त यांचा प्रचार करीत होते. चैत्यनिर्माण, प्रतिमांकन, संगीत, इ. कलांचे विधानही याच ग्रंथात आहे. त्यानंतर पुढच्या काळात मिथुन-भावनेचा विकास झाला आणि उपायकौशल याचा, मुद्रामैथुनाची गुह्य साधना असा अर्थ झाला. [ हिं. सा. को. ]

**उपायप्रत्यय** उपाय = प्रज्ञा किंवा शुद्ध ज्ञान. बौद्धमते वास्तव समाधीत या शुद्ध ज्ञानाचा उदय होतो व त्यामुळे संस्कार जळून जातात. मग व्युत्थानाविषयी कसलीही आशंका राहत नाही. भवप्रत्ययाहून उपायप्रत्यय उच्च कोटीचा असतो. कारण त्यात वृत्तींच्या निरोधाबरोबर शुद्ध ज्ञानाचाही उदय होत असतो. [ बौ. द. मी. ]

**उपांशुसवनग्रावा** उपांशू म्हणजे मंत्रांनी गाळलेला सोमरस. हा सोम ज्या दगडांनी कुटायचा, त्याला उपांशुसवनग्रावा म्हणतात. हा दगड उपांशुपात्राला चिकटवून न ठेवल्यास यजमानाचे प्राणापान विछिन्न होतात, असे तै. संहितेत सांगितले आहे (६.४.६.). [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**उपांशू** मंत्रजपाची एक पद्धती. आश्व. सूत्रांत (१.१) वृत्तिकारांनी याची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे–

**शनैरुच्चारयेन्मन्त्रं मन्दमोष्ठौ प्रचालयेत् ।**
**अपरैरश्रुतः किञ्चित् स उपांशुर्जपः स्मृतः ॥**

अर्थ – नुसत्या ओठांच्या हालचालीने, दुसऱ्याला ऐकू न येईल, इतका हळू मंत्र जपणे याला उपांशू म्हणतात.

यज्ञकर्मांत काही देवतांचा याग उपांशू होत असतो.

**उपासना** उप + आस् = बसणे, प्रवेशणे, या धातूपासून हा शब्द बनला आहे. वरिवस्या, परिचर्या, शुश्रूषा असे उपासनेचे पर्याय शब्द अमरकोशात दिले आहेत. आपल्या इष्ट किंवा आराध्य देवतेच्या जवळ पोचणे, असा त्या शब्दाचा

भावार्थ आहे. उपासनेच्या द्वारे भक्त आपल्या इष्ट देवतेच्या जवळ पोचतो व त्याच्या कृपेने कृतार्थ होतो, असे सांगितले आहे. पुराणात भक्तीला उपासनेचा प्राण मानले असून, योगाला तिचे अंग मानले आहे. प्राणाविना जसे शरीर राहू शकत नाही, त्याचप्रमाणे भक्ती व योग यांच्यावाचून उपासना घडू शकत नाही. वैदिक किंवा अवैदिक कोणीही असोत; त्यांच्या उपासनेच्या तपशिलात फरक असला, तरी उपासना हे तत्त्व सर्वांनाच मान्य आणि स्वीकार्य आहे.

आपल्या शास्त्रकारांनी मोक्ष हे मानवाचे अंतिम ध्येय ठरविले आहे. मोक्ष म्हणजे दुःखाची आत्यंतिक निवृत्ती व निरतिशय आनंदाची नित्य प्राप्ती होय. प्रत्येक जीव हा तत्त्वतः परमात्मरूपच आहे. पण अज्ञानामुळे त्याला आत्मस्वरूपाची साक्षात अनुभूती घडत नाही. जिवाशिवांच्या ऐक्यानुभूतीत अज्ञान हे अंतराय निर्माण करते. म्हणून अज्ञान दूर करणे व त्यासाठी झटणे हे प्रत्येक मोक्षसाधकाचे आद्य कर्तव्य ठरते. या अज्ञानाच्या निरासासाठी शास्त्रकारांनी कर्म, उपासना व ज्ञान ही तीन श्रेष्ठ साधने सांगितली आहेत. शास्त्रविहित कर्मांनी चित्तशुद्धी होते, ते शुद्ध चित्त उपासनेने एकाग्र होते आणि पुढे तेच ज्ञानाने परब्रह्मात विलीन होते.

ईश्वर हा उपासनेचा श्रेष्ठ विषय होय. तो एकमेवाद्वितीय असून, अनेक देवदेवतांचा स्रष्टा, प्रभव, उद्भव व अधिप आहे. सर्व धर्मांत ईश्वर हाच उपासनेचा विषय मानलेला आहे. पण तो निर्गुण, निराकार असल्यामुळे प्रत्येक व्यक्ती आपल्या आवडीप्रमाणे एखाद्या सगुण, साकार रूपात त्याची उपासनेसाठी निवड करते. या सगुण, साकार ईश्वराला कार्यब्रह्म म्हणतात. कार्यब्रह्म हे परिच्छिन्न असते. त्याच्या ठिकाणी व्यापक व सच्चिदानंदरूप असे जे कारणब्रह्म अनुस्यूत असते, तेच वस्तुतः उपास्य होय. पण त्याची उपासना निरालंब अतएव दुर्घट असल्यामुळे सामान्य लोक उपासनेसाठी त्याच्या सगुण, साकार रूपाचेच ग्रहण करतात.

सकाम व निष्काम असे उपासनेचे मुख्य दोन भेद सांगितले आहेत. निष्काम उपासना केवळ मोक्षाच्या उद्देशाने केली जाते. सकाम उपासनेत विशिष्ट कामनेची पूर्ती अपेक्षित असते. बहुधा पुष्कळसे लोक सकाम उपासकच असतात. अशा उपासकांची सोय व्हावी म्हणून कोणत्या कामनेसाठी, कोणत्या देवाची, कशी उपासना करावी, हे पुराण व तंत्रग्रंथ यांत सांगितले आहे. हिला नैमित्तिक उपासना असेही म्हणतात. याव्यतिरिक्त संध्यावंदनादी नित्य उपासनाही शास्त्रकारांनी सांगितल्या आहेत. त्या निष्काम असतात व निष्कामपणेच आचरायच्या असतात.

उपासनेतील उपास्य हे आधिदैविक जगातील सूक्ष्म तत्त्व असते. आधिभौतिक नाम, रूप व कर्म यांचा आध्यात्मिकाशी सांधा जोडणे, हे त्याचे कार्य असते. सगुण उपासनेत उपास्य व उपासक हे शरीरी असतात. त्या उपासनेत देहबुद्धी जागृत असते. हळूहळू ती क्षीण होत जाऊन त्या ठिकाणी ब्रह्मात्मैक्यबुद्धी स्थापित होणे, ही उपासनेची परिणती समजावी.

उपासनेत ईश्वराचे सगुण रूप श्रद्धेने गृहीत केलेले असते. त्यावाचून उपासना संभवणारच नाही. हीच श्रद्धा पुढे अनुभवाने दृढ होत जाते. निर्गुण निराकार परब्रह्माचीही उपासना करणे शक्य आहे; पण सामान्य साधकाला तो मार्ग कष्टप्रद ठरतो. ज्यांचे चित्त अव्यक्ताच्या ठिकाणी आसक्त आहे, अर्थात जे अव्यक्तोपासक आहेत त्यांना क्लेश अधिक पडतात; कारण व्यक्त देहधारी माणसांना अव्यक्तोपासनेचा मार्ग कष्टानेच सिद्ध होणारा आहे, असे गीतेत सांगितले आहे (१२.६).

पूजा, नामजप आणि ध्यान हे उपासनेचे मुख्य प्रकार आहेत. उपास्याच्या मूर्तीची मानसपूजा हीसुद्धा उपासनेतच मोडते. याशिवाय नवविधा भक्ती, निष्काम कर्मयोग, लोकसेवा, शास्त्रसेवा, राजयोग, तांत्रिक अनुष्ठाने, इ. सर्व गोष्टींना व्यापक अर्थाने उपासनाच म्हटलेले आहे.

भारतात वेदकालापासून-किंबहुना त्याच्याही पूर्वीपासून उपासनामार्ग उपलब्ध आहे. वैदिक धर्मावर त्या पूर्वीच्या अवैदिक संप्रदायांचा परिणाम घडला असल्याचे तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी सांगतात. कर्म, उपासना व ज्ञान ही कांडत्रयी वैदिक वाङ्मयात आणि गीतेतही मानलेली आहे. उपासनेत कर्म आणि ज्ञान या दोहोंचाही अंशतः अंतर्भाव आवश्यक असतो. उपनिषदांतील दहरोपासना, प्रणवोपासना, इ. उपासनांनी उपासकाने ब्रह्मपदी आरोहण करणे किंवा ईश्वराला प्रतिमाप्रतीकादिकांत आवाहन करून त्याचे स्वतःपुढे अवतरण करणे, अशा दोन प्रक्रिया उपासनेत असतात. पहिल्या प्रकारात ध्यानधारणेला महत्त्व असते; तर दुसऱ्या प्रकारात मूर्तिपूजेला महत्त्व असते. सगुणोपासकाला त्याच्या उपासनेत मूर्तिपूजा हे बहिरंगसाधन व श्रद्धा हे अंतरंगसाधन अशी दोन साधने आवश्यक असतात. भारतात मूर्तिपूजा हीसुद्धा प्राचीन आहे. यजुर्वेद, अथर्ववेद व शतपथब्राह्मण यांत तिचा आढळ होतो. शैव, शाक्त, वैष्णव, सौर व गाणपत्य, या पंचोपासकांची निरनिराळी तंत्रे असून, त्यांत त्या त्या मूर्तींचे वर्णन उपास्य म्हणून तपशिलवार केलेले असते. सगुणोपासकाला ध्यानासाठी अशी एखादी मूर्ती आवश्यकच असते. ती जड असली, तरी श्रद्धापूर्वक केलेल्या ध्यानाने उपासकाला तिच्या ठिकाणी हास्य, प्रसन्नता, इ. अनेक चैतन्यभाव प्रतीत होतात. इतकेच नव्हे; तर त्या मूर्तीकडून

उपासकाला मंत्रोपदेशही होऊ शकतो, अशा गोष्टी तुकाराम, रामकृष्ण परमहंस, इ. संत–भक्तांच्या चरित्रांत आढळून येतात.

मानवाची ज्ञानेंद्रिये स्वभावतःच बहिर्मुख असल्यामुळे उपासकाने प्रपंचाप्रमाणेच परमार्थातही बहिर्मुख असणे, म्हणजे त्याचे बाह्यार्थाकडे लक्ष वेधलेले असणे हे स्वाभाविकच आहे. बहिर्मुखतेत विषय-विषयीभावांचे द्वैत गृहीत धरावे लागते. उपासना या कर्मात उपासक हा विषयी असतो; तर परमात्मा हा त्याचा विषय असतो. परमात्मा हा उपासकाच्या देहासकट सर्व ब्रह्मांडात ओतप्रोत भरलेला आहे, असे वेदान्तशास्त्रात सांगितले आहे; पण मायेच्या आच्छादनामुळे साधकाला त्याचा अपरोक्ष अनुभव होणे कठीण पडते. पण तरीही त्याने मूर्ती किंवा प्रतीक यांच्या ठिकाणी परोक्षतेने तशी भावना करायची असते. यालाच उपासनाकर्म असे म्हणतात.

उपासनेस योग्य प्रतिमा–प्रतीकांची संवादी अशी आलंबने शास्त्रात अनेक प्रकारची सांगितली आहेत. साधकांनी त्या साधनांच्या द्वारे इष्ट देवतेची उपासना करायची असते. या प्रतिमा–प्रतीकांत काही चिद्रूप, तर काही जडरूप असतात. काही दृश्य, तर काही मनोवेद्य असतात. जीवमात्राची आपल्या मूळ कारणाकडे, म्हणजेच परमात्मरूपाकडे कळत वा न कळत पण स्वाभाविक ओढ असते. देहोपाधीत अडकलेला जीव, मनाच्या द्वारे बाहेर पडू पाहतो व आपल्याहून जे श्रेष्ठ, समर्थ किंवा लोभनीय असेल, त्याची उपासना करू लागतो. रम्य व दिव्य विषयांचे आकर्षण, संतांविषयी आदर, पूज्य विभूतींविषयी श्रद्धा, ईश्वराच्या सगुण–साकार मूर्तीविषयी प्रेम, निर्गुण-निराकाराकडे ओढ, विश्वी विश्वरूप परमेश्वराचा साक्षात्कार, ब्रह्मात्मैक्याची अपरोक्षानुभूती व सायुज्यतेच्या अखंडानंदाचा अनुभव, अशा उपासनेच्या एकाहून एक वरचढ पायऱ्या आहेत.

**बहिरंग उपासना** – बाह्य विषयभूत उपास्यांच्या बहिरंगोपासनेचे पुढील चार प्रकार शिवगीतेत सांगितले आहेत –

(१) संपत – अल्प वस्तूच्या ठिकाणी अनंत गुणांची भावना करणे. उदा० अन्न, प्राण, मन हेच ब्रह्म होय, अशी भावना अजाणता म्हणजे स्वतःला ब्रह्मज्ञान झाले नसताही करणे, हा संपद्विधी होय.

(२) आरोप – उपास्याच्या एकदेशावर अथवा एका अंशावर किंवा त्याच्या प्रतिमादिकांवर सर्व उपास्य तत्त्वाचा आरोप करून त्याची उपासना करणे. उदा० शिव, विष्णू, राम, कृष्ण यांच्या प्रतिमांवर त्या देवांची भावना करणे. याला आरोपविधी म्हणतात.

(३) संवर्ग – कर्मकांडातल्या अनेक देवतांची एका अग्नीच्या ठिकाणी धारणा करून उपासना करणे. हा संवर्गविधी होय.

(४) अध्यास – कोणत्याही प्रकारचे सारूप्य अथवा साधर्म्य नसता एखाद्या वस्तूवर उपास्याचा आरोप करणे. उदा० शाळिग्रामावर विष्णूच्या आणि बाणलिंगावर शिवाच्या देहाकाराची धारणा करणे. याला अध्यासविधी म्हणतात.

वरीलप्रमाणे उपास्य देवतेची ध्यान–धारणा करीत असता प्रथम त्या उपासनेत इतर विजातीय विषय विघ्ने आणतात. पण त्यांमुळे चित्त विचलित होऊ न देता उपासकाने आपली साधना अखंड चालू ठेवायची असते. म्हणजे पुढे पुढे क्रमाने त्याला उपास्य देव व उपासक आपण, यांच्यामध्ये तादात्म्य भावनेचा अनुभव येऊ लागतो (शिवगीता १२.१०–१६).

**अंतरंग उपासना** – ही बहिरंगोपासनेपेक्षा श्रेष्ठ मानलेली आहे. या उपासनेत व्यक्त व ज्ञात अशा नाम-रूपांच्या मागे त्यांना अधिष्ठानरूप असणाऱ्या अव्यक्त व अज्ञात अशा सूक्ष्म तत्त्वांचे चिंतन, मनन व निदिध्यासन अभिप्रेत असते. या उपासनेत ध्यानशक्तीच्या द्वारे ध्याता व ध्येय, विषय व विषयी या दोहोंतले द्वैत व अंतर हळूहळू नाहीसे होते व अखेर ध्याता, ध्यान, ध्येय ही त्रिपुटी मावळून शुद्ध निर्विशेष अखंडानंदरूप ज्ञान तेवढे शिल्लक उरते. तेच ब्रह्मात्मैक्यस्वरूप होय.

प्रत्येक मनुष्याची प्रकृती सत्त्व, रज, तम या त्रिगुणांमुळे व त्यांच्या मिश्रणामुळे भिन्न भिन्न प्रकारची बनत असते. प्रकृतिभेदानुसार त्या त्या माणसाचा आहार, व्यवहार व उपासना याही भिन्न होत असतात. म्हणून शास्त्रांत उत्तम, मध्यम व निकृष्ट अशा अधिकारी भेदाने उपासनेचेही तीन भेद सांगितले आहेत. श्रीमद्भगवद्गीतेत (१७.४) म्हटले आहे –

यजन्ते सात्त्विका देवान् यक्षरक्षांसि राजसाः ।
प्रेतान् भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ॥

अर्थ – सात्त्विक पुरुष देवांचे यजन करतात. राजस पुरुष यक्ष-राक्षसांचे व त्याहून अन्य म्हणजे तामस पुरुष भूत-प्रेतांचे यजन करतात.

याव्यतिरिक्त उपासनेचे आणखीही पाच प्रकार सांगितलेले आहेत, ते असे –

(१) आसुरी उपासना – क्षुद्र देवता, ग्रामदेवता, यक्ष-गंधर्व, राक्षस आणि भूत-प्रेत यांच्या उपासनेला आसुरी उपासना म्हणतात.

(२) देव-ऋषि-पितरांची उपासना – अष्ट वसू, द्वादशादित्य, एकादश रुद्र, इंद्र व प्रजापती या ३३ मूल देवता मानलेल्या आहेत. यांव्यतिरिक्त नैमित्तिक देवता ३३ कोटी म्हणजे पर्यायाने असंख्य आहेत. ऋषींच्या सात श्रेणी आहेत – ब्रह्मर्षी, देवर्षी, महर्षी, परमर्षी, काण्डर्षी, श्रुतर्षी व राजर्षी. यांच्या

द्वारे जगात वेदादी ग्रंथांच्या ज्ञानाचा विस्तार झाला. मार्कंडेय पुराणान्वये पितरांची संख्या ३१ आहे. याशिवाय पितृपितामहादी हे नैमित्तिक पितर होत. यांच्या उपासनेचे विविध प्रकार शास्त्रात सांगितले आहेत, ते असे –

(३) **अवतारोपासना** – नवविधा भक्तीच्या द्वारे अवतारांची उपासना होते. भक्ती निष्काम असेल, तर कैवल्यप्राप्ती होते व सकाम असेल तर यथाधिकार सालोक्य, सामीप्य, इ. चतुर्विध मुक्तीचा लाभ होतो.

(४) **पंचसगुणब्रह्मोपासना** – विष्णू, शिव, देवी, सूर्य व गणपती या पाच देवतांच्या उपासनेला पंचसगुणब्रह्मोपासना असे म्हणतात. त्यांची त्यांची प्रतीके किंवा मूर्ती यांची पूजा व ध्यान–धारणा यांच्या द्वारे या देवांची उपासना केली जाते.

(५) **निर्गुणब्रह्मोपासना** – गुणरहित ईश्वराच्या उपासनेला निर्गुणब्रह्मोपासना म्हणतात. ही उपासना प्रणवाच्या ध्यानाच्या द्वारे केली जाते. ओंकाराला निर्गुण परब्रह्माचा वाचक म्हटले असून, ते एकाक्षरब्रह्म आहे, असेही म्हटले आहे. (गीता ८.१३). ईश्वराचा देह अदृश्य असतो. तो भावग्राह्य व मनोमय असतो. ओंकार हेच त्याचे नाम–रूप होय. त्याच्या द्वारे आवाहन केल्याने तो प्रसन्न होतो. [ शिवलिंगोपासना; पु. त. मी. ]

**उपासनी महाराज** (इ. स. १८७०–१९४१) एक सत्पुरुष. पूर्वाश्रमी हे एक सर्वसामान्य संसारी गृहस्थ होते. यांनी अनेक विवाह केले; पण त्यांच्या सर्व बायका एकामागून एक निवर्तल्या. पुढे अमरावतीला ते वैद्यकी करू लागले. नंतर नागपुरात नारायणमहाराजांची व त्यांची गाठ पडली. नारायणमहाराजांनी त्यांचे अध्यात्मिक सामर्थ्य ओळखून आपल्या गळ्यातील माळ त्यांच्या गळ्यात घातली. इ. स. १९११ साली त्यांना साईबाबांचे दर्शन घडले व बाबांच्या आदेशावरून ते शिर्डीला राहू लागले. त्यांची वागण्याची तऱ्हा अजब होती. प्रथमच त्यांची श्रीमेहेरबाबांशी भेट झाली तेव्हा त्यांनी मेहेरबाबांना दगड मारून देहाच्या अस्तित्वाची जाणीव करून दिली. इ. स. १९१५ साली ते खरगपूरला राहायला गेले. तिथे ते हरिजनांत राहत असत. त्या भागात त्यांना अवलिया म्हणून ओळखीत. पुढे ते साकोरीला आले व पिंजऱ्यात राहू लागले. इ. स. १९४१ साली तिथेच ते समाधिस्थ झाले. [ श्री. देशमुख – से. सें. ]

**उपेंद्र** उप + इंद्र = इंद्राचा धाकटा भाऊ. 'उपेन्द्र इंद्रावरज:'(अमर). याचा जन्म अदिती व कश्यप यांच्या पासून झाला. यालाच वामन असेही म्हणतात (भागपु. १०.३.४२; वायुपु. ९८.८४; ब्रह्मांड पु. ३.२१.५९). सर्व लोकांचा अधिपती म्हणून त्याला देवांनी अभिषेक केला. त्याने आपला थोरला बंधू इंद्र याला राज्यकारभार करण्यास मदत केली (भागपु. ८.२३.२३–२५) पाहा–वामन. [ पु. इं. ]

**उपोषण** व्रत किंवा तप याच्यासाठी केला जाणारा विशिष्ट कालावधीचा अन्नत्याग. शारीरिक आरोग्यासाठीही उपोषणाचा अवलंब करतात. काही दिवस अन्न वर्ज्य केल्यास माणसाची भूक वाढते व तन-मनाला काटकपणाही प्राप्त होतो. उपोषण ही धार्मिक आचारातली एक शिस्त आहे. तो एक मन:शुद्धीचाही उपाय आहे. उपोषणाने धार्मिक कृत्यांना अधिक पावित्र्य व सामर्थ्य येते, असे समजतात. जैन धर्मात आत्मिक उन्नतीसाठी दीर्घ उपोषण करण्याची प्रथा आहे. त्यांच्यांतले कित्येक मुनी प्रायोपवेशनाने देहत्यागही करतात. पापांचे परिमार्जन व्हावे आणि परमेश्वराने त्याबद्दल क्षमा करावी, म्हणूनही उपोषण केले जाते. राजकारणातील उद्दिष्टे सिद्ध होण्यासाठी उपोषण (किंवा प्रायोपवेशन) करण्याची पद्धत म. गांधींनी सुरू केली आणि ती सांप्रतही चालू आहे. यहुदी, ख्रिस्ती व इस्लाम या तीन्ही धर्मांत उपोषणाचे विशिष्ट दिवस ठरवून दिलेले आहेत. पाहा – उपवास. [ एन्सा. रि. ]

**उपोसथ** बौद्धांची पाक्षिक सभा. उपोसथाचे मूळ वैदिक धर्मात आढळते. महिन्यातले पौर्णिमा व अमावास्या हे दोन पर्व दिवस वैदिक लोक विशेष पवित्र मानीत. या दिवसांना उपवसथ असे नाव दिलेले आढळते. बौद्धांनीही त्यांचेच अनुकरण केले. सुरवातीस वरील दोनच दिवस उपोसथाचे मानले जात; पण पुढे दोन्ही पक्षांतील अष्टमी या तिथीही उपोसथाला उक्त ठरल्या. अशा प्रकारे उपोसथाचे चार दिवस झाले.

उपोसथाच्या दिवशी विहाराच्या सीमेच्या आत राहणाऱ्या सर्व बौद्ध भिक्षूंना एकत्र जमावे लागे. या सभेत प्रत्येक भिक्षूला आपल्या हातून घडलेल्या दोषांचा स्वमुखाने उच्चार करून त्याबद्दल प्रायश्चित्त घ्यावे लागे. सभेचा अध्यक्ष पातिमोक्ष सुत्ताचे पठण करून त्यात दिलेल्या १५० नियमांचा ज्याच्याकडून भंग झाला असेल, त्याने तशी कबुली द्यावी, अशी आज्ञा करी. भिक्षूचा अपराध सौम्य किंवा क्षुल्लक असेल, तर केवळ त्याच्या उच्चाराने त्याला दोषमुक्त ठरवीत. अपराध गंभीर असेल, तर त्याला सभेतून बाहेर जावे लागे व भिक्षुसमितीने सांगितलेले प्रायश्चित्त करून शुद्ध व्हावे लागे.

उपोसथाचे चार दिवस पाठशाळांना सुट्टी असे. त्या काळात

बौद्ध भिक्षू शुभ्र वस्त्रे परिधान करीत. अहिंसा, सत्यादी नियमांचे पालन करणे, वाईट फळे न खाणे, अभ्यंग न करणे, चटईवर निजणे इ. नीतिधर्मांचे पालन या चार दिवसात त्यांना कठोरपणे करावे लागे. या उपोसथव्रताचा प्रारंभ बिंबिसार राजाच्या सूचनेवरून झाला, असे सांगतात. पाहा – उपवसथ. [ उ. प्र. बौ. वि. ]

**उप्पर** एक जात. उप्पर, उप्पार किंवा उप्पलिगर ही एकाच जातीची नावे आहेत. या जातीचे बरेचसे लोक म्हैसूर नजीकच्या जिल्ह्यांतून राहतात. कन्नड भाषेत मिठाला उप्पू म्हणतात. हे लोक पूर्वी मीठ पिकविण्याचा धंदा करीत म्हणून यांना उप्पर हे नाव पडले. पण सांप्रत ते मिठाचा धंदा सोडून विहिरी-तलाव खोदणे, विटा पाडणे, घरे बांधणे, शेतीला पाणीपुरवठा करणे, इ. कामे करतात. देशपरत्वे ते कन्नड, तेलुगू व तमिळ भाषा बोलतात. यांच्या चेहरेपट्टीवरून व चालीरीतीवरून यांचे ओड्ड जातीशी साम्य दिसते.

यांचे अनेक पोटभेद आहेत. ज्यांच्यांत परस्पर बेटीव्यवहार होत नाही, अशा समुच्चयास बेडगू अर्थात कुल म्हणतात. बेडगूंची नावे वृक्षांवरून किंवा प्राण्यांवरून पडलेली असतात. म्हणजे त्या त्या कुलाचा एखादा पूज्य वृक्ष किंवा प्राणी असतो. ज्याच्यावरून नाव पडले, तो वृक्ष वा प्राणी त्या कुलातल्या लोकांनी मारता कामा नये, असा निर्बंध असतो.

**विवाहप्रथा** – मुलींची लग्ने प्रौढपणी करतात. मुलाला आतेबहिणीशी लग्न करण्याचा हक्क असतो. या बाबतीतली चाल चमत्कारिक आहे. मुलगा जन्माला येण्यापूर्वीच त्याचा विवाह जन्माला न आलेल्या आतेबहिणीशी ठरतो. मात्र लग्नाच्या वेळी नियोजित वराशी लग्न करण्याविषयी त्या वधूवर सक्ती होऊ नये म्हणून अनेक वेळा तिची संमती विचारतात. वधूपिता मुलीचे देज घेतो. ती रक्कम बारा रुपयांपासून तो तीस रुपयांपर्यंत असते. वर वधूच्या मनगटाला रेशमी दोऱ्याचे कंकण बांधतो. मुलीचा विवाह ऋतुप्राप्तीपूर्वी होत असेल, तर वराने वधूच्या डोळ्याला डोळा भिडवायचा नसतो. ऋतुप्राप्ती झाल्यावर मग नवरा मुलगा एक मेंढा व शाकभाजी घेऊन वधूच्या घरी जातो. तिथे मेंढ्याचे शिर तोडून वराचा मेहुणा त्या मेंढ्याच्या रक्ताचा टिळा वराच्या कपाळी लावतो. नवरा मुलगा दूध–केळे तोंडात घेऊन त्याची चूळ पडद्यामागे उभ्या असलेल्या वधूच्या अंगावर टाकतो. विवाहापूर्वी वधूला रजोदर्शन झाले असेल, तर लग्नाच्या दिवशी तिला लाकडाच्या सात वाटोळ्या कड्यांमधून जावे लागते. लग्नापूर्वी मुलाने श्मश्रू करता कामा नये. केल्यास जन्मभर त्याला श्मश्रू न करता राहावे लागते. कानडी उप्परांत नवरा मुलगा श्मश्रू केल्यावर स्नान करून जानवे घालतो, मात्र ते जानवे सुताचे नसून पितळी तारांचे व दुहेरी असते. ते फक्त पाच दिवस अंगावर ठेवायचे असते. यांच्यांत घटस्फोटाची चाल आहे.

**देव-धर्म** – यांच्यात शैव, वैष्णव हे दोन्ही पंथ आहेत. वैष्णव चेन्नकेशवाला भजतात व तिरुपती, कादरी, नंजनगुड, इ. वैष्णव क्षेत्रांच्या यात्रा करतात. शैवपंथी शिवाला भजतात. सुंकलम्म, जंबुलम्म, येल्लम, दुर्गम्म, तिम्मप्प, या यांच्या ग्रामदेवता होत.

**पंचायत** – यांच्यांत पंचायतीची पद्धत आहे. न्यायदान पंचायतीमार्फतच होते. जातीत एखाद्याने गुन्हा केला असे समजले, की पंचायत भरते. प्रथम कुलदेवतेची पूजा होते. मग गुन्हा करणाऱ्या आरोपीला पुढे उभा करून साक्षीपुरावा घेतात. गुन्हा शाबीत ठरल्यास आरोपीला बहिष्कार, दंड किंवा ज्ञातिभोजन अशी शिक्षा देतात. तो निर्दोषी ठरल्यास त्याला जलकलशाला स्पर्श करायला लावतात. ज्या घरात गुन्हा घडला असेल, त्या घराची शुद्धी करतात. व्यभिचार करणाऱ्या स्त्रीच्या केसांची एक बट कापतात, तिला गार पाण्याने स्नान घालतात व शेणपाणी प्यायला देतात. नंतर तिला देवळात नेऊन पुजाऱ्याकरवी तिच्या मस्तकावर तीर्थ शिंपडतात व तिच्या घरच्या माणसांकडून दंड घेतात. व्यभिचारी पुरुषाच्या एका बाजूची मिशी व भुवईचे केस काढतात. डोक्यावरच्या केसांचे तीन पाट काढतात. सात लहान मांडव तयार करून त्यांना आग लावतात; व त्या सातही जळत्या मांडवांखालून त्याला जावयला लावतात. मग देवळात नेऊन तीर्थजलाने शुद्ध करतात.

**मर्तिक प्रथा**– प्रेते पुरतात किंवा जाळतात. सुतक १६ दिवस पाळतात. विधवा स्त्री पतिमरणानंतर ताळी (मंगळसूत्र) तोडून टाकीत नाही. ती आपोआप तुटेपर्यंत गळ्यात ठेवते. मृताला तेल लावून स्नान घालतात व फुलांच्या माळाही घालतात. प्रेत पुरायचे असेल, तर खड्डा खणण्यासाठी मृताचा पुत्र पहिली कुदळ मारतो. सोळाव्या दिवशी एका विशिष्ट झुडपाचा चीक काढून तो त्या झुडपावरच ओततात. तसे करताना मृताला उद्देशून 'स्वर्गाला जा; कैलासाच्या मार्गाने जा,' असे म्हणतात. मृतांचे चांदीचे मुखवटे करून ते घरात ठेवतात व वैशाखात त्यांची पूजा करतात. श्राद्ध करीत नाहीत; पण सर्वपित्री अमावास्येच्या दिवशी कलशाची पूजा करून पितरांच्या नावाने ब्राह्मणाला किंवा जंगमाला शिधा देतात. [ का. द्रा. स. इं. ]

**उभयतोमुखी धेनुदान** गाय प्रसूत होत असता फक्त वत्साचे मुख तेवढे बाहेर येऊन

बाकीचा सर्व भाग गर्भात असतो, अशा वेळी तिला उभयतोमुखी म्हणतात. ही धेनू पर्वतवनराजीसह पृथ्वीचे प्रतीक असते तिला त्या अवस्थेत असताना प्रदक्षिणा केल्याने पृथ्वीप्रदक्षिणेचे पुण्य मिळते, असे मानतात. गौतमाने अहल्येच्या प्राप्तीसाठी अशीच प्रदक्षिणा घातली होती. अशा धेनूचे दान पृथ्वीदानाच्या योग्यतेचे समजतात. त्या वेळी तिला वस्त्रालंकारांनी भूषवून तिची पूजा करावी व सत्त्वशील ब्राह्मणाला तिचे दान करावे, असे सांगितले आहे. याचा विधी असा – दानकर्ता ब्राह्मणाला बोलावून आणून यथाविधी संकल्प करतो. एका कांस्यपात्रात घृत व तिल भरून त्यात त्या धेनूचे पुच्छ बुडवून ते पुच्छ त्या पात्रासह ब्राह्मणाच्या हाती देतो. त्या वेळी तो पुढील मंत्र म्हणतो –

**इमां गृहाणोभयमुखीं भवांस्त्राता ममास्तु वै ।**
**मम वंशविशुद्धेश्च सदा स्वस्तिकरो भव ।।**

अर्थ – (हे ब्राह्मणा), या उभयतोमुखी धेनूचे दान घेऊन तू माझा रक्षणकर्ता हो. तू माझ्या वंशशुद्धीला कारण होऊन सार्वकाल स्वस्तिप्रद हो.

मग दान ग्रहण करणारा ब्राह्मण 'स्वस्ति' म्हणून धेनूचे ग्रहण करतो व उजव्या हाताने वत्साला धेनूच्या गर्भातून बाहेर ओढून काढतो. वत्स बाहेर आल्यावर त्या दानाची सांगता व्हावी म्हणून दानकर्ता यथाविधि हवन करतो. देव, पितर, इत्यादींचे तर्पण करतो. ब्राह्मण गायीला घेऊन स्वगृही जात असता तिच्या मागून थोडे अंतर चालून जातो. मग पायसान्नाने वारा ब्राह्मणांना भोजन घालतो.

अशा धेनूचे दान घेतल्याबद्दल दान घेणारा ब्राह्मण कृच्छ्रत्रय प्रायश्चित करतो. [ दा. चं. ]

**उभय द्वादशी** एक तिथिव्रत. व्रतारंभ मार्गशीर्ष कृ. द्वादशीला होतो. प्रत्येक द्वादशीला विष्णूच्या केशव, नारायणादी एकेका रूपाची पूजा करतात. याप्रमाणे वर्षभरात चोवीस रूपांची पूजा होते. फल – विष्णुलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

**उभय नवमी** एक तिथिव्रत. पौष मासातल्या शुक्ल-कृष्ण नवमीला उपवास व भगवतीची त्रिकाल पूजा. देवीची मूर्ती पिठाची करतात. ती चतुर्भुज व शूलधारिणी करावी, असे सांगितले आहे. तिला धृताचे स्नान घालतात. खीर-भाताचा नैवेद्य दाखवितात. कुमारीला भोजन घालतात. अशा प्रकारे प्रत्येक महिन्याच्या उभय नवमीना दुर्गेची विविध रूपे बनवून पूजा करतात. फल – दुर्गापुरनिवास. [ कृ. क. त. ]

**उभय सप्तमी** सूर्यव्रत. पौष शुद्ध आणि वद्य सप्तमीला उपवास व त्रिकाल सूर्यपूजा. सूर्याला क्षारसिद्ध ( तळणीत थोडे मीठ टाकणे ) मोदकांचा नैवेद्य. फल – सर्व कामसिद्धी [ व्रतपरिचय ]

**उभयैकादशी** एक तिथिव्रत. मार्गशीर्ष शु. एकादशीला आरंभ. व्रतावधी एक वर्ष. वद्य पक्षातील एकादशीला विष्णूची केशव, नारायणादी नावांनी व शुक्ल पक्षांतील एकादशीला कृष्णाच्या इतर नावांनी पूजा करतात. गुर्जर लोक हिला फक्त उभया असे म्हणतात. फल – विष्णुलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

**उभी चोथ** चंद्रपूजा पाहा.

**उमा** हिमालयाची कन्या पार्वती, हिचे एक सौम्य रूप. या शब्दाची व्युत्पत्ती पुढीलप्रमाणे – 'उं शिवं माति मिमीते वा' = उ म्हणजे शिव, त्याला मापते, मोजते ती उमा. (श. क.) दुसरी व्युत्पत्ती अशी –

**यतो हि तपसे पुत्रि वनं गन्तु च मेनका ।**
**उमेति तेन सोमेति नाम प्राप तदा सती ।।**

(कालिकापु. ४२)

अर्थ – तपासाठी वनात जाऊ इच्छिणाऱ्या मुलीला मेनकेने 'हे उ (= मुली) मा (तपाला ला जाऊ नको)' म्हणून निषेध केला. त्यामुळे तिला उमा हे नाव मिळाले.

कालिदासानेही उमा शब्दाची अशीच व्याख्या कुमारसंभवात दिली आहे (१.२६).

हिचा प्रथम उल्लेख केनोपनिषदात सापडतो. ही एक शक्तिदेवताही आहे. कुटुंब सुखी राहावे म्हणून हिची पूजा करतात (भाग. पु २. ३. ७). ही सोमवल्लीची अधिदेवता आहे (मत्स्य. पु. ८४. ९) उमा मुळात गोरी होती; पण निशा देवीने तिला स्पर्श केला आणि ती काळी झाली. त्यामुळे शिवाला ती आवडेनाशी झाली. त्यातून दोघांत वितुष्ट आले. उमेने पुनश्च गोरी होण्याचा निर्धार केला व ती तपस्येसाठी निघून गेली. कालांतराने तिला मूळचा वर्ण पुन्हा प्राप्त झाला (मत्स्यपु. १५५–५८). उमा ही पूर्वजन्मातली दक्षकन्या सती होय. उमेच्या रूपात अनेक देवतांचे गुणधर्म एकत्र आले आहेत.

उमा व शिव यांचा एकान्त चालू असता अग्नी पोपटाच्या रूपाने तिथे प्रवेशला. ते पाहून उमा शय्येवरून दूर झाली. शिवाने आपले स्खलित वीर्य अग्नीला प्राशन करायला सांगि-

तले. अग्नीने तसे केले. अवशिष्ट उरले त्याचे एक तळे बनले. त्यात सहा कृत्तिकांनी स्नान केले. त्यांच्या आशीर्वादाने उमा गर्भवती झाली आणि तिच्या डाव्या कुशीतून सुब्रह्मण्य जन्माला आला (वायु. पु. ७२).

उमेची तांत्रिक पद्धतीने उपासना केली जाते. तिचे तांत्रिक रूपध्यान पुढीलप्रमाणे आहे. –

सुवर्णसदृशीं गौरीं भुजद्वयसमन्विताम्।
नीलारविन्दं वामेन पाणिना बिभ्रतीं सदा ।।
शुक्लं तु चामरं धृत्वा भर्गस्याङ्केऽथ दक्षिणे ।
(कालिकापु. ६१. ४३–४४)

अर्थ – सुवर्णप्रमाणे कांती, दोन भुजा, उजव्या हाती नील-कमल, डाव्या हाती शुभ्र चामर, अशी ही उमा, शंकराच्या उजव्या मांडीवर बसलेली असते.

तांत्रिक उपासनेत उमेबरोबर तिच्या सख्या जया, विजया, मातंगी, ललिता, नारायणी, सावित्री, स्वाहा व स्वधा यांचीही पूजा करायची असते. पाहा – पार्वती. [ पु. इं.; श्री. बारुआ – पी. के गो. को.; क्रि. स्ट. ले. उ. ]

**उमाकेरळम** मल्याळम भाषेतले एक महाकाव्य. महाकवी उळ्ळूर परमेश्वर अय्यर हा याचा कर्ता होय. तिरुवितांकुर राज्यातल्या वेणाट्टू या भागावर १७ व्या शतकात आदित्यवर्मा नावाचा एक दुर्बल राजा राज्य करीत होता. त्या राज्यात घडलेल्या काही सत्य घटनांच्या पार्श्व-भूमीवर या महाकाव्याची रचना झाली आहे –

आदित्यवर्म्याने आठ ब्राह्मण व आठ गृहाधिपती अशा सोळा लोकांचे सल्लागार मंडळ बनविले होते. राजाची दुर्ब-लता पाहून त्या सल्लागारांनीच त्याचा घात करण्याचे कार-स्थान रचले. रविवर्मा तंपान हा राजाचा मुख्य व विश्वासू प्रधान होता. राजकन्या कल्याणी हिच्याशी त्याचे लग्नही ठरले होते. एक दिवस एका गृहाधिपतीने राजमहालाला आग लावली व तो आरोप तंपानवर घातला. राजाला तंपानचा राग आला व त्याने वस्तुस्थितीचा काहीही विचार न करता त्याला राज्यातून हद्दपार केले. राजाच्या अंतःशत्रूंना तेच हवे होते.

थोड्याच दिवसांत त्या लोकांनी राजाला विष घालून ठार मारले. राज्याला कोणी पुरुष वारस नसल्यामुळे राजाची वहीण उमयम्मराणी हिला राज्याची जबाबदारी स्वीकारावी लागली. पण शत्रूंनी तिचाही पिच्छा पुरविला. त्यांनी तिच्या सहा पुत्रां-पैकी पाचांना तलावांत बुडवून मारले. सुदैवाने थोरला मुलगा तेवढा वाचला. राजाचे वैरी एवढेच करून थांबले नाहीत. त्यांच्यांतल्या एकाने राजकन्या कल्याणी हिचेही अपहरण केले. पुढे एका मोगल सरदाराने त्याला ठार करून कल्याणीला आपल्या ताब्यात घेतले आणि राज्यातली ती अंदाधुंदी पाहून तिरुवितांकुरवर मोठ्या सैन्यानिशी धाड घातली.

उमयम्मराणी अशा सर्व बाजूंनी संकटात सापडली. तिने रविवर्मा तंपानचा शोध करून त्याला राज्यरक्षणासाठी बोला-विले. तो आला आणि त्याने कोट्टयमच्या केरळवर्मा या राजाची मदत घेऊन मोगल सरदाराशी युद्ध पुकारले. मोगल सरदार पराभूत होऊन पळाला. जाता जाता त्याने कल्याणीवर बलात्काराचा प्रसंग आणला. पण तिने मोठ्या धैर्याने त्या मोगल सरदाराचा प्राण घेतला व आपले शील अभंग राखले. अशा रीतीने राज्यावरचे संकट टळल्यावर मग कल्याणी व रविवर्मा तंपान याचे शुभमंगल झाले. [कै. सा. द.]

**उमाचतुर्थी** ज्येष्ठ शुद्ध चतुर्थीचे नाव. त्या दिवशी स्त्रियांनी व्रत करायचे असते. याविषयी श्लोक असा –

ज्येष्ठशुक्लचतुर्थ्यां तु जाता पूर्वभवा सती।
तस्मात् सा तत्र संपूज्या स्त्रीभिः सौभाग्यवृद्धये॥

अर्थ – ज्येष्ठ शुक्ल चतुर्थीला उमेचा जन्म झाला. म्हणून स्त्रियांनी सौभाग्यवृद्धीसाठी त्या दिवशी तिची पूजा करावी.

या व्रतात उमेची कुंदपुष्पांनी पूजा करतात व उपवासही करतात. पुरुषांनीही हे व्रत करायला हरकत नाही, असे कृत्य-रत्नात सांगितले आहे. बंगालमध्ये उपवर मुली उत्तम नवरा मिळावा म्हणून हे व्रत करतात. [ हि. ध. ]

**उमादिपूजा** एक तिथिव्रत. चैत्र शु. द्वितीयेला हे करतात. या व्रतात उमा, शिव व अग्नी या देवतांची पूजा करायची असते. [ हि. ध. ]

**उमापती शिवाचार्य** (इ. स. चे १३ वे शतक) तमिळ-नाडमधल्या शैव आचार्यांतला एक प्रमुख आचार्य. हा चिदंबरम येथील शिवमंदिरात पुजारी होता. मरै ज्ञानसंबंधर नावाचा याचा ब्राह्मणेतर गुरू होता. याने त्या गुरूच्या पानातले उच्छिष्ट खाल्ल्यामुळे ब्राह्मणांनी याला चिदंबरममधून हाकलून दिले. पण पुढे हा मोठा ग्रंथकर्ता झाला आणि याची कीर्ती सर्वत्र पसरली. त्यामुळे मग चिदंबरम-मधल्या ब्राह्मणांनी देवाच्या वार्षिक जत्रेच्या प्रसंगी त्याला परत बोलावून घेतले.

याने पुष्करागमावर संस्कृत भाष्य लिहिले असून, ते तिरु-वदुथुरै येथील मठात ठेवलेले आहे. याच्या कोइरपुराणम या

ग्रंथात चिदंबरम देवस्थानाचा इतिहास आहे. याने शैव सिद्धान्त पुढीलप्रमाणे मांडला आहे.– ईश्वर हा रूपी, अरूपी व रूपारूपी आहे. ज्ञानवंतांना तो ज्ञानरूपी आहे. कल्याण करतो म्हणून तो 'शंकर' आहे. जो अरुळ (ब्रह्म) ओळखीत नाही, त्याला मोक्ष नाही. 'नमः शिवाय' या पंचाक्षरी मंत्राच्या जपाने शिवाची कृपा होते. [ म. ज्ञा. को. ]

**उमा ब्राह्मणी** एक व्रत. ज्येष्ठ शुद्ध नवमीला उपवास, ब्राह्मणी नामक श्वेतवर्णा पार्वतीची पूजा व ब्राह्मणकन्येला दूधभाताचे भोजन घालणे, असा याचा विधी आहे. फल– सौभाग्यप्राप्ती. [ व्रतपरिचय ]

**उमा–महेश्वर** शिव-पार्वतीची एक संज्ञा. यांची मूर्ती कशा प्रकारे करावी, याचे वर्णन मत्स्यपुराणात पुढीलप्रमाणे आलेले आहे –

द्विभुज किंवा चतुर्भुज, त्रिनेत्र, गजचर्म पांघरलेले, दोन्ही अंगी जय-विजय हे द्वारपाल व कार्तिकेय आणि विनायक हे पुत्र, अशी उमा–महेश्वरांची मूर्ती करावी.

आदित्यशयन व्रतात यांची पूजा करतात. दानचंद्रिकेत या मूर्तीचे दान करावे, असे सांगितले आहे. त्याचा मंत्र असा–

शिवशक्त्यात्मकं यस्माज्जगदेतच्चराचरम् ।
तव दानेन मे वश्या पृथिवी स्यात् सुनिश्चला ।।

अर्थ – ज्या अर्थी हे चराचर जगत शिवशक्त्यात्मक आहे, त्या अर्थी ( हे उमा–महेश्वरा, ) तुझ्या दानाने पृथ्वी मला सुनिश्चल व वश होवो.

या दानानंतर ब्राह्मणाला सुवर्णदक्षिणा देतात. [ पु. इं. ]

**उमामहेश्वरव्रत** एक काम्य व्रत. भाद्रपद पूर्णिमेला याचा आरंभ करतात. व्रतावधी १५ वर्षे. विशेषतः पुरुषांनी करायचे हे व्रत असून, कर्नाटकात त्याची विशेष प्रसिद्धी आहे. याचा विधी पुढीलप्रमाणे –

शुद्ध चतुर्दशीला व्रताचा संकल्प. शिव आणि शिवभक्त यांची पूजा. हविष्यान्नाचे भोजन. रात्री शिवासन्निध निद्रा. पूर्णिमेला स्नान व भस्म – रुद्राक्ष धारण. शिव-पार्वतींच्या सुवर्णमूर्तीची स्थापना. मूर्तींच्या पुढे पंधरा ग्रंथींचा कुंकुमरंजित दोरा ठेवणे.

ध्यायामि तं महादेवमुमादेहार्धधारिणम् ।
मुक्तामालापरीताङ्गं दुकूलपरिवेष्टितम् ।।
ध्यायामि च परां गौरीमादिविद्यामनामयाम् ।
लक्ष्मीसेवितपादाब्जां शचीसेवितपादुकाम् ।।

या मंत्राने ध्यान करून षोडशोपचारपूजा. दोरकाची पूजा. मग दोरकाचे ग्रहण व जुन्या दोरकाचे विसर्जन. पंधरा घारग्यांचे किंवा मांडय़ांचे वायनदान. आचार्यपूजा. पीठदान. ब्राह्मण-सुवासिनींना भोजन. आणि यजमानाचे मौन धरून भोजन. हविष्यान्न व तैलविरहित अन्न यांचे सेवन, हा या व्रताचा विशेष आहे.

सोळाव्या वर्षी व्रताचे उद्यापन करतात. त्या वेळी उमा-महेश्वरांच्या पंधरा प्रतिमा करून त्यांची स्थापना करतात व त्यांची यामपूजा करतात. यथाविधी हवनही करतात. या व्रताची कथा अशी –

एकदा दुर्वासमुनी फिरत फिरत वैकुंठाला गेला. त्याच्या जवळ शंकराने दिलेली बिल्वदलांची माळ होती, ती त्याने विष्णूला दिली. विष्णूने ती स्वतःच्या गळयात न घालता गरुडाच्या मानेवर ठेवली. त्यामुळे दुर्वास खवळला. त्याने विष्णूला शाप दिला. ' ज्या लक्ष्मीच्या प्राप्तीमुळे तू इतका गर्विष्ठ झालास, ती लक्ष्मी क्षीरसागरात बुडेल, गरुडाचा नाश होईल आणि तुझे वैकुंठावरचे प्रभुत्व नष्ट होऊन तू पृथ्वीवर वणवण भटकशील ! '

दुर्वासाचा शाप खरा होऊन विष्णू रानावनात भटकू लागला. पुढे त्याची व गौतमऋषीची गाठ पडली. विष्णूने त्याला आपली दुर्दशा सांगितली. गौतमाने त्याला उमामहेश्वरव्रताचे विधान सांगितले. विष्णूने ते केले, त्यामुळे त्याला गतवैभव परत मिळाले.

या व्रताला शिवानंतव्रत असे दुसरे नाव आहे, त्यावरून आणि व्रताच्या विधानावरून, हे व्रत वैष्णव संप्रदायातून शैव-संप्रदायात आले असावे, असे वाटते. वैष्णवांचा आराध्य जो विष्णू त्यालाच या व्रतकथेत दुर्दशा भोगायला लावून शैवसंप्रदायाने आपली थोरवी वाढवलेली दिसते. [ हि. ध.; व्रतराज ]

**उमावन** एक वन. हे कैलासावर असून इयेच शंकराने अर्धनारी हे रूप धारण केले (वायुपु. ४१.३६). एकदा उमेने शिवाला विनंती केली, की 'या वनातल्या आपल्या आश्रमात जो पुरुष प्रवेश करील, त्याला स्त्रीरूप प्राप्त व्हावे व तुम्हीही स्त्रीरूप घ्यावे.' शिवाने ती विनंती मान्य केली व त्या वनातले सर्व प्राणी स्त्री बनले. [ पु. इं. ]

**उमास्वाती वाचक** (इ. स. चे १ ले किंवा २ रे शतक) एक जैन आचार्य व ग्रंथकार. जैन-साहित्यात याचे विशेष स्थान आहे. हा घोषनंदी श्रमणाचा शिष्य व उच्चानागरी शाखेचा वाचनाचार्य होता. हा मूळचा ब्राह्मण असून, न्यग्रोधिका या गावचा रहिवासी होता. पुढे त्याने जैन धर्म स्वीकारला. याने जैनांच्या विविध आगमग्रंथांत विखरून पडलेले तत्त्वज्ञान एकत्र करून संस्कृतात सूत्रबद्ध केले

व त्या ग्रंथाला तत्त्वार्थाधिगमसूत्र असे नाव दिले. बौद्ध पंडित वसुबंधू याने ज्याप्रमाणे पाली पिटकांतले तत्त्वज्ञान एकत्र करून अभिधर्मकोश या ग्रंथाची रचना केली व त्यावर स्वोपज्ञभाष्यही रचले, त्याच धर्तीवर उमास्वातीने केलेला हा प्रयत्न आहे. यानेही आपल्या तत्त्वार्थाधिगमावर स्वोपज्ञ भाष्य लिहिले आहे.

उमास्वातीच्या पूर्वी प्रायः सर्व जैन वाङ्मय अर्धमागधीत होते. उमास्वातीलाच पहिल्या प्रथम असे भावले, की 'सांप्रत विद्वत्समुदायाची प्रधान भाषा संस्कृत आहे; अतएव जैन तत्त्वज्ञान जर संस्कृतात परिवर्तित झाले, तरच विद्वानांचे लक्ष त्याकडे जाईल.' म्हणूनच त्याने हा दीर्घ प्रयत्न केला. त्यामुळे जैन धर्माचार्यांत उमास्वातीचे स्थान फार वरच्या दर्जाचे ठरले आहे. त्याच्या मते जीवनात ज्ञान, आचार आणि श्रद्धा या तीन्ही गोष्टींना सारखेच महत्त्व आहे. सम्यक विश्वास, सम्यक ज्ञान व सम्यक आचार ही त्रयीच जीवाला मोक्ष प्राप्त करून देते, असे त्याने म्हटले आहे. [ खो. प.; जै. सा. इ. ]

## उमिया माता

गुजरातमधील केडवा लोकांची कुलदेवी. हिचे स्थान उंझा (जि. मेहसाणा) येथे आहे. तिथे दरवर्षी जत्रा होते. [ ल. वि. सो. ]

## उम्मेदराम

( इ. स. १७४४–१८१२ ) राजस्थानातील पाल्हावत शाखेचा एक चारण. याचा जन्म जयपूर राज्यातील हणूंतिया गावी झाला. अलवारचा राजा बख्तरसिंह याने उम्मेदरामाला त्याच्या तरुणपणीच आपल्याकडे बोलावून घेतले व शेवटपर्यंत त्याची चांगली वडदास्त ठेवली.

डिंगल व पिंगल या दोन्ही भाषांत उम्मेदरामाने अनेक कविता रचल्या आहेत. त्याने ग्रंथही बरेच लिहिले आहेत. त्याच्या काही ग्रंथांची नावे अशी – (१) वाणीभूषण (२) राजनीती–चाणक्य (३) रामचंद्रजी की राजनीती (४) अवध पच्चीसी (५) जनकशतक (६) कविप्रिया की टीका इत्यादी.

याची भाषा सुश्लिष्ट व सरस आहे. याच्या इतकी कलात्मक व विचारसंपन्न कविता रचणारे कवी चारणांत फारच थोडे आढळतात. याच्या काव्याचा नमुना पुढीलप्रमाणे –

**पर नारी सब मातु सम, पर धन धूलिसमान ।**
**सबै जीव निज जीव सम, देखै सो दृगवान ।।**

अर्थ – सर्व परस्त्रिया या मातेसमान, दुसऱ्याचे धन हे मातीप्रमाणे व सगळ्यांचा जीव हा आपल्यासारखाच हे जो पाहतो (जाणतो), तोच खरा दृष्टिवान होय.

**इक तरु सूख की अगनि जारत सब बनराय ।**
**त्योंही पूत कपूत तें वंश समूल नसाय ।।**

अर्थ – ज्याप्रमाणे एका सुकलेल्या झाडाला लागलेला अग्नी सगळ्या रानाला भस्मसात करतो, त्याप्रमाणे एखादा कुपुत्र सर्व वंशाचा उच्छेद करतो. [ रा. भा. सा. ]

## उरम्मा

उर = गाव. प्राचीन काळी कर्नाटकातल्या सगळ्या ग्रामदेवतांना उरम्म असे म्हणत असत. पुढे त्यांना त्यांच्या गुणधर्मानुसार दुसरी नावे मिळाली. पण बेळ्ळारी जिल्ह्यातली ग्रामदेवता अजून उरम्म याच नावाने ओळखली जाते. हिचा उत्सव काही विशेष प्रसंगीच केला जातो. प्रारंभी गावातल्या रेड्डीच्या घरासमोर एक पणती तेवत ठेवतात. ती पणती उत्सव संपेपर्यंत तेवत राहिली पाहिजे, असा नियम आहे. देवीची मूर्ती रथातून मिरवितात. मिरवणुकीपुढे पायघड्या घालतात. देवीला रेडा बळी देतात. हा रेडा म्हणजे उरम्माचा नवरा समजतात. शेवटी देवीची मूर्ती वाजत गाजत गावाच्या सीमेवर नेऊन ठेवतात व परत येतात. [ व्हि. गाँ. सा. इं. ]

## उरळी

तिरूवितांकुर–तमिळनाडू सीमेवरील वेलची टेकड्यांवर राहणारी एक आदिवासी जमात. पूर्वी मदुरेच्या राजाचे छत्र धरणारे जे सेवक होते, त्यांचे हे वंशज आहेत,



उरळी स्त्री

असे म्हणतात. एकदा तो राजा या विभागात आला असता, त्याने परत जाताना आपले हे छत्रधारी सेवक तिथेच सोडून

दिले. त्यानंतर त्यांनी तिथेच आपली वसाहत केली.

हे लोक पठारावर न राहता सामान्यपणे डोंगराच्या उतारावर राहतात. त्यांच्या काही झोपड्या जमिनीवर तर काही झाडांवर बांधलेल्या असतात. त्यांमध्ये एक झोपडी सार्वजनिक असते. तिचा उपयोग कधी देऊळ म्हणून तर कधी रंगमंदिर म्हणून करतात. या झोपडीत एक ढोल असतो. हत्तींच्या कळपाची चाहूल लागल्यास हा ढोल वाजवून ते लोकांना इशारा देतात व मग सर्वजण आत्मसंरक्षणासाठी झाडांवर किंवा उंच झोपड्यांत जाऊन बसतात.



उरळी शिकारी पुरुष

यांच्या स्त्रिया आकर्षक असून, पुरुषांचे चेहरेही नाजूक व प्रसन्न असतात. स्त्रिया तीन वस्त्रे वापरतात. एक कमरेला गुंडाळलेले, दुसरे डाव्या हाताखालून घेऊन उजव्या खांद्यावर गाठ मारलेले व तिसरे अंगावर घेऊन गळ्याला बांधलेले असते. तिसऱ्या वस्त्राचा उपयोग सामान बांधायला किंवा मुलांना अंगावर वागविण्यासाठी करतात.

**विवाहप्रथा** – मुलामुलींचे विवाह आईबाप ठरवितात. वाङ्निश्चयाच्या वेळी वराचा मामा वधूगृही व वधूचा मामा वरगृही तीन तीन मापे तांदूळ मोजून देतो. विवाह ठरल्यावर वधू वराच्या झोपडीत जाते. विवाहाची खूण म्हणून वधूच्या गळ्यात ताळी बांधतात. पुनर्विवाहाची पद्धती आहे. विवाह झाला की मुलगा आईवापांपासून वेगळा राहतो.

हे लोक शेती करतात. शिकार करण्यातही ते तरबेज आहेत. हत्ती व म्हशी यांना ते पूज्य मानीत असल्यामुळे त्यांची शिकार करीत नाहीत.

**प्रसूतिविधी** – ऋतुमती स्त्रीला पहिले तीन दिवस निराळ्या झोपडीत व चौथ्या दिवशी स्नान केल्यावर आणखी दोन दिवस दुसऱ्या एका झोपडीत ठेवतात व नंतर घरात घेतात. स्त्रीची प्रसूती दूर कुठेतरी बनविलेल्या एका झोपडीत होते व तिथेच ती बारा दिवस राहते. नंतर तिला तिथून जवळच्या एका झोपडीत आणतात व तिथे पाच दिवस ठेवून मग घरात घेतात. पण घरातही बारा दिवस तिला कशाला स्पर्श करू देत नाहीत. पहिल्या प्रसूतीच्या वेळी तिचा पती तीन दिवस जननाशौच पाळतो व पुढच्या वेळी मुळीच पाळीत नाही. मुलाच्या जन्मानंतर १८ व्या दिवशी घरातील वृद्ध इसम त्याचे नाव ठेवून कानही टोचतो. मूल चालू लागल्यानंतर त्याचे चौल करतात.

**अंत्यविधी** – प्रेत घरापासून दूर अंतरावर पुरतात व त्या जागेवर झोपडी बांधून तिच्यात मयताची सुरी, भात व पानसुपारी या वस्तू ठेवतात. सातव्या दिवशी मृताला पिंड व पाणी देतात. सोळा दिवस सुतक पाळतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**उराँव** बंगाल, ओडिसा, छोटा नागपूर व आसाम या भागांत राहणारी आदिवासींची एक जमात. हे लोक द्रविड असून, स्वतःला कुरुख म्हणवितात. होरो=मनुष्य या शब्दावरून उराँव हे नाव बनले असावे. डाल्टन व काल्डवेल यांच्या मते हे लोक मूळ कोकणातले होते. तिथून ते बंगालमधील कैमूर डोंगरावर गेले. तिथे रोहतास नावाच्या पठारावर त्यांनी काही काळ वास्तव्य केले. नंतर पठाणी आक्रमणामुळे त्यांची पांगापांग झाली. त्यांतले काही लोक गंगातीरावरून पुढे जात जात राजमहाल डोंगरावर गेले, तर काही लोक शोण नदीच्या खोऱ्यातून पलमाऊपर्यंत पोचले व तिथून पूर्वेकडे वळून छोटा नागपूरच्या वायव्य भागात शिरले. आजमितीस ते छोटा नागपूरच्या उत्तर आणि पश्चिम भागांत, तसेच सिरगुजा आणि झासपूर यांच्या पूर्व भागांत बहुसंख्येने आढळतात. सिंगभूम, गंगापूर, बोनाई आणि हजारीबाग या, जिल्ह्यांत त्यांची थोडीबहुत वस्ती आहे.

ते छोटा नागपूरच्या वायव्य व पश्चिम या भागांत गेले, तेव्हा त्यांना तिथे मुंड लोकांची तुरळक वस्ती आढळली. मुंडांनी

त्यांना विरोध न करता आपल्या भागात स्थायिक होण्यास अनुमती दिली. आजमितीसदेखील बहुसंख्य उरांँव खेड्यांत मुंडांची थोडी बहुत वस्ती दिसते. उरांँव लोकांनी स्थानिक दैवतांची पूजा-अर्चा करणे व त्यांना बली समर्पण करणे ही धार्मिक कृत्ये मुंडांच्याकडे दिली. मुंडांच्यापेक्षा उरांँव हे सुधारलेले होते व त्यांनीच छोटा नागपूरमधील अन्य आदिवासींना जमीन नांगरून शेती करण्याची विद्या शिकविली.

उरांँव लोकांचा वर्ण काळसर तपकिरी असतो. त्यांचे केस काळे, राठ व किंचित कुरळे असतात. त्यांचे ओठ जाड असून, दात थोडे पुढे आलेले असतात. डोळे मोठे आणि तेजस्वी असतात. आकुंचित कपाळ व रुंद चपटे नाक हे त्या जमातीचे शारीरिक वैशिष्टय होय. या वैशिष्टयावरून ते शुद्ध द्रविडियन वंशाचे आहेत, असे समजले जाते. दुसरी गोष्ट म्हणजे त्यांची कुरूख नावाची बोलीही द्राविडच आहे. छोटा नागपूरच्या उत्तरेस गंगापूर या विभागात वेर्गा नावाचे लोक राहतात. त्यांना उरांँव लोकांची मूळ शाखा समजतात. वेर्गांची बोली कुरूख बोलीहून थोडी भिन्न आहे. हे लोक रानटी व क्रूर दिसतात.

उरांँव लोक, मुंडांहून आपण सुसंस्कृत आहो, असे समजत असले, तरी त्यांची घरे मात्र झोपडीवजाच असतात. हे लोक गुरेसुद्धा आपल्या राहत्या घरातच बांधतात. फक्त डुकरांसाठी तेवढी वेगळी घरकुले करतात. त्यांच्या घरांच्या भिंती तांबड्या मातीच्या असून, छप्पर कौंवळी असते. प्रत्येक खेड्यात मुंड व पहाण (पुजारी) असतो. त्यांचा अधिकार वंशपरंपरेने चालतो. हे लोक खेड्याच्या संस्थापकांचे वंशज असतात. या दोघांच्याही वंशपरंपरागत जमिनींना खूंट म्हणतात. या दोघांशिवाय गावची जरूर ती कामे करणारा एक मनुष्य असतो, त्याला महातो म्हणतात. त्यालाही जमिनीचा तुकडा तोडून दिलेला असतो. पहाण वंशपरंपरागत असला, तरी त्यांतला एखादा दुर्व्यसनी निघाला किंवा त्याने धर्मांतर केले, तर त्याचा तो अधिकार काढून घेतात व देवाला कौल लावून नव्या पहाणाची नेमणूक करतात. उरांँव वस्तीत पहाणाची सत्ता अनियंत्रित असते. वस्तीचे भवितव्य त्याच्याच हातांत असते.

**धुमकुरिया** – प्रत्येक उरांँव खेड्यात अविवाहित तरुणांना झोपण्यासाठी सामुदायिक शय्याघर असते. त्याला धुमकुरिया म्हणतात. मुलांप्रमाणेच मुलींचेही शय्याघर असते व त्या घरात झोपणाऱ्या मुलींवर नजर ठेवण्यासाठी एखाद्या विधवा स्त्रीची नेमणूक केली जाते. सामुदायिक शय्याघर नसल्यास खेड्यातल्या विधवांच्या घरी मुलींच्या झोपण्याची सोय केली जाते. उरांँव लोकांत लैंगिक निर्बंध शिथिल असतात. एखादी तरुण मुलगी रात्रीच्या वेळी मुलांच्या शय्याघरात गेली, तरी तिच्या आईबापांना अनैसर्गिक असे काही वाटत नाही. उरांँव मुली विनयशील असतात. त्या सहसा असभ्य भाषा बोलत नाहीत. कुंवारपणात त्यांच्या हातून काही प्रमाद घडला, तरी वैवाहिक जीवनात त्या आपल्या नवऱ्याशी एकनिष्ठ राहतात. दुसरी गोष्ट म्हणजे खेड्यातल्या खेड्यात विवाह क्वचितच घडतात. शक्यतो दुसऱ्या खेड्यातली मुलगी आणायची, असा रिवाज आहे. धुमकुरियामध्ये जे प्रकार घडतात, त्याची वाहेर वाच्यता करायची नाही, अशी तिथे झोपणाऱ्या तरुणांना शपथ घ्यावी लागते. शपथ मोडणाऱ्याला कडक शिक्षा होते.



उरांँवांचे नृत्य

धुमकुरियासमोरच एक नृत्यांगण असते. त्याला आखाडा म्हणतात. त्याचा परिघ अंदाजे ४० फुटांचा असतो व त्याच्या मध्यभागी एक खांब किंवा दगड असतो. उरांँव लोकांची त्या ठिकाणी नृत्ये होत असतात. प्रेक्षकांसाठी किंवा थकलेल्या नर्तकांसाठी आखाड्याभोवती कट्टा किंवा आसन बांधलेले असते. सणाच्या दिवसांत काळोख पडल्यावर नृत्य सुरू होते आणि नर्तकांना यथेच्छ दारू मिळाली, तर ते नृत्य सूर्योदयापर्यंत चालू राहते.

**वेषभूषा** – पुरुष केस लांब वाढवितात व त्यांचा बुचडा बांधतात. जत्रेला किंवा समारंभाला जाताना ते त्या बुचड्यावर तांबडा रुमाल बांधतात आणि केसांत लाकडी फण्या खोचतात. ते अरुंद धोतर काचा मारून नेसतात व त्यावर वेताचा किंवा रेशमी धाग्यांचा गोफ बांधतात. ते अंगात सदरा, डगला, असे काही घालीत नाहीत. अंगावर आणि कानात पितळेचे आणि

आरशांचे दागिने घालतात. सुसंस्कृत जगाशी ज्यांचा संबंध येतो, अशा उराँव तरुणी लाल किंवा पांढऱ्या किनारीची जाडीभरडी साडी नेसतात. शहरवस्तीपासून दूर असलेल्या बायका मात्र कमरेभोवती वस्त्राचा एक तुकडा गुंडाळतात. शिंप्याने शिवलेले कपडे ख्रिश्चन धर्म स्वीकारलेल्या स्त्रियांशिवाय इतर स्त्रिया घालीत नाहीत. चोळीचे काम साडीच्या पदरानेच करतात. त्या लाल मण्यांच्या माळा गळचात घालतात व पितळेचे पुष्कळसे दागिने वापरतात. डाव्या हाताच्या बोटांत तांब्याच्या अंगठ्या व पायात पितळेची किंवा पंचधातूंची जोडवी घालतात. त्यांच्या हातापायात धातूंचे वाळे आणि कडी असतात. त्या उजव्या कानाजवळ केसांचा बुचडा बांधतात. केसात फुले माळण्याची त्यांना विलक्षण हौस असते. त्या कानांना अनेक भोके पाडून त्यांत अनेक प्रकारचे अलंकार घालतात. उराँव स्त्रिया बालपणातच अंगावर गोंदून घेतात. त्यांच्या भुवयांवर तीन ठिकाणी आणि प्रत्येक कानशिलावर दोन ठिकाणी गोंदणे हमखास दिसते. उराँव स्त्री ओळखण्याची ती एक खास खूण असते.

**आहार** – उराँव लोक खूप खाणारे आहेत. मात्र त्यांना पाककला बिलकुल अवगत नाही. भात आणि उडदांची डाळ हा त्यांचा मुख्य आहार असतो. भाजीपाला जंगलात मिळेल तो. ते उंदीर, कोल्हे, लांडगे, साप, कासव, मासे, बेडूक, इ. बहुतेक सर्व प्राण्यांचे मांस खातात. डुकराचे मांस हे त्यांना सर्वांत अधिक आवडते. ते मेलेल्या जनावरांचे देखील मांस खातात; पण तरीही त्यांना अस्पृश्य समजले जात नाही, हे विशेष आहे. हे पट्टीचे दारूबाज असतात. ते तांदुळांची दारू घरीच बनवितात व बायका-मुलांसह ती पितात.

**विवाहप्रथा** – उराँव लोकांत बालविवाहाची चाल नाही. बहुतेक तरुण मुलगे आपली सोबतीण निवडतात. लग्नात मुलीचे देज घेतात. शकुनप्रश्न पाहिल्याशिवाय विवाह नक्की करीत नाहीत. लग्न ठरल्यावर वराकडील वऱ्हाडी मंडळी वधूच्या गावी जायला निघतात. या मंडळीतले पुरुष हत्यारबंद असतात. ही हत्यारे अर्थात बनावट किंवा बोथट असतात. गावाच्या शिवेवर पोचायच्या वेळी वधूपक्षाकडील हत्यारबंद पुरुष वरपक्षावर तुटून पडतात. थोडा वेळ उभय पक्षांत लुटुपुटीची लढाई होते. नवरा आपल्या मित्राच्या कडेवर बसून व नवरी आपल्या नातेवाईक स्त्रीच्या कडेवर बसून त्या लढाईत भाग घेतात. या लढाईत वरपक्षाचा जय ठरलेला असतो.

वधूपित्याच्या घरासमोर एक लता-कुंज उभारला जातो. त्यात एक पाटा, त्यावर जू आणि जुवावर मक्याचे कणीस ठेवलेले असते. त्या ठिकाणी नवरा-नवरीला घेऊन जातात. तिथे ती दोघे एकमेकांच्या कपाळी सिंदूर लावतात. हा संस्कार सभोवती पडदा लावून करतात. तो झाल्यावर बंदुकीचे बार काढतात. नंतर वधूवर एका खोलीत कपडे बदलण्यासाठी जातात. तो त्यांचा एकान्तवास असतो. ती दोघे खोलीत गेल्यावर बाहेरचे लोक नृत्य सुरू करतात. वधूवर बाहेर येतात, तेव्हा त्यांचे पति-पत्नी हे नाते सिद्ध झालेले असते. लग्ने कोणत्याही महिन्यात होत असली, तरी उन्हाळ्याचे दिवस अधिक पसंत करतात. नवरी मुलगी सासरी गेली, की ती जेवायच्या वेळी रुसून बसते. सासरकडून एखादा मौल्यवान अलंकार मिळाल्यानंतरच ती अन्नाला स्पर्श करते.



**प्रसूतिप्रथा** – बायका एकमेकींचे सुईणपण करतात. प्रसववेदना सुरू असता आणि प्रसूतीनंतर १५ दिवसपर्यंत बाळंतिणीला चोरडेवान या भूताची भीती असते. ते मांजराच्या रूपाने येऊन बाळंतिणीच्या अंगाला नाजूक ठिकाणी इजा करते, अशी समजूत आहे. तो धोका टाळण्यासाठी बाळंतिणीच्या शेजारी रात्रंदिवस आगटे पेटवून ठेवतात. मुलाला जे नाव ठेवायचे मनात असते, ते नाव उच्चारून पाण्यात एक दाणा टाकतात. तो तळाशी गेल्यास नाव शुभ व तरंगल्यास अशुभ समजतात.

**मैत्रीप्रथा** – उराँव मुलीची दुसऱ्या एखाद्या मुलीशी जीवश्च कंठश्च मैत्री जमली, की ते नाते विवाहबंधनाइतकेच दृढ मानतात. त्यासाठी दोघी मैत्रिणी मिळून भोजनाचा बेत करतात व इतर मुलींना त्यासाठी बोलावतात. ज्यांची मैत्री व्हायची, त्या दोन मुली इतर मुलींसमक्ष एकमेकींना फुले माळतात व मण्यांच्या माळांची अदलाबदल करून एकमेकींना आलिंगन देतात. त्या दिवसापासून त्या दोघी एकमेकींना नावाने हाक न मारता 'माझ्या फुला' किंवा तत्सम एखाद्या नावाने संबोधितात.

**देवधर्म** – उराँव लोक परमेश्वर मानतात. त्याला ते धरमी किंवा धरमेश म्हणतात. हा धरमेश सूर्याचा प्रतिनिधी असतो; पण तो कोणाचे कल्याण किंवा अकल्याण करीत नसल्यामुळे त्याला भजण्यात काही अर्थ नाही, असे उराँव लोक समजतात. त्यामुळेच ते दुष्ट भुते व क्षुद्र दैवते यांना भजतात. कारण त्यांच्या अंगी मानवांचे भले-बुरे करण्याचे सामर्थ्य असते. त्यांचा परलोकावर विश्वास नसला, तरी ते पाप-पुण्य मानतात. त्यांचा जादू-टोण्यावर विलक्षण विश्वास असतो. ते देवऋषीला ओझा म्हणतात व रोगराईच्या वेळी त्याच्याकडून मंत्रतंत्राचे प्रयोग करवितात. त्यांच्या प्रमुख भुताला दऱ्हा असे नाव आहे. जुन्या काळी त्याला नरबली देण्याचीही प्रथा होती. दुसऱ्या एका भुताचे नाव खुंटा असे आहे. भात-लावणीच्या वेळी त्याला बकरा बळी देतात. याशिवाय बरंडा (डोंगरी

समंध), अट्टी (घरातले भूत), चुडेल (सटवी), मूआ (अपघाताने मरण पावलेल्याचे भूत) अशी अनेक भुते ते मानतात. त्यांच्या जीवनावर या भुताखेतांचा विलक्षण पगडा असतो. गावाजवळची वृक्षराई हे त्यांच्या भुतांचे वसतिस्थान असते. उरांव लोक वृक्षपूजकही आहेत. ते साल व करम या वृक्षांना पवित्र मानतात. एखादा दगड, मातीचा ढीग किंवा लाकडी खांब यांना भुतांची प्रतीके मानून पुजतात. ते धरतीमातेला धरमेशाची पत्नी समजतात. वसंत ऋतूत जेव्हा वृक्षाला बहर येतो, तेव्हा धरमेश व पृथ्वी यांचे लग्न लावण्याचा समारंभ करतात. वृक्षराईत कालो पक्को नावाची देवता असते. तिला धरतीचे प्रतीक मानतात. तिच्या पुढे गावजोशाला धरमेशाचे प्रतीक म्हणून नवरदेवाच्या पोषाखात उभे करतात व त्या दोघांवर अक्षता, फुले उधळतात. या उत्सवाला खद्दी असे म्हणतात. खद्द शब्दाचा अर्थ उत्पत्ती असा आहे. या उत्सवामुळे पिके भरपूर येतात व वनस्पती खूप वाढतात, अशी त्यांची समजूत आहे.

उरांव लोकांनी मुंडांची बहुतेक नृत्ये उचलली असून, त्यांत सुधारणाही पुष्कळ केली आहे. मुंडांचे जदुरनृत्य त्यांनी विविध पदंन्यासांनी बरेच गुंतागुंतीचे केले आहे. उरांव मुले-मुली लहानपणीच नृत्याचा अभ्यास सुरू करतात. नृत्याबरोबरच सांघिक गाणीही ती शिकतात. प्रत्येक उरांव खेड्यातल्या वृक्षराईत जत्रा भरतात, पानोत्सव होतो आणि त्या ठिकाणी उरांव तरुण-तरुणी बेहोष होऊन नाचतात. ढोल वाजवीत मिरवणुकीने ही मंडळी जत्रेच्या ठिकाणी जातात. राईत शिरल्यावर खारिया नावाचे नृत्य पहिल्या प्रथम करतात. जत्रांमध्ये झेंडेही नाचवितात. हे झेंडे तिकोनी व वेगवेगळ्या रंगांचे असतात.



उरांव ढोलवादक

लहान मुलांच्या शिक्षणासाठी प्रत्येक गावात धांगरकुरियार नावाची जागा असते. तिथे मुलांना सामाजिक व व्यावहारिक शिक्षण देतात. शेतात बी पेरताना ते स्त्रियांच्या हातून पेरणे शुभ मानतात.

दर बारा वर्षांनी उरांव स्त्रिया एक उत्सव साजरा करतात. तो त्यांच्या मूलस्थानातील एका घटनेचा स्मारक असतो. उरांव लोक रोहतासगड येथे राहत असता एकदा पठाणांनी त्यांच्यावर हल्ला केला, पण उरांव स्त्रियांनीच तो हल्ला परतवून लावला. या घटनेचे स्मरण म्हणून चैत्र-वैशाखांत 'जनी सिकार' हा उत्सव त्यांच्या वस्तीत साजरा होतो. त्या दिवशी उरांव स्त्रिया मर्दानी पोषाख करतात व हातांत तीर-कमठा, लाठी वगैरे हत्यारे घेऊन नाचत, गात शेजारच्या गावात शिकारीसाठी जातात. त्या वेळचे गाणे पुढीलप्रमाणे असते –

बारह बधरे राजा जनी सिकार
जनी का मुडे राजा पगडी बांधय।
गोडे घुंगुरा राजा हाथे तरवारि
जनी का मुडे राजा पगडी बांधय।

डुक्कर, कोंबडा, बकरा, अशा कोणत्याही प्राण्याची त्या शिकार करतात. या उत्सवात पुरुषांना भाग घेण्याची मनाई असते.

**मर्तिकप्रथा –** घरात मृत्यू झाला, की आप्तेष्ट माणसे रडून आकांत मांडतात. प्रेताला चौपायीवर ठेवून तेल लावून आंघोळ घालतात. मग त्याच्या अंगावर नवे कपडे चढवितात. त्याच्या तोंडात भात व तांब्याची नाणी ठेवतात. प्रेत घरातून बाहेर काढल्यावर मृत्यूच्या जागी राख पसरून घर बंद करतात. प्रेतयात्रेत गावातले सर्व स्त्री-पुरुष भाग घेतात. प्रेते पुरतात किंवा जाळतात. जाळायचे असल्यास मयताच्या जवळचा नातेवाईक (पुरुष किंवा स्त्री) चितेला अग्नी देतो. दहन करून घरी परत आल्यावर मृताच्या जागी पसरलेल्या राखेवर एखादी खूण उमटली आहे की काय, हे पाहतात. माणसाचे पाऊल उमटले दिसले, तर मृतात्मा भूतयोनीत गेला, असे समजतात. मृताची रक्षा गोळा करण्याच्या वेळी नातेवाईकांना आणि गावातल्या सर्वांना बोलावतात. त्याच्या अस्थी एका मडक्यात भरून ते मडके घरासमोर एका खांबाला टांगून ठेवतात. प्रतिवर्षी एकदा गावातली अशी सर्व मडकी सामायिकपणे श्मशानात नेऊन तिथे ती पुरून टाकतात. उरांव मनुष्य परगावी मरण पावल्यास त्याच्या अस्थी घरी आणून गावातल्या श्मशानात पुरतात. मयतांच्या अस्थींची अशा प्रकारे विल्हेवाट लावल्याखेरीज गावात लग्ने होत नाहीत. मृत्यूचे सुतक पाळतात; पण श्राद्ध वगैरे काही करीत नाहीत. [ से. इं. १९३१ भा. आ.; एन्सा. रि. ए.; रे. क. इं. ]

## उरुचक्री आत्रेय

एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील एकोणसत्तर व सत्तर या दोन सूक्तांचा हा कर्ता आहे. मित्रावरुणांची स्तुती हा दोन्ही सूक्तांचा विषय आहे. याची एक ऋचा (५.६९.३) अशी-

प्रातर्देवीमदितिं जोहवीमि मध्यंदिनं उदिता सूर्यस्य ।
राये मित्रावरुणा सर्वतातेळे तोकाय तनयाय शं योः ।।

अर्थ – प्रातःकाली आणि माध्याह्नकाली मी देवी अदितीला आवाहन करतो. हे मित्रावरुणांनो, सुखसमृद्धीसाठी, तसेच पुत्रपौत्रांच्या अभिवृद्धीसाठी मी तुमचे स्तवन करतो.

उरुचक्राने एका ऋचेत (५.६९.१) स्वर्ग, अंतरिक्ष आणि भूलोक या तीन लोकांच्या प्रत्येकी तीन पोटविभागांना मित्रा-वरुणांचा आधार असल्याचे सांगितले आहे. पौराणिक साहित्यात सप्तपाताल, सप्तस्वर्ग अशा कल्पना आहेत. त्रैलोक्याची वैदिक कल्पना आणि पौराणिक कल्पना यांतील हा भेद आहे. [प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ. ]

**उरुवेला** पाली भाषेत वाळूला उरू म्हणतात. वेला म्हणजे नदीचा तट होय. गया व बोधगया यांच्या मधून नेरंजरा नदी वाहते. तिच्या वालुकामय विस्तीर्ण तटप्रांताला उरुवेला असे नाव मिळाले आहे. बुद्धत्व प्राप्त होण्याच्या पूर्वी गौतमाने या ठिकाणी वास्तव्य करून कठोर तप केले. बोधगये-जवळ सांप्रत उरेल नामक गाव आहे, तिथेच हे स्थान असावे. गौतम भुकेने विकल झाला असता, सुजाता नावाच्या एका गवळयाच्या मुलीने गौतमाला खीर आणून दिली, ती याच ठिकाणी. गौतमाला बोधी प्राप्त झाल्यावर त्याने या ठिकाणी वास्तव्य करणाऱ्या शेकडो जटाधारी साधूंना आपल्या धर्मात आणले. [ हि. जॉ. ए. इं. ]

**उरुस** जत्रा किंवा उत्सव असा याचा अर्थ रूढ झालेला आहे. अरबी उर्स म्हणजे (१) लग्नसमारंभातील मेजवानी किंवा (२) देवतेला समर्पण. मुस्लिम सत्पुरुष किंवा पीर यांचा उत्सव प्रतिवर्षी साजरा केला जातो, त्याला उरुस म्हणतात. अशा प्रसंगी कुस्ती वगैरे खेळ केले जातात. त्या ठिकाणी मोठा बाजार भरतो आणि आसपासच्या गावातील लोक तिथे जमतात; जत्रा भरते. उरुसाच्या आधल्या दिवशी जो कार्यक्रम सुरू होतो, त्याला संदल म्हणतात. [ म. वि. को. ]

**उरुक्षय आमहीयव** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे अठरावे सूक्त याच्या नावावर आहे. हा अमहीयू आंगिरसाचा मुलगा असावा. राक्षोघ्न अग्निस्तुती हा याच्या सूक्ताचा विषय आहे. एका ऋचेत (१०.११८.७) तो म्हणतो–

अदाभ्येन शोचिषाऽग्ने रक्षस्त्वं दह ।
गोपा ऋतस्य दीदिहि ।।

अर्थ – हे अजिंक्य तेजोयुक्त, यज्ञसंरक्षणकर्त्या आणि प्रदीप्त अग्ने, तू राक्षसांना दग्ध कर.

कवीने राक्षसींना तर उलटया करून जाळण्याची, अग्नीला विनंती केली आहे. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ. ]

**उरेन** विहारच्या मोंघीर जिल्ह्यातील एक गाव. इथे बौद्ध धर्माचे बरेच अवशेष आहेत. गावात एक टेकडी असून, तिच्यावर गौतम बुद्ध वर्षावासासाठी तीन महिने राहिला होता. याच ठिकाणी त्याने बकुल यक्षाचा पराजय केला. टेकडीच्या पायथ्याशी आग्नेय बाजूला एक मोठा पाषाण असून, त्याच्यावर बुद्ध विश्रांती घेत असे, असे सांगतात. त्याच्या खुणा तिथे उमटलेल्या आहेत. या खुणा एक इंच खोल, पाच फूट दोन इंच लांब व दोन फूट एक इंच रुंद असून, त्यांवर एक स्तूप बांधलेला आहे. जवळच बकुल यक्षाची पदचिन्हे असून, त्यांच्या मागे बुद्धाची सहा–सात फूट उंचीची बैठी पाषाणमूर्ती आहे. इथे पूर्वी बौद्ध मठ व देवालये असावी. [ मों. जि. गॅ. ]

**उर्दू भाषा व साहित्य** उर्दू व खडीबोली हिंदी या दोहोंत फार थोडा भेद दिसतो. त्यामुळे विद्वानांत विवाद आहे, की खडीबोलीतून उर्दू निघाली का उर्दूतून खडीबोली निघाली ? उर्दूच्या बाबतीत हेही सांगणे कठीण आहे, की तिचा जन्म कोणत्या प्रदेशात झाला. काहींच्या मते ती पंजाबात जन्मली व तिचे प्रथम चिन्ह 'पृथ्वीराजरासो' मध्ये आढळते. दुसरे मत असे, की मुहंमद बिन कासीमने सिंधवर आक्रमण केल्यानंतर आक्रमक लोक व सिंधमधले रहि-वासी यांच्या संपर्कातून या भाषेची उत्पत्ती झाली. तिसरे मत असे, की उर्दू दक्षिणेत जन्म पावली. गोवळकोंडा, विजापूर, इ. ठिकाणच्या मुसलमान बादशहांनी गज़ला, मस्नवी, मर्सिये, इ. काव्ये लिहिली आहेत. ही उर्दूची प्रारंभिक कविता मानली जाते. मीरच्या एका शेरावरून या गोष्टीचा अंदाज मिळतो –

ए मीर मैं ही इसको किया रेख़्ता बरना,
एक चीज़ लचर सी ब ज़बाने दकिनी थी ।

अर्थ – हे मीर ! मीच उर्दूला उर्दू बनविले. अन्यथा ती एक तुच्छ अशी दक्षिणी भाषा होती.

मात्र उर्दूच्या जन्मप्रदेशासंबंधी कितीही मतभेद असले तरी तिला महत्त्व मिळाले, ते दिल्लीच्या दरबारात. शाहजहाँच्या कारकिर्दीत तिला उर्दू हे नाव लाभले. उर्दू हा शब्द तुर्की असून, त्याचा अर्थ सैन्य किंवा लष्कर असा आहे. प्रारंभी हिला 'ज़बाने उर्दू' म्हटले गेले. कारण ही भाषा प्रथम लष्करात प्रचलित झाली.

उर्दूला भाषा या दृष्टीने पुढे आणणारा पहिला पुरुष अमीर खुस्रव हा होय. याचा जन्म इ. स. च्या १३ व्या शतकात झाला. व त्याचे कार्यक्षेत्र दिल्ली हेच राहिले. तो फारसी भाषेचा पंडित आणि कवीही होता. त्याने अरबी, फारसी, संस्कृत, अपभ्रंश व हिंदी या भाषांतील शब्दांचा उर्दूमध्ये भरणा केला व त्या भाषेची वाढ केली. त्याचा हा प्रयत्न मोगलांच्या काळात विकसित स्वरूपात दिसून आला.

उर्दू भाषेच्या प्रारंभिक अवस्थेचा अभ्यास केल्याअंती कळते, की उत्तरेच्याही आधी दक्षिणेत तिने साहित्यिक रूप धारण केले. १८ व्या शतकातील दिल्लीतल्या प्रमुख उर्दू कवींनी आपली काव्यशैली दक्षिणेतूनच मिळविली होती. मुहंमदशहाच्या दरबारात वली हा कवी आल्यानंतर उत्तर व दक्षिण या दोन्ही प्रदेशांतल्या उर्दू साहित्यिकांचा निकट संपर्क आला. शाहजहाँच्या काळातच उर्दूतली पहिली गज़ल रचली गेली. तिचा कर्ता चंद्रभान नावाचा ब्राह्मण होता. ती गज़ल अशी –

**न जाने किस शहर अंदर हमन को लाके डाला है।**
**न दिलबर है, न साकी है, न शीशा है, न प्याला है ॥**
**पिया के नाँव की सुमिरन, किया चाहूँ, करूँ कैसे ?**
**न तस्बीह है, न सुमिरन है, न कंठी है, न माला है ॥**

अर्थ – आम्हांला कोणत्या शहरात आणून घातले आहे, कोण जाणे ! (इथे) प्रियकर नाही, मद्य देणारा कोणी नाही, बाटली नाही की प्याला नाही; प्रियकराच्या नावाचे स्मरण करण्याची इच्छा आहे. पण करू कसे ? तसबीर नाही, आठवण नाही, कंठी नाही की माला नाही.

दक्षिणेतल्या राज्यावर जोवर अकबराने धाड घातली नव्हती, तोवर विजापूर, गोवळकोंडा, इ. मुसलमानी राज्यांतल्या दरबारांत शेर-शायरी बरीच चालत होती. कुतुबशाहीचा महंमदकुली कुतुबशहा हा स्वतः कवी होता. विजापूरचे इब्राहीम आदिलशहा व अली आदिलशहा हे दोन बादशहा कवी व साहित्यिक होते. इब्राहीम आदिलशहाने फारसीच्या बरोबरीने दक्षिणी उर्दूला आश्रय दिला. तो संगीताचा विलक्षण भोक्ता होता. त्याने वेळोवेळी विविध रागांत रचलेली आपली गीते एकत्र करून त्या संग्रहाला नवरस असे नाव दिले. आश्चर्याची गोष्ट ही, की त्याच्या काव्यात शिवपार्वती, सरस्वती, इ. पौराणिक देवदेवतांची स्तुती आढळते. तो सरस्वतीला म्हणतो—

**नवरस सूर जुग जुग जूनी आनद सर्वगुणी ।**
**यू सत्सरस्व्रती माता इब्राहिम प्रसाद भय दूनी ॥**

अर्थ– हे माते सरस्वती, इब्राहिमवर तुझी कृपा आहे म्हणून तुझ्या प्रसादाने त्याची नवरस गीते दीर्घकाळपर्यंत जगात टिकतील.

सतराव्या शतकाच्या सुरवातीस विजापुरातल्या त्या काळाच्या कवींत तहशीनउद्दीन मुल्ला कुतुबी, तवई हाशमी, इ. उर्दूचे कवी व साहित्यकार होते. नुसरती हा अली आदिलशहाच्या दरबारातील महाकवी होता. त्याने अलीनामा या नावाने आदिलशहाचे चरित्र लिहिले आहे. त्याची गुलशने इश्क व गुलदस्त ए इश्क ही मसनवी काव्ये प्रसिद्ध आहेत. दौलत नावाच्या कवीने शहा बहरामची कहाणी लिहिली. शहा मलिकने इस्लामविषयी काव्य लिहिले. शहा अमीमचा जवाहरुल-असरार हा काव्यग्रंथही धार्मिकच आहे. मौलाना वजदी याचा सबरस नावाचा एक गद्य ग्रंथ असून तो उर्दूतला पहिला साहित्यिक ग्रंथ मानला जातो. इब्तशाली, गौवासी, वहदी यांनी मसनवी काव्ये लिहिली आहेत.

दक्षिणेतील उर्दूचा आणखी एक मोठा कवी म्हणजे वली औरंगाबादी हा होय. तो पुढे औरंगाबादेहून दिल्लीस गेला आणि तिथल्या कविजनांवर त्याने आपला प्रभाव गाजविला. वलीने उर्दू कवितेत एक नवी शैली निर्माण केली आणि ती आजही थोड्या बहुत प्रमाणात चालू आहे. वलीच्या नंतर दिल्लीमध्ये उर्दू कवितेला बहर येत गेला. दिल्लीत दरबारी कवींच्या व्यतिरिक्त सूफी कवींचीही एक परंपरा होती. त्यांना राजदरबारात प्रतिष्ठा नसली, तरी जनतेत त्यांच्याविषयी प्रेम होते. दरबारी कवींच्या कवितेचा रंग वेगळा होता; आणि सूफी कवींचा वेगळा होता; पण तरीही प्रेम आणि शृंगार यांना दोन्ही ठिकाणी प्राधान्य होते.

उर्दू कवितेत प्रेमाची दोन रूपे मानलेली आहेत. एक हकीकी व दुसरे मज़ाज़ी. पहिल्यात परमात्म्याविषयी प्रेम प्रकट केले जाते आणि दुसऱ्यात ते व्यक्तिविशेषासाठी निर्माण होते. उर्दूवर संस्कृत, अरबी आणि फारसी, या तीन्ही भाषांचा प्रभाव पडलेला असला, तरी फारसीचा सर्वांत अधिक आहे.

इ. स. १७५७ साली प्लासीच्या लढाईत इंग्रजांचा विजय झाला. १७६१ मध्ये अहमदशहा अब्दाली याच्या आक्रमणाने भारतातले मोगल राज्य खिळखिळे झाले. शहाआलमच्या काळात तर मोगलांवर चारी बाजूंनी आक्रमणे झाली; पण अशा स्थितीतही दिल्लीतल्या उर्दू कवितेचा बहर ओसरला नव्हता. शहाआलम हा स्वतः फारसीचा कवी असला, तरी त्याच्या दरबारात उर्दू कवींचाही सन्मान होत होता. पण पुढे हे सगळे दिवस फिरले. दिल्लीवर सतत होणाऱ्या आक्रमणांच्या त्रासाने उर्दू कवी तिथून पळाले आणि लखनौ येथे नवाब आसफुद्दौला याच्या आश्रयाला आले. मीर आणि सौदा हे याच काळातले दोन सुप्रसिद्ध उर्दू कवी होत.

मीरचा जन्म आग्रा येथे इ. स. १७२३ साली झाला. वडील

पूर्ण नाव मीर महंमद तकी मीर. हा जितका प्रेमळ तितकाच स्वाभिमानी होता. त्याची धार्मिक मते उदार होती. इ. स. १७३७ पासून तो १७८२ पर्यंतच्या काळात दिल्लीत रक्तपात, खून, अंतःकलह, लूटमार याचे थैमान चालू होते. मीरला हे सगळे अत्याचार स्वतःच्या डोळ्यांनी पाहावे लागले. नादिरशहाचा हल्ला, महंमदशहाचा मृत्यू, अब्दालीचे अत्याचार, मराठे, शीख, रोहिले आणि जाट यांची आक्रमणे या सर्व गोष्टींमुळे दिल्ली उद्ध्वस्त झाली आणि तिची शतकानुशतके साठलेली संपत्ती नष्ट झाली. या आपत्तींत दिल्लीतली कैक घराणी बुडाली. अशा या परिस्थितीमुळे मीरला अनेक अमीर व नवाब यांच्याकडे आश्रयार्थ जावे लागले. मीरने १७५८ मध्ये आत्मचरित्र लिहायला घेतले. १७८५ पर्यंत त्याने ते आणून सोडले आहे. तो एका ठिकाणी म्हणतो—



उर्दू कवी मीर

**शहां के कुहल जवाहर थी खाक पा जिनकी।**
**उन्हींकी आँख़ोमें फिरते सलाइयां देखीं ॥**

अर्थ – ज्या बादशहाच्या पायांना धुळीच्या ऐवजी रत्ने लागत, त्याच्या डोळ्यांतून सळया फिरताना आम्ही पाहिल्या.

**दिल्ली में आज भीक भी मिलती नहीं उन्हें।**
**था कलतलक दिमाग जिन्हें ताजोतख्त का ॥**

अर्थ – कालपर्यंत ज्यांना राजमुकुटाची ईर्ष्या होती, त्यांना आज दिल्लीत भीकसुद्धा मिळेनाशी झाली आहे.

इ. स. १७८२ मध्ये मीरने दिली सोडली आणि तो लखनौ येथे नवाब आसफुदौला याच्या आश्रयाला गेला. मीरचे साहित्य फार मोठे आहे. त्याच्या नुसत्या गजलांचीच संख्या १६७४ भरते. शिवाय त्याने मसनवी म्हणजे दीर्घकाव्ये, कसीदे म्हणजे स्तुतिगीते व सलाम म्हणजे धार्मिक काव्येही लिहिली आहेत. मीरची कीर्ती त्याच्या गजलांवर आधारलेली आहे. गजल क्षेत्रात मीरची बरोबरी आजपर्यंत कोणी करू शकला नाही, असे रसिक म्हणतात. तळमळ, संवेदनाशील हृदय, हृदयाचा ठाव घेणारी भाषा आणि जीवनाच्या अनुभूतीतून निघालेले बोल यांमुळे मीरच्या गजला म्हणजे व्यथा आणि वेदना यांचे जणू अग्निकुंडच ठरल्या आहेत.

मीरच्या काव्यात इश्काचे मनोहर रंगही ठायी ठायी दिसतात. तो म्हणतो—

**कहता है दिल के आंखने मुझको किया ख़राब।**
**कहती है आंख ये के मुझे दिलने खो दिया ॥**
**लगता नहीं पता के सही कौनसी हूं बात।**
**दोनों ने मिलके मीर हमें तो डुबोदिया ॥**

अर्थ – हृदय म्हणते, की हा सारा घात डोळ्यांमुळे घडून आला. डोळे म्हणतात, की ही आपत्ती हृदयामुळे आली. खरे काय ते कळत नाही; पण दोघांनी मिळून मीरला मात्र सफाईने बुडविले.

मिर्जा महंमद रफी 'सौदा' हा मीरचा समकालीन कवी होय. त्याचा जन्म इ. स. १६९५ च्या सुमारास झाला. त्याचा स्वभाव रसिक आणि रंगेल होता. बापाकडून मिळालेली संपत्ती त्याने रंगढंग करून उधळून टाकली. तो म्हणतो –

**सुहबते शेर बबकफ ज्ञाम व सुराही दरदस्त।**
**इस सिवा सौदा को कुछ काम नहीं दुनियासे ॥**

अर्थ – कविजनांची सोबत, हातांत चषक आणि दारूची सुरई यांशिवाय मला जगाशी दुसरे काही काम नाही.

त्याच्या काळात लोक हळूहळू उर्दूकडे वळू लागले होते. फारसीच्या बरोबरीने उर्दूचे मुशायरेही होऊ लागले होते. पण सौदावर फारसीचा जबरदस्त पगडा होता. तो प्रथम फारसीतूनच कविता लिही. पण खान आरजू या कवीने एक दिवस त्याला सांगितले, की 'फारसी तुला अनुकूल नाही; तू उर्दूत कविता करू लागलास तर अद्वितीय ठरशील.' त्यामुळे मग तो उर्दूकडे वळला. तोही पुढे दिल्ली सोडून लखनौला गेला. लखनौच्या नवाबाशी त्याचे घनिष्ठ संबंध निर्माण झाले. त्याची शेवटची वर्षे तिथे सुखासमाधानात गेली. सौदाची काव्यसंपत्ती विपुल आहे. ती विविध प्रकारची आहे. उर्दू काव्याचा एकही प्रांत असा नाही, की ज्यात सौदाने संचार केला नाही. मीरसारखे संवेदनाशील, व्यथित हृदय त्याच्या जवळ नव्हते; पण त्याची कल्पनाशक्ती तरल व रसिकवृत्ती परिपुष्ट होती. प्रणयाची चित्रे डोळ्यांसमोर उभी करण्यात तो कुशल होता.

**तेरे आगे उस खुर्शीद का मुह खुश नहीं आता चमनसे।**
**बर्ना क्यों जाती रही वक्ते सहर शबनम्।**

अर्थ – (प्रेयसीला उद्देशून) तुझा तेजस्वी चेहरा पाहून दवबिंदूच्या मनात सूर्यसुद्धा भरेनासा झाला. म्हणून का तो सूर्योदय होताना निघून जातो अन् सूर्यास्तानंतर परत येतो?

**हल्के में उसकी जुल्फ़ के आरिज पे कर नजर।**
**कुछ शब में रह गया है गिरह खाके नूरे सुबह ॥**

अर्थ – तिच्या विखुरलेल्या केशकलापातून दिसणारे गोरे

गोरे गाल पाहिले की असे वाटते, जणू सूर्यास्त झाल्यावर प्रकाशाचा एक तुकडा रजनीच्या हातात अडकून राहिला असावा.

मीर आणि सौदा हे दोघेही पट्टीचे कवी. पण मीरचे काव्य व्यथित आणि हळुवार, तर सौदाचे प्रसन्न आणि सुखकर. दोघांची तुलना करताना एक टीकाकार म्हणतो, की 'मीर का कलम "आह" है और सौदाका कलम "वाह" है।'

या दोघांच्या जोडीला 'दर्द 'ला आणून बसविले, की उर्दूची तत्कालीन कवित्रिमूर्ती बनते. याचे पूर्ण नाव ख्वाजा मीर दर्द असे होते. हा एक सूफी संत होता. त्याच्या कवितेचा एक नमूना असा आहे –

> **तोहमतें चंद अपने जीम्मे धर चले**
> **आये क्या करने को और क्या कर चले।**
> **जिन्दगी है या कोई तूफान है**
> **हम तो इस जीने के हाथों मर चले।**

अर्थ – अनेक आपत्ती कोसळल्या, त्यांची जबाबदारी शिरावर घेऊन चालून गेलो. आलो कशाकरिता आणि काय करून गेलो ? हे जीवन आहे की एखादे वादळ आहे ? आम्हाला तर या जीवनाच्या हातानेच मरण आले.

नज़ीर अकबराबादी हा जनतेचा आवडता कवी होता. त्याची शैलीही स्वतंत्र होती. त्याने आपली पुष्कळशी कविता लहान मुलांच्यावर लिहिली आहे. याचे कविहृदय विशाल होते. याने जशी पैगंबराची 'नात' (प्रशंसापर कविता) लिहिली, तसेच कृष्ण कन्हय्याचे बाळपणही लिहिले. त्याने गुरू नानकाचे स्तोत्र लिहिले, तसेच शिव-पार्वतीच्या विवाहाचे काव्यही लिहिले. प्रतिष्ठित कविसमाजात जरी त्याला स्थान नव्हते, तरी अशिक्षित जनता आणि मुले यांचा तो आवडता होता.

लखनौमध्ये गज़लचा विकास झाला, त्याचे श्रेय मुसहफ़ी याला आहे. त्याच्या जोडीचा कवी इन्शा हा होय. याने हास्यरसप्रधान कविता लिहिली. उर्दू भाषेचे पहिले व्याकरण लिहिण्याचा मान यालाच आहे. इन्शाचा सोबती एक आंधळा कवी होता. त्याचे नाव शेख-कलंदर बख्श जुर्‌अत असे आहे. जुर्‌अतचे जुरात झाले आहे. हाही लखनौवासीच होता. तिथल्या नबाब व अमीर यांच्या जनानखान्यांत राहता यावे व विलासी लावण्यवतींचे सौंदर्य डोळे भरून पाहायला मिळावे म्हणून आपण अंध असल्याची त्याने बतावणी केली. पण त्याचे दुर्दैव असे, की तो पुढे खरोखरीच आंधळा झाला. शेवटची २५–३० वर्षे अंधावस्थेत काढून इ. स. १८१० साली तो मरण पावला. याच्या गज़लांत उत्तान शृंगार बराच आढळतो. त्याने प्रेम, विरह, मीलन इ. भावनांची उत्कृष्ट वर्णने केली आहेत. तो एका ठिकाणी म्हणतो –

> **याद आती है तो क्या फिरता हूं घबराया हुवा।**
> **चंपई रंग और बदन उसका वो गदराया हुआ॥**
> **बात ही अव्वल तो वो करता नहीं मुझसे कभी।**
> **और जो बोले है कुछ मुंहसे तो शरमाया हुआ॥**
> **नोके मिजगांपर दिले पज्मुर्दा है यूं सरनिगूं॥**
> **शाखसे झुक आये हैं ज्यूं फल मुरझाया हुवा॥**

अर्थ – तिचा तो चाफ्यासारखा वर्ण आणि प्रफुल्ल गात्रे आठवतात, तेव्हा मनाची अवस्था विचित्र होते. आधीच ती माझ्याशी बोलत नाही आणि बोलली तरी किती ते लाजणे तिचे ! तिच्या पापण्यांच्या टोकावर माझे हृदय कसे अडकले आहे, तर फांदीला कोमेजलेले फूल चिकटलेले असावे तसे !

१९ व्या शतकाच्या पूर्वार्धात दिल्लीमध्ये गालिब, जौक़ व मोमिन आणि लखनौमध्ये आतिश व नासर हे कवी उदयाला आले व लोकप्रसिद्ध झाले. जौक हा गज़लांपेक्षा कसीदे चांगला लिहीत होता. गालिब हा त्या शतकाचे भूषणच म्हटला पाहिजे. त्याचा जन्म इ. स. १७९७ व मृत्यू १८६९ मध्ये झाला.

ग़ालिबचे नाव मिर्ज़ा असदुल्ला खाँ असे होते. प्रथम तो आपले कविनाम असद असे लावी. पण पुढे त्याने ते टाकले व ग़ालिब असे घेतले. आजही त्याच नावाने तो काव्याकाशात



उर्दू कवी ग़ालिब

चमकत आहे. उर्दू काव्यात ग़ालिबची शैली अद्वितीय आहे आणि त्याला आपल्या प्रतिभेच्या उंच उड्डाणाची जाणीव होती आणि

त्याविषयी गर्वही होता. एका जागी स्वत:बद्दल तो म्हणतो –

आगही दामे शुनीदन, जिस कदर चाहे बिछाये,

मुद्द्आ उनका है अपने आलमे तहरीर का।

अर्थ – श्रवणशक्तीचे जाळे पसरले तरीही बुद्धीला माझा कवितारूप अदृश्य पक्षी पकडता येणार नाही.

ग़ालिब हा प्रथम स्वतंत्रता व स्वाभिमान यांचा पूजक होता; पण भारतात इंग्रजी राज्य स्थापित झाल्यावर त्याचा तो गुण शिल्लक उरला नाही. जुगार खेळल्याच्या अपराधावरून तो एकदा पकडला गेला व तुरुंगात त्याचा बराच छळ करण्यात आला. १८५७ च्या क्रांतियुद्धानंतर तर त्याला निराशेने पूर्ण घेरले.

ग़ालिब काव्य लिहीत होता, तसेच गद्यही लिहीत होता. उर्दू-ये-मोअल्ला, उदे-हिंदी व खुतू-ते-ग़ालिब असे त्याच्या पत्रांचे तीन संग्रह प्रकाशित झाले आहेत. ग़ालिब हा असा एक साहित्यिक आहे, की ज्याच्या काव्यावर अनेक टीकाग्रंथ लिहिले गेले.

ग़ालिबच्या बरोबरीने दिल्लीतील काव्यक्षेत्र वैभवसंपन्न करणारा ज़ौक़ हा आणखी एक कवी होय. याचा जन्म इ. स १७९० मध्ये झाला. याचे संपूर्ण नांव शेख इब्राहिम 'ज़ौक़' असे होते. ज़ौक़ची ख्याती गज़लपेक्षा कसीद्यांत विशेष आहे. याला दिल्लीच्या अकबरशहाचा आश्रय होता. अकबरशहालाही कविता करण्याचा नाद होता; पण त्या कवितांतल्या उणिवा दूर करणे व त्याच्या अर्धवट कविता पुऱ्या करून देणे अशी कामे ज़ौक़ला करावी लागत. उर्दूवर ज़ौक़चे विलक्षण प्रभुत्व होते. 'ग़ालिबच्या कल्पना आणि ज़ौक़ची भाषा' अशी म्हणच पडली आहे. ज़ौक़च्या कितीतरी काव्यपंक्ती आजही लोकोक्तीप्रमाणे वापरल्या जातात. जीवन क्षणभंगुर आहे, हे सांगताना तो म्हणतो –

अए शम्मा तेरी उम्रे तबई है एक रात।

रोकर गुज़ार या उसे हंसकर गुज़ार दे ।।

अर्थ – हे ज्योती, तुझे जीवनच मुळी एका रात्रीचे आहे. मग ते हसत–खेळत, नाही तर दु:ख करीत घालव.

गाफ़िल है बहारे चमन उम्रे जवानी।

कर सैर, के मोसम ये दुबारा नहीं आता ।।

अर्थ – अरे! हे तारुण्य म्हणजे दोन दिवसांचा बहर. याचा उपभोग घे. हा ऋतू पुन्हा येणार नाही.

कीर्ती आणि मानमरातब संपादून ज़ौक़ इ. स. १८५४ साली मृत्यू पावला. त्याची कितीतरी कविता १८५७ च्या संग्रामात नष्ट झाली. महंमद हुसेन आज़ाद हा त्याचा शिष्य होय. त्याने ज़ौक़चे मिळाले तेवढे काव्य प्रकाशित केले आहे. तेवढ्यावरून त्याच्या दर्जेदार प्रतिमेचा प्रत्यय येतो.

मोमिन हाही त्याच काळातला कवी आहे. ग़ालिब, ज़ौक़ आणि मोमिन या तिघांनी १९ व्या शतकाच्या पूर्वार्धात उर्दूचे



उर्दू कवी ज़ौक़

साहित्याकाश उजळून टाकले. त्याच शतकाच्या उत्तरार्धात लखनौ येथे अमीर व जलाल आणि दिल्ली येथे दाग़ व राशिख हे चार कवी प्रसिद्धीस आले. हे सर्व गज़लकार असून, त्या सर्वांत दाग़चे स्थान उच्च होते. दाग़चे संपूर्ण नाव नबाब इब्राहिम उर्फ 'मिर्ज़ाखान दाग़' असे होते. १८३१ साली याचा जन्म झाला. लहानपणापासूनच त्याला काव्याचा नाद लागला. तो लाल किल्ल्यातल्या विलासी वातावरणात वाढला; त्यामुळे त्याच्या काव्यात रंगेलपणाला बहर आलेला आहे. तो एका ठिकाणी एका नर्तकीबद्दल म्हणतो –

जुटी जुटी भौवों की वो तहरीर।

क्यौ न दिल इस लकीर पर हो फ़क़ीर ।।

गर्दन उसकी है वो सुराहीदार।

हो सुराही भी देखकर सरशार ।।

ऐसे पत्थर वो दोनो फ़ुब्बएनूर।

शीशाये दिल हो जिनसे चिकनाचूर ।।

अर्थ – एकत्र आलेल्या भुवयांची ही रेषा! हिच्यावर मन वेडे का होणार नाही? मान सुरईसारखी. सुरईनेही जी पाहून आनंद मानावा अशी. वक्षस्थळे म्हणजे तेजाची दोन अंडीच. ती दगडासारखी कठिण. मग हृदयरूपी काचेचा चक्काचूर का होणार नाही?

दाग़चा शिष्यपरिवार अफाट होता व तो साऱ्या भारतभर पसरला होता. दाग़ हा मुख्यत्वे गज़लकवी होता. त्याच्या

गझलांची संख्या हजाराच्या जवळपास भरते.

उर्दू गद्याचा विकास मुख्यत्वे कलकत्ता येथे झाला. तिथल्या फोर्ट विल्यम कॉलेजमध्ये एक उर्दू अकादमी निर्माण झाली होती. तिच्यातर्फे उर्दू भाषेत पुस्तके प्रसिद्ध होऊ लागली. गालिबच्या पत्रांचे तीन संग्रह प्रसिद्ध झाले. त्यानंतर मुहंमद हुसेन आज़ादचे 'मकतुबाते आज़ाद', इकबालचे 'इक-बालनामा' व मौ. अबुल कलाम आज़ादचे 'गुबारे खातिर' ही पुस्तके प्रसिद्ध झाली. हाली व मुहंमद आज़ाद यांनी उर्दू गद्याच्या नव्या शैलीचा पाया घातला. मुहंमद आजाद यांनी अनेक ग्रंथ लिहिले. त्यांत आवे हयात हा उर्दू काव्याचा इतिहास सुप्रसिद्ध आहे. त्यानंतर मौलाना शिवलीचे नाव येते. त्यांनी मअरिफ नावाचे उर्दू वृत्तपत्र आज़मगढहून चालविले. दिल्लीतले पहिले कादंबरीकार मौलवी नज़ीर अहमद हे होत. त्यांच्या बऱ्याच कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. मुन्शी अमीर अहमद यांनी अमीरुल-लुग़ात या नावाने उर्दूचा एक शब्दकोश लिहा-यला घेतला होता; पण तो पूर्ण होण्याच्या आतच त्याचा मृत्यू झाला. दुसरा शब्दकोश अज़ीजुल-लुग़ात हा लखनौ येथून प्रकाशित झाला.

विसाव्या शतकाच्या प्रारंभी मुन्शी गंगाप्रसाद वर्मा यांनी हिंदुस्तानी अखबार या नावाचे वृत्तपत्र सुरू केले. उर्दूत नव्या धर्तीच्या कथालेखनाचा प्रारंभ मुन्शी बालमुकुंद गुप्त यांनी केला. विसाव्या शतकाच्या प्रारंभी मुन्शी प्रेमचंद हे उर्दूतून कथा लिहू लागले. याच काळातले दुसरे कथालेखक कृष्णचंद्र हे होत. यांच्यापासूनच प्रगतिशील कथालेखनाला प्रारंभ झाला. त्यानंतर राजेंद्रसिंह बेदी, सआदत हसन मंटो, फ़िक्र तौंसवी, देवेन्द्र सत्यार्थी, उपेंद्रनाथ 'अश्क', रेवती सरन इ. कथालेखक उर्दू साहित्यात चमकले. मुमताज शीरीं, इस्मत चुगताई, सालिहा आबिद हुसेन या स्त्रिया कथालेखिका म्हणून पुढे आल्या. विनोदी कथालेखनात मिर्जा फरहत अल्लाबेग यांनी कीर्ती मिळविली.

कादंबरीलेखकांत पहिला कोण या बाबतीत विवाद आहे. कोणी म्हणतात, पं. रतननाथ 'सरशार' हे पहिले, तर कोणी म्हणतात की मौलवी नज़ीर अहमद हे पहिले होत. मुन्शी प्रेमचंद यांच्या चौगाने हस्ती, मैदाने अमल, या कादंबऱ्या सुप्रसिद्ध आहेत. कृष्णचंद्रांची शिकस्त व शौकत थानवी यांची बकवास या कादंबऱ्याही बऱ्याच प्रसिद्ध आहेत. उर्दूच्या साहित्यसमालोचकांत अदीब, सय्यद एहतेशाम हुसेन व सुरूर हे श्रेष्ठ समजले जातात.

विसाव्या शतकातल्या उर्दू कवींत इक़बाल हे राष्ट्रीय कवी मानले जातात. हिमालय ही त्यांची पहिली कविता इ. स. १९०१ साली प्रसिद्ध झाली. विसाव्या शतकाची पहिली दहा वर्षे राष्ट्रीय चळवळीच्या दृष्टीने फार धामधुमीची होती. त्या काळात राष्ट्रीय भावनेचा परिपोष व्हावा, म्हणून इक़बालनी अनेक स्फूर्तिदायक गीते लिहिली. इ. स. १९०५ मध्ये ते तत्त्व-ज्ञानाच्या उच्च अभ्यासासाठी इंग्लंडमध्ये गेले. तिथे इस्लाम आणि मुसलमानी राष्ट्रे यांच्या इतिहासाचा अभ्यास केल्यावर त्यांचे पूर्वीचे मन बदलले. त्यांनी भारतीय राष्ट्रभावनेचा त्याग केला आणि इस्लामच्या पुनरुज्जीवनाकडे आपले लक्ष वळविले. त्यांच्या काव्यातून खुदीचे (अस्मितेचे) तत्त्वज्ञान प्रस्फुरित होऊ लागले. व्यापक इस्लामी जगाला आपला संदेश पोचावा, म्हणून त्यांनी उर्दू सोडून फारसीचा आश्रय केला. त्यांचे बांगे-दरा (सूचनेची घंटा), बाले जबरेल (देवदूत गॅब्रिएलचे पंख), ज़र्बे कलीम (उपदेशकाचा तडाखा) हे उर्दू कवितासंग्रह व असरारे खुदी (अस्मितेचे रहस्य), रमूज़े बेखुदी (अनस्मितेचे संकेत), पयामे मशरिक (पूर्वेचा संदेश) हे फारसी कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत.

मानवी अस्मितेचे भव्य चित्र इकबालनी काढले आहे. आपल्या काव्याच्या द्वारे त्यांनी मानवी मनाला अमर्याद महत्त्वाकांक्षेने प्रेरित होण्याचा व पुढे चलण्याचा संदेश दिला आहे–

सितारोंके आगे जहाँ और भी है।
अभी इश्क के इम्तिहां और भी है।।
तही जिन्दगीसे नहीं ये फिजायें।
यहाँ सैकडों कारवां और भी है।।
किनाअत न कर आलमें रंगोबूपर।
चमन और भी आशियां और भी है।।
इसी रोज़ो शब में उलझकर न रहजा।
के तेरे ज़मां वो मकां और भी है।।

अर्थ – नक्षत्रमंडळाच्या पलिकडेही विश्वे आहेत. तुझ्या प्रेमाच्या कसोटीचे क्षण अद्याप पुढे आहेत. वातावरण जीवन-रहित नाही. त्यांत अनेक कारवान आहेत. या जगातील रस-गंधांवरच संतोष मानू नकोस. अजून पुष्कळ बागा आणि घरटी तुझी वाट पाहत आहेत. येथील दिवस-रात्रीच्या चक्रात गुरफटून राहू नकोस; कारण तुझ्याकरिता अजून दुसरे दिक्काल आहेत.

याच काळातला आणखी एक उर्दू कवी पं. ब्रजनारायण चकबस्त हा होय. हा राष्ट्रीय वृत्तीचा कवी होता. याने म. गांधी, डॉ. ॲनी बेझंट, गोखले या राष्ट्रीय पुढाऱ्यांवर उर्दू शेर लिहिले आहेत. अज़ीज़ या कवीचे भाग्य हे, की त्याचे शिष्य चांगल्या दर्जाचे कवी निघाले. त्यांमध्ये जोश मलिहाबादी याचे नाव प्रामुख्याने घेतले जाते. तो उर्दूचा श्रेष्ठ कवी मानला जातो. त्याला क्रांतिकवी असेही म्हणतात. पुढे तो

प्रेमाचाही कवी बनला. मलिहाबादचे सरदार, जागिरदार इ. लोक जे रंगढंग करीत होते, तेच त्यानेही केले. तारुण्य आहे तोवर इश्काची मजा लुटून घ्यावी अशा वृत्तीचा तो बनला. एके ठिकाणी त्याने म्हटले आहे –

नौजवानीमें मसाहबसे डरता है मुझे ।
नासिहा ! नादाँ यह है वोह मौसमे बर्को शरर ।।
आलसे कैफो जूनूंनें मारती है क़हक़हे ।
ज़िन्दगी जब मौतकी आँखोंमें आँखें डालकर ।।

अर्थ – अरे वेडचा उपदेशका, तारुण्यामध्ये तू मला संकटाची भीती दाखवितोस ? आग आणि बिजली यांचा हा काळ असतो. या वेळी जीवन हे मृत्यूच्या डोळचाशी डोळा भिडवून उन्मत्तपणे खदखदं हसत असते.

विसाव्या शतकात उर्दू कवितेत काही नवीन प्रवाह सुरू झाले. अकबर इलाहाबादी याने हास्यरसाच्या द्वारे प्राचीन रूढीचे रक्षण करण्याचा संदेश दिला. इक्बाल प्रथम राष्ट्रीय कवी होते ते पुढे ' शायरे इस्लाम ' बनले. मौ. मुहंमद अलीने नवयुवकांत जागृती निर्माण केली. मौ. हसरत मोहानीने खऱ्या प्रेमाचे वर्णन केले. वदायूंनी व अज़ीज़ लखनवी यांनी निराशेची गंभीर काव्ये गायिली. हालीने नवी शैली निर्माण केली. सर सय्यद अहमदखाँ यांनी अलिगड येथे उर्दूचे मोर्चे लावले. चालू शतकाच्या प्रारंभीच अंजुमान-तरक्की-ए-उर्दू या संस्थेचा जन्म झाला. औरंगाबाद येथे तिचे केंद्र स्थापित झाले. मौ. अब्दुल हक्क हे त्या संस्थेचे मंत्री होते. त्यांनी उर्दू चळवळीला मुस्लीम लीगच्या चळवळीचे एक अंग बनवून टाकले. त्या संस्थेला निजामाकडून पुष्कळच साहाय्य मिळाले. पुढे काही कालाने या संस्थेचे कार्यालय दिल्लीत आणण्यात आले. उर्दूच्या उन्नतीसाठी स्थापित झालेली ती संस्था पुढे राजकारणातही भाग घेऊ लागली.

भारताची फाळणी झाल्यावर त्या संस्थेचीही फाळणी झाली. मौ. अब्दुल हक्क पाकिस्तानात निघून गेले. आज मितीस अंजुमान-तरक्की-ए-उर्दू या नावापुढे हिंद हा शब्द लागलेला असून, त्या संस्थेचे कार्यालय अलिगड येथे आहे. या संस्थेतर्फे ' हमारी जवान ' व ' उर्दू अदब ' अशी दोन नियतकालिके अलिगड व लखनौ येथून प्रसिद्ध होतात. जामिया मिलिया इस्लामिया ही उर्दूची तरफदारी करणारी आणखी एक संस्था होय. मौ. मुहंमदअल्ली यांनी या संस्थेला जन्म दिला. या संस्थेने वरेच उर्दू ग्रंथ प्रकाशित केले आहेत. ही संस्था राष्ट्रीय वृत्तीची आहे. तिच्या तर्फे तालिमो-तरक्की नावाचे एक उर्दू नियतकालिक निघत होते. या संस्थेतर्फे मुशायरेही बरेच होत. या संस्थेतून जे विद्यार्थी बाहेर पडले, त्यांत भारताचे उपराष्ट्रपती ज़ाकिर हुसेन यांचे नाव अग्रगण्य आहे. दुसरे मौ. शफी–कुर्रहमान किदवई हे होत. [ उ. का. प.; उ. उ. सा. ]

## उर्दू रंगभूमी

उर्दू रंगभूमीचा इतिहास अवघा नव्वद-ब्याण्णव वर्षांचा आहे. इ. स. १८४२-४३मध्ये उर्दूतले पहिले नाटक रंगभूमीवर आले आणि इ. स. १९३४-३५ च्या सुमारास ही रंगभूमी अस्त पावली. असे का घडले, याविषयी उर्दू साहित्यिकांत नेहमी चर्चा चालते. या शंभर वर्षांच्या काळात उर्दू रंगभूमीला अनेक स्थित्यंतरांतून जावे लागले आहे. उर्दू रंगभूमीला परंपरा नव्हती. उर्दूतील बहुतेक साहित्यप्रकार पर्शियन साहित्यातून आलेले आहेत आणि त्या साहित्यात नाटक नाही. इराणात किंवा अरब मुलखात नाटक हे अधार्मिक समजून त्यावर बंदी घातलेली होती. १९ व्या शतकाच्या सुरवातीपर्यंत भारतात अमीर-उमरावांच्या करमणुकीच्या कार्यक्रमांत गायन, नर्तन, नकला, सोंगे, इ. चा अंतर्भाव होत असे. सामान्य समाजात लळितासारखे नौटंकी नावाचे खेळ होत. राधा–कृष्णांच्या चरित्रावर आधारलेले रासक्रीडेचे आणि रामचरित्रातल्या प्रसंगांचेही खेळ होत.

लखनौचा शेवटचा नबाब वाजिद अली शहा हा उर्दू रंगभूमीचा प्रवर्तक मानला जातो. त्याला नाच-गाण्याचा विलक्षण छंद होता. त्यातूनच त्याला नाटकाची स्फूर्ती झाली. उत्तर प्रदेशातले रासक्रीडेचे खेळ पाहून त्याने राधाकृष्णांच्या प्रीतीवर आधारलेले ' राधा कन्हैया का किस्सा ' हे नाटक रचले उर्दूतले हे पहिले नाटक होय. ते त्याने आपल्याच राजवाडचात रंगभूमीवर आणले. उर्दूत प्रारंभी नाटकांना ' रहस ' असे म्हणत. या शब्दाचे मूळ रास या शब्दात आहे. त्यावरून उर्दू नाटचाची उत्क्रांती रासातून झाल्याचे कळून येईल. या नाटकात सगळी कामे स्त्रियाच करीत. याच्या प्रयोगासाठी वाजिद अली शहाने अमाप पैसा खर्च केला. त्यातल्या श्रीकृष्णाचा मुकुटच एका लाखाचा होता, असे म्हणतात. हे पहिले नाटक इ. स. १८४२ किंवा ४३ या दोन वर्षांच्या दरम्यान रंगभूमीवर आले असावे, असे उर्दू साहित्याचे संशोधक ठरवितात. याच वाजिद अली शहाचे दुसरे नाटक ' दर्जा ए ताश्शुक ' हे इ. स. १८५१ मध्ये रंगभूमीवर आले.

या नाटकाचे १४ प्रवेश होते. एका रात्री एक प्रवेश, अशा प्रकारे हे नाटक १४ रात्री चालले होते. याही नाटकावर वाजिद अली शहाने लाखो रुपये खर्च केले. ' अफसाना ए इश्क ' व ' बहरे उल्फत ' अशी आणखीही दोन नाटके त्याने रंगभूमीवर आणली.

इ. स. १८५६मध्ये इंग्रजांनी शहाला राज्यभ्रष्ट केले. आणि

त्याबरोबरच त्याच्या नाटकांचाही खेळ खलास झाला.

लखनौला याच काळात सामान्य जनतेलाही नाटकाची रुची उत्पन्न झाली होती. कवी अनामत याने इंदरसभा या नावाचे एक नाटक इ. स. १८५२ मध्ये रचले. यालाही प्रेरणा वाजिद अली शहाकडूनच मिळाली होती. इ. स. १८५४ मध्ये ते रंगभूमीवर आले. त्यात इंद्राची भूमिका खुद्द वाजिद अली शहाने केली व अप्सरांची कामे राजवाड्यातील परीखान्यातल्या स्त्रियांनी केली. या नाटकाचे कथानक असे –

सिंहलद्वीपाचा राजा इंद्र याला पऱ्यांचे नृत्य पाहण्याची इच्छा होते. त्याप्रमाणे अनेक पऱ्या नृत्य-गायनाने त्याला खूष करतात. शेवटी येते सब्जपरी. तिचे गाणे ऐकल्यावर इंद्र झोपी जातो. मग सब्जपरी आपल्या रक्षकाला सांगते. ‘ इकडे येताना वाटेत मी एक सुंदर राजपुत्र पाहिला. तेव्हापासून त्याच्यावर माझे मन जडले आहे. तू त्याला घेऊन ये.’ रक्षक त्या कामगिरीवर जातो. त्या राजपुत्राचे नाव गुलफाम असे असते. सब्जपरीचा रक्षक त्याला घेऊन तिच्याकडे येतो. सब्जपरी त्याच्यापुढे आपले प्रेम व्यक्त करते. गुलफाम म्हणतो, की ‘ तुझे माझ्यावर प्रेम असेल, तर मला इंद्रसभा दाखव. ’ ती गोष्ट कठीण असते; पण गुलफामच्या प्रेमासाठी तिला ते साहस करावे लागते. ती गुलफामला घेऊन जाते व एका बागेत लपवून ठेवते. दुसऱ्या एका रक्षकाकडून ती गोष्ट इंद्राला कळते. इंद्र प्रक्षुब्ध होतो व गुलफामला पकडून एका विहिरीत कोंडून ठेवतो. त्या दुःखाने सब्जपरी जोगीण बनते व गाणी गात रानावनांत हिंडू लागते. पुढे एकदा अशीच भटकत भटकत इंद्राकडे येते. इंद्र तिला ओळखीत नाही; पण तिचे गाणे ऐकून प्रसन्न होतो. तो तिला वर देण्यास प्रवृत्त होतो. सब्जपरी गुलफामशी आपले मीलन व्हावे, असा वर मागते. इंद्र तिची इच्छा पूर्ण करतो व नाटक सुखान्त होते.

इंदरसभा नाटकाच्या एकंदरीत ४८ आवृत्त्या निघाल्या. त्या देवनागरी, गुजराती व गुरुमुखी अशा निरनिराळ्या लिपींतून आहेत. उत्तर प्रदेश, ढाका व मुंबई या ठिकाणीं त्या नाटकाचे शेकडो प्रयोग झाले. लखनौनंतर उर्दू रंगभूमी एका बाजूने ढाक्याकडे सरकली, तर दुसऱ्या बाजूने ती मुंबईत दाखल झाली. मुंबईत तिला पारशी लोकांनी पुढे आणले. इ. स. १८५३ साली श्री. भाऊ दाजी लाड यांनी गोपीचंद नामक एक नाटक लिहिले व ते हिंदू ड्रॅमॅटिक कोर या संस्थेने त्याच साली रंगभूमीवर आणले. मुंबईत रंगभूमीवर येणारे हे पहिले उर्दू नाटक होय, असे म्हणतात. इ. स. १८५३ व ५४ मध्ये ‘ पैदाइशे सय्यादकश ’, ‘ हाजीमियां फजल और कलालखाना ’, ‘ पठाण सर्फराज और गुल ’ व ‘ अल्लाउद्दिन और बानूजुलेखा ’, ही उर्दू नाटके पार्शी ड्रॅमॅटिक कोरने मुंबईत रंगभूमीवर आणली. ग्रँटरोडवरील नाट्यगृहात महाराष्ट्रीय आणि पारशी या मंडळींनी त्या त्या उर्दू नाटकांचे अनेक प्रयोग केले. इ. स. १८६२ मध्ये मुंबईत पारश्यांचा ‘ व्हिक्टोरिया क्लब ’ स्थापन झाला. त्याचीच पुढे व्हिक्टोरिया नाटक मंडळी बनली व ती १८७३ पर्यंत चालली. सुरवातीच्या या नाट्यप्रयोगाचे वर्णन आर्देशीर दादाभाई ठूठी यांनी खालील शब्दांत केले आहे–

“बेंच आणि फळ्यांच्या द्वारे रंगभूमी तयार करीत. स्टेजच्या डावी-उजवीकडे नटांना बसण्याकरिता खुर्च्या असत. त्यावर बसून ते मेकअप करीत आणि तयारी करीत. समोर खुर्च्या, सोफे इत्यादी मांडलेले असत. कित्येक प्रेक्षक खुर्च्या घेऊन येत. रंगभूमीच्या मागच्या बाजूस एक पांढरा पडदा असे. नटांपैकी कुणाचे काम आवडले, तर प्रेक्षक त्याला बोलावून बक्षिसी देत. ती घेऊन तो नट रंगभूमीवर पुन्हा आपले नाटकातील काम चालू करी. ”

सुरवातीची उर्दू नाटके गुजरातीतून अनुवादित केलेली असत. इ. स. १८७१ मध्ये मर्जबान या गृहस्थाने खुर्शीद हे नाटक गुजरातीतून अनुवादित केले. दादाभाई पटेल याने उर्दू कवी मीर हसन याच्या सहरुल बयान या दीर्घ काव्यावरून ‘ बेनजीर बद्रामुनीर ’ या नावाचे नाटक तयार करून ते रंगभूमीवर आणले.

इ. स. १८७० साली मुंबई येथे पेस्तनजी फ्रामजी या पारशी गृहस्थाने एक उर्दू नाटक कंपनी सुरू केली. त्या कंपनीत खुर्शिदजी बाटलीवाला हा एक प्रख्यात विनोदी नट होता. त्याने नंतर ‘ पार्शी व्हिक्टोरिया कंपनी ’ नावाची स्वतःची नाटक-कंपनी सुरू केली. या कंपनीने भारतात अनेक लहानमोठ्या शहरीं दौरे काढून आपली नाटके केली.

या ठिकाणी एका गोष्टीचा निर्देश केला पाहिजे तो हा, की पारशी नाटक कंपन्यांनी उर्दू रंगभूमीची उल्लेखनीय सेवा केली असली, तरी त्यात सेवेच्या भावनेपेक्षा धंदेवाईकपणाच अधिक होता. पारशी कंपन्यांचे मालक सुरुवातीला नाटकाचे संवाद स्वतःच लिहीत किंवा एखाद्या अज्ञात मुन्शीकडून लिहवून घेत. त्यामुळे नाटककार म्हणून कंपनीच्या मालकाचीच प्रसिद्धी होई. हा प्रकार १८८० पर्यंत टिकला. त्यानंतर या पारशी कंपन्यांचे मालक लेखकांकडून नाटके लिहवून घेऊ लागले. रौनक बनारसी व मियाँ झरिफ या दोघां नाटककारांनी पेस्तनजीच्या कंपनीसाठी व विनायक प्रसाद तलीब याने बाटलीवाला कंपनीसाठी नाटके लिहिली. अहसन लखनवी, नारायणप्रसाद बेताब व आगा हश्र काश्मीरी हे आणखी तीन नाटककार त्या काळात पुढे आले. बेताब याने आपल्या नाटका-

साठी भारतीय इतिहास व पुराणे यांच्यामधले विषय हाताळले. त्याने एकंदर वीस नाटके लिहिली. आगा हश्र हा बेताबहूनही सवाई ठरला. त्याने एकूण २८ नाटके लिहिली आणि पारशी कंपन्यांनी ती रंगभूमीवर आणली. त्याने पुढे स्वतःची नाटक-मंडळीही सुरू केली. आगा हश्र हा अद्‌भुतरम्यतावादी नाटक-कार होता. बेताबची महाभारत व रामायण, झरिफची बुलबल इ बिमार व शिरी फरहाद, तालीबची गोपीचंद आणि हरिश्चंद्र, आगा हश्रची शहीदे नाज, सैदे हवस, मुरीद ईजक आणि अशीर इ हिर्स ही नाटके इ. स. १९०० ते १९३० पर्यंतच्या काळात चांगलीच गाजली.

एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या २५ वर्षांत आणि चालू शतकाच्या सुरवातीस लोक नाटकाकडे निव्वळ करमणूक म्हणून पाहत. वेषभूषा, भडक देखावे, जादूचे देखावे, तार-स्वरांतली भाषणे, याच गोष्टी लोकांना फार आवडत. अनुप्रास-युक्त वाक्ये आणि काव्यमय संवाद यांचीही प्रेक्षकांना मोहिनी पडे. आणि जनतेची या प्रकारची अभिरुची पाहूनच नट, नाटककार आणि कंपन्यांचे मालक आपला नाटचसंसार उभा करीत, पण त्यानंतर ही परिस्थिती हळूहळू बदलू लागली. लोकांच्या अभिरुचीत फरक पडला. नाटककारही नाटच-कलेच्या सुधारणेकडे झुकले. ही दृष्टी मुख्यत्वे तलीबची होती.

त्यापुढचे नाटककार विशिष्ट उद्देश मनात धरून नाटके लिहू लागले. त्यांनी कथानकाच्या बांधेसूदपणाकडे आणि त्याच्या परिणामाकडे विशेष लक्ष द्यायला सुरुवात केली. अब्दुल मजीद दर्याबादी याने बालविवाहाचे दुष्परिणाम दाख-विण्यासाठी झूद पाशेमन हे नाटक लिहिले. अब्दुल हलीम शरार याने मेवा–इ–तलख हे नाटक लिहून पडदापद्धतीवर ताशेरे झाडले. उमराव अली याने १८९३ साली इल्बर्ट बिल या नावाचे पहिले राजकीय नाटक लिहिले. कृष्णचंद झेबा याने जख्मी पंजाब हे नाटक लिहून पंजाबी जनतेची मने थरारून सोडली. पंजाब सरकारने त्या नाटकावर बंदी घालून त्यावरचा आपला राग व्यक्त केला. मौलवी जाफ़रअली याने आणखी एक पाऊल पुढे टाकून जंगे रूसो–जपान या नावाचे आंतरराष्ट्रीय पार्श्वभूमीवर आधारलेले नाटक लिहिले.

अशा प्रकारे चालू शतकाच्या पहिल्या २५ वर्षांत उर्दू रंग-भूमी मर्यादित जगातून विशाल जगात प्रविष्ट झाली. तिने प्रगतीची बरीच वाटचाल केली खरी; पण त्याबरोबरच तिच्यात काही उणिवाही तितक्याच प्रमाणात राहून गेल्या. संघर्ष हा नाटकाचा आत्मा होय. उर्दू नाटकात त्याचा कुठे पत्ताच लागत नाही. स्वभावलेखनाकडेही दुर्लक्षच झाले आहे. मानसिक संघर्ष आणि त्याची सखोलता या गुणांचा तर, उर्दू नाटचकलेला स्पर्शही झालेला नाही. त्यामुळे उर्दू नाटककारांनी निर्माण केलेली पात्रे केवळ ठोकळेवजा वाटतात. याला अपवाद फक्त इम्तिाझअली ताज हा नाटककार. त्याच्या अनारकली नाटकात मोगल राजघराण्यातील जीवन आणि नायिकेचे स्वभावलेखनही वास्तववादी उतरले आहे. त्यामुळे हे नाटक प्रेक्षकाला शेवटपर्यंत चटका लावते.

उर्दू रंगभूमी इ. स. १९३५ पर्यंत मुख्यतः व्यापारी पेशाच्या मंडळींच्याच ताब्यात होती. भारतात बोलपटांचे युग सुरू होताच या मंडळींनी रंगभूमीकडे पाठ फिरवून चित्रपटव्यव-सायात पदार्पण केले. उर्दू नाटक कंपन्या एकामागून एक बंद पडू लागल्या. ही ढासळती इमारत सावरून धरण्याचा शेवटचा प्रयत्न सुप्रसिद्ध नटी कज्जन हिने केला. जहानआरा थिएट्रिकल कंपनी नावाची नाटचसंस्था स्थापन करून ती नाटके करू लागली. ती स्वतः आपल्या नाटकांत स्त्रीभूमिका करी. उर्दू रंगभूमीच्या जन्मापासूनच स्त्रिया त्या रंगभूमीवर कामे करीत होत्या. कज्जनने त्यांचीच परंपरा पुढे चालविली. पण उर्दू रंगभूमीला जिवंत ठेवण्याचे तिचेही प्रयत्न अयशस्वी झाले.

अशा प्रकारे उर्दू रंगभूमीचा अज्ञातवास कितीतरी वर्षे चालू असता, पुढे एका नवीन नाटचप्रकाराने तिला थोडा उजळा दिला. एकांकी नाटके हा तो प्रकार होय. पाश्चात्य रंगभूमीवर तो नाटचप्रकार यशस्वी होत आहे, असे कळल्यावर भारतातही त्याचे अनुकरण सुरू झाले. मग उर्दूतल्या कित्येक प्रथितयश लेखकांनी एकांकिका लिहिण्यास प्रारंभ केला. विद्यार्थ्यांच्या समारंभांतून आणि छोटचा-मोठचा नाटच-क्लबांतून त्यांचे प्रयोग होऊ लागले. त्यांतल्या काही उर्दू एकांकिका फारच सुंदर वठल्या आहेत. १९३५ साली भारतात आकाशवाणीची केंद्रे सुरू झाली. त्यामुळे उर्दू लेखकांना एक नवा प्रांत उपलब्ध झाला. या माध्यमाच्या द्वारे उर्दू लेखकांनी श्रुतिका किंवा एकां-किका लिहून प्रसिद्धी मिळविली. उपेन्द्रनाथ अश्क, कृष्णचंद्र, सआदत हसन मंटो, राजेंद्रसिंग बेदी, सज्जद जहीर, इस्मत शाहिद लतीफ, इश्रत रेहयानी हे आजकालचे उर्दू नाटककार होत. उपेन्द्रनाथ अश्क यांच्या काही नाटकांतून सामाजिक दुष्ट रूढींवर कडाडून प्रहार केलेले आहेत. मंटोची काही नाटके अश्कच्या नाटकांहूनही जहाल आहेत. कृष्णचंद्र हा सूचक आणि प्रभावी भाषाशैलीबद्दल प्रसिद्ध आहे. मुजीब यांच्या हब्बाखातून या नाटकात काश्मीरच्या प्रचलित संघर्षाचे चित्रण आहे. इस्मत चुगताई व कुदसिया जैदी या दोन महिला नाटककार होत. इस्मतचे धानीबाँके हे नाटक जातीय ऐक्यावर आधारलेले आहे. शकुंतला व खलिदकी खाला ही कुदसिया जैदीची रंगभूमीवर गाजलेली नाटके होत.

इ. स. १९४७ नंतर उर्दू रंगभूमीच्या पुनरुज्जीवनाचे काही प्रयत्न झाले. श्री. पृथ्वीराज कपूर यांनी या चळवळीत पुढाकार घेतला. पृथ्वी थिएटर्स, इंद्रप्रस्थ थिएटर्स, हिंदुस्थानी थिएटर्स, इंडियन नॅशनल थिएटर्स, थ्री आर्टस क्लब आणि दिल्ली आर्ट थिएटर्स, या प्रमुख नाट्यसंस्था उर्दू रंगभूमीला पुनरुज्जीवित करण्याच्या प्रयत्नात होत्या व आहेत.

उर्दू रंगभूमी लखनौच्या राजवाड्यात निर्माण झाली. उत्तर प्रदेशात ती इंदरसभा या नाटकाच्या द्वारे सामान्य जनांत प्रविष्ट झाली. मुंबईच्या हौशी, पण व्यापारी भांडवलदारांनी तिला नटवून सजवून प्रेक्षकांसमोर आणले. हेच आधार देणारे हात चित्रपटसृष्टीत गुंतल्यामुळे ती पुढे कोलमडून पडली हे खरे; पण एका जमान्यात तिने प्रेक्षकांचे भरपूर मनोरंजन केले, यात मात्र शंका नाही. [ उर्दू ड्रामा; मणिकांचन; भा. ना. सा. ]

**उर्वशी** एक सुप्रसिद्ध अप्सरा. ऋग्वेदकालापासून हिची प्रसिद्धी आहे. ऋग्वेदात तिचा उल्लेख बऱ्याच ठिकाणीं आला आहे. ऋग्वेदात पुरूरवा व उर्वशी यांच्या संवादाचे एक सूक्त आहे (ऋ. १०.९५). पुरूरवा-उर्वशीची ही कथा जगातली आद्य प्रेमकथा समजली जाते. त्या संवादसूक्तात उर्वशी पुरूरव्याची विनवणी झिडकारताना दिसते. शतपथ ब्राह्मणातही ही कथा आलेली आहे. तिचा सारांश असा –

उर्वशीचे पुरूरव्यावर प्रेम जडले. पण त्याच्याशी लग्न करताना तिने त्याला दोन अटी घातल्या–(१) त्याने तिच्या संमतीवाचून तिला भोगू नये व (२) विवस्त्र अवस्थेत तिच्या नजरेस पडू नये. पुढे तिला त्याच्यापासून एक पुत्र झाला. दीर्घ काळ लोटल्यानंतर गंधर्वांनी तिला परत देवलोकी नेण्यासाठी एक कारस्थान रचले. त्यांनी तिच्या पलंगाला एक मेंढी व दोन कोकरे बांधली. त्या कोकरांवर उर्वशीचे विलक्षण प्रेम जडले. एका रात्री गंधर्वांनीच ती कोकरे पळवून नेली. तेव्हा तिने आक्रोश केला, की 'इथे कोणी वीरपुरुष नाही काय ?' ते आह्वान स्वीकारून पुरूरवा त्या वेळच्या नग्न अवस्थेतच त्या कोकराच्या मागे धावला. त्या वेळी गंधर्वांनी एकाएकी विद्युतप्रकाश पाडला आणि त्या प्रकाशात तो उर्वशीला नग्नावस्थेतच दिसला. अशा प्रकारे तिची अट मोडली गेल्यामुळे ती त्याला सोडून निघून गेली. पुढे तो वियोगदु:खाने कुरुक्षेत्रात भटकत असता ती त्याला एका सरोवराच्या काठी भेटली. त्याने खूप विनवणी केल्यावर ती त्याच्या जवळ पुनश्च एक रात्र राहिली. त्या समागमातून पुढे तिला एक पुत्र झाला. मग गंधर्वांनी पुरूरव्याला वर मागण्यास सांगितले. त्याने गंधर्व बनण्याची इच्छा प्रकट केली. गंधर्वांनी त्याला 'त्यासाठी यज्ञ कर' असे सांगून त्याबद्दल मार्गदर्शनही केले. त्या यज्ञान तो गंधर्व बनला.

या कथेवरून प्रा. दा. ध. कोसंबी निष्कर्ष काढतात तो असा- मेल्यावाचून गंधर्व बनणे पुरूरव्याला शक्य नव्हते. म्हणजे त्या यज्ञातच त्याला मृत्यू आला असावा. मूळ कथेत उर्वशीला पुरूरव्याकडून पुत्रप्राप्ती झाल्यानंतर पुरूरव्याचा बळी देण्याची तिची कल्पना होती, असे वाटते. तिचा हा संकल्प समजल्यानंतर तो तिची खूप विनवणी करतो व त्यात स्वत:च्या मरणाचाही उल्लेख करतो. पण ती आपला बेत न बदलता त्याचे सांत्वन करते, की 'हे मरण हा मृत्यू नव्हेच.'

ऋग्वेदांतील पुरूरवा-उर्वशीचा संवाद वरील कल्पनेवर आधारला असावा. तिथे त्याला मृत्युबंध म्हटले आहे. देवदानवांच्या युद्धात देवांच्या विजयासाठी त्याचा बळी देण्याचा विचार होता. वायुपुराणातल्या पुरूरव्याच्या कथेतही त्याला यज्ञप्रसंगीच मृत्यू आल्याचे सांगितले आहे. ती कथा अशी -

एकदा पुरूरवा शिकारीला गेला असता त्याला नैमिषारण्यातील ऋषी सुवर्णवेदीवर यज्ञ करताना दिसले. त्याने ती सुवर्णवेदी लुटण्याचा प्रयत्न केला. ते पाहून ऋषी क्रुद्ध झाले व त्यांनी वज्रकठीण अशा दर्भांनी त्याच्यावर प्रहार करून त्याला ठार मारले (वायुपु. १.२.१३–२१).

उर्वशी ही नारायणाच्या ऊरूपासून निर्माण झाली म्हणून तिला उर्वशी हे नाव पडले. एका सत्रात उर्वशीला पाहून मित्रावरुणांचे रेत:स्खलन झाले आणि त्या रेतापासून अगस्त्य व वसिष्ठ निर्माण झाले (बृ. दे. २.३७.४४.१५६).

उर्वशी ही सह (मार्गशीर्ष) या मासाची अधिष्ठात्री अप्सरा आहे (भागपु. १२.११.४१). ही हेमंत ऋतूत सूर्याच्या रथावर असते (विष्णुपु. २.१०.१३; ब्रह्माण्डपु. १.२.१६). हिला ब्रह्मवादिनी असेही म्हटले आहे. (ब्रह्माण्डपु. २.३३.१८). हिच्या नावाचे एक तीर्थही आहे. [ मि. रि.; पु. इं.; प्रा. च. को. ]

**उर्वशीपुलिन** प्रयागातले एक तीर्थ. या ठिकाणी देहत्याग करणाऱ्याला सहासष्ट हजार वर्षे पितरांसह स्वर्गलोकात स्थान मिळते, असे मत्स्यपुराणात सांगितले आहे.

**उलटी साधना** नाथपंथातली एक पारिभाषिक संज्ञा. त्या काळात अनेक छोट्या छोट्या धर्मपंथांत साधना शब्दाच्या मागे उलटी हे विशेषण जोडण्याची प्रथा पडली होती. त्या विशेषणाला एक विशेष अर्थ होता. त्या काळी सर्व तांत्रिक पद्धतींत वामाचाराला प्राधान्य आले होते. वामाचाराचे अर्थ दोन–एक वामायुक्त साधना व दुसरा लोक-

प्रचलित साधनेच्या सर्वस्वी विरुद्ध अशी साधना. सिद्धांमध्ये मुद्रा-मैथुन प्रचलित होते. पण त्याला त्यांनी उलटी साधना म्हटले नाही. सूर्याला उलट करून चंद्रात विलीन करणे, अशा प्रकारचे एक रूपक सिद्धांच्या चर्यापदांत मिळते तेवढेच. नाथयोग्यांनी मुद्रा-मैथुनपर अर्थ बाजूला टाकून त्याचा हठयोगपर अर्थ रूढ केला. त्यांच्या मते उलटी साधना म्हणजे श्वास-निरोधाच्या द्वारे गंगेला (इडा) उलटी करून यमुनेत (पिंगला) मिळवणे होय. [हिं. सा.]

**उल वातायन** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे शहाऐंशी क्रमांकाचे सूक्त याने रचले आहे. वायू ही प्रस्तुत सूक्ताची देवता असून, सूक्तद्रष्टा हा वायुभक्त असावा असे वाटते. डॉ. राहुरकरांच्या मते उल वातायन हा वातकुलातला ऋषी असावा. याची एक ऋचा (१०-१८६.२) अशी –

**उत वात पितासि न उत भ्रातोत नः सखा ।**
**स नो जीवा तवे कृधि ।।**

अर्थ – हे भक्तपिता, भक्तबंधू आणि भक्तसखा वायो, तू आम्हास दीर्घायुषी बनव.

[प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ.]

**उलुंबन** नायरांची एक पोटजात. या शब्दाचा अर्थ गुराखी असा होतो. दंतकथा अशी आहे, की हे लोक द्वारकेहून स्थलांतर करून द. भारतात आले व स्थायिक झाले. त्यांनी आपला गुरे पाळण्याचा प्राचीन व्यवसाय अद्यापि चालू ठेवला आहे. कोट्टियूर व तेल्लिचेरी (केरळ) येथील देवस्थानांच्या वार्षिक उत्सवांत तूप व दूध पुरविण्याचा हक्क या जातीकडे आहे. [का. ट्रा. स. इं.]

**उलूक** (१) एक प्राचीन मानवगण. यांच्याविषयी विद्वानांत अनेक प्रकारचे तर्कवितर्क आहेत. अर्जुन उत्तर-दिग्विजयासाठी गेला असता त्याला या उलूकांशी सामना द्यावा लागला होता (म. भा. सभा. २७.५). उलूक (= घुबड) हे त्या गणाचे देवक असावे व त्यावरून त्याना उलूक हे नाव पडले असावे. संस्कृतात उलूकाला कौशिक असेही म्हणतात. उलूक हे शैव होते व ते लकुलीश संप्रदायाचे अनुयायी होते. लकुलीशाच्या एका शिष्याचे नाव कुशिक असे आहे. उलूक हे कुशिकाच्या परंपरेतले असल्यामुळे त्यांना कौशिक असेही म्हणत असावे. प्राचीन परंपरेच्या विस्मरणामुळे पुढे कौशिक हा शब्द उलूक नावाच्या पक्ष्याला लावला गेला.

शकुनीचा एक भाऊ उलूक नावाचा होता. त्यावरून श्री. फ्लीटने अनुमान केले आहे, की उलूक जमातीचा तो मूळपुरुष असावा. शकुनी हा गंधार (कंदाहार) देशाचा राजा होता. त्यावरून उलूकांचे स्थानही तिथेच जवळपास असावे. सोमनाथ-पट्टणामध्ये उपलब्ध झालेल्या एका लेखात उलूकराज नामक दात्याचा उल्लेख आहे. हा उलूकराज त्याच मानवगणातला शिवोपासक असू शकेल.

सर्वदर्शनसंग्रहात कणाददर्शनाला औलूक्यदर्शन म्हटले आहे. टीकाकारांनी त्याची दोन कारणे दिली आहेत. एक हे की कणाद हा उलूक ऋषीचा वंशज होता. दुसरे हे, की शिवाने उलूकरूप धारण करून कणादाला सहा पदार्थांचे ज्ञान उपदेशिले. हे औलूक्यमताचे लोक कट्टे शैव होते. ते शिवसाक्षात्कार हेच मोक्षाचे साधन मानीत. आगमांच्या द्वारे महेश्वराचे गुण ऐकणे, जे श्रवण केले त्याचा अर्थ अनुमानाने ठीक समजून घेणे व जे समजले ते ध्यानाने अंतरात अनुभविणे, अशा त्रिविध प्रकारांनी बुद्धी शिवाच्या ठिकाणी दृढ झाल्यावर मगच उत्तम योगाची प्राप्ती होते, असे त्याचे तत्त्वज्ञान होते. [नाथसंप्रदाय]

(२) एक पक्षी अर्थात घुबड. याचे ओरडणे अशुभ मानले आहे. अश्वमेधयज्ञात वनवृक्षांना याचा बळी अर्पण करीत (वा. सं. २४. २३). आजमितीसही दारातल्या वृक्षावर घुबडाचा घूत्कार सुरू झाला, की घरात काहीतरी अशुभ घडणार, असे समजतात. घुबडाला लक्ष्मीचे वाहन मानले आहे. पंचतंत्रात याला नीतिनिपुण व चतुर म्हटले आहे. हा दिवांध आहे. [वे. इं.; भा. प्र. वि.]

**उलूखल** एक यज्ञीय पात्र. ही एक लाकडी उखळी असते. 'अहोमार्थानि वारणांनि भवन्ति' = होमाकरिता नसणारी पात्रे वारण वृक्षाची असतात, असे आप. श्रौतसूत्रांत सांगितले आहे (१.१५.११). तदनुसार उलूखल हे वारण वृक्षाचे करतात. कारण उलूखलाचा साक्षात होमाशी संबंध नसतो. यागाच्या वेळी प्रत्यक्ष भात कांडणे अशक्य असल्यास टीचभर लांबीची उखळी करून तिच्यात कांडण्याचा केवळ संस्कार करण्याची पद्धत आहे.



उलूखल

**उलूखलिक** एक पिशाचगण. यांचे नेत्र बारीक व जीभ लांब असते. हे पिशाच, अलंकार म्हणून उखळ गळयात धारण करतात. [पु. इं.]

**उलेमा** आलिम (अरबी शब्द) म्हणजे पंडित, विद्वान; त्याचे बहुवचन उलेमा. यावरून पंडितांची सभा अशा अर्थीही हा शब्द वापरतात. हे इस्लामी धर्मशास्त्रात पारंगत असतात. शेख-उल-इस्लामच्या नेतृत्वाखाली उलेमांची सभा भरते व महत्त्वाच्या धार्मिक प्रश्नांवर निर्णय देते. हा निर्णय मुस्लिम समाजाला मान्य करावा लागतो. इस्लामी राजसत्तेवरही उलेमांचे काही प्रमाणात वर्चस्व असते. [ डि. इ. ]

**उल्का** सूर्यमालेत तुकड्यातुकड्यांचे एक भरताड अंतराळातून फिरत असते. त्यातला एखादा तुकडा जेव्हा पृथ्वीच्या वातावरणात प्रवेश करतो, तेव्हा तो घर्षणाने पेट घेतो आणि मधल्यामध्ये जळून जातो. तुकडा मोठा असला, तर तो अर्धवट जळलेल्या अवस्थेत पृथ्वीवर पडतो. या पतनाला उल्कापात म्हणतात. उल्केला अशनी असेही म्हटले आहे. अशनींचे संदर्भ ऋग्वेदात आढळतात; पण कथा मात्र तै. ब्राह्मणातच सापडते ती अशी –

मरुतांनी पाण्याने अग्नी विझविला. तो शांत झाल्यावर त्यांनी त्याचे हृदय फोडले. त्याचे जे तुकडे पडले, ते अशनी झाले (१.१.३.१२).

उल्कांविषयी पुढील लोकसमजुती आढळतात–

उल्का म्हणजे पुण्यक्षय झाल्यावर स्वर्गातून खाली पडणारे पुण्यात्मे होत. ते पृथ्वीवर येऊन पुनर्जन्म घेतात. देवांचे रथ एकमेकांवर घासल्यामुळे उल्कापात होतात. उल्का म्हणजे अनल पक्ष्याने टाकलेली शीट होय. चहाडखोर लोक मेल्यावर इंद्राच्या दरबारात ऋषी काय बोलतात, ते चोरून ऐकण्याचा प्रयत्न करतात व म्हणून त्यांना जाळण्याची शिक्षा होते. हे जळते आत्मे म्हणजेच उल्का होत. उल्कापात हा एखाद्या पतिव्रतेच्या अथवा सत्पुरुषाच्या मृत्यूचा सूचक मानतात. त्यामुळे दुष्काळ, वादळ व साथ येईल, असेही समजतात. उल्का पडताना दिसली. तर ते कोणाला सांगू नये; त्या वेळी 'राम राम' म्हणावे, अशीही समजूत आहे. [ लो. सा. रू. ]

**उल्कानवमी** एक तिथिव्रत. या व्रतात आश्विन शु. नवमीस महिषासुरमर्दिनीची पूजा करतात. व्रतावधी एक वर्ष. या व्रताला उल्का हे नाव पडण्याचे कारण, हे व्रत करणारा पुरुष त्याच्या शत्रूंना व व्रतकर्त्री स्त्री तिच्या सवतींना उल्केप्रमाणे दिसते, असे सांगितले आहे. [ हि. ध. ]

**उल्लादन** द. भारतातील एक जात. नंपूतिरी जातीतील एका जातिबहिष्कृत स्त्रीचे हे वंशज होत, अशी दंतकथा आहे. यांचे मूलस्थान तम्पुरक्कोत्त हे गाव होय. अद्यापही ते ठिकाण पवित्र क्षेत्र मानून हे लोक तिथे यात्रेला जातात.

**विवाहप्रथा** – या जातीत विवाहविधीबाबत एक मजेशीर चाल आहे. झाडपाल्याची एक मोठी वाटोळी झोपडी तयार करून हे लोक वधूला तिच्यात ठेवतात. नंतर गावातले सर्व उपवर तरुण त्या झोपडीला वेढा घालतात. प्रत्येकजण हातात बांबूची काठी घेऊन झोपडीभोवती नाचत फिरतो व मधेच हातातील काठी झोपडीत खुपसतो. झोपडीत वधू ज्याची काठी आत ओढून घेईल, तो तरुण वर म्हणून निवडला जातो. त्या वेळी वधूचा पिता व इतर नातलग झोपडीजवळ वाद्ये वाजवीत असतात. हा समारंभ संपल्यावर त्या दोघांचे रीतसर लग्न लावतात.

या लोकांचा निर्वाह रानातील फळे व कंदमुळे यावर चालतो.



उल्लादन पुरुष

यांची स्थिती अत्यंत हलाखीची असते. मोठमोठे जमीनदार यांच्यावर आपली मालकी सांगतात व नायर, सिरियन, इ. लोकांकडे यांना मजूर म्हणून कामाला पाठवितात. यांच्यात पंचायत असते. जातींतील वृद्ध इसमांना पंच म्हणून निवडतात. सरपंचाला मुप्पन म्हणतात. त्याच्या हाताखाली पोनंवन नावाचा मदतनीस असतो. पंचायतीच्या सभेत सरपंच गुन्ह्याचा निवाडा करतो. गुन्हेगाराला दंड किंवा शिक्षा होते. स्त्री गुन्हेगाराला मात्र नारळाचे पाणी प्यायला सांगतात व त्या तीर्थाने ती दोषमुक्त झाली असे समजतात.

**देवधर्म** – उल्लादन लोक वृक्ष-पाषाणांची व भुताखेतांची पूजा करतात. एका छपराखाली कप्पिरी, थिकुट्टी व छाथन या देवतांच्या मूर्ती म्हणून काही पाषाण ठेवलेले असतात. कन्नी (आश्विन) महिन्यातील शुक्रवारी त्यांची पूजा करतात व कोंबडे, बकरे बळी देऊन ताडी व भात यांचा नैवेद्य दाखवतात. त्या वेळी एखाद्या इसमाच्या अंगात येते व भूतबाधा झालेल्या स्त्रियांच्या अंगातील भुते तो काढून टाकतो.

हे लोक पितरांची पूजा करतात आणि पितरांपैकी कोणी स्वप्नात येऊन काही मागितल्यास ते त्याला देतात. पितरांना संतुष्ट न केल्यास कुटुंबावर संकटे ओढवतात, अशी त्यांची समजूत आहे.

**उद्योगधंदे** – हे लोक मोठ्या ओंडक्याच्या होड्या तयार करणे, रानात जाऊन मध व इतर उपयुक्त वस्तू गोळा करणे, शेतीच्या हंगामात नांगरणी, पेरणी, इ. कामे मजुरीने करणे, गुरे चारणे, वगैरे काम करतात. कामाचा मोबदला भाताच्या रूपाने घेतात. हे लोक शिकार करण्यातही प्रवीण आहेत. शिकारीत



उल्लादन स्त्री

मारलेल्या जनावरांची वाटणी प्रत्यक्ष मारणारा इसम, जंगल अधिकारी, गावचा सरपंच आणि शिकारीतील मदतनीस एवढ्या लोकांत होते. हे लोक पूर्वी अस्पृश्य मानले जात.

**मर्तिक प्रथा** – हे लोक प्रेते पुरतात. सुतक १५ दिवस पाळतात. सोळाव्या दिवशी झोपडी व अंगण झाडून शेणपाणी घालावयाला न्हावी येतो. नंतर सुतकी लोक स्नान करून घरात प्रवेश करतात व आप्तेष्टांना जेवण घालतात. जेवायला येणारे सर्व आप्तेष्ट तांदूळ, ताडी व चार आणे एवढे साहित्य आपल्या बरोबर आणतात. [ का. ट्रा. स. इं. ]

## उल्लूर

त्रिवेंद्रम जिल्ह्यातील एक क्षेत्र. इथले सुब्रह्मण्याचे मंदिर प्रख्यात असून, हजारो यात्रेकरू तिथे दर्शनासाठी जातात. पूर्वी तिरुवितांकुरचे महाराज व राजदरबारातील लोक ठराविक दिवशी इथे येऊन सुब्रह्मण्याची पूजा करीत असत. मंदिराजवळच जुना राजवाडा आहे. [ त्रिवेंद्रम गॅझे. ]

## उवज्झाय

(सं. उपाध्याय) जैन श्रमणांचा गुरू किंवा शिक्षक. ही पदवी प्राप्त होण्यासाठी त्याला तीन वर्षे श्रमणधर्माने वागावे लागते व आचारकल्प या विषयावर प्रभुत्व मिळवावे लागते. उवज्झाय म्हणजे जैनांच्या मठांतील शिक्षणाधिकारीच असे म्हणायला हरकत नाही. श्रमण व श्रमणी या दोघांच्याही शिक्षणाची जबाबदारी त्याच्यावर असते. [ हि. जै. मो. ]

## उवट

(इ. स. चे ११ वे शतक) एक वेदाचार्य. पित्याचे नाव वज्रट. नावावरून हे दोघे पितापुत्र काश्मीरी असावे, असे वाटते. उवटाने ऋक्प्रातिशाख्य व यजुःप्रातिशाख्य या ग्रंथांवर टीका लिहिली असून, ऋक्सर्वानुक्रमणी, ईशावास्योपनिषद, वाजसनेयीसंहिता, यांवर भाष्ये लिहिली आहेत. अवंतीच्या भोजराजाच्या शासनकाळात(इ. स. १०१८–१०६०) अवंती व आनंदपुर येथे याने ही ग्रंथरचना केली. [ वै. सा. सं.]

## उशना

एक आचार्य. याला कवी असेही नाव आहे. कवींच्यामध्ये मी उशना आहे, असे भगवद्गीतेत (१०.३७) म्हटले आहे. ऋग्वेदात कुत्स व इंद्र यांच्या बरोबर याचा वारंवार उल्लेख येतो (१.५१.१०; ४. १६. २; ६. २०. ११; ८. २३. १७). यालाच शुक्राचार्य असेही नाव आहे. देव-दानवांच्या युद्धप्रसंगी हा असुरांचा पुरोहित होता. वैदिक साहित्यात याचा आचार्य म्हणून उल्लेख झालेला आहे. औशनसस्मृती, औशनस उपपुराण, औशनस धर्मशास्त्र, असे तीन ग्रंथ याच्या नावावर आहेत.

औशनस धर्मसूत्राचे सात अध्याय आहेत. यांत जननमरणाशौच, जल, अग्नी, इ. साधनांनी करायचे शुद्धीकरण, मिश्र जाती, वधदंड, अभक्ष्य भक्षणाचे प्रायश्चित्त, ब्राह्मणाने शूद्र स्त्रीशी विवाह करावा की करू नये, श्राद्धकल्प, ब्राह्मणाने कोणत्या पदार्थांची विक्री करू नये, कोणत्या वस्तू सर्वदा पवित्र मानाव्या, इ. विषय आले आहेत. सातवा अध्याय श्लोकबद्ध

असून, त्यातले कित्येक श्लोक मनू व उशना यांचे समान आहेत. या सूत्रात वसिष्ठ, हारीत, शौनक व गौतम यांची मते उद्धृत केलेली आहेत. त्यावरून हे सूत्र मनुस्मृतीनंतरचे आहे, असे ठरते.

औशनसस्मृतीत नऊ अध्याय असून, त्यांत उपनयन, नित्य कर्तव्ये, अनध्याय, स्नातकधर्म, श्राद्ध, अंत्यविधी, प्रायश्चित्ते, इ. विषयांचे विवेचन आहे. याची पुढील दोन मते विशिष्ट आहेत– (१) पित्याने केलेले ऋण हे जर त्याला झालेल्या दंडाबाबत असेल किंवा ती कराची बाकी असेल किंवा ते व्यावहारिक नसेल, तर ते फेडण्याची जबाबदारी पुत्रावर नाही. (२) साहसाच्या गुन्ह्यांत अंध, बधिर, वृद्ध, स्त्रिया व अज्ञान, यांच्याही साक्षी घ्यायला हरकत नाही. [ वे. इं.; हि. ध. ]

**उशीनर** एक प्राचीन मानवगण. ऋग्वेदात या गणाचा उल्लेख आहे (१०. ५९. १०). हे लोक कुरु-पाचालांसमवेत मध्यदेशात राहत होते, असे ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे (८.१४). गोपथ ब्राह्मण व कौषीतकी उपनिषद यांतही यांचे नाव येते. पाणिनीच्या मते उशीनर हे वाहीक (पंजाब) देशातले एक जनपद होते (अष्टा. ४.२.११७-१८). शिबी हा उशीनरांचा राजा होता (म. भा. वन१९४.२) पंजाबातले शोरकोट हे गाव म्हणजे प्राचीन शिबिपुर होय, असे म्हणतात. इथे प्राचीन अवशेष बरेच आढळतात. झिमरच्या मते त्यांचे राज्य पंजाबच्या सरहद्दीवर होते. रावी व चिनाब या दोन नद्यांमधला आणि मद्रांच्या दक्षिणेचा सखल प्रदेश हा उशीनरांचा प्रदेश समजला जात असे. या लोकांच्या भोजनात दहीदूध विशेष प्रमाणात असे. कारण तो देश गोधनाने समृद्ध होता. शिबीने यज्ञ केला त्या प्रसंगी त्याने अगणित गायी ब्राह्मणांना दान दिल्या, असे द्रोणपर्वात म्हटले आहे (५७. ३-७). बौद्ध जातकांतूनही उशीनरांचा उल्लेख सापडतो. पण जातकांनी त्यांना दुष्ट व अराजकाचे भोक्ते असे म्हटले आहे. त्यांच्याविषयी कथा अशी –

इंद्राने त्यांच्या विरुद्ध शस्त्र धरून त्यांचा नि:पात केला. जे वाचले ते इंद्राला शरण गेले. इंद्राच्या आज्ञेने ते. मग धर्माचे पालन करू लागले व कालांतराने बौद्ध झाले. यावरून सुरवातीस ते बौद्धांचे विरोधक असावे, असे वाटते. पण त्यांच्या धर्माबद्दल निर्णायक असा पुरावा अद्यापि उपलब्ध झालेला नाही. [ ट्रा. ए. इं.; पा. का. भा.; वे. इं. ]

**उषःकाल** सूर्योदयापूर्वी पाच घटिकांचा किंवा आदल्या दिवशीच्या सूर्योदयापासून ५५ घटिकांनंतरचा काळ. सामान्यपणे साठ घटिकांचा एक दिवस मानतात. म्हणजे ५५ घटिकांनंतर पाच घटिकाच उरतात. यावरूनच 'पंच पंच उष:काल:' असा श्लोकचरण लोकांत रूढ झाला आहे. तो संपूर्ण श्लोक असा –

पञ्च पञ्च उष:काल: सप्त पञ्चारुणोदय: ॥
अष्ट पञ्च भवेत्प्रात: शेष: सूर्योदयो मत: ॥

अर्थ – (आदल्या दिवशीच्या सूर्योदयापासून) ५५ घटिकांनंतरचा काळ हा उष:काल, ५७ घटिकानंतरचा अरुणोदय, ५८ घटिकानंतरचा प्रात:काल व शेष उरला तो सूर्योदय समजावा. [ हि. ध. ]

**उषा** (१) एक वैदिक देवता. वस् = प्रकाशणे या धातूचा संप्रसारण होऊन हा शब्द बनला आहे. ही उष:कालाची देवता आहे. हिच्या वर्णनपर अशी २० सूक्ते ऋग्वेदात आहेत. याव्यतिरिक्त इतर देवतांबरोबरही तिचे अनेक ठिकाणीं वर्णन आढळते. उष:काल ही नित्य घडणारी नैसर्गिक घटना आहे. या घटनेला वैदिक ऋषींनी देवत्व दिले व तिच्यावर मानवी गुणांचा, विशेषत: स्त्रीसौंदर्याचा अध्यारोप करून तिच्याविषयी काव्यमय सूक्ते रचली. ऋग्वेदातले (४.५२.१) तिचे वर्णन संक्षेपात पुढीलप्रमाणे आहे–

प्रति ष्या सूनरी जनी व्युच्छन्ती परि स्वसु:।
दिवो अदर्शि दुहिता ।।

अर्थ – ही लावण्यवती रमणी, ही आकाशकन्या उषा पाहा. सुप्रकाशित होऊन ही आपल्या बहिणीच्या (रात्रीच्या) पाठोपाठ दृष्टिगोचर झाली आहे.

अधि पेशांसि वपते नृतूरिवा —
पोर्णुते वक्ष उस्रेव बर्जहम ।
ज्योतिर्विश्वस्मै भुवनाय कृण्वती
गावो न व्रजं व्यू१षाआवर्तम: ।।
(ऋ. १.९२.४)

अर्थ – ज्याप्रमाणे एखादी नटी (निरनिराळे) वेष धारण करते, त्याप्रमाणे ही उषा निरनिराळी रूपे घेऊन येते. धेनू जशी आपली कास सर्वांच्या दृष्टीस पडू देते, त्याप्रमाणे ही उषा आपला वक्ष:प्रदेश अनावृत ठेवते. सर्व जगाला प्रकाश देणाऱ्या या उषेने, गायी आपला गोठा सोडून जातात, त्याप्रमाणे अंधकाराला दूर टाकून दिले आहे.

ती सर्व ज्योतींतली श्रेष्ठ ज्योती आहे (ऋ. १.११३.१) ती प्राणिजाताला आपापले व्यवहार करण्यासाठी निद्रेतून जागृत करते. ती उत्साहवर्धक आहे. ती सूर्याच्या उदय-स्थानाच्याही पलिकडे असलेल्या प्रदेशातून रथात बसून येते (ऋ. १.४८.५–६). ती सूर्याला येण्याला मार्ग मोकळा करते

(ऋ. १.११३.१६). ती द्युलोकाची कन्या असून, सूर्याची पत्नी आहे (ऋ. १.४८.१; ७.७५.५). कालदृष्टया उषा ही सूर्याच्या अगोदर उगवत असल्यामुळे तिला सूर्याची माता असेही म्हटले आहे. ती यज्ञ व अग्नी यांची जननी आहे (ऋ. ७.७८.३). तिने मातेप्रमाणे आपल्यावर माया करावी व आपल्याला ऐश्वर्य द्यावे, अशी तिची प्रार्थना केलेली आहे (ऋ. ७.८१.४).

उषेच्या सूक्तांत वैदिक ऋषींची प्रतिभा उच्चतम स्वरूपात दृष्टिगोचर होते. तिच्या वर्णनात वैदिक कवींच्या उपमा-उत्प्रेक्षांना बहर आलेला आहे. वैदिक ऋषींची निरामय सौंदर्य-दृष्टी त्या सूक्तांतून ठायी ठायी प्रतीत होते. समस्त ऋग्वेदात हिच्या सूक्तांइतकी प्रतिभासंपन्न सूक्ते दुसऱ्या कोणत्याही देवतेच्या वाट्याला आलेली नाहीत. वैदिक कालानंतर कालिदासापर्यंतच्या काळात निसर्गदृश्याचे इतक्या चांगल्या प्रकारे केलेले वर्णन क्वचितच आढळेल. मॅक्डोनेल म्हणतो, की उषा ही देवता वैदिक प्रतिभेची सर्वांत सुंदर, सृष्टी असून, दुसऱ्या कोणत्याही देशाच्या धार्मिक साहित्यात अशी सुंदर कृती आढळणार नाही.

उषा शब्द ऋग्वेदात प्रायः एकवचनात आढळत असला, तरी काही ठिकाणी तो बहुवचनातही आढळतो. यावरून लो. टिळक असे अनुमान करतात, की ऋग्वेदात वर्णिलेली उषा ही ध्रुवप्रदेशातली असावी. ध्रुवप्रदेशात उषःकाल दीर्घ मुदतीचा असतो आणि तो दीर्घ रात्रीनंतर आल्यामुळे विशेष चित्ताकर्षक वाटतो. ऋग्वेदातल्या काही मंत्रात या दीर्घ उषःकालाचा संकेत आढळतो. 'एकाच अर्थाकडे जाणारी तू चक्राकार फीर' असे उषेला संबोधून स्पष्ट म्हटले आहे (ऋ. ३.६१.३). हे वर्णन ध्रुवावरील उषेलाच केवळ लागू पडणारे आहे, असे लो. टिळक म्हणतात. वैदिक वाङ्मयातील उषेच्या वर्णनाचे आधुनिक शास्त्रीय शोधांच्या साहाय्याने सूक्ष्म निरीक्षण करून लो. टिळकांनी पुढील अनुमाने काढली आहेत—

(१) ऋग्वेदात वर्णिलेली उषा इतकी दीर्घ होती, की तिच्या प्रथमदर्शनापासून सूर्योदयापर्यंत कित्येक दिवस (चौवीस तासांचे अवधी) जात असत; अथवा पुष्कळ उषा एकामागून एक येऊन त्यांचे सूर्योदयात पर्यवसान होई (ऋ. ७.७६.३; २.२८.९).

(२) ऋग्वेदात उषेविषयी जे अनेकवचनी प्रयोग आहेत, ते केवळ बहुमानार्थक किंवा वर्षाच्या ३६० उषांचे दर्शक नसून, ध्रुवावरील दीर्घ उषेच्या दिवसावधी तीस भागांचे द्योतक आहेत (ऋ. १.१२३.८; ६.५९.६; तै. सं. ४.३.११.६).

(३) पुष्कळ उषा एकाच ठिकाणी राहून एकमताने वागत



आणि कधीही एकमेकींशी भांडत नसत (ऋ. ४.५१.७–९; ७.७६.५; अथर्व. ७.२२.२).

(४) उषेचे तीस भाग पृथक पृथक नसून, एकाला एक लागून असे अखंडित होते (ऋ. १.१५२.४; तै. ब्रा. २.५.६.५; अथर्व. ७.२२.२).

(५) या तीस उषा किंवा एकाच उषेचे तीस भाग चक्राप्रमाणे वाटोळे फिरत व पुन्हा त्याच ठिकाणी येत.

या सर्व गोष्टी ध्रुवावर किंवा त्याच्या जवळच्या प्रदेशात दिसणाऱ्याच आहेत, हे सांगायला नकोच. त्यांत शेवटची तर खुद्द ध्रुवावरच शक्य आहे. त्यामुळे उषा ही वैदिक देवता मूळ ध्रुवोत्पन्न आहे, असे अनुमान करण्यास कोणतीही हरकत नाही (आर्य लोकांचे मूलस्थान).

ऋग्वेदातल्या कित्येक मनोरम सूक्तांचा विषय झालेली उषा ध्रुवविशिष्ट असून, वैदिक ऋषींच्या पूर्वजांनी तिला हिमपूर्वकालातच पाहिली असली पाहिजे, असे लो. टिळक सांगतात. आर्यांचे मूल वसतिस्थान उत्तर ध्रुवाच्या प्रदेशात होते, हे सिद्ध करण्यासाठी टिळकांनी जे वैदिक वाङ्मयातले पुरावे दिले आहेत, त्यांतच त्यांनी ऋग्वेदातील उषःसूक्तांचाही प्रपंच केला आहे. [ऋ. द.; वै. सा. सं.; म. ज्ञा. को.]

(२) एक मानसजात मातृदेवता (मत्स्य पु. १७९.२०).

**उष्टी हळद** लग्नात वधूला मंगलस्नान घालण्यापूर्वी गव्हांचा चौक घातलेल्या पाटावर बसवितात व तिच्या अंगाला तेलहळद लावतात. वधूला लावून शिल्लक उरलेली हळद 'उष्टी हळद' या नावाने वधूपक्षाकडील सुवासिनी वराकडे घेऊन जातात. ती हळद वराच्या अंगाला लावल्यावर मग त्याला मंगलस्नान घालतात. [ल. वि. सो.]

**उष्ट्रासन** एक यौगिक आसन. याची क्रिया पुढीलप्रमाणे सांगितलेली आहे –

अधश्च शेते पदयुग्मव्यस्तं पृष्ठे विधायापि धृतं कराभ्याम्।
आकुञ्चयेच्चैव हृदास्यमूर्ध्वमुष्ट्रं च पीठं मुनयो वदन्ति ॥

अर्थ – पालथे निजून दोन्ही पाय उलट पाठीवर आणावे व दोन्ही हातांनी पायांचे अंगठे धरावे; हृदयाचे स्नायू आकुंचन करून मान वर करावी. याला उष्ट्रासन असे म्हणतात.

या आसनाने चर्मगत व मांसगत रोग आणि वात, पित्त, कफ यांमुळे उत्पन्न होणारे रोगही नाहीसे होतात.

याच्यामुळे तहानभूक सोसून चालण्याची शक्ती येते. प्रवासी लोकांना हे आसन हितकारक असते, असे म्हणतात. [यो. सो. पू.; उ. यो. द.]

**उष्णिक** एक वैदिक छंद. हा गायत्रीच्या पुढचा व त्याहून मोठा छंद आहे. याची २५ अक्षरे असतात. हा अग्नीचा छंद मानलेला आहे. याचे उदाहरण –

**स चन्द्रो विप्र मर्त्यो महो व्राधन्तमो दिवि ।**
**प्रपेत्ते अग्ने वनुष : स्याम ।।**

(ऋ. १.१५०.३)

पुर उष्णिक नावाचा याचा आणखी एक प्रकार ऋग्वेदात काही ठिकाणी आढळतो (१.२३.१९).

वेदोत्तर संस्कृत साहित्यात उष्णिक ही सप्ताक्षर वृत्ती मानली असून, तिचे मधुमती, कुमारललिता व पदलेखा, असे तीन भेद सांगितले आहेत (श. क).

**उष्णीष** पागोटे, शिरोवेष्टन. ' उष्णं ईशते हिनस्ति इति '= जे उन्हाचा ताप दूर करते, ते उष्णीष होय. डोक्यावर पागोटे घालण्यची पद्धत भारतात वेदकालाइतकी प्राचीन आहे. वैदिक वाङ्मयात अनेक ठिकाणी त्याचे उल्लेख येतात (ऐ. ब्रा. ६.१.; श. ब्रा. ३. ३. २. ३; का. सं. १३. १०; पं. ब्रा. १७. १. १४). उष्णीष हा स्त्री-पुरुषांच्या पोशाखातला महत्त्वाचा भाग मानला जाई. भारतासारख्या उष्ण कटिबंधातल्या प्रदेशात डोक्याच्या संरक्षणासाठी त्याचा फार उपयोग होतो. उष्णीषाला धार्मिक अर्थही प्राप्त झाला होता. यज्ञकर्मात यजमानाने दीक्षा–विधीच्या वेळी उष्णीष बांधावे व ते सोमक्रयानंतर काढून टाकावे, असे सांगितले आहे. राजसूय व वाजपेय या यज्ञांत राजाला विशिष्ट प्रकारचे पागोटे बांधावे लागे (श. ब्रा. ५.३.५.२३). व्रात्यांची पागोटी उज्ज्वल व सुंदर असत व ती त्यांच्या काळ्या-भोर केश-संभारावर फार खुलून दिसत ( अथर्व. १५.२).

पागोटयाला शिरोवेष्टन म्हटले आहे. त्यावरून लांबलचक वस्त्रपट्टी डोक्याभोवती गुंडाळीत असत, असे सिद्ध होते. पागोटे बांधण्याच्या अनेक पद्धती त्यावरून सूचित होतात.

उष्णीषाच्या वस्त्राचा रंग बहुधा पांढरा असे. क्षेमेंद्राने शुभ्र उष्णीषाचाच वारंवार उल्लेख केला आहे (भरतमंजरी ३. ३९४). विशिष्ट प्रसंगी मात्र वेगवेगळ्या रंगांची उष्णीषे वापरीत. आनंदोत्सवाच्या प्रसंगी पिवळे उष्णीष वापरीत (जातक ५३२). कृष्णपक्षात अंधाऱ्या रात्री प्रेयसीच्या संकेतस्थळी निघालेला प्रियकर काळे उष्णीष वापरी. आपण कोणाला दिसू नये, हा त्यातला उद्देश असे.

उष्णीष अर्थात पागोटे बांधण्याच्या अनेक तऱ्हा होत्या. भरहूतच्या शिल्पांत मध्यभागी मुकुट ठेवून त्यांच्या भोवती पागोटे कसे गुंडाळतात, ते दाखविले आहे. या पागोटयाचे वेढे बरेच असत. निदानकथेत शक्राने युवराज सिद्धार्थाला पागोटे कसे बांधले, त्याचे सविस्तर वर्णन आहे. त्याने सिद्धार्थाच्या डोक्या-वर मध्यभागी रत्न ठेवून मग त्याभोवती वस्त्राचे वेढे दिले होते. या पागोटयाची दोन्ही टोके पुढे ओढून एका जागी खोचली जात; तर क्वचित त्यांचे दोन शेमले वेगवेगळे सोडीत.

विशिष्ट प्रसंगी स्त्रियाही विविध प्रकारची सुंदर पागोटी डोक्याला बांधीत. इंद्राणीने उष्णीष बांधल्याचे उल्लेख आढळ-तात. भरहूत व सांची येथील शिल्पांत उष्णीषधारी स्त्रिया आढळतात. पण त्यानंतर बायकांनी पागोटे घालण्याची चाल लवकरच बंद पडली असावी. कारण अमरावतीच्या शिल्पांत स्त्रियांच्या मस्तकावर उष्णीष नाही. पाहा – पागोटे. पगडी. [ वे. इं.; वै. सा. सं. ]

**उष्णीष देव** हे बौद्धांच्या वज्रयानपंथांचे आठ देव आहेत. प्रत्येकाला एकेक दिशा नेमून दिलेली आहे. यांचा ध्यानी बुद्धांशी संबंध असून, ते ध्यानी बुद्धांचीच मुद्रा व चिन्हे धारण करतात. त्यांची नावे व वर्णन पुढील प्रमाणे–

१. **वज्रोष्णीष** – शुक्लवर्ण, भूस्पर्शमुद्रा, पूर्व दिशा.
२. **रत्नोष्णीष** – नीलवर्ण, वरदमुद्रा, दक्षिण दिशा.
३. **पद्मोष्णीष** – रक्तवर्ण, ध्यानमुद्रा, पश्चिम दिशा.
४. **विश्वोष्णीष** – हरितवर्ण, अभयमुद्रा, उत्तर दिशा.
५. **तेजोष्णीष** – सित–रक्तवर्ण, हातांत सूर्यचक्र धारण करणारा, आग्नेयी दिशा.
६. **ध्वजोष्णीष** – रक्त–कृष्णवर्ण, हातांत चिंतामणी व ध्वज धारण करणारा, नैर्ऋत्य दिशा.
७. **तीक्ष्णोष्णीष** – नभःश्याम, कृपाण व पुस्तक धारण कर-णारा, वायव्य दिशा.
८. **छत्रोष्णीष** – शुभ्रवर्ण, हातांत छत्र धारण करणारा. ईशान्य दिशा.

तंत्रविद्येत या बुद्धांना फार महत्त्व आहे. हे सगळे एकमुखी, द्विभुज, वस्त्रालंकारयुक्त व रत्नखचित शिरोवेष्टन धारण करणारे असतात. [ इं. बु. इ. ]

**उष्णीषपट्ट** बाणभट्टाच्या काळातला सोन्याचा अलंकार. हा शिरोभूषणाच्या वरून बांधला जाई. राजा, युवराज, पट्टराणी व सेनापती यांनाच हा वापरण्याचा अधिकार असे. [ ह. च. सां. अ. ]

**उष्णीषविजया** एक बौद्ध देवता. साधनमालेत हिचे वर्णन केलेले आहे; ते असे – गौर वर्ण, त्रिमुख,

त्रिनेत्रा, अष्टभुजा, तरुण, अनेक अलंकारांनी सजवलेली, उजवीकडचे मुख पिवळे व डावीकडचे मुख निळे; उजव्या चार हाती विश्ववज्र, कमलारूढ बुद्ध, बाण व वरदमुद्रा; डाव्या चार हातांत धनुष्य, पाश, अभयमुद्रा व जलकुंभ; चैत्यगर्भात वसलेली, मस्तकी वैरोचनाची मूर्ती धारण करते. ही बौद्धांची अत्यंत लोकप्रिय देवता आहे. नेपाळातल्या प्रत्येक मंदिरात हिची मूर्ती असते.



उष्णीषविजया

हिच्या मूर्तीच्यावर लहान चैत्य असतो, हे ती वैरोचनापासून उत्पन्न झाल्याचे दर्शविते. उष्णीषविजया धारिणीचेच हे देवतारूप असावे.

कलकत्ता येथील भारतीय वस्तुसंग्रहालयातील मूर्ती अत्यंत कलात्मक असून, वरील वर्णनाशी बरीच मिळतीजुळती आहे. हिच्या प्रतिमा तिबेट व चीन या देशांतही आढळतात. [ इं. बु. इ. ]

(२) उष्णीष विजया ही ऊर्ध्व दिशेची देवताही मानली गेली आहे. निष्पन्नयोगावलीत तिचे रूपध्यान वर्णिलेले आहे, ते असे— ही शुक्लवर्णा असून, उजव्या हाती चक्र धारण करते. [ इं. बु. इ. ]

**उष्मप** पितरांचा एक वर्ग. प्रत्येक शु. प्रतिपदेला यांची आराधना करतात. कृष्णपक्ष हा या पितरांचा दिवस व शुक्लपक्ष ही रात्र असते (वायुपु. ५६.२१.८७).

**ऊ** सहावा स्वरवर्ण. ओष्ठ हे याचे उच्चारणस्थान आहे. हा प्लुतही होतो. उदात्त-अनुदात्त-स्वरित या भेदांनी हा त्रिविध होतो. ह्रस्व 'उ'ला एक फाटा जोडून हे अक्षर तयार झाले आहे.

कामधेनुतंत्रात याचे वर्णन पुढीलप्रमाणे दिलेले आहे.—

शङ्खकुन्दसमाकारं ऊकारं परमकुण्डली ।
पञ्चप्राणमयं वर्णं पञ्चदेवमयं सदा ।।

अर्थ – ऊकार हा परमकुण्डलाकृती असून, शंख व कुंद यांच्यासारखा आहे. तो पंचप्राणमय वर्ण असून, पंचदेवमय आहे. मातृकान्यासात याचे स्थान डाव्या कानावर येते. [ श. क. ]

**ऊढा** अष्ट नायिकांच्या बाहेरचा परकीय नायिकेचा एक भेद. ऊढा म्हणजे विवाहिता. हिच्या प्रेमात विविधता व भावात्मक विषमता अधिक; त्यामुळे रीतिकाव्यात या प्रेमाचा बराच विस्तार झाला आहे. भक्तिकाव्यातील गोपींचे प्रेम या प्रकारचे मानलेले आहे. या नायिकेत गोपनाचा भाव अधिक असल्यामुळे तिच्या प्रेमाच्या विविध भावनांचे वर्णन आकर्षक होते. नायिकेच्या उद्वेग, आकांक्षा, चिंता, वेदना, इ. भावनांचे वर्णन यात प्रामुख्याने येते [ हिं. सा. को.]

**ऊधमपूर** जम्मू प्रदेशातील एक क्षेत्र. देविका नदीच्या तीरावर हे शहर वसलेले आहे. नदीच्या एका तीरावर शंकराचे देवालय असून, त्याच्या समोरच दुसऱ्या तीरावर रामाचे मंदिर आहे. वैशाख महिन्यात तिथे मोठी जत्रा भरते. ऊधमपूरच्या जवळच देविकेच्या तीरावर शुद्ध महादेवाचे मंदिर आहे. इथे मोठा त्रिशूळ असून, त्याचे दोन तुकडे झालेले आहेत. शंकर सुधंतर दैत्याला मारीत असता हा त्रिशूळ तुटला, असे सांगतात. [ कल्याण-तीर्थांक ]

**ऊर्णास्तुका** एकदा कापल्यावर पुन्हा वाढणाऱ्या लोकरीला ऊर्णास्तुका म्हणतात. सोमयागांत ज्याच्याकडून सोम विकत घ्यायचा, त्याच्या कपाळावर काळ्या लोकरीची गोळी करून मारतात. त्यावरूनच काळी लोकर अशुभ मानली गेली असावी. पांढरी लोकर सोमक्रयाच्या वेळी यजमानाजवळ देऊन ठेवतात. सोमरस गाळतेवेळी तिचा उपयोग करायचा असतो. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**ऊर्ध्वग्रावा** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मडलातील एकशे पंचाहत्तर क्रमांकाचे सूक्त याने रचले आहे. ऊर्ध्वग्रावन हा अर्बुद ऋषीचा मुलगा म्हणून आर्बुदी नावानेही ओळखला जातो. अर्बुद हाही सूक्तद्रष्टा आहे (ऋ. १०.९४). ऊर्ध्वग्रावनच्या सूक्तात ग्राव्याचे म्हणजे सोम कुटण्याच्या दगडाचे स्तवन आहे. याची एक ऋचा (१०.१७५.२) अशी—

ग्रावाणो अप दुच्छुनामप सेधत दुर्मतिम् ।
उस्राः कर्तन भेषजम् ।।

अर्थ – हे शत्रुसंहारक, दुर्मतिपरिहारक ग्रावन् तुम्ही आम्हास सुखदात्या धेनू प्रदान करा.

याच्या सूक्तात (१०.१७५.३) उपर नावाच्या सोमसवन साधनाचा उल्लेख आहे. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ. ]

**ऊर्ध्वनाभन् ब्राह्म** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशे नऊ क्रमांकाचे सूक्त याने रचले आहे. जुहू ब्रह्मजाया ही या सूक्ताची वैकल्पिक सूक्तद्रष्टी आहे. पाहा – जुहू.

**ऊर्ध्वपाद-शिरासन** एक योगासन. याची क्रिया अशी – जमिनीवर ताठ बसून दोन्ही पाय समोर सरळ सोडावे. दोन्ही हातांचे पंजे कमरेच्या जवळ समांतर जमिनीस टेकवावे. नंतर पाय जमिनीपासून वर उचलावे. मस्तक पुढे घेऊन पायांच्या दोन्ही गुडघ्यांमध्ये टेकवावे. डोळे मिटावे व पाय गुडघ्यात वाकू देऊ नयेत.

या आसनामुळे वद्धोदर रोग नष्ट होतो व पायांच्या स्नायूंत चांगले रक्ताभिसरण होते. [ उ. यो. द. ]

**ऊर्ध्वपाद-हस्तासन** एक योगासन. याची क्रिया अशी - जमिनीवर निजावे व कमरेपर्यंत पाय जमिनीपासून वर उचलावे. नंतर हात मस्तकाला लागून वर उचलून पायांच्या अंगठ्याजवळ नेऊन टेकवावे. त्या वेळी पाठही वर उचलावी. सर्व शरीर ताठ ठेवावे. [ उ. यो. द.]

**ऊर्ध्वपुंड्र** तिलकविशेष. चंदन किंवा गोपीचंदन यांनी ललाटावर तीन उभ्या रेखा रेखल्याने ऊर्ध्वपुंड्र होतो.




ऊर्ध्वपुंड्राचे प्रकार

(१) रामानंदी (२) निमानंदी (३) वल्लभाचारी (४) मध्वाचारी (५) वडगळ (६) तिगळ (७) गोडनी स्वामी संप्र. (८) बेंदिवाले (९) चतुर्भुजी (१०) कबीरपंथी.

याच्या माहात्म्याविषयी ब्रह्मपुराणात पुढील श्लोक आहे -

ऊर्ध्वपुण्ड्रधरो मर्त्यो म्रियते यत्र कुत्रचित् ।
श्वपाकोऽपि विमानस्थो मम लोके महीयते ॥

अर्थ – ऊर्ध्वपुंड्र धारण करणारा चांडाल जरी असला आणि तो कुठेही जरी मृत्यू पावला, तरी तो विमानात बसून मा[illegible]

(वैकुंठ) लोकात येऊन पूज्य होतो.

ऊर्ध्वपुंड्र द्विजांनी धारण करावा, असे बहुमत असले, तरी देवी–भागवतात द्विजांना त्याचा निषेध सांगितला आहे. ऊर्ध्वपुंड्र कोणत्या धार्मिक कृत्यांत धारण करावा, याविषयी निर्णयसिंधूत हेमाद्रीचा पुढील श्लोक उद्‌धृत केला आहे –

**जपे होमे तथा दाने स्वाध्याये पितृकर्मणि ।**
**तत्सर्वं नश्यति क्षिप्रं ऊर्ध्वपुण्ड्रं विनाकृतम् ।।**

अर्थ – जप, होम, दान, स्वाध्याय व पितृकर्म (श्राद्धादी) या गोष्टी ऊर्ध्वपुंड्र धारण केल्यावाचून केल्या, तर त्या त्वरित नष्ट होतात (करून व्यर्थ ठरतात.)

श्राद्धात ऊर्ध्वपुंड्र लावू नये, अशीही वचने आहेत; पण त्या बाबतीत कुलाचार प्रमाण मानावा, अशी सोडवणूक ठेवलेली आहे. व्यंकटगिरीवरच्या मातीचा किंवा गोपीचंदनाचा ऊर्ध्वपुंड्र कपाळावर रेखावा, असा विधी वैष्णवांना सांगितला आहे–

**नासादिकेशान्तमूर्ध्वपुण्ड्रं विष्णोः स्थितस्य चरणाकृतिः ।**
(कात्यायनोपनिषद्)

अर्थ –नाकापासून मस्तकावरील केसांच्या मुळापर्यंत ऊर्ध्वपुंड्र लावावा. त्याला विष्णूच्या स्थिर चरणाची आकृती समजतात.

ऊर्ध्वपुंड्राचे अनेक प्रकार आहेत. त्यांत ठिपके व रेषा यांची भिन्नता असते.

ऊर्ध्वपुंड्राच्या मध्यभागी लाल रंगाचा टिळा असतो. त्यात लक्ष्मीसह विष्णू वास्तव्य करतो, अशी समजूत आहे. ऊर्ध्वपुंड्रधारी पुरुषाची प्रशंसा ब्रह्मपुराणात केली आहे –

**अशुचिर्वाप्यनाचारो मनसा पापमाचरेत् ।**
**शुचिरेव भवेन्नित्यमूर्ध्वपुण्ड्राङकितो नरः ।।**

अर्थ – अशुची, अनाचारी किंवा मनाने पाप आचरणारा अशा मनुष्याने ऊर्ध्वपुंड्र धारण केला असता, तो नित्य शुद्ध होतो. [ भा. प्र. वि.; श. क. ]

**ऊर्ध्वपुंड्र उपनिषद्** हे वैष्णव उपनिषदांपैकी एक आहे. हे वराहरूपी विष्णूने सनत्कुमाराला उपदेशिले. यात ऊर्ध्वपुंड्रधारणाचा विधी सांगितला आहे. प्रथम श्वेतमृत्तिकेची प्रार्थना, नंतर तिच्यात पाणी मिसळून नृसिंहबीजाक्षर लिहिणे व त्या मृत्तिकेने कपाळावर तीन उभ्या रेषा काढणे, असा याचा विधी आहे. या तीन रेखा तीन विष्णुपदांच्या निदर्शक आहेत. ऊर्ध्वपुंड्र धारण केल्याने विष्णूच्या परमपदाची प्राप्ती होते. [ श्री. सी. ग. देसाई ]

**ऊर्ध्वबाहू पंथ** एक शैव पंथ. या पंथाचे साधू बाहू उंच करून त्या अवस्थेत बराच काळ राहतात. काही वेळा ते मुठीही आवळून ठेवतात. त्यामुळे त्यांची वाढलेली नखे हाताला टोचत राहतात. हे लोक सारखे फिरत असतात व केवळ भिक्षेवर उपजीविका करतात. काही नग्न राहतात; तर काही कमरेभोवती भगवे वस्त्र गुंडाळतात. हे शिवाप्रमाणे केसांचा जटाजूट बांधतात व अंगाला भस्म फासतात.

**ऊर्ध्वरेता** ज्याचे वीर्य पतन पावत नाही, अशा निग्रही पुरुषाला ऊर्ध्वरेता अशी संज्ञा आहे. सनत्कुमारादी मुनी हे ऊर्ध्वरेते होते. पित्यासाठी आजन्म ब्रह्मचर्याची प्रतिज्ञा करणाऱ्या भीष्मालाही ही पदवी दिलेली आहे. (म. भा. आदि. १००). ही एक यौगिक प्रक्रियाही आहे. योगिजन विशिष्ट साधनेच्या द्वारे आपले वीर्य ऊर्ध्वगामी करतात व त्यामुळे त्यांना ओज प्राप्त होते. असे म्हटले आहे. [ श. क. ]

**ऊली** बिहार प्रदेशातील शाहाबाद जिल्ह्यातील एक क्षेत्र. ऊली ही विश्वामित्राची तपोभूमी आहे. महाभारताचे शांतिपर्व, देवी–भागवत, ब्रह्मपुराण, इ. ग्रंथांत विश्वामित्र तपचर्येसाठी तिकडे गेल्याचा उल्लेख आहे. विश्वामित्र इथे असताना मोठे अवर्षण पडले. त्या वेळी गुरुपुत्रांच्या शापाने चांडाल झालेला त्रिशंकू विश्वामित्राला शोधीत इथे आला व त्याने विश्वामित्राच्या कुटुंबाचे अवर्षणापासून रक्षण केले. त्यामुळे विश्वामित्राने प्रसन्न होऊन त्याला सदेह स्वर्गात पाठविले. परंतु तो चांडाल असल्यामुळे स्वर्गातील देवतांनी त्याला खाली ढकलून दिले. अशा स्थितीत विश्वामित्राने त्याची गती रोखली. त्यामुळे त्रिशंकू अधांतरी लोंबकळत राहिला. त्रिशंकूच्या लाळेपासून कर्मनाशा नदी उत्पन्न झाली, अशी आख्यायिका आहे. ती कैमूर पर्वतातून निघाली आहे.

इथून जवळच रावणाने स्थापिलेले शिवलिंग शोण नदीत आहे. त्याला दससीसानाथ असे म्हणतात. शिवरात्रीच्या वेळी इथे मोठी यात्रा भरते. जवळच महादेवखोहादी काही साधनोपयोगी गुहा आहेत. [ कल्याण–तीर्थांक ]

**ऊस** याचा उल्लेख प्रथम अथर्ववेदात (१.३४.५) व नंतर मैत्रायणीसंहिता (३.७.९), वाजसनेयिसंहिता (२५.१) इ. ग्रंथांत आढळतो. प्राचीन काळी ऊस जंगलातही वाढत असत. अशा वनाला इक्षुवन असे म्हणत (अष्टा ८.४.५). मग त्याची लागवड करू लागले. लागवड करताना ऊस निवडून घेत व त्यामुळे त्याच्यापासून चांगला गूळ तयार होई, असे पाणिनी सांगतो (अष्टा ४.४.१०३). प्राचीन काळीही आधुनिक काळातील सरौती, मनगो, डकचन, बाँसपती, इ. अनेक

प्रकारचे ऊस होते. काष्ठेक्षू, पौंड्रक, वंशक, इ. उसाच्य जातींचा उल्लेख प्राचीन कोशांमध्ये आलेला आहे. यांपैकी काष्ठेक्षू व वंशक (बांसपत्ती) हे जंगलात वाढत असत उसाच्या शेतांना इक्षुशाकर व इक्षुशाकिन म्हणत.

महाभारत व पुराणांत उसाच्या साखरेचा उल्लेख आहे. पितरांना द्यायच्या आहुती श्यामाक व इक्षू यांच्या असाव्या, असे विशेष विधान वायुपुराणात सांगितले आहे.

उसाच्या रसापासून गूळ, काकवी, साखर, खडीसाखर हे पदार्थ बनवता येतात. ऊस समशीतोष्ण आहे, रस थंड आहे, गूळ उष्ण आहे, साखर सम-धात व खडीसाखर निर्दोष व औषधी असते.

उसाचा कोणताही भाग वाया जात नाही. बैल, घोडे व हत्ती यांना उसाचे तुकडे खाऊ घालतात. वाढी (वरची टोके) इतर जनावरांना घालतात. चिपाडे व वाळलेली पाने सर्पण म्हणून उपयोगी पडतात. पाचटाचे उत्तम खत करता येते. काकवीपासून मद्य तयार होते. [ वे. इं.; पा. का. भा.; क. हि. वा. पु.; म. ज्ञा. को.]

## ऋ

वर्णमालेतील सातवा स्वरवर्ण. हा मूर्धन्य आहे. 'ऋकटुरषाणां मूर्धा' (सि. कौ.). ह्रस्व, दीर्घ, प्लुत व उदात्त, अनुदात्त, स्वरित अशा भेदांनी हा नवविध होतो. त्यांत सानुनासिक व निरनुनासिक असे आणखी प्रकार मानल्यास तो १८ प्रकारचा होतो. कामधेनुतंत्रात याचे वर्णन पुढीलप्रमाणे दिले आहे –

**ऋकारं परमेशानि कुण्डली मूर्तिमान् स्वयम् ।**
**अत्र ब्रह्मा च विष्णुश्च रुद्रश्चैव वरानने ।।**
**सदाशिवयुतं वर्णं सदा ईश्वरसंयुतम् ।**
**पञ्चवर्णमयं वर्जं चतुर्ज्ञानमयं तथा ।।**
**रक्तविद्युल्लताकारं ऋकारं प्रणमाम्यहम् ।**

वरील श्लोक अशुद्ध आहेत. त्यांचा सारांश पुढीलप्रमाणे सांगता येईल. पार्वतीला शिव सांगतो –

ऋकार हा कुंडलधारी आहे. त्याच्या ठिकाणी ब्रह्मा-विष्णू-रुद्र वास्तव्य करतात. तो वर्ण सदाशिव व ईश्वर यांनीही युक्त आहे. त्याला पंचवर्णमय व चतुर्ज्ञानमय म्हटले आहे. रक्तवर्ण विद्युल्लतेच्या आकाराच्या या ऋकाराला मी प्रणाम करतो.

मातृकान्यासात याचा उजव्या नाकपुडीवर न्यास करतात. तंत्रग्रंथांत याची दीर्घमुख, रुद्र, भावमूर्ती, इ. अनेक नावे दिलेली आहेत.

हा इ. स. ६ व्या शतकातील उष्णीष विजया धारिणीच्या ताडपत्रात प्रथम आढळतो. त्यानंतर १० व्या शतकातील एका नेपाळी हस्तलिखित पुस्तकात हा दिसतो.

संस्कृतात हे अक्षर दहा लक्ष, स्वर्ग व अदिती या अर्थी वापरलेले आहे. [ श. क.; म. ज्ञा. को. ]

## ऋक् प्रातिशाख्य

प्रातिशाख्य ग्रंथांतील एक प्राचीन ग्रंथ. पर्षद किंवा परिषद हिच्यामध्ये या विद्येचा प्रचार झाल्यामुळे याला पार्षद किंवा पारिषद सूत्र असेही म्हटले आहे. शौनक हा याचा कर्ता, असे विष्णुमित्राने सांगितले आहे. या सूत्रात शिक्षाविषयक विवेचन असल्यामुळे याला शिक्षाशास्त्र असेही म्हणतात. यात अठरा पटले असून, पहिल्या पटलात स्वर, व्यंजन, स्वरभक्ती, रक्त, नाभी प्रगृह्यादी पारिभाषिक शब्द, इ.ची लक्षणे दिली आहेत. द्वितीय पटलात प्रश्लिष्ट, क्षैप्र, उद्ग्राह भुग्न, इ. संधीची सोदाहरण लक्षणे आहेत. तृतीय पटलात स्वरांचा परिचय असून, चार ते नऊ या पटलांत विसर्जनीय संधी, नकाराचे नाना प्रकार, व्यंजनसंधी, इ. विविध संधीचे विस्तृत शास्त्रीय परीक्षण आहे दहा व अकरा या पटलांत क्रमपाठ, पंधराव्यात वेदपारायणाच्या पद्धतीचा संक्षिप्त परिचय व शेवटच्या तीन पटलांत गायत्री, उष्णिक, बृहती, इ. छंदांचे सविस्तर वर्णन असून, छंदःशास्त्राच्या दृष्टीने ते फार मोलाचे आहे. [ वै. सा. सं. ]

## ऋग्विधान

ऋग्वेदातील मंत्रांचा विनियोग सांगणारा ग्रंथ. ऋग्वेदात अनेक प्रकारची सूक्ते असून, त्यांचा विनियोग यज्ञकर्मात होत असतो. निरनिराळ्या प्रकारची जी कर्मे सांगितली आहेत, त्यांत शांत व घोर, तसेच पौष्टिक व आभिचारिक अशी कर्मे असतात. अशा कर्मांस उपयुक्त असे अनेक मंत्र ऋग्वेदात आहेत. मंत्राचा विनियोग यज्ञात करून त्या यज्ञाच्या द्वारे ईप्सित फल मिळविणे हा एक पक्ष. त्या दृष्टीने आश्वलायनासारख्या कल्पसूत्रकारांनी त्या त्या मंत्रांचा विनियोग निरनिराळ्या यज्ञांत सांगितला आहे. पण यज्ञ न करताही केवळ मंत्रजपाच्या द्वारे इष्ट फल मिळविता येते, असे सांगणारा दुसरा पक्ष आहे. या पक्षाच्याच दृष्टिकोनातून ऋग्विधानाची रचना झालेली आहे. प्रस्तुत ग्रंथात काही होमही सांगितलेले दिसतात; पण ते श्रौतयज्ञाहून निराळे आहेत.

ऋग्विधानाचा कर्ता कोण, हे निश्चित सांगणे कठीण आहे ते शौनकाने रचले, असे एक मत आहे. पण ऋग्विधानाची एकंदर रचना पाहता ते एका माणसाने रचले असेल, असे वाटत नाही. त्याच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटी 'नमः शौनकाय' असे म्हटलेले असते. प्रस्तुत ग्रंथाचा कर्ता शौनक असता तर

त्याने स्वतःलाच असे नमन केले नसते. शक्यता अशी वाटते, की शौनक वंशातल्या अनेक आचार्यांनी मिळून या ग्रंथाची रचना केली व अध्यायाच्या शेवटी आपल्या शाखाप्रवर्तकाला नमन लिहिले.

ऋग्विधानात पाच अध्याय असून, सुमारे साडेसातशे श्लोक आहेत. सर्व श्लोक सोपे व अनुष्टुभ् छंदातले असून, ते पुराणांच्या धर्तीवर आहेत. सध्या उपलब्ध असलेल्या ऋग्वेदाच्या शाकलसंहितेतला मंत्रक्रम यात बरोबर आढळत नाही. त्यावरून तो क्रम शौनकसंहितेवरून घेतला असावा, असा तर्क केला केला जातो. शौनकसंहिता सध्या उपव्लध नाही.

या ग्रंथात पौष्टिक व आभिचारिक अशी दोन प्रकारची कर्मे सांगून त्यांसाठी जपहोमादी विधाने दिली आहेत. दीर्घायुष्य, स्वर्गप्राप्ती, धन, प्रजा, पशुसमृद्धी, शत्रुनाश, रोगनाश, अपमृत्युनिवारण, इ. अनेक कामनांचे मंत्र व त्यांचे अनुष्ठान, यात दिलेले आहे. विधानांची सामान्य फलश्रुती सांगताना एक सामान्य सिद्धान्त सांगितला आहे, (१. ११) तो असा—

येन येनार्थमृषिणा यदर्थं देवताः स्तुताः ।
स स कामः समृद्धिश्च तेषां तेषां तथा तथा ।।

अर्थ – मंत्रद्रष्टया ऋषीने जी कामना मनात धरून देवतेची स्तुती केली असेल, ती कामना त्या मंत्राचा जप अथवा त्याचे अनुष्ठान केल्याने फलद्रूप होते.

मंत्राचा मानसजप हाच सर्वांत श्रेष्ठ होय, असेही सांगितले आहे. (१.७१) [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**ऋग्वेद** चार वेदांपैकी पहिला वेद. हा सर्व वेदांत प्राचीन आहे. किंबहुना ऋग्वेद हा सर्व जगातला आज उपलब्ध असलेला सर्वांत प्राचीन ग्रंथ होय. ऋक् म्हणजे छंदोबद्ध रचना. ऋक् शब्दाच्या काही व्याख्या पुढीलप्रमाणे आहेत—

(१) ऋच्यन्ते स्तूयन्ते देवा अनया इति ऋक् = जिच्या योगे देवांची स्तुती केली जाते, ती ऋक् होय (श. क).

(२) पादेनार्धेन चोपेतवृत्तबद्धा मन्त्रा ऋचः = चरण व अर्धी यांनी युक्त असे वृत्तबद्ध मंत्र म्हणजे ऋचा होत (जै. न्या. २.१.१२).

(३) तेषामृक् यत्रार्थवशेन पादव्यवस्था = ज्या वाक्यात अर्थ म्हणजे छंद (अनुष्टुभादी) यांच्या आधारे चरणव्यवस्था केलेली असते, ती ऋक् होय (जै. न्या. २.१.१०).

अनेक ऋचा मिळून एक सूक्त बनते. ऋग्वेदातील सूक्ते मुख्यत्वे इंद्र, अग्नी, वरुण, मरुत् इ. देवतांच्या स्तुतीची किंवा वर्णनाची आहेत. याव्यतिरिक्त समाज, संस्कार, सृष्टिरचना, तत्त्वज्ञान, इ. अनेक विषयांवरची सूक्तेही ऋग्वेदात आढळतात.

मंत्रब्राह्मणयोर्वेदनामधेयम् = मंत्रविभाग व ब्राह्मणविभाग मिळून बनलेल्या साहित्याला वेद म्हणतात. (आप. परिभाषा ३१). संहिता हा मंत्रविभाग आणि ब्राह्मण, आरण्यक व उपनिषद् मिळून ब्राह्मणविभाग होय. समस्त ऋक्संहितेची मांडणी पुढील दोन प्रकारांनी केलेली आहे –

(१) **अष्टकरचना** – ऋग्वेदाचे एकूण ६४ अध्याय आहेत. आठ अध्यायांचे एक अष्टक अशी त्याची एकूण आठ अष्टके बनविलेली आहेत. प्रत्येक अध्यायाच्या अवांतर किंवा उपविभागाला वर्ग म्हटले आहे. वर्गाची ऋक्संख्या सामान्यपणे पाच असते. पण कित्येक वर्ग एका ऋचेपासून नऊ ऋचापर्यंत असलेले आढळतात. या विषमतेचे कारण काय असावे, ते कळत नाही. ऋक्संहितेतील एकूण वर्गसंख्या २००६ इतकी आहे. वर्गरचना ही अध्ययनाच्या सोयीसाठी केलेली असावी.

(२) **मंडलरचना** – एकूण ऋक्संहिता दहा मंडलांत विभक्त केलेली आहे. प्रत्येक मंडलात अनेक सूक्ते आणि प्रत्येक सूक्तात अनेक ऋचा असतात. ही रचना ऐतिहासिक स्वरूपाची असल्यामुळे पहिल्या रचनेपेक्षा अधिक महत्त्वाची ठरते. मंडलांचे गोत्रमंडले व मिश्रमंडले असे आणखी दोन विभाग आहेत. दोन ते आठ ही मंडले गोत्र, ऋषी व त्यांचे वंशज यांच्या नावावर असल्यामुळे त्यांना गोत्रमंडले म्हणतात. गृत्समद, विश्वामित्र, वामदेव, अत्री, भरद्वाज, वसिष्ठ व आठव्याचे कण्व व आंगिरस असे क्रमाने एकूण आठ गोत्रऋषी आहेत. दोन ते सात ही मंडले म्हणजे ऋग्वेदाचा गाभाच होय. यातील मंत्रांची रचना सर्वांत प्राचीन असून, ऋग्वेदाच्या इतर सूक्तांची रचना ही त्यानंतरच्या काळातली आहे. नवव्या मंडलातली सगळी सूक्ते सोम या एकाच देवतेला उद्देशून आहेत. सोमालाच पवमान असे दुसरे नाव आहे. त्यामुळे या मंडलाला पवमानमंडल असे म्हणतात. दोन ते आठ ही मंडले तयार झाल्यावर त्या त्या ऋषींची सोमविषयक सर्व सूक्ते एकत्र करून नवव्या मंडलाची रचना करण्यात आली, असे अनुमान आहे. त्यानंतरच्या काळात पहिले व दहावे अशी दोन मंडले ऋग्वेदाला जोडण्यात आली. या दोन्ही मंडलांतील सूक्तांची संख्या समान म्हणजे १९१ आहे. त्यावरून या मंडलांची रचना मुद्दाम करण्यात आली आहे, हे स्पष्ट होते. भाषा, छंद, नवीन देवता व नूतन दार्शनिक विचार यामुळे दहाव्या मंडलाची रचना प्राचीन मंडलांच्या मानाने अर्वाचीन आहे, असे सिद्ध होते.

कात्यायनाने आपल्या सर्वानुक्रमणीत वरील दहाही मंडलांची विविध प्रकारे गणना करून त्यांतली सूक्ते, सूक्तांच्या एकूण ऋचा, त्यांतले शब्द आणि अक्षरेही मोजून त्यांची संख्या लिहून ठेवलेली आहे. या परिगणनेचे कोष्टक असे –

| | |
|---|---|
| मंडले– | १० |
| सूक्ते– | १०१७ |
| ऋचा– | १०५८०¼ |
| शब्द– | १,५३,८२६ |
| अक्षरे– | ४,३२,००० |

याव्यतिरिक्त वालखिल्य नामक ११ सूक्ते ऋग्वेदसंहितेत आहेत. ही वालखिल्य सूक्ते ८ व्या मंडलात ४९ ते ५९ इतकी असून, त्यांच्या मंत्रांची संख्या ८० आहे. ऋग्वेदात काही खिल-सूक्ते आहेत. खिल शब्दाचा अर्थ परिशिष्ट किंवा पाठीमागून जोडलेले मंत्र असा आहे.

ऋग्वेदाची इतकी तपशीलवार व पद्धतशीर गणना करून ठेवल्यामुळेच इतक्या दीर्घ कालानंतरही हा ग्रंथ पूर्वी ज्या स्वरूपात होता, त्याच स्वरूपात यत्किंचितही बदल न होता आज आपल्याला उपलब्ध झाला आहे.

ऋग्वेदाच्या दहाही मंडलांचे संकलन व विभाजन एकाच व्यक्तीने केले आहे, अशी परंपरागत समजूत आहे. दहाही मंडलांच्या ऋषींविषयी कात्यायनाने आपल्या सर्वानुक्रमणीत पुढील पंक्ती लिहिली आहे –

**शर्तचिन आद्ये मण्डलेऽन्ते क्षुद्रसूक्तमहासूक्ता मध्यमेषु माध्यमाः ।**

अर्थ – ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलाच्या ऋषींना शंभर ऋचा रचणारे, शेवटच्या मंडलांतील ऋषींना क्षुद्रसूक्ते व महासूक्ते रचणारे व मधल्या मंडलांतील ऋषींना माध्यम अशी संज्ञा आहे.

पहिल्या मंडलातील ऋषींना 'शर्तचिनः' म्हणण्याचे कारण सर्वानुक्रमणीचा टीकाकार षड्गुरुशिष्य असे देतो, की मंडलातील पहिला ऋषी विश्वामित्रपुत्र मधुच्छन्दा याने शंभरांपेक्षा जास्त ऋचा रचल्या. त्यामुळे छत्रिन्यायाने त्या मंडलाच्या सर्व ऋषींना हे अभिधान मिळाले आहे. त्याचप्रमाणे दहाव्या मंडलातील नासदीय सूक्ताच्या (१०.१२९) आधीच्या व नंतरच्या सूक्तांना अनुक्रमे महासूक्त व क्षुद्रसूक्त अशी नावे आहेत, असेही षड्गुरुशिष्य सांगतो. दोन ते नऊ ही मंडले ऋक्संहितेच्या मध्यवर्ती असल्याकारणाने त्यांच्या ऋषींना माध्यम हे नाव मिळाले आहे.

प्रारंभी वेद हा राशिरूप होता. व्यासांनी त्याचे चार विभाग केले आणि आपल्या चार शिष्यांना पृथक पृथक शिकविले किंवा वाटून दिले. म्हणून व्यासांना 'वेदान् विव्यास'= वेदांचे विभाजन करणारे, या अर्थी वेदव्यास म्हणू लागले. याच व्यासांनी आपल्या पैल नामक शिष्याला ऋग्वेद शिकविला. पैलाने त्याच्या दोन शाखा केल्या. त्यांपैकी एक बाष्कलाला व दुसरी इंद्रप्रमतीला शिकविली. इंद्रप्रमतीची संहिता माण्डूकेयाला मिळाली आणि त्याच्याकडून ती क्रमाने सत्यश्रवा, सत्यहित व सत्यश्रिय यांना मिळाली, असे भागवत, ब्रह्मांड, इ. पुराणांत सांगितले आहे.

या भिन्न भिन्न ऋषींच्या द्वारे पुढे ऋग्वेदाच्या अनेक शाखा झाल्या. पतंजलीने आपल्या व्याकरण–महाभाष्याच्या पस्पशाह्निकात 'एकविंशतिधा वाह्वृच्यम्'= ऋग्वेदाच्या एकवीस शाखा असल्याचे लिहिले आहे. त्यांपैकी शाकल, बाष्कल, आश्वलायन, शाखायन व मांडूकायन या ऋग्वेदाच्या शाखा प्रसिद्ध आहेत. त्यांतील शाकल शाखेची संहिता जशीच्या तशी वैदिक पठण परंपरेमुळे शुद्ध स्वरूपात टिकून राहिली आहे. शाकल शाखा पाच प्रकारच्या होत्या –

**(१) मुद्‌गल शाखा** – या शाखेची संहिता, ब्राह्मण वा सूत्रे उपलब्ध नाहीत. प्रपंच-हृदय नामक ग्रंथाच्या लेखनकालापर्यंत ही शाखा अस्तित्वात होती. कारण त्या ग्रंथात या शाखेचा उल्लेख आहे. महाभारत किंवा पुराणे यांच्या मते मुद्‌गल हे आंगिरस गोत्राचे होते.

**(२) गालव शाखा** – या शाखेची संहिता, ब्राह्मण किंवा सूत्र उपलब्ध नाही. गालव हा पंचाल देशाचा रहिवासी असून, त्याचे दुसरे नाव बाभ्रव्य असे होते. याने ऋग्वेदाचा क्रमपाठ बनविला होता. ऋक्प्रातिशाख्य, निरुक्त, बृहद्देवता व अष्टाध्यायी या ग्रंथांत याचा उल्लेख आला आहे.

**(३) शालीय शाखा** – या शाखेची संहिता, ब्राह्मण किंवा सूत्र काहीच उपलब्ध नाही. काशिकावृत्तींत अन्य शाखाकार ऋषींसमवेत याचाही उल्लेख आहे.

**(४) वात्स्य शाखा** – महाभाष्यात या शाखेचा उल्लेख आहे (४.२.१०४).

**(५) शैशिरी शाखा** – या शाखेचा उल्लेख अनुवाकानुक्रमणीत आहे.

या पाच शाकल शाखांचे मूळ अशी शाकल्य, शाकलक किंवा शाकलेयक ही संहिता होती. वैदिक संप्रदायांत या संहितेबद्दल मोठा आदर आहे.

बाष्कलशाखा चार प्रकारच्या होत्या, त्या पुढीलप्रमाणे आहेत –

**(१) बौध्य शाखा** – संहिता--ब्राह्मणादी उपलब्ध नाही. बौध्य हा आंगिरस गोत्राचा होता. 'कपिबोधादाङ्गिरसे'= आंगिरस गोत्राच्या बोधाचा पुत्र बौध्य होय (अष्टा. ४.१.१०७). बृहद्देवतेत याचे नाव आहे.

**(२) अग्निमाठर शाखा**–हिच्यासंबंधी नावापलिकडे जास्त माहिती मिळत नाही.

**(३) पराशर शाखा** – अधिक माहिती नाही.

**(४) जातुकर्ण्य शाखा** – अधिक माहिती नाही.

शाकल्यांप्रमाणेच बाष्कलांचीही एक सर्वसामान्य संहिता असावी, असे अनुमान आहे. त्यांचे ब्राह्मणही वेगळे होते, असा शुक्लयजुःप्रतिज्ञासूत्रांच्या अनन्तभाषात उल्लेख आहे. बाष्कल शाखेच्या पाठात शाकल शाखेच्या पाठापेक्षा आठ सूक्ते अधिक आहेत.

आश्वलायन शाखेची सांप्रत गृह्य व श्रौतसूत्रेच फक्त उपलब्ध असून, संहितादी इतर अंश मिळत नाहीत.

शांखायन शाखेचे ब्राह्मण, आरण्यक व कल्पसूत्र हे ग्रंथ उपलब्ध आहेत. शांखायनाची स्वतंत्र संहिता असावी, असा तर्क आहे. शांखायन शाखेचे शांखायन, कौषीतकी, महाकौषीतकी व शांबव्य असे चार भेद आहेत, असे पं. भगवद्दत्त सांगतात.

मांडूकायन शाखेचे अनेक ग्रंथ पूर्वी उपलब्ध होते; पण आज त्यांपैकी एकही मिळत नाही.

पं. भगवद्दत्तांनी ऋग्वेदाच्या आणखीही अनेक शाखा दिल्या आहेत, त्या पुढीलप्रमाणे – (१) बह्वृच (२) पैङग्य (३) औद्दालकी = गोतम = आरुण (४) शैलालक (५) शतबलाक्ष (६) गज = हास्तिक (७) बाष्कली भारद्वाज (८) ऐतरेय महैतरेय (९) वासिष्ठ (१०) सुलभ (११) शौनक.

व्याकरणमहाभाष्यात ऋग्वेदाच्या एकूण एकवीस शाखा असल्याचे सांगितले आहे; पण या सर्व शाखा सत्तावीस भरतात. तेव्हा यांतील सहा शाखांचा अंतर्भाव दुसऱ्या कोणत्या तरी नावाखाली झाला असला पाहिजे. अणुभाष्यात स्कंदपुराणातील काही ओळी उद्धृत केल्या असून, तदनुसार ऋग्वेदाच्या चौवीस शाखा आहेत, असे म्हटले आहे.

ऋग्वेदात मुख्यतः यज्ञांतील देवतांची स्तुती, वर्णन किंवा प्रार्थना केलेली आहे. त्याचबरोबर त्यांत मानवी जीवनाला उपकारक अशा सुंदर व तेजस्वी प्रार्थनाही आल्या असून, मधून मधून आर्यांचे तत्त्वज्ञानविषयक विचारही ग्रथित केलेले आहेत. काही सूक्तांत निसर्गाचे रम्य वर्णन आले आहे. सूक्तांचे सामान्यतः पुढीलप्रमाणे वर्गीकरण करतात –

(१) देवतासूक्ते (२) ध्रुवपदसूक्ते (३) कथासूक्ते (४) संवादसूक्ते (५) दानस्तुतिसूक्ते (६) तत्त्वज्ञानसूक्ते (७) संस्कारसूक्ते (८) मांत्रिकसूक्ते (९) लौकिकसूक्ते व (१०) आप्रीसूक्ते.

**देवतासूक्ते** – ऋग्वेदातील इंद्र, अग्नी, वरुण, सूर्य, सविता, वायू, उषा, पूषा, आप, अश्विनौ, रुद्र, भग, विष्णू; मरुत, विश्वेदेव, सरस्वती, वाक, द्यावा-पृथिवी, इ. देवतांचे रूप, स्वभाव व माहात्म्य या प्रकारच्या सूक्तांतून वर्णिलेले असून, त्यांचे स्तवन केलेले आहे.

**ध्रुवपदसूक्ते** – मंत्राच्या शेवटी काही सूक्तांत ठराविक ध्रुवपद आढळते. अशी वरीच सूक्ते ऋग्वेदात आहेत. त्यांपैकी काही सूक्तांची ध्रुवपदे पुढे दिली आहेत –

मरुद्भिरग्न आ गहि। (ऋ. १.१९)
मरुत्वन्तं सख्याय हवामहे। (ऋ. १.१०१)
स जनास इन्द्रः। (ऋ. २.१२)
महद्देवानामसुरत्वमेकम्। (ऋ. ३.५५)
भद्रा इन्द्रस्य रातयः। (ऋ. ८.६२)

**कथासूक्ते** – ऋग्वेदाच्या काही सूक्तांत बीजरूपाने काही कथा आलेल्या असून, पुढे ब्राह्मणग्रंथात त्यांचा विस्तार झाला आहे. ऋ. १.२४ मध्ये उल्लेखिलेली शुनःशेपकथा ऐ. ब्राह्मणात (५.१४) विस्तार पावली आहे; तर ऋ. १.१५४ या विष्णुसूक्तावरून शतपथब्राह्मणातील वामनावताराच्या कथेने जन्म घेतला आहे. ऋग्वेदात इतर कथावस्तू पुढीलप्रमाणे दिसतात– गोतमकथा (१.८५) वामदेवकथा (४.२६,२७) श्यावाश्वकथा (५.६१) सप्तवध्रीची कथा (५.७८) दाशराज्ञयुद्धकथा (७.१८,३३) नमुचिवधकथा (८.१४) नाभानेदिष्ठकथा (१०.६१). यांपैकी काहींची कथासूत्रे अगदी त्रोटक आहेत.

**संवादसूक्ते** – ऋग्वेदातील दार्शनिक सूक्तांचा ज्याप्रमाणे उपनिषदांतील तात्त्विक विवेचनाशी संबंध जोडतात, त्याप्रमाणे काही सूक्तांचा प्रबंध, काव्य व नाटके यांच्याशी संबंध मानतात. अशा सूक्तांना संवादसूक्ते असे नाव आहे. ऋग्वेदात अशी वीस संवादसूक्ते आहेत. या सूक्तांच्या स्वरूपाविषयी विद्वानांत बरेच मतभेद आहेत. प्रा. ओल्डेनवर्गच्या मते संवादसूक्तांतली आख्याने प्रथम गद्यपद्यात्मक होती. त्यांतला पद्यमय भाग गद्याहून अधिक सरस होता. त्यामुळे कालांतराने त्यांतला कथात्मक गद्यभाग गळला आणि पद्यभाग तेवढा शिल्लक राहिला. ही संवादसूक्ते म्हणजे प्राचीन आख्यानांचाच अवशिष्ट भाग होय, असे ते म्हणतात. याच्या उलट प्रो. सिल्वाँ लेव्ही, प्रो. श्राडर, प्रो. हर्टेल इ. विद्वानांचे मत आहे. ते म्हणतात, की ही सूक्ते म्हणजे प्राचीन नाटकांचे अवशिष्ट भाग आहेत. त्यांना संगीत आणि पात्रयोजना यांची जोड देऊन यज्ञाच्या वेळी त्यांचा साभिनय प्रयोग होत असे. प्रो. विंटरनिट्झ यांच्या मते संवादसूक्ते ही प्राचीन लोकगीतांचे नमुने आहेत. या संवादसूक्तांत कथात्मक व रूपकात्मक अशा दोन्ही भागांचे मिश्रण आहे. त्यामुळे पुढील काळात या सूक्तांपासून एका बाजूने महाकाव्य व दुसऱ्या बाजूने नाटक यांचा उदय झाला. भारतीय साहित्यात या दृष्टीने या सूक्तांचे विशेष महत्त्व आहे.

सगळ्या संवादसूक्तांत पुरूरवा-उर्वशी संवाद (ऋ. १०.९५) यम–यमीसंवाद (ऋ. १०.१०) व सरमा–पणीसंवाद (ऋ. १०.१०८) ही तीन सूक्ते विशेष महत्त्वाची आहेत. पुरूरवा

व उर्वशी यांची कथा म्हणजे स्त्री-पुरुषांच्या प्रेमाचा प्राचीन नमुना होय. स्वर्गीची अप्सरा उर्वशी ही भूतलावरचा मानव राजा पुरूरवा याचा काही अटींवर पती म्हणून स्वीकार करते; पण पुढे त्याने त्यातली एक अट मोडली, असे पाहून त्याचा त्याग करते आणि स्वर्गात निघून जाते. या सूक्तात अठरा मंत्र असून, त्यांपैकी काही उर्वशीच्या तर काही पुरूरव्याच्या तोंडी घातलेले आहेत.

यम-यमी संवादात स्त्रीपुरुषांच्या अनिर्बंध लैंगिक व्यवहाराविषयी मानवी अंतःकरणात उद्‌भवलेली संयमात्मक नीतिभावना स्पष्टपणे प्रतिबिंबित झालेली दिसते. इथे यमी आपल्या भावाला म्हणजे यमाला आपल्याशी रतिसुखासाठी एकान्त करण्याबद्दल परोपरीने विनविते; पण यम संयमपूर्वक तिच्या त्या याचनेचा तितक्याच तीव्रतेने निषेध करतो. या सूक्तात यमाला वश करण्यासाठी यमीने केलेला युक्तिवाद ठसकेबाज असून, कामविह्वल स्त्रीहृदयाची त्यावरून चांगली कल्पना येते. पुरुषाच्या अंतःकरणात विवेक जागृत झाला म्हणजे तो कसा संयमी बनतो, त्याचे यम हे उत्कृष्ट उदाहरण आहे.

तिसरे संवादसूक्त ऋग्वेदकाळातील समाजस्थितीचे निदर्शक आहे. पणी लोकांनी आर्यांच्या गायी पळवून नेल्या होत्या व त्यांना अंधाऱ्या गुंफांत लपवून ठेवले होते. त्या परत मिळविण्यासाठी इंद्र आपली कुत्री सरमा हिला पणींकडे दूती म्हणून पाठवितो. ती पणींकडे जाऊन इंद्राच्या व इतर आर्यांच्या पराक्रमाची स्तुती करते व पणींना दमदाटी देऊन त्यांच्याकडून गायी परत मागते. सरमेची निर्भयता, तिचा स्पष्टवक्तेपणा व आपल्या स्वामीबद्दलची तिची निष्ठा या गोष्टी यात चांगल्या प्रकारे व्यक्त झाल्या आहेत.

**दानस्तुतिसूक्ते** – ऋग्वेदातील काही सूक्तांना दानस्तुती असे नाव आहे. या सूक्तांत निरनिराळ्या राजांनी ऋषींना अश्व, गायी, बैल, धन इ. वस्तूंची जी दाने दिली, त्याबद्दल ऋषींनी त्या दानकर्त्या राजांची स्तुती केलेली आहे. कात्यायनाच्या ऋक्सर्वानुक्रमणीत दानस्तुतिविषयक २२ सूक्तांचा उल्लेख आहे. परंतु आधुनिक विद्वानांच्या मते ती ६८ आहेत.

ऋग्वेदाच्या १० व्या मंडलातील ११७ व्या सूक्तात दानमाहात्म्याचे ओजस्वी वर्णन आहे, ते असे –

**मोघमन्नं विन्दते अप्रचेताः । सत्यं ब्रवीमि वध इत् स तस्य ।**
**नार्यमणं पुष्यति नो सखायं । केवलाघो भवति केवलादी ।।**

अर्थ – त्या मूर्खाने व्यर्थ अन्न मिळविण्याचे श्रम घेतले. मी खरेच सांगतो, की (त्याने मिळविलेले अन्न नसून) तो त्याचा प्रत्यक्ष मृत्यूच आहे. कारण (याचकरूपाने येणाऱ्या) अर्यमादिकांना जो अन्नदान करून संतुष्ट करीत नाही व मित्रांनाही प्रसन्न ठेवीत नाही आणि जो एकटाच खात बसतो, तो महापातकी होय.

**तत्त्वज्ञानसूक्ते** – उत्तरकालीन उपनिषदांत व्यक्त झालेली सुंदर तत्त्वे बीजरूपाने प्रथम ऋग्वेदात आढळतात. वैदिक ऋषींच्या तात्त्विक विचारांची प्रगती नानादैवतवादातून 'एक देव' मानण्यापर्यंत झालेली दिसते. ऋग्वेदात अनेक देवता असून, त्यांची वेगवेगळी स्तवनेही आहेत. त्यावरून वैदिक धर्म हा बहुदेवतावाद मानणारा आहे, अशी काही विद्वानांची समजूत झालेली दिसते. ऋग्वेदात बहुदेवतावाद आहे खरा; पण तो वाद म्हणजे वेदपूर्वपरंपरेतला अवशेष होय. तो वाद ऋग्वेदात हळूहळू मंदावत चाललेला दिसतो. वैदिक ऋषी कोणत्याही मोठ्या देवाची स्तुती करताना 'तो स्थावर-जंगमाचा नियंता व सर्वांचा ईश्वर आहे', असे म्हणतात. वस्तुतः हा बहुदेवतावाद नसून, विभूतिवाद आहे. पण वैदिक ऋषींची धारणा 'एकं सत्' मानणारी असून, सर्व काही ईश्वरमय आहे व सर्व एकाच सतातून प्रकट झाले आहे, असा विचार ऋग्वेदात अनेक जागी आढळतो. याविषयीचा पुढील मंत्र प्रसिद्ध आहे-

**इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यःस सुपर्णो गरुत्मान् ।**
**एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः ॥**

(ऋ. १.१६४.४६)

अर्थ – इंद्र, मित्र, वरुण, अग्नी अशा निरनिराळ्या नावांनी संबोधिला जाणारा असा तो सुंदर पंखाचा एक दिव्य गरुड पक्षी आहे. हा वस्तुतः एकच असून, सूज्ञ लोक त्यालाच अग्नी, यम, मातरिश्वा, अशी निरनिराळी नावे देतात.

**यो देवेष्वधि देव एक आसीत् ।**

(ऋ. १०.१२१.८)

अर्थ – जो सर्व देवांत एकटाच वरिष्ठ असा देव (देवाधिदेव) ठरला आहे.

**यो देवानां नामधा एक एव ।**

(ऋ. १०.८२.३)

अर्थ – तो ईश्वर सर्व देवांमध्ये एकच आहे.

ही व अशा प्रकारची उदाहरणे ही ऋग्वेदातील 'एकं सत्'ची निदर्शक ठरतात.

दहाव्या मंडलातील नासदीय सूक्त, पुरुषसूक्त, हिरण्यगर्भसूक्त व वाक्सूक्त ही सूक्ते दार्शनिक गंभीरता व प्रतिभायुक्त अनुभूती यांसाठी प्रसिद्ध आहेत. नासदीयसूक्त हे तर वैदिक ऋषींच्या अलौकिक चिंतनाचा प्रत्यय आणून देणारे आहे. या सूक्तात सृष्ट्युत्पत्तीच्या आधीच्या अवस्थेचे वर्णन आहे- 'त्या वेळी सत नव्हते आणि असतही नव्हते. धूळ नव्हती आणि आकाशही नव्हते. रात्र नव्हती किंवा दिवसही नव्हता.

सर्व तमोमय होते, सर्व जलमय होते. मग सर्वप्रथम तिथे काम उत्पन्न झाला. संकल्पाच्या साहाय्याने तो आपली अभिव्यक्ती सृष्टीच्या निरनिराळ्या थरांत दाखवू लागला . . .'

या सर्व वर्णनांच्या मुळाशी अद्वैताचे अनुसंधान दिसते. हेच या सूक्ताचे रहस्य होय. ऋग्वेदातील दहाव्या मंडलातील सूक्तांचे अनुशीलन केल्यास सकल सृष्टीच्या मुळाशी किंवा सकलांचा नियामक असा कोणीतरी 'एको देव:' असला पाहिजे, ही कल्पना त्या काळापर्यंत दृढमूल झालेली दिसते. त्या एका देवाला त्यांनी कधी हिरण्यगर्भ, कधी पुरुष, तर कधी प्रजापती म्हणून संबोधिलेले आहे.

**संस्कारसूक्ते** – वेदमंत्रांचा विनियोग हा मुख्यत्वे श्रौत कर्माच्या ठिकाणी झालेला असला, तरी त्यांतली काही सूक्ते व काही मंत्र गृह्य संस्कारातही विनियुक्त केलेली आहेत. दहाव्या मंडलांतले ८५ वे सूक्त सूर्यासूक्त म्हणून प्रसिद्ध आहे. त्यातले मंत्र विवाहसंस्कारात घेतलेले आहेत. त्याप्रमाणे गृह्य संस्कारांत पुढील सूक्ते विनियुक्त केली जातात – स्नान व मार्जन (१०.९), श्राद्धप्रयोग (१०.१५), प्रेतकर्म (१०.१६. व १८), उपनयन (१०.१९ व ६२), गर्भाधान (१०.१८४).

**मांत्रिकसूक्ते** – मानवी जीवनात कोणावर कशी आणि केव्हा आपत्ती येईल ते सांगता येत नाही. या सगळ्याच आपत्तींचा लौकिक उपायांनी परिहार करता येत नाही. अशा प्रसंगी माणूस कोणत्या तरी अलौकिक उपायाचा अवलंब करतो. रोग, अपशकुन, दु:स्वप्ने, जारण-मारण, भूतबाधा, विषबाधा, राजयक्ष्मा, इ. विविध आपत्तींचा परिहार करण्यासाठी ऋग्वेदातील कित्येक सूक्तांचा विनियोग करतात. सूक्तांचा अशा प्रकारचा विनियोग व विधान सांगण्यासाठीच ऋग्विधान हा ग्रंथ, निर्माण झालेला आहे.

**लौकिक सूक्ते** – या सूक्तप्रकारात द्यूतविषयक सूक्त (१०. ३४) मंडूकसूक्त (७.१०३) राजधर्मविषयक सूक्त (१०. १७३) इ. सूक्ते येतात.

**आप्रीसूक्ते** – पशुयागांत या सूक्तांचा विनियोग करतात. या यागांत पशूच्या वपेचा याग होण्यापूर्वी प्रयाज नामक अकरा किंवा बारा देवतांना उद्देशून याग करायचा असतो. यात प्रत्येक देवतेसंबंधी स्तावक भाग पठण करण्याबद्दल मैत्रावरुण आज्ञा देतो व होता याज्यारूप काही ऋचा म्हणतो. अशा अकरा अथवा बारा ऋचांच्या सूक्ताला आप्रीसूक्त अशी संज्ञा आहे. ऋग्वेदात एकूण दहा आप्रीसूक्ते आहेत. त्यांपैकी पहिल्या मंडलात तीन असून, दहाव्या मंडलात दोन आहेत. चौथ्या, सहाव्या व आठव्या मंडलांत मात्र आप्रीसूक्त नाही. ज्या गोत्रांना आप्रीसूक्त नाही, त्यांनी जमदग्नीचे आप्रीसूक्त पठण करायचे, असा संकेत आहे. या सर्व सूक्तांतील वर्ण्य विषय, देवता वगैरे समान आहेत. आप्रीसूक्तांचा संबंध भिन्न भिन्न गोत्रांशी असल्यामुळे ती अनेक झाली आहेत. जेव्हा ऋग्वेदाची संहिता बनविण्यात आली, तेव्हा सूक्तद्रष्ट्या ऋषींनी पूर्वीच्या आप्रीसूक्तात अल्पस्वरूप बदल करून ते आपापल्या मंडलात समाविष्ट केले. नंतरच्या वैदिक यागांत त्यांचा 'प्रयाज-याज्या' म्हणून उपयोग होऊ लागला.

आप्रीसूक्तांची रचना कृत्रिम असून, त्यांतील ऋचांत क्रमाने (१) इध्म, सुसमिद्ध किंवा समिधान (अग्नी) (२) तनूनपात किंवा नराशंस (३) ईळ (४) बर्हिस् (५) देवी: द्वार: (६) उषासानक्तौ (७) दैव्यौ होतारौ किंवा प्रचेतसौ (८) सरस्वती, भारती, इळा (९) त्वष्टा (१०) वनस्पती (यूप) (११) स्वाहाकृती किंवा विश्वेदेव या देवतांचे वर्णन आहे. या सूक्तांतील दुसऱ्या ऋचेत जी देवता वर्णिली असेल, त्या अनुरोधाने आप्रीसूक्तांचे नराशंस व तनूनपात असे दोन भेद पडलेले आहेत. विश्वामित्र, अगस्त्य, कश्यप, जमदग्नी या गोत्रांच्या आप्रीसूक्तांत तनूनपात देवतेचाच उल्लेख आहे; तर काण्व व आंगिरस गोत्रांच्या आप्रीसूक्तांत दोन्ही देवतांचा निर्देश आहे.

वैदिक मंत्रांची संहिता सिद्ध झाल्यावर निरनिराळ्या ऋषींची निरनिराळी मंडले बनली. त्यावरून पुढे मंडलऋषींत वैमनस्यही निर्माण झाले आणि ते वैमनस्य नष्ट व्हावे म्हणून आप्रीसूक्तांचा बहुतेक मंडलांत समावेश केला गेला. आप्री शब्द आ + प्री = खूष करणे, संतुष्ट करणे या धातूपासून बनलेला आहे. विश्वामित्र व वसिष्ठ या दोन ऋषींचे आपसांत वैर असले, तरी त्या दोघांच्या मंडलांतील आप्रीसूक्त मात्र जवळ जवळ सारखेच आहे. आप्रीसूक्तांचा जर हा हेतू नसता, तर या सूक्तांचे स्वरूप आहे त्यापेक्षा अगदी वेगळे झाले असते.

ऋग्वेदात जशी आप्रीसूक्ते आहेत, तसाच पारश्यांच्या अवेस्ता ग्रंथात 'आफ्रिगन' नामक मंत्रसमूह आहे. त्या दोन्ही ठिकाणी अग्नी हीच देवता आहे. सुरवातीला आप्रीसूक्ते व 'आफ्रिगन' यांचा काहीतरी संबंध होता, असे दिसते; पण पुढे तो टिकला नाही.

**ऋग्वेदातील देवता** – 'यस्य वाक्यं स ऋषि: या तेनोच्यते सा देवता' = ज्याचे वाक्य तो ऋषी व त्या ऋषीने सांगितली ती देवता, असा नियम आहे. अशा ऋषिप्रोक्त देवता ऋग्वेदात बहुसंख्य आहेत. त्यांची संख्या ३३ व ३३,३९ एवढी सांगितली असली तरी तितक्या देवतांची नावे ऋग्वेदात सापडत नाहीत. त्यांतल्या अनेक देवता सांप्रतच्या प्रचलित देवतांहून भिन्न आहेत. या सर्व देवतांची नामावली पुढे

दिलेली आहे. या नामावलीत मंत्रोक्त देवता घेतल्या आहेत; आणि यास्क, सायण, इ. वेदवेत्या पंडितांनी ज्यांना देवता ही पदवी दिली, त्यांचाही समावेश केला आहे –

| | |
|---|---|
| अंश | अकूपार |
| अक्ष | अग्नायी |
| अग्नी | अग्नीपर्जन्यौ |
| अग्नीषोमौ | अघ्न्या |
| अंगिरसः | अजएकपाद |
| अथर्वा | अथर्वाणः |
| अदिती | अनुमती |
| अपांनपात | अप्सरस् |
| अभीशु | अरण्यानी |
| अरमती | अरू |
| अर्धदेव | अर्यमा |
| अश्वाजनी | अश्विनी |
| अश्विनौ | असू |
| असुनीती | अहना |
| अही | अहिर्बुध्न्य |
| आदितेयम | आदित्य |
| आदित्यः | आपः |
| आर्त्नी | इन्दू |
| इन्द्र | इन्द्र-नासत्या |
| इन्द्रपत्नी | इन्द्र-वायू |
| इन्द्रा-कुत्सा | इन्द्राग्नी |
| इन्द्राणी | इन्द्रा-पर्वता |
| इन्द्रा-पूषणा | इन्द्रा-बृहस्पती |
| इन्द्रा-ब्रह्मणस्पती | इन्द्रा-मरुतः |
| इन्द्रा-वरुणौ | इन्द्रा-विष्णू |
| इन्द्रा-सोमौ | इषू |
| इषुधी | इळा |
| उर्वशी | उलूखल |
| उलूखल-मुसल | उषा |
| उषासा-नक्ता | ऊर्जानी |
| ऋत | ऋतू |
| ऋभवः | ऋभुक्षाः |
| ऋक्षः | ओषधी |
| क | कृत्या |
| कृशान् | केशी |
| क्रंदनू | क्रंदसी |
| क्षेत्रस्यपती | गंधर्व |

| | |
|---|---|
| गांधर्वी | गुंगू |
| गौः | गौरी |
| ग्नाः | ग्नास्पती |
| ग्रावा | ग्राही |
| चन्द्रमा | चमू |
| चरण्यू | जातवेद |
| ज्या | ज्येष्ठा |
| तनूनपात | तार्क्ष्य |
| त्रित | त्र्यम्बक |
| त्वष्टा | त्वाष्ट्र |
| दक्ष | दक्षिणा |
| दधिक्रावा | दध्यङ् |
| दानव | दानू |
| दुंदुभी | देव |
| देवजन | देवपत्नी |
| दैव्या-होतारा | द्यावा |
| द्यावा-क्षामा | द्यावा-पृथिवी |
| द्यावा-भूमी | द्रविणोदाः |
| द्रुघण | द्वारः |
| धनुः | धाता |
| धेनु | नक्तोषासा |
| नराशंसः | नासत्यौ |
| निर्ऋती | निष्टिग्री |
| पक्ष्या | पणी |
| पतंग | पथ्या |
| पर्जन्य | पर्वत |
| पितरः | पितू |
| पिशाची | पुरंधी |
| पुरुष | पुरूरवस् |
| पूषन | पृथिवी |
| पृथिवी-द्यावा | पृश्नी |
| प्रजापती | बर्हिस् |
| बृसय | बृहस्पती |
| बृहद्दिवा | ब्रह्मणस्पती |
| ब्राह्मणासः | भग |
| भानू | भारती |
| भृगवः | मंडूक-की |
| मनः | मनू |
| मन्यू | मरुत् |
| मातरिश्वन | मित्र |

मित्रा-वरुण
यम
यातुधान
रक्षस्
राट्
रुद्र
रोदसी
वरुण
वर्मन
वसू
वाक
वाजिन:
वाता-पर्जन्या
वास्तोष्पती
विपाट्-शुतुद्री
विभ्वन
विश्वकर्मन
विश्वेदेव
वृषभ
वृषाकपी
वैवस्वत
व्रा
शकुनी
शची
शमीनहुषी
श्येन
सपत्नी
सरण्यू
सरस्वान
सलिल
सविता
सिची
सिंधू
सुम्नेआपी
सुसारथी
सूर्य
सूर्या-चन्द्रमसौ
सूर्या-वसू
सोमा-पूषणौ
सोम्यांस:

मृत्यू
यमी
यातुमावान्
राका
रात्री
रुद्रिय
वनस्पती
वरुणानी
वसर्हा
वसोष्पती
वाज
वात
वायू
विधाता
विभावरी
विवस्वान्
विश्वावसू
विष्णू
वृषाकपायी
वेन
वैश्वानर
शंयू
शक्र
शचीपती
शुनासीर
श्रद्धा
समुद्र
सरमा
सरस्वती
ससर्परी
साध्या:
सिनीवाली
सुपर्ण
सुसमिद्ध
सूर
सूर्या
सूर्या-मासा
सोम
सोमा-रुद्रौ
स्वस्ती

स्वाहाकृती हिरण्यगर्भ

देवतांचे पृथिवीस्थ, मध्यस्थ व द्युस्थ असे तीन प्रकार मानले आहेत. ते पुढीलप्रमाणे –

**पृथिवीस्थ** – शकुनी, द्रुघण, रात्री, हविर्धाने, शुनासीरौ व शुन.

**मध्यस्थ** – अग्नी, क, तार्क्ष्य, वात, ऋत, अहिर्बुध्न्य, विधाता, रुद्र, अंगिरस, अनुमती, सरस्वती, स्वस्ती, पथ्या, इळा व उर्वशी.

**द्युस्थ** – सविता, सरण्यू, वृषाकपायी, वृषाकपी, समुद्र व दध्यङ्.

देवतांच्या द्विविध रूपाचे वर्णन ऋग्वेदात आढळते. पहिले रूप दृश्य व स्थूल असून दुसरे सूक्ष्म व गूढ आहे. देवतांचे नेत्र-गोचर होणारे रूप हे स्थूल अतएव आधिभौतिक होय. जे इंद्रियांच्या अतीत किंवा ज्ञानेंद्रियांना अगम्य असे गूढ रूप असते, ते आधिदैविक समजावे. या व्यतिरिक्त काही देवतांच्या तिसऱ्या आध्यात्मिक स्वरूपाचाही ऋग्वेदात आढळ होतो. उदाहरणार्थ, विष्णू हा सूर्यरूपात प्रत्यक्ष होतो, सूक्ष्म रूपात तो विश्वाचे मापन करतो व अंतरिक्षाला स्थिर करतो; पण या दोहोंहून आगळे असे त्याचे आध्यात्मिक 'परम पद' आहे. तिथे त्याचे भक्त आनंदानुभव घेतात. त्या स्थानात जे मधुचक्र आहे, जो अमृतकूप आहे, त्यासह ते परम पद जागरणशील ज्ञानी पुरुषांना ज्ञात होते (ऋ. १.१५४.१–२; १.२२.२१).

**देवतायुग्मे** – ऋग्वेदात काही देवतायुग्मे ( जोड देवता ) आढळतात. उदा० अग्नी-षोम (ऋ. १.९३), मित्रावरुणौ (६.६७), द्यावा-पृथिवी (१.८५), शुना-सीर (४.५७.५) इत्यादी. दोन स्वतंत्र देवतांची एक संयुक्त देवता कल्पून तिची स्तुती करणे, हा वैदिक उपासनेतला एक विशेष आहे. अशा सुमारे १२ संयुक्त देवता ऋग्वेदात आल्या असून, सुमारे ६० सूक्ते त्यांच्या स्तुतिपर आहेत.

या संयुक्त देवतांची कल्पना मुळात द्यावा–पृथिवी या जोडीवरून निघाली असावी. द्यावा–पृथिवी जोडीची कल्पना वेदपूर्वकालीन असण्याचा संभव आहे. ही कल्पना जगातल्या बहुतेक प्राचीन समाजात आढळते. प्राचीन विचारवंतांनाही सृष्टिरचनेत पृथ्वी व आकाश ही दोन महाभूते एकमेकांना कायमची जोडली गेली आहेत, असे वाटले व त्यांनी या जोड देवतेची कल्पना प्रसृत केली. ही जोडी दुग्ध व मधू देणारी, अमृत वर्षिणारी व महाविशाल आहे, असे तिचे वर्णन आहे (ऋ. ६.७०.१; १.१५९.२).

द्यावा-पृथिवीच्या खालोखाल मित्रा-वरुणाचा क्रमांक लागतो. ही जोडदेवता पर्शुभारतीय काळातली आहे. अवेस्त्यातही अहुर व मिथ्र अशी तत्सम जोडी आढळते.

इंद्रा-वरुण हे विश्वसम्राट आहेत (ऋ. १.१७.१). त्यांनी सर्व जलप्रवाह मोकळे केले व सूर्याला आकाशमार्ग आक्रमिण्यास लावले. तिसरी जोडी इंद्राग्नीची. यांची मैत्री दृढ दिसते. कारण या जोडीच्या वर्णनपर असलेली सूक्ते सर्वांत अधिक आहेत. सोमपान करण्यात हीच जोडी अधिक पटाईत आहे. इंद्रा-विष्णू या जोडीला मदपती म्हटले असून तिला मुख्यत: सोमपानार्थ पाचारण केलेले आहे.

वैदिक देवतायुग्माच्या नमुन्यावर पुढे तांत्रिक व पौराणिक देवतांच्याही जोडया जुळविलेल्या दिसतात. 'देवता द्वंद्वे च' (अष्टा. ६.३.२६) असे पाणिनीचे सूत्र आहे. त्यावरच्या वृत्तीत अशा काही वैदिक व वेदोत्तरकालीन देवतायुग्माची नावे दिलेली आहेत. उदा० ब्रह्म-प्रजापती, शिस-वैश्रवणौ, संकर्षण-वासुदेवौ इत्यादी. या देवता गृह्यसूत्रांच्या काळात नव्याने मानल्या जाऊ लागल्या होत्या.

वैदिक आर्य या देवतांना प्रसन्न करण्यासाठी त्यांच्या उद्देशाने अग्नीत हवन करीत किंवा त्यांना सोमरस समर्पीत. वैदिक आर्यांची ही देवतोपासना सकाम होती. ते देवतांकडे विविध ऐहिक सुखोपभोग मागत आणि आपल्याला सर्वत्र विजय मिळावा म्हणूनही त्यांची प्रार्थना करीत. प्रार्थनाविषयक एक ऋचा (ऋ. ६.१.१२) पुढीलप्रमाणे –

नृवद्वसो सदमिद्धेह्यस्मे भूरि तोकाय तनयाय पश्वः ।
पूर्वीरिषो बृहतीरारेअघाअस्मे भद्रा सौश्रवसानि सन्तु ।।

अर्थ – हे वसू, आम्हांला मनुष्यासह धन दे. आमच्या पुत्रपौत्रांना पुष्कळ पशू दे. पूर्वी ज्याची इच्छा केली, ते पुष्कळ धन (व) कल्याणकारक यश आम्हाला दे.

याव्यतिरिक्त वैदिक ऋषींनी आपणांस शंभर वर्षे आयुष्य देण्याबद्दल, तसेच राक्षस व शत्रू यांच्यां नाशाबद्दलही जागोजाग प्रार्थिले आहे.

**वैदिक ऋषी** – 'यस्य वाक्यं स ऋषिः'=ज्याचे वाक्य म्हणजे मंत्र, तो ऋषी होय, अशी यास्काने त्याची निरुक्ती दिली आहे. या निरुक्तीप्रमाणे इन्द्र, अग्नी, इ. देवतांकडेही ऋषित्व जाते. पण देवतांना ऋषी म्हणत नाहीत. शौनकोक्त सर्वानुक्रमणीमध्ये प्रत्येक सूक्ताचा वा ऋचेचा ऋषी कोण, ते सांगितले आहे. उदा०–'गायत्र्या विश्वामित्रः सविता गायत्री' = गायत्रीमंत्राचा ऋषी विश्वामित्र असे यात सांगितले आहे. 'ऋषयो मन्त्रद्रष्टारो वसिष्ठादयः'= मंत्रद्रष्टे वसिष्ठादी हे ऋषी होत, अशी दुसरी व्याख्या आहे. वेदमंत्राबद्दल अशी समजूत आहे, की मंत्र हे अपौरुषेय असून, ते ईश्वराची निश्वःसिते आहेत. म्हणूनच ऋषी हे मंत्रकर्ते नसून, मंत्रद्रष्टे आहेत. ते ते मंत्र त्या त्या ऋषींना दैवी प्रेरणेने दिसले.

देव, ब्राह्मण व राजे यांपैकी जे ऋषी असतील, त्यांना देवर्षी, ब्रह्मर्षी, राजर्षी, असे म्हटले आहे. महर्षी व कांडर्षी असे आणखी दोन भेद केलेले दिसतात. महर्षी म्हणजे ऋग्वेदाच्या दोन ते सात या मंडलांचे द्रष्टे गृत्समद, विश्वामित्रादी व काश्यप हे असावे. तैत्तिरीय संहितेची पाच कांडे असून, त्यांच्या द्रष्टयांना कांडर्षी म्हटले आहे. प्रजापती, सोम, अग्नी, विश्वेदेव व स्वायंभुव अशी त्यांची नावे आहेत. ज्यांना मंत्र प्रादुर्भूत झाले (दिसले) अशा ऋषींचे चार प्रकार चरकाच्या सूत्रस्थानातील १.७ च्या व्याख्येत हरिश्चंद्राने सांगितले आहेत –

मुनीनां चतुर्विधो भेदः
ऋषयः ऋषिकाः ऋषिपुत्राः महर्षयश्च ।

ऋग्वेदातील मंत्रद्रष्टया ऋषींची संख्या साडेतीनशेच्या वर जाते. या सर्वांत अंगिरा, रहूगण व कुशिक हे प्राचीन मानलेले आहेत. मात्र त्यांचा एखाददुसराच मंत्र उपलब्ध होतो. त्यानंतरच्या मंत्रद्रष्टयांपैकी भरद्वाज, कश्यप, गौतम, अत्री, विश्वामित्र, जमदग्नी व वसिष्ठ हे श्रेष्ठ ऋषी होत. मंडलक्रमाप्रमाणे पाहिल्यास गुत्समद (मं. २), विश्वामित्र (मं.३), वामदेव (मं. ४), अत्री (मं. ५), भरद्वाज (मं. ६), वसिष्ठ (मं. ७) व कण्व (मं. ८) हे ऋषी प्रमुख ठरतात. मंत्ररचनेच्या दृष्टीने विचार केल्यास वसिष्ठाची सूक्ते सर्वांत अधिक म्हणजे १०३ आहेत. त्यानंतर ऋषी व सूक्ते यांचा क्रम पुढीलप्रमाणे लागतो – भरद्वाज ६०, वामदेव ५५, विश्वामित्र ४८, गृत्समद ४०, कक्षीवान २७, अगस्त्य २६, दीर्घतमा २५, गौतम २०, मेधातिथी २०, श्यावाश्व १५, कुत्स १४, मधुच्छंदा १०, प्रस्कण्व ९, पराशर ५, जमदग्नी ५, कवष ४, बृहस्पती २, हर्यंत, अपाला, अष्टक, कुशिक व सुदास प्रत्येकी १.

**ऋग्वेदातील छंद** – समस्त ऋग्वेद छंदोबद्ध आहे. त्यातले मंत्र कोणत्यातरी वृत्तात रचलेले असतात आणि त्यांना पाद असतात. विशिष्ट वैदिक अनुष्ठाने विशिष्ट छंदातल्या मंत्रांनीच करायची असतात. उदा० अग्नीचे आधान ब्राह्मणांनी गायत्री छंदाने, राजन्यांनी त्रिष्टुभ छंदाने व वैश्याने जगती छंदाने करावे, असे तैत्तिरीय ब्राह्मणात आदेशिले आहे. ऋग्वेदातले पुढील सात छंद प्रमुख आहेत – गायत्री, उष्णिक, अनुष्टुभ, बृहती, पंक्ती, त्रिष्टुभ व जगती.

'सप्तच्छंदासि चतुरुत्तराणि विराडष्टमानि' हे छंद : शास्त्राचे प्राचीन आणि महत्त्वाचे सूत्ररूपी विधान होय. वर दिलेले सात छंद अक्षरसंख्येवर अवलंबून असून, प्रत्येक छंद आपल्या मागील छंदापेक्षा चार अक्षरांनी जास्त मोठा असतो, असा हा नियम आहे. आठवा छंद विराट. यातील अक्षरसंख्या

ठरलेली नाही. त्यात कधी एका चरणात दहा अक्षरे असतात, तर कधी कधी त्यांची संख्या ३०, ३३, ४० अक्षरांपर्यंत जाते. ऋग्वेदात सर्वांत अधिक उपयोजिला जाणारा छंद त्रिष्टुभ हा आहे. पद्यबद्ध रचनेला वाणी किंवा सूक्त असे म्हटले आहे. त्याचप्रमाणे गीतीला साम व स्तोत्राला स्तोम असे नाव दिलेले आहे.

ऋग्वेदाच्या १०,४१४ मंत्रांच्या छंदांची विभागणी पुढील-प्रमाणे आहे –

| | |
|---|---|
| (१) गायत्री | २,४६७ |
| (२) उष्णिक | ३४१ |
| (३) अनुष्टुभ | ८५५ |
| (४) बृहती | १८१ |
| (५) त्रिष्टुभ | ४,२५३ |
| (६) पंक्ती | ३१२ |
| (७) जगती | १,३४८ |
| (८) अतिजगती | १७ |
| (९) शक्वरी | १९ |
| (१०) अतिशक्वरी | ९ |
| (११) अष्टी | ६ |
| (१२) अत्यष्टी | ८४ |
| (१३) धृती | २ |
| (१४) अतिधृती | १ |
| (१५) एकपादछंद | ६ |
| (१६) द्विपादछंद | १७ |
| (१७) प्रगाथबार्हत | १९४ |
| (१८) ककुभ | ५५ |
| (१९) महाबार्हत | २५७ |

**ऋग्वेदरचना** – आरण्यके आणि उपनिषदे निर्माण होण्याच्या पूर्वी ऋग्वेदसंहिता अस्तित्वात आली होती. वेदनिर्मितीच्या काळी वेदांचे संग्रहाच्या रूपाने संहितीकरण झालेले नव्हते. ऋग्वेदाला आणि इतर वेदांना संहितेचे स्वरूप ब्राह्मणकालात प्राप्त झाले. साधारणपणे हा काल इ. सनपूर्व सहाव्या शतकाच्या पूर्वीचा आहे, हे निश्चितपणे सांगता येते. ऋग्वेदमंत्रांच्या रचनेचा काल इ. सनपूर्व १२०० वर्षांच्या अलिकडे येतो, असे कोणीच संशोधक मानीत नाहीत. ऋग्वेदाचा सर्वांत प्राचीन काळ कोणता, यासंबंधी मात्र भारतीय व युरोपीय संशोधकांत मतभिन्नता आढळते. भारतीय संशोधकांचा कल सामान्यपणे ऋग्वेदाचा प्रारंभ जास्तीत जास्त मागे नेण्याकडे असतो. प्रो. याकोबी याने वेदांतल्या ज्योतिषविषयक उल्लेखांवरून मंत्ररचनेचा काल इ. सनपूर्व ४००० हा ठरविला आहे. लो. टिळकांनी ज्योतिषाधिष्ठित संशोधनपद्धतीचा अवलंब करून ऋग्वेदाचा काळ इ. सनपूर्व सहा ते चार हजार वर्षे हा ठरविला आहे.

एता (कृत्तिकाः) ह वै प्राच्यै दिशो न च्यवन्ते ।

(श. ब्रा. २.१.२.३)

अर्थ – उदयकाली कृत्तिकानक्षत्र पूर्वदिशेपासून ढळत नाही.

या उल्लेखावरून श्री. शं. बा. दीक्षित यांनी ऋग्वेदाचा काल इ. सनपूर्व अडीच हजार वर्षे हा ठरविला आहे. संपातबिंदू कृत्तिका नक्षत्रात असण्याचा तो काळ होता. पण या संबंधात श्री. दप्तरी अधिक खुलासा करतात, तो असा – वेदकालीन ज्योतिष हे दूरदर्शक यंत्रावाचून साध्या डोळ्यांच्या साहाय्याने निश्चित केले जात असे. साध्या डोळ्यांना कृत्तिका नक्षत्राचा थेट पूर्वेला होणारा उदय इ. सनपूर्व तेराशे वर्षांच्या सुमारासच दिसू शकेल, अतएव श. ब्रा. मधील उल्लेख त्याच्या मागे जाऊ शकत नाही. लो. टिळकांचे मत मुख्यतः ऋग्वेदातील उषासूक्तांत वर्णिलेल्या आकाशस्थितीवरून बनले आहे; पण ऋग्वेदाचा बराचसा भाग आर्य लोक पंजाबात आल्यानंतर सिद्ध झाला, असे त्यांचेही मत आहे. ऋग्वेदाचा प्रारंभ उत्तरध्रुवाच्या प्रदेशात झाला असावा आणि पंजाबात त्यांची वसती झाल्यानंतर ऋग्वेदाची मुख्य रचना झाली असावी, असे लो. टिळकांनी अनुमान केले आहे. डॉ. अविनाशचंद्र दास यांनी ऋग्वेदाचा काल इ. सनपूर्व पंचवीस हजार वर्षांच्या मागे नेला आहे; पण अलिकडचे वेदाभ्यासी पाश्चात्य व काही भारतीय पंडित ऋग्वेदाचा काल टिळकांनी निर्धारित केलेल्या कालाच्या अलिकडेच ठरवितात.

वैदिक काल अधिकाधिक मागे नेण्याची प्रवृत्ती ही इतिहासाची साखळी जुळविण्यास बाधक आहे. इतिहासातले स्पष्ट व निश्चित कालखंड आधाराला घेऊन बाकीची ऐतिहासिक अनुमाने करणे युक्त असते. ब्राह्मणग्रंथांची भाषा इ. सनपूर्व तिसऱ्या शतकातील अशोकाच्या लेखांशी व त्रिपिटकांतल्या भाषेशी जुळणारी आहे. म्हणजे ब्राह्मणग्रंथांचा काल बुद्धपूर्व चारशे ते पाचशे वर्षांच्या मागे नेता येत नाही. ब्राह्मणकाल आणि मंत्रकाल यांच्यात भाषा, धर्मकल्पना आणि संस्कृती यांच्या विकासाची गती कमीत कमी मानली, तरी त्यात हजारो वर्षे-वर्षांचे अंतर कल्पिता येत नाही. कोणतीही भाषा हजारो वर्षेपर्यंत न बदलता आहे तशीच राहू शकत नाही. ब्राह्मणग्रंथांतील भाषेचा आणि ऋग्वेदातील भाषेचा संबंध निकटचा आहे. त्यावरून ऋग्वेदाची रचना इ. स. पू. १५०० ते १००० या कालखंडात झाली असावी.

वैदिक आर्यांची स्थलांतरे आणि ऋग्वेदाचा भौगोलिक प्रदेश

यांविषयी अजून महत्त्वाचे मतभेद शिल्लक आहेत. पण तरीही पंजाब हा ऋग्वेद व यजुर्वेद यांच्या रचनेचा भौगोलिक प्रदेश होय, असे निश्चित करता येते. कुरु-पांचाल वंशाचा प्रदेश आणि यजुर्वेदातील यज्ञसंस्थेचा प्रदेश एकच आहे. तो म्हणजे दिल्ली-जवळचा पश्चिम उत्तरप्रदेशाचा भाग होय. ऋग्वेदाचा प्रदेश काबूल-कंदाहारपासून दिल्लीपर्यंतचा असावा, असे ऋग्वेदातील नद्यांच्या उल्लेखांवरून साधारणपणे ठरविता येते. काही पंडित ऋग्वेदाचा संबंध अफगाणिस्तानाशी जोडतात, तर काही विद्वान इराण, असीरिया आणि कॉकेशस पर्वत यांना सलगपणे अंतर्भूत करणारा प्रदेश ऋग्वेदरचना करणाऱ्या आर्यांची जन्मभूमी मानतात. त्यांनी असे अनुमान करण्याचे कारण, ऋग्वेदातील पुष्कळ नद्यांची नावे आज माहीत असलेल्या भारतीय नद्यांशी जुळविता येत नाहीत, हे होय. त्यांना ऋग्वेदात उल्लेखिलेल्या जनांची (मानवगणांची) व ऋषींची नावे आणि सांप्रत प. आशियातील व भूमध्यसमुद्राजवळील प्रदेशांची नावे यांचे सादृश्य दिसले आणि त्यांनी तो प्रदेश वैदिक आर्यांच्या ऋग्वेद-रचनेचा प्रदेश ठरविला. मात्र बहुतेक सूक्ते अफगाणिस्तान ते पंजाब या सिंधू नदीच्या दोन्ही तीरांवरील प्रदेशांत रचली गेली, असे अंतर्गत प्रमाणावरून दिसते.

**समाज व संस्कृती –** ऋग्वेदातील अनेक ठिकाणच्या अनेक उल्लेखांवरून वैदिक आर्यांच्या संस्कृतीची कल्पना करता येते. संस्कृतीच्या विकासासाठी आवश्यक असणारे आर्थिक स्थैर्य आर्यांनी प्राप्त करून घेतले होते. ते शेती करीत व गुरेही पाळीत. कृषी, पशुपालन, धातुकाम आणि पक्क्या मालाचे उत्पादन करणारे उद्योग या गोष्टी ऋग्वेदकाळातल्या आर्थिक जीवनाच्या पायाभूत होत्या. कित्येक पशूंचा उपयोग ते शेतीची व वाहतुकीची कामे आणि विनिमयाचे साधन म्हणूनही करीत. ते भूमीपेक्षा पशूंचे सांपत्तिक महत्त्व अधिक मानीत. वैदिक आर्यांना पशूंच्या अपार समृद्धीची हाव होती. पशुसमृद्धीच्या वर्णनाची कित्येक सूक्ते ऋग्वेदात आहेत. सिंध, पंजाब व गंगा-यमुनांचा प्रदेश भरपूर वृष्टीचा व कोसन्‌कोस पसरलेल्या समृद्ध कुरणांचा असल्यामुळे पशुपालनाला अत्यंत योग्य होता.

मना हे सुवर्णनाणे वैदिक काळात विनिमयाचे आणखी एक साधन होते. पहिल्या बाबिलोनियन साम्राज्याशी दक्षिण व पश्चिम हिंदुस्थानाच्या किनाऱ्यावरून व्यापार चालत असे, ही गोष्ट खाल्डियन संस्कृतीच्या अभ्यासकांनी शोधून काढली आहे. भूमध्य समुद्रावरून व्यापार करणाऱ्या फिनिशियन वाण्यांचा निर्देश ऋग्वेदात पणी या संज्ञेने केलेला आहे. स्थलपथावरच्या व जलपथावरच्या व्यापारी वाहतुकीची महत्त्वाची साधने ऋग्वेदात उल्लेखिलेली आहेत. शंभर वल्ह्यांनी समुद्रात चाल-विण्याच्या नौकेचे वर्णन ऋग्वेदात येते (१.११६.५). दुचाकी बैलगाड्या आणि घोड्यांनी चालवायचे लहान मोठे रथ वेद-काळी वापरले जात (२.३९; ३.५३; ८.९१; १०.६०). वेद-पूर्वकाली भारतात राहणाऱ्या अवैदिक लोकांवर वैदिक आर्यांनी प्रभुत्व मिळविले, याचे एक कारण त्यांच्याजवळ भक्कम अश्वरथ होते, हे होय.

वेदकाळात सुतारकामाला फार महत्त्व होते. त्वष्टा ही देवता सुतारकामावरून सुचली असावी. ऋग्वेदात शंभर दरवाजे असलेल्या पुराचा उल्लेख आहे.

वैदिक आर्यांच्या स्त्रिया लोकरीचे सुंदर विणकाम करीत. वैदिक स्त्री-पुरुषांना भपकेदार वस्त्रांची आवड होती (५.२९.१५; १.३४.४; १०.१०६.१).

संस्कृतीच्या आर्थिक इतिहासात धातूच्या शोधाला व उप-योगाला क्रांतिकारक महत्त्व असते. वैदिक काळी त्या लोकांना लोखंडाची हत्यारे बनविण्याची कला प्राप्त झाली होती. कुऱ्हाड, तलवार, सुरी, वस्तरा, इ. वस्तू ऋग्वेदकाळात लोखं-डाच्या बनविल्या जात. उत्पादनाची साधने आणि शस्त्रास्त्रे तयार करण्यासाठी वैदिकांना लोखंडाचा उपयोग करता आला व त्यामुळे ते सिंधुसंस्कृतीवर विजय मिळवू शकले. सिंधु-संस्कृतीला इतर धातू सापडले असले, तरी तिला लोखंड मिळाले नव्हते. वैदिकांनी भारतातील सर्व जुन्या राष्ट्रांवर आपले अधिराज्य स्थापले, त्या कामी लोखंड व अश्वरथ ही दोन साधने त्यांना अत्यंत उपयोगी ठरली.

वैदिक आर्यांना भारतात सोन्याचा मुबलक साठा मिळाला होता. त्याचा त्यांच्या आर्थिक जीवनावर फार मोठा प्रभाव पडला यात शंका नाही. वैदिक आर्य सोमयागात सोन्याच्या पात्रामध्ये सोम पिळीत असत (ऋ. ९.७५.३). अश्वमेधात सोन्यारुप्याची पात्रे वापरीत असत. स्त्री-पुरुषांचे अलंकार सोन्याचे असत व घोड्यांनाही सुवर्णालंकारांनी मढवीत असत (ऋ. ५.५३.४; ४.२.८). वेदांत सोन्याला पुष्कळच महत्त्व दिले आहे, ते वैदिकांच्या सुवर्णयुगाचे सूचकच आहे.

खासगी संपत्ती हा ऋग्वेदकालीन समाजसंस्थेचा पाया होता. ऋग्वेदकालीन समाजसंस्था प्राथमिक रानटी अवस्थेतून बाहेर पडली होती, हे वेदांतील दाय, दान व ऋण या कल्पनांवरून निश्चित होते. पितृपरंपरेचा वारसाहक्क ऋग्वेदकाळी रूढ झाला होता. 'आम्ही पितृधनाचे मालक व्हावे' अशी आकांक्षा ऋग्वेदात व्यक्त झाली आहे (१.७३.१). ज्येष्ठ पुत्राला पैतृक धनाच्या वाटणीत अधिक भाग मिळत असे. ऋणसंस्था ही ऋग्वेदकालातच अस्तित्वात आली होती. इहलोकी ऋणमुक्त होऊन स्वर्गाला जाण्याची कल्पना लोकांच्या मनात दृढ झाली

होती. ऋणसंस्था ही संपत्तीच्या संचयाची द्योतक आहे, तशीच वैदिक दानसंस्थाही खाजगी संपत्तीच्या मोठ्या संचयाची द्योतक ठरते. यज्ञातील दक्षिणांची परिमाणे असे सूचित करतात, की शरीरश्रमाने न जगणारा असा दात्यांचा व दान घेणाऱ्यांचा मोठा वर्ग वैदिक समाजात निर्माण झाला होता.

केवळ भौतिक साधनांनी संस्कृतीची साधना होत नसते. भौतिक साधने व आर्थिक व्यवस्था यांना मानसिक साधनांचीही जोड लागते. भाषा व गणित ही मानवी व्यवहाराची मानसिक साधने होत. वैदिक लोकांनी गणन व लेखन या बाबतीत चांगली प्रगती केली होती, याची प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष प्रमाणे वेदांत सापडतात. ऋग्वेदात वर्णाला अक्षर म्हटले आहे. वैदिक कवी छंदोरचना करताना अक्षरे मोजीत. मोजण्याची कला किंवा गणित या विषयांत वैदिकांनी इतर प्राचीन राष्ट्रांपेक्षा पुढे पाऊल टाकले होते. दशांक पद्धती वैदिकांनीच शोधून काढली. शून्याची कल्पनाही त्यांचीच आहे. या शून्यकल्पनेने गणितशास्त्रात क्रांती केली. इतकी प्रभावी शुद्ध कल्पना दुसरी कोणतीही नाही, असे गणितवेत्ते म्हणतात.

'मनुष्य' ही अत्यंत उदात्त अर्थाची कल्पना वैदिक आर्यांना स्फुरली. ही कल्पना निर्माण झाल्यावर पुरुषसूक्तात ईश्वरालाच पुरुष म्हणजे मनुष्य या संज्ञेने निर्दिष्ट केले गेले. विश्वशक्तीची 'सुकृती' म्हणजे मनुष्य होय. मनुष्य हा सकल सृष्टीत श्रेष्ठ आहे व भक्ती आणि आदर व्यक्त करण्यास मनुष्य हे ईश्वररूप सर्वांत अधिक उपयुक्त आहे, अशी नैतिक कल्पना वैदिक आर्यांच्या मनात निर्माण झाली. ऋत हे विश्वव्यापी तत्त्व वैदिक ऋषींना नीतिकल्पनेवरूनच सुचले. ऋत आणि अनृत या द्वंद्वाने नीती व अनीती हे द्वंद्व त्यांनी दिग्दर्शित केले. 'एकं सत्' म्हणून निर्दिष्ट केलेले तत्त्व वैदिक आर्यांनी प्रतिपादिले व सर्व काही ईश्वरमय असून, एकाच सतातून प्रकट झाले आहे, असे सांगितले. अशा प्रकारे ऋत व एकं सत् हे दोन मूलभूत विचार वैदिक ऋषींना प्राप्त झाले. या विश्वमननात्मक प्रतिभेच्या पाठीमागे वैदिक मनाला अमरत्वाची उत्कंठा होती. सर्व देवतांशी एकात्मभाव प्राप्त करून घेणे, हाच अमरत्वाचा उपाय वैदिक ऋषींना दिसला. इहलोक न परलोक यांचा सांधा ऋग्वेदातील ऋषींनी पूर्णपणे सांधला होता. हे जग त्यांना स्वर्गाइतकेच सुंदर दिसत होते. मृत्युभयाने या जगाबद्दलची विरक्ती त्यांच्या मनात डोकावली नाही.

ऋग्वेदातील धर्म – देव व मानव यांचे या जगातील संगमस्थान या रूपाने वैदिकांनी यज्ञसंस्था निर्माण केली. तीच पुढे वैदिक संस्कृतीच्या विस्ताराचे केंद्र बनली. सामाजिक जीवनाची प्रक्रिया व सामाजिक संस्थांची संघटना यांचा गाभा म्हणजे यज्ञ होय. परमेश्वर हा यज्ञरूप आहे, अशी वैदिक ऋषींची धारणा होती. यज्ञ हाच त्यांचा धर्म होता.



ऋग्वेदात सोमयागाला मध्यवर्ती स्थान आहे. सोम हे वृष्टीचे व अग्नी हे प्रकाशाचे प्रतीक होय. ऊन आणि पाऊस यांच्या योगानेच सर्व सजीव सृष्टी चालत असते. अन्नाची उत्पत्तीही त्यांतूनच होते. यज्ञाविषयी वैदिक ऋषींची अशी भावना असल्यामुळे त्यांनी जीवनातली प्रत्येक महत्त्वाची क्रिया यज्ञात गोवून टाकली. या यज्ञसंस्थेतून पुढे भारतीयांची समाजव्यवस्था, राजशासन, विधिनियम, पुराणे, कला इ. गोष्टींचा विकास झाला. उपनिषदांतले तत्त्वज्ञानदेखील याज्ञिकांच्या मननातूनच निर्माण झाले. वेद आणि यज्ञ यांच्याशी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष ऐतिहासिक संबंध जोडता येत नाही, अशी भारतीय संस्कृतीची कोणतीही शाखा नाही.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी ऋग्वेदाविषयी जे विचार व्यक्त केले आहेत, ते असे –

ऋग्वेद हा ग्रंथ आर्यांच्या सामाजिक व धार्मिक जीवनाच्या इतिहासाचे अत्यंत प्राचीन असे मुख्य साधन असल्यामुळे त्याला जगात मोठी प्रतिष्ठा लाभली आहे. त्यातील काव्य हे मुख्यतः धार्मिक भावकाव्य आहे. दहावे मंडल मात्र त्याला अपवाद आहे. त्यात व्यावहारिक व लौकिक जीवनावरची अनेक सूक्ते आहेत. धार्मिक सूक्ते ही प्रार्थना-सूक्ते आहेत. देवतांची शौर्यपूर्ण कृत्ये व त्यांचे औदार्य यांची भव्य व उदात्त वर्णने केली आहेत. ऋषींनी संपत्तीची, प्रजेची, दीर्घ जीवनाची विजयाची व वैभवाची प्रार्थना केली आहे. सोमयाग व अन्य साधे यज्ञ यांच्याशी संबद्ध अशा अनेक प्रार्थना यात आहेत.

ज्या देवतांचे स्तवन ऋग्वेदात केलेले आहे, त्या देवता म्हणजे निसर्गाचीच व्यक्तिरूप पावलेली दिव्य रूपे आहेत. त्यात कवींनी आश्चर्यमय सुंदर व भव्य कल्पनाचित्रे उभी केली आहेत. यावरून ऋग्वेदकालीन सामाजिक जीवन व साहित्य प्राथमिक अवस्थेतून बाहेर पडून सुसंस्कृत अवस्थेला पोचले होते, असे दिसते. काही जागी कंटाळवाणी पुनरावृत्ती दिसली तरी साहित्यिक गुणांची उत्कटता कमी झालेली नाही. सूक्तरचना ही देवांची देणगी आहे असे काही कवींनी म्हटले आहे. पण वेद हे अपौरुषेय आहेत असे मात्र कोठेही सूचित केलेले दिसत नाही.

एकदेवतावाद व विश्वदेवतावाद ऋग्वेदात स्पष्टपणे मांडलेला आहे. वेदान्त तत्त्वज्ञानाचा पाया ऋग्वेदातच घातला गेला होता.

ऋग्वेदातील देवांमध्ये सर्व श्रेष्ठ नैतिक नियमांचा पालनकर्ता देव म्हणजे वरुण होय. वरुणसूक्ते ही काव्यगुण व विश्व-

चिंतन या उभय दृष्टींनी अत्यंत मोलाची आहेत. (७.८६–८९). वरुण हा विश्वसम्राट म्हणून वर्णिलेला आहे. सूर्य, उषा, पर्जन्य, व अग्नी यांच्या सूक्तांत निसर्गाचे उत्कृष्ट काव्य आहे. इंद्र हा ऋग्वेदी आर्यांचा सर्वश्रेष्ठ देव होय. ही आदर्श युद्धदेवता आहे. त्या काळी आर्य युद्धांत गुंतले होते. तो युद्धकाळ संपून वैदिक समाज स्थिर व शांत झाला, त्या काळातले ऋग्वेदाचे दहावे मंडल आहे. त्यात देवताकल्पनेला तात्त्विक स्वरूप प्राप्त झाले. धाता, विश्वकर्मा, प्रजापती हे तत्त्विक स्वरूपाचे देव होत.

ऋग्वेदकालीन समाजरचना जातिभेदात्मक नव्हती, असे जातींच्या अनुल्लेखावरून मानता येते. ब्रह्म-क्षत्र व विश् असे व्यवसायभेदाने निश्चित होणारे तीन वर्ग त्या काळी होते. पौरोहित्य करणारा आणि युद्ध व राज्य करणारा असे दोन वर्ग प्रमुख होते. बाकीचे विविध व्यवसाय करणारे लोक म्हणजे विश् किंवा सामान्य प्रजा, हा तिसरा वर्ग होय. ऋग्वेदाच्या अखेरच्या कालखंडातील पुरुषसूक्तात सामाजिक वर्गभेद व उच्चनीच भाव स्पष्ट दिसू लागतो. सामाजिक जीवन आशावादी व ऐहिक वैभवाची आकांक्षा बाळगून स्थिरावत होते. ऐहिक जीवनाबद्दल उद्वेग व निवृत्तिमार्गाबद्दल पूज्य भाव समाजात नव्हता.

**ऋग्वेदाचे ध्यान** – चतुर्वर्गचिंतामणी या ग्रंथात ऋग्वेदाची मूर्ती कल्पून तिचे ध्यान पुढीलप्रमाणे केले आहे –

**ऋग्वेदः श्वेतवर्णः स्याद् द्विभुजो रासभाननः ।**
**अक्षमालाभयः सौम्यः प्रीतश्चाध्ययोद्यतः ।।**

अर्थ – ऋग्वेद हा श्वेतवर्णाचा, द्विभुज, गाढवाचे तोंड असलेला, एका हाती अक्षमाला व दुसरा हात अभयमुद्रेत असलेला, सौम्य, प्रसन्न व अध्ययनाला उद्युक्त आहे. [ ऋ. द.; ऋ. आ.; वै. सा. सं.; वै. वा. इ.; वै. सं. वि.; म. ज्ञा. को. ]

## ऋजिश्वा

एक सूक्तद्रष्टा. हा भारद्वाज गोत्रातला आहे. ऋग्वेदाच्या सहाव्या मंडलातील ४९ ते ५२ ही सूक्ते याच्या नावावर आहेत. ही सूक्ते ओज व कांती या गुणांनी युक्त आहेत. याने रात्र आणि उषा यांना आरक्तवर्ण विभूतीच्या दोन कन्या म्हटले आहे. एक नक्षत्रहाराने मंडित, तर दुसरी सूर्यतेजाने चित्ताकर्षक आहे. (६.४९.३). याने सरस्वतीला अद्भुतचरित्र, अतिपवित्र व मंगलधाम म्हटले आहे (६.४९.७). एका ठिकाणी (ऋ. ६.५१.८) नमस्काराचे माहात्म्य सांगताना तो म्हणतो –

**नम इदुग्रं नम आ विवासे**
**नमो दाधार पृथिवीमुत द्याम् ।**
**नमो देवेभ्यो नम ईश एषां**
**कृतं चिदेनो नमसा विवासे ।।**

अर्थ – नमस्कार करणे हेच उग्र तप. म्हणून मी ह्या तपाचेच आचरण करतो. नमस्कारानेच द्यावा-पृथिवींना आधार मिळाला आहे. म्हणून सर्व दिव्य विबुधांना नमस्कार! नमनरूप तपानेच या सर्वांवर सत्ता चालते. जे काही पातक घडले असेल, ते नमस्कारानेच घालविता येते.

ऋजिश्वा हा एक पराक्रमी राजा असून, इंद्राचा मित्र होता. वृङगद नावाच्या दस्यूशी युद्ध करून याने त्याचे पारिपत्य केले. याचा सर्वांत महत्त्वाचा पराक्रम पिप्रुनामक दस्यूशी झालेल्या युद्धात दिसला. पिप्रू हा महापराक्रमी व क्रूर होता. त्याच्यावर आक्रमण करून याने त्याला मारले व त्याचा गौळवाडा फोडून लुटला. [ ऋ. द. ]

## ऋण

याची व्याख्या अशी – 'पश्चाच्छोध्यत्वेनाङ्गीकृत्य गृहीतं द्रव्यम्' = परत करण्याच्या बोलीवर घेतलेले द्रव्य ते ऋण होय (शब्दशक्तिप्रकाशिका). ऋग्वेदात ऋणाचा उल्लेख अनेकदा येतो. त्यावरून त्या काळीही ऋण देण्याघेण्याची प्रथा असावी, असे दिसते (ऋ. २.७४.४; १०.३४.१०; ८.४७.१७). द्यूत खेळण्यासाठी एखाद्याने जर कर्ज घेतले व ते त्याला फेडता आले नाही, तर त्याला धनकोचा दास व्हावे लागे (ऋ. १०.३४). ऋण न फेडणाऱ्या माणसाला चोराप्रमाणे खांबाला बांधून ठेवल्याचेही उल्लेख आढळतात. कर्जावर व्याज घेण्याची प्रथा होती; पण त्याचा दर काय असे, ते मात्र समजत नाही (ऋ. ८.४७.७; अथर्व. ६.४६.३). ऋणकोचा किंवा धनकोचा मृत्यू झाला, तरी त्याचे वारस कर्ज फेडीत. ऋणमुक्त होणे, हे नैतिक कर्तव्य होय, असे प्राचीन काळापासून मानले गेले आहे. 'पर ऋणा सावीरध मत्कृतानि' = मी केलेली एकंदर ऋणे व पातके तू नाहीशी कर, असे गृत्समद ऋषी कळवळून म्हणतो (ऋ. २.२८.९).

लौकिक किंवा व्यावहारिक ऋणातून पुढे नैतिक ऋणत्रयाची कल्पना उगम पावली.

धार्मिक ऋणे फेडण्यासाठी जशी पुत्राची आवश्यकता आहे, तशीच व्यावहारिक ऋणाच्या फेडीसाठीही ती आहे, असे नारदस्मृतीत सांगितले आहे (४.५–९). ऋण परत केले नाही, तर ऋणकोला धनकोच्या घरी दास, स्त्री किंवा पशू यांचा जन्म घ्यावा लागतो, असे कात्यायनाने म्हटले आहे (५५१,५९१). यावरून ज्याला आपले पितर अधोगतीला जाऊ नयेत असे वाटते, त्याने पितृऋण फेडायलाच हवे, अशी धारणा समाजात दृढ झाली. मात्र जुगार व मद्यपान यांसाठी बापाने कर्ज काढले असल्यास ते फेडण्याची जबाबदारी पुत्रावर नाही, असे मनू सांगतो (८.१५९).

कर्ज देऊन त्यावर व्याज घेणे, याला तै. सं. व अथर्ववेद यांत कुसीद म्हटले आहे. 'कुसीदं वृद्धिजीविका' =व्याजावर उपजीविका करणे, म्हणजे कुसीद होय (अमर). मनूने रकमेवरील व्याजाचे चक्रवृद्धी, कालवृद्धी, कारिता व कायिका असे चार भेद सांगितले आहेत (८.१५३). बृहस्पतीने त्यांचे स्वरूप पुढील श्लोकात स्पष्ट केले आहे –

कायिका कायसंयुक्ता मासग्राह्या च कालिका ।
वृद्धेर्वृद्धिश्चक्रवृद्धिः कारिता ऋणिना कृता ।।
(मनु. ८.१५३ वरील टीका)

याचा विस्तृत अर्थ असा – (१) शरीरश्रम (दासाचे किंवा बैलाचे) रूपी व्याज देणे किंवा गाईचे दूध देणे, ही कायिका वृद्धी होय (स्मृतिचंद्रिका २.१५४), (२) दरमहा व्याज घेणे, (३) व्याजावर व्याज अर्थात चक्रवाढ पद्धतीने व्याज घेणे व (४) ऋणकोने स्वतः सुचविलेले व्याज घेणे.

याव्यतिरिक्त बृहस्पतीने शिखावृद्धी व भोगलाभ असे आणखी दोन प्रकार सांगितले आहेत. शिखावृद्धी म्हणजे केसांप्रमाणे रोज थोडे थोडे वाढणारे व्याज व भोगलाभ म्हणजे ऋणकोच्या घराचा किंवा शेताचा उपभोग घेणे होय.

व्याजाच्या दराबद्दल कौटिल्य सांगतो, की शंभर पण कर्जावर एका महिन्याचे सव्वा पण व्याज घ्यावे. स्मृती व सूत्रे यांच्या काळात परिस्थितीला अनुसरून व्याजाचे कमी अधिक दर मान्य होते. मात्र मुद्दल व व्याज मिळून दामदुपटीपेक्षा अधिक रक्कम घेऊ नये, असे बहुतेक सर्व धर्मशास्त्रकारांचे मत आहे. भारी दराने व्याज आकारणे हे महापाप होय, असे बौधायन व वसिष्ठ यांनी म्हटले आहे (बौ. ध. सू. १.५.९३; व. ध. सू. २.४०–४२). कर्ज देण्यापूर्वी धनकोने पुरेसे तारण घ्यावे किंवा विश्वासार्ह जामीन (बन्ध) घ्यावा आणि लेखी करार करावा किंवा साक्षीदार ठेवून व्यवहार करावा, असे बृहस्पतीने सांगितले आहे. पाहा – ऋणत्रय. [ हि. ध.; वे. इं. ]

**ऋणत्रय** तीन ऋणांचा समुदाय. ऋणत्रय ही भारतीय समाजशास्त्रातली मूलभूत कल्पना आहे. ही कल्पना प्रथम तै. संहितेत (६. ३. १०. ५) आली आहे –

जायमानो वै ब्राह्मणस्त्रिभिऋणवाँ जायते । ब्रह्मचर्येण ऋषिभ्यो यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्यः । एष वा अनृणो यः पुत्री यज्वा ब्रह्मचारिवासी ।

अर्थ – जन्माला येणारा ब्राह्मण तीन ऋणांसह जन्मतो. ऋषींचे ऋण ब्रह्मचर्याने, देवांचे ऋण यज्ञाने व पितरांचे ऋण प्रजोत्पादनाने फेडता येते. पुत्रवान्, यजनशील व ब्रह्मचर्य पूर्ण करणारा मनुष्यच अनृणी होतो.

शतपथ ब्राह्मणात या कल्पनेत महत्त्वाच्या सुधारणा केल्या आहेत. त्यात ब्राह्मण शब्द वगळून मानवमात्राला तो सिद्धान्त लागू केला आहे. त्याशिवाय त्याने तीन ऋणांबरोबर मनुष्य-ऋण नावाचे चौथे एक ऋण मानले असून, माणसांना अन्न व वस्त्र दिल्याने ते ऋण फिटते, असे सांगितले आहे. जो ही चारही ऋणे फेडतो म्हणजेच जो ही सर्व कर्तव्ये करतो, तो कृतकृत्य होतो, असे म्हटले आहे (श. ब्रा. १. ७. २. १–६).

धर्मकल्पनेप्रमाणेच ऋणकल्पना हीसुद्धा नीतिशास्त्रात अत्यंत महत्त्वाची ठरली आहे. नैतिक जबाबदारीच्या कल्पनेचा मुळापासून कसा विकास होत गेला, त्याची सूचक अशी ही ऋणकल्पना आहे. ही ऋणकल्पना आश्रमव्यवस्थेशी जोडून दिली आहे. किंबहुना आश्रमधर्म हा ऋणकल्पनेवरच उभारलेला आहे. मानवसमाज देवघेवींवर अधिष्ठित असतो. आपणांजवळ असलेले संचित धन दुसऱ्या गरजू मनुष्याला दिल्याशिवाय सामाजिक व्यवहार चालत नाहीत. अर्थात जे दुसऱ्याकडून घेतले, त्याची परतफेड करण्याची जबाबदारीही ऋणकोवर असते. जे दुसऱ्यापासून परत करण्यासाठी घेतले, त्यालाच ऋण म्हणतात. प्रथम ही कल्पना केवळ धनापुरतीच मर्यादित होती; पण पुढे माणसाच्या तीन किंवा चार प्रकारच्या नैतिक जबाबदाऱ्यांनाही ती लागू करण्यात आली. हे कार्य वेदकाळातच घडले. या कल्पना पुढीलप्रमाणे–

(१) विश्वव्यवहार चालविणारा परमेश्वर माणसाला जीवनसाधने देत असतो. या उपकारांची जाणीव देवऋण या संज्ञेने वेदांनी दिली आहे. हे ऋण मनुष्याने यजन, पूजन, इ. धार्मिक व दैविक कृत्यांच्या द्वारे फेडायचे असते.

(२) विद्या व कला यांचा पिढ्यान् पिढ्या संचय होऊन मनुष्याची संस्कृती वाढत असते. ऋषी हे वेद-कलांचे अर्थात विद्या-कलांचे प्रणेते होत. ते त्यांचे ऋण वेदांचे अर्थात विद्या-कलांचे अध्ययन करून आणि त्यासाठी ब्रह्मचर्य पाळून फेडायचे असते.

(३) मानववंशाची अविच्छिन्न परंपरा अनंत आपत्तीतून निभावून आजतागायत चालत आली आहे. अनादिकालापासून वेळोवेळी अनेक आपत्तींशी झुंजून मानवाच्या पूर्वजांनी आत्मरक्षण व प्रजारक्षण केले आहे, म्हणूनच त्यांना पितर म्हणतात. इथे माता, पिता किंवा सर्वच पूर्वज पितृ शब्दाने सूचित होतात. आपले जीवन म्हणजे त्यांच्यापासून प्राप्त झालेले ऋण आहे. ह्या ऋणातून मुक्त होण्याचा मार्ग म्हणजे गृहस्थाश्रम स्वीकारून प्रजोत्पादन करणे हा होय. प्रजासातत्य हाच पितरांच्या प्रयत्नाचा मुख्य उद्देश असतो. तो पार पाडल्यानेच पितृऋणातून मुक्ती मिळते.

(४) शतपथब्राह्मणात चौथे मनुष्यऋण सांगितले आहे. एकमेकांच्या सहकार्याने मानवी प्रपंच चालत असतो. सभोवतीचा मानवसमाज आपल्याला अनेक प्रकारे अनेक गोष्टी देत असतो, हेच मनुष्यऋण होय. दान व सहकार्य यांच्या योगाने या ऋणातून मुक्त होता येते. [ वै. सं. वि.; हि. ध. ]

**ऋणप्रमोचन** प्रयागातले एक तीर्थ. या तीर्थावर एक रात्र वस्ती व स्नान केल्याने मनुष्य ऋणमुक्त होऊन स्वर्गाला जातो, असे सांगितले आहे. [ कृ. क. त. ]

**ऋणमोचनक** वाराणसीमधले एक क्षेत्र. या ठिकाणी शिवाची तीन लिंगे असून त्यांच्या दर्शनाने त्रिविध ऋण नष्ट होते, असे सांगितले आहे. [ कृ. क. त. ]

**ऋणमोक्षमुहूर्त** ऋणमोक्ष म्हणजे ऋणाची फेड करताना पुढीलप्रमाणे मुहूर्त पाहावा, असे सांगितले आहे – गुरु, शनी हे वार, त्या ग्रहांची लग्ने व लग्नांचे अंश, रिक्ता तिथी, कुलिक मुहूर्त, अनुराधा नक्षत्राचा द्वितीय चरण व मैत्र मुहूर्त. अशा योगांवर ऋण परत केल्याने पुनश्च ऋण करण्याचा प्रसंग येत नाही, अशी समजूत आहे. [ नि. सिं. ]

**ऋणापनोद धेनुदान** मानवाला देव, ऋषी व पितर यांचे ऋण जन्मतःच असते. त्याची फेड होण्यासाठी वेगवेगळी कर्तव्ये धर्मशास्त्रात सांगितलेली आहेत. ती कर्तव्ये योग्य प्रकारे पार न पडल्यास त्या ऋणांतून मुक्त होण्यासाठी धेनुदान सांगितले आहे. त्यासाठी तांबडी सवत्स धेनू आणून तिला वस्त्रालंकारांनी भूषवितात. तिच्या शेपटीला मोत्ये बांधतात. मग तिची पूजा करून तिच्या दानाचे उदक ब्राह्मणाच्या हातावर सोडतात. [ दा. चं. ]

**ऋत** (१) ऋ या गतिवाचक धातूपासून हा शब्द बनला आहे. गती, प्रगती, गतीचा योग्य क्रम, सत्य, विश्वव्यवस्था, सत्याचा मार्ग, प्रशस्त वर्तनक्रम असे या शब्दाचे पर्यायार्थ आहेत.

या विविध अर्थांत विश्वाचा शाश्वत नियम हा ऋत शब्दाचा प्रमुख अर्थ मानलेला आहे. विश्वातली व्यवस्था, प्रतिष्ठा व नियमन यांना कारणीभूत असलेले आणि सकल सृष्टीच्या आधी उत्पन्न झालेले तत्त्व, म्हणजे ऋत होय. आकाशातल्या असंख्य तारका, नाचत हसत अवतरणारी आणि नेत्रांना आनंद देणारी उषा, तीन पावलांत त्रिभुवन व्यापण्यासाठी उगवलेला प्रातःकालचा सूर्य, एकामागून एक येणारे दिवस-रात्र, ऋतुचक्राचे नियमित परिवर्तन, वनस्पतींतल्या नियमबद्ध विकासक्रिया, प्राण्यांच्या गर्भधारणेतील निश्चित कालावधी, तसेच सृष्टीतली सुसंबद्धता, सुसूत्रता आणि द्यावापृथिवींचा अभेद्य संबंध, या सर्व घटनांच्यामागे ऋत नामक तत्त्व आहे, असे वैदिक ऋषींच्या कल्पनेला स्फुरले.

देवांचा आदिदेव प्रजापती हा ऋतातून प्रथम उत्पन्न झाला, म्हणून त्याला ऋतज म्हटले असून, अग्नी, सोम, वरुण, सविता, इ. देवांना ऋतावा = ऋत धारण करणारे व ऋतपा = ऋताचे रक्षण करणारे, असे म्हटले आहे. विश्वाची प्रगती एका निश्चित मार्गाने होत असते. प्रगतीच्या या मार्गाचे अनुसरण करणे, हा वैदिक देवतांचा धर्म आहे. ते त्यांचे व्रत आहे. म्हणूनच ऋग्वेदात सर्व देवतांना धृतव्रत म्हटले आहे. मानवी जीवनाच्या विकासाचा मार्गही याच तत्त्वाच्या आचरणाने चालतो. अत एव मानवानेही ऋतावा आणि ऋतपा झाले पाहिजे, अशी वैदिक ऋषींची आकांक्षा आहे.

विश्वाच्या विकासाचे शाश्वत तत्त्व आणि मानवाच्या जीवनसाफल्याला आवश्यक असणारा धर्म या दोन्ही गोष्टी ऋत या शब्दाने ध्वनित होतात. म्हणूनच देवांच्या आणि सज्जनांच्या मार्गाला 'ऋतस्य पन्थाः' म्हटले आहे. पैजवन सुदास इंद्राला म्हणतो –

वयमिन्द्र त्वायवः सखित्वमा रभामहे ।
ऋतस्य नः पथा नयाऽति विश्वानि दुरिता...॥
(ऋ. १०.१३३.६)

अर्थ – हे इंद्रा, आम्ही तुझ्यावर विश्वास ठेवणारे आहोत. तुझीच कृपा मिळविण्याचा आमचा प्रयत्न आहे. तरी ऋताच्या मार्गाने (तू) आम्हाला सर्व पातकांच्या पार ने.

ऋताची ही महान कल्पना वैदिक धर्माची प्रेरणा आहे. पुढच्या काळात त्याला यज्ञ, सत्य व ब्रह्म असे नवे अर्थ प्राप्त झाले. वेदोत्तरकालात धर्मकल्पनेचा संकोच झाला. समग्र ऋतदर्शनाऐवजी ऋताच्या विशिष्ट अंगावरच विशेष भर दिला जाऊ लागला. ब्राह्मणांच्या काळात यज्ञसंस्था महत्त्व पावली. त्यामुळे ऋत म्हणजे यज्ञ हा अर्थ त्या काळात रूढ झाला. पुढच्या काळातल्या कर्मकांडाच्या पुरस्कर्त्यांनीही ऋत हे केवळ यज्ञस्वरूपच मानले.

सत्य आणि ब्रह्म हे ऋताचे पर्याय म्हणून यास्काने दिले असले, तरी त्याच्या दृष्टीने ते ऋताचे गौण अर्थ होत. प्रमुख अर्थ यज्ञ हाच गृहीत धरून त्याने ऋत शब्दाची निरुक्ती केली आहे. हा एक प्रकारे ऋताच्या महान कल्पनेचा संकोचच होय असे म्हटले पाहिजे.

पुढे यज्ञीय कर्मकांडाचा उबग येऊन उपनिषत्कारांनी तत्त्व-संशोधन सुरू केले. त्यांच्या त्या चिंतनात त्यांना ऋताच्या 'सत्य' स्वरूपाचे दर्शन घडले. उपनिषद्-वाङ्‌मयात ऋताच्या सर्व कल्पना सत्याच्या परिभाषेत मांडलेल्या आहेत. ब्राह्मण-काळात जसा यज्ञ, तसा उपनिषत्कालात अंतिम सत्य आणि त्याची प्राप्ती हा युगधर्म होता. 'ऋतं सत्यं परं ब्रह्म' या उपनिषद्वचनांत 'ऋत हे सत्य आणि त्याबरोबरच परब्रह्म अशा फार मोठ्या नावाने ओळखले जाऊ लागले (महा. नारा. उप. ३.५.६) पण निरनिराळ्या काळी ऋत शब्दाचे भिन्न भिन्न अर्थ प्रचलित झालेले दिसले, तरी शाश्वत धर्म आणि विश्व-नियामकत्त्व हे ऋताचे मूळ अर्थ पूर्णपणे कधीही दृष्टीआड झाले नाहीत. ऋत शब्दाचा साक्षात उल्लेख असो वा नसो; पण त्याची कल्पना मात्र या ना त्या स्वरूपात अभिव्यक्त होत राहिली आहे. मनुष्याच्या अंतःकरणात निसर्गतःच ऋत आणि अनृत यांची जाणीव असते. विवेक आणि संस्कार यांनी त्या जाणिवेला स्पष्टपणा येतो व त्यातून माणसाची कर्तव्ये व अकर्तव्ये निश्चित होतात. मनुष्याच्या अंतरंगातील नैतिक सत्य व विश्वशक्तीच्या अस्तित्वाला आणि व्यापाराला प्रेरक असलेले सत्य एकच असून तेच ऋत होय, अशा निश्चयाप्रत वैदिक ऋषींची प्रतिभा पोचली. ही ऋतकल्पना म्हणजे ऋग्वेदा-तल्या तत्त्वज्ञानाचा मूलाधार होय. [वै. सं. वि.; ना. भा. ध.]

**ऋतू** याची व्याख्या अशी—'सौर मासद्वयं राम ऋतुरित्य-भिधीयते'= हे रामा, सौरमासद्वयाला ऋतू असे म्हणतात(पुरु. चिंतामणी). हे सहा असून त्यांची नावे वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद, हेमंत व शिशिर अशी आहेत. चैत्रादी मास धरून यांची गणना करतात. वर्षाचे विविध हंगाम अशा अर्थी ऋतू शब्द ऋग्वेदात अनेक वेळा आला आहे; पण तिथे तीनच ऋतूंची कल्पना आढळते. चार महिन्यांचा एक ऋतू अशी त्यांची योजना आहे (ऋ. १.४९.३; १.१६४.२). वसंत, ग्रीष्म व शरद अशी त्यांची नावे आहेत (१०.९०.६). प्राचीन काळी प्रत्येक ऋतूच्या प्रारंभी देवतांना बली अर्पण करण्याची प्रथा होती (श. ब्रा. १४.१.१.२८).

त्यानंतरच्या काळात वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद, हेमंत असे पाचच पाच ऋतू मानले गेले (अथर्व. ८.२.२२; तै. सं. १. ६.२.३; श. ब्रा. १.३५.११). जेव्हा पाच ऋतू मानीत, तेव्हा हेमंत-शिशिर यांचा एकत्र अंतर्भाव करीत. तैत्तिरीय संहितेत दुसऱ्या एका ठिकाणी सहा ऋतू मानले असून मधु-माधव, शुक्र-शुची, इ. बारा महिन्यांबरोबर वसंत, ग्रीष्म इ. प्रकारे त्यांची सांगड घातली आहे (४.४.११). वेदांत जिथे जिथे सहा ऋतूंचा एकत्र उल्लेख केला आहे, तिथे तिथे ऋतूंचा आरंभ वसंतापासून धरलेला आहे. सर्व ऋतूंत वसंत हा मुख्य होय, अशी स्वतंत्र विधानेही आहेत. 'मुखं वा एतदृतूनां यद्वसन्तः'= वसंत हे ऋतूचे मुख होय(तै. ब्रा. १.२.६). गीतेत श्रीकृष्णानेही 'ऋतूंना कुसुमाकरः'= ऋतूंमध्ये मी वसंत होय, असे म्हणून वसंतालाच श्रेष्ठत्व दिले आहे (१०.३५). तैत्तिरीय ब्राह्मणात (१.१०.४.१) दुसऱ्या एका ठिकाणी संवत्सर हा एक पक्षी कल्पून पुढील रूपक केले आहे –

तस्य ते वसन्तः शिरः। ग्रीष्मो दक्षिणः पक्षः।
वर्षाः पुच्छम्। शरदुत्तरः पक्षः। हेमन्तो मध्यम्।

अर्थ – वसंत हे संवत्सररूपी पक्ष्याचे मस्तक, ग्रीष्म उजवा पंख, वर्षाऋतू पुच्छ, शरद डावा पंख व हेमंत मध्य होय.

ऋतू हे सूर्याच्या गतीवर अवलंबून असतात. सध्या आपण चैत्र-वैशाख = वसंत ऋतू, अशी गणना करीत असलो, तरी ऋतू हे चांद्रमासांवर अवलंबून नसून ते सौरमासांवर म्हणजे सूर्यसंक्रांतीवर अवलंबून असतात. त्यामुळे वसंताचा आरंभ चैत्र शु. प्रतिपदेस न होता, तो मीन राशीत सूर्य गेला असता होतो, असे समजतात. पंचांगातही तशा प्रकारेच त्याचा निर्देश केलेला असतो. ऋतूंचा वास्तविक अर्थ असा आहे, की सूर्याने दोन संक्रांती भोगल्या असता एक ऋतू पूर्ण होतो व अशा प्रकारे बारा राशींत सहा ऋतू होऊन संवत्सरचक्र पुरे होते.

सांप्रत ऋतुचक्राचा चैत्रादी गणनेशी मेळ बसत नाही. ते सुमारे एक महिना मागे गेले आहे. चैत्रारंभापासून वसंतारंभ मानणे, ही गणना महाभारतानंतरची आहे. ती इ. स.च्या प्रारंभाच्या सुमाराची आहे. त्यात ज्येष्ठ-आषाढ हे ग्रीष्माचे महिने धरले आहेत व श्रावण-भाद्रपद हे वर्षाऋतूचे मानले आहेत; पण सांप्रत आषाढापासूनच पाऊस सुरू होतो. महाभारतात 'सर्वसस्यसुखे काले' असे कार्तिकाचे वर्णन आहे; पण अलिकडे धान्य व गवत तयार होण्याचा तो काल आश्विनातच येतो. यावरून महाभारतकालापासून आतापर्यंत ऋतू सरासरीने एक महिना मागे हटले आहेत, असे स्पष्ट दिसते.

ऋतूंचे चक्र सूर्याच्या उत्तर-दक्षिण गतीमुळे उत्पन्न होते, ही गोष्ट महाभारतकाळी ज्ञात होती. 'सूर्य दक्षिणेकडे गेला म्हणजे शीत उत्पन्न होते व तो फिरून उत्तरेकडे आला म्हणजे पाणी शोषून घेतो. नंतर तो ते पाणी (पर्जन्यरूपाने) खाली सोडतो व पुन्हा पृथ्वीवर सस्यादींची उत्पत्ती करतो,' असे महाभारतात म्हटले आहे (वन. ६३).

वर्षातल्या तीन ऋतूंच्या प्रारंभी तीन यज्ञ करण्याची बुद्धपूर्व भारतीयांची चाल होती. पुढे बुद्धाने थोडासा फरक करून तीच कल्पना स्वीकारली. पहिल्या ऋतूत वृक्षातळी राहून

मनन करायचे, दुसऱ्यात वस्स (वर्षावास) करायचा व तिसऱ्यात पर्णशाला बांधून तिच्यातच अध्ययन करायचे, अशी बुद्धाने वहिवाट पाडली.

पुराणांत ऋतूंविषयी पुढील उल्लेख आहे – ते ब्रह्मदेवाचे पुत्र असून, पाच आर्तवाचे पिते आहेत. आर्तवांना पितर व ऋतूंना पितामह समजतात. श्राद्धांत त्यांची प्रार्थना करतात. त्यांनी उमेच्या विवाहप्रसंगी नृत्य-गायन केले. [म. भा. उ. सं.; म. ज्ञा. को.; पु. इं.]

**ऋतुगमन** 'ऋतुर्गर्भग्रहणयोग्य : काल :' – गर्भधारणेस योग्य अशा कालाला ऋतू म्हणतात. स्त्रीच्या रजाला आर्तव म्हणतात. तो शब्द ऋतूवरूनच आला आहे. गृहस्थाने ऋतुकाळी व पर्वदिवस वर्ज्य करून इतर दिवसांत भार्येशी समागम करावा, अशी धर्मशास्त्राची आज्ञा आहे (मनु. ३.४५). हा काल रजोदर्शनापासून सोळा दिवसांपर्यंत मानतात. त्या काळात पहिले तीन दिवस सोडून समदिवशी रात्री दुसऱ्या प्रहरानंतर पुरुषाने प्रसन्न अंतःकरणाने भार्यागमन करावे, असे सांगितले आहे. या काळातील कोणते दिवस वर्ज्य करावे, याविषयी मतभेद आहेत. त्यासाठी त्या त्या ठिकाणी जो देशाचार असेल तो पाळावा, असे सांगितले आहे. समागमाच्या प्रसंगी पत्नी प्रेमयुक्त, संतुष्ट व इतर विषयांकडे लक्ष नसलेली, अशी असावी. पुरुषाने अशा वेळीं तांबूलभक्षण करून तलम, स्वच्छ व न फाटलेले वस्त्र धारण करावे.

ऋतुगमनासाठी स्वतंत्र रतिमंदिर असावे. तिथे दीप प्रज्वलित असावा. स्त्रीने काजळ, कुंकू व सिंदूर लावून तांबूलभक्षण करावे. तिने धौतवस्त्र परिधान करून फुले माळावी. पुरुषानेही चंदन-पुष्पादिकांनी शरीर भूषित करावे. तर्जनीत रौप्य पवित्रक असेल तर ते काढावे, उपवीती व्हावे, शिखा मोकळी सोडावी व 'विष्णुर्योनिं कल्पयतु' हे सूक्त म्हणून ईश्वरस्मरणपूर्वक समागम करावा. नंतर स्नान करून पृथक शय्येवर झोपावे. जो गृहस्थ ऋतुकाली भार्येशी गमन करीत नाही, त्याला भ्रूणहत्येचे पातक लागते, असे पराशर म्हणतो. पण कुल्लूकाच्या मते हा नियम, ज्याला पुत्रसंतती झाली नाही, त्याच्यासाठीच आहे (मनु. ३.४५ वरील टीका).

पुढील स्त्रियांशी समागम वर्ज्य सांगितलेला आहे –

नास्नातां तु स्त्रियं गच्छेन्नातुरां न रजस्वलाम् ।
नानिष्टां न प्रकुपितां नाप्रशस्तां न गर्भिणीम् ।।
वृद्धां वन्ध्यामसद्वृत्तां मृतापत्यामपुष्पिणीम् ।
बहुपुत्रवतीं चैव गमने परिवर्जयेत् ।।

अर्थ– स्नान न केलेली, व्याधिग्रस्त, रजस्वला, प्रतिकूल, क्रुद्ध, अयोग्य, गर्भिणी, वृद्धा, वन्ध्या, दुराचरणी, जिची मुले मरतात अशी, जिला रजोदर्शनच झाले नाही अशी व बहु (दहापेक्षा अधिक)–पुत्रवती स्त्री गमनाला वर्ज्य समजावी. [आचारेन्दु:]

**ऋतुपात्र** सोमयागांत ऋतू नामक ग्रह घेण्यासाठी दोन पात्रे असतात व ती पिंपळ किंवा श्रीपर्णी (शिवरी) या वृक्षाची करतात. ऋतुपात्राला दोन्ही बाजूंस मुख असते. एक ऋतुपात्र अध्वर्यूंचे व दुसरे प्रतिप्रस्थात्याचे असते. हे दोघेही या पात्रांनी सोमाचा याग करतात. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**ऋतुशांती** एखाद्या अशुभ मासात, अशुभ दिवशी व अशुभ नक्षत्री स्त्रीला प्रथम रजोदर्शन झाले असता, ती गोष्ट अशुभकारक समजून त्यासाठी ऋतुशांती करतात. या शांतीचे विधान बौधायन गृह्यशेषसूत्रांत सांगितले आहे, ते असे-

प्रथम संकल्प करून एका शुद्ध जागी धान्याचे स्थंडिल करावे. त्यावर कलश मांडून त्यात पंचपल्लव, पाच प्रकारच्या मृत्तिका इ. वस्तू घालाव्यात. कलश पाण्याने भरून त्यावर पूर्णपात्र ठेवावे. त्यात विष्णूची सुवर्णप्रतिमा स्थापून तिची पूजा करावी. मग ऋत्विजांनी कलशाला हात लावून श्रीसूक्त, वरुणसूक्त, इ. सूक्तांचे पठण करावे. मग यजमान–दंपतीला दर्भासनावर बसवून त्या कलशातल्या जलाने अभिषेक करावा. त्यानंतर यजमान – दंपतीचे स्नान झाल्यावर अग्निस्थापना व ग्रहांचे पूजन करावे. विष्णुसूक्ताने पळसाच्या समिधांचा, ब्रह्मसूक्ताने भाताचा व रुद्रसूक्ताने आज्याचा होम करावा. नंतर आयुष्य-देवता व नक्षत्रदेवता यांच्यासाठी आहुती द्याव्या. प्रायश्चित्त-होमानंतर उडीद घातलेल्या भाताचे बलिदान करावे. मग देवतांची उत्तरपूजा करून विधी समाप्त करावा. या शांतीने स्त्री सर्व दोषांतून मुक्त होते, असे बौधायन सांगतो (५.३).

ऋग्वेदीय ब्रह्मकर्मसमुच्चयामध्ये ऋतुशांतीचा विधी नाही. त्याऐवजी तिथे भुवनेश्वरीशांती करण्यास सांगितले आहे. पाहा–भुवनेश्वरीशांती [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**ऋतुस्नान** रजस्वला स्त्रीचे चौथ्या दिवशीचे स्नान. हे स्नान केल्यावर तिने प्रथम पतीचे मुखदर्शन करावे आणि तो उपस्थित नसल्यास त्याचे मनात ध्यान करून सूर्य-दर्शन करावे असे सांगितले आहे. पाहा– रजस्वला [श. इ.]

**ऋतूत्सव** ऋतुविषयक उत्सव समारंभाने साजरे करण्याची प्रथा भारतात प्राचीन काळापासून चालू असल्याचे उल्लेख संस्कृत साहित्यात अनेक ठिकाणी आढळतात. ऋतु-

विषयक लहानमोठे अनेक उत्सव त्या काळीही होते व आजही आहेत; वसंतोत्सव आणि कौमुदीमहोत्सव हे दोन त्यांतले प्रमुख होत. वसंतोत्सव त्या ऋतूचा सन्मान करण्यासाठी व कौमुदीमहोत्सव शारदीय चंद्रिकेचा आनंद लुटण्यासाठी केला जात असे. कालिदासाने आपल्या काव्यात आणि नाटकात वसंतोत्सवाचे निदर्शन अनेक ठिकाणी केले आहे. दशरथाच्या वसंतोत्सवाचे वर्णन करून तो लिहितो (रघु. ९.४८)–

**अथ यथासुखमार्तवमुत्सवं समनुभूय विलासवतीसखः ।**
**नरपतिश्चकमें मृगयारतिं स मधुमन्मधुमन्मथसन्निभः ।।**

अर्थ–विष्णू, वसंत व मदन यांच्याप्रमाणे असलेला, विलासवती स्त्रियांचा सहचर असा दशरथ राजा वसंतोत्सवाचा यथेच्छ आस्वाद घेऊन मृगयाविहार करण्याची इच्छा करता झाला.

प्राचीन काळी अशोक व बकुल यांना दोहद उत्पन्न करणे (त्यांना पुष्पोन्मुख करणे), हे वसंतोत्सवाचे एक प्रधान अंग मानीत. वसंताच्या अनेक उत्सवांत सुवसंतक व मदनोत्सव यांची वर्णने सर्वांत अधिक मिळतात. सुवसंतक या उत्सवात नागरिक लोक एकत्र जमून नृत्य, गायन, क्रीडा, द्यूत, इ. कार्यक्रम करीत. मदनोत्सव फाल्गुन महिन्यात सुरू होऊन चैत्राच्या अखेरीपर्यंत चाले. याची दोन रूपे होती. सार्वजनिक मदनोत्सव हा एखाद्या उद्यानात आणि खाजगी उत्सव राजे-महाराजे यांच्या अंतःपुरात होत असत. कामदेवाची पूजा हा या उत्सवाचा मुख्य भाग असे. हर्षाच्या रत्नावली या नाटकात मदनोत्सवाच्या सार्वजनिक स्वरूपाचे वर्णन हृदयंगम रीतीने केलेले आहे.

पावसाळ्यानंतरचे प्रसन्न चांदणे शरद्ऋतूतच प्रकट होते. शरदाचे वातावरण मोकळे आणि आल्हाददायक असते. वसंताप्रमाणेच तोही पुष्पांचा ऋतू असतो. शिवाय त्या वेळी शेतांतली काही धान्ये कापणीला आलेली असतात, तर काही कापून, मळून घरात आलेली असतात. अशा वेळी माणसाचे मन साहजिकच क्रीडा, विनोद आणि उत्सव यांच्यासाठी उत्सुक होते. त्यामुळेच वसंतातल्यापेक्षाही शरद्ऋतूतले उत्सव संख्येने अधिक आहेत. दसरा, नवान्नपूर्णिमा, कोजागिरी, दिवाळी, लक्ष्मीपूजन, गोक्रीडन इ. अनेक उत्सव पंचांगात दिलेले असतात, ते सगळे शरदाचेच उत्सव होत. या सर्वांत प्राचीन काळी कौमुदीमहोत्सवाला प्राधान्य होते. हा उत्सव आश्विन पौर्णिमेला होत असे. त्या दिवशी नगरानगरांत घरे-दारे सजवीत आणि दिव्यांची रोषणाई करीत. त्या रात्री लोक रात्रभर जागरण करीत. सगळीकडे नाच-गाण्यांच्या मैफली होत. द्यूतही खेळले जाई. त्या दिवशी खेड्यापाड्यांतली माणसे तो उत्सव पाहण्यासाठी शहराकडे लोटत. श्रीकृष्णाने गोपींसंगे रासक्रीडा केली, ती या शरद्ऋतूतल्या चांदण्या रात्रीच केली, असे भागवतपुराणात सांगितले आहे (१०.२९).

कामसूत्रात होलिकोत्सवाचे वर्णन आलेले आहे. तोही एक ऋतूत्सवच असून, प्राचीन काळापासून आजतागायत अविच्छिन्न चालत आलेला आहे. मकरसंक्रांती हाही एक ऋतूत्सवच मानायला हवा. कारण तेव्हापासून थंडी हळूहळू कमी होऊ लागते आणि निसर्गात पानगळ सुरू होते. पाहा – कोजागिरी पौर्णिमा, मकरसंक्रान्ती, वसंतोत्सव, शरद, होळी. [प्रा. भा. क. वि.]

**ऋत्विज** याची व्याख्या अशी – 'ऋतौ यजति इति' = विहित कालामध्ये यज्ञांत काम करणारा, तो ऋत्विज होय (श. क.)

**अग्न्याधेयं पाकयज्ञानग्निष्टोमादिकान् मखान् ।**
**यः करोति वृतो यस्य स तस्यर्त्विगिहोच्यते ।।**
(मानव ध. सू. २.१४३)

अर्थ–यजमानाने वरिलेला पुरोहित त्याच्यासाठी अग्न्याधान, पाकयज्ञ व अग्निष्टोमादी यज्ञ करतो, तो त्या यजमानाचा ऋत्विक होय.

ब्राह्मणग्रंथांच्या कालात कर्मकांड व ऋत्विक्प्रणाली यांमध्ये पुष्कळ वाढ झाली. एकाह सोमयागापासून तो द्वादशरात्र, संवत्सर व कित्येक वर्षे अखंड चालणारी सत्रे अशा प्रकारे यज्ञसंस्थेचा विस्तार वाढला. या वाढीबरोबरच ऋत्विजांच्या संस्थेतही वाढ झाली. ऋग्वेदात होता, पोता, नेष्टा, आग्नीध्र, प्रशास्ता, अध्वर्यू व ब्रह्मा अशा सात ऋत्विजांचा उल्लेख मिळतो (२.१.२). त्याचबरोबर उद्गाता व त्याचा साहाय्यक प्रस्तोता यांचाही उल्लेख ऋग्वेदात मिळतो. ब्राह्मण-काळात ही ऋत्विजांची संख्या वाढत वाढत सतरापर्यंत गेलेली दिसते. यज्ञसंस्थेतले हे ऋत्विज चार गटांत विभागलेले आहेत –

(१) **होता** – या गटात होता व त्याचे साहाय्यक मैत्रावरुण, अच्छावाक् व ग्रावस्तुत मिळून चार ऋत्विज असतात.

(२) **उद्गाता** – या गटात उद्गाता व त्याचे साहाय्यक म्हणून प्रस्तोता, प्रतिहर्ता, सुब्रह्मण्य मिळून चार ऋत्विज असतात.

(३) **अध्वर्यू** – या गटात अध्वर्यू व त्याचे साहाय्यक प्रतिप्रस्थाता, नेष्टा व उन्नेता मिळून चौघे ऋत्विज असतात.

(४) **ब्रह्मा** – या गटात ब्रह्मा व त्याचे साहाय्यक ब्राह्मणाच्छंसी, आग्नीध्र व पोता मिळून चार ऋत्विज असतात.

सदस्य हा सतरावा ऋत्विज होय. हा प्रधान ऋत्विज म्हणून सर्व यज्ञावर देखरेख ठेवीत असतो. शमिता, वैकर्त व चमसाध्वर्यू असे अध्वर्यूचे आणखी तीन गौण साहाय्यक असतात.

ऋत्विजांच्या योग्यतेविषयी शास्त्रकारांनी पुष्कळ चर्चा केली आहे. ज्या ब्राह्मणांना आपले कुल–गोत्र माहीत आहे व ज्यांनी वेदाध्ययन केले आहे, तेच ऋत्विज होण्याला योग्य असतात. जे तरुण आहेत, ज्यांचे सर्व अवयव निकोप आहेत, आणि ज्यांचा आवाज ठणठणीत आहे, अशांनाच ऋत्विज करावे, असे आप. श्रौतसूत्रात सांगितले आहे.

**युक्ताः सदाचाररता वेदवेदाङ्गपारगाः ।**
**शुचयो ब्राह्मणाः पूता ऋत्विजः कर्मसु स्मृताः ।।**

अर्थ – सदाचारप्रवण, वेदवेदाङ्गनिपुण, शुची व पवित्र असे ब्राह्मणच यज्ञकर्मात ऋत्विज व्हायला योग्य असतात.

क्षत्रिय व वैश्य यांना यज्ञ करण्याचा अधिकार आहे; पण त्यांच्या यज्ञात ब्राह्मणानेच आर्त्विज्य केले पाहिजे, असा नियम आहे.

ब्राह्मणाने यज्ञात आर्त्विज्य केव्हा स्वीकारावे व केव्हा स्वीकारू नये, यावद्दलचेही नियम स्मृतिग्रंथांत दिले आहेत. काही ऋत्विज हे विशिष्ट गोत्राचे असावे, असाही नियम आहे. उदा० अध्वर्यू आंगिरस गोत्राचा, ब्रह्मा वसिष्ठ गोत्राचा व होता विश्वामित्र गोत्राच असावा, असे बौधा. श्रौतसूत्र सांगते. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे; व्रतराज; सं. कौ.; हिं. सं. ]

**ऋद्धिपुरवर्णन** महानुभाव पंथाच्या साती ग्रंथांतील एक. हा कालानुक्रमे साती ग्रंथांतील अखेरचा ग्रंथ असून, इ. स. १३६३ हा याचा रचनाकाल मानला जातो. पंडित नारायण व्यास किंवा नारोवास याने हे काव्य ओवी छंदात रचले आहे. नारायण पश्चिम खानदेशातील बाहाळ गावचा रहिवासी होता; त्यामुळे तो बहाळिये या आडनावाने ओळखला जातो. कवीचे वडील या गावच्या राजपूत राजाच्या पदरी राज-ज्योतिषी म्हणून होते. दरबारातील इतर मंडळी त्यांचा मत्सर करीत होती. त्याचा परिणाम म्हणून त्यांना आपला प्राण गमवावा लागला. या वेळी नारायण बालवयात होता अशी समजूत आहे. पुढे त्याने जादूटोणा शिकून पित्याच्या मरणाला कारण झालेल्यांचा सूड घेतला. नारायण फलज्योतिषातही निष्णात होता. आपल्या हातून अनेक हत्या झाल्यामुळे कवीला पश्चाताप झाला आणि त्याने महानुभाव पंथाची दीक्षा घेऊन संन्यासाश्रम स्वीकारला. मग त्याने ऋद्धिपुरला वास्तव्य केले आणि विश्वनाथ पंडित वाळापुरकर याच्या सांगण्यावरून ऋद्धिपुरवर्णन हा काव्यग्रंथ रचला. ऋद्धिपुर हे महानुभावांचे एक मोठे क्षेत्र. ते अनेकांच्या काव्यांचा विषय झाले आहे.

या ग्रंथाची ओवीसंख्या ६४१ इतकी असून, आत्मनिष्ठ काव्याचा तो एक उत्तम नमुना आहे. उत्तम शब्दचित्रे रेखाटण्यात कवीचा हातखंडा आहे. आर्त जीवांच्या संसारश्रमाचा जणू विसावा, असे ऋद्धिपुर पाहताच सासुरवासाने शीणलेल्या लेकीला आई भेटावी असा आनंद कवीला झाला. ऋद्धिपुरचे माहात्म्य (ऋद्धि. ४४-४८) कवीने वर्णिले आहे, ते असे –

**जे आर्तांसि कारणे : संसारश्रमाचे वीसवणें :**
**ते श्रीरीधपुर देखिलें तेणें : वुरूनिया**
**मोळिकारां धांडोळितां रानें : मोळिये जोडे बावनें:**
**ना तरि दुर्भक्षीं पक्वानें: शंकू लाहे**
**दारिद्रीं आडखूळे रीधीः अनाचार्यातें परित सीधी**
**नीस्कंचना उपाधी : टाकुनि येती**
**रोगिया अमृतपानः लाहे तान्हैला जीवनः**
**स्वामि जालेया प्रसन्नः जेवि सेवका होये**
**सासुरवासे सीन्नलीः तीये जेवि भेटे माउली:**
**आसो हें तैसी परि जाली: श्रीऋधिपुर देखिलेया**

या ग्रंथाशिवाय कवीच्या अनेक रचना सांगितल्या जातात; पण डंक नावाचे एक खंडकाव्य आणि काही स्फुट पदे याशिवाय अन्य काही उपलब्ध झाले नाही. डंक या खंडकाव्याची एकूण १६ पदे आहेत. [ म. सा.; म. म. वा.; श्रीऋद्धिपुरवर्णन - संपा. शं. गो. तुळपुळे, १९६७ ]

**ऋद्धी** कुबेरपत्नी. नल-कूबरांची माता. एक ब्रह्मकला. पालिसाहित्यात ऋद्धीचे स्वरूप अणिमा, महिमा, इ. अष्टसिद्धींसारखेच चमत्कारमय मानले असून, अर्हत् पुरुषाला त्या प्राप्त असतात, असे सांगितले आहे. याचा सामान्य अर्थ सर्वांगीण वृद्धी असा आहे. पुण्याहवाचनात ' कर्म ऋध्यताम् ' =कर्माची ऋद्धी होवो, हे वाक्य ब्राह्मण तिवार उच्चारतात.

**ऋभू** (१) एक वैदिक देवतासंघ. ऋभुक्षन्, वाज व विभ्वन् या तीन देवांना मिळून ऋभू अशी संज्ञा आहे. ऋग्वेदात इंद्रासारख्या प्रमुख देवतांबरोबर काही कनिष्ठ प्रतीच्या देवतांचाही उल्लेख आलेला आहे. या कनिष्ठ देवतांत ऋभूंना फार महत्त्वाचे स्थान आहे. ऋग्वेदातील अकरा सूक्तांत यांची स्तुती केलेली असून, इतरत्रही अनेक वेळा यांचा उल्लेख आलेला आहे.

ऋभू हे सुधन्व्याचे पुत्र असून, सौधन्वान या पैतृक संज्ञेनेही ते ओळखले जातात. ऋभूंच्या शारीरिक वर्णनाचे व पोषाखाचे उल्लेख फारच त्रोटक आहेत. दिसण्यात ते सूर्यासारखे आहेत (ऋ. १.११०.४). ते धातूंची शिरस्त्राणे घालतात व उत्तमोत्तम माला धारण करतात. त्यांच्याकडे एक चकचकीत रथ असून, त्याला पुष्ट घोडे जोडलेले आहेत. त्यांच्याजवळ पुष्कळ

अश्व असतात. ते कुशल हाताचे व हुषार आहेत. हे प्रारंभी मानवच होते, पण पुढे देव बनले. (ऋ. १.११०.४)

या तीन भावांनी आपले सर्व कौशल्य व कलाचातुर्य खर्च करून त्वष्ट्याच्या चमसासारखे आणखी चार सुंदर चमस निर्माण करून दिले. आपल्या चमसपात्रांसारखीच चमसपात्रे (सोमरसासाठी लाकडी पात्रे) तीन मानवांनी तयार केलेली पाहून त्वष्ट्याला फारच आनंद झाला. नंतर वाज हा देवांचा ऋभुक्षन् हा इंद्राचा व विभ्वन् हा वरुणाचा कारागीर बनला,

त्यानंतर ऋभूंनी आंसाभोवती फिरणाऱ्या चाकांचा एक सुंदर रथ बनविला व तो अश्विनौ देवांना अर्पण केला (ऋ. १.२०.३). त्याचप्रमाणे त्यांनी बृहस्पतीसाठी एक दुभती गाय निर्माण केली व इंद्रासाठी हरिनामक सुंदर घोडे तयार करून दिले. यामुळे इंद्राशी त्यांचे सख्य जुळले. आपल्या विद्येच्या बळावर त्यांनी सूर्याच्याही घरी जाऊन पाहुणचार घेतला.

पुनर्ये चक्रुः पितरा युवाना सना यूपेव जरणा शयाना ।
(ऋ. ४.३३.३)

अर्थ– त्यांचे आईबाप वार्धक्यामुळे खांबाप्रमाणे ताठ होऊन पडले असता, ऋभूंनी त्यांना पुन्हा तारुण्य प्राप्त करून दिले.

ऋभूंनी आपल्या कर्तबगारीच्या जोरावर देवपद प्राप्त करून घेतले व यज्ञात इतर देवांप्रमाणे स्वतःसाठीही हविर्भाग मिळविला. त्यांनी नंतर त्वष्टयाचे शिष्यत्वही पत्करले.

ऋभू हा शब्द रभ्=ग्रहण करणे, या धातूपासून बनला आहे. यावरून ऋभू याचा सरळ धात्वर्थ ग्रहणीय किंवा हातचलाख असा होतो. इंद्र, अग्नी व आदित्य या देवतांनाही हे विशेषण पुष्कळदा लावलेले आढळते. [म. ज्ञा. को.; ऋ. द.]

(२) ब्रह्मदेवाचा पुत्र. हा तपोलोकाचा रहिवासी होता. याचा निदाघनामक एक शिष्य होता. खऱ्या ज्ञानाचे मर्म याने निदाघाला सांगितले. त्यानंतर एक हजार वर्षांनी याने पुन्हा निदाघाची भेट घेतली व त्याला अद्वैताचे रहस्य समजावून दिले. [पु. इं.]

(३) देवांचा एक वर्ग. यांचे वास्तव्य भुवर्लोकात असते. भृगूने दक्षाच्या यज्ञात प्रमथादिगणांचा पाडाव करण्याकरिता यांना मुद्दाम निर्माण केले [पु. इं.]

**ऋषभ** (१) नाभी व सुदेवी यांचा पुत्र. विष्णू, वायू व ब्रह्माण्ड या पुराणांत सुदेवीच्या ऐवजी मेरुदेवी असे नाव दिले आहे. हा विष्णूचा अवतार आहे. लहानपणीच याच्या हस्तपादादी अवयवांवर ध्वज, वज्र, अंकुश, इ. वैष्णव चिन्हे दिसू लागली. याने प्रथम गुरुगृही वास्तव्य करून अध्ययन केले व नंतर गृहस्थाश्रम स्वीकारला. हा अजनाभ वर्षाचा राजा होता. तो ब्राह्मणांच्या अनुज्ञेने राज्य चालवी. यज्ञनामक इंद्राने त्याला आपली जयंतीनावाची कन्या दिली होती. तिच्या ठिकाणी ऋषभाला शंभर पुत्र झाले. त्या सर्वांत भरत हा आपल्या गुणविशेषांनी श्रेष्ठ ठरला. त्या पुत्रांपैकी ८१ पुत्र कर्ममार्गाचे आचरण करणारे ऋषी झाले व- कवी, हरी, अंतरिक्ष, प्रबुद्ध, पिप्पलायन, अविर्होत्र, द्रुमिल, चमस आणि करभाजन हे नऊ पुत्र ब्रह्मनिष्ठ झाले. ऋषभाने आपल्या अजनाभ वर्षाचे नऊ खंड करून त्यांवर आपल्या नऊ पुत्रांना अधिपती नेमले व अवशिष्ट भूभागाचे सार्वभौमत्व भरताला दिले. ऋषभाने आपल्या प्रजेला धर्माचरणाचा व पुत्रांना ब्रह्मविद्येचा उपदेश केला.

याचे वैभव पाहून पुढे इंद्राला त्याचा हेवा वाटला. त्याने याच्या राज्यात पाऊस पाडण्याचे बंद केले. इंद्राचे हे दुष्ट कृत्य ऋषभदेवाने ओळखले व आपल्या मायेच्या प्रभावाने अजनाभ वर्षावर सर्वत्र भरपूर वृष्टी केली.

पुत्रांना राज्य दिल्यावर तो संन्यास घेऊन ब्रह्मावर्तातून बाहेर पडला. लोकांनी कितीही त्रास दिला, तरी त्याकडे दुर्लक्ष करून तो आनंदमय स्थितीत सर्वत्र भटकत राहिला. तो कोंक, वेंक, कुटक, दक्षिणकर्नाट, या प्रदेशांतही आला होता. त्यानंतर देहत्याग करण्याच्या इच्छेने तोंडात एक दगड धरून दक्षिणेत कटक पर्वतावरील अरण्यात भटकत असता वणव्यात सापडून तो जळून गेला, असे भागवतात सांगितले आहे; तर तो विरक्त होऊन वनात भटकत असता त्याने मातीच्या विटेने श्वसनक्रिया बंद करून देहत्याग केला, असे विष्णू व मार्कंडेय या पुराणांत सांगितले आहे (भाग. पु. ५.३.६; विष्णुपु. २.१.३२; मार्कं. पु. ५०). [पु. इं.]

(२) ऋषभगीतेचा उपदेशक. हा ऋषभकूट नावाच्या पर्वतशिखरावर राहत असे. याने सुमित्र राजाला आशा ही किती सूक्ष्म व व्यापक असते, ते सांगितले असून, त्या दोघांच्या संवादाला ऋषभगीता असे नाव मिळाले आहे. (म. भा. शांति. १२५–१२८). आशेने बद्ध मनुष्य अत्यंत दुर्बल होतो, असे ऋषभ मुनीने राजाला सांगितले आहे.

(३) भावी काळातील एक शिवावतार. हा वाराहकल्पातल्या वैवस्वत मन्वन्तरातल्या नवव्या चौकडीत होणार असून, तो व्यासांच्या निवृत्तिमार्गाचा प्रसार व योगमार्गाचा उद्धार करणार आहे. पराशर, गर्ग, भार्गव व गिरीश असे त्याला चार शिष्य मिळणार आहेत. [प्रा. च. को.]

(४) मेरूच्या उत्तर भागावरील एक पर्वत. श्रीहरीचे प्रिय निवासस्थान. बलरामाने या स्थळाची यात्रा केली होती (भाग. पु. ५.६.२६; मत्स्यपु. १६२.७).

या पर्वताचा उल्लेख कथासरित्सागरात आहे. इथे चक्रवर्ती राजांचा महाभिषेक होत असे व या पर्वतावर आषाढ शुद्ध चतुर्दशीला सर्व विद्याधर त्र्यंबकाची पूजा करण्यासाठी जमतात, असे तिथे सांगितले आहे. हा पर्वत हिंदुकुश पर्वत श्रेणीतला कोणतातरी भाग असावा, असे डॉ. केतकर म्हणतात. [ प्रा. म. ]

(५) भारतीय संगीतातील सप्तस्वरांपैकी दुसरा स्वर. हा स्वर शुभ मानलेला आहे. राजा स्वारीवर निघत असता त्याला या स्वराचे श्रवण होणे हा शुभशकुन मानीत. [ पु. इं. ]

(६) दक्षसावर्णी मन्वन्तरातील हरीचा अवतार. आयुष्मान व अंबुधारा यांच्या पोटी याचा जन्म झाला. हा ज्ञानयोगात निमग्न राहिला. (भाग. पु. ८.१३.२०).

**ऋषभतीर्थ** (१) वाराणसीमधील एक तीर्थ. [ पु. इं. ] (२) दक्षिण कोसलांतील एक तीर्थ स्थान. इथे तीन दिवस उपवास केल्याने वाजपेय यज्ञाचे पुण्य लाभते (म. भा. वन. ८५.१०). [ पु. इं. ]

**ऋषभदेव** जैनांचा पहिला तीर्थंकर. आदिनाथ पाहा.

**ऋषभपर्वत** दक्षिण भारतातील एक विष्णुक्षेत्र. मदुरेजवळच्या अलगर टेकडीचे हे नाव असावे. नृसिंहपुराणात या पर्वताचा उल्लेख आहे.

**ऋषभ वैराज** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकशेसहासष्टाव्या सूक्ताचा हा कर्ता आहे. शत्रुनाश हा प्रस्तुत सूक्ताचा विषय आहे. मनाच्या समाधानासाठी या सूक्ताचा पाठ करतात. तसेच हे सूक्त पापहारक असून, श्राद्धाच्या वेळी ब्राह्मणांना ऐकवितात. एकंदरीत या सूक्ताचा रोख यातुविद्येकडे असावा असे वाटते. याची एक ऋचा (१०.१६६.३) अशी –

अत्रैव वोऽपि नह्याम्युभे आर्त्नी इव ज्यया ।
वाचस्पते निषेधेमान् यथा मदधरं वदान् ॥

अर्थ – हे शत्रूंनो, मी तुम्हाला धनुष्याच्या दोरीने त्याची दोन्ही टोके ताणून बांधावी त्याप्रमाणे बांधून टाकतो. हे वाचस्पते, माझ्या शत्रूंना तू निंद्य आणि हीन भाषणी बनव.

याला शाक्वर असेही नाव होते.

या सूक्ताच्या पाचव्या ऋचेत अप्राप्य धनप्राप्ती, प्राप्त धनरक्षक आणि कुशलचिंतन या अर्थाने 'योगक्षेम' हा शब्द आला आहे. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ. ]

**ऋषभ वैश्वामित्र** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या तिसऱ्या मंडलातील तेरा व चौदा ही दोन सूक्ते आणि नवव्या मंडलातील एकाहत्तरावे सूक्त अशी तीन सूक्ते याने रचली आहेत. हा विश्वामित्राचा मुलगा आहे. पहिल्या दोन सूक्तांत अग्नीची व तिसऱ्यात पवमान सोमाची स्तुती आहे. याची एक ऋचा (३.१३.६) अशी –

उत नो ब्रह्मन्नविष उक्थेषु देवहूतमः ।
शं नः शोचा मरुद्वृधोऽग्ने सहस्रसातमः ॥

अर्थ – मरुतांनी वृद्धिगत केलेल्या हे देवपाचारक, आणि संपत्तिदायक अग्ने, आमच्या स्तोत्रांचे आणि कवनांचे रक्षण करून तू आमचे सौख्य वृद्धिगत कर.

प्रस्तुतच्या ऋचेवरून ऋषभाला आपल्या कवित्वाची जाणीव होती हे दिसून येते. याच्या एका सूक्तात (९.७१.२) 'असुर्यं वर्णम्' अशी शब्दसंज्ञा आढळते. असुर लोकांचा तो निर्देश आहे, असे अभ्यासक म्हणतात. तैत्तिरीय ब्राह्मणातही असुरांना असुर्यं वर्ण म्हटले आहे. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ. ]

**ऋषिऋण** याची व्याख्या सायणाने पुढीलप्रमाणे केली आहे- 'वेदाभ्यासादिभिरपाकर्तव्यं यद् ऋणं तत्'=वेदाध्ययन, स्वाध्याय इ. गोष्टी केल्यामुळे जे फिटते, ते ऋषिऋण होय. अध्ययन-अध्यापनाची परंपरा चालू ठेवल्याने ऋषींचे ऋण फिटते, असा त्याचा अर्थ होतो. पाहा – ऋणत्रय.

**ऋषिक देश** महाभारतकालीन एक देश. अर्जुन जेव्हा उत्तरदिग्विजयार्थ निघाला, तेव्हा त्याने वाल्हीक, दरद व कंबोज (आधुनिक बल्ख, गिलगित व पामीर) हे देश जिंकले व तो पूर्वकंबोज देशात शिरल्यावर तिथे ऋषिक लोकांबरोबर त्याचे घनघोर युद्ध झाले, असे सभापर्वात सांगितले आहे. मूळ महाभारतात अर्जुन चीन देशाला गेल्याचा उल्लेख नाही. परंतु बाणभट्टाने अर्जुनाच्या चीनयात्रेचे वर्णन केले आहे. इ. सनपूर्व पाचव्या शतकात यूची किंवा ऋषिकदेश हा उत्तर चीनमध्ये होता असे कळते. [ ह. च. सां. अ. ]

**ऋषिचांद्रायण** एक प्रायश्चित. महिनाभर प्रतिदिन हविष्यान्नाचे फक्त तीन घास खाऊन राहणे, हे या प्रायश्चित्ताचे स्वरूप आहे. [ हि. ध. ]

**ऋषिभाषितं** (पालि – इसिभासित) एक बौद्ध सूत्रग्रंथ. प्रत्येकबुद्धांच्या द्वारे भाषित (कथित) झाल्याकारणाने या सूत्राला हे नाव मिळाले. याच्या नारद, अंगरिसी,

वल्कलचीरी, कुम्मापुत्त, महाकासव, मंखलिपुत्त, बाहुक. इ. ४५ अध्ययनात प्रत्येकबुद्धांची चरित्रे दिलेली आहेत. [ प्रा. सा. इ. ]

**ऋषिपंचमी** (१) स्त्रियांचे एक व्रत. तिथी भाद्र. शु. पंचमी. स्त्रिया सकाळी उठून नदीवर जाऊन आघाड्याच्या काड्यांनी १०८ वेळा दात घासतात. नंतर तितक्याच वेळा नदीत बुड्या मारतात किंवा तितके तांब्ये अंगावर ओततात. घरी आल्यावर एका पाटावर तांदळांच्या आठ पुंज्या घालून त्यांवर कश्यपादी सात ऋषी व एक अरुंधती यांच्यासाठी आठ सुपाऱ्या मांडतात. नंतर संकल्प करून पुढील मंत्राने त्यांची षोडशोपचार पूजा करतात. –

कश्यपोऽत्रिर्भरद्वाजो विश्वामित्रोऽथ गौतमः ।
जमदग्निर्वसिष्ठश्च साध्वी चैवाप्यरुन्धती ।।

मग ऋषींचे विसर्जन करतात. या दिवशी स्त्रिया कंदमुळांचा आहार करतात व बैलाच्या श्रमांचे काहीही खात नाहीत.

हे व्रत सात वर्षे केल्याने अज्ञानस्थितीत घडलेल्या मासिक विटाळाचा दोष जातो. या व्रताची कहाणी अशी–आटपाट नगर होते. तिथे एक ब्राह्मण शेतीभाती करून राहत होता. एक दिवस त्याची बायको रजस्वला झाली; पण तिने दूर न राहता घरातले सगळे व्यवहार केले. त्या दोषाने तिचा नवरा पुढच्या जन्मी बैल झाला व ती स्वी कुत्री झाली. कर्मधर्मसंयोगाने ती दोघेही मुलाच्याच घरी राहायला आली. एक दिवस मुलाने आपल्या बायकोला सांगितले, की 'आज माझ्या बापाचे श्राद्ध आहे; तर तू खीरपुरीचा स्वयंपाक कर.' तिने तसे केले. पण खिरीचे भांडे उघडे राहिले व सापाने त्यात आपले विष टाकले. कुत्रीने ती गोष्ट पाहिली. ही खीर ब्राह्मण खातील, तर मरून जातील असे तिला वाटले व ती खिरीच्या पातेल्याला शिवली. ब्राह्मणाच्या बायकोने कुत्रीला ताडण करून तिला दिवसभर खायलाच घातले नाही. रात्री ती बैलाजवळ जाऊन रडू लागली. बैल तिला म्हणाला. 'आज मीही दिवसभर उपाशीच आहे. आज मुलाने मला नांगराला जुंपले व मारले. गेल्या जन्मी तू विटाळाचा संपर्क केलास, म्हणून तुला व मला हा जन्म आला.' ब्राह्मणाने ते ऐकले. त्याला वाईट वाटले. त्याने बैलाला चारा घातला. कुत्रीला अन्न घातले. दुसऱ्या दिवशी सकाळी उठून तो अरण्यात ऋषींकडे गेला. बैल झालेल्या आपल्या बापाचा व कुत्री झालेल्या आपल्या आईचा उद्धार कसा होईल, असा त्याने ऋषींना प्रश्न केला. ऋषींनी त्याला ऋषिपंचमीचे व्रत सांगितले. मुलाने ते व्रत केले व त्याचे पुण्य आईबापांना दिले. त्या पुण्याने बैल होता तो पुरुष झाला. कुत्री होती ती स्त्री झाली. मग दोघेही विमानात बसून स्वर्गाला गेली. [ व्रतराज ]

(२) जैनांचे एक व्रत. आषाढ शु. ५ मीला व्रताचा प्रारंभ. दर महिन्याच्या ५ मीस उपवास. असे ६५ उपवास झाल्यावर व्रताचे उद्यापन करतात. याची कथा अशी –

हस्तिनापुरातील धनपती श्रेष्ठीची कन्या कमलश्री हिने हे व्रत केले व तिचा हरवलेला पुत्र तिला परत मिळाला. शेवटी त्या दोघांनाही स्वर्गप्राप्ती झाली. [ जै. व्र. वि. सं. ]

**ऋषिबोधोत्सव** आर्यसमाजी लोकांचा एक उत्सव. शिवरात्रीच्या दिवशी हा उत्सव साजरा करतात व त्या प्रसंगी स्वामी दयानंदांचे गुणानुवाद गातात. स्वामी दयानंदांच्या अंतरात खऱ्या ज्ञानाचा उदय याच दिवशी झाला असे समजतात. लहानपणी दयानंद शिवरात्रीला रात्रभर जागरण करीत असत. एकदा अशा वेळी एक उंदीर शिवलिंगावर चढून तिथले तांदूळ खात असताना त्यांना दिसला. तेव्हापासून त्यांची मूर्तीच्या सामर्थ्याविषयीची श्रद्धा नष्ट झाली. नंतर त्यांनी खऱ्या शिवतत्त्वाच्या शोधाला प्रारंभ केला व ते प्राप्त झाल्यावर त्यांनी आर्यसमाजाची स्थापना केली. [ व्र. चं. ]

**ऋषियज्ञ** पंचमहायज्ञांपैकी एक. पाहा–ब्रह्मयज्ञ.

**ऋषी** ऋत् = गती या धातूवरून ऋषी शब्द व्युत्पादितात. या शब्दात 'ऋष्' हा धातू व 'इ' हा कर्मार्थक प्रत्यय आहे. ऋष् हा जोडधातू आहे. मूळ धातू ऋ असून, त्याला भृशार्थक किंवा इच्छार्थक 'स्' प्रत्यय लागून तो बनला आहे. त्याचा अर्थ प्रकर्षाने गती करणे, असा होतो. दैवी स्फूर्ती किंवा अंगात संचार होऊन थै थै नाचणारा, अंगाला आळोखे पिळोखे देणारा व सामान्य लोकांना अशक्य असे अंगविक्षेप द्रुत गतीने करणारा तो ऋषी होय, असा धात्वर्थ निघतो. इतिहासाचार्य राजवाडे ऋषी शब्दाचा अर्थ असाच करतात. त्यांच्या मते ऋषी म्हणजे मांत्रिक होय. हा शब्द पूर्ववैदिक आहे. तो इतका प्राचीन आहे, की त्या काळातले लोक अप्रत्यय भाषा बोलत होते.

ऋषी शब्द ऋग्वेदात १३३ वेळा आला असल्याचे नमूद आहे. मात्र इतक्या वेळा तो शब्द येऊनही यास्काने किंवा सायणाने धात्वर्थावरून त्याची निरुक्ती सांगितलेली नाही. 'मन्त्रद्रष्टारः' व 'अतीन्द्रियद्रष्टारः' = ज्यांना मंत्रांचे दर्शन झाले व ज्यांना अतींद्रियदर्शन घडते ते ऋषी होत, असे त्या शब्दाचे दोन अर्थ सायणाने दिले आहेत. पण हे दोन अर्थ म्हणजे त्या शब्दाची व्युत्पत्ती नव्हे. 'ऋषिर्दर्शनात्' = ज्याला दर्शन होते तो ऋषी होय, ही यास्काची व्याख्या ऋषींच्या

अतींद्रियदर्शनाला अनुलक्षूनच असावी (नि. २.११). ऋग्वेदात हा शब्द अग्नी, इंद्र, मरुत्, पूषा इ. देवतांना व एकदा ऋतूंना उद्देशून लावलेला आहे. ऋग्वेदात अग्नीला 'ऋषिर्न स्तुभ्वा' = ऋषीप्रमाणे स्तुती करणारा, असे म्हटले आहे (१.६६.२). त्यावरून ऋषींविषयी वैदिकांच्या मनात काय कल्पना होती, त्याचा सुगावा लागतो. देवतांच्या स्तुतिपर ऋचा रचणे व त्या म्हणणे, हे ऋग्वेदकाळी ऋषींचे लक्षण मानीत असावे.

**अग्निरिद्धि प्रचेता अग्निर्वेधस्तम ऋषिः ।**

(ऋ. ६.१४.२)

अर्थ – अग्नी हाच ज्ञानघन (व) अग्नी हाच अत्युत्कृष्ट नियामक असा ऋषी आहे.

या ऋचेत ज्ञानवत्ता आणि नियमन ही ऋषींची आणखी दोन लक्षणे प्रकट होतात. ऋग्वेदात (२.१८.३) ऋषी म्हणजे स्तोत्र करणारा कवी असे आणखी एक लक्षण आढळते. अशी अनेक ठिकाणची विशेषणे गोळा केल्याअंती प्रतिभावान स्तोत्रसामर्थ्य असलेला, ज्ञानी, हवन करणारा व सोम गाळणारा तो ऋषी होय, एवढा त्याचा अर्थ निष्पन्न होतो. ऋग्वेदात काही ठिकाणी भृगू, अंगिरा, विश्वामित्र, वसिष्ठ, कुत्स, औशिज, कक्षीवान, इ. पुरुषांना ऋषी म्हटले आहे.

ऋग्वेदात वर्णिलेले ऋषी हे शांत, दांत, तपस्वी व आश्रमात राहणारे होते, असा जो सामान्यतः समज आहे, तो चुकीचा आहे. हे ऋषी बहुतेक युयुत्सु आणि राजकारणाच्या उलाढाली करणारे होते. वसिष्ठ हे उत्तम घोडेस्वार होते (ऋ. ७.३३.१). अंगिरांनी पणींची धान्यकोठारे लुटली. विश्वामित्र व त्याच्या कुलातले लोक यांना कुशिक म्हणत. ते लढवय्ये होते व त्यांनी दाशराज्ञयुद्धात भाग घेतला होता. कुत्स हाही लढवय्या होता. त्याने इलिबिशाची तटबंदीची नगरे फोडली (ऋ. १.३३.१२).

श्री. प्र. रा. देशमुख यांनी ऋषिशब्दाविषयी एक नवीन कल्पना मांडली असून, ती विचारार्थ पुढे दिली आहे –

ऋषी शब्द हा देशवाचक असून, मुळात 'ऋष' देशातून आलेल्या लोकांना लावीत असावे. त्याच अर्थाने तो विजिगीषू पूर्वआर्यांसंबंधी योजला असावा. पुढे त्याचा मूलार्थ जाऊन ऋषी म्हणजे ऋचाकार या अर्थी त्याचा उपयोग होऊ लागला. ऋग्वेदात संकलित केलेल्या ऋचा रचणाऱ्या आधुनिक ऋषींना ऋषी म्हटले आहे, ते ह्याच अर्थी. म्हणून ऋचांत पूर्व ऋषी आणि नूतन ऋषी असे दोन प्रकारचे ऋषी कल्पिले आहेत. मुळात ऋषी शब्द आर्यांच्या मूलस्थानाचा द्योतक असावा. आर्यांच्या मूलस्थानासंबंधी अनेक कल्पना आहेत. त्यांपैकी एक कल्पना, आर्य हे 'ऋष' देशातील राहणारे होते, अशी आहे (नवभारत, मे १९६२).

ऋषी म्हणजे तप करणारे, ज्ञाते, द्रष्टे, पुण्यशील, दैवी पुरुष, ही कल्पना ब्राह्मणकाळात रूढ झाली (श. ब्रा. १.६.२.७; ६.१.१.१; ४.३.४.१९). ब्राह्मणकालीन व उपनिषत्कालीन ऋषिकल्पनेला धरून पुढील व्याख्या शब्दकल्पद्रुमात दिलेली आहे –

**ऋषति प्राप्नोति सर्वान् मन्त्रान् ज्ञानेन पश्यति संसारपारं वा इति ।**

अर्थ – जो सर्व मंत्रांना प्राप्त करून घेतो व ज्ञानाने जो संसारपाराला पाहतो, तो ऋषी होय.

वेदांतील ऋषी व उपनिषदांतले ऋषी यांत एक मोठाच भेद आहे. वैदिक ऋषी हे गृहस्थ, प्रपंचात रस घेणारे, सामाजिक व राजकीय उलाढालींत पुढाकार घेणारे, देवांची आराधना करणारे, यज्ञ करणारे व कौटुंबिक सुख व पुत्रपौत्र यांची कामना करणारे होते.

उपनिषत्कालीन ऋषींनी आश्रमात राहणे पसंत केले. ते संसारापासून विरक्त झाले व सर्वसंगपरित्याग करून तत्त्वचिंतनात रमू लागले. ते आश्रमात राहत असता कित्येक जिज्ञासू शिष्य त्यांच्याकडे येऊन राहत व त्यांच्याकडून आत्मज्ञान मिळवीत. याज्ञवल्क्य, आरुणी, सनत्कुमार, रैक्व, शांडिल्य, ऐतरेय, दधीच हे उपनिषत्कालीन ऋषी होत.

उपनिषदांतील ऋषींची परंपराच पुढे पुराणकाळात चालू राहिली; पण पौराणिक ऋषींतले कोणीही संन्यासी किंवा यती नाहीत. ते जरी अरण्यवास करून असले, तरी ते कुटुंबी होते व त्यांना मुलेबाळेही होती. ते उग्र तप करीत व जो कोणी काही वाकडे करील त्याला शाप देण्यासही समर्थ असत. जमदग्नी, दुर्वास, विश्वामित्र, इ. काही ऋषी अत्यंत कोपिष्ट दिसतात. या उलट वसिष्ठ ऋषी हा शांतिब्रह्म असा दिसतो. तो इक्ष्वाकुकुलाचा पुरोहित होता. त्याचा आश्रम हिमाचलाच्या पायथ्याशी होता. कालिदासाने रघुवंशात त्याच्या आश्रमाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे –

**वनान्तरादुपावृत्तैः समित्कुशफलाहरैः ।**
**पूर्यमाणमदृश्याग्निप्रत्युद्यातैस्तपस्विभिः ॥**
**आकीर्णमृषिपत्नीनामुटजद्वाररोधिभिः ।**
**अपत्यैरिव नीवारभागधेयोचितैर्मृगैः ॥**
**सेकान्ते मुनिकन्याभिस्तत्क्षणोज्झितवृक्षकम् ।**
**विश्वासाय विहङ्गानामालवालाम्बुपायिनाम् ॥**
**आतपात्ययसंक्षिप्तनीवारासु निषादिभिः ।**
**मृगैर्वर्तितरोमन्थमुटजाङ्गनभूमिषु ॥**
**अभ्युत्थिताग्निपिशुनैरतिथीनाश्रमोन्मुखान् ।**
**पुनानं पवनोद्धूतैर्धूमैराहुतिगन्धिभिः ॥**

अर्थ – संध्याकाळच्या सुमारास समिधा, दर्भ व कंदमुळे गोळा करून जंगलांतून परत आलेल्या व अदृश्य अशा यज्ञीय अग्नीने स्वागत केलेल्या तपस्विजनांनी भरलेल्या, ऋषि-पत्नींच्या मुलांप्रमाणे असणाऱ्या व नीवार धान्यांतील आपला भाग मिळविण्यास चटावल्यामुळे झोपडयांची द्वारे अडवून धरणाऱ्या हरिणांनी व्याप्त झालेल्या, वृक्षांच्या बुंध्याभोव-तालच्या आळयांतील पाणी पिण्यास पक्ष्यांना भीती वाटू नये म्हणून पाणी घातल्यावरोबर ऋषिकन्या येथील वृक्षां पासून दूर झाल्या आहेत अशा, ऊन टळून गेल्यामुळे नीवार धान्यांच्या राशी घालून ठेविलेल्या आश्रमांतील अंगणात बसून हरिणांनी जिथे रवंथ चालू केला आहे अशा व यज्ञीय अग्नी प्रज्वलित केला आहे असे दर्शविणाऱ्या, हुत द्रव्यांच्या गंधाने सुगंधित झालेल्या वाऱ्याने चहूकडे पसरलेल्या धुराने आश्रमा कडे येणाऱ्या अतिथींना पुनीत करणाऱ्या अशा (त्या संयमी वसिष्ठ ऋषीच्या आश्रमास दिलीप राजा सपत्नीक येऊन पोचला.)

निरनिराळया पुराणांतले ऋषींच्या आश्रमाचे वर्णन याच धर्तीचे असते.

पांडवांच्या काळात व्यास हे महर्षी होऊन गेले. परीक्षित व जनमेजय या पुढील राजांच्या काळात वैशंपायन हा ऋषी होऊन गेला. जनमेजयानंतर ऋषींची परंपरा बंद झालेली दिसते. चंद्रगुप्त मौर्य, पुष्यमित्र शुंग किंवा गुप्तराजे यांच्या काळातल्या कोणत्याही ऋषीचा पुराणांत उल्लेख नाही.

ऋषींचे प्रकार – महर्षी, ऋषी व ऋषिपुत्र असे ऋषींचे तीन भेद भट्टार हरिचंद्राने चरकसंहितेतल्या सूत्रस्थान १.७ वरील व्याख्येत सांगितले आहेत–

(१) महर्षी – हे पुढीलप्रमाणे सांगितले आहेत –

भृगुर्मरीचिरत्रिश्च ह्यङगिराः पुलहः क्रतुः ।
मनुर्दक्षो वसिष्ठश्च पुलस्त्यश्चेति ते दश ।।

वरील दहा महर्षी ब्रह्मदेवाचे मानसपुत्र असून स्वतः ईश्वर-स्वरूप आहेत. म. भा. शांतिपर्वात (२०८.४) महर्षींची नावे दहाऐवजी सात दिली असून, ती पुढीलप्रमाणे आहेत –

मरीचिरत्र्यङ्गिरसौ पुलस्त्यः पुलहः क्रतुः ।
वसिष्ठश्च महाभागः सदृशो वै स्वयम्भुवा ।।

यांना ब्रह्मसदृश्य किंवा प्रजापती असे म्हटले आहे.

(२) ऋषी– भृगवादी महर्षींच्या पुत्रांना ऋषी म्हटले असून, त्यांची नावे पुढीलप्रमाणे सांगितली आहेत–

काव्यो बृहस्पतिश्चैव कश्यपश्च्यवनस्तथा ।
उतथ्यो वामदेवश्च अगस्त्यश्चचौशिजस्तथा ।।
कर्दमो विश्रवाः शक्तिर्वालखिल्यास्तथार्वतः ।।

हे सर्व पुरुष तप केल्यामुळे ऋषिपदवीला गेले.

(३) ऋषिपुत्र – हे पुढीलप्रमाणे सांगितले आहेत –

वत्सरो नग्नहूश्चैव भरद्वाजस्तथैव च ।
ऋषिदीर्घतमाश्चैव बृहदुक्थः शरद्वतः ।
वाजश्रवाः सुवित्तश्च वश्याश्वश्च पराशरः ।
दधीचशंशपाश्चैव राजा वैश्रवणस्तथा ।

या सर्वांना ऋषिपुत्र म्हणतात. हे सत्याचरणाने ऋषि-पदवीला प्राप्त झाले.

रत्नकोशात ऋषींचे वेगळे सात प्रकार सांगितले आहेत–

सप्त ब्रह्मर्षिदेवर्षिमहर्षिपरमर्षयः ।।
काण्डर्षिश्च श्रुतर्षिश्च राजर्षिश्च क्रमावरा : ।।

भृगू, आंगिरा, इ. ब्रह्मर्षी; नारद, पर्वत इ. देवर्षी; व्यास, वसिष्ठ, इ. महर्षी; भेल, पराशर, इ. परमर्षी; तै. सं. च्या ५ कांडांचे द्रष्टे ते कांडर्षी; सुश्रुत, चरक, इ. श्रुतर्षी व ऋतुपर्ण हा राजर्षी होय. [म. ज्ञा. को.; वे. इं.; वै. वा. इ.; श. क.]

**ऋष्टी** मरुतांच्या हातांतील एक शस्त्र. हे शस्त्र म्हणजे आकाशात चमकणारी विद्युत होय. या अर्थी ऋष्टी हा शब्द ऋग्वेदात अनेक वेळा आला आहे (ऋ. १.३७.१; ५.५२.६). [वे. इं.]

**ऋष्यमूक** एक पर्वत. आनेगुंदीपासून आठ मैलांवर तुंगभद्रा नदीच्या तीरावर हा पर्वत आहे. पंपा नदी या पर्वतातच उगम पावते व नंतर पश्चिमेकडे वाहत जाऊन तुंग-भद्रेला मिळते. सुग्रीव या पर्वतावर राहत असे. याच पर्वता-वर रामचंद्राची हनुमान व सुग्रीव यांच्याशी प्रथम भेट झाली (वा. रा. किष्किंधा ४). मार्कंडेय पुराणातही या पर्वताचा उल्लेख आहे.

आधुनिक काळातील अहमदनगरपासून नळदुर्ग व कल्याणी यांच्या पलिकडे पसरलेली व मंजीरा आणि भीमा या नद्यांना विभागून जाणारी जी टेकडयांची रांग आहे, तोच प्राचीन ऋष्यमूक पर्वत होय, असे पार्जिटरचे मत आहे. [हि. जॉ. ए. इं.; हि. ध.; पु. इं.]

**ऋष्यशृंग** (१) काश्यप विभांडक ऋषीचा पुत्र. उर्वशीला पाहून विभांडक ऋषीचे रेतस्खलन झाले. ते रेत गंगेच्या पाण्यात पडले व एका हरिणीने ते पाण्याबरोबर गिळले. त्यामुळे तिला एक पुत्र झाला. ती हरिणी शापभ्रष्ट देवकन्या होती. पुत्रजन्मामुळे ती शापमुक्त होऊन स्वर्गात गेली. त्या पुत्राचे सर्व शरीर मानवासारखे होते, पण त्याच्या मस्तकी ऋष्य नामक मृगाप्रमाणे शिंगे होती, म्हणून त्याला ऋष्यशृंग

हे नाव प्राप्त झाले. वेदवेदांगांचे अध्ययन करून तो महान आचार्य झाला. याचा जन्म हरिणीपोटी झाला असला तरी, त्याला ब्रह्मर्षी मानलेले आहे.

एकदा अंग देशात अवर्षण होऊन दुष्काळ पडला. तिथल्या रोमपाद राजाने ऋष्यशृंगाला बोलावले व तो तिथे गेला तेव्हा तिथे पर्जन्यवृष्टी झाली. मग रोमपाद राजाने आपली दत्तक कन्या शांता याला दिली. ती अयोध्येचा राजा दशरथ याची कन्या होती. त्याने पुत्रकामेष्टी यज्ञ केला. त्या यज्ञाचा अध्वर्यू ऋष्यशृंग होता. त्याने मंत्रून दिलेल्या रसायनाच्या प्रभावामुळे दशरथाला चार पुत्र झाले. [ प्रा. च. को.; पु. इं. ]

(२) धर्मशास्त्रावरील एक ग्रंथकार. याचा ग्रंथ उपलब्ध नाही; पण त्याच्या ग्रंथातील आचार, आशौच, श्राद्ध, प्रायश्चित इ. विषयांवरील अवतरणे मिताक्षरा, स्मृतिचंद्रिका, इ. ग्रंथांत दिली आहेत. अपरार्कानें याचा एक श्लोक दिला आहे, तो असा –

**पूर्वनष्टां तु यो भूमिमेकश्चेदुद्धरेत् क्रमात् ।**
**यथांशं तु लभन्त्वन्ये दत्त्वांशं तु तुरीयकम् ।।**

**अर्थ**– सामायिक कुटुंबात राहणाऱ्या एका इसमाने पूर्वी गमावलेली जमीन जर स्वप्रयत्नाने परत मिळविली, तर त्याला त्यापैकी चौथा हिस्सा मिळावा व बाकीची कुटुंबातील इतर लोकांनी वाटून घ्यावी. [ हि. ध. ]

**ऋष्यशृंगाश्रम** हा आश्रम बिहारमधील भागलपूरपासून पश्चिमेस २८ मैलांवर कौशिकी नदीच्या तीरावर ऋषिकुंड या ठिकाणी मैरा (मरुक) टेकडीमुळे बनलेल्या एका दरीत होता. तिथे ऋषिकुंड नावाचे गार व गरम पाण्याच्या झऱ्यांनी बनलेले एक कुंड आहे. या कुंडाच्या उत्तर दिशेला ऋष्यशृंग व त्याचा पिता विभांडक हे दोघे तपश्चर्येला वसत असत. ऋष्यशृंग हा त्या काळातील महान आचार्य होता. चिकित्साशास्त्रातही त्याची गती होती. महाभारतात याच्या आश्रमाचा उल्लेख आहे. वनवासात असताना युधिष्ठिराने लोमश ऋषीबरोबर या आश्रमाची यात्रा केली होती. त्या वेळी तिथे दहा हजार छात्र नि:शुल्क अध्ययन करीत होते. त्यांच्या भोजनाची व वस्त्रप्रावरणाची सोयही आश्रमातर्फेच केली जात होती.

रायपूर जिल्ह्यात महानदीच्या उगमस्थळी ऋष्यशृंगाचा आश्रम होता, अशीही समजूत आहे. हा उगम सिहोर येथील टेकड्यात झाला आहे. तिथे उखळासारख्या एका खडकातून महानदी निघते. हा खळगा ऋष्यशृंग कमंडलू ठेवीत होता त्या जागी निर्माण झालेला आहे, अशी आख्यायिका सांगतात. [ हि. जॉ. ए. इं. ]

**ऋक्ष किंवा ऋक्षवत्** (१) भारतवर्षातील सात कुलपर्वतांपैकी एक. इथे अत्रीने पुत्रप्राप्तीसाठी तपश्चर्या केली. विंध्यपर्वताच्या पूर्वभागाला हे नाव आहे. या पर्वतातून शोण, नर्मदा व महानदी या नद्या उगम पावतात. याला ऋष्यवत् असेही म्हणतात. (मार्कं. पु. ५४. २४–२५; भाग. पु. ४. १. १७).

(२) मृगमंडा व पुलह या दंपतीपासून जन्मलेली एक जमात. ऋक्ष या शब्दाचे अस्वल, वानर, हरिण, इ. विविध अर्थ होतात. मात्र अस्वल हा अर्थ सामान्यत: मानला जातो. पाहा – अस्वल.

**ऌ** वर्णमालेतला नववा स्वरवर्ण. दन्त हे याचे उच्चारणस्थान आहे. हा ऱ्हस्व, दीर्घ व प्लुतही होतो. उदात्तानुदात्तस्वरित असेही याचे तीन भेद होतात. हा विद्युत्रयात्मक असून याचा वर्ण विद्युल्लतेसारखा पिवळा आहे (कामधेनुतंत्र). मातृकान्यासात उजव्या गालावर याची योजना होते. [ श. क. ]

**ॡ** वर्णमालेतला दहावा स्वरवर्ण. दन्त हे याचे उच्चारणस्थान आहे. उदात्तादिभेदांनी हा त्रिविध होतो. याचे रूप गुणत्रयात्मक असून, पूर्णचंद्रासारखे आहे (कामधेनुतंत्र). मातृकान्यासात डाव्या गालावर याची योजना होते. [ श. क. ]

**ए** देवनागरी वर्णमालेतील आठवा व संस्कृत वर्णमालेप्रमाणे अकरावा स्वरवर्ण. कंठ–ताल हे याचे उच्चारणस्थान आहे. हा उदात्तानुदात्तस्वरित अशा भेदाने त्रिविध होतो. या वर्णाला सध्याचे स्वरूप प्राप्त होण्यास स्थूलमानाने सहा अवस्थांतून जावे लागले आहे. पहिली अवस्था गिरनारच्या शिलालेखात, दुसरी इ. स. च्या सहाव्या शतकातल्या उष्णीषविजय धारणीच्या ताडपत्री पुस्तकात, तिसरी बुद्धगया येथील महानामन्च्या लेखात (इ. स. चे ६ वे शतक) चौथी कुमार गुप्ताच्या कालातील करेडांग येथील लेखात, पाचवी धार येथील कूर्मशतक या शिलाकाव्यात (इ. स. ११ वे शतक) व सहावी आपण अलिकडे लिहितो ती, अशा या सहा अवस्था होत.

एच्या रूपाचा विकासक्रम

कामधेनुतंत्रात एकाराचे वर्णन पुढीलप्रमाणे दिलेले आहे –

एकारं परमं दिव्यं ब्रह्मविष्णुशिवात्मकम् ।
रञ्जिनीकुसुमप्रख्यं पञ्चदेवमयं सदा ॥

अर्थ – एकार हा परम दिव्य असून, तो ब्रह्मविष्णुशिवात्मक व पंचदेवमय आहे. त्याचा वर्ण निळीच्या फुलासारखा आहे. मातृकान्यासात एकाराचे स्थान ओष्ठ हे मानलेले आहे. [म. ज्ञा. को.; श. क.]

**एकजटा** वज्रयानी बौद्धांची सामर्थ्यशाली देवता. ही नील-वर्ण, एकमुख, त्रिनेत्र आणि द्विभुज, चतुर्भुज किंवा अष्टभुज असते. क्वचित तिला बारा मुखे व चौवीस हात असतात. तिचे रूप भयानक असून, ती हातांत वज्र, खड्ग, कर्तरी, कपाल, बाण, परशू, उत्पल, इ. आयुधे धारण करते. हिच्या कमरेला व्याघ्रचर्म गुंडाळलेले असून, गळ्यात रुंडमाळा असतात. हिच्या मस्तकी पिंगट केस उभे असून, त्यावर अक्षोभ्याची मूर्ती असते. ही प्रत्यालीढ अवस्थेत उभी असून, यौवनसंपन्न दिसते.



एकजटा

या देवतेचा मंत्र असा –

ॐ ह्रीं नमो भगवत्येकजटे मम वज्रपुष्पं प्रतीच्छ स्वाहा।

एकजटा देवीचा हा मंत्र महाबलवान असून, त्याच्या केवळ श्रवणानेच माणसाची विघ्ने दूर पळतात. त्याच्या शत्रूंचा नाश होतो आणि त्याला वैभव प्राप्त होते. [इं. बु. इ.]

**एकटी तृतीया** परधान या आदिवासींचा एक धार्मिक सण. वैशाख शु. तृतीयेस हा सण येतो. या दिवशी मुली कापडाच्या बाहुल्या बनवितात व त्यांची लग्ने लावतात. मोठ्या माणसांची पद्धत याहून वेगळी असते. गावचा गुणिया पहाटे उठून गावाबाहेरच्या झऱ्यावर जातो व एक नवे मडके पाण्याने भरून घेऊन आपल्या शेतात जातो. तिथे गावकऱ्यांनी मातीची मोठी पाच ढेकळे आणून ठेवलेली असतात. ही पाच ढेकळे म्हणजे पावसाळ्याची पाच महिन्यांची प्रतीके होत. नंतर पाण्याच्या मडक्याला खाली एक भोक पाडून त्यात कापडाचा बोळा बसवितात. त्या मडक्यावर दुसरे एक लहान मडके ठेवून त्यात पणती पेटवून ठेवतात. मग गुणिया धूपदीप दाखवून त्या मडक्याची पूजा करतो व हळदीत बुडविलेला एक दोरा त्याच्या गळ्यात बांधतो. मग गावचा पाटील आपल्या दंताळ्यासह त्या मडक्याला पाच व इतर शेतकरी आपल्या बैलासह तीन प्रदक्षिणा घालतात. नंतर ती मडकी मातीच्या ढेकळांवर ठेवून लोक घरोघर जातात. दुसऱ्या दिवशी सकाळी पुन्हा ते लोक शेतात येतात. मडक्यातल्या पाण्याने जर खालची ढेकळे भिजली नाहीत, तर त्या वर्षी दुष्काळ पडणार, असे समजतात. जर दोन किंवा तीन ढेकळे ओली झाली, तर तितके महिनेच चांगला पाऊस पडेल, असे मानतात. पाहा – परधान. [दि परधान्स]

**एकतारी** एक प्राचीन व साधे तंतुवाद्य. एका पोकळ भोपळ्यात एक अडीच-तीन फूट लांबीची पोकळ बांबूची काठी बसवितात व तिला एक तार जोडतात. ही तार बोटाने वाजवितात. एकच तार बसविलेली असते म्हणून या वाद्याला एकतारी असे नाव मिळाले असले, तरी क्वचित या वाद्याला दोन ताराही असतात. संस्कृत ग्रंथांत हिला एकतंत्री वीणा असे नाव आहे. ही तीन भिन्न प्रकारे वाजवता येते. एकतारी हे ऐतिहासिक दृष्ट्या तंबोऱ्याचे पूर्वरूप आहे. साधू, बैरागी, गोसावी, वारकरी इ. लोक या वाद्याच्या सुरावर अभंग, भजने व पदे गातात. उजव्या हाती एकतारी व डाव्या हाती तालासाठी चिपळ्या घेऊन गाणी म्हणायचीही पद्धत आहे. [परंपरा–लोकगीत; सु. वि. को.; इं. म्यु. इं.]

**एकद्यू नौधस** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या आठव्या मंडलातील ऐंशी क्रमांकाचे सूक्त याच्या नावावर आहे. इंद्रस्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. याची एक ऋचा (८.८०.८) अशी –

मा सीमवद्य आ भागुर्वी काष्ठा हितं धनम् ।
अपावृक्ता अरत्नय : ॥

अर्थ – (हे इंद्रा), रणांगणात आणि युद्धात शत्रुसंहार करून आम्हा निष्पाप भक्तांची कीर्ती तू निष्कलंक कर.

कोणत्याही व्यक्तीला चार नावे असतात असा – एक उल्लेख या सूक्तात आहे (८.८०.९). सायणभाष्यमते नक्षत्रनाम, गुह्यनाम, व्यावहारिक नाम आणि यज्ञकर्तृत्व नाम ही ती चार नावे असावी.

प्रस्तुत सूक्तात कवीचे नाव असून (८.८०.१०) तो नोधापुत्र आहे. [प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ.]

**एकधना** एक यज्ञीय पात्र. हे घागरीसारखे असते. प्रात:सवनाच्या प्रारंभी विषम संख्येने या एकधना भरून ठेवण्याचा विधी करतात. सोम कुटून झाल्यावर एकधनांमधले पाणी त्यात मिसळतात. निरनिराळ्या सोमयागांत एकधनांची

संख्या भिन्न भिन्न असते. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**एकनक्षत्र-जननशांती** एकाच नक्षत्रावर दोन भावांचा किंवा पितापुत्रांचा जन्म झाला, तर ती गोष्ट अशुभ होय, असे मानतात.

ह्या दोष दूर करण्यासाठी ही शांती करतात. पिता व बालक यांचे नक्षत्र एक असल्यास प्रथम गोमुखप्रसवशांती करून नंतर वरील शांती करतात. या शांतीचा विधी असा –

पुण्याहवाचन झाल्यावर ईशान्येला एक कलश मांडून त्यावरील पूर्णपात्रात ज्या नक्षत्रावर बालक जन्मले असेल, त्या नक्षत्रदेवतेची स्थापना करतात. तिच्या बरोबरीने अन्य देवतांचेही स्थापन व आवाहन करून सर्वांची यथाविधी पूजा करतात. नंतर अग्निस्थापना करून त्या त्या नक्षत्रदेवतेसाठी प्रयोगात सांगितल्याप्रमाणे प्रधानहोम करतात. प्रायश्चित्त-होम झाल्यावर अभिषेक करतात. शेवटी ऋत्विजांना दक्षिणा देऊन कर्म समाप्त करतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**एकनाथ** (इ. स. १५३३ ते १५९९) महाराष्ट्रांतील एक प्रख्यात संत व कवी. हे भानुदास या प्रसिद्ध संतांचे पणतू होत. भानुदास–चक्रपाणि–सूर्यनारायण–एकनाथ अशी ही वंशवेल आहे. सूर्यनारायणांच्या पत्नीचे नाव रुक्मिणी असे होते. या दांपत्याच्या पोटी पैठण येथे नाथांचा जन्म झाला. तो नेमका कोणत्या साली झाला, याबद्दल विद्वानांत मतभेद आहेत. श्री. ल. रा. पांगारकरांच्या मते इ. स. १५२८ च्या सुमारास, तर श्री. वि. ल. भावे यांच्या मते इ. स. १५४८ साली नाथ जन्मले. त्यांच्या जन्माच्या वेळी मूळ नक्षत्र होते, असे सांगतात.

या संबंधात नाथांनी स्वतःच्या जन्मावर एक अभंग रचला आहे, तो असा –

**मुळींच्या मुळीं एका जन्मला ।**
**मायबापें थोर धाक घेतला ।।**
**कैसें मूळ नक्षत्र आलें कपाळा ।**
**स्वयें लागलों दोहींच्या निर्मूळा ।**
**शांति करितां अवघ्यांची शांति ।**
**मुळीं लागोनियां लाविली ख्याति ।**
**एका जनार्दनी मुळींच्या गोष्टी ।**
**मायेसगट सगळा बापचि घोटी ।।**

या अभंगाचा आध्यात्मिक अर्थ बाजूला ठेवला, तरी नाथांचे चरित्र त्यातून थोडेफार पाहता येते. मूळ नक्षत्रावर जन्मलेल्या नाथांचे आईबाप त्यांच्या बालपणीच निर्वतले व त्यामुळे त्यांचे संगोपन त्यांचे आजोबा चक्रपाणी यांना करावे लागले. वयाच्या सहाव्या वर्षी मौंजीबंधन झाल्यावर तत्कालीन पद्धतीप्रमाणे संस्कृत भाषा व नित्य-नैमित्तिक ब्रह्मकर्मे याचे शिक्षण नाथांना मिळाले. पुढे वयाच्या बाराव्या वर्षी घरात कोणालाही न सांगता ते सद्गुरूच्या शोधार्थ घराबाहेर पडले व देवगिरी येथे जनार्दनस्वामींकडे जाऊन राहिले. प्रपंच साधून परमार्थाचा लाहो कसा घ्यावा, हे जनार्दनस्वामींनी आपल्या आचरणाने नाथांना शिकविले. एकनाथांना देवगिरीवर गुरुमुखाने ज्ञानेश्वरीच्या श्रवणाचा लाभ झाला. सहा वर्षे गुरुसान्निध्यात राहिल्यावर मग नाथांना 'सुलभ' पर्वतावर ईश्वरसाक्षात्कार झाला. नंतर हे गुरुशिष्य तीर्थयात्रेला निघाले. पंचवटीच्या मुक्कामात नाथांनी स्वामींच्या आज्ञेवरून चतुःश्लोकी भागवतावर ओवीबद्ध प्राकृत टीका लिहिली. नाथांच्या काव्यरचनेला प्रारंभ झाला, तो इथून. पुढे आणखी काही तीर्थांची यात्रा करून जनार्दनस्वामी देवगिरीला परतले व नाथ एकटेच तीर्थयात्रा करू लागले. उत्तर व दक्षिण भारतातील अनेक स्थळांचे दर्शन घेऊन व तत्कालीन देशस्थितीचे अवलोकन करून नाथ वयाच्या पंचविसाव्या वर्षी पुन्हा पैठणला आले.

जनार्दनस्वामींच्या आदेशाने पुढे नाथांनी विवाह केला व गृहस्थाश्रम थाटला. नाथांची पत्नी गिरिजाबाई ही अत्यंत सुशील व आदर्श पतिव्रता होती. प्रपंचात राहूनही नाथांनी उत्कृष्ट परमार्थ साधला, याचे बरेचसे श्रेय गिरिजाबाईंना द्यायला हवे. नाथांनी आपल्या घरी सदावर्त ठेवले होते. दारी आलेल्या अतिथ-अभ्यागताची व्यवस्था ते घरच्यासारखीच ठेवीत. हे सर्व करीत असतानाही नामस्मरण, कथाकीर्तन, अध्यात्मविवेचन व ग्रंथलेखन हा त्यांचा परमार्थाचा उद्योग नित्य चालू होता.

नाथांच्या चरित्रात काही अलौकिक चमत्कारांच्या कथा आहेत. त्यांपैकी काही अशा –

(१) नाथांच्या देवडीवर दत्तात्रय स्वतः चोपदार होऊन पहारा करीत असे. जनार्दनस्वामी व दासोपंत यांना दत्तात्रयाचे दर्शन इथेच झाले.

(२) श्रीखंड्याच्या रूपाने श्रीकृष्ण स्वतः नाथांच्या घरी बारा वर्षे सेवाचाकरी करून राहिला होता.

(३) वडिलांच्या श्राद्धतिथीला केलेला स्वयंपाक नाथांनी भुकेल्या अस्पृश्यांस वाढला हे ऐकून ब्राह्मण रागावले व त्यांनी नाथांवर बहिष्कार टाकला. तेव्हा नाथांनी आपल्या पितरांना आवाहन करून भोजन घातले.

एकनाथांनी ग्रंथरचनेचा उद्योग आयुष्यभर चालू ठेवला होता. त्यांनी भागवतपुराणाच्या एकादश स्कंधावर टीका लिहायला

घेतली होती. तिचे पाच अध्याय इ. स. १५७० मध्ये लिहून पुरे झाले. भागवतासारख्या पवित्र ग्रंथावर नाथांनी प्राकृत टीका लिहावी, हे त्या वेळच्या काशीच्या कर्मठ पंडितांना आवडले नाही व त्यांनी नाथांना काशीला बोलावून त्यांना अपमानकारक वागणूक दिली. परंतु पुढे नाथांचे महत्त्व त्यांना कळून आले आणि इ. स. १५७३ साली जेव्हा काशीक्षेत्री भागवताच्या टीकेची समाप्ती झाली, तेव्हा काशीतल्या पंडितांनी त्या ग्रंथाची पालखीतून मिरवणूक काढली. काव्यदृष्टया हा ग्रंथ सरस असल्यामुळे त्याला मूळ भागवताचे नाव मिळाले व एकनाथी भागवत म्हणून त्याची प्रसिद्धी झाली. याशिवाय नाथांनी भावार्थरामायण, रुक्मिणी-स्वयंवर हे ग्रंथ लिहिले व असंख्य भारुडे, पदे इ. काव्यरचना केली.

नाथांच्या काळी ज्ञानेश्वरांनी समाधी घेतल्याला तीनशे वर्षे होऊन गेली होती. मध्यंतरीच्या काळात आळंदीला समाधिस्थानी मोठे रान माजले होते व त्या ठिकाणी ज्ञानेश्वरांची समाधी आहे, ही गोष्टही लोक विसरून गेले होते. एकनाथांना एका रात्री ज्ञानेश्वरांचा दृष्टान्त झाला व ते आपल्याबरोबर बरीच मंडळी घेऊन आळंदीला गेले. ज्ञानेश्वरांच्या समाधीचे द्वार उघडून त्यांनी समाधिस्थानात प्रवेश केला. तिथे त्यांनी पाहिले, की अजानवृक्षाची मुळी ज्ञानेश्वरांच्या गळयाला लागली आहे. मग नाथांनी ती मुळी काढून टाकली. ही आख्यायिका वारकरी मंडळीत लोकप्रिय आहे. त्याच वेळी ज्ञानेश्वरीची शुद्ध प्रत तयार करण्याचा आदेश ज्ञानेश्वरांनी नाथांना दिला, असेही वारकरी समाजात मानले जाते.

पुढे नाथांनी ज्ञानेश्वरीच्या अनेक हस्तलिखित पोथ्या जमवून तिची एक संशोधित शुद्ध आवृत्ती तयार केली. महाराष्ट्रात सध्या जी ज्ञानेश्वरी प्रचलित आहे, तीच नाथसंशोधित आवृत्ती होय.

नाथांना एकूण चार अपत्ये झाली. त्यांपैकी सर्वांत मोठा हरिपंडित. हा मोठा विद्वान व संस्कृत भाषेचा अभिमानी होता. त्यामुळे सुरुवातीला त्याने नाथांच्या लोकाभिमुख वृत्तीला व त्यांच्या मराठी ग्रंथरचनेला बराच विरोध केला; पण नंतर पित्याची थोरवी पटल्यामुळे त्याचा तो विरोध मावळला. त्यांची थोरली मुलगी गोदा ही पैठणच्या मुद्‌गलांकडे दिली होती. कविवर्य मुक्तेश्वर हा तिचाच मुलगा होय.

एकनाथांच्या भारुडांतून व भावार्थरामायणातून तत्कालीन मुसलमानी अंमलाखालील महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक व आर्थिक दुरवस्थेचे चित्रण थोडे-फार पाहायला मिळते. त्यांच्या वेळी धार्मिक क्षेत्रांत दांभिकांच्या कारवायांना ऊत आला होता. नाथांनी या संधिसाधूंचा चांगला समाचार घेतला आहे. नाथांना तत्कालीन समाजाच्या अधोगतीची खंत वाटली व ते लोकोद्धारार्थ उभे ठाकले. कथाकीर्तने व वाङ्मयरचना करून त्यांनी ते कार्य सुरू केले व तत्कालीन बहुविध व बहुरंगी समाजाला भागवतधर्माच्या सूत्रात गोवून त्याला भक्तिमार्गाला लावले. गृहस्थाश्रमात राहूनही संतवृत्ती आचरिता येते, हे नाथांनी स्वतःच्या उदाहरणाने लोकांना पटवून दिले. प्रपंच हाच परमार्थरूप करणारा नाथांसारखा संतपुरुष विरळाच आढळेल.

एकनाथांच्या थोरवीचे रहस्य त्यांनी निर्मिलेल्या ग्रंथसंपत्तीत तर आहेच; शिवाय ज्या परिस्थितीत भागवतधर्माचा प्रसार करून महाराष्ट्राची विस्कळित घडी पुनश्च ठीक बसविण्याचा त्यांनी प्रयत्न केला, त्यातही आहे. त्यांच्या कार्याचे परिस्थितिनिरपेक्ष मूल्यमापन करणे एकांगी ठरेल. ज्ञानेश्वरांच्या नंतर महाराष्ट्रावर संकटांची परंपराच कोसळत गेली. स्वराज्याचा अस्त झाल्यामुळे समाजाची घडीच विस्कटली. संतांच्या भागवतधर्माने अठरापगड जातींत धर्माविषयीचा अभिमान व सच्चारित्र्याविषयीची निष्ठा जागृत केली होती हे खरे; परंतु ही निष्ठा खोलवर रुजण्यापूर्वीच परचक्र आले आणि साराच डाव उधळला गेला. धर्म उत्सन्न होण्याच्या मार्गाला लागला. सारा समाज हतप्रभ झाला. अशा आणीबाणीच्या परिस्थितीत धर्माचा ध्वज फडकत ठेवण्याचे महनीय कार्य नाथांनी केले.

डॉ. रा. चिं. ढेरे यांनी सन्त एकनाथमहाराजांना महाराष्ट्रमहोदयाचा अग्रदूत म्हटलेले आहे. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासात ज्ञानेश्वरांच्या खालोखाल महनीय स्थान भूषविणारे संत म्हणजे एकनाथ हेच होत. त्यांनी ज्ञानेश्वरांचा वारसा समर्थपणे सांभाळून तो अधिक समृद्ध बनविला आणि आपल्या व्यापक अनुभवांची व सखोल चिंतनाची शिदोरी भावी पिढ्यांच्या हाती देऊन महाराष्ट्रमहोदयाची पार्श्वभूमी निर्माण केली. ज्ञानेश्वरांनंतर महाराष्ट्रातील समाजजीवन इस्लामी आक्रमणाने सर्वांगांनी उद्ध्वस्त केले होते. ते आपल्या पूर्ववैशिष्टयांनिशी संजीवित करण्यात नाथांचा मोठा वाटा आहे. म्हणून नाथांचे चरित्र हे केवळ एका पारमार्थिकाचे चरित्र नसून, नवयुगाचा वेध घेऊ पाहणाऱ्या या संक्रमणावस्थेतील समाजजीवनाचे प्रातिनिधिक चरित्र आहे.

रामदास आणि तुकाराम या दोन्ही शिवकालीन संतांवर एकनाथांचा विलक्षण प्रभाव पडलेला दिसतो. एकप्रकारे एकनाथ म्हणजे रामदास अधिक तुकाराम. भागवत धर्मातील भावपक्षाचे प्राबल्य तुकोबांच्या जीवनात दिसते, तर कर्म-पक्षाचे प्राबल्य समर्थ रामदासांच्या जीवनात दिसते. एकनाथांची भावार्थरामायणातील राम-चरित्रामागची भूमिका समर्थांनी पुरस्कारिली आहे. समर्थांनी ज्या 'रामवरदायिनी' तुळजाभवानीच्या भक्तीचा पुरस्कार केला, त्या तुळजाभवानीला रामकथेत

प्रतिष्ठा प्रथम नाथांनीच दिली होती. नाथांची लोकसंग्रहाची वृत्ती समर्थांच्या आक्रमक संघटनेत परिणती पावली आहे. दासबोधातील पारमार्थिक विचारांच्या क्षेत्रातही समर्थांनी एकनाथांच्या वाणीचे अनुकरण अनेक ठिकाणीं केलेले आहे.

संत तुकाराममहाराज हे जणू नाथांचे मानसपुत्र आहेत. एकनाथी भागवत आणि एकनाथांचा गाथा यांचा तुकोबांच्या वाणीवर विलक्षण प्रभाव आहे. नाथांच्या भागवतधर्मातील सदाचार, सत्यनिष्ठा, समत्वबुद्धी आणि सर्वांभूतीं भगवंत पाहणारे आत्मौपम्य तुकोबांच्या जीवनात आणि वाणीत नव्या सामर्थ्याने अवतरले आहे. एकनाथी भागवतातील कितीतरी ओव्या तुकोबांच्या अभंगांचे चरण बनलेल्या आहेत.

थोडक्यात निष्कलंक चारित्र्य, विवेक, औदार्य, भूतमात्रा-विषयी कळवळा, सत्याशी प्रामाणिक राहून समन्वय साधणे, प्रपंच आणि परमार्थ एकरूप करू शकणारी साधना, लोक-संग्राहकता, अधर्माच्या निखंदनाची ओढ आणि प्रेरक व प्रासादिक वाणी या वैशिष्ट्यांमुळे नाथांचे चरित्र आणि चारित्र्य प्रातः-स्मरणीय बनले आहे.

एकनाथांनी अध्यात्मावर लहानमोठे असे आठ-दहा ग्रंथ लिहिलेले आहेत. चतुःश्लोकी भागवत हा त्यांचा पहिला ग्रंथ. यानंतर त्यांनी हस्तामलक, शुकाष्टक, स्वात्मसुख, आनंदलहरी, गीतासार, आनंदानुभव, नाथभागवत, रुक्मिणीस्वयंवर, भावार्थ-रामायण, हे ग्रंथ लिहिले. याशिवाय ध्रुव, प्रल्हाद, उपमन्यू, सुदामा, ज्ञानेश्वर, नामदेव, चोखामेळा, इ. भक्तांची व संतांची चरित्रेही त्यांनी लिहिली आहेत. त्यांनी रचलेली पदे व अभंग हे वारकऱ्यांच्या व अन्य पारमार्थिकांच्या परिचयाचे आहेत. त्यांच्या अभंगांची गाथा तुकोबांच्या गाथेएवढीच भरेल. त्यांनी जी भारुडे रचली आहेत, ती विशेष लोकप्रिय आहेत. जनता भक्तिज्ञानाला सन्मुख व्हावी, तिला आत्मकल्याणाचा मार्ग साप-डावा व संसार करीत असतानाच जीवाने परमात्मसुख भोगावे, या हेतूने नाथांनी हे सारे वाङ्मय निर्माण केले आहे.

**चतुःश्लोकी भागवत**—हे मूळ भागवताच्या दुसऱ्या स्कंधाच्या नवव्या अध्यायात आहे. मुळात याचे ४५ श्लोक आहेत व नाथांनी त्याच्या स्पष्टीकरणार्थ हजारावर ओव्या लिहिल्या आहेत. हे प्रकरण नाथांनी गोदावरीच्या उत्तरतीरी चंद्रगिरी-वर चंद्र नामक ब्राह्मणाच्या घरी वस्तीस असताना लिहिले.

ब्रह्मदेवाला आदिनारायणाने सृष्टी निर्माण करण्याची आज्ञा केली असता हे कार्य आपल्या हातून कसे पार पडेल, याची ब्रह्मदेवाला चिंता पडली. तेव्हा उदकातून 'तप तप' = तप कर, असा ध्वनी निघाला. ब्रह्मदेवाने त्याप्रमाणे तपश्चर्या केली. त्यावर भगवान प्रसन्न झाला व त्याने ब्रह्मदेवाला दर्शन देऊन चार श्लोकांत आपले गुह्य ज्ञान सांगितले. याच विषयावर नाथांनी हे अत्यंत रोचक असे भाष्य लिहिले आहे. भगवान सांगतो, की सृष्टीच्या आदिमध्यावसानी एका नारायणावाचून दुसरे काहीही नाही –

तेंवि नामरूपसंबंध । जाऊनि भूतभौतिकभेद ।
अंतीं उरें मी परमानंद । स्वानंदकंद निजरूपें ॥
ज्याचें नांव म्हणिजे लुगडें । तें पाहों जातां सूतचि उघडें ।
तेंवि जग पाहतां धडफुडें । अति चोखडें चिद्रूप माझें ॥
यालागीं सृष्टिआदि मीच असें । सृष्टिरूपीं मीचि भासें ।
अंतीं सृष्टिचेनि नाशें । म्यां उरिजे अविनाशें सच्चिदानंदें ॥

**हस्तामलक**–'नाहं मनुष्यो न च देवयक्षो' या शंकराचार्य-कृत १४ श्लोकांच्या स्तोत्रावर नाथांनी हे ६७४ ओव्यांचे भाष्य केले आहे. नाथांच्या हृदयातील गुह्य ज्ञान या ग्रंथाच्या मिषाने प्रकट झाले आहे, असे म्हटले पाहिजे. यात आत्म-स्वरूपाचे वर्णन पुढीलप्रमाणे केलेले आहे –

आकाश न माखे काजळें । आत्मा न माखे मोहमळें ।
आकाश न जळे अग्निज्वाळें । आत्मा क्रोधानळें संतापेना ॥
आकाश न भिजे पाउसें । आत्मा न माखे विषयरसें ।
नभ शून्यत्वें व्यापक असे । आत्मा चिदंशें स्वानंदपूर्ण ॥

**शुकाष्टक** – 'निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ।' असा चतुर्थ चरण असलेले एक शुककृत अष्टक प्रसिद्ध आहे. त्यावर नाथांची ही टीका आहे.

**स्वात्मसुख**–या ग्रंथाच्या नावारूनच त्यातील वर्ण्य विषयाची कल्पना येईल.

**आनंदलहरी** – सुमारे १५० ओव्यांचे हे एक छोटे प्रकरण असून, त्यात आत्म्याचे आनंदरूप कळून आल्यावर बंध-मोक्ष, स्वर्ग-नरक, सगुण-निर्गुण इ. सर्व भाषा मावळते व भ्रांती नष्ट होते असे म्हटले आहे. त्यातील काही ओव्या अशा –

निजस्वरूप पाहतां दृष्टी । निजानंद न समाये सृष्टी ।
तुटल्या जन्ममरणाच्या गाठीं । निर्भय पोटीं मी जालों ॥
बंधमुक्तीची आटाआटी । संचरली होती माझ्ये पोटीं ।
होता तुझी कृपादृष्टी । उठाउठी पळाली ॥

याशिवाय, नाथांनी दशावतार, एकादशीमाहात्म्य, रुक्मां-गदाची कथा, तुलसीमाहात्म्य, हनुमानजन्म, सांदीपनीकथा, शिवपार्वतीविवाह, गंगागौरीकलह, इ. पौराणिक कथानके व आख्याने सोप्या अभंग वृत्तात वर्णिली आहेत. [ म. वा. इ.; ना. भा. ध.; प्रा. म. सं.; ए. द.; विविधा ]

**एकनाथी भागवत** भागवतपुराणाच्या एकादशस्कंधावर एकनाथांनी मराठी ओवीबद्ध टीका

लिहिली व पुढे ती एकनाथी भागवत या नावाने प्रसिद्धी पावली. हा ग्रंथ म्हणजे नाथांच्या वाङमयरत्नमालेतला मेरु-मणीच होय. तो सागराप्रमाणेच गंभीर, विशाल व रत्नगर्भ आहे. या ग्रंथाची ओवीसंख्या १८८४६ इतकी आहे. संत जनार्दनस्वामी व साक्षात दत्तात्रय यांच्या प्रेरणेने आपण हा ग्रंथ लिहायला प्रवृत्त झालो, असे नाथ म्हणतात. पैठण येथे या ग्रंथाचा प्रारंभ होऊन त्याचे पहिले पाच अध्याय लिहिले गेले. पुढे त्यांना काशीतल्या एका स्वामीचे बोलावणे आल्यावरून एकनाथ काशीस गेले व पुढचा सर्व ग्रंथ काशीतच पुरा झाला.

एकनाथ हे वारकरी संप्रदायातले विठ्ठलाचे उपासक होत. वारकरी संप्रदायाचेच भागवत धर्म असे दुसरे नाव आहे. एकनाथांनी आपल्या या ग्रंथात भागवत धर्माचे जागोजाग विवरण केले असून, ते उपमा-दृष्टान्तांनी सजविले आहे. दुसऱ्या अध्यायात भागवत धर्माचे सार ते पुढीलप्रमाणे सांगतात –

**मनें करावें हरीचें ध्यान । श्रवणें करावें कीर्तिश्रवण ।**
**जिव्हेनें करावें नामस्मरण । हरिकीर्तन अहर्निशीं ।।**
**करीं करावें हरिपूजन । चरणीं देवालयगमन ।**
**घ्राणीं तुलसी आमोदग्रहण । जिहीं हरिचरण पूजिले ।।**
**घाढतेनि सद्भावें जाण । चढतेनि प्रेमें पूर्ण ।**
**अखंड ज्यासी श्रीकृष्णभजन । त्यासी भवबंधन असेना ।।**
**भागवत धर्माचिये स्थिती । बाळीं भोळीं भवाब्धि तरती ।**
**सुखोपायें ब्रह्मप्राप्ति । होय निश्चिती सकळिकां ।।**

कवित्वापेक्षा भागवताचा अर्थ सुगम करून सांगण्याकडे नाथांनी अधिक लक्ष पुरविले आहे. ज्ञानेश्वरीत आढळतात, तशा बुद्धीला थक्क करून सोडणाऱ्या विशाल कल्पना नाथांच्या भागवतात आढळणार नाहीत; पण वेदान्तासारखा गहन विषय सुगम करून सांगणारी शैली नाथांनी आत्मसात केली आहे. ज्ञानेश्वर आणि एकनाथ यांच्या शैलीची 'महाराष्ट्र सारस्वत'-कार तुलना करतात, ती अशी – 'आपल्या बोलाला रूप द्यावे, अतींद्रिय असले तरी ते इंद्रियांना भोगवावे ही ज्ञानेश्वरांची हातोटी व जे शब्दरूपाने दिसते आणि इंद्रियांनाच जाणता येते, ते सामान्य माणसांनाही वागविता येईल असे करावे, ही एकनाथांची युक्ती.' नाथांच्या भागवतधर्माचे संकलित स्वरूप थोडक्यात पुढीलप्रमाणे सांगता येईल –

कलियुगात अधर्माचरणी राजे फार झाले. या राजांना धर्म आणि नीती यांची चाड राहिली नाही. त्यांनी प्रजेची नागवण चालविली आहे. हा अनर्थ भगवंतास सहन होत नाही. म्हणून पूर्वीच्या काळात भगवंताने धर्मरक्षणार्थ अवतार घेतले, त्या प्रमाणे याही युगात भगवंताने विठ्ठलरूपाने अवतार घेतला. भगवंताच्या अवताराच्या योगाने प्रकट होणारा धर्म म्हणजे याज्ञिकांचा धर्म नसून, भागवतधर्म हा आहे. भगवंताच्या भक्तांनी आचरिलेला व भगवंताने उपदेशिलेला हा धर्म सुलभ आणि सोपा आहे. या धर्मात बुडण्याचा धोका नाही. भक्ति-भावाने स्वधर्माचरण केले म्हणजे भोळ्या-भावड्यांना भवाब्धी तरून जाता येते. इतकेच नव्हे; तर ब्रह्मप्राप्तीही होते. भक्तीचे आचरण करणारा भक्त हा सर्व कर्म अहेतुक करीत असतो. स्वधर्माचरण करणे, हे परमेश्वराचे शुद्ध भजन आहे. या भज-नाने परमेश्वर प्रसन्न होतो. निष्काम कर्मयोगाने सर्वांभूतीं भगवद्भाव जागृत झाल्यावर त्याच्या ठिकाणी श्रेष्ठ-कनिष्ठ हा भाव राहत नाही.

या वृत्तीत भक्त मुरला म्हणजे त्याला 'जनीं जनार्दन' हा प्रत्यय येतो. हा प्रत्यय सकल उपनिषदांचे सार आहे. ज्ञान या प्रत्ययाहून वेगळे नाही. या अवस्थेत नामरूपातीत सत्तत्त्वाशी भक्त एकरूप होतो. ज्ञानी भक्त केवळ स्वतःच्या उद्धाराने संतुष्ट होत नाही. दीनोद्धरणाचे कार्य केल्याखेरीज त्याच्या आत्मोद्धारास पूर्णता येत नाही. लौकिक कर्म करूनही तो कर्मबंधनाने बद्ध होत नाही. प्रपंच करूनही तो प्रपंचातीत असतो. किंबहुना त्याचा प्रपंचच परमार्थरूप होतो.

नरदेह हा परम पावन आहे. त्याचा विनियोग विषयसुखार्थ न करता परमार्थसाधनेसाठी केला पाहिजे. भागवतधर्मात स्वधर्म आणि स्वकर्म यांचे ऐक्य साधलेले असते. म्हणून भागवत-धर्मीय संत आश्रमधर्माचे पालन करतात. ते कर्म करतात, पण कर्मठ होत नाहीत; तर कर्मातीत होतात. ते स्वधर्मकर्मातच ब्रह्मप्रतीतीचा अनुभव घेत असतात. [ए. द.; ना. भा. ध.]

**एकपत्नी प्रथा** पुरुषाला एका वेळी एकच पत्नी असावी, असे बंधन प्राचीन काळी नव्हते, आणि या शतकाच्या पूर्वार्धातही नव्हते. पूर्वी कोणताही पुरुष एक पत्नी जिवंत असताना दुसऱ्या स्त्रीशी विवाह करू शके. धर्म-शास्त्राची त्याला मान्यता होती. तथापि अनेक स्त्रियांशी संसार करणाऱ्या पुरुषांची संख्या पूर्वी अल्पच होती. बहुसंख्य पुरुष एकपत्नी व्रताचे पालन करीत. काही पुरुष पत्नीवरील प्रेमामुळे तिच्याशी एकनिष्ठ असतील; काही जण आर्थिक परिस्थितीमुळे तसे राहत असतील. एका पत्नीला मूल होत नसेल तर दुसरी पत्नी करावी, अशी चाल होती. पाहा–पति-पत्नी.

**एकपाठी** कोणताही ग्रंथ एकदा ऐकल्यावर मुखोद्गत होणे याला एकपाठ म्हणतात. अशा प्रकारचे एकपाठी होण्याचे विधान सामविधानब्राह्मणात पुढीलप्रमाणे सांगितले आहे – प्रथम तीन दिवस उपवास; नंतर सोमरस किंवा सोम-

वल्लींची फुले पाण्यात मिसळून किंवा चुरडून ते पाणी अभिमंत्रित करून एक वर्ष प्राशन करणे.

## एकपाद

एक प्राचीन जमात. म. भा. च्या सभापर्वात यांचा उल्लेख येतो (४७.१६). यांच्याविषयी फार थोडी माहिती मिळते. पांडवांच्या दिग्विजययात्रेत सहदेव दक्षिण दिशा जिंकायला गेला असता ताम्रक द्वीप व रामक पर्वत यांच्या पुढे हे एकपाद लोक सहदेवाला भेटल्याचे वर्णन आहे (म. भा. सभा. २८.४७). यांना जिंकल्यावर मग त्याने शूर्पारक जिंकले. यांना 'वनवासी' म्हटले आहे. त्यावरून हे लोक उत्तर कर्नाटकातल्या बनवासी प्रदेशातले रहिवासी असावे. हे लोक चालण्यात घोड्याहूनही वेगवान होते, असे मॅगॅस्थनीज म्हणतो. यांनी राजसूय यज्ञात युधिष्ठिराला सोन्याचांदीचा नजराणा दिला होता, असे सभापर्वात म्हटले आहे. [ ना. प्र. प. विक्रमांक १९४३ ].

## एकपाद उत्थानपादासन

जमिनीवर चटई पसरून उताणे झोपतात व हात कंबरेच्या दोन्ही बाजूंना ठेवतात. नंतर श्वास फुप्फुसांत भरून घेऊन उजवा पाय गुडघ्यात न वाकविता सुमारे दोन फूट वर उचलतात. उचललेला पाय पुढच्या बाजूस ताणतात. सहजपणे जितका वेळ



एकपाद उत्थानपादासन

श्वास रोखून धरता येईल, तितका वेळ पाय वर ठेवतात व मग हळूहळू खाली आणतात. श्वासही हळूहळू बाहेर सोडतात. नंतर पुन्हा फुप्फुसात श्वास भरून घेऊन डावा पाय वर उचलतात. या आसनामुळे पायांतील रक्ताभिसरण योग्य रीतीने होऊन पायाची सूज व गुडघ्यांतील दुखणे कमी होते. [ उ. यो. द. ]

## एकपाद पवनमुक्तासन

जमिनीवर उताणे झोपून डावा पाय सरळ ठेवतात व उजवा पाय गुडघ्यात दुमडून छाती व पोट यांवर दोन्ही हातांनी दाबून धरतात. नंतर डोके वर उचलून गुडघ्याला तोंड लावतात. या वेळी सर्व शरीर ताणलेल्या स्थितीत ठेवतात पाच वेळा श्वासोच्छ्वास होईपर्यंत गुडघा दुमडलेल्या स्थितीत ठेवतात व नंतर श्वास आत घेऊन पाय सरळ करतात. नंतर श्वास बाहेर सोडून डावा गुडघा दुमडतात. या आसनाने शरीरातील मेद व वात कमी होतो. [ उ. यो. द. ]

## एकपाद भुजासन

दोन्ही पाय ताठ पसरून बसतात व उजवा पाय गुडघ्यापासून वळवून उजव्या खांद्यावर ठेवतात. दोन्ही हातांचे तळवे कमरेच्या दोन्ही बाजूंना जमिनीवर टेकतात व श्वास आत घेऊन त्यांच्या आधाराने सर्व शरीर जमिनीपासून वर अधांतरी उचलतात. या वेळी डावा पाय गुडघ्यात वाकू देत नाहीत. शरीर व डोके ताठ ठेवतात. नंतर डाव्या पायानेही अशीच क्रिया करतात. या आसनाने अंतर्गळ, यकृतविकार, गुडघ्याची सूज व खांद्यातील वेदना नाहीशा होतात. [ उ. यो. द. ]

## एकपादमूर्ती

शिवमूर्तीचा एक प्रकार. या प्रकारात शिव एका पायावर उभा असून, त्याच्या डाव्या-



एकपादमूर्ती

उजव्या कुशीतून अनुक्रमे विष्णू व ब्रह्मा हे हात जोडून बाहेर आलेले दाखविलेले असतात. कारणागम ग्रंथात हे शिवाचे

खेळकर रूप मानलेले आहे. ऋग्वेदात एकादश रुद्रांपैकी एकाचे नाव अज एकपाद असे आहे. त्या नावावरून ही मूर्ती केलेली असावी. ही शिवप्रधान त्रिमूर्ती बनते. त्रिमूर्तीचा हा प्रथम आविष्कार होय. तिच्यावरूनच पुढे वैष्णवपंथी शिल्पकारांनी विष्णुप्रधान त्रिमूर्ती घडविल्या. [डे. हिं. इ.; सा. इं. इ. गॉ. गॉ.]

**एकपाद शलभासन** जमिनीवर पालथे झोपतात व हनुवटी जमिनीवर टेकतात. दोन्ही हात मुठी आवळून शरीराशी समांतर ठेवतात. नंतर श्वास आत घेऊन डाव्या हाताच्या आधाराने उजवा पाय वर उचलतात व सहजपणे जेवढा उंच नेता येईल तेवढा नेतात. पाय वर



एकपाद शलभासन

उचलताना पाच वेळा श्वासोच्छ्वास करतात. सहाव्या वेळी श्वास आत रोखून पाय हळूहळू जमिनीला टेकतात. पाय गुडघ्यात वाकू न देण्याची खबरदारी घेतात. या आसनाच्या अभ्यासाने मूळव्याध व आंत्रपुच्छ यांसारखे रोग उद्‌भवत नाहीत. [उ. यो. द.]

**एकपाद शिरासन** दोन्ही पाय सरळ पसरून बसतात. नंतर डावा पाय डाव्या खांद्यावरून नेऊन मानेच्या मागच्या बाजूस टेकतात. नंतर दोन्ही हात जोडून छातीसमोर ठेवतात. छाती व डोके ताठ ठेवून सर्व शरीरही ताणलेल्या अवस्थेत ठेवतात. त्यानंतर उजव्या पायाने अशीच क्रिया करतात. ज्या स्त्रियांचा गर्भाशय अशक्त आहे व ज्यांचा नेहमी गर्भपात होतो, अशांना हे आसन अत्यंत हितप्रद आहे. अंडकोशाची सूज व मूळव्याध यांसारखे रोग या आसनाने दूर होतात. [उ. यो. द.]

**एकभक्त व्रत** याची व्याख्या अशी – 'रात्रिभोजनाभावविशिष्टदिवाभोजनम्' = रात्री भोजन न करता फक्त दिवसाच एकदा भोजन करणे, याला एकभक्तव्रत म्हणतात. हे भोजन मध्याह्न टळून गेल्यावर करायचे असते. हाच आशय स्कंदपुराणातल्या पुढील श्लोकात सांगितला आहे –

> दिनार्धसमयेऽतीते भुज्यते नियमेन यत् ।
> एकभक्तमिति प्रोक्तं रात्रौ तन्न कदाचन ।।

या व्रताचे नियम व फल विष्णुधर्मोत्तरपुराणात पुढीलप्रमाणे सांगितले आहेत –

संपूर्ण चैत्रमासभर एकभक्त करून वासुदेवपरायण व्हावे, सर्वभूतांविषयी अहिंसावृत्ती पाळावी व 'नमोऽस्तु वासुदेवाय' या मंत्राचा ८०० जप करावा. त्यामुळे अतिरात्र यज्ञाचे फल मिळते. वर्षभर एकभक्त व्रत केल्याने पौंडरीक यज्ञाचे फल मिळून व्रतकर्ता दहा हजार वर्षे स्वर्गाचा अधिकारी होतो.

या व्रतात भोजन एकोणीस किंवा सव्वीस ग्रासांपुरते मर्यादित असावे, असे व्रतराजात सांगितले आहे. [नि. सिं.; श. क.]

**एकभक्त सोमवारव्रत** एक काम्य व्रत. चैत्र, वैशाख, ज्येष्ठ, श्रावण किंवा मार्गशीर्ष यांपैकी कोणत्याही महिन्यातील पहिल्या सोमवारी या व्रताला प्रारंभ करता येतो. त्यातल्या त्यात श्रावण महिन्यातील सोमवार विशेष प्रशस्त मानतात. व्रतावधी एक महिना. शिवाची पूजा व उपवास, हा या व्रताचा विधी आहे. उपवास शक्य नसेल, तर नक्तभोजन करतात. चार सोमवार याप्रमाणे व्रत केल्यावर त्याचे उद्यापन करतात.

उद्यापनाच्या दिवशी उमा-शंकराच्या सुवर्णप्रतिमेची पूजा करतात. दुसऱ्या दिवशी होमहवन करून आचार्याला सवत्स धेनू दान देतात व तेरा ब्राह्मणांना भोजन घालतात. [व्रतराज]

**एकराट** एक राजकीय आधिपत्याची संज्ञा. ही सम्राट या उपाधीहून श्रेष्ठ आहे. प्राचीनबर्हि, सुवर्म्याचा पुत्र व महापद्म हे एकराट होते. समुद्रवलयांकित पृथ्वीचे राज्य मिळविणे म्हणजे एकराट होणे, असे ऐ. ब्राह्मणात म्हटले आहे (८.५). श्राद्धांत सप्तार्चिष पठण करण्याने, तसेच त्या प्रसंगी समृद्ध दाने देण्याने पुढील जन्मी एकराट-पद प्राप्त होते, असे सांगितले आहे. [पु. इं.]

**एकलिंग** याची व्याख्या शब्दकल्पद्रुमात दिली आहे, ती अशी –

> पञ्चक्रोशान्तरे यत्र न लिङ्गान्तरमीक्ष्यते ।
> तदेकलिङ्गमाख्यातं तत्र सिद्धिरनुत्तमा ।।

अर्थ – शिवलिंग असलेल्या स्थानाच्या पंचक्रोशीत जेव्हा

दुसरे शिवलिंग आढळत नाही, तेव्हा त्या स्थानाला एकलिंग असे नाव प्राप्त होते. तिथे तप केल्याने उत्तम सिद्धी मिळते.

**एकलिंगजी** मेवाड व उदयपूर येथील राजपूत राजघराण्यांचा कुलदेव. उदेपूर–नाथद्वारा या मार्गावर उदेपूरपासून १२ मैलांवर कैलाशपुरी हे एकलिंगजीचे क्षेत्र आहे. इथले एकलिंगजीचे मंदिर भव्य असून, त्याच्या भोवती तटबंदी आहे. मंदिरातील लिंगमूर्तीला चार मुखे असून, पश्चिम द्वाराजवळ नंदीची पितळी मूर्ती आहे. यात्रेकरूंना उतरण्यासाठी इथे धर्मशाळा आहेत.

बाप्पा रावळने हे मंदिर इ. स. च्या ८ व्या शतकात बांधले, असे सांगतात. त्यानंतर काही वर्षांनी मंदिराचा पूर्व भाग नष्ट झाला होता. इ. स. च्या १४ व्या शतकात महाराणा हम्मीरने तो परत बांधून काढला. हम्मीरचा चौथा वंशज मोकल (इ. स. १४२०–१४३३) याने मंदिराच्या चारी बाजूंना तटबंदी उभारली. व महाराणा कुंभ याने संपूर्ण देवळाचा जीर्णोद्धार केला.



एकलिंगजीचे मंदिर

इथल्या देवदर्शनाच्या वेळा ठरलेल्या आहेत. इथला पुजारी ब्रह्मचारी असून, तो रोज वेगवेगळ्या रत्नांनी देवाचा साजशृंगार करतो. गाभाऱ्यात जाऊन देवदर्शन घ्यायचे असल्यास त्या आधी पुजाऱ्याने दिलेले वस्त्र नेसावे लागते. पाहा – कैलाशपुरी. [ कल्याण – तीर्थांक ]

**एकवीरा** परशुरामाची माता रेणुका हिलाच एकवीरा असे दुसरे नाव आहे. महाराष्ट्रात रेणुकेची जी स्थाने आहेत, ती सगळी एकवीरा देवीचीच स्थाने म्हणून ओळखली जातात. महाराष्ट्र व कर्नाटक या दोन्ही प्रदेशांत एकवीरेची पूजा सर्वत्र आढळते. परशुराम हा त्याच्या काळातला एकमेव वीर होता, त्यावरून त्याच्या आईला हे नाव मिळाले असावे. एकवीरा ही एकनाथांची कुलदेवता होती. एकनाथी भागवताच्या मंगलाचरणांत नाथांनी तिचे वर्णन केले आहे –

ते शिवशक्तिरूपें दोनी। नेऊन मिरवे एकपणीं।
एकपणें जाली गुर्विणी। प्रसवे एकपणीं एकवीरा॥
ते एकरूपें एकवीरा। प्रसवली बोध-फरशधरा।
जयाचा कां दरारा। महावीरां अभिमानियां॥
तेणें उपजोनि निवटिली माया। आज्ञा पाळूनि सुख दे पितया।
म्हणोनि तो जाहला विजया। लवलाह्यां दिग्मंडळीं॥
जो वासनासहस्रबाहो। छेदिला सहस्रार्जुन-अहंभावो।
स्वराज्य करूनियां पाहा हो। अर्पी स्वयमेवो स्वजातियां॥
(ए. भा. १.७०–७३)

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात विष्णुदास नावाचे एक थोर पुरुष एकवीरेचे उपासक होऊन गेले. (इ. स. १८४४–१९१७) त्यांचा मठ माहूर येथे आहे.

कार्ले येथील लेण्याजवळ एकवीरा देवीचे मंदिर आहे. हे मंदिर मूळचे खडकात खोदून काढलेले असावे; ते नंतर केव्हातरी बांधले गेले. त्यात देवीची मूर्ती डोंगराच्या खडकातच कोरलेली आहे. ही कोळी व प्रभू लोकांची कुलदेवता आहे. चैत्र शुद्ध अष्टमी ते पौर्णिमा इथे त्यांची जत्रा असते. ही देवी नवसाला पावते अशी भक्तांची दृढ श्रद्धा आहे. नवस फेडताना अर्पण केलेल्या अनेक वस्तू मंदिरात आहेत.

गुहागर व किन्हई येथेही एकवीरा देवीची मंदिरे आहेत. पाहा – यल्लम्मा; रेणुका; विष्णुदास (३) [ प्रसाद श्रीशक्तिविशेषांक, ऑगस्ट १९७१

**एकशरण नामधर्म** शंकरदेवाने स्थापन केलेल्या महापुरुषिया नामक भक्तिपंथाचे अधिकृत नाव. एकशरण म्हणजे एकाच देवतेची उपासना. विष्णू हा या पंथाचा एकमेव उपास्य देव होय. दुसऱ्या कोणत्याही देवतेची उपासना या पंथाला निषिद्ध आहे. भागवतपुराण व भगवद्गीता हे दोन ग्रंथ या पंथाने पूज्य मानले आहेत. भगवंताचे नामसंकीर्तन हा भक्तिमार्ग या पंथाने अनुसरला आहे. नवविध भक्तीपैकी श्रवण व कीर्तन हे प्रकार शंकरदेवाने सर्वांत उपयुक्त मानले आहेत. मूर्तिपूजेला या पंथात स्थान नाही; मात्र ती निषिद्ध नाही. आदर्श भक्त केवळ मनोभावे पूजा करतो. पाहा – महापुरुषिया संप्रदाय. [ शंकरदेव ]

**एकश्रुती** यज्ञक्रियेत उदात्तानुदात्तस्वरित हे स्वर वर्ज्य करून जे मंत्र म्हटले जातात, त्यांना पाणिनीने एकश्रुती असे म्हटले आहे (अष्टा. १.२.३४). जपाचे मंत्र स्वरसहित

म्हटले जावे व सामगायनातही स्वरांचे यथावत पालन केले जावे, याविषयी मात्र आग्रह होता. कात्यायनाने एकश्रुतीला तान म्हटले आहे (श्रौ. सू. १.८.१८).

असे दिसते, की पाणिनी व कात्यायन यांच्या कालातच स्वरसहित मंत्रपाठाचे नियम शिथिल होऊ लागले होते. वैदिक स्वरांच्या जागी भाषिक स्वर किंवा ब्राह्मणग्रंथातले वैकल्पिक स्वर प्रचलित होऊ लागले होते. सस्वर उच्चारणातली ही ढिलाई यज्ञसंस्थेत विशेष रूपाने आली होती. पुढे पुढे तर स्वरविचार नष्ट होण्याच्याच मार्गावर आला. अशा वेळी जैमिनीने या प्रवृत्तीला आळा घालण्याचा प्रयत्न केला. त्याने आग्रह धरून प्रतिपादिले की यज्ञ आणि स्वाध्याय या दोन्ही प्रसंगी मंत्रांचे त्रिस्वरयुक्तच पठन व्हायला हवे (जै. मी. १२.३.२०–२४). पण त्याचा हा आग्रह नव्या प्रवृत्तीपुढे टिकू शकला नाही. [ पा. का. भा. ]

**एकांतर ज्वरनाशन यंत्र** एकान्तर ज्वर (पाळीचा ताप) नाहीसा होण्यासाठी या यंत्राचा प्रयोग करतात. हळदीच्या रसाने विडयाच्या पानावर बाभ-




एकांतर ज्वरनाशन यंत्र

ळीच्या काट्याने यंत्र काढतात. एकमेकांत अडकलेल्या दोन समभुज त्रिकोणांनी होणाऱ्या षट्कोनात 'क्रौं' या बीजाक्षराने संपुटित करून साध्यनाम लिहितात. षट्कोणाभोवती होणाऱ्या त्रिकोणात 'ॐ' हे बीजाक्षर व बाहेरच्या बाजूस कोणबिंदूजवळ 'ह्रीं' हे बीजाक्षर लिहून यंत्र पूर्ण केल्यावर त्याची यथाविधि पूजा करून ते यंत्र भक्षण करितात. या उपचाराने एकान्तर ज्वर जातो' असे सांगितले आहे [ यं. चिं. ]

**एकांतवाद्यम** द. भारतातील वीणेसारखे एक वाद्य. याचा आवाज मधुर व आल्हादक असतो. मोठ्या बैठकीऐवजी लहान बंदिस्त जागी या वाद्याचा प्रभाव विशेष पडतो. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**एकांतिक धर्म** वैष्णव संप्रदायाचे प्राचीन नाव. प्राचीन काळी भागवत, सात्वत, पांचरात्र व एकान्तिक या नावांनी वैष्णव संप्रदायांचा उल्लेख होत असे. ज्या धर्मात एकच म्हणजे भगवान विष्णू हा अन्त म्हणजे सिद्धान्त मानला जातो, तो एकान्तिक धर्म होय. भागवत धर्माचे प्रधान तत्त्व प्रपत्ती किंवा शरणागती हे आहे. भगवंताला शरण जाण्यानेच जीवाचे परमकल्याण होते. जोवर भगवत्कृपा होत नाही, तोवर जीवाचा उद्धार होणे शक्य नाही. ही भगवत्कृपा मिळविण्याचे शरणागती हेच श्रेष्ठ साधन आहे. याविषयी अनुस्मृतीत पुढील श्लो (४८) दिलेला आहे –

**एकान्तिनो हि निर्द्वंद्वा निराशाः कर्मकारिणः ।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणस्त्वां विशन्ति मनस्विनः ॥**

अर्थ – द्वंद्वरहित, आशारहित, उद्योगशील आणि ज्ञानाग्नीने ज्यांची कर्मे दग्ध झाली आहेत, असे एकान्तिक धर्माचे ज्ञानी लोक (हे भगवंता,) तुझ्या ठिकाणी प्रवेश करतात (भगवद्रूप होतात).

एकान्तिक धर्माच्या प्राचीन संहितांची संख्या १०८ च्या वर असल्याचे सांगतात. या सर्व संहितांत अहिर्बुध्न्य, जयाख्य व बृहद्ब्रह्म या संहिता मुख्य आहेत. त्यांत ज्ञान, योग, क्रिया व चर्या या चार विषयांचे प्रतिपादन विशेष रूपाने केलेले आहे. ज्ञानप्रकरणात ब्रह्म, जीव आणि जगत यांच्या आध्यात्मिक स्वरूपाचे, तसेच सृष्टिप्रक्रियेचे निरूपण येते. योगप्रकरणात मुक्तीला साधनीभूत अशा योगप्रक्रियांचे विवरण येते. क्रियाप्रकरणात विष्णुमंदिरांची निर्मिती, मूर्तिस्थापना इ. विषयांचे वर्णन येते. चर्याप्रकरणात आह्निक क्रिया, मूर्तिपूजेची विधाने, पर्वे आणि उत्सव, यांचे वर्णन येते. वरील तीन संहितांच्या आधारेच पुढे मध्ययुगात वैष्णव संप्रदायांची विशेष प्रगती झालेली आहे.

**एकादश रुद्र** ब्राह्मणग्रंथांत अकरा रुद्रांचा उल्लेख केलेला आहे; पण तिथे त्यांची नावे मात्र सांगितलेली नाहीत. निरनिराळ्या पुराणांत ती दिलेली असली, तरी त्यात एकवाक्यता नाही. महाभारताच्या आदिपर्वात ती दिली आहेत ती अशी–मृगव्याध, सर्प, निर्ऋती, अजैकपाद, अहिर्बुध्न्य, पिनाकी, दहन, ईश्वर, कपाली, स्थाणू व भव. महाभारताच्या शांतिपर्वात ही नावे अजैकपाद, अहिर्बुध्न्य, विरूपाक्ष, रैवत, हर

बहुरूप, त्र्यंबक, सुरेश्वर, सावित्र, जयंत्य व पिनाकी अशी सांगितली आहेत; तर अनुशासन पर्वात यापेक्षाही वेगळी नामावली दिलेली आहे.

चतुर्वर्गचिंतामणीत अज, एकपाद, अहिर्बुध्न्य, विरूपाक्ष, रेवत, हर, बहुरूप, अंबक, सुरेश्वर, जयंत व अपराजित हे अकरा रुद्र सांगितले असून ते सोळा हातांचे व शूल, अंकुश, कपाल, डमरू, सर्प, मुद्गर, सुदर्शन, अक्षसूत्र, खट्वांग, गदा, पट्टिश, घंटा, शक्ती, परशू, कुंडिका, धनुष्य, अक्षमाला, चक्र, चर्म, तोमर, तर्जनीघट इ. आयुधे धारण करणारे असतात, असे सांगितले आहे. [ म. ज्ञा. को.; च. व. चिं. ]

**एकादशी** प्रत्येक मासातील शुक्ल व कृष्ण पक्षांतील ११वी तिथी. हिला हरिदिनी असेही म्हणतात. ही विष्णूची तिथी मानलेली आहे. या दिवशी उपवास करून दुसऱ्या दिवशी त्याची पारणा करतात. एकादशीत स्मार्त व भागवत असे दोन भेद आहेत. ज्या पक्षात हे दोन भेद संभवतील, त्या वेळी पंचांगात पहिल्या दिवशी स्मार्त व दुसऱ्या दिवशी भागवत, असे लिहिलेले असते. स्मार्त ही पूर्व दिवशी येते व भागवत दुसऱ्या दिवशी येते. भागवत एकादशी नेहमी द्वादशीविद्ध (द्वादशीयुक्त) असते. वैष्णव लोक भागवत एकादशी पाळतात. या दोन एकादश्या केव्हा मानायच्या, त्या संबंधीचे विवेचन धर्मसिंधू, निर्णयसिंधू इ. ग्रंथांत सविस्तर दिलेले आहे. मध्ययुगात शूलपाणीने (इ. स. १३७५–१४६०) एकादशी-विवेक व रघुनंदनाने (इ. स. १६ वे शतक) एकादशीतत्त्व हे ग्रंथ केवळ एकादशीवर लिहिलेले आहेत. याव्यतिरिक्त व्रतराज व कालतत्त्वविवेचन या ग्रंथांत एकादशीच्या विवेचनाला शेकडो पाने दिलेली आहेत.

प्रत्येक मासात दोन, याप्रमाणे वर्षाच्या २४ एकादश्या येतात. त्यांची नावे पुढीलप्रमाणे –

**शुक्लपक्ष** – (चैत्रापासून) कामदा, मोहिनी, निर्जला, शयनी, पुत्रदा, परिवर्तिनी, पाशांकुशा, प्रबोधिनी, मोक्षदा, प्रजावर्धिनी, जयदा व आमलकी.

**कृष्णपक्ष** – (चैत्रापासून) पापमोचनी, वरूथिनी, अपरा, योगिनी, कामिका, अजा, इंदिरा, रमा, फलदा, सफला, षट्तिला व विजया.

**एकादशीचे प्रकार** – नित्य आणि काम्य असे एकादशीचे दोन भेद आहेत.

> सत्यं सर्वाणि पापानि ब्रह्महत्यादिकानि च ।
> सन्त्येवौदनमाश्रित्य श्रीकृष्णव्रतवासरे ।।
>
> (ब्र. वै. पु. कृष्णजन्मखंड २६.२३)

**अर्थ** – एकादशीच्या दिवशी ब्रह्महत्यादी सर्व पापे अन्नाचा आश्रय करून राहतात. (जो मनुष्य त्या दिवशी अन्न भक्षण करतो, त्याला ती पापे लागतात.)

वर्षाच्या २४ ही एकादश्या नियमाने करणे व त्या दिवशी विष्णुपूजा, जागरण, हरिकथाश्रवण इ. गोष्टी करणे, हे नित्य-व्रत होय.

कात्यायनाने काम्य एकादशीव्रताविषयी पुढीलप्रमाणे लिहिले आहे –

> संसारसागरोत्तारमिच्छन् विष्णुपरायणः ।
> ऐश्वर्यं सन्ततिं स्वर्गं मुक्तिं वा यद्यदिच्छति ।
> एकादश्यां न भुञ्जीत पक्षयोरुभयोरपि ।।

**अर्थ** – जो कोणी विष्णुपरायण होऊन संसारसागरातून तरून जाऊ इच्छितो किंवा ऐश्वर्य, संतती, स्वर्ग, मोक्ष किंवा अन्य कोणतेही फल इच्छितो, त्याने उभय पक्षांतील एकादशीस अन्न भक्षण करू नये.

**एकादशीविषयी विधिनिषेध** – दोन्ही एकादशींना उपवास करणे, हा नियम वनात राहणाऱ्या ऋषीमुनींना आणि यतींना लागू आहे; गृहस्थाने केवळ शुक्ल एकादशीच करावी, असे देवलाचे मत निर्णयसिंधूत उद्धृत केले आहे. पुत्रवान गृहस्थाने कृष्ण एकादशीला उपवास करू नये, असे नारद म्हणतो. विधवा स्त्रियांनी मात्र दोन्ही एकादशींना उपवास करावा, असा संकेत आहे. वैष्णवांनाही उभय एकादशी विहित आहेत. हेमाद्रीने मात्र उभय पक्षांतील एकादशींचा अधिकार सर्वांना दिला आहे. ज्यांचे वय आठ वर्षांच्या खाली व ऐंशी वर्षांहून अधिक असेल, त्यांना एकादशीच्या उपवासाचा नियम लागू नाही, असे नारद सांगतो. मार्कंडेयपुराणात पुढील पर्याय सांगितला आहे– एकादशीस दुपारनंतर एकदा जेवावे, नक्त (सूर्यास्तानंतर तारे दिसल्यावर) भोजन करावे, अयाचित जे मिळेल, ते खावे व शक्ती असल्यास पूर्ण उपवास करावा; मात्र एकादशीमुळे प्राप्त होणारे फल गमावू नये.

**एकादशीचे फल** – पद्मपुराणाच्या आदिखंडात एकादशीच्या उपवासाचे फल पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

> अश्वमेधसहस्राणि राजसूयशतानि च ।
> एकादश्युपवासस्य कलां नार्हन्ति षोडशीम् ।।
> स्वर्गमोक्षप्रदा ह्येषा शरीरारोग्यदायिनी ।
> सुकलत्रप्रदा ह्येषा जीवत्पुत्रप्रदायिनी ।
> न गङ्गा न गया भूप न काशी न च पुष्करम् ।
> न चापि वैष्णवं क्षेत्रं तुल्यं हरिदिनेन च ।।
> यमुना चंद्रभागा न तुल्या हरिदिनेन तु ।
> अनायासेन येनात्र प्राप्यते वैष्णवं पदम् ।।

अर्थ – अनेक सहस्र अश्वमेध आणि शेकडो राजसूय यांना एकादशीच्या उपवासाच्या सोळाव्या कलेइतकेही महत्त्व नाही. एकादशी ही स्वर्ग, मोक्ष, आरोग्य, चांगली भार्या व जीवत्पुत्र देणारी आहे. गंगा, गया, काशी, पुष्कर, वैष्णवक्षेत्र, यमुना, चंद्रभागा यांपैकी कोणालाही एकादशीची बरोबरी करता येणार नाही. या दिवशी उपवास केल्याने अनायासे वैष्णवपद प्राप्त होते.

**एकादशीची उत्पत्ती** – एकादशीच्या उत्पत्तीविषयी पुढील दोन कथा पुराणांत सांगितल्या आहेत –

(१) मृदुमान्य नावाचा एक दैत्य शंकराच्या प्रसन्नतेसाठी तप करीत होता. शिवाने प्रसन्न होऊन त्याला पुढील वर दिला– 'तुला कोणाकडूनही मृत्यू येणार नाही. तू ब्रह्मादिदेवांना युद्धात जिंकशील. मात्र उन्मत्त झालास, तर तुला एका स्त्रीच्या हातून मरण येईल.' हा वर मिळताच मृदुमान्याने देवांवर चाल केली. विष्णूसह सर्व देव पराभूत होऊन शेवटी शिवाकडे आले; पण शिवही आता त्या दैत्याला आवरू शकत नव्हता. मग ते सगळे देव एका गुहेत जाऊन लपले. तिथे त्या सर्वांच्या एकत्र झालेल्या श्वासांतून एक देवता उत्पन्न झाली. तिचेच नाव एकादशी होय. त्या वेळी पाऊस पडत असल्यामुळे सर्व देवांना स्नान घडले व गुहेत बसल्यामुळे उपोषणही घडले. नंतर एकादशीने सर्व देवांना अभय देऊन मृदुमान्याला ठार मारले.

(२) मुर नावाचा एक दैत्य होता. तो विष्णूवर चालून गेला. विष्णूने सर्व देवांसह त्याच्याशी युद्ध केले; पण त्याचे काही चालले नाही. मग विष्णू बदरिकाश्रमी जाऊन एका गुहेत दडून बसला. तिथे त्याला शस्त्रास्त्रांनी सज्ज अशी एक सुंदर स्त्री दिसली. मुरदैत्य विष्णूचा पाठलाग करीत तिथवर गेला असता, त्या स्त्रीने आपल्या हुंकाराने त्याला ठार केले. विष्णूने संतुष्ट होऊन त्या स्त्रीला वर मागण्यास सांगितले. तिने 'एकादशीचा उपवास करणाऱ्यांवर तू सदैव प्रसन्न असावेस,' असा वर मागितला. विष्णूने 'तथास्तु' म्हटले.

**माहात्म्य** – भागवत संप्रदायात या महाव्रताचे माहात्म्य फार मोठे आहे. या दिवशी उपवास करून दिवसरात्र हरि-भजन, नामसंकीर्तन करावे, असे सांगितले आहे. एकनाथांनी एकादशीचे व्रत कसे करावे, ते सांगून त्याचे माहात्म्यही वर्णिले आहे ते असे–

अनंत व्रतांचिया राशी । पायां लागती एकादशी ।। ज्यासी न माने एकादशी । तनू जाणावी ती राक्षसी । त्यासी संगती घडे ज्यासी । नरकवासी तो होय ।। जे एका-दशीस भक्षिती अन्न । ते श्वानविष्ठेसमान । तांबुल ते रुधिर-पान । रजस्वले स्त्रियेचे । ऐसे एकादशीचे व्रत । निर्विकल्प जे आचरत । त्याचे घरी हरि तिष्ठत । कांतेसह वर्तमान ।। यापरी एकादशी । भक्त उद्धरती दोष पक्षी । मोक्षाचिया राशी । तिथियात्रा जोडिती ।।

तुकाराम महाराजांनीही अनेक अभंगांतून एकादशीचे महत्त्व सांगितले आहे –

एकादशीस अन्नपान । जे नर करिती भोजन । श्वान विष्ठे-समान । अधम जन तो एक ।। सेज वाज विलास भोग । करी कामिनीशी संग । तया जोडे क्षयरोग । जन्मव्याधी बळिवंत ।।

वारकरी पंथाने आषाढी व कार्तिकी एकादशांचे माहात्म्य खूपच वाढवले आहे. त्या दिवशी पंढरपूर, आळंदी, इ. तीर्थ-क्षेत्रांत लक्षावधी वारकरी विठ्ठलाचे दर्शन घेण्यासाठी जमतात.

**एकादशीचे ध्यान** – हेमाद्रीने शुक्ल–कृष्ण एकादशीचे ध्यान पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

एकादशी मृगाब्जस्था तुला–कर्तरिकायुता ।
सिंहाननाऽरुणगला तुन्दिला लासिनी परा ।।

अर्थ – एकादशी ( शुक्ल-कृष्ण या अनुक्रमाने ) मृगारूढ व कमलारूढ, तागडी व कात्री धारण करणारी, सिंहमुखी व रक्तकंठी, तशीच पुष्ट व कृश आहे.

रुक्मांगद–मोहिनी व अंबरीष–दुर्वास यांच्या कथाही एका-दशीव्रताशीच संबद्ध आहेत. [ध. सिं.; हि. ध.; म. ज्ञा को.]

**एकानंगापूजा** स्त्रीव्रत. एकानंगा हे एकानंशेचे दुसरे नाव आहे. कार्तिक शु. चतुर्थी, अष्टमी, नवमी किंवा चतुर्दशी, या तिथीस हे व्रत करतात. चतुर्दशीच्या दिवशी पूजा करायची, ती एका फलित वृक्षाखाली करतात व तिला अन्नाचा महानैवेद्य दाखवितात. मग त्या अन्नातला उत्कृष्ट अंश देवीला पोचविण्याबद्दल बहिरी ससाण्याची किंवा दुसऱ्या एखाद्या पक्ष्याची प्रार्थना करतात. या व्रताचा विशेष हा, की या दिवशी पतीच्या अगोदर पत्नी भोजन करते. फल–पुत्रप्राप्ती [हि. ध.]

**एकानंशा** एक देवता. हिने नंदपत्नी यशोदेच्या पोटी जन्म घेतला, असे हरिवंशात म्हटले आहे (विष्णूपर्व ४.१४). हिच्या जन्मासंबंधी याच पुराणात पुढे म्हटले आहे –

विद्धि चैनामथोत्पन्नामंशाद्देवीं प्रजापतेः ।
एकानंशां योगकलां रक्षार्थं केशवस्य तु ।।

अर्थ – प्रजापतीच्या अंशाने कृष्णाच्या रक्षणार्थ उत्पन्न झालेली एकानंशा ही योगकला आहे, असे जाण.

हिला दुर्गेचे एक रूप किंवा अवतार, मानतात. महाभार-ताच्या दुर्गास्तोत्रानुसार, ही यशोदागर्भसंभूता, नंदगोपकुलोत्पन्ना आहे असे म्हटले आहे (म. भा. विराट ६). या कृष्णभगिनी

एकानंशेचे मूळ स्वरूप काही वेगळेच असावे असे वाटते. ही कलहप्रिया, मुक्तकेशी व मद्य-मांस प्रिया आहे. ही रात्री भटकते. कधी वस्त्र नेसते तर कधी नग्न असते. शबर, बर्बर, पुलिंद या जमातीचे लोक तिचे भक्त होते. ती भूतगणांमध्ये वावरते (हरि. विष्णु. २.४६). एकानंशेचा कालरात्री म्हणूनही उल्लेख आहे (हरि. विष्णु. ३.५–१४). तसेच हरिवंशाने आर्यानामक देवतेला अनेकवार एकानंशा म्हटले आहे. महाभारतानुसार आर्या ही एक मातृका आहे (म. भा. वन. २२८.१०).

बृहत्संहितेत हिची मूर्ती द्विभुज, चतुर्भुज व क्वचित अष्टभुज असल्याचे सांगितले आहे (५७.३७–३९). द्विभुज मूर्ती कृष्ण व बलराम यांच्या मध्ये उभी असते. तिचा डावा हात कमरेवर असून, उजव्या हाती कमळ असते. मध्ययुगात पूर्व भारतात या देवीची उपासना होत असावी, असे वाटते. त्या काळातल्या तिच्या पाषाणाच्या व पंचरस धातूच्या मूर्ती सापडल्या आहेत. भुवनेश्वर येथील अनंत वासुदेवाच्या मंदिरात मुख्यतः हिच्याच मूर्तीची पूजा होते. विहारमधील इमदपुर येथे सापडलेली हिची पंचरशी मूर्ती फार सुरेख आहे. ही द्विभुज असून, कमळावर सरळ उभी आहे. हिचा उजवा हात वरदमुद्रेत असून डाव्या हातात आरसा आहे. दोहीं अंगी कृष्ण व बलराम उभे आहेत. हिला एकानंगा असेही दुसरे नाव आहे. [ ज्ञानेश्वर त्रैमासिक, नोव्हें. १९७९; डे. हिं. इ. ]

**एकाम्रक** ओडिसात कटकपासून १८ मैल अंतरावर हे क्षेत्र आहे. हे रुद्रतीर्थ आहे. सांप्रत याला भुवनेश्वर म्हणतात. इथे पूर्वी एकच आम्रवृक्ष होता. त्यावरून हे नाव पडले (ब्रह्मपु. ३४.६). वाराणसीप्रमाणेच हेही पापनाशक क्षेत्र समजले जाते. या क्षेत्रात आठ उपतीर्थे आहेत. इथे इ. स. च्या बाराव्या शतकातील एक शिलालेख आहे. त्यावरून इथले विष्णुमंदिर गंगराजवंशातील अनंगभीम याची मुलगी चंद्रिका (हैहय वंशातील परमर्दिदेव राजाची विधवा पत्नी) हिने बांधले, असे कळते. पाहा – भुवनेश्वर. [ हि. ध. ]

**एकाम्रनिलय** शिवकांचीचे नाव. इथे शिवाने ललितादेवीची आराधना केली. पाहा–कांची. [ पु. इं. ]

**एकायन** एक वेद. 'एकम् अयनं विषयो यस्य' = ज्याचा विषय एक आहे, तो एकायन होय, अशी याची व्याख्या आहे (श. क.). दुसरी व्याख्या अशी –

> मोक्षायनाय वै पन्था एतदन्यो न विद्यते ।
> तस्मादेकायनं नाम प्रवदन्ति मनीषिणः ।।

अर्थ – मोक्षप्राप्तीसाठी याहून दुसरा मार्ग नसल्यामुळे याला विद्वान लोक एकायन म्हणतात.

छांदोग्योपनिषदांत भूमाविद्येच्या प्रसंगाने हा शब्द प्रथम आढळतो (७.१.२–४). तिथे नारद आपण एकायन विद्येचे अध्ययन केल्याचे सांगतो. पांचरात्रसंहितांमध्ये या नावाचा एक वेद असल्याचे सांगून त्याचा महिमा गायिला आहे–

> वेदमेकायनं नाम वेदानां शिरसि स्थिरम् ।
> तदर्थकं पञ्चरात्रं मोक्षदं तत्क्रियावताम् ।।

अर्थ–एकायन नामक वेद सर्व वेदांत श्रेष्ठ आहे. पंचरात्र मत हे त्या वेदाचेच समर्थक असून, त्याचे आचरण करणाऱ्यांना ते मोक्षदायक होते.

शांडिल्याने साक्षात संकर्षणापासून हा वेद प्राप्त करून घेतला व तो सुमंत, जैमिनी, इ. शिष्यांना शिकविला. हा एकायन वेद साऱ्या जगात प्रसिद्ध असल्याचे ईश्वरसंहितेत लिहिले आहे.

नागेश नामक एका अर्वाचीन ग्रंथकाराने शुक्ल यजुर्वेदाच्या काण्वशाखेचे दुसरे नाव एकायनशाखा असल्याचे सांगितले आहे. जयाख्य संहितेतही या विधानाला पुष्टी मिळते. तिथे पांचरात्र मताचे प्रवर्तक शांडिल्य, भरद्वाज व मौञ्जायन हे काण्व शाखेचे असल्याचे सांगितले आहे.

पांचरात्र मताच्या लोकांनी आपल्या मताचे महत्त्व वाढविण्यासाठी कित्येक कथा निर्माण केल्या असल्या, तरी एकायन नावाचे एक शास्त्र पूर्वी होते, याचे सूचन छांदोग्योपनिषदा-वरून होते (७.१–२).

पंचरात्र संप्रदायाची एकायन नामक एक शाखा होती, तिचे वर्णन शांतिपर्वात पुढीलप्रमाणे आले आहे –

> पुरुषः पुरुषं गच्छेन्निष्क्रियं पञ्चविंशकम् ।
> एवमेकं सांख्ययोगं वेदारण्यकमेव च ।।
> परस्पराङ्गान्येतानि पाञ्चरात्रं च कथ्यते ।
> एष एकान्तिनां धर्मो नारायणपरात्मकः ।।
> (म. भा. शांति. ३४८.८१–८२)

अर्थ–अशा प्रकारे पुरुष (जीव), निष्क्रिय पुरुष (परमात्मा), सांख्य, योग व वेदारण्यक (तत्त्वमस्यादी वाक्यांनी होणारे ज्ञान) ही पाच जिथे परस्परांची अंगे होतात, त्याला पांचरात्र म्हणतात. हा एकान्ती (एकायन) यांचा नारायणपरक अर्थ आहे.

सात्वतशास्त्राच्या अध्ययनावरून एकायन वेद हा भक्तीला प्राधान्य देणारा असल्याचे समजते. त्यात मूळ वेदांतूनही काही मंत्र घेतलेले आहेत. ब्राह्मणादी ग्रंथांतलीही काही वाक्ये घे-तलेली असावी. वेदांपैकी यजुर्वेदातून घेतलेली सामग्री अधिक असावी. 'एकायनान् यजुर्वेदमयानाश्रावि तदन्तरम्', असे सात्वतसंहितेच्या २५ व्या परिच्छेदात लिहिलेले आहे. पाहा-

एकांतिक धर्म. [भा. सं.; वै. वा. इ.; श. क.]

**एकार्णव** जलप्रलयाच्या वेळची अवस्था. या वेळी सर्व विश्व जलाने व अंधकाराने भरून जाते. त्या वेळी विष्णुरूप भगवान अव्यक्त होतो व त्याचा हंस नामक अवतार कार्य करतो. ही स्थिती एक हजार देवांची वर्षे टिकते. या सर्व प्रकाराला एकार्णव असे म्हणतात. [पु. इं.]

**एकावली व्रत** एक जैनव्रत. श्रावण मासापासून याचा आरंभ करतात. शुक्ल पक्षात प्रतिपदा, पंचमी, अष्टमी व चतुर्दशी या तिथींना व कृष्ण पक्षात चतुर्थी, अष्टमी व चतुर्दशी या तिथींना मिळून सात उपवास करतात. वर्षातून असे ८४ उपवास व ८४ पारणा करणे, हा या व्रताचा विधी आहे. याच नावाचे २४ उपवास व २४ पारणा मिळून होणारे व्रत आहे. त्याला एकावली लघुव्रत म्हणतात. याचा प्रारंभ कोणत्याही महिन्यात, कोणत्याही तिथीपासून करता येतो. [जै. व्र. वि. सं.; व्र. ति. नि.]

**एकाष्टका** (१) प्रजापतीची कन्या. इंद्र व सोम यांची माता. अथर्ववेदात कठोर व्रत करणारी, असा हिचा उल्लेख मिळतो.

(२) आज्यप पितरांची मानसजात कन्या. हिचे पूर्वनाम विरजा असून ही नहुषाची पत्नी होती. पुढे ब्रह्मलोकात गेल्यावर तिला एकाष्टका हे नाव मिळाले.

(३) कोणत्याही महिन्यातील वद्य अष्टमीला अष्टका असे नाव आहे (श. ब्रा. ६.२.२.२३). एकाष्टका म्हणजे विशिष्ट महिन्यातील अष्टमी होय. सायणाने अथर्ववेदाच्या टीकेत माघ वद्य अष्टमीला एकाष्टका मानले आहे (३.१०). तैत्तिरीय संहितेत म्हटले आहे, की ज्यांना वर्षभर यज्ञ करायचा असेल, त्याने या तिथीला दीक्षा घ्यावी (७.४.८.१; ३.३.८.४).

**एकाक्षरा** तांत्रिक गाणपत्य मूर्ती. ही रक्तवर्ण, चंद्रकलाधारी, त्रिनेत्र, नागाभरण, दंत व महाळुंग धारण करणारी अशी करतात. [श्रीविद्यार्णवतंत्र]

**एकाक्षरोपनिषद्** एकाक्षर ब्रह्माचे वर्णन करणारे एक उपनिषद. याचा सारांश असा—जगाचे रक्षक व पुरातन असे सुषुम्नानाडीत स्थिरावलेले अक्षरतत्त्व म्हणजेच हिरण्यगर्भ होय. सूर्याच्या रूपाने त्याचेच दर्शन होते. हे एकाक्षरतत्त्व वज्रधारी आहे. सोमरसात त्याचेच वास्तव्य आहे. स्वाहा, स्वधा व वषट् ही त्याचीच रूपे आहेत. हे त्रिकालव्यापी आहे. याच्या मुखापासून ऋक्–यजु:–साम व वसू आणि अंतरिक्ष यांची उत्पत्ती झाली. या एकाक्षरतत्त्वाचे ज्याला ज्ञान झाले, त्याच्या बुद्धीची झेप सर्वसामान्य ज्ञानाच्या कक्षेच्या पलिकडे जाते. तो अमर होतो, अक्षर होतो.

या उपनिषदात एकाक्षरतत्त्वाबद्दल पुल्लिंगी निर्देश आहे. त्यावरून उपनिषद लिहिताना नारायणस्वरूपी एकाक्षरब्रह्म लेखकाच्या दृष्टीसमोर असावे, असे वाटते. एकाक्षर म्हणजे ओंकार होय. त्याचा नावाने निर्देश या उपनिषदात नसला, तरी 'हृदयाच्या गुहेत वास्तव्य करणारे' या विशेषणावरून त्याचा बोध होतो. तांत्रिक विधानात पुढे रां, गं, इ. बीजाक्षरे कल्पून त्या बीजाक्षरांचे उदात्तीकरण ओंकारात केलेले आढळते. सर्व मंत्र, देवता व यंत्रे ही शेवटी ओंकारातच विलीन होतात, असे अनेक ठिकाणी म्हटलेले आहे. या ओंकाराचेच माहात्म्य या छोट्याशा उपनिषदात अद्वैताच्या परिभाषेने सांगितले आहे. हे उपनिषद ऋग्वेदाचे का कृष्णयजुर्वेदाचे ते नक्की सांगता येत नाही; कारण याच्या वेगवेगळ्या प्रतींत शांतिपाठाचे मंत्र भिन्न आहेत. [डॉ. सी. ग. देसाई]

**एकेश्वर** गढवाल प्रदेशातल्या चौंदकट गावात ६००० फूट उंचीवर एकेश्वर नामक एक रमणीय तीर्थ आहे. शिवधारा नावाचा छोटा जलप्रवाह याच्या जवळून वाहतो. इथे वसंतपंचमी व शिवरात्री या दिवशी मोठी यात्रा भरते. [कल्याण–तीर्थांक]

**एकेश्वरवाद** ज्यात एकाच ईश्वराचे विधान व एकाच ईश्वरावर श्रद्धा असते, त्याला एकेश्वरवाद असे नाव आहे. ईश्वर एक आहे. तो परमात्मा असून, तोच जगाचे सृष्टि-स्थिति-प्रलय करणारा आहे, तो नित्य ज्ञान आणि नित्यानंद यांचा आश्रय आहे, तो निर्दोष असून, समस्त गुणांचे भांडार आहे, अशी एकेश्वरवादाची धारणा असते. त्याचीच एकाची उपासना करावी; अन्य कोणी देव मानू नयेत, असाही या मतात आग्रह असतो.

ऋग्वेदात एकेश्वरवादाची बीजे आढळतात (१.१६४.४६; १०.८२.२; १०.११४.५). ऋग्वेदापासून महाभारताच्या कालापर्यंत एकेश्वरवादाचा विकास होत गेलेला दिसतो. श्वेताश्वतर उपनिषदात ईश्वरवादाचे तात्त्विक विवेचन आहे. गीतेत तर साक्षात भगवंताच्या मुखानेच ईश्वरवादाची महती गायिली आहे (१८.६१–६२). पांचरात्र, शैव, आणि शाक्त या संप्रदायांतही हळूहळू एकेश्वरवाद दृढतर होत गेलेला आहे.

सगुणब्रह्मवाद्यांत रामानुजाने नारायणाला, मध्वाने विष्णूला तर अन्य कित्येक संप्रदायांनी कृष्णाला एकमेव ईश्वर मानले आहे. रामानंद, कबीर, तुलसीदास, इ. रामभक्त रामचंद्राला एकमेव ईश्वर मानतात. नानकानेही एकेश्वरवादच मानलेला आहे. काही संप्रदाय अनेक देवतांचे अस्तित्व मान्य करून त्या सर्वांत एक सर्वश्रेष्ठ असा देव म्हणजे परमेश्वर मानतात, तर काही धर्मांत अन्य देवतांचे अस्तित्वच नाकारून एकमेव परमेश्वर मानतात. वैदिक व पौराण धर्म हे पहिल्याचे उदाहरण असून, इस्लाम व ख्रिश्चन धर्म हे दुसऱ्याचे उदाहरण आहे.

**एकोत** खानदेशातील एक कुलाचार. याचे विधान रात्रीचे असते व त्यासाठी फारच खटाटोप करावा लागतो. त्या दिवशी सूर्योदयानंतर घर सारवून सर्व वस्तूंची सिद्धता करतात. घरातील प्रमुख स्त्री-पुरुष सकाळपासून सूर्यास्तापर्यंत निर्जल उपवास करतात. सूर्यास्तानंतर स्नान करून देवाची पूजा करतात. व्रतकर्त्या पुरुषाला भगत म्हणतात. तो अव्यंग अशा एका कुमारिकेची व सात सदाचरणी स्त्रियांची या व्रतासाठी 'गवरणी' म्हणून योजना करतो. गवरणी हे गौरीचे बहुवचन आहे. त्यांच्या जोडीला आणखी एका भगताचीही योजना करतो. अशी ही एकूण नऊ पात्रे होतात. एकोताच्या आदल्या दुपारी गवरणींना अभ्यंगस्नान घालून नवी वस्त्रे देतात. हळदीने पिवळ्या केलेल्या काठांची शुभ्र चोळी देतात.

कलशांत खारका व मनुका भरून ते गवरणींच्या हाती देतात व त्यांची गावातून मिरवणूक काढतात.

**एकोद्दिष्ट** श्राद्धाचा एक प्रकार. याची व्याख्या अशी – 'एक: प्रेत एव उद्दिष्ट: यत्र' = एक मृत व्यक्ती हीच ज्यात उद्दिष्ट असते असे श्राद्ध. पार्वणादी श्राद्धांत पिता, पितामह, प्रपितामह किंवा माता, पितामही, प्रपितामही अशा त्रयीचा उद्देश असतो, तर एकोद्दिष्टात केवळ एकाच मृत व्यक्तीचा उद्देश असतो. हे अंत्यक्रियेतले एक श्राद्ध आहे. याचे तीन प्रकार आहेत–

(१) **नवश्राद्ध** – हे मृत्यूनंतर दहा किंवा अकरा दिवसपर्यंत करायचे असते.

(२) **नवमिश्रश्राद्ध** – हे त्यानंतर एक वर्षपर्यंत प्रतिमास करायचे असते.

(३) **पुराणश्राद्ध** – एका वर्षानंतर करायची श्राद्धे. यांत अग्नौकरण, अभिश्रवण, पूर्वनिमन्त्रण, धूप, दीप, स्वधा, नमस्कार, अपूप (वडा) या गोष्टी करायच्या नसतात (बौ. ध. सू. ३.१२.६). यात एक अर्घ्य, एक पिंड, एक पवित्र असे सगळे एक असते, 'स्वदितम्' हा तृप्तिप्रश्न नसतो व 'उपतिष्ठताम्' या अक्षय्य स्थानाच्या जागी 'अभिरम्यताम्' असा ऊह असतो (कात्यायनीय श्राद्धसूत्र ४).

यतीला उद्देशून एकोद्दिष्टश्राद्ध करू नये; फक्त ११ व्या दिवशी पार्वणश्राद्ध तेवढे करावे; कारण यतीने त्रिदंड ग्रहण केले असल्यामुळे त्याला प्रेतत्व प्राप्त होत नाही, असे सांगितले आहे. (याज्ञ. १.२५.५ वरील मिताक्षरा). [ हि. ध. ]

**एक्कालम** पितळेची अथवा तांब्याची सरळ तुतारी. याला चार नळ्या असून, त्या एकांत एक बसविलेल्या असतात. निमुळते टोक ओठावर ठेवून हे वाद्य देवाच्या मिरवणुकीत वाजवितात. याचा आवाज जरा कर्कशच असतो.

तिरुनेलवेल्ली या जिल्ह्यातल्या शनूबगरामनल्लूरच्या मंदिरात एक दगडी खांब आहे. त्यात एक छिद्र खोदलेले आहे. त्यात फुंकर मारली, की एक्कालमसारखे स्वर निघतात. त्या छिद्राला एक्कालरंध्र असे नाव आहे. यातून निघणारे स्वर षड्ज-मध्यमाशी संवादी असतात. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**एखणा** सिंधमधील एक प्राचीन उत्सव. नदीला पूर येतो त्या वेळी व तो पूर ओसरतो त्या वेळी असा हा दोनदा केला जात असे. या उत्सवात जत्रा भरवीत व मिरवणुका काढीत. [ सिं. क. ]

**एगलविहारपडिमा** जैन श्रमणांच्या तपाचा एक प्रकार. या तपात एकान्तवास आवश्यक असतो. हे तप विशिष्ट मुदतीचे असते; ते सुरू करून मध्येच सोडल्यास प्रायश्चित घ्यावे लागते. [ हि. जै. मो. ]

**एडुत्तच्छन** (इ. स. चे १६ वे शतक) मलयाळम भाषेचा महाकवी. याचे संपूर्ण नाव तुंचत्तू रामानुजन एड़त्तच्छन असे होते. याचा जन्म नायर जातीत तृकण्डियुर येथे झाला. त्याचे विश्वसनीय चरित्र उपलब्ध नाही. आख्यायिका मात्र खूप आहेत. त्या आख्यायिकांतून त्याच्या चरित्राचे धागे-दोरे मिळतात, ते असे–

लहानपणीच त्याने अनेक शास्त्रांचे अध्ययन केले. मग तो भारताची तीर्थयात्रेला निघाला. त्या प्रवासात त्याला साऱ्या द. भारताची सामाजिक व राजकीय दुरवस्था पाहायला मिळाली. लोकस्थितीचे ते दर्शन त्याला उद्वेगकारक वाटले. परत गावी येऊन त्याने अध्यापनाचे कार्य सुरू केले; पण त्यात त्याचे मन रमेना. त्याला वाटे, की आपल्या भोवतीचा समाज स्वार्थ, लोभ, कलह,

भ्रष्टाचार, लंपटपणा, इ. दुर्गुणांनी पोखरून गेला आहे. तो जीवनमूल्यांना पारखा होऊन अधःपाताकडे धाव घेत आहे. या प्रकाराला आळा घालायचा, तर आपण काही तरी केले पाहिजे. सुसंस्कृत जीवनाचे आदर्श या समाजापुढे उभे केले पाहिजेत, असा विचार त्याच्या मनात सतत घोळू लागला. एकाएकी त्याला स्फुरले, की आपण मलयाळम भाषेत रामायणाची रचना करावी आणि जनतेला जीवनाचा आदर्श ठरेल, असा एक ग्रंथ निर्माण करून द्यावा.

तो विचार पक्का करून त्याने रामायण लिहायला सुरुवात केली. त्या कामी तो अध्यात्मरामायणाला अनुसरला. थोड्याच काळात त्याने आपला ग्रंथ समग्र पुरा केला. हे रामायण त्याने पाट्टुशैलीत लिहिले आहे. पोपटाच्या मुखातून कथा वदविण्याची ही शैली किळिपाट्टू या नावाने केरळात त्याच्या आधीच लोकप्रिय ठरली होती. एडुत्तच्छन्ने तिचाच अंगीकार केला. त्याची अनुवादपद्धती स्वतंत्र आहे. जिथे म्हणून नीतिबोधाला अवसर मिळेल, तिथे तिथे तो आपल्या प्रतिभेसह रमला आहे. त्याला लाभलेली काव्यसिद्धी अद्भुत आहे. मलयाळम साहित्याला गती आणि श्रेष्ठता त्यानेच मिळवून दिली. केरळी जीवनात अध्यात्माचे पावित्र्य आणि प्राणिमात्राविषयीचे सौहार्द त्यानेच आणले. त्याचे रामायण ऐकून केरळातली जनता मंत्रमुग्ध झाली, भारून गेली. तिला तो ग्रंथ प्रिय व पूज्य झाला.

एडुत्तच्छन्ने निर्मिलेला रामचंद्र एका विशिष्ट सीमेपर्यंतच मानव आहे, त्या रेषेपलिकडे पाय ठेवताच तो दिव्य, उदात्त आणि आणि देव-दानवांनाही आदर्शरूप बनतो. चौदा वर्षांचा वनवास अचानक पुढे उभा ठाकला असता हा सत्पुत्र राम, कैकेयीकडे जाऊन तिला म्हणतो—

"आई, तू किती मायाळू आहेस ! भरत तुझा औरस पुत्र; पण त्याच्यापेक्षा तुझे माझ्यावरच प्रेम अधिक ! कारण लहान वयात तू त्याच्या शिरावर राज्यकारभाराचे प्रचंड ओझे ठेवलेस आणि मला मोकळे केलेस. मी निश्चित मनाने वनात हवे तसे, हवे तिकडे हिंडावे. आई, तुझे हे माझ्यावर अनंत उपकार आहेत."

पण लक्ष्मणाला मात्र तो प्रकार सहन झाला नाही. तो दशरथाला टाकून बोलला आणि म्हणाला—

भ्रान्तचित्तं जडं वृद्धं वधूजितं
शान्तेतरं त्रपाहीनं शठाप्रियं
बंधिच्चुताततनेयुं पित्रे स्रान्
परिपन्थिकळायुळ्ळवे ने युमोक्कवे
अन्तकन् वीटिट्टन्नयच्चभिषेक—
मोरत्तर मेन्नियॆ साधिच्चु कोळ्ळुवन्

अर्थ – भ्रांत, जड-मूढ, बाइलबुद्धीच्या, वृद्ध, निर्लज्ज, पित्याला आणि त्याच्या साथिदारांना मी पकडून कैदेत टाकीन किंवा प्रसंगी त्यांचा वधही करीन. जे प्रसंगोचित ते ते करून मी ज्येष्ठ बंधूचा राज्याभिषेक घडवून आणीन, तेवढे सामर्थ्य माझ्या ठिकाणी आहे.

त्यावर सागराप्रमाणे गंभीर असलेल्या रामचंद्राने खवळलेल्या लक्ष्मणाला पुढील उपदेशाने शांत केले—

क्रोधमूलं मनस्तापमुण्टाइवरं
क्रोधमूलं नृणां संसारबन्धनं
क्रोधमल्लो निजकर्मक्षयकरं
क्रोधं परित्यजिवक्वेणं बुधजनम्

अर्थ – क्रोधाने मनस्ताप होतो. क्रोध संसारबंधनात घालतो. क्रोध हा कर्माचा क्षय करणारा आहे. म्हणून बुद्धिमान लोक क्रोधाचा त्याग करतात.

एडुत्तच्छन्च्या या रामायणाला 'भाषा-अध्यात्मरामायणम' असे म्हणतात. उत्तरेत तुलसीरामायणाला जी लोकप्रियता लाभली, तीच केरळात एडुत्तच्छन्च्या रामायणाला लाभली आहे. केरळात घरोघरी त्याची पारायणे चालतात. एडुत्तच्छन्ने महाभारताचाही अनुवाद केला आहे. तोही ग्रंथ केरळी जनतेचा आवडता ठरला आहे. एडुत्तच्छन्चे हृदय भक्तिप्रवण आहे. तो म्हणतो, की 'भक्तिहीन मनुष्याला शत-सहस्र जन्मांनीही ज्ञान किंवा मोक्ष मिळणार नाही.' हा आपला भक्तिभाव परिपुष्ट करण्यासाठी त्याने भागवतपुराणाचाही अनुवाद केला आहे. एडुत्तच्छन हा शंकराचार्यांना अनुसरणारा अद्वैतवादी आहे. तो एका ठिकाणी ईश्वराची स्तुती करताना म्हणतो —

ओन्नाय निन्नेयिट रण्टन्नु कण्टलविल ।
उन्डायोरिन्टल बत मिन्डावल्ल मम ।
पन्ट कणक्कुवरुवान निन कृपावलिक—
लुन्डाक एकल इह नारायणाय नमः ।

अर्थ – हे भगवन, तू एकमेवाद्वितीय आहेस. पण मायाजालात सापडल्यामुळे माझ्या जीवात्म्याला असे भासते, की तू माझ्याहून अलग आहेस. याच गंभीर दुःखात मी बुडालो आहे. तू माझ्यावर दया कर आणि मला तुझ्याशी समरस करून टाक.

एडुत्तच्छन् जिथे जन्मला, ते घर केरळी जनतेला तीर्थरूप ठरले आहे. जुन्या काळी मुलाचा विद्यारंभसंस्कार करतेवेळी त्याच्या धूळपाटीवर टाकण्यासाठी केरळातले लोक एडुत्तच्छन्च्या आवारांतली माती आणीत. थोडक्यात सांगायचे, तर एडुत्तच्छन् हे भक्तीचे परिपक्व फळ होते, धर्मग्लानीचे मोचन होते, धर्माधिष्ठित पौरुषाचे पुनरुज्जीवन होते आणि केरळाचे मूर्तिमंत पुण्य होते.

एडुत्तच्छन्च्या मृत्यूनंतर मलयाळम साहित्यात काही काळ

जवळजवळ अंधाराचे साम्राज्य पसरले. [ कै. सा. द.; केरळ ]

**एडूक** ‘ यदन्तर्न्यस्तकीकसम् ’=ज्यात अस्थी, केस इ. वस्तू मध्ये ठेवून दगड-मातीचा भिंतीवजा चौथरा बांधला जातो, त्याला एडूक असे म्हणतात (अमर). बौद्ध लोकांनी बुद्धाच्या शरीराचे केस, नखे, हाडे इ. अवशेष सापडले, ते घेऊन त्यांवर अशी एडूके बांधली व ते त्यांची पूजा करू लागले. एडूक हे भावी कालातील सुबद्ध स्तूपांचे पूर्वरूप होय. युधिष्ठिराला कलियुगाचे भविष्य सांगताना मार्कंडेय म्हणतो —

> **विपरीतश्च लोकोऽयं भविष्यत्यधरोत्तरः ।**
> **एडूकान् पूजयिष्यन्ति वर्जयिष्यन्ति देवता ।।**
>
> (म. भा. वन १९०.६५)

अर्थ — हा लोकसमाज (यापुढे) उलटा पालटा होऊन विपरीत बनेल. लोक देवतांची पूजा वर्ज्य करून एडूकांना पुजू लागतील. [ श. क.; म. भा. उ. सं.; अं. यु. भा. ]

**एप्रिल फूल** एप्रिल महिन्याच्या पहिल्या दिवसाला ख्रिस्ती समाजात एप्रिल फूल दिन अर्थात थट्टामस्करीचा दिवस असे समजतात. या दिवशी एखाद्याची फजिती करणे किंवा खोटी अफवा उठवून एखाद्याला फसविणे, अशी चाल रूढ आहे. अशा थट्टामस्करीला बळी पडणाऱ्या माणसाला ‘ एप्रिल फूल ’ म्हणतात. शेक्सपिअर, स्विफ्ट, चार्ल्स लँब, इ. जुन्या इंग्रज साहित्यिकांनी या दिवसाच्या थट्टामस्करीचा उल्लेख केला आहे. ही चाल सर्व युरोपात व ख्रिस्ती धर्म प्रचलित असलेल्या अन्य देशांतही चालू आहे. कित्येक विद्वानांच्या मते ही चाल प्रथम फ्रान्समध्ये उगम पावली व तिथून इतरत्र पसरली. या चालीची एक उपपत्ती पुढीलप्रमाणे सांगितली जाते—

ख्रिस्ती धर्माचे नवीन पंचांग फ्रान्सने प्रथम अंमलात आणले. त्यात १ जानेवारी हा वर्षारंभाचा दिवस ठरविलेला होता. आजही ख्रिस्ती जगात तोच रूढ आहे. त्यापूर्वी जे पंचांग होते, त्यात नवे वर्ष १ एप्रिलला सुरू होत होते. नवे वर्ष बहुजन समाजाने स्वीकारले; पण समाजातले जुन्याचे अभिमानी असे जे लोक होते, ते या गोष्टीला मान्यता देण्यास तयार होईनात. त्यामुळे साहजिकच हे जुन्याचे अभिमानी लोक बहुजनांच्या थट्टामस्करीस पात्र झाले. ते ज्या दिवशी आपला वर्षारंभ दिन साजरा करीत, त्या दिवशी म्हणजे एप्रिलच्या पहिल्या तारखेस नवे लोक त्यांना बनावट भेटी व बनावट निमंत्रणे पाठवून फसवू लागले. हीच चाल पुढे सार्वत्रिक होऊन सर्व लोकांना फसविण्याचा दिवस, असे स्वरूप त्या दिवसाला प्राप्त झाले.

कित्येकांच्या मते एप्रिल फूलची चाल याहूनही फार प्राचीन असावी व ख्रिस्ती लोकांनी तत्पूर्वीच्या समाजांतून ती स्वीकारली असावी. [ एंन्सा. रि. ए. ]

**एरंड** मोकळ्या मैदानात हा खेळ खेळतात. मुलांची संख्या ३० पर्यंत असली तरी चालते. मुलांच्या संख्येच्या मानाने पाच फूट त्रिज्येचे एक व त्या भोवताली पंधरा फूट त्रिज्येचे दुसरे, अशी दोन वर्तुळे काढतात. राज्य घेणारी मुले आतल्या लहान वर्तुळात आणि खेळणारी सर्व मुले बाहेरच्या मोठ्या वर्तुळात उभी राहतात.

राज्य घेणारा मुलगा एक पाय उंच करून लंगडी घालीत बाहेरच्या वर्तुळात खेळणाऱ्या मुलांना मारण्यासाठी बाहेर निघून त्यांचा पाठलाग करतो. खेळणारी मुले लहान वर्तुळाच्या आत आणि बाहेरच्या वर्तुळाच्या बाहेर न जाता स्वतःच्या संरक्षणासाठी मोठ्या वर्तुळातच धावतात. [ व्या. ज्ञा. को. ]

**एरंडोल** महाराष्ट्रातल्या जळगाव जिल्ह्यातले तालुक्याचे ठिकाण. याच्या जवळून अंजनी नदी वाहते. गावात एक जुना पडका वाडा आहे. याच्या भिंतीला विविध प्रकारचे नक्षीकाम केलेल्या सुंदर दगडी खिडक्या आहेत. याला पांडवांचा वाडा असे म्हणतात. वनवासकाळात पांडव ज्या एकचक्रा नगरीत राहत होते, ती नगरी म्हणजे एरंडोल हीच असावी व तिथून पाच मैलांवर असलेले पद्मालय हेच बकासुराचे वधस्थान असावे, अशी आख्यायिका आहे. पद्मालयाच्या काठी स्वयंभू गणपतीचे मंदिर आहे. जवळच भीमकुंड आहे. इथे कार्तिक पौर्णिमेला यात्रा असते. [ म. जि. – जळगाव ]

**एरनाडन** एक वन्य जमात. हिला अरनाडन असेही म्हणतात. केरळातल्या कालिकत जिल्ह्यातील एरनाड तालुक्यात या लोकांची वस्ती आहे. यांची संख्या अत्यल्प म्हणजे हजाराच्या आतच आहे. हे लोक अत्यंत मागसलेले आहेत. त्यांचा रंग काळा असून, उंची मध्यम असते. त्यांचे हात लांब आणि शरीर पिळदार असते. त्यांचे कपडे अत्यंत अपुरे आणि अस्वच्छही असतात. त्यांच्या स्त्रिया गळ्यात मण्यांच्या माळा, हातात बांगड्या आणि अंगठ्या घालतात. त्यांच्या कानांत मोठमोठी कडी असतात.

त्यांच्या झोपड्या रानात डोंगराच्या पायथ्याशी असतात. त्या अतिशय ठेंगण्या, गवताने शाकारलेल्या आणि चारही बाजूंनी मोकळ्याच असतात. त्यांचा संसार गाडग्यामडक्यांचा असतो. शेकोटी पेटवून ते तिच्या भोवती झोपतात. त्यामुळे थंडी व जंगली जनावरे यांपासून त्यांचे रक्षण होते.

हे लोक पूर्वी शिकार करीत आणि फळे-मुळे गोळा करून त्यांवर उपजीविका करीत. हल्ली ते बांबू तोडण्याचे काम करतात आणि मध, डिंक, इ. पदार्थ गोळा करून बाजारात विकतात. काहीजण शेतमजूर म्हणूनही काम करतात.

हे लोक कोणत्याही प्राण्याचे मांस खातात. अजगर पकडून त्यांचे कातडे विकतात आणि मांस आवडीने खातात. दारूही त्यांना फार प्रिय आहे.

**विवाहप्रथा** – मुलामुलींचे विवाह सर्वसाधारणपणे ती वयात आल्यावर होतात. लग्न आईबाप ठरवतात किंवा मुले-मुली पळून जाऊनही विवाह करतात. असा विवाह निंद्य मानला जात नाही. वधू-वरांनी एकत्र जेवणे आणि एकमेकांना घास देणे हा विवाहातील मुख्य विधी होय. काहीजण वधूच्या गळ्यात ताळी बांधतात. सांप्रत सहा रुपये वधूमूल्य देतात आणि मुलीचे आईबाप जिवंत असेपर्यंत दरवर्षी त्यांना सहा रुपये द्यावे लागतात. समागमासाठी पतिपत्नी रानात जातात.

पतीच्या किंवा पत्नीच्या इच्छेनुसार घटस्फोट घेता येतो.

या लोकांना कोणताच धर्म नाही.

या लोकांत ग्रामप्रमुखाची पद्धत नाही. सर्व वडील मंडळी एकत्र जमून तक्रारींचा न्यायनिवाडा करतात आणि तो सर्वांना बंधनकारक असतो. ज्यांना निर्णय मान्य नसतो, ते आपल्या झोपड्या जाळून टाकतात आणि दुसरीकडे निघून जातात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते पुरतात. पुरण्यापूर्वी त्याच्या अंगाभोवती ताज्या पाने गुंडाळतात. सात ते बारा दिवस सुतक पाळतात. [ ट्रा. के. ]

## एरवल्लर

केरळमधील पालघाट व तामिळनाडूमधील कोइंमतूर जिल्ह्यात राहणारी एक जंगली जमात. विदडु-वेदन असे हिचे मूळ नाव होते. हे तमिळ–मलयाळम भाषा बोलतात. शेतमजुरी हा यांचा व्यवसाय आहे. हे लोक विश्वासू व देवभीरू आहेत. काली, मुनी, कन्निमार आणि कुरुपरामन हे यांचे देव होत. पहिल्या दोहोंची पूजा रानात करतात व बाकीच्यांची घरात करतात. हे लोक भूतपूजकही आहेत. हे उत्तम शिकारी आहेत. शिकारी ससे, पक्षी, डुकरे यांना मारून त्यांचे मांस खातात. हे नायर, कम्मालर व इझावा यांच्या घरी जेवतात; पण मन्नन, परयन व चेरुमन यांना शिवतही नाहीत. हे लोक केस लांब वाढवितात. बायका पांढ्या मण्यांच्या माळा व पितळेच्या अंगठ्या घालतात. ओणम, विशू व पोंगल हे यांचे मुख्य सण होत.

**विवाहप्रथा** – लग्न ठरले, की वधू-वरांचे आईवडील ज्यांच्या शेतीवर मजुरी करतात, त्या जमीनदारांना पानसुपारी व तंबाखू देऊन ती बातमी सांगतात. लग्न सोमवारी करतात. रविवारी वरपक्षाच्या बायका वधूला रुपया व पितळेची अंगठी देतात. विधवेला फक्त विधुराशीच लग्न करता येते. काडीमोड देण्याचीही चाल आहे. लग्नापूर्वी एखादी मुलगी गरोदर राहिली तर जुन्या काळी तिला मृत्युदंड देत; पण अलिकडे फक्त जातिबहिष्कृत करतात. मुलीला न्हाण आले, की तिला दूर एका झोपडीत ठेवतात. सात दिवसानंतर तिला न्हायला घालून घरी आणतात. प्रसूतीच्या वेळी तिला अशीच दूर झोपडीत ठेवतात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते पुरतात. प्रेताचे डोके दक्षिणेकडे ठेवतात. मृताला सहाव्या दिवशी भात, केळी व कोंबडी अर्पण करतात. [ का. ट्रा. स. इं.; म. ज्ञा. को. ]

## एरिलिगारू

तमिळनाडूमध्ये नीलगिरीच्या पठारावर व त्याच्या पायथ्याशी असलेल्या जंगलात राहणारी एक रानटी जमात. हे लोक बहुतांशी नग्न असतात व झोपड्या न बांधता झाडाखालीच रहातात. त्यांच्या वसाहतीच्या मध्यभागी उबेसाठी व हिंस्र पशूंपासून संरक्षण होण्यासाठी एक आगटी सदैव पेटलेली असते. हे लोक शेळ्या, मेंढ्या व गुरे यांची निपज करतात; जाळ्या लावून वाघ धरतात; केळी व नारिंगे यांच्या बागा लावतात. सभोवतालच्या अनेक भाषांच्या मिश्रणाने बनलेली अशी एक वेगळीच भाषा हे लोक बोलतात. [ म. ज्ञा. को. ]

## एरुवाक पौर्णिमा

ज्येष्ट पौर्णिमा. आंध्रांतल्या शेतकऱ्यांचा एक सण. शेतात नांगर धरण्याचा हा दिवस असतो. या दिवशी शेतकरी आपले बैल व आउते धुवून काढतात. बैलांच्या अंगावर नवी झूल व दागिने घालतात आणि त्यांना गोडाधोडाचा नैवेद्य दाखवितात. मग गावातले सगळे शेतकरी मिळून गावभर त्यांची मिरवणूक काढतात आणि बैलांसह आपल्या शेतांत जाऊन नांगरणीचा मुहूर्त करतात. [ आं. सा. इ. ]

## एरेंगा मुंड

एक आदिवासी जमात. ही मुंडांची एक शाखा आहे. बिहारमध्ये कोल्हन, गंगपूर, आणि बिरू या प्रदेशात जंगले आणि डोंगर यांच्या आश्रयाने हे राहतात. इंग्रजांनी यांना गुन्हेगार जमातींत घातले होते. त्यांच्यावर पोलिस-खात्याची सक्त नजर असे. ते आपल्या वसाहतीजवळ एक गुप्त भुयार खोदीत व पोलिसांचा छापा आला, की त्यात लपून बसत. त्यांच्यामध्ये दरोडे घालण्याची जबरदस्त प्रवृत्ती होती. ते तिथल्या संस्थानांत व मोठ्या जमीनदारींत सशस्त्र

दरोडे घालीत, जाळपोळ करीत आणि स्त्रियांवरही बलात्कार करीत; पण अलिकडे त्यांची ही गुन्हेगारी प्रवृत्ती कमी झाली असून, ते आता शेती आणि शेतमजुरी यांसारखे व्यवसाय करू लागले आहेत.

त्यांची मूळ भाषा मुंडारी ही आहे. पण ते एक वेगळीच भाषा बोलतात. तिला चोरांची हिंदी असे नाव आहे. ती जलद बोलली असतां कोणाला कळत नाही.

एरेंगांचा इतिहास व धर्म यांविषयी माहिती मिळविणे दुरापास्त झाले आहे. आपले पूर्वज बिरूच्या बाजूने येऊन सरंद व बोनाइ इथे स्थायिक झाले, असे ते सांगतात. मुंडांप्रमाणे यांचीही अनेक गोते असतात. यांच्यातला रोटीबेटी व्यवहार कडक असतो. ते आपल्या गोताबाहेर अन्न घेत नाहीत व मुलीही देत नाहीत. मुंडांप्रमाणे ते बोंगाला भजतात. याशिवाय हुटुबोंगा नावाचा त्यांचा एक ग्रामदेवही असतो. यांच्यात जादूटोणा आढळत नाही. हो आदिवासींचा व यांचा धार्मिक संबंध आहे. ते लोक भुताखेतांना बलिदान करण्यासाठी एरेंगांना पुरोहित म्हणून बोलावितात. इतर बाबतींत मात्र हो व त्या भागातल्या अन्य जमाती यांना अस्पृश्यांप्रमाणेच लेखतात.

**विवाहप्रथा** – एरेंगा तरुणाला एखादी मुलगी आवडली, की तो आपल्या काही सोबत्यांना बरोबर घेऊन तिला पळवून आणतो. मुलीच्या आई-बापांना त्या तरुणाचा पत्ता लागला, की ते त्याच्या आई-बापांकडे जाऊन मुलीच्या किंमतीबद्दल वाटाघाटी करतात. गुरे, डुकरे, कोंबडी, शेळ्या-मेंढ्या, ही पाळीव जनावरे मुलीची किंमत म्हणून तिचा बाप वसूल करतो. एवढे झाल्यावर मग लग्न होते. घरात बाळंतपण झाल्यावर सबंध घर आशौचात पडले, असे समजतात. विशिष्ट दिवशी एक पांढरा कोंबडा देवाला बळी देतात व त्याचे रक्त बाळंतिणीला पाजतात.

**मृतकप्रथा** – हे लोक प्रेते जाळतात. प्रेताचे दहन चालू असता एक बैल चितेजवळ बांधून ठेवतात. त्या वेळी तो हंबरला, तर ते सुचिन्ह मानून मृतात्म्याला गती मिळाली, असे समजतात. दहन झाल्यावर त्या बैलाच्या डोक्यावर घण घालून त्याला ठार करतात. [ एन्सा. मुंडा. ]

**एलापत्र** सहस्रफणांचा एक नाग. श्रावणमासात हा नाग सूर्याबरोबर राहतो (भाग. पु. १२.११.३७.).

मध्य प्रदेशातील भरहूत येथील शिल्पात बुद्धाच्या दर्शनार्थ आलेल्या नागराजांच्या अनेक प्रतिमा आहेत. त्यांत एलापत्राच्या दोन भिन्न प्रकारच्या मूर्ती दिसतात. एका रूपात त्याला पाच फणा असून, मधल्या फणेवर एक युवती आहे. हे त्याचे संपूर्ण नागरूप होय. दुसरे रूप अर्धमानव आहे. त्यात त्याच्या मानवमस्तकाच्या मागे नागफणा आहेत. पाली भाषे-तल्या बौद्धवाङ्मयात बुद्धाला वंदन करून त्याचे आशीर्वाद मिळविणाऱ्या अनेक नागराजांच्या कथा आहेत. त्या सर्व नागांत एलापत्र (किंवा एरकपत्र) विशेष प्रसिद्ध आहे. [ डे. हि. इ. ]

**एलापूर** हे सध्याचे वेरूळ होय. राष्ट्रकूट राजा कृष्णराज (पहिला) याच्या इ. स. ७६८ च्या एका ताम्रपटा-वरून असे दिसते, की त्याने कांची येथील कैलासनाथ मंदिराच्या धर्तीवर इथे एक मंदिर बांधले (एपि. इं. १३ पृ. २७५). हे श्राद्धयोग्य क्षेत्र असल्याचे मत्स्यपुराण सांगते (२०.५०). पाहा – वेरूळ. [ हि. ध.; हि. जॉ. ए. इं. ]

**एलुरू** आंध्र प्रदेशातील प. गोदावरी जिल्ह्यातले एक प्रमुख स्थान. इथून १३ कि. मी. अंतरावर पट्टावेंगी येथे पूर्व चालुक्यांची राजधानी वेंगी या प्राचीन नगरीचे अवशेष आढळतात. नागार्जुनाचे शिष्य आर्यदेव व दिङ्नागाचार्य यांचे प्रसिद्ध बौद्ध विद्यापीठ तिथेच असून, त्याचेही बरेच अवशेष तिथे सापडले आहेत. त्या अवशेषांतील काही पाषाणखंड तिथला किल्ला बांधताना वापरलेले दिसतात. ओडिसाच्या गणपती राजाकडून विजयनगरच्या कृष्णदेवरायाने हे नगर घेतले. नंतर ते गोवळ-कोंडयाच्या कुतुबशाहाने जिंकले. [ म. वि. को. ]

**एल्लाई कुरुप्पू** तमिळ प्रदेशातील ग्रामसीमेवरचा एक देव. याला पशुबळी देत नाहीत; पण ग्राम-देवतेच्या जत्रेत मारलेल्या पशूंच्या रक्तात कालविलेला भात मात्र अर्पण करतात. [ व्हि. गॉ. सा. इं. ]

**एवया मरुत्** अत्रिकुलातला एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील सत्याऐंशीव्या सूक्ताचा हा कर्ता आहे. मरुतांची स्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. त्यांचे अनेक गुणविशेष या सूक्तात प्रकट झालेले आहेत. ते उत्साही, उदार, स्पर्धाशील, सामर्थ्यशाली, रुद्रपुत्र, इ. आहेत असे याने सांगितले आहे. याची एक ऋचा (५.८७.८.) अशी –

अद्वेषो नो मरुतो गातुमेतन
श्रोता हवं जरितुरेवयामरुत् ।
विष्णोर्महः समन्यवो युयोतन
स्मद रथ्यो न दंसनाऽप द्वेषांसि सनुतः ॥

अर्थ – रथी योध्याप्रमाणे अनेक पराक्रम करणाऱ्या हे इंद्र-सदृश, भक्तवत्सल आणि थोर मरुतांनो, एवया मरुताने रचलेले यज्ञीय स्तोत्र तुम्ही श्रवण करा. आमच्या द्वेष्ट्यांचा नाश करा.

एवया कवी असून या सूक्तात त्याचा अनेकवार उल्लेख आढळतो. [ प्रा. च. को.; ऋ. म. भा.; सी. ऋ. ]

**एवाव्रत** एक काम्य स्त्रीव्रत. आश्विन अमावास्येला उपवास व रात्री गव्हाचे व कोणत्याही एका धान्याचे भोजन असा याचा विधी आहे. फल-अखंड सौभाग्याची प्राप्ती.

**एव्हरेस्ट** जगातील सर्वोच्च पर्वतशिखर. हे हिमालयाच्या हिमाद्री रांगेत नेपाळ–तिबेट सीमेवर आहे. त्याची उंची ८,८४७.६ मी. आहे. भारताच्या सर्वेक्षण विभागातील एक अधिकारी राधानाथ शिखधर याने इ. स. १८५२ मध्ये त्या सर्वोच्च शिखराचा शोध लागल्याचे सर्वेक्षणप्रमुख सर अँड्रू लाँ याला सांगितले. सर्वेक्षण विभागाचा पहिला प्रमुख सर जॉर्ज एव्हरेस्ट याने हिमालय पर्वताची प्रथम पाहणी केली आणि त्याने केलेल्या निरीक्षण नोंदीवरून राधानाथ याला या शिखराची उंची २९,००२ फूट असल्याचे आढळले. इ. स. १८५६ मध्ये या शिखराला एव्हरेस्टचे नाव देण्यात आले. आता भारतीय सर्वेक्षण विभागाने या शिखराची उंची २९,०२८ फूट किंवा ८,८४८ मीटर ठरविली आहे. यालाच गौरीशंकर असे म्हणतात.

हे सर्वोच्च शिखर गाठण्याचे प्रयत्न अनेक गिर्यारोहकांनी केले. इ. स. १९२२ मध्ये ब्रिटिश गिर्यारोहकांनी ८,२३० मीटर उंची गाठली. १९२४ ची ब्रिटिश तुकडी ८५३४ मी. पेक्षा थोडे वर चढून गेली. शेवटी १९५३ मध्ये सर जॉन हंट याच्या नेतृत्वाखाली गेलेल्या ब्रिटिश तुकडीतील एडमंड हिलरी व शेर्पा तेनसिंग नोर्के हे दोघे २९ मे रोजी या शिखरावर चढून जाण्यात यशस्वी झाले. त्यानंतर स्विस, अमेरिकन, भारतीय व जपानी तुकड्याही हे शिखर चढून जाण्यात यशस्वी झाल्या. या मोहिमांत अनेक गिर्यारोहकांनी आपले प्राण गमावले. [ म. वि. को. ]

**एशियाटिक सोसायटी** एक ज्ञानसंस्था. इ. स. च्या एकोणिसाव्या शतकात इंग्रजांच्या अमदानीत भारतात ज्ञानसंवर्धनाचे कार्य वेगाने सुरू झाले, त्याचा प्रणेता सर विल्यम जोन्स हा होय. त्याने इ. स. १७८४ साली कलकत्ता येथे एशियाटिक सोसायटी ऑफ बेंगॉल, या संस्थेची स्थापना केली. तोच त्या संस्थेचा अध्यक्षही झाला. भारतीय कला, शास्त्रे, साहित्य, इतिहास आणि प्राचीन अवशेष यांचा अभ्यास करणे, हे या संस्थेचे उद्दिष्ट होते. इतिहासाचा व संस्कृत भाषेतील ज्ञानभांडाराचा शास्त्रीय पद्धतीने अभ्यास करण्यासाठी स्थापन झालेली, ही पहिलीच संस्था होय. ही संस्था पुढे अनेक विद्वानांना मार्गदर्शक ठरली. विल्यम चेंबर्स, ग्लॅड्विन, हॅमिल्टन व चार्ल्स विल्किन्स हे या सोसायटीचे मूळ सभासद होते. विल्यम जोन्सने शाकुंतलाचा व मनुस्मृतीचा इंग्रजी अनुवाद केला. विल्यम चेंबर्स हा प्राच्यविद्यांचा पंडित होता. ग्लॅड्विनने अकबराच्या कायदेकानूंचे भाषांतर केले. हॅमिल्टनने काही पर्शियन ग्रंथ इंग्रजीत अनुवादिले. चार्ल्स विल्किन्स याने संस्कृत ग्रंथांच्या मुद्रणाचा पाया घातला. विल्यम जोन्सने चालविलेल्या या महान ज्ञानकार्याला हिंदुस्थान सरकारने पाठिंबा दिला.

संस्कृत विद्येच्या अध्ययनाच्या बाबतीत कलकत्त्याच्या या सोसायटीचे मुंबई प्रांतातही लगेच अनुकरण झाले. सर जेम्स मॅकिंटॉश याने त्या कामी पुढाकार घेतला. रेकॉर्डर म्हणून मुंबईत त्याची नेमणूक झाली होती. इ. स. १८०४ साली तो मुंबईत आला व त्याच साली त्याने एशियाटिक सोसायटी ऑफ बाँबे या संस्थेची स्थापना केली. त्या वेळचा मुंबईचा गव्हर्नर जोनॅथन डंकन याने मॅकिंटॉशला त्या कामी बरीच मदत केली. त्याने सोसायटीचा अध्यक्ष म्हणून मॅकिंटॉशचीच नेमणूक केली. सोसायटीच्या मार्फत एक सार्वजनिक वाचनालय सुरू करण्याचे ठरले. त्यासाठी मुंबईतल्या वैद्यकीय व्यवसायातील काही लोकांनी जमविलेला मोठा ग्रंथसंग्रह सोसायटीने विकत घेतला. प्राचीन अवशेषांचा बहुमोल वस्तुसंग्रह कॅप्टन बेसिल हॉल याने, मुंबईत वस्तुसंग्रहालय स्थापले जावे म्हणून सोसायटीला बहाल केला. मुंबई सरकारनेही अनेक संस्कृत ग्रंथ वेळोवेळी सोसायटीला दिले. एशियाटिक सोसायटीच्या कार्याचा वृत्तान्त म्हणजे भारताच्या ज्ञानोपासनेच्या इतिहासातील एक महत्त्वाचे पर्व होय. [ म. सा. पु. ]

**ऐंद्रवायवपात्र** एक यज्ञीय पात्र. हे वेकळीचे करतात. या पात्रात इंद्र व वायू यांच्यासाठी सोम घेतात. या पात्राच्या गळयाला रास्ना करतात. घागरीच्या गळयाला दोरी बांधावी तशी ही रास्ना असते.

**ऐंद्र व्याकरण** ब्रह्मदेव व देवेंद्र शक्र यांनी पाणिनीच्या पूर्वी व्याकरणविषयक काही नियम प्रस्थापित केले होते, अशी अनुश्रुती आहे. देवतांनी इंद्राला 'वाचं व्याकुरु' =वाणीचे व्याकरण कर, अशी प्रार्थना केल्याचा उल्लेख तै. संहितेत आहे. सामवेदाच्या ऋक्तंत्रनामक प्रातिशाख्यात लिहिले आहे, की ब्रह्मचाने इंद्राला व इंद्राने भारद्वाजाला व्याकरण शिकविले व पुढ भारद्वाजाकडून अन्य ऋषींना ते व्याकरण प्राप्त झाले (१.४). [ पा. का. भा. ]

**ऐंद्रीपूजन** एक देवीव्रत. आषाढातल्या कोणत्याही पक्षातल्या नवमीला शुभ्र ऐरावतावर आरूढ अशा श्वेतवर्ण ऐंद्री देवतेची पूजा करून नक्त भोजन करणे, असा याचा विधी आहे. [ व्र. प. ]

**ऐंन साई** इ. स. च्या १९ व्या शतकातला एक मुसलमान संत. हा ग्वाल्हेर येथे जन्मला. तरुण वयातच त्याने फकिरी पत्करली. पुढे तो दतिया (म. प्र.) येथे सिफशहाच्या मठात राहू लागला. आजही त्याची शिष्यशाखा त्या भागात दिसते. त्याने गीतेचा संक्षेपानुवाद उर्दूत केला आहे. त्याचा 'ऐंन साई की हिलारे' हा पद्यग्रंथ सुप्रसिद्ध आहे.

**ऐ** बारावा स्वरवर्ण. कंठ व तालू ही याची उच्चारणस्थाने होत. हा दीर्घ असून, प्लुतही होतो. उदात्तादी भेदाने त्रिविध व अनुनासिक–अननुनासिक या भेदाने सहा प्रकारचा होतो. कामधेनुतंत्रात याचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे –

**ऐकारं परमं दिव्यं महाकुण्डलिनीस्वयम् ।**
**कोटिचन्द्रप्रतीकाशं पञ्चप्राणमयं सदा ।।**

अर्थ – ऐकार हा परम दिव्य, महाकुंडलिनी आहे. तो कोटिचंद्राइतका प्रकाशमय असून पंचप्राणमय आहे.

मातृकान्यासात खालचा ओठ, हे याचे स्थान आहे. त्रिपुरा-लोहिता, भौतिकासन इ. याची अनेक नावे आहेत.

**अक्षरविकास** – इसवी सनपूर्व दुसऱ्या शतकातल्या हाथीगुंफा येथील लेखात पहिल्या अवस्थेतील 'ए'ला डोक्यावर आडवी रेघ काढून 'ऐ' बनविल्याचे दिसून येते. दुसऱ्या अवस्थेतील 'ए'ला मात्रा देऊन 'ऐ' केल्याचे उदाहरण इ. स. च्या ६ व्या शतकातील उष्णीषविजयधारिणीच्या पुस्तकात आढळते. पुढील शतकातील कुयारकोट लेखात तिसऱ्या अवस्थेतील 'ए'ला चांगली मोठी मात्रा देऊन ऐ अक्षर काढले आहे. दहाव्या शतकात असाच ऐ काढीत असत, असे दिसते. बाराव्या शतकातील हस्तलिखित पुस्तकात हल्लीचा वळणदार ऐ पाहायला सापडतो. [ म. ज्ञा. को.; श. क. ]

**ऐकादशिन पशुयाग** पशुयागाचा हा एक विशेष प्रकार आहे. यात अग्नी, सरस्वती, सोम, पूषा, बृहस्पती, विश्वेदेव, इंद्र, मरुत, इंद्राग्नी, सविता, आणि वरुण या देवतांना प्रत्येकी एक पशू अर्पण करतात. या यागात अकरा पशूंसाठी तेरा किंवा एकच यूप पुरतात. तेरा यूपांपैकी अकरा यूप हे अकरा पशूंसाठी असतात. बाराव्या यूपाला उपशय असे नाव असून, तो भूमीत न पुरता यूपांच्या दक्षिणेला आडवा ठेवतात. हा यूप सर्वांत उंच असतो. तेराव्या यूपाला पात्नीवत असे नाव असून, जमिनीत पुरल्यावर त्याची उंची यजमानाच्या नाभीपेक्षा जास्त नसते.

पात्नीवत यूपाला बांधलेला पशू त्वष्टयासाठी असून, तो न मारता सोडून देतात. [ हि. ध. ]

**ऐघरा** ओडिसामधला एक ग्रामीण उत्सव. हा डोल महिन्याच्या पौर्णिमेस करतात. एक छोटीशी झोपडी बांधून रात्री तिची पूजा करून ती पेटवितात. पेटताना ती ज्या बाजूला कलंडेल त्या बाजूच्या भागात पिके चांगली येतील, असे समजतात. हा अग्न्युत्सवाचाच एक प्रकार आहे. हा उत्सव केल्याने घरे जळत नाहीत, अशी समजूत आहे. [ स्ट. ओ. फो. ]

**ऐतरेय** ऋग्वेदाच्या ऐतरेय ब्राह्मणाचा कर्ता. महीदास हे याचे खरे नाव आहे. त्याच्या आईचे नाव इतरा असे होते. त्यावरून पुढे त्याला ऐतरेय म्हणू लागले, असे सायण म्हणतो. ऐतरेय आरण्यकात याचा वारंवार उल्लेख येतो (२.१.८; ३.७). हा दासीपुत्र असूनही श्रेष्ठ कसा मानला गेला, याविषयी सायणाचार्याने एक आख्यायिका दिली आहे, ती पुढीलप्रमाणे –

एका महर्षीला अनेक भार्या होत्या. त्यांतल्या इतरा नामक भार्येला महीदास नावाचा एक पुत्र झाला. त्याला अनेक सावत्र-बंधू होते. महीदास बुद्धिमान असूनही तो बापाला आवडत नसे. एके दिवशी तो महर्षी आपल्या सर्व मुलांसह एका यज्ञाला गेला. तिथे त्याला पुत्रवात्सल्याचा उमाळा येऊन त्याने महीदासाला वगळून बाकीच्या पुत्रांना जवळ घेतले. महीदासाला तो अपमान सहन झाला नाही. रडत रडत घरी येऊन त्याने घडलेली हकीकत आपल्या आईला सांगितली. तिला आपल्या मुलाचा कळवळा आला. तिने आपली कुलदेवता भूमाता हिचा धावा केला. ती तत्काळ प्रगट झाली. तिने महीदासाला हाती धरून त्या यज्ञसभेत आणले. त्याला सिंहासनावर बसवून ती सर्वांना म्हणाली, की 'हा महीदास सर्व कुमारांत श्रेष्ठ आहे.' त्याच वेळी तिने त्याला वरही दिला, की 'तू ब्राह्मणसंज्ञक वेदवाङ्मयाचा द्रष्टा होशील !' त्या वराने महीदासाला स्फूर्ती झाली व त्याने चाळीस अध्यायांचा एक ब्राह्मणग्रंथ निर्माण केला. त्या ग्रंथालाच पुढे ऐतरेय ब्राह्मण असे नाव मिळाले.

हा ११६ वर्षे जगला. उत्तरायुष्यात रोगाने याला जर्जर केले; पण तो रोगाला निर्धारवचन बोलला, की 'मी तुझ्या त्रासाने मरणार नाही.' (छांदो. ३.१६.७; जै. उ. ब्रा. ४. २. ११.) [ लो. सा. रू.; प्रा. च. को. ].

**ऐतरेय आरण्यक** हे ऋग्वेदाचे आरण्यक असून, याचे पाच भाग व अठरा अध्याय आहेत. पहिल्यात पाच, दुसऱ्यात सात, तिसऱ्यात दोन, चौथ्यात एक व पाचव्यात तीन अध्याय आहेत. प्रत्येक अध्यायात काही खंड आहेत. ऐ. आरण्यक हा ऐ. ब्राह्मणाचाच एक भाग होय. यात तत्त्वज्ञानात्मक विचारांपेक्षा यज्ञविषयक विवेचनच अधिक आहे. महाव्रत नामक श्रौतविधीच्या होत्रासंबंधी याच्या पहिल्या, चौथ्या व पाचव्या आरण्यकात विचार केलेला आहे. दुसरे आरण्यक आध्यात्मिक विचारांचे असून, पहिल्या तीन अध्यायात पुरुष या नावाने विचार केलेला आहे. तिसऱ्या आरण्यकात ऋग्वेदाच्या संहिता, पदपाठ व क्रमपाठ या तीन पठनांच्या गूढ अर्थाविषयी रूपकात्मक विवेचन असून, सृष्टीतील काही चमत्कार प्रत्यक्ष अथवा स्वप्नात पाहिल्यास तद्विषयक शांतीची काही विधानेही सांगितली आहेत. चौथ्या आरण्यकात महानाम्नी ऋचांचे संकलन आहे. पाचव्यात महाव्रताच्या माध्यंदिन सवनात म्हटल्या जाणाऱ्या निष्केवल्य शस्त्राचे विवरण आहे. [वै.सा.; म.ज्ञा.को.]

**ऐतरेय उपनिषद** हे ऋग्वेदाचे उपनिषद आहे. ऐ. आरण्यकाच्या दुसऱ्या विभागातील चौथ्यापासून पुढचे तीन अध्याय एवढ्या भागाला ऐ. उपनिषद म्हणतात. पहिल्या अध्यायात जग हे ब्रह्मापासून निर्माण झाले असून, मनुष्य हा त्याचे अत्युच्च व्यक्त स्वरूप होय; तसेच मनुष्यामधल्या इंद्रिये, मन व हृदय या तीन करणात आत्मा वास करीत असून, तदनुरूप त्याला जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्था उत्पन्न होतात, असे म्हटले आहे. दुसऱ्या अध्यायात वामदेवाच्या तीन जन्मांची मीमांसा आणि तद्विषयक तत्त्वज्ञान सांगितले आहे. या उपनिषदात पुनर्जन्माची कल्पना निश्चयात्मक रूपाने प्रतिपादिली असून, सर्व सचेतन-अचेतन पदार्थ एकाच प्रज्ञानरूप चैतन्याची रूपे होत, असे म्हणून शेवटच्या अध्यायात अद्वैत तत्त्वज्ञानाची मूलतत्त्वे सांगितली आहेत. 'प्रज्ञानं ब्रह्म' हे या उपनिषदातील महावाक्य होय. सर्वाधिष्ठान, शुद्ध, अद्वय असे जे चैतन्यमय प्रज्ञान तेच ब्रह्म असून, त्यांच्या ज्ञानाने मुक्ती मिळते, असा या उपनिषदाचा उद्घोष आहे. [उपनिषद्रहस्य]

**ऐतरेय ब्राह्मण** हे ऋग्वेदाचे ब्राह्मण आहे. याचे चाळीस अध्याय असून पाच अध्यायांची एक अशा आठ पंचिका आहेत. यज्ञातले हौमकर्म व त्या कर्मात ऋग्वेदातल्या कोणत्या ऋचा कोणत्या ठिकाणी म्हणायच्या, हा या ब्राह्मणाचा मुख्य विषय आहे. याचा मोठा भाग सोमयागाने व्यापलेला आहे. पहिल्या सोळा अध्यायांत अग्निष्टोमाचा ऊहापोह आहे. सतरा व अठरा या दोन अध्यायांत ३६० दिवस चालणाऱ्या गवामयन सत्राचा विचार केलेला आहे. एकोणीस ते चौव्वीस या अध्यायांत द्वादशाह यागाचे विवरण आहे. पंचवीस ते बत्तीस या अध्यायांत अग्निहोत्राची चर्चा आलेली आहे. शेवटच्या आठ अध्यायांत राज्याभिषेकाच्या विधी सविस्तर दिलेला आहे.

सायणाने जी आख्यायिका दिली आहे, तिच्यावरून पाहता ऐतरेय ब्राह्मण हा ग्रंथ एकाच्याच हातचा असावा, असे वाटते. श्री. ना. गो. चापेकर यांना हे मत मान्य आहे; पण डॉ. श्री. व्यं. केतकर या ग्रंथांतला बराच भाग मूळचा नसावा असे म्हणतात. सोमयागाला धरून जो मजकूर असेल, तो मूळचा व अवांतर विषय मागाहून त्याला जोडलेला असावा, असे त्यांचे मत आहे. वेबर, कीथ इ. विद्वानांचे मतही आपल्यासारखेच असल्याचे डॉ. केतकर सांगतात.

**रचनाकाल** – ऐ. ब्राह्मण व कौषीतकी ब्राह्मण ही दोन्ही यास्काला माहीत होती व यास्कपूर्व शाकल्यालाही माहीत होती. यावरून या ब्राह्मणाचा काळ सनपूर्व ६०० वर्षांच्या पूर्वीचा असला पाहिजे, असे मानावे लागते. हा झाला बाह्य पुरावा. प्रस्तुत ग्रंथात ज्या ऋत्विजांचा व राजांचा उल्लेख येतो, त्यावरूनही वरील कालालाच पुष्टी मिळते. ऐ. ब्राह्मणात जनमेजयाच्या राज्याभिषेकाचे वर्णन आहे. हा जनमेजय संहितीकरणाच्या प्राचीन कालाच्या शेवटी शेवटी झाला. अर्थात प्रस्तुत ग्रंथात प्रसिद्ध राजा म्हणून त्याचा उल्लेख येणे स्वाभाविकच आहे. त्यावरून हे ब्राह्मण कुरुयुद्धानंतर लौकरच रचले गेले असावे.

**भाषा** – ऐ. ब्राह्मणाची गद्य भाषाशैली अपरिणत, बोजड व तुटक स्वरूपाची आहे. तिच्यात उपमा-उत्प्रेक्षा सहसा आढळत नाहीत. कित्येक स्थळे मात्र अशी आहेत, की तिथली भाषा सोपी, सरळ व जिवंत वाटते. शुनःशेपाची कथा हे त्याचे उत्कृष्ट उदाहरण होय. यातील गद्यापेक्षा यातल्या गाथा भाषेच्या दृष्टीने उच्च प्रतीच्या आहेत.

**अंतरंगपरिचय** – ऐतरेय ब्राह्मणाचा प्रारंभ पुढीलप्रमाणे झाला आहे–

**अग्निर्वै देवानामवमो विष्णुः परमस्तदन्तरेण सर्वा अन्या देवताः।**

अर्थ – अग्नी हा सर्व देवतांच्या अलिकडचा असून विष्णू हा पलिकडचा अर्थात सर्वश्रेष्ठ आहे आणि इतर सर्व देवता या दोहोंच्या मध्ये अन्तर्भूत आहेत.

यावरून प्रस्तुत ग्रंथाच्या काळी वरील दोन देवतांना महत्त्व प्राप्त झाल्याचे दिसून येते. निरनिराळ्या प्रसंगी इंद्र, सूर्य, इ. देवतांना महत्त्व दिलेले असले, तरी या सर्व देवता ही अग्नीच

रूपे होत, असे या ग्रंथात म्हटले आहे (३.४).

यात देवासुरयुद्धाचा आठ वेळा उल्लेख आला आहे. देव निरनिराळे यज्ञ करीत व असुर त्यांत विघ्ने आणीत आणि त्यांतून देवासुरांची युद्धे उद्भवत. देवांची यज्ञकर्मे पाहून असुरही यज्ञ करू लागले; पण त्यांतील कित्येक गूढ मंत्र व कित्येक गूढ क्रिया त्यांना न समजल्यामुळे त्यांचा यज्ञ असफल झाला व देवांकडून त्यांचा पराभव झाला. या वर्णनावरून असे दिसते, की, 'देव' संज्ञा धारण करणाऱ्या काही आर्यजनांत यज्ञविधी चालत; पण त्यांच्या क्रिया असुर संज्ञक इतर जनांस माहीत नव्हत्या. यज्ञकांड हे आर्यांच्या काही विशिष्ट समुदायांतच प्रचलित होते. यज्ञकर्मास अत्यावश्यक असलेल्या सोमाबद्दल या ब्राह्मणात बरीच मनोरंजक माहिती आली आहे. वाग्देवतेने स्त्रीरूप धारण करून गंधर्वलोकी असलेल्या सोमाला देवलोकी आणले. याविषयी कथा अशी–

एकदा यज्ञदेवता देवांपासून दूर निघून गेली. त्यामुळे देवांना पुरेसे अन्न मिळेना. म्हणून त्यांनी अदितीची प्रार्थना करून पुनश्च त्या देवतेला संपादन केले. यज्ञानेच देव स्वर्गाला गेले; पण त्या वेळी त्यांना अशी भीती वाटली, की आपल्याप्रमाणेच मानव आणि ऋषी हे देखील यज्ञ करून स्वर्गात येतील. म्हणून देवांनी त्यांची दिशाभूल करण्यासाठी यज्ञाचा यूप खाली तोंड करून पुरला; पण मानव आणि ऋषी यांनी देवांची ही लबाडी ओळखली व तेही देवांप्रमाणे यज्ञ करून स्वर्ग मिळविते झाले (ऐ. ब्रा. १.७).

ऐतरेय ब्राह्मणावरून यज्ञाची उत्क्रांती कसकशी होत गेली त्याचे दिग्दर्शन होते. प्रथम देव नामक आर्य हे नरमेध करीत असावे. शुनःशेपाची कथा नरमेधाचीच द्योतक आहे (७.१३–१८). नरमेधातून अश्वमेधाची कल्पना उगम पावली. अश्वमेधातून गवालंभ व त्यातून पुढे अजालंभ सुरू झाला. अजालंभ म्हणजे यज्ञात बोकडाचे हनन करणे होय. हा प्रघात पुढे बराच काळपर्यंत प्रचलित राहिला; पण ऐ. ब्राह्मणाच्या कालातच सर्व यज्ञांची व्रीहियज्ञात उत्क्रांती झाली होती, असे दिसून येते.

भृगू, अंगिरा इ. ऋषींनी शूद्रेचा पुत्र कवष याचा ऋषी म्हणून स्वीकार केला आहे, अशी या ब्राह्मणात आणखी एक लक्षात घेण्याजोगी गोष्ट दिसते. प्रस्तुत ब्राह्मणात विश्वोत्पत्तीविषयी पुढील कथा आली आहे –

एकदा प्रजापतीला आपली मुलगी उषा हिला पाहून कामवासना उत्पन्न झाली. तो तिच्या मागे लागला. ती रोहित मृगीचे रूप घेऊन पळू लागताच त्यानेही ऋष्य नामक मृगाचे रूप घेऊन तिचा पाठलाग आरंभिला. ते पाहून सर्व देवांनी प्रजापतीच्या अंगातल्या पापपुरुषाला मारण्यासाठी आपली भयानक स्वरूपे एकत्र केली. त्यांतून भूतवान नामक भयंकर पुरुष निर्माण झाला. त्याने प्रजापतीचा पापयुक्त मृगदेह मारला. तोच सांप्रत मृगनक्षत्राच्या रूपाने आकाशात दिसतो. रोहिणीची तारका हीच ती प्रजापतीची कन्या होय. तिच्या मागून पळत असताना प्रजापतीचे जे वीर्य पडले, त्याच्या निरनिराळ्या भागांपासून निरनिराळ्या प्राण्यांची उत्पत्ती झाली. प्रजापतीने प्रखर तप करून तीन लोक उत्पन्न केले व त्या तपाच्या तेजानेच अग्नी, वायू, आदित्य हे तीन देव, तीन वेद व त्यांपासून अ उ म् ही तीन अक्षरे उत्पन्न केली आणि अशा रीतीने सर्व चराचर सृष्टी निर्माण झाली (३.३३; ५.२३).

याव्यतिरिक्त क्षत्रिय आणि यज्ञ, नाभानेदिष्ठ, अर्बुद काद्रवेय, विश्वामित्र–वामदेव इ. कितीतरी कथा व आख्यायिका ऐ. ब्राह्मणात पाहायला मिळतात. [ म. ज्ञा. को.– वेदविद्या; वै. सा.]

## ऐतान

लिंगायतांच्या पुरोहित – वर्गातला एक उपनयनसदृश संस्कार. मुलाच्या सात ते नऊ या वर्षांच्या कालावधीत केव्हा तरी हा संस्कार करतात. त्यासाठी शुभ मुहूर्त पाहतात. संस्कारासाठी एक चौकोन आखतात. त्याच्या चारी कोनांवर तांदळाच्या राशींवर चार जलकलश ठेवतात. त्या कलशांच्या गळ्याभोवती सूत गुंडाळतात. प्रथम मुलाचे मुंडन करवून त्याला स्नान घालतात व वरील चौकोनाच्या पुढे पाटावर बसवितात. मग गुरू त्या मुलाच्या कानात काही मंत्र उच्चारतो व ते त्याच्याकडून म्हणवून घेतो. मंगल वाद्यांच्या गजरात हा समारंभ होतो. मग भोजनसमारंभ व अन्नदान होते.

ऐतान विधी झाल्यावर मग तो मुलगा पुरोहित बनतो. त्या दिवसापासून स्नान व लिंगपूजा केल्यावाचून त्याने काही खायचे नसते. [ कोल्हापूर गॅझे. ]

## ऐनुद्दीन

मूल्हकांत व किताब–उल्–अन्वार या ग्रंथांचा कर्ता. या ग्रंथांत भारतातील सर्व मुस्लिम संतांचा इतिहास दिलेला आहे. हा इतिहासकार सुलतान अल्लाउद्दीन हसन बहामन शाहा याच्या कालात (इ. स. च्या १४ व्या शतकाचा पूर्वार्ध) उदयाला आला. [ म. ज्ञा. को.]

## ऐयर कुल्लू

द. भारतातली एक जात. याचा अर्थ प्रतिष्ठित व्यक्ती असा आहे. राजकृपेमुळे यांचा सामाजिक दर्जा वाढला. यांचे पूर्वज विजयनगरच्या सैन्यात होते व त्यांनी त्या राज्याची चांगली सेवा केली. दंतकथा अशी सांगतात, की 'एक मुसलमान सेनापती यांची वस्ती उद्ध्वस्त करण्यास निघाला, त्या वेळी गावातले सगळे पुरुष

गोवळकोंड्याच्या मोहिमेवर होते. अशा स्थितीत हे सुलतानी संकट आले असता तिथल्या स्त्रिया पुरुषवेष घेऊन मुसलमानी सैन्याशी लढल्या व त्यांनी त्या सैन्याला पळवून लावले.' या त्यांच्या शौर्याबद्दल विजयनगरच्या राजाने त्यांचा सत्कार करून त्या सर्व स्त्रियांच्या पायांत चांदीचे वाळे घातले. आजही ऐयर कुलूंच्या बायका पायात चांदीचे वाळे घालतात.

हे लोक शेती करतात व बैलगाड्याही बाळगतात. यांना पाट्टडू अश्या उपाधीने संबोधिण्याची पद्धत आहे. यांच्यांतले काही लोक स्वतःला इतरांपेक्षा श्रेष्ठ समजून जानवे घालतात. नाग व कासव अशी यांची दोन देवकें आहेत. यांच्या एका शाखेत मामेबहिणीशीच लग्न करण्याची प्रथा आहे. मुलगी वयात येण्याच्या आधी तिचे लग्न करतात. घटस्फोट व विधवाविवाह यांना मान्य नाही. [का. ट्रा. स. इं.]

**ऐया अथवा ऐय्या** याचा अर्थ पिता असा होतो. द. भारतातील दासरी, देवांग, कोप्पळ इ. अनेक जाती स्वतःला ही उपाधी लावून घेतात. पूर्वी ही उपाधी फक्त ब्राह्मणच घेत असत; पण आता प्रत्येक ठिकाणचा स्थानिक पुजारी ती स्वतःला लावून घेतो. [का. ट्रा. स. इं.]

**ऐरावत** (१) एक हत्ती. इरावानाचा पुत्र व नागांचा राजा (अथर्व. ८.१०.२९; पं. ब्रा. २५.१५.३.). नंतरच्या वाङ्मयात याला इंद्राचा हत्ती असे म्हटले आहे. हा समुद्रमंथनातून उत्पन्न झाला व इंद्राचे वाहन बनला. हा शुभ्रवर्णाचा असून, याला चार सुळे आहेत. इंद्राने याला पूर्वदिशेचे स्वामित्व दिले. कृष्ण व इंद्र यांच्या युद्धात गरुडाने याचा पराभव केला होता. [वे. इं.; पु. इं.]

(२) धृतराष्ट्र नावाच्या नागाचे पैतृक नाव. कद्रूपुत्र नागांना ऐरावत म्हणतात. जनमेजयाच्या सर्पसत्रात यांची दहा कुळे दग्ध झाली. [पु. इं.; प्रा. च. को.]

**ऐरावत धन्व** मध्य आशियातल्या गोबीच्या वाळवंटातला एक प्रदेश, ऐरावत धन्व या नावाने प्रसिद्ध असावा, असे डॉ. वासुदेवशरण अग्रवाल म्हणतात. पांडवांनी महाप्रस्थानाच्या प्रवासात हिमालय ओलांडून वाळूचा समुद्र पाहिला व त्याच्या जवळच असलेल्या मेरू पर्वताचे दर्शन घेतले, असे महाप्रस्थानिक पर्वात म्हटले आहे (२.२). पामीरचे पठार हाच मेरुपर्वत होय. इथेच ऐरावत वर्ष असल्याचे भीष्मपर्वात म्हटले आहे (६.३७). यावरून ऐरावत वर्ष व ऐरावत धन्व या दोहोंचे स्थान मध्य आशियातल्या मोठ्या वाळवंटातच असले पाहिजे, असे समजून येते. [पा. का. भा.]

**ऐरिणीदान** विवाह-संस्काराच्या उत्तरांगातला एक विधी. याला महाराष्ट्रात झाल असे म्हणतात. ऐरिणी म्हणजे वंशपात्र अर्थात वेळूच्या पट्ट्यांचे शिप्तर. कन्यापित्याने हे वराच्या आईला वंशवृद्धीच्या उद्देशाने दान करायचे असते. या पात्रात पाच पुरणपोळ्या, पाच कच्चे पापड, इ. पदार्थ पत्रावळीवर घालून ठेवतात. पात्रात कणकीचे पंधरा दिवे पेटवून ठेवतात. सोळावा दिवा मधोमध ठेवतात. मग कन्येचा पिता पत्नीसह त्या पात्राची पूजा करतो व ते वरमातेला दान देतो. या वेळी वरमातेला चोळी-लुगडे देतात, त्याला 'मांडी चेपणे' असे नाव आहे. मग ती दिव्यांनी प्रज्वलित केलेली झाल वरपक्षातल्या प्रमुख स्त्री-पुरुषांच्या मस्तकावर ठेवतात व वधूला त्यांच्या मांडीवर बसवितात. वरमातेच्या मांडीवर वधूला बसविल्यावर वधुपक्षीय स्त्रिया 'जड का हलू?' असे वरमातेला विचारतात. ती 'मध्यम' असे उत्तर देते व वधूच्या मुखात साखरेची चिमूट घालते. या वेळी वधूपिता वराच्या वडिलधाऱ्या मंडळींना पुढील श्लोकाने प्रार्थना करतो—

**अष्टवर्षा त्वियं कन्या पुत्रवत्पालिता मया।**
**इदानीं तव पुत्राय दत्ता स्नेहेन पाल्यताम् ।।**

अर्थ—आठ वर्षांची माझी ही मुलगी आजवर मी मुलाप्रमाणे सांभाळली आहे. आता मी ती तुझ्या पुत्राला दिली आहे. (तुम्ही सर्वांनी) तिचे प्रेमाने पालन करावे.

एवढे झाल्यावर वधू सोळा ब्राह्मणांना सौभाग्यवायने देते. वेळूचे संस्कृत नाव वंश असे आहे. वंशवृद्धी हा विवाहाचा एक उद्देश असतो. तेव्हा वंशवृद्धीसाठी वंशपात्र म्हणजे वेळूचे शिप्तर दान द्यावे, असा हा विधी नामैक्यावरून प्रचलित झाला असावा. [हि. ध.; ल. वि. सो.]

**ऐलक** हा शब्द अचेलक=वस्त्रहीन, यावरून बनला आहे. प्रथम हा शब्द जैनांतल्या नग्न मुनींना लावला जात असे. पुढे जेव्हा नग्न मुनींना निर्ग्रंथ किंवा दिगंबर म्हणू लागले, तेव्हा ऐलक शब्द ११ व्या प्रतिमाधारीला व नाममात्र वस्त्र-खंड धारण करणाऱ्या उत्कृष्ट श्रावकाला लावला जाऊ लागला. ऐलकाला उभ्या उभ्या भोजन करणे, केशलुंचन करणे व मयूर-पिच्छिका बाळगणे या गोष्टींचा अधिकार असतो. [व. श्रा.]

**ऐसोदशव्रत** एक जैन व्रत. हे व्रत पुरे होण्यास ६५० दिवस लागतात. यात ५५० उपवास व १०० पारणा असतात. कोणत्याही महिन्यापासून याचा प्रारंभ करता येतो.

प्रथम एक दिवस उपवास, एक पारणा, नंतर दोन दिवस उपवास, एक पारणा, अशा प्रकारे हे दहा दिवस उपवासांपर्यंत वाढवीत न्यायचे व नंतर उलट्या क्रमाने नऊ दिवस उपवास, एक पारणा, आठ दिवस उपवास, एक पारणा अशा रीतीने एका उपवासापर्यंत यायचे. अशी दहा आवर्तने झाली, की सर्व उपवास व पारणा पूर्ण होतात. [ जै. व्र. वि. सं. ]

**ऐहोळ** (सं. आर्यपुर) हे स्थान कर्नाटकात विजापूर जिल्ह्यात मलप्रभेच्या तीरावर व बादामीच्या पूर्वेस १२ मैलांवर वसलेले आहे. चालुक्य राजा पुलिकेशी (पहिला) याने आपली राजधानी बादामीला नेण्यापूर्वी ती ऐहोळ येथे होती. दुसऱ्या पुलिकेशीच्या एका शिलालेखात (इ. स. ६३४) या स्थानाचा उल्लेख ऐइयाओळे असा केलेला आहे. त्यावरूनच याला ऐहोळे हे नाव मिळाले असावे. इथल्या लहानशा परिसरात सुमारे ३०–३५ मंदिरे आहेत. त्यातली काही चालुक्यांनी बांधलेली तर काही त्यांच्याही पूर्वीची आहेत. त्यावरून १५०० वर्षांपूर्वी कर्नाटकाची शिल्पकला किती प्रगत आणि वैभवशाली होती, याची स्पष्ट कल्पना येते. आजमितीस तिथे थोडीच मंदिरे चांगल्या स्थितीत आहेत. पण त्या मंदिरांच्या ढासळलेल्या अवशेषांतही उत्कृष्ट शिल्प आढळते. इथली बहुतेक मंदिरे इ. स. च्या पाच ते सात या शतकांतली आहेत. येथील स्थापत्यात बांधणीची निश्चित नियमबद्धता दिसून येत नाही. ऐहोळचे स्थापती बांधणीचे वेगवेगळे प्रयोग करीत होते, असे दिसते.



लाडखानाचे मंदिर–ऐहोळ

ऐहोळच्या मध्यभागी 'लाडखानाचे मंदिर' नामक एक हिंदू मंदिर आहे. ते बरेचसे कोरीव लेण्याच्या धर्तीवर आहे. या मंदिराचे छप्पर सपाट आहे. त्यात एकाच्या पोटात दुसरा असे दोन मंडप आहेत. या शिल्पात नक्षीकाम बेताचेच आहे; पण जे आहे, ते मात्र स्पष्ट आणि प्रभावी आहे. त्याच्या भिंतींत जी जाळीदार दगडी गवाक्षे बसविली आहेत, त्यांतल्या माशांच्या आकृती मनोज्ञ आहेत. मंदिराच्या मुख्य भागापेक्षा पडवीचे खांब दर्शनीय असून, त्यावरच्या पूर्णाकृती प्रतिमा रेखीव आहेत. गाभाऱ्यात शिवलिंग आणि मंडपात नंदी असला, तरी हे मंदिर मुळात विष्णूचे असावे. कारण, त्या ठिकाणी काही वैष्णवचिन्हे दिसतात. या मंदिरावरील एका शिलालेखावरून हे मंदिर इ. स. च्या ७ व्या शतकातले ठरते.

इथले दुर्गमंदिर हे प्रथम सूर्यमंदिर असावे. आता तिथे सर्व देवतांच्या मूर्ती आढळतात. याच्या भोवती कोट उभारलेला असल्यामुळे याला दुर्गमंदिर म्हणू लागले. हे मंदिर म्हणजे बौद्धांच्या चैत्याचे ब्राह्मणी रूपांतर होय. हे उंच दगडी जोत्यावर उभारलेले आहे. याला शिखर आहे; पण कदाचित ती रचना मागाहूनची असावी.



शिवमूर्ती–ऐहोळ

इथले तिसरे महत्त्वाचे मंदिर म्हणजे हुच्चिमल्लीगुडी. याची रचना भुवनेश्वर मधील परशुरामेश्वराच्या मंदिरासारखी आहे. मोठमोठ्या शिळा एकीवर एक चढवून याचे बांधकाम केले आहे. याचे खांब ओबडधोबड असले, तरी ते भक्कम आहेत. यांत गर्भगृह आणि सभामंडप यांच्यामध्ये एक खोली नव्याने दाखल झाली, हे याचे इतरांहून वेगळेपण होय. हिलाच विमान किंवा अन्तराळ अशी मंदिरशिल्पातली विशिष्ट अशी संज्ञा आहे. इथेही बौद्ध चैत्य-

गृहाचे अनुकरण दिसते. याच्या छतावर कार्तिकेयाची प्रतिमा कोरलेली दिसते. तिच्यावरून आणि इतरही काही चिन्हांवरून हे पूर्वी शिवमंदिर असावे, असे संशोधकांचे अनुमान आहे.

इथले विष्णुमंदिर ६ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास बांधले गेले. चालुक्य शिल्पाची ही पुढची पायरी होय. याच्या प्राकारात विष्णूचे अवतार, अष्टदिक्पाल, इ. मूर्ती कोरलेल्या आहेत. याच्या मध्यभागावरील छप्पर बाजूच्या छप्परापेक्षा बरेच उंच आहे.

इथल्या वास्तुशिल्पात द्राविड व नागर शिल्पशैलीचे मिश्रण झालेले आढळते. मंदिरांची छते गुप्तशैलीची असून, स्तंभयुक्त सभामंडप चालुक्य शैलीचे दिसतात.

ऐहोळ-शिल्पाची शेवटची प्रगत अवस्था दाखवते, ते तिथल्या एका टेकडीवरचे मेगुटीमंदिर. हे जैन स्थापत्य आहे. याची उभारणी इ. स. ६३४ साली झाली. लहान लहान शिलाखंडांनी हे मंदिर उभारले आहे. इथे पाथरवटाचे कौशल्य चांगलेच प्रतीत होते. इथल्या स्तंभावरची कलाकुसरही नाजूक आहे. ऐहोळच्या पूर्वेस व उत्तरेस काही जैन गुंफा आहेत. त्यातल्या एका गुंफेत पार्श्वनाथाची सुरेख मूर्ती आहे. [ क. द.; खं. वै.; प्रा. भा. क.; कर्नाटक ]

## ओंकार

एक पवित्र स्वरवर्ण. हा ॐ असा लिहिण्याची प्रथा आहे. भगवद्गीतेत याला एकाक्षरी ब्रह्म असे म्हटले आहे. श्री. शांताराम आठवले यांनी 'ॐकार रहस्य' या आपल्या पुस्तकात या वर्णाचे माहात्म्य वर्णिले आहे, ते असे— श्रीगणेश म्हणजेच मूर्तिमंत ओंकार. या ॐकार स्वरूप गणेशाचे ज्ञानेश्वरांनी केलेले वर्णन बहारीचे आहे. ॐ या प्रतीकरूप वात्मरूपाच्या द्वारे परब्रह्माचे सम्यक ज्ञान हीच सोऽहम् सिद्धी होय. ॐ हा ध्वनी सर्व ब्रह्मांडाला अंतर्बाह्य व्यापून राहिलेला असून, तो अत्यंत सूक्ष्म आहे, असे नादयोगात सांगितले आहे.

ॐ या अक्षराचे घटक अ, उ, म. व अर्धचंद्रावर बिंदू असे आहेत. मांडुक्य हे उपनिषद मुख्यतः ॐ काराचेच विवेचन करणारे आहे.

विश्वरूप वृक्षाचा नामरूपरंगमय विकास व विस्तार ॐ च्या ध्वनिबीजाने होतो. या दृष्टीने ॐ पासून निघालेल्या वर्णमालेतील प्रत्येक अक्षर व ध्वनी शक्तिगर्भ आहे.

मानवी शरीरातील षट्चक्रे ही चैतन्य केंद्रे आहेत. त्या प्रत्येक चक्रात काही विशेष शक्ती असते. ॐकारापासून स्वर व व्यंजने जन्म पावतात व ती शक्तिशाली ध्वनिलहरी निर्माण करतात. त्या ध्वनिलहरी निरनिराळ्या चक्रांवर प्रभावी कार्य करतात. ओंकार हा एकाक्षरी महामंत्र आहे. त्याचा ऋषी परब्रह्म, देवता परमात्मा व छंद गायत्री. याच्या जपाने मनोजय साधतो. वेदोपनिषदांतील मंत्रमयऋचा, गायत्री, मृत्युंजय हे महामंत्र, सर्व सिद्ध मंत्र आणि ईश्वरवाचक सर्व नामे ही ॐकाराचीच विविध रूपे आहेत. कोणत्याही मंत्रोच्चाराच्या पूर्वी ॐकाराचा उच्चार आवश्यक आहे.

स्वामी विवेकानंद म्हणतात—ॐकार म्हणजेच ईश्वर. म्हणून त्याचा जप करावा, त्याचे ध्यान करावे, त्याच्या अद्‌भुत स्वरूपाचे व अपूर्व अर्थाचे चिंतन करावे. सर्वदा ॐकाराचा जप करणे हीच खरी उपासना होय. ॐ हा काही एक केवळ साधा शब्द नाही. तो स्वयं ईश्वरस्वरूप आहे. पाहा – ओम; प्रणवोपासना. [ ॐकार–रहस्य ]

## ओंकार–मांधाता

ओंकारेश्वराचे क्षेत्र. बाराज्योतिर्लिंगांत याची गणना होते. हे स्थान मध्यप्रदेशातल्या निमाड जिल्ह्यात मोरटक्का स्टेशनापासून सहा मैलांवर आहे. हे नर्मदेच्या दुभंगलेल्या पात्रात बेटासारखे वसलेले आहे. एक चौरस मैल विस्तार एवढाच या बेटाचा विस्तार आहे. याच्या एका अंगाने वाहणाऱ्या प्रवाहाला नर्मदा म्हणतात व दुसऱ्या अंगाने वाहणाऱ्या प्रवाहाला कावेरी म्हणतात. बेटाच्या टोकावर कावेरी नर्मदेला मिळते. या बेटावरील डोंगराचा आकार ओंकाराशी मिळता-जुळता असल्यामुळे याला ओंकार असे नाव मिळाले. इक्ष्वाकू वंशातील युवनाश्व राजाचा पुत्र याने इथे तपश्चर्या केल्यामुळे ओंकाराला मांधात्याचे नाव जोडले जाऊन लोक या क्षेत्राला ओंकार मांधाता असे म्हणू लागले.

या एकाच क्षेत्रात ओंकारेश्वर व अमलेश्वर अशी दोन ज्योतिर्लिंगे आहेत. ओंकारेश्वरमंदिराचा आकार प्राचीन बौद्ध विहारासारखा दिसतो. मंदिरप्रदक्षिणेच्या वाटेवर शेकडो भग्नमूर्ती व बौद्धविहारांच्या द्वारासारख्या भग्न कमानी आढळतात. सांप्रतचे ओंकारेश्वराचे मंदिर अहिल्याबाईने बांधले आहे. ओंकारेश्वराचे लिंग ओबडधोबडच आहे. शिवाय हे लिंग नेमके शिखराच्या खाली नसून, ते बरेच बाजूला आहे.

असे म्हणतात, की मुसलमानी आक्रमणापासून ओंकारेश्वराचे रक्षण करण्यासाठी तिथल्या पुजाऱ्यांनी किंवा अधिकाऱ्यांनी मूळ लिंग कोणत्यातरी प्रकारे लपविले व दुसरेच एक लिंग त्याच्या बाजूला बसवून टाकले. या शिवलिंगाभोवती सदैव पाणी भरलेले असते. ओंकारेश्वराच्या जवळच पार्वती व पंचमुख गणेश यांच्या मूर्ती स्थापलेल्या आहेत. मंदिराच्या दुसऱ्या मजल्यावर महाकालेश्वरलिंग व तिसऱ्या मजल्यावर वैद्यनाथेश्वर लिंग आहे. ही दोन्ही लिंगे ठीक शिखराच्या खाली येतात. तळमजल्यावरचे ओंकारेश्वराचे लिंग मात्र बरेच बाजूला

दिसतअसल्यामुळे वर दिलेल्या आख्यायिकेत तथ्य आहेसे वाटते.

ओंकारेश्वर व अमलेश्वर या दोन ज्योतिर्लिंगांच्या स्थापनेची कथा पुढीलप्रमाणे आहे (शिव. राम. ४२.२; १८–२२)–

विंध्यपर्वत इथे पार्थिव लिंगाच्या रूपात शंकराची आराधना करीत होता. शिव प्रसन्न झाल्यावर विंध्याने त्याला म्हटले, की 'तू आपल्या दिव्य रूपात इथेच राहा.' तेव्हापासून तो ओंकारयंत्राच्या ठिकाणी ओंकारेश्वर या रूपात व पार्थिवलिंगाच्या ठिकाणी अमलेश्वर या रूपात राहिला.

यात्रिकाने प्रथम ओंकारेश्वराचे व तिथून परत येताना अमलेश्वराचे दर्शन घ्यावे, असा इथला नियम आहे. ओंकारेश्वर बेटात आहे; तर अमलेश्वर नर्मदातटाकी पलीकडे रुद्रपुरीत आहे. महाशिवरात्रीला इथे मोठी यात्रा भरते. स्कंदपुराणात या स्थळाचे माहात्म्य पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

देवस्थानसमं ह्येतत् मत्प्रसादाद् भविष्यति ।
अन्नदानं तपः पूजा तथा प्राणविसर्जनम् ।।
ये कुर्वन्ति नरास्तेषां शिवलोकनिवासनम् ।
(रेवाखंड २२)

अर्थ – (शिव म्हणतो) माझ्या प्रसादामुळे हे स्थान स्वर्गतुल्य होईल. जे लोक इथे अन्नदान, तप, पूजा किंवा प्राणविसर्जन करतील, त्यांना शिवलोकी निवास मिळेल.

या बेटावर पश्चिम भागात गौरी-सोमनाथ मंदिर असून, त्याच्या समोर एक प्रचंड नदी खडकात खोदलेला दिसतो. नदीच्या काठी विष्णूचे व वराहाचे मंदिर आहे. तिथे चामुंडीची भव्य मूर्तीही आहे.

या बेटाच्या पूर्वेकडील भागात नर्मदेच्या काठी जे कडे आहेत ते अत्यंत पवित्र मानले जातात. पूर्वी काही अत्यंत भाविक यात्रेकरू या कडयांवरून नदीत उडी घेऊन आत्मत्याग करीत, असे उल्लेख आढळतात.

इथे काही जैन मंदिरेही आहेत. [ कल्याण – तीर्थांक; मध्यप्रदेश; प्रा. स्थ. को. ]

**ओंकारवाकू** ( इ. स. चे १७ वे शतक-उत्तरार्ध ) एक संतकवी. याचा 'लीळानिधी' नावाचा मराठी ओवीबद्ध ग्रंथ असून, त्याचे १०० अध्याय आहेत. हा ग्रंथ शके १५९५ (इ. स. १६७३) मध्ये परंडपट्टणी लिहिल्याचा उल्लेख ग्रंथाच्या शेवटी आहे. यात परमेश्वराच्या लीला वर्णिल्या आहेत. [ म. म. वा. ]

**ओंगी** अंदमान-द्वीपसमूहातील छोटे अंदमान या बेटावर राहणारी एक आदिवासी जमात. हे लोक ठेंगणे असून त्यांचा रंग निग्रोंसारखा काळा असतो. त्यांच्या डोक्यावरचे केस अगदी लहान व कुरळे असतात. पुरुषांप्रमाणेच स्त्रियाही डोक्यावरले केस कापतात. पुरुष सगळेच विवस्त्र असतात. स्त्रियांच्या कमरेत कमरपट्टा असतो व पुढच्या भागी लज्जारक्षणार्थ त्याला एक झुपका बांधलेला असतो. एका मोठ्याशा झोपडीत चार-पाच कुटुंबे एकत्र राहतात. झोपण्यासाठी हे लोक बांबूची दोन अडीच फूट उंच एक खाट बनवितात. अशा तऱ्हेच्या चार पाच खाटा एका झोपडीत असतात. प्रत्येक कुटुंब आपल्या खाटेच्या शेजारीच आपापला स्वयंपाक करते. तसा यांचा स्वयंपाक विशेषसा नसतोच. कधी ते डुक्कर, मासे, बेडूक, खेकडे, इ. प्राणी विस्तवावर भाजतात, तर कधी त्यांचे मांस कच्चेच खातात. विशेष प्रसंगी झोपडीतील सर्व कुटुंबे एकत्र स्वयंपाक करतात व भोजनोत्तर नृत्य करतात. नारळ, कंदमुळे, मध यांवरही ते जगतात.



ओंगी माता व बालक

ही जमात अत्यल्प असून तिच्यात फक्त १३० माणसे आहेत. त्यांची भाषा दुसऱ्या लोकांना कळत नाही. यांच्या घरात डुकराचे मुंडके व डुक्कर, बेडूक इ. प्राण्यांचे सांगाडे टांगलेले असतात. डुकराचे मुंडके गेरूने रंगवतात व शिकारीला जाण्यापूर्वी पुष्कळ शिकार मिळावी, म्हणून त्या मुंडक्याचे दर्शन घेतात.

काही वर्षांपूर्वी हे लोक कुठल्याही बाहेरच्या माणसाला आपल्या बेटावर पाय ठेवू देत नसत. तसा कोणी प्रयत्न केल्यास त्याला त्यांच्या तिरंदाजीला बळी पडावे लागे. परंतु हल्ली हे लोक त्या बाबतीत बरेच सुधारले आहेत. इथला सरकारी नोकरवर्ग आपल्या सुखसोयीसाठी प्रयत्न करतो, हे त्यांना आता कळून चुकले आहे.

ओंगी स्त्रियांत वंध्यत्वाचे प्रमाण फार मोठे म्हणजे शेकडा

८८ टक्के एवढे आहे. त्यामुळे हे लोक अपत्यजन्म ही एक मोठी आनंदाची बाब मानतात. स्त्रीच्या गरोदरपणी सुरुवातीच्या महिन्यांत एक साधा विधी करण्याची पद्धत आहे. गरोदर स्त्री अंथरुणावर बसते. मग तिच्यासमोर एखादा पुरुष, स्त्री किंवा मूल यांना बसवितात. त्यांच्या हस्ते डुकराचे किंवा कासवाचे मांस मधात घोळवून त्याचा तुकडा तिच्या तोंडात घालतात. थोडा वेळ चघळून गर्भवती तो घास थुंकून टाकते. या विधीच्या वेळी गर्भवतीला जो पदार्थ दिला असेल, त्यावरून पुढे तिच्या मुलाचे नाव ठेवतात.

**विवाहप्रथा** – ओंगी लोकांत खऱ्या विवाहापूर्वी एक लुटुपुटीचा विवाह लावण्याची पद्धत आहे. वडीलधारी माणसे मुलीसाठी एखाद्या तरुणाची किंवा विवाहित पुरुषाचीही वर म्हणून निवड करतात. मुलाला व ठरलेल्या वधूला दोन वेगवेगळ्या बिछान्यावर बसवितात. नंतर मुलगा उठून त्या वधूचा हात धरतो व तिला आपल्या बिछान्यावर आणतो. नंतर तो मुलगा वधूला आपल्या मांडीवर घेतो व दोघे एकमेकांना आलिंगन देतात. नंतर वधू तिथून उठून आपल्या बिछान्यावर जाऊन झोपते. खरा विवाह-समारंभही अशाच पद्धतीने होतो. मुलगा आपली वधू पसंत करतो व तिच्या आई-बापांकडे तिला मागणी घालतो. आई-बाप मुलीच्या संमतीने होकार देतात. मग त्यांचे खरे लग्न लागते. त्या वेळी ती दोघे परस्परांची शरीरे रंगवितात. जमलेले स्त्री-पुरुष लग्नाच्या रात्री चेहरे रंगवून नृत्य-गायन करतात.



ओंगी नर्तक

**मर्तिकप्रथा** – ओंगी माणूस मृत झाला म्हणजे त्याला बिछान्यावर खालीच खड्डा खणून पुरतात. मृताचे सर्व नातेवाईक जमून मोठमोठ्याने आक्रोश करतात. मृत माणसाचे नाव कोणीही उच्चारीत नाहीत. पाच-सहा महिन्यांनंतर मृताचा खालचा जबडा काढून घेतात. तो तांबड्या रंगाने रंगवितात. आणि त्याला तांबडा दोर बांधून सर्व नातेवाईक क्रमाक्रमाने तो आपल्या गळ्यात बांधतात. नंतर तो जबडा परत पुरून टाकतात. हा जबडा उकरून काढल्यानंतर तीन चार दिवसांनी सर्व नातेवाईक आपले चेहरे रंगवून गातात व नाचतात. नाचताना स्त्रिया मधेच थांबून आपल्या नवऱ्याला मिठी मारतात व हुंदके देऊन रडतात. हा कार्यक्रम स्त्रिया दमेपर्यंत चालू असतो. नंतर पुरुषही तसेच करतात. हा समारंभ झाला, की सुतक संपले असे समजतात. [अंदमान ते आनंदमान, श्री. राजवाडे, १९६७; भा. द्वी.; फोकलोअर नोव्हें–डिसेंबर १९६१]

**ओ** तेरावा स्वरवर्ण. ओष्ठ व कंठ ही याची उच्चारणस्थाने होत. हा दीर्घ असून प्लुतही होतो. तसेच उदात्तादी भेदाने व अनुनासिक-अननुनासिक या भेदाने सहा प्रकारचा होतो. कामधेनुतंत्रात याचे वर्णन पुढीलप्रमाणे दिलेले आहे–

**ओकारं चञ्चलापाङ्गि पञ्चदेवमयं सदा।**
**रक्तविद्युल्लताकारं त्रिगुणात्मानमीश्वरम् ॥**

अर्थ – हे देवी, ओकार हा रक्तविद्युल्लतेच्या आकाराचा, त्रिगुणात्मक, पंचदेवमय व ईश्वर आहे.

याला सद्योजात, वासुदेव इ. अनेक नावे आहेत. मातृकान्यासात याचे स्थान वरच्या दंतपंक्तीवर येते.

**अक्षरविकास** – 'अ' पासून 'ओ' वर्ण तयार झाला असावा, ही साहजिक सुचणारी कल्पना चुकीची ठरते. कारण अशोकाच्या गिरनार–लेखात 'ओ' ची आकृती स्वस्तिकातील उभ्या भागाप्रमाणे आहे. इ. स. च्या पहिल्या शतकातील कुशाणवंशी राजाच्या वेळच्या मथुरा येथील लेखांत वरील 'ओ' वरच्या आडव्या रेघेला बराच बाक आहे. पुढील शतकातील नासिकच्या वासिष्ठीपुत्र पुलुमायीच्या लेखात खालच्या रेघेलाही बाक आहे. कार्ले लेण्यातसुद्धा असाच ओ दिसतो. पाचव्या शतकातील जयनाथच्या दानपत्रात हल्लीच्या 'उ' च्या सारखी 'ओ' ची आकृती दिसते. प्रतिहार कक्कुकाच्या घटिआलालेखात (इ. स. ८३१) हे साम्य अधिकच पटते. इ. स. १२ व्या शतकातील एका हस्तलिखित पुस्तकात 'ओ' हा 'अ' ला मात्रा देऊन काढल्यासारखा दिसतो. आज आपण काढतो, तसा ओ कुठेच आढळत नाही. पूर्वी अक्षराच्या डाव्या हाताला काना काढून मात्रेचे काम भागवीत असत. [श. क.; म. ज्ञा. को.]

**ओका-बोका** लहान मुलांचा एक खेळ. यात दहा-पाच मुले जमिनीवर बसून आपल्या दोन्ही हातांची बोटे उभी जमिनीवर टेकवितात. मग त्या समुदायातला एक मुलगा प्रत्येकाच्या हाताला स्पर्श करीत पुढील गाणे म्हणतो.

दिसतअसल्यामुळे वर दिलेल्या आख्यायिकेत तथ्य आहेसे वाटते.

ओंकारेश्वर व अमलेश्वर या दोन ज्योतिर्लिंगांच्या स्थापनेची कथा पुढीलप्रमाणे आहे (शिव. राम. ४२.२; १८–२२)–

विंध्यपर्वत इथे पार्थिव लिंगाच्या रूपात शंकराची आराधना करीत होता. शिव प्रसन्न झाल्यावर विंध्याने त्याला म्हटले, की 'तू आपल्या दिव्य रूपात इथेच राहा.' तेव्हापासून तो ओंकारयंत्राच्या ठिकाणी ओंकारेश्वर या रूपात व पार्थिवलिंगाच्या ठिकाणी अमलेश्वर या रूपात राहिला.

यात्रिकाने प्रथम ओंकारेश्वराचे व तिथून परत येताना अमलेश्वराचे दर्शन घ्यावे, असा इथला नियम आहे. ओंकारेश्वर बेटात आहे; तर अमलेश्वर नर्मदातटाकी पलीकडे रुद्रपुरीत आहे. महाशिवरात्रीला इथे मोठी यात्रा भरते. स्कंदपुराणात या स्थळाचे माहात्म्य पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

**देवस्थानसमं ह्येतत् मत्प्रसादाद् भविष्यति ।**
**अन्नदानं तपः पूजा तथा प्राणविसर्जनम् ।।**
**ये कुर्वन्ति नरास्तेषां शिवलोकनिवासनम् ।**

(रेवाखंड २२)

अर्थ – (शिव म्हणतो) माझ्या प्रसादामुळे हे स्थान स्वर्गतुल्य होईल. जे लोक इथे अन्नदान, तप, पूजा किंवा प्राणविसर्जन करतील, त्यांना शिवलोकी निवास मिळेल.

या बेटावर पश्चिम भागात गौरी-सोमनाथ मंदिर असून, त्याच्या समोर एक प्रचंड नदी खडकात खोदलेला दिसतो. नदीच्या काठी विष्णूचे व वराहाचे मंदिर आहे. तिथे चामुंडीची भव्य मूर्तीही आहे.

या बेटाच्या पूर्वेकडील भागात नर्मदेच्या काठी जे कडे आहेत ते अत्यंत पवित्र मानले जातात. पूर्वी काही अत्यंत भाविक यात्रेकरू या कडयांवरून नदीत उडी घेऊन आत्मत्याग करीत, असे उल्लेख आढळतात.

इथे काही जैन मंदिरेही आहेत. [ कल्याण – तीर्थांक; मध्यप्रदेश; प्रा. स्थ. को. ]

## ओंकारवाक्

( इ. स. चे १७ वे शतक-उत्तरार्ध ) एक संतकवी. याचा 'लीळानिधी' नावाचा मराठी ओवीबद्ध ग्रंथ असून, त्याचे १०० अध्याय आहेत. हा ग्रंथ शके १५९५ (इ. स. १६७३) मध्ये परंडपट्टणी लिहिल्याचा उल्लेख ग्रंथाच्या शेवटी आहे. यात परमेश्वराच्या लीला वर्णिल्या आहेत. [ म. म. वा. ]

## ओंगी

अंदमान-द्वीपसमूहातील छोटे अंदमान या बेटावर राहणारी एक आदिवासी जमात. हे लोक ठेंगणे असून त्यांचा रंग निग्रोंसारखा काळा असतो. त्यांच्या डोक्यावरचे केस अगदी लहान व कुरळे असतात. पुरुषांप्रमाणेच स्त्रियाही डोक्यावरले केस कापतात. पुरुष सगळेच विवस्त्र असतात. स्त्रियांच्या कमरेत कमरपट्टा असतो व पुढच्या भागी लज्जारक्षणार्थ त्याला एक झुपका बांधलेला असतो. एका मोठ्याशा झोपडीत चार-पाच कुटुंबे एकत्र राहतात. झोपण्यासाठी हे लोक बांबूची दोन अडीच फूट उंच एक खाट बनवितात. अशा तऱ्हेच्या चार पाच खाटा एका झोपडीत असतात. प्रत्येक कुटुंब आपल्या खाटेच्या शेजारीच आपापला स्वयंपाक करते. तसा यांचा स्वयंपाक विशेषसा नसतोच. कधी ते डुक्कर, मासे, बेडूक, खेकडे, इ. प्राणी विस्तवावर भाजतात, तर कधी त्यांचे मांस कच्चेच खातात. विशेष प्रसंगी झोपडीतील सर्व कुटुंबे एकत्र स्वयंपाक करतात व भोजनोत्तर नृत्य करतात. नारळ, कंदमुळे, मध यांवरही ते जगतात.



ओंगी माता व बालक

ही जमात अत्यल्प असून तिच्यात फक्त १३० माणसे आहेत. त्यांची भाषा दुसऱ्या लोकांना कळत नाही. यांच्या घरात डुकराचे मुंडके व डुक्कर, बेडूक इ. प्राण्यांचे सांगाडे टांगलेले असतात. डुकराचे मुंडके गेरूने रंगवतात व शिकारीला जाण्यापूर्वी पुष्कळ शिकार मिळावी, म्हणून त्या मुंडक्याचे दर्शन घेतात.

काही वर्षांपूर्वी हे लोक कुठल्याही बाहेरच्या माणसाला आपल्या बेटावर पाय ठेवू देत नसत. तसा कोणी प्रयत्न केल्यास त्याला त्यांच्या तिरंदाजीला बळी पडावे लागे. परंतु हल्ली हे लोक त्या बाबतीत बरेच सुधारले आहेत. इथला सरकारी नोकरवर्ग आपल्या सुखसोयीसाठी प्रयत्न करतो, हे त्यांना आता कळून चुकले आहे.

ओंगी स्त्रियांत वंध्यत्वाचे प्रमाण फार मोठे म्हणजे शेकडा

८८ टक्के एवढे आहे. त्यामुळे हे लोक अपत्यजन्म ही एक मोठी आनंदाची बाब मानतात. स्त्रीच्या गरोदरपणी सुरुवातीच्या महिन्यांत एक साधा विधी करण्याची पद्धत आहे. गरोदर स्त्री अंथरुणावर बसते. मग तिच्यासमोर एखादा पुरुष, स्त्री किंवा मूल यांना बसवितात. त्यांच्या हस्ते डुकराचे किंवा कासवाचे मांस मधात घोळवून त्याचा तुकडा तिच्या तोंडात घालतात. थोडा वेळ चघळून गर्भवती तो घास थुंकून टाकते. या विधीच्या वेळी गर्भवतीला जो पदार्थ दिला असेल, त्यावरून पुढे तिच्या मुलाचे नाव ठेवतात.

**विवाहप्रथा –** ओंगी लोकांत खऱ्या विवाहापूर्वी एक लुटुपुटीचा विवाह लावण्याची पद्धत आहे. वडीलधारी माणसे मुलीसाठी एखाद्या तरुणाची किंवा विवाहित पुरुषाचीही वर म्हणून निवड करतात. मुलाला व ठरलेल्या वधूला दोन वेगवेगळ्या बिछान्यावर बसवितात. नंतर मुलगा उठून त्या वधूचा हात धरतो व तिला आपल्या बिछान्यावर आणतो. नंतर तो मुलगा वधूला आपल्या मांडीवर घेतो व दोघे एकमेकांना आलिंगन देतात. नंतर वधू तिथून उठून आपल्या बिछान्यावर जाऊन झोपते. खरा विवाहसमारंभही अशाच पद्धतीने होतो. मुलगा आपली वधू पसंत करतो व तिच्या आई-बापांकडे तिला मागणी घालतो. आई-बाप मुलीच्या संमतीने होकार देतात. मग त्यांचे खरे लग्न लागते. त्या वेळी ती दोघे परस्परांची शरीरे रंगवितात. जमलेले स्त्री-पुरुष लग्नाच्या रात्री चेहरे रंगवून नृत्य-गायन करतात.



ओंगी नर्तक

**मृतकप्रथा –** ओंगी माणूस मृत झाला म्हणजे त्याला बिछान्यावर खालीच खड्डा खणून पुरतात. मृताचे सर्व नातेवाईक जमून मोठमोठ्याने आक्रोश करतात. मृत माणसाचे नाव कोणीही उच्चारीत नाहीत. पाच-सहा महिन्यानंतर मृताचा खालचा जबडा काढून घेतात. तो तांबड्या रंगाने रंगवितात. आणि त्याला तांबडा दोर बांधून सर्व नातेवाईक क्रमाक्रमाने तो आपल्या गळ्यात बांधतात. नंतर तो जबडा परत पुरून टाकतात. हा जबडा उकरून काढल्यानंतर तीन चार दिवसांनी सर्व नातेवाईक आपले चेहरे रंगवून गातात व नाचतात. नाचताना स्त्रिया मधेच थांबून आपल्या नवऱ्याला मिठी मारतात व हुंदके देऊन रडतात. हा कार्यक्रम स्त्रिया दमेपर्यंत चालू असतो. नंतर पुरुषही तसेच करतात. हा समारंभ झाला, की सुतक संपले असे समजतात. [ अंदमान ते आनंदमान, श्री. राजवाडे, १९६७; भा. द्वी.; फोकलोअर नोव्हें–डिसेंबर १९६१ ]

## ओ

तेरावा स्वरवर्ण. ओष्ठ व कंठ ही याची उच्चारणस्थाने होत. हा दीर्घ असून प्लुतही होतो. तसेच उदात्तादी भेदाने व अनुनासिक-अननुनासिक या भेदाने सहा प्रकारचा होतो. कामधेनुतंत्रात याचे वर्णन पुढीलप्रमाणे दिलेले आहे–

**ओकारं चञ्चलापाङ्गि पञ्चदेवमयं सदा।**
**रक्तविद्युल्लताकारं त्रिगुणात्मानमीश्वरम् ॥**

**अर्थ –** हे देवी, ओकार हा रक्तविद्युल्लतेच्या आकाराचा, त्रिगुणात्मक, पंचदेवमय व ईश्वर आहे.

याला सद्योजात, वासुदेव इ. अनेक नावे आहेत. मातृकान्यासात याचे स्थान वरच्या दंतपंक्तीवर येते.

**अक्षरविकास –** 'अ' पासून 'ओ' वर्ण तयार झाला असावा, ही साहजिक सुचणारी कल्पना चुकीची ठरते. कारण अशोकाच्या गिरनार–लेखात 'ओ' ची आकृती स्वस्तिकातील उभ्या भागाप्रमाणे आहे. इ. स. च्या पहिल्या शतकातील कुशाणवंशी राजाच्या वेळच्या मथुरा येथील लेखांत वरील 'ओ' वरच्या आडव्या रेघेला बराच बाक आहे. पुढील शतकातील नासिकच्या वासिष्ठीपुत्र पुलुमायीच्या लेखात खालच्या रेघेलाही बाक आहे. कार्ले लेण्यातसुद्धा असाच ओ दिसतो. पाचव्या शतकातील जयनाथच्या दानपत्रात हल्लीच्या 'उ' च्या सारखी 'ओ' ची आकृती दिसते. प्रतिहार कक्कुकाच्या घटिआलालेखात (इ. स. ८३१) हे साम्य अधिकच पटते. इ. स. १२ व्या शतकातील एका हस्तलिखित पुस्तकात 'ओ' हा 'अ' ला मात्रा देऊन काढल्यासारखा दिसतो. आज आपण काढतो, तसा ओ कुठेच आढळत नाही. पूर्वी अक्षराच्या डाव्या हाताला काना काढून मात्रेचे काम भागवीत असत. [ श. क.; म. ज्ञा. को. ]

## ओका-बोका

लहान मुलांचा एक खेळ. यात दहा-पाच मुले जमिनीवर बसून आपल्या दोन्ही हातांची बोटे उभी जमिनीवर टेकवितात. मग त्या समुदायातला एक मुलगा प्रत्येकाच्या हाताला स्पर्श करीत पुढील गाणे म्हणतो.

**ओका बोका तीन तडोका । लडवा लाठी चंदन काठी ।**
**बाग में बगडवा डोले । सावनमें करइली फूले ।**
**ओ करइली के नांव का ? इजइल बिजइल, पानवा फूलवा ढोढिया पचक ॥**

हे त्याचे गाणे ठेक्यात चालते. प्रत्येक ठेक्याला तो मुलांच्या एकेका हातावर बोट ठेवीत जातो आणि ' पचक ' शब्द येताच त्या मुलाच्या हातावर मूठ मारून तो हात जमिनीसरपट करतो. [ लो. सा. भू. ]

**ओकोपोई** अंदमानी आदिवासीतले विशिष्ट पुरुष. यांना दिव्यदृष्टी असते. त्या दृष्टीमुळे त्यांना स्वप्नांचे अर्थ कळतात, भूमिगत संपत्ती दिसते व दुसऱ्या गावी काय चालले आहे, तेही कळते, अशी समजूत आहे. [ प्रि. क. इं. ]

**ओ क्यां को** राजस्थानातील मुलांचा एक खेळ. क्रीडास्थानी मुले एकत्र जमल्यावर त्यांतला एक मुलगा हात उंच उभारून इतर खेळाडूंना विचारतो, ' ओ क्यां को ?' यावर बाकीचे एका आवाजात म्हणतात, ' आल को. ' मग तो मुलगा खेळाडूंतल्या कोण्या एकाचे नाव घेऊन म्हणतो,–

**इकें सिर पर जिको नई देगो ।**
**जिको मोडी रांड चिंडाल को ।**

ही एक शिवी असते. ती ऐकल्यावर तिचा प्रभाव दूर करण्यासाठी ज्याला शिवी दिली असेल, त्याच्या डोक्यावर सगळे लोक थपडा मारायला धावतात. तो त्या थपडा चुकविण्यासाठी धावत सुटतो; पण सर्व मुले त्याला पकडून थपडा लगावतातच. सर्वांच्या थपडा लगावून झाल्या, की मग त्यालाही तोच प्रश्न विचारला जातो. तो दुसऱ्या कोणाचे तरी नाव घेतो. मग मुले त्याच्यामागे लागतात. अशा रीतीने हा खेळ सगळ्या मुलांची नावे घेऊन होईपर्यंत चालतो.

**ओक्कलियन** कानडी शेतकऱ्यांची तमिळनाडमध्ये जाऊन वसलेली एक शाखा. हे लोक स्वतःला आनेगुंदीच्या बल्लाळ राजाचे वंशज समजतात. हे मूळचे शेतकरी होते; पण आता त्यांनी दूधविक्री, गवंडीकाम, शिंपीकाम, विडचा वळणे, इ. धंदे पत्करले आहेत. यांच्यांत पोटजाती पुष्कळ आहेत. त्यांच्यांतली अरुव ही पोटजात शैव आणि हट्टी ही वैष्णव आहे. शैव-वैष्णवांत विवाह होतात. मागालिअम्म व कोनिअम्म या यांच्या ग्रामदेवता असून, ते त्यांना कोंबडचाबकऱ्यांचे बळी देतात.

**विवाहप्रथा** – वधूपेक्षा कित्येक प्रसंगी वर अल्पवयी असतो. लग्नाच्या वेळी वधूगृही जाताना तो एक बांबूची काठी, अलंकार, कंकणे, ताळी, फळे, नारळ, कोरी चटई, कापूर इ. वस्तु आपल्याबरोबर नेतो. लग्नाच्या वेळी तो आपल्या हाती टोकाला लिंबू खोचलेली कटचार धरतो.

मुलीला प्रथम रजोदर्शन झाले, की तिचा मामा किंवा मामेभाऊ तिच्याकरिता माडाच्या झावळ्यांची एक निराळी झोपडी बांधून देतो. ती त्या झोपडीत राहते व तिचे नातेवाईक तिला दररोज कपडे, फळे व फुले आणून देतात. तिथे तिला एका दिवसाआड स्नान घालतात. सातव्या दिवशी तिची पहिली झोपडी मोडून तिच्यासाठी दुसरी झोपडी बांधतात.

जातीचा कोणीतरी पुढारी असतो. तो ज्ञातिसभा भरवून तंटे-भांडणे मिटवितो व व्यभिचार, मारामारी, इ. अपराधांबद्दल गुन्हेगाराला दंड किंवा शिक्षा करतो.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना पुरतात. प्रेतयात्रा चालू असता मृतावर फुले, नाणी, भात इ. वस्तू उधळतात. मृताची विधवा आपल्या बांगडचा फोडून त्याच्या थडग्यात टाकते. तिसऱ्या दिवशी फणसाच्या डहाळचा जाळून त्या राखेची मृताची प्रतिमा बनवितात, तिच्यावर फुले टाकतात व दूध घालतात. ११ दिवस सुतक पाळतात. ११ व्या दिवशी ब्राह्मणाकडून पंचगव्य घेऊन शुद्ध होतात व ज्ञातिभोजन घालतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**ओगलिया** कुमाऊँ (उत्तर प्रदेश) प्रदेशात साजरा होणारा सिंहसंक्रांतीचा सण. इंग्रजी राज्य येण्यापूर्वी चंद राजे त्या प्रदेशावर राज्य करीत होते (इ. स. १४०० ते १८००). त्या दिवशी विविध कलात्मक वस्तू प्रजेकडून राजाला भेट म्हणून दिल्या जात. या उपायनाला ओगल असे नाव होते. या दिवशी उडदांच्या डाळीचे वडे करण्याची प्रथा आहे. या दिवशी पुष्कळ ठिकाणी जत्रा भरतात. त्या दिवशी हुडका नावाचे वाद्य वाजवून पहाडी लोक गाणी गातात. हा येथील आदिवासी जातींचा प्राचीन उत्सव आहे. [ संमेलनपत्रिका – लोकसंस्कृतिविशेषांक. ]

**ओच्छन** तमिळनाडमधील व मलबारमधील वाद्यवादकांचा एक वर्ग. हे लोक पिडारी व इतर ग्रामदेवतांचे पुजारीही असतात. देवालयात असताना हे जानवे घालतात. ' ओच्छन ' ही या लोकांची पदवी असून, ती तिरुवितांकुरच्या राजाने त्यांना दिलेली आहे. ओच्छन शब्दातला मूळ धातू ओच्छै = आवाज करणे, असा आहे. हे लोक मृदंग वाजवून ग्रामदेवतांच्या स्तुतिपर गाणी म्हणत. त्यावरून त्यांना ही पदवी दिली गेली. याशिवाय त्यांना आच्छिक, उमै आच्छिक, दीवर,

पुलवर आणि कंबन अशाही उपाधी आहेत. शेवटची उपाधी तमिळ रामायण लिहिणाऱ्या कंबन या महाकवीवरून त्यांना मिळाली आहे. कारण कंबन हा ओच्छन वर्गातला होता.

यांच्यातले बरेचसे लोक शैव आहेत, तर काही थोडे वडगळ किंवा तिंगळ या वैष्णवपंथातले आहेत. चिंगलपुट जिल्ह्यातील काही ओच्छन देवदासींना नृत्य शिकवितात. त्यांना नट्टुवान म्हणतात. मद्रासच्या उत्तरेकडील जिल्ह्यांत ओच्छनांचे मारयन, पांडी, कंडप्पन, पेरिय अर्थात पल्लवरायन व पुलवन असे पाच पोटभेद आहेत. दक्षिणेकडील जिल्ह्यांत ओच्छन लोक आत्याच्या मुलीवर हक्क सांगून तिच्याशी लग्न करतात. उत्तरेकडील जिल्ह्यांतले ओच्छन मामेबहीण किंवा मावसबहीण हिच्याशी लग्न करतात. यांचे बहुतेक धार्मिक विधी पल्ली व वन्नियन लोकांच्याप्रमाणे आहेत.

हे प्रेते जाळतात. यांच्या अंत्यकर्माचे पौरोहित्य ब्राह्मण करतात.

ही जमात संघटित असते. प्रत्येक ठिकाणी त्यांचा एक वर्गप्रमुख असतो. त्याला परियथन कारन म्हणतात व त्याच्या आदेशानुसार सर्व महत्त्वाची कामे होतात. पाहा – मारान. [ का. ट्रा. स. इं. ]

**ओजली** आंध्रप्रदेशातील एक जात. यांना वोजली किंवा ओझोलू असेही म्हणतात. हे लोहारकाम करतात. चोळांच्या कारकिर्दीत आपण ब्राह्मणांच्या बरोबरीचे आहो, असे हे प्रतिपादू लागले. त्यामुळे चोळराजा रागावला आणि त्याने त्या सर्व लोकांचा शिरच्छेद करण्याचा हुकूम दिला. त्या आपत्तीतून बचावण्यासाठी त्यांच्यांतल्या काही लोकांनी ओझू नावाच्या जातीचा आश्रय घेतला. पुढे या उपकाराची कृतज्ञता म्हणून ते ओझू हे नाव आपल्या नावापुढे जोडू लागले. उदा० कट्टोझू, लक्कोझू इत्यादी. [ का. ट्रा. स. इं. ]

**ओझर** अष्ट विनायकांपैकी विघ्नेश्वर गणपतीचे स्थान. हे पुणे जिल्ह्यात, जुन्नर तालुक्यात नारायण गावापासून ५ मैलांवर, कुकडी नदीच्या काठी आहे. गणपतीने या ठिकाणी विघ्नासुराचे पारिपत्य केले म्हणून त्याला विघ्नेश्वर हे नाव मिळाले.

इथले गणेशमंदिर पूर्वाभिमुख असून, भोवती दगडी तट आहे. चिमाजी अप्पाने या मंदिराचा जीर्णोद्धार केला. बाजीराव पेशवे या गणेशाचे अनन्य भक्त होते. गाभाऱ्यात चारी बाजूंना कोनाड्यांत पंचायतनाच्या मूर्ती आहेत. एका बाजूच्या भिंतीवर कमलारूढ लक्ष्मीचे चित्र व दुसऱ्या बाजूच्या भिंतीवर विष्णूचे चित्र आहे. गाभाऱ्यासमोर ओळीने तीन सभामंडप आहेत. मूर्ती पूर्णाकृती डावीकडे सोंड व मांडी घातलेली अशी आहे. [ अष्ट विनायक ]

**ओझा** हे लोक गोंडांचे भाट असून, शकुनप्रश्न सांगणारे आहेत. यांतले काही लोक आता सातपुड्यातल्या कोरकूंचेही जोशी बनले आहेत. गोंडांचे ओझा त्यांच्या घरी जाऊन करताळ वाजवीत नाचतात व त्यांच्याकडून बिदागी मिळवितात. [ म. ज्ञा. को. ]

**ओटी भरणे** सुवासिनी किंवा गर्भिणी यांच्या लुगड्यांच्या ओच्यात किंवा पदरात तांदूळ, सुपारी, हळकुंड, नारळ इ. वस्तू घालतात, त्याला ओटी भरणे असे नाव आहे. ओटी भरणे हे गर्भधारणेचे प्रतीकविधान आहे. कारण, सासुरवाशीण माहेरी जाऊ लागली म्हणजे तिला फक्त कुंकू लावतात; पण तिची ओटी भरीत नाहीत. कारण स्त्री, किंवा वधू माहेरी असताना तिला गर्भधारणा होण्याचा संभवच नसतो. माहेरवाशीण सासरी जाऊ लागली म्हणजे मात्र तिची ओटी भरतात. ओटी म्हणजे बेंबीखालचे पोट होय. तिथेच स्त्रीचा गर्भाशय असतो. गर्भाधानालाही ओटभरण अशी संज्ञा आहे. ओटीत घातलेली फलपुष्पे ही संततीची सूचक असून, तांदूळ हे विघ्ननिवारक आहेत. लग्नसमारंभात अनेक सुवासिनींच्या ओट्या भरतात, त्यांतही विवाहित वधूला संतानप्राप्ती व्हावी, हाच गर्भित उद्देश असतो. पहिल्या गर्भारपणात, पाचव्या महिन्यात गर्भिणीची ओटी भरतात. एकदा हा ओटीभरणाचा सोहळा झाला, की मग प्रसूतिपर्यंत गर्भिणीची ओटी भरीत नाहीत. [ चित्पावन ]

**ओट्टम् थुळ्ळल** कथकळी नृत्यातला एक प्रमुख प्रकार. प्रख्यात मलयाळम् कवी कुंचन नंबियार हा या नृत्याचा जनक होय. हे एकाच नटाने करायचे नृत्यनाट्य असते. विशिष्ट प्रकारची वेषभूषा व रंगरेखणी करून एकच नट रंगभूमीवर येतो व एखादे आख्यान मुद्राभिनयांच्या द्वारे प्रेक्षकांना विदित करतो. या नृत्याची आख्याने रामायण-महाभारतातील असतात. नटाच्या मागे दोन साथीदार उभे असतात. त्यातला एक मृदंग आणि दुसरा टाळ वाजवून नृत्याला साथ करतो.

थुळ्ळल नृत्याचे तंत्र कथकळीप्रमाणे शास्त्रशुद्ध व काटेकोर नाही. त्याचे वैशिष्ट्य हे, की ते पूर्णपणे लोकाभिमुख आहे. मलबारमधील सर्व जनतेवर त्याची विलक्षण छाप आहे. लोकांच्या

वर्तमानकालीन जीवनाशी त्याने आपला मेळ बसविला असल्यामुळे ते आजतागायत केरळात विलक्षण लोकप्रिय ठरले आहे. 'गरिबांची कथकळी' या नावाने त्याचा उल्लेख होतो. तंत्राचा बडेजाव नसल्यामुळे थुळ्ळल नृत्य करणारा नट प्रेक्षकांशी चटकन् समरस होतो.

परयन, शीतंकन, व ओट्टम असे थुळ्ळल नृत्याचे तीन प्रकार आहेत. त्यापैकी ओट्टम हा प्रकार विशेष लोकप्रिय आहे. ओट्टन हे मलयालम काव्यातले एक वृत्त आहे. ते द्रुतगती आहे. थुळ्ळल नृत्य हे ओट्टन वृत्तात रचलेल्या कथाकाव्यावर आधारलेले असते. थुळ्ळल नृत्यपद्धती इ. स. च्या १८ व्या शतकाच्या मध्यावर जन्माला आली, तो प्रसंगही मोठा मनोरंजक आहे–

एके दिवशी एका कृष्णमंदिरात एक चाकियार कूत्तू नामक नृत्यनाट्याचा प्रयोग करीत होता. त्या दिवशी कुंचन नंबियार याला मिझाऊ नावाचे वाद्य वाजवून चाकियारची साथ करावी लागली. ते काम करीत असता कुंचनला एकाएकी डुलकी आली. चाकियारला हे सहन न होऊन त्याने भरल्या सभेत कुंचनाची हजेरी घेतली. त्याच्यावर तोंडसुख घेताना चाकियारने यत्किंचितही मागेपुढे पाहिले नाही. कूत्तू हा धार्मिक नाट्यप्रसंग असल्यामुळे चाकियार कोणाला काहीही बोलला, तरी कोणी त्याचा प्रतिवाद करायचा नाही, असा सक्त नियम आहे. त्यामुळे कुंचनला ते बोलणे सहन करावे लागले. प्रयोग संपल्यावर त्या अपमानाच्या दंशाने फणफणतच तो घरी गेला. या अपमानाचे उट्टे काढलेच पाहिजे, असे त्याने मनाशी ठरविले. हा बुद्धिमान होता, कवी होता आणि प्रत्युत्पन्नमतिही होता. त्याने त्या रात्री महाभारतातल्या 'भीम–मारुती–भेट' या प्रसंगावर एक आख्यान रचले व दुसऱ्याच दिवशी रात्री रंगभूषा करून त्याच देवळाच्या प्राकारातल्या एका चौथऱ्यावर तो उभा राहिला. आपल्या अभिनयाच्या द्वारे तो आख्यानात रंग भरू लागला.



नर्तक–ओट्टम् थुळ्ळल

मंदिरात चाकियारचे ठराविक पद्धतीचे कूत्तू आख्यान सुरू होते आणि बाहेर कुंचनने आपला नवा खेळ मांडला होता. मधून मधून विनोदी कोट्या करून तो समोरच्या प्रेक्षकांना हसवीत होता. तो हास्याचा खळखळाट ऐकून मंदिरातले प्रेक्षकही बाहेर पडले आणि कुंचनच्या प्रेक्षकात येऊन बसले. कुंचनने रात्रभर त्यांना हसवीत ठेवले आणि उजाडता प्रसन्न मनाने घरी पाठविले.

त्याच रात्री सामान्य जनतेला समजेल आणि रंजवील अशी कथकळीची एक लोकाभिमुख शाखा प्रकट झाली. कुंचनने चौसष्ट थुळ्ळल आख्याने रचली आणि ती रंगभूमीवर जनतेला सादर केली. त्यापुढे त्याने आपले समग्र जीवनच थुळ्ळल नृत्याला वाहिले. थुळ्ळलची आजची जडण–घडण, वेषभूषा, अभिनयाची रीत, ही सारी त्या कलेला कुंचनचीच देणगी आहे.

थुळ्ळल नर्तकाची रंगभूषा आणि वेषभूषा वैचित्र्यपूर्ण असते. तो कमरेला करदोटा बांधून त्यात तांबड्या–पांढऱ्या रंगाच्या कापडाची तीन इंच रुंदीचीं लांबच लांब पट्टी अशा प्रकारे गुंफतो की तिचा गुडघ्यापर्यंत लोंबणारा परकर बनावा. तो अंगावर मण्यांचे अलंकार घालतो. मस्तकावर मणिजडित किरीट चढवितो. चेहऱ्यावर हनुवटीवरून या कानापासून त्या कानापर्यंत एक पांढरा पट्टा ओढतो. ओठ व डोळ्यांच्या कडा लाल करतो. पायात चाळ बांधतो व कपाळावर जाति-विशिष्ट चिन्ह उमटवितो.

अशी वेषभूषा करून नर्तक रंगभूमीवर प्रविष्ट होताच प्रेक्षकांकडून हास्याची फैर झडते. तिकडील देवस्थानांतल्या उत्सवात थुळ्ळल नृत्याचे प्रयोग होतात. थुळ्ळलचा प्रयोग दोन-अडीच तास चालतो. [ मार्च ऑफ इंडिया, मे-जून, १९५३; मार्ग, डिसेंबर १९५७; केरळ ]

**ओट्टुक्कूत्तन** तमिळनाडमधला कंबनचा समकालीन एक कवी. या दोघांच्या संबंधी एक आख्यायिका प्रचलित आहे, ती अशी – कंबन व ओट्टुक्कूत्तन दोघेही मोठे विद्वान होते. त्या दोघांच्यामध्ये स्पर्धाही होती. कंबनप्रमाणेच ओट्टुक्कूत्तननेही तमिळ भाषेत रामायण रचले होते; पण कंबनचे रामायण जनतेत लोकप्रिय झाले आणि त्यामुळे ओट्टुक्कूत्तनचे रामायण मागे पडले. या गोष्टीचे ओट्टुक्कूत्तनला फार दुःख झाले आणि तो एके दिवशी आपले रामायण जाळायला निघाला. ही गोष्ट कंबनला समजताच तो त्या जागी धावत आला. एवढ्या अवधीत सहा कांडे भस्मसात झाली होती. ओट्टुक्कूत्तनचा हात धरून कंबनने सातवे उत्तरकांड तेवढे वाचविले. त्या कालावधीपर्यंत कंबनच्या रामायणाची युद्धकांडाच्या अखेरीपर्यंत रचना झाली होती. कंबनने ओट्टुक्कूत्तनचा आदर करण्यासाठी आपले रामायण तिथेच थांबविले व ओट्टुक्कूत्तनचे उत्तरकांड आपल्या रामायणाला जोडून आपली कृती पूर्ण केली. [ त. सां. सं. ]

**ओडव** पंचस्वरयुक्त राग. यात ऋषभ आणि पंचम हे स्वर वर्ज्य असतात. याचे लक्षण संगीतरत्नाकरात पुढील-प्रमाणे दिले आहे–

**वान्ति यान्त्युडवोऽत्रेति व्योमोक्तमुडवं बुधैः ।**
**पञ्चमं तच्च भूतेषु पञ्चसंख्या तदुद्भवा ।**
**ओडवी साऽस्ति येषां च स्वराते त्वोडवा मताः ।।**

अर्थ – नक्षत्रे ज्यातून गमन करतात, ते उडव होय. उडव म्हणजे आकाश. ते भूतांतले पाचवे असते. त्यावरून ओडव शब्दाने पाच ही संख्या लक्षित होते. ज्या रागांच्या स्वरांची संख्या पाच असते, ते ओडव होत.

मल्लारादी राग हे ओडव होत, असे म्हटले आहे [ श. क. ]

**ओडारी** ओडारी किंवा वोडारी हे दक्षिण कानडा (मंगळूर) जिल्ह्यात राहणारे, कुंभारकाम करणारे व तुळू भाषा बोलणारे लोक होत. ज्यांनी कुंभारकाम सोडले, ते स्वतःला 'मूलिया' म्हणतात. हे क्षुद्रदेवतांच्या देवळांत पुजाऱ्याचे काम करतात. ओडारी लोकांचे कुंभारकामाचे चाक प्राथमिक अवस्थेतले असते. त्याचा दांडा ते हाताने फिरवितात. हे भुतांखेतांना भजतात, तसेच वेंकटरामालाही भजतात.

**विवाहप्रथा** – वाङ्‌निश्चयाच्या वेळी वधू-वरांचे बाप एकमेकांना विडचाचे पान देतात. वरपक्षाकडून या वेळी वधूला अंगठी मिळते. लग्नाच्या दिवशी मांडवात एक बाक ठेवतात. परीट त्यावर वस्त्र आंथरतो. वधूचा भाऊ वराला त्या बाकाकडे नेतो. वर त्याला तीन प्रदक्षिणा करून त्यावर बसतो. या वेळी काही स्त्रिया दिवा, अक्षता व फळे घेऊन वरापुढे चालतात. मग प्रथम दिव्यावर व नंतर वराच्या मस्तकावर अक्षता टाकतात. नंतर न्हावी पुढे येऊन वराच्या डोक्याला दूध लावतो व वस्तऱ्याने केसांची रेघ धरतो. न्हावीण त्याच पद्धतीने वधूच्या डोक्याचे काही केस काढते. नंतर वधू-वरांना सजवून मांडवात आणतात. जमलेले लोक त्यांच्यावर अक्षता उधळतात. वधूवरांना रोख आहेर करतात. मग वधूपक्षाकडील प्रमुख पुरुष वधू-वरांचे हात एकमेकांच्या हाती देतो. वधूचा मामा त्या पाणिग्रहणावर पाण्याची धार ओततो. लग्नविधी एका दिवसात पुरा होतो.

गर्भिणीला तिचा मामा एक किंवा दोन कबुतरे देतो. गर्भिणी त्यांचे पोषण करते. कबुतराने पुष्कळ अंडी घातली, तर त्या स्त्रीलाही पुष्कळ मुले होतील, असे समजतात.

**मृतकप्रथा** – हे लोक मृताला जाळतात किंवा पुरतात. प्रेताचे दहन केल्यास ११व्या किंवा १३ व्या दिवशी अंत्यक्रिया करतात. प्रेत पुरल्यास, एक महिना पुरा होण्यापूर्वी अंत्यक्रिया करीत नाहीत. [ का. ट्रा. स. इं. ]

**ओडिय** ओडिसातील गंजाम जिल्ह्यातील एक प्रमुख जात. या जातीत अनेक पोटभेद आहेत. वेनाइटो हा सर्वांत मोठा पोटभेद असून नुनिआ हा त्याच्या खालोखालचा पोटभेद आहे. हे व्यवसायाने शेतकरी आहेत. यांच्यांत नागसिर, गोंड, कोछिपो, बरह इ. अनेक देवके आहेत. हे लोक जगन्नाथाचे भक्त आहेत. ठाकुराणी ही यांची ग्रामदेवता आहे.

**विवाहप्रथा** – यांच्यात बाल व प्रौढ असे उभयविध विवाह रूढ आहेत. घटस्फोट व पुनर्विवाहही मान्य आहेत. यांच्याकडे ब्राह्मण पौरोहित्य करतात. अविवाहित मुलगी आजारी पडली, तर तिला बरे वाटण्यासाठी धर्मदेवतेशी (सूर्य) तिचा विवाह करण्याचा नवस बोलतात. या देवतेचे प्रतीक म्हणून एक पितळी भांडे घेतात व त्याच्याशी हे नवसाचे लग्न लावतात.

हे लोक मासे व मांस खातात. [ का. ट्रा. स. इं. ]

**ओडिया भाषा व साहित्य** ओडिसातील भाषेला ओडिया हे नाव आहे. भाषा या अर्थी ओडिया हा शब्द प्रथम केव्हा व्यवहृत झाला, हे सांगणे कठीण आहे; पण ओडिया भाषेची उत्पत्ती बरीच प्राचीन आहे. भरताने ओड्रजा म्हणून तिचा उल्लेख केला आहे. तो तिला विभाषा म्हणतो. ओड्री विभाषेचा शबर, आभीर, द्राविड इ. विभाषांशी संबंध होता. तात्त्विक दृष्टीने विचार केल्याअंती ही भाषा आर्य, द्राविड व मुंडारी या भाषांच्या संमिश्रणांतून निर्माण झाली आहे. मात्र आधुनिक ओडिया भाषेचा मुख्य आधार आर्य भाषा हाच आहे. आर्य भाषा म्हणजे मुख्यत्वे प्राकृत भाषा होय. ओडिया भाषेचा मागधी भाषेशी संबंध आहे. या भाषेत तालव्य शचे उच्चारण उपलब्ध आहे. र–ल आणि न–ण हे दोन्ही वर्णही तिच्यात आहेत.

ओडियातील सर्वांत जुना शिलालेख इ. स. १०५१ मधला असून, तो उरगंज येथे सापडला आहे. या भाषेचे व उग्री लिपीचे उल्लेख ललितविस्तर, प्राकृत-सर्वस्व, प्राकृत-चंद्रिका, इ. प्राचीन ग्रंथांत आढळतात. ओडिसातील राजांचे इ. स. ६व्या शतकापासूनचे संस्कृत शिलालेख ओडिसात व आंध्रप्रदेशांत सापडले आहेत; त्यांतील संस्कृत भाषेवर ओडिया भाषेचा प्रभाव दिसून येतो. त्यावरून त्या काळापासून ओडिया ही स्वतंत्र भाषा अस्तित्वात असावी, असे वाटते. साहित्यिक भाषा म्हणून हिचा उपयोग इ. स. १००० पासून बौद्ध चर्यागीतांत केलेला आढळतो. मात्र सूर्यवंशाच्या राजवटीत (इ. स. १४३५–१५१३) ओडिया साहित्याची निर्मिती सुरू झाली. त्या शतकात

रामायण, महाभारत, पुराणे, उपनिषदे वगैरे ग्रंथांची भाषांतरे ओडिया भाषेत करण्यात आली.

ओडिया भाषेचा क्षेत्रविस्तार ६०,१३६ चौ. मैल आहे. भारतातील ओडिया भाषिकांची संख्या १.७ कोटीच्या जवळपास आहे.

ओडियाची व्याकरणपद्धती थोडचा प्रमाणात बंगालीसारखी आहे. तथापि ती बंगालीची पोटभाषा नाही.

ओडिया लिपी ब्राह्मी लिपीतून निघाली आहे. तिला कलिंग लिपी असे म्हणतात. ती नागरी लिपीहून सर्वथैव भिन्न असली तरी त्या दोन्ही लिपींत काही साम्यही आढळते. नागरी लिपीची शिरोरेखा ओडिया लिपीत वर्तुळाकार होते व त्या त्या वर्णाच्या मुख्य अंशापेक्षा अधिक जागा व्यापते. या वर्तुळाच्या

| | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ଅ | ଆ | ଇ | ଈ | ଉ | ଊ | ଋ | ଏ | ଐ | ଓ | ଔ | ଂ | ଁ | ଃ |
| अ[ऑ] | आ | इ | ई | उ | ऊ | ऋ | ए | ऐ | ओ | औ | अनुस्वार | चंद्रबिंदु | विसर्ग |

| | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| କ | ଖ | ଗ | ଘ | ଙ | ଚ | ଛ | ଜ | ଝ | ଞ | ଟ | ଠ | ଡ | ଢ | ଣ | ତ |
| क[कॉ] | ख[खॉ] | ग[गॉ] | घ[घॉ] | ङ[ङॉ] | च[चॉ] | छ[छॉ] | ज[जॉ] | झ[झॉ] | ञ[ञॉ] | ट[टॉ] | ठ[ठॉ] | ड[डॉ] | ढ[ढॉ] | ण[णॉ] | त[तॉ] |

| | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ଥ | ଦ | ଧ | ନ | ପ | ଫ | ବ | ଭ | ମ | ଯ | ୟ | ର | ଲ | ଵ | ଶ |
| थ[थॉ] | द[दॉ] | ध[धॉ] | न[नॉ] | प[पॉ] | फ[फॉ] | ब[बॉ] | भ[भॉ] | म[मॉ] | य[जॉ] | य[यॉ] | र[रॉ] | ल[लॉ] | व[वॉ] | श[शॉ] |

| | | | |
|---|---|---|---|
| ଷ | ସ | ହ | ଳ |
| ष[षॉ] | स[सॉ] | ह[हॉ] | ळ[ळॉ] |

ओडिया भाषेची लिपी

बाबतीत विद्वानांचे मत असे आहे, की ओडिसात प्रारंभी ताडपत्रांवर लोखंडी सळईने लिहिण्याची पद्धत होती आणि सरळ आडवी शिरोरेखा ओढण्याने ताडपत्र फाटण्याची भीती होती. म्हणून सरळ रेषेच्या ऐवजी वर्तुळरेषा दिली जाऊ लागली आणि ओडिया लिपीला क्रमशः आधुनिक रूप प्राप्त झाले.

ओडिया व्याकरणाची प्रमुख वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे आहेत– भूतकाळात ने प्रयोगाचा अभाव व लिंगानुसारी क्रियापदाच्या परिवर्तनाचा अभाव. ओडिया भाषेत क्रियापदाला स्त्रीलिंग विकार होतच नाही. विशेषणातही तो होत नाही, विशेष्यांत होतो. भूतकालवाचक क्रियापदाला ळ, ला, लि, लू, इळ, इळू, इळूं, इ. लयुक्त प्रत्यय लावले जातात.

वाक्यरचनेत हिंदीहून ओडिया भाषेचे आणखी एक वेगळेपण आहे. हिंदीत निषेधात्मक अव्यय क्रियेच्या पूर्वी येते, पण ओडिया भाषेत ते क्रियेच्या मागून वाक्याच्या अंती येते.

ओडिया साहित्याचे कालविभाग पुढीलप्रमाणे पडतात –

(१) आदियुग–यालाच इतिवृत्तयुग किंवा सारळादासयुग असे म्हणतात. ११ व्या शतकापासून १६ व्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत या युगाचा कालखंड मानतात.

(२) मध्ययुग – सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धापासून एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत.

(३) आधुनिक युग – स्वातंत्र्यानंतर.

आदियुग – या युगात सारळापूर्व साहित्याचाही अंतर्भाव आहे. बौद्ध गान ओ दोहा या ग्रंथाला ओडिया भाषेचे पूर्वरूप व प्रथमसाहित्य मानतात. या ग्रंथात कान्हूपा, शवरपा, लुइपा, इ. सिद्धांचे पद्यात्मक वाङ्मय पाहायला मिळते. साहित्यिक प्रवाहाच्या दृष्टीने या सिद्धांच्या पद्यांचा पंचसखासाहित्याशी घनिष्ठ संबंध आहे. या युगाच्या साहित्यात गोरखनाथाचा सप्तांगयोगधारणम् हा ग्रंथही सामील आहे. त्यात सात वारांची स्वरसाधना वर्णिलेली आहे. दुसऱ्या ग्रंथाचे नाव आहे, मादळापांजी. तो ग्रंथ जगन्नाथाच्या मंदिरात सुरक्षित आहे. आसामातल्या बुरुंजी साहित्याप्रमाणे यातही ओडिसाच्या राजवंशाचे वर्णन आहे. ओडिया भाषेच्या प्राचीन गद्याचे स्वरूप त्यात पाहायला मिळते. आख्यायिका अशी सांगतात, की गंगवंशाचा पहिला राजा चोडगंगदेव याने इ. स. १०४२ मध्ये मादळा-

पांजी लिहायला सुरुवात केली; पण दुसरे मत असे आहे, की मादळापांजी सोळाव्या शतकात रामचंद्रदेवाच्या कारकिर्दीत लिहविली गेली. रुद्रसुधानिधी हाही सारळापूर्वकालीन ग्रंथ समजतात. ही रचना तेराव्या किंवा चौदाव्या शतकातली असावी. हा ग्रंथ संपूर्ण उपलब्ध नाही आणि जेवढा उपलब्ध आहे, तेवढाही तो छापलेला नाही. या ग्रंथाचा लेखक नारायणानंद अवधूतस्वामी हा आहे. त्याने या ग्रंथात एका योगभ्रष्ट पुरुषाचा वृत्तान्त वर्णिलेला आहे. कोणी म्हणतात, हा ग्रंथ गद्य आहे; तर कोणी म्हणतात, तो दंडिवृत्तात आहे. कलशाचौतिशा हा ग्रंथही सारळापूर्वकालीन समजला जातो. वत्सदास हा याचा लेखक होय. या काव्यग्रंथात शिवाची वरयात्रा व विवाह या गोष्टी विनोदी पद्धतीने लिहिल्या आहेत. या ग्रंथाची आणखी एक गम्मत अशी आहे, की त्यात ओडिया लिपीतील ३४ अक्षरांपैकी एकेक अक्षर प्रत्येक श्लोकाच्या आरंभी घेतलेले आहे.

सारळादास हाच ओडिया भाषेचा प्रथम कवी होय. तो आदियुगाचा प्रतिनिधीच मानला जातो. त्याने स्वतःला शूद्रमुनी म्हटले आहे. त्याचे पहिले नाव सिद्धेश्वर परिडा असे होते. तो सारळादेवीच्या वरप्रसादाने कवी बनला, असे सांगतात. सारळेचा भक्त म्हणून त्याने स्वतःला सारळादास असे म्हणवून घेतले. याचा काल इ. स. च्या १४३५ च्या सुमारास येतो. काही लोक त्याला १३५० च्या सुमाराचा मानतात. सारळादासाच्या विळंकारामायण, महाभारताचा अनुवाद व चंडीपुराण अशा तीन साहित्यकृती उपलब्ध आहेत. महाभारताचा अनुवाद हा त्याचा प्रचंड ग्रंथ आहे. याच कालात अर्जुनदास या नावाचा एक कवी होऊन गेला. त्याचा रामविभा नावाचा एक काव्यग्रंथ उपलब्ध आहे. आणखी एक कवी चैतन्यदास हा होय. त्याचे विष्णुगर्भपुराण व निर्गुणमाहात्म्य असे दोन ग्रंथ मिळतात. ते निर्गुणिया संप्रदायाचे आहेत.

मध्ययुग – याचे पूर्वमध्य व उत्तरमध्य असे दोन विभाग पडतात. पूर्वमध्याला भक्तियुग असेही म्हणता येईल; पण या युगातली भक्ती रामप्रवण नाही व प्रेमप्रधानही नाही. ती आहे ज्ञानमिश्र व योगप्रधान. या भक्तीत कायसाधनेचे अवडंबर होते. पंचवैष्णव किंवा पंचसखा हे या युगाचे प्रधानकवी होत. याच कालात चैतन्यदेव ओडिसात आले होते व पंचवैष्णवांनी त्यांच्याशी सख्य केले होते. त्यावरूनच त्यांना पंचसखा असे नाव मिळाले. बलरामदास, जगन्नाथदास, यशोवंतदास अनंतदास व अच्युतानंददास अशी त्या पंचवैष्णवांची नावे होती. ते अनुक्रमे रामतारक, षोडषनाम, पंचाक्षर, एकाक्षर व अष्टाक्षर मंत्रांचे उपासक होते. या प्रत्येकाने अनेक ग्रंथ लिहिले होते, असे कळून येते. आजमितीस त्यातले काही मुद्रित, काही अमुद्रित व काही अप्राप्य आहेत.

याच कालात काही चरित्रग्रंथही पद्यांत लिहिले गेले. दिवाकरदासाने जगन्नाथचरितामृत लिहिले. त्यात पंचवैष्णवांपैकी जगन्नाथदासाचे चरित्र वर्णिले आहे. दिवाकरदास हा सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धात झाला. ईश्वरदास हा दुसरा एक कवी १७ व्या शतकाच्या प्रारंभी झाला व त्याने चैतन्यभागवत लिहिले. सालवाग नामक एका मुसलमान भक्तकवीने भक्तिरसात्मक अशी अनेक गीते रचली. शिशुशंकरदास याने उषाभिलाष, कपिलेश्वरदासानें कपटकेली, हरिहरदासाने चन्द्रावलीविलास व देवदुर्लभदासाने रहस्यमंजरी ही पौराणिक काव्ये लिहिली. याच काव्यांच्या बरोबरीने लौकिक अथवा काल्पनिक काव्यांचीही निर्मिती सुरू झाली होती. याचे एक उदाहरण म्हणजे प्रतापरायाचे शशिसेणा हे काव्य होय.

उत्तरमध्ययुगात ओडिया भाषेचा रीतिकाल सुरू होतो. या कालात पौराणिक व काल्पनिक अशी उभयविध काव्ये प्राप्त होतात. नायिकांमध्ये सीता, राधा, इ. ची नखशिखान्त वर्णने आढळतात. या युगातले काव्य शृंगाररसाने ओतप्रोत भरलेले असून ते बरेचसे क्लिष्ट आहे. उपेन्द्रभंज या कवीने अशा प्रकारच्या काव्याची परिसीमा गाठली, म्हणून या युगाला भंजयुग असे नाव मिळाले. पण या युगाचा प्रारंभ उपेन्द्रभंजाचा आजा धनंजयभंज (१६३७–१७०१ इ. स.) याच्यापासूनच झाला होता. हा घुमसरचा राजा होता. त्याने रघुनाथविलास, त्रिपुरसुंदरी, मदनमंजरी, रत्नमंजरी, अनंगरेखा, इच्छावती, इ. अनेक काव्ये लिहिली. याचेच रत्नपरीक्षा, अश्व-गजपरीक्षा इ. काही लक्षणग्रंथ व चौपदी, भूषण इ. काही संगीतग्रंथही आढळतात. उपेन्द्रभंजावर आपल्या आजोबाचा प्रभाव स्पष्ट दिसतो.

उपेन्द्रभंजाच्या आधी म्हणजे त्याच्या आजोबाच्या काळात आणखी काही रीतियुगाचे कवी आढळतात. त्यांतले दीनकृष्णदास, द्वितीय मुकुंददेव (१६५१–१६८६ इ. स.) व दिव्यसिंहदेव हे समकालीन कवी होते. त्यांनी रसकल्लोल नामक काव्य लिहिले. याचे वैशिष्टच हे, की त्याच्या प्रत्येक पंक्तीच्या आरंभी 'क' हे अक्षर आहे. वृंदावतीदासी या कवयित्रीने पूर्णतमचन्द्रोदय नामक काव्य लिहिले. त्याचा नायक, श्रीकृष्ण हाच पूर्णतमचंद्र होय. भूपतिपंडित हा तिरहुत येथून ओडिसात आलेला एक कवी होय. याने प्रेमपंचामृत नामक काव्य लिहून कृष्णलीला वर्णिली. लोकनाथ विद्यालंकार याने सर्वांगसुंदरी, पद्मावतीपरिणय, वृन्दावनविहार इ. काव्ये निर्माण केली. याच रीतिकालीन परंपरेचा उपेन्द्रभंज हा मुकुटमणी ठरला. इ. स. १६८५–१७२५ हा याचा काल होय. याने सुभद्रापरिणय, व्रज-

लीला, लावण्यवती, भाववती इ. सुमारे ४० काव्ये लिहिली. त्याच्या वैदेहीशविलास या काव्यातल्या प्रत्येक पंक्तीचा प्रारंभ 'व' या अक्षराने होतो. याचाच रसपंचक नावाचा एक आलंकारिक ग्रंथ आहे. चित्रकाव्यबंधोदय हा त्याचा आणखी एक ग्रंथ चित्रकाव्याचा एक उत्तम नमुना आहे. त्याने एक कोशग्रंथही लिहिला होता. उपेन्द्रभंजाच्या काव्यात रीतिकालीन काव्यलक्षणांचा पूर्ण विकास झालेला आहे. कुठे कुठे त्याची काव्यरचना मर्यादेचे उल्लंघन करून अश्लीलही बनली आहे.

मध्ययुगातल्या ओडिया साहित्यात वैष्णवधर्माची प्रवृत्ती आणि रीतिलक्षणाची प्रवृत्ती अशा उभयविध प्रवृत्ती दिसतात. भंजयुगानंतर ओडिया साहित्यात गौडीय वैष्णवधर्म व रीतिकालीन लक्षणे या दोहोंचा समन्वय झालेला दिसतो. या काळातली बहुतेक काव्ये राधा-कृष्णप्रेमाची आहेत. यांत साधुचरणदासाची प्रेमतरंगिणी, प्रेमलहरी इ. काव्ये, भक्तचरणदासाची मथुरामंगल, मनबोधचौतिशा इ. काव्ये, अभिमन्युसामन्तसिंदार याची सुलक्षणी, रसवती, प्रेमकला इ. काव्ये, गोपालकृष्ण पटनायकाची पद्यावली, यदुमणिमहामात्राचे प्रबंधपूर्णचंद्र, बलदेवकविसूर्याची किशोरचंद्राननचंपू, चंद्रकला इ. काव्ये प्रमुख मानलेली आहेत.

ब्रजनाथ वडजेना याचे समरतरंग, व चतुरविनोद हे दोन महत्त्वपूर्ण ग्रंथ आहेत. समरतरंग हे एक ऐतिहासिक काव्य आहे. त्यात ढेंकानालचा राजा त्रिलोचनमहेन्द्र याचे नागपूरच्या चिमणाजीशी जे युद्ध झाले, त्याचे सरस वर्णन आहे.

याच युगातला आणखी एक उल्लेखनीय कवी म्हणजे भीम भोई. हा जन्मान्ध होता व जातीने कंध आदिवासी होता. तो कुंभिपाटिआ या संप्रदायाचा अनुयायी व महिमागोसांईचा उपासक होता. त्याने स्तुतिचिंतामणी नावाचा एक ग्रंथ रचला आहे. त्याने अनेक भजनेही रचली असून ती लोकप्रिय आहेत.

**आधुनिक युग** – मोगलकाल व मराठाकाल संपण्याच्या वेळीच मध्ययुगही समाप्त होते. तिथून पुढे ब्रिटिश अंमलाचा काल सुरू होतो. आधुनिक युगाचाही प्रारंभ तिथूनच होतो. त्या काळाच्या प्रारंभी तत्कालीन सुशिक्षितांत इंग्रजी साहित्याविषयीचे असामान्य आकर्षण दिसते; पण त्या लोकांवर संस्कृत, फारसी व हिंदी साहित्यांचाही प्रभाव थोडाबहुत शिल्लक राहिला होता. या काळातले प्रमुख कवी म्हणजे राधानाथ राय. त्यांनी पार्वती, नंदिकेश्वरी, ययातिकेशरी अशी काही ऐतिहासिक काव्ये लिहिली. त्यांनी महापात्र नावाचे एक महाकाव्यही निर्मिले. त्या काव्यावर मिल्टनचा प्रभाव स्पष्टपणे दिसून येतो. याशिवाय, त्यांनी कित्येक संस्कृत व हिंदी काव्यांचे अनुवादही केले आहेत. थोडेबहुत गद्यही लिहिले आहे. या आधुनिक युगाला काही लोक राधानाथयुग असेही म्हणतात.

याच युगात राजेंद्रलाल मित्र व त्यांचे काही सहकारी यांनी बंगालमधून एक भाषिक चळवळ सुरू केली होती. त्यांच्या मते ओडिया ही स्वतंत्र भाषाच नव्हती. या चळवळीला प्रत्युत्तर देण्यासाठी ओडिसातल्या काही लेखकांनी कंबरा कसल्या. फकीरमोहन व सेनापती हे या लेखकमंडळीत अग्रेसर होते. त्यांनी कित्येक कादंबऱ्या लिहिल्या, ओडिया गद्याला आकार व शैली प्राप्त करून दिली. लछमा, छमाण, प्रायश्चित्त, इ. त्यांच्या अनेक कादंबऱ्या आहेत. उत्कलभ्रमण, पुष्पमाला, उपहार, इ. त्यांचे कित्येक काव्यसंग्रहही आहेत. त्यांनी रामायण–महाभारताचाही पद्यानुवाद केला आहे.

या कालखंडात कवी म्हणून विशेष प्रसिद्धीला आले, ते मधुसूदन राय. ते ब्राह्मसमाजी होते. त्यांची कविता भक्तिरसात्मक आहे. विश्वकवी रवीन्द्रनाथ व त्यांचा परिवार यांचा मधुसूदन राय यांच्यावर पुष्कळच प्रभाव होता.

त्याच काळातले आणखी एक कवी म्हणजे गंगाधर मेहेर. हे निसर्गोपासक होते. त्यांना ओडिसाचे वर्डस्वर्थ म्हणतात. कालिदास हा त्यांचा आदर्श होता. त्यांची 'प्रणयवल्लरी' शाकुंतलावर, 'तपस्विनी' सीतावनवासावर व 'इंदुमती' अजविलापावर आधारित आहे.

राधानाथयुगानंतर सत्यवादीयुगाचा प्रारंभ होतो. या युगावर म. गांधींचा स्पष्ट प्रभाव आहे. श्री. गोपबंधुदास यांनी शांतिनिकेतनाच्या धर्तीवर सत्यवादी (साक्षी गोपाल) येथे एक महाविद्यालय स्थापन केले होते. श्री. गोपबंधुदास यांनी धर्मपद, बंदीर-आत्मकथा, काराकविता, अवकाशचिंता इ. ग्रंथ लिहिले. याच कालात नीलकंठदास यांनी टेनिसनच्या 'प्रिन्सेस'च्या आधारावर प्रणयिनी व 'इनॉक आर्डेन'च्या आधारावर दासनायक हे ग्रंथ लिहिले. याच कालात गोदावरीश मिश्र हे गद्य–पद्य लेखक म्हणून प्रसिद्धीस आले.

त्यानंतरच्या रोमँटिकयुगाचे प्रधान कवी म्हणजे मायाधर मानसिंह हे होत. यानंतर सबुझयुग प्राप्त होते. या युगात कालिंदीचरण पाणिग्राही, वैकुंठनाथ पटनायक, हरिहर महापात्र, शरच्चंद्र मुखर्जी व अन्नदाशंकर राय या पाच कवींनी आपला संघ निर्मून काव्यरचना केली. त्यांची ती कविता सबुझ कवित्व या नावाने प्रसिद्ध आहे. काही कालाने हे पंचायतन अलग झाले. कालिंदीचरण यांच्या माटिरमणिप, लुहारमणिप, इ. अनेक काव्यकृती उपलब्ध आहेत. वैकुंठनाथ पटनायक यांच्याही कवितांचे संग्रह निघाले आहेत.

सच्चिदानंद राउतराय, गोपीनाथ महान्ती, कान्हुचरण महान्ती, नित्यानंद महापात्र, राधामोहन गडनायक, क्षुद्रगालिक,

गोदावरीश महापात्र, इ. लेखक आधुनिक युगाचे प्रतिनिधी समजले जातात. [ हिं. सा. को.; सु. वि. को.; म. वि. को. ]

## ओडिया रंगभूमी

ओडिया नाट्य आणि रंगभूमी यांची सुरुवात ओडिसात मध्ययुगाच्या प्रारंभी झाली. ओडिसातील संस्कृत पंडितांनी भारताच्या प्रवासाहून परत येताना आपल्याबरोबर काही संस्कृत नाटके आणली होती. या बाहेरून आणलेल्या नाटकांचा स्थानिक पंडितांवर मोठा प्रभाव पडला व त्यांनी महाकाव्यांतील विषयांवर स्वतः नाटके लिहिण्यास सुरुवात केली. ही नाटके भरताच्या नाट्यशास्त्राच्या नियमाप्रमाणे लिहिलेली असली तरी नाट्यतंत्राच्या दृष्टीने ती कनिष्ठ प्रतीची होती. नंतरच्या कालात शेजारच्या प्रदेशात जाऊन काही लोकांनी प्रयोग–तंत्राचा अभ्यास केला आणि त्याचा परिणाम म्हणून प्रयोगतंत्रात सुधारणाही झाली. सध्या ओडिसामध्ये जी भाषा प्रचलित आहे तिची निर्मिती इ. स. च्या ८ ते १२ या शतकांच्या दरम्यान झाली. या काळात प्राकृत भाषेचा चांगलाच विकास झाला होता. त्यामुळे संस्कृत नाटकांत आस्ते आस्ते प्राकृत पद्यांचा आणि संवादांचा अंतर्भाव होऊ लागला. नाट्यकला किंवा रंगभूमी ही समाजाभिमुख झाल्याचेच हे द्योतक होते.

ओडिया नाटकाच्या वाङ्मयीन स्वरूपाचा विकास या नंतरच्या काळात झाला. चौदाव्या शतकात ओडिया लेखन-शैलीला आकार येऊ लागला. या घटनेमुळे ओडिया रंग-भूमीच्या इतिहासाला वेगळे वळण मिळाले. ओडिसातील सूर्यवंशी सम्राटांच्या राजवटीत ओडिया नाट्यलेखन आणि रंगभूमी या दोहोंनाही उत्तेजन मिळाले. कपिलेंद्र देव, पुरुषोत्तम देव आणि प्रतापरुद्र देव या तीनही सम्राटांनी नाट्य-कलेच्या उत्कर्षासाठी मोठी खटपट केली. या सम्राटांच्या कारकिर्दीत संस्कृत आणि प्राकृत या दोन्ही भाषांत नाटके लिहिली गेली आणि जगन्नाथाच्या मंदिरात त्यांचे प्रयोग झाले. स्वतः सम्राट कपिलेंद्र देव याने परशुराम व्यायोग नावाचे नाटक प्राकृत भाषेत न लिहिता ओडिया भाषेतच लिहिले आणि जुन्या परंपरेला कलाटणी दिली. राजा प्रतापरुद्र देव याने अभिनव वेणीसंहरम् नावाचे एकांकी नाटक लिहिले आणि त्यात जगन्नाथमंदिरातील देवदासींनी भूमिका केल्या. महाभारत, रामायण आणि इतर पौराणिक ग्रंथ यांतील कथानके निवडून, त्या काळात निदान चौव्वीस तरी एकांकी नाटके लिहिली गेली असतील. सूर्यवंशी सम्राट शांततेच्या काळात आपल्या सैनिकांकडूनही लष्करी मोहिमांतील महत्त्वाच्या घटनांवर आधारलेली नाटके करून घेत. अशा रीतीने लष्करातील सैनिकांत नाट्यकलेची आवड निर्माण झाली.

पुढे संस्कृत नाटकांचे स्थान ओडिया लोकनाट्यांनी घेतले. रामलीला व रासलीला ही त्यांपैकी प्राचीन लोकनाट्ये होत. याशिवाय दंडनाट नामक शिवपार्वतीच्या विवाहाचे वर्णन करणारे एक प्राचीन नाट्यही प्रसिद्ध आहे. ओडिसामध्ये सध्या प्रचलित असलेले छउ नृत्य या दंडनाटाचेच एक उन्नत रूप होय, असे काही पंडित म्हणतात. तोंड झाकून त्या नृत्याचा प्रयोग करतात. छउ या शब्दाची व्युत्पत्ती काही जण छबी या शब्दावरून सांगतात; तर काही ती छावणी या शब्दापासून लावतात. याचे कारण असे, की मुळात हे एक युद्धनृत्य होते. हल्ली दंडनाट व छउ या दोन्ही नृत्यांचे प्रयोग चैत्र संक्रातीला होतात. याशिवाय रंगसभा नावाचा एक नाट्यप्रकार अतिशय लोकप्रिय आहे. रंगसभा म्हणजे कंसाची राजसभा होय. कंसाने कृष्णाला कपटाने मारण्याच्या हेतूने या राजसभेत बोलाविले होते. परंतु त्यात कंसाचेच मरण ओढवले. या नाट्य प्रयोगाच्या वेळी मोठमोठे कृत्रिम हत्ती, घोडे व पक्षी बनवून भव्य आणि चमत्कृतिपूर्ण असे वातावरण निर्माण केले जाते.

अठराव्या शतकाच्या मध्यावर पहिल्या वीरकिशोर देवाच्या राजवटीत गौरीहरण नावाचे एक नाटक लिहिले गेले आणि पुरीमध्ये त्याचे प्रयोगही झाले. इ. स. १८३४ साली ओडिया भाषेत खड्गप्रसाद नावाच्या लेखकाने पद्मावतीहरण नावाचे एक नाटक लिहिले. रघुनाथ परिछ आणि जगमोहन लाला हे त्या काळातले आणखी दोन नाटककार होत. परिछकृत गोपीनाथवल्लव हे नाटक १८६८ साली प्रकाशित झाले. ते ओडिया भाषेत लिहिलेले असून, त्यातील अनेक पद्ये संस्कृतात आहेत. जगमोहन यांचे बालाजी हे नाटक मादक पदार्थांच्या व्यसना-विरुद्ध लिहिलेले असून ते १८७७ साली प्रसिद्ध झाले. अशा रीतीने इ. स. १८८० च्या सुमारास ओडिया रंगभूमीवर नवीन आणि सुधारलेल्या नाटकाने प्रवेश केला.

ओडिया रंगभूमीची दुसरी अवस्था रमाशंकर राय यांच्या-पासून सुरू होते. आधुनिक ओडिया रंगभूमीचे ते जनक मानले जातात. शेक्सपिअरच्या नाटकांचा त्यांनी अभ्यास केला आणि भारतीय रंगभूमीच्या तत्त्वानुसार आधुनिक नाटके लिहिली. गंभीर भावनांचा आविष्कार करताना त्यांनी मुक्तछंदाचा उपयोग केला आहे. रमाशंकरांनी एकूण दहा नाटके लिहली. पद्मानव नारायणदेव, राधामोहन राजेंद्रदेव, कंपाल मिश्र आणि भिकारीचरण पटनायक हे रमाशंकरांचे समकालीन नाटककार होत. त्यांनीही नवीन तंत्रानुसार नाट्यलेखन केले. या नवीन नाट्यप्रयोगाबरोबर लीला, स्वांग, यात्रा हे नाट्यप्रकारही लोकांचे मनोरंजन करीत होते. रामलीला, भरतलीला,

पाला या नाट्यप्रकारांची या काळात भरभराट झाली. या नाट्यप्रकारांचे प्रयोग उघड्यावर होत. वैष्णवपाणी व लक्ष्मीकांत महापात्र यांच्या यात्रा व रासलीला या नाट्यप्रकारांनी अलिकडील काळात लोकांचे पुष्कळ मनोरंजन केले. कृष्णप्रसाद बसू हे अद्यापही पालाची रचना करतात. त्यांचे हे नाट्यप्रकार अतिशय लोकप्रिय आहेत.

पंडित गोदावरीश मिश्र आणि नाट्यसम्राट अश्विनीकुमार घोष यांच्यापासून ओडिया रंगभूमीच्या आधुनिक इतिहासाला प्रारंभ होतो. या दोघांनी अगदी नवीन धर्तीची नाटके लिहिण्यास सुरुवात केली. अश्विनीकुमारांनी आपली नाट्यलेखनाची सुरुवात पौराणिक नाटकांनी केली; पण नंतर ते सामाजिक, ऐतिहासिक आणि चरित्रात्मक नाटकांकडे वळले. यांचे कोणार्क हे नाटक अत्युत्कृष्ट गणले जाते. गोदावरीश मिश्रांची ऐतिहासिक नाटके त्या मानाने रंगभूमीवर विशेष प्रभावी ठरली नाहीत. या दोघांची बहुतेक सर्व नाटके राधाकृष्ण थिएटर या नाटक कंपनीने रंगभूमीवर आणली. वनमाली पती हे या कंपनीचे मालक होते. त्यांच्या मृत्यूनंतर कंपनीला वनमाली आर्ट थिएटर हे नाव देण्यात आले. इ. स. १९२८ ते ३० या दरम्यान ही नाटक मंडळी मोडली.

अशा प्रकारे ओडिया नाटकाचा एकीकडे विकास होत असताना दुसरीकडे रासलीला या गीतिनाट्याचीही प्रगती चालू होती. इ. स. १९१७ साली गोविंदचंद्रसूरदेवाने एक गीतिनाट्यमंडळी स्थापन केली. त्यानंतर मोहनसुंदर गोस्वामीने दुसरी एक मंडळी बनविली. या दोन्ही मंडळ्या गीति-नाट्यांचे प्रयोग सादर करीत. विशेषकरून या मंडळ्या ओडियातील वैष्णव कवींची गीते सादर करीत असत. कविचंद्र कालीचरण पटनायक हे यांचे उत्तराधिकारी होत. हे राधाकृष्णांच्या रासलीलेचा प्रयोग दाखवीत असत. संगीतविशारद आणि कवी म्हणून त्यांनी रंगभूमीवर पदार्पण केले; पण अल्पावधीतच एक चांगला नाट्य-दिग्दर्शक म्हणून त्यांचा लौकिक झाला. त्यांनी ओडिसा थिएटर्स या नावाची एक नाट्यसंस्थाही स्थापन केली. ही संस्था मुख्यतः कालीचरणांचीच नाटके करते. नियमितपणे वर्षभर नाट्यप्रयोग सादर करणे, हे या संस्थेचे वैशिष्ट्य आहे. ओडिसात या नाट्यसंस्थेइतकी लोकप्रियता दुसऱ्या कोणत्याही नाट्यसंस्थेला लाभली नाही. स्त्री कलावंतांना ओडिया रंगभूमीवर आणण्याचे श्रेय मुख्यतः यांनाच आहे. अस्पृश्यता, भूक, बेकारी, आर्थिक शोषण, इ. समस्यांवर लिहिलेली भात, रक्तमाटी, बेकार इ. यांची नाटके रंगभूमीवर अनेक दिवस गाजत होती. यांनी एकूण बारा नाटके लिहिली. वर्तमानकालातील नवीन नाटककारांत मनोरंजन दास, लक्ष्मीधर नायक, अद्वैतचरण महंती, भंजन किशोर पटनायक व नरसिंह महापात्र यांची गणना होते.

नंतरच्या कालात कालीचरण पाणिग्रही यांच्या माटिर मणिष या कादंबरीच्या आधारे काही नाटके लिहिली गेली आहेत. या नाटकांचे काही प्रयोग प्राणबंधुकर यांनी रंगभूमीवर यशस्वी रीत्या सादर केले. कालीचरणांच्या नंतर गोपाल छोटा रॉय यांची एक यशस्वी नाटककार म्हणून कीर्ती झालेली आहे. यांनी सामाजिक व राजनैतिक विषयांवर नाटके लिहिली आहेत. कालीचरणांच्या ओडिसा थिएटर्स या संस्थेशिवाय आर्ट थिएटर्स व अन्नपूर्णा थिएटर अशा दोन धंदेवाईक नाट्यसंस्था ओडिसात आहेत. याचबरोबर धंदेवाईक कलावंतांच्या संघामार्फत जनता रंगमंच या नावाची एक नाट्यसंस्था चालविली जाते. धंदेवाईक नाट्यसंस्थेप्रमाणेच हौशी नाट्यसंस्थाही अधूनमधून नाट्यप्रयोग करीत असतात. या ओडिया रंगभूमीवर एकांकिका, संस्कृत नाटकांची भाषांतरे, इंग्लिश आणि तेलुगू नाटकांची रूपांतरे, इ. विविध प्रकारचे नाट्यप्रयोग सादर केले जातात. [ भा. ना. सा.; मार्च ऑफ इंडिया, डिसेंबर १९५७ ]

## ओडिसा

भारतीय संघ राज्यातील एक घटक राज्य. याच्या पूर्वेला बंगालचा उपसागर, उत्तरेला बिहार, पश्चिमेला मध्य प्रदेश व दक्षिणेला आंध्र प्रदेश आहे. याची ईशान्य सीमा प. बंगालला लागून आहे. या प्रदेशाचे क्षेत्रफळ १,५५८०० चौ. कि. मी. असून, लोकसंख्या १९७१ मध्ये २ कोटी २० लक्ष होती. ती आता २.५ कोटी झाली असावी. या राज्यात तेरा जिल्हे असून, भुवनेश्वर येथे याची राजधानी आहे.

**नैसर्गिक विभाग** – या प्रदेशाचे चार नैसर्गिक विभाग झालेले आहेत. (१) उत्तरेकडील पठार – यात मयूरभंज, केओंझर व सुंदरगढ हे तीन जिल्हे आहेत. हा बिहारमधील छोटा नागपठाराचाच दक्षिण भाग असून, त्यावर अनेक उंच पर्वतशिखरे आहेत. (२) मध्यवर्ती नदीखोरी – महानदी, ब्राह्मणी व वैतरणी या नद्यांची जलवाहन क्षेत्रे या विभागात असून, त्यात बोलानगिरी, संबलपूर व धेनकानाल या तीन जिल्ह्यांचा समावेश होतो. हा विभाग सुपीक व दाट लोकवस्तीचा आहे. (३) दक्षिणेकडचा डोंगराळ भाग – हा पूर्वघाटाचा उत्तरभाग असून, मध्यवर्ती सपाट भूप्रदेशाच्या दक्षिणेकडून ईशान्येकडे पसरलेला आहे. यातील डोंगरांच्या रांगा कोरापुट, कालहंडी, बौध खोंडमाल्स व गंजाम या चार जिल्ह्यांतून जातात. या भागातही अनेक उंच पर्वत शिखरे असून, तो घनदाट अरण्यांनी व्यापलेला आहे. या भागात पडणारा पाऊस दोन्ही बाजूंना वाहत जाणाऱ्या नद्यांना मिळतो. (४) किनारी प्रदेश – यात

बलसोर, कटक व पुरी हे तीन जिल्हे व गंजाम जिल्ह्याचा काही भाग आहे. बंगालच्या उपसागराला लागून असलेला भूभाग बलसोर व पुरी जिल्ह्यांत रेताड असून कटक जिल्ह्यात दलदलीचा आहे. त्याच्या पश्चिमेकडे डोंगरापर्यंत पसरलेला सपाट भूभाग गाळाने भरलेला व नद्यांनी भिजवलेला, सुपीक आहे.

महानदी, ब्राह्मणी व वैतरणी या मुख्य नद्या वायव्येकडून आग्नेयीकडे वाहत जाऊन बंगालच्या उपसागराला मिळतात. मान्सूनच्या दोन्ही मोसमांत इथे पाऊस पडतो. काही वेळा दोन्हीकडून एकदम मान्सून येतो व वादळे होतात.

या राज्यातला ४२% भूभाग वनव्याप्त असून, त्यात शाल, साग, शिसवी, कुरुम, चाफा, गंभर, इ. वृक्ष आढळतात. वांबूची मोठी बेटेही आहेत. तेंदूची पानेही मोठ्या प्रमाणावर होतात. अरण्यात औषधी वनस्पती व मध, लाख वगैरे पदार्थही मिळतात. या जंगलात वाघ, हत्ती व चित्ते खूप आहेत; रानरेड्यांचे




राज्याच्या उत्तर भागात सालंदी, बुराबलंग व सुवर्णरेखा आणि द. भागात ऋषिकुल्या, वंशधरा, नागावली, इंद्रावती, कोलाब व मुचकुंद या लहान नद्या आहेत. महानदी ही सर्वांत मोठी असून, ओडिसातली तिची लांबी ८५० कि. मी. आहे. ती अनेक मुखांनी सागराला मिळते. या नदीवर संबळपुरपासून ९ मैलांवर हिराकूड नामक प्रचंड धरण बांधलेले आहे. त्यामुळे महापुराचे नियंत्रण होते.

या राज्यात पावसाची वार्षिक सरासरी १४८ सें. मी. असते.

कळपही आहेत. मोठ्या नद्यांच्या मुखांजवळ सुसरी बऱ्याच आढळतात.

पुरी व गंजाम या जिल्ह्यांच्या सीमेवर, पूर्व समुद्राला लागूनच एक विशाल सरोवर आहे, त्याचे नाव चिलका. समुद्राच्या सान्निध्यामुळे याचे पाणी खारे झाले आहे; पण पावसाळ्यात नद्यानाल्यांचे विपुल पाणी त्यात शिरल्यामुळे त्याचा खारेपणा खूप कमी होतो. या सरोवरात अनेक द्वीपे व टेकड्या आहेत. अशी आणखीही काही लहान-मोठी सरोवरे ओडिसाच्या निर-

निराळ्या भागांत आहेत. आणि त्यांत पुष्कळ मासळी मिळते.

डुडुमा (कोरापुट), खंडधार (सुंदरगढ), बडघांग्रा आणि सानधाग्रा (केंदुझर), प्रधानपाट (संबलपूर), रावणधार (कलाहांडी), केंडामारी (बांद) आणि बेरोट्टिपाणी (मयूरभंज) – ही ओडिसांतल्या प्रमुख धबधब्यांची नावे. पैकी डुडुमा आणि हिराकूड बांध या ठिकाणी वीजउत्पादन केले जाते.

आज ज्या प्रदेशाला आपण ओडिसा असे म्हणतो, तो प्रदेश एके काळी प्राचीन कलिंग साम्राज्यात मोडत होता. प्राचीन ओडिसा प्रांतात ओड्र, उत्कल व कलिंग या तीन प्रदेशांचा समावेश होत होता. ओडिया भाषेत ओडिसा शब्द ओडिशा असा लिहितात. या प्रदेशात पूर्वी उड्र किंवा ओड्र या जमातीचे लोक राहत होते. त्यांच्या नावावरून औड्रियविषय > ओडिविस्स > ओडीविसा > ओडिसा अशी रूपे होऊन या प्रदेशाला ओडिसा हे नाव रूढ झाले. याउलट एक मत असे आहे, की काही द्राविडी भाषांमध्ये ओक्कल व ओड्डिस या शब्दांचा अर्थ शेतकरी असा आहे. त्यांवरून आर्यांनी या प्रदेशाला उत्कल व ओड्र ही नावे ठेवली. कालिंजी नावाची एक जात या भागात अजूनही वसलेली आहे. त्यावरून या देशाला कलिंग असेही म्हणू लागले.

महाभारतात कलिंग, ओड्र व उत्कल या तीन्ही नावांचा उल्लेख अनेकवार आला आहे. त्या काळी हे तीन प्रदेश वेगळे वेगळे होते. पद्म, मत्स्य, वायू, इ. पुराणांत कलिंग देश व तिथले राजवंश याविषयी बरीच माहिती मिळते. कलिंग देश हा आर्य संस्कृतीच्या कक्षेबाहेर असल्यामुळे त्या देशात जाणे निषिद्ध होय, असे बौ. ध. सूत्रांत सांगितले आहे. इ. स. पूर्व तिसऱ्या शतकात अशोकाने कलिंग देश जिंकला. इ. स. पू. दुसऱ्या शतकात जैन राजा खारवेल हा कलिंगाच्या गादीवर आला. राजा सातकर्णी याचा त्याने पराभव केला. सातवाहन खारवेल हा अत्यंत बलाढ्य होता. त्याने राष्ट्रिक व भोजक या राजांनाही जिंकले. मगधराजा पुष्यमित्र याचा पराभव करून त्याने अंग व मगध हे प्रदेशही जिंकून घेतले. इ. स. पू. १ ल्या शतकात ओडिसावर सातवाहनांचे राज्य होते. इ. स. च्या ५ व्या शतकात कलिंगाचा विस्तार कृष्णा नदीपासून महानदीपर्यंत झाला होता. सध्याच्या ओडिसाच्या ईशान्येकडील किनारपट्टीच्या भागाला उत्कल देश असे नाव होते. उत्कल, कलिंग, अंग, वंग, पौंड्र, इ. लोक एकाच कुळात जन्मलेले होते, असे महाभारतात व पुराणांत सांगितले आहे. उत्कल देश वंग व कलिंग यांच्या मध्ये आहे, असे कालिदासाने रघुवंशात म्हटले आहे (४.३८). सध्याच्या ओडिसातील बलसोर जिल्हा, कटक जिल्ह्याचा काही भाग व बंगालमधील मिदनापूर जिल्ह्याचा काही भाग एवढा प्रदेश पूर्वीच्या उत्कल देशात मोडत होता.

इ. स. ५०० च्या सुमारास कलिंग देशावर गंग वंशाचे राज्य चालू झाले; पण गंजाम, पुरी व कटक या भागांवर मात्र विग्रह वंशाची सत्ता होती. या राजांची राजधानी तोसली ही असून, त्यांच्या राज्याचे नावही तोसली हेच होते. विग्रह राजांनी पुढे उत्कल प्रदेशावरही आपली सत्ता प्रस्थापित केली व त्याला उत्तर तोसली असे नाव दिले. पुढे ११व्या शतकापर्यंत उत्तर व दक्षिण तोसली हीच नावे प्रचलित होती. त्यानंतर मात्र उत्कल व ओड्र ही नावे प्रचारात आली. (तोसली पाहा)

वाकाटकनृपती हरिषेण (इ. स. ४७५–५००) याच्या साहाय्याने गंग वंशाने कलिंग देशावर सुमारे ३० वर्षे राज्य केले. या काळात कलिंगात एक नवयुग सुरू झाले आणि नवीन संस्कृतीही उदयाला आली. गंग राजांनी आपला स्वतंत्र शक सुरू केला. त्याचा आरंभ इ. स. ४९८ मध्ये झाला असावा, असे मानतात. मात्र तो नक्की कोणत्या राजाने सुरू केला, ते अज्ञात आहे. या वंशातील पहिले दोन-तीन राजे स्वतःला त्रिकलिंगाधिपती म्हणवून घेत. त्यांची राजधानी कलिंगनगर होती. मध्यंतरी काही काळ चालुक्यांनी कलिंग देशावर स्वामित्व मिळविले होते, पण गंग राजांनी पुन्हा त्याचा ताबा घेतला.

इ. स. च्या ७ व्या शतकाच्या प्रारंभी कंगोड नामक प्रदेशावर शैलद्भव नामक घराणे राज्य करीत होते. त्यात कटक, पुरी व गंजाम हे जिल्हे समाविष्ट होते. त्यांनी हर्षवर्धनाच्या स्वाऱ्यांना यशस्वी प्रतिकार केला.



परशुरामेश्वर-मंदिर, भुवनेश्वर

इ. स. च्या ८ व्या शतकाच्या पूर्वार्धात उत्कल देशातील भौमकर वंश प्रबळ झाला व त्या राजांनी सबंध ओडिसावर आपली सत्ता स्थापन केली. त्यांनी सुमारे २०० वर्षे राज्य केले. या काळाला ओडिसाच्या इतिहासातले सुवर्णयुग मानतात.

भौमकर राजांनी मोठे साम्राज्य स्थापले व सबंध भारतात आपल्या संस्कृतीचा प्रसार केला. गुहेश्वरपाटक ही त्यांची राजधानी होती. सध्या त्या ठिकाणी जयपूर शहर (कटक जिल्हा) वसले आहे. या वंशातील राजाने इ. स. ७४० च्या सुमारास आपला शक सुरू केला, तो इ. स. ९४० पर्यंत चालला. हे राजे स्वतः बौद्धधर्मी असले, तरी त्यांचा शैव व वैष्णव पंथांनाही आश्रय होता. याच काळात ओडिया भाषेच्या विकासाला प्रारंभ झाला व ओडिया लोकांचे भारतात स्वतंत्र स्थान निर्माण होऊ लागले.

भौमकर वंशानंतर सोम किंवा केसरी या वंशाचा उदय झाला. कोसलामधील हे सोमवंशी राजे प्रथम वैष्णवपंथी होते; पण ओडिसात राज्य स्थापन केल्यावर त्यांनी शैवपंथ स्वीकारला. ओडिसात हा वंश केसरी वंश म्हणून प्रसिद्धी पावला. त्यांच्या त्रिकलिंग राज्यात कोसलाचा काही भाग समाविष्ट होता. म्हणून ते स्वतःला कोसलेंद्र व त्रिकलिंगाधिपती असे म्हणवून घेत. महाभवगुप्त जनमेजय (इ. स. ९३५–९७०) हा ओडिसावर राज्य करणारा पहिला सोमवंशी राजा होय. या वंशाची सत्ता तिथे ११ व्या शतकाच्या अखेरपर्यंत टिकली. कान्यकुब्ज देशातून त्याने दहा हजार ब्राह्मण ओडिसात आणले. त्याच्या कारकिर्दीत शिल्प व इतर कला यांचा पुष्कळ विकास झाला.

इ. स. च्या ९ व्या शतकाच्या प्रारंभी लुप्त झालेल्या गंग वंशातील राजांनी त्या शतकाच्या अखेरीस पुन्हा ओडिसात आपली सत्ता स्थापली. इ. स. च्या ११व्या शतकाच्या उत्तरार्धात चोडगंगदेव नावाचा महापराक्रमी राजा या वंशात झाला. द्रविड राजा राजेंद्र चोल याची कन्या राजसुंदरी व गंग राजा देवेंद्र वर्मा (१०६९–७६ इ. स.) यांचा हा पुत्र होय. हा महापराक्रमी असून, याने गंगेपासून गोदावरीपर्यंत आपल्या साम्राज्याचा विस्तार केला. वेद, पुराणे, काव्यशास्त्र, धर्मशास्त्र व शिल्पशास्त्र या विषयांचे त्याला उत्तम ज्ञान होते. त्याने वेंगी, उत्कल, मंदार रामबाग व बंगाल हे प्रदेश जिंकले. खारवेल राजाप्रमाणे याचेही साम्राज्य विशाल होते.

गंग राजे प्रथम शिवभक्त होते; पण चोडगंगदेवापासून ते वैष्णव बनले. त्याच वेळी रामानुजाचार्य (इ. स. १०१७–११३७) वैष्णव धर्माचा प्रचार करीत होते, त्याचा हा परिणाम असावा. याने विष्णूची पुष्कळ मंदिरे बांधली. पुरी येथे जगन्नाथाचे एक जुने मंदिर होते. चोडगंगाने तिथे हल्लीचे भव्य मंदिर उभारले. त्याने ७० वर्षे राज्य केले. त्याच्या कारकिर्दीत ओडिसाचे राजकीय संघटन झाले व ओडिया संस्कृती उत्कर्षाला पोचली. त्याच्या नंतर १२ व्या शतकाच्या अखेरीस उ. भारतावर मुसलमान आक्रमकांचे वर्चस्व सुरू झाले. परंतु गंगराजे प्रबळ असल्यामुळे १४ व्या शतकाच्या मध्यापर्यंत ओडिसाला मुसलमानी आक्रमणांची झळ लागली नाही. त्यानंतर मुसलमानांच्या काही स्वाऱ्या ओडिसावर झाल्या; पण गंग राजांनी त्या परतवून लावल्या. इ. स. च्या १५ व्या शतकाच्या मध्यापर्यंत ओडिसात गंगांचे राज्य टिकून राहिले.

त्यानंतरच्या शंभर वर्षांत दुसऱ्या वंशातील अनेक हिंदू राजांनी ओडिसावर राज्य केलेले दिसते. त्यांतील सूर्यवंशी कपिलेंद्रदेव महापराक्रमी होता. त्याने गंगेपासून कृष्णानदीपर्यंत आपले साम्राज्य स्थापले होते. सूर्यवंशाची सत्ता इ. स. १५४० पर्यंत होती. त्यानंतर भोई वंशाने सुमारे २५ वर्षे राज्य केले. मुकुंददेव हा त्यांतला शेवटचा हिंदू राजा होय. शेवटी १५६८ मध्ये बंगालचा अफगाण सुलतान सुलेमान कर्राणी याने ओडिसाचे राज्य जिंकले; पण ओडिसात आपली राज्यव्यवस्था सुरू करायच्या आतच इ. स. १५७२ मध्ये त्याचा मृत्यू झाला. त्याच्या मागून त्याचा धाकटा मुलगा दाऊद हा सुलतान बनला. कर्राणीने दिल्लीच्या अकबर बादशहाचे स्वामित्व मान्य केले होते; पण अफगाण लोक दिल्लीचे वर्चस्व झुगारून देण्याची संधी पाहत होते. दाऊदने त्याचा फायदा घेतला व अफगाण सरदारांच्या मदतीने आपल्या नावाची द्वाही फिरवली. या घटनेमुळे अफगाण व मोगल यांच्यांत संघर्ष माजला व पुढे अनेक वर्षे तो चालू राहिला. अखेरीस त्यात दाऊदचा



वैताल मंदिर

अंत झाला (इ. स. १५७६). इ. स. १५७८ साली ओडिसा मोगल राज्याला जोडला गेला खरा; पण मोगल व अफगाण यांच्यामधले वैर मात्र एवढ्यावर थांबले नाही, ते पुढेही चालूच राहिले. त्यानंतर अकबराने राजा रामचंद्रदेव याला ओडिसाचा राजा म्हणून मान्यता दिली. इ. स. १५९२ ते १६०४ या कालात मानसिंह हा बंगाल व ओडिसा यांचा सुभेदार होता.

त्याच्या नंतर जे सुभेदार झाले, त्यांपैकी हासिमखान हा फार जुलमी निघाला. त्याने जमीनदारांना तर लुटलेच; पण त्याचबरोबर जगन्नाथाच्या देवालयाचीही लूट केली. शहाजहानच्या कारकिर्दीतील बाकरखान सुभेदारही असाच अत्यंत जुलमी व क्रूर होता. त्याने सात हजार जमीनदारांना तुरुंगात कोंडून त्यांचा वध केला. शेवटी शहाजहानने त्याला कामावरून दूर केले. औरंगजेबाच्या धर्मवेडाची झळही ओडिसाला लागल्यावाचून राहिली नाही. त्याच्या कारकिर्दीत मुर्शिद कुलीखान हा ओडिसाचा सुभेदार होता. इ. स. १७०४ साली त्याने आपला जावई सुजाउद्दिन याची आपल्या हाताखाली नेमणूक करून घेतली. ओडिसामध्ये सध्या प्रचलित असलेला सत्यपीराचा पंथ यानेच सुरू केला, असे काही पंडितांचे मत आहे. हा दयाळू होता. त्याने कैदेत असलेल्या अनेक जमीनदारांची मुक्तता केली. इ. स. १७३९ साली सुजाउद्दिन मरण पावला.



मिथुनशिल्प—ओडिसा]

त्यानंतर थोड्याच काळात त्याचा भाऊ अलिवर्दी व मराठे यांच्यामध्ये लढाई सुरू झाली व मराठ्यांनी ओडिसावर ताबा मिळवला. नागपूरच्या रघूजी भोसल्याने आपल्या दहा हजार फौजेनिशी अलिवर्दीखानावर चाल केली व त्याला बंगालमध्ये पिटाळून लावले. मराठ्यांनीही ओडिसातील लोकांचे खूप हाल केले. लोकांना त्यांची इतकी दहशत बसली, की मराठा हे नाव ऐकताच माणसे गिरिकंदरांचा आश्रय घेऊ लागली. इ. स. १७५१ साली ओडिसावर मराठ्यांचा अंमल आला व तो सुमारे पन्नास वर्षे टिकला. मराठ्यांनी तिथे जमीनदारीची व्यवस्था लावून दिली आणि मुसलमानी वर्चस्वाखालून ओडिसाला मुक्त केले.

इ. स. १५१४ मध्ये ओडिसा प्रांतात एक उल्लेखनीय घटना घडली. पिपली या गावी पोर्तुगिजांनी आपली वसाहत केली व पिपली गाव त्यांच्या व्यापाराचे एक केंद्र बनले. पोर्तुगीजांच्या पाठोपाठ डच व इंग्रज या लोकांनीही ओडिसात आपले पाय रोवले. इंग्रजांनी इ. स. १८०३ मध्ये ओडिसा जिंकला. इंग्रजांच्या आक्रमणाच्या काळात मयूरभंजचा मुख्य दामोदर भंज याने इंग्रजांशी चांगली झुंज दिली. तो शूर सेनापती होता, तसाच धूर्त राजकारणीही होता. त्याची देशभक्तीही प्रखर होती. एकाकीपणे त्याने मराठा व इंग्रज या दोन्ही शत्रूंना तोंड दिले.

यानंतरची ओडिसातली प्रमुख घटना म्हणजे पाइकांचे बंड. ओडिसात प्राचीन काळापासून पाइकपद्धती अस्तित्वात होती. तिथल्या निरनिराळ्या स्वतंत्र राजांचे जे खडे सैनिक होते. त्यांना पाइक असे नाव होते. राजांनी या लोकांना जमिनी फुकट दिल्या होत्या. त्या कसून ते आपला उदरनिर्वाह करीत. जमिनीच्या मोबदल्यात त्यांना केव्हाही युद्धाच्या मोहिमेवर जावे



भव्य हत्ती, कोणार्क

लागे. अबुलफजलच्या मते या लोकांची संख्या एक लाख पंचावन हजार होती. इंग्रजांचे राज्य आल्यावर त्यांच्या या वंशपरंपरागत जमिनी काढून घेण्यात आल्या. त्यामुळे ते बिथरले

व त्यांनी इंग्रजांविरुद्ध बंड उभारले (इ. स. १८१७). परंतु इंग्रजांनी त्या बंडाचा मोड केला. जे पाइक जंगलात लपून बसले होते, त्यांना शोधून शिक्षा करण्याचे काम पुढे इ. स. १८२६ पर्यंत चालू होते. या बंडाचा आणखी एक परिणाम असा झाला, की ओडिया लोकांना सैन्यात दाखल व्हायला बंदी करण्यात आली. यानंतरही त्यांनी इ. स. १८३३ व १८४७ मध्ये असे दोनदा उठाव केले; परंतु ते अयशस्वी ठरले. १९०५ साली ओडिसा प्रांत बिहारला जोडण्यात आला; पण पुढे एकतीस वर्षांनी तो स्वतंत्र प्रांत झाला. १९४७ मध्ये भारताला स्वातंत्र्य मिळाले. त्यानंतर दोन वर्षांतच ओडिसातील पंचवीस संस्थाने भारतीय संघराज्यात विलीन करण्यात आली.

लोक – ओडिसातील लोक एका विशिष्ट वंशांचे किंवा जातीचे नाहीत. त्यांच्यांत अनेक जातींचे मिश्रण आहे. सुमारे हजार वर्षांपूर्वी ओडिसाच्या राजांनी कनोजच्या ब्राह्मणांना आपल्या राज्यात बोलावले व त्यांच्याकडे चातुर्वर्ण्याधिष्ठित धर्माची व्यवस्था लावण्याचे काम दिले. ब्राह्मणांनी हे काम चोखपणे बजावले असे सांगतात. ब्राह्मणांप्रमाणेच ओडिसात अन्य प्रांतांतून कायस्थ व आग्रा-दिल्लीकडचे अघारिया हे शेतकरी आले व स्थायिक झाले. ओडिसावर मुसलमानांची सत्ता असताना परप्रांतांतून हजारो मुसलमान इथे वस्ती करण्यासाठी आले. तथापि ओडिसात सध्या मात्र बहुतेक सर्व वस्ती हिंदूंचीच आहे.

ओडिसातले ससनी नावाचे ब्राह्मण सर्वांत उच्च समजले जातात. पूर्वीच्या राजांकडून त्यांना वंशपरंपरा जमिनी मिळालेल्या आहेत. उत्कल ब्राह्मणांनाही समाजात उच्च दर्जा आहे. ब्राह्मणांच्या खालोखाल क्षत्रिय किंवा राजपूत यांचा वर्ग येतो. बहुतेक सर्व जमीनदार स्वतःला क्षत्रिय म्हणवितात. याशिवायही तिथे अनेक जाती आहेत. परंतु ओडिसाचे वैशिष्ट्य हे, की तिथे जातीय भेदभाव फार कमी आहे.

एकूण लोकसंख्येपैकी ७३ टक्के लोक शेतीवर अवलंबून आहेत. तथापि लोकवस्ती शहरातच जास्त आहे. सखल प्रदेशातले लोक सुखी व समृद्ध आहेत. डोंगराळ आणि जंगली प्रदेशात आदिवासी राहतात. ते खूप राबतात. प्रकृतीनेही ते काटक आहेत.

ओडिसातले आदिवासी कुरळ्या केसांचे, चपट्या नाकांचे, धवकड्या आणि लांबोळक्या चेहऱ्याचे असे आहेत. ते कंदमुळे खातात आणि जंगलात उत्पन्न होणारे उपयुक्त पदार्थ विकून गुजराण करतात. त्यांच्यापैकी काही लोक शेतीही करतात. लांजिया, सोरा, कुटिया, डांगरिया, बंडा, कोया, कांध, जुआंग, इ. नावांनी हे ओळखले जातात.

ओडिसामध्ये आदिवासी व मागसलेल्या जमाती यांची संख्या सुमारे दीड कोटी आहे. त्यांपैकी आदिवासी ३० लाख, मागस जमाती ३६ लाख व इतर मागसलेल्या जाती ४२ लाख मिळून सुमारे एक कोटी लोक मागसलेले आहेत. हे लोकही एके ठिकाणी वसलेले नसून जंगलात विखुरलेले आहेत.

ओडिसातली जमीन अत्यंत सुपीक असून, तिथे भात विपुल प्रमाणात पिकते. याशिवाय ऊस, गहू, ताग, गळिताची धान्ये, डाळी, नारळ, हळद, विड्यांचीं पाने, आवळा, काजू, फणस, केळी, तंबाखू, इ. पिकेही येतात.

ओडिसाचा एक तृतीयांशापेक्षा जास्त भाग जंगलांनी व्यापलेला आहे. या जंगलांत इमारती लाकूड, बांबू, रेल्वेच्या, स्लिपर्ससाठी लागणारे लाकूड, विड्यांना लागणारी केंदूची पाने, वेत, मध, शिंगे, मोहाची फुले, रेशमाचे किडे, लाख, हस्तिदंत, कातडी, औषधी वनस्पती वगैरे नाना वस्तू मिळतात. या जंगलातच कोंढ, संताळ, गदब, कोया, जुआंग, सवर, बोंडो वगैरे आदिवासी स्वच्छंदपणे आपले आयुष्य घालवितात. हें आदिवासी अत्यंत प्रामाणिक, कष्टाळू व काटक आहेत.

ओडिसा प्रांत खनिज संपत्तीनेही समृद्ध आहे. दगडी कोळसा, लोखंड, मँगेनीज, बॉक्साइट, चुनखडी, क्रोमाइट, कोळसा, ग्राफाइट व डोलोमाइट ही खनिज द्रव्ये ओडिसात सापडतात. ओडिसात जेवढे कच्चे लोखंड पैदा होते, तेवढे भारतात अन्यत्र कुठेही पैदा होत नाही. सुंदरगढ, मयूरभंज, केंदुझर, कटक हे जिल्हे या कच्च्या लोखंडाच्या मिळकतीसाठी नावाजले जातात. तालचेर आणि रायचूर इथे खनिज कोळसा विपुल प्रमाणात



हिराकूड धरण

मिळतो. केंदुझर, सुंदरगढ, बलांगीर, कलहांडी, कोरापुट हे जिल्हे मँगेनीज आणि अभ्रकासाठी प्रसिद्ध आहेत.

कोरापुट जिल्ह्यातल्या सुनाबेडा येथ विमानांचा आणि राऊरकेला येथे पोलादाचा कारखाना आहे. त्याचप्रमाणे सिमेंट, ॲल्यूमिनियम, काच, कागद, इ. पदार्थांचे कारखाने अनुक्रमे राजगंगपूर, हिराकूड, कटक, रायगढ येथे आहेत.

महानदीवरचा पूल सबंध आशियात प्रचंड व प्रदीर्घ म्हणून प्रसिद्ध आहे. हिराकूडचा बांधही असाच प्रचंड आहे.

**प्रेक्षणीय स्थळे व तीर्थक्षेत्रे** – कटक हे नगर महानदी व तिची उपनदी काठजोडी या दोन नद्यांच्या मधल्या प्रदेशात वसले आहे. ओडिसातले सर्वांत मोठे आणि समृद्ध नगर म्हणून याची ख्याती आहे. हे ओडिसातल्या व्यापाराचे प्रमुख केंद्र. कटकमधील प्रेक्षणीय स्थळांत काठजोडीवरील भव्य दगडी पूल, चंडीमंदिर, बारबाटीचा किल्ला, टेकडीवरील जुन्या प्रासादाचे भग्न अवशेष, रेवेन्शा कॉलेज यांचा समावेश आहे.

पुरी – जगन्नाथपुरी हे भारतातले प्रसिद्ध वैष्णवक्षेत्र आहे (जगन्नाथपुरी पाहा.)

भुवनेश्वर – हे प्रसिद्ध शिवक्षेत्र आहे. (भुवनेश्वर पाहा.)

ब्रह्मपूर आणि संबलपूर ही दोन नगरे अनुक्रमे व्यापार आणि शिक्षण यांसाठी प्रसिद्ध आहेत. ब्रह्मपूरच्या जवळ एका टेकडी-वर तारातारिणी देवीचे जुने मंदिर आहे.

उदयगिरी–खंडगिरी – जैनांचे पवित्र क्षेत्र.

हाथी–गुंफा – प्रसिद्ध गुहा.

भारतातील इतर प्रदेशाप्रमाणे ओडिसातही ग्रामोद्योगाला महत्त्वाचे स्थान आहे. मातीची व काशाची भांडी तयार करणे, शंख–शिंपले, हस्तिदंत व शिंगे यांच्या कलाकृती बनविणे हे ग्रामोद्योग इथे चालतात; पण इथला महत्त्वाचा ग्रामोद्योग म्हणजे हातमागावर नक्षीदार कापड तयार करणे, हा आहे. रंगीबेरंगी धाग्यांनी सुंदर वेलबुट्टी व भडक पशुपक्षी विणलेल्या या कापडाला विलायतेत फार मोठी मागणी असते.

ओडिसातली नैसर्गिक परिस्थिती कोकणाप्रमाणे आहे. तिथली हवा कोकणाप्रमाणेच उष्ण व दमट असल्यामुळे कपडे विशेषसे लागत नाहीत. सर्वसामान्य लोक पंचेवजा आखूड धोतर नेसतात व आखूड बाह्यांचा सदरा घालतात. ग्रामीण लोकांना तर सदऱ्याचीही गरज भासत नाही. एक पंचा कमरेला वेढला व दुसरा अंगावर टाकला, की त्यांचे काम भागते. स्त्रिया मुख्यतः पाचवारी पांढऱ्या साड्या वापरतात. आदिवासी स्त्रिया मात्र रंगीत लुगडी नेसतात. इथे बहुतेक सर्व ठिकाणी सामायिक कुटुंबपद्धती आहे; परंतु हल्ली शिक्षित लोकांत विभक्त होण्याची प्रवृत्ती वाढत आहे. इथे स्त्रियांत पडदापद्धती नाही; परंतु वडील माणसांसमोर उघड्या चेहऱ्याने सुनांना येण्याची परवानगी नसते.

ओडिसातील लोकांचे काही खास सणवार आहेत. वैशाख शु. प्रतिपदेला ते पणासंक्रांती म्हणतात. त्या दिवशी ओडिसात ठिकठिकाणी जत्रा भरतात.



नर्तिका – कोणार्क

आषाढ शु. प्रतिपदा ही रजसंक्रांती. या सणासाठी तीन दिवस सर्वांना सुट्टी असते. त्या दिवसांत शेत-करीही आपले काम बंद ठेवतात. स्त्रिया स्वयंपाका-लाही सुट्टी घेतात. तीन दिवस पुरुष व स्त्रिया खेळ खेळतात व आमोद–प्रमोद करतात.

आषाढ शु. द्वितीयेपासून जगन्नाथाची रथयात्रा सुरू होते व ती नऊ दिवस चालते. कोजागरीला ते कुमारपौर्णिमा म्हणतात. या पौर्णिमेच्या आधी महिनाभर मुली चंद्राची पूजा करतात व या दिवशी सकाळी सूर्याची आणि रात्री चंद्राची पूजा करतात. माघ पौर्णिमेला ते अग्न्युत्सव करतात. या दिवशी घरोघरचा कचरा एकत्र करून पेटवितात व गाव स्वच्छ करतात. चैत्र शु. अष्टमीला अशोकाष्टमी असे नाव आहे. या दिवशी अशोकाची फुले खाल्ल्याने वर्षभर शोक होत नाही, अशी त्या लोकांची समजूत आहे. ज्येष्ठ पौर्णिमेला देवस्नान पौर्णिमा असे म्हणतात. त्या दिवशी जगन्नाथाला स्नान घालतात. याशिवाय गणेश-चतुर्थी, नवरात्र, दिवाळी, होळी वगैरे सार्वजनिक सणही ओडिसातील लोक साजरे करतातच.

ब्रिटिश अमदानीत सुमारे शंभर-सव्वाशे वर्षे ओडिसावर बंगाली भाषिकांचे वर्चस्व होते. त्याचा परिणाम म्हणून बंगाली भाषेचा फार मोठा प्रभाव ओडिया भाषेवर पडला आहे. त्याच्या खालोखाल छत्तीसगढी व मराठी भाषेचा प्रभावही त्या भाषेवर दिसतो. छत्तीसगढाचा भाग ओडिसाला लागून असल्यामुळे त्या भाषेतील काही शब्द व ओडियातील काही शब्द समान असणे स्वाभाविक आहे; पण मराठी व ओडिया

भाषेच्या साम्याबद्दल मात्र जरा आश्चर्य वाटते. मराठ्यांनी या प्रदेशावर सुमारे पन्नास वर्षे राज्य केले, त्यांचा हा परिणाम असावा.

ओडिसा प्रांतावर निसर्गसौंदर्याचा वरदहस्त आहे. लहान-मोठे पर्वत, दाट जंगले, नद्या, समुद्रकिनारा, इ. गोष्टींमुळे इथे अनेक प्रेक्षणीय स्थळे निर्माण झाली आहेत. सातकोसिया खिंड ही त्यांपैकी एक होय. ही सुमारे चौदा मैल लांब असून महानदीच्या डोंगराळ भागातील प्रवाहामुळे निर्माण झाली आहे. दुसरे एक निसर्गनिर्मित सौंदर्यस्थळ म्हणजे चिलका सरोवर. या सरोवराचे क्षेत्रफळ सुमारे चारशे चौरस मैल



चिलका सरोवर – ओडिसा

असून त्याची लांबी ४४ मैल आहे. भारतातील हे सर्वांत मोठे सरोवर होय. याची खोली मात्र सरासरी पाच-सहा फूट असून, ती बारा फुटांहून जास्त कुठेच नाही. हिवाळ्यात इथे जगाच्या निरनिराळ्या भागांतून चित्रविचित्र रंगांचे व जातींचे पक्षी जमतात व त्यांच्या शिकारीसाठी शिकारी लोकांचे तळ पडतात. याशिवाय या सरोवराचे एक वैशिष्ट्य असे, की यात उत्कृष्ट व विपुल मासळीही सापडते.

**ओडिसातले आदिवासी** – सवर आणि भुइया हे ओडिसाचे मूळ रहिवासी होत. त्यांनी ओडिसाच्या सांस्कृतिक क्षेत्रात आपले असे काही पेरून ठेवले आहे. पूर्वी या प्रदेशात आदिवासींची अशी एक खास संस्कृती होती. त्यांची जात-पंचायत होती व तिची सर्वांवर हुकमत चाले. या सर्व जमातींत सवर आदिवासी हे प्रमुख आहेत. इंडो-आर्यन भाषा बोलणाऱ्या लोकांशी यांचा फार पूर्वीपासून संबंध आला होता. आजच्या ओडिया भाषेत इंडो-आर्यन भाषेचे अवशेष आहेत, असे भाषाशास्त्रज्ञांचे मत आहे. ओडिसातील काही धार्मिक पंथांचा उगमही याच सवरांच्या मूळ धर्मात सापडतो. सध्याची जगन्नाथाची पूजा करण्याची पद्धत ही सवरांकडूनच उचललेली आहे. पेरलेल्या धान्याला फूल आल्यावर कार्तिक महिन्यात त्या फुलाची पूजा करतात, हाही आदिवासी संस्कृतीचाच अवशेष आहे.

ओडिसाच्या संस्कृतीवर आपली छाप उमटविणारे दुसरे आदिवासी म्हणजे भुइया होत. ओडिसाचा काही भाग प्राचीन काळी यांच्या ताब्यात होता, असे दिसते. कारण, केओंजहार संस्थानातील राजाला राज्याभिषेक करताना भुइया जमातीचा पुरोहित उपस्थित असावा लागे. यावरून भुइया लोकांच्या संमतीनेच हे राजे राज्य करीत, असे अनुमान निघते.

**देवधर्म** – ओडिसा व बौद्ध धर्म यांचा संबंध बराच जुना आहे. मगध व ओडिसा या देशांत व्यापारी देवाण-घेवाण इ. स. पू. सहाव्या शतकापासून सुरू असल्याचे पुरावे सापडतात. इ. स. पू. तिसऱ्या शतकात अशोकाने कलिंग देश काबीज केला व त्यामुळे तिथल्या लोकांत बौद्ध धर्माचा प्रसार झाला. जगन्नाथाची पूजाअर्चाही काही काल बौद्ध भिक्षूंच्याच हातात होती. बौद्ध वाङ्मयातही जगन्नाथ हा बुद्धाचाच अवतार असल्याचे उल्लेख आढळतात. इ. स. च्या सातव्या शतकापर्यंत हा संबंध टिकून होता, असे दिसते.

द. भारताशीही ओडिसाचा संबंध प्राचीन काळीच आला असावा, असे वाटते. जगन्नाथाच्या देवालयात अजूनही उच्छिष्ट किंवा बंदा गणपतीची पूजा होते, हा त्याचाच पुरावा होय.

ययाती केसरी या राजाने ओडिसात हिंदू धर्माचा व विशेषत: शैव पंथाचा पुरस्कार केला. कनोज व संयुक्त प्रांत या दोन ठिकाणांहून त्याने दहा हजार ब्राह्मण आणून इथे वसविले. जयपूर या नव्याने वसविलेल्या नगरीत एक मोठा यज्ञ केला. तेव्हापासून ओडिसात हिंदू धर्म प्रबळ झाला व बौद्ध धर्माला ओहोटी लागली. इ. स. च्या १५ व्या शतकात चैतन्यप्रभूंच्या वैष्णव पंथाने ओडिसात मूळ धरले. त्यामुळे पुढे जगन्नाथ हा विष्णूचा अवतार मानण्यात येऊ लागला. वैष्णव पंथाचा ओडिसात सर्वत्र प्रसार झाल्यावर तिथल्या शैव पंथाला ओहोटी लागली.

**ओडिसातील शिल्पकला** – द. भारताप्रमाणेच ओडिसा प्रांतातही शिल्पकलेचे वैभव जागोजाग दृष्टीस पडते. भुवनेश्वर, कोणार्क, जगन्नाथपुरी, या ठिकाणी भारतीय शिल्पकलेचा जो आविष्कार दिसतो, तो अतिशय भव्य-दिव्य असा आहे. भुवनेश्वराचे लिंगराजमंदिर हे ययाती राजाच्या कारकिर्दीत (इ. स. ७९५–८४०) बांधलेले आहे. हिंदू शिल्पकलेचा परमोत्कर्ष या ठिकाणी दृष्टीस पडतो. भुवनेश्वर नगर म्हणजे मंदिरांचे आगरच असून, इथे लहान-मोठी मिळून सुमारे पाचशे

मंदिरे आहेत. त्यांपैकी लिंगराज, परशुरामेश्वर, वैताल, राजरानी, मुक्तेश्वर, इ. मंदिरे विशेष प्रेक्षणीय आहेत. लिंगराज-मंदिराच्या आवाराची लांबी ५२० फूट व रुंदी ४६५ फूट आहे. मंदिराच्या मुख्य शिखराची उंची जोत्यापासून १४७ फूट आहे. यावरून मंदिराच्या भव्यतेची कल्पना येईल. आतील शिवलिंगही मंदिराला साजेसे मोठे आहे. येथील शिल्पात भव्यता व नाजूकपणा यांचा मनोहर संगम दिसतो.

मुक्तेश्वराचे मंदिर इतर मंदिरांच्या मानाने आकाराने लहान असले, तरी शिल्पकलेच्या दृष्टीने ते श्रेष्ठ आहे. या मंदिरात उंदरावर बसलेला गणपती, मोरावर आरूढ झालेला कार्तिकेय व सप्तमातृका यांच्या मूर्ती आहेत. परशुरामेश्वराच्या मंदिराच्या भिंतीवर रामायण-महाभारतांतील प्रसंग कोरलेले आहेत.

राजरानी या मंदिरात देवाची मूर्ती नाही. देवालयाचे हे बांधकाम अर्धवट सोडण्यात आले आहे. त्यामुळे इथे कोणत्याही धर्माच्या वा पंथाच्या माणसाला मज्जाव नाही. इथले शिल्पकाम नाजूक व मनोहर आहे. ओडिसाची पूर्वीची राजधानी कटक होती, तर हल्लीची राजधानी भुवनेश्वर ही आहे. चंदीगडाप्रमाणेच हे शहर नव्याने वसविण्यात आले आहे. १३ एप्रिल १९४८ रोजी या नव्या राजधानीचा कोनशिला समारंभ पंडित नेहरूंच्या हस्ते झाला. या नव्या शहराची विभागणी पाच भागांत करण्यात आली असून प्रत्येक भाग शाळा, बाजार, क्रीडांगणे, उद्याने या बाबतीत स्वयंपूर्ण आहे.

ओडिसातील प्रख्यात क्षेत्र म्हणजे जगन्नाथपुरी. सम्राट अनंग भीमदेव (११८९–१२२३ इ. स.)याने हे मंदिर ११९८ साली बांधले. कृष्ण, बलराम व त्या दोघांच्या मध्ये सुभद्रा अशा तीन लाकडी मूर्ती या मंदिरात आहेत. त्यांना मूर्ती म्हणण्यापेक्षा ओबडधोबड लाकडी ठोकळे म्हणणेच रास्त होईल. या मूर्ती कुजून जाऊ नयेत म्हणून दर बारा वर्षांनी त्या बदलण्याची पद्धत आहे. तो समारंभ मोठा होतो.

ओडिसातील आणखी एक प्रेक्षणीय शिल्प म्हणजे कोणार्क येथील सूर्यमंदिर. हे गंगवंशातील सम्राट नरसिंह (१२३८–१२६४ इ. स.) याने बांधले. मंदिर अगदी समुद्रकिनाऱ्यावर असल्याने समुद्राच्या खाऱ्या पाण्याचा व हवेचा मंदिराच्या जांभ्या दगडावर परिणाम होऊन बराचसा भाग पडला आहे. सध्या अस्तित्वात असलेल्या मंदिराच्या अवशेषांवरून या मंदिराची मुळात उंची २२७ फूट असावी, असा शास्त्रज्ञांचा अंदाज आहे. या मंदिराचा आकार रथासारखा आहे. त्याच्या दोन्ही बाजूंना प्रचंड चाके असून त्याला घोडे जोडलेले आहेत. मंदिरात सूर्याची मूर्ती मात्र नाही.

मंदिराच्या वरच्या बाजूला मध्यान्हीच्या व सूर्यास्तसमयीच्या सूर्याच्या मूर्ती, नृत्यांगनांच्या मूर्ती व माणसांची आणि पशूंचीही सुंदर चित्रे आहेत. नटमंडपाच्या भिंतीवरील नृत्य-



घोडेस्वार—कोणार्क

वाद्यांची चित्रे अप्रतिम आहेत. इथेही स्त्री-पुरुषसंभोगाची अनेक शिल्पे कोरलेली दिसतात. [लोकयात्रा; हि. ओ.; हि. ओ. ले.; ओरिसा; उडीसा; पु. इं.; अजन्ता–मार्च १९५७.; हि. जॉ. ए. इं.; जॉ. ए. मि. इं.; ट्रा. ए. इं.]

## ओडिसी नृत्य

प्राचीन भारतीय नृत्यांच्या अनेक प्रकारांपैकी हा एक शास्त्रीय नृत्यप्रकार आहे. भरतनाट्यम, कथकळी, मणिपुरी व कथक या नृत्यांच्या बरोबरीचे स्थान ओडिसीला आहे. ओडिसामध्ये या नृत्याची परंपरा आहे. इ. सनपूर्व २०० वर्षांच्या आधीपासून हे नृत्य तिथे प्रचलित होते. उदयगिरी येथील हाथीगुंफेतल्या शिलालेखात या प्राचीन कलेचे वर्णन आढळते. कलिंगाधिपती खारवेल याने लोकांच्या मनोरंजनासाठी दर्पनृत्य व वादित्रनृत्य या उभयविध नृत्यांचा कार्यक्रम ठरविला होता, असा उल्लेख त्या लेखात आहे. इ. स. च्या ८ व्या शतकापर्यंत तिथे बौद्ध राजांची सत्ता होती. त्यांच्या कालात ओडिसातील विविध कलांचा विकास झाला. इ. स. च्या ८ व्या शतकात केसरी राजसत्तेच्या आश्रयाने तिथे पुनश्च श्रुतिस्मृतिपुराणप्रतिपादित धर्माची प्रस्थापना झाली. त्यानंतर त्या भागात जी शिवमंदिरे उभारली गेली, त्यांत नृत्यमंडपही बांधण्याची प्रथा सुरू झाली. या मंदिरशिल्पावरील कोरीव कामात ओडिसी नृत्याचे विशेष दर्शन घडते. तेव्हापासूनच त्या प्रदेशात देवदासींची प्रथा सुरू झाली. शंकरासमोर विविध प्रसंगी नृत्य-गायन करणे, ही सेवा त्यांना नेमून देण्यात आली.

इ. स. च्या १२ व्या शतकात महेश्वर महापात्र याने अभिनयचंद्रिका नामक ग्रंथ रचला, त्यात या नृत्याचे शास्त्रीय विवेचन केले आहे.

इ. स. १५८६ मध्ये मुसलमान आक्रमकांनी ओडिसा जिंकून जगन्नाथाचे मंदिरही लुटले. पुढे मोगलसत्ता प्रस्थापित झाल्यानंतर त्या मंदिरात पुनश्च पूजा, उत्सव इ. कार्यक्रम सुरू झाले. मोगलसत्तेकडून राजा रामचंद्र देव याला पुरी येथील जगन्नाथ मंदिराचा व्यवस्थापक नेमण्यात आले. त्याने पूर्वीची पूजापद्धती चालू केली. मुलांना ओडिसी नृत्य शिकवून व त्यांना मुलींचे वेष देऊन त्यांच्याकरवी उत्सवादी प्रसंगी ओडिसी नृत्य करण्याची प्रथाही त्यानेच सुरू केली. आजही ती प्रथा चालू आहे.



ओडिसी नृत्य

इ. स. १९५८ मध्ये ओडिसा येथील एका नृत्यमंडळाने ओडिसी नृत्याचा प्रयोग करून दाखविला. या नृत्यमंडळाचे कलागुरू श्री. कालीचरण पटनायक हे होते. हे गृहस्थ या नृत्याच्या क्षेत्रात संशोधन करीत असून, त्यांनी ओडिसी नृत्याविषयी अनेक प्राचीन हस्तलिखिते व प्रबंध जमा केले आहेत.

या नृत्याचे ५ भाग असतात, त्यांची नावे अशी – (१) मंगलाचरण, (२) पल्लवी, (३) वाटू, (४) अभिनय व (५) मोक्ष.

ओडिसी नृत्यात एकूण ५७ हस्तमुद्रा असतात. अनेक पदमुद्राही असतात. त्याचे लास्य व उग्र असे दोन प्रकार आहेत. शरीराच्या मूलभूत हालचालींना ओडिसीत भंगी म्हणतात. दर्पण व एकपादभ्रमरी या विशेष भंगी होत. या नृत्याला गाण्याची जोड असते व साथीला मर्दल (मोठा मृदंग), बांसरी व झांज ही वाद्ये असतात. त्रिभंग अवस्थेत उभे राहून डोळे, भुवया व मान यांच्या लयबद्ध हालचाली करणे, हा या नृत्याचा पूर्वरंग असतो. त्या वेळी, मृदंगावर लयबद्ध असे बोल किंवा तुकडे वाजविले जातात व त्यावरच या नृत्यातील विविध तालबद्ध क्रिया आधारलेल्या असतात. अतिभंग व त्रिभंग यांना ओडिसी नृत्यात महत्त्वाचे स्थान आहे.

नाट्यशास्त्रात अवंती, दाक्षिणात्य, पांचाली व ओड्र-मगध अशा चार प्रादेशिक नृत्यपद्धतींचा उल्लेख आहे. ओड्र म्हणजेच ओडिसाची ओडिसी नृत्यपरंपरा होय. या नृत्यात शरीराची डौलदार वळणे व लवचिक हालचाली, यांचे सुंदर दर्शन घडते. [ रागिणीदेवी – इलस. वीकली, १ जून १९५८; श्री. पटनायक – मार्च ऑफ इंडिया, फेब्रुवारी १९६१ ]

**ओड्ड** भारताच्या सर्व भागांत पसरलेली एक जात. या लोकांना वेलदार, ओड्डे, वोड्डे, वड्डर, वडार व ओर्ह असेही म्हणतात. हे लोक स्वतःला क्षत्रिय समजतात. ओड्र अर्थात ओडिसा या प्रदेशाशी यांचा संबंध असावा. प्रांतपरत्वे यांचे अनेक पोटभेद आहेत. हे लोक खेड्यापाड्यात राहून विहिरी खणतात, तलाव बांधतात व रस्ते आणि कालवेही खणतात. इतरही माती-दगडांची कामे यांना चांगली करता येतात. किंबहुना अशा कामांवर हे लोक आपला विशेष हक्क सांगतात. हे लोक अशिक्षित व अडाणी आहेत. मात्र ते खुल्या दिलाचे व सुस्वभावी असतात. मजुरीचा पैसा मिळाला, की तो मात्र लगेच चैनीत उडवून टाकतात. या त्यांच्या स्वभावाविषयी एक दंतकथा सांगतात; ती अशी –



ओड्ड स्त्री-पुरुष

प्राचीन काळी देवांना व माणसांना पाणी मिळावे म्हणून ओड्डांना एक तलाव खोदण्याचे काम देण्यात आले. ते काम पुरे झाल्यावर ते आपली मजुरी मागू लागले, तेव्हा शिवाने प्रत्येकाच्या कपाळी अंगारा लावला. घरी येऊन पाहतात, तो त्या अंगाऱ्याचे नाणे बनले; पण तेवढ्याने संतुष्ट न होता, ते शिवाकडे आणखी अंगारा मागू लागले. ते पाहून शिव रागावला व त्याने ओड्डांना शाप दिला, की 'जंगलात खणण्याच्या कामाचा जो पैसा तुम्ही मिळवाल, तो जंगलातून बाहेर येताच नाहीसा होईल.'

हा शाप ऐकून पार्वतीला ओड्डांची दया आली. तिने त्यांना

पुष्कळ द्रव्य देण्याविषयी शिवाला विनविले. मग शिवाने एका कोहळ्यात सुवर्णनाणी भरून तो कोहळा ओड्डांच्या मुकादमाच्या हस्ते ओड्डु ज्या जागी काम करीत होते, त्या जागी जमिनीत पुरून ठेवला. पुढे थोड्या वेळाने एक रेडा तिथे आला व त्याने ती जागा आपल्या शिगांनी उकरली. त्यामुळे तो पुरलेला कोहळा वर आला; पण ओड्डु असे अडाणी, की त्यांनी त्या कोहळ्यात काय आहे ते न पाहताच तो कोहळा अल्प किंमतीत एका कोमट्याला विकून टाकला.

ओड्डु हे खाण्यापिण्याच्या बाबतीत कोणतेही निर्बंध पाळीत नसले, तरी ते उच्च जातींच्या घरीच अन्नग्रहण करतात. पण तरीही बहुतेक शूद्र जाती यांना आपल्याहून हलके मानून यांचा तिरस्कार करतात. यांच्यात बहुपत्नीकत्व व घटस्फोट अशा दोन्ही चाली आहेत. बायकांना अठरा वेळा पाट लावता येतो.



ओड्डांची झोपडी

आणि त्यानंतर मात्र तिला त्या कामी बंदी होते. ही मर्यादा पुरुषांना लागू नाही. सात नवरे केलेली स्त्री सन्माननीय समजली जाते व अशा स्त्रीने लग्नात वधू-वरांना आशीर्वाद देणे हे मंगलकारक समजतात. एका कुळात लग्ने करीत नाहीत. आते-मामे बहिणीशी लग्ने करतात. लग्नातले पुरोहित त्यांच्याच जातीचे असतात.

हे लोक व्यंकटरमण, नरसोबा, महादेव, यल्लम्म, अंक्कम्म इ. देवताना भजतात. यल्लमाची वार्षिक जत्रा करतात. कुदळ हे या जातीचे देवक आहे.

कल्लू व मन्नू अशा यांच्या दोन पोटजाती आहेत. कल्लू दगडांचे व मन्नू मातीचे काम करतात. पोटजातींत लग्नसंबंध होत नाहीत. कारण कल्लू स्वतःला श्रेष्ठ समजतात. मन्नू लोक उंदीर, साळू व खवले मांजर खातात. वरील दोन पोटजातीशिवाय बंडोल्लू, वोच्छोल्लू, अशा आणखी २४ उपजाती त्यांच्यात निर्माण झाल्या आहेत. अरशिन (हळद), हुविन (फुले), होन्न (सोने) व अक्षंतल (अक्षता) ही या पोटजातींची देवके होत.

गुजरातेत या लोकांना जयसिंह सिद्धराज (इ. स. १०९४ ते ११४३) याने पाटण येथील सहस्रलिंग तलाव खोदण्यासाठी आणले, अशी दंतकथा सांगतात. दुसरी दंतकथा अशी–

तलाव खणणाऱ्या एका सुंदर ओड्डु स्त्रीवर जयसिंह सिद्धराजाचे मन जडले. त्याने तिला वश करण्याचा प्रयत्न केला; पण ती वश झाली नाही. म्हणून जयसिंह सिद्धराज तिचा छळ करू लागला. त्या छळाला कंटाळून तिने आत्महत्या केली. मरताना तिने राजाला शाप दिला, की 'तळ्यात पाणी राहणार नाही व इतःपर कोणीही ओडाणी स्त्री रूपवती निपजणार नाही.'

ही दंतकथा खरी-खोटी कशीही असो; पण एवढे खरे, की ओड्डांच्या बायकांना रूप नसते.

अन्य जातीतील लोक ओड्डांच्या जातीत येऊ शकतात. परजातीचा माणूस आपल्या जातीत घेताना ते प्रथम त्याचे क्षौर करतात, लिंबाच्या जळत्या काठीने त्याच्या जिभेच्या टोकाला डाग देतात व मग त्याला तीर्थ पाजतात. स्त्रीचे जात्यंतर करायचे झाल्यास तिचे क्षौर करीत नाहीत; पण तिची चोळी, बांगडी काढून घेतात. [ रजःकण; का. ट्रा. स. इं.; मुं. इ. जा. ]

**ओढणी** मध्यदेश व माळवा यांतील स्त्रिया डोके झाकण्यासाठी ज्या वस्त्राचा उपयोग करतात, त्याला ओढणी म्हणतात. तलम कापडावर सुंदर वेलबुट्टी काढून त्याचा काही भाग डोक्याच्या मागील बाजूस व दोन्ही खांद्यावर शोभून दिसेल, अशा प्रकारे ओढणी तयार करतात. सुंदर केशरचनेचा काही भाग नजरेस पडावा, अशा रीतीने ओढणी डोक्यावर टाकतात. चेहऱ्याचे सौंदर्य खुलून दिसावे हाही हेतू त्यात असतो. मध्ययुगात ओढणी फार लोकप्रिय होती.

**ओणम** केरळातला एक मोठा सण. हा चिंगम (आश्विन) मासाच्या शुक्लपक्षात, श्रवण नक्षत्र येईल त्या दिवशी साजरा करतात. श्रवणालाच केरळात तिरुओणम असे नाव आहे. त्याआधी दहा दिवस हस्त नक्षत्र येते व त्या दिवसापासून त्या सणाला प्रारंभ होतो. या सणासाठी केरळात घरांना रंग देऊन दर्शनी भाग फुलांनी शृंगारतात. गृहिणी घरापुढचे अंगण सारवितात व त्यावर बहुरंगी रांगोळी व तिच्यावर फुलांची रचना करतात. गावात व रानात हिंडून फुले गोळा करणे, हे मुलांचे काम असते. दहा दिवसांपर्यंत अशी पुष्पशोभा केल्यावर श्रवण नक्षत्राच्या मुख्य दिवशी वामनाची मृण्मय मूर्ती

करून ती अंगणात बसवितात व तिच्या भोवतीही पुष्पशोभा करतात. प्रथम सर्व मिळून 'आरप्पू' असा उद्घोष करतात. हा एक मंगलध्वनी व हर्षध्वनी असतो. मग वामनाची पूजा करतात. त्या दिवशी घरोघरी मिष्टान्नभोजन असते. भात, भाज्या, पापड, फळे, खीर व पिकलेल्या केळ्यांचे तळलेले तुकडे, हे पदार्थ त्या दिवशीच्या भोजनात आवश्यक असतात.

हा एक शारदीय उत्सव आहे. प्राचीन कालापासून तो केरळात प्रचलित आहे. केरळ प्रदेश तमिळनाडपासून अलग होण्याच्या पूर्वीपासून हा उत्सव त्या भागात चालत आल्याचे प्रत्यंतर तमिळ आळवारांच्या कित्येक भक्तिगीतांतून मिळते. केवळ वामनाचाच नव्हे; तर भगवान श्रीविष्णूचे सर्व अवतार ओणम्च्या दिवशीच झाले, ही आळवारांची श्रद्धा त्यांच्या कित्येक अवतारगीतांवरून दिसून येते. आजही तमिळनाडमधील वैष्णव ओणम्च्या दिवशी भगवंताचा विशेष पूजोत्सव करतात. हे दोन प्रदेश विभक्त झाल्यावर तमिळनाडमध्ये ओणम्ला केवळ पंथीय स्वरूप राहिले व केरळात तो सार्वजनिक झाला. कर्नाटकाच्या समुद्रकिनाऱ्याच्या भागातही गंगावळी नदीपर्यंत ओणम्च्या उत्सवाचे अवशेष दिसतात.

ओणम उत्सव कसा व का सुरू झाला, त्याविषयीची आख्यायिका पुढीलप्रमाणे आहे –

बळिराजाने पृथ्वी आणि स्वर्ग जिंकून साम्राज्य स्थापले. त्याच्या राज्यात प्रजेला अपार सुखशांती मिळाली. लोक देवांना विसरून दानवमहिमा गाऊ लागले. देवांना हा अपमान सहन न होऊन त्यांनी आपले महत्त्व वाढविण्यासाठी विष्णूची प्रार्थना केली. विष्णूने 'वामन' अवतार घेऊन बळीकडे त्रिपाद भूमीची याचना केली आणि त्या प्रसंगात बळीला पाताळात दडपले. पाताळात जाते वेळी बळीने वामनापाशी एवढेच मागितले, की वर्षातून एकदा पृथ्वीवर येऊन आपल्या प्रजेचा समाचार घेण्याची आपल्याला मोकळीक असावी. वामनाने 'तथास्तु' म्हटले. त्या दिवसापासून आश्विन मासी बळिराजा एकदा पृथ्वीवर आपल्या प्रजेला भेटण्यासाठी येतो आणि त्या प्रजावत्सल राजाला आपली दैन्य-दुःखे दिसू नयेत म्हणून केरळी प्रजा आनंदोत्सव करते. बळिराजा लोकांचा तो उल्हास पाहतो आणि आपली प्रजा पूर्ववत सुखी आहे, असे समजून परत स्वस्थानी जातो.

समस्त केरळाची बळिराजावर महान श्रद्धा आहे. दिवाळीच्या पाडव्याला मराठी जनताही 'बळीचे राज्य येवो' अशी आकांक्षा उद्घोषित करते. वाल्मीकिरामायण व प्रादेशिक भाषांतली अनेक रामायणे यांमध्ये रामराज्याविषयी ज्या कल्पना दिसून येतात, त्या सर्व कल्पना केरळी जनतेने बळीच्या म्हणजेच एका असुराच्या राज्याला लावलेल्या आहेत. पाट्टुकाव्यात एक केरळी लोककवी बळीच्या राज्याची पुढीलप्रमाणे प्रशंसा करतो –

मावेली नाडु वाणीटुम कालम ।
मानुष रेल्लारु मोन्नुपोले ।
कळ्ळवुमिल्ला चतियुमिल्ला ।
एळ्ळोळमिल्ला पोळिवचनम ।

अर्थ – जेव्हा मावेली (महावली) राजा राज्य करीत होता, तेव्हा सर्व माणसे समान होती. राज्यात चोरी नव्हती, कपट नव्हते व लोक तिळाएवढेही खोटे बोलत नव्हते.

या उत्सवावर मलयाळम भाषेत दोन अतीव सुंदर काव्ये निर्माण झाली आहेत. एक विल्वत्तय राघवन नंबियार याचे 'अरणमुलाविलासम' व दुसरे पेरुंपरा वासुदेव भट्टाथिरी याचे 'उट्ट्रितथिचरितम्'. याशिवाय कुंचन नंबियार यानेही आपल्या काव्यात या उत्सवाचे मनोरम वर्णन केले आहे.

केरळातील सामाजिक व कौटुंबिक जीवनात स्नेह–सौहार्द उत्पन्न करणारा हा एक महान उत्सव आहे. मलबारातली माणसे दूर देशांत असली, तरी बहुधा ओणम्च्या सणाला ती घरी येतात. या वेळी माहेरी गेलेली मुलगी सासरी आलीच पाहिजे, असा नियम आहे. ओणम्च्या दिवसात घरातील माणसांना आणि नोकरचाकरांना नवी वस्त्रप्रावरणे मिळतात. खंडकरी कुळे त्या दिवशी आपल्या धन्याला केळी, काकड्या, कारंदे इ. वस्तूंची भेट पाठवितात. जमीनदार त्यांना गोड-धोड जेवण वाढतात. ओणम्च्या दिवसात तिकडचे लोक चेंडूचा एक खास खेळ खेळतात. त्याला नाटन पंतुकळी असे नाव आहे. याशिवाय किळितट्टू, कुंतिक्कळी असे आणखीही काही मैदानी खेळ आहेत. बुद्धिबळे, पलॉन्कुशी, पल्लूकळी हे त्या दिवसांतले घरबैठे खेळ होत. या दिवसात बायका-मुली दुपारी व रात्री एकत्र जमून नृत्य करतात. त्याला कैकोट्टिक्कळी असे नाव आहे. पुरुष लुटुपुटीची लढाई खेळतात. या उत्सवात वाद्यांच्या, तिरंदाजीच्या, मल्लयुद्धाच्या अशा अनेक स्पर्धा घडवून आणतात. नौकास्पर्धा ही त्यातली सर्वश्रेष्ठ स्पर्धा होय. या स्पर्धेला वंचिकळी असे नाव आहे.


ओणम्मधील लुटुपुटीची लढाई

उत्सवाच्या चौथ्या दिवशी या नौकास्पर्धा होतात. ते लोक तिथल्या नद्यांत आणि खाड्यांत आपल्या होड्या सोडतात. या नौकांचे पुढील टोक एखाद्या बगळ्याच्या मानेमारखे उंच असते. चढाओढीत भाग घेणारे नावाडी शुभ्र वस्त्रे आणि शुभ्र शिरोवेष्टने वापरतात. वल्ही मारणारे, गाणी म्हणणारे, वाद्य वाजविणारे असे अनेक लोक त्या होड्यांत खेचून भरलेले असतात. नदीच्या काठावर माणसांची गर्दी उभी असते. रंगीबेरंगी पताका लावलेल्या त्या होड्या वेगाने नदीतून पाणी कापीत जाऊ लागल्या, की ते दृश्य मोठे मनोवेधक व उत्साहवर्धक दिसते.

पंपा नदीच्या किनाऱ्यावर आरन्मुळा (जि. अलेप्पी) या गावी होणारा नौकाविहार केरळात विशेष प्रसिद्ध आहे. त्याच्यामागे एक आख्यायिका आहे, ती अशी—

तीर्थयात्रेला निघालेला अर्जुन कन्याकुमारीपर्यंत जाऊन तिथून परत इंद्रप्रस्थाकडे जायला निघाला होता. त्याच्याजवळ पार्थसारथीची (कृष्ण) एक मूर्ती होती. तो पंपा नदीवर येतो, तर तिला महापूर आलेला व तरी-होड्या बंद झालेल्या. अशा स्थितीत एक नावाडी धाडस करून पुढे आला आणि त्याने अर्जुनाला आपल्या होडीत बसवून महाप्रयासाने त्या महापुरातून पैलतीराला नेले. नदी पार झाल्यावर अर्जुनाने आपल्या जवळची पार्थसारथीची मूर्ती तिथेच स्थापन केली. कालांतराने लोकांनी मग तिच्यावर मंदिर उभारले. त्या घटनेच्या स्मरणार्थ आरन्मुळा येथे प्रतिवार्षिक नौकोत्सव सुरू झाला. [ केरळ ]

**ओतारी** महाराष्ट्र व मध्यप्रदेश यांत आढळणारी एक जात. हे लोक धातूंचे ओतकाम करतात, त्यावरून यांना हे नाव मिळाले आहे. यांचे गोंडाद्य अर्थात गोंड ओतारी व मराठा ओतारी असे दोन प्रमुख भेद आहेत. त्यांच्यात लग्नसंबंध होत नाहीत. हे स्वतःला क्षत्रिय समजतात. महाराष्ट्रात अहीर, बेंद्रे, धनगर, गोटपागर, मगरघाट, महाडिक अशी यांची आडनावे आहेत.

हे लोक दसऱ्याच्या दिवशी तुळजापूरच्या अंबाबाईला बकरा बळी देतात. पैठणच्या कालकादेवीला हे आपली कुलस्वामिनी मानतात व बहिरोबा, खंडोबा, भवानी, नागजी, इ. देवतांना भजतात.

हे मामेबहिणीशी लग्न करतात. विधवाविवाह रूढ असला, तरी अविवाहिताला विधवेशी लग्न करता येत नाही. पूर्वी यांच्यामध्ये राक्षसविवाह प्रचलित होता. एखाद्याने एखाद्याच्या मुलीला मागणी घातली आणि त्याने ती झिडकारली, तर त्या मुलीला पळवून नेले जाई. पुढे तिच्या बापाला देज म्हणून काही रक्कम देऊन तिचे लग्न तिला पळवून नेणाऱ्या वराशी लावीत.

हे मृतांना जाळतात किंवा पुरतात. वार्षिक श्राद्ध करतात. यांना मद्यमांस चालते. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**ओदन** भाताला संस्कृतात ओदन असे नाव आहे. हे प्राचीन काळापासून लोकांचे प्रिय भोजन आहे. ओदन भोजनाच्या सुरवातीलाच वाढण्याची प्रथा आहे. जेवायला बसणारा माणूस पानात वाढलेल्या भाताचे प्रारंभीच दोन विभाग करी. त्यांतील एक भाग भोजनारंभी खाणे व दुसरा भोजनान्ती खाणे, अशी पद्धत होती आणि आहे. प्राचीन वाङ्मयात ओदनाचे अनेक प्रकार वर्णिलेले आहेत. शुद्ध पाण्यात शिजविलेल्या भाताला उदौदन म्हणत (अष्टा. ६.३.७). मांसाबरोबर शिजविलेल्या भाताला मांसौदन म्हणत. यालाच हल्ली आपण पुलाव म्हणतो. दुधाबरोबर शिजविलेल्या भाताला क्षीरौदन म्हणत. त्यातच साखर घातली, की तीच खीर बने. याव्यतिरिक्त दध्योदन (दहीभात), घृतौदन (तूप घालून शिजविलेला भात), मुद्गौदन (मुगांची खिचडी) असे अनेक प्रकार शतपथात उल्लेखिलेले आढळतात (श. ब्रा. २. ५. ३. ४; १०. ५. ७. ५). चरकानेही ओदनाच्या अनेक प्रकारांचा उल्लेख केला आहे.

ओदन = भात = चरू हे एक हविर्द्रव्यही आहे. ग्रहयज्ञात व इतर अनेक देवतांच्या हवनात चरूचा समावेश असतो. ग्रामदेवता व क्षुद्र देवता यांनाही कोंबड्या-बकऱ्याबरोबर भाताचा बळी देतात. श्राद्धात पिंडही भाताचेच करतात. पाहा – चरू. [ पा. का. भा.; वे. इं. ]

**ओदनसव** एक सोमयाग. शिजवलेला भात हे यातील मुख्य हविर्द्रव्य असते. या यागात चार वर्णांचे चार पुरुष अनुक्रमे तूप, दूध, दही व पाणी यांत भाजलेल्या सातूंचे पीठ कालवून त्याने भरलेले प्रत्येकी एक पात्र यजमानाला देतात. त्या चारी पात्रांना स्पर्श करून यजमान काही मंत्र म्हणतो. नंतर हुतशेष भात भक्षण करतो. शेवटी वरील चारी पात्रांतल्या पिठाच्या मिश्रणाने यजमानाला अभिषेक केला जातो. [ म. ज्ञा. को.—वेदविद्या ]

**ओदुव तिरुमलाम्बा** ही महान कवयित्री प्रथम विजयनगरचा राजा अच्युतदेवराय (इ. स. १५३० ते १५४२) याच्या पदरी काव्यगायन करणारी सेविका होती. पुढे त्याच राजाने तिच्याशी लग्न केले. ती अतिशय लावण्यवती होती. तिच्या अंगी प्रतिभेप्रमाणेच विद्व-

ताही होती. काव्य, नाट्य, संगीत, व्याकरण, तत्त्वज्ञान, इ. विषयांत तिची उत्तम गती होती. तिला अनेक भाषा बोलता व लिहिता येत. राजाची पट्टराणी वरदाम्बिका ही होती. तिच्याशी अच्युतरायाचा विवाह झाला,त्या समारंभाचे वर्णन तिरुमलाम्बेनें 'वरदाम्बिकापरिणयचम्पू' या संस्कृत ग्रंथात केले आहे. या ग्रंथाच्या प्रस्तावनेत स्वत:विषयीही तिने काही माहिती दिली आहे. राजाची राणी झाल्यावर तिने अनेक पंडितांना, कवींना व देवालयांना उदार देणग्या दिल्याचे उल्लेख केले आहेत. [ ग्रे. वि. इं. ]

**ओबरी** राजस्थानातली मुले पावसाळचात बाग, महाल, स्तूप, घर इ. गोष्टी बनवून जो खेळ खेळतात, त्याला हे नाव आहे. महाराष्ट्रात दिवाळीच्या वेळी मुले किल्ले बनवितात, तशातलाच हा प्रकार आहे.

**ओमनैटो** ओडिया शेतकऱ्यांची दक्षिणेतील एक जात. आपला मूळ पुरुष अयोध्येत श्रीरामाचा एक अमात्य होता, असे हे लोक सांगतात. या जातीच्या बोडो (मोठे) आणि सन्नो (हलके) अशा दोन पोटजाती आहेत. बोडोंच्या आणखी आठ उपजाती बनलेल्या आहेत.

**विवाहप्रथा** – यांच्यात बाल व प्रौढ असे दोन्ही प्रकारचे विवाह होतात. हे आतेबहिणीशी लग्न करतात. देसारी हा त्यांचा पुरोहित असतो व तोच लग्नविधी चालवितो. यांच्यांत घटस्फोट व विधवाविवाह रूढ आहे.

ठाकुराणी व चामरिया या यांच्या देवता होत. ते चैत्रात त्यांचा वार्षिक उत्सव करतात. यांची पंचायत असते व तीच जातीचे न्यायनिवाडे करते. हे लोक आपल्याला नायको म्हणवितात; पण यांच्यात जे श्रीमंत असतात, ते स्वतःला पात्रो म्हणवितात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते जाळतात. दहा दिवस सुतक पाळतात. अकराव्या दिवशी ज्ञातिभोजन घालतात. या भोजनात दारू वर्ज्य असते. [ का. ट्रा. स. इं. ]

**ओम्** उद्गारवाचक वर्ण. यालाच प्रणव असेही म्हणतात. ऋग्वेद व अथर्ववेद या दोन्ही वेदांत हा वर्ण आढळत नाही. प्राचीन यज्ञयागांत व लौकिक मंत्र-तंत्रांत ओंकार प्रचारात असल्याचे दिसत नाही. तै. संहितेत एकदाच तो प्रणव या संज्ञेने दिसतो. ॐ प्रतिष्ठ व ॐ श्रावय अशी वाक्ये वाजसनेयी व मैत्रायणी या संहितांत आढळतात. प्रतिज्ञापूर्वक विधान या अर्थी ओंकाराचा उपयोग प्रथमच ब्राह्मणग्रंथांत केलेला दिसून येतो. यज्ञप्रसंगी होकार दर्शविण्यासाठी ओंकाराचा उपयोग शतपथ ब्राह्मणात पुष्कळ वेळा केलेला आहे.

या वर्णाचा उद्भव कसा झाला, त्याबद्दल निश्चित उपपत्ती मिळत नाही. माक्स म्यूलर याच्या मते अव् या सार्वनामिक मूलरूपापासून हे अक्षर उत्पन्न झाले, त्याचेच अवम् असे रूप बनले व पुढे संप्रसारण क्रियेने त्याचे अउम् असे रूप होऊन त्याच्यापासून सामान्य ध्वनीच्या संधिनियमाप्रमाणे ॐ हे अक्षर बनले.

पण रोठ व बोथलिंग या दोघा पंडितांनी शास्त्रीय पुराव्याच्या अभावी वरील उपपत्ती त्याज्य ठरविली आहे. त्यांच्या मते ॐ हा वर्ण 'ओ' या ध्वनीचे सानुनासिक उद्गारस्वरूप असून 'आ' या ध्वनीशीही त्याचा संबंध आहे. या उपपत्तीला वैदिक वाङ्मयातच पुरावा आढळतो, तो असा– 'ॐ श्रावय' या वैदिक वाक्याबद्दल सूत्रग्रंथांत 'ओ श्रावय' व 'आ श्रावय' अशी वाक्ये वापरली जातात. उच्चार करताना ध्वनींना अनुनासिकत्व प्राप्त होणे, ही वैदिक भाषेची सर्वसामान्य प्रवृत्ती आहे.

प्रणव या ओंकारवाचक शब्दापासूनही या वर्णाच्या उत्पत्तीवर काहीसा प्रकाश पडू शकेल. कारण, श्रौतांत 'पुरोनुवाक्या' मंत्र म्हणत असता शेवटच्या अक्षराचा दीर्घ सानुनासिक उच्चार करणे व त्यात 'ओ' हा वर्ण मिळविणे, असा प्रणव या शब्दाचा मूलार्थ आहे. आणि त्यावरूनच ॐ हा वर्ण उत्पन्न झाला असावा, असे वाटते. पाणिनीनेही 'ओमाङोश्च' या सूत्रात नियम सांगितला आहे, की ॐ पूर्वीचा ऱ्हस्व किंवा दीर्घ 'अ' यात अउम् असा बदल न होता ओंकारच कायम राहून पूर्वीच्या 'अ'चा लोप होतो (अष्टा० ६.१.९). ब्राह्मणे व तदुत्तर उपनिषदे यांच्या कालात ओंकारामध्ये गूढवाद प्रविष्ट झाला. अनेक रहस्यात्मक अर्थ ओंकाराला येऊन चिकटले. सर्वप्रथम ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे, की ओंकारात अउम् अशी तीन अक्षरे असून, ती 'भूर्भुवःस्वः' या तीन व्याहृतींपासून निघाली आहेत. तैत्तिरीय उपनिषदात, ॐ हे ब्रह्म असून, जगाचे उत्पत्ति-स्थिति-लय त्याच्याच आश्रयाने चालू असतात, असे म्हटले आहे (१.८). कठोपनिषदात त्याच्याविषयी पुढील मंत्र आला आहे (१.२).

सर्वे वेदा यत्पदमामनन्ति ।
तपांसि सर्वाणि च यद्वदन्ति ॥
यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति ।
तत्ते पदं संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत् ॥

अर्थ – सर्व वेद ज्या पदाची घोषणा करतात, सर्व तपे ज्याच्याविषयी बोलतात, (व) ज्याची इच्छा करणारे ब्रह्मचर्याचे आचरण करतात, ते पद तुला संक्षेपाने सांगतो, की ते ॐ हे आहे.

गोपथ ब्राह्मणाच्या प्रणवोपनिषदात ओंकाराच्या गूढार्थाची परिसीमा झाली आहे. वेद, छंद, इतिहास–पुराणे, गीत–नृत्य इ. सारे काही ओंकारापासून उत्पन्न झाले, असे सांगितले आहे.

अ + उ + म् + ˇ मिळून ओंकार बनतो. ओंकाराचे हे चार विभाग जागृती, स्वप्न, सुषुप्ती व तुर्या या चार अवस्थांचे, तसेच विश्व, तैजस, प्राज्ञ व आत्मा अशा चार आत्मस्वरूपाचे निदर्शक मानलेले आहेत. त्याचप्रमाणे अकार हा विष्णू, उकार हा महेश्वर, मकार हा ब्रह्मा अशा प्रकारे तीन्ही देवांचाही ओंकारात समावेश केलेला आहे. अकार मात्रा विश्वाची प्राप्ती करून देते, उकार तेजाची व मकार ज्ञानाची आणि ज्या ठिकाणी मात्रा नाहीशा होतात तिथे तुरीय अवस्थेत प्रवास संपतो, असे गौडपादाचार्यांनी म्हटले आहे.

उपनिषदांनी प्रणवाच्या गूढार्थाचा विकास केला, त्याचबरोबर श्रौतसूत्रांनी प्रणवाच्या यज्ञसंबंधी विनियोगाचे विवेचन केले. धर्मसूत्रांपैकी बौधायन धर्मसूत्रांत त्रैवर्णिकाने करायच्या प्रणवोच्चारपूर्वक वेदाध्ययनालाच ब्रह्मयज्ञ म्हटले. दुर्गादास नामक वैय्याकरण म्हणतो, की ओंकार हा ब्रह्मदेवाचा कंठ भेदून बाहेर आल्यामुळे तो मांगलिक ठरला आहे. वेदाध्ययनाच्या आरंभी व अध्ययनसमाप्तीच्या वेळी ओंकाराचे उच्चारण केले पाहिजे आणि तसे जो न करील त्याचे ते वेदाध्ययन हळूहळू नाश पावेल, असे मनूनेही म्हटले आहे (२.७४). पुढे प्रायश्चित्त-प्रकरणातही प्रणवोच्चाराला महत्त्व दिले गेले. प्रतिदिन प्रणवोच्चारपूर्वक सोळा प्राणायाम महिनाभर केल्याने ब्रह्महत्येचाही दोष नष्ट होतो, असे सांगितले आहे. मंत्र–तंत्रात्मक अभिचार कर्मातही प्रणवोच्चाराला किती महत्त्व आले, ते कौशिक सूत्रावरून कळते.

भारतीय तत्त्वज्ञानात्मक वाङमयात ओंकाराचे ध्यान हे ब्रह्मप्राप्तीचे एक साधन म्हणून सांगितले आहे. पातंजल योगसूत्रांत 'तस्य वाचकः प्रणवः' इ. सूत्रांनी प्रणव हा ईश्वराचा वाचकवर्ण असून त्याची पुनःपुन्हा आवृत्ती करावी, त्याच्या अर्थाचे सतत अनुसंधान ठेवावे, म्हणजे त्यायोगे तत्त्वज्ञान होते, असे स्पष्ट सांगितले आहे. त्यामुळे योगदर्शनात ओंकाराचे महत्त्व फारच वाढले आहे.

हिंदूंच्या सर्व वैदिक व लौकिक धर्मकृत्यांत मंत्राबरोबर ओंकाराचा उच्चार आवर्जून केला जातो. इ. स. च्या ६ व्या शतकापासून जे हस्तलिखित धर्मग्रंथ आढळतात, त्यांतही मंगलाच्या उद्देशाने प्रणवपूर्वक ग्रंथारंभ केलेला आढळतो. जैन व बौद्ध यांनीही ओंकाराचा स्वीकार केलेला आहे. 'ॐ मणिपद्मे हुम्' या अवलोकितेश्वराच्या मंत्रात आरंभी ओंकार आवश्यक रीतीने आलेला आहे.

बौद्धदर्शनात शून्यापासून प्रणवाची उत्पत्ती व त्यापासून विश्वाची उत्पत्ती झाल्याचे सांगितले आहे.

पुराणवाङमयात भिन्न भिन्न संप्रदायांच्या लोकांनी ओंकाराचा अर्थ आपापल्या विशिष्ट देवतेला धरून केलेला आहे. शिवपुराणात ओंकाराला पंचमुख शिवाचे प्रतीक मानले आहे. वैष्णव पुराणांत त्र्यक्षरात्मक प्रणवाला विष्णू, श्री व भक्त या तीहींचा द्योतक मानले असून प्रणव म्हणजे तीन वेद, तीन लोक, तीन अग्नी व विष्णूची तीन पावले असल्याचे सांगितले आहे. प्रणवाच्या विनियोगाविषयी भगवद्-गीतेत पुढील दोन श्लोक आहेत –

ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः।
ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ।।
तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः।
प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ।।
(गीता. १७.२३–२४)

अर्थ – परब्रह्माचा 'ॐ तत्सत्' असा तीन प्रकारे (शास्त्रांत) निर्देश केला जातो. या (च) निर्देशाने पूर्वी ब्राह्मण, वेद व यज्ञ निर्माण केलेले आहेत. म्हणून ब्रह्मवादी लोकांची यज्ञ, दान, तप आणि इतर शास्त्रोक्त कर्मे नेहमी ॐ असा उच्चार करून प्रवृत्त होत असतात.

म्हणूनच याज्ञवल्क्याने म्हटले, की 'वेदांच्या आरंभी प्रणव होता. वेदांचे पर्यवसानही प्रणवातच होते. सर्व वाङ्मय म्हणजे प्रणवच होय. म्हणून प्रणवाचा अभ्यास करावा.' पाहा–प्रणवोपासना. [ उ. अ.; उ. र.; ओंकार किमया; म. ज्ञा. को. ]

**ओम् मणिपद्मे हुम्** वज्रयानी बौद्धांचा प्रसिद्ध मंत्र. त्यांच्याकडून तो हिंदूंच्या तंत्रमार्गात दाखल झाला. हुम् हा शब्द प्रथम ध्यानी बुद्ध अक्षोभ्य याला उद्देशून उच्चारण्यात आला होता. तोच पुढे हिंदूंच्या तंत्रग्रंथांत शिवाला उद्देशून वापरण्यात आला आहे. वरदातंत्रात या गूढ मंत्राची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे –

हृ शिवः कथितो देवि उ भैरव इहोच्यते।
परार्थो नादशब्दस्तु बिन्दुर्दुःखहरार्थकः ।।

अर्थ – हृ म्हणजे शिव; शिवाचे सौम्य रूप. उ म्हणजे भैरव–शिवाचे भयानक रूप. अनुनासिक नाद आणि बिंदू म्हणजे अनुक्रमे श्रेष्ठ व दुःखहारक होत.

हुम् याचा रंग निळा आहे. याचे कारण त्याचे नीलाकाशाशी तादात्म्य आहे. म्हणून ध्यानी बुद्ध अक्षोभ्य याचा वर्णही निळा मानलेला आहे. शिवाने समुद्रमंथनातून निघालेले हालाहल प्राशन केल्यामुळे त्याचा कंठही निळाच आहे.

हुम् हा गूढ वर्ण वज्रयान पंथातून हिंदूंच्या तंत्रमार्गात आणला गेला, हे खरे असले तरी त्याचे मूळ आपणांस वेदामध्येच आढळते. हा वैदिक वर्ण असून, त्याचा वैदिक यज्ञाशी संबंध होता. यज्ञातला प्रस्तोता हा मंत्र म्हणण्याच्या प्रारंभी व प्रतिहर्ता प्रस्तोत्याला उत्तर देत असताना या वर्णाचा उच्चार करी. श्रौतसूत्रातही याचा उल्लेख आहे. यावरून निश्चितपणे असे म्हणता येते, की हा वर्ण वज्रयान संप्रदायाच्याच नव्हे, तर बौद्ध धर्माच्याही पूर्वीचा आहे. वैदिक यज्ञसंस्था मागे पडल्यावर या वर्णाने बौद्ध धर्मात प्रवेश केला आणि तिथून हिंदूंनी पुनश्च तो आपल्या धर्मात आणला.

या हुम्च्या मागे मणिपद्मे असा शब्द आहे. त्याचा अर्थ रत्नकमल असा होतो. ते सूर्योदयाचे प्रतीक मानलेले आहे. सूर्योदयाचा संबंध प्राचीन कवींनी आत्मप्रकाशाशी जोडलेला आहे. ऋग्वेदात अग्नीविषयी असा एक उल्लेख आहे, की अथर्वणाने अग्नीला पुष्करातून मंथन करून प्रकट केले (६.१६.१३). वेदांत अग्नीचा संबंध तेजस्वी हिरे-माणकांशी व तत्सम सर्व श्रीमंतीशी जोडलेला आढळतो. म्हणून आकाशात प्रकाश देणारा, पृथ्वीवर उष्णता उत्पन्न करणारा आणि प्राण्यांच्या उदरात अन्न पचविणारा या अर्थी हठयोगात अग्नीला मणिपद्म म्हटले आहे. थोडक्यात सांगायचे तर हठयोगातील मणिपूर पद्म हेच मणिपद्म होय. त्याच्या निळचा पाकळयांमध्ये हुम् हा निळा वर्ण वास्तव्य करतो, असे वज्रयानी बौद्ध मानतात. मणिपद्म हे वज्राचे महान केन्द्र आहे. तिथे प्राणापान समतोलपणाने राहतात. सृष्टी आणि स्थिती म्हणजेच प्रजनन आणि जीवन यांची ती वेदी आहे. तिथूनच सर्व गूढ मंत्रांना प्रचोदना मिळते. सारांश 'ॐ मणिपद्मे हुम्' हा मंत्र जीवनशक्तीचे माहेरघरच आहे.

महायान बौद्ध ग्रंथांमध्येदेखील वज्रधर या आदिबुद्धाचा अक्षोभ्य या ध्यानी बुद्धाशी निकटचा संबंध दाखविला आहे. त्यांनी हुम् हा महामंत्र वज्रधराशी जोडलेला आहे. वज्रयानी लोक षडक्षरी लोकेश्वराचाही या मंत्राशी संबंध प्रस्थापित करतात. इतकेच नव्हे; तर लोकेश्वराला या गूढमंत्राचे दृश्य प्रतीक मानतात. धर्म, बुद्ध आणि संघ या त्रिरत्नांपैकी लोकेश्वर हे धर्माचे प्रतीक आहे. धर्म, लोकेश्वर व पशुपती शिव या सर्वांचे आसन पद्मासन हेच आहे. मोहेंजोदडो येथे पशुपतीची पद्मासनस्थ व ध्यानमग्न मूर्ती सापडली आहे. लोकेश्वराची मूर्ती सारनाथ येथे आढळते. हा लोकेश्वर चतुर्भुज असून, त्याच्या उजव्या हाती जपमाळ आणि डाव्या हाती कमल आहे. षडक्षरी विद्या 'मणिपद्मे हुम्' या मंत्राची शक्ती होय. ती मानवी स्त्रीच्या स्वरूपात लोकेश्वरासन्निध दिसते. [श्री. प्रफुल्लचंद्र भंजदेव–पी. के. गो. को.]



**ओयिल आट्टम** तमिळनाडमधले एक धार्मिक नृत्य. सुमारे २० पुरुष एका गटाने हे नृत्य करतात. तिरुचिरापल्ली, मदुरा व कोइंबतूर या जिल्ह्यांतल्या मंदिरातील उत्सवप्रसंगीच हे केले जाते. नृत्य करणारे लोक रंगीत कपडे घालतात. एका हातात टिपरी व दुसऱ्या हातात रंगीत रुमाल घेतात. मग रांगा किंवा वर्तुळ करून फिरतात. मग टिपरी देत व रुमाल फिरवीत नाचतात आणि गातात. [मार्च ऑफ इंडिया, सप्टेंबर १९६२]

**ओरुमन** मलबारमधील एक जात. यांना चेरुमन असेही म्हणतात. हे लोक शेतकाम व मजुरी करतात. कित्येक लोक एखाद्या जमीनदाराकडे जन्माचे गुलाम असतात. ते आपल्या या गुलामांना दुसऱ्याच्या कामावरही मजूर म्हणून धाडतात. सांप्रत यांची गुलामगिरीतून मुक्तता झालेली असली, तरी त्यांची आर्थिक परिस्थिती मात्र सुधारलेली नाही. इतिहासकाळात हे लोक स्वत: जमीनदार होते व उत्तर त्रिवांकुरमध्ये या जातीचे एक राजघराणेही होते. त्रिवेंद्रम येथील कालिमातेच्या मंदिरात जाण्यास या लोकांना प्रतिबंध आहे. मात्र तिच्या उत्सवात एक दिवस मंदिरात जाऊन त्यांना तिची पूजा हक्काने करता येते. यांच्यातही अनेक पोटजाती आहेत. त्यातली कणक्कन ही पोटजात श्रेष्ठ समजली जाते. हे लोक पितृपूजक आहेत. ते कुट्टीचत्तन आणि करिमकुत्ती या दोन शूर पूर्वजांना भजतात.

**विवाहप्रथा** – हे लोक पोटजातीतच विवाहसंबंध करतात. उभय पक्षातल्या वडीलधाऱ्या माणसांच्या संमतीने नियोजित वधूवर लग्नापूर्वीच एकत्र राहू लागतात. कुंवारपणी त्यांना मुलेही झाली तरी चालतात. पुढे कधीतरी दोन्ही पक्षांच्या संमतीने मुहूर्त ठरतो व त्यांचे लग्न होते. लग्नाचा खर्च पूर्वी नवरदेवाचा मालक करीत असे.

**मर्तिकप्रथा** – मृताला बहुधा पुरतात. पुरलेल्या जागी मातीचा उंचवटा करून तिथे मृताच्या मस्तकाच्या जागी एक दगड ठेवतात. मर्तिकाच्या दिवशी मयताचे नातलग उपास करतात व दुसऱ्या दिवशी ज्ञातिभोजन घालतात. शेतीच्या हंगामात एखाद्याचा मृत्यू झाल्यास दफनानंतरचा अंत्यविधी तहकूब ठेवून पुढे उन्हाळ्यात शेतकाम संपल्यावर तो करतात. सुतक १५ दिवस पाळतात. पितरांचे वार्षिक श्राद्ध ताडी आणि भात वाढून

करतात. [ डॉ. सी. अच्युत मेनन–बी. सी. लॉ. को. व्हॉ. ]

**ओवी** मराठीतला एक जुना छंद. ओवीचा उगम इ. स. ११२९ पर्यंत मागे नेता येतो. त्या काळातल्या सोमेश्वरकृत अभिलषितार्थचिंतामणी नामक ग्रंथात ओवीचा पुढीलप्रमाणे उल्लेख आला आहे –

**महाराष्ट्रेषु योषिद्भिरोवी गेया तु कण्डने ।**

महाराष्ट्रातल्या स्त्रिया कांडण (व दळण) करताना ओवी गातात, असा त्याचा अर्थ आहे. वरील अवतरणात ओवी ही संज्ञा छंद या अर्थी योजिली आहे. महानुभाव पंथात इ. स. च्या १६ व्या शतकाच्या अखेरीस भीष्माचार्य नामक एक ग्रंथकार झाला. त्याने मार्गप्रभाकर या आपल्या ग्रंथात दिलेले ओवीचे लक्षण श्री. वि. का. राजवाडे यांनी उद्धृत केले आहे, ते असे–

**गायत्रीछंदापासौनी धृतिपर्यंत ।**
**ग्रंथ वोवीयांचे तीन चरण जाणावे मिश्रित ।**
**प्रतिष्ठे पासौनि जगतीपर्यंत । चौथा चरण ।।**

अर्थ – ओवीचे पहिले तीन चरण गायत्रीपासून धृतीपर्यंतच्या कोणत्याही छंदाचे असावे व चौथा चरण प्रतिष्ठेपासून जगतीपर्यंतच्या कोणत्याही छंदाचा असावा.

वरील ओवीचा विस्तृत अर्थ असा, की पहिले तीन चरण षडक्षरी वृत्तापासून तो अष्टादशाक्षरी वृत्तापर्यंतच्या कोणत्याही वृत्ताचे असावे आणि चौथा चरण चतुरक्षरी वृत्तापासून तो द्वादशाक्षरी वृत्तापर्यंतच्या कोणत्याही वृत्ताचा असावा. सामान्यतः ओवीचे चार चरण असतात. त्यांत शेवटचा चरण दिडका असतो, पहिल्या तीन चरणांच्या अंती यमक असते व चौथा चरण निर्यमक असतो. इ. स. च्या सोळाव्या शतकातील महानुभावीय कवी लक्षधीर याचा छंदःशास्त्रावर महाराष्ट्र-काव्य-प्रदीपिका नावाचा छप्पन्न ओव्यांचा ग्रंथ आहे. त्याने साडेतीन चरणी, चार चरणी, साडेचार चरणी व पाच चरणी असे ओवीचे प्रकार नमूद केले आहेत. साडेतीन चरणी ओवीला लघुचरणी असेही म्हटले आहे. ज्ञानेश्वरांची ओवी ही लघुचरणी असते. उदा०–(ज्ञाने. १. १–२)

**ॐ नमोजी आद्या । वेदप्रतिपाद्या ।**
**जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ।।**
**देवा तूंचि गणेशु । सकलमतिप्रकाशु ।**
**म्हणे निवृत्तिदासु । अवधारिजो ।।**

एकनाथांची ओवी चोहड अर्थात साडेचार चरणी असते. तशीच ती समतोल असूनं, अंतःप्रासयुक्त असते. हा अंतःप्रास चौथ्या चरणात दिसतो.

**कवळें अभ्यासिला डोळा । तो चंद्रमा देखे पिवळा ।**
**तेवीं आत्मा कर्ता भासे स्थूळा । केवळ निश्चळा नेणती ।**
**सवेग चालतां आभाळें । बाळें म्हणती चंद्रमा पळे ।**
**तेवि आत्मा कर्ता मानिती स्थूळें । उपाधि मेळें अभ्यासु ।।**
(ए. भा. १०. ६३३–३४)

ओवी ही गद्य व पद्य किंवा ग्रांथिक व गेय अशा दोन प्रकारची असते. चौथा चरण दिडका असणे, हे वैशिष्ट्य दोन्ही प्रकारच्या ओव्यांत समान असते.

ओवीच्या उगमाविषयी विद्वानांत अनेक मते आहेत. वि. का. राजवाडे तो उगम वैदिक छंदात आहे, असे म्हणतात (मराठी छंद, पृ. ३१), तर ल. रा. पांगारकर तो अनुष्टुभात आहे, असे मानतात (मोरोपंत चरित्र–काव्यविवेचन, पृ. ५३१); पण श्री. भ. श्री. पंडित यांना ही दोन्ही मते मान्य नाहीत. ओवी बहुधा कानडी मुलखातून महाराष्ट्रात आली असावी, या श्री. बेंद्रे यांच्या मताशी ते सहमत आहेत. कारण, कन्नड त्रिपदीशी ओवीचे सादृश्य आहे. अभंग हा छंद ओवीतून उत्क्रांत झाला, असेही ते सूचित करतात. अभिलषितार्थचिंतामणीतील वर दिलेल्या उल्लेखावरून महाराष्ट्रातील बायका-मुली ओवी गात असत, हे स्पष्ट कळते. तेव्हा तिच्या पद्यस्वरूपाविषयी वाद असायचे कारण नाही. पद्य ओवीलाच अभंग असे दुसरे नाव आहे. मोरोपंतांनी मुलींसाठी रचलेल्या ओव्या अभंग म्हणूनच प्रसिद्ध आहेत.

ओवी हा आबालसुबोध साहित्यप्रकार आहे. मुकुंदराज, ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, मुक्तेश्वर, श्रीधर, इ. संतपंत कवींनी आपापले ग्रंथ ओवीत लिहून ओवीला महाराष्ट्रीय जनजीवनात असाधारण स्थान प्राप्त करून दिले. महाराष्ट्रात विठ्ठलभक्तीचा भागवतधर्म समाजातल्या सर्व थरांत आणि बाळचा-भोळचांपर्यंत प्रसृत झाला, त्याला ओवी व अभंग हे दोन छंद मुख्यत्वे साधनीभूत आहेत. महाराष्ट्रात निर्माण झालेल्या ग्रांथिक ओवीची संख्या लाखांनी मोजावी लागेल. भक्तीचे पावित्र्य, तरल कल्पना, विचित्र अलंकार आणि हृद्य भावना, ही सारी संपदा ओवीला लाभलेली आहे.

ओवी जशी ग्रंथात आहे, तशीच ती महाराष्ट्रातल्या स्त्रियांच्या तोंडीही आहे. स्त्रीजीवनात भावनांचे पाझर आणि अश्रूंचे ओघळ निर्माण करणाऱ्या जानपद ओवीचे स्वरूप आणि कार्य पुढीलप्रमाणे सांगता येते –

महाराष्ट्रात पूर्वापार चालत आलेल्या जानपदगीतांचे जे अनेक प्रकार आजही प्रचलित आहेत, त्या सर्वांत ओवीचे स्थान श्रेष्ठ आहे. श्राव्य ओवी हा प्रकार अशिक्षित जनता व विशेषतः स्त्रिया यांच्या जीवनाशी निगडित झालेला आहे.

२ ते ४ ओळींच्या अत्यंत लहान पद्यात पुष्कळदा कल्पनाचातुर्य आणि हृद्य भावनाविष्कार यांचा सुंदर मिलाफ आढळून येतो. अशिक्षित स्त्रीवर्गाने ओवीमध्ये आपले कौटुंबिक जीवन व भोवतालचे सामाजिक जीवन जणू ओतून ठेवले आहे. त्यामुळेच ओवीचा जिवंतपणा अजूनही कायम राहिलेला दिसतो. आजही महाराष्ट्रातल्या खेड्यांतून सकाळच्या रामपाऱ्यात ग्रामीण स्त्रिया जात्यावर दळीत असताना ओव्या गात असलेल्या ऐकू येतात. सुखवस्तू कुटुंबांतल्या मुलींनी झोपाळ्यावर बसून म्हटलेल्या व मातांनी आपल्या तान्ह्या अर्भकांना निजविताना आळविलेल्या ओव्यांचा मंजुळ स्वर आजही खेडोपाडी कानावर पडतो.

साधारणपणे उच्च वर्गातील मुली किंवा स्त्रिया झोपाळ्यावर बसल्यावेळी किंवा मुलाला अंगाई गाताना ज्या ओव्या म्हणतात, त्या साडेतीन चरणी असतात —

मोरमुगुट माथा । गळा वनमाळा ।
स्मरावा सावळा । गोकुळीचा ।।

पण खालच्या वर्गातील स्त्रिया जात्यावर दळताना ज्या ओव्या म्हणतात, त्या बहुधा चार चरणी असतात —

सकाळींच्या पारीं । चल अंगण लोटूं दोघी ।
माझ्या दारामधी सुर्व्या । पावणा आला बिगी ।।

सामान्यतः जानपद ओवीची रचना पुढे दिल्याप्रमाणे होत असते —

दळण मांडले की एक स्त्री सुचेल ती ओवी म्हणते व ती थोडीशी आळवून सोडून देते. दुसरी तिला साथ करता करता तीच ओवी उचलून ती पुरी करते किंवा तिच्यावरून सुचलेली दुसरी एखादी ओवी रचते. अशाच प्रकारे दुव्यात दुवा गुंफला जातो व ओव्यांची साखळी तयार होते.

जनपदातल्या या ओव्यांचे वर्गीकरण मुख्यत्वे पुढीलप्रमाणे करता येते —

(१) पौराणिक कथांवर आधारलेल्या ओव्या.
(२) भक्तिप्रधान ओव्या.
(३) ऐतिहासिक कथांवर आधारलेल्या ओव्या.
(४) देवादिकांच्या ओव्या.
(५) सामाजिक व कौटुंबिक जीवनावरील ओव्या.

पुराणकथांवर आधारलेल्या ओव्यांमध्ये महाभारत व रामायण यांमधील कथाप्रसंगांवरच्या ओव्या अधिक मिळतात. महाभारतापेक्षाही रामायणकथा अधिक लोकप्रिय आहे. राम-सीता व लक्ष्मण यांचे वनवासी कष्टमय जीवन हा विभाग जानपद स्त्रियांना अत्यंत हृद्य वाटलेला आहे. एकवचनी, एकपत्नी रामापेक्षाही सीतेसारख्या सुकुमार साध्वी स्त्रीला सर्व थरांतल्या स्त्रियांच्या अंतरात अधिक सहानुभूती मिळालेली आहे. विशेषतः लोकनिंदेस्तव रामाने सीतेचा त्याग केला आणि त्यानंतर तिला जे परित्यक्त जीवन जगावे लागले, त्याबद्दल स्त्रीहृदयात अपार करुणा पाझरताना दिसते —

सीता वनवासी । दगडाची केली उशी ।
अंकुश बाळ कुशी । वाढतसे ।।
सीता वनवासी । वनीं कंटकांची दाटी ।
पांचा महिन्यांचा । अंकुशबाळ पोटीं ।।

इ. स. च्या १३व्या शतकात ज्ञानेश्वरांनी महाराष्ट्रात भागवतधर्माचा पाया घातला व पुढे १७ व्या शतकात तुकारामाने त्यावर कळस चढविला. या चारशे वर्षांत पंढरपूर हे भागवत धर्मांचे आणि महाराष्ट्रातल्या सर्व जनतेच्या भक्ति-प्रेमाचे केंद्र बनले आणि तसेच विठ्ठल हे परम उपास्य दैवत ठरले. पंढरपुराच्याच जोडीने देहू, आळंदी, पैठण, या संतक्षेत्रांनाही तेवढेच महत्त्व प्राप्त झाले. संतचरित्रांना अलौकिक चमत्कारांची जोड मिळाली आणि महाराष्ट्रातल्या स्त्रियांनी पंढरी, पांडुरंग आणि संत यांच्यावर भक्तिभावाच्या विपुल ओव्या लिहिल्या —

आल्या जल्मामधीं । मला पंढरी पाह्याची ।
पाण्यामधीं माडी । देव कुंडलीक रायाची ।।
आळंदीला जावें । जीवन्मुक्त व्हावें ।
तेथें श्रीज्ञानदेवें । दिव्य केलें ।।
देहूला जाऊन । देह विसरावा ।
अंतरीं स्मरावा । तुकाराम ।।

ऐतिहासिक संदर्भांवरच्या ओव्या तुरळकच आढळतात; पण ज्या आहेत त्यांत मराठेशाहीबद्दल आत्मीयतेची भावना दिसते —

शिवाजीचे किल्ले । किल्ले चढाया कठीण ।
मोल प्राणाचें देऊन । करी मराठा जतन ।।
शिवछत्रपति । धन्य ग धन्य राजा ।।
पोटच्या पुत्रापरी । पाळिली त्याने प्रजा ।।
चिमणाजी बाजीराव । दोघे सख्खे भाऊ ।
म्हणती वसई घेऊं । एका रात्रीं ।।
नारायणरावाला मारिलें । गंगाबाई गरभार ।
नवा भरविला दरबार । रघुनाथरावांनी ।।
पुण्याचें वैभव । पुन्हा दिसेल ठळक ।
तिथे आहेत टिळक । देशभक्त ।।
गांधी जादुगार । ब्याडा करी धीट ।
दारूचा आणी वीट । सर्व लोकां ।।

देवादिकांच्या ओव्यांत गणपती, मारुती, राम, कृष्ण, शिव, व देवी यांच्या बऱ्याच ओव्या आढळतात —

मोरया रे देवा । सारीं विघ्नें कर दूर ।
निर्विघ्न माझा कर । संवसार ।।
रानीं वनीं वसे । माझा कैलासीचा राजा ।
भोळ्या सांबालागीं । माझा प्रणिपात ।।
राम लक्ष्मण । मोतियांची जोडी ।
मध्ये शोभते लालडी । सीतामाई ।
खांदिये घोंगडी । अधरीं धरी पांवा ।
गोपाळकृष्ण गावा । गोकुळींचा ।
वाढतां वाढतां । सुटे द्रौपदीची चोळी ।
गोविंद सांभाळी । तिची लाज ।।
देव भावाचा भुकेला । विदुराच्या कण्या खातो ।
अर्जुनाचे घोडे धुतो । नारायण ।।
राम राम म्हणत । दारावरून कोण गेला ।
रामराया तुझा चेला । मारुतिराया ।

सर्व देवदेवतांत देवी किंवा अंबाबाई हिच्या ओव्या अधिक आहेत. देवी जगदंबा ही स्त्रियांनी आपली सौभाग्यरक्षक देवता मानली असून, तिने आपले चुडे अभंग ठेवावे व आपला संसार सुखी राखावा, म्हणून तिची परोपरीनी आळवणी केली आहे–

आई अंबाबाई । भरल्यें तुझी ओटी ।
सांभाळ सौभाग्याची पेटी । उषाताईची ।
आई अंबाबाई । फुलें तुला सुवासाचीं ।
काळजी कुंकवाची । माझ्या घेई ।।

सामाजिक व कौटुंबिक जीवनावरील ओव्या जनपदांत सर्वांत अधिक आणि प्रमुख आहेत. त्यात खेडचातील जीवनाची निरनिराळी चित्रे रेखाटलेली दिसतात. पुष्कळशा ओव्या कुटुंबातल्या किंवा सभोवतालच्या कोण्यातरी माणसावरून गायिलेल्या असतात व त्या माणसाबद्दलच्या गाणारणीच्या भावना त्यातून व्यक्त झालेल्या असतात. अशा ओव्यांत भावनात्मक भाग अधिक असतो. गाणारीण स्वत:ला सुचणाऱ्या कल्पनांची सांगड त्या आवडत्या व्यक्तीच्या नावाशी घालून अशा ओव्या गाते. त्यामुळे पुष्कळदा ओवीचा तिसरा किंवा चौथा चरण त्या व्यक्तीचे नाव किंवा संबंध दर्शवून पुरा केलेला असतो. या भावनात्मक ओव्यांचे वर्गीकरण खालीलप्रमाणे करता येते–

(१) मातृ-पितृ प्रेम (२) वात्सल्य (३) भावा-बहिणीचे प्रेम (४) पति-पत्नींचे प्रेम (५) इतर नातलगांबद्दलच्या भावना (६) शेजारणीविषयीच्या भावना व (७) मैत्रीभाव.

आईविषयीची भावना पुढीलप्रमाणे व्यक्त झालेली दिसते–

बया बया म्हणूं । बया साखरेची लाही ।
प्रिथिम धुंडल्यानं । तिच्या सारखी माया नाही ।।
आई तूं हवीस । हवीस जन्मवेरीं ।
सांग कोण कंटाळेल । अमृताच्या ग सागरीं ।।
माउलीचे कष्ट । कुठे रे फेडूं देवा ।
तळहाताचा पाळणा । नेत्रींचा केला दिवा ।।

बापाविषयीची भावना पुढीलप्रमाणे व्यक्त केलेली आहे–

फुलामध्यें फूल । फूल हुंगावें चांफ्याचें ।
सुख भोगावें बापाचें । बाळपणीं ।।
आई तूं मुके घेशी । बाबा कां बोलताती ।
पुत्र होवो वाचस्पति । म्हणूनियां ।।
बाप्पाजी चंदन । घासलिया वास ।
आईचा सुवास । आपोआप ।।

वात्सल्याच्या ओव्यांमधून मातृप्रेमाला पूर आलेला दिसतो. त्यातल्या त्यात मुलीचे कौतुक विशेष असते. आईच्या लेखी मुलाइतकीच मुलीचीही किंमत असते; किंबहुना काकणभर सरसच ! ती परघरी जायची असते, हे त्याचे प्रमुख कारण ! मुलामुलींच्या प्रेमाविषयी पुढील ओव्या पाहा–

तान्ह्या रे तान्हिका । बाळा रे माणिका ।
तुझ्या रे श्रीमुखा । लिंबलोण ।।
माझें तान्हेबाळ । हळदीनें न्हाई ।
त्याचें पाणी जाई । शेवंतीला ।।
बाप म्हणे लेकी । लाडकी होऊं नको ।
जाशील परघरीं । वेडी माया लावूं नको ।।
लेका ग परिस । लेक ती काय उणी ?
हिरा नव्हे हिरकणी । उषाताई ।।
लेकीच्या रे बापा । धन्य धन्य तुझी छाती ।
काळजाचा घडा । देतोस परक्या हातीं ।।

बहीण व भाऊ यांच्यांतील परस्पर-प्रेम हा ओवी-गीतांचा सर्वांत मोठा विषय आहे. भावावरील आपले गाढ प्रेम बहिणीने अनेक प्रकारे व्यक्त केलेले आढळते. आईला जशी आपल्या मुलापुढे कुठलीही गोष्ट तुच्छ वाटते, तशीच ती बहिणीलाही आपल्या भावापुढे वाटते. भाऊ म्हणजे तिचा एक अमूल्य दागिनाच असतो –

म्यापला येशीवर । शिंपिते दहीभात ।
ताईत माझा बंधू । आला शिंगी नाचवीत ।।
नको धन, नको मुद्रा । नको मोतियांचे हार ।
देई प्रेमाश्रूंची धार । भाईराया ।।
पाठच्या बहिणीवरी । भाऊ कसा रागावेल ?
चंद्र आग का ओकेल । कांही केल्या ।।
संसारी कितीक । असती नाती-गोतीं ।
मोलाचीं माणिक-मोती । बहिणभाऊ ।।

भावा ग बहिणीच्या । प्रेमाला नाही सरी ।
गंगेच्या पाण्यापरी । पवित्रता ।।

पति–पत्नींच्या मधुर प्रेमाची साक्ष पटविणाऱ्या ओव्या जनपदांत किती तरी आढळतात. पण या ओव्यांत बरोबरीच्या नात्यापेक्षा पती हा आपला धनी आहे, ही भावना अधिक प्रभावी दिसते. पती हाच स्त्रीचा देव, हा स्मृतिग्रंथांनी सांगितलेला सिद्धान्त जनपदांतल्या स्त्रियांनीही स्वीकारलेला आहे. त्यामुळे प्रत्येक स्त्रीला आपला पती हा रूप, गुण आणि अधिकार यांनी श्रेष्ठ वाटलेला आहे. पतीचे कर्तृत्व, त्याचा दर्जा, त्याचा दरारा, त्याचा उद्योगधंदा इ. गोष्टींबद्दल अशा ओव्यांतून सुरेख वर्णने आढळतात –

काळी चंद्रकळा । माझ्या मनांत घ्यावी होती ।
हौशा भर्ताराने । आणिली अंगमती ।।
उन्हाळा पावसाळा । पानमळ्याला गारवा ।
हौशाच्या जिवावरी । न्हाई कुणाची परवा ।।
सावळी सुरत । अशी पाहिली न्हाई कुठं ।
माझ्या राजसाचं । ओठ बारीक, डोळं मोठं ।।
सोइरे धाइरे । सारे संपत्तीचे लोक ।
आपुल्या भरताराचं । निर्वाणीचं राज्य एक ।।

भाऊ–बहीण, माय-लेकरे आणि पति-पत्नी या अत्यंत निकट संबंधांवरच्या ओव्यांबरोबरच चुलता, मामा, आजा–आजी, दीर, मेहुणा, मावशी, मेहुणी, सासू–सासरे इ. परिवारातल्या नात्यांवरही काही ओव्या आहेत; मात्र त्यांची संख्या अल्प आहे–

अक्काची ग चोळी । येते माझ्या अंगा ।
आम्ही दोघी बहिणी । एका वेलाच्या दोन शेंगा ।।
पाटाचं ग पानी । उसासंग एरंडाला ।
सांगून मी धाडी । बहिणीकारन मेव्हन्याला ।।
मामंजी सासूबाई । तुम्ही तुळशीची झाडें ।
आम्ही तुमच्या उजेडें । राज्य करूं ।।
भावोजी हो दिरा । माझ्या मनींचें जाणावें ।
माझ्या वेणीस आणावें । गंगावन ।।

शेजारणीविषयीच्या कित्येक ओव्या समर्पक व गोड आहेत. शेजारची माणसे कशी भेटतील, त्यावर पुष्कळसे कौटुंबिक सुखसमाधान अवलंबून असते. मुलगी माहेराहून सासरी येते, तेव्हा सासरची माणसे तिच्यावर अधिकार गाजवितात; पण एखादी शेजारीण जर हळुवार अंतःकरणाची असेल, तर ती त्या नववधूला दिलासा देते व मायाही देते. आणि मग नववधूच्या तोंडून पुढीलप्रकारे कृतज्ञतेचे बोल उमटतात –

शेजारिणी बाई । तुझा शेजार चांगला ।
नाही मला आठवला । मायबाप ।।
शेजारिणी बाई । माझी वेणी हो घालावी ।
आईच्या हातांची । आठवण मज द्यावी ।।

शेजारधर्मापेक्षा मैत्री भावनेच्या ओव्या अल्प असल्या, तरी त्या अत्यंत मनोज्ञ आहेत. शेजारी राहणाऱ्या दोन मुली एकत्र वाढतात, हसतात, खेळतात. त्यांच्यामध्ये मैत्रीचा नाजूक बंध निर्माण होतो. स्त्री ज्या व्यथा–वेदना, जे मनाच्या खोल कप्प्यातले सुख–दुःख आईजवळ बोलू शकत नाही किंवा नवऱ्याजवळही बोलू शकत नाही, ते ती आपल्या मैत्रिणीशी निस्संकोचपणे बोलू शकते. पागोळीला पागोळी लावून असलेल्या घरात वाढलेल्या दोन मुली लग्न झाल्यावर कोसांच्या अंतरावर जाऊन पडतात. त्या दोघींची पुनश्च गाठभेट व्हायची ती केवळ योगायोगानेच. अशा भेटीच्या वेळी त्या दोघींच्या अंतरांत प्रेमाला जे भरते येते, त्याच्या काही लहरी पुढीलप्रमाणे दिसतात –

आपण मैत्रिणी । जाऊं ग बारावाटे ।
जसे नशिबाचे फाटे । फुटतील ।।
वारियाच्या संगें । आपण पाठवूं निरोप ।
पोचेल आपोआप । मैत्रिणीला ।।
तुझा माझा मैत्रपणा । मैत्रपणा काय देऊं ।
एक लवंग दोघी खाऊं । मनुबाई ।।
आपण गुज बोलूं । कशाला हवा दिवा ।
आहे चांदण्याची हवा । शांताताई ।।
गळां घालूं गळा । ये ग रडूं पोटभरी ।
पुन्हा जायाचें सासरीं । चार दिशीं ।।

जनपदांतले जीवन हे शहरी जीवनाहून सर्वस्वी निराळे असते. नागरी स्त्रीच्या दैनंदिन कार्यक्रमापेक्षा जानपद स्त्रीचा दैनंदिन कार्यक्रम अगदी वेगळा असतो. ग्रामीण जीवन श्रमाधिष्ठित असते आणि हे श्रम मळचात, शेतात, अंगणात, घरात आणि परसात करायचे असतात. शेतात पतीबरोबर पत्नीही राबते, त्या दोघांचा सारा जन्म शेतामळ्याच्याच सावलीत जातो. मोट, बैलजोडी, गुरे-वासरे, शेतात वाढणारी हिरवी रोपे, कापणी–मळणी, कणगीत किंवा बळदात येऊन पडणारी धान्यसंपदा, निरनिराळ्या ऋतूंत करावी लागणारी कामे, गावातले कारू-नारू, गावची देव-देवस्की, अज्ञानातून पोसलेल्या अंधश्रद्धा आणि भ्रामक समजुती, गावातले सण आणि उत्सव, या गोष्टींनी व्यापलेले ते कृषिजीवन असते. या जीवनातल्या विविध अंगांविषयी ग्रामीण स्त्रियांनी कितीतरी सुंदर ओव्या लिहून त्याला जिवंतपणा आणला आहे–

सकाळच्या पारीं । हात जोडिते डोंगराला ।
खोंड खिलारी नांगराला ।।

मोट ग चालते । एका वानाचं चारी बैल ।
मोटकऱ्याला दृष्ट व्हईल ।।
शिवंच्या शेतामंदी । शाळु आलाया राखनीला ।
घुंगुर लाविलं गोफनीला ।।
पाऊस पडतो । मोत्यांचा शिरवा ।
मळा सरव्याचा हिरवा ।।
दृष्ट मी काढीतें । मीठ, मोहऱ्या, मिरच्या तीन ।
धन्या–बैलाची एक शीण ।।
घुसळण घुसळितें । पांच फेरांत आलं लोनी ।
माझ्या गौळणीची भरज्वानी ।।
वाटेवरली लक्षुमी । आली दडत लपत ।
धान्याची ग रास । पडली सोप्यांत ।।
शिमग्या दिशीं । होळी बाई बाळंतीण ।
राघूच्या डफाखाली । नाचते कळवंतीण ।।
माझ्या पाठीवरनं । नका नेऊंसा रानशेणी ।
ताईत माझा बंधू । नाग गुंफला माझ्या वेणी ।।
पेरणीला जातां । आडवी झाली कुरी ।
बंधु पिकेल तुमची शेंरी ।।

ग्रांथिक ओवी आणि जनपदांतली गेय ओवी या दोहोंचा दृढ संबंध आहे. ग्रांथिक ओवीने गेय ओवीवर बराच प्रभाव पाडलेला असला, तरी त्या दोहींत एक मूलभूत फरक आहे. ग्रांथिक ओवीचे मूळ विशिष्ट व्यक्तीच्या बुद्धीत किंवा एखाद्या पंथाच्या तत्त्वज्ञानात असते; तर जानपद ओवीचा उगम सर्वसामान्य अशिक्षित जनतेच्या सामुदायिक मनःप्रवृत्तीत आणि अनुभवांत असतो. यामुळेच ग्रांथिक ओवीचा जोरकस प्रचार होऊनही गेय ओवीने आपले जानपद स्वरूप कायम ठेवले आहे. संत-पंत कवींच्या ओवीबद्ध ग्रंथांचा मूळ हेतू प्रचारात्मक होता. समाजाला धर्म, नीती आणि भक्ती यांची शिकवण त्यांना आपल्या ग्रंथांच्या द्वारे द्यायची होती; पण जानपद ओवीने तशा प्रकारचा हेतू कधीच धरलेला नाहीं. जानपद ओवी मानवतेला आणि वास्तविकतेला धर्म व नीती यांच्यापेक्षाही अधिक किंमत देते. आणि म्हणूनच समाजशास्त्र-दृष्ट्या ग्रांथिक ओवीपेक्षा गेय जानपद ओवीचे महत्त्व अधिक आहे. [श्री. रा. चिं. ढेरे]

## ओशन मारू

तेलंगणातली एक जात. हे लोक कर्नाटकातही आढळतात. भंडी, बोशेट्टी, धनशेट्टी, सतनूर, इ. यांची आडनावें आहेत. यांच्यात पोटभेद नाहीत. अंचिवू, कमळ, निळ, पळ व पसणी अशी यांची पाच देवके आहेत. यांचा बांधा वंजीगारांसारखा असतो. हे उत्तम स्वयंपाकी असतात. पुरुषही कानांत कुडी घालतात. हनुमान, हुलगव्व, येल्लम्मा ही यांची कुलदैवते होत. यांचा पूर्वापार धंदा कुंकू व अत्तरे तयार करणे हा आहे. कांचीचा ताताचार्य हा या ज्ञातीचा गुरू असतो. यांच्यातले लहानसहान तंटे पंचायतीकडून व मोठे तंटे गुरूकडून निवडले जातात. गुरूची आज्ञा मोडल्यास बहिष्काराची शिक्षा मिळते. यांच्यांत मुलाचे नाव नवव्या दिवशी ठेवतात. मृतांना पुरतात. [म. ज्ञा. को.]

## ओषधी

वैदिक वाङ्मयात वनस्पतींचे ओषधी व वीरुध किंवा वनस्पती असे दोन विभाग केलेले आहेत. पहिल्या विभागातल्या वनस्पतींत औषधी गुणधर्म असतात व दुसऱ्या प्रकारच्या वनस्पतींत ते नसतात, असे मानलेले आहे (ऋ. १०. ९७). तृण व धान्यरोप यांना वृक्षापासून अलग गणले असले, तरी पाणिनी यांचा समावेश औषधि-वर्गात करतो (अष्टा. २. ४. १२). तैत्तिरीय संहितेत सामान्य वनस्पतींचे मूल, तूल (अग्रे), कांड (खोड), वल्श (दोन फांद्यांचा सांधा), पुष्प व फल असे सहा भाग कल्पिलेले आहेत (तै. सं. ७. ३. १९. १). अथर्ववेदात (८.७) वनस्पतींचे अनेक प्रकारे वर्गीकरण केलेले आढळते.

निरनिराळ्या रोगांच्या चिकित्सेसाठी ओषधींचे संशोधन करून त्यांचा उपयोग करणे, ही गोष्ट वैदिक युगापासून चालू झालेली दिसते. ऋग्वेदाच्या १० व्या मंडलात ओषधींबद्दल एक स्वतंत्र सूक्त आहे. त्यातील दोन ऋचा अशा –

यत्रौषधीः समग्मत राजानः समिताविव ।
विप्रःस उच्यते भिषग् रक्षोहामीवचातनः ।।
अश्वावतीं सोमावतीमूर्जयन्तीमुदोजसम् ।
आवित्सि सर्वा ओषधीरस्मा अरिष्टतातये ।।
(ऋ. १०. ९७. ६–७)

अर्थ –– लोकसभेमध्ये जसे राजे अधिष्ठित होतात, त्याप्रमाणे ज्याच्या ठिकाणी ओषधी (आपले ज्ञान ठेवून) एकत्रित होतात, त्याच ज्ञानी पुरुषाला वैद्य असे नाव आहे. तो पिशाच व राक्षस यांचा नाश करून व्याधींचाही निःपात करतो. काही ओषधी अश्वाप्रमाणे (झटपट गुणकारी) असतात; काही सोमाच्या गुणांनी युक्त (वीर्योत्पादक), काही उत्साहवर्धक, तर काही ओज उत्पन्न करणाऱ्या असतात. त्या सर्वांचा मी आरोग्यवृद्धीसाठी उपयोग करतो.

भरद्वाजाचा शिष्य पुनर्वसू आत्रेय हा महान ओषधि-संशोधक होता. तो अनेक ऋषींना आपल्या बरोबर घेऊन ओषधींच्या संशोधनासाठी हिमालयात हिंडत असे. बौद्ध युगात निर्माण झालेल्या भारतातील प्रमुख विद्यापीठांत आयुर्वेदाचे

अध्यापन आणि तदंगभूत ओषधींचे संशोधनही चालत असे. तक्षशिलेचे विद्यापीठ या विषयात अग्रगण्य होते. बिंबिसाराचा राजवैद्य असलेला जीवक नावाचा वैद्य तक्षशिलेत राहूनच ओषधिविज्ञान संपादून आला होता.

गुरूने एक दिवस त्याला म्हटले, की 'ओषधी नसलेली अशी एखादी वनस्पती मला आणून दे.' जीवक 'बरें' म्हणून निघाला व खूप भटकला. पण त्याला ओषधी नसलेली अशी एकही वनस्पती सापडली नाही. त्याने परत येऊन गुरूला तसे सांगितले. तेव्हा गुरू प्रसन्न होऊन त्याला म्हणाला, की 'तू आता खरा वैद्य झालास.' (महावग्ग)

पाणिनीच्या काळात निरनिराळ्या वनस्पतींना त्यांच्या त्यांच्या विशिष्ट गुणधर्मांवरून नावे दिली जात असत. पाणिनीच्या अजादिगणात त्रिफलेचा व पतंजलीच्या महाभाष्यात ब्राह्मीचा उल्लेख आहे. पाहा—आयुर्वेद (वे. इं.; पा. का. भा.)

**ओसवाल** एक वाणी जात. महाराष्ट्र, राजस्थान, मध्यप्रदेश, पंजाब, इ. प्रदेशांत यांची वस्ती आहे. ओसवालांत जैनांची संख्या मोठी आहे. ओस या स्थळावरून यांना ओसवाल हे नाव मिळाले. हे स्थळ मारवाडात लूनी नदीच्या जवळ आहे. आजमितीस ते नकाशात दिसत नसले तरी, मुनी आत्मारामजी यांच्या अज्ञानतिमिरभास्कर या ग्रंथात ते जोधपूरच्या पश्चिमेस २० कोसांच्या अंतरावर असल्याचे सांगितले आहे. राजस्थानातल्या मरुभूमीतले ते एक निर्जन व अप्रसिद्ध स्थळ आहे. तिथे एक प्राचीन जैन मंदिर असून, त्यात महावीराची वैशिट्यपूर्ण मूर्ती आहे.

रत्नप्रभसूरी नामक एका जैन आचार्याच्या प्रयत्नाने इथली वसाहत इ. स. च्या १२ शतकात भरभराटीस आली. तिथले श्रीमाळी, वाणी, चौहान, गोहिल, राठोड, राजपूत, इ. सारे वसाहतकार शैवपंथी होते. रत्नप्रभसूरीने त्या सर्वांना जैन धर्माची दीक्षा दिली. तिथल्या जैन समाजाला उपकेश हे नाव मिळाले व त्या नगराला उपकेशपट्टण किंवा उपकेशनगरी असे नाव पडले. त्याचाच पुढे ओस असा संक्षिप्त अपभ्रंश झाला. तिथले जैन 'ओसवाल' म्हणून ओळखले जाऊ लागले.

हे ओसवाल उपकेशगच्छाचे गृहस्थाश्रमी अनुयायी होत. राजस्थानातले हे प्रमुख व्यापारी आहेत. बिकानेरमधील ओसवालांची दद, कोटारी, सेठिया, सावन, भटिया, इ. गोत्रे असून, मारवाडातील ओसवालांची भंडारी, मोहनत, लोधा, सिंग्वी, इ. गोत्रे आहेत. ओसवाल व्यापाऱ्यांच्या वसाहती भारताच्या कित्येक भागांत आढळतात. काशीचा प्रसिद्ध राजा शिवप्रसाद हा ओसवाल ज्ञातीचा होता. भोजक हे ओसवालांचे उपाध्ये होत. त्यांच्या तीर्थंकरांचे पुजारीही भोजकच असतात. हे लोक अबूचा पहाड, पालिताणा, गिरनार, पावागढ, इ. जैन क्षेत्रांच्या यात्रा करतात. याशिवाय काशी, अयोध्या, यांसारख्या हिंदू क्षेत्रांच्याही यात्रेला हे लोक जातात. मारवाडातील ओसिया ही सर्व ओसवालांची कुलदेवता होय.

सौराष्ट्रातील ओसवालांत दसा, वीसा व पाचा असे तीन पोटभेद आहेत. दसांतलेच विधवाविवाहाला मान्यता देणारे जे लोक तेच पाचा म्हणून विभक्त झाले. दसांत सगुण व निर्गुण अशा उपासनाभेदाने दोन गट पडलेले आहेत. यांच्यांत प्राचीन काळापासून पंचायतसंस्था चालत आलेली आहे. दसा व वीसा यांच्यांत रोटीव्यवहार होतो; पण बेटीव्यवहार मात्र होत नाही. [ म. ज्ञा. को. ]

**औंढ्या नागनाथ** बारा ज्योतिर्लिंगांपैकी नागेशाचे क्षेत्र. याला पूर्वी दारुकावन असे म्हणत. कारण इथे प्राचीन काळी अरण्य होते आणि त्यात दारुका राक्षसी वास्तव्य करीत होती. ती ऋषिमुनींना त्रास देऊ लागल्यावर शिवाने तिथे प्रगट होऊन त्या दारुकेचा नाश केला. नंतर तो नागेशलिंगाच्या रूपाने तिथेच राहिला.

या ज्योतिर्लिंगाच्या उत्पत्तीची दुसरी कथा अशी —

दक्षयज्ञात सतीने देहत्याग केल्यावर शिव विषण्ण होऊन दारुकवनात राहायला आला. तो दिगंबर अवस्थेत राहत होता. तो जेव्हा भिक्षा मागण्यासाठी आसपासच्या मनुष्यवस्तीत जाई, तेव्हा त्याचे तेजस्वी रूप पाहून ब्राह्मण स्त्रिया त्याच्यावर मोहित होत व त्याच्या मागे लागत. हा प्रकार पाहून त्यांचे पती संतप्त झाले आणि त्यांनी शिवाला शाप दिला. त्यामुळे त्याचा देह भस्मसात झाला आणि त्यातून देदीप्यमान असे ज्योतिर्लिंग प्रकट झाले. मग देव तिथे आले आणि त्यांनी तिथल्या जलाशयात त्या लिंगाची स्थापना केली. तिथल्या नाग लोकांकडे त्याच्या पूजेची व्यवस्था सोपवून देव स्वस्थानी निघून गेले. नागांकडून पूजिला गेला, म्हणून त्याला नागेश असे नाव पडले.

हे गाव मराठवाड्यातल्या परभणी जिल्ह्यात हिंगोलीपासून १२ मैलांवर आहे. नागनाथाचे मंदिर शिल्पसौंदर्याने नटलेले आहे. मंदिराभोवती २० फूट उंचीचा तट असून, त्याला ४ प्रवेशद्वारे आहेत. अन्य प्राचीन शिवालयात गाभारा नेहमी खोल असतो, पण इथे तो तसा नाही. गाभाऱ्यात सुंदर शिवलिंग असून, त्यावर सण-समारंभाच्या वेळी शिवमुख-कवच घातले जाते. महाशिवरात्रीला इथे मोठी यात्रा भरते. त्या प्रसंगी रथोत्सवही केला जातो.

मुख्य मंदिराची बरीच मोडतोड झालेली असून, त्याचे भग्नावशेष आवारात विखरून पडले आहेत. त्यात काही बुद्ध-मूर्तीही आहेत. मंदिराची बांधणी हेमाडपंती असून, आकार द्वादशकोनी आहे. ते उतरत्या कंगोऱ्यांनी युक्त अशा चौथऱ्या-वर उभे आहे. मंदिराच्या आत व बाहेर अनेक शिल्पपट्ट असून, त्यात हत्ती, घोडे, स्वार, कमळे, इ. आकृती कोरलेल्या



औंढ्या नागनाथाचे मंदिर

आहेत. महाद्वाराच्या दोन्ही बाजूस शिवाची विविध रूपे कोर-लेली आहेत. त्यांच्या शेजारी पार्वती, रावण, यती, बुद्ध इ. अनेक मूर्ती कोरलेल्या दिसतात. दक्षिणेकडील भिंतीवर गणे-शाच्या काही सुंदर मूर्ती आढळतात. या मंदिराचे शिल्पकार वेरुळ–अजंटा येथील शिल्पपरंपरेचे असावेत.

मंदिरातील मध्यमंडप वर्तुळाकार असून, तो आठ खांबांनी तोलून धरलेला आहे. त्याचे छत घुमटाकार आहे. खांब अष्टकोनी व कलाकुसरीचे आहेत.

गावाच्या दक्षिणेला जवळच कनकेश्वरीचे मंदिर असून, ती नागेशाची पत्नी होय, असे मानले जाते. या गावात लहानमोठी १०८ शिवालये आहेत. (श्री. रा. चिं. ढेरे–नागेशं दारुकावने सांस्कृतिक महाराष्ट्र दर्शन, १९६०)

**औंध** सातारा जिल्ह्यात खटाव तालुक्यात साताऱ्या-पासून सुमारे ४१ कि. मी. अंतरावर हे स्थान आहे. औंध संस्थानाचे पंतप्रतिनिधी यांची राजधानी इथे होती. हे गाव लहानच असले तरी पंतांचा भव्य, मराठेशाही वाडा आणि त्यांची कुलदेवी यमाई हिचे मंदिर यांमुळे ते प्रेक्षणीय झाले आहे. यमाईच्या मंदिरासमोर सुमारे १८ मी. उंचीची भव्य दीपमाळ आहे. त्या दीपमाळेवर १७६ दिवे लावता येतात. कार्तिक मासात तिथे जत्रा भरते, त्यावेळी सर्व दिवे लावले जातात. त्यांतले काही दिवे नित्य लावले जातात.

गावापासून सुमारे दीड कि. मीटर अंतरावर, सुमारे २४० मीटर उंच टेकडी असून, त्या टेकडीवरही यमाई देवीचे एक मंदिर आहे. त्या मंदिराभोवती एक उंच व जाड भिंत बांध-लेली असून, तीत पाच बुरुज आहेत.

याच टेकडीवर श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांचे वस्तुसंग्रहालय आहे. त्यात त्यांनी जमा केलेल्या मौल्यवान चित्रांचा मोठा संग्रह प्रदर्शनार्थ ठेवलेला आहे. ते स्वतः चांगले चित्रकार होते. त्यांनी युरोप खंडातून बरीच चित्रे आणली आणि भारतातील नामवंत चित्रकारांची चित्रेही गोळा केली. त्यांनी स्वतः काढलेली चित्रेही या प्रदर्शनात दिसतात. सुंदर पुतळे आणि अन्य कला कृतीही त्यात ठेवलेल्या आहेत. हिरे, माणके, पाचू, इ. बहुमोल रत्नेही तिथे ठेवलेली आहेत. [सातारा गॅझे.]

**औ** चौदावा स्वरवर्ण. कंठ व ओष्ठ ही याची स्थाने आहेत. हा दीर्घ असून प्लुतही होतो. उदात्तानुदात्तस्वरितभेदाने तो त्रिविध होतो व अनुनासिक-अननुनासिक अशा भेदाने सहा प्रकारचा होतो. कामधेनुतंत्रात याचे वर्णन पुढीलप्रमाणे दिलेले आहे—

रक्तविद्युल्लताकारं औकारं कुण्डली स्वयम् ।
अत्र ब्रह्मादयः सर्वे तिष्टन्ति सततं प्रिये ॥

अर्थ – औकार हा वर्तुळ व रक्तविद्युल्लतेसारखा आहे. हे प्रिये, याच्या ठिकाणी ब्रह्मादी सर्व देव सतत वास्तव्य करतात मातृकान्यासात याचे स्थान खालच्या दंतपंक्तीवर असते.

**अक्षरविकास** – इ. स. ६ व्या शतकातील मंदसोर येथील लेखात हा वर्ण प्रथम दिसतो. पाचव्या शतकातील जयनाथ-दानपत्रात 'ओ' च्या कमरेवर एक वाकडी (रोमन S सारखी) रेघ काढून औ बनविलेला दिसतो. याच शतकातील उष्णीष-विजयधारिणीच्या ताडपत्री पुस्तकात असाच औ आहे. पण त्याच्या रेघेचा बाक कोन करून गेलेला दिसतो. १० व्या शतकाच्या सुमारास नेपाळात सापडलेल्या हस्तलिखित ग्रंथातला 'औ' ही वरीलप्रमाणेच आहे. इ. स. च्या ११ व्या व १२ व्या शतकांत हा वर्ण अ सारखा रेखाटलेला दिसतो. इतर वर्णांप्रमाणे ओ व औ या वर्णाचा संगतवार विकास आढळून येत नाही. [श. कं.; म. ज्ञा. को.]

**औचित्यसंप्रदाय** संस्कृत साहित्यशास्त्रातील एक संप्र-दाय. औचित्याची भावना ही रस, ध्वनी, इ. समस्त काव्यतत्त्वांची मूल भावना आहे. सगळ्या

प्राचीन साहित्यशास्त्रज्ञांनी औचित्याचे रक्षण करण्याविषयी आवर्जून सांगितले आहे. क्षेमेंद्राने ( इ. स. चे ११ वे शतक ) औचित्यविचारचर्चा नामक ग्रंथ लिहून या काव्यतत्त्वाचे व्यापक स्वरूप स्पष्ट केले आहे. क्षेमेंद्र म्हणतो, की औचित्य हाच रसाचा प्राण आहे ( औ. वि. च. ३ ) कोणत्या वस्तूसह वर्णन केल्यास ते रसाला अनुकूल होईल, त्याचा विचार करणे म्हणजे 'उचित' व उचिताचा भाव ते औचित्य होय (औ. वि. च. ७).

क्षेमेंद्राने उपलक्षण म्हणून २७ प्रकारच्या औचित्यांचा विचार केला आहे. तो म्हणतो की, काव्यात शृंगार रसाशी माधुर्य हा गुण व कोमलवृत्ती, तसेच वीर-रौद्र यांच्याशी ओज हा गुण व कठोरवृत्ती ही सुसंवादी अतएव उचित ठरतात. त्याचप्रमाणे विशिष्ट अलंकारही विशिष्ट रसांना अनुकूल ठरतात.

औचित्य हे पद, वाक्य, अर्थ, रस, लिंग, वचन, इ. अनेक ठिकाणी कसे असते, ते क्षेमेंद्राने विस्तारपूर्वक सांगितले आहे. पण औचित्य या कल्पनेचा क्षेमेंद्र हा जनक नाही. त्याच्याही पूर्वी आनंदवर्धन ( इ. स. चे ९ वे शतक ) व अभिनवगुप्त (इ. स. चे १० वे शतक) यांनी औचित्याचा निर्देश केला आहे. आनंदवर्धन म्हणतो –

**अनौचित्यादृते सान्यद् रसभङ्गस्य कारणम् ।**
**औचित्योनिबन्धुस्तु रसस्योपनिषत् परा ।।**

अर्थ – अनौचित्यावाचून रसभंगाचे दुसरे कारण नाही. औचित्य संभाळणे हेच परम रहस्य आहे.

भरताच्या नाट्यशास्त्रातही औचित्याची बीजे सापडतात. अनौचित्याचे उदाहरण म्हणून पुढील श्लोक प्रसिद्ध आहे –

**कण्ठे मेखलया, नितम्बफलके तारेण हारेण वा ।**
**पाणौ नूपुरबंधनेन, चरणे केयूरपाशेन वा ।।**
**शौर्येण प्रणते रिपौ करुणया नायान्ति के हास्यतां ।**
**औचित्येन विना रुचिं प्रतनुते नालंकृतिर्नो गुणः ।।**

अर्थ – गळ्यात मेखला, कटिभागावर हार, हातात नूपुर व पायात केयूर बांधणे यांत अवयव व अलंकार यांचे अनौचित्य आहे. त्याचप्रमाणे नमलेल्या माणसाच्या ठिकाणी शौर्य व शत्रूच्या ठिकाणी करुणा हे गुणही अनुचित ठरतात. अशा गोष्टींच्या प्रदर्शनाने कोणाचा उपहास होणार नाही ? तात्पर्य काय, औचित्यावाचून अलंकार किंवा गुण रुची उत्पन्न करीत नाहीत. [ सं. सा. इ.; हिं. सा. बृ. इ. ]

## औजी

गढवाल प्रदेशात ढोल–दमामा वाजविणारी एक पूर्वास्पृश्य जात. मंगलकार्ये व सणवार या प्रसंगी हे लोक सवर्णाच्या घरी भिक्षा मागायला जातात व त्यांची बिरुदावली गातात. त्यांच्या गाण्याचा एक नमुना असा –

**मंगलाचार, मंगलाचार । बडा सरकार, बडा दरबार ।**
**राजमहल्लीं राजमुसद्दी । जुग जुग जीवे राजाधिराज ।**
**माराज बोलां दा बद्रीनाथ । जै जै कार, जै जै कार ।**
**पुरबी पच्छमी घाटको राज बढे ।**
**उत्तरी दखणी घाटको राज बडे ।**
**बेटी बेटानको राज बढे । नाती पोतानको राज बढे ।**

[ गढवाली लोकगीत – श्री. गोविंद चातक, १९५६

## औडुलोमी

अद्वैत दर्शनाचा एक आचार्य. हा बादरायणाच्या पूर्वकालातला असावा. याचे नाव ब्रह्मसूत्रांत तीन ठिकाणी आढळते. ( १.४.२१; ३.४.४५; ४.४.६ ). मीमांसासूत्रांत याचे नाव दिसत नाही. हा अद्वैतवादी पण अद्वैतात भेदाभेद मानणारा होता. जीव आणि ब्रह्म यांच्यांत भेद आणि अभेद हे भिन्न अवस्थांमुळे होत असतात, असे याचे मत आहे. संसारी दशेत जीव हा ब्रह्माहून नितांत भिन्न असतो. देह व इंद्रिये यांचा संपर्क येताच जीव कलुषित होतो; पण ज्ञान आणि ध्यान यांच्या योगे त्याचे कलुषित्व दूर होताच तो प्रसन्न होऊन ब्रह्माशी एकत्व प्राप्त करून घेतो. म्हणून मुक्तावस्थेत अभेद आहे; पण संसारदशेत भेद आहे. चैतन्य हेच आत्म्याचे स्वरूप असल्यामुळे जीव हा मोक्षावस्थेत केवळ आत्म्याच्या चैतन्य स्वरूपाशीच अभिन्न होतो; पण त्याही वेळी परमात्म्याचे सत्यसंकल्पत्व, सर्वज्ञत्व, सर्वेश्वरत्व, इ. धर्म जीवाच्या ठिकाणी राहत नाहीत. [ हिंदुत्व; शंकराचार्य. ]

## औदीच्य ब्राह्मण

सर्व गुजरातभर यांची वस्ती आहे अणहिलवाडच्या मूलराज सोळंकी या राजाने उत्तरेकडून अनेक ब्राह्मणांना यज्ञ करण्यासाठी आणले होते, त्यांपैकीच हे ब्राह्मण होत. हे उत्तरेकडून आले, त्या वेळी त्यांची संख्या एक हजार होती, म्हणून त्यांना औदीच्य सहस्र हे नाव मिळाले. हे सर्व औदीच्य ब्राह्मण २९ गोत्रांचे होते. त्यांत काही ऋग्वेदी आश्वलायन शाखेचे, काही सामवेदी कौथुल शाखेचे आणि काही यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे होते. सांप्रत यांच्यामध्ये यजुर्वेदी – यांचा भरणा जास्त आहे.

औदीच्य ब्राह्मणांच्या सहस्र आणि टोळकिया अशा दोन शाखा आहेत. सहस्रांचे पुन्हा सिद्धपुरा आणि शिहोरा असे दोन भेद आहेत. सुरुवातीला ज्या ब्राह्मणांनी दान स्वीकारले नव्हते, त्यांना टोळकिया असे नाव पडले. नंतर मात्र या

लोकांनी खंबायत आणि इतर गावे दान म्हणून स्वीकारली. पूर्वी हे सर्व ब्राह्मण भिक्षा, यजमानवृत्ती व शेती हे तीनही धंदे करीत असत. [ वि. मुं. रा. प. ]

**औदुंबर** (१) महाराष्ट्रातील एक प्रसिद्ध दत्तक्षेत्र. हे सांगली जिल्ह्यात भिलवडी स्टेशनपासून चार मैलांवर कृष्णेच्या काठी आहे. कृष्णा नदीच्या ऐलतीरावर भिलवडी आहे आणि पैलतीरावर औदुंबर आहे. भिलवडी-जवळ भुवनेश्वरीचे प्राचीन शक्तिपीठ आहे. त्यामुळे या स्थानी



भुवनेश्वरीचे मंदिर

तपस्वी जनांची वस्ती नेहमी असे. कृष्णेच्या तीरावरील वृक्षांच्या दाटीमुळे इथे आपोआपच एकान्तमय तपोवन निर्माण झालेले होते. त्यामुळे या निसर्गसिद्ध तपोवनात औदुंबराच्या छायेत इ. स. १४२२ च्या सुमारास श्रीनृसिंहसरस्वतींनी इथे येऊन चातुर्मासाचा काळ घालविला आणि या स्थळाला



दत्तपादुका मंदिर

चिरंतन पावित्र्य प्राप्त करून दिले. येथील कृष्णेचा घाट प्रशांत आणि प्रशस्त आहे. या घाटावरच दत्तपादुकांचे मंदिर आहे. ते ज्या घाटावर आहे, तो घाट येथील ब्रह्मानंदस्वामींचे शिष्य सहजानंदस्वामी यांनी बांधविला आहे.

या क्षेत्रात ब्रह्मानंदस्वामींचा मठ आहे. हे सत्पुरुष इ. स. १९०४ च्या सुमारास गिरनारहून औदुंबर क्षेत्री आले आणि इथेच एक मठ उभारून राहिले. येथील शांत आणि पवित्र वातावरणात त्यांच्या तपाला सिद्धीचे यश प्राप्त झाले आणि अखेर इथेच त्यांनी समाधी घेतली.

कित्येक भवतापतप्त लोक इथे दत्ताची सेवा करण्यासाठी येऊन राहतात. [ कल्याण–तीर्थांक; वि. मुं. रा. प. ]

(२) एक प्राचीन मानवगण. हे लोक स्वतःला विश्वामित्राचे वंशज म्हणवीत. पंजाबातील बियास, सतलुज व रावी यांच्या मधल्या प्रदेशात यांचे जनपद होते. पठाणकोट, ज्वालामुखी व होशियारपूर या प्रदेशात यांची काही नाणी सापडली आहेत. या नाण्यांवर शिवदास, रुद्रदास, महादेव आणि धारघोष या राजांची नावे दिसतात. काही नाण्यांवर विश्वामित्र ऋषीचेही चित्र दिसते. औदुंबरांचे राज्य प्रजासत्ताक असावे, असे त्यांच्या नाण्यांवरून कळते. इ. स. च्या प्रारंभी विमकी नावाचे राजघराणे औदुंबर प्रदेशावर राज्य करू लागले. त्या घराण्याच्या नाण्यांवर रुद्रवर्मा, आर्यमित्र, महीमित्र आणि भानुमित्र ही नावे आढळतात. [ अ. हि. नॉ. इं. ]

(३) एक मुनिपंथ ( भाग. पु. ३.१.२.४३ ). हे लोक सकाळी उठल्यावर जी दिशा प्रथम पाहत, त्याच दिशेची फळे आणि कंदमुळे आणून त्यांवर निर्वाह करीत. [ श. क. ]

(४) एक पवित्र वृक्ष. हा दत्ताला प्रिय मानला जातो याला उंबर किंवा उदुंबर असेही म्हणतात पाहा–उदुंबर.

**औदुंबरी** यज्ञमंडपातला एक खांब. ऋत्विजांना बसण्यासाठी केलेल्या सदोमंडपाच्या मध्यभागी खड्डा खणून त्यात उंबराच्या झाडापासून तयार केलेला व यजमानच्या उंचीचा एक खांब पुरतात. याच्या वरच्या टोकाला दुबेळके असावे लागते. या खांबाला वस्त्र गुंडाळतात साम गाणारे ऋत्विज औदुंबरीजवळ बसूनच सामगायन करतात. हे ऋत्विज औदुंबरीला देवता समजतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**औद्वाहिक** पुरुषाला लग्नाच्या वेळी सासुरवाडीकडून मिळालेले द्रव्य. हे भार्याधन अर्थात स्त्रीधन असते. त्याची वाटणी त्या पुरुषाच्या भावांना मिळत नाही. याविषयी मनूचे वचन (९.२०६) असे—

विद्याधनं तु यद्यस्य तत्तस्यैव धनं भवेत् ।
मैत्रमौद्वाहिकंचैव माधुपर्किकमेव च ।।

अर्थ – विद्या, मैत्री व विवाह या संबंधांत मिळालेले द्रव्य हे ज्याला मिळाले असेल, त्याच्याच मालकीचे असते.

**औधेलिया** बिलासपूर जिल्ह्यात आढळणारी एक जात. उऱ्हारिया राजपूत व मूरीबंदी नामक एक दासी यांच्या संबंधातून ही जात उत्पन्न झाली, असे सांगतात. यांच्यांत बचावत धनावत, पंचभैया, इ. गोत्रे आहेत.

**विवाहप्रथा** – पूर्वी मुलींची लग्ने पाचव्या किंवा सातव्या वर्षी करीत. या जातीत मुलींची संख्या कमी आहे. बहुधा साटेलोटे करून लग्ने जुळवतात. मुलींचे देज घेतात.

हे लोक दुल्हादेव वादेवी यांना भजतात. होळी हा यांचा मुख्य सण असतो.

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते जाळतात. तिसऱ्या दिवशी मृताच्या अस्थी गोळा करून पिंपळाखाली पुरतात. दहाव्या दिवशी जातीचे लोक एकत्र जमून क्षौर करतात आणि झाडा खाली अंगाला तेल लावतात. अविवाहित माणूस महामारीने मेल्यास त्याचे प्रेत पुरतात. प्रेत जर उघडे पडले, तर तो गंगचा अपमान झाला, असे समजतात. [ म. ज्ञा. को ]

**औपधेनव** आयुर्वेदाचा एक आचार्य. उपधेनूचा पुत्र. हा सुश्रुताचा समकालीन होता. याने धन्वंतरीकडून अष्टांग आयुर्वेदाचे शिक्षण घेतले. याचे एक शल्यतंत्र असल्याचे सुश्रुतसंहितेवरून कळते (सू.४.९) [ आ. इ. ]

**औपनिषद्व्रत** ब्रह्मचाऱ्यांसाठी सांगितलेल्या चार व्रतांपैकी एक व्रत. उपनिषद्-ब्राह्मणांचे अध्ययन करण्यापूर्वी हे व्रत करायचे असते. या व्रताच्या वेळी क्षौरापासून परिदानापर्यंतचे उपनयनातले सर्व संस्कार करायचे असतात (आश्व. गृ. सू. १. २२. २०). [ हि. ध. ]

**औपासन होम** गृहस्थाने गृह्याग्नी ठेवून त्यात सकाळ-संध्याकाळ नित्य होम करायचा असतो. अग्नीच्या उपासनेचा हा एक भाग असल्यामुळे याला औपासन होम म्हणतात. याच्या नित्यत्वाच्या बाबतीत 'अकरणे प्रत्यवायजनकं कर्म' = न केल्याने दोष घडविणारे कर्म, असे म्हटले आहे. केल्याने पुण्य नाही; पण न केल्याने मात्र दोष आहे, असे हे कर्म आहे. सूर्योदयापूर्वी आणि त्यानंतर दहा घटिका एवढा काल प्रातर्होमाचा व सूर्यास्तापूर्वी आणि त्यानंतर नऊ घटिका हा काल सायंहोमाचा सांगितलेला आहे.

या होमास दोन आहुतींना पुरतील इतके व्रीही ( भात ) किंवा यव घेतात. प्रथम अग्नीभोवती परिस्तरणे (दर्भमंडळ) घालून परिषेक (जलसिंचन) करतात. स्थालीमध्ये हविर्द्रव्ये घेऊन त्यांवर प्रोक्षण करतात. या होमाच्या देवता प्रातर्होमात सूर्य व प्रजापती आणि सायंहोमांत अग्नी व प्रजापती या असतात. होमानंतर परिषेक व अग्नीचे उपस्थान करतात-[धर्मसिंधू; एकता श्रावण, शके १८८०]

**औमापतम्** उमापतीने लिहिलेला संगीतावरील एक ग्रंथ. शिव–पार्वतींच्या संवादांतून हा ग्रंथ विस्तारला असून, त्यात ३८ प्रकरणे आहेत. यांत शुद्ध रागांची लक्षणे, वाद्ये, ताल, नृत्य, इ. विषयांचे विवेचन आहे. तांत्रिक शब्दांची सूचीही दिलेली आहे. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**औरंगजेब** (इ. स. १६१८–१७०७) याचे संपूर्ण नाव मुहिउद्दीन मुहंमद औरंगजेब. हा शहाजहान व मुमताज महल यांचा मुलगा होता. गुजरातेत दोहद या गावी याचा जन्म झाला. शहाजहानचे हे सहावे अपत्य होय. इ. स. १६२८ साली शहाजहान तख्तावर येताच औरंगजेबाला मासिक पंधरा हजारांची नेमणूक देण्यात आली व त्याच्या शिक्षणास प्रारंभ झाला.

औरंगजेबाची बुद्धी प्रखर होती. त्याने थोडक्याच काळात कुराण व हदीस यांचे अध्ययन पुरे केले. तो अरबी व फारसी या दोन्ही भाषा उत्तम शिकला. त्याचबरोबर त्याने तुर्की व हिंदी याही भाषा शिकून घेतल्या. त्याने 'फतवा–इ–आलमगिरी' हा ग्रंथ तयार करवून घेतला. त्यात इस्लामी धर्मशास्त्र व कायदे यांचे विवेचन आहे. त्याला चित्रकला, संगीत व इतर ललितकला यांची मुळीच आवड नव्हती. त्याने आवडीने अध्ययन केले, ते धार्मिक ग्रंथांचे. अरबी लिपीत कुराणाच्या दोन प्रती लिहून त्याने मक्का व मदिना येथे पाठविल्या. त्याचे हस्ताक्षर फार सुरेख होते. दिल्ली येथील निजामुद्दीन अवलियाच्या दर्ग्यांतही त्याच्या हातची कुराणाची एक प्रत ठेवली आहे. त्याला दरवेशी व अवलिया यांची संगत आवडे.

सोळा वर्षांचा होईपर्यंत तो कुशल सैनिक बनला. वयाच्या पंधराव्या वर्षी त्याने एक मोठा पराक्रम केला. साठमारीतल्या एका हत्तीने त्याच्यावर हल्ला केला असता, त्याने हत्तीला घायाळ करून माघारी परतविले. या त्याच्या धाडसाबद्दल शहाजहानने त्याला दोन लाख रुपये बक्षीस दिले आणि वर 'बहादुर' ही पदवी दिली. इ. स. १६३५ साली शहाजहानने त्याला दसहजारी मनसब देऊन चार हजार पायदळासह ओर-

त्याच्या जुझारसिंहावर आक्रमण करण्यासाठी पाठविले. या मोहिमेत जुझारसिंह मारला गेला. या विजयाचे बक्षीस म्हणून शहाजहानने त्याला दक्षिणेचा सुभेदार नेमले व तो दौलताबादेस राहण्यास आला (इ. स. १६३७).

दक्षिणेत शहाजीराजे भोसले त्या वेळी हुसेन निजामशहाला पुढे करून निजामशाही तगविण्याचा प्रयत्न करीत होते. पण त्यांना औरंगजेबापुढे हार खावी लागली व बाल निजामशहाला मोगलांच्या ताब्यात द्यावे लागले.

इ. स. १६३७ साली पर्शियाच्या राजघराण्यातल्या शहानवाझची कन्या दिलरासबानू बेगम हिच्याशी त्याचा विवाह झाला. दिलरासबानूच्या शिवाय त्याला आणखी तीन स्त्रिया होत्या. सर्व स्त्रियांपासून त्याला एकूण दहा मुले झाली. दौलताबादेहून ९ मैलांवर असलेल्या खडकी या गावी त्याने १६३८ मध्ये नवे शहर वसविले, तेच औरंगाबाद होय. औरंगाबाद येथेच त्याची दिलरासबानू ही बेगम मृत झाली. तिथे त्याने ताजमहालच्या नमुन्यावर तिची कबर बांधली. तीच कबर हल्ली 'बिबीका मकबरा' म्हणून प्रसिद्ध आहे. पुढे काही कारणावरून शहाजहानचे औरंगजेबाशी बिनसले व त्याने औरंगजेबाला दक्षिणेच्या सुभेदारीवरून बदलले (इ. स. १६४४). इतकेच नव्हे; तर त्याचा तनखाही बंद केला. पुढे जहानआरा या औरंजेबाच्या बहिणीने शहाजहानची समजूत घातली व शहाजहानने त्याला पुनश्च अधिकारावर आणून गुजरातच्या सुभेदारीवर नेमले.

त्याने गुजरातमधल्या लुटारूंचा व बंडखोरांचा बंदोबस्त करून प्रांताची एकंदर व्यवस्था उत्तम लावली. त्यानंतर शहाजहानने त्याला बल्ख व बदक्शाँ या प्रांतांच्या सुभेदारीवर नेमले. शहाजादा मुरादने इ. स. १६४६ साली बल्ख जिंकून घेतले होते; पण मुराद परत येताच तिकडे पुन्हा बंडाळी सुरू झाली. तिचाच बंदोबस्त करण्यासाठी शहाजहानने औरंगजेबाची ही नेमणूक केली होती. औरंगजेबाने २५,००० सैन्यानिशी बल्खवर हल्ला चढवून तो प्रांत काबीज केला. पुढे तिथून बदक्शाँकडे जात असता त्याच्या सैन्याचा पराभव होऊ लागला. त्यामुळे त्याला बल्खकडे परत फिरावे लागले. वाटेत उझबेग जमातींनी त्याच्यावर हल्ले करून त्याचे फार हाल केले. शेवटी बल्ख शहर व किल्ला तेथील पूर्वीचा राजा नजरमहंमद याच्या नातवास देऊन तो इ. स. १६४७ साली काबूलकडे परतला. येताना उझबेगांचे हल्ले व वादळे यांच्यामुळे त्याचे सुमारे १०,००० सैन्य गारद झाले. या स्वारीत मोगलांचा काडीचाही फायदा न होता ४ कोट रुपयांचा चुराडा मात्र झाला.

यानंतर शहाजहानने औरंगजेबास मुलतानचा सुभेदार नेमले (१६४८). तो या जागेवर इ. स. १६५२ सालापर्यंत होता. एवढ्या अवधीत त्याने कंधारवर दोन स्वाऱ्या केल्या; पण त्या दोन्ही स्वाऱ्यांत त्याला अपयश आले. त्यामुळे शहाजहानची त्याच्यावर फार इतराजी झाली. त्यानंतर शहाजहानने त्याची इ. स. १६५३ साली पुनश्च दक्षिणेच्या सुभेदारीवर नेमणूक केली.

नेमणूक झाल्यानंतर तो प्रथम बऱ्हाणपुरास आला. तिथे त्याने ९ महिने काढले. पुढे दौलताबादेस तो ४ वर्षे राहिला. या मुदतीत त्याने विजापूर व गोवळकोंडा यांच्यावर स्वाऱ्या केल्या. इ. स. १६५७ साली त्याने अली अदिलशहाशी भांडण उकरून काढून त्याच्यावर स्वारी केली आणि बिदर व कल्याणी येथील किल्ले जिंकून घेतले. पण शहाजहानने हुकूम केल्यावरून त्याने पुढे आदिलशहाशी तहही केला. याच वेळी शिवाजी महाराजांनी आदिलशहाची बाजू घेऊन जुन्नरपासून औरंगाबादपर्यंतचा त्याचा मुलुख लुटला. व अहमदनगरवरही धाड घातली. ते पाहून औरंगजेबाने शिवाजी महाराजांवर नासीरखानाला पाठविले. पण विजापूरकरांशी तह झाल्यावर ही मोहीम आपोआप थांबली.

पुढे शहाजहान दिल्लीस आजारी पडला व त्याने सर्व सरदारांदेखत आपला सर्वांत मोठा मुलगा दारा शुकोह याला गादीचा वारस नेमले. मग तो प्रकृतिस्वास्थ्यासाठी आग्र्यास जाऊन राहिला. तो थोड्या दिवसांत बराही झाला; पण बंगालमध्ये असणाऱ्या शुजाने स्वतःला बादशहा ही पदवी घेऊन दिल्लीवर चाल केली. मुरादनेही आपण बादशहा बनल्याचे जाहीर केले. शहाजहानने मुरादची तिथून वऱ्हाड प्रांतात बदली केली; पण मुरादने तो हुकूम मानला नाही. पुढे औरंगजेबही मुरादला सामील झाला. त्यानंतर त्यांच्या दारा शुकोहशी दोन लढाया झाल्या. शेवटी शहाजहानला आग्र्याच्या किल्ल्यात कैद करून औरंगजेबाने इ. स. १६५८ साली दिल्लीच्या तख्तावर आरोहण केले. या प्रसंगी त्याने 'आलमगीर गाझी' अशी पदवी धारण केली. पुढे त्याने दारा शुकोहला पकडून त्याचा शिरच्छेद केला व त्याच्या मुलासही ठार मारले.

औरंगजेब तख्तावर बसल्यानंतर त्याच्या मृत्यूपर्यंतच्या काळाचे सामान्यतः २५।२५ वर्षांचे दोन भाग पाडतात त्याचा पहिला कालखंड उत्तरेत गेला. अफगाण व राजपूत यांची बंडे या कालखंडात झाली. दुसरा कालखंड दक्षिणेत गेला. (मोगल राजवंश पाहा).

मराठ्यांना जिंकण्यासाठी म्हणून तो इ. स. १६८२ साली दक्षिणेत उतरला. प्रथम त्याने विजापूर व गोवळकोंडा येथील शीयापंथी मुसलमानी राज्ये बुडवली. त्यानंतर त्याने मराठेशाहीवर प्रचंड सैन्यानिशी हल्ला चढविला, पण मराठ्यांनी त्याची दाणादाण उडविली. मराठे जिवावर उदार होऊन त्याच्याशी लढले.

शिवाजी महाराजांचा पुत्र संभाजी याने इ. स. १६८० ते ८८ या काळात मोगलांशी चांगलीच टक्कर दिली. पुढे १९८० साली शेख निजामाने संभाजीला संगमेश्वरी पकडले व वडू येथे त्याचा वध करण्यात आला. त्यानंतर औरंगजेबाने रायगड जिंकला व संभाजीचा पुत्र शाहू याला कैद केले. पण तरीही मराठे दबले नाहीत. ते मोगली सैन्यावर जागोजाग हल्ले करीतच राहिले. मोगलांनी मराठ्यांचे किल्ले सर करावे आणि त्यांची पाठ वळताच मराठ्यांनी पुनश्च ते जिंकून घ्यावे असा प्रकार सुरू झाला. धनाजी आणि संताजी यांनी तर त्याला हैराण करून सोडले. औरंगजेबाने शाहूकडून मराठ्यांना पत्रे लिहून त्यांचा बुद्धिभेद करण्याचाही प्रयत्न केला; पण त्यातही त्याला यश आले नाही.

वर्षानुवर्षे चाललेल्या या युद्धाच्या धुमश्चक्रीमुळे अखेर औरंगजेब जर्जर झाला. तो १७०६ मध्ये अहमदनगरास परतला. मराठ्यांनी त्याचा पाठलाग केला आणि वाटेत त्याच्यावर हल्ला करून त्याला लुटले. शेवटी तो अहमदनगर येथे आजारी पडून इ. स. १७०७ साली मृत्यू पावला. मरणाआधी त्याने मृत्यूपत्र करून आपले राज्य आपल्या तिघा मुलांत वाटून दिले. दौलताबादेजवळ खुलदाबाद येथे त्याच्या शवाचे दफन करण्यात आले.

औरंगजेबाची शासनव्यवस्था त्याच्याच ठिकाणी केंद्रित होती. त्याने राज्याचे सारे अधिकार बादशाहा या नात्याने आपल्याच हाती ठेवले होते. राज्यातल्या बारीकसारीक तपशिलाच्या गोष्टीही तो स्वतः पाही. तो सगळे हुकूम स्वतः देत असे. त्याचे सर्व मंत्री आणि अधिकारी त्याच्या कठोर नियंत्रणात असत. तो एकतंत्र शासनपद्धतीचा पुरस्कर्ता होता.

औरंगजेबाचा मृत्यू झाला, त्या वेळी भारतातले २० प्रांत त्याच्या साम्राज्यात समाविष्ट होते. त्यांपैकी १४ उत्तर भारतात आणि ६ दक्षिण भारतात होते. यद्यपि औरंगजेबाची शासनव्यवस्था एकतंत्री आणि कठोर होती, तरीही तो पंचवीस वर्षे कायम दक्षिणेत राहिल्यामुळे अखेरीस उत्तरेत त्याची सत्ता ढिली पडली. त्यामुळे तिकडच्या सरदारांचे आणि जमीनदारांचे फावले.

औरंगजेबाने हिंदूंवर 'जंजिया' कर लादला होता. शिवाय तो हिंदूंकडून यात्राकरही वसूल करी. आपल्या अमदानीत औरंगजेबाने सैन्य खूप वाढविले. शहाजहानच्या कारकिर्दीत होई त्यापेक्षा औरंगजेबाच्या काळात सैन्यावर दुप्पट खर्च होऊ लागला. जरी औरंगजेबाची सैन्यावर करडी नजर होती, तरी त्याचे सैन्य अकबराच्या सैन्यापेक्षा निकृष्ट दर्जाचे राहिले.

औरंगजेब उद्योगी व संयमी असून त्याचे आचार-विचारावर कठोर नियंत्रण होते. त्याचे भोजन साधे असे आणि पोशाखही साधा असे. चारापेक्षा अधिक बायका करायच्या नाहीत, हा कुराणप्रणीत नियम त्याने पाळला होता. त्याला अन्य स्त्रियांचे कधीही आकर्षण वाटले नाही. त्याला कसलेही व्यसन नव्हते. तो बालपणापासूनच विद्याप्रेमी होता. त्याला ग्रंथांचेही प्रेम होते. तो रोज पाच वेळा नमाज पढत असे; तसेच रमजानचे उपवास करी आणि आपल्या धर्माचे श्रद्धेने पालन करी. इस्लामशिवाय तो इतर सारे धर्म झूट मानी.

सैनिक आणि सेनापती या स्वरूपांत औरंगजेब त्याच्या वंशातल्या अनेक बादशहांपेक्षा श्रेष्ठ होता. त्याच्या ठिकाणी शरीरबल आणि सहनशीलता तर होतीच; शिवाय प्रसंगी जीव धोक्यात घालण्याचीही त्याची तयारी होती. तो एक कुशल सेनानी होता. शत्रूची चूकभूल आणि दुर्बलता यांचा तो सदैव लाभ उठवी. कपट—कारस्थाने आणि राजनैतिक चलाखी करून तो शत्रूवर मात करी.

औरंगजेब अत्यंत महत्त्वाकांक्षी होता. साऱ्या हिंदुस्थान देशावर मोगल साम्राज्य प्रस्थापित करण्याची जिद्द त्याने बाळगली होती. त्याबाबतीत त्याला बरेच यशही मिळाले. काबूलपासून पूर्वेला चित्तगांगपर्यंत आणि दक्षिणेत कोलेरून नदीपर्यंत त्याची सत्ता होती. त्यासाठी त्याने कित्येक हिंदू सरदार व मुत्सद्दी पुरुष आपल्या पदरी ठेवले होते. त्याच्या राज्यकारभारात मुसलमान व हिंदू अधिकाऱ्यांना सारखेच स्थान होते. परंतु औरंगजेब कट्टर सुन्नी पंथाचा होता आणि सर्व देशभर इस्लामचा प्रसार व्हावा म्हणून त्याने आटोकाट प्रयत्न केले. त्याची लष्करी सत्ता सर्व काळ चालू राहिली. त्याने प्रजाजनांच्या हितासाठी कोणतेही योजनापूर्वक प्रयत्न केले नाहीत. आर्थिक उन्नती, शिक्षण, कला, सामाजिक न्याय, इ. बाबतीत त्याने लक्ष घातलेच नाही. एवढा व्यापक विचार करण्याची कुवत त्याच्याजवळ नव्हती. तो सत्तापिपासू असून, शासनाची सर्व सूत्रे त्याने स्वतःच्या हातात ठेवली होती. तो दुसऱ्या कोणावरही विसंबून राहत नसे; कोणावर विश्वास ठेवत नसे. स्वतःच्या मुलांनाही त्याने दूर ठेवले; त्यांना योग्य शिक्षण देऊन राज्यकारभारासाठी लायक बनविले नाही. कर्तबगार मंत्री व अधिकारी यांनाही तो स्वतःच्या बुद्धीने

कारभार करू देत नसे; तर आपल्या इच्छेप्रमाणेच नाचायला लावी. त्यामुळे त्याचा एकतंत्री कारभार शेवटी विस्कळीत होऊ लागला आणि त्याच्या दीर्घोद्योगामुळे प्रस्थापित झालेल्या मोगल साम्राज्याचा ऱ्हास त्याच्या कारकिर्दीतच सुरू झाला. [म. ज्ञा. को; मु. का. भा; हि. क. इं. पी. ७]

**औरंगाबाद** एक प्रसिद्ध ऐतिहासिक स्थान. हे मराठवाड्यात मुंबईपासून ३७० कि. मी. अंतरावर, दुधना खोऱ्यात, खाम नदीच्या तीरावर वसलेले आहे. अहमदनगरचा मूर्तझा निजामशाहा याचा वजीर मलिकंबर याने हे शहर इ. स. १६१० मध्ये वसवले. त्या जागी खडकी नावाचे खेडेगाव होते. दहा वर्षांत तिथे मोठी वसाहत झाली. पण इ, स. १६२१ साली शहाजहानाच्या फौजेने त्या शहराचा नाश केला. इ. स. १६२६ साली मलिकंबरचा मुलगा फत्तेखान याने खडकी हे नाव बदलून त्या शहराला फत्तेनगर हे नाव दिले.

इ. स. १६३३ मध्ये मोगल बादशाही फौजांनी दौलताबाद जिंकून, आसपासच्या निजामशाही मुलखावर ताबा मिळवला व फत्तेनगर त्यांच्या ताब्यात गेले. पुढे इ. स. १६५३ साली औरंगजेब दख्खनचा सुभेदार झाला. आणि त्याने फत्तेनगर हे आपले मुख्य ठिकाण बनवून त्याला औरंगाबाद हे नाव दिले.

इ. स. १६८१ मध्ये सुभेदार खानजहान बहादुर याने शहराभोवती भक्कम तट बांधला. त्यानंतर औरंगजेब बादशाहाने दख्खनच्या मोहिमेत इथेच आपले मुख्य ठाणे स्थापले होते.

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर लवकरच निजाम उलमुल्क आसफ जा हा दख्खनचा सुभेदार झाला. पुढे इ. स. १७२४ साली त्याने आपले स्वतंत्र राज्यच स्थापले. मात्र त्याने आपली राजधानी औरंगाबादहून हैदराबादला हलवली.

औरंगाबादच्या भोवती जो तट होता तो आता बहुतेक ढासळलेला आहे. त्याला तेरा दरवाजे होते. मलिकंबर याने इ. स. १६१६ साली जो राजवाडा बांधला होता, त्याचे नाव नौकोंडा महाल. हा राजवाडाही आता मोडून पडला आहे. औरंगजेबाने इ. स. १६९२ मध्ये एक महाल इथे बांधून घेतला होता. तोही बहुतेक मोडकळीस आलेला आहे. त्याचे नाव किल्ला अरंक असे होते. कारण तो एक भुइकोट किल्लाच होता. त्याला तट, बुरुज, मिनार सर्व काही होते. त्यातील दरबाराचा आमखास महाल व जुम्मा मशीद या दोनच इमारती उभ्या आहेत.

या किल्ल्याजवळ मलिकंबरने बांधलेली जुम्मा मशीद आहे. तीत पन्नास स्तंभ असून, त्यांवरील कमानी व घुमट यांमुळे तिचे शिल्पकाम अत्यंत देखणे वाटते. मलिकंबरने इ. स. १६०० साली बांधलेली काळी मशीद जुना बाजार या भागात आहे.

औरंगाबाद शहराच्या मध्यवर्ती चौकात शाह गंज मशीद आहे. ती इ. स. १७२० साली बांधली गेली. तिचे शिल्पकाम अतिशय प्रेक्षणीय आहे. तिच्या मध्यभागी मोठा घुमट व भोवती लहान घुमट आहेत. कोपऱ्यांवर मिनारही आहेत.

याशिवाय चौक मशीद, लाल मशीद, सोनेरी महाल, चित्त खान, पीर इस्माइलची कबर, बाबा मुसाफिराचा दर्गा, इ. इमारतीही चांगल्या आहेत.

**बिबीका मकबरा (रोजा)**–बेगमपुरा या उपनगरात औरंगजेबाची बेगम रबिया दुराणी हिची कबर आहे. औरंगजेबाचा मुलगा आझम शाहा याने आपल्या आईच्या स्मरणार्थ ही सुंदर इमारत इ. स. १६५०–५७ या काळात बांधली. ती ताज महालसारखी बांधावी, अशी कल्पना होती; पण ताजमहालाच्या मानाने तिचे शिल्पकाम कमी प्रतीचे दिसते. या कबरीचे बांधकाम चौकोनी आहे व चारी बाजूंना उंच कमानी आहेत. हा रोजाही अत्यंत सुरेख आहे. त्याच्या माथ्यावर भव्य घुमट व चार कोपऱ्यांवर मिनार आहेत. याचा बराच भाग शुभ्र संगमरवरी आहे.

खडकेश्वराचे चालुक्य शैलीचे मंदिर हे शहरातले सर्वांत प्राचीन शिल्पकाम मानले जाते.

**पाणी बाबाचा धबधबा**– एका बागेच्या एका कोपऱ्यात एक चौरस बुरुज असून, त्यातून पाण्याचा एक धबधबा अखंड वाहत असतो. पूर्वी त्या ठिकाणी एक फकीर वाटसरूंना नेहमी पाणी पाजत असे. त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या शिष्यांनी त्या पाणी बाबाचे स्मारक म्हणून हा धबधबा निर्माण केला असे म्हणतात. जवळच्या पहाडावरील तळ्यातले पाणी भाजलेल्या मातीच्या नळातून बागेत आणून बुरुजातून खाली सोडलेले आहे.

या शहराला पाणी पुरवठ्यासाठी जुन्या काळी दगडी नळ टाकलेले आहेत. खाम नदीपासून एक कालवा मलिकंबरने बांधून त्याचे पाणी त्या नळांतून सर्व शहरात खेळवले. जवळच्या डोंगरावरूनही अशाच दगडी नळातून पाणी आणलेले आहे शहरात काही पाणचक्क्या आहेत. त्या चालवण्यासाठी असेच उंचावरून पाणी आणलेले आहे.

शहरापासून जवळ डोंगरात काही लेणी खोदलेली आहेत. त्यांत तीन गट असून पहिल्या व दुसऱ्या गटात बौद्ध गुंफा आहेत. त्यांतील काही शिल्पकाम उत्तम प्रकारचे दिसते.

गुंफा क्र. १ हे विहार लेणे असून, त्यात आठ स्तंभ आहेत. एका बाजूला बुद्धाची प्रतिमा आहे.

गुंफा क्र. २ हे लेणे मंदिरासारखे असून, त्यात मध्यभागी ९ फूट उंचीच बुद्धाची मूर्ती आहे.

गुंफा क्र. ३ हा विहार असून त्याच्या दालनात बारा सुंदर स्तंभ आहेत: त्यात सुरेख नक्षीकाम कोरलेले दिसते. या लेण्यात खोल्याही आहेत आणि चैत्यही आहे. त्यात एक प्रचंड बुद्ध मूर्ती आहे.

गुंफा क्र. ४ हे चैत्य लेणे असून, ते अगदी साधे आहे. हे इ. स. च्या चौथ्या शतकात खोदलेले असावे. त्यात १७ स्तंभ असून, गर्भगृहात साधा दागोबा आहे.

गुंफा क्र. ५ हे लेणे मंदिरासारखे असून त्यात बुद्धाची मूर्ती आहे, मात्र जैन लोक त्याला पार्श्वनाथाचे लेणे मानतात.

पहिल्या गटाच्या पूर्वेला सुमारे १ कि. मी. अंतरावर दुसऱ्या गटातील क्र. ६ ची गुंफा आहे. हे लेणे विहार व मंदिर असे संमिश्र प्रकारचे आहे. कारण यात खोल्या व बुद्धाच्या मूर्ती आहेत. यात काही भित्तिचित्रे आढळतात.

गुंफा क्र. ७ हे विहार लेणे असून, त्यात बुद्धाच्या मूर्ती आहेत. हे देखील मंदिराप्रमाणेच आहे. त्यात अनेक सुंदर शिल्पे दिसतात.

गुंफा क्र. ८ ही अपूर्ण स्थितीत आहे.

गुंफा क्र. ९ हे लेणे बरेचसे पडलेले असून, त्यात एक मोठे दालन व मागे तीन लहान दालने होती. अगदी मागे गर्भगृह असून, त्यात बुद्धाची मूर्ती आहे. एका भिंतीवर १६ फूट लांबीची बुद्धाची आकृती निर्वाणावस्थेतली दिसते.

तिसऱ्या गटातली ३ लेणी अपूर्ण आहेत.

या बौद्ध लेण्यांजवळच निपट निरंजन यांची समाधी आहे. [भारत दर्शन १–श्री. काका कालेलकर; औरंगाबाद गॅझे.]

**औरभ्र** (१) एक जमात. हे लोक शेळचा व मेंढचा पाळण्याचा धंदा करतात; तसेच लोकरीच्या घोंगडयाही तयार करतात. पाहा–धनगर. [हि. ध.]

(२) एक आयुर्वेदाचार्य. उरभ्राचा पुत्र. हा धन्वंतरीच्या अनेक शिष्यांतला एक होता. याचे एक शल्यतंत्र होते. अष्टांग-संग्रहाच्या इंदुनामक एका पुरातन टीकेत उरभ्राच्या नावाने दहा श्लोक उद्धृत केले आहेत. उरभ्र आणि औरभ्र यांचा पिता–पुत्र संबंध होता की काय, या विषयी श्री. भगवद्दत्त संदेह व्यक्त करतात.

औरभ्र हा सुश्रुताचा समकालीन (इ. स. पू. ८०० पूर्वी) होता, असे आयुर्वेदीय ग्रंथांवरून कळून येते. [आ. इ.]

**औरस** द्वादशविध पुत्रांमध्ये श्रेष्ठ पुत्र. 'सवर्णायां संस्कृतायां स्वयमुत्पादितमौरसं विद्यात्' = संस्कार केलेल्या सवर्ण स्त्रीच्या ठिकाणी स्वतः उत्पन्न केलेला पुत्र तो औरस होय, असे बोधायन म्हणतो. मनूनेही अशाच प्रकारची व्याख्या केलेली आहे. (९.१६६). धर्मपत्नीपासून उत्पन्न झालेल्या पुत्राला औरस म्हणावे, असे याज्ञवल्क्य सांगतो.

**और्ध्वदेहिक** मनुष्य मृत झाल्यावर प्रेताच्या दाह-संस्कारापासून सपिंडीकरणाच्या पूर्वी प्रेताला उद्देशून जी पिंडदानादी कृत्ये केली जातात, त्यांना और्ध्वदेहिक म्हणतात. पाहा – अंत्यक्रिया; अंत्येष्टी. [श. क.]

**और्व** (१) श्रीहरीने और्व नामक अग्नीचे रूप धारण करून समुद्रातले जल प्राशन केले. ब्रह्मदेवाने त्याला महासागरात कायमचे स्थापले. यालाच संवत्सर व वडवामुख ही नावे आहेत (मत्स्य पु. १२१.७७). याची और्वी नामक माया प्रसिद्ध आहे (मत्स्य पु. १७४.१८).

(२) एक ऋषी. आप्नुवान व ऋची यांचा पुत्र. हा मंत्र-कर्ता होता. याने सगराला विष्णुपूजेची पद्धती सांगितली. यानेच पित्याच्या मृत्यूनंतर जन्मलेल्या सगराचे आपल्या आश्र-मात संगोपन केले. हा स्वारोचिष मन्वंतरातला ऋषी होता. भार्गवगोत्राच्या पाच प्रवरांपैकी और्व हा एक प्रवर आहे.

**औलिया** 'वली' चे बहुवचन. देवाच्या आवडत्या व्यक्ती. यांना कशाचीही भीती नसते. व दुःख कधीही शिवत नाही, असे कुराणात म्हटले आहे. (१०. ६३). [डि. इ.]

**औशनस** सरस्वती नदीवरील एक प्रसिद्ध तीर्थक्षेत्र. यालाच कपालमोचन असेही म्हणतात. इथे उशना ऋषीने तप करून सिद्धी मिळविली. इथे कार्तिकेय व ब्रह्मादी देव उशना ऋषीचे प्रिय करण्यासाठी वास्तव्य करतात. इथे स्नान केल्याने सर्व पापे नष्ट होतात. असे सांगितले आहे. (म. भा. वन. ८३. १३५–३७). [हि. ध.]

**औशनस धर्मशास्त्र** उशनसाचे हे धर्मशास्त्र ५१ श्लोकांचे असून, त्यात सूत, मागध, चंडाल, इ. जाती आणि त्यांचे धंदे दिलेले आहेत. [हि. ध.]

**औशनस स्मृती** या स्मृतीत ९ अध्याय असून, सुमारे ६०० श्लोक आहेत. त्यात उपनयन

वेदाध्ययन, अनध्याय, श्राद्ध, वृत्तिविधान, अनुलोम–प्रतिलोम जाती इ. विषयांचा विचार केलेला आहे. [ हिंदुत्व; हि. ध. ]

**औषध** रोगनाशक द्रव्य. वाग्भटाने आपल्या ग्रंथात औषधाविषयी पुढील श्लोक दिलेले आहेत–

'शोधनं शमनं चेति समासादौषधं द्विधा।
शरीरजानां दोषणां क्रमेण परमौषधम्।।
बस्तिर्विरेको वमनं तथा तैलं घृतं मधु।
धीधैर्यात्मादिविज्ञानं मनोदोषौषधं परम् ।।

अर्थ–शोधन (शरीरातील मलद्रव्ये काढून टाकणे) व शमन असे औषधाचे दोन प्रकार आहेत. (दोन्ही मिळून) क्रमाने शरीरजन्य दोषांचे परम औषध बनतात.

बस्ती, विरेचन, वमन त्याचप्रमाणे तेल, तूप, मध ही शरीरदोषावरची; तसेचबुद्धी, धैर्य, आत्मादी विज्ञान ही मानसिक दोषांवरची औषधे होत.

सृष्टीतील बहुतेक सर्व द्रव्यांचा उपयोग औषधे म्हणून केला जातो. मात्र औषधी द्रव्य शरीराला शक्य तितके भावेल असे करून, युक्तीने द्यावे लागते. औषधांत रसादी गुणांपैकी जो बलवान असेल त्याच्या योगे रोगनाशाचे कार्य होते. त्यासाठी द्रव्यांवर विविध संस्कार केले जातात, आणि त्यांचा उपयोग विविध प्रकारे केला जातो.

**औषधासाठी मुहूर्त**–मुहूर्तचिंतामणी या ग्रंथात औषध तयार करणे, ते घेणे व सूचीकर्म (सुई टोचणे) या क्रियांसाठी पुढीलप्रमाणे मुहूर्त सांगितले आहेत–

भेषज्यं सल्लघुमृदुचरे मूलभे द्व्यंगलग्ने
शुक्रेन्द्विज्ये विदि च दिवसे चापि तेषां रवेश्च ।
शुद्धेरिःफद्युनमृतिगृहे सत्तिथौनोजनेर्भे–
सूचीकर्माप्यदितिवसुभे तक्षमैत्राश्विपुष्ये ।।

अर्थ–लघुनक्षत्रे (हस्त, अश्विनी, पुष्य, अभिजित), मृदुनक्षत्रे (मृगशीर्ष, रेवती, चित्रा, अनुराधा), चरनक्षत्रे (स्वाती पुनर्वसू, श्रवण, धनिष्ठा, शततारका) व मूळ या चौदा नक्षत्रांवर; तसेच द्विस्वभाव लग्न व त्यात शुक्र, चंद्र, गुरू व बुध हे ग्रह असता आणि याच चार ग्रहांच्या वारी व रविवारी नवीन औषध तयार करणे किंवा ते घेण्यास आरंभ करणे शुभ होय. या मुहूर्ताच्या वेळी लग्नापासून सात, आठ व बारा ही स्थाने शुद्ध अर्थात ग्रहरहित असावी. अमावास्या व रिक्ता या तिथी नसाव्या. जन्मनक्षत्री औषध घेण्यास आरंभ करू नये. पुनर्वसू, धनिष्ठा, चित्रा अनुराधा, अश्विनी व पुष्य ही नक्षत्रे सूचिकर्मास शुभ होत. [ श. क. ]

**औक्षण** उक्ष् = शिंपडणे, या धातूवरून हा शब्द बनला आहे. सायणाने औक्ष म्हणजे प्रलेपन द्रव्य असा त्याचा अर्थ दिला आहे. महाराष्ट्रात आरती, नीरांजन किंवा लामणदिवा ओवाळणे, यांसाठी हा शब्द वापरला जातो. मंगलप्रसंगी ज्याचे मंगलकार्य व्हायचे असेल, त्याच्या तोंडाभोवती सुवासिनी स्त्रिया ताम्हनात नीरांजन ठेवून आरती ओवाळतात. देवमूर्ती व राजे यांचेही उचित प्रसंगी औक्षण करतात. हा एक आयुष्यवर्धक विधी आहे. पाहा–अश्विनी. [ वै. नि. ]

• • •

# परिशिष्ट

**अग्निहोत्र** एक उपासना–पद्धती. सामान्य मनुष्याला नित्य-कर्म म्हणून अग्नीची उपासना सहज करता यावी, या दृष्टीने ही सोपी पद्धती अक्कलकोटच्या पूज्य श्रीगजानन-महाराजांनी प्रचलित केली आहे. सकाळी व सायंकाळी दोन वेळा अग्नी प्रज्वलित करून त्याला तांदुळाच्या दोन आहुती देणे, असा या उपासनेचा साधा विधी आहे. जगातल्या बहुतेक प्रमुख देशांतील हजारो लोक ही अग्नीची उपासना करतात. व ती करण्याची रीत जगभर सारखीच आहे.

**अग्निप्रज्वलन**–केवळ गोमयाच्या म्हणजे गायी–बैलांच्या शेणाच्या गोवऱ्या अग्नी उत्पन्न करण्या-साठी वापरतात. कारण अशा शेणात वातावरण– शुद्धीसाठी पोषक असे गुणधर्म आढळतात. पिरॅमिडच्या आकाराच्या तांब्याच्या पात्रात या गोवऱ्यांचे तुकडे ठेवतात आणि ते पेट-वण्यासाठी गुग्गुळ, कापूर किंवा तुपाची फुलवात वापरतात. रॉकेल वापरणे निषिद्ध आहे. वायूची किंवा तेलाची ज्योत गोवऱ्या पेटवण्यासाठी वापरता येते. किंवा वड, पिंपळ, उंबर, पळस, बेल या वृक्षांच्या वाळलेल्या काटक्या पेटवून त्यांवर गोवऱ्यांचे तुकडे ठेवून अग्नी प्रज्वलित करावा.

**समय**–या हवनासाठी सूर्यास्त व सूर्योदय या दोन वेळा प्रशस्त मानलेल्या आहेत. या संधिकालात वैश्विक किरणांच्या पृथ्वीवरील वर्षावात काही बदल होत असतो. त्याचा परिणाम होऊ नये म्हणून विशिष्ट वेळेवर आहुती देणे आवश्यक असते.

**आहुती**–पाच बोटांच्या चिमटीत घेता येतील इतकेच तांदूळ एका आहुतीसाठी पुरतात. असडी तांदुळाचे अखंड दाणे निवडून घेऊन त्यांना गाईचे तूप लावून एका पात्रात ठेवतात. मग चित्त एकाग्र करून व मंत्र म्हणून 'स्वाहा' म्हणताना आहुती देतात. प्रत्येक वेळी दोनच आहुती द्यायच्या असतात.

**मंत्र**–आहुती देताना वेगवेगळे मंत्र म्हणतात, ते असे–
सूर्यास्ताच्या वेळी पहिली आहुती देताना,

**अग्नये स्वाहा, अग्नये इदं न मम।**
हा मंत्र व दुसरी आहुती देताना
**प्रजापतये स्वाहा, प्रजापतये इदं न मम ।**
हा मंत्र म्हणतात.



सूर्योदयाच्या वेळी पहिली आहुती देताना
**सूर्याय स्वाहा, सूर्याय इदं न मम।**
हा मंत्र व दुसरी आहुती देताना
**प्रजापतये स्वाहा, प्रजापतये इदं न मम।**
हा मंत्र म्हणतात.

मंत्रोच्चार अगदी सावकाश किंवा जलद न करता तो लय-बद्ध करायचा असतो. मंत्र मनात किंवा फार मोठ्याने म्हणू नये. या मंत्रांमुळे उत्पन्न होणाऱ्या कंपनांचा प्रभाव वातावरणा-वर व मनावरही अपेक्षित असतो. या अग्निहोत्रातील गोमय, अग्नी, मंत्र, संधिकाल आणि विशिष्ट हवनीय द्रव्ये यांच्या योगाने वायुमंडळ शुद्ध होते; त्यामुळे प्राणशुद्धी व मनःशुद्धी होते; उदासीनता व क्रोधादी विकार कमी होऊन मनः शांती लाभते.

नव्याने अग्निहोत्र सुरू करताना ते प्रथम सायंकाळी करावे व मग सकाळी करावे. अग्निहोत्राचे स्थान स्वच्छ असावे आणि आरंभ करण्यापूर्वी शरीरशुद्धीही करावी.

आहुती देण्यापूर्वी अग्नी पूर्ण प्रज्वलित (निर्धूम) होऊ द्यावा. आहुती दिल्यानंतर अग्नी विझवू नये. तो आपोआप शांत होऊ द्यावा. त्यानंतर पात्रात राहिलेली रक्षा जमा करून ठेवावी. फळाफुलांची रोपे किंवा शेतांतील पिके यांसाठी तिचा पुष्कळ उपयोग होतो.

हे अग्निहोत्र वेदप्रणीत पंचसाधनांपैकी एक आहे. ऋग्वे-दाच्या पहिल्या मंडलातील पहिल्या सूक्तात याचे बीज आढ-ळते, (ऋ. १.१.७) ते असे–

**उपत्वाग्ने दिवे दिवे । दोषावस्तर्धिया वयम् । नमो भरंत एमसि ।।**

अर्थ–हे अग्नी, प्रत्यही, रात्री व दिवसा, तुला अंतःकरण पूर्वक वंदन करीत आम्ही तुझ्याजवळ येतो.

वेदांची सूत्रमय रचना आणि त्यांतील व्यापक प्रतिपादन लक्षात घेता, या ऋचेतील आशय समजू शकेल. अग्नीच्या जवळ प्रत्येक दिवशी दोन वेळा अंतःकरणपूर्वक, बुद्धिपूर्वक जाण्यात त्याची नित्य उपासना चालवणे अभिप्रेत आहे.

ऋग्वेद, अथर्ववेद, तैत्तिरीय संहिता, तैत्तिरीय, आरण्यक,

शतपथ ब्राह्मण, गोपथ ब्राह्मण, इ. ग्रंथांत दोन विशिष्ट समयी हवन आणि मूलभूत धर्म यांविषयी उल्लेख आढळतो.

ही एखाद्या विशिष्ट धर्ममताची उपासना नसून, सर्व मानवमात्रांसाठी सांगितलेली आहे. दक्षिण अमेरिका, आफ्रिका, इराण, जपान, इ. देशांत ही उपासना शेकडो वर्षे प्रचलित आहे. सध्या भारतात या उपासनापद्धतीची बरीच केंद्रे स्थापन झालेली असून, जगातील सर्व देशांत या उपासनेचा खूप प्रसार झालेला आहे. पाश्चात देशांत या विषयाची मासिकेही निघालेली आहेत. हिंदू, मुस्लिम, ज्यू, पारशी, ख्रिस्ती कोणीही या व्रताचे पालन करू शकतो.

उपासना हा शब्द मुख्यतः भारतात वापरला जातो. अन्य देशांत अग्निहोत्राचा हा विधी एक वैज्ञानिक प्रयोग मानला जातो. विशेषतः चिली, पोलंड यांसारख्या देशांत, उपासना म्हणजे 'देवाचे काहीतरी' असे न मानता, वेदांनी विशुद्ध वातावरण प्रस्थापित करण्यासाठी सांगितलेला व आधुनिक वैज्ञानिक निकषांवर सिद्ध होऊ शकणारा मार्ग म्हणून त्याकडे पाहिले जाते. अनेक संस्था व संघटना या हवन–विधीचा शास्त्रीय पद्धतीने अभ्यास करून त्याच्या विशिष्ट परिणामांवर लक्ष केंद्रीत करीत आहेत. [श्री. स. के. कुलकर्णी]

## अद्‌भुत रामायण

एक संस्कृत रामायण. याला अद्‌भुतोत्तर कांड असे दुसरे नाव आहे. वाल्मीकी व भारद्वाज यांच्या संवाद–स्वरूपात या रामायणाची रचना झाली असून, त्यात सत्तावीस अध्याय आहेत.

नारद व पर्वत यांच्या शापामुळे विष्णूने रामावतार धारण केला आणि अंबरीषाची श्रीमती नामक कन्याही त्यांच्या शापामुळेच पृथ्वीपुत्री झाली. जनकाने तिचे पालन केले. राक्षसाने तिला पळवून नेले, हाही शापाचाच एक भाग होता, असे सूचित केले आहे, (अ. रा. ४.५६.६२). एकदा लक्ष्मीने नारदाचा अपमान केला त्याचे फल म्हणून ती मंदोदरीची कन्या सीता झाली (अ.रा. ६.१५.१६). अशीही एक कथा या ग्रंथात आहे.

प्रस्तुत रामायणात परशुरामाच्या तेजोभंगापासून रावण-वधानंतर अयोध्या-प्रवेशापर्यंतच्या घटना संक्षेपाने सांगितल्या आहेत. रामाने परशुरामाला (अ. ९) आणि सीता हरणानंतर हनुमंताला आपले विष्णुरूप दाखविले, (अ. १०), या यातील विशेष घटना होत. रामाची व हनुमंताची ऋष्यमूक पर्वतावर भेट झाली असता, रामाने या भक्तोत्तमाला सांख्ययोग, भक्तीचे तत्त्वज्ञान विशद करून सांगितले (अ. रा. ११.१५).

अद्‌भुत रामायणाच्या अंतिम भागावर देवी–माहात्म्याची छाप पडली आहे. पुष्करनिवासी सहस्रमुख रावणाने इंद्रादी देवांना कैदेत टाकले होते. त्यांची मुक्तता करण्यासाठी राम सीतेला घेऊन त्याच्यावर चालून गेला; पण रावणाने रामाच्या सैन्याचा विध्वंस केला आणि त्याचा वधही केला. ते पाहून सीतेने विक्राळ रूप धारण केले व ती रावणाबरोबर युद्ध करू लागली. युद्धात तिने रावणाचे शिर कापून नृत्याला प्रारंभ केला. घोरकाली, महाबला जानकीच्या नृत्यामुळे सारी सृष्टी संकटात सापडली. सीतेने आपले घोर रूप टाकून नृत्य संपवावे म्हणून देवांनी तिला विनंती केली. रामाचा वध झाला असल्यामुळे सीतेने देवांची विनंती मानली नाही. अखेर ब्रह्मदेवाने रामाला जिवंत केले. मग सीतेने नृत्य थांबविले. नंतर तिने आपले पूर्वरूप धारण करून रामासह ती पुष्पक विमानातून अयोध्येला परतली.

अद्‌भुत रामायणातील हा कथाभाग जैमिनी भारताच्या आश्रमवासपर्वातील कथानकावर आधारित आहे, असे काही पंडितांचे मत आहे.

या संस्कृत ग्रंथाच्या आधारे आसामी व बंगाली भाषांतही अशा कथा लिहिल्या गेल्या आहेत. [रा. क.; श्रीअद्‌भुत रामायण–भाषांतरकार श्री. विष्णुशास्त्री बापट, १९१०]

## अनंत

(इ. स. चे १८ वे शतक) एक मराठी कवी. हा जातीने विश्वकर्मा सोनार असून, मराठवाड्यातील परभणीचा रहिवासी होता. याच्या वडिलांचा व्यवसाय कापड विक्रीचा होता. रामानंद नामक एक विरक्त सत्पुरुष पुसद नदीच्या वाळवंटात खेचरी मुद्रा लावून बसला असता, अनंत कवीने त्याला पाहिले. अनंताची वृत्ती मूलतःच श्रद्धाळू असल्याने व रामानंदाठायी त्याला धगधगीत वैराग्याचा आढळ झाल्याने तो रामानंदाला शरण गेला. रामानंदानेही त्याचा भक्तिभाव जाणून त्याला गुरुदीक्षा दिली. पुढे गुरुकृपेने अनंताला कवित्वस्फूर्ती झाली. त्याने भक्तरहस्य, जीवन्मुक्त माधवदासी, शिल्पशास्त्र आणि फाल्गुन माहात्म्य असे पाच ग्रंथ लिहिले असून, ते यवतमाळ येथील शारदाश्रमाच्या हस्तलिखित ग्रंथ संग्रहालयात आहेत. यांपैकी भक्तरहस्य हा ग्रंथ ३२ अध्यायांचा आणि ४८५५ ओव्यांचा असून, त्यांत ब्राह्मण, सोनार, कुणबी, इ. अठरा पगड जातीतील भक्तांची चरित्रे आहेत. अनंत कवीच्या या ग्रंथामुळे बऱ्याच अज्ञात भक्तांची चरित्रे प्रथमच वाचावयास मिळतात.

विदर्भातील दारव्हा गावी अनंत कवी मरण पावला. तिथेच त्याची समाधी आहे. [म. वा. को. १–संपा. गं. दे. खानोलकर]

## आंतर-भारती

सर्व भारतीय जनांमध्ये एकत्वाची भावना निर्माण व्हावी आणि अखिल भारतात बंधुभावाचे वातावरण प्रसृत व्हावे, हे सानेगुरुजींचे एक स्वप्न होते. त्यांनी या आपल्या कल्पनेचा 'आंतर-भारती' या नावाने प्रचार सुरू केला होता. त्यांच्या निधनानंतर त्यांच्या मित्रमंडळींनी त्यांच्या कल्पनेला मूर्तरूप देण्यासाठी 'आंतर-भारती' या नावाची संस्था स्थापन केली. गुरुदेव रवींद्रनाथ ठाकुर यांच्या विश्वभारतीचा सांस्कृतिक समन्वयाचा आदर्श सानेगुरुजींच्या समोर होता. मात्र विश्वभारती ही संस्था अखिल विश्वाच्या एकात्मतेसाठी स्थापन झाली होती; व आंतर-भारती ही संस्था केवळ भारताच्या एकात्मतेसाठी आहे. जगातील सर्व मानवांचे सांस्कृतिक संघटन विश्वत्वाच्या आधारे करावे, हा विश्व-भारतीचा उद्देश होय. आंतर-भारतीची जीवनविषयक तात्त्विक दृष्टी निराळी नाही. मात्र भारतीय गणराज्याच्या घटक राज्यांमध्ये सांस्कृतिक सहजीवन निर्माण करणे, हे आंतर-भारतीचे मुख्य कार्य होय.

भारतीय गणराज्य हे भिन्न भिन्न प्रादेशिक घटक राज्यांचे बनलेले आहे. भारतीय समाजाच्या विकासात या विविध घटकांचे एकत्व दिसून येते. प्रादेशिक भेद असले तरी, भारतीयत्व सर्वत्र अभिन्नच आहे. म्हणूनच 'अविभक्त विभक्तेषु' अशी आंतर-भारतीची दृष्टी आहे. प्रादेशिक भाषा हे प्रत्येक घटकाचे वेगळेपण दर्शविणारे लक्षण आहे. भारतातील सुशिक्षितांना भारतीय भाषांतील साहित्याची आणि कलांची व्यवस्थित माहिती करून देण्याचे काम आंतर-भारतीने अंगीकारले आहे.

अखिल भारताच्या सर्व घटक राज्यांतील प्रमुख शहरांत आंतर-भारतीची केंद्रे स्थापन करण्यात आली आहेत.

आंतर भारती या संस्थेचे उद्देश :—

(१) भारताच्या सर्व प्रदेशांतील सर्व नागरिकांत परस्पर-प्रेम व एकात्मता निर्माण करणे, आणि त्यांचे संवर्धन करणे. त्यासाठी (२) राष्ट्रप्रेम, लोकतंत्र, समता, मानवता, जाति-धर्मातील नागरिकत्व व विज्ञानाभिमुखता या कल्पनांची जोपासना करणे.

हे उद्देश साधण्यासाठी आंतर-भारतीने जे विविध कार्यक्रम हाती घेतले आहेत, ते असे— सर्व राज्यांतील प्रमुख भाषा व त्यांचे साहित्य, चित्र, शिल्प, नृत्य, नाट्य, इ. कला, सामाजिक संस्था, यांचा परस्पर परिचय व्हावा म्हणून अभ्यासवर्ग, श्रम शिबिरे, व्याख्याने, भारत-दर्शन-सहली, रक्तदान, ग्रंथ-प्रकाशन, पत्रिका, विद्यालये, इ. साधनांचा उपयोग. पाठशाला-प्रकल्पात निरनिराळ्या वर्गात निरनिराळ्या प्रदेशांतील भाषा व चालीरीती यांचा प्रत्यक्ष प्रयोग करण्याची योजना आहे. युवक स्नेह-संमेलने, सांस्कृतिक सहयोग याचाही अवलंब केला जातो. [ आचार्य स. ज. भागवत— जीवन-चिन्तन (लेख-संग्रह), १९५८, श्री. यदुनाथ थत्ते, पुणे ]

## आत्मारामस्वामी

(इ. स. १८ वे १९ वे शतक) एक रामदासी कवी. याचे मूळ नाव तिप्पण्णा असे होते. याच्या वडिलांचे नाव निर्वाणीपंत व आईचे उमा होते. हा नाघोरचा राहणारा. योगायोगाने हा आपचंद मठपती रामचंद्रबुवा या समर्थसंप्रदायी सत्पुरुषाच्या सहवासात आला आणि त्यांचा शिष्य बनला. हा समर्थ रामदास— कल्याण स्वामी— शिवराम— रामचंद्र— आत्माराम अशी आपली परंपरा सांगतो. सांप्रतच्या आंध्रप्रदेशातील येक्केहाळी या गावी याचा मठ आहे. हा गृहस्थाश्रमी असला तरी, याला संतती नव्हती. दासविश्रामधाम नामक, समर्थांचे चरित्र वर्णन करणारा बृहद्ग्रंथ याने रचला असून, तो समर्थसंप्रदायात फार मान्यता पावला आहे. या ग्रंथाची अध्याय संख्या १२१ असून, ओवी-संख्या १६३०२ एवढी आहे. यात समर्थ चरित्र कथनाबरोबर समर्थांची व अन्य अनेक साधु-संतांची पदे, अवतरणे, सुभाषिते, समर्थसंप्रदायविषयक माहिती संकलित केली आहे. ग्रंथाच्या अशा या सर्वसमावेशक स्वरुपामुळे समर्थभक्त देवांनी त्याला ' रामदासी संप्रदायाचा विश्वकोश ' म्हटले आहे. या खंडप्राय ग्रंथाशिवाय पदपदांतरे, अभंग, स्फुट प्रकरणे, इ. बरीच कविता आत्माराम स्वामीने रचली आहे.

याची समाधी येक्केहाळीला आहे. [ म. वा. को. १ ]

## आनंदी देवी

कर्नाटकात गुलबर्ग्यापासून १६ मैल अंतरावर आळंद या गावी या देवीचे स्थान आहे. आळंदी किंवा आनंदी नामक देवी या नगराची अधिष्ठात्री देवता होती आणि तिच्यामुळेच त्या नगराला आळंद हे नाव मिळाले. तुकारामांचे परात्पर गुरू राघव चैतन्य यांच्या समाधीच्या आवारातच सोमेश्वर व आनंदी देवी यांची मंदिरे आहेत. मात्र त्या मंदिरातील आनंदी देवी आळंदपासून दीड मैलावर होन्नहळी या गावी उपेक्षित अवस्थेत पडलेली आहे. स्थानिक लोक तिला यल्लमा या नावाने ओळखतात. तिच्याविषयी अनेक दंतकथा प्रचलित आहेत. तिथे तिची मूर्ती वाळूत पालथी पडलेली असून, लोक तिच्या पार्श्वभागाचीच पूजा करतात. पाहा— आळंद [ लज्जागौरी ]

## उछारल

केरळातील एक 'लोकोत्सव. हा उत्सव तिथले शेतकरी देवीच्या म्हणजेच भूदेवीच्या रजोदर्श-

नाचा म्हणन साजरा करतात. शेतीचा हंगाम संपल्यावर मकरम् (जानेवारी–फेब्रुवारी) महिन्याच्या अंती हा उत्सव होतो. उत्सवाच्या पहिल्या दिवशी धान्याच्या कोठारांची दारे काटे व केरसुण्यांचे फड लावून बंद करतात. पुढचे तीन दिवस ती उघडत नाहीत. या काळात धान्य विकणे बंद असते; त्याचप्रमाणे घर, आंगण, बागा यांचीही झाडझूड, शिपण–सारवण बंद असते. शेतीच्या अवजारांना तर स्पर्शही करीत नाहीत. चौथ्या दिवशी भगवती भूदेवी शुद्ध झाल्यानंतरच धान्यागारे उघडतात आणि टोपलीभर पाने शेतात नेऊन ती खतात मिसळतात. एवढे झाल्यावर शेताची भाजणी होते. वल्लुवनाडू तालुक्यातील चेरप्पाशेरी व शोरनूर भागात हा उत्सव विशेष समारंभपूर्वक साजरा केला जातो. [ लज्जागौरी ]

**उद्धव** (इ. स. १६२७–१७१०) एक रामदासी कवी. हा समर्थांचा प्रथमशिष्य होय. नाशिकजवळचे दशकपंचक हे याचे मूळ गाव. याचे आडनाव दशपुत्रे. याच्या आईचे नाव उमाबाई व वडिलांचे सदाशिव असे होते. बालवयापासूनच उद्धवाला समर्थसहवास लाभला. समर्थांचा त्याच्यावर अपार लोभ होता. समर्थांचे शिष्यत्व प्राप्त झाल्यावर टाकळीमठाचे सूत्रसंचालन उद्धवाकडे आले. पुढे इंदुरबोधन येथे मठ स्थापल्यावर त्या मठाचे व्यवस्थापनही समर्थांनी उद्धवावरच सोपवले सांप्रतचे मनमाड–हैद्राबाद मार्गावरील निजामाबाद हेच तेव्हांचे इंदुरबोधन होय.

अनेक स्फुट प्रकरणे, पदपदांतरे, श्लोक, इ. विविध स्वरुपाची कविता उद्धवाने रचली असून, ती त्याच्या उत्कट गुरुभक्तीमुळे रसाळ व हृदयस्पर्शी झाली आहे. समर्थांचा अत्यंत आवडता असल्यामुळेच त्यांच्या निर्याणानंतर त्याला त्यांचे विरहदुःख फार जाणवले. शिवाय, अन्य समर्थशिष्यांनी त्याला परोपरीने त्रास दिल्यामुळेही तो खूप व्यथित झाला. त्याच्या या सर्व वेदनांचे पडसाद त्याच्या कवितेत जागोजाग उमटलेले दिसतात. याने एक समर्थचरित्र लिहिले असल्याचेही उल्लेख अन्यत्र सापडतात; तथापि तो ग्रंथ अद्याप उपलब्ध झालेला नाही. याने आपली बरीच कविता शिवराम या टोपणनावाने लिहिली आहे. [ म. वा. को. १ ]

**उद्धवगीता** यादवांचा नाश झाल्यानंतर श्रीकृष्णही निजधामाला जाणार, या कल्पनेने त्याचा परम प्रिय मित्र उद्धव याला अतिशय दुःख झाले. श्रीकृष्ण सरस्वतीच्या तीरावर एका वृक्षाखाली बसलेला असताना उद्धवही तिथे उपस्थित झाला. तेव्हा श्रीकृष्णाने त्याला सर्वश्रेष्ठ आत्मज्ञान सांगितले. त्यात आत्मानात्मविवेकाचा उपदेश केला आहे. त्यालाच उद्धवगीता किंवा अवधूतगीता असे म्हणतात (भाग. पु. ११.७–२९). [ प्रा. च. को. ]

**एरण** मध्य प्रदेशात, सागर जिल्ह्यातील सुरई तालुक्यात हे स्थान आहे. पुराणवस्तू संशोधनाच्या दृष्टीने हे ठिकाण फार उपयोगी ठरले आहे. कारण या ठिकाणी इ. स. पू. तीनचार शतकांपासूनच्या काळातली प्राचीन नाणी सापडली आहेत. त्याचप्रमाणे तिथे प्राचीन देवालयांचे भग्नावशेष; विष्णू, वराह, नरसिंह इ. देवतांच्या प्रचंड मूर्ती, अनेक प्राचीन शिलालेख व स्तंभलेख आढळतात. त्यांत प्राचीन गणराज्यांची नाणी, सातवाहनकालीन व गुप्तकालीन शिलालेख व शिल्पे यांचा समावेश होतो. तिथे सापडलेल्या काही नाण्यांवर या नगराचे ‘एरिकिण’ हे प्राचीन नाव प्राकृत भाषेत लिहिलेले आहे.

सुमारे शंभर वर्षांपूर्वी जनरल कनिंगहॅमने या ठिकाणाची पाहणी करून, तिथे सापडलेल्या अवशेषांचे वर्णन प्रसिद्ध केले. त्याला बीना नदीच्या काठी एका शिवलिंगावर कोरलेला लेख आढळला. हा लेख इ. स. ५१० या वर्षातला आहे. त्याच शिवलिंगाच्या खाली एका स्तंभावर असलेला दुसरा लेख सुमारे तीस वर्षांपूर्वी सापडला. तो स्तंभ अष्टकोनी, सोळाकोनी आणि शेवटी गोल असून, अष्टकोनी भागावर तीन लेख आहेत. प्रस्तुत लेख संस्कृत भाषेत असून, तो शकवर्शी श्रीधरवर्मा याचा आहे. म. म. मिराशी यांच्या मते तो इ. स. ३६५ मध्ये कोरलेला असावा. या लेखात सत्यनाग आपणास ‘महाराष्ट्र’ म्हणजे महाराष्ट्रीय म्हणवितो. महाराष्ट्र हे देशवाचक नाव ज्या ग्रंथांत आलेले आहे, ते ग्रंथ इ. स. च्या ५ व्या ६ व्या शतकांतले आहेत. त्यामुळे श्रीधरवर्मा याच्या प्रस्तुत लेखातील महाराष्ट्राचा निर्देश इ. स. च्या ४ थ्या शतकातला म्हणजे कालक्रमाने पहिला ठरतो. (सं. मु. १; म. प्र. पु. रू.)

**एर्नाकुलम** केरळमधील एक प्रसिद्ध नगर; जुन्या कोचिन संस्थानाची राजधानी. हे नगर त्रिवेंद्रमपासून २२२ कि. मी. अंतरावर, वेंबनाड नामक विशाल सरोवराजवळ वसलेले आहे. या नगराच्या मध्यभागी एक शिवमंदिर आहे. त्या मंदिराविषयी एक आख्यायिका सांगतात, ती अशी–हिमालयात कुलू मुनी व त्यांचा शिष्य देवलन यांचे वास्तव्य होते. एके दिवशी देवलन याने एका नागाच्या पिल्लाला ठार मारले. ते नागाचे पिल्लू दिव्य योनीतले असल्यामुळे कुलू मुनीला क्रोध आला व त्याने देवलनाला

शाप दिला. त्यामुळे तो नागमुखी झाला, व त्याला नागऋषी हे नाव मिळाले. तो शापमुक्तीसाठी मंदार पर्वतावर व तिथून बगुलारण्यात गेला. तिथे त्याला एक शिवलिंग आढळले. एक नाग त्याचे रक्षण करीत होता. ते शिवलिंग घेऊन नागऋषी रामेश्वरला गेला. परतीच्या मार्गावर एका जागी त्याने शिवलिंग जमिनीवर ठेवले. पण मग ते त्याला उचलता येईना. तिथेच तो शापमुक्त झाला. त्याच ठिकाणी शिव–पार्वतींची मूर्तीही भूमीतून वर आली. त्या जागेला ऋषिनागकुलम असे नाव मिळाले. तिथे मग काही लोकांनी एक शिवमंदिर बांधून त्यात लिंग व मूर्ती यांची स्थापना केली. हे शिवलिंग अर्जुनाने निर्माण केले होते, असे म्हणतात.

जानेवारी महिन्यात इथे आठ दिवस वार्षिक उत्सव साजरा केला जातो.

शिवमंदिराजवळ एक गणेशमंदिर व एक हनुमानकोइल आहेत. नगरात श्रीकृष्ण, देवी व मरिअम्मा यांचीही मंदिरे आहेत. गौड सारस्वत ब्राह्मणांचे एर्नाकुलम थिरुमल देवस्वम नावाचे वेगळे देवालय आहे.

कॅथॉलिक पंथाची अनेक प्राचीन चर्चे इथे आहेत. सेंट मेरीचे कॅथेड्रल इ. स. १११२ साली स्थापन झालेले आहे.

सुब्रमण्य स्वामीचे एक मंदिर १५ वर्षांपूर्वी बांधण्यात आले आहे. त्या पूर्वी इथे एक शीख गुरुद्वाराही निर्माण झालेला आहे.

ओणमच्या उत्सवात इथे होणाऱ्या नौकानयन स्पर्धा अत्यंत प्रेक्षणीय असतात. [ एर्नाकुलम् गॅझे. ]

**ओदंतपुरी** एक प्राचीन बौद्ध क्षेत्र. हे स्थान विहारमध्ये पाटणा जिल्ह्यात विहार–शरीफ शहरापासून जवळच असावे, असे अनुमान केले जाते. तिथे एक टेकाड असून त्यात एका बौद्ध महाविहाराचे भग्नावशेष आहेत, असे म्हणतात. बंगालच्या पाल वंशाच्या राजवटीत इ. स. ८ व्या शतकाच्या पूर्वार्धात हा विहार बांधला गेला. पाल राजांनी त्यासाठी विपुल द्रव्य खर्च केले आणि तिथल्या पंडितांच्या योगक्षेमासाठीही पुष्कळ द्रव्य दिले.

तिबेटातील पहिला बौद्ध विहार सम–ये (संस्कृत-अचिंत्य विहार) ओदंतपुरी येथील विहाराप्रमाणे इ. स. ७४९ मध्ये बांधला गेला. त्या काळात ओदंतपुरीच्या विहारात अनेक बौद्ध महापंडित वास्तव्य करीत होते.

दीपंकर श्रीज्ञान (अतिश) हा महापंडित ओदंतपुरीच्या विहारात दोन वर्षे राहिला होता. तिथे त्याने धर्मरक्षित या महान आचार्याकडून ज्ञान संपादन केले. ओदंतपुरीचा महासांघिक शीलरक्षित याने त्याला दीक्षा दिली व दीपंकर हे नाव दिले. महायान पंथाचा प्रमुख अभयकरगुप्त याने इथल्या विहारात राहून अनेक ग्रंथांचे तिबेटी भाषेत अनुवाद केले.

ओदंतपुरीच्या विहारात १२००० भिक्षू होते, असे एका तिबेटी कथेत सांगितले आहे. तिथे एक प्रचंड ग्रंथालयही होते. मात्र इ. स. च्या ११ व्या शतकाच्या अखेरीस त्या विहाराचा ऱ्हास झाला असावा. इ. स. ११९९ च्या सुमारास बख्तियार खलजीचा मुलगा इख्तियार याने त्याचा पूर्ण नाश केला. [ वि. ए. इं. ]

• • •



## भारतीय संस्कृतीचे वैशिष्टय

धर्म, संस्कृती आणि जीवन या तीन्ही क्षेत्रांचा विस्तार आणि व्यापकता समान आहे. या तीन्हींचा आशय एकच; आणि तो म्हणजे सर्व अंगांनी अंतर्बाह्य विकसित झालेले मानव्य! व्यक्तित्व आणि मानव्य या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. भारतीय संस्कृती या दोन्ही अंगांचा परिपोष करण्यासाठी प्रयत्नशील आहे. लौकिक अभ्युदयाची साधना करता करताच निःश्रेय-साची सिद्धी प्राप्त करणे आणि आधिभौतिकाचा योग्य तो मान राखून आध्यात्मिक मूल्यांची प्रतिष्ठापना करणे, हे भारतीय संस्कृतीचे उद्दिष्ट आहे. म्हणून भारतीय संस्कृती कर्माला प्राधान्य देते; त्या कर्मात जिव्हाळा निर्माण व्हावा, म्हणून भक्तीचा आधार घेते आणि त्या कर्मात उत्साहाचा झरा सतत वाहत राहावा, म्हणून कलेलाही मान्यता देते.

भारतीय संस्कृति कोश मंडळ, पुणे

